सार्थ

# ज्ञानेश्वरी

Jnānesvari with Marathi Tr.

कठीण शब्दांचा कोश, ऑव्यांची सूची, विषयांची सूची, भिन्नपाठांची चर्चा, ज्ञानेश्वरींतील कथानकें व ज्ञानेश्वरीच्या अभ्यासास अत्यंत उपयुक्त अशी प्रस्तावना.







संपादक
शंकर वामन दांडेकर
Shankar Vaman Dandekar



आषाढ शु. एकादशी
शके १८७५

दिनांक २२ जुलै
सन १९५३

# प्रकाशकाचें पान

- प्रा. सोनोपंत दांडेकर यांच्या सहकार्यानें १९४७ सालीं मी जेव्हां प्रसाद मासिक काढलें–तेव्हां कल्पनाहि नव्हती कीं, त्या प्रकाशनांतून आजचा सुदिन उगवणार आहे. प्रा. सोनोपंत दांडेकरांनीं संपादन केलेली "ज्ञानेश्वरी" माझ्या प्रसादप्रकाशनमार्फत आज प्रसिद्ध होत असून लोकांकडून या ग्रंथाचें आगाऊच अभिनंदन होत आहे; पण तरीहि मोकळ्या मनानें लिहावेंसें वाटतें कीं, वैयक्तिक आयुष्यांत आजचा दिवस माझ्या भाग्याचा आणि वैभवाचा आहे. पण तो माझ्या प्रकाशन-वैभवाचा कळस मात्र वाटत नाहीं. कारण प्रा. सोनोपंत दांडेकरांच्याच सहकार्यानें 'महाराष्ट्र वाङ्मयांत' आणखींहि मी मोलाची भर टाकूं शकेन असें का कोणास ठाऊक, पण मला निश्चित वाटत आहे !

- मी मोठमोठीं कामें अंगावर घेतों व ती पारहि पडतात. यावरून अनेकांना वाटतें कीं 'मी फार श्रीमंत आहें' पण तें खरें नाहीं. माझ्यावर लोभ करणारे माझे स्नेही–आणि सुमारें हजारावर ग्राहकांनीं आगाऊ ग्राहक होऊन दाखविलेली मनाची श्रीमंती–यावरून मी श्रीमंत वाटतों आणि ही श्रीमंती अलौकिक नाहीं, असें कोण म्हणेल ? जी श्रीमंती संभाळावयाचा त्रास नाहीं–पण हवी तेव्हां वापरतां येते–माझ्या सारख्याला अशीच श्रीमंती हवीशी वाटते.

- प्रतिभा प्रेसचे श्री. नानासाहेब जोशी व आण्णासाहेब लोखंडे, कामाचा त्रास न मानणारे श्री. काळे, पुरोहित, देशपांडे, पंडित; प्रसादचे ऋणानुबंधी चित्रकार श्री. जि. भि. दिक्षित, जी. डी. गोंधळेकर, नवे ऋणानुबंधी चित्रकार दलाल, तीन रंगी चित्राचे ठसे व छपाई करून देणारे के. जोशी ब्लॉक मेकर्सचे जोशी बंधु, भारत प्रेसचे बाबुराव गुर्जर, डेक्कन प्रेसचे यशवंतराव गद्रे, ब्लॉकमेकर खाडीलकर, माझी घाईचीं कामें आस्थेनें व वेळेवर करून देणारे जे. विनायक कंपनीचे विनायकराव जोग आणि अनेक. त्यांच्याबद्दल हार्दिक कृतज्ञता. त्यांचे आभार मानून इतक्यांत मोकळें व्हायला मला सवड नाहीं. कारण त्यांच्याकडून अद्याप मला पुष्कळ कामें करून घ्यावयाचीं आहेत.

- आशा आहे, माझें पुढील महत्त्वपूर्ण प्रकाशन म्हणजे प्रा. सोनोपंत दांडेकरांनीं संपादन केलेली सार्थ तुकारामाची गाथा राहील !

बुधवार, आषाढी एकादशी,
शके १८७५

सर्वांचा कृपाभिलाषी
यशवंत गोपाळ जोशी

# थोडा पूर्वेतिहास

वैकुंठवासी गुरुवर्य जोगमहाराज यांनीं श्रीतुकाराममहाराजांचा सार्थ 'गाथा' लिहून प्रसिद्ध केल्यानंतर ज्ञानेश्वरीहि सार्थ प्रसिद्ध करण्याचें ठरविलें; त्याप्रमाणें पहिले दोन अध्याय लिहून काढले; पण तें काम पूर्ण होण्याच्या आंतच गुरुवर्यांचें देहावसान झालें. त्यांचें हें राहिलेलें काम त्यांची शिष्यमंडळी कै. ह. भ. प. बंकटस्वामी कै. ह. भ. प. लक्ष्मणबोवा, कै. ह. भ. प; मारुतीबोवा श्री. पांडुरंगशर्मा व प्रा. सोनोपंत दांडेकर यांनीं पूर्ण करण्याचें ठरवून सुमारें तीस वर्षांपूर्वी गुरुवर्यांचे परमस्नेही कै. ती. माधवराव देशमुख यांच्या घरीं त्यांच्या सहाय्यानें या कामास सुरुवात करून पूर्ण केलें व तयार झालेला ज्ञानेश्वरीग्रंथ श्रेष्ठ गुरुबंधु कै. ह. भ. प. बंकटस्वामी यांच्या नांवानें आषाढ शुद्ध एकादशीस ( शके १८४९ ) प्रसिद्ध केला. त्या ग्रंथप्रसिद्धींत जो फायदा झाला, तो गुरुवर्य जोग महाराजांनीं श्रीक्षेत्र आळंदी येथें काढलेल्या वारकरी शिक्षणसंस्थेस दिला गेला आहे. याहि प्रतीचा खर्चवेंच वजा जातां जो फायदा शिल्लक राहील तो वारकरी शिक्षणसंस्थेसच मिळणार आहे.

बंकटस्वामींच्या नांवानें प्रसिद्ध झालेली प्रत आज अनेक वर्षे दुर्मिळ आहे, तेव्हां त्याची जशीच्या तशीच दुसरी आवृत्ति काढण्यापेक्षां इष्ट ते फेरफार व अधिक योग्य तो मजकूर घालून ही प्रत तयार केली आहे. ज्ञानेश्वरी संशोधनकार पैठणकर श्रीएकनाथ यांच्या समाधिकालानंतर तीस वर्षांतच त्यांच्या घरीं बसून उतरविलेली प्रत मिळाली होती. तिच्यावरुन उतरलेली प्रत आधारादाखल घेऊन बंकटस्वामींची प्रत तयार केली होती. त्यांनीं छापतांना ती प्रत जशीच्या तशी छापलेली दिसत नाहीं; पण या आवृत्तींत ती जशीच्या तशी फक्त अक्षरें छापण्याची जुनी पद्धत सोडून छापली आहे. शब्दांच्या विभक्तीचीं रूपें बहुतेक मुळांतल्यासारखीं ठेवलीं आहेत. एवढेंच नव्हे तर श्लोक व त्याखालील ओंव्या यांचा जो क्रम मूळ पोथींत आहे, तोच या आवृत्तींत कायम ठेवला आहे. माडगांवकरांची प्रत आणि ही प्रत बहुतेक जुळती आहे. बंकटस्वामींच्या प्रतींत जुनी प्रत, मूळ म्हणून घेतली असली, तरी श्लोक व त्यावरील ओंव्या याबाबत कुंटे, साखरे यांच्याच प्रतीचें अनुकरण केलें. मुळांत दोन अथवा तीन श्लोक एकत्र करून त्यावर ओंव्या लिहिलेल्या आढळून येत नाहींत. शक्यतोंवर प्रत्येक श्लोक वेगवेगळा घेऊन त्याखालीं ओंव्या दिल्या आहेत. नाथपूर्वकालीन राजवाड्यांची म्हणून जी प्रत प्रसिद्ध आहे, त्यांतहि असेंच आहे. या आवृत्तीकरितां मूळ घेतलेली प्रत नाथांच्या नंतर ६० वर्षांची असल्यानें व ती त्यापूर्वी ३० वर्षे लिहिलेल्या नाथगृहीं विद्यमान असलेल्या पोथीशीं तुलना करून छापली असल्यानें असें निखालस म्हणतां येईल कीं, हल्लीं कुंटे, साखरे, ढवळे वगैरे प्रचलित पोथ्यांतील श्लोक व ओंव्या यांचा अनुक्रम नाथकाळीं नव्हता, एवढेंच नव्हे तर नाथांच्या नंतर ६० वर्षे नव्हता. नंतर अर्थाच्या दृष्टीनें सुसंगत दिसण्याकरितां कोणीतरी क्रम तयार केला व तोच पुढें चालत आला.

ह. भ. प. बंकटस्वामींनीं कित्येक ठिकाणीं मूळ पोथींतील पाठाऐवजीं आपले परिचित असलेले कुंटे-साखरे प्रतींतील पाठ दिले होते. ओंव्यांचा पाठ एक व अर्थ एक असेंहि कांहीं ठिकाणीं झालें आहे. हें जो ओंवी व अर्थ तोलून सूक्ष्म दृष्टीनें बघेल, त्याच्या लक्षांत येईल. अशा प्रकारचें एक उदाहरण पहा. अध्याय पहिला ओंवी दोनमध्यें ओंवींत पाठ 'सकलार्थ मतिप्रकाशु' असा घेतला आहे व अर्थ 'सकळमति प्रकाश' असा पाठ घेऊन केला आहे. या पोथीमध्यें अर्थविसंगति शक्यतोंवर राहू न देण्याचा प्रयत्न केला आहे. मूळ पोथींत जसे पाठ आहेत तसेच घेऊन अर्थ दिला आहे. जेथें अर्थ लागत नाहीं तेथें तसें म्हटलें आहे व कित्येक ठिकाणीं 'भिन्नपाठ' हि दिले आहेत.

कुंटे वगैरेंच्या प्रतिप्रमाणें बंकटस्वामी-प्रतींत अध्यायाचा शेवटचा श्लोक संपला, कीं 'इतिश्रीमद्भगवद्गीतासु' वगैरे मंत्र शेवटीं दिला आहे व त्याच श्लोकावरील ओंव्या संपून अध्याय संपला कीं, 'इतिभावार्थदीपिकायां' वगैरे लिहिलेलें आहे. मूळ प्रतींत व नाथांच्या घरीं असलेल्या प्रतींत 'इतिभावार्थदीपिकायां' हा मंत्र नाहीं. इतर श्लोकांप्रमाणेंच शेवटच्या श्लोकाखालीं ओंव्या दिल्या आहेत व ओंव्या संपल्यावर 'इतिश्रीमद्भगवद्गीतासु' हा भाग दिला आहे. या मंत्रांत अध्यायांतील विषयाचें स्वरूप दाखविणारे जे शब्द आहेत, ते मुळांतील व बंकटस्वामींच्या प्रतींतील वेगवेगळे आहेत. स्वामींनीं याहि बाबतींत कुंटे, साखरे वगैरेंचेंच अनुकरण केलें आहे. पण

एकनाथी पोथींत तसें नाहीं. कित्येक अध्यायांचीं नामाभिधानें वेगळीं आहेत. तात्पर्य, प्रस्तुतची प्रत शब्द-लिखाणाची पद्धत जर सोडून दिली तर मूळ प्रती बरहुकुम छापली आहे.

कठीण शब्दांच्या कोशांतसुद्धां बऱ्याच नवीन शब्दांची भर घालून कोश विस्तृत केला आहे. ओव्यांचा अर्थ पाठाप्रमाणें फरक करून दिला आहे.

( १ ) प्रत्येक अध्यायाच्या आरंभीं अध्यायांतील ऑव्यांचा सारांश दिला आहे. कोणच्या ऑवीपासून कोणच्या ऑवीपर्यंत कोणचा विषय आहे तें दाखविणारे ऑव्यांचे आंकडेहि दिले आहे.

( २ ) प्रत्येक अध्यायांत असलेले भिन्न पाठ देऊन कांहींची चर्चाहि केली आहे.

( ३ ) विषयांची सूची दिली आहे. कीर्तनप्रवचनकार, ज्ञानेश्वरीचे अभ्यासु या सर्वांनाच तिचा उपयोग होईल.

( ४ ) या प्रतींत पौराणिक संदर्भ शोधून मुळांतील कथा दिल्या आहेत.

( ५ ) याशिवाय ज्ञानेश्वरीसंबंधित वेगवेगळ्या विषयांची चर्चा करणारी प्रदीर्घ प्रस्तावना अथवा उपोद्घात या प्रतीस जोडला आहे. ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी यांबद्दल आणखीं अनेक बाबतींत लिहिण्यासारखें आहे; पण तो या ग्रंथाचा विषय नव्हे. प्रत्यक्ष ज्ञानेश्वरी समजण्याकरितां वाचकांना अवश्य वाटेल तेवढेंच शक्य तितक्या विस्तारानें प्रस्तावनेंत चर्चिलें आहे आणि हें तर या प्रतीचें खास वैशिष्ट्य आहे.

---


# ऋणनिर्देश

- हा ग्रंथ तयार करतांना अनेक लोकांचें अनेक प्रकारांनीं सहाय्य झालें आहे. श्रीएकनाथ महाराजांचे वंशज पैठणचे जहागिरदार ह. भ. प. नरहरपंत यांनीं त्यांच्या घरीं असलेली जुनी पोथी वाचावयास दिली, कै. ह. भ. प. बंकटस्वामी यांच्या मठाचे मुख्य ट्रस्टी ह. भ. प. श्री. रामचंद्र जगताप उर्फ भागुजीबोवा यांनीं त्यांच्या संग्रहांत असलेली हस्तलिखित पोथी दिली, म्हणूनच जुने पाठ देऊन ही प्रत तयार करतां आली. श्रीक्षेत्र नेवासें येथील ट्रस्टी ह. भ. प. बन्सी बोवा व तेथील वकील श्री. छबुराव कुलकर्णी यांनीं नाथप्रत मिळवून दिली व नेवासें येथील खांबाचा फोटो पाठवून दिला.
- कै. डॉ. भडकमकर यांनीं या प्रतीचे प्रकाशनाकरितां वारकरी शिक्षणसंस्थेस सहाय्य केलें आहे.
- श्री नेऊरगांवकर चीफ् इंजीनीयर, पुणें कार्पोरेशन, ह. भ. प. नारायण मास्तर, ह. भ. प. गंगाधरपंत रिसबूड, ह. भ. प. शांताराम बोवा, श्री. रा. गो. पाटील, श्री. गणपतराव करंदीकर इत्यादींनीं विषयानुक्रमणिका, कोश, छापखान्याकरितां हस्तलिखित प्रत तयार करणें इत्यादि. श्री. त्र्यं. ग. बापट यांनीं हस्तलिखित वाचून अनेक उपयुक्त सूचना केल्या. श्री. प. स. देसाई यांनीं मुद्रितें तपासणें इ. कोश तयार करतांना श्री. शिवाजी भावे यांच्या कोशाचाहि उपयोग झाला आहे.
- सर परशुरामभाऊ कॉलेजचें ग्रंथालय, लोणावळा येथील कैवल्यधाम संस्थेचे स्वामी कुवलयानंद व सुपरिंटेंडेंट श्री. डॉ. शुक्ल यांनीं मुक्त हस्तानें ग्रंथ वापरण्यास दिले.

मी या सर्वांचे आभार मानावे कीं नाहीं हा त्यांच्या आमच्यांतील मतभेदाचा प्रश्न आहे. अद्याप एकमत होऊं शकलें नाहीं म्हणून येथें फक्त ऋणनिर्देश करून ठेवतों.

—शंकर वामन दांडेकर

# विषयानुक्रम

# चित्रानुक्रम

स्वानंदसुखनिवासी महाराज विष्णुबोवा जोग



जन्म : भाद्रपद वद्य १, शके १७८९ ]　　[ मृत्यु : माघ वद्य १, शके १८४१

# ::प्रस्तावना

## १. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें संक्षिप्त चरित्र.

महाराष्ट्र सारस्वताला ललामभूत ठरणाऱ्या श्रीज्ञानेश्वरी या ग्रंथाचे निर्माते श्रीज्ञानदेव यांचा जन्म पुण्यक्षेत्र आळंदी येथें शके ११९३ सालीं झाला. त्यांच्या वडिलांचें नांव विठ्ठलपन्त व मातोश्रींचें नांव रखुमाबाई. ज्ञानदेव हे विठ्ठलपन्तांचें दुसरें अपत्य. त्यांना एकूण चार अपत्यें झालीं. त्यांपैकीं सर्वांत वडील निवृत्ति, त्यानंतरचे ज्ञानदेव, नंतरचे सोपान व सर्वांत धाकट्या मुक्ताबाई. विठ्ठलपन्तांचें घराणें पवित्र, सदाचारसंपन्न म्हणून प्रसिद्ध. त्यांचे मूळ पुरुष, त्यांच्या पणजांचे पणजे हरिहरपन्त कुलकर्णी हे होत. ते शके १०६० च्या सुमारास आपेगांवचें कुळकर्णीपण पहात. ज्ञानेश्वरांचे पणजे त्र्यंबकपन्त यांची व गोरक्षनाथांची गांठ पडून त्यांना त्यांचा उपदेशहि झाला होता. ज्ञानदेवांच्या पूर्वी भगवत्‌भक्त असे प्रथम हेच झाले. ज्ञानदेवांचे आजोबा गोविंदपन्त व आजी नीराबाई या दोघांनाहि गहिनीनाथांनीं उपदेश दिला होता. ज्ञानदेवांचे वडील विठ्ठलपन्त हेच या दांपत्याला उतार वयांत झालेलें अपत्य.

ज्ञानदेवांच्या आईकडील घराणेंहि सदाचाराच्या बाबतींत प्रसिद्ध होतें. ज्ञानदेवांच्या मातोश्रींचे वडील सिद्धेश्वरपन्त कुळकर्णी. यांच्याकडे चाकण, आळंदी वगैरे चोवीस गांवांची कुळकर्णीपणाची वृत्ति होती.

विठ्ठलपन्तांना झालेलीं हीं चार अपत्यें, ज्या काळांत व परिस्थितींत जन्माला आलीं, ती खरोखरच लोकविलक्षण होती. दोन सदाचारसंपन्न, सत्त्वशील व ईश्वरविषयक भक्तींत आनंद मानणाऱ्या घराण्यांचा ईश्वरी इच्छेनुसार घडून आलेला संबंध होता तो. विठ्ठलपन्तांना बाळपणींच घरांतून शास्त्राध्ययनाचे धडे मिळाले होते. वेद, व्याकरण, काव्य यांचें पाठान्तर अल्पवयांतच होऊन ते निपुण शास्त्रवक्ते बनले होते. त्या काळच्या पद्धतीनुसार शास्त्राध्ययनाबरोबर अनुभवाचा फायदा मिळावा म्हणून देशपर्यटन करणें हें क्रमप्राप्तच होतें. त्यांत विठ्ठलपन्तांना मूळांतच त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या वैराग्याची जोड मिळालेली. साहजिकच वडिलांना वन्दन करून त्यांनी तीर्थाटनास सुरवात करून मोक्षविश्रांति जी द्वारका तिथें जाऊन श्रीकृष्णमूर्तीचें दर्शन घेतलें. तेथून पिंडारक, मालुका तीर्थ इत्यादि तीर्थांत पावन होऊन ते नाशिक जिल्ह्यांतील सप्तशृंगी पर्वतावर आले. तेथील कपालेश्वराची पूजा करून त्र्यंबकेश्वरास आले. कुशावर्तांत स्नान करून व ज्योतिर्लिंगाचें दर्शन घेऊन भीमाशंकर येथें येऊन पोंचले असतां त्यांस भीमानदी पाहून पंढरीची आठवण झाली व त्यांचें मन तिकडे ओढूं लागलें. पंढरीच्या वाटेवरच इंद्रायणीच्या तीरावर वसलेलें सिद्धेश्वराच्या देवतामुळें प्रसिद्ध असलेलें जुनाट शिवपीठ जें अलंकापूर तिथें ते आले. यात्रेकरूंची ये-जा तिथें नेहमींच असे. इंद्रायणींत स्नान करून सिद्धेश्वराच्या समोरील सुवर्ण अश्वत्थाखालीं ते नित्यनेम करीत असतां ज्ञानदेवांच्या मातोश्रींच्या वडिलांना त्यांचा तो तेजःपुंज चेहरा पाहून फार समाधान वाटलें. त्यांनीं त्यांना आग्रहानें भोजनास आपल्या घरीं नेलें व भोजनोत्तर गप्पांत त्यांच्या घरांतील माणसें कोण, घरांतील वृत्ति कोणती, तीर्थयात्रा करण्याचा हेतु वगैरे माहिती काढून घेतली. आपली विवाहाला उपवर झालेली कन्या रुक्मिणी हिला त्यांनीं हा वर मनांत योजून ठेवला. त्या दिवशीं त्यांनीं विठ्ठलपन्तांना घरींच रात्रीं ठेवून घेतलें व योगायोग असा कीं, त्यांना त्याच रात्रीं पंढरीनाथांनीं स्वप्नांत येऊन कन्या सालंकृत यांस द्यावी असें सांगितलें. प्रातःकाळीं विठ्ठलपन्तांस सिद्धेश्वरांनीं आपले पडलेलें स्वप्न सांगून आपला मनोदयहि स्पष्ट केला; पण आपण रामेश्वरास जात आहों, शिवाय याला मातापितरांची अनुज्ञा हवी म्हणून तसा आपणाला त्यांच्या कन्येचा अंगीकार करतां येत नाहीं असें विठ्ठलपन्तांनीं सांगितलें. त्यावर एक रात्र आपण इथें राहावें व तशी आज्ञा आपणांस झाल्यासच आम्हांला पदरांत घ्या, अशी सविनय व सौम्य शब्दांत सिद्धोपंतांनीं विनंति केली; आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं त्या रात्रीं तुळशीवृंदावनाजवळील ओट्यावर निजलेल्या विठ्ठलपन्तांस स्वप्न पडून त्यांत विश्वंभरानेंच—

* भक्ति आणि ज्ञान वैराग्य आवडी ।
बसती उघडी तुझ्या अंगीं ॥
मूर्तिमन्त चारी जन्म इच्या उदरीं ।
म्हणोनि स्वीकारीं आज्ञा माझी ॥
नामदेव महाराजांचे अभंग ८८९।१६।१७

असें सांगितलें. सकाळीं उठल्यावर तें स्वप्न त्यांनीं सिद्धेश्वरपन्तांस सांगून, होणार तें अटळ हें लक्षांत घेऊन त्यांच्या कन्येचा अंगीकार करण्याची तयारी दाखविली. लगेच जोशीबुवांना बोलावून घटित पहातांच छत्तीस गुण उतरतात असें आढळून आलें. परम समाधान पावलेल्या सिद्धोपन्तांनीं ज्येष्ठ मासीं सुमुहूर्त पाहून सालंकृत विधियुक्त कन्यादान केलें.

ज्येष्ठांत विवाह झाला. थोड्याच दिवसांत पंढरपुरास दिंड्या-पताका घेऊन जाणारे वैष्णवांचे भार विठ्ठलपन्तांच्या दृष्टीस पडतांच त्यांची पंढरी पहाण्याची इच्छा बळावली. त्यांनीं श्वशुरांजवळ तशी इच्छा दर्शवितांच त्यांना तर आनंदानें संमति मिळालीच पण खुद्द सिद्धेश्वरपन्तहि आपल्या मंडळीसह त्यांच्याबरोबर निघाले. सिद्धोपंताना हरिरंगांत तल्लीन झालेला जांवई मिळाल्यानें परम समाधान वाटलें. पंढरपुरीं पांडुरंगाचें दर्शन करून श्वशुरांच्या संमतीनें ते एकटेच रामेश्वरास गेले व आपला यात्रेचा संकल्प पुरा करून आळंदीस परत आले. तिथें आल्यावर स्वाभाविकच त्यांना आपल्या मातापितरांस भेटण्याची इच्छा होऊन त्यांनीं सिद्धोपंताजवळ तशी गोष्ट काढतांच सर्वच मंडळी आपेगांवला आली. विठ्ठलपंताचे वडील गोविंदपंत व मातोश्री नीराबाई, पुत्राची मार्गप्रतीक्षाच करीत होतीं. अशा स्थितींत अकस्मित मुलगा आला; इतकेंच नव्हे तर स्नुषेस घेऊन व्याही मंडळीसह आला हें पाहून त्यांचा आनंद गगनांत मावेना. सिद्धोपंतांनीं व्याह्यांचा वस्त्रालंकार देऊन बहुमान केला व ते परतले.

यानंतरचे विठ्ठलपन्तांचे कांहीं दिवस सुखाचे गेले. कालान्तरानें वृद्ध मातापितरें वैकुंठवासी झालीं आणि सहाजिकच प्रपंचाचा भार त्यांच्यावर पडला. पण त्यांची वृत्ति विरक्त असल्यानें देवावर भार टाकून समाधानीवृत्तींत ते राहात. या त्यांच्या उदासीन वृत्तीची वार्ता त्यांच्या श्वशुरांस समजतांच ते आपेगांवास आले. संसारांत वित्तावांचून चालत नाहीं व आपली वृत्ति तर उदासीन; तेव्हां आपण आमच्याच घरीं रहा व एकदोन मुलें झाल्यानंतर वाटल्यास परत जा, असें त्यांनीं विठ्ठलपन्तांना सांगितलें. देवानेंच आपलें गाऱ्हाणें ऐकलें असें मानून विठ्ठलपन्त अलंकापुरीं आले. त्यांचा तेथील जीवनक्रम नामदेवांनीं पुढीलप्रमाणें वर्णिला आहे—

* नित्य हरिकथा नामसंकीर्तन ।
सन्तांचें दर्शन सर्वकाळ ॥
पंढरीची वारी आषाढी कार्तिकी ।
विठ्ठल एकाएकी सुखरूप ॥ ८५९।२३

पण याचा स्वाभाविक परिणाम व्हायचा तो झालाच. त्यांची संसारांतील आसक्ति सुटली आणि विरक्तता वाढली. शिवाय लग्न होऊन त्या मानानें अधिक काळ गेला तरी अपत्य न झाल्यानें त्यांच्या वृत्तीनें संन्यासाचा ध्यास घेतला. मधूनमधून पत्नीला ते ' मला संन्यास घ्यावासा वाटतो, तूं परवानगी दे ' असें बोलत. त्यांच्या पत्नीनें आपल्या वडिलांना ती गोष्ट सांगतांच त्यांनीं 'सन्ततीवांचून न घ्यावा संन्यास असें तूं त्यांना सांग, ' असें सांगितलें. विठ्ठलपतांना मात्र एकच ध्यास लागल्यानें हें ऐकूनहि ते सारखा तोच प्रश्न पत्नीला विचारीत. एकदा यामुळेंच थोडी दुश्चित्त व अनवधानी असतांना त्यांच्या पत्नीनें 'जा' असे काढलेले उद्गारच पडत्या फळाची आज्ञा मानून त्यांनीं त्याच रात्रीं एका वस्त्रानिशीं काशीची वाट धरली. सकाळीं उठतांच त्यांचा शोध सुरू झाला; पण ते आढळले नाहींत. आपला पति काशीला गेल्यामुळें आतां परत येण्याची आशा नाहीं, आपलीच वाचा आपल्याला भोंवली असें मानून त्यांच्या पत्नीनें जन्माचें सार्थक करण्यासाठीं सिद्धेश्वराच्या देवळाजवळील सुवर्ण अश्वत्याची सेवा आरंभिली.

विठ्ठलपन्तांनीं काशीस जाऊन कोणा एका श्रीपादाकडून संन्यास घेतला व ते चैतन्याश्रम या नांवानें वावरूं लागले. तिथें शास्त्राध्ययन व वेदान्तचिन्तन करीत असतां त्यांच्या गुरुजींना रामेश्वरास जाण्याची इच्छा झाल्यानें त्यांनीं आश्रमाची जबाबदारी चैतन्याश्रमावर टाकली व ते यात्रेला निघाले. वाटेंतील क्षेत्रांस भेट देत देत ते आळंदीस आले. रुक्मिणीच्या भाग्यानेंच त्यांना तिथें आणलें असें म्हणण्यापेक्षां महाराष्ट्राच्या परम भाग्यानेंच त्यांना तिथें येण्याची इच्छा झाली असें म्हटलें पाहिजे. ते तिथें आले त्या वेळीं रुक्मिणी अश्वत्थवृक्षास प्रदक्षिणा घालीत होती. तिच्या दृष्टीस हे सत्पात्र स्वामी पडतांच तिनें त्यांना नमस्कार केला. सहाजिकच स्वामींच्या तोंडून ' पुत्रवती भव ' असे उद्गार निघाले. त्याबरोबर रखुमाबाईंना सखेद पण हसं

आलें. त्याबद्दल स्वामींनीं विचारतांच रखुमाबाईनीं सर्व हकीकत त्यांना निवेदन केली. ती ऐकून आपण अनुग्रह केलेला चैतन्याश्रम तोच हिचा पति असावा असें खात्रीपूर्वक वाटून त्यांनीं रखुमाबाई व त्यांचे वडील यांना विठ्ठलपन्ताची गांठ घालून तर देतोंच; पण त्यांना रखुमाईचा स्वीकार करण्यास लावतों; असें अभिवचन दिलें. लगेच त्या दोघांना घेऊन ते काशीस गेले. त्यांना दुसरीकडे ठेवून ते एकटेच आश्रमांत गेले. स्वामी अचानक परत आलेले पाहून चैतन्याश्रम थोडे स्तिमित झाले. त्यांत गुरुजींनीं त्यांना 'घरीं कोण कोण मंडळी आहेत' असें दरडावून विचारतांच सारा प्रकार त्यांच्या लक्षांत येऊन त्यांनीं खरी हकीकत निवेदन केली व पत्नीची आज्ञा घेऊन निघालों असें सांगून स्वामींच्या चरणावर मस्तक ठेवलें. स्वामींनीं त्यांना उठवून त्यांची व रखुमाबाईची गांठ घालून त्यास खालील उपदेश केला.

• " .......... । म्हणती करीं ग्रहण इचें आतां ॥
अविधी कर्माचें न धरावें भय ।
साक्षी आहे शाम्र जगदीश ॥
स्वदेशा जाउनी करावा आश्रम ।
सुखरूप स्वधर्म चालवावा ।"

अ. ८९९ । ७ । ८

' गुरू क्षेत्र गुरू देवता । गुरू माता गुरू पिता ।
जो गुरू पूजे परौता । मार्गु नेणे ॥
गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ' ॥

ज्ञा. अ. १३

अशा वृत्तीचे चैतन्याश्रम असल्यानें स्वामींची आज्ञा शिरसावंद्य मानून त्यांनीं परत गृहस्थाश्रम स्वीकारला व ते परत कुटुंबाबरोबर संसार करूं लागले. संन्यासाश्रमांतून गृहस्थाश्रमांत प्रवेश हा असाधारण व जनरूढीविरुद्ध प्रकार पाहून विठ्ठलपन्त हे त्या काळीं जननिंदेस केवढ्या मोठ्या प्रमाणांत विषय झाले असतील, याची कल्पना करणें कठीण आहे. शिष्ट ब्रह्मवृंदांनीं त्यांना वाळींत टाकलें व आप्त उपेक्षा करूं लागले. या पतीपत्नींनीं गांवाबाहेरील झोंपडींत ईशचिन्तनांत पण अतिशय विपन्नावस्थेंत एकदोन नव्हे तर बारा वर्षे काढलीं. लौकिक दृष्ट्या त्यांचा हा काळ अगदींच हीन परिस्थितींत गेलेला दिसतो; पण पारमार्थिक दृष्ट्या ही त्यांची घोर तपश्चर्या पुढील ज्ञानरत्नांच्या निर्मितीसाठींच होती, असें म्हणावेंसें वाटतें. ज्ञानेश्वरमहाराजांनीं, योगभ्रष्ट कुठें जन्म घेतात, याचें सहाव्या अध्यायांत जें वर्णन केलें आहे तें वाचीत असतां, त्यांची कुलपरंपरा तर त्यांच्या डोळ्यासमोर नसेल ना; अशी शंका मनाला चाटून गेल्याशिवाय राहात नाहीं.

अशा पारमार्थिक जीवनाच्या एक तपाअखेरीस त्यांना शके ११९० मध्यें जें पुत्ररत्न झालें तेंच ज्ञानदेवाचे वडील बंधु निवृत्तिनाथ. हेच त्यांचे पारमार्थिक गुरु. त्यानंतर श्रीज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई अशीं एकूण तीन अपत्यें त्यांना शके ११९३।९६।९९ मध्यें झालीं. या सर्व भावंडांचा जन्म आळंदी येथें झाला.

निवृत्तिनाथादि चार भावंडांचे आम्हीं जे जन्मशक दिले आहेत, त्यांस आधार जनाबाईचा खालील अभंग आहे:—

• " शालिवाहन शके अकराशें नव्वद ।
निवृत्ति आनंद प्रगटले ॥
त्र्याण्णवाच्या सालीं ज्ञानेश्वर प्रगटले ।
सोपान देखिले शाण्णवांत ॥
नव्याण्णवाच्या सालीं मुक्ताई देखिली ।
जनी म्हणे केली मात त्यांनीं ॥ "

जनाबाई, अ. २७७

पण या भावंडांचे जन्मशक व तिथि पुढीलप्रमाणेंही दिलेलीं आढळतात.

( १ ) निवृत्तिनाथ—शके ११९५ श्रीमुख संवत्सर, माघ वद्य १ सोमवार, प्रातःकाळ.

( २ ) ज्ञानदेव—शके ११९७ युवा संवत्सर, श्रावण वद्य ८ गुरुवार, मध्यरात्र.

( ३ ) सोपानदेव—शके ११९९ ईश्वर संवत्सर, कार्तिक शुद्ध १५ रविवार, प्रहर रात्र.

( ४ ) मुक्ताबाई—शके १२०१ प्रमाथि संवत्सर, आश्विन शुद्ध १ शुक्रवार, मध्यान्ह.

हे जन्मशक व तिथि हीं कै. भिंगारकर, कै. पांगारकर व 'महाराष्ट्र सारस्वत' कार कै. भावे हे देतात 'यांपैकीं भिंगारकर व पांगारकर ( श्रीज्ञानेश्वरमहाराजचरित्र, पृ. ४६ ) यांनीं जनाबाई, नामदेव, विसोबा खेचर व 'ज्ञानेश्वर विजय' कर्ते सच्चिदानंद बाबा यांचे जन्मशक व तिथि देणारे अभंग दिले आहेत; तथापि त्यांनीं दिलेले नामदेव, जनाबाई व विसोबा खेचर

यांचे अभंग हल्लीं प्रसिद्ध असलेल्या इंदिराप्रेस, चित्रशाळा व जगद्धितेच्छु यांनीं छापिलेल्या गाथ्यांत आढळत नाहींत. आजगावकर यांनीं 'महाराष्ट्र कविचरित्र' भाग ६, यांत दोन्ही शक दिले आहेत. ( पृ. ८ ); व या दोहोंतून खरा जन्मकाल कोणता या बाबतींत खालील निकाल दिला आहे. ते म्हणतात, " या दोन कालांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें सांगावयास नकोच. या दोहोंतील कोणता तरी एक काल कदाचित् खरा असेल किंवा बहुतकरून दोन्ही खोटे असतील. "

ज्यांना जगानें अक्षरशः डोक्यावर घेऊन नाचावें, नव्हे ज्यांच्या समाधीचें दर्शन घेण्याच्या अतीव तळमळीनें अखिल महाराष्ट्रांतून लोक अनंत अडचणी बाजूला ठेवून येतात व दर्शनांत धन्यता मानतात, अशीं रत्नें ज्यांना लाभलीं त्यांना मात्र त्यांच्या जन्माबरोबर अधिकाधिकच हाल भोगावे लागले. समाजबंधनें तोडणाऱ्याला जे हाल भोगावे लागतात, असे विलक्षण हाल तर त्यांना स्वतःला सोसावे लागलेच; पण त्यांच्या मनश्चक्षुंपुढें त्यांच्या मुलांच्या भावी जीवनाचें चित्र उभें राहतांच त्यांच्या अंतःकरणांत विलक्षण कालवाकालव होत असावी. कारण त्यांच्या प्रमाणेंच त्यांच्या निष्पाप व निर्मल मुलांचें दर्शन हा अपशकुन समजला जाई. या सर्व भावंडांच्या वांट्यासहि त्यांच्या मातापितरांप्रमाणें हालअपेष्टा आल्याच; पण घराबाहेर जितकें रखरखीत, रुक्ष, सहानुभूतिशून्य असें वातावरण; तितकेंच घरांत शीतल, सात्विक, वैराग्यपूर्ण वातावरण त्यांना लाभलें होतें आणि म्हणूनच बाह्य परिस्थिति सर्वांगांनीं प्रतिकूल असतांनाहि लहानपणींच त्यांच्या मनावर विद्येचे उत्तम संस्कार झालेले होते. अल्पवयांत अक्षरवाङ्मयांत जमा होणाऱ्या ग्रंथांची निर्मिति श्रीज्ञानदेवांनीं केली. त्यांतहि भारत, भागवत, योगवासिष्ठ यासारख्या ग्रंथांतील दाखले त्यांत सांपडतात याला जीं कांहीं कारणें असूं शकतील त्यांत व्युत्पन्न अशा पित्याच्या सहवासांत ज्ञानदेवांचें गेलेलें बालपण हें एक खास असूं शकेल. शिवाय वयाचा विचार करतां या सर्व भावंडांना फारच कुशाग्रबुद्धि व समज होती. ' तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । ' हें त्या सर्वांच्या बाबतींत खरें ठरलेलें आपण पहातच आहोंत.

या प्रकारानें आयुष्य चाललें असतां तीर्थक्षेत्रें हिंडण्याचे प्रेमी विठ्ठलपंत हे सारखेच आळंदीस राहिले असतील हें फारसें संभवत नाहीं. ते तीर्थयात्रा करीत असतांना त्याजबरोबर हीं लहान मुलेंहि फिरत असावींत. ज्ञानदेवांनीं आपल्या वडिल–मातोश्रींसमवेत यात्रा केल्या असाव्यात कीं, ज्यांचे संस्कार आपणांस ज्ञानेश्वरींत दिसतात.

ज्ञानेश्वरांनीं आपल्या अल्पजीवितयात्रेंत प्रसंगोपात् जे चमत्कार केले, त्यांपेक्षांहि त्यांचें स्वतःचें जीवनच अधिक चमत्कारमय आहे.

निवृत्तिनाथांना समाजाकडून होणाऱ्या उपद्रवांपासून सुटका होण्याला उग्र तपश्चर्येवांचून अन्य मार्ग नाहीं, असें वाटल्यावरून त्यांनीं त्या वेळींहि प्रसिद्ध असलेल्या त्र्यंबकक्षेत्रास जाण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें तिथें जाऊन देहदंड हवा म्हणून जवळच गोदावरीचें उगमस्थान जो ब्रह्मगिरी पर्वत, त्याला दररोज प्रदक्षिणा घालण्यास प्रारंभ केला. ही प्रदक्षिणा घालीत असतां वाघाच्या भयानें गुहेंत पळत पळत जाणारे निवृत्तिनाथ जे बाहेर पडले ते श्रीगहिनीनाथांच्या कृपेनें, ' धरा येवो पां स्वर्ग । का वरि पडो वाघ । परि आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ॥ ' अशा अभयगुणानें मंडित असणाऱ्या स्वानंदसाम्राज्याचे सम्राट होऊनच. आणि यामुळेंच श्रीज्ञानेश्वरांना परमार्थाच्या मार्गावरून थेट मुक्कामाप्रत पोंचायला लागणारे पारमार्थिक गुरु अगदीं आयतेच विनासायास लाभले आणि म्हणूनच कदाचित गुरुभेटीची तळमळ या भावंडांच्या अभंगांत फारशी आढळून येत नसावी. निवृत्तींनीं ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई यांना स्वानंदसाम्राज्याचे वांटेकरी केलें.

त्या भावंडांच्या दृष्टीनें जरी तीं आनंदघन आत्मरूप होऊन घरीं आलीं होतीं, तरी त्यांच्या आगमनानें विठ्ठलपन्तांच्या पुढची अडचण मात्र त्यांना अधिकच जाणवूं लागली. निवृत्तिनाथ उपनयनसंस्काराला योग्य झाले होते. पण आळंदीचे लोक हे विठ्ठलपन्त व त्यांचीं अपत्यें यांचें दर्शन हा अपशकुन समजत, मग मुलांच्या मौंजीबंधनाची गोष्ट कशी व कुणाजवळ काढणार ! आपल्याला बहिष्कृत केलें असलें तरी मुलाबाळांना आपलें कर्म त्यांच्या अभ्युदयनिःश्रेयसाच्या आड येऊं नये म्हणून त्यांचा व्रतबंध व्हावा असें त्यांना वाटत होतें आणि म्हणूनच वाळींत टाकलें असताहि आळंदीच्या ब्रह्मवृंदांना शरण जाण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. ब्रह्मवृंदांची सभा भरवून त्यांनीं विनंति केली.

• " ..................।
क्षमा अपराधा करा दीना ॥ ८ ॥
निबंधीं निर्णय पहाती धर्मशास्त्रीं ।
तुम्ही अति श्रौती परायण ॥ ९ ॥
सांगाल तें मान्य म्हणती साहीजणें ।
शुची हें करणें पतितांसीं ॥ १० ॥"

नामदेव अ. ९००

जमलेल्या पुण्यश्लोकांना विठ्ठलपंत व त्यांचें कुटुंब यांना पावन करून घेण्यास धर्मग्रंथांत आधार आढळेना. त्यांनीं विठ्ठलपन्तांस आपला कठोर निर्णय सांगितला.

•" देहान्त प्रायश्चित्त असे या बोलिले ।
विचारुनि भले हित करा ॥
.........आणिक नाहीं उपाव ।"

नामदेव अ. ९०० १।२।३

विठ्ठलपन्त हे मूळचेच विरक्त. त्यांस मायापाश पूर्वीपासूनच फार कमी; त्यामुळें माझ्या व माझ्या सन्ततीच्या कल्याणाकरतां देहत्याग करणें अवश्य असेल तर मी त्रिवेणींत देह टाकून अथवा करवतीखालीं मान देऊन देहान्त प्रायश्चित्त जरूर घेईन, असें म्हणून जमलेल्या द्विजवरांस वन्दन करून विठ्ठलपन्त यांनीं आपली पत्नी व मुलें यांचा त्याग करून ते निघून गेले. त्यांनीं पुनः मागें म्हणून पाहिलें नाहीं. रखुमाबाई त्यांच्या मागोमाग गेल्या. शास्त्रानें एवढा कठोर निर्णय दिला असतांहि ज्ञानेश्वरांची शास्त्रावरील अतीव श्रद्धा पाहिली म्हणजे विभूतींचें अन्तःकरण केवढें खोल असतें, याची कल्पना येते. 'शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यहि तृण मानावें' हे त्यांचे सोळाव्या अध्यायांतील 'तस्मात् शास्त्र प्रमाणं' या २४ व्या श्लोकावरील टीकेंतील उद्गार तरी दुसरें काय दाखवितात.

या भावंडांच्या मातापितरांचा प्रश्न जरी दुःखद रीतीनें का होईना सुटला असला तरी या लोकदृष्ट्या अजाण बालकांचा प्रश्न अनुत्तरीतच राहिला. सर्वांत ज्येष्ठ श्रीनिवृत्तिनाथ त्यांनीं सभेला तोच प्रश्न केला. 'महाराज आम्हांला गति काय ?' यांवर त्यांनीं पैठणाहून शुद्धिपत्र घेऊन यावें म्हणजे आम्ही तुम्हांला आमच्या जातींत घेऊं असें आळंदीकर ब्राह्मणांनीं सांगितलें. निवृत्तिनाथ हे मूळांतच निवृत्त असल्यानें शुद्ध होऊन नसतें कर्मबंधन लावून घेणें हा त्यांना उपद्रवच वाटूं लागला. आपण नामरूपातीत असल्यानें देहाश्रित वर्णाश्रम कर्मबंधनाच्या भानगडींत पडण्याची आपली इच्छा नाहीं असें त्यांनीं श्रीज्ञानदेवांना सांगितलें. पण ज्ञानदेवांना वर्णाश्रम धर्माची घडी बसवायची होती व तत्प्रीत्यर्थ लोकसंग्रह करावयाचा होता, म्हणून ते निवृत्तिनाथांना म्हणाले.

• विधि वेद विरुद्ध संपर्क संबंध ।
नाही भेदाभेद स्वस्वरूपीं ॥ १ ॥
अविधि आचरण परम दूषण ।
वेदो नारायण बोलियेला ॥ २ ॥
स्वधर्म अधिकार जातीपरत्व भेद ।
उचित तें शुद्ध ज्याचें तया ॥ ३ ॥
म्हणोनिया सन्तीं अवश्य आचरावें ।
जना दाखवावें वर्तोनिया ॥ ४ ॥
कुळींचा कुळधर्म अवश्य पाळावा ।
सर्वथा न करावा अनाचार ॥ ५ ॥
प्रत्यवाय आहे अशास्त्रीं चालतां ।
पावन अवस्था जरी झाली ॥ ६ ॥
ज्ञानदेव म्हणे ऐका जी निवृत्ति ।
बोलीली पद्धती धर्मशास्त्रीं ॥ ७ ॥

नामदेव अ. ९०३

सोपानदेवांनाहि पावन होण्याची आवश्यकता वाटली नाहीं. पण ज्ञानदेवांच्या आग्रहापुढें सर्वांनाच मान तुकवावी लागली. आळंदीकरांचें पत्र घेऊन हीं भावंडें दक्षिणकाशी म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रतिष्ठान (पैठण) क्षेत्रीं गेलीं. तिथें ब्रह्मसभेंतील श्रेष्ठांसमोर निवृत्तिनाथांनीं आळंदीकर ब्राह्मणांनीं दिलेलें पत्र ठेवलें व आपला खरा वृत्तान्त निवेदन केला. हीं संन्याशाचीं पोरें आहेत, असें लक्षांत येतांच त्यांनीहि

• नाहीं प्रायश्चित्त उभयतां कुलभ्रष्ट ।
बोलियले श्रेष्ठ पूर्वापार ॥ ६ ॥

नामदेव अ. ९०५.

असेंच सांगितलें.

पण यावर आमची गति काय ? असा प्रश्न निवृत्तिनाथांनीं त्यांना केला असतां त्यांना कांहींच उत्तर न देणें हें कमीपणाचें वाटून महाजनांनीं यास एकच उपाय सांगितला,

•" या एक उपाय असे शास्त्रमतें ।
अनन्य भक्तीतें अनुसरावें ॥ ७ ॥

तीव्र अनुतापें करावें भजन ।
गो, खर आणि श्वान वंदूनिया ॥ ८ ॥ "
वंदावे अंत्यज ब्रह्मभावनेसी ।
ऐसें पद्धतीसी बोलियेले ॥ ९ ॥

नामदेव अ. १०५

हा उपदेश ऐकून या निवृत्त निवृत्ति मुलांस सन्तोषच झाला; महाराज आपण सांगाल तें आम्हांस मान्य असें म्हणून त्यांनीं ब्रह्मवृंदांच्या बोलण्याचा स्वीकार केला.

पण एवढ्यावरच जर हा इतिहास थांबता तर महाराष्ट्राची मोठी हानी झाली असती; पण कांहीं वेळां वाईटांतून चांगलें निघतें तसाच प्रकार थोडासा घडला आणि महाराष्ट्र हा भाग्यवान् ठरला. तेथें जमलेल्या कांहीं टवाळ लोकांचें या भावंडांच्या नांवांकडे लक्ष गेलें. निवृत्ति, ज्ञानदेव अशीं नांवें ऐकून ते त्यांची टवाळी करूं लागले. इतक्यांत एक पखालवाला आपल्या ग्यान्या नांवाच्या रेड्यावर पखाल ठेवून त्याच रस्त्यावरून जात होता. त्याच्याकडे बघून एकानें टवाळी केली, 'अहो, नांवांत काय आहे ! यांचेंहि नांव ग्यान्याच आहे.' त्यावर ज्ञानदेव म्हणाले, 'तुम्ही म्हणतां तें खरें. त्याचा व माझा आत्मा एकच आहे.' यावर पुढें काय घडलें तें नामदेवांच्या शब्दांतच वाचकांनीं वाचावें म्हणून तो अभंग खालीं देत आहोंत.

• मारिती आसुड म्हैशियाचे पाठीं ।
तोचि वळ उठी ज्ञानदेवा ॥
म्हणती द्विजवर अहो ज्ञानदेवा ।
यापासोनि उच्चारावा वेदध्वनी ॥
तरीच तुमची सत्ता आम्हां येईल कळों ।
नाहीं तरी बोलों नका कांहीं ॥
ज्ञानदेव म्हणे बोले रे ऋग्वेद ।
ओंकार मूळ शब्द प्रणवाचा ॥
वेदाचा आरंभ करिता झाला पशु ।
विधि उपन्यासु सांग पुढें ॥
करिती आश्चर्य सकळ द्विजवर ।
हे तिन्ही अवतार तीन देवांचे ॥
आदिमाता मुक्ताई मुक्तपणें अवतरली ।
आम्हांपासुनि झाली थोर चुकी ॥
कर्मठ अभिमानें ठकलों देहबुद्धि ।
गोविंदेली विधि निःसंदेह ॥
नेणों भक्तिज्ञान वैराग्याचा लेश ।
कुटुंबाचे दास होऊनी ठेलों ॥
आणीकांसी सांगो आपण नाचरों ।
लटिकेंच हुंबरों प्रतिष्ठेसी ॥
धन्य यांचा वंश धन्य यांचें कूळ ।
धन्य पुण्यशील अवतार हे ॥
सकळ द्विजवर करिती नमस्कार ।
आनंदें जयजयकार करिताती ॥
ज्ञानदेव म्हणे तुमच्या चरणांचा महिमा ।
सामर्थ्य हें आम्हां अंगीं नाहीं ॥

नामदेव अ. १०६

ज्ञानदेवाच्या अलौकिक योगसामर्थ्यानें लोकांचे डोळे दिपून गेले व सभेचें विसर्जन न समजतांच झालें. शुद्धिपत्राचा प्रश्न पुढें सरसावण्याचें भानच राहिलें नाहीं.

नंतर त्यांनीं पैठणांतच कांहीं दिवस वास केला. त्यांचा त्या वेळचा कार्यक्रम पुढीलप्रमाणें होता.

• अध्यात्म ग्रंथ पहाती पैठणीं ।
गीता संबोधनी जवळी असे ॥ ८ ॥
भोगावती स्नान कालिका दरुशन ।
वेदान्त व्याख्यान परिमिती ॥ ९ ॥
सांगती पुराण रात्रीं हरिकीर्तन ।

······ नामदेव अ. १०७

पैठणच्या लोकांना यानंतर शुद्धिपत्र देतांना मोठी धन्यता वाटली असेल. त्यांच्या शुद्धिपत्रांतील आशय नामदेव वर्णितात—

• " हे परलोकींचें तारूं देवत्रय यासी ।
प्रायश्चित्त काय यासी द्यावें कोणी ॥ "

नामदेव अ. १०७

शुद्धिपत्र हातांत पडतांच त्यांचा पहिला कुटुंबाबाहेरचा शिष्य ग्यान्या याला घेऊन त्यांनीं पैठण सोडलें.

साहजिकच ज्ञानदेवांची कीर्ति सर्वत्र फैलावून त्यांच्या दर्शनाला झुंडीच्या झुंडी येऊन आपणांला अध्यात्मश्रवणाचा लाभ व्हावा म्हणून त्यांना गांवाला बोलावीत. गहिनीनाथांच्या प्रसादानें पूर्ण झालेले निवृत्तिनाथ व निवृत्तिनाथांच्या प्रसादानें निःशंक ब्रह्मस्थिति प्राप्त होऊन अवाप्तकाम झालेलीं त्यांचीं भावंडें यांना स्वतःकरितां कांहींच करावयाचें नव्हतें. कीर्तन व

प्रवचनद्वारां भक्तिमार्गाचा प्रसार करीत करीत ही मंडळी संचार करीत रहायची. असा संचार चालू असतांनाच गोदावरीपासून दोन कोसांवर प्रवरेच्या कांठीं असलेल्या म्हाळसापूर अथवा नेवासें मुक्कामीं शके १२१२ त ज्ञानदेवांनीं ज्ञानदेवी अथवा ज्ञानेश्वरी हा श्रीमद्भगवद्गीतेवरील आपला अलौकिक टीकाग्रंथ पूर्ण केला. हा ग्रंथ लिहून घेण्याचें काम सच्चिदानंद बाबा करीत होते, असा स्पष्ट उल्लेख ज्ञानेश्वरीच्या शेवटीं ज्ञानेश्वरांनींच केला आहे. कित्येक लोक हा उल्लेख ज्ञानदेवांचा नाहीं असें समजतात; पण ज्ञानेश्वरी ज्ञानदेवांनीं सांगितली व सच्चिदानंदबाबांनीं लिहिली याबाबत दुमत नाहीं. इथेंच आपले गुरुजी श्रीनिवृत्तिनाथ यांच्या सांगण्यावरून ज्ञानदेवांनीं 'अमृतानुभव' अथवा 'अनुभवामृत' हा आपला स्वतंत्र ग्रंथ निर्माण केला. जन्मभर अभ्यासूनहि ज्यांचा अभ्यास पुरा होत नाहीं व जे प्रत्येक वाचनाच्या वेळीं विचारवन्तांना नवा आनंद देऊं शकतात असे हे निर्माण झालेले ग्रंथ व तेहि अगदीं अल्पवयाचे असतांना हें लक्षांत घेतांच ज्ञानेश्वरांनीं केलेला हा सर्वांत मोठा चमत्कार आहे असें निश्चित वाटतें.

ज्ञानेश्वरांच्या सामर्थ्याची वार्ता सहाजिकच तापी-तीरावर असलेल्या व योगबलानें चौदाशें वर्षें जगलेल्या चांगदेवांच्या कानीं गेली. रेड्यामुखीं वेद बोलावयास लावणारी ही मोठी विभूति कोण, अशी उत्कंठा त्यांना लागून राहणें स्वाभाविक होतें; पण प्रथम प्रत्यक्ष दर्शना-पेक्षां पत्र देऊन अंदाज घेणें बरें, असें वाटून पत्र लिहिण्याकरितां त्यांनीं कोरा कागद पुढें ओढला; पण श्रीज्ञानदेवांना आशीर्वाद कीं नमस्कार यांपैकीं काय लिहावें हें त्यांना मनाशीं न ठरवितां आल्यानें त्यांनीं तो कागद तसाच कोरा पाठवून दिला. त्यावर ज्ञानेश्वरांनीं उत्तरादाखल जें लिखाण केलें तेंच 'चांगदेवपासष्टि' म्हणून प्रसिद्ध आहे. या उत्तरानें तर चांगदेवांची जिज्ञासा शिगेला पोंचली व ते वाघावर आरूढ होऊन सर्पाचा चाबूक करून ज्ञानदेवांच्या भेटीस निघाले. ज्ञानदेवादि भावंडें त्या वेळीं घराच्या भिंतीवर बसलीं होतीं. चांगदेव वाघावर येतात हें ऐकून ज्ञानदेवांनीं भिंतीला चालण्यास आज्ञा दिली व तिनेंहि ती तात्काळ मानली. जड भिन्त चेतन होऊन चालते, हें पाहून चांगदेवांचा गर्वपरिहार झाला व ते त्यांना शरण जाऊन त्यांचे शिष्य झाले. पुढें मुक्ताबाईनें त्यांना अनुग्रह करून आत्मरूपाची प्राप्ति करून दिली.

अशी 'बांधलीं सोडीत, बुडालीं काढीत, आर्तांची सांकडीं' फेडीत किंबहुना जगाच्या सुखोन्नतीसाठीं अहोरात्र खटपट करीत या मंडळींची कालक्रमणा चालली असतां ज्ञानदेवांच्या मनांत तीर्थयात्रा करावी असें आलें. वास्तविक 'जयाचें नांव तीर्थांरावो। दर्शनें प्रशस्तीसि ठावो। जयाचेनि संगें ब्रह्मभावो। भ्रान्तांसही॥' असल्या उच्च पदवीला जाऊन पोंचलेले ज्ञानेश्वर. पण त्यांनींच म्हटल्याप्रमाणें 'जीवन्मुक्त ज्ञानी जरी झाले पावन। तरी देव तीर्थ भजन न सांडती॥' कारण त्यांना जगाला मार्ग दाखवावयाचा असतो. सन्तांचा समागम लाभल्यास यात्रेंत आनंद लुटावयास मिळेल, म्हणून ज्ञानदेव हे नामदेवास आपल्याबरोबर येण्याविषयीं आग्रह करण्यासाठीं पंढरपुरास गेले. ज्ञानदेवासारख्या सन्तांच्या आगमनानें नामदेवास परम समाधान वाटलें. ज्ञानदेवांनीं त्यांस आपला मनोदय कळविला. नामदेव म्हणाले कीं माझी खरी इच्छा पंढरीच्या ओट्यावर पडावें ही आहे. मी पंढरीनाथास विकलेला आहे. तेव्हां माझ्याबाबतींत त्यांनाच विचारा. त्यांवर ज्ञानदेवांनीं आपलें मनोगत पंढरीरायास कळविलें व पंढरीनाथांनींहि

*"प्रत्यक्ष परब्रह्म मूर्ति ज्ञानेश्वर।
करीतसे आदर संगतीचा॥
ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें।
तरीच जन्मा यावें विष्णुदासा॥
जावें स्वस्तिक्षेम यावें शीघ्रवत।
करावें स्वहित कळे तैसें॥"

नामदेव अ. ९१७

अशी आज्ञा दिल्यानें सगुणभक्तीचे अध्वर्यु व परम प्रेमळ भक्त नामदेव मोठ्या कष्टानें यात्रेला निघाले. आपली पंढरीरायाच्या वियोगानें झालेली मनःस्थिति नामदेवांनींच मोठ्या प्रेमानें उत्कृष्ट प्रकारें वर्णन करून आपल्याजवळील कवित्वाची साक्ष लोकांना पटवली आहे.

पंढरपूर सोडल्यावर प्रभासच्या रस्त्यावर या दोन लोकोत्तर पुरुषांत जो संवाद चाले, तो नामदेवांनीं आपल्या अभंगांत ग्रथित केला आहे. ते अभंग मननीय आहेत. कधीं ज्ञानदेव हे नामदेवाची सगुणभक्ति कसाला लावण्यासाठीं अद्वैत वेदान्त सांगून परीक्षा घेतात; तर कधीं अणिमा लघिमासारख्या सिद्धींचा अवलंब करून खोल विहिरींतील पाणी पिणें यासारखे चमत्कार दाखवून त्यांना स्तिमित करण्याचा प्रयत्न करतांना दिसतात. पण

नामदेव या परीक्षेत उत्तम रीतीनें उत्तीर्ण होतात व 'धन्य तुझा भाव एकविध।' असें प्रशस्तिपत्र ते ज्ञानदेवांकडून मिळतात. कधीं ज्ञानदेव स्वतःकडे लघुत्व पत्करून "कैसा तो साधावा सांग भजनविधि।" असे प्रश्न विचारून त्यांची परीक्षा पहातात व त्यांना नामदेवाकडून मिळालेल्या प्रत्युत्तरांनीं तुजवर खरोखरच भगवन्ताची कृपा आहे असें म्हणून त्यांचा गौरव करतात. अशी उदंड आत्मचर्चा करीत व 'कृष्ण विष्णु हरि गोविंद' गात त्यांनीं प्रभास द्वारकादि सप्तपुऱ्या पाहिल्या आणि सर्व मंडळी पंढरपुरास सुखरूप परत आली. पंढरपुरास येतांच नामदेव राऊळांत गेले व पांडुरंगास प्रेमपूर्वक आलिंगन दिलें. त्यांनीं मावंदेहि मोठया थाटानें केलें.

ज्ञानदेवांनाहि आपलें इहलोकचें कार्य समाप्त झालें असें वाटून त्यांनीं पांडुरंगचरणीं समाधीची परवानगी मागितली. ही विनंति ऐकून नामदेवास फार वाईट वाटलें. नामदेवांनीं हा समाधीचा प्रसंग मोठ्या करुणपूर्ण वाणीनें वर्णिला आहे. ज्या ठिकाणीं महावली अजानवृक्ष आहे, त्याच्या सन्निध आळंदी मुक्कामीं ज्ञानदेवांचें समाधीचें स्थान निश्चित करण्यांत आलें. ज्ञानदेवांना पांडुरंगाकडून खालीलप्रमाणें वचन मिळालें.

*" कृष्णपक्षीं तुज निर्धारा।
भेट देत जाईन ॥ ५ ॥
कार्तिक शुद्ध एकादशी।
पंढरीयात्रा होईल सरिशी।
दुसरी कृष्णपक्षीं निर्धारेंसी।
तुज दिधली असे ॥ ६ ॥ अ. ९७६

या वचनानुसार संतमंडळी दिंड्यापताका घेऊन आळंदीस आली. सर्वांना ज्ञानदेवांच्या समाधिस्थ होण्याच्या निश्चयामुळें खेद होत होता. नित्यनिवृत्त असलेले निवृत्तिनाथ पण त्यांचाहि कंठ दाटून आला. सोपान-मुक्ताबाई यांना तर रडूंच कोसळलें. प्रेमळ नामदेवांच्या शोकास तर पारावार नाहींसा झाला.

इंद्रायणीकांठच्या श्रीसिद्धेश्वरासमोरील नंदी उचलून तेथून आंत जाऊन ज्ञानदेवांच्या समाधीची जागा साफ करण्यांत आली. नामदेवांच्या दोन मुलांनीं ती झाडून स्वच्छ केली. या प्रसंगीं सर्वांनीं ज्ञानदेवांची षोडशोपचारें पूजा केली. कंठ दाटून येऊन सर्वांच्या तोंडून एकच उद्गार बाहेर पडला.

*" पूर्वीं अनन्त भक्त जहाले।
पुढेंहि भविष्य बोलिलें।
परि निवृत्ति-ज्ञानदेवें सोडविले।
अपार जीवजन्तु ॥ " ना. अ. १००८.

यानंतर ज्ञानदेवांनीं १०९ ओंव्यांनीं भगवन्ताची नामरूपी स्तुति केली, व ते समाधींत जाऊन बसले आणि निवृत्तिनाथांनीं समाधीवर चिरा बसविला. ज्ञानदेवांच्या संजीवन समाधीचा हा प्रसंग शके १२१५ कार्तिक वद्य त्रयोदशीस मध्यान्ह कालीं घडला.

ज्ञानदेवांच्या समाधी-सोहळ्यानंतर अवघ्या आठ महिन्यांच्या आंतच बाकीच्या तिन्ही भावंडांनीं आपली इहलोकची यात्रा संपविली. या वेळची हकीगत नामदेवांनीं फारच हृदयस्पर्शी शब्दांत वर्णन केली आहे. त्यांतील ज्ञानदेवांचे गुरु व थोरले बंधु श्रीनिवृत्तिनाथ यांचेच त्या वेळचे ज्ञानदेवासंबंधींचे उद्गार देतों; म्हणजे त्यावरून तेथील सर्व मंडळींची अवस्था कशी झाली असेल याची वाचकांस कल्पना येईल.

तदनंतर नामदेवांचे याच वेळचे श्रीज्ञानदेवादि भावंडांचें व श्रीज्ञानदेवांचें वर्णन करणारे दोन अभंग देऊन व या विश्ववंद्य विभूतींना सविनय प्रणाम करून हें त्रोटक चरित्र संपवतों.

वोसंडोनि निवृत्ति आलिंगों लागला। आणिकांच्या डोळां अश्रु येती ॥१॥ अमर्यादा कधीं नाहीं केली येणें। शिष्य गुरूपण सिद्धि नेलें ॥२॥ गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा। गुह्यगौप्यमाळा लेवविल्या ॥ ३ ॥ फेडिली डोळ्यांची अत्यंत पारणी। आतां ऐसे कोणी सखे नाहीं ॥४॥ काढोनियां गुह्य देव केले फोल। आठवती बोल मनामाजीं ॥५॥ नामा म्हणे संत कासावीस सारे। लाविती पदर डोळियांसी ॥६॥ ॥१०९०॥

निवृत्तिदेव म्हणे करितां समाधान। कांहीं केल्या मन राहात नाहीं ॥१॥ बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट। ओघ बारा वाट मुरडताती ॥२॥ बांधल्या पेढीचा सुटलासे आळा। तृण रानोमाळा पांगलेंसे ॥३॥ हरिणीवीण सोपी पडियेली वोस। दशदिशा पाडस भ्रमताती ॥४॥ मायबापें आम्हा त्यागियेलें जेव्हां। ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं ॥५॥ नामा म्हणे देवा पेटला हुताशन। करा समाधान निवृत्तीचें ॥६॥ ॥१०९४॥

× × ×

* गेले दिगंबर ईश्वर विभूति ।
राहिल्या त्या कीर्ति जगामाजी ॥ १ ॥
वैराग्याच्या गोष्टी ऐकल्या त्या कानीं ।
आतां ऐसे कोणी होणें नाहीं ॥ २ ॥
सांगतील ज्ञान म्हणतील खूण ।
नयेचि साधन निवृत्तीचें ॥ ३ ॥
परब्रह्म डोळां दाऊं ऐसें म्हणती ।
कोणा नये युक्ति ज्ञानोबाची ॥ ४ ॥
करतील अर्थ सांगतील परमार्थ ।
नये पा एकान्त सोपानाचा ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा सांगूनियां कांहीं ।
नये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥ ६ ॥

नामदेव, अ. १२१४

देवो म्हणती रुक्मिणी । हा एकचि योगी देखिला नयनीं । हेंचि ज्ञान संजीवनी । जाण त्रैलोक्यासी ॥ १ ॥ धन्यधन्य धरातळीं । जो यातें दृष्टीं न्याहाळी । तो वाहात येईल टाळी । वैकुंठभुवनासी ॥ २ ॥ जो करील याची यात्रा । तो तारील सकळ गोत्रां । सकळही कुळें पवित्रा । याचेंनि दर्शनें होती ॥ ३ ॥ अलंकापुरी हें शिवपीठ । पूर्वी येथें होते नीलकंठ । ब्रह्मादिकीं तप वरिष्ठ । येथेंचि पैं केलें ॥ ४ ॥ इंद्र येऊनियां भूमीसी । याग संपादिले अहर्निशीं । इंद्रायणी इंदोरिसीं । पंचक्रोशी यापासुनी ॥ ५ ॥ येथें त्रिवेणी गुप्त असे । भैरवापासुनी भागीरथी वसे । पूर्वंत्रहि जे माया दिले । ते प्रत्यक्ष जाणा पार्वती ॥ ६ ॥ भोंवतीं वनवल्ली वृक्षीं । येथें देव येऊनी होती पक्षी । हे असे नित्य साक्षी । अस्थीं नासती उदकीं ॥ ७ ॥ पंढरीहूनी हें सोपें । जनाचीं हरावया पापें । काळिकाळ कोपलिया कोपें । न चले अलंकापुरासी ॥८॥ ऐसें सांगतां हरिसी । प्रेम ओसंडलें रुक्मिणीसी । म्हणे धन्य धन्य जयाची कुशी । ज्ञानदेव जन्मले ॥ ९ ॥नामा म्हणे माझा स्वामी । वसे संततमागमीं । ऐसें सांगितलें मार्मी । अलंकापुरीसी ॥ १० ॥ ९८७ ॥

ज्ञानदेवादि भावंडांचे समाधिकाल व स्थानें आमच्या मतें पुढीलप्रमाणें आहेत—

| | जन्मकाळ—स्थळ | समाधिकाळ—स्थळ |
|---|---|---|
| निवृत्तिनाथ : | शके ११९० आळंदी | शके १२१६ ज्येष्ठ व. ११, त्र्यंबकेश्वर. |
| ज्ञानदेव : | शके ११९३ श्रावण व. ८, आळंदी | शके १२१५ कार्तिक व. १३, आळंदी. |
| सोपानदेव : | शके ११९६ आळंदी | शके १२१५ मार्गशीर्ष व. १३, सासवड. |
| मुक्ताबाई : | शके ११९९ आळंदी | शके १२१६ वैशाख व. १२, मेहुण. |



[टीपः—ज्ञानदेवांचें चरित्र सर्वविश्रुत असल्यानें व त्यांतील विवाद स्थळांसंबंधीं वेगळी चर्चा केलेली असल्यामुळें श्रीनामदेवांनीं जें चरित्र गाईलें आहे त्यास अनुसरून येथें थोडक्यांत चरित्रभाग दिला आहे.]

---

## २. ज्ञानदेवांच्या चरित्रांतील कांहीं विवादस्थळें.

### (अ) विठ्ठलपंताचे गुरु रामानंद हे कोण ?

ज्ञानदेवांचे वडिल विठ्ठलपंत यांना संन्यासदीक्षा देणारे संन्यासी गुरु रामानंद होते असें के. रा. गोडबोले आपल्या 'भारतीय अर्वाचीन कोशांत' सांगतात व हेच कबीरांचे गुरु होत, अशी माहिती देतात. बहुतेक अर्वाचीन चरित्रकारहि तसेंच समजतात. पण रामानंद हे विठ्ठलपंतांचे गुरु असणेंच जरा कठीण दिसतें; कारण एक तर असा स्पष्ट उल्लेख कोठेंच नाहीं.

ज्ञानदेवांचे मुख्य चरित्रकार नामदेवराय हे सुद्धां असें नांव देत नाहींत. ते म्हणतात, "कोणा एका 'श्रीपादा' कडून विठ्ठलपंत संन्यासग्रहण करते झाले"

* "जाऊनी विठ्ठलें घेतला संन्यास ।
चिंता रखुमाईस पडली भारी ॥ ८९६ ॥
जाणोनि पैं देवें उग्र अनुष्ठान ।
तेथें झालें येणें श्रीपादांचें ॥

× × ×

* माते तूं हांसली श्रीपाद पुसती ।
स्वामी पुत्र केले होती पतीवीण ॥ ८९७ ॥"

(सकल संतगाथा, नामदेव अभंग)

निळोबाराय आपल्या अभंगांत 'नृसिंहाश्रम' म्हणून स्वामींचें नांव देतात.

* "तंव नृसिंहाश्रमासी निजस्वप्नीं दृष्टांत ।
झाला अकस्मात महाक्षेत्रीं ॥

चैतन्याश्रमाची आहे नार्या घरीं ।
पतिव्रता माहेरीं मार्ग लक्षी ॥

× × ×

• मग नृसिंहाश्रम आले अलंकापुरासी ।
आणि नेलें वाराणसी सिदोपंत ॥ "

( सकल संतगाथा, अभंग १५५४ )

संन्यास घेतल्यानंतर विठ्ठलपंतांचें नांव 'चैतन्याश्रम' ठेवलें असावें असें दिसतें. कारण, नामदेवरायसुद्धां विठ्ठलपंतांचा, संन्यासानंतर 'चैतन्य' असाच उल्लेख करतात.

• जाउनी वाराणसी मठीं प्रवेशले ।
मग पाचारिलें चैतन्यासी ॥ ८९९ ॥

( सकलसंतगाथा )

शिष्याच्या या नांवाशीं गुरुचें नृसिंहाश्रम नांव जुळतें आहे. तात्पर्य, नामदेवराय व निळोबाराय यांच्या अभंगांत विठ्ठलपंतांचा संन्यासदीक्षा देणारा गुरु 'रामानंद' असा उल्लेख नाहीं.

दुसरें, रामानंद विठ्ठलपंताचे गुरु होते, हें ठरण्याकरितां त्यांच्या काळाचा निर्णय होणें अवश्य आहे. यांकरितां आपण शोध घेऊं लागलों असतां कबिराच्या गुरुचें नांवहि रामानंद होतें, असें आढळून येतें. आतां या दोन्ही व्यक्ति एकच होत कां भिन्न हें ठरविलें पाहिजे. आपल्याकडे सामान्य समजूत अशी आहे कीं, या दोन व्यक्ति भिन्न नसून एकच होत व अर्थातच ज्यांनीं विठ्ठलपंतांना संन्यासदीक्षा दिली तेच रामानंद कबीराचे गुरु होत.

या प्रश्नाचा निर्णय लावण्याकरतां कबीर, रामानंद व नामदेव यांच्या काळाचा निर्णय ठरविणें अवश्य आहे. ज्ञानदेवांच्या वेळीं एक नामदेव होते ही गोष्ट निर्विवाद आहे व कबिरांच्या गुरुचें नांव रामानंद होतें हेंहि सर्वमान्य आहे. कबीर नामदेवांचे समकालीन कां थोडे नंतर हा विवाद्य प्रश्न आहे. कबिरांचा काळ ठरण्यावर रामानंदाचा काळ अवलंबून आहे. आपण आतां कबिरांचा काळ काय ठरतो तें पाहूं.

कबिरांच्या कवनांत नामदेवांचा उल्लेख खालील ठिकाणीं आढळतो.

( गाथापंचक ६ ) कबीर

भीमा किनारे मुर्शद मौला पीर पैगंबर बडा है । तनके दुर्गों म्याने साईं आकल आकेला खडा है ॥ १ ॥ ओही हमारा अल्ला है मुरशद पीर मौला है ॥ धृ ॥ सब घट म्याने घरघर भरा ओही आकल आकेला है । जिदर देखे उदर भरा मौजूद उनोंका बोलबाला है ॥२॥ नामा दरजी बडा हटेला आपसे दूध पिलाये है । बंदा उनोका नारा माहादा जनी खाना खिलाया है ॥ ३ ॥ क्यां कहु उनोकी तारीफ बाबा तीनों लोकमें भरा है । कहत कबीरा सुनो भाई साधु जमकाल हमसे डर भागा है ॥ ४ ॥

( गाथापंचक १९७ ) कबीर

साधुकी संगत पायी । जाकी पूरन कमाई ॥ धृ ॥ साधुकी संगत संतका वचन अवघड रहा बताई ॥ १ ॥ धना जाठ रोहीदास नामा चवथी ॥ २ ॥ कहत कबीरा सुन मेरो गुनिया ज्योतीमें ज्योत मिलाई ॥ ३ ॥

( गाथापंचक २४२ ) कबीर

उन दरजीका कोय मरम न पाया । बिन धागे जामा अजब बनाया ॥ धृ ॥ जलकारे कपरा पवनकारे धागा जोरत जोरत तिनरुन बागा ॥ १ ॥ सीस परवास सर मुगत बनाय सारी पाताल पैरम उलटाय ॥ २ ॥ उन बिच मोती माणेक लगाय बिच बिच दो रतन जडाय ॥ ३ ॥ कहत कबीर ये सुरत जमा न्यारी । उन दरजीकी खुदरत प्यारी ॥ ४ ॥

॥ शब्द ९२ ॥

ता मनको चिन्हो मेरे भाई । तन छुटे मन कहां समाई ।
सनक सनंदन जैदेवनामा । भक्ति हेतु मन उनहुँ न जाना॥
अंबरीष प्रल्हाद सुदामा। भक्ति सही मन उनहुँ न जाना॥
भरथरी गोरख गोपीचंदा । ता मन मिलिमिलि कियो अनंदा॥
जा मनको कोइ जानु न भेवा। ता मन मगन भये शुकदेवा॥
शिवसनकादिक नारद शेषा।तनके भीतर मन उनहुँ न पेखा॥
येकल निरंजन सकल शरीरा।तामहँ भ्रमि भ्रमि रहल कबीरा॥

( बीजक मूल पान ६३–६४ )

॥ शब्द ८६ ॥

कबिरा तेरो घर कंदलामें । यह जग रहत भुलाना । गुरुकी कही करत नहिं कोई । अमहल महल दिवाना । सकल ब्रह्म......मुगा चरिन्द्रा होई ॥

बडबड ज्ञानी मुनीवर थाके । पकरी सके नहिं कोई । ब्रह्मा वरुण.......नामदेव जैदेव दाशा ॥

तिनकी खबर कहत नहिं कोई । ( उन ) कहाँ कियो है वाशा । चौपर खेल......मारो हैयम किल्ली ॥

सकल अवतार जाके महिमंडल । अनंत खडा कर जोरे ॥ अद्‌बुद अगम औगाह रच्यो है ।......हरदम करहिं पुकारा ॥

( बीजक मूल पान ६१ )

संकर जाग चरन सेव ।
कलि जागे नामा जैदेव ॥
( बा. प. ३८७, सं. क. वसंत २ )
गुरु परसादी जैदेउ नामा ।
भगति के प्रेम इनहीं है जाना ॥

( सं. क. ग. ३६ )

वरील उल्लेखावरून नामदेवांनंतर कबीर झाले, हें उघड आहे. नामदेवांना कबीर, जयदेव कवीच्या पंक्तीला बसवितात. यावरून कबिरांच्या पूर्वी बरेच वर्षे तरी नामदेव झाले असले पाहिजेत असें वाटतें; पण बघेल-वंशागमनिर्देशाप्रमाणें कबीर आणि नामदेव समकालीन होते व कबिरांनीं नामदेवाशीं चर्चा करून वीरसिंहदेव यांना दीक्षा दिली. ' हमहुँ जाय तहँ अति सुख भरिकै । नामदेव सों चरचा करिकैं ॥ राममंत्र भूपति कहँ दीन्हों । बरबस बस तरेस करि लीन्हों ॥ ' पण ही गोष्ट केवळ काल्पनिक आहे, असें उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक चरित्र-लेखक मानतात.

संत कबीर व संत नामदेव हे समकालीन होते. एक उत्तरेंत व एक दक्षिणेंत, असा स्पष्ट उल्लेख कबीरपुत्र कमाल यांच्या पुढील कवनांत मात्र आहे .

वोही साई हजरत मौला खडा पंढरपुरवाला है ।
दुवले भगत दोनों भये उनोंसे करो बोलवाला है ।१।
दखनम्याने नामा दरजी उनोंका बंदा विठ्ठल है ।
और सेवा कछूं नहि जाने अंदर भीतर केशव है ।२।
ज्युत्तरम्याने भयो कबीरा रामचरनका बंदा है ।
उनोंका पूत कहे कमाल दोनोंका बोलबाला है ॥३॥

या कवनास किती किंमत द्यावयाची हें ठरवलें पाहिजे. उत्तर हिंदुस्थानांत कबीरपंथी लोक कबिरांना गृहस्थी समजतच नाहींत ! पण ग्रंथसाहेबामध्यें एक दोहा आहे त्यावरून असें दिसतें कीं कबीरांना एक कमाल नांवाचा मुलगा असावा; पण त्याचा मार्ग कबिराहून अगदीं भिन्न होता. " बूडा बंस कबीरका । उपजिओ पुतु कमालु " ॥ सं. क. स. ११५ ॥ असा कमालासंबंधींचा उल्लेख केला जातो. यावरून त्याच्या कवनास किती किंमत द्यावयाची हें ठरवलें पाहिजे.

अलिकडे रामानंद व कबीर यांचा काळ ठरविण्याबाबत उत्तर हिंदुस्थानामध्यें श्री बाबू श्यामसुंदरदास, शांति-निकेतनमधील पं. हजारीप्रसाद द्विवेदी, श्री पुरुषोत्तमदास श्रीवास्तव वगैरे विद्वान मंडळींनीं प्रयत्न केले आहेत. त्यांचा निष्कर्ष असा आहे कीं, कबीरांचा जन्म संवत् १४५५ व मृत्यु संवत् १५७५ मध्यें झाला म्हणजे शके १३२०त जन्म व शके १४४०त मृत्यु झाला.

' कबीरसाहित्यका अध्ययन ' या पुस्तकांत श्री. पुरुषोत्तमदास श्रीवास्तव एम्. ए. यांनीं यासंबंधीं उत्कृष्ट चर्चा केली आहे. त्यांनीं, विद्वान् मंडळीमध्यें यासंबंधीं मतभेद आहेत, ते कसे आहेत हें, पान १९१ वर दिलें आहे. तो भाग खालीं देत आहोंत.

| लेखक | वि. सं. | इ. स. | आयु |
|---|---|---|---|
| वेस्टकाट | !–१५७५ | !–१५१८ | × |
| के | १४९७–१५७५, | १४४०–१५१८, | ७८ |
| हरिऔध आणि मिश्रबंधु | १४५५-१५५२, | १३९८-१४९५, | ९७ |
| श्यामसुंदरदास व रामचंद्र शुक्ल | १४५६–१५७५, | १३९९-१५१८, | ११९ |
| मेकॉलिफ व भंडारकर | १४५५–१५७५, | १३९८–१५१८ | ११९ वर्षे ५ म. २७ दि. |
| सेन | १४५५–१५०५, | १३९८–१४४८, | ५० |
| बड्थ्वाल | १४२७–१५०५, | १३७०–१४४८, | ७८ |
| रामकुमार वर्मा | १४५५-१५५१, | १३९८-१४९४, | ९६. |

जन्मतिथिसंबंधीं खालील पद्य प्रचारांत आहे.

चौदा से पचपन साल गए चंद्रवार एक ठाटनए ।
जेठ सुदी बरसायनको पूरनमासी तिथि प्रगट भए ॥
घर गरजे दामिनी दमके बूँदे बरसें झर लाग गए ।
लहर तालाबमें कमल खिले तहँ कबीर भानु परकास भए ॥

वर दिलेल्या विद्वानपैकीं बहुतेकांनीं सं. १४५५ हा काळ मान्य केला आहे. इतर अंतर्गत पुराव्यावरूनहि वरचा संवत् युक्त दिसतो.

आपणांस एवढेंच पहाणें आहे कीं, उत्तर हिंदुस्थानांतील कबीरवाङ्मयाचा अभ्यास करणारे बहुतेक सर्व लोक कबीरांचा जन्म सं. १४५५ मध्यें मानतात. कबीरांच्या सर्व चरित्रकारांचें या एका बाबतींत एकमत आहे कीं, ज्या वेळेस शिकंदर लोदी काशीस आला त्या वेळीं विरोधीं 'हिंदु मुसुल्मान' ह्या दोघांनीं तक्रार केल्यावरून लोदीनें कबीरांना शिक्षा केली होती. जरी प्रत्यक्ष लोदीचें नांव नसलें तरी ह्या घटनेचा उल्लेख कबीरांच्याहि ग्रंथांत मिळतो.

शिकंदर लोदीचा शासनकाल सं. १५४५ ते सं. १५७५ (सन १४८८ ते १५१७) होता तो सर्वमान्य आहे; व तो काशीस सं. १५५३ (सन १४९३) मध्यें आला होता, असें मानतात. त्या वेळीं कबीरांच्यावर केलेल्या आरोपांची त्यानें चौकशी केली असावी. त्याचा अर्थ कबीर सं. १५५३ पर्यंत जिवंत होते.

आतां कबीरांचा जन्म जर संवत् १४५५ म्हणजे शके १३२० मध्यें झाला व त्यांना संवत् १४७५ (शके १३४०) च्या सुमारास रामानंदांनीं उपदेश दिला, हें मान्य करावयाचें व त्याचा, विठ्ठलपंतांना त्यांनीं संन्यास दिला, या गोष्टीशीं मेळ बसवावयाचा असेल तर कबीरांना अनुग्रह करण्याच्या वेळीं रामानंदांचें वय जवळजवळ १८० मानावें लागेल व हें असंभवनीय आहे. कारण, ज्ञानदेवांचा जन्म शके ११९३ अथवा ११९७; तत्पूर्वी १५ वर्षें संन्यास (म्हणजे शके ११७८) व तो देतांना रामानंद कमींत कमी ३० वर्षांचे धरले पाहिजेत. कारण ते संन्यास देण्याइतके ख्यातनाम होते, एवढें तरी मानावें लागेल; व मग वरीलप्रमाणें वय मानावें लागतें आणि ही घटना अशक्य आहे. तात्पर्य या पद्धतीनें विचार केल्यास विठ्ठलपंतांना संन्यास देणारे 'रामानंद' कबीरांचे गुरु नसले पाहिजेत ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते.

या प्रश्नास दुसरीहि बाजू आहे व ती म्हणजे महाराष्ट्रांतील प्रचलित कथांची व वचनांची. आपल्याकडे अशी कथा आहे कीं नामदेव व कबीर हे समकालीन होते. येवढेंच नव्हे तर त्यांची एकमेकांची गांठ पडली होती. जनाबाईचा पुढीलप्रमाणें अभंग आहे त्यांत दोघांची गांठ पडली होती असा उल्लेख आहे.

सकल संत गाथा—जनाबाई अभंग २६६

एकच टाळी झाली चंद्रभागे वाळवंटीं। माझा ज्ञानराज गोपाळांशीं लाह्या वाटी ॥१॥ नामदेव कीर्तन करी पुढें नाचे पांडुरंग। जनी म्हणे बोला ज्ञानदेवा अभंग॥२॥ अभंग बोलतां रंग कीर्तनीं भरला। प्रेमाचेनि छंदें विठ्ठल नाचूं लागला॥३॥ नाचतां नाचतां देवाचा गळला पितांबर। सावध होईं देवा ऐसा बोले कबीर॥४॥ साधु या संतांनीं देवाला धरिला मनगटीं। काय झालें म्हणुनी दचकले जगजेटी॥५॥ ऐसा कीर्तन महिमा सर्वांमाजी वरिष्ठ। जड मूढ भाविका सोपी केली पायवाट॥६॥ नामयाची जनी लोळे संतांच्या पायीं। कीर्तन प्रेमरस अखंड देईं गे विठाई॥७॥

पण नामदेवांच्या गाथ्याचें अजून चांगलें संशोधन व्हावयास पाहिजे, हेंहि सर्व मान्य आहे. ज्ञानदेवांचे समकालीन नामदेव त्यांचे अभंग कोणचे, मागाहून झालेले नामदेव त्यांचे कोणचे, तसेंच खुद्द जनाबाईचे कोणचे व मागाहून त्यांत घातलेले कोणचे हे प्रश्न जोपर्यंत निकालांत निघत नाहींत, तोंपर्यंत या प्रश्नाचा निकाल लागणें कठीण आहे. पण जर कबीरांच्या अभंगांतील सिकंदर लोदीच्या दंडाचा उल्लेख खरा, व शिकंदर लोदीचा काल निश्चित आहे, तर कबीरांचा काळ निश्चित झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. याशीं सुसंगत व आपल्याकडील वचनांशीं सुसंगत असा निष्कर्ष काढावयाचा, तर कबीरांच्या वेळेला दुसरे रामानंद मानावे लागतील.

इतका हा कबीर-नामदेवकाळाचा प्रपंच केला, याचें कारण कबीरांचा काळ ठरण्यावर रामानंदांचा काळ अवलंबून आहे व त्यावर विठ्ठलपंतांना दीक्षा देणारे कोण तें अवलंबून आहे. आमच्या मतें विठ्ठलपंतांना दीक्षा देणाऱ्या गुरुंचें नांव रामानंद नसावेंच; पण विठ्ठलपंतांना दीक्षा देणारे यती यांचें नांव रामानंद मानावयाचेंच असेल तर हे रामानंद कबीरांच्या गुरुहून वेगळे मानणें अवश्य. शंकराचार्य, नाथ याप्रमाणें ती एक गादी असावी.

कबीरांचे गुरु रामानंद व रामानुजाचार्य यांच्या परस्परसंबंधाविषयीं जी नवीन माहिती उपलब्ध झाली आहे, ती मननीय आहे. तेवढी देऊन हें प्रकरण संपवूं. पं.

हजारीप्रसाद द्विवेदी आपल्या 'कबीर' या पुस्तकांत पान ९५-९६वर दोहोंचा संबंध खालीलप्रमाणें दाखवितातः-

'इसमें कोई संदेह नहीं कि सारी परम्परायें रामानन्दका रामानुज-सम्प्रदाय से सम्बन्ध बताती हैं; पर साथ ही कुछ ऐसी दलीलें भी उपस्थित की गई हैं जिनसे इस अनुमानकी पुष्टी होती है कि दोनो आचार्योंका सम्बन्ध दूरका ही था। कहा गया है रामानंदके प्रवर्तित सम्प्रदायमें राम और सिताको जिस प्रकार एक मात्र परमाराध्य माना जाता है। उस प्रकार रामानुजके प्रवर्तित श्रीवैष्णवसम्प्रदायमें नहीं। श्रीवैष्णवलोग सभी अवतारोंकी उपासना करते हैं। फिर रामानंदी लोगोंमें जो मंत्र प्रचलित है वह भी रामानुजसम्प्रदायके मंत्रसे भिन्न है। उनका तिलक भी यद्यपि रामानुजी मतके तिलकसे मिलता जुलता है फिर भी हू-ब-हू वही नहीं है, थोडा भिन्न है। स्वयं रामानंदजी त्रिदण्डी संन्यासी नहीं थे, यह भी सिद्ध किया गया है। फिर और भी एक विचारणीय बात है। रामानंदी संप्रदायका नाम हू-ब-हू वही नहीं है जो रामानुजीय सम्प्रदायका। इस प्रकार नीचे लिखी तालिकासे स्पष्ट हो जायगा कि दोनो संप्रदायोंमें महत्त्वपूर्ण बातोंमें भेद है!

| | रामानुजीय | रामानंदीय |
|---|---|---|
| संप्रदाय— | श्रीवैष्णवसंप्रदाय | श्री संप्रदाय |
| मंत्र— | ॐ नमो नारायणाय | ॐ रामाय नमः |
| भाष्य— | श्री भाष्य | आनंदभाष्य |

फिर भी परम्परासे रामानंदका संबंध रामानुजीय सम्प्रदायसे सिद्ध है। इसका समाधान इस प्रकार किया गया है: अनुमान कर लिया गया है कि तामिळ देश में बहुत पुराने जमानेसे कोई रामसम्प्रदाय चला आ रहा था जो कभी श्रीवैष्णवोंमे अन्तर्भुक्त हो गया था। रामानंद उसी सम्प्रदायके आचार्य थे।"

× × ×

परंतु एक दुसरी दलील जो फर्कुहरने पेश की है, काफी वजनदार है। कहा जाता है कि रामानंद पहले पहले 'अध्यात्मरामायण' और 'अगस्त्यसुतीक्ष्णसंवाद' अपने साथ ले आये थे और इस बातमें तो कोई संदेह ही नहीं की उनके सम्प्रदायमें इन ग्रंथोंका आज भी बहुत समादर है।............आज भी रामानंदी बैष्णव इन ग्रंथोंको संप्रदायमान्य ग्रंथ मानते है। और यह आश्चर्यकी बात है कि ये ग्रंथ विशिष्टाद्वैतकी अपेक्षा शांकर-मतकी ओर अधिक झुके है।...इस प्रकार यह अनुमान असंगत नहीं जँचता कि रामानंदजीके मनमें भक्ति ही सबसे बडी चीज थी, तत्त्ववाद नहीं। उनके शिष्योंमें और संप्रदायमें अद्वैतवेदान्तका पूर्ण समादर है, तथापि वे स्वयं विशिष्टाद्वैत-वादके प्रचारक थे। इसी तरह उनके शिष्योंमें केवल एक बातको छोडकर अन्य बातोंमें काफी स्वतंत्रताका परिचय पाया जाता है। वह बात है भक्ति-अनन्य भक्ति।... ...

× × ×

वरील उताऱ्यावरून एकदोन गोष्टी स्पष्ट होत आहेत. त्यांपैकीं एक कीं उपासनेच्या बाबतींत रामानंद संप्रदाय व रामानुजीय संप्रदाय एक नव्हेत. दुसरी तत्त्वाच्या बाबतींत. रामानंद स्वतः जरी विशिष्टाद्वैत-मतवादी होते तरी त्यांचे अध्यात्मरामायणावर प्रेम असे व त्यांच्या शिष्यांना शांकरीयअद्वैत मान्य करण्यास त्यांची मुभा असे. आजहि अद्वैतासंबंधीं या संप्रदायांत आदर आहे. त्यांच्या सर्व शिष्यवर्गांत समान म्हणजे अनन्यभक्ति आहे.

ही माहिती देण्याचा हेतु असा आहे कीं चर्चेकरितां घटकाभर मान्य केलें कीं कबीरांचे गुरु रामानंद हेच विठ्ठलपंतांना संन्यास देणारे गुरु होते; तरी सुद्धां त्यांच्याद्वारां रामानुजाचार्यांच्या मतांचें बाळकडु ज्ञानदेवांना मिळण्याचा संभव फारच कमी! जवळजवळ नाहींच.

वस्तुस्थिति अशी आहे कीं 'अज्ञानाचा धांडोळा' घेण्यास ज्ञानदेव प्रवृत्त व्हावेत याकरितां इतकें दूर जाण्याचें कारण नाहीं. ज्या संप्रदायाचे ज्ञानदेव, तो नाथसंप्रदायच शांकर अद्वैतास मान देत नव्हता, कारण तो 'अद्वयाची' भाषा बोलणारा होता. अशी कथा सांगतात कीं, एक अद्वैतवेदान्ती गोरक्षनाथाशीं चर्चा करतांना वस्तु ही अद्वैत आहे, असा आग्रह धरून बसला. त्यावर गोरक्षनाथ म्हणाले 'अरे बाबा जी वस्तु सत्, चित्, आनंद हीं लक्षणेंहि अंगीं लावून घेत नाहीं ती तुझें हें संख्यात्मक अद्वैत तेवढें लावून घेईल होय!'

## (आ) ज्ञानदेव, ज्ञानेश्वर—एक कां दोन?

हा प्रश्न इतका जुना आहे व याची चर्चा त्यामुळें इतकी झाली आहे कीं पुनः त्याची चर्चा करून शाई व कागद खर्च करणें व्यर्थ वाटणें संभवनीय आहे. परंतु

अजून सुद्धां जुन्याच गोष्टी मोठ्या विद्वानांकडून मांडल्या जात आहेत असें दिसतें. म्हणून पुनः एकवार याची विस्तृत चर्चा करीत आहोंत.

'ज्ञानदेव आणि ज्ञानेश्वर' या नांवाचें एक पुस्तक इ. स. १९३१ मध्यें श्री. गंगाधर गणेश दाभोळकर यांनीं छापून प्रसिद्ध केलें. त्यांत 'भारद्वाज' या सहीनें सुधारक पत्रांत इ. स. १८९८–९९ सालीं रा. शिवराम एकनाथ भारदे यांनीं लिहिलेले लेख आहेत. त्यांत ज्ञानदेव हा भक्त आणि ज्ञानेश्वर हा योगी असें म्हटलें असून दोन्ही व्यक्ति भिन्न होत्या असें प्रतिपादिलें आहे. त्यांतील कांहीं मुद्दे पुढें देऊन त्यांचें निराकरण करतों.

श्री भारद्वाजांचे मुद्दे:—(१) योगी ज्ञानेश्वर आणि भक्त ज्ञानदेव असे दोन महापुरुष झाले. योगी हा आपेगांवचा आणि भक्त आळंदीचा असें म्हणतां येतें.

(२) योगी ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरी लिहिली. तिच्यामध्यें अनेक देव आहेत, पण विठ्ठलदेव नाहीं. ज्ञानेश्वरीमध्यें एकहि शब्द मुसलमानी नाहीं. त्याचा दुसरा ग्रंथ अमृतानुभव. त्यांतहि मुसलमानी शब्द नाहींत. तसेंच ज्या अभंगांत मुसलमानी शब्द नाहींत ते या योगी ज्ञानेश्वराचे अभंग असावेत.

(३) योगी ज्ञानेश्वर हा निवृत्तिनाथांचा पुत्र आणि शिष्यहि होता. हा नाथपंथांचा असून शिवभक्त होता.

(४) यानें ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शके १२१२ मध्यें गोदावरी तीरावरील पंचक्रोश क्षेत्रीं, जेथें महाल्या या दक्षिणलिंगी शाक्तांच्या देवीचें मंदीर आहे त्या स्थळीं ( म्हणजे आपेगांवीं ) लिहिली.

(५) योगी ज्ञानेश्वरानें स्वसंतोषानें समाधि घेतली असावी, असें त्या प्रसंगास अनुसरून ज्ञानदेवानें केलेल्या अभंगावरून सिद्ध आहे. ते अभंग या खालीं देतों.

> देवे निवृत्तीनें धरिले दोन्ही कर ।
> जातो ज्ञानदेव बैसावया ॥
> नदीचिया माशा घातलें माजवण ।
> तैसें जनमन काळवलें ॥
> जाऊनी ज्ञानेश्वर बसले आसनावरी ।
> पुढें ज्ञानेश्वरी ठेवियेली ॥
> ज्ञानदेव म्हणे सुखी केलें देवा ।
> पादपद्मीं ठेवा निरंतर ॥

हे अभंग ज्ञानदेवानें केले व त्यांत ज्ञानेश्वर नांव घातलें, त्यावरून त्या दोन्ही व्यक्ति निरनिराळ्या होत्या.

(६) ज्ञानेश्वरानें स्वतः होऊन समाधि घेतली असल्यास ती भगवद्गीतेतील विधानाप्रमाणें उत्तरायणांतच घेतली असावी व ती ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदा होय. याच समयास आपेगांवीं पुण्यतिथि उत्सव होतो.

(७) अमृतानुभवाच्या गुरुस्तवन नामक दुसऱ्या अध्यायांत निवृत्तीसंबंधानें पुढील ओंवी आढळते.

> जीवपणाचेनि त्रासे । यावया आपुलिये दसे ।
> शिवहि मुहूर्त पुसे । जया जोशियातें ॥

यावरून आपेगांवची जोशीपणाची वृत्ति ज्ञानेश्वराकडे असावी.

(८) ज्ञानेश्वरी अ. १५ ओ. १९ वी ओंवी पुढीलप्रमाणें आहे.

> का जे तानें मीचि एकौलते ।
> माझेंचि श्रीगुरुसी लागतें ।
> म्हणोनि कृपेसि एक हातें ।
> झाले तिये ॥

( राजवाडे पाठ )

या ओंवींत ज्ञानेश्वर हा निवृत्तीनाथांचा मुलगा असें म्हटलें आहे.

वरील मुद्यांना खालीलप्रमाणें उत्तरें देतां येतील. एक योगी ज्ञानेश्वर व दुसरे भक्त ज्ञानदेव असें सिद्ध झालें, तर पुढच्या गोष्टी सिद्ध होणार. तेव्हां प्रथम असा फरक करावयास, ज्ञानेश्वरी व अनुभवामृत हे जे योगी ज्ञानेश्वरांचे म्हणून ग्रंथ निर्विवाद मानले जातात, त्यांत जागा आहे कां हें पाहूं.

(१) आमूलाग्र निर्विकारबुद्धीनें समजून जो ज्ञानेश्वरी वाचील ( मग तो सांप्रदायिक असो वा नसो ) त्याच्या लक्षांत येईल कीं, असा फरक करण्यास ज्ञानेश्वरींत अथवा अनुभवामृतांत वाव नाहीं. या आमच्या विधानास खालीलप्रमाणें पुरावे देतां येतील—

(अ) श्रीज्ञानदेव हे अशा समन्वय वृत्तीचे होते, कीं त्यांना सर्व साधनें एकाच मुक्कामाला नेणारीं असल्यामुळें सारख्याच योग्यतेचीं वाटत होतीं. यास प्रमाण म्हणून गीता अ. ९ श्लो. १४–१५ यावरील ज्ञानदेवांची टीका पहावी.

त्या टीकेंत गीतेंत सांगितलेल्या 'कीर्तन' 'दृढव्रतानें होणारा प्रयत्न (योग)' 'नमन' 'ज्ञानयज्ञ' अशा चारहि साधनांचीं वर्णनें दिलीं आहेत, व तीं इतकीं उत्कृष्ट आहेत कीं ज्ञानदेवांना तीं साधनें सर्व पसंत होतीं, याबाबत शंकाच उरत नाहीं; अशा स्थितींत या चार साधनांचें त्यांनीं वर्णन केलें आहे, त्यावरून अनुमानच जर काढावयाचें असेल तर तें हें निघेल कीं, त्यांना कीर्तन हें साधन, त्याचा समाजावर होणारा परिणाम, या दृष्टीनें इतर साधनापेक्षां अधिक आवडतें असावें. योग, नमन व ज्ञान हीं साधनें व्यक्तीच्या उद्धाराचे मार्ग आहेत; पण व्यक्तीचा उद्धार करून कशाहि निकृष्ट अधिकाराचा मनुष्य असेना, त्याचेहि दोष धालवून त्याचा उद्धार करणारें कीर्तनरूपी साधन त्यांच्या दृष्टीनें सर्व साधनांत वरिष्ठ होतें. त्यांच्या समोर, तुकारामबुवा ज्याचें 'खळ। होतीं क्षणेचि निर्मळ' वर्णन करतात, असें पंढरपुरचें वाळवंट होतें. ही गोष्ट ज्यानें पंढरपुरच्या वाळवंटांतील कार्तिकीचा भजनसोहळा पाहिला असेल, त्याला सहजच पटेल. ज्ञानेश्वर महाराज ज्या कीर्तनाचें वर्णन करतात तें 'वैष्णवसंकीर्तन' आहे हें त्यांनीं 'कृष्ण विष्णु हरि गोविंद' या वैष्णव नांवाचाच उल्लेख केल्यावरून स्पष्ट होणार आहे. त्यांनीं कीर्तनाचें व कीर्तनकाराचें केलेलें संपूर्ण वर्णन वाचण्याजोगेंच आहे. येथें फक्त मुद्याच्या ओंव्या देतों.

* तरी कीर्तनाचेनि नटनाचे ।
  नाशिले व्यवसाव प्रायश्चित्तांचे ।
  जें नामचि नाहीं पापाचें ।
  ऐसें केलें ॥ १७ ॥

  यमदमा अवकळा आणिली ।
  तीर्थें ठायावरूनि उठविलीं ।
  यमलोकींची खुंटली ।
  राहटी आघवी ॥ १८ ॥

  यमु म्हणे काय यमावें ।
  दमु म्हणे कवणातें दमावें ।
  तीर्थें म्हणती काय खावें ।
  दोष ओखदासि नाहीं ॥ १९ ॥

  ऐसे माझेनि नामघोषें ।
  नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें ।
  अवघें जगचि महासुखें ।
  दुमदुमित भरलें ॥ २०० ॥

  ते पइंटेवीण पाहावीत । अमृतेंवीण जीववित ।
  **योगेंवीण दावित । कैवल्य डोळा ॥ १ ॥**

  परी राया रंका पाड धरूं ।
  नेणती सानेयां थोरां कडसणी करूं ।
  एकसरें आनंदाचें आवारु ।
  होत जगा ॥ २ ॥

  कहीं एकाधेनि वैकुंठा जावें ।
  तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें ।
  ऐसें नामघोष गौरवें ।
  धवळलें विश्व ॥ ३ ॥

नुसता योगी 'योगेंवीण दावित । कैवल्य डोळा ॥' असलें व्याख्यान करूं शकणार नाहीं.

(आ) गीता अ. २ श्लो. २९ 'आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम् । आश्चर्यवद्वदति तथैव चान्यः' या श्लोकावर श्रीमत् शंकराचार्यादिकांनीं केलेला अर्थ सोडून देऊन ज्ञानेश्वर महाराजांनीं स्वतंत्र अर्थ केला आहे. या श्लोकावर त्यांनीं वेगवेगळीं साधनें सांगितलीं आहेत व लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं 'आश्चर्यवद् वदति' या पदाचें व्याख्यान पुढीलप्रमाणें केलें आहे :—

एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊनि चित्ता ।
निरवधि तल्लीनता । निरंतर ॥ १७३ ॥

जर ग्रंथकर्ता हा नुसता योगीच असता व त्यास भक्तिमार्ग पसंत नसता तर त्यानें ही ओंवी लिहिलीच नसती.

(इ) भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुंच तत्त्वेन प्रवेष्टुंच परंतप ।

अ. ११ श्लो. ५४.

या श्लोकावर अनन्य भक्तीचें केलेलें व्याख्यान बघण्यासारखें आहे.

* परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी ।
  धरावांचूनि अनारिसी । गतिचि नेणे ॥ ६८६ ॥
  कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसिती ।
  गंगा जैसी अनन्यगती । मिळालीच मिळे ॥ ६८७ ॥
  तैसें **सर्वभावसंभारें** । न धरत प्रेम एकसरें ।
  मजमाजीं संचरे । मीचि होऊनी ॥ ६८८ ॥

ही अनन्यभक्ति प्रेमावर उभारलेली आहे. नारदांनीं आपल्या भक्तिसूत्रांत 'सात्वस्मिन् परमप्रेमरूपा' अशी दुसऱ्या सूत्रांत भक्तीची व्याख्या देऊन लगेच पुढें म्हटलें आहे, 'अन्याश्रयाणां त्यागो अनन्यता'।

ज्ञानेश्वर महाराजांनीं जी अनन्यभक्ति या श्लोकांत सांगितली आहे असें समजतात, ती अष्टांगयोगाचा परिपाक नव्हे; तो प्रेमलक्षणात्मक भक्तीचा पाक आहे. याच भक्तीला 'रागात्मिका' असेंहि म्हणतात. हिच्यांतच वात्सल्य, सख्य, माधुर इत्यादि भाव संभवतात व याच भावांचा ६८८ व्या ओंवींत उल्लेख आहे.

( ई ) 'मय्येव मन आधत्स्व' अ. १२ श्लो. ८ यावर ज्ञानदेवांनीं 'प्राणायाम प्रत्याहारादि' योगिक साधनांचा उल्लेख केला नाहीं. ते म्हणतात. "अगा मानस हें एक। माझ्या स्वरूपीं वृत्तिक। करूनि घालीं निष्टंक। बुद्धिनिश्चयेंसी ॥ ९७ ॥ इयें दोन्ही सरिसीं। मजमाजि प्रेमेसीं। रिगालीं तरी पावसी। मातें तूं गा ॥ ९८ ॥"

( उ ) ज्ञानेश्वरीमध्यें 'अर्जुन' 'संजय' यांचीं जीं वर्णनें आलीं आहेत तीं ज्यांना 'भक्त' म्हणतात त्यांची आहेत. कैवल्याकरितां रागद्वेषशून्य होऊन 'तहानें तहानचि पियावी' असें योगसाधन करणाऱ्या योग्यांचीं नाहींत.

( ऊ ) ज्ञानेश्वरींत ज्ञानेश्वर महाराज चारी पुरुषार्थांपेक्षां भक्ति श्रेष्ठ म्हणतात, 'चहुं पुरुषार्थां शिरीं। भक्ति जैसी ॥' अ. १८-८६७.

अनुभवामृताच्या नवव्या प्रकरणांत ज्ञान्याची स्थिति वर्णन करीत असतां इतर कोठल्याहि कर्मांचा उल्लेख न करतां ज्ञानेश्वर महाराज भक्तीचाच उल्लेख करून म्हणतात —

* ऐलियाहि स्वामीभृत्यसंबंधा।
  लागीं उठली श्रद्धा।
  तैं देवोचि नुसधा।
  कामविजे ॥ ३९ ॥

ज्ञानेश्वर महाराज नुसता उल्लेख करून थांबत नाहींत, तर अद्वैतांत भक्ति संभवते हें सिद्ध करतात.

* देव देऊळ परिवारु। कीजे कोरूनि डोंगरु।
  तैसा भक्तीचा व्यवहारु। कां न व्हावा ॥४३॥

हीं स्थळें वाचकांच्या समोर मांडण्यांत हेतु असा आहे कीं, ज्ञानेश्वरीचे व अनुभवामृताचे लेखक श्री ज्ञानदेव हे जसे योगी होते, तसेच भक्तहि होते. त्यांच्या अंतःकरणांत भक्तीचा ओलावा होता व यामुळें 'भक्ति' या साधनासंबंधीं प्रेम होतें. तुकारामबुवांचा दृष्टान्त देऊन सांगावयाचें तर 'उदक अग्नि धान्य जाल्या घडे पाक'. तसें ज्ञानदेवांच्या ठिकाणीं कर्म, भक्ति, योग व ज्ञान या साधनांचा उत्कृष्ट पाक झाला होता. ते ज्ञान्यांचे राजे, योग्यांचे मुकुटमणि, भक्तांचे शिरोमणि व कर्मठांना वंद्य असे होते.

या बाबतींत आणखी कांहीं मुद्दे वाचकांच्या समोर आणून पुढचा प्रश्न विचारांत घेऊं.

( ए ) ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव योगी होते; पण गीतेंत आपल्या पंथांतले रहस्य जो कुंडलिनीयोग तोच सांगितला आहे असें ते म्हणत नाहींत. उलट ते म्हणतात कीं, गीता ही काण्डत्रय ( कर्म, उपासना, ज्ञान ) निरूपिणी कोंडिसवाणी श्रुतीच आहे. तेव्हां ज्ञानेश्वरीचे कर्ते ज्ञानदेव हे योगी होते हें म्हणण्यांत फारसें महत्त्व रहात नाहीं.

( ऐ ) यापेक्षां आणखी महत्त्वाचा मुद्दा वाचकांच्यापुढें मांडावयाचा आहे. तो असा कीं; ज्ञानदेव हे एका दृष्टीनें सांगावयाचें तर आपआपला अधिकार जाणून केलीं तर सर्व साधनें सारखीच समजणारे. पण ते कोणच्या साधनाचें काय वैशिष्ट्य आहे तेंहि पुरें जाणत होते. गीतेच्या बाराव्या अध्यायाच्या शेवटीं 'अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः' या १९ व्या श्लोकाचें व्याख्यान करतांना ते म्हणतात—

* मग याहीवरी पार्था। माझ्या भजनीं आस्था।
  तरी तयातें मी माथां। मुकुट करीं ॥ २१४ ॥
  जे पुरुषार्थ सिद्धी चौथी। घेऊनी आपुलां हातीं।
  रिगाला भक्तिपंथीं। जगा देतु ॥ २१९ ॥

स्वतः मुक्त होऊन ती मुक्ति, भक्तिमार्गाचा प्रसार करून, जगांत वांटीत सुटतो तो मला प्रिय. या ओंवीवरून ज्यांना योगी म्हणतात, त्या ज्ञानेश्वरीकर्त्यांचें भक्तिमार्गावरील प्रेम व्यक्त होत नाहीं काय? संपूर्ण बारावा अध्याय याकरितां पहाण्यासारखा आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, पुष्कळसे लेखक पुरा ग्रंथ अथपासून इतिपर्यंत जाणून वाचून मग लिहावें इत्कादि धीर धरतांना दिसत नाहींत. साधन करणारे जे साधक आहेत, ते जाणतात

कीं, योग व भक्ति यांत सामान्य माणसें समजतात तितका फरक नाहीं. भक्तीलाहि यमनियम लागतात व योगानें जसे कांहीं अनुभव येतात तसे भक्तीनेंहि येतात. ही गोष्ट 'पंथराज' या प्रकरणांत स्पष्ट दाखविली आहे. वाचकांनीं ती अवश्य पहावी.

येथपर्यंत ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव नुसते योगी नव्हते, पण भक्तहि होते हें दाखविलें. आतां भक्त म्हणून वेगळे काढले गेलेले जे अभंगकर्ते ज्ञानदेव ते योगी होते हें थोडक्यांत दाखवितो.

ज्ञानदेवांचे म्हणून जे अभंग आहेत त्यांत योगानुभव सांगणारे कितीतरी अभंग आहेत व ते इतके क्लिष्ट आहेत कीं, त्यांचा अर्थ लावणेंहि कठीण आहे. या मुद्द्याची फारशी चर्चा करण्याचें कारण नाहीं. कारण योडे का होईना जे अभंग ज्ञानदेवांनीं केले ते सर्वमान्य झाले आहेत. आतां या बाबतींत निष्कर्ष असा देतां येईल कीं, जरी ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव यांनींच कांहीं अभंग केले असले तरी हल्लीं जी उपलब्ध गाथा आहे त्यांत या संतश्रेष्ठ ज्ञानदेवानंतर झालेले दुसरे कोणी ज्ञानदेव यांचेहि अभंग असण्याचा संभव आहे. जसे ज्ञानदेवांच्या नांवावर मोडणारे ओंवीबद्ध सर्व ग्रंथ ज्ञानदेवांचें नाहींत हें उघड आहे; तसे गाथ्यांतील कांहीं अभंग दुसऱ्या ज्ञानदेवांचे असतील हें मान्य करण्यास कांहींच हरकत नाहीं. पण, याचा अर्थ ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव व अभंगकर्ते ज्ञानदेव हे दोन वेगळे असले पाहिजेत, असा निष्कर्ष काढणें चुकीचें आहे. ओंवी व अभंग यांत कांहीं फारसा फरक नाहीं. नुसत्या म्हणण्याच्या पद्धतीनें ओंवीचा अभंग होतो, हें भजन करणाऱ्यांस विदित आहे. तुकाराम-बुवांच्यापर्यंत अभंगाला 'ओंव्या' म्हटलेलें आढळून येतें. तुकारामबुवा आपल्या एकशें एक कडव्यांच्या अभंगाच्या आरंभीं म्हणतात—

> गाईन ओंविया पंढरीचा देव ।
> आमुचा तो जीव पांडुरंग ॥ १ ॥

योगी व भक्त हा भेद करून ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव योगी व अभंगकर्ते ज्ञानदेव भक्त असे दोन ज्ञानदेव केले जातात. यास कारण आमच्या मतें हल्लींच्या वारकऱ्यांचा म्हणून समजला गेलेला वारी, भजनादि कार्यक्रम व त्याचें बाहेरून होणारें ज्ञान. वारकरी टाळ वाजवितात, पंढरपुरला जातात व योगी हा कोठल्या तरी कोपऱ्यांत नाक धरून, आसन घालून बसतो. यांत साम्य कसलें असणार, असें वरवर बाहेरून पहाणाऱ्यास वाटतें. त्यावरच हा भेद उभारला आहे. पण हें कवच दूर करून तुकारामबुवादिकांनीं सांगितलेला भजनवारीचा मार्ग जो जाणतियासवा बघेल त्यास आढळून येईल कीं, कऱ्हाडास कृष्णाकोयनांच्या झालेल्या प्रीतिसंगमाप्रमाणें एका साधकाच्या ठिकाणीं या दोन साधनांचा प्रीतिसंगम होणें शक्य आहे.

असें शक्य होतें यास पुरावाच पाहिजे असला, तर अर्वाचीन काळांत झालेले स्वामी विवेकानंदाचे गुरु श्रीरामकृष्ण यांचें उदाहरण देतां येईल. मूळचे भक्त. त्यांना तोतापुरीनें योग व भैरवीनें तंत्रमार्ग शिकविला व ते साधनत्रिवेणीचे प्रयाग झाले. त्यांच्या चरित्रांत तर असें वर्णन आहे कीं, त्यांनीं इसाई, महंमद यांनीं सांगितलेलीहि साधना केली व 'आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम्' या न्यायानें सर्व धर्म एकाच वस्तूकडे जातात असें सिद्ध केलें.

तात्पर्य, योगी हा भक्तापेक्षां सर्वस्वीच भिन्न असतो, ही अज्ञानजन्य कल्पना होय. सहाशें वर्षांपूर्वींच साधनांचा समन्वय करून बोलणारे ज्ञानराजांच्यासारखे भक्त महाराष्ट्रांत जन्माला आले हें महाराष्ट्राचें भाग्य.

नाथसंप्रदायांमध्यें योग व भक्ति यांचा मधुर समन्वय होता. हें या पंथाचें वैशिष्ट्य. ज्ञानदेवांच्या शिष्याचे शिष्य नामदेव हे मोठे भक्त होते हें प्रसिद्धच आहे. ते ज्ञानोबाचें वर्णन करतात.

> ज्ञानराज माझी योग्यांची माऊली ।
> तेणें निगमवल्ली प्रगट केली ॥

इतका या प्रश्नाचा प्रपंच करण्याचें कारण असें कीं, मूळांत ही कल्पनाच तर्कदुष्ट व प्रत्यक्षास विरुद्ध आहे व तिच्यावर उभारलेली 'योगी ज्ञानदेव व भक्त ज्ञानदेव हे दोन भिन्न' ही इमारत अर्थात् बिनपायाची व म्हणून न टिकणारी आहे.

( २ ) इतक्या विस्तारानंतर दुसऱ्या प्रश्नास वेगळें उत्तर देण्याचें कारण नाहीं. त्यांतील महत्त्वाचा मुद्दा हा कीं ज्ञानेश्वरी व अनुभवामृत यांत विठ्ठलाचा उल्लेख नाहीं. यास गु. प्रा. रानडे यांनीं आपल्या ज्ञानेश्वर-वचनामृत या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत सविस्तर उत्तर दिलें आहे, तें वाचकांनीं पहावें.

( ३ ) ज्ञानेश्वरीकर्त्यां ज्ञानदेवांच्या वडिलांचें नांव निवृत्ति होतें आणि हें ज्या एका ओंवीवरून भारद्वाज ठरवतात, त्या ओंवीचा अर्थ भारद्वाज यांना समजला नाहीं असें दुःखानें म्हणावें लागतें. ती ओंवीं पुढीलप्रमाणें आहे.

• तेथ महेशान्वय संभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीतें । देशीकार लेणें ॥१८–१८०५॥

या ओंवीचा 'महेश म्हणजे शंकर यांच्या वंशांत ( विद्यावंशांत–संप्रदायांत ) उत्पन्न झालेल्या श्रीनिवृत्तिनाथांचा सुत म्हणजे शिष्य ज्ञानदेव त्यानें गीतेवर देशी भाषेतील टीकारूप हा दागिना चढविला' असा सरळ अर्थ आहे. पण त्यांच्या मताप्रमाणें हा झाला सांप्रदायिक अर्थ ! तो स्वतंत्रप्रज्ञांना कसा पटणार ? पण ज्ञानदेवासारखे संत हें जें लिहितात त्यांची लिहिण्याची ठराविक पद्धत, त्यांच्या समजुती, जाणून घेणें अवश्य आहे. जसें संस्कारानें त्रैवर्णिकांना द्विजत्व प्राप्त होतें, तसें मनुष्यानें गुरूपासून दीक्षा घेतली कीं त्यास पारमार्थिक दृष्ट्या 'द्विजत्व' प्राप्त होतें. तो एक दुसरा जन्मच होतो असें हे सर्व संत समजतात.

श्रीएकनाथ म्हणतात, 'गुरुपासोनि दीक्षाग्रहण । हा पुरुषासि नवा जन्म जाण । गुरु मायबाप संपूर्ण । तें ऐक लक्षण उद्धवा ॥ उपजल्या बाळकासि तत्त्वता । पंचविध जाण पिता । जनिता आणि उपनेता । तिजा प्रतिपाळिता अन्नदानें ॥ जो भयापासूनि सोडविता । जो बंदिविमोचन करविता । जो देहाचें मरण चुकविता । तोही पिता शास्त्रार्थें ॥ या वेगळा पांचवा पिता । जो झाडणी करी पंचभूतां । मृत्यूपासून सोडवितां । जो गर्भव्यथा निवारी ॥ ज्याचे देखलिया चरण । बाधूं न शके भवबंधन । तो सद्गुरु पिता जाण । भाग्येंवीण न पाविजे ॥......तैसा सद्गुरु नव्हे पिता । निजवीर्य न वेंचिता । योनिद्वारें नुपजवितां । जननी जनिता स्वयें झाला ॥ उदराबाहेर निघाल्या पाठीं । माता पुत्रस्नेहें कळवळा उठी । वाहेरीलें सूनि आपुल्या पोटीं । निजस्नेहें गोमटी गुरुमाता ॥ या लागीं शिष्यासि तत्त्वतां । सद्गुरुचि मातापिता । निजस्नेहें वाढविता । तदात्मता अभेदें ॥ मागील पिते जे चौघेजण । ते याचे सावत्र बाप जाण । मातापिता भिन्न भिन्न । सखेपण त्या कैंचें ॥ यालागीं सद्गुरु जो सद्बापु । तो उच्छिष्यासि सखाबापू ॥ अ. १३, ८०–९० ॥' 'उत्पादकब्रह्मदात्रोर्गरीयान् ब्रह्मदः पिता' हें वचनहि सुप्रसिद्धच आहे.

या ओंवीमध्यें ज्ञानदेव हे आपल्या मांसवंशाचा उल्लेख करीत नाहींत; तर विद्यावंशाचा करीत आहेत. त्याचेंच वर्णन त्यांनीं या ओंवीच्या वरच्या ओव्यांतून दिलें आहे. विद्यावंशांत गुरूपासून दीक्षा प्राप्त होत असल्यामुळें गुरूला 'पिता' असें म्हणतात तसेंच येथें म्हटलें आहे. 'तान्हेनि मियां अपत्यें' यांतसुद्धां मी जो एकटा लहान शिष्य असाच अर्थ आहे.

अभंगांत सुद्धां याच अर्थाचा निवृत्तिनाथ हे स्थूळ शरीराचे जनक नव्हेत असें सांगणारें वचन आहे. 'निवृत्ति गार्हस्थ्य मांडले आहे । निष्काम अपत्य प्रसवित जाये'

महाराष्ट्र सारस्वतकार श्री. भावे यांची मजल आपल्या महाराष्ट्रसारस्वताच्या प्रथमावृत्तींत 'महेश' म्हणजे 'म्हैसे' असावेत असा सुद्धां तर्क करण्यापर्यंत गेली होती. पुढें दुसऱ्या आवृत्तींत त्यांनीं ही चूक सुधारली आहे.

हे साधुसंत आपल्या गुरूचा व गुरुसंप्रदायाचाच उल्लेख करतात; फारकरून मांसवंशाचा क्वचितच करतात. तुकारामबुवांनीं सुद्धां आपल्या अभंगांत आपल्या वडील मातोश्री यांचीं नांवें दिलीं नाहींत. राघव चैतन्य, केशव चैतन्य अशी गुरुपरंपरा दिली आहे.

ज्ञानदेवांचे गुरु निवृत्तिनाथ हें मान्यच करावें लागेल. प्रश्न एवढाच कीं हे वडील का बंधु ? ज्ञानदेवांनीं आपले गुरु श्रीनिवृत्तिनाथांचें जें अनुभवामृतांत वर्णन दिलें आहे, नामदेवांनीं त्यांची जी स्थिति वर्णन केली आहे त्यावरून त्यांनीं संसार कधीं केलाच नाहीं हें उघड होणार आहे. 'वांचोनि प्रवृत्तिविरोधें । का निवृत्तीचेनि बोधें । आणिजे तैसा वादें । निवृत्ति नव्हे ॥' प्र. २-७१ ॥ प्रवृत्ति करीत होते, ती जमेना म्हणून तिच्याशीं लढले व मागून निवृत्तीच्या मार्गाला लागले असें माझे 'निवृत्ति' नव्हेत असा या ओंवीचा अर्थ आहे. तात्पर्य, ज्ञानदेवांचे गुरु निवृत्तिनाथ यांनीं प्रवृत्ति कधीं स्वीकारलीच नव्हती असे ते होते. अर्थात् निवृत्ति स्थूलदेहाचे जनक नव्हत, ते बंधु होते.

योगी ज्ञानदेव शिवभक्त होते. हेंहि 'शिवभक्त' हा शब्द संकोचित अर्थानें घेतल्यास खरें नाहीं. ज्ञानेश्वर

महाराज हे नाथसंप्रदायी. त्यांचे मूळ पुरुष आदिनाथ शंकर हें खरें. पण याचा अर्थ ते संकोचित अर्थानें शिवभक्त होते असा करणें चुकीचें ठरेल. त्यांना शिव व विष्णु सारखेच प्रिय. 'देवद्विजगुरुप्राज्ञ' या अ. १७ श्लो. १४ वर लिहितांना ते लिहितात. 'तरि शंभू कां श्रीहरि । पढियंता होय ॥ २०१ ॥ लिंग कां प्रतिमा दिठी । देखत सैंबो अंगेष्ठी । लोटिजे कां काठी । पडली जैसी ॥ २०४ ॥' तसेंच 'स्वाध्यायाभ्यसनं चैव' या त्याच अध्यायांतील पुढील श्लोकावर लिहितांना ते म्हणतात. 'नातरि एकाधें नांव । तेंचि शैव कां वैष्णव ॥' शिवाय श्रीकृष्ण हे श्रीमहाविष्णूचे अवतार असें ज्ञानदेव म्हणतात व आपले विचार मांडायला एखादा शैवागम न घेतांना महाविष्णूनें सांगितलेली गीताच पसंत करतात. यावरून ते संकोचित वृत्तीचे शैव नव्हते ही गोष्ट स्पष्ट आहे.

दक्षिणेंत वीरशैव व वीरवैष्णव यांत जें उभें वैर आहे तसें महाराष्ट्रांत नाहीं. त्याचें कारण महाराष्ट्र-संस्कृतीचे आद्यजनक ज्ञानदेव यांनींच आपल्या ग्रंथांत तें ठेवलें नाहीं. 'हरि हरा भेद । नाहीं नका करूं वाद' हीच भूमिका त्यांनीं मांडली व पुढें संतांनीं तीच उचलून तिचा प्रसार केला. तात्पर्य, ज्ञानेश्वरीकर्ते शैव होते व अभंगकर्ते वैष्णव होते हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण अभंगांतसुद्धां 'शिवनाम शीतळ मुखीं सेवी का कापडिया रे ।' असे शिवनामाचें महात्म्य सांगणारे अभंग आहेत. ज्ञानदेवांनीं पंढरपुरच्या देवाचें जें वर्णन केलें आहे, त्यांत विष्णूंनीं शिवास डोक्यावर घेतलें आहे. अशी ही मूर्ति आहे असें म्हटलें आहे. 'रूप पाहतां तरी डोळसु । सुंदर पाहतां गोपवेषु । महिमा वर्णितां महेशु । जेणें मस्तकीं वंदिला ॥'

तात्पर्य, ज्ञानदेवी लिहिणारे ज्ञानदेव योगी व त्याहून अभंग लिहिणारे भक्त ज्ञानदेव वेगळे असा निष्कर्ष काढण्यास आधार नाहीं. याबाबतींत आमचे स्नेही नाशिक महाविद्यालयांतील प्रा. कृष्णराव गजेंद्रगडकर यांनीं श्रीज्ञानेश्वरदर्शन साहित्य खंड 'श्रीज्ञानदेव महाराजांचे अभंग' या निबंधांत दोन्ही एक हा जो निष्कर्ष काढला आहे तो सर्वांना मान्य होण्यासारखा आहे.

(४) या मुद्याचा विचार 'ज्ञानेश्वरीचें जन्मस्थान' या प्रकरणांत सविस्तर केला आहे, तो वाचकांनीं पहावा.

(५) 'योगी ज्ञानदेवानें समाधि आपण होऊन घेतली; त्या वर्णनांत ज्ञानेश्वर असें म्हटलें आहे; म्हणून त्या दोन व्यक्ति भिन्न होत' असें भारद्वाज म्हणतात. पण मुळांत हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हे अभंग नामदेवांनीं रचले आहेत. समाधीची कथा नामदेवांनीं वर्णन केली आहे.

(६) जर ज्ञानदेवांनीं आपण होऊन समाधि घेतली असती तर ती उत्तरायणांत घेतली असती. या कल्पनेस आधार आपेगांवीं ज्येष्ठ प्रतिपदेस पुण्यतिथि उत्सव होतो, असा दिला आहे. ही कल्पना ज्ञानेश्वरी संपूर्ण व जाणून न वाचतां शंका करणारे जे आहेत त्यांची आहे. अर्चिरादिमार्ग व धूम्रमार्ग, दक्षिणायन व उत्तरायण हे भेद जे साधक योगी आहेत त्यांच्याकरितां आहेत, साधन करून जे येथेंच 'सोहंसिद्ध' झाले 'मजचि मिळोनि गेले फुडे ।' त्यांना नाहीं असें ज्ञानदेवांनीं मोठे उत्कृष्ट दृष्टान्त देऊन पुढें याच अध्यायांतील २७ व्या श्लोकावर लिहितांना मांडले आहे. ते म्हणतात. 'आतां शरीराचें तयाचिया ठायीं । आडनांवही उरलें नाहीं । तरी कोणें काळें काई । निमे ते पाहें पां ॥ मग मार्गातें कासया शोधावें । कोणें कोठूनि कें जावें । जरी देशकाळादि आघवें । आपणचि असिजे ॥ आणि हां गा घट जे वेळीं फुटे । तैं वेळीं तेथींचें आकाश लागे नीट वाटे । वाटा लागे तरि गगना भेटे । एऱ्हवीं चुके ॥ पाहें पां ऐसें हन आहे । कीं तो आकाशचि म्हणो जाये । येर गगन तें गगनींचि आहे । घटत्वाहि आधीं ॥ ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गांचें सांकडें । तया सोहंसिद्धां न पडे । योगीयांसी ॥ अ. ८ श्रो. २५१–५५ ॥

ज्ञानदेव म्हणतात, घडा फुटला व त्यांतील आकाशाला योग्य मार्गदर्शक भेटला तर तें महदाकाशाला भेटेल, नाहींतर चुकेल काय ? तसेंच जे सोहंसिद्ध मरणाच्याहि आधीं ब्रह्मरूप झाले, ते मरण आल्यावर कोठें जाणार ? त्यांच्याकरितां दक्षिणायण–उत्तरायण हा काळ, धूम्रमार्ग, अर्चिरादि मार्ग, उत्तरेकडे तोंड करून बसला कां पश्चिमेकडे, हे प्रश्नच उत्पन्न होत नाहींत. इतकें स्वच्छ ज्ञानदेव लिहितात; पण हें वाचणार कोण ? आपेगांवचा उत्सव हा, ज्या मूळ पुरुषांची तेथें समाधि आहे त्यांचा होत असावा.

(७) ही तर इतकी पोचट कल्पना आहे कीं तिला उत्तर देण्याचें सुद्धां कारण नाहीं. जीवत्वदशेला प्राप्त

झालेला शिव हा आपल्या मूळ स्थितीस येण्यास ' स्वयंभचि जो निवृत्ति त्या ज्योतिषाला मुहूर्त विचारतो,' असें रूपक आहे. त्यावरून व जोसपण त्यांच्या कुळांत होतें म्हणून येथें निवृत्तिनाथाचे म्हणजे ज्ञानदेवांच्या वडिलांचें वर्णन आहे असें समजणें हें तर्कदुष्ट आहे.

या प्रश्नास नसतें महत्त्व आलें याचें कारण पैठण-जवळचे श्री. भारदे यांनीं हें पुढें मांडलें. पण ते जरी पैठणजवळचे होते, तरी त्यांची माहिती अपुरी दिसते व शास्त्र आणि संप्रदाय यांचें ज्ञान तर अगदींच बेताचें दिसतें. त्यांनीं उडविलेली धूळ अजूनहि बसली नाहीं. पैठणपासून आपेगांव हें सात मैलांपेक्षां जास्त नाहीं. जर श्रीएकनाथकाळीं श्री. भारदे यांच्या ज्ञानदेव दोन व अभंगकर्त्या ज्ञानदेवांची समाधि आळंदीस व ज्ञानेश्वरी-कर्ते योगी ज्ञानदेव यांची समाधि आपेगांवीं या कल्पना रूढ असत्या तर एकनाथांना ज्ञानेश्वरीच्या संशोधना-करितां आळंदीची वारी करण्याचें कारण नव्हतें ! आपेगांवीं ज्ञानदेवांची समाधि आहे असें श्री. भारदे म्हणतात; पण आपेगांवापासून आठ मैलांवर असणाऱ्या पैठणक्षेत्रीं रहाणारे एकनाथांच्या सारखे साक्षेपी संशोधक तसें म्हणत नाहींत; खुद्द ( आपेगांव ) पैठण प्रांतांतील सर्व मंडळी वर्षानुवर्षे आळंदीस ज्ञानदेवांची समाधि आहे म्हणून दर्शनाला आळंदीस येतात. या गोष्टीस कांहींच महत्त्व नाहीं काय ? आपेगांवच्या लोकांनीं तेथें असलेल्या समाधीचा नुकताच जीर्णोद्धार केला आहे. पण ते लोक ही ज्ञानदेवाची समाधि आहे असें आजहि म्हणत नाहींत. ती ज्ञानदेवांच्या पूर्वजांची समाधि आहे. वस्तुस्थिति अशी कीं, या विषयावर लिहिणारे व बोलणारे स्वतः आपेगांवीं जाऊन पहाण्याचा त्रास कचितच घेतात. त्यांनीं जर तसा त्रास घेतला तर आम्हीं वर केलेल्या विधानांची सत्यता त्यांना दिसून येईल.

### (इ) ज्ञानदेवांचें जन्मस्थान—आळंदी कीं आपेगांव ?

डॉ. शं. गो. तुळपुळे हे त्यांच्या ' पांच संतकवि ' ह्या उत्कृष्ट पुस्तकांत म्हणतात:—" आपेगांवीं जन्माला आलेलीं हीं चार भावंडें मोठीं होऊं लागलीं, " बडोद्याचे इतिहाससंशोधक श्री. वाकसकर यांनीं 'पराग' मासिकाच्या एका अंकांत ' दोन ज्ञानदेव ' या विषयाची चर्चा केली आहे. अशा लेखांनीं पुन्हां एकवार ज्ञानदेवांचें जन्मस्थान कोणतें या प्रश्नाचा विचार करणें अवश्य झालें आहे.

येथें हेंहि सांगणें अवश्य आहे कीं, प्रस्तुत लेखकाचेंहि मत ज्ञानदेवादि भावंडांचा जन्म आपेगांवीं झाला असेंच होतें व त्याप्रमाणें आपल्या " श्रीज्ञानदेव, चरित्र ग्रंथ व तत्त्वज्ञान " या पुस्तकांत त्यानें म्हटलेंहि आहे; पण अधिक विचाराअंतीं त्यास असें दिसून आलें कीं, हें विधान बरोबर नव्हे. ज्ञानदेवादि भावंडांचा जन्म आळंदीसच झाला असला पाहिजे.

ज्ञानदेवाच्या जीवनाविषयीं माहिती देणारे निरपवाद म्हणून मान्य असलेले ग्रंथ ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेवपासष्टी व कांहीं अभंग; व त्यांच्या समकालीन एवढेंच नव्हे तर त्यांच्याच नाथपरंपरेंत समाविष्ट झालेले झालेले भगवद्भक्त पंढरपूरनिवासी नामदेवराय यांचे अभंग. यापैकीं ज्ञानदेवांच्या ग्रंथांतून त्यांच्या अध्या-त्मिक उच्च भूमिकेसंबंधीं जरी कांहीं महत्त्वाची माहिती मिळत असली तरी त्यांच्या व्यावहारिक जीवनाविषयीं जवळजवळ कांहींहि माहिती मिळत नाहीं ही गोष्ट प्रसिद्ध आहे. गीतेंतील ' अमानित्व ' या ज्ञानगुणाचें ज्ञानदेवांनीं जें ' माझें नामरूप हरपो ' असें व्याख्यान केलें आहे तदनुसारच त्यांचें या बाबतींत वर्तन आहे. यामुळें त्यांच्या व्यावहारिक जीवनाविषयीं उरला महत्त्वाचा एकच पुरावा व तो म्हणजे नामदेवकृत अभंगाचा ! उद्बोधनाथादिकांनीं त्यांचें चरित्र लिहिलें आहे. पण नामदेव हे समकालीन व त्यांच्याबरोबर कांहीं काळ राहिलेले असल्यानें त्यांच्या वर्णनास फार महत्त्व आहे. तेव्हां ज्ञानदेवांच्या व्यावहारिक जीवनांतील कांहीं बाबींविषयीं वाद उत्पन्न झाला तर प्रथम नामदेवांच्याच अभंगांकडे वळणें प्राप्त आहे. म्हणून आपण प्रथम त्यांतील माहितीचा विचार करूं.

ज्ञानदेवचरित्राच्या दृष्टीनें आपण नामदेवांचा गाथा जर पाहिला तर त्यांत ज्ञानदेवविषयक म्हणून पुढील प्रकरणें आढळतात:—

( १ ) श्रीज्ञानेश्वरमहाराजांची आदि
( २ ) श्रीज्ञानेश्वरमहाराजांची समाधि
( ३ ) श्रीज्ञानदेव व श्रीनामदेव तीर्थावली
( ४ ) श्रीज्ञानेश्वरसमाधि महिमा
( ५ ) श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या भेटीविषयी श्री-नामदेवाची आळ

ज्ञानदेवांचे दोघे बंधु व धाकटी बहीण मुक्ताबाई तसेंच चांगदेव यांच्या समाधीचें वर्णन करणारेहि

नामदेवांचे अभंग आहेत. त्यांचाहि प्रस्तुत प्रकरणीं विचार करणें अवश्य आहे.

जन्माच्या माहितीच्या दृष्टीनें यांपैकीं 'आदि' हें प्रकरण महत्त्वाचें आहे. त्यांतील कांहीं भाग येथें देणें अवश्य आहे. कारण या 'आदींत' नामदेव, ज्ञानदेवादिक चारी भावंडांचा जन्म आळंदीस झाला अगर आपेगांवीं झाला असें स्पष्ट विधान कोठेंच करीत नाहींत, ते एवढेंच म्हणतात: —

> ' ऐसीं बारा वर्षें क्रमिली निगुती ।
> झालीसे संतती चौघे जण ॥
> निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई ।......

अर्थात् महत्त्वाचा प्रश्न हीं बारा वर्षें विठ्ठल-रुक्मिणी या दांपत्यानें कोठें काढली ? व तें नामदेवांच्या व्याख्यानाचा ओघ व इतर तत्कालीन त्या कुटुंबांतील माणसांचे माहिती असलेले स्वभाव व तत्कालीन परिस्थिति यांचा विचार करूनच ठरवले पाहिजे; म्हणून आपण आतां नामदेवांनीं विठ्ठलपंतांच्या गृहस्थाश्रमाचें केलेलें वर्णन पाहूं.

ज्ञानदेवांचे वडील विठ्ठलपंत व मातोश्री रुक्मिणी यांच्या विवाहापर्यंतच्या हकीगतीबाबत दुमत नाहीं. म्हणून ती कथा येथें न सांगतां पुढील भाग नामदेव कसा सांगतात तें पाहूं. नामदेव म्हणतात : " जरी विवाह झाला व विठ्ठलपंत आश्रमविधीचें जरी पालन करीत होते तरी त्यांचें मन तीर्थाटणींच होतें. जांवयाचें हें अंतर जाणून शिदोपंतांनीं ( रुक्मिणीच्या वडिलांनीं ) त्यांना सांगितलें कीं, आपला हेतु पुरा करा व लवकर घरीं परत या. ही सासऱ्याची आज्ञा मिळाल्यावर विठ्ठलपंत यात्रेस गेले. दक्षिणेकडील तीर्थांचें दर्शन करून माहुली संगमांत स्नान करून विठ्ठलपंत कांहीं काळानें आळंदीला परत आले. आल्यावर आपल्या मनांत मातापित्यांचें दर्शन घ्यावयाचें आहे तेव्हां आज्ञा द्यावी अशी शिदोपंतांजवळ त्यांनीं विनंती केली. शिदोपंत म्हणाले, ' उत्तम. कुटुंबासहित दर्शनास जावें, मीहि येतों ' त्याप्रमाणें शिदोपंत मुलीस व जांवयास घेऊन आपेगांवीं गेले. शिदोपंतांनीं विठ्ठलपंत व रुक्मिणी यांना विठ्ठलपंतांच्या मातापित्यांच्या चरणांवर घातल्यावर दोघांनीं आशीर्वाद दिले कीं, ' चिरंजीव व्हा. आम्हांला आनंद झाला.' शिदोपंत कांहीं दिवस आपेगांवीं राहिले व नंतर कांहीं दिवसांनीं ते घरीं आळंदीला परतले.

कालांतरानें वृद्ध होऊन विठ्ठलपंतांचे मातोश्री व वडील दोघे वैकुंठवासी झाले. विठ्ठलपंत हे स्वभावतःच विरक्त; त्यांना संसाराची काळजीच नव्हती. " नेहमीं समाधान वृत्तीनें राहातात, प्रपंचांत उदासीन. " हें वृत्त शिदोपंतांना कळलें तेव्हां त्यांना खेद झाला व ते आपेगांवास आले व दोघांची विचारपूस करून म्हणाले, ' तुम्ही आळंदीला मजजवळ राहाण्यास चला. मी वृद्ध, माझा संभाळ करा. '

नामदेव म्हणतात:—

> येऊनी परामर्श घेतला दोघांचा ।
> म्हणे संभाळ तुमचा करितो देव ॥
> उदासीन वृत्ती तुमची सर्व काळ ।
> पदार्थ सकळ पाहिजे तो ॥
> दया करोनी मज आतां संभाळावें ।
> अलंकापुरीं रहावें सुखरूप ॥
> पुत्रसंतती कांहीं होईल तुम्हांसी ।
> मग येईल तें चित्तासी करा सुखें ॥
> मानुनी विठ्ठल वचन तयाचें ।
> म्हणे हें देवाचें करणें हो ॥
> येऊनी अलंकावती केला क्षेत्रवास ।
> देऊनि चित्तासी समाधान ॥
> नित्य हरिकथा नामसंकीर्तन ।
> संतांचें दरुशन सर्व काळ ॥
> पंढरीची वारी आषाढी-कार्तिकी ।
> विठ्ठल एकाएकीं सुखरूप ॥
> ऐसा बहुतकाळ क्रमिलीयावरी ।
> पुत्र अपत्य उदरीं होता न दिसे ॥

नंतर एके दिवशीं रखुमाईची आज्ञा घेऊन विठ्ठलपंत काशीस गेले व तेथें त्यांनीं संन्यास घेतला. पुढील हकीगत प्रसिद्ध आहे. त्यांतील सार येवढेंच कीं, गुरुआज्ञेवरून विठ्ठलपंत पुनः संसारी बनले.

विठ्ठलपंतांचे वडील निवर्तल्यावर शिदोपंतांनीं त्यांची उदासीन स्थिति बघून त्यांना आपल्या घरींच रहावयास आणलें व ' जेव्हां पुत्रसंतति होईल तेव्हां मग जें मनास येईल तें करा ' असें सांगितलें. आळंदींत घरजांवई म्हणून सासऱ्याजवळ ' बहुत काळ ' विठ्ठलपंत राहिले. या अवधींत आपेगांवीं जाण्याचें नांवसुद्धां काढल्याचा उल्लेख नाहीं. प्रपंचच नको म्हणणारा, संन्यासास उत्सुक झालेला

गृहस्थ, कुटुंब सासऱ्याकडे रहात असतांना वेगळे बिऱ्हाड करण्याची गोष्ट करीत नाहीं; उलट संन्यास घेण्याचीच करतो, तो त्याहीपेक्षां संन्यास घेऊन परत आल्यावर स्वतःवर कुटुंबपोषणाचा बोजा घेईल हें संभवतच नाहीं.

शिवाय, फार महत्त्वाची गोष्ट म्हणजे गुरुआज्ञेनें विठ्ठलपंत परत आले त्या वेळीं शिदोपंत जिवंत होते. शिदोपंत जिवंत नसते तर एकवेळ परत आपेगांवीं बिऱ्हाड थाटणें शक्य होतें. सातशें वर्षांपूर्वीची गोष्ट. संन्याशाचा संसारी झाला, अशा स्थितींत तत्कालीन जगानें या कुटुंबाची किती हेटाळणी केली असेल याची सहज कल्पना येईल. सरळ गृहस्थाश्रम असतांना जांवई उदासीन वागतो म्हणून आपेगांवला जाऊन जांवयाला व मुलीला घरीं आणणारे शिदोपंत, जांवई व कन्या जगाच्या निंदेस पात्र होतील हें समोर दिसत असतांना त्यांना आपल्यापासून दूर लोटतील हें अत्यंत असंभवनीय आहे. शिदोपंताच्या संमतीनें पुनः गृहस्थाश्रम सुरूं झाल्यावर शिदोपंतांना व जांवयाला लोकांनीं छळलें नसेल काय ? यामुळें शिदोपंतांनीं आपल्या आश्रयाखालींच दोघांना ठेवून घेतलें असलें पाहिजे, ही गोष्ट सहज पटण्यासारखी आहे.

याच्या पुढचाहि इतिहास विचार करण्यासारखा आहे. मुलें मोठीं झालीं व विठ्ठलपंतांना, हीं मुलें, यांचें संस्कार झाले नाहींत तर जातिकुळावेगळीं पडतील, अशी मोठी काळजी पडली व त्यांनीं द्विज मेळवून ब्रह्मसभा केली. ही कोठें भरविली ? आपेगांवीं ? नव्हे ! आपेगांवांत जन्म झाला जे म्हणतात ते सुद्धां ही ब्रह्मसभा आपेगांवीं भरली असें मानीत नाहींत. डॉ. तुळपुळे म्हणतात, " मुलें मोठीं झालीं, उपनयनसंस्कारास योग्य झालीं, असें पाहून अंतर्बाह्य पोळलेले विठ्ठलपंत ' क्षमा अपराधा करा दीन ' अशा आर्त वाणीनें आळंदीकर ब्रह्मवृंदास शरण गेले. सभा झाल्या, ग्रंथ पाहिले गेले आणि त्या ब्राह्मणांनीं एकमुखानें विठ्ठलपंतास देहांतप्रायश्चित्ताचा निर्णय दिला. " या सभा आळंदींत झाल्या हेंच खरें दिसतें. कारण आपेगांवीं जर विठ्ठलपंत रहाते तर मग पैठणासच सभा होऊन त्यांना तेथेंच शास्त्रार्थ मिळाला असता. कारण आपेगांव हें पैठणपासून पुरे आठ मैल सुद्धां नाहीं. मग आईबाप निघून गेल्यावर ' प्रतिष्ठानास जा. तेथून पत्र आणा. तें आम्ही वंद्य करूं. ' असें मुलांना सांगण्याचा प्रश्नच उत्पन्न झाला नसता. शिवाय मुलें आपेगांवीं मोठीं झालीं असतीं तर त्या काळची ज्यांना कल्पना करतां येईल त्यांना सहज पटेल कीं, या मुलांच्या भवितव्याची चर्चा करून पैठणच्या ब्राह्मणांनीं केव्हांच निकाल तयार ठेवला असता ! शुद्धीपत्राकरितां पैठणांत गेल्यावर तुमचीं नांवें काय, तुम्ही कोठले हे विचारण्याचें सुद्धां कारण पडलें नसतें. या सर्व लिहिण्याचा हेतु असा कीं, शिदोपंत हयात असतांना विठ्ठलपंत परत येतात, सभा वगैरे आळंदीस होतात, व आळंदीचे ब्राह्मण त्यांना प्रतिष्ठानास जाऊन शुद्धिपत्र आणा असें सांगतात. यांचा शिदोपंत व विठ्ठलपंत यांचे स्वभाव व जनस्वभाव यांशीं मेळ घालतां, असेंच वाटतें कीं, या अलौकिक मुलांचे जन्म शिदोपंतांच्या गांवीं म्हणजे आळंदीसच झाले असले पाहिजेत.

ही गोष्ट सहज ओघांतच असल्यानें नामदेवरायांनीं तिचा स्वतंत्र उल्लेख केला नाहीं. आईबाप निवर्तल्यावर विठ्ठलपंत जे आळंदीस आले तेव्हांच त्यांच्या जीवनांतून आपेगांव संपलें असें समजण्यास हरकत नाहीं. जर आपेगांवीं ते गेले असते तर नामदेवांनीं त्याचा उल्लेख अवश्य केला असता.

आमच्या या वरील मांडणीच्या विरुद्ध एक मोठा पुरावा मांडला जाण्याचा संभव आहे व तो म्हणजे मुक्ताबाईच्या समाधीचें वर्णन करणाऱ्या नामदेवांच्याच अभंगाचा. त्याप्रसंगीं नामदेव खालील उद्गार काढतात.

८९८. मायभूमि पाहूं यांची आम्ही डोळां ।
चलावे गोपाळा सहजा सहज ॥ १ ॥
भक्त त्र्यंबकपंत मूळ पुरुष आदि
तयाची समाधी आपेगांवीं ॥ २ ॥
आपेगांवीं आले देव ऋषीश्वर
उतरले भार वैष्णवांचे ॥ ३ ॥
धन्य यांचें कूळ धन्य यांचा वंश
धन्य यांचें कुशीं योगीराज ॥ ४ ॥
नामा म्हणे आम्हां दाविलें नारायणें
झालीं चौघी जणें याचि क्षेत्रीं ॥ ५ ॥

८९९. निवृत्ति मुक्ताबाईनें पाहुनी स्थळ डोळां ।
आलासे उमाळा ओसंडुनी ॥ १ ॥
तात आणि मात गेलीसे तेथून
तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा ॥ २ ॥

निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न ।
संभाळी सोपान मजलागीं ॥ ३ ॥
तुझ्या योगें हरी क्रमियेले काळां ।
फुटलासे मेळा तापसांचा ॥ ४ ॥
नामा म्हणे यांचें कळवळिलें मन ।
करी समाधान पांडुरंग ॥ ५ ॥

हें वाचून कोणी असें सहज म्हणेल कीं, या ओंळी-वरून स्पष्ट होत आहे कीं, नामदेवांच्या मतें हीं चार भावंडें 'या क्षेत्रीं झालीं;' परंतु हा प्रश्न दिसतो तितका सोपा नाहीं. कारण हेच नामदेव, ज्ञानदेवांचा जन्म, शक व तिथि देतांना त्यांचा जन्म 'अलंकापुरीं' झाला असें लिहितात.

अधिक सत्याण्णव शके अकराशतीं ।
श्रावणमास तिथि कृष्णाष्टमी ॥ १ ॥
वर्षाऋतु युवा नाम संवत्सर ।
उगवे निशाकर रात्रिमाजी ॥ २ ॥
पंचमहापातकी तारावया जन ।
झाले नारायण मृत्युलोकां ॥ ३ ॥
नामा म्हणे पूर्णब्रह्म ज्ञानेश्वर ।
घेतसे अवतार अलंकापुरीं ॥ ४ ॥
—पांगारकरकृत श्रीज्ञानेश्वर-चरित्र पान ४६.

याचा अर्थ एवढाच कीं, मूळ नामदेवांच्या वर्णनांतच विसंगति दिसते. यांकरतां नामदेवांच्या अभंगांचें संशोधन होणें अवश्य आहे. यामुळें तदभावीं हा प्रश्न सुटणें कठीण आहे. पण दुसरा आनुषंगिक पुरावा घेऊन हा प्रश्न सोडवणें कठीण नाहीं असें प्रस्तुत लेखकास वाटतें व म्हणूनच वरती नामदेवांच्या 'आदींतील' सविस्तर कथा दिली आहे. आदींतील अभंगांत एकसूत्रमय कथा आहे. तीवर विश्वास ठेवण्यास हरकत नाहीं. ती नामदेवांची म्हणून मान्य आहे.

जर या भावंडांचा जन्म आपेगांवीं झाला असता तर आपेगांवजवळच्या पैठणांत रहाणारे श्रीएकनाथ यांना तो अवश्य कळता. ज्ञानेश्वरीचें संशोधन करून ज्याप्रमाणें त्यांनीं 'शुद्ध' ज्ञानेश्वरीची प्रत जगापुढें ठेवली तशी ज्ञानदेवांच्या जन्मभूमीचीहि 'शुद्धि' करून त्या जागेचें माहात्म्य वाढवलें असतें, इतकें त्यांना आपेगांव जवळ आहे. एकनाथमहाराजहि ज्ञानदेवांचा जन्म आळंदींत झाला असेंच म्हणतातः—

संतांचा महिमा वर्णावा किती ।
अलक्ष मूर्ति ज्ञानोबा तो ॥ १ ॥
अर्जुना संकट पडतां जडभारी ।
गीता सांगे हरि कुरुक्षेत्रीं ॥ २ ॥
तोचि अवतार धरी अलंकापुरीं ।
ज्ञानाबाई सुंदरी तारावया ॥ ३ ॥
श्रीएकनाथ अभंग ३५६१

यावरून श्रीएकनाथ हे ज्ञानदेवांचा जन्म आळंदींत झाला असें समजत होते व त्यांच्या कानावर ज्ञानदेवांचा जन्म आपेगांवीं झाला ही माहिती नव्हती असें दिसतें; जर आपेगांवीं ज्ञानदेवांचा जन्म झाला हें सर्वमान्य असतें, तर हजारों वारकरी पैठणला एकनाथषष्ठीला जमल्यानंतर ज्ञानेश्वरीच्या लेखनाच्या गांवीं म्हणजे 'नेवाशास' जसे जमतात तसे आपेगांवीं उभ्या उभ्या तरी गेले असते; पण तसा कांहीं एक प्रकार होत नाहीं. तात्पर्य विठ्ठलपंतांना शिदोपंतांनीं आळंदीस आणल्यावर त्यांच्या जीवनक्रमांत 'आपेगांवास' स्थानच राहिलें नाहीं हें खरें दिसतें.

आज आळंदीस ज्ञानेश्वरांचें 'आजोळघर' दाखवितात. येवढेंच नव्हे तर त्यांच्या जन्माची जागा दाखवितात. सिद्धबेटांत विठ्ठलपंत व नंतर हीं भावंडें झोपडी घालून रहात होते असा परंपरागत झालेला इतिहासहि लोक सांगतात.

तात्पर्य, ज्याला आनुषंगिक पुरावा म्हणतात, तो सर्व विचारांत घेतां ज्ञानदेवादि चारी भावंडांचा जन्म आळंदीस झाला असावा, असें मानण्यास पुष्कळ आधार आहे असें वाटतें.

हा प्रश्न सर्वसंमत निकालांत निघणें पुराव्याच्या अभावीं कठीण आहे, हें मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाहीं हेंहि सांगणें अवश्य वाटतें.

## (ई) ज्ञानेश्वरीचें जन्मस्थान—नेवासें कां आपेगांव?

ज्ञानदेवांच्या जन्मस्थानासारखाच ज्ञानेश्वरीचें जन्म-स्थान हा वादाचा मुद्दा होऊं पहात आहे; पण सुदैवानें याबाबत इतका स्पष्ट पुरावा आहे कीं हा वाद यापुढें राहाणार नाहीं.

हा प्रश्न प्रथम श्री. भारदे यांनीं 'दोन ज्ञानदेव' ही आपली कल्पना मांडतांना पुढें आणला. त्यांच्या मतें

' योगी ज्ञानेश्वरानें ' दक्षिणलिंगीं शाक्तपंथी महालया देवीचे मंदीर ज्या गांवीं आहे व जें अनादिपंचकोशक्षेत्र गोदावरी तीरावर आहे, अशा आपेगांवीं ज्ञानेश्वरी लिहिली. ही कल्पना ज्ञानेश्वरीच्या सरतेशेवटीं ज्ञानदेवांनीं ज्या दोन ओंव्या लिहिल्या आहेत, त्यावर उभारलेली आहे. त्या ओंव्या पुढीलप्रमाणें आहेतः —

ऐसें युगीं परि कळीं । महाराष्ट्र भूमंडळी । गोदावरीचां कुळीं । दक्षिणीलीं ( अथवा दक्षिणलिंगीं )।। त्रिभुवनैक-पवित्र । अनादिपंचक्रोशक्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ।।

या दोन ओंव्यांचा अर्थ नीट समजून घेण्याचा श्री. भारदे यांनीं प्रयत्न केला होता असें दिसत नाहीं. ज्ञानेश्वरी जेथें लिहिली त्या क्षेत्राचें महात्म्य सांगण्याकरितां ज्ञानदेवांनीं जें वर्णन केलें आहे त्यापैकीं एकहि लक्षण ' आपेगांवला ' लागू पडत नाहीं, हें आपेगांवला जो जाईल त्याला दिसेल. उलट नगर जिल्ह्यांतील प्रवरेच्या कांठीं असणाऱ्या ' नेवासें ' गांवास तें वर्णन संपूर्णपणें लागू पडतें.

( १ ) अनादि—आपेगांव हें, सरकारी जें पुराण-वस्तु संशोधनखातें सांगतें, त्यावरून ' अनादि ' म्हणण्या-इतकें जुनें ठरत नाहीं. उलट नेवासें येथील संस्कृति व इतिहास पैठणइतका म्हणजे जवळजवळ दोन हजार वर्षापूर्वीच्या आहे असें तें खातें म्हणतें.

( २ ) पंचक्रोशक्षेत्र—आपेगांव हे गोदातटाकींच आहे. तेथें पंचक्रोशाचें क्षेत्र कसलें ? त्याला साधें क्षेत्र सुद्धां कोणी समजत नाहीं.

श्रीएकनाथांच्या पुण्यतिथीची यात्रा पैठणला फा. व. ६ ला भरते. लाखों भक्तगण तेथें जमतात. त्यांतले अवघे पांचपन्नास तरी या अनादि पंचक्रोश महाक्षेत्रास जात असतील का नाहीं कोणास ठाऊक !

उलट नेवाशास त्यानंतरच्या एकादशीस यात्रा भरते. ' महालया महात्म्या ' मध्यें नेवासें ' देवांचें निवास ' असें त्याचें मोठें वर्णन आहे. त्यांतील या ओंवीस सुद्धां आधार असण्यासारखे दोन श्लोक देतों. त्यावरून ' अनादि-पंचक्रोश ' यानें नेवासेंच अपेक्षित आहे, हें स्पष्ट होईल.

' विंध्यस्य दक्षिणेभागे गोदाया दक्षिणे तटे । पंचक्रो-शात्मकं क्षेत्रं वरा ( प्रवरा ) यत्र नदी शुभा ।। १ ।। तथा पापहरां लोके विख्याता भुक्तिमुक्तिदा । तस्यास्तु पूर्वभागेच वैष्णवी शक्तिरद्‌भुता ।। २ ।। '

( श्री महालयामहात्म्य अ. १ श्लोक ३७–३८ ).

( ३ ) महालयाः—प्रत्येक गांवीं शंकर, मारुति, देवी यांचीं देवळें असतात, तसें आपेगांवीं एकादें देवीचें देऊळ असेलहि; पण ' जगाचें जीवनसूत्र ' म्हणून जिचें महात्म्य गातात अशी ती देवी नव्हे. उलट नेवासें येथें अमृतकुंभ हातांत धरून अमृत वांटणाऱ्या मोहनीराजाचें मंदीर आहे व त्यामुळें हें पावन क्षेत्र समजलें जातें. श्रीमोहनीराजासच महालया म्हणतात. याच श्रीमोहनी राजाचें महात्म्य सांगणारें संस्कृतांत " श्री महालया महात्म्य " आहे व त्यांतीलच दोन श्लोक वरती उद्धृत केले आहेत.

( ४ ) दक्षिणलिंगीः—मुळांत दक्षिणिली असाहि पाठ आहे. आपेगांवीं शाक्तमतांतील ' दक्षिण ' अशा पंथाचें मोठें देवीचें देऊळ नाहीं.

दक्षिणिली म्हणजे दक्षिण तीरावरील. गोदावरीच्या दक्षिण तीरावरील पंचक्रोशात्मक जें नेवासें क्षेत्र व जेथें मोहनीराजाचें स्थान आहे त्या अनादि क्षेत्रांत ज्ञान-देवांनीं ज्ञानेश्वरी लिहिली.

याचसंबंधीं आणखी एक गैरसमज आहे. तोहि या प्रसंगानें दूर करणें अवश्य आहे.

' पांच संतकवी ' ह्या आपल्या पुस्तकांत पान ६ वर डॉ. शं. गो. तुळपुळे लिहितात, ' येथें महालया मंदिरांत शके १२१२ मध्यें ज्ञानदेवांनीं आपली ज्ञानदेवी रचिली... ' हीहि गोष्ट सत्य नाहीं. नेवासें गांवीं ती लिहिली व त्या गांवीं महालयेचा वास आहे एवढेंच ज्ञानदेव लिहितात. महालयेच्या देवळांत लिहिली असें ते म्हणत नाहींत.

उलट, वस्तुस्थिति अशी आहे कीं नेवासें गांवीं असणाऱ्या शंकराच्या देवळांत ज्ञानेश्वरीची निर्मिती झाली व त्या देवळाचा आज एक खांब हयात आहे व येथें ज्ञानेश्वरी लिहिली गेली, हे मुंबई हायकोर्टानेंहि मान्य केलें आहे. त्या ठिकाणीं शंकराचें देऊळ होतें तेथें हल्लीं त्या देवळाचा अवशेष जो खांब त्याचें मंदीर आहे. या खांबास टेकून बसून ज्ञानदेव ज्ञानेश्वरी सांगत व सच्चिदानंद बाबा लिहून घेत; अशी परंपरागत कथा

त्या गांवीं सांगितली जाते. त्या खांबाच्या मागें विठोबा-रुखमाईच्या मूर्ति बसविल्या आहेत. त्या मंदिराच्या जीर्णोद्धाराचें काम सध्या सुरू आहे. या जागेस हल्लीं 'श्री ज्ञानेश्वरमंदीर' म्हणतात. याबाबत वर म्हटल्याप्रमाणें हायकोर्टाकडे जाण्याचा प्रसंग कां आला व कोर्टाचा निकाल कसा झाला हा प्रश्न फारच महत्त्वाचा असल्यानें पुढें थोडक्यांत देत आहों.

श्रीज्ञानेश्वरमंदिराच्या मागच्या बाजूस असलेल्या ओंवरीच्या जागेसंबंधीं हिंदुमुसल्मानांचा वाद सन १९१५ पासून सुरू झाला. सन १९१७ चे सुमारास मुसलमानांनीं सदरील ओंवरीच्या जागेमध्यें बळजबरीनें शिरण्याचा व नमाज पढण्याचा प्रयत्न केल्यावरून सार्वजनिक शांततेचा भंग होऊं नये म्हणून मे. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट साहेब अहमदनगर यांनीं Criminal Procedure Code कलम १४५ प्रमाणें काम चालवून सदरील जागा १४६ कलमान्वयें जप्त केली व हिंदु अगर मुसलमान या दोहोंपैकीं जो कोणी सदरील जागेवरील आपला मालकी हक्क योग्य कोर्टामार्फत शाबीत करून घेईल, त्यास त्या जागेचा कबजा करणेचा हक्क प्राप्त होईल असे कळविणेंत आलें. त्यावर मुसलमानांनीं सदरील जागा आमची मालकीची आहे असें ठरविणेंकरतां प्रातिनिधीक स्वरूपाचा दावा हिंदूवर सन १९२९ सालीं ( मुकदमा ३२३/२९ चा ) नेवासें कोर्टांत आणला. त्याचा निकाल मे. कोर्टानें देऊन सदरील जागा हिंदूंच्या मालकीची आहे, अशा ठराव करून वादीचा दावा रद्द केला. त्यावर मुसलमानांनीं केलेल्या अहमदनगर डिस्ट्रिक्ट कोर्टांत अपील नं. ६३/३३ व त्याचेवर नामदार मुंबई हायकोर्टांत दुसरें अपील नं. ५३३/३६ व त्यावरहि लेटर्स पेटंट अपील नं. ३/३८ व अपीलांत हिंदूंच्या तर्फे निकाल झाला. लेटर्स पेटंट अपीलाचा निकाल ९।२।३८ रोजीं लागला. अशा प्रकारें सर्व कोर्टांनीं हिंदूंच्या तर्फे निकाल देऊन ही जागा हिंदूंची, येथें ज्ञानेश्वरी ज्या देवळांत सांगितली त्याचा खांब आहे हें मान्य केलें आहे. स. १९३८-३९ सालांत सदर जागा कायदेशीररित्या ताब्यांत आली असून तेथील पंच मंडळींनीं त्या मंदिराच्या जीर्णोद्धाराचें कामहि सुरू केलें आहे.

तात्पर्य, ज्ञानदेवांनीं पैठणहून आळंदीस येतांना प्रवरेच्या कांठीं असणाऱ्या नेवासें गांवीं पण शंकराच्या मंदिरांत ज्ञानेश्वरी सांगितली व नेवासेंगांवचे कुलकर्णी सच्चिदानंदबाबा यानें ती लिहिली, असें इतिहास सांगतो व तें कोर्टानेंहि मान्य केलें आहे.



---

## ३. ज्ञानेश्वरीची राजवाडे प्रत

कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं, आपणांस बीड येथें मिळालेली नाथपूर्वकालीन ज्ञानेश्वरीची प्रत प्रसिद्ध करून, ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाच्या क्षेत्रांत नवीन युगास आरंभ केला, हें त्यांचें मोठें कार्य आहे. ज्ञानेश्वरकालीन भाषेचा नमुना या दृष्टीनें मराठी वाङ्मयास त्यांची ही अमोलिक देणगी आहे. त्याबद्दल ज्ञानेश्वरीप्रेमी महाराष्ट्र हा त्यांचा सदैव कृतज्ञ राहील यांत शंका नाहीं.

पण इतकें सांगितल्यानंतर हेंहि सांगणें अवश्य आहे कीं, राजवाडे यांनीं त्या प्रतींत नसलेले गुणहि तीस चिकटविण्याचा प्रयत्न केला आहे. यामुळें त्या प्रतीची खरी योग्यता लोकांच्या नजरेआड झाली आहे. ज्ञानेश्वरीच्या प्रतीचे मूल्यमापन करतांना भाषा ही एक जशी कसोटी आहे, त्याचप्रमाणें गीतार्थाशीं जुळणारे पाठ किती आहेत, ज्ञानदेवांच्या नेहमींच्या शब्दयोजना, वाक्यांतील प्रयोग यांचीं सुसंगत पाठ किती आहेत, इत्यादि गोष्टीहि विचारांत घेणें अवश्य आहे. कै. राजवाडे व तदनंतर त्यांच्यामागून हा एक अमूल्य ठेवा मिळाला म्हणून बघणारे कै. आगाशे, यांच्यासारख्या लेखकांनीं या गोष्टीस फारसें महत्त्व दिलें नाहीं.

या प्रतीसंबंधीं १९३०-३१ सालीं रा. त्रिलोकेकर यांनीं 'प्रभुप्रभात' मासिकांत 'एकनाथ विरुद्ध राजवाडे' या लेखांत राजवाड्यांची ज्ञानेश्वरीची प्रस्तावना आणि पुढें छापलेली ज्ञानेश्वरी व एक पानाचा फोटो यांतील विसंगति नजरेस आणिली होती. पण धुळें येथील 'संशोधक' त्रैमासिकांत विसंगतीबद्दल योग्य तो खुलासा आल्यानें विसंगतीवरून काढलेलें अनुमान अर्थातच बरोबर नाहीं हें उघड ठरलें. अलिकडे 'श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या पुस्तकांत प्रकरण दोन 'ज्ञानेश्वरीची राजवाडे प्रत' यामध्यें डॉ. पेंडसे यांनीं पाठांचा थोडाबहुत विचार केला आहे. पण त्यांच्याहि त्या प्रकरणांत एका महत्त्वाच्या मुद्याचा निर्देश दिसत

नाहीं. म्हणून तो मुद्दा सांगून एकदोन तदनुषंगीक गोष्टी या प्रकरणांत सांगण्याचें ठरविलें आहे. तत्पूर्वी राजवाडे आपण छापलेल्या प्रतीसंबंधीं काय म्हणतात तें पाहूं.

" समाप्तीच्या या तीन लेखांवरून पुढील निगमनें प्राप्त होतात. [ १ ] मूळ लेखकानें ज्या प्रतीवरून आपली प्रत उतरून घेतली त्या प्रतींत अर्थात् उताऱ्यांत " शके बारा शतें " इत्यादि ओंवी नव्हती. [ २ ] ती ओंवी ज्ञानदेवानंतर कोणीतरी रचलेली आहे. ती ओंवी सच्चिदानंदबाबानेंहि रचिलेली नाहीं. कारण, ज्ञानदेव व सच्चिदानंदबाबा यांच्या काळीं 'बाबा' असें रूप प्रचलित नसून ' बाबा ' असें रूप प्रचलित होतें.

पोथीचा काळनिर्णय—' वप्पा = बप्पा = बापा = बाबा = बाबा' अशी उच्चारपरंपरा आहे. सच्चिदानंदबाबानें ही ओंवी लिहिली असती, तर 'बाबा' असा पाठ आला असता. मजजवळ ज्ञानेश्वरीच्या इतर सुमारें पन्नास पोथ्या आहेत. त्यापैकीं एकींतहि ' बाबा ' असा पाठ नाहीं, 'बाबा' असाच पाठ आहे. म्हणजे सच्चिदानंदबाबा वारल्यावर त्यांच्या कोण्या चाहत्यानें तत्स्मरणार्थ ही ओंवी रचिलेली आहे. अर्थात, प्रस्तुत छापिली गेलेली प्रत ज्या मूळ प्रतीवरून केली, ती मूळ प्रत सच्चिदानंदबाबाच्या मृत्यूच्या आधीं लिहिलेली होती. [ ३ ] ही मूळ प्रत सद्गुरु मुकुंदानें विद्याधर नामक शिष्याला दिली. सच्चिदानंदबाबाच्या मृत्यूच्या अगोदर असणारा हा मुकुंद, मुकुंदराज ज्याला म्हणतात तोच होय. दुसरा कोणी मुकुंद, शक १२१२ पासून शक १२४० पर्यंत हयात नव्हता. मुकुंदराजांची हयात शक ११५८ पासून शक १२५८ पर्यंत होती, ( ग्रंथमाला, मुकुंदराज ). तात्पर्य, मुकुंदराजानें आपला शिष्य जो विद्याधर त्याला आपल्याजवळील ज्ञानेश्वरीची प्रत बक्षीस दिली. तीच ही मजजवळ असलेली प्रत होय. ही प्रत सच्चिदानंदबाबांच्या मृत्यूच्या अगोदर म्हणजे शक १२४० च्या अगोदर व शक १२१२ च्या नंतर केव्हांतरी लिहिलेली आहे. या प्रतीचा उत्तम मजबूत, तलम व कमावलेला कागद; उत्तमोत्तम शाई; कसलेल्या लेखनकुशल लेखकाचें येथून तेथून एकवळणी अक्षर पाहिलें म्हणजे असें कबूल करणें भाग पडतें कीं, ही प्रत तयार करण्यास पुष्कळ द्रव्य लागलें असावें व ज्या धन्याकरितां ही प्रत तयार केली तो धनी श्रीमान् असावा. सारांश ही प्रत मुकुंदराजाची आहे व ही शक १२१२ पासून शक १२४० पर्यंतच्या काळांत केव्हांतरी लिहिलेली आहे. एकाच शब्दानें सांगावयाचें म्हटलें, तर असें म्हणणें प्राप्त होतें कीं, महाराष्ट्रग्रंथसंग्रहांत ही ज्ञानदेवीची प्रत केवळ ' अमूल्य ' आहे.

( प्रस्तावना पान ६८ )

हें वर्णन वाचून कोणासहि असें वाटेल कीं, राजवाड्यांना मिळालेली प्रत म्हणजे ज्ञानदेवांनीं लिहिलेल्या प्रतीवरून तयार केलेली, ' सच्चिदानंदबाबा आदरें लेखकु जाला ' हें मुद्दां मागाहून घातलेलें; अशी जुनी ज्ञानदेवांच्या अस्सल प्रतीवरून केलेली प्रत.

पण निर्विकार बुद्धीनें या पोथीची छाननी केली व राजवाडे यांनींच लावलेला निकष लावला तर ही पोथी ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरीनंतर राजवाडे म्हणतात त्यापेक्षां बरेच दिवसांची असावी; एवढेंच नव्हे तर ज्ञानदेवांना मान्य अशा प्रतीशी जुळती नसावी, असें अनुमान काढण्यास सबळ पुरावा आहे.

ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्या गीतेवर टीका लिहिली तिचे सातशेंच श्लोक आहेत. ते म्हणतातः—

सातशतें श्लोक । अध्याय अठरांचे लेख ।
परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥
तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत ।
भारताचें शतेंसात । सर्वस्व गीता ॥
तयांही सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोक शेषींचा ।
व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गार जो ॥
ऐसें श्लोक शतें सात । गीतेचीं पदें आंगें वाहत ।
पदें म्हणों कीं परमामृत । गीताकाशीचें ॥

कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती ।
मोहमहिषा मुक्ति । आनंदलीसे ॥ अ. १८–१६६१–६६

राजवाडे ज्ञानेश्वरीच्या प्रतींत सातशें एक श्लोक आहेत. पण सूक्ष्म संशोधनाची गंमत अशी आहे कीं, ही गोष्ट वाचकापासून दूर ठेवली गेली आहे. ही अशी कोणी ठेविली देव जाणे ! कै. इतिहासाचार्य राजवाडे यांच्यासारख्या सूक्ष्म संशोधकांच्या नजरेंतून ही गोष्ट राहील हें संभवत नाहीं; त्याचप्रमाणें आपल्या ज्ञानेश्वरीचें व्यंग लोकांसमोर चटकन् दिसूं नये म्हणून ते असें करतील हेंहि संभवत नाहीं. कारण जी गोष्ट छापलीं ती

कोणाच्याहि लक्षांत येईल हें न कळण्याइतके राजवाडे अडाणी नव्हते. आम्ही वर दिलेली गोष्ट कशी घडली तें सांगतो. त्याचा वाचकांनीच विचार करावा.

तेराव्या अध्यायामध्यें ३४ श्लोक आहेत. पण गंमत अशी झाली आहे कीं, राजवाडे-प्रतींत ३५ श्लोक असूनसुद्धां शेवटच्या श्लोकाला ३४ चाच आंकडा आहे. हें कसें झालें? तर दोन श्लोकांपुढें ४ चाच आंकडा टाकला आहे म्हणून. राजवाडे प्रतींत पुढीलप्रमाणें आंकडे आहेत.

अर्जुन उवाच–प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेवच ।
एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च
केशव ॥ १ ॥

श्री भगवान् उवाच–इदं शरीरं .......॥ २ ॥
क्षेत्रज्ञं चापि......॥ ३ ॥
तत्क्षेत्रं.... ...॥ ४ ॥
ऋषिभिर्बहुधा......॥ ४ ॥

'तत्क्षेत्रं' व 'ऋषिभिर्बहुधा' या दोन्ही श्लोकांना ४ चाच आंकडा दिल्यानें शेवट ३४ जमला. 'प्रकृति पुरुषं चैव' या श्लोकावर ओंवीहि दिली आहे. ती अशी–'तेंग अर्जुन म्हणे प्रकृति पुरुष। क्षेत्रज्ञु आणि क्षेत्रविशेष। हें तुजपाशीं अशेष। इच्छितु असें जाणों ॥ १ ॥

यांतील पहिला श्लोक व त्यावरील ओंवी इतर ज्ञानेश्वरींत नाहीं. [याबाबत अधिक माहिती भिन्न पाठचर्चा प्रकरणांत पहावी.]

ज्ञानेश्वर महाराज जर आपल्या पोथींत ७०० श्लोक म्हणतात, तर ७०१ व्या श्लोकावर ते ओंवी लिहितील कशी? जी ज्ञानेशांची ओंवी नसावी–नाहींच–ती ज्या प्रतींत आहे त्या प्रतीला किती किंमत द्यावी हें वाचकांनींच ठरवावें.

हें लिहिण्याचा हेतु असा कीं, राजवाडे म्हणतात, 'नाथांना ज्ञानेश्वरीची अस्सल प्रत मिळाली नव्हती.' आम्हांला म्हणावयाचें आहे कीं राजवाड्यांनाहि तशी प्रत मिळाली नाहीं. येवढेंच नव्हे तर ज्ञानेशांनीं लिहिलेल्या ज्ञानेश्वरीशीं अर्थाच्या दृष्टीनें जुळणारीहि प्रत मिळाली नाहीं. वस्तुस्थिति अशी दिसते कीं, महाभारतादि ग्रंथांच्या ज्याप्रमाणें वेगवेगळ्या पाठांच्या प्रति तयार झाल्या, तशाच ज्ञानेश्वरीच्या झाल्या. अशा दोन भिन्न प्रकारच्या पोथ्या श्रीएकनाथ व राजवाडे यांना मिळाल्या. कांहींत लेखकांच्या दोषामुळें श्लोक व ओंव्या अधिक घातल्या गेल्या, तर कांहीं प्रतींत गाळल्या गेल्या. अशारीतीनें नवीन पाठाच्या पोथ्या तयार झाल्या. राजवाडे-प्रतींत दोन्ही दोष आहेत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

राजवाडे यांचा, ज्ञानेश्वरीच्या प्रतीचा काळ ठरविण्याचा एक निकष असा कीं, प्रतींत ओंव्या जितक्या कमी तितकी प्रत अधिक जुनी, तितकी अधिक मूळाजवळ. हा निकषसुद्धां बरोबर नाहीं. तो कांहीं अंशानें खरा आहे येवढेंच. राजवाडे म्हणतात, 'जितक्या ओव्या कमी तितकी प्रत अधिक जुनी.' राजवाडे यांचा जो दावा आहे कीं, आपल्या प्रतींत कमी ओव्या आहेत, हाच दावा मुळांत चुकीचा आहे, हें वर दाखविलें आहेच. त्यांच्या पोथींत एक अधिक श्लोक व एक अधिक ओंवी आहे कीं, जी ज्ञानेशांना मान्य नाहीं. तरीहि राजवाडे आपलीच प्रत सर्वश्रेष्ठ म्हणतात व आगाशेसारखे त्यांची री ओढतात.

'ओंव्या कमी तर ती मुळाजवळ' असें मानण्यांत राजवाडे हें विसरतात कीं मनुष्य जसें अधिक घालूं शकतो, तसें उतरवण्याचें विसरूंहि शकतो. ओंव्या लिहिण्याचें विसरला म्हणजे प्रत अधिक जुनी असें मानणें चुकीचें आहे.

याबाबत खुद्द राजवाडेप्रतच बघण्याजोगी आहे. अ. १० श्लो. ३४ यावर 'आतां स्त्रीगणाचां पैकीं। माझिया विभूति सात येकि। तेती आइक कवतिकीं। सांघिजती ॥ ओ. २५४॥ स्त्रीगणांत माझ्या सात विभूति आहेत असें सांगून 'एवं नारी माझारी। या सात शक्ति मी अवधारी॥ ओ. २५७॥' असा शेवट करतात. तेव्हां ही उघड गोष्ट आहे कीं ज्ञानदेवांनीं सातहि विभूतींचें वर्णन केलें आहे. पण मधील दोन वाक् आणि स्मृति या विभूतींचें वर्णन करणाऱ्या ओंव्या राजवाडेप्रतींत गळल्या आहेत. याचा उघड अर्थ असा कीं, लेखक त्या दोन ओंव्या लिहिण्यास विसरला. ही गोष्ट उघड असतांना राजवाडे आपल्या प्रतींत ओंव्या कमी म्हणून ती जुनी म्हणतच रहाणार!

आगाशे हे राजवाड्यांच्या पावलावर पाऊल टाकून ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानावर उत्कृष्ट प्रकाश पाडणाऱ्या अशा कांहीं ओंव्या इतर प्रतींतून असतांना सुद्धां त्या राजवाडे-

प्रतींत नाहींत म्हणून प्रक्षिप्त आहेत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात व राजवाडे प्रत अधिक जुनी समजतात.

आगाशे म्हणतात, "असो, अशा रीतीनें सबंध ओंवीच्या ओंवीहि केव्हां केव्हां प्रक्षिप्त रूपानें मुळांत सामील होते. अशा प्रकारचे ज्ञानेश्वरींतील अठराव्या अध्यायांतील दोनच मासले आम्ही या ठिकाणीं देतों. १२८७ व्या ओंवीनंतर साखरे आणि कुंटे प्रतींत खालील दोन ओंव्या आहेत.

- उत्तर वैराटिचा राजा ।
  पळतां तूं कां निघालासि झुंझा ।
  हा क्षात्रस्वभाव तुझा ।
  झुंझवील तुज ॥ १२९५ ॥
  महावीर अकरा अक्षौहिणी ।
  तुवां एकें नागविलें रणांगणीं ।
  तो स्वभाव कोंदंडपाणी ।
  झुंझवील तूतें ॥ १२९६ ॥

ह्या ठिकाणीं, किंतीहि नाहीं म्हटलें तरी मनुष्य आपल्या जातिस्वभावर कसा जातो, तें प्रत्यक्ष अर्जुनाच्याच पूर्व चरित्रांतील प्रसंग त्याच्या स्मरणांत आणून देऊन ओंव्या लिहिणारानें प्रस्थापित केलें आहे.

असेंच दुसरें एक उदाहरण त्या अठराव्या अध्यायापैकीं आहे, तें असें. हीं दोन उदाहरणें आम्ही काय म्हणतो त्याच्या प्रत्यंतरांस पुरेशीं होतील, असें आम्हांस वाटतें. १५३४ व्या ओंवीनंतर साखरे आणि कुंटे ह्यांच्या प्रतींत खालील प्रक्षिप्त ओंवी दृष्टीस पडते.

- पूर्णब्रह्म झाला पार्थु ।
  तरी पुढील साधावया कार्यार्थु ।
  मर्यादा श्रीकृष्णनाथु ।
  उल्लंघों नेदी ॥ १५४७ ॥

ही ओंवीहि मागीलपुढील संदर्भ सुलभ रीतीनें समजण्यास अधिक उपयोगी आहे, असें तो भाग वाचला असतां वाचकांच्या ध्यानीं आल्यावांचून रहाणार नाहीं.

उपरिनिर्दिष्ट दोन्हींहि स्थळीं त्या त्या ओंव्या ग्रंथाची हानि न करतां उलट परिपोषच करतात यांत शंका नाहीं; पण तसें असलें म्हणून त्यावरून ग्रंथकारानें त्या लिहिल्या होत्या असें कसें म्हणतां येईल? कारण ग्रंथकारानें त्या लिहिल्या असत्याच तर प्राचीनतर प्रतींत त्या कां दिसत नाहींत.?"

या दोन्ही ओंव्या मूळांतील व्याख्यानाशीं सुसंगत आहेत. एवढेंच नव्हे तर आगाशे यांच्या भाषेंत सांगावयाचें तर 'ग्रंथाची हानि न करतां उलट त्या परिपोषच करतात यांत शंका नाहीं.' असें असतांना 'त्या ग्रंथकारानें लिहिल्या होत्या, असें कसें समजावयाचें? कारण ग्रंथकारानें त्या लिहिल्या असत्याच तर प्राचीनतर प्रतींत त्या कां दिसत नाहींत?' असें म्हणतांना आगाशे विसरतात कीं जें सिद्ध करावयाचें तेंच आपण गृहीत धरून चाललों आहोंत. राजवाडे प्रत जुनी का? तर त्यांत ओंव्या कमी! इत्या अशा ओंव्या इतर प्रतींत दिसतात त्या ज्ञानेश्वरांच्या आहेत, कां नाहींत? उत्तर नाहींत. कारण त्या जुन्या पोथींत नाहींत म्हणून.

वस्तुस्थिति अशी दिसते कीं, आगाशे एकदां मनाचा निश्चय करून बसले कीं राजवाडेप्रत ही जुनी व जुनी पोथी ती कीं जिच्यांत ओंव्या कमी. या दोन गोष्टी मान्य केल्या म्हणजे मग सर्व जुळतें. पण, हीं प्रमेयेंच चुकीचीं आहेत. श्लोकाच्या स्पष्टीकरणार्थ आवश्यक व राजवाडेकृत प्रतींत नाहींत अशा कितीतरी ओंव्या आपणांस अ. १० व अ. १५ यांत सांपडतील. पण एकदां ठरलेंच कीं कमी ओंव्यांची ती अधिक जुनी, मग राजवाडेप्रत कमी ओंव्यांची अर्थात ती जुनी व तींत नाहीं त्या सर्व ओंव्या मागाहून घुसडलेल्या हें आपोआप आलेंच.

आपण आतां पाठांकडे वळूं. राजवाडेप्रत जुनी अर्थात् तिचे पाठ उत्तम असलेच पाहिजेत व नार्यांना मिळालेली प्रत त्या मानानें अशुद्ध. हा मुद्दा निष्कर्ष चुकीचाच आहे. राजवाडेप्रतींत कितीतरी पाठ असे आहेत कीं, ते पाठ घेतले तर श्लोकाच्या विरुद्ध अथवा आपणच केलेल्या व्याख्यानाच्या विरुद्ध व्याख्यान केल्याचें श्रेय ज्ञानेश्वरांच्या पदरांत टाकावें लागेल. याकरितां खालील स्थळें पहाण्याजोगीं आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| अ. ३ ओ. | ७० | अ. ९ ओ. | ६० |
| अ. ३ ओ. | ९४ | अ. १०ओ. | ४ |
| अ. ७ ओ. | ५६ | अ. १०ओ. | १५ |
| अ. ७ ओ. | ६५ | अ. १०ओ. | १३७ |
| अ. ८ ओ. | ८ | अ. १०ओ. | १६३ |
| अ. ८ ओ. | १५ | अ. १३ओ. | ९२३ |
| अ. ८ ओ. | ४७ | अ. १४ओ. | ११५ |
| अ. ८ ओ. | ५५ | अ. १७ओ. | ३ |
| अ. ९ ओ. | ५७ | अ. १८ओ. | २४६ |



ज्ञानेश्वरींचें जन्मस्थान श्रीक्षेत्र नेवासें येथील श्रीशंकराचे मंदिरांतील
ज्या खांबाजवळ बसून श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञानेश्वरी सांगत
त्या खांबाचें छायाचित्र

यांची चर्चा 'भिन्नपाठ' या प्रकरणांत केली आहे, ती वाचकांनीं पहावी.

आणखी अशीं कितीतरी स्थळें दाखवतां येतील.

शेवटीं या पोथीच्या बाबतींतील मौजेची एकच घटना सांगून हें 'राजवाडेप्रत-प्रकरण' आटपूं. या पोथीच्या शेवटीं एक श्लोक आहे तो असाः—

'श्री सद्गुरुमुकुंदेन दत्ता ज्ञानेश्वरी शुभा ।
विद्याधराय शिष्याय स्वीये स्वल्पं न शोभते ॥'

राजवाडे पडले जाडे संशोधक. त्यांनीं या श्लोकावर कांहीं अनुमानें बांधलीं. हीं अनुमानें सांगणारा संपूर्ण उतारा याच प्रकरणांत प्रारंभीं दिलाच आहे. त्याचें सार असें कीं 'ज्ञानेशांच्या पूर्वी प्रसिद्ध असलेले परमामृतकर्ते मुकुंदराज तेच या श्लोकांत उल्लेखिलेले मुकुंदराज. त्यांचा तो शिष्य विद्याधर, व ज्या अर्थी प्रत इतकी उत्तम आहे त्या अर्थी तो मोठा धनिक असावा.' हें सर्व निराधार तर्कांचें उत्कृष्ट उदाहरण आहे. मूळ मुकुंदराजांचा काळ ठरणें अवश्य. तो आतां ज्ञानेश्वरांच्या पूर्वीचा (१०५०–११२०) हें निश्चित ठरलें. याचा अर्थ राजवाडे यांचे सर्वच तर्क बिनबुडाचे ठरले. शिवाय मुकुंदराज या नांवाला कांहीं शिक्का आहे काय, कीं तें फक्त प्रसिद्ध मुकुंदराज यांनाच लागू ! ज्ञानदेव तसे मुकुंदराजहि पुष्कळ असतील व प्रत्येक शिष्याला आपला गुरु हा ब्रह्मरूपच दिसत असल्यानें तो 'सद्गुरु मुकुंदराजेन दत्ता' म्हणेल. स्वतंत्रप्रज्ञ राजवाडे यांना ही गोष्ट ठाऊक नसावी कीं प्रत्येक शिष्याला आपला गुरु ब्रह्मरूप वाटतो. मौज ती पुढेंच आहे. हें सर्वच मनःकल्पित कसें आहे हें दाखविण्याकरतां एक गोष्ट सांगतो. याच श्लोकावरून 'ज्ञानसिंह' या नांवाच्या मानभावमतप्रचारक मासिकाच्या संपादकांनीं ज्ञानदेव हे मानभावी संप्रदायांतले होते असें सिद्ध केलें आहे. आहे कीं नाहीं संशोधन ! कोणचें खरें मानावें ! छापील प्रतींत राजवाडेप्रत नाथपूर्वकालीन, म्हणून तिची त्या दृष्टीनें किंमत. नाथपूर्वकालीन प्रत कै. वंकटस्वामींनाहि मिळालेली होती. पण ती छापलेली नाहीं.

या लिहिण्याचा अर्थ एवढाच आहे कीं, राजवाडे-प्रत नाथपूर्वकालीन खरी; पण ती त्रुटित, कित्येक ठिकाणीं चुकीचे पाठ असलेली, ज्ञानदेवांना मान्य नसलेला श्लोक व ओंवी असणारी अशी आहे. तिचें मुख्य मूल्य ती यादवकालीन आहे एवढेंच. सर्व दृष्टीनें शुद्ध अशी ज्ञानेश्वरीची प्रत अजून मिळावयाची आहे हेंच खरें.

---

## ४. असंप्रदायिक अर्थाचा एक नमुना

### राजवाडेकृत ज्ञानेश्वरीच्या पहिल्या ओंवीचा अर्थ

संप्रदाय, सांप्रदायिक व त्यांचे अर्थ यांना नांवें ठेवणें हा बुद्धिप्रधानकाळाचा युगधर्मच आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं. कोणत्याहि विचारवंशास आपण मानीत नाहीं असें समजणारा बुद्धिनिष्ठ, संप्रदायास नांव न ठेवील तरच आश्चर्य ! संप्रदाय हा अंधश्रद्धेवर उभारलेला असतो, त्यांत प्रगमनशीलता नसून स्थितिस्थापकत्व असतें व हेंच खऱ्या सुधारणेच्या आड येत असतें; तेव्हां धर्म, राजकारण, तत्वज्ञान, भाषा इत्यादि जेथें जेथें संप्रदाय निर्माण झालेला दिसेल तेथें तेथें त्याच्या मुळावर प्रहार करून त्याचा नायनाट करणें हें प्रगतीकरितां अवश्य आहे, असा समज सुशिक्षितांत रूढ झाला आहे. सांप्रदायिक म्हणजे अज्ञ, अडाणी, मागासलेला, याचा प्रतिवाचक शब्दच होऊन बसलेला आहे.

अंधश्रद्धेवर उभारलेल्या संप्रदायाचा पाठपुरावा कोणी जाणता पुरुष करील असें वाटत नाहीं. पण 'संप्रदाय' म्हणजेच अंधश्रद्धेवर उभारलेल्या समजुतीचा गोळा ही जी समजूत आहे तीच चुकीची आहे. शब्दांचे अर्थ करतांना शब्दाची व्युत्पत्ति जशी पहावी लागते त्याप्रमाणें तो शब्द कोण लोक उपयोगांत आणीत आहेत, त्यांचे कांहीं संकेत आहेत किंवा नाहींत, हेंहि पाहणें अवश्य आहे. अक्षरें, शब्द हेच मुळीं एक प्रकारचे अर्थसूचक संकेत आहेत, हें भाषाशास्त्रज्ञ जाणतात. अर्थातच शब्दांचे सगळेच उपयोग मूळांतील व्युत्पत्तीला धरून असतात असें नाहीं, हेंहि सर्व विद्वान् लोक जाणतात. एऱ्हवी अर्थाचे वेगवेगळे प्रकार झालेच नसते. एक उदाहरणादाखल म्हणून हल्लीं मराठींत रूढ झालेला 'बेबी' शब्द घेऊं. हा मूळांत इंग्रजी व त्याचा अर्थ 'लहान मूल.' एक काळ असा होता कीं तो आपल्याकडे लहान मुलींना लावीत. आतां तो मोठ्या मुलालाहि लावतात. आपणांस हल्लींच्या वाङ्मयाचा जर अर्थ करावयाचा तर ही रूढी माहीत हवी. आगगाडीचे डबे ओढणारे इंजिन. पण त्यांचीं नांवें 'ॲक्टिव;' 'पामर्स्टन' म्हणजे जीं नांवें विलायतेंतील बड्या

सरदारांचीं, तीं नांवें इंजिनांचीं असतात. आतां 'ऑक्स्फिय' गाडीला जोड असें वाक्य असलें तर आपणांस आगगाडीच्या खात्यांतला हा संप्रदाय माहीत हवा.

इतका हा प्रपंच करण्याचा हेतु असा कीं, ज्ञानेश्वरींतील ओंव्यांचा जर अर्थ करावयाचा तर नुसता कोश पाहून चालणार नाहीं. त्याच्या जोडीला नुसतें व्याकरण पाहूनहि चालणार नाहीं. ही तर हवींतच; पण ज्ञानदेव हे योग, वेदान्त, शास्त्रांतील ज्या परिभाषा वापरतात त्याच्याशीं परिचय हवा. ज्या नाथसंप्रदायांतले ते होते त्याच्याशीं परिचय हवा. तसेंच खुद्द ज्ञानदेव तो शब्द कोणत्या अर्थानें उपयोगांत आणतात, हेंहि पाहावें लागतें; हें पहाणें हेंच सांप्रदायिक पद्धतीनें अर्थ लावणें.

सांप्रदायिक अर्थ चूक असतात, असें घटकाभर गृहीत धरलें तरी संप्रदायाला सोडून आपल्या बुद्धीनें अर्थ लावणारे यांचे तरी सगळे अर्थ बरोबर आहेत का, हें पहाण्यासारखें आहे. या बाबतींत एक नमुना म्हणून के. राजवाडे यांनीं केलेल्या ज्ञानेश्वरीच्या पहिल्या ओंवीचा अर्थ वाचकांपुढें मांडतो म्हणजे हे असंप्रदायिक कसे अर्थ करतात व इतरांना नांवें ठेवण्यांत यांना कितपत हक्क पोंचतो हें वाचक सहजच जाणतील.

राजवाडेकृत ज्ञानेश्वरीच्या पहिल्या ओंवीचा अर्थः—पान १५

राजवाडे पाठः—ॐ नमो आद्या । वेदप्रतिपाद्या ।

जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १ ॥

अशी ओंवी आहे.

अन्वयः—आद्या वेदप्रतिपाद्या नमो; स्वसंवेद्या आत्मरूपा जय. येथें नमो व जय हीं रूपें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचीं अनेक वचनाचीं आहेत.

| संस्कृत | प्राकृत | अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|---|
| नमत | नमह | नमहु | नमूँ, नमो |
| जयत | जयह | जयहु | जयूँ, जयो, जय |

नम् व जी ह्या धातूंचीं रूपें ग्रंथारंभीं नांदींत आणण्याचा परिपाठ प्राकृत व संस्कृत ग्रंथांत अनेक स्थलीं आढळतो. गाथासप्तशतींत, सेतुबंधांत व कर्पूरमंजरींत नांदींत नमह व जअह हीं रूपें आलीं आहेत. नमह—नमहु—नमो म्हणजे तुम्हीं नमस्कार करा. जय ह्या धातूचा अर्थ मराठींत "कोणासाठीं तरी जय शब्द उच्चारणें" असा झाला आहे. उदाहरणार्थ, जय शंकरा (शंकराचा जयकार करा). तेव्हां पहिल्या ओंवीचा व्याकरणदृष्ट्या अर्थ असाः—

'आद्या वेदप्रतिपाद्या नमस्कार करा; स्वसंवेद्या आत्मरूपाचा जयकार करा'; ज्ञानेश्वर श्रोत्यांना स्वहितार्थ आद्याला नमस्कार व प्रणाम करावयाला सांगतात व त्याचा जयकार करावयास सांगतात. नांदींत श्रोत्यांना इष्टदेवतेला नमस्कार करण्यास सांगण्याची चाल संस्कृत व प्राकृत नाटकांत व काव्यांत आहे. तीच परंपरागत चाल ज्ञानेश्वरांनीं उचललेली आहे. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी श्रोत्यांना उद्देशून मुद्दाम लिहिलेली आहे; स्वतःला उद्देशून लिहिलेली नाहीं. एतद्विषयक उल्लेख ज्ञानेश्वरींत अनेक आहेत; बहुतेक प्रत्येक अध्यायांत आहेत. तेव्हां ह्या ओंवींतील क्रियापदें द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं आज्ञार्थी आहेत, हें ठीकच आहे.

आठल्ये व भिडे परब्रह्माला सांगतात कीं, तुझा जयजयकार असो. परब्रह्माचा जयजयकार नव्हता कधीं; कीं, तुझा जयजयकार असो, असा आशिर्वाद कवीनें त्यास देण्याचें धाष्टर्य व औद्धत्य करावें. "तुला नमस्कार असो" (आठल्ये), "तुला माझा नमस्कार असो" (भिडे), ह्याहि भाषान्तराला हाच दोष लागतो. शिवाय ग्रंथकर्त्यानें आपण एकट्यानेंच नमस्कार करण्यापेक्षां, श्रोत्यांसह नमस्कार करणें जास्त सौजन्याचें आहे. ज्ञानेश्वर तर सौजन्याचे केवळ पुतळेच होते, तेव्हां त्यांच्या तोंडून तुला माझा नमस्कार असो, अशी उद्धट वाणी कदापीहि निघावयाची नाहीं."

राजवाडे या ओंवींतील "नमो याचा अर्थ ज्ञानदेव श्रोत्यांना 'नमस्कार करा' असें म्हणतात." असा करतात; व त्यास पहिला पुरावा असा देतात कीं, 'नमो' व 'जय' हीं आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचीं अनेक वचनाचीं रूपें आहेत. तेव्हां 'नमो' याचा अर्थ 'नमस्कार करा' असाच करणें अवश्य आहे.

वादाकरितां घटकाभर गृहीत धरलें कीं, हीं तशीं रूपें आहेत. पण ज्ञानदेवांचें 'नमो' हें यांचेंच मराठींत रूप आहे. व संस्कृतांत प्रथम पुरुषीं एक वचनीं 'नमः, नमो' उपयोजिलें जातें त्याचें 'नाहीं' हें कशावरून ठरवावयाचें ?

फार कशाला! याकरितां दूर इतर ग्रंथाकडे जावयास नको. खुद्द गीतेंत अकराव्या अध्यांत अर्जुन म्हणतोः—

'वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वंप्रपितामहश्च।

नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।' श्लोक ॥ ४० ॥

या श्लोकांचा सर्व टीकाकार 'माझा तुला नमस्कार असो' असें अर्जुन म्हणतो असाच अर्थ करतात.

ज्ञानदेव खालीलप्रमाणें लिहितातः—

जी काय एक तूं नव्हसी। कवणें ठायीं नससी।
हें असो जैसा आहासी। तैसिया नमो ॥ ५१९ ॥
आणीकही जें जें कांहीं। रूप आथी अथवा नाहीं।
तया नमो तुज तैसयाही। जगन्नाथा ॥
ऐसे सानुरागें चित्तें। नमन केलें पांडुसुतें।
मग पुढती म्हणे नमस्ते। नमस्ते प्रभो ॥

येथें 'नमो' याचा उपयोग ज्ञानदेवांनीं 'मी नमस्कार करतो' अशा अर्थानें केला आहे. गंमत अशी आहे कीं, राजवाडे 'नमो' याचा अर्थ ठरवितांना प्राकृत, अपभ्रंश या भाषांचा विचार करतात. फक्त ज्ञानदेवच हा शब्द कोणत्या अर्थानें उपयोगांत आणतात तें बघत नाहींत. ज्ञानेश्वरीचा अर्थ करतांना ज्ञानेश्वरीच पाहिली तर मग पांडित्य तें काय? व इतर संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश या भाषांचा जो अभ्यास केला त्याचा उपयोग काय? भिन्न प्रसंगांत ज्ञानेश्वरांनीं जें म्हटलें आहे त्याचा उपयोग करून यांची स्थिति वर्णन करावयाची तर 'ज्ञानचि तें अंधारें। ज्ञानासि करी॥'

ज्ञानेश्वरमहाराज हे 'ॐ' नें निर्दिष्ट 'आत्मस्वरूप' त्यास नमन करीत आहेत, हें लक्षांत येण्याकरितां अकराव्या अध्यायापर्यंत सुद्धा जाण्याचें कारण नाहीं. याच नमनाचा शेवट २० व्या ओवीनें केला आहे व ती अशी आहेः—

हे तिन्ही एकवटले। तेथ शब्दब्रह्म कवळलें।
तें मियां गुरुकृपा नमिलें। आदिबीज ॥

या ओंवीचा सरळ अर्थ 'हे आद्या ओंकारा, तुला नमस्कार असो.' पण हा झाला सांप्रदायिक अर्थ!

'नमो' शब्दद्वारां ज्ञानदेव श्रोत्यांना 'नमस्कार करा' म्हणतात. असा अर्थ करण्याचें दुसरें कारण "नांदींत श्रोत्यांना इष्ट देवतेला नमस्कार करण्यास सांगण्याची चाल संस्कृत प्राकृत नाटकांत व काव्यांत आहे. तीच परंपरागत चाल ज्ञानेश्वरांनीं उचललेली आहे. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी श्रोत्यांना उद्देशून मुद्दाम लिहिली आहे. स्वतःला नव्हे" वगैरे राजवाडे लिहितात.

प्रथम हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, सगळे काव्यकर्ते तरी कुठें लोकांना नमस्कार करा असें प्रारंभीं सांगतात? उदाहरणार्थ, कालिदासानें 'तौ वंदे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये' असें स्वतःच वंदन केलें आहे.

दुसरें, राजवाडे विसरतात कीं, ज्ञानेश्वरी म्हणजे कांहीं नाटक अथवा शृंगाररसप्रधान काव्य नव्हे व ज्ञानेश्वरीकार कांहीं नाटककार नव्हेत. 'शृंगाराचियाहि माथां पाय ठेवी' असें परतत्त्व स्पर्श करणारें हें अध्यात्मप्रधान काव्य आहे व असे ग्रंथ करणाऱ्यांची एक वहिवाट आहे कीं, ग्रंथाच्या आरंभीं ग्रंथ निर्विघ्नपणें पार पडावा, हा ग्रंथ आस्तिकाचा आहे असें वाचकांस प्रारंभीं ज्ञान व्हावें इत्यादि कारणाकरितां वेदान्तादि शास्त्रांतील हे ग्रंथकर्ते मंगलरूप परमात्म्यास नमस्क्रियारूप अथवा वस्तुनिर्देश रूप मंगल करीत असतात.

संस्कृत, वेदान्त, सांख्य वगैरे शास्त्रांवरील हजारो ग्रंथांतूनहि ग्रंथारंभीं मंगलाचरण अथवा नमन करण्याची प्रथा आढळून येते. पण ती परंपरा ज्ञानदेवांनीं चालविली म्हटलें तर 'संप्रदायास' अनुसरून बोललें असें होईल ना? जसें 'नमो' च्या बाबतींत आम्हीं दाखवलें कीं ज्ञानदेव 'नमो' शब्द 'मी नमस्कार करतो' या अर्थी वापरतात; तसेंच याहि बाबतींत दाखवतां येण्याजोगें आहे कीं ज्ञानदेवांची रीत 'संप्रदायशब्द नको' अशी आहे कीं ग्रंथारंभीं स्वतः नमन करावयाचें. त्यांचाच म्हणून निःसंशय असलेला अनुभवामृत, त्याच्या आरंभींच श्लोक व प्रथम प्रकरणाची ओंवी खालील प्रमाणें आहेतः—

यदक्षरमनाख्येयमानंदमजकेवलम्।
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये॥

× × ×

ऐसीं हीं निरुपाधिकें। जगाचीं जियें जनकें।
तियें वंदिली मियां मूळिकें। देवोदेवीं ॥१॥

ज्ञानदेवांना स्वतः नमन करणें इतकें आवडतें कीं, प्रकरणाच्या आरंभीं, मध्यें व अंतीं ते स्वतः नमन करतात. अनुभवामृत प्र. १।२ पहावींत.

राजवाडे यांच्या पुढें एक पाऊल टाकून चालणाऱ्या गृहस्थांनीं या ओंवीचा राजवाडेकृत अर्थ बरोबर आहे असें सिद्ध करण्याकरितां पुढील पुरावा दिलेला आम्हीं वाचला आहे. ते लेखक म्हणतात, 'कीर्तनकार नाहीं का म्हणत, 'बोला पुंडलीक वरदे', असेंच ज्ञानदेव म्हणतात, 'करा नमस्कार.' बरोबर. यापेक्षां ज्ञानदेवांच्या ओंवीचा अर्थ लावायला आणखी कोणचा पुरावा हवा? लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, हा पुरावा सांगणारे सांप्रदायिक वारकरी नव्हेत. स्वतंत्रप्रज्ञ आहेत. लोकांना 'बोला पुंडलिक वरदे' सांगण्यापूर्वी कीर्तनकार कांहीं म्हणतो, पुटपुटतो व मग कांहीं वेळानें बोला म्हणतो. पण हें पहाणें म्हणजे पुनः संप्रदाय पहाणें आलें.

'जय' शब्दाचा अर्थ सुद्धां जयजयकार तुम्ही करा. असा पाहिजे असें राजवाडे म्हणतात; कारण "ब्रह्माचा जयजयकार नव्हता कधीं? कीं तो तुझा जयजयकार असो, असा आशीर्वाद कवीनें त्यास देण्याचें धार्ष्ट्य व औद्धत्य करावें." Victory to God असे उद्गार अन्य भाषांतूनहि आहेत, हें राजवाडे यांना माहीत नसावें असें म्हणणें धाष्टर्याचें आहे. 'जयजयकार असो' हा आशीर्वच नव्हे. ही उत्कट इच्छा आहे व अशा अर्थाचीं वचनें मराठीतर भाषेतून आहेत.

जयतु जयतु देवो देवकी नंदनोऽयम्।
जयतु जयतु कृष्णः वृष्णिवंशप्रदीपः॥

प्रसिद्ध जयदेव कवींच्या अष्टपदींतील 'जय जगदीश हरे' हे उद्गार काय लोकांना जयजयकार करा सांगण्याकरितां आहेत?

पण हें सगळें वर्णें म्हणजे आपल्या स्वतंत्र प्रज्ञेस मर्यादा घालणें आहे.

'स्वसंवेद्या' हा ओंवींतील शब्द राजवाडे यांनीं आपल्या अर्थांत जशाचा तसाच ठेवला आहे; पण आठल्ये व भिडे यांचे अर्थ चूक ठरवितांना त्यांनीं आपला अर्थ दिला आहे. प्रस्तावना पान १४. ते म्हणतात. "तुझ्या स्वरूपास जाणणारा तूं स्वतःच आहेस" असेंहि वाक्य योजून स्वमुखदर्शनदोष ते (भिडे) आठल्यांच्या प्रमाणेंच करतात." आठल्ये यांच्या अर्थासंबंधीं राजवाडे लिहितातः—स्वसंवेद्या या पदाचा तर शब्दार्थहि आठल्यास समजला नाहीं. स्वसंवेद्या म्हणजे 'आपल्या आपण जाणणाऱ्या' असा अनर्थ आठल्येच करूं जाणोत. सत् चित्च आहे. त्याला आपलें संवेदन आपणच करण्याची कोणती अपेक्षा आहे?" असा आठल्यांचा अर्थ चूक दाखवून पा. १३ वर राजवाडे म्हणतातः—

'संवेद्य कोणाला? इतरांना, स्वतः नव्हे. स्व म्हणजे जीवात्मा, त्याला संवेदन होण्याचा विषय. तें संवेदनहि संपूर्ण होईलच असा भाग नाहीं. ज्याचें संवेदन, ज्या सद्वस्तूचें संवेदन करून घेण्याचा प्रयत्न जीवात्म्यानें करणें संभाव्य आहे, अशा सद्वस्तूला, असा स्वसंवेद्या याचा अर्थ आहे.'

गीता अ. १० श्लोक १५ मध्यें अर्जुन म्हणतोः—

'स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम'

यावर ज्ञानेश्वरमहाराज लिहितातः—

'जी आपणपयातें तूंचि जाणसी।
आणिकातें सांगावया ही तूं समर्थ होसी॥ ओं. १८०

राजवाडे म्हणतात, स्वसंवेद्य म्हणजे 'जीवात्म्यांना संवेदन होण्याचा विषय' केनोपनिषदासारखीं उपनिषदें व ज्ञानेश्वरींतील 'दृश्यपणें देखिजे। कां ज्ञेयत्वें जाणिजे। अमुकें ऐसें म्हणिजे। तें जें नव्हे॥' वचनें अशीं कंठरवानें वस्तूचें अविषयत्व सांगत आहेत; पण राजवाडे हे बघतात कशाला?

स्वसंवेद्या याचा अर्थ 'स्वतःला स्वतः जाणण्यास योग्य असणाऱ्या' असा आहे.

ही इतकी थोडीशी कटुचर्चा करण्याचें कारण येवढेंच कीं ज्ञानेश्वरीच्या अभ्यासूंची भुलवणूक होऊं नये.

नुसता संशोधक व बुद्धिमान् असला म्हणजे त्याला ज्ञानेश्वरीचा अर्थ समजेलच असें नाहीं.

———

## ५. ज्ञानेश्वरीच्या कांहीं महत्त्वाच्या हस्तलिखित व छापील प्रतींची माहिती

१. तंजावर-संग्रह
क्रमांक ४६८
पत्रें ३४५
आकार १२″×६″
शक १५१५

२. एकनाथस्वामीचा मठ ( पैठण )
शक १५५१
[ छापील माडगांवकरप्रतींत हिचा निर्देश आहे. ]

३. वेंकटस्वामींचा मठ
शके १५८५
श्रीएकनाथांच्या घरीं बसून उतरलेल्या शक १५६३ च्या प्रतीवरून उतरविलेली.
ओंवीसंख्या ९०३३
[ ह्या पोथीवरूनच ही प्रत छापली आहे. ]

४. केशव नारायण विप्र ( पंढरपूर ) संग्रह
आकार ११¼″×६″
पत्रें ६०१
ओंवीसंख्या ९०६०
शक १ ● ७२

शतंचा अंक उडाला आहे. डॉ. रा. ग. हर्षे यांच्या मतें तो २ असावा व कांहींच्या मतें ५ असावा. तथापि ही पोथी प्राचीन वाटते.

५. थिगळे संग्रह ( बीड )
आकार ११½″ × ५¼″
पत्रें ४२०
ओंवीसंख्या ८९८१
[ नाथपूर्वकालीन पोथीची नक्कल ]

६. राजवाडेसंशोधन मंदिर-संग्रह
क्रमांक ३६६
आकार ९½″ × ५¼″
पत्रें ६७९
ओंवीसंख्या ९०२२
शक १६०४



७. नारायण श्रीपाद इनामदार
( मु. नेर्ले, जि. सातारा ) संग्रह
संवत् १६८५
आकार ११″ × ५¾″

८. औंधसंग्रह
संयांक ४
पत्रें ४३०
आकार ९¾″ × ५½″
ओंवीसंख्या ९७४१
शक १६३६

९. तंजावर-संग्रह
क्रमांक ४७
आकार १०″ × ५¼″
पत्रें ४७१
शक १६३६
[ राजवाडेप्रतीशीं साम्य ]

१०. केशव नारायण विप्र ( पंढरपूर ) संग्रह
आकार ११¾″ × ५½″
पत्रें ५५८
ओंवीसंख्या ९०३६
शक १६४२

११. शालिग्रामप्रत
आकार २३″ × १०¼″
पत्रें २६९
ओंवीसंख्या ९०४५ + ९
शक १६४२
[ सिद्धनाथप्रतीची नक्कल वाटते. ]

१२. पाटांगणकर-संग्रह
आकार ७¼″ × १२¾″
पत्रें ४१३
ओंवीसंख्या ९०३०
शक १६५३

१३. चन्होली प्रत
शक १६५९
[ छापील माडगांवकर प्रतींत निर्देश ]

१४. भांडारकर ओ. रि. इन्स्टिट्यूट संग्रह
क्रमांक ७३१
पत्रें ६८०
ओवीसंख्या ९०२२
शक १६७३

१५. वा. भा. पाठक-संग्रह
आकार ७ ३/४" × ११ ३/४"
पत्रें ६०५
ओवीसंख्या ९०७३
शक १६७४

१६. भारदे संग्रह
आकार ८ १/४" × ४"
पत्रें २५०
ओवी संख्या ९०३९
शक १६७५

१७. राजवाडे संशोधन मंडळ-संग्रह
क्रमांक ३४६
आकार ११ ३/४" × ५ ३/४"
पत्रें ५१३
ओवीसंख्या ९०५१
शक १६७९
[ नाथपूर्व पोथीची नक्कल असावी. ]

१८. आनंदाश्रम प्रत
( अनुक्रम ८५१९ )
आकार ११ १/२" × ६ १/४"
पत्रें ९३५
कालनिर्देश नाहीं. तथापि नाथोत्तर कालीन.
[ ही पोथी शक १५६५ च्या आळंदीस लिहिलेल्या प्रतीची शक १७४५ मध्यें पुनः केलेली नक्कल दिसते. ]

१९. औंध-संग्रह
ग्रंथांक ९
आकार ९ १/४" × ५ १/२"
पत्रें १९५०
ओवी संख्या ९५३५
[ नाथोत्तर कालीन ]

२०. साखरे मठ-संग्रह
आकार १५" × ६ १/४"
पत्रें २८५
ओवी संख्या ८९३२
[ नाथोत्तर कालीन ]
[ ही डॉ. हर्षे यांनीं विकत घेतली. ]

२१. वासुदेव महादेव गोन्हे ( पुणतांबें ) संग्रह
आकार ६ १/२" × ९ ३/४"
ओवीसंख्या ९०३१
पत्रें २८८
शक १६९७

२२. भारत इतिहास संशोधक मंडळ-संग्रह
लेखक रामाजी महिपत कासार ( लोहगांवकर )
शक १७०० नंतरची पोथी.

२३. चांगदेव मठ ( पुणतांबें ) संग्रह
आकार १२" × ६ १/२"
शक १७१२

२४. गुधाटे-संग्रह ( बीड )
आकार ११ १/८" × ६ १/८"
पत्रें ४७१
ओवीसंख्या ९०४४ + २
शक १७१३

२५. औंध-संग्रह
ग्रंथांक २
पत्रें ५४४
आकार ११" × ५ १/२"
ओवीसंख्या ९०३४
शक १७१६

२६. औंधसंग्रह
ग्रंथांक १
पत्रें ४९८
आकार १८ १/२" × ६ १/३"
शक १७३१

२७. भांडारकर ओ. रि. इन्स्टिट्यूट संग्रह
क्रमांक ७३२
आकार १०" × ५ ३/४"
पत्रें ६०१
शक १७३१

२८. साखरे संग्रह ( दामूअण्णा साखरे )
शक १७४७
[ छापील माडगांवकर प्रतींत निर्देश ]

२९. मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटी-संग्रह
शक १७४७
[ छापील माडगांवकर प्रतींत निर्देश ]

३०. पाटांगणकर-संग्रह
आकार १०¼" × ६½
पत्रे ३९६
ओंवीसंख्या ९१४६
शक १७६७
[ गोपाळाश्रम प्रत ]

३१. हर्षे-प्रत
आकार ७¾" × ६"
पत्रे ७८४
ओंवीसंख्या ९०२९
शक १७८२

३२. मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटी-संग्रह
काशीकडील डॉ. भाऊदाजी यांची प्रत
[ छापील माडगांवकर प्रतींत हिचा निर्देश आहे. ]

## ज्ञानेश्वरीच्या छापील प्रती

१. शके १७६७—शिळाछाप. प्रभाकर, मुंबई, पाठभेदांसह पोथी. अत्यंत दुर्मिळ.

२. शके १७८६—गणेश बापूजी शास्त्री मालवणकर, मुंबई.

३. शके १७९६—गणपत कृष्णाजी, मुंबई. दुर्बोधशब्दकोश.

४. शके १८१२—नारायण रामचंद्र सोहनी, मुंबई. शब्दकोशासह.

५. शके १८१६—अण्णा मोरेश्वर कुंटे, मुंबई.

६. शके १८१९—तुकारामतात्या, मुंबई.

७. शके १८२२—कृ. ना. आठल्ये, मुंबई.

८. शके १८२७—नाना महाराज साखरे, पुणें.

९. शके १८२९—रा. वि. मांडगांवकर, मुंबई,

१०. शके १८३०—हिंद एजन्सी, मुंबई.

११. शके १८३१—वि. का. राजवाडे, धुळें.

१२. शके १८४६—त्र्य. त्र्यं. चाफेकर, चित्रशाळा, पुणें.

१३. शके १८४८—गो. रा. मोघे, मुंबई, पद्यात्मक अनुवाद.

१४. शके १८४९—वंकटस्वामी, गद्यभाषान्तर सूची, कोश इत्यादि, पुणें.

१५. शके १८५०—बा. अ. भिडे, मुंबई.

१६. शके १८७०—भिक्षु कृष्णानंद स्वामी, विषयसूची, पुणें.

१७. शके १८७०—रंगनाथबोवा परभणी व राजाभाऊ यादव कोल्हापूर.

---

## ६. ज्ञानदेवांचें कवित्व

" उपमा, भाषासौंदर्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, भक्ति व अद्वैत यांची सांगड, अलौकिक निरीक्षणशक्ति, अप्रतिहत कवित्वशैली, अलोट वाक्माधुर्य या सर्व गुणांच्या संमिश्रणानें ' ज्ञानेश्वरी ' हा ग्रंथ न भूतो न भविष्यति असें म्हणण्यास हरकत नाहीं. "

प्रा. रा. द. रानडे ज्ञानेश्वरवचनामृत पान ८

" With Jnanadeva the Ovi trips, it gallops, it dances, it whirls, it ambles, it trots, it runs, it takes long leaps or short jumps, it halts or sweeps along, evolves a hundred and one graces of movement at the master's command. In the music of sound too it reveals a mysterious capacity of manifold evolution. The thrill, the quiver, the thunder, the bellow, the murmur, the grumble-in fact, every shade of sound it wields when occasion demands. It is an instrument that he has only to touch, and it responds to any key high or low, and to any note and tune."

" Unparalleled in Marathi literature, Jnaneshvari is so exquisite, so beautiful, so highly poetic in its metaphors and comparisons, similes and analogical illustrations, so perspicuous and lucid in style, so lofty in its flights, so sublime in tone, so melodious in word-music, so original in its concepts, so pure in taste....that, notwithstanding the profundity, the recondite nature of the subject, and the inevitable limitations attendant upon the circumstance that the author's main object was to make the original intelligible rather than add any thing new, the reader is simply fascinated, floats rapturously on the crest of the flow, and is lost in the candence of rhythm and the sweet insinuating harmonies till all is thanks-giving and thought is not."

W. B. Patwardhan
Wilson Philological Lectures.
Lecture III.

Quoted by—
Prof. R. D. Ranade
in Mysticism in Maharashtra,
Page 30.

ज्ञानदेव हे जसे मोठे पंडित होते, थोर आत्मानुभवी होते, तसे ते अभिजात कवीहि होते. मात्र त्यांनीं आपली काव्यस्फूर्ति विश्वात्मक देवाचें वर्णन करून धर्मकीर्तन करण्यांत खर्च केली. सामान्यतः रुक्ष म्हणून गणला जाणारा वेदान्त त्यांनीं रसाळ काव्यस्वरूपांत मांडला. त्यांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे " माझा मराठाचि बोलु कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंके । ऐसी अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ " आणि " ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा । बोलें इंद्रिया लागे कळंभा । एकमेकां ॥ " ही प्रतिज्ञा त्यांनीं खरी करून दाखविली. " ज्ञानेश्वरींत कर्म आहे पण कर्माची कटकट नाहीं, ज्ञान आहे पण ज्ञानाचा रुक्षपणा नाहीं, भक्ति आहे पण ती भोळ्या अज्ञानाची नाहीं. त्यांनीं तत्त्वज्ञानाला प्रेमाची माधुरी आणली व भक्तीला ज्ञानाचा डोळा दिला. त्यांच्या दृष्टान्तातहि कौटुंबिकांविषयीं, पशुपक्षांविषयीं व चराचर सृष्टीविषयीं अतुल प्रेम पदोपदीं ओसंडत आहे. त्यांच्या वैराग्यांत रखरखीतपणा नाहीं व ज्ञानांत रुक्षपणा नाहीं. जगांत कोणालाहि न मिळालेली " माऊली " ही पदवी त्यांना सर्वांनीं एकमतानें दिली. " ज्ञानेश्वर माऊली " हे दोनच शब्द ! यांत ज्ञानेश्वरांचें विश्वप्रेम प्रगट झालें. " ज्ञानेश्वर माऊली " हा महाराष्ट्राचा महामंत्र झाला. "

या विश्वप्रेमामुळें त्यांच्या काव्यांत माधुर्य निर्माण झालें. भावनांची कोमलता, कल्पनाशक्तीची उदारता, मृदुमधुर शब्दांची समृद्धि, रचनेची सहजता आणि सरलता हे सर्व प्रथमश्रेणींतल्या काव्यांतलें विशेष ज्ञानेश्वरींत आढळतात. प्रो. रा. कृ. लागू म्हणतात, " जगाच्या वाङ्मयांतील अत्युच्च श्रेणींतील कोणत्याहि काव्याची बरोबरी करूं शकेल, इतकी या ज्ञानेश्वरांच्या भावार्थदीपिकेची थोरवी आहे. "

" वाक्यं रसात्मकं काव्यम् " ही काव्याची व्याख्या सर्वमान्य आहे. ज्ञानेश्वर म्हणतात, " वाचें बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्व— । स्पर्शु जैसा ॥ " सत्काव्य हें जसें रसात्मक असलें पाहिजे तसें परतत्त्व स्पर्श करणारें अथवा जीविताचें रहस्य उकलून दाखविणारें असले पाहिजे हें उघड आहे.

काव्य प्रभावशाली होण्यास प्रसाद, माधुर्य इत्यादि गुणांची आवश्यकता आहे. निर्मल व शांत जलाशयांत पाहणाऱ्यास आपलें प्रतिबिंब स्पष्ट उमटलेलें दिसतें; त्याचप्रमाणें प्रासादिक ग्रंथांत प्रतिबिंबित झालेलें प्रमेय वाचकांच्या स्पष्ट अनुभवास येतें. गहन विषय सहजसुंदर भाषेंत सांगणें, हें कार्य कठीण आहे. त्यांतून प्रसादगुणास नादमाधुर्याची जोड मिळाल्यास पाहावयासच नको. असें उभयगुणयुक्त काव्य म्हणजे ज्ञानदेवांचाच दृष्टान्त द्यावयाचा तर " सहजें मल्यानिळु मंदु सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंचि जोडे नादु । जरी दैवगत्या ॥ तरी स्पर्शें सर्वांग निववीं । स्वादें जिव्हेतें नाचवी । तेवींचि कानांकरवीं । म्हणवी बापु माझा ॥ " (ज्ञा. अ. ४ । २२०–२२१ ) ज्ञानदेवांना असें प्रसन्न मधुर काव्य निर्मावयाचें होतें.

ज्ञानदेवांच्या वाङ्मयांत शांतरस हा प्रामुख्यानें दिसून येतो. निर्वेद अथवा शम, हा शांतरसाचा स्थायीभाव होय. ज्ञानदेवांची तर अशी प्रतिज्ञा आहे कीं, आपल्या व्याख्यानांतील शांतरस शृंगारासहि जिंकील, " खेचराचिया मना " सात्त्विकाचा पान्हा आणील व सुमनास तर श्रवणासवें समाधि लावील. ज्ञानदेवांच्या काव्यकन्येनें शब्दालंकार, अर्थालंकार इत्यादि भूषणें धारण केलीं. आपल्या सौंदर्यानें जगाचे डोळे दिपविले. पण ही काव्ययुवती ज्ञानेश्वरांचाच दृष्टान्त द्यावयाचा तर, लावण्यवती आहे, कुलवती आहे आणि पतिव्रताहि आहे. पण आपला शृंगारविलास पार्थिवसेवेंत खर्च करणारी छचोर " अहेव " नव्हे. त्यांनींच म्हटल्याप्रमाणें लक्ष्मी जशी श्रीविष्णूच्या ठिकाणीं अनन्य होऊन राहिली, तशी ही ज्ञानदेवांची सालंकृत काव्यकन्या आत्मारामाच्या ठिकाणीं पतिव्रता होऊन राहिली.

ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शांतरसप्रधान आहे. या शांतरसांत अधूनमधून इतर रस मिसळून स्वादिष्ट पाक तयार झाला आहे. ज्ञानेश्वर म्हणतात, " जेथ शांताचिया घरा । अद्‌भुत आला आहे पाहुणेरा । आणि येरांही रसां पांतिकरां । जाहला मानु ॥ " [ अ. ११ । २ ] येथें शांत व अद्‌भुत यांच्याबरोबर वीर, रौद्र, भयानक या रसांसहि मान मिळाला आहे. ज्ञानेश्वरमहाराज व्यवहारांतला दृष्टान्त देतात. " अहो वधुवरांचिये मिळणीं । जैसीं वराडियांही लुगडीं लेणीं । तैसे देशियेचां सोकासनीं । मिरवले रस ॥ " [ अ. ११ । ३ ]. ज्ञानेश्वरींत शांतरसाला प्राधान्य असल्यामुळें शृंगारास फारशी जागा नाहीं; परंतु ज्ञानदेवांना शृंगाराचेंहि वावडे नाहीं. मात्र हा शृंगार मुग्ध रूपांत अवतरला आहे. उदाहरणार्थ, " कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगना अंगीं ॥ अ. १ । ४२. वीर व भयानक रस पहिल्या व अकराव्या अध्यायांत पाहावयास मिळतात.

काव्याचा आत्मा जो रस त्याचा ज्ञानेश्वरींत कसा परिपोष झाला आहे, हें थोडक्यात दर्शविलें. आतां काव्याची शोभा वाढविणारे जे शब्दालंकार व अर्थालंकार आहेत, यांचें निरीक्षण करूं.

काव्य केवळ परतत्त्वस्पर्शी असून उपयोगी नाहीं; त्याचें बाह्यांगहि रेखीव, प्रमाणबद्ध व आकर्षक असलें पाहिजे. म्हणून रेखीव शब्द, अर्थास साजेल अशी पदपद्धति, नादमाधुर्य, इत्यादि गोष्टींकडे ज्ञानेश्वरांनीं लक्ष पुरविलें. आपण मराठींत अशी शब्दरचना करूं कीं, त्या शब्दांच्या नादरंगाकडे पाहून लोकांनीं भुलावें. ज्ञानेश्वर म्हणतात, " जियें कोंवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे । वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ॥ " अ. ६–१५ ज्ञानदेवांच्या काव्यांत शब्दसौष्ठवाबरोबर अनुप्रासादि अलंकार साधलेले आहेत. पुढील ओंवी पहा " ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें । बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥ " अ. १२–२३९. ज्ञानेश्वरांचें काव्य उपमा दृष्टान्त, रूपक, उत्प्रेक्षा, निदर्शना, अनन्वय, अपन्हुति, एकावली इत्यादि अर्थालंकारांनीं युक्त आहे. उपमा आणि दृष्टान्त यांची तर गर्दी झाली आहे. उपमालंकार हा दोन वस्तूंमधील कांहीं साम्यावर अधिष्ठित असतो. उपमेनें वर्ण्यविषय वाचकांच्या मनांत सहज ठसेल अशा प्रकारचें उपमान व उपमेय यामधील साधर्म्य दर्शविलें पाहिजे. उपमा ही व्यवहारांतली असावी; तसेच ती सूचक व साभिप्राय असावी लागते. उदाहरणार्थ " जात्यंधा लागे पिसें । मग ते सैरा धावे जैसें । तुझें शहाणपण तैसें । दिसतसे ॥ " अ. २–९३ " स्वाशिखरांचा भाव । नेणें जैसा मेरु । कीं धरा यशसुकरू । बोझें न म्हणे ॥ " अ. १३–३४७

उपमेंत जसें साधर्म्य असतें, तसें दृष्टान्तांतहि असतें. परंतु उपमेला लागणारें साधर्म्य दोन वस्तूंमधील पाहिजे, तर दृष्टान्ताला लागणारें साधर्म्य दोन स्वतंत्र चित्रांमधील पाहिजे. यालाच साहित्यशास्त्रांत बिंब-प्रतिबिंबभाव असें म्हणतात. उदाहरणार्थ, " पै महोदधीचिया तरंगा । व्यवस्था धरूं नये जेवीं गा । तेवीं माझिया विशेषलिंगा । नाहीं मिती ॥ " अ. १०–३०१ येथें समुद्राचे तरंग आणि माझ्या विभूति या दोन वस्तूंत अमितपणा हा समान धर्म आहे. म्हणून या ओंवीत उपमालंकार दिसून येतो. पण " तो तूं परब्रह्मचि असकें । मज देवें दिधलासि हस्तोदकें । तरी आतां भेदु कायसा कें । देखावा कवणें ॥ जी चंद्रबिंबाचां गाभारां । रिगालिया-वरीहि उबारा । परि राणेपणें शार्ङ्गधरा । बोला हें तुम्ही ॥ " [ अ. १०। ३२२–२३ ] या ओंव्यांत दृष्टान्त आहे. कारण, श्रीकृष्ण हातांत येणें आणि भेद नाहींसा होणें हें वस्तुस्थितीचें एक चित्र आहे. चंद्रबिंबाच्या गाभाऱ्यांत शिरणें आणि उबारा नष्ट होणें हें दुसरें चित्र आहे. या दोन चित्रांत साम्य दाखवलें असून श्रीकृष्ण व चंद्राचा गाभा; हातांत येणें व आंत

शिरणें आणि भेद व उबारा नाहींसा होणें हीं बिंब-प्रतिबिंबरूपानें सांगितली आहेत.

ज्ञानदेवांनीं व्यावहारिक दृष्टान्त देऊन व्यवहार शिकविला असें कांहीं लोक मानतात; पण हें बरोबर नाहीं. ज्ञानदेवांनीं पारमार्थिक सत्य पटविण्याकरितां दृष्टान्त दिले आहेत. लहान वयांतसुद्धां ज्ञानदेवांचें निरीक्षण अत्यंत व्यापक आणि सूक्ष्म होतें असें दिसतें. ज्ञानदेवांचे आवडते आणि नाविन्यपूर्ण असे कांहीं दृष्टान्त आहेत. त्यांच्यानंतर होऊन गेलेल्या संत कवींनीं त्या दृष्टान्तांचा अंगिकार केला आहे. उदाहरणार्थ– " जैसी ते शुकाचेनि आंगभारें। नळिका भोविन्नली एरी मोहरें। तरी तेणें उडावें परी न पुरे। मनशंका ॥ वायांचि मान पिळी। अटुवें हियें आवळी। टिटांतु नळी। धरूनी ठाके ॥ म्हणे बांधला मी फुडा। ऐसिया भावनेचिया पडे खोडां। कीं मोकळिया पायांचा चवडा। गोंवी अधिकें ॥ ऐसा काजेंवीण आतुडला। तो सांग पां काय आणिकें बांधला। मग नसोडी जर्‍ही नेला। तोडूनि अर्धा ॥ " [ अ. ६। ७६–७९ ] हाच शुकाचा दृष्टान्त तुकारामबुवांच्या अभंगांत सांपडतो. " शुकनालिकान्यायें गुंतलासि काय। विचारूनि पाहे मोकळिया ॥ "

ज्ञानदेवांच्या दृष्टान्ताचा आणखी एक विशेष असा आहे कीं, त्यांना एखादी महत्त्वाची गोष्ट पटवावयाची असते, तेव्हां ते सातआठ दृष्टान्त ओळीनें देतात. [ अ. १३। १७९ ते ८३ ] [ अ. १४। ३७३ ते ७६ ] कित्येक वेळां हे दृष्टान्त एकापेक्षां एक चढते असतात. तात्त्विक दृष्ट्या त्यांचा फार उपयोग असतो. कित्येकदां या दृष्टान्तश्रेणींत ग्रंथकाराच्या मताचें मंडन व दुसर्‍याच्या मताचें खंडण पहावयास मिळतें. अशी दृष्टान्तपरंपरा देण्यास कवीचे सृष्टि व व्यवहार यांचें निरीक्षण व्यापक व सूक्ष्म असावें लागतें. एकाच उपमानाचा वेगवेगळ्या प्रसंगीं वेगवेगळ्या अंशानें उपयोग करण्यांत ज्ञानदेवांचें बुद्धिवैभव प्रकट झालें आहे. उदाहरणार्थ, आपण ' सूर्य ' हें उपमान घेऊं.

( १ ) शब्दाची व्याप्तिः–' जैसें बिंब तरी बचकें एवढें। परी प्रकाशा त्रैलोक्य थोकडें। शब्दाची व्याप्ति तेणें पाडें। अनुभवावी ॥ ' [ अ. ४। २१५ ]

( २ ) आपण ब्रह्म झालों कीं सर्व ब्रह्मचः–" जैसी पूर्व दिशेचां राउळीं। उदयाचि सूर्ये दिवाळी। कीं येरी ही दिशां तियेचि काळीं। काळिमा नाहीं ॥ [ अ. ५। ८६ ]

( ३ ) गुणातीत पुरुष देहीं अकर्तृत्व पाहतोः–" कां तारागणीं लोपावें। सूर्यकांतीं उद्दीपावें। कमळीं विकासावें। जावें तमें ॥ ये कोणाचीं काजीं कहीं। सविता जैसा नाहीं। " [ अ. १४। २९६–९७ ]

ज्ञानदेवांच्या रूपकांचा विचार करूं. त्यांच्या काव्य-स्फूर्तीला भरती आली, कीं एकामागून एक रूपकें लाटा-प्रमाणें वाहत जातात. अशापैकीं सोळाव्या अध्यायाच्या आरंभीं सूर्याच्या रूपकानें केलेलें चित्सूर्याचें वर्णन पाहाण्यासारखें आहे. हें इतक्या बहारीचें आहे कीं, वाचकाला अनेक वेळा वाचावेंसें वाटतें. प्लेटो या विख्यात ग्रीक तत्ववेत्यानें आपल्या " रिपब्लिक " नामक ग्रंथांत या सूर्यश्लेषाचा उपयोग केला आहे. त्याच्याशीं या वर्णनाची तुलना केल्यास ज्ञानदेवांचा आध्यात्मिक अनुभव व काव्यस्फूर्ति हीं दोन्हीं किती श्रेष्ठ कोटींची आहेत, हें दिसून येईल. ज्ञानदेवांच्या रूपकांची मौज अशी आहे कीं, त्यांपैकीं पुष्कळशीं अध्यात्म-शास्त्रांतील निरनिराळ्या अनुभवांवर उभारलेली आहेत.

उपमामूलक इतर अलंकारहि ज्ञानेश्वरींत आढळतात. पुढील " अनन्वय " अलंकाराचें परिचित उदाहरण पाहा. " रामरावण झुंजिन्नले कैसे। रामरावण जैसे। मीनलें समरीं ॥ " [ अ. १०-३८ ] आतां दुसरें रम्य उदाहरण पाहा. " जैसी अमृताची चवी निवडिजे। तरी अमृताचिसारिखी म्हणिजे ॥ " [ अ. ३–१८२ ] तसेंच ज्ञानेश्वरींत जागोजाग आलेल्या उत्प्रेक्षा अलंकारा-पैकीं गीतेच्या श्लोकांचें केलेलें वर्णन नमुन्यादाखल सांगतां येईल. " कीं श्लोक नव्हती आन। गमे गीतेचें महिमान। वाखाणिते बंदीजन। उदंड जैसे ॥ कीं श्लोकाचिया आवारा। सात शतें करूनि सुंदरा। सर्वांगम गीतापुरा। वसों आलें ॥ कीं निजकांता आत्मया। आवडी गीता मिळावया। श्लोक नव्हती बाह्या-। पसरू का जो ॥ कीं गीता कमळींचें भृंग। हे गीतासागरतरंग। कीं हरीचे तुरंग। गीतारथींचें ॥ " [ अ. १८।१६७१–७४ ]

आतां ज्ञानदेवांच्या काव्याचे कोणते विशेष आहेत त्यांचा विचार करूं. त्यांच्या काव्याचा पहिला विशेष म्हणजे त्यांत दिसून येणारी निर्व्यंग व सुदृढ मानसिक स्थिति. या ग्रंथकाराच्या अंतःकरणाला पापीवृत्तीचा

विटाळ झालेला नाहीं. त्याच्या चरित्राला पार्थिव कोठेंहि चिकटलेलें नाहीं. मराठी भाषेचा आणि शुद्ध परमार्थाचा गौरव करण्याकरितां ईश्वरी तेज ज्ञानदेवांच्या देहांतून चमकून गेलें.

त्यांच्या काव्याचा दुसरा विशेष म्हणजे त्यांची अलौकिक काव्यस्फूर्ति होय. त्यांच्या काव्यस्फूर्तीचें हें लोकोत्तर सामर्थ्य ज्यांना पहावयाचें असेल, त्यांनीं तेराव्या अध्यायांतील "अज्ञानं यदतोऽन्यथा" या श्लोकावरील अज्ञानाचीं लक्षणें पाहावीं. तसेंच ज्ञानी माणसाच्या लक्षणांपैकीं "अहिंसा" या पदाचें ज्ञानदेवांनीं केलेले व्याख्यान पाहावें. ज्ञानदेवांना स्वसामर्थ्याविषयीं आत्मप्रत्यय होता. हा त्यांच्या काव्याचा तिसरा विशेष. आपल्या असाधारण भाषाप्रभुत्वाची जाणीव त्यांनीं अनेक ठिकाणीं व्यक्त केली आहे. त्यांच्या स्वभावांत स्वाभिमान आहे, पण घमेंड नाहीं; लीनता आहे, पण दीनता नाहीं. उदाहरणार्थ, त्यांचे हे तेजस्वी उद्‌गार पहा. " माझा मऱ्हाठाचि बोलु कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंके ॥ " [ अ. ६–१४ ] आपल्या ग्रंथरचनेची थोरवी ज्ञानदेवांनीं अठराव्या अध्यायांतील १७३७ ते १७५० या ओंव्यांत वर्णिली आहे. हा त्यांचा स्वाभिमान गुरूशीं बोलतांना देखील दिसतो. ते गुरूपुढें नम्र होतील, पण आपण तुमचा वरदहस्त ठेविलांत कीं मी सर्व करीन असेंहि बोलल्याशिवाय रहाणार नाहींत. " मऱ्हाटियेचां नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं । घेणें देणें सुखचिवरी । हों देईं या जगा ॥ तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवें । तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये ॥ " [ अ. १२-१६–१७ ].

ज्ञानदेवांची लेखनपद्धति स्वतंत्र आहे. ज्ञानेश्वरींत ते पूर्वपक्ष व उत्तरपक्ष करून आपलें मत फारसें मांडीत नाहींत. आपला भावार्थ सहजसुंदर रीतीनें श्रोत्यांपुढें मांडण्याकडे त्यांचा कटाक्ष आहे. तथापि, ज्ञानेश्वरींत वेदान्तप्रक्रियेची चर्चा स्पष्ट नसल्यानें तो ग्रंथ प्राकृत जनाकरितां आहे, असें मानणें चुकीचें होईल. वेदांताची भाषा व अर्थ पचवून भावार्थदीपिकेंतील बोल निघालेले आहेत, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. शेवटीं ज्ञानदेवांनीं गीतेच्या रमणीयतेचें जें वर्णन केलें आहे, तें त्यांच्या ग्रंथांसहि लागू आहे. तें वर्णन येथे उद्धृत करून हें प्रकरण संपवितों.

" या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी । जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी । तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें का स्वरूप तुझें । तैसें नित्य नूतन हें देखिजे । गीतातत्व ॥ " अ. १–७०–७१

ज्ञानदेवांच्या काव्यासंबंधीं प्रा. जोग, प्रा. खुपरीकर प्रभृति या विषयावर अधिकारयुक्त वाणीनें बोलूं व लिहूं शकणारांनीं लिखाण केलेलें आहे, तें अभ्यासूंनीं जरूर पहावें. येथें थोडक्यांत तत्संबंधीं चार शब्द सांगितले आहेत.

---

## ७. नाथसंप्रदाय

ज्ञानेश्वरी म्हणजे नाथ-संप्रदायांतील गुरुपरंपराप्राप्त समाधिधनाचा जगाकरितां उघडा करून ठेवलेला ठेवा असें ज्ञानेश्वर महाराज सांगतात व म्हणून ते ज्ञानेश्वरीच्या शेवटीं आपल्या गुरुसंप्रदायाचा थोडासा इतिहास देतात. ते म्हणतात, " फार पुरातन काळीं ( कोणास ठाऊक केव्हां ) त्रिपुरारी शंकर यांनीं क्षीरसिंधूच्या तीराजवळ शक्ति पार्वतीच्या कानांत उपदेश केला. तो मत्स्याच्या पोटांत असलेल्या विष्णूनें ऐकला व तो ज्ञानसंपन्न झाला. मत्स्येंद्रनाथ हे संचार करीत असतां फिरतफिरत सप्तशृंगी-पर्वतावर आले व तेथें त्यांना हातपाय तुटलेला चौरंगी भेटला. त्याच्यावर त्यांनीं कृपा केली व त्याला सर्वांगीं परिपूर्ण केलें. मत्स्येंद्रांनीं योगाब्जिनीसरोवर, विषयविध्वंसैकवीर असे श्री गोरक्षनाथ यांना उपदेश दिला. त्यांनीं गहिनीनाथांना उपदेश केला. गहिनीनाथांनीं निवृत्तिनाथांना व निवृत्तिनाथांनीं, ज्ञानेश्वर म्हणतात, मला कृतकृत्य केलें. ( अ. १८, १७५१–६२ ) असा थोडक्यांत आपल्या संप्रदायाचा इतिहास त्यांनीं दिला आहे. आपण यांत सांगितलेल्या महानुपुरुषांची कांहीं माहिती मिळते का पाहूं.

नाथपंथाचा व महाराष्ट्राचा संबंध ज्ञानदेवांपासूनच सुरू झाला असें नव्हे. ज्ञानदेवांचे पणजे त्र्यंबकपंत यांना गोरक्षनाथांचा अनुग्रह होता व आजे गोविंदपंत व आजी नीराबाई यांना गैनीनाथांचा अनुग्रह होता. यावरून असें दिसतें कीं, नाथपंथांतील साधु हे खालीं महाराष्ट्रांत येऊन धर्मजागृतीचें बरेंच कार्य करीत असावेत.

पण ज्या नाथपंथानें महाराष्ट्रास ज्ञानदेवांसारखीं दिव्य रत्नें दिलीं, त्या नाथपंथाचा उगम महाराष्ट्राबाहेर म्हणजे

उत्तर हिंदुस्तानांत आहे, ही गोष्ट खरी आहे. त्याचा विस्तार प्रथम वरतीच झाला व मग खालती झाला.

बंगाल, गुजराथ, कर्नाटक, वऱ्हाड, दक्षिण भारत या सर्व विभागांत त्याचा फैलाव झालेला दिसून येतो. इतर कांहीं बाबतींत मतभेद असला तरी पंथाचे संस्थापक आदिनाथ होत हें सर्वांना मान्य आहे; त्याचप्रमाणें हे आदिनाथ म्हणजे शंकर हेंहि सर्वांना मान्य आहे. हठयोगप्रदीपिकेचे टीकाकार ब्रह्मानंद लिहितात कीं, सर्व नाथांमध्यें प्रथम आदिनाथ व ते प्रत्यक्ष शंकर म्हणून या पंथास नाथसंप्रदाय म्हणतात. आदिनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ इत्यादिकांचीं स्थानें महाराष्ट्रांत दाखवितात.

कै. ह. भ. पांगारकर हे म्हणतात, "नेवाशाच्या डोंगरांत गोरक्षनाथांची समाधि असून सातारा प्रांतांत मत्स्येंद्रगडावर मत्स्येंद्रनाथांची समाधि आहे व तेथें दरसाल चैत्र व. ५ ला मत्स्येंद्राची यात्राहि भरते."

( मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १ पान ४८६ ) कांहींच्या मतें तीं स्थानें म्हणजे त्यांच्या समाध्या असें समजणें कठीण आहे. कारण आदिनाथ म्हणजे जर शंकर तर त्यांची समाधि असणें शक्य नाहीं. एवढेंच फारतर म्हणतां येईल कीं, हे नाथ संचारार्थ इकडे दक्षिणेंत आले असतां त्यांचा ज्या गांवीं वास झाला होता तेथें त्यांच्या नांवानें गादी स्थापन केली असावी. वाल्मिकि, कबीर, चैतन्य यांचीं जशीं स्थानें दाखवितात, तशांतलाच हा प्रकार असावा. याबाबतींत अजून संशोधनास पुष्कळच वाव आहे.

**पंथाचा प्रारंभः**—या पंथाचा प्रारंभ आठवें अथवा नववें शतक असावा; कारण गोरक्षनाथांचा काळ हा दहावें शतक समजला जातो.

**पंथाचें नांव**—सांप्रदायिकग्रंथांत नाथसंप्रदायाला निरनिराळ्या नांवांनीं संबोधिलेलें आढळतें. 'हठयोग-प्रदीपिके' वर लिहिलेल्या टीकेंत सर्व नाथांमध्यें प्रथम आदिनाथ आहेत व ते प्रत्यक्ष शंकर आहेत व म्हणून या संप्रदायाला 'नाथसंप्रदाय' या नांवानें उल्लेखिलेलें आहे, असें ब्रह्मानंदांनीं लिहिलें आहे. अनेक ग्रंथांतूनहि या संबंधीं उल्लेख मिळतो. परंतु 'सिद्धमत, सिद्धमार्ग, योगबीज, योगमार्ग, योगसंप्रदाय, अवधूतमत, अवधूत-संप्रदाय' इत्यादि शब्द वेळोवेळीं या संप्रदायाला लावलेले सांप्रदायिक ग्रंथांतून आढळतात.

आपल्या संप्रदायाला हे लोक 'सिद्धमत' किंवा 'सिद्धमार्ग' म्हणतात, याचें कारण असें आहे कीं, नाथ स्वतःसिद्ध असतात अशी यांची समजूत आहे. या मताचा अत्यंत प्रामाणिक ग्रंथ 'सिद्ध-सिद्धान्त-पद्धति' हा आहे. याच ग्रंथाची संक्षिप्त प्रत 'सिद्धसिद्धान्त संग्रह' या नांवानें अठराव्या शताब्दीच्या शेवटीं शेवटीं काशीचे बलभद्र पंडित यांनीं तयार केली आहे. वास्तविक वादी व प्रतिवादीद्वारां निर्णित अर्थाला सिद्धान्त म्हणतात; परंतु, हे लोक सिद्धद्वारां निर्णित तत्त्वालाच 'सिद्धान्त' समजतात. म्हणून आपल्या संप्रदायाच्या ग्रंथांना हे लोक 'सिद्धान्त ग्रंथ' म्हणतात.

'सिद्धमत' हें नांव संप्रदायांत फार प्रचलित आहे व याची परंपरा फार जुनी आहे. मत्स्येंद्रनाथांच्या 'कौलज्ञाननिर्णया' च्या सोळाव्या पटलावरून असें वाटतें कीं, ते ज्या संप्रदायाचे अनुयायी होते, त्याचें नांव 'सिद्ध-कौलसंप्रदाय' होतें. डॉ. बागची यांनीं लिहिलें आहे कीं, "मत्स्येंद्रनाथांनीं ज्या संप्रदायाचें प्रवर्तन नंतर केलें होतें त्याचें नांव 'योगिनीकौलमार्ग' होतें व हे सिद्ध-कौलमतच पुढें नाथपरंपरेच्या रूपानें विकसित झालें."

**नाथपंथ व बौद्ध, शाक्त आणि कापालिक पंथ**—या पंथाच्या उगमकाळीं देशांत बौद्ध, शाक्त आणि कापालिक इत्यादि अनेक पंथ होते. नाथसंप्रदायाचे आद्यगुरु आदिनाथ स्वतः श्रीशंकर आहेत. मुळापासूनच सर्व नाथसंप्रदाय शैव आहे व मूळ उपास्यदेवता श्रीशंकर आहेत, असा नाथसांप्रदायिकांचा दृढ विश्वास आहे. कापालिक मतालासुद्धां 'श्रीनाथ' यांनींच प्रगट केलें होतें. 'शाबरतंत्रांत' कापालिकांच्या बारा आचार्यांमध्यें सर्वप्रथम नांव आदिनाथांचेंच आहे व बारा शिष्यांपैकीं बहुतेक शिष्य नाथसंप्रदायाचे प्रधान आचार्य होते.

शाक्तमार्ग, जो तंत्रानुसारी आहे, त्याचे उपदेष्टे पण 'श्रीनाथ' च आहेत. नाथांनींच तंत्रांची रचना केली आहे. 'षोडश नित्यातंत्रा' मध्यें श्रीशंकरांनीं म्हटलें आहे कीं, मी सांगितलेल्या तंत्राचाच नवनाथांनीं लोकांत प्रचार केला आहे. शाक्तमतानुसार चार प्रधान आचार आहेत, वैदिक, वैष्णव, शैव व शाक्त. शाक्त आचारहि चार प्रकारचा आहे : वामाचार, दक्षिणाचार, सिद्धान्ताचार व कौलाचार.

'षट्शांभव रहस्य' नामक ग्रंथांत स्पष्टपणें दिग्दर्शित केलें आहे कीं, "वैदिक आचारापेक्षां वैष्णव आचार श्रेष्ठ आहे, त्याहून गाणपत्य, त्याहून सौर, त्याहून शैव व त्याहूनहि शाक्त आचार श्रेष्ठ आहे. शाक्त आचारांत सुद्धां वाम, दक्षिण, सिद्धान्त व कौल आचार उत्तरोत्तर श्रेष्ठ आहे." कौल मार्गालाच अवधूत मार्ग म्हणतात. या प्रकारें तंत्रग्रंथानुसार कौल अथवा अवधूत मार्गच श्रेष्ठ आहे व शाक्ततंत्र नाथानुयायीच आहे. 'गोरक्षसिद्धान्तसंग्रहां' त तांत्रिक व अवधूत यांतील फरक दाखविलेला आहे. तांत्रिक लोक प्रथम बहिरंग उपासना करतात व शेवटीं क्रमशः सिद्धि प्राप्त करून कुंडलिनी शक्तीची उपासना करतात. ही तंतोतंत अवधूत मार्गाचीच उपासना आहे.

कापालिक मताचा अल्पसा परिचय यामुनाचार्यांच्या 'आगमप्रामाण्य' या ग्रंथांतून मिळतो. भवभूतीच्या मालतीमाधव नामक नाटकांत कापालिकांचें वर्णन आढळतें. त्या आधारानें कापालिकांचें मत स्पष्टपणें कळून येतें. जरी ते मनुष्यबळी देत होते, तरी त्यांचा षट्चक्र व नाडिका-निचयाच्या कायायोगाशीं संबंध होता. हा कायायोग नाथपंथियांची एक विशेषता आहे. कापालिकामध्यें कान्हुपाद अथवा कृष्णपाद हे प्रसिद्ध सिद्ध होऊन गेले. ते स्वतःला 'कापाली' अथवा कापालिक म्हणवून घेत होते त्यांचे गुरु जालंदरपाद होते. ते नाथपंथाचे प्रसिद्ध आचार्य होते.

**विस्तार**—नाथमताला मानणाऱ्या पुष्कळशा जाती भारताच्या प्रत्येक प्रांतांत आहेत. त्या जातींमध्यें कांहीं ब्रह्मचारी योगी आहेत, कांहीं गृहस्थी आहेत. कांहीं जाती उच्च तर कांहीं नीच समजल्या जातात. सिमला, अलमोडा, पंजाब, अंबाला, गढवाल वगैरे विभागांतील योगी स्वतःला नाथसांप्रदायांतील विभिन्न शाखांचे अनुयायी मानतात व त्यांचें चिन्ह अंगावर धारण करतात. कलाकौशल्य, हातचलाखी, तंत्रमंत्रादि मार्गानें आपली उपजीविका करतात.

साधारणतः वयनजीवि जाति साळी, कोष्टी, शिंपी, इत्यादि नाथमताला मानणाऱ्या आढळतात. सुताचा रोजगार योगी जातीचा जुना व्यवसाय आहे. पुष्कळच गृहस्थयोगी जातीनें मुसलमान आहेत. सन्त कबीरदासजी अशाच एका योगी मुसलमान कोष्टी घराण्यांत जन्मास आले होते.



## कांहीं नाथांची माहिती

आतां थोडक्यांत या नाथांपैकीं कांहींची माहिती देतों.

**आदिनाथः**—नाथपंथाचे आदिगुरु आदिनाथ. पण हे प्रत्यक्ष शंकरच असल्यानें यांचा काल ठरविण्याचा प्रश्नच नाहीं. यामुळें ऐतिहासिक विभूति या दृष्टीनें या पंथाचा प्रारंभ मत्स्येंद्रनाथांपासून धरण्यास हरकत नाहीं. त्यांच्या-संबंधीं खालील माहिती मिळते.

**मत्स्येंद्रनाथः**—मत्स्येन्द्रनाथ व गोरक्षनाथ हे या पंथाचे संस्थापक नव्हत. अथवा कबीर व नानक हे ज्या अर्थानें धर्मपंथसुधारक म्हणून ओळखले जातात, त्या अर्थानें धर्मसुधारकहि नव्हत.

नाथ-परंपरेंत आदिनाथानंतर सर्वश्रेष्ठ आचार्य मत्स्येंद्रनाथ होत. आदिनाथ साक्षात् शंकरच असल्या-मुळें मत्स्येंद्रनाथच मानवगुरूमध्यें या परंपरेचे सर्वप्रथम आचार्य होते. हे गोरखनाथांचे गुरू, अवलोकितेश्वराचे अवतार, नाथपरंपरेचे मानवआद्यगुरु व कौलाचाराचे सिद्ध पुरुष होते.

**यांच्या नांवासंबंधीं अनेक मतें**—मत्स्येंद्रनाथांच्या नांवासंबंधीं अनेक मतभेद आहेत. योगी-संप्रदायांत 'मछन्दरनाथ' हें नांव प्रसिद्ध आहे. परंतु 'मत्स्येंद्रनाथ' हें नांवच शुद्ध व वास्तविक आहे. मत्स्येंद्रनाथकृत पुष्कळच ग्रंथ नेपाळमधील दरबारपुस्तकालयांत सुरक्षित आहेत. त्यांत 'कौलज्ञाननिर्णय' नांवाचें एक पुस्तक आहे. त्यांतील लिपीला पाहून स्व. महामहोपाध्याय पं. हरप्रसाद शास्त्री यांनीं अनुमान केलें आहे कीं, तो ग्रंथ इ. स. च्या नवव्या शतकांत लिहिलेला असावा. अलिकडे डॉ. प्रबोधचंद्र बागची यांनीं त्या पुस्तकाचें व मत्स्येंद्र-नाथांनीं लिहिलेल्या दुसऱ्या चार पुस्तकांचें नवीन संस्करण प्रकाशित केलें आहे. डॉ. बागची यांच्या मतानें त्या ग्रंथाची हस्तलिपि इ. स. च्या ११ व्या शतकाच्या मध्यभागांतील असावी. त्या पुस्तकांत आचार्योंचीं नांवें 'मच्छघ्नपाद, मच्छेंद्रपाद, मत्स्येंद्रपाद, मीनपाद, मत्स्येंद्र, मच्छिंद्रनाथपाद' अशीं आहेत. मच्छेंद्र, मच्छिन्द्र, मच्छेंद इत्यादि नांवें मत्स्येंद्रनाथांचें अपभ्रंशरूप होऊं शकतात. परंतु 'मच्छघ्न' हा शब्द 'मत्स्येंद्र' या शब्दाचें अपभ्रंश रूप होऊं शकत नाहीं. या नांवावरून पं. हरप्रसाद शास्त्री यांनीं अनुमान केलें आहे कीं, मत्स्येंद्र-नाथ हे मासे मारणाऱ्या जातींत उत्पन्न झाले होते. 'कौल-ज्ञन निर्णय' या ग्रंथांत 'मत्स्यघ्न' नांवाचें समर्थन केलें

आहे. त्या ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं, मत्स्येंद्रनाथ ब्राह्मण होते; परंतु एका विशेष कारणावरून त्यांचे नांव 'मत्स्यघ्न' पडलें. कार्तिकेयांनीं 'कुलागम' शास्त्र चोरून समुद्रांत फेंकून दिलें असतां त्या शास्त्राचा उद्धार करण्याकरितां स्वतः भैरव अर्थात् शिवजींनीं मत्स्येंद्रनाथांचा अवतार धारण करून समुद्रांत प्रवेश करून त्या शास्त्राचें भक्षण करणाऱ्या माशाचें पोट विदीर्ण करून त्या शास्त्राचा उद्धार केला. यावरून त्यांचें नांव 'मत्स्यघ्न' पडलें.

अभिनवगुप्तपादांच्या मतें आतान वितान वृत्त्यात्मक जाळीला छिन्नभिन्न करण्यावरून, 'तंत्रालोक' या ग्रंथाचे टीकाकार जयद्रथ यांच्या मतें चपळ वृत्त्यांचें छेदन करण्यावरून व कबीरसंप्रदायानुसार चंचल मनाच्या किंवा चपल चित्ताच्या वृत्त्यांचें छेदन करण्यावरून त्यांचे नांव मच्छद्र पडलें.

मत्स्येंद्रनाथाचें दुसरें नांव मनिनाथ आहे. या नांवाविषयींही अनेकांचीं अनेक मतें आहेत. (१) 'कौलज्ञान निर्णया' नुसार मीननाथ व मत्स्येंद्रनाथ एकाच व्यक्तीचीं दोन नांवें आहेत. (२) सांप्रदायिक अनुश्रुतीनुसार मीननाथ मत्स्येंद्रनाथांचे पुत्र. (३) तिब्बत परंपरेनुसार मीननाथ मत्स्येंद्रनाथांचे पिता तर, (४) नेपाली परंपरेनुसार मीननाथ मत्स्येंद्रनाथांचे धाकटे बंधु. असे निरनिराळे विचार प्रचलित आहेत तरी मीननाथ व मत्स्येंद्रनाथ एकच व्यक्ति होत असें अनेक ग्रंथांवरून सिद्ध होतें. ज्ञानेश्वर महाराज दोन्ही एकच समजतात. ते म्हणतात, 'मुद्रा गोरक्षराया । दिधली मीनी ॥'

मत्स्येंद्रनाथ कोणत्या कुळांत, कोणत्या प्रांतांत जन्मास आले होते, त्यांचे रचित ग्रंथ कोणकोणते, त्यांचा साधनमार्ग कोणता व कसा होता इत्यादि प्रश्न भयंकर वादग्रस्त आहेत. सर्व भारतांत त्यांच्याविषयीं, त्यांचे गुरुबंधु जालंधरनाथ, त्यांचे शिष्य गोरखनाथ यांचे विषयीं इतक्या दंतकथा प्रसिद्ध आहेत कीं, त्यांच्या आधारें त्यांचें चरित्र लिहिणें फार कठीण आहे. तरीपण कांहीं थोड्या आधारांवरून त्यांचें चरित्र प्रकाशित करण्यांत आलें आहे.

### मत्स्येंद्रनाथ

कित्येक मत्स्येंद्रनाथांचा अवतारकाल साधारण इ. स. १०३८ च्या आसपास असावा असें म्हणतात. परंतु गोरक्षनाथांचा काळ दहावें शतक समजला गेल्यानें मत्स्येंद्रनाथांचा काळहि त्याच्याजवळपासच मानणें अवश्य आहे. पं. हरप्रसाद शास्त्री व डॉ. बागची यांनीं अनेक ग्रंथांच्या आधारें आपल्या बुद्धीनुसार मत्स्येंद्रनाथांचें चरित्र लिहिलें आहे. त्यांच्या मतें मत्स्येंद्रांचा जन्म चंद्रगिरीमध्यें कामरूप देशांत झाला असावा.

मत्स्येंद्रनाथविषयक दंतकथा:—कौलज्ञाननिर्णय, बुद्धपुराण, सुधाकर चंद्रिका, बंगाली साहित्याचा इतिहास इत्यादि पुस्तकांतून मत्स्येंद्रनाथांच्या विषयीं अनेक कथा दिल्या आहेत. त्या दंतकथांवरून येवढाच बोध होतो कीं, मत्स्येंद्रनाथ कोणा एका स्त्रियांच्या मोहांत पडले असावेत व गोरक्षनाथांनीं त्यांना तेथून काढलें असावे.

नाथपंथावर लिहिणाऱ्या हिंदुस्थानीं अर्वाचीन लेखकांच्या माहितीप्रमाणें मत्स्येंद्रनाथांनीं कौलमार्गाचा प्रचार केला. त्याची कांहीं माहिती पुढें देत आहोत. त्यावरून वाचकांना मत्स्येंद्रनाथांच्या तत्त्वज्ञानाची तोंड-ओळख होईल.

### कुल व अकुल या शब्दांचे अर्थ व त्यांचे परस्पर संबंधः—

कुल व अकुल ह्या शब्दांच्या अर्थासंबंधींहि थोडाफार विचार होणें आवश्यक आहे. 'कौल' लोकांच्या मतानुसार 'कुल' याचा अर्थ शक्ति आहे व 'अकुल' याचा अर्थ शिव असा आहे. कुलाचा अकुलाबरोबर म्हणजेच शक्तीचा शिवाबरोबर संबंध प्रस्थापित करणें हाच 'कौल' मार्ग होय. म्हणून कुलाकुलसंबंध जोडणें, हें कौलसाधनाचें ध्येय आहे व त्या दोघांचें समरस एकरूप होणें हेंच कौलज्ञान आहे. 'कुल' या शब्दाचे आणखीहि पुष्कळ अर्थ केलेले आहेत; पण त्यामध्ये वर दिलेलाच मुख्य समजला जातो. शिव हा अनादि असल्यामुळें तो कोणत्या कुलांत-गोत्रांत-उत्पन्न झाला असें म्हणतां येणार नाहीं व म्हणूनच शिवाला अकुल म्हणणें अगदीं उचित ठरतें. शिवाची सृष्टि निर्माण करण्याची इच्छा, त्यालाच शक्ति असें म्हणतात. सर्व पदार्थमात्राची उत्पत्ति शक्तीपासून झाली आहे व शक्ति शिवाची प्रियाहि आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, शिव व शक्ति दोन भिन्न वस्तू आहेत. जसे चंद्र व चांदणें ही दोन नव्हेत, तसेच शिव व शक्ति ही दोन्ही एकच आहेत.

**( ३ ) कौलमार्गाचे कांहीं दार्शनिक सिद्धान्तः—** कौलमार्ग सत्कार्यवादी आहे. कार्याच्या अव्यक्तावस्थेचेंच नांव 'कारण' आहे व कारणांची व्यक्तावस्था म्हणजेच कार्य होय.

प्रलयकाळाच्या वेळीं परमशिव सर्व प्रपंच आपल्यामध्यें विलीन करतो व सर्व प्राण्यांचें कर्मफल सूक्ष्मरूपानें आपल्यामध्यें धारण करतो. कर्मफल शिल्लक राहिल्यामुळेंच तें परिपक्व झाल्यावर सृष्टीचें चक्र पुनः सुरू होतें व त्या वेळीं 'परमशिवा'मध्यें सुप्त असलेली शक्ति सर्जनाच्या रूपानें पुनः व्यक्त स्वरूपाला येते. हीच त्रिपुराशक्ति होय. तांत्रिक लोकांच्या मतानुसार परब्रह्म जरी सदासर्वकाळ असतें, तरीपण सृष्टिसर्जनाचें कार्य ह्या त्रिपुराशक्तीशिवाय होत नाहीं. जगत् हें ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीनें युक्त असल्यामुळें तें उत्पन्न करणारी जी शक्ति तिला त्रिपुरा असें म्हटलेलें आहे. मत्स्येन्द्रनाथांनीं आपल्याच कौलज्ञान निर्णयामध्यें ह्या शक्तीचा ह्याच नांवानें उल्लेख केलेला आढळत नाहीं; तरीपण तांत्रिकांची सृष्टितत्त्वें तशीच्या तशीच्या मानलीं आहेत.

सत्कार्यवादाचा जो सिद्धान्त वर सांगितला आहे त्यावर असा एक आक्षेप होणें शक्य आहे कीं जी वस्तु कधीं नव्हती ती उत्पन्न कशी होऊं शकेल ? तर मग जगत शक्तिपासून कसें निर्माण झालें ? याचें उत्तर असें आहे कीं, प्रलयकाळाच्या वेळीं ही शक्ति जगताच्या ३६तत्त्वाला घेऊन अव्यक्तावस्थेत जाते. आतां तिचें व्यक्तस्वरूप म्हणजेच जगत् होय. ही शक्ति जर शिवाच्या ठिकाणीं अव्यक्तदशेला असते तर मग परमशिवच जगताचें कारण कां नाहीं मानलें जात ? वामकेश्वर मंत्रांत असें सांगितलें आहे कीं, शक्ति ज्यावेळीं जगत्‌रूपानें दिसूं लागते, त्या वेळीं तिला शिवाची अपेक्षा राहात नाहीं. तांत्रिक लोक ह्या शक्तीला जड न मानतां चिद्रूपा मानतात.

परमशिवाला सृष्टि निर्माण करण्याची इच्छा उत्पन्न झाल्यावर शिव व शक्ति हीं दोन तत्त्वें निर्माण होतात. परमशिव निर्गुण निरञ्जन आहे. शिव सगुण व शक्तीनें युक्त आहे. शिवाचा धर्म शक्ति आहे व म्हणूनच ते अविभाज्य आहेत.

### गोरक्षनाथ.

विक्रम संवत् दहाव्या शतकांत भारतवर्षामध्यें गोरक्षनाथांचा आविर्भाव झाला. शंकराचार्यांनंतर इतके प्रभावशाली व महिमान्वित महापुरुष भारतवर्षांत अजूनपर्यंत कोणी अवतरले नाहींत, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. आजहि भारताच्या कानाकोपऱ्यात यांचे अनुयायी आढळतात. भक्तिमार्ग प्रचलित होण्याच्या अगोदर सर्वांत शक्तिशाली धार्मिक मार्ग म्हणजे गोरक्षनाथांचा योगमार्गच होता. गोरक्षनाथांसंबंधींच्या गोष्टी भारतांतील प्रत्येक भाषेंत उपलब्ध आहेत; त्यावरून असें स्पष्ट होतें कीं, गोरक्षनाथ आपल्या युगाचे सर्वांत श्रेष्ठ धार्मिक पुढारी होते.

त्यांच्या जन्मस्थानासंबंधीं अजून एकमत झालें नाहीं. 'योगीसंप्रदायाविष्कृति' या ग्रंथामध्यें त्यांचा जन्म गोदावरीतीरावर चंद्रगिरी नांवाच्या गांवीं झाला होता, असें आढळतें.

ग्रियर्सननें त्यांना काठियावाडमधील गोरखमठीचे निवासी म्हणून म्हटलें आहे. बंगालमध्यें, पंजाबमध्यें त्यांचा जन्म झाला होता असा कित्येकांचा समज आहे. पंजाबमधील गोरखटेकडीवरुन ब्रिग्सुसाहेबांनीं त्यांचा जन्म पंजाबमध्यें झाला होता, या मतावर विशेष जोर दिला आहे. डॉ. मोहनसिंग यांच्यामतेंहि पेशावरजवळ त्यांचा जन्म झाला असावा. एवढेंमात्र निश्चितपणें सांगतां येईल कीं, गोरखनाथांचा जन्म ब्राह्मणकुळांत झाला असावा व त्यांचा बहुतेक आयुष्याचा भाग ब्राह्मणवातावरणांतच व्यतीत झाला असावा.

गोरक्षनाथांच्या नांवावर पुष्कळसे ग्रंथ आज उपलब्ध आहेत; परंतु गोरक्षनाथांनीं कोणते ग्रंथ स्वतः लिहिले व क्षेपक ग्रंथ कोणते आहेत, हा अजूनपर्यंत वादग्रस्त प्रश्न आहे. या पुस्तकाच्या आधारें कित्येक विद्वानांनीं गोरक्षनाथांचें जन्मस्थान, त्यांचा कालनिर्णय, त्यांच्या विषयींच्या प्रचलित कथा यावर प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला आहे. कबीरदासाबरोबर, गुरु नानकबरोबर त्यांचा वार्तालाप झाला होता व ते चौदाव्या शताब्दींत होऊन गेलें असें ग्रियर्सन साहेबांनीं अनुमान बांधलें आहे. फार काय, सतराव्या शताब्दींत त्यांचा बनारसीदास जैन यांच्याशीं शास्त्रार्थ झाला होता, असाहि एक स्वर आहे. डॉ. बडथ्वाल यांनीं त्यांना अकराव्या शताब्दीमधील प्रसिद्ध योगी मानलें आहे व आपल्या मताच्या समर्थनार्थ त्यांनीं गोरखनाथांच्या ग्रंथांचा उल्लेख केला आहे. कै. ह. भ. प. पांगारकर गोरक्षनाथ हे बाराव्या शतकांत हयात होते, असें मानतात.

गोरक्षनाथांचीं संस्कृत पुस्तकें आज सर्वच्या सर्वच उपलब्ध नाहींत. तीं सर्वच त्यांनीं लिहिलीं आहेत असें म्हणणेंहि धाडसाचें आहे. एकूण २८ पुस्तकांचा उल्लेख डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी यांनीं आपल्या 'नाथसंप्रदाय' या पुस्तकांत केलेला आहे. त्यांतील अमनस्क, अमरौघ-शासनम्, गोरक्षपद्धति, गोरक्ष-संहिता, सिद्धसिद्धान्तपद्धति हे ग्रंथ अधिक महत्त्वपूर्ण आहेत.

वरील संस्कृत पुस्तकांव्यतिरिक्त हिंदीमध्यें गोरक्ष-नाथांचीं कांहीं पुस्तकें आढळतात. यांचें संपादन स्व. डॉ. पीतांबरदत्त बडथ्वाल यांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक व योग्य आधारांनीं केलें आहे. हा ग्रंथ 'गोरखबानी' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्या ग्रंथांत गोरक्षनाथांच्या ४० हिंदी पुस्तकांचा उल्लेख आहे. त्यांतील 'सबदी' 'गोरखबोध' इत्यादि पुस्तकें अत्यंत महत्त्वपूर्ण आहेत.

मराठींतहि त्यांचे ग्रंथ आहेत. त्यांपैकीं 'अमरनाथ संवाद' हा योगपर ग्रंथ आहे. गोरक्षगीता या ओंवीबद्ध ग्रंथांतहि योगविषयक अनुभव दिले आहेत.

डॉ. मोहनसिंग यांनीं Gorakhanath and Medieval Hindu Mysticism (Lahore 1937) म्हणून परिश्रमपूर्वक पुस्तक लिहिलें आहे. त्यावरून गोरखनाथासंबंधींच्या खालील चुकीच्या समजुती दूर व्हाव्यात अशी कल्पना आहे :—

(१) गोरक्ष हे बुद्ध मताचे होते.
(२) ते कानफाटा पंथाचे संस्थापक होते.
(३) ते १४ व्या शतकांत झाले.
(४) कबीर व नानक यांची व त्यांची गांठ पडली होती.
(५) ते नाशिकजवळ जन्मास आले.

### गोरक्षमत

डॉ. मोहनसिंग यांच्या मतें गोरक्षनाथ हे उपनिषदांनीं सांगितलेल्या योगमार्गाचे पुरस्कर्ते होते. श्री. भट्टाचार्य म्हणतात, 'वृत्ति निरोधकरून मनाचा अमनीभाव करणें,' हें गोरक्षनाथांच्या मार्गाचें सार आहे.

गोरक्षमताचा हा आद्य सिद्धान्त आहे कीं, जे ब्रह्माण्डांत आहे, ते सर्व सूक्ष्म प्रमाणांत पिण्डांत आहे. या पिण्डशरिरांत मुख्य कार्यकारी शक्ति कुण्डलीनी आहे. विश्व–ब्रह्माण्डांत भरलेली जी महा कुण्डलिनी तिचें हें पिण्डगत स्वरूप आहे. या शक्तीची उपासना करण्या-करितां कोठें दूरवर भटकत जाण्याची जरूरी नाहीं. प्रत्येक पिण्डांत अणुपरमाणूंत, ही शक्ति भरलेली आहे. ब्रह्माण्डाच्या प्रत्येक कणांत भरून उरलेली ही शक्ति मानवी देहांत 'कुण्डलिनी' रूपानें वास करते. नाथमार्गी साधक या शक्तीची उपासना करण्याकरितां शरीराला प्रमुख साधन मानतात. केवळ शक्तीचें संचालन हें प्रमुख ध्येय नसून शिवशक्तीचें ऐक्य म्हणजेच सहज समाधि साधणें हेंच खरें ध्येय आहे. मनुष्याला खरा मोक्ष साधावयाचा असेल, तर त्या सहज समाधिद्वारांच मनानें मनाला पहावयास शिकले पाहिजे.

गोरक्षनाथांच्या मतासंबंधीं त्यांच्या अमरौघशासनांतील एक उतारा देतों. 'अहो मूर्खता लोकस्य । केचिद्वदन्ति शुभाशुभकर्मविच्छेदनं मोक्षः। केचिद् वदन्ति वेदपाठाश्रितो मोक्षः। केचिद् वदन्ति निरालम्बनलक्षणो मोक्षः। केचिद् वदन्ति ध्यानकलाकरणसंबद्धप्रयोगसंभवेन रूपबिन्दू-नादचैतन्यपिण्डाकाशलक्षणो मोक्षः। केचिद् वदन्ति पूजा-पूजकमद्यमांसादिसुरतप्रसंगाननूलक्षणो मोक्षः। केचिद् वदन्ति मूलकरोल्लसितकुण्डलीसंचारलक्षणो मोक्षः। केचिद् वदन्ति सुसमदृष्टिनिपातलक्षणो मोक्षः। इत्यंवे-विधः भावनाश्रितः लक्षणे मोक्षो न भवति। अथ मोक्षपदं कथ्यते-यत्र सहजसमाधिक्रमेण मनसा मनः समालोक्यते स एव मोक्षः।' अमरौघशासनम् पृ. ८–९.

डॉ. मोहनसिंग यांनीं गोरक्षमताचें सार थोडक्यांत खालीलप्रमाणें दिलें आहे :—

### The Doctrine of Gorakha.

The doctrine of Gorakha can be summed up as follows:—

The goal of human life is to eternalize real life and to understand the real self; this can be done by transcending the lower self, which consists of the vital essence–the sexual power, the vital air, and the mind. Each of the three must help to transcend Itself by Itself. Yet, the control of the second gives the control of the first and of the third, of the first

two. The mind is controlled through contemplation, through the stoppage of its going-out Manas, through intellectual analytic perception through recitation, through the reversal of its normal activity, till it transcends Itself, reaches the state of Unmani, self-transcen dence. This control is to be effected in the most natural manner, with inborn facility or sahaja. By such control we shall rise into a supramental state, which is void of the working of these three but; which is a positive state wherein the three higher powers, which are the essence of the higher Self, Atma, reside, namely, Divine Music, Divine Joy and Divine Consciousness, Sat, Ananda and Chit, which are also called Word or Shabda, Union or Rasa and Amrita and Light or Joyti. This is really the fourth state above those three states, wherein the vital breath, the sex and the mind work, each predominent in one or other of the three stages. By simple natural method of Kaivalya Kumbhaka (Prolongation of the period before intake of breath), physical, moral or mental, the vital air is controlled; by simple natural method of trying to repeat the word given by the Guru and to listen to the inner Word (Ajapa japa) the sex is controlled; and by simple natural method of the stoppage or negation or emptying out of mental activity aided by psysical, moral and spiritual contemplation (Not meditation), the mind is controlled. When the mind sees and resides in the mind, when the mind and Manasa, mental activity or desire, is absorbed in the mind, when we arise above the pairs of opposites, psysically, morally and intellectually and have Samadrishti, equal-eyedness, then come the Asampragyata Samadhi and Kaivalya Moksha, the absorption of the Self in the Self, beyond all dualism; the Sahaja-Samadhi, the natural trans or easy inborn equilibrium; the Turyatita stage, the fourth, supra-mental state; the Atita Shunya, the Supreme Void which is not void. It is the Yoga of making the Surta, attention, rise through the magnetic aid of the Shabda–imparted by the teacher, and heard within–and unite with, merge itself in, the Supreme Self, Atma. It is Atma Jog, Atma Yoga, as Charpet calls it. It is the internalistic Yoga, the Yoga of the mind, wherein the mental and the moral equivalent of outer, external ceremonies, postures, and practices are to be found and observed. It is thus Siddhanta Yoga, as Kumbhari Bava calls it. the Yoga of the metaphysical, essential truth. To practise it, the control of sex is necessary; but such a mental yoga can be carried on even in married life by suitable and requisite abstinence. Mendicancy and monastic life are not indespensable. There is no demand in this for rigorous Hatha exercises, or Tantrika sensualities,or Buddhistic selfdenials. It is a kind of Raja Yoga of the

Upanishads, open to all classes, requiring a mental and moral detachment. The true Guru's air ( Word ) is indispensable for achieving what the followers of other paths achieve through difficult practices, followed by constant self-abnegation and profound contemplation. The powers to work miracles, nine siddhis and twelve siddhis, which accrue to a Jogi are mere temptations on the way. He must pass beyond the stage of a Siddha, who according to Alberuni did not desire liberation. The goal of Alchemy ( Rasa ), Tantrism and Hatha is not the goal of Gorkha, who seeks to aquire the immortality of the spirit, not of the body, who drinks of the wine of the word ( Shabda ) and enjoys the spiritual union of Shiva and Shakti, who discards the mere cauterization of body, the temple of the spirit.

वरील उताऱ्याचें मराठींत सार :

"मिथ्या असत्‌जीवनाचा त्याग करून शाश्वत जीवन जगणें हें गोरखपंथाचें ध्येय आहे. आणि हें त्याच वेळेला शक्य आहे कीं, ज्या वेळेला साधक मन, प्राण व काम हा जो अशुद्ध वर्ग आहे त्याच्यावर ताबा मिळवून शुद्ध आत्मस्वरूप होऊन राहतो. हा जो अविद्या वर्ग आहे याला जिंकण्याकरतां या प्रत्येकाची तर मदत लागतेच. प्राणायामानें काम जिंकले जातात. मनाला जिंकण्याचा उपाय म्हणजे ध्यान, मनाची वृत्तिद्वारां बाहेर धांवण्याची जी संवय आहे तिचा संयम, विचारानें अंतर्मुखता प्राप्त करून घेऊन आत्मशोधन, यांयोगें मनच मनावर ताबा मिळवतें व अमनीभावाजवळ येतें. हा संयम 'सहज' मार्गानेंच करणें सुखकर. या अभ्यासमार्गानें 'अमनीभाव' (supramental) प्राप्त होऊं शकतो. त्या ठिकाणीं कामादि त्रयींचा प्रवेश नाहीं. ही स्थिति म्हणजे शून्य नव्हे. ही स्थिति सच्चिदानंदानें परिपूर्ण भावरूप अशी आहे. या सच्चिदानंदालाच शब्द, रस, ज्योति असें नांव आहे. जाग्रति गिळून जागणें, निदैपरौते निजणें, मनाला मनानें गिळून रहाणें अशी ही स्थिति आहे.

केवलकुंभकानें प्राणावर जय मिळवतां येतो. गुरूनें सांगितलेल्या मंत्राचा (अजप )जप केला कीं काम आवरला जातो. विषय बाहेर दवडून मनाला मोकळे-रिकामें करण्यानें व ध्यानानें मन ताब्यांत येतें. स्पृहा मनांतच नाहींशीं झाली, मनामाजीं मन आलिंगू सरलें, द्वंद्वातीत अवस्था प्राप्त झाली कीं समदृष्टित्व प्राप्त होतें व या भावालाच असंप्रज्ञात समाधि, कैवल्य, सहजसमाधि, तुर्यावस्था, महाशून्य अशीं वेगवेगळीं नांवें आहेत. हा मार्ग म्हणजे नादानुसंधानाचा मार्ग आहे. यास गुरूपदिष्ट दिव्य नाममंत्राचें शांत ध्यान करणें, नादानुसंधान, हा मार्ग म्हणतात व यानें आत्म्यांत समरस होणें हें ध्येय आहे. हाच आत्मयोग. हा अंतर्मार्ग. याचकरितां बाह्य आसनादिक करावयाचे असतात. कुंभारीबुवा म्हणतात, त्याप्रमाणें हाच सिद्धान्तयोग.

या योगास ब्रह्मचर्याची आवश्यकता खरी. पण योग्य संयम पाळून गृहस्थाश्रमांतहि हा करतां येतो. भिक्षुवृत्ति अथवा संन्यास यांची आवश्यकताच आहे असें नाहीं. बौद्धांसारखी आत्मपीडा यांत नाहीं अथवा कांहीं तांत्रिक मार्गांतील भोगातिशय यांत नाहीं. हठयोगाच्या क्रियांचा कडकपणाहि यांत नाहीं. गोरक्षनाथांचा मार्ग म्हणजे उपनिषदांनीं सांगितलेला राजयोगच आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. याचा सर्वांना अधिकार आहे. याच्या साधकास नीतियुक्त आचार व वैराग्य यांची गरज आहे. इतर मार्गांनीं जें साध्य होतें तें खऱ्या गुरुच्या शब्दानें साधकास प्राप्त होतें. चमत्कार करण्याची शक्ति ज्यांना सिद्धि मग त्या नऊ अथवा बारा-प्राप्त होणें, हें योगाचें ध्येय नव्हे. हें योगामार्गांतील विलोभन मोठें विघ्न आहे. साधकानें याच्यापलिकडे जाणें अवश्य आहे.

तंत्र, हठ अथवा रसशास्त्र हीं शरीर अमर करण्याचा प्रयत्न करणारीं शास्त्रें आहेत. गोरक्षनाथांचा पंथ हा आत्म्याचें अमरत्व अनुभवणें, नादमधुचा आनंद भोगणें व शिवशक्तीच्या सामरस्याचा आनंद भोगणें या करतां आहे. आत्म्याचें मंदीर जें शरीर त्याचें नुसतें शोषण हें त्याचें ध्येय नव्हे. आत्म्याचें अमरत्व अनुभवणें हेंच या मार्गाचें उद्दिष्ट आहे."

**गोरक्षनाथांचा प्रभाव**—नाथपंथामध्ये ज्यांनीं या पंथाचा प्रसार केला व त्याचें वजन वाढवलें असे गोरक्षनाथांच्या सारखे प्रभावी व व्यक्तिमान् पुरुष दुसरे कोणी झालेच नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असें नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजांनीं सुद्धां पुढीलप्रमाणें मोठे गौरवपूर्ण उद्गार काढले आहेतः—

तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु ।
तिये पदीं का सर्वेश्वरु । अभिषेकिले ॥
अ. १८–१७५६.

गोरक्षनाथांनीं अनेक लोकांना या मार्गाची दीक्षा दिली. त्यांतला एक फांटा गहिनीनाथांच्या द्वारां श्रीनिवृत्तिनाथांकडे आला. पण गोरक्षांनीं योगासंबंधीं तत्कालीन भारतीय जनता व राजे यांच्यात इतकी आवड उत्पन्न केली कीं संस्कृतांत या विषयावर अनेक ग्रंथ निर्माण झाले. गुरुगोविंदसिंग यांनीं आपल्या आत्मचरित्रांत गोरक्षांचें केवढें वजन होतें व त्यांनीं अनेक राजांना आपल्या पंथांत कसें खेचलें याचें वर्णन केलें आहे. दहा, अकरा, बारा, तेरा, चौदा या शतकांत बौद्ध व जैन लोकांत सुद्धां योगमतावर अनेक ग्रंथ झाले. चालुक्य परमार यांच्या कारकीर्दींत शिवमंदीरें व शैवयोग यावरील ग्रंथरचना यांत पुष्कळच वाढ झाली.

तात्पर्य, गोरक्षनाथ हेच या पंथाचे खरे कर्तृत्ववान् आदिपुरुष. आदिनाथ व मत्स्येंद्रनाथ यांचें कार्यक्षेत्र त्या मानानें फारच संकोचित.

**गोरक्षनाथानंतर**—गहिनीनाथांची कांहीं फारशी माहिती मिळत नाहीं; पण त्यांचा महाराष्ट्रांत संचार होता ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ज्ञानोबाचे आजे गोविंदपंत व आजी नीराबाई यांना त्यांचा अनुग्रह होता हें मागे सांगितलेंच आहे. यांनींच महाराष्ट्रास श्रीनिवृत्तिनाथ दिले.

निवृत्तिनाथांच्या द्वारांत लावलेलें हें नाथपंथाचें रोपटें, त्याचा विस्तार गगनावर गेला. पण अजून त्याचा इतिहास लिहिला गेला नाहीं. तो एक अवश्य करणीय असा भाग करावयाचा शिल्लक राहिला आहे.

उत्तरहिंदुस्थानांत जसे गोरक्षनाथ तसे महाराष्ट्रांत श्रीज्ञानराज.

'निवृत्तिज्ञानदेवें सोडविलें अपार जीवजंतु' असें नामदेवांनीं यांच्या कार्याचें वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरमहाराज हे योगी, भक्त व ज्ञानी असें असल्यामुळें त्यांच्याशीं गुरुत्वाचें नातें जोडणारे असे वेगवेगळे लोक आहेत. ज्ञानदेवाशीं आपला योगमार्गपरंपरेंतील साधु म्हणून संबंध जोडणारे महाराष्ट्रांत पंथराजाचे कापडी अजूनही आहेत. 'भक्तिपंथी' वारकरी ज्ञानदेव मोठे भक्त म्हणून त्यांच्याशीं नातें जोडतात. ज्ञानमार्गाचेहि पांथिक महाराष्ट्रांत आहेत. तेही ज्ञानराजाशीं आपला संबंध जोडतात. महाराष्ट्रांत अनुभवामृताची परंपरा अजूनहि विद्यमान आहे. त्याच्यांतहि शाखा आहेत. एका शाखेनें शिवकल्याण दिलें व दुसऱ्या शाखेनें प्रसिद्ध पुरुष विश्वनाथ ऊर्फ भय्याकाका, ज्यांनीं के. कुंटे यांना ज्ञानेश्वरीची गोडी लावली, हे दिले.

पहिलीः—शिवकल्याणांनीं अनुभवामृतावरील आपल्या 'नित्यानंदैक्यदिपिका' या टीकेच्या शेवटीं आपली पुढीलप्रमाणें परंपरा दिली आहेः—

शंकर, पार्वती, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, गहिनीनाथ, निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, मुक्ताबाई, वटेश्वर, चक्रपाणी, विमळानंद, चांगाकेशवदास, जनकराज, नृसिंह, श्रीहृदयानंद, विश्वेश्वराव, श्रीकेशवराज, श्रीहरिदास, स्वामी, परमानंद नित्यानंद व शिवकल्याण-नित्यानंदैक्यदिपिका. अ. १०।३४५–७५

दुसरीः—आदिनाथ, मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ, गहिनीनाथ, निवृत्ति, ज्ञानदेव, सत्यामलनाथ, दिनानाथ, अनंतराज, अमळनाथ, भूमानंद, गोपाळ, विश्वनाथ, ऊर्फ भय्याकाका, अण्णाबोवा हुपरीकर, रघुनाथबोवा.

ज्ञानदेवांच्या शिकवणुकींतील, योग, भक्ति, ज्ञान यांचा समन्वय पंढरपुरीं श्रीपांडुरंगचरणीं झाला व म्हणून महाराष्ट्रापुरते बोलावयाचें तर पंढरपूर हें नाथपंथाचें पीठ झालें. शंकराचार्य हे पंढरपूरचें 'महायोगपीठ' असें वर्णन करतात. नाथपंथाचें हें इवलेसें रोप पंढरपुरांत निवृत्ति-ज्ञानदेवांनीं लावलें व त्याला खतपाणी नामदेव, एकनाथ, तुकोबा यांनीं घातलें व त्यामुळें त्याचा वेल गगनावर गेला. महाराष्ट्रांत या वारकरी संप्रदायाइतका विस्तार पावलेला दुसरा संप्रदाय नाहीं.

या प्रकरणांत मत्स्येंद्रनाथ व गोरक्षनाथ यांच्यासंबंधीं माहिती दिली आहे. तिला मुख्यत्वें आधार उत्तर हिंदुस्थानांतील पं. हजारीप्रसाद, डॉ. मोहनसिंग इत्यादि लेखकांनीं लिहिलेल्या ग्रंथांचा आहे.

आपल्याकडे नाथसंप्रदायाची जी शाखा श्रीनिवृत्तिनाथांच्या द्वारीं रोवली गेली, तिचा अधिकृत, उत्तर हिंदुस्थानांतील इतिहासांशीं मेळ घालून तयार केलेला असा इतिहास अजून तयार होणे आहे.

आपल्याकडे नाथसंप्रदायाला श्रीनिवृत्तिनाथ-ज्ञानेश्वरमहाराज यांनीं भक्तिमार्गाची जोड देऊन त्याचा प्रसार केला.

या संतांच्या अभंगांत जे उल्लेख आहेत, त्यावरून गोरक्षपंथ यास विरुद्ध नव्हता असें दिसतें; पण कित्येकांच्या मतें उत्तर हिंदुस्थानांत जो गोरक्षपंथ ओळखला जातो तो योगमार्गी म्हणून ओळखला जातो. कबीर व तुळसीदासजी या पंथाचें भक्तीस अनुकूल मार्ग म्हणून वर्णन करतांना आढळून येत नाहींत. उलट कित्येक असें म्हणणारे आहेत कीं, गोरक्षनाथांच्या मार्गांत ईश्वरनिष्ठेला स्थान होतें व म्हणूनच कबीर, नानक, ज्ञाननाथ यांच्या मनावर त्यांच्या मताचा परिणाम मोठा झाला.

आपल्याकडील माहितीनें बोलावयाचें तर ज्ञानेश्वर महाराज हे भक्ति व योग यांत विसंगति मानीत नव्हते येवढेंच नव्हे, तर त्यांच्या ठिकाणीं त्यांचा उत्कृष्ट समन्वय झालेला होता.

## नाथपरंपरा



महाराष्ट्रांत नाथांची दुसरी एक धारा आहे.

आदिनाथ
|
हरनाथ
|
रघुनाथ
|
मुकुंदराज

---

## ८. भाष्यकारांतें वाट पुसतु

या विषयाचा थोडासा इतिहास देणें अवश्य आहे. त्याशिवाय या प्रश्नाचें खरें स्वरूप लक्षांत येणार नाहीं. एक काळ असा होता कीं, ज्ञानदेवांच्या कार्याचें. मूल्यमापन असें केलें जात असें कीं, त्यांनीं संस्कृतांत असलेलें अध्यात्म व तत्त्वज्ञान मराठींत आणलें, हें खरें; पण हें तत्त्वज्ञान म्हणजे अद्वैत वेदांताचें म्हणजे शंकराचार्यांचें.याहि पुढें जाऊन कित्येक वेळां याचा अर्थ असा केला जाई कीं ज्ञानेश्वर म्हणजे शंकराचार्यांचे 'शिरपे' व ज्ञानेश्वरी हा प्राकृत ग्रंथ बायाबापड्याकरितां; पंचदशी, भामती वगैरे ग्रंथ हे पंडितांकरितां. यास जबर धक्का कै. गु. जोगमहाराज यांनीं दिला. कै. जोगमहाराज यांनीं याविषयीं लिखाण केलें नाहीं. त्यांच्या मतें गीतातात्पर्यांच्या विषयीं शंकराचार्य व ज्ञानेश्वर महाराज यांचें एकच मत आहे. पण याचा अर्थ ज्ञानेश्वरी म्हणजे भाष्याचें मराठींत नुसतें रूपान्तर नव्हे.

कै. जोगमहाराज वैकुंठाला गेल्यानंतर ज्ञानेश्वर महाराजांचें तत्त्वज्ञान स्वतंत्र आहे, हें दाखविण्याचा प्रयत्न पं. पांडुरंग शर्मा यांनीं केला. त्यांच्या लिखाणानें त्या वेळीं वेदांताच्या वाचकवर्गांत बरीच खळबळ उडाली. आधींच पंडितांची लेखणी व ती प्रतिक्रियेकरितां सरसा-वलेली ! यामुळें त्यांच्या लिखाणास तिखट असें स्वरूप प्राप्त झालें. ज्ञानेश्वर महाराज हे शंकराचार्यांचे शिरपे नव्हते, दुसऱ्याहि आचार्यांचें ग्रंथ त्यांनीं अवलोकन केले होते व त्यांना स्वतंत्र प्रज्ञा होती हें दाखवण्याकरितां रामानुजाचार्यांच्या अनुपपत्तीशीं त्यांनीं ज्ञानदेवांच्या अनुभवामृताच्या सातव्या प्रकरणांतील कांहीं प्रमाणांचें साधर्म्य दाखवलें. पण ज्ञानेश्वर महाराज रामानुजा-चार्यांप्रमाणें विशिष्टाद्वैती होते असें त्यांनीं कोठें लिहिलेलें प्रस्तुत लेखकाच्या वाचण्यांत नाहीं. असें असूनसुद्धां 'पं. पांडुरंगशर्मा हे ज्ञानदेव रामानुजीय मताचे होते' असें लिहिणारे व बोलणारे लेखक व वक्ते आढळून येतात. पण आमच्या मतें ह्यास मुख्यत्वेंकरून पंडित पांडुरंगशर्मा यांची लेखणीच जबाबदार आहे.

ज्ञानेश्वरीच्या बाबतींतहि ज्ञानदेव आचार्यांचे अंध अनुयायी नव्हेत, हें दाखविण्याकरतां रामानुज मताप्रमाणें कांहीं श्लोकांचा अर्थ ज्ञानदेवांनीं कसा केला हें त्यांनीं दाखविलें व आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ जीं प्रमाणें आणलीं, त्यांत ज्ञानेशांच्याच उक्तीचा आधार मिळाला तर तो पहावा म्हणून ते ज्ञानेश्वरी धुंडूं लागले. त्यांच्या सुदैवानें त्यांना एक हवी तशी ओंवीहि मिळाली.

तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट पुसतु ।
अयोग्यहि मी न पवतु । कें जाईन ॥ अ. १८-१७२२.

त्यांना मिळालेल्या पोथींत 'भाष्यकारांतें' या शब्दांत 'रां' वर अनुस्वार सांपडला. पं. पांडुरंगशर्मा यांना वाटलें, काम झालें. त्यांनीं तो अनुस्वार आदरार्थी न घेतां बहुवचनार्थी घेतला व ओंवीचा अर्थ असा केला का, 'अनेक भाष्यकारांना वाट पुसली.'

याबाबतींत नागपूरचे सुप्रसिद्ध डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं आपल्या 'श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या मोठ्या परिश्रमपूर्वक लिहिलेल्या पुस्तकांतील तिसऱ्या 'भाष्यकारांतें वाट पुसतु' या प्रकरणांत ज्ञानेश्वरी,गीतेवरील शांकरभाष्य व रामानुज-भाष्य यांची अध्यायवार तुलना करून असें सिद्ध केलें आहे कीं, वरील ओंवींत 'भाष्यकार' म्हणजे शंकराचार्यच असले पाहिजेत. डॉ. पेंडसे यांनीं फार परिश्रमपूर्वक लिहिलेलें हें सर्वच प्रकरण वाचनीय आहे. आपल्या लिखाणाचा निष्कर्ष त्यांनीं पुढील प्रमाणें काढलेला आहे:—

"एकंदर २१८ स्थळांची तुलना केली. त्यांत असें दिसलें कीं, १४६ ठिकाणीं शंकर व ज्ञानेशांनीं तत्त्व-ज्ञानाच्या व अर्थांच्या दृष्टीनें सदृश अशी टीका केली आहे. त्यांपैकीं ४२ ठिकाणीं शंकरांचे शब्द ज्ञानेशांनीं योजिले आहेत, १० ठिकाणीं शंकर आणि ज्ञानेश यांचे दृष्टान्तहि सारखे आहेत व ५७ ठिकाणीं शंकरांचा अर्थ

घेऊन रामानुजांचा टाकला आहे. ६८ ठिकाणीं शंकरांचा किंवा रामानुजांचाहि अर्थ न घेतां ज्ञानेशांनीं स्वतंत्र अर्थ केले आहेत. १८ ठिकाणीं तर निर्गुण किंवा मायावादपर अर्थ शंकरांपेक्षांहि पुढें जाऊन किंवा त्यांच्याहिपेक्षां स्पष्टपणें केले आहेत. एका ठिकाणीं शंकर व रामानुज दोघांच्याही अर्थांचा समुच्चय केला आहे व फक्त ५ ठिकाणीं शंकरांना सोडून रामानुजांचा अर्थ स्वीकारला आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें शंकरांना विरोधी असें एकहि स्थळ नाहीं, शंकरांना सोडून रामानुजांना अनुसरल्याचीं स्थळें तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाचीं नाहींत. रामानुजांप्रमाणें जेथें अर्थ केला आहे अशा सहा स्थळांपैकीं पांच स्थळें अशीं आहेत कीं, तेथील अर्थ ज्ञानेशांना स्वतंत्रपणें सुचणें संभवनीय आहे. उदाहरणार्थ —( १ ) 'आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनम्' (२–२९) या श्लोकावरील "दृष्टी सुनि जयातें । ब्रह्मचर्यादि व्रतें । मुनीश्वर तपातें । आचरति ॥ १७१ ॥" येथील तपाचरणाची कल्पना "सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये" (२–१५) या कठोपनिषदांतील मंत्रावरून घेतली आहे, हें त्या ओंवीतील ब्रह्मचर्याच्या उल्लेखावरून सहज लक्षांत येईल. "श्रवणायापि बहुभिः यो न लभ्यः... आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य श्रोता (२–७)" या कठोपनिषदांतील मंत्रावरूनच "आश्चर्यवत् पश्यति" हा श्लोक घेतला असल्यामुळें तपाचरणांची कल्पना रामानुज व ज्ञानेश्वर या दोघांनींहि कठोपनिषदांतूनच घेतली असावी; पण शंकरांच्या भाष्यांत तपाचा उल्लेख नसल्यामुळें रामानुजभाष्यांतील कल्पनेची छाया ज्ञानेश्वरांच्या ओंवीवर पडल्याचें तुलनेंत दाखविलें आहे. वस्तुतः ही कल्पना स्वतंत्रपणें कठोपनिषदावरून ज्ञानेश्वरांना सुचली हें उघड दिसतें.

( २ ) "शब्दब्रह्म अतिवर्तते" (६–४४) याचा "अनिर्वाच्य" हा अर्थ किंवा ( ३ ) "अनन्याः चिन्तयन्तः" ( ९–२२ ) याचा ज्ञानेशांनीं केलेला अर्थ ( ४ ) 'शशिसूर्यनेत्रं" (११–१९) याचा इंद्रियांसहित मनाचें नियमन करणें हा अर्थ स्वतंत्रपणें सुचण्यासारखा आहे. पण यांपैकी ३–४ ठिकाणीं रामानुज आणि ज्ञानेशांत शब्दसाम्यहि आढळल्यामुळें हे अर्थ रामानुजांपासून ज्ञानेशांनीं घेतले असावे, असें तुलनेंत दाखविलें आहे. रामानुजांच्या अनुसरणाचें निरपवाद स्थळ एकच आहे व तें "यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके" ( २–४६ ) हा श्लोक होय. बाकीचीं सर्व स्थळें संशयित व अर्थाच्या दृष्टीनें अगदीं गौण होत; तथापि या सहा स्थळीं ज्ञानेश रामानुजांना अनुसरले असें म्हटलें तरी त्याच्या उलट तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा ५७ ठिकाणीं रामानुजांना सोडून शंकरांचा अर्थ ज्ञानेशांनीं स्वीकारला आहे, १४६ ठिकाणीं शंकरांप्रमाणें अर्थ केला आहे, ४२ ठिकाणीं शंकरांचे शब्द ज्ञानेशांनीं अर्थ करतांना योजिले आहेत, १० ठिकाणीं शंकरांचेच दृष्टान्त ज्ञानेशांनीं घेतले आहेत व २–३ ठिकाणीं तर शंकरांच्या भाष्याचे भाषान्तरच केलें आहे. या गोष्टी घेतल्या म्हणजे "भाष्यकारांतें ( वाट ) पुसत" यांतील "भाष्यकार" शब्दानें ज्ञानेशांना एकच भाष्यकार अभिप्रेत आहेत व ते म्हणजे शंकराचार्य होत असें या तुलनेवरून दिसेल व या वाक्याच्या अर्थाविषयीं शंका नाहींशी होऊन वाद थांबतील अशी आशा आहे."

डॉ. पेंडसे यांनीं काढलेला निष्कर्ष योग्यच आहे, असें आमचेंहि मत आहे. पण आमच्या मतें या चर्चेस बाजवीपेक्षां जास्त महत्त्व देण्यात आलें आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या तत्त्वज्ञानावर औपनिषदीय तत्त्वज्ञान, नाथपंथीय तत्त्वज्ञान व त्याच्या खालोखाल शांकरीय तत्त्वज्ञान यांचा परिणाम झाला आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याचप्रमाणें 'भाष्यकार' म्हणून ज्यांचा उल्लेख केला आहे, तेही शंकराचार्य असावेत, ही गोष्टसुद्धां आमच्या मतें निश्चितच आहे. याबाबत थोडी चर्चा आमच्या दृष्टीनें पुढें करणार आहोंत. पण तत्पूर्वी या प्रश्नास नसतेंच फार महत्त्व दिलें गेलें, असें आम्ही म्हटलें तें कां, हें प्रथम सांगतों.

आम्ही जें हें विधान केलें त्याची थोडीशी स्पष्टता करणें अवश्य आहे. नाहींतर डॉ. पेंडसे यांच्या सारख्यांनीं जे याबाबतींत परिश्रम केलें त्याचें मूल्य कमी केल्यासारखें होईल. जबरदस्त असें एक अयथार्थ प्रमेय पुढें आलें कीं तें खोडून काढण्याकरितां तितका जोराचा प्रयत्न लागतो हें खरेंच आहे. त्या दृष्टीनें डॉ. पेंडसे यांचा प्रयत्न स्तुत्यच आहे हें वर सांगितलेंच आहे.

आम्ही जें वरतीं या प्रश्नास नसतेंच महत्त्व दिलें गेलें असें म्हटलें याचा अर्थ असा आहे कीं 'तैसा व्यासाचा मागोवा घेतु' या संपूर्ण ओंवीचें मूल्यमापन जसें

व्हावयास पाहिजे तसें झालें नाहीं. त्या ओंवीलाच नसतें महत्त्व दिलें गेलें असें आम्हांस वाटतें.

(१) ज्ञानेश्वर महाराज हे अत्यंत विनयशील असे पुरुष होते; आपलें कर्तृत्व आपले गुरु निवृत्तिनाथ यांचें आहे असें ते ठिकठिकाणी लीनतेनें म्हणतात. ज्ञानदेवांच्या जवळ लीनता आहे, पण दीनता नाहीं. प्रसंगविशेषीं योग्य अभिमानपूर्वक सत्यहि सांगण्यास ते कचरत नाहींत. 'इये मऱ्हाटीचिये नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं' अशी गुरूंची प्रार्थना करणारे ज्ञानेश्वर महाराज 'माझा मराटाचि बोल कौतुकें। अमृतातेंहि पैजा जिंकें। ऐसी अक्षरें रसिकें। मेळवीन' असें म्हणतांना आढळतात. त्याचप्रमाणें 'कां बिटिभू चांचूवरी। माप सूये सागरीं। मी नेणत तयापरी। प्रवर्तें एथ' असें म्हणणारे ज्ञानदेव गीता व आपली टीका या विषयींच्यासंबंधात पुढीलप्रमाणें उद्गार काढतांना दिसतातः—

मूळ ग्रंथीचिया संस्कृता। वरि मऱ्हाटी नीट पाहतां। अभिप्राय मानलिया उचिता। कवण भूमि हे न चोजवे ॥ जैसें अंगाचेनि सुंदरपणें। लेणिया आंगचि होय लेणें। तेथ अलंकारिलें कवण कवणें। हे निर्वचेना॥

अ १०–४३, ४४

दागिना घालणारें शरीर सुंदर आहे व दागिनाहि उत्कृष्ट आहे. अशा स्थितींत कोणी कोणाला शोभा आणली हें सांगणें जसें कठीण आहे. तसें मूळ संस्कृतांतील गीता उत्तम व तीवरील साहित्यानें नटलेली माझी देशी टीका ही उत्तम. या दोन्ही इतक्या सारख्या आहेत कीं, या दोहोंची तुलना अर्थ समजून घेऊन जर कोणी करूं लागला तर त्याला क्षणभर असा भ्रम उत्पन्न होईल कीं, मूळ संस्कृत व त्यावर देशी टीका कां मूळ देशी व त्यावर संस्कृत टीका. मूळ कोणतें हें ठरविणें जड जाईल.

(२) अध्याय अठरामध्यें उपसंहारांतच 'तैसा व्यासाचा मागोवा घेतु। भाष्यकारांतें वाट पुसतु' या ओंवीच्या पुढेंच 'मी अयोग्य पण माझे गुरु निवृत्तिनाथ हे समर्थ आहेतना व ते माझे पाठीराखे आहेतना! मग मी गीता मराठींत सांगेन यांत काय आश्चर्य!

ज्या कृपेनें माझे श्वासोच्छ्वासहि काव्य ग्रंथ होतील अशी गुरुकृपा लाभली आहे, मग मी गीतेवर मराठी टीका करतों यांत नवल काय,' असे उद्गार काढतात.

'व्यासाचा मागोवा घेतु' हें सांगितल्यानंतर लगेच माझे गुरु सर्व करवून घेण्यास समर्थ आहेत हें सांगण्यानें मागच्या विधानाचें महत्त्व थोडें कमी होतें असें मानणें चुकीचें ठरणार नाहीं.

(३) आपली गीतेवरील टीका कशी आहे, हें तेच या पुढील ओंव्यांत सांगत आहेत. त्याचा वाचकांनींच विचार करावा.

···॥ श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेवो म्हणे॥ यांकारणें मियां। श्रीगीतार्थ मऱ्हाठिया। केला लोका घयां। दिठीचा विषो॥ परी मऱ्हाटे बोलरंगें। कवळितां पै गीतांगें। तैं गातयाचेनि पांगें। हेकाडता नोहे॥ म्हणौनि गीता गावीं म्हणे। तैं गाणिवे होती लेणें। ना मोकळें तरी उणें। गीता ही आणीत॥ सुंदर आंगीं लेणें न सूये। तैं तो मोकळा शृंगारु होये। ना लेइलें तरि आहे। तैसें कें उचित॥ कां मोतियांची जैसी जाती। सोनयाही मान देती। ना तरी मानविती। अंगेंचि सडीं॥ नाना गुंफिलीं कां मोकळीं। उणीं न होती परिमळीं। वसंतागमींचीं वाटोळीं। मोगरीं जैसीं॥ तैसा गाणिवेनें मिरवी। गीतेंवीण ही रंगु दावी। तो लाभाचा प्रबंधु ओंवी। केला मियां॥ ओ. १७३४–४१.

"श्रीगुरुकृपेनें काय होणार नाहीं? ती कृपा माझ्यावर असल्यानें मी लोकांना समजेल अशा स्पष्ट रीतीनें संस्कृतांतील गीतार्थ मराठींत आणला. संस्कृताची जोड नसेल व माझी नुसती टीका पाहून गीतार्थ समजून घेण्याचा कोणी प्रयत्न करील तर त्याला संस्कृत येत नाहीं या उणिवेमुळें गीतार्थ कळायचा राहील असें नाहीं. नुसती माझी टीका वाचूनहि त्याला गीतार्थ कळेल. म्हणून संस्कृतगीतेचा अर्थ सांगून माझी मराठी टीका जर सांगितली, तर संस्कृतगीतेवरून अर्थ सांगण्याला माझी मराठी टीका दागिना होईल; म्हणजे संस्कृतांतील अर्थ अधिक खुलवून दाखवील. अथवा माझी नुसती मराठी टीका जरी सांगितली तरी ती संस्कृत गीतेवरून अर्थ सांगण्यालाहि मागें टाकील. सुंदर अंगावर नाहीं घातला, तरी तो नुसता दागिना शोभतोच. बरें, सुंदर अंगावर घातला तर त्यापेक्षां अधिक चांगलें काय होणार आहे? जशीं मोतीं सोन्यालाहि शोभिवंत करतात; पण मोकळीं असलीं तरी आपल्या अंगच्या सौंदर्यानें शोभिवंतच दिसतात. अथवा वसंतऋतूच्या आरंभींचीं मोगरीचीं वाटोळीं फुलें, गुंफलेलीं असोत वा मोकळीं

असोत, वासाच्या दृष्टीनें त्यांत कांहीं कमीपणा नसतो. त्याचप्रमाणें संस्कृत गीतेसह माझी टीका सांगितली तरी गीतेला शोभा आणील अथवा संस्कृत गीता न सांगतां केवळ माझी मराठी टीकाच सांगितली तरी ती शोभा देणारच. असा दोन्ही प्रकारानें लाभ देणारा ओंवीबद्ध ग्रंथ मी केला."

हे दोन्ही उतारे संपूर्ण व सार्थ देण्याचा हेतु असा आहे कीं, गीतेच्या शिवाय माझी टीका वाचली तरीसुद्धां गीतेचा ती अर्थ दाखवील, इतकी ती हुबेहुब गीतेची प्रतिमा आहे. इतक्या आत्मविश्वासानें बोलणारा ग्रंथकार मी दुसऱ्यास वाट पुसतों असें म्हणत असला, त्याच्या पावलावर पाऊल टाकून मी चाललों तर चुकेन कसा, असें म्हणतांना दिसत असला तरी त्यांत विनयाचा पुष्कळसा भाग आहे हें चाणाक्ष वाचक विसरूं शकत नाहींत.

यासंबंधांत पुढील एक प्रसंग विचारांत घेण्यासारखा आहे.

(४) एके ठिकाणीं ज्ञानेश्वरमहाराजांनीं अर्जुनाचा व्यासांनीं मांडलेला प्रश्न कसा असावयास पाहिजे, हें आपल्या टीकेंत दाखविलें आहे. तो प्रसंग अ. १४ श्लोक २१ वरील टीकेंत आहे. श्लोक व त्यावरील टीका पुढें देत आहोंत, त्यावरून आमच्या म्हणण्याची सत्यता पटेल.

अर्जुन उवाच :—कैर्लिंगैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो । किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥ यावरील ओंव्या :—

तेणें तोषें वीर पुसे । जी कोण्ही चिन्हीं तो दिसे । जयामाजीं वसे । ऐसा बोधु ॥ तो निर्गुण काय आचरे । कैसेनि गुण निस्तरे । हें सांगिजो माहेरें । कृपेचेनि॥ यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा । परिहारू आकर्णा । बोल्तु असे ॥ म्हणे पार्था तुझी नवाई । हें येतुलेंचि पुससी काई । तें नामाचि तया पाहीं । साच लटिकें ॥ गुणातीत जया नांवें । तो गुणाधीन तरी नव्हे । ना होय तरी नागवे । गुणां यया ॥ परी अधीन कां नागवे । हेंचि कैसेनि जाणावें । गुणाचिये उजरवे– । माजीं असतां ॥ हा संदेह जरी वाहसी । तरी सुखें पुसों लाहसी । परिस आतां तयाची । रूप करूं ॥

अ. १४; ३२०–२६

या ओंव्यांचें तात्पर्य असें आहे कीं, गुणातीत आचरण करतो कसा? हा प्रश्नच चुकीचा आहे. कारण 'गुणातीत' असें म्हटल्यामुळेंच त्याचें आचरण काय हा प्रश्नच संभवत नाहीं; पण गुणातीत पुरुष गुणांत वावरतांना दिसतो, तेव्हां तो गुणाच्या आधीन आहे किंवा नाहीं, हें कसें ओळखावें अशी तुझी शंका असेल तर त्याचें उत्तर सांगतों.

तात्पर्य, व्यासांनीं प्रश्न कसा मांडावयास पाहिजे होता असें सुचवणारा लेखक जरी म्हणत असला कीं, मी अमक्याच्या पावलावर पाऊल टाकून चाललों तर चुकेन कसा? तर याचा अर्थ असा घेणें अवश्य कीं ज्यांचीं नांवें तो घेतो त्यांच्याविषयीं त्याला परम आदर आहे. ग्रंथकर्ता विनयशील आहे. व ज्यांचें सहाय्य त्यानें घेतलें त्यांचें ऋण तो व्यक्त करीत आहे. पण म्हणून तो सर्वस्वी त्यांच्यावर अवलंबून आहे असा नव्हे. ज्ञानेश्वर महाराज हे स्वतंत्रप्रज्ञ होते. या ठिकाणीं दिसून येणारी वृत्ति अनुभवामृतांत पुढील ओंवींत अधिक स्पष्ट रीतीनें व्यक्त झाली आहे.

परि शिवें कां श्रीवल्लभें । बोलिलें येणेंचि लोभें ।
मानूं तेंहि लाभे । न बोलतांही ॥

प्र. ३–१८.

या वरील गोष्टी विचारांत घेतल्या असतां वाचकांना पटेल, कीं या ओंवीला थोडें बाजवीपेक्षां जास्त महत्त्व दिलें गेलें आहे. आतां मूळ ओंवीकडे वळूं.

डॉ. पेंडसे यांनीं या विषयासंबंधानें इतकें विस्तृत लिहिलें आहे कीं, त्यासंबंधानें फारसें लिहिण्याचें कारण नाहीं, पण प्रत्येकाचा दृष्टिकोन कांहीं वेगळा असतोच. म्हणून या प्रश्नासंबंधीं आमच्या दृष्टीनें सांगण्यासारख्या कांहीं गोष्टी देतों.

(१) पं. पांडुरंगशर्मा यांच्या प्रमाणांपैकीं 'भाष्यकारांतें' या शब्दांतील अनुस्वार हें प्रमाण अगदीं कुचकामाचें आहे. कारण एक तर अनुस्वार जरी असला तरी तो आदरार्थी आहे असें समजणें शक्य आहे. तो 'अनेकार्थी' कां घ्यावा हें वेगळें सिद्ध करणें अवश्य आहे. दुसरें, ज्यांना जुनीं हस्तलिखितें वाचण्याचा प्रसंग आहे त्यांना जुन्या शुद्धलेखनाची चांगली कल्पना आहे. ऱ्हस्वदीर्घ, अनुस्वार, वगैरेबाबत त्यावर फार अवलंबून रहाणें धोक्याचें आहे. प्रस्तुत लेखकानें एका चांगल्या पोथींत ' स्वमुखें श्रीकृष्ण सांगतु असे ' याकरतां ' श्वमुखें श्रीकृष्ण

सांगतु असे ' असें लिहिलेलें पाहिलें आहे. शिवाय, खुद्द श्रीएकनाथयुद्धीं जी पोथी आज उपलब्ध आहे, तींत या ओंवींतील ' भाष्यकारांतें ' यामध्यें ' रा ' वर अनुस्वारच नाहीं ! तेव्हां 'भाष्यकारातें' का 'भाष्यकारांतें' यावर वेळ घालवणें फुकट आहे. मुख्य निकाल अंतर्गत पुराव्यावरून लागणारा आहे.

( २ ) त्या अंतर्गत पुराव्याचा जर विचार केला, तर गीतेवर टीका करतांना श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या जवळ ' संबोधिनी ' होती, असें नामदेव म्हणतात; त्याप्रमाणें त्यांनीं उल्लेखिलें नसलें तरी आज शंकराचार्यांचें गीताभाष्य म्हणून जें ओळखलें जातें तें होतें, हें निर्विवाद आहे. गीताभाष्य व ज्ञानेश्वरी यांत तपशिलांत जरी फरक असला ( व तो आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे ) तरी गीतेच्या तात्पर्याच्याबाबतींत दोघांची एकवाक्यता आहे.

गीतेचें तात्पर्य शंकराचार्य पुढीलप्रमाणें सांगतात. ( १ ) गीताभाष्याच्या प्रारंभीं ते म्हणतात,

' तस्य अस्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं सहेतुकस्य संसारस्य अत्यन्तोपरमलक्षणम् । तच्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् आत्मज्ञाननिष्ठारूपाद् धर्माद्भवति ॥ '

ज्ञानेश्वरमहाराज ' भक्त्यामामभिजानाति '

( अ. १८–५५) यावर लिहितांना म्हणतातः—

' एथ अविद्याविनाश हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारीं ।...... '

शंकराचार्यांच्या भाष्यांतील वरील उतारा व वरील ओंव्या यांतील साम्य इतकें उघड आहे कीं, तें नुसतें दाखवलें कीं पुरें. वेगळें व्याख्यान करण्याचें कारण नाहीं.

याप्रमाणेंच इतरहि कांहीं साम्यें सांगतों.

( २ ) कित्येक ठिकाणीं अध्यायसंगति सांगतांना आचार्यांचें भाष्य त्यांच्याजवळ होतें, हें दोहोंची तुलना केली असतां स्पष्ट होणार आहे. पुढील दोन प्रसंग पहा.

( अ ) प्रकृतिस्थत्वं गुणेषु च सङ्गः संसारकारणम् इतिउक्तं कस्मिन् गुणे, कथं सङ्गः, के वा गुणाः कथं वा ते बध्नन्ति इति गुणेभ्यश्च मोक्षणं कथं स्याद् मुक्तस्य च लक्षणं वक्तव्यम् इति एवम् अर्थेच—अ. १४

' आणि हाचि प्रकृतिगतु । सुखदुःख भोगीं हेतु । अथवा गुणातीतु । केवळ हा ॥ तरी कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगु । सुखदुःखादि भोगु । केवीं तया ॥ गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती । नातरी गुणातीती । चिन्हें काई ॥ एवं इया आघवेया । अर्थां रूप करावया । विषो एथ चौदाविया । अध्यायासी ॥

अ. १४; ३४–३७

( आ ) तत्र तावद् वृक्षरूपककल्पनया वैराग्यहेतोः संसारस्वरूपं वर्णयति विरक्तस्य हि संसाराद् भगवत्तत्त्वज्ञाने अधिकारो न अन्यस्य इति ॥ अ. १५

ज्ञानोबाराय आपल्या नमनांत पुढीप्रमाणें सांगतातः—

' तरी विरक्तीवांचूनि केंहीं । ज्ञानासि तगणें नाहीं । हें विचारूनि ठाईं । ठेवलें देवें ॥ आतां विरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी । हेंही सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ॥ जे विषें रांधिली रसव्हेये । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं ताटचि सांडूनि जाये । जियापरी ॥ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ॥ आतां अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकारमिषें । सांगिजत असे विश्वेशें । पंचदशीं ॥ अ. १५ ओं ३६–४०

आणखीही तपशीलांतील साम्यें पुष्कळ दाखवतां येतील. पण हें काम डॉ. पेंडसे यांनीं आधींच विस्तृत रीतीनें केलेलें असल्यामुळें तीं स्थळें आणखीं देऊन उगीच वाचकांचा वेळ घेत नाहीं.

आतां दोहोंमधील फरकाचीं स्थळें सांगतों, कीं ज्यामुळें ज्ञानेश्वर महाराज हे जरी शंकराचार्यांस जवळ घेऊन बोलतात, तरी ज्ञानेश्वरी ही गीताभाष्याची मराठी आवृत्ति नव्हे हें स्पष्ट होईल.

( १ ) आचार्यांचें भाष्य व ज्ञानेश्वरी यांमध्यें इतका फरक आहे कीं, श्रीमदाचार्यांच्या अंधअनुयायांशिवाय दुसरा कोणी ज्ञानेश्वरी म्हणजे भाष्याचें मराठी रूप आहे असें म्हणणार नाहीं. दोहोंच्या ग्रंथ करण्याच्या हेतूंत फरक, पद्धतींत फरक. एक ' अर्थनिर्धारणार्थे ' लिहितों म्हणतात तर एक मराठींत 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' करण्याकरतां लिहितों म्हणतात. म्हणून एक ' संक्षेपतः विवरणं करिष्यामि '

असें म्हणतात तर दुसरे ' तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेसि विश्वभरूं ' म्हणतात.

' तदिदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं दुर्विज्ञेयार्थम्। तदर्थाविष्करणाय अनेकैः विवृतपदपदार्थवाक्यार्थन्यायम् अपि अत्यन्तविरुद्धानेकार्थत्वेन लौकिकैः गृह्यमाणं उपलभ्य अहं विवेकतः अर्थनिर्धारणार्थं संक्षेपतो विवरणं करिष्यामि ॥ '

यामुळें थोडक्यांत अवश्यक तेवढेंच सांगणें त्यांना आवश्यक होतें. यामुळेंच पहिल्या अध्यायाचें सार सांगून ते पुढें गेले.

ज्ञानदेवांचें गीतेवर टीका करण्याचें प्रयोजनच वेगळें. ' फिटो विवेकांची वाणी । हो कानामना जिणी । देखे आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेंशी विश्वभरू । आनंदाचे आवारू । मांडू जगा ॥ ' आतां संक्षिप्त व्याख्यान चालणार कसें ?

ज्ञानेश्वरी, भावार्थदीपिका या नांवानेंहि पुष्कळ वेळेला संबोधली जाते. पण यामुळें पुष्कळांचा गैरसमज झालेला दिसतो. पुष्कळांना वाटतें कीं, शंकराचार्य हे ज्याप्रमाणे ' संक्षेपतः विवरणं करिष्यामि ' म्हणतात, त्याप्रमाणें ज्ञानेशहि गीतार्थ थोडक्यांत सांगतात. पण ज्ञानेशांच्या व्याख्यानाकडे पाहिलें तर हा अर्थ बरोबर नाहीं, हें सहज लक्षांत येईल. उदाहरणार्थ, पंधराव्या अध्यायांत वीस श्लोक आहेत व त्यावर ज्ञानेशांच्या ५९९ ओंव्या आहेत. अठराव्या अध्यायांत ७८ श्लोक आहेत तर ओंव्या १७०० वर आहेत. हें काय ' संक्षेपतः ' व्याख्यान ?

वस्तुस्थिति अशी आहे, कीं ज्ञानेश्वरीसंबंधानें भावार्थदीपिका याचा अर्थ ' सार सांगणारी टीका ' असा आहे. प्रारंभीचे कांहीं अध्याय लहान आहेत. पण असे अध्याय थोडे आहेत.

हेतूंतील या फरकामुळें दोन्ही ग्रंथांच्या प्रारंभांतच ठळक फरक दिसून येतो. आचार्यांनीं पहिल्या अध्यायावर व्याख्यान केलेंच नाहीं. उपोद्घात लिहून गीतेचें स्वरूप व आपण टीका कां लिहितों हें सांगून व त्याचा सारांश सांगून एकदम 'तमुवाच हृषीकेशः' या अ. २ श्लोक १० वर ते प्रतिश्लोक टीका लिहिण्यास प्रारंभ करतात. त्या श्लोकांवर लिहितांना ते म्हणतातः—

" अत्र च ' दृष्ट्वा तु पाण्डवानीकम् ' इत्यारभ्य , न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूवह ' इति एतदन्तः प्राणिनां शोकमोहादिसंसारबीजभूतदोषोद्भवकारणप्रदर्शनार्थत्वेन व्याख्येयो ग्रंथः " ' दृष्ट्वा... ' पासून ' न योत्स्ये ' एथपर्यंत प्राण्यामध्यें संसाराला कारण असणारे शोकमोहादिदोष कसे उत्पन्न होतात, तें दाखविण्याकरितां हा भाग आहे, या दृष्टीनें हें प्रकरण लावावयाचें आहे. गीतेच्या चर्चेस प्रारंभ कां येवढेंच दाखवावयाचें आहे तें थोडक्यांत सांगितलें.

ज्ञानेश्वरमहाराजांनीं पहिल्या अध्यायांतीलसुद्धां प्रत्येक श्लोकांवर टीका लिहिली आहे. कारण तो शास्त्रप्रवृत्ति प्रस्ताव आहे व त्यांना ' वाग्विलास ' विस्तारणें आहे.

( २ ) दुसरा ठळक फरक अध्यायसंगतीच्या बाबतींत. हे दोघे हे थोर टीकाकार गीता ही कांडत्रय निरुपिणी मानत असले तरी इतर कांहीं टीकाकारांप्रमाणें पहिलें षट्क कर्मकाण्ड, दुसरें उपासना व तिसरें ज्ञानकाण्ड असें हे दोघेहि समजत नाहींत. एवढें दोहोंत साम्य आहे. एऱ्हवी प्रत्येकास जशी जशी वाटली तशी तशी त्यानें संगति लावली आहे.

चवथ्या अध्यायाच्या प्रारंभीं शंकराचार्य म्हणतातः— ······गीतासुच सर्वासु अयमेव योगो विवक्षितो भगवता अतः परिसमाप्तं वेदार्थं मन्वानः तं वंशकथनेन स्तौति ।

ज्ञानेश्वर महाराज,' आद्य एकीमातु तो अनंत सांगेल ' व पांडुसुतु प्रश्न करील एवढेंच म्हणतात व संपूर्ण अठरा अध्यायांची संगति सांगताना ' कर्मकांड व देवताकांड ' यांची जोडणी झालेला हा अध्याय, अशी त्याची व्यवस्था लावतात.

अ. १८ श्लोक ६६ यावर ज्ञानेश्वरमहाराजांनीं जी अध्यायसंगति दिली आहे ती पाहिली कीं ज्ञानेश्वरमहाराजांच्या स्वतंत्र प्रज्ञेची कल्पना येईल.

तियेंचि कर्मादिकें तिन्हीं । कांडें कोणकोणे स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आईक ॥ १४३४ ॥ तरी पहिला जो अध्यावो । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्तावो । द्वितीयीं सांख्यसद्भावो । प्रकाशिला ॥ ३५ ॥ मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुलालें दुजीं सूत्र । उभारिलें ॥ ३६ ॥ मग अज्ञानें बांधलेयां । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ ३७ ॥ जे देहाभिमानबंधें । सांडूनि काम्यनिषिद्धें । विहित परी अप्रमादें । अनुष्ठावें ॥ ३८ ॥ ऐसेनि सद्भावें

कर्म करावें । हा तिजा अध्यावो जो देवें । निर्णय केला तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ ३९ ॥ आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचे आवश्यक । आचरतां मोचक । केवीं होय पां ॥ ४० ॥ ऐसी अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षु तें आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगीतली ॥ ४१ ॥ जे देहवाचा मानसें । विहित निपजे जें जैसें । तें एक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणीतलें ॥ ४२ ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजन कथनाचें खागें । आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनि ॥ ४३ ॥ तें विश्वरूप अकरावा । अध्यायो संपे जंव आघवा । तंव कर्में ईशु भजावा । हे जें बोलिलें ॥ ४४ ॥ तें अष्टाध्यायीं उघड । जाण येथें देवताकांड । शास्त्र सांगतसे आड । मोडूनि बोलें ॥ ४५ ॥ आणि तेणेंचि ईशप्रसादें । श्रीगुरु संप्रदाय लब्धें । साच ज्ञान उद्बोधें । कोंवळें जें ॥ ४६ ॥ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानित्वादिकीं । वाढविजे म्हणोनि लेखीं । बारावा गणूं ॥ ४७ ॥ तो बारावा अध्याय आदी । आणि पंधरावा अवधी । ज्ञानफळ-पाकसिद्धि । निरूपणासी ॥ ४८ ॥ म्हणौनि चहूंही इहीं । ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं । ज्ञानकांड ये ठायीं । निरूपिजे ॥ ४९ ॥ एवं कांडत्रयनिरूपणीं । श्रुतीचि हे कोडिस-वाणी । गीता पद्यरत्नांचीं लेणीं । लेयिली आहे ॥१४५०॥ हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । बोधावे जें अवश्यक । ठाकावें म्हणौनि ॥ ५१ ॥ तयाचेनि साधन ज्ञानेंशीं । वैर करी जो प्रतिदिवशीं । तो अज्ञान वर्ग षोडशीं । प्रतिपादिजे ॥ ५२ ॥ तोचि शास्त्राचा बोळावा । घेवोनि वैरी जिणावा । हा निरोपु तो सतरावा । अध्याय येथ ॥ ५३ ॥ ऐसा प्रथमा-लागोनी । सतरावा लाणी करूनी । आत्मनिश्वास विवरूनि । दाविला देवें ॥ ५४ ॥ तया अर्थजातां अशेषां । केला तात्पर्याचा आवांका । तो हा अठरावा देखा । कलशाध्यायो ॥ ५५ ॥

( २ ) जसें अध्यायसंगतीचें आहे तसेंच श्लोक संगतीचें आहे. याबाबतींत नमुन्याकरतां म्हणून दोन उत्कृष्ट उदाहरणें देतो.

( अ ) श्रीकृष्णांनीं अर्जुनाला गीता सांगितली व शेवटीं ' कच्चिदेतद्श्रुतं पार्थ ' वगैरे प्रश्न केला. यावरील दोघांची टीका तोलून बघण्याजोगी आहे. प्रश्न कां केला असा येथें प्रश्न आहे. त्याचें उत्तर आचार्य देतात:—

शिष्यस्य शास्त्रार्थग्रहणाग्रहणविवेकबुभुत्सया पृच्छति। तदग्रहणे ज्ञाते पुनः ग्राहयिष्यामि उपायान्तरेण इति प्रष्टुः अभिप्रायः। यत्नान्तरं आस्थाय शिष्यः कृतार्थः कर्तव्यः इति आचार्यधर्मः प्रदर्शितो भवति ॥

ज्ञानेश्वरमहाराज लिहितात—अ. १८–१५४० ते १५५७.

तरी सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांत आघवा । तुज एकचित्तें फावा । गेला आहे ॥ ५४० ॥ आम्हीं जैसें जया रीती । उगाणिलें कानांचां हातीं । येरीं तैसेंचि तुझ्या चित्तीं । पैठें केलें कीं ॥ ४१ ॥ अथवा माझारीं । गेलें सांडिविखुरी । किंवा उपेक्षेवरी । वाळूनि सांडिलें ॥ ४२ ॥ जैसें आम्ही सांगितलें । तैसेंचि हृदयीं पावलें । तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥ ४३ ॥ तरी स्वाज्ञानजनितें । मागिलें मोहें तूंतें । भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ॥ ४४ ॥ हें बहु पुसों काई । सांगें तूं आपलां ठाईं । कर्माकर्म कांहीं । देखताही ॥ ४५ ॥ पार्थु स्वानंदैकरसें । विरेल ऐसा भेददशे । आणिला येणें मिषें । प्रश्नाचेनि ॥ ४६ ॥ पूर्णब्रह्म जाला पार्थु । तरी पुढील साधावया कार्यार्थु । मर्यादा श्रीकृष्णनाथु । उल्लंघों नेदी ॥ ४७ ॥ एऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणे । परी केलें पुसणें । याचि लागीं ॥ ४८ ॥ एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणूनियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ॥ ४९ ॥ मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजु मंडितु । निवडे जैसा न निवडितु । पूर्णचंद्र ॥ १५५० ॥ तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे । हेंही सांडी तरी विरे । ब्रह्मपणही ॥ ५१ ॥ ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥ ५२ ॥

(आ) दुसरें उदाहरण अ. १८ श्लोक ७७ व ७८ या मधील संगतीचें. ७७ व्या श्लोकांत संजय म्हणतो ' हरीच्या त्या अतिशय अद्भुत रूपाचें पुनः पुनः स्मरण होऊन, हे राजा, मला अत्यंत आश्चर्य वाटत आहे व पुनः पुनः मी हर्ष पावत आहे.'

पुढें ७८ व्या श्लोकांत संजय म्हणतो,— ' जिकडे योगेश्वर कृष्ण आणि धनुर्धर पार्थ असतील तेथें श्री, विजय, ऐश्वर्य आणि नीति हीं अढळ आहेतच, अशी माझी समजूत आहे.' येथें गीता समाप्त झाली हें सर्वांस ठाऊक आहे.

'संजय जेथें भगवान् श्रीकृष्ण व धनुर्धर अर्जुन आहेत तेथें श्रीविजय वगैरे आहे,' हें कशाकरितां सांगतो असा प्रश्न. याबाबत आचार्य ७७ व्या प्रश्नानंतर म्हणतात 'किंबहुना' म्हणजे 'फार सांगून काय?' येवढें सांगतो कीं 'यत्र योगेश्वरः'—वगैरे.

ज्ञानेश्वरमहाराजांची श्लोकसंगति पहाण्यासारखी आहे.

अर्जुनानें 'नष्टोमोहः' असें सांगितल्यावर संजय त्या संवादाचें वर्णन करूं लागला; आपल्याला श्रीव्यासांच्या कृपेनें तें प्राप्त झालें, ते आमचे गुरू, असें सांगून आपलें भाग्य वर्णन करूं लागला. पण तें वर्णन करतां करतां जसजसा श्रीहरीच्या रूपाचा आठव त्याला होऊं लागला तसतसा तो देहभान विवर्जित होऊं लागला. त्याच्या शरीरावर अष्टसात्त्विक भाव उत्पन्न होऊन तो 'श्रीकृष्ण' 'श्रीकृष्ण' सद्गदें वेळोवेळीं म्हणूं लागला. शेवटीं धृतराष्ट्रास म्हणूं लागला, 'अहो, श्रीहरींच्या विश्वरूपाला पाहून तुम्हांला स्वस्थ कसें बसवतें?' आपण नोकर, धृतराष्ट्र मालक हें तो विसरला व 'श्रीकृष्ण, श्रीकृष्ण' म्हणूं लागला.

हें पाहून मात्र धृतराष्ट्राचा धीर सुटला. कारण जोंपर्यंत संजय श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादाचा अहवाल सादर करीत होता तोंपर्यंत त्याचा शेवट होण्याचा संभव होता. तो संवाद संपला. त्याचें थोडें वर्णनहि झालें व संजय थांबण्याच्याऐवजीं त्यालाच म्हणूं लागला 'अहो, स्वस्थ कसें बसवतें!' व असें म्हणून 'श्रीकृष्ण श्रीकृष्ण' म्हणूं लागला.

संजयाला ज्याअवस्था प्राप्त झाल्या त्याची धृतराष्ट्राला कांहींच कल्पना होईना. धृतराष्ट्र म्हणतो:—

तेथ कोणी येकी अवसरीं । होआवी ते करूनि दुरी । रावो म्हणे संजया परी । कैसी तुझी गा ॥ तेणें तूतें येथें व्यासें । बैसविलें कासया उद्देशें । अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ॥

तो म्हणूं लागला, 'अरे, तुला व्यासांनीं येथें कशाकरितां बसविलें तें विसरलास का? भलतेंच काय करून राहिलास?'

धृतराष्ट्राच्या या प्रश्न विचारण्याचें सकारण स्वरूप ज्ञानेश्वर महाराज पुढीलप्रमाणें वर्णन करतात.—

रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया । कां रात्री होय पाहल्या । निशाचरां ॥ जो जेयींचें गौरव नेणें । तयासि तें भिगुळवाणें । म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥

एवढेंच म्हणून धृतराष्ट्र स्वस्थ बसला नव्हे तर त्यानें आपलें युद्धाच्या निकालाविषयींचें मत देऊन संजयास त्याचें मत विचारलें.

मग म्हणे सांगे प्रस्तुत । उदयलेंसे जें उत्कलित । तें कोणासि बा रे जैत । देईल शेखीं ॥ एऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जें दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ॥ २८ ॥ आणि येरांचेनि पाडें । दळही यांचें देव्हडें । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें ॥ २९ ॥ आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें जोतीष कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ १६३० ॥

या धृतराष्ट्राच्या विचारण्यानें संजयाची चमत्कारिक परिस्थिति झाली. पांडवांचा जय होईल असें आपलें खरें मत सांगावें, तर तें मालकास रुचणार नाहीं; व खोटेंच मालकास रुचणारें सांगावें तर स्वतःस बरें वाटणार नाहीं. 'सत्यंब्रूयात् प्रियंब्रूयात्' पण 'प्रियंचनानृतंब्रूयात्' असा नियम असल्यानें तो खरें पण धृतराष्ट्र दुखवणार नाहीं अशा भाषेत आपलें मत सांगूं लागला. 'यत्र योगेश्वरः कृष्णो···' ही झाली श्लोकसंगति. पण यावरील टीका ही अप्रतिम आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या स्फूर्तीला येथें भरती आली आहे. संजय आपला निश्चय व्यक्त करण्याकरितां एकापेक्षां एक उत्कृष्ट असे दृष्टान्त देऊन शेवटीं सांगतो कीं, जेथें 'विजयी' नामें अर्जुन विख्यात व 'विजयस्वरूप' श्रीकृष्णनाथ, तेथें 'जय' हा ठेवलेलाच आहे.

(४) शंकराचार्य व ज्ञानेश्वरमहाराज या दोघांचें, मोक्षाला कारणीभूत जो संन्यास तो 'ज्ञानप्रधान' संन्यास या बाबतींत जरी एकमत असलें, तरी 'आश्रम' संन्यासाबाबतींत दोघांच्या मतांत थोडा फरक आहे. शंकराचार्य हे संन्यासाश्रमाला जितकें महत्त्व देतात, तितकें ज्ञानेश्वर महाराज देत नाहींत. उलट ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. 'जैसा खाळूनियां लेपु एकु । सर्वांचि लाविजे आणिकु । तैसेनि आग्रहाचा पाइकु । विचंबे वायां ॥' गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें । कीं तेंचि संन्यासवा ठेविजे । सरिसें पुढती ॥ म्हणूनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडितां । आहे योगसुख स्वभावता ॥ आपणपांचि ॥" अ. ६, ४९–५१.

शंकराचार्य व ज्ञानेश्वरमहाराज यांच्या टीकेंतील फरक आणखीहि दाखवितां येण्यासारखे आहेत. येथें आणखी एक दोन फरक दाखवून हें प्रकरण आटपूं.

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणांच परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥

अ. १८ श्लोक ४१.

या श्लोकावरील दोघांचीं भाष्यें देतों म्हणजे फरक चटकन् लक्षांत येईल.

श्रीमद्आचार्य लिहितातः—ब्राह्मणाः च क्षत्रियाः च विशः च ब्राह्मणक्षत्रियविशः तेषां ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च शूद्राणां असमासकरणं एकजातित्वे सति वेदे अनधिकारात्........ व्यवस्थापितानि !

ज्ञानेश्वरमहाराज लिहितातः—तेचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण । तरी जयां मुख्य ब्राह्मण । धुरेचे कां ॥ येर क्षत्रिय वैश्य दोन्हीं । तेहि ब्राह्मणाच्याचि मानिजे मानीं। जे ते वैदिकविधानीं । योग्य म्हणौनि ॥ चौथा शूद्र जो धनंजया। वेदीं लागु कीर नाहीं तया। तऱ्ही वृत्तिवर्णत्रया-अधीन तयाची ॥ तिये वृत्तीचिया जवळिका । वर्णां ब्राह्मणादिकां । शूद्रही कीं देखा । चौथा जाला ॥ जैसा फुलाचेनि सांगातें । तांतु तुरंबिजे श्रीमंतें । तैसे द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती ॥ ओ.८१८–८२२.

ज्ञानेश्वरी हें मराठींतील एक उत्कृष्ट काव्य आहे. ज्ञानदेवांनीं महाभारताच्या वर्णनाकरितां जी शब्दयोजना केली, तिचा उपयोग करून असें म्हणतां येईल कीं, मराठी-सारस्वतांत 'हा काव्यारावो' असा ग्रंथ आहे व तो तसा बुद्धिपूर्वक केलेला आहे. रोग्यानें घ्यावें म्हणून गोड अनुपानांतून वैद्य रोग्यास जसें औषध देतो, तसा हा ब्रह्मरस लोकांनीं आवडीनें वारंवार सेवन करावा म्हणून ज्ञानोबा माउलीनें गोड काव्याच्या अनुपानांतून हा रस मांडला. श्रीमद्आचार्यांचें भाष्य उत्कृष्ट खरें; पण त्याला कोणी 'काव्यारावो' म्हणणार नाहीं, हें उघड आहे.

आपणांस असे जे फरक दिसून येतात, याला प्रत्येक व्यक्तीची वृत्ति व कौटुंबिक परिस्थिति तर कारण खरीच; पण ज्या काळांत ती व्यक्ति जन्माला येते, त्या काळचें सामान्य वातावरणहि त्याला कारणीभूत असतें. शंकराचार्यांचें



अत्यंत खोल अभ्यासी व त्यांच्या विषयीं परम आदर असलेले गृहस्थ म्हणत कीं, आपल्या लिखाणाचा लोक 'कर्मच नको' असा अर्थ करतील, अशी जर आचार्यांना थोडीशी कल्पना आली असती, तर त्यांनीं कर्माविरुद्ध आपली लेखणी इतकी चालवली नसती.

श्रीमद्आचार्य व ज्ञानदेव हे दोन्हीहि अत्यंत पूज्य व थोर. यांतील फरक इतक्या प्रमाणांत दाखविण्याचा हेतु एवढाच कीं 'भाष्यकारांतें वाट पुसतु' याचा अर्थ ज्ञानदेवांचें व्यक्तिमत्व लक्षांत घेऊन केला जावा.

---

## ९. ज्ञानेश्वरींतील पंथराज अथवा कुंडलिनीयोग

जिये मार्गींचा कापडी । महेशु आझुनि ॥ ६–१५२ ॥

ज्ञानेश्वरी हा ग्रंथ ज्ञानराजांनीं आपली विद्वत्ता दाखविण्याकरितां लिहिला नसून विवेकाची वाणी फिटावी, ब्रह्मविद्या उघडी करावी म्हणून लिहिला. लेखक अथवा वक्ता असा कळवळ्यानें प्रेरित झालेला असला म्हणजे आपणांस जें सांगावयाचें आहे, तें सांगण्याची मिळेल ती संधि घेत असतो. वर म्हटल्याप्रमाणें ज्ञानराज हे कलीच्या त्रासानें त्रस्त झालेल्यांना आनंद मिळावा म्हणून ग्रंथाच्या कार्यास प्रवृत्त झाल्यानें या त्यांच्या टीकेंत आत्मसाक्षात्कारविषयक वेगवेगळ्या साधनांची चर्चा आली आहे व ती करणारे ज्ञानराजांच्यासारखे अनुभवियांचे राजे असल्यामुळें हा ग्रंथ सर्वोत्कृष्ट असा उतरला आहे. ज्ञानेश्वरी हें 'ईश्वरदर्शनच' आहे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

इतकें सांगण्याचा हेतु असा कीं, ज्ञानेश्वरींत एके प्रसंगीं ज्ञानेश्वर महाराजांनीं आपल्या नाथसंप्रदायांतलें एक रहस्य सांगण्याची संधि साधून घेतली व आपल्या पंथांतलें एक गुह्य प्रगट केलें. आपण मूळ गीतेंत नाहीं तें सांगत आहोंत याची त्यांना पूर्ण जाणीव होती. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात :—

'पिंडानें पिंडाचा ग्रास करावयाचा हें आमच्या नाथसंप्रदायाचें रहस्य आहे; परंतु महाविष्णूनें 'प्रशान्तात्मा' दि दोनतीन श्लोकांत ह्या नाथरहस्याचा ओझरता उल्लेख केला आणि आपण श्रोतेमंडळी या विषयांतील तज्ञ व आवड असणारे असल्यामुळें श्रीकृष्णांनीं ज्याचा नुसता दंश दाखविला तें मी उघड

स्पष्ट करून आपल्यासमोर मांडीत आहे. येऱ्हवी गीतेचा मुख्य विषय हा नव्हे हें मी जाणतों.'

> पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतीचा दंशु ।
> परि दाऊनि उद्देशु । महाविष्णु ॥ ६–२९१ ॥
> तया ध्वनिताचें केणें सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी ।
> उपलविली म्यां जाणुनी । ग्राहीक श्रोते ॥ २९२ ॥

या विषयासंबंधीं सुशिक्षित व अशिक्षित यांच्यामध्यें सारखाच गैरसमज आहे. ज्ञानराजांनीं इतकें स्वच्छ लिहिलें असूनसुद्धां मोठमोठे लेखक ज्ञानराजांनीं या पंथास ' पंथराज ' म्हटलें येवढ्यावरूनच ज्ञानराजांच्या मतें गीतेंतला प्रतिपाद्य विषय तोच आहे असें म्हणण्याचा अट्टाग्रीपणा करतात. या विषयासंबंधीं ज्ञानेश्वरीशीं ज्यांचा परंपरेनें संबंध नाहीं पण आपल्या भाषेंतला उत्कृष्ट ग्रंथ म्हणून त्याकडे बघणारे सुशिक्षित यांच्यामध्यें अज्ञान असेल यांत काय नवल आहे? ' माऊली ' म्हणून ज्ञानराजांचें भजन करणारा, खुद्द ज्ञानेश्वरीस माऊली म्हणून संबोधणारा, परंपरेनें आपला संबंध ज्ञानराजांशीं जोडणारा असा वारकरी पंथ पण त्या वारकऱ्यांतसुद्धां कित्येकांच्या ठिकाणीं या महायोगासंबंधीं अज्ञान दिसून येतें. ज्ञानराजांनीं आपल्या हरिपाठांत नाममहात्म्य गातांना ' योगयागविधि येणें नव्हे सिद्धि, वायांचि उपाधि दंभधर्म ' असे उद्गार काढले आहेत. त्याचप्रमाणें इतर अभंगांतूनहि उद्गार काढले आहेत. उदाहरणार्थः—

> ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ ध्रु ॥
> वोढियाणा बंधु देहुडा घालुनि लागसील पावो ।
> वोत प्रोत मना सांडुनि धरिसी अहंभावो ।
> ॐ कार बिंदुचा तूं न पवसि ठावो ।
> वोळगे वोळगे कृष्ण द्वारावतिये रावो ॥ १ ॥
> ' नागिणी उत्थाईं नवहि द्वारें निरोधुन ।
> नाडित्रयामाजि सुषुम्नासंचरण ।
> न साधे हा मार्ग ऐसें बोलती मुनिजन ।
> नरहरि चिंतनें अहर्निशि मुक्तिस्थान ॥ २ ॥
> मोडिली करचरण तेणें पावसी अंतसमो ।
> आशा तृष्णा न तुटे अहाविद्या केवि गमो ॥ ३ ॥
> ' अष्टांग योगें न शिणिजे ।
> यमनियम निरोध न कीजे रया ॥ '

ज्ञानेश्वरी अ. १२ मधील ' क्लेशोऽधिकतरस्तेषाम् ' या श्लोकावर लिहितांना त्यांनीं योगमार्गाचें आचरण म्हणजे बोचऱ्यानें लोखंडाचे चणे खाण्याइतकें कठीण आहे असें म्हटलें आहे. अशा त्यांच्या कांहीं योगविषयक उद्गारांवरून कांहीं वारकरी ह्यांत योगाची निंदाच आहे, असें समजून योगमार्ग हा सर्वथा तिरस्करणीय आहे, अशी आपली विपरीत कल्पना करून घेऊन बसले आहेत. पण हा एक अज्ञानाचा प्रकार आहे येवढेंच. वरील उताऱ्यांत सुद्धां ज्ञानराज योगानें कैवल्य प्राप्त होणार नाहीं असें म्हणत नाहींत. त्यांच्या म्हणण्याचा मतितार्थ ' क्लेशोऽधिकतरस्तेषाम् ' येवढाच आहे.

उलट गीतेंत ज्या ज्या वेळेला त्यांना साधन म्हणून सांगण्याचा प्रसंग आला त्या त्या वेळेला योगाचाच उल्लेख त्यांनीं केला आहे. मग गीतेमध्यें ' योग ' साधन म्हणून सांगितलें आहे तेथें त्यांनीं योगाचें योग म्हणून वर्णन केलें असल्यास नवल नाहीं. प्रथम गीतेंतील कांहीं स्थळें घेऊं.

( १ ) ' ज्ञानयोगव्यवस्थितिः ' अ १६ श्लो. १ यावर टीका करतांना ज्ञान हाच योग व त्या ठिकाणीं मनाची निष्ठा अथवा स्थिरता असा शंकरानंदादिकांनीं केल्याप्रमाणें अर्थ त्यांना करतां आला असता. शंकरानंद आपल्या टीकेंत या पदाचें व्याख्यान खालीलप्रमाणें करतात. ' ज्ञानयोगव्यवस्थितिः ज्ञानयोगः श्रवणमनना-दिस्तत्रैव मनसो विशिष्यावस्थितिर्व्यवस्थितिः सदातदेक प्रावण्यम् ॥ ' ज्ञानदेव याचें व्याख्यान पुढीलप्रमाणें करतात—' आतां आत्मलाभाविखीं । ज्ञानयोगामाजीं एकीं । जें आपुलिया ठाकीं । हांवें भरे ' ॥ अ. १६ ओ. ८१ ॥

( २ ) ' बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ' अ. ४ श्लो. १० यावर टीका करतांनासुद्धां ' ज्ञानमयं तपः ' असें व्याख्यान अगदीं ओघानें करतां येण्याजोगें असतांना सुद्धां ' तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेचि ते जाहले । एथ संशयो कायसा ॥' असें व्याख्यान त्यांनीं केलें आहे. ज्ञानदेवांचें असें स्पष्ट मत होतें कीं, ज्ञानानें मोक्ष मिळतो हें खरें; पण तें ज्ञान म्हणजे नुसतें शाब्दिक ज्ञान अथवा बुद्धीची कल्पना नव्हे. तो अनुभव आहे व त्याकरितां बुद्धीच्या प्रयत्नाला योगाच्या मदतीची अपेक्षा आहे. " योगेन रहितं ज्ञानं न मोक्षाय भवेद्विधे । ज्ञानेनैव विना योगो न सिद्ध्यति कदाचन ॥ तस्माज्ज्ञानंच योगं च मुमुक्षुर्दृढमभ्यसेत् ।

जन्मान्तरैश्च बहुभिर्योगो ज्ञानेन लभ्यते ॥ " असें श्रीशंकरानीं म्हटल्याप्रमाणें त्यांचें मत असल्यामुळें 'अंतरींचे धांवें स्वभावें बाहेरी ' या न्यायानें ठिकठिकाणीं योगासंबंधीं गौरवपर उद्गार साहजिक निघाले आहेत.

आतां त्यांनीं साधन सांगितलेलीं स्थानें पहा.

( अ ) अ. १५ श्लो. १५ ' सर्वस्यचाहम् ' यावर ज्ञानोबा लिहितात, ' परि संतासवें वसतां । योगज्ञानीं पैसतां । गुरुचरण उपासितां । वैराग्येसीं ॥ येणेंचि सत्कर्में । ......

( आ ) अ. ७ श्लो. १४ ' मायामेतां तरन्ति ते ' या ठिकाणीं मायानदीचें तरणें कसें दुस्तर आहे हें दाखवीत असतांना कर्म, वैराग्य, विचारादिकांचा तेथें लागच नाहीं असें दाखविल्यावर योगासंबंधानें मात्र ' वरी कांहीं तरी ये योगें । तरी विपाये तो ॥ ' असें म्हणतात.

( इ ) अ. १८ श्लो. ५२ ' ध्यानयोगपरोनित्यं वैराग्यंसमुपाश्रितः ' यावर ' म्हणौनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला दक्षु । परी पुढां सूनि पक्षु । योगाभ्यासाचा ॥ १०३५ ॥ ' असें लिहिलें आहे.

आतां याच्याहि पुढें जाऊन थोडें सांगणें अवश्य आहे कीं, ज्याठिकाणीं साधनयोग थोडा विस्तारानें सांगण्याचा प्रसंग आला, त्या ठिकाणीं ज्ञानदेवांनीं सहाव्या अध्यायांत ज्याला ' पंथराज ' म्हटलें त्या महायोगाचा अथवा कुंडलिनी योगाचाच उल्लेख केला आहे.

( क ) अ. ६ ओ. १५३ व पुढील व्याख्यान तर प्रसिद्धच आहे. १५३ ओवींचा उल्लेख या प्रकरणाच्या प्रारंभींच आला आहे.

( ख ) अ. ९ श्लोक. २४ ' यतंतश्च दृढव्रताः ' यावर लिहितात, ' तेथ उल्हाटशक्तिचेनि उजिवडें । मनपवनाचेनि सुरवाडें । सतरावियेचें पाणियाडें । वळियाविलें ' ॥ २१४ ॥

( ग ) अ. १२ नमनांत श्रीगुरुरूपी स्नेहाळ माऊली आपल्या शिष्याचे कोडकौतुक कशी पुरवते हें सांगतांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात ' आधार शक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाश पल्लकीं । परियें देसी निजें ॥ ५ ॥

( घ ) अ १२ मध्यें अव्यक्तोपासकांची साधना सांगतांना जें साधन सांगितलें तेथें ते म्हणतात, ' मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा । तया चोजवले प्रभा । निमथावरी ॥ ५१ ॥

( ड ) अ. १८ श्लोक ५२ मध्यें ' ध्यानयोगपरः ' यावर लिहितात, ' कुंडलिनी जागवूनि । मध्यमा विकाशूनि । आधारादि भेदूनि । अग्नीवरी ॥१०३८॥

इतक्या विस्तृतपणें ही गोष्ट सांगण्याचा हेतु असा कीं, ज्ञानेश्वर महाराज या योगास किती महत्त्व देतात हें सर्वांना कळावें. योगाकडे आपण दुर्लक्ष केलें तर आपण ज्ञानेश्वरांच्या दृष्टीनें अज्ञानी ठरूं. ज्ञानेश्वर महाराज तेराव्या अध्यायांत अज्ञानाचीं लक्षणें सांगताना म्हणतात कीं तो अज्ञानी कीं जो 'उपनिषदांकडे न वचे ।' व ज्यास 'योगशास्त्र न रूचे '.

ज्ञानेश्वर महाराज ' कुंडलिनी जागवूनि ' जो मार्ग आक्रमण केला जातो त्याला ' पंथराज ' असें म्हणतात. तेव्हां आपण आतां या पंथराजाचें थोडें स्वरूप पाहूं.

( १ ) महायोगाचें स्वरूप—संस्कृत ग्रंथांतून या मार्गाचें नांव ' महायोग ' असें आहे व त्याचें लक्षण पुढीलप्रमाणें दिलें आहे. ' मन्त्रो लयो हठो राजयोगोऽन्तर्भूमिका क्रमात् । एक एव चतुर्धा ऽयं महायोगोऽभिधियते ॥ योगशिखोपनिषत् ॥ '

सामान्य माणसें मंत्रयोग, हठयोग, लययोग व राजयोग हे वेगवेगळे आहेत असें समजतात. वास्तवीक स्थिति तशी नाहीं. या चारींनीहि कुंडलिनीच जागी होते व साधकाचें कार्य होतें. म्हणूनच कुंडलिनी जागृतीला ' महायोग ' अथवा ' सिद्ध उपाय ' अशी संज्ञा आहे. पूर्वसुकृतानें ईश्वरप्रसाद होऊन, सद्गुरुकृपा प्राप्त होऊन जर कुंडलिनी जागृत झाली तर या सुखाचा अनुभव येईल.

' योगस्तुद्विविधो ज्ञेयो ह्यभावः परमोमतः ।
अपरस्तु महायोगः सर्वयोगोत्तमो मतः ॥
शून्यं सर्वं निराभासं स्वरूपं यत्र चिन्त्यते ।
अभावयोगः स प्रोक्तो येनात्मानं प्रपश्यति ॥
यत्र पश्यतिचात्मानं नित्यानंदं निरंजनम् ।
मयैक्यं स महायोगो भाषितः परमः स्वयम् ॥ '

अशी श्रीमहेश्वरकथित महायोगाची व्याख्याहि लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

( २ ) कुंडलिनी जागृतीचे उपाय—ती जागृत होण्याचे उपाय श्री स्वामी विष्णुतीर्थ यांच्या 'शक्तिपात' अर्थात् 'कुंडलिनी महायोग' या पुस्तकांत पान ६७ वर खालीलप्रमाणें दिले आहेत.

( अ ) 'योगाभ्यासात् तीव्रवैराग्याद्वा'। योगाभ्यासानें अथवा तीव्र वैराग्यानें, ( आ ) 'ज्ञानभक्तिभ्यां वा।' ज्ञानानें अथवा भक्तीनें. ( इ ) 'प्राणायामाद् वा।' अथवा प्राणायामानें. ( ई ) 'शक्तिपाताद् विशेषेण।' शक्तिपातानें विशेषरूपानें.

( ३ ) शक्तिपात—शक्तिपात करणें याचा अर्थ अतींद्रिय विषयग्रहण करण्याचें सामर्थ्य देणें असा आहे. शक्तिपाताचें वैशिष्ट्य असें आहे कीं, त्यांत शिष्याला आयास नाहींत. गुरुकृपेच्या बळानें कुंडलिनी त्वरित जागृत होते. ऐऱ्हवीं साधकाला दीर्घकाळपर्यंत त्याकरितां प्राणायामादिकांचा अभ्यास करावा लागतो. शिवाय ही जागृत केव्हां होईल तें सांगतां येत नाहीं व प्रयत्न करतांनाच देह पडायचा संभव.

येथें सुद्धां एक गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्य आहे, ती ही कीं, कुंडलिनीची जागृति ही गुरु व शिष्य या दोघांच्या स्थितीवर अवलंबून आहे. शिष्याची तयारी नसेल तर गुरुनें सामान्य प्रयत्न करूनहि ती शक्ति जागृत होईलच असें नाहीं. उलट शिष्याची तयारी असेल तर गुरुच्या नुसत्या सान्निध्यांतसुद्धा ती जागृत होईल. श्रीरामकृष्ण, स्वामी विवेकानंद, ब्रह्मानंदादि शिष्य तयार करूं शकले, पण त्यांना आपला भाचा जो हृदय त्याला तयार करतां आलें नाहीं.

शक्तिपातानें सुप्त क्रियारहित कुंडलिनी क्रियावती होते. या मार्गाचा विशेष असा कीं, एकदां कुंडलिनी जागी झाली म्हणजे साधकास कांहीं करावें लागत नाहीं. पुढचा अभ्यास सहज होतो. अभ्यासच अभ्यासाला वरतो, याविषयीं ज्ञानेश्वरींत खालील उल्लेख आढळतात—

( १ ) मग तेथ आपण। एकाग्र अंतःकरण। करूनि सद्गुरू स्मरण। अनुभविजे॥ जेथ स्मरतेनि आदरें। सबाह्य सात्त्विकें भरें। जंव काठिण्य विरे। अहंभावाचें॥ विषयांचा विसरु पडे। इंद्रियांची कसमस मोडे। मनाची घडी घडे। हृदयामाजीं॥ ऐसें ऐक्य हैं सहजें। फावे तंव राहिजे। मग तेणेंचि बोधें बैसिजे। आसनावरी॥ आतां आगातें आंगवरी। पवनातें पवनु धरी। ऐसी अनुभवाची उजरी। होंचि लागे॥ प्रवृत्ति माघौति मोहरे। समाधि ऐलाडी उतरे। आघवें अभ्यासु सरे। बैसत सैंवो॥...... तेथ अपानु आंतुलेकडे। वोहोटौ लागे॥......नेत्र द्वारींचीं कवाडें। लागूं पाहाती॥......वरचिलें पातीं न ढळती। तळींचीं तळीं पुंजाळती॥......मग कंठनाळ आटे।' अ. ६, १८६–२०७.

'होचि लागे।' याचा अर्थ असा आहे कीं, साधकास प्रयत्न करावा लागत नाहीं. त्या गोष्टी आपोआप होतात.

### शक्तिपाताचे उल्लेख

( १ ) 'तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थावें। माथां हातु ठेवणें नव्हे। थापटिला जैसा' ॥ माथां हात ठेवणें— शक्तिपाताचा प्रकार.

( २ ) 'सर्व धर्मान् परित्यज्य'। अ. १८ श्लो. ६६ या श्लोकांत गीताशास्त्र संपलें असें ज्ञानेश्वर महाराजांनीं मानलें आहे. यापुढें गीतेचा संप्रदाय सांगितला आहे. तेव्हां शब्दानें सांगावयाचें तें सांगणें झाल्यावर भगवंतांनीं शब्दानें देतां येत नाहीं अशी गोष्ट देण्याकरितां आपल्या भक्तास आलिंगन दिलें, असें ज्ञानेश्वर महाराजांनीं म्हटलें आहे. 'मग सांवळा सकंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु। आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु तो॥ न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें। बोलणें मागौतें। वोसरलें॥ ऐसें जें कांहीं एक। बोला बुद्धीसीही अटक। तें द्यावया मिष। खेंवाचें केलें॥ हृदया हृदय येक जालें। ये हृदयींचें ते हृदयीं घातलें। द्वैत न मोडितां केलें। आपणा ऐसें अर्जुना॥ दीपें दीपु लावला। तैसा परिष्वंगु तो जाला। द्वैत न मोडितां केला। आपणपे पार्थु॥ तेव्हां सुखाचा मग तया। पूर आला जो धनंजया। तेथ बाहु तन्हीं बुडोनिया। ठेला देवो॥ १४१८–२३ ॥

हा कांहीं नुसता कविकल्पनेचा खेळ नव्हे. हा शक्तिपाताचा एक प्रकार आहे. ज्ञानेश्वर महाराजांना, अर्जुनाला शेवटीं पूर्णतेस पोहोंचविण्याकरतां भगवंतांनीं आलिंगन देऊन शक्तिपात केला, असें सांगावयाचें आहे.

( ३ ) हरिपाठांतसुद्धां ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ' ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधले संपूर्ण माझे हाती ॥ ' अभंग १२.

( ४ ) ' अधर्मधर्मयोः साम्ये जाते शक्तिः पतत्यसौ । ज्ञानात्मिका पराशक्तिःशंभोर्यास्मिन्निपातिता॥' ( विद्यारण्यकृत सूतसंहितेवरील तात्पर्यदीपिका टीका.) याच अर्थाचा सूतसंहितेत खालील श्लोक आहे. ' तस्य शिष्यस्य विप्रेन्द्राः कर्मसाम्ये सति द्विजाः । शांभवी शक्तिरत्यर्थं तस्मिन् पतति चिद्घने ॥ ( सूतसंहिता अ. ३४ श्लो. २० ) ' गुरूच्या अनुग्रहानें अथवा आपल्या प्रबळ पुण्यप्रतापानें धर्माधर्मरूपसंस्कार साम्यतेला प्राप्त होतात तेव्हां, श्रीशंभुद्वारा प्राप्त झालेली ज्ञानात्मिक पराशक्ति हिचा गुरुद्वारां शक्तिपात होतो. ज्ञानेश्वरींत त्याचाच पुढीलप्रमाणें अनुवाद आढळतो. ' ऐसी कर्मसाम्यदशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ॥ अ. १८–९६६ ॥

शक्तिपातानें जी शक्ति जाग्रत होते तिला 'देवात्मिका' म्हणतात. ती कुंडलिनी या नांवानें अधिक प्रसिद्ध आहे. आपण आतां तिचा थोडा इतिहास व स्वरूप पाहूं.

## कुंडलिनी

इतिहास— कुंडलिनीचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला, तर असें आढळून येतें, कीं पतंजलीच्या प्रसिद्ध योगसूत्रांत कुंडलिनीचा उल्लेख नाहीं. आश्चर्य हें कीं, गोरक्षशतक म्हणून गोरक्षनाथांचा जो संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्यांतहि कुंडलिनीचा उल्लेख नाहीं.

योगदर्शनाच्या इतिहासाकडे जर आपण ऐतिहासिक दृष्टया पाहूं लागलों तर आपणांस या दर्शनाच्या तीन अवस्था दिसतात. ( १ ) उपनिषदांचा काळ ( २ ) पातंजलसूत्रांचा काळ ( ३ ) तदनंतरचा तंत्रादिकांचा काळ. यांपैकीं कुंडलिनीचा उल्लेख योगोपनिषदें म्हणून जीं म्हणतात त्यांत आहे; पण प्रसिद्ध जीं ईशावास्यादि दशोपनिषदें आहेत त्यांत नाहीं. श्वेताश्वेतरमध्यें 'देवात्मशक्ति' म्हणून उल्लेख आहे.

योगसूत्रांत ' कैवल्य ' असें मोक्षास अभिधान प्राप्त झालें. योगसूत्रावरील टीकाकार विज्ञानभिक्षुसारखे योग याचा अर्थ वियोग करून नाना पुरुषांचें अस्तित्वप्रतिपादक योगदर्शन आहे असें म्हणतात. औपनिषदीययोग हा निर्विवाद अद्वैतीच आहे. पण योगसूत्रांतून आढळून येणारा योग हा मात्र सांख्यशास्त्राप्रमाणें नाना पुरुष मानणारा व ' कैवल्य ' ध्येय मानणारा असा आढळून येतो. पुढच्या काळांत जी त्याची वाढ झाली त्यांत पुनश्च योग हा अद्वैताकडे वळलेला दिसतो.

**वैदिक मार्गः**— कुंडलिनीयोग हा तंत्रमार्गाचा विशेष भाग आहे. तंत्रमार्ग म्हणजे शक्तीच्या उपासनेचा मार्ग आहे. त्याच्यामध्यें वाममार्गादि भेद आहेत; पण पंच मकाराचा मार्ग सोडून शक्तीउपासनेचा एक शुद्ध मार्गहि आहे. अनेक साधक या मार्गात या ना त्या रीतीनें आलेले आढळून येतात. पण तो अवैदिक आहे असें मात्र नव्हे. सूतसंहिता अ. ३५ श्लो. १७ मध्यें सूतानीं या विद्येस वैदिकी असें स्वच्छ म्हटलें आहे. ' तस्मात् संवत्सरं शिष्यं परीक्ष्य कृत्रिमं पुनः । प्रदद्याद् वैदिकीं विद्यां गुरुर्विद्याभिवृद्धये ॥

डॉ. वसंत जी. रेळे यांनीं The Mysterious Kundalini या पुस्तकांत कुंडलिनी म्हणजे The Right Vagus Nerve असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे; परंतु त्याच पुस्तकाला प्रस्तावना लिहिणारे त्या विषयावरील अधिकारी लेखक सर जॉन् वुड्राफ् म्हणतात कीं, कुंडलिनी Vagus Nerve असणें शक्य नाहीं. ते म्हणतातः—

" His view is an original one, namely that Kundalini is the right Vagus Nerve. As to this I would say that Kundalini herself cannot be that and for this reason. She is the Grand Potential. As such she cannot, in my view, be identified with any of the products she becomes........She is then not as such, in my view, a nerve or any other physical substance or a mental faculty but the Ground Substance of both which, on being roused, ascends and is merged in the higher Tattvas ending in Shiva–Shakti Tattvas when she is said to be merged in Paramashiva.

Page X Foreword.

जे कुंडलिनी मार्गाचे पुरस्कर्ते लोक आहेत त्याचें म्हणणे असें आहे कीं जें ब्रह्मांडांत ( macrocosm ) आहे तें पिंडांत ( Microcosm ) आहे. अशा तऱ्हेची पण थोड्या उलट्या भाषेत संबंध सांगणारी मराठीमध्यें 'पिंडीं तें ब्रह्मांडीं' अशी एक म्हणसुद्धां रूढ आहे. ब्रह्मांडांतील सर्व चवदा भुवनें शरीराच्या वेगवेगळ्या भागांच्या ठिकाणीं आहेत असें ते सांगतात. संध्यादि कर्मांच्या पूर्वी न्यास वगैरे करतात त्याचा सूक्ष्म अर्थ बघितला तर त्या न्यासांची योजना 'ब्रह्मांडीं तें पिंडीं' याच तत्वावर उभारली आहे असें आढळून येईल. ज्याप्रमाणें सप्त स्वर्ग व सप्त लोक पिंडांत म्हणजे शरिरांत आहेत त्याचप्रमाणें ब्रह्मांडाला आधारभूत असणारी शक्ति मानवशरीरांतहि आहे. तिलाच 'कुंडलिनी' असें म्हणतात. तिचें स्वरूप 'देवात्मशक्ति' या शब्दानें उत्तम ओळखलें जातें. श्वेताश्वेतर उपनिषदांत तिला देवात्मशक्ति असें म्हटलें आहे. संहिता भागामध्येंहि तिचें आत्म्याची शक्ति आहे असें वर्णन आढळतें. अथर्वसंहिता एकादशकांड आठवें सूक्त मंत्र १६–१७ मध्यें या शक्तीचा स्पष्ट उल्लेख आढळतो. 'यत्तच्छरीरे मशयत् संधया संहित महत् । येनेदमद्य रोचेत को अस्मिन् वर्णमाभरत् ॥ सर्वे देवा उपाशिक्षन् तद जानाद् वधूः सती । ईशा वशस्य या जाया सास्मिन् वर्णमाभरत् ॥'

'हें मोठें शरीर 'संधा' ( जोडणारी ) नामक शक्तीनें जोडलें असतांना सुद्धां निश्चेष्ट पडलेलें होतें. यामुळें आतां प्रश्न उत्पन्न होतो कीं, ती कोण आहे जिनें याच्यांत प्रकाश भरला आहे ? सर्व देवतांनीं वरीलप्रमाणें आपणांस ज्ञान व्हावें म्हणून प्रार्थना केली. त्या वेळीं त्या धारण करणाऱ्या वधू सतीनें दाखवलें कीं जी परमेश्वराची शक्ति त्याची पत्नी तिनेंच या शरिरांत वर्णांचें म्हणजे चेतनरूप प्रकाशाचें आभरण केलें.'

यंत्रांत जसें सामर्थ्य असतें तशी ही शक्ति नव्हे. ही चित्‌शक्ति आहे, ज्ञानस्वरूप आहे. हिलाच 'प्राण' असेंहि श्रुतींत म्हटलें आहे. 'या प्राणेन संभवत्यदिति देवतामयी, गुहां प्रविश्य तिष्ठंती या भूतेभिर्व्यजायत, एतद्वैतत्' कठ ४।७ स एष प्राण एव प्रज्ञात्मानन्दोऽजरोऽमृतः ॥' कौषीतिकी ब्राह्मणोपनिषद् ३।८ ज्ञानेश्वर महाराज हिचें 'प्राण' म्हणून, व शक्ति म्हणून वर्णन करतात.

**कुंडलिनी जागृतींत गुरूचें महत्त्व**—गुरूपासून शक्तीचा लाभ झाला तर 'क्षुरस्य' धारेसारखा कठीण असणाऱ्या मार्गावर साधकाचा प्रवास भराभर होतो. म्हणूनच 'गुरूची आवश्यकता व त्याची थोरवी' सर्व ठिकाणीं गाइलेली आढळते. नाथमहाराज म्हणतात कीं, साधे व्यवहारातलें कार्य असलें तर मार्गदर्शकाची आवश्यकता लागते. मग जें गूढ म्हणून गाजलें आहे त्यांत मार्गदर्शन करणाऱ्याची आवश्यकता लागणार नाहीं काय ?

प्रवृत्तिनिवृत्तिकृतकार्यां । अवश्य पाहिजे आचार्या ।
आपमति भजतां राया । अनेक अपायामाजी पडे ॥

तुकारामबुवांच्या अभंगांतून 'गुरुमार्गावर' तडाखे आहेत, ते 'बुवाबाजीवर' आहेत. जो शास्त्रशुद्ध गुरुमार्ग आहे त्यावर नव्हे. तसें असतें तर आपल्या वडील मातोश्रींचा अथवा मोरे कुळींचाहि निर्देश न करणारे तुकारामबोवा 'राघवचैतन्य केशवचैतन्य' यांचा उल्लेख करून 'रामकृष्ण हरी मंत्र' दिला हें सांगून ज्यांनीं हा दिला, त्यांची सेवा करण्याची संधि मिळाली नाहीं म्हणून खंती व्यक्त करतेना. ते म्हणतात—

सद्‌गुरुरायें कृपा मज केली ।
परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥

इतकें विस्तृत सांगण्याचा हेतु असा कीं, ज्ञानमार्ग असो, नाममार्ग असो, कां एकदम कुंडलिनी जागृत करण्याचा मार्ग असो; या सर्व मार्गांत गुरूंनीं शक्तिपात करण्याच्या कल्पनेस मोठें स्थान आहे.

**शक्तिजागृतीचीं कांहीं लक्षणें**:—तेव्हां आसन स्थिर होतें, उड्डियान, मूल व जालंधर हे तीन बंध आपोआप लागतात, जीभ खेचरीमुद्रेप्रमाणें उलट होऊन आंत जाऊं लागते, इतकी स्फूर्ति उत्पन्न होते कीं, स्थिर होऊन बसणें अशक्य होतें, हातपाय बलात्कारानें खेंचले जातात, तेव्हां समजावें कीं शक्ति जागृत झालेली आहे.

तसेंच ज्यावेळीं आसन दृढ होऊन दृष्टि भ्रूमध्यावर स्थिर होते, डोळ्यांतील बाहुल्या फिरूं लागतात, केवल कुंभक आपोआप होऊं लागतो, बाह्य ज्ञान बंद होऊन मन शून्य होऊन जातें, तेव्हां शक्ति जागृत झाली आहे असें निश्चित समजावें.

मूलाधारापासून प्राणवायूचा ओघ सहस्रारमध्यें जात आहे असें भासणें, आंतल्या आंत प्रणवाचा जप होणें, प्राणाच्या प्रवाहाबरोबर नानातऱ्हेचे सुखानुभव येणें हीं सर्व शक्तिजागृतीचींच लक्षणें होत.

नानाप्रकारचे नाद उत्पन्न होणें, मेरुदण्डामध्यें कम्पन होणें, शरीर शून्य होऊन शरीर नसल्याचा भास होणें, सर्वत्र शून्यवत् भासणें, डोळे उघडण्याचा प्रयत्न केला तरी न उघडणें, शरिरांतून विजेसारखा प्रवाह बाहेर जात आहे असें वाटणें ही सर्व शक्तिजागृतीचींच चिन्हें आहेत.

याशिवाय आणखीहि नानाप्रकारचे अनुभव साधकाला येऊं शकतात.

शरीर अत्यंत जड होऊन निश्चेष्ट पडतें अथवा गतिमान होऊन थोडा वेळहि स्थिर होत नाहीं, नानाप्रकारचे प्राणायाम आपोआप होऊं लागतात.

तसेंच संकल्प करून आसनावर बसल्याबरोबर नानाप्रकारचीं आसनें, बंध, मुद्रा आपोआप होऊं लागतात. मनुष्य निरनिराळ्या प्रकारचे राग आळवूं लागतो व ज्यानें नृत्याचें शिक्षणहि कधीं घेतलें नाहीं तो नृत्यहि करूं लागतो. निरनिराळ्या प्रकारचे अवघड मंत्र मनुष्य आपोआप उच्चारूं लागतो. नेत्र बंद केल्याबरोबर निरनिराळ्या देवदेवतांचीं दर्शनें होऊं लागतात. दिव्य स्पर्श, रस, गंध यांचेहि अनुभव साधकाला मिळतात. संशयनिवृत्ति, गूढ तत्वाचा उकल अशा प्रकारचेहि अनुभव येतात.

तरी पण या ठिकाणीं एक गोष्ट ध्यानांत ठेवणें इष्ट आहे कीं, हे सर्वच्या सर्व अनुभव प्रत्येकालाच येतील असें नाहीं. तसेंच अनुभवांची सर्व यादी वर आली आहे असेंही नाहीं. मनुष्यामध्यें असलेली सुप्तशक्ति जागृत होते, तेव्हां पूर्व संस्कारानुसार महाशक्ति आपला मार्ग आक्रमण करूं लागते. साधकाला येणारे अनुभव त्याच्या पूर्वसंस्काराला धरूनच असतात.

सूतसंहितेंत पुढील श्लोकांतून हीं लक्षणें दिलीं आहेत. 'देहपातस्तथा कंपः परमानंददर्पणे। स्वेदो रोमांच इत्येतत् शक्तिपातस्य लक्षणम् ॥ शिष्यस्य देहे विप्रेन्द्राः धरण्यां पतिते सति। प्रसादः शांकरस्तस्य द्विजाः संजात एव हि ॥'

श्वेताश्वेतर उपनिषदांत अ. २-११ मध्यें ब्रह्मानुभवापूर्वी प्रकट होणारीं चिन्हें खालीलप्रमाणें दिलीं आहेत— 'नीहारधूमार्कानिलानलानां। खद्योतविद्युत्स्फटिकशशिनाम्। एतानि रूपाणि पुरःसराणि। ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे ॥'

शक्ति जागृत म्हणजे क्रियावती झाली कीं प्राण व अपान या दोहोंचें उत्थान होतें व मग ती सुषुम्नेंत प्रवेश करते, चक्रांचें वेध करते, नाडीशुद्धि करते इत्यादि परिणाम शक्ति क्रियावती झाल्यानें होतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं अ. ६ मधील आपल्या पंथराजाच्या व्याख्यानामध्यें हें सर्व दिलें आहे.

ज्ञानेश्वरींत अर्जुनाला दिव्य दृष्टि दिली त्यावेळचें त्याच्या स्थितीचें वर्णन ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे. तो शक्तिजागृतीचाच परिणाम आहे.

ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें। निघती ना जंव एकसरें।
तंव अविद्येचे आंधारें। जावोंचि लागे ॥············
मग दिव्यचक्षुप्रकाश प्रगटला। तयां ज्ञानदृष्टि पाटा फुटला। ययापरी दाविता जाहला। ऐश्वर्य आपुलें ॥···
एकसरें ऐश्वर्य तेजें पाहलें। तया चमत्कारीं चें एकार्णव जाहलें। चित्त समाधीं बुडोनि ठेलें। विस्मयाचिया ॥···
म्हणे केवढें गगन येथ होतें। ते कवणें नेलें पां केउतें।
तीं चराचरें महाभूतें। काय जाहलीं ॥
दिशांचे ठावही हारपले। अधोर्ध्व काय नेणों जाहले।
चेइलिया स्वप्न तैसें गेलें। लोकाकार ॥
नानासूर्यतेजप्रतापें। सचंद्रतारागण जैसें लोपे। तैसी गिळिली विश्वरूपें। प्रपंच रचना ॥
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे। बुद्धि आपणपें न सांवरे। इंद्रियांचे रश्मी माघारे। हृदयवरी भरले ॥
तेथ ताटस्थ्या ताटस्थ पडिलें। टकाशी टक लागलें।
जैसें मोहनास्त्र घातलें। विचार जातां ॥ ··········
तैसें आपणेनवीण कवणीकडे। नेदांचि उरों।···

ज्ञा. अ. ११ ओ. १७७–९४

या वर्णनाची स्वामी विवेकानंदांनीं, रामकृष्ण परमहंसांनीं त्यांच्यावर कृपा केली असतां जी स्थिति झाली त्याचें जें वर्णन केलें आहे, त्याच्याशी तुलना करण्याजोगी आहे. स्वामी म्हणतातः—

" But in the twinkling of an eye he placed his right foot on my body. The touch at once gave rise to a novel experience within me. With

my eyes wide open, I saw the walls and every thing in the room, whirled rapidly and vanished into nought and the whole Universe together with my individuality was about to merge in an all encompassing mysterious void ! I was terribly frightened and thought that I was facing Death, for the loss of individuality meant nothing short of that. Unable to control myself; I cried out, " What is this you that are doing to me? I have my parents at home! ' He laughed aloud at this and stroking my chest said, " All right, let it rest now. Everything will come in time!" " The wonder of it was that no sooner had he said this than that strange experience of mine vanished. I was myself again and found everything within and without the room as it had been before."

Life of Ramkrishna, Pages 376-377

**इतर मार्गांतील शक्तिपाताचे दाखले**—परमार्थसाधनांत शक्तिपात अथवा गुरुप्रसाद याला फार महत्त्व आहे. उदाहरणार्थ, नामस्मरणाचा मार्ग घ्या. नामाच्या द्वारां देवास कळवळ्यानें हांक मारली असतां देव भेटतो हें खरेंच आहे व श्रीतुकोबा म्हणतात त्याप्रमाणें 'रामकृष्ण' हा उघडा मंत्र आहे हेंहि खरेंच आहे. पण हें मान्य करून सुद्धां ज्यांना नाममंत्र सिद्ध झाला आहे, त्यांनीं तो सिद्धमंत्र दिला असतां साधकाचें कार्य लवकर होण्याची शक्यता आहे हें मान्यच करावें लागेल. असें आहे म्हणूनच 'गुरुशिष्यपरंपरा' अखंड आजवर चालू रहात आलेली आहे. कल्पना करा, आपणांस परतीराला जाणें आहे व आपण नावेंत बसलों व स्वत: नाव वल्हवूं लागलों. आतां ही नाव परतीराला पोंचणार नाहीं असें कोण म्हणेल ? पण मार्ग अज्ञात असल्यानें परतीराला पोंचण्यापूर्वी नाव खडकावर आदळणार नाहीं, उलटा वारा येऊन ती उपडी होणार नाहीं, मुक्कामाच्या जागेचें निश्चित स्वरूप माहीत नसल्यानें पोंचेल केव्हां हें सांगतां येत नाहीं, अशा परिस्थितींत अडचणी येणारच. पण जर जाणता नावाडी मिळाला तर हे अपाय भोगावे लागणार नाहींत व नाव परतीराला हमखास पोंचेल. याचप्रमाणें परमार्थसाधनरूपी जलांत साधकाची नाव पडली असतां ती प्राप्तीच्या पैलतीराला लागणारच नाहीं असें सांगता येणार नाहीं. पण जर समर्थ गुरु कर्णधार भेटले तर मात्र निश्चितपणें नाव परतीराला जाईल, यांत शंका नाहीं. श्री एकनाथांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे.

नाव तारी हे साचार । माजी बैसले आहाती थोर थोर । परी तारकेवीण परपार । समर्ग नर न पवती ॥

तुकारामबोवा आपल्याला उपदेश झाला तो कसा हें सांगतांना सांगतातः—

सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना ।
मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥

निळोबा उपदेश देणें व सांप्रदायिक करणें यांत फरक करतात, तो सुद्धां या शक्तिपाताच्या समजुतीवरच उभारलेला आहे. ते म्हणतातः—

निळा म्हणे मज उपदेश दिला ।
संप्रदाय दिला सकळजना ॥

गुरूपासून 'मंत्रोपदेश' यांचा अर्थ 'शक्तीचें दान' असा आहे. ती एक शक्ति देण्याची रीत आहे.

## शक्तिपात करण्याचे प्रकार

शक्तिपात करण्याचे प्रकार खालील श्लोकांत सांगितले आहेत. 'दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके । जनयेत् समावेशं शांभवं स हि दैशिकः ॥ स्पर्शाख्या देवि दृक्संज्ञा मानसाख्या महेश्वरा । क्रियावाक्वादिरहिता देवि दीक्षा त्रिधा स्मृता ॥'

संतांच्या वाङ्मयांतून यांचे उल्लेख आढळतात. उदाहरणार्थः– 'कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदीं बैसविलें । बापरखुमादेविवरु विठ्ठलें । भक्तां दिधलें वरदान ॥' ज्ञानदेव अभंग.

**दीक्षा देणें म्हणजे शक्तिपात करणें:**—दीक्षा ही सांगण्याचा अथवा ऐकण्याचा विषय नाहीं. ती देण्याचा व घेण्याचा विषय आहे. दीक्षा या शब्दाची व्युत्पत्ति पुढील श्लोकांत दिली आहेः –

ददाति शिवतादात्म्यं क्षिणोतिच मलत्रयम् ।
अतो दीक्षेति संप्रोक्ता दीक्षातंत्रार्थवेदिभिः ॥

याचा अर्थ असा कीं, दिव्यज्ञानाला देते व सर्व पापाचा क्षय करते ती दीक्षा.

**गुरूला शरणागति व अभ्यासः—** या मार्गाचें रहस्य गुरु व शक्ति यांना संपूर्णपणें शरणागति करणें असें आहे. गुरुस्मरण करून आसनावर बसून आपण नाहींसें होणें, आपला अहंकार काढून घेणें व शक्तिच सर्व करते अशी भावना ठेवणें हा या मार्गांतीला अंतरंगांतला एक भाग आहे.

आम्ही वर म्हटलें, कीं शक्ति सर्व करते, आसनें आपोआप होतात वगैरे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, साधकास कांहींच करणें लागत नाहीं. तसें समजणें म्हणजे आत्मनाश करून घेणें आहे. साधकास रोज अभ्यास करावाच लागतो. खुद्द ज्ञानदेव म्हणतात 'जिये मार्गींचा कापडी । महेश अझुनी···' यापेक्षां जास्त काय सांगावें ?

**महायोगाचें ध्येय शक्तीचें शिवस्वरूपाशीं सामरस्यः—**शक्ति जाग्रत झाली कीं, ती सुषुम्नेच्या द्वारां ब्रह्मरंध्रा पर्यंत जाते व तेथें असणाऱ्या शिवाचें व तिचें ऐक्य होतें. हेंच शक्तिजागृतीचें प्राप्तव्य. ह्यालाच समाधि म्हणतात. ह्यालाच 'पदींपद प्रवेश' म्हणतात. येथें योगी पोंचला कीं त्याला परमानंदाचा लाभ होतो.

**या महायोगाचे कांहीं विशेषः—**( १ ) हठ, लय, मंत्र अथवा राजयोग. यांचें प्राप्तव्यहि शेवटीं ही देवात्मशक्ति जाग्रत करणें हेंच होय असें या योगाचे उपासक मानतात. शक्तिपातद्वारां त्वरित कार्य होतें. या योगानें प्राण, अपान जाग्रत होतात.

( २ ) मनुष्यमात्र या शक्तिग्रहणाला अधिकारी आहे. यामुळें भक्तियोगाप्रमाणें हा योग 'सकळांसी येथें आहे अधिकार' असा आहे. कर्म, जाति, अवस्था यांचा तपशील भेद नाहीं. हा आत्मसाक्षात्काराचा जवळचा रस्ता ( Short cut ) आहे. एऱ्हवीं साधकांस किती वेळ लागेल देव जाणें !

( ३ ) या योगाचें फळ प्रत्यक्ष आहे. एका दृष्टीनें 'योग' हा गूढ आहे असें म्हटलें जातें तें खरें आहे. त्याचे अनुभव हे सर्व जगापुढें मांडणें अशक्य आहे. त्याचे प्रयोग रसायनशाळेंत करून दाखवणें कठीण. उदाहरणार्थ—साधा यमांतला प्रकार ब्रह्मचर्य. त्याचा प्रयोग कसा करणार ? पण एका दृष्टीनें हें प्रयोगाचें शास्त्र आहे. म्हणूनच पतंजलींनीं आपल्या सूत्रांत यम-नियम सांगून त्या प्रत्येकाचीं फळें सांगितलीं आहेत. तीं त्यांच्या दृष्टीनें प्रयोगसिद्ध आहेत. 'कुंडलिनीयोग' तर या बाबतींत एक पाऊल पुढेंच आहे. गुरूंनीं दीक्षा दिल्याबरोबरहि प्रत्यक्ष फळ दिसूं लागतें.

( ४ ) भक्तिप्रमाणें योग हा मनावरचे दुष्ट संस्कार घालविण्यास उपयोगी पडणारा आहे. पाश्चिमात्यांना मनाच्या गूढ भागाचें महत्त्व एका दृष्टीनें या एकोणि-साव्या शतकाच्या शेवटीं व विसाव्याच्या प्रारंभीं कळूं लागलें. तत्पूर्वी लायब्निट्झ यानें याची योग्यता जाणली होती. गूढमन अथवा मनाचा अज्ञातभाग हा वासना संस्कारांचा बनलेला असतो, हें आमच्याकडे बहुत दिवसा-पासून ज्ञात आहे. पाश्चात्य या वासनांचा कसा शोधाव्यात यावावत प्रयोग करून कांहीं पद्धति ठरवीत आहेत. पण आमच्याकडे या गूढमनाला स्वच्छ करून त्याचा ताबा कसा घ्यावा याचा विचार फार वर्षांपूर्वी केलेला आहे. याबाबत प्राणाचा, वासनांचा व मनाचा निकटचा संबंध आहे, हें जाणून प्राणायामद्वारां मन-शुद्धीचा मार्ग पूर्वीच्या महात्म्यांनीं दाखवून दिला आहे. 'ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं' हा संध्येच्या प्रारंभाचा मंत्र म्हणून संध्योपासक प्राणायाम करतो, हें प्रसिद्ध आहे. दुर्दैव कीं द्विज हा या वैदिक संस्कृतीच्या उत्कृष्ट अंगास आज पारखा होत आहे. आपल्याकडे प्रत्येक कर्माच्या आरंभीं 'प्राणानायम्य' हें जें आहे त्याचें रहस्यहि हेंच आहे.

( ५ ) ज्ञान अथवा भक्ति योगापेक्षां या योगाचा हा विशेष आहे कीं, तो मन, प्राण व शरीर यांना संघटित करतो. ज्ञानयोगामध्यें शरीर 'असत्' म्हणून तिरस्कारलें जातें. भक्ति करणारा हाहि देवाकरितां 'झुरोनि पांजिरा' होण्याचाच अधिक संभव. पण हा योग म्हणतो, ईश्वरानें मन, प्राण व शरीर यांचा संयोग करून दिला असतां शरिराला तिरस्कृत काय म्हणून लेखावें ? उलट शरीर 'आद्य धर्मसाधन' जाणून त्यासहि शुद्ध करून त्याचाहि विकास करून आपलें इष्ट कार्य अधिक पूर्णतेनें करून घ्यावें. ज्ञानेश्वरीमध्यें या योगाच्या क्रियेनें शरिराचें

रूपांतर होऊन तें सतेज कसें होतें याचें दहावीस ओंव्यांतून उत्कृष्ट वर्णन आहे. त्यांतली एकच ओंवी देतों. 'शारदीयेचेनि बोलें । चंद्रबिंब पाल्हेलें । हो कां मूर्त तेजचि बैसलें । आसनावरी ।' तात्पर्य, ज्ञानाकरितांहि शरीर दृढ हवें. धर्माचरणाचा पाया शरीर. तें दृढ करून साधकास वरच्या पायरीवर नेणारा हा योग आहे. याबाबतींत महायोगाच्या या ध्येयाजवळ येणारा श्री. बाबू अरविंद घोष यांचा योग आहे. ते म्हणतात कीं ज्ञान-योगानें मुक्ति मिळेल. पण त्यांचा योग भुक्ति व मुक्ति दोन्ही देणारा आहे. एकच सद्वस्तु जर चित् व जड अशा दोन्ही रूपांत व्यक्त झाली आहे, तर एकाचा तिरस्कार करावयाचा व एकालाच वाढवावयाचें हें योग्य होणार नाहीं. एके ठिकाणीं श्री. अरविंद म्हणतातः—

"To neglect or to deny the real needs of the body, to think of it as something not Divine is, to neglect and deny greater, life of which it is a part and to falsify the great doctrine of the unity of all, and of the ultimate identity of matter and spirit."

**पंथराज व महाराष्ट्रीय भक्तिसंप्रदाय**—या योगाचा व महाराष्ट्रीय वैष्णव भक्तिसंप्रदायाचा कसा निकट संबंध आहे याचीं एकदोन गमकें सांगून हें प्रकरण आटोपूं.

( १ ) श्रीशंकराचार्य श्रीपांडुरंगाष्टकांत पंढरपूरचें वर्णन करतांना पंढरपुरास 'महायोगपीठ' म्हणतात.

'महायोगपीठे तटे भीमरथ्यां वरं पुण्डरीकाय दातुं मुनींद्रैः । समागत्य तिष्ठन्तमानंदकंदं परब्रह्मलिंगं भजे पांडुरंगम् ॥'

पंढरपुरांत श्रीविठ्ठलचरणीं श्रीज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकोबा सर्व एकत्र येऊं शकतात, त्याचें मर्मच तें 'महायोगपीठ' आहे याच्यांत आहे.

( २ ) योगांत दिलेले अनुभव भक्तिमार्गानें ही येतात. तुकारामबोवा हे 'कोणी कांहीं तरी केली आचरणें । मज या कीर्तनेंविण नाहीं' असे एकनिष्ठ नामधारक. त्यांचे अनुभव व योगमार्गांतील साधकाचे अनुभव तोलून पहाण्यासारखे आहेत.

( १ ) स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण ।
अंतरींची खूण पावूनियां ॥ १ ॥
पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीलित ।
कंठ सद्गदित रोमांच आले ॥ २ ॥
चित्त चाकाटलें स्वरूपा माझारीं ।
न निघे बाहेरी सुखावलें ॥ ३ ॥
सुनील प्रकाश उदेजला दीन ।
अमृताचें पान जीवनकळा ॥ ४ ॥
शशिसूर्यां जाली नीवें ओंवाळणी ।
आनंदा दाटणी आनंदाची ॥ ५ ॥
तुका म्हणे सुखें प्रेमेसी डुलत ।
विरालों निश्चित निश्चितीनें ॥ ६ ॥

( २ ) लक्षूनियां योगी पहाती आभास ।
तो दिसे आम्हांस दृष्टिपुढें ॥ १ ॥
कर दोनी कटीं राहिलासे उभा ।
सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ २ ॥

( ३ ) रक्तश्वेतकृष्णपीतप्रभा भिन्न ।
चिन्मय अंजन सूदलें डोळां ॥ १ ॥
तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि झाली ।
कल्पना निमाली द्वैताद्वैत ॥ २ ॥

( ४ ) अनुहातीं गुंतला नेणे बाह्यरंग ।
वृत्ति येतां मग बळ लागे ॥ १ ॥
मदें माते तया नाहीं देहभाव ।
आपुले अवयव आवरितां ॥ २ ॥
आणिकांची वाणी वदे तेणें मुखें ।
उपचार दुःखें नाठवती ॥ ३ ॥
तें सुख बोलतां आश्चर्य या जना ।
विपरीत मना भासतसे ॥ ४ ॥
तुका म्हणे बाह्य रंग ते विठ्ठले ।
अंतर निवालें ब्रह्मरसें ॥ ५ ॥

( ५ ) पांडुरंगें सत्य केला अनुग्रह ।
निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥ १ ॥
जीवाशिवा शेज रचिली आनंदें ।
औटावेपदीं आरोहण ॥ २ ॥
निजीं निजरूपीं निजविला तुका ।
अनुहतें बाळका हलरु गाती ॥ ३ ॥

( ६ ) कंठीं धरला कृष्णमणि ।
अवघा जनीं प्रकाश ॥

(७) बोल नाइके कोणाचे ।
कथे नागवाचि नाचे ॥

(८) सुखें मी निजलों गा शून्य सारोनि तेथें ।
त्रिकुटशिखरीं गा दान मिळे आईतें ।

(९) मागोनी आली वाट ।
सिद्ध ओळखीची तैशी ।
तरले तरले गा ।
आणिकही विश्वाशी ।

(१०)...जाईन सिद्धपंथें ।
अवघ्या चुकतील खेपा ॥

(११) ऊर्ध्व मुखें आळविला ।
सोहंशब्दाचा नाद ।
अरूप जागविला ।
दाता घेऊनिया छंद ।
घेऊनि आला दान ।
निजतत्त्व निजबोध ।
स्वरूपी मेळविले ।
नांव ठेविला भेद ॥

असे तुकाराममहाराजांच्या अंभगांतून आणखी उतारे देतां येतील. तसेंच इतरहि साधुसंतांच्या ग्रंथांतून देतां येतील; पण स्थलसंकोचास्तव येथेंच थांबणें अवश्य.

या पंपराजाची इतकी माहिती देण्याचीं कारणें दोन. एक खुद्द ज्ञानदेवच यास 'पंथराज' म्हणतात. दुसरें, कांहीं लोक जसें समजतात तसा योग व भक्ति यांत फार भेद नाहीं. देव जर एक आहे तर त्याचा खरा अनुभव ज्यांना येतो, त्यांच्या अनुभवांत दक्षिणोत्तर ध्रुवाइतकें अंतर राहणारच नाहीं. त्यांत भेदापेक्षां साम्यच अधिक असणें अवश्य.

---

## १०. ज्ञानेश्वर महाराजांची गीतेकडे पहाण्याची दृष्टि.

गीताग्रंथ सांगून आज पांच हजारांवर वर्षे जरी झालीं तरीसुद्धां गीतेचा ताजेपणा आजहि कायम आहे. झाडावरचीं फुलें जशीं शिळीं होतात, तशीं सुवर्णफुलें होत नाहींत. तीं सदा ताजींच असतात. त्याप्रमाणें इसवीसनापूर्वी दोन हजार वर्षांच्याहि अगोदर झालेल्या ह्या संवादांतील शब्दसुमनें आपल्या सुवासानें आज पांच हजार वर्षांनंतरसुद्धां जाणत्यांचीं मनें आपल्याकडे खेंचून घेत आहेत. गीता सांगून झाल्यावर भारतांत होऊन गेलेले थोर आचार्य शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य; भारतांतील वेगवेगळ्या प्रांतांत झालेले मध्ययुगांतील संत; आपल्याकडील नांवें सांगावयाचीं तर ज्ञानेश्वरमहाराज, वामनपंडित; अगदीं अर्वाचीन काळांत झालेले लोकमान्य टिळक, बाबू अरविंद घोष, महात्मा गांधी, हे सर्व भिन्न काळांतील भिन्न मताचे थोर पुरुष, पण या सर्वांमध्यें एका बाबतींत 'एकवद' आहे व ती म्हणजे गीता हा शिरोधार्य ग्रंथ आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या भाषेंत सांगावयाचें तर 'म्हणोनि जाणतिया सवा । गीताचि एकी सेवा । काय कराल आघवा । शास्त्रीं येरी ॥' १८–१६९५ ॥

गीतेला जें हें अनन्य साधारण महत्त्व आलें त्याचें कारण आपल्या समोर जी गीता आहे ती भारतीय युद्धामध्यें गोत्रच दोहीं दळांत उदित झालेलें पाहून विषण्ण मन झाल्यामुळें निःशस्त्र प्रतिकार करून रणांगण सोडून जाणाऱ्या एका भारतीय योद्धयाला व्यवहारचतुर प्रसंग जाणणारा कार्यसाधु त्याचा मेव्हणा, त्यानें केलेला उपदेश अशा स्वरूपांत ती नाहीं म्हणून.

गीतेकडे दोन दृष्टींनीं पाहतां येईल. भारतीय कथेंतील एक प्रसंग ही एक दृष्टि. दुसरी गीता ही भारत-कमळपराग खरीच. पण ती नुसती प्रासंगिक उपदेशाच्या रूपाची नव्हे. मानवी जीवनांत जीं कांहीं शाश्वत मूल्यें आहेत त्यांचा वस्तुनिष्ठपद्धतीनें ज्यांत विचार केला आहे असें एक शास्त्र म्हणून. आप-आपल्यापरीनें या दोन्हीहि दृष्टयांना किंमत आहे. भारताच्या इतिहासाचें साधन या दृष्टीनें पहिलीला महत्त्व आहेच. तसेंच वेद उपनिषदें यांच्यापासून चालत आलेल्या अध्यात्मशास्त्र परंपरेंतील एक मोठा दुवा या दृष्टीनें दुसरीला महत्त्व आहे. महाभारतांतील भीष्मपर्वांत गीता आली आहे, यावरून पहिल्या दृष्टीची सत्यता सांगण्या-करितां वेगळा आधार देण्याचें कारण नाहीं. पण दुसरी-करतां थोडासा अधिक विचार करणें अवश्य आहे.

पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे खुद्द भगवान् आपण जें सांगतों तें शास्त्र सांगत आहोंत असें सांगतात, 'इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।' १५–२० ॥ शास्त्र या शब्दाचा अर्थ थोडा स्पष्ट करणें अवश्य आहे. शास्त्र

म्हणजे कहाणी तर नव्हेच, पण शास्त्र म्हणजे एका विशिष्ट मानवसमूहाकरितां विशिष्ट स्थल-काळ लक्षांत घेऊन केलेला शोध नव्हे. शास्त्र हें सर्वांच्याकरितां सर्वकाळीं जें सत्य त्याचा शोध घेतें. उदाहरणार्थ, गणितशास्त्रांतील एक प्रमेय घेऊं. दोन व दोन चार हे भारतांत खरें व रशियांत काय खोटें आहे ? गणित हें शास्त्र आहे. तसेंच गीता हें शास्त्र आहे. तें सर्व मानवांच्याकरितां आहे. आपल्यासमोर जी गीता आहे ती श्रीकृष्ण व अर्जुन यांचा मोकळा संवाद जसा झाला त्या स्वरूपांत नाहीं. व्यासांनीं महाभारतांत ग्रथित केलेल्या स्वरूपांत तो आपलेसमोर आहे. आपल्यासमोर काय आहे याचें एक बाह्य गमक म्हणून एक गोष्ट सांगून पुढें जाऊं. गीतेंत ' श्रीकृष्ण उवाच ' नाहीं, ' श्रीभगवान् उवाच ' आहे. हा देवाचा व मानवाचा संवाद आहे असें " श्रीभगवान् " या नांवानें सुचवावयाचें आहे.

हें शास्त्र कोणास शिकवावें, कोणास शिकवूं नये, याचें पठण केल्यास काय उपयोग, हें लोकांना शिकविल्यास काय फळ इत्यादि अनुबंध चतुष्टयापैकीं कांहीं गोष्टींचा विचार पंधराव्या अध्यायांतील वर दिलेला श्लोक व अठराव्यांतील ६७ ते ७१ श्लोक यांच्यांत सांगितला आहे. याचा अर्थ उघड आहे कीं, आपल्यासमोर जी गीता आहे तो श्रीकृष्णार्जुनांचा प्रारंभिक घडून आलेला अर्जुनाच्या उपयोगपुरताच संवाद नव्हे. जीवनांतील अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नांचा वस्तुनिष्ठपद्धतीनें खोल जाऊन त्यांत विचार केला आहे असें तें जीवनशास्त्र आलें. म्हणूनच यांत प्रकृतिपुरुष, क्षेत्रक्षेत्रज्ञ, क्षर अक्षर इत्यादि गोष्टींचा विचार आला आहे.

गीतेंतील विषय हा तात्पुरत्या किंमतीचा हंगामी महत्त्वाचा नव्हे, तर सार्वकालिक महत्त्वाचा आहे हें पुढील गोष्टींचा विचार करतां अधिक स्पष्ट होईल.

( १ ) गीता हें कोणत्या प्रकारचें शास्त्र आहे ?

( २ ) गीतेच्या उपक्रम उपसंहाराचा विचार.

( ३ ) गीता सांगणारे भगवान् योगेश्वर होते.

( ४ ) गीतेचा अधिकारी कोण सांगितला आहे ?

( ५ ) ज्या दोहोंत हा संवाद घडला त्या श्रीकृष्ण व अर्जुन यांचीं गीतेंतील वर्णनें काय स्वरूपाचीं आहेत ?

( ६ ) ' मोक्ष्यसेऽशुभात् ' असें कर्म सांगतो म्हणून भगवान् म्हणतात.

(१) आपण प्रथम गीता हें कोणत्या प्रकारचें शास्त्र आहे, हे पाहूं. गीता हें अध्यात्मशास्त्र ( Philosophical Science ) आहे. शास्त्रांत प्रामुख्यानें दोन प्रकार करतां येतात. ( १ ) प्रयोगप्रधान ( Experimental ) व ( २ ) विचारप्रधान ( Philosophical ). रसायन, पदार्थविज्ञान, प्राणिशास्त्र इत्यादि प्रयोगप्रधान शास्त्रें आहेत. जीवनाच्या एका मर्यादित कक्षेंतील एक भाग घेऊन त्यांत प्रयोग करून नवीन नवीन शोध लावणें व तद्द्वारां जगाच्या ज्ञानांत भर घालणें असें या शास्त्रांचें स्वरूप असतें. विचारप्रधान शास्त्रें एका दृष्टीनें जीवनाच्या सर्व कक्षांचा एकदम विचार करतात. जीवनांत कांहीं कप्पे नाहींत. जीवन एकच आहे. कारण प्रयोग करणारा जीव हा वेगवेगळ्या क्षेत्रांत ज्या वेळीं प्रयोग करीत असतो, त्या वेळेला तो व्यापक अर्थानें जीवन जगतच असतो. त्याचे विवक्षित क्षेत्रांतील प्रयोग हा त्यांतील एक भाग आहे. सुखदुःख, शोकमोह वगैरे गोष्टींना त्या वेळींहि त्याच्या जीवनांत स्थान आहेच. पण जोंपर्यंत तो बाहेरच्या वस्तूंचें संशोधन करीत असतो, तोंपर्यंत हा जीवनांतील भाग विसरलेला असतो. खगोलज्ञ हा आपली दुर्बिण लावून शनीचीं कडीं, शुक्राचें चंद्रापासून अंतर ज्या वेळीं पहातो, तरी विचाराची दुर्बिण आंत लावून तो आपणांस सुखदुःख, शोक, भय, राग, द्वेष आहेत, आपणांस मन आहे हें बघत नाहीं. हें सर्व तो त्यावेळीं विसरलेला असतो.

प्रयोगप्रधानशास्त्राचें क्षेत्र असें संकोचित असतें. शिवाय ज्या मर्यादित क्षेत्रांत त्याची व्याप्ति असते, तेथें सुद्धां काम करणारा शास्त्रज्ञ त्या विषयासंबंधीं जीवनांत अत्यंत महत्त्वाचे असे उत्पन्न होणारे प्रश्न असतात, त्यांना उत्तरें शोधण्याचा प्रयत्न करीत नाहीं. अंतिम मूल्यें हीं त्यांच्या क्षेत्रांत येतच नाहींत.

विचारप्रधानशास्त्रांत प्रयोग कमी, जवळजवळ नाहींतच. त्यांचें काम या प्रयोगप्रधानशास्त्रांनीं न काढलेले पण जीवनदृष्टीनें महत्त्वाचे असे जे प्रश्न आहेत, त्यांचा विचार करणें. उदाहरणार्थ बाह्यपदार्थ दिसतो कसा, हें मानसशास्त्र ठरवतें. पण या व्यक्तीनें या वेळेला हें पाहणें बरें का ? जे दिसतें तें सत्य आहे का ? असले प्रश्न प्रयोगप्रधानशास्त्राच्या कक्षेंत येत नाहींत. ते विचार-

प्रधानशास्त्राच्या कक्षेत पडतात. नीति, अर्थ, तर्क, अध्यात्म हीं विचारप्रधान शास्त्रांचीं उदाहरणें देतां येतील.

अज्ञ लोकांची अशी कल्पना आहे कीं, या विचारप्रधानशास्त्रांतील अध्यात्मशास्त्राचा जीवनाशीं कांहीं संबंध नाहीं. पण तो एक अज्ञानाचा परिणाम आहे. आपण डोळ्यानें बघण्याच्या अथवा वाणीनें बोलण्याच्या प्रत्येकाकडून होणाऱ्या नेहमींच्या क्रियेचेंच उदाहरण घेऊं. विज्ञानशास्त्र, मानसशास्त्र हीं या क्रियेचा विचार करतील; पण अध्यात्मशास्त्र त्यांच्यापुढें जाऊन विचारतें, कीं, बघणाऱ्याचें स्वरूप काय ? बोलणाऱ्याचें स्वरूप काय ? बोलतो कोण ? बोलणें चालू रहातें, कित्येक वेळां कांहीं वेळ थांबतें, कधीं तर कायमचेंच थांबतें, हें जें घडतें तें कोणाच्या सत्तेनें वगैरे. हे प्रश्न अध्यात्मशास्त्रांत पडतात. हे प्रश्न विज्ञानांत पडत नाहींत. प्रश्न रोजचेच, पण मूळापर्यंत जाऊन विचार करूं लागलें कीं, तो विचार अध्यात्मक्षेत्रांत जाऊन पडतो. वर सांगितलेला विषयच केनोपनिषदांत आहे, हें उपनिषदांचे वाचक जाणतातच.

या विचारप्रधानशास्त्रांपैकीं अर्थ, नीति, अध्यात्म हीं शास्त्रें जीवनांतील मूल्यांचा आपआपल्या दृष्टीनें विचार करतात; पण अध्यात्म हें अंतिम मूल्यांचा विचार करतें. या शास्त्राला नीतिशास्त्र हें अर्थशास्त्रापेक्षां जवळचें आहे. सदाचार कोठला, असदाचार कोठला, बरें काय, वाईट काय हें नीतिशास्त्र ठरवितें. मानवी जीवनांत उच्च प्रकारची रहाणी कोठली, जीवनाचें ध्येय काय हे प्रश्न सोडविण्याचा नीतिशास्त्र प्रयत्न करतें; पण पुष्कळ वेळेला नीतिशास्त्रावरील लेखक आपलें क्षेत्र संकोचित करून मानवाच्या कृतींचीं मूल्यें ठरवतात. पण जे नीतिशास्त्रज्ञ आपल्या प्रश्नांचा पुरा विचार करूं इच्छितात व त्यांतील प्रश्नांना पुरीं उत्तरें देऊं इच्छितात, ते संकोचित क्षेत्र कल्पित नाहींत. तें अध्यात्मक्षेत्रांत शिरून त्या पायावर नीतिशास्त्राची उभारणी करतात.

नीतिशास्त्र व अध्यात्मशास्त्र यांचा कसा संबंध आहे, हें लक्षांत येण्याकरितां एक प्रश्न घेऊन सांगूं. उदाहरणार्थ, माझें कर्तव्य काय, हाच प्रश्न घेऊं. त्याचें उत्तर दुसऱ्या एका प्रश्नास जें उत्तर मिळेल त्यावर अवलंबून आहे व तो प्रश्न म्हणजे 'मी कोण ?' पण 'मी कोण ?' हा प्रश्न नीतिशास्त्राच्या कक्षेंत पडत नाहीं. तो अध्यात्माच्या क्षेत्रांत पडतो. या प्रश्नास जसें आपण उत्तर देऊं, त्यावर कर्तव्य अवलंबून रहाणार. 'मी' जर स्थूलशरीर व तत्स्थ इंद्रियें एवढेंच ठरलें, तर माझें कर्तव्य म्हणजे चार्वाकूदर्शनासंबंधीं नेहमीं उल्लेखिलेल्या शब्दांत सांगतां येईल:—

यावत् जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् ।
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥

उलट जर असें ठरलें, कीं मी शरीराबरोबर नाश पावत नाहीं तर 'वासांसिजीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोपराणि । तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानिसंयाति नवानि देही' अ. २–२२. तर माझें कर्तव्य वेगळें ठरेल. व याहून वेगळें असें जर माझें स्वरूप सिद्ध झालें कीं अजर, अमर असा आत्मा मी आहें तर माझें कर्तव्य वेगळेंच ठरेल !

तात्पर्य, नीतिशास्त्रांतील प्रश्नांचा पुरा विचार करावयाचा तर अध्यात्मांत शिरल्याशिवाय होणारच नाहीं असा अध्यात्माचा व नीतिशास्त्राचा निकटचा संबंध आहे. अध्यात्म हा नीतीचा पाया आहे.

कित्येक लेखक नीतिशास्त्रास वेगळ्या पायाची गरज आहे असें मानतात; पण त्यांच्या मतें त्याकरितां अध्यात्मशास्त्राकडे जाण्याची गरज नाहीं. मानसशास्त्र, मानववंशशास्त्र, समाजशास्त्र यांच्या दृष्टिकोनांतून मानवाचा विचार केला तरी काम भागेल. त्यायोगें आपणांस नीतिशास्त्रास हवें असें मानवाचें रूप मिळेल. पण हें म्हणणें टिकाऊ नव्हे. कारण हीं सर्व शास्त्रें मुळांत जाऊन 'कोऽहम्, कथमिदंजातम्, कोऽवा अस्य कर्ता' इत्यादि जे महत्त्वाचे प्रश्न आहेत त्यांची प्रामुख्यानें चर्चा करीत नाहींत एवढेंच नव्हे तर मुळींच करीत नाहीं म्हटलें तरी चालेल. मानवाचें, त्याच्या वंशाचें व त्याच्या आचाराचें वस्तुस्थितीनुरूप वर्णन करणें एवढेंच यांचें काम आहे. त्याचा अर्थ लावणें, त्याचें मूल्य ठरविणें हें नाहीं. यामुळें हीं शास्त्रें जे मूलभूत प्रश्न आहेत तिकडे बघतच नाहींत. यामुळेंच पाश्चात्य देशांतील स्पिनोझा, हेगेल्, ग्रीन् सारखे मोठे तत्त्ववेत्ते म्हणतात, कीं नीतिशास्त्राचा पाया अध्यात्मच मानणें अवश्य आहे.

इतका हा प्रपंच करण्याचें कारण हें कीं, गीता हें शास्त्र खरें; पण कोणत्या प्रकारचें शास्त्र आहे, त्याचें स्वरूप काय आहे हें लक्षांत यावें म्हणून. गीतेंतील अर्जुनाचा मूळ

प्रश्न व त्यास भगवंतांनीं दिलेलें उत्तर याचा जर विचार केला, तर असें आढळून येईल कीं गीता हें अध्यात्मप्रधान नीतिशास्त्र आहे.

अध्यात्मशास्त्रांतील प्रश्नांची चर्चा स्वतंत्रपणें करणें शक्य आहे. पण, बहुतेक लोक जीवनाच्या कोणत्या तरी एकाद्या शाखेचा खोल विचार करतां करतां अध्यात्मापर्यंत येऊन टेकलेले दिसतात. हीच गोष्ट थोड्या वेगळ्या स्वरूपांत सांगावयाची म्हणजे अध्यात्माच्या चर्चेस आरंभ कधीं विज्ञानांतून, कधीं नीतींतून, कधीं अधिदैविक शास्त्रांतून अशा कोणत्यातरी जीवनशाखेंतील प्रश्नाच्या रूपानें होतो. उदाहरणार्थ, कठोपनिषदांत अध्यात्माची चर्चा आहे. पण तिचा उगम मृत्यूनंतर प्राण्याचें काय होतें या प्रश्नांतून आहे. यमराजास नचिकेतानें प्रश्न केला तो 'येयं प्रेते विचिकित्सा' असा आहे व त्यास उत्तर देतांना यमराजांनीं अध्यात्म सांगितलें आहे.

अर्जुनाच्या ज्या प्रश्नावरून भगवान् उपदेश करूं लागले, तो अर्जुनाचा प्रश्न धर्म-नीति-विषयक-कर्तव्याकर्तव्य विषयक आहे. अर्जुन म्हणतोः—

कार्पण्यदोषोपहतः स्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।

यत् श्रेयः स्यात् निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ अ. २–७

अर्जुनाचें भाग्य कीं, त्याला जगद्गुरु श्रीकृष्णासारखा सोबती मिळाला होता. यामुळेंच या उत्तरांतून गीताशास्त्र निर्माण झालें.

याबाबतींत आणखींही एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. असेल अर्जुनाचा नीतिविषयक प्रश्न. भगवान् कृष्णांनीं त्याला 'अर्जुना तूं क्षत्रिय आहेस. लढणें हें तुझें कर्तव्य आहे. तूं लढ.' एवढेंचउत्तर दिलें असतें, तरीसुद्धां काम भागतें; पण मग भगवान् गुरु मिळाल्याचा उपयोग काय? ज्ञानेश्वर महाराजादिकांची पहाण्याची जी दृष्टि आहे तिचें मर्म याच्यांतच आहे.

भगवंतांनीं तात्पुरती शंका फेडली असती तर तें शास्त्र झालें नसतें. ज्ञानेश्वर महाराजांनीं हा विचार, एक दृष्टान्त देऊन, फारच उत्कृष्ट रीतीनें मांडला आहे. ते म्हणतात,

> नातरी असाध्य देखोनि व्याधि ।
> अमृतासम दिव्य औषधि ।
> वैद्य सूची निरवधि । निदानींची ॥ २–८६

वैद्य हा रोग्याकडे दोन दृष्टीनें बघूं शकतो. एक त्वरित पण तात्पुरता बरा होईल अशी औषधयोजना करणें. दुसरा थोडें उशीरा पण रोग पुनः होणार नाहीं अशा पद्धतीनें औषधयोजना करणें. ज्ञानेश्वर महाराज वरील ओवींत दुसऱ्या प्रकाराचा उल्लेख करतात. रोग सामान्य औषधास असाध्य आहे असें जाणून वैद्य हा अमृतासारख्या अखेरच्या औषधीची योजना करतो. भगवंतांनीं असेंच केलें. अर्जुनानें प्रश्न केला होता, 'लढूं कां नको?' पण देव त्यास उत्तर देऊं लागले कीं 'गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः' 'नत्वेवाहं जातु नासं नत्वं नेमे' इत्यादि. तो विचारतो 'लढूं कां नको?' भगवान् म्हणतात, 'तूंहि कधीं जन्माला आला नाहींस, मीहि कधीं जन्माला आलों नाहीं. हे राजेहि कधीं जन्माला आले नाहींत.' हा प्रकार म्हणजे 'क्षीर मागे तया वाढी रायतें, (मागतो आहे दूध व वाढणारा विचारतो काय रायतें हवें?) असा दिसतो.

पण याचा अर्थ असा आहे कीं, वरती म्हटल्याप्रमाणें देवानें नुसता तात्पुरता अर्जुनाची अडचण दूर करण्याचा मार्ग स्वीकारला नव्हे. तर अर्जुनाला अशी अडचण पुनः पडूं नये असें सांगण्यास आरंभ केला व म्हणूनच 'गीताशास्त्र' निर्माण झालें.

अर्जुनाचा प्रश्न नीतिविषयक होता व त्यास भगवंतांनीं उत्तर देतांना शास्त्र निर्माण केलें. अर्थात् वाचकांना सांगावयास नको कीं, हें जीवनांतील धर्माधर्म, कर्तव्याकर्तव्य या महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार करणारें नीतिशास्त्र अथवा जीवनशास्त्र आहे.

याबाबत आणखीहि एक महत्त्वाचा भाग सांगितल्याविना या भगवत्कथितशास्त्राचें खरें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येणार नाहीं. अर्जुनानें प्रश्न विचारला 'लढूं का नको?' त्यास उत्तर म्हणून भगवंतांनीं अर्जुनाच्या समोर त्याच्या कर्तव्यांची यादी सोडली नाहीं. 'लढूं कां नको' या प्रश्नास उत्तर म्हणून कोणकोणांत लढा असला तर तो बरा, किती वेळ झाला तर बरा, कसा झाला तर बरा, त्याला अपवाद काय, कोणच्या परिस्थितींत लढाई वर्ज्य, कोणत्यांत ग्राह्य ह्याचा विचार भगवंतानी सांगितला नाहीं. या प्रश्नांची चर्चा प्रामुख्यानें केलीच नाहीं. देव एकदम म्हणतात अशोच्यानन्वशोचस्त्वं——इत्यादि. याचा अर्थ असा आहे कीं, गीता हें विशिष्ट प्रकारच्या स्वरूपाचें धर्म अथवा नीतिशास्त्र आहे. कित्येकांच्या मतें नीतिशास्त्राचें

स्वरूप धर्मशास्त्राप्रमाणें वर्ज्यावर्ज्यांची चर्चा करणारें असावें. पण पाश्चात्य देशांतील ब्रॅडलेसारखे या विषयासंबंधीं लिहिणारे लोक आहेत त्यांच्या मतें अशी वर्ज्यावर्ज्यांची चिकित्सा करीत बसणें हें नीतिशास्त्राचें खरें काम नव्हे. कारण या चर्चेस शेवटच नाहीं. उदाहरणार्थ, भोजन कसें व केव्हां करावें या प्रश्नाचा विचार करूं. प्रथम हा प्रश्न कोणाकरितां आहे हें विचारावें लागेल. ब्रह्मचारी कां गृहस्थाश्रमी, कां संन्यासी, कोणाकरतां? धरलें ब्रह्मचाऱ्याकरितां तर उत्तर 'अमितं ब्रह्मचारिणाम्' असा नियम. पण तो ब्रह्मचारी उतारवयाचा असला तर, अयवा पोटदुखीसारख्या रोगानें ग्रस्त असला तर अथवा प्रकृति चांगली पण आदल्या दिवशीच्या जेवणानें अजीर्ण झालें असेल, तर? असे कितीतरी प्रश्न विचारांत घ्यावे लागतील त्या वेळेला त्या व्यक्तीचें कर्तव्य ठरेल. आतां अशा किती व्यक्तींच्या व किती परिस्थितीच्या कल्पना करणार व शास्त्र लिहिणार? याला शेवटच नाहीं. म्हणून नीतिशास्त्राचें हें खरें कामच नाहीं. याबाबत निर्णय घेणें हें त्या शास्त्राचा गौण भाग आहे.

जसा खरा शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांस कसे कसे प्रश्न परीक्षेत येतील, त्यांचीं कशीं कशीं उत्तरें द्यावयाचीं हें सांगत परीक्षेच्या मांडवापर्यंत जात नाहीं. असे किती प्रश्न व किती उत्तरें देणार? तो विषय शिकविल्यावर नमुन्यादाखल एखाद दोन प्रश्न सोडवून दाखवितो व सांगतो कीं तुला मी सर्व विषय समजावून सांगितला. आतां तुला कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर देतां येईल. शिष्यासहि विषय समजला असला तर तो म्हणतो कीं गुरुजी, कोणताहि प्रश्न येऊं द्या, मी सोडवीन. तसेंच उच्च प्रकारचें नीतिशास्त्र अध्यात्मांत जाऊन जीवाच्या खऱ्या स्वरूपाची ओळख करून देतें, विश्वांत त्याचें स्थान दाखवतें. व एकदां का ही स्वरूपओळख झाली कीं, तो जे जे प्रश्न येतील ते ते उत्तम रीतीनें सोडवूं शकतो.

भगवंतांनीं अर्जुनाला उपदेश करतांना याच पद्धतीचा अवलंब केला. त्याला तो कोण, जगाचें स्वरूप काय, त्याचा व जगाचा संबंध काय, या जगाचा कोणी कर्ता आहे किंवा नाहीं इत्यादि अध्यात्मिक गोष्टी सांगून त्याला असा तयार केला कीं, पुनः एतद्विषयक मोहच उत्पन्न होऊं नये. आपण जी भूमिका याला प्राप्त व्हावी असें म्हणत होतों ती याला प्राप्त झाली असें जाणून देव म्हणतात, 'यथेच्छसि तथा कुरु।' पहिल्यांदां लढणें कर्तव्य असें सांगून शेवटीं त्याला मोकळीक. पण याचा अर्थच असा कीं, भगवंतांनीं त्याला असा तयार केला कीं, त्याच्याकडून भलतें होणारच नाहीं. अशी भूमिका यथार्थ आत्मज्ञानानें होते. असें आत्मज्ञान गीतेंत आहे. म्हणूनच गीतेला 'ज्ञानप्रधानशास्त्र', 'अध्यात्मशास्त्र' असें संत म्हणतात. उच्च प्रकारचें नीतिशास्त्र हें 'तूं असें कर' हें सांगण्यापेक्षां 'तूं असा हो' असें सांगतें. कारण एक तर 'असें कर' यांत नुसती बाह्यकृति होऊं शकते. त्यांत ढोंगाला वाव आहे व दुसरें कृति ही होण्याकरितां आहे. तात्पर्य, उच्च प्रकारचें नीतिशास्त्र हें जीवनविषयक मूल्यांची, जीवनतत्त्वांची चर्चा करून निष्कर्ष काढून देतें. बाकीचा त्यांचा उपयोग यथाप्रसंग. आपल्यासमोर जी गीता आहे, तिचें स्वरूप असेंच आहे. त्यांत वर्ज्यावर्ज्यांच्या चर्चेपेक्षां तत्त्वांची चर्चा आहे. युद्ध केव्हां चांगलें हें एके ठिकाणीं सांगितल्यावर पुढें भगवंतांनीं वर्ज्यावर्ज्यांची फारशी चर्चा केली नाहीं. पुढें क्षत्रियांचे गुण सांगितले. पण त्याबरोबर इतर वर्णांचेहि गुण सांगितले. त्यांचा उपयोग, त्यांस अपवाद वगैरेंची चर्चा केली नाहीं. असें गीतेचे स्वरूप असल्यानें गीता हें अध्यात्मप्रधान अथवा अध्यात्माच्या पायावर उभारलेलें नीतिशास्त्र आहे हें निश्चित होतें. याच दृष्टीनें ज्ञानेश्वर महाराज गीतेला हें 'अध्यात्मशास्त्र' आहे असें म्हणतात.

येथपर्यंतच्या चर्चेवरून गीता हें शास्त्र कोणच्या प्रकारचें ज्ञानेश्वरमहाराज समजत होते तें सांगितलें. हें सांगतांना एका दृष्टीनें गीतेचा उपक्रमच खरोखरी सांगितला, हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आलें असेल.

( २ ) कोणच्याहि ग्रंथाचें तात्पर्य ठरवितांना षड्लिंगें लावून तें काढावें असें मीमांसक म्हणतात.

> 'उपक्रमोपसंहारावभ्यासापूर्वता फलम्।
> अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये ॥

सामान्यतः गीतेचा उपक्रम व उपसंहार सांगितला जातो तो असा कीं, 'अर्जुन मोहानें ग्रस्त झाल्यामुळें शस्त्रसंन्यास करून चालला होता, कर्म टाकत होता. भगवंतांनीं गीता सांगितली. तो कर्म करूं लागला. म्हणून गीता हें 'कर्मप्रधान शास्त्र'. पण ज्ञानेश्वर महाराजादिकांच्या दृष्टीनें उपक्रमाचा येवढाच विचार हा एकांगी अतएव अपुरा विचार आहे.

येथें पहिली एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, अर्जुनाला कर्तव्याचा उपदेश भगवंतांनीं केला, तो नव्या कोवळ्या मुलाला ज्याप्रमाणें खरें बोलावें, खोटें बोलणें पाप आहे असें शिकवितात त्या तऱ्हेचा नव्हे. या युद्धासंबंधींच्या बऱ्यावाईटाची भवति न भवति आधींच झाली होती व चर्चा होऊन असें ठरलें कीं, युद्धाविना मार्ग नाहीं. मगच धर्मराजांनीं अनुज्ञा दिली. अशा स्थितींत अर्जुन युद्धाच्या तयारीनें रणांगणावर आला, रणांगणावर त्यानें एक दृश्य पाहिलें. व्यासांनीं त्याचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे. त्या योगें त्याचें मन पालटलें व तो रणांगण सोडून जाऊं लागला. तेव्हां उपक्रमाचा विचार करतांना त्याच्या मनांत काय आल्यानें तो रणांगणांतून परत चालला हें पाहणें अवश्य आहे. असें पाणी वाहत असावें, मध्येंच काडी पडली म्हणून वाहण्याचें थांबलें, काडी काढून टाकली कीं पुनः पाणी वाहावयास लागावें. असेंच अर्जुनाचें झालें. तेव्हां उपक्रम पहातांना काय आड आल्यानें म्हणजे काय मनांत आल्यानें अर्जुन युद्धाच्या तयारीनें आलेला, शस्त्रसंन्यास करून युद्धभूमि सोडून जाऊं लागला याचा विचार करणें अवश्य आहे.

आतां हें पहातांना ज्यानें उपदेश केला, त्यानें काय विचार केला व उपदेश केला हेंहि पाहिलें पाहिजे. मन पालटल्यावर उपदेश ज्याला केला त्या व्यक्तीची कृति काय झाली, ती व्यक्ति काय बोलली हा गौण भाग आहे. त्याच्या बोलण्याचा, कृतीचा अर्थ उपदेशक काय समजला, उपदेशक कोणत्या योग्यतेचा होता व तो काय हेतूनें उपदेश करीत होता हें पहाणें मुख्य काम आहे.

उदाहरणार्थ, एकादा रोगी वैद्याकडे गेला व सांगूं लागला, 'बवा, डोळ्याची आग आग होते, हाता-पायाची जळजळ होते, वांती होईलसें वाटतें, समोर अन्नाचें ताट आलेलें नको वाटतें!' यावर वैद्य म्हणतो, थांब, तुला तापावर औषध देतो. ताप बरा झाला कीं हें सर्व बरें होईल.' रोगी म्हणतो कीं 'आग आग होते त्यावर औषध द्या हो!' आतां वैद्यानें जो विचार केला तो खरा, कीं रोगी बोलतो तें खरें? वैद्यानें काय औषध दिलें व कशावर दिलें हें जर ठरवावयाचें असेल तर वैद्य काय म्हणतो हें पाहणें अवश्य आहे. तद्वत् गीतेचा उपक्रम पहातांना म्हणजे भगवान् काय बोलले याचें सार ठरवितांना अर्जुनाच्या बोलण्याचा व कृतीचा अर्थ भगवान् काय समजले, त्यांनीं काय हेतु मनांत धरून उपदेश केला हें पहाणें अवश्य आहे. तो लक्षांत घेऊन केलेला उपक्रमाचा विचार हा पुरा विचार होईल.

या गोष्टी जर लक्षांत घेतल्या तर वाचकांना ज्ञानेश्वर-महाराज यांच्या 'नातरि असाध्य देखोनी व्याधी' या वर दिलेल्या ओंवीचें मर्म समजेल. ज्ञानेश्वर महाराजांच्या मतानें भगवंतांनीं अर्जुनाचा कर्तव्याकर्तव्याचा मोह कायम जावा, त्याला शोकाचा प्रसंगच येऊं नये म्हणून 'अध्यात्म' सांगितलें, त्याला ब्रह्मविद्या दिली. ब्रह्म-विद्येविना मनुष्य कायमचा निर्मोह होऊं शकत नाहीं.

गीतेच्या उपसंहाराकडेहि याच दृष्टीनें पहाणें अवश्य आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीं 'नष्टो मोहः' या श्लोकावर फारच उत्कृष्ट व्याख्यान केलें आहे. ते म्हणतात, अर्जुन नुसता 'करेन' असें म्हणत नाहीं, 'तूं म्हणशील तें करीन' 'करिष्ये वचनं तव' अशा हा स्वतः 'कर्तव्य शून्य' होऊन 'तुझी आज्ञा वांचोनि आन नेणें' असा झाला. ह्या ओंव्या इतक्या उत्कृष्ट आहेत कीं, त्या संपूर्ण देण्याचा मोह आवरणें कठिण आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या दृष्टीनें गीतेचें सार त्यांत आहे.

'मग अर्जुन म्हणे काय देवो। पुसताति आवडे मोहो। तरि तो सकुटुंब गेला जी ठावो। घेऊनि आपुला ॥ १५५८ ॥ पासीं येऊनि दिनकरें। डोळ्यातें आंधारें। पुसिजे हें काय सरे। कोणे गांवीं ॥ ५९ ॥ तैसा तूं श्रीकृष्णराया। आमुचिया डोळ्यां। गोचर हेंचि कायिसया। न पुरे तंव ॥ ६० ॥ वरि लोभें मायेपासूनि। तें सांगसी तोंड भरूनि। जें कायिसेनिही करूनि। जाणों नये ॥ ६१ ॥ आतां मोह असे कीं नाहीं। हें ऐसें जी पुससी काई। कृतकृत्य जाहलों पाहीं। तुझेपणें ॥ ६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनगुणें। तो मुक्त जालों तुझेपणें। आतां पुसणें सांगणें। दोन्ही नाहीं ॥ ६३ ॥ मी तुझेनि प्रसादें। लाधलेनि आत्मबोधें। मोहाचे तया कांदें। नेदींच उरों ॥ ६४ ॥ आतां करणें कां न करणें। हें जेणें उठी दुजेपणें। तें तूं वांचूनि नेणें। सर्वत्र गा ॥ ६५ ॥ येविषयीं माझां ठायीं। संदेहाचे नुरेचि कांहीं। त्रिशुद्धी कर्म जेथ नाहीं। तें मी जालों ॥ ६६ ॥ तुझेनि मज मी पावोनि। कर्तव्य गेलें निपटूनि। परि आज्ञा तुझीवांचोनि। आन नाहीं प्रभो ॥ १५६७ ॥'......

आपणचि होऊनि ब्रह्म। सारिजे कृत्याकृत्यांचें काम। मग कीजे कां निःसीम। सेवा जयाची ॥१८-१५७१॥

गंगा सिंधु सेवूं गेली । पावतांचि समुद्र जाली । तेवि भक्ता सेल दिधली । निजपदाची ॥ ७२ ॥ तो तूं माझा जी निरुपचार । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरु । मा ब्रह्मतेचा उपकारु । हाचि मानीं ॥ ७३ ॥ जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ ७४ ॥ तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा । करीन देईं अनुज्ञा । भलतिये विषयीं ॥ १५७५ ॥

तात्पर्य, उपक्रम व उपसंहार जर बघितला, तर युद्धास प्रवृत्त झालेला अर्जुन नातेवाईक पाहून कर्तव्यच्युत होत होता. त्याला 'स्वदेहानाम अर्जुनु परदेहा नाम स्वजनु' ही समजूत अथवा हें अज्ञान घालवणारें 'अध्यात्म' सांगून भगवंतांनीं मोहपार केलें. तो युद्धालाच आलेला होता, युद्ध करूं लागला.

ज्ञानेश्वर महाराजांच्या मतानें उपक्रम उपसंहाराचा विचार केला तर भगवंतांनीं मुख्य अध्यात्म सांगून त्यास कृतकृत्य केलें व युद्धांत घातलें. म्हणून हें अध्यात्मप्रधान नीतिशास्त्र आहे.

( ३ ) यासंबंधानें तिसरी गोष्ट विचारांत घ्यावयाची ती अशी. गीता सांगणारे भगवान् हे योगेश्वर होते हें लक्षांत घेणें अवश्य आहे. योगेश्वर असलेल्या खुद्द भगवंताला अर्जुनाचा संदेह घालविण्याकरतां इतके सतरा अध्याय बोलावयाचें कारण नव्हतें. संजय म्हणतो, भगवान् म्हणजे योगेश्वर अ. १८ श्लो. ७५ व ७८.

शंकराचार्य, ज्ञानेश्वरमहाराज इत्यादि गीतेवरील लिहिणारे जुने ग्रंथकार व श्री अरविंदांच्यासारखे अर्वाचीन ग्रंथकार यांचें म्हणणें असें आहे कीं, भगवान् योगयोगेश्वर असल्यानें एकट्या अर्जुनाचा उद्धार करायला त्यांना कितीसा प्रयास पडला असता ! सामान्य योगी हा शक्तिपात करून आपल्या शिष्याच्या बुद्धींत पालट करूं शकतो. मग योगेश्वर, परब्रह्म असे जे भगवान् त्यांना अर्जुनासारख्याचा जर उद्धार करावयाचा तर त्याला ७०० श्लोक सांगण्याइतका खटाटोप कशाला ! या संताच्या दृष्टीनें अर्जुनाला निमित्त करून भगवंतांनीं 'जगाचें सांकडें फेडलें' आहे.

शंकराचार्य म्हणतात, 'स्वप्रयोजनाभावेऽपि भूतानुजिघृक्षया वैदिकं हि धर्मद्वयं शोकमोहमहोदधौ निमग्नाय उपदिदेश, गुणाधिकैः हि गृहीतः अनुष्ठीयमानश्च धर्मः प्रचयं गमिष्यति इति ॥' स्वतःला प्राप्तव्य असें कांहीं नसतांना, भूतांवर दया करण्याकरितां, गुणांनीं थोर असलेल्या पुरुषांनीं मान्य करून अस्तित्वांत आणलेला धर्म विस्ताराला पावतो असा विचार करून भगवान् श्रीकृष्णांनीं शोक मोहाच्या समुद्रांत बुडणाऱ्या थोर अर्जुनाला उपदेश केला.

ज्ञानेश्वरमहाराजहि असेंच म्हणतातः—

कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ॥ चकोराचेनि निमित्तें । तिन्ही भुवनें संतप्तें । निवविलीं कळावंतें । चंद्रें जेवीं ॥ कां गौतमाचेनि मिषें । कलिकाळज्वरितोद्देशें । पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ॥ तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ॥ १८–१६८६–८९. असे उद्गार ज्ञानेश्वरमहाराजांनीं ठिकठिकाणीं काढले आहेत.

ज्ञानेश्वर महाराजांच्या मतें मोहरूपी सर्पानें अर्जुनाला दंश केलेला पाहून कृपाकटाक्षानें त्या दंशाचा परिणाम दूर करील असा मांत्रिक अर्जुनास लाभला. अर्जुनाचा उद्धार करण्यास एक कृपाकटाक्ष पुरे. भगवंत जर बोलले असले तर ते अर्जुनाकरतां थोडें—जगाकरितांच मुख्य; व म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज आपल्यासमोर जो गीता ग्रंथ आहे हा अर्जुन व श्रीकृष्ण यांचा एक प्रासंगिक संवाद आहे, असें समजत नाहींत. सर्व संशय निरसन करणारे आदिगुरु भगवान् श्रीकृष्ण व जीवाला सहज असणारे दोष ज्याच्यांत आहे असा मोहाला वश होणारा नर अर्जुन यांचा हा संवाद व तो अर्थातच जीवनांतले जे महत्त्वाचे प्रश्न आहेत त्याविषयीं. यामुळें त्यास प्रासंगिक असें स्वरूप थोडेंच आहे. तो सार्वकालिक महत्त्वाचा, जगाच्या कल्याणाचा ग्रंथ आहे.

श्री. अरविंदहि असेंच म्हणतात—

"In the Gita there is very little that is merely local or temporal and its spirit is so large, profound and universal that even this little can easily be universalised without the sense of the teaching suffering any diminution or violation; rather by

giving an ampler scope to it than belonged to the country and epoch, the teaching gains in depth, truth and power."

"What is of entirely permanent value is that which besides being universal has been experienced, lived and seen with a higher than the intellectual vision. I hold it therefore of small importance to extract from the Gita its exact metaphysical connotation as it was understood by the men of the time, even if that were accurately possible."

(४) गीतेचा अधिकारी जो सांगितला त्याचा विचार केला तर गीता हा 'अध्यात्मपरग्रंथ' असाच निष्कर्ष निघेल. गीताकार म्हणतात, अर्जुना, गीता जो अतपस्वी आहे त्याला देऊं नकोस'

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रुषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ १८-६७.

ज्ञानेश्वरमहाराज यावर टीका करतांना म्हणतात, अर्जुना गीता ही तपी आहे त्याला दे.

म्हणोनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा ।
वरि गुरुभक्तीचा पुरा । प्रासादु जो जाला ॥
आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंठा सदा उघडा ।
वरी कलशु चोखडा । अनिंदारत्नांचा ॥
ऐशा भक्तालयीं चोखटीं । गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठीं ।
१५०७-१०

ज्ञानेश्वरमहाराज हे हा जीवनाचा ग्रंथ, म्हणजे गीता ही नुसती वाचायची, समजून घ्यावयाची एवढेंच नव्हे तर जगावयाची असा ग्रंथ आहे असें समजत होते. व म्हणून गीतेच्या अधिकारी 'तपी' 'निष्काम' असावा असें त्यांनीं ठिकठिकाणीं म्हटलें आहे.

(५) गीतेंत उपदेशक भगवान् श्रीकृष्ण व शिष्य अर्जुन यांचीं जीं वर्णनें दिलीं आहेत, तीं अशा स्वरूपाचीं आहेत कीं, श्रीकृष्ण व अर्जुन हे नुसते क्षत्रिय योद्धे नव्हते असें वाचकाच्या लक्षांत यावें. श्रीकृष्ण म्हणजे विवस्वानाला उपदेश करणारा, जगताची स्थिति रहावी एवढ्याकरितां युगायुगाच्या ठिकाणीं अवतार घेऊन धर्माचें परिपालन करणारा, जगाचा प्रभु, 'ब्रह्माची प्रतिष्ठा' असा साक्षात् नारायण.' गीतेंत 'कृष्ण उवाच' नव्हे, श्रीभगवान् उवाच आहे, हें मागें सांगितलेंच आहे. अर्जुन हा या त्याच्या कार्यात सहकारी मित्र. राज्यवैभव प्राप्त होण्याची आशा असतांना पाप होतें म्हणून त्याचा त्याग करणारा, सख्यभक्तीची मातृका असा भक्त. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात तो नर तैसा नारायण. अशी ही श्रीअरविंदाच्या भाषेंत बोलावयाचें तर दैवी गुरु व दैवी शिष्य यांची अलौकिक जोडी जमली व म्हणूनच त्यांतून अमर अशी गीता निर्माण झाली.

या कारणास्तव गीता हा एक भारतांतील प्रसंग न मानतां ज्ञानेश्वरमहाराजांनीं हा वेदांतेंहि पढविता आद्यगुरु व त्याचा शिष्य अर्जुन यांचा हा संवाद आहे असें म्हटलें आहे.

या संवादांत जीवनविषयक शाश्वत मूल्यांचा वस्तुनिष्ठपद्धतीनें विचार केलेला असल्यामुळें हें 'अध्यात्मशास्त्र' आहे, असा म्हणण्याचा या लोकांचा रिवाज आहे.

(६) गीता हें अशा प्रकारचें प्रामुख्यानें अध्यात्मशास्त्र आहे असें जें म्हटलें त्याला एक आणखी पुरावा म्हणून गीतेंतील चर्चेच्या स्वरूपाची कल्पना देणारा पुढील एक प्रसंग सांगून हें प्रकरण आटपूं.

अ. ४ श्लो. १६ यामध्यें भगवान् म्हणतात, 'अर्जुना, कर्म काय व अकर्म काय हें ठरविणें मोठ्या शहाण्यांना सुद्धां कठीण आहे. मी तुला आतां तें कर्म सांगतों कीं, ज्यामुळें तूं अशुभ संसारापासून सुटशील.'

'किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्'॥

कर्म सांगतो असें भगवान् म्हणाले, पण सांगितलें काय—'कर्मणोह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः । अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ ४-१७ ज्ञानेश्वर महाराजांनीं यावर लिहितांना कर्मांची व्याख्या दिली ही गोष्ट वेगळी; पण भगवान् खुद्द एवढेंच सांगतात, 'कर्म म्हणजे काय हें जाणलें पाहिजे, विकर्म म्हणजे काय

हेंहि जाणलें पाहिजे, त्याचप्रमाणें अकर्म हेंहि जाणलें पाहिजे. कर्मांची व्याप्ति गहन आहे.'

तात्पर्य, भगवंतांनीं कर्तव्य कर्म, निषिद्ध कर्म, वगैरे कांहीं सांगितलें नाहीं. ते वेगळाच विचार पुढच्या श्लोकांत सांगतात. 'कर्मण्यकर्म यः पश्येत् अकर्मणि च कर्म यः। स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ ४–१८ ॥ कर्मांतील वर्ज्यावर्ज्य हा भाग न सांगतां कर्मांकडे बघण्याची अशी दृष्टि सांगतात कीं, ज्या योगानें कर्मपाशांतून जीवात्मा मुक्त होईल. याचा अर्थच असा कीं, गीता अध्यात्मप्रधान नीतिशास्त्र आहे.

गीता ठिकठिकाणीं म्हणते, 'असा हो व लढ म्हणजे तुला पाप लागणार नाहीं. 'सर्व भूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥५–७' 'यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते। हत्वाऽपि स इमान् लोकान् न हन्ति न निबध्यते ॥ १८–१७ भगवान् म्हणतात, 'मी कर्म सांगतो पण सुटकेकरतां. 'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसे ऽशुभात्' याचकरितां ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'मोक्षदानीं स्वतंत्र। ज्ञानप्रधान हें शास्त्र ॥' हाच त्यांचा गीतेकडे बघण्याचा दृष्टिकोन.

---

## ११. ज्ञानेश्वरी लिहिण्याचा हेतु

या प्रकरणांतील चर्चा म्हणजे मागील प्रकरणांतील चर्चिलेल्या 'ज्ञानेश्वरांची गीतेकडे बघण्याची दृष्टि' या विषयाचाच एका दृष्टीनें विस्तार आहे, असें म्हटल्यास हरकत नाहीं. गीतेविषयींच्या समजुतीवर तिचा प्रसार करण्याची बुद्धि अवलंबून रहाणार हें उघड आहे.

मनुष्य हा समाजांत निर्माण होतो, समाजांत वाढतो, समाजाविना मनुष्यास स्थिति नाहीं; यामुळें ज्या समाजांत तो जन्मला व वाढला त्या समाजाची तत्कालीन परिस्थिति लक्षांत घेतल्याविना त्या मनुष्याच्या कृतींचें पुरें मूल्यमापन होणार नाहीं. हें जितकें खरें आहे तितकेंच किंबहुना कांकणभर जास्तच हेंहि खरें आहे कीं, त्या मनुष्याचा स्वभावविशेष, त्याचा प्रकृतिधर्म याचा विचार केला नाहीं, तरीहि त्याच्या कृतींचें योग्य मूल्यमापन होणार नाहीं. ज्या काळांत मनुष्यप्राणी निर्माण होतो त्या काळची समाजाची परिस्थिति मनुष्याच्या स्वभावाचा प्रतिक्रियारूप आविष्कार कोणच्या क्षेत्रांत व कोणच्या स्वरूपांत होईल यास कांहीं अंशीं कारणीभूत होईल. पण त्याची प्रतिक्रिया मूळांत काय स्वरूपाची असेल व कोणत्या क्षेत्रांत होणार, हें त्या मनुष्याचा जो स्वभाव असेल त्यावरच बव्हंशीं अवलंबून रहाणार. उदाहरणार्थ–काळ तोच, समाज तोच. दोन्हीहि माणसें बुद्धिमान्, पण जर एकाची प्रकृति साहित्य आणि कला यांच्या विषयींच्या आवडीनें बनलेली असली, तर त्याच्या बुद्धीचा व कृतीचा आविष्कार साहित्य व कला या क्षेत्रांत होईल व दुसऱ्याची प्रकृति धार्मिक असली तर त्याच्या बुद्धीचा प्रवाह ती धर्मक्षेत्रांत आणून सोडील व तेथें उत्कृष्ट धर्मविचारांचें पीक निर्माण करील. विचारवंतांच्या लक्षांत येईल कीं, कोणत्याहि व्यक्तीच्या कृतीचें पुरें मूल्यमापन होण्यास त्या व्यक्तीच्या वेळचा काळ आणि परिस्थिति यांच्या ज्ञानाबरोबरच त्याचा स्वभावविशेषहि चांगला ज्ञात करून घेणें आवश्यक असतें. तो जर पाहिला नाहीं, तर त्याच्या कृतीचें मूल्यमापन यथार्थ होणार नाहीं.

हें लिहिण्याचा हेतु असा कीं 'ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी कां लिहिली ?' या प्रश्नाचा विचार करतांना आमच्या मतें ज्ञानदेव ज्या काळांत जन्माला आले, त्या काळाच्या विचाराबरोबर (१) ते गीतेस कोणच्या प्रकारचा ग्रंथ समजत होते ? (२) गीताज्ञानाच्या प्रसाराच्या योगानें काय होईल अशी त्यांची कल्पना होती ? (३) स्वतः ज्ञानेश्वरींत हें गीतेवरील मराठी टीका लिहिण्याचें कार्य आपण कशाकरतां हातीं घेतलें असें त्यांनीं सांगितलें ? व (४) त्यांचा स्वभावविशेष काय होता ? यांचा विचार करणें अवश्य आहे. या सर्वांचा विचार केला म्हणजे ज्ञानदेवांचा हेतु कोणता असावा हें स्पष्ट होईल.

**(१) ज्ञानदेव गीतेस कोणच्या प्रकारचा ग्रंथ समजत होते ?**—ज्ञानदेव गीता कोणच्या प्रकारचा ग्रंथ समजत होते हें ते ग्रंथाचा विषय, त्याचा अधिकारी व त्याचें प्रयोजन काय सांगतात, शास्त्रीय भाषेंत सांगावयाचें म्हणजे तें या ग्रंथाच्या अनुबंधचतुष्टयाचें काय स्वरूप सांगतात त्यावरून कळून येणार आहे. गीतेच्या अनुबंधचतुष्टयाविषयींची ज्ञानदेवांची काय कल्पना असेल, याची कल्पना मागील प्रकरणावरून सुज्ञ वाचकांस सहजच आली असेल. त्यांच्या मतें गीता अध्यात्मशास्त्र असल्यानें गीतेचें अनुबंधचतुष्टय त्यास सुसंगत असेंच

त्यांनीं सांगितलें आहे. आपण प्रथम ग्रंथाच्या विषयासंबंधीं ते काय सांगतात तें पाहूं.

(अ) गीतेचा विषय—'आतां भारतकमळ–परागु। गीताख्य प्रसंगु। जो संवादला श्रीरंगु। अर्जुनेसीं॥ ना तरि शब्दब्रह्माब्धि। मथियला व्यास–बुद्धी। निवडिलें निरवधि। नवनीत हें॥ मग ज्ञानाग्नि-संपर्कें। कडसिलें विवेकें। पद आलें परिपाकें। आमोदासी॥ जें अपेक्षिजे विरक्तीं। सदा अनुभाविजे संतीं। सोहं-भावें पारंगतीं। रमिजे जेथ॥ जें आकर्णिजे भक्तीं। जें आदिवंद्य त्रिजगतीं। तें भीष्मपर्वी संगती। सांगिजैल॥ अ. १ ओं. ५० ते ५४' 'साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र। संसार जिणे तें हें शस्त्र। आत्मा अवतरवी पैं ते मंत्र। अक्षरें इयें॥' अ. १५ ओं. ५७७॥ 'म्हणोनि जगीं गीता। मिया आत्मेनि पतिव्रता॥' अ. १५–५७६

वरील ओंव्यांतून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, पूर्ण झालेले, विरक्त महात्मे ज्या पदाची सदा अपेक्षा करतात, संत हे ज्याचा नेहमीं अनुभव घेतात व सोहंभावांत पारंगत झालेले ज्या पदाच्या ठिकाणीं निरंतर रममाण होतात असें जें अच्युतानंदघनपद–आत्मा–हा या ग्रंथाचा विषय आहे.

(आ) या ग्रंथाचा अधिकारी—ज्ञानदेवांच्या दृष्टीनें या ग्रंथाचा अधिकारी तोच, कीं जो अर्जुनाच्या पंक्तीला बसण्याच्या योग्यतेचा आहे! म्हणजे राज्यवैभव प्राप्त होण्याची आशा असतांना त्यावर लाथ मारण्याची ज्याची तयारी आहे असा. 'अहो अर्जुनाचिये पांतीं। जे परिसणया योग्य होती। तिहीं कृपा करूनि संतीं। अवधान द्यावें॥ १–६२॥ ते म्हणतात कीं अर्जुना, गीतेलगट मी तुझ्या ठिकाणीं रहावयास आलों, याचें कारण तूं तीन दोषांपासून सुटलास म्हणून. 'जे त्रिविध मळकटा। तूं सांडिलासी सुभटा। म्हणोनि गीतेसी मज वसौटा। जाहलासी गा॥ १५–५८२॥'

या ग्रंथाचें सेवन करण्याची रीत खालीलप्रमाणें आहे. 'जैसें शारदीयेचे चंद्रकळे-। माजि अमृतकण कोंवळे। तें वेंचिती मनें मवाळें। चकोर तलगे॥ तया परी श्रोता। अनुभवावी हे कथा। अति हळुवारपण चित्ता। आणुनियां॥ १–५६ ते ५७॥

ज्यांना असें सेवन करतां येईल ते अधिकारी. आपण जी मराठी टीका केली तिचा अधिकारी कोण हेंहि त्यांनीं स्पष्ट शब्दांत एके ठिकाणीं सांगितलें आहे.

हें असोतु या बोलाचीं ताटें भलीं। वरी कैवल्यरसें वोगरलीं। हीं प्रतिपत्ति मियां केली। निष्कामासी॥ २२॥ आतां आत्मप्रभा नीच नवी। तेचि करूनि ठाणदिवी। जो इंद्रियांतें चोरूनि जेवी। तयासीचि फावे॥ २३॥ येथ श्रवणाचेनि पांगें–। वीण श्रोतयां व्हावें लागे। हें मनाचेनि निजांगें। भोगिजे गा॥ २४॥ आहाच बोलाची वालीफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे। मग सुखेंसी सुरवाडिजे। सुखाचिमाजि॥ २५॥ ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल। एरव्हीं आघवी गोठी होईल। मुकयाबहिरयाची॥ २६॥ परी तें असो आतां आघवें। नलगे श्रोतयांतें कडसावें। जे एथ अधिकारिये स्वभावें। निष्कामकाम॥ २७॥ जिहीं आत्मबोधाचिया आवडी। केली स्वर्गसंसाराची कुरोंडी। तेवांचूनि एथींची गोडी। नेणती आणिक॥ २८॥ जैसा वायसीं चंद्र नोळखिजे। तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे। आणि तो हिमांशुचि जेवि खाजें। चकोरांचें॥ २९॥ तैसा सज्ञानासी तरी हा ठावो। आणि अज्ञानासी आन गांवो। म्हणोनि बोलावया विषय पहाहो। विशेषें नाहीं॥ ३०॥ अ. ६, २२–३०

या ठिकाणीं त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे, कीं परमात्म-सुखाकरितां ज्यांनीं ऐहिक-पारत्रिक भोगावरची आशा संपूर्ण सोडली आहे त्यांनाच ही मेजवानी आहे. कारण ही ब्रह्मरसाची मेजवानी आहे. सामान्य मनुष्यास याचा आस्वाद घेणें कठीण आहे. अशा अर्थाचे कितीतरी उतारे देतां येतील; पण स्थळसंकोचास्तव तो मोह आवरून फक्त एकच प्रसिद्ध उक्ति देऊन हा भाग आटपतों. 'तैसें अध्यात्मशास्त्रीं इयें। अंतरंगचि अधिकारिये। परी लोकु वाक्चातुर्यें। होईल सुखिया॥ १८–१७४१॥ हा ग्रंथ अध्यात्मप्रधान असल्यानें इयला खरा अधिकारी हा अंतरंगच आहे.

(२) गीतेचें प्रयोजन—गीतेच्या ज्ञानाचा प्रसार झाला तर काय होईल? म्हणजे गीतेचें प्रयोजन काय, त्याचें उत्तर पुढील ओंव्यांत आहे. जीवाच्या दुःखाला कारणीभूत होणारें अनादिकालापासून त्याच्या पाठीमागें लागलेलें अज्ञान संपूर्ण नाहींसें होऊन त्यास परमानंदाची प्राप्ति करून देणें हें या ग्रंथाचें फल आहे.

एथ अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ।
या दोहीं केवळ। साधन ज्ञान॥
हें इतुलेंचि नानापरी। निरूपिलें ग्रंथविस्तारीं।
अ. १८ ओं. १२४३–४४.

यावरून ज्ञानदेव गीता हा ग्रंथ अध्यात्मज्ञानाचें स्वरूप सांगणारा आहे, असें समजत होते, ही गोष्ट स्पष्ट होणारी आहे.

> हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीच देईल ।
> सर्वेंद्रिया पोषवील । श्रवणाकरवीं ॥
> अ. १८ ओं. १७४७.

तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव वोठी । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल अंगा ॥
अ. १८ ओं. १६९२.

कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ॥

(२) ' ज्ञानदेव म्हणतात, जीवाला आनंद-साम्राज्यावर अभिषेक करण्यास समर्थ अशी एक ब्रह्मविद्याच आहे. तिच्या योगानें जीवाची दृष्टि उघडली तरच त्याला 'परतत्त्वाचा ' अनुभव येईल. जीवाला अपेक्षणीय असलेलें शाश्वत महासुख दुसऱ्या कोणच्याहि उपायानें मिळणारें नव्हे. या ब्रह्मविद्येविषयीं संस्कृतात पुष्कळ ग्रंथ आहेत; पण संस्कृत सर्वांना कोठें येते ? यामुळें जगांत ब्रह्मविद्येची चर्चा करणारे ग्रंथ असूनसुद्धां बहुजन समाजाच्या दृष्टीनें ते नसल्यासारखेच झाले व त्या आनंदाच्या अभावांत उत्पन्न होणारे दुष्परिणाम समाज भोगूं लागला. ही ब्रह्मविद्येची उणीव नाहींशी व्हावी, आवड व इच्छा असेल त्या प्रत्येकाला ही ब्रह्मविद्या प्राप्त व्हावी व तो कृतार्थ व्हावा या कळकळीनें गीतेचा अर्थ विस्तृत करून मी तो जगासमोर मांडतों. '

तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेंसी विश्वभरूं । आनंदाचें आवारु । मांडूं जगा ॥ फिटो विवेकाची वाणी । हो काना मना जिणी । देखों आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ दिसो परतत्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध सुकाळा— । माजि विश्व ॥
अ. १३ ओं. ११५९–६१.

हीच गोष्ट रूपकानें व आपल्या गुरुजींच्याकडे नम्रभावानें सर्व कर्तृत्व देऊन ज्ञानोबांनीं दोन ठिकाणीं सांगितली आहे.

ज्ञानदेव हे जसे उत्कृष्ट कवि होते त्याप्रमाणें शीलसंपन्न गुरुभक्त होते. आपण कार्य करण्यास उत्सुक झालों, पण गुरूंचा आशीर्वाद असावा म्हणून ते वेळोवेळां ' कृपाभांडवल सोडी ' म्हणून गुरूंची प्रार्थना करतात. तसेंच आपल्याकडून घडणाऱ्या गोष्टींचें श्रेय हें आपल्या गुरुजनांचें आहे असें ते सांगतात.

> 'एथ श्रवणाचेनि द्वारें । तीर्थी रिघतां सोपारें ।
> ज्ञानदेव म्हणे दातारें । माझेनि केलें ॥
> तीरें संस्कृताचीं गहनें ।
> तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें ॥
> रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥
> म्हणौनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें ।
> प्रयागमाधव विश्वरूप पहावें ।
> येतुलेनि संसारासी द्यावें । तिळोदक ॥
> अ. ११ ओं ८–१०

माझे गुरु जे निवृत्तिनाथ त्यांनीं श्रीगीताचिद्गंगेच्या कांठावरचें संस्कृत भाषेचें दाट अरण्य तोडून कोणालाहि या गंगेत स्नान करतां येईल असा ज्ञानेश्वरीरूपी घाट बांधला. आतां कोणीही स्नान करून ' प्रयागमाधवाचें ' खुशाल दर्शन घेऊन संसारांतून कायमचे मुक्त व्हावें.

हीच गोष्ट गुरुपरंपरा सांगून ग्रंथसमाप्तीच्या वेळीं मोठ्या विनम्रभावानें सांगतातः—

> मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव ।
> संपादिलें सप्रभव । श्रीगहिनीनाथा ॥
> तेणें कळिकळितु भूतां । आला देखोनि निरुता ।
> ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥
> ना आदिगुरु शंकरा । लागोनि शिष्यपरंपरा ।
> बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ॥
> तो हा तूं घेऊनि आघवा । कळी गिळितया जीवां ।
> सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ॥
> आधींच तव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू ॥
> जाला जैसा वरिषाकाळू । खवळणें मेघा ॥
> मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थ ग्रंथन मिसें ॥
> वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥
> तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ति आपुलिया ॥
> कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥
> अ. १८ ओं. १७५६–६२

कांहीं ठिकाणीं संतांशीं बोलतांना त्यांनीं असेंहि म्हटलें आहे कीं, ' मी गीताग्रंथ टीका करण्यास घेतला याचें कारण माझे गुरु श्रीनिवृत्तिनाथ यांनीं मला आपली

सेवा करावयास सांगितली व आपणांस गीता आवडते हें मी जाणतों म्हणून '.

> ज्ञानदेव म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्ही ।
> हें पढविलें स्वामी । श्रीनिवृत्तिदेवें ॥
> १२-२४७.

> आणि माझें तंव आघवें । ग्रथन येणेंचि भावें ।
> जें तुम्ही संतीं होआवें । सन्मुख सदा ॥
> १३-३२८.

असे जे उद्गार आहेत त्यांचें मूळ या ग्रंथाकरितां जी सभोवतालची परिस्थिति ज्ञानेशांनीं मांडली आहे त्यांत आहे. श्रोते मंडळी संत होती. त्यांच्याकडून अवधानाची अपेक्षा होती म्हणून ज्ञानदेव संतमंडळींना म्हणतात मी अशा प्रकारें आपली सेवा करावी अशी गुरुजींची आज्ञा म्हणून मी आपणांस हें श्रवण करवीत आहे. अर्थात् हें अमुल्य प्रयोजन आहे.

## ( ४ ) ज्ञानदेवांचा स्वभाव

ज्ञानदेव हे थोर आत्मानुभवी संत. त्यांच्या ग्रंथांतून प्रतिबिंबित झालेला त्यांचा स्वभाव सांगणें थोडें कठीण आहे. तुकारामबोवा हे खेडेगांवची भाषा वापरणारे रागीट संत दिसतात. शान्तिब्रह्म एकनाथ हे मनमोकळेपणानें सर्व सांगणारे दिसतात. नागर भाषा वापरणारे ज्ञानदेव हे निजानंदांत निमग्न असल्यामुळें आपणांस कोण धक्केचपेटे देतो याची खबर नसणारे, असे सत्पुरुष दिसतात. तुकारामबोवा रागावले तर षडीचा प्रयोग करण्यासहि मागेंपुढें पहाणारे नव्हेत. ते म्हणतातचः—

' तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ॥' त्यांच्यांत अलिकडे ज्याला ( चांगल्या अर्थानें ) प्रचार म्हणतात तसा धर्मप्रचार करावा अशी उर्मी होती. तसा आपणांस देवाचा संदेश आहे असे ते सांगतांना आढळून येतात.

एकनाथ 'मला राम झोंप येऊं देत नाहीं, रामायण लिहवतो ' असें सांगतांना आढळून येतात. तर ज्ञानदेव एकेच ठिकाणीं श्रोते संत यांच्या मुखांतून येवढेंच वदवतात,

> ' तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त ' ॥
> १३-८५६

यांतील फरक सूज्ञ वाचक सहज जाणतील. ज्ञानदेव हे अगदीं वरच्या कोटींतले संत होते. श्रीकृष्णाच्या तोंडीं रागाची भाषा घालतांना ते येवढेंच वदवतात, ' परि नेणसींच गांवादिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ॥' ११-६२९

त्यांच्या संपूर्ण ग्रंथांत दोनदांच निकृष्ट अशा शब्द आलेला आहे. यापलिकडे 'कटु' शब्दहि वापरत नाहींत. ' जीवांतळीं आंथरितु आपला जीव,' अशीच त्यांची वृत्ति असावी. ज्या शास्त्राच्या आधारानें आपल्या वडिलांना देहान्त प्रायश्चित सांगितलें, ज्या ब्राह्मणांनीं तें सांगितलें व ज्या वर्णाश्रमधर्मव्यवस्थेमुळें हें झालें व आपल्या सर्व कुटुंबास हाल सोसावे लागले या त्रयी-संबंधानें कोठेंहि रागाचे अथवा अनादराचे शब्द तर नाहींतच; उलट, प्रसंगाप्रमाणें समयोचित शब्दांत त्यांचें गुणवर्णनच ज्ञानेशांनीं केलें आहे. केवढी अपरंपार शान्ति ! आपणास शास्त्रग्रंथामुळें त्रास भोगावा लागला म्हणून त्या ग्रंथाची होळी करणारी माणसें आपण पहातों. यांत कांहीं अमानुष नाहीं. आपणांस त्रास झाला त्याचा प्रतिकार ज्याप्रकारें करतां येईल त्याप्रकारें करणें हें मानवतासुलभ आहे. त्यांत आश्चर्य करण्यासारखें अगर गौण समजण्यासारखें कांहीं नाहीं. आश्चर्यमात्र याच्यांत आहे कीं, दुःखाचे डोंगर सोसावे लागूनसुद्धां ज्याच्यामुळें सोसावे लागतात, त्याविषयीं प्रेमाचीच भावना ठेवणें. यासंबंधांत ज्ञानदेवांचें ' तस्मात् शास्त्रंप्रमाणं ते ' अ. १६-२४ या श्लोकावरचें व्याख्यान अत्यंत मननीय असें आहे.

इतका हा भाग विस्तृत देण्याचा हेतु असा कीं, 'जीवा तळीं आंथरितु आपला जीव,' अशा वृत्तीचा पुरुष एकाद्या जमातीकरितांच पुस्तक लिहील असें वाटत नाहीं. या हेतूनें ग्रंथ लिहिला तर त्याला विशिष्ट परिस्थितींत किंमत आहे. त्याच्या लेखकालाहि कांहीं विशिष्ट दृष्टीनें मान आहे हें खरें. परंतु सर्व जगाची उणीव दूर व्हावी, संपूर्ण विश्वाच्या कल्याणाची तळमळ लागल्यामुळें संपूर्ण जगतास मार्गदर्शन करणारा ग्रंथ लिहावा असें ज्या महात्म्यास वाटतें तो वरील आपल्या जमातीच्या हितापुरता पाहणाऱ्यापेक्षां निर्विवाद श्रेष्ठ. हल्लींच्या काळांत तर ही गोष्ट सिद्ध करण्याचें कारणच नाहीं.

ज्ञानदेवांच्या ठिकाणी ही विश्वकल्याणाची कळकळ केवढी होती हें त्यांनीं ग्रंथ समाप्त झाल्यावर आपल्या गुरुजींच्या जवळ जें पसायदान मागितलें त्यावरून स्पष्ट

होणार आहे. त्यांनीं मागितलेलें पसायदान पुढील-प्रमाणें आहे:—

**पसायदान** :—' आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १७९३ ॥ जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥९४॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९५ ॥ वर्षत सकळ मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळीं । भेटतु भूतां ॥ ९६ ॥ चला कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणीचें गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ९७ ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांहीं सदा सज्जन । सोयरे होतु ॥९८॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरखीं । अखंडित ॥ ९९ ॥

अ. १८–१७९३–९९.

## ज्ञानेश्वरीकालीन परिस्थिति

आतां आपण ज्ञानेश्वरीच्या रचनाकाळीं महाराष्ट्राची परिस्थिति कशा प्रकारची होती हें पाहूं. त्यायोगें ज्ञानेश्वरांचा ज्ञानेश्वरी लिहिण्याचा जो हेतु त्यावर आणखी प्रकाश पडेल.

ज्ञानदेवकालीन महाराष्ट्राची राजकीय, धार्मिक, सामाजिक परिस्थिति कशा स्वरूपाची होती याचा विचार ' श्री ज्ञानदेव–चरित्र, ग्रंथ आणि तत्त्वज्ञान ' या प्रस्तुत लेखकाच्या पुस्तकांत सविस्तर केला आहे. तो वाचकांनीं पहावा. येथें थोडक्यांत तोच विचार मांडला आहे.

ज्ञानेश्वरीच्या रचनाकाळीं यादवांचें राज्य होतें असें ज्ञानेश्वरीच्या शेवटीं ज्ञानेश्वरीचे स्थळ-काळ सांगतांना ज्ञानदेव सांगतात, ' तेथ यदुवंश विलासु । जो सकळ कळा निवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥ १८–१८०४ ॥ ' ज्ञानदेवांच्या वेळेला स्वराज्य होतें. भारतांत मुसलमानांचा प्रवेश झाला होता. पण खुद्द महाराष्ट्रामध्यें त्यांचें राज्य नव्हतें. ज्ञानेश्वरींत म्लेंच्छांचा उल्लेख आहे, पण त्यावरून जर अनुमान काढावयाचें असेल, तर तें असें काढावें लागेल कीं मुसलमानी धर्मांचें हातपाय महाराष्ट्रांत पसरूं लागले नव्हते. अ. १८ श्लो. २२ यांत सांगितलेल्या तामस ज्ञानासंबंधीं लिहितांना ज्ञानेश्वर महाराज लिहितात, ' तरी किरिटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रेंहीन । श्रुति पाठमोरी नग्न । म्हणौनि तया॥ येरीही शास्त्र बटिकरीं। जें निंदेचे विटाळ-वरी। बोलविलेंसे डोंगरीं। म्लेंच्छधर्मांच्या ॥१८–५४९, ५५० ॥ ' विधिनिषेध न मानणारें, निंद्य, श्रुतिबाह्य ज्ञान म्लेंच्छधर्मांच्या डोंगरावर घालवून दिलें आहे. त्याचा अर्थ आमच्या धर्मांस त्याचा स्पर्श नाहीं. यावरून उघड होणार आहे कीं महाराष्ट्रांत म्लेंच्छधर्मांचा प्रसार नव्हता, त्यांचें राज्य नव्हतें व त्यांचा धर्महि महाराष्ट्रास अजून बोचूं लागला नव्हता.

त्या वेळीं वैदिक धर्माला महाराष्ट्रांत जी गळती लागली होती, ती अगदीं विलक्षणत्वानें भिन्न असणाऱ्या महंमदीय धर्मांच्या प्रसारानें नव्हे तर वैदिक धर्मांचें एक अंग जी भारतीय संस्कृति तिची पाखर ज्यांच्यावरून दूर झाली नव्हती अशा भारतीय संस्कृतीच्या कक्षेंतील बौद्ध, जैन, मानभाव, लिंगायत इत्यादि धर्मांच्या प्रसारामुळें. हे सर्व धर्म एका संस्कृतीचीं अपत्यें असल्यानें आज अशी स्थिति प्राप्त झाली आहे कीं, बौद्ध, मानभाव, जैन या धर्मांच्या संबंधीं लिहिणारे कित्येक वजनदार लेखक वैदिक धर्मांशीं यांचा कसा निकट संबंध आहे, हें दाखवीत आहेत. पण ज्ञानदेवांच्या काळची परिस्थिति वेगळी होती. शिवाय, ज्ञानदेवांना प्रिय असणाऱ्या संस्कृतीची व तत्त्वज्ञानाचीं अंगें या धर्मांच्या प्रसारामुळें विलयास जाऊन त्या धर्मांस विकृत स्वरूप प्राप्त होतें काय असें त्यांस वाटूं लागलें असावें; म्हणून त्यांनीं वैदिक धर्मावर आपल्या लिखाणांत जोर देऊन त्याचें रक्षण करण्याचा प्रयत्न केला. येथें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, ज्ञानेश्वरींत म्लेंच्छ, बौद्ध यांचा नांवानें उल्लेख आहे. जैनांचाहि उल्लेख जवळजवळ आहेच. पण मानभाव व लिंगायत यांचा नामनिर्देश कोठेंच नाहीं. याचा अर्थ असा कीं, ज्ञानेश्वरांच्या दृष्टीनें या पंथांना निर्देश-करण्याइतकेंहि वजन त्या काळीं नव्हतें.

ज्ञानेश्वरांनीं वैदिक धर्मांची रक्षा करण्याकरितां प्रयत्न केला; पण तो परधर्मीयांवर हवा तसा हल्ला चढवून नव्हे, तर आपल्याला हवा तसा उदारपणानें उदार अध्यात्म सांगणारा गीता ग्रंथ टीका करण्यास हातीं घेऊन व त्यांतील गीतार्थानें विश्व भरून.

एकदां आगगाडींत बसून ' निद्रेचें सुख न मोडे । मार्ग तरी बहुसाल सांडे । ' अशा सुखासनाचा योग झाल्यावर बैलगाडींत अथवा घोड्यावर बसून कोण प्रवास करील? त्या त्या वाहनांचा उपयोग करूं नका असा

प्रचार करण्याचें कारणच नाहीं ! त्या वाहनांचें महत्त्व आपोआपच कमी होतें. त्याचप्रमाणें स्वधर्म कळला, कीं आपोआपच 'परधर्म सेवा' सुटते. घरींच मनाजोगते खायला मिळाल्यावर हॉटेलें कोण धुंडाळतो ? म्हणून सर्व जीवांना आनंद देणारे, प्रत्येक व्यक्तीपर्यंत देव आणून पोचविणारें असें जिव्हाळ्याचें तत्त्वज्ञान आचांडाल सर्वांच्या कक्षेत येईल असा वैदिक धर्माचा संदेश त्यांनीं मराठींत ग्रंथ लिहून महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यापर्यंत पोचविला. हीच त्यांची वैदिक धर्मप्रसाराची पद्धत.

ज्ञानदेवांचा दृढविश्वास होता कीं, ज्याला आत्मकल्याण करून घ्यावयाचें आहे त्यानें वेदाच्या निरोपाविरुद्ध वागूं नये. ते म्हणतातः—या कारणें बापा । जया आथी आपली कृपा । तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ॥ अ. १६–४५५. जगाला तारणारा वैदिक धर्मच आहे असा त्यांचा दृढविश्वास. 'पै अहिता पासोनि काढिती । हित देउनि वाढविती । नाहीं श्रुती-परौती । माऊली जगा ॥ अ. १६–४६२' त्या वैदिक धर्मांतील उदार ज्ञान उदारपणानें सर्व जगास देणारी भगवद्गीता. म्हणूनच ज्ञानदेवांनीं टीका लिहिण्यास ती पसंत केली. हेतु असा कीं त्यायोगें गीतेचा 'अद्वयानंदाचा' संदेश जगाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत पोंचवून सर्व विश्वास सुखी करावें. 'अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदे भरीन तिन्ही लोक ॥' ज्ञा. अभंग ॥ हाच ज्ञानेश्वरी लिहिण्याचा हेतु.

---

## १२. ज्ञानेश्वरींतील कर्मयोग

ज्ञानदेवांच्या दृष्टीनें भगवद्‌गीतेनें जी साधना सांगितली आहे तिचा आरंभ 'कर्म' आहे. त्यांनीं 'साधनारंभ' कर्म असें म्हटल्यामुळें वाचकांच्या मनांत गैरसमज होण्याचा संभव आहे. येवढ्याकरतां साधनेंत ज्ञानदेव कर्माला केवढें स्थान देतात, याची थोडीशी चर्चा करूं व ज्ञानदेवांनीं मांडलेला कर्माचा विचार काय आहे तो पाहूं.

पाश्चात्य तत्त्वज्ञानाची भारतीय तत्त्वज्ञानाची तुलना केली असतां भारतीय तत्त्वज्ञानाचे जे विशेष दृष्टीस पडतात, त्यांपैकीं एक महत्त्वाचा विशेष म्हणजे भारतीयांची 'कर्माची' कल्पना. एक चार्वाकदर्शन जर सोडून दिलें तर बाकीची सर्व दर्शनें हा कर्माचा कायदा मानतांनाच दिसतात. मग तीं मीमांसेसारखीं सद्दा आस्तिक दर्शनें असोत अथवा बौद्धांच्या सारखीं नास्तिक दर्शनें असोत. बौद्ध हे वेदप्रामाण्य मानीत नाहींत; अथवा सत्स्वरूपाचा आत्मा मानीत नाहींत. कारण त्यांचा अनत्तावाद आहे. पण ते कर्माचा कायदा व तज्जन्य संसाराची म्हणजे 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' ही कल्पना मान्य करतात.

प्रो. मॅक्समुल्लरनें आपल्या Six systems of Indian philosophy या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत कांहीं कल्पना भारतीय तत्त्वज्ञानांच्या सर्व शाखांतून कशा पसरलेल्या आहेत हें एका दृष्टांतानें सांगितलें आहे. एकाच मानस सरोवरांतून जशा सिंधु, ब्रह्मपुत्रादि नद्या निघाल्या व त्या वेगवेगळ्या प्रांतांतून वहात गेल्यानें त्या त्या भूमीचे गुण त्यांच्या पाण्याला जरी लागले असले, तरी मूळ उगमांतील सरोवराचे गुणधर्म त्यांत सर्वांत सारखेच दिसून येतात. तसेंच भारतीयांचें 'मन' हेंच जें एक सरोवर त्यांतून निघणाऱ्या ज्या दर्शनरूपी नद्या आहेत त्यांना उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम या प्रांताप्रमाणें जरी वेगवेगळे रूप आलें असलें तरी आसेतुहिमाचल एकच भारतीय 'मन' असल्यानें या सर्व दर्शनांतून कांहीं कल्पना सारख्याच मान्य केलेल्या आढळतात. अखंडभारताचा हा एक मोठा पुरावा आहे. अशा सर्व दर्शनांना मान्य होणाऱ्या कल्पनांपैकीं 'कर्माचा कायदा व संसार' या कल्पना आहेत.

वैदिक धर्माहून वेगळे असे खिश्चन, महंमदीय वगैरे जे धर्म आहेत ते सुद्धां 'कर्म' मानतात. पण मनुष्य जन्मानंतर एकच पुनर्जीवन मानतात व म्हणून त्यांच्यामध्यें शरीर मृत झाल्यावर पुरण्याची रीत आहे. आमच्याकडील कर्माचा कायदा असें सांगतो कीं जीवाला एका योनींतून दुसऱ्या योनींत जसा त्याचा कर्मभोग असेल त्याप्रमाणें फिरावें लागतें. शास्त्रांत ज्याला संसार म्हणतात तो हाच. ही रहाट गाडग्याप्रमाणें अखंड चालणारी जन्ममरण्याची परंपरा हाच संसार व वेदांतादि शास्त्रें जीवापुढें ज्या संसारांतून मुक्तता होण्याचें ध्येय ठेवतात तो हाच. बायकामुलें, मुलेंटोपलें, घरदार यांस व्यवहारांत संसार म्हणतात. पण ती शास्त्रीय कल्पना नव्हे.

व्यवहाराचाच विचार केला तर संसार शब्द 'मुलगा' 'बायको', 'घर' या परिग्रहांतील एकएकट्या वस्तुलासुद्धां लावलेला आढळून येतो. एकाद्याचा एकुलता एक मुलगा मेला तर त्याचा 'संसार' बसला असें म्हणतात. पण हा 'संसार' शब्दाचा व्यावहारिक उपयोग आहे. येथें हें सांगण्याचें कारण असें आहे कीं, 'संसार' या शब्दाचा शास्त्रीय अर्थ न कळल्यामुळें शास्त्रावर तें संसार टाकून द्या असें सांगतें असे निष्कारणच आरोप केले जातात.

कर्म व त्याच्याशीं संलग्न असलेली संसाराची कल्पना आपणांस सर्व भारतीय दर्शनांचें मूळ जीं उपनिषदें त्यांतून आढळून येते. 'योनिमन्ये प्रपद्यन्ते शरीरत्वाय देहिनः। स्थाणुमन्ये ऽ नुसंयन्ति यथाकर्म यथाश्रुतम्॥ कठ. २–५–७.' कोणी मनुष्य (पुनः) शरीर धारण करण्यासाठीं जननेंद्रियांत प्रवेश करतात. दुसरे कोणी (अत्यंत अधम) मनुष्य (वृक्षादि) स्थावरभावाप्रत जातात. (सारांश,) जसें कर्म केलें असेल आणि जसें ज्ञान मिळविलें असेल, त्यामानानें सर्वांना अवस्था प्राप्त होते.

भगवद्‌गीतेंनेंहि ही कल्पना मान्य केली आहे.

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥ अ. २–२२

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।
मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति॥
शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात्॥
अ. १५–७–८

यं यं वाऽपि स्मरन् भावं त्यजत्यन्ते कलेवरम्।
तंतमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः॥
अ. ८–६

इत्यादि श्लोकांतून जन्ममरणाची कल्पना स्पष्टपणें मांडलेली आहे. त्याचप्रमाणें पुढचा जन्म कर्मानें 'यथाकर्म' ठरणारा आहे असेंहि गीतेंत सांगितलें आहे. उपनिषदांपेक्षां गीतेमध्यें याचा विचार अधिक स्पष्ट व सर्वांगीण झालेला आहे. ज्ञानदेवांनींहि या विचाराला आपल्या टीकेंतून योग्य तें स्थान दिलें आहे.



ज्ञानेश्वरमहाराजांनीं गीतेस अध्यात्मशास्त्र म्हणून म्हटलें असलें व 'येथ अविद्याविनाश हें स्थळ। मोक्षोपादान फळ। यया दोहींसी केवळ। साधन ज्ञान॥ इतुलेंचि नानापरी। निरूपिलें ग्रंथ विस्तारीं।' असें 'मोक्ष देईल ज्ञान' सांगितलें असलें तरी ज्ञानेश्वरांनीं गीतेंतील मोक्षसाधनांत कर्मांला केवढें मोठें स्थान दिलें आहे हें पहाण्यासारखें आहे.

ज्ञानदेवांच्या स्वभावाचा हा विशेष आहे कीं, ते दुराग्रही नाहींत. स्वतः नाथपंथांतले अधिकारी पुरुष असतांना गीतेंत कुंडलिनीयोग सांगितला आहे असा आग्रह धरण्याचा हेकेखोरपणा ते करीत नाहींत. त्यांची समन्वयाची पद्धति वेगळीच आहे. गीतेचा अर्थ जो आपणांस वाटतो तो मांडतांना शब्दांचे अर्थ फिरविणें यासारख्या गोष्टी ते करीत नाहींत. याचें एक ठळक उदाहरण म्हणून देतों. तेराव्या अध्यायामध्यें भगवंतांनीं क्षेत्रक्षेत्रज्ञ-ज्ञेयज्ञान यांचा विचार सांगितल्यावर प्रकृति-पुरुषांचा विचार सांगण्यास पुढीलप्रमाणें आरंभ केला आहे. गी. अ. १३ श्लोक १९

प्रकृतिं पुरुषं चैव विध्द्यनादी उभावपि। विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान्॥ याच्यावर त्यांनीं 'प्रकृति' आणि 'पुरुष' हीं दोन स्वतंत्र तत्त्वें आहेत असें घेऊन गीता त्यांचा उपयोग करीत आहे याची स्वच्छ जाणीव दाखविली आहे. या श्लोकाच्या वरती ते म्हणतात—

मींचि होती परी। हे मुख्य गा अवधारीं। सोहोपी सर्वोपरी। रचिली आम्हीं॥ १४६॥ कढां पावरी कीजे। निराळीं माचु बांधिजे। अथावीं बुडजे। तरी जैसी॥४७॥ एऱ्हवीं अवघेंचि आत्मा। हें सांगों जरी वीरोत्तमा। तरी तुझिया मनोधर्मा। मिळेल ना॥४८॥ म्हणोनि एकचि संचलें। चतुर्धा आम्हीं केलें। जें अदळपण देखिलें। तुझिये प्रज्ञे॥४९॥ पैं बाळ जैं जेवविजे। तैं घांस विसा ठायीं कीजे। तैसें एकाचि चतुर्व्याजें। कथिलें आम्हीं॥ ५०॥ एक क्षेत्र एक ज्ञान। एक ज्ञेय एक अज्ञान। हे भाग केले अवधान। जाणोनि तुझें॥५१॥ आणि ऐसेनही पार्था। जरी हा अभिप्रावो तुज हाता। नये तरी हे

व्यवस्था । एक वेळ सांगों ॥५२॥ आतां चौठायीं न करूं । एकही म्हणोनि न सरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसा पाडु ॥५३॥

यामुळें मूळ गीतेंत कर्माला प्राधान्य असल्यानें ज्ञानदेवांनींहि कर्माला योग्य स्थान दिलें आहे. ज्ञानदेव कर्माला केवढा मान देत होते याचीं दोनचार गमकें सांगून ज्ञानेश्वरींतील कर्मयोगाचें स्पष्टीकरण करूं.

( १ ) कांडत्रयनिरूपिणी गीता आहे असें सांगून गीतेंत कोणकोणचीं कांडें आहेत, हें सांगण्यास ज्ञानदेव प्रवृत्त झाले असतां ते म्हणतातः—'मग अज्ञानें बांधलया । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभु तो तृतीया—। ध्यायीं बोलिला ॥' अथवा अ. १०'तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें' या त्यांच्या उक्तीवरून वरवर पहाणान्यास असें वाटण्याचा संभव आहे कीं, ज्ञानदेवांनीं कर्मास अगदींच लहान स्थान गीतेच्या साधनविचारांत दिलें आहे. पण त्यांच्या एकंदर अध्यायसंगतीचा जर विचार केला तर यापेक्षां वेगळेंच उत्तर निघेल. कारण गीतेच्या अठरा अध्यायांपैकीं साधनचर्चा अशी तेरा अध्याय आहे. पहिला अध्याय शास्त्रप्रवृत्ति प्रस्ताव म्हणून गेला, दुसऱ्यांत ' मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र ' अशी शास्त्रविषयाची गुढी उभारली, सोळावा म्हणजे नवव्यांतील राहिलेला विषय पुरा, सतरावा अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर व अठरावा सर्व गीतेचा उपसंहार. तात्पर्य, गीतेच्या अठरा अध्यायांपैकीं वरीलप्रमाणें पांच अध्याय वजा करून राहिले तेरा अध्याय. यांपैकीं ज्ञानदेव म्हणतात कीं ९ अध्याय कर्माचाच विचार आहे. ते म्हणतात, अज्ञानानें बांधलेल्यास मोक्षपदीं बैसण्याचा मार्ग आक्रमण करावयाचा झाला तर त्याचा साधनारंभ तृतीयाध्यायांत सांगितला. ' जे देहाभिमान बंधें । सांडूनि काम्य निषिद्धें । विहित परी अप्रमादें । अनुष्ठावें ॥ ऐसेनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यावो जो देवें । निर्णयो केला तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ '

पण एवढ्यानें कर्माचें काम सुटलें असें नाहीं. पारलौकिक उत्तमगति ही सुद्धां संसाराचेंच एक अंग आहे असें कळून आलें, ' जें जें कर्मधर्म तें नाशिवंत आहे ' असें सत्समागमानें व सच्छास्त्रश्रवणानें ज्ञान उत्पन्न झालें, म्हणजे संसारी जीवास आपण या अनंत व अफाट अशा संसारांतून मुक्त व्हावें अशी तळमळ उत्पन्न होते व तो या संसारांतून म्हणजे जन्ममरणाच्या कचाट्यांतून सुटण्याचा प्रयत्न करतो. ज्ञानदेव म्हणतात कीं असा बद्ध म्हणजे संसारी असणारा जीव मुमुक्षु या अवस्थेवर आला तर त्यानें कर्म टाकूं नये. विहितकर्मच पण ईश्वरार्पण बुद्धीनें करावें.

आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचें आवश्यक । आचरतां मोचक।केवि होय पां ॥ऐसी अपेक्षा जालिया। बद्ध मुमुक्षुते आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगितली ॥ जे देह वाचा मानसें । विहित निपजे जें जैसें । तें एक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणितलें ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें लागें । आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनी ॥ तें विश्वरूप अकरावा । अध्यावो संपे जंव आघवा । तंव कर्में ईशु भजावा । हें जें बोलिलें ॥ ते अष्टाध्यायी उघड । जाण येथ देवताकांड । शास्त्र सांगतसे आड । मोडूनि बोलें ॥ अ. १८. १४४० ते १४४५ ॥

गीतेंत वेगवेगळ्या प्रकारच्या भजनांचा म्हणजे भक्तीचा विचार आला आहे, पण गीतेंत जी उपासना सांगितली आहे, ती आपल्या विहितकर्माच्या आचरणाच्याच योगानें होणारी आहे, असें ज्ञानेश्वर महाराज स्पष्ट सांगतात. उपासनेकरतां आपलें कर्म टाकण्याची गरज नाहीं. एवढेंच नव्हे तर कर्म करूनच ईशप्रसाद मिळवितां येतो. ते म्हणतातः —

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ तियेपूजे । रिझलेनि आत्मराजें । वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥ अ. १८. ९१७–१८.

( २ ) ही झाली साधकाची स्थिति. आतां प्राप्त पुरुषानें कर्म करावें, का करूं नये ? असा प्रश्न निर्माण झाला असतां ज्ञानदेव काय म्हणतात, तें पहा. ' लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि ॥ अ. ३ श्लोक २० या प्रसिद्ध श्लोकावर लिहितांना ते म्हणतातः—

अर्जुना एवढ्याकरितां प्राप्त पुरुषानें कर्मांविषयीं कळकळ बाळगावी. कारण त्याचा आणखीं एक मोठा उपयोग आहे, तो असा कीं, आपण कर्माचें आचरण करीत असतां अनायासें अज्ञानी जीवांना मार्गदर्शन घडेल. त्यांना कसें वागावें हें कळेल. त्यांच्या रहाणीला वळण लागेल व ते अज्ञानी, योग्य मार्गदर्श-

नाच्या अभावीं जे भ्रष्ट झाले असते, तो अप्रसंग अनायासें टळून जाईल. एवढ्याकरतां प्राप्त पुरुषानें कर्म टाकूं नये, करीत रहावें. ते पुढें स्वच्छ म्हणतात. ' देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असे उरले । लोकांलागी ॥ अ. ३–१५५ जे पुरुष नैष्कर्म्य स्थितीला प्राप्त झाले आहेत त्यांनाहि लोकांच्याकरतां कर्म करणें शिल्लकच आहे. त्यांच्यावर लोकोद्धाराची जबाबदारी असल्यानें अज्ञान्यांना स्वतः कर्म आचरण करून मार्गदर्शन करण्याची जबाबदारी त्यांनीं टाळतां कामा नये. ज्ञानदेवांनीं पुढें एक मोठा उत्कृष्ट दृष्टान्त दिला आहे. ते म्हणतात, आंधळ्याची माळिका भीक मागण्यास निघाली कीं, त्या सर्व आंधाळ्याच्या पुढें एक डोळस असतो. आतां दृष्टि असल्यानें तो डोळस मनुष्य मनांत आणल्यास मेलगाडीच्या वेगानें धांवत जाऊं शकेल. पण तो जात नाहीं. कारण त्यास ठाऊक आहे कीं, जर आपण असे वेगानें चाललों तर मागून येणारी अंधळ्याची माळिका कोलमडून पडेल. तसेंच ज्ञान्यांनीं विचार करणें अवश्य आहे कीं, आपण जरी'कोविधिः कोनिषेधः' या स्थितीस प्राप्त झालेले असलों तरी आपली वागण्याची रीत पाहून येणारा समाज या स्थितींत पात्र झाला आहे कां ! नसेल तर त्यांना घेऊन चालण्याकरतां नैष्कर्म्य स्थितींत प्राप्त झालेल्यांनींहि बद्धाप्रमाणेंच वागून त्यांना मार्गदर्शन करावें. त्यांनीं जर असें केलें नाहीं, तर अज्ञान्यांना इहपरलोकीं कल्याण करणारा धर्म कळणार नाहीं. म्हणून ज्ञाते संत जे आहेत त्यांच्यावर विशेष जबाबदारी आहे. त्यांनीं सत्कर्मांचें आचरण केलेंच पाहिजे. ' मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा । आचरोनी ॥ हां गा ऐसें जरी न किजे । अज्ञाना काय उमजे । तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ॥ एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें । विशेषें आचरावें । लागे संतीं ॥ अ. ३–१५६ ते १६०.

( ३ ) भगवन्तानीं अर्जुनाला गीतारूपी उपदेश केला व शेवटीं 'कच्चिदेतत्श्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ' असा प्रश्न केला. या प्रश्नाचें समर्थन सामान्यतः अगदीं सोपें आहे. सद्वैद्य हा जसा आपल्या औषधयोजनेचें फळ रोग्याच्या चेहऱ्यावर दिसत असूनसुद्धां रोग्याकडून काढून घेण्याकरतां ' कसें आहे, बरें आहे ना,' वगैरे विचारतो; तसेंच अर्जुनाच्याकडून त्याचें कार्य झालें किंवा नाहीं हें काढून घेण्याकरतां त्यास प्रश्न केला असें सहज सांगतां आलें असतें. ज्ञानदेवानीं यापेक्षां सुंदर असें एक कारण ' आम्ही जैसे जया रिती । उगाणिलें कानाचिये हातीं । येरीं तैसेंचि तुम्हां चित्तीं । पैठें केलें कीं ॥ अथवा माझारीं । गेलें सांडी विखुरी ' या ओंव्यांतून सुचवलें आहे. पिठीसाखरेचा पुडा घरीं घेऊन जाणाऱ्या मुलाला पुड्याच्या कागदाला पडलेली बारीक तड न कळल्यामुळें पुड्यांतील साखर रांगोळी-सारखी बारिक गळत चालावी व घरीं पोरगा येईपर्यंत पुडा अर्धा व्हावा,तसें तर अर्जुनाला झालें नाहींनाअसा भगवंताच्या विचारण्याचा एक भाग होता. पण ज्ञान-देवांच्या मतें हेंहि कारण वरवरचेंच आहे. म्हणून ते आणखीं एक महत्त्वाचें कारण देतात. ते म्हणतात:–

पार्थु स्वानंदैकरसें । विरेल ऐसा भेददशे । आणिला येणें मिषें । प्रश्नाचेनि ॥ पूर्णब्रह्म झाला पार्थु । तरि पुढील साधावया कार्यार्थु । मर्यादा श्रीकृष्णनाथु । उल्लंघों नेदी ॥ एऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणे । परि केलें पुसणें । याचिलागीं ॥ एवं करोनिया प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणूनियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ॥ १८,१५४६-४९.

ज्ञानेशांच्या तत्वज्ञानांत ज्ञान व कर्म यांचा सामान्यतः लोक समजतात असा विरोध नाहीं. ते गीता ही संन्यासपर मानीत नाहींत. स्वानंदरसांत बुडून जाऊन अर्जुन कर्तव्यपराङ्मुख होईल, हें देवाला बरें वाटत नव्हतें. आपण उपदेश करण्यापूर्वी तो मोहानें कर्तव्य सोडून चालला होता, आतां ज्ञानानें कर्तव्य सोडून चालला. पण फलदृष्ट्या या दोहोंत फारसा फरक नाहीं. ज्ञानोबांना हें नको होतें, कारण ज्ञान प्राप्त झाल्यावर अर्जुन हा आनंदरसांत बुडून कर्तव्य विसरेल, आणि कर्तव्यपरिपालन होणें तर अवश्य; म्हणून भगवान् त्याला अर्जुनपणावर आणून त्याला कर्म करावयाची आठवण देत आहेत. केवढी ही ज्ञानेशांची कर्म-योगावरील निष्ठा !

( ४ ) आणखी एक गमक श्रीकृष्णाच्या यावर दिलेल्या प्रश्नाला अर्जुनानें दिलेल्या उत्तरांत आहे. अर्जुन देवाला म्हणतो:—

आपणचि होऊनी ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्यांचें काम। मग कीजे कां निःसीम । सेवा जयाची॥.. तो तूं माझा जी निरूपचारु । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरू । मा ब्रह्मतेचा उपकारु । हाचि मानीं ॥ जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ तरी आतां तुम्ही आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा । करीन देईं अनुज्ञा । भलतिये विषयीं ॥

अ. १८, १४७१–७५

ब्रह्मत्वाला पावल्यावर कर्म टाकून स्वस्थ बसणें ही गीतेची अंतिम ध्येयस्थिति नव्हे. गीता ही दिव्यकर्म करीतच रहावें असा संदेश देणारी आहे असें ज्ञानेशांनीं काढलेलें गीतेचें सार आहे.

ज्ञानदेव कर्मांविषयीं इतका आग्रह धरतात, त्याचें मूळ,गीतेंत जें तत्त्वज्ञान घेऊन नीतीचा व्यवहार सांगितला आहे, त्यांत आहे. गीता असें सांगते कीं,देहधाऱ्याकडून कर्मांच्या त्याग संभवतच नाहीं.

नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः

अ. १८–११

यावर लिहितांना ज्ञानेश्वर महाराजांनीं विनोदानें आरंभ केला आहे. ते म्हणतातः– अरे अर्जुना, देहाची मूर्ति प्राप्त झाल्यानंतर आपणांस कर्म करावें लागतें याबद्दल विषाद मानणारा हा गांवढळ आहे. अरे, शरिराला आल्यानंतर कर्म कधीं सुटणार आहे काय ? ज्ञानेश्वर महाराज पुष्कळ वेळेला वेदान्त प्रक्रिया स्पष्ट-पणें न सांगतां ती मनांत धरून दृष्टान्त देतात. त्यांनी दिलेले दृष्टान्त देतों व मग त्याच्या पाठीमागचा थोडासा विचार देतोंः–

ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः––

आणि हां गा सव्यसाची । मूर्तीचि होऊनि देहाची । खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ मृत्तिकेचा वीटु । घेऊनि काय करील घटु । केउता तातु पटु । सांडील तो॥ तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणे आगी । तो दीपु प्रभेलागीं । द्वेषु करील काई ॥ हिंगु त्रासिला घाणी । तरी कैंचे सुगंधत्व आणी। द्रवपण सांडूनि पाणी। केवीं राहे तें ॥ तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जंव असे । तंव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी ॥

ओं. २१८।२२२

ओंव्या इतक्या सोप्या आहेत कीं,त्या सर्वांचें भाषांतर करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात 'मातीचा घडा आहे त्याला मातीचा वीट आला तरी उपयोग काय ? वस्त्राला धाग्याचा कंटाळा आला तरी उपयोग काय ? त्यांची स्थितीच अनुक्रमें मातीवर व धाग्यावर आहे. तसाच कर्मांचा व शरिराचा संबंध आहे.'

शरिराचें उपादान कारण कर्म आहे. ज्या कारणाचा कार्यांत प्रवेश असतो, त्याला कार्यांचें उपादान कारण म्हणतात. त्याहून भिन्न,दुसरें एक निमित्त कारण असतें. एकदां कार्य निष्पन्न झालें म्हणजे तें आपल्या स्थिति-करितां निमित्त कारणावर अवलंबून नसतें. एकदा मडकें तयार झालें व मग कुंभार मेला, चाक मोडलें तरी हरकत नाहीं. मडकें जसें असेल तसेंच राहतें. उपादान कारणाचें तसें नाहीं. उपादान कारणाविना कार्य राहूंच शकत नाहीं. कोणत्याहि अवस्थेंत कार्य हें उपादान कारणावरच अवलंबून असतें. वेदान्तशास्त्राच्या दृष्टीनें शरीराचें उपादान कारण कर्म आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात जन्माला म्हणजेच शरीराला कारण कर्म आहे. 'अगा कर्में जैं उरावें । तैं तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तयातें भोगावया यावें । देहा एका ॥ अ. ९-४०२.

रामगीतेंतील पुढील श्लोक प्रसिद्धच आहे. ' क्रिया शरीरोद्भवहेतुरादृता । प्रियाप्रियौ तौ भवतः सुरागिणः ॥ धर्मेतरौ तत्र पुनः शरीरकं । पुनः क्रिया चक्रवदीर्यते भवः ॥ '

हाच विचार आधुनिक भाषेंत सांगतां येण्याजोगा आहे. कायद्याचे पुढीलप्रमाणें चार प्रकार करतां येतील– (१)जे बदलतां येतात व मोडतां येतात. (२) जे बदलतां येत नाहींत पण मोडतां येतात. ( ३ ) जे बदलतां येतात पण मोडतां येत नाहींत. ( ४ ) जे बदलतांहि येत नाहींत व जे मोडतांहि येत नाहींत.

पहिल्या प्रकाराचें उदाहरण म्हणून मानवनिर्मित कायदे सांगता येतील. हे आपण बदलूं शकतों व मोडूंहि शकतो. दुसऱ्या प्रकारच्या कायद्याचें उदाहरण म्हणून नीतीच्या कायद्याचें देतां येईल. खरें बोलावें हा नीतिनियम आपण बदलूं शकत नाहीं. तो मोडतां येतो हें उदाहरणें देऊन सिद्ध करण्याची गरज नाहीं.

तिसऱ्या प्रकारचें उदाहरण म्हणून उष्णता, थंडी वगैरे-बाबत भौतिकशास्त्रांनीं शोधून काढलेले नियम. हवेंत उष्णता आहे; पण आपण डब्यांत अथवा खोलींत गारवा निर्माण करूं शकतो. पण एकदां गारवा निर्माण झाला म्हणजे त्याचे जे नियम आहेत ते आपण मोडूं शकत नाहीं. चवथ्या प्रकारच्या कायद्याचें उदाहरण म्हणजे निसर्गाचे नियम. ते बदलतां येत नाहींत, मोडतां येत नाहींत. शरिराकडून कर्म होतच रहाणें हा निसर्गाचा नियम आहे. ज्ञाता जरी असला तरी त्याला सुद्धां तो मोडतां येत नाहीं. त्याच्या संघाताकडूनहि कर्म होतच रहातें. कारण कर्म होणें न होणें त्याच्या हातांत नाहीं. ते प्रकृतीच्या हातांत आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'कर्म पराधीनपणें। निपजतसे प्रकृतिगुणें। येरीं धरीं मोकळीं अंतःकरणें। वाहिजे वायां॥ कर्म उत्पन्न होणें न होणें हे माणसाच्या हातांत नाहीं. मनुष्य फुकटच मी करीन अथवा करणार नाहीं म्हणतो. काय करावें व काय न करावें हे त्याच्या हातांत आहे, पण मूळांत करायचें किंवा नाहीं हें हातांत नाहीं. "देखें रथीं आरूढिजे। मग जरी निश्चळा बैसिजे॥ तरी चळा होऊन हिंडिजे। परतंत्रा॥ कां उचलिलें वायुवशें। चळे शुष्कपत्र जैसें। निचेष्ट आकाशें। परिभ्रमे॥ तैसें प्रकृति आधारें। कर्मेंद्रियविकारें। निष्कर्मुहि व्यापारे। निरंतर॥ अ. ३ ५९ ते ६३॥'

हाच विचार अर्वाचीन दृष्टान्त देऊन सांगावयाचा तर पुढीलप्रमाणें सांगतां येईल. एक गृहस्थ पुण्याच्या स्टेशनवर मुंबईकडे जाणाऱ्या आगगाडींत बसले. गाडी चालू झाली. स्टेशन सोडून पुढें गेली व नंतर गाडींतील एक गृहस्थ म्हणूं लागले कीं आपण पुणें स्टेशन सोडणार नाहीं. या त्यांच्या म्हणण्याला काय अर्थ रहाणार? गाडीचें चालणें सुरूच आहे. शिवाजी-नगर, खडकी इत्यादि स्टेशनें येतच रहाणार व हे गृहस्थ गाडींत बसलेले असल्यानें गाडीबरोबर शिवाजी-नगर इत्यादि स्टेशनांच्यांकडे नेले जाणारच! मी पुणें सोडणार नाहीं ही त्यांची घोकणी मात्र चालू राहील.

शरीर हें सुद्धां एका दृष्टीनें आग्निरथच आहे. यांतील अग्नि कां गेला कीं फक्त ओला चिखलच मागें उरला! उपनिषदांमध्यें शरिराला रथ म्हटलेंच आहे. 'आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु। बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च॥' कठोपनिषद्. तात्पर्य, रथांत बसलेल्या मनुष्याला इच्छा असो वा नसो, रथाबरोबर हिंडावेंच लागतें. त्याचप्रमाणें शरिरांत येऊन राहिलेला जो जीवात्मा त्याला शरिराबरोबर कर्म करीतच रहावें लागतें. कारण त्यानें कांहीं करावयाचे नाहीं असें जरी म्हटलें तरी शरिराकडून कर्म होतच राहणार! ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, जीवानें कर्म करावयाचें नाहीं असें जरी ठरविलें तरी त्याच्या स्थूलसूक्ष्मसंघाताकडून होणाऱ्या ज्या क्रिया आहेत त्यापैकीं कोणची बंद पडणार आहे? डोळ्याचें पहाणें थांबणार आहे कां कानाचें ऐकणें थांबणार आहे? पायाचें चालणें थांबेल कीं श्वासोच्छ्वास थांबतील? कां मनाचा संकल्प थांबेल? 'सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें। कीं नेत्रींचें तेज गेलें। हें नासारंध्र बुझालें। परिमळु नेघे। ॥५५॥ नातरि प्राणापानगति। कीं निर्विकल्प जाहली मति। कीं क्षुधातृष्णादि आर्ती। खुंटलिया ॥५६॥ हे स्वप्नावबोधु ठेले। कीं चरण चालों विसरले। हें असो काय निमालें। जन्ममृत्यु ॥५७॥ तात्पर्य, शरिराचें उपादान कारण कर्म असल्यानें शरीर आहे तोपर्यंत कर्म होतच राहणार. डोळ्यांचें बघणें, कानांचें ऐकणें, श्वासोच्छ्वास घेणें इत्यादि कर्में होतच रहाणार! मग थांबणार काय अथवा सोडणार काय? यावाबत ज्ञानदेवांनीं एक मोठा उत्कृष्ट दृष्टांत दिला आहे. कपाळ शरिराबरोबर प्राप्त झालें आहे. आपण त्यावर गंध लावतो म्हणून आपणांस लावलेलें गंध बरें वाटलें नाहीं तर तें पुसून पुनः लावतां येतें. तें पुनः लावलेले गंध पसंत पडलें नाहीं तर पुनः पुसून दुसरें लावतां येतें. तसें कपाळाचें करतां येईल काय? 'आपण लाविजे टिळा। म्हणोनि पुसो ये वेळोवेळां। मा घाली फेडी निडळा। कां करूं ये गा ॥१८-२२३ त्याप्रमाणें आपल्या वाट्याला आलेलें विहित कर्म आपण आरंभिलें तर होणारें असल्यानें त्यास आरंभ करतां येईल अथवा टाकतां येईल. पण देहाच्या रूपानें कर्मच उभें असल्यानें देह आहे तोपर्यंत कर्मास कसें टाकतां येईल! 'मी कर्म करीत नाहीं' असा आग्रह मात्र उरेल. 'मी कर्म करीत नाहीं.' असा निश्चय हेंहि बुद्धीचें कर्मच आहे! कर्म होतच रहाणार! 'विहित स्वयें आदरिलें। म्हणोनि त्यजूं ये त्यजिलें। परि कर्मचि देह आतलें। तें कां सांडील गा॥ जे श्वासोच्छ्वासवेरी। होत

निजेलियाही वरी । कांहीं न करणेंचि परी । होती जयाची ॥ या शरीराचेनि मिषें । कर्मचि लागलें अशेषें । जितां मेलयां न टके । इया रीती ॥' १८–२२४ ते २६

मनुष्याकडून कर्माचा संपूर्णतया त्याग होणें शक्य नाहीं. याचें एक कारण मनुष्यशरिराचें उपादान कारण कर्म ह्याचा एथवर विचार सांगितला.

पण ज्ञानदेवांच्या मतें यास आणखीहि एक महत्त्वाचें कारण आहे व तें म्हणजे समष्टीचा विचार. जगाला कारणच कर्म आहे. अध्याय ४ श्लोक १७ मधील 'कर्मणोह्यपि बोद्धव्यम्' यावर टीका करतांना ते लिहितात.

तरी कर्म म्हणिजे स्वभावें । जेणें विश्वाकारु संभवे । तें सम्यक् आधीं जाणावें । लागे एथ ॥ ओ. ८९

"ज्याच्या योगानें स्वभावतः हें विश्व आकाराला येतें, तें कर्म होय."

कर्माची अशी सामान्य व्याख्या लक्षांत घेतल्यावर व्यक्तीच्या शरीराकडून कर्मत्याग किती असंभवनीय आहे हें सहजच लक्षांत येईल.

म्हणून ज्ञानेशांची अशी सांगी आहे कीं, कोणीहि कर्मत्यागाची भाषा बोलूं नये. उलट जर कर्म होणारच आहे, तर ज्यांत आपलें व आपल्या समाजाचें कल्याण आहे असें आपलें विहित कर्म माणसानें कां करूं नये ! कष्ट होणारच मग स्वधर्माचरण करावें असा त्यांचा आग्रह आहे. 'आणि स्वधर्मुचि पाळावा । परधर्मु तो गाळावा । हा नेमुही पांडवा । न कीजेचि पैं गा । तरी आत्मा दृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां ठाये । आणि करणें तेथ आहे । आयासु आधीं ॥ म्हणौनि भलतिये कर्मीं । आयासु जऱ्ही उपक्रमीं । तरी काय स्वधर्मी । दोषु सांगें ॥

अगा उजूवाटा चालावें । तऱ्ही पायांचि शिणवावे । ना आडरानें धांवावें । तऱ्ही तेंचि ॥ पैं शिळा कां शिदोरिया । दाटणें एक धनंजया । परी जें वाहतां विसांवया । मिळिजे तें घेपें ॥ एऱ्हवीं कणा आणि भुसा । कांडिताही सोसु सरिसा । जेंचि रंधन श्वानमांसा । तेंचि हवी ॥ दधीजळाचिया घुसळणा । व्यापार सरिसेचि विचक्षणा । वाळुवे तिळा घाणा । गाळणें एक ॥

पैं नित्य होम देयावया । कां सेरा आगी सुवावया । फुंकितां धूं धनंजया । साहणें तेंचि ॥ परी धर्मपत्नी वांगडी । पोसितां जरी एकी वोढी । तरी कां अपरवडी । आणावी अंगा ॥

हा गा पाठी लागलां घाईं । मरण न चुकेचि पाहीं । तरी समोरली काईं । आगळें न कीजे ॥ अकुलस्त्री दांड्याचे घाये । परघर रिगालीहि जरी साहे । तरी स्वपतीतें वायें । सांडिलें कीं ॥ तैसें आवडतेंही करणें । न निपजे शिणल्याविणें । तरि विहित बा रे कोणें । बोलें भारी ॥ अ. १८–९३४–४५

'नियतं कुरु कर्मत्वम्' असें त्यांचें आग्रहाचें सांगणें आहे.

### कर्मपाश

कर्म करावें असें सांगणें सोपें आहे. अडचण जी आहे ती कर्म केल्यानें उत्पन्न होणारें जें संसाराचें बंधन —जन्ममरणरूप अखंड परंपरा—त्यांतून सुटावयाचें कसें ही आहे.

यावर ज्ञानदेवांचें उत्तर फारच उत्तम आहे. ज्ञानदेव म्हणतात कीं, कर्म बंधाला कारणीभूत होतें म्हणून जर टाकलें तर कर्म जीवावर जो मोठा उपकार करतें त्याला जीवाला आंचवावें लागेल. कारण, वर सांगितल्याप्रमाणें कर्म टाकल्यानें टाकलें जात नाहीं. आपण आपलें करणीय कर्म केलें नाहीं, तर 'निषिद्धं समाचरन्' या सदरांत नाहीं पण 'अकुर्वन् विहितं कर्म' या सदरांत आपण खास पडूं व मग आपणांस त्याचें अनिष्ट फल भोगावें लागेल. आपणांस हें चुकविणें शक्य आहे हें न कळल्यामुळें मनुष्य कर्मानें प्राप्त होणारें चित्तशुद्धिरूप फळास मुकतो. त्यास मोठा उत्कृष्ट दृष्टांत देऊन कर्म करण्याची हातवटी सुचवतात. ते म्हणतात, 'असें पहा कीं, एका मूर्ख गृहस्थास एकानें उत्तम भारी किंमतीचे हापूसचे आंबे दिले. पण तो मूर्ख असल्यानें त्याला वाटलें, कीं गांवठी आंबा खातांना साल व कोय टाकावयाची असते. हे आंबे भारी किंमतीचे आहेत. तेव्हां यांत टाकण्यासारखें कांहीं नसावें. म्हणून त्यानें आंबा जसाच्या तसाच तोंडांत घालण्याचा प्रयत्न केला. तेव्हां त्या योगानें त्याच्या तोंडांत तो आंबा बुचासारखा बसून आंतला श्वास आंत व बाहेरचा बाहेर अशी त्या मूर्ख मनुष्याची स्थिति होऊन तो मनुष्य आंब्याच्या मधुर रसास मुकता पारखा झाला

येवढेंच नव्हे, तर मृत्युपंथास लावला. कोणी शहाणा मनुष्य जवळ असला तर तो त्याच्या मानेवर बुक्का मारून या संकटांतून त्याला सोडवील व सांगेल कीं अरे, कोणचेंहि भारी किंमतीचें आंब्याचें फळ असलें तरी त्यांत टाकावयाचा भाग असतोच.

आवडतियेहि फळीं । असारें साली आंठोळी ।
त्यासाठीं अवगळीं । फळातें कोण्ही ॥

१८-२०४

जर हें न समजून मारक म्हणून आंब्याचा त्याग केला तर रसास्वादास जसें मुकावें लागेल, तसेंच कर्मांतील आठोळी व साल 'कर्तृत्वमद व फलास्वाद' यांचा त्याग कठीण म्हणून जर कर्मच टाकलें, तर जीवास मुक्ततेचा आनंद कधींच भोगतां येणार नाहीं.

## कर्मांतील बाधक--

ज्ञानदेवांचा म्हणण्याचा आशय असा कीं,कर्म बाधक नाहीं. कर्मांत कर्तृत्वमद व फलास्वाद म्हणजे मी कर्म कर्ता अशी अहंता व कर्मांपासून उत्पन्न होणारें फळ मला प्राप्त व्हावें अशी फलाची इच्छा, हे बाधक आहेत. या योगानें जीव बांधला जातो.

तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफळाचा आस्वादु।
या दोहींचें नांवें बंधु । कर्मांचा कीं ॥ १८-२०५

कर्तृत्वमद व फलास्वाद जीवास फळभोगास म्हणजे धर्माधर्म व तद्द्वारा बऱ्यावाईट गतीस कसे बांधतात, हें ज्ञानदेवांनीं ठिकठिकाणीं अनेक दृष्टान्त देऊन सांगितलें आहे. त्यांपैकीं कांहीं दृष्टान्त पुढें देतो:—

एऱ्हवीं तरी धनंजया । त्रिविधा कर्मफळा गा यया ।
समर्थ ते कीं भोगावया । जे न सांडितीचि आशा ॥
आपणचि विऊनि दुहिता । कीं न मम म्हणे पिता ।
तो सुटे कीं प्रतिग्राहिता । जांवई शिरके ॥ विषाचे
आगर वाइती । ते विकितां सुखें लाभे जिती । येर
निमाले जे घेती । वेंचोनि मोलें ॥ ...

× × × ×

वाटे पिकलिया वृक्षाचें । फळ अपेक्षी तयाचें ।
तैंवि साधारण कर्माचें । फळ घे तया ॥

१८-२१३-१७

कर्तृत्वमद व कर्मफलस्वाद घेणारा कां बांधला जातो, हा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे व एका दृष्टीनें गीतेंतील नैष्कर्म्ययोगाचा तो पाया आहे. शरिराकडून कर्म अखंड होतच राहणार हा सिद्धांत जसा गीतेच्या एक मूलभूत सिद्धांतापैकीं आहे, तसाच आत्मा 'अकर्ता व अभोक्ता' आहे असा गीतेचा सिद्धान्त आहे. पूर्वमीमांसकाप्रमाणें गीता आत्म्यास 'कर्ता' 'भोक्ता' समजत नाहीं. अथवा सांख्यांच्याप्रमाणें अकर्ता पण भोक्ता असें समजत नाहीं. आत्मा हा शरिरांत राहतो असें दिसत असतांना व शरीर व्यापार करीत असतांनासुद्धां आत्मा अकर्ता व अभोक्ताच असतो.

## मूळांत आत्मा अकर्ता

परी अविद्या आपुली देहीं । आहे जै कां ॥ जै कर्तेपणाचेनि थांवें । आत्मा शुभाशुभी धांवे । दृष्टी भेदाचिये राणिवे । रचलीसे जै ॥ तै तरी गा सुवर्मा । बिजावळी आत्मया कर्मा । अपाडे जैसी पश्चिमा । पूर्वेसि कां ॥ नातरी आकाशा कां आभाळा । सूर्या आणि मृगजळा । बिजावळी भूतळा । वायूसि जैसी ॥ पांघरोनि नईचें उदक । असे नदीचिमाजी खडक । परी जाणिजे कां वेगळिक । कोडीची ते ॥

× × ×

पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनिशीं कर्म सिनें ।
१८-२६७-७५

येर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादान। ना अंगें करी संवाहन कर्मसिद्धीचें॥ तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजतीं कर्में ऐशीं । राती दिवो आकाशीं । जियापरी। तोय तेज धूमु । यया वायूसी संगमु । जालिया होय अभ्रागमु । व्योम ते नेणें ॥ नाना काष्ठीं नाव मिळे । ते नावाडेनि चळे । चालविजे अनिळे । उदक तें साक्षी ॥ कां कवणें एकें पिंडें । वेंचितां अवतरे भांडें । मग मवंडिजे दंडें । भ्रमे चक्र । आणि कर्तृत्व कुलालाचें । तेथ काय तें पृथ्वीयेचें । आधारावांचूनि वेंचे । विचारी पां ॥ हेंही असो लोकांचिया । राहाटी होतां आघविया। कोण काम सवितया । आंगा आलें ॥ तैसे पांच हेतुमिळणीं । पांचेंचि इहीं कारणीं । कीजे कर्मलतांची लावणी । आत्मा सिना ॥

अ. १८-३०६-३११

गीतेची जी आत्म्याची कल्पना आहे ती अशी आहे कीं, तो स्थूलसूक्ष्मकारणसंघाताहून वेगळा आहे. आत्मा शरीर नव्हे. तो गुणात्मक नव्हे. शरीर त्रिगुणाचें बनलें आहे आत्मा व शरीर यांत जिवंत आणि मेलेला यांत जितकें अंतर आहे, तेवढें आहे.

अनादित्वात् निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः । शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥

अ. १३–३१

आत्मा हा निर्गुण, निरुपाधि, अनंत, अद्वय व ज्ञानघन असल्यानें त्याच्या ठिकाणीं स्वभावतःच कोणतीच क्रिया संभवत नाहीं. देशपरिच्छेदरहित जें आकाश त्याच्या ठिकाणीं जाणेंयेणें, येणेंदेणें वगैरे क्रिया संभवत नाहींत. मग 'गगनाचेंहि पांघरूण' असणारें आत्मतत्त्व त्या ठिकाणीं कोठलें क्रियाकर्म असणार ?

तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोण्हीच क्रिया । म्हणौनि प्रवाहु तया । नैष्कर्म्यु ऐसा ॥ अ. १८-९७८.

तळ्यात मग तो असवलाचा का असेना त्यावर जसे स्वभावतःच केस नाहींत; त्याप्रमाणें आत्मस्वरूपीं स्वभावतःच कर्म नाहीं. असा आत्मा हेंच आहे आपलें स्वरूप. ज्या सर्व क्रिया होतात त्या आपणाहून भिन्न अशा अधिष्ठान, कर्ता, करण, इंद्रियांच्या चेष्टा व इंद्रियांचीं देवतें यां कारणामुळें होतात. आत्मा साक्षी-सुद्धां नव्हे. तो करीत नाहीं व करवीतहि नाहीं. आपण जर कर्म करणारे असतो तर कर्मांचा अभिमान घेण्यास कांहींच हरकत नव्हती व तीं कर्मेंहि आपणांस बाधक न होतीं. पण कर्मांचा अभिमान घेऊन फलाची अपेक्षा करण्यांत आपण एक प्रकारें ज्ञानदेवांच्या दृष्टीनें चोरीच करीत आहोंत.

इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें पर-कर्म बलात्कारें । आपादी जो ॥ अ. ३–१८५

गुणोत्कर्षाप्रमाणें इंद्रियें आपआपल्या विषयांच्या ठिकाणीं व्याप्रृत होत असतां त्यांचें कर्तृत्व आपण घेणें म्हणजे 'परकर्म' दुसऱ्याचें कर्म मी केलें म्हटल्यासारखें होतें. म्हणूनच चोरी असें म्हटलें. अर्थात् आपण चोरी न करतां मी चोरी केली असें जर एखादा म्हणूं लागला तर फुकटच शिक्षा भोगावी लागते. एकनाथ महाराज म्हणतातः—

जो न करतां चोरी । मी चोर म्हणें राजद्वारीं । तो मारिजे लहान थोरी ।

अथवा ज्ञानदेव म्हणतात दुसऱ्याच्या खांद्यावरचें ओझें आपल्या खांद्यावर घेतलें म्हणजे तो ओझ्यानें जसा मरत होता तसें आपणांसहि मरावें लागेल. तसेंच येथें आहे.

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैःकर्माणि सर्वशः॥ अहंकार-विमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ १ ॥ गी. ३–२७

देखें पुढिलाचें ओझें । जरी आपुलां माथां घेइजे । तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ॥ तैसीं शुभाशुभें कर्में । जियें निफजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ॥ ३–१७७–७८

तात्पर्य, कर्तृत्वाभिमानानें व कर्मफलाशेनें जीवात्मा कर्मफळाच्या खुंटीस बांधला जातो; याचें कारण तो कर्ता नसतांना आपण कर्ता असें समजतो. या विवरणांतच त्याच्या मुक्ततेचें बीज आहे. त्यांनीं हा अभिमान सोडला, कीं तो मुक्तच आहे. व म्हणूनच गीता सांगते कीं, कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून कर्म करावें.

कर्म करण्याची हातवटी—

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानिच । कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ अ. १८।६

म्हणोनि फळीं लाग । सांडोनि देहसंग । कर्में करावीं हा चांग । निरोप माझा ॥

कर्में टाकतांच येत नाहींत. तेव्हां नैष्कर्म्य होणें म्हणजे कर्म टाकणें नव्हे. 'कर्मांत नैष्कर्म्य' असें गीतेचें नैष्कर्म्य आहे. सर राधाकृष्णनन् यांनीं म्हटल्याप्रमाणें Gita preaches not renunciation *of* Karma but renunciation *in* Karma कर्मांचा संन्यास नव्हे. कर्मांत संन्यास गीतेला सांगावयाचा आहे.

गीतेचें वैशिष्ट्य याच्यांतच आहे. जो पाण्यांत पोहण्यास पडला व ज्याच्या नाका–तोंडांत पाणी गेलें, त्याला त्रास झाला. तोंडांत पाणी जाईल, म्हणून पाण्यांत पायच बुडविला नाहीं, तो भ्याड. कुशल तो कीं पोहण्याकरितां पाण्यांत पडला; पण अशा कौशल्यानें पोहला, कीं नाकातोंडांत पाणी जाऊन

शुद्धमरण्याचा त्यांस प्रसंगच आला नाहीं. अथवा मरणाच्या भीतिनें रणांगणावर न जाणारा भ्याड; जाऊन मरणारा कच्चा. शूर व कुशल योद्धा तो कीं, समरभूमीवर जाऊन युद्ध करून एकहि बाण न लागतां युद्ध जिंकतो. वैद्याची गोळी ती कीं, जी रोगी कुपथ्य करीत असतांहि त्याचा रोग निवारण करील. पावसांत उभे राहून अंगाला पाण्याचा थेंब लागूं न देणें, हा पराक्रम. तसेंच कर्मांच्या जंजाळास कंटाळून कर्मच टाकणारा भित्रा; कर्म फलाशेनें करून बऱ्यावाईट गतीस जाणारा अज्ञानी; गीतेच्या दृष्टीनें थोर तो, कीं जो कर्म करतो, पण कर्मफलांत अडकत नाहीं. गीतेची थोरवी याच्यांतच आहे कीं, ती कर्म करून कर्मबंधांतून मुक्त होण्याचा मार्ग शिकविते. गीतेंत पलायनवाद ( Escapism ) नाहीं. गीता ही कर्मास तोंड देण्यास साधकांस समर्थ करते. गीतेचें हेंच वैशिष्टय आहे.

ज्ञानदेव म्हणतात कर्मानेंच कर्मांची शृंखला तोडतां येते. जसें विष हें मारक खरें; पण तेंच रासायनिक पद्धतीनें शुद्ध करून घेतलें, तर पुष्टिकारक होतें. तसेंच कर्म करण्याची हातवटी जाणून कर्म केलें, तर बांधणारें कर्मच मोचक होतें.

तैसें कर्मे कर्मबद्धुता । मुमुक्षु सोडविले पंडुसुता । जैसा रसरीति मरतां । राखिला विषें ॥

तैसी एकें हातवटिया । कर्में केलीं धनंजया । बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होतीं ॥

अ. १८ ओं. १६३–६४

### कर्म करण्याची हातवटी

ती कर्म करण्याची हातवटी म्हणजे **कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून कर्म करणें**. अशीं कर्में कशीं करतां येतात, हें ज्ञानदेवांनीं पुढील ओंव्यांतून दृष्टान्त देऊन फारच उत्तम रीतीनें सांगितलें आहे:–

आतां तेचि हातवटी । तुज सांगों गोमटी । जया कर्मासि किरीटि । कर्मचि रुसे ॥ १६५ ॥ तरी महायागप्रमुखें । कर्में निफजतांही अचुकें । कर्तेपणाचें न ठाके । फुंजणें आंगीं ॥ ६६ ॥ जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहें । ऐसी श्लाघाचि नोहे । तोषु जीवीं ॥ ६७ ॥ का मुद्रा समर्थांचिया । जो एकटु झोंबे राया । तो मी जिणता ऐसिया । गर्वा नये ॥ ६८ ॥ जो कासे लागोनि तरे । तया पोहती उर्मी नुरे । पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ॥ ६९ ॥ तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथा अवसरें । कृत्यजाताचीं निरहरें । सारांजती ॥७०॥ आणि केला कर्मी पांडवा । जो आधी फळाचा यावा । तया मोंहरा हो नेदावा । मनोरथु ॥ ७१ ॥ आधींचि फळीं आस तुटिया । कर्में आरंभावीं धनंजया । परावें बाळ धाया । पाहिजे जैसें ॥ ७२ ॥ पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा । तैसिया फळनिराशा । कीजती कर्में ॥ ७३ ॥ सांडूनि दुधाची टकळी । गोवारी गांवधनें वेटाळी । किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ ७४ ॥ ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी । आपुलिया आपण गांठी । लाहेचि तो ॥७५॥ म्हणोनि फळीं लागु । सांडोनि देहसंगु । कर्में करावीं हा चांगु । निरोपु माझा ॥ ७६ ॥ जो जीव बंधें शिणला । मुटके नाचे आपला । तेणें पुढतपुढतीं या बोला । आन न कीजे ॥ ७७ ॥

ज्ञानेशांना हे दृष्टांत देऊन निष्काम बुद्धीनें व कर्तृत्व न घेतां कर्म कसें करतां येते, हें दाखवावयाचें आहे.

### ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म

आणखी एका दृष्टीनें विचार केला असतां सुद्धां जीवानें कर्माचें कर्तृत्व घेणें चुकीचें ठरणार आहे. गीतेंत गीताकार, विचाराची आणखी एक धारा मांडतांना दिसतात. ती अशी कीं, आपल्याकडून जें कर्म होतें त्यास फळ येणें न येणें हें कर्ता जो प्राणी त्याच्या हातांत नाहीं. फार काय, कर्म पुरें होणें न होणें हेंहि माणसाच्या हातांत नाहीं. त्याला बाह्य परिस्थिति अनुकूल लागते. आपलें कर्म विश्वाच्या चक्रांत बसावें लागतें. तें योग्य रीतीनें बसलें तर त्वरित फळ, नाहींतर फळ येईल तेव्हां येईल. कर्माला आरंभ करणें, व तशी इच्छा करणें एवढेंच माणसाच्या हातांत आहे. व्यक्ति ही सृष्टींतील एक अंश आहे व तिच्या कर्माचें यशापयशरूपी फल हे सृष्टीचा जो चालक आहे, त्याच्या हेतुशीं, तें कर्म मिळतें न मिळतें यावर अवलंबून आहे. गीताकार व ज्ञानदेव या जगाचा चालक ईश्वर आहे, असें मानतात. त्याच्या सत्तेनें व प्रकाशानें हें जगच्चक्र फिरतें आहे असा त्यांचा सिद्धान्त आहे.

दिसता प्रकाश जगा । यया आपणचि जो । १५।५५२

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वं भूतानि यंत्रारूढानि मायया ॥

अ. १८-६१.

ज्ञानेश्वरीमध्यें कित्येक ठिकाणीं मोठा विनोद आहे. त्यांपैकीं एक पुढील प्रसंग आहे.

भगवान् श्रीकृष्ण गीतेच्या अगदीं प्रारंभींच अर्जुनाला म्हणत आहेत. 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्' अ. २—११

यावर ज्ञानदेवांनीं मोठा विनोद केला आहे. भगवान् म्हणतात, 'अर्जुना, आम्हीं आजपर्यंत असें समजत होतों कीं, या जगाचा नियंता समर्थ ईश्वर म्हणून आहे. जन्ममृत्यु ह्या त्याच्या सत्तेनें घडणाऱ्या गोष्टी आहेत. पण ईश्वराच्या जागीं तुझी नेमणूक होऊन तुझ्या हातांत जन्माला घालवयाची व येथून नाहींशीं करावयाची सत्ता केव्हांपासून आली तें आम्हांस ठाऊक नाहीं. पण तुझ्या बोलण्यावरून असें दिसतें कीं, ही सत्ता तुझ्या हातांत आली आहे.'

एथ समर्थु एक आथी । तयापासूनि भूतें होतीं । तरी हें वायांचि काय बोलती । जगामाजीं ॥ हो कां सांप्रत ऐसें झालें । जे हें जन्ममृत्यु तुवां सृजिलें । आणि नाशु पावे नाशिलें । तुझेनि कायी ॥

अ. २ । ९६-९७

म्हणूनच गीतेमध्यें कर्माच्या कर्तेपणाची व फळाची मालकी ईश्वरावर सोपवून आपण मोकळे व्हावें असें सांगितलें आहे. कर्मांत यश आलें तरी देवाच्या मनांत होतें म्हणून, नाहीं आलें तरी त्यांच्या मनांत नाहीं म्हणून. कर्म करणें एवढेंच आपलें कर्तव्य. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ॥ अ. २—४७

म्हणूनच 'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ। ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि॥' अ.२—३८

या विचाराचा प्रपंचांत फार मोठा उपयोग आहे. मनाच्या समाधानीला कारण होणारा असा हा विचार आहे. मनुष्य मोठ्या उत्साहानें व आशेनें कर्म करतो. पण त्याच्या इच्छेप्रमाणें त्याच्या कर्माला फळ येतेंच असें नाहीं. कित्येक वेळां तर अगदीं उलट असेंच फळ आलेलें दिसतें व त्यामुळें मनुष्य निराश होऊन आपलें कर्तव्यकर्म टाकण्यास उद्युक्त झालेला दिसतो. गीता सांगते, कीं मानवांत फळ हमखास निर्माण करण्याची शक्ति नाहीं. मनुष्य हा मर्यादित शक्तीचा आहे. तेव्हां आपण कर्मसिद्धीविषयीं आग्रह न धरतां कर्माचें कर्तृत्व व कर्माची सिद्धि ( फळ ) हें त्याचें त्यास म्हणजे ईश्वराला अर्पण करावें. त्याला अर्पण केलेलें कर्म आपणांस भोग द्यावयास उरत नाहीं; तसेंच त्यालाहि त्रास द्यावयास शिल्लक रहात नाहीं. आपण 'न मम' म्हटल्यानें सुटतों व परमात्मा हा सर्वांचा प्रकाश व शेवट असल्यानें त्यालाहि तीं बाधक होऊं शकत नाहींत. म्हणून जीवानें कर्म ईश्वरास अर्पण करावें असें गीता शिकवते.

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ गी.अ.९-२७

अथवा 'अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ अ.१२-१०

अथवा 'यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः' ॥
अ. १८—४६

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ ९१७

शिवाय, कर्म ईश्वरार्पण करण्यामध्यें समत्व निर्माण होतें. गीतेला जें समत्व सांगावयाचें आहे, तें सर्वांना एकच प्रकारचें कर्म करावयास लावणारें समत्व नव्हे. गीता ही अधिकारभेद जाणते व याचकरितां गीतेंत प्रामुख्यानें गुणकर्मविचार सांगितला आहे. ज्या गुणांची प्रकृति ज्याला मिळाली आहे, त्या प्रकृतीस अनुरुप कर्में त्यानें करावींत. येथें कर्म करतांना जरी भिन्नता दिसली तरी तींच कर्में ईश्वराला अर्पण केलीं कीं समत्व निर्माण होतें. ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः—
जैसा द्विज षट्कर्में करी । शूद्र तयातें नमस्कारी । कीं दोहींसही सरोभरी । निपजे वागु ॥ अ. १६—९६

जसें मोटारींत मोठ्या चाकापासून लहान खिळ्यापर्यंत सर्वांची गरज आहे, त्या सर्वांना मोटारच्या सृष्टींत स्थान आहे व त्यांपैकीं प्रत्येकाला योग्य क्रिया आहे. त्याप्रमाणें या विश्वयंत्रांत प्रत्येक लहानमोठ्या व्यक्तीस स्थान आहे व त्यास कार्य आहे. तें आपल्या वांट्याला आलेलें कार्य त्यानें केलें म्हणजे फळ सर्वांना सारखेंच.

ही समता ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करण्यानें निर्माण होते असें गीता सांगते. गीतेला जसें कर्त्यांच्या बुद्धीचें समत्व सांगावयाचें आहे, तसेंच फळाचेंहि समत्व सांगावयाचें आहे.

ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म केलें कीं कोणतेंच कर्म हलकें अथवा मोठें नाहीं, तें कर्म दिव्यच होतें. श्री. अरविंद म्हणतात, " All work for the Divine is equally divine, manual labour done for the Divine is more divine than mental culture done for one's own development, fame or mental satisfaction,"

ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करणें, हेंच भागवतधर्मांचें प्रधान अंग आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीं अनेक सुंदर सुंदर दृष्टान्त देऊन ह्या ईश्वरसेवेचें मोठें उत्कृष्ट वर्णन केलें आहे. आपण ईश्वराला अर्पण केलेलें कर्म आपणांस फळ द्यावयास कसें उरत नाहीं, याकरितां ते पुढील दृष्टान्त देतातः—

अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे जेविं मुकलीं । तेविं न फळतीचि मज अर्पिलीं । शुभाशुभें ॥

अ. ९-४०२

अग्नींत घातलेलें बीज भाजून निघतें व त्यामुळें त्यांच्यांतील अंकूर जसा जळून जातो तसें भगवंताला अर्पण केलेलें कर्म भर्जितबीजाप्रमाणें पुढच्या जन्माला कारणीभूत होत नाहीं.

## दिव्य अथवा ब्रह्मकर्म व धुरेचा योग

पण अशा रितीनें ईश्वराला कर्मफळ अर्पण करणें हीहि गीतेच्या शिकवणुकीची अंतिम पायरी नव्हे. गीतेला आणखी या ओळींतली शेवटची व महत्त्वाची पायरी सांगायची आहे, कीं ज्या योगानें गीता ज्यास दिव्यकर्म म्हणते अथवा ब्रह्मकर्म म्हणते तें स्वरूप कर्मांस प्राप्त होईल. कर्म ब्रह्म होण्यास मुळांत कर्ताच म्हणजे कर्तेपणाच नाहींसा व्हावा लागतो. व ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करण्याचें अंतरंग हेंच आहे. जोंपर्यंत कर्ता जिवंत आहे; मग तो किती का अंशानें असेना— तोपर्यंत कर्म संपूर्ण नाहींसें होत नाहीं व तें जन्माला कारणीभूत झाल्यावांचून रहाणार नाहीं. कर्ताच नाहींसा होऊन कर्म ब्रह्मरूप होणें ही कर्मयोगांतील अंतिम पायरी आहे.

भगवंताला कर्मफळ अर्पण करणें यांतील उणीव व कर्ता निमून कर्म घडत राहणें ही अत्युच्च पायरी ह्यांतील भेद पुढील दृष्टान्तानें समजून येईल. समजा, एक मूर्ख गृहस्थ रजिस्टर कचेरींत गेला व आपल्या मालकीचें नसलेल्या आपल्यासमोरील घराचें दानपत्र एका गरिबाच्या नांवानें करून देऊं लागला. त्यावर रजिस्ट्रार त्या गृहस्थाला विचारूं लागले, 'अहो, तें घर तुमचें आहे काय ! तुम्ही कसें दान देतां ?' त्यावर तो मूर्ख म्हणाला, 'अहो, माझें नाहीं हें खरें. पण मी जर तें माझ्या नांवानें करून घेत असतों तर दोषी ठरलों असतों. पण तें कांहीं मी घेत नाहीं. तें या गरिबाच्या नांवानें मी दान करीत आहें.' यावर तो रजिस्ट्रार म्हणेल कीं, 'अरे बाबा, दान करावयास दान देण्याच्या वस्तूवर दात्याची मालकी लागते. दान करणें म्हणजे आपली सत्ता काढून घेणें. तुझी सत्ता अथवा मालकी आहे का त्या घरावर ?' तात्पर्य, घरावर आपली मालकी नसतांना घर दान देणें हाहि गुन्हाच आहे. तसेंच कर्मांचे कर्ते आपण असतों तर कर्मफळ भगवंताला अर्पण करण्याचे योग्य अधिकारी ठरलों असतों. पण गीता सांगते कीं कर्मांचे कर्ते आपण नाहींच. मग आपण ईश्वराला कर्मफळ अर्पण करणारे कोण ? आपण जर कर्म ईश्वराला अर्पण केलें तर त्याचा अर्थ कर्मांचें कर्तृत्व अथवा मालकी पत्करली व तेवढ्या अंशानें तें कर्म आपणांस फळ दिल्याशिवाय रहाणार नाहीं.

म्हणून गीतेला जी उच्च पायरी सांगावयाची आहे ती ज्ञानदेवांनीं अ. १२ श्लोक ११ 'अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ' या श्लोकावर सांगितली आहे. ते म्हणतातः—

ना तरी हेंहि तुज । नेदवे कर्म मज । तरी गा तूं भज । पांडुकुमरा ॥ बुद्धीचां पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं । मातें बांधणें किरीटी । दुवाड जन्हीं ॥ तरि हेंही असो । सांडी माझा अतिसो । परि संयतिसीं वसो । बुद्धी तुझी ॥ आणि जेणें जेणें वेळें । घडती कर्में सकळें । तयांचीं तियें फळें । त्यजितु जाय ॥ वृक्ष कां वेली । लोटतीं फळें आलीं । तैसीं सांडीं निपजलीं । कर्में सिद्धें ॥ परि मातें मनीं धरावें । कां मज उद्देशें करावें । हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं ॥

खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजीं पेरिलें । कर्म मानी देखिलें । स्वप्न जैसें ॥ अगा आत्मजेचां विषीं । जिवु जैसा निरमिलाषी । तैसा कर्मी अशेषीं । निकामु होई ॥ वन्हीची ज्वाळा जैसी । वायां जाय आकाशीं । क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजीं ॥ अ. १२. ओ. १२५–१३.

अर्जुना, तूंहि कर्मांची अहंता घेऊं नकोस व मलाहि अर्पण करूं नकोस. जिकडे कर्मफळ जावयाचें तिकडे जाईल. वस्तुस्थिति अशी आहे कीं, जें जें कर्म निर्माण होतें, तें परमात्म्याच्या सत्तेनें होतें व त्याची सिद्धीहि त्याच्याच चक्रांत बसल्यानें होते. तात्पर्य, आपण जर अहंता घेतली नाहीं, तर कर्म कृष्णार्पण आपोआपच होतें. आपण अहंता घेऊन तें कृष्णार्पण होण्याच्या आड येतों. हें कसें घडतें, यासंबंधीं एक दृष्टान्त देण्यासारला आहे.

कित्येक वेळेला असें घडतें, कीं मनुष्य आपलें घर दुसऱ्या मनुष्यास कांहीं किंमतीस विकत देतो. विकत देत असतांना अथवा विकत घेतांना कोणालाच या घरांतील भिंतींत नाण्याचा हंडा पुरला आहे हें ठाऊक नसतें. पुढें कालान्तरानें घराची भिंत पडली व नाण्यांचा हंडा सांपडला. तर कायदा सांगतो कीं, तें भूमिगत धन जरी आपणांस आपल्या मालकीच्या घरीं सांपडलें तरी तें सरकारांत नेऊन द्यावें लागतें. न देईल तो गुन्हेगार. तसेंच या कर्मांच्या बाबतींत आहे. याचा सर्व मालकी हक्क परमात्मरूपसरकारकडे आहे. आपण जर त्यावर मालकी सांगितली नाहीं, तर तें आपोआप सरकारजमाच होईल. दुसरीकडे जाणार नाहीं. आपण मात्र ज्यावेळीं हक्क सांगतों त्यावेळीं वर म्हटल्याप्रमाणें चोरी करतों व म्हणून भोग भोगतों. तुकारामबोवा हीच गोष्ट पुढील अभंगांत उत्तम रीतीनें सांगतातः—

आहे तें सकळ कृष्णासी अर्पण । न कळतां मन दुजें भावीं ॥ १ ॥ म्हणऊनि पाठीं लागतील भूतें । येती गवसीत पांचजणें ॥ २ ॥ ज्याचें त्या वंचलें आठव न होतां । दंड या निमित्ताकारणें हा ॥ ३ ॥ तुका म्हणे काळें चेपियला गळा । मी मी वेळोवेळां करीतसे ॥ ४ ॥ ज्ञानेश्वर महाराज अशा रीतीनें कर्ताच नाहींसा होऊन निर्माण होणारा फलत्याग ज्या योगांत घडतो त्यास धुरेचा योग म्हणतात. 'अर्जुना हा फलत्यागु, आवडे कीर अलगु । परि योगामाजीं योगु । धुरेचा हा ॥' १२–१३४

या योगाच्या सहाय्यानें जो कर्मफलत्याग होतो त्या योगें जन्ममरणपरंपरा खुंटते, व साधक जन्ममरणाच्या चक्रांतून सुटतो. 'येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न विरूढे । एकचि वेळे वेळुझाडें । वांझें जैसीं ॥ तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे । किंबहुना येरझारे । चिरा पडे ॥ अ. १३५–१३६

ज्याला 'ईश्वरार्पण' कर्म म्हणतात, त्याचें अंतरंग हेंच आहे. 'मत्कर्मपरमोभव' या श्लोकावर लिहीत असतांना ज्ञानोबाराय लिहितातः—'माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ म्हणवी तरी सुभटा । उजू कां अव्हांटा । रथु काई खटपटा । करितु असे ॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति । इयें वोझीं नेघे मती । अखंड चित्तवृत्ती आठवीं मातें ॥' अ. १२०–२२

माळी ज्या आळ्याला लावील त्याकडे कुरकुर न करतां आनंदानें पाणी जसें जातें, अथवा रथ हा घोडे जिकडे नेतील तिकडे जातो, तसा ईश्वर जें घडवील तें होईल, कर्ता करविता तो आहे या बुद्धीनें, जें जें प्राप्त होतें ती ईश्वराची इच्छा असें समजून, ईश्वरांत नाहींसें होऊन कर्म करीत राहणें हा मोठा योग आहे व भक्तीची ही उत्तम स्थिति आहे. तुकारामबोवा या स्थितीलाच थोर भक्ति म्हणतात.

हेचि थोर भक्ति आवडते देवा । संकल्पाची माया संसाराची ॥ १ ॥ ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २

कर्ता ब्रह्मरूप झाला, कीं त्याच्या संघाताकडून घडणारें कार्य ब्रह्मरूप होतें. कर्मयोग पर्वताचें हें शिखर आहे. गीतेला या दिव्य कर्मापलिकडे सांगावयाचें नाहीं.

ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ गी. ४–२४ ॥ म्हणऊनि ब्रह्म तेचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ॥ ४–१२१ ॥

सतराव्या अध्यायांत 'ॐ तत्सदिति निर्देशो' या २३ श्लोकापासून व्याख्यानास आरंभ करून 'सद्भावे

साधुभावेच' या २६ श्लोकांअखेर ॐ तत्सत् या नामाचें साह्य घेऊन केलेल्या कर्मानें कर्ता ब्रह्मरूप कसा होतो, हें भगवंतांनीं दाखविलें आहे, असें ज्ञानेश्वर महाराजांनीं सांगितलें आहे. २५ व्या श्लोकावर व्याख्यान करतांना ते म्हणतातः—

आतां ओंकारें आदरिलें। तत्कारें समर्पिलें। इया रिती जया आलें। ब्रह्मत्व कर्मा॥ तें कर्म कीर ब्रह्माकारें। जालें तेणेंही नसरें। जे करीतेणेंसी दुसरें। आहे म्हणौनि॥ मीठ आंगें जळीं विरे। परी क्षारता वेगळी उरे। तैसें कर्म ब्रह्माकारें। गमे तें द्वैत॥ आणि दुजें जंव जंव घडे। तंव तंव संसारभय जोडे। हें देवो आपुलेंनि तोंडें। बोलती वेदें॥ म्हणोनि परत्वें ब्रह्म असे। तें आत्मत्वें परियवसें। सच्छब्द या रिणादोषें। ठेविला देवें॥ अ. १७ ओं ३७३-७७

तात्पर्य, गीतेला जो योग सांगावयाचा आहे तो हा. 'योगः कर्मसु कौशलम्' हेंच. कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून कर्म करणें याचा अर्थही कर्ता अंतीं ब्रह्मरूप होऊन त्याच्या संघाताकडून कर्म घडत रहाणें. गीतेला जो संन्यास सांगावयाचा आहे तोही हाच.

**ज्ञानप्रधान संन्यास**—ज्ञात्याच्या संघाताकडून अशीं कर्में घडत रहातात म्हणून तो खरा संन्यासी. गीतेला आश्रम-संन्यास सांगावयाचा नाहीं. अर्जुनाची एका दृष्टीनें तशा प्रकारच्या संन्यासाची तयारी होती. तो मी निःशस्त्र प्रतिकार करीन म्हणून रथ सोडून खालीं उतरलाच होता. भगवान् त्याला 'उठीं घे धनुष्य बाण' म्हणून उपदेश करीत आहेत. अर्थातच् गीता ही आश्रम-संन्यास सांगणारी नव्हे. किंबहुना मुक्तीकरितां त्याची गरज नाहीं असें सांगणारी आहे. साधन करण्याला सभोंवताली बरी परिस्थिति निर्माण करावी असें वाटत असेल तर साधकानें हवातर तो घ्यावा. पण गीतेचा आश्रम–संन्यासाविषयींचा आग्रह नाहीं. ज्ञानेश्वर महाराज तर एके ठिकाणीं म्हणतात—

गृहस्थाश्रमाचें वोझें। कपाळीं आधींची आहे सहजें। कीं तेंचि संन्यासवा ठेविजे। सरिसें पुढती॥ अ. ६–५०

त्यांचे अभंग उगाच संन्यास घेणाऱ्याची स्पष्टपणें कानउघाडणी करतात.

खऱ्या त्यागाचें वर्म न समजतां घरादिकांचा बाह्य त्याग करणाऱ्यास ज्ञानदेव पुढीलप्रमाणें उपदेश करतातः—

घरदार वोखटें त्यजूं म्हणसी तरी शरीरायेवढें जाड। मायबाप वोखटीं त्यजूं म्हणसी तरी अहंकार अविद्येचें कोड। बंधु सखे त्यजूं म्हणसी तरी कामक्रोधमदमत्सर अवघड। बहिणी पाठींच्या त्यजूं म्हणसी आशा तृष्णा मायेचें बंड रया॥ १॥ त्यजिलें तें काय कासया म्हणिजे कांग या मजपाशीं ऐसें। जया भेणें तूं जासी वनांतरा तें तंव तुजचि सरिसें रया॥ २॥...

अवघीच तुज जवळी घुमघुमित असतां वरीवरी मुंडिसी कां करिसी विटंबना। सहज संतोषें असोनि जैसा तैसा परि तो सद्गुरु पाविजे खुणा। आपुलें आश्रमीं स्वधर्मी असतां सर्वत्र एकुचि जाणा। बापरखुमादेवि-वरुविठ्ठल इतुकिया साठीं नेईल वैकुंठभुवना॥ ४॥

आलियाचा संतोष गेलियाची हानी। नाहीं त्याचा अतिसो वेचे त्याची कहाणी। ऐसें संकल्प विकल्प देहीं वरीवरी मुंडलिया होय कायी। तरी बहुरूप्याच्या ठायीं काई काई नटु नसे रया॥ १॥ आधीं भितरू दंडावा पाठीं बाहिजु मुंडावा। नाहीं तरी योग मंडिवा कां करिसी रया॥ २॥

असे त्यांचे पुष्कळसे अभंग आहेत. ज्ञानदेवांचें या बाबतींत ज्ञानेश्वरीमध्यें स्पष्ट विचारणें आहे कीं, 'जयाचें ऐहिक धड नाहीं। तयाचें परत्र पुससी काई?' ज्याला या लोकांत प्रपंच चांगला करतां येत नाहीं, स्वधर्माचरण करून मानानें रहातां येत नाहीं त्याला पुढें मोठा लाभ होणार आहे, हें कशावरून जाणावें? ज्ञानेश्वरमहाराजांना 'दृष्टादृष्ट विजय' आणून देणारा धर्म हवा. कर्ममार्ग हा असा इहलोकीं अभ्युदय, परलोकीं उत्तमगति व अंतीं निःश्रेयस प्राप्त करून देणारा असल्यानें कर्म टाकूं नये असें ज्ञानदेवांचें सांगणें आहे.

भोग तोडून काय फायदा? शरीर जगणें अवश्य आहे, म्हणून त्यांनीं एके ठिकाणीं या भोगत्यागाबद्दल फारच उत्कृष्ट लिहिलें आहे. भगवान् अर्जुनाला म्हणतातः—

तुवां शरीरपरां नोहावें। कामनाजात सांडावें। मग अवसरोचित भोगावे। भोग सकळ॥ आतां कोदंड घेऊनि हातीं। आरूढ पां इये रथीं। देई आलिंगन

वीरवृत्ती । समाधानें ॥ जगीं कीर्ति रूढवी । स्वधर्माचा मानु वाढवी । बया भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे॥

अ. ३ ओं. १८८–९०

गीता ही 'मी माझें' अथवा 'प्रकृतीशीं तादात्म्य' याचा त्याग सांगते.

कर्मांचा त्याग सांगत नाहीं. कारण कर्मयोगांत संन्यास संकल्पाचा आहे व खरा संन्यासीहि तोच कीं ज्याचा संकल्प सुटला. म्हणून संन्यास व कर्मयोग एकच.

आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥

अ. ५ ओं. २०.

जेथ संन्यासिला संकल्प तुटे । तेथेचि योगाचें सार भेटे ॥ अ. ६ ओं. ५३

कर्म कधींच थांबत नाहीं, असा गीतेचा सिद्धान्त आहे. यामुळें विहित कर्म करावेंच असा गीतेचा आग्रह आहे. 'कुरुकर्मैव' असें गीता म्हणते.

पण गीता दुसरीहि एक महत्त्वाची गोष्ट दृष्टीआड करूं शकत नाहीं व ती ही कीं 'कर्म सुटतें.' 'निर्मानमोहाः' या अ. १५ श्लोक ५ वरील आपल्या अप्रतीम व्याख्यानांत ज्ञानदेव म्हणतात—

'फळली केळी उन्मळे । तैसी आत्मलाभें प्रबळें । जयाची क्रिया वाळेंवाळें । गळती आहे.' आमचें शास्त्र कर्म टाक असें सांगत नाहीं, पण तें नाकारितहि नाहीं कीं आत्मलाभाच्या स्वादांत कर्म सुटतें. जसें केळीला लोंगर लागले कीं तिची वाढ खुंटली, ती उपटून टाकावयाची. तसें प्रबळ आत्मलाभ का होऊं लागला कीं सर्व भाव ध्यानाला खेंच देतात व मग आपोआपच क्रिया बंद पडते.

पण जातां जातां येथें एक लक्षांत ठेवण्यासारखी महत्त्वाची गोष्ट आहे, कीं ज्ञानेश्वर महाराज हे ज्यांचें असें कर्म सुटतें ते तरले असेंच समजतात. पण जे असे स्वतः तरून उन्मत्त पिशाचवत् रहातात त्यांच्यापेक्षां नैष्कर्म्य स्थितीचा अनुभव घेऊन जगाकरतां कर्म करीत रहातात त्यांना 'वडिल' म्हणतात. ते म्हणतात:—

परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त । अनुष्ठानें जगा देत । वडिल जे ॥ अ. १७ ओं. ८६

प्राप्त पुरुषानें कर्म करून जगांस मार्गदर्शन करावें असा ज्ञानदेवांचा आग्रह आहे. ही गोष्ट याच प्रकरणाच्या प्रारंभी सांगितली आहे. ते म्हणतातः— 'विशेषें आचरावें । लागे संतीं'. त्याचा थोडा अधिक विचार 'आत्मसाक्षात्कार' या प्रकरणांत करूं.

गीतेला जो अभिप्रेत संन्यास आहे, तो ज्ञानप्रधान संन्यास आहे. 'तेथें कर्म उरत नाहीं' म्हणजे स्थूल-सूक्ष्मसंघाताकडून कर्म घडत नाहीं, असें नव्हे. तें तर ज्ञाता जरी झाला, तरी त्याच्या संघाताकडून होतच राहणार! ज्ञान झालें व शरिराचें कर्म थांबलें असें जर होत असेल, तर तें ज्ञान रोगांत जमा होईल. मनुष्य जसा पटकी, ताप, क्षय यानें मरतो, तसा ज्ञान हें मनुष्याच्या मृत्यूस कारणीभूत होणारा रोग होईल. ज्ञानदेव असें समजत नाहींत. ते म्हणतात, ज्ञान झालें, मुक्त झाला तरी त्याच्या संघाताकडून पूर्वसंस्काराप्रमाणें कर्म होतच रहातें.

यस्य नाहंकृतोभावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वाऽपि स इमान्लोकान् न हन्ति न निबद्धयते ॥ अ. १८ श्लोक १७,

या श्लोकावरील ज्ञानराजांची टीका बहारीची आहे. ज्ञाता 'मुक्त' कसा होतो, वगैरे सांगून झाल्यावर त्याच्या संघाताकडून कर्म कसें होत रहातें, हें ज्ञानदेव दृष्टान्त देऊन सांगतातः—

ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधीं जाहला वावो । तऱ्ही देहा जंव निर्वाहो । तंव आथी कर्में ॥ ४२२ ॥ वारा जरी वाजोनि वोसरे । तरी तो डोल रुखीं उरे । कां सेंदें द्रुति राहे कापुरें । वेंचलेनी ॥ २३ ॥ कां सरलेया गीताचा समारंभु । न वचे राहिलेपणाचा क्षोभु । भूमि लोळोनि गेलिया अंबु । वोल थारे ॥ २४ ॥ अगा मावळलेनि अर्कें । संध्येचिये भूमिके । ज्योतिदीप्ति कौतुकें । दिसे जैसी ॥ २५ ॥ पैं लक्ष भेदिलियाहीवरी । बाण धांवेचि तंववरी । जंव भरली आथी उरी । बळाची तया ॥ २६ ॥ नाना चाकीं भांडें जालें । तें कुलालें परतें नेलें । परी भ्रमेचि तें मागिलें । भोंवडिलेपणें ॥ २७ ॥ तैसा देहाभिमानु गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जालें तें अपैसया । चेष्टवीच तें ॥ २८ ॥ संकल्पेंवीण स्वप्न । न लावितां दांगीचें वन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें ॥ २९॥

आत्मयाचेनि उद्यमेंवीण । तैसें देहादि पंचकारण । होय आपणयां आपण । क्रियाजात ॥ ४१० ॥

ज्ञानानें संचित व क्रियमाण जळतें. पण ज्या प्रारब्धानें शरिरास सुरवात झाली आहे तें जोंपर्यंत शिल्लक आहे तोपर्यंत शरीराकडून कर्म होतच रहातें, शरीर पडत नाहीं. जसा अंगांत वेग भरलेला असला म्हणजे बाण लक्ष्याला जाऊन भिडल्यावरहि पुढें चालतोच. तसें पूर्वजन्माचा संस्काररुप वेग आंत भरलेला असल्यानें मुक्ताचें शरीर हालतच रहातें. 'मुक्ताचें देह तैसें । हालत संस्कारवशें.' फरक होतो तो असा कीं आंतली समजूत पार बदलून गेलेली असते. पूर्वीचे त्याचें संघाताशीं असणारें तादात्म्य ज्ञानानें जळून गेल्यानें संघाताकडून कर्म होत असतांना ज्ञात्याच्या ठिकाणीं तीं 'मी करतो' ही बुद्धि नाहीं म्हणून त्याला पाप व पुण्य नाहीं.

म्हणोनि तयाची बुद्धी । नेणें पापपुण्याची गंधी । गंगा मिनलिया नदी । विटाळ जैसा ॥१८-४५०

तात्पर्य, गीता जो संन्यास सांगते तो कर्माचा, नव्हे हें कर्म व मी तें करतो या बुद्धीचा आहे. या बुद्धी-रहित कर्म ते निष्काम कर्म. या बुद्धीचा संपूर्ण त्याग त्याच वेळेला होईल कीं ज्या वेळेला विमल आत्मज्ञानानें साधक क्रिया करणारा जो स्थूलसूक्ष्म संघात आहे त्याहून वेगळे आहोंत असें जाणील. उदाहरणार्थ ज्या हातानें पैसा दिला तो मी आहे अशी समजूत आहे तोपर्यंत हातानें पैसा दिला असतां मी कर्ता नव्हे हें कसें पटेल ? हातानें पैसा देण्याची क्रिया होत असतां मी देत नाहीं हें त्याच वेळेला पटेल कीं जेव्हां हात मी नाहीं, त्याहून मी वेगळा आहे. हें पटेल. एऱ्हवी झोपेंत सुद्धां निष्कामकर्म होतें असें मानावें लागेल. कारण झोपेंत लोळला, बडबडला तर त्या ठिकाणीं मनुष्याचें तादात्म्य नसतें. झालें निष्काम कर्म ! गीतेला यापेक्षां वेगळें निष्कामकर्म सांगावयाचें आहे. ज्या संन्यासानें 'निष्कामकर्म' घडतें तो संन्यास 'ज्ञानप्रधान' असावा लागतो. गुरुकृपेमुळें प्राप्त झालेल्या आत्मज्ञानानें, कर्माची जन्मभूमि जी प्रकृति त्याहून आपणांस जो अत्यंत वेगळा समजतो तो संन्यासी.

या संन्यासाचें वर्णन अठराव्यांतच दोन ठिकाणीं मोठें उत्कृष्ट आलें आहे.

(१) ते सत्त्वशुद्धिसाह्याकारें । गुरुकृपामृततुषारें । सामिग्रलेनि बोधें बोसरे । द्वैतदैन्य ॥ तेव्हां जगदा-भासमिषें । स्फुरे तें त्रिविध फळ नासे । येथ भोक्ता भोग्य आपैसें । निमालें हें ॥ घडे ज्ञानप्रधानु हा ऐसा । संन्यासु जयां वीरेशा । तेचि फळभोग सोसा । मुकलेगा ॥ आणि येणें कीरसंन्यासें । जैं आत्मरुपीं दिठी पैसे । तैं कर्म एक ऐसें । देखणें आहे ॥ तैसें गा संन्यासें येणें । मूळ अविद्येचीचि नाहीं जिणें । मा तियेचें कार्य कोणें । घेपे दीजे ॥ २५९-६६

येथें फळत्याग होतो, कारण ज्ञानांत फळ (जग) राहतच नाहीं. व मग भोग्यच नाहीं, तेव्हां भोक्ता भोग त्रिपुटी संपली. निष्काम झाला.

पुढच्या एका प्रसंगांत दुसऱ्या बाजूनें संन्यास सांग-तात. ज्ञानानें कर्माची जन्मभूमि प्रकृति, आपणाहून दूर म्हणजे वेगळी समजल्यामुळें कर्तृत्व बुद्धि संपली. हा खरा संन्यास. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात 'संन्यास' करावयाचा असला तर असा खरा करा. उगीच करणीचा करूं नका.

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः । बुद्धि-योगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ अ. १८-५७

याकारणें गा तुवां इया । सर्व कर्मां आपुलिया । माझां स्वरूपीं धनंजया । संन्यासु कीजे ॥ परी तोचि संन्यासु वीरा । करणीयेचा झणें करा । आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ॥ मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मां वेगळें । माझां स्वरूपीं निर्मळें । देखिजेल ॥ आणि कर्माची जन्मभोये । प्रकृति जे कां आहे । तें आपणयाहूनि बहुवे । देखसी दुरी ॥ तेथ प्रकृति आपणया । वेगळी नुरे धनंजया । रूपेंवीण कां छाया जयापरी ॥ ऐसेनि प्रकृतिनाशु । जालया कर्मसंन्यासु । निफजेल अनायासु । सकारणु ॥ १२६०-६६

तात्पर्य, गीतेचा संन्यास हा कर्माचा नव्हे. 'तो मी मानें' याचा सकारण ( अज्ञानासह ) न्यास आहे. असा ज्ञानानें ज्याला संन्यास घडतो, तोच 'समाधिस्थ'.

गीतेची 'समाधि'—

गीता ज्याला समाधि म्हणते, ती व्यवहारांत ज्याला 'समाधि' म्हणतात त्यापेक्षां वेगळी आहे. व्यवहारांत

एकादे संन्यासी गतप्राण झाले, कीं जमिनींत खड्डा खणून त्यांत त्यांना पुरतात. म्हणून स्वामी समाधिस्थ झाले, म्हणजे खड्डा खणला व त्याचे मृत शरीर त्यांत पुरलें असा अर्थ होतो.

गीता अशी मृतदेहाची समाधि सांगत नाहीं. एवढेंच नव्हे तर जिवंत असतांना हातपाय काष्ठासारखे ताठून निचेष्ट पडून राहणें यालाहि फारशी किंमत देत नाहीं. वर ज्या स्थितीला संन्यास म्हटलें त्यालाच गीता समाधि म्हणते.

यासंबधीं गीतेंत अर्जुनानें भगवंताला प्रश्न केला आहे.

अर्जुन उवाचः—स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव । स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेतकिम् ॥ २–५४. यावर पुढील ५५ ते ५८ श्लोकांत भगवंतांनी जें उत्तर दिलें तें फारच उत्कृष्ट आहे. भगवान् म्हणतात, अर्जुना स्थितप्रज्ञ तो ' कीं जो हरिखशोक-रहितु । आत्मबोधभरितु ' होऊन कर्म करीतच रहातो. जो नाक दाबून कुंभक करून घटकाभर निचेष्ट पडतो त्याला किंमत किती देणार ? श्रीएकनाथ तर म्हणतात हें काम खेळ करून दाखविणाऱ्या गारोड्याचें आहे. खरी समाधि, कर्म होत असतांनाच होते. जे लोक कर्माचरणीं समाधि होत नाहीं असें म्हणतात ते अडाणी, त्यांची बुद्धि ठकली. अर्जुनाला भगवंतांनीं समाधि दिली आणि त्याला युद्धांत घातला. ते म्हणतात:—

कर्माचरणीं समाधी । एक म्हणती नघडे कधीं । ते पावले नाहीं निजात्मबोधीं । जाण त्रिशुद्धी विदेहा॥४१६॥ ताटस्थ्या नांव समाधि । म्हणे त्याची ठकली बुद्धि । ते समाधि नव्हे त्रिशुद्धि । जाणावी नुसधी । मूर्छा आली ॥ १७ ॥ ताटस्थ्यापासूनि उठिला । तैं तो समाधीस मुकला । तेव्हां एकदेशी भावो आला । मंदही या बोला । नमानिती सत्य ॥१८ ॥ समाधी आणि एकदेशी । बोलतां बोलणें ये लाजेसी । सत्य मानी ते शब्दपिशी । शुद्ध स्वरूपासीं अनोळख ॥ १९ ॥ येथें प्राचीन अति समर्थ । ते मूर्छा आणोनि करी तटस्थ । वांचूनि चालते बोलते समाधिस्थ । जाणपां निश्चित वसिष्ठादिक ॥२०॥ पाहे पां देवर्षी नारदू । विनोदें नमोडे समाधि बोधू । याज्ञवल्क्याचा समाधि संबंधू । ऋषी प्रसिध्दू परीक्षा केली ॥ २१ ॥ स्वरूप देखोनि मूर्छित जाहला । तो आपणियां आपण तरला । स्वयें तरुनि जन उद्धरिला । तो बोध प्रकाशिला शुकवामदेवा ॥ २२ ॥ या लागीं समाधि आणि व्युत्थान । या दोन्हीं अवस्थांसहित जाण । बुद्धि होय ब्रम्हार्पण । अखंडत्वें पूर्णपरम समाधी ॥ २३ ॥ अर्जुना देऊनि निजसमाधी । सवेंचि घातला महायुद्धीं । परी तो कृष्ण कृपानिधी । ताटस्थ्य त्रिशुद्धी नेदीच स्पर्शो ॥ २४ ॥ एकनाथी भागवत अ. २, ४१६–२४

गीता साधनाची अशी मौज आहे कीं, कर्मानें आरंभ करून शेवट नैष्कर्म्य प्राप्तींत.

न कर्मणामनारंभात् नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । अ. ३ श्लो. ४

पण या नैष्कर्म्यांकरतां संन्यासाची ही गरज आहे. संन्यासाविना नैष्कर्म्य नाहीं.

नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति॥ अ. १८–४९

गीता अशा प्रकारचा ज्ञान-प्रधान संन्यास सांगत असल्यानें ज्ञात्या पुरुषाचें वर्णन ती विरोधात्मक शब्दांनीं करूं शकते.

> कर्मण्यकर्म यःपश्येदकर्मणिच कर्म यः ।
> स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तःकृत्स्नकर्मकृत् ॥
> अ. ४–१८

कर्मांच्या ठिकाणीं जो अकर्म पाहतो व अकर्मांच्या ठिकाणीं कर्म पाहतो तो मनुष्यांत शहाणा, तोच योगी व त्यानेंच सर्व केलें. वर झालेल्या चर्चेवरून या श्लोकाचा अर्थ वाचकांच्या लक्षांत येईलच. वेगळा सांगण्याचें कारण नाहीं.

सिद्धि, संन्यास, समाधि, नैष्कर्म्य हीं नांवें एकाच स्थितीचीं आहेत. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे ज्ञानराजांच्या दृष्टीनें द्वैतसंबंधशून्य, क्रियारहित, ज्ञानघन अशी जी आत्मस्थिति तिचींच हीं वेगवेगळीं नांवें आहेत. त्या स्थितीला नैष्कर्म्य म्हणतात. कारण स्वभावतःच तेथें कोणचीच क्रिया नाहीं.

तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया । म्हणोनि प्रवादु तया । नैष्कर्म्य ऐसा ॥ १८–९७८

कर्ता, कर्म व कार्य ही त्रिपुटीच मूळांत नाहीं. कारण ही त्रिपुटी अविद्याजन्य व तिचा या स्वरूपीं मागमूसहि नाहीं. आत्म्याचें अकर्तृत्व मागें सांगितलेंच आहे. अशा ठिकाणीं कर्म संभवत नाहीं म्हणून नैष्कर्म्य हा त्या आत्मस्थितीवर ' आळ ' आला आहे.

जसें सूर्याला 'तमारी' म्हणतात. पण सूर्याची व अंधकाराची कधीं लढाई झाली होती व तींत सूर्यानें अंधकाराचा कधीं नायनाट केला होता ? हें कधीं घडलेंच नाहीं. कारण सूर्याच्या ठिकाणीं रात्र तर नाहींच पण रात्रसापेक्ष दिवसहि नाहीं. त्याच्या घरीं अंधकराची वार्ता सुद्धां नाहीं. अशा स्थितींत सूर्याला जसें 'तमारी' म्हणतात. हा त्याच्यावर जसा आळ; तसाच आत्मस्थितीवर नैष्कर्म्य हा आळ आहे. आत्मा कधीं कर्मांत गुरफटला होता तर तो त्यांतून मुक्त व्हावा ? शरीर क्रिया करीत आहे असें दिसत असतांना सुद्धां निर्गुणत्यामुळें आत्मा 'अकर्ताच' आहे. या अर्थानें त्याला नैष्कर्म्य म्हणतात.

तेथें कर्मांची जाणीवहि नाहीं. म्हणून कर्मसंन्यास याच अवस्थेला समाधि म्हणतात. कारण कर्म होत असतांनासुद्धा या आत्मबोधसंपन्न पुरुषाचें 'समत्व' बिघडतच नाहीं. गीतेला 'समत्वं योग उच्यते' यांतून जो योग सांगावयाचा तो हाच. यालाच 'सिद्धि' म्हणतात. कारण याच्या पलिकडे जीवाला प्राप्तव्य नाहीं. देवळाच्या कामाचा शेवट कळसानें. त्याच्यावर आणिक कांहीं नाहीं; (कळसापरौतें कांहीं । प्रासादिक काम नाहीं॥). गंगेची धांव समुद्रापर्यंत, पुढें नाहीं; अथवा सोनें शुद्ध होत होत ज्ञानेश्वरांच्या भाषेंत बोलावयाचें तर सोळा या दरापर्यंत, अर्वाचीन भाषेंत सांगावयाचें तर शंभर नंबरापर्यंत. त्यांत एकशें एक नंबर नाहीं.

देवळाचिया कामा कळसु । परम गंगेसी सिंधु प्रवेशु ।
नाना सुवर्णशुद्धि कळसु । सोळावा जैसा ॥ १८–९८१

त्याप्रमाणें जीव हा साधन करीत करीत या आत्मानुभवापर्यंत आला, कीं 'सा काष्ठा सा परागतिः' म्हणून याच स्थितीला परमसिद्धि म्हणतात.

तियेपरते कांहीं । निपजणें आन नाहीं । म्हणोनि म्हाणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ११–९८३

ज्ञानोबांच्या मतें हेंच ज्ञानाचें टोंक व भक्तीचा तरी शेवट हाच. ज्ञानेश्वर महाराजांनीं कर्म, भक्ति, ज्ञान यांचा या भूमिकेवरून मोठा उत्कृष्ट असा समन्वय केला आहे.

**नैष्कर्म्य होण्याचा मार्ग**—या परमसिद्धिपर्यंत साधक कसा पोहोंचतो, हें ज्ञानराजांनीं प्रसंगोपात ठिकठिकाणीं दाखविलें आहे; पण हा सर्व विचार अ. १८–४५ 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः' या श्लोकापासून व्याख्यानाला आरंभ करून अ. १८–४९ 'नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति' याअखेर फारच उत्कृष्ट रीतीनें मांडला आहे.

शास्त्रसंस्कार झालेल्या साधकाला ठाऊक असतें, कीं कर्म टाकून नैष्कर्म्य होतां येत नाहीं, म्हणून तो विहित कर्म करीत राहतो. पण तें विहित ठरवावयाचें कसें हा प्रश्न आहे. यावर ज्ञानदेवांचे म्हणणें असें आहे कीं शास्त्र जाणणारा साधक आपलें कर्म ठरवितांना आपल्या वर्णाला व आश्रमाला शास्त्रांनीं सांगितलेलें उचित असें कर्म पाहून तें करतो; पण तें कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून ईश्वरार्पण बुद्धीनें करतो. अशा रीतीनें त्यानें निष्काम कर्म केलें कीं कर्म न करण्यानें येणारा अपाय चुकला. चंदनाचा केलेला असला तरी तो खोडाच हें जाणून जसा शहाणा मनुष्य त्यांत पाय अडकून घेत नाहीं, त्याप्रमाणें काम्यकर्म दिसावयास चांगलें; पण जन्मांतच गुंतविणार म्हणून तें तो करीत नाहीं. निषिद्धाची तर गोष्टच नको. कारण, तो साधक जाणतो कीं या योगें आपणांस अधोगति मिळेल. नित्य, नैमित्तिक, काम्य, निषिद्ध व प्रायश्चित्त अशीं पांच प्रकारचीं कर्में आहेत. त्यांपैकीं काम्य व निषिद्ध यांचा तो अजिबात त्यागच करतो. जर पातक चुकून घडलेलें असलें, तर त्याच्या निराकरणार्थ सांगितलेलें प्रायश्चित्त कर्म करतो. त्याचप्रमाणें 'ज्ञाताज्ञातदोषपरिहारार्थ' गंगास्नान व भगवन्नामस्मरण हीं साधारण प्रायश्चित्तें करतो. प्रायश्चित्त हें दोष निवारणार्थ. पण तो आपल्या वांट्यास आलेलीं नित्य नैमित्तिक कर्में पण तीहि ईश्वरार्पण बुद्धीनें करतो. अशा युक्तीनें तो कर्म करीत असल्यानें तो मोठ्या उच्च अशा भूमिकेला प्राप्त होतो. कर्म करीत असल्यानें 'अकुर्वन्'चा दोष गेला. निषिद्ध व काम्य नाहींतच म्हणून उच्च व अधोगति देणारें क्रियमाण उत्पन्नच होत नाहीं. आतां तो नित्य नैमित्तिक करतो. पण तें ईश्वरार्पण बुद्धीनें करीत असल्यानें तें त्याला भर्जितबीजासारखें उत्तर जन्माला कारणीभूत होत नाहीं. तात्पर्य उत्तर जन्माला कारणीभूत होणारें ज्याला क्रियमाण म्हणतात, तें कर्म त्याच्याकडून होतच नाहीं, अशा रीतीनें नवीन जन्माचें कारण संपतें.

ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलें हें कर्म हीच ईश्वराची परम सेवा. या संबंधांत त्यांनीं लिहिलेल्या ओंव्याहि फारच सुंदर आहेत. ते म्हणतात, आपलें कर्म न टाकतां ईश्वरसेवा होते. पतिव्रता स्त्री ही पतीबरोबर संसार करतांना दिसते. पण तिचा तो संसार नव्हे. ते महान् तप आहे. तसेंच आपण आपलें कर्तव्य करीत राहिलों, तर ईश्वराची मोठी सेवा होते. ज्ञानदेव म्हणतातः--

हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य ओलावा । आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ॥ ९०६ ॥ पैं आघवाचि भोगेंसी । पतिव्रता क्रीडे प्रियेंसी । कीं तयाचि नामें जैसीं । तपें तियां केलीं ॥ ७ ॥ कां बाळक एकी मायें । वांचोनि जिणें काय आहे । म्हणौनि सेविजे कीं तो होये । पाटाचा धर्मु ॥ ८ ॥ ना ना पाणी म्हणौनि मासा । गंगा न सांडितां जैसा । सर्वतीर्थे सहवासा । वरपडा जाला ॥ ९ ॥ तैसें आपुलिया विहिता । उपायो असे न विसंबितां । ऐसा कीजे कीं जगन्नाथा । आभारु पडे ॥ १० ॥ अगा जयाचें विहित । तें ईश्वराचें मनोगत । म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ११ ॥ पैं जीवाचें कसीं उतरली । ते दासी कीं गोसांविण जाली । सिसें वेंचितया मविली । वहीं जेवीं ॥ १२ ॥ तैसें स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परम सेवा । येर ते गा पांडवा । वणिज करणें ॥ १३ ॥ अ. १८ ओं. ९०६–१३

सर्वात्मक ईश्वराला ही स्वकर्मकुसुमांची पूजा फार आवडते. त्या पूजेनें संतुष्ट झालेला ईश्वर त्याला ' वैराग्यसिद्धिरूपी ' प्रसाद देतो. ईश्वराची खरी कृपा ती हीच. ही का झाली कीं देवाचा वेध लागतो व प्रपंचाचा मोह सुटतो. तो साधक ईश्वरानुग्रहानें असक्तबुद्धीच्या भूमिकेवर येऊन पोंचतो. या भूमिकेवर आलेल्या साधकाचा स्नेह कोठेंच गुंतत नाहीं. त्याच्या वासना थंड होऊन जातात व कालान्तरानें ' भोगून प्राचीन संपलें, नवीन क्रिय-माण नाहीं ' अशी कर्मसाम्य दशा झाली म्हणजे त्यास श्रीगुरु ' अपैसा ' भेटतो. व तो त्याच्यांत जी थोडी उणीव राहिलेली असते ती बोध देऊन भरून काढतो. घड आला कीं केळीची वाढ संपली अथवा पौर्णिमा ही चंद्राला पूर्णता आणून देते; तसें गुरुकृपेनें त्या साधकाचें होतें. गुरुपासून प्राप्त झालेल्या बोधानें अविद्या नाहींशी होते व मग गर्भवती स्त्री मेली म्हणजे तिच्या कुक्षींतील मूलहि मरतें, तसें अविद्यानाशाबरोबर तिच्या पोटांतील कर्म, कर्ता, कार्य ही त्रिपुटीहि संपते व साधक परम गति जी नैष्कर्म्यसिद्धि तिला येऊन पोंचतो. आत्मसिद्धीचा ' परिणामींचा निर्वाळा । अचुंबित ये फळा । अनुष्ठितां ' ' प्रांजळ ' जो मार्ग तो हाच.

---

## १३. ज्ञानेश्वरींतील भक्तियोग

महाराष्ट्रांत भक्तिप्रधान भागवत धर्माचे जे वेगवेगळे पंथ आहेत त्यांचें मूळ प्राकृत ग्रंथांत पहावयाचें असल्यास आपणांस ज्ञानेश्वरीकडेच जावें लागेल हें सर्वमान्य आहे. ज्ञानेश्वरीची अशी थोरवी आहे, कीं ज्ञानेश्वरी हा ग्रंथ महाराष्ट्रांत जेवढे भक्तिमार्गाचे संप्रदायी आहेत, त्या सर्वांना सारखाच पूज्य आहे. श्रीएकनाथ, तुकारामबोवा, समर्थ या सर्वांना ज्ञानेश्वरी सारखीच प्रिय आहे. महाराष्ट्रांत विद्यमान जे भक्तिसंप्रदाय आहेत, त्यांत सर्वांत मोठा जो वारकरी पंथ तो तर या ग्रंथास व ग्रंथकर्त्यास 'माउली' म्हणूनच संबोधतो, व ती 'आपली' माउली म्हणून तिचा संप्रदायपूर्वक अभ्यास करतो. ज्ञानदेवांचेच अनुभवामृत व चांगदेवपासष्टि हे ग्रंथ आहेत; पण ज्ञानेश्वरीला जी लोकप्रियता प्राप्त झालेली आहे, ती या ग्रंथांना नाहीं. याचें महत्त्वाचें कारण ज्ञानेश्वरींत भक्तीच्या मधुररसाचा जसा परिपोष झाला आहे, तसा अनुभवामृतांत अथवा चांगदेवपासष्टींत नाहीं.

ज्ञानेश्वरीला जी ही अप्रतिम गोडी आली, त्याला कारण या टीकेच्या प्रसंगांत अपूर्व असा दोन गोष्टींचा मिलाफ होण्याचा योग आला. ' मोठा वैष्णव ' म्हणून मुक्ताबाई ज्यांचें वर्णन करतात असे श्रीज्ञानदेव हे टीकाकार व टीका करण्याकरितां ग्रंथही मुळांत ईश्वर-भक्तीनें असा भरलेला कीं, तो नारदांच्या अथवा शांडिल्यांच्या भक्तिसूत्राप्रमाणें भक्तीची चर्चा करणारा ग्रंथ नसूनसुद्धां श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य, श्री वल्लभाचार्य इत्यादि सर्व वैष्णव भक्त्याचार्यांना प्रिय व्हावा, एवढेंच नव्हे तर वैष्णवाचार्य म्हणून न ओळखले जाणारे पण वैष्णव असे शंकराचार्य त्यांनाहि प्रिय व्हावा; याचा अर्थच असा कीं, या ग्रंथांत भक्तीची मोठी उत्कृष्ट चर्चा असली पाहिजे.

गीतेचें श्रेष्ठत्व याच्यांतच आहे, कीं गीतेनें कर्म, भक्ति, योग, ज्ञान यांचा असा उत्कृष्ट समन्वय केला आहे कीं, या वेगवेगळ्या मार्गांवर प्रेम ठेवणाऱ्या प्रत्येकाला वाटावें कीं, गीता हा माझेंच साधन सांगणारा ग्रंथ आहे. पण जातांजातां येथें एक महत्त्वाची गोष्ट सांगणें अवश्य आहे कीं, गीतेंत कर्म, भक्ति इत्यादि मार्ग प्रतिपादिले आहेत म्हणजे या मार्गरूप ठिगळांना जोडून तयार केलेली गोधडी म्हणजे गीता असें नव्हे. गीता या वेगवेगळ्या साधनांचा उच्च भूमिकेवरून समन्वय करणारा ग्रंथ आहे.

वेगवेगळ्या मार्गांचा समन्वय गीतेंत असल्यानें गीतेची स्थिति खालील प्रकारच्या चित्रासारखी दिसते. अशा प्रकारचीं कांहीं चित्रें असतात कीं, समोरून बघितलें तर तें चित्र आपल्याकडे बघतें असें वाटतें. बरें, उजव्या अथवा डाव्या बाजूस जाऊन तेथून पाहूं लागलें, तरी तें आपल्याकडेच बघतें असें वाटतें. तसेंच गीतेचें आहे. याच कारणाकरितां सुब्रह्मण्यम् या मद्रासी लेखकानें गीता म्हणजे 'ईश्वर'च असें तिचें वर्णन केलें आहे. ईश्वर जसा 'सहस्राक्ष' तशीच गीता. जो जेथून बघेल त्याला ती आपल्याकडे बघते असेंच वाटतें.

ज्या दृष्टीनें बघूं तशी गीता आपणांस दिसते असें जरी आहे तरी, सूक्ष्म दृष्टीनें जर आपण पाहिलें तर कर्म, ज्ञान, योग हे विषय जरी गीतेंत आले असले, तरी ज्याप्रमाणें कपड्याला आंतून अस्तर लावलेलें असतें तसें या सर्व योगांच्या मागें भक्तीचें अस्तर आहे.

गीतेंत कर्मयोग निःसंशय सांगितला आहे; परंतु सांगितलेलें कर्म पूर्वमीमांसक सांगतात तें कर्म नाहीं. 'यतः प्रवृत्तिर्भूतानां' या श्लोकांतील 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य' या पदांचा विचार केला तर दिसून येईल कीं, कर्म हें साध्य नसून 'सर्वात्मक ईश्वराची पूजा' करून त्याला प्रसन्न करून घेण्याचें तें साधन आहे. तिसऱ्या अध्यायांत जरी केवळ कर्म सांगितलें असलें, तरी त्यांतील 'मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य' हा श्लोक पाहिला तर कर्मांचा शेवट भक्तींतच केला आहे, असें दिसून येईल.

सहाव्या अध्यायांत 'अष्टांगयोग' आहे. पण शेवटीं 'योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना। श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥' हा श्लोक सांगून 'जो मला भजतो तोच खरा योगी' असा समारोप केला आहे. पातंजल योगसूत्रांतील योगापेक्षां हा गीतेंतील योग निःसंशय वेगळाच आहे. पातंजल योगसूत्रांत जें ईश्वराचें वर्णन केलेलें आहे, तें गीतेंतील ईश्वराच्या वर्णनाहून वेगळ्या प्रकारचें आहे. योगसूत्रांत 'क्लेशकर्म-विपाकाशयैरपरामृष्टः' एक पुरुषविशेष असें ईश्वराचें स्वरूप सांगितलें आहे. गीतेची ईश्वराची कल्पना वेगळी आहे. ईश्वर हा सर्व भूतांच्या अंतरांत राहून सर्वांच्या वृत्तींचें प्रकाशन करून तद्द्वारां जगाचे व्यवहार चालवितो, अशी गीतेची कल्पना आहे.

आतां गीतेंतील ज्ञानाचा विचार करूं. वरील दोघांप्रमाणें ज्ञानाचाहि परिपाक भक्तींतच झाला आहे. 'ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा' अशा ज्ञान्याला 'पराभक्ति' चा योग होतो असें भगवान् अठराव्या अध्यायांत सांगतात. गीतेचा पंधरावा अध्याय हा ज्ञानकांडांतला शेवटचा अध्याय असें ज्ञानदेव समजतात. त्याचाहि शेवट 'यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ॥ स सर्व-विद्भजति मां सर्वभावेन भारत ॥' या १९ व्या श्लोकानें केला आहे.

यावरून वाचकांच्या लक्षांत येईल, कीं कर्म, ज्ञान अथवा योग हे गीतेंत स्वतंत्रपणें सांगितले नसून भक्तीच्या कक्षा म्हणून त्यांचा विचार आहे. पण येथें 'भक्ति' हा शब्द आम्ही कोणत्या अर्थानें उपयोगांत आणतों हें सांगणें अवश्य आहे. एऱ्हवीं आमचें हें सांगणें 'ज्ञानप्रधान हें शास्त्र' ही जी गीतेसंबंधीं ज्ञानदेवांची उक्ति आहे, तिच्याशीं विरोधी दिसेल. आम्ही भक्ति हा शब्द 'ईश्वरनिष्ठा' या अर्थानें वापरत आहोंत. गीता ही ब्रह्मवादिनी जरी असली तरी ती ईश्वरनिष्ठेच्या द्वारां ब्रह्मप्राप्ति सांगणारी आहे. ईश्वरवादाची (Theism) छाया संपूर्ण गीतेवर आहे. 'मन्मना भव', 'मां एकं शरणं व्रज' हा एका दृष्टीनें गीतेचा आत्मा आहे.

प्रत्येक साधनाचा पाया ईश्वरभक्ति हा सांगितलेला गीतेंत आढळून येईल. वर म्हटल्याप्रमाणें कोटाला जसें अस्तर असतें किंवा झाडाच्या वरच्या सालीच्या आंतून जसा जीवनरस अनुस्यूत असतो; त्याप्रमाणें वेगवेगळ्या साधनांच्या चर्चेच्या बुडाशीं भक्तीचा जीवनरस आहे व त्यामुळें सर्व संप्रदायांच्या आचार्यांना—मग ते ज्ञानमार्गी शंकराचार्य असोत अथवा भक्तिमार्गी श्रीरामानुजादि आचार्य असोत—गीता ही सारखीच प्रिय झाली आहे.

ज्ञानदेवांच्या ठिकाणीं भक्ति, ज्ञान, कर्म, योग यांचा अपूर्व मिलाफ झाला होता. स्वतः ज्ञानेश्वर महाराज मोठे ज्ञानी, योगी, भक्त व क्रियावान् होते. त्यांचा भर उत्कृष्ट आचारसंपन्नतेवर होता, हें 'भीतरीं ज्ञानें उजळिला। बाहेरीं कर्में क्षाळिला' या ओंवीवरून दिसून येतें. देहाचें चोजलें यथास्थित पुरवून तोंडानें ' अहं ब्रह्मास्मि ' अशा गप्पा मारणाऱ्या कर्मभ्रष्टाला ते कांहीं किंमत देत नाहींत. 'निर्वाळूनि कनकें । भरला गांगें पियूखें ।' या ओंवींत त्यांनीं आपलें मनोगत स्पष्ट सांगितलें आहे. सोन्याचा कलश असून त्यांत गंगेचें पाणी भरलेलें असावें, त्याप्रमाणें बाह्य इंद्रियें कर्माचरणानें पवित्र असून आंत निर्मळ–विमल असें ज्ञान आहे, असा 'आंतबाहेर', 'चोखाळ' ज्ञानदेवांना पसंत आहे. तसाच ज्ञान व भक्ति यांचाहि ते समन्वय करतात. ज्ञान व भक्ति एकत्र राहूं शकत नाहींत अशी त्यांची समजूत नव्हती. ते स्वतः योगी, ज्ञानी, क्रियावान् वैष्णव होते. यामुळेंच ज्ञानेश्वरींत कर्म, योग, ज्ञान व भक्ति यांची सुंदर अशी चर्चा आपणांला सांपडते. मागील प्रकरणांत कर्मयोगाची चर्चा केली. आतां ज्ञानेश्वरींतील भक्तियोगाची करूं.

प्रारंभीं एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, आपल्या सूत्रांतून नारदांनीं अथवा शांडिल्यांनीं ज्याप्रमाणें 'सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा' अथवा 'सा परानुरक्तिरीश्वरे' अशा भक्तीच्या व्याख्या दिल्या आहेत; अथवा खुद्द गीतेमध्यें ' योगः कर्मसु कौशलम् ' अशी योगाची व्याख्या दिली आहे, तशी गीतेंत भक्तीची व्याख्या दिलेली नाहीं. ' स्वकर्मणा तमभ्यर्च्य ' अथवा ' समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां, ' ' नमस्यन्तश्च मां भक्त्या ', ' स सर्वविद् भजति मां सर्वभावेन भारत, ' ' भजते मां अनन्यभाक्, ' ' मां हि पार्थ व्यपाश्रित्य ', ' मन्मना भव ' यांसारखे जे उद्गार वेगवेगळ्या ठिकाणीं विखुरलेले आहेत त्यावरून गीतेंतील भक्तीच्या स्वरूपाची कल्पना करावी लागेल.

ज्ञानेश्वरीचें याहून थोडें भिन्न आहे. भक्तिसूत्राप्रमाणें जरी यांत ओळीनें भक्तिशास्त्रांतील प्रमेयांची चर्चा नसली तरी भक्तीच्या वेगवेगळ्या अंगोपांगांची या ग्रंथांत भरपूर व उत्कृष्ट अशी चर्चा येऊन गेली आहे. ज्ञानेशांनीं 'हा भक्तियोग जाण माझा' अथवा 'आम्ही परम भक्ति आपुली म्हणों ' असें म्हणून भक्तीच्या व्याख्यासुद्धां दिल्या आहेत. एवढेंच नव्हे, तर नारदांनीं प्रेमस्वरूपिणी भक्तिचीं-लक्षणें जीं सूत्रांत दिलीं आहेत तींसुद्धां आपल्या ग्रंथांत ज्ञानराजांनीं दिलीं आहेत. अर्थात् देण्याची पद्धत वेगळी. आपण प्रथम त्या लक्षणांचा या ग्रंथांत कसा व कोठें विचार आला आहे तें पाहूं; व नंतर त्या भक्तीचे जे वेगवेगळे आविष्कार आहेत त्यांचा परिपोषहि या ग्रंथांत कसा झाला आहे तें पाहूं.

नारदांनीं आपल्या भक्तिसूत्रांत भक्तीची व्याख्या आतां सांगतो असें म्हणून तिची फारच उत्कृष्ट अशी व्याख्या सांगितली. ते म्हणतात, भक्ति म्हणजे ' सात्वस्मिन परमप्रेमरूपा ' ॥ सूत्र २ ॥ भक्ति म्हणजे परमात्म्याच्या ठिकाणीं नितान्त प्रेम. पुढें त्यांनीं ' अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ' म्हणून त्याची व्याख्या करतां येत नाहीं असें सांगितलें. ' प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभवें चित्ता चित्त जाणें ॥ ' असें तुकारामबोवाहि म्हणतात. नारदांनीं प्रेम अनिर्वचनीय कसें, हें सांगतांना मोठा उत्कृष्ट दृष्टान्त दिला आहे. ते म्हणतात, 'मूकास्वादनवत्' तें मुक्यानें साखर खाल्ल्यासारखें आहे, ' गोड लागे परि सांगताचि नये. ' तात्पर्य, त्याचें यथार्थ स्वरूप सांगतां येत नाहीं, हें जरी खरें असलें, तरी त्याचें कांहीं वर्णन करणें शक्य आहे. म्हणून त्याचें थोडेसें वर्णन पुढील सूत्रांत केलें आहे, ' गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानं अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम् । ' ज्ञानेश्वरांची मौज अशी आहे कीं, यांतील प्रमुख लक्षणें पण दृष्टान्ताच्या द्वारां त्यांनीं ज्ञानेश्वरींत सांगितलीं आहेत.

अ. १२ श्लो. २ ' मय्यावेश्य मनो ये माम् ' या श्लोकावर लिहितांना ते म्हणतात, ' तरि अस्तगिरीचां उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं । रश्मि जैसे किरिटी । संचरती ॥ कां वर्षाकाळीं सरिता । चढौ लागे पांडुसुता । तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ परि ठाकलियाहि सागरु । जैसा मागिलही यावा अनिवारु । तिये गंगेचिया ऐसा पडिभरु । प्रेमभावा ॥ तैसें सर्वेंद्रियासहित । मजमाजीं सूनि चित्त । जे रात्रिदिवस न म्हणत । उपासिति ॥ ३५ ते ३८.

प्रेमाचें ' अनन्यता ' हें एक मोठें चिन्ह आहे. नारदांनीं भक्तीची व्याख्या, ती प्रेमस्वरूपिणी अशी दिल्यावर ' अन्याश्रयाणां त्यागो अनन्यता ।' ' भक्ता एकान्तिनो मुख्याः ।' असें म्हटलेंच आहे. ज्ञानेश्वरांची मौज अशी आहे कीं,कामनारहित,अनन्य, प्रतिक्षणवर्धमान वगैरे शब्द न योजतां दृष्टान्त देऊन हीं लक्षणें भक्ताच्या

ठिकाणीं कशी असतात, हें वरील ओंव्यांत त्यांनीं दाखविलें आहे.

कित्येक वेळेला द्राष्टान्तीं असणाऱ्या प्रमेयाच्या दृढीकरणार्थ ते अनेक दृष्टान्त देतात. कित्येक वेळेला त्या प्रमेयाच्या वेगवेगळ्या अंगांची परिस्फुटता करण्याकरितां वेगवेगळे दृष्टान्त देतात. या प्रसंगीं वेगवेगळ्या दृष्टान्तांनीं भक्तीची वेगवेगळीं अंगें सांगितलीं आहेत.

( १ ) पहिल्या ओंवींत ( ३५ व्या ओंवींत) भक्ताची अनन्यता सांगितली आहे. सूर्य अस्तास जाऊं लागला म्हणजे किरणें मागें रहात नाहींत. तींहि त्याच्या पाठोपाठ जातात. तीं सूर्याच्या ठिकाणीं अनन्य. हाच दृष्टान्त त्यांनीं पुढें अधिक स्पष्ट करून भक्ताची अनन्यता दाखविली आहे. ते म्हणतात, 'सूर्यीचा होणा होईजे । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेंपण साजे । प्रभेसी जेवीं ॥ अ.१३–६०९ ' सूर्य हें किरणांचे जीवन. तसें देव हें भक्तांचें जीवन. सूर्याच्या मागोमाग किरणें; तो आहे तरच तीं. त्याचप्रमाणें देवाचें स्मरण तरच यांचें जगणें. ज्ञानोबा म्हणतात ' जीवें जीवो माझेनि तो. '

हाच गुण दुसऱ्या शब्दांत सांगावयाचा, तर ' भक्ता एकांतिनो मुख्याः ' असा सांगतां येईल. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ' शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश । एक मी वाचूनि वास । न पाहती आन'॥ अ.१३-६०५ ' जयाचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी । भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ऐसे अनन्ययोगें । विकलें जीवें मनें आंगें । तयांचे काइ एक सांगे । जे सर्व मी करीं ॥ ' १२–८१,८२ ॥ भक्ताची ' अनन्यता ' दाखवण्याकरितां ' देवाला विकणें ' अशी शब्दयोजना करून सांगण्याची ज्ञानोबांची आवड आहे. अनेक ठिकाणीं त्यांनीं असें म्हटलें आहे, ' पैं सर्व भावेंसीं उखितें । जें वोपिलें मज चित्तें । जैसा गर्भगोळु उद्यमातें । कोण्याहि नेणें ॥ ' अ. ९–२३५.

( २ ) दुसऱ्या ओंवींत (३६) ' प्रतिक्षणवर्धमानम् ' हें जें नारदांनीं चिन्ह सांगितलें आहे, तें सांगतातः—

प्रेम हें भोगानें कमी होत नाहीं, वाढतें. जसें वर्षाऋतूंत नदीचें पाणी दिवसेंदिवस वाढतच जातें. तसें प्रेम हें भोगानें वाढतच जातें. तुकारामबोवा असाच अनुभव सांगतात. ' वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त ते ॥' ज्ञानोबाराय अनुभवामृतांत म्हणतात, 'प्रिय वस्तूच्या भोगाचा कंटाळा येत नाहीं. उलट रोज वेगवेगळा, नवीन नवीन आनंद वाढतो.'

पढियंतें सदा तेंचि । परि भोगीं नवीनवी रुचि ॥

( ३ ) तिसऱ्या ओंवींत ( ३७ ) 'अविच्छिन्नत्व' सांगतातः—

मनुष्याचा उत्साह प्रथमदर्शनीं मोठा असतो. ओहळाला पाणी एकदम आलें, कीं इतकें येतें कीं गाडी वाहून जाईल. पण दोन तासांनीं तें इतकें कमी होतें कीं घोटाभर पाणी रहात नाहीं. भक्तीची जात या सारखी नव्हे. भक्तीचा झरा एकदां अंतःकरणांत का लागला, कीं तो अखंड वाहतोच. ज्ञानोबाराय हीच गोष्ट गंगेचा समर्पक दृष्टान्त देऊन सांगतात.

गंगेच्या पाण्याचा एक लोंढा समुद्रास जाऊन मिळाला. मग तो लोंढा समुद्राला भेटून मागाहून येणारे जे गंगेचे लोट आहेत त्यांना सांगतो काय, कीं 'मी भेटून आलों, चला आतां दुसरीकडे.' गंगेच्या पाण्याचे लोट समुद्राला सारखे एकावर एक मिळतच असतात. 'मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसे ॥' त्याचप्रमाणें भक्ताच्या अंतःकरणांतील वृत्ती एकसारख्या भगवंताला विषय करणाऱ्याच उठतात. त्या सर्वांचा विषय एकच, ' भगवंत '.

भक्तिरसायनकारांनींहि भक्तीची व्याख्या अशीच दिली आहे. ' द्रुतस्य भगवद्धर्माद् धारावाहिकतां गता । सर्वेशे मनसो वृत्तिः भक्तिरित्यभिधीयते ॥ ' ' सर्वेंद्रियासहित । मनमाजि सूनि चित्त । जे रात्रीदिवस न म्हणत । उपासिति ॥ ' ईश्वराकडे निज म्हणजे मन धांवणें यालाच भक्ति म्हणतात.

ज्ञानेश्वरीमध्यें भक्तिप्रेमाचीं अशीं वर्णनें ठिकठिकाणीं विखुरलीं आहेत. या दृष्टीनें ज्ञानेश्वरी हें ' भक्तिशास्त्र ' म्हटलें तरी सुद्धां चालेल.

पुष्कळ वेळेला भक्ति म्हणून श्रीमद्भागवतांतील प्रल्हादांची पुढील उक्ति सांगितली जातेः—

श्रवणं कीर्तनं विष्णोःस्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदम् ॥

पण वाचकांच्या लक्षांत आलें असेल कीं, ह्यांत भक्तीची व्याख्या दिली नाहीं. या श्लोकांत सांगितलेले

नऊ प्रकार हे भक्तीचे वेगवेगळे आविष्कार आहेत. समुद्राला का भरती आली म्हणजे खाड्यांतून पाणी भरतें. तसे मनांत का ईश्वरविषयक प्रेमाची भरती आली कीं, ती डोळे, कान इत्यादि इंद्रियरूपी खाड्यांतून भरून वाहूं लागते. आंत प्रेमाची भरती आली, कीं भक्त हा कधीं श्रीकृष्ण श्रीकृष्ण म्हणेल, कधीं डोळे भरोनियां त्याचें रूप पहात बसेल. अशा त्याच्या विविध इंद्रियांच्या होणाऱ्या क्रियांचा वरच्या श्लोकांत उल्लेख आहे. पण, भक्तीची व्याख्या म्हणजे 'अस्मिन् परमप्रेमरूपा' हीच खरी. कारण जर या क्रियांच्या बुडाशीं देवविषयक प्रेम नसेल तर ह्या होऊनसुद्धां त्या क्रिया भक्तींत जमा होणार नाहींत. प्रेमाच्या बैठकीमुळें या क्रिया भक्तींत जमा होतात. तुकारामबोवा म्हणतात. 'एकें दाखविलें दहा। पहा फांटा पुसून ॥' तसेंच येथेंहि आहे. प्रेम नसेल तर ती क्रिया फुकट जाईल, भक्तींत जमा होणार नाहीं.

भक्तींत प्रेम हें मुख्य आहे. बाह्योपचार गौण आहेत. ही गोष्ट ज्ञानेश्वरमहाराजांनीं अ. ९ श्लोक १६ 'पत्रं पुष्पं फलं तोयम् ।' या प्रसिद्ध श्लोकावर टीका-करतांना मोठी उत्कृष्ट रीतीनें दाखविली आहे.

या श्लोकांत उपचार सांगितले आहेत. पण या श्लोकाचें मर्म वाचकांच्या लक्षांत यावें, एवढ्याकरितां ज्ञानेशांनीं दिलण्यास नेमकें विरुद्ध सांगून श्लोकाची भूमिका तयार केली आहे. ते म्हणतातः—

पैं अर्जुना माझे ठायीं। आपणपेंवीण सौरसु नाहीं। मी उपचारें कवणाही। नाकळें गा ॥ ३६७ ॥

अर्जुना, माझें भजन करण्याकरितां भक्ताला आत्म-समर्पण करावें लागतें. पान, फूल, फळ हें भजण्याचें नुसतें निमित्त. मला अर्पण करावयाचा म्हणजे आपला जीव. पण आत्मसमर्पण करणें अथवा जीव देणें याचा अर्थ चाकू अथवा सुरा घेऊन मान कापणें नव्हे. भगवंताला अर्पण करायला आपल्याजवळ काय योग्य आहे, तर आपण भगवंताला तें अर्पण करावें व त्याचा तोष संपादन करावा? जेथें लक्ष्मीचा थोरपणा सरता होत नाहीं, शंभूचें तप पुरत नाहीं, तेथें आपला पाड काय लागणार? असा विचार करून थोरपण पऱ्हा सांडून, व्युत्पत्ति आघवी विसरून, जगा धाकुटें होऊन, धनमद गुणमद हे टाकून देऊन, शरीरहि देवावरून ओवाळून टाकावें व आपल्या जीवावरील प्रेम भगवंताला अर्पण करावें, हें आत्मसमर्पण. अर्जुना, असें आत्मसमर्पण करून, निःसीम भावानें युक्त होऊन, उल्हसित अंतःकरणानें मला कशाचें का फळ भक्त देईना मी संतुष्ट होतों. फळानें होईल यांत काय नवल आहे! वास्तविक भक्तानें दिलेल्या फुलाचा मी वास घ्यावा; पण, भक्ताच्या प्रेमभक्तीनें मी इतका वेडा होतो कीं त्याचा वास घेण्याच्या ऐवजीं तें तोंडांतच घालतों! अशा प्रेमानें युक्त होऊन त्यांनीं पाण्याचा थेंब दिला, तरी त्यानें वैकुंठापेक्षां मोठीं घरें मला दिलीं असें मी समजतों. तात्पर्य, मी भक्ताच्या ठिकाणचें प्रेम ओळखतो. आम्ही भावाचे पाहुणे आहोंत. कारण आमच्या घरीं प्रेमळाचें सांकडें आहे.

तात्पर्य, देव भक्ताच्या आंतलें प्रेम व भाव बघतो. आपल्याला वस्तु अर्पण करणारा स्त्री का पुरुष, ब्राह्मण का महार हा विचार करीत नाहीं. त्याचप्रमाणे जें देतो तें सोन्याच्या ताटांत आहे का पत्रावळीवर आहे याचा विचार करीत नाहीं. फार काय, दिलेलें ताजुक आहे का शिळें आहे हेंहि बघत नाहीं. तो देणारा किती प्रेम-भावानें देतो हें बघतो. म्हणून भक्ति म्हणजे प्रेम. देवावर भक्ति करावयाची म्हणजे आपलें प्रेमसर्वस्व त्याला अर्पण करावयाचें.

'एकच गहू प्रकार बहु' या म्हणीप्रमाणें देव-विषयक प्रेम एकच; पण त्याचे आविष्कार वेगवेगळे. एकाच गव्हाचे मांडे, पुऱ्या, करंज्या वगैरे प्रकार करून खातात; तसे देवविषयक प्रेम भोगण्याचे वेगवेगळे प्रकार आहेत. यामुळें एकाच भक्तीचे वर दर्शविल्याप्रमाणें प्रकार संभवतात. त्यांपैकीं कांहींचा विचार ज्ञानेश्वरींत कलकला आला आहे, तें आपण आतां पाहूं.

(१) **सगुणोपासना**:—देवविषयक प्रेम कधीं त्या देवाची सगुणरूपांत उपासना करण्याच्या रूपानें आविष्करेल. याचाहि विचार ज्ञानेश्वरींत आलेला आहे. उदाहरणार्थः—

तरि शंभू कां श्रीहरि। पढियंता होय॥ तया प्रिय देवताल्या। यात्रादिकें करावया। आठही पाहार जैसें पायां। उळिग घापें॥ देवांगण मिरवणियां। अंगोपचार पुरवणियां। करावया म्हणियां। शोभती हात॥ लिंग का प्रतिमा दिठी। देखत सैंघो अंगेष्टी। लोटिजे कां काठी। पडली जैसी॥ अ. १७, ओं. २०१-४.

पण या सगुणभक्तीविषयीं गैरसमज उत्पन्न होईल असा मजकूर ज्ञानेश्वरीवरील पुष्कळ पुस्तकांतून आलेला आहे. ज्ञानेश्वर मूर्तिपूजेविरुद्ध होते असा पुष्कळांनीं निष्कर्ष काढला आहे. परंतु हा निष्कर्ष बरोबर नव्हे. सोळाव्या अध्यायांत आसुरी प्रकृतीच्या लोकांचें वर्णन करतांना ज्ञानदेवांनीं 'देवपिसे प्रतिमालिंगीं' असें म्हणणारे नास्तिक असें म्हटलें आहे.

देवपूजा करणें म्हणजे वेळेचा दुरुपयोग आहे व प्रतिमापूजन निरुपयोगी आहे असें ज्ञानदेव मानतात, असें जर कोणी म्हणूं लागला तर वरील सतराव्या अध्यायांतील ओंव्यांच्या विचारावरून त्याचें हें म्हणणें किती फोल आहे हें स्पष्ट होणार आहे. परमार्थांत अत्यंत अवश्य असलेलें जें तप त्या तपांत देवपूजा ही अग्रभागीं असून तिचें ज्ञानदेवांनीं वरील ओंव्यांत सुंदर वर्णन केलें आहे. खुळ्यासारखें कांहींतरी करीत बसणें हा वेडेपणा आहे. म्हणून नवव्या अध्यायांत 'अवजानन्ति मां मूढाः' अथवा तेराव्या अध्यायांतील 'अज्ञानं यदतोन्यथा' या श्लोकावर व्याख्यान करतांना त्यांनीं अज्ञानी भक्तीवर टीका केली आहे. त्यांचा जो आक्षेप आहे तो देवाच्या मूर्ति करण्याविरुद्ध नव्हे. तिची व्याप्ति फक्त घरांतील कोनाड्यापुरती मर्यादित करण्यावर आहे. त्याचप्रमाणें त्या देवाकरितां उपचारांचा जो अतिरेक झालेला दिसतो, त्या अतिरेकांचा निषेध आहे, खुळ्या कल्पनांचा निषेध आहे. पण या अतिरेकांचा निषेध म्हणजे मूळ प्रतिमा-पूजनच नको असें ज्ञानदेव म्हणत होते, हा निष्कर्ष चुकीचा आहे ;उलट परमात्म्याच्या सगुण स्वरूपाचें वर्णन खुद्द ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं केलेलें दिसून येतें, 'किरीटिनं गदिनं चक्रहस्तम्' अ. ११–४६ या श्लोकावरील ज्ञानदेवांची टीका पहा. ते म्हणतातः—

'कैसें नीलोत्पलातें रांवित। आकाशाही रंग लावित॥ तेजाची वोज दावित। इंद्रनीळा ॥ ६०० ॥ जैसा परिमळ जाइला मरगजा। कां आनंदासीचि निघालिया भुजा। ज्याचें जानुवरी मकरध्वजा। जोडिली बरव ॥ ६०१ ॥ मस्तकीं मुकुटातें ठेविलें। कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें। शृंगारा लेणें लाधलें ।आंगाचेनि जया ॥ ६०२ ॥ इंद्रधनुष्याचिये आडणी– । माजी मेघ गगनरंगणी। तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी। वैजयंतिया ॥ ६०३ ॥ कवणी ते उदार गदा। असुरां देत कैवल्य सदा। कैसे चक्र हन गोविंदा। सौम्य तेजें मिरवे॥६०४॥ किंबहुना स्वामी। तें देखावया उत्कंठित पां मी।...

ज्ञानेश्वरीमध्यें 'तेथ शंभू कां श्रीहरि। पाडियंता होय॥' असें सांगितलें आहे. यावरून कित्येकांनीं ज्ञानेश्वरांच्या सांगण्यांत 'बहुदेवतावाद' आहे असें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरींत 'बहुदेवतावाद आहे का एकेश्वरीवाद आहे, कीं 'एकं संतं बहुधा कल्पयन्ति' असा 'वैदिक भक्तिमार्ग' आहे, हाहि विचार करण्या-सारखा प्रश्न आहे. ज्ञानेश्वर महाराज हे बहुदेवतावादी अथवा एकेश्वरवादी नव्हते. त्यांचे 'ज्ञानेविण नाशिले। जे बुद्धिभेदासी आले। तेणें एकाचि मियां कल्पिले। अनेकत्वें॥' असे उद्गार प्रसिद्ध आहेत. एकेश्वरीवादामध्यें एकच दैवत मानलें जातें, पण त्याच्याबरोबर असेंहि समजलें जातें कीं, इतर देव हे देव तर नव्हेतच पण त्याज्य आहेत. दक्षिण भारतांतील असणारे वीरवैष्णव अथवा वीरशैवासारखे पंथ अथवा खिश्चन, मुसलमान धर्मा-सारखे धर्म हे एकेश्वरवादी आहेत. त्यांच्या देवाहून इतर देवांची उपासना करणाऱ्या भक्तांस उत्तम गति मिळणार नाहीं असा त्यांचा सिद्धान्त असतो.

ज्ञानदेव अशा संकोचित वृत्तीचे भक्त नव्हते. ज्ञानदेवांच्या मतें गीता हा वैष्णवप्रासाद असला तरी तो अशा संकोचित स्वरूपाचा नव्हे. तो 'एकं संतं बहुधा कल्पयन्ति' या वैदिक पायावर उभारलेला आहे. यामुळें त्यांत प्रवेश सर्वांना आहे. येथें श्रीशंभू व श्रीहरि यांना सारखेंच पूज्य स्थान आहे.

**व्यभिचारी भक्तिः**—एकच देव आहे हें न जाणून प्रत्येक देवतेगणिक वेगवेगळा भाव धरीत, वेगवेगळ्या हेतूनें त्यांची उपासना करणारा ज्ञानदेवांना पसंत नाहीं. त्यांनीं या व्यभिचारी भक्तीचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.

आणि माझां ठायीं भक्ती। फळा लागीं जया आर्ती। घनोद्देशें विरक्ती। नटणें जेवीं ॥ ७ ॥ नातरी कांताचां मानसीं। रिगोनि स्वैरिणी जैसी। रहाटे जारेंसी। जावयालागीं ॥ ८ ॥ तैसी मातें किरीटी। भजती गा पाउटी। करूनि जो दिठी। विषो सूये ॥ ९ ॥ आणि भजिन्नलियासवें। तो विषो जरी न पावे। तरी सांडी म्हणे आघवें। टवाळ हें ॥ १० ॥ कुणबट कुळवाडी। तैसा आन आन देव मांडी। आदिलाची परवडी। वरी

तथा ॥ ११॥ तया गुरुमार्गा टेकें । जयाचा सुगरवा देखे । तरी तयाचा मंत्र शिके । येंव नेघे ॥१२॥ प्राणिजातेंसी निष्ठुर । स्थावरीं बहु भरु । तेवींचि नाहीं एकसरू । निर्वाहो जया ॥१३॥ माझी मूर्ति निफजवी । ते घराचे कोनीं बैसवी । आपण देवो देवीं । यात्रे जाय ॥१४॥ नित्य आराधन माझें । कामीं कुळदेवता भजे । पर्वं विशेषें कीजे । पूजा आना ॥१५॥ माझें अधिष्ठान घरीं । आणि वोवसे आनाचे करी । पितृकार्यावसरीं । पितरांचा होय ॥१६॥ एकादशीचां दिवशीं । जेतुला पाडु आम्हांसी । तेतुलाचि नागांसी । पंचमीचां दिवशीं ॥१७॥ चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये । चावदसी म्हणे माये । तुझाच वो दुर्गे ॥ १८ ॥ नित्य नैमित्तिकें कर्में सांडी । मग बैसे नवचंडी । आदित्यवारी वाढी । भैरवा पात्रीं ॥ १९ ॥ पाठी सोमवार पावे । आणि बेलेंसी लिंगा धांवे । ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥ २० ॥ ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी । अवघेन गांवद्वारीं । अहेव जैसी ॥२१॥

अ. १३ ओं. ८०७–२१

तात्पर्य, 'एकं संतं बहुधा कल्पयन्ति' या वैदिक बैठकीवरून केल्या जाणाऱ्या प्रतिमापूजन, वारी इत्यादि सगुणोपासनेचे प्रकार ज्ञानदेवांना मान्य होते. पण त्यांना अज्ञानपणानें भक्ति म्हणून कांहीं तरी करणें मान्य नव्हतें.

आतां सगुणोपासनेंतलें एक प्रमुख अंग पण सगुण-निर्गुणाला जोडणारी जी कीर्तनभक्ति हिच्याविषयीं श्रीज्ञानदेव काय म्हणतात तें पाहूं.

(२) **कीर्तनभक्तिः**—ह्या भक्तीचें अप्रतिम वर्णन अ. ९ श्लोक १४ यांतील 'सततं कीर्तयन्तो मां' या पदावरील व्याख्यानांत माउलींनी केलें आहे. तें एकदां मागें येऊन गेलें आहे. तरीहि त्या १४ ओंव्या पुनः या प्रकरणांत देत आहोंत, याचें कारण त्या इतक्या उत्तम आहेत कीं, त्या पुनश्च दिल्या व पुनः वाचकांनीं सर्व वाचल्या तरी द्विरुक्तिदोष वाटणार नाहीं. त्या ओंव्या पुढीलप्रमाणें:—

तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे । जें नामचि नाहीं पापांचें । ऐसें केलें ॥ यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरुनि उठविलीं । यमलोकींची खुंटली । राहटी आघवी ॥ यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणती काय खावें । दोष ओखदासि नाहीं ॥ ऐसें माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ ते पाहांटेवीण पाहावित । अमृतेवीण जीववित । योगेंविण दावित । कैवल्य डोळां ॥ परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेया थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारूं । होत जगा ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोष गौरवें । धवळलें विश्व ॥ तेजें सूर्य तैसे सोज्वळ । परि तोहि अस्तवे हें किडाळ । चंद्र संपूर्ण एकादे वेळ । हे सदा पुरते ॥ मेघ उदार परि वोसरे । म्हणऊनि उपमेसी न पुरे । हे निःशंकपणें सपांखरे । पंचानन ॥ जयांचे वाचेपुढां भोजें । अखंड नाम नाचत असे माझें । जें जन्मसहस्रीं वोळगिजे । एक वेळ मुखासी यावया ॥ तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबीही न दिसें । वरी योगियांचींहीं मानसें । उमरडोनि जाय ॥ परि तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझा ॥ कैसे माझां गुणीं धाले । देशकाळातें विसरले । कीर्तनसुखी झाले । आपणपांचि ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥

अ. ९ ओ. १९७–२१०

या ओंव्यांवरून हें व्याख्यान करतांना पंढरपूरचा कीर्तनसंप्रदाय व निरूपणच त्यांच्या डोळ्यासमोर होतें हें कोणाच्याहि लक्षांत येईल. ज्याप्रमाणें अष्टांगयोगाचें वर्णन करतांना ज्ञानदेवांनीं गीतेंत जें सांगितलें आहे, त्याच्या थोडें बाहेर जाऊन स्वतःच्या योगावरील आवडीनें निवृत्तिनाथांसारखे श्रोते समोर बसलेले आहेत हें निमित्त साधून योगावरील व्याख्यानाचा जाणूनबुजून विस्तार केला; त्याचप्रमाणें कीर्तनभक्तीचेंहि व्याख्यान त्यांनीं सविस्तर केलें आहे असें दिसून येईल.

या वर्णनाकडे जो सूक्ष्म दृष्टीनें पाहील, त्याच्या लक्षांत येईल कीं, ज्ञानदेवांनीं या ठिकाणीं भजनाच्या साधनस्वरूपाचा विचार एकदोन ओंव्यांतच मांडला. त्याचा लोकोत्तर परिणामच विशेष वर्णन केला.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, ही कीर्तनभक्ति अशी आहे कीं, जगांतील सर्व दोष नाहींसे करून जगाला सुखी करण्याचें सामर्थ्य इच्यांत आहे. फार काय सांगावें ? हे कीर्तनभक्ति करणारे हरिदास लहानथोर, रावरंक

इत्यादि भेद मनांत न आणतां मेघासारखे उदार पण मेघासारखे पाऊस काळांतच नव्हे तर सर्व काळ जगावर श्रीहरीच्या प्रेमाचा वर्षाव करीत असतात. बाकीचीं साधनें एकएकट्याचा उद्धार करतात. या साधनाचें कांहीं औरच आहे. कोणी एकादा प्रयत्न करून कधींतरी वैकुंठास जाईल; पण या साधनाची बलहारी अशी आहे कीं, याचा अवलंब करणाऱ्यांनीं हा लोकच वैकुंठ केला! ज्यांना माझा शोध घ्यावयाचा असेल त्यांनी मला वैकुंठलोक, भानुबिंब इत्यादि ठिकाणीं पाहूं नये. कारण कदाचित् कांहीं प्रसंगीं मी तेथें नसण्याचा संभव. ज्यांना मी हमखास सांपडावा, असें वाटत असेल त्यांनीं जेथें माझा बरवा नामघोष चालू आहे तेथें शोध घ्यावा. मी तेथें नक्की आहेच. उत्तमापासोनि अंत्यजवरी सर्वांची काळजी वाहणाऱ्या माउलीला या अशा मार्गासंबंधीं आत्यन्तिक प्रेम वाटावें यांत आश्चर्य कसलें!

(२) कर्में ईश भजावा:—येथपर्यंतच्या वर्णनावरून असा एक गैरसमज होण्याचा संभव आहे कीं, भक्ति म्हणजे अंतःकरणांत भगवद्‌विषयक प्रेम उत्पन्न होऊन त्याची पूजा नामस्मरणादि करीत रहाणें एवढीच मर्यादित स्वरूपाची आहे. पण परमार्थ हा एकाद्या विवक्षित कालांत विवक्षित स्थळीं होणारी विवक्षित प्रकारची क्रिया नव्हे. अंतःकरणांत भक्ति उत्पन्न होणें, अथवा परमार्थाची आवड उत्पन्न होणें याचा अर्थ ज्या भाग्यवानाच्या आंत ही उत्पन्न झाली त्याच्या जीवनांत संपूर्ण क्रान्ति होणें असा आहे. एक तास भजन व बाकीचे तास त्याशीं विसंगत व्यवहार ही खरी भक्ति नव्हे. भक्ति म्हणजे संपूर्णजीवन ईश्वरप्रेमानें भरून जाणें. नारदांनीं आपल्या भक्तिसूत्रांत 'तदर्पिताखिलाचारता' असें भक्तीचें लक्षण केलें आहे. गीतेंत या भक्तीचा विचार प्रामुख्यानें आला आहे.

गी. अ. ९ श्लोक २६ यांत 'यांति मद्याजिनोऽपि माम्' असें सांगून भगवान् पुढच्या श्लोकांतून आपलें पूजन करण्याचा प्रकार सांगतात. तो असा कीं 'पत्रं पुष्पं' 'जें ठाकेल कोणा कांहीं। फळ पुष्प अथवा तोयी' ते देवाला प्रेमभावानें द्यावें. यांतलें गुह्यहि ज्ञानराजांनीं प्रगट केलें, त्याचा विचार याच प्रकरणांत नुकताच होऊन गेल्यानें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. पण हें सांगितल्याबरोबर लगेच भगवान् सांगतात, 'अर्जुना, पान, फूल, फळ अथवा पाणी मला अर्पण करणें एवढीच भक्ति नव्हे, तर

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥९–२७

जे जे कांहीं व्यापार करिसी। कां भोग हन भोगिसी। अथवा यज्ञीं यजिसी। नानाविधीं॥ नातरी पात्रविशेषें दानें। कां सेवकां देसी जीवनें। तपादि हन साधनें। व्रतें करिसी॥ तें क्रियाजात आघवें। जें जैसें निपजेल स्वभावें। तें भावना करोनि करावें। माझियां मोहरां॥ परि सर्वथा आपुलें जीवीं। केलियाची से कांहींचि नुरवीं। ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं। माझिया हातीं॥ ३९८–४०१

देव म्हणतात, मला 'स्वकर्मकुसुमें व कर्मफळ' फार आवडतात. कर्म करून त्याचें 'फळ' मला अर्पण करणें ही सर्वात्मक जो मी त्या माझी मोठी भक्ति आहे.

या भक्तीचा विचार मागील प्रकरणांत संपूर्णतया केलेला असल्यानें त्यांतील एकदोन गोष्टी देऊन भक्तीच्या दुसऱ्या एका आविष्काराकडे वळूं.

एक, संघाताकडून होणारीं कर्में देवालाच अर्पण करावयाचीं मग तीं चांगलीच असलीं पाहिजेत, अथवा चांगल्या रीतीनेंच केलीं पाहिजेत, अशी शंका उठण्याचा संभव आहे. कित्येक वेळां आपण असें पाहतों कीं, देवाला ठेवायचा ना मग गुळगुळीत पैसा अथवा कुचकी सुपारी चालेल. अशांतला प्रकार ज्ञानदेवांना मान्य नाहीं. देवाला तांदूळ वाहणें आहेना? मग ती 'अक्षत' हवी. तसेंच देवाला अर्पण करावयाचें, मग तें कर्म पवित्रच हवें व तें उत्तम रीतीनें करणेंच अवश्य, असा ज्ञानराजांचा आग्रह आहे. 'मयि सर्वाणि कर्माणि' या तिसऱ्या अध्यायांतील श्लोक ३० वर ते लिहितात, 'तरी उचितें कर्में आघवीं। तुवां आचरोनि मज अर्पावीं। परी चित्तवृत्ति न्यासावी। आत्मरूपीं॥' १८६

दुसरी, देव म्हणतातः—'हें विहित कर्म पांढवा। आपुला अनन्य ओलावा। आणि हेचि परमसेवा। मज सर्वात्मकाची॥' १८–९०६.

× × ×

तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा।
पूजा केली होय अपारा। तोषालागीं॥
१८–९१७.

या पूजेची मौज अशी आहे कीं, तिला खंड नाहीं. प्रतिमेची पूजा ही मर्यादित सेवा आहे. एक दिवस, सप्ताह, महिनाभर अशी कांहीं मर्यादित काल होणारी ती आहे. ती संपते व पुनः कालान्तरानें सुरू होते. ही तशी नव्हे, सर्वात्मक जो मी त्याची स्वकर्म मदर्पणबुद्धीनें करीत रहाणें ही अखंड सेवा आहे.

(४) परा, अव्यभिचारी, गुरवी, अनन्य-भक्तिः—कर्माचा आरंभ सकाम कर्म करण्यांत पण शेवट नैष्कर्म्य सिद्धींत अथवा ज्ञानप्रधानसंन्यासांत; त्याचप्रमाणें भक्तीचा प्रारंभ जरी प्रतिमापूजनांत अथवा आर्तस्थितींत असला, तरी तिचा शेवट ज्ञानीभक्तींत, 'शिवोभूत्वाशिवं यजेत्' याच्यांत आहे. ज्ञानराजांना आवडणारी अशी ही भक्ति आहे व यांत आश्चर्य नाहीं. कारण एक तर ते नांवाप्रमाणें ज्ञानराजच होत. शिवाय खुद्द गीतेंमध्यें सुद्धां जी उत्कृष्ट म्हणून भक्ति सांगितली आहे ती सर्वत्र ज्ञानी-भक्तीच आहे. सातव्या अध्यायांत श्लोक १७ मध्यें आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी अशा चार भक्तांचा निर्देश केला व अठराव्या श्लोकांत हे 'उदाराः सर्व एवैते' उदार म्हणजे उत्कृष्ट आहेत असें म्हटलें. पण भगवान् लगेच पुढें म्हणतात, 'ज्ञानीत्वात्मैव मे मतम्' (ज्ञानी तो माझा आत्मा). त्याचप्रमाणें अठराव्या अध्यायांत श्लोक ५४ मध्यें आपली 'परा' भक्ति म्हणून सांगतात, तीहि ज्ञानोत्तरच भक्ति आहे. भगवान् म्हणतात :—

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समःसर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥

ज्ञानेश्वर महाराज ह्याच भक्तीसंबंधीं पुढील ५५ व्या श्लोकाचें व्याख्यान करतांना लिहितातः—

ज्ञानी इयेतें स्वसंविति । शैव म्हणती शक्ति ।
आम्ही परम भक्ति । आपुली म्हणों ॥

याच ज्ञानोत्तर भक्तीचें 'अव्यभिचारी भक्ति', 'गुरवी भक्ति', 'अनन्यभक्ति' या प्रकारानें व्याख्यान केलेलें आहे. ज्ञानेश्वर महाराज हे भक्तीची बैठक अद्वैतज्ञानच समजतात. तुकारामबोवाहि एके ठिकाणीं असेंच म्हणतात,

'···पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥'

ज्ञानेश्वर महाराजांनीं एकदोन ठिकाणीं भक्तीच्या या बैठकीचें मोठें जोरदार समर्थन केलें आहे. ज्ञानोबांच्या दृष्टीनें भक्तीला ज्ञानाची बैठक इतकी आवश्यक आहे कीं, ते म्हणतात, 'म्हणून मद्रुप न होतां भक्तीचा लाग आहे काय?'

म्हणोनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना । गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ॥ क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें । अमृतचि होउनि मिळणें । अमृतीं जेवीं ॥ साडेपंधरा मिळावें । तैं साडेपंधरेंचि होआवें । तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥ हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती । म्हणोनि मी न होतां भक्ती ॥ अन्वयो आहे ॥
अ. १५, ५६४–५६७.

समुद्राहून वेगळी असती तर गंगा समुद्राला मिळेल कशी? त्याचप्रमाणें माझ्याहून वेगळें राहून माझा आनंद मिळणार कसा? पण या भूमिकेवर एक नेहमीं आक्षेप येतो कीं, जर भक्तच देव झाला तर भक्तीसुखाचा आनंद या अद्वैतांत कसा भोगतां येणार? गोडी घेणारा, भोक्ता हा भोग्य वस्तुहून वेगळा असावा लागतो. जसें पाणी पाण्याची गोडी चाखूं शकत नाहीं, झाड आपलीं फळें खात नाहीं. पाणी पिणारा पाण्याहून वेगळा, फळें खाणारा झाडाहून वेगळा तसा भोक्ता भोग्याहून वेगळा लागतो. अद्वैतज्ञानांत तर भोक्ता भोग्य झाला. आतां भोग कसा घडणार?

ज्ञानेश्वरमहाराजांनीं अध्याय १८ मध्यें याच शब्दांत पूर्वपक्ष करून त्याला पुढीलप्रमाणें उत्तर दिलें आहेः—

तोचि जालिया भोगु तयाचा । न घडे हा भावो जयांचा । तिहीं बोलें केवीं बोलाचा । उच्चारु कीजे ॥ ४२ ॥ तयांचां नेणो गांवीं । रवी प्रकाशी हन दिवी । कीं व्योमालागीं मांडवी । उभिलीं तिहीं ॥ ४३ ॥ हां गा राजत्व नव्हतां आंगीं । रावो रायपण काय भोगी । का आंधारु हन आलिंगी । दिनकरातें ॥ ४४ ॥ आणि आकाश जें नव्हे । तया आकाश काय जाणवे । रत्नाच्या रूपीं मिरवे । गुंजाचें लेणें ॥ ४५ ॥ म्हणौनि मी होणें नाहीं । तया मीचि आहे केहीं । मग भजेल हें कायी । बोलों कीर ॥ ४६ ॥ अ. १८, ११४२–४६

'तोच झाल्यावर त्याचा भोग घडत नाहीं'. त्यावर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'सूर्य सूर्याचें प्रकाशन करीत नाहीं का? शब्दानें शब्दाचा उच्चार होत नाहीं काय? उलट जर स्वतः राजा झाला नाहीं तर तो राजेपणाचा भोग भोगूं शकेल काय? त्याचप्रमाणें देव म्हणतात, मी जो

झाला नाहीं त्याला मीच आहे कोठें ? व मग तो माझी भक्ति करील यांत किती अर्थ रहाणार ?'

अनुभवामृताच्या नवव्या प्रकरणांतहि अद्वैतांत भक्ति होत नाहीं म्हणणाऱ्यांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

देव देऊळ परिवारु । कीजे कोरुनि डोंगरु ।
तैसा भक्तिचा व्यवहारु । कां न व्हावा ॥४३॥

एकाच डोंगरांत श्रीराम, त्यांचा परिवार, देऊळ हें सर्व करतां येतें; मग एकाच ज्ञानांत हा सेव्यसेवकपणाचा व्यवहार कां करतां येणार नाहीं ? ज्ञानेश्वरी अध्याय १२ श्लोक १६ 'अनपेक्षः शुचिः' यावर टीका करतांना तर ते स्पष्ट लिहितातः—

अर्जुना हा ठावोवरी । जो सोहंभावो सरोभरी । द्वैताचां पैलतीरीं । निगो सरला ॥ कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंची दोहीं भागीं । वांटूनियां आंगीं । सेवकै बाणे ॥ येरा नाम मी ठेवी । मग भजतां वोज बरवी । न भजत्या दावी । योगिया जो ॥

१८५–८७

ब्रह्मरूप झालेला महात्मा हा अद्वैत न मोडतां भज्यभजक द्वैत करून भक्तिसुखाचा आनंद लुटूं शकतो. अनुभवामृतांत ते म्हणतातः—अहो ऐक्याचें मुद्दल न ढळे । आणि साजिरेपणाचा लाभु मिळे । तरी स्वतरंगाची मुकुळे । तुरंबु का पाणी ॥

प्र. १–५९

आपल्या लाटाशीं असणाऱ्या अद्वैतांत भंग न येतां पाण्याला जर लाटांचा आस्वाद घेतां आला तर त्यानें कां न घ्यावा ? तसेंच देवाभक्तांचें ऐक्य न मोडतां जर भक्तीचा आनंद लुटतां आला, तर तो भक्तानें कां लुटूं नये ?

लक्षांत ठेवण्यासारखी महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं, केवलाद्वैताचे पुरस्कर्ते श्रीशंकराचार्य पण तेहि आपल्या षट्पदींत म्हणतातः—

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः ॥ ३ ॥

या ज्ञानप्रधानभक्तीची वेगवेगळ्या अंगांनीं ज्ञानेश्वरींत चर्चा आली आहे.

(१) क्रिया कीर न साहे । परि अद्वैतीं भक्ति आहे ॥

या भक्तीचा प्रकार असा आहे कीं, येथें देवाच्या नांवानें म्हणून क्रिया करायला वावच नाहीं. ही गोष्ट समजण्याकरितां शरणागतीचे दोन प्रकार लक्षांत घेणें अवश्य आहे. एका प्रकारास 'कर्तृतंत्र' शरणागति म्हणतात व दुसऱ्यास 'वस्तुतंत्र' शरणागति म्हणतात. पहिली शरणागति म्हणजे देवविषयक दंडवतादि कायावाचा-मनानें भक्ताकडून केल्या जाणाऱ्या क्रियेनें होणारी. दुसरी जी वस्तुतंत्र, येथें कर्ता हा वस्तुरूप म्हणजे देवरूप झालेला. कर्ता भिन्नच नसल्यानें क्रिया संपली. समजुतीच्या अंगानें वस्तुरूप होऊन रहाणें हीच शरणागति. 'भज् सेवायाम्' जो आपला भिन्नपणा सोडून ईश्वरांत नाहींसा झाला तोच भक्त. मिठानें मीठपणाचा मोह सोडून समुद्ररूप होऊन रहाणें अथवा 'सुवर्णमणि सोनिया । ये कल्लोळ जैसा पाणिया' अशी शरणागति ही वस्तुतंत्र शरणागति. ज्ञानोबाराय या भक्तीचें वर्णन पुढील ओंव्यां-तून करतातः—

या लागीं तो कर्मयोगी । मी जालाचि मातें भोगी । तारुण्य का तरुणांगीं । जियापरी ॥४७॥ तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे विंबीं । नाना अवकाश नभीं । लुंठतु जैसा ॥ ४८ ॥ तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे । अलंकारु का सहजें । सोनयातें जेवीं ॥ ४९ ॥ का चंदनाची द्रुती जैसी । चंदनीं भजे अपैसी । का अकृत्रिम शशी । चंद्रिका तें ॥ ११५०॥ तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचि जोगें नव्हे । बोला ऐसें ॥ ५१ ॥

अ. १८, ११४७–५१.

कांहीं न होऊन सहजस्थितीनें रहाणें असें या भक्तीचें स्वरूप आहे.

एऱ्हवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती ।
पैं माझिये सहजस्थिति । भक्तिनाम ॥१८–१११३

× × ×

या ज्ञानभक्ति सहज । भक्त एकवटला मज ।……

आतां या स्थितींत संघाताकडून जें कांहीं घडेल ती भक्तीच होणार ! कारण समुद्रावरील तरंग हा तिन्हीं काळीं समुद्राशीं एकरूपच झालेला असतो. तो कोणत्याहि अवस्थेंत समुद्राला सोडीत नाहीं. त्याचप्रमाणें हा भक्त कोणत्याहि अवस्थेंत देवाला सोडून नाहींच. यामुळें तो

बोलेल तें स्तवनच, करेल ती पूजाच ' यद्यत् कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम् । ' असें याचें झालें.

तो जे जे करतो ती देवाची भक्तीच, हें कसें तें समजण्याकरितां एक अर्वाचीन दृष्टान्त देतों. सेवानिवृत्त होऊन सेवानिवृत्तीचें वेतन घेणारा गृहस्थ कचेरींत नाहीं गेला, तरी त्याची नोकरी सुरूंच आहे, गेला तरी ठीक.

ज्ञानोबा म्हणतातः—

तेव्हां पूर्वसंस्कारछंदें । जें कांहीं तो अनुवादे ।
तेणें आळविलेनि बो दें । बोलता मीचि ॥११५२.

× × ×

तें भलतयाहि किरीटी । पदार्थाचिया भेटी ।
द्रष्टृदृश्यातीता दृष्टी । भोगी तो सदा ॥ ६४

× × ×

म्हणोनि सर्व मी जालेंपणें । ठेलें तया येणें जाणें ।
तेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ६८

× × ×

आणि शरीर स्वभाववशें । कांहीं येक करूं जरी
बैसे । तरी मीचि तो तेणें मिषें । भेटे तया ॥ ७३

× × ×

म्हणोनि करतयाही वोजा । तें न करणें होचि कपिध्वजा । निफजे तिया महापूजा । पूजी तो मातें ॥ ७९.

× × ×

एवं तो बोलें तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मजगमन । तो चाले तेंचि ॥ ११८०॥ तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा । तो असे तेंचि कपिध्वजा । समाधि माझी ॥ ११८१ ॥ जैसें कनकेंसीं कांकणें । असिजे अनन्यपणें । तो भक्तियोगें येणें । मजसीं तैसा ॥

इया अनन्यसिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं । मज आपणपैंया सुमती । द्रष्टयातें जाणे ॥ ८५ ॥

ज्ञानेशांनीं साठसत्तर ओव्यांतून या ' क्रिया कीर न साहे ' या भक्तीचें अप्रतीम वर्णन केलें आहे. त्याचा कांहीं सारांश वर दिला आहे, तें मूळांतच वघणें अवश्य आहे.

अनुभवामृताच्या नवव्या प्रकरणांत ' आंगेचि होतसे उपास्ति ' याचें उत्कृष्ट वर्णन आहे. तें वाचकांनीं अवश्य पहावें.

(२) ज्ञानी भक्तीचाच एक प्रकार **अव्यभिचारी भक्तिः** इचें वर्णन अ. १४ ' मांचयोऽव्यभिचारेण ' या २६ व्या श्लोकावर पुढीलप्रमाणें केलें आहे.

याकारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें ।
आपणासकट मातें । जाणावें गा ॥ ८२ ॥
पार्थां सोनयाची टिक । सोनयासी लागली देख ।
तैसें आपणपें आणिक । मानावें ना ॥ ८३ ॥
तेजाचा तेजौनि निघाला । परी तेजींचि असे लागला ।
तया रश्मी ऐसा भला । बोधु होआवा ॥ ८४ ॥
पैं परमाणु भूतळीं । हिमकणु हिमाचळीं ।
मजमाजीं त्याहाळीं । अहंतेसें ॥ ८५ ॥
हो कां तरंगु लहानु । परी सिंधूसी नाहीं भिन्नु ।
तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेचि मा ॥ ८६ ॥
ऐसेनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे ।
ते भक्ति पैं ऐसे । आम्हीं म्हणो ॥ ८७ ॥

सर्व विश्वाच्या रूपानें श्रीहरिच नटला आहे, हें जाणून आपल्यासकट सर्व ठिकाणीं त्याला पहाणें हीच अव्यभिचारी भक्ति होय. ज्ञानेश्वरमहाराजांनीं ही भक्ति सांगतांना भक्ति, ज्ञान व योग यांचा येथें समन्वय होतो असें सांगितलें आहे. ते म्हणतात,

ऐसेनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे । ते भक्ति पैं ऐसें । आम्ही म्हणों ॥ आणि ज्ञानाचें चांगावें । इयेचि दृष्टि नांवें । योगाचेंही आघवें । सर्वस्व हें ॥ ३८७–८८

( ३ ) हिचा आणखी एक प्रकार **गुरवी भक्तिः**— मुंगी पासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व ठिकाणीं परमात्माच भरला आहे असें जाणून ' नमस्कारीं भूतें विसरोनि याती ' ही नमनरूप गुरवी भक्ति होय.

तरी दोन्ही पालववेरी । जैसा एक तंतू अंबरीं ।
तैसा मीवांचूनि चराचरीं । जाणती ना ॥ २२०
आदि ब्रह्मा करूनी । शेवटीं मशक धरूनी ॥
माजी समस्त हें जाणोनि । स्वरूप माझें ॥ २१ ॥
मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती ।
देखिलिये वस्तु उजू लुंटिती । मीचि म्हणोनि ॥ २२ ॥
आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।
एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥ २३ ॥
जैसें उंचीं उदक पडिलें । तें तळवटवरी ये उगेलें ।
तैसें नमिजे भूतजात देखिलें ।
ऐसा स्वभावोचि तयांचा ॥२४॥

कां फळल्या तरूची शाखा ।
सहजें भूमीसी उतरे देखा ।
तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥ २५ ॥
अखंड अगर्वता होऊनि असती ।
तयांची विनय हेचि संपत्ती ।
जे जयमंत्रें अर्पिती । माझांचि ठायीं ॥ २६ ॥
नमितां मानापमान गळाले ।
म्हणोनि अवचिता ते मीचि जहाले ।
ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥ २७ ॥
अर्जुना हे गुरुवी भक्ती । सांगितली तुजप्रती ।......
अ. ९, २२०–२८.

ज्ञानेश्वर महाराज दहाव्या अध्यायांत म्हणतात :—
जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥ ११८.

विनय, अगर्वता इत्यादि गुणांनीं युक्त होऊन गुणदोषरहित दृष्टीनें सर्वत्र परमात्मा बघणें ही नमन भक्ति होय.

(४) सर्व ठिकाणीं परमात्मा भरला आहे असें जाणून भजणें हीच **अनन्यभक्तिः**—

परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गतिचि नेणे ॥ ६८६ ॥ कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसिती । गंगा जैसी अनन्यगती । मिळालीचि मिळे ॥८७॥ तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें । मजमाजीं संचरें । मीचि होऊनी ॥८८॥ आणि तैंवीचि मी ऐसा । थडिये माझारीं सरिसा । क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ॥८९॥ तैसें मज लागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं । भजनाथि कां दुसरी । भ्रांति नाहीं ॥६९०॥
अ. ११, ६८६–९०

(५) याचाच एक उत्कृष्ट प्रकार म्हणजे **ज्ञानोत्तर प्रेमलक्षणा भक्तिः**—अद्वैतानुभवाला प्राप्त झाल्यावरहि भगवंताच्या प्रेमलक्षणात्मक भक्तीचा आस्वाद घेणारा भक्त हा या भक्तीच्या सदरांत येतो.

ज्ञानोबाराय म्हणतातः—जया भक्तीची येतुली प्राप्ति । जे कैवल्यातें परौतें सर म्हणतीं । जयाचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ १९२ ॥ ...... ऐसे जे महानुभाव । दैविये प्रकृतीचे दैव । जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥ मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे । परि दुजेपण मनोधर्में । शिवतलें नाहीं ॥ ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक ॥ तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे । जें नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥
अ. ९, १९२–९७

भगवान् या ठिकाणीं 'मीचि होऊन माझी चरणसेवा करीतच रहाणारे' जे भक्त त्यांचें वर्णन करतात.

अनुभवामृतांत प्र. ९ मध्यें ज्ञानदेव म्हणतात, जर देवाची सेवाचाकरी करून सेवेचा आनंद भोगावा अशी इच्छा उत्पन्न झाली, तर त्याला काय अडचण आहे !

ऐसियाहि स्वामीभृत्यसंबंधा । लागी उठली श्रद्धा ।
तें देवोचि नुसधा । कामविजे ॥ ३९ ॥

याच संबंधांत जसें एकाच डोंगरांत देव, देऊळ, परिवार कोरतां येतो तसें देव भक्त हे एकाच ज्ञानांत कां मानतां येऊं नयेत ? असें त्यांनीं म्हटलें आहे. ज्ञानेशांना हा भक्तीचा प्रकार इतका आवडतो, कीं ते या भक्तीला पांचवा पुरुषार्थ म्हणतात.

' चहूं पुरुषार्थाशिरीं । भक्ति जैसी ॥
अ. १८ ओं. ८६७

'शिवोभूत्वाशिवं यजेत्' ही जी भक्तीची वैदिक भूमिका आहे, तिच्यावरच आचार्यांची व ज्ञानदेवांची ही भक्तीची इमारत उभारलेली आहे. तात्पर्य, देव होऊन देवाला भजणें हे ज्ञानेशांच्या दृष्टीनें भक्तीचें वर्म आहे. व याचाच महाराष्ट्रांतील भागवतधर्मीय भक्तिपंथावर परिणाम झालेला आहे.

महाराष्ट्रामध्यें सोन्याला सुगंध असावा, त्याप्रमाणें अद्वैत व भाक्ति यांचा समन्वय आहे. भक्त्याचार्य म्हणून जे प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीं मध्वाचार्य तर उघड उघड द्वैतीच आहेत. पंचभेदांपैकीं त्यांच्या दृष्टीनें ईशजीवभेद हा मुख्यच. रामानुजाचार्य व वल्लभाचार्य हे जरी आपणांस अनुक्रमें विशिष्टाद्वैती व शुद्धाद्वैती म्हणवीत असले तरी तेहि देवभक्तसंबंधांत द्वैतीच. यांच्या मतें भक्त हा देव कधींच होत नाहीं. 'तत्त्वमसि' महावाक्याचा अर्थ रामानुज 'तस्य त्वं असि' असा करतात. महाराष्ट्रांत मध्ययुगांत झालेल्या संतांनीं अद्वैत व भाक्ति यांचा समन्वय केला व

अद्वैतानुभवावर भक्तीची इमारत उठवली. या विचारास बैठक जर कोणी पुरवली असेल तर ती ज्ञानराजांनीं. श्रीएकनाथ, तुकोबाप्रभृति भागवतधर्मी संत ह्या भक्तीचाच पुरस्कार करतात.

नाथांचें 'भागवत' म्हणजे या ज्ञानोत्तरभक्तीचा पुरस्कारच आहे. त्यांच्या सर्वच ग्रंथांतून या भक्तीचा उत्कृष्ट आविष्कार दिसून येतो. नमुन्याकरितां म्हणून एका अभंगाचीं दोन कडवीं देतोः—

सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ।
ज्ञानाचा उद्बोध भक्तिप्रेमाचा कल्लोळ ॥१॥
धन्य जगीं तोचि एक हरिरंगीं नाचे।
रामकृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे ॥२॥

तुकारामबोवा असेंच म्हणतात :—

येणें बोधें आम्ही असों सर्वकाळ।
करूनि निर्मळ हरिकथा ॥

× × ×

गाय वासुदेव वासुदेवा। भिन्न नाहीं आणिका नांवा।

× × ×

घेईन मी जन्म याजसाठीं देवा।
तुझी चरणसेवा साधावया ॥ ३ ॥
हरिनामकीर्तन संतांचें पूजन।
घालीन लोटांगण महाद्वारीं ॥ ४ ॥

× × ×

मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी।
होय सांगो ऐसी तुका म्हणे ॥ ५ ॥

त्यांचा प्रसिद्ध अभंगः—

हेंचि दान दे गा देवा। तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी। हेंचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥
नलगे मुक्ति आणि संपदा। संतसंग देई सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासी। सुखें घालावें आम्हासी ॥ ४ ॥

## भक्तीचें उदारत्व

आणखी एक याबाबत मुद्दा सांगावयाचा राहिला आहे, तो जर सांगितला नाहीं तर ज्ञानेश्वरींतील भक्तीचा हा सांगितलेला विचार अपुराच राहील. तो मुद्दा म्हणजे भक्तीची पावन करण्याची शक्ति. गीतेच्या नवव्या अध्यायांत याची फारच विस्तृत व गोड चर्चा ज्ञानराजांनीं केली आहे. 'श्रीरामरावण यांचें युद्ध कसें झालें? तर रामरावण जैसे भिनले समरीं असेंच.' त्यास दुसरा दृष्टान्त नाहीं. तसा नववा अध्याय, नवव्या अध्यायासारखाच असें ते म्हणतात. यास जीं अनेक कारणें आहेत, त्यांपैकीं त्यांत भक्तीचें अपूर्व महात्म्य वर्णन केलेलें आहे, हें एक महत्त्वाचें कारण आहे. भक्तीचें महात्म्य वर्णन करीत असतां ज्ञानेश्वरमहाराजांच्या स्फूर्तीस मोठें भरतें आलें आहे.

या अध्यायांतील 'अपि चेत् सुदुराचारो' या श्लोकांत भगवान् अर्जुनाला सांगत आहेत कीं, अर्जुना, मनुष्य कितीहि दुष्ट आचरणाचा असेना, जर पूर्वकर्माबद्दल पश्चात्ताप होऊन माझ्या भक्तीच्या वाटेला तो लागला तर त्याची पूर्वीची पापरूपता संपली. कोणी एक गृहस्थ महापुरांत पोहण्यास पडला व पाण्याच्या ओघांत सांपडून खालीं वहात जाऊं लागला. कांठावरचे लोक तो मेला असेंच समजूं लागले. पण असें घडून आलें, कीं तो निचेष्ट होऊन पाण्याबरोबर खालीं वहात जात असतांना त्याला एका गांवच्या लोकांनीं पाहिला, त्यांनीं नाव तेथपर्यंत नेऊन त्याला पाण्याबाहेर काढला, चाकावर घातला, पोटांतलें पाणी पडलें, कांहीं दिवसांनीं तो सुधारला व आपल्या गांवाला परत गेला. तो जवळ-जवळ बुडाला होता; पण शेवटीं जिवंत निघाला. यामुळें त्याचा जिवंतपणा हाच खरा ठरला; व तो पाण्यांत बुडाला हें खोटें झालें. तसा पापांत बुडून गेलेला मनुष्य पूर्वीचा पापी खरा; पण उरलेलें आयुष्य ज्यानें शेवटीं भक्तीला दिलें, त्याचें पूर्वीचें पाप खोटें ठरलें. ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः—

ऐसें भजतेनि प्रेमभावें। जया शरीरहि पाठीं न पवे। तेणें भलतया व्हावें। जातीचिया॥ आणि आचरण पाहातां सुभटा। तो दुष्कृताचा कीर सेल वांटा। परी जीवित वेचलें चोहटा। भक्तीचिया कीं॥ अगा अंतीचिया मती। साचपण पुढिले गती। म्हणोनि जीवित जेणें भक्ती। दिधलें शेखीं॥ तो आधीं जरी दुराचारी। तरी सर्वोत्तमुचि अवधारीं। जैसा बुडाला महापुरीं। न मरतु निघाला॥ तयाचें जीवित ऐलथडिये आलें। म्हणोनि बुडालेपण जेविं वायां गेलें। तेविं नुरेचि पाप केलें। शेवटलिये भक्ती॥

अ. ९, ४१५–१९.

असा जो देवाचा भक्त झाला, त्याचा उद्धार व्हायला किती वेळ लागणार! ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हा प्रश्नच चुकीचा आहे. जो अमृतांत राहील त्याला मरण कोठलें?

अनन्य होऊन त्यांनीं चित्तवृत्ति का मला दिली कीं माझी स्वरूपशांती त्याला मिळते व मग एका दिव्यावर लावलेला दुसरा दिवा यांपैकीं पहिला कोण व दुसरा कोण हें कळत नाहीं, इतका दुसरा पहिल्यासारखा होतो; तसा तो पूर्वीचा पापी खरा पण माझ्या नित्य शांतीनें युक्त होऊन मजसारखा होतो.

खरें सांगावयाचें म्हणजे अर्जुना, जशी सूर्य नाहीं ती रात्र तसें **माझ्या भक्तीविण कर्म तें पाप.** अज्ञाणी स्वर्गाला देणाऱ्या कर्मास पुण्य म्हणतात व नरकास नेणाऱ्या कर्मांला पाप म्हणतात. खरें पाहिलें तर ही दोन्हीं पापेंच आहेत. एक पुण्यात्मक पाप जें स्वर्गाला देतें व दुसरें पापात्मक पाप कीं जें नरकाला नेतें. माझ्यांत राहून मजपासून दुरावणाऱ्यास पुण्य कसें म्हणतां येईल! ज्ञानोबा म्हणतात, 'स्वर्ग नरक या वाटा चोरांचिया', त्या अव्हाटा आहेत. माझी भक्ति करणारा पापयोनी, मूढ, दुष्टाचरणाचा ठोकळा वाटा, श्रुताधीत नसलेला, कोणी कां असेना! फार काय, शरिराच्या नांवानें त्याला पशूचें मिळालेलें असलें तरी चालेल. पण तो भक्त पाहिजे. मग तो मद्‌रूप झाला यांत शंकाच नाहीं. प्रल्हाद असुरकुळांत जन्माला आला खरा, पण त्याला असुर कोण म्हणेल? माझ्या भक्तीनें तो माझ्यासारखा इतका झाला कीं मी जें देऊं शकतों तें देण्याचें सामर्थ्य त्याला प्राप्त झालें.

शरिराला काय किंमत आहे? माझ्या प्रसादाला किंमत आहे. चामड्याचा तुकडा आहे पण त्याच्यावर जर राजमुद्रा असेल तर त्यानें बाजारांतल्या वस्तु विकत मिळतात. उलट सोनें आहे पण शिक्का नसेल, तर तें बाजारांत चालणार नाहीं. तसेंच ब्राह्मणाचें शरीर आहे पण भक्ति नाहीं, तर काय उपयोग? उलट अंत्यज आहे पण भक्त आहे तर तो तरला जाईल.

शेवटीं ज्ञानेश्वरमहाराज दोन निष्कर्ष काढतात. एक, देवाकडे मन लागलें पाहिजे हें मुख्य. भक्तीनें लागलें तर तो तरेल यांत काय नवल? विषय, विराग, द्वेष या भावनेनें देवाकडे आले तेहि तरले. 'वरि फोडावया लागीं। लोहो मिळो कां परिसाअंगीचे। कां जे मिळतिये प्रसंगीं। मीचि होईल॥'

दुसरें, मनुष्यजन्माला येऊन भक्त झाला नाहीं तर त्याचा मनुष्यजन्म फुकट. भक्तीचें उदारत्व सांगणारा पुढील नवव्या अध्यायांतील उतारा लांब पण उत्कृष्ट आहेः—

अगा नांवें घेतां वोखटीं। जे आघवेया अधमाचिये शेवटीं।
तिये पापयोनीं ही किरीटी। जन्मले जे॥ ४३॥
ते पापयोनि मूढ। मूर्ख जैसे कां दगड।
परि माझ्या ठायीं दृढ। सर्वभावें॥ ४४॥
जयाचिये वाचे माझे आलाप। दृष्टी भोगी माझेंचि रूप।
जयांचें मन संकल्प। माझाचि वाहे॥ ४५॥
माझिया कीर्तीविण। जयांचे रिते नाहीं श्रवण।
जयां सर्वांगीं भूषण। माझी सेवा॥ ४६॥
जयांचें ज्ञान विषो नेणें। जाणीव मज एकातेंचि जाणें।
जया ऐसें लाभे तरी जिणें। एऱ्हवीं मरण॥ ४७॥
ऐसा आघवाचि परी पांडवा। जिहीं आपुलिया सर्वभावा।
जियावयालागीं वोलावा। मीचि केला॥ ४८॥
ते पापयोनीही होतु कां। ते श्रुताधीतही न होतु कां।
परि मजसिं तुकितां तुका। तुटी नाहीं॥ ४९॥
पाहें पां भक्तीचेनि आथिलेपणें। दैत्यीं देवा आणिलें उणें।
माझें नृसिंहत्व लेणें। जयाचिये महिमे॥५०॥
तो प्रल्हादु गा मजसाठीं। घेतां बहुतें सदा किरीटी।
कां जें मियां द्यावें तें गोष्टी। तयाचिया जोडे॥५१॥
एऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें। परि इंद्रही सरी न लाहे उपरें।
म्हणोनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण॥५२॥
राजाज्ञेचीं अक्षरें आहाती। तियें चामा एका जया पडती।
तया चामासाठीं जोडती। सकळवस्तू॥ ५३॥
वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे। एथ राजाज्ञाचि समर्थ आहे।
तेचि चाम एक जैं लाहे। तेणें विकती आघवीं॥५४॥
तैसें उत्तमत्व तैंचि तरे। तैंचि सर्वज्ञता सरे।
जैं मनोबुद्धि भरे। माझेनि प्रेमें॥ ५५॥
म्हणोनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण।
एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक॥ ५६॥
तेंचि भलतेणें भावें। मन मज आंतु येतें होआवें।
आलें तरी आघवें। मागील वावो॥ ५७॥
तैसे तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ।
मग होऊनि ठाकती केवळ। गंगारूप॥ ५८॥

कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंवचि घटे ।
जंव न घापती एकवटे । अग्नीमाजीं ॥ ५९ ॥
तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥४६० ॥
मग जाति व्यक्ती पडे बिंदुलें । जेव्हां भावें होती मज मीनलें ।
जैसे लवणकण घातले । सागरामाजीं ॥ ६१ ॥
तंववरी नदनदींचीं नांवें । तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे ।
जंव न येती आघवे । समुद्रामाजीं ॥ ६२ ॥
हेंचि कवणें एके मिसें । चित्त माझें ठायीं प्रवेशे ।
येतुले हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ६३ ॥

माझ्या भक्तिकरतां उपायांची वाणी नाहीं.

अगा वरी फोडावयालागीं । लोहो मिळो कां परिसाचे आंगीं ।
कां जे मिळतिये प्रसंगीं । सोनेंचि होईल ॥ ६४ ॥
पाहें पां वाल्भाचेनि व्याजें । तिया व्रजांगनांचीं निजें ।
मज मीनलिया काय माझें । स्वरूप नव्हती ॥ ६५ ॥
ना तरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें ।
कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ॥ ६६ ॥
अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां ।
कीं ममत्वें वसुदेवा— । दिकांसकळां ॥ ६७ ॥
नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका इन सनत्कुमारा ।
इयां भक्ती मी धनुर्धरा । प्राप्यु जैसा ॥ ६८ ॥
तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें ।
येरां घातकें मनोधर्में । शिशुपालादिकां ॥ ६९ ॥
अगा मी एकलाणीचें खागें । मज येवो पां भलतेनि मार्गें ।
भक्ति कां विषयविरागें । अथवा वैरें ॥ ४७० ॥
म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझां ठायीं ।
उपायांची नाहीं । वाणी एथ ॥ ७१ ॥
आणि भलतिया जाती जन्मावें । मग भाजिजे का विरोधावें ।
परि भक्त कां वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ७२ ॥

पतितांना पावन करणारी उदार अशी भक्ति आहे, हें जाणून भगवान् मोठ्या कळवळ्यानें सांगतात कीं, कुळाच्या शुद्धतेवर, आपल्या ज्ञानावर, रूपावर, वयावर, कशावर अवलंबून राहूं नका. या भक्तीच्या वाटेस लागा. जीविताची कृतकृत्यता याच्यांत आहे.

एथ पार्था पुढत पुढती । तेंचि तें सांगों किती ।
जरी मियां चाड तरी भक्ती । न विसंबिजे गा ॥४३०॥
अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । अभिजात्य झणें श्लाघा ।
व्युत्पत्तीचा वाउगा । सोसु कां वाहावा ॥ ३१ ॥
कां रूपवयसा माजा । आथिलेपणें कां गाजा ।
एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ॥ ३२ ॥
कणेंविण सोपटें । कणसें दाटलीं घनदाटें ।
काय करावें गोमटें । वोस नगर ॥ ३३ ॥
ना तरी सरोवर आटलें । रानीं दुःखिया दुःखी भेटलें ।
कां वांझ फुलीं फुललें । झाड तैसें ॥ ३४ ॥
तैसें सकळ तें वैभव । अथवा कुळ जाति गौरव ।
जैसें शरीर आहे सावेव । परि जीवचि नाहीं ॥ ३५ ॥
तैसें माझिये भक्तिविण । जळो तें जियालेपण ।
अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ॥ ३६ ॥
पैं हिंवराची दाट साउली । सज्जनीं जैसी वाळिली ।
तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तातें ॥ ३७ ॥
निंब निंबोळिया मोडोनि आला । तरी तो काउळियांसीचि सुकाळु जाहला ।
तैसा भक्तिहीनु वाढिन्नला । दोषांचि लागीं ॥ ३८ ॥
कां षड्रस खापरीं वाढिले । वाढूनि चोहटां ठेविले ।
ते सुणियाचेचि ऐसे झाले । जियापरी ॥ ३९ ॥
तैसें भक्तिहीनाचें जिणें । जो स्वप्नीहि परि सुकृत नेणें ।
तेणें संसारदुःखासि आवंतणें । वोगरिलें ॥ ४४० ॥
म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें ।
वरि देहाचेनि नांवें । पशूचेंही लाभो ॥ ४१ ॥
पाहें पां सावजें हातिरूं धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें ।
कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पावलिया मातें ॥४२॥
अ. ९ ओं. ४३० ते ४२

अर्जुनालाहि भगवान् म्हणतातः—

'तरी झडझडोनि वहिला नीघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।
जेणें पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥'

अ. ९–५१६.

दीन आणि दुर्बळांना तारून नेणारा हा भक्तिमार्ग आहे. म्हणूनच ज्ञानोबाराय म्हणतात, 'तो देवाला फार प्रिय कीं जो—

'···पुरुषार्थ सिद्धि चौथी । घेऊनि आपलिया हातीं ।
रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥' अ. १२–२१९.

---

## १४. ज्ञानेश्वरींतील ज्ञानयोग

ज्ञानेश्वरमहाराज गीता हें 'मोक्षदानीं स्वतंत्र ज्ञानप्रधान' असें शास्त्र समजतात. खुद्द गीतेंतच 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' (अ. ४–३८) असें ज्ञानाचें वर्णन केलें आहे व त्यावर ज्ञानोबा लिहितात—

'या महातेजाचेनि कसें। जरी चोखाळु प्रतिबिंब दिसे। कां गिंवसिलें गिंवसें। आकाश हें॥ नातरी पृथ्वीचेनि पाडें। कांटाळें जरी जोडे। तरी उपमा ज्ञानीं घडे। पंडुकुमरा॥' १८०–८१

यावर कोणी म्हणेल कीं, अहो गीतेंत पांचव्या अध्यायाच्या आरंभीं अर्जुनानें प्रश्न केला कीं दोन निष्ठांपैकीं एक निश्चित सांग कीं, जिच्या योगानें मला निःश्रेयसाची प्राप्ति होईल. दुटप्पी बोलूं नकोस. त्यावर भगवंतांनीं '**कर्मयोगो विशिष्यते**' असें उत्तर दिलें आहे. ज्ञानेश्वरमहाराज याचा अर्थ असा करतात कीं, ज्ञान म्हणजे 'धांवतया कर्मांची लाणी', 'सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' म्हणून सर्वश्रेष्ठ; पण, भगवान 'कर्मयोगो विशिष्यते' म्हणतात, याचें कारण असें आहे कीं कर्मयोगाचे अधिकारी फार व त्याच्यांतून गेल्याविना ज्ञानप्राप्ति होत नाहीं. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात,

तरी जाणां नेणां सकळां। कर्मयोग कीर प्रांजळा। जैसी नाव स्त्रिया बाळां। तोयतरणीं॥ अ. ५–१६

भोपळ्याच्या सहाय्यानें एकाद दुसरा तरेल. पण नाव ही अशी आहे कीं, पोहतां येवो न येवो तींत बसेल त्या सर्वांना ती परतीराला घेऊन जाईल. तसा कर्मयोग हा साधक वैराग्यसंपन्न असो नसो सर्वांना परतीराला घेऊन जाईल. ज्ञानयोगाचें तसें नाहीं. विरक्ती वांचूनि केहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं.' म्हणून 'कर्मयोगो विशिष्यते'. येऱ्हवीं ज्ञान हेंच सर्व उपायांत श्रेष्ठ आहे. त्यांच्या मतें मोक्ष ज्ञानानेंच मिळतो. ते म्हणतात–

जें ज्ञान जयाचां हातीं। तोचि समर्थु मुक्ती। जैसा शतमख संपत्ती। स्वर्गींचिये। कां शत एक जन्मा। जो जन्मोनि ब्रह्मकर्मा। करी तोचि ब्रह्मा। आनु नोहे॥ नाना सूर्याचा प्रकाशु। लाहे जेवीं डोळसु। तेवीं ज्ञानेंचि सौरसु। मोक्षाचा तो॥ अ. १५–३०–३२



सोळाव्या अध्यायांत ते म्हणतात—

भरूनि प्रपंचाचा घोटु। कीजे देखतयाचि देखतां द्रष्टु। आनंदसाम्राज्यीं पाटु। बांधिजे जीवा॥ येवढेया लाठेपणाचा उपावो। आनु नाहींचि म्हणे देवो। हा सम्यक् ज्ञानाचा रावो। उपायांमाजीं॥ ५०–५१

अशा ज्ञानाच्या कथनाकरितां गीता आहे अशी ज्ञानेशांची गीतेकडे बघण्याची दृष्टि. त्यांनीं गीतेसंबंधानें म्हटलेंच आहे 'मोक्षदानीं स्वतंत्र' 'ज्ञानप्रधान' हें शास्त्र. म्हणून ज्ञानकथनप्रसंगीं त्यांच्या स्फूर्तीस अलोट भरती यावी यांत आश्चर्य कसलें! ज्ञानेश्वरी हा ग्रंथ आपल्या नांवाप्रमाणें खरोखरच 'ज्ञानेश्वरी' आहे. म्हणूनच ज्ञानराजांच्याप्रमाणें त्यांच्या या ग्रंथाची साधुसंत सेवा करतात. अ. १३ मध्यें ज्ञानगुणांचें वर्णन श्रवण करून श्रोते संत ज्ञानराजांच्यावर इतके खुष झाले, कीं त्यांनीं ज्ञानदेवांना 'ज्ञानी देखणा होसी' अशी पदवी बहाल केली. तो प्रसंग ज्ञानेश्वरींत पुढीलप्रमाणें वर्णन केला आहे—

'तंव श्रोता म्हणितलें असो। न संगतियाचा अतिसो। ग्रंथोक्ती तेथ आडसो। घालिसी कां॥ तुझा हाचि आम्हां थोरु। वक्तृत्वाचा पाहुणेरु। जे ज्ञान विषो फारु। निरोपिला॥ .. ...कथा ज्ञानलेशोद्देशें। कीजती योगादि सायासें। तें घणींचें आणि हाभिया ऐसें। निरूपण॥ अमृताची सोनवांकुडी। लागो कां अनुघडी। सुखाचां दिसीकोडी। गणिजतु कां॥ पूर्ण चंद्रेंसी राती। युग एक असो न पाहती। तरी काय पाहत आहाती। चकोरें ते॥ तैसें ज्ञानाचें बोलणें। आणि येणें रसाळपणें। आतां पुरे कोण म्हणे। आकर्णितां॥ आणि सभाग्यु पाहुणा ये। सुभगाचि वादती होये। तैं सरो नेणें रसोये। ऐसें आथी॥ तैसा जाहला प्रसंगु। जे ज्ञानीं आम्हांसी लागु। आणि तुजही अनुरागु। आथि येथ॥ म्हणोनि बापा व्याख्याना। पासीं से आली चौगुणा। ना म्हणों नये देखणा। होसी ज्ञानी॥ अ. १३, ६३३-६४५

आपण आतां या 'धांवतया कर्मांची लाणी' व 'थकेलिया साधनांची धणी' असें जें ज्ञान त्याच्या ज्ञानोबारायांच्या 'धणीच्या' निरूपणाकडे वळूं.

गीतेच्या साधनांतील कर्मयोग ही पहिली पायरी तर

ज्ञानयोग ही शेवटली पायरी आहे. ज्ञानेश्वर महाराज ज्ञानाचें पुढीलप्रमाणें वर्णन करतातः—

'देखें परमात्मसुखनिधान। साधावया योगीजन। जें न विसंबिती अंजन। उन्मेषनेत्रीं॥ जें धांवतया कर्मांची लाणी। नैष्कर्म्यबोधाची खाणी। जें भुकेलिया धणी। साधनांची॥ जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली। तर्कांची दिठी गेली। जेणें इंद्रियें विसरलीं। विषयसंगु॥ मनाचें मनपण गेलें। जेथ बोलाचें बोलपण ठेलें। जयामाजि सांपडलें। ज्ञेय दिसे॥ जेथ वैराग्याचा पांगु फिटे। विवेकाचाहि सोसु तुटे। जेथ न पाहतां सहज भेटे। आपणपें॥ अ. ४–१६०–६४

१३ व्या अध्यायांतहि असेंच वर्णन आहे. तिसऱ्या अध्यायामध्यें अर्जुनाच्या प्रश्नास उत्तर म्हणून भगवंतांनीं 'ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्' अशा दोन निष्ठा सांगितल्या. त्यावर ज्ञानेश्वर महाराजांनीं जें व्याख्यान केलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, त्यांच्यामतें या दोन स्वतंत्र निष्ठा नसून, मूळांत एकाच साधनेचे दोन विभाग आहेत; अधिकारपरत्वें भिन्नत्व प्राप्त झालेल्या एकमेकींस पूरक अशा या दोन निष्ठा आहेत. कर्मयोग हा ज्ञानयोगाचा पाया आहे, तर ज्ञानयोग हें कर्मयोगाचें शिखर आहे. त्याचें आचरण करणारे भिन्न अधिकाराचे असल्यानें त्या स्वतंत्र निष्ठा म्हणून सांगितल्या आहेत. ज्ञानदेवांनीं या निष्ठांचा संबंध खालील ओंव्यांतून अनेक उत्कृष्ट दृष्टांत देऊन सांगितला आहे. त्यांपैकीं एक दृष्टांत द्यावयाचा तर पक्षी हा वृक्षावरील फळाला एका झेपेंत जाऊन भिडतो, पण माणसाला तसें करणें शक्य नाहीं. तो त्या ठिकाणीं खात्रीनें पोंचेल, पण त्यास कांहीं वेळ लागेल. कारण त्याला या फांदीवरून त्या फांदीवर, त्या वरून पुढच्या फांदीवर असें करीत करीत फळापर्यंत पोंचावें लागतें.

हे मार्गु तरी दोनी। परि एकवटती निदानीं। जैसी सिद्धसाध्य भोजनीं। तृप्ती एक॥ कां पूर्वापर सरिता। भिन्न दिसती पाहतां। मग सिंधुमिळणीं ऐक्यता। पावती शेखीं॥ तैसीं दोनीही मतें। सूचिती एका कारणातें। परी उपास्ति ते योग्यते। आधीन असे॥ देखें उत्प्लवना सरिसा। पक्षी फळासी झोंबे जैसा। सांगे नर केवीं तैसा। पावे वेगां॥ तो हळू-हळू ढाळें ढाळें। केतुलेनि एकें वेळें। मार्गाचेनि बळें। निश्चित ठाकी॥ १८–४२

एकास विहंगम व दुसऱ्यास पिपीलिका मार्ग म्हणून इतर ग्रंथांतूनहि हाच भेद सांगितला जातो.

ज्ञानयोग व कर्मयोग यांतील हा संबंध सांगण्याचें कारण असें आहे कीं, ज्ञानदेव हे ज्या ज्या ठिकाणीं ज्ञानयोग सांगतात, त्या त्या ठिकाणीं साधकानें कर्मयोगाचें आचरण करूनच ज्ञानयोग आचरण्याची तयारी केली आहे, असें प्रारंभीं दाखवितात. या तयारीविना जो ज्ञानयोगाचें आचरण करूं लागतो त्याच्या पदरांत परमसिद्धिरूप फल पडणें जवळजवळ अशक्यच असतें असें त्यांचें मत आहे.

गीता अ. ७ श्लोक १९ 'बहूनां जन्मनामंते ज्ञानवान् मां प्रपद्यते।' या प्रसिद्ध श्लोकावर ज्ञानयोगांतील मुख्य मुख्य पायऱ्या थोडक्यांत पण सुंदर रीतीनें त्यांनीं सांगितल्या आहेत व त्याचाच विस्तार पुढें अठराव्या अध्यायांत त्यांनीं केला आहे. या श्लोकावर ते लिहितातः—

जे तो विषयांची मोट झाडी। मार्जी कामक्रोधांचीं सांकडीं। चुकावूनी आला पाडीं। सद्वासनेचिया॥ मग साधुसंगें सुभटा। उजू सत्कर्मांचिया वाटा। अप्रवृत्तीचा अव्हांटा। डावलूनि॥ आणि जन्मशतांचा वाहतवणा। तेवींचि आशेचिया न लेचि वाहणा। तेथ फळहेतुचा उगाणा। कवणु चाळी॥ ऐसा शरीरसंयोगाचिये राती–। माजीं धांवतां सडिया आयती। तंव कर्मक्षयाची पाहती। पाहांट जाली॥ तैसीच गुरुकृपाउखा उजाळली। ज्ञानाची वोतपली पडली। तेथ साम्याची ऋद्धि उघडली। तयाचिये दिठी॥ अध्याय ७, १२७–३१

या मार्गांतील प्रथम पायरी 'सद्वासना' ही आहे. योगवासिष्ठादि ग्रंथांतून हिलाच 'शुभेच्छा' म्हटलें आहे. पण ही पायरीच मूळांत इतकी उंच आहे, कीं ज्ञानेश्वर महाराजांनीं जो ती चढून आला त्याचें "आला पाडीं। सद्वासनेच्या" असें वर्णन केलें आहे. पहाड चढून वरती टोंकाला जाणें हें ज्याची छाती कमकुवत आहे त्यास जसें जमत नाहीं; तसें कामक्रोधादि विकारांनीं ज्याचें चित्त पोखरलें आहे, त्याच्या ठिकाणीं सद्विषयक वासना निर्माण होणें कठीण आहे. ज्ञानेश्वर महाराज

रूपकानें सांगतात कीं, साधनरूप डोंगराच्या पायथ्याशीं विषयाची दाट झाडी असून त्यांत कामक्रोधासारखीं हिंस्र श्वापदें राहतात. ज्ञानयोगपथावरील पांथिक –ज्ञानयोगाचा साधक– हा या श्वापदांना चुकवून सद्वासनेच्या पहाडावर येतो. याचा अभिप्राय असा आहे कीं, मनुष्याच्या अंत:करणांत कामक्रोधादि विकार असतात. ते मनुष्याला विषयोपभोगाच्या बाहेर पडूं देत नाहींत. त्याचें सर्व जीवन त्याच्यांतच जातें. त्यामुळें त्यास परमार्थ कसा घडणार ? या मार्गांवरील साधकानें तीव्र वैराग्याच्या साह्यानें या विकाररूपी श्वापदांचा हल्ला चुकविला आणि म्हणून तो सद्वासनारूपी पहाडावर सुरक्षितपणें येऊन पोंचला. एकनाथ महाराजहि असेंच सांगतात कीं, अंत:करणांतील पांच विषयांचा स्नेह ज्या वेळीं नाहींसा होतो, त्या वेळीं, आंत सद्बुद्धीचा उदय होतो. " पांचांहि विषयांचे शेवटीं । उपजे सद्बुद्धि गोमटी ॥ ( रुक्मिणी स्वयंवर )

साधक हा एकदां का या सद्वासनेच्या पहाडावर पोंचला, कीं मग त्याची व या देवाच्या यात्रेस निघालेल्या साधुवाटसरूंची गांठ पडते व पुढील मार्ग आक्रमण करणें त्यास सोपें जातें. मग त्यांच्याबरोबर चालल्यानें अप्रवृत्तीची आडवाट सुटते व सत्कर्मरूपी सरळ वाट साधक चालतो; पण, देवदर्शनाला निघालेला भक्त हा जसा पायांत वहाणा न घालतां अनवाणी जातो, तसाच हा पांथिकहि आस्थेच्या वहाणा न घालतां शेंकडो जन्म विहितकर्मरूपी कर्मांची वाट चालतच राहातो. असा शरीरसंयोगरूपी रात्रींत एकटा धांवत राहतो, म्हणजे कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून सारखा कर्म करीत राहतो. असा हा परमार्थाची वाट वेगानें चालत असतां कर्मरूपी रात्र संपते व कर्मक्षय होऊन कर्मसाम्यदशारूपी पहांट होते, गुरुकृपारूपी दिवस उजाडतो व ज्ञानाचा प्रकाश प्राप्त होतो व जिकडे तिकडे त्याच्या दृष्टीला साम्याचेंच ऐश्वर्य प्रतीतीला येतें. सद्वावासना, सत्समागम, विहित कर्मांचें कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून अनेक जन्मपर्यंत आचरण, कर्मसाम्यदशा, गुरूची कृपा, महावाक्यांचें श्रवण, त्याचें मनन, निदिध्यासन व आत्मसाक्षात्कार असा हा थोडक्यांत ज्ञानमार्ग आहे.

याची विस्तारपूर्वक मांडणी अठराव्या अध्यायामध्यें ज्ञानदेवांनीं फारच उत्कृष्ट रीतीनें केलेली आहे. ती आपण आतां पाहूं.

तेथें ज्ञानयोगाच्या दोन तऱ्हेच्या अधिकाऱ्यांचें वर्णन केलेलें आहे, एक तीव्र व एक मंद. उदाहरण द्यावयाचें तर अंत:करणाची एक जात कापरासारखी असते. अग्नीचा नुसता स्पर्श झाला कीं कापूर एकदम पेट घेतो. त्याला वेळूची फुंकणी घेऊन फुंकण्याचें कारण पडत नाहीं. पण दुसरी एक जात गोवरीसारखी असते. गोवरीला पेटवून ज्वाला निर्माण करावयाची असेल तर नुसता निखारा ठेवल्याबरोबर ती पेटत नाहीं. बराच वेळ फुंकावें लागतें; धूर होतो व मागाहून ज्वाला निर्माण होते. तिसरीहि एक अंत:करणाची जात याच दृष्टान्तानें पुढें जाऊन सांगण्यासारखी आहे. पण लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ती साधकाच्या दर्शेत येत नाहीं. ती जात म्हणजे जसा म्हशीचा ताजा पोह. पेटलेली काडी जवळ नेली तरी तो पोह तर पेटत नाहींच पण उलट पेटणारी काडी विझते. त्याप्रमाणें हा तिसरा इतका विषयासक्त असतो, कीं त्याच्यावर तर श्रवणाचा कांहीं परिणाम होत नाहींच; पण सांगणारा जर अर्धकच्चा असला तर त्याच्यांतील परमार्थबुद्धि नष्ट होण्याचा संभव फार ! वरील दृष्टान्ताप्रमाणें तीव्र अधिकारी हा कापरासारखा व मंद अधिकारी हा गोवरीसारखा समजावा.

मंद व तीव्र या दोघांनाहि पूर्वतयारी लागतेच. तीव्र अधिकाऱ्यानेंपूर्व तयारी तर केलेलेलीच असते. पण पूर्वसंस्कारानें त्याला अशी सत्वसंपन्नता प्राप्त झालेली असते कीं, त्याच्या अंत:करणांत असंभावना विपरीतभावनादि ज्ञानाच्या आड येणारे दोष नाहींसे झालेले असतात. यामुळें गुरूंच्या मुखांतून ' तूं ब्रह्म आहेस '' हें वाक्य श्रवण करण्याबरोबर त्याची वृत्ति स्वरूपाकार होऊन राहाते. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, परी हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि । श्रीगुरुकृपालब्धि- । काळीं पावे ॥ उदयजताचि दिनकर । प्रकाशाचि आते आंधार । कां दीपसंगें कापुर । दीपुचि होय ॥ तया लवणाची कणिका । मिळतखेंवों उदका । उदकचि होऊनि देखा । ठाके जेवीं ॥ कां निद्रित चेवविलिया । स्वप्नैसी नीद वायां । जाउनि आपणपयां । मिळे जैसा ॥ तैसें जयां कोण्हासी दैवें । गुरुवाक्यश्रवणाचि सवें । द्वैत गिळोनि विसंवे । आपणयां वृत्ती ॥ अ. १८, ९८४–८८

तुकारामबोवाही अशा अधिकारी साधकासंबंधानें म्हणतातः--

तुका म्हणे कानीं आइकली मात । तोचि झाला घात जीवपणा ॥

पण सर्वांची इतकी मोठी तयारी असणें कसें शक्य आहे ? ज्याची अशी तयारी नाहीं, त्याला क्रमाक्रमानेंच जावें लागतें. ज्ञानेश्वर महाराजांनीं हा विचार अध्याय १८ श्लोक ५०।५१।५२ यां वरील टीकेंत फार उत्कृष्ट मांडला आहे.

प्रथम या साधकानें पूर्वतयारी कशी केली तें सांगतातः–

येव्हवीं एकदम ज्याची वृत्ति ब्रह्माकार होत नाहीं, त्यानें काम्यनिषिद्धांचा त्याग करून व निष्काम बुद्धीनें नित्य नैमित्तिक कर्मांचें आचरण करून सत्त्वशुद्धीच्या आड येणारे रज व तम जाळून टाकले. पुत्र, वित्त, परलोक या विषयांचा स्नेह आपल्या अंकित केला. मोकाट सुटलेलीं इंद्रियें हव्या त्या विषयांचा भोग घेऊन विटाळलीं होतीं तीं प्रत्याहाररूप तीर्थांत त्यांना स्नान घालून शुद्ध केलीं. स्वकर्माचें फळ ईश्वराला अर्पण करून परमार्थमार्गावरील खरा सोबती जें वैराग्य तें बळकट असें स्वाधीन करून ठेवलें. अशा रीतीनें आत्मसाक्षात्कारास आवश्यक अशी जी साधनसामुग्री ती सर्व साधकानें गोळा केली. ती ज्ञानदेव खालील ओंव्यांत सांगतातः–

' एरव्हीं स्वकर्माचेनि वन्हीं । काम्यनिषिद्धाचिया इंधनीं । रजतमें कीर दोन्ही । जाळिलीं आधीं ॥ पुत्र वित्त परलोकु । यया तिन्हींचा अभिलाखु । घरीं होय पाइकु । ऐसी जाली । इंद्रियें सैरा पदार्थी । रिगतां विटाळलीं होतीं । तियें प्रत्याहारतीर्थी । न्हाणिलीं कीर ॥ आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पुनी सकळ । घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ॥ ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उजरी । ते सामग्री कीर पुरी। मेळविली॥ अ. १८, ९९२–९६

आणि त्याच वेळेला सद्गुरुहि भेटले व त्यांनीं शिष्याला योग्य तो उपदेश केला; पण ज्याप्रमाणें औषध घेतल्याबरोबर रोग बरा होत नाहीं, अथवा सूर्योदयाबरोबर मध्यान्ह नाहीं; त्यास कांहीं काळ जावा लागतो; किंवा उत्तम जमीन आहे, बीज चांगली लाभली आहे, बीजहि चांगलें पेरलें आहे, इतकें असल्यावर आतां आलेलें फळ येण्यास जरी अडचण नाहीं, तरी त्यालासुद्धां कांहीं काळ लागणारच; अथवा चांगला सरळ मार्ग मिळाला, सज्जनाचा संगहि लाभला, पण मुक्कामास पोचण्यास जास्त वेळ लागतोच. त्याप्रमाणें अंगीं वैराग्य असलें, गुरु भेटले व त्यांनीं महावाक्याचा उपदेश केला व मी ब्रह्म आहे असा जीवाच्या ठिकाणीं अंकुरहि फुटला पण तेवढ्यानें काम भागत नाहीं. जसें चकमकींतून उडणाऱ्या ठिणगीनें लाकडाचा ओंडका जाळला जात नाहीं; त्याप्रमाणें वृत्तीनें वस्तूस नुसता स्पर्श केल्यानें सर्व संस्कार एकदम नाहींसे होत नाहींत. ' कांहीं नुरोनि उरें ' अशी जी ब्रह्मस्थिति ती प्राप्त करून घेण्यास महावाक्यश्रवणानंतरहि या साधकाला मनननिदिध्यासनरूप प्रयत्न करावा लागतो; कारण याच्या अंतःकरणांत असंभावनादि दोष असतात.

मनांत जर विपरीत कल्पना असली तर प्रत्यक्ष इंद्रियासमोर वस्तु असूनसुद्धां त्या वस्तूचें दर्शन घडत नाहीं. इतका विपरीत कल्पनेचा परिणाम होतो. ही आपल्या अनुभवांतली गोष्ट आहे.

कल्पना करा, एखादा गृहस्थ वास्तविक जिवंत असून तो भूत होऊन बसला अशी भूताखेतांवर श्रद्धा ठेवणाऱ्या त्याच्या मित्राची समजूत झाली. पुढें कांहीं दिवसांनीं अकस्मात् सायंकाळच्या वेळेला ह्या भोळ्या भित्र्या मनुष्यापुढें ज्याला भूत झाला म्हणून तो समजत होता तोच दत्त म्हणून उभा राहिला. याचा परिणाम असा झाला कीं, त्या गृहस्थाच्या दर्शनांत होणारा आनंद तर बाजूलाच राहिला; उलट तो घाबरून जाऊन त्याची बोबडी वळायची पाळी आली. मनुष्य प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभा आहे; पण त्याच्या दर्शनाचा आनंद नाहीं. याला कारण विपरीत कल्पना. त्याप्रमाणें आत्मा प्रत्यक्ष असतांना व श्रुतिहि ' तस्य भासा सर्वमिदं विभाति ' असें सांगत असतांना मी देह अशी विपरीत कल्पना करून घेतल्यानें आपणांस आत्मदर्शन होत नाहीं; गुरूंनीं सांगितलें ' तूं ब्रह्म आहेस ' तर ब्रह्म आहोंत असा आनंद होण्याऐवजीं श्रोता म्हणतो. ' छे ! असें म्हणूं नका. मी दमेकरी, खोकणारा. मी कसा ब्रह्म होईन ? ' नाथ महाराज हीच गोष्ट सांगतातः–
" आपणचि ब्रह्म आहाति । परि ब्रह्म म्हणतां भीति । बाप विकल्पाची ख्याति । संशयो जाती अधःपात ॥ '
नाथ महाराज म्हणतात काय आश्चर्य आहे कीं, शास्त्र

'जननाशौच अथवा मृताशौच पाळावें' असें सांगतें म्हणून मनुष्य अशौच पाळतो. पण त्याच शास्त्रानें 'तूं ब्रह्म आहेस' असें सांगितलें तर ते त्याला पटत नाहीं! काय हा विपरीत भावनेचा परिणाम?

ज्ञानेश्वर महाराजांनीं कल्पनेनें जीवात्मा कसा अडकला जातो, हें दाखवण्याकरितां दिलेलें पोपटाचें खालील उदाहरण प्रसिद्धच आहे.

जैसी ते शुकाचेनि आंगभारें । नळिका भोंविन्नली एरी मोहरें । तरी तेणें उडावें परि न पुरे । मनःशंका ॥ वायांचि मान पिळी । आडुवें हियें आवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥ ऐसा कानेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला । मग नोसंडी जन्हीं नेला । तोडूनि अर्धा ॥ अ. ६, ७६–७९

गुरुकडून महावाक्यांचें श्रवण हें आत्मज्ञानाचें मुख्य साधन आहे. 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः मंतव्यः निदिध्यासितव्यः' हा श्रुत्युक्त मार्गच ज्ञानेश्वर महाराज सांगतात. पण हा साधक तीव्र अधिकारी नसल्यानें श्रवण करूनसुद्धां त्याची वृत्ति 'कांहीं नुरोनि उरें' अशी होत नाहीं. कारण त्याच्या ठिकाणीं अनेक पूर्वार्जित विकल्प असतात. म्हणून श्रवणानंतरहि त्याला पुनः अभ्यास करावाच लागतो. तो साधक ज्या क्रमानें ब्रह्मप्राप्ति करून घेतो, त्याचा विचार 'बुद्ध्या विशुद्धया' या श्लोकापासून 'भक्त्या मां अभिजानाति' या श्लोकांपर्यंत ज्ञानराजांनीं सांगितला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असाः—

तो साधक जाणतो कीं, 'मनसा एव इदं द्रष्टव्यम्' (ज्ञान मनाला व्हावयाचें आहे). आत्मा नित्य जवळच आहे. पण त्याचें ज्ञान अथवा दर्शन होत नाहीं, याचें कारण ज्या मनाला ज्ञान व्हावयाचें तें मन शुद्ध असत नाहीं. जसें आपलें मुख आपल्या जवळ आहे हें खरें; पण, आपणांस तें पहावयाचें असलें तर ज्या आरशाच्या द्वारां तें आपण पाहतों तो आरसा स्वच्छ असावा लागतो. त्यावर मळ असला तर दर्शन स्वच्छ होणार नाहीं व आरशाऐवजीं दुसरी प्रतिबिंब न घेणारी वस्तु समोर धरली तर मुखदर्शन मुळींच होणार नाहीं. श्रीएकनाथांनीं या बाबतींत उत्कृष्ट दृष्टान्त दिला आहे. ते म्हणतात, 'आरिसां उपलब्धि तथा मती । एकी जाती नव्हा आरशासी । तेवीं चित्तशुद्धि परमार्थासी । विकल्पवंताशी अभावो (हस्तामलक) तुकारामबोवा अनेक दृष्टान्त देऊन पुढील अभंगांत हीच गोष्ट सांगतातः—

'नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥
तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथे बोध करील कायी ॥२॥
वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥३॥
वांझे न होती लेंकुरें । काय करावें भ्रतारें ॥४॥

तात्पर्य, तो साधक मनःशुद्धीच्या मार्गाचें सर्व प्रकारें आचरण करतो. यांत मुख्यपणें विवेक असतो.

'गुरु दाविलिया वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा । धुवूनिया मळकटा । बुद्धीचा जेणें ॥'

एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, गुरु साधकाच्या तळहातांत ब्रह्म टेवीत नाहींत, तर ते त्याला मार्ग दाखवतात व प्रसंगविशेषीं शक्तिपातहि करतात. पण साधन ज्याचें त्यानेंच करावयाचें असतें. समर्थांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, साधकाला साधन न लावणारा असा गुरु अडक्याला मिळाला तरी करूं नये. नाथ महाराज म्हणतात—

'आत्मानुभव नोहे भिकारी । जे वाटा लाभिजे गोत्रजासी । हा लहाणा विरक्तांसी । जे देहभावीं सांडिलें ॥' हस्तामलक.

हा साधक गुरूंनीं सांगितलेला जो विवेक त्याचा पुनः पुन्हां विचार करतो. 'तच्चिंतन' त्याचें सारखें चालू असतें. यांतहि लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही आहे कीं 'तत्त्वमसि' चा जप सांगितलेला नाहीं. जप हा देवाच्या नांवाचा असतो, आणि 'तत्त्वमसि'च्या तात्पर्याचें चिंतन करावयाचें असतें. यालाच मनन असें म्हणतात. हें करतांना तो सुखदुःखादि द्वंद्वाचें चिंतन करण्याचें सोडून देतो.

तो साधक जाणतो कीं, आपलें काम थोडें फसलें. तेव्हां तो मुळापासून सुरवात करतो. इंद्रियांच्या ठिकाणचे राहिलेले सूक्ष्मसंस्कारवासनादि धुवून टाकण्याकरितां तो साधक साधन करतो. आपलें अंतर पुरें शुद्ध व्हावें येवढ्याकरतां ज्या इंद्रियद्वारां घाण आंत शिरते व त्यांच्या ठिकाणीं अनेक गलिच्छ संस्कार

सांठवलेले आहेत, तीं इंद्रियें शोषण्यास म्हणजे धुण्यास तो आरंभ करतो. यम, नियम प्राणायाम, प्रत्याहार हीं इंद्रियशुद्धीचीं साधनें आहेत. साधक यांचा अवलंब करतो. ज्याप्रमाणें नीच मनुष्याच्या घरचें अन्न चुकून पोटांत गेलें तर ज्ञाता पुरुष तें ओकून बाहेर टाकतो; त्याप्रमाणें 'सवासना' विषयांचा त्याग हा साधक इंद्रियांकडून करवितो. प्रत्याहार करून प्रत्यगा-वृत्तिगंगेच्या तटाकावर तो इंद्रियांना आणून ती पुन्हां स्वच्छ करतो. तात्पर्य, अशीं 'धुवट' प्रायश्चित्तें करून सात्त्विक वैद्यांच्या सहाय्यानें इंद्रियांना नियमन करून व राग द्वेष टाकून पुढच्या अभ्यासाकरितां एकांत गांठतो.

वनांत जाण्याची इतकी तयारी केल्याशिवाय जाणत्या साधकानें घराचा त्याग करूं नये. नाहींतर 'सर्वस्व सांडोनि वना गेला। वनीं वनिता चिंतूं लागला।' असें व्हावयाचें. हा साधक जाणता असल्यानें आत्मदर्शनाकरितां इंद्रियें व मन पवित्र केल्यानंतर 'गजबजा सांडलिया' अशा वनस्थळाच्या ठिकाणीं वास करतो. पण तो बरोबर कोणाला सोबती म्हणून घेतो? एक वेळ अशी होती कीं, 'साधकीं वसते हो-आवें' अशी जागा तो पहात होता; पण, आतांची त्याची भूमिका वेगळी असते. ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः—तो आतां अशा भूमिकेपर्यंत आला आहे कीं त्याचा सोबती तोच. (आंगाचिया मांदिया एकलेया.) एका हातांत दोन बांगड्या असल्या तर त्या आवाज देतात. पण तोहि आवाज नको म्हणून अवधूतांनीं गुरु केलेल्या मुलीनें हातांत एकेकच बांगडी ठेवली. त्याप्रमाणें हा साधक वनांत एकटाच राहतो. पण एकान्तात राहून वेळ कसा घालवतो, हा खाण्याची काय तजवीज करतो, झोंप कितो घेतो या सर्व गोष्टी ज्ञानेश्वर महाराज पुढीलप्रमाणें सांगतातः—त्याचा वेळ 'शमदमादिकीं खेळें। न बोलणें चावळें। गुरुवाक्याचेनि मेळें। नेणें वेळ॥' असा जातो. तो खातो किती? 'आणि आंगाबळ यावें। नातरि क्षुधा जावें। कां जिभेचे पुरवावे। मनोरथ॥ भोजन करितां विखीं। यया तिहींतें न लेखी। आहारीं मिती संतोषीं। माप न सुये॥ आसनाचेनि पावकें। हरपतां प्राण पोखे। इतुकि-याचिया भागा मोटकें। अन्न करी॥' प्राण राहतील व साधनास शरीर प्रसन्न राहील एवढेंच खातो. निजतो किती? 'दंडवताचेनि प्रसंगें। भुयीं हन अंग लागे। वांचूनी येर नेघे। राभस्व तेथ॥'

तात्पर्य, त्याच्या सर्व वागण्याचें सूत्र म्हणजे 'देह निर्वाहापुरतें। रहाटवी हातापायांतें॥' असें असतें.

अशा जोरकस अभ्यास करून त्या साधकानें बाह्य शरीर, इंद्रियें व मन आपल्या स्वाधीन करून घेतलीं.

ज्याप्रमाणें मोटार हांकणारा मोटार हाकण्यास आरंभ करण्यापूर्वी ब्रेक चालू आहे किंवा नाहीं हें पाहतो; अथवा घोड्यावर बसणारा हा घोडें हांकण्यापूर्वी घोडें आपल्या स्वाधीन आहे कां नाहीं, हें जसें बघतो; तसेंच ज्या मनाच्या इंद्रियांच्या द्वारां साधन करावयाचें तीं आपल्या ताब्यांत आलीं आहेत असें पाहूनच मग साधक त्यांना ध्यानाच्या मार्गाला लावतो.

अशी तयारी करीत असतांना सुद्धां तो साधक 'ध्यान' रूपी मुख्य साधन थोडें थोडें करीतच राहतो. तें साधन तो कसें व कोठवर करतो ही गोष्ट ज्ञानेश्वर महाराज पुढील ओव्यांतून सांगतात:—

गुरुवाक्यें उठविला। बोधीं निश्चयो आपुला।
न्याहाळीं हातीं घेतला। आरिसा जैसा॥

आरशांत मुख पहावें त्याप्रमाणें गुरूच्या वाक्यांनीं जाग्रत झालेल्या स्वरूपबोधांत तो साधक आपलें मुख पाहतो, म्हणजे 'तूं ब्रह्म आहे' असें गुरूनीं सांगितलेलें पटवून घेतो.

'तद्बुद्धयस्तदात्मानः तन्निष्ठास्तत्परायणाः' अ. ५-१७.

'बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान। ब्रह्मरूप भावी आपणा आपण। ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण। तत्परायण अहर्निशीं' या मार्गानें तो जातो. गुरूकडून स्वरूपबोध त्याला मिळाल्यानें त्याचा मार्ग सुकर होतो. मग तो ध्यान करतो. ध्यानाचें स्वरूप व तें करण्याची रीत ज्ञानेश्वर महाराज पुढील सांगतात:—

पैं ध्याता आपणपेंचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारी।
ध्येयत्वें घे हे अवधारीं। ध्यानरूढी गा॥

ध्याता हा ध्यानरूप वृत्तीच्या द्वारां ध्येयाची कल्पना करतो व तें आपणच आहोंत असें चिंतन करतो. कोठपर्यंत चिंतन करतो तें ज्ञानदेव सांगतातः—

'तेथ ध्येय ध्यान ध्याता । यया तिहींसी एकरूपता । होय तंव पंडुसुता । कीजे तें गा ॥

ध्यान, ध्येय व ध्याता या तिहींची एकरूपता होईपर्यंत करतो.

हें ध्यान आपलेंच असल्यानें याला 'अहंग्रह' उपासनाहि म्हणतात.

ध्यानाचा जोर असा आहे कीं, मग तें ध्यान प्रेमानें लागो वा द्वेषानें लागो, ध्याता ध्येयाकार बनतो. नाथ-महाराज सांगतात कीं, मूढ आळी भ्रमराचें ध्यान करते तर तिला तद्रूपता प्राप्त होते. तुकोबाराय हेंच म्हणतात, 'तुका म्हणे आळी । जेवि नुरेचि वेगळी ॥' मग येथें तर ध्यान करणारा हा मूळांत आत्मरूपच आहे. ध्यान साधकास ब्रह्म करीत नाहीं. तो मुळांत ब्रह्म आहेच. भ्रम दूर करणें एवढेंच ध्यानाचें कार्य असतें. स्वामी विवेकानंद अमेरिकेंत असतांना एकानें त्यांना विचारलें, 'मी ब्रह्म आहे' असें चिंतन करणें हा एक आत्मभ्रमाचा प्रकार नव्हे का? त्यावर त्यांनीं उत्तर दिलें कीं, हा आत्मभ्रमाचा [हिप्नॉटिझमचा] प्रकार नव्हे, तर हें. (Dehypnotizing) पूर्वी असलेला भ्रम दूर करण्याचा प्रकार आहे. जीव हा ब्रह्म असतांना त्यानें 'मी देह' अशी जी विपरीत कल्पना करून घेतली आहे ती घालविण्याकरितां हा उपाय आहे.

ध्यानाच्या मार्गांतहि अनेक अडथळे आहेतच. पण आपणांस अडचण येईल म्हणून या साधकानें जो 'आथवीयाची भूमिका सर्वे चाले" असा वैराग्यासारखा सोबती जोडून ठेवलेला असतो. साधक तरी मनुष्यच असल्यामुळें तो संसाराचें गिऱ्हाईक असतो. तो संसाराबाहेर पडूं लागल्यामुळें संसार त्याला आडवा येतो. पण शत्रूला जिंकण्याकरितां तयारी करून निघालेला शूर योद्धा जसा बेडरपणानें रणांत जातो, तसा ध्यानखड्ग हातांत घेतलेला हा साधक संसाराबाहेर पडलेला असतो व आपणांस आडवावयाला येणारे शत्रुपक्षीचे अहंकारादि जे योद्धे त्यांच्याशी दोन हात करावयास सरसावतोच. महान् तपस्व्यांच्याहि अंगावर ज्याचें नांव ऐकलें कीं कांटा उभा रहातो असा काम व त्याचा परिपाक जो क्रोध, आणि नागवियाही शरीरें लागला आहे असा परिग्रह व जो जिवंत असतां जगूं देत नाहीं व मेला असतां मरूं देत नाहीं अशा देहरूपी किल्ल्याच्या आड राहून लढणारा अहंकार—या सर्वांना तो साधक ध्यानाच्या आणि विवेकवैराग्याच्या जोरावर जिंकतो.

तात्पर्य, सवैराग्य ज्ञानाभ्यास करून विकारांना जिंकून तो आत्मलाभास योग्य होतो. शत्रूंचा निःपात करून व योगाभ्यासाची मदत घेऊन मी ब्रह्म आहे अशा अनुभवावर तो येतो. पण अजूनहि 'ब्रह्म होणें' हें दूरच आहे. कारण जें ब्रह्म आहे त्या ठिकाणीं, 'मी ब्रह्म आहे' असेंहि स्फुरण नसतें. असें स्फुरण हाहि एक भ्रमाचाच प्रकार आहे. भ्रमांत दोन प्रकार—एक संवादी व एक विसंवादी. 'मी देह' हा विसंवादी भ्रम; 'मी ब्रह्म' हा संवादी भ्रम आहे. नाथांनी म्हटलें आहे की—

ब्रह्मीं स्फुरे जें स्फुरण । तें शुद्धसत्वाचें लक्षण । तो तूं लक्षी लक्ष्यातीत परिपूर्ण रे ॥ कान्हू सच्चिदानंद शब्द अरुता रे । त्याहि परौता तूं निजानंदु रे रे ॥

समूळ अविद्येला खाणारें जें 'वृत्तिज्ञान' म्हणजे 'मी ब्रह्म' हें स्फुरण तें जोंपर्यंत आहे तोंपर्यंत साधक ब्रह्म झाला नाहीं. कारण ही वृत्ति हा शुद्ध पण अविद्येचाच प्रकार आहे. पण याचाहि उपयोग आहे. तो असा आहे कीं, पायांत गेलेला कांटा काढण्याकरितां जसा दुसरा कांटा आणावा लागतो; तसें मी देह ही वृत्ति घालवण्याकरतां मी ब्रह्म ही वृत्ति आणावी लागते. पण पायांतला कांटा काढल्यावर कांटा काढावयाकरितां आणलेला कांटा कांहीं खिशांत ठेवा-वयाचा नसतो. अथवा खैराचा तरी शूळच व चंदनाचा जरी झाला तरी शूळच. दोहोंचा त्यागच करणें जरूर आहे. लोखंडाची बेडी त्रास देते पण सोन्याची काय सुख देते! दोन्ही दुःखदायकच. त्याचप्रमाणें मी देह ही वृत्ति ज्याप्रमाणें दुःखाला कारणीभूत आहे, त्याच-प्रमाणें 'मी ब्रह्म' ही वृत्तिही दुःखालाच कारणीभूत होते. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनीं 'मी ब्रह्म' या सम-जुतीला अनुभवामृतांत बंधच म्हटलें आहे.

तैसा ज्ञानरुप आत्मा । ज्ञानेंची आपुली प्रमा । करीतसे सोहं मा । ऐसा बंधु ॥ अ. ३-२१
जिती आविद्या ऐसी । अन्यथा बोधातें गिंवसी । तेंचि यथाबोधेंसी । निमाली उठी ॥ परि जीती ना मेली । अविद्या हे जाकळी । बंधमोक्षीं घाली । बांधोनिया ॥ अ. ३, १०-११.

ज्याला ज्ञान म्हणतात (मी ब्रह्म ही वृत्ति) तो सत्त्वाचा म्हणजे गुणाचाच भाग आहे व त्या स्फुरणाचा अर्थच असा कीं, अजून "ब्रह्म नाहीं" असें कांहीं भासतें कीं ज्याच्या सापेक्ष 'मी ब्रह्म आहे' असें ज्ञान स्फुरतें. मी ब्रह्म ही घोकणी हा एक वेडाचाच प्रकार आहे. आपण सर्व माणसें आहोंत, पण म्हणून आपल्या ठिकाणीं आपण माणूस आहोंत असें सारखें स्फुरण आहे काय ? असें सारखें स्फुरूं लागलें तर तो एक वेडाचाच प्रकार होईल. तसेंच कांहीं मायिक भासानें तत्सापेक्ष मी ब्रह्म स्फुरतें. वास्तविक, वस्तु ही स्फुरणरहित, ज्ञातृज्ञेयाविहीन नुसतेंचि ज्ञान अशी आहे.

हें ज्ञानसुद्धां जर भ्रमच तर तें अंगीं बाणण्याकरितां खटपट कां ? याचें एक उत्तर वर दिलेंच आहे.

दुसरा व महत्त्वाचा प्रकार असा आहे कीं, अविद्येला नाहींसें करण्याकरितां या वृत्तिज्ञानाची आवश्यकता आहे. पण याला नाहींसें करण्याकरितां आणखी दुसरें ज्ञान लागत नाहीं. जसें जोंपर्यंत दाह्य लांकूड आहे तों-पर्यंतच दाहक अग्नि. अग्नि जळतो आहेना मग समजावें अजून सरपणाचा अंश आहे. दाह्य संपलें कीं दाहक अग्नि संपला. ब्रह्मज्ञानाचा व अविद्येचा असाच संबंध आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनीं ठिकठिकाणीं कापूर व अग्नि हा दृष्टांत दिला आहे. ते म्हणतात, कापुराला को अग्नि लागला म्हणजे खालीं राख उरत नाहीं व जाळणारा अग्नीही शिल्लक रहात नाहीं. हा जो अग्नि व कापूरसंबंध तो थोडा वेगळ्या भाषेंत सांगावयाचा तर असा सांगतां येईल कीं, अग्नीनें कापुराला जाळलें असें म्हणण्यापेक्षां कापुराला जाळण्याच्या निमित्तानें अग्नीनें आपण आपल्याला जाळून घेतलें. हरिपाठांत साधुबोध ज्याला झाला त्याची काय स्थिति होते हें सांगण्याकरितां ज्ञानदेव हाच दृष्टांत देतात.

साधुबोध झाला नुरोनिया ठेला । ठायींच मुराला अनुभव ।। कापुराची वाती उजळल्या ज्योती । ठायींच समाप्ती झाली जैसी ।।

दृष्टान्तीं कापूर जळाला व राखहि शिल्लक राहत नाहीं व जळणारा अग्नीहि उरत नाहीं. मग मोठा महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो कीं, खालीं काय उरलें ? कांहीं नाहीं असें म्हणावें का ? द्राष्टान्तीं अविद्याकार्य वृत्ति, मी देह, हें संपलें व त्याला नाहींसें करण्याकरितां आणलेलें मी ब्रह्म हेंहि संपलें.

ऐसीं जळो सरलिया माया । तेथ जाळितें तेंही जळे ।। अ० ८–५८

तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । ऐसी स्थिति झाल्यावर शिल्लक काय उरे ? तऱ्ही जें नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही ।। १५–४४० कांहीं नाहीं असें म्हणावें का ? ज्ञानदेव म्हणतात, छे ! कांहीं नाहीं हें तर खंडित शून्यवादी बौद्धाचें मत ! त्याचें खंडण करण्यास कांहीं मोठ्या प्रमाणाचें कारण नाहीं. ते म्हणतातः–शून्यसिद्धान्त बोधु । कवणें सत्ता होय सिद्धु । नसता हा अपवादु । वस्तूसी जो ।। मालविता दिवे । मालविते जरी मालवे । तरी दिपु नाहीं हे फावे । कवणासी बा ।।अ.४, २७–२८ ज्ञानेश्वरींत पहिल्या अध्यायांत या बौद्धमतास खंडित दांताची उपमा दिली आहे. कांहीं–नाहीं हे आपली सिद्धी करूं शकत नाहीं; तर 'कांहीं-आहे' हें कांहींनाहींची सिद्धी करूं शकते. दिवा मालवल्यावर मालवणाराच त्याबरोबर नाहींसा झाला तर दिवा नाहीं हें कोणास कळतें ? 'माझ्या तोंडांत जीभ नाहीं' असें तोंडानें सांगणारा गृहस्थ आपल्या जीभेची सिद्धीच करीत असतो. तात्पर्य कांहीं नाहीं असें म्हणतां येत नाहीं. मग उरलें काय? असा प्रश्न उरतोच.

त्याचें ज्ञानदेव दृष्टांतानीं उत्तर देतात कीं, अग्नीनें कापुराला जाळण्याचा व्यवहार ज्या आकाशांत झाला तें कापूर व अग्नि या दोहोंहून भिन्न पण दोघांना आधार असणारें आकाश उरतें. हें आकाश त्या क्रियेच्या पूर्वी, मध्यें व नंतर ही आहेच. जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नांव अग्नि पुरे । मग उभयातीत उरे । आकाश जेवीं ।। १८–१२११ त्याप्रमाणें 'मी देह' हें ज्या स्वरूपावर स्फुरतें तें या स्फुरणापूर्वी आहेच. 'मी ब्रह्म' हेंही त्याच्यावरच स्फुरतें. 'मी ब्रह्म' या स्फुरणानें 'मी देह' हें नाहींसें झालें तरी तें आहेच. व तेंच ब्रह्म आहे, यालाच शांति म्हणतात. 'मजमाजीं संचरे । मीचि म्हणोनि' ही ती स्थिति आहे. त्याचें व्याख्यान करतां येत नाहीं. 'सोहं तेंहि अस्तवलें । सांगतेंचि सांगणें झालें । ' 'ब्रह्म आत्मा ईशु । या बोलाचा मोडे सौरसु । न बोलण्याहि पैसु । नाहीं तेथें ।। हाच उत्तम पुरुष. व हेंच ब्रह्म आहे. साधक गुरुकृपेमुळें या परम उच्चस्थितीला पोचतो. तिचेंच वर्णन उपनिषद्द्रष्ट्या ऋषींनीं 'सा काष्ठा सा परा गतिः' असें

केलें आहे. ही ज्ञानस्थिति अनिरूप्य, ' शब्द निमाला ' अशी खरी. पण हें ज्ञान हृदयांत प्रगट झालें असतां देहावर त्याचीं चिन्हें उमटतात. गीतेंत अशीं जीं चिन्हें सांगितलीं आहेत त्यांचें ' डोळां देखिजे ' असें उत्कृष्ट वर्णन ज्ञानदेवांनीं केलें आहे. ते म्हणतातः—

मग तेंचि इये शरीरीं । जैं आपुला प्रभावो करी । तैं इंद्रियांचां व्यापारीं । डोळांहि दिसे ।। पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें । जाणिजे तेवीं करणें । सांगतीं ज्ञान ।। अगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळीं । तें शाखांचिये बाहाळीं । बाहेर दिसे ।। कां भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचार-गौरव । सुकुलीनाचें ।। अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्ति । कां दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्य पुरुष ।। नातरी केळीं कापूर जाहला । जेवीं परिमळें जाणों आला । कां भिंगारीं दीपु ठेविला । बाहेरि फांके ।। तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जिये देहीं उमटती चिन्हें । तियें सांगो आतां अवधानें । चांगें आइक ।।

अ. १३–१७७–८३

अ. १३, १४, १५, १६ यांत हा विषय भरपूर आला आहे, पण स्थलाभावीं तो देणें अशक्य आहे. वाचकांनीं मुळांतच जरूर बघावा. यांतील कांहीं स्थळें 'आत्मसाक्षात्कार' प्रकरणांत पाहूं.

---

## १५. ज्ञानदेवांचें तत्त्वज्ञान

ज्ञानदेव हे जसे उच्च अधिकाराचे आत्मानुभवी संत होते, त्याचप्रमाणें ते फार थोर दर्जाचे तत्त्वज्ञानीहि होते. कित्येकांची कल्पना अशी आहे कीं, आत्मानुभव व तत्त्वज्ञान हीं एकत्र राहूं शकत नाहींत. आत्मानुभवी संत हा आत्मरससेवनांत गुंग होऊन राहतो व तत्त्वज्ञान हा एक बुद्धीचा खेळ आहे असें समजून तिकडे दुर्लक्ष करतो. कित्येकांचें तर म्हणणें असें आहे कीं, या रसाच्या भोगानें मनुष्याची बुद्धि स्वतंत्र विचार करण्यास कमकुवत होते. उलट तत्त्वज्ञानी हा आत्मानुभव बुद्धीच्या कक्षेंत येत नसल्यानें आत्मानुभव हा व्यक्तीच्या मनाचा खेळ आहे, तिकडे वेळ खर्च न करतां बुद्धीनें निष्ठुरपणानें तत्त्वचिकित्सा करणें हाच सत्यान्वेषणाचा मार्ग आहे असें



समजून तो आत्मानुभवाच्या मार्गास जातच नाहीं. यामुळें आत्मानुभवी व तत्त्वचिकित्सक असा योग क्वचितच सांपडतो. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, दोघांचा छत्तिसांचा आंकडा असण्याचें कारण नाहीं. दोन्हीहि एकत्र राहूं शकतात. याचीं आपल्या भारतांतील दोन मोठीं उदाहरणें म्हणजे शंकराचार्य व ज्ञानेश्वर महाराज. पाश्चात्य देशांतील उदाहरण म्हणून जर्मन तत्त्वज्ञ व संत एखार्टचें नांव सांगतां येईल. पुष्कळ लोकांची अशी कल्पना आहे कीं, ज्ञानदेव हे योगी, तेव्हां त्यांच्या ठिकाणीं शास्त्राभ्यास व तत्त्वचिकित्सा हीं नाहींतच. पण त्यांच्या ग्रंथाचा अभ्यास केला तर आपणांस आढळून येईल कीं, ज्ञानेशांना चांगला शास्त्रपरिचय होता. अनुभवामृत बाजूला ठेवला व नुसती ज्ञानेश्वरी पाहिली तरीसुद्धां आम्ही म्हणतों याची सत्यता पटेल. एकच उदाहरण द्यावयाचें तर ज्ञानेश्वरीच्या प्रारंभींचें गणपतीचें वर्णन विचारांत घेण्यासारखें आहे. वेद, स्मृति, पुराणें, षड्दर्शनें, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा, नास्तिकदर्शन, द्वैताद्वैतमतें, शेवटीं गणेशाच्या मुकुटावरील फुलें, उपनिषदें या सर्वांचा नुसता उल्लेख नव्हे तर शब्दब्रह्मांतील त्यांचें स्थान दाखवणारे निर्देश त्यांत आहेत. भारतीय तत्त्वज्ञानाच्या अंगोपांगाचें चांगलें ज्ञान असल्याशिवाय हें रूपक करणें अशक्य आहे.

अनुभवामृतांत तर श्रीशंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा गड्डा समजल्या जाणाऱ्या अज्ञानाचा धांडोळा घेण्याचा मोठा प्रयत्न आहे व त्यांत परीक्षण करण्याकरितां युक्त्या आणल्या आहेत त्या श्रीरामानुजाचार्यांच्या अनुपपत्तीशीं कांहीं बाबतींत सारख्या असणाऱ्या सांख्य, योग, न्याय या शास्त्रांशींहि त्यांचा परिचय कसा होता, हें कळण्याकरितां एक अनुभवामृतांतील ओंवी देतों.

' घटाचें नाहींपण । फुटलियाची नागवण । मानीत असें तें जाण । म्हणों ये कीं ।। प्र. ३–१४ ।।'

नैय्यायिकांनीं मानलेले प्रागभाव, प्रध्वंसाभाव, अन्योन्याभाव, अत्यंताभाव हे अभावाचे प्रकार ज्यास ठाऊक आहेत तोच ही ओंवी लिहील.

ज्ञानेश्वर महाराजांना योग, मीमांसा, न्याय वगैरे शास्त्रांचा जरी परिचय होता, तरी ज्ञानेश्वर महाराजांच्या ग्रंथाच्या अभ्यासकास असें लवकरच दिसूं लागतें कीं, ज्ञानेश्वर महाराजांच्या तत्त्वज्ञानावर उपनिषदांतील

अद्वैतवेदांती, गौडपादीय, शांकरीय व नाथसंप्रदायी या चार प्रकारच्या तत्वज्ञानांचाच अधिक परिणाम झालेला आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या ठिकाणीं उपनिषदासंबंधीं अत्यंत आदर वसत होता. ज्ञानेश्वरीच्या आरंभीं वाङ्मय-गणपतीच्या मूर्तीचें वर्णन करीत असतांना त्या गणपतीच्या मुकुटावर ज्ञानमकरंद येणारी दशोपनिषद्रूपी कुसुमें शोभा देत आहेत असें त्यांनीं उपनिषदांचें वर्णन केलें आहे. या एका वर्णनावरूनच ज्ञानेश्वर महाराज उपनिषदांना केवढा मान देत होते, हें समजून येईल. त्यांनीं 'अज्ञानं यदतोऽन्यथा' या गीता अ. १३ श्लो. ११ वर टीका करतांना 'उपनिषदांकडे न वचे' असें अज्ञान्याचें लक्षण केलें आहे. अनुभवामृतांत श्रीसदाशिव अथवा श्रीविष्णु यांनीं अज्ञान हा बंध सांगितला नसतां पण माझ्या अनुभवास तो तसा आला असता तर मी मानलाच असता असें म्हणणारे ज्ञानेश्वर महाराज 'विभाति यस्य भासा। सर्वमिदं हा ऐसा। श्रुति काय वायसा। ढेंकरु देती' (प्र. ९-२९०) असा श्रुतीचा आदरपूर्वक पुरावा देतात.

गौडपादीय तत्त्वज्ञान व ज्ञानेश्वर महाराजांचें तत्त्वज्ञान यांत पुष्कळ साम्य आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीं गौडपादांचा नामनिर्देश कोठेंच केला नाहीं. पण गौडपादकारिका, अनुभवामृत व ज्ञानेश्वरी यांची तुलना करून जो पाहील, त्यास सहज दिसून येईल कीं, श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या समोर त्या कारिका अवश्य असाव्यात.

शंकराचार्यांसंबंधीं त्यांना काय वाटत होतें, हें ज्ञानेश्वरीच्या सरतेशेवटीं। 'तैसा व्यासाचा मागोवा घेतु। भाष्यकारांतें वाट पुसतु। अयोग्य ही मी न पवतु। कें जाईन॥' असें जें त्यांनीं म्हटलें आहे, त्यावरून स्पष्ट आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं 'अनुभवामृताच्या' सातव्या प्रकरणांत अज्ञानाचा धांडोळा घेऊन अज्ञान मूळांतच नाहीं असें सिद्ध केलें. यावरून या ओंवीचा अर्थ करतांना कित्येकांनीं या ओंवींतील 'भाष्यकारांतें' याचा अर्थ शंकराचार्य, रामानुज वगैरे अनेक भाष्यकार असा केला आहे; पण प्रस्तुत लेखकास तो अर्थ बरोबर वाटत नाहीं. येथील बहुवचन आदारार्थी आहे व भाष्यकार म्हणजे शंकराचार्यच ज्ञानेश्वरमहाराजांना अभिप्रेत आहेत असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. याबाबत सविस्तर चर्चा 'भाष्यकारांते वाट पुसतु' या प्रकरणांत केलेली आहे, ती वाचकांनीं पहावी.

नाथपंथीय तत्त्वज्ञानाचा परिणाम ज्ञानेश्वर-महाराजांवर होणें अगदीं स्वाभाविक आहे. कारण ते नाथपंथांतलेच होते. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं 'आपणांस हें सांप्रदायिक ज्ञान श्रीनिवृत्तिनाथांकडून मिळालें' असें त्यांनीं स्वच्छ म्हटलें आहे. त्यांनीं शिवसूत्राचा आपल्या अनुभवामृतांत स्पष्ट उल्लेखहि केलेला आहे.

ज्ञानेश्वर महाराज हे अनुभवी महात्मे असल्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानास प्रचीतिवादाचें (Mysticism) स्वरूप असावें हें स्वाभाविक आहे.

ज्ञानेश्वरमहाराज हे स्वतंत्रप्रज्ञ खरे, पण ते उपनिषदांस मानणारे होते हें वर दिलेंच आहे. यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानाचें स्वरूप व त्यांतील मुख्य कल्पना औपनिषदीय असाव्यात हें ओघानेंच प्राप्त होतें. 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः' हें जसें उपनिषदाचें सार आहे, तसेंच 'आत्मा' हें ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानाचें हृदय आहे. तो त्यांच्या तत्त्वज्ञानाचा गाभा आहे. ज्ञानेश्वरांचे जे ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेवपासष्टि हे प्रसिद्ध तीन ग्रंथ आहेत त्यांमध्यें त्यांनीं या प्रत्येक ग्रंथाचें सार अथवा त्यांतील मुख्य भाग म्हणून जो वर्णन केला तो 'आत्मा' हाच आहे.

**ज्ञानेश्वरीः**— म्हणोनि जगीं गीता। मिया आत्मेनि पतिव्रता।...साचचि बोलाचें नव्हे शास्त्र। संसार जिणें तें शस्त्र। आत्मा अवतरवितें मंत्र। अक्षरें इयें॥ अ. १५, ५७६-७७ कीं आत्मराजाचिये सभे। गीते वोडवलें हें खांबे। मज श्लोक प्रतिभे। ऐसे येत॥ १८-१६६५ कां निजकांता आत्मया। आवडी गीता मिळावया। श्लोक नव्हती बाह्या-। पसरू कां जो॥ १८-१६७३

**चांगदेवपासष्टिः**— तियापरी जो इया। दर्पण करील ओंविया। तो आत्मा एवढिया। मिळेल सुखा॥

**अनुभवामृतः**— तया आत्मयाच्या भाखा। न पडेचि दुसरी रेखा। जऱ्ही विश्वा अशेखा। भरला आहे॥ प्र. ७-१४६.

कित्येक लोकांचा असा समज आहे कीं, ज्ञानेश्वर-महाराजांचें असें तत्त्वज्ञान बघणें असल्यास अनुभवामृता-कडेच गेलें पाहिजे. पण ही समजूत आमच्या दृष्टीनें चुकीची आहे. ज्ञानेश्वर महाराज ज्ञानेश्वरीच्या शेवटीं स्वच्छ म्हणतात, 'एवं गुरुक्रमें लाधलें। समाधिधन जें आपुलें। तें ग्रंथें बांधौनि दिधलें। गोसावी मज॥

१८–१७६३ यापेक्षां दोन्ही एकच याला आणखी पुरावा कशास हवा ?

आत्मा ही त्यांच्या तत्त्वज्ञानांतील मध्यवर्ति कल्पना असल्यानें ज्ञानेश्वर महाराजांची आत्मस्वरूपाची काय कल्पना होती, हें आपण प्रथम पाहूं. हा विचार वेगवेगळ्या रूपानें त्यांच्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं आला आहे.

( १ ) आत्मा म्हणजे देह नव्हे. ज्ञानदेव देहात्मवादी नव्हेत, हें मोठे पुरावे आणून सिद्ध करावयास पाहिजे असें नव्हे. परंतु देहबुद्धि हीच आत्मस्वरूपाच्या आड येणारी असल्यानें देहात्मवादाचा विचार त्यांच्या ग्रंथांत ठिकठिकाणीं येणें स्वाभाविक आहे. ते म्हणतात—

' परी देहाहंमानभुली । जयाची बुद्धि देहींच आतली । तया आत्मविषयीं ज्ञाली । मध्यरात्र गा ॥१८–३८१.

मी देह या भ्रामक कल्पनेनें ज्याची बुद्धि घेरलेली आहे, त्याला आत्मस्वरूपासंबंधीं गूढ अज्ञान असणार हें स्पष्ट आहे. ज्यानें आकाशांतला सत्यसूर्य पाहिला नाहीं तो डबक्यांतल्या पाण्यांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबालाच सत्यसूर्य समजला तर त्यांत आश्चर्य कसलें ?

पैं जेणें आकाशींचा कहीं । साचु सूर्यु देखिला नाहीं । तो थिल्लरींचें बिंब काई । मानू न लाहे ॥३८६॥ थिल्लराचेनि जालेपणें । सूर्यासि आणी होणें । तयाचां नाशीं नाशणें । कंपें कंपु ॥३८७॥ अगा निद्रिता चेवो नये । तंव स्वप्न साच हों लाहे । रज्जु नेणतां सापा बिहे । विस्मो कवण ॥३८८॥ जंव कवळ आथि डोळां । तंव चंद्रु देखावा कीं पिवळा । काय मृगींही मृगजळा । माळावें नाहीं ॥३८९॥ तैसा शास्त्रागुरुचेनि नांवें । जो वाराही टेकों नेदी सिवे । केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ॥३९०॥ तेणें देहात्मदृष्टीमुळें । आत्मया घापे देहाचें जाळें । जैसा अभ्राचा वेगु कोव्हें । चंद्रीं मानी ॥३९१॥

अ. १८, ३८६–९१

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, तो अल्पज्ञ, चैतन्य, ईश्वर, ब्रह्म, आत्मा हे सर्व देहासच समजतो, इतका त्यानें आत्म्याचा संकोच केला.

' जें देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाण प्रतिमा । ययापरौती प्रमा । ढळों नेणें ॥ १८–५६७ ॥'

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, हें वरील ओवींत सांगितलेलें ज्ञान तामस ज्ञान आहे. हें ज्ञान म्लेच्छधर्मांच्या डोंगरी बोळवलें आहे. आमच्या संस्कृतीशीं त्याचा संबंध नाहीं.

देहात्मवादावर उभारलेल्या तत्त्वज्ञानाचा प्रकार ज्ञानेशांनीं ' असत्यमप्रतिष्ठन्ते ' अ. १६–८ या श्लोकावर उत्तम रीतीनें मांडला आहे. तो वाचतांना आजचीं जीं अवैदिक मतें आहेत तींच जणूं आपण वाचीत आहोंत असा भास होतो.

तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो । चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेदु ॥ २९५ ॥ वेदीं अन्यायी पडे । तो निरयभोगें दंडे । सन्यायी तो सुरवाडें । स्वर्गीं जिये ॥ २९६ ॥ ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था । इयेतें म्हणती ते वृथा । अवघेंचि हें ॥ २९७ ॥ यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसे प्रतिमालिंगीं । नागविले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ २९८ ॥ तेथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें वैंटाळें । हें वांचोनि कें वेगळें । पुण्य आहे ॥ २९९ ॥ ना अशक्तपणें आंगिकें । वेगळ वैंटाळीं न टके । ऐसा गादिजेवीण विषयसुखें । तेंचि पाप ॥ ३०० ॥ प्राण घेपती संपन्नांचे । तें पाप जरी साचें । तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हें पुण्यफळ कीं ॥ ३०१ ॥ बळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय । तरी मासयां कां न होय । निसंतान ॥ ३०२ ॥ आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारोचि शुभलग्नीं । मेळवीजती प्रजासाधनीं । हेतु जरी ॥ ३०३ ॥ तरी पशुपक्षादि जाती । जया मिती नाहीं संतती । तयां कोणें प्रतिपत्ती । विवाह केले ॥ ३०४ ॥ चोरियेचें धन आलें । तरी तें कोणासि विष जालें । बालभें परद्वार केलें । कोढी कोणी होय ॥ ३०५ ॥ म्हणोनि देवो गोसावी । तो धर्माधर्मु भोगवी । आणि परत्राचां गांवीं । करी तो भोगी ॥ ३०६ ॥ परी परत्र ना देवो । न दिसे म्हणोनि तें वावो । आणि कर्ता निमे मा ठावो । भोग्यासि कवणु ॥ ३०७ ॥ येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं । तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु श्लाघे ॥३०८॥ म्हणौनि नरक स्वर्गु । नव्हे पापपुण्यभागु । जे दोहीं ठायीं सुखभोगु । कामाचाचि तो ॥ ३०९ ॥ याकारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में । मिळतीं तेथ जन्में । आघवें जग ॥ ३१० ॥ आणि जें जें अभिलाषें । स्वार्थालागीं हें

पोषे । पाठीं परस्परें द्वेषें । कामचि नाशी ॥ ३११ ॥ एवं कामावांचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं । ऐसें बोलती पाहीं । आसुर गा ते ॥ ३१२ ॥

ज्ञानदेवांच्या मतें आत्मा देहाहून अगदीं वेगळा आहे. दोहोंच्या स्वरूपांत, गुणांत जमीनअस्मानाचें अंतर आहे.

' देह तंव पांचाचें जालें । हें कर्माचां गुणीं गुंथलें । भंवतसे चाकीं सूदलें । जन्ममृत्यूचां ॥ हें काळानळाचां तोंडीं । घातली लोणियाची उंडी । माशी पांखु पाखडी । तंव हे सरे ॥ विपायें आगीं पडे । तरी भस्म होउनि उडे । जाहलें श्वाना वरपडें । तरी ते विष्ठा ॥ या चुके दोन्हीं काजा । तरी होय कृमींचा पुंजा । हा परिणाम कपिध्वजा । कश्मल गा ॥ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो येथ ऐसा । नित्य शुद्ध अपैसा । अनादिपणें ॥ '

अ. १३ ओं. ११०३ ते ७.

देह पंचमहाभूतांचा बनला आहे, कर्मसूत्रांत गोंवलेला आहे व यामुळें जन्ममृत्यूच्या चक्रांत फिरत आहे. याचा शेवटहि तीन चिमट्या राख, विष्ठा, नाहींतर कृमींचा पुंजा असा गलिच्छ ! उलट आत्मा हा स्वभावतः सद्रूप असल्यानें कर्मजन्ममरणातीत नित्यशुद्ध असा आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, असें भिन्न स्वरूपवान् देह व आत्मा यांची भेट ही अशक्यच गोष्ट आहे.

' तया देहा म्हणती भेटी । हें सपायी निर्जीव गोठी । वारिया वाळुवे गांठीं । कैं आहे ॥ ' अशा स्थितींत मी देह समजणें हाच भ्रम. आपणाहून अत्यंत विलक्षण असणाऱ्या देहाचे धर्म आपल्यावर मानून घेणें हीच जीवदशा.

' अगा उपजणें आणि निमणें । हें साचाचि जें कां मानणें ।
तो मी जीवलोकु म्हणे । संसार हन ॥ १५–३४७ ॥
ऐसें शरीराचि एवढें । आत्मज्ञान वेगळें पडे ।
तें माझा अंश आवडे । थोडेपणें ' ॥ १५–३४३ ॥

देह आहे म्हणून आपण आहोंत, हें समजणें किती वेडेपणाचें आहे, हें समजण्याकरितां ज्ञानदेवांनीं अ. ६ यांत तीनचार उत्कृष्ट दृष्टांत दिले आहेत.

एऱ्हवीं कोशकीटकाचिया परी । तो आपणपया आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं ॥ ७२ ॥ कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा अंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥ ७३ ॥ कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंदु अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥ ७४ ॥ एऱ्हवी होय तें तोचि आहे । परि काई कीजे बुद्धि तैशी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥ ७५ ॥ जैसी ते शुकाचेनि आंगभारें । नळिका भोंविन्नली एरी मोहरे । तरी तेणें उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥ वायांचि मान पिळी । अटुवें हियें आवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥ म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥ ७८ ॥ ऐसा काजेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला । मग नोसंडी जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥

या दृष्टान्ताचें सार असें आहे कीं, आत्म्याच्या सत्तेवर देह स्फुरत असतांना अज्ञानी, देह आहे म्हणून मी आहे असें समजतो. ' कां कवणु एक भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंद अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥ ' या ७४ व्या ओंवीचें मर्म समजण्याकरितां एक गोष्ट सांगतों.

एक व्यवहारशून्य गृहस्थ होते. त्यांनीं बाजारहाट कधीं केलाच नाहीं. नेहमीं त्यांचें कुटुंब सर्व कारभार करी. पण एके दिवशीं त्यांच्यावरच बाजारांत जायचा प्रसंग आला. तेव्हां ते आपल्या कुटुंबास म्हणाले, ' तूं मला बाजारांत जा म्हणतेस, पण मी चोरला गेलों तर ? ' त्या बाईला बाई होती व स्वतः जाणें शक्य नव्हतें. म्हणून तिनें सांगितलें कीं पलिकडे काळा दोरा पडला आहे तो पायाला बांधा व मधूनमधून त्याच्याकडे बघा. काळा दोरा असला म्हणजे तुम्ही आहांत. तुम्हांला कोणी चोरलें नाहीं. त्या गृहस्थास हें पटलें. त्यानें पायाला काळा दोरा बांधला व तो बाजारांत गेला. मधूनमधून तो त्या दोऱ्याकडे पाही. दोरा असला, कीं आपण आहोंत, चोरलों गेलों नाहीं असा निश्चय करी.

पण त्याच्या दुर्दैवानें असें झालें कीं, सापाचा खेळ रस्त्यावर चालला होता. हे राजश्री त्या गर्दींत खेळ पहावयास शिरले. हे गर्दींत शिरायला व तें जनावर फणा काढून डोलत होतें तें लांब होऊन गर्दींत शिरायला एकच गांठ आली. झालें ! बघे सगळे पांगले. भीतीनें पळतां पळतां एकाची तंगडी दुसऱ्याच्या तंगडींत अडकून कांहीं पडले. त्यांत हे काळा दोरावाले गृहस्थहि

पडले. दोरा तुटला. पडलेले उठून कपडे सांवरून जों पाहूं लागले, तो दोरा नाहीं. लगेच मोठयांदा ओरडूं लागले 'हरवलों हो हरवलों.' कांहीं दयार्द्र माणसें जवळ येऊन त्यांना विचारूं लागली 'काय हरवलें?' ते म्हणूं लागले 'अहो, मीच हरवलों.' आश्चर्यानें एकानें विचारलें तूं हरवलास हें कशावरून म्हणतोस? याला प्रमाण काय? ते म्हणाले, 'अहो, मी जर असतों तर माझ्या पायाला काळा दोरा नसतां का? तो कोठें आहे? मी काळा दोरावाला नाहीं. म्हणून मी चोरला गेलों.''

याचें तात्पर्य असें आहे कीं, वास्तविक पायावरचा दोरा देहास आधार नाहीं तर देह दोऱ्यास आधार. पण भ्रमिष्ट मनुष्य हा दोरा नाहीं म्हणून मी नाहीं म्हणतो. तसेंच आत्मसत्तेंत देह स्फुरतो; पण, अज्ञजीवात्मा देह नाहीं म्हणजे मीच नाहीं म्हणतो. देह दृश्य आहे, आत्मा त्याचा द्रष्टा प्रकाशक आहे. अज्ञ हें न समजून देहालाच आत्मा मानतो. असाच विचार. अ. १५, १०–११ श्लोकावर ज्ञानदेवानीं मांडला आहे.

तैसेंचि तयां संगती। इंद्रियें आपलालां अर्थीं वर्तती। तया नांव सुभद्रापती। भोगणें जया ॥ ३७४ ॥ पाठीं भोगक्षीण आपैसें। देह गेलिया तें न दिसे। तेथें गेला गेला ऐसें। बोभाती गा ॥ ३७५ ॥ पैं रुखु डोलतु देखावा। तरी वारा वाजतु मानावा। रुखु नसे तेथें पांडवा। नाहीं तो गा ॥ ३७६ ॥ कां आरसा समोर ठेविजे। आणि आपणपें तेथ देखिजे। तरी तेथवांचि जालें मानिजे। काय आधीं नाहीं ॥ ३७७ ॥ कां परता केलिया आरिसा। लोपु जाला तया आभासा। तरी आपणपें नाहीं ऐसा। निश्चयो करावा ॥ ३७८ ॥ शब्द तरी आकाशाचा। परी कपाळीं पिटे मेघांचा। कां चंद्रीं वेगु अभ्राचा। आरोपिजे ॥ ३७९ ॥ तैसें होइजे जाइजे देहें। तें आत्मसत्ते अविक्रिये। निष्टंकिती गा मोहें। आंधळे ते ॥ ३८० ॥ येथ आत्मा आत्मयाचां ठायीं। देखिजे देहींचा धर्मु देहीं। ऐसें देखणें ते पाहीं। आन आहाती ॥ ३८१ ॥ अ. १५, ३७४–३८१

( २ ) आत्मा इंद्रियें नव्हे. तो 'सर्वेंद्रियगुणाभासम्' पण 'सर्वेंद्रियविवर्जितम्' (अ.१३–१४.) असा आहे.

पैं गुळाची गोडी। नोहे बांधया सांगडी। तैसीं गुण इंद्रियें फुडीं। नाहीं तेथ ॥ १३–९०१.

देहांत आत्मा राहिल्यासारखा दिसतो. पण तो देह नव्हे. तसेंच आत्मा कर्ता दिसतो. पण तो इंद्रियें नव्हे. गुळाची गोडी गुळाच्या ढेपेंत आहे. पण तिला ढेपेचा आकार नाहीं. त्याचप्रमाणें आत्म्याचा व गुणइंद्रियें यांचा संबंध नाहीं. 'वांचूनि हस्तनेत्रपायें। हे भाष तेथ कें आहे। सर्व शून्यत्वाचा न साहे। निष्कर्षु जें ॥ १३-८८४.

( ३ ) आत्मा शून्य नाहीं. बौद्धांतील माध्यमिक हे शून्यवादी आहेत. आत्मा देह नाहीं, इंद्रियें नाहीं, विज्ञानांतील कांहींच नाहीं. मग मुळांत नाहींच म्हणाना! ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, 'नाहीं कीर नोहे.'

बौद्धांचें हें मत स्वभावतः खंडित आहे व ज्ञानेश्वर-महाराज त्याचें कसें खंडन करतात हा विचार 'ज्ञानयोगांत' येऊन गेलेला असल्यानें त्याचें येथें अधिक विवरण करीत नाहीं. वाचकांनीं तें प्रकरण पहावें.

पण जातां जातां एक गोष्ट सांगणें अवश्य आहे. ज्ञानेश्वर महाराज सद्वस्तूचें 'नाहीं कीर नोहे। परि न साहे असणेंहि' असें वर्णन करतात. तसेंच 'शून्य ते 'महाशून्य'। श्रुति वचन संमत' असें महाशून्य म्हणून तिचा उल्लेख करतांना दिसतात. यांवरून त्यांच्या मनावर बौद्धतत्त्वज्ञानाची छाप पडली होती अथवा ते प्रच्छन्न बौद्ध होते, असें म्हणण्याचें कारण नाहीं. 'शून्य' महाशून्य' हे नाथपंथांतील पारिभाषिक शब्द आहेत व वर सांगितलेल्या स्थितीचे वाचक म्हणून गोरक्षनाथांच्या ग्रंथांतून त्यांचा तसा उपयोग केलेला आढळतो. बौद्धांचा अनत्तावाद व अद्वैत्यांचा 'अजातवाद' यांत जमीन-अस्मानाचें अंतर आहे.

( ४ ) आत्मा **विज्ञान** नाहीं—बौद्धामध्यें 'क्षणिक-विज्ञानवादी' एक पक्ष आहे. ते म्हणतात, आत्मा म्हणजे अखंड वाहणारी विज्ञानाची धारा आहे. ज्ञानदेव म्हणतात, 'आत्मा हा अविकार्य आहे. त्याच्यांत बदल होतच नाहीं.'

सृष्टीचा होणा न रचे। सर्व संहारें न वेंचे।
आथी नाथी या दोहींचें। पंचत्व तो।

आत्मा हा सत्य, शुद्ध, निरुपाधिक, गुणातीत, सजातीयविजातीयस्वगतभेदशून्य व देशकालवस्तु-परिच्छेदशून्य असा अनंत, ज्ञान, आनंद स्वरूप आहे. 'सकलु ना निष्कलु। अक्रियु ना क्रियाशीलु। कृश ना स्थुलु। निर्गुणपणें ॥ ११०७ ॥ आभासु ना

निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु । अल्प ना बहुवसु । अरूपपणें ॥ ११०८ ॥ रिता ना भरितु । रहितु ना सहितु । मूर्तु ना अमूर्तु । शून्यपणें ॥ ११०९ ॥ आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु । मुक्त ना बध्दु । आत्मपणें ॥ १११० ॥ येतुला ना तेतुला । आइता ना रचिला । बोलता ना उगला । अलक्षपणें ॥ ११११ ॥ सृष्टीचा होणा न रचे । सर्व संहारें न वेंचे । आथी नाथी या दोहींचे । पंचत्व तो ॥ १११२ ॥ मवे ना चर्चे । वाढे ना खांचे । विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥ १११३ ॥ एवंरूप पैं आत्मा । देहीं जें म्हणती प्रियोत्तमा । तें मठाकारें व्योमा । नाम जैसें ॥ १११४ ॥ तैसें तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृती । तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ॥ १११५ ॥' अ. १३ ओं. ११०७–१५.

हाच आत्मा सर्व रूपांनीं नटलेला आहे. शिवापासून तृणापर्यंत अथवा ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत एक आत्माच स्फुरत आहे. किंबहुना विश्व व त्यांत भरलेला आत्मा एवढें देखील द्वैत संभवत नाहीं; तर अवघा एक आत्माच आहे. यालाच ब्रह्म म्हणतात. ज्ञानदेवांच्या पूर्णाद्वैताचें थोडक्यांत स्वरूप असें आहे.

" तया आत्मयाचा माखा । न पडेचि दुसरी रेखा । जरी विश्वा अशेखा । भरला आहे ॥ " अमृ. प्र. ७–१४६ " तेवी शिवोनी पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी । प्रकाशे ते एकसरी । संवित्ति हे " चांगदेवपासष्टि ओ. १२.

म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ । तेवीं मी गा सकळ । संबंधु वावो ॥ जालेंनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांकें । किळेवरी माणिकें । लोपिजे कोई । अलंकारातें आलें । तरी सोनेंपण काई गेलें । कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके । सांग पां धनंजया । अवयवीं अवयविया । आच्छादिजे कीं तया । तेंचि रूप ॥ कीं विरुढलेया जोंधळा । कणिसांचा निर्वाळा । वेंचला कीं आगळा । दिसतसे ॥ म्हणोनि जगपरौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नव्हे उखितें । आघवें मीचि ॥

अ. १४, १२२–२७

अशा अर्थाचे आणखी कितीतरी उतारे देतां येतील ज्ञानदेवांचा अद्वैतानुभूतीवर अत्यंत कटाक्ष आहे. एके ठिकाणीं तर त्यांनीं असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, या विश्वांतील प्राण्यांचे आकार, त्यांचीं नांवें व वेष यांतील वैचित्र्य पाहून जर त्या प्राण्यांतील भेदच खरा आहे असें एकादा मनुष्य धरून बसेल, तर त्यानें कोटि जन्म जरी घेतले तरी त्यास मुक्तीची आशा नको.

ज्ञा. अ. १३–१०५९

अद्वैत तत्त्वज्ञानांत मोठा महत्त्वाचा प्रश्न असेल, तर सद्वस्तु एकच म्हणतां मग हें अनेकत्व आलें कसें ? पुरा अद्वैती आहे तो म्हणेल हा प्रश्नच बरोबर नाहीं. द्वितीयसंबंधशून्य जर अद्वैत आहे तर द्वैत व नानात्व त्यांत निर्माण होईल कसें ! तें झालेंच नाहीं. यालाच अजातवाद म्हणतात व ज्ञानेश्वर महाराज आपल्या ग्रंथांतून हा अजातवादच सांगतात.

ज्ञानविज्ञान सांगतांना अन्वय व्यतिरेक भगवंतांनीं सांगितला. व्यतिरेकानें वस्तुस्वरूपाची ओळख होऊन तीच सर्व ठिकाणीं व्याप्त आहे असें सांगण्याकरितां अन्वय आहे. पण व्यतिरेक अथवा अन्वय यांत सुद्धां द्वैत आहेच. त्याशिवाय ही भाषाच संभवत नाहीं. ज्ञानेश्वर महाराजांना द्वैतसंबंधशून्य एकरस अशी वस्तूच आहे असेंच सांगावयाचें म्हणून व्यतिरेक व अन्वय सांगितल्यावर ते म्हणतात,

' आमुच्या प्रकृतिपैलीकडील भावो । जरी कल्पनेंवीण लागसी पाहों । तरी मजमाजीं भूतें हेंहि वावो । जें सर्व मी म्हणोनि ॥ अ. ९–७१. अथवा ' मी गा सकळ । संबंध वाव. ' अ. १४ ओं १२२

हा अजातवाद जरी मांडला तरी जोंपर्यंत ऐकणाऱ्यास डोळ्यासमोर जग दिसतें, तोंपर्यंत त्याची व्यवस्था लावून दाखवणें अवश्य असतें. त्याच्या भूमिकेवरून आरंभ करून गोष्टी सांगाव्या लागतात; म्हणून हाच विचार पण सृष्टिदृष्टिवादाचा अंगीकार करून अ. ९ मध्येंच सांगितला आहे. शिवाय व्यष्टींतील विचार समष्टीला लागू. 'पिंडी ते ब्रह्मांडीं ' म्हणून गीतेंत वर दिलेला अद्वैताचा विचार, अध्याय ७, ज्ञानविज्ञान; अ. १३, क्षेत्रक्षेत्रज्ञ व प्रकृतिपुरुष; अ. १५, क्षराक्षर या रूपानें आलेला आहे. ज्ञानदेवांनीं या सर्व ठिकाणीं ज्ञान ( आत्मा ) विज्ञान म्हणजे प्रपंच याहून वेगळा, क्षेत्रज्ञ क्षेत्राहून वेगळा, पुरुष प्रकृतीहून वेगळा, उत्तम पुरुष हा क्षराक्षराहून वेगळा कसा हे अनेक दृष्टान्त देऊन दाखविलें आहे. यांपैकीं प्रकृतिपुरुष या दांपत्याच्या गृहस्थाश्रमाचें वर्णन ज्ञानोबारायांनीं केले ते देतों:—

प्रकृति पुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी । जे आंबुली जोडी । आमुला खाय ॥ १३–९७८ ॥ आमुलया आंबुलिये । संगती ना सोये । कीं आंबुली जग विये । चोज ऐकें ॥ ९७९ ॥ जे अनंगु तो पैंधा । निकवडा नुसधा । जीर्णु अतिवृद्धा । पालोनि वृद्धु ॥ ९८० ॥ तया आडनांव पुरुषु । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकु । निश्चयो नव्हे ॥ ९८१ ॥ अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ॥ ९८२ ॥ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखाचें ॥ ९८३ ॥ तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । परि इया पतिव्रता । भोगविजे ॥ ९८४ ॥ जियेतें अलुमालु । रूपागुणाचा चाळदाळु । ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ॥ ९८५ ॥

× × ×

इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्यातीची थोरी । म्हणोनि तया आवरी । अनावरातें ॥ ९९७ ॥ तयाचां तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं । कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥ ९९८ ॥

व्यतिरेकानें ब्रह्म या द्वंद्वाहून वेगळें दाखवून पुनश्च 'जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वी । असें जे वस्तु।' अशा वस्तूचें 'ओतप्रोत ती भरली आहे' असें वर्णन ठिकठिकाणीं केलें आहे.

ज्ञानेश्वर महाराज हे 'आघवेंचि आत्मा' सांगणारे अद्वैती होते असें म्हटल्यानें उघड होणार आहे कीं, ते रामानुजाचार्यांच्याप्रमाणें विशिष्टाद्वैती अथवा वल्लभाचार्यांच्याप्रमाणें शुद्धाद्वैती नव्हते. ज्ञानेश्वर महाराज अज्ञानाचा घांडोळा घेतात याचें कारण ते रामानुजीय मताच्या रामानंदाचे संन्यासी शिष्य विठ्ठलपंत यांचे चिरंजीव असा एक धागा जोडला जातो. पण याचा विचार ज्ञानदेव चरित्रांतील विवादस्थळें यांपैकीं 'विठ्ठलपंतांचे गुरु रामानंद कोण?' या प्रकरणांत आम्ही केला आहे व तेथें दाखवलें आहे कीं विठ्ठलपंतांचे गुरु व कबीरांचे गुरु एक नव्हत. शिवाय वादाकरितां घटकाभर मानलें कीं तेच रामानंद होते तरी आज जी रामानंदाची माहिती मिळते, त्यावरून असें ठरतें कीं रामानंद हे जरी स्वतः रामानुजाचार्यांच्या मताचे होते, तरी आपल्या शिष्यांना त्यांच्या आवडीप्रमाणें ते शंकराचार्यांचे अद्वैत मानण्याची मुभा देत. रामानंद हे मुख्यतः भक्तिमार्गी होते.

ज्ञानदेवांना अज्ञानाचा घांडोळा घेण्यास कारण त्यांना गुरुद्वारां प्राप्त झालेलें नाथपंथीय अद्वयानंद वैभव. गोरक्षमतांतच शंकराचार्यांच्या अद्वैतीची टीका केली आहे. याविषयीं मागें गोरक्षनाथ व अद्वैती यांचा एक संवाद दिलेलाच आहे.

रामानुजाचार्यांचें विशिष्टाद्वैत म्हणजे खरें द्वैतच आहे. रामानुजाचार्य ब्रह्म अथवा परमात्मा अशी एक वस्तु मानीत नाहींत. ईश्वर, चित् व जड अशा नित्य तीन वस्तु मिळून ब्रह्म. त्यांची सद्वस्तु तीन पायाच्या तिवई सारखी आहे. ते अद्वैत म्हणतात, कारण ईश्वर व चित् व जड यांत शरीरशरीरीभावसंबंध ते मानतात म्हणून. तांबडा घोडा यांत तांबडा व घोडा या दोन गुण व गुणींचें जसें ऐक्य, तसेंच ईश्वर, जीव व जगत् यांचें आहे. जीव ते अनंत मानतात. एकंदर या विश्वरचनेची त्यांच्या दृष्टीनें कल्पना येईल असा दृष्टान्त द्यावयाचा तर तो डाळिंबाचा देतां येईल. अनंत दाणे व वर संग्राहक कवच. तसें अनंत जीव सत्य व त्यांस आवरण ईश्वर. तात्पर्य हें द्वैतच आहे.

ज्ञानेश्वर महाराजांना हें अद्वैत मुळींच मान्य नाहीं, ते म्हणतात,

हो कां तरंग लहान । परि सिंधुसि नाहीं भिन्न ।
तैसा ईश्वरीं मी आन । नोहेचि मा ॥

अ. १४. ३८२

'अर्जुना, तूं आपल्याला असा समज':—

या कारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें ।
आपणयासकट मातें । जाणावें गा ॥...

रामानुजांच्या विशिष्टाद्वैताहून ज्ञानेश्वरांचें अद्वैत वेगळें तसेंच तें वल्लभाचार्यांच्या शुद्धाद्वैताहूनहि वेगळें आहे. या दोन आचार्यांत अज्ञान अथवा माया न मानणें एवढेंच साम्य. वसुदेवसुत श्रीकृष्णासच वल्लभाचार्य परमात्मा समजतात व त्याच्या अखंड सेवेकरितां पुष्टिमार्गाचा अवलंब करावा असें ते म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराज कृष्णभक्त खरे. पण त्यांची कृष्णाची कल्पना वेगळी.

देवाचिया दाटणी । देऊळा झाली आटणी । देशकाळादि वाहाणीं । येईंचना ॥ आतां देवातेंचि देवें । देववरी भजावें । अर्पणाचेनी नांवें । भलतिया ॥ अ. प्र. ९–३७–४०

या अद्वैतांत व गोलोक, नित्य रासक्रीडा, पुष्टि, ब्रह्मसंबंध सांगणाऱ्या वल्लभाचार्यांच्या अद्वैतांत फार अंतर आहे.

पं. पांडुरंग शर्मा यांच्या लिखाणामुळें विशेष चर्चिला जाणारा प्रश्न म्हणजे ज्ञानेशांचें अद्वैत व शंकराचार्यांचें अद्वैत हें एकच का यांतहि कांहीं फरक आहे ? ज्ञानदेवांना जवळचे शंकराचार्यच; एक अद्वय सांगतात व दुसरे अद्वैत सांगतात असा नाथपंथी फरक करतात एवढेंच. याबाबत पं. पांडुरंग शर्मा यांच्याहि पूर्वी कै. बाळशास्त्री हुपरीकर यांनीं शांकरमत व ज्ञानदेव यांच्या मतांमधील फरक दाखविला होता. पं. पांडुरंग शर्मा यांनीं चित्रमयजगत्मध्यें लेख लिहून हा प्रश्न धसास लावला. त्याला उत्तर देण्याचा प्रयत्न डॉ. पेंडसे यांनीं 'श्री ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या पुस्तकांत केला आहे.

प्रश्न सोडविण्यास बिकट याचे कारण शंकराचार्य व ज्ञानदेव दोघेहि अजातवादी आहेत; एवढेंच नव्हे तर शंकराचार्यांनीं अज्ञान मानून जगताची व्यवस्था लावून जसें अद्वैत मांडलें तसें ज्ञानदेवांनींहि अज्ञान मानून जगताची व्यवस्था लावून अद्वैत ज्ञानेश्वरींत मांडलें आहे.

मग कोणी म्हणेल तंटा कोठें आहे ? तंटा आहे तो येथें कीं, ज्ञानेश्वर महाराजांनीं अनुभवामृताच्या प्र. ७ मध्यें अज्ञानाचा धांडोळा घेण्यास प्रारंभ करून 'अज्ञान सिद्धच' होत नाहीं असें सिद्ध केलें आहे व जगताची 'जगआघवी वस्तुप्रभा' अशी व्यवस्था लावली आहे.

याचा अर्थ शंकराचार्य व ज्ञानेश्वरमहाराज एकच अद्वैत सांगणारे आहेत असें म्हणणारे असा करतात कीं, व्यावहारिक सत्तेत जेथें अज्ञान मानावयास पाहिजे तेथें दोघे मानतात व खास स्वरूपीं पारमार्थिक सत्तेत दोघेहि मानीत नाहीत.

उलट जे ज्ञानेश व शंकराचार्य ह्यांच्या तत्त्वज्ञानांत फरक दाखवितात, ते म्हणतात कीं स्वरुपीं तर अज्ञान नाहींच पण व्यावहारिक सत्तेत जगाची व्यवस्थासुद्धां अज्ञान न घेतां लावतां येते व तसें ज्ञानेशांनीं अनुभवामृतांत करून दाखविलें आहे. ही व्यवस्था ज्ञानदेव हे एकरूप असणाऱ्या शिवशक्ति या चिद्रूप दांपत्याची कल्पना घेऊन दाखवितात. यालाहि उपनिषदांतच आधार आहे. तसेंच अनुभवामृतांत 'सिद्धानुवाद' आहे हे उभयपक्षीं मान्य आहे. प्रश्न येवढाच कीं, सिद्धानुवाद याचा अर्थ काय करावयाचा ? 'सिद्ध आहेत त्यांच्या अनुभवाचा' अनुवाद का 'सिद्धवस्तूचा' अनुवाद ? जे ज्ञानेश व शंकराचार्य यांच्या मतांत भेद नाहीं म्हणतात ते पहिला अर्थ घेतात. म्हणजे अनुभवामृतांत सिद्ध म्हणजे जीवन्मुक्तांचा अनुभव सांगितला आहे असें म्हणतात. दुसरे म्हणतात हा सिद्धांचा अनुभव नव्हे, जी सिद्धवस्तु आहे तिचें वर्णन आहे.

ज्ञानेश्वरमहाराजांचा अज्ञानवाद्याशीं जो तंटा आहे, तो आत्मसत्तावादावरून आहे. ते या आत्मसत्तावादाच्या भूमिकेवरून अज्ञानवाद्यास विचारतात कीं, तूं अज्ञान मानून काय मिळविलेंस ? अज्ञान आत्म्याचें प्रकाशन करणार ? कीं आत्मा अज्ञानाचें प्रकाशन करणार ? पहिला पक्ष तूं अज्ञान ज्या स्वरूपाचें मानतोस, त्यावरूनच असिद्ध होणार आहे. बरें, दुसऱ्या पक्षीं आमच्याच मताची सिद्धि होते. कारण या पक्षाप्रमाणें आत्मा अज्ञाना-पूर्वीच प्रकाशस्वरूप आहे.

'तरि कां निमित्त पिसे । हा यया दाऊ बैसे । देखते नाहीं ते आरिसे । देखावे कोणे ।। दीपु दावीतयातें रची । कीं तेणेंचि सिद्धि दीपाची । तैशीं सत्ता निमित्ताची । येणें साच ।। आणि निमित्त जे बोलावें । तें येणें दिसोनि दावावें । देखिलें तऱ्ही स्वभावें । द्रष्टाही हा ।। म्हणोनि स्वयंप्रकाशा यया । आपणपें देखावया । निमित्त हा वांचोनियां । नाहींच मा ।। भलतेन विन्यासें । दिसत तेणेंचि दिसे । हा वांचूनि नसे । येथें कांहीं ।।' अमृ. प्र. ७–२३० ते २३५ ।। 'वांचूनि वस्तु इया । आपणपें प्रकाशावयां । अज्ञान हेतु वाया । अवघेचि ।।' अमृ. प्र. ७–२१२ ।।.

तात्पर्य, ज्ञानेश्वरमहाराजांचें म्हणणें असें कीं, अज्ञानास स्वतंत्र सत्ता संभवतच नाहीं. आत्म्याच्या योगानेंच तें प्रकाशित झालें आहे, म्हणूनच 'विभाति यस्य भासा । सर्वमिदं हा ऐसा । श्रुति काय वायसा । दैऊर देती ।।' असें श्रुतींतील वचन देऊन आपलें मत श्रुतीस मान्यच आहे, असें ते जोरानें सांगतात. ज्या आत्मसत्तावादावरून ज्ञानेश अज्ञानवाद्याला 'आरोपां'संबंधीं प्रश्न करतात त्याचें थोडेसें स्पष्टीकरण करणें अवश्य आहे. त्या योगानें ज्ञानेशांच्या तत्त्वज्ञानावर थोडा अधिक प्रकाश पडेल.

व्यवहारी मनुष्य दोन सत्ता मानतो; एक आपली व दुसरी आपल्याला विषय होणाऱ्या पदार्थांची. कारण

त्यास ही गोष्ट उघड दिसते की, आपण जरी डोळे मिटले, तरी समोरची वस्तु कांहीं नाश पावत नाहीं. दृश्यास स्वतंत्र सत्ता देणाऱ्या वादास पदार्थसत्तावाद ( Realism ) म्हणतात. अत्यंत जडवादी हे जड पदार्थांचीच एक सत्ता मानतात. ते एकांतिक पदार्थसत्तावादी ( Extreme Realist ) आहेत. आत्मा त्यांच्या मतें भासरूप आहे. कांहीं सत्य पदार्थ कांहीं विवक्षित प्रमाणांत मिश्रित झाले कीं, हा चेतनात्मक भाव निर्माण होतो. त्याला स्वतंत्र सदत्व, सत्ता अथवा अस्तित्व नाहीं, असा त्यांचा सिद्धांत आहे. आत्मसत्तावादी हा एकच सत्ता मानतो. पण ती अर्थातच जड पदार्थांची नव्हे तर आत्म्याची. त्याचें म्हणणें असें कीं, आत्मभानानें पदार्थाला अस्तित्व आहे–आत्मभानें पदार्थसत्ता. ' तस्य भासा सर्वमिदं विभाति. '

ज्ञानेश्वरमहाराज ' आरोपें काय काज ' असें स्वच्छ विचारतात येवढेंच नव्हे तर वस्तूच्या ठिकाणीं ही कल्पना कोणा निकृष्टानें केली, ( अ. प्र. ७–२७४ ) असें रागावून विचारतात. ज्ञानेश्वरमहाराजांना आवरण व विक्षेप शक्तीनें संपन्न अज्ञान मानणें हें सर्वस्वीं मान्य होतें हें म्हणणें धाष्टर्याचें आहे. ज्ञानेश्वरींत ते अज्ञान मानून जगाची व्यवस्था लावतात याचें कारण मागच्या प्रकरणांत सांगितलेली ज्ञानेश्वरांची समन्वयाची दृष्टि आहे. त्यांच्या दृष्टीनें ज्या रीतीनें पटवतां येईल त्या दृष्टीनें पटवून पण अद्वयापर्यंत साधकास नेऊन सोडणें अवश्य आहे. या संबंधांत तेराव्या अध्यायांतील ' अवघेंचि आत्मा । ऐसें सांगो वीरोत्तमा । परि तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ' इत्यादि ओंव्या लक्षांत घेण्यासारख्या आहेत. त्यांची चर्चा मागें येऊन गेल्यामुळें पुनः करीत नाहीं.

ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाची सांगोपांग चर्चा करणारा ग्रंथ अजून लिहिला गेला नाहीं. कांहीं थोडें परंपरेनें आलेलें ज्ञान एकादोघांनीं छापून जगासमोर मांडलें आहे. बाकी आजवर शंकराचार्यांचेच ग्रंथ प्रामुख्यानें बघून ज्ञानदेवासंबंधीं लिखाण लिहिलें गेलें आहे. नाथसंप्रदायांतील संस्कृत, हिंदी, मराठी भाषांतील ग्रंथांचा अभ्यास करून, तंत्रमार्गांतील ग्रंथांचा अभ्यास करून अर्थातच ज्ञानदेवांचे समग्र ग्रंथ अभ्यसून ज्ञानेश्वांच्या तत्त्वज्ञानासंबंधीं ग्रंथ लिहिणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांच्या शुद्ध प्रतीहि उपलब्ध होणें अवश्य आहे. या गोष्टी घडून प्रमाणभूत असा ग्रंथ झाला नाहीं, तोंपर्यंत या वादांचा निकाल लागणें दुष्कर आहे.

आतां ज्ञानेश्वर महाराज अज्ञान मानीत नाहींत, मग ते जग काय समजतात तें पाहूं. जर ते अज्ञान मानीत असते तर हा प्रश्न इतका महत्त्वाचा नव्हता. पण जर ते अज्ञान मानीत नाहींत, तर अर्थातच जग हें अज्ञानकार्य म्हणून मिथ्या असें मानणार नाहींत व जग जर मिथ्या नाहीं तर जग हें सत्यच ते मानीत असले पाहिजेत असें ओघानें येतें.

पण ज्ञानदेवांच्या बाबतींत ही विचारपरंपरा चुकीची आहे. ज्ञानेश्वर महाराज हे जडवादी चार्वाक् जसें जगत् सत्य मानतो तसें मानीत नाहींत. त्यांचा मुख्य सिद्धान्त ' अस्फुट ब्रह्म ' हाच आहे. ते म्हणतातः—

' तया आत्मयाच्या भाखा । न पडेचि दुसरी रेखा । जरी विश्वा अशेखा । भरलें आहे ॥ दुबंधीं खिरोदकीं । वाणें परी अनेकीं । दिसतीं तरी तितुकीं । सुतें आथी ॥ पातयाची मिठी । नुकलितां दिठी । अवघियाचि सृष्टी । पाविजे जरी ॥ न फुटतां बीजकणिका । मार्जी विस्तारे बहु असिका । तरी अद्वैत फांका । उपमा आथी ॥ अमृ. प्र. ७–१४६ ते ४९ ॥

ज्ञानदेव जगत् काय समजत होते हें समजण्याकरितां खालील ओंव्यांहि उपयोगी पडतील.

' प्रकाश तो प्रकाश कीं । यासि न बंधे घेई चुकी । म्हणोनि जग असकी । वस्तुप्रभा ॥ विभाति यस्य भासा । सर्वमिदम् हा ऐसा । श्रुति काय वायसा । ढेंकर देती ॥ यालागीं वस्तुप्रभा । वस्तुचि पावे शोभा । जात असे लाभा । वस्तुसिचि ॥' अमृ. प्र. ७–२८९ ते ९१

'देव जगत् आहे ' व 'जगत् देव आहे.' हीं वाक्यें थोड्या फरकानें एकच दिसत असलीं तरी त्यांत मूल्याच्या दृष्टीनें फार फरक आहे. पहिलें चिद्वादाचें प्रमेय मांडतें, तर दुसरें वाक्य जडवाद सांगतें. पहिल्याचा अर्थ ' आहे देवच.' लोक ' जग ' म्हणतात. दुसऱ्याचा अर्थ ' आहे जगच.' कांहीं लोक ' देव ' म्हणतात एवढेंच. ज्ञानदेव हे देवच जगत् म्हणणारे, हें आतां सांगावयास नकोच.

वरील विवेचनावरून जगत् सत्य मानणारा जडवादी व ज्ञानदेव यांत किती अंतर आहे हें स्पष्ट होईल.

जगत् आत्म्याहून वेगळें झालेंच नाहीं, असें ज्यांचें मत त्यांच्या मतांत जीव तरी आत्म्याहून वेगळा कसा आणि कोठें उरणार? एवढयाचकरितां ज्ञानदेवांनीं अमृतानुभवांत जीवाची स्वतंत्र व्याख्या देण्याचा प्रयत्न केला नाहीं. आतां जेथें श्रोत्यांस विषय समजून सांगण्यासाठीं मायावादाचा अंगीकार करून भाषा चाललेली आहे, तेथें वेदांत्याप्रमाणें त्यांनींही जीवस्वरूपाची व्याख्या दिली आहे. (ज्ञा. अ. १८–३२१ पहा.) परंतु खुद्द वेदान्त्यांतसुद्धां बिंबप्रतिबिंब अथवा अवच्छेद असे जीवस्वरूपाविषयीं दोन पक्ष आहेतच. जसें जगतासंबंधीं तसेंच जीवस्वरूपासंबंधींहि लोकांना कांहीं कल्पना यावी म्हणून ज्ञानदेवांनीं पुढील तीनचार दृष्टान्त दिले आहेत, ते लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

'तया पुत्र तूं वटेश्वराचा। रवा जैसा कापुराचा ॥'

चां. पा. ओ. ३७

'पैं परमाणु भूतळीं। हिमकणु हिमाचळीं। मजमाजीं न्याहाळीं। अहंतेसें ॥ हो कां तरंगु व्हानु। परी सिंधुसी नाहीं भिन्नु। तैसा ईश्वरीं मी आनु। नोहेंचि गा ॥'

ज्ञा. अ. १४, ३८५–३८६

या दृष्टांतावरून ज्ञानदेव हे जीवस्वरूप 'परमाणु' एवढें समजत होते, हें मागील पुढील संबंध जो पाहणार नाहीं तोच म्हणेल. हे सर्व दृष्टान्त 'अहं' स्फुरण ज्यास होतें त्यानें आपण कसे आहोंत हें पाहण्याकरितां आहेत. या सर्व दृष्टांतांतून ज्ञानदेवांस आत्मा एक आहे व जीव त्याहून वेगळा कधीं पडलाच नाहीं, हेंच दाखवावयाचें आहे.

जीव वेगळा पडलाच नाहीं, असें म्हटल्यावर त्याच्या बंधाचा व मोक्षाचा विशेष विचार करण्याचें कारण नाहीं. ज्ञानदेव म्हणतात,

'म्हणोनि बंधचि तंव वावो। मा मोक्षा के प्रसवो ॥'

अमृ. प्र. ३–१५ ॥

हें त्यांचें वाक्य गौडपादाचार्यांच्या मताशीं कितीतरी जुळतें आहे, तें वाचकांनींच पाहावें. ज्ञानदेवांच्या मतें मोक्ष प्राप्त होणें म्हणजे "अहं ब्रह्मास्मि" या वृत्तिज्ञानावर येणें नव्हे; कारण ही वृत्ति हाहि एक प्रकारचा बंधच आहे. (अमृ. प्र. ३–२३) खरोखरीचें कैवल्य म्हणजे 'इदमहं' या उभयवृत्ति शून्य होऊन राहणें.

अर्थात् ज्ञान मोक्ष देतें हें खरें, पण जिवंत राहून नव्हे तर मरून. ते म्हणतात:—

'ज्ञानें मोक्षु घडे। निमालेनि.' शूर शिपायी आपला जीव अर्पण करतो व मालकाचें काम साधतो. ज्ञानाचें तसेंच आहे. 'येथें निर्धारेंसी विचारु। निमोनि झाला साचारु। स्वामीच्या संकटीं शूरु। सुभटु जैसा ॥'

अ. ५–५७

ज्ञानदेवांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानासंबंधीं विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. कारण तत्संबंधीं पुष्कळ विचार मागील 'ज्ञानेश्वरींतील कर्मयोग, भक्तियोग, व ज्ञानयोग' या प्रकरणांतून येऊन गेलाच आहे व कांहीं पुढील प्रकरणांत येणार आहे.

येथें एवढेंच सांगणें अवश्य वाटतें कीं, त्यांचें तत्त्वज्ञान मानव 'दृष्टादृष्टीं' विजयी कसा होईल, याचा विचार करणारें आहे. ते म्हणतातच, 'जयां ऐहिक धड नाहीं। तयांचें परत्र पुससी काई ॥' अ. ४–१५४. 'यतः अभ्युदयनिःश्रेयससिद्धिः सधर्मः' ही जी धर्माची कणादांची व्याख्या त्याचप्रमाणें ज्ञानेशाचीहि आहे.

ते म्हणतात:—'एक आत्मसुख अंतरीं। विसंब क्षणीं ॥ अ. २–२६९

तुवां शरीरधर्म नोहावें। कामना जात सांडावें। मग अवसरोचित भोगावें। भोग सकळ ॥ आतां कोदंड घेऊनि हातीं। आरूढ पां इये रथीं। देईं आलिंगन वीरवृत्ती। समाधानें ॥ जगीं कीर्ति रूढवीं। स्वधर्माचा मानु वाढवीं। इया भारापासोनि सोडवीं। मेदिनी हे ॥

अ. ३, १८८–९०.

कां पेडित पापताप। पोखीत दीनांचे पादप। समुद्रा जाय आप। गंगेचें जैसें ॥ कां जगाचें आंध्य फेडितु। श्रीयेची राउळें उघडितु। निघे जैसा भास्वतु। प्रदक्षिणे ॥ तैसी बांधलीं सोडित। बुडालीं काढित। सांकडि फेडित। आर्तांचिया ॥ किंबहुना दिवसरातीं। पुढिलांचें सुख उन्नति। आणित आणित स्वार्थीं। प्रवेशिजे ॥

अ. १६, १९९–२०२.

या ओंव्यांतून ज्ञानदेवांचें जीवनविषयक तत्त्वज्ञान सांठवलेलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

———

## १६. आत्मसाक्षात्कार

हें प्रकरण शेवटीं घातलें आहे, याचा अर्थ ज्ञानेश्वरींच्या विचारांतील ह्या प्रकरणांतील विचार शेवटच्या म्हणजे हलक्या प्रतीचे आहेत म्हणून नव्हे, हें सुज्ञ वाचकांस सांगणें न लगे. हे विचार हलक्या प्रतीचे तर नव्हेतच. उलट असें म्हणावयासहि हरकत नाहीं कीं, ते शेवटचे म्हणजे मागें जें सर्व सांगितलें तें यांच्या तयारी करतां म्हणूनच. मागच्या तत्त्वज्ञानप्रकरणांत सांगितल्याप्रमाणें ज्ञानोबांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा गाभा म्हणजे आत्मसाक्षात्कार. त्यांच्या दृष्टीनें आत्म्याच्या प्रसन्नतेपलिकडे मानवी जीवनांत मिळविण्यासारखा दुसरा लाभ नाहीं. एक ती मिळाली कीं मग न मिळण्याजोगें असें काय उरलें आहे? ' किंबहुना पांडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पविजतां । लाभु कवणु असे ॥ अ. १८–१२५९

ज्ञानेश्वरी, अनुभवामृत, चांगदेवपासष्टि वगैरे ग्रंथरचना करण्याचा तरी हेतु हाच. ' दिसो परतत्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध सुकाळा । –माजि विश्व ॥' अ. १३–११६१.

ज्ञानराजांनीं हें मऱ्हाटिचिये चोहट्यावर अध्यात्मज्ञानाचें अन्नछत्र घातलें, त्याचा हेतू असाच कीं, ज्याला ज्याला हवें असेल, त्या प्रत्येकाला हा ब्रह्मरसाचा प्रसाद मिळावा व त्याला तृप्ती लाभावी. श्रीएकनाथ महाराजांचे गुरुबंधु रामाजनार्दन यांनीं ज्ञानोबांची उत्कृष्ट आरती केली आहे. तिच्या शेवटीं ते म्हणतात, ' प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामया जनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ॥ '

मागील पंथराज, कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोग हीं जीं चार प्रकरणें आहेत, त्यांत वास्तविक आत्मसाक्षात्काराचाच विचार सांगितलेला आहे. कारण कर्म, भक्ति, ज्ञान, कुंडलिनी जागृति या सर्वांचें फळ आत्मप्राप्ति हेंच आहे. त्याचीं साधनें म्हणूनच त्यांना किंमत आहे. वाचकांच्या हें लक्षांत आलें असेल कीं, चर्चेकरितां जरी कर्म, भक्ति, ज्ञान यांचीं वेगवेगळीं प्रकरणें पाडून चर्चा केली असली तरीसुद्धां त्यांचें खरें स्वरूप असें आहे कीं, ज्ञानदेवांच्या दृष्टीनें ते तिन्ही मिळून एकच मार्ग आहे. रामानुजांच्या ' ज्ञानकर्मसमुच्चयाप्रमाणें ' कर्म-भक्ति-ज्ञान समुच्चय ज्ञानदेव सांगत नाहींत.

मागील प्रकरणांतून आत्मसाक्षात्कारविषयक विचार येऊन गेलेले असल्यामुळें या प्रकरणांत थोडी पुनरुक्ति होणें साहजिक आहे.

या आत्मसाक्षात्काराच्या बाबतींत पहिली महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी अशी आहे कीं, मनुष्याचें चित्त इकडे वळण्याकरितां ते भोगांतून निघालें पाहिजे. जर तें भोगांतच रत असलें तर या पथावर पाउलें पडणेंच कठीण. भोगांतून चित्त निघण्याचा उपाय म्हणजे भोगांचें अनित्यत्व विचारानें पटणें हा होय. जोंपर्यंत विषयाच्या ठिकाणीं अलंबुद्धि आहे म्हणजे ते नित्यरूप व सुखरूप आहेत अशी बुद्धि आहे तोंपर्यंत विषयाविषयीं वीट मनुष्याला येणार नाहीं. हा विचार पूर्वजन्मींच्या संस्कारानें अथवा सत्समागम व सत्शास्त्रश्रवणानेंच उत्पन्न होतो. कारण ज्ञानेश्वर महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें 'चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणेंचि कीं ॥ '

ज्ञानेश्वर महाराजांनींच अ. १६ श्लो. २२ वर व्याख्यान करतांना लिहिलें आहे कीं, जोंपर्यंत अंतःकरणांत काम, क्रोध, लोभ हे तिन्ही जागत आहेत तोंपर्यंत निक्रियाची प्राप्ति अशक्य आहे, असें देव म्हणतात. नीतियुक्त आचार हा या मार्गावर चालणाऱ्याचा साधा प्रारंभीचा आवश्यक गुण आहे.

' त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं फिटलिया नगर । त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ॥ तैसा कामादिकीं तिहीं । सांडिला सुख पावोनि जगीं । संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ॥ १६–३३९–४० ॥ '

तात्पर्य, सज्जन संगतीनें ज्याला या विषयोपभोगांचें अनित्यत्व व दुःखरूपत्व कळलें तोच कळकळीनें या मार्गाकडे वळतो. त्याला कळूं लागतें कीं ' हे विरक्तांचिये दिठी । जैं न्याहाळिजे किरीटी । तैं पंडुरोगाचिये पुष्टी । सारिखे दिसे ॥ अ. ५ ओ. ११९

प्रपंच म्हणजे—

' बाप दुःखाचें केणें सुटलें । जेथ मरणाचें भरे लोटलें । तिये मृत्युलोकींचिये शेवटिलें । येणें जाहालें हाटवेळे ॥ ४९६ ॥ आतां सुखेंसि जीविता । कैंची गाहिकी कीजेल पांडुसुता । काय राखोंडी फुंकिता । दीपु लागे ॥ ४९७ ॥ अगा विषाचे कांदे वाटुनी । जो रसु घेइजे पिळुनी । तया नाम अमृत ठेउनी । जैसें अमर

होणें ॥ ४९८ ॥ तेविं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ४९९ ॥ कां शीस खांडूनि आपुलें । पायींचां खतीं बांधिलें । तैसें मृत्युलोकींचें भलें । आहे आघवें ॥५००॥ म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचां श्रवणीं । कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळाचां ॥५०१॥ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं । दुःख लेऊनि सुखाची आंगी । सळित जगातें ॥ ५०२ ॥ जेथ मंगळाचां अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पोरी । मृत्यु उदराचां परिवरीं । गर्भु गिंवसी॥५०३॥ जें नाहीं तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वी । गेलियाची कवणे गांवीं । शुद्धि न लभे ॥ ५०४ ॥ अगा गिंवसितां आघवा वाटीं । परतलें पाउलचि नाहीं किरीटी । सैंघ निमालियांचियाचि गोठी । तियें पुराणें जेथिंची ॥ ५०५ ॥ जेथींचिये अनित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचें आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं । निपटूनियां ॥ ५०६ ॥ अ. ९

अध्याय पंधरामधील प्रपंचाचें अश्वत्थ वृक्षाच्या रूपकानें वर्णन येवढ्याचकरितां कीं, प्रपंच अनित्य आहे हें साधकास पटावें. कारण तें जोंपर्यंत पटलें नाहीं तोंवर त्याची परमार्थाकडे नजर वळणार नाहीं. 'अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया घरा । करीतसे आडवारा । विश्वाभास जो ॥ तो हा जगडंबरू । नोहे येथ संसारु । हा जाणिजे महातरु । थांवला असे ॥ ४६-४७ करूनि संसार वावो । स्वरूपीं अहंते ठावो । होआवाया अध्यावो । पंधरावा हा ॥' १५–४३

तात्पर्य, जोंपर्यंत प्रपंच हवें तें सुख देणारा आहे असें वाटतें तोंपर्यंत मनुष्य सत्यवस्तूच्या संशोधनाकडे वळणार कसा ? सत्समागमानें व सत्शास्त्रश्रवणानें हा 'श्व म्हणिजे उखा । तंववरी एकसारिखा । निर्वाहो नाहीं ' असा आहे असें कळतें व मग तद्विषयीं वैराग्य उत्पन्न होतें. ज्ञानेश्वर महाराज एका दृष्टान्तानें या वैराग्याच्या स्वरूपाचें वर्णन करतात, 'जे विषें रांधली रससोये । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं तो ताटचि सांडूनि जाये । जियापरी ॥ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जें अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठी लागे ॥'

अ. १५, ३८–३९

असें घरबुसें वैराग्य प्राप्त झालें, कीं प्रपंची साधक होतो व त्याच्या परमार्थास सुरवात होते. जोंपर्यंत असें वैराग्य नाहीं, तोंपर्यंत परमार्थ नाहींच. म्हणून प्रत्येक ठिकाणीं ज्ञानेश्वर महाराजांनीं 'वैराग्याचें' कथन व वर्णन केलें आहे. सात्त्विक सुख सांगतांना ते म्हणतात 'देत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसें वैराग्य उठी । स्वर्ग संसारा कांटी । काढितचि ॥ १८–७८२ ॥ पहिला वैराग्यगरळा । धैर्य शंभु वोढवी गळा । जरी ज्ञानामृतें सोहळा पाहे जेथें ॥१८–७८९॥' 'आपण ज्यांच्यावर विसंबून बसलों ते हे आपल्या देहासकट सर्व चोर म्हणजे केव्हां हातावर तुरी देऊन जातील याचा नियम नाहीं' असा त्याला विचार स्फुरतो व देव म्हणतात तें पटूं लागतें. 'यालागीं शतजर्जर नावे । रिगोनि केविं निश्चिंत होआवें । कैसेनि उघडिया असावें । शस्त्रवर्षीं ॥४९०॥ आंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केविं वोडण । रोगें दाटला आणि उदासपण । वोखदेंसीं ॥४९१॥ जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केविं पांडवा । तेविं लोकां येऊनि सोपद्रवा । केविं न भजिजे मातें ॥ ४९२ ॥ अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पां आपुलिये आंगीं । काइ घरीं कीं भोगीं । निश्चिती केली ॥४९३॥ ना तरी विद्या कीं वयसा । ययां प्राणियांसि हा ऐसा । मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ॥४९४॥ तरी भोग्यजात जेतुलें । तें एका देहाचिया निकिया लागलें । आणि एथ देह तंव असे पडिलें । काळाचिये तोंडीं ॥ ४९५ ॥ अ. ९ ओं. ४९०–९५

बाकीचे सोयरे धायरे, संपत्ति, जात यांचा विचार सोडून द्या. पण आपण ज्या शरीरावर अवलंबून राहिलों तेच अनित्य व दुःखरूप आहे.

'मग क्लेशतरूची वाडी । जे तापत्रयाग्नीची सगडी । जे मृत्युकाकासि कुरोंडी । सांडिली आहे ॥ १४० ॥ जें दैन्याचे दुभतें । जें महाभयातें वाढवितें । जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥ १४१ ॥ जें दुर्मतीचें मूळ । जें कुमार्गाचें फळ । जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ॥ १४२ ॥ जें संसाराचे बैसणें । जें विकाराचें उद्यानें । जें सकळ रोगाचें भाणें । वाढिलें आहे ॥ १४३ ॥ जें काळाचा खिचउशिटा । जें आशेचा आंगवठा । जन्ममरणाचा वोलिंवटा । स्वभावें जें ॥ १४४ ॥ जें भुलीचें भरींव । जें विकल्पाचें वोतींव । किंबहुना पेंव । विंचुवाचें ॥ १४५ ॥ जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पण्यांगनेचें मैत्र । जें विषयविज्ञान यंत्र । सुपुजित ॥ १४६ ॥ जें लावेचा कळवळा । निवालिया विषोदकाचा गळाळा ।

जैं विश्वासु आंगवळा। संवचोराचा ॥ १४७ ॥ जैं कोदियाचे खेंव। जैं काळसर्पाचें मार्दव। गोरियेचें स्वभाव। गायन जैं ॥ १४८ ॥ जैं वैरियाचा पाहुणेर। जें दुर्जनाचा आदर। हें असो जैं सागर। अनर्थांचा ॥ १४९ ॥ जें स्वप्नीं देखिलें स्वप्न। जैं मृगजळें सासिन्नलें वन। जैं धूम्ररजाचें गगन। ओतलें आहे ॥ १५० ॥ ऐसें जैं हें शरीर। तें ते न पवतीचि पुढती नर। जे होऊनि ठेले अपार। स्वरूप माझें ॥१५१॥'

अ. ८–१४०–५१

'एऱ्हवीं तरी अर्जुना। या शरीरा पराधीना। कां नाना भोगरचना। मेळवावी ॥ २०५ ॥ आपण सायासें करूनि बहुतें। सकळहि समृद्धिजातें। उदोअस्तु या देहातें। प्रतिपाळावें कां ॥२०६॥ सर्वस्वें शिणोनि एथें। अर्जवावीं संपत्तिजातें। तेणें स्वधर्मु सांडूनि देहातें। पोखावें काई ॥ २०७ ॥ मग हें तंव पांचमेळावा। शेखीं अनुसरेल पंचत्वा। ते वेळीं केला कैं गिंवसावा। शीणु आपुला ॥ २०८ ॥ म्हणूनि केवळ देहभरण। ते जाणें उघडी नागवण। यालागीं एथ अंतःकरण। देयावें ना ॥ २०९ ॥' अ. ३, २०५–९.

आतां देवाचा, शाश्वत स्वरूपाचा शोध करूं या, म्हणून तो देव शोधावयास लागतो. अशा जाणिवेनें व कळकळीनें तो या मार्गावर आक्रमण करण्याची इच्छा करूं लागला कीं, त्यानें पहिली पायरी गांठली असें समजावें. अशी सदिच्छा म्हणजे अनंताची ओढ व तळमळ. जातां जातांना येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, ही तळमळ कित्येक दैववानांत उपजत असते, कित्येकांत प्रपंचाच्या दुःखाच्या अनुभवानें निर्माण होते; तर कित्येकांत एकदम निर्माण झालेली दिसते. या भूमिकेला 'शुभेच्छा' असें म्हणतात. हिचा विचार मागें येऊन गेल्यामुळें एवढेंच सांगणें पुरे कीं, ही उत्पन्न झाल्याविना 'परमार्थाचें अस्तित्वच' नाहीं. मग माणूस तिकडे वळणार कसा व प्रयत्न करणार कसा ?

ज्याला अशी तीव्र जिज्ञासा निर्माण झाली, त्याला सत्समागमाचा लाभ होतो व त्याच्याकडून सत्शास्त्रश्रवण होतें व त्याला कळतें कीं, आपणांस जें हवें तें आत्मदर्शनानें मिळणार. 'भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्वसंशयाः। क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥'

ज्ञानेश्वर महाराज हेंच पुढील ओवींत सांगतात. 'मग सत्संगें प्रबळें। सत्शास्त्राचेनि बळें। जन्ममृत्यूचीं निमाळें। निस्तरे रानें ॥' शास्त्रामध्यें वेगवेगळीं साधनें सांगितलीं आहेत, तीं तो पहातो. तीं साधनें अ. १३ मध्यें पुढील ओंव्यांतून दिली आहेत.

'परि हाचि अंतरीं। विवेक मानूचियापरी। उदैजे ते अवधारीं। उपाय बहुत ॥ १०३६ ॥ कोणी एकु सुभटा। विचाराचां आगिटां। आत्मानात्मकिटा। पुटें देउनी ॥ १०३७ ॥ छत्तीसही वानी भेद। तोडोनिया निर्विवाद। निवडिती शुद्ध। आपणपें ॥ १०३८ ॥ तया आपणपयाचां पोटीं। आत्मध्यानाचिया दिठी। देखती गा किरीटी। आपणपेंचि ॥ १०३९ ॥ आणिक पैं दैवबगें। चित्त देती सांख्ययोगें। एक ते अंगलगें। कर्माचेनि ॥ १०४० ॥ येणें येणें प्रकारें। निस्तरती साचोकारें। हें भवभेउरें। आघवेंचि ॥ १०४१ ॥ यापरी ते करिती ऐसें। अभिमानु दवडूनि देशें। एकाचिया विश्वासें। टेकती बोला ॥ १०४२ ॥ जे हिताहित देखती। हानि कणवा घेपती। पुसोनि शिणु हरिती। देती सुख ॥ १०४३ ॥ तयांचेनि मुखें जें निघे। तेतुलें आदरें चांगें। ऐकोनियां आंगें। मनें होती ॥ १०४४ ॥ तया ऐकणेयाचि नांवें। ठेविती गा आघवें। तया अक्षरांसी जीवें। लोण करिती ॥१०४५॥ तेही अंतीं कपिध्वजा। इया मरणार्णवसमाजा–। पासूनि निघती वोजा। गोमटिया ॥ १०४६ ॥'

संतांच्या संगतींत आपल्या वांट्याला आलेल्या विविध कर्मांचें निष्काम बुद्धीनें आचरण करणें, सतत आत्मानात्मविवेक करणें, प्रत्याहारासारखीं इंद्रियें शोधणारीं साधनें करणें, मनाला परमात्म्याची मोहर लावणें इत्यादि साधनें करून अंतःकरणांतील दोष धुवून टाकण्याचें काम अनेक जन्में तो करीतच रहातो.

तो साधक यत्नेश्वराचें यजन करणारा मोठा प्रयत्न-वादी असतो. त्याचा पुढील भगवद्वचनांवर अढळ विश्वास असतो.

अथचित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥१२–९

ज्ञानेश्वर महाराजांनीं यांवर अभ्यासयोगासंबंधीं सुंदर लिहिलें आहे. तें साधकांनीं अवश्य लक्षांत घेण्यासारखें आहे. ते म्हणतातः—

अथवा हें चित्त। मनबुद्धीसहीत। माझां हातीं अचुंबित। न शकसी देवों ॥ तरि गा ऐसें करीं। यां

आठां पाहारां माझारीं । मोटकें निमिषभरी । देतु जाव ॥ मग जेणें कां निमित्त । देखेल माझें सुख । तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥ जैसा शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटुं लागे । तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनी ॥ मग पुनवेहुनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें । हारपत अंवसे । नाहींचि होये ॥ तैसें भोगाआंतुनि निगतां । चित्तभजमाजीं रिगतां । हळूंहळूं पांडुसुता । मीचि होईल ॥

अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे । येणें काहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळे । व्याघ्रसर्प प्रांजळे । केले एकीं ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । या लागीं माझां ठायीं । अभ्यासें मीळ ॥

अ. १२ ओं. १०४–११३

अ. ८ मध्यें असाच प्रयत्नवाद सांगतात. ते म्हणतात, 'उपाय बळें पंगु पहाड ठाकी' हें जाणून 'तैंवि सद्भ्यासें निरंतर । चित्तासि परम पुरुषाची मोहर । लावीं मग शरीर । असो अथवा जावो ॥' अ. ८–८२

परमार्थ सोपानाचा हा दुसरा टप्पा आहे. याच्या पुढचा तिसरा टप्पा म्हणजे गुरुकृपा होणें. या तिसऱ्या टप्प्यापर्यंत का साधक आला म्हणजे परमार्थ त्याला कांहीं जड नाहीं. पण प्रथम टप्पा सुटून तिसऱ्या टप्प्यापर्यंतच्या प्रवासाचा हाच मोठा खडतर मार्ग आहे. कारण त्यानें शास्त्रश्रवण जरी केलेलें असलें व त्याच्या सारखे साधक जरी त्याला भेटलेले असले, तरी ज्ञानेश्वरांच्या भाषेत सांगावयाचें तर 'याकारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकीं न ठेवी हातु । निवृत्तिदास असे विनवतु । तंव निवांतु केवि होय ॥' गुरुकृपेशिवाय शिष्याला निवांतता कशी येणार? हा त्याचा भाव कां, तर हें वांचपडल्यासारखें आहे. व्हावें असें तर वाटतें पण कोठें जावें व काय करावें हें तर कळत नाहीं. तुकारामबुवांनीं म्हटलें आहे. त्या साधकास असें वाटतें, 'काय देह घालूं करवतीं कमेरीं ।' नाथ महाराज म्हणतात, 'भगवंताचे भेटीलागीं । कडां धावूं लागे वेगीं ॥' या स्थितीकडेच मुख्यतः बघून 'दुर्गेपथः' असें याचें वर्णन केलें असावें.

अशीं साधनें करतांना साधकाची काय दशा होते, याचें वर्णन ज्ञानेश्वर महाराज पुढील ओंव्यांतून करतात.

'तयापरी पांडवा । जया सुखाचा रिगावा । विषम तेथ मेळावा । यमदमांचा ॥ ७८१ ॥ देत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसें वैराग्य उठी । स्वर्गसंसारा कांटी । काढितची ॥ ७८२ ॥ विवेक श्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाती भोकसे । बुद्ध्यादिकांचे ॥ ७८३ ॥ सुषुम्नेचेनि तोंडें । गिळिजे प्राणापानाचे लोंढे । वोहणियेसीचि येवढें । भारी जेथ ॥ ७८४ ॥ जे सारसांहीं विघडतां । होय वोहांहूनि वत्स काढितां । ना भणंगु दवडितां । भाणयावरुनी ॥ ७८५ ॥ पैं मायेपुढोनि बाळक । काळें नेतां एकुलतें एक । होय कां उदक । तुटतां मीना ॥ ७८६ ॥ तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर । युगांतु होय ते वीर । विराग साहाती ॥ ७८७ ॥ अ. १८, ७८१–८७

साधक अशी कष्टतर साधनें करून स्वकर्माचरण, ध्यानधारणा इत्यादि साधन रूप सेवा कां करूं लागला कीं देव प्रसन्न होतो व दुहेरी प्रसाद देतो. पहिला प्रसाद, जे कौवळें वैराग्य उत्पन्न झालेलें असतें तें परिपक्व दशेला आणतो. देवाच्या प्रसादाचा हा आरंभ आहे.

**तोच देतो व तोच वाढवतो**—ज्ञानेश्वरमहाराजांनीं अ. ९ 'अनन्याश्चिंतयन्तो मां' या श्लोकावर देवाच्या भक्तावरच्या प्रेमाचें फारच उत्कृष्ट वर्णन केलें आहे. ते म्हणतात, देव हा भक्ताचा 'योगक्षेम' वाहतो म्हणजे त्याची खाण्यापिण्याची काळजी वाहतो असा अर्थ नव्हे. तसा तर देव सर्वांचाच सांभाळ करतो. तोच म्हणतो कीं मी जगाचा 'पितामाता' आहे. शिवाय भक्त याची काळजी वाहतच नाहीं. मग ती काळजी वाहण्यांत देव त्याचें ओझें दूर काय करणार? हा सर्व विचार मनांत घेऊन भक्तराज ज्ञानोबाराय म्हणतात, देव जी काळजी वाहतो ती या योगक्षेमाची नव्हे, ती पारमार्थिक योगक्षेमाची. 'अप्राप्तस्य प्राप्तिः योगः प्राप्तस्य परिपालनं क्षेमः' जी वस्तु अप्राप्त असते तिचा लाभ होणें याला योग म्हणतात व झालेला लाभ टिकणें, जतन होणें, याला 'क्षेम' म्हणतात. देव भक्ताचा योगक्षेम वाहतो म्हणजे त्याला 'सायुज्य अथवा सेवा' यापैकीं जें हवें असेल त्याचा योग करून देतो व दिलेल्याचें क्षेम करतो.

'तयां मानिया सायुज्याची चाड । तरि तेंचि पुरवीं कोड । कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुयें ॥३४१॥ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो तो पुढां पुढां

लागे तया देवों । आणि दिधलियाचा निर्वाहो । तोही मीचि करीं ॥ ३४२ ॥ हा योगक्षेमु आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा । जयाचिया सर्वभावा । आश्रयो मी ॥ ३४३ ॥ ' ९, ३४१–४३

जातां जातांना मोठी महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, भगवान् म्हणतात, कीं मी ही काळजी भक्त जेव्हां माझ्या ठिकाणीं अनन्य झाला त्या क्षणापासूनच करतो.

' ते एकवटूनि जियें क्षणीं । अनुसरलें गा माझिये वाटणीं । तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥ ३३८ ॥ मग तिहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें आघवें । जैसी अजातपक्षाचेनि जीवें । पक्षिणी जिये ॥ ३३९ ॥ आपुली तहान भूक नेणें । तान्हया निकें ते माउलीसीचि करणें । तैसे अनुसरले जे मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥ ३४० ॥ अ. ९, ३३८–४०

देव सर्व करतो म्हणजे येट मृत्युपर्यंतची त्याची काळजी वाहतो. इतराप्रमाणें मृत्युसमयीं भक्ताचें मन विकल होऊं नये म्हणून त्याला बोधरूप पिंजऱ्यांत घालतो व आपल्या स्मरणाची साऊली त्याच्यावर करतो व सुखानें आपल्याकडे आपल्या भक्तांना तो घेऊन जातो.

सर्व भक्तांचा हाच अनुभव आहे. तुकारामबोवा म्हणतात— ' योगक्षेम त्यांचे जाणे जडभारी । वाट दावी करी धरूनिया ॥' साधकाचें काम अनन्य होणें आहे. देव बाकीचें सर्व करतो. तात्पर्य, फळ परिपक्व झालें असतां तें देठाला धरित नाहीं व देठ त्याला धरीत नाहीं, तसा देव हा ज्या भक्ताचा स्नेह खुळा करतो, त्याला ईश्वराचा असा वेध लागतो कीं, देवावांचून इतर सर्व त्याला वांतीप्रमाणें त्याज्य वाटूं लागतें. अशी असक्तबुद्धि प्राप्त झाली, स्पृहा नाहींशी झाली, कर्मसाम्यदशा प्राप्त झाली, कीं त्याला गुरुकृपेचा लाभ होतो. तुकारामबोवा म्हणतात, ' देवच गुरुरूपानें भेट देतो.'

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥ गुरुकृपेविना सर्व फुकट आहे. ज्ञानेश्वर महाराजांचा या विषयाचा एक मोठा अभंग आहे. ते म्हणतातः—

कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म । कासया सांडिसी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि ॥ १ ॥ भस्म उधळण जटाभार । अथवा उदास दिगंबर । न धरी लोकांचा आधार । आहे तो विचार वेगळाचि ॥ २ ॥ जप तप अनुष्ठान । क्रिया कर्म यज्ञ दान । कासया इंद्रियबंधन । आहे तें निधान वेगळेंचि ॥ ३ ॥ वेदशास्त्र जाणितलें । आगमीं पूर्ण ज्ञान झालें । पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेंचि ॥ ४ ॥ शब्दब्रह्में होसी आगळा । म्हणसी न भिये कळिकाळा । बोधेंविण सुखसोहळा । आहे तो जिव्हाळा वेगळाचि ॥ ५ ॥ या कारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकीं न ठेवी हातु । निवृत्तिदास असे विनवितु । तंव निवांत केंवि होय ॥ ६ ॥

ज्ञानेश्वरींत असेंच म्हणतात. गुरूंच्या योगानें साधनांना सफळता येते. —म्हणोनि भाग्य जैं सानुकूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ । तैसे श्रुताधीत सकळ । गुरुकृपा साच ॥ जी वनकरु झाडेंसी जीवेंसाटीं । पाळूनि जन्में काढी आटी । परि फळेंसीं तैंचि भेटी । जैं वसंतु पावे ॥ अहो विषमा जैं वोहट पडे । तैं मधुर तें मधुर आवडे । पैं रसायनें तैं गोडें । जेव्हां आरोग्य देहीं ॥ कां इंद्रियें वाचा प्राण । या जालियांचें तैंचि सार्थकपण । जैं चैतन्य येऊनि आपण । संचरे माजीं ॥ तैसें शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें । तें तैंचि म्हणों ये आपुलें । जैं सानुकूळ गुरु ॥ अ. १० ओ. १६८–१७२.

अनुभवामृताच्या दुसऱ्या प्रकरणांत त्यांनीं असेंच गुरूला उपायवनवसंत म्हटलें आहे. ज्ञानेश्वरमहाराजांच्या ठिकाणीं या गुरुकृपेविषयीं किती आदर व प्रेम वसत होतें हें अ. १३ श्लोक ७ मधील ' आचार्योपासनं ' या पदावरील त्यांचें व्याख्यान वाचल्यानें कळून येणार आहे. ते म्हणतात, ' आघवियाचि दैवा । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्मचि करी जीवा । शोच्यातेंहि ॥ '

एकदां श्रीगुरु पाठीराखा भेटल्यावर इतर साधनांना कोण विचारतो ?

ज्ञानोबाराय म्हणतात :—श्रीगुरुसारखा असतां पाठीराखा । इतरांचा लेखा कोण करी ॥ १ ॥ राजयाची कांता काय भीक मागे । मनाचिया जोगें सिद्धि पावे ॥ २ ॥ कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला । काय वाणी त्याला सांगिजो जी ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों । आतां उद्धरलों गुरुकृपें ॥ ४ ॥

ज्ञानेश्वर महाराज ज्ञानेश्वरींत म्हणतात ' परि हेंचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि । श्रीगुरुकृपालब्धि । काळीं पावे ॥ १८–९८४

श्रीगुरुंनीं उपदेशिलेल्या साधनाचे अवलंबन करून हा परमार्थी यात्रिकरू परमात्मप्राप्तीच्या मुक्कामाकडे का चालूं लागला, कीं त्याला दिव्य दर्शन, दिव्य श्रवण होऊं लागतें व त्याला कळूं लागतें, कीं आपण योग्य मार्गावर आहोंत. कारण साधकाला जरी मार्ग कळला तरी एकदम मुक्काम भारीच गांठतां येतो ? याचाहि विचार मागें येऊन गेला आहे. म्हणून येथें सांगत नाहीं; त्याचप्रमाणें साधकास दिव्य अनुभव कोणच्या प्रकारचे येतात याचाहि विचार 'पंथराज' प्रकरणांत येऊन गेला आहे; म्हणून त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं, परंतु दिव्य दृष्टि प्राप्त झाली असतां साधकाचा अनुभव कशा स्वरूपाचा होतो, याचा विचार ज्ञानेश्वरमहाराजांनीं- भगवंतांनीं अर्जुनाला दिव्य दृष्टि दिली, त्यावेळेला सांगितला आहे. त्यांतील कांहीं भाग 'पंथराज' प्रकरणांत दिलेला वाचकांच्या लक्षांत असेलच.

गुरुकृपा एवढी जबरदस्त आहे कीं, साधकाची इच्छा असो वा नसो ते अनुभव येतच रहातात. ज्ञानेश्वर महाराज भगवंतांनीं अर्जुनाला दिलेल्या दिव्यदृष्टीचें वर्णन पुढीलप्रमाणें करतातः—

"अहो पाहतां कीर प्रतिभासे । एय कांहीं नवलावो काइअसे । परि न पाहतांही दिसे । चोज आइका ॥ कैसे अनुमहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें । तयाहीसकट नारायणें । व्यापूनि घातलें ॥ म्हणोनि आश्चर्यांचां पुरीं एकीं । पडिला ठायेंठाव थडी ठाकी । तंव चमत्काराचिये आणिकीं । महार्णवीं बुडे ॥... ! आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे । तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें । दिधली आहे ॥ म्हणोनि किरिटीसि दोहीं परी । तें देखणें देखे आंधारीं ॥ हे संजयो हस्तिनापुरीं । सांगतसे राया ॥

अ. ११, २२९–३५

साधकाला असा गुरुदेवासारखा पाठिराखा मिळाल्यावर साधक निर्विघ्नपणें मुक्कामाला पोंचेल यांत काय संशय ? देवच म्हणतात, 'अर्जुना, मीच त्याचा दिवटा म्हणजे मशालजी–मार्गदर्शक होतो.'

"म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मी वांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ॥ तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी पोतासाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ॥

अ. १०, १४१–४२.

तुकारामबोवा आपला अनुभव असाच सांगतात—
योग क्षेम त्यांचे जाणे जडभारी । वाट दावी करी धरोनियां ॥

भगवान् म्हणतात—माझ्या भक्ताच्या पदवीचा परिपोष, संगोपन मीच करतो. शिवाय त्या साधकानें अडीअडचणीला उपयोगी पडावा म्हणून ईश्वराच्या प्रसादद्वारां वैराग्य सोबती जोडून ठेवलेला असतोच. तो त्याचा पाठपुरावा करतो.

वीतरागते सारखा । जोडोनि ठेविला सखा । तो आघवियाचि भूमिका ।– सवें चाले ॥ पहावें तें दिसे तंववरी । दिठीतें न संडी दीप जरी । तरी कें आहे अवसरी । देखावया ॥ तैसें मोक्षीं प्रवर्तलिया । वृत्ती ब्रह्मीं जाय लया । तंव वैराग्य आथी तया । भंगु कैचा ॥ १८, १०४३–४५.

तात्पर्य, वैराग्ययुक्त ज्ञानाभ्यास करून हा साधक आत्मलाभाला योग्य होतो. 'म्हणोनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यास तो सभाग्यु । करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥'

१८–१०४६.

ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं, साधक वैराग्याचें चिलखत अंगांत घालून साधनाच्या घोड्यावर स्वार होऊन मुक्तीला वरण्याकरितां निघाला, कीं त्याला संसारणांत संसारपक्षाचे अहंकारादि योद्धे आडवे होतात. पण हा साधक वीतराग व साधनावर निष्ठा ठेवणारा असल्यानें सूर्य जसा अंधकाराचा नाश करीत बेडरपणानें जातो, तसा हा साधक या शत्रूंना बेडरपणें तोंड देत आपला मार्ग आक्रमण करतो. तात्पर्य, परमार्थांत येणारीं विघ्नें साधनाच्या व वैराग्याच्या जोरावर दूर करून साधक हा आपला मार्ग आक्रमित असतो. जसजसा साधक आत्मप्राप्तिजवळ येतो तसतसे पूर्वीचे विकार नाहींसे होऊन दैवी संपत्तीचे अमानित्वादि गुण त्या साधकाच्या अंगीं बसूं लागतात. तो ब्रह्मैक्याजवळ येतो. संसार नाहींसा होऊन ब्रह्मप्राप्तीजवळ साधक आला म्हणजे भवविजयाचा उत्साह तो कसकसा अनुभवतो याचें ज्ञानदेवांनीं उत्कृष्ट वर्णन केलें आहे.

'ऐसा दुर्जयो जो परिग्रहो । तयाचा फेडूनि ठावो । भवविजयाचा उत्सावो । भोगीतसे जो ॥ १०६६ ॥ तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणाचे जे मेळावे । ते कैवल्यदेशींचे आडवे । रावो जैसे आले ॥ १०६७ ॥ तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया । राणिवा उगाणूनि तया ।

परिवारु होऊनियां । राहत आंगें ॥ १०६८ ॥ प्रवृत्ती-चिये राजबिदीं । अवस्थाभेदप्रमदीं । कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण ॥ १०६९ ॥ पुढां बोधाचिये कांबीवरी । विवेकु दृश्याची मांदी सारी । योगभूमिका आरती करी । येती जैसिया ॥ १०७० ॥ तेथ ऋद्धि-सिद्धींची अनेगें । वृंदें मिळती प्रसंगें । तिये पुष्पवर्षी आंगें । नाहातसे तो ॥ १०७१ ॥ ऐसेनि ब्रह्मैक्या-सारिखें । स्वराज्य येतां जवळिकें । झळंबित आहे हरिखें । तिन्ही लोक ॥ १०७२ ॥ तेव्हां वैरिया कां मैत्रिया । तयासि माझें म्हणावया । समानता धनंजया । उरेचिही ना ॥ १०७३ ॥ हें ना भलतेणें व्याजें । तो जयातें म्हणे माझें । तें नोडवेचि कां दुजें । अद्वितीय जाला ॥ १०७४ ॥ पैं आपुलिया एकी सत्ता । सर्वही कवळूनियां पांडुसुता । कहीं न लगती ममता । धाडिली तेणें ॥ १०७५ ॥ '

अ. १८, १०६६–१०७५.

साधक असा विजय आटोक्यांतला आहे असें दिसलें तरी साधन अथवा वैराग्य यांचा त्याग करीत नाहीं. ज्ञानदेव म्हणतात कीं तो हतियेर मोडून टाकीत नाहीं. तो ' साधन हतियेर हळूंच ठेवी. ' असें साधन करतां करतां त्याच्या वृत्तीवरील द्वैत नाहींसें होऊन त्याची वृत्ति आवृत्तीसह स्वरूपीं नाहींशी होते व त्याला आत्मसाक्षात्कार होतो.

आत्मस्वरूप हें इदं अथवा अहंला विषय होत नसल्यानें त्याचा साक्षात्कार म्हणजे आत्मस्वरूपास पहाणें, हें आरशांत आपलें मुख पहाण्यासारखें नव्हे. तें कसें पाहणें म्हणजे आत्मसाक्षात्कार म्हणजे काय, याचें वर्णन अ. १५ व अ. १८ मध्यें ज्ञानदेवांनीं उत्कृष्ट केलें आहे तें पुढें देतों.

' मग इदंतेसि वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें । तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ॥ २६७ ॥ परि दर्पणाचेनि आधारें । एकचि करून दुसरें । मुख पाहाती गव्हारें । तैसें नको हो ॥ २६८ ॥ हें पाहाणें ऐसें असे वीरा । जैसा न मोडलिया विहिरा । मग आपुलिया उगमीं झरा । भरोनि ठाके ॥ २६९ ॥ ना तरी आटलिया अंभ । निजबिंबीं प्रतिबिंब । निहटे कां नभीं नभ । घटाभावीं ॥ २७० ॥ ना ना इंधनांशु सरलेया । वन्हि परते जेविं आपणपयां । तैसें आपेआप धनंजया । न्याहाळणें जें गा ॥ २७१ ॥ जिव्हे आपुली चवी चाखणें । चक्षु निज बुबुळ देखणें । आहे तया ऐसें निरीक्षणें । आपुलें पैं ॥ २७२ ॥ कां प्रभेसि प्रभा मिळे । गगन गगनावरी लोळे । नाना पाणी भरलें खोळे । पाणियाचिये ॥ २७३ ॥ आपणेंचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होय निरुतें । बोलिजतु असे ॥ २७४ ॥ जें पाहिजतेनवीण पाहिजे । कांहीं नेणणाचि जाणिजे । आद्यपुरुष कां म्हणिजे । जया ठायातें ॥ २७५ ॥ '

अ. १५, २६७–७५.

' जैसा मी तों हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । काल्वूनियां प्रवेशे । मजचिमाजीं ॥ १२०९ ॥ आणि तो हे भाष जेथ जाय । तेथ मी हें कोण्हाही आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रुपीं ॥ १२१० ॥ जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे । मग उभयतातीत उरे । आकाश जेवीं ॥ १२११ ॥ कां धाडलिया एका एकु । वाढे तो शून्यविशेखु । तैसा आहेनाहींचा शेखु । मीचि मग आथी ॥ १२१२ ॥ जेथ ब्रह्म आत्मा ईशु । यया बोला मोडे सौरसु । न बोलणेयाही पैसु । नाहीं तेथ ॥ १२१३ ॥ न बोलणेंही न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरुनी । जाणिवनेणिव नेणोनी । जाणिजे तें ॥ १२१४ ॥ तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें । सुखवरी सुखधें । सुखचि भोगिजे ॥ १२१५ ॥ तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा । विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥ १२१६ ॥ शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांती आला । अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें ॥ १२१७ ॥ अ. १८, ओं. १२०९–१७

तें पहाणें ' पहाते पहाणें दूरी सारोनियां पहाणें ' आहे. तें भोगणें ' भोग्यभोक्ताभोग ' या त्रिपुटीस दूर सारून भोगणें आहे.

परी तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे । तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥ भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अचळु लोटी । मग सुखेंसि वे आंठी । गाढेपणें ॥ तिये आलिंगनमेळीं । होय आपें-आप कवळी । तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥ कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे । तैसें सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥ ऐसी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एकचि होय । तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जें ॥ अ. ५, १३१–१३५

असा आत्मलाभ त्याला झाला कीं त्याला देव आपल्या स्थानावर स्थापन करतो. त्याला पट्टाभिषेक करतो.

' तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचें निशाण बाजत । दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ।। पाठीं समाधिश्रियेचा अशेखा । आत्मानुभव राज्यसुखा । पट्टाभिषेक देखा । समरसें जाहला ।।'

ज्ञा. अ. ९, २१५–२१७

तुकोबा आपला अनुभव असाच सांगतात. ' तुकया-स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनि उल्हासता सप्रेमता ।। '

पण, एका दृष्टीनें हें आत्मदर्शन अशक्य आहे. कारण आत्म्याचें निर्विषयत्व उपनिषदादि वेदांतग्रंथांतून प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरीमध्येंहि आत्म्याचें निर्विषयत्व अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. त्यांतील एकदोन महत्त्वाच्या स्थळींच्या ओंव्या देतों. आपल्याजवळ ज्ञान करून घेण्याची ज्ञानेंद्रियें मनबुद्धि ही जी सामुग्री आहे, तिला आत्मा विषय होत नाहीं, कारण तो शब्दादि विषय नव्हे. तो या मनबुद्ध्यादिकांचा प्रकाशक आहे. तो यांनीं प्रकाशला कसा जाणार ? 'मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टि न रिगे । इंद्रिया कीर जोगे । काय होईल।। अ. १२ ओं. ४१ दृश्यपणें देखिजे । का शेयत्वें जाणिजे । अमुकें ऐसें म्हणिजे । ते जें नव्हे ।। अ. १५ ओं. ३०७

समष्टीतील प्रकाश देणारी तत्त्वें त्यांना तो विषय होत नाहीं. ' न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ' १५–६. आत्मा हा या व्यष्टि-समष्टींतील प्रकाश देणाऱ्या वस्तूंचा प्रकाशक आहे म्हणून तो त्यांच्याकडून प्रकाशला जात नाहीं ही गोष्ट ' ज्योतिषामपि तज्ज्योतिः अ. १३-१७ या श्लोकावरील टीकेंत ज्ञानोबाराय सांगतात.

' तें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणें ।। जयाचे उजियेडें । तारागण उभडे । महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ।। ' .... ' बुद्धीची जे बुद्धि । जीवाचा जीवु ।। जें मनाचें मन । जें नेत्राचे नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ।। '

अनुभवामृतांत हीच गोष्ट त्यांनीं पुढीलप्रमाणें सांगितली आहे. ' तेवीं जेणें तेजें । वाचेसि वाच्य सुजे । ते वाचा प्रकाशिजे । हें कें आहे ।। ' प्र. ५–१५ ' बुद्धि बोद्धया लोके । परि बया वस्तु चुके । मना संकल्प निके । याहीहूनि ।। ' ७–११० ।।

ही ओंवी वाचली कीं, ' यद्वाचानभ्युदितं येन वाग् अभ्युद्यते तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ' या केनोपनिषदांतील ऋचेची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. ज्ञानेश्वरांनीं गीतेचें वर्णन केलें आहे कीं, गीता म्हणजे ' उपनिषदां सौरभ्य । कमळदळा जेवीं. ' त्याच शब्दांत ज्ञानेश्वरीचें वर्णन असें करतां येईल कीं ज्ञानेश्वरी ही ' उपनिषदां सौरभ्य । कमळदळा जेवीं ' अशी आहे.

ज्ञानेश्वर महाराज आत्म्याचें हें अविषयत्व वर्णन करतां करतां तो आपला आपल्यालाहि विषय होत नाहीं असें वर्णन करतात. ' कीं पुढिलांची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निपजे । परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरें ।। अ. १४–५

' सर्वं सिद्धांताचिया उजरिया । सांडोनियां निदसुरियां । आपुलिया हातां चोरियां । आपणाचि जो ।। अनु. प्र. ५–३९ ।।

मी सर्वांचा आदि व निर्विषय यामुळें देव, ऋषि, फार काय वेद यांच्याकडून जाणला जात नाहीं असें ' न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः । अहमादिर्हि देवानां महर्षीणांच सर्वशः ।। १०–२ ।। या श्लोकांत भगवान् सांगतात. त्यावर ज्ञानोबा लिहितात—

' एथ वेद मुके जाले । मन पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशि जेथ ।। अगा उदरींचा गर्भु जैसा । न देखे आपुलिये मातेची वयसा । मी आघवेया देवां तैसा । नेणवे कहीं ।। आणि जळचरा उदधींचें मान । मशका नोलांडवेचि गगन । तेविं महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ।। मी कवण पां केतुला । कवणाचा कैं जाहला । या निरुती करितां बोला । कल्प गेले ।। कां जे महर्षी आणि या देवां । येरां भूतजातां सर्वां । मी आदि म्हणोनि पांडवा । अवघड जाणतां ' ।।१०-६४ ते ६८

माझें ज्ञान होणें किती अवघड आहे म्हणून सांगूं ?

' उतरलें उदक पर्वत वळघे । जरी झाड वाढत मुळीं लागे । तरी मियां झालेनि जगें । जाणिजे मातें ।। कां गाभेवनें वटु गिंवसवे । जरी तरंगीं सागर सांठवे । कां परमाणूमाजीं सामावे । भूगोलु हा ।। तरी मियां जालिया जीवां । महर्षी अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाशु गा. ' ।। १०–६९ ते ७१

येथें एक महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो कीं, आत्मा अविषय असल्यामुळें त्याचें दर्शन होणें म्हणजे डोंगरावरून खालीं आलेल्या पाण्यानें पुनः डोंगर चढण्यासारखें अशक्य असेल तर त्याच्या दर्शनाकरितां प्रयत्न करणें म्हणजे मूर्खपणाचें काम आहे. तेव्हां शहाण्या मनुष्यानें परमात्मदर्शनाकरतां प्रयत्न न करणें बरें! भगवंताच्या अविषयत्वाच्या व्याख्यानाचा परिणाम कित्येकांवर वरीलप्रमाणें होण्याचा संभव आहे हें जाणूनच कीं काय ७१ व्या ओवीनंतर माऊली लगेच सांगण्याची घाई करते कीं, असा निष्कर्ष काढण्याचें कारण नाहीं. तो जरी दृश्यपणें देखिजे असा नसला तरी तो पाहतां येतच नाहीं असें नव्हे. भूतांच्या माथ्यावर गेलें तर तो दिसतो.

'ऐसाही जरी विषायें । सांडूनि पुढील पावें । सर्वेंद्रियांसि होवें । पाठिमोरा जो ॥ प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥ तेथ राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥ ७२ ते ७४

यावर पुन्हां असें वाटण्याचा संभव आहे कीं, आत्मा हा निर्विषय आहे असें सांगणारेच पुनः तो विषय होतो असें म्हणतात. तेव्हां हें विसंगत आहे. पण ज्यांना शास्त्रसंस्कार आहे त्यांना ठाऊक आहे कीं, आत्मा विषय होत नाहीं व विषय होतो हीं विरुद्ध दिसणारीं दोन विधानें आत्म्याकडे दोन वेगवेगळ्या दृष्टीनें पहाण्याचा परिणाम आहे. ही विसंगती नाहीं हें समजण्याकरितां एक दृष्टान्त घेऊन थोडें स्पष्टीकरण करूं. अंधारांत मडक्या-खालीं घड्याळासारखी वस्तु ठेवलेली आहे. आपणांस ती पाहावयाची असेल तर आपणांस दोन गोष्टींची आवश्यकता आहे, एक मडकें फोडणारी काठी व अंधार दूर करणारा प्रकाश. कारण, काठी मडकें फोडील पण मडकें व घड्याळ या वस्तूंप्रमाणें तीहि जडच आहे. म्हणून अंधार दूर करण्यास ती असमर्थ आहे. आतां आपण दुसरी कल्पना करूं. अंधारांत मडक्याखालीं घड्याळाच्या ऐवजीं विजेचा लावलेला दिवा आहे. तो जर आपणांस पाहावयाचा असला तर फक्त एकाच साधनाची गरज आहे व ती म्हणजे दिव्यावर असलेलें आवरण म्हणजे मडकें फोडणाऱ्या काठीची. अंधार दूर करणारा दिवा नकोच. कारण मडक्याखालीं असलेला दिवा स्वयंप्रकाश म्हणजे अंधार दूर करून आपलें ज्ञान करून देण्यास समर्थ आहे. तसेंच दार्ष्टांतीं बाह्य जड वस्तूचें ज्ञान करण्याकरितां ज्यावेळीं आपली वृत्ति जाते त्या वेळीं तद्‌गत आभासहि जातो व या दोहोंची त्या जड वस्तूच्या ज्ञानाकरितां गरज आहे. कारण वृत्ति व बाहेरचा पदार्थ दोघे जडच आहेत. म्हणून वृत्तीप्रमाणें ( वेदान्तशास्त्रांत वृत्तिव्याप्ति म्हणतात ) आभासाची ( वेदान्तशास्त्रांत फलव्याप्ति म्हणतात ) गरज आहे. पण ज्या वेळीं ती अंतःकरण वृत्ति परतून आत्म-दर्शनाकरितां आत्म्याकडे जाते त्यावेळीं फक्त आवरण-भंगाकरतां वृत्तिव्याप्तीची गरज आहे, आभासाची नाहीं. कारण आत्मा स्वयंप्रकाश आहे. जर त्याची गरज लागत असेल तर आत्मा जड ठरेल. श्रुति व संत आत्मा स्वयंप्रकाश आहे असें सांगतात.

'अगा सूर्योदय जालिया । सूर्ये सूर्यचि पहावा धनंजया । तेविं मातें मियां जाणावयां । मीचि हेतु ॥ १५–४२५

तात्पर्य, आभासाची म्हणजे फलव्याप्तीची गरज नाहीं, आत्मा जड नव्हे हें सांगण्याकरितां आत्मा निर्विषय आहे असें म्हटलें आहे. वृत्तिव्याप्ती आवरणभंगद्वारां आत्मज्ञान करून देते म्हणून आत्म्याचें ज्ञान होऊं शकतें असें म्हटलें आहे. 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह' सांगणारी श्रुतीच सांगते, 'मनसा एव इदं द्रष्टव्यम्।' याचें वर्म हेंच आहे.

तात्पर्य, अशा या आत्मलाभाला जो पुरुष प्राप्त झाला त्याला लक्षणेंहि आहेत. हंडींत दिवा लागला तर प्रकाश जसा बाहेर पडतो, अथवा वसंत ऋतूचा प्रवेश झाला कीं झाडांना टवटवी प्राप्त होते; त्याप्रमाणें आंत आत्मज्ञानाचा का उदय झाला म्हणजे त्या पुरुषाची क्रिया पालटते. गीतेंत जवळजवळ प्रत्येक अध्यायांत अशा पुरुषाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांतलीं कांहीं येथें देतों.

( १ ) आत्मदर्शन जें होतें तें मनाला होत असल्यानें ज्याला झालें त्याच्या मनाचे पूर्व गुण पालटतात. अग्नींत लांकूड पडून तें अग्निरूप झालें म्हणजे त्याचे मागील नाम-गुण जसे रहात नाहीं. तुकोबा म्हणतात,

'अग्नीमाजी गेलें । तें अग्नि होऊनि ठेलें ॥ १ ॥
काय उरलें त्यापण । मागील तें नामगुण ॥ २ ॥

तसेंच मनाचा धर्म सुखदुःखाची संवेदना करणें. तें मन आत्मारामरूप झालें, याची मोठी खूण त्याचे पूर्वीचे सुखदुःखादि संवेदनाचे गुणधर्म संपले. कारण तें सुखरूप जो राम तद्रूप झालें. त्याचें वर्णन ज्ञानेश्वरींत पुढील-प्रमाणें केलें आहे. एकाच ओवींत सांगावयाचें तर,

'जो निजानंदें धाला । परिणाम आयुष्या आला । पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥ अ. १२–१७१

म्हणोनि आसनाचिया गाढिका । जो आम्ही अभ्यासु सांगितला निका । तेणें होईल तरी हो कां । निरोध यया ॥ ३६४ ॥ एऱ्हवीं तरी येणें योगें । जें इंद्रियां विंदाण लागे । तैं चित्त भेटों रिगे । आपणपेयां ॥ ६५ ॥ परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियातें आपण देखे । देखतखेंचो वोळखे । म्हणे तत्त्व हें मीचि ॥ ६६ ॥ तियें वोळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । मग आपणपां समरसें । विरोनि जाय ॥ ६७ ॥ जयापरतें आणिक नाहीं । जयातें इन्द्रियें नेणती कांहीं । तें आपणचि आपुलया ठायीं । होऊनि ठाके ॥ ६८ ॥ मग मेरुपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ॥ ६९ ॥ कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्नीमाजीं पडलिया । चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये ॥ ७० ॥ ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वासु न पाहे । आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥ ७१ ॥
अ. ६, ३६४–७१

'पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा भीनलें वोघें । तें काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येत ॥ ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेवि चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जे ॥' ८–८४, ८५

( २ ) त्याला अपरिमित आनंदाचा लाभ झाल्यामुळें अल्प विषयसुखाकडे तो ढुंकूनहि पाहायला राजी नाहीं. शरदृतूंतील शुद्ध चंद्रकिरणांतून येणाऱ्या मानस-सरोवरांतील कमळदळावर पडलेल्या अमृतकणांचा आस्वाद घेणारा चकोर वाळवंटांतील खडे खाईल काय ?

जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं । तो विषय न सेवी हें कांई । विचित्र येथ ॥१०५॥ सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अंतरें । रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घाली ॥६॥ सांगे कुमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें । तो चकोर काई वाळुवंटें । चुंबितु असे ॥७॥ तैसें आत्मसुख उपाइलें । जयासि आपणपेंचि फावलें । तया विषयो सहज सांडवलें । म्हणों काई ॥८॥
अ. ५, १०५–८

( ३ ) अशा 'देशो काळें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा ।' त्या आश्चर्यवत् सुखाची सुखसंपदा तुकोबासारखे अखंड भोगत असतात, म्हणून घरांत अठराविश्वे दारिद्र्य असतां पायावर लोळण घेत द्रव्य आलें तरी ते त्याचा त्याग करूं शकतात. त्यांना विषयसुखाचा आत्यंतिक विसर पडतो. तुकोबा म्हणतात, 'विषयीं विसर पडला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥'

तरी जयाचियां इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाचा वोवरां । पहुडला असे ॥६२॥ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे । विषय पासींही आलिया से न रिघे । हें काय म्हणऊनि ॥ ६३ ॥ इंद्रियें कर्माचां ठायीं । वाढीनलीं परि कहीं । फळहेतूचीं चाड नाहीं । अंतःकरणीं ॥ ६४ ॥ असतेनि देहें एतुला । जो चेतुचि दिसे निदेला । तोचि योगारूढु भला । वोळखें तूं ॥ ६५ ॥ अ. ६, ६२–६५

देखें भूतजात निदेलें । तेथेंचि जया पाहलें । आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रितु जो ॥ ३५५ ॥ तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ॥ ३५६ ॥ अ. २, ३५५–५६.

( ४ ) असा तो 'निजानंदें धाला' त्याला आत्मतृप्ति प्राप्त होते. त्याच्या अंतःकरणाची स्थिरता बिघडत नाहीं. त्याची सर्व वासना निमाली. तो ऋद्धि-सिद्धीला पुसत नाहीं.

पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥ ३५७ ॥ जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ॥ ५८ ॥ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ॥ ५९ ॥ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी । तयासि क्षोभु नाहीं बुद्धी । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥ ६० ॥ सांगें सूर्याचां घरीं । प्रकाशु काय वातीवरी । कीं न लविजे तरी अंधारीं । कोंडेल तो ॥ ६१ ॥ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी ।

आली गेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥ ६२ ॥ जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पावलें म्हणे । तो केवीं रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ॥ ६३ ॥ जो अमृतासी ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ६४ ॥ पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ॥ ६५ ॥ अ. २, ३५७–६५.

( ५ ) स्वरूपस्थ झाल्यामुळें निजानंदांत बुडालेला जो पुरुष त्याला अनुकूल विषय प्राप्त झाला असतां त्याची संवेदना तें ' सुख ' अथवा प्रतिकूल विषय प्राप्त झाला असतांना संवेदना होतें तें ' दुःख ' हीं दोन्ही सारखीच. त्याच्याजवळ यांचा हिशोबच नाहीं. ज्या-वेळेला जीवात्मा देहरूपी जळांत मासोळी होतो, त्या वेळीं सुखदुःखाची संवेदना होते व भोग घडतो. हा तर ' आणिकचि सुख होऊन ' राहिलेला असतो. तो द्वंद्वातीत झाला, समदुःखसुख झाला. हें मोठें ठळक लक्षण आहे व तें गीतेंत वारंवार सांगितलें आहे.

एऱ्हवीं तरी सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे । देहजळीं होइजे । मासोळी जैं ॥३५१॥ आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसीचि मांडिलें । सस्यांतीं निवाडिलें । बीज जैसें ॥५२॥ कां वोघ सांडूनि गांग । रिघोनि समुद्राचें आंग । निस्तरली लगबग । खळाळ.ची ॥५३॥ तेवि आपणपांचि जया । वस्ती झाली गा धनंजया । तया देहीं अपैसया । सुख तैसें दुःख ॥५४॥

अ. १४, ३५१–३५४

सूर्यासमोर जसा अंधार येत नाहीं, तशीं द्वंद्वें द्वंद्व-रूपानें याला प्रतीतच होत नाहींत. अशी याची समदृष्टि झालेली असते.

अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें । तियें जयां कां समोरें । होतीचि ना ॥ २९३ ॥ स्वप्नींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकासि कारण । उपवढलिया जाण । नियापरी ॥ २९४ ॥ तैसें सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं । न घेपिजती सर्पी । गरुड जैसे ॥ २९५ ॥ अ. १५, २९३–९५

याला आत्मदर्शनच सर्वत्र होतें. वृत्तिवर विषय येतच नाहीं.

आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर । चरताति जे सविचार । राजहंस ॥ २९६ ॥ जैसा वर्षोनि भूतळीं । आपला रसु अंशुमाळी । मागौता आणी रश्मिजाळीं । बिंबासीचि ॥ ९७ ॥ तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बारावाटी । ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे ॥ ९८ ॥ किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेकु जयाचा । बुडाला बोधु गंगेचा । सिंधूमाजीं जैसा ॥ ९९ ॥ अ. १५, २९६–९९

अमृतानुभवाच्या नवव्या प्रकरणांत ज्ञान्याच्या या स्थितीचें उत्तम वर्णन केलें आहे.

पसरूनि वृत्तीची वावे । दिठी रूपातें दे खेवें । परी साचाचेनि नांवें । कांहींचि नव्हे ॥ तमातें ध्यावया । उचलूनी सहस्र बाहिया । शेवटीं रवि इया । हाचि जैसा ॥ तैसा उदेल्यानि विषयें । ज्ञानी विषयी हीं लाहे । तंव दोन्ही न होनी होये । काय नेणों ॥ २१–२५

( ७ ) तो आत्मरूप झाल्यामुळें व आत्मदर्शनाहून वेगळें दर्शनच त्याला नसल्यामुळें तो ' पापपुण्य ' या द्वंद्वातीत झाला.

अगा अंधारचि देखावा तेजें । मग तो फेडिजे हें बोलिजे । तैसें ज्ञानिया नाहीं दुजें । जे तो मारील ॥ ४४९ ॥ म्हणोनि तयाची बुद्धि । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळु जैसा ॥ ५० ॥ आगीसी आगी झगटलिया । काय पोळे धनंजया । कीं शस्त्र रुपे आपणया । आपणचि ॥ ५१ ॥ तैसें आपणपयापरतें । जो नेणें क्रियाजातातें । तेथ काय लिपवी बुद्धीतें । तयाचिये ॥ ५२ ॥ म्हणोनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहलें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मीं बंधु ॥ ५३ ॥

अ. १८, ४४९–५३

( ८ ) तो सूर्यासारखा अलिप्त असतो.

जैसा सूर्यु आकाशगतु । रश्मिकरें जगातें स्पर्शतु । तरी संगदोषें काय लिप्तु । तेयिंचेनि ॥३३३॥ तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ ३४ ॥ तरी विषयांतही कांहीं । आपणपेंवांचूनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥३५॥ जरी उदकीं उदकें बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्णु तो ॥३६॥ ऐसा आपणचि केवळु । होऊनि असे निखळु । तयाची प्रज्ञा अचळु । निभ्रांत मानीं ॥३७॥ अ. २, ३३३–३७

( ९ ) तो पुरुष गुणातीत झाला, अकर्ता झाला.
तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें । तिये अहं बैसे अहंतें । मूळकेचिये ॥ पैं तेथूनि मग पाहतां । म्हणे साक्षी मी अकर्ता । हे गुणचि क्रियाजातां । नियोजित ॥ सत्त्वरजतमाचा । भेदीं पसरु कर्माचा । होत असे तो गुणांचा । विकारु हा ॥ यथामाजीं मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा । वनलक्ष्मीविलासा । हेतुभूत ॥ कां तारागणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें । कमळीं विकासावें । जावें तमें ॥ यया कोणाचीं काजें कहीं । सवितया जैसीं नाहीं । तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ अ. १४, २९२ ते २९७ ॥

( १० ) तो 'किं धर्म कैसें नेणें देह' म्हणून आपल्या ठिकाणीं जन्ममृत्यु पहातच नाहीं. 'थोर बोधानें' तो देहांत असतो.

किंबहुना पांडुसुता । ऐसी तो माझी सत्ता । पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥ नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला । तैसा मूळअहंतें वेढिला । तो म्हणौनिया ॥ अगा अज्ञानाचिया निदा । जो घोरत होता बदबदा । तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा । चेइला कीं ॥ पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तया हातोनि पडिला वीरेशा । म्हणौनि प्रतिमुखाभासा । मुकला तो ॥ देहाभिमानाचा वारा । आतां वाजों ठेला वीरा । तैं ऐक्य वीचिसागरां । जोंवेशा हें ॥ म्हणौनि मद्भावेंसीं । प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी । वर्षांतीं आकाशीं । घनजात जेवीं ॥ तेविं मी होऊनि निरुता । मग देहींचि ये असतां । नागवे देहसंभूतां । गुणासि तो ॥ जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाशु नावरे । कां न विझेचि सागरें । वडवानळु ॥ तैसा आलागेला गुणांचा । बोधु न मैळे तयाचा । तो देहीं जैसा व्योमींचा । चंद्र जळीं ॥ तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती बागडीं । तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ॥ हा ठायवरी । नेइटोनि ठेला अंतरीं । आतां काय वर्ते शरीरीं । कांहीं नेणें ॥ सांडूनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं । ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें ॥ कां सौरभ्यजीर्णु जैसा । आमोदु मिळोनि जाय आकाशा । माघारा कमळकोशा । न येचि तो ॥ पैं स्वरूपसमरसें । ऐक्य गा जालें तैसें । तेथ किंधर्म हें कैसें । नेणें देह ॥ म्हणौनि जन्म जरा मरण । इत्यादि जे साही गुण । ते देहींचि ठेले कारण । नाहीं तयां ॥ घटाचिया खापरिया । घटभंगीं फेडिलिया । महदाकाश अपैसया । जालेंचि असे ॥ तैसी देहबुद्धि जाये । जैं आपणपां आठौ होये । तैं आन कांहीं आहे । तें वांचुनी ॥ येणें थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें । म्हणूनि तो मी म्हणें । गुणातीत ॥' अ. १४–३०१ ते ३१८

( ११ ) जगदुद्धार करावयास त्यांना श्रम लागत नाहींत. त्यांच्या लीलेंत नीति जगते.

तरी जयाचें चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जया निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ १८८ ॥ जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा । जयाचें मनीं ओलावा । विवेकाचा ॥ ८९ ॥ जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले । जे शांतीसि आले । पालव नवे ॥ ९० ॥ जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ । जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुंबकळोनि भरिले ॥ ९१ ॥ जयां भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती । जयांचिये लीळेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ ९२ ॥

अ. ९–१८८–९२

( १२ ) देवाभक्तांचें ऐक्य होतें—

'तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगाचिपाशीं दिसे । मग संवादीं जीं नसें । कांहींच भेदु ॥ १५८९ ॥ पैं दर्पणाहूनिचोखें । दोन्ही होती सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें ॥१५९०॥ तैसा देवेंसीं पांडुसुतु । आपणपें देवीं देखतु । पांडवेंसीं देखे अनंतु । आपणपें पार्थीं ॥ १५९१ ॥ देवो देवभक्तालागीं । जिये विवरू देखे आंगीं । येव तियेहींची भागीं । दोन्ही देखे ॥१५९२ ॥ आणिक कांहींचि नाहीं । म्हणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांदताती ॥१५९३॥...उट्ठनि दोन्ही आरसें । बोडविलिया सरिसें । कोण कोणा पाहातसे कल्पावें पां ॥१५९६॥ कां दीपासन्मुखु । ठेवलया दीपकु । कोण कोणा अर्थिकु । कोण जाणें ॥ १५९७ ॥ ना ना अर्का-पुढें अर्कु । उदयलिया आणिकु । कोण म्हणे प्रकाशकु । प्रकाश्य कवण ॥ १५९८ ॥ हें निर्धारु जातां फुडें । निर्धारासि ठक पडे । ते दोघे जाले येवढें । संवादें सरिसें ॥ १५९९ ॥ जी मिळतां दोन्ही उदकें । माजीं लवण बाऊं ठाके । कीं तयासीही निमिखें । तेंचि होय ॥ १६०० ॥ तैसे श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादिलें तें मनीं । धरितां मजही वानी । तेचि होतसे ॥ १६०१ ॥

अ. १८, ओ. १५८९–१६०१

( १३ ) जेथें देवभक्तांचा संयोग आहे तेथें विजय ठेवलेलाच आहे.

'यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें मी नेणें । परी आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ १६३१॥ चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ १६३२ ॥ रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ १६३३ ॥ दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ १६३४ ॥ वसंत तेथें वनें । वन तेथ सुमनें । सुमनीं पालिंगनें । सारंगांचीं ॥ १६३५ ॥ गुरु तेथें ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥ १६३६ ॥ भाग्य तेथ विलासु । सुख तेथ उल्हासु । हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥ १६३७ ॥ तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ । तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ १६३८॥ आणि आपलेनि कांतेसीं । ते जगदंबा जयापासीं । अणिमादिकीं काय दासी । नव्हती तयातें ॥१६३९॥ कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तैं जयो लागवेगें तेथेंचि आहे ॥ १६४० ॥ विजयी नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । श्रियेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ॥ १६४१ ॥'

अ. १८, १६३१–४१

× × ×

'म्हणौनि जेथ श्री तेथें श्रीमंतु । जेथ तो पांडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ १६५५ ॥ जरी व्यासाचेनि साचें । थिरे मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवचि माना ॥१६५६॥ जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगळाचा ॥ १६५७ ॥ या बोला आन होवे । तरि व्यासाचा अंकु न वाहे । ऐसें गाजोनि बाहे । उभिली तेणें ॥१६५८॥

अ. १८, १६५५–५८

---

## १७. आपणाऐसें केलें

आतांपर्यंत आपण ज्ञानेश्वरांच्या 'गीतेकडे बघण्याच्या दृष्टिकोना' पासून आरंभ करून गीतेंतील काण्डत्रय-निरूपणाचा आविष्कार ज्ञानदेवांनीं कसा केला आहे, हें पाहिलें. तसेंच, त्या निरूपणाच्या बुडाशीं असलेलें आत्मसाक्षात्कारी तत्त्वज्ञान याचाहि थोडा विचार केला. आतां राहिला शेवटचा भाग—अर्जुनाला भगवंतांनीं गीतेच्या द्वारां काय लाभ करून दिला, या प्रश्नाचा ज्ञानेश्वरांच्या दृष्टीनें थोडा विचार. मागील प्रकरणांतून याचा उल्लेख थोडासा आलाच आहे. पण हा प्रश्न स्वतंत्र रीत्या चर्चिण्याइतका महत्त्वाचा आहे. ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगावयाचें तर ज्याकरितां इतका 'शास्त्रातिशो' केला तें अर्जुनाचें कार्य झालें का ?

कोणी म्हणेल कार्य झालें किंवा नाहीं हा आवा प्रश्न विचारण्याचें कारणच नाहीं. ही चर्चेची गोष्ट नाहीं. ही एक इतिहासजमा झालेली घटना आहे. अर्जुन लढत नव्हता. त्याला भगवान् श्रीकृष्णांनीं लढण्याचा उपदेश केला. अर्जुनानें लढाई केली, जय मिळविला असें भारत सांगतें. आतां प्रश्न कोठें उरला ? वर सांगितलेल्या दृष्टीनें जे बघणारे आहेत, त्यांच्यापुरता प्रश्न उरत नाहीं हें खरें.

पण असा एक वर्ग आहे व तो मोठा आहे कीं, त्याच्या दृष्टीनें अर्जुन लढत नव्हता व लढूं लागला यापेक्षां भगवंतांनीं काय सांगून अर्जुनाला लढावयास प्रवृत्त केलें, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. तात्पर्य, ज्यांच्या मतें भगवंतांनीं अर्जुनाला ज्ञान सांगितलें त्यांच्या दृष्टीनें हा महत्त्वाचा प्रश्न आहे कीं, अर्जुन लढला खरा, पण तो आत्मज्ञानसंपन्न झाला का ? असा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण, युद्ध आटोपल्यावर अर्जुनानें भगवंतास पुनः प्रश्न केला आहे व त्याला उत्तर म्हणून अनुगीता भगवंतांनीं सांगितली आहे. भारतांत सांगितलेल्या या घटनेवरून गीतेवर लिहिणाऱ्या पुष्कळ लेखकांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं, अर्जुन लढला खरा, पण अर्जुनाला गीता श्रवण करून सर्व संशयांची निवृत्ति करणारें आत्मज्ञान झालें नाहीं. तसें झालें असतें तर तो पुनः प्रश्न न करता.

ज्ञानेश्वरांची गीतेकडे बघण्याची कांहीं निराळीच दृष्टि आहे. अर्जुन व श्रीकृष्ण यांचीं मधूनमधून जीं गोड वर्णनें आहेत त्यांत काव्य निःसंशय आहे; पण त्यांत नुसतेंच काव्य नसून त्यांत ज्ञानेशांचे पारमार्थिक जीवनविषयक विचार साहित्याचें सहाय्य घेऊन मांडले आहेत. ते गीताग्रंथ हा 'सांगतयाचें बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन तुटे' असा ऐकणाऱ्यालाच सांगणारा करून टाकणारा ग्रंथ आहे असें समजत होते. म्हणून एकें

ठिकाणीं तर गीता हे 'वाङ्मयमूर्ति प्रभूची' असें गीतेचें वर्णन त्यांनीं केलें आहे.

भगवंतांनीं अर्जुनाला कर्म सांगितलें का ज्ञान सांगितलें का भक्ति सांगितली? ज्ञानदेवांचें मत असें आहे कीं, तिन्ही योग गीतेंत आहेत व ज्ञानदेवांची लेखणी परिसाप्रमाणें असल्यानें ज्या ज्या विषयाला तिनें स्पर्श केला त्याला सोन्याचा करून तिनें ठेवला आहे. पण ज्ञानदेवांच्या दृष्टीनें भगवंतांनीं जरी हे योग सांगितले असले तरी हे साधनभूत आहेत. भगवंतांनीं मुख्य 'आत्मयोग' सांगितला. नुसता सांगितला नव्हे, तर भगवंतांनीं कृपाप्रसाद करून—'सांवळा सकंकण बाहु पसरुनि दक्षिण' अर्जुनास आलिंगन देऊन–त्यास आपल्यासारखें केलें. 'हृदया हृदय येक जालें। ये हृदयींचें तें हृदयीं घातलें। द्वैत न मोडतां केलें। आपणाऐसें अर्जुना॥

अ. १८–१४२१.

ज्ञानेश्वरांच्या दृष्टीनें अर्जुन प्रश्न विचारतो यावरून तो आत्मज्ञानसंपन्न झाला नव्हता, असाच निष्कर्ष काढण्याचें कारण नाहीं. कार्यावरून कारणाकडे जाणें हें कारणावरून कार्याकडे येण्याइतकें निश्चत स्वरूपाचें नसतें. कारण, व्यवहारांत एकच कार्य अनेक कारणांमुळें निर्माण झालेलें दिसतें. मनुष्य मेला एवढें श्रवण केलें तर तेवढ्यावरून अमुकच कारणानें मेला असें अनुमान बांधतां येणार नाहीं. कारण मृत्यु अनेक कारणांनीं होऊं शकतो. तसेंच अर्जुनाच्या प्रश्नास कारण त्याच्या आंत अज्ञान शिल्लक होतें व त्यामुळें त्याचे संशय शिल्लक होते हें असूं शकेल; किंवा ज्ञान झाल्यानंतर त्याला त्या विषयाची जी गोडी लागली ती त्याला स्वस्थ बसूं देत नव्हती हेंहि असूं शकेल. ज्ञानेशांच्या दृष्टीनें तो प्रश्न विचारीत होता याला कारण दुसरें होतें. अर्जुन आत्मज्ञानसंपन्न झाला. 'मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्' अथवा तुकारामबोवांच्या भाषेंत बोलावयाचें तर 'अवघे ब्रह्मांड मुक्त करी हेळा मात्रें' असा जगद्गुरु गुरु म्हणून अर्जुनास लाभल्यावर व त्यानें प्रेमानें आत्मबोध केल्यावर जर ज्ञान होणार नसलें, तर कशानें होणार! अर्जुन पूर्ण ब्रह्म झाला. श्रीकृष्णाचा संपूर्ण बोध अर्जुनांत उतरला. तरी पण अर्जुन प्रश्न करण्याचें सोडीना. याला कारण त्या वस्तूचा स्वभाव.

अध्याय पंधरामध्यें हा प्रसंग ज्ञानेश्वरांनीं वर्णिला आहे तो त्यांच्याच शब्दांत देतों.

तो आघवाचि बोधु सहला। अर्जुनीं उमटला कैसा। व्योमींचा चंद्रोदयो जैसा। क्षीरार्णवीं॥ कां प्रतिभिंतीं चोखटे। समोरील चित्र उमटे। तैसा अर्जुनें आणि वैकुंठें। नांदतसे बोधु॥ तरी बाप वस्तुस्वभावो। फावे तंव तंव गोडिये थांवो। म्हणौनि अनुभविवांचा रावो। अर्जुन म्हणे॥·········

यावर द्वारकेचे नाथ म्हणतातः—पैं अर्जुना आम्हांहि वाडेंकोडें। अखंड बोलों आवडे। परी काय कीजे न जोडे। पुसतें ऐसें॥ आजि मनोरथांसि फळ। जोडलासि तूं केवळ। जे तोंड भरूनि निखळ। आलासि पुसों॥ जें अद्वैतावरीही भोगिजे। तें अनुभवीचें तूं विरजें। पुसोनि मज माझें। देतासि सुख॥ जैसा आरिसा आलिया जवळा। दिसे आपणपें आपलां डोळां। तैसा संवादिया तूं निर्मळा। शिरोमणी॥ तुवां नेणोनि पुसावें। मग आम्हीं परिसऊं बैसावें। तो गा हा पाडु नव्हे। सोयरेया॥ अ. १५ ओ. ४४३–५०

ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, आवड याचा अर्थच असा आहे, कीं आवडीच्या पदार्थांचा भोग पुनःपुनः घ्यावासा वाटतो. 'आवडी जेथ पडे। तयाची अवसरी पुढें पुढें। रिगों लागे हे घडे। प्रेम ऐसें.' ज्ञानदेवांच्या दृष्टीनें अठरावा अध्याय म्हणजे एकाध्यायी गीताच. तेव्हां सतरा अध्याय ऐकून पुनः अर्जुन संन्यास व त्याग याबद्दल प्रश्न करतोच आहे व देव मागील विचार थोडयाफार फरकानें साठसत्तर श्लोकांतून सांगतच आहेत, याची संगति कशी लावावयाची, असा त्यांच्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. हा प्रश्न त्यांनीं याच म्हणजे 'जेथें आवड आहे तेथें तृप्ति नाहीं' या भूमिकेवरून सोडवला आहे. ते म्हणतातः—

एऱ्हवीं तत्त्वविषयीं भला। तो निश्चितु असे कीर जाहला। परी देवो राहे उगला। तें साहावेना॥ वत्स धाल्याही वरी। धेनु न वचावी दुरी। अनन्य प्रीतीची परी। ऐसीच आहे॥ तेणें कानेंवीणही बोलावें। तें देखिलें तरी पाहावें। भोगितां चाड दुणावें। पढियंतया ठायीं॥ ऐसी प्रेमाची हे जाती। पार्थ तंव तेचि मूर्ति। म्हणूनि करूं लाहे खंती। उगेपणाची॥ आणि संवादाचेनि मिषें। जे अव्यवहारी वस्तु असे। तेचि भोगिजे कीं जैसें।

आरिसां रूप ।। मग संवादु तोही पारुखे । तरी भोगणें भोगितां योके । हें कां साहावेल सुखें । लांचावलेया ।।... तैसी संपता अवसरीं । गीता आदरविली माघारीं । स्वामीभृत्याचा न करी । संवादु काई ।।

अ. १८, ओ. ७७–८५

तात्पर्य, अर्जुनानें प्रश्न केला एवढ्यावरून बुजून जाण्याचें कारण नाहीं. अर्जुन हा सख्यभक्ति पिठिकेवरील मातृका, श्रीकृष्णासारखा प्रेमळ सखा गुरु, परमार्थरसाचा विषय-अशांत हा संवाद संपला हेंच आश्चर्य ! देवाला कार्य करवून घ्यावयाचें होतें, म्हणून देवांनींच आवरतें घेतलें.

ज्ञानेश्वर महाराज गीता हा जीवनाचा ग्रंथ समजत होते. यांत उच्च प्रकारचें जीवन कसें चालवावें याची प्रामुख्यानें चर्चा आहे. इतर विषय तदनुषंगिक आहेत. भगवंतांनीं अर्जुनाला गीतासांगण्याच्या निमित्तानें अत्युच्च अशा जीवनाच्या भूमिकेवर आणून बसविलें. त्यांनीं अर्जुनास लढाईंत घातलें पण समाधिस्थ करून. भगवंतांनीं अर्जुनाला समाधि दिली म्हणजे आनंदरूप करून शोकमोहाच्या पलिकडे कायमचें नेऊन ठेवलें. ज्ञानेश्वर महाराज म्हणतातः— तेथ निजानंदा बहुवसा– । माजीं अर्जुनु तो सहसा । हरपला चंद्रु जैसा । चांदणेनि ॥ अहो संग्रामु हा वाणिया । मापें नाराचांचिया आणिया । सुनि मांस घे मवणिया । जीवितेंसी ।। ऐसिया समयीं करंडीं । भोगीजत स्वानंदराज्य कैसें । आजि भाग्योदयो हा नसे । आणिके ठाईं ॥ अ. १७ ओ. ४२४–२६.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अर्जुन अशा अखंडानंदाच्या साम्राज्याचा धनी झाला, यांत काय आश्चर्य ! गीता आम्हि ' म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवक होईल इयेचा । तो स्वानंद साम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥ अ. १८–१६६७

असा ज्ञानेश्वरांचा दृढ समज. म्हणूनच त्यांनीं गीतेवर हा ज्ञानेश्वरीरूपी देशी अलंकार चढविला.



## • पसायदान •

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥१७९३॥ जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मीं रती वाढो। भूतां परस्परें पडो। मैत्र जीवांचें ॥९४॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९५ ॥ वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळी । भेटतु भूतां ॥ ९६ ॥ चलां कल्पतरूंचे आरव। चेतनाचिंतामणीचे गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ९७ ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९८ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥ ९९ ॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवे जी ॥ १८०० ॥ येथ म्हणे विश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ १ ॥



## श्रीनिळोबाकृत श्रीज्ञानेश्वरमहाराजांची आरती.

होतां कृपा तुमची पशु बोले वेद । निर्जिव चाले भिंती महिमा अगाध ॥
भगवद्गीताटीका ज्ञानेश्वरी शुद्ध । करूनि भाविक लोकां केलानिजबोध ॥१॥
जयदेव जयदेव जय ज्ञानसिंधु । नामस्मरणें तुमच्या तुटे भवबंधु ॥ धृ०॥
चौदाशें वरुषांचे तप्तीतिरवासी । येऊनि चांगदेव लागति चरणांसी ॥
करुनी कृपा देवें अनुग्रहिलें त्यासी । देऊनि आत्मज्ञान केलें सहवासी ॥२॥
समाधिसमयीं सकळ समुदाय । घेउनि सुरवर आले श्रीपंढरिराय ॥
दारीं आजानवृक्ष सुवर्णपिंपळ असुमाय ।
जाणुनि महिमा निळा चरणातळीं राहे ॥ ३ ॥

# अध्यायानुक्रम

## प्रास्ताविक : : : नमन व अध्यायसंगति यांविषयीं माहिती

प्रस्तुतचा अध्याय हा पहिलाच अध्याय असल्यानें या अध्यायाचा सारांश देण्यापूर्वी ज्या नमनापासून ज्ञानेश्वर-महाराज आपल्या टीकेस आरंभ करतात, तें नमन म्हणजे काय, त्याचा उपयोग ते कसा करतात, अध्यायसंगति म्हणजे काय, ज्ञानेश्वरमहाराजांनीं लावलेल्या अध्यायसंगतीचें सामान्य स्वरूप कसें आहे, या गोष्टी प्रथम सांगणें अवश्य आहे. कारण त्या जाणल्यानें ज्ञानेश्वरीचा अर्थ व तिचें स्वरूप कळण्यास मदत होणार आहे.

वैदिक संप्रदाय असा आहे कीं, कोणत्याहि कार्याच्या आरंभीं मंगल करावें म्हणजे 'मंगलानां च मंगलं' असणारा जो परमात्मा त्यास नमन करावें. या नमनाकरितां सर्व वैदिकांनीं विघ्नहरण करणारें गजाननरूपी परमात्म्याचें स्वरूप पसंत केलें; म्हणून, कोणत्याहि कार्याच्या पूर्वी श्रीगणेश या देवतेचें पूजन करावें, असा वैदिकपद्धतीनें कर्म करणाऱ्यांचा संप्रदाय होऊन बसला आहे.

ग्रंथ करणें हेंहि कार्य असल्यानें ग्रंथकर्ता हा वैदिक संप्रदायाचा असल्यास तो श्रीगजाननाचें स्मरण व नमस्कार करतो. ज्ञानेश्वरमहाराज हे वैदिक संप्रदायी असल्यानें त्यांनीं ग्रंथारंभीं श्रीगजाननाचें स्मरण करून त्यास नमस्कार केला आहे. पण, अद्वैत संप्रदायाचे वैदिक हे 'त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि' या गणपत्यथर्वशीर्षांतील श्रीगजाननाच्या प्रसिद्ध तात्त्विक स्वरूपाचा बहुधा उल्लेख करतात व यामुळें अशा मंगलास वस्तुनिर्देशरूप मंगल म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं अशाच तऱ्हेनें वस्तु म्हणजे परमात्मवस्तु हिचाच आरंभीं पहिल्या ओवींत उल्लेख करून 'देवा तूंचि गणेशु' असा दुसऱ्या ओवींत हा आमचा गणेश असें सांगितलें आहे. असें परमात्मवस्तूचें स्मरण करून त्या वस्तूला नमस्कारहि केला आहे. आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, या 'वस्तूचा' निर्देश करतांना त्या वस्तूचें प्रसिद्ध वाचक जें 'ओम्' तेंच उपयोगांत आणलें आहे. खुद्द गीतेंतच 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म' असें अ. ८ मध्यें म्हटलें आहे. 'ओम्' हें मांगलिक असल्याचें प्रसिद्धच आहे.

या मंगलासच 'नमन' असेंहि म्हणतात. असें नमन सामान्यतः ग्रंथाच्या प्रारंभीं करतात. पुढें दर प्रकरणाच्या आरंभीं करतातच असा नियम नाहीं. पण, मराठींत पुष्कळसे संत-कवि दर प्रकरणाच्या प्रारंभीं असें नमन करतांना दिसतात. ज्ञानेश्वरीचीं दोन वैशिष्ट्यें आहेत. ज्ञानेश्वरमहाराजांनीं अशीं नमनें गीतेंतील सर्वच अध्यायांच्या प्रारंभीं केलीं नाहींत. अध्याय २–३–५–७–८ या पांच अध्यायांना नमनें नाहींतच. चौथ्या अध्यायास प्रास्ताविक म्हणून ओव्या लिहिल्या आहेत. त्यांत स्पष्ट 'नमन' असें केलेलें नसलें, तरी संतांचा आशीर्वाद लाभला असें त्यांतहि म्हटलें आहे. म्हणून त्यांत नमन केलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. बाकीच्या सर्व अध्यायांतून ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्पष्ट नमन केलें आहे.

पण या बाबतींत आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. निर्गुणब्रह्माचें जें सगुण रूप नमनाकरितां उपासक निवडतात तें बहुधा गणपति, राम, कृष्ण, इत्यादि एखादें उपास्य दैवत असतें. ज्ञानेश्वरमहाराजांनीं आरंभाला श्रीगजानन व सरस्वती यांना नमन केल्यानंतर पुढें आपले गुरु जे निवृत्तिनाथ याच परमात्मस्वरूपाच्या प्रतीकास वारंवार वंदन केलें आहे. 'गुरुःसाक्षात् परब्रह्म' हें वचन प्रसिद्धच आहे. यावरून श्रीज्ञानेशांची गुरुभक्ति केवढी मोठी होती हेंहि प्रत्ययास येणार आहे.

यांत आणखी एक मौज आहे. ज्ञानेश्वरमहाराज हे प्रतिभासंपन्न कवि असल्यानें त्यांनीं हीं गुरूचीं वर्णनें करीत असतांना वेगवेगळ्या सूर्य, गणपति, आई इत्यादि रूपकांचा उपयोग करून मोठीं रसभरित व काव्यमय अशीं वर्णनें केलीं आहेत. तीं इतकीं सरस आहेत कीं, तीं वाचलीं म्हणजे तत्कालीन श्रोत्यांनीं त्यासंबंधानें 'निराळी बोल देखसी सनागर' असें म्हटलें आहे त्याची सत्यता पटते.

ज्ञानेश्वरमहाराज या प्रास्ताविकांचा सांप्रदायिक पद्धतीनें नमन करण्यास उपयोग करतातच. ते गुरूच्या जवळ कृपाप्रसादाची मागणी ठिकठिकाणीं करतात; पण त्याजबरोबर आपलीं परमात्मा-जगत्-जीव इत्यादिविषयक मतें, गुरुशिष्यसंबंधाची गोडी, गुरुपासून शिष्यास मिळणारा अनुभव, इत्यादि श्लोकांच्या टीकेंत न सांगतां येण्याजोग्या गोष्टीहि सांगण्याकरतां ते या नमनांचा उपयोग करतात.

टीकाकारावर श्लोकसंगति व अध्यायसंगति लावून दाखवणें ही एक जबाबदारी आहे. ज्ञानेश्वरमहाराज ही जबाबदारी पार पाडण्याकरितां म्हणजे 'अध्यायसंगति' सांगण्याकरितांहि या नमनांचा उपयोग करतात.

नववा अध्याय संपून दहाव्या अध्यायास प्रारंभ करतांना अध्यायांच्या संख्येच्या दृष्टीनें 'पूर्वकांड' समाप्त झालें, असें म्हटलें आहे. उत्तरकांडास त्या अध्यायांत प्रारंभ झाला म्हणून तेथें झालेल्या नऊ अध्यायांत कोणकोणते विषय आले आहेत हें थोडक्यांत २४ ते ४० ओव्यांत सांगून पुढें दहाव्या अध्यायाचा 'विभूति-प्रतिविभूति' असा विषय सांगितला आहे.

पण मुख्य विषयाच्या दृष्टीनें सर्व अध्यायांची संगति अठराव्या अध्यायांतील 'सर्वधर्मान् परित्यज्य' या ६६ व्या श्लोकावर टीका करतांना सांगितली आहे. त्या संगतीचें स्वरूप स्थूलपणानें खालीलप्रमाणें आहे:—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं श्रीमद्भगवत्-गीतेंतील अध्यायांची जी संगति लावली आहे, ती पूर्वीच्या भाष्यकारो-पेक्षां निराळी व स्वतंत्र आहे. कांहीं टीकाकारांच्या मताप्रमाणें गीतेच्या अठरा अध्यायांपैकीं पहिले सहा अध्याय कर्मकांडाचे, त्यापुढील अध्याय उपासनाकांडाचे असून शेवटच्या सहा अध्यायांत भगवंतांनीं ज्ञानकांड पुरें केलें आहे. वेदांतील कर्म, उपासना व ज्ञान या तीन कांडांची गीतेंत अशी समान वांटणी त्यांनीं केली आहे. परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनीं गीतेची संगति अशी लावली नाहीं. त्यांच्या मताप्रमाणें 'पहिला जो अध्याव। तो शास्त्रप्रवृत्ति-प्रस्ताव ॥' आहे. म्हणजे गीता सांगण्यास भगवान् श्रीकृष्ण कां प्रवृत्त झाले, तें या अध्यायांत सांगितलें आहे. दुसऱ्या अध्यायांत 'मोक्षदानीं स्वतंत्र। ज्ञानप्रधान हें शास्त्र। इतुलालें दुजीं सूत्र। उभारिलें ॥' आहे. तिसऱ्या अध्यायांत केवळ कर्म प्रतिष्ठिलें आहे व चवथ्या अध्यायापासून बाराव्या अध्यायांतील 'श्रेयोहि ज्ञानमभ्यासात्' या बाराव्या श्लोकाच्या शेवटपर्यंत भगवंतांनीं उपासना सांगितली आहे. बाराव्या अध्यायांतील 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' या तेराव्या श्लोका-पासून राहिलेला भाग व १३, १४ व १५ हे ज्ञानकांडाचे अध्याय आहेत. या पंधराव्या अध्यायाच्या शेवटीं ज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीनें गीताशास्त्र संपलें आहे. यापुढील १६, १७ व १८ अध्याय हे पुस्तीवजा आहेत. ज्ञानानें मोक्ष प्राप्त होऊन पुरुष कृतकृत्य होतो, हें जरी खरें असलें तरी तें ज्ञान उत्पन्न होणें व उत्पन्न झाल्यावरहि टिकणें फार कठिण आहे. यासाठीं त्या ज्ञानाला पोषक अशी दैवी संपत्ति व विरोधक अशी आसुरी संपत्ति भगवंतांनीं सोळाव्या अध्यायांत सांगून प्रत्येकाला करणीय काय व निषिद्ध काय हें ठरविण्याचें एकमेव साधन शास्त्र आहे, असा निर्णय दिला आहे. शास्त्रावर जी श्रद्धा ठेवणें जरूर आहे, ती फक्त सात्त्विक श्रद्धाच असली पाहिजे, एवढ्यासाठीं तीन प्रकारच्या श्रद्धा, यजन, दान यांचें स्पष्टीकरण सतराव्या अध्यायांत केलें आहे. शेवटचा १८ वा अध्याय हा 'कलशाध्याय' असून त्यांत पूर्वीच्या अध्यायांत सांगितलेला विषय सूत्ररूपानें भगवंतांनीं पुन्हां सांगितला आहे. 'अठरावा अध्यावो नोहे। हे एकाध्यायी गीताचि आहे।' असें त्यांनीं म्हटलें आहे.

—

## अध्याय पहिला : : : सारांश

तरी पहिला जो अध्यावो । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्तावो ॥ अ. १८—१४३५

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं गीतेंतील अध्यायांची जी संगति लावली आहे, त्याप्रमाणें पहिला अध्याय हा 'शास्त्र-प्रवृत्तिप्रस्ताव' आहे, म्हणजे गीताशास्त्र सांगण्यास भगवान् श्रीकृष्ण कां प्रवृत्त झाले, तें या अध्यायांत सांगितलें आहे. भगवंतांच्या या म्हणण्याचा अनुवाद करण्यास सुरुवात करण्यापूर्वी श्रीज्ञानदेवांनीं ओंकार या वाचकाचा उपयोग करून परमात्मरूपी श्रीगणेशाचें काव्यमय नमन पहिल्या वीस ओव्यांत केलें आहे. त्यानंतर चातुर्य, वागर्थ व कला यांची देवता जी सरस्वती तिला नमन केलें आहे (२१). गणेश व सरस्वती यांना नमस्कार केल्यानंतर ज्यांच्या कृपेमुळें आपण पूर्णकाम झालों त्या श्रीनिवृत्तिनाथांना वंदन करून गुरु-भजनाचा महिमा थोडक्यांत वर्णन केला आहे ( २२–२७ ). यानंतर भगवद्गीता ज्या महाभारत ग्रंथांतील भाग आहे त्या ग्रंथाची 'परमार्थाची जन्मभूमि, सर्व विद्यांचें मूळपीठ, सर्व काव्यांचा रावो' इत्यादि विशेषणांनीं थोरवी व श्रेष्ठता गाइली आहे ( २८–४९ ). महाभारताचें सुरस वर्णन केल्यानंतर ज्या गीताग्रंथावर व्याख्यान करावयाचें त्या भगवद्गीतेचें 'भारतकमलपरागु', जिचें विरक्त संत, सोहंभावी पारंगत मुनि सेवन करतात व प्रत्यक्ष ब्रह्मदेव व शंकर जिची प्रशंसा करतात असें गुणगान केलें आहे ( ५०–५५ ). या थोर गीताग्रंथाचें सेवन श्रोत्यांनीं स्थिर अंतःकरणानें व हळुवारपणानें कसें करावें, हें त्यानंतर सुचविलें आहे ( ५६–६२ ). आपल्यापुढें जे थोर श्रोते बसले आहेत, त्यांचा या आपल्या बोलण्यानें अनादर झाला असेल म्हणून 'मी आपलें लाडकें अपत्य सलगीनें बोललों' असा लडिवाळपणाचा परिहार दिला आहे ( ६३–६५ ). यानंतर प्रत्यक्ष श्रीशंभूचीहि मति ज्या गीताग्रंथाचा विचार करतांना स्तिमित झाली, सर्वज्ञ वेदहि जेथें कुंठित होतो त्या अगाध ग्रंथावर व्याख्यान करण्यास माझ्यासारख्या अल्पज्ञ व मंद बालकानें सरसावणें हें धाष्ट्यांचें आहे, याची जाणीव आपल्याला असल्याचा निर्वाळा ज्ञानदेवांनीं दिला आहे ( ६७–७४ ); परंतु ज्या श्रीगुरुकृपेच्या आधारावर विसंबून हें अगाध कार्य करण्याचें मी धाडस केलें आहे ती कृपा माझ्या हातून हें कार्य तडीस नेईल, असें आत्मविश्वासानें म्हणून त्या कृपेचा महिमा त्यांनीं वर्णन केला आहे ( ७५–७८ ). मी कळसूत्री बाहुली असून तिला चालविणारे जे श्रीनिवृत्तिनाथ हे 'सूत्रधार' आहेत. त्यांच्याजवळ ग्रंथ सुरुवात करण्यासाठीं आशीर्वादपूर्वक आज्ञा मागितली आहे ( ७९–८२ ); व ती मिळाल्यावर भगवंताच्या म्हणण्याचा अनुवाद करण्यास श्रीज्ञानदेव सुरुवात करतात ( ८३–८४ ).

धर्मक्षेत्रावर माझे व पंडूचे पुत्र काय करीत आहेत, या धृतराष्ट्राच्या प्रश्नास संजयानें उत्तर देतांना प्रथमतः उभय पक्षांचे रथी-महारथी, त्यांचे रथ यांचें वर्णन करून सर्वांच्या शेवटीं अर्जुनाच्या रथाचें, भगवंतांच्या भक्त-वात्सल्याचें हृदयंगम वर्णन ज्ञानदेवांनीं केलें आहे. युद्धक्षेत्रावर जो शंखनिनाद झाला, त्यामुळें प्रत्यक्ष आदिपुरुष विस्मित होण्याची पाळी आली. आतां युद्धाची सर्व सज्जता झाली असून उभयपक्षीं प्रलयकालच्या मेघवर्षावाप्रमाणें बाणांची वृष्टि होण्याची पाळी आली आहे, तिचें वर्णन ज्ञानदेवांनीं केलें आहे ( ८५–१६६ ). अशा प्रसंगीं हर्षयुक्त होऊन सर्व सैन्याकडे अर्जुनानें दृष्टि टाकली व आपला रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं नेऊन उभा करण्यास भगवंताला सांगितलें. भगवंतांनीं रथ तेथें नेऊन उभा केल्यावर त्याच्या दृष्टीला जें दिसावयास पाहिजे होतें तें दृश्य न दिसतां त्याला दिसूं नये तें दृश्य दिसलें. भीष्मद्रोणादिक योद्धे हे आपले शत्रु आहेत असें न दिसतां ते आपले पूज्य गुरुजन, भाऊ, काका, मामा असे नातेवाईक आहेत, असें दृश्य दिसलें; त्याचें वर्णन

ज्ञानदेवांनीं केलें आहे ( १६५–१८५ ). हें पाहून अर्जुनाच्या अंतःकरणांत अकस्मात् करुणा उत्पन्न झाली व त्याचा परिणाम असा झाला, कीं अर्जुनाच्या अंगच्या वीरवृत्तीचा लोप होऊन प्रत्यक्ष शंकरांना युद्धांत जिंकणाऱ्या अर्जुनाचीं गात्रें लढाईस सुरुवात होण्यापूर्वीच शिथिल होऊन त्याचें गांडीव अस्त्र गळून पडलें. अशा या करुणास्पद अर्जुनाचें चित्र ज्ञानेश्वरांनीं उभें केलें आहे ( १८६–२०४ ). आपण युद्ध करण्यापासून कां परावृत्त होत आहों, याची कारणमीमांसा देऊन आपल्या कृतीचें समर्थन अर्जुनानें केलें आहे. त्याचा अनुवाद या अध्यायाच्या शेवटपर्यंत ज्ञानदेवांनीं केला आहे. क्षत्रियाला अनुरूप अशी वीरवृत्ति जाऊन क्षत्रियाला अयोग्य अशा, दया-कृपा या सत्त्वप्रधान वृत्तीचा प्रादुर्भाव अर्जुनाच्या ठिकाणीं स्पष्ट दिसलेला वर्णन केला आहे. मला विजय नको, राज्य नको, ज्यांच्याशीं मी हें युद्ध करून राज्य मिळविणार त्या आचार्य-पितर-पितामह या सर्वांचा नाश माझ्याकडून होणार व त्यामुळें मोठें पाप मला लागणार, ही अर्जुनाच्या अंतःकरणांतील खरी भीति. कौरवांना जरी कळत नसलें तरी मला माझें हित-अनहित कळतें. माझ्या हातून कुळाचा नाश, त्याबरोबर कुलधर्माचा नाश, त्यामुळें अधर्म वर्णसंकर व याचा शेवट नरकाची प्राप्ति होण्यांत—अशी अवनति माझ्या युद्धप्रवृत्तीमुळें होत आहे, तर मीच या युद्धांतून निवृत्त होतों. निःशस्त्र अशा अवस्थेंत मला जरी कौरवांनीं मारलें तरी त्यांत माझें कल्याणच आहे, अशा हतबल स्थितींत अर्जुनानें रथाखालीं उडी टाकली व शस्त्रसंन्यास केला. या अर्जुनाच्या अति गहिंवरलेल्या व उद्विग्न स्थितीचें मोठें मार्मिक वर्णन ज्ञानदेवांनीं केलें आहे ( २०५–२७३ ).

अशा स्थितींत श्रीकृष्ण परमात्मा त्याला परमार्थाचा उपदेश करण्यास पुढील अध्यायांत सुरुवात करील असें शेवटच्या दोन ओव्यांत सुचवून या अध्यायाची समाप्ति केली आहे ( २७४–२७५ ).



श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ ॐ अस्य श्रीमद्भगवद्गीतामालामंत्रस्य भगवान्वेदव्यास ऋषिः ॥ अनुष्टुप् छंदः ॥ श्रीकृष्णः परमात्मा देवता ॥ अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषस इति बीजम् ॥ सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रजेति शक्तिः ॥ अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच इति कीलकम् ॥ नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावक इत्यंगुष्ठाभ्यां नमः ॥ न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुत इति तर्जनीभ्यां नमः ॥ अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव चेति मध्यमाभ्यां नमः ॥ नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातन इत्यनामिकाभ्यां नमः ॥ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रश इति कनिष्ठिकाभ्यां नमः ॥ नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि चेति करतलकरपृष्ठाभ्यां नमः ॥ इति करन्यासः ॥ अथ हृदयादिन्यासः ॥ नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावक इति हृदयाय नमः ॥ न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुत इति शिरसे स्वाहा ॥ अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव चेति शिखायै वषट् ॥ नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातन इति कवचाय हुम् ॥ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रश इति नेत्रत्रयाय वौषट् ॥ नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि चेति अस्त्राय फट् ॥ श्रीकृष्णप्रीत्यर्थे पाठे विनियोगः ॥ ॐ पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ॥ अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनीमंब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥ नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे फुल्लारविंदायतपत्रनेत्र ॥ येन त्वया भारततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥ २ ॥ प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ॥ ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ ३ ॥ सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः ॥ पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ४ ॥ वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ॥ देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥ ५ ॥ भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गांधारनीलोत्पला शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ॥ अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी सोत्तीर्णा खलु पांडवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ६ ॥ पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थगंधोत्कटं नानाख्यानककेसरं हरिकथासंबोधनाबोधितम् ॥ लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा भूयाद्भारतपंकजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ७ ॥ मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ॥ यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥ ८ ॥ यं ब्रह्मा वरुणेंद्ररुद्रमरुतः स्तुन्वंति दिव्यैः स्तवैर्वेदैः सांगपदक्रमोपनिषदैर्गायंति यं सामगाः ॥ ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यंति यं योगिनो यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ॥ ९ ॥ इति श्रीमद्भगवद्गीतान्यासध्यानादि ॥



# ज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

श्रीगणेशाय नमः । ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १ ॥ देवा तूंचि गणेशु । सकलमतिप्रकाशु । म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ॥ २ ॥ हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष । तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ॥ ३ ॥ स्मृति तेचि अवयव । देखा अंगीकभाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥ ४ ॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धती खेवणें । प्रमेयरत्नांचीं ॥ ५ ॥ पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर । जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥ ६ ॥ देखा काव्यनाटका । जें निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥ ७ ॥ नाना प्रमेयांची परी । निपुणपणें पाहतां कुसरी । दिसती उचित पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥ तेथ व्यासादिकांच्या मती । तेचि मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ॥ ९ ॥ देखा षड्दर्शनें म्हणिपती । तेचि भुजांची आकृती । म्हणऊनि विसंवादें धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥ तरी तर्कु तोचि फरशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु । मोदकु मिरवे ॥ ११ ॥ एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ॥ १२ ॥ मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु । धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ॥ १३ ॥ देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥ १४ ॥ तरी संवादु तोचि दशनु । जो समताशुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥ १५ ॥ मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी- । अली सेविती ॥ १६ ॥ प्रमेयप्रवाल सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसे एकवटत इभ । मस्तकावरी ॥ १७ ॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें । शोभतीं भलीं ॥ १८ ॥ अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकार महामंडल । मस्तकाकारें ॥ १९ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

[ ओंकार हाच परमात्मा आहे असें कल्पून ज्ञानेश्वरमहाराज येथें मंगल करतात. ] हे सर्वांचें मूळ असणाऱ्या व वेदांच्या प्रतिपादनाचा विषय असणाऱ्या ओंकारा, तुला नमस्कार असो; व स्वतांला स्वतः जाणण्यास योग्य असणाऱ्या आणि सर्वव्यापी अशा आत्मरूपी ओंकारा, तुझा जयजयकार असो. १. (वरील विशेषणांनीं युक्त अशा) देवा, सर्वांच्या बुद्धीचा प्रकाश जो गणेश, तो तूंच आहेस. निवृत्तिनाथांचे शिष्य (ज्ञानेश्वरमहाराज) म्हणतात, महाराज, ऐका. २. संपूर्ण वेद हीच ( त्या गणपतीची ) उत्तम सजविलेली मूर्ति आहे; आणि तिच्या ठिकाणीं निर्दोष वर्णरूपी सौंदर्य खुलून राहिलें आहे. ३. आतां शरीराची ठेवण पहा. ( मन्वादिकांच्या ) स्मृति हेच त्याचे अवयव होत. त्या स्मृतींतील अर्थसौंदर्यानें ( ते अवयव म्हणजे ) लावण्याची केवळ खाणच बनले आहेत. ४. अठरा पुराणें हेच (त्याच्या) अंगावरील रत्नखचित अलंकार; त्यांत प्रतिपादलेलीं तत्त्वें हींच रत्नें व छंदोबद्ध शब्द हींच त्यांचीं कोंदणें होत. ५. उत्तम प्रकारची शब्दरचना हेंच ( त्या गणपतीच्या ) अंगावरील रंगविलेलें वस्त्र आहे; आणि त्या शब्दरचनेंतील अलंकार हे त्या वस्त्राचे चकचकीत तलम तंतु होत. ६. पहा, कौतुकानें काव्यनाटकांविषयीं विचार केला असतां तीं काव्यनाटकें ( त्या गणपतीच्या ) पायांतील लहान घागऱ्या असून, त्या अर्थरूप आवाज रुणझुणत असतात. ७. ( कारण ) त्यांत प्रतिपादलेलीं अनेक प्रकारचीं तत्त्वें व त्यांतील कुशलता यांचा बारकाईनें विचार केला असतां यांमध्येंहि निवडक वेच्यांचीं कांहीं चांगलीं रत्नें आढळतात. ८. येथें व्यासादिकांच्या बुद्धि हाच कोणी ( त्या गणपतीच्या ) कमरेला बांधलेला शेला शोभत आहे व त्याच्या पदराच्या दशा निर्दोषपणानें झळकत आहेत. ९. पहा, सहा शास्त्रें म्हणून जीं म्हणतात, तेच गणपतीचे सहा हात आहेत आणि म्हणून भिन्नभिन्न मतें हींच त्यांतील ( हातांतील ) शस्त्रें आहेत. १०. तरी काणादशास्त्ररूपी हातांमध्यें अनुमानरूपी परशु आहे. गौतमीय न्यायदर्शनरूपी हातांत प्रमाणप्रमेयादि षोडश पदार्थांचें तत्त्वभेदरूपी अंकुश आहे. व्यासकृत वेदान्तसूत्ररूपी हातांत ब्रह्मरसानें भरलेला ब्रह्मज्ञानरूपी मोदक शोभत आहे. ११. बौद्धमताचें निदर्शन करणाऱ्या बौद्धवार्तिकांनीं प्रतिपादलेलें बौद्धमत, हाच कोणी स्वभावतः खंडित असलेला दांत, तो पांतजलदर्शनरूपी एका हातांत धरला आहे. १२. मग ( बौद्धांच्या शून्यवादाचें खंडन झाल्यावर ) सहजच येणारा निरीश्वर सांख्यांचा सत्कारवाद हाच ( गणपतीचा) वर देणारा कमलासारखा हात होय व जैमिनीकृत धर्मसूत्रें हा धर्माची सिद्धि करणारा व अभय देणारा (गणपतीचा) हात होय. १३. पहा. त्या ( गणपतीच्या ) ठिकाणीं सोलीव ब्रह्मसुखाचा निरतिशय आनंद हीच सरळ, अति निर्मळ व बरेवाइटाची निवड करण्यांत समर्थ अशी लांब सोंड आहे. १४. तर प्रश्नोत्तररूप चर्चा हाच दांत असून, त्या चर्चेंतील पक्षरहितपणा हा त्या दांताचा पांढरा रंग आहे; ज्ञानरूप बारीक डोळे असलेला विघ्नांचा नियामक असा हा देव आहे. १५. (ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात) पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा हीं शास्त्रें हींच त्या ( गणपतीच्या ) दोन्ही कानांच्या ठिकाणीं मला वाटतात व बोध हेंच मदरूपी अमृत असून मुनि हे भ्रमर त्याचें सेवन करतात. १६. वर सांगितलेल्या श्रुतिस्मृत्यादिकांत प्रतिपादलेलीं तत्त्वें हींच ( गणपतीच्या ) अंगावरील तेजदार पोंवळीं होत व द्वैत आणि अद्वैत मतें हींच त्या गजवदनाच्या मस्तकावरील गंडस्थळें असून, तीं तुल्यबलानें तेथें एकत्र राहिलीं आहेत. १७. ज्ञानरूप मध देण्यांत उदार असलेलीं ईशावास्यादि दशोपनिषद्रूप सुगंधी फुलें गंडस्थळावर असलेल्या मुकुटाच्या ठिकाणीं चांगलीं शोभतात. १८. ओंकाराची प्रथम अकारमात्रा, हे ( गणपतीचे ) दोन पाय असून, दुसरी उकारमात्रा हें त्याचें मोठें पोट आहे; आणि तिसरी मकारमात्रा हाच त्याच्या मोठ्या व वाटोळ्या मस्तकाचा आकार आहे. १९.

हे तिन्ही एकवटले । तेथें शब्दब्रह्म कवळलें । तें मियां गुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥ आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी । ते शारदा विश्वमोहिनी । नमस्कारिली मियां ॥ २१ ॥ मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु । म्हणऊनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ २२ ॥ जैसें डोळ्यां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥ २३ ॥ कां चिंतामणि जालया हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम निवृत्ती । ज्ञानदेवो म्हणे ॥ २४ ॥ म्हणोनि जाणतेनो गुरु भजिजे । तेणें कृतकार्या होईजे । जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥ कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं । ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ॥ २६ ॥ तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि । जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥ २७ ॥ आतां अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥ २८ ॥ ना तरी सर्व सुखांची आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥ कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजातां वसिष्ठ । अशेषांचें ॥ ३० ॥ ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥ नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥ म्हणोनि हा काव्यां रावो । ग्रंथ गुरुत्वाचा ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥ ३३ ॥ तेवींचि आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक । आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥ ३४ ॥ एथ चातुर्य शहाणें झालें । प्रमेय रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ३५ ॥ माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता । रूढपण उचितां । दिसे भलें ॥ ३६ ॥ एथ कळाविदपण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा । म्हणऊनि जन्मेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥ आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळीक । गुणां सगुणपणाचें बिक । बहुवस एथ ॥ ३८ ॥ भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें । तैसें व्यासमती कवळलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥ कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ ४० ॥ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागराचि होईजे । तैसें व्यासोक्तितेजें । धवळित सकळ ॥ ४१ ॥ कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ ४२ ॥ ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासोनि अपाडें । जियापरी ॥ ४३ ॥ नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अळंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥ ४४ ॥ तैसें व्यासोक्ती अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें । तें जाणोनि काय आश्रयिलें । इतिहासीं ॥ ४५ ॥ नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं । पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥

ह्या तिन्ही मात्रा एकत्र झाल्या म्हणजे संपूर्ण वेद कवटाळला जातो. त्या मूळ बीजरूपी ( ओंकाररूप ) गणपतीला मी गुरुकृपेनें नमस्कार करतों. २०. आतां ( गणपतीला वंदन केल्यावर ) जी वाणीची अपूर्व क्रीडा करणारी असून, चातुर्य, वागर्थ व कला यांची देवता आहे व जिनें सर्व जग मोहून टाकलें आहे, त्या सरस्वतीस मी नमस्कार करतों. २१. ज्या सद्गुरूंनीं मला या संसारपुरांतून तारिलें, ते माझ्या हृदयांत आहेत, म्हणून माझें विवेकावर फार प्रेम आहे. २२. ज्याप्रमाणें डोळ्यांना अंजन मिळतें त्या वेळीं दृष्टि फांकते आणि मग ( भूमिगत ) द्रव्याचा सहज सुगावा लागून ( द्रव्याचा ) मोठा खजिना ( दृष्टीला ) प्रगट होतो; २३. अथवा, ज्याप्रमाणें चिंतामणि हस्तगत झाल्यावर मनोरथ नेहमीं विजयी होतात, त्याप्रमाणें माझे सर्व मनोरथ श्रीनिवृत्तिनाथांच्यामुळें पूर्ण झाले आहेत, असें ज्ञानदेव म्हणतात. २४. एवढ्याकरितां, अहो शतेपुरुषहो, गुरुभजन करावें आणि त्या योगानें कृतकृत्य व्हावें. ज्याप्रमाणें झाडांच्या मुळांना पाणी घातलें असतां अनायासें खांद्या व पानें यांना टवटवी येते; २५. अथवा समुद्रस्नानानें त्रैलोक्यांत जेवढीं तीर्थें आहेत तेवढीं घडतात किंवा अमृतरसाच्या सेवनानें सर्व रसांचें सेवन घडतें; २६. त्याप्रमाणें ( श्रीगुरुवंदनांत सर्वांचें वंदन येत असल्यामुळें ) मीं त्याच श्रीगुरूला वारंवार पूज्यताबुद्धीनें नमन केलें. ( कारण कीं, ) तो इच्छिलेल्या मनाच्या आवडी पुरविणारा आहे. २७. ( श्रीगुरूला वंदन केल्यानंतर ) आतां ( ज्यांत गीता निर्माण झाली अशा महाभारताची ) खोल विचारांनीं भरलेली कथा ( तिचें माहात्म्य ) ऐका. ही कथा सर्व चमत्कारांची खाण आहे किंवा विचाररूपी वृक्षांचा अपूर्व बगीचाच आहे; २८. अथवा ही सर्व सुखांचें उगमस्थान आहे, अनेक सिद्धान्तांचा सांठा आहे किंवा ही शृंगारादि नवरसरूपी अमृतानें तुडुंब भरलेला असा समुद्र आहे; २९. किंवा ही ( कथा ) प्रत्यक्ष मोक्ष असून सर्व विद्यांचें मूलस्थान आहे; त्याचप्रमाणें संपूर्ण शास्त्रांमध्यें ही श्रेष्ठ आहे; ३०. किंवा ही ( कथा ) सर्व धर्मांचें माहेरघर आहे; सज्जनांचा जिव्हाळा आहे; सरस्वतीच्या सौंदर्यरूप रत्नांचा जामदारखाना आहे; ३१. अथवा व्यासांच्या विशाल बुद्धीमध्यें स्फुरून, सरस्वती या कथेच्या रूपानें त्रिजगतांत प्रगट झाली आहे. ३२. म्हणून हा ( महाभारत ग्रंथ ) सर्व काव्यग्रंथांचा राजा आहे; या ग्रंथाच्या ठिकाणीं मोठेपणाची कमाल झाली आहे व येथूनच रसांना रसाळपणाचा डौल आला आहे. ३३. त्याचप्रमाणें याची आणखी एक महती ऐका. यापासूनच शब्दांच्या संपत्तीला निर्दोष शास्त्रीयता आली व यामुळें ब्रह्मज्ञानाची मृदुता वाढली. ३४. येथें ( या भारतांत ) चतुरता शहाणी झाली, तत्त्वांना गोडी आली व सुखाचें ऐश्वर्य येथें पुष्ट झालें. ३५. गोडीचा गोडपणा, शृंगाराचा सुरेखपणा व योग्य वस्तूंना आलेला रूढपणा यापासूनच चांगला ( योग्य ) दिसूं लागला. ३६. येथून कलांना कुशलता प्राप्त झाली, पुण्याला विशेष तेज चढलें व म्हणूनच ( भारताच्या पठणानें ) जन्मेजयाचे दोष सहज नाहींसे झाले; ३७. आणि क्षणभर विचार केला असतां असें दिसून येतें कीं, रंगामध्यें सुरंगतेची वाढ येथें झाली आहे ( आनंदाला विशेष मनोहरता आली आहे. ) व यामुळेंच सद्गुणांना चांगुलपणाचें विशेष सामर्थ्य प्राप्त झालें आहे. ३८. सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशित झालेलें त्रैलोक्य ज्याप्रमाणें उज्ज्वल दिसतें, त्याप्रमाणें व्यासांच्या बुद्धीनें व्यापलेलें विश्व शोभतें; ३९. किंवा उत्तम जमिनींत बी पेरलें असतां त्याचा जसा हवा तसा विस्तार होतो, त्याप्रमाणें भारतामध्यें चार पुरुषार्थ हवे तेवढे प्रफुल्लित झालेले आहेत; ४०. अथवा शहरांत राहिल्यानें जसा मनुष्य चाणाक्षच होतो, त्याप्रमाणें व्यासांच्या वाणींतील तेजानें सर्व गोष्टी उज्ज्वल ( स्पष्ट ) झाल्या आहेत; ४१. किंवा तारुण्यावस्थेंत स्त्रियांच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें सौंदर्याचा बहर अधिक उठावदार दिसूं लागतो; ४२. अथवा बगीच्यांत वसंतानें प्रवेश केला असतां तेथील सर्व झाडांच्या सौंदर्याची पूर्वीपेक्षां ज्याप्रमाणें असाधारण अशी खाण उघडते; ४३. अथवा सोन्याची लगड पाहिली असतां तें सोनें साधारण दिसतें ( डोळ्यांत भरत नाहीं ); पण त्याच लगडीचे दागिने बनविल्यावर तेंच सोनें आपलें सौंदर्य कांहीं निराळेंच दाखवितें, ४४. त्याप्रमाणें व्यासांच्या बोलण्यानें अलंकृत झालें असतां हवातसा चांगलेपणा येतो, हें समजूनच कीं काय, पूर्वीच्या कथानकांनीं (इतिहासांनीं) भारताचा आश्रय केला; ४५. अथवा, जगामध्यें पूर्ण मोठेपणा प्राप्त व्हावा, म्हणून स्वतःच्या ठिकाणीं लहानपणा घेऊन, पुराणांनीं आख्यानरूपानें भारतांत प्रवेश केला. ४६.

म्हणऊनि महाभारतीं जें नाहीं। तें नोहेचि लोकीं तिहीं। येणें कारणें म्हणिपे पाहीं। व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ४७ ॥ ऐसी सुरस जगीं कथा। जे जन्मभूमि परमार्था। मुनि सांगे नृपनाथा। जन्मेजया ॥ ४८ ॥ जें अद्वितीय उत्तम। पवित्रैक निरुपम। परम मंगलधाम। अवधारिजो ॥ ४९ ॥ आतां भारतीं कमळपरागु। गीताख्यु प्रसंगु। जो संवादला श्रीरंगु। अर्जुनेसी ॥ ५० ॥ ना तरी शब्दब्रह्माब्धि। मथिलेया व्यासबुद्धि। निवाडिलें निरवधि। नवनीत हें ॥ ५१ ॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें। कडसिलें विवेकें। पद आलें परिपाकें। आमोदासी ॥ ५२ ॥ जें अपेक्षिजे विरक्तीं। सदा अनुभविजे संतीं। सोहंभावें पारंगतीं। रमिजे जेथ ॥ ५३ ॥ जें आकर्णिजे भक्तीं। जें आदिवंद्य त्रिजगतीं। ते भीष्मपर्वीं संगती। सांगिजैल ॥ ५४ ॥ जें भगवद्गीता म्हणिजे। जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे। जें सनकादिकीं सेविजे। आदरेंसीं ॥ ५५ ॥ जैसें शारदीयेचें चंद्रकळे-। माजीं अमृतकण कोंवळे। ते वेंचिती मनें मवाळें। चकोरतलगें ॥ ५६ ॥ तियापरी श्रोता। अनुभवावी हे कथा। अतिहळुवारपण चित्ता। आणुनियां ॥ ५७ ॥ हे शब्देंविण संवादिजे। इंद्रियां नेणतां भोगिजे। बोलाआदि झोंबिजे। प्रमेयासी ॥ ५८ ॥ जैसे भ्रमर परागु नेती। परी कमळदळें नेणती। तैसी परी आहे सेविती। ग्रंथीं इये ॥ ५९ ॥ कां आपुला ठावो न सांडितां। आलिंगिजे चंदु प्रगटतां। हा अनुरागु भोगितां। कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥ ऐसेनि गंभीरपणें। थिरावलेनि अंतःकरणें। आथिला तोचि जाणे। मानूं इये ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांती। परिसणया योग्य होती। तिहीं कृपा करूनि संतीं। अवधान द्यावें ॥ ६२ ॥ हें सलगी म्यां म्हाणितलें। चरणां लागोनि विनाविलें। प्रभू सखोल हृदय आपुलें। म्हणऊनियां ॥ ६३ ॥ जैसा स्वभावो मायबापांचा। अपत्य बोले जरी बोबडी वाचा। तरी अधिकाचि तयाचा। संतोष आथी ॥ ६४ ॥ तैसा तुम्हीं मी अंगीकारिला। सज्जनीं आपुला म्हणितला। तरी उणें सहजें उपसाहला। प्रार्थूं कायी ॥ ६५ ॥ परी अपराधु तो आणीक आहे। जें मी गीतार्थु कवळूं पाहें। तें अवधारा विनवूं लाहे। म्हणऊनियां ॥ ६६ ॥ हें अनावर न विचारितां। वायांचि धिंवसा उपनला चित्ता। येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता। शोभा आथी ॥ ६७ ॥ कीं टिटिभू चांचुवरी। माप सूये सागरीं। मी नेणतु त्यापरी। प्रवर्तें येथ ॥ ६८ ॥ आयका आकाश गिंवसावें। तरी आणीक त्याहूनि थोर होआवें। म्हणऊनि अपाडु हें आघवें। निर्धारितां ॥६९॥ या गीतार्थाची थोरी। स्वयें शंभू विवरी। जेथ भवानी प्रश्नु करी। चमत्कारोनी ॥ ७० ॥ तेथ हरु म्हणे नेणिजे। देवी जैसें कां स्वरूप तुझें। तैसें हें नित्य नूतन देखिजे। गीतातत्त्व ॥ ७१ ॥ हा वेदार्थसागरु। जया निद्रिताचा घोरु। तो स्वयें सर्वेश्वरु। प्रत्यक्ष अनुवादला ॥ ७२ ॥ ऐसें जें अगाध। जेथ वेडावती वेद। तेथ अल्प मी मतिमंद। काय होय ॥ ७३ ॥ हें अपार कैसेनि कवळावें। महातेज कवणें धवळावें। गगन मुठीं सुवावें। मशकें केवीं ॥ ७४ ॥

एवढ्याकरितां महाभारतामध्यें जें नाहीं तें त्रैलोक्यांतहि नाहीं. या कारणांमुळें संपूर्ण त्रैलोक्य व्यासाचें उष्टें म्हटलें जातें ( म्हणजे व्यासानंतर झालेल्यांनीं आपल्या सर्व कल्पना व्यासापासून उसन्या घेतल्या आहेत ). ४७. अशी जगांत सुरस म्हणून प्रसिद्ध असलेली व ब्रह्मज्ञानाला जन्म देणारी ही भारतीय कथा राजश्रेष्ठ जन्मेजय राजाला वैशंपायन ऋषींनीं सांगितली. ४८. ऐका, हें महाभारत अद्वितीय, उत्तम, अतिपवित्र, निरुपम आणि श्रेष्ठ असें कल्याणाचें ठिकाण आहे. ४९. आतां जो श्रीकृष्णानें अर्जुनाला संवादरूपानें उपदेशिला, तो गीता नांवाचा प्रसंग ( विषय ) भारतामध्यें कमलांतील परागाप्रमाणें आहे. ५०. अथवा व्यासांनीं आपल्या बुद्धीनें वेदरूपी समुद्राचें मंथन करून, हें भारतरूपी अमर्याद लोणी काढलें. ५१. मग तें ( भारतरूप ) लोणी ज्ञानरूप अग्नीच्या संसर्गानें विचारपूर्वक कढविल्यानें, त्याचा परिपाक होऊन त्याला साजूकपणा आला ( त्याचें गीतारूप साजूक तूप बनलें.) ५२. वैराग्यशील ज्याची (गीतारूप तुपाची) इच्छा करतात, संत जें नेहमीं अनुभवितात व पार पावलेले ज्ञानी 'तेंच मी आहें' या भावनेनें जेथें रममाण होतात; ५३. भक्तांनीं जिचें ( गीतेचें ) श्रवण करावें, जी तिन्ही लोकांत प्रथम नमस्कार करण्याला योग्य आहे, ती गीता भीष्मपर्वांत प्रसंगानुरोधानें सांगितली आहे. ५४. जिला भगवद्गीता असें म्हणतात, ब्रह्मदेव व शंकर जिची प्रशंसा करतात व जिचें सनकादिक आदरानें सेवन करतात; ५५. ज्याप्रमाणें शरदृतूच्या चंद्रकिरणांतील अमृताचे कोमल कण चकोरांचीं पिलें मृदु मनानें वेंचतात; ५६. त्याप्रमाणें चित्त अगदीं हलकें करून ( वासनांचें जाड्य काढून ) मग श्रोत्यांनीं ही कथा अनुभवावी. ५७. हिची चर्चा शब्दावांचून करावी ( मनांतलें मनांत हिचा विचार करावा. ), इंद्रियांना पत्ता लागूं न देतां हिचा उपभोग घ्यावा व हिच्यांत प्रतिपादक शब्दांच्या अगोदर त्यांत सांगितलेल्या सिद्धान्ताचें आकलन करावें. ५८. कमलांतील पराग भुंगे घेऊन जातात, परंतु कमळाच्या पाकळ्यांना त्याची खबरहि नसते; या ग्रंथांतील तत्त्वांचें सेवनहि त्याच पद्धतीनें करावें; ५९. किंवा चंद्र दिसूं लागतांच चंद्रविकासी कमलिनी प्रफुल्ल होऊन, आपली जागा न सोडतां त्याला आलिंगन देते; हें प्रेमसौख्य कसें भोगावें हें एक तिचें तिलाच ठाऊक! ६०. त्याचप्रमाणें गंभीर व शांत अंतःकरणानें जो संपन्न आहे, तोच या गीतेचें रहस्य जाणतो. ६१. अहो, अर्जुनाच्या पंक्तीला बसून ऐकण्याची ज्यांची योग्यता असेल, त्या संतांनीं कृपा करून इकडे लक्ष द्यावें. ६२. (ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात,) अहो महाराज, आपलें अंतःकरण गंभीर आहे; म्हणून हें (वरील ओंवीतील) विधान मीं केवळ लडिवाळपणानें केलें. ही ( वास्तविक ) आपल्या पायांजवळ विनंति आहे. ६३. लहान मूल जरी बोबड्या शब्दांनीं बोललें, तरी त्याचा अधिकच संतोष मानावयाचा, हा ज्याप्रमाणें आईबापांचा स्वभावच असतो; ६४. त्याप्रमाणें तुमच्याकडून माझा अंगीकार झाला आहे व सज्जनांनीं मला आपला म्हणून म्हटलें आहे, तेव्हां अर्थातच ( माझें जें काय ) उणें असेल तें सहन करून घ्यालच. त्याबद्दल आपली प्रार्थना कशाला ? ६५. परंतु (खरा) अपराध तो वेगळाच आहे. तो हा कीं, मी गीतेचा अर्थ आकलन करण्याचा प्रयत्न करीत आहें म्हणून, (अहो महाराज) ऐका, ही मी तुमची विनंति करीत आहें. ६६. हें (गीतार्थाचें काम) न झेपणारें आहे, याचा विचार न करतां उगाच हें साहस करण्याचें मनांत आणलें. वास्तविक पाहिलें तर, सूर्यप्रकाशांत काजव्याची काय शोभा आहे ? ६७. किंवा टिटवीनें ( समुद्र आटविण्यासाठीं ) ज्याप्रमाणें आपल्या चोंचीनें समुद्राचें पाणी उपसण्याचा प्रयत्न केला, त्याप्रमाणें मी अल्पज्ञ या कामास (गीतार्थ करण्यास) प्रवृत्त झालों आहें. ६८. हें पहा, आकाशाला कवळावयाचें असल्यास आकाशाहून मोठें व्हावयास पाहिजे; (आणि) म्हणूनच हें सर्व करणें, विचार केला असतां, माझ्या योग्यतेबाहेरचें आहे ( असें म्हणावें लागतें ). ६९. या गीतार्थाची महती एवढी आहे कीं, स्वतः शंकर आपल्या मनाशींच त्याचा विचार करीत असतां, देवी पार्वतीनें "आपण एकसारखा विचार कशाचा करतां ?" असा त्यांना मोठ्या आश्चर्यानें प्रश्न केला. ७०. त्यावर शंकर म्हणाले, "हे देवि, ज्याप्रमाणें तुझ्या स्वरूपाचा अंत लागत नाहीं, त्याप्रमाणें गीतेचाहि अंत लागत नाहीं. हें गीतातत्त्व पाहावयास जावें, तेव्हां नवीनच आहे असें दिसतें." ७१. वेदार्थरूपी समुद्र हा योगनिद्रेंत असलेल्या ज्या सर्वेश्वराचें झोंपेंतील घोरणें आहे, त्या परमात्म्यानें स्वतः प्रत्यक्ष ( जागेपणीं ) गीता ( अर्जुनाला ) सांगितली. ७२. असें हें ( गीतार्थाचें काम ) गहन आहे; या कामीं वेदांचीहि मति कुंठित होते. मी तर पडलों मंदमति, तेव्हां तेथें माझा पाड कसा लागणार ? ७३. या अमर्याद गीतार्थाचें कसें आकलन होणार ? सूर्याला कोणीं उजळावें ? चिलटासारख्या क्षुद्र प्राण्यास हें आकाश आपल्या मुठींत कसें घालून ठेवतां यावें ? ७४.

परी एथ असे एकु आधारु। तेणेंचि बोलें मी सधरु। जे सानुकूळ श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे ॥ ७५ ॥ येऱ्हवीं तरी मी मुर्खु। जरी जाहला अविवेकु। तरी संतकृपादीपकु। सोज्वळु असे ॥ ७६ ॥ लोहाचें कनक होये। हें सामर्थ्य परिसींच आहे। कीं मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धि ॥ ७७ ॥ जरी प्रकटे सिद्धसरस्वती। तरी मुकया आथी भारती। एथ वस्तुसामर्थ्यशक्ती। नवल कायी ॥ ७८ ॥ जयातें कामधेनु माये। तयासी अप्राप्य कांहीं आहे। म्हणऊनि मी प्रवर्तों लाहें। ग्रंथीं इये ॥ ७९ ॥ तरी न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें। करूनि घेयावें हें तुमतें। विनवितु असें ॥ ८० ॥ आतां देइजो अवधान। तुम्हीं बोलविल्या मी बोलेन। जैसें चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र ॥ ८१ ॥ तैसा मी अनुग्रहीतु। साधूंचा निरूपितु। ते आपुला अलंकारितु। भलतयापरी ॥ ८२ ॥ तंव श्रीगुरु म्हणती राहीं। हें तुज बोलावें नलगे कांहीं। आतां ग्रंथा चित्त देईं। झडकरी वेगा ॥ ८३ ॥ या बोला निवृत्तिदासु। पावूनि परम उल्हासु। म्हणे परियेसा मना अवकाशु। देऊनियां ॥ ८४ ॥

धृतराष्ट्र उवाचः—धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः। मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

तरी पुत्रस्नेहें मोहितु। धृतराष्ट्र असे पुसतु। म्हणे संजया सांगें मातु। कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥ जें धर्मालय म्हणिजे। तेथ पांडव आणि माझे। गेले असती व्याजें। झुंझाचेनि ॥ ८६ ॥ तरी तिहीं येतुला अवसरीं। काय किजत असे येरयेरीं। तें झडकरी कथन करीं। मजप्रती ॥ ८७ ॥

संजय उवाचः—दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा। आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

तिये वेळीं तो संजय बोले। म्हणे पांडवसैन्य उचललें। जैसें महाप्रळयीं पसरलें। कृतांतमुख ॥ ८८ ॥ तैसें तें घनदाट। उठावलें एकवाट। जैसें उसळलें कालकूट। धरी कवण ॥ ८९ ॥ नातरी वडवानलु सांदुकला। प्रलयवातें पोखला। सागर शोषूनि उधवला। अंबरासी ॥ ९० ॥ तैसें दळ दुर्धर। नानाव्यूहीं परिकर। अवगमलें भयासुर। तिये काळीं ॥ ९१ ॥ तें देखिलेयां दुर्योधनें। अव्हेरिलें कवणें मानें। जैसें न गणिजे पंचाननें। गजघटांतें ॥ ९२ ॥

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्। व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

मग द्रोणापासीं आला। तयातें म्हणे हा देखिला। कैसा दळभारु उचलला। पांडवांचा ॥ ९३ ॥ गिरिदुर्ग जैसे चालते। तैसे विविध व्यूह सभंवते। हे रचिले आथि बुद्धिमंतें। द्रुपदकुमरें ॥ ९४ ॥ जो का तुम्हीं शिक्षापिला। विद्या देऊनि कुरुठा केला। तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला। देखदेख ॥ ९५ ॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि। युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

आणीकही असाधारण। जे शस्त्रास्त्रीं प्रवीण। जे क्षात्रधर्मीं निपुण। वीर आहाती ॥ ९६ ॥ जे बळें प्रौढी पौरुषें। भीमार्जुनांसारिखे। ते सांगेन कौतुकें। प्रसंगेंची ॥ ९७ ॥ एथ युयुधानु सुभटु। आला असे विराटु। महारथी श्रेष्ठु। द्रुपद वीरु ॥ ९८ ॥

असें आहे, तरी ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, या कामीं ( मला ) एक आधार आहे. ज्या अर्थी या कामीं श्रीगुरु निवृत्तिराय यांची अनुकूलता आहे, त्या अर्थी त्यांच्या आधारावर धीर धरून मी बोलतों ( गीतार्थाचा यत्न करतों. ) ७५. एरवीं मी तर बोलून चालून मूर्ख आहें व माझ्या हातून हा अविचार होत आहे. तरी ( पण ) संतकृपेचा दिवा ( मजपुढें सारखा ) लखलखीत जळत आहे. ७६. लोखंडाचें सोनें होतें खरें; परंतु तसें करण्याचें सामर्थ्य केवळ परिसामध्येंच आहे किंवा मेलेल्यासहि परत जीवित लाभतें; पण तो प्रताप केवळ अमृताचा आहे. ७७. जर प्रत्यक्ष सरस्वती प्रगट होईल, तर मुक्याला वाचा फुटेल. ही केवळ वस्तुसामर्थ्याची शक्ति आहे, यांत आश्चर्य तें काय ? ७८. कामधेनु ही ज्याची आई आहे, त्याला न मिळण्यासारखें काय आहे ? आणि म्हणूनच मीं या ग्रंथाला हात घातला आहे. ७९. तरी उणें असेल तें पुरें करून घ्यावें, आणि जास्त असेल तें मान्य करून घ्यावें ( सोडून द्यावें ), अशी माझी आपणांस विनंति आहे. ८०. आतां आपण लक्ष द्यावें. आपण मला बोलवीत आहां, म्हणून मी बोलतों ( गीतेचें व्याख्यान करतों ). ज्याप्रमाणें लांकडी कळसूत्री बाहुली सूत्रधाराची दोरी नाचवील तशी नाचते; ८१. त्याप्रमाणें मी आपल्या कृपेंतील असून साधूंचा केवळ निरोप्या आहे ( ते सांगतील तें काम करणारा आहें ). आतां त्यांनीं मला वाटेल तसें नटवावें. ८२. तेव्हां श्रीगुरु म्हणाले, थांब, हें तूं आम्हांला सांगावें असें नाहीं. आतां तूं चटकन ग्रंथाकडे लक्ष दे ( लौकर ग्रंथ सांगण्यास आरंभ कर ). ८३. या श्रीगुरूंच्या भाषणावर निवृत्तिनाथाचे शिष्य ज्ञानेश्वर-महाराज अतिशय हर्षित होऊन म्हणाले, मी बोलतों तें मोकळ्या मनानें ऐका. ८४.

**धृतराष्ट्र म्हणाला, हे संजया, धर्माचें स्थान अशा कुरुक्षेत्रामध्यें जमलेले आणि युद्धाची इच्छा करणारे माझे ( पुत्र कौरव ) आणि पांडव काय करिते झाले ? १.**

तर मुलांच्या ममतेनें वेडा झालेला धृतराष्ट्र संजयास प्रश्न करूं लागला. तो म्हणाला, संजया, कुरुक्षेत्रींची हकीगत काय आहे, ती मला सांग. ८५. ज्या कुरुक्षेत्राला धर्माचें घर म्हणतात, तेथें पांडव आणि माझे पुत्र लढाईच्या निमित्तानें गेले आहेत. ८६. तरी ते एकमेक एवढा वेळ काय करीत आहेत, हें मला लौकर सांग. ८७.

**संजय म्हणाला, त्या वेळीं पांडवांचें सैन्य तर व्यूहाच्या आकारानें उभें राहिलेलें पाहून राजा दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांना पुढील शब्द बोलला. २.**

त्या वेळीं तो संजय बोलला. तो म्हणाला कीं, पांडव-सैन्यानें उठाव केला, तेव्हां ज्याप्रमाणें महाप्रळयाचे वेळीं काळ आपलें तोंड पसरतो त्याप्रमाणें तें दिसलें. ८८. अशा प्रकारें त्या घनदाट सैन्यानें एकदम उठाव केला ( तेव्हां तें कोणाला आवरणार ? ) जसें काळकूट एकदां उसळलें म्हणजे त्याचें शमन करण्याला कोण समर्थ आहे ? ८९. अथवा वडवानल ( समुद्राच्या पोटांतील अग्नि ) एकदां पेटला, तशांत त्याला प्रलयकालच्या वाऱ्यानें हात दिला, म्हणजे तो ज्याप्रमाणें सागराचें शोषण करून आकाशापर्यंत भडकतो; ९०. त्याप्रमाणें न आटोपणारें तें सैन्य अनेक व्यूह रचून सज्ज झालेलें असल्यामुळें त्या वेळीं फारच भयंकर भासलें. ९१. ज्याप्रमाणें हत्तींच्या कळपांना सिंह मुळींच मोजीत नाहीं, त्याप्रमाणें तें सैन्य पाहून दुर्योधनानें त्याची मुळींच पर्वा केली नाहीं. ९२.

**हे गुरो, तुमचा बुद्धिमान् शिष्य द्रुपदपुत्र (धृष्टद्युम्न) यानें व्यूहानें बद्ध केलेली अशी ही पांडवांची मोठी सेना अवलोकन करा. ३.**

नंतर दुर्योधन द्रोणाचार्यांजवळ येऊन त्यांना म्हणाला, पांडवांचें हें सैन्य कसें उसळलें आहे पाहिलें का ? ९३. हुषार अशा द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नानें सैन्याचे हे नानाप्रकारचे व्यूह सभोंवार रचले आहेत. जसे काय चालते डोंगरी किल्लेच ! ९४. ज्याला तुम्हीं शिक्षण देऊन शहाणे केलेंत त्यानें ( धृष्टद्युम्नानें ), हा सैन्यसिंह कसा उभारला ( तयार केला ) आहे पहा ! पहा तर खरा. ९५.

**या सेनेमध्यें भीमार्जुनासारखे युद्धामध्यें शूर व महाधनुर्धर योद्धे आहेत. (त्यांचीं नांवें सांगतों ऐका.) सात्यकि, विराट, महारथि द्रुपद, ४.**

आणखीहि जे शस्त्रास्त्रांत प्रवीण व क्षात्रधर्मांत निपुण असे असामान्य योद्धे आहेत; ९६. जे शक्तीनें, मोठेपणानें व पराक्रमानें भीम व अर्जुन यांच्यासारखे आहेत, त्यांचीं नांवें प्रसंग आला आहे, म्हणून कौतुकानें सांगतों. ९७. येथें लढवय्या सात्यकी, विराट, महारथीश्रेष्ठ आणि शूर असा द्रुपद, हे आले आहेत. ९८.

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् । पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥

चेकितान धृष्टकेतु । काशीश्वरु विक्रांतु । उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ॥ ९९ ॥ हा कुंतिभोजु पाहें । एथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देखें ॥१००॥

युधामन्युश्चविक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् । सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

हा सुभद्राहृदयनंदनु । जो अपरु नवा अर्जुनु । तो अभिमन्यु म्हणे दुर्योधनु । देखें द्रोणा ॥ १ ॥ आणीकही द्रौपदीकुमर । हे सकळही महारथी वीर । मिती नेणिजे परी अपार । मीनले असती ॥ २ ॥

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम । नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढ वीर सैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजती ॥ ३ ॥

भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः । अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

उद्देशें एक दोनी । जायिजती बोलोनी । तुम्ही आदिकरूनी । मुख्य जे जे ॥ ४ ॥ हा भीष्मु गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । रिपुगजपंचाननु । कर्ण वीरु ॥ ५ ॥ या एकेकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्य न पुरे । एकलाचि ॥ ६ ॥ एथ विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहें । याचा अडदरु सदा वाहे । कृतांतु मनीं ॥ ७ ॥ समितिंजयो सौमदत्ति । ऐसे आणीकही बहुत आहाती । जयांचिया बळा मिती । धाताही नेणे ॥ ८ ॥

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः । नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त । हो का जे अस्त्रजात । एथूनि रूढ ॥ ९ ॥ हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रतापु अंगीं । परी सर्व प्राणें मजाचिलागीं । आराइले असती ॥ ११० ॥ पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व या तैसें । सुभटांसी ॥ ११ ॥ आमुचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित थोकडें । ऐसे निरवधि चोखडे । स्वामिभक्त ॥ १२ ॥ झुंजती कुळकणी जाणती । कळे कीर्तीसी जिती । हें बहु असो क्षात्रनीती । एथोनियां ॥ १३ ॥ ऐसे सर्वांपरी पुरते । वीर दळीं आमुतें । आतां काय गणूं यांतें । अपार हे ॥ १४ ॥

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् । पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

वरी क्षत्रियांमाजी श्रेष्ठु । जो जगजेठी जगीं सुभटु । तया दळवैपणाचा पाटु । भीष्मासि पैं ॥ १५ ॥ आतां याचेनि बळें गवसलें । हें दुर्ग जैसें पन्नासिलें । येणें पाडें थेंकुलें । लोकत्रय ॥ १६ ॥ आधींच समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण कवणा नाहीं । मग वडवानळु तैसेयाही । विरजा जैसा ॥ १७ ॥ ना तरी प्रलयवान्हि महावातु । या दोघां जैसा सांघातु । तैसा हा गंगासुतु । सेनापति ॥ १८ ॥ आतां येणेंसि कवण भिडे । हें पांडव सैन्य कीर थोडें । ओइचलेनि पाडें । दिसत असे ॥ १९ ॥ वरी भीमसेन बेधु । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनि हे मातु । सांडिली तेणें ॥ १२० ॥

धृष्टकेतु, चेकितान, वीर्यसंपन्न काशिराज, पुरुजित्, कुंतिभोज, नरवीर शैब्य, ५.

चेकितान, धृष्टकेतु, पराक्रमी असा काशिराजा, नृपश्रेष्ठ उत्तमौजा आणि राजा शैब्य, हे पहा. ९९. हा कुंतिभोज पहा. येथें हा युधामन्यु आला आहे. आणखी हे पुरुजित् वगैरे इतर सर्व राजे आलेले आहेत, ते पहा. १००.

पराक्रमी युधामन्यु, वीर्यशाली उत्तमौजा, सुभद्रापुत्र अभिमन्यु आणि द्रौपदीचे पुत्र हे सर्व महारथी आहेत. ६.

दुर्योधन म्हणाला, अहो द्रोणाचार्य, सुभद्रेच्या अंतःकरणाला आनंद देणारा व प्रतिअर्जुनच असा तिचा मुलगा अभिमन्यु, हा पहा. १०१. आणखीहि द्रौपदीचे पुत्र, हे सर्वच महारथी वीर आहेत. यांची मोजदाद करतां येत नाहीं पण असे अपरिमित महारथी वीर या ठिकाणीं जमले आहेत. १०२.

हे द्विजश्रेष्ठा, आपल्या बाजूचे असलेलेहि माझ्या सैन्याचे जे प्रसिद्ध नायक आहेत (त्यांचीं नांवें) श्रवण करा. तुमच्या दिग्दर्शनार्थ (कांहीं नांवें) मी सांगतों. ७.

आतां आमच्या सैन्यामध्यें प्रमुख प्रमुख असे जे महायोद्धे आहेत, ते प्रसंगाच्या ओघानेंच सांगतों, ऐका. १०३.

आपण स्वतः, भीष्म, कर्ण, कृपाचार्य, समितिंजय, अश्वत्थामा, विकर्ण, त्याचप्रमाणें सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा. ८.

तुम्ही आदिकरून जे जे मुख्य मुख्य ( वीर ) आहेत, त्यांचीं नांवें केवळ दिग्दर्शनाकरितां ( आपल्या माहितीकरितां ) सांगून टाकतों. १०४. प्रतापानें केवळ तेजस्वी सूर्यच असा हा गंगेचा पुत्र भीष्म आहे आणि शत्रुरूपी हत्तीला सिंहासारखा असणारा हा वीर कर्ण. १०५. या एकेकट्याच्या केवळ संकल्पानें या जगाची उत्पत्ति व संहार होऊं शकतात. फार कशाला ? हा एकटाच कृपाचार्य यांना पुरे नाहीं का ? १०६. येथें विकर्ण वीर आहे. तो पलीकडे अश्वत्थामा पहा. याची धास्ती प्रत्यक्ष यमहि मनांत नेहमीं बाळगतो. १०७. समितिंजय आणि सौमदत्ति असे आणखीहि पुष्कळ आहेत. त्यांच्या सामर्थ्याची मर्यादा ब्रह्मदेवालाहि समजत नाहीं. १०८.

आणखी इतरहि अनेक वीर माझ्याकरितां जिवावर उदार झालेले, नानाप्रकारच्या शस्त्रांनीं संग्राम करणारे आणि सर्वहि युद्धशास्त्रामध्यें प्रवीण असे आहेत. ९.

ते शस्त्रविद्येंत तरबेज आहेत, अस्त्रांच्या मंत्रविद्येचे मूर्तिमंत अवतार आहेत. फार काय सांगावें ? जेवढीं म्हणून अस्त्रें आहेत, तेवढीं सर्व यांच्यापासून प्रचारांत आलीं आहेत. १०९. हे या जगांत अद्वितीय योद्धे आहेत; यांच्या अंगांत पुरेपूर शौर्य आहे. एवढें असूनहि हे सर्व वीर अगदीं जिवावर उदार होऊन माझ्या बाजूला मिळाले आहेत. ११०. ज्याप्रमाणें पतिव्रतेचें मन पतीवांचून इतराला स्पर्श करीत नाहीं, त्याप्रमाणें या चांगल्या योद्ध्यांना मीच काय तें सर्वस्व आहें. १११. आमच्या कार्यापुढें यांना आपलें जीवित अगदीं तुच्छ वाटतें, असे हे निस्सीम व उत्तम स्वामिभक्त आहेत. ११२. हे युद्धकलाकुशल असून युद्धकौशल्यानें कीर्तीस जिंकणारे आहेत. फार काय सांगावें ! क्षात्रधर्म ( मूळ ) यांच्यापासूनच ( उत्पन्न ) झाला आहे. ११३. याप्रमाणें सर्व अंगांनीं पूर्ण असे वीर आमच्या सैन्यांत आहेत. आतां यांची गणती काय करूं ! हे अपार आहेत. ११४.

तें हें आमचें भीष्मांनीं सर्व बाजूंनीं ( सेनापति होऊन ) रक्षण केलेलें सैन्य अजिंक्य आहे; पण त्यांचें तें ( दांडग्या ) भीमानें सर्व बाजूंनीं रक्षण केलेलें सैन्य क्षुद्र ( जिंकण्यास सोपें ) आहे. १०.

आणखी, क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ व या जगांत नाणावलेले योद्धे असे जे भीष्माचार्य, त्यांना या सेनेच्या आधिपत्याचा अधिकार दिलेला आहे. ११५. आतां यांनीं आपल्या सामर्थ्यानें आवरून या सैन्याची अशी कांहीं रचना केली आहे कीं, जसे काय किल्लेच बांधले आहेत ! यांच्यापुढें त्रिभुवनहि कःपदार्थ आहे. ११६. आधीं असें पहा, समुद्र हा कोणाला दुस्तर नाहीं ? तशांत त्याला ज्याप्रमाणें वडवानल साह्यकारी व्हावा; ११७. किंवा प्रळयकाळचा अग्नि व प्रचंड वारा या दोहोंचा ज्याप्रमाणें मिलाफ व्हावा, त्याप्रमाणें या गंगेच्या पुत्राच्या सेनापतित्वाची जोड या पराक्रमी सैन्याला मिळाली आहे. ११८. आतां या सैन्याबरोबर कोण झगडेल ? वर सांगितलेल्या आमच्या सैन्याच्या मानानें हें पांडवांचें सैन्य खरोखरच अपुरें दिसत आहे; ११९. आणि त्यांत भीमसेन ( अगोदरच ) आडदांड आणि तो त्यांच्या सैन्याचा अधिपति झाला आहे ! ( मग काय ? ) असें बोलून त्यानें ती गोष्ट सोडून दिली. १२०.

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः । भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥

मग पुनरपि काय बोले । सकळ सैनिकांतें म्हाणितलें । आतां दळभार आपुलाले । सरसे करा ॥ २१ ॥ जया जिया अक्षौहिणी । तेणें तिया आरणी । वरगण कवणकवणी । महारथिया ॥ २२ ॥ तेणें तिया आवरिजे । भीष्मातळीं राहिजे । द्रोणातें म्हणे पाहिजे । तुम्ही सकळ ॥ २३ ॥ हाचि एकु रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभारु आघवा । साचु आमुचा ॥ २४ ॥

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः । सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

या राजाचिया बोला । सेनापति संतोषला । मग तेणें केला । सिंहनादु ॥ २५ ॥ तो गाजत असे अद्भुतु । दोन्ही सैन्यांआंतु । प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ॥ २६ ॥ तयाचि तुलगासवें । वीरवृत्तीचेनि थावें । दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला ॥ २७ ॥ ते दोन्ही नाद मिनले । तेथ त्रैलोक्य बधिरभूत जाहलें । जैसें आकाश का पडिलें । तुटोनियां ॥ २८ ॥ घडघडीत अंबर । उचंबळत सागर । क्षोभलें चराचर । कांपत असे ॥ २९ ॥ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें । तंव दळामाजि रणतुरें । आस्फारिलीं ॥ १३० ॥

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः । सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

उदंड सैंघ वाजतें । भयानकें खाखातें । महाप्रळयो जेथें । धाकडांसी ॥ ३१ ॥ भेरी निशाण मांदळ । शंख काहळा भोंगळ । आणि भयासुर रणकोल्हाळ । सुभटांचे ॥ ३२ ॥ आवेशें भुजा त्राहाटिती । विसणैले हांका देती । जेथ महामद भद्रजाती । आवरती ना ॥ ३३ ॥ तेथ भेडांची कवण मातु । कांचया केर फिटतु । जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे ॥ ३४ ॥ एकां उभयांचि प्राण गेले । चांगांचे दांत बैसले । बिरुदांचे दादुले । हिंवताती ॥ ३५ ॥ ऐसा अद्भुत तूरबंबाळु । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु । देव म्हणती प्रळयकाळु । वोढवला आजी ॥ ३६ ॥ ऐसी स्वर्गीं मातु । देखोनि तो आकांतु । तंव पांडवदळाआंतु । वर्तलें कायी ॥ ३७ ॥ हो का निजसार विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें । जेथ गरुडाचिये जावळियेचे । कांतले चान्ही ॥ ३८ ॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ । माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवतसे तैसा । तेजें कोंदाटलिया दिशा । जयाचेनि ॥ ३९ ॥ जेथ अश्ववाहकु आपण । वैकुंठीचा राणा जाण । तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥ १४० ॥ ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेंसीं ॥ ४१ ॥ देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्तांचें । जे सारथ्य पार्थाचें । करितु असे ॥ ४२ ॥ पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पांचजन्यु आस्फुरिला । अवलीळाचि ॥ ४३ ॥

**युद्धाच्या प्रवेशद्वारांत आपापल्या नेमलेल्या ठिकाणीं उभे राहून आपण सर्वांनीं मिळून भीष्माचेंच सर्व बाजूंनीं रक्षण करा. ११.**

मग दुर्योधन सर्व सेनापतींना पुन्हां असें म्हणाला कीं, आतां आपापलें सैन्यसमुदाय सज्ज करा. १२१. ज्यांच्या ज्या अक्षौहिणी आल्या असतील, त्यांनीं त्या अक्षौहिणी युद्धभूमीवर कोणकोणत्या महारथ्याकडे विभागून द्यावयाच्या त्या द्याव्या. १२२. त्या महारथ्यानें त्या अक्षौहिणीला आपल्या हुकमतींत ठेवावें आणि भीष्मांच्या आज्ञेत राहावें. (नंतर) दुर्योधन द्रोणाचार्यांना म्हणाला, तुम्हीं सर्वांवर देखरेख करावी. १२३. या भीष्मांचेंच फक्त संरक्षण करावें; यांना मजप्रमाणेंच मानावें. यांच्या योगानेंच आमचा हा सर्व सेनाभार खरा (समर्थ) आहे (आमच्या सेनेची सर्व मदार यांच्यावरच आहे). १२४.

**(या दुर्योधनाच्या बोलण्यानें संतुष्ट होऊन) त्या दुर्योधनाला हर्ष उत्पन्न करणारा कुरुकुलांतील वृद्ध पितामह प्रतापी भीष्माचार्य सिंहनादाप्रमाणें मोठी गर्जना करून शंख वाजविता झाला. १२.**

राजाच्या या भाषणानें सेनापति भीष्माला संतोष झाला. मग त्यानें सिंहासारखी गर्जना केली. १२५. ती गर्जना दोन्ही सैन्यांत विलक्षण तऱ्हेनें दुमदुमत राहिली. तिचा प्रतिध्वनिहि (आकाशांत) न मावतां पुनःपुन्हा उठूं लागला. १२६. तो प्रतिध्वनि उठत असतांच वीरवृत्तीच्या बळानें (स्फुरण येऊन) भीष्मदेवानें आपला दिव्य शंख वाजविला. १२७. ते दोन्ही आवाज मिळाले, तेव्हां त्रैलोक्याच्या कानठळ्या बसल्या. त्या वेळीं जणूं काय आकाशच तुटून पडतें कीं काय, असें वाटलें. १२८. (त्यामुळें) आकाश धडाडलें, सागर उसळला आणि स्थावर व जंगम जग गांगरून कांपूं लागलें. १२९. त्या मोठ्या आवाजाच्या नादानें डोंगरांतील दऱ्या दणाणून राहिल्या. इतक्यांत त्या सैन्यांत रणवाद्यें सुरू झालीं. १३०

**त्यानंतर शंख, नगारे, ढोल, मृदंग आणि कर्णा हीं सर्व वाद्यें एकदम वाजविण्यांत आलीं. त्यांचा आवाज फार भयंकर झाला. १३.**

नाना प्रकारचीं रणवाद्यें जिकडे तिकडे इतकीं भयंकर व कर्कश वाजूं लागलीं कीं, मी मी म्हणणारांनाहि तो महाप्रलयच वाटला! १३१. नौबद, डंके, ढोल, शंख, मोठ्या झांजा व कर्णे, आणखी महायोद्ध्यांच्या भयंकर गर्जना (या सर्वांची एकच गर्दी झाली). १३२. (ते योद्धे) आवेशानें दंड ठोकूं लागले, (कोणी) चिडून (एकमेकांना) युद्धार्थ हांका मारूं लागले आणि त्या ठिकाणीं मदोन्मत्त हत्ती आवरतनासे झाले. १३३. तेथें (अशा स्थितींत) भित्र्यांची तर गोष्ट कशाला पाहिजे! कचे लोक तर कस्पटाप्रमाणें उडून गेलेच. पण प्रत्यक्ष यमास धाक पडला. तो (गर्भगळीत होऊन) पायच धरीना. १३४. (त्यापैकीं) कित्येकांचे तर उभ्या उभ्याच प्राण गेले. जे धैर्यवान् होते, त्यांची दांतखिळी बसली; आणि मी मी म्हणणारे नामांकित वीर थरथर कांपूं लागले. १३५. असा वाद्यांचा मोठा विलक्षण आवाज ऐकून ब्रह्मदेव व्याकुळ झाला व आज प्रलयकाळ येऊन ठेपला, असें देव म्हणूं लागले. १३६. तो आकान्त पाहून स्वर्गांत अशी गोष्ट झाली. इतक्यांत इकडे पांडवांच्या सैन्यांत काय झालें? १३७. जो रथ विजयाचा गाभा किंवा महातेजाचें भांडारच (होता), ज्याला (वेगांत) गरुडाची बरोबरी करणारे चार घोडे जुंपले होते; १३८.

**त्यानंतर श्वेतवर्ण अश्व जोडलेल्या महान् रथावर आरूढ होत्साते श्रीकृष्ण आणि अर्जुन यांनींहि आपले दिव्य शंख वाजविले. १४.**

व ज्याच्या तेजानें सर्व दिशा भरून गेल्या होत्या व जो दिव्य असा शोभत होता, कीं जणूं काय पंख असलेला मेरु पर्वतच! १३९. त्या रथावर सारथ्याचें काम करणारा प्रत्यक्ष वैकुंठाचा राजा श्रीकृष्ण आहे, त्या रथाचे गुण काय वर्णावेत? १४०. रथावर लाविलेल्या निशाणाच्या खांबावर शंकराचा प्रत्यक्ष अवतार असलेला वानर (मारुति) होता व शारंगधर श्रीकृष्ण अर्जुनाचा सारथी होता. १४१. पहा त्या प्रभूचें नवल! त्याचें भक्तांविषयीं प्रेम विलक्षण आहे! कारण (तो सर्वशक्तिमान् परमेश्वर, पण) अर्जुनाच्या सारथ्याचेंहि काम करीत होता! १४२. आपल्या दासास पाठीशीं घालून (तो) स्वतः युद्धाचे तोंडावर राहिला. त्या श्रीकृष्णानें पांचजन्य नांवाचा शंख लीलेनेंच वाजविला. १४३.

पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः । पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥

परी तो महाघोषु थोरु । गाजत असे गंहिरु । जैसा उदैला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें ॥४४॥ तैसे तूरबंबाळु भंवते । कौरवदळीं गाजत होते । ते हारपोनि नेणों केउते । गेले तेथ ॥ ४५ ॥ तैसाचि देखें येरें । निनादें अति गहिरें । देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ ४६ ॥ ते दोन्ही शब्द अचाट । मिनले एकवट । तेथ ब्रह्मकटाह शतकूट । हों पाहत असे ॥ ४७ ॥ तंव भीमसेनु विसणैला । जैसा महाकाळु खवळला । तेणें पौंड्र आस्फुरिला । महाशंखु ॥ ४८ ॥

अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः । नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

तो महाप्रलयजलधरु । जैसा घडघडिला गंहिरु । तंव अनंतविजयो युधिष्ठिरु । आस्फुरित असे ॥ ४९ ॥ नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु । जेणें नादें अंतकु । गजबजला ठाके ॥ १५० ॥

काश्यश्च परमेश्वासः शिखंडी च महारथः । धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते । सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥

तेथ भूपती होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक । हा काशीपति देख । महाबाहू ॥ ५१ ॥ तेथ अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु । धृष्टद्युम्नु नृपनाथु । शिखंडी हन ॥ ५२ ॥ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नाना शंख निरंतर । आस्फुरिले ॥ ५३ ॥ तेणें महाघोषनिर्घातें । शेष कूर्म अवचितें । गजबजोनि भूभारातें । सांडूं पाहती ॥ ५४ ॥ तेथ तिन्ही लोक डंडळित । मेरु मांदार आंदोळित । समुद्रजळ उसळत । कैलासवेरी ॥ ५५ ॥

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् । नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आसुडत । तेथ सडा होत । नक्षत्रांचा ॥ ५६ ॥ सृष्टि गेली रे गेली । देवां मोकळवादी जाहली । ऐशी एक टाळी पिटिली । सत्यलोकीं ॥ ५७ ॥ दिहाचि दिन थोकला । जैसा प्रळयकाळ मांडला । तैसा हाहाकारु उठिला । तिहीं लोकीं ॥ ५८ ॥ तंव आदिपुरुष विस्मितु । म्हणे झणें होय पां अंतु । मग लोपिला अद्भुतु । संभ्रमु तो ॥ ५९ ॥ म्हणोनि विश्व सांवरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें । जैं महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं ॥ १६० ॥ तो घोष तरी उपसंहरला । परी पडिसाद होता राहिला । तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा ॥६१॥ जैसा गजघटाआंतु । सिंह लीला विदारितु । तैसा हृदयातें भेदितु । कौरवांचिया ॥६२॥ तो गाजत जंव आइकती । तंव उभेचि हियें घालिती । एकमेकांतें म्हणती । सावध रे सावध ॥ ६३ ॥ तेथ बळें प्रौढीपुरते । जे महारथी वीर होते । तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें ॥ ६४ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः । प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥

मग सरिसेपणें उठावले । दुणवटोनि उचलले । तया दंडीं क्षोभलें । लोकत्रय ॥ ६५ ॥ तेथ बाणवरी धनुर्धर । वर्षताती निरंतर । जैसे प्रळयांत जलधर । अनिवार कां ॥ ६६ ॥ तें देखालिया अर्जुनें । संतोष घेऊनि मनें । मग संभ्रमें दिठी सेने । घालितसे ॥ ६७ ॥ तंव संग्रामीं सज्ज जाहले । सकळ कौरव देखिले । मग लीला धनुष्य उचलिलें । पंडुकुमरें ॥ ६८ ॥

भगवान् श्रीकृष्णानें पांचजन्य शंख, अर्जुनानें देवदत्त, ( व ) अचाटकर्मी भीमसेनानें पौंड्र नांवाचा महान् शंख वाजविला. १५.

परंतु त्याचा तो भयंकर आवाज गंभीरपणानें घुमत राहिला. ज्याप्रमाणें उगवलेला सूर्य नक्षत्रांना लोपवून टाकतो, १४४. त्याचप्रमाणें कौरवांच्या सैन्यांत जिकडे तिकडे दुमदुमणारा जो वाद्यांचा कल्होळ, तो ( त्या शंखाच्या महानादानें ) कोणीकडे लोपून गेला, तें कांहीं कळेना. १४५. त्याचप्रमाणें पहा, नंतर त्या अर्जुनानें अतिगंभीर आवाजानें देवदत्त नांवाचा आपला शंख वाजविला. १४६. ते दोन्ही अचाट आवाज जेव्हां एकत्र मिळाले, तेव्हां हें सर्व ब्रह्मांड शतचूर्ण होतें कीं काय, असें वाटूं लागलें. १४७. इतक्यांत खवळलेल्या कृतान्ताप्रमाणें आवेश चढलेल्या भीमानें आपला पौंड्र नांवाचा मोठा शंख वाजविला. १४८. त्याचा आवाज कल्पान्ताच्या वेळच्या मेघगर्जनेप्रमाणें अतिगंभीर असा मोठा झाला. इतक्यांत धर्मराजानें अनंतविजय नांवाचा शंख वाजविला. १४९.

कुन्तीपुत्र राजा युधिष्ठिरानें अनंतविजय, नकुलानें सुघोष आणि सहदेवानें मणिपुष्पक, १६.

नकुलानें सुघोष व सहदेवानें मणिपुष्पक या नांवाचे शंख वाजविले. त्या आवाजानें काळहि गडबडून गेला. १५०.

महाधनुर्धर काशिराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, शत्रूकडून कधीं पराजय न पावलेला सात्यकी, द्रुपद, द्रौपदीचे पुत्र, महाबाहु अभिमन्यु इत्यादिकांनीं, हे पृथिवीपते धृतराष्ट्रा, चोहोंकडून सत्रानीं आपापले शंख वाजविले. १७-१८.

त्या युद्धभूमीवर द्रुपद, द्रौपदीचे पुत्र इत्यादिक अनेक राजे होते. हा वीर्यशाली काशीराजा पहा. १५१. तेथें अर्जुनाचा मुलगा ( अभिमन्यु ), अजिंक्य सात्यकी, राजश्रेष्ठ धृष्टद्युम्न व शिखंडी, १५२. विराटादिक मोठे राजे, जे महत्त्वाचे शूर सैनिक होते, त्यांनीं सर्वांनीं निरनिराळे शंख एकसारखे वाजविण्यास आरंभ केला. १५३. त्या मोठ्या घोषाच्या दणक्यानें शेष व कूर्म हे एकदम गोंधळून, आपण धरलेलें पृथ्वीचें ओझें टाकून द्यावयाच्या बेतांत आले. १५४. त्यामुळें तिन्ही लोक डळमळूं लागले. मेरु व मांदार हे पर्वत मागेंपुढें झोके खाऊं लागले व समुद्राच्या लाटा कैलासापर्यंत उसळल्या. १५५.

पृथ्वी आणि आकाश हीं दणाणून सोडणाऱ्या त्या ( शंखांच्या ) तुंबळ घोषानें कौरवांचीं हृदयें विदीर्ण केलीं. १९.

जमीन उलथते कीं काय व आकाशाला हिसके बसूं लागल्यामुळें नक्षत्रांचा सडाच होतो कीं काय ( असें वाटूं लागलें ). १५६. सृष्टि चालली रे चालली, देवांना निराधार स्थिति आली, अशी ब्रह्मलोकांत एकच ओरड झाली. १५७. दिवसासच सूर्य थांबला व ज्याप्रमाणें प्रळयकाल सुरू व्हावा, त्याप्रमाणें तिन्ही लोकांत हाहाकार उडाला. १५८. तें पाहून परमात्मा विस्मित झाला आणि मनांत म्हणाला, " न जाणों कदाचित् सृष्टीचा अंत होईल ". ( तो चुकवावा म्हणून ) मग त्यानें तो विलक्षण गोंधळ ( एकदम ) शांत केला. १५९. त्यामुळें जग सांवरलें. नाहींतर ज्या वेळेला कृष्णादिकांनीं आपले दिव्य शंख वाजविले, त्या वेळीं युगान्त होण्याची वेळ आली होती. १६०. तो घोष तर शांत झाला पण त्याचा प्रतिध्वनि जो शिल्लक होता, त्यामुळेंच कौरवांच्या सर्व सैन्याची दाणादाण उडाली. १६१. हत्तींच्या कळपाची सिंह लीलेनेंच जशी फांकाफांक करतो, तशीं कौरवांचीं अंतःकरणें त्या प्रतिध्वनींनें भेदून टाकलीं. १६२. तो प्रतिध्वनि दुमदुमत असतांना जेव्हां त्यांच्या कानावर आला, तेव्हां उभेपणींच त्यांच्या काळजानें ठाव सोडला. ( त्यांतले त्यांत ) ते एकमेकाला " अरे सावध राहा, सावध राहा " असें म्हणूं लागले. १६३. त्या सैन्यांत पराक्रमानें व मोठेपणानें जे पुरे शूर महारथी होते, त्यांनीं पुन्हां सैन्याला आवरिलें. १६४.

कौरवपक्षीय सैनिक ( पुनः ) व्यवस्थित उभे राहिलेले पाहून शस्त्रसंपाताच्या प्रसंगीं आपलें धनुष्य उचलून पांडुपुत्र अर्जुन, २०.

मग ते लढण्याच्या तयारीनें सिद्ध झाले व दुप्पट जोरानें उसळले. त्या सैन्याच्या उसळण्यानें तिन्ही लोक त्रस्त झाले. १६५. त्या वेळीं प्रळयकाळीं मेघ ज्याप्रमाणें अनिवार वर्षाव करतात, त्याप्रमाणें धनुष्य धरणारे योद्धे बाणांचा एकसारखा वर्षाव करूं लागले. १६६. अर्जुनानें तें पाहून मनांत संतोष मानला आणि मग उत्सुकतेनें सैन्याकडे नजर फेंकली. १६७. तेव्हां युद्धाला तयार झालेले सर्व कौरव ( त्यानें ) पाहिले. मग पांडुपुत्र अर्जुनानें लीलेनेंच धनुष्य उचलून घेतलें. १६८.

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते । अर्जुन उवाचः— । सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥

ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथु पेलावा । नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळां ॥ ६९ ॥

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् । कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥

जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिक । न्याहाळीन अशेख । झुंजते जे ॥ १७० ॥

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः । धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

एथ आले असती आघवे । परी कवणेसीं म्यां झुंजावें । हें रणीं लागे पहावें । म्हणऊनियां ॥ ७१ ॥ बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव । वांटिवावीण हांव । बांधिती झुंजीं ॥ ७२ ॥ झुंजाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीर नव्हती । हें सांगोनि रायाप्रती । काय संजयो म्हणे ॥ ७३ ॥

संजय उवाचः—एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत । सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

आइका अर्जुन इतुकें बोलिला । तंव कृष्णें रथु पेलिला । दोहीं सैन्यांमाजीं केला । उभा तेणें ॥ ७४ ॥

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् । उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥

जेथ भीष्मद्रोणादिक । जवळिकेचि सन्मुख । पृथिवीपति आणिक । बहुत आहाती ॥७५॥

तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् । आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि । तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

तेथ स्थिर करूनि रथु । अर्जुन असे पाहातु । तो दळभार समस्तु । संभ्रमेंसीं ॥ ७६ ॥ मग देवा म्हणे देख देख । हे गोत्रगुरु अशेख । तंव कृष्णा मनीं नावेक । विस्मो जाहला ॥ ७७ ॥ तो आपणयां आपण म्हणे । एथ कायी कवण जाणे । हें मनीं धरिलें येणें । परि कांहीं आश्चर्य असे ॥ ७८ ॥ ऐसी पुढील से घेतु । तो सहजें जाणे हृदयस्थु । परि उगा असे निवांतु । तिये वेळीं ॥ ७९ ॥ तंव तेथ पार्थु सकळ । पितृ पितामह केवळ । गुरु बंधु मातुळ । देखता जाहला ॥ १८० ॥ इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले । हे सकळ असती आले । तयांमाजीं ॥ ८१ ॥ सुहृज्जन सासरे । आणीकही सखे सोइरे । कुमर पौत्र धनुर्धरें । देखिले तेथ ॥ ८२ ॥ जयां उपकार होते केले । कां आपदीं जे राखिले । हे असो वडील धाकुले । आदिकरूनी ॥ ८३ ॥ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदित जालें असे कळीं । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥ ८४ ॥

कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
अर्जुन उवाचः—दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

तेथ मनीं गजबज जाहाली । आणि आपैसी कृपा आली । तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ ८५ ॥ जिया उत्तमे कुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी । तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें ॥ ८६ ॥ नविये आवडीचेनि भरें । कामुक निजवनिता विसरे । मग पाडेंवीण अनुसरे । भ्रमला जैसा ॥ ८७ ॥ कीं तपोबळें ऋद्धी । पातलिया भ्रंशे बुद्धी । मग तया विरक्तासिद्धी ।

**हे धृतराष्ट्रा, त्या वेळीं भगवान् श्रीकृष्णाला पुढील वाक्य बोलला, “हे अच्युता, माझा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं नेऊन उभा कर.” २१.**

त्या वेळीं अर्जुन म्हणाला, देवा, आतां चटकन रथ हांकावा व तो दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं नेऊन उभा करावा. १६९.

**म्हणजे युद्धाची इच्छा करून त्यासाठीं तयार असलेले हे ( सर्व योद्धे ) मी अवलोकन करीन व या रणसंग्रामामध्यें मला कोणाबरोबर युद्ध करावयाचें तें मी पाहून घेईन. २२.**

जोंपर्यंत हे सर्व झुंजण्याकरितां आलेले शूर सैनिक मी क्षणभर पुरते न्याहाळून पाहीन (तोंपर्यंत उभा कर).१७०.

**दुर्बुद्धि धृतराष्ट्रपुत्राचे ( दुर्योधनाचे ) युद्धामध्यें प्रिय करण्याची इच्छा असलेले जे हे योद्धे येथें गोळा झाले आहेत, त्यांना मी अवलोकन करीन.२३.**

येथें सर्व आले आहेत; पण मी रणांत कोणाबरोबर लढावें, याचा विचार करणें जरूर आहे, म्हणून ( मी पहातों ). १७१. फार करून कौरव हे उतावळे व दुष्ट बुद्धीचे असून पुरुषार्थावांचून युद्धाची हांव धरतात. १७२. हे लढाईची हौस तर बाळगतात पण युद्धांत टिकाव धरीत नाहींत. इतकें सांगून संजय धृतराष्ट्र राजाला पुढें काय म्हणाला, १७३.

**संजय म्हणाला, “हे भरतकुलोत्पन्ना धृतराष्ट्रा, अर्जुनानें असें म्हणतांच श्रीकृष्ण दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं ( तो ) श्रेष्ठरथ थांबवून, २४.**

ऐका. अर्जुन एवढें बोलला. इतक्यांत श्रीकृष्णानें रथ हांकला व त्यानें तो दोन्ही सैन्यामध्यें उभा केला. १७४.

**भीष्म, द्रोण आणि इतर सर्व राजे यांच्यासमोर म्हणाला, “हे पार्था, जमलेल्या या कौरवांना पहा.” २५.**

ज्या ठिकाणीं भीष्म, द्रोण आदिकरून आप्तसंबंधी व आणखी पुष्कळ राजे पुढें उभे होते, १७५.

**त्या ठिकाणीं जमलेलीं वडील माणसें, आजे, गुरु, मामा, बंधु, पुत्र, नातू, तसेंच जिवलग मित्र, सासरे, स्नेही या सर्वांना दोन्ही सैन्यांमध्यें अर्जुनानें पाहिलें. तेथें जमलेले आपले बांधवच आहेत असें पाहून तो कुंतीपुत्र २६–२७.**

त्या ठिकाणीं रथ थांबवून, अर्जुन तो सर्व सैन्यसमुदाय उत्सुकतेनें पाहूं लागला. १७६. मग म्हणाला, देवा, पहा, पहा. हे सगळे भाऊबंद व गुरु आहेत. तेव्हां (तें ऐकून) कृष्णाच्या मनाला क्षणभर अचंबा वाटला. १७७. तो (श्रीकृष्ण) आपल्या मनाशींच आपण म्हणाला, ह्यानें ह्या वेळीं हें काय मनांत आणिलें आहे कोणास ठाऊक ! पण कांहीं तरी विलक्षणच असावें.१७८. याप्रमाणें पुढचें त्यानें अनुमान बांधलें. तो ( सर्वांच्या ) हृदयामध्यें राहणारा असल्यामुळें त्यानें तें सहज जाणलें; परंतु त्या वेळीं तो (कांहीं न बोलता) स्तब्ध राहिला. १७९. तों तेथें केवळ आपले चुलते, आजे, गुरु, भाऊ, मामा यासर्वांसच अर्जुनानें पाहिलें. १८०. आपले इष्टमित्र, मुलेंबाळें हे सर्व त्या सैन्यांत आले आहेत, असें त्यानें पाहिलें. १८१. जिवलग मित्र, सासरे, आणखी सगेसोयरे, पुत्र, नातू ( असे ) अर्जुनानें तेथें पाहिले. १८२. ज्यांच्यावर त्यानें उपकार केलेले होते किंवा संकटकाळीं ज्यांचें रक्षण केलेलें होतें; फार काय ? लहानमोठे आदिकरून– १८३. असें हें सर्व कुळच दोन्ही सैन्यांत लढाईस तयार झालेलें आहे, हें त्या वेळीं अर्जुनानें पाहिलें. १८४.

**अत्यंत करुणेनें व्याकूळ झाला आणि कष्टी होत्साता असें म्हणाला ( अर्जुन म्हणाला ):–हे कृष्णा, युद्ध करण्याकरितां एकत्र जमलेल्या या स्वजनांना पाहून, २८.**

त्या प्रसंगीं (अर्जुनाच्या) मनांत गडबड उडाली आणि ( त्यामुळें त्याच्या मनांत ) सहजच करुणा उत्पन्न झाली. त्या अपमानामुळें अर्जुनाच्या अंगांतील वीरवृत्ति निघून गेली. १८५. ज्या ( स्त्रिया ) उच्च कुळांतल्या असून गुण व रूप यांनीं संपन्न असतात, त्यांना आपल्या अंगच्या पाणीदारपणामुळें दुसऱ्या स्त्रीचें ( सवतीचें ) वर्चस्व सहन होत नाहीं; १८६. नवीन स्त्रियेच्या ( जारिणीच्या ) आवडीच्या भरांत कामासक्त पुरुष आपल्या स्वतःच्या बायकोला विसरतो आणि मग वेडावल्यासारखा ( तिची ) योग्यता न पाहतां तिच्या नादीं लागतो; १८७. किंवा तपोबलानें ऋद्धि (ऐश्वर्य) प्राप्त झाली असतां (वैराग्यशाली पुरुषाची) बुद्धि भ्रम पावते; आणि मग त्याला वैराग्यसिद्धी-

आठवेना ॥ ८८ ॥ तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेलें । जें अंतःकरण दिधलें । कारुण्यासी ॥ ८९ ॥ देखा मंत्रज्ञु बरळु जाय । मग तेथ का जैसा संचारु होय । तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला ॥१९०॥ म्हणवूनि असतां धीरु गेला । हृदया द्रावो आला । जैसा चंद्रकळीं सिंपिला । सोमकांतु ॥ ९१ ॥ तयापरी पार्थु । अतिस्नेहें मोहितु । मग सखेद असे बोलतु । अच्युतेसीं ॥ ९२ ॥ तो म्हणे अवधारीं देवा । म्यां पाहिला हा मेळावा । तंव गोत्रवर्गु आघवा । देखिला एथ ॥ ९३ ॥ हे संग्रामीं अति उद्यत । जहाले असती कीर समस्त । पण आपणपेयां उचित । केवीं होय ॥ ९४ ॥

सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति । वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥

येणें नांवेंचि नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं । मन बुद्धी ठायीं । स्थिर नोहे ॥९५॥ देखें देह कांपत । तोंड असे कोरडे होत । विकळता उपजत । गात्रांसी ॥९६॥

गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते । न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

सर्वांगा कांटाळा आला । अति संतापु उपनला । तेथ वेंबळ हातु गेला । गांडिवाचा ॥ ९७ ॥ तें न धरताचि निष्टलें । परि नेणेंचि हातोनि पडिलें । ऐसें हृदय असे व्यापिलें । मोहें येणें ॥ ९८ ॥ जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण । तयाहून असाधारण । हें स्नेह नवल ॥ ९९ ॥ जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥ २०० ॥ जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें । परि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ॥ १ ॥ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरूं नेणे । तैसें कठिण कोंवळेंपणें । स्नेह देखा ॥ २ ॥ हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयाही नयेचि आया । म्हणवूनि भुलविला ऐके राया । संजयो म्हणे ॥ ३ ॥ अवधारीं मग तो अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु । विसरला अभिमानु । संग्रामींचा ॥ ४ ॥ कैसी नेणों सदयता । उपनली तेथें चित्ता । मग म्हणे कृष्णा आतां । नासिजे एथ ॥ ५ ॥ माझें अतिशय मन व्याकुळ । होतसे वाचा बरळ । जे वधावे हे सकळ । येणें नांवें ॥ ६ ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव । न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिक कां न वधावें । हे येरयेर आघवे । गोत्रज आमुचे ॥ ७ ॥ म्हणोनि जळो हें झुंज । प्रत्यया नये मज । एणें काय काज । महापापें ॥ ८ ॥ देवा बहुतीं परी पाहतां । एथ वोखटें होईल झुंजतां । वर कांहीं चुकवितां । लाभु आथी ॥ ९ ॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च । किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । हें पाहुनियां ॥२१०॥ यां सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थु म्हणे ॥ ११ ॥

-ची आठवणहि रहात नाहीं. १८८. त्याप्रमाणें अर्जुनाची त्या वेळीं स्थिति झाली. त्याची असलेली वीरवृत्ति (पराक्रम) गेली. कारण त्यानें (आपलें) अंतःकरण करुणेला वाहिलें १८९. पहा, मांत्रिक चांचरला (मंत्रोच्चारांत चुकला) असतां, जशी त्याला बाधा होते, तसा तो धनुर्धारी अर्जुन मोठ्या मोहानें व्यापला गेला. १९०. म्हणून त्याच्या अंगीं असलेलें धैर्य खचलें आणि त्याचें हृदय करुणेनें पाझरलें. ज्याप्रमाणें चंद्रकिरणांचा वर्षाव झाल्यानें चंद्रकांतमणि पाझरूं लागतो, १९१. त्याप्रमाणें पार्थ महाकरुणेनें मोहून गेला; आणि मग खेदयुक्त होऊन कृष्णाबरोबर बोलूं लागला. १९२. तो म्हणाला, देवा, ऐका. मी हा सर्व जमाव पाहिला; तो एथें तर सर्व आप्तसंबंधींच दिसतात. १९३. हे सर्व लढाईत उन्मत्त झाले आहेत, हें खरें; पण तें (यांच्याशीं लढणें) आपल्याला कसें योग्य होईल? १९४.

**माझीं गात्रें शिथिल होत आहेत, तोंड कोरडें पडत आहे, माझ्या शरिराला कंप सुटला आहे, शरिरावर रोमांच उभे राहिले आहेत. २९.**

या (नातलगांशीं युद्ध करावयाच्या) विचारानेंच मला कसेंसेंच होते. माझें मलाच मुळीं भान नाहींसें झालें आहे. माझें मन व बुद्धि हीं स्थिर नाहींत. १९५. पहा, माझा देह कांपत आहे, तोंडाला कोरड पडली आहे आणि सगळ्या गात्रांना शिथिलता आली आहे. १९६.

**हातांतून गांडीव धनुष्य गळून पडत आहे. शरिराच्या त्वचेचा दाह होत आहे. मी उभा राहण्याला समर्थ नाहीं. माझें मन जणूं काय भ्रमण पावत आहे. ३०.**

सर्वांगावर कांटा उभा राहिला आहे, माझे मनांत अतिशय यातना होत आहेत आणि गांडीव धनुष्य धरावयाचा हात लुला होऊन गेला आहे. १९७. तें धरलें न जातां निसटलें; परंतु हातांतून केव्हां पडून गेलें, याची मला दादच नाहीं. या मोहानें माझें हृदय असें घेरलें आहे. १९८. (हें अर्जुनाचें अंतःकरण) वज्राहूनहि कठिण, दुसऱ्यास दाद न देणारें, अति खंबीर आहे; पण या करुणेची कळा त्याच्याहि वर आहे! मोठी नवलाची गोष्ट! १९९. ज्यानें युद्धांत शंकरास हार खाण्यास लाविलें व निवातकवच नांवाच्या राक्षसांस बेपत्ता केलें, त्या अर्जुनाला एका क्षणांत मोहानें घेरलें! २००. ज्याप्रमाणें वाटेल त्या प्रकारचें कोरडें लांकूड भुंगा सहज लीलेनें पोंखरून टाकतो, परंतु कोंवळ्या कळीमध्येंच अडकून पडतो; २०१. तेथें तो प्राणासहि मुकेल, पण त्या कमळाच्या पाकळ्या फाडण्याचा विचार त्याच्या मनास शिवतहि नाहीं; त्याप्रमाणें पहा, हा स्नेह (करुणा) जात्या कोंवळा खरा, पण महा कठिण! २०२. संजय म्हणाला, राजा, ऐक. हा स्नेह म्हणजे परमात्म्याची माया आहे. ही ब्रह्मदेवालाहि आकळत नाहीं. म्हणून त्यानें अर्जुनाला भुरळ पाडली. २०३. असो; राजा, ऐक. मग तो अर्जुन (युद्धाला आलेले) सर्व आपलेच लोक आहेत असें पाहून, लढाईचा अभिमान (ईर्षा) विसरून गेला. २०४. तेथें त्याच्या चित्तांत सदयता कोठून उत्पन्न झाली कोण जाणे! मग तो म्हणाला, कृष्णा, आपण आतां येथें राहूं नये, हें बरें. २०५. ह्या सर्वांस मारावयाचें हें मनांत येतांच त्यानें माझें मन अतिशय व्याकूळ होतें आणि तोंड हवें तें बरळूं लागतें. २०६.

**हे केशवा, मला विपरीत लक्षणें दिसत आहेत. युद्धामध्यें स्वजनांना मारिलें असतां कोणतेंहि श्रेय (प्राप्त होईल असें) मला दिसत नाहीं. ३१.**

या कौरवांना मारणें जर योग्य आहे, तर धर्मराजादिकांना मारण्याला काय हरकत आहे? कारण कीं, हे सर्व आम्ही एकमेकांचे नातलगच आहोंत. २०७. याकरितां आग लागो या युद्धाला! मला हें पटत नाहीं. या महापापाची आम्हांस काय गरज आहे? २०८. देवा, अनेक दृष्टींनीं विचार केला असतां (असें वाटतें कीं,) या वेळीं युद्ध केलें, तर (त्याचा परिणाम) वाईट होईल; पण तें जर टाळलें तर कांहीं लाभ (कल्याण) होईल. २०९.

**कृष्णा, मला विजयाची इच्छा नाहीं, राज्याची नाहीं, सुखाचीहि नाहीं. हे गोविंदा, आम्हांला राज्य मिळून काय उपयोग? सुखोपभोग मिळून काय उपयोग? किंबहुना आम्हांला जगून तरी काय उपयोग? ३२.**

त्या विजयाच्या इच्छेशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं; अशा रीतीनें मिळविलेलें राज्य तरी आपल्याला काय करावयाचें? २१०. अर्जुन म्हणाला, या सर्वांना मारून जे भोग भोगावयाचे, त्या सगळ्यांना आग लागो! २११.

येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च । त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

तेणें सुखेंविण होईल । तें भलतेंही साहिजेल । वरी जीवितही वेंचिजेल । याचिलागीं ॥ १२ ॥ परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्य भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ १३ ॥ तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें । जें वडिलां यां चिंतावें । विरुद्ध मनें ॥ १४ ॥ पुत्रातें इप्सी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जे निर्दाळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ १५ ॥ हें मनींचि केविं धरिजे । आपण वज्राचेयां बोलिजे । वरी घडे तरी कीजे । भलें एयां ॥ १६ ॥ आम्हीं जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें । काजीं यांच्या ॥ १७ ॥ आम्ही दिगंतीचे भूपाळ । विभांडूनि सकळ । मग संतोषविजे कुळ । आपुलें जें ॥ १८ ॥ तेचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत । जे जाहले असती उद्यत । झुंजावया ॥१९॥ अंतौरियां कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥२२०॥ ऐसियांतें कैसेनि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं । निज हृदया करूं । घातु केवीं ॥ २१ ॥

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः । मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

हे नेणसी तूं कवण । परी पैल भीष्म द्रोण । जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥ २२ ॥ एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती ॥ २३ ॥ अवधारीं अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । म्हणोनि दोष आथि वाचे । बोलतांचि ॥ २४ ॥

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन । अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

हे वरी भलतें करितु । आतांचि एथें मारितु । परि आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २५ ॥ त्रैलोक्यींचें अनकळित । जरी राज्य होईल एथ । तरी हें अनुचित । नाचरें मी ॥ २६ ॥ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे । सांगें मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा ॥ २७ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन । पापमेवाऽऽश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

जरी वधु करूनि गोत्रजांचा । तरी वसौटा होऊनि दोषांचा । मज जोडलासि तूं हातींचा । दूरी होसी ॥ २८ ॥ कुळहरणीं पातकें । तियें आंगीं जडती अशेखें । तये वेळीं तूं कवणें कें । देखावासी ॥ २९ ॥ जैसा उद्यानामाजीं अनळु । संचरला देखोनि प्रबळु । मग क्षणभरी कोकिळु । स्थिर नोहे ॥ २३० ॥ सकर्दम सरोवरु । अवलोकूनि चकोरु । न सेवितु अव्हेरु । करूनि निघे ॥ ३१ ॥ तयापरी तूं देवा । मज झकों न येसी मावा । जरी पुण्याचा बोलावा । नाशिजैल ॥ ३२ ॥

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् । स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

म्हणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाळ बहुतीं परी । दिसतसे ॥ ३३ ॥ तुजसीं अंतराय होईल । मग सांगें आमचें काय उरेल । तेणें दुःखें हियें फुटेल ।

ज्यांच्याकरितां आम्हांला राज्याची, भोगांची अथवा सुखांची इच्छा असावयाची, ते हे या युद्धामध्यें स्वतःचे प्राण आणि धन यांचा त्याग करून उभे आहेत. ३३.

त्या भोगांपासून मिळणाऱ्या सुखाच्या अभावीं, जो प्रसंग येऊन पडेल, तो वाटेल तसा बिकट असला तरीहि सहन करून घेतां येईल. इतकेंच काय? यांच्याकरितां आमचे प्राण खर्ची पडले तरी चालेल; २१२. पण यांचे प्राण घ्यावे आणि मग आपण राज्य भोगावें, ही गोष्ट माझें मन स्वप्नांत देखील करूं शकणार नाहीं. २१३. जर या वडील माणसांचें अहित मनानें चिंतावयाचें, तर आम्हीं जन्माला येऊन तरी उपयोग काय व आम्हीं जगावें तरी कोणासाठीं! २१४. कुळांतील लोक पुत्राची इच्छा करितात, त्याचें काय हेंच फल कीं, त्यानें आपले आप्तेष्टांचा केवळ वधच करावा? २१५. हें (मी आपल्या कुळाचा नाश राज्य मिळविण्याकरितां करीन असें) आपण मनांत तरी कसें आणावें? वज्रासारखे कठोर शब्द आपण कसे उच्चारावे? उलटपक्षीं, शक्यास आपण त्यांचें हितच करावें. २१६. आम्हीं जें जें मिळवावें, तें तें या सर्वांनीं (वास्तविक) भोगावयाचें आहे. यांच्या कामाकरितां आम्हीं आपले प्राणहि खर्चावयाचे आहेत. २१७. आम्ही देशोदेशींचे सर्व राजे युद्धांत जिंकून जें आपलें कुळ संतोषवावें, २१८. तेंच हें आमचें सर्व कुळ; पण कर्म कसें विपरीत आहे पहा! हे सर्व आपसांत लढावयास तयार झाले आहेत! २१९. बायका, मुलें, आपले खजिने हीं सर्व सोडून व तलवारीच्या धारेवर आपले प्राण ठेवून जे लढाईस तयार झाले आहेत, २२०. अशांना मी मारूं तरी कसा? मी कोणावर शस्त्र धरूं? (हे कौरव म्हणजे आम्हीच, तेव्हां यांना मारणें म्हणजे आपलाच घात करणें होय. या दृष्टीनें अर्जुन म्हणतो मी) आपल्या काळजाचा घात कसा करूं? २२१.

माझे गुरु, माझे पितृतुल्य स्वजन, पुत्र त्याचप्रमाणें आजे, मामे, सासरे, नातू, मेव्हणे आणि तसेंच संबंधी लोक, ३४.

हे कोण आहेत, तूं जाणत नाहींस काय? ज्यांचे आमच्यावर असामान्य उपकार आहेत, असे भीष्म व द्रोण, ते पलीकडे आहेत पहा. २२२. येथें (या सैन्यांत) मेहुणे, सासरे, मामे आणि हे इतर सर्व बंधु, पुत्र, नातू आणि केवळ इष्टहि आहेत. २२३. ऐक, अतिशय जवळचे असे हे आमचे सर्व सोयरे आहेत; आणि म्हणूनच (यांना मारावें असें) वाणीनें नुसतें बोलणें, हेंच पाप आहे. २२४.



हे मधुसूदना, मी मेलों तरी यांना ठार मारण्याची माझी इच्छा नाहीं. त्रैलोक्याचें राज्य मिळालें तरीहि (यांना मारण्याची माझी इच्छा नाहीं), मग पृथ्वीच्या राज्याची कथा काय? ३५.

उलटपक्षीं, हे वाटेल तें करोत, आतांच पाहिजे तर आम्हांस येथें मारोत; पण आम्ही यांच्या घाताची गोष्ट मनांतहि आणणें बरें नाहीं. २२५. त्रैलोक्याचें समग्र राज्य जरी येथें मिळणार असलें तरी हें अयोग्य काम मी करणार नाहीं. २२६. जर आज आम्ही येथें असें (यांच्याशीं झुंजणें व यांना मारणें) केलें, तर मग आमच्याविषयीं कोणाच्या मनांत आदर राहील? आणि मग कृष्णा! सांग, तुझें मुख कसचें दिसणार? (म्हणजे तूं आम्हांला अंतरशील). २२७.

हे जनार्दना, धृतराष्ट्रपुत्रांना मारून आमचें काय प्रिय होणार? ह्या आततायांना मारलें असतां आम्हांला (कुलनाशाचें) पाप मात्र लागेल. ३६.

जर मीं गोत्रजांचा वध केला, तर सर्व दोषांचें मी वसतिस्थान होईन आणि मग ज्या तुझी जोड मला लाभली आहे, तो तूं (माझ्या) हातचा जाशील. २२८. कुळाच्या घातानें घडणारीं सर्व पातकें, जेव्हां अंगीं जडतील तेव्हां तुला कोणीं कोठें पहावें? २२९. ज्याप्रमाणें बगीचाला भयंकर आग लागलेली पाहून कोकिळ तेथें क्षणभरहि थांबत नाहीं; २३०. चिखलानें भरलेलें सरोवर पाहून (कमलपत्रावर बसून चंद्रामृत सेवन करणारा) चकोर त्यांत न राहतां त्याचा त्याग करून तेथून निघून जातो; २३१. त्याप्रमाणें हे देवा, जर (माझ्या ठिकाणचा) पुण्याचा ओलावा नाहींसा झाला, तर तूं आपल्या मायेनें मला चकवून माझेकडे येणार नाहींस. २३२.

म्हणून आमचे बांधव जे कौरव, त्यांना मारणें आम्हांला योग्य नाहीं. कारण, हे माधवा, स्वजनांना ठार मारून आम्हीं कसे बरें सुखी होऊं? ३७.

म्हणून मी हें करणार नाहीं; या लढाईमध्यें हत्यार धरणार नाहीं. कारण, हें युद्ध पुष्कळ प्रकारांनीं निंद्य दिसत आहे. २३३. तुझ्याशीं ताटातूट होईल, तर मग सांग आमचें काय राहिलें? हे कृष्णा, तुझ्यावांचून त्या

तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥ म्हणऊनि कौरव हे वधिजती । मग आम्ही भोग भोगिजती । हे असो मात अघडती । अर्जुन म्हणे ॥ ३५ ॥

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः । कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

हे अभिमानमदें भुलले । जरी पां संग्रामा आले । तऱ्ही आम्हीं हित आपुलें । जाणावें लागे ॥ ३६ ॥ हें ऐसें कैसें करावें । जे आपुले आपण मारावे । जाणत जाणतांचि सेवावें । काळकूट ॥ ३७ ॥ हां जी मार्गी चालतां । पुढां सिंह जाहला अवचितां । तो तंव चुकवितां । लाभु आथी ॥ ३८ ॥ असता प्रकाशु सांडावा । मग अंधकूप आश्रावा । तरी तेथ कवणु देवा । लाभु सांगें ॥ ३९ ॥ का समोर अग्नि देखोनी । जरी न वचिजे वोसंडोनी । तरी क्षणा एका कवळूनि । जाळूं सके ॥ २४० ॥

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् । कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

तैसे दोष हे मूर्त । अंगीं वाजों असती पहात । हें जाणतांही केवीं एथ । प्रवर्तावें ॥४१॥ ऐसें पार्थ तिये अवसरीं । म्हणे देवा अवधारीं । या कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ ४२ ॥

कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः । धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

जैसें काष्ठें काष्ठ माथिजे । तेथ वन्हि एक उपजे । तेणें काष्ठजात जाळिजे । प्रज्वळलेनि ॥ ४३ ॥ तैसा गोत्रींची परस्परें । जरी वधु घडे मत्सरें । तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ॥ ४४ ॥ म्हणवूनि येणें पापें । वंशजधर्मु लोपे । मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजी ॥ ४५ ॥

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः । स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

एथ सारासार विचारावें । कवणें काय आचरावें । आणि विधिनिषेध आघवे । पारुषती ॥ ४६ ॥ असता दीपु दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे । तरी उजूचि का आडळिजे । जयापरी ॥ ४७ ॥ तैसा कुळीं कुळक्षयो होय । तये वेळीं तो आद्यधर्मु जाय । मग आन कांहीं आहे । पापावांचुनी ॥ ४८ ॥ जैं यमनियम ठाकती । तेथ इंद्रियें सैरा विचरती । म्हणऊनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियांसी ॥ ४९ ॥ उत्तम अधमीं संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म ॥ २५० ॥ जैसी चोहटाचिये बळी । पाविजे सैरा काउळीं । तैसीं महापापें कुळीं । प्रवेशती ॥ ५१ ॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च । पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां । येरयेरां नरका । जाणें आथी ॥५२॥ देखें वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतित । मग वोवांडिती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥ ५३ ॥ जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि नैमित्तिक कर्म पारुखे । तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ॥ ५४ ॥ तरी पितर काय करिती । कैसेनि स्वर्गी वसती । म्हणोनी तेही येती । कुळापासीं ॥ ५५ ॥ जैसा नखाग्रीं व्याळु लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं आब्रह्म कुळ आघवें । आप्लविजे ॥ ५६ ॥

( वियोग ) दुःखानें आमचें हृदय दुभंग होईल. २३४. एवढ्याकरितां कौरव मारले जावेत आणि आम्हीं (राज्य) भोग भोगावेत, हें राहूं दे; ही गोष्ट घडणें अशक्य आहे, असें अर्जुन म्हणाला. २३५.

लोभाच्या योगानें अंतःकरण भ्रष्ट झालेल्या यांना (कौरवांना) जरी कुलक्षय केल्यानें होणारा दोष आणि मित्रद्रोहाचें पातक दिसत नाहीं, ३८.

हे कौरव अभिमानाच्या मस्तीनें बहकून जाऊन जरी लढण्याकरितां आले आहेत, तरी पण आम्हीं आपलें हित ( कशांत ) आहे, हें पाहिलें पाहिजे. २३६. आपलेच आप्तसंबंधी आपण मारावे, हें असें ( भलतेंच ) कसें करावें ? जाणूनबुजून हें कालकूट कसें घ्यावें ? २३७. अहो महाराज, रस्त्यानें चाललें असतां अकस्मात् सिंह आडवा आला, तर त्याला चुकवून जाण्यांतच हित आहे. २३८. असलेला उजेड टाकून अंधकूपाचा आश्रय केला, तर देवा, त्यांत काय हित आहे ? सांग बरें. २३९. किंवा समोर अग्नि पाहून त्याला चुकवून जर आपण पलीकडे गेलों नाहीं, तर तो एका क्षणांत आपणांस घेरून जाळून टाकील. २४०.

तरी कुलक्षय केल्यानें होणारा दोष जाणणाऱ्या आम्हाला देखील, हे जनार्दना, या पापापासून परावृत्त होण्याची जाणीव असूं नये काय ? ३९.

त्याचप्रमाणें हे मूर्तिमंत दोष ( आमच्या ) अंगावर आदळूं पहात आहेत; हें समजत असतांहि, या कामीं कसें प्रवृत्त व्हावें ? २४१. त्या वेळीं इतकें बोलून पार्थ म्हणाला, देवा, ऐक. मी तुला या पापाचा भयंकरपणा सांगतों. २४२.

कुलक्षय झाला असतां सनातन असे कुलधर्म नाश पावतात आणि धर्माचा नाश झाला असतां, अधर्म सर्व कुळ व्यापून टाकतो. ४०.

ज्याप्रमाणें लांकडानें लांकूड घांसलें असतां तेथें एक अग्नि उत्पन्न होतो आणि तो भडकला म्हणजे सर्व लांकडांना जाळून टाकतो; २४३. त्याप्रमाणें कुळामध्यें मत्सरानें एकमेकांनीं जर एकमेकांचा वध केला, तर त्या भयंकर महादोषानें कूळच नाशाला पावतें. २४४. म्हणून या पापानें वंशपरंपरागत आलेल्या धर्मांचा लोप होईल आणि मग कुळामध्यें अधर्मच माजेल. २४५.

अधर्मानें कुळ व्यापल्यानें, हे कृष्णा, कुलस्त्रिया बिघडतात. हे वार्ष्णेया, स्त्रिया बिघडल्यानें वर्णसंकर होतो. ४१.

तेथें सारासारविचार, कोणी कशाचें आचरण करावें व विधिनिषेध ( कर्तव्य काय, अकर्तव्य काय ), या सगळ्या गोष्टी बंद पडतात. २४६. जवळ असलेला दिवा मालवून मग अंधारांत वावरूं लागलें, तर ज्याप्रमाणें सरळ चाललें असतांच अडखळण्याचा प्रसंग येतो; २४७. त्याप्रमाणें ज्या वेळीं कुलक्षय होतो, त्या वेळीं कुळांत पहिल्यापासून चालत असलेल्या धर्मांचा लोप होतो. मग तेथें पापावांचून दुसरें काय असणार ? २४८. ज्या वेळीं इंद्रियें व मन यांचा निग्रह थांबतो, त्या वेळीं इंद्रियें स्वैर सुटतात आणि मग सहजच कुलीन स्त्रियांच्या हातून व्यभिचार घडतो. २४९. उच्च वर्णांच्या स्त्रिया नीच वर्णांच्या लोकांत शिरतात; अशा रीतीनें वर्ण एकमेकांत मिसळतात ( वर्णसंकर होतो ) व त्यामुळें जातिधर्म मुळापासून उखडले जातात. २५०. ज्याप्रमाणें चव्हाट्यावर ठेवलेल्या बळीवर चारी बाजूंनीं कावळे येऊन पडतात, त्याप्रमाणें मोठीं पापें ( अशा ) कुळांत शिरतात. २५१.

संकर झाला, म्हणजे तो सर्व कुळाला आणि त्या कुळाचा क्षय करणारांना हटकून नरकाला नेतो. पिंडदान व तर्पणादि क्रिया लुप्त झालेल्यांचे पितर पतन पावतात. ४२.

मग त्या संपूर्ण कुळाला आणि कुळघातकांना–दोघांनाहि–नरकाला जावें लागतें. २५२. पहा, ह्याप्रमाणें वंशांत वाढलेली सर्व प्रजा अधोगतीला जाते; आणि मग त्यांचे स्वर्गातील पूर्वज फिरून परत येतात. २५३. ज्या वेळीं रोज करावयाचीं धार्मिक कृत्यें बंद पडतात आणि प्रसंगविशेषीं करावयाचीं लोपतात, त्या वेळीं कोण कोणाला तिलोदक देणार ? २५४. असें झाल्यावर पितर काय करणार ? स्वर्गांत कसे राहणार ? म्हणून ते देखील (आपल्या) कुळापाशीं (नरकांत) येतात. २५५. ज्याप्रमाणें नखाच्या टोंकाला साप चावला, म्हणजे त्याचें विष शेंडीपर्यंत हां हां म्हणतां पसरतें, त्याप्रमाणें थेट ब्रह्मदेवापासूनचें पुढील सर्व कुळ ( अशा पातकानें ) बुडून जातें. २५६.

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः । उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन । नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

देवा अवधारीं आणीक एक । एथ घडे महापातक । जे संगदोषें हा लौकिक । भ्रंशु पावे ॥ ५७ ॥ जैसा घरीं आपुलां । बानिवसें वन्ही लागला । तो आणिकांहीं प्रज्वाळिला । जाळूनि घाली ॥ ५८ ॥ तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती । तेही बाधु पावती । निमित्तें येणें॥५९॥ तैसें नाना दोषें सकळ । अर्जुन म्हणे तें कुळ । मग महाघोर केवळ । निरय भोगी ॥ २६० ॥ पडिलिया तिये ठायीं । मग कल्पांतींहि उगंडु नाहीं । येसणें पतन कुळक्षयीं । अर्जुन म्हणे ॥६१॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् । यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

देवा हें विविध कानीं ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुपजे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारीं पां ॥ ६२ ॥ अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं तें तंव क्षणिक । ऐसें जाणतांही दोख । अव्हेरूं ना ॥ ६३ ॥ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दिठी सूदले । सांग पां काय येकुलें । घडलें आम्हां ॥ ६४ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः । धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

आतां यावरी जें जियावें । तयापासूनि हें बरवें । जे शस्त्रें सांडूनि साहावे । बाण यांचे ॥ ६५ ॥ तयावरी होय जितुकें । तें मरणही वरी निकें । परी येणें कल्मषें । चाड नाहीं ॥ ६६ ॥ ऐसें देखून सकळ । अर्जुनें आपुलें कुळ । मग म्हणे राज्य तें केवळ । निरयभोगु ॥ ६७ ॥ ऐसें तिये अवसरीं । अर्जुन बोलिला समरीं । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ ६८ ॥

संजय उवाच—एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् । विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥

मग अत्यंत उद्वेगला । न धरत गाहिंवरु आला । तेथ उडी घातली खालां । रथौनियां ॥ ६९ ॥ जैसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होय उपहतु । कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहीनु ॥ २७० ॥ नातरी महासिद्धिसंभ्रमें । जिंतला तापसु भ्रमें । मग आकळूनि कामें । दीनु कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु । दिसे जेथ रहंवरु । त्यजिला तेणें ॥ ७२ ॥ मग धनुष्य बाण सांडिले । न धरत अश्रुपात आले । ऐसें ऐकें राया तेथें वर्तलें । संजयो म्हणे ॥७३॥ आतां यावरी तो वैकुंठनाथु । देखोनि सखेद पार्थु । कवणेपरी परमार्थु । निरूपील ॥७४॥ ते साविस्तर पुढारी कथा । अति सकौतुक ऐकतां । ज्ञानदेव म्हणे आतां । निवृत्तिदासु ॥२७५॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ [ओंव्या २७५ श्लोक ४७.]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



कुलक्षय करणाऱ्यांच्या या वर्णसंकर करणाऱ्या दोषांनीं शाश्वत अशा जातिधर्माचा आणि कुल-धर्माचा नाश होतो. ४३. हे जनार्दना, ज्या मनुष्यांचे कुलधर्म नष्ट झाले आहेत, त्यांचा निश्चयेंकरून नरकामध्यें वास होतो, असें आम्हीं ऐकलें आहे. ४४.

देवा, ऐका. येथें आणखी एक महापातक होतें, तें हें कीं, त्या पतितांच्या संसर्गदोषानें लोकांचे आचारविचार चळतात (भ्रष्ट होतात.). २५७. ज्याप्रमाणें आपल्या घराला अकस्मात् अग्नि लागला म्हणजे तो भडकलेला अग्नि दुसऱ्या घरांनाहि जाळून टाकतो; २५८. त्याप्रमाणें त्या कुळाच्या संसर्गानें जे जे लोक वागतात, ते ते ह्या संसर्गरूपकारणानें दोषित होतात. २५९. तसें अर्जुन म्हणतो, अनेक दोषांमुळें मग त्या सर्व कुळाला भयंकर नरक भोगावा लागतो २६०. त्या ठिकाणीं पडल्यावर कल्पांतींदेखील त्याची सुटका होत नाहीं; एवढी कुलक्षयामुळें अधोगति होते, असें अर्जुन पुढें म्हणाला. २६१.

अहो, ज्याअर्थी आम्हीं राज्यसुखाच्या लोभानें स्वजनांना ठार मारण्यास उद्युक्त झालों आहोंत, त्याअर्थी खरोखर मोठें थोरलें पाप करण्याला तयार झालों आहोंत. ४५.

देवा, ऐक. हीं नानाप्रकारचीं (दोषांविषयींचीं) बोलणीं कानानें ऐकतोस पण अजूनपर्यंत तुला शिसारी येत नाहीं; तूं आपलें हृदय वज्रासारखें कठोर कां केलेंस? २६२. ज्या शरीराकरितां राज्यसुखाची इच्छा करावयाची, तें शरीर तर क्षणभंगूर आहे, असें कळत असताहि, अशा ह्या घडणाऱ्या महत्पातकांचा त्याग करूं नये काय? २६३. हे जे सर्व आपले वाडवडील जमले आहेत, त्यांस मारून टाकावें अशा बुद्धीनें त्यांजकडे पाहिलें, ही काय लहानसहान गोष्ट (पातक) आमच्या हातून घडली? तूंच सांग. २६४.

जर प्रतिकार न करणाऱ्या आणि निःशस्त्र अशा मला, हातांत शस्त्रें धारण करणारे कौरव रणामध्यें ठार मारतील, तर माझें कल्याण होईल. ४६.

आतां इतक्यावरहि जगण्यापेक्षां आपण शस्त्रें टाकून देऊन यांचे बाण सहन करावे हें चांगलें. २६५. असें केल्यानें जितकें दुःख भोगावें लागेल (तितकें सहन करावें इतकेंच काय; पण अशा करण्यानें) मृत्युहि जरी प्राप्त झाला, तथापि तो अधिक चांगला. परंतु असें हें पातक करण्याची आपणांस इच्छा नाहीं. २६६. याप्रमाणें अर्जुनानें आपलें सर्व कूळ पाहून म्हटलें कीं, (यांचा नाश करून मिळविलेलें राज्य म्हणजे केवळ) नरकभोग आहे. २६७.

संजय म्हणाला, रणामध्यें याप्रमाणें बोलून शोकानें ज्याचें चित्त व्यापिलें आहे असा अर्जुन धनुष्य आणि बाण टाकून (रथाखालीं उडी टाकून) रथाच्या मागच्या भागाजवळ बसला. ४७.

संजय धृतराष्ट्राला म्हणाला, ऐक. असें त्या वेळीं अर्जुन समरांगणावर बोलला. २६८. मग अर्जुन अत्यंत खिन्न झाला व त्याला अनिवार गहिंवर आला; मग त्यानें रथावरून खालीं उडी घातली. २६९. ज्याप्रमाणें अधि-कारावरून दूर झालेला राजपुत्र सर्व प्रकारांनीं निस्तेज होतो किंवा जसा राहूनें ग्रासलेला सूर्य तेजरहित होतो. २७०. अथवा महासिद्धींच्या मोहानें पछाडलेला तपस्वी भुलतो आणि मग कामनेच्या तडाक्यांत सांपडून दीन होतो २७१. त्याप्रमाणें त्यानें जेव्हां रथाचा त्याग केला, तेव्हां तो अर्जुन दुःखानें फार पिडलेला दिसला; २७२. मग धनुष्यबाण त्यानें टाकून दिले व त्याच्या डोळ्यांना अनिवार पाणी आलें. संजय म्हणाला, राजा, ऐक. तेथें अशी गोष्ट घडली. २७३. आतां यावर तो वैकुंठपति कृष्ण अर्जुनाला खिन्न झालेला पाहून कोणत्या प्रकारें परमार्थाचा उपदेश करील, २७४ ती आतां पुढें येणारी सविस्तर कथा ऐकावयास फार कौतुककारक आहे, असें निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. २७५.



मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । इतुलालें दुर्जी सूत्र । उभारलें ॥ अ. १८–१४३६.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मताप्रमाणें गीतेंत कर्म, उपासना व ज्ञान या तिन्ही मार्गांची जरी चर्चा असली, तरी गीताशास्त्र हें मुख्यतः ज्ञानप्रधान असून जिवाला अपेक्षणीय असलेल्या मोक्षाची प्राप्ति करून देण्याच्या बाबतींत तें स्वतंत्र आहे. या अध्यायांत सांख्यशास्त्राचा अभिप्राय सांगून बुद्धियोगहि भगवंतांनीं थोडक्यांत सांगितला आहे. त्याचा अनुवाद ज्ञानदेवांनीं कसा केला आहे हें आपण पाहूं.

रणक्षेत्रांवर आपल्यासमोर उभा असलेला सर्व आप्तसमुदाय पाहून अर्जुनाच्या ठिकाणीं अनिवार शोक व करुणा उत्पन्न होऊन चिखलांत रुतलेल्या राजहंसाप्रमाणें त्याची स्थिति झाली. ती पाहून, त्याला त्या महामोहांतून सोडविण्याकरितां भगवंतांनीं उपदेश करण्यास या अध्यायांत सुरुवात केली आहे. ( १-५ ) प्रथमतः अर्जुनाला त्याच्या शौर्य, सामर्थ्य व पराक्रम या गुणांची आठवण करून देऊन 'सांप्रतचे प्रसंगीं निशःस्त्र होणें हें पंढासारखें आहे, त्यामुळें तुझी असलेली प्रतिष्ठा तर जाईलच; परंतु ज्या इहपरलोकाची तुला काळजी लागली आहे, ते दोन्ही लोक तुला अंतरतील' असें सांगितलें. ( ६-२७ ) तरी देखील अर्जुन देवालाच उलट शिकवतांना दिसतो. 'देवा हें युद्ध नाहीं, हें मोठें पातक घडत आहे. इष्टमित्र, सोयरे, भीष्म-द्रोणासारखे पूज्य गुरुजन यांचा वध माझ्याहातून होत आहे. छे. असलें पाप करण्यापेक्षां भीक मागितलेली बरी.' ( २८-४६ ) असें म्हणून त्यानें देवाकडे पाहिलें, तेव्हां देवाला आपलें म्हणणें पटत नाहीं असें त्याला दिसलें. या वेळीं मात्र अधिक कांहीं न बोलतां आपला देवाच्या ठिकाणीं असलेला अनन्य भाव प्रगट करून तो देवाला शरण गेला व 'मला तर माझें हित कळत नाहीं, तूंच मला योग्य व धर्म्य काय आहे तें सांग.' असें विनवून म्हणाला. ( ४७-६३ ) देव जणूंकाय शरणागतीची वाटच पहात होते. ज्ञानदेवांनीं मोठें सुंदर रूपक करून मोहरूपी सर्पदंश झालेल्या अर्जुनाच्या मदतीला, ज्याच्या नुसत्या दृष्टिक्षेपांतच, तें विष उतरविण्याचें सामर्थ्य आहे, असे भगवानरूपी गारुडी कसे धावले याचें वर्णन केलें आहे. ( ६४-८० ) अध्यात्माच्या बैठकीवरून केलेल्या उपदेशास येथूनच सुरुवात झाली आहे. एथपर्यंतचें देवाचें बोलणें वरवरच्या उपचाराप्रमाणें होतें. परंतु सद्वैद्य जसा असाध्य रोग असला, म्हणजे खोलवर जाऊन निदान करतो व दिव्यौषधाची योजना करतो, तसें अर्जुनाचें 'मी लढणार नाहीं, मला पाप लागेल.' याचें खोलवर जाऊन निदान करून यापुढें भगवंतांनीं उपदेश केला आहे. ( ८१-९० ) सुरुवातीसच अर्जुनाच्या डोळ्यांवर आलेली अहंतेची झांपड घालविण्याकरितां मात्रेचे चांगले दोन वळसे दिले आहेत. 'मी मारले तरच हे मरतील' या अर्जुनाच्या घमेंडीवर प्रहार करून 'या जगाचा सर्वशक्तिमान, समर्थ असा ईश्वर चालक असून, त्याच्या संकल्पाप्रमाणें सर्व सृष्टीच्या उत्पत्तिनाशाचा क्रम अव्याहतपणें चालला असून तूं आपल्या ठिकाणीं 'यांना मी मारीन व मला पाप लागेल' अशी फुकट अहंता कां घेत आहेस ! ( ९१-१०२ ) तूं भ्रांतीला वश होऊन देह व इंद्रियें यांच्यावर दृष्टि ठेवली आहेस, म्हणून तुला जन्ममृत्यु दिसतात; परंतु जे या देह व इंद्रियांच्या तडाक्यांतून सुटतात, त्यांना फक्त एक आत्माच दिसतो. ( १०३-१२४ ). आतां हें खरें कीं देहादि उपाधि व चैतन्य यांची सरमिसळ झाली आहे व ती वेगळीक करणें कठीण आहे; पण जे संत आहेत, त्यांना विवेकाची कांस धरून या फुटक्या उपाधींतील शाश्वत, सर्वव्यापी, जन्ममरणरहित चैतन्याची ओळख करून घेणें शक्य आहे. ( १२५-१३२ ) कोणत्याहि शस्त्रानें या सर्वांच्या अंतर्यामी वसत असणाऱ्या चैतन्याचा घात करूं गेलें तरी होणें शक्य नाहीं. ( १३३-३५ ) शस्त्रानें नाश फक्त शरीराचा होतो व शस्त्र टाकून देऊन शरिराचा नाश करण्याचें टाळलें तरी आज ना उद्यां तें शरीर पडणारच. नासणें हा त्याचा स्वभावच आहे. ( १३६.) जुनी वस्त्रें फाटलीं म्हणजे मनुष्य नवीन घेतो, तसे हे चैतन्याच्या ठिकाणीं अनेक देह जातात व येतात. आकाशांत मेघ येतात व जातात. त्याप्रमाणें या सृष्टीची मायेच्यामुळें घडामोड झालेली दिसते. ( १३७-१६८ ). म्हणून आत्मा अमर आहे, या दृष्टीनें विचार केला काय अथवा शरीर जाणारेंच आहे म्हणून विचार केला काय, तुला शोकाला अवसर नाहीं, म्हणून तुला लढणें हेंच श्रेयस्कर आहे.'

येथपर्यंत अविनाशी आत्मा व नाशिवंत परंतु पुनः जन्माला येणारा देह, यांचा विचार स्पष्टपणें सांगून यापुढें अर्जुनाला ज्या धर्माची काळजी लागली होती, त्याचा विचार भगवंतांनीं सांगितला आहे. (१६९–१८०) 'क्षत्रियांना या जगांत युद्धासारखें दुसरें आणखी धर्म्य व उचित नाहीं.' याकरितां मोठा उचित दृष्टान्त श्रीज्ञानदेवांनीं योजला आहे. 'गाईचें दूध एऱ्हवीं कितीहि उत्कृष्ट असलें तरी नवज्वराच्या रोग्याला दिलें तर तें जसें मारक होतें तसें करुणा, दया हे ब्राह्मणाचे गुण क्षत्रियानें युद्धाच्या वेळीं अंगिकारले तर त्यांत त्याचा संपूर्ण नाश होईल.' (१८१–१८५) बहुत पुण्य करावें त्या वेळीं क्षत्रियांना असला युद्धाचा प्रसंग येतो व तूं तर तो टाकून जात आहेस. पूर्वपुण्याचा नाश होऊन तुझी थोर कीर्ति यामुळें मातींत मिळणार आहे. (१८६–२१७) शिवाय हे कौरव तुला तसे मोकळे सोडणार आहेत थोडेच! तुला धरून आणून तुझी बेअब्रू करतील. थोडक्यांत सांगायचें म्हणजे या तुझ्या शस्त्रसंन्यासामुळें कीर्ति जाऊन अपकीर्ति व अधर्म तुझ्या वांट्याला येणार आहे. (२१७–१९) यापेक्षां युद्ध केलेंस तर कोणत्याहि दृष्टीनें बघितलें तरी तुझा फायदाच आहे. लढतां लढतां मरण आलें तर स्वर्ग मिळेल. जय मिळाला तर राज्य ठेवलें आहेच. (२२०–२५) म्हणून जय झाला काय किंवा अपजय झाला काय, तुझें कल्याणच आहे. ही समत्वबुद्धि ठेवून उचित अशा धर्म्ययुद्धाला पुन्हां प्रवृत्त हो व जें प्राप्त होईल तें निमूटपणें सहन करणें श्रेयस्कर आहे. त्यांत पाप बिलकूल लागणार नाहीं. (२२६–२९)

थोडक्यांत सांख्यस्थिति सांगितली; आतां वज्रकवचाप्रमाणें अभेद्य व रक्षण करणारा जो निष्काम कर्मयोग तो तुला सांगतों; असें म्हणून त्याची चर्चा करण्यास देवांनीं आरंभ केला. (२३०–३१.) 'ईश्वरावांचून ज्या बुद्धीला दुसरा आधार नाहीं त्या अनासक्त बुद्धीनें स्वधर्माचरण करण्याची हातवटी कां एकदां प्राप्त झाली म्हणजे या प्रपंचाच्या उपाधींत असूनहि ती उपाधि मनुष्याला बाधा करूं शकत नाहीं. (२३२–४२) परंतु ईश्वराला सोडून व वेदाच्या अर्थवादांत सांगितलेल्या मनोहर दिसणाऱ्या स्वर्गसुखाला भुलून जे त्याच्या मागें लागणारे दुर्बुद्धि लोक या जगांत आहेत, त्यांची तूं संगत धरूं नकोस. (२४३–५९.) वेदांत अधिकारपरत्वें अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. तुला मात्र निष्काम कर्म करणेंच योग्य आहे. (२६०–६७) ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलें कर्म जरी दैववशांत असांग राहिलें तरी तें ईश्वराच्या ठिकाणीं प्रविष्ट झालें असल्यामुळें तें परिपूर्णच आहे. (२६८–७२) अशा बुद्धीनें कर्म करणें हें योगाचें सार आहे. (२७३.) देह व इंद्रियें यांच्यावर तुझी बुद्धि स्थित आहे, म्हणून तिला मोह उत्पन्न झाला आहे. ती बुद्धि जेव्हां शुद्ध होईल, त्या वेळीं तुला या योगस्थितीचा म्हणजे साक्षात् समाधीचा अनुभव येईल.' (२७४–८४) समाधीचें हें अद्भुत वर्णन ऐकल्याबरोबर अर्जुनाच्या तोंडाला पाणी सुटलें व त्यानें 'या समाधिसुखाचा निरंतर अनुभव कोणी घेतला आहे कां? त्यांची स्थिति व आचरण, देवा, मला सांगाल कां?' अशी देवाला विनवणी केली. (२८५–८९) येथून पुढें देव समाधिस्थ अथवा स्थितप्रज्ञांचीं लक्षणें सांगत आहेत. (२९०) 'देहरूपी प्रपंचाची उपाधि सोडून अंतर्यामीच्या आनंदानें जो तृप्त आहे; कोणतीहि कामना ज्याला शिवत नाहीं; देहावर दुःखाचे कितीहि प्रसंग आले तरी ज्याचें चित्त महासुखांत निमग्न असतें. उद्विग्न होत नाहीं–आपल्या आनंदाचा प्रकाश चंद्राप्रमाणें जो सर्वांना सारखा देतो, योगी लोकांनाहि दुर्दम्य अशीं इंद्रियें ज्याच्या स्वाधीन आहेत; मला हृदयांत सांठविल्यामुळें रस-विषयासारख्या रसाचीहि त्याच्यापुढें मातब्बरी नाहीं.' (२९१–३१७) या ठिकाणीं भगवंतांनीं ज्यांच्या ठिकाणीं मनाची चंचलता असल्यामुळें इंद्रियनिग्रह नाहीं त्यांना सुखलेशहि मिळत नाहीं. (३१८–३३०) याचें वर्णन करून प्राप्तस्थितीच्या जवळ आलेल्या पुरुषांनाहि इंद्रियनिग्रहाची केवढी आवश्यकता आहे याचें प्रतिपादन केलें आहे. (३३०–३५०) विषयाची नुसती आठवण जरी चित्तांत राहिली तरी संपूर्ण नाशाचें तें बीज आहे; परंतु हे स्थितप्रज्ञ पुरुष सदा जागे राहिलेले असतात. (३५१–३५६) ते अनंत सुखसमुद्रांत बुडी देऊन राहिल्यामुळें ऋद्धिसिद्धीसारखें ऐश्वर्यही ज्यांच्या खिजगणतींत येत नाहीं. (३५७–३६५) असें परमानंदानें पुष्ट झालेले पुरुष जगद्रूप बनून जगतांतच राहतात. (३६६–६७) या बोधावर सर्व काळ असल्यामुळें देहपात व्हावयाचा प्रसंग आला तरी त्यांच्या चित्तांत कोणतीच गडबड न उडतां, खपली पडावी तसा त्यांचा देह न कळत पडतो. (३६८–६९) देवाचें हें बोलणें ऐकून अर्जुनाला मनांतून हर्ष झाला. त्याच्या मनांत होतें तेंच देवानें सांगितलें असें त्याला वाटलें. (३७०–७३) हा विचार देवाला अर्जुन पुढच्या अध्यायांत सांगेल.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दुसरा

संजय उवाचः—तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् । विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

मग संजयो म्हणे रायातें । आइकें तो पार्थु तेथें । शोकाकुल रुदनातें । करितुसे ॥ १ ॥ तें कुळ देखोनि समस्त । स्नेह उपनलें अद्भुत । तेणें द्रवलें असे चित्त । कवणेपरि ॥ २ ॥ जैसें लवण जळें झळंबलें । ना तरीं अभ्र वातें हालें । तैसें सधीर परी विरमलें । हृदय तयाचें ॥ ३ ॥ म्हणोनी कृपा आकळिला । दिसतसे अति कोमाइला । जैसा कर्दमीं रुपला । राजहंस ॥ ४ ॥ तयापरी तो पांडुकुमरु । महामोहें अति जर्जरु । देखोनी श्रीशार्ङ्गधरु । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाचः—कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् । अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

म्हणे अर्जुना आदि पाहीं । हें उचित काय इये ठायीं । तूं कवण हें कायी । करीत, आहासी ॥६॥ तुज सांगें काय जाहलें । कवण उणें आलें । करितां काय ठेलें । खेदु कायिसा ॥७॥ तूं अनुचिता चित्त नेदिसी । धीरु कंहींच न संडिसी । तुझेनि नामें अपयशीं । दिशा लंघिजे ॥८॥ तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजीं रावो । तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ॥ ९ ॥ तुवां संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । पवाडा तुवां केला । गंधर्वांसी ॥ १० ॥ हें पाहतां तुझेनि पाडें । दिसे त्रैलोक्यही थोकडें । ऐसें पौरुष चोखडें । पार्था तुझें ॥११॥ तो तूं कीं आजि एथें । सांडूनिया वीरवृत्तीतें । अधोमुख रुदनातें । करितु आहासी ॥१२॥ विचारीं तूं अर्जुनु । कीं कारुण्यें कीजसी दीनु । सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला आथी ॥१३॥ ना तरी पवनु मेघासी बिहे । कीं अमृतासी मरण आहे । पाहें पां इंधनाचि गिळोनि जाये । पावकातें ॥१४॥ कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गें काळकूट मरे । सांग महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ॥१५॥ सिंहासी झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कां जाहला । परी तो त्वां साच केला । आजि एथ ॥१६॥ म्हणोनि अझुनी अर्जुना । झणें चित्त देसी या हीना । वेगीं धीर करूनियां मना । सावधान होईं ॥१७॥ सांडीं हें मूर्खपण । उठीं घे धनुष्यबाण । संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ॥१८॥ हां गा तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां । सांगें झुंजावेळे सदयता । उचित कायी ॥१९॥ हे असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु । म्हणे जगन्निवासु । अर्जुनातें ॥२०॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दुसरा

संजय म्हणाला, करुणेनें व्याप्त झालेल्या, अश्रुपूर्ण आणि व्याकुळ नेत्र झालेल्या आणि विषाद पावलेल्या, त्या अर्जुनाला भगवान् कृष्ण पुढील वाक्य बोलले. १.

मग संजय राजाधृतराष्ट्राला म्हणाला, ऐक. तो शोकानें व्याप्त झालेला अर्जुन त्या वेळीं रडूं लागला. १. तो सर्व आप्तसमुदाय पाहून (त्याला) विलक्षण मोह उत्पन्न झाला. त्यायोगानें त्याचें चित्त द्रवलें. कसें म्हणाल तर, २. ज्याप्रमाणें पाण्यानें मीठ विरघळतें किंवा वाऱ्यानें मेघ हालतात, त्याप्रमाणें त्याचें हृदय खंबीर खरें परंतु त्या वेळीं द्रवलें; ३. म्हणून मोहाधीन झालेला (तो अर्जुन) चिखलांत रुतलेल्या राजहंसाप्रमाणें, अगदीं कोमेजून गेलेला दिसला. ४. पंडूचा पुत्र अर्जुन याप्रमाणें महामोहानें जर्जर झालेला पाहून शार्ङ्गधर काय बोलला (तें ऐका.) ५.

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, हे अर्जुना, आर्यांनी सेवन करण्याला अयोग्य, स्वर्गप्राप्तीला विघ्न करणारा आणि असलेली कीर्ति घालविणारा हा मूर्खपणा तुझ्या मनांत या लढाईच्या वेळीं कोठून उद्भवला ? २.

तो म्हणाला, अर्जुना, ह्या ठिकाणीं हें करणें योग्य आहे काय ? तूं कोण आहेस आणि हें काय करीत आहेस त्याचा अगोदर विचार कर. ६. सांग, तुला झालें तरी काय ? काय कमी पडलें ? काय करावयाचें चुकलें ? हा खेद कशाकरितां ? ७. तूं अयोग्य गोष्टीकडे लक्ष देत नाहींस; कधींहि धीर सोडीत नाहींस, तुझें नांव ऐकल्याबरोबर अपयशानें देशोधडीस पळून जावें. ८. तूं शूरवृत्तीचें (शौर्याचें) ठिकाण आहेस; क्षत्रियांचा राजा आहेस; तुझ्या पराक्रमाचा दबदबा तिन्ही लोकांत आहे. ९. तूं युद्धांत शंकराला जिंकलेंस; निवातकवचांचा मागमूस नाहींसा केलास; तूं गंधर्वांवरहि पराक्रम गाजविलास; १०. तुझ्या मानानें पाहिलें असतां, हें त्रैलोक्यहि लहानच (तुच्छ असें) वाटतें. पार्था, तुझा पराक्रम असा चांगला आहे. ११. (पण) तोच तूं या वेळीं आपला वीरपणा टाकून, खालीं मान घालून रडत आहेस ! १२. विचार कर. तूं (प्रत्यक्ष) अर्जुन, आणि करुणेनें तुला दीन करून सोडावें ! सांग बरें, अंधकार सूर्याला कधीं ग्रासील काय ? १३. अथवा वारा मेघास कधीं भ्याला आहे का ? किंवा अमृताला मरण आहे का ? अरे विचार कर, लांकूडच अग्नीला गिळून टाकील का ? १४. किंवा मिठानें पाणी विरेल का ? दुसऱ्याच्या संसर्गानें काळकूट मरेल काय ? सांग बरें बेडूक महासर्पाला गिळील का ? १५. कोल्हा सिंहाबरोबर झोंबी करील काय ? असें अघटित कधीं घडलें आहे काय ? पण तो अघटित प्रकार तूं आज येथें खरा करून दाखविलास. १६. म्हणून, अर्जुना, अजून तरी या अनुचित गोष्टीकडे तूं लक्ष देऊं नकोस; तूं लवकर आपल्या मनाला खंबीर करून सावध हो. १७. हा मूर्खपणा सोडून दे. ऊठ, धनुष्य बाण (पुन्हां) हातीं घे. युद्धाच्या (ऐन) वेळीं ही कोण करुणा तुझी ! (अशा भलत्या वेळीं तिचें काय प्रयोजन ?) १८. अरे, तूं जर चांगला जाणता आहेस; तर मग आतां विचार करून कां पहात नाहींस ? युद्धाच्या वेळीं कारुण्य उचित आहे काय ? बोल. १९. जगन्निवास (पुढें) अर्जुनाला म्हणाला, (या वेळची तुझी दया) ही (तुझ्या) असलेल्या कीर्तीचा नाश करणारी व परलोकाला मुकविणारी आहे. २०.

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते । क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

म्हणोनि शोकु न करीं । तूं पुरता धीरु धरीं । हे शोच्यता अव्हेरीं । पंडुकुमरा ॥ २१ ॥ तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें बहुत । तूं अझुनिवरी हित । विचारीं पां ॥२२॥ येणें संग्रामाचेनि अवसरें । एथ कृपाळुपण नुपकरे । हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ॥ २३ ॥ तूं आधींचि काय नेणसी । कीं हे गोत्र नोळखसी । वायांचि काय करिसी । अतिशो आतां ॥ २४ ॥ आजिचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज । हें परस्परें तुम्हां व्याज । सदाचि आथी ॥ २५ ॥ तरी आतां काय जाहलें । कायि स्नेह उपनलें । हें नेणिजे परी कुडें केलें । अर्जुना तुवां ॥ २६ ॥ मोह धरिलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल । आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसी ॥ २७ ॥ हृदयाचें ढिलेपण । एथ निकयासि नव्हे कारण । हें संग्रामीं पतन जाण । क्षत्रियांसीं ॥ २८ ॥ ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवतु । हें ऐकोनि पंडुसुतु । काय बोले ॥ २९ ॥

अर्जुन उवाचः—कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन । इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥४॥

देवा हें येतुलेवरी । बोलावें नलगे अवधारीं । आधीं तूंचि चित्तीं विचारीं । संग्रामु हा ॥ ३० ॥ हें झुंज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु । हा उघडा लिंगभेदु । वोढवला आम्हां ॥३१॥ देखें मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोष पावविजती । तियें पाठीं केवीं वधिजती ॥ आपुलां हातीं ॥३२॥ देवा संतवृंद नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे । हें वांचूनि केवीं निंदिजे । स्वयें वाचा ॥३३॥ तैसे गोत्रगुरु आमुचे । हे पूजनीय आम्हां नियमाचे । मज बहुत भीष्म-द्रोणांचें । वर्ततसे ॥३४॥ जयांलागीं मनें विरु । आम्ही स्वप्नींही न शकों धरूं । तयां प्रत्यक्ष केवीं करूं । घातु देवा ॥३५॥ वर जळो हें जियालें । एथ आघवेयांसि हेंचि काय जाहलें । जे यांच्या वधीं अभ्यासिलें । मिरविजे आम्हीं ॥३६॥ मी पार्थु द्रोणाचा केला । येणें धनुर्वेदु मज दिधला । तेणें उपकारें काय आभारैला । वधीं तयातें ॥ ३७ ॥ जेथींचिया कृपा लाभिजे वरु । तेथेंचि मनें व्यभिचारु । तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ॥ ३८ ॥ देवा समुद्र गंभीर आइकिजे । वर तोहि आहाच देखिजे । परी क्षोभु मनीं नेणिजे । द्रोणाचिये ॥३९॥ हें अपार जें गगन । वर तयाही होईल मान । परि अगाध भलें गहन । हृदय याचें ॥ ४० ॥ वरी अमृतही विटे । कीं काळवशें वज्र फुटे । परी मनोधर्मु न लोटे । विकरविला हा ॥४१॥ स्नेहालागीं माये । म्हणिपे तें कीरु होये । पण कृपा ते मूर्त आहे । द्रोणीं इये ॥ ४२ ॥ हा कारुण्याची आदि । सकळ गुणांचा निधि । विद्यासिंधु निरवधि । अर्जुन म्हणे ॥४३॥ हा येणें मानें महंतु । वरी आम्हांलागीं कृपावंतु । आतां सांग पां येथ घातु । चिंतूं येईल ॥४४॥

गुरूनहत्वा हि महानुभावान्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥
हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

ऐसे हे रणीं वधावे । मग आपण राज्यसुख भोगावें । तें मना नये आघवें । जीवितेंसीं ॥४५॥

**हे पार्था, दुबळेपणाचा त्याग कर. हा तुला शोभत नाहीं. असा हृदयाचा क्षुद्र ढिलेपणा टाकून देऊन, हे अर्जुना, ( युद्धाला ) ऊठ. ३.**

म्हणून तूं शोक करूं नकोस; पुरता धीर धर; अर्जुना, हा खेद टाकून दे. २१. तुला हें योग्य नाहीं. (आजपर्यंत) जें काय पुष्कळ ( यश वगैरे ) तूं जोडिलें आहेस, त्याचा येणेंकरून नाश होईल. तूं अजून तरी आपल्या हिताचा विचार कर. २२. लढाईच्या या ऐन प्रसंगीं कृपाळूपणा कामाचा नाहीं. हे तुझे आतांच का सोयरे झाले आहेत ? २३. पूर्वीच तूं हें जाणत नव्हतास कां ? किंवा या भाऊबंदांची ओळख तुला नव्हती कां ? आतांच ( त्यांच्या-बद्दल ) विनाकारण हा फाजील कळवळा कां ? २४. आजचें हें युद्ध तुला जन्मांत नवीन कां आहे ? तुम्हां एकमेकांना लढावयास निमित्त हें नेहमींचेंच आहे. २५. मग आतांच काय झालें ? ही ममता कोठून उत्पन्न झाली, हें मला कांहींच कळत नाहीं; पण अर्जुना, वाईट केलेंस तूं. २६. ही ममता धरल्यास असें होईल कीं, असलेली प्रतिष्ठा जाईल आणि तूं इहलोकासह परलोकास अंतरशील. २७. ह्या वेळीं अंतःकरणाचा ढिलेपणा हा कांहीं चांगलें होण्याला कारण होणार नाहीं; लढाईत ढिलेपणा ठेवल्यानें क्षत्रियांना अधोगति आहे असें समज. २८. याप्रमाणें त्या कृपाळू श्रीकृष्णानें अनेक प्रकारांनीं अर्जुनाला बोध केला. तो बोध ऐकून अर्जुन काय म्हणाला ? २९.

**अर्जुन म्हणाला, हे मधुसूदना, पूजनीय अशा भीष्मावर आणि द्रोणावर युद्धामध्यें उलट बाण टाकून मी कसें बरें युद्ध करूं ? ४.**

देवा, ऐक, इतकें बोलण्याचें कांहीं कारण नाहीं. आधीं तूंच चित्तांत विचार कर, हें युद्ध आहे कां ? ३०. हें युद्ध नव्हे; ही मोठी चूक आहे. ही करण्यांत दोष दिसत आहे. हें उघड उघड थोरांच्या उच्छेदाचें कृत्य आमच्यावर येऊन पडलें आहे. ३१. पहा, आईबापांची सेवा करावी, सर्व प्रकारें त्यांस संतोषवावें आणि पुढें आपल्याच हातांनीं त्यांचा वध कसा बरें करावा ? ३२. देवा, संतसमुदायाला वंदन करावें, अथवा घडलें तर त्यांचें पूजन करावें; ( पण ) हें टाकून आपणच वाचेनें त्यांची निंदा कशी करावी ? ३३. त्याप्रमाणें आमचे भाऊबंद व गुरु आम्हांला अवश्य पूज्य आहेत. भीष्म व द्रोण यांचा तर मी किती तरी ऋणी आहें ! ३४. ज्यांच्या-विषयीं मनानें वांकडेपणा आम्हांला स्वप्नांतहि धरतां याव-याचा नाहीं, त्यांचा, देवा, आम्हीं प्रत्यक्ष घात कसा बरें करावा ? ३५. यापेक्षां आग लागो या जिण्याला ! सगळ्यां-नाच आज असें काय झालें आहे ? जो आम्हीं ( शस्त्र-विद्येचा ) अभ्यास केला, त्याची प्रतिष्ठा यांचा वध करून मिरवावयाची कां ? ३६. मी पार्थ द्रोणांनीं तयार केलेला (त्यांचा चेला) आहें. त्यांनींच मला धनुर्विद्या दिली. त्या उपकारांनीं बद्ध होऊन मी त्यांचा वध करावा काय ? ३७. अर्जुन म्हणाला, ज्यांच्या कृपेनें वराची प्राप्ति करून घ्यावी, त्यांच्यावरच मनानें उलटावें, तर मी काय भस्मासूर आहें ? ३८. देवा, समुद्र गंभीर आहे, असें ऐकतों तथापि तोहि तसा वरवरच आहे, असें दिसतें. परंतु या द्रोणाचार्यांच्या मनाला क्षोभ कसा तो ठाऊकच नाहीं. ३९. हें आकाश अमर्याद आहे खरें, पण ( कदाचित् ) त्याचेंहि मोजमाप होईल; पण यांचें हृदय अत्यंत गहन व अगाध आहे (त्याचा ठाव लागावयाचा नाहीं.) ४०. एक वेळ अमृतहि विटेल, किंवा कालवशात् वज्र भंगेल; पण यांच्या मनांत विकार उत्पन्न करण्याचा कसाहि प्रयत्न जरी केला, तरी यांचें मन आपला धर्म सोडणार नाहीं. ४१. ममता आई-नेंच करावी असें म्हणतात, तें खरें आहे; परंतु या द्रोणा-चार्यांचे ठिकाणीं ममता ही तर मूर्तिमंत आहे. ४२. अर्जुन म्हणाला, हे दयेचें माहेरघर, सर्व गुणांचें भांडार, विद्येचा अनंत सागर आहेत. ४३. इतके हे मोठे आहेत, शिवाय आमच्यावर यांची ( विशेष ) कृपा आहे. अशा स्थितींत यांच्या घाताची कल्पना तरी मनांत आणतां येईल कां ? सांग. ४४.

**महान् योग्यतेच्या अशा गुरुजनांना न मारतां या लोकीं भिक्षावृत्तीचें देखील सेवन करणें श्रेयस्कर आहे. गुरुजनांचा वध केला तर, त्यांच्या रक्तानें माख-लेले विषयोपभोग भोगतां येतील. पण ते लिप्त कसे सेवन करावेत ? ५.**

अशा यांना समरांगणीं मारावें आणि मग आपण राज्यसुखाचा उपभोग घ्यावा, ही गोष्ट अंतःकरणापासून मनांत येत नाहीं. ४५. द्रोणाचार्यांसारख्यांस मारावें,

हें येणें मानें दुर्भर । जे याहीहुनि भोग सधर । ते असतु येथवर । भिक्षा मागतां भली ॥४६॥ ना तरी देशत्यागें जाइजे । का गिरिकंदर सेविजे । परी शस्त्र आतां न धरिजे । इयांवरी ॥४७॥ देवा नवनिशतीं शरीं । वावरोनी यांच्या जिव्हारीं । भोग गिंवसावे रुधिरीं । बुडाले जे ॥४८॥ ते काढूनि काय कीजती । लिप्त केवीं सेविजती । मज नये हे उपपत्ति । याचिलागीं ॥४९॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ॥
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

ऐसें अर्जुन तिये अवसरीं । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं । परि तें मना नयेचि मुरारी । आइकोनियां ॥५०॥ हें जाणोनि पार्थु विहाला । मग पुनरपि बोलों लागला । म्हणे देवो कां चित्त या बोला । देतीचिना ॥५१॥ येऱ्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विचारुनि बोलिलों एथें । परी निकें काय यापरौतें । तें तुम्ही जाणा ॥५२॥ पैं विरु जयांसी ऐकिजे । आणि या बोलींचि प्राणु सांडिजे । ते एथ संग्रामव्याजें । उभे आहाती ॥५३॥ आतां ऐसेयांतें वधावें । कीं अव्हेरुनिया निघावें । या दोहींमाजीं काइ करावें । तें नेणों आम्ही ॥५४॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥

आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे येथ । जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥५५॥ तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे । मग पांसींच असतां न दिसे । वस्तुजात ॥५६॥ देवा मज तैसें जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥५७॥ तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें तें आम्हां सांगावें । जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ॥५८॥ तूं गुरु बंधु पिता । तूं आमची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ॥ ५९ ॥ जैसा शिष्यांतें गुरु । सर्वथा नेणे अव्हेरु । कीं सरितांतें सागरु । त्यजी केवीं ॥ ६० ॥ नातरी अपत्यातें माये । सांडूनि जरी जाये । तरी तें कैसेंनि जिये । ऐकें कृष्णा ॥ ६१ ॥ तैसा सर्वांपरी आम्हांसी । देवा तूंचि एक आहासि । आणि बोलिलें जरी न मनिसी । मागील माझें ॥ ६२ ॥

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ॥
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाऽऽधिपत्यम् ॥ ८ ॥

तरी उचित काय आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगें आतां ॥ ६३ ॥ हें सकळ कुळ देखोनि । जो शोकु उपजलासे मनीं । तो तुझिया वाक्यावांचुनि । न जाय आणिकें ॥ ६४ ॥ एथ पृथ्वीतळ आपु होईल । हें महेंद्रपदही पाविजेल । परि मोह हा न फिटेल । मानसींचा ॥ ६५ ॥ जैसीं बीजें सर्वथा आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जर्‍ही पेरिलीं । तरी न विरुढती सिंचलीं । आवडे तैसीं ॥६६॥ ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे । एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥६७॥ तैसें राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन नोहे जीवबुद्धि । एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ॥६८॥ ऐसें अर्जुन तेथ बोलिला । जंव क्षणएक भ्रांती सांडिला ।



तयापरी तो धनुर्धरु । जाहलासे दुःखें जर्जरु ।
जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु । वणवला का ॥
म्हणोनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु ।
तो बोळलासे श्रीगोपाळु । महामेघु ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय २ रा, ओवी ७६।७७

तेव्हां आपण राज्यसुख भोगावें; अशा प्रकारें राज्यसुख भोगणें हें दुर्घट आहे. आतां राज्यसुख भोगणेंच काय, पण याहूनहि अधिक श्रेष्ठ ( इंद्रपदादिक ) भोग मिळाले, तरी आम्हांला ते द्रोणाचार्यांसारख्यांची हत्या करून नकोत. यापेक्षां भीक मागितलेली बरी. ४६. अथवा देशत्याग करून जावें, किंवा गिरिकंदरांचा आश्रय करावा; पण यांच्यावर आतां शस्त्र धरूं नये. ४७. देवा, नवीन धार लावलेल्या बाणांनीं यांच्या मर्मस्थानावर प्रहार करून ( मग मेलेल्यांच्या ) रक्तांत बुडालेले जे भोग (राज्यसुखें) शोधावयाचे, ४८. ते मिळवून तरी काय करावयाचे आहेत ? रक्तानें भरलेल्या त्या भोगांचें सेवन तरी कसें करावें ? याचकरितां हा तुझा युक्तिवाद मला पसंत नाहीं. ४९.

या दोहोंपैकीं आम्हांला कोणतें श्रेयस्कर आहे, हें समजत नाहीं. ( युद्धामध्यें ) आम्हांला जय मिळेल कां ते आम्हांला जिंकतील, हेंहि समजत नाहीं. ज्यांना मारून जगण्याची आमची इच्छा नाहीं, ते कौरव लढाईकरितां समोर उभे राहिले आहेत. ६.

त्या वेळीं 'कृष्णा ऐक,' असें अर्जुन म्हणाला. परंतु तें ऐकूनहि कृष्णाच्या मनाला तें रुचलें नाहीं. ५० हें जाणून अर्जुन भ्याला, मग पुन्हां बोलूं लागला. तो म्हणाला, देव या बोलण्याकडे कां बरें लक्ष देत नाहींत ? ५१. बाकी माझ्या मनांत जें होतें, तें मी येथें स्पष्ट करून बोललों; परंतु याच्यापेक्षां चांगलें काय तें तुम्हांसच ठाऊक. ५२. पण ज्यांच्याशीं वांकडेपणा करण्याची गोष्ट ऐकल्याबरोबर आम्हीं प्राण सांडावे, ते येथें युद्धाच्या निमित्तानें उभे आहेत. ५३. आतां अशांचा वध करावा किंवा यांना सोडून येथून निघून जावें, या दोहोंपैकीं काय करावें, तें आम्हांला समजत नाहीं. ५४.

मोहरूपी दोषानें स्वभाव नष्ट झालेला व धर्मासंबंधानें चित्त मोहित झालेला मी तुला विचारीत आहें. जें खरोखरीच श्रेयस्कर असेल तें मला सांग. मी तुझा शिष्य आहे. तुला शरण आलेल्या मला उपदेश कर. ७.

आम्हांला काय करणें उचित आहे, हें या वेळीं विचार करून पाहिलें तरी सुचत नाहीं; कारण या मोहामुळें माझें चित्त व्याकूळ झालें आहे. ५५. डोळ्यांवर सारा आला म्हणजे दृष्टीचें तेज लोपतें; मग जवळ असलेली कोणतीहि वस्तु दिसत नाहींशी होते. ५६. देवा, तसें मला झालें आहे. कारण माझें मन भ्रांतीनें ग्रासलें आहे. आतां आपलें हित कशांत आहे, हेंहि मला समजत नाहीं. ५७. तरी श्रीकृष्णा, तूं ( यासंबंधाचा ) विचार करून पहा आणि चांगलें तें आम्हांला सांग; कारण आमचा सखा ( आमचें ) सर्व कांहीं तूंच आहेस. ५८. तूं आमचा गुरु, बंधु, पिता. तूं आमची इष्ट देवता; संकटसमयीं नेहमीं तूंच आमचा रक्षण करणारा आहेस. ५९. शिष्याचा अव्हेर करण्याची गोष्ट गुरूच्या मनांतहि मुळीं ज्याप्रमाणें येत नाहीं, किंवा समुद्र नद्यांचा त्याग कसा करील ? ( ज्याप्रमाणें करीत नाहीं. ) ६०. किंवा, कृष्णा ऐक. मुलाला आई जर सोडून गेली तर तें कसें जगणार ? ( ज्याप्रमाणें जगणार नाहीं. ) ६१. त्याप्रमाणें देवा, सर्वतोपरी तूंच एक आम्हांला आहेस; आणि मागील ( आतांपर्यंतचें ) माझें बोलणें जर तुला पटत नसेल; ६२.

भूलोकावर निष्कंटक व समृद्ध असें राज्य आणि देवाचें आधिपत्य हीं मिळालीं तरीहि इंद्रियांचें शोषण करून टाकणारा माझा शोक नाहींसा करील असें ( तुझ्या उपदेशाशिवाय दुसरें कांहीं साधन ) मला दिसत नाहीं. ८.

तर जें आम्हांला उचित असून, धर्माला अनुचित नसेल, तें पुरुषोत्तमा, चटकन आतां सांग पाहूं. ६३. हें सर्व कुळ पाहून मनामध्यें जो शोक उत्पन्न झाला आहे, तो तुझ्या उपदेशावांचून ( दुसऱ्या ) कशानेंहि जाणार नाहीं. ६४. या वेळीं सर्व पृथ्वी जरी हातीं आली, किंबहुना इंद्रपदहि जरी मिळालें, तरी माझ्या मनांतला मोह दूर होणार नाहीं. ६५. ज्याप्रमाणें पूर्ण भाजलेलें बीं उत्तम जमिनींत पेरलें व त्यास हवें तितकें पाणी जरी घातलें, तरी त्यास अंकुर फुटणार नाहीं; ६६. किंवा आयुष्य संपलें असलें तर औषधानें कांहीं होत नाहीं; ( पण ) तेथें एका परमामृताचाच ( ज्याप्रमाणें ) उपयोग होतो; ६७. त्याचप्रमाणें या माझ्या मोहित झालेल्या बुद्धीला राज्यभोगांची समृद्धि ही उत्तेजन ( देऊं शकणार ) नाहीं. या वेळीं, कृपानिधे, तुझी कृपाच माझा आधार आहे. ( तीच कामीं येईल. ) ६८. जेव्हां क्षणभर अर्जुनाची भ्रांति दूर झाली, तेव्हां अर्जुन

मग पुनरपि व्यापिला । उर्मी तेणें ॥ ६९ ॥ कीं मज पाहतां उर्मी नोहे । हें अनारिसें गमत आहे । तो ग्रासिला महामोहें । काळसर्पें ॥ ७० ॥ सवर्म हृदयकल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं । लागला म्हणोनि लहरी । भांजेचि ना ॥ ७१ ॥ हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवें विष फेडी । तो धावया श्रीहरी गारुडी । पातला कीं ॥ ७२ ॥ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मिरवतसे श्रीकृष्ण जवळा । तो कृपावशें अवलीला । रक्षील आतां ॥ ७३ ॥ म्हणोनि तो पार्थु । मोहफणिग्रस्तु । म्यां म्हणितला हा हेतु । जाणोनियां ॥ ७४ ॥ मग देखा तेथ फाल्गुनु । घेतला असे भ्रांती कवळूनु । जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥ ७५ ॥ तयापरी तो धनुर्धरु । जाहलासे दुःखें जर्जरु । जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु । वणवला कां ॥ ७६ ॥ म्हणोनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु । तो वोळलासे श्रीगोपाळु । महामेघु ॥ ७७ ॥ तेथ सुदर्शनाची द्युति । तेचि विद्युल्लता झळकती । गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ॥ ७८ ॥ आतां तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळु निवेल । मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ॥ ७९ ॥ ते कथा आइका । मनाचिया आराणुका । ज्ञानदेवो म्हणे देखा । निवृत्तीदासु ॥ ८० ॥

संजय उवाचः—एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः । न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥

ऐसें संजयो सांगतु । म्हणे राया तो पार्थु । पुनरपि शोकाकुलितु । काय बोले ॥ ८१ ॥ आइकें सखेदु बोल श्रीकृष्णातें । आतां नाळवावें तुम्हीं मातें । मी सर्वथा न झुंजें येथें । भरंवसेनि ॥ ८२ ॥ ऐसें येकि हेळां बोलिला । मग मौन करूनि ठेला । तेथ श्रीकृष्णा विस्मो पातला । देखोनि तयातें ॥ ८३ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत । सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

मग आपुलां चित्तीं म्हणे । एथ हें कायी आदरिलें येणें । अर्जुन सर्वथा कांहीं नेणे । काय कीजे ॥ ८४ ॥ हा उमजे आतां कवणेपरी । कैसेनि धीरु स्वीकारी । जैसा ग्रहातें पंचाक्षरी । अनुमानी कां ॥ ८५ ॥ ना तरी असाध्य देखोनि व्याधी । अमृतासम दिव्य औषधी । वैद्य सूची निरवधि । निदानींची ॥ ८६ ॥ तैसे विवरतु असे श्रीअनंतु । तया दोहीं सैन्यांआंतु । जयापरी पार्थु । भ्रांति सांडी ॥ ८७ ॥ तें कारण मनीं धरिलें । मग सरोष बोलों आदरिलें । जैसें मातेच्या कोपीं थोकलें । स्नेह आथी ॥ ८८ ॥ कीं औषधाचिया कडुवटपणीं । जैसी अमृताची पुरवणी । ते आहाच न दिसे, परी गुणीं । प्रकट होय ॥ ८९ ॥ तैसीं वरिवरि पाहतां उदासें । आंत तरी अतिसुरसें । तियें वाक्यें हृषीकेशें । बोलों आदरिलीं ॥ ९० ॥

श्रीभगवानुवाचः—अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे । गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥

मग अर्जुनातें म्हणितलें । आम्हीं आजि हें नवल देखिलें । जें तुवा येथ आदरिलें । माझारींचि ॥ ९१ ॥ तूं जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न संडिसी । आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी । बहुसाल नीति ॥ ९२ ॥ जात्यंधा लागे पिसें । मग तें सैरा धावे जैसें । तुझें शहाणपण तैसें । दिसतसे ॥ ९३ ॥ तूं आपणपें तरी नेणसी । परी या कौरवांतें शोचूं पहासी ।

असें बोलला. (पण) मग त्याला पुन्हा मोहाच्या लहरींनें व्यापलें. ६९. (ज्ञानेश्वर महाराज म्हणतात) किंवा विचार केला असतां, मला असें वाटतें कीं, ही मोहाची लहर नाहीं, तर दुसरेंच कांहीं असावें. (तें दुसरें हें कीं) महामोहरूपी काळसर्पानें त्याला ग्रासिलें असावें. ७०. मर्मस्थान जें हृदयकमल, त्या ठिकाणीं करुणारूपी भर सांजवेळेला, त्या महामोहरूपी काळसर्पानें त्याला दंश केला, म्हणून या लहरी उतरतच नाहींत. ७१. त्या विषाचा असा जालिमपणा जाणून जो आपल्या कृपाकटाक्षानेंच विषाचें निवारण करतो, तो गारुडी श्रीहरी अर्जुनाच्या हांकेला धांवून आला. ७२. तशा त्या व्याकूळ झालेल्या अर्जुनाशेजारीं श्रीकृष्ण शोभत होताच; तो आपल्या कृपेच्या बळानें (त्याचें) आतां सहजच रक्षण करील. ७३. हा अभिप्राय लक्षांत घेऊनच त्या अर्जुनास मोहरूपी सर्प चावला आहे, असें मीं म्हटलें. ७४. ज्याप्रमाणें मेघपटलानें सूर्य आच्छादला जावा, त्याप्रमाणें त्या प्रसंगीं अर्जुन भ्रांतीनें घेरला होता असें समजा. ७५. ज्याप्रमाणें उन्हाळ्यांत एखादा मोठा पर्वत वणव्यानें व्यापावा, त्याप्रमाणें अर्जुन दुःखानें जर्जर झाला होता. ७६. म्हणून स्वभावतः सुनीळ (अत्यंत सावळा) व कृपामृतरूप जीवनानें युक्त, असा तो श्रीगोपाळरूपी महामेघ (अर्जुनाकडे) वळला. ७७. तेथें (श्रीकृष्णरूपी मेघाचे ठिकाणीं) सुदर्शनाचें तेज हीच जणूंकाय चमकणारी वीज होय आणि गंभीर बोल, हाच गडगडाटाचा थाट होय. ७८. आतां तो उदार (श्रीकृष्णमेघ) कसा वर्षाव करील व त्यामुळें अर्जुनरूपी पर्वत कसा शांत होईल आणि मग ज्ञानरूपी नवीन अंकुर त्याच्या ठिकाणीं कसा फुटेल, ७९. हें पहा. ती कथा समाधानवृत्तीनें ऐका, असें निवृत्तीनाथांचे शिष्य ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ८०.

**संजय म्हणाला, राजा, (जितनिद्र असा) पार्थ श्रीकृष्णाला याप्रमाणें बोलून व 'मी युद्ध करणार नाहीं' असें श्रीकृष्णाला स्पष्ट सांगून स्तब्ध झाला. ९.**

याप्रमाणें संजयानें (धृतराष्ट्राला) सांगितलें. तो (मग) म्हणाला, राजा, अर्जुन पुनः शोकाकुल होऊन काय म्हणाला, ८१. तें ऐक. तो खिन्न होऊन श्रीकृष्णाला म्हणाला, आतां तुम्ही माझी समजूत घालण्याचा प्रयत्न करूं नका. मी कांहीं झालें तरी खात्रीनें ह्या वेळीं लढणार नाहीं. ८२. असें एकदम बोलला, मग स्तब्ध होऊन बसला. त्याप्रसंगीं त्याला (तसा) पाहून श्रीकृष्णाला विस्मय वाटला. ८३.

**हे भरतकुलोत्पन्ना धृतराष्ट्रा, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं खिन्न होऊन बसलेल्या त्याला (अर्जुनाला) श्रीकृष्ण किंचित् हसल्यासारखें करून (आणि मग रागाचा अविर्भाव आणून) पुढीलप्रमाणें बोलूं लागले. १०.**

मग आपल्या मनांत म्हणाला, याप्रसंगीं यानें हें काय आरंभिलें आहे! या अर्जुनाला मुळींच कांहीं कळत नाहीं, काय करावें! ८४. हा आतां कशानें उमजेल? कशानें धीर धरील? ज्याप्रमाणें एखादा मांत्रिक, पिशाच कसें दूर होईल, याचा विचार करतो; ८५. किंवा रोग असाध्य पाहून, ज्याप्रमाणें वैद्य निर्वाणीच्या अमृततुल्य, दिव्य औषधींची तावडतोब योजना करतो; ८६. त्याचप्रमाणें अर्जुन कोणत्या उपायानें मोह टाकील, याचा, त्या दोन्हीं सैन्यांच्या मध्यभागीं, श्रीकृष्ण विचार करीत होता. ८७. तो (श्रीकृष्णानें) हेतु मनांत धरला. मग (तो) रागानें बोलावयास लागला. ज्याप्रमाणें आईच्या रागांत गुप्त माया असते, ८८. किंवा औषधाच्या कडूपणांत ज्याप्रमाणें अमृताची जोड असते. ती वर दिसत नाहीं, पण गुणाच्या रूपानें पुढें स्पष्ट होते. ८९. त्याप्रमाणें वरवर पाहतां उदास (कठोर), पण आंत अति सुरस (परिणामीं अत्यंत हितकर), असे उपदेशाचे शब्द श्रीकृष्ण बोलूं लागले. ९०.

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, शोक करण्याला अयोग्य अशा गोष्टीबद्दल तूं शोक केलास (म्हणजे करतोस), आणि पांडित्याच्या गोष्टी सांगतोस. पण विवेकी लोक मेलेल्याबद्दल किंवा न मेलेल्याबद्दल शोक करीत नाहीत. ११.**

मग श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, हें जें तूं मध्येंच आरंभिलें आहेस, तें आम्हीं आज एक आश्चर्यच पाहिलें. ९१. तूं आपल्याला जाणता तर म्हणवितोस, पण मूर्खपणा टाकीत नाहींस. बरें, तुला कांहीं शिकवावें असें म्हटलें, तर तूं नीतीच्या मोठमोठ्या गोष्टी सांगतोस. ९२. जन्मांधाला वेड लागलें म्हणजे तें जसें सैरावैरा धांवतें, तसें तुझें शहाणपण दिसतें. ९३. तूं स्वतःला तर जाणत नाहींस, परंतु या कौरवांकरितां शोक करूं पाहातोस, याबद्दल

हा बहु विस्मय आम्हांसीं । पुढतपुढती ॥ ९४ ॥ तरी सांग पां मज अर्जुना । तुजपासूनि स्थिति या त्रिभुवना । हे अनादि विश्वरचना । तें लटकें कायी ॥ ९५ ॥ एथ समर्थु एक आथी । तयापासूनि भूतें होती । तरी हें वांयाचि काय बोलती । जगामाजी ॥९६ ॥ हो कां सांप्रत ऐसें जहालें । जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिले । आणि नाशु पावे नाशिले । तुझेनि कायी ॥ ९७ ॥ तूं भ्रमलेपणें अहंकृती । यांसि घातु न धरिसी चित्तीं । तरी सांगें काथि हे होती । चिरंतन ॥ ९८ ॥ कीं तूं एक वधिता । आणि सकळ लोकु हा मरता । ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ॥ ९९ ॥ अनादिसिद्ध हें आघवें । होत जात स्वभावें । तरी तुवां कां शोचावें । सांगें मज ॥ १०० ॥ परी मूर्खपणें नेणसी । न चिंतावें तें चिंतिसी । आणि तूंचि नीति सांगसी । आम्हांप्रति ॥ १ ॥ देखें विवेकी जे होती । ते दोहींतेंही न शोचती । जे होय जाय हे भ्रांती । म्हणऊनियां ॥ २ ॥

न त्वेवाहं जातु नाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः । न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥१२॥

अर्जुना सांगेन आइक । एथ आम्ही तुम्ही देख । आणि हे भूपति अशेख । आदिकरुनी ॥ ३ ॥ नित्यता ऐसेचि असोनी । ना तरी निश्चित क्षया जाउनि । हे भ्रांति वेगळी करूनी । दोन्हीं नाहीं ॥ ४ ॥ हें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे । येऱ्हवीं तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ॥ ५ ॥ जैसें पवनें तोय हालविलें । आणि तरंगाकार जाहलें । तरी कवण कें जन्मलें । म्हणों ये तेथ ॥ ६ ॥ तेंचि वायूचें स्फुरण ठेलें । आणि उदक सहज सपाटलें । तरी आतां काय निमालें । विचारीं पां ॥ ७ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा । तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

आइकें शरीर तरी एक । परी वयसा भेद अनेक । हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तूं ॥ ८ ॥ एथ कौमारत्व दिसे । मग तारुण्यीं तें भ्रंशे । परी देहचि न नाशे । एकेकासवें ॥ ९ ॥ तैसीं चैतन्याच्या ठायीं । इयें शरीरांतरें होती जाती पाहीं । ऐसें जाणे तया नाहीं । व्यामोहदुःख ॥ ११० ॥

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः । आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

एथ नेणावया हेंचि कारण । जे इंद्रियांआधीनपण । तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥११॥ इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष शोकु उपजती । ते अंतर आप्लविती । संगें येणें ॥१२॥ जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं । तेथ दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥ १३ ॥ देखें हे शब्दाची व्याप्ति । निंदा आणि स्तुति । तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥१४॥ मृदु आणि कठीण । हे स्पर्शाचे दोन्ही गुण । जे वपूचेनि संगें कारण । संतोषखेदां ॥१५॥ भ्यासुर आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख । जें उपजवी सुखदुःख । नेत्रद्वारें ॥१६॥ सुगंधु आणि दुर्गंधु । हा परिमळाचा भेदु । जो घ्राणसंगें विषादु । तोषु देता ॥१७॥ तैसाचि द्विविध रसु ।

आम्हांला वारंवार फारच विस्मय वाटतो. ९४. तर अर्जुना, मला सांग बाबा, तुझ्यामुळें या त्रिभुवनाचें अस्तित्व आहे काय? ही विश्वाची रचना सनातन ( आहे असें म्हणतात ) तें खोटें आहे काय? ९५. तर येथें सर्वशक्तिमान् असा कोणी आहे आणि त्याच्यापासून प्राणी उत्पन्न होतात, असें जें जगांत बोलतात, तें उगीचच काय? ९६. ( तेव्हां ) आतां असें झालें का, कीं हे जन्ममृत्यु तूं उत्पन्न केलेस? आणि तूं मारशील तर हे मरतील होय? ९७. तूं भ्रमानें अहंकार घेऊन यांचा घात करण्याचें मनांत आणिलें नाहींस, तर सांग, हे काय चिरंजीव होणार आहेत? ९८. किंवा तूं एक मारणारा व बाकीचे सर्व लोक मरणारे अशी भ्रांति ( कदाचित् ) तुझ्या चित्ताला होईल, तर ती होऊं देऊं नकोस. ९९. हें सगळें ( सृष्टि ) अनादिसिद्ध ( अनादि कालापासून सारखें ) आपोआप ( सृष्टिक्रमाप्रमाणें ) होतें व जातें, तर मग तूं शोक कां करावास? सांग मला. १००. पण मूर्खपणामुळें तुला समजत नाहीं; मनांत आणूं नये तें आणतोस; आणि ( उलट ) तूंच नीतीच्या गोष्टी आम्हांला सांगतोस! १०१. हें पहा, जन्म व मृत्यु ही केवळ भ्रांति असल्यामुळें, जे विचारवंत आहेत, ते या दोहोंबद्दलहि शोक करीत नाहींत. १०२.

**खरोखर मी, तूं व हे राजे पूर्वी नव्हतों असें नाहीं. तसेंच यानंतर आपण सर्वजण असणार नाहीं, असेंहि नाहीं. १२.**

अर्जुना, सांगतों ऐक. पहा, येथें आम्ही, तुम्ही आणि हे सर्व राजे वगैरे ( जे आहों ), १०३. ते ( आपण ) हल्लीं आहों, असेच निरंतर राहूं अथवा खात्रीनें क्षयाला जाऊं, एवढी भ्रांति सुटली ( दूर झाली ) कीं, वस्तुतः ( या ) दोन्ही ( गोष्टी ) खऱ्या नाहींत. ( असें आपल्याला दिसून येईल. ) १०४. जन्म व मृत्यु हे ( आपल्याला केवळ ) भ्रांतीला वश झाल्यामुळें अनुभवास येतात. एरवीं वास्तविक वस्तु ( आत्मा ) जी आहे, ती अविनाशीच आहे. १०५. वाऱ्यानें पाणी हालविलें, त्यामुळें त्याला तरंगाचें रूप आलें, तर या ठिकाणीं कोणाला व कुठें जन्म आला असें म्हणतां येईल? १०६. पुढें तीच वायूची हालचाल बंद झाली आणि पाणी आपोआप स्थिर झालें, तर आतां कशाचा नाश झाला? विचार कर. १०७.



**देहयुक्त आत्म्याला ज्याप्रमाणें देहामध्यें बाल्य, तारुण्य व वार्धक्य असतात, त्याचप्रमाणें ( एक देह जाऊन त्याला ) दुसऱ्या देहाची प्राप्ति होत असते आणि असें असल्यामुळें जो आत्मा नित्य असल्याचें जाणतो, त्याला ( जन्ममरणाविषयीं ) भ्रांति होत नाहीं. १३.**

आणखी असें पहा कीं, शरीर तर एकच; पण वयपरत्वें त्यास अनेक दशा प्राप्त होतात, हा प्रत्यक्ष पुरावा तूं पहा. १०८. याच्या ( शरीराच्या ) ठिकाणीं पहिल्यानें बालपण दिसतें, मग तारुण्यांत तें बालपण नाहींसें होतें; पण शरीराच्या एकेक अवस्थेबरोबर शरीराचा कांहीं नाश होत नाहीं. १०९. त्याचप्रमाणें, हें पहा, चैतन्याच्या ( ठिकाणीं ) निरनिराळीं शरीरें येतात व जातात असें जो जाणतो, त्याला भ्रांतिजन्य दुःख कधींहि होत नाहीं. ११०.

**हे अर्जुना, इंद्रियांचे ( विषयांशीं होणारे ) संयोग शीत, उष्ण, सुख, दुःख देणारे आहेत. ते उत्पत्ति व विनाश यांनीं युक्त असल्यामुळें अनित्य आहेत; म्हणून हे भारता, त्यांना तूं सहन कर ( त्यांचा त्याग कर. ) १४.**

असें न जाणण्याला इंद्रियाधीनता हेंच एक कारण आहे. तीं इंद्रियें अंतःकरणावर आपला पगडा बसवितात, म्हणून त्याला भ्रम होतो. १११. इंद्रियें विषयांचें सेवन करतात, त्यामुळें सुखदुःख उत्पन्न होतात. ते (मग) आपल्या संसर्गानें अंतःकरण ग्रासून टाकतात. ११२. ज्या ( शब्दादि ) विषयांच्या ठिकाणीं एकच स्थिति कधीं नसते, त्या विषयाचे ठिकाणीं कांहीं दुःख व कांहीं थोडें सुखहि दिसतें. ( त्या विषयांपासून कधीं सुख तर कधीं दुःख प्राप्त होतें. ) ११३. पहा कीं, निंदा आणि स्तुति ही शब्दांची व्याप्ति आहे. कर्णद्वारानें जसें निंदेच्या किंवा स्तुतीच्या शब्दांचें सेवन होईल, तसे क्रोध किंवा लोभ अंतःकरणांत उत्पन्न होतात. ११४. मृदु आणि कठीण, हे स्पर्श या विषयाचे दोन प्रकार आहेत; ते त्वचेच्या संयोगानें संतोषाला व दुःखाला कारण होतात. ११५. पहा, भेसूर आणि सुरेख हीं रूपें या विषयाचीं दोन स्वरूपें आहेत; तीं नेत्रद्वारें सुखदुःख उत्पन्न करतात. ११६. सुगंध व दुर्गंध, हे गंध या विषयाचे दोन भेद आहेत. ते नाकाच्या संयोगानें सुख आणि दुःख उत्पन्न करतात. ११७. त्याप्रमाणेंच ( कडू व गोड असा ) दोन प्रकारचा रस आवड व नावड उत्पन्न

उपजवी प्रीतित्रासु । म्हणूनि हा अपभ्रंशु । विषयसंगु ॥ १८ ॥ देखें इंद्रियांआधीन होईजे । तैं शीतोष्णातें पाविजे । आणि सुखदुःखीं आकळिजे । आपणपें ॥१९॥ या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥१२०॥ हे विषय तरी कैसे । रोहिणीचें जळ जैसें । कां स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ॥२१॥ देखें अनित्य तियापरी । म्हण-ऊनि तूं अव्हेरीं । हा सर्वथा संगु न धरीं । धनुर्धरा ॥२२॥

यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ । समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

हे विषय जयातें नाकळिती । तया सुखदुःखें दोनी न पवती । आणि गर्भवासुसंगती । नाहीं तया ॥ २३ ॥ तो नित्यरूपु पार्था । वोळखावा सर्वथा । जो या इंद्रियार्थां । नागवेचि ॥ २४ ॥

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः । उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

आतां अर्जुना आणिक कांहीं एक । सांगेन मी आइक । जें विचारें पर लोक । वोळखिती ॥२५॥ या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥२६॥ सलिलीं पय जैसें । एक होऊनि मीनलें असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळे कीजे ॥२७॥ कीं अग्निमुखें किडाळ । तोडोनियां चोखाळ । निवडिती केवळ । बुद्धिमंत ॥ २८ ॥ ना तरी जाणिवेच्या आयणी । करितां दधिकडसणी । मग नवनीत निर्वाणीं । दिसे जैसें ॥२९॥ कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट । तेथ उडे तें फलकट । जाणों आलें ॥ १३० ॥ तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंचु सहजें सांडवलें । मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियांसी ॥ ३१ ॥ म्हणोनि अनित्याच्या ठायीं । तयां आस्तिक्यबुद्धि नाहीं । निष्कर्षु दोहींही । देखिला असे ॥ ३२ ॥

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् । विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता । तरी सार तें स्वभावता । नित्य जाणें ॥ ३३ ॥ हा लोकत्रयाकारु । तो जयाचा विस्तारु । तेथ नाम वर्ण आकारु । चिन्ह नाहीं ॥ ३४ ॥ जो सर्वदा सर्वगतु । जन्मक्षयातीतु । तया केलियाहि घातु । कदाचि नोहे ॥ ३५ ॥

अंतवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः । अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

आणि शरीरजात आघवें । हें नाशवंत स्वभावें । म्हणोनि तुवां झुंजावें । पंडुकुमरा ॥ ३६ ॥

य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् । उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥

तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी सूनि या शरीरातें । मी मारिता हे मरते । म्हणत आहासी ॥ ३७ ॥ तरी अर्जुना तूं हें नेणसी । जरी तत्त्वता विचारिसी । तरी वधिता तूं नव्हेसी । हे वध्य नव्हती ॥ ३८ ॥

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥

करितो. म्हणून या विषयांची संगति अधोगतीला नेणारी आहे, ११८. पहा, जेव्हां (मनुष्य) इंद्रियांच्या ताब्यांत जातो तेव्हां त्याला शीतोष्णाचा अनुभव घ्यावा लागतो आणि मग तो स्वतः सुखदुःखांच्या तडाक्यांत सांपडतो. ११९ पहा, या इंद्रियांचा हा स्वभावच असा आहे कीं, त्यांना या विषयावांचून दुसरें कांहींच गोड वाटत नाहीं. १२०. हे विषय आहेत तरी कसे ? मृगजल जसें आभासात्मक, किंवा स्वप्नांत पाहिलेला हत्ती जसा केवळ भासमय असतो; १२१. तसे ( हे विषय ) क्षणभंगूर आहेत; पहा, याकरितां धनुर्धरा, तूं त्यांचा त्याग कर; त्यांच्या नादीं मुळींच लागूं नकोस. १२२.

**हे पुरुषश्रेष्ठा, ज्या पुरुषाला हे ( विषयसंबंध ) उपद्रव देत नाहींत व म्हणून ज्याला सुख व दुःख समान आहेत, असा तो धीर पुरुष मोक्षाला योग्य होतो. १५.**

या विषयांच्या तावडींत जो सांपडत नाहीं, त्याला सुख-दुःख हीं दोन्ही होत नाहींत आणि गर्भवासाची संगति त्याला कधीं घडत नाहीं. १२३. जो या इंद्रियांचे जे विषय त्यांच्या कक्षांत सांपडत नाहीं, तो, पार्था, पूर्णपणें ब्रह्मरूप आहे असें जाणावें. १२४.

**अविद्यमान वस्तूला ( कधीं ) अस्तित्व नसतें, विद्यमान वस्तूचा ( कधीं ) अभाव नसतो. ( विद्यमान व अविद्यमान ) या दोहोंचाहि निर्णय तत्त्ववेत्त्यांनीं जाणला आहे. १६.**

आतां अर्जुना, तुला मी आणखी कांहीं एक ( गोष्ट ) सांगतों, ऐक. तें वस्तुस्वरूप ज्ञानीपुरुष विचारानें जाणतात. १२५. या देहादि प्रपंचामध्यें सर्वत्र चैतन्य गुप्त रूपानें आहे. तत्त्व जाणणारे संत तें ओळखून त्याचेंच ग्रहण करितात. १२६. दूध पाण्याशीं एकरूप होऊन त्यांत अगदीं मिळून गेलेलें असतें; पण राजहंस ज्याप्रमाणें निवडून तें वेगळें करतो; १२७. अथवा चतुर लोक अग्नीच्या सहाय्यानें हिणकस धातु काढून टाकून, केवळ शुद्ध सोनें ज्याप्रमाणें निवडून काढतात; १२८. अथवा, बुद्धिचातुर्यानें दहीं घुसळलें असतां, ज्याप्रमाणें शेवटीं लोणी दृष्टीस पडतें; १२९. किंवा एकत्र झालेलें भूस व धान्य उफणलें असतां धान्य जाग्यावर राहातें व उडून गेलेलें तें फोलकट, असें ज्याप्रमाणें समजून येतें; १३०. त्याप्रमाणें विचार केला असतां, ज्याचा निरास होतो ( जो मिथ्या ठरतो ) असा प्रपंच ( देहादिउपाधि ) ज्ञानी पुरुषांकडून सहजच टाकला जातो व मग ज्ञानी पुरुषांना खरोखर एक तत्त्व ( ब्रह्म ) मात्र उरतें. १३१. म्हणून ज्यांनीं दोहोंमधील ( उपाधि व चैतन्य यांमधील ) सार ओळखलें, त्यांची शरीरादि अशाश्वत वस्तूंच्या ठिकाणीं त्या नित्य आहेत, असा निश्चय नसतो.

**ज्यानें हें सर्व जगत् व्यापलें आहे, तें ( सत् ) विनाश पावणारें नव्हे, असें समज. या क्षयरहिताचा विनाश करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. १७.**

पहा, सारासाराचा विचार केला असतां, असारता ही भ्रांति आहे असें समज आणि सार हें स्वभावतःच नित्य आहे असें जाण. १३३. हे तिन्ही लोक हा ज्याचा विस्तार आहे, त्याला नाम, वर्ण, आकार अशीं कांहीं चिन्हें (लक्षणें) नाहींत; १३४. जो शाश्वत व सर्वव्यापी असून जन्म-मरणरहित आहे, त्याचा करूं गेला तरी केव्हांहि घात होत नाहीं. १३५.

**नित्य, अविनाशी व अगम्य अशा आत्म्याचे हे देह ( स्वभावतः ) विनाशी म्हटलेले आहेत. म्हणून हे अर्जुना तूं युद्ध कर. १८**

आणि शरीर म्हणून जेवढें आहे, तेवढें सगळें स्वभावतः नाशवंत आहे. म्हणून अर्जुना, तूं लढावें हें योग्य आहे. १३६.

**हा ( आत्मा ) मारणारा आहे असें जो समजतो व मरणारा आहे असें जो समजतो, त्या दोघांनाहि ज्ञान नाहीं. हा कोणाला मारीत नाहीं कोणाकडून मारला जात नाहीं. १९.**

तूं देहाचा अभिमान धरून व या शरीराकडेच दृष्टि देऊन मी ( अर्जुन ) मारणारा आणि हे ( कौरव ) मरणारे, असें म्हणत आहेस. १३७. तरी अर्जुना, तुला खरें तत्त्व समजत नाहीं. जर तत्त्वतः विचार करून पाहाशील तर तूं मारणारा नाहींस आणि हे मारले जातील असेंहि नाहींत. १३८.

**हा आत्मा कधीं जन्म पावत नाहीं अथवा कधीं मृत्यु पावत नाहीं हा ( एकदां ) होऊन पुन्हां होणारा नाहीं, असेंहि नाहीं. हा जन्मरहित नित्य, क्षयरहित व अनादि आहे. शरीराचा नाश झाला असतां याचा नाश होत नाहीं. २०.**

जैसें स्वप्नामाजिं देखिजे । तें स्वप्नींचि साच आपजे । मग चेऊनियां पाहिजे । तंव कांहीं नाहीं ॥ ३९ ॥ तैसी हे जाण माया । तूं भ्रमत आहासी वायां । शस्त्रें हाणितलिया छाया । जैसी आंगीं न रुपे ॥ १४० ॥ कां पूर्ण कुंभ उलंडला । तेथ बिंबाकारु दिसे भ्रंशला । परी भानु नाहीं नासला । तयासवें ॥ ४१ ॥ ना तरी मठीं आकाश जैसें । मठाकृती अवतरलें असे । तो भंगलिया आपैसें । स्वरूपाचि ॥ ४२ ॥

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् । कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ॥ २१ ॥

तैसें शरीराच्या लोपीं । सर्वथा नाशु नाहीं स्वरूपीं । म्हणऊनि तूं हें नारोपीं । भ्रांति बापा ॥ ४३ ॥

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे । तैसें देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥ ४४ ॥

नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥

हा अनादि नित्यसिद्ध । निरुपाधि विशुद्ध । म्हणऊनि शस्त्रादिकीं छेदु । न घडे यया ॥ ४५ ॥

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च । नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥
अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते । तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

हा प्रळयोदकें नाप्लवे । अग्निदाहो न संभवे । एथ महाशोषु न प्रभवे । मारुताचा ॥ ४६ ॥ हा तर्कांचिये दिठी । गोचर नोहे किरीटी । ध्यान याचिये भेटी । उत्कंठा वाहे ॥ ४७ ॥ हा सदा दुर्लभु मना । आपु नोहे साधना । निःसीमु हा अर्जुना । पुरुषोत्तमु ॥ ४८ ॥ हा गुणत्रयारहितु । व्यक्तीसी अतीतु । अनादि अविकृतु । सर्वरूप ॥ १४९ ॥ अर्जुना हा नित्यु । अचळु हा शाश्वतु । सर्वत्र सदोदितु । परिपूर्णु हा ॥ १५० ॥ अर्जुना ऐसा जाणावा । हा सकळात्मकु देखावा । मग सहजें शोकु आघवा । हरेल तुझा ॥ ५१ ॥ अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंतचि हें मानिसी । तऱ्ही शोचूं न पवसी । पंडुकुमरा ॥ ५२ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् । तथाऽपि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

जे आदि स्थिति अंतु । हा निरंतर असे नित्यु । जैसा प्रवाहो अनुस्यूतु । गंगाजळाचा ॥ ५३ ॥ तें आदि नाहीं खंडलें । समुद्रीं तरी असे मिनलें । आणि जातचि मध्यें उरलें । दिसे जैसें ॥ ५४ ॥ इयें तिन्ही तयापरी । सरसींच सदा अवधारीं । भूतांसि कवणीं अवसरीं । ठाकती ना ॥ ५५ ॥ म्हणोनि हें आघवें । एथ तुज नलगे शोचावें । जे स्थितीची हे स्वभावें । अनादि ऐसी ॥ ५६ ॥

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

ज्याप्रमाणें जें स्वप्नांत पाहावें, तें स्वप्न आहे तोंपर्यंतच खरें वाटतें; पण मग जागें होऊन पाहावें, तों कांहीं एक नसतें. १३९. त्याप्रमाणें ही ( केवळ ) माया आहे असें समज. तूं व्यर्थ ( हिच्या ) भ्रमांत पडला आहेस. ज्याप्रमाणें ( मनुष्याच्या ) सावलीला शस्त्रानें मारल्यास त्याच्या अंगाला घाव लागत नाहीं; १४०. किंवा भरलेला घडा पालथा झाला म्हणजे त्यांतील सूर्याचें प्रतिबिंब नाहींसें झालेलें दिसतें; परंतु त्या प्रतिबिंबाबरोबर सूर्याचा नाश झालेला नसतो; १४१. किंवा ज्याप्रमाणें आकाश हें मठांत मठाच्या आकाराचें झालेलें असतें ( दिसतें ); पण तो मठ मोडल्यावर तें आकाश सहजच आपल्या मूळरूपानें राहतें; १४२.

**या आत्म्याला जो नाशरहित, नित्य, जन्मरहित व क्षयरहित असा जाणतो, तो पुरुष, हे पार्था, कोणाला मारण्यास प्रवृत्त तरी करणार कसा व मारणार तरी कसा ? २१.**

त्याप्रमाणें शरिराचा नाश झाला तरी प्राणाच्या मूळ स्वरूपाचा मुळींच नाश होत नाहीं, म्हणून बाबा, तूं स्वरूपाच्या ठिकाणीं नाशाच्या भ्रांतीचा आरोप करूं नकोस. १४३.

**ज्याप्रमाणें पुरुष जीर्ण वस्त्रें टाकून देऊन दुसरीं नवीं घेतो, त्याप्रमाणें आत्मा जीर्ण शरीरें टाकून देऊन दुसरीं नवीं प्राप्त करून घेतो. २२.**

ज्याप्रमाणें जुनें वस्त्र टाकावें आणि मग नवीन नेसावें, त्याप्रमाणें हा ( आत्मा ) एक देह टाकून दुसरा स्वीकारतो. १४४.

**या आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत, अग्नि जाळीत नाहीं, पाणी भिजवीत नाहीं, वारा सुकवीत नाहीं. २३.**

हा आत्मा अनादि, नित्यसिद्ध, ( शाश्वत असणारा ) उपाधिरहित व अत्यंत शुद्ध असा आहे. म्हणून याचा शस्त्रादिकांच्या योगानें घात होत नाहीं. १४५.

**या आत्म्याचा छेद अथवा दाह होणें अशक्य असून हा आर्द्र होणें किंवा शुष्क होऊन जाणेंहि अशक्यच आहे. हा नित्य, सर्वव्यापी, स्थिर, अचल व सनातन आहे. २४. हा आत्मा अव्यक्त, अचिंत्य व अविकृत असल्याचें म्हटलें आहे; म्हणून याला या प्रकारें ( सकलात्मक ) जाणल्यावर तुला शोक करणें योग्य नाहीं. २५.**

हा ( आत्मा ) प्रलयकाळच्या पाण्यानेंहि बुडत नाहीं; हा अग्नीनें जळणें संभवत नाहीं; येथें वायूच्या महाशोषणशक्तीचा प्रभाव चालत नाहीं. १४६. हा ( आत्मा ) अर्जुना, तर्काच्या दृष्टीला दिसणारा नाहीं. ध्यान तर याच्या भेटीसाठीं उत्कंठित झालेलें असतें. १४७. हा मनाला नेहमीं दुर्लभ आहे व साधनाला प्राप्त न होणारा ( आहे. ) अर्जुना, हा पुरुषोत्तम ( परमात्मा ) अनंत आहे. १४८. हा ( सत्वादि ) तीन गुणांनीं रहित, आकाराच्या पलीकडचा, अनादि, विकार न पावणारा व सर्वव्यापी आहे. १४९. अर्जुना हा ( आत्मा ) नित्य स्थिर, शाश्वत असून सर्व ठिकाणीं नेहमीं भरलेला असा आहे. १५०. अर्जुना, असा हा आहे हें लक्षांत घे. हा सर्वव्यापी आहे, हें ओळख. मग तुझा सगळा हा शोक सहजच नाहींसा होईल. १५१. अथवा हा असा आहे, हें न जाणतां तूं ( हा ) नाशवंतच आहे असें मानलेंस, तरी अर्जुना, तुला शोक करणें उचित नाहीं. १५२.

**हे महाबाहो, हा आत्मा नेहमीं ( प्रत्येक देहोत्पत्तीचे वेळीं ) जन्म पावतो व नेहमीं मृत्यु पावतो, असें जरी मानलेंस तरी देखील या प्रकारें शोक करण्यास तूं योग्य नाहींस. २६.**

कारण गंगेच्या पाण्याचा प्रवाह जसा अखंड आहे, तसा उत्पत्ति, स्थिति व नाश यांचा क्रम अखंडच आहे. १५३. तें ( गंगाजल ) उगमस्थानीं तुटत नाहीं ( त्याची उत्पत्ति एकसारखी सुरूच असते ) व शेवटीं समुद्रांत तर एकसारखें मिळत असतें आणि मध्यंतरी ज्याप्रमाणें वाहात राहिलेलें दिसतें; १५४. त्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति व लय हीं तिन्हीं नेहमीं बरोबरच असतात, असें समज. ही कोणत्याहि वेळीं प्राण्यांना थांबवितां येत नाहींत. १५५. म्हणून या सगळ्यांबद्दल शोक करण्याचें येथें तुला कारण नाहीं; कारण मुळापासूनच स्वभावतः अशी ही व्यवस्था चालत आलेली आहे. १५६.

**उत्पन्न झालेल्याला निःसंशय मृत्यु आहे आणि मेलेल्याला निःसंशय जन्म आहे. म्हणून अपरिहार्य अशा गोष्टीविषयीं शोक करण्यास तूं योग्य नाहींस. २७.**

ना तरी हें अर्जुना । नयेचि तुझिया मना । जे देखोनि लोकु अधीना । जन्मक्षया ॥ ५७ ॥ तरी येथ कांहीं । तुज शोकासि कारण नाहीं । जे जन्ममृत्यु हे पाहीं । अपरिहर ॥ ५८ ॥ उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे । हें घटिकायंत्र तैसें । परिभ्रमे गा ॥ ५९ ॥ ना तरी उदो अस्तु आपैसे । अखंडित होत जात जैसे । हें जन्ममरण तैसें । अनिवार जगीं ॥ १६० ॥ महाप्रळयअवसरे । हें त्रैलोक्यही संहरे । म्हणोनि हा न परिहरे । आदि अंतु ॥ ६१ ॥ तूं जरी हें ऐसें मानसी । तरी खेदु कां करिसी । काय जाणतचि नेणसी । धनुर्धरा ॥ ६२ ॥ एथ आणीकही एक पार्था । तुज बहुतीं परी पहातां । दुःख करावया सर्वथा । विषो नाहीं ॥ ६३ ॥

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत । अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

जें समस्तें इयें भूतें । जन्माआदि अमूर्तें । मग पातलीं व्यक्तीतें । जन्मलेया ॥ ६४ ॥ तियें क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत आनें नव्हती । देखें पूर्व स्थितीच येती । आपुलिये ॥ ६५ ॥ येर मध्यें जें प्रतिभासे । तें निद्रिता स्वप्न जैसें । तैसा आकारु हा मायावशें । सत्स्वरूपीं ॥ ६६ ॥ ना तरी पवनें स्पर्शिलें नीर । पढियासे तरंगाकार । का परापेक्षा अळंकार— । व्यक्ति कनकीं ॥ ६७ ॥ तैसें सकळ हें मूर्त । जाण पां मायाकारित । जैसें आकाशीं बिंबत । अभ्रपटळ ॥ ६८ ॥ तैसें आदीचि जें नाहीं । तयालागीं तूं रुदसि कायी । तूं अचीट तें पाहीं । चैतन्य एक ॥ ६९ ॥

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

जयाची आर्तीचि भोगित । विषयीं त्यजिलें संत । जयालागीं विरक्त । वनवासिये ॥ १७० ॥ दिठी सूनि जयातें । ब्रह्मचर्यादि व्रतें । मुनीश्वर तपातें । आचरताती ॥ ७१ ॥ एक अंतरीं निश्चळ । जें निहाळितां केवळ । विसरले सकळ । संसारजात ॥ ७२ ॥ एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊनि चित्ता । निरवधि तल्लीनता । निरंतर ॥ ७३ ॥ एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले । एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥ ७४ ॥ जैसे सरिता ओघ समस्त । समुद्रामाजि मिळत । परी माघौते न समात । परतले नाहीं ॥ ७५ ॥ तैसिया योगिश्वरांचिया मती । मिळणींसवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचिना ॥ ७६ ॥

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत । तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करितांही घातु नाहीं । तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ॥ ७७ ॥ याचेनिचि स्वभावें । हें होत जात आघवें । तरी सांग काय शोचावें । एथ तुवां ॥ ७८ ॥ एऱ्हवीं तरी पार्था । तुज कां नेणों न मनें चित्ता । परी किडाळ हें शोचितां । बहुतीं परी ॥ ७९ ॥

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि । धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥

तूं अझुनि कां न विचारिसी । काय हें चिंतितु आहासी । स्वधर्मु तो विसरलासी । तरावें जेणें ॥ १८० ॥ या कौरवां भलतें जाहलें । अथवा तुजचि कांहीं पातलें । कीं युगचि हें बुडालें ।

अथवा अर्जुना, हा जीवलोक जन्ममृत्यूच्या स्वाधीन आहे, असें पाहून जरी हें ( वरील म्हणणें ) तुझ्या मनाला येत नसेल; १५७. तरी पण त्यांत तुला शोक करण्याचें कारण नाहीं; ( कारण ) असें पाहा कीं हे जन्ममृत्यु टाळतां न येणारे आहेत. १५८. जें उपजतें तें नाश पावतें व नाश पावलेलें पुन्हां दिसतें ( उत्पन्न होतें ). अर्जुना, रहाटगाडग्यासारखा हा क्रम अखंड चालतो; १५९. अथवा उदय आणि अस्त, हे आपोआप ज्याप्रमाणें निरंतर होत जात असतात, त्याप्रमाणें जन्ममृत्यु हे जगांत चुकवितां येणारे नाहींत. १६०. महाप्रलयाच्या वेळीं या त्रैलोक्याचाहि संहार होतो; म्हणून हा उत्पत्ति-नाश टळत नाहीं. १६१. असें हें जर तुला कबूल असेल, तर मग खेद कां करीत आहेस? अर्जुना, तूं शहाणा असून वेड्यासारखें कां करतोस? १६२. या ठिकाणीं अर्जुना, आणखी एक तऱ्हेनें विचार करतां येईल. पुष्कळ बाजूंनीं पाहिलें, तरी तुला दुःख करण्याचें मुळींच कारण दिसत नाहीं. १६३.

**अर्जुना, हे प्राणिमात्र जन्मापूर्वी अमूर्त असतात, मध्यें तेवढें व्यक्त होतात व ( पुनः ) मृत्यूनंतर अव्यक्तच बनतात, मग शोक कसला ? २८.**

कारण हे सर्व जीव जन्माच्या अगोदर निराकार होते, मग जन्मल्यावर त्यांना आकार प्राप्त झाला १६४. ते जेथें नाश होऊन जातात, तेथें निःसंशय वेगळे असत नाहींत. पहा, ते आपल्या मूळच्या ( अव्यक्त ) अवस्थेलाच येतात. १६५. आतां मध्यंतरी जें निराळें ( व्यक्त, साकार रूप ) दिसतें, तें निद्रिताच्या स्वप्नाप्रमाणें होय. त्या स्वप्नाप्रमाणेंच सत्स्वरूप चैतन्याच्या ठिकाणीं मायेमुळें हा जगदाकार दिसतो; १६६. अथवा उदकाला वाऱ्याचा स्पर्श झाल्यावरोबर तें लाटांच्या आकाराचें भासतें किंवा दुसऱ्याच्या इच्छेनें सोन्याला दागिन्याचा आकार येतो; १६७. त्याप्रमाणें ही सर्व आकारास आलेली सृष्टि मायेनें केली ( मायेमुळें भासमान झाली ) आहे, असें समज. ज्याप्रमाणें आकाशांत मेघांचा पडदा उत्पन्न होतो; १६८. त्याप्रमाणें जें मुळांतच नाहीं, त्याकरितां तूं काय रडत बसला आहेस ! निर्विकार असें जें चैतन्य त्याच्याकडे तूं लक्ष दे. १६९.

**कोणी या आत्म्याला आश्चर्याप्रमाणें पहातो ( व विसरून जातो, ) कोणी आश्चर्याप्रमाणें याविषयीं बोलतो ( व तल्लीन होतो, ) आणखी कोणी आश्चर्याप्रमाणें याविषयीं ऐकतो, ( व देहाला विसरतो, ) पण ( याप्रमाणें पाहून, वर्णन करून व ) ऐकूनहि ( यापैकीं ) कोणी याला ( तत्त्वतः ) जाणत नाहीं. २९.**

ज्या चैतन्याच्या प्राप्तीची तळमळ ( संतांच्या ठिकाणीं ) उत्पन्न होतांच, विषय त्या संतांना सोडून जातात. जे विरक्त आहेत, ते त्या आत्म्याच्या लाभाकरितां बनवास स्वीकारतात. १७०. त्याच्यावर नजर ठेवून मोठाले मुनि ब्रह्मचर्यादिक व्रतांचें आणि तपाचें आचरण करतात. १७१. कित्येक स्थिर अंतःकरणाचे लोक त्याला ( आत्म्याला ) निरखून पाहातांच सर्व संसार विसरून जातात. १७२. कित्येक त्याच्या गुणांचें वर्णन करतां करतां चित्तांत वैराग्य उत्पन्न होऊन अमर्याद व अखंड तन्मयता पावतात. १७३. कित्येक ( त्याचें स्वरूपवर्णन ) ऐकतांच शांत होतात व त्यांची देहभावना सुटते. कित्येक ( त्याच्या ) अनुभवानें ( साक्षात्कारानें ) तद्रूपता पावतात. १७४. सर्व नद्या समुद्राला मिळतात; पण त्यांत त्यांचा समावेश झाला नाहीं, म्हणून त्या परतल्या, असें ज्याप्रमाणें केव्हांहि होत नाहीं; १७५. त्याप्रमाणें थोर थोर योग्यांच्या बुद्धि त्याचा ( आत्मस्वरूपाचा ) साक्षात्कार होतांच तद्रूप होतात; पण एकदां ते तद्रूप झाले, कीं विचार करून पुनः देहतादात्म्यावर येत नाहींत. १७६.

**अर्जुना, सर्वांच्या देहामध्यें ( असलेला ) हा आत्मा सर्वकाळ अवध्य आहे. म्हणून कोणत्याहि प्राण्याबद्दल शोक करण्यास तूं योग्य नाहींस. ३०.**

जें सर्वत्र व सर्व देहांत आहे व करूं लागलें तरी ज्याचा घात होत नाहीं, तें विश्वव्यापी एक चैतन्य तूं लक्षांत घे. १७७. हें सर्व जग स्वभावतः उत्पन्न होत आहे व नाश पावत आहे, तर सांग येथें तुला शोक करण्यासारखें काय आहे ? १७८. हे अर्जुना, विचार करून पाहिलें तर तुझ्या चित्ताला हें कां पटूं नये, हें मला समजत नाहीं; पण याचा शोक करणें पुष्कळ प्रकारांनीं वाईट आहे. १७९.

**स्वधर्माकडे पाहून देखील तूं व्याकुळ होण्यास योग्य नाहींस. कर्तव्यप्राप्त युद्धापेक्षां क्षत्रियाला दुसरें हितकर कांहीं नाहीं. ३१.**

तूं अजून ( याचा ) कां विचार करीत नाहींस ? काय हें मनांत घेऊन बसला आहेस ? ज्याच्या योगानें तरून जावयाचें, तो आपला धर्म तूं विसरला आहेस. १८०. या कौरवांचें वाटेल तें झालें, अथवा तुझ्यावरच कांहीं प्रसंग

जऱ्हीं एथ ॥ ८१ ॥ तरी स्वधर्मु एक आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे । मग तरिजेल काय पाहें । कृपाळूपणें ॥ ८२ ॥ अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहलें द्रवीभूत । तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ ८३ ॥ अगा गोक्षीर जरी जाहलें । तरी पथ्यासि नाहीं म्हणितलें । ऐसेनिहि विष होय सुदलें । नवज्वरीं देतां ॥ ८४ ॥ तैसें आनी आन करितां । नाशु होईल हिता । म्हणऊनि तूं आतां । सावध होई ॥ ८५ ॥ वायांचि व्याकुळ कायी । आपुला निजधर्मु पाहीं । जो आचरितां बाधु नाहीं । कवणें काळीं ॥ ८६ ॥ जैसें मार्गेंचि चालतां । अपावो न पवे सर्वथा । कां दीपाधारें वर्ततां । नाडळिजे ॥ ८७ ॥ तयापरी पार्था । स्वधर्में राहाटतां । सकळकामपूर्णता । सहजें होय ॥ ८८ ॥ म्हणोनि यालागीं पाहीं । तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं । संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥८९॥ निष्कपटा होआवें । उसिणा घाई जुंझावें । हें असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी ॥१९०॥

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् । सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥

अर्जुना झुंज देखें आतांचें । हें हो काज दैव तुमचें । कीं निधान सकळ धर्माचें । प्रगटलें असे ॥ ९१ ॥ हा संग्रामु काय म्हणिपे । कीं स्वर्गुचि येणें रूपें । मूर्त कां प्रतापें । उदो केला ॥९२॥ ना तरी गुणाचेनि पतिकरें । आर्तीचेनि पडिभरें । हे कीर्तीचि स्वयंवरें । आली तुज ॥९३॥ क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तैं झुंज ऐसें हें लाहिजे । जैसें मार्गे जातां आडळिजे । चिंतामणिसी ॥ ९४ ॥ ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचटें पडे पीयूख । तैसा संग्रामु हा देख । पातला असे ॥ ९५ ॥

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि । ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥

आतां हा ऐसा अव्हेरिजे । मग नाथिले शोचूं बैसिजे । तरी आपण आहाणा होईजे । आपणपेयां ॥ ९६ ॥ पूर्वजांचें जोडलें । आपणाचि होय धाडिलें । जरी आजि शस्त्र सांडिलें । रणीं इये ॥ ९७ ॥ असती कीर्ति जाईल । जगचि अभिशापु देईल । आणि गिंवसित पावतील । महादोष ॥ ९८ ॥ जैंसी भातारेंहीन वनिता । उपहति पावे सर्वथा । तैशी दशा जीविता । स्वधर्मेवीण ॥ ९९ ॥ ना तरी रणीं शव सांडिजे । तें चौमेरीं गिधीं विदारिजे । तैसें स्वधर्महीन अभिभविजे । महादोषीं ॥ २०० ॥

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् । संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥

म्हणोनि स्वधर्म हा सांडसील । तरी पापा वरपडा होसील । आणि अपेश तें न वचेल । कल्पांतवरी ॥ १ ॥ जाणतेनि तंवचि जियावें । जंव अपकीर्ति आंगा न पवे । आणि सांग पां केवीं निगावें । एथोनियां ॥ २ ॥ तूं निर्मत्सरु सदयता । येथूनि निघसी कीर माघौता । परी ते गति समस्तां । न मनेल ययां ॥ ३ ॥

भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः । येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥

हे चहूंकडूनि वेढितील । बाणवरी घेतील । तेथ पार्था न सुटिजेल । कृपाळुपणें ॥ ४ ॥ ऐसोनिहि प्राणसंकटें । जरी विपायें पां निघणें घटे । तरी तें जियालेंही वोखटें । मरणाहुनी ॥ ५ ॥

आला, अथवा या वेळीं युगान्त जरी झाला, १८१. तरी स्वधर्म म्हणून जो एक आहे, तो मुळींच टाकतां येत नाहीं; असें असतां, विचार कर, कृपाळूपणा धरून तुला तरून जातां येईल काय ? १८२. अर्जुना, तुझें चित्त जरी दयेनें विरघळून गेलें, तरी तें तसें होणें या युद्धाच्या प्रसंगीं योग्य नाहीं. १८३. अरे, दूध जरी गाईचें असलें, तरी तें पथ्यास घेऊं नये, असें ( वैद्यशास्त्रानें ) सांगितलें असतांहि ( आग्रहानें ) नवज्वरांत दिलेंच तर तें विषवत् ( मारक ) होतें. १८४. त्याप्रमाणें भलत्या ठिकाणीं भलतें केलें असतां हिताचा नाश होतो; एवढ्याकरितां तूं आतां सावध हो. १८५. तूं विनाकारण शोकाकुल का होतोस ? ज्याचें आचरण केलें असतां केव्हांहि दोष लागावयाचा नाहीं, त्या आपल्या स्वधर्माकडे लक्ष दे. १८६. ज्याप्रमाणें सरळ रस्त्यानें चाललें असतां मुळींच अपाय पोहोंचत नाहीं, किंवा दिव्याच्या आधारानें चाललें असतां ठेंच लागत नाहीं; १८७. त्याप्रमाणें पार्था, स्वधर्मानें वागलें असतां सर्व इच्छा सहजच पुऱ्या होतात. १८८. म्हणून हें पहा, तुम्हां क्षत्रियांना युद्धावांचून दुसरें कांहीं उचित नाहीं, हें लक्षांत ठेव. १८९. मनांत कपट न धरतां, माऱ्याला मारा करून आवेशानें लढावें; पण हें ( बोलणें ) असो. प्रत्यक्षच प्रसंग आला आहे, तेव्हां जास्त काय सांगावें ! १९०.

**पार्था, अशा प्रकारचें युद्ध ( म्हणजे ) सहजगत्या उघडलेलें स्वर्गाचें द्वार प्राप्त झालें आहे; भाग्यशाली क्षत्रियांनाच हें प्राप्त होतें. ३२.**

अर्जुना, सांप्रतचें युद्ध पहा; हें कार्य म्हणजे जणूं काय तुमचें दैवच फळलें आहे, अथवा सर्व धर्मांचा ठेवाच ( तुमच्यापुढें ) उघडा झालेला आहे ! १९१. याला काय युद्ध म्हणावें ? युद्धाच्या रूपानें हा मूर्तिमंत स्वर्गच ( अवतरला ) आहे. अथवा तुझा प्रतापच हा उगवला आहे. १९२. अथवा तुझ्या गुणांवर लुब्ध होऊन ही कीर्तीच उत्कट इच्छेनें तुला वरण्याला आली आहे. १९३. क्षत्रियानें पुष्कळ पुण्य करावें, तेव्हां त्याला असें हें युद्ध करावयास मिळतें. ज्याप्रमाणें वाटेनें ( सहज ) जात असतां ठेंच लागावी व काय लागलें म्हणून पहावें, तों चिंतामणि आढळावा; १९४. अथवा जांभई येऊन तोंड उघडलें असतां अकस्मात् अमृत येऊन त्यांत पडावें, त्याप्रमाणें हें युद्ध ( अनायासें ) आलेलें आहे असें समज. १९५.



**असें असून हा कर्तव्यप्राप्त संग्राम तूं करणार नाहींस, तर स्वधर्म व कीर्ति टाकल्यामुळें पाप ( मात्र ) मिळवशील. ३३.**

आतां असा हा ( संग्राम ) टाकून नाहीं त्याचा ( भलत्याच गोष्टीचा ) शोक करीत बसलास, तर आपल्याला आपलाच दृष्टान्त योग्य ! ( तुझ्यासारखा मूर्ख तूंच. ) १९६. आज जर तूं या युद्धांत शस्त्र टाकून दिलेंस, तर पूर्वजांनीं मिळवून ठेवलेलें ( पुण्य व यश ) आपणच घालविल्यासारखें होईल. १९७. ( इतकेंच नव्हे, तर तुझी ) असलेली कीर्ति जाईल, सगळें जग तुला नांवें ठेवील आणि महापातकें तुला हुडकीत येऊन गांठतील. १९८. ज्याप्रमाणें पतिविरहित स्त्री सर्व प्रकारें अनादराला पात्र होते, त्याप्रमाणें स्वधर्मत्यागानें जीविताची तशी दशा होते. १९९. अथवा युद्धभूमीवर टाकून दिलेल्या प्रेताला ज्याप्रमाणें चोहींबाजूंनीं गिधाडें तोडतात, त्याप्रमाणें स्वधर्मरहित पुरुषाला महादोष घेरतात. २००.

**( सर्व ) लोक तुझी सर्वकाल अकीर्ति सांगत राहतील आणि संभावित पुरुषाला ( तर ) अकीर्ति मरणापेक्षां जास्त ( वाईट ) आहे. ३४.**

म्हणून तूं आपला धर्म टाकशील, तर पापाला पात्र होशील आणि अपकीर्तीचा डाग तर कल्पान्तापर्यंतहि जाणार नाहीं. २०१. अपकीर्ति जोंपर्यंत अंगाला येऊन बिलगली नाहीं, तोंपर्यंतच शहाण्यानें जगावें. आतां सांग बरें येथून कसें परत फिरावें ? २०२. तूं मत्सर टाकून व दयेनें युक्त होऊन रणांतून परत फिरशील खरा; पण तुझी ती स्थिति या सर्वांना पटणार नाहीं. २०३.

**महारथी, भयामुळें तूं रणांतून परत गेलास, ( असें ) तुला मानतील. ज्यांना तुझ्याविषयीं बहुमान ( वाटत ) होता, त्यांच्या ( दृष्टीनें ) तूं कमीपणाला जाशील. ३५.**

म्हणून हे तुला चारी बाजूंनीं घेरतील; तुझ्यावर बाणांचा वर्षाव करतील; त्याप्रसंगीं अर्जुना ( फक्त ) कृपाळूपणामुळें तुझी सुटका होणार नाहीं. २०४. जरी कदाचित् त्या प्राणसंकटांतून तुझी कशीबशी सुटका झाली, तरी ( तसें ) तें जगणेंहि मरणाहून वाईटच. २०५. आणखीहि अर्जुना

तूं आणीकही एक न विचारिसी । एथ संभ्रमें झुंजों आलासी । आणि सकणवपणें निघालासी । मागुता जरी ॥ ६ ॥ तरी तुझें तें अर्जुना । या वैरियां दुर्जनां । कां प्रत्यया येईल मना । सांगें मज ॥ ७ ॥

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः । निंदन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

हे म्हणतील गेला रे गेला । अर्जुन आम्हां बिहाला । हा सांगें बोलु उरला । निका कायी ॥ ८ ॥ लोक सायासें करूनि बहुतें । का वेंचिती आपुलीं जीवितें । परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ॥ ९ ॥ ते तुज अनायासें । अनकळित जोडिली असे । हें अद्वितीय जैसें । गगन आहे ॥ २१० ॥ तैसी कीर्ती निःसीम । तुझ्या ठायीं निरुपम । तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ॥ ११ ॥ दिगंतीचे भूपति । भाट होऊनि वाखाणिती । जे ऐकिलिया दचकती । कृतांतादिक ॥ १२ ॥ ऐसा महिमा घनवट । गंगा तैसी चोखट । जया देखी जगीं सुभट । वोंठ जाहली ॥ १३ ॥ तें पौरुष तुझें अद्‌भुत । आइकोनियां हे समस्त । जाहले आथि विरक्त । जीवितेंसी ॥ १४ ॥ जैसा सिंहाचिया हांका । युगांतु होय मदमुखा । तैसा कौरवां अशेखां । धाकु तुझा ॥ १५ ॥ जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें । तैसे अर्जुना हे तूतें । मानिती सदा ॥१६॥ तें अगाधपण जाईल । मग हिणावो अंगा येईल । जरी मागुता निघसील । न झुंजतांचि ॥ १७ ॥ आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि अवकळा करिती । न गणित कुटी बोलती । आइकतां तुज ॥ १८ ॥ मग ते वेळीं हियें फुटावें । आतां लाठेपणें कां न झुंजावें । हें जिंतलें तरी भोगावें । पृथ्वीतळ ॥ १९ ॥

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् । तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

ना तरी रणीं एथ । झुंजतां वेंचलें जीवित । तरी स्वर्गसुख अनकळित । पावसील ॥ २० ॥ म्हणोनि ये गोठी । विचारु न करीं किरीटी । आतां धनुष्य घेऊनि उठीं । झुंजें वेगीं ॥ २१ ॥ देखें स्वधर्मु हा आचरतां । दोषु नाशे असता । तुज भ्रांति हे कवण चित्ता । एथ पातकाची ॥ २२ ॥ सांगें पुवेंचि काय बुडिजे । कां मार्गीं जातां आडळिजे । परी विषायें चालों नेणिजे । तरी तेंही घडे ॥ २३ ॥ अमृतें तरीचि मरिजे । जरी विखेंसीं सेविजे । तैसा स्वधर्में दोषु पाविजे । हेतुकपणें ॥ २४ ॥ म्हणोनि तुज पार्था । हेतु सांडोनि सर्वथा । क्षात्रवृत्ती झुंजतां । पाप नाहीं ॥२५॥

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ । ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा न भजावें । आणि लाभालाभ न धरावे । मनामाजीं ॥ २६ ॥ एथ विजयपण होईल । कां सर्वथा देह जाईल । हें आधींचि कांहीं पुढील । चिंतावेना ॥ २७ ॥ आपणयां उचिता । स्वधर्मातेंचि रहाटतां । जें पावे तें निवांता । साहोनि जावें ॥ २८ ॥ ऐसेया मनें होआवें । तरी दोषु न घडे स्वभावें । म्हणोनि आतां झुंजावें । निभ्रांत तुवां ॥ २९ ॥

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु । बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

एका गोष्टीचा विचार तूं करीत नाहींस. येथें तूं मोठ्या उत्सुकतेनें लढण्याकरितां म्हणून आलास आणि आतां जर दया उत्पन्न झाल्यामुळें परत फिरलास; २०६. तर अर्जुना, तुझें तें ( दयाळूपण ) या दुष्ट वैऱ्यांच्या मनाला खरें वाटेल का ? सांग बरें मला. २०७.

**तुझे शत्रू बोलण्याला अयोग्य अशीं बहुत भाषणें बोलतील; ( आणि ) तुझ्या सामर्थ्याची निंदा करीत (राहतील). यापेक्षां अधिक दुःखदायक काय आहे ? ३६.**

ते म्हणतील 'हा पळाला रे पळाला !' 'अर्जुन आम्हांला भ्याला.' असा दोष तुझ्यावर राहिला, तर तें चांगलें का ? सांग. २०८. लोक अनेक कष्ट करितात किंवा प्रसंगीं आपले प्राणहि खर्ची घालतात; पण, धनुर्धरा, कीर्ति वाढवितात. २०९. ती तुला अनायासें पुरी लाभली आहे. आकाश हें ज्याप्रमाणें अद्वितीय आहे; २१०. त्याप्रमाणें अनंत व उपमारहित, अशी तुझ्या ठिकाणीं ( तुझी ) कीर्ति आहे. तिन्ही लोकांत तुझे गुण उत्तम ( म्हणून प्रसिद्ध ) आहेत. २११. देशोदेशींचे राजे भाट बनून ( तुझी गुणकीर्ति ) वाखाणतात, ती ऐकून यमादिकांनाहि धास्ती पडते. २१२. अशी ( तुझी ) थोरवी भक्कम असून गंगेसारखी निर्मल आहे. ती पाहून जगांतील मी मी म्हणणारे वीर चकित होतात. २१३. तो तुझा अपूर्व पराक्रम ऐकून, या सगळ्यांनीं आपल्या जिवाची आशा सोडली आहे. २१४. ज्याप्रमाणें सिंहाच्या गर्जनेनें मदोन्मत्त हत्तीला प्रळयकाळ होतो, त्याप्रमाणें या कौरवांना तुझा धाक बसला आहे. २१५. ज्याप्रमाणें पर्वत वज्राला किंवा सर्प गरुडाला समजतात, त्याप्रमाणें अर्जुना, हे तुला नेहमीं मानतात. २१६. जर तूं न लढतांच परत निघशील, तर तुझें तें महत्त्व नाहींसें होईल आणि मग तुला हीनपणा येईल. २१७. आणि तूं पळून जाऊं लागलास, तर हे कौरव तुला जाऊं देणार नाहींत; तुला पकडून तुझी फजीती करतील आणि तूं ऐकत असतांना तुझी अमर्याद निंदा करतील. २१८. मग त्या वेळीं तुझें हृदय विदीर्ण होईल. त्यापेक्षां आज शौर्यानें कां लढूं नये ? ह्यांना जिंकलेस तर पृथ्वीच्या राज्याचा उपभोग घेशील. २१९.

**मारला गेलास तर स्वर्गाला प्राप्त होशील; अथवा जय मिळविलास तर पृथ्वी भोगशील. म्हणून हे अर्जुना, निश्चय करून युद्धाला उभा रहा. ३७.**

अथवा या समरांगणावर युद्ध करतांना प्राण खर्ची पडले, तर स्वर्गांतील सुख ( तुला ) त्रासावांचून प्राप्त होईल. २२०. एवढ्याकरितां अर्जुना, या गोष्टीचा विचार करीत बसूं नकोस. आतां हें धनुष्य घेऊन ऊठ, आणि लवकर युद्धाला आरंभ कर. २२१. पहा, या स्वधर्माचें आचरण केलें असतां असलेलीं पापें नाहींशीं होतात. ( मग हें युद्ध केल्यानें ) पातक लागेल, हा भ्रम या ठिकाणीं तुझ्या चित्तांत कसा आला ? २२२. अर्जुना सांग, नावेनें कोणी बुडेल का ? किंवा ( चांगल्या ) वाटेनें जातांना ठेंच लागेल का ? पण कदाचित् नीट चालतां येत नसलें तर तेंहि होईल. २२३. दूधच पण जर विषासह सेवन केलें तरच त्यानें ( दुधानें ) मरण येईल. त्याचप्रमाणें फलाशेनें स्वधर्मापासून दोष लागतो. २२४. म्हणून पार्था, फलाशा अगदीं सोडून क्षत्रियांच्या धर्माप्रमाणें युद्ध कर, म्हणजे तुला पाप मुळींच लागणार नाहीं. २२५.

**सुख दुःख, लाभ अलाभ, जय अपजय, हीं सारखीं मानून नंतर युद्धाला सज्ज हो. मनानें असें झालें असतां तुला पाप लागणार नाहीं. ३८.**

सुखाच्या वेळीं संतोष मानूं नये, दुःखाच्या वेळीं खिन्नता धरूं नये आणि लाभ व हानि मनांत धरूं नये. २२६. या युद्धामध्यें जय मिळेल किंवा अजिबात देहच नाहींसा होईल, या पुढच्या गोष्टी अगोदरच चिंतीत बसूं नये. २२७. आपल्याला योग्य असें जें स्वधर्माचें आचरण, तेंच करीत असतांना, जो प्रसंग येईल, तो मुकाट्यानें सहन करून टाकावा. २२८. अशी मनाची तयारी होईल, तर मग सहजच पाप घडणार नाहीं; म्हणून भ्रांति नाहींशी करून तूं आतां लढावेंस हें योग्य आहे. २२९.

**याप्रमाणें सांख्यविषयक बुद्धि तुला सांगितली. आतां अर्जुना, कर्मयोगांतील बुद्धि प्राप्त झाली असतां तूं कर्मबंध टाकून देशील, अशा बुद्धीचें श्रवण कर. ३९.**

हे सांख्यस्थिति मुकुलित । सांगितली तुज एथ । आतां बुद्धियोगु निश्चित । अवधारीं पां ॥ २३० ॥ जया बुद्धियुक्ता । जाहालिया पार्था । कर्मबंधु सर्वथा । बाधूं न पवे ॥ ३१ ॥ जैसें वज्रकवच लेइजे । मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे । परी जैतेंसीं उरिजे । अचुंबिता ॥ ३२ ॥ तैसें ऐहिक तरी न नशे । आणि मोक्षु तो उरला असे । जेथ पूर्वानुक्रमु दिसे । चोखाळत ॥ ३३ ॥

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते । स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

कर्माधारें राहाटिजे । परी कर्मफळ न निरीक्षिजे । जैसा मंत्रज्ञु न बधिजे । भूतबाधा ॥ ३४ ॥ तियापरी जे सुबुद्धि । आपुलौल्या निरवधि । हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ॥ ३५ ॥

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन । बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

जेथ न संचरे पुण्यपाप । जें सूक्ष्म अति निष्कंप । गुणत्रयादि लेप । न लगती जेथ ॥ ३६ ॥ अर्जुना तें पुण्यवशें । जरी अल्पाचि हृदयीं बुद्धि प्रकाशे । तरी अशेषही नाशे । संसारभय ॥ ३७ ॥ जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रगटी । तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणों नये ॥ ३८ ॥ पार्था बहुतीं परी । हे अपेक्षिजे विचारशूरीं । जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ॥ ३९ ॥ आणिकासारिखा बहुवसु । जैसा न जोडे परिसु । कां अमृताचा लेशु । दैवगुणें ॥ २४० ॥ तैसी दुर्लभ जे सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि । जैसा गंगेसी उदधि । निरंतर ॥ ४१ ॥ तैसा ईश्वरावांचुनि कांहीं । जिये आणीक लाणी नाहीं । ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥ ४२ ॥ येरी ते दुर्मति । जे बहुधा असे विकरती । तेथ निरंतर रमती । अविवेकिये ॥ ४३ ॥ म्हणोनि तया पार्था । स्वर्ग संसार नरकावस्था । आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ॥ ४४ ॥

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती । परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ॥ ४५ ॥ म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादि कर्म कीजे । मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ ४६ ॥ एथ हेंवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं । ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥ ४७ ॥

कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥

देखें कामना अभिभूत । होऊनि कर्मे आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥ ४८ ॥ क्रियाविशेषें बहुतें । न लोपिती विधीतें । निपुण होऊनि धर्मातें । अनुष्ठिती ॥ ४९ ॥

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ॥ व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

परी एकचि कुडें करिती । जे स्वर्गकामु मनीं धरिती । यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥ २५० ॥ जैसा कर्पूराचा राशि कीजे । मग अग्नि लाऊनि दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे ।

येथपर्यंत तुला हा ज्ञानमार्ग थोडक्यांत सांगितला. आतां निष्काम कर्ममार्ग निश्चित सांगतों, तो तूं ऐक. २३०. अर्जुना, निष्काम कर्मयोगांतील बुद्धि ज्याला साधली, त्याला कर्मबंध मुळींच बाधत नाहीं. २३१. ज्याप्रमाणें वज्रासारखें चिलखत अंगांत घातलें असतां शस्त्रांची वृष्टि सहन करतां येते, इतकेंच नव्हे तर, ( त्या शस्त्रांचा अंगाला ) स्पर्शहि न होतां विजयी होऊन रहातां येतें; २३२. त्याप्रमाणें ज्या कर्मयोगांत पूर्वीपासून चालत आलेलें कर्म शुद्धपणानें चालू राहिलेलें दिसून येतें, त्या कर्मयोगांत इहलोकांतील भोगांचा नाश तर होत नाहींच, पण मोक्षाचीहि प्राप्ति होते. २३३.

या निष्कामकर्मयोगांत, आरंभ केलेल्या कर्माचा नाश होत नाहीं; याला संकट येत नाहीं. या धर्माचें थोडें जरी ( अनुष्ठान ) झालें, तरी तें मोठ्या भयापासून रक्षण करतें. ४०.

कर्माच्या आधारानें वागावें, पण त्या कर्माच्या फळावर नजर ठेवूं नये. ज्याप्रमाणें मंत्र जाणणाऱ्याला भुताची बाधा होत नाहीं; २३४. त्याप्रमाणें सुबुद्धि ( अनासक्तपणें कर्म करण्याची बुद्धि ) एकदां पूर्णपणें आपलीशी झाली, म्हणजे हा उपाधींत असूनहि उपाधि त्याला बाधा करूं शकत नाहीं. २३५.

हे अर्जुना, निश्चयात्मक ( ईश्वरनिष्ठ ) बुद्धि एकच आहे. जे अनिश्चित आहेत, त्यांना मात्र अनेक भेदांनीं युक्त अशा अनन्त बुद्धि असतात. ४१.

ज्या बुद्धींत पुण्यपापादि कर्मफलांचा प्रवेश होत नाहीं, जी ( विचारानें ) सूक्ष्म व अति निश्चल झालेली असते व जिला रजतमादि गुणांचा विटाळ नसतो; २३६. अर्जुना, ती बुद्धि पुण्याईच्या जोरानें जर थोडीशी हृदयांत प्रगट होईल, तर संसाराचें सर्व भय नाहींसें होईल. २३७. ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत लहान खरी, पण ती मोठा प्रकाश पाडते, त्याप्रमाणें ह्या सद्बुद्धीला लहान म्हणतां येत नाहीं. २३८. अर्जुना, विचार करण्यांत पटाईत असलेले लोक या बुद्धीची पुष्कळ प्रकारें इच्छा करतात; कारण एकंदर सृष्टींत ही सद्बुद्धि दुर्लभ आहे. २३९. ज्याप्रमाणें इतर वस्तु हव्या तितक्या मिळतात, पण परीस तसा मिळत नाहीं, किंवा अमृताचा थेंब मिळण्यास तसाच दैवयोग लागतो, २४०. अमृत जसें दुर्लभ त्याचप्रमाणें, परमात्मा हाच जिचा शेवट ( अन्तिम ध्येय ) आहे ती सद्बुद्धि दुर्लभ आहे. गंगेला ज्याप्रमाणें समुद्रावांचून निखालस अन्य गति नाहीं. २४१. त्याप्रमाणें जिला ईश्वरावांचून अन्य आश्रयस्थान नाहीं, तीच जगांत फक्त एक सद्बुद्धि आहे. पहा. २४२. हीहून अन्य जी बुद्धि, ती दुर्बुद्धि होय. ती अनेक प्रकारें विकार पावते. अविचारी असतात, तेच तिच्या ठिकाणीं नेहमीं आसक्त होतात. २४३. म्हणून पार्था, त्यांना ( दुर्बुद्धियुक्तांना ) स्वर्ग, संसार व नरक हे प्राप्त होतात. ( पण ) त्यांना आत्मसुखाचें मुळींच दर्शन होत नाहीं. २४४.

हे अर्जुना, जी ही पुष्पयुक्त ( वृक्षाप्रमाणें मनोहर ) दिसते, अशा वेदवाणीच्या आधारानें बोलतात. ते वेदाच्या अर्थवादांत रत झालेले, अविवेकी, ( स्वर्गसुख व त्याचें साधन कर्म याखेरीज ) दुसरें कांहीं नाहीं असें म्हणत असतात; ४२.

वेदवचनांचीं प्रमाणें देऊन बोलतात, केवळ कर्ममार्गाचें श्रेष्ठत्व सिद्ध करतात, पण कर्मफलांचा लोभ धरतात. २४५. ते म्हणतात, मृत्युलोकीं जन्मावें, यज्ञादि कर्में करावीं आणि मनोहर अशा स्वर्गसुखाचा उपभोग घ्यावा. २४६. यावांचून या लोकीं दुसरें मुळींच सुख नाहीं, असें, ते दुर्बुद्धीचे लोक प्रतिपादितात; अर्जुना पहा. २४७.

विषयभोगाविषयीं तत्पर व स्वर्गाच्या मागें लागलेले, भोग आणि ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसंबंधानें जिच्यामध्यें पुष्कळ विशेष कर्में सांगितलीं आहेत, जी जन्मरूप कर्मफल देणारी ( अशी वाणी बोलणारे ), ४३.

पहा, केवळ सुखोपभोगाकडे नजर देऊन व फलाशेनें व्याप्त होऊन ते दुर्बुद्धीचे लोक कर्में आचरितात. २४८. अनेक प्रकारच्या कर्मानुष्ठानानें, विधींत जरा कोठेंहि चूक होऊं न देतां व अगदीं दक्षतेनें ते धर्माचरण करतात. २४९.

त्या विषय व ऐश्वर्य यांचे ठिकाणीं आसक्त झालेल्या आणि त्या वाणीच्या योगानें विवेकबुद्धि आच्छादित झालेल्या पुरुषांच्या अंतःकरणामध्यें आत्मतत्त्वविषयक बुद्धि उद्भवत नाहीं. ( ते दुर्बुद्धीच होत. ) ४४.

परंतु ते एकच वाईट गोष्ट करतात. ती हीच कीं, स्वर्गाची इच्छा ते मनांत बाळगतात आणि यज्ञाचा भोक्ता जो परमात्मा, त्याला विसरतात. २५०. ज्याप्रमाणें कापराची रास करावी आणि मग तिला अग्नि लावून द्यावा किंवा

काळकूट ॥ ५१ ॥ दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्मु निपजला । हेतुकपणें ॥ ५२ ॥ सायासें पुण्य अर्जिजे । मग संसारु कां अपेक्षिजे । परी नेणती ते काय कीजे । अप्राप्त देखें ॥ ५३ ॥ जैसी रांधवणी रससोय निकी । करूनियां मोलें विकी । तैसा भोगासाठीं अविवेकी । धाडिती धर्मु ॥ ५४ ॥ म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा । तयां वेदवादरतां । मनीं वसे ॥ ५५ ॥

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन । निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

तिहीं गुणीं आवृत । हे वेद जाणें निभ्रांत । म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते ॥ ५६ ॥ येर रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक । जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ॥ ५७ ॥ म्हणोनि तूं जाण । हे सुखदुःखांसीच कारण । एथ झणें अंतःकरण । रिगों देसी ॥ ५८ ॥ तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी माझें हें न करीं । एक आत्मसुख अंतरीं । विसंब झणीं ॥ ५९ ॥

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके । तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले । तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपे । ॥ २६० ॥ जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती । तरी तेतुलेही काय चालिजती । सांगें मज ॥ ६१ ॥ कां उदकमय सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ । तरी आपण घेपे केवळ । आर्तीचजोगें ॥ ६२ ॥ तैसे ज्ञानीये जे होती । ते वेदार्थातें विवरिती । मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ॥ ६३ ॥

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन । मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

म्हणोनि आइकें पार्था । याचिपरी पहातां । तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ॥ ६४ ॥ आम्हीं समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न संडिजे तुवां आपुलें । विहित कर्म ॥ ६५ ॥ परी कर्मफळीं आस न करावी । आणि कुकर्मीं संगति न व्हावी । हे सत्क्रियाचि आचरावी । हेतुविण ॥ ६६ ॥

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय । सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

तूं योगयुक्त होउनी । फळाचा संग सांडुनी । मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्मे ॥ ६७ ॥ परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे । तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको ॥ ६८ ॥ कां निमित्तें कोणें एकें । तें सिद्धी न वचत ठाके । तरी तेथिंचेनि अपरितोखें । क्षोभावें ना ॥ ६९ ॥ आचरतां सिद्धी गेलें । तरी काजाचि कीर आलें । परी ठेलियाही सगुण जहालें । ऐसेंचि मानीं ॥ २७० ॥ देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं जरी अर्पिजे । तरी परीपूर्ण सहजें । जहालें जाणें ॥ ७१ ॥ देखें संतासंतीं कर्मीं । हें जें सरिसेपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिति उत्तमीं । प्रशंसिजे ॥ ७२ ॥

मिष्टान्नांत जालीम विष घालावें; २५१. किंवा दैवयोगानें मिळालेला अमृताचा घडा लाथ मारून पालथा करावा, त्याप्रमाणें फलाचा अभिलाष धरून ते आयता घडलेला धर्म विनाकारण फुकट घालवितात. २५२. मोठ्या आयासांनीं पुण्य जोडावें, आणि मग संसाराची अपेक्षा कां ठेवावी ? पण पहा, सद्‌बुद्धि ज्यांस प्राप्त नाहीं, अशा त्या अज्ञानी लोकांस हें समजत नाहीं, काय करावें ? २५३. ज्याप्रमाणें एखाद्या सुगरण स्त्रीनें उत्तम पक्वान्नें करून तीं केवळ द्रव्याच्या आशेनें विकून टाकावीं, त्याप्रमाणें हे अविचारी लोक सुखोपभोगाच्या आशेनें हातचा धर्म दवडतात. २५४. म्हणून अर्जुना, वेदांच्या अर्थवादामध्यें मग्न झालेल्या त्या लोकांच्या मनांत पूर्णपणें ही दुर्बुद्धि वास करीत असते, हें लक्षांत ठेव. २५५.

**हे अर्जुना, वेद त्रिगुणात्मक ( संसाराचें ) प्रतिपादन करणारे आहेत, तूं त्रिगुणातीत हो. द्वंद्वरहित हो, नित्य सत्त्वगुणी हो, योगक्षेमरहित हो, ( आणि ) आत्मनिष्ठ हो, (आत्मसुखाला विसरूं नकोस.) ४५.**

तूं असें निःसंशय समज कीं, वेद हे ( सत्त्व, रज व तम या ) तीन गुणांनीं व्याप्त आहेत; म्हणून ( त्यांपैकीं ) उपनिषदादि जे भाग आहेत, ते सगळे सात्त्विक आहेत; २५६. आणि अर्जुना, केवळ स्वर्गसूचक अशा कर्मादिकांचें ज्यांत निरूपण केलेलें आहे, ते बाकीचे ( वेदांचे भाग ) रज व तम या गुणांनीं युक्त आहेत. २५७. म्हणून हे केवळ सुखदुःखाला कारण होणारे आहेत, असें तूं समज व त्यांचे ठिकाणीं कदाचित् तुझें मन जाईल, तर जाऊं देऊं नकोस. २५८. तूं तिन्ही गुण टाकून दे; मीमाझेपण धरूं नकोस; ( पण ) अंतःकरणांत फक्त एका आत्मसुखाचा विसर पडूं देऊं नकोस. २५९.

**सर्वत्र पाणीच पाणी जरी झालें, तरी आपणांस जेवढी तहान असेल तेवढेंच पाणी घ्यावें; त्याप्रमाणें ज्ञानी, संपूर्ण वेदाचा विचार करून त्यांतील आपणांस अपेक्षित ( जें शाश्वत तत्त्व ) त्याचें ग्रहण करतात. ४६.**

जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत, अनेक ( विधिनिषेधांचे ) प्रकार सुचविले आहेत, तरी त्यांपैकीं जेवढें कांहीं आपल्या हिताचें असेल, तेवढेंच घ्यावें. २६०. ज्याप्रमाणें सूर्योदय होतांच सगळे रस्ते ( पुढें स्पष्ट ) दिसूं लागतात; म्हणून तितक्या सगळ्याच रस्त्यांनीं कां जावयाचें ? सांग बरें मला. २६१. किंवा पृथ्वीच्या पाठीवर वाटेल तेवढें जरी पाणी असलें, तरी त्यांतून आपण आपल्या गरजेपुरतेंच घेतों. २६२. त्याप्रमाणें जे ज्ञानी आहेत, ते वेदार्थांचा विचार करितात; मग त्यांत शाश्वत व जें इष्ट त्याचेंच ग्रहण करितात. २६३.

**तुला फक्त कर्मांविषयीं अधिकार आहे; कर्मफलाविषयीं तूं इच्छा धरतां कामा नये. म्हणजे कर्मफलाला हेतुभूत तुला कधीं होतां उपयोगी नाहीं; ( आणि ) कर्म न करण्याविषयीं ( मनाचा ) कल होऊं देऊं नकोस. ४७.**

म्हणून अर्जुना, ऐक. याच दृष्टीनें पाहिलें, तर हें स्वकर्मच या वेळीं तुला उचित आहे. २६४. आम्हीं सर्व गोष्टींचा विचार करून पाहिला; तेव्हां हें असेंच आमच्या मनाला बरें वाटलें कीं, तूं आपलें विहित कर्म सोडूं नयेस. २६५. परंतु कर्मफलाच्या ठिकाणीं आशा ठेवूं नये आणि निषिद्ध कर्म करण्याविषयींहि प्रवृत्ति होऊं देऊं नकोस, हा सदाचारच निष्काम बुद्धीनें आचरावा. २६६.

**अर्जुना, योगयुक्त होऊन, फलाची संगति टाकून तूं ( चित्त देऊन ) कर्में कर. पूर्ण व अपूर्ण कर्माविषयीं जो मनाचा समतोलपणा त्यालाच योग असें म्हणतात. ४८.**

अर्जुना, तूं निष्काम कर्मयोगानें युक्त होऊन कर्मफलाचा अभिलाष टाकून मग मनःपूर्वक विहित कर्में करावींस. २६७. परंतु दैवाच्या अनुकूलतेनें हातांत घेतलेलें कर्म जरी यथासांग पार पडलें, तरी त्यांत विशेष संतोष मानावा, हेंहि नको. २६८. किंवा कांहीं कारणांमुळें तें ( आरंभिलेलें कर्म ) जरी सिद्धीस न जातां ( तसें अर्धवट ) राहिलें, तरीहि त्यासंबंधीच्या असंतोषानें आपल्या चित्ताची गडबड होऊं देऊं नये. २६९. हातीं घेतलेलें कर्म सिद्धीस गेलें, तर खरोखर आपलें कामच झालें; पण जरी अपुरें राहिलें, तरी तें सफल झालें, असेंच समज. २७०. ( कारण, असें ) पहा, जेवढें म्हणून हातून कर्म होईल, तेवढें सगळें जर परमात्म्याला समर्पण केलें, तर तें सहजच पुरें झालें, असेंच समज. २७१. हें पहा, पूर्ण आणि अपूर्ण कर्मांविषयीं हा जो मनाचा समतोलपणा आहे, तीच ( खरी ) योगस्थिति ( निष्काम कर्मयोग ). तिलाच ज्ञानी पुरुष वाखाणतात. २७२.

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥

अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मना आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ॥ ७३ ॥ तो बुद्धीयोग विचारितां । बहुतें पाडें पार्था । दिसे हा अरुता । कर्मभागु ॥ ७४ ॥ परी तेंचि कर्म आचरिजे । तरीच हा योगु पाविजे । जें कर्मशेष सहजें । योगस्थिति ॥ ७५ ॥

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते । तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

म्हणोनि बुद्धियोगु सधरु । तेथ अर्जुना होईं स्थिरु । मनें करीं अव्हेरु ॥ फळहेतूचा ॥ ७६ ॥ जे बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले । इहीं उभयबंधीं सांडिलें । पापपुण्यीं ॥ ७७ ॥

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः । जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥

ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती । आणि यातायाती लोपती । अर्जुना तयां ॥ ७८ ॥ मग निरामयभरित । पावती पद अच्युत । ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ॥ ७९ ॥ तूं ऐसा तैं होसी । जैं मोहातें या सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । संचरेल ॥ २८० ॥

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति । तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान । तेणें निचाडें होईल मन । अपैसें तुझें ॥८१॥ तेथ आणिक कांहीं जाणावें । कां मागिलातें स्मरावें । हें अर्जुना आघवें । पारुषेल ॥ ८२ ॥

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला । समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

इंद्रियांचिया संगती । जियें पसरु होतसे मती । ते स्थिर होईल मागुती । आत्मस्वरूपीं ॥८३॥ समाधिसुखीं केवळ। जैं बुद्धि होईल निश्चळ। तैं पावसी तूं सकळ। योगस्थिति ॥८४॥

अर्जुन उवाचः—स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव । स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥

तेथ अर्जुन म्हणे देवा । हाचि अभिप्रावो आघवा । मी पुसेन आतां सांगावा । कृपानिधी ॥ ८५ ॥ मग अच्युत म्हणे सुखें। जें किरीटी तुज निकें। तें पूस पां उन्मेखें। मनाचेनि॥ ८६ ॥ या बोला पार्थें । म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें। काय म्हणिपे स्थितप्रज्ञातें । बोळखों केवीं ॥ ८७ ॥ आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे । तो कैसां चिन्हीं जाणिजे। जो समाधिसुख भुंजे । अखंडित ॥ ८८ ॥ तो कवणे स्थिती असे । कैसेनि रूपीं विलसे। देवा सांगावें हें ऐसें। लक्ष्मीपती ॥ ८९ ॥ तंव परब्रह्मअवतरणु । जो षड्गुणाधिकरणु । तो काय तेथ नारायणु । बोलतु असे ॥ २९० ॥

हे अर्जुना ( समत्व– ) बुद्धियुक्त होऊन केलेल्या कर्मापेक्षां ( फलेच्छेनें केलेलें ) कर्म अत्यंत निकृष्ट आहे. तूं बुद्धीला शरण जा; फलाचा हेतु धरून कर्म करणारे दीन होत. ४९.

अर्जुना, ( यशापयशीं ) चित्ताची समता हेंच योगाचें वर्म आहे, असें समज. या योगांत मन व बुद्धि यांचें ऐक्य असतें. ( मनाचा संकल्प व बुद्धीचा निश्चय, यांत विरोध नसतो. ) २७३. पार्था, बुद्धियोगाचा ( निष्काम-कर्माचरणाचा ) विचार करून ( तुलनेनें ) पाहतां सकाम-कर्मांचा भाग हा फारच कमी प्रतीचा दिसतो. २७४. परंतु ( आरंभीं ) तेंच सकाम कर्म जेव्हां करावें तेव्हांच ( पुढें ) ह्या निष्काम कर्मयोगाची प्राप्ति होते. कारण असें करतां करतां सकामकर्मांतून कर्तृत्वमद आणि फलास्वाद टाकून राहिलेलें जें शेषकर्म ती सहजच योगस्थिति होय. २७५.

बुद्धियुक्त असलेला ( पुरुष ) या लोकींच पुण्य व पाप या दोहोंचाहि त्याग करतो. म्हणून योगा-करितां प्रयत्न कर. कारण हा योग म्हणजे कर्मांतील कौशल्य होय. ५०.

म्हणून बुद्धियोग हाच भक्कम पायावर उभारलेला आहे. त्यावरच अर्जुना, तूं आपलें मन स्थिर कर व मनानें फलाशेचा त्याग कर. २७६ जे बुद्धियोगाचा आश्रय करितात, तेच संसारसागराच्या पलीकडे जातात. त्यांचीच पाप व पुण्य या दोहोंच्याहि बंधांतून सुटका होते. २७७.

बुद्धियोगाचा अवलंब करणारे कर्मजन्य फलाचा त्याग केल्यानें ज्ञानी होऊन जन्मरूप बंधनापासून मुक्त होतात; ( व ) निरामय अशा मोक्षपदाला जातात. ५१.

ते ( निष्काम कर्मयोगी ) कर्में तर करितात, पण कर्म-फलाला ( मनानेंहि ) शिवत नाहींत. म्हणून अर्जुना, जन्ममरणाच्या त्यांच्या येरझारा बंद पडतात. २७८. अर्जुना, ते बुद्धियोगाचें आचरण करणारे लोक, मग आनंदानें ओथंबलेलें व कधींहि न ढळणारें असें पद पावतात. २७९. अर्जुना, ज्या वेळेला हा मोह तूं टाक-शील आणि तुझ्या मनांत वैराग्याचा संचार होईल, त्या वेळेला तूं असा ( वरीलप्रमाणें ) होशील. २८०.



जेव्हां तुझी बुद्धि मोहरूप मलिनपणाचें अति-क्रमण करील तेव्हां तूं ( पूर्वी ) ऐकलेल्या व पुढें ऐकण्याच्या ( गोष्टी– ) विषयीं विरक्त होशील. ५२.

मग शुद्ध व गंभीर असें आत्मज्ञान ( तुझ्या ठिकाणीं ) उत्पन्न होईल व त्या योगानें तुझें मन सहजच निरिच्छ होईल. २८१. तेथें ( तशी तुझी स्थिति झाल्यावर ) आणखी ( पुढें ) कांहीं समजून घ्यावें किंवा, जें ( कांहीं ज्ञान ) मागें मिळविलें, तें पुन्हां आठवावें, हें सर्व अर्जुना, केवळ जागचे जागीं राहील. २८२.

( व नंतर ) जेव्हां ( नानाप्रकारच्या ) श्रवणांनीं ( संशय– ) ग्रस्त झालेली तुझी बुद्धि निश्चल होऊन समाधिसुखाचें ठिकाणीं स्थिर होईल तेव्हां तुला संपूर्ण योगस्थिति प्राप्त होईल. ५३.

इंद्रियांच्या नादानें जी बुद्धि फांकते ( चंचल होते ), ती पुनः आपल्या स्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होईल. २८३. मग केवळ समाधीच्या सुखांत ( शुद्ध आत्म-सुखाच्या ठिकाणीं ) ज्या वेळेला बुद्धि स्थिर होईल, त्या वेळेला संपूर्ण निष्काम कर्मयोग तुझ्या हातांत आला, असें समज. २८४.

अर्जुन म्हणाला, हे कृष्णा, समाधि सुख अखंड भोगणारा असा जो स्थितप्रज्ञ तो कोणच्या लक्षणांनीं ओळखावा ? स्थितप्रज्ञ काय बोलतो, कसा बसतो व कसा चालतो ? ५४.

त्या वेळीं अर्जुन म्हणाला, देवा, हाच सर्व अभिप्राय मी आतां विचारतों; हे करुणासागरा, तो तूं सांग. २८५. मग श्रीकृष्ण म्हणाला, अर्जुना, तुला जें योग्य वाटेल, तें मोकळ्या मनानें खुशाल विचार. २८६. या बोलण्या-वर अर्जुनानें श्रीकृष्णाला म्हटलें, देवा, स्थितप्रज्ञाला ( ज्याची बुद्धि स्थिर झाली त्याला ) काय म्हणतात व त्याला ओळखावें कसें, सांग बरें ! २८७. आणि ज्याला स्थिरबुद्धि म्हणतात व जो समाधिसुखाचा निरंतर अनुभव घेतो; त्याला कोणत्या लक्षणांनीं ओळखावें ? २८८. तो कोणत्या स्थितींत असतो, कोणत्या प्रकारें वागतो हें, लक्ष्मीपती श्रीकृष्णा मला सांगावें. २८९. तेव्हां ऐश्व-र्यादि सहा गुणांचें आश्रयस्थान व परब्रह्माचा अवतार असलेला जो श्रीकृष्ण, तो काय बोलता झाला, ( तें ऐका. ) २९०.

श्रीभगवानुवाचः — प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् । आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥

म्हणे अर्जुना परियेसीं । जो हा अभिलाषु प्रौढ मानसीं । तो अंतराय स्वसुखेंसी । करीत असे ॥ ९१ ॥ जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरणभरितु । परी विषयामाजि पतितु । जेणें संगें कीजे ॥ ९२ ॥ तो कामु सर्वथा जाये । जयाचें आत्मतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणें ॥ ९३ ॥

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥

नाना दुःखीं प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्ती । अडपैजेना ॥ ९४ ॥ अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं । आणि भयातें नेणे कहीं । परिपूर्णु तो ॥ ९५ ॥ ऐसा जो निरवधि । तो जाण पां स्थिरबुद्धि । जो निरसूनि उपाधि । भेदरहितु ॥ ९६ ॥

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

जो सर्वत्र सदा सारिसा ॥ परिपूर्ण चंद्रु कां जैसा । अधमोत्तम प्रकाशा–। माजीं न म्हणे ॥ ९७ ॥ ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥ ९८ ॥ गोमटें कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे । जो ओखटेनि नागवे । विषादासी ॥ ९९ ॥ ऐसा हरिखशोकरहितु । जो आत्मबोधभरितु । तो जाण पां प्रज्ञायुक्तु । धनुर्धरा ॥ २०० ॥

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

कां कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी । ना इच्छावशें आवरी । आपुले आपण ॥ १ ॥ तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पातली असे ॥ २ ॥ आतां अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक । या विषयांतें साधक । त्यजिती नियमें ॥ ३ ॥

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः । रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परि रसने नियमु न करिती । ते सहस्रधा कवळिजती । विषयीं इहीं ॥ ४ ॥ जैसी वरिवरी पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाशु निपजे । तया वृक्षा ॥ ५ ॥ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आंगें फांके । तैसा मानसीं विषो पोखे । रसनाद्वारें ॥ ६ ॥ येरां इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमू न ये रस हटें । जें जीवन हें न घटे । येणेंविण ॥ ७ ॥ मग अर्जुना स्वभावें । ऐसियाही नियमातें पावे । जैं परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥ ८ ॥ तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभावप्रतीति । प्रगट होय ॥ ९ ॥

श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, मनामध्यें असलेल्या सर्व इच्छा जेव्हां ( निःशेष ) टाकून देतो व स्वतः स्वस्वरूपाचें ठिकाणीं संतुष्ट होतो, तेव्हां त्या पुरुषाला स्थितप्रज्ञ म्हणतात. ५५.

( श्रीकृष्ण ) म्हणाला, अर्जुना ऐक. मनांत जी उत्कट विषयासक्ति असते, ती आत्मसुखांत अडथळा आणते. २९१. जो सदा तृप्त असतो, ज्याचें अंतःकरण नेहमीं आनंदानें भरलेलें असतें, परंतु अशा जीवात्म्याचेंहि ज्याच्या ( कामाच्या ) संगतीनें विषयांमध्यें पतन होतें, २९२. तो काम ज्याचा सर्वथैव गेलेला असतो व ज्याचें मन ( निरंतर ) आत्मसुखांत ( निमग्न ) राहतें, तोच पुरुष स्थितप्रज्ञ होय असें समज. २९३.

दुःखें आलीं असतांना ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं, सुखें आलीं असतां जो त्यांच्याविषयीं निरिच्छ असतो, प्रीति, भय, क्रोध हीं ज्याचीं गेलेली असतात, त्याला स्थितप्रज्ञ मुनि म्हणावें. ५६.

कितीहि दुःखें प्राप्त झालीं, तरी ज्याचें चित्त ( खिन्न ) होत नाहीं, आणि जो सुखाच्या प्रबळ इच्छेनें कधीं अडकला जात नाहीं. २९४. अर्जुना, त्याचें ठिकाणीं स्वभावतःच कामक्रोध नसतात आणि त्याला भय हें केव्हांच माहीत नसतें. (असा) तो परिपूर्ण होय. २९५. असा जो अमर्याद आहे व जो ( देहप्रपंचादि ) उपाधि सोडून भेदरहित झालेला असतो, तो स्थिरबुद्धि होय, असें समज. २९६.

ज्याची कोठेंहि आसक्ति नसते, शुभ किंवा अशुभ प्राप्त झालें असतां ज्याला आनंद किंवा विषाद होत नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली ( असें समजावें ). ५७.

परिपूर्ण चंद्र आपला प्रकाश देतांना हा उत्तम, हा अधम, असें ज्याप्रमाणें म्हणत नाहीं, त्याप्रमाणें जो सर्वत्र सारखा ( समबुद्धीनें ) वागतो; २९७. (ज्याचे ठिकाणीं) अशी निरंतर समता व भूतमात्राविषयीं सदयता असते, आणि कोणत्याहि वेळीं ज्याच्या चित्तांत पालट म्हणून कसा तो होत नाहीं; २९८. कांहीं चांगलें प्राप्त झालें, तरी त्यापासून होणाऱ्या संतोषाचा पगडा ज्याच्या मनावर बसत नाहीं व वाईट गोष्ट झाल्यामुळें जो खिन्नतेच्या तावडींत सांपडत नाहीं; २९९. याप्रमाणें जो हर्षशोक-रहित असतो व आत्मज्ञानानें संपन्न असतो, तो स्थिरबुद्धि होय, असें अर्जुना जाण. ३००.

ज्याप्रमाणें कासव आपले अवयव सर्व बाजूंनीं आंखडून घेतो, त्याप्रमाणें (तो) जेव्हां (आपलीं) इंद्रियें विषयांपासून आंत ओढून घेतो तेव्हां त्याची बुद्धि स्थिर झाली ( असें समजावें ). ५८.

किंवा ज्याप्रमाणें कासव प्रसन्न असतांना आपले अवयव पसरतें किंवा मनाला वाटल्यास आपल्या आपण आंवरून घेतें; ३०१. त्याप्रमाणें ज्याचीं इंद्रियें ताब्यांत असतात व तीं तो जें म्हणेल तें करितात, त्याची बुद्धि स्थिर झालेली आहे, असें समज. ३०२. अर्जुना, आतां आणखी एक नवलाची गोष्ट सांगतों, ऐक. जे साधक निग्रहानें विषयांचा त्याग करितात, ३०३.

आहार न घेणाऱ्या प्राण्याचे रसविषय सोडून बाकीचे विषय निवृत्त होतात. पण परब्रह्माचें ज्ञान झाल्यावर ( हा रसविषय व ) सर्व विषयांची गोडी देखील नाहींशी होते. ५९.

( जे ) श्रोत्रादि इंद्रियें आंवरतात, पण जिभेला आळा घालीत नाहींत, त्यांस हे विषय हजारों प्रकारांनीं घेरून टाकतात. ३०४. ज्याप्रमाणें, एखाद्या झाडाची वरवरची पालवी खुडून टाकली पण मुळाला पाणी घातलें, तर त्या झाडाचा नाश कसा होणार ? ३०५. तें झाड पाण्याच्या जोरावर आडव्या अंगानें ज्याप्रमाणें अधिक विस्तारतें, त्याप्रमाणें रसनेंद्रियाच्या द्वारानें विषयवासना मनांत पोसतात. ३०६. ( ज्याप्रमाणें ) इतर इंद्रियांचे विषय तुटतात, त्याप्रमाणें रस ( खाणें, पिणें ) हा ( जिभेचा ) विषय निग्रहानें तोडतां येत नाहीं; कारण त्यावांचून जगणेंच व्हावयाचें नाहीं. ३०७. पण अर्जुना, जेव्हां ( साधक ) अपरोक्षानुभव घेऊन परब्रह्म होऊन जातो, तेव्हां (त्याला) अशाहि रसनेचें सहज नियमन करतां येतें. ३०८. ज्या वेळीं तें ब्रह्म मी आहे असा अनुभव येतो, त्या वेळीं शरीराचे कामक्रोधादि विकार नष्ट होतात आणि इंद्रियें आपले विषय विसरतात. ३०९.

यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः । इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥

येऱ्हवीं तरी अर्जुना । हें आया नये साधना । जे राहटताती जतना । निरंतर ॥ ३१० ॥
जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥११॥
तेही किजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवसी । भुलवी कां ॥ १२ ॥
देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग आकळिती स्पर्शें । इंद्रियांचेनी ॥ १३ ॥
तिये संधीं मन जाये । मग अभ्यासीं ठोटावलें ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥१४॥

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः । वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

म्हणोनि आइकें पार्था । यांतें निर्दळी जो सर्वथा । सर्वविषयीं आस्था । सांडूनियां ॥१५॥
तोचि तूं जाण । योगनिष्ठेसि कारण । जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥ १६ ॥ जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना ॥ १७ ॥ एऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं । तरी साद्यंतुचि हा पाहीं । संसारु असे ॥१८॥
जैसा कां विषाचा लेशु । घेतलियां होय बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासि ॥ १९ ॥
तैसी यां विषयांची शंका । मनीं वसती देखा । घातु करी अशेखा । विवेकजाता ॥ ३२० ॥

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निसंगाही आपजे संगती । संगीं प्रगटे मूर्ति । अभिलाषाची ॥ २१ ॥ जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला । क्रोधीं असे ठेविला । संमोह जाणें ॥ २२ ॥ संमोहा जालिया व्यक्ति । तरी नाशु पावे स्मृति । चंडवातें ज्योति । आहत जैसी ॥ २३ ॥ कां अस्तमानीं निशी । जैसी सूर्यतेजातें ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियांसी ॥ २४ ॥ मग अज्ञानांध केवळ । तेणें आप्लविजे सकळ । तेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं ॥ २५ ॥ जैसें जात्यंधा पळणी पावे । मग ते काकुळती सैरा धांवे । तैसे बुद्धिसि होती भेंवे । धनुर्धरा ॥ २६ ॥ ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे । तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ॥ २७ ॥ चैतन्याच्या भ्रंशीं । शरीरा दशा जैशी । तैशी पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें ॥ २८ ॥ म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधना । मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ॥ २९ ॥ तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन । तरी येसणें हें पतन । गिंवसीत पावे ॥ ३३० ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥ ३१ ॥ पार्था आणिकही एक । जरी नाशले रागद्वेष । तरी इंद्रियां विषयीं बाधक ।

**हे अर्जुना, ( बुद्धि स्थिर होण्याकरितां ) प्रयत्न करीत असलेल्या विवेकी पुरुषाचेंहि मन चित्त-क्षोभक इंद्रियें बळानें ( विषयाकडे ) ओढतात. ६०.**

एरवीं अर्जुना, हीं इंद्रियें साधनांना दाद देत नाहींत. जे ( तीं इंद्रियें उच्छृंखल होऊं नयेत म्हणून ) नेहमीं जपून वागतात; ३१०. जे ( आपल्यावर ) अभ्यासाचा पहारा ठेवतात, यमनियमांचें ( मनाला ) कुंपण घालतात व जे मनाला नेहमीं मुठींत धरून असतात; ३११. त्या साधकांना देखील ( हीं इंद्रियें ) अगदीं कासावीस करून टाकतात. ह्या इंद्रियांचा प्रताप हा असा आहे. ज्याप्रमाणें हडळ मांत्रिकाला चकविते; ३१२. त्याप्रमाणें पहा, हे विषय ऋद्धिसिद्धींच्या रूपानें प्राप्त होतात आणि मग ते इंद्रियांच्या द्वारें ( साधकाच्या मनाला ) ग्रासून टाकतात. ३१३. अशा पेंचांत मन सांपडलें, म्हणजे तें मन अभ्यासाच्या कामीं पंगु होऊन रहातें. ( त्याचा अभ्यास जागच्या जागीं राहतो. ) इंद्रियांचा जोर हा असा आहे. ३१४.

**त्या सर्वांचें ( इंद्रियांचें ) संयमन करून, योगयुक्त होऊन मत्पर ( माझ्यावरच चित्त ठेवलेला ) असावें. ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत, त्याची बुद्धि स्थिर झाली ( असें समजावें ). ६१.**

म्हणून अर्जुना, ऐक. सर्व विषयांवरील आसक्ति सोडून यांचें ( इंद्रियांचें ) जो सर्वस्वी दमन करतो; ३१५ ज्याचें अंतःकरण विषयसुखाच्या लालसेनें फसलें जात नाहीं, तोच पुरुष योगनिष्ठेला अधिकारी आहे, असें तूं समज. ३१६. तो आत्मज्ञानानें निरंतर संपन्न असतो. त्याचप्रमाणें माझेंहि ( परमात्म्याचेंहि ) अंतःकरणांतून त्याला कधीं विस्मरण होत नाहीं. ३१७. एरवीं ( एखाद्यानें ) बाह्यतः विषयांचा त्याग केला, पण मनांत जर कांहीं विषय ( वासना ) असतील तर हा संपूर्ण संसार त्याला आहेच, असें समज. ३१८. ज्याप्रमाणें विषाचा एक थेंब घेतला, तरी तो फार होतो, आणि मग निःसंशय प्राणाची हानि करतो; ३१९. त्याचप्रमाणें पहा, या विषयांची नुसती शंका ( सूक्ष्म संस्कार ) जरी मनांत राहिली, तरी ती संपूर्ण विचारमात्राचा घात करते. ३२०.

**विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाला त्यांच्याविषयीं प्रीति उत्पन्न होते; प्रीतीमुळें काम उत्पन्न होतो ( व ) कामापासून क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून संमोह, संमोहापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश होतो आणि बुद्धिनाशामुळें ( तो पुरुष ) नाश पावतो. ६२–६३.**

अंतःकरणांत विषयांची जर नुसती आठवण असेल, तर, संग टाकलेल्यासहि पुन्हां विषयासक्ति येऊन चिकटते व त्या विषयासक्तीमुळें विषयप्राप्तीची इच्छा प्रगट होते. ३२१. जेथें काम उत्पन्न होतो, तेथें क्रोधानें आपलें बिऱ्हाड अगोदरच ठेवलेलें असतें, आणि जेथें क्रोध आला तेथें कार्याकार्यविषयीं अविचार ठेवलेला आहेच, असें समज. ३२२. ज्याप्रमाणें सोसाट्याच्या वाऱ्यानें दिवा नाहींसा होतो, त्याप्रमाणें संमोहाची स्वारी प्रकट झाल्यावर स्मृति नाश पावते. ३२३. किंवा सूर्य मावळावयाच्या वेळेला रात्र सूर्यतेजाला ज्याप्रमाणें गिळून टाकते, त्याप्रमाणें स्मृति नाहींशी झाली म्हणजे प्राण्यांची दशा होते. ३२४. मग सर्वत्र अज्ञानाचा केवळ अंधार होतो व त्याचेंच आवरण सर्वांवर पडतें. अशा वेळीं हृदयांत बुद्धि व्याकुळ होते. ३२५. जसा जन्मांध पळापळींत सांपडला म्हणजे निरुपायानें दीन होऊन सैरावैरा धावूं लागतो, तसें अर्जुना, बुद्धीला मग भ्रमण होतें. ३२६. अशा रीतीनें स्मृतीला भ्रंश झाला, म्हणजे मग बुद्धीची सर्व प्रकारें कुचंबणा होते; त्या प्रसंगीं जेवढें म्हणून ज्ञान आहे, तेवढें सर्व समूळ नष्ट होतें ३२७. प्राण निघून गेले असतां शरीराची जशी दशा होते, त्याप्रमाणें बुद्धीचा नाश झाला असतां पुरुषाची तशी स्थिति होते, असें समज. ३२८. म्हणून अर्जुना, ऐक. लांकडाला ठिणगी लागली व ती एकदां का भडकली, म्हणजे त्रिभुवनाला ( जाळण्याला ) ज्याप्रमाणें ती समर्थ होते, ३२९. त्याप्रमाणें विषयांचें चिंतन मनाकडून चुकून ( अल्पहि ) जरी झालें, तरी एवढें हें ( मोठें ) पतन शोधीत येतें. ३३०.

**प्रीति व द्वेष यांनीं रहित आणि आपल्या वश असलेल्या इंद्रियांनीं विषयांचा उपभोग घेणारा व ज्याचें मन स्वाधीन असतें असा ( पुरुष ) स्वास्थ्य संपादन करतो. ६४.**

म्हणून हे सर्व विषय पूर्णपणें मनांतूनच काढून टाकावे, मग रागद्वेष ( आवडनावड ) आपोआप नष्ट होतील. ३३१. अर्जुना, आणीक एक गोष्ट ( ऐक ) रागद्वेषांचा ( एकदां ) नाश झाल्यावर ( मग ) इंद्रियें विषयांत जरी ( कदाचित् ) रममाण झालीं तरी ( ते

रमतां नाहीं ॥ ३२ ॥ जैसा सूर्य आकाशगतु । रश्मिकरीं जगातें स्पर्शतु । तरी संगदोषें काय लिंपतु । तेथिंचेनि ॥ ३३ ॥ तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोध-विहीन । होऊनि असे ॥ ३४ ॥ तरी विषयांतुही कांहीं । आपणपेंवाचुनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥ ३५ ॥ जरी उदकें उदकीं बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्ण तो ॥ ३६ ॥ ऐसा आपणचि केवळ । होऊनि असे निखळ । तयाची प्रज्ञा अचल । निभ्रांत मानीं ॥ ३७ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते । प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिःपर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता । तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसार-दुःखां ॥ ३८ ॥ जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु । तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ॥ ३९ ॥ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे । तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥ ३४० ॥ जैसा निर्वातीचा दीपु । सर्वथा नेणे कंपु । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ॥ ४१ ॥

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चाऽयुक्तस्य भावना । नचाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

ये युक्तीचि कडसणी । नाहीं जयाच्या अंतःकरणीं । तो आकळिला जाण गुणीं । विषयादिकीं ॥ ४२ ॥ तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं नाहीं सर्वथा । आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ॥ ४३ ॥ निश्चळत्वाची भावना । जरी नव्हेचि देखें मना । तरी शांति केवी अर्जुना । आपु होय ॥ ४४ ॥ आणि जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिगे कहीं । जैसा पापियाच्या ठायीं । मोक्षु न वसे ॥ ४५ ॥ देखें अग्निमाजीं घापती । तियें बीजें जरी विरूढती । तरी अशांता सुखप्राप्ती । घडों शके ॥ ४६ ॥ म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें । या कारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥ ४७ ॥

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते । तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥

ये इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष करिती । ते तरलेचि न तरती । विषय-सिंधु ॥ ४८ ॥ जैसी नाव थडिये ठाकितां । जरी बरपडी होय दुर्वाता । तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ॥ ४९ ॥ तैसीं प्राप्तेंही पुरुषें । इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें । तरी आक्रमिला देख दुःखें । सांसारिकें ॥ ३५० ॥

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

म्हणोनि आपुलीं आपणपेया । जरी ये इंद्रियें येती आया । तरी अधिक कांहीं धनंजया । सार्थक असे ॥ ५१ ॥ देखें कूर्म जियापरी । उवाइला अवयव पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि ॥ ५२ ॥ तैसीं इंद्रियें आपैतीं होतीं । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे ॥ ५३ ॥ आतां आणिक एक गहन । पूर्णाचें चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिस पां ॥ ५४ ॥

विषय ) बाधक होत नाहींत. ३३१. ज्याप्रमाणें आकाशांत असलेला सूर्य जगाला आपल्या किरणरूपी हातांनीं स्पर्श करितो, पण त्या संगदोषानें लिप्त होतो काय ? ३३२. त्याप्रमाणें जो विषयांचे ठिकाणीं अनासक्त, आत्मानंदांत तल्लीन व कामक्रोधरहित झालेला असतो; ३३४. आणि विषयांतही ( ज्याला ) आत्मस्वरूपावांचून दुसरें कांहीं दिसत नाहीं, त्याला विषय कसले काय ? आणि कसली कोणाला बाधा करणार ? ३३५. जर पाणी पाण्यांत बुडेल किंवा अग्नि आगीनें पोळेल, तर ( मात्र ) तो पूर्णावस्थेला पावलेला पुरुष विषयांचे संगतीनें लिप्त होईल. ३३६. असा जो केवळ शुद्ध आत्मस्वरूप होऊन राहतो, त्याची बुद्धि स्थिर झालेली आहे, असें तूं निःसंशय मान. ३३७.

चित्त प्रसन्न झालें असतां त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. चित्त प्रसन्न असणाऱ्याची बुद्धि परमात्मस्वरूपीं लवकर स्थिर होते. ६५.

पहा, जेथें चित्ताला निरंतर प्रसन्नता असते, तेथें कोणत्याहि संसारदुःखाचा प्रवेश होत नाहीं. ३३८. ज्याप्रमाणें अमृताचा झरा ज्याच्या पोटांतच उत्पन्न होतो, त्याला तहानभुकेची भीति कधींच नसते; ३३९. त्याप्रमाणें अंतःकरण प्रसन्न झालें तर मग दुःख कसलें, आणि कोठलें ? त्या वेळीं परमात्मस्वरूपाचे ठिकाणीं बुद्धि सहजच स्थिर होते. ३४०. ज्याप्रमाणें निवाऱ्याचे ठिकाणीं असलेली दिव्याची ज्योत मुळींच हालत नाहीं, त्याप्रमाणें योगयुक्त पुरुष स्वस्वरूपीं स्थिर बुद्धीनें राहतो. ३४१.

योगयुक्त नसलेल्या पुरुषाची बुद्धि ( स्थिर ) नसते आणि त्याला ( स्थिरतेची ) इच्छाहि नसते. ज्याला ( स्थिरतेची ) इच्छा नाहीं त्याला शांति नाहीं आणि शांतिरहिताला सुख कोठलें ? ६६.

योगयुक्त होऊन राहण्याचा हा विचार ज्याच्या अंतःकरणांत नाहीं, त्याला शब्दादि विषय ( आपल्या ) पाशांनीं जखडून टाकतात. ३४२. अर्जुना, त्याची बुद्धि स्थिर अशी केव्हांच होत नाहीं; आणि तशी बुद्धिस्थिरतेची उत्कट इच्छाहि त्याचें मनांत उत्पन्न होत नाहीं. ३४३. आणि पहा, निश्चलत्वाची नुसती कल्पनाहि जर त्याच्या मनाला शिवत नाहीं, तर अर्जुना, त्याला शांतीचा लाभ कसा होणार ? ३४४. ज्याप्रमाणें पापी मनुष्याचे ठिकाणीं मोक्षाचा वास नसतो, त्याप्रमाणें जेथें शांतीचा ओलावा नाहीं, तेथें सुख चुकूनसुद्धां कधीं पाय टाकीत नाहीं. ३४५. पहा, विस्तवांत घातलेलें ( भाजलेलें ) बीं जर उगवेल, तर शांतिहीन पुरुषाला सुखप्राप्ति होऊं शकेल. ३४६. म्हणून मनाची चंचलता हेंच दुःखाचें सार आहे; याकरितां इंद्रियांचा निग्रह करावा हें चांगलें. ३४७.

( विषयांचे ठिकाणीं ) इंद्रियें संचार करूं लागलीं असतांना जें मन त्यांच्या मागें संचार करूं लागतें, तें जलमार्गानें जाणाऱ्या नावेला (भलतीकडे) नेणाऱ्या वायूप्रमाणें याच्या ( पुरुषाच्या ) बुद्धीला भलतीकडे नेतें. ६७.

हीं इंद्रियें जें जें म्हणतील, तें तेंच जे पुरुष करितात ( इंद्रियांच्या नादानें जे वागतात ), ते विषयसागराच्या पलीकडे गेले असले, तरी ते खरोखर गेले नाहींत, ( असें समजावें. ) ३४८. ज्याप्रमाणें नाव तीरावर येऊन लागल्यावरहि जर वादळांत सांपडली, तर ज्या अपायाला ती चुकवून आली, तोच अपाय तिला मागून पोंचतो. ३४९. त्याप्रमाणें आत्मप्राप्ति झालेल्या पुरुषानें जर इंद्रियांचे सहज लाड केले, तर तोदेखील पुनः संसारदुःखानें व्यापला जातो, पहा. ३५०.

म्हणून हे महाबाहो, ज्याचीं इंद्रियें विषयांपासून सर्व प्रकारें निग्रह केलेलीं असतात, त्याचीच बुद्धि ( आत्मस्वरूपीं ) स्थिर झाली ( असें समज ). ६८.

म्हणून आपल्याला आपलीं हीं इंद्रियें जर आकळतां येतील तर, अर्जुना, दुसरें कांहीं त्यांहून मोठें सार्थक आहे काय ? ३५१. पहा, ज्याप्रमाणें कांसव प्रसन्न असतांना आपले हातपाय इत्यादिक अवयव पसरतें किंवा मनांत आल्यास आपोआप आंत आंखडून घेतें; ३५२. त्याप्रमाणें ज्याचीं इंद्रियें ताब्यांत असतात व तो म्हणेल तसें करितात, त्याची बुद्धि स्थिर झालेली आहे, असें समज. ३५३. आतां आणखी एक पूर्णावस्थेला पोंचलेल्या पुरुषाचें गूढ ( सहसा लक्षांत न येणारें ) लक्षण तुला सांगतों, ऐक हो. ३५४.

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

देखें भूतजात निदेलें । तेथोंचि जया पाहलें । आणि जीव जेथ चेइले । तेथ निद्रितु जो ॥ ५५ ॥ तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि । मुनीश्वर ॥ ५६ ॥

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥

पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥ ५७ ॥ जरी सरीताओघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तरी अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ॥ ५८ ॥ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्रु जैसा ॥५९॥ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धि । तयासि क्षोभु नाहीं बुद्धि । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥३६०॥ सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवेरी । कीं न लविजे तरी अंधारीं । कोंडिल तो ॥ ६१ ॥ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥ ६२ ॥ जो आपुलेंनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे । तो केवीं रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ॥ ६३ ॥ जो अमृतासि ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ६४ ॥ पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ॥ ६५ ॥

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः । निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥

ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला । तोचि स्थिरप्रज्ञु भला । वोळख तूं ॥ ६६ ॥ तो अहंकारातें दंडुनी । सकळ कामु सांडोनी । विचरे विश्व होऊनि । विश्वाचि माजीं ॥ ६७ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । स्थित्वाऽस्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

हे ब्रह्मस्थिति निःसीम । जे अनुभवितां निष्काम । पातले परब्रह्म । अनायासें ॥ ६८ ॥ जे चिद्रूपीं मिळतां । देहांतीची व्याकुळता । आड ठाकों न शके चित्ता । प्राज्ञा जया ॥ ६९ ॥ तेचि हे स्थिति । स्वमुखें श्रीपति । सांगत अर्जुनाप्रति । संजयो म्हणे ॥ ३७० ॥ ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें । तेथ अर्जुनें मनीं म्हणितलें । आतां आम्हुचियाचि काजा आलें । उपपत्ती इया ॥ ७१ ॥ जें कर्मजात आघवें । एथ निराकारिलें देवें । तरी पारुषलें म्या झुंजावें । म्हणूनियां ॥ ७२ ॥ ऐसा श्रीअच्युताचिया बोला । चित्तीं धनुर्धरु उवायिला । आतां प्रश्नु करील भला । आशंकोनियां ॥ ७३ ॥ तो प्रसंगु असे नागरु । जो सकळ धर्मासि आगरु । कीं विवेकामृतसागरु । प्रांतहीनु ॥ ७४ ॥ जो आपण सर्वज्ञनाथु । निरूपिता होईल श्रीअनंतु । ते ज्ञानदेवो सांगेल मातु । निवृत्तिदासु ॥ ३७५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥

[ ओंव्या ३७५. श्लोक ७२. ]

ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु.

**सर्व प्राणी ज्यासंबंधानें निद्रित असतात त्यासंबंधानें संयमी पुरुष जागरूक असतो. ज्यासंबंधानें प्राणिमात्र जागृत असतात त्यासंबंधानें ज्ञानवान् मुनि निद्रित असतो. ६९.**

पहा, सर्व प्राणी ज्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं निजलेले (अज्ञानी) असतात, त्या ठिकाणीं ज्याला उजाडलेलें असतें (म्हणजे ज्याला आत्मज्ञान झालेलें असतें); आणि जीव ज्या (देहादि प्रपंचाच्या) ठिकाणीं जागे (विषयसुख अनुभवणारे) असतात; त्या ठिकाणीं जो निजलेला (विषयनिवृत्त) असतो. ३५५. तोच तो खरा निरुपाधि होय. अर्जुना, त्याचीच बुद्धि स्थिर झालेली आहे आणि तोच अखंड मुनीश्वर आहे, असें समज. ३५६.

**(उदकानें) चोहोंबाजूंनीं भरत असतांहि ज्याची मर्यादा चळत नाहीं, अशा समुद्रामध्यें ज्याप्रमाणें उदक प्रवेश करतें, त्याप्रमाणें ज्या पुरुषामध्यें (विकृति उत्पन्न न करितां) सर्व इच्छा प्रवेश करतात, त्याला शांति मिळते. विषयांची इच्छा करणाऱ्यांना मिळत नाहीं. ७०.**

अर्जुना, आणखी एका प्रकारानें त्याला ओळखतां येईल. तो प्रकार ऐक. पहा, जशी समुद्रांत निरंतर शांतता असते ३५७. जरी सर्व नद्यांचे प्रवाह तुडुंब भरून (त्या समुद्राला) मिळतात, तरी तो त्यामुळें जराही फुगत नाहीं व आपली मर्यादा थोडीहि सोडीत नाहीं. ३५८. किंवा उन्हाळ्याच्या वेळीं सर्व नद्या आटून गेल्यामुळें, जरी त्यास एकहि नदी मिळाली नाहीं, तरी त्या वेळीं अर्जुना, समुद्र मुळींच ओसरत नाहीं. ३५९. त्याप्रमाणें ऋद्धिसिद्धि प्राप्त झाल्या असतांहि त्याचें मन (हर्षानें) उचंबळत नाहीं आणि त्या जर प्राप्त झाल्या नाहींत, तर अधैर्याची त्याला बाधा होत नाहीं. ३६०. सांग बरें, सूर्याच्या घरीं प्रकाशाला दिवा का लागतो? आणि दिवा लावला नाहीं तर तो सूर्य अंधारानें कोंडून जाईल का? ३६१. पहा, त्याप्रमाणें ऋद्धिसिद्धि आल्या कीं गेल्या, याचें त्याला भानहि नसतें. तो अंतःकरणानें महासुखांत निमग्न असतो. ३६२. जो आपल्या ऐश्वर्यापुढें इंद्रभुवनालाहि तुच्छ समजतो, तो भिल्लांच्या पालांच्या खोपटावर कसा खूष होईल? ३६३. जो अमृताला नांवें ठेवितो, तो त्याप्रमाणें कांजीला हात लावीत नाहीं, त्याप्रमाणें ज्याला आत्मसुखाचा अनुभव आला, तो ऋद्धीचा भोग घेत नाहीं. ३६४. अर्जुना, काय आश्चर्य आहे पहा, जेथें स्वर्गसुखाची खिजगणती नाहीं, तेथें बापड्या ऋद्धिसिद्धींचा काय पाड! ३६५.



**जो पुरुष सर्व इच्छांचा त्याग करून निरिच्छ, ममत्वरहित व अहंकाररहित होऊन संचार करतो, तोच शान्तीला (स्थितप्रज्ञतेला) प्राप्त होतो. ७१.**

असा जो आत्मज्ञानानें तुष्ट झालेला व परमानंदानें पुष्ट झालेला आहे, तोच खरा स्थिरबुद्धि आहे, असें तूं जाण. ३६६. तो अहंकाराला घालवून सर्व कामना सोडून व (अनुभवाच्या अंगानें) जगद्रूप बनून जगांत वावरतो. ३६७.

**अर्जुना, ही ब्रह्मविषयक अवस्था आहे. ही प्राप्त झाल्यावर मोह होत नाहीं. अंतकाळीं देखील या अवस्थेंत स्थित होऊन तो ब्रह्मानंदाप्रत पोंचतो. ७२.**

ही ब्रह्मस्थिति अमर्याद आहे. जे निष्काम पुरुष हिचा अनुभव घेतात, ते अनायासें परब्रह्माला पोंचतात. ३६८. कारण कीं चिद्रूपीं (ज्ञानस्वरूपीं) मिळाल्यावर प्राण जाते वेळीं होणारी व्याकुळता (चित्ताची तळमळ) ज्या ब्रह्मस्थितीमुळें ज्ञान्याच्या चित्तांत लुडबूड करीत नाहीं; ३६९. तीच ही स्थिति, श्रीकृष्णानें स्वमुखानें अर्जुनास सांगितली असें संजय म्हणाला. ३७०. असें श्रीकृष्णाचें बोलणें ऐकून अर्जुनानें असें मनांत म्हटलें कीं, आतां (देवाच्या) ह्या विचारसरणीनें आमचें चांगलें कार्य झालें. ३७१. कारण कीं जेवढें कर्म म्हणून आहे, तेवढें सर्व देवानें त्याज्य ठरविलें, तर मग माझें युद्ध करणें आयतेंच थांबलें. ३७२. श्रीकृष्णाचें बोलणें ऐकून अर्जुन आपल्या चित्तांत असा प्रसन्न झाला. यापुढें त्याचे मनांत शंका येऊन तो (श्रीकृष्णाला) चांगला प्रश्न करील. ३७३. तो प्रसंग मोठा बहारीचा आहे. (जणूं काय तो) सर्व धर्मांचें आगरच किंवा विचाररूपी अमृताचा अमर्याद सागरच आहे! ३७४. सर्वज्ञश्रेष्ठ जो श्रीकृष्ण, तोच स्वतः जें निरूपण करील, ती हकीकत निवृत्तिनाथांचा शिष्य ज्ञानदेव सांगेल. ३७५.



साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ अ. १८-१४३७.

गीता हें मोक्ष प्राप्त करून देणारें ज्ञानप्रधान शास्त्र आहे, असें सूत्ररूपानें भगवंतांनीं दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे; परंतु सर्व जीव तर अज्ञानानें बांधलेले आहेत, असें आपणांस प्रत्यक्षांत दिसतें; तेव्हां अशा अज्ञानी जीवांना मोक्षपद प्राप्त करून घेण्याची योग्यता येणें जरूर आहे; त्यासाठीं कर्मउपासनेचा मार्ग गीतेनें सांगितला आहे व त्याचा आरंभ तिसऱ्या अध्यायांत कर्मापासून झाला आहे. म्हणून 'साधनारंभ' या अध्यायांत सांगितला असें त्यांनीं म्हटलें आहे.

मागल्या अध्यायांत, ज्या स्थितींत कर्म व कर्ता कांहींच राहत नाहीं, त्या स्थितीचें भगवंतांनीं केलेलें वर्णन ऐकून अर्जुनानें देवाला जरा जोरानेंच प्रश्न केला. 'देवा, तूं कर्मांचा एका बाजूनें निषेध करतोस व दुसऱ्या बाजूनें मला हिंसारूपी पाप करावयासहि तूंच सांगतोस ( १-५. ) हा तुझा दुटप्पी उपदेश नको. मला सोप्या व निःसंदिग्ध रीतीनें माझें हित निश्चित कशांत आहे तें सांग; असें विचारण्याचा माझा हक्कहि आहे. अनेक जन्म तुझी उपासना करून तुझी प्राप्ति झाली आहे व आईप्रमाणें तुझी माझ्यावर प्रेमाची पाखरहि आहे.' ( ६-३१. ) या प्रश्नावर श्रीभगवंतांनीं सविस्तर उत्तर दिलें. त्याचा अनुवाद श्रीज्ञानदेवांनीं केला तो थोडक्यांत असा आहे— 'निष्काम कर्ममार्ग व ज्ञानमार्ग हे दोन्ही मीच सांगितले व ते दोन्ही एकाच फळाची प्राप्ति करून देतात; परंतु या दोन्ही मार्गांचे मंद व तीव्र असे भिन्नभिन्न अधिकारी आहेत; म्हणून त्यानुसार दोन मार्ग वेगळे सांगणें जरूर पडलें. जो मंद अधिकारी आहे, त्याला कर्म टाकून देऊन निरिच्छ अधिकाऱ्याकरितां सांगितलेल्या ज्ञानमार्गाचा अवलंब करण्यास सांगणें योग्य होणार नाहीं; कारण केवळ कर्म टाकण्यानें कर्मत्याग होऊं शकत नाहीं. ( ३२-५२. ) कर्मत्याग प्रत्यक्षांत घडणें शक्यच नाहीं. फार काय, कर्मातीत अवस्थेला प्राप्त झालेल्या पुरुषालाहि शरीर धारण करीत आहे, तोंपर्यंत कर्मत्याग करणें शक्य नाहीं. ( ५३-६२. ) मग मंद, वासनासक्त पुरुषासंबंधीं बोलावयासच नको. या वासनासक्त पुरुषांनीं जरी बाह्यतः कर्मेंद्रियप्रवृत्तींचा विरोध केला तरी आंत वासना वळवळ करीत असल्यामुळें त्यांत त्यांचा दांभिकपणा मात्र दिसून येतो. ( ६३-६७. ) जो खरा निष्काम पुरुष आहे, तो आपलें अंतःकरण स्थिर करून राहत असतो. त्याचीं कर्मेंद्रियें आपापले व्यापार करीतच असतात. त्यामुळें सामान्य लोकांप्रमाणेंच तो वागतांना दिसतो; परंतु सूर्यबिंब हें जरी पाण्यांत प्रतिबिंबित झालेलें दिसलें, तरी तें जसें पाण्याहून अलिप्त असतें, तसा हा पुरुष कर्मांचरण करीत असतांना दिसला तरी तो कर्मांपासून मुक्तच आहे. ( ६५-७६. ) अशी जेथें निरिच्छ पुरुषाचीहि राहणी आहे, तेथें वासनासक्त पुरुषानें विहित कर्म टाकून कर्मातीत होण्याचा कां आग्रह करावा ? त्यामुळें कर्मत्याग तर होणार नाहींच, पण त्याचें हसूं मात्र होईल. वास्तविक प्रत्येकानें अहंकार टाकून देऊन निष्काम बुद्धीनें स्वकर्म करण्यांतच हित आहे. त्यामुळें त्याला कर्मबंध न लागतां मोक्षाप्रत जातां येतें. ( ७७-८०. ) असें वागणें हाच आपला नित्य यज्ञ आहे. हें स्वधर्माचरण ज्याचे हातून घडत नाहीं त्याची कुकर्मांकडे प्रवृत्ति घडते व तद्द्वारां नाश होतो. ब्रह्मदेवानें जेव्हां सृष्टीची उत्पत्ति केली, तेव्हां मनुष्यप्राण्याबरोबर स्वधर्म त्याच्या मागें लावला व प्रजेला सांगितलें कीं, याचें आचरण करण्यांत तुमचें हित आहे. याशिवाय व्रतवैकल्यें, तीर्थें, साकांक्ष आराधनें, मंत्रतंत्र कांहीं करण्याची तुम्हांला जरुरी नाहीं. हें स्वधर्माचरण न कराल व इंद्रियांच्या ओढीनुसार कुकर्मांत दंग व्हाल तर त्रैलोक्यांतील सर्व पापें व दुःखें तुम्हांला भोगावीं लागतील. तें टाळून सुख प्राप्त करून घ्यावयाचें असेल, तर इंद्रियांना स्वैर चरूं न देतां स्वधर्माची कास धरावी.' ( ८६-११८. ) ( ज्ञानदेवांनीं या स्वधर्माचे स्पष्टीकरणांत अग्निमुखीं हवन, देवपूजा, ब्राह्मणभोजन, गुरुभक्ति, अतिथीसत्कार व ज्ञातिसंतोष यांचा उल्लेख केला आहे. ) जेवढें म्हणून सन्मार्गानें आपण मिळविलें असेल, तें भोगार्थ न समजतां तें स्वधर्मरूप यज्ञद्वारां परमेश्वरास अर्पण करावें व राहिलें तें शेषप्रसाद म्हणून संतोषानें सेवन करावें. ( ११९-३०. ) ज्यानें यज्ञ सिद्धीस जातो, तें अन्न सामान्य समजूं नये. जीवनाला

हेतु असणारें अन्न ब्रह्मरूप समजावें. ( १३१–३७. ) याप्रमाणें जो वागत नाहीं, तो मनुष्यजन्माला येऊन आपला जन्म पशुप्रमाणें फुकट घालवितो. येवढ्याकरितां प्रत्येकानें कर्म न टाकतां तें यथाविधि निर्दोष रीतीनें करावें. मनुष्याला जें शरीर प्राप्त झालें आहे, तेंच मुळीं पूर्वकर्माचें फळ भोगण्यासाठीं आहे, मग कर्म टाकणें कधीं तरी शक्य आहे का ? (१३८–४५.) जो कृतकृत्य पुरुष आत्मस्वरूपीं गढलेला असतो त्याचाच कर्माशीं संबंध सुटलेला असतो. (१४६–४७.) ही स्थिति सामान्य नाहीं व ती जोंपर्यंत प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंत कर्माचरण केलेंच पाहिजे. त्यांत कांहीं बिघडत तर नाहीं उलट मोक्षाप्रत जाता येतें. ( १४८–५३. ) मागें जनकादिक थोर पुरुष कर्मत्याग न करतां कर्माचरण करूनच मोक्षाप्रत गेले, शिवाय आणिकही एक यांत फायदा आहे कीं अज्ञानी पुरुषांना कर्म कसें करावें, याचा या पुरुषांच्या आचरणामुळें कित्ता मिळतो. हे अज्ञानी लोक थोर लोकांचें आचरण पाहून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करीत असतात; म्हणून ज्ञानी व प्राप्त पुरुषांनीं कर्मत्याग न करतां स्वतःला जरूर म्हणून जरी नसलें तरी या अज्ञानी जीवांना उदाहरण म्हणून कर्में कटाक्षानें अवश्य करावींत. (१५४–५९.) जनकादिकांचें काय, प्रत्यक्ष मी पूर्ण काम असून प्राणिमात्र माझ्याकडे पाहून चालतात म्हणून त्यांच्याकरितां सकाम पुरुषांप्रमाणें मीहि कर्माचरण निमूटपणें करितों. हेंच जर कर्म मी केलें नाहीं, तर भूतमात्रांना आचार रहाणार नाहीं. एवढ्यासाठीं समर्थ व प्राप्त पुरुषांनीं अज्ञानी जीवांना चुकूनसुद्धां आपला नैष्कर्म्य बोध सांगू नये. उलट बहुरूपी जशी सोंगाची बतावणी उत्कृष्टपणें करतो, तसें स्वधर्माचरण, अज्ञ लोकांसाठीं त्या लोकांच्या रीतीनें करावें. ( १६०–७६. ) या स्वधर्माचरणांत एक गोष्ट मात्र कटाक्षानें लक्षांत ठेवली पाहिजे कीं, हीं कर्में प्रकृतीच्या गुणानुसार इंद्रियद्वारां होतात. आपला त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं. ब्रह्मनिष्ठ पुरुषांची हीच अंतरीं दृढ समजूत असते, म्हणून लोकसंग्रहाकरितां त्यांनीं जरी कर्में केलीं, तरी त्यांच्याशीं त्यांचें तादात्म्य नसल्यामुळें कर्मांचा बंध त्यांना बाधा करूं शकत नाहीं. जो तादात्म्य घेतो, तो या बंधांत सांपडतो. ( १७७–८५. ) असें असल्यामुळें अर्जुना, तुला प्रस्तुत जें क्षत्रियाचें लढण्याचें स्वकर्म प्राप्त झालें आहे तें तूं कसें टाकणार ? हातांत धनुष्य घे, लढ, पृथ्वीला दुष्टांच्या भारापासून सोडव, कीर्ति वाढव. तुला याशिवाय दुसरें गत्यंतरच नाहीं. (१८६–९१.) मी सांगितलेल्या हातवटीनें जर तूं युद्ध केलेंस तर तूं कर्मरहितच असा राहशील. (१९१–९३.) पण उलट प्रकृति-तंत्र होऊन राहशील तर त्यांत निःसंशय आत्मनाश आहे. ( १९४–२०१. ) म्हणून ज्ञानी जरी असले तरी त्यांनीं प्रकृति-तंत्र होऊन इंद्रियाचे चोजले चुकुनसुद्धां पुरवूं नयेत. स्वैर इंद्रियाचरण क्षणभर गोड लागेल; पण शेवटीं देह हा नाशिवंत आहे. त्याची तीन चिमट्या राख झाल्यावर शेवटीं काय शिल्लक राहील ? (२०२–९.) म्हणून विषयांची आठवणहि मनांत ठेवूं नये. एक स्वधर्माचरणच अंतरीं जागृत ठेवावें. (२१०–१८.) चार वर्णांचीं व चार आश्रमाचीं कर्में निरनिराळीं आहेत. तीं प्रत्येकानें आपापल्या वांट्याला आल्याप्रमाणें करावींत. आपलें कर्म, आचरण करण्यास कष्टदायक आहे व दुसऱ्या धर्माचें सोपें आहे, म्हणून आपलें कर्म सोडून दुसऱ्याचें घेऊं नये. आपलें कर्म आचरत असतां त्यांत मरण आलें तरी बेहेत्तर. त्यामुळें इह व परलोकीं सुखच मिळेल. ( २१९–२९. ) यावर अर्जुनानें देवाला शंका विचारली कीं, अज्ञानी लोकांना तुम्ही सांगतां तें माहीत नाहीं म्हणून त्यांच्याकडून स्वधर्माचरण होत नाहीं हें क्षम्य आहे; पण जे जाणते आहेत त्यांना कळत असूनहि त्यांच्या हातून कर्माचरण घडत कां नाहीं ? ( २३०–३८. ) कळत असून वळत कां नाहीं, याचें कारण भगवंतांनीं स्पष्ट केलें ' या जाणत्या पुरुषांचेहि ज्यांच्यापुढें चालत नाहीं, असे बलात्कारी काम-क्रोध हे मांग आहेत. यांनींच ज्ञानी, भजनी साधकांचा आजपर्यंत नाश केला आहे. दैवी संपत्तीचा उच्छेद यांनींच केला. अज्ञानी लोक तर बापडे बिचारे ! पण मी मी म्हणविणारे जे ज्ञानी तेसुद्धां यांच्यापुढें तेव्हांच गारद होतात. ( २३९–५९. ) ज्ञान फार कल्याणकारक व शुद्ध आहे पण जेथें ज्ञान आहे तेथें हे दुष्ट राक्षस अगोदरच येऊन बसतात. ( २६०–६६. ) यांची हकालपट्टी करण्याचा एकच उपाय आहे व तो म्हणजे या काम-क्रोधांचें राहण्याचें ठिकाण जीं इंद्रियें आहेत, यांचें पूर्णपणें दमन करणें हा होय. काम-क्रोध तेथून गेले कीं, मन व बुद्धि या दुष्टांच्या कचाट्यांतून सुटेल. (२६७–६९.) व जीवाला ब्रह्मरूपी स्वराज्य उपभोगण्यास मिळून तो अक्षय सुखांत रममाण होईल. ( २७०–७१. ) पुढील अध्यायांत श्रीकृष्ण पुनः एक प्राचीन कथा सांगणार आहेत, तिचा अनुवाद शांतादि रसांसह करून तुम्हांला सुखाची रेलचेल करून देईन, असें सांगून श्रीज्ञानदेव हा अध्याय संपवितात.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तिसरा

अर्जुन उवाच—ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन । तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥

मग आइका अर्जुनें म्हणितलें । देवा तुम्हीं जें वाक्य बोलिलें । तें निकें म्यां परिसलें । कमळापती ॥ १ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां । ऐसें मत तुझें अनंता । निश्चित जरी ॥ २ ॥ तरी मातें केवी हरी । म्हणसी पार्था संग्रामु करीं । इये लाजसीना महाघोरीं । कर्मीं सुतां ॥ ३ ॥ हां गा कर्म तुंचि अशेष । निराकरिसी निःशेष । तरी मजकरवीं हें हिंसक । कां करविसी तूं ॥ ४ ॥ तरी हेंचि विचारीं हृषीकेशा । तूं मानु देसी कर्मलेशा । आणि येसणी हे हिंसा । करवीत अहासी ॥ ५ ॥

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे । तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥

देवा तुवांचि ऐसें बोलावें । तरी आम्हीं नेणतीं काय करावें । आतां संपलें म्हण पां आघवें । विवेकाचें ॥ ६ ॥ हां गा उपदेशु जरी ऐसा । तरी अपभ्रंशु तो कैसा । आतां पुरला आम्हां धिंवसा । आत्मबोधाचा ॥ ७ ॥ वैद्यु पथ्य वारूनि जाये । मग जरी आपणचि विष सुये । तरी रोगिया कैसेनि जिये । सांगें मज ॥ ८ ॥ जैसें आंधळें सुईजे आव्हांटा । कां माजवण दीजे मर्कटा । तैसा उपदेशु हा गोमटा । वोढवला आम्हां ॥ ९ ॥ मी आधींचि कांहीं नेणें । वरी कवळिलों मोहें येणें । कृष्णा विवेकु या कारणें । पुसिला तुज ॥ १० ॥ तंव तुझी एकेकी नवाई । एथ उपदेशामाजि गांवाई । तरी अनुसरलिया काई । ऐसें कीजे ॥ ११ ॥ आम्हीं तनुमनुजीवें । तुझिया बोला वोटंगावें । आणि तुवांचि ऐसें करावें । तरी सरलें म्हणे ॥ १२ ॥ आतां ऐसियापरी बोधिसी । तरी निकें आम्हां करिसी । एथ ज्ञानाची आस कायसी । अर्जुन म्हणे ॥ १३ ॥ तरी ये जाणिवेचें कीर सरलें । परी आणीक एक असें जाहलें । जें थितें हें डहुळलें । मानस माझें ॥ १४ ॥ तेवींचि कृष्णा हें तुझें । चरित्र कांहीं नेणिजे । जरी चित्त पाहसी माझें । येणें मिषें ॥ १५ ॥ ना तरी झकवीतु आहासी मातें । कीं तत्त्वचि कथिलें ध्वनितें । हें अवगमितां निरुतें । जाणवेना ॥ १६ ॥ म्हणोनि आइकें देवा । हा भावार्थु आतां न बोलावा । मज विवेकु सांगावा । मऱ्हाटा जी ॥ १७ ॥ मी अत्यंत जड असें । परी ऐसाही निकें परियसें । कृष्णा बोलावें तुवां तैसें । एकनिष्ठ ॥ १८ ॥



देखें उत्प्लवना सरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा ।
सांगें नरु केवीं तसा । पावे वेगा ? ॥
तो हळहळ टाळें टाळें । केउतेनि एके वेळे ।
तया मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय १२, ओवी ४१।४२.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तिसरा

अर्जुन म्हणाला, हे श्रीकृष्णा, कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ आहे असें तुला संमत आहे, तर घोर कर्माचे ठिकाणीं तूं माझी योजना कां करीत आहेस? १.

मग अर्जुन म्हणाला, श्रीकृष्णा ऐका. देवा, तुम्ही जें कांहीं बोललांत, तें मी चांगलें ऐकलें. १. श्रीअनंता, तुमच्या मागील व्याख्यानाचा विचार करून पाहिला असतां त्या ठिकाणीं कर्म आणि त्याचा कर्ता, हे उरतच नाहींत व हेंच जर तुझें मत निश्चित असेल, २. तर मग श्रीकृष्णा, 'अर्जुना, तूं युद्ध कर' असें मला कसें सांगतोस? ह्या मोठ्या घोर कर्मामध्यें मला घालतांना तुला कांहीं लाज वाटत नाहीं काय? ३. अरे, तूंच जर सर्व कर्मांचा पूर्ण निषेध करितोस, तर मग हें हिंसात्मक कृत्य माझ्याकडून तूं कां करवितोस? ४. तर हृषीकेशा, याचा तूंच विचार करून पाहा कीं, तूं कर्माला मान देऊन माझ्याकडून ही एवढी मोठी हिंसा करवीत आहेस. (याचा मेळ कसा घालावा?) ५.

घोटाळ्याच्या दिसणाऱ्या (या) भाषणानें तूं माझ्या बुद्धीला मोह पाडल्यासारखें करीत आहेस. तर ज्याच्या योगानें मला हित प्राप्त होईल असें एक निश्चित करून सांग. २.

श्रीकृष्णा, तूंच असें (असंबद्ध) बोलूं लागलास, तर मग आमच्यासारख्या अजाण माणसांनीं काय करावें? आतां सारासार विचार जगांतून पार नाहींसा झाला, असें म्हणेनास! ६. अरे, याला जर हित सांगणें म्हणावयाचें, तर मग भ्रम उत्पन्न करणारें भाषण याहून वेगळें तें काय राहिलें? आतां आमची आत्मबोधाची इच्छा चांगलीच पुरली म्हणावयाची! ७. वैद्यानें प्रथम रोग्यानें काय खावें व काय खाऊं नये, हें सांगून गेल्यावर मग त्यानेंच जर रोग्यास विष दिलें, तर तो रोगी कसा वांचावा, हें मला सांग बरें! ८. आंधळ्याला जसें (मुद्दाम) आडमार्गांत घालावें किंवा आधींच माकड आणि त्यांत त्याला मादक पदार्थ पाजावा, त्याप्रमाणें तुझा हा उपदेश आम्हांला फार चांगला लाभला आहे! ९. मला अगोदरच कांहीं समजत नाहीं, शिवाय, या भ्रमानें मला घेरलें आहे, म्हणून कृष्णा, तुला सारासार विचार पुसला. १०. पण तुझें एकेक पाहावें, तों सर्वच आश्चर्य! इकडे उपदेश करतोस आणि त्यांत घोटाळ्यांत घालतोस! तर तुझ्या उपदेशाप्रमाणें चालावयाचें असा ज्यांचा विचार आहे, त्यांच्याशीं तूं असें वागावेंस का? ११. आम्हीं शरीरानें, मनानें व जीवानें तुझ्या शब्दांवर अवलंबून राहावें आणि तूंच असें (भलतेंच) करावेंस, तर मग सर्व संपलें म्हणावयाचें! १२. आतां याप्रमाणेंच जर तूं उपदेश करणार असशील, तर मग आमचें चांगलेंच कल्याण करतोस म्हणावयाचें! अर्जुन म्हणाला, आतां येथें ज्ञान मिळण्याची आशा कशाची? १३. ज्ञान मिळविण्याची गोष्ट तर खरोखरच संपली, पण यांत आणखी एक असें झालें कीं, माझे निश्चित असलेले विचार यामुळें गडबडले. १४. त्याचप्रमाणें श्रीकृष्णा, तुझें हें चरित्र कांहीं समजत नाहीं; कदाचित् या निमित्तानें तूं माझें मन पहातोस कीं काय? (तें न कळे!) १५. अथवा तूं आम्हांला फसवीत आहेस किंवा गूढार्थानें तत्त्वज्ञानच सांगितलें आहेस, हें विचार करून पाहिलें, तरी निश्चित असें कांहींच समजत नाहीं. १६. एवढ्याकरितां देवा, ऐक. हा उपदेश अशा गूढार्थानें सांगूं नकोस. महाराज, मला तो विचार माझ्या भाषेत मला समजेल असा सोपा करून सांगावा. १७. मी अतिशय मंद आहे; परंतु कृष्णा, अशाहि मला चांगलें समजेल, असें एक निश्चयात्मक सांग. १८. हें पहा, रोगाला हटविण्याकरितां औषध

देखें रोगातें जिणावें । औषध तरी देयावें । परी तें अतिरुच्य व्हावें । मधुर जैसें ॥ १९ ॥ तैसें सकळार्थभरित । तत्त्व तरी सांगावें उचित । परी बोधे माझें चित्त । जयापरी ॥ २० ॥ देवा तुजऐसा निजगुरु । आजि आर्तीधणी कां न करूं । एथ भीड कवणाची धरूं । तूं माय आम्हुची ॥ २१ ॥ हां गा कामधेनूचें दुभतें । दैवें जाहलें जरी आपैतें । तरी कामनेची कां तेथें । वानी कीजे ॥ २२ ॥ जरी चिंतामणी हातां चढे । तरी वांछिचें कवण सांकडें । कां आपुलेनि सुरवाडें इच्छावें ना ॥ २३ ॥ देखा अमृतसिंधुतें ठाकावें । मग ताहाना जरी फुटावें । तरी सायासु कां करावे । मागील ते ॥ २४ ॥ तैसा जन्मांतरीं बहुतीं । उपासितां लक्ष्मीपती । तूं दैवें आजि हातीं । जाहलासी जरी ॥ २५ ॥ तरी आपुलिया सवेसा । कां न मगावासि परेशा । देवा सुकाळु हा मानसा । पाहला असे ॥ २६ ॥ देखें सकळार्तीचें जियालें । आजि पुण्य यशासि आलें । हे मनोरथ जहाले । विजयी माझे ॥ २७ ॥ जी जी परममंगळधामा । देवदेवोत्तमा । तूं स्वाधीन आजि आम्हां । म्हणऊनियां ॥ २८ ॥ जैसें मातेच्या ठायीं । अपत्या अनवसरु नाहीं । स्तन्यालागूनि पाहीं । जियापरी ॥ २९ ॥ तैसें देवा तूतें । पुसिजतसे आवडे तें । आपुलेंनि आर्तें । कृपानिधि ॥ ३० ॥ तरी पारत्रिकीं हित । आणि आचरितां तरी उचित । तें सांगें एक निश्चित । पार्थु म्हणे ॥ ३१ ॥

श्रीभगवानुवाच—लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥

या बोला अच्युतु । म्हणतसे विस्मितु । अर्जुना हा ध्वनितु । अभिप्रावो ॥ ३२ ॥ जे बुद्धियोगु सांगतां । सांख्यमतसंस्था । प्रकटिली स्वभावता । प्रसंगें आम्हीं ॥ ३३ ॥ तो उद्देशु तूं नेणसीचि । म्हणोनि क्षोभलासि वायांचि । तरी आतां जाण म्यांचि । उक्त दोन्ही ॥ ३४ ॥ अवधारीं वीरश्रेष्ठा । ये लोकीं या दोन्ही निष्ठा । मजचिपासूनि प्रगटा । अनादिसिद्धा ॥ ३५ ॥ एकु ज्ञानयोगु म्हणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिजे । जेथ ओळखीसवें पाविजे । तद्रूपता ॥ ३६ ॥ एक कर्मयोगु जाण । जेथ साधकजन निपुण । होवूनिया निर्वाण । पावती वेळे ॥ ३७ ॥ हे मार्गु तरी दोनी । परि एकवटती निदानीं । जैसी सिद्धसाध्यभोजनीं । तृप्ति एकी ॥ ३८ ॥ कां पूर्वापर सारिता । भिन्ना दिसती पाहतां । मग सिंधुमिळणीं ऐक्यता । पावती शेखीं ॥ ३९ ॥ तैसीं दोनी ये मतें । सूचिती एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते । आधीन असे ॥ ४० ॥ देखें उत्प्लवनासरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नरु केवीं तैसा । पावे वेगां ॥ ४१ ॥ तो हळूहळू ढाळेंढाळें । केतुकेनि एके वेळे । मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥ ४२ ॥ तैसें देख पां विहंगममतें । अधिष्ठूनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥ येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें । पूर्णता अवसरें । पावते होती ॥ ४४ ॥

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥

वांचोनि कर्मारंभ उचित । न करितांचि सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईजेना ॥ ४५ ॥ कां प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्या होइजे । हें अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥

तर द्यावें, पण तें औषध ज्याप्रमाणें अतिशय रुचकर आणि गोड असें असावें; १९. त्याप्रमाणें सर्वार्थानें भरलेलें योग्य तत्व तर सांगावें, पण तें असें सांगावें कीं, जेणेंकरून तें माझ्या मनाला निःसंशय कळेल. २०. देवा, तुझ्यासारखा मला आज गुरु मिळाला आहे, तेव्हां आज मीं आपल्या इच्छेची तृप्ति कां करून घेऊं नये? तूं आमची आई आहेस (तर मग) येथें भीड कोणाची धरावयाची? २१. अहो, दैववशात् कामधेनूचें दुभतें जर प्राप्त झालें तर तशा प्रसंगीं हवें तें मागण्यास कमी कां करावें? २२. चिंतामणी जर हाताला आला, तर मग हवी ती वस्तु मागण्याची अडचण कां वाटावी? आपल्याला हवें तसें कां इच्छूं नये? २३. पहा, अमृताच्या समुद्राजवळ प्राप्त होऊन, तेथें तहानेनें जर तडफडत रहावयाचें, तर मग तेथपर्यंत येण्याकरितां केलेले भागले श्रम कशाकरितां करावयाचे? २४. त्याप्रमाणें श्रीकृष्णा, अनेक जन्मीं तुझी सेवा केल्यामुळें, तूं आज दैववशात् जर हातांत आला आहेस, २५. तर मग हे परमेश्वरा, आपल्या इच्छेला येईल तसें तुजजवळून कां मागून घेऊं नये? देवा, माझ्या मनांतील हेतु पूर्ण सफल होण्याची ही वेळ आली आहे. २६. पहा, माझ्या सर्व मनोरथांचें जीवित सफल झालें. आज माझें पूर्व पुण्य यशस्वी झालें व माझ्या मनांतील हे हेतु आज तडीस गेले; २७. कारण, अहो महाराज, सर्वोत्कृष्ट मंगलाचें स्थान आणि (सर्व) देवांत श्रेष्ठ अशा देवा, तूं आमच्या ताब्यांत आला आहेस, म्हणून २८. पहा, जसें लहान मुलाला स्तनपान करण्यास आईच्या ठिकाणीं वेळ अवेळ अशी कांहींच नसते; २९. तसें हे कृपानिधि देवा, मी आपल्या इच्छेला येईल त्याप्रमाणें तुला वाटेल तें विचारीत आहें. ३०. तर मग परलोकीं कल्याणकारक आणि (इहलोकीं) आचरण्याला तर योग्य असें जें असेल, तें एक मला निश्चित करून सांग असें अर्जुन म्हणाला. ३१.

**श्रीकृष्ण म्हणाले, हे निष्पापा, मी या लोकांमध्यें ज्ञानयोगानें सांख्यांचा व कर्मयोगानें कर्म करणारांचा असे दोन वर्तनक्रम पूर्वींच सांगितले आहेत. ३.**

अर्जुनाच्या या भाषणानें श्रीकृष्ण आश्चर्यचकीत होऊन म्हणूं लागले, अर्जुना, आम्हीं तुला हा थोडक्यांत मतलब सांगितला. ३२. कारण कीं निष्काम कर्मयोग सांगत असतांना प्रसंगानें सहजच आम्हीं ज्ञानमार्गाची व्यवस्था (ज्या हेतूनें) स्पष्ट केली, ३३. तो आमच्या प्रतिपादनाचा हेतु तूं जाणलाच नाहींस, म्हणून उगीचच रागावला आहेस. तर आतां ध्यानांत ठेव कीं, हे दोनहि मार्ग मीच सांगितलेले आहेत. ३४. हे वीरश्रेष्ठा अर्जुना, ऐक. या लोकांमध्यें हे दोन्ही मार्ग माझ्यापासूनच प्रगट झालेले आहेत व ते मूळपासून तसेच चालत आलेले आहेत. ३५. त्यांपैकीं एकाला ज्ञानयोग म्हणतात, त्याचें आचरण ज्ञानी लोक करतात; आणि त्यानें ओळखीबरोबर परमात्मस्वरूपाशीं तन्मयता प्राप्त होते. ३६. दुसरा तो कर्मयोग समज. जेथें साधक लोक निष्णात होऊन परम गतीला पावतात, (परंतु) ते कांहीं कालानें पावतात. ३७. हे मार्ग तर दोन आहेत. परंतु ते शेवटीं एकाच ठिकाणीं येऊन मिळतात. ज्याप्रमाणें तयार असलेल्या व तयार करावयाच्या अशा दोन्ही जेवणांत सारखीच तृप्ति असते; ३८. किंवा पूर्वेकडून व पश्चिमेकडून वाहणाऱ्या नद्या पाहिल्या, तर वाहतांना वेगळाल्या दिसतात, मग समुद्रांत मिळाल्या असतां शेवटीं एकच होतात. ३९. त्याप्रमाणें ज्ञानयोग व कर्मयोग हे मार्ग जरी दोन आहेत, तरी ते एकाच साध्याला सुचवितात. परंतु त्यांचें आचरण करणें आचरणाराच्या योग्यतेवर अवलंबून आहे. ४०. हे पहा, पक्षी उड्डाणाबरोबर ज्याप्रमाणें फळाला बिलगतो, परंतु त्याप्रमाणें मनुष्याला त्या वेगानें तें फळ कसें प्राप्त करून घेतां येईल? सांग बरें. ४१. तो हळके हळके एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर जात जात, कांहीं वेळानें, त्या मार्गाच्या आधारानें त्या फळापर्यंत खात्रीनें पोहोंचतो. ४२. पहा, तसे विहंगममार्गानें (वरील दृष्टांतांतील पक्ष्याच्या मार्गाप्रमाणें) ज्ञानमार्गाचा आश्रय करून ज्ञानी तत्क्षणींच मोक्ष आपल्या स्वाधीन करून घेतात. ४३. दुसरे जे कर्मयोगी, ते कर्ममार्गाच्या आश्रयानें वेदांत सांगितलेला आपला आचारच पाळून, कांहीं कालानें पूर्णतेस पोहोंचतात. ४४.

**कर्म न केल्यानें पुरुषाला कर्मशून्यत्व प्राप्त होत नाहीं. (कारण) केवल (प्राप्त) कर्मसंन्यासानेंच नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होत नसते. ४.**

शिवाय योग्य कर्मांचा आरंभ न करतांच कर्महीनाला सिद्धाप्रमाणें (निष्कर्म) निश्चयानें होतां येणार नाहीं. ४५. किंवा अधिकारपरत्वें आपल्या भागाला आलेलें कर्म टाकून द्यावें व एवढ्यानेंच निष्कर्म व्हावें, हें बोलणें अर्जुना, व्यर्थ व मूर्खपणाचें आहे, ४६. जेथें पलीकडील

सांगें पैलतीरा जावें । ऐसें व्यसन कां जेथ पावे । तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ॥ ४७ ॥ ना तरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसेनि पाकु न कीजे । कीं सिद्धुही न सेविजे । केवीं सांगें ॥ ४८ ॥

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापारु असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ॥ ४९ ॥ म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था । तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥ आणि आपुलालिया चाडे । आपादिलें हें मांडे । कीं त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे ॥ ५१ ॥ हें वायांचि सैरा बोलिजे । उकलु तरी देखों पाहिजे । परी त्यजिता कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥ जंव प्रकृतीचें अधिष्ठान । तंव सांडी मांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । आवैसी असे ॥ ५३ ॥ देखें विहित कर्म जेतुलें । तें सळें जरी वोसंडिलें । तरी स्वभाव काय निमाले । इंद्रियांचे ॥ ५४ ॥ सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें । कीं नेत्रींचें तेज गेलें । हें नासारंध्र बुझालें । परिमळु नेघे ॥ ५५ ॥ ना तरी प्राणापानगति । कीं निर्विकल्प जाहली मति । कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ॥ ५६ ॥ हे स्वप्नावबोधु ठेले । कीं चरण चालों विसरले । हें असो काय निमाले । जन्ममृत्यू ॥ ५७ ॥ हें न ठकेचि जरी कांहीं । तरी सांडिलें तें कायी । म्हणोनि कर्मत्यागु नाहीं । प्रकृतिमंतां ॥ ५८ ॥ कर्म पराधीनपणें । निपजतसे प्रकृतिगुणें । येरीं धरीं मोकलीं अंतःकरणें । वाहिजे वायां ॥ ५९ ॥ देखें रथीं आरूढिजे । मग जरी निश्चळा बैसिजे । तरी चळा होऊन हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥ कां उचलिलें वायुवशें । चळे शुष्क पत्र जैसें । निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ ६१ ॥ तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें । निष्कर्म्युही व्यापारे । निरंतर ॥ ६२ ॥ म्हणऊनि संगु जंव प्रकृतीचा । तंव त्यागु न घडे कर्माचा । ऐसियाहि करूं म्हणती तयांचा । आग्रहोचि उरे ॥ ६३ ॥

कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

जे उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य होऊं पाहती । परी कर्मेंद्रियप्रवृत्ती । निरोधुनी ॥ ६४ ॥ तयां कर्मत्यागु न घडे । जें कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्र जाण ॥ ६५ ॥ ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा । ओळखावे तत्त्वता । येथ भ्रांति नाहीं ॥ ६६ ॥

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्याऽऽरभतेऽर्जुन । कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

आतां देईं अवधान । प्रसंगें तुज सांगेन । या नैराश्याचें चिन्ह । धनुर्धरा ॥६७॥ जो अंतरीं दृढु । परमात्मरूपीं गूढु । बाह्य तरी रूढु । लौकिकु जैसा ॥६८॥ तो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी । प्राप्त कर्म न अव्हेरी । उचित जें जें ॥ ६९ ॥ तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहटतां तरी

तीराला कसें जावें अशी अडचण पडली आहे, तेथें नावेचा त्याग करून कसें चालेल? सांग बरें. ४७. अथवा जर भोजनापासून तृप्तीची इच्छा करावयाची, तर स्वयंपाक न करतां कसें चालेल? किंवा तयार असलेला स्वयंपाक न सेवन करतां कसें चालेल? सांग. ४८.

**कारण ( कांहीं तरी ) कर्म न करतांना क्षणभर देखील कोणीहि केव्हांहि रहात नाहीं. प्रकृतिजन्य गुण, परतंत्र अशा प्रत्येकाकडून, कर्म करवीत असतात. ५.**

जेथपर्यंत निरिच्छता प्राप्त झाली नाहीं तेथपर्यंत कर्म करणें हें रहाणारच, असें समज; व मग आत्मतृप्ति प्राप्त झाली असतां कर्म सहजच थांबतें. ४९. म्हणून अर्जुना, ऐक. ज्याला नैष्कर्म्य स्थितीची तीव्र इच्छा आहे, त्यानें आपलीं विहित कर्में टाकणें मुळींच योग्य होणार नाहीं. ५०. आणखी ( असें पहा कीं, ) आपल्या इच्छेप्रमाणें कर्मांचा स्वीकार केला असतां तें घडतें आणि कर्म सोडल्यानें कर्मांचा त्याग होतो, असें आहे काय? ५१. हें ( कर्मांचा इच्छेनुरूप स्वीकार अथवा त्याग करतां येतो हें ) उगाच कांहीं तरी बोलणें आहे. याचा नीट विचार करून पाहिलें, तर कर्म करण्याचें टाकलें म्हणजे कर्मत्याग होतो असें नाहीं, हें तूं निःसंशय समज. ५२. जोंपर्यंत शरीराचा आश्रय आहे, तोंपर्यंत मी कर्म टाकीन अथवा करीन हें म्हणणें मूर्खपणाचें आहे. कारण कीं, जेवढें म्हणून कर्म घडणें आहे, तें स्वभावतः गुणांच्या स्वाधीन आहे. ५३. पहा, जेवढें म्हणून विहित कर्म आहे तेवढें हट्टानें जरी करावयाचें सोडून दिलें, तरी इंद्रियांचे स्वभाव नाहींसे झाले आहेत काय? ५४. सांग, कानांनीं ऐकण्याचें बंद झालें आहे काय? अथवा डोळ्यांतील पाहाण्याचें सामर्थ्य गेलें आहे काय? या नाकपुड्या बुजून वास घेईनाशा झाल्या आहेत काय? ५५. अथवा प्राण व अपान, या दोन वायूंच्या क्रिया थांबल्या आहेत काय? किंवा बुद्धीनें कल्पना करण्याचें सोडलें आहे काय? किंवा भूक, तहान इत्यादिकांची पीडा होण्याचें थांबलें आहे काय? ५६. जागृति व स्वप्न ह्या अवस्था थांबल्या का? अथवा पाय चालावयाचे विसरले काय? हें सर्व असूं दे. जन्म आणि मरण संपलीं आहेत काय? ५७. हें जर कांहीं रहात नाहीं, तर मग त्याग तो काय केला? म्हणून शरीराच्या आश्रयानें असणारांना कर्मत्याग ( केव्हांहि ) घडत नाहीं. ५८. कर्म हें परतंत्र असल्यामुळें तें शरीरांतील सत्त्वादि गुणानुसार उत्पन्न होत असतें. म्हणून एखाद्यानें मी कर्म करीन अथवा कर्म टाकीन, असा अंतःकरणांत अभिमान बाळगणें, हें व्यर्थ आहे. ५९. पहा, रथावर स्वार होऊन, मग जरी स्थिर बसलें, तरी तेथें बसणारा रथाच्या स्वाधीन असल्यानें, सहजच रथाच्या हालचालीमुळें त्यास प्रवास घडतो. ६०. अथवा वायूच्या सपाट्यांत सांपडून उंच उडलेलें वाळकें पान, ज्याप्रमाणें आपण स्वतः हालचाल न करतां, वायुवेगामुळें आकाशांत इकडे तिकडे फिरत असतें; ६१. त्याप्रमाणें कर्मांतीत अवस्थेस प्राप्त झालेला पुरुषहि, शरीराच्या आश्रयानें कर्मेंद्रियांच्या हालचालींच्या द्वारां, नेहमीं कर्में करीत असतो. ६२. म्हणून जेथपर्यंत शरीराशीं संबंध आहे, तेथपर्यंत कर्मांचा त्याग घडणें शक्य नाहीं; असें असूनहि 'त्याग करूं' असें जे कोणी म्हणतील, तर त्यांचा हट्ट मात्र उरणार आहे. ६३.

**कर्मेंद्रियांचें संयमन करून जो मनांत विषयांचें चिंतन करीत रहातो, तो अत्यंत मूढबुद्धि होय. त्याला दांभिक असें म्हणतात. ६.**

जे पुरुष योग्य कर्म टाकतात व त्यायोगें कर्मातीत अवस्थेला पोहोंचूं पाहतात; परंतु केवळ कर्मेंद्रिय प्रवृत्तीचा विरोध करूनच. ६४. त्यास कर्मत्याग तर घडत नाहीं; कारण त्यांचे ठिकाणीं कर्तव्यबुद्धि असते; असें असूनहि ते बाह्यात्कारीं कर्मत्यागाचा जो डौल आणतात, तें खरोखर दैन्य आहे, असें समज. ६५. अर्जुना, असे ते लोक खरोखरच केवळ विषयासक्त आहेत, असें निःसंशय समज. ६६.

**पण हे अर्जुना, मनानें इंद्रियांचें नियमन करून जो आसक्त न होतां कर्मेंद्रियांनीं कर्मयोगाला आरंभ करतो त्याची योग्यता विशेष होय. ७**

अर्जुना, प्रसंग आलेला आहे म्हणून तुला या निष्काम पुरुषाचें लक्षण सांगतों. इकडे तूं लक्ष दे. ६७. जो अंतर्यामीं निश्चळ व परमात्म्याच्या स्वरूपांत गढलेला असतो आणि बाहेरून मात्र लोकांप्रमाणें व्यवहार करीत असतो; ६८. तो इंद्रियांना हुकूम करीत नाहीं आणि विषय बाधतील, अशी त्यास भीति नसते. तो अधिकारपरत्वें प्राप्त झालेलें जें जें विहित कर्म, त्याचा अनादर करीत नाहीं. ६९. तो पुरुष कर्मेंद्रियें कर्में करीत असलीं

न नियमी । परी तेथिचेनि उर्मी । झांकोळेना ॥ ७० ॥ तो कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे । जैसें जळीं जळें न शिंपे । पद्मपत्र ॥ ७१ ॥ तैसा संसर्गामाजि असे । सकळांसारिखा दिसे । जैसें तोयसंगें आभासे । भानुबिंब ॥ ७२ ॥ तैसा सामान्यत्वें पाहिजे । तरी साधारणुचि देखिजे । येरवीं निर्धारितां नेणिजे । सोय जयाची ॥ ७३ ॥ ऐशा चिन्हीं चिन्हितु । देखसी तोचि मुक्तु । आशापाशरहितु । वोळख पां ॥ ७४ ॥ अर्जुना तोचि योगी । विशेषिजे जो जगीं । म्हणोनि ऐसा होय यालागीं । म्हणिपे तूतें ॥ ७५ ॥

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः । शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥

तूं मानसा नियमु करीं । निश्चळु होय अंतरीं । मग कर्मेंद्रियें हीं व्यापारीं । वर्ततु सुखें ॥ ७६ ॥ म्हणशी नैष्कर्म्य होआवें । तरी एथ तें न संभवे । आणि निषिद्ध केवीं राहाटावें । विचारीं पां ॥ ७७ ॥ म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचर तूं ॥ ७८ ॥ पार्था आणीकही एक । नेणसी तूं हें कवतिक । जें ऐसें कर्म मोचक । आपैसें असे ॥ ७९ ॥ देखें अनुक्रमाधारें । स्वधर्मु जो आचरे । तो मोक्षु तेणें व्यापारें । निश्चित पावे ॥ ८० ॥

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः । तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥

स्वधर्मु जो बापा । तोचि नित्ययज्ञु जाण पां । म्हणोनि वर्ततां तेथ पापा । संचारु नाहीं ॥ ८१ ॥ हा निजधर्मु जैं सांडे । कुकर्मीं रति घडे । तैंचि बंधु पडे । संसारिकु ॥ ८२ ॥ म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञयाजन । जो करी तया बंधन । कहींच नाहीं ॥ ८३ ॥ हा लोकु कर्मे बांधिला । जो परतंत्रा भुतला । तो नित्य यज्ञातें चुकला । म्हणोनियां ॥ ८४ ॥

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः । अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥

आतां येचिविशीं पार्था । तुज सांगेन एकी मी कथा । जैं सृष्ट्यादि संस्था । ब्रह्मेनि केली ॥ ८५ ॥ तैं नित्ययागसहितें । सृजिलीं भूतें समस्तें । परी नेणतीचि तियें यज्ञातें । सूक्ष्म म्हणउनी ॥ ८६ ॥ ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा । देवा आश्रयो काय एथ आम्हां । तंव म्हणे तो कमळजन्मा । भूतांप्रति ॥ ८७ ॥ तुम्हां वर्णविशेषवशें । आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे । यातें उपासा मग आपैसे । काम पुरती ॥ ८८ ॥ तुम्हीं व्रतें नियमु न करावे । शरीरातें न पीडावें । दुरी केंही न वचावें । तीर्थासी गा ॥ ८९ ॥ योगादिकें साधनें । साकांक्ष आराधनें । मंत्रयंत्रविधानें । झणीं करा ॥ ९० ॥ देवतांतरा न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें । तुम्हीं स्वधर्मयज्ञीं यजावें । अनायासें ॥ ९१ ॥ अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां ययातें । पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ९२ ॥ तैसा स्वधर्मरूप मखु । हाचि सेव्यु तुम्हां एकु । ऐसें सत्यलोकनायकु । म्हणता जहाला ॥ ९३ ॥ देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु हा होईल । मग प्रजाहो न संडील । तुमतें सदा ॥ ९४ ॥

तरी, त्यांना आवरीत नाहीं; पण त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या विकारांनीं तो लिप्त होत नाहीं. ७०. ज्याप्रमाणें पाण्यांतील कमलाचें पान पाण्यानें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें तो कोणत्याहि कामनेनें लिप्त होत नाहीं व अविवेकरूपी मलाच्या योगानें तो मलीन होत नाहीं. ७१. त्या कमलाच्या पानाप्रमाणें तो अलिप्तपणानें संगामध्यें राहातो. तो दिसण्यांत सामान्य लोकांप्रमाणें दिसतो. ज्याप्रमाणें सूर्यबिंब पाण्याहून अलिप्त असूनहि, ( प्रतिबिंबामुळें ) पाण्याच्या संगतींत राहातांना दिसतें. ७२. त्याप्रमाणें वरवर पाहिलें तर, तो इतर सामान्य लोकांसारखाच दिसतो. बाकी त्याच्यासंबंधीं निश्चित विचार ठरवूं म्हटलें तर त्याच्या स्थितीविषयीं कांहींच कल्पना करतां येत नाहीं. ७३. अशा लक्षणांनीं युक्त असलेला जो तुला दिसेल, तोच आशापाशरहित व मुक्त आहे, असें तूं ओळख. ७४. अर्जुना, जगामध्यें ज्याचें विशेष वर्णन केलें जातें, असा तोच योगी होय. याकरितांच तूं असा हो, म्हणून मी तुला म्हणतों. ७५

**नित्य असें जें कर्म, तें तूं करीत जा. कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें अधिक चांगलें. कर्म न करण्यानें ही देहयात्राही सिद्धीला जाणार नाहीं. ८.**

तूं मनाला आंवरून धर व अंतःकरणांत स्थिर हो; मग हीं कर्मेंद्रियें आपापले व्यवहार करीत खुशाल राहूं देत. ७६. कर्मातीत व्हावें असें म्हणशील, तर विहित कर्में करणें टाकून कर्मातीत होणें देहधाऱ्यास संभवत नाहीं; असें आहे तर मग शास्त्रबाह्य कर्मांचें आचरण काय म्हणून करावें, याचा तूंच विचार कर; ७७. म्हणून जें जें करणीय व प्रसंगानुसार प्राप्त झालेलें कर्म आहे, तें तें तूं फलाशा सोडून करीत जा. ७८. अर्जुना, अशा या निष्काम कर्मांचें आणखीहि एक आश्चर्य आहे, तें तुला ठाऊक नाहीं. तें हें कीं, असें ( अहंकाररहित व निष्कामबुद्धीनें केलेलें विहितनित्यनैमित्तिक ) कर्म प्राण्यांना कर्मबंधनापासून आपोआप मुक्त करतें. ७९. पहा, वर्णाश्रमधर्मांप्रमाणें जो आपणांस योग्य असलेल्या धर्माचें आचरण करतो, त्यास त्या आचरणानें खचितच मोक्षाची प्राप्ति होते. ८०.

**स्वधर्मप्रीत्यर्थ कर्मावांचून दुसरें कर्म लोकांना बंधनाला कारण होतें. त्याकरितां ( स्वधर्मप्रीत्यर्थ ) कर्म कर आणि हे अर्जुना, ( कर्मफलविषयीं ) अनासक्त होऊन रहा. ९.**

अरे बाबा, आपला जो धर्म आहे, तोच नित्ययज्ञ होय, असें समज; म्हणून त्याचें आचरण करीत असतांना त्यांत पापाचा प्रवेश होत नाहीं. ८१. हें स्वधर्माचरण सुटलें म्हणजे वाईट कर्मांच्या ठिकाणीं आसक्ति उत्पन्न होते आणि तेव्हांच त्या वाईट कर्में करणाऱ्या पुरुषास संसारबंध प्राप्त होतो. ८२. म्हणून स्वधर्माचें आचरण करणें, हेंच नित्य यज्ञयाजन करण्यासारखें होय. जो असें स्वधर्माचरण करतो, तो केव्हांच बंधांत पडत नाहीं. ८३. हे ( कर्माधिकारी ) लोक आपल्या नित्ययज्ञाला चुकले, म्हणून कर्मानें बद्ध होऊन परतंत्र अशा देहाच्या स्वाधीन झाले. ८४.

**पूर्वी ब्रह्मदेव यज्ञासहवर्तमान ( स्वधर्मासहवर्तमान ) प्रजा उत्पन्न करून ( त्यांना ) म्हणाला कीं, याच्या योगानें तुम्ही आपली अभिवृद्धि करून घ्या. हा तुमच्या इष्ट कामना देणारा होवो. १०.**

अर्जुना, याच संबंधाची तुला एक गोष्ट सांगतों. ब्रह्मदेवानें सृष्ट्यादि रचना जेव्हां केली; ८५. तेव्हां नित्ययज्ञ-( कर्म ) सहित सर्व प्राणी त्यानें उत्पन्न केले परंतु; कर्म हें सूक्ष्म असल्यामुळें ते प्राणी आपल्या कर्तव्यकर्मांना मुळींच जाणत नव्हते. ८६. त्या वेळीं सर्व प्राण्यांनीं ब्रह्मदेवाची विनंति केली कीं, देवा, या लोकांत आम्हांला आधार काय? तेव्हां ब्रह्मदेव लोकांना म्हणाला, ८७. तुम्हांला वर्णानुसार हा आम्हीं स्वधर्मच सांगितला आहे. याचें आचरण करा, म्हणजे तुमच्या मनांतील इच्छा आपोआप पूर्ण होतील. ८८. ( याखेरीज ) तुम्हांला आणखी व्रतें व नियम करण्याची जरूर नाहीं; शरीराला पीडा देण्याची जरूर नाहीं व दूर कोठें तीर्थाला जाण्याचें कारण नाहीं. ८९. योग वगैरे साधनें, कामनायुक्त आराधना अथवा मंत्रयंत्र इत्यादि कर्में कदाचित् कराल, तर करूं नका. ९०. स्वधर्म सोडून अन्य देवतांस भजावयाचें कारण नाहीं. तात्पर्य, वर सांगितलेल्या सर्व गोष्टी करण्याचें मुळींच कारण नाहीं; तर तुम्ही कष्टांत न पडतां स्वधर्माचरणरूप यज्ञ करावा. ९१. ज्याप्रमाणें पतिव्रता, आपल्या पतीला एकनिष्ठेनें भजते, त्याप्रमाणें तुम्ही मनांत कोणताहि हेतु न धरतां याचें आचरण करा. ९२. अशा रीतीनें तुम्हांला हाच एक स्वधर्मरूपी यज्ञ आचरण करण्यास योग्य आहे, असें सत्यलोकाचा अधिपति ब्रह्मदेव बोलला. ९३. पहा, स्वधर्माचें जर आचरण कराल, तर हा धर्म कामधेनूप्रमाणें इच्छा पुरविणारा होईल. मग लोकहो, ही ( स्वधर्मरूपी ) कामधेनु तुम्हांला नेहमीं सोडणार नाहीं. ९४.

देवान्भावयताऽनेन ते देवा भावयंतु वः । परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

जें येणेंकरूनि समस्तां । परितोषु होईल देवतां । मग ते तुम्हां ईप्सिता । अर्थातें देती ॥ ९५ ॥ या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्तां । योगक्षेमु निश्चिता । करिती तुमचा ॥ ९६ ॥ तुम्ही देवतांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील । ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ९७ ॥ तेथ तुम्ही जें करूं म्हणाल । तें आपैसें सिद्धी जाईल । वांछितही पुरेल । मानसींचें ॥ ९८ ॥ वाचासिद्धी पावाल । आज्ञापक होआल । म्हणिये तुमतें मागतील । महाऋद्धि ॥ ९९ ॥ जैसें ऋतुपतीचें द्वार । वनश्री निरंतर । वोळगे फळभार । लावण्येंसी ॥ १०० ॥

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः । तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

तैसें सर्व सुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत । येईल देखा काढत । तुम्हांपाठीं ॥ १ ॥ ऐसे समस्त भोगभरित । होआल तुम्ही अनार्त । जरी स्वधर्मैकनिरत । वर्ताल बापा ॥ २ ॥ कां जालिया सकल संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा । लुब्ध होऊनियां स्वादा । विषयांचिया ॥ ३ ॥ तिहीं यज्ञभाविकीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी । तयां स्वमार्गीं सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥ ४ ॥ अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन । प्राप्तवेळे भोजनें । ब्राह्मणाचें ॥ ५ ॥ विमुखु होईल गुरुभक्ती । आदरु न करील अतिथी । संतोषु नेदील ज्ञाती । आपुलिये ॥ ६ ॥ ऐसा स्वधर्मक्रियारहितु । आथिलेपणें प्रमत्तु । केवल भोगासक्तु । होईल जो ॥ ७ ॥ तया मग अपावो थोरु आहे । जेणें तें हातीचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ॥ ८ ॥ जैसें गतायुषी शरीरीं । चैतन्य वासु न करी । कां निदैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी ॥ ९ ॥ तैसा स्वधर्मु जरी लोपला । तरी सर्व सुखांचा थारा मोडला । जैसा दीपासवें हरपला । प्रकाशु जाय ॥ ११० ॥ तैसी निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे । आइका प्रजाहो हें फुडें । विरिंचि म्हणे ॥ ११ ॥ म्हणऊनि स्वधर्मु जो सांडील । तयातें काळु दंडील । चोरु म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ १२ ॥ मग सकळ दोष भंवते । गिंवसोनि घेती तयातें । रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैशीं ॥ १३ ॥ तैशीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें । दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥ १४ ॥ ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां । परी कल्पांतींही सर्वथा । प्राणिगण हो ॥ १५ ॥ म्हणऊनि निजवृत्ति हे न संडावी । इंद्रियें बरळों नेदावीं । ऐसें प्रजांतें शिकवी । चतुराननु ॥ १६ ॥ जैसें जळचरा जळ सांडे । आणि तत्क्षणीं मरण मांडे । हा स्वधर्मु तेणें पाडें । विसंबों नये ॥ १७ ॥ म्हणोनि तुम्हीं समस्तीं । आपुलालिया कर्मीं उचितीं । निरत व्हावें पुढतपुढती । म्हणिपत असे ॥ १८ ॥

यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः । भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥

देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि । जो असातिये समृद्धि । विनियोगु करी ॥ १९ ॥ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें ॥ १२० ॥ या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां । हुतशेष स्वभावतः । उरे जें जें ॥ २१ ॥ तें सुखें

**याच्या योगानें तुम्ही देवांना भजाल आणि ते देव तुमच्यावर संतुष्ट होऊन तुमची समृद्धि करतील. परस्पराची अभिवृद्धि करणारे तुम्ही उत्कृष्ट प्रकारचें कल्याण प्राप्त करून घ्याल. ११.**

कारण या धर्माच्या आचरणामुळें सर्व देवतांना आनंद होईल आणि मग त्या देवता तुम्हांला इच्छिलेले विषय देतील. ९५. या स्वधर्मरूपपूजेनें सर्व देवतांना आराधिलें असतां, त्या तुमचा खात्रीनें योगक्षेम चालवितील. ९६. तुम्ही देवांचें आराधन कराल आणि देव तुमच्यावर प्रसन्न होतील; याप्रमाणें तुमचें एकमेकांवर जेव्हां प्रेम जडेल; ९७. तेव्हां तुम्ही जें करूं म्हणाल, तें सहजच सिद्धीस जाईल, आणि मनांतील इच्छित गोष्टीहि पूर्ण होतील. ९८. तुम्ही बोलाल तें खरें होईल आणि तुम्ही आज्ञा करणारे व्हाल. तुम्हांला 'आपली काय आज्ञा आहे' म्हणून महाऋद्धि विचारतील. ९९. ऋतुश्रेष्ठ वसंताचे द्वारांत वनशोभा ज्याप्रमाणें फलभार व सौंदर्यासह निरंतर सेवा करिते; १००.

**यज्ञानें संतुष्ट केलेले देव तुम्हांला इष्ट भोग देतील. त्यांनीं दिलेल्या वस्तूंचा त्यांना न देतां जो उपभोग घेतो तो चोर होय. १२.**

पहा, त्याप्रमाणें सर्व सुखांसह मूर्तिमंत दैवच तुमच्या-मागें शोध काढीत येईल. १०१. अशारीतीनें बाबांनो, जर तुम्ही एकनिष्ठपणानें स्वधर्माचें आचरण कराल, तर सर्व भोगांनीं संपन्न होऊन तुम्ही निरिच्छ व्हाल. १०२. अथवा ( उलटपक्षीं ) सर्व संपदा प्राप्त झाली असतां जो विषयांचे गोडीला लालचाऊन उन्मत्त इंद्रियें जसें सांगतील तसें वागतो. १०३. यज्ञानें संतुष्ट होणाऱ्या त्या देवांनीं जी ही पूर्ण संपत्ति दिली आहे, त्या संपत्तीच्या योगानें ( स्वधर्मरूप ) मार्गानें जो परमेश्वरास भजणार नाहीं; १०४. जो अग्नीचे मुखांत हवन करणार नाहीं अथवा देवतांचें आराधन करणार नाहीं किंवा योग्य वेळीं ब्राह्मणांना भोजन देणार नाहीं; १०५. जो गुरुभक्तीला पाठमोरा होईल, अतिथीचा मान करणार नाहीं व आपल्या जातीला संतोष देणार नाहीं; १०६. अशा रीतीनें जो आपल्या धर्माचें आचरण टाकून आणि संपन्नतेनें उन्मत्त होऊन केवळ भोगामध्यें गढून जाईल; १०७. त्याला पुढें मोठा धोका आहे. तो असा कीं, त्याच्याजवळ असलेलें सर्व ऐश्वर्य नाहींसें होईल; हें पहा, मिळविलेले भोगसुद्धां त्याला भोगावयास मिळणार नाहींत. १०८. जसें आयुष्य संपलेल्या शरीरांत प्राण राहात नाहींत किंवा दैवहीनाच्या घरांत लक्ष्मी राहात नाहीं; १०९. जसा दिवा मालविल्या-बरोबर त्याचा प्रकाश नाहींसा होतो, तसा धर्म जर लोपून गेला, तर सर्व सुखाचें आश्रयस्थान नाहींसें होतें. ११०. वरीलप्रमाणें आपला आचार जेथें सुटतो, त्या ठिकाणीं आत्मस्वातंत्र्य राहात नाहीं. प्रजाहो, हें नीट ऐका, असें ब्रह्मदेव म्हणाला. १११. म्हणून आपला धर्म जो टाकील, त्याला यमधर्म शिक्षा करील व तो केवळ चोर आहे, असें समजून त्याची मालमत्ता हिरावून घेईल. ११२. रात्रीच्या वेळीं ज्याप्रमाणें पिशाचें स्मशान वेढून टाकितात, त्याप्रमाणें मग सर्व पापें त्याला घेरतात. ११३. त्याप्रमाणें त्रैलोक्यांत असणारीं सर्व दुःखें आणि अनेक प्रकारचीं पापें व सर्व दैन्य त्याच्याच जवळ राहतात. ११४. त्या उन्मत्त मनुष्याची अशी स्थिति होते आणि मग प्रजाहो, रडलें तरी कल्पाच्या अंतापर्यंत देखील त्याची त्यांतून मुळींच सुटका होत नाहीं. ११५. म्हणून स्वधर्मा-चरण सोडूं नये; इंद्रियांना भलत्याच मार्गाला जाऊं देऊं नये; असा ब्रह्मदेवानें प्रजांना उपदेश केला. ११६. ज्या-प्रमाणें माशांना पाण्याचा वियोग झाला कीं, त्याच क्षणीं मरण येतें, ( म्हणून माशानें पाण्याचा त्याग करूं नये, ) त्याप्रमाणें स्वधर्माचरणाच्या त्यागानें मनुष्याचा नाश होतो, म्हणून त्यानें ह्या स्वधर्माचरणाला विसरूं नये. ११७. म्हणून तुम्ही सर्वांनीं आपापल्या विहित कर्माचरणामध्यें तत्पर असावें, हेंच वारंवार सांगणें आहे. ११८.

**यज्ञशेष भक्षण करणारे सज्जन सर्व पापांपासून मुक्त होतात. जे ( यज्ञ न करितां केवळ ) स्वतः-करितां पाकसिद्धि करतात, ते पापी लोक पाप भक्षण करतात. १३.**

पहा, निर्हेतुक बुद्धीनें स्वधर्माचरण करण्यांत जो जवळ असलेल्या संपत्तीचा विनियोग करतो; ११९. गुरु, गोत्र व अग्नि यांचें पूजन करतो, योग्य वेळेला ब्राह्मणांची सेवा करतो आणि पितरांकरितां श्राद्धादि नैमित्तिक कर्में करतो; १२०. वर सांगितलेल्या विहितकर्माचरणरूप यज्ञानें यज्ञ-पुरुषाचे ठिकाणीं यजन करून, जें जें यज्ञशेष सहजच राहील; १२१. त्याचें आपल्या घरीं आपल्या कुटुंबासह

आपुलां घरीं । कुटुंबेसीं भोजन करी । कीं भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥ २२ ॥ तें यज्ञावशिष्ट भोगी । म्हणोनि सांडिजे तो अघीं । जयापरी महा रोगीं । अमृतसिद्धि ॥ २३ ॥ कीं तत्त्वनिष्ठु जैसा । नागवे भ्रांतिलेशा । तो शेषभोगी तैसा । नाकळे दोषा ॥ २४ ॥ म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मींचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेंसीं ॥ २५ ॥ हें वांचूनि पार्था । राहाटों नये अन्यथा । ऐसी आद्य हे कथा । मुरारी सांगे ॥ २६ ॥ जे देहाचि आपणपें मानिती । आणि विषयांतें भोग्य म्हणती । यापरतें न स्मरती । आणिक कांहीं ॥ २७ ॥ हें यज्ञोपकरण सकळ । नेणतसांते बरळ । अहंबुद्धी केवळ । भोगूं पाहती ॥ २८ ॥ इंद्रियरुचीसारखे । करविती पाक निके । ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ २९ ॥ जे संपत्तिजात आघवें । हें हवनद्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥ हें सांडोनिया मूर्ख । आपणपेंयालागीं देख । निपजविती पाक । नानाविध ॥ ३१ ॥ जिहीं यज्ञु सिद्धी जाये । परेशा तोषु होये । तें हें सामान्य अन्न न होये । म्हणोनियां ॥ ३२ ॥ हें न म्हणावें साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण । जे जीवनहेतु कारण । विश्वा यया ॥ ३३ ॥

अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः । यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

अन्नास्तव भूतें । प्ररोह पावति समस्तें । मग वरिषु या अन्नातें । सर्वत्र प्रसवे ॥ ३४ ॥ तया पर्जन्या यज्ञीं जन्म । यज्ञातें प्रगटी कर्म । कर्मासि आदि ब्रह्म । वेदरूप ॥ ३५ ॥

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवं । तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

मग वेदांतें परापर । प्रसवतसे अक्षर । म्हणऊनि हें चराचर । ब्रह्मबद्ध ॥ ३६ ॥ परी कर्माचिये मूर्ति । यज्ञीं अधिवासु श्रुति । ऐकें सुभद्रापति । अखंड गा ॥ ३७ ॥

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः । अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

ऐशी हे आदि परंपरा । संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगितली या अध्वरा । लागोनियां ॥ ३८ ॥ म्हणूनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु । नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इये ॥ ३९ ॥ तो पातकांची राशी । जाण भार भूमीसी । जो कुकर्में इंद्रियांसी । उपेगा गेला ॥ १४० ॥ तें जन्म कर्म सकळ । अर्जुना अति निष्फळ । जैसें कां अभ्रपटळ । अकाळींचें ॥ ४१ ॥ कां गळा स्तन अजेचे । तैसें जियालें देखें तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ॥ ४२ ॥ म्हणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्मु कवणें न संडावा । सर्वभावें भजावा । हाचि एकु ॥ ४३ ॥ हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोधें आलें । मग उचित कां आपुलें । वोसंडावें ॥ ४४ ॥ परिसें पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्मांची । ते गांवढे गा ॥ ४५ ॥

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः । आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥

देखें असतेनि देहधर्में । एथ तोचि एकु न लिंपे कर्में । जो अखंडित रमे । आपणपांचि ॥ ४६ ॥ जे तो आत्मबोधें तोषला । तरी कृतकार्यु देखें जाहला । म्हणोनि सहजें सांडवला । कर्मसंगु ॥ ४७ ॥

सुखानें सेवन करतो; तें सेव्यच त्याच्या पापाचा नाश करतें. १२२. तें यज्ञ करून राहिलेलें शेष तो भोगतो, म्हणून ज्याप्रमाणें अमृत मिळालें असतां मोठाले रोग (रोग्याला) सोडून जातात, त्याप्रमाणें पातकें त्यास सोडून जातात. १२३. अथवा ज्याप्रमाणें ब्रह्मनिष्ठ पुरुष भ्रांतीला (देहतादात्म्याला) यत्किंचितहि वश होत नाहीं, त्याप्रमाणें यज्ञांतील तो शेष भोगणारा पापाच्या तडाक्यांत सांपडत नाहीं. १२४. म्हणून स्वधर्माचरणानें जें मिळेल तें स्वधर्म करण्यांतच खर्च करावें व मग जें शिल्लक राहील, त्याचा संतोषानें उपभोग घ्यावा. १२५. अर्जुना, अशा रीतीनें वागण्याखेरीज दुसऱ्या तऱ्हेनें वागूं नये, अशी ही सृष्टिआरंभाची कथा श्रीकृष्णांनीं सांगितली. १२६. आपण देहच आहोंत, असें मानून जे लोक विषय हे भोग्यवस्तु आहेत असें समजतात आणि ज्यांस यापलीकडे दुसरी कांहींच कल्पना नसते, १२७. ते भ्रमिष्ट लोक आपल्या जवळ असलेली संपत्ति वगैरे सर्व कांहीं यज्ञाची सामुग्री आहे असें न समजतां, त्या यज्ञसामुग्रीचा केवळ आपणच अहंकारानें भोग घेण्याकडे प्रवृत्त होतात; १२८. इंद्रियांना आवडतील असे चटकदार पदार्थ ते तयार करतात; ते पापी लोक या पदार्थांच्या रूपानें वस्तुतः पापच सेवन करतात असें समज. १२९. वास्तविक पाहतां जेवढी आपली संपत्ति आहे, ती सर्व यज्ञांत उपयोगी पडणारी सामुग्री आहे, असें समजून, मग ती स्वधर्मरूप यज्ञानें परमेश्वराला अर्पण करावी. १३०. अशा रीतीनें वागा-वयाचें टाकून, पहा, ते मूर्ख लोक आपल्या स्वतःकरितां नाना प्रकारचीं पक्वान्नें तयार करितात. १३१. ज्या अन्नाच्या योगानें यज्ञ सिद्धीला जातो आणि परमेश्वर संतुष्ट होतो, म्हणून तें हें अन्न कमी योग्यतेचें नाहीं. १३२. तें अन्न सामान्य समजूं नये. अन्न हें ब्रह्मरूप आहे असें समज; कारण कीं, अन्न हें सर्व जगाला जगण्याचें साधन आहे. १३३.

अन्नापासून भूतें उत्पन्न होतात. पर्जन्यापासून अन्नाची उत्पत्ति आहे. यज्ञापासून पर्जन्य होतो व कर्मापासून यज्ञाची उत्पत्ति आहे. १४.

हीं सर्व भूतें अन्नामुळें वाढतात व या अन्नाला पाऊस चोहोंकडे उत्पन्न करतो. १३४. तो पाऊस यज्ञापासून उत्पन्न होतो; तो यज्ञ कर्मापासून प्रकट होतो; आणि वेदरूप ब्रह्म हें कर्माचें मूळ आहे. १३५.

कर्म वेदापासून उद्भव पावलें असें जाण; आणि परमात्मा वेदाचें कारण आहे. म्हणून सर्वव्यापी (सर्व विषयांचें प्रकाशन करणारा) वेद नित्य यज्ञा-मध्यें स्थित आहे. १५.

दूर व जवळ असणारें (सर्वत्र असणारें) जें ब्रह्म, तें वेदांना उत्पन्न करतें, म्हणून हें स्थावरजंगमात्मक विश्व ब्रह्मांत गोंविलेलें आहे. १३६. अर्जुना, ऐक; परंतु मूर्तिमंत कर्मरूप यज्ञामध्यें वेदाचें निरंतर राहाणें आहे. १३७.

हे अर्जुना, याप्रमाणें सुरूं केलेल्या चक्राला अनुसरून जो इहलोकीं वागत नाहीं व इंद्रियांमध्यें रममाण होतो, त्याचें आयुष्य पापमय होय. तो व्यर्थ जगतो. १६.

अर्जुना, याप्रमाणें ही मूळांतली कार्यकारणाची मालिका तुला या यज्ञाकरितां थोडक्यांत सांगितली. १३८. म्हणून जो उन्मत्त पुरुष, या लोकांमध्यें योग्य असलेल्या, या स्वधर्मरूप यज्ञाचें साचंत आचरण करणार नाहीं. १३९. जो वाईट आचरण करून इंद्रियांचें केवळ लाड पुरवितो, तो पापांची राशि असून भूमीला केवळ भार आहे, असें समज. १४०. जसें भलत्याच वेळेला आलेली ढगांची फळी निरुपयोगी असते, त्याप्रमाणें अर्जुना, त्याचें जन्म व कर्म निष्फळ आहे; १४१. किंवा ज्याच्या हातून आपल्या धर्माचें आचरण होत नाहीं, त्याचें जगणें शेळीच्या गळ्यास असलेल्या स्तनाप्रमाणें निरर्थक आहे असें समज. १४२. म्हणून अर्जुना, ऐक. आपला हा धर्म कोणीहि सोडूं नये, कायावाचामनें करून ह्या एकाचेंच आचरण करावें. १४३. अरे हें शरीर जें प्राप्त झालें आहे, तें तरी पूर्वकर्मा-नुसार मिळालेलें आहे. असें आहे, तर मग आपल्यास विहित असलेलें कर्म आपण कां टाकावें ? १४४. अर्जुना, ऐक. मनुष्यशरीर मिळालें असतां, जे कर्मांचा कंटाळा करितात, ते अडाणी आहेत. १४५.

जो मनुष्य आत्म्याचेच ठिकाणीं रत असतो आणि आत्म्याचे योगानें तृप्त असतो आणि आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो, त्याला (कांहीं) कार्य रहात नाहीं. १७.

पहा, जो निरंतर आपल्या स्वरूपांत गढलेला असतो, तोच एक या जगांत देहधर्मानें युक्त असूनहि कर्मानें लिप्त होत नाहीं. १४६. कारण कीं, पहा, तो आत्म-ज्ञानानें संतुष्ट होऊन कृतकृत्य झालेला असतो; म्हणून त्याचा कर्माशीं संबंध सहज सुटलेला असतो. १४७.

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन । न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

तृप्ति जालिया जैसीं । साधनें सरती आपैसीं । देखें आत्मतुष्टीं तैसीं । कर्मे नाहीं ॥ ४८ ॥ जंववरी अर्जुना । तो बोध भेटेना मना । तंवचि यया साधना । भजावें लागे ॥ ४९ ॥

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर । असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

म्हणऊनि तूं नियतु । सकळ कामरहितु । होऊनियां उचितु । स्वधर्मे रहाटें ॥ १५० ॥ जे स्वकर्मे निष्कामता । अनुसरले पार्था । ते कैवल्य परं तत्त्वतां । पातले जगीं ॥ ५१ ॥

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः । लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

देख पां जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥ ५२ ॥ याकारणें पार्था । होआवी कर्मी आस्था । हे आणिकाहि एका अर्था । उपकारेल ॥ ५३ ॥

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

जे आचरतां आपणपेयां । देखी लागेल लोका यया । तरी चुकेल हा अपाया । प्रसंगेंचि ॥ ५४ ॥ देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयाही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ ५५ ॥ मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा । आचरोनि ॥ ५६ ॥ हा गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञानां काय बुझे । तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ॥ ५७ ॥ एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती सामान्य सकळ ॥ ५८ ॥ हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें । विशेषें आचरावें । लागे संतीं ॥ ५९ ॥

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन । नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥

आतां आणिकाचिया गोठी । तुज सांगों काइ किरीटी । देखें मीचि इये राहाटी । वर्तत असें ॥ १६० ॥ काय सांकडें कांहीं मातें । कीं कवणें एकें आर्तें । आचरें मी धर्मातें । म्हणसी जरी ॥ ६१ ॥ तरी पुरतेपणालागीं । आणिकु दुसरा नाहीं जगीं । ऐसी सामुग्री माझ्या अंगीं । जाणसी तूं ॥ ६२ ॥ मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवां पवाडा देखिला । तोही मी उगला । कर्मी वर्ते ॥ ६३ ॥ परी स्वधर्मी वर्ते कैसा । साकांक्षु कां होय जैसा । तयाचि एका उद्देशा- । लागोनियां ॥ ६४ ॥

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः । मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

जे भूतजात सकळ । असे आम्हांचि आधीन केवळ । तरी न व्हावें बरळ । म्हणोनिया ॥ ६५ ॥ आम्ही पूर्णकाम होउनी । जरी आत्मस्थिती राहुनी । तरी प्रजा हे कैसेनि । निस्तरेल ॥ ६६ ॥ इहीं आमुची वास पाहावी । मग वर्तती परी जाणावी । तै लौकिक स्थिति आघवी । नासिली होईल ॥ ६७ ॥

**इहलोकीं त्याला कर्म केल्यानें कांहीं लाभ नाहीं आणि कर्म न केल्यानेंहि नाहीं. त्याला कोणत्याहि प्राण्यापासून कांहीं लाभ साधावयाचा नसतो. १८.**

पहा, ज्याप्रमाणें पोट भरल्यावर स्वयंपाक करण्याचा खटाटोप सहजच संपतो, त्याप्रमाणें आत्मानंदाच्या तृप्तींत कर्मांची खटपट ( सहजच ) संपते. १४८. अर्जुना, जोंपर्यंत अंतःकरणाची व त्या ज्ञानाची गांठ पडत नाहीं. तोंपर्यंतच या साधनांची खटपट करावी लागते. १४९.

**म्हणून सर्वदा अनासक्त होऊन कर्तव्य असें कर्म करीत जा. अनासक्त होत्साता कर्म आचरण करणारा पुरुष मोक्षपद मिळवितो. १९.**

म्हणून तूं सर्व आसक्ति टाकून देऊन निरंतर आपल्या धर्माप्रमाणें वाग. १५०. अर्जुना, जे निष्काम बुद्धीनें स्वधर्माचें आचरण करतात, ते या जगामध्यें तत्वतः श्रेष्ठ अशा मोक्षाला पोहोंचतात. १५१.

**कर्माच्याच योगानें जनकादिकांना सिद्धि प्राप्त झाली. लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊन देखील कर्म करणें तुला योग्य आहे. २०.**

पहा, कर्ममात्राचा मुळींच त्याग न करतां जनकादिकांना मोक्षाचें सुख मिळालें. १५२. अर्जुना, यास्तव कर्मांचे ठिकाणीं आस्था असणें जरूर आहे. ही आस्था आणखीहि एका कामाला उपयोगी पडेल. १५३.

**श्रेष्ठ पुरुष जें आचरण करतो, तसेंच इतर जन करतात. तो जी गोष्ट प्रमाण करतो त्याचेंच लोक अनुकरण करतात. २१.**

कारण आपण आचरण केलें असतां या लोकांना तो कित्ता होईल; आणि अर्थात् सहजच त्यांची कर्मलोपानें होणारी हानि टळेल. १५४ पहा, मिळवावयाचें तें ज्यानीं मिळविलें व म्हणून जे निरिच्छ झाले, त्यांना देखील, लोकांना वळण लावण्याकरितां, कर्म करणें प्राप्त आहे. १५५. रस्त्यानें आंधळ्यांच्या बरोबर पुढें चालणारा डोळस, आंधळ्यास संभाळून घेऊन, त्याचेबरोबर चालतो, त्याप्रमाणें अज्ञानी पुरुषाला ज्ञान्यानें आपण आचरण करून धर्म स्पष्ट करून दाखवावा. १५६. अरे, असें जर (ज्ञानी पुरुषानें) न केलें तर, अज्ञानी लोकांना काय कळणार आहे ? त्यांना आपल्याला योग्य असलेला मार्ग कोणत्या प्रकारें समजेल ? १५७. या जगांत थोर लोक जें कर्म आचरतात, त्यालाच सामान्य लोक धर्म असें म्हणतात; आणि सामान्य प्रतीचे इतर सर्व लोक त्याचेंच आचरण करितात. १५८. अशी ही स्थिति असल्यामुळें (ज्ञानी पुरुषानें) कर्म सोडणें बरोबर नाहीं. ( इतकेंच काय, परंतु ) संतांनीं तर याचें आचरण विशेष काळजीनें केलें पाहिजे. १५९.

**हे अर्जुना, या त्रैलोक्यामध्यें मला कर्तव्य असें कांहीं नाहीं. प्राप्त न झालेली अशी गोष्ट मला प्राप्त करावयाची राहिलेली नाहीं; तथापि मी कर्में करीतच आहें. २२.**

अर्जुना, आतां दुसऱ्याच्या गोष्टी तुला कशाला सांगूं ? हें पहा मीसुद्धां याच मार्गानें वागतों. १६०. मला कांहीं कमी आहे म्हणून किंवा कांहीं एक इच्छा धरून मी धर्माचें आचरण करतों, असें जर म्हणशील, १६१. तर पूर्णतेच्या दृष्टीनें पाहिलें असतां, माझ्या तोडीला या जगांत दुसरा कोणीहि नाहीं; अशा तऱ्हेचें सामर्थ्य माझ्या अंगांत आहे, हें तुला माहीत आहे. १६२. मी आपल्या गुरूचा मेलेला मुलगा परत आणला; तो माझा पराक्रम तूं पाहिलाच आहेस. असा मी देखील, निमूटपणें कर्में करीत आहें. १६३. परंतु तीं कर्में मी कशीं करतों म्हणून विचारशील, तर सकाम पुरुष केवळ फलाच्या उद्देशानें ज्या दक्षतेनें कर्में करितो, तितक्याच दक्षतेनें मीहि पण कर्माचरण करितों; पण तें केवळ त्याच एका हेतूनें कीं–१६४.

**जर मी कर्म करण्याविषयीं कदाचित् निष्काळजी राहीन, तर हे अर्जुना, खरोखर सर्व लोक माझ्या मार्गालाच अनुसरतील. २३.**

सर्व प्राणिसमूह आमच्याच तंत्रानें चालणारा आहे, तेव्हां तो भडकूं नये म्हणून; १६५. आम्ही निरिच्छ होऊन जर आपल्या स्वरूपस्थितींतच राहिलों, तर ही प्रजा कशा तऱ्हेनें भवसागरांतून पार पडेल ? १६६. यांनीं आमच्या मार्गाकडे पहावें आणि मग वागण्याची रीत समजून घ्यावी; असा प्रकार असल्यामुळें ( आम्ही कर्म सोडून राहिलों तर ) ती लोकांची रहाणी सर्वच बिघडेल. १६७.

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् । संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

म्हणोनि समर्थु जो एथें । आथिला सर्वज्ञते । तेणें सविशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ ६८ ॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत । कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

देखें फळाचिया आशा । आचरे कामुकु जैसा । कर्मी भरु होआवा तैसा । निराशाही ॥ ६९ ॥ जे पुढतपुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय सर्वथा । म्हणऊनियां ॥१७०॥ मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें । अलौकिक नोहावें । लोकांप्रति ॥ ७१ ॥ जें सायासें स्तन्य सेवी । तें पक्वान्नें केवीं जेवी । म्हणोनि बाळका जैशीं नेदावीं । धनुर्धरा ॥ ७२ ॥

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् । जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

तैशीं कर्मी जया अयोग्यता । तयाप्रति नैष्कर्म्यता । न प्रगटावी खेळतां । आदिकरुनी ॥ ७३ ॥ तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी । नैष्कर्मींही दावावी । आचरोनी ॥ ७४ ॥ तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मसंगीं । तो कर्मबंधु आंगीं । वाजेलना ॥ ७५ ॥ जैसी बहुरूपियांची रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोकसंपादणी । तैशीच करिती ॥ ७६ ॥

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥

देखे पुढिलाचें वोझें । जरी आपुलां माथां घेईजे । तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ॥ ७७ ॥ तैसीं शुभाशुभें कर्में । जियें निफजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ॥ ७८ ॥ ऐसा अहंकाराधिरूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥ ७९ ॥ हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां ॥१८०॥

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः । गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

जें तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभावो नाहीं । जेथ कर्मजात पाहीं । निपजत असे ॥ ८१ ॥ ते देहाभिमानु सांडुनी । गुणकर्में वोलांडुनी । साक्षीभूत होउनी । वर्तती देहीं ॥ ८२ ॥ म्हणूनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नाकळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥ ८३ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु । तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

एथ कर्मी तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे । प्रकृतीचेनि आटोपें । वर्ततु असे ॥ ८४ ॥ इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आपादी जो ॥ ८५ ॥

जर मी कर्म करणार नाहीं, तर हे सर्व लोक नाश पावतील. संकर करण्याला मी कारण होईन, या प्रजेचा ( लोकस्थितीचा ) नाश करण्यास कारण होईन. २४.

म्हणून या लोकांत जो समर्थ असेल आणि सर्वज्ञतेनें युक्त असेल, त्यानें तर विशेषेंकरून कर्मांचा त्याग करूं नये. १६८.

हे अर्जुना, ज्याप्रमाणें अज्ञानी लोक कर्माचे ठिकाणीं आसक्त होऊन कर्म करतात, त्याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या ज्ञानी पुरुषानें अनासक्त होऊन कर्म ( आचरण ) करावें. २५.

पहा, फलाच्या आशेनें फलासक्त पुरुष जितक्या उत्सुकतेनें कर्माचें आचरण करितो, तितक्याच उत्सुकतेनें फलाशा नसलेल्या लोकांनींहि कर्में केलीं पाहिजेत. १६९. कारण अर्जुना, लोकांचीहि वागणुकीची रीत सर्व प्रकारें नेहमीं कायम ठेवणें योग्य आहे, म्हणून–१७०. शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें वागून जगास सरळ मार्गाला लावावें, आणि आपण लोकांशीं लोकबाह्य वागूं नये. १७१. जें ( तान्हें बालक ) मोठ्या कष्टानें आईचें दूध पितें, तें पक्वान्न कसें खाणार ? म्हणून अर्जुना, तीं पक्वान्नें ज्याप्रमाणें तान्ह्या मुलांना देऊं नयेत; १७२.

कर्माचे ठिकाणीं आसक्त झालेल्या अज्ञानी लोकांचा ( ज्ञानी पुरुषानें ) बुद्धिभेद करूं नये. अवधानपूर्वक स्वतः कर्म करून ज्ञानी पुरुषानें समाहित चित्त राहून ( लोकांकडून ) सर्व कर्में करवावींत. २६.

त्याप्रमाणें ज्यांना कर्में चांगल्या तऱ्हेनें करण्याचीही पूर्ण योग्यता आली नाहीं, त्यांना लीलेनें देखील नैष्कर्म्यतेचा उपदेश करूं नये. १७३. त्यास योग्य कर्मांची वागणूक लावून द्यावी हें योग्य आहे. त्यांच्याजवळ त्या सत्कर्माचरणाचीच स्तुति करावी आणि कर्मातीत पुरुषांनींहि सत्कर्माचेंच आचरण करून दाखवावें. १७४. लोकांच्या कल्याणासाठीं जरी त्यांनीं कर्मांचें आचरण केलें, तरी कर्मांचें बंधन त्यांस प्राप्त होणार नाहीं. १७५. बहुरूपी जेव्हां राजाराणीचें सोंग आणतात, त्या वेळीं त्यांचे मनांत आपण स्त्रीपुरुष आहोंत, अशी कल्पनाहि नसते; तथापि ते जसे घेतलेल्या सोंगाची बतावणी यथास्थितपणें लोकांत करितात; ( त्याप्रमाणें लोकसंग्रहाकरतां निष्काम पुरुष जरी कर्में करीत असले, तरी त्यांस कर्मांचें बंधन प्राप्त होत नाहीं. ) १७६.

मायेच्या गुणांनीं सर्व कर्में केलीं जातात. अहंकाराच्या योगानें ज्याचें मन मोहित झालें असा पुरुष ( या कर्मांचा ) 'मीच कर्ता' असें मानतो. २७.

अर्जुना, पहा. दुसऱ्याचें ओझें आपण आपल्या शिरावर घेतलें, तर आपण त्या भारानें दडपले जाणार नाहीं का ? सांग १७७. तसें प्रकृतीच्या गुणानें जीं बरींवाईट कर्में होतात, तीं अज्ञानी मनुष्य, बुद्धिभ्रंशामुळें, मी करतों असें म्हणतो. १७८. अशा रीतीनें देहाहंकार धरणारा व स्वतःस मर्यादित समजणारा जो मूर्ख, त्यास हें गूढ तत्त्वज्ञान उघड सांगूं नये. १७९. हें राहूं दे. अर्जुना आतां तुला हिताची गोष्ट सांगतों, ती तूं चित्त देऊन ऐक. १८०.

परंतु हे महाबाहो अर्जुना, गुण व कर्म यांच्या विभागाचें ( तीं आपल्याहून भिन्न आहेत हें ) तत्त्व जाणणारा गुणांचें ठिकाणीं गुणांची प्रवृत्ति असते असें समजून आसक्त होत नाहीं. २८.

ती अशी कीं, ज्या प्रकृतीच्या गुणापासून हीं सर्व कर्में उत्पन्न होतात, तिच्याशीं ब्रह्मनिष्ठांचें तादात्म्य नसतें. १८१. ते देहाचा अभिमान टाकून, गुण व गुणांपासून उत्पन्न होणारीं जीं कर्में, त्यांचें उल्लंघन करून, देहामध्यें उदासीनतेनें राहतात. १८२. म्हणून सूर्याच्या प्रकाशांत जरी प्राण्यांचीं सर्व कर्में होतात, तरी सूर्य हा प्राण्यांच्या कर्मानें जसा लिप्त होत नाहीं, तसे हे शरीरधारी जरी असतात, तरी ते कर्मबंधाच्या ताब्यांत जात नाहींत. १८३.

मायेच्या गुणासंबंधानें मोहित झालेले लोक गुणांच्या कर्मांचे ठिकाणीं आसक्त होतात. त्या असर्वज्ञ मंदबुद्धि पुरुषांना सर्वज्ञ पुरुषानें चाळवूं नये. २९.

या जगांत, जो प्रकृतीच्या तावडींत सांपडून गुणांना वश होऊन वागतो, तोच कर्मांत बद्ध होतो. १८४. गुणांच्या योगानें इंद्रियें आपापले व्यापार करितात. त्या दुसऱ्यांनीं ( गुणांनीं ) केलेल्या कर्मांचा कर्तेपणा जो बळेंच आपणाकडे घेतो, ( तो वर सांगितल्याप्रमाणें कर्मांत बद्ध होतो. ) १८५.

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा । निराशीर्निर्ममो भूत्वा युद्धयस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

तरी उचितें कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति न्यासावीं । आत्मरूपीं ॥ ८६ ॥ हें कर्म मी कर्ता । कां आचरेन या अर्था । ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिगों देसी ॥ ८७ ॥ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥ ८८ ॥ आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इये रथीं । देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ ८९ ॥ जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मानु वाढवीं । यया भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे ॥ १९० ॥ आतां पार्था निःशंकु होईं । या संग्रामा चित्त देईं । एथ हें वांचूनि कांहीं । बोलों नये ॥ ९१ ॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः । श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥

हें अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे । श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥९२॥ तेही सकळ कर्मी वर्ततु । जाण पां कर्मरहितु । म्हणोनि हें निश्चितु । करणीय गा ॥ ९३ ॥

ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् । सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

नातरी प्रकृतिमंतु होउनी । इंद्रिया लळा देउनी । जे हें माझें मत अव्हेरुनी । ओसंडिती ॥ ९४ ॥ जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखिती । कां हा अर्थवादु म्हणती । वाचाळपणें ॥ ९५ ॥ ते मोहमदिरा भ्रमले । विषयविखें घारले । अज्ञानपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ॥ ९६ ॥ देखें शवाच्या हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें । नातरी जात्यंधा पाहलें । प्रमाण नोहे ॥ ९७ ॥ कां चंद्राचा उदयो जैसा । उपयोगा नवचे वायसा । मूर्खा विवेकु हा तैसा । रुचेल ना ॥ ९८ ॥ तैसे ते पार्था । जे विमुख या परमार्था । तयांसी संभाषण सर्वथा । करावेना ॥ ९९ ॥ म्हणोनि ते न मानिती । आणि निंदाही करूं लागती । सांगें पतंग काय साहती । प्रकाशातें ॥ २०० ॥ पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण । तेवीं विषयाचरण । आत्मघाता ॥ १ ॥

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें । लाळावीं ना कौतुकें । आदिकरूनी ॥ २ ॥ हां गा सर्पेसीं खेळों येईल । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धि जाईल । सांगें हाळाहाळ जिरेल । सेविलिया काई ॥ ३ ॥ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला । तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥ ४ ॥ एऱ्हवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नाना भोगरचना । मेळवावी ॥ ५ ॥ आपण सायासेंकरूनि बहुतें । सकळहि समृद्धिजातें । उदोअस्तु या देहातें । प्रतिपाळावें कां ॥ ६ ॥ सर्वस्वें शिणोनि एथें । अर्जवावीं संपत्तिजातें । तेणें स्वधर्मु सांडूनि देहातें । पोखावें काई ॥ ७ ॥ मग हें तंव पांचमेळावा । शेखीं अनुसरेल पंचत्वा । ते वेळीं केला कें गिंवसावा । शीणु आपुला ॥ ८ ॥ म्हणूनि केवळ देहभरण । ते जाणें उघडी नागवण । यालागीं एथ अंतःकरण । देयावेना ॥ ९ ॥

**चित्तवृत्ति माझ्या ठिकाणीं ठेवून, माझ्या ठिकाणीं सर्व कर्में समर्पण करून निरिच्छ व निरहंकार होऊन, संशयरहित असा तूं युद्ध कर. ३०.**

तरी सर्व विहित कर्में करून, तीं मला तूं अर्पण कर; परंतु चित्तवृत्ति मात्र आत्मस्वरूपीं ठेव. १८६. हें विहित कर्म, मी त्याचा कर्ता अथवा अमूक कारणाकरितां मी त्या कर्माचें आचरण करीन, असा अभिमान तुझ्या चित्तांत येईल, तर तो येऊं देऊं नकोस. १८७. तूं केवळ देहासक्त होऊन राहूं नकोस, सर्व कामनांना टाकून दे आणि मग सर्व भोगांचा यथाकालीं उपभोग घे. १८८. आतां तूं आपल्या हातांत धनुष्य घेऊन या रथावर चढ आणि आनंदानें वीरवृत्तीचा अंगीकार कर. १८९. या जगांत तूं आपली कीर्ति वाढव व आपल्या धर्माचा मान वाढव; आणि पृथ्वीला या दुष्टांच्या ओझ्यापासून सोडव. १९०. आतां अर्जुना, संशय टाकून दे आणि या युद्धाकडे लक्ष दे. या प्रसंगीं युद्धाशिवाय दुसरें कांहीं बोलूं नकोस. १९१.

**जे श्रद्धावान् व निर्मत्सर मानव हें माझें मत नित्य अनुसरतील, ते देखील कर्मापासुन मुक्त होतील. ३१.**

अर्जुना, हा माझा यथार्थ उपदेश जे मोठ्या पूज्यबुद्धीनें मान्य करितात आणि विश्वासपूर्वक त्याप्रमाणें वागतात, १९२. ते सर्व कर्में करीत असले तरी, ते कर्मरहित आहेत, असें अर्जुना, तूं समज. म्हणून हें कर्म अवश्य करणीय आहे. १९३.

**पण जे मत्सरी लोक हें माझें मत अनुसरत नाहींत, ते सर्व प्रकारच्या ज्ञानाविषयीं मूढ, अविवेकी व नष्ट आहेत असें समज. ३२.**

नाहींतर प्रकृतीच्या स्वाधीन होऊन व इंद्रियांचे लाड करून, जे लोक ह्या माझ्या मताचा तिरस्कार करून, तें टाकून देतात; १९४. जे याला एक साधारण गोष्ट समजतात, जे याच्याकडे अनादरानें पहातात किंवा जे वाचाळपणानें ह्यास पुष्पित वाणी म्हणतात; १९५. ते लोक अविवेकरूपी दारूनें मत्त झाले आहेत व विषयरूपी विषानें व्यापलेले आहेत व अज्ञानरूपी चिखलामध्यें फसलेले आहेत, असें निःसंशय समज. १९६. पहा, प्रेताच्या हातांत दिलेलें रत्न ज्याप्रमाणें व्यर्थ जातें अथवा जन्मांधाला दिवस उगवल्याचा उपयोग नाहीं; १९७. किंवा ज्याप्रमाणें चंद्राचा उदय कावळ्याच्या उपयोगी पडत नाहीं; त्याप्रमाणें हा विचार मूर्खांना रुचणार नाहीं. १९८. अर्जुना, याप्रमाणें जे या परमार्थाला पाठमोरे असतील, त्यांच्याशीं मुळींच भाषण करूं नये. १९९. ते या उपदेशाला मानीत नाहींत आणि उलट त्याची निंदा देखील करूं लागतात; म्हणून ( त्यांना न सांगणें बरोबरच आहे. ) सांग, पतंग काय प्रकाशाला सहन करूं शकतील ? २००. ज्याप्रमाणें दिव्याला आलिंगन देण्यांत पतंगाला अचूक मरण येतें, त्याप्रमाणें विषयाचरणांत अचूक आत्मनाश होतो. २०१.

**ज्ञानीसुद्धां आपल्या प्रकृतीस अनुसरून वागत असतो. महाभूतें ( आपापल्या कारणांत ) अव्यक्तांत लीन होतात, तेथें निग्रहाचा काय उपयोग ? ३३.**

म्हणून कोणीहि शहाण्या मनुष्यानें ह्या इंद्रियांचे लीलेनें देखील लाड करूं नयेत. २०२. अरे, सापाबरोबर खेळतां येईल काय ? किंवा वाघाची संगत नीटपणें शेवटास जाईल काय ? सांग बरें. हलाहल विष प्यालें तर पचेल काय ? २०३. पहा, सहज खेळतां खेळतां जर आग लागली आणि मग ती जर बळावली, तर ती जशी आटोपत नाहीं, त्याप्रमाणें इंद्रियांचा लाड केला, तर तें चांगलें नाहीं. २०४. अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर, या प्रकृतीच्या स्वाधीन असणाऱ्या शरीराला नानाप्रकारचे व्यवस्थित भोग कां द्यावेत ? २०५. आपण अतिशय कष्ट करून, जेवढी म्हणून संपत्ति आहे तेवढी सर्व एकूणएक खर्चून, रात्रंदिवस या देहाची जोपासना कां करावी ? २०६. या लोकांत सर्व प्रकारें कष्ट करून सर्व प्रकारची संपत्ति संपादन करावी आणि मग आपला धर्म टाकून देऊन, त्या संपत्तीनें, या देहाचें पालनपोषण करावें, हें योग्य आहे काय ? २०७. मग हें ( शरीर पाहिलें ) तर पांच भूतांच्या मिलाफानें झालेलें आहे व तें शेवटीं पांच भूतांतच मिळून जाणार; त्या वेळीं आपण केलेले श्रम कोठें शोधून काढावेत ? ( म्हणजे आपल्या कष्टाचा मोबदला कोणास विचारावा ? ) २०८. म्हणून केवळ देहाचें पोषण करणें, हा उघड उघड घात आहे. याकरितां तूं देहपोषणाकडे लक्ष देऊं नकोस २०९.

इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ । तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

एऱ्हवीं इंद्रियांचियां अर्था- । सारिखा विषयो पोखितां । संतोषु कीर चित्ता । आपजेल ॥ २१० ॥ परी तो संवचोराचा सांगातु । जैसा नावेक स्वस्थु । जंव नगराचा प्रांतु । सांडिजेना ॥ ११ ॥ बापा विषाची मधुरता । झणें आवडी उपजे चित्ता । परी तो परिणाम विचारितां । प्राणु हरी ॥ १२ ॥ देखें इंद्रियीं कामु असे । तो लावी सुखदुराशे । जैसा गळीं मीनु आमिषें । भुलविजे गा ॥ १३ ॥ परी तयामाजी गळु आहे । जो प्राणातें घेऊनि जाये । तो जैसा ठाउवा नोहे । झांकलेपणें ॥ १४ ॥ तैसे अभिलाषें येणें कीजेल । जरी विषयांची आशा धरिजेल । तरी वरपडा होईजेल । क्रोधानळा ॥ १५ ॥ जैसा कवळोनियां पारधी । घातेचिये संधी । आणी मृगातें बुद्धी । साधावया ॥ १६ ॥ एथ तैसीची परी आहे । म्हणूनि संगु हा तुज नोहे । पार्था दोन्ही कामक्रोध हे । घातुक जाणें ॥ १७ ॥ म्हणऊनि हा आश्रोचि न करावा । मनींही आठवो न धरावा । एकु निजवृत्तीचा बोलावा । नासों नेदीं ॥ १८ ॥

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिणु जाहला । तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें ॥ १९ ॥ येरु आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा । परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥ २२० ॥ सांगें शूद्रघरीं आघवीं । पक्वान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केवीं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥ २१ ॥ हें अनुचित कैसेनि कीजे । अप्राप्य केवीं इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२ ॥ तरी लोकांचीं धवळारें । देखोनियां मनोहरें । असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं ॥ २३ ॥ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली । तरी भोगितां तेचि भली । जियापरी ॥ २४ ॥ तेवीं आवडे तैसा सांकडु । आचरतां जरी दुवाडु । तरी स्वधर्मुचि सुरवाडु । पारत्रिकीचा ॥ २५ ॥ हां गा साकर आणि दूध । हें गौल्य कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ॥ २६ ॥ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते आळुकीचि उरेल । जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा ॥ २७ ॥ म्हणोनि आणिकांसी जें विहित । आणि आपणपेयां अनुचित । तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥ २८ ॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेचु होईल जीविता । तोहि निका वर उभयतां । दिसत असे ॥ २९ ॥

अर्जुन उवाच—अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः । अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

ऐसें समस्तसुराशिरोमणी । बोलिले जेथ श्रीशार्ङ्गपाणी । तेथ अर्जुन म्हणे विनवणी । असे देवा ॥ २३० ॥ हें जें तुम्हीं सांगितलें । तें सकळ कीर म्यां परिसलें । परी आतां पुसेन कांहीं आपुलें । अपेक्षित ॥ ३१ ॥ तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांचीही स्थिति भ्रंशे । मार्गु सांडुनि अनारिसे । चालत देखों ॥ ३२ ॥ सर्वज्ञुही जे होती । हे उँपायही जाणती । तेही परधर्में व्यभिचरति । कवणें गुणें ॥ ३३ ॥ बीजा आणि भुसा । अंधु निवाडु नेणे जैसा ।

**विषयांच्या ठिकाणीं इंद्रियांचे प्रीति व द्वेष असतात. त्या प्रीतिद्वेषांच्या ताब्यांत आपण जाऊं नये; कारण ते याच्या मार्गाच्या आड येणारे आहेत. ३४.**

एरवीं इंद्रियांना पाहिजे त्याप्रमाणें विषय देत गेलें, तर खरोखर मनाला संतोष प्राप्त होईल; २१०. परंतु तो संतोष म्हणजे सभ्य दिसणाऱ्या चोराच्या संगतीप्रमाणें आहे; सभ्य दिसणारा चोर गांवची शीव ओलांडली नाहीं, तेथपर्यंतच क्षणभर स्वस्थ असतो. ( पुढें वनांत गेल्यावर तोच आपल्या घातास प्रवृत्त होतो. ) २११. बाबा, वचनागादि विषें गोड आहेत खरीं; पण त्यांच्याविषयीं अंतःकरणांत इच्छा कदाचित् उत्पन्न होईल, तरीपण ती उत्पन्न होऊं देऊं नकोस. कारण त्यांच्या परिणामाचा विचार केला तर तीं प्राणघातक आहेत. २१२. पहा, ज्याप्रमाणें गळाला लावलेलें आमिष माशाला भुलवितें, त्याचप्रमाणें इंद्रियांच्या ठिकाणीं असणारी विषयांची लालसा प्राण्यांना सुखाच्या खोट्या आशेकडे ओढते. २१३. परंतु त्या आमिषाखालीं प्राण घेणारा गळ आहे, हें तो गळ आमिषानें झांकला गेला असल्यामुळें ज्याप्रमाणें त्या माशाला कळत नाहीं; २१४. या विषयांच्या लालसेनें तशीच स्थिति होईल. जर विषयांचा अभिलाष धरला, तर क्रोधरूपी अग्नींत पडावें लागेल. २१५. जसा पारधी मारण्याच्या हेतूनें हरणाला चहूंकडून घेरून माराच्या कचाटींत आणतो; २१६. येथें तसाच प्रकार आहे. म्हणून तूं विषयांचा संग धरूं नकोस. अर्जुना, काम व क्रोध हे दोन्ही घात करणारे आहेत, असें समज. २१७. म्हणून विषयेच्छेला थाराच देऊं नये. या विषयांची मनांतही आठवण आणूं नये. फक्त हा स्वधर्माचा जिव्हाळा नासूं देऊं नकोस. २१८.

**उत्तम प्रकारें अनुष्ठान झालेल्या परधर्मापेक्षां, स्वधर्म जरी आचरण्यास कठीण असला तरी स्वधर्मच चांगला. स्वधर्माचरण करीत असतांना मरण आलें तरी चांगलें. (पण) परधर्म हा भयंकर होय. ३५.**

पहा, अरे आपला स्वतःचा धर्म आचरण्यास कठीण जरी असला, तरी त्याचेंच आचरण केलेलें चांगलें. २१९. याहून दुसरा जो परकीयांचा आचार, तो खरोखर दिसावयास चांगला जरी दिसला तरी आचरण करणारानें आपणांस विहित असलेल्या कर्माचेंच आचरण करावें. २२०. शूद्राच्या घरीं सर्व चांगलीं पक्वान्नें आहेत, तीं ब्राह्मण दरिद्री जरी असला, तरी त्यानें कशीं सेवन करावींत ? सांग. २२१. अशी ही अयोग्य गोष्ट कशी करावी ? जे प्राप्त करून घेणें योग्य नाहीं, त्याची इच्छा कशी करावी ? अथवा विचार कर, इच्छा जरी झाली, तरी त्याचें सेवन करावें काय ? २२२. दुसऱ्यांची सुंदर चुनेगच्ची घरें पाहून, आपल्या असलेल्या गवताच्या झोंपड्या कशा मोडून टाकाव्यात ? २२३. हें असूं दे. आपली बायको जरी रूपानें वाईट असली तरी ज्याप्रमाणें तिच्याबरोबर संसार करावा हें चांगलें; २२४. त्याप्रमाणें वाटेल तसा अडचणीचा प्रसंग आला अथवा आचरावयास त्रास पडला, तरी आपला धर्मच परलोकीं सुख देणारा आहे. २२५. बाबा, साखर आणि दूध हे पदार्थ गोड आहेत, हें उघड आहे; पण जंतांच्या रोगांत त्यांचा वाईट परिणाम होत असल्यामुळें, ज्यांना तो रोग आहे, त्यांनीं ते पदार्थ कसे सेवन करावेत ? २२६. असें असूनहि जर त्याचें सेवन केलें, तर सेवन करणाराचा आग्रहच ठरेल. कारण, अर्जुना, त्याचें तें करणें परिणामी हितकर होणार नाहीं. २२७. म्हणून दुसऱ्यांना जें विहित, पण आपणांस जें अकरणीय म्हणून ठरलें आहे, तें हिताचा विचार करून पाहिलें तर, आचरण करूं नये (हें बरें). २२८. ( फार काय ? ) या आपल्या धर्माचें आचरण करीत असतां, जर प्राण खर्ची पडतील, तरीहि इहपरलोकाच्या दृष्टीनें तो ( धर्म ) चांगलाच आहे. २२९.

**अर्जुन म्हणाला, हे श्रीकृष्णा, तर मग स्वतःची इच्छा नसतांहि व जणूं काय बलानें नियुक्त केलेला हा पुरुष कोणाकडून प्रेरित होत्साता पाप आचरतो ? ३६.**

सर्व देवांत श्रेष्ठ असलेले, श्रीकृष्ण, ज्यावेळीं असें बोलले, त्यावेळीं अर्जुन म्हणाला, देवा, माझी एक विनंति आहे. २३०. तुम्ही मला जें वर सांगितलें, तें खरोखर मीं सर्व ऐकलें. परंतु आतां मला कांहीं पाहिजे आहे, तें मी विचारतों. २३१. तर देवा, हें असें कसें कीं, ज्ञान्यांचीही स्थिति बिघडून, ते मार्ग सोडून भलत्याच वाटेनें चालत असल्याचें नजरेस येतें ! २३२. ज्यांना सर्व कळतें व ज्यांस हे उपायही ठाऊक असतात, ते देखील परधर्माच्या आचरणानें स्वधर्मापासून कशामुळें भ्रष्ट होतात ? २३३. आंधळा ज्याप्रमाणें धान्य आणि कोंडा यांची निवड

नावेक देखणाही तैसा। बरळे कां पां ॥ ३४ ॥ जे असता संगु सांडिती। तेचि संसर्गु करितां न धाती। वनवासीही सेविती। जनपदातें ॥ ३५ ॥ आपण तरी लपती। सर्वस्वें पाप चुकविती। परी बलात्कारें सुइजती। तयाचि मार्जी ॥ ३६ ॥ जयांची जीवें घेती विवसी। तेचि जडोनि ठाके जीवेंसीं। चुकविती ते गिंवसी। तयातेंचि ॥ ३७ ॥ ऐसा बलात्कारु एकु दिसे। तो कवणाचा एथ आग्रहो असे। हें बोलावें हृषीकेशें। पार्थु म्हणे ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाच—काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विद्धयेनमिह वैरिणम्॥३७॥

तंव हृदयकमळआरामु। जो योगियांचा निष्काम कामु। तो म्हणतसे पुरुषोत्तमु। सांगेन आइक ॥ ३९ ॥ तरी हे काम क्रोधु पाहीं। जयांतें कृपेची सांठवण नाहीं। हे कृतांताच्या ठायीं। मानिजती ॥ २४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरांचे वाघ। भजनमार्गींचे मांग। मारक जे ॥ ४१ ॥ हे देहदुर्गींचे धोंड। इंद्रियग्रामींचे कोंड। यांचें व्यामोहादिक बंड। जगावरी ॥ ४२ ॥ हे रजोगुण मानसाचे। समूळ आसुरियेचे। धायपण ययांचें। अविद्या केलें ॥ ४३ ॥ हे रजाचे कीर जाहले। परी तमासी पढियंते भले। तेणें निजपद यां दिधलें। प्रमादमोहो ॥ ४४ ॥ हे मृत्यूच्या नगरीं। मानिजती निकियापरी। जे जीविताचे वैरी। म्हणऊनियां ॥ ४५ ॥ जयांसि भुकेलियां आमिषा। हें विश्व न पुरेचि घांसा। कुळवाडि यांची आशा। चाळीत असे ॥ ४६ ॥ कौतुकें कवळितां मुठी। जिये चवदा भुवनें थेंकुटीं। ते भ्रांति तिये धाकुटी। वाल्हीदुल्ही ॥ ४७ ॥ जे लोकत्रयाचें भातुकें। खेळतांचि खाय कवतिकें। तिच्या दासीपणाचेनि बिकें। तृष्णा जिये ॥ ४८ ॥ हें असो मोहें मानिजे। यांतें अहंकारें घेपे दीजे। जेणें जग आपुलेनि भोजें। नाचवीत असे ॥ ४९ ॥ जेणें सत्याचा भोकसा काढिला। मग अँकृत्य तृणकुटा भरिला। तो दंभु रूढविला। जगीं इहीं ॥ २५० ॥ साध्वी शांति नागविली। मग माया मांगी शृंगारिली। तियेकरवीं विटाळविलीं। साधुवृंदें ॥ ५१ ॥ इहीं विवेकाची त्राय फेडिली। वैराग्याची खाली काढिली। जितया मान मोडिली। उपशमाची ॥ ५२ ॥ इहीं संतोषवन खांडिलें। धैर्यदुर्ग पाडिले। आनंदरोप सांडिलें। उपडूनियां ॥ ५३ ॥ इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं। सुखाची लिपि पुसिली। जिव्हारीं आगी सूदली। तापत्रयाची ॥ ५४ ॥ हे आंगा तंव घडले। जीवींचि आथी जडले। परी नातुडती गिंवसिले। ब्रह्मादिकां ॥ ५५ ॥ हे चैतन्याचे शेजारीं। वसती ज्ञानाच्या एका हारीं। म्हणोनि प्रवर्तले महामारी। सांवरती ना ॥ ५६ ॥ हे जळेंवीण बुडविती। आगीवीण जाळिती। न बोलतां कवळिती। प्राणियांतें ॥ ५७ ॥ हे शस्त्रेंवीण साधिती। दोरेंवीण बांधिती। ज्ञानियासी तरी वधिती। पैज घेउनी ॥ ५८ ॥ हे चिखलेंवीण रोंविती। पाशिकेंवीण गोंविती। हे कवणाजोगे न होती। आंतौटेपणें ॥ ५९ ॥

धूमेनाऽऽव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च। यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम्॥ ३८ ॥

जाणत नाहीं, त्याप्रमाणें कधीं कधीं डोळसालाही कळत नाहीं, असें कां व्हावें ? २३४. जे असलेल्या सर्व संगाचा त्याग करितात, तेच परत कितीही संग केला तरी तृप्त होत नाहींत. सर्व सोडून अरण्यांत राहिलेले लोक देखील पुन्हां लोकांत येऊन राहातात. २३५. आपण स्वतः पापांना चुकविण्याकरितां लपून बसतात. तात्पर्य, सर्व प्रकारें पाप चुकविण्याकरितां प्रयत्न करितात, परंतु पुनः बळजबरीनें त्यांतच कोंबले जातात. २३६. ज्यांचा मनापासून कंटाळा येतो, तेच अंतःकरणाला येऊन चिकटतात, व ज्यांना टाळण्याचा प्रयत्न करावा तेच उलट त्यांनाच घेरतात. २३७. अशी एक बळजबरी दिसून येते; हा येथें कोणाचा बलात्कार आहे ? हें देवांनीं मला सांगावें, असें अर्जुन म्हणाला. २३८.

**श्रीकृष्ण म्हणाले, हा काम आहे, हा क्रोध आहे, रजोगुणापासून उत्पन्न झालेला हा अधाशी व महापापी आहे. या लोकीं हा ( आपला ) वैरी आहे असें जाण. ३७.**

तेव्हां हृदयरूपी कमलांमध्यें विश्रांति घेणारा ( रहाणारा ) व निरिच्छ झालेले योगी ज्याची इच्छा करितात, असा जो श्रीकृष्ण, तो अर्जुनाला म्हणाला, ऐक. २३९. तर बाबा, ( बलात्कार करणारे ) हे काम क्रोध आहेत असें समज. हे असे आहेत कीं, ज्यांचे मनांत दयेचा सांठा मुळींच नाहीं. हे कामक्रोध प्रत्यक्ष यमधर्म आहेत, असें समजलें जातें. २४० हे ज्ञानरूपी ठेव्यावर असलेले सर्प होत; हे विषयरूपी दऱ्यांत राहणारे वाघ आहेत; हे भजनरूपी रस्त्यावरील वाटमारे मांग आहेत. २४१. हे देहरूपी डोंगरी किल्ल्यावरचे मोठाले दगड आहेत; हे इंद्रियरूपी गांवाचें गांवकूस आहेत; यांचें अविवेकादिकाच्या रूपानें जगावर ( मोठें ) बंड आहे. २४२. हे मनांत असलेल्या रजोगुणाचे बळलेले आहेत व मुळापासूनच असुरी संपत्तीचे आहेत. यांचें पालनपोषण अविद्येनें केलेलें आहे. २४३. हे वास्तविक रजोगुणाचे जरी बनलेले आहेत, तरी ते तमोगुणाला फार प्रिय होऊन राहिले आहेत. त्या तमोगुणानें प्रमाद व मोहरूपी आपली गादी यांना बहाल केली आहे. २४४. ह्यांची मृत्यूच्या नगरांत चांगली पत आहे. कारण कीं, हे जीविताचे शत्रु आहेत. २४५. भूक लागली असतां खाण्यास हें जग एका घांसासही ज्यांना पुरत नाहीं, अशा या कामक्रोधांचा जो ( नाशकारक ) व्यापार, त्या व्यापारांवर देखरेख आशा करते. २४६. सहज मुठींत धरण्यास जिला चौदाही भुवनें थोडीं आहेत, अशी जी भ्रांति, ती या आशेची नवानवसाची लाडकी धाकटी बहीण आहे. २४७. जी खेळत असतां त्रैलोक्यरूप खाऊ सहज खाऊन टाकते, त्या भ्रांतीच्या दासीपणाचे जोरावर तृष्णा जगली आहे. २४८. हें असो. या कामक्रोधांना मोहाचे घरीं मान आहे. आपल्या करामतीनें जो सर्व जगास नाचवितो, तो अहंकार या कामक्रोधांपाशीं देवघेव करितो. २४९. ज्यानें सत्याच्या पोटीं असलेला मालमसाला काढून, त्या ऐवजीं असत्याचा पेंढा भरला, असा जो दंभ, तो, या कामक्रोधांनीं जगांत प्रसिद्धीस आणला. २५०. या कामक्रोधांनीं पतिव्रता जी शांति तिला वस्त्रहीन केलें; व मग त्या वस्त्रालंकारांनीं मायारूप मांगीण सजविली; व मग अशा या सजविलेल्या मायेकडून साधूंचे समुदाय या कामक्रोधांनीं भ्रष्ट करविले. २५१. यांनीं विचाराचा आश्रय नाहींसा केला, वैराग्याची कातडी काढली व निग्रहाची जिवंतपणींच मान मुरगळून टाकली. २५२. यांनीं संतोषरूपी अरण्य तोडून टाकलें; व धैर्यरूपी किल्ले पाडले व आनंदरूपी लहान रोपटें उपटून टाकलें. २५३. यांनीं बोधरूपी रोपें उपटलीं आणि सुखाची भाषा पुसून टाकली. यांनीं हृदयांत त्रिविध तापाचे निखारे पसरिले. २५४. हे शरीराबरोबरच उत्पन्न झाले आहेत, व अंतःकरणाला सारखे चिकटून राहिले आहेत. परंतु धुंडाळले तरी ब्रह्मादि देवांना हातीं लागत नाहींत. २५५. हे कामक्रोध जीवात्म्याच्याजवळ असतात व वृत्तिज्ञानाच्या पंक्तीला राहातात, म्हणून हे हल्ला करावयास उसळले म्हणजे आटोपत नाहींत. २५६. हे पाण्यावांचून बुडवितात, अग्नीवांचून जाळतात आणि न बोलतांच प्राण्यांना घेरतात. २५७. हे शस्त्रावांचून ठार करितात. दोरावांचून बांधतात आणि ज्ञान्यांची तर प्रतिज्ञापूर्वक मान कापतात. २५८. हे चिखलावांचून रोंवतात व जाळ्यावांचून अडकवितात, हे फार आंत असल्यामुळें कोणालाहि आटोपण्यासारखे नाहींत. २५९.

**ज्याप्रमाणें धूमानें अग्नि, मळानें आरसा व गर्भवेष्टनानें गर्भ आच्छादिलेला असतो, त्याप्रमाणें यानें ( कामानें ) हें सर्व आच्छादिलें आहे. ३८.**

जैसी चंदनाची मुळी। गिंवसोनि घेपे व्याळीं। नातरी उल्वाची खोळी। गर्भस्थासी ॥ २६० ॥ कां प्रभावीण भानु। धूमेंवीण हुताशनु। जैसा दर्पण मळहीनु। कहींच नसे ॥ ६१ ॥ तैसें इहींवीण एकलें। आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें। जैसें कोंडेनि पां गुंतलें। बीज निपजे ॥ ६२ ॥

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा। कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणाऽनलेन च ॥ ३९ ॥

तैसें ज्ञान तरी शुद्ध। परी इहीं असे प्ररुद्ध। म्हणोनि तें अगाध। होऊनि ठेलें ॥ ६३ ॥ आधीं यातें जिणावें। मग तें ज्ञान पावावें। तंव पराभवो न संभवे। रागद्वेषां ॥ ६४ ॥ यांतें साधावयालागीं। जें बळ आणिजे आंगीं। तें इंधन जैसें आगी। सावावो होय ॥ ६५ ॥

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते। एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

तैसे उपाय कीजती जे जे। ते यांसीचि होती विरजे। म्हणोनि हटियांतें जिणिजे। इहींचि जगीं ॥ ६६ ॥ ऐसियांही सांकडां बोला। एक उपायो आहे भला। तो करितां जरी आंगवला। तरी सांगेन तुज ॥ ६७ ॥

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ। पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

यांचा पहिला कुरुठा इंद्रियें। एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये। आधीं निर्दळूनि घालीं तियें। सर्वथैव ॥ ६८ ॥

इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः। मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥

मग मनाची धांव पारुषेल। आणि बुद्धीची सोडवण होईल। इतुकेनि थारा मोडेल। या पापियांचा ॥ ६९ ॥

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना। जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

हे अंतरीहूनि जरी फिटले। तरी निभ्रांत जाण निवटले। जैसें रश्मीवीण उरलें। मृगजळ नाहीं ॥ २७० ॥ तैसे रागद्वेष जरी निमाले। तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें। मग तो भोगी सुख आपुलें। आपणाचि ॥ ७१ ॥ जे गुरुशिष्याची गोठी। पदपिंडाची गांठी। तेथ स्थिर राहोनि नुठीं। कवणे काळीं ॥ ७२ ॥ ऐसें सकळ सिद्धांचा रावो। देवी लक्ष्मीयेचा नाहो। राया ऐक देवदेवो। बोलता जाहला ॥ ७३ ॥ आतां पुनरपि तो अनंतु। आद्य एकी मातु। सांगेल तेथ पंडुसुतु। प्रश्नु करील ॥ ७४ ॥ तया बोलाचा हन पाडु। का रसवृत्तीचा निवाडु। येणें श्रोतयां होईल सुरवाडु। श्रवणसुखाचा ॥ ७५ ॥ ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा। चांग उठावा करूनि उन्मेषाचा। मग संवादु श्रीहरिपार्थाचा। भोगा बापा ॥ २७६ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः।

[ ओंव्या २७६. श्लोक ४३. ]

ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु.

जसे चंदनाच्या मुळीला साप वेढे घालून बसतात किंवा पोटांत असणाऱ्या गर्भाला वेष्टणाची गवसणी असते; २६०. अथवा प्रकाशावांचून सूर्य, धुरावांचून अग्नि किंवा मळाशिवाय आरसा केव्हांच नसतो; २६१. तसे या कामक्रोधाशिवाय एकटें असलेलें ज्ञान आमच्या नजरेला आलें नाहीं. ज्याप्रमाणें बीं कोंड्यासकट उत्पन्न होतें. २६२.

**ज्याची पूर्तता होणें कठीण आहे, असा हा ज्ञानी पुरुषाचा नित्य वैरी जो कामरूपी अग्नि, त्यानें हे अर्जुना, ज्ञान आच्छादिलें आहे. ३९.**

तसें ज्ञान स्वभावतः निर्लेप आहे, परंतु तें या कामक्रोधाकडून पूर्ण आच्छादिलेलें असतें, म्हणून तें मिळण्याला कठीण होऊन राहिलें आहे. २६३. अगोदर यांना जिंकावें आणि मग ज्ञानाची प्राप्ति करून घ्यावी. परंतु या कामक्रोधांचा तर पराभव होऊं शकत नाहीं. २६४. उलट यांचा नाश करण्याकरितां, जेवढें सामर्थ्य अंगांत आणावें, तेवढें अग्नीला ज्याप्रमाणें सर्पण, त्याप्रमाणें यांनाच उलट साह्य करणारें होतें. २६५.

**इंद्रियें, मन व बुद्धि हीं याचें अधिष्ठान आहेत. ज्ञान आच्छादित करून यांच्या ( इंद्रियादिकांच्या ) योगानें हा प्राण्याला मोह पाडतो. ४०.**

अशा रीतीनें ज्या ज्या युक्त्या योजाव्यात, त्या सर्व या कामक्रोधांनाच साहाय्य करितात; म्हणून या जगांत हेच हटयोग्यांना जिंकतात. २६६. असे हे कामक्रोध जिंकण्याला कठीण म्हटले, तरी त्यांस जिंकण्याचा एक चांगला उपाय आहे; तो जर तुझ्याकडून होईल तर ( पहा ) तुला सांगतों. २६७.

**हे भरतश्रेष्ठा अर्जुना, म्हणून तूं अगोदर इंद्रियांचें नियमन करून, ज्ञान व विज्ञान यांचा नाश करणाऱ्या या पापरूपी कामाचा त्याग कर. ४१.**

तर यांचें पहिलें आश्रयस्थान इंद्रियें आहेत आणि तेथूनच कर्मांची प्रवृत्ति होते, तेव्हां अगोदर त्या इंद्रियांचेंच पूर्णपणें दमन कर. २६८.

**इंद्रियें ( हीं ज्ञानविरोधी म्हणून ) श्रेष्ठ आहेत असें म्हणतात; इंद्रियांपेक्षां मन श्रेष्ठ आहे; मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ आहे; आणि बुद्धिपेक्षां तो ( काम ) श्रेष्ठ आहे. ४२.**

मग मनाचें धांवणें थांबेल, आणि बुद्धि मोकळी होईल. एवढें झालें म्हणजे या दुष्टांचा आश्रय नाहींसा होईल. २६९.

**मनानें मनाचें संयमन करून, या प्रकारच्या बुद्धीच्यापेक्षांही ( जोरदार असलेल्या ) कामाला जाणून, ज्याचें ठाणें हालण्याला कठीण अशा कामरूपी शत्रूला ठार कर. ४३.**

हे कामक्रोध अंतःकरणांतून पार गेले कीं, ते निःसंशय नाहींसे झाले असें समज. ज्याप्रमाणें सूर्यकिरणांशिवाय मृगजळ राहात नाहीं; २७०. तसे कामक्रोध जर निःशेष गेले, तर ब्रह्मप्राप्तिरूप स्वराज्य मिळालें असें समज. मग तो पुरुष आपणच आपलें सुख उपभोगितो. २७१. गुरुशिष्यांच्या संवादांत येणाऱ्या विचारानें प्राप्त झालेली जीवपरमात्म्याची जी एकता, तिचे ठिकाणीं स्थिर होऊन तेथून तूं कधीं हालूं नकोस. २७२. सर्व सिद्धांचा राजा, देवी लक्ष्मीचा पति व देवांचा देव जो श्रीकृष्ण, तो असें म्हणाला, 'हे राजा धृतराष्ट्रा ऐक.' (असें संजय म्हणाला.) २७३. आतां पुन्हां तो श्रीकृष्ण ( आणखी ) एक प्राचीन कथा सांगेल, त्या वेळीं अर्जुन प्रश्न करील. २७४. त्या प्रतिपादनाची योग्यता अथवा त्या प्रतिपादनांत स्पष्ट अनुभवास येणारे शांतादि रस, या योगानें श्रोत्यांस ऐकण्याच्या सुखाची रेलचेल होईल. २७५. निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात, बुद्धीला चांगलें जागें करून मग, बाबांनो, कृष्णार्जुनांचा संवाद ऐका. २७६.



## देवें ब्रह्मापर्णत्वें। क्रिया सांगितली. अ. १८–१४४१

या अध्यायापासून बाराव्या अध्यायाच्या ' अद्वेष्टा सर्व भूतानां ' या तेराव्या श्लोकापर्यंत श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या दृष्टीनें गीतेंतील उपासनाकांड आहे. तिसऱ्या अध्यायांत प्रत्येकानें कर्म केलेंच पाहिजे असा निर्णय भगवंतांनीं केला आहे. परंतु कर्म आचरत असतां त्यांत अज्ञानाचे जे बंध आहेत, त्या बंधांपासून सोडवणूक करून मोक्षापर्यंत जावयाचें असेल, तर ब्रह्मार्पणबुद्धीनें कर्म करणें जरूर आहे. शरीर, वाणी व मन याद्वारां जें विहित कर्म उत्पन्न होतें तें एक ईश्वराच्याच प्रीत्यर्थ करणें जरुर आहे. ही उपासना कशी करावी हें सांगण्यास या चौथ्या अध्यायाच्या शेवटच्या भागांत आरंभ केला आहे.

भगवंताच्या म्हणण्याचा अनुवाद करण्यापूर्वी, त्या अनुवादानें श्रोत्यांना सुखाची मेजवानी होणार आहे, असें म्हणून ज्ञानदेव श्रोत्यांचें अवधान प्रथम एकाग्र करून घेतात व अर्जुनाचा प्रश्न नसतांहि भगवान त्याला आपणहूनच अत्यंत दुर्मिळ, सर्वांपासून आतांपर्यंत चोरून ठेवलेली गोष्ट सांगत आहेत, याची उपपत्ति सांगतात. ज्ञानदेव म्हणतात, कीं अर्जुनावरील देवाचें असलेलें निस्सीम प्रेमच यास कारण आहे. ( १–१५ ). भगवंताचें म्हणणें ज्ञानदेवांनीं जें मांडलें तें थोडक्यांत असें आहे.—

'मागील अध्यायांत सांगितलेला निष्कामकर्मयोग माझ्यापासून पूर्वी विवस्वत मनु, इक्ष्वाकू व इतर राजर्षि यांना परंपरागत प्राप्त झाला होता. परंतु सांप्रतकाळीं वैराग्य विवेकाच्या अभावीं व लोक देहासक्त होऊन विषयसुखांत दंग झाल्यामुळें तो निष्कामकर्मयोग लुप्त झाला, तोच पुनः मी आज तुला युद्धाची धांदल क्षणभर बाजूस ठेवून सांगितला; याचें कारण तूं प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा व सख्याची मूर्तीच आहेस.' ( १६–३१ ) 'मी फार प्राचीनकाळीं हा उपदेश केला.' असें सांगणारा श्रीकृष्ण सध्यां अर्जुनाच्या समोर उभा आहे, यांत जी विसंगति दिसते तिचें निराकरण देवांनीं करून सांगितलें कीं, 'माझ्यासहित सर्वांचे आजपर्यंत कितीतरी जन्म होऊन गेले; पण मनुष्याला आपल्या जन्माची आठवण राहत नाहीं, परंतु मला ती राहते. ( ३२–४३ ). वास्तविक मी जन्मरहितच आहे; पण जन्म घेतों ही जी क्रिया दिसते ती मायेमुळें भासते. एकाच वस्तूची आरशामुळें दोन रूपें दिसतात, तसें माझें अवतार-कार्य भासतें. हें अवतार-कार्य धर्माची संस्थापना, साधूंचें रक्षण व दैत्यांचा नाश करून जगांत धर्म नांदून सुख वाढावें एवढ्याकरितां आहे. ( ४४–५७ ). हेंच माझें अवतार-कार्य आहे व हें काम, क्रोध, भय यांपासून मुक्त असलेल्या पुरुषांना यथार्थ रीतीनें समजतें. वास्तविक ते पुरुष मद्रूपच आहेत. मात्र जे लोक भेदबुद्धीला वश होतात, त्यांना परमात्मा एकरस असूनहि जगांत चांगला-वाईट असा भेद दिसतो. वास्तविक हा भेद त्यांच्या बुद्धींत आहे. ( ५८–७६ ). ब्राह्मणादि चार वर्णांतील माणसें वस्तुतः एकच आहेत; परंतु त्यांच्या ठिकाणीं जे स्वभावधर्म व गुण आहेत; त्यांच्या अनुरोधानें मी त्यांची चार वर्गांत विभागणी केली आहे व प्रकृतिजन्य गुणांतील भेदाप्रमाणें त्यांना कर्में वांटून दिलीं आहेत. म्हणून तत्त्वतः विचार केला तर या वर्णभेद संस्थेचा कर्ता मी नव्हे. प्रत्येकानें आपापलें कर्म योग्य रीतीनें आचरलें तर तेंच कर्म कर्मबंधापासून निःसंशय सोडवील. मात्र कर्म-अकर्म वगैरे कशाला म्हणतात याचा विचार करतांना, चांगलेचांगले दूरदर्शी पुरुष देखील घोटाळ्यांत पडतात. म्हणून या सर्व क्रियेच्या बुडाशीं महत्त्वाचा विचार असा आहे कीं, कर्म घडत असलें तरी तें आपण करीत नाहीं, अशी ठाम समजूत ठेवणें व त्याच्या फलाची आशा न ठेवणें, कर्म करीत असतांहि आपलें नैष्कर्म्य तसेंच आहे, अशा समजुतीनें



माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे ॥
तेही भ्रांतिबुद्धी तरी घडे । एऱ्हवीं नाहीं ॥
कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें ॥
एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ॥

— ज्ञानेश्वरी ओव्या ४६।४७ अध्याय ४ था

रहाणें ही याची युक्ति आहे. (७७–१०५). ती ज्याला सांपडली तो ब्रह्मरूप झालेला पुरुष संतोषाच्या गाभाऱ्यांत आत्मबोधाचें सेवन करीत असतो. लौकिक दृष्ट्या, यदृच्छेनें जें मिळेल त्यावर तो संतुष्ट असतो. त्याला आपला व परका असा भेद राहत नाहीं. सर्व विश्व त्याला वेगळें राहिलेलें नसतें. मग त्याला कर्म कोठलें व जरी त्यानें लीलेनें यज्ञादिक कर्में केलीं तरी त्याच्या ऐक्यभावनेमुळें शेवटीं तीं ऐक्यांतच मिळतात. कर्म ब्रह्मच आहे, असें साम्य त्याच्या अनुभवाला आलें असल्यामुळें त्यानें कर्म केलें तरी तें नैष्कर्म्यच आहे. (१०६–१२१).

विवेक व वैराग्ययुक्त होऊन ज्यांनीं योगरूप अग्नीची उपासना स्वीकारली आहे त्या दैव यज्ञाचे, ब्रह्मरूप अग्नीचे उपासक, तसेंच इंद्रियांचीं व प्राणांचीं सर्व कर्में ज्ञानरूपी अग्नीनें प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमस्वरूपी अग्नींत आहुति देणारे, या सर्वांच्या यज्ञक्रिया जरी भिन्न आहेत तरी त्या सर्वांचें मोक्ष हें एकच फल आहे. द्रव्यादि यज्ञद्वारां मनाच्या ठिकाणचे सर्व मळ धुऊन टाकून अज्ञान नाहींसें झाल्यामुळें केवळ ज्ञानच शिल्लक राहतें, असें जें ब्रह्मतत्त्व तें ते पावतात. हे द्रव्यादि यज्ञ जरी सांगितले आहेत, तरी ज्ञानयज्ञाची योग्यता त्यांना येत नाहीं. ज्ञानाची महति फार मोठी आहे. (१२२–१६४). तें जर प्राप्त करून घ्यावयाचें असेल, तर संतचरणांची अनन्य सेवा हाच उपाय आहे. त्याची प्राप्ति झाल्यावर मोहरूपी अंधकार नाहींसा होऊन भ्रांति, व्यामोह यांचा संपर्कहि लागणार नाहीं. ज्ञानासारखी पवित्र वस्तु दुसरी नसून ती फक्त आत्मसुखाची ज्याला चटक लागून सर्व विषयांचा वीट आला आहे व ज्याला इंद्रियांची ओढ नाहीं व जो कर्माचें कर्तृत्व आपल्याकडे घेत नाहीं, अशा पुरुषालाच प्राप्त होते व त्यामुळें त्याला निरंतर शांतीचा लाभ मिळतो. (१६५–१९२).

जन्माला येऊन ज्यांनीं संयमाग्नीची सेवा केली नाहीं, त्यांना परलोक तर दूरच राहिला. त्यांचें येथील जिणेंहि धड राहात नाहीं. त्याचप्रमाणें या ज्ञानाची ज्याला आवड नाहीं, त्याचें येथील जिणें व्यर्थ आहे. विषयसुखांत रंगून जाऊन जो संशयग्रस्त असतो, तो पातकी असून त्याचा सर्वस्वी घातच होतो. (१९३–२०३)

जेथें ज्ञानाचा अभाव असतो तेथेंच हा संशय असतो, अज्ञानामुळें हा वाढतो व श्रद्धेचा मार्ग बंद पडतो. हृदय व बुद्धीला तो ग्रस्त करून टाकतो. परंतु ज्ञानरूपी खड्ग हातीं असेल तर या प्रबळ संशयाचा नाश करतां येतो; मग मनावरील मळ निःशेष नाहींसे होतात. शेवटीं भगवंतांनीं अर्जुनाला आपल्या अंतःकरणांतील सर्व संशय टाकून पुनः युद्धप्रवृत्त होण्यास सांगितलें. (२०४–२०९)

अध्यायाचा शेवट करण्यापूर्वी ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथांत शांतरसाचा कसा उत्कर्ष झाला आहे; त्यांतील शब्द दिसण्यांत लहान असले तरी त्यांचें सामर्थ्य कसें अमर्याद आहे; साहित्य, अलंकार व आत्मचर्चा यांनीं आपला ग्रंथ कसा नटलेला आहे; या ग्रंथाचें श्रवण करणाऱ्यांचें संसारदुःखाचें समूळ उच्चाटन कसें होईल; हे सर्व विषय मोठ्या बहारीनें सांगून 'मी जें सांगतों त्याकडे मोठ्या प्रसन्न चित्तानें लक्ष द्या,' अशी श्रोत्यांना विनंति केली आहे. (२१०–२२५).



# ज्ञानेश्वरी

## अध्याय चवथा

आजि श्रवणेंद्रिया पिकलें। जे येणें गीतानिधान देखिलें। आतां स्वप्नाचि हें तुकलें। साचासरिसें ॥ १ ॥ आधींचि विवेकाची गोठी। वरी प्रतिपादी कृष्ण जगजेठी। आणि भक्तराजु किरीटी। परिसत असे ॥ २ ॥ जैसा पंचमालापु सुगंधु। कीं परिमळु आणि सुस्वादु। तै भला जाहला विनोदु। कथेचा इये ॥ ३ ॥ कैसी आगळिक दैवाची। जे गंगा वोळली अमृताची। हो कां जपतपें श्रोतयांचीं। फळा आलीं ॥ ४ ॥ आतां इंद्रियजात आघवें। तिहीं श्रवणाचें घर रिघावें। मग संवादसुख भोगावें। गीताख्य हें ॥ ५ ॥ हा अतिसो अतिप्रसंगें। सांडूनि कथाचि ते सांगें। जे कृष्णार्जुनु दोघे। बोलत होते ॥ ६ ॥ ते वेळीं संजयो रायातें म्हणे। अर्जुनु आथिठिला दैवगुणें। जे अतिप्रीती नारायणें। बोलिजतु असे ॥ ७ ॥ जें न संगेचि पितया वसुदेवासी। जें न संगेचि माते देवकीसी। जें न संगेचि बळिभद्रासी। तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ॥ ८ ॥ देवी लक्ष्मीयेवढी जवळिक। तेही न देखे या प्रेमाचें सुख। आजि कृष्णस्नेहाचें पिक। यातेंचि आथी ॥ ९ ॥ सनकादिकांचिया आशा। वाढीनल्या होतिया कीर बहुवसा। परी त्याही येणें मानें यशा। येतीचिना ॥ १० ॥ या जगदीश्वराचें प्रेम। एथ दिसतसे निरुपम। कैसें पार्थें येणें सर्वोत्तम। पुण्य केलें ॥ ११ ॥ हो कां जयाचिया प्रीती। अमूर्त हा आला व्यक्ती। मज एकवंकी याची स्थिती। आवडतु असे ॥ १२ ॥ एऱ्हवीं हा योगियां नाडळे। वेदार्थासी नाकळे। जेथ ध्यानाचेही डोळे। पावतीना ॥ १३ ॥ तें हा निजस्वरूप। अनादि निष्कंप। परी कवणें मानें सकृप। जाहला आहे ॥ १४ ॥ हा त्रैलोक्यपटाची घडी। आकाराची पैलथडी। कैसा याचिये आवडी। आवरला असे ॥ १५ ॥

श्रीभगवानुवाच:—इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्। विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥१॥

मग देव म्हणे अगा पंडुसुता। हाचि योगु आम्हीं विवस्वता। कथिला परी ते वार्ता। बहुवां दिवसांची ॥ १६ ॥ मग तेणें विवस्वतें रवी। हे योगस्थिति आघवी। निरूपिली बरवी। मनूप्रती ॥ १७ ॥ मनूनें आपण अनुष्ठिली। मग इक्ष्वाकुवा उपदेशिली। ऐसी परंपरा विस्तारिली। आद्य हे गा ॥ १८ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चवथा

आज श्रवणेंद्रियाला सुकाळ झाला; कारण गीतेसारखा ठेवा त्याला पहावयास मिळाला. जसें कांहीं स्वप्नच खरें व्हावें, तसें आतां हें झालें आहे. १. अगोदरच ही विचाराची कथा, त्यांत तिचें प्रतिपादन जगांत श्रेष्ठ असे श्रीकृष्ण करीत असून भक्तांमध्यें श्रेष्ठ असणारा अर्जुन तें ऐकत आहे. २. ज्याप्रमाणें पंचमस्वर व सुवास किंवा सुवास व उत्तम रुचि यांच्या गोड मिलाफाचा योग यावा, (त्याप्रमाणें ) या कथेंतील चर्चेचा योग मोठ्या बहारीचा जमला आहे. ३. काय दैवाचा जोर पहा ! ( कारण त्या जोरामुळें ) ही अमृताची गंगाच लाभली म्हणावयाची; किंवा श्रोत्यांचीं जपतपादि अनुष्ठानें ( या कथेच्या रूपानें ) फळास आलीं आहेत. ४. आतां एकुण एक इंद्रियांनीं श्रवणेंद्रियाचा आश्रय करावा; आणि मग गीता नांवाच्या या संवादाचें सुख भोगावें. ५. हा अप्रासंगिक पाल्हाळ पुरे कर व कृष्ण आणि अर्जुन हे दोघे जे कांहीं बोलत होते ती हकीकतच सांग ( असें श्रोते म्हणाले. ) ६. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात) त्यावेळीं संजय धृतराष्ट्राला म्हणाला, खरोखर भाग्यानेंच अर्जुनाचा आश्रय केला. ( असें म्हटलें पाहिजे. ) कारण प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण त्याच्याशीं मोठ्या प्रेमानें बोलत आहेत. ७. ( आपला ) बाप वसुदेव याला जें सांगितलेंच नाहीं, (आपली) आई देवकी हिला जें सांगितलेंच नाहीं, ( आपला भाऊ ) बळिभद्र याला जें सांगितलेंच नाहीं, तें रहस्य अर्जुनाजवळ श्रीकृष्ण बोलत आहेत. ८. देवी लक्ष्मी एवढी ( श्रीकृष्ण देवाच्या ) जवळ असणारी, पण या ( कृष्णाच्या ) प्रेमाचें सुख तिलाही ( कधी ) दिसलें नाहीं. कृष्णाच्या प्रेमाचें सर्व फळ यालाच ( अर्जुनालाच ) आज लाभत आहे. ९. सनकादिकांच्या ( परमात्मसुखाबद्दलच्या ) आशा खरोखर खूपच बळावल्या होत्या; पण त्याही इतक्या प्रमाणांत यशाला आल्याच नाहींत. १०. या जगदीश्वराचें प्रेम येथें ( या अर्जुनावर ) अगदीं निरुपम दिसत आहे. या पार्थानें कसें उत्कृष्ट पुण्य केलें आहे बरें ! ११. पहा, ज्या अर्जुनाच्या प्रीतीमुळें हा कृष्ण, ( वास्तविक ) निराकार असून साकार झाला, त्या अर्जुनाची ( देवाशीं ) एकरूपता मला चांगलीच पटते. १२. नाहीं तर हा योग्यांना सांपडत नाहीं, वेदांच्या अर्थाला सांपडत नाहीं; ध्यानाचीही नजर जेथपर्यंत पोहोंचत नाहीं, १३. अशी जी आत्मस्थिति, तद्रूप असणारा हा श्रीकृष्ण मूळचाच अचल आहे; पण ( आज या अर्जुनावर ) किती बरें कृपावंत झाला आहे ! १४. हा त्रैलोक्यरूप वस्त्राची घडी असून आकाराच्या पलीकडचा आहे; ( पण ) या अर्जुनाच्या प्रेमानें कसा आटोपशीर झाला आहे ! १५.

श्रीकृष्ण म्हणाले, हा अक्षय योग मीं सूर्याला सांगितला; सूर्यानें मनूला सांगितला; मनूनें इक्ष्वाकूला सांगितला. १.

मग देव म्हणाला, अरे अर्जुना, हाच ( निष्कामकर्म ) योग आम्हीं सूर्याला सांगितला; परंतु ती गोष्ट फार दिवसांची आहे. १६. मग त्या विवस्वान सूर्यानें या योगाची संपूर्ण माहिती वैवस्वत मनूला उत्तम प्रकारें सांगितली. १७. वैवस्वत मनूनें याचें स्वतः आचरण केलें आणि मग ( आपला मुलगा जो ) इक्ष्वाकु त्याला त्याचा उपदेश केला. अशी ही परंपरा मुळापासून चालत आली आहे. १८.

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः । स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

मग आणिकहि या योगातें । राजर्षि जाहले जाणते । परि तेथोनि आतां सांप्रतें । नेणिजे कोणी ॥ १९ ॥ जे प्राणिया कामीं भरु । देहाचिवरी आदरु । म्हणोनि पडिला विसरु । आत्मबोधाचा ॥ २० ॥ अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषय सुखचि परमावधि । जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ २१ ॥ एऱ्हवीं तरी खवणेयांच्या गांवीं । । पाटाउवें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय आथी ॥ २२ ॥ कां बहिरयांच्या आस्थानीं । कवण गीतातें मानी । कीं कोल्हेया चांदणीं । आवडी उपजे ॥ २३ ॥ पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती ॥ २४ ॥ तैसे वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाष नेणती । ते मूर्ख केंवीं पावती । मज ईश्वरातें ॥ २५ ॥ कैसा नेणों मोहो वाढीनला । तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला । म्हणोनि योगु हा लोपला । लोकीं इये ॥ २६ ॥

स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः । भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता । सांगितला आम्हीं तत्त्वता । भ्रांति न करीं ॥ २७ ॥ हें जीवींचें निज गुज । परी केवीं राखों तुज । जे पढियेसी तूं मज । म्हणऊनियां ॥ २८ ॥ तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा । मैत्रियेची चित्कळा । धनुर्धरा ॥ २९ ॥ तूं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वंचूं जावों । जरी संग्रामारूढ आहों । जाहलों आम्ही ॥ ३० ॥ तरी नावेक हें सहावें । गाजावज्यही न धरावें । परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ॥ ३१ ॥

अर्जुन उवाचः—अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः । कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

तंव अर्जुन म्हणे हरी । माय आपुलेयाचा स्नेहो करी । एथ विस्मयो काय अवधारीं । कृपानिधी ॥ ३२ ॥ तूं संसारश्रांतांची साउली । अनाथा जीवांची माउली । आम्हुतें कीर प्रसवली । तुझीच कृपा ॥ ३३ ॥ देवा पांगुळ एकादें विइजे । तरी जन्मौनि जोजारु साहिजे । हें बोलों काय तुझें । तुजचि पुढां ॥ ३४ ॥ आतां पुसेन जें मी कांहीं । तेथ निकें चित्त देईं । तेवींचि देवें कोपावें ना कांहीं । बोला एका ॥ ३५ ॥ तरी मागील जे वार्ता । तुवां सांगितली होती अनंता । ते नावेक मज चित्ता । मानेचिना ॥ ३६ ॥ जे तो विवस्वतु म्हणजे कायी । ऐसें हें वडिलां ठाउवें नाहीं । तरी तुवांचि केवीं पाहीं । उपदेशिला ॥ ३७ ॥ तो तरी आइकिजे बहुतां काळांचा । आणि तूं तंव कृष्ण सांपेचा । म्हणोनि गा इये मातुचा । विसंवादु ॥ ३८ ॥ तेवींचि देवा चरित्र तुझें । आपण कांहीं काय जाणिजे । हें लटिकें केवीं म्हणिजे । एकिहेळां ॥ ३९ ॥ परी हेचि मातु आघवी । मी परियेसें तैशी सांगावी । जे तुवांचि तया रवी केवीं । उपदेशु केला ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाचः—बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन । तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

तंव कृष्ण म्हणे पंडुसुता । तो विवस्वतु जैं होता । तैं आम्हीं नसों ऐसी चित्ता । भ्रांति जरी तुज ॥ ४१ ॥ तरी तूं गा हें नेणसी । पैं जन्में आम्हां तुम्हांसी । बहुतें गेलीं परी तियें न

याप्रमाणें परंपरेनें प्राप्त झालेला हा योग राजर्षींना ज्ञात झाला. हे शत्रुतापना, पुष्कळ काळ लोटल्यामुळें तो योग या लोकीं नष्ट झालेला आहे. २.

मग आणखीही ह्या निष्काम कर्मयोगाला जाणणारे राजर्षि पुढें होऊन गेले; पण तेव्हांपासून आतां हल्लीं (हा निष्काम कर्मयोग) कोणालाही ठाऊक नाहीं. १९. कारण, प्राण्यांचा सगळा भर विषयवासनेवर (पडला) व त्यांचा सगळा जीव काय तो देहावर आहे; म्हणून त्यांना आत्मज्ञानाचा विसर पडला. २०. आत्मबोधाची आस्था बाळगणारी बुद्धि आड मार्गाला लागल्यामुळें (लोकांना) विषयसुख हें आत्यंतिक सुख वाटूं लागलें व देहादिक प्रपंच हा प्राणाप्रमाणें प्रिय झाला. २१. नाहीं तर, दिगंबरांच्या गांवीं उंची वस्त्रें काय करावयाचीं? जन्मांधाला सूर्य काय होय? सांग बरें. २२. किंवा, बहिऱ्यांच्या सभेंत गाण्याला कोण किंमत देणार? किंवा कोल्ह्यांच्या मनांत चांदण्याबद्दल प्रेम कधीं उत्पन्न होईल काय? २३. चंद्राचा उदय होण्याच्या अगोदरच ज्यांचे असलेले डोळे फुटतात, (निरुपयोगी होतात,) ते कावळे चंद्राला कसे बरें ओळखणार? २४. त्याप्रमाणें वैराग्यनगराच्या शिवेचेंही ज्यांनीं कधीं दर्शन घेतलें नाहीं, विवेक कशाला म्हणतात हें ज्यांना माहीत नाहीं, त्या मूर्खांना, माझी ईश्वराची कशी बरें प्राप्ति होणार? २५. हा मोह इतका कसा वाढला कोण जाणें! त्यामुळें बहुतेक काळ व्यर्थ गेला, आणि म्हणून या लोकांतला हा निष्काम कर्मयोग बुडाला. २६.

तोच हा पुरातन योग, हें (सर्व रहस्यांतील) उत्तम रहस्य म्हणून, मीं आज तुला सांगितला आहे; कारण तूं माझा भक्त व सखा आहेस. ३.

तोच हा योग अर्जुना, आम्हीं तुला आज खरोखर सांगितला, याविषयीं संशय ठेवूं नकोस. २७. (हा योग म्हणजे) माझ्या जिवाची अगदीं गुप्त गोष्ट आहे; पण तुझ्यापासून ती कशी चोरून ठेवूं? कारण तूं माझा अगदीं लाडका पडलास. २८. अर्जुना, तूं प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा व सख्याची जीवनकला आहेस. २९. अर्जुना, तूं निकटसंबंधाचें ठिकाण आहेस. (तुझा व माझा संबंध अगदी निकटचा आहे.) या वेळीं तुझी फसवणूक कशी करावी? जरी आम्ही युद्धाला सज्ज झालों आहों; ३०. तरी क्षणभर तें बाजूला ठेवून, या गडबडीचाही विचार मनांत न आणतां, पहिल्यानें तुझें अज्ञान घालवून टाकलें पाहिजे. ३१.

अर्जुन म्हणाला, तुझा जन्म अलीकडचा असून सूर्याचा जन्म पलीकडचा (तुझ्या फार पूर्वीचा) आहे. (असें असतां) तूं आधीं (हा योग) सांगितलास हें मीं कसें जाणावें? ४.

तेव्हां अर्जुन म्हणाला, कृपानिधे श्रीहरी, पहा बरें, आई आपल्या (मुलांवर) ममता करिते, यांत नवल तें काय? ३२. संसारतापानें थकलेल्यांची तूं सावली (विसावा) आहेस; अनाथ जीवांची आई आहेस. आम्हांला तर केवळ तुझ्या कृपेनेंच जन्मास घातलें आहे. ३३. देवा, (आईनें) एखाद्या पांगळ्या मुलाला जन्म दिला, तर जन्मापासून त्याचा त्रास तिला काढावाच लागतो (तोच प्रकार येथें आहे); या तुझ्या (गोष्टी) तुझ्यासमोर काय बोलाव्या? ३४. आतां मी जें कांहीं विचारीन, त्याकडे चांगलें चित्त दे. त्याचप्रमाणें देवा, माझ्या या एका बोलाचा (प्रश्नाचा) मुळीं राग धरूं नकोस. ३५. अनंता, पूर्वीची गोष्ट म्हणून जी तूं मला सांगितलीस, ती क्षणभर माझ्या मनाला पटतच नाहीं. ३६. पहा, तो विवस्वत म्हणजे कोण, हें वाडवडिलांनासुद्धां ठाऊक नाहीं; तर तूं त्याला उपदेश केलास, हें कसें बरें शक्य आहे? ३७. तो तर फार पूर्वीच्या काळचा, असें ऐकतों; आणि तूं श्रीकृष्ण तर आजच्या काळचा म्हणून देवा, हें तुझें बोलणें विसंगत आहे. ३८. तसेंच; देवा, तुझें चरित्र मला कसें काय समजणार? तेव्हां हें एकदम खोटें तरी कसें म्हणावें? ३९. पण तूं त्या सूर्याला उपदेश कसा केलास, हीच सगळी हकीकत मला पटेल अशी सांग. ४०.

श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, माझे व तुझे पुष्कळ जन्म होऊन गेले. हे शत्रुतापना, त्या सर्वांना मी जाणतों, तूं जाणत नाहींस. ५.

त्यावर श्रीकृष्ण म्हणाला, अर्जुना, जेव्हां तो विवस्वान होता, तेव्हां आम्ही नव्हतों, अशी जरी तुझ्या चित्ताला भ्रांति झाली आहे; ४१. तरी अरे, तुला हें माहीत नाहीं कीं, तुमचे व आमचे (आजपर्यंत) किती तरी जन्म होऊन

स्मरसी । आपुलीं तूं ॥ ४२ ॥ मी जेणें जेणें अवसरें । जें जें होऊनि अवतरें । तें समस्तही स्मरें । धनुर्धरा ॥ ४३ ॥

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् । प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

म्हणोनि आघवें । मागील मज आठवें । मी अजुही परि संभवें । प्रकृतियोगें ॥ ४४ ॥ माझें अव्ययत्व तरी न नसे । परी होणें जाणें एक दिसे । तें प्रतिबिंबे मायावशें । माझांचि ठायीं ॥ ४५ ॥ माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे । तेंही भ्रांतिबुद्धि तरी घडे । एऱ्हवीं नाहीं ॥ ४६ ॥ कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें । एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ॥ ४७ ॥ तैसा अमूर्तचि मी किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं । तैं साकारपणें नटें नटीं । कार्यालागीं ॥ ४८ ॥

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें । ऐसा ओघु हा स्वभावें । आद्य असे ॥४९॥ म्हणोनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं । जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ॥ ५० ॥

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें । मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घालीं ॥५१॥ अधर्माची अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं फाडीं । सज्जनांकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥ ५२ ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिंवशीं । धर्मासीं नीतीशीं । शेंज भरीं ॥ ५३ ॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥ ५४ ॥ स्वसुखें विश्व कोंदे । धर्मचि जगीं नांदे । भक्तां निघती दोंदें । सात्त्विकाचीं ॥ ५५ ॥ तैं पापाचा अचळु फिटे । पुण्याची पहाट फुटे । जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ५६ ॥ ऐसेया काजालागीं । अवतरें मी युगीं युगीं । परी हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥ ५७ ॥

जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः । त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥

माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें । हें अविकार जो जाणे । तो परममुक्त ॥ ५८ ॥ तो चालिला संगें न चळे । देहींचा देहा नाकळे । मग पंचत्वीं तंव मिळे । माझांचि रूपीं ॥ ५९ ॥

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः । बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

एऱ्हवीं परापर न शोचिती । जे कामनाशून्य होती । वाटा केंव्हेळीं न वचती । क्रोधाचिया ॥ ६० ॥ जे सदा मियांचि आथिले । माझिया सेवा जियाले । कां आत्मबोधें तोषले । वीतराग जे ॥ ६१ ॥ जे तपोतेजाचिया राशी । कां एकायतन ज्ञानासी । जे पवित्रता तीर्थांसी ।

गेलेले आहेत; पण तुला आपल्या जन्मांची आठवण नाहीं. ४२. ज्या ज्या वेळीं जें जें रूप घेऊन मी अवतरलों, तें तें सगळें ( ते सगळे जन्म ) अर्जुना, मला आठवतें.४३.

**मी जन्मरहित, अव्ययस्वरूप आणि भूतांचा अधिपति असूनही, स्वकीय मायेला वश करून आपल्या मायेच्या योगानें जन्म घेतों. ६.**

म्हणून मागचें सगळें मला आठवतें. मी जन्मरहित आहे पण मायेच्या योगानें जन्म घेतों. ४४. माझा अविनाशपणा तर नाहींसा होत नाहीं पण ( जन्माला ) येणें व जाणें ( अवतार घेणें व संपविणें ) ही जी एक क्रिया ( माझ्या संबंधानें ) दिसते, ती माझ्या ठिकाणीं मायेच्या योगानें भासते. ४५. माझें स्वातंत्र्य तर बिघडतच नाहीं परंतु मी कर्माधीन आहें, असें जें दिसतें, तें भ्रांत ( अज्ञान ) बुद्धि असली तरच दिसतें, एरवीं ( दिसत ) नाहीं. ४६. किंवा एकाच वस्तूचीं दोन रूपें दिसतात; पण तीं केवळ आरशाच्या योगानें दिसतात; एरवीं ( त्या मूळ ) वस्तूचा विचार केला तर, तिला दुसरें ( रूप ) आहे काय? ४७. तसा अर्जुना, मी निराकारच आहें; पण जेव्हां मायेचा आश्रय करतों, तेव्हां कांहीं विशेष कार्यासाठीं मी सगुणरूपाच्या वेषानें नटतों. ४८.

**हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, जेव्हां जेव्हां धर्माची ग्लानि होते आणि अधर्म बळावूं लागतो तेव्हां मी स्वतःला जन्मास आणतों. ७.**

कारण कीं, जेवढे धर्म म्हणून आहेत, तेवढ्या सर्वांचें प्रत्येक युगांत मीं रक्षण करावें, असा क्रम स्वभावतः अगदीं मुळापासून चालत आलेला आहे. ४९. म्हणून ज्या वेळेला अधर्म हा धर्माचा पराभव करतो, त्या वेळेला मी आपला जन्मराहितपणा बाजूला ठेवतों व आपलें अव्यक्तपणही मनांत आणीत नाहीं. ५०.

**सज्जनांच्या संरक्षणाकरितां आणि दुर्जनांच्या नाशाकरितां व धर्माची संस्थापना करण्याकरितां मी युगायुगाचे ठिकाणीं अवतार घेतों. ८.**

त्यावेळीं स्वजनांच्या ( भक्तांच्या ) कैवारासाठीं साकार होऊन ( देह धारण करून ) मी अवतरतों; आणि मग अज्ञानरूपी अंधकार पार नाहींसा करून टाकतों. ५१. अधर्माची हद्द तोडून टाकतों. दोषांच्या सनदा फाडून टाकतों आणि सज्जनांच्या हातून सुखाची ध्वजा उभारवितों. ५२. दैत्यांच्या कुळांचा नाश करितों, साधूंचा ( गेलेला ) मान ( पुनः ) प्रस्थापित करतों, आणि धर्म व नीति यांची सांगड घालतों. ५३. मी विवेकदीपाला आलेली अविचाराची काजळी झाडून, तो प्रज्वलित करितों; त्यावेळीं योग्यांना निरंतर दिवाळी होते. ५४. तेव्हां सर्व जग आत्मसुखानें भरून जातें, फक्त धर्मच जगांत नांदूं लागतो; आणि भक्तांना सात्त्विकतेची दोंदें येतात. ५५. ज्या वेळेला अर्जुना, माझी मूर्ति प्रकट होते, त्या वेळेला पापांचा पर्वत नाहींसा होतो आणि पुण्याचा प्रातःकाल होतो. ५६. अशा या कामाकरितां मी प्रत्येक युगांत अवतार घेतों, परंतु हेंच तत्व जो ओळखतो, तो या जगांत खरा विचारी होय. ५७.

**या प्रकारचें माझें दिव्य जन्म व कर्म जो खरें खरें जाणतो, तो ( आपला ) देह टाकल्यावर पुन्हा जन्माला येत नाहीं. अर्जुना, तो मजप्रत येतो. ९.**

मी अजत्व कायम ठेवून जन्मतों, क्रियाशून्य असूनच कर्में करितों, हें माझें अलिप्तत्व जो जाणतो, तोच श्रेष्ठ प्रतीचा मुक्त होय. ५८. तो व्यवहारांत वागला, तरी आसक्तीनें ( अहंकारवृत्तीनें ) वागत नाहीं, देहधारी असूनही देहभावाला वश होत नाहीं, आणि मरणोत्तर माझ्याच रूपांत येऊन मिळतो. ५९.

**प्रीति, भय व क्रोध हीं ज्यांच्यापासून निघून गेलीं आहेत, जे मत्परायण झाले आहेत, जे माझा आश्रय करून राहिले आहेत, असे अनेक लोक ज्ञानरूपी तपश्चर्येनें ( तप व ज्ञान यांनीं ) शुद्ध झालेले मत्स्वरूपाला प्राप्त झाले आहेत. १०.**

एरवीं आपल्याबद्दल किंवा दुसऱ्याबद्दल जे शोक करीत नाहींत, ज्यांच्या कामना नाहींशा झालेल्या असतात, जे केव्हांही क्रोधाच्या वाटेनें जात नाहींत, ६० माझ्या भावनेनें जे नेहमीं संपन्न असतात, माझ्याच सेवेकरितां ज्यांचें जिणें असतें, आत्मज्ञानानें जे संतोष पावलेले असतात व ज्यांची विषयांवरील प्रीति नष्ट झालेली असते; ६१. जे तपाच्या तेजाचे पुंज असतात, किंवा जे ज्ञानाचें केवळ एकच ठिकाण असतात, जे तीर्थांना पवित्रता

तीर्थरूप ॥ ६२ ॥ ते मद्भावा सहजें आले। मी तेचि ते होऊनि ठेले। जे मज तयां उरले। पदर नाहीं ॥ ६३ ॥ सांगें पितळेची गंधिकाळिक। जैं फिटली होय निःशेख। तैं सुवर्ण काई आणिक। जोडूं जाईजे ॥ ६४ ॥ तैसे यमनियमीं कडसले। जे तपोज्ञानीं चोखाळले। मी तेचि ते जाहले। एथ संशयो कायसा ॥ ६५ ॥

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्। मम वर्त्माऽनुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

एऱ्हवीं तरी पाहीं। जे जैसे माझ्या ठायीं। भजती तयां मीही। तैसाचि भजें ॥ ६६ ॥ देखें मनुष्यजात सकळ। हें स्वभावता भजनशीळ। जाहलें असे केवळ। माझां ठायीं ॥ ६७ ॥

कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः। क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

परी ज्ञानेंवीण नाशिले। जे बुद्धिभेदासी आले। तेणेंचि या कल्पिलें। अनेकत्व ॥ ६८ ॥ म्हणऊनि अभेदीं भेदु देखती। यया अनाम्या नामें ठेविती। देवी देवो म्हणती। अचर्चातें ॥ ६९ ॥ जें सर्वत्र सदा सम। तेथ विभाग अधमोत्तम। मतिवशें संभ्रम। विवंचिती ॥ ७० ॥ मग नानाहेतुप्रकारें। यथोचितें उपचारें। मानिलीं देवतांतरें। उपासिती ॥ ७१ ॥ तेथ जें जें अपेक्षित। तें तैसेंचि पावती समस्त। परी तें कर्मफळ निश्चित। बोळख तूं ॥ ७२ ॥ वांचूनि देतें घेतें आणिक। निभ्रांत नाहीं सम्यक। एथ कर्मचि फळसूचक। मनुष्यलोकीं ॥ ७३ ॥ जैसें क्षेत्रीं जें पेरिजे। तेंवांचूनि आन न निपजे। कां पाहिजे तेंचि देखिजे। दर्पणाधारें ॥ ७४ ॥ नातरी कडेयातळवटीं। जैसा आपुलाचि बोलु किरीटी। पडिसादु होऊनि उठी। निमित्तयोगें ॥ ७५ ॥ तैसा समस्तां यां भजनां। मी साक्षिभूतु पैं अर्जुना। एथ प्रतिफळे भावना। आपुलाली ॥ ७६ ॥

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः। तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥

आतां याचिपरी जाण। चाऱ्ही आहेती हे वर्ण। सृजिले म्यां गुण। कर्मभागें ॥ ७७ ॥ हें मजचिस्तव जाहलें। परी म्यां नाहीं केलें। ऐसें जेणें जाणितलें। तो सुटला गा ॥ ७८ ॥

न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा। इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥ १४ ॥

जे प्रकृतीचेनि आधारें। गुणाचेनि व्यभिचारें। कर्में तदनुसारें। विवंचिलीं ॥ ७९ ॥ एथ एकाचि हे धनुष्यपाणी। परी जाहले गा चहूं वर्णीं। ऐसी गुणकर्मीं कडसणी। केली सहजें ॥ ८० ॥ म्हणोनि आइकें पार्था। हे वर्णभेदसंस्था। मी कर्ता नव्हे सर्वथा। याचिलागीं॥ ८१ ॥

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः। कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

देणारे—फार काय—जे मूर्तिमंत तीर्थच असतात; ६२. ते सहजच माझ्या स्वरूपाला मिळतात, ते मीच होऊन राहतात; कारण, त्यांच्यांत व माझ्यांत मग पडदाच उरत नाहीं. ६३. सांग बरें, कलंक ( कळकविण्याचा गुण ) व कालिमा ( काळसरपणा ) हे दोन पितळेचे गुण जर पूर्णपणें नाहींसे झाले, तर मग आणखी सोनें प्राप्त करून घेण्याची काय जरूर आहे ? ६४. त्याचप्रमाणें यमनियमांच्या कसास जे उतरले, तपानें व ज्ञानानें जे शुद्ध झाले, ते मद्रूप झाले, यांत संशय कसला ? ६५.

जे जसे मला भजतात त्यांना मीही तसाच भजतों ( तसेंच फल देतों ). हे पार्था, मनुष्यमात्र सर्व प्रकारांनीं ( स्वभावतः ) माझ्या मार्गाचेंच अनुसरण करतात. ११.

दुसरें असें पाहा, जे जशी माझी भक्ति करितात, त्यांच्यावर मी उलट तसेंच ( त्याच प्रमाणांत ) प्रेम करितों. ६६. हें पहा, जेवढे म्हणून मनुष्यप्राणी आहेत, तेवढ्या सर्वांच्या मनाचा स्वाभाविक कल माझी भक्ति करण्याकडे असतो; ६७

कर्मांच्या सिद्धीची ( कर्मफलाची ) इच्छा करणारे या लोकीं देवतांची उपासना करतात. कारण मनुष्यलोकीं कर्मापासून होणारी सिद्धि लवकर प्राप्त होते. १२.

पण ज्ञान नसल्यामुळें त्यांचें सर्व बिघडतें; तें असें कीं, त्यांच्या ठिकाणीं भेदबुद्धि उत्पन्न होते त्यामुळें ते, मी जो एक, त्या माझ्या ठिकाणीं अनेकत्वाची कल्पना करतात. ६८. म्हणून जेथें वास्तविक अभेद (भेदशून्यता) आहे, तेथें ( त्या परमात्म्याचे ठिकाणीं ) ते भेद पहातात, जो नामरहित आहे, त्याला ते नांवें देतात, (वास्तविक) जो चर्चेचा विषयच होऊं शकत नाहीं, त्याला देव किंवा देवी म्हणतात. ६९. भेदबुद्धीला वश होऊन घोटाळ्यांत पडल्यामुळें, जो परमात्मा सर्व ठिकाणीं नेहमीं (वास्तविक) सारखा आहे, त्याच्या ठिकाणीं ते 'चांगला, वाईट' असे भेद पाडतात. ७०. मग नाना प्रकारचे हेतु मनांत धरून, आपण मानलेल्या निरनिराळ्या देवतांची विधीपूर्वक उपासना करितात. ७१ अशा रीतीनें जें जें ( त्यांच्या ) मनांत असतें, तें तें सगळें त्यांना प्राप्त होतें; पण तें केवळ त्यांच्याच कर्मांचें फळ आहे, हें तूं निश्चयानें समज. ७२. एरवीं चांगला विचार करून पाहिलें, तर फल देणारें किंवा घेणारें दुसरें खात्रीनें कोणीही नाहीं; या मनुष्यलोकांमध्यें फक्त कर्मच फल देणारें आहे. ७३. ज्याप्रमाणें शेतांत जें पेरावें त्यावांचून ( तेथें ) दुसरें उत्पन्न होत नाहीं, किंवा आरशांत जें पाहावें तेंच त्यांत दिसतें; ७४. किंवा अर्जुना, ज्याप्रमाणें डोंगराच्या पायथ्याशीं आपणच बोललेला शब्द कांहीं कारणानें प्रतिध्वनीचें रूप घेऊन तसाच उमटतो; ७५. त्याप्रमाणें अर्जुना, या सर्व उपासनांचा मी केवळ साक्षी आहें. येथें ज्याच्या त्याच्या भावनेला अनुसरून फलाची प्राप्ति होते. ७६.

गुण आणि कर्म यांचे विभाग करून चार वर्णांचे लोक मीं निर्माण केले. या कर्माचा जरी मी कर्ता आहें तरी ( परमार्थतः ) मी अकर्ता व अव्यय आहें असें जाण. १३.

आतां याचप्रमाणें तूं असें लक्षांत घे कीं, हे ब्राह्मणादि जे चार वर्ण आहेत, ते, मीं गुण व कर्म यांच्या विभागांच्या अनुरोधानें उत्पन्न केले आहेत. ७७. ही व्यवस्था माझ्यामुळेंच रूढ झाली आहे, परंतु ही मीं केलेली नाहीं, अरे अर्जुना, हें ज्यानें तत्वतः ओळखलें, तो ( कर्मबंधनापासून ) मुक्त झाला. ७८.

कर्में मला बंधन करीत नाहींत, कर्मफलाविषयीं माझी इच्छा नाहीं. मला अशा प्रकारें ( म्हणजे मी आत्मरूप आहें असा ) जो जाणतो तो कर्मापासून बंध पावत नाहीं. १४.

कारण कीं निरनिराळे स्वभावधर्म व गुण यांच्या धोरणानें ( त्या चारी वर्णांच्या ) कर्मांची मी योजना केली आहे. ७९. अर्जुना, हे सर्व मनुष्य वस्तुतः एकच खरे; परंतु चार वर्णांत त्यांची विभागणी झाली. याप्रमाणें ही निवड स्वभावतः गुणकर्मामुळें केलेली आहे. ८०. म्हणून अर्जुना, ऐक. ही वर्णभेदाची व्यवस्था अशी असल्यामुळें तिचा कर्ता मी मुळींच नाहीं. ८१

अशा प्रकारचा मला जाणून पूर्वीच्या मुमुक्षूंनीं कर्म केलें. म्हणून पूर्वीच्यांनीं ( जनकादिकांनीं ) परंपरागत केलेलें कर्मच तूं कर. १५.

मागील मुमुक्षु जे होते। तिहीं ऐशियाचि जाणोनि मातें। कर्में केलीं समस्तें। धनुर्धरा ॥ ८२ ॥ परि तें बीजें जैसीं दग्धलीं। नुगवतीचि पेरिलीं। तैशीं कर्मोंचि परि तयां जाहलीं। मोक्षहेतु ॥ ८३ ॥ एथ आणिकही एक अर्जुना। हे कर्माकर्मविवंचना। आपुलिये चाडे सज्ञाना। योग्य नोहे ॥ ८४ ॥

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः। तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

कर्म म्हणिजे तें कवण। अथवा अकर्मा काय लक्षण। ऐसें विचारितां विचक्षण। गुंफोनि ठेले ॥ ८५ ॥ जैसें कां कुडें नाणें। खऱ्याचेनि सारखेपणें। डोळ्याचेंहि देखणें। संशयीं घाली ॥ ८६ ॥ तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें। गिंवसिजत आहाती कर्में। जे दुजी सृष्टि मनोधर्में। करूं सकती ॥ ८७ ॥ वांचूनि मूर्खांची गोठी कायसी। एथ मोहले गा क्रांतदर्शी। म्हणोनि आतां तेचि परियेसीं। सांगेन तुज ॥ ८८ ॥

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः। अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥

तरी कर्म म्हणजे स्वभावें। जेणें विश्वाकारु संभवे। तें सम्यक आधीं जाणावें। लागे एथ ॥ ८९ ॥ मग वर्णाश्रमासि उचित। जें विशेष कर्म विहित। तेंही वोळखावें निश्चित। उपयोगेंसीं ॥ ९० ॥ पाठीं जें निषिद्ध म्हणिपे। तेंही बुझावें स्वरूपें। येतुलेंनि येथ कांहीं न गुंफे। आपैसेंचि ॥ ९१ ॥ एऱ्हवीं जग हें कर्माधीन। ऐसी याची व्याप्ती गहन। परी तें असो आइकें चिन्ह। प्राप्ताचें गा ॥ ९२ ॥

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः। स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

जो सकळकर्मीं वर्ततां। देखे आपुली नैष्कर्म्यता। कर्मसंगें निराशता। फळाचिया ॥ ९३ ॥ आणि कर्तव्यतेलागीं। जया दुसरें नाहीं जगीं। ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगी। बोधला असे ॥ ९४ ॥ परी क्रियाकलापु आघवा। आचरतु दिसे बरवा। तरी तो इहीं चिन्हीं जाणावा। ज्ञानिया गा ॥ ९५ ॥ जैसा कां जळापाशीं उभा ठाके। तो जरी आपणपें जळामाजिं देखे। तरी तो निभ्रांत वोळखे। म्हणे मी वेगळा आहें ॥ ९६ ॥ अथवा नावे हन जो रिगे। तो थडियेंचे रुख जातां देखे वेगें। तेचि साचोकारें जों पाहों लागे। तंव रुख म्हणे अचळ ॥ ९७ ॥ तैसें सर्व कर्मीं असणें। तें फुडें मानूनि वायाणें। मग आपणपें जो जाणे। नैष्कर्म्यु ऐसा ॥ ९८ ॥ आणि उदोअस्ताचेनि प्रमाणें। जैसें न चलतां सूर्याचें चालणें। तैसें नैष्कर्म्यत्व जाणे। कर्मींचि असतां ॥ ९९ ॥ तो मनुष्यासारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे। जैसें जळीं जळामाजीं न बुडे। भानुबिंब ॥ १०० ॥ तेणें न पाहतां विश्व देखिलें। न करितां सर्व केलें। न भोगितां भोगिलें। भोग्यजात ॥ १ ॥ एकेचि ठायीं बैसला। परि सर्वत्र तोचि गेला। हें असो विश्व जाहला। आंगेंचि तो ॥ २ ॥

अर्जुना, पूर्वी जे मुमुक्षु होऊन गेले त्यांनीं मी असाच आहे, हें जाणून सर्व कर्मांचें आचरण केलें. ८२. परंतु भाजलेलें बीं जरी पेरलें, तरी उगवत नाहीं; त्याप्रमाणें (त्यांचीं) तीं कर्में खरीं; परंतु त्यांना कर्मबंधांतून सोडविण्याला तींच कारण झालीं. ८३. या बाबतींत अर्जुना, आणखी एक गोष्ट महत्त्वाची आहे. हा कर्माकर्माचा विचार जाणत्या पुरुषासदेखील आपल्या बुद्धीनें करतां येईल असा नाहीं. ८४.

**कर्म कोणतें आणि अकर्म कोणतें, या विषयासंबंधानें शहाण्या पुरुषांनाहि भ्रम पडतो. (म्हणून) जें जाणल्यानें तूं अशुभ अशा संसारापासून मुक्त होशील, तें कर्म मी तुला सांगतों. १६.**

कर्म कशाला म्हणावें, अथवा अकर्माचें लक्षण काय याचा विचार करतां करतां चिकित्सकहि (विचारीहि) घोटाळ्यांत पडतात. ८५. ज्याप्रमाणें खोटें नाणें हुबेहुब खऱ्यासारखेंच असल्यामुळें परीक्षकांच्याहि नजरेला संशयांत घालतें; ८६. त्याप्रमाणें केवळ मनाच्या संकल्पानें प्रतिसृष्टि उत्पन्न करण्याचें अंगीं सामर्थ्य असलेले (पुरुष देखील), आम्ही कर्मातीत आहों, या भ्रमामुळें कर्मांच्या पाशांत सांपडतात. ८७. या बाबतींत चांगले चांगले दूरदर्शी देखील मूढ बनतात, तेथें बिचाऱ्या मूर्खांची कथा काय? म्हणून आतां तीच गोष्ट (कर्माकर्मविवेक) तुला सांगतों, ऐक. ८८.

**कर्म (सामान्य-भूतभावोद्भवकर) म्हणजे काय हें जाणलें पाहिजे. विकर्म (विशेषकर्म-विहितकर्म) म्हणजे काय, हेंहि जाणलें पाहिजे. त्याचप्रमाणें अकर्म हि (निषिद्धकर्म) जाणलें पाहिजे. (कारण) कर्माची गति (व्याप्ति) गहन आहे. १७.**

तर ज्याच्या योगानें स्वभावतः (आपोआप) हें विश्व आकाराला (व्यक्तेला) येतें, तेंच कर्म होय; या ठिकाणीं त्याच कर्माचें यथार्थ ज्ञान पहिल्यानें करून घेतलें पाहिजे. ८९. मग वर्ण व आश्रम यांना जें कर्म विशेष योग्य म्हणून (वेदांत) सांगितलें आहे, त्याची देखील त्याच्या उपयुक्ततेसह चांगली ओळख करून घेतली पाहिजे. ९०. त्यानंतर ज्याला निषिद्ध (कर्म) म्हणतात, त्याचेंहि स्वरूप ओळखणें जरूर आहे. या ठिकाणीं एवढें झालें म्हणजे (मनुष्य) मग सहजच कर्म करीत असतां गुंतत (कर्मानें बद्ध होत) नाहीं. ९१. एरवीं हें सर्व जग कर्मांच्या आधीन आहे; असा याचा (या कर्मांचा) विस्तार दुर्बोध आहे. पण अर्जुना तें असो. आतां कृतकृत्य पुरुषाचें लक्षण ऐक. ९२.

**कर्माचे ठिकाणीं जो अकर्म पहातो आणि अकर्माचे ठिकाणीं कर्म पहातो, तो मनुष्यांमध्यें बुद्धिमान् जाणावा, योगी जाणावा व सर्वकर्मकर्ता जाणावा. १८.**

सर्व कर्मांचें आचरण करीत असतांहि, आपण (खरोखर) कर्म करीत नाहीं, हें जो जाणतो व कर्माबरोबर त्यांच्या फलांची आशा जो धरीत नाहीं; ९३. आणि कर्तव्य करण्याला जगांत दुसरेपणानें कांहींच नसतें, अशा नैष्कर्म्यतेचा चांगला बोध ज्याला झालेला असतो, ९४. तरी जो सर्व कर्मसमुदायाचें उत्तम प्रकारें आचरण करतांना दिसतो, तोच या लक्षणांवरून ज्ञानी आहे, असें जाणावें. ९५. ज्याप्रमाणें जो पाण्यापाशीं उभा राहिलेला असतो, तो जरी आपण पाण्यांत आहों, असें पाहात असतो, तरी त्याला निःसंशय खरें ज्ञान असतें, कीं आपण वेगळे आहों (पाण्यांत नाहीं.) ९६. अथवा जो नावेंत बसून जातो, त्याला किनाऱ्यावरचीं झाडें भराभर चालली आहेत असें दिसतें; पण वस्तुस्थिति जेव्हां तो पाहूं लागतो, तेव्हां तीं झाडें स्थिर आहेत, असें तो म्हणतो. ९७. त्याप्रमाणें तो सर्व कर्मांचें आचरण करीत असतो. पण तें कर्माचरण उघड उघड केवळ आभासात्मक आहे, असें मानून मग आपण कर्मरहित आहों, हें तो जाणतो. ९८. आणि सूर्य उदय व अस्त पावतो, या एका प्रमाणावरून तो चाललेला भासतो, पण वास्तविक तो चालत नाहीं; त्याप्रमाणें तो कर्माचरण करीत असतांहि आपलें नैष्कर्म्य जाणतो. ९९. ज्याप्रमाणें पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडलेलें दिसतें, पण त्यावरून प्रत्यक्ष बिंब त्यांत बुडालें असें होत नाहीं, त्याप्रमाणें तो दिसण्यांत सामान्य माणसासारखा दिसतो, पण त्याच्या ठिकाणीं मनुष्यत्व (मनुष्याचे सामान्य गुण) नसतें. १००. त्यानें विश्व पाहिलें नसतांहि तें पाहिल्याप्रमाणेंच आहे. कांहीं न करतांहि सर्व कांहीं केल्याप्रमाणेंच आहे व भोग्य वस्तूंचा उपभोग न घेतांहि त्या भोगल्याप्रमाणेंच आहेत. १०१. एकाच ठिकाणीं तो बसून असला, तरी तो सर्वत्र गेल्याप्रमाणेंच आहे. फार कशाला? तो स्वतः विश्वरूपच झालेला असतो, (असें समज.) १०२.

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः । ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥

जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेदु नाहीं । परी फळापेक्षा कहीं । संचरेना ॥ ३ ॥ आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन । येणें संकल्पेंही जयाचें मन । विटाळेना ॥ ४ ॥ ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में अशेखें । तो ब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तूं ॥ ५ ॥

त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः । कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥

जो शरीरीं उदासु । फळभोगीं निरासु । नित्यता उल्हासु । होऊनि असे ॥ ६ ॥ जो संतोषाचां गाभारां । आत्मबोधाचिया वोगरा । पुरे न म्हणेचि धनुर्धरा । आरोगितां ॥ ७ ॥

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः । शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥

कैसी अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी । सांडोनियां आशा कुरोंडी । अहंभावेंसीं ॥ ८ ॥ म्हणोनि अवसरें जें जें पावे । कीं तेणेंचि तो सुखावे । जया आपुलें आणि परावें । दोन्हीं नाहीं ॥ ९ ॥ तो दिठी जें पाहे । तें आपणचि होऊनि जाये । आइके तें आहे । तोचि जाहाला ॥ ११० ॥ चरणीं हन चाले । मुखें जें जें बोले । ऐसें चेष्टाजात तेतुलें । आपणचि जो ॥ ११ ॥ हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ॥ १२ ॥

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः । समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ २२ ॥

हा मत्सरु जेथ उपजे । तेतुलें नुरेचि जया दुजें । तो निर्मत्सरु काइ म्हणिजे । बोलवरी ॥ १३ ॥ म्हणोनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु । सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहीं ॥ १४ ॥

गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः । यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

तो देहसंगें तरी असे । परी चैतन्यासारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कसें । चोखाळु भला ॥ १५ ॥ ऐसाही परी कौतुकें । जरी कर्में करी यज्ञादिकें । तरी तियें लया जाती अशेखें । तयाचांचि ठायीं ॥ १६ ॥ अकाळींचीं अभ्रें जैशीं । उर्मीवीण आकाशीं । हारपती आपैशीं । उदयलीं सांतीं ॥ १७ ॥ तैशीं विधिविधान विहितें । जरी आचरे तो समस्तें । तरी तियें ऐक्य-भावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥ १८ ॥

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

ज्याचीं सर्व कर्में भोगेच्छा व (त्याचें कारण) संकल्प यांनीं विरहित असतात आणि ज्ञानरूपी अग्नीनें ज्याचीं कर्में दग्ध झालेलीं असतात, त्याला ज्ञाते लोक पंडित म्हणतात. १९.

ज्या पुरुषाच्या ठिकाणीं कर्मांविषयीं तर कंटाळा नसतो पण ज्याच्या चित्तांत फलाची इच्छा चुकून केव्हांही प्रवेश करीत नाहीं. १०३. आणि हें कर्म मी करीन, अथवा आरंभिलेलें मी पुरें करीन, ह्या कल्पनेनेंही ज्याचें मन विटाळत नाहीं; १०४. ज्ञानरूपी अग्नीच्या द्वारां ज्यानें सर्व कर्में जाळून टाकलीं आहेत, तो मनुष्याचें रूप घेतलेलें प्रत्यक्ष ब्रह्मच आहे असें तूं समज. १०५.

कर्माची आणि कर्मफलाची आसक्ति सोडून नित्य-तृप्त व निराश्रय होत्साता मनुष्य (लोकदृष्टीनें) कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त असला तथापि (वास्तविक) तो कांहीं करीत नाहीं. २०.

तो शरीराविषयीं उदास असतो, फलाच्या उपभोगा-विषयीं निरिच्छ असतो व नेहमीं आनंदरूप होऊन राहिलेला असतो. १०६. अर्जुना, तो संतोषाच्या गाभाऱ्यांत जेवीत असतां, आत्मबोधाच्या पक्वान्नाला पुरे असें कधीं म्हणतच नाहीं. १०७

इच्छारहित, चित्त (अंतःकरण) व आत्मा (बाह्य शरीरेंद्रियसंघात) यांचें नियमन केलेला, सर्व उपाधींचा त्याग केलेला, शरीरस्थितीला आवश्यक तेवढें कर्म करणारा असा जो मनुष्य त्याला पाप लागत नाहीं. २१.

अहंकाराच्या वृत्तीसह आशेचा बळी टाकून देऊन नित्य वाढणाऱ्या आवडीनें परमानंदाची रुचि तो किती तरी घेत असतो! १०८. म्हणून वेळेवर जें जें मिळेल, त्यांतच तो संतुष्ट असतो. त्याला आपलें व परकें हीं दोन्ही नाहींत. १०९. तो दृष्टीनें जें पहातो, तें आपणच होऊन जातो, आणि तो जें ऐकतो तेंच तो झालेला असतो. ११०. पायानें जें चालतो, तोंडानें जें कांहीं बोलतो, (तात्पर्य) याप्रमाणें जेवढे म्हणून व्यापार त्याचे-कडून होतात, तेवढे सर्व तोच स्वतः झालेला असतो. १११. हे असो; पहा, हें विश्वच ज्याला आपल्याहून वेगळें (दिसत) नाहीं, आतां त्याला कर्म तें कसलें व बाधा ती काय करणार? ११२.



न मागतां जे (शरीरपोषणाला आवश्यक असें अन्न वगैरे) मिळेल त्यावर संतुष्ट असणारा, आप-परभावरहित, निर्मत्सर, कांहीं मिळो अथवा न मिळो ज्याला त्याबद्दल हर्षविषाद वाटत नाहीं, असा पुरुष (लौकिकदृष्ट्या) जरी कर्म करतोसा दिसतो, तरी तो (त्या कर्मानें) बंध पावत नाहीं. २२.

ज्या द्वैतापासून हा मत्सर उत्पन्न होतो, तें द्वैत ज्याच्या ठिकाणीं मुळींच उरलेलें नाहीं, तो निर्मत्सर आहे, हें काय शब्दांनीं बोलून दाखविलें पाहिजे? ११३. म्हणून तो सर्व प्रकारें मुक्त आहे; कर्म करीत असतांही कर्मरहित आहे व गुणयुक्त असूनही गुणातीत आहे; ह्यांत संशय नाहीं. ११४.

ज्याची (कर्मफलाविषयीं) आसक्ति नष्ट झाली आहे, जो (धर्मअधर्मादि बंधांपासून) मुक्त झाला आहे, ज्ञानाचे ठिकाणीं ज्याचें चित्त स्थिर झालें आहे, जो यज्ञाकरितां कर्माचरण करतो, त्याचें तें सर्व कर्म (त्याचेंच ठिकाणीं) लय पावतें. २३.

तो देहधारी तर असतोच, पण (निर्गुण) चैतन्या-सारखा दिसतो. परब्रह्माच्या कसोटीनें त्यास पाहिलें असतां, तो अगदीं शुद्ध आहे असें आढळून येतें. ११५. असें असून देखील केवळ लीलेनें त्यानें जरी यज्ञादिक कर्में केलीं, तरी तीं सर्व त्याच्याच ठिकाणीं लय पावतात. ११६. आकाशांत अकालीं आलेले मेघ, ज्याप्रमाणें कांहीं जोर न करतां आले तसे, आपोआप जागच्याजागीं विरून जातात; ११७. त्याचप्रमाणें वेदांनीं सांगितलेल्या एकूण एक विधानांचें यथासांग जरी तो अनुष्ठान करितो, तरी त्याच्या ऐक्यभावनेमुळें, तीं शेवटीं ऐक्यालाच मिळतात. (त्याच्या ठिकाणीं दुजाभाव नसल्यामुळें त्याच्याच ठिकाणीं लय पावतात.) ११८.

ब्रह्मरूपी कर्माचे ठिकाणीं ज्याचें लक्ष (समाधि) आहे, (ब्रह्मच कर्म आहे अशी समता ज्याची झाली आहे) असा पुरुष जें अर्पण करतो तें ब्रह्म, ज्याची आहुति देतो तें ब्रह्म, (ज्या अग्नींत आहुति देतो तो ब्रह्म,) तो स्वतः आहुति देणाराहि ब्रह्म व तो ज्याप्रत जाणार तेंहि ब्रह्म, अशी त्याची स्थिति असते. २४.

जें हें हवन मी होता । कां इयें यज्ञीं हा भोक्ता । ऐसिया बुद्धीसि नाहीं भंगता । म्हणऊनियां ॥ १९ ॥ जे इष्टयज्ञ यजावे । तें हविर्मंत्रादि आघवें । तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धि ॥ १२० ॥ म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ॥ २१ ॥ आतां अविवेककुमारत्वा मुकले । जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहलें । मग उपासन जिहीं आणिलें । योगाग्नीचें ॥ २२ ॥

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते । ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

जे यजनशील अहर्निशी । जिहीं अविद्या हविली मनेंसीं । गुरुवाक्यहुताशीं । हवन केलें ॥ २३ ॥ तिहीं योगाग्निकीं यजिजे । तो दैवयज्ञु म्हणिजे । जेणें आत्मसुख कामिजे । पंडुकुमरा ॥ २४ ॥ दैवास्तव देहाचें पाळण । ऐसा निश्चयो परिपूर्ण । जो चिंतीना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगें ॥ २५ ॥ आतां अवधारीं सांगेन आणिक । जे ब्रह्माग्नी साग्निक । तयांतें यज्ञेंचि यज्ञु देख । उपासिजे ॥ २६ ॥

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति । शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

एक संयमाग्नीहोत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ॥ २७ ॥ एकां वैराग्यरवि विवळे । तंव संयती विहार केले । तेथ अपावृत जाहले । इंद्रियानळ ॥ २८ ॥ तिहीं विरक्तीची ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें पळिपलीं । तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचही कुंडें ॥ २९ ॥ मग वाक्यविधीचिया निरवडी । विषयआहुती उदंडी । हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीच्या ॥ १३० ॥

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे । आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

एकीं ययापरी पार्था । दोषु क्षाळिले सर्वथा । आणिकीं हृदयारणीं मंथा । विवेकु केला ॥ ३१ ॥ तो उपशमें निहटिला । धैर्यें वरी दाटिला । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥ ३२ ॥ ऐसें समरसें मंथन केलें । तेथ झडकरी काजा आलें । जे उज्जीवन जहालें । ज्ञानाग्नीचें ॥ ३३ ॥ पहिला ऋद्धिसिद्धीचा संभ्रमु । तो निवर्तोनि गेला धूमु । मग प्रगटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ॥ ३४ ॥ तया मनाचें मोकळें । तेंचि पेटवण घातलें । जें यमदमीं हळुवारलें । आइतें होतें ॥ ३५ ॥ तेणें सादुकपणें ज्वाळा समृद्धा । मग वासनांतराचिया समिधा । स्नेहेंसि नानाविधा । जाळिलिया ॥ ३६ ॥ तेथ सोहंमंत्रें दीक्षितीं । इंद्रियकर्मांचिया आहुती । तिये ज्ञानानळीं प्रदीप्तीं । दिधलिया ॥ ३७ ॥ पाठीं प्राणक्रियेचेनि स्रुवेनिशीं । पूर्णाहुती पडली हुताशीं । तेथ अवभृथ समरसीं । सहजें जाहलें ॥ ३८ ॥ मग आत्मबोधींचें सुख । जें संयमाग्नीचें हुतशेष । तोचि पुरोडाशु देख । घेतला तिहीं ॥ ३९ ॥ एक ऐशिया इहीं यजनीं । मुक्त ते जाहले त्रिभुवनीं । या यज्ञक्रिया तरी आनानी । परि प्राप्य तें एक ॥ १४० ॥

कारण हें यज्ञरूपी कर्म व तें करणारा मी, किंवा या यज्ञामध्यें (अमूक) हा भोक्ता, अशी बुद्धीची भिन्नता त्याच्या ठिकाणीं नाहीं, म्हणून (वरच्या ओंवींत सांगितल्याप्रमाणें सर्व कर्में त्याचे ठिकाणीं लय पावतात.) ११९. जे जे इष्ट यज्ञ तो करितो, त्यांतील होमद्रव्यें, मंत्र इत्यादि सर्व, तो आत्म्याच्या ठिकाणीं स्थिरबुद्धि असलेला पुरुष, अविनाश बुद्धीनें (तीं ब्रह्मच आहेत, अशा बुद्धीनें) पहातो. १२०. म्हणून कर्म ब्रह्मच आहे, असें साम्य ज्याच्या प्रतीतीला आलें, त्यानें कर्तव्यकर्म जरी केलें, तरी अर्जुना, तें नैष्कर्म्यच होय. १२१. आतां ज्यांचें अविचाररूप बालपण गेलेलें आहे, (म्हणजे विवेकरूप तारुण्य ज्यांना प्राप्त झालेलें आहे) ज्यांनीं विरक्तीशीं लग्न लाविलें आहे आणि मग ज्यांनीं योगरूप अग्नीची उपासना स्वीकारली आहे; १२२.

दुसरे योगी दैवयज्ञाची उपासना करतात. कित्येक योगी, ब्रह्मस्वरूपी अग्नीचे ठिकाणीं यज्ञानेंच यज्ञाची उपासना करतात. २५.

जे रात्रंदिवस यज्ञ करण्यांत गुंतलेले आहेत, ज्यांनीं गुरुवाक्यरूपी अग्नीमध्यें मनासह अविद्येची आहुति देऊन हवन केलें आहे, १२३. ते योगरूपी अग्नीचें ग्रहण केलेले अग्निहोत्री, जो यज्ञ करितात, त्यास दैवयज्ञ असें म्हणतात. अर्जुना, तेथें (त्यांनीं) आत्मसुखाचीच इच्छा धरलेली असते. १२४. देहाची जोपासना प्रारब्धवशात् होत आहे, असा ज्याचा पूर्ण निश्चय झालेला असतो, तो देहाच्या पोषणाविषयीं मनांत चिंता वाहात नाहीं; तो या दैवयज्ञरूप योगानें महायोगी झालेला आहे, असें समज. १२५. दुसरा प्रकार आतां तुला सांगतों, ऐक, जे ब्रह्मरूप अग्नीचे अग्निहोत्री आहेत, ते यज्ञाची यज्ञानेंच उपासना करितात. १२६.

दुसरे कोणी संयमस्वरूपी अग्नीचे ठिकाणीं श्रोत्र आदिकरून इंद्रियांचें हवन करतात. कित्येक कोणी इंद्रियरूपी अग्नीचे ठिकाणीं शब्द आदिकरून विषयांची आहुति देतात. २६.

धारणाध्यानसमाधिरूप संयम, हेंच कोणी अग्निहोत्र, त्याचें आचरण करणारे कित्येक मूलबंधादिक तीन बंधरूपी मंत्रद्वारां, इंद्रियरूपी पवित्र द्रव्यांनीं यज्ञ करितात. १२७. दुसरे कित्येक, वैराग्यरूपी सूर्य उगवल्याबरोबर संयमरूप कुंडाची रचना करितात व मग त्या कुंडांत इंद्रियरूप अग्नि प्रकट होतो. १२८. त्या इंद्रियरूप अग्नींतून वैराग्याची ज्वाळा निघते, तेव्हां कामक्रोधादि विकारांचीं लांकडें पेटूं लागतात. त्या वेळीं आहवनीयादिक अग्नि असलेल्या इंद्रियरूपी पांच कुंडांतून आशारूप धूर नाहींसा होतो. १२९. मग वेदांत सांगितलेल्या विधिवाक्याच्या कुशलतेनें इंद्रियरूप अग्नि असलेल्या कुंडांत विषयरूप अनेक आहुति देऊन यज्ञ करितात. १३०.

दुसरे कोणी इंद्रियांचीं सर्व कर्में आणि प्राणांची सर्व कर्में यांची ज्ञानरूपी अग्नीनें प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमस्वरूपी योगाग्नीमध्यें आहुति देतात. २७.

अर्जुना, याप्रमाणें (वर सांगितल्याप्रमाणें) कोणी एक आपल्या सर्व दोषांचें क्षालन करितात; दुसरे कोणी हृदयाची अरणी करून विवेकाचा मंथा करितात. १३१ तो मंथा शांतीनें बळकट धरितात व वरून सात्त्विक धैर्यानें दाबून गुरूपदेशरूपी जोरानें ओढतात. १३२. याप्रमाणें समरसतेनें मंथन केलें म्हणजे त्याचा तावडतोब उपयोग होतो. तो हाच कीं, ज्ञानाग्नि प्रकट होतो. १३३ पहिल्यानें ऋद्धिसिद्धीचा मोह, हाच कोणी धूर, तो नाहींसा होतो. मग (ज्ञानाग्नीची) बारीकशी ठिणगी उत्पन्न होते. १३४. यमदमांनीं आवर्तें वाळवून ठेविलेलें मोकळें मन, हेंच त्या ज्ञानरूपी ठिणगीला पेटवण घालितात. १३५. त्या (पेटवणाच्या) साह्यानें ज्वाला प्रदीप्त होतात; मग त्यांत नानाप्रकारच्या वासनारूपी समिधा ममतारूपी तुपासह जाळितात. १३६. तेथें दीक्षित (यज्ञकर्ता पुरुष) मी ब्रह्मच आहें, या मंत्रानें त्या प्रदीप्त अशा ज्ञानाग्नींत इंद्रियकर्मांच्या आहुति देतो. १३७. नंतर प्राणक्रियेच्या स्रुवेनें ज्ञानाग्नीमध्यें पूर्ण आहुति दिल्यावर त्या वेळीं ऐक्यबोध होऊन अवभृथस्नान (त्याला) सहजच होतें. १३८. संयमाग्नींत (इंद्रियादिक होमद्रव्यांचें) हवन करून, शिल्लक राहिलेलें जें आत्मज्ञानाचें सुख, तोच पुरोडाश मग ते सेवन करितात. १३९. अशा या यज्ञांनीं कित्येक आजपर्यंत या त्रिभुवनांत मुक्त होऊन गेलेले आहेत. या यज्ञक्रिया जरी भिन्न भिन्न आहेत, तरी त्या सर्वांची फलप्राप्ति एकच आहे. १४०.

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे । स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

एक द्रव्ययज्ञु म्हणिपती । एक तपसामग्रिया निपजती । एक योगयागुही आहाती । जे सांगितले ॥ ४१ ॥ एकीं शब्दीं शब्दु यजिजे । तो वाग्यज्ञु म्हणिजे । ज्ञानें ज्ञेय गमिजे। तो ज्ञानयज्ञु ॥ ४२ ॥ हें अर्जुना सकळ कुवाडें । जे अनुष्ठितां अतिसांकडें । परी जितेंद्रियासीचि घडे । योग्यतावशें ॥ ४३ ॥ ते प्रवीण तेथ भले । आणि योगसमृद्धी आथिले । म्हणोनि आपणपां तिहीं केलें । आत्महवन ॥ ४४ ॥

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे । प्राणापानगती रुध्द्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

मग अपानाग्नीचे मुखीं । प्राणद्रव्यें देखीं । हवन केलें एकीं । अभ्यासयोगें ॥ ४५ ॥ एक अपानु प्राणीं अर्पिती । एक दोहींतेंही निरुंधिती । ते प्राणायामी म्हणिपती । पंडुकुमरा ॥ ४६ ॥

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

एक वज्रयोगक्रमें । सर्वाहारसंयमें । प्राणीं प्राणु संभ्रमें । हवन करिती ॥ ४७ ॥ ऐसे मोक्षकाम सकळ । समस्त हे यजनशीळ । जिहीं यज्ञद्वारा मनोमळ । क्षाळण केले ॥ ४८ ॥ जया अविद्याजात जाळितां । जें उरलें निजस्वभावता । जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ॥ ४९ ॥ जेथ यजितयाचा कामु पुरे । यज्ञींचें विधान सरे । मागुतें जेथूनि वोसरे । क्रियाजात ॥ १५० ॥ विचार जेथ न रिगे । हेतु जेथ न निगे । जे द्वैतदोषसंगें । सिंपेचिना ॥ ५१ ॥

यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् । नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

ऐसें अनादिसिद्ध चोखट । जें ज्ञान यज्ञावशिष्ट । तें सेविती ब्रह्मनिष्ठ । ब्रह्माहंमंत्रें ॥ ५२ ॥ ऐसे शेषामृतें धाले । कीं अमर्त्यभावा आले । म्हणोनि ब्रह्म ते जहाले । अनायासें ॥ ५३ ॥ येरां विरक्ति माळ न घालीचि । जयां संयमाग्नीची सेवा न घडेचि । जे योगुयागु न करितीचि । जन्मले सांते ॥ ५४ ॥ जयां ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी काई । म्हणोनि सांगों कां वांई । पंडुकुमरा ॥ ५५ ॥

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे । कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ व ज्ञान-यज्ञ असे ( पांच प्रकारचे ) यज्ञ आहेत. तीक्ष्ण व्रतें आचरण करणारे यतीच हे यज्ञ करतात. २८.

त्यांपैकीं कांहींना ' द्रव्ययज्ञ ' अशी संज्ञा आहे. कांहीं यज्ञ तपरूप सामुग्रीनें उत्पन्न होतात. कित्येक ' योगयज्ञ ' म्हणून सांगितले आहेत, १४१. कित्येकांत शब्दांनीं शब्दांचें हवन करितात ( वेदांच्या शब्दांचा उच्चार करतात ); त्यास ' वाग्यज्ञ ' म्हणतात. ( ज्यांत ) ज्ञानानें ज्ञेय ( जाणावयाची वस्तु, ब्रह्म ) जाणतां येतें, तो ' ज्ञानयज्ञ ' होय. १४२. अर्जुना, हे सर्व यज्ञ कठीण आहेत. कारण त्यांचें अनुष्ठान करणें अतिशय त्रासाचें आहे; परंतु ज्यांनीं इंद्रियें जिंकलीं, त्यांसच ते करण्याची योग्यता येऊन त्यांचें आचरण घडतें. १४३. ते त्या कामीं चांगले प्रवीण असतात व योगसमृद्धीनें संपन्न असतात, म्हणून ते आपलें हवन आपल्यांतच करितात. ( आत्म-स्वरूपाचे ठिकाणीं जीवबुद्धीचें हवन करितात. ) १४४.

( कोणी ) अपानवायूचे ठिकाणीं प्राणवायूचें हवन करतात ( म्हणजे पूरक नांवाचा प्राणायाम करतात. ) ( कोणी ) प्राणवायूचे ठिकाणीं अपान-वायूचें हवन करतात ( म्हणजे रेचक नांवाचा प्राणायाम करतात ). प्राणायामाचे ठिकाणीं तत्पर असणारे, प्राणवायु ( मुख व नासिका यांचें द्वारें बाहेर जाणारा वायु ) आणि अपानवायु ( मुख व नासिका यांचें द्वारें आंत येणारा वायु ) यांच्या गतींना रोध करून ( कुंभक नांवाचा प्राणायाम करतात. ) २९.

मग कोणी अभ्यासानें अपानरूप अग्नीच्या मुखांत प्राणरूप द्रव्याचें हवन करितात, पहा. १४५. कित्येक अपानवायु प्राणवायूचे ठिकाणीं अर्पण करितात, दुसरे कितीएक प्राण व अपान या दोहींचा निरोध करितात; त्यांना अर्जुना, ' प्राणायामी ' म्हणतात. १४६.

दुसरे कोणते मिताहारी होत्साते वायूंचे ठिकाणीं प्राणांचे हवन करतात ( म्हणजे प्राणायामादि सर्व वायूंना स्वाधीन ठेवतात ). ( हे सर्व यज्ञवेत्ते याज्ञिक ) या ( निरनिराळ्या ) यज्ञांनीं ज्यांचीं पातकें नष्ट झालीं आहेत असे जाणावेत. ३०.

कितीएक ( वज्रासनाच्या ) मूळबंधाच्या पद्धतीनें सर्व आहारांचा संयम करून प्रयत्नानें प्राणाचें प्राण्याच्या ठिकाणीं हवन करितात. ( प्राणानेंच प्राणाचा लय करितात. ) १४७. याप्रमाणें हे सगळे यज्ञकर्ते मोक्षाची इच्छा करणारे असतात; त्यांनीं यज्ञाच्या द्वारें मनाच्या ठिकाणचे सर्व मळ धुऊन टाकिलेले असतात. १४८. त्यांनीं सर्व अज्ञान जाळून टाकल्यामुळें जें ( स्वरूप ) सहजच बाकी शिल्लक राहतें, जेथें ( ज्या स्वरूपज्ञानाच्या ठिकाणीं ) अग्नि व यज्ञकर्ता हा भेद उरतच नाहीं; १४९. जेथें ( स्वरूपज्ञानाच्या ठिकाणीं ) यज्ञकर्त्यांच्या सर्व इच्छा पुरतात व यज्ञक्रिया संपते व जेथून क्रियामार्ग मागें पर-तून नाहींसा होतात; १५०. जेथें विचाराचा प्रवेश होत नाहीं, जेथें कोणताहि तर्क चालत नाहीं, जें द्वैतदोषाचे संपर्कानें लिप्त होत नाहीं. १५१.

( या सर्व ) यज्ञांचें अवशिष्ट जें अमृतरूपी फल ( ब्रह्म ) तें भोगणारें चिरकालिक ब्रह्मपदाला प्राप्त होतात. ( या द्वादश यज्ञांपैकीं एकदेखील ) यज्ञ न करणाराला हा मनुष्यलोक देखील प्राप्त होत नाहीं म्हणजे ऐहिकहि सुख त्यास प्राप्त होत नाहीं. मग हे कुरुश्रेष्ठा, उत्तम लोक त्यास कसा प्राप्त होणार ? ३१.

असें जें अनादिसिद्ध व शुद्ध आणि ज्ञानरूपी यज्ञांत शिल्लक राहिलेलें ब्रह्म असतें, तें ज्ञानरूपी ब्रह्म, ब्रह्मनिष्ठ ( पुरुष ) मी ब्रह्म आहें, या मंत्रद्वारें उपभोगितात. १५२. याप्रमाणें यज्ञांतील शेषरूपी अमृतानें ते तृप्त होतात किंवा अमरस्थितीस प्राप्त होतात, म्हणून ते सह-जच ब्रह्मत्व पावतात. १५३. जन्माला येऊन ज्यांना संयमरूप अग्नीची सेवा घडत नाहीं, व योग व यज्ञ ज्यांचे हातून मुळींच होत नाहीं, त्या इतर लोकांना विरक्ति माळ घालीत नाहीं. १५४. ज्यांचें ऐहिक नीट नाहीं, त्यांच्या परलोकाची गोष्ट कशाला विचारतोस ? म्हणून अर्जुना, ती गोष्ट व्यर्थ कशाला सांगू ? १५५.

याप्रमाणें पुष्कळ प्रकारच्या यज्ञाचा वेदाच्या मुखांत ( द्वारानें ) विस्तार झाला आहे. हे सर्व यज्ञ ( कायिक, वाचिक व मानसिक ) कर्मापासून होणारे आहेत ( आत्म्यापासून होणारे नाहींत ) असें जाण. याप्रमाणें ज्ञान झाल्यावर ( संसारबंधनापासून ) तूं मुक्त होशील. ३२.

ऐसें बहुतीं परी अनेग । जे सांगितले तुज कां याग । ते विस्तारूनि वेदेंचि चांग । म्हणितले आहाती ॥ ५६ ॥ परि तेणें विस्तारें काय करावें । हेंचि कर्मसिद्ध जाणावें । येतुलेनि कर्मबंधु स्वभावें । पावेल ना ॥ ५७ ॥

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप । सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

अर्जुना वेदु जयांचें मूळ । जे क्रियाविशेषें स्थूळ । जयां नव्हाळियेचें फळ । स्वर्गसुख ॥ ५८ ॥ ते द्रव्यादियागु कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती । जैशी तारातेजसंपत्ती । दिनकरापाशीं ॥ ५९ ॥ देखें परमात्मसुखनिधान । साधावया योगीजन । जें न विसंबिती अंजन । उन्मेषनेत्रीं ॥ १६० ॥ जें धांवतया कर्माची लाणी । नैष्कर्म्यबोधाची खाणी । जें भुकेलिया धणी । साधनाची ॥ ६१ ॥ जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली । जेणें इंद्रियें विसरलीं । विषयसंगु ॥ ६२ ॥ मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलपण ठेलें । जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥ ६३ ॥ जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे । जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥ ६४ ॥

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि आणावें । तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंशीं ॥ ६५ ॥ जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंटा । तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ॥ ६६ ॥ तरी तनुमनुजीवें । चरणासीं लागावें । आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥ ६७॥ मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगती पुसिलें । जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ॥ ६८ ॥

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव । येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

जयाचेनि वाक्यउजिवडें । जाहलें चित्त निधडें । ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ॥ ६९ ॥ ते वेळीं आपणपेया सहितें । इयें अशेषेंही भूतें । माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥ १७० ॥ ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकारु जाईल । जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ॥ ७१ ॥

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः । सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥

जरी कल्मषांचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरु । व्यामोहाचा डोंगरु । होउनी अससी ॥ ७२ ॥ तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें । ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥७३॥ देखें विश्वभ्रमाऐसा । जो अमूर्ताचा कडवसा । तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥ ७४ ॥ तया कायसे हे मनोमळ । हें बोलतांचि अति किडाळ । नाहीं येणें पाडें ढिसाळ । दुजें जगीं ॥ ७५ ॥

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥

सांगें भुवनत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधवली । तिये प्रळयींचे वाहटुळी । काय अभ्र पुरे ॥ ७६ ॥ कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पळिपे । तो प्रळयानळु दडपे । तृणें काष्टें काइ ॥ ७७ ॥

असे पुष्कळ प्रकारचे जे अनेक यज्ञ तुला सांगितले, ते वेदांनेंच चांगल्या विस्तारानें सांगितले आहेत. १५६. परंतु त्या विस्ताराशीं आपल्याला काय करावयाचें आहे ? ( तात्पर्य ) असें समज कीं, हे ( मागें सांगितलेले यज्ञादिक ) सर्व कर्मांपासूनच उत्पन्न होतात. एवढें जाणलें कीं आपोआपच कर्मबंधाची प्राप्ति होणार नाहीं. १५७.

हे शत्रूतापना, द्रव्यसाधनानें साध्य होणाऱ्या यज्ञापेक्षां ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. हे पार्था, सर्व प्रकारच्या सर्व कर्मांचा ज्ञानामध्यें अंतर्भाव होतो. ३३.

अर्जुना वेद ज्यांचे मूळ आहे, ( ज्यांत क्रियांचा विशेष खटाटोप आहे, ) व ज्यांपासून अपूर्व असें स्वर्गसुखाचें फल प्राप्त होतें; १५८. ते द्रव्यादि यज्ञ खरे आहेत; पण ताऱ्यांच्या तेजाचा डौल जसा सूर्यापुढें चालत नाहीं, तशी ज्ञानयज्ञाची सर त्यांना येत नाहीं. १५९. पहा, परमात्मस्वरूप सुखाचा ठेवा हस्तगत करण्याकरितां, योगी लोक जें ज्ञानरूपी अंजन बुद्धिरूप डोळ्यांमध्यें घालण्याला कधींहि विसंबत नाहींत; १६०. जें चालू कर्मांच्या समाप्तीचें ठिकाण आहे, जें कर्मातीत ज्ञानाची खाण आहे. ( आत्मसुखार्थ ) जे भुकेले आहेत, त्यांच्या साधनांची जें तृप्ति आहे; १६१. ज्याच्या ठिकाणीं प्रवृत्ति पांगळी होते, तर्काची दृष्टि जाते, ज्याच्या योगानें इंद्रियांना विषयांचा विसर पडतो; १६२. मनाचें मनपण नाहींसें होतें, बोलाचा बोलकेपणा थांबतो, ज्यामध्यें ज्ञेय ( जाणावयाची वस्तु–ब्रह्म ) प्रत्यक्ष सांपडतें, १६३. ज्याच्या ठिकाणीं वैराग्याचें दारिद्य दूर होतें, विवेकाचा हांवरेपणा खुंटतो, आणि ज्याच्या ठिकाणीं न पाहतां ( आपोआपच ) आत्मस्वरूप दिसतें. १६४.

( आचार्यांकडे जाऊन ) प्रणिपात करणें, प्रश्न करणें, सेवा करणें इत्यादि प्रकारांनीं ( नम्रता आल्यावर ) ते ज्ञानसंपन्न व तत्त्वदर्शी आचार्य त्या ज्ञानाचा उपदेश करतील असें जाण. ३४.

अरे अर्जुना, तें उत्तम ज्ञान जर लाभावें असें मनांत असेल, तर या संतांस सर्वस्वेंकरून त्यां भजावें. १६५. कारण ते ज्ञानाचें घर आहेत; त्यांची सेवा हा त्या घराचा उंबरठा आहे; अर्जुना, तूं सेवा करून तो आपल्या स्वाधीन करून घे. १६६. एवढ्याकरितां शरीरानें, मनानें व जीवानें त्यांच्या चरणीं लागावें आणि अभिमान सोडून त्यांची सर्व चाकरी करावी. १६७. मग आपलें जें इच्छित असेल, तें त्यांस विचारलें असतां ते सांगतात. त्या त्यांच्या उपदेशानें अंतःकरण ज्ञानसंपन्न होऊन पुनः संकल्पाकडे वळत नाहीं. १६८.

हें ज्ञान झाल्यावर हे पांडवा, तुला याप्रमाणें पुन्हां मोह येणार नाहीं. आत्मस्वरूप जो मी, त्या माझे ठिकाणीं सर्व भूतमात्र आहेत असें या ज्ञानाच्या योगानें तूं जाणशील. ३५.

त्यांच्या उपदेशरूप उजेडानें निर्धास्त झालेलें चित्त ब्रह्माप्रमाणें शंकारहित होतें. १६९. त्या वेळीं आपल्यासहित हीं सर्व भूतें माझ्या स्वरूपांत तूं निरंतर पहाशील. १७०. अरे पार्था, ज्या वेळीं श्रीगुरूची कृपा होईल, त्या वेळीं असा ज्ञानप्रकाशाचा उदय होईल; आणि मग त्यावेळीं मोहरूप अंधकार नाहींसा होईल. १७१.

सर्व पापी माणसांमध्यें अत्यंत पाप करणारा जरी तूं असलास तरी ज्ञानरूपी नौकेनें सर्व पातकांतून तूं तरून जाशील. ३६.

तूं पापाचें आगर, भ्रांतीचा सागर किंवा व्यामोहाचा ( मनाच्या घोंटाळ्याचा ) डोंगर जरी असलास; १७२. तरी ज्ञानशक्तीच्या पुढें बाबा, हें सगळें कांहींच नाहीं, असें या ज्ञानाच्या अंगीं निर्दोष सामर्थ्य आहे. १७३. पहा, निराकार परमात्म्याची पडछाया म्हणून असणारा हा जो जगताचा पसारा, तो देखील ज्या ज्ञानाच्या प्रकाशाला पुरत नाहीं; ( विश्वाचा निरास करणें, ह्याचीहि ज्या ज्ञानाच्या सामर्थ्यापुढें किंमत नाहीं ) १७४. त्या ज्ञानाला हे मनांतील मळ म्हणजे काय आहेत ? पण अशी तुलना करणें, हेंच अनुचित आहे. ( वास्तविक पहातां ) याच्यासारखें समर्थ जगांत दुसरें कांहीं नाहीं. १७५.

हे अर्जुना, प्रज्वलित केलेला अग्नि जसा काष्ठांचें भस्म करून टाकतो, तसा ज्ञानरूपी अग्नि सर्व कर्मांना भस्म करून टाकतो. ३७.

तिन्ही लोकांची राख आकाशांत उडवून देणारी जी प्रळयकाळची वावटळ, तिच्यापुढें ढग काय टिकणार आहेत ? सांग बरें. १७६. अथवा वाऱ्याच्या क्षोभानें जो प्रळयकाळचा अग्नि केवळ पाण्यानेंच पेटतो, तो गवत व काष्ठें यांनीं दबेल काय ? १७७.

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥

म्हणोनि असो हें न घडे । तें विचारितांचि असंगडें । पुढती ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे ॥ ७८ ॥ एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे । जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ॥ ७९ ॥ या महातेजाचेनि कसें । जरी चोखाळ प्रतिबिंब दिसे । कां गिंवासिलें गिंवसे । आकाश हें ॥ १८० ॥ नातरी पृथ्वीचेनि पाडें । कांटाळें जरी जोडे । तरी उपमा ज्ञानीं घडे । पंडुकुमरा ॥ ८१ ॥ म्हणूनि बहुतीं परीं पाहतां । पुढतपुढती निर्धारितां । हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आथि ॥ ८२ ॥ जैसी अमृताची चवी निवडिजे । तरी अमृताचिसारिखी म्हणिजे । तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसींचि ॥ ८३ ॥ आतां यावरी जें बोलणें । तें वायांचि वेळ फेडणें । तंव साचचि जी हें पार्थु म्हणे । जें बोलत असां ॥ ८४ ॥ परि तेंचि ज्ञान केवीं जाणावें । ऐसें अर्जुनें जंव पुसावें । तंव तें मनोगत देवें । जाणितलें ॥ ८५ ॥ मग म्हणतसे किरीटी । आतां चित्त देयीं इये गोठी । सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपाय तुज ॥ ८६ ॥

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

तरी आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां । जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं ॥ ८७ ॥ जो मनासी चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे । जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥ ८८ ॥ तयातेंचि गिंवासित । हें ज्ञान पावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ॥ ८९ ॥ तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे । मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ॥ १९० ॥ मग जेउती वास पाहिजे । तेउती शांतीचि देखिजे । तेथ अपारा पारु नेणिजे । निर्धारितां ॥ ९१ ॥ ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु । सांगतां असे अपारु । परि असो आतां ॥ ९२ ॥

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति । नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

ऐकें जया प्राणियाच्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाहीं । तयाचें जियालें म्हणों काई । वरी मरण चांग ॥ ९३ ॥ शून्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह । तैसें जीवित तें संमोह । ज्ञानहीना ॥ ९४ ॥ अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि ते चाड एकी जरी वाहे । तरी तेथ जिव्हाळा कांहीं आहे । प्राप्तीचा पैं ॥ ९५ ॥ वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी । परि ते आस्थाही न धरी मानसीं । तरी तो संशयरूप हुताशीं । पडिला जाण ॥ ९६ ॥ जे अमृतही परि नावडे । ऐसें सावियाचि आरोचकु जैं पडे । तैं मरण आलें असे फुडें । जाणों ये कीं ॥ ९७ ॥ तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेंसींचि माजे । तो संशयें अंगिकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥ ९८ ॥ मग संशयी जरी पडला । तरी निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिकपरत्रा मुकला । सुखासि गा ॥ ९९ ॥ जया काळज्वरु आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैशीं नेणे । आगी आणि चांदिणें । सरिसेंचि मानी ॥ २०० ॥ तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें । संशयी तो नोळखे । हिताहित ॥१॥ हा रात्रिदिवसु पाहीं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं । तैसें संशयीं असतां कांहीं । मना नये ॥२॥

या ज्ञानासारखी पवित्र करणारी वस्तु या जगामध्यें कोणतीहि नाहीं. योगाचरणानें स्वतः योग्यता प्राप्त झालेल्याला ( मुमुक्षूला ) हें ज्ञान कालांतरानें प्राप्त होतें. ३८.

असो; म्हणून असें घडणें अशक्य आहे. नुसत्या विचारानेंच हें अशक्य आहे असें दिसतें. एकंदरींत पहातां ज्ञानासारखें पवित्र कांहीं नाहीं. १७८. इहलोकीं ज्ञान हें उत्तम आहे. ज्याप्रमाणें दुसरें चैतन्य नाहीं, त्याप्रमाणें ( ज्ञानाइतकें उत्तम ) दुसरें कोठें आहे ? १७९. या सूर्याच्या कसोटीला लावून पहातां, त्याचें प्रतिबिंब जर तेजस्वी आहे असें आढळेल किंवा आकाशाला कवळूं जातां, जर कवळतां येईल; १८०. अथवा योग्यतेनें पृथ्वीच्या तोलाचें जर कांहीं मिळेल, तरच अर्जुना, ज्ञानाला उपमा सांपडेल. १८१. म्हणून अनेक प्रकारांनीं विचार केला असतां व पुनः पुन्हा निर्णय करून पाहिलें असतां, असें दिसतें कीं, ज्ञानाची पवित्रता ही फक्त ज्ञानाचेच ठिकाणीं आहे. १८२. अमृताची चव कशासारखी आहे, हें निवडूं जातां, ती अमृतासारखीच आहे, असें ज्याप्रमाणें म्हणावें लागतें, त्याप्रमाणेंच ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा देणें भाग आहे. १८३. आतां ( यापेक्षां ज्ञानाच्या महतीविषयीं ) जास्त बोलणें म्हणजे केवळ वेळ फुकट घालविणें होय. यावर अर्जुन म्हणाला, महाराज, आपण जें बोलत आहां तें खरेंच आहे. १८४. पण तेंच ज्ञान कसें प्राप्त करून घ्यावें, असें अर्जुन विचारणार, तोंच तें त्याचें मनोगत देवानें जाणलें. १८५. मग तो म्हणाला, अर्जुना, ज्ञानाच्या प्राप्तीचा उपाय मी तुला सांगतों. आतां या गोष्टीकडे नीट चित्त दे. १८६.

श्रद्धावान्, ज्ञानतत्पर आणि जितेंद्रिय अशा ( गुणांनीं युक्त ) मनुष्याला ज्ञान प्राप्त होतें. ज्ञान प्राप्त झाल्याबरोबर अत्यंत श्रेष्ठ अशी ( मोक्षरूपी ) शांति त्याला प्राप्त होते. ३९.

तर आत्मसुखाच्या गोडीमुळें, जो सर्व विषयांना विटलेला असतो, ज्याच्या ठिकाणीं इंद्रियांना मान कसा तो मुळींच नसतो; १८७. जो कशाचीहि इच्छा मनांत येऊं देत नाहीं, जो प्रकृतीकडून होणारीं कर्में ( त्या कर्मांचें कर्तृत्व ) आपल्याकडे घेत नाहीं, श्रद्धेच्या उपभोगानें जो सुखी झालेला असतो; १८८. ज्या ज्ञानांत निर्भेळ शांतीची वसति असते, तें ज्ञान त्याला शोधीत येऊन हटकून पोंचतें. १८९. तें ज्ञान अंतःकरणांत स्थिर वसतें आणि मग शांतीचा अंकुर फुटतो. पुढें आत्मज्ञानाचा विस्तार पुष्कळच प्रकट होतो. १९०. मग ज्या बाजूला पाहील, त्या बाजूला त्याला शांतीच दिसते. त्या अमर्याद शांतीचें पैलतीर कुठें आहे, तें विचार करूनही समजत नाहीं. १९१. अशा या ज्ञानरूप बीजाचा उत्तरोत्तर होत जाणारा विस्तार सांगूं लागलों तर, तो अपार आहे. पण तें आतां राहूं दे. १९२.

आत्मज्ञानहीन, श्रद्धाहीन आणि संशयी मनुष्य नाश पावतो. ( त्यांतून ) संशयी मनुष्याला तर इहलोक साधत नाही, परलोक साधत नाहीं आणि सुखहि मिळत नाहीं. ४०.

ऐक, ज्या प्राण्याच्या ठिकाणीं या ज्ञानाची आवड नाहीं, त्याच्या जिण्याला काय म्हणावें ? त्यापेक्षां मरण बरें. १९३. जसें ओसाड घर किंवा जसा प्राणरहित देह ( व्यर्थ होय ) तसें ज्ञानहीनास जीवित हें केवळ शून्यवत् आहे. १९४. अथवा खरोखर ज्ञानाची प्राप्ति झालेली नसली, पण त्याची नुसती इच्छा जरी मनुष्यानें ( निरंतर ) बाळगली, तरी त्याला ज्ञानप्राप्तीची कांहीं तरी आशा आहे. १९५. एरवीं ज्ञानाची गोष्ट कशाला ? पण जो त्याच्याबद्दल मनांत आस्थाहि बाळगीत नाहीं, तो संशयरूप अग्नींत पडला, असें समज. १९६. अमृतहि आवडत नाहीं, अशी अरुचि ज्या वेळेस स्वभावतःच येते, त्या वेळेला मरण ओढवलें आहे असें उघड समजावें. १९७. त्याप्रमाणें जो विषयसुखानें रंगून जातो व ज्ञानाविषयीं जो बेपर्वा असतो, तो संशयानें घेरला जातो, यांत संशय नाहीं. १९८. अशा रीतीनें जो संशयांत पडला, त्याचा निःसंशय घात झाला असें समज. तो इहपरलोकांतील सुखाला आंचवला. १९९. ज्याला विषमज्वर झालेला असतो, त्याला जसें शीत-उष्ण कांहीं कळत नाहीं. तो अग्नि आणि चांदणें, हीं दोन्ही सारखींच मानतो; २००. त्याप्रमाणें खरें आणि खोटें, प्रतिकूल आणि अनुकूल, हित व अहित, हीं संशयग्रस्त मनुष्याला ओळखतां येत नाहींत. २०१. पहा, ही रात्र आणि हा दिवस, असें जन्मांधाला ज्याप्रमाणें ठाऊक नसतें, त्याप्रमाणें जोंपर्यंत ( मनुष्य ) संशयग्रस्त आहे, तोंपर्यंत त्याच्या मनाला कांहींच पटत नाहीं. २०२ म्हणून संशयापेक्षां थोर असें

म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियासी ॥३॥ येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एकु जिणावा । जो ज्ञानाचिया अभावा-। माजि असे ॥४॥ जैं अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवस मनीं वाढे । म्हणोनि सर्वथा मागु मोडे । विश्वासाचा ॥५॥ हृदयीं हाचि न समाये । बुद्धीतें गिंवसूनि ठाये । तेथ संशयात्मक होये । लोकत्रय ॥६॥

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् । आत्मवंतं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥

ऐसा जरी थोरावे । तरी उपायें एकें आंगवे । जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग ॥ ७ ॥ तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळ हा निवटे । मग निःशेष खता फिटे । मानसींचा ॥ ८ ॥

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः । छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

याकारणें पार्था । उठीं वेगीं बरौता । नाशु करोनि हृदयस्था । संशयासी ॥ ९ ॥ ऐसें सर्वज्ञानाचा बापु । जो कृष्णु ज्ञानदीपु । तो म्हणतसे सकृपु । ऐकें राया ॥ २१० ॥ तंव या पूर्वापर बोलाचा । विचारूनि कुमरु पंडूचा । कैसा प्रश्नु हन अवसरींचा । करिता होईल ॥ ११ ॥ ते कथेची संगति । भावाची संपत्ति । रसाची उन्नति । म्हणिपेल पुढां ॥ १२ ॥ जयाचिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची ओवाळणी । जो सज्जनाचिये आयणी । विसांवा जगीं ॥ १३ ॥ तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा मऱ्हाठे बोल । जे समुद्राहूनि खोल । अर्थभरित ॥ १४ ॥ जैसें बिंब तरी बचकें एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें । शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ १५ ॥ नातरी कामितयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा । बोलु व्यापकु होय तैसा । तरी अवधान द्यावें ॥ १६ ॥ हें असो काय म्हणावें । सर्वज्ञु जाणती स्वभावें । तरी निकें चित्त द्यावें । हे विनंति माझी ॥ १७ ॥ जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती । जैसी लावण्यगुणकुळवती । आणि पतिव्रता ॥ १८ ॥ आधींचि साखर आवडे । आणि तेचि जरी ओखदीं जोडे । तरी सेवावी ना कां कोडें । नावानावा ॥ १९ ॥ सहजें मलयानिलु मंदु सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंचि जोडे नादु । जरी दैवगत्या ॥ २२० ॥ तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी । तेवींचि कानाकरवीं । म्हणवी बापु माझा ॥ २१ ॥ तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासि होय पारणें । आणि संसारदुःख मूळवणें । विकृतीविणें ॥ २२ ॥ जरी मंत्रेंचि वैरी मरे । तरी वायांचि कां बांधावीं कटारें । रोग जाय दुधें साखरें । तरी निंब कां पियावा ॥ २३ ॥ तैसा मनाचा मारु न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां । एथ मोक्षु असे आयता । श्रवणाचिमाजी ॥ २४ ॥ म्हणोनि आथिलिया आराणुका । गीतार्थु हा निका । ज्ञानदेवो म्हणे आइका । निवृत्तिदासु ॥ २२५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ।

[ ओव्या २२५. श्लोक ४२. ]

ॐ श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.

दुसरें घोर पातक कोणतेंच नाहीं. हा संशय प्राण्याला विनाशाचें एक जाळेंच आहे. २०३ एवढ्याकरितां तूं याचा त्याग करावा. जेथें ज्ञानाचा अभाव असतो तेथेंच जो असतो त्या ह्या एकट्यालाच पहिल्यानें जिंकावें. २०४. जेव्हां अज्ञानाचा गाढ अंधार पडतो, तेव्हां हा मनांत फार वाढतो. म्हणून श्रद्धेचा मार्ग अगदींच बंद पडतो. २०५. हा फक्त हृदयालाच व्यापून रहातो असें नाहीं; तर बुद्धीलाही व्यापून टाकतो त्यावेळीं तिन्ही लोक संशयरूप होऊन जातात. २०६.

योगानें ज्यांचीं कर्में नाश पावलीं आहेत आणि ( जीवात्मा व परमात्मा यांचें ऐक्यदर्शनस्वरूपी ) ज्ञानानें ज्याचे संशय नष्ट झाले आहेत, अशा आत्मवेत्या ( ज्ञानी ) मनुष्याला, हे धनंजया, कर्में बद्ध करीत नाहींत. ४१.

एवढा जरी तो वाढला, तरी एका उपायानें तो जिंकतां येतो. चांगलें ज्ञानरूप खड्ग जर हातीं असेल, २०७. तर त्या ज्ञानरूपी तीक्ष्ण शस्त्रानें हा संपूर्ण नाश पावतो. मग मनावरील सर्व मळ निःशेष नाहींसा होतो. २०८.

म्हणून हे भरतकुलोत्पन्ना, अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या व स्वतःचे हृदयाचे ठिकाणीं असलेल्या या संशयाचा ज्ञानरूपी खड्गानें छेद करून ( आपल्या क्षात्रधर्माला उचित अशा ) कर्मयोगाचा अवलंब कर. युद्धाला उभा रहा. ४२.

एवढ्याकरितां अर्जुना, अंतःकरणांत असलेल्या सर्व संशयांचा नाश करून लौकर ऊठ पाहूं. २०९. (संजय म्हणाला) राजा धृतराष्ट्रा, ऐक. सर्व ज्ञानाचा जनक व ज्ञानाचा केवळ दीपच, असा जो श्रीकृष्ण तो मोठ्या कृपाळूपणानें ( याप्रमाणें ) अर्जुनास बोलला. २१०. पुढें या मागच्या पुढच्या बोलण्याचा विचार करून अर्जुन कसा समयोचित प्रश्न विचारील; २११. ती संगतवार कथा, ती अर्थांची खाण, तो रसांचा उत्कर्ष, पुढें सांगण्यांत येईल. २१२. ज्याच्या चांगलेपणावरून आठहि रस ( नऊ रसांपैकीं शांतरसाशिवाय बाकीचे आठ रस ) ओंवाळून टाकावे, जो या जगांत सज्जनांच्या बुद्धीचें विश्रांतिस्थान आहे; २१३. तो शांतरसच ज्यांत अपूर्वतेनें प्रगटेल, जे अर्थपूर्ण व समुद्रापेक्षांहि गंभीर आहेत, ते मराठी बोल ऐका. २१४. सूर्यबिंब जरी बचकेएवढें दिसतें, तरी त्याच्या प्रकाशाला त्रिभुवन अपुरें पडतें; त्याप्रमाणें या शब्दांची व्याप्ति आहे, असें अनुभवास येईल. २१५. अथवा इच्छा करणाऱ्यांच्या संकल्पाप्रमाणें कल्पवृक्ष फळें देतो, त्याप्रमाणें हे बोल व्यापक आहेत, म्हणून नीट लक्ष द्यावें. २१६. पण हें राहूं द्या. जास्त काय सांगावें? जे सर्वज्ञ आहेत, त्यांना आपोआप समजतेंच आहे. तरी नीट लक्ष द्यावें, हीच माझी विनंति आहे. २१७. ज्याप्रमाणें ( एखादी स्त्री ) रूप, गुण आणि कुल यांनीं युक्त आणि शिवाय पतिव्रता असावी, त्याप्रमाणें या बोलण्याच्या मर्यादेंत ( पद्धतींत ) शांतीला ( शांतरसाला ) अलंकारांची जोड दिलेली दिसेल. २१८. आधींच साखर प्रिय, आणि त्यांत तीच जर औषध म्हणून मिळाली, तर मग आनंदानें तिचें वारंवार सेवन कां न करावें? २१९. मलय पर्वतावरील वारा स्वभावतःच मंद व सुगंध असतो, त्यांतच जर त्याला अमृतासारखी गोडी प्राप्त होईल, आणि दैवयोगानें त्याचे ठिकाणींच सुस्वर उत्पन्न होईल; २२०. तर तो आपल्या स्पर्शानें सर्व शरीर शांत करील, आपल्या गोडीनें जिभेला नाचवील, त्याचप्रमाणें कानांकडून वाहवा म्हणवील. २२१. तसेंच या कथेच्या श्रवणानें होणार आहे. एकतर कानांचें पारणें फिटेल; आणि दुसरें अनायासें संसारदुःखाचें समूळ उच्चाटन होईल. २२२. जर मंत्रप्रयोगानेंच शत्रूस ठार करतां येईल, तर उगीचच कट्यार कमरेस कां बांधून ठेवावी? जर दुधानें व साखरेनेंच रोग नाहींसा होईल, तर कडुलिंबाचा रस पिण्याचें काय कारण? २२३. त्याप्रमाणें मनाला न मारतां, इंद्रियांना दुःख न देतां, येथें ऐकण्यानेंच आयता मोक्ष मिळणारा आहे. २२४. म्हणून प्रसन्न मनानें हा गीतार्थ चांगला ऐका, असें निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. २२५.



तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळ ॥ अ. ५—१६

मागील अध्यायांत भगवंतानीं ज्ञानमार्गाची अनेक रीतींनें प्रशंसा केली; पण शेवटीं अर्जुनास, 'तूं मात्र कर्मयोगाचें आचरण कर व युद्धास उभा रहा' असा उपदेश केला. त्यामुळें अर्जुनाचें मन द्विधा होऊन त्याला कर्मसंन्यास व कर्मयोग या दोन मार्गांपैकीं कोणता मार्ग श्रेयस्कर आहे, याबद्दल साशंकता निर्माण झाली. या अर्जुनाच्या प्रश्नांतून पांचवा अध्याय निर्माण झाला आहे. भगवंतांना अर्जुनाचा प्रश्न ऐकून मोठा संतोष झाला व हा अध्याय म्हणजे अर्जुनावरील प्रेमाचें निदर्शक असें त्याचें उत्तर आहे. ( १–१४ )

या अध्यायास एका दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. कारण, ज्ञानमार्ग व निष्कामकर्मयोग या दोन मार्गांपैकीं कर्मयोग हा कर्मसंन्यासापेक्षां श्रेयस्कर आहे, असें भगवंतांनीं स्पष्टपणें सांगितलें आहे; पण एवढ्यावरून भगवंताना संन्यासमार्गाची किंमत कमी लेखावयाची असें दिसेल, म्हणून ज्ञानदेवांनीं भगवान असें कां म्हणतात याचें कारण सयुक्तिक दिलें आहे. तें म्हणजे या जगांत कर्मयोगाचेच अधिकारी पुष्कळ आहेत. कर्मयोग हा जाणते व नेणते या सर्वांना आचरण्यास सुलभ व शेवटीं मोक्षफलदायी आहे. याच्या उलट ज्ञानमार्गानें जावयाचें असल्यास साधनचतुष्टयसंपन्नतेची आवश्यकता असल्यामुळें त्या मार्गाचे अधिकारी फारच थोडे आहेत. बहुतेक सामान्य लोकांना कर्मयोगच सोपा व योग्य असा मार्ग आहे. ( १५–१८ )

या अध्यायांत गीतेंतील नैष्कर्म्य स्थितीची उद्बोधक चर्चा आली आहे. अज्ञ लोक नैष्कर्म्य म्हणजे आळशी बनून कांहीं न करतां स्वस्थ बसणें असा अर्थ करतात; परंतु या अध्यायांत जो अर्थ भगवंतांनीं स्पष्ट केला आहे, त्याप्रमाणें देहादि संघाताकडून कर्में होत असतांनाहि स्वतःच्या अकर्तेपणांत यत्किंचितहि बिघाड येऊं न देणें ही खरी नैष्कर्म्य स्थिति आहे. अशा स्थितींत घरदार सोडण्याची कांहीं जरूरी नाहीं. प्रपंचाची आसक्ति घेणारें मन निःसंग करणें हेंच महत्त्वाचें कार्य आहे. 'मी व माझें' हे संकल्प ज्याचे नाहींसे झाले, तो प्रपंचांत राहूनहि कर्मसंन्यासीच आहे. कर्मसंन्यास व कर्मयोग यांपैकीं एकाचें जरी चांगलें तत्त्व समजून घेतलें तरी हे दोन्ही मार्ग एकाच फळाला देणारे आहेत हें दिसून येईल. असें न करतां जो कर्मयोगहि नीट आचरत नाहीं, परंतु कर्मसंन्यासाच्या नादीं लागला त्याला कशाचीच प्राप्ति होत नाहीं. ( १९–३३ )

निष्काम कर्मयोगाचें आचरण करण्यास चित्तांतील भ्रांति नाहींशी होऊन गुरुवाक्यानें शुद्ध होऊन आत्मस्वरूपीं तें स्थिर होणें अत्यंत जरूर आहे. असें झालें म्हणजे त्या पुरुषाकडून जरी कर्में झालीं, तरी पूर्वीची भ्रांतीची झोंप ज्ञानोदयानें नाहींशी झाल्यामुळें त्याचीं सर्व कर्में धर्माधर्मरूप कर्मबंधापासून अलिप्त अशीं असतात. त्यांच्या ठिकाणीं बुद्धीपासून देहापर्यंत कोठेंहि अहंकार नसल्यामुळें हे पुरुष शुद्ध असतात. याप्रमाणें मोठ्या बहारीनें ज्ञानदेवांनीं शब्दांनीं व्यक्त करण्यास कठीण अशा स्थितीचें वर्णन करून श्रोत्यांना शांतरसांत तल्लीन करून टाकलें आहे. ( ३४–६९ )

सकाम पुरुषाप्रमाणें ज्ञानयोगी कर्में करतांना दिसतो खरा, परंतु जणूं काय आपल्या हातून तें कर्म झालेंच नाहीं, अशा अकर्तेपणाच्या बोधानें तो फळाबद्दल उदास राहतो; म्हणून त्याला या जगांत अमर्याद शांति प्राप्त होते. तो जिकडे पाहील तिकडे त्याला जग सुखमय दिसतें. ( ७०–७५ )

हा पुरुष ईश्वराप्रमाणेंच असतो. ईश्वर हा जगांतील सर्व प्राणीमात्रांना व्यापून असूनहि कोणाबद्दल आसक्ति धरीत नाहीं; फार काय, या जगाच्या उत्पत्ति-विनाशाचीहि त्याला दाद नसते. सगुणरूप धारण करून क्रीडा करीत असतांहि त्याच्या समर्थ-निर्गुणपणांत न्यूनता येत नाहीं; परंतु ईश्वराच्या ठिकाणीं लोक अज्ञानानें कर्तृत्वाचा आरोप करतात. सर्वत्र सम असणारें अद्वैत ब्रह्म, तें आपण आहोंत असा ज्यांना बोध प्राप्त झाला आहे, त्या पुरुषांना तिन्ही लोकांत कोणताच भेद शिल्लक राहत नाहीं. असें जरी असलें तरी त्यांचें वागणें अलौकिक नसतें. लौकिक व्यवहार करतांना ते दिसतात, म्हणून संसारी लोकांना त्यांची ओळख पटत नाहीं. सामान्य लोकांपासून ते निराळे आहेत, याची मोठी खूण म्हणजे इष्ट अथवा अनिष्ट गोष्टी प्राप्त झाल्या असतांना त्यांच्या मनांत यत्किंचितहि सुखदुःखाचा विकार उत्पन्न होत नाहीं व ते इंद्रियांशीं तादात्म्य घेऊन तद्वारां विषयांचा भोग घेत नाहींत. ( ७६–१०८ )

एरव्हीं हा आत्मसुखाचा भोग ज्यांना प्राप्त झालेला नाहीं ते मृगजळाप्रमाणें विषयाच्या मागें लागून दुःख भोगीत असतात; परंतु ज्या ज्ञानी पुरुषांना हें विषयाचें दुःखद स्वरूप माहीत असतें, ते तें विष आहे असें मानून त्यांच्यापुढें विषय आला तरी त्यापासून ते तात्काळ दूर होतात. ते त्यांत रममाण होत नाहींत. या ज्ञानी पुरुषाचा स्वसुखाचा भोग बाहेरील विषयाच्या प्राप्तिमुळें होणारा नसल्यामुळें भोग्य भोक्ता व भोग, या त्रिपुटीरहित असतो. या सुखाचें वर्णन न बोलण्यासारखें आहे. जे हे महाबोधांत रममाण झालेले आत्मनिष्ठ पुरुष भोग घेणारे आहेत, त्यांनाच हें समजेल. असें हें ज्ञानी पुरुषांचें वर्णन 'सनागर' बोलींत ज्ञानदेवांनीं केलें आहे. ( १०९–१४१ )

अशी ही अक्षय परमनिस्सीम स्थिति, कामनारहित वैराग्यवान पुरुषासच प्राप्त होते. फार काय ते देहांत असतांनाच साक्षात् ब्रह्म झालेले असतात. वैराग्याचा आधार घेऊन अंतःकरणांतील विषय बाहेर काढून यम, नियम व प्राणायामद्वारां मनाच्या वृत्ति अंतर्मुख करून तें एकाग्र करून योगी मनच नाहींसें करतात. संसारचित्र ज्यांत उमटतें तें मनच नाहींसें झाल्यानें अहंकारादिक आपोआपच नाहींसे होतात व साधक याच शरीरांत ब्रह्म होतो. ( १४२–१५७ )

असा योगमार्गाचा थोडक्यांत देवा भगवंतांनीं सांगितला, तेव्हां मर्मज्ञ अर्जुनाला विस्मय वाटला व त्याला तो मार्ग पायउतान्यासारखा सोपा वाटला; म्हणून देवांनीं हें अधिक स्पष्ट करून सांगावें असें त्यास वाटलें. ही अर्जुनाची स्थिति देवांनीं मनकवडेपणानें जाणली व अर्जुनाला 'तूं नुसता ऐकणारा नाहींस तर ऐकून त्याचप्रमाणें आचरण करणाराहि आहेस' अशी शाबासकी देऊन त्याला सांगत योगमार्ग सांगतों असें देव म्हणाले. माय ( देव ) लेंकरांतील ( अर्जुन ) आवडीच्या प्रसंगाचें हृद्य चित्रण ज्ञानदेवांनीं करून योग म्हणजे काय ! त्याचा उपयोग काय ? त्याचा अधिकार कोणाला ? वगैरे सर्व विषय आपला अखंड योग न सोडतां देव पुढील अध्यायांत अर्जुनाला सांगणार आहेत, असें म्हणून हा अध्याय संपविला आहे. ( १५८–१८० )



# ज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

अर्जुन उवाचः—संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि । यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥१॥

मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे । हां हो हें कैसें तुमचें बोलणें । एक होय तरी अंतःकरणें । विचारूं ये ॥ १ ॥ मागां सकळ कर्मांचा संन्यासु । तुम्हींचि निरोपिला होता बहुवसु । तरी कर्मयोगीं केवीं अतिरसु । पोखीतसां पुढती ॥२॥ ऐसें द्व्यर्थ हें बोलतां । आम्हां नेणतयांच्या चित्ता । आपुलिये चाडे अनंता । उमजु नोहे ॥ ३ ॥ ऐकें एकसारातें बोधिजे । तरी एक-निष्ठचि बोलिजे । हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥ ४ ॥ तरी याचिलागीं तुमतें । म्यां राउळासि विनाविलें होतें । जे हा परमार्थु ध्वनितें । न बोलावा ॥ ५ ॥ परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु देखावा । सांगें दोहींमाजि बरवा । मार्गु कवण ॥ ६ ॥ जो परिणामींचा निर्वाळा । अचुंबितु ये फळा । आणि अनुष्ठितां प्रांजळा । सावियाचि ॥ ७ ॥ जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे । तैसें सोकासना सांगडें । सोहपें होय ॥ ८ ॥ येणें अर्जुनाचेनि बोलें । देवो मनीं रिझले । मग होईल ऐकें म्हणितलें । संतोषोनियां ॥ ९ ॥ देखा कामधेनुऐसी माये । सदैव जया होये । तो चंद्रुही परी लाहे । खेळावया ॥ १० ॥ पाहें पां शंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया आर्ता । काय क्षीराब्धि दूधमाता । देइजेचिना ॥ ११ ॥ तैसा औदार्याचा कुळठा । कृष्ण आपु जाहलिया सुभटा । कां सर्व सुखांचा वसौटा । तोचि नोहावा ॥ १२ ॥ एथ चमत्कारु कायसा । गोसावी लक्ष्मीकांताऐसा । आतां आपुलिया सवेसा । मागावा कीं ॥ १३ ॥ म्हणोनि अर्जुनें म्हणितलें । तें हांसोनि येरें दिधलें । तेंचि सांगेन बोलिलें । काय कृष्णें ॥ १४ ॥

श्रीभगवानुवाचः—संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ । तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥२॥

तो म्हणे गा कुंतीसुता । हे संन्यास योग विचारितां । मोक्षकर तत्त्वता । दोनीही होती ॥ १५ ॥ तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥ १६ ॥ तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ १७ ॥ आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें चिन्ह । मग सहजें हे अभिन्न । जाणसी तूं ॥ १८ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

अर्जुन म्हणाला, हे कृष्णा, कर्मांचा त्याग करावा असें तूं सांगतोस आणि पुन: कर्मांचें अनुष्ठान (योग) करावें असेंहि तूं सांगतोस. या दोहोंपैकीं खरोखर तुझ्या मतानें जें श्रेयस्कर असेल तें मला निश्चयानें सांग. १.

मग अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला, अहो, हें असें कसें तुमचें बोलणें ! यांत एकवाक्यता असेल, तर त्यासंबंधीं मनानें कांहीं विचार करतां येईल. १. सर्व कर्मांचा त्याग करावा असें तुम्हींच मागें पुष्कळ रीतीनें सांगितलें होतें, तर आतां कर्मयोगाविषयींच्या भराला जास्त उत्तेजन कां देतां ? २. श्रीअनंता, असें हें दुटप्पी बोललें असतां, आमच्यासारख्या अल्पमतीच्या लोकांच्या मनाला पाहिजे तसा उलगडा होत नाहीं. ३. ऐक. एक तत्त्व जर सांगावयाचें असेल, तर एकच निश्चित सांगितलें पाहिजे; हें तुम्हाला दुसऱ्यांनीं सांगावयास पाहिजे काय ? ४. एवढ्यासाठीं मी आपल्यासारख्या श्रेष्ठांना विनंति केली होती कीं, हें तत्त्वज्ञान संदिग्ध भाषेंत सांगूं नये. ५. परंतु, देवा, मागें झालें तें राहूं द्या. आतां ह्या वेळीं उलगडा करा आणि या दोन मार्गांपैकीं चांगला कोणता हें सांगा. ६. ज्याचा शेवट शुद्ध असून ज्याचें फळ अचूक प्राप्त होतें व ज्याचें अनुष्ठान सहजच सरळ आहे. ७. ज्याप्रमाणें झोपेचें सुखांत व्यत्यय न येतां रस्ता तर पुष्कळ काटत जातो, अशा सुखकारक वाहनासारखा जो सोईचा मार्ग असेल (तो सांगा.) ८. ह्या अर्जुनाच्या बोलण्यानें देव मनांत खूष झाले. मग संतुष्ट होऊन म्हणाले; 'ऐक, तसेंहि होईल,' ९. पहा, ज्या दैववानाला कामधेनूसारखी आई मिळते, त्याला चंद्र, पण तोसुद्धां खेळावयास मिळतो. १०. हें पहा श्रीशंकरांनीं प्रसन्न होऊन त्या उपमन्यूच्या इच्छेप्रमाणें त्याला दूधभाताकरितां क्षीरसमुद्र दिला नाहीं का ? ११. त्याप्रमाणें उदारपणाचें घर, जो श्रीकृष्ण, तो अर्जुनाच्या स्वाधीन झाल्यावर मग तो (अर्जुन) सर्व सुखाचें वसतिस्थान कां होऊं नये ? १२. यांत आश्चर्य तें कसलें ? लक्ष्मीकांतासारखा मालक मिळाला असतां, आतां आपल्याला हवें तसें त्यानें कां मागून घेऊं नये ? १३ म्हणून अर्जुनानें जें मागितलें तें श्रीकृष्णांनीं प्रसन्न होऊन दिलें. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, श्रीकृष्ण जें काय म्हणाले, तेंच मी सांगेन. १४.

श्रीकृष्ण म्हणाले, कर्मांचा त्याग आणि कर्मांचें अनुष्ठान, हीं दोन्हीं श्रेयाला म्हणजे मोक्षाला कारणीभूत आहेत. या दोहोंपैकीं कर्मत्यागापेक्षां कर्मयोगच (तो जाणत्यानेणत्या सर्वांस सुलभ असल्यानें) विशेष (श्रेयस्कर) आहे. २

श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, हे संन्यास व कर्मयोग, विचार करून पाहिले तर, तात्त्विक दृष्ट्या दोन्ही मोक्ष प्राप्त करून देणारे आहेत. १५. तरी पण जाणते नेणते, या सगळ्यांना, हा निष्काम कर्मयोग आचरण्याला सरळ आहे. ज्याप्रमाणें पाण्यांतून तरून जाण्याला, स्त्रियांना व बालकांना नाव (हें सुलभ साधन आहे) त्याप्रमाणें (भवसागरांतून तरून जाण्यास) हा कर्मयोग साधन आहे. १६. त्याचप्रमाणें सारासाराचा विचार केला तर, हाच सोपा दिसतो. यानें कर्मांच्या संन्यासापासून मिळणाऱ्या फलाची प्राप्ति कष्टावांचून होते. १७. आतां एवढ्याकरितां मी तुला कर्मसंन्यास करणाराचें लक्षण सांगेन; मग हे दोन्ही मार्ग सहजच एक आहेत, असें तूं जाणशील. १८.

ज्ञेयः स नित्यसंन्यासि यो न द्वेष्टि न काङ्क्षति । निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ।। ३ ।।

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी । जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ।। १९ ।। आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ।। २० ।। जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला । म्हणोनि सुखें सुख पावला । अखंडित ।। २१ ।। आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें । जे घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणऊनि ।। २२ ।। देखें अग्नि विझोनि जाये । मग जे राखोंडी केवळु होये । तैं ते कापुसें गिंवसूं ये । जियापरी ।। २३ ।। तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं । जयाचिये बुद्धी । संकल्पु नाहीं ।। २४ ।। म्हणोनि कल्पना जैं सांडे । तैंचि गा संन्यासु घडे । या कारणे दोनी सांगडे । संन्यासयोगु ।। २५ ।।

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः । एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ।। ४ ।।

एऱ्हवीं तरी पार्था । जे मूर्ख होती सर्वथा । ते सांख्यकर्मसंस्था । जाणती केवीं ।। २६ ।। सहजें ते अज्ञान । म्हणोनि म्हणती हे भिन्न । एऱ्हवी दीपाप्रति काई आनान । प्रकाशु आहाती ।। २७ ।। पैं सम्यक् एकें अनुभवें । जिहीं देखिलें तत्त्व आघवें । ते दोन्हींतेंही ऐक्यभावें । मानिती गा ।। २८ ।।

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते । एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ।। ५ ।।

आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे । म्हणोनि ऐक्यता दोहींतें सहजें । इयापरी ।। २९ ।। देखें आकाशा आणि अवकाशा । भेदु नाहीं जैसा । तैसें ऐक्य योगसंन्यासा । बोळखे जो ।। ३० ।। तयासींचि जगीं पाहलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोग जाणवले । भेदेंविण ।। ३१ ।।

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः । योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाऽधिगच्छति ।। ६ ।।

जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता । तो महासुखाचा निमथा । वहिला पावे ।। ३२ ।। येरा योगस्थिति जया सांडे । तो वायांचि गा हव्यासीं पडे । परि प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ।। ३३ ।।

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ।। ७ ।।

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरूपीं घातलें । हारौनिया ।। ३४ ।। जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आवडे । मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ।। ३५ ।। तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ।। ३६ ।। आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें । आणि करी जऱ्हीं आघवें । तऱ्हीं अकर्ता तो ।। ३७ ।।

हे महाबाहो अर्जुना, जो कशाचा द्वेष करीत नाहीं व कशाची इच्छा करीत नाहीं तो कर्मयोगी नित्य कर्मसंन्यासीच जाणावा. ( प्रीति–द्वेष, सुख–दुःख, जय–पराजय इत्यादि ) द्वंद्वांनीं रहित असलेला तो बंधापासून सहज ( अनायासानें ) मुक्त होतो. ३.

तरी गतगोष्टींची जो आठवण करीत नाहीं; कांहीं मिळालें नाहीं तर त्याची इच्छा धरीत नाहीं; जो मेरु पर्वताप्रमाणें अंतःकरणांत अगदीं अचल असतो, १९. आणि ज्याच्या अंतःकरणामध्यें ' मी ' आणि ' माझें ' याचें स्मरणच राहिलें नाहीं. अर्जुना, तो सदोदीत संन्यासीच आहे असें तूं जाण. २०. ज्याच्या मनाची अशी तयारी झाली, त्याला संगच सोडून जातात, म्हणून त्याला शाश्वत सुखाची अनायासें प्राप्ति होते. २१. अशा स्थितींत घर वगैरे सर्वांचा त्याग करण्याची कांहीं जरूरी नाहीं. कारण त्यांची आसक्ति घेणारें जें मन, तेंच स्वभावतः निःसंग झालें आहे म्हणून. २२. पहा, विस्तव विझून गेल्यावर मग जो राखेचा ढेपळा शिल्लक राहतो तेव्हां त्याला कापसामध्यें देखील ज्याप्रमाणें गुंडाळून ठेवितां येतें. २३. त्याप्रमाणें ज्याचे बुद्धींत संकल्प नाहीं, तो परिवारांत असून सुद्धां कर्मबंधांत सांपडत नाहीं; २४. म्हणून ज्या वेळेला कल्पना सुटते, त्याच वेळेला संन्यास घडतो. या कारणानें कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्ही सारखे आहेत. २५.

सांख्य व कर्मयोग भिन्न ( फल देणारे ) आहेत असें अज्ञ बोलतात, ज्ञानी बोलत नाहींत. ( सांख्य आणि कर्मयोग यांपैकीं ) एकाचें जरी योग्य अनुष्ठान केलें, तरी तें करणाराला दोहोंचेंहि फल ( जो मोक्ष ) प्राप्त होतें. ४.

एरव्हीं तरी अर्जुना, जे पूर्णपणें अज्ञानी आहेत, ते सांख्ययोग आणि कर्मयोग यांतील भेद कसे जाणतील ? २६. ते स्वभावतःच मूर्ख असतात; म्हणून या दोन मार्गांना भिन्न समजतात, नाहीं तर प्रत्येक दिव्याचे प्रकाश काय निरनिराळे आहेत ? २७. एकाचेंच चांगलें आचरण करून ज्यांनीं संपूर्ण तत्त्व समजावून घेतलें, ते दोघांनाहि एकच रूपानें समजतात. २८.

सांख्यमार्गानें जाणाऱ्यांना जें ( मोक्षरूपी ) स्थान प्राप्त होतें, तेंच ( निष्काम ) कर्मयोगानें अनुष्ठान करणारांनाहि प्राप्त होतें. सांख्य आणि कर्मयोग हे एक आहेत असें जाणणारा खरा ज्ञाता होय. ५.



आणि सांख्यमार्गानें जें मिळतें, तेंच योगानें प्राप्त होतें. अशा रीतीनें या दोन मार्गांत सहजच एकता आहे. २९. पहा, आकाश आणि पोकळी यांच्यामध्यें ज्याप्रमाणें भिन्नता नाहीं, त्याप्रमाणें कर्मयोग आणि सांख्ययोग यांची एकता ज्याला पटलेली असते, ३०. ज्याला सांख्य आणि कर्मयोग अभिन्नतेनें पटले, त्यालाच जगांत उजाडलें, ( ज्ञानप्राप्ति झाली, ) व त्यानेंच आत्मस्वरूप पाहिलें. ३१.

हे महाबाहो, कर्मयोगावाचून कर्मसंन्यासाची प्राप्ति होणें दुष्कर आहे. ( फलनिरपेक्ष ) कर्मयोगाचे ठिकाणीं रत असलेल्या मुनीला ब्रह्माची प्राप्ति तत्काल होते. ६.

अर्जुना, जो निष्काम कर्म करण्याची हातवटी, ह्याच रस्त्यानें मोक्षरूप पर्वतावर चढतो, तो परमानंदरूपी शिखर त्वरेनें गांठतो. ३२. वाचून दुसरा, ज्याचे हातून कर्मयोगाचें अनुष्ठान होत नाहीं, तो व्यर्थच (संन्यासाच्या) छंदांत पडतो. परंतु त्याला संन्यासाची प्राप्ति केव्हांच घडत नाहीं. ३३.

शुद्धचित्त, जितदेह, जितेंद्रिय व ज्याचा आत्मा सर्व भूतांच्या आत्मरूप झाला आहे; असा निष्काम-कर्मयोगाचे ठिकाणीं रत असलेला मनुष्य कर्म करीत असला, तरी त्यापासून अलिप्त असतो. ७.

ज्यानें भ्रमापासून हिरावून घेतलेलें आपलें मन गुरूपदेशानें स्वच्छ करून आत्मस्वरूपांत बुचकळून ठेवलें; ३४. ज्याप्रमाणें समुद्रांत मीठ पडलें नाहीं तोंपर्यंत तें मर्यादित असें दिसतें; मग ज्या वेळीं समुद्राशीं त्याचा योग होतो, त्या वेळीं तें समुद्राएवढें होतें; ३५. त्याप्रमाणें संकल्पापासून दूर केल्यामुळें ज्याचें चित्त चिद्रूप झालें, तो मर्यादित दिसला तरी, त्यानें तिन्ही लोक व्यापले आहेत असें समज. ३६. आतां कर्ता-कर्म-कार्य, हा त्रिपुटीचा व्यवहार स्वभावतःच त्याचे ठिकाणीं बंद पडतो; आणि यावर त्यानें सर्व जरी केलें, तरी तो तत्त्वतः त्याचा कर्ता होत नाहीं. ३७.

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् । पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥
प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि । इंद्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं । तरी कर्तृत्व कैचें काई । उरे सांगें ॥ ३८ ॥ ऐसे तनुत्यागेंवीण । अमूर्ताचे गुण । दिसती संपूर्ण । योगयुक्ता ॥ ३९ ॥ एऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी । अशेषींही व्यापारीं । वर्तंतु दिसे ॥ ४० ॥ तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे । परि तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥ ४१ ॥ स्पर्शासि तरी जाणे । परिमळु सेवी घ्राणें । अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ॥ ४२ ॥ आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी । निद्रेचिया अवसरीं । निदिजे सुखें ॥ ४३ ॥ आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे । पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे कीर ॥ ४४ ॥ हें सांगों काई एकैक । देखें श्वासोश्वासादिक । आणि निमिषोन्मिमिष । आदिकरूनि ॥ ४५ ॥ पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथि पाहीं । परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥ ४६ ॥ जैं भ्रांति-सेजे सुतला । तैं स्वप्नसुखें भुतला । मग तो ज्ञानोदयीं चेइला । म्हणोनियां ॥ ४७ ॥

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः । लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥

आतां अधिष्ठानसंगती । अशेषाही इंद्रियवृत्ती । आपुलालिया अर्थीं । वर्तत आहाती ॥ ४८ ॥ दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे । देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता ॥ ४९ ॥ तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे । जैसें न सिंपे जळीं जळें । पद्मपत्र ॥५० ॥

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि । योगिनः कर्म कुर्वंति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ॥

देखें बुद्धीची भाष नेणिजे । मनाचा अंकुर नुदैजे । ऐसा व्यापारु तो बोलिजे । शारीरु गा ॥ ५१ ॥ हेंच मराठें परियेशीं । तरी बाळकाची चेष्टा जैशी । योगिये कर्में करिती तैशीं । केवळा तनू ॥ ५२ ॥ मग पांचभौतिक संचलें । जेव्हां शरीर असे निदेलें । तेथ मनाचि राहाटे एकलें । स्वप्नीं जेवीं ॥ ५३ ॥ नवल ऐकें धनुर्धरा । कैसा वासनेचा संसारा । देहा होऊं नेदी उजगरा । परी सुखदुःखें भोगी ॥ ५४ ॥ इंद्रियांच्या गांवीं नेणिजे । ऐसा व्यापारु जो निपजे । तो केवळ गा म्हणिजे । मानसाचा ॥ ५५ ॥ योगिये तोही करिती । परी कर्में तेणें न बंधिजती । जे सांडिली आहे संगती । अहंभावाची ॥ ५६ ॥ आतां जाहालिया भ्रमहत । जैसें पिशाचाचें चित्त । मग इंद्रियांचें चेष्टित । विकळ दिसे ॥ ५७ ॥ स्वरूप तरी देखे । आळविलें आइके । शब्दु बोले मुखें । परी ज्ञान नाहीं ॥ ५८ ॥ हें असो काजेंविण । जें जें कांहीं कारण । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५९ ॥ मग सर्वत्र जें जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें । वोळख अर्जुनातें । म्हणे हरी ॥ ६० ॥ ते बुद्धि धुरे करुनी । कर्म करिती चित्त

पहात असतां, ऐकत असतां, स्पर्श करीत असतां, वास घेत असतां, खात असतां, चालत असतां, झोंप घेत असतां, श्वास घेत असतां, बोलत असतां, देत असतां, घेत असतां, डोळ्याची पापणी उघडीत असतां, मिटत असतां, इंद्रियांच्या अर्थांचे ठिकाणीं इंद्रियांची प्रवृत्ति असते, असें लक्षांत आणून कर्मयोगाचे ठिकाणीं रत असलेल्या व आत्म्याचें खरें स्वरूप जाणणाऱ्या (तत्त्ववित्) मनुष्यानें "मी कांहीं करीत नाहीं" असें लक्षांत ठेवावें. ८.९

कारण, अर्जुना, त्याच्या ठिकाणीं 'मी देह' अशी आठवणच नसते, तर मग कर्तेपणा कोठचा? तो (कर्तेपणा) तेथें राहील काय? सांग. ३८. याप्रमाणें शरीराचा त्याग केल्याशिवाय, अव्यक्त परमात्म्याचे सर्व स्वभाव, त्या कर्मयोग्याचे ठिकाणीं, स्पष्टपणें अनुभवास येतात. ३९. एरव्हीं तोही इतर लोकांप्रमाणें शरीरांत असून, सर्व व्यवहार करीत असतांना दिसतो. ४०. तो देखील (इतर लोकांसारखा) डोळ्यांनीं पहातो, कानांनीं ऐकत असतो, परंतु आश्चर्य पहा कीं, तो त्या व्यवहारांत मुळींच लिप्त होत नाहीं. ४१. तो (इतरांसारखा) स्पर्शासही समजतो, नाकानें गंधाचा अनुभव घेतो व समयोचित बोलण्याचा व्यवहारही त्याचेकडून होतो. ४२. आहाराचें सेवन करतो, टाकावयाचें तें टाकतो व झोंपेच्या वेळेला समाधानानें झोंप घेतो. ४३. तो आपल्या इच्छेनुरूप चालतांना दिसतो. असें तो सर्व कर्मांचें खरोखर आचरण करतो. ४४. हें एकेक काय सांगावें? पहा, श्वास घेणें व सोडणें, आणि पापण्यांची उघडझांप करणें, इत्यादि कर्में-४५. अर्जुना, त्याचे ठिकाणीं हीं सर्वच असतात असें समज. परंतु तो आपल्या अनुभवाच्या सामर्थ्यावर ह्यांचा कर्ता मुळींच होत नाहीं. ४६. ज्या वेळेला भ्रांतीरूप अंथरुणावर झोंपला होता, त्या वेळीं स्वप्नाच्या सुखानें घेरला होता; मग तो ज्ञानाचा उदय झाला असतांना जागा झाला म्हणून (तो आपल्याला कर्ता समजत नाहीं.) ४७.

ब्रह्माचे ठिकाणीं कर्में अर्पण करून, फलाची आसक्ति टाकून जो कर्में करतो, तो, कमलपत्र जसें पाण्यापासून अलिप्त असतें, तसा पापापासून अलिप्त असतो. १०.

आतां चैतन्याच्या आश्रयानें सर्वेंद्रियांच्या वृत्ती आपापल्या विषयांकडे धांव घेत असतात. ४८. दिव्याच्या उजेडावर ज्याप्रमाणें घरांतील व्यवहार चालतात, त्याप्रमाणें (ज्ञानाच्या आश्रयानें) योगयुक्तांचीं सर्व कर्में देहांत चालतात. ४९. ज्याप्रमाणें कमलाचें पान पाण्यांत असून पाण्यानें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें तो सर्व कर्में करतो, परंतु धर्माधर्मरूप कर्मबंधानें आकळला जात नाहीं. ५०

(केवळ) शरीरानें, (केवळ) मनानें, (केवळ) बुद्धीनें आणि (केवळ) इंद्रियांनीं कर्मयोगी फलासक्ति टाकून कर्म करतात, म्हणून त्यांची चित्तशुद्धि होते. (ते अहंकारविरहित कर्में करीत असतात, म्हणून ते कर्म करीत असूनही शुद्ध असतात.) ११.

पहा, जें कर्म, बुद्धीला समजण्याचे पूर्वी व मनांत विचार उद्भवण्याच्या अगोदर होतें, त्या व्यवहाराला 'कायिक' व्यवहार म्हणतात. ५१. हेंच स्पष्ट पाहिजे असेल तर ऐक. ज्याप्रमाणें तान्ह्या मुलाची हालचाल असते, त्याप्रमाणें योगी केवळ शरीरानेंच कर्में करतात. ५२. हें पांच भूतांचें बनलेलें शरीर ज्या वेळेला झोंपलेलें असतें, त्या वेळेला ज्याप्रमाणें एकटें मनच स्वप्नांत व्यवहार करतें. ५३. अर्जुना, एक आश्चर्य पहा. या वासनेचा विस्तार केवढा आहे! ती, देहाला जागें होऊं देत नाहीं, पण सुखदुःखाचा भोग भोगविते. ५४. इंद्रियांना ज्याचा पत्ता नसतो, असें जें कर्म उत्पन्न होतें, त्यास केवळ 'मानसिक' कर्म म्हणतात, ५५. योगी तेंही कर्म करतात, पण ते त्या कर्मानें बांधले जात नाहींत; कारण त्यांनीं अहंकाराची संगति टाकलेली असते. ५६. आतां ज्याप्रमाणें भूतांचा संचार झाल्यामुळें, चित्त भ्रमाच्या स्वाधीन झाल्यावर मग, संचार झालेल्या माणसाच्या इंद्रियांच्या क्रिया अमेळ दिसतात. ५७. त्यास रूप तर दिसतें, हांका मारलेलें ऐकूं येतें, तो तोंडानें शब्दांचा उच्चारही करतो, परंतु हें सर्व केल्याची त्यास जाणीव नसते. ५८. हें राहूं दे. तो प्रयोजनावांचून जें जें कांहीं करतो, तें सर्व केवळ इंद्रियांचें कर्म आहे असें समज. ५९. मग श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, 'सर्व ठिकाणीं जाणण्याचें जें काम आहे, तें खरोखर बुद्धीचें आहे, असें ओळख. ६०. ते बुद्धीच्या प्रामुख्यानें मनःपूर्वक कर्में करतात; पण ते (कर्मयोगी) नैष्कर्म्य स्थितीस

देउनी। परी ते नैष्कर्म्यापासुनी। मुक्त दिसती ॥ ६१ ॥ जे बुद्धीचिये ठावूनि देहीं। तयां अहंकाराची सेचि नाहीं। म्हणोनि कर्मेंचि करितां पाहीं। चोखाळले ॥ ६२ ॥ अगा करितें-नवीण कर्म। तेंचि तें निष्कर्म। हें जाणती सवर्म। गुरुगम्य जें ॥ ६३ ॥ आतां शांतरसाचें भरितें। सांडीत आहे पातातें। जें बोलणें बोलापरौतें। बोलवलें ॥ ६४ ॥ एथ इंद्रियांचा पांगु। जया फिटला अाहे चांगु। तयासीचि आथि लागु। परिसावया ॥ ६५ ॥ हा असो अतिप्रसंगु। न संडीं पां कथालागु। होईल श्लोकसंगतिभंगु। म्हणऊनियां ॥ ६६ ॥ जें मना आकळितां कुवाडें। घाघुसितां बुद्धी नातुडे। तें दैवाचेनि सुरवाडें। सांगवलें तुज ॥ ६७ ॥ जें शब्दातीत स्वभावें। तें बोलींचि जरी फावे। तरी आणिकें काय करावें। सांगें कथा ॥ ६८ ॥ हा आतिवि-शेषु श्रोतयांचा। जाणोनि दास निवृत्तीचा। म्हणे संवादु तया दोघांचा। परिसोनि परिसा ॥ ६९ ॥

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् । अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबद्ध्यते ॥ १२॥

मग कृष्ण म्हणे पार्थातें। आतां प्राप्ताचें चिह्न पुरतें। सांगेन तुज निरुतें। चित्त देईं ॥ ७० ॥ तरी आत्मयोगें आथिला। जो कर्मफळांशीं विटला। तो घर रिघोनि वरिला। शांती जगीं ॥ ७१ ॥ येरु कर्मबंधें किरीटी। अभिलाषाचिया गांठी। कळासला खुंटीं। फळभोगाच्या ॥ ७२ ॥

सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्ते सुखं वशी । नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

जैसा फळाचिये हावे। ऐसें कर्म करी आघवें। मग न कीजेचि येणें भावें। उपेक्षी जो ॥ ७३ ॥ तो जयाकडे वास पाहे। तेउती सुखाची सृष्टि होये। तो म्हणे तेथ राहे। महाबोधु ॥ ७४ ॥ नवद्वारे देहीं। तो असतुचि परि नाहीं। करितुचि न करी कांहीं। फल-त्यागी ॥ ७५ ॥

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः । न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

जैसा कां सर्वेश्वरु। पाहिजे तंव निर्व्यापारु। परि तोचि रची विस्तारु। त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥ आणि कर्ता ऐसें म्हणिपे। तरी कवणें कर्मीं न शिंपे। जे हातुपावो न लिंपे। उदास-वृत्तीचा ॥ ७७ ॥ योगनिद्रा तरी न मोडे। अकर्तेपणा सळु न पडे। परी महाभूतांचें दळवाडें। उभारी भलें ॥ ७८ ॥ जगाच्या जीवीं आहे। परि कवणाचा कहीं नोहे। जगचि हें होय जाये। तो शुद्धीही नेणें ॥ ७९ ॥

नाऽऽदत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः । अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥

पापपुण्यें अशेषें। पासींचि असतु न देखे। आणि साक्षीही होऊं न ठके। येरी गोठी कायसी ॥ ८० ॥ पैं मूर्तीचेनि मेळें। तो मूर्तचि होऊनि खेळे। परि अमूर्तपण न मैळे। दादुलयाचें ॥ ८१ ॥ तो सृजी पाळी संहारी। ऐसें बोलती जें चराचरीं। तें अज्ञान गा अवधारीं। पंडुकुमरा ॥ ८२ ॥



नातरी मृगें तृषा पीडितें । संभ्रमें विसरोनी जळांतें ॥
मग तोयबुद्धी बरडीतें । टाकूनि येती ॥

— अध्याय ५ वा, ओवी १११

प्राप्त झालेल्या पुरुषापेक्षांही मुक्त दिसतात. ६१. कारण त्यांच्यामध्यें बुद्धीपासून देहापर्यंत कोठेंही अहंकाराचें स्मरणच नसतें. म्हणून अशा कर्मांचें आचरण करीत असतांही ते शुद्धच असतात असें समज. ६२. अर्जुना, कर्तेपणाचा अहंकार टाकून केलेलें जें कर्म, तेंच निष्कर्म होय; ही गुरुकडून कळणारी मर्माची गोष्ट ( प्राप्तपुरुष ) समजतात.' ६३. आतां शांतरसाचा पूर मर्यादा सोडून उचंबळत आहे; कारण बोलण्याच्या पलीकडील गोष्टीचें व्याख्यान करतां आलें. ६४. ज्यांचा इंद्रियांविषयींचा पराधीनपणा चांगल्या तऱ्हेनें नाहींसा झाला आहे, त्यांनाच हें ऐकण्याची योग्यता आहे. ६५. ( या श्रीज्ञानेश्वर-महाराज यांचे बोलण्यावर संत श्रोते म्हणतात ) ' हें विषयांतर करणें पुरे कथेचा संबंध सोडूं नकोस, कारण तसें करण्यानें श्लोकांच्या संगतीचा बिघाड होईल. ६६. जें मनानें आकलन करणें कठीण आहे, घासाघीस केली तरी बुद्धीला जें प्राप्त होत नाहीं, तें दैवाच्या अनुकूल-तेनें तुला सांगतां आलें. ६७. जें स्वभावतः शब्दाच्या पलीकडचें आहे, तें बोलण्यांत जर सांपडलें, तर इतरांचें काय प्रयोजन ? तेव्हां तूं श्रीकृष्णार्जुनसंवादाची चाललेली कथा सांग.' ६८. श्रोत्यांची अशी ही अतिशय उत्कंठा जाणून निवृत्तिनाथांचे शिष्य ( ज्ञानेश्वरमहाराज ) म्हणतात, ' कृष्ण आणि अर्जुन या दोघांत चाललेलें संभाषण एवढा वेळ ऐकलें तें लक्षांत घेऊन यापुढें ऐका ' ६९.

कर्मफलाचा त्याग करून ( कर्म करणारा ) योगी अत्यंत श्रेष्ठ अशी शांति ( मोक्ष ) मिळवितो. ( कर्म-योगाचे ठिकाणीं ) अयुक्त असलेला व फलाचे ठिकाणीं आसक्त असलेला ( मनुष्य ) कामाचे योगानें प्रेरित झाल्यामुळें बंधन पावतो. १२.

मग श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, आतां तुला कृतकृत्य झालेल्या पुरुषाचें चिन्ह संपूर्ण सांगेन, तूं चांगलें लक्ष दे. ७०. तरी ज्ञानयोगानें जो संपन्न झाला आहे, आणि ज्याला कर्मफलाचा वीट आलेला आहे, त्याला या जगांत शांति घरांत घुसून वरते. ७१. अर्जुना, त्याहून दुसरा (प्रपंची) कर्माच्या बंधामुळें अभिलाषेच्या दाव्यानें फलभोगाच्या खुंट्याला बांधला जातो. ७२.

सर्व कर्मांचा मनानें ( साक्षात् नव्हे ) संन्यास करून, जितेंद्रिय देहवान् ( पुरुष ) नवद्वाराच्या या ( देहरूपी ) नगरांत ( सर्व करूनहि ) कांहीं न करितां व न करवितां आनंदानें पडलेला असतो. १३.

फलाची इच्छा असलेल्या पुरुषाप्रमाणें तो सर्व कर्मे करतो, आणि नंतर आपल्या हातून ती गोष्ट घडलीच नाहीं, अशा अकर्तेपणाच्या समजुतीनें जो त्याविषयीं उदासीन रहातो. ७३. तो जिकडे पाहतो, तिकडे सुखमय सृष्टि होते आणि तो जेथें सांगेल तेथें महाबोध नांदतो. ७४. नऊ छिद्रांच्या देहामध्यें वागत असूनहि त्याचें देहाशीं तादात्म्य नसतें. तो फलांचा त्याग करणारा कर्मे करीत असतांनाहि ( परिणामाच्या दृष्टीनें पाहिलें असतां ) कांहींच करीत नाहीं. ७५.

विश्वाचा कर्तेपणा, कर्म अथवा कर्माचा फलाशीं संयोग यांपैकीं कांहींही सर्वेश्वर उत्पन्न करीत नाहीं. स्वभाव म्हणजे प्रकृतीच सर्व करते. १४.

ज्याप्रमाणें सर्वेश्वर जर पाहिला, तर तो वस्तुतः क्रियाशून्य असतो, परंतु तोच तिन्ही लोकांच्या विस्ताराची रचना करतो. ७६. आणि त्यास कर्ता असें म्हणावें, तर तो कोणत्याहि कर्मांत लिप्त होत नाहीं. कारण त्याच्या ठिकाणीं असणाऱ्या उदासीनतेचा कोणताहि अवयव अशुद्ध होत नाहीं. ( त्याची उदासीनता किंचित्‌हि बिघडत नाहीं. ) ७७. त्याच्या सहज स्थितीचा तर भंग होत नाहीं व त्याचा अकर्तेपणा चोळवटत नाहीं; असें असूनहि तो महाभूतांचे समुदाय चांगल्या तऱ्हेनें उत्पन्न करतो. ७८. तो जगांतील सर्व प्राण्यांना व्यापून असतो परंतु केव्हांही कोणाची आसक्ति धरीत नाहीं. हें जग उत्पन्न होतें व नाहींसें होतें, ह्याची त्यास खबरहि नसते. ७९.

ईश्वर कोणाचें पाप घेत नाहीं, पुण्य घेत नाहीं. ज्ञान अज्ञानानें आच्छादिलेलें आहे, तेणेंकरून प्राणी मोह पावतात. १५.

( प्राणिमात्राकडून होणारीं संपूर्ण ) पापपुण्यें, हीं त्याच्या अगदीं जवळ असतां, तो त्यांना जाणत नाहीं; (फार काय?) तो त्यांचा साक्षीहि होऊन रहात नाहीं, तर मग दुसरी गोष्ट कशाला बोलावयास पाहिजे ! ८०. सगुण स्वरूपाच्या संगतीनें तो सगुण होऊन क्रीडा करतो, परंतु त्या समर्थाच्या निर्गुणपणाला भ्रष्टता येत नाहीं. ८१. तो उत्पन्न करतो, पालन करतो व संहार करतो, असें त्याच्या कर्तृत्वाविषयीं सर्व लोकांत वर्णन होतें; अर्जुना, ऐक, तें केवळ अज्ञान आहे. ८२.

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः । तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मसैरें फिटे । मग अकर्तृत्व प्रगटे । ईश्वराचें ॥ ८३ ॥ एथ ईश्वरु एकु अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता । तरी तोचि मी हें स्वभावता । आदीचि आहे ॥ ८४ ॥ ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासि भेदु कैंचा त्रिजगतीं । देखे आपुलिया प्रतीती । जगचि मुक्त ॥ ८५ ॥ जैशी पूर्वदिशेच्या राउळीं । उदयाची सूर्यें दिवाळी । कीं येरींही दिशां तियेचि काळीं । काळिमा नाहीं ॥ ८६ ॥

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः । गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणा आपण । ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण अहर्निशीं ॥ ८७ ॥ ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदयातें गिंवसित आलें । तयांचि समतादृष्टि बोलें । विशेषूं काई ॥ ८८ ॥ एक आपणपेंचि पां जैसें । ते देखती विश्व तैसें । हें बोलणें कायसें । नवलु एथ ॥ ८९ ॥ परी दैव जैसें कवतिकें । कहींचि दैन्य न देखे । कां विवेकु हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ॥ ९० ॥ नातरी अंधकाराची वानी । जैसा सूर्यो न देखे स्वप्नीं । अमृत नायके कानीं । मृत्युकथा ॥ ९१ ॥ हें असो संतापु कैसा । चंद्रु न स्मरे जैसा । भूतीं भेदु नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥

मग हा मशकु हा गजु । कीं हा श्वपचु हा द्विजु । पैल इतरु हा आत्मजु । हें उरेल कें ॥ ९३ ॥ ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन । हें असो कैंचें स्वप्न । जागतया ॥ ९४ ॥ एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषम काई ॥ ९५ ॥

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥

म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म । हें संपूर्ण जाणे वर्म । समदृष्टीचें ॥ ९६ ॥ जिहीं विषय संगु न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां । परि भोगिली निःसंगता । कामेंविण ॥ ९७ ॥ जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि व्यापारें । पण सांडिलें निदसुरें । लौकिकु हें ॥ ९८ ॥ जैसा जनामाजि खेचरु । असतुचि जना नोहे गोचरु । तैसा शरीरीं तो परि संसारु । नोळखे तयांतें ॥ ९९ ॥ हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळींचि जळ लोळे । तें आणिकें म्हणती वेगळे । कल्लोळ हे ॥ १०० ॥ तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें ।

परमात्म्याच्या ज्ञानानें ज्यांचें तें अज्ञान नाश पावलें आहे, त्यांना तें ज्ञान ( सर्व वस्तूंचे ठिकाणीं ) पर जी वस्तु, तिचें सूर्याप्रमाणें प्रकाशन करतें. १६.

तें अज्ञान ज्या वेळेला संपूर्ण नाहींसें होतें, त्या वेळेला भ्रांतिरूप काजळी दूर होते आणि मग ईश्वराचें अकर्तृत्व प्रतीतीला येतें. ८३. आणि ईश्वर एक अकर्ता आहे, असें जर चित्ताला पटलें आणि मूळपासून स्वभावतः तोच (ईश्वरच) मी आहें. (तर मीही उघडच अकर्ता आहे). ८४. अशा विचारानें चित्तांत उदय केला असतां, त्याला तिन्ही लोकांत भेद कशाचा? तो आपल्या अनुभवानें सर्व जगच मुक्त आहे असें पहातो. ८५. ज्याप्रमाणें पूर्व-दिशारूप राजवाड्यांत सूर्योदयरूपी दिवाळी झाली असतां त्याच वेळेला दुसऱ्याही दिशांतील काळोख नाहींसा होतो; ८६.

त्या परब्रह्माचेच ठिकाणीं ज्यांच्या बुद्धि रंगल्या आहेत; तें परब्रह्मच ज्यांचा आत्मा आहे. (तें पर-ब्रह्मच आपण आहोंत असा ज्यांच्या बुद्धि निश्चय करतात ); त्याचेच ठिकाणीं ज्यांचा अभिनिवेश आहे ( तेंच आपण आहोंत अशी भावना ज्यांच्या बुद्धि करीत आहेत ); आणि जे तत्परायण आहेत ( त्याचाच निजध्यास ज्यांच्या बुद्धि करतात ) त्या लोकांना पुनरपि संसार प्राप्त होत नाहीं; कारण ज्ञानाच्या योगानें त्यांचे दोष नाहींसे झालेले असतात. १७.

बुद्धीच्या निश्चयानें आत्मज्ञान झालें, म्हणजे साधक आपणच आपल्याला ब्रह्मरूप मानूं लागतो, आणि आपली वृत्ति पूर्णब्रह्माकार ठेवून तो रात्रंदिवस त्याच अनुसंधानांत असतो. ८७. असें चांगलें व्यापक ज्ञान ज्यांच्या हृदयांचा तपास करीत आलें ( ज्यांना प्राप्त झालें ) त्यांची जी समताद्दष्टि होते, तिचें शब्दांनीं विशेष काय वर्णन करूं! ८८. ते जसे आपल्यालाच ब्रह्मरूप पाहतात, तसेंच ते सर्व जगाला ( ब्रह्मरूप ) पहातात, हें येथें सांगण्यांत काय मोठें आश्चर्य आहे? ८९. परंतु ज्याप्रमाणें दैव हें लीलेनें देखील केव्हांच दरिद्रतेला पहात नाहीं किंवा विचार हा ज्याप्रमाणें भ्रांतीला ओळखत नाहीं, ९०. किंवा अंधकाराचा मासला ज्याप्रमाणें सूर्याला स्वप्नांतही दिसत नाहीं किंवा अमृताचे कानावर मृत्यूची वार्ताहि येत नाहीं. ९१. हें राहूं दे; उष्णता कशी असते, हें ज्याप्रमाणें चंद्राला आठवूनही लक्षांत येणार नाहीं, त्याप्रमाणें ते ज्ञानी लोक प्राण्यांच्या ठिकाणीं भेदाला जाणत नाहींत. ९२.

विद्या व विनय यांनीं युक्त असा ब्राह्मण, गाय, हत्ती, तसेंच कुत्रा आणि चांडाल या सर्वांचे ठिकाणीं त्या ज्ञानी पुरुषांची दृष्टि सारखीच असते. १८.

मग ( त्यांचे ठिकाणीं ) हें चिलिट आणि हा हत्ती, किंवा हा चांडाळ आणि हा ब्राह्मण, किंवा हा आपला मुलगा आणि हा पलीकडे असलेला परका, हा भेद कोठून उरणार? ९३. अथवा, ही गाय आणि हें कुत्रें अथवा एक थोर आणि एक नीच ( हें कोठलें? ) हें राहूं दे. जागा असलेल्याला स्वप्न कोठून पडणार? ९४. जर अहंकार उरलेला असेल, तरच भेदाची प्रतीति होईल. तो अहंकार ( तर ) अगोदरच सर्व नाहींसा झाला, आतां भेदभाव कोठला? ९५.

( अशा ) समदृष्टीमध्यें ज्यांचें मन स्थिर झालें आहे, त्यांनीं या लोकींच संसाराला जिंकलें. कारण ब्रह्म ( सर्व भूतांचें ठिकाणीं ) सम आहे व ( विष-मतारूपी ) दोषरहित आहे; ( व ) याकरितां ते ज्ञानी पुरुष ब्रह्माचे ठिकाणीं निश्चळ ( स्थिर ) झालेले असतात. ( आणि म्हणून ते सर्वत्र सम आहेत.) १९.

म्हणून सर्व ठिकाणीं, सर्व काळ सारखें असणारें जें अद्वय ब्रह्म तेंच आपण आहों, हें जें समदृष्टीचें तत्व, तें तो संपूर्ण जाणतो. ९६. ज्यांनीं विषयाचा संबंध टाकला नाहीं आणि इंद्रियांना शासन केलें नाहीं, परंतु एक आपले ठिकाणीं इच्छा नसल्यामुळें, ज्यांनीं अलि-प्तता भोगिली; ९७ जे लोकांना अनुसरून, लोक करतात त्याप्रमाणें व्यवहार करतात, परंतु ज्यांनीं लोकांचे ठिकाणीं असणाऱ्या अज्ञानाचा त्याग केला आहे; ९८. ज्याप्रमाणें पिशाच जगांत असून जगाला दिसत नाहीं, त्याप्रमाणें तो देहधारी असूनही संसारी लोक त्याला ओळखत नाहींत. ९९. हें राहूंदे. वाऱ्याच्या संगतीनें ज्याप्रमाणें पाण्यावरच पाणी ( लाटरूपानें ) खेळतें, ( पण ) लोक त्यास, ह्या लाटा पाण्याहून वेगळ्या आहेत, असें म्हणतात. १००. त्याप्रमाणें त्याचें नाम-रूपाची गोष्ट आहे. एऱ्हवी, ज्याचें मन सर्व ठिकाणीं

मन साम्या आलें जयाचें। सर्वत्र गा ॥ १ ॥ ऐसेनि समदृष्टी जो होये। तया पुरुषा लक्षणही आहे। अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें। अच्युत म्हणे ॥ २ ॥

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाऽप्रियम्। स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

तरी मृगजळाचेनि पूरें। जैसें न लोटिजे कां गिरिवरें। तैसा शुभाशुभीं न विकरे। पातला जो ॥ ३ ॥ तोचि तो निरुता। समदृष्टि तत्त्वता। हरि म्हणे पंडूसुता। तोचि ब्रह्म ॥ ४ ॥

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम्। स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

जया आपणपें सांडूनि कहीं। इंद्रियग्रामावरी येणें नाहीं। तो विषय न सेवी हें काई। विचित्र येथ ॥ ५ ॥ सहजें स्वसुखाचेनि अपारें। सुरवाडें अंतरें। रचिला म्हणऊनि बाहिरें। पाऊल न घली ॥ ६ ॥ सांगें कुमुददळाचेनि ताटें। जो जेविला चंद्रकिरणें चोखटें। तो चकोरु काई वाळुवंटें। चुंबितु आहे ॥ ७ ॥ तैसें आत्मसुख उपाइलें। जयासि आपणपांचि फावलें। तया विषय सहज सांडवले। सांगों काई ॥ ८ ॥ एऱ्हवीं तरी कौतुकें। विचारूनि पाहें पां निकें। या विषयांचेनि सुखें। झकवती कवण ॥ ९ ॥

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते। आद्यंतवंतः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

जिहीं आपणपें नाहीं देखिलें। तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले। जैसें रंक कां आलुकैलें। तुषांतें सेवी ॥ ११० ॥ नातरी मृगें तृषापीडितें। संभ्रमें विसरोनि जळांतें। मग तोयबुद्धी बरडीते। ठाकूनि येती ॥ ११ ॥ तैसें आपणपें नाहीं दिठे। जयातें स्वसुखाचे सदा खरांटे। तयासीचि विषय हे गोमटे। आवडती ॥ १२ ॥ एऱ्हवीं विषयीं काइ सुख आहे। हें बोलणेंचि सारिखें नोहे। तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे। जगामाजीं ॥ १३ ॥ सांगें वातवर्षआतपु घरे। ऐसें अभ्रच्छायाचि जरी सरे। तरी त्रिमाळिकें धवळारें। करावीं कां ॥ १४ ॥ म्हणोनि विषय-सुख जें बोलिजे। तें नेणतां गा वायां जल्पिजे। जैसें महूर कां म्हणिजे। विषकंदातें ॥ १५ ॥ नातरी भौमा नाम मंगळु। रोहिणीतें म्हणती जळु। तैसा सुखप्रवादु बरळु। विषयिकु हा ॥ १६ ॥ हे असो आघवी बोली। सांग पां सर्पफणीची साउली। ते शीतल होईल केतुली। मूषकासी ॥ १७ ॥ जैसा आमिषकवळु पांडवा। मीनु न सेवी तंवचि बरवा। तैसा विषयसंगु आघवा। निभ्रांत जाणें ॥ १८ ॥ हें विरक्तांचिये दिठी। जैं न्याहाळिजे किरीटी। तैं पांडु-रोगाचिये पुष्टी। सारिखें दिसे ॥ १९ ॥ म्हणोनि विषयभोगीं जें सुख। तें साद्यंतचि जाण दुःख। परि काय करिती मूर्ख। न सेवितां न सरे ॥ १२० ॥ ते अंतर नेणती बापुडे। म्हणोनि अगत्य सेवणें घडे। सांगें पूयपंकींचे किडे। काय चिळसी घेती ॥ २१ ॥ तयां दुःखियां

साम्याला आलेलें आहे, तो खरोखर ब्रह्मच आहे. १०१. अशा तऱ्हेनें जो समदृष्टीनें असतो, त्या पुरुषाला लक्षण देखील आहे. अच्युत म्हणाले, अर्जुना, मी तुला तें थोडक्यांत सांगतों, त्याचा तूं विचार कर. १०२.

प्रिय वस्तूची प्राप्ति झाली असतां आनंद मानूं नये आणि अप्रिय वस्तूची प्राप्ति झाली असतां उद्वेग पावूं नये; (अशी समदृष्टि ज्यांची आहे) तेच स्थिरबुद्धि, मोहरहित, ब्रह्मज्ञ व ब्रह्माचे ठिकाणीं स्थित आहेत, (असें ओळख.) २०.

मृगजलाच्या लोंढ्यानें ज्याप्रमाणें मोठा पर्वत (किंचितही) ढकलला जात नाहीं, त्याप्रमाणें चांगल्या अथवा वाईट गोष्टी प्राप्त झाल्या असतां, ज्याच्यामध्यें विकार उत्पन्न होत नाहींत; १०३. तोच खरोखर तात्त्विकदृष्ट्या समदृष्टीचा पुरुष होय. कृष्ण म्हणाले अर्जुना, ब्रह्म तें तोच समज. १०४.

बाह्य विषयांचे ठिकाणीं ज्याचें अंतःकरण आसक्त झालेलें नाहीं, त्याला आत्म्याचे ठिकाणीं जें काय सुख आहे, तें मिळतें. तो ब्रह्माशीं समरस होऊन युक्त झालेला पुरुष अक्षय्य सुखाचा अनुभव घेतो. २१.

जो आत्मस्वरूपाला सोडून केव्हांही इंद्रियरूपी गांवांत येत नाहीं (म्हणजे इंद्रियांशीं तादात्म्य करीत नाहीं,) तो विषय सेवन करीत नाहीं, यांत आश्चर्य तें काय आहे? १०५. अपरिमित अशा स्वाभाविक असलेल्या आत्मसुखाच्या विपुलतेनें अंतःकरणांतच स्थिर झाल्यामुळें तो बाहेर पाऊल टाकीत नाहीं. (विषयांकडे प्रवृत्त होत नाहीं.) १०६. सांग, कमळाच्या पाकळीच्या पात्रावर जो शुद्ध चंद्रकिरणांचें भोजन करतो, तो चकोर पक्षी वाळवंटांतील दगड चाटीत बसेल काय? १०७. त्याप्रमाणें ज्याला स्वतःच आपल्या ठिकाणीं उत्कृष्ट आत्मसुख प्राप्त झालें, त्याला सहजच विषय सुटले, हें काय सांगावयास पाहिजे? १०८. एऱ्हवीं सहजच चांगला विचार करून पहा, या विषयांच्या सुखानें कोण फसले जातात? १०९.

(विषय व इंद्रियें) यांच्या संयोगानें उत्पन्न होणारे भोग दुःखालाच कारण होतात. त्यांना आदि आहे व अंत आहे. हे कौंतेया, ज्ञानी पुरुष त्यांचे ठिकाणीं रममाण होत नाहींत. २२

ज्याप्रमाणें भुकेलेला दरिद्री पुरुष कोंडा खातो, त्याप्रमाणें ज्यांनीं आत्मस्वरूपाचा अनुभव घेतला नाहीं, तेच या विषयांत रंगतात. ११०. अथवा तहानेनें त्रस्त झालेलीं हरणें भ्रमानें खऱ्या पाण्याला विसरून, (मृगजळाला) पाणी आहे असें समजून माळरानावरच येऊन पोहोंचतात, १११. तसेंच ज्याला आत्मस्वरूपाचा अनुभव नाहीं, (अर्थात्) ज्याचे ठिकाणीं स्वरूपानंदाचा नेहमीं पूर्ण अभाव असतो, त्यालाच हे विषय सुखरूप वाटतात. ११२. एऱ्हवीं विषयांमध्यें कांहीं सुख आहे, हें म्हणणें बोलण्यांत जमा होणारें नाहीं. नाहींतर विजेच्या चमकण्यानें जगामध्यें कां उजाडत नाहीं? ११३. सांग, वारा, पाऊस आणि ऊन यांच्यापासून बचाव करण्याचें काम जर ढगांच्या सावलीनेंच होईल, तर तीन मजल्यांचीं चुनेगची घरें करण्याचा खटाटोप कशाला? ११४. म्हणून, ज्याप्रमाणें विषाच्या कांद्याला (बचनागाला) मधुर म्हणावें, त्याप्रमाणें विषयांत सुख आहे असें जे म्हणतात, ती (विषयाचें खरें स्वरूप न जाणतांच) व्यर्थ केलेली बडबड आहे (असें समज.) ११५. किंवा पृथ्वीचा पुत्र असलेल्या ग्रहाला मंगळ असें म्हणतात, (पण त्याचा परिणाम पीडाकारक दिसून येतो,) किंवा मृगजळालाच 'जल' असें म्हणतात, त्याप्रमाणें विषयांपासून येणाऱ्या अनुभवाला 'सुख' म्हणणें व्यर्थ आहे. ११६. हें सर्व प्रतिपादन राहूं दे. तूंच सांग, सर्पाच्या फडीची सांवली आहे, ती उंदराला कितपत शांत करणारी होईल बरें? ११७. अर्जुना, ज्याप्रमाणें गळाला लावलेल्या आमिषाचा पिंड जेथपर्यंत मासा गिळीत नाहीं, तेथपर्यंतच ठीक. त्याप्रमाणें विषयांचा सर्व संग आहे, हें तूं निःसंशय समज. ११८. विरक्तांच्या नजरेनें पाहिलें तर हे विषय, अर्जुना, पंडुरोगामध्यें आलेल्या लठ्ठपणा-(सुजे) प्रमाणें (घातक) आहेत असें समज. ११९. म्हणून विषयांच्या उपभोगांमध्यें जें सुख असतें, तें प्रारंभापासून शेवटपर्यंत दुःखच आहे, हें समज; परंतु काय करतील वेडे? विषयांचें सेवन केल्याशिवाय त्यांचें चालतच नाहीं. १२०. ते बिचारे वेडे लोक त्या विषयांचें आंतलें स्वरूप जाणत नाहींत, म्हणून त्यांचेकडून विषयांचें अगत्य सेवन होतें. तूंच सांग, पुवाच्या चिखलांतील किडे पुवाची किळस घेतात काय? १२१. त्या

दुःखचि जिव्हार। ते विषयकर्दमींचे दर्दुर। ते भोगजळातें जलचर। सांडिती केवीं ॥ २२ ॥ आणि दुःखयोनि जिया आहाती। तिया निरर्थका तरी नव्हती। जरी विषयांवरी विरक्ती। धरिती जीव ॥ २३ ॥ नातरी गर्भवासादि संकट। कां जन्ममरणींचे कष्ट। हे विसांवेनवीण वाट। वाहावी कवणें ॥ २४ ॥ जरी विषयीं विषयो सांडिजेल। तरी महादोषीं कें वसिजेल। आणि संसारु हा शब्दु नव्हेल। लटिका जगीं ॥ २५ ॥ म्हणोनि अविद्याजात नाथिलें। ते तिहींचि साच दाविलें। जिहीं सुखबुद्धी घेतलें। विषयदुःख ॥ २६ ॥ या कारणें गा सुभटा। हा विचारितां विषय वोखटा। तूं झणें कहीं या वाटा। विसरोनि जाशी ॥ २७ ॥ पैं यातें विरक्त पुरुष। त्यजिती कां जैसें विष। निराशां तयां दुःख। दाविलें नावडे ॥ २८ ॥

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात्। कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

ज्ञानियांच्या हन ठायीं। यांची मातुही कीर नाहीं। देहीं देहभावो जिहीं। स्ववश केले ॥ २९ ॥ जयांतें बाह्याची भाष। नेणिजेचि निःशेष। अंतरीं सुख। एक आथि ॥ १३० ॥ परी तें वेगळेपणें भोगिजे। जैसें पक्षियें फळ चुंबिजे। तैसें नव्हे तेथ विसरिजे। भोगितेपणही ॥ ३१ ॥ भोगीं अवस्था एकी उठी। ते अहंकाराचा अचळु लोटी। मग सुखेंसि घे आंठी। गाढेपणें ॥ ३२ ॥ तिये आलिंगनमेळीं। होय आपेंआप कवळी। तेथ जळ जैसें जळीं। वेगळें न दिसे ॥ ३३ ॥ कां आकाशीं वायु हारपे। तेथ दोन्ही हे भाष लोपे। तैसें सुखचि उरे स्वरूपें। सुरतीं तिये ॥ ३४ ॥ ऐसी द्वैताची भाष जाय। मग म्हणों जरी एकचि होय। तरी तेथ साक्षी कवणु आहे। जाणतें जें ॥ ३५ ॥

योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः। स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

म्हणोनि असो हें आघवें। एथ न बोलणें काय बोलावें। ते खुणाचि पावेल स्वभावें। आत्माराम ॥ ३६ ॥ जे ऐसेनि सुखें मातले। आपणपांचि आपण गुंतले। ते मी जाणें निखळ वोतले। सामरस्याचे ॥ ३७ ॥ ते आनंदाचे अनुकार। सुखाचे अंकुर। कीं महाबोधें विहार। केले जैसे ॥ ३८ ॥ ते विवेकाचे गांव। कीं परब्रह्मींचे स्वभाव। नातरी अळंकारले अवयव। ब्रह्मविद्येचे ॥ ३९ ॥ ते सत्त्वाचे सात्त्विक। कीं चैतन्याचे आंगिक। हें बहु असो एकैक। वानिसी काई ॥ १४० ॥ तूं संतस्तवनीं रचसी। तरी कथेची से न करिसी। कीं निराळीं बोल देखसी। सनागर ॥ ४१ ॥ परि तो रसातिशयो मुकुळीं। मग ग्रंथार्थदीपु उजळीं। करीं साधु-हृदयराउळीं। मंगळ उखा ॥ ४२ ॥ ऐसा गुरूचा उवायिला। निवृत्तीदासासी पातला। मग तो

दुःखी लोकांना दुःखच जीवन होऊन राहिलेलें असतें. ते विषयरूपी चिखलांतील बेडूकच बनतात. ते विषयासक्त-लोकरूपी मासे विषयोपभोगरूपी पाण्याला कसे टाकतील? १२२. शिवाय जर हे जीव विषयांवर अनासक्त होतील तर दुःखदायक योनी ज्या आहेत, त्या सर्व निरर्थक होणार नाहींत काय? १२३. अथवा गर्भांत रहाणें वगैरे संकट किंवा जन्म आणि मरण यापासून होणारे कष्ट, हा मार्ग अविश्रांतपणें कोणी चालावा? १२४. जर विषयासक्त लोक विषय सोडून देतील, तर मोठमोठ्या दोषांस रहावयास जागा कोठें मिळणार? आणि मग या जगामध्यें 'संसार' हा शब्दच खोटा ठरणार नाहीं काय? १२५. म्हणून ज्यांनीं, विषयांपासून होणारें दुःखच, सुख या समजुतीनें स्वीकारलें, त्यांनींच मिथ्या असलेले सर्व अविद्यादिक हे खरे करून दाखविले. १२६. अर्जुना, यामुळेंच विचार करून पाहिलें, तर हे विषय वाईट आहेत. तूं विस्मरणानें कदाचित् चुकून कधींतरी त्या मार्गाला जाशील, तर जाऊं नकोस. १२७. जे विरक्त पुरुष आहेत, ते, या विषयांस, जसें कांहीं ते विषच आहेत, असें समजून त्यांचा त्याग करतात. कारण ते निरिच्छ असल्या कारणानें विषयांनीं दाखविलेलें दुःखरूपी सुख त्यांस आवडत नाहीं. १२८.

इहलोकीं, मरणाचे अगोदर जो मनुष्य काम व क्रोध यांचा वेग सहन करूं शकतो, तोच योगी व तोच सुखी होय. २३.

आत्मज्ञान्यांच्या ठिकाणीं तर, या दुःखरूप विषयांची गोष्टसुद्धां नाहीं. कारण त्यांनीं देहांत असतांनाच काम-क्रोधादि वृत्ति आपल्या स्वाधीन ठेवल्या आहेत. १२९. त्यांना अंतःकरणांत एक ब्रह्मसुख अनुभवाला आलेलें असतें, म्हणून ते बाह्य विषयाची गोष्ट मुळींच जाणत नाहींत. १३०. परंतु पक्षी जसें फळ खातो, (म्हणजे खाणारा पक्षी, खाण्याचा विषय फळ, आणि क्रिया, ही त्रिपुटी जशी स्पष्ट भासते) तसें तें ब्रह्मसुख वेगळेपणानें (भोक्ता, भोग्य व भोग ही त्रिपुटी कायम ठेवून) भोगण्यासारखें नाहीं. तर तेथें भोक्तेपणाही विसरलें पाहिजे. (म्हणजे हें भोगणें त्रिपुटीविरहित, म्हणजे तद्रूपतेचें असतें.) १३१. त्या भोगामध्यें वृत्तीची अशी एक स्थिति उत्पन्न होते, कीं ती स्थिति अहंकाराचा पडदा दूर करते आणि मग तो जीव सुखाला गाढ अलिंगन देतो. १३२. पाण्यांत पाणी मिळालें असतां जसें वेगवेगळें दिसत नाहीं, त्याप्रमाणें त्या आलिंगनाच्या संबंधांत आपणच आपल्याला मिठी मारतों, (म्हणजे आपलेंच आपल्याशीं सहज ऐक्य होतें.) १३३. अथवा आकाशांत वायूचा लय झाला म्हणजे, आकाश व वायु हे दोन आहेत, असें म्हणतां येत नाहीं, तसें या भोगामध्यें केवळ एक ब्रह्मसुखच स्वरूपानें राहतें. १३४. अशी द्वैताची गोष्टच गेली, म्हणजे मग ऐक्य होतें, असें जर म्हणावें, तर तसें ऐक्य जाणून, 'ऐक्य आहे,' असें म्हणणारा तेथें साक्षी तरी कोण उरला आहे? १३५.

जो अंतःसुखी (आत्मस्वरूप बनल्यामुळें स्वतःच सुखरूप बनलेला), अंतराराम (आत्मरूप बनून तेथेंच क्रीडा करणारा), अंतर्ज्योति (आत्म प्रकाश ज्याच्या आंत पडला आहे) असा जो योगी तो ब्रह्मरूप होऊन त्याला इहलोकींच मुक्ति प्राप्त होते. २४.

म्हणून हें मागील सगळें असूं दे. जें न बोलण्यासारखें आहे, तें काय बोलावें? जे ब्रह्मनिष्ठ आहेत, तेच हें मर्म सहज जाणतील. १३६. जे अशा सुखानें मस्त अथवा धुंद झाले आहेत, व आपल्या ठिकाणींच आपण रममाण झाले आहेत, ते पूर्णपणें साम्यरसाचे (ब्रह्मैक्य-भावाचे) ओतलेले पुतळेच आहेत, असें मी समजतों. १३७. ते आनंदाचें प्रतिबिंब किंवा सुखाचे कोंब आहेत किंवा जणूं काय महाबोधानें आपल्याला रहाण्याला मंदीर केले आहेत. १३८. ते विवेकाचें मूळ वस्तिस्थान आहेत किंवा परब्रह्माच्या ठिकाणचे स्वभाव किंवा जणूं काय मूर्तिमंत ब्रह्मविद्येचे सजविलेले अवयवच आहेत. १३९. ते शुद्ध सत्त्वाचें सात्त्विक आहेत अथवा चैतन्याचे अवयव आहेत. यावर श्रीगुरुनिवृत्तिनाथ म्हणाले, हा बोलण्याचा विस्तार पुरे. तूं एक एक कोठवर वर्णन करणार? १४०. तूं जेव्हां संतांच्या स्तुतींत तन्मय होतोस, तेव्हां चालू विषयाचें स्मरण तुला रहात नाहीं आणि विषयाला सोडून पण चांगले बोल तूं बोलतोस. १४१. परंतु हा रसाचा अधिकपणा आवरता घे; आणि आतां ग्रंथाचा अर्थरूपी दिवा प्रज्वलीत कर. तूं सज्जनांच्या अंतःकरणरूपी मंदिरांत मंगलकारक दिवसाचा प्रातःकाल कर. १४२. याप्रमाणें श्रीगुरुंचा इशारा निवृत्तीनाथांचे शिष्य ज्ञानेश्वर यांना मिळाला, मग ज्ञानेश्वर महाराज

म्हणे कृष्ण बोलिला । तेंचि आइका ॥ ४३ ॥ अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं । एकसरा तळुचि घेतला जिहीं । मग स्थिराऊनि तेही । तेंचि जाहले ॥ ४४ ॥

लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः । छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

अथवा आत्मप्रकाशें चोखें । जो आपणपेंचि विश्व देखे । तो देहेंचि परब्रह्म सुखें । मानूं येईल ॥ ४५ ॥ जें साचोकारें परम । ना तें अक्षर निःसीम । जिये गांवींचे निष्काम । अधिकारिये ॥४६॥ जें महर्षी वाटलें । विरक्तां भागा फिटलें । जें निःसंशया पिकलें । निरंतर ॥४७॥

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् । अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

जिहीं विषयापासोनि हिरतलें । चित्त आपुलें आपण जिंतिलें । ते निश्चित जेथ सुतले । चेतीचिना ॥ ४८ ॥ तें परब्रह्म निर्वाण । जें आत्मविदांचें कारण । तेंचि ते पुरुष जाण । पंडुकुमरा ॥ ४९ ॥ ते ऐसे कैसेंनि जहाले । जे देहींचि ब्रह्मत्वा आले । हें ही पुससी तरी भलें । संक्षेपें सांगों ॥ १५० ॥

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः । प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥

तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें । शरीरीं एकंदरें । केलें मन ॥ ५१ ॥ सहजें तिहीं संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवां पडे गांठी । तेथ पाठिमोरी दिठी । पालखोनियां ॥५२॥ सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम । चित्तेंसीं व्योम- । गामिये करिती ॥५३॥

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः । विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

तेथ जैसीं रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे । मग एकेक वेगळें । निवडूं नये ॥ ५४ ॥ तैसी वासनातरांची विवंचना । मग आपैसी पारुखे अर्जुना । जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥ ५५ ॥ जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूपु पटु फाटे । जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥ ५६ ॥ तैसें मनपण मुदल जाय । मग अहंभावादिक कें आहे । म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ ५७ ॥

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् । सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥

आम्हीं मागां हन सांगितलें । जे देहींचि ब्रह्मत्व पावले । ते येणें मार्गें आले । म्हणऊनियां ॥ ५८ ॥ आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर । क्रमोनि हे पार । पातले ते ॥५९॥ तिहीं आपणपें करुनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप । मग साचाचेंचि रूप । होऊनि ठेले ॥१६०॥ ऐसा योगयुक्तीचा उद्देशु । जेथ बोलिला हृषीकेशु । तेथ अर्जुनु सुदंशु । म्हणोनि चमत्कारला ॥ ६१ ॥ तें देखिलिया कृष्णें जाणितलें । मग हांसोनि पार्थातें म्हणितलें । तें काई पां चित्त उबाइलें । इये बोलीं तुझें ॥६२॥ तंव अर्जुन म्हणे देवो । परचित्तलक्षणांचा रावो । भला जाणितला

म्हणाले, श्रीकृष्ण जे म्हणाले, तेंच ऐका. १४३. अर्जुना, अमर्याद सुखाच्या डोहांत जे एकदम तळाशीं जाऊन पोहोंचले आहेत, ते मग त्याच ठिकाणीं स्थिर होऊन तद्रूपतेला प्राप्त झाले. १४४.

ज्यांचे पापादि दोष नष्ट झाले आहेत, ज्यांच्या संशयाचा छेद झाला आहे, ज्यांनीं मन ताब्यांत ठेवलें आहे आणि प्राणिमात्रांच्या हिताविषयीं जे रत आहेत, असे ऋषी मोक्ष मिळवितात. २५.

अथवा शुद्ध आत्मज्ञानानें जो, आपणच विश्व आहोंत, असें जाणतो, तो देहामध्येंच परब्रह्म आहे, असें खुशाल मानतां येईल. १४५. जें खरोखर अतिशय श्रेष्ठ आहे अथवा जें क्षयरहित व अमर्याद आहे व कामनाशून्य लोक ज्या ठिकाणची प्राप्ति करून घेण्यास अधिकारी आहेत; १४६. जें थोर ऋषींकरितांच काढून ठेवलें आहे किंवा वैराग्यवानांच्याच वांट्याला आलेलें आहे व जें नेहमीं संशयरहितास फलद्रूप होतें. १४७.

काम व क्रोध यांनीं विरहित असलेले, मन ताब्यांत ठेवणारे आणि आत्मतत्त्व जाणणारे यती येथेंच ( या देहांतच ) ब्रह्म बनतात. २६.

ज्यांनीं आपण आपलें चित्त विषयांपासून हिरावून घेऊन, आपलें स्वाधीन करून ठेवलें आहे, असे पुरुष निश्चयानें ज्या स्वरूपांत लीन झाले असतां पुनः जागे होत नाहींत ( वृत्तीवर येत नाहींत ), १४८. आत्मज्ञान्यांचें साध्य, जें मोक्षरूप परब्रह्म, तेंच ते पुरुष आहेत, असें अर्जुना, तूं समज. १४९. ( वर सांगितलेले ) जे देहधारी असतांनाच ब्रह्मभावास आले, ते, असे कशानें झाले, हेंही विचारशील तर तें आम्ही चांगलें ( पण ) थोडक्यांत सांगतों. १५०.

बाह्य विषयांना दूर करून, दोन भुवयांमध्यें दृष्टि ठेवून, नासिकेमध्यें असलेले प्राण व अपान यांना समान करून, २७.

तरी वैराग्याच्या आश्रयानें अंतःकरणांतील विषयवासना बाहेर काढून देऊन त्यांनीं मनाच्या वृत्ति शरीरामध्यें अंतर्मुखतेनें एकाग्र केल्या, १५१. इडा, पिंगळा व सुषुम्ना ह्या तिघींच्या भेटीच्या संधींत जेथें भुवयांच्या टोंकांचा मिलाफ होतो, तेथें दृष्टि स्थिर करून मागें फिरवितात, १५२. उजव्या ( पिंगळा ) व डाव्या ( इडा ) नाकपुडींतून जात येत असलेल्या वायूची गति ( रेचक व पूरक ) बंद करून ( म्हणजे कुंभक करून ), प्राण ( हृदयस्थ वायु ) व अपान ( गुदस्थ वायु ) यांची सुषुम्नेंत समगति म्हणजे ऐक्य करून, त्यासह चित्तास ते व्योमगामी ( म्हणजे मूर्ध्नी आकाशाकडे जाणारें ) करतात. १५३.

मन व बुद्धि यांचें नियमन करून, जो मुनि मोक्ष हेंच आपलें अंतिम ध्येय ठेवतो व इच्छा, भय आणि क्रोध हीं ज्याचीं नाश पावलीं आहेत, तो सर्वदा मुक्तच समजावा. २८.

तेथें, ज्याप्रमाणें रस्त्यावरून वहाणारें पाणी आपल्या पोटांत घेऊन गंगा समुद्राला मिळते, त्या वेळेला ( एक गटारांतील पाणी व एक गंगेचें पाणी अशी ) वेगवेगळी निवड करतां येत नाहीं. १५४. त्याप्रमाणें अर्जुना, ज्यावेळीं प्राणापानांच्या निरोधानें मूर्ध्न्याकाशांत मनाचा लय केला जातो, त्यावेळीं नानाप्रकारच्या वासनांची निवड सहजच थांबते. १५५. ( त्या वेळीं ) ज्या ठिकाणीं हें संसाररूप चित्र उमटतें तो मनोरूपी पडदा फाटून जातो. ज्याप्रमाणें सरोवर आटलें म्हणजे प्रतिबिंब नाहींसें होतें, १५६. त्याप्रमाणें मनाचें मनपण मुळींच नाहींसें झाल्यावर मग 'मी देह' वगैरे अहंकारादि विकार कोठें राहिले ? ( देहाहंकारादि विकार नाहींसे झाले ) म्हणून तो ब्रह्मानुभवी पुरुष देहधारी असतांनाच ब्रह्म बनतो. १५७.

यज्ञ व तप यांचा भोक्ता, सर्व लोकांचा महेश्वर व प्राणिमात्रांचा मित्र मी आहे; अशा प्रकारें जो मला जाणतो त्याला शांति प्राप्त होते. २९.

देहधारी असतांनाच ब्रह्मभावाला पावले, असें जें आम्हीं मागें सांगितलें, ते या मार्गानें आले म्हणून. १५८ आणि यमनियमांचे डोंगर व अभ्यासाचे समुद्र ओलांडून ते ह्या पलीकडच्या तीराला ( ब्रह्मत्वाला ) पोहोंचले. १५९. त्यांनीं आपणा स्वतःला शुद्ध करून प्रपंचाची योग्य किंमत केली, आणि मग सत्य पदार्थ जें ब्रह्म, तद्रूप ते होऊन राहिले. १६०. जेव्हां श्रीकृष्णांनीं योगमार्गाचा अभिप्राय अशा रीतीनें थोडक्यांत सांगितला, तेव्हां अर्जुन मर्मज्ञ असल्याकारणानें आश्चर्यचकित झाला. ( कारण त्यानें कधीं ऐकिला नाहीं, असा योगाचा हा प्रकार पहिल्यांदाच ऐकला. ) १६१. श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या मनाची ही स्थिति जाणली व मग ते हांसून अर्जुनाला म्हणाले, 'आमच्या बोलण्यानें तुझें चित्त प्रसन्न झालें का ? १६२. यावर अर्जुन म्हणाला, 'देवा,

जी भावो । मानसु माझा ॥ ६३ ॥ म्यां जें कांहीं विवरूनि पुसावें । तें आधींचि कळिलें देवें । तरी बोलिलें तेंचि सांगावें । विवळ करूनि ॥ ६४ ॥ एऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसारा । तो पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा जैसा ॥ ६५ ॥ तैसा सांख्याहूनि प्रांजळा । परी आम्हांसारिखियां अभोळां । एथ आहाति कांहीं परि काळा । तो साहों ये वर ॥६६॥ म्हणोनि एक वेळ देवा । तोचि पडताळा घेयावा । विस्तरेंल तरी सांगावा । साद्यंतुचि ॥ ६७ ॥ तंव कृष्ण म्हणती हो कां । तुज हा मार्गु गमला निका । तरी काय जाहलें ऐकीजो कां । सुखें बोलों ॥ ६८ ॥ अर्जुना तूं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वानी कायसी । सांगावयाची ॥ ६९ ॥ आधींच चित्त मायेचें । वरी मिष जाहलें पढियंतयाचें । आतां तें अद्भुतपण स्नेहाचें । कवण जाणे ॥ १७० ॥ तें म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टि । हें असो नेणिजे दृष्टी । हरीची वानूं ॥ ७१ ॥ जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली । म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥ ७२ ॥ हें बहु जें जें जल्पिजेल । तेथें कथेसि फांकु होईल । परि तें स्नेह रूपा नयेल । बोलवरी ॥ ७३ ॥ म्हणोनि विसुरा काय येणें । तो ईश्वरु आकळावा कवणें । जो आपुलें मान नेणे । आपणाचि ॥ ७४ ॥ तरी मागीला ध्वनीआंतु । मज गमला सावियाचि मोहितु । जे बलात्कारें असे म्हणतु । परिस बापा ॥ ७५ ॥ अर्जुना जेणें भेदें । तुझें कां चित्त बोधे । तैसें तैसें विनोदें । निरूपिजेल ॥ ७६ ॥ तो काइसया नाम योगु । तयाचा कवण उपेगु । अथवा अधिकारप्रसंगु । कवणा येथ ॥ ७७ ॥ ऐसें जें जें कांहीं । उक्त असे इये ठाईं । तें आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ॥ ७८ ॥ तूं चित्त देऊनि अवधारीं । ऐसें म्हणोनि श्रीहरी । बोलिजेल ते पुढारी । कथा आहे ॥ ७९ ॥ श्रीकृष्ण अर्जुनासी संगु । न सांडोनि सांगेल योगु । तो व्यक्त करूं प्रसंगु । म्हणे निवृत्तिदासु ॥ १८० ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे योगगर्भो नाम पञ्चमोऽध्यायः ।

[ ऑव्या १८०, श्लोक २९. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



आपण मनकवड्यांचे राजे आहांत. आपण माझ्या चित्तांतला अभिप्राय चांगलाच ओळखलात,' १६३. मी जें कांहीं विचार करून तुम्हांस विचारावें, तें, देवा, आपण आधींच जाणलेंत. तरी आपण जें बोललांत तेंच स्पष्ट करून सांगा. १६४. सहज विचार करून पाहिलें, तर देवा, ऐका, तुम्ही जो मार्ग दाखविला, तो पोहून जाण्यापेक्षां पाय उतारानें जाणें जसें सोपें, १६५. तसा हा ( योगमार्ग ) सांख्याहून सोपा आहे. परंतु आमच्यासारख्या दुर्बळांना येथें कांहीं विलंब लागेल, पण तो सहन करतां येईल. १६६. म्हणून देवा, एक वेळ त्याचाच अनुवाद करावा; जरी विस्तार होईल, तरी हरकत नाहीं. ( पण ) तो योगमार्ग आरंभापासून अखेरपर्यंत सांगाच. १६७. तेव्हां श्रीकृष्ण,'म्हणाले असें कां ? तुला हा मार्ग चांगला वाटतो, तर सांगायला आमची काय हरकत आहे ? ऐक, आम्ही तो आनंदानें सांगतों. १६८. अर्जुना, तूं ऐकतोस व ऐकून त्याप्रमाणें आचरण करतोस असें जर आहे, तर आम्हीच सांगावयास कां कमी करूं ? १६९. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ) अगोदरच आईचें अंतःकरण, त्यांत आवडतेपणाचें निमित्त झालें, मग त्या ममतेच्या अद्भुततेची कल्पना कोणाला येईल ? १७०. ती हरीची कृपादृष्टि करुणरसाचा वर्षावच आहे असें म्हणूं ! अथवा नव्या स्नेहाची सृष्टि आहे असें म्हणूं ! हें राहूं द्या. कृष्णाच्या त्या दृष्टीचें वर्णन कसें करावें, हें आम्हांस कळत नाहीं. १७१. ही हरीची दृष्टि ( जणूं काय ) अमृताचीच ओतलेली होती अथवा अर्जुनाविषयींचें प्रेम पिऊन मस्त झाली होती, म्हणून अर्जुनाच्या मोहांत अडकलेल्या त्या (हरीच्या) दृष्टीस बाहेर निघण्याचें कळेना. १७२. या हरीच्या दृष्टीसंबंधानें जितकी जास्त जास्त बडबड करावी, तितकी कथेची संगति सुटून या वर्णनाचा विस्तार वाढेल; परंतु ( शेवटीं ) हरीच्या अर्जुनाविषयींच्या प्रेमाचें यथार्थ वर्णन शब्दांनीं करतां येणार नाहीं तें नाहींच. १७३. यांत आश्चर्य तें काय ? कारण, जो आपलें मोजमाप आपणच जाणत नाहीं, तो ईश्वर कोणी आकलन करावा ? १७४. तर मागील बोलण्याच्या अभिप्रायावरून मला सहज असें वाटतें कीं, देव अर्जुनाच्या प्रेमरूपी मोहांत गुंतले आहेत, कारण ते अर्जुनाला बलात्कारानें ' अरे बाबा ऐक ' म्हणून म्हणत होते. १७५. अर्जुना, ज्या प्रकारानें तुझ्या चित्ताला कळेल, त्या त्या रीतीनें कौतुकानें सांगण्यांत येईल. १७६. योग हें कशाला नांव आहे ? त्याचा उपयोग काय ? अथवा त्या योगाचा अधिकार कोणाला आहे ? १७७. याप्रमाणें जें जें कांहीं या बाबतींत ( शास्त्रांत ) सांगितलेलें असेल, तें सर्वच मी तुला आतां सांगेन, पहा. १७८. तूं मन लावून ऐक. असें म्हणून श्रीहरी जे बोलले ती कथा पुढें आहे; ती सांगण्यांत येईल. १७९. अर्जुनाशीं असलेल्या सख्यांत बिघाड येऊं न देतां, श्रीकृष्ण अर्जुनाला अष्टांगयोग सांगतील, तो प्रसंग निवृत्तिनाथांचे शिष्य ( ज्ञानेश्वर महाराज ) म्हणतात मी स्पष्ट रीतीनें सांगेन. १८०.



### नाना योगविभव भांडार । उघडलें कां ॥ अ. ६—११

पांचव्या अध्यायांत ज्याचा दंश दाखविला, त्या योगाचें भगवंतांनीं केलेलें स्पष्टीकरण धृतराष्ट्राला सांगण्या-पूर्वी संजय हें ब्रह्मरसाचें बोलणें आपणांस अनायासें ऐकण्याला मिळालें म्हणून धन्य मानीत आहे. (१-९) हा सहावा अध्याय 'गीतार्थाचें सार' व 'योगविभव भांडार' आहे, असें वर्णन करून त्याचें प्रतिपादन, अमृतही ज्याच्यापुढें फिके पडेल, अशा रसभरीत अक्षरांनीं करीन व त्यामुळें श्रोत्यांच्या इंद्रियांना अपूर्व मेजवानी प्राप्त होईल व रसज्ञ श्रोत्यांना तर हातांत चिंतामणि आल्याचा आनंद होईल, अशी श्रीज्ञानदेवांनीं ग्वाही दिली आहे. (१०-२१) मात्र, या मेजवानीचा भोग येथील व स्वर्गलोकांतील सुखांना तुच्छ लेखणाऱ्या निष्काम पुरुषांनाच घडेल. (२२-३१). गीतेंतील इंद्रियें, मन व बुद्धि यांना अगोचर असणाऱ्या अरूप ब्रह्माचें मराठींत प्रतिपादन करण्याचें सामर्थ्य ज्यांच्या कृपेमुळें आपणांस प्राप्त झालें, त्या श्रीनिवृत्तिनाथांचें स्मरण करून भगवंतांनीं अर्जुनाला जें सांगितलें, त्याचा अनुवाद करण्यास सुरवात केली आहे. (३२-३८).

भगवान् म्हणतातः—एकाच गांवाला जसे दोन निरनिराळ्या मार्गांनीं जातां येतें किंवा एकाच पुरुषाला दोन निरनिराळ्या नांवांनीं हांक मारतात, तसे निष्काम कर्मयोग व सांख्ययोग हीं नांवें जरी निरनिराळीं असलीं तरी ते मार्ग एकाच ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून देणारे आहेत. खरा निष्काम कर्मयोगी हा संन्यासीही आहे. कारण संकल्पाचा संपूर्ण संन्यास हाच संन्यास व तो त्याच्या ठिकाणीं असतो. याप्रमाणें बुद्धिसंन्यस्त नसेल तर संन्याशाचीं वस्त्रें घेऊन संन्यास होऊं शकणार नाहीं. (३९-५१) ज्याला त्या उच्च स्थितीस प्राप्त व्हावयाचें असेल, त्यानें कर्माचरणापासूनच सुरुवात करून यमनियमादि अष्टांगयोगाच्या पायऱ्यांनीं गेलें पाहिजे. मग शेवटीं ब्रह्मैक्य झाल्यामुळें जेथें साध्य व साधन यांतील भेद नाहींसा होतो, अशी समाधि प्राप्त होते. (५२-६०) अशा योगारूढ पुरुषांच्या पुढें विषयांची मातब्बरी नाहींशी होते. त्यांचीं इंद्रियें जरी व्यवहार करतांना दिसलीं तरी ते अंतर्यामी क्रियाशून्यच असतात. (६१-६५) ही स्थिति एकानें दुसऱ्याला देतां येण्यासारखी नाहीं; ज्याची त्यानीं आपणच मिळवावयाची आहे. मी अमुक आहे, असें जीवाच्या ठिकाणीं होणारें स्फुरण त्यानें टाकलें, कीं त्याची सोडवणूक होते. असें न करतां देहच मी आहे म्हणून जो चिकटून राहतो, तो कोशकीटकाप्रमाणें नाश करून घेतो. मिथ्या देहाचा अभिमान संपूर्ण नाहींसा झाला म्हणजे परमात्मा कांहीं कोठून बाहेरून यावयाचा नाहीं. तोच परमात्मा आहे, असें त्याला अनुभवाला येईल. त्या अद्वैत स्थितींत सुखदुःखादि द्वंद्वें त्याचेपुढें येऊं शकत नाहींत. विश्वांतील सर्व भिन्नभिन्न आकाराचे पदार्थ एकाच परब्रह्मरुपी सोन्याचें घडले आहेत, अशी त्याला खोल दृष्टि आलेली असते. (६६-१०७)

वरील लक्षणांचें वर्णन ऐकून, आपल्या ठिकाणींही तीं लक्षणें काय केलें असतां येतील, असा उत्कट विचार अर्जुनाच्या ठिकाणीं उत्पन्न झाला; म्हणून भगवान् त्या मार्गाचें वर्णन करतात. त्याचा अनुवाद करण्यापूर्वी ज्ञानदेवांनीं श्रीकृष्णअर्जुन यांच्यांतील प्रेमाचें अत्यंत हृदयंगम वर्णन केलें आहे. (१०८—१४७).

या मार्गानें जाऊनच योगी महर्षि सिद्धावस्थेला पोचले. श्रीशंकर तर अजून या मार्गावरील पांथिक आहेत. हा मार्ग आक्रमण करीत असतांना रात्र-दिवस, तहान-भूक यांची देखील आठवण राहत नाहीं. प्रवृत्तींतून या मार्गाचा आरंभ असून निवृत्तींत त्याचा शेवट आहे. (१४८—१६०) या योगमार्गाचा अभ्यास करण्यासाठीं निवांत व रम्य स्थानाची आवश्यकता आहे. त्या ठिकाणीं पूर्वी संतांनीं वास्तव्य केलेलें असावें. ज्या ठिकाणीं गेलें असतां नास्तिक अथवा विषयी पुरुषासही उपरति उत्पन्न होईल; अशा ठिकाणीं साधकानें आसन घालून एकाग्र चित्त करून सद्गुरूंचें स्मरण करावें व अभ्यासास सुरवात करावी. (१६१—१८९). भगवंतांनीं अर्जुनाला कोणतें आसन कसें घालावें हें दंशरूपानें सांगितलें. त्याचा विस्तार श्रीज्ञानदेवांनीं श्रीनिवृत्तीनाथासारखे श्रोते

समोर बसले होते, म्हणून स्वानुभवाच्या बैठकीवरून केलेला आहे. तीन बंध देऊन कुंडलिनी जागृत करून होणाऱ्या या योगमार्गांत साधकाला कोणते अनुभव येतात, त्याची शरीरकांति सुवर्णासारखी कशी होते, अष्ट महासिद्धींची प्राप्ती झाली, तरी त्यांत तो अडकून न राहतां तो ब्रह्मैक्यस्थितीपर्यंत कसा पोहोंचतो, याचें तपशीलवार वर्णन आपणाला आढळून येतें ( १९०–३२५ ).

या मार्गाकरीता इंद्रियनिग्रह पाहिजे. इंद्रियनिग्रह म्हणजे विषय अजिबात तोडणें नसून त्याबद्दलची आसक्ति टाकून त्यांचें नियमन करणें. ज्याला हा इंद्रियनिग्रह साधला, त्याचें मन ध्यानासाठीं ताब्यांत येतें. (३२६–३५८). निर्वात स्थलीं ठेवलेल्या दिव्याप्रमाणें स्थिर झालेलें मन जेव्हां अंतर्मुख होतें, तेव्हां त्याला आपलें मूळचें स्वरूपच दिसतें व त्याचा मनपणा नाहींसा होऊन एक सुखरूप चैतन्यच उरतें. ( ३५९–३६८ ). ही स्थिति प्राप्त झाल्यावर प्रारब्धयोगेंकरून देहावर दुःखाचे डोंगर जरी कोसळले, तरी त्याला त्याची दादही नसते. ( ३६९–३७४ ). विषयवासना नाहींशा करण्यासाठीं इंद्रियनिग्रहाचे कष्ट या अभ्यासांत आहेत हें खरें. पण त्या कष्टांचा या लाडावलेल्या इंद्रियांनीं फाजील बाऊ केला आहे. जें जीवाच्या खऱ्या हिताचें आहे, तें या इंद्रियांना सदा दुःखकारकच वाटत असतें. ( ३७५–३८६ ).

भगवान म्हणतात हें सोपें म्हणून सांगितलें, तरी एका दृष्टीनें हें अवघडांतलें सोपें आहे. वास्तविक हे आपल्या पायांनीं आपल्याच पाठीवर चालण्यासारखें अशक्य आहे, म्हणून तुला दुसरा उपाय सांगतों. तो म्हणजे 'मी सर्वांच्या ठिकाणीं सारखा व्यापून राहिलों आहे,' ही खूणगांठ बांधून सर्व ठिकाणीं मलाच पहा. वस्त्रामध्यें जसा एक तंतूच असतो, अथवा भिन्न अलंकारामध्यें एक सोनेंच असतें तसे भिन्न चराचर पदार्थांत मलाच एकाला पहा म्हणजे सुखदुःख-समविषम वगैरे भेद येणार नाहींत. अशी ही साम्यस्थिति प्राप्त होणें, यापेक्षां या त्रैलोक्यांत दुसरा मोठा लाभ नाहीं ( ३८७–४१० ).

'ही साम्यस्थिति प्राप्त होण्यास मूळांत मन निश्चल असणें जरूर आहे; परंतु तें तर माकडासारखें चंचल आहे, त्याला ताब्यांत आणण्याचा प्रयत्न करावा तों तें अधिकच उसळी घेतें.' या अर्जुनाच्या शंकेला देव उत्तर देतात. 'मनाचा स्वभाव जरी चंचल असला तरी त्याची एक गोष्ट चांगली आहे. ज्या गोष्टीची त्याला गोडी लावावी, त्या ठिकाणीं तें लालचावतें. म्हणून अभ्यास व वैराग्य यांनीं आत्मसुखाची त्याला गोडी लाव म्हणजे तें हलकें हलकें ताब्यांत येईल. ( ४११–४२९ ).

अर्जुनाच्या आणखी एका शंकेचें भगवान निरसन करतात. 'साधकाच्या अंगीं पुरी योग्यता नाहीं; परंतु प्रबळ श्रद्धा आहे. त्या श्रद्धेच्या जोरावर जो ही स्थिति प्राप्त व्हावी म्हणून निघाला, परंतु अंगीं तितकी योग्यता नसल्यामुळें ती स्थिति प्राप्त होण्याच्या पूर्वीच आयुष्य संपलें. अशा स्थितींत धड प्रपंच ना धड मोक्ष. मग त्याची काय गति? अशी शंका तुला येईल तर सांगतों कीं, त्या योगभ्रष्टाची गति थांबत नाहीं. आयुष्य संपल्यावर कांहीं काल त्याला स्वर्गांत तेथील दिव्य भोग भोगावे लागतात, पण त्याला ते नको असतात. म्हणून लवकरच तो पुन्हां मृत्युलोकांत पवित्र व नीतिमान कुळांत जन्म घेतो. पूर्वजन्मीं त्याची बुद्धि अभ्यासास अनुकूल अशी तयार झालेली असल्यामुळें अगदीं लहान वयांतच गूढ अशा अध्यात्मविद्येंत त्याची बुद्धि प्रवेश करते. पुढील अभ्यास आपोआप होतो व शेवटीं समाधि ही त्याचें घर पुसत येते. ( ४३०–४७३ ) ही स्थिति प्राप्त व्हावी म्हणून कर्मनिष्ठ, ज्ञानी, तपी, भजनी, साधक आपआपल्या मार्गांनीं सतत प्रयत्न करीत असतात म्हणून या सर्वांना तो आदरणीय वाटावा हें साहजिकच आहे. खुद्द मला तो माझ्या जीवापेक्षां जास्त प्रिय आहे.' ( ४७४–४८५ )

भगवान मोठ्या प्रेमानें रसभरीत बोलत होते व तें ग्रहण करण्यास अर्जुनासारखा श्रोता त्यांना लाभला होता, यामुळें आनंदाच्या भरांत ते तसेच पुढें ( सातवा अध्याय ) बोलत राहिले. श्रीनिवृत्तिनाथांनीं माझ्यावर अनुग्रह करून मला त्या बोलण्याचा अनुवाद करण्याची योग्यता दिली, त्यांच्या कृपेमुळें तें मी सांगेन पण श्रोत्यांनीं तें मनरूपी कानांनीं ऐकावें व बुद्धिरूपी डोळ्यांनीं पहावें, म्हणजे त्यांना सुखाची लाखोली प्राप्त होईल, असें म्हणून श्रीज्ञानदेवांनीं हा अध्याय संपविला आहे. ( ४८६–९७ ).

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सहावा

मग रायातें म्हणे संजयो। तोचि अभिप्रावो अवधारिजो। कृष्ण सांगती जो। योगरूप ॥ १ ॥ सहजें ब्रह्मरसाचें पारणें। केलें अर्जुनालागीं नारायणें। कीं तेचि अवसरीं पाहुणे। पातलों आम्ही ॥ २ ॥ केसी दैवाची थोरी नेणिजे। जैसें तान्हेलिया तोय सेविजे। कीं तेंचि चवी करूनि पाहिजे। तंव अमृत आहे ॥ ३ ॥ तैसें आम्हां तुम्हां जाहलें। जें आडमुठीं तत्त्व फावलें। तंव धृतराष्ट्रें म्हाणितलें। हें न पुसों तूंतें ॥ ४ ॥ तया संजया येणें बोलें। रायाचें हृदय चोजवलें। जें अवसरीं आहे घेतलें। कुमरांचिया ॥ ५ ॥ हें जाणोनि मनीं हांसिला। म्हणे म्हातारा मोहें नाडिला। एऱ्हवीं बोलु तरी भला जाहला। अवसरीं ये ॥ ६ ॥ परि तें तैसें कैसेनि होईल। जात्यंधा कैसें पाहेल। तेवींचि येरु से घेईल। म्हणोनि बिहे ॥ ७ ॥ परि आपण चित्तीं आपुलां। निकियापरी संतोषला। जे तो संवादु फावला। कृष्णार्जुनांचा ॥ ८ ॥ तेणें आनंदाचेनि धालेपणें। साभिप्राय अंतःकरणें। आतां आदरेंसीं बोलणें। घडेल तया ॥ ९ ॥ तो गीतेमाजि षष्ठांचा। प्रसंगु असे आयणीचा। जैसा क्षीरार्णवीं अमृताचा। निवाडु जाहला ॥ १० ॥ तैसें गीतार्थाचें सार। जें विवेकसिंधूचें पार। नाना योगविभवभांडार। उघडलें कां ॥ ११ ॥ जें आदिप्रकृतीचें विसवणें। जें शब्दब्रह्मासि न बोलणें। जेथूनि गीता-वल्लीचें ठाणें। प्ररोहो पावे ॥ १२ ॥ तो अध्याय हा सहावा। वरि साहित्याचिया बरवा। सांगिजेल म्हणोनि परिसावा। चित्त देउनी ॥ १३ ॥ माझा मराठाचि बोलु कौतुकें। परि अमृतातेंही पैजासीं जिंके। ऐसी अक्षरें रसिकें। मेळवीन ॥ १४ ॥ जिये कोंवळिकेचेनि पाडें। दिसती नादींचे रंग थोडे। वेधें परिमळाचें बीक मोडे। जयाचेनि ॥ १५ ॥ ऐका रसाळपणाचिया लोभा। कीं श्रवणींचि होति जिभा। बोलें इंद्रिया लागे कळंभा। एकमेकां ॥ १६ ॥ सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा। परि रसना म्हणे हा रसु आमुचा। घ्राणासि भावो जाय परिमळाचा। हा तोचि होईल ॥ १७ ॥ नवल बोलतीये रेखेची वाहणी। देखतां डोळ्यांही पुरों लागे धणी। ते म्हणती उघडली खाणी। रूपाची हे ॥ १८ ॥ जेथ संपूर्ण पद उभारे। तेथ मनाचि धांवे बाहिरें। बोलु भुजाही आविष्करे। आलिंगावयां ॥ १९ ॥ ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं। झोंबती परि

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सहावा

मग संजय धृतराष्ट्राला म्हणाला, ' कृष्ण जो ( पांचव्यांत देश दाखविलेला ) योगरूप अभिप्राय अर्जुनाला सांगतील तो ऐका.' १. श्रीकृष्णांनीं अर्जुनास ब्रह्मज्ञानाचें पारणें ( आजपर्यंतच्या अज्ञानरूपी उपासानंतर ज्ञानामृताची मेजवानी ) केलें. त्याच समयास आम्ही सहजगत्या पाहुणे प्राप्त झालों. २. आमचें दैव किती थोर आहे हें कळत नाहीं ! ज्याप्रमाणें एखाद्या तहानेलेल्या पुरुषानें पाणी पिण्यास लागावें व पाण्याचा घोट घेऊन त्याची रुचि पहावी, तों त्यास, तें पाणी नसून अमृत आहे असें समजण्यांत यावें, ३. तसें आम्हांला व तुम्हांला झालें आहे. कारण, मिळण्याचा संभव नसतां ब्रह्मज्ञान आपणांस मिळालें आहे. तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला, आम्ही तुला ही गोष्ट विचारीत नाहीं. ४. या बोलण्यानें, त्या संजयाला, धृतराष्ट्राचें हृदय मुलांविषयींच्या स्नेहानें या वेळीं घेरलें आहे, असें कळून आलें. ५. हें लक्षांत घेऊन संजय मनांतच हांसला व आपल्याशींच म्हणाला हा म्हातारा मोहानें अगदींच बिघडून गेला आहे. येऱ्हवीं या वेळेला प्रतिपादन तर फार चांगलें झालें आहे. ६. पण तें तसें कसें होईल. ( पण धृतराष्ट्राला हें प्रतिपादन गोड कसें लागणार ? ) जन्मांधाला कसें उजाडेल ? त्याचप्रमाणें ( ही गोष्ट धृतराष्ट्रास उघड सांगितली तर ) तो मनांत रोष ठेवील म्हणून संजय उघड बोलण्यास भ्यायला. ७. पण तो मात्र आपल्याला कृष्ण व अर्जुन यांचा संवाद प्राप्त झाला म्हणून आपल्या मनांत चांगल्या प्रकारें खूष झाला. ८. त्या आनंदाच्या तृप्तीनें श्रीकृष्णाच्या बोलण्याचा अभिप्राय मनामध्यें घेऊन, तो ( संजय ) धृतराष्ट्रास आदरानें सांगता होईल. ९. तें संजयाचें बोलणें हाच गीतेंतील सहाव्या अध्यायाचा प्रसंग आहे, व तो जाणण्यास ( चांगलीच ) बुद्धि पाहिजे. ज्याप्रमाणें क्षीरसमुद्रांतून अमृताची निवड झाली, १० त्याप्रमाणें हा सहावा अध्याय गीतेच्या अर्थाचें सार आहे. हा अध्याय विचाररूपी समुद्राचा पलीकडचा किनारा आहे. अथवा हा अध्याय म्हणजे अष्टांगयोगाच्या ऐश्वर्याचें खुलें केलेलें कोठारच होय. ११. जो मूळ मायेचें विश्रांतिस्थान आहे, ज्याचें वर्णन करण्यास वेद समर्थ नाहींत व ज्यांत गीतारूपी वेलीच्या अंकुराचें स्वरूप वाढीला लागलेलें आहे, १२. असा हा सहावा अध्याय असून, त्यावर तो अलंकारानें सजवून सांगितला जाईल, म्हणून लक्ष देऊन ऐकावा. १३.माझें हें प्रतिपादन मराठी आहे खरें, परंतु तें लीलेनेंच अमृतालाही प्रतिज्ञापूर्वक जिंकील, अशा तऱ्हेची रसभरित शब्दरचना मी करीन. १४. त्या माझ्या अक्षरांच्या अरुवारपणाचे मानानें पाहिलें असतां, सुस्वरांचे निरनिराळे प्रकार कमी योग्यतेचे दिसतील व ज्या अक्षरांचा चित्ताकर्षकपणा सुवासाचें बल नाहींसें करील; १५. ऐका, रसाळपणाच्या लोभानें कानास जिभा उत्पन्न होतील व माझ्या शब्दांच्या योगानें इंद्रियांमध्यें परस्परांत भांडण लागेल. १६. सहज विचार करून पाहिलें तर शब्द हा केवळ कानांचा विषय आहे. परंतु जिव्हा म्हणेल कीं, हा शब्द माझा रसविषय आहे. नाकाला असें वाटेल कीं, या शब्दाच्या योगानें मला सुवास मिळावा, तर तो शब्दच अनुक्रमें रस व सुवास होईल. १७. या बोलण्याच्या मर्यादेची पद्धत आश्चर्यकारक आहे. ही पाहिली असतां डोळ्यांनाही तृप्ति मिळूं लागेल व ते म्हणतील, ' हें आम्हांला रूपविषयाचें कोठारच उघडलें आहे. १८. संपूर्ण पद जेथें पूर्ण होईल, तेथें त्याच्या भेटीकरितां अंतःकरण बाहेर धांव घेईल व शब्दाला आलिंगन देण्यास बाहूही पुढें सरसावतील. १९. याप्रमाणें इंद्रियें आपापल्या इच्छेप्रमाणें

तो सरिसेपणेंचि बुझावी। जैसा एकला जग चेववी। सहस्रकरु ॥२०॥ तैसें शब्दाचें व्यापकपण। देखिजे असाधारण। पाहातयां भावज्ञां फावती गुण। चिंतामणीचे ॥ २१ ॥ हें असोतु या बोलाचीं ताटें भलीं। वरी कैवल्यरसें वोगरलीं। ही प्रतिपत्ति मियां केली। निष्कामासी ॥ २२ ॥ आतां आत्मप्रभा नीच नवी। तेचि करुनि ठाणदिवी। जो इंद्रियांतें चोरुनि जेवी। तयासीचि फावे ॥ २३ ॥ येथ श्रवणाचेनि पांगें-। वीण श्रोतयां व्हावें लागे। हे मनाचेनि निजांगें। भोगिजे गा ॥२४॥ आहाच बोलाची वालीफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे। मग सुखेंसी सुरवाडिजे। सुखाचिमाजि ॥ २५ ॥ ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल। एरव्हीं आघवी गोठी होईल। मुकयाबहिरियाची ॥ २६ ॥ परी तें असो आतां आघवें। नलगे श्रोतयांतें कडसावें। जे एथ अधिकारिये स्वभावें। निष्कामकाम ॥ २७ ॥ जिहीं आत्मबोधाचिया आवडी। केली स्वर्गसंसाराची कुरोंडी। तेवांचूनि एथींची गोडी। नेणती आणिक ॥ २८ ॥ जैसा वायसीं चंद्र नोळखिजे। तैसा ग्रंथु हा प्राकृतीं नेणिजे। आणि तो हिमांशुचि जेवीं खाजें। चकोराचें ॥ २९ ॥ तैसा सज्ञानासी तरी हा ठावो। आणि अज्ञानासी आन गांवो। म्हणोनि बोलावया विषय पहाहो। विशेषें नाहीं ॥ ३० ॥ परि अनुवादला मी प्रसंगें। तें सज्जनीं उपसाहावें लागे। आतां सांगेन काय श्रीरंगें। निरोपिलें जें ॥ ३१ ॥ तें बुद्धीही कळितां सांकडें। म्हणऊनि बोलीं विपायें सांपडे। परि निवृत्तिकृपादीपउजियेडें। देखेन मी ॥ ३२ ॥ जें दिठीही न पविजे। तें दिठीविण देखिजे। जरी अतींद्रिय लाहिजे। ज्ञानबळ ॥ ३३ ॥ ना तरी धातुवादाही न जोडे। तें लोहींचि पंधरें सांपडे। जरी दैवयोगें चढे। परिसु हातां ॥ ३४ ॥ तैसी सद्गुरुकृपा होये। तरी करितां काय आपु नोहे। म्हणऊनि ते अपार मातें आहे। ज्ञानदेवो म्हणे ॥ ३५ ॥ तेणें कारणें मी बोलेन। बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परि भोगवीन। इंद्रियांकरवीं ॥ ३६ ॥

श्री भगवानुवाचः—अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः। स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥

आइका यश श्री औदार्य। ज्ञान वैराग्य ऐश्वर्य। हे साही गुणवर्य। वसती जेथ ॥ ३७ ॥ म्हणोनि तो भगवंतु। जो निःसंगाचा सांगातु। तो म्हणे पार्था दत्तचितु। होईं आतां ॥३८॥ आइकें योगी आणि संन्यासी जनीं। हे एकचि सिनाने झणीं मानीं। एऱ्हवी विचारिजती जंव दोन्ही। तंव एकचि ते ॥ ३९ ॥ सांडिजे दुजया नामाचा आभासु। तरी योगु तोचि संन्यासु। पहातां ब्रह्मीं नाहीं अवकाशु। दोहींमाजी ॥ ४० ॥ जैसें नामाचेनि अनारिसेपणें। एका पुरुषातें बोलावणें। कां दोहींमार्गीं जाणें। एकाचि ठायां ॥ ४१ ॥ नातरी एकचि उदक सहजें। परि सिनानां घटीं भरिजे। तैसें भिन्नत्व हें जाणिजे। योगसंन्यासांचें ॥ ४२ ॥ आइकें सकळ संमतें जगीं। अर्जुना गा तोचि योगी। जो कर्में करुनि रागी। नोहेचि फळीं ॥ ४३ ॥ जैसी मही हे उद्भिजें। जनी अहंबुद्धीविण सहजें। आणि तेथिंचीं तियें बीजें। अपेक्षीना ॥ ४४ ॥

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ॥



परि अवश्यक पांडवा । ऐसा ठावो जोडावा ।
तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ॥

—ज्ञानेश्वरी, अध्याय ६ – १७९.

माझ्या शब्दाला लगट करतील; पण तो शब्द सर्वांचें सारखें समाधान करील. ज्याप्रमाणें एकटाच सूर्य सर्व जगाला जागें करतो, २०. त्याप्रमाणें शब्दाचें व्यापकपण असामान्य आहे, असे समजाव. याचा विचार करून, अभिप्राय जाणणाऱ्याला यांत चिंतामणीसारखे गुण दिसून येतील. २१. हें राहूं द्या. असे शब्द हींच कोणी चांगलीं ताटें व त्यांत मोक्षरूप पक्वान्नें वाढलेलीं आहेत. अशी ही ग्रंथरचनारूपी मेजवानी मी निष्काम संतांना केली आहे. २२. आतां नित्य नवा आत्मप्रकाश हीच कोणी एक ठाणदिवी करून, जो इंद्रियांना न कळतां, उपभोग घेतो, त्यालाच ( कैवल्यरूप पक्वान्नाचा ) लाभ होतो. २३. या मेजवानीकरितां श्रोत्यांना श्रवणेंद्रियाचा पंगिस्तपणा टाकावयास पाहिजे. ही मेजवानी मनाच्या अंतर्मुखतेनें भोगावयाची आहे. २४. वरवर असलेली शब्दरूपी गवसणी काढून, आंत अर्थरूपी ब्रह्म आहे, त्याच्याशीं तद्रूप व्हावें: नंतर सुखामध्येंच सुखानें रंगून जावें. २५. याप्रमाणें चित्ताला जर सूक्ष्मपणा येईल, तर माझ्या निरूपणाचा उपयोग होईल. नाहींतर मुक्याबहिऱ्याच्या गोष्टीसारखा सर्व प्रकार होईल. २६. परंतु तें आतां सर्वच राहूं दे. श्रोत्यांची निवड करण्याची जरुरी नाहीं. कारण या विषयांत सहजच कामनाशून्य अंतःकरणाचे लोकच अधिकारी आहेत. २७. ज्यांनीं आत्मज्ञानाच्या आवडीनें, ( आत्मज्ञानावरून ) संसार व स्वर्ग हा उतारा उतरून टाकला आहे, त्या लोकांवांचून दुसरे लोक या विषयाची गोडी समजत नाहींत. २८. ज्याप्रमाणें कावळ्यांना चंद्राची ओळख नसते, त्याप्रमाणें विषयासक्त लोकांस हें प्रतिपादन समजणार नाहीं; आणि शीतल किरणांचा चंद्र, हाच ज्याप्रमाणें चकोरांचें आवडतें खाद्य आहे, २९. त्याप्रमाणें ज्ञानवानांना हा ग्रंथ भोगण्याचा विषय आहे. आणि अज्ञानांना तर हा ग्रंथ अगदी अनोळखीचें ठिकाण आहे म्हणून पहा, ह्याविषयीं फार बोलण्याचें कारण नाहीं. ३० परंतु वेळ आली म्हणून मी बोलून गेलों. तें संतांनीं क्षमा करणें उचित आहे. आतां श्रीकृष्णांनीं जें कांहीं सांगितलें तें सांगतों. ३१. तें बुद्धीला देखील आकलन करण्यास कठीण आहे, म्हणून शब्दांनीं तें क्वचितच सांगतां येईल, तरीपण माझे गुरु निवृत्तिनाथ, यांच्या कृपारूपी दिव्याच्या उजेडानें मी तें पाहीन ( व सांगेन ). ३२. जर अतींद्रिय ज्ञानाचें बळ प्राप्त होईल, तर जें दृष्टीला दिसत नाहीं, तें डोळ्यांशिवाय पाहतां येतें. ३३. दैववशात् परीस जर हाताला येईल, तर किमयेच्या योगानेंही प्राप्त न होणारें उत्तम सोनें, लोखंडांतच मिळेल. ३४. त्याप्रमाणें जर सद्गुरूची कृपा होईल,तर प्रयत्न केला असतां कोणती गोष्ट प्राप्त होणार नाहीं ! ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्यावर ती ( कृपा ) अलोट आहे. ३५. त्या सद्गुरुकृपेच्या योगानें मी व्याख्यान करीन व म्हणून माझ्या व्याख्यानांत अरूप ब्रह्माचें स्पष्ट रूप दाखवीन. आणि जरी तें ( ब्रह्म ) इंद्रियांना गोचर होण्यापलिकडचें आहे, तरी त्याचाही अनुभव इंद्रियांना येईल, असें मी करीन. ३६.

भगवान श्रीकृष्ण म्हणाले, कर्मफलाचा आश्रय न करितां, जो कर्तव्य असें कर्म करतो, तोच ( खरा ) संन्यासी व तोच योगी आहे. ( केवळ ) निरग्नि अथवा क्रियारहित मनुष्य संन्यासी अथवा योगी नव्हे. १.

ऐका, कीर्ति, लक्ष्मी, उदारता, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य हे सहा उच्च प्रतीचे गुण ज्याचे ठिकाणीं असतात, ३७. म्हणून ज्यास भगवंत असें म्हणतात व जो सर्वसंग परित्याग केलेल्यांचा सोबती आहे, तो श्रीकृष्ण म्हणाला, अर्जुना, आतां तूं पूर्ण लक्ष दे. ३८. अर्जुना, ऐक. या जगांत निष्काम कर्मयोगी आणि सांख्ययोगी हे दोन्ही एकच आहेत. ह्यांना कदाचित् तूं वेगळे मानशील, पण तसें मानूं नकोस. कारण, सहज विचार करून पाहिलें तर, हे दोन्ही एकच आहेत. ३९. नांवाच्या वेगळेपणामुळें भासणारा दुजेपणा टाकून दिला तर, योग तोच संन्यास होय. तत्वतः पाहिलें तर, ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं ह्या दोहींत अंतर रहात नाहीं. ४०. ज्याप्रमाणें वेगवेगळ्या नांवानें एकाच पुरुषाला हांक मारतात किंवा दोन रस्त्यांनीं एकच मुक्काम गांठतात; ४१. किंवा स्वभावतः पाणी तितकें एकच, परंतु तें वेगवेगळ्या घागरींतून भरावें, म्हणजे जसें तें वेगवेगळें दिसतें, त्याप्रमाणें योग व संन्यास ह्यांचा वेगवेगळेपणा फक्त दिसण्यापुरता आहे. ४२. अर्जुना, ऐक. जो कर्मांचें आचरण करून त्याच्या फलविषयीं आसक्त होत नाहीं, तोच ह्या जगामध्यें सर्वांना मान्य असलेला योगी होय. ४३. ज्याप्रमाणें पृथ्वी ही अहंकारावांचून सहजच वृक्षादिकांना जन्म देते, आणि त्यांना येणाऱ्या बीजाची ( फळाची ) अपेक्षा करीत नाहीं. ४४. तसें कुळक्रमांतील वहिवाटीप्रमाणें,

तैसा अन्वयाचेनि आधारें । जातीचेनि अनुकारें । जें जेणें अवसरें । करणें पावे ॥ ४५ ॥ तें तैसेंचि उचित करी । परी साटोपु नोहे शरीरीं । आणि बुद्धिही करोनि फळवेरीं । जायेचिना ॥ ४६ ॥ ऐसा तोचि संन्यासी । पार्था गा परियेसीं । तोचि भरंवसेनिसीं । योगीश्वरु ॥ ४७ ॥ वांचूनि उचित कर्म प्रासंगिक । तयातें म्हणे हें सांडीन बद्धक । तरी टांकोटांकीं आणिक एक । मांडीचि तो ॥४८॥ जैसा क्षाळूनियां लेपु एकु । सवेंचि लाविजे आणिकु । तैसेनि आग्रहाचा पाइकु । विचंबे वायां ॥ ४९ ॥ गृहस्थाश्रमाचें ओझें । कपाळीं आधींचि आहे सहजें । कीं तेंचि संन्याससवा ठेविजे । सरिसें पुढती ॥ ५० ॥ म्हणूनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडितां । आहे योगसुख स्वभावता । आपणपांचि ॥ ५१ ॥

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव । न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

ऐकें संन्यासी तोचि योगी । ऐसी एकवाक्यतेची जे जगीं । गुढी उभविली अनेगीं । शास्त्रांतरीं ॥ ५२ ॥ जेथ संन्यासिला संकल्पु तुटे । तेथेचि योगाचें सार भेटे । ऐसें हें अनुभवाचेनि घटें । साचें जया ॥ ५३ ॥

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते । योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

आतां योगाचळाचा निमथा । जरी ठाकावा आथि पार्था । तरी सोपाना या कर्मपथा । चुका झणीं ॥५४॥ येणें यमनियमांचेनि तळवटें । रिगे आसनाचिये पाउलवाटे । येई प्राणायामाचेनि आडकंठें । वरौता गा ॥ ५५ ॥ मग प्रत्याहाराचा आधाडा । जो बुद्धीचियाही पाया निसरडा । जेथ हटिये सांडिती होडा । कडेलग ॥ ५६ ॥ तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळे । नखी लागेल ढाळें ढाळें । वैराग्याची ॥५७॥ ऐसा पवनाचेनि पाठारें । येतां धारणेचेनि पैसारें । क्रमी ध्यानाचें चवरें । सांडे तंव ॥ ५८ ॥ मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव । जेथ साध्यसाधना खेंव । समरसें होय ॥ ५९ ॥ जेथ पुढील पैस पारुखे । मागील स्मरावें तें ठाके । ऐसिये सारिसीये भूमिके । समाधि राहे ॥ ६० ॥ येणें उपायें योगारूढु । जो निरवधि जाहला प्रौढु । तयांचिया चिन्हांचा निवाडु । सांगेन आइकें ॥ ६१ ॥

यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते । सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे ॥६२॥ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे । विषय पासींही आलिया से न रिघे । हें काय म्हणऊनि ॥ ६३ ॥ इंद्रियें कर्माचां ठायीं । वाढीनलीं परि कहीं । फळहेतूचि चाड नाहीं । अंतःकरणीं ॥ ६४ ॥ असतेनि देहें एतुला । जो चेतुचि दिसे निदेला । तोचि योगारूढु भला । वोळखें तूं ॥ ६५ ॥ तेथ अर्जुन म्हणे अनंता । हें मज विस्मो बहु आइकतां । सांगें तया ऐसी हे योग्यता । कवणें दीजे ॥ ६६ ॥

वर्णाश्रमधर्मांतील आचारांना अनुसरून, जें कर्म ज्या वेळेला (करणें) प्राप्त आहे, ४५. तें त्याप्रमाणेंच यथास्थित करतो; परंतु त्यासंबंधीं आपल्या ठिकाणीं कर्तृत्वबुद्धि घेत नाहीं, आणि बुद्धीनेंही फलापर्यंत जात नाहीं. ( फलांची इच्छा करीत नाहीं ) ४६. असा जो असेल, तोच संन्यासी होय. अर्जुना, ऐक. तोच खात्रीनें योगीराज आहे असें समज. ४७. याशिवाय नित्यनैमित्तिक कर्म करणें प्राप्त झालें, तर त्या कर्माला तो म्हणतो, हें कर्म बंधन करणारें आहे, हें मी टाकीन. पण हें कर्म टाकलें कीं, लागलीच तो दुसरें एकादें कर्म करण्याचें आरंभितोच ४८. जसा एक लेप धुवून टाकून लागलीच दुसरा लावावा, त्याप्रमाणें केवळ आग्रहाचा दास झालेला तो व्यर्थच कष्टांत पडतो. ४९. डोक्यावर अगोदरच स्वभावतः गृहस्थाश्रमाचें ओझें आहेच, तें टाकण्याकरितां संन्यास घेतला, तर त्याबरोबरच पुनः संन्यासाश्रमांतील कर्माचें ओझें तो डोक्यावर घेतो; ५०. म्हणून अग्निसेवा न टाकतां व कर्माचरणाची मर्यादा उल्लंघन न करतां, ज्ञानयोगाचें सुख आपलें ठिकाणीं सहजच मिळणारें आहे. ५१.

अर्जुना, ज्याला संन्यास असें म्हणतात, तो योग आहे असें जाण. ज्याचा ( कर्मफलविषयींचा ) संकल्प सुटला नाहीं, असा कोणीही ( मनुष्य ) योगी होत नाहीं. २

ऐक, जो संन्यासी तोच योगी आहे, अशी आपली एकवाक्यता असल्याबद्दल अनेक शास्त्रांनीं जी या जगांत ध्वजा उभारून प्रसिद्ध केलें आहे. ५२. ज्या ठिकाणीं टाकून दिलेला संकल्प अजिबात नाहींसा होतो, त्याच ठिकाणीं योगाचें सर्वस्व ( ब्रह्म ) प्राप्त होतें, असें हें ज्याला अनुभवाच्या तराजूंत खरें ठरून पटलें आहे. ( तोच संन्यासी व तोच योगी होय. ) ५३.

योग प्राप्त व्हावा अशी इच्छा करणाऱ्या मुनीला कर्म हें साधन आहे, असें सांगितलें आहे. योगप्राप्ति झाल्यानंतर त्यालाच शम हें साधन आहे, असें सांगितलें आहे. ३.

अर्जुना, आतां योगरूपी पर्वताच्या शिखरावर ज्या कोणास जाऊन पोहोंचावयाचें असेल, त्यानें या कर्ममार्गरूपी पायऱ्यांस चुकूं नये. ५४. ( कर्ममार्गानें जाणारा ) या यमनियमरूपी पायथ्यावरून आसनाच्या पायवाटेवर येतो आणि मग प्राणायामाच्या कड्यानें योगरूपी डोंगराच्या मध्यभागावर पोहोंचतो. ५५. नंतर प्रत्याहाररूपी तुटलेला कडा लागतो. त्या निसरड्या कड्यावर बुद्धीचेही पाय ठरत नाहींत. त्या प्रसंगांत हट्टयोग्यांना शेवटीं आपल्या प्रतिज्ञा सोडून द्याव्या लागतात. ५६. तरी अभ्यासाच्या बळानें, चढण्यास आधार न देणाऱ्या प्रत्याहाररूपी कड्यावर, वैराग्यरूपी नखी ( घोरपडीसारखी ) हळू हळू चिकटेल ( आणि याप्रमाणें ) चढावयास आश्रय मिळेल. ५७. याप्रमाणें प्राण व अपान या वायूंच्या वाहनावरून येऊन धारणेच्या प्रशस्त रस्त्यानें ध्यानरूपी शिखर मागें टाकीतोंपर्यंत तो चालतो. ५८. मग त्या धारणामार्गाची चाल पुरी होऊन अमुक एक गोष्ट करावयाची आहे, अशा विषयींची इच्छा बंद पडून, ज्या अवस्थेमध्यें ब्रह्मैक्य झाल्यामुळें साध्य व साधन यांतील भेद नाहींसा होतो, ५९. ज्या ठिकाणीं पुढील प्रवृत्ति बंद पडून मागील कशाचेंही स्मरण होत नाहीं, अशा या ऐक्याच्या भूमिकेवर समाधि रहाते. ६०. या उपायांनीं जो योगनिष्णात अखंड परिपूर्ण झाला, त्याचीं चिन्हें तुला स्पष्ट तऱ्हेनें सांगतों ऐक ६१.

विषयांचे ठिकाणीं आणि कर्मांचे ठिकाणीं जेव्हां आसक्त होत नाहीं, आणि जेव्हां सर्व (कर्मफलाच्या ) इच्छेचा त्याग करतो, तेव्हां त्याला योगारूढ असें म्हणतात ४

तरी ज्याच्या इंद्रियरूपी घरांत विषयांचें येणें जाणें होत नाहीं आणि जो आत्मज्ञानरूपी विश्रांतीच्या खोलींत स्वस्थ पडलेला असतो; ६२ ज्याच्या मनाला सुखदुःखांनीं स्वतः धक्के दिले असतांना तें जागें होत नाहीं, विषय अगदीं जवळ आले तरी, हें काय आहे, म्हणून ज्याला स्मरणच होत नाहीं; ६३. ज्याचीं इंद्रियें कर्में करीत आलीं परंतु ज्याच्या अंतःकरणांत फलाची इच्छा कधींही उत्पन्न झाली नाहीं; ६४ जो देहधारी असून वरीलप्रमाणें असतो व जो जागृतीप्रमाणें सर्व व्यवहार करीत असूनही निद्रिस्ताप्रमाणें क्रियाशून्य दिसतो, तोच उत्तम प्रतीचा योगनिष्णात आहे, असें तूं समज. ६५ त्या वेळीं अर्जुन म्हणाला, कृष्णा, तुझें हें बोलणें ऐकून मला फार आश्चर्य वाटतें. सांग, त्याला अशी ही योग्यता कोण देतो ! ६६.

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

तंव हांसोनि कृष्ण म्हणे । तुझें नवल ना हें बोलणें । कवणासि काय दिजेल कवणें । येथ अद्वैतीं इये ॥६७॥ पैं व्यामोहाचिया शेजे । बळिया अविद्या निद्रित होईजे । ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ॥ ६८ ॥ पाठीं अवसांत ये चेवो । तैं तें अवघेंचि होय वावो । ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोहि आपणपांचि ॥ ६९ ॥ म्हणऊनि आपणचि आपणपेया । घातु कीजतु असे धनंजया । चित्त देऊनि नाथिलिया । देहाभिमाना ॥ ७० ॥

बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः । अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

हा विचारूनि अहंकारु सांडिजे । मग असतीच वस्तु होईजे । तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली ॥७१॥ एऱ्हवीं कोशकीटकाचिया परी । तो आपणपया आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं ॥७२॥ कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा अंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥७३॥ कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंदु अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥ ७४ ॥ एऱ्हवीं होय तें तोचि आहे । परि काइ कीजे बुद्धि तैशी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥ ७५ ॥ जैसी ते शुकाचेनि आंगभारें । नळिका भोविन्नली एरी मोहरे । तरी तेणें उडावें परि न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥ वायांचि मान पिळी । अडुवें हियें आवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥ म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥ ७८ ॥ ऐसा काजेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधला । मग नोसंडी जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥ म्हणऊनि आपणपया आपणचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु । येर स्वयंबुद्धी म्हणे बापु । जो नाथिलें नेघे ॥ ८० ॥

जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः । शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता । परमात्मा परौता । दूरी नाहीं ॥ ८१ ॥ जैसा किडाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥ ८२ ॥ हा घटाकारु जैसा । निमालिया तया अवकाशा । नलगे मिळों जाणें आकाशा । आना ठाया ॥८३॥ तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ॥ ८४ ॥ आतां शीतोष्णाचिया वाहणी । तेथ सुखदुःखाची कडसणी । इयें न समाती कांहीं बोलणीं । मानापमानाचीं ॥ ८५ ॥ जे जया वाटा सूर्यु जाये । तेउतें तेजाचें विश्व होये । तैसें

आपला आपण उद्धार करावा, अवनति करूं नये. आपण स्वतःच स्वतःचे मित्र आहोंत, स्वतःच स्वतःचे शत्रु आहोंत. ५.

तेव्हां कृष्ण हांसून म्हणाले, 'तुझें हें बोलणें आश्चर्यकारक नव्हे काय? या अद्वैतामध्यें येथें कोणाला कोणी काय द्यावयाचें आहे? ६७. अविवेकरूपी अंथरूणावर प्रबळ अविद्येच्या योगानें (ज्या वेळेला जीव) निजतो, त्या वेळेला हें जन्ममरणरूपी वाईट स्वप्न तो अनुभवितो. ६८. नंतर ज्या वेळेला अकस्मात् जागृति येते, त्या वेळेला तें स्वप्न वगैरे सर्वच व्यर्थ होतें. अशा प्रकारचा आपल्या नित्य अस्तित्वाचा जो सहज प्रत्यय येतो, तोही आपल्याच ठिकाणीं आपल्याला येतो ६९. म्हणून अर्जुना, मिथ्या जो देहाभिमान, त्याकडे चित्त देऊन (देहच मी आहे असें चित्तानें मानून) आपणच आपला घात करतो. ७०.

ज्यानें स्वतः स्वतःला जिंकलें (म्हणजे आपल्या आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेतली) तो स्वतः स्वतःचा मित्र होय. ज्याचा स्वतःवर ताबा नाहीं (ज्यानें आपल्या आत्मरूपतेस जाणलें नाहीं) तो स्वतः (स्वतःचेच ठिकाणीं) शत्रुप्रमाणें शत्रुत्वानें वर्तन करतो. ६.

विचार करून हा अहंकार टाकावा आणि मग असलेलें आपलें स्वरूप ओळखून ब्रह्मरूप व्हावें, म्हणजे आपण आपलें कल्याण केल्यासारखें सहजच होईल. ७१ नाहींतर, जो शरीर हेंच उत्तम ठिकाण समजून, तेथें आत्मबुद्धि ठेवतो, तो कोसल्याप्रमाणें आपला आपणच शत्रु होतो. ७२. ऐन लाभाच्या वेळेला करंट्याला आंधळेपणाचे डोहाळे कसे होतात पहा! तो आपले असलेले डोळे आपणच झांकून घेतो. ७३. किंवा कोणी एक (मनुष्य) वेड लागल्यामुळें, पूर्वीचा जो मी, तो मी आतां नाहीं, मी चोरला गेलों, असें म्हणतो. (आणि) आपल्या मनांत असा नसताच आग्रह घेऊन बसतो. ७४. खरा विचार करून पाहिलें तर, हल्लीं तो जो आहे, तो पूर्वीचाच आहे; पण काय करावें? त्याच्या बुद्धीला तसें वाटत नाहीं. पहा, स्वप्नांतील तरवारीच्या घारानें कोणी खरोखर मरतो काय? ७५. (पोपटाला धरण्याकरतां बांधलेल्या नळीवर पोपट बसल्यामुळें) जेव्हां पोपटाच्या शरीराच्या वजनानें ती नळिका उलट बाजूला फिरते, तेव्हां त्यानें वास्तविक तेथून उडून जावें; परंतु (ही नळी सोडली तर आपण पडूं व मरूं, या) त्याच्या मनांतील शंकेचें समाधान होत नाहीं; ७६. मग व्यर्थच मान इकडे तिकडे करतो व संकोचलेल्या छातीनें नळीला आवळीत (ती नळी) चवड्यांत धरून राहतो. ७७. मग मनांत म्हणतो कीं, मी खरोखर बांधला गेलों आहे; अशा (या) कल्पनेच्या खोड्यांत सांपडतो आणि मग मोकळा असलेला आपल्या पायांचा चवडा अधिकच गुंतवितो. ७८. याप्रमाणें विनाकारण अडकलेल्या त्या पोपटाला दुसऱ्यानें कोणी बांधलें आहे काय? अशा स्थितींत त्याला ओढून, अर्धा तोडून जरी नेला, तरी तो कांहीं केल्या नळी सोडीत नाहीं. ७९. म्हणून ज्यानें आपला संकल्प (देहाभिमान) वाढविला आहे, तो आपला आपणच शत्रु होय. श्रीकृष्ण म्हणतात, दुसरा, जो खोट्याचा (मिथ्या देहाचा) अभिमान घेत नाहीं, तो आत्मज्ञानी म्हणावा. ८०.

ज्यानें आपलें मन जिंकलें आहे व जो अत्यंत शांत आहे, त्याचे ठिकाणीं आत्मा हा आत्मभावानें राहतो. (तो अनुभवानें परमात्मरूप बनतो). शीत अथवा उष्ण, सुख अथवा दुःख, मान अथवा अपमान, यांचे ठिकाणीं तो शान्त (निश्चल) असतो. ७.

अशा त्या पुरुषानें आपलें अंतःकरण जिंकल्यामुळें व त्याच्या सर्व इच्छा निवृत्त झाल्यामुळें, त्याला परमात्मा कोठें पलीकडे लांब नाहीं. ८१. ज्याप्रमाणें हिणकस सोन्यांतून मिसळलेल्या धातूचा दोष निघाला, तर तेंच शंभर नंबरी सोनें होतें, त्याप्रमाणें अहंकाराचा नायनाट झाला असतां जीवाला ब्रह्मत्व ठेवलेलेंच आहे. ८२. (घट फुटून) हा घटाचा आकार नाहींसा झाला असतां, त्यांतील पोकळीस आकाशांत मिळण्याकरितां ज्याप्रमाणें दुसऱ्या ठिकाणीं जावें लागत नाहीं. ८३. त्याप्रमाणें, ज्याचा हा मिथ्या देहाहंकार कारणांसह नाहींसा झाला आहे, तो मूळचाच सर्वत्र भरलेला परमात्मा आहे. ८४. आतां थंड व उष्ण असे प्रकार, किंवा हें सुख व हें दुःख अशी निवड, तसेंच हा मान व हा अपमान अशी समजूत, ह्या गोष्टी त्या पुरुषाच्या ठिकाणीं मुळींच संभवत नाहींत. ८५. कारण कीं, सूर्य ज्या मार्गानें जातो, तितका जगाचा

तया पावे तें आहे । तोचि म्हणउनी ॥ ८६ ॥ देखें मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा । तैशीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें ॥ ८७ ॥

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः । युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ॥ ८ ॥

जो हा विज्ञानात्मकु भावो । तया विवरितां जाहला वावो । मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ॥ ८८ ॥ आतां व्यापकु कीं एकदेशी । हे ऊहापोही जे ऐसी । ते करावी ठेली आपैशी । दुजेनवीण ॥ ८९ ॥ ऐसा शरीरीचि परि कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुके । जेणें जिंतलीं एकें । इंद्रियें गा ॥ ९० ॥ तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्तु म्हणिजे । जेणें सानें थोर नेणिजे । कवणे काळीं ॥ ९१ ॥ देखें सोनियाचें निखळ । मेरुयेसणें ढिसाळ । आणि मातियेचें डिखळ । सरिसेंचि मानी ॥ ९२ ॥ पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें । देखे दगडाचेनि पाडें । निचाडु ऐसा ॥ ९३ ॥

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु । साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

तेथ सुहृद आणि शत्रु । कां उदासु आणि मित्रु । हा भावभेदु विचित्रु । कल्पूं कैंचा ॥ ९४ ॥ तया बंधु कोण काह्माचा । द्वेषिया कवणु तयाचा । मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ॥ ९५ ॥ मग तयाचिये दिठी । अधमोत्तम असे किरीटी । काय परिसाचिया कसवटी । वानिया कीजे ॥ ९६ ॥ ते जैशी निर्वाण वर्णुचि करी । तैशी जयाची बुद्धि चराचरीं । होय साम्याची उजरी । निरंतर ॥ ९७ ॥ जे ते विश्वाळंकाराचे विसुरे । जरी आहाती आनानें आकारें । तरी घडले एकेंचि भांगारें । परब्रह्में ॥ ९८ ॥ ऐसें जाणणें जें बरवें । तें फावलें तया आघवें । म्हणोनि आहाचवाहाचे न झकवे । येणें आकाराचित्रें ॥ ९९ ॥ घापे पटामाजीं दृष्टी । दिसे तंतूंची सैंघ सृष्टी । परि तो एकवांचूनि गोठी । दुजी नाहीं ॥ १०० ॥ ऐसेनि प्रतीती हे गवसे । ऐसा अनुभव जयातें असे । तोचि समबुद्धि हें अनारिसें । नव्हे जाणें ॥ १ ॥ जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो । जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासी ॥ २ ॥ जयाचेनि बोलें धर्म्मु जिये । दिठी महासिद्धीतें विये । देखें स्वर्गसुखादि इयें । खेळु जयाचा ॥ ३ ॥ विपायें जरी आठवलें चित्ता । तरी दे आपुली योग्यता । हें असो तयातें प्रशंसितां । लाभु आथि ॥ ४ ॥ पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें । मग आपणपांचि आपण असे । अखंडित ॥ ५ ॥

योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः । एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो एकाकी । सहजें अपरिग्रही जे तिहीं लोकीं । तोचि म्हणऊनि ॥ ६ ॥ ऐसियें असाधारणें । निष्पन्नाचीं लक्षणें । आपुलेनि बहुवसपणें । कृष्ण म्हणे

भाग प्रकाशित होतो. त्याप्रमाणें त्याला जें जें प्राप्त होईल, तें त्याचेंच स्वरूप आहे म्हणून ( वर सांगितलेलीं द्वंद्वें त्याच्या ठिकाणीं संभवत नाहींत. ) ८६. पहा, मेघापासून ज्या पावसाच्या धारा पडतात, त्या ज्याप्रमाणें समुद्राला टोंचत नाहींत, त्याप्रमाणें शुभाशुभें, हीं योगेश्वराच्या आत्म-स्वरूपाहून भिन्न नसल्यामुळें, त्यास तीं द्वंद्वें प्रतीत होत नाहींत. ८७.

ज्ञान आणि विज्ञान यांच्या अनुभवानें ज्याचें चित्त समाधान पावलें आहे, ( कारण विज्ञानाच्या निरासांत खाली राहिलेलें जें ज्ञान, तद्रूपच तो बन-लेला आहे, ) जो निश्चल आहे, जितेंद्रिय आहे, मातीचें ढेंकूळ, दगड अथवा सुवर्ण यांचे ठिकाणीं ज्याची दृष्टि समान आहे, जो ( अशा गुणांनीं ) युक्त आहे, त्याला योगी म्हणतात. ८.

अनुभवाला येणारें जें हें दृश्य जगत त्याचा विचार करतां, तें त्याच्या दृष्टीनें मिथ्या ठरलें; व मग आपण कोण आहों, असें जेव्हां तो पहावयास लागला, तेव्हां ज्ञान तेंच आपण आहोंत, असें त्यास कळलें. ८८. आतां द्वैत नसल्यामुळें ( मी ) व्यापक आहे किंवा मर्या-दित आहे, अशी वाटाघाट करण्याचें ( त्याच्या ठिकाणीं ) सहजच थांबतें. ८९ अशा रीतीनें ज्या कोणी एकानें आपलीं इंद्रियें जिंकलीं आहेत, तो देहधारीच असतो, परंतु सहजच तो परब्रह्माच्या बरोबरीचा ठरतो. ९० तो सहजच जितेंद्रिय आहे आणि त्यालाच योगयुक्त म्हणावें व त्याला लहान–थोर असा भेद कोणत्याच वेळेला प्रतीत होत नाहीं. ९१. पहा, शुद्ध सोन्याचा मेरुपर्वताएवढा प्रचंड ढीग आणि मातीचें ढेंकूळ ( तो ) सारखेंच मानतो. ९२. पहावयास गेलें तर, पृथ्वीची किंमत ही कांहीं नाहीं, असें शुद्ध अमूल्य रत्न, ( पण तो तें ) दगडासारखेंच मानतो; असा तो निरिच्छ असतो. ९३

हितचिंतक, मित्र, शत्रु, उदासीन, मध्यस्थ ( दोन्ही पक्षांचें हित इच्छिणारा ), अप्रिय, नातलग, सज्जन, पापी या सर्वांचे ठिकाणीं समबुद्धि असलेला योगी सर्वांमध्यें श्रेष्ठ होय. ९.

त्याचे ठिकाणीं हितचिंतक व शत्रु किंवा उदास आणि मित्र, अशा तऱ्हेच्या वेगवेगळ्या वृत्तींची कल्पना कोठून करावी ? ९४. मीच विश्व आहे, अशी प्रतीति ज्यास झाली आहे, त्याला नातलग कोण आणि कशाचा ? व त्याला वैरी तरी कोण ? ९५. मग त्याच्या दृष्टीनें, अर्जुना, वाईट-चांगलें असेल काय ? परिसाच्या कसवटीवर घासलें असतां सोन्यांत निरनिराळे प्रकार करतां येतील काय ? ९६. ती परिसाची कसवटी ज्या-प्रमाणें त्यास उत्तम रंगाचेंच ( सोनें ) करते, त्याप्रमाणें त्याच्या बुद्धिमध्यें चराचराविषयींच्या समतेचा निरंतर उदय होतो. ९७. कारण विश्वांतील प्राणीरूप अलं-काराचे समुदाय जरी निरनिराळ्या आकाराचे आहेत, तरी ते एक परब्रह्मरूप सोन्याचेच बनलेले आहेत; ९८ असें जें उत्तम ज्ञान, तें त्याला सर्व प्राप्त झालें, म्हणून तो वरवरच्या या नानाप्रकारच्या आकारांनीं फसत नाहीं. ९९. वस्त्रावर दृष्टि टाकली असतां, त्या वस्त्रामध्यें ( जिकडे तिकडे अनेक ) तंतूंचीच रचना दिसते; तरीही पण त्या वस्त्रांत एक सुतावांचून दुसरी गोष्टच नाहीं. १०० अशा या तंतुपटन्यायानें, हा वर सांगितलेला अनुभव येतो व असा ज्याचा अनुभव आहे, तोच समबुद्धि होय; यांत अन्यथा नाहीं असें समज. १०१. ज्याचें नांव तीर्थराज आहे व ज्याचें दर्शन झालें असतां समाधान होतें व ज्याच्या संगतीनें भ्रमलेल्यास ब्रह्मता मिळते, १०२. ज्याच्या बोलण्यानें धर्म जगतो, ज्याची कृपा मोठाल्या सिद्धीला उत्पन्न करते, पहा स्वर्गसुखा-दिक हीं ज्याचा खेळ आहेत, स्वर्गसुखादिक देणें हा ज्याच्या हातचा मळ आहे. १०३. अशा पुरुषाचें नांव मनाला जरी सहज आठवलें तरी तो आपली योग्यता देतो; हें राहूं दे. त्याची स्तुति केली असतां हित आहे. १०४. पुन्हा मावळणार नाहीं, अशा ऐक्यरूपी दिवसानें ज्यास उजाडलें आहे व जो मग निरंतर आपण आपल्या ठिकाणींच ( स्वात्मसुखांत निमग्न ) असतो, १०५.

अंतःकरण व देह यांचें संयमन करून, निरिच्छ बनून, ( अद्वैतानुभवावर आल्यामुळें ) एकाकी व ( अर्थात ) अपरिग्रह झालेला योगी एकांतांत नेहमीं आत्मानुभवांत तल्लीन असतो. ( तो आत्मरूप बनलेला एकाकी सहजच अपरिग्रही असतो ). १०.

अशा दृष्टीनें जो विचारयुक्त आहे, अर्जुना, तो अद्वि-तीय आहे. कारण तिन्ही लोकांत तोच आहे; म्हणून तो सहजच परिग्रहशून्य असतो. १०६. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ) अशीं प्राप्त पुरुषाचीं लोकोत्तर लक्षणें

॥ ७ ॥ तो ज्ञानियांचा बापु । देखणेयांचे दिठीचा दीपु । जया दादुलयाचा संकल्पु । विश्व रची ॥ ८ ॥ प्रणवाचिये पेठे । जाहलें शब्दब्रह्म माजिठें । तें जयाचिये यशा धाकुटें । वेढूं न पुरे ॥ ९ ॥ जयाचेनि आंगिकें तेजें । आवो रविशशीचिये वाणिजे । म्हणऊनि जग हें वेसजे-बीण असे तया ॥ ११० ॥ हां गा नांवाचि एक जयाचें । पाहतां गगनही दिसे टांचें । गुण एकैक काय तयाचे । कळिशील तूं ॥ ११ ॥ म्हणोनि असो हें वानणें । सांगों नेणों कवणाचीं लक्षणें । दावावीं मिषें येणें । कां बोलिलों तें ॥ १२ ॥ ऐकें द्वैताचा ठावोचि फेडी । ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी । तरि अर्जुनु पढिये हे गोडी । नासेल हन ॥ १३ ॥ म्हणोनि तें तैसें बोलणें । नव्हे सपातळ आड लावणें । केलें मनाचि वेगळवाणें । भोगावया ॥१४॥ जया सोहं-भाव हा अटकु । मोक्षसुखालागोनि रंकु । तयाचिये दिठीचा झणें कळंकु । लागेल तुझिया प्रेमा ॥ १५ ॥ विपायें अहंभाव ययाचा जाईल । मी तोंचि हा जरी होईल । तरि मग काय कीजेल । एकलेया ॥ १६ ॥ दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे । नातरी दाटूनि खेंव दीजे । ऐसें कोण आहे ॥ १७ ॥ आपुलिया मना बरवी । असमाई गोठी जीवीं । ते कवणेंसि चावळावी । जरी ऐक्य जाहलें ॥ १८ ॥ इया काकुळती जनार्दनें । अन्यो-पदेशाचेनि हातासनें । बोलामाजीं मन मनें । आलिंगूं सरलें ॥ १९ ॥ हें परिसतां जरी कानडें । तरी जाण पां पार्थ उघडें । कृष्णसुखाचोंचि रूपडें । वोतलें गा ॥ १२० ॥ हे असो वयसेचिये शेवटीं । जैसें एकचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी । नाचों लागे ॥ २१ ॥ तैसें जाहलें अनंता । ऐसें तरि मी न म्हणतां । जरी तयाचा न देखतां । आतिशयो एथ ॥ २२ ॥ पाहा पां नवल कैसें चोज । कें उपदेशु केउतें झुंज । परि पुढें वालभाचें भोज । नाचत असे ॥ २३ ॥ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें आणि न भुलवी । तरी तोंचि काइ ॥ २४ ॥ म्हणऊनि भावार्थु तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुवासा । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पणु तो ॥ २५ ॥ यापरी बाप पुण्यपवित्र । जगीं भक्ति-बीजासि सुक्षेत्र । तो कृष्णकृपे पात्र । याचिलागीं ॥ २६ ॥ हो कां आत्मनिवेदनातळींची । जे पीठिका आहे सख्याची । पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा ॥ २७ ॥ पार्सींचि गोसावी वर न वानिजे । मग पाइकाचा गुण घेईजे । ऐसा अर्जुनुचि तो सहजें । पढिये हरी ॥ २८ ॥ पाहा पां अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे । ते पतीहीहूनि काय न वर्णिजे । पतिव्रता ॥ २९ ॥ तैसा अर्जुनुचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा । जे तो

कृष्ण आपल्या सर्वज्ञतेनें सांगतात. १०७ जो ( श्रीकृष्ण ) ज्ञान्यांचा वडील आहे, सर्व पाहणाऱ्यांच्या दृष्टीचा जो प्रकाशक आहे व ज्या समर्थाचा संकल्प विश्वाची उभारणी करतो १०८. ओंकाराच्या पेठेंत तयार झालेलें वेदरूपी वस्त्र, तें ज्याच्या सहा गुणांपैकीं एक जें यश, त्या यशाला अपुरें असल्यामुळें वेढूं शकलें नाहीं. ( वेदाकडून ज्या श्रीकृष्णाच्या यशाचें सुद्धां संपूर्ण वर्णन झालें नाहीं ) १०९. ज्याच्या ( श्रीकृष्णाच्या ) अंगांतील तेजानें सूर्यचंद्रांच्या व्यापाराला जोर आहे, तर मग जग हें त्याच्यावांचून प्रकाशित आहे काय ? ११० ( ज्ञानेश्वर महाराज आपल्या मनाला म्हणतात, हे मना ) ज्या भगवंताच्या नामाचें माहात्म्य पाहिलें असतां त्याच्यापुढें आकाशही कमी दिसतें, त्या भगवंताचे एक एक गुण तूं कसे जाणशील ? १११. म्हणून हें वर्णन करणें पुरे. 'या ( संतांचीं ) लक्षणें सांगण्याच्या निमित्तानें देवानें कोणाचीं लक्षणें सांगितलीं व तीं कां सांगितलीं हें मला सांगतां येत नाहीं. ११२. ( पण मला असें वाटतें, ) ऐक, द्वैताचा ठावठिकाण नाहींसा करणारें असें जें आत्मज्ञान, तें उघड उघड व्यक्त केलें तर, अर्जुन मला आवडतो ही प्रेमाची गोडी खरोखर नाहींशी होईल ११३. म्हणून भगवंत तसें बोलले नाहींत. ( म्हणजे भगवंतांनीं अर्जुनास, तें ब्रह्म तूं आहेस, असा महावाक्याचा स्पष्ट बोध केला नाहीं ) परंतु मध्यें अगदीं बारीक असा पडदा ठेविला. ( म्हणजे साधूच्या अद्वैतस्थितीच्या वर्णनानें अप्रत्यक्ष रीतीनें महावाक्याचाच बोध केला व अशा रीतीनें देव भक्त यांचीं ) मनें प्रेमसुख भोगण्याकरितां वेगळीं ठेविलीं ११४. जे 'मी ब्रह्म आहें' अशा बोधांत अडकले आहेत व जे मोक्षसुखाकरितां दीन झाले आहेत अशांच्या ( मुमुक्षूंच्या ) दृष्टीचा काळिमा तुझ्या प्रेमाला कदाचित् लागेल. ११५. कदाचित् याचा मीपणा जाईल आणि हा जर मीच होईल, तर मग मी एकट्यानें काय करावें ? ११६. दृष्टीनेंच पाहून शांत व्हावें किंवा तोंड भरून बोलावें अथवा कडकडून आलिंगन द्यावें असें ( दुसरें ) कोण आहे ? ११७. जी गोष्ट आपल्या मनाला चांगली वाटते आणि जी जिवांत मावत नाहीं ( म्हणजे कोणाला तरी सांगावी असें वाटतें ) अशी गोष्ट, जर अर्जुनाचें आपणाचीं ऐक्य झालें तर, कोणास सांगावी ? ११८. याप्रमाणें भगवंतांनीं आपल्याविषयींची करुणा आपल्या मनांत घेऊन, अन्योपदेशाच्या हातवटीनें ( साधूंच्या वर्णनानें ) बोलण्यामध्यें, श्रीकृष्णांनीं अर्जुनाचें अर्जुनत्व कायम ठेवून आपल्या मनानें अर्जुनाच्या मनास आलिंगन दिलें. ११९. हें ऐकण्यास जरी अवघड वाटलें, तरी ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, माझ्या मना, ) तूं असें समज कीं अर्जुन हा श्रीकृष्णाच्या सुखाचीच ओतलेली उघड मूर्ति आहे. १२०. हें राहूं द्या. ज्याप्रमाणें वयाच्या शेवटीं ( अगदीं म्हातारपणीं ) एखाद्या वांझ स्त्रीला एकुलतें एक मूल झालें असतां त्या स्त्रीच्या रूपानें मग मूर्तिमंत मोहच ( मोहानें भरलेली स्त्री तिचें मूल व मोह ) वावरतो. ( तशी देवाची स्थिति झाली. ) १२१. अर्जुनाविषयीं देवाच्या प्रेमाचा अतिरेक जर मी पाहिला नसता तर मी असें ( वांझोट्या बाईसारखें ) देवाला झालें, असें म्हटलें नसतें. १२२. आश्चर्य पहा, कीं भगवंताचें अर्जुनाचे ठिकाणीं प्रेम कसें आहे ! कोठें उपदेश व कोणीकडे युद्ध ! ( युद्धाचा प्रसंग ही अत्यंत विक्षेपाची जागा असल्यामुळें, आत्मज्ञानाचा उपदेश करण्याला अगदीं अयोग्य; परंतु अर्जुनाच्या प्रेमामुळें भगवंतांनीं वेळेच्या योग्यतेकडे लक्ष न देतां आत्मज्ञानाचा उपदेश केला. ) परंतु निश्चयेंकरून श्रीकृष्ण ही अर्जुनाच्या प्रेमाची मूर्तीच अगर चित्रच नाचत आहे. १२३. प्रेम आहे, आणि तें लाज उत्पन्न करतें, तर तें प्रेम कसचें ? तसेंच व्यसन आहे, आणि त्यानें जर क्षीण होत असेल, तर तें व्यसन कसलें ? वेड आहे, परंतु भ्रम पाडीत नाहीं, तर तें वेड कसचें ? १२४, म्हणून इतक्या बोलण्याचा अभिप्राय एवढाच कीं, अर्जुन हा भगवंताच्या सख्य भक्तीचा आश्रयच आहे, अथवा सुखानें शृंगारलेल्या ( भगवंताच्या ) मनाचा तो आरसाच आहे. १२५. याप्रमाणें तो अर्जुन धन्य असून पुण्यानें पावन आहे. या जगांत भक्तीरूप बी पेरण्यास तो चांगलें शेत आहे आणि म्हणून कृष्णकृपेला तो पात्र झाला आहे. १२६. अथवा आत्मनिवेदनरूपी भक्तीच्या खालची जी सख्यभक्तीची भूमिका आहे, त्यावरील अर्जुन ही मुख्य देवता आहे. १२७. शेजारींच असलेल्या श्रेष्ठ प्रभूचें वर्णन न करतां, मग भक्ताच्या गुणांचें वर्णन करावें इतका अर्जुनच स्वाभाविक रीतीनें देवास आवडतो. १२८ पहा, जी नवऱ्याला प्रेमानें भजते व जिला नवरा मानतो, त्या पतिव्रतेचें वर्णन तिच्या नवऱ्यापेक्षां देखील जास्त करावयास नको काय ? १२९. त्याप्रमाणें अर्जुनाचेंच विशेष वर्णन करावें, असेंच माझ्या मनाला पसंत पडतें. कारण, त्रिभुवनांतील सर्व भाग्य एका अर्जुनाच्याच ठिकाणीं

त्रिभुवनींचियां दैवां । एकायतनु जाहला ॥ १३० ॥ जयाचिया आवडीचेनि पांगें । अमूर्तुही मूर्ति आवगे । पूर्णाहि परी लागे । अवस्था जयाची ॥ ३१ ॥ तंव श्रोते म्हणती दैव । कैसी बोलाची हवाव । काय नादातें हन बरव । जिणोनि आली ॥ ३२ ॥ हां हो नवल नोहे देशी । मऱ्हाटी बोलिजे तरी ऐसी । वाणें उमटताहे आकाशीं । साहित्यरंगाचें ॥ ३३ ॥ कैसें उन्मेखचांदिणें तार । आणि भावार्था पडे गार । हेचि श्लोकार्थकुमुदी तरी फार । साविया होती ॥ ३४ ॥ चाडाचि निचाडा करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवळले अंतरीं । तेथ डोलु आला ॥ ३५ ॥ तें निवृत्तिदासें जाणितलें । मग अवधान द्या म्हणितलें । नवल पांडवकुळीं पाहलें । कृष्णादिवसें ॥ ३६ ॥ देवकीया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । कीं शेखीं उपेगा गेला । पांडवांसी ॥ ३७ ॥ म्हणऊनि बहुदिवस वोळगावा । कां अवसरु पाहोनि विनवावा । हाही सोसु तया सदैवा । पडेचिना ॥ ३८ ॥ हें असो कथा सांगें वेगीं । मग अर्जुन म्हणे सलगी । देवा इयें संतचिन्हें हन आंगीं । न ठकती माझां ॥ ३९ ॥ एऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा । मी अपाडें कीर अपुरा । परि तुमचेनि बोलें अवधारा । थोरावें जरी ॥ १४० ॥ जी तुम्ही चित्त देयाल । तरी ब्रह्म माझें होईल । काय जहालें अभ्यासिजेल । सांगाल तें ॥ ४१ ॥ हां हो नेणों कवणाची काहाणी । आइकोनि श्लाघत असों अंतःकरणीं । ऐसी जाहलेपणाची शिरयाणी । कायसी देवा ॥ ४२ ॥ हें आंगें म्यां होइजो कां । येतुलें गोसावी आपुलेपणें कीजो कां । तंव हांसोनि कृष्ण हो कां । करूं म्हणती ॥ ४३ ॥ देखा संतोषु एक न जोडे । तंवाचि सुखाचें सैंध सांकडें । मग जोडलिया कवणेकडे । अपुरें असे ॥ ४४ ॥ तैसा सर्वेश्वरु बळिया सेवकें । म्हणोनि ब्रह्महीं होय तो कौतुकें । परि कैसा भारें आतला पिके । दैवाचेनि ॥ ४५ ॥ जो जन्मसहस्रां-चियांसाठीं । इंद्रादिकांही महागु भेटी । तो आधीनु केतुला किरीटी । जे बोलुही न साहे ॥ ४६ ॥ मग ऐका जें पांडवें । म्हणितलें ब्रह्म म्यां होआवें । तें अशेषही देवें । अवधारिलें ॥ ४७ ॥ तेथ ऐसेंचि एक विचारिलें । जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले । परि उदरा वैराग्य आहे आलें । बुद्धीचिया ॥ ४८ ॥ एऱ्हवीं दिवस तरी अपुरे । परी वैराग्यवसंताचेनि भरें । जे सोहंभावमहुरें । मोडोनि आला ॥ ४९ ॥ म्हणोनि प्राप्तिफळें फळतां । यासि वेळु न लागेल आतां । होय विरक्तु ऐसा अनंता । भरंवसा जाहला ॥ १५० ॥ म्हणे जें जें हा अधिष्ठील । तें आतां आरंभींच यया फळेल । म्हणोनि सांगितला न वचेल । अभ्यासु वायां ॥ ५१ ॥ ऐसें विवरोनियां श्रीहरी । म्हणितलें तिये अवसरीं । अर्जुना हा अवधारीं । पंथराजु ॥ ५२ ॥ तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं । दिसती निवृत्तिफळाचिया कोडी । जिये मार्गींचा कापडी । महेशु आझुनी ॥ ५३ ॥ पैं योगिवृंदें वहिलीं । आडाचि आकाशीं निघालीं । कीं तेथ अनु-भवाच्या पाउलीं । धोरणु पडिला ॥ ५४ ॥ तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें । धांव घेतली एकसरें । कीं येर सकळ मार्ग निदसुरे । सांडूनिया ॥ ५५ ॥ पाठीं महर्षी येणें आले ।

राहिलें आहे. १३०. ज्याच्या प्रेमाच्या स्वाधीन होऊन निराकार परमात्मा सगुणरूप घेतो, व तो (देव) पूर्ण आहे, परंतु त्याला देखील ज्याचा वेध लागतो. १३१. तेव्हां श्रोते म्हणतात, काय भाग्य आमचें ! काय बोलण्याचा रंग आहे ! याच्या बोलण्याची शोभा नादब्रह्मास जिंकून आली कीं काय न जाणों ! ( म्हणजे याच्या बोलण्याच्या शोभेपुढें नादब्रह्म फिकें पडलें ! ) १३२. अहो, देशीभाषारूपी आकाशांत अलंकाररूपी रंगाचे निरनिराळे प्रकार स्पष्ट येत ( होत ) आहेत, अशी मराठी भाषा बोलतां येते, हें आश्चर्य नव्हे काय ? १३३. ज्ञानरूपी चांदणें कसें स्वच्छ व टपोर पडलें आहे ! ( पहा, ) त्या व्याख्यानांतील निरनिराळे अभिप्राय, हाच त्या चांदण्याचा गारवा आहे आणि श्लोकाचा अर्थ, हींच कोणी चंद्रविकासी कमळें सहज विकसीत होत आहेत ! १३४ ( ज्ञानेश्वर महाराजांचें ) हें व्याख्यान ऐकण्याच्या इच्छेची थोरवी अशी आहे कीं, निरिच्छ पुरुषाला देखील हें व्याख्यान ऐकण्याची इच्छा होईल, असा श्रोत्यांच्या मनांत व्याख्यानाविषयीं प्रकाश पडल्यामुळे ते डोलूं लागले. १३५ निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानेश्वर महाराज, यांनीं तें जाणलें व मग ते श्रोत्यांस म्हणाले, महाराज, लक्ष द्या. पांडवांच्या कुळामध्यें कृष्णरूपी अद्भुत दिवस उगवला आहे. ( कृष्णानीं त्यांच्यावर अद्भुत कृपा केली आहे. ) १३६. देवकीनें आपल्या उदरांत त्याला वाढविलें, यशोदेनें त्याचें कष्टानें पालन केलें, ( पण ) शेवटीं तो पांडवांच्या उपयोगाला आला. १३७. म्हणून पुष्कळ दिवस सेवा करावी किंवा वेळ पाहून विनंति करावी, येवढाही प्रयास त्या भाग्यवानांस (अर्जुनास) पडला नाहीं. १३८. श्रोते म्हणतात, हें राहूं दे. लवकर चालू विषय सांग. ( यावर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ) मग अर्जुन सलगीनें म्हणाला, कृष्णा, हीं संतांचीं लक्षणें माझ्या अंगांत वसत नाहींत. १३९. येव्हवीं या लक्षणांच्या तात्पर्यांचा ( विचार केला, तर ) मी खरोखर फारच अपुरा पडेन. परंतु ऐका, जर माझ्यांत मोठेपणा आला, तर तो तुमच्या बोलण्यानेंच येईल. १४०. महाराज तुम्ही लक्ष घाल तर मी ब्रह्म होईन, आणि सांगाल तो अभ्यास करीन; न करायला काय झालें ? १४१. अहो देवा, आपण कोणाची गोष्ट सांगतां हें कळत नाहीं. ( परंतु ) ती ऐकून मनांत मी त्यांची स्तुति करीत आहें. अशीं लक्षणें ज्यांच्या आंगांत सिद्ध असतील, त्यांचें महत्त्व कसें असेल बरें ? १४२. ते मी स्वतः व्हावें, येवढें, प्रभू, मी आपला आहें, असें समजून आपण करावें. तेव्हां श्रीकृष्ण हांसून म्हणतात, असें का तुझें म्हणणें आहे ? तर तसें करूं बरें ! १४३. पहा, जोंपर्यंत एक समाधान प्राप्त झालें नाहीं, तोंपर्यंत सुखाचा चोहोंकडे दुष्काळ असतो. पण एकदां संतोष पूर्णपणें प्राप्त झाल्यावर मग सुखाला कोठें कमी आहे ? १४४. त्याप्रमाणें सर्वशक्तिमान सर्वेश्वराचा अर्जुन सेवक आहे, म्हणून तो सहज ब्रह्महि होईल. पण अर्जुनाच्या देवाच्या वजनानें दडपल्यामुळें श्रीकृष्ण कशाप्रकारें फलद्रूप झाला ( तें पहा. ) १४५ इंद्रादिकांनादेखील हजारों जन्म घेतले तरी ज्याची भेट होणें दुर्लभ, तो अर्जुनाच्या किती स्वाधीन झाला आहे ! अर्जुनाचें प्रश्न करणेंही त्यास सहन होत नाहीं. ( कारण अर्जुनानें प्रश्न करण्यापूर्वीच देवाची सांगण्याची तयारी असते. ) १४६. मग ऐका. अर्जुनानें 'मी ब्रह्म व्हावें' असें जें म्हटलें तें श्रीकृष्णांनीं पूर्णपणें ऐकलें. १४७. परंतु भगवंतांनीं तेथें असा एक विचार केला कीं, ज्याअर्थी अर्जुनाला ब्रह्मत्वाचे डोहाळे झाले आहेत, त्याअर्थी याच्या बुद्धीच्या पोटांत वैराग्याचा गर्भ राहिला आहे. १४८. सहज विचार करून पाहिलें तर, ब्रह्म होण्याला यास दिवस कमी आहेत; परंतु वैराग्यरूपी वसंताच्या भरानें 'मी ब्रह्म आहें' असा भावरूपी मोहोर दाट आला आहे. १४९. म्हणून ब्रह्मप्राप्ति हें फळ येण्यास आतां यास उशीर लागणार नाहीं; अशा रीतीनें हा वैराग्यसंपन्न झाला आहे, अशी देवाची पूर्ण खात्री झाली. १५०. ( श्रीकृष्ण आपल्याशीं ) म्हणाले, कीं हा अर्जुन ज्या ज्या कर्मांचें आचरण करील, तें तें याला आतां आरंभालाच फळास येईल; म्हणून याला सांगितलेला अभ्यास वाया जाणार नाहीं. १५१. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात ) श्रीकृष्णानें असा दूरवर विचार करून त्या वेळेला म्हटलें, अर्जुना, हा सर्वोत्कृष्ट मार्ग ऐक. १५२. या मार्गामध्यें प्रवृत्तिरूप झाडाच्या बुडालाच निवृत्तिरूप कोट्यवधि फळें दिसत आहेत, ( म्हणजे ज्या मार्गाचें आचरण करावयास लागले असतां मोक्षरूपी फळ मिळतें ) व या मार्गाचे श्रीशंकर अद्यापपर्यंत यात्रेकरू आहेत. १५३. योग्यांचे समुदाय सुषुम्नेच्या संकोचित मार्गानें मूर्धीआकाशाकडे सत्वर जावयास निघाले, व असे योग्यांचे समुदाय अनुभवाच्या पाउलांनीं जातां जातां तो मार्ग सुलभ झाला. १५४. त्यांनीं इतर सर्व अज्ञानाचे मार्ग टाकून आत्मज्ञानाच्या सरळ मार्गानें एकसारखी धांव घेतली. १५५. नंतर महर्षि याच मार्गानें आले; याच मार्गानें साधकाचे सिद्ध झाले; व याच मार्गानें आत्मज्ञानी

साधकांचे सिद्ध जाहाले । आत्मविद थोरावले । येणेंचि पंथें ॥ ५६ ॥ हा मार्गु जैं देखिजे । तैं तहान भूक विसरिजे । रात्रिदिवसु नेणिजे । वाटे इये ॥ ५७ ॥ चालतां पाउल जेथ पडे । तेथ अपवर्गाची खाणी उघडे । आव्हांटलिया तरी जोडे । स्वर्गसुख ॥ ५८ ॥ निगिजे पूर्वीलिया मोहरा । कीं येईजे पश्चिमेचिया घरा । निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिंचें ॥ ५९ ॥ येणें मार्गें जया ठाया जाइजे । तो गांवो आपणचि होईजे । हें सांगों काय सहजें । जाणसी तूं ॥१६०॥ तेथ म्हणितलें देवा । तरि तेंचि मग केव्हां । कां आर्तिसमुद्रौनि न काढावा । बुडतु जी मी ॥ ६१ ॥ तंव कृष्ण म्हणती ऐसें । हें उत्संखळ बोलणें कायसें । आम्ही सांगतसों आपैसें । वरि पुशिलें तुवां ॥ ६२ ॥

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः । नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

तरी विशेषें आतांचि बोलिजेल । परि तें अनुभवें उपेगा जाईल । म्हणोनि तैसें एक लागेल । स्थान पाहावें ॥ ६३ ॥ जेथ आराणुकेचेनि कोडें । बैसलिया उठों नावडे । वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ॥ ६४ ॥ जो संतीं वसविला ठावो । संतोषासि सावावो । मना होय उत्सावो । धैर्याचा ॥ ६५ ॥ अभ्यासुचि आपणयातें करी । हृदयातें अनुभव वरी । ऐसी रम्य-पणाची थोरी । अखंड जेथ ॥ ६६ ॥ जया आड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा । पाखांडियाही आस्था । समूळ होय ॥ ६७ ॥ स्वभावें वाटे येतां । जरी वरपडा जाहला अवचितां । तरी सकामुही परि माघौता । निघों विसरे ॥ ६८ ॥ ऐसे न राहतयातें राहवी । भ्रमतयातें बैसवी । थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥ ६९ ॥ हें राज्य वर सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे । ऐसें श्रृंगारियांहि उपजे । देखतखेंवों ॥ १७० ॥ जें येणेंमानें बरवंट । आणि तैसेंचि अति चोखट । जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥ ७१ ॥ आणिकही एक पहावें । जें साधकीं वसतें होआवें । आणि जनाचेनि पायरवें । मैळेचिना ॥ ७२ ॥ जेथ अमृताचेनि पाडें । मुळेंहीसकट गोडें । जोडती दाटें झाडें । सदाफळतीं ॥ ७३ ॥ पाउला पाउला उदकें । परि वर्षाकाळीही चोखें । निर्झरें कां विशेखें । सुलभें जेथ ॥ ७४ ॥ हा आतपुही अळुमाळु । जाणिजे तरी शीतळु । पवनु अति निश्चळु । मंद झुळके ॥ ७५ ॥ बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिगे श्वापद । शुक हन षट्पद । तेउतें नाहीं ॥ ७६ ॥ पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें । कवणे एके वेळे बैसे । तरी कोकिळही हो ॥ ७७ ॥ निरंतर नाहीं । तरि आलीं गेलीं कांहीं । होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥ ७८ ॥ परि अवश्यक पांडवा । ऐसा ठावो जोडावा । तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ॥ ७९ ॥ दोहीं माजि आवडे तें । जें मानलें होय चित्तें । बहुतकरूनि एकांतें । बैसिजे गा ॥ १८० ॥ म्हणोनि तैसें तें जाणावें । मन राहतें पाहावें । राहेल तेथ रचावें । आसन ऐसें ॥ ८१ ॥ वरी चोखट मृगसेवडी । माजी धूतवस्त्राची घडी । तळवटीं अमोडी । कुशांकुर ॥ ८२ ॥ सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती आपैसे । एकें पाडें तैसे । वोजा घालीं ॥ ८३ ॥ परि सावियाचि उंच होइल । तरि आंग हन डोलेल । नीच तरी पावेल ।

पुरुष महत्त्व पावले. १५६. या मार्गाची ओळख झाली असतां तहानभुकेची आठवण रहात नाहीं. या रस्त्यावर रात्र व दिवस यांची कल्पना येत नाहीं. १५७. या मार्गानें जात असतां जेथें जेथें पाऊल पडेल, तेथें तेथें मोक्षाची खाणच उघडते. आणि या मार्गाचें आचरण करणारा जरी भलत्या मार्गाला लागला, तथापि त्यास स्वर्गसुख मिळतें. १५८. अर्जुना, ( या मार्गांत ) पूर्वदिशेच्या मार्गानें निघून पश्चिम दिशेच्या घरास यावें, असें आहे. या मार्गाचें चालणें स्थिरपणानें आहे. ( मनाचा स्थिरपणा हेंच या मार्गानें चालणें आहे ) १५९. या मार्गानें ज्या मुक्कामास जावयाचें, तो गांवच आपण होतों, हें कशास सांगावयास पाहिजे ? तुला तें सहजच कळेल. १६०. तेव्हां ( अर्जुन ) म्हणाला, कृष्णा, ( तर मग ) तेंच तुम्ही केव्हां करणार ? मी उत्कंठारूप समुद्रांत बुडत असतांना त्यांतून तुम्ही मला कां काढीत नाहीं ? १६१. तेव्हां कृष्ण म्हणाले, असें हें उतावळीचें भाषण कशाकरितां ? आम्ही आपण होऊनच सांगत होतों, आणखी त्यांत तूं तेंच विचारलेंस. १६२.

शुद्ध अशा स्थानीं, अति उंच नाहीं, अतिसखल नाहीं असें, दर्भांवर अजिन [ मृगादिकांचें चर्म ] व त्यावर वस्त्र ठेवलेलें, असें आपलें स्थिर आसन स्थापन करून, ११.

तर आतांच त्याचें सविस्तर प्रतिपादन केलें जाईल. परंतु त्याप्रमाणें अनुष्ठान करून अनुभव केला तरच त्याचा उपयोग होईल. त्याकरितां ह्या अभ्यासाला योग्य असें एक ठिकाण पहाणें जरूर आहे. १६३. ज्या ठिकाणीं सहज बसलें असतां, असें समाधान प्राप्त होतें कीं, तेथून उठावें असें वाटत नाहीं व जें पाहिल्याबरोबरच वैराग्यास दुप्पट जोर येतो; १६४. जेथें संतांनीं वास्तव्य केलें आहे, आणि ज्या ठिकाणीं समाधानाला साहाय्य मिळून मनाला धैर्याचा उल्हास येतो. १६५. ( जेथें ) अभ्यासच आपण आपल्याला साधकांकडून करवितो व अनुभव आपण होऊन साधकाच्या अंतःकरणाला माळ घालतो; याप्रमाणें जेथें रम्यपणाचें माहात्म्य निरंतर आहे. १६६. अर्जुना, ज्या स्थानावरून सहज गेलें असतां नास्तिकाला देखील, तपश्चर्या करावी, अशी पूर्णपणें मनापासून आस्था वाटते. १६७. सहज वाटेनें येत असतां जर कोणी अकस्मात् त्या ठिकाणीं आला, तर तो विषयासक्त जरी असला, तरीही तो परत माघारी जाण्याचें विसरतो; १६८. याप्रमाणें जें स्थान न रहाणाऱ्याला रहावयास लावतें व भटकणाऱ्याला एके ठिकाणीं बसवितें आणि वैराग्याला थापटी मारून जागें करतें, १६९. जें स्थान पाहिल्याबरोबर, एकाद्या विलासी पुरुषालासुद्धां असें वाटावें कीं, या स्थानावरून राज्य ओंवाळून टाकावें व येथेंच स्वस्थपणें रहावें. १७०. जें स्थान इतकें सुंदर आणि तसेंच अतीशय पवित्र असून जेथें डोळ्याला ब्रह्म स्पष्ट दिसतें. १७१. आणखीही एक ह्या स्थानाचें लक्षण पहावें; तें हें कीं, ज्या स्थानीं साधक राहिलेले असावेत व जें स्थान लोकांच्या येण्याजाण्यानें मळलेलें ( वहिवाटलेलें ) नसावें. १७२. जेथें अमृताच्या योग्यतेचीं मुळासकट गोड असलेलीं व नेहमीं फळणारीं अशीं दाट झाडें लागतात. १७३. ज्या ठिकाणीं पावलोपावलीं पाणी आहे, पण तें पावसाळ्यांतही निर्मळ असतें; व जेथें तर विशेषकरून पाण्याचे झरे सहज आढळतात. १७४. हें ऊन देखील जेथें सौम्य भासतें आणि जेथें वारा अतिशय शांत असून त्याच्या मंद झुळुका येत असतात, १७५. जें स्थान बहुतेक निःशब्द असावें, व ज्या ठिकाणीं श्वापदांची गर्दी असूं नये व ज्या ठिकाणीं राघू आणि भ्रमर हे नसावेत. १७६. ज्या ठिकाणीं पाण्याच्या संबंधानें असणारे हंस, दोन चार चक्रवाक, कोणी एकाद्या वेळेला कोकीळही असला तरी चालेल. १७७. ( जेथें ) नेहमीं जरी नाहीं, तरी येऊन जाऊन असणारे कांहीं मोरही असले तर त्यास आमची ना नाहीं. १७८. परंतु अर्जुना, असलें स्थान जरूर शोधून ठेवावें. त्या ठिकाणीं सहज दृष्टीस न पडणारा एकादा मठ अथवा शंकराचें देऊळ असावें. १७९. या दोहोंमध्यें, जें मनाला मानेल असें एक स्थान असावें. बहुतकरून एकांतांत बसावें. १८०. म्हणून तें स्थान तसें आहे कीं नाहीं, हें समजून घ्यावें. आपलें मन तेथें स्थिर रहातें कीं नाहीं, तें पहावें; आणि राहील, तर तेथें असें आसन लावावें. १८१. तळास साग्र दर्भ घालून त्यावर शुद्ध कृष्णाजिन घालून त्यावर धुतलेल्या वस्त्राची घडी घालावी. १८२. ते दर्भ कोंवळे असून, सारखे आणि सहजच एकमेकाला लागलेले एकसारखे रहातील असें व्यवस्थेनें घालावेत. १८३. परंतु तें ( आसन ) कदाचित् जर उंच होईल, तर शरीर कलांडेल, आणि सखल होईल तर, जमिनीचे ( गारवा

भूमिदोषु ॥ ८४ ॥ म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥ ८५ ॥

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः । उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ॥ ८६ ॥ तैसें स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव कठिणपण विरे । अहंभावाचें ॥ ८७ ॥ विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजीं ॥ ८८ ॥ ऐसें ऐक्य हें सहजें । फावे तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥ ८९ ॥

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः । संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥

आतां आंगातें आंग करी । पवनातें पवनुचि धरी । ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ॥ १९० ॥ प्रवृत्ति माघौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे । आघवें अभ्यासु सरे । बैसतखेंवो ॥ ९१ ॥ मुद्रेची प्रौढी ऐशी । तेचि सांगिजेल आतां परियेसीं । तरी उरु या जघनासी । जडोनि घालीं ॥ ९२ ॥ चरणतळें देव्हडीं । आधारद्रुमाच्या बुडीं । सुघटितें गाढीं । संचरीं पां ॥ ९३ ॥ सव्य तें तळीं ठेविजे । तेणें सिवणीमध्यु पीडिजे । वरी बैसे तो सहजें । वामचरणु ॥ ९४ ॥ गुदमेंढ्राआंतौतीं । चारी अंगुळें निगुतीं । तेथ सार्ध सार्ध प्रांतीं । सांडुनियां ॥ ९५ ॥ माजि अंगुळ एक निगे । तेथ टांचेचेनि उत्तरभागें । नेहेटिजे बरि आंगें । पेल्लेनी ॥ ९६ ॥ उचलिलें कां नेणिजे । तैसें पृष्ठांत उचलिजे । गुल्फद्वय धरिजे । तेणेंचि मानें ॥ ९७ ॥ मग शरीरसंचु पार्था । अशेषही सर्वथा । पार्ष्णींचा माथा । स्वयंभु होय ॥ ९८ ॥ अर्जुना हें जाण । मूळबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ॥ ९९ ॥ ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचा मार्गु मोडे । तेथ अपानु आंतलीकडे । वोहोटों लागे ॥ २०० ॥ तव करसंपुट आपैसें । वामचरणीं बैसे । बाहुमूळीं दिसे । थोरीव आली ॥ १ ॥ माजि उभारलेनि दंडें । शिरकमळ होय गाढें । नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती ॥ २ ॥ वरचिलें पातीं ढळती । तळींचीं तळीं पुंजाळती । तेथ अर्धोन्मीलित स्थिती । उपजे तया ॥ ३ ॥ दिठी राहोनी आंतुलीकडे । बाहेर पाऊल घाली कोडें । ते ठायीं ठावो पडे । नासाग्रपीठीं ॥ ४ ॥ ऐसें आंतुच्या आंतुचि रचे । बाहेरी मागुतें न वचे । म्हणोनि राहणें आधियें दिठीचें । तेथेंचि होय ॥ ५ ॥ आतां दिशांची भेटी घ्यावी । कां रूपाची वाट पहावी । हे चाड सरे आघवी । आपैसया ॥ ६ ॥ मग कंठनाळ आटे । हनुवटी हे हडौती दाटे । ते गाढी होऊनि नेहटे । वक्षःस्थळीं ॥ ७ ॥ माजि घंटिका लोपे । वरी बंधु जो आरोपे । तो जालंधरु म्हणिपे । पंडुकुमरा ॥ ८ ॥ नाभी वरी पोखे । उदर हें थोके । अंतरीं फांके । हृदयकोशु ॥ ९ ॥ स्वाधिष्ठानावरिचिले कांठीं । नाभिस्थानातळवटीं । बंधु पडे किरीटी । वोढियाणा तो ॥ २१० ॥ ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाची पाखर पडे । तंव आंतु त्राय मोडे । मनोधर्माची ॥ ११ ॥ कल्पना निमे । प्रवृत्ती शमे । आंग मन

वगैरे ) दोष प्राप्त होतील. १८४. म्हणून आसन उंच अथवा सखल होऊं देऊं नये. तर तें समांतर घालावें. आतां हें फार वर्णन करणें पुरे. अशा प्रकारचें आसन असावें. १८५.

त्या ठिकाणीं एकाग्र मन करून आसनावर बसलेल्या आणि चित्त व इंद्रियें यांच्या क्रियांचें नियमन केलेल्या, अशा योग्यानें अंतःकरणाच्या शुद्धीसाठीं योगाचा अभ्यास करावा. १२.

मग तेथें आपण एकाग्र अंतःकरण करून मनांत सद्गुरुचें स्मरण करावें. १८६. त्या स्मरणाच्या आदरानें अहंकाराचा कठीणपणा इतका नाहींसा होतो कीं, तो ( स्मरण करणारा ) आंतबाहेर सात्त्विक भावांनीं व्याप्त होतो; १८७. विषयांचा विसर पडतो, इंद्रियांची रग मोडते, अंतःकरणाच्या ठिकाणीं मनाची स्थिरता होते. १८८. याप्रमाणें ऐक्य प्राप्त होईपर्यंत थांबावें, व मग त्याच ऐक्याच्या बोधानें आसनावर बसावें. १८९.

काय म्हणजे ( शरीराचा ) मधला भाग, मस्तक व मान हीं समान आणि अचल धारण करणारा, निश्चल, स्वतःच्या नाकाच्या अग्रभागाकडे दृष्टि लावलेला व दिशांकडे न पहाणारा. १३.

आतां ( आसनावर बसल्यानंतर ) आंगाला आंग आपण होऊन सांवरून धरतें. वायूला वायुच आपण होऊन आंवरून धरतो; याप्रमाणें अनुभवाचा उदय होऊं लागतो. १९०. प्रवृत्ति माघारी फिरते, समाधि अलीकडील तीराला येते ( आटोक्यांत येते ) व बसतांक्षणींच सर्व अभ्यास संपतो. १९१. मुद्रेची थोरवी अशी आहे; तीच आतां सांगतों ऐक. तर पोटऱ्याला चिकटून मांडी घालावी. १९२. दोन्ही तळपाय वांकडे करून ते आधार चक्राखालीं ( गुदस्थानावर शिवणीपाशीं ) चांगले सुस्थिर रहातील असे बळकट बसवावेत. १९३. ( पण त्यांत ) उजव्या पायाची टांच खालीं घालावी, व तिनें शिवण दाबावी, म्हणजे उजव्या पायावर स्वाभाविकच डावा पाय बसतो. १९४. गुद व शिश्न यांमधील बरोबर जी चार बोटें जागा आहे, त्यापैकीं दीड बोट वर व दीड बोट खालीं जागा सोडून १९५. मध्यें जी एक बोट जागा रहाते, तेथें उजव्या पायाच्या टांचेच्या उत्तर भागानें ( टांचेच्या वरच्या बाजूनें ) आपलें आंग वर तोलून घट्ट दाबावें. १९६. उचलला आहे कीं नाहीं हें कळे न कळे अशा तऱ्हेनें ( थोड्या प्रमाणांत ) पाठीच्या खालचा भाग उचलावा व त्याच प्रकारें दोन्ही घोटे उचलून धरावेत. १९७. अर्जुना, मग हा सर्व शरीराचा आकार जसा कांहीं अगदीं खालच्या पायाच्या टांचेचा वरचा स्वयंभू भागच आहे, असा होऊन जातो. १९८. अर्जुना, हें मूळबंधाचें लक्षण आहे असें समज व याचेंच वज्रासन असें गौण नांव आहे. १९९. याप्रमाणें आधारचक्रावर मूळबंध बरोबर लागला आणि खालचा मार्ग बंद पडला म्हणजे अपानवायु आंतल्या बाजूस संकोचित होऊं लागतो. २००. तेव्हां द्रोणाकार झालेली हस्तांजुळी सहजच डाव्या पावलावर बसते व त्यामुळें दोन्ही खांदे वर चढलेले दिसतात. २०१. पाठीच्या उभ्या कण्याच्या योगानें वर चढलेल्या खांद्यांत मस्तक घट्ट रहातें व डोळ्यांच्या पापण्या झांकावयास लागतात. २०२. वरच्या पापण्यांस कांहीं ढाळ होऊन खालच्या पापण्या खालीं पसरतात; तेव्हां अर्धी उघडी अशी त्या डोळ्यांची स्थिति होते. २०३. दृष्टि ही आंतल्या आंत डोळ्यांतच रहाते; जर कौतुकानें बाहेर आलीच, तर ती नेमकी नाकाच्या शेंड्यावर पडते. २०४. अशी आंतल्या आंतच दृष्टि राहते, ती पुन्हा बाहेर येत नाहीं; म्हणून अर्ध्या दृष्टीचें राहणें नाकाच्या शेंड्यावरच होतें. २०५. आतां दिशांची गांठ घेण्याची ( चोहोंकडे पहाण्याची ) अथवा रूप विषय पहाण्याची ही सर्व इच्छा आपोआप नाहींशी होते. २०६. मग गळा आकुंचित होऊन गळ्याखालच्या खळगींत हनुवटी अडकून बसते, ती तेथें घट्ट बसून छातीवर दाबून बसते. २०७. अर्जुना, त्यामध्यें कंठमणि ( गळ्याची घाटी ) अदृश्य होतो; असा जो बंध पडतो, त्याला ' जालंधर बंध ' म्हणतात. २०८. जो वोढियाणाबंध बेंबीवर पुष्ट होतो, पोट खपाटीला जातें आणि हृदयकमल आंत प्रफुल्लित होतें. २०९. अर्जुना, शिश्नावरील कांठास ( व ) बेंबीच्या खालच्या भागास जो बंध पडतो, त्यास ' वोढियाणा बंध ' असें म्हणतात. २१०. याप्रमाणें शरीराच्या बाहेरच्या बाजूला अभ्यासाची छाया पसरते. तों आंतल्या बाजूस मनाच्या चंचलतेचा जोर नाहींसा होतो. २११. कल्पना नाहींशी होते, मनाची बाह्य विषयांकडे धांव थांबते व सहजच शरीर आणि मन

विरमे । सावियाचि ॥ १२ ॥ क्षुधा काय जाहाली । निद्रा केउती गेली । हे आठवणही हारपली । न दिसे वेगां ॥ १३ ॥ जो मूळबंधें कोंडला । अपानु माघौता मुरडला । तो सवेंचि वरी सांकडला । फुगु धरी ॥ १४ ॥ क्षोभलेपणें माजे । उवाइला ठायीं गाजे । मणिपूरेंसीं झुंजे । राहोनियां ॥१५॥ मग थावली ते वाहटुळी । सैंघ घेऊनि घरडहुळी । बाळपणींची कुहीटुळी । बाहेर घाली ॥ १६ ॥ भीतरीं वळी न धरे । कोठयामाजी संचरे । कफपित्तांचे थारे । उरों नेदी ॥ १७ ॥ धातूंचे समुद्र उलंडी । मेदाचे पर्वत फोडी । आंतली मज्जा काढी । अस्थिगत ॥ १८ ॥ नाडीतें सोडवी । गात्रांतें विघडवी । साधकातें भेडसावी । परि बिहावें ना ॥ १९ ॥

प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः । मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

व्याधीतें दावी । सवेंचि हरवी । आप पृथ्वी कालवी । एकवाट ॥ २२० ॥ तंव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबारा । शक्ती करी उजगरा । कुंडलिनीये ॥ २१ ॥ नागाचें पिलें । कुंकुमें नाहलें । वळण घेऊनि आलें । सेजे जैसें ॥ २२ ॥ तैशी ते कुंडलिनी । मोटकी औट वळणी । अधोमुख सर्पिणी । निजैली असे ॥ २३ ॥ विद्युल्लतेची विडी । वन्हिज्वाळांची घडी । पंधरेयाची चोखडी । घोंटीव जैशी ॥ २४ ॥ तैशी सुबद्ध आटली । पुटीं होती दाटली । ते वज्रासनें चिमुटली । सावध होय ॥ २५ ॥ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडलें । तेजाचें बीज विरूढलें । अंकुरेंशीं ॥ २६ ॥ तैशी वेढियातें सोडिती । कवतिकें आंग मोडिती । कंदावरी शक्ती । उठली दिसे ॥ २७ ॥ सहजें बहुतां दिवसांची भूक । वरि चेवविली तें होय मिष । मग आवेशें पसरी मुख । ऊर्ध्वा उजू ॥ २८ ॥ तेथ हृदयकोशातळवटीं । जो पवनु भरे किरीटी । तया सगळेयाचि मिठी । देऊनि घाली ॥ २९ ॥ मुखींच्या ज्वाळीं । तळीं वरी कवळी । मांसाची वडवाळी । आरोगूं लागे ॥ २३० ॥ जे जे ठाय समांस । तेथ आहाच जोडे घाउस । पाठी एकदोनी घांस । हियाही भरी ॥ ३१ ॥ मग तळवे तळहात शोधी । उर्ध्वींचे खंड भेदी । झाडा घे संधी । प्रत्यंगाचा ॥ ३२ ॥ आधार तरी न संडी । परि नखींचेंही सत्त्व काढी । त्वचा धुवूनि जडी । पांजरेंशी ॥ ३३ ॥ अस्थींचे नळे निरपे । शिरांचे हीर वोरपे । तंव बाहेरी विरूढी करपे । रोमबीजांची ॥ ३४ ॥ मग सप्तधातूंच्या सागरीं । ताहानेली घोंट भरी । आणि सवेंचि उन्हाळा करी । खडखडीत ॥ ३५ ॥ नासापुटौनि वारा । जो जातसे अंगुळें बारा । तो गचिये धरूनि माघारा । आंतु घाली ॥ ३६ ॥ तेथ अध वरौतें आकुंचे । ऊर्ध्व तळौतें खाचे । तया खेवामाजि चक्रांचे । पदर उरती ॥ ३७ ॥ एऱ्हवीं तरी दोन्ही तेव्हांचि मिळती । परी कुंडलिनी नावेक दुश्चित्त होती । ते तयातें म्हणे परौती । तुम्हीचि कायसीं एथें ॥ ३८ ॥ आइकें पार्थिव धातु आघवी । आरोगितां कांहीं नुरवी । आणि आपातें तंव ठेवी । पुसोनियां ॥ ३९ ॥ ऐसी दोनी भूतें खाये । ते वेळीं संपूर्ण धाये । मग सौम्य होऊनि राहे । सुषुम्नेपाशीं ॥ २४० ॥ तेथ तृप्तीचेनि संतोषें । गरळ जें वमी मुखें । तेणें तियेचेनि पीयुषें । प्राणु जिये ॥ ४१ ॥ तो आगी आंतूनि निघे । परि सबाह्य निववूंचि लागे । ते वेळीं कसु बांधिती आंगें । सांडिला पुढती ॥ ४२ ॥ मार्ग मोडिती

शांत होतें. २१२. भूक काय झाली, झोंप कोठें गेली, याची आठवण देखील राहिली नाहीं. भूक व झोंप यांचा अंमल ( मुद्दां ) दिसत नाहीं. २१३. जो अपानवायु मूळबंध कोंडलेला असतो तो उर्ध्वगतीनें माघारा फिरून सहजच वर अवधडल्यामुळें फुगवटा धरतो, २१४. खवळून तो अपान वायु मस्त होतो व पसरल्या ठिकाणीं गुरगुरूं लागतो; व तेथेंच राहून मणीपूरचक्राला धक्के देतो. २१५ मग ती अपानवायूची वळावलेली वाहुटळ सर्व शरीराच्या आंत शोधन करून लहानपणाची पोटांतील कुचकी घाण बाहेर घालते. २१६. त्या अपानवायूला आंत वळण्याला कोठें जागा नसल्यामुळें, तो मग कोठयांत प्रवेश करतो; व तेथें असलेले कफ आणि पित्त यांचा थारा राहूं देत नाहीं. २१७. सप्तधातूंचे समुद्र पालथे करतो; मेदाचे पर्वत फोडतो व हाडांमधील मज्जा बाहेर काढतो. २१८. नाड्या खुल्या करतो, अवयव शिथील करतो व साधकाला भीति दाखवितो. परंतु त्यानें भिऊं नये. २१९.

**अंतःकरण शांत असलेला, भीतिरहित, ब्रह्मचर्यव्रत पालन करणारा, माझे ठिकाणीं चित्त ठेवणारा, मत्परायण व मनाचें संयमन केलेला असा होऊन ( आसनावर ) बसावें. १४.**

रोगांना दाखवितो व लागलीच त्यांस नाहींसे करतो, आणि शरीरांत जे पृथ्वीचे आणि पाण्याचे अंश आहेत, ते एकांत एक कालवितो. २२०. अर्जुना, ( कोंडलेला अपानवायु असे प्रकार करतो तों, ) दुसरीकडे वज्रासनाची उष्णता कुंडलिनी शक्तीला जागें करिते. २२१. केशरानें न्हालेलें नागाचें पिलूं वेढे घेऊन जसें निजावें; २२२. त्याप्रमाणें नेमकी साडेतीन वेढ्याची ती कुंडलिनीरूपी नागीण खालीं तोंड करून निजलेली आहे. २२३. ती नागीण जशी मूर्तिमंत बनविलेली विजेची वाटोळी कडी किंवा प्रत्यक्ष अग्नीच्या ज्वालेची केलेली घडी अथवा जणूंकाय उत्तम सोन्याचे चकचकीत वेढे, २२४. त्याप्रमाणें व्यवस्थितपणें आकुंचित असलेली व नाभीजवळच्या संकोचित जाग्यांत, ती वज्रासनानें दाटून बसलेली चिमटल्यामुळें जागी होते. २२५. त्या ठिकाणीं जसें नक्षत्र तुटून पडावें अथवा सूर्यानें जसें आपलें आसन सोडून खालीं यावें किंवा प्रकाशरूप बीजालच अंकुर फुटावा, २२६. त्याप्रमाणें वेढ्याला सोडीत असलेली व कौतुकानें अंग मोडीत असलेली ती कुंडलिनी शक्ति नाभीस्थानाखालील कंदावर उठलेली दिसते. २२७. आधींच तिला पुष्कळ दिवसांची भूक लागलेली असते व तशांत तिला जागें केल्याचें निमित्त होतें, मग ती जोरानें सरळ असें वरती तोंड पसरते. २२८. अर्जुना, हृदयकोशाखालीं जो वारा भरलेला असतो, त्या सगळ्या वायूस ती खाऊन टाकते. २२९. मुखाच्या ज्वाळांनीं ती खालींवर व्यापते आणि मांसाचे घांस खावयास लागते. २३०. जें जें ठिकाण मांसल असेल त्या ठिकाणीं वरच्यावरच मोठा लचका घेते, शिवाय हृदयाच्या ठिकाणचेही एकदोन घांस घेते. २३१. नंतर तळहात व तळपाय शोधून ( त्यांतील रक्त, मांस वगैरे खाऊन ) वरच्या भागाचें भेदन करते व प्रत्येक अंगाच्या सांध्याचा झाडा घेते. २३२. आपला आश्रय तर सोडीत नाहीं, पण तेथेंच राहून नखांचें देखील सत्त्व काढून घेते व त्वचा धुऊन पुसून त्या त्वचेला हाडांच्या सांपळ्यास चिकटवून ठेविते. २३३. हाडांच्या नळ्या निरपून घेते व शिरांच्या काड्या ओरपून घेते, त्या वेळीं बाहेरच्या केसांच्या बीजाची वाढ होण्याची शक्ति जळून जाते. २३४. मग तान्हेनें पीडित अशी ती सप्तधातूंचा समुद्र एका घोटांत पिऊन टाकते व लागलीच शरीरांत जिकडे तिकडे खडखडीत उन्हाळा करते. २३५. दोन्ही नाकपुड्यांतून बारा बोटें वाहात असलेल्या वायूला गच्च धरून त्यास आंत मागें घालते. २३६. तेव्हां खालचा अपानवायु वरती आकुंचित होतो आणि वरचा प्राणवायु खालीं खचतो; त्या प्राणापानांच्या भेटीमध्यें षट्चक्रांचे नुसते पदर तेवढे उरतात. २३७. येन्हवीं तरी प्राण व अपान या दोहोंचा तेव्हांच मिलाफ झाला असता; परंतु कुंडलिनी तेथें क्षणभर क्षोभलेली असते, म्हणून ती त्यांना म्हणते, 'तुम्ही येथें कोण? चालते व्हा.' २३८. अर्जुना, ऐक. पृथ्वीसंबंधीं सर्व धातू खाऊन कांहींएक शिल्लक ठेवीत नाहीं आणि पाण्याचा भाग तर तेव्हांच चाटून पुसून टाकते. २३९. याप्रमाणें पृथ्वी व जल, हीं दोन्हीं भुतें खाल्लयावर तिची संपूर्ण तृप्ति होते, आणि मग ती शांत होऊन सुषुम्नेजवळ रहाते. २४० त्यावेळीं तृप्त होऊन समाधान झाल्यावर ती तोंडानें जें गरळ ओकते, त्या गरळरूपी अमृताचे योगानें प्राणवायु जगतो. २४१. तो गरळरूपी अमृताचा अग्नि तिच्या तोंडांतून निघतो खरा, परंतु तो अग्नि आंत व बाहेर थंडच करूं लागतो, त्या वेळेस सर्व गात्रांची गेलेली शक्ति पुन्हा येऊं लागते. २४२. नाड्यांचें वाहणें बंद पडतें व वायूचे नऊ प्रकार

नाडीचे । नवविधपण वायूचें । जाय म्हणऊनि शरीराचे । धर्मु नाहीं ॥ ४३ ॥ इडा पिंगळा एकवटती । गांठी तिन्ही सुटती । साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥ ४४ ॥ मग शशी आणि भानु । ऐसा कल्पिजे जो अनुमानु । तो वातीवरी पवनु । गिंवसितां न दिसे ॥ ४५ ॥ बुद्धीची पुळिका विरे । परिमळु घ्राणीं उरे । तोही शक्तीसवें संचरे । मध्यमेमाजी ॥ ४६ ॥ तंव वरिलेकडोनि ढाळें । चंद्रामृताचें तळें । कानवडोनि मिळे । शक्तिमुखीं ॥ ४७ ॥ तेणें नातकें रस भरे । तो सर्वांगामाजीं संचरे । जेथिंचा तेथ मुरे । प्राणपवनु ॥ ४८ ॥ तातलिये मुसे । मेण निघोनि जाय जैसें । मग कोंदली राहे रसें । वोतलेंनि ॥ ४९ ॥ तैसें पिंडाचेनि आकारें । ते कळाचि कां अवतरे । वरी त्वचेचेनि पदरें । पांगुरली असे ॥ २५० ॥ जैशी आभाळाची बुंथी । करुनि राहे गभस्ती । मग फिटलिया दीप्ति । धरूं नये ॥ ५१ ॥ तैसा आहाचवरि कोरडा । त्वचेचा असे पातवडा । तो झडोनि जाय कोंडा । जैसा होय ॥५२॥ मग काश्मीराचे स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ । अवयवकांतीची भांब । तैसी दिसे ॥ ५३ ॥ नातरी संध्यारागींचे रंग । काढूनि वळिलें तें आंग । कीं अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें ॥ ५४ ॥ कुंकुमाचें भरींव । सिद्धरसाचें वोतींव । मज पाहतां सावेव । शांतिचि ते ॥ ५५ ॥ तें आनंदचित्रींचे लेप । नातरी महासुखाचें रूप । कीं संतोषतरूचें रोप । थांवलें जैसें ॥ ५६ ॥ तो कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सासिंनला मळा । कोंवळिकेचा ॥५७॥ हो कां जे शारदियेचिये वोले । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजचि मूर्त बैसलें । आसनावरी ॥ ५८ ॥ तैसें शरीर होये । जे वेळीं कुंडलिनी चंद्र पिये । मग देहाकृती बिहे । कृतांतु गा ॥ ५९ ॥ वृद्धाप्य तरी बहुडे । तारुण्याची गांठी विघडे । लोपली उघडे । बाळदशा ॥ २६० ॥ वयसा तरी येतुलेवरी । एऱ्हवीं बळाचा बळार्थु करी । धैर्याची थोरी । निरुपम ॥ ६१ ॥ कनकद्रुमाच्या पालवीं । रत्नकळिका नित्य नवी । नखें तैसीं बरवीं । नवीं निघती ॥ ६२ ॥ दांतही आन होती । परि अपाडें सानेजती । जैसी दुबाहीं बैसे पांती । हिरेयांची ॥ ६३ ॥ माणिकुलियांचिया कणिया । सावियाचि अणुमानिया । तैसिया सर्वांगीं उधवती अणिया । रोमांचिया ॥ ६४ ॥ करचरणतळें । जैसीं कां रातोत्पलें । पाखाळीं होती डोळे । काय सांगों ॥ ६५ ॥ निडाराचेनि कोंदाटें । मोतियें नावरती संपुटें । मग शिवणी जैशी उतटे । शुक्तिपल्लवांची ॥ ६६ ॥ तैशी पातियांचिये कवळिये न समाये । दिठी जाकळोनि निघों पाहे । आधिलीचि परी होये । गगना कळिती ॥ ६७ ॥ आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव ये वायूचें । जे आपा आणि पृथ्वीचे । अंशु नाहीं ॥ ६८ ॥ मग समुद्रापैलाडी देखे । स्वर्गींचा आलोचु आइके । मनोगत वोळखे । मुंगियेचें ॥६९॥ पवनाचा वारिका वळघे । चाले तरी उदकीं पाउल न लागे । येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि ॥२७०॥ आइकें प्राणाचा हात धरुनी । गगनाची पाउटी करूनी । मध्यमेचेनि दादरेहुनी । हृदया आली ॥ ७१ ॥ ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा । जिया विश्वबिजाचिया कोंभा । साउली केली ॥ ७२ ॥ जे शून्यलिंगाची पिंडी । जे परमात्मया शिवाची करंडी । जे प्राणाची

जातात म्हणून शरीराचे धर्म रहात नाहींत. २४३. इडा व पिंगळा ह्या दोन्ही नाड्या एक होतात आणि तिन्ही गांठी सुटून सहा चक्रांचेही पदर फुटतात. २४४. अनुमानिक कल्पनेनें ठरविलेले डाव्या व उजव्या नाकपुडींतून वाहणारे चंद्रसूर्यरूपी वायु, नाकापुढें कापूस धरून पाहिलें तरी, दिसत नाहींत. २४५. बुद्धीचा आकार ( चैतन्यांत ) नाहींसा होतो व नाकामध्यें राहिलेली गंध घेण्याची जी शक्ति, ती कुंडलिनीबरोबर सुषुम्ना नाडींत शिरते. २४६. तेव्हां वरच्या बाजूस हळू हळू चंद्रामृताचें तळें कलथें होऊन तें चंद्रामृत कुंडलिनीच्या मुखांत पडतें. २४७. त्या नळीनें ( कुंडलिनीनें ) रस भरतो, तो सर्वांगामध्यें संचार करतो, व प्राणवायु जेथल्या तेथें मुरतो. २४८. तापलेल्या मुशींतील मेण निघून जाऊन मग ती मूस जशी नुसत्या ओतलेल्या रसानेंच भरून राहते, २४९. त्याप्रमाणें शरीराच्या आकारानें जणूंकाय त्वचेचा पदर पांघरलेलें मूर्तिमंत तेजच प्रगट झालेलें असतें. २५०. सूर्यावर ढगांचें आवरण आलें असतां त्याचें तेज झांकलेलें असतें. पण तें ढगांचे आवरण निघून गेल्यावर मग त्याचें तेज जसें आवरून धरतां येत नाहीं. २५१. त्याप्रमाणें वरवर असणारा कातड्याचा कोरडा पापुद्रा कोंड्यासारखा झडून जातो. २५२. मग जणूंकाय मुर्तिमंत स्फटिकच अथवा रत्नरूप बीजास निघालेले अंकुरच कीं काय ! अशी अवयवांच्या कांतीची शोभा दिसते. २५३. अथवा संध्याकाळच्या आकाशरंगाचे रंग काढून बनविलेली मूर्ति किंवा प्रत्यग्आत्म्याचें शुद्ध लिंगच. २५४. केशराचें पूर्ण भरलेलें किंवा अमृताचें ओतलेलें, अथवा तें पाहतांना मला असें वाटतें कीं ती मूर्तिमंत शांतीच आहे, २५५. तें ( योग्याचें शरीर ) आनंदरूपी चित्राचा रंग अथवा ब्रह्मसुखाची प्रत्यक्ष मूर्तीच, किंवा संतोषरूप झाडाचें जसें कांहीं बळावलेलें रोप आहे. २५६. तो ( योगी ) सोनचाफ्याची मोठी कळी अथवा अमृताचा पुतळा किंवा नाजूकपणाचा भरास आलेला मळाच, २५७. किंवा शरदृतूच्या ओलाव्यानें टवटवीत झालेलें चंद्रबिंब अथवा आसनावर बसलेलें मूर्तिमंत तेजच, कीं काय ! २५८. त्या वेळीं कुंडलिनी चंद्रामृत पिते, त्या वेळीं शरीर असें होतें. मग त्या देहाच्या आकाराला पाहून यम भितो. २५९. म्हातारपण मागें फिरतें, व तारुण्याचा वियोग होतो आणि गेलेली बाल्यावस्था येते. २६०. वय तर त्याचें इतकें, तथापि जेवढीं बलवान् पुरुष कृत्यें करूं शकतो, तेवढीं हा करतो. आणि त्याच्या धैर्याच्या थोरवीला तर उपमा नाहीं. २६१. सोन्याच्या झाडाला पालवी फुटून जशी रत्नाची नित्य नवी कळी यावी, तशी चांगली नवीं नखें येतात. २६२. दांतही दुसरे ( नवे ) येतात. पण ते फार लहान होतात; व ते असे दिसतात कीं जणूंकाय, दुतर्फा हिऱ्यांची रांगच बसली आहे. २६३. ज्याप्रमाणें माणिकाचे अणूएवढाले कण असावेत, त्याप्रमाणें सहजच सर्व आंगावर केसांचीं अग्रें वर येतात. २६४. तळहात व तळपाय हे तांबड्या कमळाप्रमाणें असतात; व डोळे किती स्वच्छ होतात हें काय सांगूं ! २६५. परिपूर्ण दशेला येऊन गच्च भरल्यामुळें मोत्यें शिंपीच्या गर्भांत मावत नाहींत, म्हणून जसा शिंपेच्या दोन शकलांचा सांधा उकलतो. २६६. त्याप्रमाणें दृष्टी पापण्यांच्या कवळींत न मावतां त्या कवळीला व्यापून बाहेर निघण्यास पहाते. दृष्टी पूर्वीचीच असते, परंतु ती आकाश व्यापणारी होते. २६७. अर्जुना ऐक. त्याचा देह सोन्याचा ( सोन्यासारख्या कांतीचा ) होतो; परंतु त्याला वायुसारखा हलकेपणा येतो. कारण कीं त्याच्यांत पृथ्वीचे व पाण्याचे अंश नसतात. २६८. मग तो समुद्राच्या पलीकडचे पाहतो, स्वर्गांतील विचार ऐकतो व मुंगीच्या मनांतील भाव ओळखतो. २६९. वायुरूप घोड्यावर बसतो व पाण्यावर चालतो, पण पाण्यांत पाऊल शिरत नाहीं. अशा अशा अनेक सिद्धी त्यास प्रसंगानुरूप प्राप्त होतात. २७०. अर्जुना, ऐक. प्राणवायूचा हात धरून, आकाशाची पायरी करून, सुषुम्नारूप जिन्यानें जी हृदयांत आली. २७१. जी कुंडलिनी जगाची आई आहे, ब्रह्मरूपी सार्वभौमाची शोभा आहे व जिनें विश्वाच्या बीजाच्या कोंबाला सावली केली आहे. ( आश्रय दिला आहे ) २७२. जी निराकार परमात्म्याचें चिन्ह दाखविणारी पिंडी, जी परब्रह्मरूपी शिवाची संपळी

उघडी । जन्मभूमी ॥ ७३ ॥ हें असो ते कुंडली । हृदयाआंतु आली । तंव अनाहताचां बोलीं । चावळे ते ॥ ७४ ॥ शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें आलें । तें तेणें आइकिलें । अळुमाळु ॥ ७५ ॥ घोषाच्या कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं । प्रणवाचिया मोडी । रेखिलीं ऐसीं ॥ ७६ ॥ हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परी आतां कल्पितें कैचें आणिजे । परी नेणों काय गाजे । तिये ठायीं ॥ ७७ ॥ विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना । तंव वाचा आथी गगना । म्हणऊनि घुमे ॥ ७८ ॥ तया अनाहताचेनि मेघें । मग आकाश दुमदुमों लागे । तंव ब्रह्मस्थानींचें वेगें । फिटलें सहजें ॥ ७९ ॥ आइकें कमळगर्भाकारें । जें महदाकाश दुसरें । जेथ चैतन्यें आधातुरें । करूनि असिजे ॥ २८० ॥ तया हृदयाच्या परिवरीं । कुंडलिनिया परमेश्वरी । तेजाची शिदोरी । विनियोगिली ॥ ८१ ॥ बुद्धीचेनि शाकें । हातवोनें निकें । द्वैत जेथ न देखे । तैसें केलें ॥ ८२ ॥ ऐसी निजकांती हारविली । मग प्राणुचि केवळ जाहाली । ते वेळीं कैसी गमली । म्हणावी पां ॥ ८३ ॥ हो कां जे पवनाची पुतळी । पांघुरली होती सोनेसळी । ते फेडुनियां वेगळी । ठेविली तिया ॥ ८४ ॥ नातरी वारयाचेनि आंगें झगटली । दीपाची दिठी निमटली । कां लखलखोनि हारपली । वीजु गगनीं ॥ ८५ ॥ तैशी हृदयकमळवेर्‍हीं । दिसे सोनियाची जैशी सरी । नातरी प्रकाशजळाची झरी । वाहत आली ॥ ८६ ॥ मग तिये हृदयभूमी पोकळे । जिराली कां एके वेळे । तैसें शक्तीचें रूप मावळे । शक्तीचिमाजी ॥ ८७ ॥ तेव्हां तरी शक्तीचि म्हणिजे । एऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे । आतां नाद बिंदु नेणिजे । कलाज्योती ॥ ८८ ॥ मनाचा हन मारु । कां पवनाचा धरु । ध्यानाचा आदरु । नाहीं परी ॥ ८९ ॥ हे कल्पना घे सांडी । ते नाहीं इये परवडी । हे महाभूतांची फुडी । आटणी देखा ॥ २९० ॥ पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । महाविष्णु ॥ ९१ ॥ तया ध्वनिताचें केणें सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी । उपलविली म्यां जाणुनी । ग्राहीक श्रोते ॥ ९२ ॥ ऐकें शक्तीचें तेज लोपे । तेथ देहींचें रूप हारपे । मग तो डोळियांचि माजि लपे । जगाचिया ॥ ९३ ॥ एऱ्हवीं आधिलाचि ऐसें । सावयव तरी असे । परी वायूचें कां जैसें । वळिलें होय ॥ ९४ ॥ नातरी कर्दळीचा गाभा । बुंथी सांडोनी उभा । कां अवयवाचि नभा । निवडला तो ॥ ९५ ॥ तैसें होय शरीर । तैं तें म्हणिजे खेचर । हें पद होतां चमत्कार । पिंडजनीं ॥ ९६ ॥ देखें साधकु निघोनि जाये । मागां पाउलांची वोळ राहे । तेथ ठायीं ठायीं होये । हे अणिमादिक ॥ ९७ ॥ परि तेणें काय काज आपणपयां । अवधारीं ऐसा धनंजया । लोप आथी भूतत्रया । देहींचा देहीं ॥ ९८ ॥ पृथ्वीतें आप विरवी । आपातें तेज जिरवी । तेजातें पवनु हरवी । हृदयामाजीं ॥ ९९ ॥ पाठीं आपण एकला उरे । परि शरीराचेनि अनुकारें । मग तोही निगे अंतरें । गगना मिळे ॥ ३०० ॥ ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये । मारुत ऐसें नाम होये । परि शक्तिपण तें आहे । जंव न मिळे शिवीं ॥ १ ॥ मग जालंधर सांडी । ककारांत फोडी ।

व जी प्राणाची उघडउघड जन्मभूमि आहे, २७३. हें असो; ती कुंडलिनी हृदयांत ( अनाहत चक्रांत ) येते तेव्हां ती अनाहताच्या शब्दानें बोलते. २७४. कुंडलिनीला चिकटून राहिलेलें जें बुद्धीचें ( जाणीवशक्तियुक्त ) ज्ञान ( तिजबरोबर ) आलें होतें, त्यानें ( त्या ज्ञानानें ) तो ( अनाहत ) शब्द किंचित ऐकला. २७५. घोषाच्या ( परावाणीच्या ) कुंडांत नाद ( मध्यमारूपी ) चित्रांचीं रूपडीं ओंकाराच्या आकारासारखीं रेखलेलीं असतात. २७६. याची कल्पना करतां येईल तर समजून घ्यावें; पण आतां कल्पना करणारें ( मन ) कोठून आणावें, तर त्या ठिकाणीं काय वाजतें, तें कळत नाहीं. २७७. अर्जुना, पण तें तसें नव्हे, विसरून सांगण्याचेंच राहिलें; तें काय म्हणशील, तर जोंपर्यंत वायूचा नाश झाला नाहीं, तोंपर्यंत हृदयाकाशांत शब्द असतो; म्हणून तो अनाहत शब्द घुमतो, असें समज. २७८. मग त्या अनाहतरूप मेघानें आकाश दुमदुमायला लागतें, तेव्हां ब्रह्मस्थानाचें द्वार आपोआप उघडतें. २७९. अर्जुना ऐक. कमळाच्या गर्भाच्या आकाराप्रमाणें जें मूर्ध्निआकाश आहे, तें दुसरें महाकाशच आहे; त्या मूर्ध्न्याकाशाचे ठिकाणीं चैतन्य अर्धें भोजन करून ( अतृप्त ) असतें. २८०. त्या चैतन्याला हृदयाकाशाच्या माजघरांत असणारी कुंडलिनी देवी ही आपल्या तेजाची शिदोरी अर्पण करते. ( ती कशी तर, ) २८१. द्वैत ज्याला पाहाणार नाहीं, अशा बुद्धीच्या भाजीसह हातांत घेतलेला चांगला नैवेद्य अर्पण केला. २८२. याप्रमाणें आपलें तेज अर्पण केल्यावर ती कुंडलिनी केवळ प्राणवायुरूप होते. तेव्हां ती कशी भासते म्हणून म्हणाल तर २८३. जशी एकादी वाऱ्याची पुतळी असावी व तिनें पीतांबर नेसलेला असावा आणि मग तिनें वस्त्र सोडून ठेवावें; २८४. अथवा वाऱ्याची झुळूक लागून दिव्याची ज्योत नाहींशी व्हावी किंवा आकाशांत वीज चमकून अदृश्य व्हावी, २८५. अथवा हृदयकमळापर्यंत जणूंकाय सोन्याची सरी अथवा प्रकाशरूप जलाचा झरा जसा कांहीं वाहात आला आहे, तशी ती दिसते. २८६. मग तो प्रकाशाचा झरा जसा हृदयाच्या पोकळ भूमींत एकदम जिरावा, त्याप्रमाणें शक्तीचें रूप शक्तीमध्येंच मावळतें. २८७. तेव्हां तरी शक्तीच म्हणतात, पण वास्तविक तो प्राणवायुच आहे असें समज. आतां त्यास नाद, बिंदु, कला व ज्योति एवढे चारी धर्म नसतात. २८८. मनाचा निग्रह करणें किंवा प्राणवायूचा निरोध करणें किंवा ध्यान करावेंसें वाटणें, हे प्रकार तेथें रहात नाहींत. २८९. ही कल्पना घे, ती कल्पना टाक; हे प्रकार तेथें नाहींत. ( कारण ) ही स्थिति पंचमहाभूतांची पक्की आटणी (नाश) आहे असें समज. २९०. पिंडानें पिंडाचा ग्रास करणें ( पंचमहाभूतांनीं पंचमहाभूतांचा लय करावयाचा ) हें आदिनाथ जे शंकर यांच्या अंतरंग खुणेचें मर्म आहे. परंतु हें मर्म श्रीविष्णु ( श्रीकृष्ण ) दाखवून गेले. २९१. वरच्या ओंवींत सांगितलेल्या उद्देशरूपी सणंगाच्या गूढपणारूपी दोऱ्या सोडून, यथार्थाची घडी साफ करून, श्रोते ( हे या मालाचे योग्य ) गिऱ्हाइक आहेत, असें समजून, त्यांच्यापुढें घडी उलगडून मी हें सणंग ठेविलें ( असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ) २९२. अर्जुना, ऐक. कुंडलिनीचें तेज ( जेव्हां ) लय पावतें, तेव्हां देहाचा आकार नाहींसा होतो, ( देह वायुरूप बनतो. ) तो याप्रमाणें सूक्ष्म झाल्यामुळें मग त्या योग्याला जगाच्या ( लोकांच्या ) डोळ्यांतच लपतां येतें. २९३. वास्तविक तो देह पूर्वीप्रमाणेंच सावयव असतो; परंतु ( आतां ) तो देह जसा वायूचाच बनविलेला असावा, असा होतो. २९४. अथवा केळींतील पोकळीवरील सोपटें काढून टाकून ती पोकळी जशी उभी करावी, किंवा आकाशालाच अवयव उत्पन्न व्हावेत असा तो दिसतो. २९५. असें ज्या वेळेस शरीर होतें, तेव्हां त्यास खेचर ( गगनविहारी ) म्हणतात. देहधारी लोकांत असें रूप होणें म्हणजे मोठा चमत्कार आहे. २९६. पहा, साधक निघून गेल्यावर मागें जी पाउलांची ओळ रहाते, तेथें ठिकठिकाणीं अणिमादिक सिद्धी उत्पन्न होतात. ( म्हणजे साधकाची जी जी भूमिका सिद्ध होईल, त्या त्या ठिकाणीं अणिमादिक सिद्धि त्यास प्राप्त होत जातात. ) २९७. पण आपल्याला त्या सिद्धींशीं काय काम आहे ? अर्जुना, ऐक. देहाच्या देहांतच तीनही भूतांचा असा लोप होतो. २९८. पृथ्वीला पाणी नाहींसें करतें, पाण्याला तेज नाहींसें करतें व तेजाला वायु हृदयामध्यें नाहींसा करतो. २९९. नंतर प्राणवायु एकटा उरतो. पण तो शरीराच्या आकारानें असतो. मग तोही कांहीं वेळानें निघून मूर्ध्निआकाशांत मिळतो. ३००. त्या वेळीं कुंडलिनी ही भाषा जाते व तिला ' मारुत ' असें नांव येतें. पण जोंपर्यंत ती शिवाशीं एक होत नाहीं, तोंपर्यंत तिचा शक्तिपणा असतोच. ३०१. मग ती प्राणवायुरूपशक्ति जालंदर बंधाचें उल्लंघन करून टाळ्यावरती नऊ इंद्रियांचें ऐक्य होण्याचें जें काकीमुख म्हणून स्थान आहे, त्याचा भेद करून मग

गगनाचिये पाहाडीं । पैठी होय ॥ २ ॥ ते ॐकाराचिये पाठीं । पाय देत उठाउठी । पश्यंतीचिये पाउटी । मार्गा घाली ॥ ३ ॥ पुढां तन्मात्रा अर्धवेरी । आकाशाच्या अंतरीं । भरती गमे सागरीं । सरिता जैशी ॥ ४ ॥

युंजन्नेवं सदाऽऽत्मानं योगी नियतमानसः । शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥

मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी । सोहंभावाच्या बाह्या पसरूनी । परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ॥ ५ ॥ तंव महाभूतांची जवनिक फिटे । मग दोहींसि होय झटें । तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ॥ ६ ॥ पैं मेघाचेनि मुखीं निवडला । समुद्र कां वोधीं पडिला । तो मागुता जैसा आला । आपणपेयां ॥ ७ ॥ तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे । तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥ ८ ॥ आतां दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें । ऐशिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥ ९ ॥ गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे । तें अनुभवें जो होये । तो होऊनि ठाके ॥ ३१० ॥ म्हणोनि तेथिंची मातु । न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥ ११ ॥ अर्जुना एऱ्हवीं तरी । इया अभिप्रायाचा जे गर्वु धरी । ते पाहें पां वैखरी । दुरी ठेली ॥ १२ ॥ भ्रूलता मागलीकडे । तेथ मकाराचेंचि आंग न मांडे । सडेया प्राणा सांकडें । गगना येतां ॥ १३ ॥ पाठीं तेथेंचि तो भासळला । तंव शब्दाचा दिवो मावळला । मग तयाहि वरी आटु भविन्नला । आकाशाचा ॥ १४ ॥ आतां महाशून्याचिया डोहीं । जेथ गगनासीचि ठावो नाहीं । तेथ तागा लागेल काई । बोलाचा या ॥ १५ ॥ म्हणूनि आखरामाजि सांपडे । कीं कानावरी जोडे । हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ॥ १६ ॥ जें कहीं दैवें । अनुभविलें फावे । तें आपणचि हें ठाकावें । होऊनियां ॥ १७ ॥ पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणोनि असो किती हेंचि । बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ॥ १८ ॥ ऐसें शब्दजात माघौतें सरे । तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे । वाराही जेथ न शिरे । विचाराचा ॥ १९ ॥ जें उन्मनियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य । अनादि जें अगण्य । परमतत्त्व ॥ ३२० ॥ जें आकाराचा प्रांतु । जें मोक्षाचा एकांतु । जेथ आदि आणि अंतु । विरोनी गेले ॥ २१ ॥ जें विश्वाचें मूळ । जें योगद्रुमाचें फळ । जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा ॥ २२ ॥ जें महाभूतांचें बीज । जें महातेजाचें तेज । एवं पार्था जें निज । स्वरूप माझें ॥ २३ ॥ ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपा आली । देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंदें ॥ २४ ॥ तें अनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले ते पुरुष । जयांचे कां निष्कर्ष । प्राप्तिवेरीं ॥ २५ ॥ आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीर जिहीं केलें । ते आम्हुचेनि पाडें आले । निवाळ्लेया ॥ २६ ॥ परब्रह्माचेनि रसें । देहाकृतीचियें मुसे । वोतींव जाहले तैसे । दिसती आंगें ॥ २७ ॥ जरि हे प्रतीति हन अंतरीं फांके । तरी विश्वचि हें अवघें झांकें । तंव अर्जुन म्हणे निकें । साचाचि जी हें ॥ २८ ॥ कां जे आपण आतां देवो । हा बोलिले जो उपावो । तो प्राप्तीचा ठावो । म्हणोनि घडे ॥ २९ ॥ इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरवसेंनि ब्रह्मत्वा येती । हें सांगतियाचि रीती । कळलें मज ॥ ३३० ॥ देवा गोठीचि हे

मूर्ध्न्याकाशरूपी पहाडावर जाऊन रहाते. ३०२. ती ॐकाराचे पाठीवर तात्काळ पाय देऊन पश्यंती वाणीची पायरी मागें टाकते. ३०३. पुढें समुद्रांत जशा नद्या मिळालेल्या दिसतात, त्याप्रमाणें अर्धमात्रापर्यंतच्या ॐकाराच्या मात्रा मूर्ध्निआकाशांत मिळतात. ३०४.

मनाचें नियमन केलेला व याप्रमाणें मनाला सदा युक्त करणारा योगी, जिचें पर्यवसान मोक्षामध्यें आहे, अशी मत्स्वरूप शान्ति प्राप्त करून घेतो. १५.

मग ब्रह्मरंध्राचे ठिकाणीं स्वस्थ होऊन, 'तें ब्रह्म मी' या भावनारूप बाहू पसरून त्वरेनें परब्रह्मरूप लिंगाशीं ऐक्य पावते. ३०५. तेव्हां पंचमहाभूतांचा पडदा नाहींसा होऊन मग शक्ति आणि परमात्मा यांचें ऐक्य होतें; त्या ऐक्यांत मूर्ध्निआकाशासकट सगळ्यांचा लय होतो. ३०६. मेघांच्या द्वारानें समुद्रापासून वेगळें झालेलें समुद्राचें पाणी, नदीच्या ओघांत पडून, नदीच्या रूपानें जसें पुनः समुद्रास मिळतें ( तो समुद्रच नदीच्या रूपानें आपण आपणास मिळतो. ) ३०७. हे अर्जुना, त्याप्रमाणें शरीराच्या द्वारें जेव्हां शक्तीरूप टाकून शिवच शिवांत मिळतो, तेव्हां तें एकत्व वरील समुद्राच्या ऐक्याप्रमाणें आहे. ३०८. आतां द्वैत होतें, कीं हें स्वरूप स्वतःसिद्ध एकच होतें, असा विचार करण्यापुरतीही जागा उरतच नाहीं. ३०९. चिदाकाशांत मूर्ध्निआकाश लयास जातें, अशी जी कांहीं स्थिति आहे, ती अनुभवानें जो होईल, त्यालाच ती स्थिति प्राप्त होईल. ३१०. मागें सांगितल्याकारणानें त्या स्थितीची गोष्ट शब्दांनीं सांगतां येत नाहीं आणि शब्दांनीं सांगतां येईल तेव्हांच ती गोष्ट संवादाच्या गांवांत स्थापित करतां येईल. ( अर्थात् शब्दांनींच सांगतां येत नाहीं, तर तिजविषयीं संवादही होणें शक्य नाहीं. ) ३११. अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर, हा अभिप्राय सांगण्याचा गर्व, जी वैखरी धरते, ती वाचा या ब्रह्मस्थितीपासून फार दूर राहिली. ३१२. भिवईच्या मागल्या बाजूस (आज्ञाचक्रांत) मकाराचें स्वरूप रहात नाहीं; इतकेंच नव्हे, तर एकट्या प्राणवायूला गगनास येण्याला संकट पडतें. ३१३. नंतर तो प्राणवायु तेथेंच ( मूर्ध्निआकाशांत ) मिळाला तेव्हां शब्दाचा दिवस मावळला. मग त्यानंतर आकाशाचाही लय झाला. ३१४. आतां परब्रह्मरूपी डोहांत जेथें आकाशाचाच थांग लागत नाहीं, तेथें या शब्दरूपी ( नाव ढकलण्याच्या ) वेळूचा लाग लागेल काय ? ३१५ या कारणास्तव ती ब्रह्मस्थिति अक्षरांत सांपडेल ( शब्दांनीं सांगतां येईल ) अथवा कानांनीं ऐकतां येईल, अशी खरोखर नाहीं, हें त्रिवार सत्य आहे. ३१६. जेव्हां कधीं तरी दैवयोगानें तें अनुभवाला प्राप्त होईल, तेव्हां तें आपणच होऊन रहावें, असें तें आहे. ३१७. अर्जुना, तद्रूप झालें म्हणजे त्यापुढें आतां जाणणें कांहीं उरलें नाहीं. म्हणून आतां हें राहूं दे. हेंच व्यर्थ किती बोलावें ! ३१८. याप्रमाणें शब्दमात्र जेथून माघारी परततो, जेथें संकल्पाचें आयुष्य संपतें ( संकल्प नाहींसा होतो ) व विचाराचा वाराही जेथें प्रवेश करूं शकत नाहीं. ३१९. जें परमात्मतत्त्व मनरहित अवस्थेचें सौंदर्य आहे व चौथ्या ज्ञानरूप अवस्थेचें तारुण्य आहे आणि जें नित्यसिद्ध व अमर्याद आहे. ३२०. जें आकाराचें शेवट आहे, जें मोक्षाचें निश्चयाचें ठिकाण आहे, ज्या ठिकाणीं आरंभ आणि शेवट ही नाहींशी झालीं आहेत. ३२१. जें त्रैलोक्याचें कारण आहे, जें अष्टांगयोगरूप वृक्षाचें फळ आहे व जें आनंदाची केवळ जीवनकला आहे, ३२२. जें पंचमहाभूतांचें बीज आहे, जें सूर्याचें तेज आहे; ( ज्याच्यापासून सूर्याला तेज मिळतें ) याप्रमाणें अर्जुना, जें माझें खास स्वरूप आहे. ३२३. नास्तिकांनीं भक्तांचे समुदाय पराभव केलेले पाहून ज्याची ( निर्गुणस्वरूपाची ) शोभा व्यक्ततेला आली, तीच ही आकाराला आलेली चतुर्भुज मूर्ति होय. ३२४. ज्या पुरुषांचे निश्चय प्राप्तीपर्यंत टिकतात, ते पुरुष असें हें शब्दातीत उत्कृष्ट सुख आपणच बनतात. ३२५. आम्हीं जें हें अष्टांगयोगरूपी साधन सांगितलें, त्या साधनाची मूर्तीच आपलें शरीर ज्यांनीं केलें, ते योगाभ्यासानें शुद्ध झाल्यावर आमच्या बरोबरीला आले. ३२६. देहाकृतीच्या मुशींत परब्रह्मरस ओतून तयार केलेली ( जणूंकाय ) मूर्तीच, ते शरीरानें दिसतात. ३२७. जर हा अनुभव अंतःकरणांत प्रकाशेल तर हें सर्व जग मावळेल. तेव्हां अर्जुन म्हणाला, ठीक. हें खरें आहे महाराज. ३२८. कारण कीं, आतां देवा, आपण जो हा उपाय सांगितला, तो ब्रह्मप्राप्तीचें ठिकाण आहे, म्हणून त्या उपायानें ब्रह्मप्राप्ति होते. ३२९. बाचा दृढनिश्चयानें जे अभ्यास करितात, ते खात्रीनें ब्रह्मत्वास प्राप्त होतात, हें आपल्या सांगण्याच्याच रीतीवरून मला समजलें. ३३०. देवा, योगाचें हें वर्णनच केवळ ऐकलें

ऐकतां । बोधु उपजतसे चित्ता । मा अनुभवें तल्लीनता । नव्हेल केवीं ॥ ३१ ॥ म्हणऊनि एथ कांहीं । अनारिसें नाहीं । परी नावभरी चित्त देईं । बोला एका ॥ ३२ ॥ आतां कृष्णा तुवां सांगितला योगु । तो मना तरी आला चांगु । परि न शके करूं पांगु । योग्यतेचा ॥ ३३ ॥ सहजें आंगिक जेतुली आहे । तेतुलियाची जरी सिद्धि जाये । तरी हाचि मार्गु सुखोपायें । अभ्यासीन ॥ ३४ ॥ नातरी देवो जैसें सांगतील । तैसें आपणपां जरी न ठकेल । तरी योग्यतेवीण होईल । तेंचि पुसों ॥ ३५ ॥ जीवींचिये ऐसी धारण । म्हणोनि पुसावया जाहलें कारण । मग म्हणे तरी आपण । चित्त देइजो ॥ ३६ ॥ हां हो जी अवधारिलें । हें जें साधन तुम्हीं निरूपिलें । तें आवडतयाहि अभ्यासिलें । फावों शके ॥ ३७ ॥ कीं योग्यतेवीण नाहीं । ऐसें हन आहे कांहीं । तेथ कृष्ण म्हणती तरी काई । धनुर्धरा ॥ ३८ ॥ हें काज कीर निर्वाण । परि आणिकही जें कांहीं साधारण । तेंही अधिकाराचे वोडवेविण । काय सिद्धि जाय ॥ ३९ ॥ पैं योग्यता जे म्हणिजे । ते प्राप्तीची अधीन जाणिजे । कां जें योग्य होउनि कीजे । तें आरंभीं फळे ॥ ३४० ॥ तरी तैसी एथ कांहीं । सावियाचि केणी नाहीं । आणि योग्यांची काई । खाणी असे ॥ ४१ ॥ नावेक विरक्तु । जाहला देहधर्मीं नियतु । तरि तोचि नव्हे व्यवस्थितु । अधिकारिया ॥ ४२ ॥ येतुलालिये आयणीमाजि येवढें । योग्यपण तूंतेंही जोडे । ऐसें प्रसंगें सांकडें । फेडिलें तयाचें ॥ ४३ ॥ मग म्हणे गा पार्था । ते हे ऐसी व्यवस्था । अनियतासि सर्वथा । योग्यता नाहीं ॥ ४४ ॥

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः । न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसी जीवें विकला । तो नाहीं एथ म्हणितला । अधिकारिया ॥ ४५ ॥ अथवा आग्रहाचिये बांदोडी । क्षुधा तृषा कोंडी । आहारातें तोडी । मारूनियां ॥ ४६ ॥ निद्रेचिया वाटा नवचे । ऐसा दर्पिवेचेनि अवतरणें नाचे । तें शरीरचि नव्हे तयाचें । मा योगु कवणाचा ॥ ४७ ॥ म्हणोनि अतिशयें विषयसेवा । तैसा विरोध न व्हावा । कां सर्वथा निरोधु करावा । हेंही नको ॥ ४८ ॥

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

आहार तरी सेविजे । परी युक्तीचेनि मापें मविजे । क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती ॥ ४९ ॥ मपितला बोली बोलिजे । मितलां पाउलीं चालिजे । निद्रेही मानु दीजे । अवसरें एकें ॥ ३५० ॥ जागणें जरी जाहलें । तरी व्हावें तें मितलें । येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल सुखें ॥ ५१ ॥ ऐसें युक्तिचेनि हातें । जें इंद्रियां वोपिजे भातें । तें संतोषासी वाढतें । मनचि करी ॥ ५२ ॥ बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंत सुख वाढे । तेथें सहजेंचि योगु घडे । नाभ्यासितां ॥ ५३ ॥ जैसें भाग्याचिये भडसें । उद्यमाचेनि मिसें । मग समृद्धिजात आपैसें । घर रिघे ॥ ५४ ॥

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते । निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

असतां चित्तांत ज्ञान उत्पन्न होतें, तर मग अनुभवानें तल्लीनता कशी होणार नाहीं ? ३३१. म्हणून तुझ्या सांगण्यांत कांहीं अन्यथा नाहीं; परंतु क्षणभर माझ्या एका बोलण्याकडे लक्ष दे. ३३२. कृष्णा, तूं जो आतां योग सांगितलास, तो माझ्या मनाला तर चांगलाच पटला, परंतु माझ्या ठिकाणीं अधिकाराची उणीव असल्यामुळें मी त्याचें अनुष्ठान करूं शकत नाहीं. ३३३. माझ्या अंगांत स्वभावतः जितकी योग्यता आहे, तितक्याच योग्यतेनें जर हा अभ्यास सिद्धीला जाईल, तर याच मार्गाचा मी सुखानें अभ्यास करीन. ३३४. अथवा देव जसें सांगतील, तसें जर आपल्या हातून होणार नसेल, तर योग्यतेशिवाय जें होण्याजोगें असेल, तेंच विचारूं. ३३५. माझ्या मनाची अशी समजूत झाली म्हणून पुसण्याचें प्रयोजन पडलें; म्हणून मी ( अर्जुन ) म्हणतो आपण ( इकडे ) लक्ष द्यावें. ३३६. अहो महाराज, ऐकलें का ? तुम्ही जें हें साधन सांगितलें, त्याचें वाटेल त्यानें अनुष्ठान केलें, तर तें साध्य होईल काय ? ३३७. अथवा योग्यतेशिवाय प्राप्त होत नाहीं, असें कांहीं ( येथें ) आहे ? ( असें अर्जुनानें विचारिलें ). तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, हें तूं काय विचारतोस ? ३३८. ही तर शेवटची ( अत्यंत उच्च दर्जाची ) गोष्ट आहे; पण इतर कांहीं साधारण काम असतें, तें तरी अधिकाराच्या योग्यतेशिवाय सिद्धीस जातें काय ? ३३९ परंतु योग्यता जी म्हणावयाची, ती प्राप्तीच्या आधीन आहे, असें समजावें; कारण योग्य होऊन जें करावें, तें आरंभींच फलदायक होतें. ३४०. तर तसा कांहीं येथें योग्यता हा सहज बाजारांत मिळणारा माल नाहीं; आणि योग्य पुरुषांची खाणी आहे काय ? ३४१. थोडासा विरक्त असून देहाच्या गरजा ज्यानें आवरल्या आहेत, तोच या कामीं योग्य अधिकारी नाहीं काय ? ३४२. एवढ्या युक्तीनें एवढी योग्यता तुलाही प्राप्त होईल. ( ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं ) अशी त्याची अडचण देवांनीं ओघानेंच दूर केली. ३४३. मग देव पुढें म्हणतात, अर्जुना, त्याची अशीही व्यवस्था आहे कीं, जो अनियमित वागतो; त्यास मुळींच योग्यता नाहीं. ३४४.

हे अर्जुना, अति खाणारा ( अथवा ) अगदींच न खाणारा ( किंवा ) अति झोंप घेणारा ( अथवा ) अगदींच झोंप न घेणारा असा ( जो असेल ) त्याला योग प्राप्त होणार नाहीं. १६.

जो जिह्वेच्या स्वाधीन आहे किंवा झोंपेला मनापासून वाहिलेला आहे, तो योगाविषयीं अधिकारी आहे, असें म्हणतां येत नाहीं. ३४५. अथवा जो हट्टाच्या बंदीखान्यांत भूक व तहान कोंडतो व भुकेला मारून आहार तोडतो; ३४६. व जो निद्रेच्या वाटेस जात नाहीं; याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं हट्टाचा पूर्ण संचार होऊन जो नाचतो, त्याचें तें शरीरच त्याच्या ताब्यांत रहाणार नाहीं; तर मग योग कोण करणार ? ३४७. म्हणून विषयाचें अतिसेवन करावें ही अशा प्रकारची विरोधी बुद्धि नसावी; किंवा वाजवीपेक्षा फाजील नियमन करणें हेंही कामाचें नाहीं. ३४८.

ज्याचें खाणें व हिंडणें परिमित आहे, जो सर्व कार्यामध्यें परिमित काम करतो, ज्याची निद्रा व जागर परिमित आहेत, त्याला ( संसाररूपी ) दुःखाचा नाश करणारा (हा) योग साध्य होतो. १७.

अन्न तर सेवन करावें, परंतु नियमाच्या मापानें मोजलेलें असावें. त्याचप्रमाणें इतर सर्व क्रिया कराव्यात. ३४९. मोजके शब्द बोलावेत, नियमित पावलांनीं चालावें व कोणा एका योग्य वेळीं झोंपेलाही मान द्यावा. ३५०. जागावयाचें जरी झालें, तरी तेंही परिमितच असावें. एवढ्यानें अनायासें कफवातादि सर्व धातूंची समता राहील. ३५१. अशा रीतीनें नियमितपणाच्या द्वारानें विषय दिले असतां मनच संतोषाला वाढवितें. ३५२. ( मग ) बाह्येंद्रियांना नियमितपणाचें वळण पडतें आणि अंतःकरणांत सुख वाढतें. अशा स्थितींत अभ्यासाचे कष्ट न पडतां योगाचा अभ्यास सहजच होतो. ३५३. ज्याप्रमाणें दैवाचा उदय झाला असतां, मग उद्योगाच्या निमित्तानें सर्व ऐश्वर्यें आपोआप घरीं चालत येतात, ३५४.

जेव्हां नियमन केलेलें असें चित्त आत्म्याचें ठिकाणीं लय पावतें, ( आणि जेव्हां ) सर्व प्रकारच्या इच्छांविषयीं साधक निरिच्छ होतो, तेव्हां त्याला योग सिद्ध झाला असें म्हणतात. १८.

तैसा युक्तिमंतु कौतुकें । अभ्यासाचिया मोहरा ठाके । आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभवु तयाचा ॥ ५५ ॥ म्हणोनि युक्ति हे पांडवा । घडे जया सदैवा । तो अपवर्गींचिये राणिवा । अळंकरिजे ॥ ५६ ॥ युक्ति योगाचें आंग पावे । ऐसें प्रयाग होय जे बरवें । तेथ क्षेत्रसंन्यासें स्थिरावें । मानस जयाचें ॥ ५७ ॥

यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता । योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥

तयातें योगयुक्त म्हण । हेंहीं प्रसंगें जाण । तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया ॥ ५८ ॥ आतां तुझें मनोगत जाणोनी । कांहीं एक आम्ही म्हणोनि । तें निकें चित्त देउनी । परिसावें गा ॥ ५९ ॥ तूं प्राप्तीची चाड वाहसी । परि अभ्यासीं दक्षु नव्हसी । तें सांग पां काय बिहसी । दुवाडपणा ॥ ३६० ॥ तरी पार्था हें झणें । सायास घेशी हो मनें । वायां बागूल इये दुर्जनें । इंद्रियें करिती ॥ ६१ ॥ पाहें पां आयुष्याचा अढळ करी । जें सरतें जीवित वारी । तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ॥ ६२ ॥ ऐसें हितासि जें जें निकें । तें सदाचि या इंद्रियां दुखे । एऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ॥ ६३ ॥ म्हणोनि आसनाचिया गाढिका । जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका । तेणें होईल तरी हो कां । निरोधु यया ॥ ६४ ॥

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया । यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥

एऱ्हवीं तरी येणें योगें । जें इंद्रियां विंदाण लागे । तें चित्त भेटों रिगे । आपणपेया ॥ ६५ ॥ परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियांतें आपण देखे । देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व तें मी ॥ ६६ ॥

सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् । वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥

तिये ओळखीचिसरिसें । सुखाचियां साम्राज्यीं बैसे । चित्तपण समरसें । विरोनि जाय । ॥ ६७ ॥ जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कहीं । तें आपणचि आपुलां ठायीं । होऊनि ठाके ॥ ६८ ॥

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥

मग मेरुपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां परि भारें । चित्त न दटे ॥ ६९ ॥ कां शस्त्रवरी तोडिलिया । देह आगीमाजीं पडलिया । चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये ॥ ३७० ॥ ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वास न पाहे । आणिकाचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥ ७१ ॥

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् । स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

त्याप्रमाणें नियमानें वागणारा पुरुष ज्या वेळेस लीलेनें आपला मोर्चा योगाभ्यासाकडे वळवितो, त्याच वेळेला त्याचा अनुभव आत्मप्राप्तीरूपानें पिकतो. ३५५. म्हणून, अर्जुना, हा नियमितपणा ज्या भाग्यवानाच्या हातून घडतो, तो पुरुष मोक्षाच्या राज्यानें अलंकृत होतो. ३५६. नियमितपणा ज्या वेळेस योगाला जाऊन मिळतो व असा दोघांचा प्रयागरूप चांगला संगम जेथें होतो, त्या ठिकाणीं ज्याचें मन क्षेत्रसंन्यास करून स्थिर होतें, ३५७.

वायुरहित प्रदेशामध्यें असलेला दीप ज्याप्रमाणें चलन पावत नाहीं, तीच उपमा चित्ताचें नियमन केलेल्या व आत्मयोगाचें अनुष्ठान करणाऱ्या योगी मनुष्यासंबंधानें जाणावी. १९.

त्याला तूं योगयुक्त म्हण. त्या पुरुषाच्या मनाच्या स्थितीला निवांत स्थलींच्या दीपाची उपमा योग्य होईल, हेंहि तूं प्रसंगानुसार समज. ३५८. आतां तुझ्या मनांतील अभिप्राय ओळखून तुला मी कांहीं थोडें सांगतों, तें तूं चांगलें चित्त देऊन ऐक. ३५९. तूं प्राप्तीची इच्छा बाळगतोस, परंतु अभ्यास करण्याविषयीं तत्पर असत नाहींस; तर सांग बाबा, तूं कठीणपणाला भितोस काय ? ३६०. तरी अर्जुना, यांत कष्ट आहेत, असा तुझ्या मनाचा ग्रह कदाचित होऊन बसेल, तर तो तसा होऊं देऊं नकोस. हीं दुष्ट इंद्रियें याचा उगाचच बाऊ करतात. ३६१. पहा बरें, आयुष्याला स्थिर करणारें व संपणाऱ्या जीविताला मागें आणणारें जें औषध, त्याला जिव्हा शत्रु समजत नाहीं काय ? ३६२. त्याप्रमाणें आपल्या हितास जें जें चांगलें, तें या इंद्रियांना सदोदित दुःखकारक वाटतें, येऱ्हवीं योगासारखें सोपें कांहीं आहे काय ? ३६३. म्हणून आसनाच्या बळकटपणापासून आरंभ करून जो आम्हीं तुला चांगला योगाभ्यास सांगितला, त्यायोगानें या इंद्रियांचा निरोध झाला तर होईल. ३६४.

जेथें योगाच्या अभ्यासानें नियमन पावलेलें चित्त विषयांपासून परावृत्त होतें; जेथें साधक आपण आपल्याला पाहून आत्मस्वरूपीं सुख पावतो; २०.

एऱ्हवीं तरी या योगामुळें ज्या वेळेला इंद्रियांचा निग्रह होतो, त्या वेळेला चित्त आपल्या ( चैतन्याच्या ) भेटीला निघतें. ३६५ तें ज्या वेळेला विषय सोडून परत अंतर्मुख होतें आणि आपण आपल्या आत्मस्वरूपाला पहातें, त्याच वेळीं, पाहिल्याबरोबर त्यास स्वस्वरूपाची ओळख पटते व तें तत्व मी आहें, अशा समजुतीवर तें येतें. ३६६.

जें सुख सर्वोत्कृष्ट आहे, जें ( केवळ ) बुद्धीनें प्राप्त आहे, जें इंद्रियांना अगोचर आहे, जें सुख भोगीत असतांना तो योगी आपल्या स्वरूपापासून चलन पावत नाहीं, असें सुख योग्याच्या अनुभवाला येतें. २१.

त्या ओळखीबरोबरच तें सुखाच्या साम्राज्यावर बसतें आणि तेथें आत्म्याशीं समरस झाल्यानें चित्ताचा चित्तपणा नाहींसा होतो. ३६७. व ज्याहून दुसरें कांहीं नाहीं व ज्याला इंद्रियें केव्हांच जाणत नाहींत असें जें चैतन्य तें चैतन्य, मन आपण स्वतः आपल्या ठिकाणीं होऊन रहातें. ३६८.

जें सुख मिळालें असतां, त्यापेक्षां अधिक असा दुसरा कांहीं लाभ आहे, अशी कल्पना येत नाहीं; व ज्या सुखामध्यें असतांना योगी मोठ्या दुःखानें देखील डगमगत नाहीं, २२.

मग मेरुपेक्षां मोठ्या दुःखाच्या डोंगरानें त्याचा देह जरी दडपला, तरी पण त्या भारानें त्याचें चित्त दडपत नाहीं. ३६९. अथवा शस्त्रानें त्याचा देह तोडला किंवा देह अग्नीमध्यें पडला तरी, चित्त निरतिशय सुखांत लीन झाल्यामुळें, परत वृत्तीवर येत नाहीं. ३७०. याप्रमाणें चित्त आपल्या ठिकाणीं प्रवेश करून राहिल्यावर मग देहाची वाट पहात नाहीं; ( देहतादात्म्य घेत नाहीं; ) व अलौकिक सुखच बनल्यामुळें तें चित्त देहाला विसरतें, ३७१.

त्या दुःखाच्या संयोगानें विहीन अशा सुखाला योग ही संज्ञा आहे असें जाणावें. निश्चयपूर्वक व सोत्साह अंतःकरणानें युक्त होऊन या योगाचें अनुष्ठान करावें. २३.

जया सुखाचिया गोडी । मन आर्तीची सेचि सोडी । संसाराचिया तोंडीं । गुंतलें जे ॥७२॥ जें योगाची बरव । संतोषाची राणीव । ज्ञानाची जाणीव । जयालागीं ॥ ७३ ॥ तें अभ्यासिलेनि योगें । सावेव देखावें लागे । देखिलें तरी आंगें । होइजेल गा ॥ ७४ ॥

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः । मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥

परि तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा । जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखविजे ॥७५॥ हा विषयांतें निमालिया आइके । इंद्रियें नेमाचिया घारणीं देखे । तरी हियें घालूनि मुके । जीवितासी ॥७६॥ ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाची सरे वारी । सुखें धृतीचिया घवळारीं । बुद्धि नांदे ॥ ७७ ॥

शनैः शनैरुपरमेद्बुद्धया धृतिगृहीतया । आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥

बुद्धी धैर्या होय वसौटा । तरी मनातें अनुभवाचिया वाटा । हळु हळु करी प्रतिष्ठा । आत्मभुवनीं ॥ ७८ ॥ याही एके परी । प्राप्ति आहे विचारीं । हें न ठके तरी । सोपारी आणिक ऐकें ॥ ७९ ॥

यतो यतो निश्चलति मनश्चंचलमस्थिरम् । ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

आतां नियमुचि हा एकला । जीवें करावा आपुला । जैसा कृतनिश्चयाचिया बोला- । बाहेरा नोहे ॥ ३८० ॥ जरी येतुलेनि चित्त स्थिरावे । तरी काजा आलें स्वभावें । न राहे तरी घालावें । मोकलुनी ॥ ८१ ॥ मग मोकलिलें जेथ जेथ जाईल । तेथूनि नियमुचि घेऊनि येईल । ऐसेनि स्थैर्याची होईल । सवे यया ॥ ८२ ॥

प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् । उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

पाठीं केतुलेनि एके वेळे । तया स्थैर्याचेनि मेळें । आत्मस्वरूपाजवळें । येईल सहजें ॥ ८३ ॥ तयातें देखोनि आंगा घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐक्यतेजें उघडेल । त्रैलोक्य हें ॥ ८४ ॥ आकाशीं दिसे दुसरें । तें अभ्र जैं विरे । तैं गगनाचि कां भरे । विश्व जैसें ॥ ८५ ॥ तैसें चित्त लया जाये । आणि चैतन्याचि आघवें होये । ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ॥ ८६ ॥

युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः । सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥

या सोपिया योगस्थिती । उकलु देखिला गा बहुतीं । संकल्पाचिया संपत्ती । रुसोनियां ॥ ८७ ॥ ते सुखाचेनि सांगातें । आले परब्रह्म आंतौतें । तेथ लवण जैसें जळातें । सांडूं नेणे ॥ ८८ ॥ तैसें होय तिये मेळीं । मग सामरस्याचिया राउळीं । महासुखाची दिवाळी । जगेंसि दिसे ॥ ८९ ॥ ऐसें आपले पायवरी । चालिजे आपुले पाठीवरी । हें पार्था नागवे तरी । आन ऐकें ॥ ३९० ॥

ज्या सुखाची चटक लागल्यानें संसाराच्या तोंडांत गुंतलेलें जें मन, तें विषयवासनेची आठवणही ठेवीत नाहीं. ३७२. जें सुख योगाचें सौभाग्य आहे, संतोषाचें राज्य आहे आणि ज्याच्याकरितां ज्ञानाची समजूत करून घ्यावयाची असते, ३७३. तें ( सुख ) अभ्यासलेल्या योगाच्या द्वारां मूर्तिमंत पाहिलें पाहिजे आणि पाहिल्यावर मग, तो पाहाणारा आपणच स्वतः सुखरूप होऊन जातो. ३७४.

संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व कामांना निःशेष टाकून व सर्व इंद्रियांचें सर्व बाजूंनीं मनानें नियमन करून, २४.

पण बाबा अर्जुना, एक प्रकारानें तो योग सोपा आहे, ( तो कसा म्हणशील तर ) संकल्पाला पुत्रशोक दाखवावा. [ संकल्पाचा पुत्र जो काम ( विषयवासना ) तो नाहींसा करावा. ] ३७५. हा संकल्प जर विषयवासना मेल्या असें ऐकेल व इंद्रियें नियमाच्या स्थितींत आहेत असें पाहील तर तो ऊर फुटून प्राणास मुकेल, ३७६. असें हें वैराग्यानें केलें, तर संकल्पाची येरझार संपते व बुद्धि धैर्याच्या महालांत सुखानें वास करते. ३७७.

धैर्ययुक्त अशा बुद्धीनें हळू हळू ( बाह्य प्रपंचापासून ) उपरम करावा ( बाह्य विषयांचा त्याग करावा ). मनाला आत्म्याच्याच ठिकाणीं स्थित करून, दुसऱ्या कशाचेंहि चिंतन करूं नये. २५.

बुद्धि जर धैर्याला आश्रयस्थान झाली, तर ती मनाला अनुभवाच्या वाटेनें हळू हळू आत्मानुभवांत कायमचें स्थिर करते. ३७८. याही एका तऱ्हेनें ब्रह्मप्राप्ति आहे, याचा विचार कर आणि हें जर तुला साध्य होत नसेल, तर आणखी एक सोपी युक्ति आहे, ती ऐक. ३७९.

चंचलवृत्ति ( अतएव ) अस्थिर असें मन ( आत्म्याकडून निघून ) ज्या ज्यामुळें बाहेर जातें त्या त्यापासून नियमन करून त्याला आत्म्याच्याच ताब्यांत आणावें. २६.

आतां तूं जो निश्चय करशील, त्याच्या हुकुमाच्या बाहेर जो नियम कधीं जाणार नाहीं, अशा प्रकारचा हा एकटा नियमच जिवाभावापासून तूं आपलासा कर. ३८०. जर एवढ्यानें चित्त स्थिर झालें, तर सहजच काम झालें. आणि जर येवढ्यानें स्थिर झालें नाहीं, तर त्याला मोकळें सोडून द्यावें. ३८१. मग मोकळें सोडलें असतां जेथें जेथें जाईल, तेथून नियमच त्यास परत घेऊन येईल, अशा रीतीनें यालाहि स्थैर्याची संवय होईल ३८२.



( याप्रमाणें अभ्यास केल्यानें ) ज्याच्या मनाला उत्तम शान्ति मिळाली आहे, ज्याचा रजोगुण नाश पावला आहे, जो पापपुण्यादिकांविरहित आहे व जो ब्रह्मस्वरूप झाला आहे, अशा योग्याला श्रेष्ठ असें सुख प्राप्त होतें. २७.

नंतर कांहीं एक वेळानें त्या स्थैर्याच्या योगानें मन सहज आत्मस्वरूपाजवळ येईल. ३८३. आणि मनानें त्या आत्मस्वरूपास पाहिल्याबरोबर, तें मन स्वतः आत्मरूप बनून जाईल; तेव्हां त्या अद्वैत स्वरूपांत द्वैत नाहींसें होईल; आणि नंतर हें सर्व त्रैलोक्य ऐक्याच्या तेजानें प्रकाशित होईल. ३८४. आकाशामध्यें निराळे दिसणारे जे मेघ, ते नाहींसे झाल्यावर ज्याप्रमाणें संपूर्ण विश्व पोकळीनेंच भरलेलें असतें, ३८५. त्याप्रमाणें आत्मस्वरूपीं चित्त लयाला गेलें, कीं संपूर्ण विश्व चैतन्यमयच होतें. या सुलभ उपायानें अशी ( एवढी मोठी ) प्राप्ति होते. ३८६.

या प्रकारें सर्वदा मन आत्म्याचे ठिकाणीं स्थिर करणारा योगी पापांनीं विरहित होतो व अनायासानें ब्रह्मसाक्षात्काररूपी आत्यंतिक सुख भोगतो. २८.

संकल्पाच्या संपत्तीचा ( विषयवासनांचा ) त्याग करून पुष्कळांनीं या सोप्या योगमार्गाचा उलगडा पाहिला आहे. ( अनुभव घेतला आहे. ). ३८७. ते पुरुष अनायासें परब्रह्माच्या आंत आले, ( तें कसें तर ) मीठ पाण्यास मिळालें असतां, पाण्यास सोडून जसें तें वेगळें रहात नाहीं, ३८८. त्याप्रमाणें त्या योग्याचा जेव्हां परब्रह्माशीं मिलाफ होतो, तेव्हां वरील मीठपाणी यांच्या मिलाफाच्या दृष्टान्ताप्रमाणें एकत्वरूपाची स्थिति होते; मग समरसतेच्या मंदिरांत संपूर्ण जगासह त्याला महासुखाची दिवाळी दिसते. ३८९. आपल्या पायांनीं आपल्या पाठीवर चालण्यासारखें हें आहे. अर्जुना, म्हणून जर तें तुला करतां येणार नाहीं, तर दुसरें सांगतों ऐक. ३९०.

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥

तरि मी तंव सकळ देहीं । असें एथ विचारु नाहीं । आणि तैसेंचि माझां ठायीं । सकळ असे ॥ ९१ ॥ हें ऐसेंचि संचलें । परस्परें मिसळलें । बुद्धी घेपे एतुलें । होआवें गा ॥ ९२ ॥

यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति । तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

एऱ्हवीं तरी अर्जुना । जो एकवटलिया भावना । सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ॥ ९३ ॥ भूतांचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंतःकरणें । केवल एकत्वचि माझें जाणे । सर्वत्र जो ॥ ९४ ॥

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः । सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

मग तो एक हा मियां । बोलतां दिसतसे वायां । एऱ्हवीं न बोलिजे तरि धनंजया । तो मीचि आहें ॥ ९५ ॥ दीपा आणि प्रकाशा । एकवंकीचा पाडु जैसा । तो माझां ठायीं तैसा । मी तयामाजीं ॥ ९६ ॥ जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु । कां गगनाचेनि मानें अवकाशु । तैसा माझेनि रूपें रूपसु । पुरुषु तो गा ॥ ९७ ॥ जेणें ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी । देखिला जैसा पटीं । तंतु एकु ॥ ९८ ॥ कां स्वरूपें तरी बहुतें आहाती । परी तैसीं सोनीं बहुवें न होती । ऐसी ऐक्याचळाची स्थिती । केली जेणें ॥ ९९ ॥ नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं । तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं । ऐसी अद्वैतदिवसें पाहली । रात्री जया ॥ ४०० ॥ तो पंचात्मकीं सांपडे । मग सांग पां कैसेनि अडे । जो प्रतीतीचेनि पाडें । मजसीं तुके ॥ १ ॥ माझें व्यापकपण आघवें । गवसलें तयाचेनि अनुभवें । तरी न म्हणतां स्वभावें । व्यापकु जाहला ॥ २ ॥ आतां शरीरीं तरी आहे । परी शरीराचा तो नोहे । ऐसें बोलवरी होये । तें करूं ये काई ॥ ३ ॥

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

म्हणोनि असो तें विशेषें । आपणपयासारिखें । जो चराचर देखे । अखंडित ॥ ४ ॥ सुख-दुःखादि वर्में । कां शुभाशुभें कर्में । दोनी ऐसीं मनोधर्में । नेणेचि जो ॥ ५ ॥ हे समविषम भाव । आणिकही विचित्र जें सर्व । तें मानी जैसे अवयव । आपुले होती ॥ ६ ॥ हें एकैक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि आघवें । मी ऐसें स्वभावें । बोधा आलें ॥ ७ ॥ तयाही देह एकु कीर आथी । लौकिकीं सुखदुःखी तयातें म्हणती । परी आम्हांतें ऐसीचि प्रतीती । परब्रह्मचि हा ॥ ८ ॥ म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे । ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥ ९ ॥ हें तूतें बहुतीं प्रसंगीं । आम्ही म्हणों याचिलागीं । जे साम्यापरौती जगीं । प्राप्ति नाहीं ॥ ४१० ॥

अर्जुनउवाच—योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन । एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥

अर्जुन म्हणे देवा । तुम्ही सांगा कीर आमुचिया कणवा । परी न पुरों जी स्वभावा । मनाचिया ॥ ११ ॥ हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे । एऱ्हवीं राहाटावया

ज्याचें मन योगयुक्त झालें आहे, तो आपण प्राणिमात्राचे ठिकाणीं आहों व आपल्या ठिकाणीं प्राणिमात्र आहेत असें पहातो. तो सर्व ठिकाणीं समदृष्टी होतो. २९.

आणि मी तर सर्व देहांमध्यें आहें, यांत वाटाघाट करण्यासारखें कांहीं नाहीं आणि त्याचप्रमाणें माझ्या ठिकाणीं हें सर्व आहे. ३९१. हें असेंच बनलेलें आहे व परस्पर मिसळलेलें आहे, पण बुद्धीनें एवढें ग्रहण मात्र केलें पाहिजे. ३९२.

जो मला सर्वत्र पहातो आणि माझ्या ठिकाणीं सर्व पहातो, त्याला मी कधीं दृष्टीआड ( अथवा दूर ) होत नाहीं व तो मला कधीं दृष्टीआड ( अथवा दूर ) होत नाहीं. ३०.

एऱ्हवीं तरी अर्जुना, जो ऐक्याच्या समजुतीनें मी सर्व भूतांत सारखा व्यापून राहिलेलों आहें असें जाणून मला भजतो. ३९३. प्राण्यांच्या भेदानें त्याच्या अंतःकरणांत द्वैत उत्पन्न होत नाहीं आणि जो सर्व ठिकाणीं माझें केवळ एकत्वच जाणतो. ३९४.

( माझें ) एकत्व जाणून रहाणारा जो योगी सर्व भूतांचे ठायीं असलेल्या मला सेवितो, तो ( देह, नाम, इत्यादि ) सर्व प्रकारांनीं युक्त असला तरी मत्स्वरूप झालेला असतो. ३१.

अर्जुना, मग तो माझ्याशीं एकच आहे असें बोलणें व्यर्थ आहे. कारण असें जरी बोललें नाहीं, तरी तो मीच आहे. ३९५. दिवा व त्याचा प्रकाश, हे जसे दोन्ही एकच आहेत, त्याप्रमाणें, तो माझ्या ठिकाणीं आणि मी त्याच्या ठिकाणीं ऐक्यतेनें आहोंत. ३९६. ज्याप्रमाणें जेथपर्यंत पाणी आहे, तेथपर्यंत ओलावा आहे अथवा आकाशाच्या बरोबरीनें पोकळी आहे, त्याप्रमाणें माझ्या रूपानें तो पुरुष रूपवान आहे. ३९७. अर्जुना, ज्याप्रमाणें वस्त्रामध्यें केवळ एक सूतच असतें, त्याप्रमाणें ज्यानें अद्वैतबोधानें सर्व ठिकाणीं केवळ मलाच पाहिलें आहे. ३९८. अथवा अलंकाराचे आकार जरी पुष्कळ आहेत तरी त्याप्रमाणें सोनें पुष्कळ नाहींत, अशी ऐक्यरूपी पर्वताची स्थिरता ज्यानें केली आहे, ३९९. अथवा झाडाचीं जितकीं पानें आहेत, तितकीं रोपें लावलेलीं नाहींत, अशा अद्वैतदिवसानें ज्यास द्वैताची रात्र उजाडली. ४००. ( अशा रीतीनें ) जो अनुभवाच्या योग्यतेनें माझ्या बरोबरीचा ठरतो, तो पंचमहाभूतात्मक शरीरांत जरी असला तरी, मग सांग बरें, तो देहतादात्म्य घेऊन त्यांत कसा अडकून राहील ! ४०१. माझें सर्व व्यापकपण त्याच्या अनुभवानें कवटाळलें तर, त्याला व्यापक असें जरी म्हटलें नाहीं, तरी तो सहज व्यापक आहे. ४०२. आतां तो देहधारी जरी आहे, तरी तो देहाचें तादात्म्य घेत नाहीं, अशी ही त्याची स्थिति शब्दांनीं सांगतां येईल असें करतां येईल, काय ! ४०३.

सर्व ठिकाणीं जो आपल्यासारखें पहातो, सुख अथवा दुःख हेंही जो आपल्यासारखें पहातो, तो योगी, हे अर्जुना, अत्यंत श्रेष्ठ ( अवस्थेला पोहोंचलेला ) आहे असें जाणावें. ३२.

म्हणून त्याचें विशेष वर्णन करणें राहूं दे; अथवा जो तत्ववेत्ता सर्व चराचर आपणासारखेंच निरंतर पहातो; ४०४. सुखदुःखादि वर्में अथवा पुण्यपापादि कर्में, अशीं हीं द्वंद्वें जो मनानें समजतच नाहीं; ४०५. हे समविषमभाव (बरें-वाईट) आणखीही सर्व निरनिराळ्या प्रकारच्या वस्तु, ह्या जसे कांहीं आपले अवयव आहेत, असें जो समजतो; ४०६. हें वेगवेगळें काय सांगावयाचें आहे ? ज्याला सर्व त्रैलोक्यच आपण आहोंत असें ज्ञान सहजच प्राप्त झालें आहे. ४०७. त्यालाहि देह आहे खरा, आणि लोकांत त्याला सुखीदुःखीही म्हणतात, परंतु आमचा अनुभव असाच आहे कीं, तो परब्रह्म आहे. ४०८. म्हणून आपल्या ठिकाणीं जगत पहावें आणि आपणच जगत व्हावें, अशा एक साम्याचीच, हे अर्जुना, तूं उपासना कर. ४०९. तूं समदृष्टि ठेव, असें आम्ही एवढ्याचकरितां तुला पुष्कळ प्रसंगीं म्हणत आलों; कारण साम्यापलीकडे या जगांत दुसरा लाभ नाहीं. ४१०.

अर्जुन म्हणाला, हे मधुसूदना, तूं जो हा समदर्शनाचा योग सांगितलास, त्या योगाची, मन हें चंचल असल्यामुळें, कायमची स्थिति होईल असें मला वाटत नाहीं. ३३

( यावर ) अर्जुन म्हणाला, देवा, तुम्ही आमच्या विषयींच्या कळकळीनें खरोखर सांगत आहांत. परंतु महाराज, या मनाच्या स्वभावापुढें ( आमचा ) ठिकाव लागत नाहीं. ४११. हें मन कसें व केवढें आहे, याचा पत्ता लावूं असें म्हटलें, तर सांपडत नाहीं. एऱ्हवीं या मनाला वावर-

थोडें । त्रैलोक्य यया ॥ १२ ॥ म्हणोनि ऐसें कैसें घडेल । जे मर्कट समाधी येईल । कां राहे म्हणतलिया राहेल । महावातु ॥ १३ ॥

चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

जें बुद्धीतें सळी । निश्चयातें टाळी । धैर्येंसी हातफळी । मिळऊनि जाय ॥ १४ ॥ जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ १५ ॥ जें निरोधलें घे उवावो । जया संयमुचि होय सावावो । तें मन आपुला स्वभावो । सांडील काई ॥ १६ ॥ म्हणोनि मन एक निश्चळ राहेल । मग आम्हांसि साम्य येईल । हें विशेषेंहि न घडेल। तयालागीं ॥ १७ ॥

श्रीभगवानुवाचः—असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् । अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

तंव कृष्ण म्हणती साचचि । बोलत आहासि तें तैसेंचि । यया मनाचा कीर चपळचि । स्वभावो गा ॥ १८ ॥ परि वैराग्याचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरे । तरि केतुलेनि एकें अवसरें । स्थिरावेल ॥ १९ ॥ कां जें यया मनाचें एक निकें । जे हें देखिले गोडीचिया ठाया सोके । म्हणोनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाइजे ॥ ४२० ॥

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः । वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

एऱ्हवीं विरक्ति जयांसि नाहीं । जे अभ्यासीं न रिघती कहीं । तयां नाकळे हें आम्हीही । न मनूं कायी ॥ २१ ॥ परि यमनियमांचिया वाटा न वचिजे । कहीं वैराग्याची से न करिजे । केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ॥ २२ ॥ या जालिया मानसा कहीं । युक्तीची कांबी लागली नाहीं । तरी निश्चल होईल काई । कैसेनि सांगें ॥ २३ ॥ म्हणोनि मनाचा निग्रहो होये । ऐसा उपाय जो आहे । तो आरंभीं मग नोहे । कैसा पाहें ॥ २४ ॥ तरी योगसाधन जितुकें । तें अवघेंचि काय लटिकें । परि आपणपयां अभ्यासुं न ठाके । हेंचि म्हणें ॥ २५ ॥ आंगीं योगाचें होय बळ । तरि मन केतुलें चपळ । काय महदादि हें सकळ । आपु नोहे ॥ २६ ॥

अर्जुन उवाचः—अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः । अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥

तेथ अर्जुन म्हणे निकें । देवो बोलती तें न चुके । साच योगबळेंसीं न तुके । मनोबळ ॥ २७ ॥ तरि तोचि योगु कैसा केवीं जाणों । आम्ही येतुले दिया मातुही नेणों । म्हणोनि मनातें जी म्हणों । अनावर हें ॥ २८ ॥ हा आतां आघवेया जन्मा । तुझेनि प्रसादें पुरुषोत्तमा । योगपरिचयो आम्हां । जाहला आजी ॥ २९ ॥ परि आणिक एक गोसांविया । मज संशयो असे साविया । तो तूंवांचूनि फेडावया । समर्थु नाहीं ॥ ४३० ॥ म्हणोनि सांगें गोविंदा । कवण एकु मोक्षपदा । झोंबत होता श्रद्धा । उपायेंविण ॥ ३१ ॥ इंद्रियग्रामोनि निगाला । आस्थेचिया वाटा लागला । आत्मसिद्धीचिया पुढिला । नगरा यावया ॥ ३२ ॥

ज्याला हें सर्व त्रैलोक्य अपुरें पडतें. ४१२. म्हणून हें असें कसें होईल, कीं माकडाला समाधि लागेल ! किंवा सोसाट्याचा वारा, ' थांब ' म्हटल्याबरोबर थांबेल काय ! ४१३.

हे कृष्णा, मन चंचल, क्षोभक, बलयुक्त व ( वळवण्यास ) कठीण आहे, त्याचा निग्रह (करणें) वायूच्या निग्रहाप्रमाणेंच अत्यंत कठीण आहे असें मला वाटतें. ३४.

जें मन बुद्धीला छळतें, बुद्धीनें केलेला निश्चय सिद्धीस जाऊं देत नाहीं आणि सात्त्विक धैर्याच्या हातावर हात मारून पळून जातें, ४१४. जें सारासारबुद्धीला भ्रमांत पाडतें, संतोषाला आशा उत्पन्न करतें आणि आपण एके ठिकाणीं राहिलों तरी आपणांला दाही दिशांना फिरवितें. ४१५. ज्याला आवरलें असतां तें जास्त उसळतें, ज्याला निरोधच साह्य होतो, तें मन आपला स्वभाव टाकील काय ! ४१६. म्हणून हें मन एक निश्चल राहील, आणि मग आम्हांला साम्यावस्था प्राप्त होईल, हें एवढ्याकरितां फार करून घडणार नाहीं. ४१७.

श्रीकृष्ण म्हणाले, हे वीर्यशाली अर्जुना, मन हें निःसंशय चंचल असून निग्रह करण्यास अत्यंत कठीण आहे. परंतु अर्जुना ( सतत ) अभ्यासानें व वैराग्यानें याचा निग्रह करतां येतो. ३५.

तेव्हां कृष्ण म्हणाले, खरोखर तूं म्हणत आहेस, तें तसेंच आहे. या मनाचा स्वभाव खरोखर चपळच आहे. ४१८. परंतु वैराग्याच्या जोरावर मन जर अभ्यासाकडे वळविलें, तर कांहीं एका वेळानें तें स्थिर होईल. ४१९. कारण कीं, या मनाची एक गोष्ट चांगली आहे; ती ही कीं, तें अनुभविलेल्या गोडीच्या ठिकाणीं संवकतें. म्हणून त्याला कौतुकानें आत्मानुभवसुखच वारंवार दाखवीत जावें ४२०.

( विरक्ति व अभ्यास यांचे अभावीं ) ज्याचें अंतःकरण स्वाधीन नाहीं, त्याला योग प्राप्त होणें अत्यंत कठीण आहे, हें मलाही पटतें. परंतु ज्याचें अंतःकरण स्वाधीन आहे, त्यानें ( वर सांगितलेल्या ) उपायांनीं प्रयत्न केला असतां त्याला योग प्राप्त होणें शक्य आहे. ३६.

एऱ्हवीं ज्यांना वैराग्य नाहीं, जे केव्हांच अभ्यासांत शिरत नाहींत, त्यांना मन आवरत नाहीं, ही गोष्ट आम्हांलाही कबूल नाहीं काय ! ४२१. परंतु यमनियमाच्या वाटेनें गेलें नाहीं, वैराग्याची केव्हांहि आठवण केली नाहीं व केवळ विषयरूपी पाण्यामध्यें बुडी मारून राहिले, ४२२. ( व ) आपल्या मनाला उत्पन्न झाल्यापासून कधींही युक्तीचा चिमटा जर लावलाच नाहीं; तर तें स्थिर कसें काय होईल ! सांग बरें. ४२३. म्हणून मनाचा निग्रह होईल, असा जो उपाय आहे, तो करण्याला आरंभ कर; मग निग्रह कसा होत नाहीं तें पाहूं ! ४२४. तर योगसाधन जेवढें आहे, तें सर्वच खोटें आहे काय ! परंतु, आपल्या हातून अभ्यास होत नाहीं असें म्हण. ४२५. अंगामध्यें योगाचें जर सामर्थ्य असेल, तर त्यापुढें मनाची चपलता ती किती आहे ! हें महत्तत्त्वादि सर्व आपल्या स्वाधीन होणार नाहीं काय ! ४२६.

अर्जुन म्हणाला, हे कृष्णा, मनुष्य श्रद्धेनें युक्त असला, पण त्याचें मन ( कांहीं कालानें ) योगापासून चलित झाल्यानें त्याचा प्रयत्न सुटला व ( तेणेंकरून ) त्याला योगसिद्धि प्राप्त झाली नाहीं, तर तो कोणत्या गतीला जातो ! ३७.

त्या प्रसंगीं अर्जुन म्हणाला, फार चांगलें ! देव म्हणतात त्यांत चूक नाहीं. खरोखर योगाच्या सामर्थ्याबरोबर मनाच्या सामर्थ्याची तुलना करतां येणार नाहीं. ४२७. परंतु, तोच योग कसा आहे व त्याचें ज्ञान कसें करून घ्यावयाचें ! ह्याची इतके दिवस आम्हांला वार्ताही नव्हती. म्हणून महाराज, आम्हीं म्हणत होतों कीं हें मन अनावर आहे. ४२८. कृष्णा, ह्या सार्‍या जन्मांत तुझ्या प्रसादाच्या योगानें ही आतां संप्रत आम्हांला योगाची ओळख झाली. ४२९. परंतु महाराज, ( या प्रसंगीं ) मला आणखी एक संशय आलेला आहे, तो दूर करण्यास तुझ्यावांचून कोणी समर्थ नाहीं. ४३०. म्हणून देवा सांगा, कोणी एक योग्य खटपटीशिवाय केवळ श्रद्धेच्या जोरावर मोक्षपदाला काबीज करावयास पाहात होता. ४३१. पुढलें गांव जें आत्मसिद्धि, त्या गांवाला येण्याकरितां तो इंद्रियरूपी गांवाहून निघून आस्थेच्या वाटेला लागला. ४३२.

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति । अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥

तंव आत्मसिद्धि न ठकोचि । आणि मागुतें न येववेचि । ऐसा अस्तु गेला माझारींचि । आयुष्यभानु ॥ ३३ ॥ जैसें अवकाळीं आभाळ । अळुमाळु सपातळ । विपायें आलें केवळ । वसे ना वर्षे ॥ ३४ ॥

एतन्मे संशयं कृष्ण च्छेत्तुमर्हस्यशेषतः । त्वदन्यः संशयस्यास्य च्छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

तैसीं दोन्ही दुरावलीं । जे प्राप्ति तव अलग ठेली । आणि अप्राप्तिही सांडवली । श्रद्धा तया ॥३५॥ ऐसा बोलांतरलाकाजीं । जो श्रद्धेचांचि समाजीं । बुडला तया हो जी । कवण गति ॥३६॥

श्रीभगवानुवाचः—पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते । न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

तंव कृष्ण म्हणती पार्था । जया मोक्षसुखीं आस्था । मोक्षावांचुनि अन्यथा । गति आहे गा ॥ ३७ ॥ परि एतुलेंचि एक घडे । जें माझारीं विसवावें पडे । तेंही परि ऐसेनि सुरवाडें । जो देवां नाहीं ॥ ३८ ॥ एऱ्हवीं अभ्यासाचां उचलतां । पाउलीं जरी चालता । तरि दिवसाआधीं ठाकिता । सोहंसिद्धीतें ॥ ३९ ॥ परि तेतुला वेगु नव्हेचि । म्हणउनि विसावा तरी निकाचि । पाठीं मोक्षु तंव तैसाचि । ठेविला असे ॥ ४४० ॥

प्राप्य पुण्यकृताँल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः । शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

ऐकें कवतिक हें कैसें । जे शतमखा लोक सायासें । ते तो पावे अनायासें । कैवल्यकामु ॥ ४१ ॥ मग तेथिंचे जे अमोघ । अलौकिक भोग । भोगितांही सांग । कांटाळे मन ॥ ४२ ॥ हा अंतरायो अवचितां । कां वोढवला भगवंता । दिविभोग भोगितां । अनुतापी नित्य ॥ ४३ ॥ पाठीं जन्मे संसारीं । परी सकळ धर्माचिया माहेरीं । लांबा उगवे आगरीं । विभवश्रियेचा ॥ ४४ ॥ जयातें नीतिपंथें चालिजे । सत्यधूत बोलिजे । देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टी ॥ ४५ ॥ वेद तो जागेश्वरु । जया व्यवसाय निजाचारु । सारासारविचारु । मंत्री जयातें ॥४६॥ जयाचां कुळीं चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता । जयातें गृहदेवता । आदि ऋद्धि ॥ ४७ ॥ ऐसी निजपुण्याचिया जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी । तिये जन्मे तो सुरवाडी । योगच्युतु ॥ ४८ ॥

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् । एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

अथवा ज्ञानाग्निहोत्री । जे परब्रह्मण्य श्रोत्री । महासुखक्षेत्रीं । आदिवंत ॥ ४९ ॥ जे सिद्धांताचां सिंहासनीं । राज्य करिती त्रिभुवनीं । जे कूंजते कोकिल वनीं । संतोषाचां ॥ ४५० ॥ जे विवेकद्रुमाचे मुळीं । बैसले आहाति नित्य फळीं । तया योगियांचां कुळीं । जन्म पावे ॥ ५१ ॥

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ॥ ४३ ॥

मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पांहाट फुटे । सूर्यापुढां प्रगटे । प्रकाशु जैसा ॥ ५२ ॥ तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच

हे वीर्यशाली श्रीकृष्णा, ( इंद्रियसुख व मोक्ष या ) दोहींपासून भ्रष्ट झालेला तो ब्रह्मप्राप्तीच्या मार्गामध्यें आधारहीन व मतिहीन होत्साता, इतर ढगांपासून वेगळ्या झालेल्या ढगाप्रमाणें, नाश पावतो कीं काय ? ३८

( आतां ) तो आत्मसिद्धीच्या गांवालाही पोहोंचला नाहीं आणि त्यास परतही येववत नाहीं; असा मध्येंच असतांना त्याचा आयुष्यरूपी सूर्य अस्ताला गेला. ४३३. भलत्या वेळीं विरळ असे थोडे नुसते चुकून ढग आले, तर ते टिकत नाहींत व वर्षावही करीत नाहींत; ४३४.

हे कृष्णा, ही माझी शंका पूर्णतेनें नाहींशी करण्याला तूं समर्थ आहेस. ही शंका नष्ट करण्यास तुझ्याखेरीज दुसरा कोणी समर्थ आढळत नाहीं. ३९.

त्याप्रमाणें विषयासक्तता व मोक्ष हीं दोन्हीं त्यास दूर राहिलीं; अशी कीं, आत्मसिद्धीची प्राप्ति तर दूरच राहिली आणि दुसरें, आपल्यास आत्मप्राप्ति होणार नाहीं अशी आशाही त्यास श्रद्धा असल्यामुळें सोडतां येत नाहीं. ४३५. याप्रमाणें जो पुरुष उशीरामुळें फसला व जो आत्मप्राप्तीविषयीं पूर्ण श्रद्धा असतांना मेला, त्याला, अहो महाराज, कोणती गति प्राप्त होते ? तें सांगा. ४३६.

श्रीकृष्ण म्हणाले, हे पार्था, इहलोकीं अथवा परलोकीं ( कोठेंहि ) त्याचा नाश होत नाहीं. कारण बाबा, शुभकर्म करणारा कोणीहि दुर्गतीला जात नाहीं. ४०

तेव्हां कृष्ण म्हणाले, अर्जुना, ज्याला मोक्षसुखाची उत्कट इच्छा आहे, त्याला मोक्षाशिवाय दुसरी गति आहे काय ? ४३७. पण एवढेंच एक होतें कीं, मध्यें विसांवा घ्यावा लागतो; पण तें विसांवा घेणेंही असें सुखकर असतें कीं, जें इंद्रादि देवांनाही नाहीं. ४३८. वास्तविक अभ्यासाच्या जलद पावलानें जर तो चालता, तर मरण-काळापूर्वीच ब्रह्मसिद्धीस येऊन मिळता. ४३९. पण तितक्या वेगानें अभ्यास न झाल्यामुळें, विसावा घेणें योग्यच होतें व नंतर मोक्ष त्याच्याकरितां ठेवलेलाच आहे. ४४०.

पुण्यकर्मीयांच्या लोकाला जाऊन ( तेथें ) पुष्कळ वर्षें वास केल्यानंतर, शुद्धाचरणी व धनवान अशा कुळामध्यें तो योगभ्रष्ट जन्म पावतो. ४१.

ऐक, कसा चमत्कार होतो तो ! शंभर यज्ञ करणाऱ्यास कष्टानें जी स्थिति प्राप्त होते, ती त्या मोक्षाची इच्छा करणारास श्रमावांचून मिळते. ४४१. मग त्या ठिकाणचे जे दिव्य व निष्फळ न होणारे भोग, ते यथास्थित भोगीत असतांही त्याच्या मनास कंटाळा येतो. ४४२. 'देवा, हें विघ्न आमच्यावर कां कोसळलें !' असा, स्वर्गांतील भोग भोगीत असतां तो सारखा पश्चात्ताप करीत असतो. ४४३. नंतर तो मनुष्यलोकांत जन्मतो; पण सर्वधर्माचें वसतिस्थान आणि वैभवरूप लक्ष्मीचें जें कुलरूपी शेत, त्यामध्यें तो भातगोट्याचे रोपाप्रमाणें वाढतो. ४४४. जें कुल नीतीच्या मार्गानें चालतें, सत्यानें पवित्र झालेलें बोलतें आणि जें पाहाणें असेल तें, शास्त्रदृष्टीनें पाहातें. ४४५. ज्या कुळांत वेद हें जागृत दैवत असतें, शास्त्रविहित आचरण हाच ज्याचा व्यापार आहे व सारासार विचार हाच ज्याचा सल्लामसलत देणारा प्रधान आहे. ४४६. ज्या कुळामध्यें चिंता ईश्वराचीच एकनिष्ठ पत्नी झालेली असते आणि ऋध्यादिक या ज्याच्या घरांतील देवता आहेत, ४४७. अशा रीतीनें ज्या कुळांत आपल्या पुण्याईच्या कमाईनें सर्व सुखाचा व्यापार वाढला आहे, त्या कुळांत तो योगभ्रष्ट सुखानें जन्म घेतो. ४४८.

अथवा बुद्धिमान् अशा योगी लोकांच्या कुळामध्यें तो जन्म पावतो. अशा तऱ्हेचा हा जन्म या जगामध्यें फार दुर्लभ आहे. ४२.

अथवा जे ज्ञानाग्नीमध्यें हवन करतात आणि जे ब्रह्मनिष्ठ व वेदसंपन्न असतात व जे ब्रह्मसुखरूपी शेताचे मिरासदार असतात, ४४९. जे ( एकमेवाद्वितीयं ब्रह्म ) या सिद्धांताच्या सिंहासनावर बसून, त्रैलोक्यांत राज्य करतात व जे संतोषाच्या वनांत शब्द करणारे कोकीळ आहेत, ४५०. जे विवेकरूप गांवाच्या मुख्य ठिकाणीं असलेल्या ब्रह्मरूप फळाचें नित्य सेवन करीत राहिले आहेत, त्या योग्यांच्या कुळांत त्यास जन्म मिळतो. ४५१.

त्या ठिकाणीं पूर्वदेहींच्या संस्कारानें आलेला बुद्धियोग त्याला प्राप्त होतो. हे कुरुनंदना, त्यापुढें तो पुन्हां योगसिद्धीसाठीं प्रयत्न करतो. ४३.

अल्प वयांतच त्याच्या ठिकाणीं स्वरूपज्ञानाचा उदय होतो. ज्याप्रमाणें सूर्य उगवण्याच्या पूर्वी अरुणोदयाचा प्रकाश होतो, ४५२. त्याप्रमाणें योग्य अवस्थेची वाट न पाहतां, प्रौढ वयरूपी गांवाला पोहोंचण्याच्या

सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ५३ ॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥ ५४ ॥ ऐसें जें जन्म । जयालागीं देव सकाम । स्वर्गीं ठेले जप होम । करिती सदा ॥ ५५ ॥ अमरीं भाट होईजे । मग मृत्युलोकातें वानिजे । ऐसें जन्म पार्था गा जें । तें तो पावे ॥ ५६ ॥

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः । जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

आणि मागील जे सद्बुद्धि । जेथ जीविता जाहाली होती अवधि । मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ॥ ५७ ॥ तेथ सदैवा आणि पायाळा । वरि दिव्यांजन होय डोळां । मग देखे जैसी अवलीळा । पाताळधनें ॥ ५८ ॥ तैसे दुर्भेद जे अभिप्राय । कां गुरुगम्य हन ठाय । तेथ सौरसेंवीण जाय । बुद्धि तयाची ॥ ५९ ॥ बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना । पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ॥ ४६० ॥ ऐसें नेणों काय आपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें । समाधि घर पुसे । मानसाचें ॥ ६१ ॥ जाणिजे योगपीठीचा भैरवु । काय हा आरंभरंभेचा गौरवु । कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ॥ ६२ ॥ हा संसार उमाणितें माप । कां अष्टांगसामग्रीचे दीप । जैसे परिमळेंचि धरिजे रूप । चंदनाचें ॥ ६३ ॥ तैसा संतोषाचा काय घडिला । कीं सिद्धभांडारींहूनि काढिला । दिसे तेणें मानें रूढला । साधकदशे ॥ ६४ ॥ जे वर्षशतांचिया कोडी । जन्मसहस्रांचिया आडी । लंघिता पातला थडी । आत्मसिद्धीची ॥ ६५ ॥ म्हणोनि साधनजात आघवें । अनुसरे तया स्वभावें । मग आयतिये बैसे राणिवे । विवेकाचिये ॥ ६६ ॥ पाठीं विचारितया वेगा । तो विवेकुही ठाके मागां । मग अविचारणीय तें आंगा । घडोनि जाय ॥ ६७ ॥ तेथ मनाचें मेहुडें विरे । पवनाचें पवनपण सरे । आपणपां आपण मुरे । आकाशही ॥ ६८ ॥ प्रणवाचा माथा बुडे । येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे । म्हणोनि आधींचि बोलु बहुडे । तयालागीं ॥ ६९ ॥ ऐसी ब्रह्माची स्थिती । जे सकळां गतींसी गती । तया अमूर्ताची मूर्ति । होऊनि ठाके ॥ १७० ॥

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः । अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं । म्हणोनि उपजतखेंवो बुडाली । लग्नघटिका ॥ ७१ ॥ आणि तद्रूपतेसीं लग्न । लागोनि ठेलें अभिन्न । जैसें लोपलें अभ्र गगन । होऊनि ठाके ॥ ७२ ॥ तैसें विश्व जेथ होये । मागौतें जेथ लया जाये । तें विद्यमानेंचि देहें । जाहला तो गा ॥ ७३ ॥ जया लाभाचिया आशा । करूनि धैर्यबाहूंचा भरंवसा । घालीत षट्कर्मांचा धारसा । कर्मनिष्ठ ॥ ७४ ॥ कां जिये एकी वस्तूलागीं । बाणोनि ज्ञानाची वज्रांगी । झुंजत प्रपंचेंशीं समरंगीं । ज्ञानिये गा ॥ ७५ ॥ अथवा निलागें निसरडा । तपोदुर्गाचा आडकडा । झोंबती तपिये चाडा । जयाचिया ॥ ७६ ॥ जें भजतियांसी

अगोदर लहानपणींच, सर्वज्ञता त्यास माळ घालते. ४५३. पूर्वजन्मांत तयार झालेली बुद्धि त्याला अनुकूल असल्यामुळे, त्याचें मनच सर्व विद्यांना प्रसवतें आणि मग सर्व शास्त्रें आपोआप त्याच्या मुखांतून निघतात. ४५४. ज्याकरितां देव कामनायुक्त होऊन स्वर्गांत नेहमीं जप, होम इत्यादिक करीत राहिले आहेत, असा जो जन्म ४५५. व देवांनीं भाट होऊन मृत्युलोकाचें वर्णन करावें असा जो जन्म, अर्जुना, तो त्याला प्राप्त होतो. ४५६.

योगमार्गाचा अवलंब करण्यास जरी तो समर्थ नसला तरी तो पूर्वजन्मींचा योगाभ्यास त्याला आपल्याकडे ओढतो. फार कशाला ? योगसंबंधीं जिज्ञासु असूनही शब्दब्रह्माचें अतिक्रमण करतो. (वेदरहस्यासारखे गूढ अभिप्राय अथवा समाधीचा अनुभव हे याच स्थितींत त्याला सहज साध्य होतात. ) ४४.

आणि मागल्या जन्मांची चांगली बुद्धि, जी त्याला मागील जन्माचा शेवट होण्याच्या वेळीं प्राप्त झाली होती, तीच चांगली बुद्धि मग (या जन्मीं) त्याला सतत नवी प्राप्त होते. ४५७. एकादा भाग्यवान पुरुष पायाळू असून, त्याला डोळ्यांत घालण्याला दिव्यांजन मिळाल्यानंतर, तो जसा पाताळांतील द्रव्य सहज पहातो, ४५८. त्याप्रमाणें ज्या सिद्धांतांत बुद्धीचा प्रवेश होत नाहीं अथवा जे सिद्धांत केवळ गुरुकडून खरोखर कळावयाचे असतात, त्या सिद्धांतांत त्याची बुद्धि यत्नावांचून प्रवेश करते. ४५९. बलवान इंद्रियें मनाच्या स्वाधीन होतात, मन प्राणवायूशीं एक होतें आणि प्राणवायु अनायासें मूर्ध्निआकाशास मिळूं लागतो. ४६०. असें सहजच कसें काय होतें, हें समजत नाहीं. अभ्यास त्याला आपोआप येतो व समाधि त्याच्या मनाचें घर विचारीत येते. ४६१. हा योगभ्रष्ट पुरुष योगरूपी आसनावरील जणूंकाय भैरवदेवच अथवा योगारंभरूपी केळीची शोभाच किंवा जणूंकाय वैराग्याच्या पूर्णतेचा मूर्तिमंत अनुभवच आकाराला आलेला आहे ! ४६२. हा पुरुष म्हणजे संसार मोजण्याचें मापच किंवा अष्टांगयोगाची सामुग्री दाखविणारा जणूं दिवाच होय ! ज्याप्रमाणें सुवासानेंच चंदनाचें रूप धरावें, ४६३. त्याप्रमाणें हा पुरुष जसा कांहीं संतोषाचाच बनविलेला अथवा सिद्धांच्या समुदायांतून काढलेला असावा, इतक्या योग्यतेचा साधकदशेंतच तयार झालेला दिसतो. ४६४. कारण कीं कोट्यावधि शतवर्षांत हजारों जन्मांचे प्रतिबंध उल्लंघन करून तो आत्मसिद्धीच्या किनाऱ्याला येऊन पोहोंचला. ४६५. म्हणून सर्व साधनमात्र आपोआप त्याच्यामागें येतात; नंतर तो आयताच विवेकाच्या राज्यावर बसतो. ४६६. नंतर विचाराच्या वेगामुळें तो विवेकही मागें राहतो आणि मग विचारांच्या आवांक्याबाहेरचें जें स्वरूप तें तो स्वतः बनतो. ४६७. त्या ठिकाणीं मनरूपी मेघ नाहींसा होतो व वाऱ्याचा वारेपणा ( चंचलपणा ) संपतो आणि त्याचप्रमाणें आकाशदेखील आपण आपल्यांतच मुरतें. ४६८. तो ओंकाराच्या अर्धमात्रेंत लीन व्हावा, इतकें त्याला शब्दातीत सुख मिळतें. म्हणून त्याच्याविषयीं शब्द अगोदरच परत फिरतो ( शब्दानें ह्याचें वर्णन करतां येत नाहीं. ) ४६९. (तात्पर्य) अशी जी ब्रह्माची स्थिति, जी सगळ्या गतींची गति आहे, त्या निराकार ब्रह्मस्थितीची हा मूर्ति होऊन राहतो. ४७०.

(आणि नंतर) प्रयत्नपूर्वक योगमार्गाचे ठिकाणीं झटल्यावर, तो योगी पापापासून शुद्ध होऊन, अनेक जन्मांनीं योगसिद्धि प्राप्त झाल्यावर, अत्यंत श्रेष्ठ अशा गतीला म्हणजे मोक्षाला जातो. ४५.

त्यानें मागील अनेक जन्मांत विक्षेपरूपी केरकचरा काढून टाकला म्हणून, या जन्मीं उपजतांक्षणींच लग्नघटका बुडाली. (त्याचा कर्मक्षय होऊन ब्रह्माशीं ऐक्य होण्याची वेळ प्राप्त झाली. ) ४७१. आणि ज्याप्रमाणें ढग नाहींसा झाला म्हणजे तो आकाशाशीं एकरूप होतो, त्याप्रमाणें ब्रह्मरूपाशीं त्याचें अभिन्नतेनें लग्न लागतें. ४७२. त्याप्रमाणें अर्जुना, ज्या स्वरूपापासून विश्व उत्पन्न होतें व फिरून तें विश्व ज्या स्वरूपीं लीन होतें, तें स्वरूप तो ह्यांच्या देहानेंच होतो. ४७३. ज्या वस्तूच्या प्राप्तीच्या आशेनें, धैर्यरूपी बाहूंचा विश्वास धरून, कर्मनिष्ठ लोक षट्कर्मांच्या प्रवाहामध्यें उडी टाकतात; ४७४. अथवा ज्या एका वस्तूकरितां ज्ञानी लोक ज्ञानाचें चिलखत अंगांत घालून समरांगणामध्यें संसाराशीं लढतात; ४७५. अथवा तपी लोक ज्या स्वरूपप्राप्तीच्या इच्छेनें तपरूपी तुटलेल्या निराधार व निसरड्या कड्यावर चढण्याचा प्रयत्न करतात, ४७६. जें स्वरूप भजन करणाऱ्या लोकांच्या भजनाचा विषय आहे, जें स्वरूप यज्ञ करणाऱ्या लोकांच्या यज्ञाचा विषय आहे; याप्रमाणें

भज्य । याज्ञिकांचें याज्य । एवं जें पूज्य । सकळां सदा ॥ ७७ ॥ तेंचि तो आपण । स्वयें जाहला निर्वाण । जें साधकांचें कारण । सिद्ध तत्त्व ॥ ७८ ॥

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः । कर्मिभ्यश्चाऽधिको योगी तस्माद्योगी भवाऽर्जुन ॥ ४६ ॥

म्हणोनि कर्मनिष्ठां वंद्यु । तो ज्ञानियांसि वेद्यु । तापसांचा आद्यु । तपोनाथु ॥ ७९ ॥ पैं जीवपरमात्मसंगमा । जयाचें येणें जाहलें मनोधर्मा । तो शरीरीचि परी महिमा । ऐसी पावे ॥ ४८० ॥ म्हणोनि याकारणें । तूंतें मी सदा म्हणें । योगी होय अंतःकरणें । पंडुकुमरा ॥ ८१ ॥

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना । श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

अगा योगी जो म्हणिजे । तो देवांचा देव जाणिजे । आणि सुखसर्वस्व माझें । चैतन्य तो ॥ ८२ ॥ जया भजता भजन भजावें । हें भक्तिसाधन जें आघवें । तें मीचि जाहलों अनुभवें । अखंडित ॥ ८३ ॥ मग तया आम्हां प्रीतीचें । स्वरूप बोलीं निर्वचे । ऐसें नव्हे गा तो साचें । सुभद्रापती ॥ ८४ ॥ तया एकवटलिया प्रेमा । जरी पाडें पाहिजे उपमा । तरी मी देह तो आत्मा । हेचि होय ॥ ८५ ॥ ऐसें भक्तचकोरचंद्रें । तेथ त्रिभुवनैकनरेंद्रें । बोलिलें गुण-समुद्रें । संजयो म्हणे ॥ ८६ ॥ तेथ आदिलापासूनि पार्था । ऐकिजे ऐसीचि अवस्था । दुणावली हें यदुनाथा । पावों सरलें ॥ ८७ ॥ कीं साविचाचि मनीं तोषला । जे बोला आरिसा जोडला । तेणें हरिखें आतां उपलवला । निरूपील ॥ ८८ ॥ तो प्रसंगु आहे पुढां । जेथ शांतु दिसेल उघडा । तो पालविजेल मुडा । प्रमेयबीजांचा ॥ ८९ ॥ जे सात्त्विकाचेनि वडपें । गेलें आध्यात्मिक खरपें । सहजें निरोळले वाफे । चतुरचित्ताचे ॥ ४९० ॥ वरी अवधानाचा वाफसा । लाधला सोनयाऐसा । म्हणोनि पेरावया धिंवसा । निवृत्तीसी ॥ ९१ ॥ ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनीं केला कोडें । माथां हात ठेविला तें फुडें । बीचि वाइलें ॥ ९२ ॥ म्हणऊनि येणें मुखें जें निगे । तें संतांचां हृदयीं साचचि लागे । हें असो सांगें श्रीरंगें । बोलिलें जें ॥ ९३ ॥ परी तें मनाच्या कानीं ऐकावें । बोल बुद्धीच्या डोळां देखावे । हे साटोवाटीं घ्यावे । चित्ताचिया ॥ ९४ ॥ अवधानाचेनि हातें । नेयावे हृदयाआंतौतें । हे रिझवितील आयणीतें । सज्जनांचिये ॥ ९५ ॥ हे स्वहितातें निववितो । परिणामातें जीववितो । सुखाची वाहविती । लाखोली जीवा ॥ ९६ ॥ आतां अर्जुनेंसी मुकुंदें । नागर बोलिजेल विनोदें । तें वोंवियेचेनि प्रबंधें । सांगेन मी ॥ ४९७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः । [ ओंव्या ४९७, श्लोक ४७ ]

ॐ श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.

जें स्वरूप सर्वांना सर्वकाळीं पूज्य आहे; ४७७. जें स्वरूप शेवटची गति आहे, साधकांचें साध्य आहे व जें एकच सिद्धतत्त्व आहे, तें स्वरूप तो योगी आपण स्वतः होतो. ४७८.

तपस्वी, ज्ञानी व कर्मी ह्यांपेक्षां योगी श्रेष्ठ आहे असें माझें मत आहे. म्हणून हे अर्जुना, तूं योगी हो. ४६.

म्हणून तो पुरुष कर्मनिष्ठांना पूज्य आहे. ज्ञानी पुरुषाला जाणण्यास तो योग्य आहे. आणि तपस्वी लोकांमध्यें तो मूळ तपोनाथ आहे. ४७९. जीव परमात्म्याच्या ऐक्याच्या ठिकाणीं ज्याच्या मनाच्या वृत्तीचें येणें झालें, तो जरी देहधारी असला, तरी त्याला असला महिमा प्राप्त होतो. ४८०. म्हणून या कारणास्तव हे अर्जुना, तूं मनानें योगी हो; असें मी नेहमीं तुला म्हणतों. ४८१.

( जें अंतःकरण ) माझ्या ठिकाणीं मुरलेलें आहे, अशा अंतःकरणानें युक्त होऊन ( मद्रूप होऊन ) जो श्रद्धाशील मनुष्य माझी ( त्रिपुटीरहित ) भक्ति करतो, तो सर्व प्रकारच्या योग्यांपेक्षां श्रेष्ठ प्रकारचा योगी मला वाटतो. ४७.

अर्जुना, योगी जो म्हणतात, तो देवांचा देव जाणावा; आणि माझें सुखसर्वस्व व माझा आत्मा तो आहे. ४८२. ज्या पुरुषाला, भजन करणारा, भजन व भज्य अशी भक्तिसाधनांची जी त्रिपुटी, ती सर्व अनुभवानें सदोदित मद्रूपच आहे; ४८३. मग त्याच्या आमच्या प्रेमाचें स्वरूप शब्दानें सांगतां येईल, अर्जुना, असा तो खरोखर नाहीं. ४८४. त्या ऐक्यभावाच्या प्रेमाला जर योग्य उपमा हवी असेल, तर मी देह व तो आत्मा, ही होय. ४८५. याप्रमाणें तेथें भक्तरूपी चकोरांचे चन्द्र, त्रैलोक्याचे एकच राजे व गुणांचे समुद्र, असे जे श्रीकृष्णपरमात्मा, ते बोलले, असें संजय म्हणाला. ४८६. तेथें भगवंताचें बोलणें ऐकावें, अशी जी अर्जुनाला तीव्र इच्छा होती, ती पहिल्यापेक्षां दुप्पट झाली, असें भगवंताला कळून चुकलें. ४८७. त्यामुळें त्याच्या मनांत सहजच संतोष उत्पन्न झाला, कारण त्याच्या बोलण्याचें यथार्थ ग्रहण करणारा अर्जुनरूपी आरसा त्याला प्राप्त झाला. त्या आनंदाच्या योगानें अंतःकरण प्रफुल्लित झालेला श्रीकृष्ण आतां सविस्तर सांगेल. ४८८. तो प्रसंग पुढें आहे. जेथें शांतरस स्पष्ट दिसेल, असें जें प्रतिपाद्य विषयरूपी बीजाचें सांठवण, तें ( मोकळें करून ) विस्तृत तऱ्हेनें श्रोत्यांच्या मनांत पेरण्यांत येईल. ४८९. कारण कीं, सत्वगुणाच्या दृष्टीनें मानसिकतारूपी ढिखळें विरघळून, योग्य चित्ताचे वाफे सहज तयार झाले. ४९०. आणखी सोन्यासारखा अवधानरूपी वाफसा मिळाला; म्हणून श्रीनिवृत्तीनाथांस पेरण्याची इच्छा झाली. ४९१. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, सद्गुरुंनीं कौतुकानें मला चाडें केलें व माझ्या मस्तकावर जो हात ठेवला, तें उघड उघड बीजच घातलें. ४९२. म्हणून या माझ्या मुखांतून जें निघेल तें संतांच्या मनाला खरोखर पटेल. श्रोते म्हणतात, हें रूपक राहूं दे; श्रीकृष्ण परमात्मा जें कांहीं म्हणाले, तें तूं सांग. ४९३. ( असें म्हटल्यावर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात मी सांगतों. ) पण तें मनाच्या कानानें ऐकलें पाहिजे. माझे शब्द बुद्धीच्या डोळ्यानें पाहिले पाहिजेत. हे माझे शब्द चित्त देऊन त्याच्या मोबदला घेतले पाहिजेत. ४९४. हे शब्द अवधानाच्या द्वारां मनाच्या आंत न्यावेत. हे शब्द सज्जनांच्या बुद्धीला समाधान देतील. ४९५. हे शब्द आत्महिताला स्थिर करतील, पूर्ण अवस्थेला जगवितील आणि जीवाला सुखाची लाखोली वाहवितील. ४९६. आतां अर्जुनाशीं श्रीकृष्ण चांगले कौतुकानें बोलले, तें त्याचें बोलणें मी ( ज्ञानदेव ) ओंवी-छंदानें सांगेन. ४९७.



तयापरी सप्रमीं । प्रकृतिपरिहार उपक्रमीं ।
करूनि भजती जे पुरुषोत्तमीं । ते बोलिले चाऱ्ही ॥ अ. १०-२८ ॥

योगाची अर्जुनाला ओळख करून दिल्यानंतर आपलें समग्र ज्ञान ज्यानें होईल, असा ज्ञानविज्ञानाचा विचार या अध्यायांत देव सांगत आहेत. प्रपंचाला विज्ञान म्हणतात. तो सत्य समजणें हें अज्ञान. जाणिवेचा जेथें शिरकावच होत नाहीं तें ज्ञान. विज्ञान निःशेष भाजलें जातें, अज्ञान नाहींसें होतें व मन, बुद्धि इत्यादिकांना अगोचर असणारें जें स्वरूप तेंच शिल्लक राहतें, असा विचार सांगितला जाईल. ज्या बोलण्यानें सांगणारा व ऐकणारा या दोघांचें कार्य होईल असें बोलणें मी बोलेन असें भगवान म्हणतात. ( १-९ ) परंतु हा मिथ्या प्रपंचच खरा म्हणून त्याच्या मागें सर्व लोक लागले आहेत. कुठें एखादाच ' खरें काय आहे ? ' हें समजून घेण्याची खटपट करतो व त्यांतूनही एखाद्यालाच त्याची यथार्थ ओळख होते. विज्ञानाचा निरास करून ज्ञानाची प्राप्ति होणार असल्यामुळें तुला अगोदर तें विज्ञान सांगतों. ( १०-१५ )

ही सर्व दृश्य सृष्टि माझ्या मायेमुळें उत्पन्न होते. तिला प्रकृति म्हणतात व ती अपरा व परा अशी दोन प्रकारची आहे. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि व अहंकार अशा आठ भागांनीं व्याकृत झालेली ती अपरा प्रकृति व हे आठ भाग ज्या ठिकाणीं लीन होऊ राहतात ती परा प्रकृति. परा प्रकृति जेव्हां अष्टधा प्रकृतीच्या परिणामाला पावते तेव्हां अंडज, स्वेदज, जारज व उद्भिज असे निरनिराळ्या आकाराचे परंतु एकाच योग्यतेचे असंख्य प्राणी निर्माण होतात व त्यांच्याकडून पुढें कर्मांचे व्यवहार होतात. हीच प्रकृति पुनः साम्यावस्थेला आली म्हणजे हा विश्वाकार सर्व लयाला जातो. हें सर्व जें दिसतें तें मृगजळाप्रमाणें फक्त भासमान आहे, त्याला सत्य अधिष्ठान सर्व मीच आहे. सृष्टींतील पदार्थांत विशेषत्वानें भासणारे गुण-पाण्यांतील रस, चंद्र सूर्यांमध्यें तेज, बळवानांतील बळ, प्राणीमात्रांच्या ठिकाणीं असणारा, शास्त्रानें नियमन केलेला काम वगैरे सर्व मीच आहें. सत्त्वरजतमादि गुणांनीं युक्त असे विश्वाच्या आकाराला आलेले पदार्थ हे जरी सर्व माझ्यापासून झालेले आहेत, तरी त्या पदार्थांत मात्र मी नाहीं. अग्नीपासून धूर झाला, तरी त्या धुरांत कधीं अग्नि असतो कां ? ( १६-५९ )

ही त्रिगुणात्मक सृष्टि माझ्यापासून उत्पन्न झाली, पण तिनें मलाच झांकून टाकलें. डोळ्यांतील पाण्याचा पडदा उत्पन्न होऊन त्यामुळेंच डोळ्याची दृष्टि मंद व्हावी, तसे हे प्राणिमात्र माझ्यापासून झाले; परंतु मी व माझे या भ्रांतींत गुरफटून जाऊन मलाच विसरले व विषयाच्या मागें लागले ( ६०-६८ ) त्रिगुणात्मक व अनेक विकारांनीं युक्त अशी ही सृष्टि ज्या मायेमुळें उत्पन्न झाली, तिचें उल्लंघन ब्रह्मादिकांनाही आजपर्यंत बिकट झालें आहे. आतां ही अशी दुर्लंघ्य महत्तत्त्वादि जी माझी माया ती कशी तरून जातां येईल, असें तुला वाटेल तर सांगतों ऐक. ही माया म्हणजे तरून जाण्यास कठीण अशी मोठी नदीच समज. हिचा उगम ब्रह्मरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यांत झाला. ही सृष्टिविस्ताराच्या रूपानें इतकी वाढते कीं प्रवृत्ति-निवृत्ति या दोन्ही उंच कांठाबाहेर वाहते. गुणरूपी मेघांचा जोरदार वर्षाव झाल्यानें ही मोहरूपी महापुरानें भरून यमनियमरूपी गांवें वाहून नेते. हिच्यांत द्वेषरूपी भोंवरे व तरूण स्त्रिया-धन वगैरे मोठे मासे आहेत. हिला प्रपंचाचीं अनेक वळणें आहेत व अहंकाराच्या मोठ्या धारा आहेत. हिच्या लाटा सत्यलोकाच्या बुरूजावर जाऊन आदळतात. हिचा पूर अजून ओसरला नाहीं. असा हा मायेचा पूर कोण तरून जाईल ? बुद्धि, वेदाभ्यास, यज्ञ, तप, कर्म वगैरे साधनांनीं केवळ आपल्या सामर्थ्यावर भिस्त ठेऊन जे ही मायारूपी नदी तरून जाण्याचा प्रयत्न करतात, त्यांची त्यांत असणाऱ्या विषय, अभिमान, मद



कां जे तनुमनुप्राणें । तें आणिक कांहिंचि नेणे ।
देखे तयातें म्हणे । हे माय माझी ॥
तें येणें मानें अनन्यगती । म्हणौनि धेनुही तैसीचि प्रीति ।
या लागीं लक्ष्मीपती । बोलिले साचें ॥

—ज्ञानेश्वरी अध्याय ७ वा, ओवी १२१, १२२

वगैरे संकटांनीं दमछाट होते. या मायेंतून तरून जाण्यास सद्गुरुचरणांचा आश्रय करून मला सर्व भावानें शरण येणें हाच एकमेव उपाय आहे ( ६९–१०१ ) परंतु असे मला शरण येणारे फारच थोडे; जवळजवळ सर्व लोक अहंकार रूपी भूतानें पछाडले गेले आहेत व त्यामुळें निषिद्ध कर्माच्या वाटेला लागून जन्ममरणरूपी दुःख भोगीत आहेत व आतां त्याचें त्यांना कांहीं वाटेनासेंही झालें आहे, इतके कोडगे झाले आहेत. ( १०२–१०७ ) जे कांहीं थोडे भक्त म्हणून आहेत, त्यांतही चार प्रकार आहेत. दुःखाचा टोला बसला म्हणजे तन्निवारणार्थ येणारे, कांहीं जाणून घेण्याकरितां येणारे व तिसरे अर्थप्राप्ति व्हावी म्हणून येणारे हे सर्व भक्तच आहेत. मलाही ते आवडतात, परंतु हे कनिष्ठ प्रतीचे. खरा श्रेष्ठ भक्त म्हणून जो मला अत्यंत प्रिय आहे, त्याला माझ्यापासून कांहीं मिळावें अशी यत्किंचितही अपेक्षा नसते. फार काय तो माझ्या योग्यतेला आलेला असतो व तसा असतांही तो माझी सेवा करतो. ( १०८–१२६ ) ( ज्ञानी भक्ताचा साधन मार्ग सांगतात. ) शेंकडो जन्म वैराग्याची कांस धरून व संतसंगतींत राहून तो निष्काम कर्म करीत राहतो. शेवटीं त्याला गुरुकृपा होऊन अखिल विश्वांत श्रीवासुदेवच भरून राहिला आहे असा दुर्मिळ अपरोक्ष अनुभव त्याला येतो ( १२७–१३७ ) असा महात्मा दुर्लभच आहे. जगताकडे पाहिलें तर नाशिवंत विषयांच्या ठिकाणीं आवड असणारेच दिसतात. मग ते विषय प्राप्त व्हावे म्हणून ज्या देवतांपासून त्यांची प्राप्ती होईल त्या देवतांचें आराधन करण्यांत गर्क होतात; पण त्या बिचाऱ्यांना कळत नाहीं कीं त्या देवतांत तरी मीच आहे व त्यांची इच्छा खरोखरी माझ्यामुळेंच पुरी होत असते. ( १३८–१४६ )

यांत वाईट एवढेंच आहे कीं या देवतांतरांच्या भक्तीमुळें प्राप्त होणारे भोग नाशिवंत असतात. वास्तविक शाश्वत जो मी त्याची त्यांनीं प्राप्ति करून घ्यावयाची, पण त्यालाच ते अंतरतात. जवळचा समुद्र सोडून तळ्यातांतील पाण्यांत पोहण्यासारखें मूर्खपणाचें आहे. ( १४७–१५७ ) वास्तविक ज्यामध्यें मी नाहीं असा पदार्थच नाहीं. ( सदा सर्व ठिकाणीं अनुस्यूत असतांना हे लोक देवाला कां विसरले याची कारणमीमांसा सांगतात. ) ( १५८–१६५ ) मी देह आहें असा अभिमान घेतल्यावर इच्छा उत्पन्न होते, ती वाढल्यावर तिचें कामांत रूपांतर होऊन पुढें क्रोध, द्वंद्व यांची उत्पत्ति होते. यामुळें माझ्याकडे येण्याचा खरा रस्ता बाजूला राहतो व निषिद्ध मार्गाला लागल्यामुळें जन्ममरणरूपी दुःखाचे तडाखे खात बसावें लागतें. ( १६६–१७२ )

अगदीं थोडे पुण्यवान लोक यांतून सुटतात. ते आपल्या बुद्धीला भ्रम पडूं देत नाहींत व सरळ मार्गानेंच जाऊन परब्रह्मरूपी मुक्कामाला प्राप्त होऊन कृतकृत्य होतात. ते मद्रूप झाले असल्यामुळें त्यांना शरीर सोडण्याचा प्रसंग जेव्हां येतो, तेव्हां इतर जीवांना होणारे अंतकाळींचे कष्ट बिलकुल होत नाहींत. ( १७३–१८४ ).

ज्ञानदेव म्हणतात कीं, ब्रह्मरसानें भरलेलें परमानंदानें परिपूर्ण असें देवाचें बोलणें ऐकूनच अर्जुन मुग्ध झाला; त्याला स्वर्गसुख फिकें वाटूं लागलें. जें आपण अर्धवट ऐकलें तें पुरें ऐकल्याशिवाय त्याच्याच्यानें रहावेना, अशी त्या शब्दांत माधुरी होती म्हणून देवानें ज्या गोष्टी शेवटीं शेवटीं सांगितल्या; पण ज्या अर्जुनास पुऱ्या समजल्या नाहींत, त्याबाबत त्यानें सात प्रश्न केले. तोच आठव्या अध्यायाचा आरंभ. हे प्रश्न करीत असतांना अर्जुन देवाला किती नम्रपणानें व चतुराईनें प्रश्न करील, त्याकडे प्रश्न करण्याचा आदर्श म्हणून ज्ञानदेवांनीं श्रोत्यांचें लक्ष वेधलें आहे. ' माझ्या बोलण्यांतील नुसत्या अक्षरांच्या सौंदर्यानें नेत्रादि इंद्रियें तर समाधानाला पावतीलच; परंतु ज्या ठिकाणीं शब्दही नाहींसा होतो अशा ब्रह्माच्या सिद्धान्ताकडे नेण्याचें सामर्थ्यही या शब्दांत आहे; ज्यांना बुद्धीच्या सामर्थ्यावर खोलवर जातां येईल, त्यांनीं त्याची प्राप्ती करून घ्यावी. ' असे आत्मविश्वासाचे परंतु विनम्रपणाचे उद्गार काढून ज्ञानदेवांनीं अध्यायाची समाप्ति केली आहे. ( १८५–२१० ).



# ज्ञानेश्वरी

## अध्याय सातवा

श्रीभगवानुवाचः—मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः। असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥

आइकां मग तो अनंतु। पार्थातें असे म्हणतु। पैं गा तूं योगयुक्तु। जालासि आतां ॥ १ ॥ मज समग्रातें जाणसी ऐसें। आपुलिया तळहातींचें रत्न जैसें। तुज ज्ञान सांगेन तैसें। विज्ञानेंसीं ॥ २ ॥

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः। यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

एथ विज्ञानें काय करावें। ऐसें घेसी जरी मनोभावें। तरी पैं आधी जाणावें। तेंचि लागे ॥ ३ ॥ मग ज्ञानाचिये वेळे। झांकती जाणिवेचे डोळे। जैसी तीरीं नाव न ढळे। टेकलीसांती ॥ ४ ॥ तैसी जाणीव जेथ न रिघे। विचार मागुता पाउलीं निघे। तर्कु आयणी नेघे। आंगीं जयाचां ॥ ५ ॥ अर्जुना तया नांव ज्ञान। येर प्रपंचु हें विज्ञान। तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान। हेंही जाण ॥ ६ ॥ आतां अज्ञान अवघें हरपे। विज्ञान निःशेष करपे। आणि ज्ञान तें स्वरूपें। होऊनि जाइजे ॥ ७ ॥ ऐसें वर्म जें गूढ। तें कीजेल वाक्यारूढ। जेणें थोडेन पुरे कोड। बहुत मनींचें ॥ ८ ॥ जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे। ऐकतयाचें व्यसन तुटे। हें जाणणें सानें मोठें। उरों नेदी ॥ ९ ॥

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां-। माजि विपाइलेयाची येथ धिंवसा। तैसें या धिंवसेकरां बहुवसां। माजि विरळा जाणे ॥ १० ॥ जैसा भरलेया त्रिभुवना। आंतु एकएकु चांगु अर्जुना। निवडूनि कीजे सेना। लक्षवरी ॥ ११ ॥ कीं तयाही पाठीं। जे वेळीं लोह मांसातें घांटी। ते वेळीं विजयश्रियेचां पाटीं। एकुचि बैसे ॥ १२ ॥ तैसे आस्थेचां महापुरीं। रिघताती कोटिवरी। परी प्राप्तीच्या पैलतीरीं। विपाइला निगे ॥ १३ ॥ म्हणऊनि सामान्य गा नोहे। हें सांगतां वडिल गोठि गा आहे। परी तें बोलों येईल पाहें। आतां प्रस्तुत ऐकें ॥ १४ ॥ तरी अवधारीं गा धनंजया। हे महदादिक माझी माया। जैसी प्रतिबिंबे छाया। निजांगाची ॥ १५ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सातवा

श्रीकृष्ण म्हणाले, हे पार्था माझ्या ठिकाणीं ज्या तुझें मन आसक्त झालें आहे व माझ्यावर आधार ठेवून योग आचरण करणारा जो तूं, तो तूं कोणत्या प्रकारानें मला पूर्णत्वानें आणि शंका न राहतां जाणशील तो प्रकार ऐक. १.

ऐका. मग तो श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, अरे, तूं आतां योगाच्या ज्ञानानें युक्त झाला आहेस. १. आपल्या तळहातांत घेतलेल्या रत्नाप्रमाणें मला संपूर्णाला तूं जाणशील, असें विज्ञाना-( प्रपंच ज्ञाना- ) सह तुला ज्ञान ( स्वरूपज्ञान ) सांगतों. २.

हें ( मद्विषयक ) ज्ञान विज्ञानासह (प्रपंच-ज्ञानासह ) मी तुला पूर्णत्वानें सांगतों. हें ज्ञान झाल्यावर या लोकीं पुनः दुसरें जाणण्याला योग्य असें ( ज्ञान ) शिल्लक रहात नाहीं. २.

येथें विज्ञानाशीं काय करावयाचें आहे ! अशी जर तुझी मनापासून समजूत असेल, तर तेंच अगोदर समजणें जरूर आहे. ३. कारण कीं, स्वरूपज्ञानाचे वेळीं बुद्धीचे डोळे झांकतात. ज्याप्रमाणें नाव नदीच्या तीराला टेकली असतां पुढें सरकत नाहीं, ४. त्याप्रमाणें जेथें बुद्धीचा प्रवेश होत नाहीं व विचार जेथून मागें फिरतो आणि ज्याच्यासंबंधानें तर्काचें चातुर्य चालत नाहीं, ५. अर्जुना, त्याचें नांव ज्ञान होय. त्याहून दुसरा जो प्रपंच, तें विज्ञान आहे आणि प्रपंचाचे ठिकाणीं खरेपणाची बुद्धि असणें, त्यास अज्ञान म्हणतात, हेंही तूं समज. ६. आतां अज्ञान संपूर्ण नाहींसें होईल व प्रपंच पूर्णपणें बाधित होईल आणि ज्ञान आपण स्वतःच बनून जाऊं; ७. अशी जी गूढ गुजाची गोष्ट आहे, ती शब्दांत आणली जाईल व त्याच्या थोड्या प्रतिपादनानेंच मनांतील पुष्कळ इच्छा तृप्त होतील. ( म्हणजे मनाचें पूर्ण समाधान होईल. ) ८ त्या योगानें व्याख्यात्याचें प्रतिपादन थांबतें व ऐकणाराचा ऐकण्याचा छंद नाहींसा होतो. हें ज्ञान लहानमोठा ( असा भेद ) राहूं देत नाहीं. ९.

सहस्रावधि मनुष्यांमध्यें एखादा ( ज्ञानाच्या ) सिद्धीसाठीं यत्न करतो. ( त्या ) यत्न करणाऱ्या सिद्ध मनुष्यांमध्यें एखादा मला खऱ्या प्रकारें जाणतो. ३.

अरे अर्जुना, हजारों मनुष्यांत एकाद्यासच याविषयीं इच्छा असते व अशा बहुत इच्छावाल्यांमध्यें स्वरूपज्ञानास एकादाच जाणतो. १०. ज्याप्रमाणें भरलेल्या त्रैलोक्यांत, अर्जुना, एक एक चांगला निवडून लक्षावधि सैन्य तयार करतात. ११. असें सैन्य निवडल्यानंतर, ज्या वेळीं लोखंडाच्या शस्त्राचे अंगावर घाव होतात, त्या वेळीं विजयलक्ष्मीच्या सिंहासनावर एकादाच बसतो. १२. त्याप्रमाणें स्वरूपज्ञानाच्या इच्छारूप पुरांत कोट्यवधि लोक प्रवेश करतात, पण स्वरूपज्ञानाच्या प्राप्तीरूपी पलीकडच्या कांठाला एकादाच निघतो. १३. म्हणून हें ( ज्ञानाचें कथन ) सामान्य नाहीं. सांगावयास गेलें असतां ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. परंतु ती ज्ञानाची गोष्ट पुढें सांगतां येईल. प्रस्तुत तुला ( विज्ञानाची गोष्ट ) सांगतों ती ऐक. १४. अर्जुना, तर ऐक, हे महत्तत्त्वादिक ही माझी माया आहे. ज्याप्रमाणें आपल्या अंगाची पडछाया पडते ( त्याप्रमाणें ती माझी छाया आहे ) १५

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च । अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा भिन्न जाणिजे । लोकत्रय निपजे । इयेस्तव ॥ १६ ॥ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि धरिसी जरी मानसीं । तरी तेचि गा आतां परियेसीं । विवंचना ॥ १७ ॥ आप तेज गगन । मही मारुत मन । बुद्धि अहंकार हे भिन्न । आठै भाग ॥ १८ ॥

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

आणि या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीवु ऐसी ॥ १९ ॥ जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी । मनाकरवीं मानवी । शोक मोहो ॥ २० ॥ पैं बुद्धीचां अंगीं जाणणें । ते जियेचिये जवळिकेचें करणें । जिया अहंकाराचेनि विंदाणें । जगचि धरिजे ॥ २१ ॥

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय । अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

ते सूक्ष्म प्रकृति कोडें । जैं स्थूळाचिया आंगा घडे । तैं भूतसृष्टीची पडे । टांकसाळ ॥ २२ ॥ चतुर्विधु ठसा । उमटों लागे आपैसा । मोला तरी सरिसा । परि थरचि आनान ॥ २३ ॥ होती चौऱ्यांशीं लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारा । भरे आदिशून्याचा गाभारा । नाणेयांसी ॥ २४ ॥ ऐसे एकतुके पांचभौतिक । पडती बहुवस टांक । मग तिये समृद्धीचे लेख । प्रकृतीचि धरी ॥ २५ ॥ जे आंखूनि नाणें विस्तारी । पाठी तयांची आटणी करी । माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं । प्रवर्तु दावी ॥ २६ ॥ हें रूपक परी असो । सांगों उघड जैसें परियेसों । तरी नामरूपाचा अतिसो । प्रकृतीच कीजे ॥ २७ ॥ आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं । बिंबे येथ आन नाहीं । म्हणोनि आदि मध्य अवसान पाहीं । जगासि मी ॥ २८ ॥

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

हें रोहिणीचें जळ । तयाचें पाहातां येइजे मूळ । तैं रश्मि नव्हती केवळ । होय तो भानु ॥ २९ ॥ तयाचिपरी किरीटी । इया प्रकृती जालिये सृष्टी । जैं उपसंहरूनि कीजेल ठी । तैं मीचि आहें ॥ ३० ॥ ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचि माजिवडे असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें मणि ॥ ३१ ॥ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं ॥ ३२ ॥

रसोऽहमप्सु कौंतेय प्रभाऽस्मि शशिसूर्ययोः । प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

म्हणोनि उदकीं रसु । कां पवनीं जो स्पर्शु । शशिसूर्यीं जो प्रकाशु । तो मीचि जाण ॥ ३३ ॥ तैसाचि नैसर्गिकु शुद्धु । मी पृथ्वीचां ठायीं गंधु । गगनीं मी शब्दु । वेदीं प्रणवु ॥ ३४ ॥ नराचां ठायीं नरत्व । जें अहंभाविये सत्त्व । तें पौरुष मी हें तत्त्व । बोलिजत असे ॥ ३५ ॥

पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशा आठ प्रकारांनीं विभागलेली माझी माया आहे. ४.

आणि हिला प्रकृति असें म्हणतात. ही आठ प्रकारांनीं वेगवेगळी आहे, असें समज; हिच्यामुळें त्रैलोक्य उत्पन्न होतें. १६. ही आठ प्रकारांनीं वेगळी कशी, असा अभिप्राय जर तुझ्या मनांत असेल, तर त्याचें विवेचन तूं आतां ऐक. १७. पाणी, अग्नि, आकाश, पृथ्वी, वारा, मन, बुद्धि आणि अहंकार, हे ते आठ वेगळे वेगळे भाग आहेत. १८.

ही ( माझी ) माया अपरा होय. हे अर्जुना, जिनें हें सर्व जग धारण केलें आहे, अशी माझी हिच्याहून दुसरी जीवभूता परा प्रकृति आहे असें समज. ५.

आणि या आठांची जी साम्यावस्था ( हे आठ ज्या ठिकाणीं लीन होऊन असतात ), तीच माझी श्रेष्ठ प्रकृति असून, तिला जीव असें नांव आहे. १९. ती जडाला सजीव करते, जीवाला ( आभासाला ) सज्ञान करते व मनाकडून शोक मोह मानावयास लावते; २०. बुद्धीमध्यें जी जाणण्याची शक्ति आहे, ती हिच्या साम्निध्यामुळें आहे व तिनें अहंकाराच्या कौशल्यानें जगत धरलें आहे. २१

सर्व प्राणिमात्र या दोन मायांपासून निर्माण झाले आहेत असें जाण. त्याप्रमाणें सर्व जगाचा आदि व अंत मी आहें. ६.

ती सूक्ष्म प्रकृति ( जीवरूपा प्रकृति ) कौतुकानें स्थूल प्रकृतीच्या ( अष्टधा प्रकृतीच्या ) परिणामास जेव्हां पावते, तेव्हां प्राणीवर्गरूपी नाणीं पाडण्याची टांकसाळ सुरू होते. २२. चार प्रकारच्या आकृति ( अंडज, स्वेदज, जारज, उद्भिज ) त्या टांकसाळींतून आपोआप व्यक्तत्वाला येऊं लागतात. त्या चार आकृति सारख्याच किंमतीच्या असतात. परंतु आकार मात्र वेगवेगळे असतात. २३. चौऱ्यांशीं लक्ष योनींचे आकार तयार होतात, इतर आणखीं नाण्यांचे आकार त्या टांकसाळीच्या भांडारांत जे तयार होतात, त्यांची गणति नाहीं. त्या सर्व प्राणीरूप नाण्यांनीं मायेचा गाभारा भरून जातो. २४. याप्रमाणें पंचमहाभूतांची एकाच योग्यतेचीं अनेक नाणीं तयार होतात. त्यांच्या भरण्याची गणति प्रकृतीच ठेवते. २५. ती प्राणीरूप नाण्याच्या आकृतीची योजना करून त्यांचा प्रसार करते व मग त्या आकृतीची आटणी करते व दरम्यान ( स्थितिकाळीं ) प्राण्यांकडून कर्माकर्मांचा व्यवहार करून दाखविते. २६ परंतु हें रूपक असो; तुला ऐकतां येईल ( कळेल ) असें स्पष्ट सांगतों. तर नामरूपाचा विस्तार प्रकृतीच करते. २७. आणि प्रकृति तर माझ्या ठिकाणीं भासते, यांत अन्यथा नाहीं; म्हणून जगाला आदि, मध्य व शेवट मीच आहें असें समज. २८.

हे धनंजया, माझ्याहून वेगळें असें दुसरें कांहीं नाहीं. ( सुवर्ण ) सूत्रामध्यें ज्याप्रमाणें ( सुवर्ण ) मण्यांचा समुदाय, त्याप्रमाणें हें सर्व ( जग ) माझ्यामध्यें गुंफलेलें आहे. ७.

या मृगजळाचें मूळ पाहूं गेलें असतां, तें सूर्यकिरणें नसून, केवळ तो सूर्यच आहे. २९. त्याप्रमाणें अर्जुना, ज्यावेळीं या ( स्थूलाच्या परिणामाला पावलेल्या परा- ) प्रकृतीपासून झालेल्या सृष्टीचा उपसंहार होऊन शेवट मुक्काम होतो, त्यावेळीं पाहिलें असतां मीच आहें. ३०. याप्रमाणें जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय, हे माझ्यामध्येंच आहेत. ज्याप्रमाणें दोरा मण्याला धारण करतो त्याप्रमाणें मी जगाला धारण करतों. ३१. सोन्याचे मणी करून ते सोन्याच्या सुतांत ओंवावेत, त्याप्रमाणें आंत बाहेर जग मीच धरलें आहे. ३२.

हे कौन्तेया, उदकांतील रस मी आहें, चंद्रसूर्यांमधील प्रभा मी आहें, सर्व वेदांमधील ॐकार, आकाशांतील शब्द, पुरुषांमधील पौरुष मी आहें. ८.

म्हणून पाण्यामध्यें ओलावा किंवा वाऱ्यामध्यें स्पर्श अथवा चंद्रसूर्यांमध्यें जें तेज आहे, तें मीच आहें असें समज. ३३. त्याचप्रमाणें पृथ्वीच्या ठिकाणीं स्वभावतःच असणारा शुद्ध वास मीच आहें, आकाशाच्या ठिकाणीं असणारा शब्द मी आहें व वेदांत ओंकार मी आहें. ३४. मनुष्याच्या ठिकाणीं अहंपणाचें सारभूत जें पुरुषत्व आहे, तो पराक्रम मी आहे, हें तत्त्व मी तुला सांगतों. ३५.

पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ । जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

अग्नि ऐसें आहाच । तेजा नामाचें आहे कवच । तें परौतें केलिया साच । निजतेज तें मी ॥ ३६ ॥ आणि नानाविध योनीं । जन्मोनि भूतें त्रिभुवनीं । वर्तते आहाति जीवनीं । आपुलालां ॥ ३७ ॥ एकें पवनेंचि पिती । एकें तृणास्तव जिती । एकें अन्नाधारें राहती । जळें एकें ॥ ३८ ॥ ऐसें भूताप्रति आनान । जें प्रकृतिवशें दिसे जीवन । तें आघवाठायीं अभिन्न । मीचि एक ॥ ३९ ॥ पैं आदिचेनि अवसरें । विरुढे गगनाचेनि अंकुरें । जें अंतीं गिळी अक्षरें । प्रणवेपटींचीं ॥ ४० ॥ जंव हा विश्वाकार असे । तंव जें विश्वाचिसारखें दिसे । मग महाप्रळयदशे । कैसेंही नव्हे ॥ ४१ ॥

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् । बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥

ऐसें अनादि जें सहज । तें मी गा विश्वबीज । हें हातातळीं तुज । देइजत असे ॥४२॥ मग उघड करुनि पांडवा । जैं हें आणिसील सांख्याचिया गांवा । तैं ययाचा उपेगु बरवा । देखशील ॥ ४३ ॥ परी हे अप्रासंगिक आलाप । आतां असतु न बोलों संक्षेप । जाण तपियांचां ठायीं तप । तें स्वरूप माझें ॥ ४४ ॥

बलं बलवतांचाहं कामरागविवर्जितं । धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

बाळियांमाजीं बळ । तें मी जाणें अढळ । बुद्धिमंतीं केवळ । बुद्धि ते मी ॥ ४५ ॥ भूतांचां ठायीं कामु । तो मी म्हणे आत्मारामु । जेणें अर्थास्तव धर्मु । थोरु होय ॥४६॥ एऱ्हवीं विकाराचेनि पैसें । करी कीर इंद्रियांचेयाचि ऐसें । परी धर्मासि वेखासें । जावों नेदी ॥ ४७ ॥ जे अप्रवृत्तीचा अव्हांटा । सांडूनि विधींचिया निघे वाटा । तेवींचि नियमाचा दिवटा । सवें चाले ॥ ४८ ॥ कामु ऐशिया वोजा प्रवर्ते । म्हणोनि धर्मासि होय पुरतें । मोक्षतीर्थींचें मुक्तें । संसारु भोगी ॥४९॥ जो श्रुतिगौरवाचां मांडवीं । काम सृष्टीचा वेलु वाढवी । जंव कर्मफळेंसीं पालवी । अपवर्गीं टेंके ॥ ५० ॥ ऐसा नियतु कां कंदर्पु । जो भूतां यां बीजरूपु । तो मी म्हणे बापु । योगियांचा ॥ ५१ ॥ हें एकैक किती सांगावें । आतां वस्तुजातचि आघवें । मजपासूनि जाणावें । विकरलें असे ॥ ५२ ॥

ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये । मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

जे सात्त्विक इन भाव । कां रजतमादि सर्व । ते ममरूपसंभव । वोळख तूं ॥ ५३ ॥ हे जाले तरी माझां ठायीं । परी ययामाजीं मी नाहीं । जैसी स्वप्नींचां डोहीं । जागृति न बुडे ॥ ५४ ॥ नातरी रसाचीचि सुघट । जैसी बीजकणिका तरी घनवट । परी तियेस्तव होय काष्ठ । अंकुरद्वारें ॥ ५५ ॥ मग तया काष्ठाचां ठायीं । सांग पां बीजपण असे काई । तैसा मी विकारीं नाहीं । जरी विकारला दिसें ॥ ५६ ॥ पैं गगनीं उपजे आभाळ । परी तेथ गगन नाहीं केवळ । अथवा आभाळीं होय सलिल । तेथ अभ्र नाहीं ॥ ५७ ॥ मग तया उदकाचेनि आवेशें । प्रगटलें

पृथ्वीमधील शुद्धगंध आणि अग्नीमधील तेज मी आहें. प्राणिमात्रांचें जीवन आणि तपस्व्यांचें तप मी आहें. ९.

तेजाला अग्नि अशा नांवाचें जें वरवर दिसणारें पांघरूण आहे, तें दूर केल्यावर जें स्वयंसिद्ध तेज, तें मी आहे. ३६. आणि त्रैलोक्यामध्यें नानाप्रकारच्या योनींत प्राणी उत्पन्न होऊन आपआपला आहार सेवन करून रहातात. ३७. कित्येक वाराच पितात, कित्येक गवतावर जगतात, कित्येक अन्नावर रहातात आणि कित्येक पाण्यानें जगतात. ३८. याप्रमाणें प्राण्यांना ज्याच्या त्याच्या प्रकृतीला अनुलरून असा जो आहार दिसतो, त्या सर्व निरनिराळ्या आहारांच्या ठिकाणीं मीच एक अभिन्नत्वानें आहें. ३९. जें (आत्मतत्त्व) सृष्टीच्या उत्पत्तीकाळीं आकाशाच्या अंकुरानें वाढतें व जें सृष्टीच्या लयाच्या काळीं ॲकाररूपी पटाच्या अक्षराचा ग्रास करतें, ४०. जोंपर्यंत हा विश्वाकार असतो तोंपर्यंत जें आत्मतत्त्व विश्वासारखें दिसतें, मग महाप्रलयकाळीं जें कोणत्याच आकाराचें नसतें, ४१.

हे पार्था, सर्व प्राण्यांचें शाश्वत असें आदिकारण मी आहें असें जाण. बुद्धिमानांची बुद्धि मी आहें व तेजस्व्यांचें तेज मी आहें. १०.

असें जें स्वभावतः अनादि विश्वाचें बीज, तें मी आहें, हें मी तुझ्या तळहातांत देतों. (स्पष्ट सांगतों.) ४२. नंतर हें चांगलें नीट समजून घेऊन जेव्हां हें विचाराच्या गांवाकडे आणशील (म्हणजे याचा विचार करशील), तेव्हां याचा उपयोग तुला चांगला दिसून येईल. ४३. परंतु हें विषयाला सोडून बोलणें राहूं दे, तें मी आतां बोलत नाहीं. (आतां माझ्या विभूतींसंबंधानें) थोडक्यांत सांगतों. तपस्वी लोकांचे ठिकाणीं तप ही माझी विभूति आहे असें समज. ४४.

काम (अप्राप्त वस्तूंचा अभिलाष) आणि राग (अप्राप्त वस्तु प्राप्त झाल्यावर होणारा आनंद) या (दोहोंनीं) विरहित असें बलवानांचें बल मी आहें. हे भरतश्रेष्ठा भूतांचे ठिकाणीं धर्माला अनुसरून असलेला जो काम, तो मी आहें. ११.

बलवान लोकांमध्यें जें अढळ बल आहे, तीं माझीच विभूति आहे व बुद्धिवानांच्या ठिकाणीं जी बुद्धि म्हणून आहे, ती माझीच विभूति आहे. ४५. ज्या कामाच्या निमित्तानें धर्माचा उत्कर्ष होतो, असा प्राणिमात्रांचे ठिकाणीं असणारा जो काम, तो मी आहें असें आत्माराम (श्रीकृष्ण) म्हणाला. ४६. सहज विचार करून पाहिलें तर, विकाराच्या फैलावानें इंद्रियांसच अनुकूल अशीं कर्में (तो काम) खरोखर करतो, परंतु तीं कर्में धर्मास विरुद्ध जाऊं देत नाहीं, ४७. कारण कीं, (जो काम,) शास्त्रनिषिद्ध कर्माची आडवाट सोडून शास्त्रविहित कर्माच्या राजमार्गानें निघतो व त्याचप्रमाणें विधीच्या मार्गानें तो जात असतांना त्याच्याबरोबर नियमरूपी मशालजी चालतो. ४८. अशा व्यवस्थेनें काम चालतो म्हणून धर्माची पूर्णता होते. मग तो काम संसार भोगतो म्हणजे मोक्षतीर्थांतील जणूंकाय मोतीच भोगतो. ४९. जो काम वेदाच्या मोठेपणाच्या मांडवावर (कर्म-) सृष्टीरूप वेल, कर्मफलासह त्याचीं पानें मोक्षाला जाऊन भिडेतोंपर्यंत, वाढवितो. (म्हणजे जो वेदांनीं गौरव केलेल्या कर्मांचें आचरण मोक्षप्राप्ति होईपर्यंत करवितो.) ५०. असा नियमन केलेला व प्राणिमात्रांच्या उत्पत्तीस कारण जो काम, तो मी आहें, असें योग्यांचा बाप श्रीकृष्ण म्हणाला. ५१. हें वेगळें वेगळें किती सांगावें ? आतां जेवढे म्हणून पदार्थ आहेत, तेवढे सर्व माझ्यापासूनच आकाराला आलेले आहेत, असें समज. ५२.

सात्त्विक, राजस आणि तामस म्हणून जे पदार्थ आहेत, ते सर्व माझ्यापासून उत्पन्न झालेले आहेत असें जाण. ते माझ्यामध्यें आहेत, पण मी त्यांच्यामध्यें नाहीं. १२.

जे सत्त्वापासून झालेले पदार्थ किंवा रज तम या गुणांपासून झालेले सर्व, ते माझ्या स्वरूपापासून उत्पन्न झाले आहेत असें समज. ५३. हे पदार्थ माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाले, परंतु या पदार्थांत मी नाहीं. ज्याप्रमाणें (जागृतिपासून स्वप्न उत्पन्न झालें असलें तरी) स्वप्नांतील डोहांत जागृति बुडत नाहीं (म्हणजे स्वप्नांत जागृति नाहीं); ५४. अथवा ज्याप्रमाणें भरीव बीं म्हणजे गोठलेला रसच असतो, पण त्यापासूनच अंकुर उत्पन्न होऊन त्याचेंच लांकूड बनतें, ५५. मग त्या लांकडाचे ठिकाणीं बीपणा कांहीं आहे का ? सांग. त्याप्रमाणें मी जरी विकारलेला दिसलों, तरी मी त्या विकारांत नाहीं. ५६. आकाशामध्यें ढग उत्पन्न होतात, परंतु त्या ढगांत केवळ आकाश नसतें; किंवा ढगांत पाणी असतें, परंतु पाण्यांत ढग नाहींत. ५७. मग त्या पाण्याच्या जोरानें उत्पन्न झालेलें

तेज जें लखलखीत दिसे । तिये विजूमाजीं असे । सलिल कायी ॥ ५८ ॥ सांगें अग्नीस्तव धूम होये । तिये धूमीं काय अग्नी आहे । तैसा विकारु हा मी नोहें । जरी विकारला असें ॥ ५९ ॥

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् । मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

परी उदकीं झाली बाबुळी । ते उदकातें जैसी झांकोळी । कां वायांचि आभाळीं । आकाश लोपे ॥ ६० ॥ हां गा स्वप्न हें लटिकें म्हणों ये । परि निद्रावशें बाणलें होये । तंव आठवु काय देत आहे । आपणपेयां ॥ ६१ ॥ हें असो डोळ्यांचें । डोळांचि पडळ रचे । तेणें देखणेंपण डोळ्यांचें । न गिळिजे कायि ॥ ६२ ॥ तैसी हे माझीच विंवली । त्रिगुणात्मक साउली । कीं मजाचि आड बोडवली । जवनिका जैसी ॥ ६३ ॥ म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी नव्हती । जैसी जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें ॥ ६४ ॥ पैं पृथ्वीयेचा घटु कीजे । सवेंचि पृथ्वीसि मिळे जरी मेळविजे । एऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे । तरी वेगळा होय ॥ ६५ ॥

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥

तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । परि मायायोगें जीव- । दशे आले ॥ ६६ ॥ म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंममताभ्रांती । विषयांध झाले ॥ ६७ ॥ आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया । मी होइजे हें आया । कैसेनि ये ॥ ६८ ॥ जिये ब्रह्माचळाचां आघाडां । पहिलिया संकल्पजळाचा उभडा । सवेंचि महाभूतांचा बुडबुडा । साना आला ॥ ६९ ॥ जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें । चढत काळ-कलनेचेनि वेगें । प्रवृत्तिनिवृत्तींचीं तुंगें । तटें सांडी ॥ ७० ॥ जे गुणघनाचेनि वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥ ७१ ॥ जे द्वेषाचां आवर्तीं दाटत । मत्सराचे वळसे पडत । माजी प्रमदादि तळपत । महामीन ॥ ७२ ॥ जेथ प्रपंचाचीं वळणें । कर्माकर्मांचीं वोभाणें । वरी तरताती वोसाणें । सुखदुःखांचीं ॥ ७३ ॥ रतीचिया बेटा । आदळती कामाचिया लाटा । जेथ जीवफेन संघाटा । सैंघ दिसे ॥ ७४ ॥ अहंकाराचिया चाळिया । वरि मदत्रयाचिया उकाळिया । जेथ विषयोर्मीच्या आकळिया । उह्माळे घेती ॥ ७५ ॥ उदोअस्ताचे लोंढे । पाडीत जन्ममृत्युचे चोंढे । जेथ पांचभौतिक बुडबुडे । होती जाती ॥ ७६ ॥ संमोह विभ्रम मासे । गिळित धैर्याचीं आविसें । तेथ देव्हडे भोंवत वळसे । अज्ञानाचे ॥ ७७ ॥ भ्रांतीचेनि खडुळें । रेवले आस्थेचे अवगाळे । रजोगुणाचेनि खळाळें । स्वर्गु गाजे ॥ ७८ ॥ तमाचे धारसे वाड । सत्त्वाचें स्थिरपण जाड । किंबहुना हे दुवाड । मायानदी ॥ ७९ ॥ पैं पुनरावृत्तीचेनि उभडें । झळंबती सत्यलोकींचे हुडे । घायें गडबडती धोंडे । ब्रह्मगोळकाचे ॥ ८० ॥ तया पाणियाचेनि वहिलेपणें । अद्युनी न धरिती वोभाणें । ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ॥ ८१ ॥ येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो । तो तो अपावो । होय तें ऐक ॥ ८२ ॥ एक स्वयंबुद्धीचां बाहीं । रिगाले तयांची शुद्धीचि

तें लखलखीत तेज दिसतें, त्या विजेमध्यें पाणी आहे काय ? ५८. सांग, अग्नीपासून धूर तयार होतो, त्या धुरांत अग्नि आहे काय ? त्याप्रमाणें जरी पदार्थ माझ्यापासून झाले, तरी मी पदार्थ नाहीं. ५९.

या तीन ( सत्व, रज व तम ) गुणमय भावांनीं ( त्रिगुणात्मकमायेनें ) मोह पाडलेलें हें सर्व जग, या गुणांहून वेगळा व विकाररहित अशा, मला जाणत नाहीं. १३.

परंतु पाण्यांत उत्पन्न झालेलें गोंडाळ ज्याप्रमाणें पाण्याला झांकून टाकतें किंवा ढगाच्या योगानें आकाश व्यर्थच झांकलें जातें. ६०. अरे अर्जुना, स्वप्न हें खोटें आहे असें म्हणतां येतें, पण आपण निद्रेच्या स्वाधीन झाल्यामुळे तें जेव्हां आपल्या अनुभवाला येतें, त्या वेळीं तें आपलें आपल्याला आठवण होऊं देतें का ? ६१. हे वरील दृष्टान्त राहूं दे. डोळ्यांचें पाणी डोळ्यांत गोठून त्याचा पडदा डोळ्यांवर येतो, तो पडदा डोळ्यांची दृष्टि ( पहाणेंपणा ) नाहींशी करीत नाहीं का ? ६२. त्याप्रमाणें त्रिगुणात्मक माया माझीच पडलेली छाया आहे. ती जणूं काय पडद्याप्रमाणें माझ्याआड आली आहे ( मला तिनें झांकलें आहे. ) ६३. म्हणून प्राणी मला जाणत नाहींत; ते माझेच आहेत, पण मद्रूप होत नाहींत. ज्याप्रमाणें मोत्यें ही पाण्याचींच होतात, पण पाण्यांत विरघळत नाहींत. ६४. ( जसें ) मातीचें मडकें करावें व तें केल्याबरोबर ( कच्च्या स्थितींत ) मातीशीं मिळविलें तर मातींत मिळून जातें. पण तें मडकें भाजलें असतां, तें मातीशीं न मिळतां खापररूपानें वेगळें राहतें; ६५.

ही माझी त्रिगुणात्मिका दैवी माया तरून जाण्यास दुस्तर आहे; जे मलाच शरण येतात तेच ही माया तरून जातात. १४.

त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्र हे खरोखर माझेच अवयव आहेत; पण मायेच्या योगानें ते जीवदशेस आले. ६६. म्हणून ते प्राणी माझेच असून मी नाहींत, माझेच असून मला ते ओळखीत नाहींत. कारण मी आणि माझेपणा या भ्रांतीनें ते विषयांध झाले आहेत. ६७. आतां अर्जुना, महत्तत्वादि जी माझी माया, ती पार उतरून मद्रूप होणें, हें साध्य कसें होईल ? ६८. जी मायानदी ब्रह्मरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यांतून मूळ संकल्परूपी उसळीनें निघाल्याबरोबर, तिच्यांत पंचमहाभूतांचा लहान बुडबुडा आला; ६९. जी सृष्टीच्या विस्तारूपी ओघानें, कालाच्या ग्रास करण्याच्या शक्तिरूपाच्या वेगानें वाहून, प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही उंच कांठांबाहेर वाहते; ७०. जी, गुणरूपी मेघांचा जोरदार वर्षाव झाल्यानें, मोहरूपी महापुरानें भरून यमनियमरूपी गावें वाहून नेते; ७१. जी द्वेषरूपी भोंवऱ्यानें गच्च भरली आहे व मत्सररूपी वळणें जिला पडलीं आहेत व जिच्यामध्यें तरुण स्त्रिया वगैरे मोठे मासे चमकत आहेत; ७२. जिच्यामध्यें प्रपंचरूपी वळणें आहेत व जिला कर्माकर्मरूपी पूर येत आहेत; आणि सुखदुःखरूपी पुराड जिच्यावर तरत आहे; ७३. रतीच्या बेटावर जिच्या कामरूपी लाटा आदळतात व जेथें जीवरूपी फेंसाचा समुदाय एकवटलेला दिसतो; ७४. जिच्यामध्यें अहंकाराच्या मोठ्या धारा आहेत, त्यावर विद्यादि ( विद्या, धन व कुल हा ) तीन मदांच्या उकळ्या येतात व ज्या नदीमध्यें विषयरूपी लाटांचे प्रवाह उसळतात. ७५. ज्या नदींत उदयअस्तांचे लोंढे जन्ममृत्युरूप खळगे पाडतात व तेथें पंचमहाभूतांपासून झालेले शरीररूपी बुडबुडे होतात व जातात; ७६. ( जिच्यांत ) अविवेक व गोंधळ हेच कोणी मासे, ते सात्विक धैर्यरूपी आमिष गिळतात व ज्या नदींत अज्ञानाचे भोंवरे वक्रगतीनें फिरतात; ७७. जिच्यांत भ्रांतीच्या गढूळपणानें आशारूप गाळांत प्राणी फसले व रजोगुणाच्या खळखळीनें स्वर्ग गाजूं लागला; ७८. अशा या मायानदींत तमोगुणाची मोठी धार असते, सत्वगुणाचा स्थिरपणा गंभीर असतो. फार काय सांगावें ? ही मायानदी (तरून जाण्यास) फार कठीण आहे. ७९. तिच्या पुनर्जन्मरूपी लाटांची उसळी सत्यलोकाचे बुरुजांवर जाऊन आदळते व पुनरावृत्तीच्या आघातानें ब्रह्मांडाचे धोंडे कोसळून पडतात. ८०. त्या पाण्याच्या वेगानें अजूनपर्यंत वाहात असलेला जोराचा पूर थांबत नाहीं. असा हा मायेचा पूर कोण तरून जाईल ? ८१. या मायानदीसंबंधानें एकच आश्चर्य आहे, तें हें कीं, हिच्यांतून तरून जाण्याला जो जो म्हणून उपाय करावा, तो तो अपायच होतो तो प्रकार कसा, तें ऐक. ८२. एक आपल्याच बुद्धिरूपी बाहूनें ही नदी तरून जाण्याकरितां या नदींत शिरले. ते कोठें गेले त्यांचा पत्ताच नाहीं; दुसरे कित्येक (मायानदींत) ज्ञानाच्या डोहामध्यें

नाहीं । एक जाणिवेचां डोहीं । गर्वेचि गिळिले ॥ ८३ ॥ एकीं वेदत्रयाचिया सांगडी । घेतलिया अहंभावाचिया धोंडी । ते मदमीनाचां तोंडीं । सगळेचि गेले ॥ ८४ ॥ एकीं वयसेचें जाड बांधले । मग मन्मथाचिये कासे लागले । ते विषयमगरीं सांडिले । चघळुनियां ॥ ८५ ॥ आतां वृद्धाप्याचिया तरंगा- । माजीं मतिभ्रंशाचा जरंगा । तेणें कवळिजताती पैं गा । चहूंकडे ॥ ८६ ॥ आणि शोकाचां कडा उपडत । क्रोधाचां आवर्तीं दाटत । आपदागिधीं चुंबिजत । उधवला ठायीं ॥ ८७ ॥ मग दुःखाचेनि बरबटें बोंबले । पाठीं मरणाचिये रेवे रेवले । ऐसे कामाचिये कासे लागले । ते गेले वायां ॥ ८८ ॥ एकीं यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं । ते स्वर्गसुखाचां कपाटीं । शिरकोनि ठेले ॥ ८९ ॥ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा भरंवसा । परि ते पडिले वळसां । विधिनिषेधांचां ॥ ९० ॥ जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लगे । वरि कांहीं तरों ये योगें । तरी विपायें तो ॥ ९१ ॥ ऐसें जीवाचिये आंगवणें । इये मायानदीचें उतरणें । हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥ ९२ ॥ जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धि । कीं रागी सांडी रिद्धी । आली सांती ॥ ९३ ॥ जरी चोरां सभा दाटे । अथवा मीना गळु घोंटे । ना तरी भेडा उलटे । विवसी जरी ॥ ९४ ॥ पाडस वागुर करांडी । जरी मुंगी मेरु वोलांडी । तरी मायेची पैलथडी । देखती जीव ॥ ९५ ॥ म्हणऊनि गा पंडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनिता । तैसी मायामय हे सरिता । न तरवे जीवां ॥ ९६ ॥ येथ एकाचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां ऐलीच थडिये सरलें । मायाजळ ॥ ९७ ॥ जयां सद्गुरु तारु पुढें । जे अनुभवाचिये कासे गाढे । जयां आत्मनिवेदनतरांडें । आकळलें ॥ ९८ ॥ जे अहंभावाचें वोझें सांडुनी । विकल्पाचिया झुळकां चुकाउनी । अनुरागाचा निरु ताउनी । पाणिढाळु ॥ ९९ ॥ जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा । मग निवृत्तीचिया पैल तीरा । झेंपावले जे ॥ १०० ॥ ते उपरतीचां वांवीं सेलत । सोहंभावाचेनि थावें पेलत । मग निघाले अनकळित । निवृत्तितटीं ॥ १ ॥ येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले । परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥ २ ॥

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः । माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥

जे बहुतां एका अवांतरु । अहंकाराचा भूतसंचारु । जाहला म्हणोनि विसरु । आत्मबोधाचा ॥ ३ ॥ ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे । पुढील अधोगतीची लाज नेणवे । आणि करितात जें न करावें । वेदु म्हणे ॥ ४ ॥ पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा । तो कार्यार्थु आघवा । सांडुनियां ॥ ५ ॥ इंद्रियग्रामींचे राजबिदीं । अहंममतेचिया जल्पवादीं । विकारांतरांची मांदी । मेळविताती ॥ ६ ॥ दुःखशोकांचां घाई । मारिलियाची सेचि नाहीं । हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ॥ ७ ॥

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन । आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

अभिमानानेंच गिळले. ८३. कितीएकांनीं तीन वेदरूपी सांगडीचा (मायानदींतून तरण्याकरतां) आश्रय केला. पण त्याबरोबरच अभिमानाचे मोठे धोंडे घेतले, ते मदरूपी माशांच्या तोंडांत सबंध गेले. ८४. कितीएकांनीं तारुण्यरूपी कांसपेटा कमरेस बांधला व मग मदनाच्या कांसेला लागले; ते विषयरूपी मगरांनीं चघळून टाकले. ८५. आतां म्हातारपणरूपी लाटेमध्यें असणाऱ्या बुद्धिभ्रंशरूपी जाळ्यानें ते चोहोंबाजूंनीं व्यापले जातात, ८६. आणि शोकरूपी कांठावर आपटून, क्रोधरूपी भोंवऱ्यांत गुरफटून, ज्या ठिकाणीं वर येतील, त्या ठिकाणीं संकटरूपी गिधाडांकडून टोंचले जातात. ८७. नंतर ते दुःखरूपी चिखलानें भरले, व मग मरणाच्या गाळांत फसले; याप्रमाणें ज्यांनीं कामाचा आश्रय केला, ते असे व्यर्थ गेले. ८८. कितीएकांनीं यज्ञकर्मरूपपेटी मायानदी तरण्याकरितां आपल्या पोटाशीं बांधली, ते स्वर्गसुखाच्या कपारीमध्यें अडकून राहिले. ८९. कितीएकांनीं मोक्षरूपी पलीकडल्या किनाऱ्याला लागावें, या आशेनें कर्मरूपी बाहूंवर विश्वास ठेवला; परंतु ते विधिनिषेधाच्या बळणांत सांपडले. ९०. ज्या मायानदींत वैराग्याची नाव प्रवेश करूं शकत नाहीं व त्याचप्रमाणें विवेकरूपी वेळूला ठाव लागत नाहीं. याउपर अष्टांग योगानें कांहीं तरणोपाय होतो; पण तो क्वचित् होतो. ९१. याप्रमाणें जीवाच्या सामर्थ्यानें ही नदी उतरून जाणें, हें म्हणणें कशासारखें आहे म्हणून म्हणावें ? ९२. जर पथ्य न करणाराला रोग घालवितां येईल, किंवा साधूला दुर्जनाची बुद्धि कळेल, अथवा एकादा लोभी पुरुष, त्यास ऐश्वर्य प्राप्त झालें असतां, त्याचा तो त्याग करील; ९३. चोरांना जर चौकशी करणारे सभासद (न्यायाधीश) भितील, अथवा माशाला जर गळ गिळतां येईल, किंवा एकाद्या भित्र्या मनुष्याला पिशाचावर हल्ला करतां येईल; ९४. हरणाच्या पोराला जर जाळें कुरतडून तोडतां आलें, मुंगीला जर मेरु पर्वत ओलांडतां आला, तरच मायानदीच्या पलीकडच्या कांठाला जीव पाहूं शकतील. (पोहोंचतील.) ९५. म्हणून हे अर्जुना, ज्याप्रमाणें विषयी पुरुषाला स्त्री जिंकतां येत नाहीं, त्याप्रमाणें जीवांना ही मायारूप नदी स्वसामर्थ्यानें तरतां येणार नाहीं. ९६. अशा स्थितींत जे सर्वभावानें मला भजले, ते एकच ही मायानदी सहज तरून गेले; व त्यांस मायानदीच्या अलिकडच्या कांठावरच मायानदीचें जल संपलें. ९७. ज्यांस सद्‌गुरु हा पुढें तारणारा (नावाडी) आहे, ज्या साधकांनीं आत्मानुभवरूपी कांसोटा घट्ट बांधला आहे व ज्यांना आत्मनिवेदनरूपी तारू हस्तगत झाला आहे; ९८. जे अहंभावाचें ओझें टाकून, विकल्परूपी वाऱ्याच्या झुळुका चुकवून, संसारावरील प्रेमाच्या ओहोटीचें पाणी तपासून, ९९. व ज्यांना जीव व परमात्मा यांच्या ऐक्यरूपी उतार असलेल्या पाण्यांत ज्ञानरूपी सोपी पायवाट सांपडून, मग जे (पलीकडल्या) निवृत्तीरूपी तीराकडे वळले. १००. वैराग्यरूपी हातांनीं पाणी तोडीत, व मीच परमात्मा आहें, अशी समजूत हेंच कोणी एक बळ, त्यानें तोल सांभाळीत अशा रीतीनें कसल्याही अडचणींत न पडतां, निवृत्तिरूपी कांठावर ते बाहेर आले. १०१. या उपायानें जे मला भजले, ते ही माझी माया तरून गेले; परंतु असे भक्त थोडे आहेत, फार नाहींत. १०२.

दुष्कर्मी, मूर्ख व अधम असे मनुष्य, मायेनें ज्ञान नष्ट झाल्यामुळें आसुरी मार्गाचा अवलंब करतात (आणि) मला शरण येत नाहींत. १५.

कारण कीं, वरील साधकांशिवाय बहुतेक इतरांना अहंकाररूपी भूताचा संचार झाल्यामुळें, त्यांस आत्मज्ञानाची विस्मृति झाली असते. १०३. त्या वेळीं नियमरूप वस्त्राची आठवण त्यांस रहात नाहीं, पुढें असलेल्या अधोगतीची लाज त्यांना भासत नाहीं; व वेद ज्या गोष्टी करूं नये म्हणून म्हणतो, त्या गोष्टी ते करतात. १०४. अर्जुना, पहा, ज्या कामाकरितां या शरीररूपी गांवाला ते आले तो कार्यभाग सर्व सोडून देऊन १०५. इंद्रियरूपी गांवाच्या राजरस्त्यावर 'मी माझेपणाच्या' बडबडीनें, नानाप्रकारच्या विकारांचे समुदाय ते गोळा करतात; १०६. व दुःखशोकाच्या घावांनीं कितीहि मारलें, तरी त्यांस त्याची आठवणच राहात नाहीं. हें सांगण्याचें कारण एवढेंच कीं, असें ते मायेनें घासलेले असतात. १०७.

हे अर्जुना, चार प्रकारचे पुण्यवान लोक माझी भक्ति करतात. हे भरतश्रेष्ठा, (ते चार प्रकार हे–) दुःखानें ग्रस्त झालेला, ज्ञानाची इच्छा करणारा, द्रव्याची इच्छा करणारा आणि ब्रह्मज्ञान प्राप्त झालेला (ज्ञानी). १६.

म्हणोनि ते मातें चुकले। आइकां चतुर्विध मज भजले। जिहीं आत्महित केलें। वाढतें या ॥ ८ ॥ तो पहिला आर्तु म्हणिजे। दुसरा जिज्ञासु बोलिजे। तिजा अर्थार्थी जाणिजे। ज्ञानिया चौथा ॥ ९ ॥ तेथ आर्तु तो आर्तीचेनि व्याजें। जिज्ञासु तो जाणावयाचिलागीं भजे। तिजेनि तेणें इच्छिजे। अर्थसिद्धि ॥ ११० ॥ मग चौथियाचां ठायीं। कांहींचि करणें नाहीं। म्हणोनि भक्तु एकु पाहीं। ज्ञानिया जो ॥ ११ ॥

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते। प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥

जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें। फिटलें भेदाभेदांचें कडवसें। मग मीचि जाहला समरसें। आणि भक्तुही तेवींचि ॥१२॥ परि आणिकांचिये दिठी नावेक। जैसा स्फटिकुचि आभासे उदक। तैसा ज्ञानी नव्हे कौतुक। सांगतां तो ॥१३॥ जैसा वारा कां गगनीं थिरे। मग वारेपण वेगळें नुरे। तेविं भक्त हे पैज न सरे। जरी ऐक्या आला ॥ १४ ॥ जरी पवन हालवूनि पाहिजे। तरी गगनावेगळा देखिजे। एऱ्हवीं गगन तो सहजें। असे जैसें ॥ १५ ॥ तैसें शरीरें इन कर्में। तो भक्त ऐसा गमे। परी अंतरें प्रतीतिधर्में। मीचि जाहला ॥ १६ ॥ आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें। मी आत्मा ऐसें तो जाणे। म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें। उचंबळला सांता ॥ १७ ॥ हा गा जीवापैलीकडिली खुणे। जो पावोनि वावरोंही जाणे। तो देहाचेनि वेगळेपणें। काय वेगळा होय ॥ १८ ॥

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्। आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥१८॥

म्हणोनि आपुलालिया हिताचेनि लोभें। मज आवडे तेही भक्त शोभे। परी मीचि करी वालभें। ऐसा ज्ञानिया एकु ॥ १९ ॥ पाहें पां दुभतेयाचिया आशा। जगचि धेनूसि करीताहे फांसा। परि दोरेंवीण कैसा। वत्साचा बळी ॥ १२० ॥ कां जे तनुमनुप्राणें। तें आणिक कांहींचि नेणे। देखे तयातें म्हणे। हे मायाचि कीं माझी ॥ २१ ॥ तें येणें मानें अनन्यगती। म्हणूनि धेनूही तैसीचि प्रीती। यालागीं लक्ष्मीपती। बोलिले साच ॥ २२ ॥ हें असो मग म्हणितलें। जे कां तुज सांगितलें। तेही भक्त भले। पढियंते आम्हां ॥ २३ ॥ परि जाणोनियां मातें। जो पाहों विसरला मागौतें। जैसें सागरा येऊनि सरितें। मुरडावें ठेलें ॥ २४ ॥ तैसी अंतःकरणकुहरीं उपजली। जयाची प्रतीतिगंगा मज मिनली। तो मी हें काय बोली। फार करूं ॥ २५ ॥ एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे। तो चैतन्याचि केवळ माझें। हें न म्हणावें परि काय कीजे। न बोलणें बोलों ॥ २६ ॥ जे तो विषयांची मोट झाडी-। माजीं कामक्रोधांचीं सांकडीं। चुकावूनि आला पाडीं। सद्वासनेचिया ॥ २७ ॥ मग साधुसंगें सुभटा। उजू सत्कर्माचिया वाटा। अप्रवृत्तीचा अव्हांटा। डावलूनि ॥ २८ ॥

म्हणून ते मला चुकले. आतां आइका, दुसरे, ज्यांनीं आपलें आत्महित वाढतें केलें, ते मला चार प्रकारांनीं भजले. १०८. त्यांतील जो पहिला, त्याला आर्त (दुःखपीडीत) म्हणावें; दुसऱ्याला जिज्ञासु (ज्ञानाची इच्छा करणारा) या नांवानें ओळखावें; आणि तिसरा अर्थार्थी (द्रव्याची इच्छा करणारा) आणि चौथा तो ज्ञानी होय, असें समजावें. १०९. त्यांत जो आर्त आहे, तो पीडेच्या निमित्तानें भक्ति करतो; व जो जिज्ञासु आहे, तो जाणण्याकरितांच भक्ति करितो; आणि त्यांतील जो तिसरा, तो अर्थप्राप्तीची इच्छा करतो. ११०. मग राहिलेल्या चौथ्याच्या ठिकाणीं कांहींच कर्तव्य नसतें; म्हणून, अर्जुना, जो ज्ञानी आहे, तोच एक भक्त आहे, असें समज. १११.

यांमध्यें नित्य व (माझ्याशीं) अनन्य (होऊन) भक्ति करणारा ज्ञानी श्रेष्ठ होय. कारण ज्ञानी मनुष्याला अत्यंत प्रिय वस्तु मी आहें व मला तो अत्यंत प्रिय आहे. १७.

कारण कीं, ज्ञानाच्या प्रकाशानें त्याच्या ठिकाणचा द्वैताद्वैतरूपी अंधार नाहींसा होतो. नंतर ब्रह्मैक्यभावानें तो मद्रूप होतो. आणि मद्रूप होऊन सुद्धां तो माझा भक्त असतोच. ११२. जसा इतरांच्या दृष्टीला स्फटीकच क्षणभर पाण्यासारखा भासतो, तसा इतरांच्या दृष्टीला ज्ञानी (हा त्याच्या भजनपूजनादिक शारीरिक क्रियांवरून) माझ्याहून वेगळा दिसतो; पण ज्ञानी हा तसा (माझ्याहून वेगळा) नाहीं. त्याचें वर्णन करण्यास मोठें कौतुक वाटतें. ११३. ज्याप्रमाणें वारा आकाशांत विराला, म्हणजे त्याचें वारेपण वेगळें राहात नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी जरी माझ्याशीं ऐक्याला पावला, तरी त्याची भक्त ही प्रतिज्ञा जात नाहीं. ११४. जर वारा हलवून पाहिला, तर तो आकाशाहून भिन्न देखील दिसतो; एरव्हीं तो वारा स्वभावतःच आकाशरूप असतो. ११५. त्याप्रमाणें ज्ञानी पुरुष जेव्हां शारीरिक क्रिया (भजनपूजनादिक) करतो, त्या वेळीं तो भक्त असा वाटतो; पण आंतील अनुभवाच्या अंगानें तो मद्रूपच झालेला असतो. ११६. आणि ज्ञानाचा उदय झाल्यामुळें तो मला आपला आत्मा समजतो, म्हणून मी आनंदयुक्त होऊन, ज्ञानी हा माझा आत्मा आहे, असें म्हणतों. ११७. अरे अर्जुना, जीवाच्या पलीकडील वर्मांच्या ठिकाणीं प्राप्त होऊन, जो व्यवहारही कसा करावा हें समजतो, तो देहाच्या वेगळेपणानें खरोखर वेगळा होईल काय ? ११८.

हे सर्वही भक्त उत्कृष्टच (भले) आहेत; पण (त्यांपैकीं) ज्ञानी तर केवळ माझा आत्माच होय, असें मी समजतों. कारण, 'मीच ब्रह्म' अशा बुद्धीनें चित्त स्थिर झालेला तो ज्ञानी, अत्यंत श्रेष्ठ प्राप्तव्य जो मी, त्या मलाच प्राप्त झालेला असतो. १८.

म्हणून आपापल्या हिताच्या इच्छेनें मला वाटेल तो भक्त चिकटतो, परंतु मीच ज्याच्यावर प्रेम करतों, असा त्यांपैकीं एक 'ज्ञानी' भक्त होय. ११९. असें पहा, अर्जुना, दुभत्याच्या आशेनें लोकच गाईला भाला घालतात; परंतु दोरावांचून वांसराचा पाश कसा बळकट आहे ! (कीं दोरावांचून त्याचा भाग त्याला सहज मिळतो.) १२०. याचें कारण एवढेंच कीं, तें वासरूं शरीरानें, मनानें व प्राणानें दुसऱ्या कोणासही जाणत नाहीं. जें त्याला पुढें दिसेल, त्याला 'ही माझी आईच आहे,' असें तें म्हणतें. (त्याला गायच वाटते.) १२१. तें वासरूं इतके (गाईच्या ठिकाणीं) अनन्यगति असतें, म्हणून गाईचीही त्याच्यावर तशीच प्रीति असते. म्हणून श्रीकृष्ण जें वर म्हणाले तें खरें आहे (असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.) १२२. नंतर भगवंतांनीं म्हटलें, हें असो; इतर तीन भक्त जे तुला सांगितले, ते देखील आम्हांला चांगले आवडते आहेत. १२३. परंतु मला जाणून जो (ज्ञानी भक्त) मागें पाहावयास विसरला (देहेंद्रियादि प्रपंचाला विसरला.) ज्याप्रमाणें नदी समुद्राला मिळाल्यावर माघारी वळत नाहीं, १२४. त्याप्रमाणें अंतःकरणरूपी गुहेमध्यें उत्पन्न झालेली, ज्याची अनुभवरूपी गंगा मला मिळाली आहे, तो मी आहे, हें शब्दानें विस्तार करून काय सांगूं ! १२५. वास्तविक पाहिलें तर, ज्ञानी म्हणून जो म्हणतात, तो माझा केवळ आत्माच आहे; ही गोष्ट शब्दांनीं सांगण्यासारखी नाहीं, परंतु काय करावें ? ही न बोलण्यासारखी गोष्ट, पण तुला सांगितली. १२६. कारण तो विषयांच्या दाट झाडींतून, काम क्रोध यांचीं संकटें टाळून, चांगल्या वासनारूपी डोंगरावर आला. १२७. अर्जुना, मग संतांच्या संगतीनें विहितकर्मांच्या सरळ मार्गानें, निषिद्ध आचरणाचा आडमार्ग टाकून, १२८.

बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

आणि जन्मशतांचा वाहतवणा । तेविंचि आस्थेचिया न लेचि वाहणा । तेथ फलहेतूचा उगाणा । कवणु चाळी ॥२९॥ ऐसा शरीरसंयोगाचिये राती । माजीं धांवतां सडिया आयती । तंव कर्मक्षयाची पाहती । पाहांट जाली ॥ १३० ॥ तैसीच गुरुकृपाउखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली । तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥ ३१ ॥ ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवांत जरी राहे । तरी मीचि तया ॥ ३२ ॥ हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं । जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥ ३३ ॥ तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरीं । हें सांगिजे बोलवरी । तैसें नव्हे ॥ ३४ ॥ म्हणोनि असो हें यापरी । तो देखे ज्ञानाची वाखारी । तेणें संसरलेनि करी । आपु विश्व ॥ ३५ ॥ हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो । म्हणोनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि ॥ ३६ ॥ जयाचिये प्रतीतींचां वाखौरां । पवाडु होय चराचरा । तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभु आथी ॥ ३७ ॥ येर बहु जोडती किरीटी । जयांचीं भजनें भोगासाठीं । जे आशातिमिरें दृष्टी- । मंद जाले ॥ ३८ ॥

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः । तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥

आणि फळाचिया हांवा । हृदयीं कामा जाला रिगावा । कीं तयाचिये घसणी दिवा । ज्ञानाचा गेला ॥ ३९ ॥ ऐसे उभयतां आंधारीं पडले । म्हणोनि पासींचि मातें चुकले । मग सर्वभावें अनुसरले । देवतांतरां ॥ १४० ॥ आधींच प्रकृतीचे पाइक । वरी भोगालागीं तंव रंक । मग तेणें लोलुप्यें कौतुक । कैसे भजती ॥ ४१ ॥ कवणी तिया नियमबुद्धि । कैसिया इन उपचारसमृद्धि । कां अर्पण यथाविधि । विहित करणें ॥ ४२ ॥

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति । तस्य तस्याऽचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१॥

पैं जो जिये देवतांतरीं । भजावयाची चाड करी । तयाची ते चाड पुरी । पुरविता मी ॥ ४३ ॥ देवोदेवीं मीचि पाहीं । हाही निश्चय त्यासि नाहीं । भाव ते ते ठायीं । वेगळाला धरी ॥ ४४ ॥

स तया श्रद्धया युक्तस्तस्या राधनमीहते । लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥

मग श्रद्धायुक्त । तेथिंचें आराधन जें उचित । तें सिद्धीवरी समस्त । वर्तों लागे ॥ ४५ ॥ ऐसें जेणें जें भाविजे । तें फळ तेणें पाविजे । परी तेंही सकळ निपजे । मजचिस्तव ॥ ४६ ॥ परी ते भक्त मातें नेणती । जे कल्पनेबाहेरी न निघती । म्हणोनि कल्पित फळ पावती । अंतवंत ॥ ४७ ॥

अनेक जन्म ( सत्संस्कार ) झाल्यानंतर 'सर्व ( विश्व ) वासुदेव होय ' असें ज्ञान प्राप्त होऊन ज्ञानी मला शरण येतो, ( मला येऊन पोंचतो. ) असा महात्मा अत्यंत दुर्लभ आहे. १९.

आणि शेंकडों जन्मांचा ( कर्ममार्गानें ) प्रवास करीत असतां, तो फलाशेच्या वहाणा ( अंतःकरणरूपी ) पायांत घालीत नाहीं. अशा स्थितींत ( स्वर्गादि ) फलांच्या कारणांचा ( साधनांचा ) हिशोब कोणी करावा ? १२९. याप्रमाणें देहतादात्म्यरूप रात्रींत सर्वसंगपरित्यागरूपी तयारीनें धांवत असतांना, कर्मांच्या नाशाची उजाडती पहांट झाली. १३०. त्याचप्रमाणें गुरुकृपारूप उषःकाल झाला; व ज्ञानरूपी कोंवळें ऊन पडलें; तेव्हां त्या प्रसंगीं त्याच्या दृष्टीला ब्रह्मैक्याचें ऐश्वर्य दिसूं लागलें. १३१. त्या वेळीं तो जिकडे जिकडे पाहील, तिकडे तिकडे त्याला मीच एक आहें; अथवा तो जरी निवांत राहिला, तरीही त्याला मीच आहें. १३२. हें बोलणें असो; त्याला सर्व ठिकाणीं माझ्यावांचून दुसरें कांहीं एक नाहीं. ज्याप्रमाणें डोहांत घट बुडाला असतां, त्याच्या आंत बाहेर जसें पाणीच असतें; १३३. त्याप्रमाणें तो माझ्या मध्यें असतो; व मी त्याच्या आंतबाहेर असतों; ही स्थिति शब्दानें सांगतां येईल, अशी नाहीं १३४. म्हणून हें राहू दे; याप्रमाणें तो ज्ञानाचें भांडार पहातो व त्या योगानें सांवरल्यामुळें सर्व जग आत्मरूप पहातो. १३५. हें संपूर्ण विश्व श्रीवासुदेव आहे, अशा अनुभवरूपी रसाची त्याची समजूत ओतलेली असते; म्हणून सर्व भक्तांमध्यें तो राजा आहे आणि ज्ञानीही तोच आहे. १३६. ज्याच्या अनुभवरूपी भांडारांत स्थावरजंगमात्मक अखिल विश्वाचा समावेश होतो, हे अर्जुना, तो महात्मा दुर्लभ आहे. १३७. अर्जुना, ज्यांची भजनें भोगासाठीं असतात व ज्यांची दृष्टि आशारूपी नेत्ररोगानें मंद झालेली असते, असे इतर भक्त पुष्कळ मिळतात. १३८

(जन्मांतरीं मिळविलेल्या संस्कारांनीं प्राप्त झालेल्या) स्वतःच्या स्वभावानें नियंत्रित झालेले, आणि निरनिराळ्या ( विषयांच्या ) अभिलाषांनीं ज्ञान नष्ट झालेले निरनिराळ्या नियमांचा आश्रय करून ( माझ्याहून ) वेगळ्या अशा देवतांची भक्ति करतात. २०.

आणि फलाविषयींच्या तीव्र इच्छेमुळें अंतःकरणांत कामानें प्रवेश केला आणि त्या कामाच्या प्रवेशाच्या संसर्गानें ज्ञानाचा दिवा गेला. १३९. ( बाहेर आशारूपी नेत्ररोगानें व आंत अविवेकानें ) असे दोन्हीं प्रकारांनीं (अज्ञानरूपी) अंधारांत ते पडले; म्हणून त्यांचे जवळच असणारा जो मी, त्या मला ते चुकले. नंतर ( इच्छित फल देणाऱ्या ) निरनिराळ्या देवतांस सर्व भावानें भजूं लागले. १४०. मूळचेच देहात्मबुद्धीचे दास, त्याशिवाय आणखी भोगाकरितां दीन झालेले, असे ते लोक मग त्या विषयसुखाच्या लालसेनें इतर देवांचें कशा कौतुकानें भजन करतात. (तें पहा) १४१. त्या त्या देवतेच्या आराधनेविषयीं जो जो नियम प्रसिद्ध आहे, त्याचा त्याचा आश्रय करून, कोणते कोणते उपचार लागतात. ते जमवून, अथवा ते उपचार अर्पण कसे करावेत, ते समजून घेऊन, शास्त्रानें सांगितलेल्या विधीप्रमाणें कर्में करतात. १४२.

जो जो भक्त ज्या ज्या देवतारूपी तनूची श्रद्धेनें भक्ति करण्याची इच्छा करतो, त्या त्या भक्ताची श्रद्धा त्या त्या देवतारूपी तनूचे ठिकाणीं मी स्थिर करतों. २१.

परंतु जो ज्या अन्य देवतांना भजावयाची इच्छा करतो, त्याची ती इच्छा पूर्णपणें पुरविणारा मीच आहें. १४३. देवदेवतांतरांतून मीच आहें, हा निश्चय देखील त्यास नसतो; त्या त्या देवतांविषयीं त्याची भिन्न भिन्न समजूत असते. १४४.

तो भक्त त्या श्रद्धेनें युक्त होत्साता त्या देवतेचें आराधन करतो; आणि मग त्या देवतारूपी तनूपासून मीच निर्माण केलेलीं इच्छितफळें त्याला मिळतात. २२.

मग (त्या देवतेचें ) जें योग्य अराधन असेल, तें श्रद्धेनें आपली कार्यसिद्धि होईपर्यंत संपूर्ण आचरतो. १४५. याप्रमाणें ज्यानें ज्याची इच्छा करावी, त्याला तें फळ मिळतें. पण तें देखील सर्व माझ्यामुळेंच होतें. १४६. परंतु ते भक्त मला जाणत नाहींत, कारण ते कल्पनेच्या बाहेर पडत नाहींत व म्हणून त्यांस नाशवंत असें इच्छिलेलें फळ प्राप्त होतें. १४७.

अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् । देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥

किंबहुना ऐसें जें भजन। तें संसाराचेंचि साधन। येर फळभोग तो स्वप्न। नावभरी दिसे ॥ ४८ ॥ हें असो परौतें। मग हो का आवडे तें। परि यजी जो देवतांतें। तो देवत्वासीचि ये ॥ ४९ ॥ येर तनुमनप्राणीं। जे निरंतर माझेयाचि वाहणीं। ते देहाचां निर्वाणीं। मीचि होती ॥ १५० ॥ परी तैसें न करिती प्राणिये। वायां आपुलां हितीं वाणिये। पैं पोहताती पाणियें। तळहातींचेनि ॥ ५१ ॥ नाना अमृताचां सागरीं बुडिजे। मग तोंडा कां वज्रमिठी पाडिजे। आणि मनीं तरी आठविजे। थिल्लरोदकातें ॥ ५२ ॥ हें ऐसें काइसेया करावें। जें अमृतींही रिगोनि मरावें। तें सुखें अमृत होऊनि कां नसावें। अमृतामाजीं ॥ ५३ ॥ तैसा फळहेतूचा पांजरा। सांडूनिया धनुर्धरा। कां प्रतीतिपाखीं चिदंबरा। गोसाविया नोहावें ॥ ५४ ॥ जेथ उंचावतेनि पवाडें। सुखाचा पैसारु जोडे। आपुलेनि सुरवाडें। उडों ये ऐसा ॥ ५५ ॥

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः। परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् । ॥ २४ ॥

तया उमपा माप कां सुवावें। मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें। सिद्ध असतां कां निमावें। साधनवरी ॥ ५६ ॥ परि हा बोल आघवा। जरी विचारीजतसे पांडवा। तरी विशेषें या जीवां। न चोजवे गा ॥ ५७ ॥

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः। मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥

कां जे योगमायापडळें। हे जाले आहाती आंधळे। म्हणोनि प्रकाशाचेनिहि देहबळें। न देखती मातें ॥ ५८ ॥ एऱ्हवीं मी नसें ऐसें। कांहीं वस्तुजात असे। पाहें पां कवण जळ रसें– । रहित आहे ॥ ५९ ॥ पवन कवणातें न शिवेचि। आकाश कें न समायेचि। हें असो एक मीचि। विश्वीं असें ॥ १६० ॥

वेदाहंसमतीतानि वर्तमानानि चाऽर्जुन। भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

येथें भूतें जियें अतीतलीं। तियें मीचि होऊनि ठेलीं। आणि वर्तत आहाति जेतुलीं। तींहि मीचि ॥ ६१ ॥ भविष्यमाणें जियें हीं। तींही मजवेगळीं नाहीं। हा बोलचि एऱ्हवीं कांहीं। होय ना जाय ॥ ६२ ॥ दोराचिया सापासी। डोंबा वडी ना गव्हाळा ऐसी। संख्या न करवे कोण्हासी। तेवीं भूतांसि मिथ्यत्वें ॥ ६३ ॥ ऐसा मी पंडुसुता। अनुस्यूत सदा असतां। यां संसार जो भूतां। तो आनें बोलें ॥ ६४ ॥

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत। सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥

आतां थोडी ऐसी। गोठी सांगिजेल परियेसीं। जें अहंकारतनूंसी। वालभ पडिलें ॥ ६५ ॥ तें इच्छा हे कुमारी जाली। मग ते कामाचिया तारुण्या आली। तेथ द्वेषेंसीं मांडिली। वराडिक ॥ ६६ ॥ तया दोघांस्तव जन्मला। ऐसा द्वंद्वमोह जाला। मग तो आजेन वाढविला। अहंकारें ॥ ६७ ॥ जो धृतीसि सदां प्रतिकूळ। नियमाही नागवे सळ। आशारसें दोंदिलु। जाला

परंतु त्या अल्पबुद्धि मनुष्यांचें तें फल विनाशी होतें. देवतांची भक्ति करणारे देवतांप्रत जातात आणि माझी भक्ति करणारे मजप्रत येतात. २३.

फार काय सांगावें ! असें जें भजन आहे, ते जन्म-मरणाला देणारें आहे आणि त्या भजनानें मिळणारा हा ऐहिक पारत्रिक फलभोग क्षणभर दिसणारें स्वप्नच आहे. १४८. हें ( फलभोगाची गोष्ट ) एका बाजूला राहू दे. मग वाटेल तें कां दैवत असेना, परंतु जो ज्या देवतांना भजतो, तो त्या त्या देवत्वास प्राप्त होतो. १४९. दुसरे जे शरीरानें मनानें व प्राणानें अखंड माझ्या भजनाच्या ओघांत आहेत, ते देहाचे अंतीं मीच होतात. १५०. पण प्राणी तसें करीत नाहींत. व्यर्थ आपल्या हिताचा तोटा करतात. तें त्यांचें करणें तळहातांतील पाण्यांत पोहल्याप्रमाणें आहे; १५१. किंवा अमृताच्या समुद्रामध्यें बुडी घावी आणि मग तोंड कां घट्ट मिटून धरावें ? आणि मनांत तर डबक्यांतील पाण्याची आठवण कां करावी ? १५२. अमृतांत शिरून तोंडांत अमृत जाऊं न देतां मरावें, असें हें कशाला करावें ? तर अमृतामध्यें सुखानें अमृत ( अमर ) होऊन कां राहू नये ? १५३. अर्जुना, त्याप्रमाणें फलाशेचा पिंजरा टाकून, आत्मानुभवरूपी पंखानें चिदाकाशांत हवा तसा संचार करणारा समर्थ कां होऊं नये ? १५४. त्या चिदाकाशांत जितके जितके आपण उंच जाऊं, त्या मानानें आपणांला सुखानें संचार करण्याला हवा तसा विस्तार मिळतो. १५५.

अविनाशी व अत्यंत उत्तम ( ज्याहून उत्तम दुसरें कांहीं नाहीं असें ) माझें शुद्ध स्वरूप न जाणणारे अल्पबुद्धि मनुष्य अव्यक्त असलेल्या मला व्यक्त स्वरूप पावलेला समजतात. २४.

त्या अमर्याद स्वरूपाला माप कां घालावें ? मला निराकाराला साकार कां समजावें ? मी स्वतःसिद्ध असतां माझ्या प्राप्तीकरितां साधनें करून कां मरावें ? १५६. अर्जुना, पण ह्या सर्व बोलण्याचा विचार केला तर बहुतकरून ह्या जीवांना ही गोष्ट समजत नाहीं. १५७.

सर्वांना माझें ज्ञान होत नाहीं; कारण योगमायेनें ( गुणांनीं युक्त अशा मायेनें ) हें सर्व जग आच्छादिलेलें आहे; व म्हणूनच हें मूढ जग जन्मरहित व नाशरहित अशा मला जाणत नाहीं. २५.

कारण कीं, योगमायेच्या पडद्यानें हे आंधळे झाले आहेत, म्हणून ( स्वरूप ) प्रकाशानें भरलेल्या दिवसाच्या बळानें देखील ते मला पाहात नाहींत. १५८. सहज विचार करून पाहिलें तर, ज्यामध्यें मी नाहीं, असा कांहीं पदार्थमात्र आहे काय ? असें पहा कीं रसाशिवाय पाणी कोठें आहे काय ? १५९. वारा कोणाला शिवत नाहीं ? आकाश कोठें व्यापीत नाहीं ? हें बोलणें राहू दे, मीच एक सगळ्या विश्वास व्यापून आहें. १६०.

हे अर्जुना, मागें झालेल्या, सध्यां असलेल्या व पुढें होणाऱ्या सर्व प्राण्यांना मी जाणतों; पण मला कोणी जाणत नाहीं. २६.

ह्या जगांत जितके प्राणी होऊन गेले, ते मीच होऊन राहिले; आणि हल्लीं जितके प्राणी हयात आहेत, तेही मीच आहेत. १६१. पुढें जे प्राणी होणार आहेत, तेही माझ्याहून निराळे नाहींत. हें सर्व फक्त म्हणावयाचेंच. वास्तविक कांहीं होत नाहीं व जात नाहीं. १६२. दोरीवर भासणाऱ्या सापाचा तो कोणत्या जातीचा आहे, म्हणजे डोंघा ( काळा ) आहे, कीं बडी ( कवड्या ) आहे, कां गव्हाळा ( गव्हासारख्या ठिपक्यांचा ) आहे, असा कोणासही निश्चय करतां येत नाहीं; त्याप्रमाणें प्राण्यांसंबंधीं निश्चय करतां येत नाहीं; कारण प्राणी मिथ्या आहेत. १६३. अर्जुना, याप्रमाणें मी सदा अखंडित असतांना, या प्राण्यांना जन्ममरणरूपी संसार लागला आहे, तो वेगळ्या प्रकारानें १६४.

हे भारता, शत्रुतापना, इच्छा व द्वेष यांपासून उत्पन्न झालेल्या ( सुखदुःखादि ) द्वंद्वरूपी मोहाच्या योगानें या सृष्टीमध्यें सर्व प्राणी मोह पावतात. २७

आतां थोडीशी गोष्ट सांगतों, ऐक. जेव्हां अहंकार आणि देह यांचें प्रेम एकमेकांवर जुळलें, १६५. तेव्हां त्यांना इच्छा ही मुलगी झाली; नंतर ती इच्छा कामरूपी तारुण्याला आली; त्या वेळीं तिचें द्वेषाशीं लग्न लावलें. १६६. त्या दोघांपासून द्वंद्वमोह जन्मला; मग त्याचा आजा जो अहंकार, त्यानें त्याला वाढविला. १६७. तो द्वंद्वमोह सात्त्विक धैर्याला नेहमीं प्रतिकूल असतो आणि आशारूपी रसानें पुष्ट झाला असतां तो

सांता ॥ ६८ ॥ असंतुष्टीचिया मदिरा । मत्त होवोनी धनुर्धरा । विषयांचां बोवरां । विकृतीसी असे ॥ ६९ ॥ तेणें भावशुद्धीचिया वाटे । विखुरले विकल्पाचे कांटे । मग चिरिले अव्हांटे । अप्रवृत्तीचे ॥ १७० ॥ तेणें भूतें भांबावलीं । म्हणोनि संसाराचिया आडवामाजीं पडिलीं । मग महादुःखाचां घेतलीं । दांडेवरी ॥ ७१ ॥ ऐसे विकल्पाचे वांयाणे । कांटे देखोनि सणाणे । जे मतिभ्रमाचें पासवणें । घेतीचिना ॥ ७२ ॥

येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् । ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

उजू एकनिष्ठतेचां पाउलीं । रगडूनि विकल्पाचिया भालीं । महापातकांची सांडिली । अटवी जिहीं ॥ ७३ ॥ मग पुण्याचे धांवा घेतले । आणि माझी जवळीक पातले । किंबहुना ते चुकले । वाटवघेयां ॥ ७४ ॥

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये । ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥

एऱ्हवीं तरी पार्था । जन्मरणाची निमे कथा । ऐसिया प्रयत्नातें आस्था । विये जयांची ॥ ७५ ॥ तयां तो प्रयत्नुचि एके वेळे । मग समग्रें परब्रह्में फळे । जया पिकलेया रसु गळे । पूर्णतेचा ॥ ७६ ॥ तेवेळीं कृतकृत्यता जग भरे । तेथ अध्यात्माचें नवलपण पुरे । कर्माचें काम सरे । विरमे मन ॥ ७७ ॥ ऐसा अध्यात्मलाभ तया । होय गा धनंजया । भांडवल जया । उद्यमीं मी ॥ ७८ ॥ तयातें साम्याचिये वाढी । ऐक्याची सांदे कुळवाडी । तेथ भेदाचिया दुबळवाडी । नेणिजे तो ॥ ७९ ॥

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः । प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

जिहीं साधिभूता मातें । प्रतीतीचेनि हातें । धरूनि अधिदैवातें । शिवतलें गा ॥ १८० ॥ जया जाणिवेचेनि वेगें । मी अधियज्ञु दृष्टी रिगे । ते तनूचेनि वियोगें । विऱ्हये नव्हती ॥ ८१ ॥ एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां । भूतांची उमटे खडाडता । काय न मरत-याहि चिचा । युगांतु नोहे ॥ ८२ ॥ परी नेणों कैसें पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा । ते प्रयाणींचिया लगबगा । न सांडितीच मातें ॥ ८३ ॥ एऱ्हवीं तरी जाण । ऐसे जे निपुण । तेचि अंतःकरण-। युक्त योगी ॥ ८४ ॥ तंव इये शब्दकुपिकेतळीं । नोडवेचि अवधानाची अंजुळी । जे नावेक अर्जुन तये वेळीं । मागांचि होता ॥ ८५ ॥ जेथ तद्ब्रह्म-वाक्यफळें । जियें नानार्थरसें रसाळें । वहकाते आहाती परिमळें । भावाचेनि ॥ ८६ ॥ सहज कृपामंदानिळें । कृष्णद्रुमाचीं वचनफळें । अर्जुनश्रवणाचिये खोळे । अवचित पडिलीं ॥ ८७ ॥ तियें प्रमेयाचींच हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाचां सागरीं चुबुकळिलीं । मग तैसींच का घोळिलीं । परमानंदें ॥ ८८ ॥ तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषाचे डोहळे । घेताति गळाळे । विस्मयामृताचे ॥ ८९ ॥ तिया सुखसंपत्ति जोडालिया । मग स्वर्गा वाती वांकुलिया । हृदयाचां जीवीं गुतकुलिया । होत आहाती ॥ १९० ॥ ऐसें बरविलीचि बरवा । सुख जावों

छळणारा द्वंद्वमोह नियमांत सांपडत नाहीं. १६८. अर्जुना, असंतोषरूप दारूनें उन्मत्त होऊन तो पंचविषयरूपी खोलीमध्यें विकाररूपी स्त्रीसह राहतो. १६९. त्या द्वंद्वमोहानें अंतःकरणशुद्धीच्या वाटेवर विकल्परूपी कांटे पसरले आणि नंतर निषिद्ध कर्माचे आडमार्ग खुले केले. १७०. त्यायोगानें प्राणी भांबावले, व म्हणून संसाररूपी अरण्यांत पडले; आणि मग मोठमोठाल्या दुःखाच्या दांडक्यानें बडवले गेले. १७१. असे विकल्पाचे पोकळ अणकुचीदार कांटे पाहून, जे बुद्धिभ्रंशरूपी माघार घेतच नाहींत, ( म्हणजे बुद्धीला भ्रंश पडूं देत नाहींत. ) १७२.

ज्या पुण्यकर्मी लोकांच्या पापाचा नाश झालेला असतो, ते ( सुखदुःखादि ) द्वंद्वरूपी मोहानें रहित होऊन एकनिष्ठतापूर्वक माझी भक्ति करतात. २८.

ज्यांनीं सरळ एकनिष्ठेच्या पावलांनीं विकल्परूपी काट्यांचीं टोकें चेंगरून, मोठमोठ्या पातकांचें अरण्य टाकलें आहे, १७३. नंतर ज्यांनीं पुण्यरूपी धांव घेतली आणि जे माझ्याजवळ प्राप्त झाले, फार काय सांगावें ! असे ते भक्त या (काम, द्वंद्वमोह वगैरे) वाटमाऱ्यांच्या तडाख्यांतून सुटले. १७४.

जरा व मरण यांपासून मुक्त होण्याकरितां माझा आश्रय करून जे यत्न करतात ते त्या ब्रह्माला, संपूर्ण अध्यात्माला व संपूर्ण कर्माला जाणतात. २९.

अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर, ज्या प्रयत्नानें जन्ममरणाची कथा संपते, अशा प्रयत्नांस ज्यांची इच्छा उत्पन्न करते, १७५. मग त्यांना तो प्रयत्नच एकदम संपूर्ण परब्रह्मरूप फळानें फलद्रूप होतो. तें परब्रह्मरूपी फळ पिकलें असतां त्यांतून पूर्णतेचा रस गळतो. १७६. त्या वेळीं कृतकृत्यतेनें जग भरून जातें व ब्रह्माच्या सहजस्थितीची अनोळख फिटते, कर्माचें प्रयोजन संपतें व मन नाहींसें होतें. १७७. अर्जुना, ज्याच्या व्यापाराला भांडवल मी असतो, त्याला ब्रह्माच्या सहजस्थितीचा असा लाभ होतो. १७८. त्याला साम्याच्या वाढीमुळें ऐक्याचा व्यापार साधतो. त्या ऐक्याच्या ठिकाणीं तो भेदाचें दारिद्र्य जाणतच नाहीं. १७९.

अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ ह्यांसहवर्तमान जे मला जाणतात ते स्वस्थचित्तानें युक्त असलेले पुरुष प्रयाणकालींही मला जाणतात. ३०

अधिभूतासह ( शरीरासह ) मला परमात्म्याला अनुभवाच्या द्वारां यथार्थ जाणून, ज्यांनीं अधिदैवाला (जीवाला ) आकलन केलें ( जाणलें ), १८०. ज्यांस वरील ज्ञानाच्या जोरानें, अधियज्ञ जो मी, तो अनुभवास येतो, ते पुरुष शरीराच्या वियोगाच्या वेळेला दुःखी होत नाहींत. १८१. सहज विचार करून पाहिलें तर, आयुष्याची दोरी तुटली कीं, ( मरणाऱ्या ) प्राण्यांची खळबळ उडते. ( ती पाहून ) न मरणाऱ्याचाही चित्ताला प्रलयकाळ ओढवला असें वाटत नाहीं काय ? १८२. परंतु ज्ञान्यांच्या बाबतींत कोण जाणें कसें होतें तें ! जे माझ्या स्वरूपाशीं एकरूप होऊन गेले आहेत, ते अंतकालाच्या धांदलींत मला विसरतच नाहींत ! १८३. सहज विचार करून पाहिलें, तर, असे जे निष्णात आहेत तेच ( माझ्या ठिकाणीं ) स्थिर अंतःकरण झालेले योगी आहेत, असें समज. १८४. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ) त्या वेळीं श्रीकृष्णानें सांगितलेल्या शब्दरूपी कुपीच्या खालीं अर्जुनाची लक्षरूपी ओंजळ प्राप्त झाली नाहीं. कारण अर्जुन त्या वेळीं क्षणभर मागें होता. ( देवाच्या सांगण्याकडे अर्जुनाचें लक्ष नव्हतें ). १८५. त्या ठिकाणीं तें ब्रह्म सांगणारीं वाक्यें हींच कोणी फळें नाना प्रकारच्या अर्थरूपी रसानें रसभरीत होतीं; व तीं अभिप्रायाच्या सुगंधानें दरवळलीं होतीं. १८६. अशीं हीं श्रीकृष्णरूपवृक्षाचीं वचनरूप फळें, सहज कृपारूपी मंद वाऱ्यानें, अर्जुनाच्या कानरूपी ओटींत, अकस्मात् पडलीं. १८७. तीं वाक्यरूपी फळें तत्त्वज्ञानाच्या सिद्धांताचीच जणूंकाय बनविलेलीं असून, ब्रह्मरसाच्या समुद्रांत बुडवून मग तशींच तीं जणूंकाय परमानंदानें घोळलेलीं होतीं. १८८. त्या फळांच्या शुद्ध चांगलेपणानें अर्जुनाला ज्ञानाचे डोहाळे लागले. ते डोहाळे आश्चर्यरूपी अमृताचे घुटके घेऊं लागले. १८९. त्या सुखसंपत्तीचा लाभ झाल्यामुळें मग अर्जुन स्वर्गाला वेडावून दाखवूं लागला; व त्याच्या हृदयाच्या जीवांत गुदगुल्या होऊं लागल्या. १९०. याप्रमाणें त्या फळांच्या बाह्य सौंदर्याचें अर्जुनास सुख अनुभवाला येऊं

लागलें फावा । तंव रसस्वादाचिया हांवा । लाहो केला ॥ ९१ ॥ झाकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्यफळें । प्रतीतिमुखीं एके वेळे । घालूं पाहिलीं ॥ ९२ ॥ तंव विचाराचिया रसना न दाटती । परी हेतूचांहि दशनीं न फुटती । ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबीचिना ॥ ९३ ॥ मग चमत्कारला म्हणे । इयें जळींचीं मा तारांगणें । कैसा झकविलों असलगपणें । अक्षरांचेनि ॥ ९४ ॥ इयें पदें नव्हती फुडीया । गगनाचियाचि घडिया । येथ आमुची मति बुडिया । थाव न निघे ॥ ९५ ॥ बांचूनि जाणावयाची कें गोठी । ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी । तियें पुनरपि केली दृष्टी । यादवेंद्रा ॥ ९६ ॥ मग विनाविलें सुभटें । हां हो जी यें एकवाटें । सातही पदें अनुच्छिष्टें । नवलें आहाती ॥ ९७ ॥ एऱ्हवीं अवधानाचेनि वहिलेपणें । नाना प्रमेयांचे उगाणे । काय श्रवणाचेनि आंगणें । बोलों लाहाती ॥ ९८ ॥ परि तैसें हें नोहेचि देवा । देखिला अक्षरांचा मेळावा । आणि विस्मयाचिया जीवा । विस्मयो जाला ॥ ९९ ॥ कानाचेनि गवाक्षद्वारें । बोलाचे रश्मी अभ्यंतरें । पाहेना तंव चमत्कारें । अवधान ठकलें ॥ २०० ॥ तेविंचि अर्थाची चाड मज आहे । ते सांगतांही वेळु न साहे । म्हणूनि निरूपण लवलाहें । कीजो देवा ॥ १ ॥ ऐसा मागील पडताळा घेउनी । पुढां अभिप्रावो दृष्टी सूनी । तेविंचि माजि शिरवुनी । आर्ती आपुली ॥ २ ॥ कैसी पुसती पाहें पां जाणिव । भिडेचि तरी लंघों नेदी शिंव । एऱ्हवीं कृष्णहृदयासि खेंव । देवों सरला ॥ ३ ॥ अगा गुरुतें जैं पुसावें । तैं येणें मानें सावध होआवें । हें एकचि जाणें आघवें । सव्यसाची ॥ ४ ॥ आतां तयाचें तें प्रश्न करणें । वरी सर्वज्ञा हरीचें बोलणें । हें संजयो आवडलेपणें । सांगेल कैसें ॥ ५ ॥ तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाटी । जैसी कानाचे आधीं दृष्टी । उपेगा जाये ॥ ६ ॥ बुद्धीचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा । अक्षरांचियाचि भांबा । इंद्रियें जिती ॥ ७ ॥ पहा पां मालतीचे कळे । घ्राणासि कीर वाटले परिमळें । परि वरचिली बरवा काइ डोळे । सुखिये नव्हती ॥ ८ ॥ तैसें देशियेचिया हवावा । इंद्रियें करिती राणिवा । मग प्रमेयाचिया गांवा । लेसा जाइजे ॥ ९ ॥ ऐसेनि नागरपणें । बोलु निमे तें बोलणें । ऐका ज्ञानदेव म्हणे । निवृत्तीचा ॥ २१० ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वनियोगो नाम सप्तमोऽध्यायः ।

[ ओंव्या २१०, श्लोक ३०. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



लागलें. तों इतक्यांत त्या फळाच्या रसाची रुचि घेण्याच्या तीव्र इच्छेनें त्वरा केली. १९१. ताबडतोब अनुमानाच्या तळहातांत तीं वाक्यफळें घेऊन, अनुभवरूपी मुखांत तीं एकदम घालावयास ( अर्जुन ) पाहूं लागला. १९२. तेव्हां विचाराच्या तोंडांत तीं फळें मावेनात; आणखी हेतुच्याही दांतांनीं तीं फळें फुटेनांत. ( म्हणजे भगवंताचा हेतु काय आहे, हें त्याच्या विचारांस कळेना. ) असें जाणून अर्जुन तीं वाक्यरूपीं फळें तोंडाला लावीना. १९३. मग चमत्कार वाटून अर्जुन म्हणतो, हीं वाक्यें म्हणजे पाण्यांत पडलेल्या ताऱ्यांचें प्रतिबिंब होय. मी अक्षरांच्या सुलभपणानें कसा फसलों ? १९४. हीं खरोखर वाक्यें नाहींत, तर ह्या आकाशाच्या घड्याच आहेत. तेथें आमच्या बुद्धीनें किती जरी धडपड केली, तरी तिला थांग लागत नाहीं. १९५. असें जर आहे, तर मग तीं वाक्यें कळावयाची गोष्ट कशाला ? असा अर्जुनानें मनांत विचार करून, त्यानें पुनः भगवंताकडे दृष्टि केली. १९६. मग अर्जुनानें विनंति केली कीं, अहो देवा, हीं सातही पदें ( १ ब्रह्म २ अध्यात्म ३ कर्म ४ अधिभूत ५ अधिदैवत ६ अधियज्ञ ७ प्रयाण कालीं योग्यांना होणारें तुझें स्मरण ) एकसारखीं कधीं न ऐकलेलीं अशीं आश्चर्यकारक आहेत. १९७. सहज विचार करून पाहिलें तर, या सात वाक्यांतील निरनिराळ्या प्रमेयांचा उलगडा, वेगानें अवधान देऊन श्रवण केलें असतां, त्या श्रवणाच्या बळानें, कांहीं बोलतां येईल ( असें मला वाटलें होतें. ) १९८. पण, देवा, हें तसें नव्हे. मी अक्षरांचा समुदाय पाहिला; आणि ( माझ्या ) आश्चर्याच्या जीवाला आश्चर्य झालें. १९९. कानाच्या झरोक्यावाटे शब्दाचे किरण आंत प्रवेश करितात न करितात तोंच, माझें लक्ष चमत्कारानें चकित झालें. २००. त्याचप्रमाणें अर्थाची मला इच्छा आहे. ( ती इच्छा किती आहे ) तें सांगतांना जो वेळ लागेल, तितका वेळ देखील विलंब सहन होत नाहीं. म्हणून, अहो देवा, आपण त्याचें निरूपण लवकर करावें. २०१. अशा रीतीनें देवानें मागें काय सांगितलें, याचा विचार करून, व पुढें देव काय सांगतील, त्या अभिप्रायावर दृष्टि ठेवून, त्याचप्रमाणें आपली इच्छाही मध्यें घिरकावून, २०२. अर्जुनाची प्रश्न करण्याची ही चतुराई कशी आहे पहा ! तो भिडेची मर्यादा तर उल्लंघन करीत नाहीं, ( परंतु ) सहज विचार करून पाहिलें तर, तो श्रीकृष्णाच्या अंतःकरणाला आलिंगन देण्यास प्रवृत्त झाला. २०३. अहो, श्रीगुरूला जेव्हां विचारावयाचें असेल, त्या वेळीं या मानानें हुशार व्हावें, हें सर्व एक अर्जुनच जाणतो. २०४. आतां त्या अर्जुनाचें खुबीदार प्रश्न करणें व त्यावर सर्वज्ञ श्रीकृष्ण परमात्म्याचें बोलणें, हें संजयास आवडल्यामुळें तो तें बोलणें कशा प्रेमानें सांगेल, २०५. तें सरळ मराठी भाषेंत सांगितलें जाईल, त्या निरूपणाकडे लक्ष द्यावें. जसें कानाच्या आधीं दृष्टीचा उपयोग होतो. २०६. ( तसें ) बुद्धीच्या जिव्हेनें शब्दाचा मतलब न चाखतां, केवळ अक्षरांच्याच शोभेनें इंद्रियें जगतील. ( इंद्रियांचें समाधान होईल. ) २०७. अहो, असें पहा कीं, मालतीच्या कळ्या नाकाला खरोखर सुगंधानें बऱ्या वाटल्या, पण त्यांच्या बऱ्या शोभेनें डोळे सुखी होत नाहींत काय ? २०८. त्याप्रमाणें मराठी भाषेच्या सौंदर्यानें इंद्रियें राज्य करतील; व मग प्रमेयाच्या ( सिद्धांताच्या ) गांवाला त्यांस चांगल्या तयारीनें जातां येईल. २०९. जेथें शब्द नाहींसा होतो, तें बोलणें अशा सुंदर रीतीनें मी सांगेन. तें तुम्ही ऐका, असें निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. २१०.



पाठीं सप्तमीची प्रश्नसिद्धि । बोलोनि-प्रयाणसिद्धि ।
एवं ते सकळवाक्यअवधि । अष्टमाध्यायीं ॥ अ. १०–२९ ॥

मागील अध्यायाचे शेवटीं भगवंतांनीं अर्जुनाला संक्षेपानें सांगितलें की, 'अधिभूत व अधिदैव यांना जाणून अधियज्ञ जो मी त्याची प्राप्ति ज्यानें करून घेतली त्या पुरुषाला अंतकालीं शरीर-वियोगाचें दुःख होत नाहीं' त्या बाबत अर्जुनानें भगवंताला सात प्रश्न विचारल्यावरून भगवान या अध्यायांत आपल्या बोलण्याचें स्पष्टीकरण करीत आहेत. ( १–५ ) अर्जुनानें नुसता विचारण्याचा अवकाश कीं, वत्साला पाजण्यासाठीं अधीर झालेल्या धेनूप्रमाणें देव कसे उतावीळ झाले होते याचें वर्णन करून भगवंताच्या म्हणण्याचा अनुवाद श्रीज्ञानदेव करतात. ( ६–१४ )

श्री भगवान म्हणतात–आकाराला आलेल्या सर्व नाशिवंत पदार्थांत ओतप्रोत भरलेलें जें सूक्ष्म अविनाशी तत्त्व आहे त्याला ब्रह्म म्हणतात. ( १४–१७ ) सृष्टीचा आकार उत्पन्न झाला तरी त्याबरोबर उत्पन्न होत नाहीं अथवा सृष्टीचा लय झाला तरी त्याबरोबर नाश होत नाहीं, अशी जी त्या ब्रह्माची सहजस्थिति तिला अध्यात्म म्हणतात. ( १८–१९ ) विशुद्ध व निराकार ब्रह्माच्या ठिकाणीं चराचर चित्रविचित्र सृष्टि उत्पन्न होते, असा कर्त्यांविना अव्यक्ताच्या ठिकाणीं दिसणारा जो व्यापार त्या व्यापाराला कर्म हें नांव आहे. ( २०–२९ ) पंचमहाभूतांचा संयोग झाला कीं जें नामरूपात्मक शरीर दिसतें व वियोग झाला कीं जें नाहींसें होतें, त्याला अधि-भूत म्हणतात. ( ३०–३२ ) जो वास्तविक परमात्माच आहे पण अहंकारामुळें निराळा झाल्यासारखा होऊन शरीरांत राहतो, त्याला अधिदैव म्हणतात. ( ३३–३६ ) अधिदैवाचा हा देहाहंकार नाहींसा करून देहांतच राहणारा जो त्याला अधियज्ञ म्हणतात. ( ३७ ) व तो मी आहें. एऱ्हवीं अधिभूत, अधिदैव, हेंहि मीच आहें, पण काय करावें, अविद्येमुळें तें तत्त्व हीन दशेला आलें आहे. तो हिणकसपणा गेला कीं मूळचा अधियज्ञ आहेच. ( ३८–४७ ) हा हिणकसपणा घालविण्याचा मार्ग म्हणजे वैराग्याच्या आधारानें इंद्रियांना प्रिय असलेले विषय बाहेर दवडून अष्टांग योगाचें साधन करणें हा आहे. शेवटीं तें साधनहि नाहींसें होऊन साध्यच शिल्लक राहतें. ( ४८–५३ ) आपल्या बोलण्याकडे बुद्धिमान अर्जुनाचें पूर्ण लक्ष आहे हें पाहून अधिक आनंदयुक्त होऊन भगवान अंतकालची स्थिति सांगतात. ( ५४–५८ ) ज्या पुरुषांनीं मरणापूर्वीच असा अभ्यास करून मद्रूपता प्राप्त करून घेतली आहे; त्यांना शरीर पडण्याचे कष्ट तरी कोठले ! शरीर खपलीप्रमाणें केव्हां पडले हेंही त्यांना समजून येत नाहीं. पाण्यांत बुडविलेला घट पाण्यांत असतांनाच फुटला म्हणजे जसें होतें तसें त्या योग्याचें होतें. ( ५९–६८ ) याप्रमाणें अर्जुनाच्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन भगवान एक महत्त्वाचा सिद्धान्त सांगतात कीं, जिवंत असतांना ज्या गोष्टींची आपणांस आवड असते, तीच गोष्ट मरणसमयीं आठवते व मरणसमयीं जी गोष्ट आठवते त्याच गतीला तो पुरुष जातो. ( ६९–७५ ) असें असल्यामुळें तूं नेहमी माझेंच स्मरण ठेव व लढ म्हणजे तूं मद्रूपच होशील, मग युद्ध करण्यांत कसली भीति आहे ? ( ७६–७९ ) याचा अनुभव घ्यायचा असेल तर मी सांगतों त्याप्रमाणें चित्ताला माझी मोहर लावण्याचा अभ्यास कर. तुझें चित्त मद्रूप झाल्यावर तुझ्या मागचा जन्ममरणाचा शीण कायमचा नाहींसा होईल ( ८०–८५ ) प्रयाणकाळ प्राप्त झाला असतां योगयुक्त होऊन स्थिर अंतःकरणानें अव्यंग ब्रह्माचें जो स्मरण करतो, तो त्या परमपुरुषाप्रत जातो. हें सांगताना त्या ब्रह्माचें स्वरूप व योगसाधनाचें स्पष्टीकरण भगवंतांनीं केलें आहे. घटाखालीं झांकलेला दिवा केव्हां विझला हें जसें कळत नाहीं, तसें त्या योगी पुरुषाचें शांतपणें देहावसान होतें ( ८६–९९ ) या अविनाशी ब्रह्माच्या प्राप्तीसाठीं विरक्त, निष्काम व तपी पुरुष अहर्निश हा प्रयत्न करीत असतात, परंतु त्यांनाही तें प्राप्त होण्यास अत्यंत कठीण आहे. प्रत्यक्ष वेदांसही अगम्य राहिलें. योगी पुरुषांना त्याची प्राप्ति कशी होते, तो साधनमार्ग पुन्हा संक्षेपानें सांगतात ( १००–१११ ) यासाठीं

मनाची बाहेर धांवण्याची खोड मोडून तें मन अंतर्मुख होणें अत्यंत अवश्य आहे व ही वाईट खोड जाण्यासाठीं सर्व बाजूंनीं संयमी व निग्रही जीवन घालविणें जरूर आहे. याप्रमाणें मन स्थिर झाल्यावर प्राणाबरोबर ओंकाराचें चिंतन करावें. कांहीं काळानें चिंतन करतांकरतां ॐ चें स्मरणहि नाहींसें होईल व पूर्ण ब्रह्मैक्याचा अनुभव येईल. ( ११२–११९ )

अंतकाळीं स्मरण करावें असें भगवंतांनीं सांगितलें. पण मरणकाळीं मनुष्याची असहाय स्थिति झाली असतांना हें स्मरण निश्चितपणें होणें कठीण आहे, या शंकेचें भगवान निरसन करतात. 'सर्व विषयांचा त्याग करून जन्मभर माझेंच अखंड चिंतन करणाऱ्या भक्तांच्या सेवेचें माझ्या डोक्यावर इतकें ऋण झालेलें असतें कीं, तें फेडण्याकरितां मी त्यांची अंतकाळीं सेवा करतो. म्हणजे मी त्यांना माझा स्वरूपबोध व स्मरण देतों व माझ्याप्रत त्यांना आणतों. वास्तविक हेंहि मला करण्याची जरुरी नाहीं, कारण मरणाच्या अगोदरच ते मला मिळालेले असतात; व मरणानंतर अनायासें त्यांची जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका होते, ( १२०–१५१ ) अनेक अनर्थ, संकटें व दुःखें यांनीं भरलेल्या शरीरांतून अशा रीतीनें सुटणें हें फार महत्त्वाचें आहे. एवढा मोठा स्वर्गांतला इंद्र व त्यापेक्षांहि सत्यलोकांतला ब्रह्मदेव; त्याचा दिवस उगवल्यावर त्रैलोक्याची उत्पत्ति होते व त्याची रात्र झाली म्हणजे हा त्रैलोक्याचा पसारा मावळतो. पण त्याच्याही मागचें 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' सुटलें नाहीं ( १५२–१६९ ) ब्रह्मदेवाची व्यक्त सृष्टि प्रलयकाळीं अव्यक्तांत लीन होते. या दोन्ही व्यक्ताव्यक्ताला आधारभूत असणारें अक्षर चैतन्य वेगळेंच आहे, त्याचा सृष्टींतील व्यवहारांशीं कांहींसुद्धां संबंध नाहीं; सृष्टीचा लय झाला तरी त्याचीहि त्या चैतन्याला दाद नसते.

या चैतन्याच्या प्राप्तीचा एकनिष्ठ भक्ति हा सरळ मार्ग आहे. कायावाचामनेंकरून एका परमात्म्याचीच सेवा करणें याचें नांव एकनिष्ठ भक्ति. अशा भक्तांचें घर तें चैतन्य आपणहून शोधीत येतें. ज्याप्रमाणें लांकूड एकदां अग्निरूप झाल्यावर लांकूडपणानें शिल्लक राहत नाहीं, त्याप्रमाणें परमात्मवस्तूला पावल्यानंतर भक्तांना पुनः जन्ममरण नाहीं. ( १७०–२०३ )

जन्ममरणांत सांपडणें अथवा त्यांतून सुटणें हीं दोन्ही ( कांहीं अंशानें ) मरणकाळच्या स्थिति व काळावर अवलंबून आहेत. प्रयाणसमयीं जर देहांत अग्नीचें बल असेल व बाहेर उत्तरायण शुक्लपक्ष व दिवस असा काळ असेल तर योग्याला सायुज्यसिद्धि प्राप्त होते; हा अर्चिरा मार्ग आहे. याउलट मरणकाळीं जर शरीरांत कफवाताचा जोर असेल व बाहेर दक्षिणायन वद्यपक्ष व रात्र अशी वेळ असेल तर जन्मभर केलेला योगाभ्यास हातचा जाऊन योग्याला पुनः जन्म घ्यावा लागतो. याला धूम्रमार्ग म्हणतात. ( २०४–२३६ )

एक सरळ व एक आड, असे हे दोन्ही मार्ग अनादि काळापासून चालत आले आहेत. मरणसमयीं या पैकीं कोणता मार्ग मिळेल हें कांहीं निश्चितपणें आपल्या स्वाधीन नाहीं; म्हणून त्यावर अवलंबून राहतां येत नाहीं. परंतु जे पुरुष आपण मरणापूर्वीच वस्तुरूप होऊन राहिलेले असतात, त्यांनां मरणाच्या वेळीं कोठलाहि कां मार्ग मिळेना, त्यांच्या अखंड ब्रह्मभावाचा किंचितहि बिघाड होत नाहीं. ( २३७–२५७ ) या पुरुषांना ऐहिक अथवा पारलौकिक ऐश्वर्यांचा किंचितही मोह राहिलेला नसतो. इंद्रपदालाहि ते अशाश्वत म्हणून तुच्छ लेखून परब्रह्माच्या ठिकाणीं ते स्थिर झालेले असतात. ( २५८–२६७ )

श्रीज्ञानदेव म्हणतात, ही योगीश्वरांची कथा, त्या योग्यांचेच निजध्येय जें परब्रह्म तेंच श्रीकृष्णरूपानें अर्जुनाला सांगत होतें; त्याचा अनुवाद संजयानें धृतराष्ट्राला केला व तोच मी श्रीनिवृत्तीनाथांच्या कृपेनें तुम्हांला करीत आहें. ( २६८–२७१ )



# ज्ञानेश्वरी

## अध्याय आठवा

अर्जुन उवाच—किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम । अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥

मग अर्जुनें म्हणितलें । हां हो जी अवधारिलें । जें म्यां पुसिलें । तें निरूपिजो ॥ १ ॥ सांगा कवण तें ब्रह्म । कायसया नाम कर्म । अथवा अध्यात्म । काय म्हणिपे ॥ २ ॥ अधिभूत तें कैसें । एथ अधिदैव तें कवण असे । हें उघड मी परियेसें । तैसें बोला ॥ ३ ॥

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन । प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥

देवा अधियज्ञ तो काई । कवण पां इये देहीं । हें अनुमानासि कांहीं । दिठी न भरे ॥४॥ आणि नियता अंतःकरणीं । तूं जाणिजसी देहप्रयाणीं । तें कैसेनि हें शार्ङ्गपाणी । परिसवा मातें ॥ ५ ॥ देखा धवळारीं चिंतामणीचां । जरी पहुडला होय दैवाचा । तरी वोसणतांही बोलु तयाचा । परी सोपु न वचे ॥ ६ ॥ तैसें अर्जुनाचिया बोलासवें । आलें तेंचि म्हणितलें देवें । परियेसें गा बरवें । जें पुसिलें तुवां ॥ ७ ॥ किरीटी कामधेनूचा पाडा । वरी कल्पतरूचा आहे मांदोडा । म्हणोनि मनोरथसिद्धीचिया चाडा । तो नवल नोहे ॥ ८ ॥ कृष्ण कोपोनि ज्यासी मारी । तो पावे ब्रह्मसाक्षात्कारीं । मा कृपेनें उपदेशु करी । तो कैशापरी न पवेल ॥ ९ ॥ जैं कृष्णाचया होइजे आपण । कृष्ण होय आपुलें अंतःकरण । तैं संकल्पाचें आंगण । वोळगती सिद्धी ॥ १० ॥ परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि आथि निस्सीम । म्हणऊनि तयाचे काम । सदां फळ ॥ ११ ॥ या कारणें अनंतें । तें मनोगत तयाचें पुसतें । होईल जाणूनि आइतें । वोगरूनि ठेविलें ॥ १२ ॥ जें अपत्य थानींहूनि निगे । तयाची भूक ते मायेसीचि लागे । एऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य दे येरी ॥ १३ ॥ म्हणोनि कृपाळुवा गुरुचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं । परि तें असो आइका काई । जें देवो बोलता झाला ॥ १४ ॥

श्रीभगवानुवाच—अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते । भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

मग म्हणितलें सर्वेश्वरें । जें आकारीं इये खोंकरें । कोंदलें असत न खिरे । कवणे काळीं ॥ १५ ॥ एऱ्हवीं सपूरपण तयाचें पहावें । तरि शून्याचि नव्हे स्वभावें । वरि गगनाचेनि पालवें । गाळूनि घेतलें ॥ १६ ॥ जें ऐसेंही परि विरुळें । इये विज्ञानाचिये खोळे । हालवलेंही न गळे ।



भज तरंगपण असे का नसे । ऐसें हें उदकासी कहीं प्रतिभासे ॥
तें भलतेव्हां जैसें तैसें । उदकचि कीं ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय ८ वा, ओवी २४९.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय आठवा

अर्जुन म्हणाला, हे पुरुषोत्तमा, तें ब्रह्म म्हणजे काय? अध्यात्म म्हणजे काय? कर्म म्हणजे काय? अधिभूत कशाला म्हणतात? व अधिदैव कशाला म्हणतात. १.

मग अर्जुन म्हणाला, अहो महाराज, ऐकलें कां! जें मी विचारलें तें सांगावें. १. सांगा, तें ब्रह्म कोणतें! कर्म कशाचें नांव आहे? आणि अध्यात्म म्हणतात तें काय? २. अधिभूत म्हणतात तें कसें आहे? यांत अधिदैव तें कोण आहे? हें मला स्पष्ट समजेल असें सांगा. ३.

हे मधुसूदना, या देहांत अधियज्ञ कोणता व कसा? अंतःकरणनिग्रह केलेले (योगी) देहावसानसमयीं तुला कसा जाणतात? २.

देवा, अधियज्ञ तो काय आहे? व या देहांत तो कोण आहे? हें अनुमानानें पाहूं म्हटलें तर कांहींच समजुतीस येत नाहीं. ४. आणि हे श्रीकृष्णा, ज्या पुरुषांनीं आपलें अंतःकरण स्वाधीन करून घेतलें आहे, त्या पुरुषांकडून त्यांच्या प्रयाणकालीं तूं जाणला जातोस तो कसा, हें मला ऐकवा. ५. (ज्ञानेश्वर महाराज म्हणतात) पहा, एकादा भाग्यवान पुरुष जर चिंतामणीचे घरांत निजला असेल, तर त्याचे बरळण्यांतीलही शब्द, पण ते व्यर्थ जाणार नाहींत. ६. त्याप्रमाणें अर्जुनाच्या विचारण्याबरोबरच श्रीकृष्णाच्या मनांत जें आलें, तेंच श्रीकृष्ण सांगूं लागले, "अरे, जें तूं विचारलेंस तें चांगलें ऐक." ७. अर्जुन हा कामधेनूचा बछडा असून शिवाय तो कल्पतरूच्या मांडवाखालीं आहे; म्हणून त्यानें आपले मनोरथ सिद्धीस जावे अशी इच्छा केली तर, तें आश्चर्य नाहीं. ८. श्रीकृष्ण रागावून ज्याचा वध करतो, त्यास ब्रह्माचा साक्षात्कार होतो; मग ज्याला कृपेनें उपदेश करील तो ब्रह्मसाक्षात्काराला कसा पावणार नाहीं?. ९. जेव्हा आपण कृष्णाचे (अनन्यभक्त) व्हावें, (तेव्हां) आपलें (भक्ताचें) अंतःकरण कृष्ण होतें; व मग त्या वेळीं आपल्या संकल्पाच्या आंगणांत अष्टमहासिद्धि राबतील. १०. परंतु असें जें प्रेम, तें अर्जुनाच्याच ठिकाणीं अमर्याद आहे; म्हणून त्याच्या इच्छा सदा सफल आहेत. ११. यासाठीं श्रीकृष्णांनीं अर्जुन आपल्याला ही गोष्ट विचारील, अशी त्याच्या मनांतील गोष्ट ओळखून अगोदरच त्या गोष्टीरूपी पक्वान्नाचें ताट वाढून ठेवलें. १२. कारण कीं, स्तनपान केल्यानंतर दूर असलेल्या मुलाची भूक आईला समजते; एऱ्हवीं काय तें शब्दानें 'मला भूक लागली दूध पाज' असें सांगतें? आणि मग ती स्तनपान देते? १३. म्हणून कृपाळू गुरूच्या बाबतींत हें कांहींच आश्चर्य नाहीं; परंतु तें असो. देव जें कांहीं बोलला तें ऐका. १४.

श्रीकृष्ण म्हणाले, जें परम अविनाशी आहे तें ब्रह्म. ब्रह्माची (आकाराच्या उत्पत्तिविनाशाबरोबर उत्पन्न व नष्ट न होणें ही) जी सहज स्वरूपस्थिति तिला अध्यात्म असें म्हणतात (अक्षर ब्रह्मापासून) भूतमात्रादि (चराचर) पदार्थांची उत्पत्ति करणारा जो विसर्ग म्हणजे सृष्टिव्यापार, त्याचें नांव कर्म. ३.

मग सर्वेश्वर श्रीकृष्ण म्हणाले, जें या सर्व फुटक्या (नाशिवंत) आकारमात्रांत गच्च भरलें असतांही कोणत्याही वेळीं गळत नाहीं; १५. एऱ्हवीं त्याचा सूक्ष्मपणा पाहूं गेलें तर तें शून्यच वाटेल, पण तें स्वभावानें शून्य नव्हे. (कारण, तें मूळचें सत् आहे.) शिवाय तें इतकें सूक्ष्म आहे कीं, सूक्ष्मांत सूक्ष्म जें आकाश, त्याच्या पदरांतून तें गाळून घेतलें आहे. १६. जें इतकेंही सूक्ष्म आहे, परंतु झिरझिरीत असलेल्या या प्रपंचरूप

तें परब्रह्म ॥ १७ ॥ आणि आकाराचेनि जालेपणें । जन्मधर्मातें नेणे । आकारलोपीं निमणें । नाहीं कहीं ॥ १८ ॥ ऐशिया आपुलियाची सहजस्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती । तया नाम सुभद्रापती । अध्यात्म गा ॥ १९ ॥ मग गगनीं जेविं निर्मळें । नेणों कैचीं एके वेळे । उठती घनपटळें । नानावर्णे ॥ २० ॥ तैसे अमूर्तीं तिये विशुद्धें । महदादि भूतभेदें । ब्रह्मांडाचे बांधे । होंचि लागती ॥ २१ ॥ पैं निर्विकल्पाचिये वरडी । कीं आदिसंकल्पाची फुटे विरुढी । आणि ते सवोंचि मोडोनि ये ढोंढी । ब्रह्मगोळकांची ॥ २२ ॥ तया एकैकाचे भीतरीं पाहिजे । तंव बीजाचाचि भरिला देखिजे । माजीं होतियां जातियां नेणिजे । लेख जीवां ॥ २३ ॥ मग तया गोळकांचे अंशांश । प्रसवती आदिसंकल्प असमसहास । हें असो ऐसी बहुवस । सृष्टि वाढे ॥२४॥ परि दुजेनविण एकला । परब्रह्माचि संचला । अनेकत्वाचा आला । पूर जैसा ॥ २५ ॥ तैसें सम-विषमत्व नेणों कैचें । वांयांचि चराचर रचे । पाहातां प्रसवतिया योनींचे । लक्ष दिसती ॥२६॥ येरी जीवभावाचिये पालविये । कांहीं मर्यादाच करूं नये । पाहिजे कवण हें आघवें विये । तंव मूळ तें शून्य ॥ २७ ॥ म्हणूनि कर्ता मुद्दल न दिसे । आणि शेखीं कारणही कांहीं नसे । माजीं कार्यचि आपैसें । वाढों लागे ॥ २८ ॥ ऐसा करितेनवीण गोचरु । अव्यक्तीं हा आकारु । निपजे जो व्यापारु । तया नाम कर्म ॥ २९ ॥

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् । अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

आतां अधिभूत जें म्हणिपे । तेंहि सांगों संक्षेपें । तरी होय आणि हारपे । अभ्र जैसें ॥ ३० ॥ तैसें असतेपण आहाच । नाहीं होइजे हें साच । जयातें रूपा आणिती पांचपांच । मिळोनियां ॥ ३१ ॥ भूतांतें अधिकरूनि असे । आणि भूतसंयोगें तरि दिसे । जें वियोगवेळे भ्रंशे । नामरुपादिक ॥ ३२ ॥ तयातें अधिभूत म्हणिजे । मग अधिदैव पुरुष जाणिजे । जेणें प्रकृतीचें भोगिजे । उपार्जिलें ॥ ३३ ॥ जो चेतनेचा चक्षु । जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु । जो देहास्तमानीं वृक्षु । संकल्पविहंगाचा ॥ ३४ ॥ जो परमात्माचि परि दुसरा । जे अहंकारनिद्रा निदसुरा । म्हणोनि स्वप्नीचिया वोरवारा । संतोषे शिणे ॥३५॥ जीव येणें नांवें । जयातें आळविजे स्वभावें । तें अधिदैव जाणावें । पंचायतनींचें ॥३६॥ आतां इयेचि शरीरग्रामीं । जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञु एथ गा मी । पंडुकुमरा ॥ ३७ ॥ येर अधिदैवाधिभूत । तेंहि मीचि कीर समस्त । परि पंधरें किडाळा मिळत । काय सांकें नोहे ॥ ३८ ॥ तरि तें पंधरेंपण न मैळे । आणि किडाचियाही अंशा न मिळे । परि जंव असे तयाचेनि मेळें । तंव सांकेंचि म्हणिजे ॥ ३९ ॥ तैसें अधिभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पालवें । झांकलें तंव मानावें । वेगळें ऐसें ॥ ४० ॥ तेचि अविद्येची जवनिक फिटे । आणि भेदभावाची अवधि तुटे । मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी काय दोनी होती ॥ ४१ ॥ पैं केशांचा गुंडाळा । ठेविली स्फटिकशिळा । ते वरी पाहिली डोळां । तंव भेदली गमली ॥ ४२ ॥ पाठीं केश परौते नेले । आणि भेदलेपण काय नेणों जाहालें । तरि डांक देऊनि सांदिलें । शिळेतें काइ ॥ ४३ ॥ ना ते अखंडाचि आयती ।

वस्त्राच्या गाळणींतून हालवलें तरी गळत नाहीं, तें परब्रह्म होय. १७. आणि आकारवान पदार्थांच्या उत्पत्तीबरोबर जें जन्मरूपी विकाराला जाणत नाहीं, व आकारवान पदार्थ नाहींसे झाल्यानें जें केव्हांही नाश पावत नाहीं; १८. अर्जुना, याप्रमाणें आपल्या सहज स्थितीनें असणाऱ्या ब्रह्माचें जें अखंडत्व, त्या अखंडत्वास अध्यात्म हें नांव आहे, १९. मग ज्याप्रमाणें निर्मळ आकाशांत एकदम अनेक रंगांच्या मेघांच्या फळ्या कशा येतात हें कळत नाहीं; २०. त्याप्रमाणें त्या विशेष शुद्ध व निराकार अशा ब्रह्माचे ठिकाणीं महत्तत्त्व वगैरे भूतभेदानें ब्रह्मांडाचे आकार उत्पन्न व्हावयासच लागतात. २१. निर्विकल्प परब्रह्मरूपी माळ जमिनीवर मूळसंकल्प (एकोऽहं बहु:स्याम्) रूपी अंकुर फुटतो; आणि त्याबरोबरच ब्रह्मगोळकाचे आकार दाट येतात. २२. त्या एकेक ब्रह्मांडामध्यें पहावें, तों तें ब्रह्मांड बीजांनींच (मूळ संकल्पांनींच) भरलेलें दिसतें; व त्या एकेका ब्रह्मांडामध्यें होणाऱ्या जाणाऱ्या जीवांची (तर) गणति नाहीं. २३. मग त्या गोळकांमधील अंशरूपी एकेक जीव, असंख्य आदिसंकल्प करावयास लागले. हें असो. याप्रमाणें सृष्टि फार वाढावयास लागली. २४. पण दुसऱ्याशिवाय एक परब्रह्मच सर्वत्र भरलेलें आहे आणि त्याच्या ठिकाणीं अनेकत्वाचा जसा पूर आला आहे. २५. याप्रमाणें त्या ब्रह्माचे ठिकाणीं समविषमत्व कोठून आलें, हें कळत नाहीं. तेथें उगीचच स्थावर जंगम पदार्थ उत्पन्न होतात. ते पाहिले असतां, प्रसवणाऱ्या योनींचे लक्षावधि प्रकार दिसतात. २६. इतर जीवभावाच्या पालवींची कांहीं गणनाच करतां येत नाहीं. हें कोण प्रसवतें ! म्हणून पाहूं गेलें तर, त्याचें मूळ तें शून्य आहे. २७. म्हणून याचा मुळांत कर्ता कोणी दिसत नसून, शेवटीं याचें कारणही कांहीं नाहीं व मध्यें कार्यच आपोआप वाढावयास लागलें आहे. २८. याप्रमाणें कर्त्याशिवाय अव्यक्ताच्या ठिकाणीं (ज्याच्या योगें) हा भासमान होणारा आकार उत्पन्न होतो, असा जो व्यापार, त्याला 'कर्म' हें नांव आहे. २९.

हे नरश्रेष्ठा, अधिभूत म्हणजे नश्वर वस्तु; जीव हाच अधिदैवत; आणि या देहांत (देहभावाचा उपशमन करणारा) अधियज्ञ मीच आहें. ४.

आतां अधिभूत ज्याला म्हणतात, तेंही थोडक्यांत सांगतों. तर ज्याप्रमाणें ढग उत्पन्न होतात व लय पावतात; ३०. त्याप्रमाणें ज्याचें असतेपण उगीच वरवर असतें, व न होणें हेंच ज्याचें खरें स्वरूप आहे, आणि ज्याला पंचमहाभूतें एकत्र होऊन व्यक्त दशेला आणतात; ३१. जें पंचमहाभूतांचा आश्रय करून असतें; आणि पंचमहाभूतांचा संयोग (पंचीकरण) झाला तरच जें दिसतें; आणि पंचमहाभूतांचा वियोग झाला असतां जें नामरूपात्मक शरीर नाशाला पावतें; ३२. त्याला (शरीराला) अधिभूत म्हणावें. मग अधिदैव म्हणजे पुरुष समजावा, तो कसा तर, जो प्रकृतीनें मिळविलेले भोग भोगतो; ३३. जो चेतनेचा प्रकाशक आहे, जो इंद्रियरूपी देशाचा स्वामी आहे, आणि जो देह पडण्याच्या वेळीं संकल्परूप पक्षी राहण्याचा वृक्ष आहे; ३४. जो वास्तविक परमात्माच आहे, पण जो दुसरा (वेगळा) झाला. कारण कीं ज्यास अहंकाररूपी झोंप येऊन (द्वैतभासात्मक) स्वप्नाच्या व्यवहारानें जो संतोष पावतो व कष्टी होतो, ३५. ज्याला जीव या नांवानें स्वभावतः बोलतात, त्याला पंचभूतात्मक शरीररूपी घरांतील अधिदैव समजावें. ३६. आतां याच शरीररूपी गांवामध्यें जो शरीरभावाला (देहाहंकारादिकांना) नाहींसें करतो, तो या शरीरांतील अधियज्ञ, अर्जुना, मी आहे. ३७. इतर अधिदैव, अधिभूत तेंही सर्व खरोखर मीच आहे. परंतु अस्सल सोनें डांकाला मिळालें तर, तें हिणकस होत नाहीं काय ? ३८. वास्तवीक त्या सोन्याचा उत्तमपणा मळत नाहीं आणि तें सोनें किडाच्या भागाबरोबर तद्रूप होत नाहीं. पण जोंपर्यंत तें उत्तम सोनें किडाच्या मिलाफानें असतें, तोंपर्यंत त्याला हिणकसच म्हटलें जातें. ३९. त्याप्रमाणें अधिभूत वगैरे हे सर्व जोंपर्यंत अविद्येच्या पदरानें झांकलेले आहेत, तोंपर्यंत वेगळे असे समजावेत. ४०. तोच अविद्येचा पडदा काढला, म्हणजे द्वैतभावाची हद्द संपते. मग ते एकमेकांत मिळून तद्रूप झाले असें जर म्हणावें, तर पहिल्याप्रथम ते का दोन होते ? ४१. केसांचा गुंडाळा आहे (व त्यावर) स्फटिकाची शिळा ठेवली, तर ती वरून डोळ्यानें पाहिली असतां फुटलेली दिसते. ४२. नंतर केस त्या स्फटिक शिळेपासून दूर काढले, मग त्या शिळेचा फुटकेपणा कोठें गेला, तें कळत नाहीं. तर डाग देऊन त्या शिळेला जोडले काय ? ४३. तर नाहीं. ती मूळची अखंड होती तशीच आहे.

परि संगें भिन्न गमली होती । ते सारीलिया मागौती । जैसी का तैसी ॥ ४४ ॥ तेवीं अहंभावो जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे । हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु मी ॥ ४५ ॥ पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मज । सांगितलें कां जें काज । मनीं धरूनि ॥ ४६ ॥ तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्यसुखाचा ठेवा । परि उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥ ४७ ॥ पहिलें वैराग्यइंधन परिपूर्तीं । इंद्रियानळीं प्रदीप्तीं । विषयद्रव्याचिया आहुती । देऊनियां ॥ ४८ ॥ मग वज्रासन तेचि उर्वी । शोधूनि आधारमुद्रा बरवी । वेदिका रचे मांडवीं । शरीराचां ॥ ४९ ॥ तेथ संयमाग्नीचीं कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पवाडें । पुजिती उदंडें । युक्तिघोषें ॥ ५० ॥ मग मनप्राण आणि संयमु । हाचि हवनसंपदेचा संभ्रमु । येणें संतोषविजे निर्धूमु । ज्ञानानळु ॥ ५१ ॥ ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे । मग ज्ञान तें ज्ञेयीं हारपे । पाठीं ज्ञेयचि स्वरूपें । निखिल उरे ॥ ५२ ॥ तया नांव गा अधियज्ञु । ऐसें बोलला जंव सर्वज्ञु । तंव अर्जुन अतिप्राज्ञु । तया पातलें तें ॥ ५३ ॥ हें जाणोनि म्हणितलें देवें । पार्था परिसतु आहासि बरवें । या कृष्णाचिया संतोषासवें । येरु सुखाचा जाहला ॥ ५४ ॥ देखा बाळकाचिया घणी धाइजे । कां शिष्या-चेनि जाहलेपणें होईजे । हें सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ॥ ५५ ॥ म्हणोनि सात्त्विक भावांची मांदी । कृष्णाआंगीं अर्जुनाआधीं । न समातसे परी बुद्धी । सांवरूनि देवें ॥ ५६ ॥ मग पिकलिया सुखाचा परिमळु । का निवालिया अमृताचा कल्लोळु । तैसा कोंवळा आणि सरळु । बोलु बोलिला ॥ ५७ ॥ म्हणे परिसणेयांच्या राया । आइकें बापा धनंजया । ऐसी जळों सरलिया माया । तेथ जाळितें तेंही जळे ॥ ५८ ॥ जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें । जे आदींचि तया मातें । जाणोनि अंतीं ॥ ५९ ॥ ते देह झोळ ऐसें मानुनी । ठेले आपणपें आपणचि होउनी । जैसा मठ गगना भरुनी । गगनींचि असे ॥ ६० ॥ ये प्रतीतीचिया माजघरीं । तयां निश्चयाची ओवरी । आली म्हणोनि बाहेरी । नव्हेचि से ॥ ६१ ॥ ऐसें सबाह्य ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरी भूतांचीं पांचही खवलें । नेणतांचि पडिलीं ॥ ६२ ॥ उभयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन कवण तयाचें । म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ॥ ६३ ॥ ते ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी समरससमुद्रीं धुतली । कळेचिना ॥ ६४ ॥ पैं अथावीं घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें भरला । पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ॥ ६५ ॥ नातरी सर्पें कवच सांडिलें । कां उबारेन वस्त्र फेडिलें । तरी सांग पां कांहीं मोडलें । अवेवामाजीं ॥ ६६ ॥ तैसा आकारु हा आहाच भ्रंशे । वांचूनि वस्तु ते सांचलीचि असे । तेचि बुद्धि जालिया विसुकुसे । कैसेनि आतां ॥ ६७ ॥

अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् । यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

म्हणोनि यापरी मातें । अंतकाळीं जाणतसाते । जे मोकलिती देहातें । ते मीचि होती ॥ ६८ ॥ एऱ्हवीं तरी साधारण । उरीं आदळलिया मरण । जो आठवु धरी अंतःकरण । तेंचि होईजे ॥ ६९ ॥

परंतु केसांच्या संगतीनें फुटलेली वाटत होती. ते केस दूर केल्यावर, पुनः ती मूळची जशी अखंड होती तशीच आहे. ४४. त्याप्रमाणें अहंकार गेला तर ऐक्य मूळचेंच आहे. हा प्रकार खरोखर जेथें घडतो, तो अधियज्ञ मी आहें. ४५. अरे, आम्ही जो हेतु मनांत धरून सर्व यज्ञ कर्मापासून झाले आहेत, असें (चौथ्या अध्यायांत) तुला सांगितलें ४६. तो हा अधियज्ञ सर्व जीवांचा विसांवा आहे व नैष्कर्म्य सुखाचा ठेवा आहे. पण अर्जुना, तुला तो मी उघड करून दाखवीत आहें. ४७. प्रथम वैराग्यरूपी काष्ठांच्या पूर्ण भरीनें चांगला पेट घेतलेल्या इंद्रीयरूपी अग्नींत शब्दादि विषयरूपी द्रव्यांच्या आहुति देऊन, ४८. नंतर वज्रासन हीच कोणी पृथ्वी, ती शुद्ध करून, शरीररूपी मांडवांत आधारमुद्रारूपी चांगला ओटा घालतात. ४९. तेथें ध्यानधारणासमाधिरूपी अग्नीच्या कुंडांत बंधत्रयाच्या मंत्रघोषानें, इंद्रियरूपी विपुल द्रव्याच्या साह्यानें यजन करितात. ५०. नंतर मन, प्राण आणि संयम, अशा या यज्ञसंपत्तीच्या समारंभानें धूररहित ज्ञानरूप अग्नीला संतुष्ट करतात. ५१. अशा रीतीनें हें वर सांगितलेलें साहित्य, ज्ञानरूपी अग्नीमध्यें समर्पण केल्यावर, मग त्या ज्ञानाचाही ज्ञेयामध्यें लय होतो. नंतर केवळ ज्ञेयच स्वरूपानें राहतें. ५२. त्यास अधियज्ञ असें नांव आहे. असें सर्व जाणणारा श्रीकृष्ण ज्या वेळेस म्हणाला, त्यावेळेस अर्जुन अतिशयच बुद्धिमान असल्यामुळें त्याच्या तें लक्षांत आलें. ५३. हें लक्षांत येऊन देव म्हणाले, अर्जुना, तूं चांगल्या तऱ्हेनें ऐकत आहेस, ह्या कृष्णाच्या संतोषानें अर्जुन आनंदित झाला. ५४. पहा, लहान मुलाच्या तृप्तीनें आपण तृप्त व्हावें किंवा शिष्याच्या पूर्ण होण्यानें आपण कृतार्थ व्हावें, हें एक जन्मदाती आई किंवा सद्गुरूच समजतात, ५५. म्हणून अष्टसात्विकभावांचा समुदाय अर्जुनाच्या अगोदर श्रीकृष्णाच्या आंगीं मावेनासा झाला. परंतु देवानें आपल्या बुद्धीनें तो सांवरून, ५६ नंतर सुख हेंच कोणी पिकलेलें फळ, त्याचा सुवास अथवा थंड अशा अमृताची लाट, त्याप्रमाणें मृदु आणि सरळ असें भाषण केलें. ५७. श्रीकृष्ण म्हणाले, श्रोत्यांतील श्रेष्ठ अर्जुना, बाबा, ऐक. याप्रमाणें माया जळण्याची संपली कीं तिला जाळणारें जें ज्ञान, तेंही त्याप्रसंगीं जळतें. (नाहींसें होतें) ५८. अर्जुना, ज्यास अधियज्ञ म्हणतात, म्हणून आतांच सांगितलें, त्या मला, जे पुरुष हयात असतानांच जाणून, मरणकाळींही जाणतात, ५९. त्याप्रमाणें मठ (घर) हा पोकळीनें भरून पोकळींत असतो, त्याप्रमाणें ते पुरुष, देह खोटा आहे असें विचारानें जाणून, आपणच (आत्मरूप) होऊन आपल्या ठिकाणीं असतात. ६०. अशा या वरील अनुभवाच्या माजघरांत, निश्चयाच्या खोलींत, त्यांस (झोंप) आली, म्हणून त्यांस बाह्य विषयांची आठवणच होत नाहीं. ६१. याप्रमाणें अंतर्बाह्य ऐक्य भरलेलें असून, ते पुरुष मद्रूप होऊन राहिले असतां बाहेर पांच भूतांच्या खपल्या पडल्या, तरी त्यास समजत नाहीं. ६२ जिवंतपणीं शरीर उभें असतां (सर्व व्यवहार करीत असतां) ज्यांस त्या शरीराच्या उभेपणाची जाणीव नाहीं, त्यांस मग शरीर पडण्याचें संकट काय करणार? म्हणून अशाही प्रसंगीं त्यांच्या स्वरूपअनुभवाच्या पोटांतील (निश्चयरूप) पाणी हालत नाहीं. ६३. ती त्यांची प्रतीति ऐक्यरसाचीच जणूंकाय ओतलेली असते; अथवा त्रिकालाबाधित जें स्वरूप, त्या स्वरूपाच्या हृदयांत ती जणूंकाय घातलेली असते; त्यांची प्रतीति ऐक्यतारूपी समुद्रांत जणूंकाय धुतली असल्यामुळें ती मळत नाहीं; ६४. खोल पाण्यांत घट बुडाला असतां तो आंत बाहेर पाण्यानेंच भरलेला असतो. नंतर तो दैववशात् पाण्यांत असतांनाच जर फुटला, तर त्या घटांत असलेलें पाणी फुटतें काय? ६५. अथवा सर्पानें कात टाकली अगर एकाद्यानें उकडतें म्हणून वस्त्र टाकलें, तर असें करण्यांत अवयवांमध्यें कांहीं मोडतोड झाली का? सांग बरें? ६६. त्याप्रमाणें वरवर भासणारा जो शरीररूपी आकार, तोच नाश पावत असून, त्या शरीराशिवाय असणारी आत्मवस्तु तर, जशी सर्वत्र भरलेली आहे तशीच आहे. तीच आत्मवस्तु आपण अनुभवानें झाल्यावर आतां (देहपाताचे वेळीं) बुद्धीचा निश्चय कसा डगमगेल? ६७.

मरणाचें वेळीं जो केवळ माझेंच स्मरण करीत शरीराचा त्याग करून जातो, तो मत्स्वरूप पावतो, याविषयीं संशय नाहीं. ५.

म्हणून, याप्रमाणें मला अंतःकाळीं जाणत असतां जे देहाचा त्याग करितात, ते मद्रूपच होतात. ६८. एऱ्हवीं साधारण विचार करून पाहिलें तर, मरण येऊन ठेपलें असतां मनुष्याच्या मनाला ज्या वस्तूची आठवण होते, तीच वस्तू तो प्राणी होतो. ६९. त्याप्रमाणें

जैसा कवणु एकु काकुळती । पळतां पवनगती । दुपाउलीं अवचितीं । कुहामाजीं पडिला ॥ ७० ॥ आतां तया पडणयाआरौतें । पडण चुकवावया परौतें । नाहीं म्हणोनि तेथें । पडावेंचि पडे ॥ ७१ ॥ तेविं मृत्यूचेनि अवसरें एकें । जें येऊनि जीवासमोर ठाके । तें होणें मग न चुके । भलतयापरी ॥ ७२ ॥ आणि जागता जंव असिजे । तंव जेणें ध्यानें भावना भाविजे । डोळां लागतखेंवो देखिजे । तेंचि स्वप्नीं ॥ ७३ ॥

यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

तेविं जितेनि अवसरें । जें आवडोनि जीवीं उरे । तेंचि मरणाचिये मेरे । फार हों लागे ॥ ७४ ॥ आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे । म्हणोनि सदां स्मरावें । मातेंचि तुवां ॥ ७५ ॥

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध्य च । मय्यर्पित मनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥

डोळां जें देखावें । कां कानीं हन ऐकावें । मनीं जें भावावें । बोलावें वाचे ॥ ७६ ॥ तें आंत बाहेरी आघवें । मीचि करूनि घालावें । मग सर्वीं काळीं स्वभावें । मीचि आहें ॥ ७७ ॥ अगा ऐसया जरी जाहालिया । मग न मरिजे देह गेलिया । मा संग्रामु केलिया । भय काय तुज ॥ ७८ ॥ तूं मन बुद्धि सांचेंसीं । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी । तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक ॥ ७९ ॥ हेंच कायिसया वरी होये । ऐसा जरी संदेहो वर्तत आहे । तरी अभ्यासूनि आदीं पाहें । मग नव्हे तरी कोपें ॥ ८० ॥

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना । परमं पुरुषं दिव्यं याति पार्थाऽनुचिंतयन् ॥ ८ ॥

येणेंचि अभ्यासेंसीं योगु । चित्तासि करी पां चांगु । अगा उपायबळें पंगु । पहाड ठाकी ॥ ८१ ॥ तेविं सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर । लावीं मग शरीर । असो अथवा जावो ॥ ८२ ॥ जें नानागती पावतें । तें चित्त वरील आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ॥ ८३ ॥ पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनलें घोघें । तें काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येती ॥ ८४ ॥ ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥ ८५ ॥

कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

जयाचें आकारावीण असणें । जया जन्म ना निमणें । जें आघवेंचि आघवेंपणें । देखत असे ॥ ८६ ॥ जें गगनाहून जुनें । जें परमाणुहूनि सानें । जयाचेनि सान्निधानें । विश्व चळे ॥ ८७ ॥ जें सर्वातें यया विये । सर्व जेणें जिये । हेतु जया बिहे । अचिंत्य जें ॥ ८८ ॥ देखें बोळंवा इंगळु न चरे । तेजीं तिमिर जेथ न सरे । जें देहाचें आंधारें । चर्मचक्षूसीं ॥ ८९ ॥ सुसडा सूर्यकणांच्या राशी । जो नित्य उदो ज्ञानियांसी । अस्तमानाचें जयासी । आडनांव नाहीं ॥ ९० ॥

कोणी एकादा मनुष्य दीनपणानें वाऱ्यासारखा पळत असतां एकाएकीं दोन्हीं पावलें निसटून आडांत पडला. ७०. आतां त्याला पडण्यापूर्वी, तें पडणें चुकविण्याकरितां दुसरा कांहीं ( उपाय ) नाहीं; म्हणून जसें त्याला पडावेंच लागतें; ७१. त्याप्रमाणें मृत्यूच्या त्या प्रसंगीं, जी कांहीं एक वस्तु जीवाच्या समोर येऊन उभी रहाते ( त्या वस्तूकडे त्याचें मन लागतें, ) ती वस्तु होणें मग कोणत्याही प्रकारानें चुकत नाहीं. ७२. आणि जेव्हां ( मनुष्य ) जागा असतो, त्या वेळेला त्याच्या वृत्तीनें ज्याचा ध्यास घेतलेला असतो, तेंच त्याला, डोळा लागल्याबरोबर स्वप्नांत दिसतें. ७३.

हे कुंतीपुत्रा, ज्या ज्या वस्तूचें स्मरण करीत मनुष्य अंतकालीं देहाचा त्याग करतो, त्या त्या वस्तूप्रत तो–सर्वदा ( तिच्या स्मरणानें ) तिच्या ठिकाणीं चित्त एकाग्र झालेला असल्यामुळें–जातो. ६.

त्याप्रमाणें जिवंत असतांना, जी गोष्ट आवडीनें अंतःकरणांत राहाते, तीच मरणाचे वेळीं वारंवार मनांत येते. ७४. आणि मरणसमयीं ज्यास जी वस्तु आठवते त्याच गतीला तो जातो; असें आहे म्हणून, तूं नेहमीं माझेंच स्मरण कर. ७५.

म्हणून सर्व प्रसंगीं माझें स्मरण कायम ठेव आणि युद्ध कर. मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं अर्पण करून राहिलास म्हणजे तूं निःसंशय मजप्रतच येशील. ७.

डोळ्यांनीं जें पहावें किंवा कानांनीं जें ऐकावें अथवा मनानें ज्याची कल्पना करावी किंवा वाणीनें जें बोलावें, ७६. वरील सांगितलेले सर्व व्यवहार आंत बाहेर मीच करून घाल, मग सर्वकाळ सहज मीच आहें. ७७. अरे, असें ( सर्व मद्रूप आहे असें ) झालें म्हणजे मग देह नाहींसा झाला, तरी तो मरत नाहीं. मग लढाई केलीस तरी तुला काय भय आहे ! ७८. तूं मनबुद्धि हीं खरोखर माझ्या स्वरूपांत अर्पण करशील, तर मग माझ्याशीं एकरूपच होशील, हें माझें प्रतिज्ञापूर्वक सांगणें आहे. ७९. अशी स्थिति कशानें होईल, असा जर संशय तुझ्या मनांत राहिला असेल, तर अगोदर अभ्यास करून पहा; मग ती स्थिति झाली नाहीं, तर रागाव. ८०.

हे पार्था, अभ्यासयोगामुळें ( अभ्यास=विषयांपासून मन परावृत्त करणें ) स्थिर झालेल्या व अन्यत्र न जाणाऱ्या चित्तानें ( परम पुरुषाचें ) सतत स्मरण करणारा मनुष्य त्या तेजस्वी परम पुरुषाप्रत जातो. ८.

याच अभ्यासाबरोबर चित्ताची सांगड चांगल्याप्रकारें घाल. अरे, प्रयत्नाच्या बळावर पांगळा देखील पर्वत चढून जातो. ८१. त्याप्रमाणें चांगल्या अभ्यासानें तूं निरंतर आपल्या चित्ताला परमपुरुषाचें ध्यान लाव. असें झाल्यावर मग शरीर राहो अथवा जावो. ८२. अनेक गतीस पावणाऱ्या चित्तानें एकदा आत्मस्वरूपास वरलें, मग देह आहे किंवा गेला, ह्याची कोणी आठवण ठेवावयाची ! ८३. नदीच्या ओघानें, घों घों करीत समुद्राच्या पाण्यास मिळालेलें जें पाणी, तें मागें काय चाललें आहे, म्हणून पहाण्याकरितां परत येतें काय ? ८४. नाहीं, तर तें समुद्रच होऊन राहिलें; त्याप्रमाणें तें चित्तच चिद्रूप बनल्यावर मग, त्या ठिकाणीं जन्ममरणाचा शीण सहजच राहिला; कारण तें चैतन्य एकरस आनंद आहे. ८५.

सर्वज्ञ, जुनाट, ( विश्वाचा ) नियंता, अणूपेक्षां ( देखील ) लहान, सर्व ( स्थूलसूक्ष्म जगाचा ) आश्रय, ज्याचें स्वरूप कल्पनेला अगोचर आहे असा, सूर्याप्रमाणें ( प्रकाशरूप असें ) ज्याचें स्वरूप आहे असा, ( अज्ञानरूप ) अंधकाराच्या पलीकडे असलेला जो ( परम पुरुष ), त्याचें जो ( खालील प्रकारें ) सतत स्मरण करतो–९.

ज्याचें अस्तित्व आकाराशिवाय आहे व जें जन्ममृत्युरहित असून, जें सर्वच असल्यामुळें सर्वपणानें पाहतें; ८६. जें आकाशाहून पुरातन आहे व जें परमाणूपेक्षांही लहान असून ज्याच्या सान्निध्यानें विश्वाची हालचाल होते; ८७. जें या सर्वांना प्रसवतें व ज्याच्यायोगानें सर्व असतें. तर्क ज्याला भितो; असें जें कल्पनेच्या पलीकडे आहे; ८८. पहा, दिवसास जशी वाळवी लागत नाहीं, ज्या स्वरूपप्रकाशाच्या ठिकाणीं ( अज्ञानरूप ) अंधाराचा लाग नाहीं, त्याचप्रमाणें जो स्वभावतः ज्ञानप्रकाशाचा दिवस असूनही स्थूल दृष्टीला अंधार आहे, ८९. ( जो स्वरूपदिवस अज्ञान्यांना अंधाराप्रमाणें असतो, तोच स्वरूपदिवस ज्ञान्यांना कसा असतो, हें या ओंवीत सांगतात. ) जें चैतन्य स्वच्छ सूर्यरूपी किरणांचा ढीग आहे, जें ज्ञानवानांना नित्य अपरोक्ष आहे व ज्या चैतन्यरूप दिवसाला अस्तमानाचें आडनांवसुद्धां नाहीं. ( जेथें अस्त होत नाहीं. ) ९०.

प्रयाणकाले मनसाऽचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

तया अव्यंगवाणेया ब्रह्मातें । प्रयाणकाले प्राप्ते । जो स्थिरावलेनि चित्तें । जाणोनि स्मरे ॥ ९१ ॥ बाहेरी पद्मासन रचुनी । उत्तराभिमुख बैसोनि । जीवीं सुख स्रुनि । कर्म-योगाचें ॥ ९२ ॥ आंतु मीनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें । आपेंआप संभ्रमें । मिळावया ॥ ९३ ॥ आकळलेनि योगें । मध्यमामध्यमार्गें । अग्निस्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ॥ ९४ ॥ तेथ अचेत चित्ताचा सांगातु । आहाचवाणा दिसे मांडतु । तेथ प्राणु गगनाआंतु । संचरे कां ॥ ९५ ॥ परी मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला । योगबळें आवरला । सज्ज होउनी ॥ ९६ ॥ तो जडाजडातें विरवितु । भ्रूलतामाजीं रचतु । जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसीच होय ॥ ९७ ॥ कां झांकलिये घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां । या रीती जो पांडवा । देह ठेवी ॥ ९८ ॥ तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम । तें माझें निजधाम । होऊनि ठाके ॥ ९९ ॥

यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

सकळां जाणणेयां जे लाणी । तिये जाणिवेची जे खाणी । तयां ज्ञानियांचिये आयणी । जयातें अक्षर म्हणिपे ॥ १०० ॥ चंडवातेंही न मोडे । तें गगनचि कीं फुडें । वांचूनि जरी होईल मेहुडें । तरी उरेल कैंचें ॥ १ ॥ तेविं जाणणेया जें आकळिलें । तें जाणवलेपणेंचि उमाणलें । मग नेणवेचि तयातें म्हणितलें । अक्षर सहजे ॥ २ ॥ म्हणोनि वेदविद नर । म्हणती जयातें अक्षर । जें प्रकृतीसी पर । परमात्मरूप ॥ ३ ॥ आणि विष-यांचे विष उलंडूनि । जे सर्वेंद्रियां प्रायश्चित्त देऊनि । आहाति देहाचिया बैसोनि । झाडा-तळीं ॥ ४ ॥ ते यापरी विरक्त । जयाची निरंतर वाट पाहात । निष्कामासि अभिप्रेत । सर्वदा जें ॥ ५ ॥ जयाचिया आवडी । न गणिती ब्रह्मचर्याचीं सांकडीं । निष्ठुर होऊनि बापुडीं । इंद्रियें करिती ॥ ६ ॥ ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध । जयाचिये थडियेचि वेद । चुबुकाळिले ठेले ॥ ७ ॥ तें ते पुरुष होती । जे यापरी लया जाती । तरी पार्था हेचि स्थिती । एक वेळ सांगों ॥ ८ ॥ तेथ अर्जुनें म्हणितलें स्वामी । हेंचि म्हणावया होतों पां मी । तंव सहजें कृपा केली तुम्हीं । तरी बोलिजो कां जी ॥ ९ ॥ परि बोलावें तें अति सोहोपें । तेथें म्हणितलें त्रिभुवनदीपें । तुज काय नेणों संक्षेपें । सांगेन ऐक ॥ १० ॥ तरी मना या बाहेरिलीकडे । यावयाची साविया सवे मोडे । हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ॥ ११ ॥

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च । मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥

–( म्हणजे जो ) मरणसमयीं एकाग्र मनानें, भक्तीनें व योगबलानें युक्त होत्साता, दोन भुवयांच्या मध्यें प्राणवायूची योग्य प्रकारें स्थापना करून ( त्याचें स्मरण करतो, ) तो त्या तेजस्वी परम पुरुषाप्रत जातो. १०.

मरणकाळ प्राप्त झाला असतांना, स्थिर अंतःकरणानें कांहींच व्यंग नसलेल्या ब्रह्माला, जो जाणून स्मरतो, ९१. बाहेर पद्मासन घालून, उत्तरेकडे तोंड करून बसून, कर्मयोगाचें सुख ( कर्मयोगाच्या आचरणानें प्राप्त झालेल्या समाधानाचें सुख ) अंतःकरणांत सांठवून, ९२. आंत मन एकाग्र झाल्यानें व आत्मस्वरूपप्राप्तीच्या प्रेमानें आपल्या ठिकाणीं आपण समारंभानें मिळण्याकरिता, ९३. स्वाधीन झालेल्या अष्टांगयोगानें, सुषुम्ना नाडीच्या मध्यमार्गानें, अग्निस्थानापासून ब्रह्मरंध्रास जाण्यास तो प्राण निघतो. ९४. जेथें प्राणवायु मूर्ध्नी-आकाशांत प्रवेश करतो, तेथें प्राणाचा आणि चित्ताचा वरवर संबंध झालेला दिसतो. ९५. परंतु मनाच्या स्थिरतेनें धरलेला व भक्तीच्या भावानें भरलेला व योग-बलानें आवरलेला, असा तयार होऊन, ९६. तो प्राण-वायु चेतन व अचेतन पदार्थांस नाहींसे करून भिंवयांत संचार करतो ( आणि तेथें लय पावतो; ) ज्याप्रमाणें घंटेचा नाद घंटेंत लय पावतो. ९७. अथवा घटा-खालीं झांकलेला दिवा केव्हां काय झाला ( विझला ) हें जसें कळत नाहीं, याप्रमाणें अर्जुना, जो देह ठेवतो, ९८. तो पुरुष जें केवळ परब्रह्म आहे व ज्याला परम-पुरुष हें नांव आहे, असें जें माझें खास स्वरूप आहे, तें होऊन राहतो. ९९.

जें अविनाशी आहे असें वेदवेत्ते सांगतात, ( संसाराच्या ) इच्छेपासून पराङ्मुख झालेले विरक्त ज्यामध्यें प्रवेश करतात व जें जाणण्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्य आचरण करतात, तें ' ब्रह्म ' नामक पद मी तुला संक्षेपानें सांगतों. ११.

जें ज्ञान, संपूर्ण ज्ञानाचा शेवट आहे, त्या ज्ञानाची जे केवळ खाणच आहेत, त्या ब्रह्मज्ञान्यांच्या बुद्धीनें ज्यास ( ब्रह्मस्वरूपास ) अविनाशी असें म्हणतात. १००. प्रचंड वाऱ्यानेंही जें नाहींसे होत नाहीं, तें खरोखर आकाशच होय. नाहींतर तें जर ढग असतें, तर तें प्रचंड वाऱ्यापुढें कसें टिकतें ? १०१. त्याप्रमाणें ज्ञानाला जें विषय झालें, आणि विषय झाल्यामुळेंच त्याच्याकडून जें मोजलें गेलें, ( तें क्षर होय. ) नंतर वृत्तीज्ञानाला जें विषय होत नाहीं ( तर उलट वृत्तिज्ञानच जेथें लय पावतें ) त्याला सहजच अक्षर असें म्हटलें. १०२. म्हणून वेद जाणणारे पुरुष ज्याला अक्षर असें म्हणतात आणि जें परमात्मस्वरूप प्रकृतीपलीकडचें आहे; १०३. आणि जे विषयांचा विषवत् त्याग करून व सर्वेंद्रियांना शुद्ध करून, देहरूप झाडाच्या खालीं बसलेले आहेत, १०४. याप्रमाणें जे विरक्त पुरुष आहेत, ते ज्याची ( परब्रह्माची ) नेहमीं वाट पहात असतात; आणि जें ( परब्रह्म ) निष्काम पुरुषांना अखंड अत्यंत प्रिय आहे; १०५. ज्याच्या प्रेमानें ते ब्रह्मचर्यासारख्या कठीण गोष्टी जुमानीत नाहींत आणि इंद्रियांवर कठोर होऊन त्यांना दीन करतात; १०६. असें जें ठिकाण ( ब्रह्मस्वरूप ) जें मिळावयास कठीण व जाणण्यास कठीण व ज्याच्या अलिकडच्या कांठावरींच वेद गटांगळ्या खात राहिले आहेत, ( वेदांसही जें अगम्य आहे. ) १०७. तें ( परब्रह्म ) जे पुरुष याप्रमाणें देह ठेवतात, ते होतात. तर अर्जुना; हाच प्रकार तुला आणखी एक वेळ सांगतों. १०८. त्या प्रसंगीं अर्जुन म्हणाला, महाराज, मी हेंच विचारण्याच्या बेतांत होतों. इतक्यांत तुम्ही सहजच कृपा केली, तर महाराज, आतां सांगावें. १०९. परंतु जें सांगाल, तें अतिशय सोपें करून सांगा. त्या प्रसंगीं तीन लोकांचें प्रकाशन करणारे श्रीकृष्ण म्हणाले, आम्ही तुला ओळखत नाहीं काय ? तुला तें थोडक्यांत सांगतों, ऐक. ११०. तरी या मनाला बाहेर येण्याची जी संवय आहे, ती सहज नाहींशी करून, तें हृदयाच्या डोहांत बुडेल, तसें करावें. १११.

सर्व इंद्रियांचें नियमन करून, हृदयाचे ठिकाणीं मनाचा निरोध करून आणि आपला प्राणवायु मस्तकामध्यें ठेवून योगाचरणामध्यें स्थित होत्सांता, १२.

परी हें तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडें । कळासती ॥ १२ ॥ तरी सहजें मन कोंडलें । हृदयींचि असेल उगलें । जैसें करचरणीं मोडलें । परिवरु न संडी ॥ १३ ॥ तैसें चित्त राहिल्या पांडवा । प्राणांचा प्रणवुचि करावा । मग अनुवृत्तिपंथें आणावा । मूर्ध्निवरी ॥ १४ ॥ तेथ आकाशीं मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळें । जंव मात्रात्रय मावळे । अर्धबिंबीं ॥ १५ ॥ तंववरी तो समीरु । निराळीं कीजे स्थिरु । मग लग्नीं जेविं ॐकारु । बिंबींचि विलसे ॥ १६ ॥

ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् । यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

तैसें ॐ हें स्मरों सरे । आणि तेथेंचि प्राणु पुरे । मग प्रणवांतीं उरे । पूर्णघन जें ॥१७॥ म्हणोनि प्रणवैकनाम । हें एकाक्षर ब्रह्म । जो माझें स्वरूप परम । स्मरतसांता ॥ १८ ॥ यापरी त्यजी देहातें । तो त्रिशुद्धी पावे मातें । जया पावणया परौतें । आणिक पावणें नाहीं ॥ १९ ॥ येथ अर्जुना जरी विपायें । तुझ्या जीवीं हन ऐसें जाये । ना हें स्मरण मग होये । कायसयावरी अंतीं ॥ १२० ॥ इंद्रियां अनुघडु पडलिया । जीविताचें सुख बुडालिया । आंतुबाहेरी उधडलिया मृत्युचिन्हें ॥ २१ ॥ ते वेळीं बैसावेंचि कवणें । मग कवण निरोधी करणें । तेथ काह्याचेनि अंतःकरणें । प्रणव स्मरावा ॥ २२ ॥ तरि अगा ऐशिया ध्वनी । झणें थारा देशी हो मनीं । पैं नित्य सेविला मी निदानीं । सेवकु होय ॥ २३ ॥

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः । तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥

जे विषयांसि तिळांजळी देऊनि । प्रवृत्तीवरी निगड वाऊनि । मातें हृदयीं सूनि । भोगिताती ॥ २४ ॥ परि भोगितया नाराणुका । भेटणें नाहीं क्षुधादिकां । तेथ चक्षुरादिकां । कवण पाडु ॥ २५ ॥ ऐसे निरंतर एकवटले । जे अंतःकरणीं मजशीं लिगटले । मीचि होऊनि आटले । उपासिती ॥ २६ ॥ तयां देहावसान जैं पावे । तैं तिहीं मातें स्मरावें । मग म्यां जरी पावावें । तरि उपास्ति ते कायसी ॥२७॥ पैं रंकु एक आडलेपणें । काकुळती अंतीं धांवां गा धांवां म्हणे । तरि तयाचिये ग्लानी धांवणें । काय न घडे मज ॥ २८ ॥ आणि भक्तांही तेचि दशा । तरी भक्तीचा सोसु कायसा । म्हणऊनि हा ध्वनी ऐसा । न वाखाणावा ॥ २९ ॥ तिहीं जे वेळीं मी स्मरावा । ते वेळीं स्मरला कीं पावावा । तो आभारुही जीवा । साहवेचि ना ॥ १३० ॥ तें ऋणवैपण देखोनि आंगीं । मी आपुलियाचि उत्तीर्णत्वालागीं । भक्तांचियां तनुत्यागीं । परिचर्या करी ॥ ३१ ॥ देहवैकल्याचा वारा । झणें लागेल या सकुमारा । म्हणोनि आत्मबोधाचां पांजिरां । घूयें तयातें ॥ ३२ ॥ वरि आपुलिया स्मरणाची उवाइली । ढींव ऐसी करीं साउली । ऐसेनि नित्यबुद्धि संचली । मी आणीं तयातें ॥ ३३ ॥ म्हणोनि देहांतींचें सांकडें । माझिया कहींचि न पडे । मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥ ३४ ॥ वरचील

परंतु जर सर्वेंद्रियांच्या द्वारांत नेहमीं निग्रहाचीं कवाडें लावलीं, तरच हें घडेल. ११२. मग ज्याप्रमाणें हातपाय मोडलेला मनुष्य घर सोडीत नाहीं, त्याप्रमाणें मग स्वभावतःच कोंडलेलें मन अंतःकरणांत स्वस्थ राहील. ११३. अर्जुना, तसें चित्त स्थिर झालें असतां मग प्राणवायूचा ओंकार करून ( प्राणानें ओंकाराचें चिंतन केलें असतां प्राण प्रणवरूप होतो. ) त्यास मग सुषुम्ना नाडीच्या मार्गानें मूर्ध्नीआकाशापर्यंत आणावा. ११४. तेथें मूर्ध्नीआकाशांत प्राणवायूचा लय होईल न होईल, अशा अर्धवट स्थितींत, धारणेच्या जोरावर धरून ठेवावा. जेथपर्यंत अकार, उकार व मकार या तीन मात्रा अर्धमात्रारूप ओंकार बिंदूमध्यें नाहींशा झाल्या नाहींत, ११५. तोंपर्यंत तो प्राणवायु मूर्ध्नीआकाशांत निश्चल करावा, मग अर्धबिंबांत मात्रात्रयाचें ऐक्य झालें असता ओंकार अर्धमात्रेमध्यें जसा शोभतो ( लयाला पावतो ) तसा तो प्राण मूर्ध्याकाशांत शोभतो ( लयाला पावतो. ) ११६.

**ॐ या एकाक्षरी ब्रह्माचा उच्चार करीत असतां व माझें स्मरण करीत असतां, जो देहाचा त्याग करून जातो, तो अत्यंत श्रेष्ठ अशा गतीला पावतो. १३.**

तेव्हां ओम् हें स्मरण्याचें संपून तेथेंच प्राणवायु संपतो. मग ओंकार स्मरण्याचें राहिलें कीं, जें पूर्ण परब्रह्म, तेंच काय तें एक रहातें. ११७. म्हणून प्रणव हें एक ज्याचें नाम आहे व जें एकाक्षर ब्रह्म आहे, तें माझें मुख्य स्वरूप असून, त्या स्वरूपाचें स्मरण करीत असतांना ११८. जो अशा स्थितींतच देहाचा त्याग करितो, तो ज्या ब्रह्मप्राप्तीपलीकडे दुसरी कांहीं एक गोष्ट साध्य करण्याची नाहीं, त्या माझ्या स्वरूपाला निश्चयानें पावतो. ११९. येथें अर्जुना, कदाचित् जर तुझ्या मनांत असें वाटेल कीं, अंतकाळीं हें स्मरण करावें हें खरें, परंतु अंतकाळीं हें स्मरण कशानें होणार? १२० कारण इंद्रियें आपापलीं कामें करण्यास असमर्थ स्थितींत असल्यावर, जगण्यांत असलेलें सुख नाहींसें होऊन, आंत बाहेर मरणाचीं लक्षणें उघड दिसूं लागल्यावर, १२१. मग त्या वेळेस योगसाधनास कोणी बसावें? व इंद्रियांचा निग्रह कोणी करावा? आणि कोणत्या अंतःकरणानें ओंकाराचें स्मरण करावें? १२२. तर बाबा, अशा शंकेला कदाचित् तूं मनांत जागा देशील ( तर अशी शंका मनांत आणूं नकोस; कारण ) माझी जे नेहमींच सेवा करतात, त्या भक्तांच्या मरणकाळीं मी त्यांचा सेवक होतों. १२३.

**पार्था, जो सतत अनन्यचित्त ( माझ्याखेरीज इतरत्र चित्त न ठेवणारा ) होत्साता नित्य माझें स्मरण करतो, त्या माझ्याशीं निरंतर एकवटलेल्या योग्याला मी सुलभच आहें. १४.**

जे विषयांना तिलांजलि देऊन, ( विषयांवर पाणी सोडून ) प्रवृत्तीला बेडी घालून ( निरोधून ) मला अंतःकरणांत सांठवून, माझ्या स्वरूपाचा अनुभव घेतात. १२४. परंतु मला हृदयांत धालून कितीही भोग घेतला, तरी त्यांचें समाधान होत नसल्यामुळें, भूक व तहान इत्यादिकांचा त्यांस पत्ता नसतो; तेथें डोळे इत्यादिकांची काय किंमत आहे! १२५. अशा प्रकारें जे अखंड माझ्याशीं एकरूप होऊन अंतःकरणानें मला जे चिकटले, ते मद्रूप होऊन माझीच भक्ति करतात. १२६. त्यांना ज्या वेळेला देह पडण्याचा प्रसंग येतो, त्या वेळेला त्यांनीं माझी आठवण करावी आणि मग जर मीं त्यांच्याकडे जावें, तर त्यांच्या त्या केलेल्या भक्तीची किंमत काय राहिली? १२७. कोणी एकादा दीन अडल्यामुळें मरणसमयीं काकुळतीनें जर मला, देवा धांवा हो धांवा, असें म्हणाला, तर त्याच्या संकटसमयीं मी धांवत नाहीं काय? १२८. आणि भक्तांचीही जर तीच अवस्था होत असेल, तर मग भक्तीचा एवढा हव्यास तरी कशाकरितां करावयाचा? ( अशी आपत्ति येईल ) म्हणून अशा प्रकारच्या शंकेला तूं महत्त्व देऊं नकोस. १२९. त्यांनीं ज्या वेळीं माझी आठवण करावी, त्या वेळेला स्मरण करतांच मीं हजर व्हावें, एवढें ओझें देखील माझ्या मनाला सहन होत नाहीं. १३०. तो कर्जदारपणा आपल्या ठिकाणीं असलेला पाहून, त्या आपल्याच कर्जाच्या फेडीकरितां मी भक्तांच्या देह पडण्याच्या वेळीं त्यांची सेवाचाकरी करतों. १३१. देहान्तीं त्रास होणाऱ्या व्याकुळतेचा संबंध कदाचित माझ्या या सुकुमार भक्ताला लागेल, म्हणून त्यास मी आत्मज्ञानाच्या पिंजऱ्यांत ठेवतों, १३२. शिवाय आपली माझ्याविषयीं त्याला असलेलें स्मरण, हीच कोणी प्रशस्त व थंडगार अशी सांवली, ती त्या पिंजऱ्यावर मी करतों; अशा तऱ्हेनें आत्म्याच्या नित्यतेविषयीं दृढ झालेली बुद्धि मी त्याला देतों. १३३. म्हणून मरणाचें संकट माझ्या भक्ताला कधींच पडत नाहीं; माझ्या भक्ताला मी आपल्याकडे कांहीं आयास न पडतां आणतों. १३४. आत्म्यावर

देहाची गंवसणी फेडुनी । आहाच अहंकाराचे रज झाडुनी । शुद्ध वासना निवडुनी । आपणपां मेळवीं ॥ ३५ ॥ आणि भक्तां तरी देहीं । विशेष एकवंकीचा ठाव नाहीं । म्हणऊनि अव्हेरु करितां कांहीं । वियोगु ऐसा न वाटे ॥ ३६ ॥ नातरी देहांतींचि मियां यावें । मग आपणपयातें न्यावें । हेंही नाहीं स्वभावें । जे आधींचि मज मीनले ॥ ३७ ॥ येरी शरीराचिया सालिलीं । असतेंपण हेचि साउली । वांचूनि चंद्रिका ते ठेली । चंद्रींच आहे ॥ ३८ ॥ ऐसे जे नित्ययुक्त । तयासि सुलभ मी सतत । म्हणऊनि देहांतीं निश्चित । मीचि होती ॥ ३९ ॥

मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् । नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥

मग क्लेशतरूची वाडी । जे तापत्रयाग्नीची सगडी । जे मृत्युकाकासि कुरोंडी । सांडिली आहे ॥ १४० ॥ जें दैन्याचें दुभतें । जें महाभयातें वाढवितें । जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥ ४१ ॥ जें दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ । जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ॥ ४२ ॥ जें संसाराचें बैसणें । जें विकाराचें उद्यानें । जें सकळ रोगांचें भाणें । वाढिलें आहे ॥ ४३ ॥ जें काळाचा खिचउशिटा । जें आशेचा आंगवठा । जन्ममरणाचा वोलिंवटा । स्वभावें जें ॥ ४४ ॥ जें भुलीचें भरिंव । जें विकल्पाचें वोतिंव । किंबहुना पेंव । विंचुवांचें ॥ ४५ ॥ जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पण्यांगनेचें मैत्र । जें विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ॥ ४६ ॥ जें लावेचा कळवळा । निवालिया विषोदकाचा गळाला । जें विश्वासु आंगवळा । संवचोराचा ॥ ४७ ॥ जें कोढियाचें खेंव । जें काळसर्पाचें मार्दव । जें गोरीचें स्वभाव । गायन जें ॥ ४८ ॥ जें वैरियाचा पाहुणेरु । जें दुर्जनाचा आदरु । हें असो जें सागरु । अनर्थांचा ॥ ४९ ॥ जें स्वप्नीं देखिलें स्वप्न । जें मृगजळें सासिन्नलें वन । जें धूम्ररजांचें गगन । ओतलें आहे ॥ १५० ॥ ऐसें जें हें शरीर । तें ते न पवतीचि पुढती नर । जे होऊनि ठेले अपार । स्वरूप माझें ॥ ५१ ॥

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन । मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

एऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे । परि निवटलियाचें जैसें । पोट न दुखे ॥ ५२ ॥ नातरी चेइलियानंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापूरें । तेवीं मातें पावले ते संसारें । लिंपतीचि ना ॥ ५३ ॥ एऱ्हवीं जगदाकाराचें सिरें । जें चिरस्थायीयांचें धुरे । ब्रह्मभुवन गा चवरें । लोकाचळाचें ॥ ५४ ॥

सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः । रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

जिये गांवींचा पहारु दीवोवेरी । एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी । विळोनि पांती उठी एकीसरी । चवदाजणांची ॥ ५५ ॥ जें चोकडिया सहस्र जाये । तैं ठायेठावो विळुचि होये । आणि तैसेंचि सहस्रें भरियें पाहें । रात्री जेथ ॥ ५६ ॥ येवढें अहोरात्र जेथिंचें । तेणें न लोटती जे भाग्याचे । देखती ते स्वर्गींचे । चिरंजीव ॥ ५७ ॥ येरां सुरगणांची नवाई । विशेष सांगावी

असणारी देहरूपी गवसणी काढून टाकून, अहंकाररूपी वरवर असणारी धूळ झाडून, शुद्ध वासना वेगळी काढून घेऊन, त्या भक्ताचें ( मी ) आपल्याशीं ऐक्य करतों. १३५. आणि भक्तांना तरी देहांत असतांना देखील विशेषतः देहतादात्म्यतेचा पत्ता नसतो, म्हणून देहत्याग करतांना त्यांत ( देहाचा ) वियोग असा वाटत नाहीं. १३६. अथवा मरणाच्या वेळेलाच मीं यावें आणि नंतर त्यांना आपणाकडे न्यावें, ( म्हणजे आपल्या स्वरूपांत मिळवावें ) हेंही घडत नाहीं, कारण ते ( भक्त ) आधींच मला सहज मिळालेले असतात. १३७. एऱ्हवीं चंद्राच्या चांदण्याचा भास जरी पाण्यांत झाला, तरी तें चांदणें चंद्राचेंच ठिकाणीं आहे, त्याप्रमाणें शरीररूपी पाण्यांत जरी तो भक्त भासला, तरी तो नुसता भासमात्र आहे, वास्तविक तो माझ्या स्वरूपींच आहे. १३८. याप्रमाणें जे माझ्या ठिकाणीं नित्य जडलेले असतात, त्यांना मी नेहमीं जवळ आहें. म्हणून ते देह पडल्यावर खात्रीनें मीच होतात. १३९.

( ही ) श्रेष्ठ स्थिति प्राप्त झालेल्या महात्म्यांना मजप्रत आल्यानंतर, दुःखाचें आगर असलेला व नश्वर असा पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. १५.

नंतर, जें ( शरीर ) दुःखरूप झाडांचा बाग व अध्यात्मादि तीन तापरूपी विस्तवाची शेगडी व मृत्युरूपी कावळ्यास उतरून टाकलेला बळी आहे; १४०. जें दीनता प्रसवणारें आहे, जें मरणाला पोसतें व जें सर्व दुःखाचें पुरेसें भांडवल आहे, १४१. जें दुष्टबुद्धीचें उत्पत्तिस्थान व वाईट क्रियांचें फळ आहे, जें मूर्तिमंत केवळ गाढ अविवेकच आहे, १४२. जें संसाराची बैठक आहे, जें विकाररूपी झाडांचा बगीचा आहे व जें सर्व रोगांचें वाढलेलें ताट आहे. १४३. जें मृत्यूचें खाऊन राहिलेलें अन्न आहे, जें मूर्तिमंत आशा आहे, जें जन्म व मृत्यूची स्वाभाविक वाहती वाट आहे. १४४. जें भ्रमाचें भरलेलें व संशयाचें ओतलेलें आहे, फार काय सांगावें ? जें विंचवाचें पेव आहे, १४५. जें शरीर, वाघाचें वस्तीस्थान आहे, जे वेश्येच्या स्नेहाप्रमाणें ( दिखाऊ ) आहे, जें विषयांचा अनुभव करून देणारें सुपूजित यंत्रच आहे, १४६. जें राक्षसीची दिखाऊ कळकळ आहे, जें निवालेल्या विषाचा घोट आहे, जें सावाचें सोंग घेतलेल्या चोराचा मिळविलेला विश्वास आहे, १४७. जें रक्तपित्याचें आलिंगन आहे, जें डंख करून मरण आणणाऱ्या सापाचा मऊपणा आहे व जें पारध्याचें स्वाभाविक गायन आहे, १४८. जें शत्रूचा पाहुणचार आहे, जें दुष्ट लोकांचा सन्मान आहे, हें राहूं द्या; जें ( सर्व ) अनर्थांचा समुद्र आहे, १४९. जें ( शरीर ) स्वप्नांत पाहिलेलें स्वप्न आहे, अथवा मृगजळाच्या पाण्यानें भरास आलेलें रान आहे किंवा जें शरीर म्हणजे धुराच्या कणांचें बनविलेलें आकाश आहे, १५०. असें ( अनर्थकारक व खोटें ) जें शरीर तें, जे पुरुष माझें अमर्याद स्वरूपच होऊन राहिलेले आहेत, त्यांस पुन्हां प्राप्त होत नाहीं. १५१.



अर्जुना, ब्रह्मलोकासकट सर्व लोकींचे प्राणी पुनर्जन्म पावणारे आहेत. कुंतीपुत्रा, परंतु मजप्रत आल्यानंतर पुनर्जन्म नाहीं. १६.

सहज विचार करून पाहिलें तर ब्रह्मपदाचा थोरपणा जरी प्राप्त झाला, तरी त्यांस पुनः पुन्हां येणारे जन्ममरणाचे फेरे चुकतच नाहींत. परंतु ज्याप्रमाणें मेलेल्या माणसाचें पोट दुखत नाहीं; १५२. अथवा जागें झाल्यानंतर स्वप्नांतील महापुरानें बुडत नाहीं, त्याप्रमाणें जे माझ्या स्वरूपीं प्राप्त झाले, ते पुरुष संसारबंधनांत सांपडतच नाहींत. १५३. सहज विचार करून पाहिलें तर, जगदाकाराचा शिरोभाग आणि सर्व चिरस्थायी पदार्थांमध्यें अग्रगण्य व स्वर्गादि लोकरूपी पर्वताचें शिखर जो सत्यलोक ( ब्रह्मदेवाचा लोक ), १५४.

एक सहस्र युगें ( चार युगांच्या चौकड्या ) झालीं म्हणजे संपणारा असा ब्रह्मदेवाचा एक दिवस होय आणि एक सहस्र युगें रहाणारी ( ब्रह्मदेवाची ) एक रात्र होय. असें जे जाणतात, ते ( ब्रह्मदेवाचे ) अहोरात्र जाणणारे होत. १७.

ज्या सत्यलोकरूपी गांवाच्या प्रहर दिवसपर्यंत एका इंद्राचें आयुष्य टिकत नाहीं, ( तर ज्या गांवच्या ) एका दिवसांत एकसारखी चौदा इंद्रांची पंगत उठते, ( चौदा इंद्र होऊन जातात. ) १५५. चार युगांच्या जेव्हां हजार फेऱ्या होतात, तेव्हां ब्रह्मदेवाचा एक पूर्ण दिवसच होतो व पहा, त्याचप्रमाणें हजार चौकड्या भरल्या म्हणजे जेथील एक रात्र होते, १५६. ज्या ठिकाणचा दिवस व रात्र एवढा मोठा आहे, त्या दिवसानें जे मरत नाहींत, ते भाग्यवान हा दिवस पाहतात. ते स्वर्गांतील चिरंजीव होत. १५७. इतर देवांचें या ठिकाणीं विशेष आश्चर्य

येथ काई। मुदला इंद्राचीचि दशा पाहीं। जे दिहाचे चौदा ॥ ५८ ॥ परि ब्रह्मयाचियाहि आठां प्रहरांतें। आपुलियां डोळां देखते। आहाति गा तयांतें। अहोरात्रविद म्हणिपे ॥ ५९ ॥

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे। रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥

तिये ब्रह्मभुवनीं दिवसें पाहे। ते वेळीं गणना केंही न समाये। ऐसें अव्यक्ताचें होये। व्यक्त विश्व ॥ १६० ॥ पुढती दिहाची चौपाहारी फिटे। आणि हा आकारसमुद्र आटे। पाठीं तैसाचि मग पाहांटे। भरों लागे ॥ ६१ ॥ शारदीयेचिये प्रवेशीं। अभ्रें जिरती आकाशीं। मग ग्रीष्मांतीं जैशी। निगती पुढती ॥ ६२ ॥

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते। रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

तैशी ब्रह्मदिनाचिये आदी। हे भूतसृष्टीची मांदी। मिळे जंव सहस्रावधी। निमित्त पुरे ॥ ६३ ॥ पाठीं रात्रींचा अवसरु होये। आणि विश्व अव्यक्तीं लया जाये। तोही युगसहस्र मोटका पाहे। आणि तैसेंचि रचे ॥ ६४ ॥ हें सांगावया काय उपपत्ती। जे जगाचा प्रळयो आणि संभूती। इये ब्रह्मभुवनींचिया होती। अहोरात्रामाजीं ॥ ६५ ॥ कैसें थोरिवेचें मान पाहें पां। तो सृष्टिबीजाचा साटोपा। परि पुनरावृत्तीचिया मापा। शीग जाहला ॥ ६६ ॥ एऱ्हवीं त्रैलोक्य हें धनुर्धरा। तिये गांवींचा गा पसारा। तो हा दिनोदयीं एकसरां। मांडत असे ॥ ६७ ॥ पाठीं रात्रींचा समो पावे। आणि अपैसाचि सांठवे। म्हणिये जेथिंचें तेथ स्वभावें। साम्यासि ये ॥ ६८ ॥ जैसें वृक्षपण बीजासि आलें। कीं मेघ हें गगन जाहालें। तैसें अनेकत्व जेथ सामावलें। तें साम्य म्हणिपे ॥ ६९ ॥

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः। यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

तेथ समविषम न दिसे कांहीं। म्हणोनि भूतें हे भाष नाहीं। जेवीं दूधचि जाहालिया दहीं। नामरूप जाय ॥ १७० ॥ तेवीं आकारलोपासरिसें। जगाचें जगपण भ्रंशे। परि जेथें जाहालें तें जैसें। तैसेंचि असे ॥ ७१ ॥ तें तया नांव सहज अव्यक्त। आणि आकारा वेळीं तेंचि व्यक्त। हें एकास्तव एक सूचित। एऱ्हवीं दोनी नाहीं ॥ ७२ ॥ जैसें आटलिया रूपें। आटलेपण ते खोटी म्हणिपे। पुढती तो घनाकारु हारपे। जे वेळीं अळंकार होती ॥ ७३ ॥ इयें दोन्ही जैशीं होणीं। एकीं साक्षीभूत सुवर्णीं। तैसी व्यक्ताव्यक्ताची कडसणी। वस्तूचां ठायीं ॥ ७४ ॥ तें तरी व्यक्त ना अव्यक्त। नित्य ना नाशवंत। या दोहीं भावाअतीत। अनादिसिद्ध ॥ ७५ ॥ जें हें विश्वचि होऊनि असे। परि विश्वपण नासिलेनि न नासे। अक्षरें पुसिलया न पुसे। अर्थु जैसा ॥ ७६ ॥ पाहें पां तरंग तरी होत जात। परि तेथ उदक तें अखंड असत।

काय सांगावयाचें आहे! मुख्य देवांचा राजा जो इंद्र त्याचीच दशा पहा कीं, ते इंद्र ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा होतात. १५८. परंतु ब्रह्मदेवाच्याही आठा प्रहरांना आपल्या डोळ्यांनीं पाहाणारे जे आहेत, त्यांस ब्रह्मदेवाच्या दिवसरात्रीला जाणणारे म्हणावेत. १५९.

ब्रह्मदेवाच्या दिवसाला प्रारंभ झाला, म्हणजे सर्व व्यक्त वस्तु अव्यक्तापासून उत्पन्न होतात. रात्रीला प्रारंभ झाला म्हणजे त्याच अव्यक्तामध्यें सर्व नाश पावतात. १८.

त्या ब्रह्मलोकांत जेव्हां दिवस उगवतो, तेव्हां ज्याची मोजदाद कोठेंही करतां येत नाहीं, असें लीन असलेलें जग आकाराला येतें. १६०. पुढें दिवसाचे चार प्रहर संपले कीं, हा आकारसमुद्र आटतो व पुनः पहांटे तसाच आकारसमुद्र भरावयास लागतो. १६१. शरद् ऋतूच्या आरंभीं ज्याप्रमाणें ढग आकाशांत नाहींसे होतात व नंतर ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं जसे ते पुनः उत्पन्न होतात; १६२.

भूतांचा तोच हा समुदाय (याप्रमाणें) पुनः पुनः जन्मून, पराधीन होत्साता, रात्र सुरू झाली कीं लय पावतो, आणि हे अर्जुना, दिवस सुरू झाला कीं (पुनः) जन्मतो. १९.

त्याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या आरंभीं हे भूतसृष्टीचे समुदाय, हजार चौकड्यांच्या काळाचें कारण संपेपर्यंत, उत्पन्न होत राहातात. १६३. मग रात्रीचा वेळ होतो आणि विश्व अव्यक्तांत (मायेंत) लीन होतें; ती ही हजार चौकड्यांची रात्र अंमळ उजाडली कीं, पूर्वीप्रमाणें जगत् उत्पन्न होऊं लागतें. १६४. हें सांगावयास कारण काय, तर ब्रह्मलोकाच्या एका दिवसरात्रीमध्यें जगाची उत्पत्ति आणि संहार होतात. १६५. ब्रह्मदेवाच्या मोठेपणाचें प्रमाण कसें आहे! पहा कीं, तो सृष्टीरूपी बीजाचें कोठार आहे; तरी पण तोही पुनरावृत्तीच्या मापाला शीग (टोंक) झाला. १६६. हे अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर, हा जो त्रैलोक्याचा विस्तार, तो त्या ब्रह्मदेवाच्या गांवचा दिवस उगवल्याबरोबर एकदम रचला जातो. १६७. मग रात्रीचा वेळ प्राप्त झाला कीं तो (त्रैलोक्याचा पसारा) आपोआप लीन होतो, (व तो) जेथून उत्पन्न झाला तेथें स्वभावतः साम्याला येतो, असें म्हणतात. १६८. ज्याप्रमाणें झाड बीजरूपाला येतें अथवा ढग हे आकाशरूप होतात, त्याप्रमाणें या अनेकत्वाचा जेथें समावेश होतो, त्यास 'साम्य' म्हणतात. १६९.

पण या वर सांगितलेल्या अव्यक्तापलीकडचा (व्यक्ताव्यक्त कल्पना निरपेक्ष असा) दुसरा जो सनातन अव्यक्त पदार्थ आहे, तो सर्व भूतें नाहींशीं झालीं तरीही नाहींसा होत नाहीं. २०.

तेथें (त्या साम्यावस्थेंत) सम (एकासारखें एक) विषम (एकाहून एक भिन्न) हें कांहीं दिसत नाहीं. म्हणून (त्या साम्यावस्थेस) भूतें असें म्हणतां येत नाहीं. तें कसें तर, ज्याप्रमाणें दूध हें दहीं झाल्यावर, त्याचें दूध हें नांव व पातळपणाचें स्वरूप, हीं जातात; १७०. त्याप्रमाणें आकार नाहींसा झाल्याबरोबर जगाचा जगपणा नाश पावतो. पण जग जेथून झालें, तें अव्यक्त जसेंच्या तसेंच असतें. १७१. त्या वेळीं त्यास (साम्यावस्थेस) स्वभावतः अव्यक्त असें म्हणतात आणि आकाराला आलें म्हणजे त्यास व्यक्त (जग) असें म्हणतात. व्यक्त व अव्यक्त, हीं दोन्हीं नांवें एकाच्यामुळें दुसरें, अशीं सापेक्ष दिलेलीं आहेत. विचार करून पाहिलें तर, स्वरूपदृष्ट्या हे दोन्ही भाव नाहींत. १७२. ज्याप्रमाणें अलंकार आटविल्यावर आटलेल्या आकाराला लगड असें म्हणतात व पुढें ज्या वेळीं त्या लगडीचे निरनिराळे अलंकार होतात, त्या वेळीं त्या लगडीचा लगडपणा नाहींसा होतो. १७३. अलंकार व लगड ह्या दोहींचें होणें जसें एका आधारभूत सोन्यावर असतें, त्याप्रमाणें आकार (जग) आणि निराकार (माया) यांचा विचार चैतन्याच्या ठिकाणीं आहे. (म्हणजे आकार आणि निराकार, या दोन्ही सापेक्ष कल्पनांस आधार चैतन्यच आहे.) १७४. तें चैतन्य तर साकारही नाहीं आणि निराकारही नाहीं; त्यास तिन्ही काळांत असणारें असेंही म्हणतां येत नाहीं व क्षणभंगूर असेंही म्हणतां येत नाहीं. तें या परस्पर सापेक्ष दोन्ही स्थितींच्या पलीकडे असून नित्यसिद्ध आहे. १७५. जें चैतन्य विश्वाच्या रूपानें बनलेलें आहे परंतु विश्वपण नाहींसें झाल्यानें तें चैतन्य नाहींसें होत नाहीं. ज्याप्रमाणें पाटीवर लिहिलेलीं अक्षरें पुसून टाकलीं, तरी त्यांपासून होणारा बोध नाहींसा होत नाहीं. १७६. हें पहा, पाण्यावर लाटा तर उत्पन्न होतात आणि नाहींशा होतात, परंतु त्या ठिकाणीं त्या लाटांस आधार असलेलें

तेवीं भूतभावीं नाशिवंत । अविनाश जें ॥ ७७ ॥ नातरी आटतिये अळंकारीं । नाटतें कनक असे जयापरी । तेवीं मरतिये जीवाकरीं । अमर जें आहे ॥ ७८ ॥

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् । यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥

जयातें अव्यक्त म्हणों ये कोडें । म्हणतां स्तुति हे ऐसें नावडे । जें मना बुद्धी न सांपडे । म्हणऊनियां ॥ ७९ ॥ आणि आकारा आलिया जयाचें । निराकारपण न वचे । आकारलोपें न विसंचे । नित्यता गा ॥ १८० ॥ म्हणोनि अक्षर जें म्हणिजे । तेवींचि म्हणतां बोधुही उपजे । जयापरौता पैसु न देखिजे । या नाम परमगती ॥ ८१ ॥ पै आघवा इहीं देहपुरीं । आहे निजेलियाचे परी । जे व्यापारु करवी ना करी । म्हणऊनियां ॥ ८२ ॥ एऱ्हवीं जे शरीरचेष्टा । त्यांमाजी एकही न ठके गा सुभटा । दाहीं इंद्रियांचिया वाटा । वाहताचि आहाती ॥ ८३ ॥ उकलूं विषयांचा पेटा । होत मनाचां चोहटां । तो सुखदुःखाचा राजवांटा । भीतराहि पावे ॥८४॥ परि रावो पहुडलिया सुखें । जैसा देशींचा व्यापारु न ठके । प्रजा आपुलालेनि अभिलाखें । करिताचि असती ॥ ८५ ॥ तैसें बुद्धीचें हन जाणणें । कां मनाचें घेणें देणें । इंद्रियांचें करणें । स्फुरण वायूचें ॥ ८६ ॥ हे देहक्रिया आघवी । न करवितां होय बरवी । जैसा न चलवितेनि रवी । लोकु चाले ॥ ८७ ॥

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया । यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

अर्जुना तया परी । सुतला ऐसा आहे शरीरीं । म्हणोनि पुरुषु गा अवधारीं । म्हणिपे जयातें ॥ ८८ ॥ आणि प्रकृतिपतिव्रते । पडिला एकपत्नीव्रतें । येणेंही कारणें जयातें । पुरुषु म्हणों ये ॥ ८९ ॥ पैं वेदांचें बहुवसपण । देखेचिना जयाचें आंगण । हें गगनाचें पांघरूण । होय देखा ॥ १९० ॥ ऐसें जाणूनि योगीश्वर । जयातें म्हणती परमपर । जें अनन्यगतीचें घर । गिंवसीत ये ॥ ९१ ॥ जे तनुवाचाचित्तें । नाइकती दुजिये गोष्टीतें । तयां एकनिष्ठेचें पिकतें । सुक्षेत्र जें ॥ ९२ ॥ हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु । ऐसा साचु जयांचा मनोधर्मु । तयां आस्तिक्यांचा आश्रमु । पांडवा गा ॥ ९३ ॥ जें निगर्वाचें गौरव । जें निर्गुणाची जाणिव । जें सुखाची राणिव । निराशांसी ॥ ९४ ॥ जें संतोषियां वाढिलें ताट । जें अचिंतां अनाथांचें मायपोट । भक्तीसी उजू वाट । जया गांवा ॥ ९५ ॥ हें एकैक सांगोनि वाया । काय फार करूं धनंजया । पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होइजे ॥ ९६ ॥ हिंवाचिया झुळुका । जैसें हिंवचि पडे उष्णोदका । कां समोर जालिया अर्का । तमाचि प्रकाशु होय ॥ ९७ ॥ तैसा संसारु जया गांवा । गेला सांता पांडवा । होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाचि ॥ ९८ ॥ तरि अग्नीमाजीं आलें । जैसें इंधनाचि अग्नि जहालें । पाठीं न निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ॥ ९९ ॥ नातरी

पाणी सर्वकाळ असतें, त्याप्रमाणें या नाशिवंत प्राणिमात्रांत त्यांस आधारभूत असलेलें जें चैतन्य, तें अविनाशच असतें. १७७. अथवा आटणाऱ्या अलंकारांत जसें न आटणारें सोनें असतें; त्याप्रमाणें मरणाऱ्या जीवांच्या आकारांत जें अमर आहे; १७८.

ज्यास अव्यक्त, 'अक्षर' असें म्हणतात, त्यालाच परम (अत्यंत श्रेष्ठ) गति म्हणतात. ज्याप्रत गेल्यावर (प्राणी जन्ममृत्यूमध्यें) परत येत नाहींत, तें माझें अत्यंत श्रेष्ठ असें स्वरूप आहे. २१.

ज्याला (परब्रह्माला) कौतुकानें अव्यक्त असें म्हटलें, तर त्याची स्तुति होते असें वाटत नाहीं; कारण तें मनबुद्धीला अगोचर आहे म्हणून; १७९. अर्जुना, आणि आकाराला आल्यानें ज्याचें निराकारपण जात नाहीं व आकाराच्या लोपानें ज्याची नित्यता बिघडत नाहीं, १८०. म्हणून ज्याला (ब्रह्माला) अक्षर असें म्हणावें, तसेंच ज्यास (ब्रह्मास) अक्षर असें म्हटलें असतां ज्याचा बोधही उत्पन्न होतो व ज्याच्या पलीकडे कांहीं एक विस्तार दिसण्यांत येत नाहीं, म्हणून ज्यास परमगति असें म्हणतात. १८१. परंतु संपूर्ण देहरूपी नगरामध्यें (जो परमात्मा) निजल्यासारखा आहे (उदासीन आहे); कारण कीं तो (परमात्मा) कोणताही व्यापार करीत नाहीं व करवीतही नाहीं म्हणून. १८२. एऱ्हवीं शरीराचे जे व्यापार आहेत, त्यांपैकीं अर्जुना, एकही थांबत नाहीं; तर दहाही इंद्रियांचे व्यवहार सुरूच आहेत. १८३. मनरूपी चव्हाट्यावर विषयरूप बाजार उघडलेले असतात व त्यापासून होणाऱ्या सुखदुःखरूपी प्राप्तींतील राजाच्या हक्काचा मुख्य हिस्सा आंत जीवालाही पावता होतो. १८४. परंतु राजा सुखानें निजला असतां, ज्याप्रमाणें देशाचा व्यापार थांबत नाहीं, तर त्याची प्रजा आपापल्या इच्छेप्रमाणें व्यापार करीतच असते. १८५. त्याप्रमाणें बुद्धीची जाणण्याची क्रिया, अथवा मनाची संकल्पविकल्परूप घेण्यादेण्याची क्रिया, इंद्रियांचे व्यापार व प्राणवायूची हालचाल, १८६. ही सर्व देहक्रिया (परमात्म्यानें स्वतः) न करवितां चांगली होते. ज्याप्रमाणें सूर्य हा स्वतः लोकांस व्यापार करावयास न लावतां लोकांचे व्यापार चांगले चालतात. १८७.

ज्याच्यामध्यें ही सर्व भूतें आहेत व ज्यानें हें सर्व (विश्व) व्यापिलेलें आहे, तो पर (श्रेष्ठ) पुरुष, हे पार्था, अनन्य (एकनिष्ठ) भक्तीनें प्राप्त होणारा आहे. २२.

अर्जुना, याप्रमाणें (आत्मा) हा शरीरांत निजल्यासारखा असा आहे, म्हणून ज्याला पुरुष असें म्हणतात, हें समज. १८८. आणि पुरुष असें म्हणण्याचें दुसरें कारण असें कीं, हा आत्मा एकपत्नीव्रतानें, पतिव्रता जी प्रकृति, तिच्याशीं असतो. या कारणास्तव देखील ज्याला पुरुष असें म्हणतां येतें. १८९. चारी वेदांचा विस्तार त्या परमात्म्याचें आंगणही पाहूं शकत नाहीं. हें चैतन्य आकाशाचें पांघरूण आहे, पहा. १९०. वर सांगितल्याप्रमाणें या पुरुषाचें स्वरूप आहे, असें जाणून श्रेष्ठ योगी ज्याला (पुरुषाला) सर्वांत पलीकडची गति असें म्हणतात; आणि जो परमात्मा एकनिष्ठ भक्ताचें घर शोधीत येतो, १९१. जे कायावाचामनानें परमात्म्याबांचून दुसरी गोष्ट ऐकत नाहींत, त्या एकनिष्ठांच्या एकनिष्ठतेचें पीक देणारें जें चांगलें शेतच आहे. १९२. हें त्रैलोक्यच पुरुषोत्तम आहे, अशी ज्यांची खरी समजूत आहे, त्या आस्तिकांचें, अर्जुना, (जें परमात्मस्वरूप) नेहमीं राहण्याचें ठिकाण आहे, १९३. जें (परमात्मस्वरूप) गर्वरहित पुरुषांचें मोठेपण आहे, जें गुणातीत पुरुषांचें ज्ञान आहे व निरिच्छ पुरुषांस जें सुखाचें राज्य आहे; १९४. जें (परमात्मरूप) संतोषी पुरुषांस वाढलेलें ताट आहे; जे संसाराची चिंता न करणारे असून ज्यांना माझ्याबांचून दुसरा कोणी मालक नाहीं. अशा भक्तांचें मायपोट आहे आणि ज्या गांवाला पोंहचण्याला भक्ति हीच सरळ वाट आहे, १९५. अर्जुना, हें एकेक सांगून व्यर्थ विस्तार कशाला करूं? परंतु ज्या ठिकाणीं गेलें असतां तें ठिकाणच आपण होतो. १९६. थंडीच्या झुळुकांनीं जसें ऊनपाणीच थंड होतें अथवा सूर्यासमोर अंधार आला असतां तो अंधारच प्रकाश बनतो; १९७. अर्जुना, त्याप्रमाणें ज्या परमात्मस्वरूपरूपीं मुक्कामाला हा (दुःखरूप देहबुद्ध्यादिसंघातरूपी) संसार पोंहोंचला असतां, तो संसार सर्व बाजूंनीं मोक्षच (दुःखशून्य व सुखरूप असा) होऊन रहातो. १९८. तरी ज्याप्रमाणें लाकूड अग्नींत गेलें म्हणजे अग्निरूपच होतें व तें अग्निरूप झाल्यावर पुनः लाकूडपणानें निराळें काढूं म्हटलें, तर तें जसें निराळें निघतच नाहीं, १९९. अथवा

साखरेचा माघौता । बुद्धिमंतपणेंही करितां । परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ॥ २०० ॥ लोहाचें कनक जहालें । हें एकें परिसें केलें । आतां आणिक कैचें तें गेलें । लोहत्व आणी ॥ १ ॥ म्हणोनि तूप होऊनि माघौतें । जेवीं दुधपणा न येचि निरुतें । तेविं पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥ २ ॥ तें माझें परम । साचोकारें निजधाम । हें आंतुवट तुज वर्म । दाविजत असे ॥ ३ ॥

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः । प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

तेवींचि आणिकेंही एकें प्रकारें । हें जाणतां आहे सोपारें । तरि देह सांडितेनि अवसरें । जेथ मिळती योगी ॥ ४ ॥ अथवा अवचटें ऐसें घडे । जे अनवसरें देह सांडे । तरि माघौतें येणें घडे । देहासीचि ॥ ५ ॥ म्हणोनि काळशुद्धी जरी देह ठेविती । तरी ठेवितखेवीं ब्रह्मचि होती । एऱ्हवीं अकाळीं तरी येती । संसारा पुढती ॥ ६ ॥ तैसें सायुज्य आणि पुनरावृत्ती । ये दोन्ही अवसराआधीन आहाती । तो अवसरु तुजप्रती । प्रसंगें सांगों ॥ ७ ॥ तरि ऐकें गा सुभटा । पातलिया मरणाचा माजिवटा । पांचे आपुलालिया वाटा । निघती अंतीं ॥ ८ ॥ ऐसा वरिपडिला प्रयाणकाळीं । बुद्धीतें भ्रमु न गिळी । स्मृति नव्हे आंधळी । न मरे मन ॥ ९ ॥ हा चेतनावर्गु आथवा । मरणीं असे टवटवा । परि अनुभविलिया ब्रह्मभावा । गंवसणी होऊनि ॥ २१० ॥ ऐसा सावध हा समवावो । आणि निर्वाणवेऱ्हीं निर्वाहो । हें तरीच घडे जरी सावावो । अग्नीचा आथी ॥ ११ ॥ पाहा पां वारेन कां उदकें । जैं दिविंयाचें दिवेपण झांके । तैं असतीच काय देखे । दिठी आपुली ॥ १२ ॥ तैसें देहांतींचेनि विषमवातें । देह आंत बाहेरि श्लेष्मा आते । तैं विझोनि जाय उजितें । अग्नीचें जेव्हां ॥ १३ ॥ ते वेळीं प्राणासीचि प्राणु नाहीं । तेथ बुद्धि असोनि करील काई । म्हणोनि अग्नीविण देहीं । चेतना न थरे ॥ १४ ॥ अगा देहींचा अग्नि जरी गेला । तरी देह नव्हे चिखलु वोला । वायां आयुष्यवेळु आपुला । आंधारां गिंवसी ॥ १५ ॥ आणि मागील स्मरण आघवें । तें तेणें अवसरें सांभाळावें । मग देह त्यजूनि मिळावें । स्वरूपीं कीं ॥ १६ ॥ तंव तया देहश्लेष्माचां चिखलीं । चेतनाचि बुडोनि गेली । तेथ मागिली पुढिली हे ठेली । आठवण सहजें ॥ १७ ॥ म्हणोनि आदीचि अभ्यासु जो केला । तो मरण न येतांचि निमोनि गेला । जैसें ठेवणें न दिसतां मालवला । दीपु हातींचा ॥ १८ ॥ आतां असो हें सकळ । जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ । तया अग्नीचें प्रयाणीं बळ । संपूर्ण आथी ॥ १९ ॥

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

आंत अग्निज्योतीचा प्रकाशु । बाहेरी शुक्लपक्षु परी दिवसु । आणि सामासांमाजीं मासु । उत्तरायण ॥ २२० ॥ ऐसिया समायोगाची निरुती । लाहोनि जे देह ठेविती । ते ब्रह्मविद होती । परब्रह्म ॥ २१ ॥ अवधारीं गा धनुर्धरा । येथवरी सामर्थ्य यया अवसरा । तेवींचि हा उजू मार्ग स्वपुरा । यावयासी ॥ २२ ॥ एथ अग्नी हें पहिलें पायतरें । ज्योतिर्मय हें दुसरें ।

उंसाची साखर झाल्यावर, त्या साखरेचा मूळचा ऊंस करण्याचें जरी बुद्धिमान पुरुषानें मनांत आणलें, तरी पुनः ऊंस होणें ज्याप्रमाणें शक्य नाहीं, २००. परिसानें लोखंडाचें सोनें केलें; आतां आणिक दुसरा पदार्थ कोठें आहे, कीं जो त्याचा नाहींसा झालेला लोखंडपणा पुनः आणील ? २०१. म्हणून ज्याप्रमाणें दुधाचें तूप झाल्यावर, पुनः त्या तुपाला दूधपणा खात्रीनें येत नाहीं, त्याप्रमाणें ज्या परमात्मस्वरूपास पावल्यावर पुनः जन्म नाहीं; २०२. असें जें स्वरूप, तें माझें स्वतःचें खरोखर श्रेष्ठ ठिकाण आहे; ही अंतरंग गुह्यगोष्ट तुला दाखविली जात आहे. २०३.

हे भरतश्रेष्ठा, कोणत्या कालीं देहावसान झालें असतांना योगी अनावृत्तीप्रत जातात (जन्ममरणापासून मुक्त होतात) व कोणत्या कालीं देहावसान झालें असतांना आवृत्तीप्रत (पुनर्जन्माप्रत) जातात, तो काल सांगतों, २३.

त्याचप्रमाणें आणखीही एका प्रकारानें हें (निजधाम) जाणणें सोपें आहे. तरी योगी लोक योग्य कालीं देहत्याग करून जेथें मिळतात (तें माझें निजधाम होय.) २०४. अथवा अकस्मात असें घडतें कीं, योग्याचा देह अयोग्यकालीं पडला, तर त्याला पुनः जन्माला यावें लागतें. २०५. म्हणून योग्यांनीं योग्य कालीं देह ठेवला, तर देह ठेवतांक्षणींच ब्रह्म होतात; एऱ्हवीं त्यांनीं जर अयोग्य कालीं देह ठेवला, तर ते पुनः संसाराला येतात. २०६. त्याप्रमाणें मद्रूप होणें आणि जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडणें, हे दोन्ही ठराविक मरणवेळेच्या स्वाधीन आहेत. आतां प्रसंगानुसार त्याच कालासंबंधानें विचार तुला सांगतों. २०७. तर अर्जुना, ऐक. मरणाची गुंगी प्राप्त झाली असतां शेवटीं पंचमहाभूतें आपआपल्या वाटेनें निघतात.२०८. अशा मरणकाल प्राप्त झाला असतांना बुद्धीला भ्रम गिळीत नाहीं, स्मरणशक्ति आंधळी होत नाहीं; आणखी मन मरत नाहीं, २०९. याप्रमाणें हा सर्व इंद्रियसमुदाय मरणसमयीं टवटवीत असतो, पण तो अनुभवलेल्या ब्रह्मस्थितीला आकलन केल्यामुळें प्रसन्न असतो. २१०. याप्रमाणें हा इंद्रियसमुदाय सावध असणें आणि तो त्याचा सावधपणा शेवटपर्यंत टिकणें, हें जर अग्नीचें साह्य असेल तरच घडेल. २११. असें पहा कीं, वाऱ्यानें अथवा पाण्यानें जेव्हां दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो, तेव्हा असलेलीच आपली दृष्टि पाहूं शकते काय? २१२. त्याप्रमाणें देह पडण्याच्या वेळीं होणाऱ्या त्रिदोषानें देह आंतबाहेर कफानें व्यापला जातो, त्या वेळीं जेव्हां अग्नीचें तेज विझून जातें. २१३. त्या वेळीं प्राणालाच क्रियाशक्ति नसते, मग तेथें बुद्धि असून काय करील ? म्हणून अग्नीशिवाय शरीरांत चेतना (ज्ञानकला) टिकत नाहीं. २१४. अरे अर्जुना, जर देहांतील अग्नि गेला, तर तो देह नाहीं, ओला चिखल आहे; असें झालें म्हणजे आयुष्य आपला वेळ व्यर्थ अंधारांत शोधीत रहातें. २१५. आणि वास्तविक पाहिलें असतां, मागील जें सर्व स्मरण आहे, तें त्या वेळीं तसेंच ठेवावयाचें असतें आणि मग देह टाकून परमात्मस्वरूपीं मिळावयाचें असतें. २१६. परंतु देहाला ज्या कफानें व्यापलें, त्या कफाच्या चिखलांत चेतना बुडून गेली, तेथें मागील (केलेल्या अभ्यासाची) पुढील (स्वरूपस्थितीची) आठवण स्वाभाविक रीतीनें थांबली. २१७. म्हणून मरणाच्या अगोदरच जो जन्मभर अभ्यास केला, तो मरण येण्याच्या पूर्वी नाहींसा झाला. ज्याप्रमाणें ठेवलेली वस्तु पाहण्याकरितां हातांत घेतलेला दिवा, ती वस्तु दिसण्यापूर्वीच, मालवून जावा त्याप्रमाणें. २१८. आतां हें सगळें असूं दे. (सारांश) असें समज कीं, ज्ञानाला मूळ कारण अग्नि आहे. त्या अग्नीचें मरणकाळीं संपूर्ण बळ असावें. २१९.

(आंत) अग्नि व ज्योतीचा प्रकाश (बाहेर) दिवस, शुक्लपक्ष आणि उत्तरायणाचे सहा महिने, यांचे ठिकाणी (या स्थितींत) ज्यांचें देहावसान होतें, ते ब्रह्मवेत्ते जन ब्रह्माप्रत जातात. २४.

देहांत अग्नीचा व ज्योतीचा प्रकाश असून, बाहेर शुक्लपक्ष परंतु दिवस, आणि उत्तरायणांतील सहा महिन्यांपैकीं एक महिना, २२०. अशा या चांगल्या जुळून आलेल्या योगाची प्राप्ति होऊन, जे योगी आपला देह सोडतात, ते ब्रह्मवेत्ते परब्रह्म होतात. २२१. अर्जुना, ऐक, या कालाचें येथपर्यंत सामर्थ्य आहे. आणि त्याचप्रमाणें आत्मस्वरूपाकडे येण्यास हा सरळ मार्ग आहे. २२२. येथें अग्नि ही पहिली पायरी आहे व ज्योतीचें स्वरूप ही दुसरी पायरी आहे, दिवस ही तिसरी पायरी आणि

दिवस जाणें तिसरें । चौथें शुक्लपक्ष ॥ २३ ॥ आणि सामास उत्तरायण । तें वरचील गा सोपान । येणें सायुज्यसिद्धिसदन । पावती योगी ॥ २४ ॥ हा उत्तम काळु जाणिजे । यातें अर्चिरा मार्गु म्हणिजे । आतां अकाळु तोही सहजें । सांगेन आईक ॥ २५ ॥

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

तरि प्रयाणाचेनि अवसरें । वातुश्लेष्मु सुभरे । तेणें अंतःकरणीं आंधारें । कोंदलें ठाके ॥ २६ ॥ सर्वेंद्रियां लांकुड पडे । स्मृति भ्रमामाजीं बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण ॥ २७ ॥ अग्नीचें अग्निपण जाये । मग तो धूमाचि अवघा होये । तेणें चेतना गिंवसिली ठाये । शरीरींची ॥ २८ ॥ जैसें चंद्राआड आभाळ । सदट दाटे सजळ । मग गडद ना उजाळ । ऐसें झांवळें होय ॥ २९ ॥ कां मरे ना सावध । ऐसें जीवितासि पडे स्तब्ध । आयुष्य मरणाची मर्याद । वेळु ठाकी ॥ २३० ॥ ऐसी मनबुद्धिकरणीं । सभोंवतीं धूमाकुळाची कोंडणी । तेथ जन्में जोडलिये वाहणी । युगचि बुडे ॥ ३१ ॥ हां गा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें आहे । म्हणऊनि प्रयाणीं तंव होये । येतुली दशा ॥ ३२ ॥ आणि देहाआंतु ऐसी स्थिती । बाहेरि कृष्णपखु वरि राती । आणि सामासही ते वोडवती । दक्षिणायन ॥ ३३ ॥ इये पुनरावृत्तीचीं घराणीं । आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धीची काहाणी । कैसेनि आइके ॥ ३४ ॥ ऐसा जयाचा देह पडे । तया योगी म्हणोनि चंद्रवरी जाणें घडे । मग तेथूनि मागुता बहुडे । संसारा ये ॥ ३५ ॥ आम्हीं अकाळु जो पांडवा । म्हणितला तो हा जाणावा । आणि हाचि धूम्रमार्गु गांवा । पुनरावृत्तीचिया ॥ ३६ ॥ येर तो अर्चिरा मार्गु । तो वसता आणि असलगु । साविया स्वस्त चांगु । निवृत्तीवरी ॥ ३७ ॥

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते । एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥

ऐसिया अनादि या दोन्ही वाटा । एकी उजू एकी अव्हांटा । म्हणऊनि बुद्धिपूर्वक सुभटा । दाविलिया तुज ॥ ३८ ॥ कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें वोळखावें । हिताहित जाणावें । हिताचिलागीं ॥ ३९ ॥ पाहें पां नाव देखतां बरवी । कोणी आड घाली काय अथावीं । कां सुपंथ जाणोनिया अडवीं । रिगवत असे ॥ २४० ॥ जो विष अमृत वोळखे । तो अमृत काय सांडूं शके । तेविं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा न वचे ॥ ४१ ॥ म्हणोनि फुडें । पारखावें खरें कुडें । पारखिलें तरी न पडे । अनवसरें कहीं ॥ ४२ ॥ एऱ्हवीं देहांतीं थोर विषम । या मार्गाचें आहे संभ्रम । जन्में अभ्यासिलियाचें हन काम । जाईल वायां ॥ ४३ ॥ जरी अर्चिरा मार्गु चुकलिया । अवचटें धूम्रपंथें पडलिया । तरी संसारपाशीं जुंतलिया । भंवताचि असावें ॥ ४४ ॥ हे सायास देखोनि मोठे । आतां कैसेनि पां एकवेळ फिटे । म्हणोनि योगमार्ग गोमटे । शोधले दोन्ही ॥ ४५ ॥ तंव एकें ब्रह्मत्वा जाइजे । आणि एकें पुनरावृत्ती येइजे । परि दैवगत्या जो लाहिजे । देहांतीं जेणें ॥ ४६ ॥ ते वेळीं

शुक्लपक्ष ही चौथी पायरी असें समज. २२३. आणि उत्तरायणांतील सहा महिने ही वरची पायरी आहे. या मार्गानें योगी तद्रूपतासिद्धीच्या घराला येतात. २२४. हा उत्तम काळ आहे असें समज. याला अर्चिरामार्ग म्हणावें. आतां अकाळ जो आहे, तोही ओघानें सांगतों, ऐक. २२५.

( आंत ) धूमयुक्त अग्नि, त्याचप्रमाणें ( बाहेर ) रात्र, कृष्णपक्ष आणि दक्षिणायनाचे सहा महिने, यांचे ठिकाणीं ( या स्थितींत ज्याचें देहावसान होतें तो ) योगी चंद्रलोकापर्यंत जाऊन परत येतो. २५.

तरी मरणाच्या वेळीं वात व कफ ( शरीरामध्यें ) फार दाटतो, त्यामुळें अंतःकरणांत अंधार गच्च भरून रहातो. २२६. सर्व इंद्रियें लाकडासारखीं जड होतात, स्मरणशक्ति भ्रमांत बुडते, मन वेडें होतें व प्राण कोंडतो. २२७. अग्नीची उष्णता जाते, मग तो सर्व धूरच होतो, त्या धुरानें चेतना शरीरांत कोंडलेली रहाते. २२८. ज्याप्रमाणें पाण्यानें भरगच्च भरलेले ढग चंद्राच्या आड दाट यावेत, मग त्या वेळीं गडद अंधकारही नसतो आणि स्वच्छ उजेडही नसतो, असा झुंजुमुंजु उजेड असतो. २२९. याप्रमाणें तो धड मेलेला नसतो व शुद्धीवरही नसतो, अशी जीवितास स्तब्धता येते. आयुष्य मरणाच्या वेळेची वाट पहात राहतें. २३०. याप्रमाणें मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या सभोंवतीं अशी ही धुराच्या समुदायाची कोंदणी होते, तेव्हां जन्मभर संपादन केलेला स्वरूपअभ्यासाचा मार्ग संपूर्ण नष्ट होतो. २३१. बाबा अर्जुना, जन्मभर केलेला हातचा अभ्यास जेव्हां जातो, त्या वेळीं दुसऱ्या प्राप्तीची गोष्ट कशाला मनांत आणावयाला पाहिजे ? म्हणून मरणकाळीं तर अशी अवस्था होते. २३२. व अशी ही देहाच्या आंत स्थिति होऊन बाहेर वद्य पंधरवडा शिवाय रात्र आणि दक्षिणायनांतील सहा महिनेही येतात. २३३. हीं वारंवार फेऱ्यांत आणणारीं ठिकाणें, ज्याच्या मरणाच्या वेळेला सर्वच एकत्र जुळून येतात, तो ब्रह्मप्राप्तीची गोष्ट कशी ऐकेल ? २३४. अशा रीतीनें ज्याचा देह पडतो, तो योगी असल्याकारणानें त्याचें चंद्रलोकापर्यंत जाणें घडतें. नंतर तेथून तो माघारा फिरून पुनः मृत्युलोकांत जन्मास येतो. २३५. अर्जुना आम्ही अकाळ म्हणून जा म्हटला, तो हाच, असें समज; आणि हाच पुनर्जन्मरूप गांवास येण्याचा धूम्रमार्ग आहे. २३६. दुसरा जो अर्चिरादिमार्ग, तो वाहाता आणि सुगम आहे; आणि तो सहज कल्याणकारक असून मोक्षाची प्राप्ति करून देण्यास चांगला आहे. २३७.

जगाचें प्रकाशरूप आणि अंधकाररूप ( म्हणजे अर्चिरादि आणि धूम्र ) असे हे दोन मार्ग नित्य आहेत. एकानें मनुष्य अनावृत्तीप्रत जातो पण दुसऱ्यानें आवृत्तीप्रत परत येतो. २६.

हे अर्जुना, अशा या अनादि कालापासून चालत असलेल्या दोन्ही वाटा आहेत. त्यांपैकीं एक सरळ व एक आडमार्गाची आहे. म्हणून तुला या दोन्ही वाटा मुद्दाम दाखविल्या आहेत. २३८ कारण कीं, आपल्या हिताकरितांच योग्य-अयोग्य मार्ग पहावे, खरें-खोटें ओळखावें आणि आपलें हित कशांत आहे व अनहित कशांत आहे, हें समजावें. २३९. असें पहा कीं, चांगली नाव डोळ्यांपुढें दिसत असून ( तीमध्यें न बसतां ) कोणी अथांग पाण्यांत उडी घालील काय ? अथवा राजमार्ग माहीत असून, कोणाच्यानें आडरानांत शिरवेल काय ? २४०. विष व अमृत हीं जो ओळखतो, त्याच्यानें अमृत टाकवेल काय ? त्याचप्रमाणें जो सरळ मार्ग जाणतो, तो आडमार्गाला जाणार नाहीं. २४१. म्हणून खरें व खोटें, याची पक्की परीक्षा करावी व अशी परीक्षा केली असतां कधींही अनुचित होणार नाहीं, ( अकालीं देह पडणार नाहीं. ) २४२. तसें केलें नाहीं तर ( वर सांगितल्याप्रमाणें खऱ्याखोट्याची पारख केली नाहीं तर ) मरणकाळीं या भ्रांतिकारक धूम्रमार्गाचें मोठें संकट आहे, कीं जन्मभर ज्या हेतूनें अभ्यास केला तो हेतु व्यर्थ जाईल. २४३. अर्चिरादिमार्ग चुकून, अकस्मात् जर धूम्रमार्गांत पडलें, तर संसाराच्या घातीला जुंपले जाऊन फिरतच रहावें लागेल. २४४. हे ( पुनः पुनः जन्ममरणाचे ) मोठे सायास पाहून, आतां हे सायास कशानें एकवार दूर होतील ( हें पहावें, ) म्हणून हे दोन्ही योगमार्ग नीट रीतीनें पाहिले. २४५. तर एका मार्गानें ( अर्चिरादि मार्गानें ) ब्रह्मत्वास जातां येतें, आणि एकानें ( धूम्रमार्गानें ) पुनर्जन्माला येणें होतें. परंतु प्रारब्धानें, मरणकाळीं ज्याला जो मार्ग वांट्याला येईल, ( त्याला त्या मार्गाची गति मिळेल. ) २४६. ( मरणकाळीं अर्चिरादिमार्ग वांट्याला

म्हणितलें हें नव्हे । वायां अवचटें काय पावे । देह जाऊनि वस्तु होआवे । मार्गेंच कीं ॥ ४७ ॥ तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों । कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ॥ ४८ ॥ मज तरंगपण असे का नसे । ऐसें हें उदकासी कहीं प्रतिभासे । तें भलतेव्हां जैसें तैसें । उदकाचि कीं ॥ ४९ ॥ तरंगाकारें न जन्मेचि । ना तरंगलोपें न निमेचि । तेवि देहीं जे देहेंचि । वस्तु जाहले ॥ २५० ॥ आतां शरीराचें तयाचिया ठाईं । आडनांवही उरलें नाहीं । तरी कोणें काळें काई । निमे तें पाहें पां ॥ ५१ ॥ मग मार्ग तैं कासया शोधावे । कोणें कोठूनि कें जावें । जरी देशकालादि आघवें । आपणचि असिजे ॥ ५२ ॥

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन । तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

आणि हां गा घटु जे वेळीं फुटे । ते वेळीं तेथिंचें आकाश लागे नीटे वाटे । वाटा लागे तरि गगना भेटे । एऱ्हवीं चुके ॥ ५३ ॥ पाहें पां ऐसें हन आहे । कीं तो आकारुचि म्हणों जाये । येर गगन तें गगनींचि आहे । घटत्वाहि आधीं ॥ ५४ ॥ ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचें सांकडें । तया सोहंसिद्धा न पडे । योगियांसी ॥ ५५ ॥ याकारणें पंडुसुता । तुवां होआवें योगयुक्ता । येतुलेनि सर्वकालीं साम्यता । आपणपां होईल ॥ ५६ ॥ मग भलतेथ भलतेव्हां । देहबंधु असो अथवा जावा । परि अबंधा नित्य ब्रह्मभावा । विघड नाहीं ॥ ५७ ॥ तो कल्पादि जन्मा नागवे । कल्पांतीं मरणें नाप्लवे । माजि स्वर्गसंसाराचेनि लाघवें । झकवेना ॥ ५८ ॥ येणें बोधें जो योगी होये । तयासी या बोधाचीचि नीटपण आहे । कां जे भोगातें पेलूनि पाहें । निजरूपा ये ॥ ५९ ॥ पै गा इंद्रादिकां देवां । जयां सर्वस्वें गाजती राणिवा । तें सांडणें मानूनि पांडवा । डावली जो ॥ २६० ॥

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाऽऽद्यम् ॥ २८ ॥

जरी वेदाध्ययनाचें जालें । अथवा यज्ञाचें शेतचि पिकलें । का तपोदानांचें जोडलें । सर्वस्व हन जें ॥ ६१ ॥ तया आघवयांचि पुण्याचा मळा । भारु आंतौनि जया ये फळा । जें परब्रह्म निर्मळा । सांठि न सरे ॥ ६२ ॥ जें नित्यानंदाचेनि मानें । उपमेचा कांटाळां न दिसे सानें । पाहा पां वेदयज्ञादि साधनें । जया सुखा ॥ ६३ ॥ जें विटे ना सरे । भोगितयाचेनि पवाडें पुरे । पुढती महासुखाचें सोयरें । भावंडचि ॥ ६४ ॥ ऐसें दृष्टीचेनि सुखपणें । जयासी अदृष्टाचें बैसणें । जें शतमखींही आंगवणें । नोहेचि एका ॥ ६५ ॥ तयातें योगीश्वर अलौकिकें । दिठीचेनि हाततुकें । अनुमानिती कौतुकें । तंव हलुवट आवडे ॥ ६६ ॥ मग तया सुखाची किरीटी । करूनियां गा पाउटी । परब्रह्माचिये पाठीं । आरूढती ॥ ६७ ॥ ऐसें चराचरैकभाग्य ।

येतो कां धूम्रमार्ग वाट्याला येतो, हें अनिश्चित आहे. असें पाहून अर्जुन खिन्न झाला.) त्या वेळीं (भगवंत) म्हणाले, देह जाऊन अर्चिरादिमार्गानें ब्रह्म होईल हें व्यर्थ आहे; कारण, प्रारब्धवशात् अकस्मात् काय प्राप्त होईल कोणास ठाऊक ? ( तें कळत नाहीं. ) म्हणून हें नको. २४७. तर आतां देह असो अथवा जावो, आम्ही तर केवळ ( ब्रह्मच ) आहोंत. कारण कीं, जसें दोरीवर भासलेला सर्पपणा दोरीच्या दृष्टीनें मिथ्या आहे. २४८. मला तरंगपणा आहे किंवा नाहीं, असें पाण्याला केव्हां तरी वाटतें काय ? तें पाणी वाटेल तेव्हां जसेंच्या तसें पाणीच असतें. २४९. लाटेच्या व्यक्त होण्यानें पाणी जन्मत नाहीं; अथवा लाट नाहींशी झाली तरी तें पाणी मरत नाहीं. त्याप्रमाणें जे देहवान् असतांना देहानेंच ब्रह्म झाले. २५०. आतां त्या तत्ववेत्त्याच्या ठिकाणीं शरीराचें आडनांवही उरलें नाहीं. तर बाबा अर्जुना, असा विचार कर कीं, कोणत्या काळेंकरून काय नाश पावणार आहे ? २५१. जर सर्व देश व काल आपणच आहोंत, तर मग अर्चिरादि अथवा धूम्रमार्ग हे कशाला शोधावे ? आणि कोणी कोठून कोठें जावयाचें ? २५२.

हे पार्था, हे दोन मार्ग जाणणारा कोणताहि योगी मोह पावत नाहीं. म्हणून अर्जुना, तूं सर्व कालामध्यें योगयुक्त हो. २७.

आणि अरे अर्जुना, घट ज्या वेळेला फुटतो, त्या वेळीं घटांतील आकाश नीट वाटेला लागतें व नीट वाटेला लागलें, तर महाकाशाला तें नेमकें मिळतें, नाहीं तर तें महाकाशाला मिळावयाचें चुकेल काय ? आम्ही म्हणतों असें आहे; पहा कीं, घटाचा आकारच नाहींसा होतो. वास्तविक पाहिलें तर घटपणाच्या आधींही आकाश आकाशाच्या ठिकाणींच आहे. २५४. अशा या बोधाच्या अनुकूलतेनें मार्गामार्गाचें संकट, 'मी ब्रह्म आहे' असें ज्ञान झालेल्या त्या योग्यांना पडत नाहीं. २५५. अर्जुना, म्हणून तूं योगसंपन्न हो. एवढ्यानें स्वतःच्या ठिकाणीं सर्वकाळ स्वरूपसाम्यता होईल. २५६. मग वाटेल तेथें, वाटेल तेव्हां, देहाचा पाश असो अथवा जावो, परंतु बंधरहित अखंड ब्रह्मस्थितींत बिघाड येणार नाहीं २५७. तो कल्पाच्या आरंभीं जन्मांत सांपडत नाहीं, कल्पाच्या अंतीं तो मरणानें बुडत नाहीं व मधल्या स्थितींत, म्हणजे स्थितिकालीं, स्वर्ग आणि संसार यांच्या मोहानें तो फसला जात नाहीं. २५८. या बोधानें जो योगी होतो, त्याला या बोधाचाच सरळपणा असतो. कारण कीं, तो स्वर्ग व संसारांतील भोगांना विचारानें वजन करून पाहतो व ते असार म्हणून त्यांचा त्याग करून तो आत्मस्वरूपाला येतो. २५९. बा अर्जुना, इंद्रादिक देवांना त्यांचें सर्वस्व म्हणून जीं हीं राज्यें प्रसिद्ध आहेत, तीं ओवाळून टाकलेल्या बळीप्रमाणें त्याज्य समजून, त्यांस तो तुच्छ म्हणून टाकतो. २६०.

वेदाध्ययनामध्यें, यज्ञामध्यें, तपश्चर्येमध्यें अथवा दानामध्यें जें जें पुण्यकारक फल सांगितलेलें आहे, त्या सर्व फलांहून अधिक फल हें ( जीव व ब्रह्म यांचें ऐक्यरूपी ज्ञान ) आहे; हें जाणून योगी त्यांस ( वरील वेदाध्ययनादिकांच्या योगानें प्राप्त होणारी स्वर्गसुखासारखीं फलें त्यांस ) मागें टाकून जातो आणि अत्यंत श्रेष्ठ अशा स्थानाप्रत जातो. २८.

जरी वेदाच्या अध्ययनानें मिळणारें पुण्य प्राप्त झालें अथवा यज्ञरूप शेतच पिकलें, किंवा तपाचें अथवा दानाचें असलेलें सर्वस्व पुण्य मिळालें. २६१. ( तरी ) त्या सर्वच पुण्याच्या मळ्याला पुष्कळ पीक येऊन जे फळ येतें, तें फळ नित्यशुद्ध परमात्म्याच्या तुलनेला येत नाहीं. २६२. जें स्वर्गसुख, नित्यानंदाचे मानानें उपमेच्या ताजव्यांत घालून पाहिलें असतां, कमी दिसत नाहीं; पहा कीं, ज्या सुखाच्या प्राप्तीकरितां वेदयज्ञादि साधनें आहेत; २६३. जें ( स्वर्गसुख ) विटत नाहीं व संपत नाहीं, भोगणाऱ्याच्या इच्छा पुरवितें आणि शिवाय जें स्वर्गसुख ब्रह्मसुखाचें धाकटें भावंडच आहे, २६४. अशा तऱ्हेचें दिसण्यांतच जें सुख आहे व ज्याला अदृष्टाचा ( संस्काररूपानें असलेल्या धर्मांचा ) आधार आहे व जें शंभर यज्ञ करून देखील कित्येकांना साध्य होत नाहींच. २६५. त्या स्वर्गसुखाला योगीश्वर ( आपल्या ) लोकोत्तर विचारदृष्टिरूपी हातावर लीलेनेंच वजन करून, त्या स्वर्गसुखाच्या योग्यतेचें अनुमान करतात, तों तें त्यांस हलकें वाटतें. २६६. अर्जुना, मग ते योगीश्वर त्या स्वर्गसुखाची पायरी करून परब्रह्माच्या पटावर बसतात. २६७. याप्रमाणें स्थावरजंगमात्मक

जें ब्रह्मेशां आराधनायोग्य। योगियांचें भोग्य। भोगधन जें॥ ६८॥ जो सकळ कळांची कळा। जो परमानंदाचा पुतळा। जो जिवाचा जिव्हाळा। विश्वाचिया॥ ६९॥ जो सर्वज्ञतेचा बोलावा। जो यादव कुळींचा कुळदिवा। तो कृष्ण जी पांडवा-। प्रती बोलिला॥ २७०॥ ऐसा कुरु-क्षेत्रींचा वृत्तांतु। संजयो रायासी असे सांगतु। तेचि परियसा पुढां मातु। ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा॥ २७१॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ब्रह्माक्षरनिर्देशो नाम अष्टमोऽध्यायः।
[ ओव्या २७१. श्लोक २८. ]

ॐ श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



जगाचें जें एक भाग्य, जें ब्रह्मदेव व शंकर यांनाही आराधना करण्यास योग्य व जें योग्यांना भोगण्याला योग्य असें भोगरूपी ऐश्वर्य आहे, २६८. जो ( परमात्मा ) सर्व कळांची कळा आहे, जो परमानंदाची मूर्ति आहे व जो विश्वाच्या जीवाचा जिव्हाळा आहे. २६९. जो परमात्मा सर्वज्ञतेचें जीवन आहे. जो यादवांच्या कुलाचा कुलदीप आहे, महाराज, तो श्रीकृष्ण अर्जुनास असें बोलला. २७०. अशी ही कुरुक्षेत्रावरील हकीकत संजय धृतराष्ट्र राजाला सांगत होता, तीच गोष्ट पुढें तुम्हीं ऐका; असें निवृत्तीनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. २७१.



आणि जो अभिप्राय सातेंशती । तो एकलाचि नवमीं ॥ अ. १०–३१

भगवंताच्या बोलण्याचा अनुवाद करण्यास सुरुवात करण्यापूर्वी आपले गुरु श्रीनिवृत्तिनाथ यांना श्रीज्ञानदेव बहुतेक अध्यायांत नमन करतात. त्यांतील कांहीं नमनें उच्च व गूढ अशा तत्वज्ञान व अध्यात्मज्ञानचर्चेनीं भरलेलीं आहेत व कांहीं नमनें जरी दिसायला साधीं असलीं तरी तीं अत्यंत रसभरित अशीं आहेत. नवव्या अध्यायाचें नमन हें दुसऱ्या प्रकारच्या नमनांत मोडणारें आहे. नववा अध्याय हा गीतेच्या पूर्वखंडांतील शेवटचा व भक्तिप्रधान अध्याय असून त्याचें व्याख्यान सुरू करण्यापूर्वी श्रीज्ञानदेवांनीं आपल्या गुरूंना जें नमन केलें आहे त्यांत लेंकराच्या अंगीं असलेला लडिवाळपणाचा भाव उत्कटतेनें दिसून येतो. ज्ञानदेव आपल्यापुढें बसलेल्या संत-मंडळींना लडिवाळपणानें विनवितातः— 'लहान मूल बापाच्या ताटांत जेवायला बसतें आणि बापालाच जेऊं घालावयास लागतें पण त्यामुळें बापाला राग येत नाहीं, उलट आनंदच होतो व त्या आनंदाच्या भरांत तो आपण होऊन आपलें तोंड त्याच्या हातचा घांस घेण्याकरितां त्याच्यापुढें करितो. त्याप्रमाणें मीं तुमच्याशीं लगट करून बालबुद्धीनें गीतेचें व्याख्यान करण्याचा प्रयत्न करीत आहें व मजबद्दल तुमच्या अंतःकरणांत प्रेम असल्यामुळें तुम्हांला माझ्या बालबुद्धीचें कौतुक वाटून माझें कार्य आपण सिद्धीस नेत आहां. 'ज्ञानोबा हा आपला आहे' असा भाव तुमच्या ठिकाणीं असल्यामुळें मी जरी कांहीं बोललों तरी तुम्हाला राग न येतां उलट तुमचा संतोष अधिकच वाढेल. (१-१९). जें कार्य मी अंगिकारिलें आहे तें कांहीं सामान्य नाहीं. सर्वज्ञ अशा वेदाचीही मति त्या ठिकाणीं कुंठीत झाली आहे. हा गीतार्थ मराठी भाषेंत प्रतिपादन करण्याची माझी काय योग्यता आहे ? पण आपण जर कृपा केली तर माझ्या बुद्धींत अनेक अभिप्राय स्फुरूं लागतील, चंद्रकांत मणि पाझरतो हें खरें आहे, परंतु त्याला पाझरावयास लावण्याची हातवटी चंद्राचीच आहे. तसें मी गीतेचें व्याख्यान जरी करीत आहें तरी मला बोलावयास लावण्याची शक्ति आपल्या ठिकाणची आहे. (२०-३३). अशी श्रीनिवृत्तिनाथांना विनंती करून श्रीज्ञानदेव श्रीकृष्णाच्या बोलण्याचा अनुवाद करतात.

श्रीकृष्ण म्हणालेः–(सातव्या अध्यायांत सांगितलेला) ज्ञान-विज्ञानाचा विषय मी तुला पुनः सांगतों. ही माझी अगदीं जीवांतली गोष्ट आहे, पण तुझ्यासारखा सुमन, शुद्ध बुद्धीचा, अनिंदक व एकनिष्ठ जिज्ञासु भेटला म्हणूनच हें गूढ मी उघडें करीत आहे. (३४-४१). आपल्या स्तनांत असलेलें दूध कांहीं आईला आपल्याच ठिकाणीं ठेवावें असें वाटत नाहीं. आपल्या अनन्य लेंकराची तें पिऊन तृप्ति व्हावी यांतच तिचा खरा आनंद असतो. तसें तुझ्यासारखा दृढश्रद्धेनें ऐकणारा व त्याप्रमाणें आचरण करणारा श्रोता मला आज भेटला यांत मला किती संतोष झाला आहे ! हें ज्ञान झालें असतां असार संसार व सार आत्मा यांची वेगळीक होऊन जन्ममरणांतून सुटका होते. हें ज्ञान सर्व ज्ञानांत अत्यंत श्रेष्ठ, उत्तम व पवित्र असून तें प्रत्येकाच्या हृदयांतच आहे. परंतु गुरुमुखांतून त्याचें श्रवण केल्यानंतर त्याचा अनुभव येतो. (४२-५५). पण हा हृदयांतील जवळचा सुखाचा आश्रय सोडून बहिर्मुख लोक विषयसुखाच्या मागें लागतात. गाईच्या सडाच्या आंत असलेलें पवित्र व गोड दूध टाकून गोचिड तिच्या सडाच्या त्वचेतील अशुद्ध रक्तच जसें पीत असतात, त्याप्रमाणें सर्वांच्या हृदयांतील सर्व सुखाचा आगर असा मी त्याला टाकून देऊन मूर्ख लोक सुखाच्या आशेनें विषयांच्या मागें धांवत आहेत. हें त्यांचें करणें मृगजल पाहून तोंडांत असलेला अमृताचा घुटका थुंकून टाकण्यासारखें मूर्खपणाचें आहे. (५६-६२).

एऱ्हवीं मला पाहाण्याकरितां दूर कोठें जाण्याची गरज भारीच आहे ! मी सर्व ठिकाणीं व्यापून आहें. समोर दिसतें तें जग हा माझाच विस्तार नव्हे का ? थिजलेलें तूप वितळावें तसा निराकार असणारा मी मायेचा अंगीकार केला म्हणजे चित्रविचित्र अशा विश्वाच्या आकाराला येतों. हें सर्व विश्व जरी माझ्या ठिकाणीं उत्पन्न झालेलें दिसलें तरी यांत मी नाहीं हें पक्कें लक्षांत ठेव. (६३-७३) तसें म्हटलें तर विश्व माझ्या ठिकाणीं आहे हेंहि म्हणणें निरर्थकच आहे; कारण कल्पना टाकून जर पाहशील तर तुला आढळून येईल कीं ओतप्रोत सर्व मीच आहें. जें विश्व दिसतें तें पहाणाराच्या कल्पनेचा खेळ आहे. माझ्या शुद्ध स्वरूपाच्या ठिकाणीं कल्पनेमुळें भूतांचा भास होतो व ही कल्पना संपली कीं माझें मूळचें अखंड दंडायमान रूप आहेच. वायु आणि आकाश हे मूळचें एकच आहे; परंतु पंख्यानें हालचाल केल्यामुळें वायु आकाशापासून वेगळा झालेला दिसतो, त्याप्रमाणें कल्पनेची हालचाल झाली कीं, प्राणिमात्र माझ्या ठिकाणीं वेगळें दिसावयास लागतात. परंतु पंख्यामुळें वारा निराळा होतो, तसाच हा प्रकार आहे. ( ७४-९५ ) विश्वाच्या उत्पत्तीला कारण माया आहे. या मायेचा मी अंगीकार केल्यावर जग उत्पन्न होतें खरें, पण ही भूतसृष्टि उत्पन्न करण्याच्या कामांत मी कांहींएक करीत नाहीं अथवा करवीतही नाहीं. मी यापासून अगदीं दूर असून केवळ निमित्त मात्र आहें. भूतें माझ्या ठिकाणीं नाहींत व मीही त्यांच्या ठिकाणीं नाहीं हें महत्वाचें वर्म आहे. याचा अनुभव घ्यावयाचा असेल तर इंद्रियांची विषयांकडील धांव सोडून तीं अंतर्मुख केलीं पाहिजेत ( ९६-१३४ ). परंतु माझें यथार्थ स्वरूप न जाणतां मी देहधारी, जन्म मरणारा असेंच जर समजलें तर हा अनुभव येणार नाहीं. भाताची पेज पिऊन कोठें अमृताचा अनुभव येतो काय ? ( १३५-१७१ ). माझ्या यथार्थ स्वरूपाचें वर्म न जाणतां या अज्ञानी लोकांनीं कितीही शास्त्राध्ययन केलें तरी तें आंधळ्याच्या हातांत मोती देण्यासारखें व्यर्थ आहे. आशा, द्वेष, चिंता वगैरे तमोगुणांनीं हे लोक ग्रासलेले आहेत. ( १७२-१८५ ). यांच्या उलट जे दैवी गुणांनीं संपन्न, महात्मे असतात त्यांना सर्वत्र माझीच प्रतीति असते व नवल हें आहे कीं या अनुभवाला प्राप्त होऊन सुद्धां ते माझी सेवाच करीत रहातात. सतत माझें नामसंकीर्तन करीत विश्वांतील पातकें नाहींशी करून तें विश्व पुनीत करणें हाच त्यांचा रात्रंदिवस कार्यक्रम असतो. कीर्तनद्वारां त्यांनीं विश्वांतलीं दुःखें नाहींशीं करून तें विश्व महासुखानें भरून टाकलें. मी या कीर्तनांचे मेळाव्यांत हटकून सांपडतों.(१८६-२१०). अष्टांग-योगाच्या कठीण मार्गानें जाऊन स्वरूपसमरसतेचें उच्च स्थान प्राप्त करून घेणारे दुसरेही भक्त आहेत. पण याशिवाय माझ्या प्राप्तीचा एक सोपा पण श्रेष्ठ मार्ग आहे. ब्रह्मदेवापासून यःकश्चित् चिलटापर्यंत यच्चयावत सजीव अथवा निर्जीव सृष्टींत मीच भरून राहिलों आहें, अशा समजुतीनें नम्र होऊन सर्वत्र नमस्कार करीत राहणें हा त्या भक्तांचा स्वभावच बनला असतो, या नमस्कार-भक्तीमुळें मान-अभिमान नाहींसे होऊन ते मद्रूप होतात. ( २११-२२७ ).

आणखी एक माझ्या उपासनेचा मार्ग सांगतों. तो म्हणजे मागें चवथ्या अध्यायांत सांगितलेला ज्ञानयज्ञाचाच विचार. तो पुनः सांगतों. याचें कारण तुझी ऐकण्याची उत्कंठा तशीच आहे, शिवाय जगाचेंही त्यामुळें अनायासें कार्य होईल. द्वैत प्रतीतीस कारण जें अज्ञान त्याचा होम करून सर्व मीच एक आहें अशी एकत्वानें प्रतीति येणें हा या ज्ञानयज्ञरूप भक्तीचा एक प्रकार आहे. स्वप्नांतून जागा झालेला पुरुष स्वप्नांतील नाना विचित्र पदार्थ आपणच झालों होतों असें जसें पहातो, त्याप्रमाणेंच अज्ञानांतून जागा झालेला हा ज्ञानी भक्त भूतें, विषय वगैरे वेगळें न पाहतां सर्व विश्वच एकत्वानें पहातो. ( २२८–२४८ ). जगतांतील पदार्थ नामरूपानें एकमेकांपासून जरी भिन्न असले तरी त्या सर्वांत मला अन्वय दृष्टीनें जाणून घेण्याचा ज्ञानभक्तीचा दुसरा प्रकार आहे व तिसरा प्रकार म्हणजे वाटेल तेथें व वाटेल त्या स्थितींत मीच सर्वच आहें अशीच प्रतीति असणें. या भक्तांनीं जरी कृतीनें भजन केलें नाहीं तरी जें जें करतील तें अखंड भजनच असतें. सर्वच ठिकाणीं जर मीच एक आहें, तर कोणी व केव्हां माझें निराळें भजन करावयाचें ? ( २४९–२६३ ).

ही गोष्ट ज्ञानी भक्तांची झाली; परंतु जगतांत अज्ञानामुळे क्रतु, स्वधा, मंत्र, अग्नि, आहुति अशीं यज्ञांतील निरनिराळीं अंगें व उपांगें दिसतात; पण वास्तविक हें सर्व मीच आहे व यामुळें कोणतीही क्रिया माझ्याच ठिकाणीं सहजच अर्पण होत असते. सूर्य, इंद्र,वेद वगैरे माझींच रूपें आहेत. मारणारे व मरणारे हींही माझीं स्वरूपें आहेत. फार काय सांगूं; मी जेथें नाहीं अशी जागाच नाहीं ( २६४–२९९ ); परंतु दुर्दैव प्राण्यांचें कीं त्यांना मला ओळखतां येत नाहीं; व सुखप्राप्तीकरितां यज्ञादि साधनाच्या मागें लागलेले दिसतात. पण लक्षांत असूं दे कीं मला न जाणतां त्यांनीं कितीहि सत्कर्मे केलीं तरी तीं व्यर्थ आहेत. हे लोक शंभर यज्ञ करून क्षणिक अशा स्वर्गसुखाच्या मागें लागतात व माझ्याकडे येण्याचा रस्ता चुकतात. स्वर्गांतील सुख कितीही रमणीय व मनोहर दिसत असलें तरी पुण्याची पुंजी संपली कीं पुनः दुःखानें भरलेल्या मृत्युलोकांत स्वर्गसुख भोगणाऱ्यांची हकालपट्टी होते. ( ३००–३३३ ) स्वर्गाचा आडमार्ग टाकून देऊन जे अनन्य होऊन सर्व भावानें मलाच शरण येतात तेच माझे खरे भक्त आहेत. त्यांची योग्यता इतकी मोठी आहे कीं, त्यांची मी सेवा करतों, त्यांत मला कांहीं सुद्धां लाज वाटत नाहीं. त्यांचा योगक्षेमाचा सर्वभार मी घेतों ( ३३४–३४३ ). पण जगतांत कामना ठेवून इंद्रादि देवतांचे भजन करणारेच फार. हें भजन जरी शेवटीं मलाच प्राप्त होत असलें तरी त्या भक्तांची भावना तशी नसते, त्यामुळें त्यांच्या भावनेप्रमाणें देवत्व, पितृत्व वगैरेची त्यांना प्राप्ति होते. (३४४–३५८) पण अन्य देवतांचें भजन सोडून जे माझीच अनन्य भावानें उपासना करतात त्यांना सायुज्य मोक्ष मिळतो. माझी भक्ति करावयाची म्हणजे कांहीं मौल्यवान उपचार अर्पण करण्याचें संकट नाहीं, कारण मला स्वतःला काय कमी आहे ? परंतु आपलें ऐश्वर्य व वैभव यांच्या बळावर अभिमानानें माझ्याकडे लोक येतात पण जेथें श्रीशंकराचें तप पुरें पडत नाहीं, वेदासारख्याच्या जाणिवेचा लाग लागत नाहीं, देवी लक्ष्मीचें ऐश्वर्य अपुरें पडतें; तेथें सामान्य जीवानें आपलें ज्ञान, तप, ऐश्वर्य यांच्या जोरावर मला बांधून आणूं अशी आशा कशी करावी ? खरें पाहिलें तर परमार्थांत आपणाला तुच्छ लेखून आपलें सर्वस्व परमात्म्यावरून ओवाळून टाकलें पाहिजे. आपल्या अंगीं असलेल्या गुणाचें निंबलोण उतरलें पाहिजे व सामर्थ्याचा फुंज टाकून माझ्या ठिकाणीं नितांत भाव ठेवणेंच श्रेयस्कर आहे. निःसीम भक्तिभावानें दिलेलें साधें पान हें सुद्धां मला अमृताहून गोड आहे. पत्रपुष्पादि पूजोपचार हे केवळ निमित्त आहे. मी माझ्या भक्ताच्या ठिकाणीं फक्त जिव्हाळा पाहतो. ( ३५९–३९७ ) अर्जुना, तुला सोपी गोष्ट सांगतों कीं सदैव माझी आठवण ठेव व मग कोणतेंही कर्म केलेंस तरी त्यापासून उत्पन्न होणारा जन्ममरणाचा बंध तुला लागणार नाहीं. (३९८–४०६).

मी सर्वत्र सारखा भरून राहिलेला आहें असें जाणून जे माझी भक्ति करतात ते दिसायला जरी देहधारी असले तरी ते मद्रूपच झालेले असतात, ( फक्त ) अवशिष्ट प्रारब्ध भोगण्याकरितांच ते उदासीन वृत्तीनें ( देहांत ) राहिलेले असतात. ( ४०७-४१४ ). ही भक्ति करणारा भक्त कोणत्या जातीचा आहे याविषयीं कोणतीही आडकाठी नाहीं. फार काय, तो पूर्वी जरी पापी व दुराचारी असला व जर अनुताप होऊन त्यानें पुढील आयुष्य माझ्या सेवेंत घालविलें तर त्याला माझी प्राप्ति निःसंशय होते. ( ४१५-४२८ ). उलट भक्तीचा जिव्हाळा नसतांना पुष्कळ शास्त्राध्ययन केलें व त्याचें कुळ जरी उत्तम असलें तरी त्याचा माझ्या ठिकाणीं लाग नाहीं. ( ४२९-४४० ). कुळ, जाति, वर्ण हे माझ्या ठिकाणीं नाहींत. नाले, ओढे हा भेद जसा नदीला मिळेपर्यंतच असतो, तसे अंत्यज, पशु, स्त्रिया हा भेद मला मिळेतोपर्यंत. मला मिळाल्यावर हे भेद राहात नाहींत. वाटेल त्या जातींत जन्म झालेला भक्त जसा चालतो त्याप्रमाणें माझ्या प्राप्तीसाठीं साधनांची कमतरता नाहीं. भक्तीनें व वैराग्यानें तर मी प्राप्त होतोंच पण माझ्या ठिकाणीं गोपींच्याप्रमाणें विषयप्रेम ठेवलें अथवा कंसाप्रमाणें वैरबुद्धि ठेवली तरी त्यांत आडकाठी येत नाहीं. ( ४४१-४७४ ). वैश्य, शूद्र, स्त्रियादिकांना जेथें माझा दरवाजा मोकळा आहे तेथें पुण्यवान ब्राह्मण अथवा राजर्षि यांनीं माझी सेवा केली तर मी त्यांना प्राप्त होईन हें काय सांगावयास पाहिजे ? ( ४७५-४८९ ).

अर्जुना, तूं अनित्य व दुःखरूप अशा मृत्युलोकांत जन्मला आहेस. शेकडों रीतींनीं जीर्ण झालेली ही आयुष्य-नौका आहे. ती केव्हां बुडेल याचा नेम नाहीं. परंतु या मृत्युलोकांतील लोक पहावे तर त्याची यांना फिकीरही नाहीं. खुशाल निश्चित होऊन विषयसुखांत दंग होऊन राहिले आहेत! इहपरलोकीं कल्याण करणारा असा जो धर्म त्याप्रीत्यर्थ एक कवडीदेखील खर्च करायला हे लोक तयार नाहींत व ज्यांत सर्वस्व हानि आहे तेथें कोट्यावधि रुपये खर्च करीत आहेत. विषयविलासांत दंग होणाऱ्या लोभग्रस्त लोकांना या जगांत फार मोठा मान आहे. जो दिवस गेला त्यामुळें आपलें आयुष्य घटलें, व मृत्यु जवळ आला याची दादही यांना नाहीं; खुशाल आनंदानें बेहोष होऊन मरेतोपर्यंत सारखी तृष्णा वाढवीतच आहेत. या मूर्खांच्या नादीं लागूं नकोस. अनित्य व दुःखरूप जगांत जन्माला आला आहेस हें ध्यानांत ठेवून तूं आपला माझ्या भक्तीच्या मार्गाला लाग. (४९०-५१६).

माझी भक्ति करणें, म्हणजे माझ्या ठिकाणीं मन लावणें, सर्वत्र मलाच पहाणें, माझेंच अनुसंधान ठेवणें; तूं असें केलेंस म्हणजे शेवटीं माझ्याप्रत येऊन अवघाचि सुखरूप होशील. (५१७-५२०) आपलें जीवींचें निजगुज भगवान अर्जुनाला सांगत होते व सात्त्विक अंतःकरणाचा संजय तें धृतराष्ट्राला सांगत असतांना अष्टसात्त्विक भावांनीं भरून गेला, त्याला आपला आनंद धरवेना; तो आनंद धृतराष्ट्राला द्यावा म्हणून त्याला हांक मारूं लागला. पण भगवंताच्या बोलण्याकडे धृतराष्ट्राचें लक्ष नव्हतें हें पाहून तो मनांत खिन्न झाला. अष्टसात्त्विक भावानें संपन्न झालेल्या संजयाच्या मुखांतून निघालेलें भगवंताचें हें बोलणें ऐकून श्रोत्यांना आनंदाच्या राशींवर लोळतां येईल असें म्हणून या अध्यायाच्या सुरवातीस केलेल्या ('तरी अवधान एकवेळे दीजे। मग सर्वसुखासी पात्र होईजे') प्रतिज्ञेची पूर्तता करून ज्ञानदेव या अध्यायाची समाप्ति करतात.



# ज्ञानेश्वरी

## अध्याय नववा

तरी अवधान एकेवेळें दीजे । मग सर्वसुखासि पात्र होइजे । हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ॥ १ ॥ परी प्रौढी न बोलें हो जी । तुम्हां सर्वज्ञांचां समाजीं । देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २ ॥ कां जे लळेयांचे लळे सरती । मनोरथांचे मनोरे पुरती । जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हांऐसीं ॥ ३ ॥ तुमचेया दिठिवेयाचिये वोले । सासिन्नले प्रसन्नतेचे मळे । ते साउली देखोनि लोळें । श्रांतु जी मी ॥ ४ ॥ प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि आम्ही आपुलिया स्वेच्छा वोलावों लाहों । येथही जरी सलगी करूं बिहों । तरी निवों कें पां ॥ ५ ॥ नातरी बालक बोबडां बोलीं । कां वांकुडां विचुकां पाउलीं । तें चोज करूनि माउली । रिझे जेवीं ॥ ६ ॥ तेवीं तुम्हां संतांचा पाढियावो । कैसेनि तरी आम्हांवरी हो । या बहुवा आळुकिया जी आहों । सलगी करित ॥ ७ ॥ वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवादृश श्रोते । काय धड्यावरी सारस्वतें । पढों सिकिजे ॥ ८ ॥ अवधारां आवडे तेसणा धुंधुरु । परि महातेजीं न मिरवे काय करूं । अमृताचिया ताटीं वोगरूं । ऐसी रससोय कैंची ॥ ९ ॥ अहो हिमकरासी विंजणें । कीं नादापुढें आइकवणें । लेणियासी लेणें । हें कहीं आथी ॥ १० ॥ सांगां परिमळें काय तुरंबावें । सागरें कवणे ठायीं नाहावें । हें गगनाचि आडे आघवें । ऐसा पवाडु कैंचा ॥ ११ ॥ तैसें तुमचें अवधान धाये । आणि तुम्ही म्हणा हें होये । ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें रिझा तुम्ही ॥ १२ ॥ तरि विश्वप्रगटितया गभस्ती । हातिवेनि न कीजे आरती । कां चुळोदकें आपांपती । अर्घ्यु नेदिजे ॥ १३ ॥ प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा अर्चितसें भक्ती । म्हणोनि बेलें जऱ्ही गंगावती । तऱ्ही स्वीकाराल कीं ॥ १४ ॥ बाळक बापाचिये ताटीं रिगे । रिगौनि बापातेंच जेवऊं लागे । कीं तो संतोषलेनि वेगें । मुखाचि वोडवी ॥ १५ ॥ तैसा मी जरी तुम्हांप्रती । चावटी करीतसें बाळमती । तरी तुम्हीं तोषिजे ऐसी जाती । प्रेमाची या ॥ १६ ॥ आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्ही संत घेतले असा बहुवे । म्हणोनि केलिये सलगीचा नोहे । आभारु तुम्हां ॥ १७ ॥ अहो तान्हयाची लागे झटे । तरी अधिकाचि पान्हा फुटे । रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि ॥ १८ ॥ म्हणऊनि मज लेंकुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण

# ज्ञानेश्वरी

## अध्याय नववा

श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, अहो श्रोते हो, तर तुम्ही एक वेळ श्रवणाकडे लक्ष द्या; म्हणजे मग सर्व सुखाला पात्र व्हाल; हें माझें उघड प्रतिज्ञेचें बोलणें ऐका. १. परंतु महाराज, तुमच्यासारख्या सर्वजाणत्यांच्या सभेमध्यें हें मी आढ्यतेनें बोलत नाहीं. 'लक्ष द्यावें' ही माझी लडीवाळपणाची विनंति आहे. २. कारण कीं, तुमच्यासारखे जर समर्थ आईबाप असतील, तर हट्ट घेणारांचे लाड पुरतात व मनोरथ करणारांचे उंच डोहाळे पूर्ण होतात. (मनानें रचलेले कल्पित पदार्थही) प्रत्यक्ष प्राप्त होतात. ३ तुमच्या त्या कृपारूप दृष्टीच्या ओलाव्यानें प्रसन्नतारूप मळा टवटवीत झाला, त्याची ती सावली पाहून, महाराज, तेथें मी भागलेला लोळत आहें. ४. महाराज, आपण सुखरूपी अमृताचे डोह आहांत, म्हणून आम्ही आपल्या इच्छेनुरूप गारवा प्राप्त करून घेतों. येथें देखील जर आम्ही लडिवाळपणा करण्यास भ्यालों, तर आम्हीं शांत कोठें व्हावें ? ५. अथवा, लेकरूं बोबडें बोलत असलें, अथवा वेडेंवाकडें पाऊल टाकीत असलें तर त्यावरून त्याचें कौतुक करून आई जशी समाधान पावते. ६. त्याप्रमाणें तुम्हां संतांचें प्रेम कशानें तरी आमच्यावर व्हावें, अशी आमची फार इच्छा असल्यामुळें, महाराज, आम्ही सलगी करीत आहोंत. ७. वास्तविक पाहिलें तर, आपल्यासारख्या सर्वज्ञ श्रोत्यांपुढें 'माझ्या बोलण्याकडे अवधान द्या म्हणजे सर्व सुखाला पात्र व्हाल.' असें बोलण्याची माझी काय योग्यता आहे ! (आपण सर्वज्ञ असल्यामुळें आपणांस कोठें व केव्हां लक्ष द्यावें हें सहजच कळतें; तसेंच आपण स्वतः सुखरूप असल्यामुळें 'माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या, म्हणजे सुखाला प्राप्त व्हाल.' हें माझें बोलणें धारिष्ट आहे.) सरस्वतीच्या मुलाला धडा घेऊन शिकावयाचें आहे काय ! (तर नाहीं; सरस्वतीचा मुलगा स्वभावतःच सर्व जाणतो.) ८. ऐका, वाटेल तेवढा काजवा जरी असला, तरी सूर्याच्या प्रकाशापुढें त्याचें तेज पडत नाहीं; त्याला काय करावें ! अमृताच्या ताटामध्यें वाढण्यासारखें पक्वान्न कोठून असणार ? ९. अहो, शीतल किरण असलेल्या चंद्राला पंख्यानें वारा घालणें किंवा प्रत्यक्ष नादब्रह्मापुढें गाणें करणें, किंवा स्वतः अलंकारास दागिन्यानें सजविणें, असें कोठें झालें आहे काय ! १०. सांगा, सुवासानें कशाचा वास घ्यावा ! समुद्रानें कोणत्या ठिकाणीं स्नान करावें ? हें सर्व आकाशच जीमध्यें मावेल, अशी मोठी विस्तृत वस्तु कोठून असणार ? ११. त्याप्रमाणें तुमची ऐकण्याची इच्छा तृप्त होईल आणि तुम्ही म्हणाल कीं 'याला म्हणावें व्याख्यान' व ज्या योगानें तुमचें मन रंगून जाईल, असें वक्तृत्व कोणाजवळ आहे? १२. तरी जग उजेडांत आणणाऱ्या सूर्याला काडवातीनें ओवाळूं नये काय ? किंवा चूळभर पाण्यानें समुद्राला अर्घ्य देऊं नये काय ? १३. महाराज, तुम्ही मूर्तिमंत शंकर आहांत आणि मी दुर्बळ मनुष्य भक्तीनें पूजा करीत आहें; म्हणून बेलाऐवजीं मी जरी निर्गुडी वहात आहें तरी आपण बेल समजूनच तिचा स्वीकार कराल. १४. लहान मूल बापाच्या ताटांत जेवावयास बसतें आणि पानांत शिरून बापालाच जेवूं घालावयास लागतें. पण बाप (न रागावतां उलट) आनंदाच्या भरानें आपलें तोंडच त्याच्यापुढें करतो. १५. त्याप्रमाणें जरी मी तुमच्याशीं बाल्बुद्धीनें बडबड करीत आहें, तरी त्यामुळें तुम्हीं आनंदीच व्हावें असा ह्या प्रेमाचा स्वभाव आहे. १६. आणि त्या आपलेपणाच्या (ज्ञानोबा आमचा आहे अशा) प्रेमानें तुम्हीं संत अतिशय घेरलेले आहांत; म्हणून मी केलेल्या सलगीचें तुम्हांस ओझें वाटणार नाहीं. १७. अहो, गाईच्या सडाला तिच्या वासरानें ढुसणी दिली तर त्या योगानें तिला जास्तच पान्हा फुटतो. (कारण) आवडत्याच्या रागानें प्रेम दुप्पट होत असतें. १८. म्हणून तुमचें निजलेलें कृपाळूपण तें मज लेंकराच्या बोलण्यानें जागें झालें,

निर्दैलें। तें चेइलें हें जी जाणवलें। यालागीं बोलिलों मी ॥ १९ ॥ एऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चेपणी। कीं वारया धापत आहे वाहणी। हां हो गगनासि गंवसणी। घालिजे केवीं ॥२०॥ आइकां पाणी वोथिजावें न लगे। नवनीतीं माथुला न रिघे। तेवीं लाजिलें व्याख्यान न निघे। देखोनि जयांतें ॥ २१ ॥ हें असो शब्दब्रह्म जिये वाजे। शब्द मावळलेया निवांतु निजे। तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे। हा पाडु काई ॥ २२ ॥ परि ऐसियाही मज धिंवसा। तो पुढतियाचि येकी आशा। जे धिटींवा करूनि भवादृशां। पढियंतया होआवें ॥ २३ ॥ परि आतां चंद्रापासोनि निववितें। जें अमृताहूनि जीवविते। तेणें अवधानें कीजो वाढतें। मनोरथा माझिया ॥ २४ ॥ कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थसिद्धि मती पिके। एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके। जरी उदास तुम्ही ॥ २५ ॥ सहजें तरी अवधारा। वक्तृत्वा अवधानाचा होय चारा। तरी दोंदें पेलती अक्षरां। प्रमेयाचीं ॥ २६ ॥ अर्थ बोलाची वाट पाहे। तेथ अभिप्रावो अभिप्रायातें विये। भावाचा फुलौरा होत जाये। मतिवरी ॥ २७ ॥ म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे। तरी हृदयाकाश सारस्वतें वोळे। आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे। मांडला रसु ॥२८॥ अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये। परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे। म्हणऊनि वक्ता तो वक्ताचि नोहे। श्रोतेनविण ॥२९॥ परी आतां आम्हतें गोड करावें। ऐसें हें तांदुळीं कासया विनवावें। साइखडियानें काइ प्रार्थावें। सूत्रधारातें ॥ ३० ॥ काय तो बाहुलियांचिया काजा नाचवी। कीं आपुलिये जाणिवेची कळा वाढवी। म्हणऊनि आम्हां या ठेवाठेवी। काय काज ॥ ३१ ॥ तंव गुरु म्हणती काइ जाहलें। हें समस्तही आम्हां पावलें। आतां सांगें जें निरोपिलें। नारायणें ॥ ३२ ॥ येथ संतोषोनि निवृत्तिदासें। जी जी म्हणऊनि उल्हासें। अवधारां श्रीकृष्ण ऐसें। बोलते जाहले ॥ ३३ ॥

श्रीभगवानुवाचः—इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे। ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

नातरि अर्जुना हें बीज। पुढती सांगिजेल तुज। जें हें अंतःकरणींचें गुज। जिवाचिये ॥ ३४ ॥ येणें मानें जीवाचें हियें फोडावें। मग गुज कां पां मज सांगावें। ऐसें कांहीं स्वभावें कल्पिशी जरी ॥ ३५ ॥ तरी परियेसीं प्राज्ञा। तूं आस्थेचीच संज्ञा। बोलिलिये गोष्टीची अवज्ञा। नेणसी करूं ॥ ३६ ॥ म्हणोनि गूढपण आपुलें मोडो। वरि न बोलावेंही बोलावें घडो। परि आम्हुचिये जीवींचें पडो। तुझां जीवीं ॥३७॥ अगा थानीं कीर दूध गूढ। परि थानासीचि नव्हे कीं गोड। म्हणोनि सरो कां सेवितयाची चाड। जरी अनन्य मिळे ॥३८॥ मुडाहूनि बीज काढिलें। मग निर्वाळलिये भूमी पेरिलें। तरि तें सांडीविखुरीं गेलें। म्हणों ये कायी ॥ ३९ ॥ यालागीं सुमनु आणि शुद्धमती। जो अनिंदकु अनन्यगती। पैं गा गौप्यही परी तयाप्रती। चावळिजे सुखें ॥४०॥ तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं। तूंवांचूनि आणिक नाहीं। म्हणोनि गुज तरी तुझां ठायीं। लपवूं नये ॥ ४१ ॥ आतां किती नावानावा गुज। म्हणतां कानडें वाटेल तुज। तरि ज्ञान सांगेन



पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटीं ॥
तेथ चंद्रासि काय किरीटी । उपरवा पडे ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय ९, ओवी ११५

हें मला कळलें; महाराज, याकरितां ' अवधान द्या ' असें मी बोललों. १९. वास्तविक पाहिलें तर चांदणें आदींत पिकवितात काय ? किंवा वाऱ्याला कोणी गति दिली आहे काय ? अहो महाराज, आकाशाला गवसणी कशी घालावी ? २०. ऐका, ज्याप्रमाणें पाणी पातळ करावें लागत नाहीं, लोण्यामध्यें रवीचा प्रवेश होत नाहीं, त्याप्रमाणें ज्या संतांना पाहून माझें व्याख्यान लज्जित होऊन बाहेर निघत नाहीं. २१. हें असो; वेदांचे शब्द कुंठित झाले असतां, ते वेद ज्या गीतार्थरूपी बाजेवर निवान्त निजतात, तो गीतार्थ मी मराठीमध्यें बोलावा, ही माझी योग्यता आहे काय ? २२. परंतु असें असूनही ही जी मला ( गीतार्थ मराठींत सांगण्याची ) तीव्र इच्छा झाली आहे, ती पुढच्या याच एका आशेनें कीं, धिटाई करून आपल्यासारख्यांचा मी आवडता व्हावें. २३. तर आतां चंद्रापेक्षां शांत करणारें व अमृताहूनही जीवित वाढविणारें, असें जें आपलें लक्ष, त्या लक्षानें माझ्या मनोरथांची वाढ करावी. २४. कारण कीं, जेव्हां तुमच्या कृपादृष्टीचा वर्षाव होईल, तेव्हां माझ्या बुद्धींत सर्वार्थ पूर्णपणें स्फुरतील व येन्हवीं जर तुम्ही उदास रहाल, तर अंकुरदशेला आलेलें माझें ज्ञान सुकेल. २५. तरी ऐका, कीं सहजच वक्त्याच्या वक्तृत्वाला श्रोत्यांचें लक्ष-रूपी जर खाद्य मिळेल, तर वक्त्याच्या अक्षरांना प्रमेयांचीं दोंदें सुटतील. २६. ( आणखी दुसरें असें कीं ) वक्त्याच्या तोंडांतून केव्हां शब्दउच्चार होईल, याची अर्थ वाट पहात असतो व तेथें ( त्यावेळीं ) एकापासून दुसरा असे अनेक अभिप्राय उत्पन्न होतात आणि बुद्धीवर भावाचा फुलोरा ( फुलांचा बहर ) होत जातो. ( बुद्धीमध्यें अनेक अभिप्रायांच्या कल्पना स्फुरूं लागतात. ) २७. म्हणून उल्हासानें प्रश्नोत्तर देणें, हाच कोणी अनुकूल वारा, तो सुटला तर, हृदयरूपी आकाशांत शास्त्र सिद्धान्तरूपी मेघ दाट येतील; आणि श्रोता दुश्चित असेल, तर व्याख्यानास आलेला रंग वितळून जाईल. २८. अहो, चंद्रकांतमणि पाझरणारा आहे खरा, परंतु त्याला पाझरावयास लावण्याची युक्ति चंद्रामध्येंच आहे. ( त्याप्रमाणें वक्ता पुष्कळ बोलेल खरा, पण त्याला बोलावयास लावण्याची हातवटी श्रोत्यांमध्यें आहे. ) म्हणून ( लक्ष लावून ऐकणाऱ्या ) श्रोत्याशिवाय वक्ता हा वक्ताच नाहीं. २९. परंतु आतां ' आम्हांस गोड करा ' अशी ही तांदुळांनीं खाणाराची प्रार्थना कशाकरितां करावयाची ? लाकडाच्या बाहुल्यांनीं सूत्राधाराची कां प्रार्थना करावयाची ? ३० तो ( सूत्रधार ) बाहुलीच्या कामा-करितां तिला नाचवितो काय ? ( तर नाहीं. मग ) बाहुली नाचविण्यानें तो आपल्या ज्ञानाचें चातुर्य वाढवितो. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ' अवधान द्या ' अशी श्रोत्यांची विनंति करण्याच्या उठाठेवीचें आम्हांला काय काम आहे ? ३१. तेव्हां श्रीगुरुनिवृत्तिनाथ म्हणाले, ' अरे, झालें तरी काय ? तुझी ही सर्व विनंति आम्हांला पावली. आतां भगवंतांनीं जें अर्जुनाला सांगितलें, तें सांग. ' ३२. यावर निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव महाराज संतोषून उल्हासानें म्हणाले, जी महाराज, ऐका. श्रीकृष्ण याप्रमाणें बोलले, ३३.

श्रीकृष्ण म्हणाले, अत्यंत गुह्य असें हें ( ब्रह्माचें ) ज्ञान, प्रपंचज्ञानासह, असूयारहित अशा तुला सांगतों. हें जाणल्यानें तूं दुःखप्रद अशा संसारापासून मुक्त होशील. १

अथवा अर्जुना, हेंच वर्म, जें माझ्या अंतःकरणांतील जिवाची गोष्ट आहे, ती तुला पुन्हा सांगतों. ३४. इतक्या मानानें जिवाच्या आंतली गोष्ट बाहेर काढून, मग ती गुप्त गोष्ट मला कां सांगावी, अशी कांहीं कल्पना तुझ्या मनांत सहज जर आली असेल, ३५. तर बुद्धिवान अर्जुना ऐक. तूं ज्ञानप्राप्तीच्या तीव्र इच्छेचीच खूण ( मूर्ति ) आहेस, आणि त्याचप्रमाणें सांगितलेल्या गोष्टीचा अनादर करणें तुला माहीत नाहीं. ३६. म्हणून आमचें गुप्तपण मोडलें तर मोडो ! शिवाय न बोलण्याची जी गोष्ट तीही बोलली जावो ! पण आमच्या अंतःकरणांतील गुप्त गोष्ट तुझ्या मनांत उतरो. ३७. बा अर्जुना, स्तनांत खरोखर दूध गुप्त असतें, पण त्याची गोडी स्तनास नसते. याकरितां एकनिष्ठ सेवन करणारा ( आपलें लेकरूं ) जर प्राप्त झाला तर त्या पिणाऱ्याची इच्छा स्तनपान करून तृप्त होईना का ? ३८. कणगींतून बीं काढलें, आणि मग तें निर्मळ केलेल्या जमिनींत पेरलें, तर तें सांडण्या-लवंडण्यांत गेलें, असें म्हणतां येईल काय ? ३९. याकरितां चांगल्या मनाचा व शुद्ध बुद्धीचा आणि निंदा न करणारा व एकनिष्ठ असा श्रोता जर मिळाला, तर त्यास आपली गुह्य गोष्ट असली तरी खुशाल सांगावी. ४०. तर आतां सध्यां या गुणांनीं युक्त तुझ्यावांचून दुसरा कोणी दिसत नाहीं, म्हणून जरी गुह्य गोष्ट असली, तरी तुझ्या ठिकाणीं ती लपवून ठेवतां येत नाहीं. ४१. आतां वारं-वार ' गुह्य गुह्य ' असें म्हटलें असतां तुला चमत्कारिक

सहज । विज्ञानेंसीं ॥ ४२ ॥ परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें कुडें । मग काढिजे फाडोवाडें । पारखूनियां ॥ ४३ ॥ कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय पाणी राजहंसें । तुज ज्ञान विज्ञान तैसें । वांटूनि देऊं ॥ ४४ ॥ मग वारयाचियां धारसां । पाडिला कोंडा कां तुरेचि जैसा । आणि अन्नकणाचा आपैसा । राशि जोडे ॥ ४५ ॥ तैसें जें जाणितलेयासाठीं । संसार संसाराचिये गांठीं । लाऊनि बैसवी पाटीं । मोक्षश्रियेचां ॥ ४६ ॥

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् । प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

जें जाणणें यां अवघीयांचां गांवीं । गुरुत्वाची आचार्यपदवी । जें सकळ गुह्यांचा गोसावी । पवित्रां रावो ॥ ४७ ॥ आणि धर्मांचें निजधाम । तेंविंचि उत्तमाचें उत्तम । पैं जया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥ ४८ ॥ मोटकें गुरुमुखें उदेजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फावो लागे तैसें । आपैसया ॥ ४९ ॥ तेविंचि पैं गा सुखाचां पाउटीं । चढतां येइजे जयाचिया भेटी । मग भेटल्या कीर मिठी । भोगणेयाहि पडे ॥ ५० ॥ परि भोगाचिया ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभें ठेलेंचि सुखा भरे । ऐसें सुलभ आणि सोपारें । वरि परब्रह्म ॥ ५१ ॥ पैं गा आणिकही एक याचें । जें हातां आलें तरी न वचे । आणि अनुभवितां कांहीं न वेचे । वरी विटेहि ना ॥ ५२ ॥ येथ जरी तूं तार्किका । ऐसी हन घेसी शंका । ना येवढी वस्तु हे लोकां । उरली केविं पां ॥ ५३ ॥ एकोत्तरेयाचिया वाढी । जे जळतिये आगीं घालिती उडी । ते अनायासें स्वगोडी । सांडिती केविं ॥ ५४ ॥ तरि पवित्र आणि रम्य । तेविंचि सुखोपायेंचि गम्य । आणि स्वसुख परि धर्म्य । वरि आपणपां जोडे ॥ ५५ ॥ ऐसा अवघाचि सुरवाडु आहे । तरी जनाहातीं केविं उरों लाहे । हा शंकेचा ठाव कीर होये । परि न धरावी तुवां ॥ ५६ ॥

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप । अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदराआड । परि तें अव्हेरूनि गोचिडें । अशुद्ध काय नेघती ॥ ५७ ॥ कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरीं । परि पराग सेविजे भ्रमरीं । जवळिलां चिखलुचि उरे ॥ ५८ ॥ नातरी निदैवाचां परिवरीं । लोह्या रुतलिया आहाति सहस्रवरीं । परि तेथ बैसोनि उपवासु करी । कां दरिद्रें जिये ॥ ५९ ॥ तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु । कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥ ६० ॥ बहु मृगजळ देखोनि डोळां । थुंकिजे अमृताचा भिळितां गळाळा । तोडिला परिसु बांधिला गळां । शुक्तिकालाभें ॥ ६१ ॥ तैसीं अहंममतेचिये लवडसवडीं । मातें न पवतीचि बापुडीं । म्हणोनि जन्ममरणाची दुथडी । डहुळितें ठेलीं ॥ ६२ ॥

वाटेल, तर आतां तुला सहजच प्रपंचज्ञानासहित आत्मज्ञान सांगेन. ४२. परंतु जसें खरेंखोटें एकत्र मिसळलें असतां, तें परीक्षा करून निरनिराळें काढावें, त्याप्रमाणें स्पष्टतेनें ज्ञानविज्ञान ( तुला ) सांगेन. ४३. अथवा ज्याप्रमाणें राजहंसानें आपल्या चोंचीच्या चिमटयानें एकत्र मिसळलेलें दूध व पाणी वेगळें करावें, त्याप्रमाणें तुला ज्ञान व विज्ञान हें स्वच्छ वेगवेगळें सांगूं. ४४. मग मळणी करून एकत्र मिसळलेले कण व भूस वाऱ्याच्या धरेवर उफणले असतां, जसा कोंडा उडून जाऊन, धान्याची आपोआप रास जमते; ४५. त्याप्रमाणें जें ज्ञान जाणल्यानें, तें ज्ञान संसार संसाराच्या गांठी लावून ( अनात्मतत्वाचे धर्म, अनात्मतत्त्वाच्या ठिकाणीं ठेवून ) मोक्षरूपी लक्ष्मीच्या पटावर ( जाणणाऱ्यास ) बसवितें. ४६.

हें ( ज्ञान ) सर्व विद्यांचा राजा, सर्व गुह्यांचा स्वामी, पवित्र, उत्कृष्ट, प्रत्यक्ष अनुभवास येणारें, धर्माला अनुसरून असलेलें, सुखानें ( अथवा सहज ) आचरण करतां ( मिळवितां ) येणारें आणि क्षयरहित आहे. २.

जें स्वरूपज्ञान या सर्व विद्यांचें गांवामध्यें श्रेष्ठत्वाच्या आचार्यपदावर आहे आणि जें ज्ञान सर्व गुप्त गोष्टींचा स्वामी आहे व जें पवित्र गोष्टींचा राजा आहे. ४७. आणि जें ज्ञान धर्माचें स्वतःचें राहण्याचें घर आहे आणि त्याचप्रमाणें जें ज्ञान सर्व उत्तम पदार्थांत उत्तम आहे व ज्या ज्ञानाच्या ठिकाणीं प्राप्त झालें असतां पुनः दुसऱ्या जन्माचें काम नाहीं. ४८. गुरुमुखांतून तें ज्ञान अंमळसें उगवतांना दिसतें; पण तें हृदयांत निलासिद्धच असतें, तसें तें आपोआप प्रत्यक्ष अनुभवाला येऊं लागतें. ४९. त्याचप्रमाणें, अरे अर्जुना, ज्याच्या भेटीला सुखांच्या चढत्या पायऱ्यांनीं यावयाचें असतें, आणि जें भेटलें असतां निश्चयेंकरून भोगणेंही संपतें. ५०. परंतु भोगाच्या अलीकडच्या कांठावर चित्त उभें राहिल्याबरोबर तें सुखानें पूर्ण भरून जातें असें तें ( स्वरूपज्ञान ) कष्टांवाचून मिळणारें व सोपें असून शिवाय तें श्रेष्ठ ब्रह्म आहे. ५१. अर्जुना, याचें आणखीही एक माहात्म्य आहे. तें असें कीं, जें प्राप्त झालें असतां कधीं ( हातांतून ) जात नाहीं, आणि अनुभविलें असतां ( सेवन केलें असतां ) कांहीं कमी होत नाहीं व शिवाय त्यांत कांहीं विकारही उत्पन्न होत नाहींत. ५२. या ठिकाणीं तर्कदुशल अर्जुना, जर तूं अशी शंका घेशील कीं, एवढी ज्ञानासारखी ही वस्तु अनुभव घेतल्याशिवाय लोकांत कशी राहिली ? ५३. शंभराला एक व्याज मिळून एकरोंएक रुपये व्हावेत म्हणून जळत अग्नीमध्यें ( घोक्यांत ) उडी घालतात, असे जे लोक, ते कष्टांवाचून मिळणारी स्वरूपसुखाची गोडी कशी टाकतील ? ५४. तरी पवित्र आणि रम्य, त्याचप्रमाणें सुखोपायानेंच प्राप्त होणारें व तें आपलें स्वतःचेंच सुख परंतु धर्माला धरून मिळणारें शिवाय तें आपल्याच ठिकाणीं आपल्याला मिळतें, ५५. याप्रमाणें हें सर्व प्रकारें सुखकर आहे, तर तें लोकांच्या तडाख्यांतून राहिलें कसें ? ही खरोखर शंकेची जागा आहे, परंतु तूं अशी शंका धरूं नकोस. ५६.

हे शत्रुतापना, या ( आत्मज्ञानरूपी ) धर्मावर श्रद्धा न ठेवणारे मनुष्य माझी प्राप्ति न होतां मृत्यूनें युक्त अशा संसारामध्यें वारंवार परत जातात. ३.

अर्जुना, पहा दूध हें पवित्र असून शिवाय गोड आहे व तें जवळच ( सडाच्या ) कातडीच्या पदरापलीकडे आहे, परंतु गोचीड तें टाकून देऊन रक्तच पीत नाहीं काय ? ५७. किंवा कमलाचा कांदा आणि बेडूक यांची वस्ती एके ठिकाणींच असते; परंतु कमलांतील परिमळ ( दूरचे ) भुंगे येऊन, सेवन करून जातात व जवळच असलेल्या बेडकांना केवळ चिखलच शिल्लक राहतो. ५८. अथवा दुर्दैवी पुरुषाच्या घरांत हजारों मोहरा पुरलेल्या आहेत, परंतु तो तेथें राहून उपवास करतो किंवा दारिद्र्यांत जीवित कंठितो. ५९. त्याप्रमाणें सर्व सुखांचा बगीचा असा जो मी राम, तो मी ( सर्वांच्या ) हृदयांत असतांना ( त्या मला न जाणून ) मूर्ख लोक ( सुखाकरितां ) विषयांचीच इच्छा करितात. ६०. पुष्कळसें मृगजळ डोळ्यानें पाहून अर्धवट गिळलेला अमृताचा घोट थुंकून टाकावा अथवा गळ्यांत बांधलेला परीस शिंपीच्या लाभानें तोडून टाकावा, ६१. त्याप्रमाणें मी व माझें या गडबडींत ते दीन झालेले लोक मला येऊन मिळत नाहींत आणि म्हणूनच ते जन्म व मरण या दोन थड्या असलेल्या नदींत ( संसारांत ) धक्के खात राहिले आहेत. ६२.

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्वभूतानि न चाऽहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥

एऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु कां जैसा । कहीं नैसे न दिसे ऐसा । वाणीचा नव्हें ॥६३॥ माझेया विस्तारलेपणा नांवें । हें जगचि नोहे आघवें । जैसें दूध मुरालें स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥६४॥ कां बीजचि जाहलें तरु । अथवा भांगारचि अळंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ ६५ ॥ हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें । तैसें अमूर्तमूर्ति मियां विस्तारलें । त्रैलोक्य जाणें ॥ ६६ ॥ महदादि देहांतें । इयें अशेषेंही भूतें । परि माझां ठायीं बिंबते । जैसें जळीं फेण ॥ ६७ ॥ परि तया फेणांआंतु पाहतां । जेवीं जळ न दिसे पंडुसुता । नातरी स्वप्नींची अनेकता । चेइलिया नोहिजे ॥ ६८ ॥ तैसीं भूतें इयें माझां ठायीं । बिंबती तयांमाजि मी नाहीं । इया उपपत्ती तुज पाहीं । सांगितलिया मागां ॥ ६९ ॥ म्हणऊनि बोलिलिया बोलाचा अतिसो । न कीजे यालागीं हें असो । तरी मजआंत पैसो । दिठी तुझी ॥ ७० ॥

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् । भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

आमचा प्रकृतीपैलीकडील भावो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों । तरी मजमाजि भूतें हेंही वावो । जे मी सर्व म्हणउनी ॥ ७१ ॥ एऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळे । नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे । म्हणोनि अखंडित परि झांवळें । भूतभिन्न ऐसें देखें ॥ ७२ ॥ तेचि संकल्पाची सांज जैं लोपे । तैं अखंडितचि आहे स्वरूपें । जैसें शंका जातखेंवो लोपे । सापपण माळेचें ॥ ७३ ॥ एऱ्हवीं तरी भूमीआंतुनि स्वयंभ । काय घडेयागाडगेयांचे निघती कोंभ । परि ते कुलालमतीचे गर्भ । उमटले कीं ॥ ७४ ॥ नातरी सागरींचां पाणीं । काय तरंगाचिया आहाती खाणी । ते अवांतर करणी । वारयाची नव्हे ॥ ७५ ॥ पाहें पां कापसाचां पोटीं । काय कापडाची होती पेटी । तो वेढितयाचिया दिठी । कापड जाहला ॥ ७६ ॥ जरी सोनें लेणें होऊनि घडे । तरी तयाचें सोनेंपण न मोडे । येर अळंकार हे बराचिलीकडे । लेतयाचेनि भावें ॥ ७७ ॥ सांगें पडिसादाची प्रत्युत्तरें । कां आरिसां जें आविष्करे । तें आपलें कीं साचोकारें । तेथेंचि होतें ॥ ७८ ॥ तैसी इये निर्मळे माझां स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी । तयासि तयाचां संकल्पीं । भूताभासु असे ॥ ७९ ॥ तेचि कल्पिती प्रकृती पुरे । आणि भूताभासु आधींच सरे । मग स्वरूप उरे एकसरें । निखळ माझें ॥ ८० ॥ हें असो आंगीं भरलिया भवंडी । जैशा भोंवत दिसती अरडीदरडी । तैशी आपुलिया कल्पना अखंडीं । गमती भूतें ॥ ८१ ॥ तेचि कल्पना सांडूनि पाहीं । तरि मी भूतीं भूतें माझिया ठायीं । हें स्वप्नींही परि नाहीं । कल्पावयाजोगें ॥ ८२ ॥ आतां मी एक भूतातें धर्ता । अथवा भूतांमाजि मी असता । या संकल्पसन्निपाता- । आंतुलिया बोलिया ॥ ८३ ॥ म्हणोनि परियेसीं गा प्रियोत्तमा । यापरी मी विश्वेंसीं विश्वात्मा । जो इया लट-

अव्यक्तरूप अशा मीं हें सर्व जग व्यापलेलें आहे. सर्व भूतें माझ्या ठिकाणीं स्थित आहेत, पण मी त्यांच्या ठिकाणीं स्थित नाहीं. ४.

सहज विचार करून पाहिलें तर मी कसा आहें ? तर तोंडासमोर जसा सूर्य तसा मी सगळ्यांना सदा समोर आहें; पण तो सूर्य केव्हां ( रात्रीं ) नसतो ( व ) केव्हां केव्हां ( दिवसा ) दिसत नाहीं, असा त्याच्यांत कमीपणा आहे, तसा कमीपणा माझ्यांत नाहीं. ६३. माझा विस्तार म्हणजेच जग नाहीं काय ? ( तर होय, माझाच विस्तार आहे. ) तें कसें ? तर जसें दूध विरजलें असतां तेंच स्वभावतः दहीं होतें. ६४. अथवा बीजच झाड झालें किंवा सोनेंच अलंकार बनलें, त्याप्रमाणें हें जग म्हणजे माझ्या एकाचा विस्तार आहे. ६५. हें अव्यक्त-पणानें थिजलेलें ( संकोचित ) असतें, तेंच मग विश्वाच्या आकारानें पातळ होतें ( पसरतें ); या रीतीनें अव्यक्तरूप असलेला मी त्रैलोक्याच्या रूपानें विस्तार पावतों, असें समज. ६६. पाण्यावर जसा फेस भासतो, त्याप्रमाणें महत्‌तत्त्वापासून देहापर्यंत हीं सर्वही भूतें माझ्या ठिकाणीं भासतात. ६७. अर्जुना, पण त्या फेसाच्या आंत पाहिलें असतां जसें पाणी दिसत नाहीं, अथवा स्वप्नांतील अनेकपण जसें जागें झाल्यावर नसतें. ६८. त्याप्रमाणें हीं भूतें माझ्या ठिकाणीं जरी भासलीं, तरी पण त्यांमध्यें मी नाहीं. हा विचार तुला आम्हीं मागें ( अध्याय ७ वा श्लोक १२ मध्यें ) सांगितला, तो लक्षांत आण. ६९. येवढ्याकरितां बोललेल्याच गोष्टींचा विस्तार करूं नये, म्हणून हें बोलणें राहूं दे. तर माझ्या स्वरूपांत तुझी दृष्टि प्रवेश करो.७०.

( कल्पना टाकून पाहूं लागलास तर ) सर्व भूतें माझ्या ठिकाणीं स्थितही नाहींत, असा हा माझा ऐश्वर्य योग आहे पहा. ( तसेंच ) भूतांचें धारण करणारा, तथापि ( अलिप्त असल्यानें ) भूतांचे ठिकाणीं स्थित नसलेला आणि ज्याचे ठिकाणीं भूतांची कल्पना करतां येईल, अशा प्रकारचें माझें स्वरूप आहे. ५.

मायेच्या पलीकडे असणारी जी आमची शुद्धस्वरूप-स्थिति, ती जर तूं कल्पना टाकून पाहशील, तर हे (सर्व) प्राणी माझ्या ठिकाणीं आहेत, हें म्हणणें देखील व्यर्थ आहे; कारण सर्व मीच आहें म्हणून. ७१. सहज विचार केला तर, कल्पनारूप संध्याकाळचे वेळीं बुद्धीची दृष्टि क्षणभर मंद होते, म्हणून माझें स्वरूप अखंडदंडायमान जरी आहे, तरी परंतु तें अस्पष्ट होतें व ( त्या ठिकाणीं ) भूतें निरनिराळीं आहेत असें दिसतें. ७२. तीच कल्पना-रूप संध्याकाळ नाहींशी झाली, म्हणजे त्या वेळीं मी अखंड दंडायमानच स्वरूपानें आहे. तें कसें तर, ज्या-प्रमाणें माळेवर होणारी सर्पकल्पना जातांक्षणींच, माळेचें सर्पपण जाऊन, तिचें मूळचें स्वरूप दिसतें. ७३. सहज विचार करून पाहिलें तर, घागरी व मडकीं यांचे आकार आपोआप जमिनींतून निघतात काय ? तर नाहीं. परंतु त्या घागरी व तीं मडकीं हे कुंभाराच्या बुद्धीच्या कल्पने-चेच आकार उमटले आहेत. ७४. अथवा समुद्राच्या पाण्यांत लाटांच्या खाणी आहेत काय ? पाण्याचें रूपांतर ( लाटा ) ही वाऱ्याची करणी नव्हे काय ? ७५. असें पहा कीं, कापसाच्या पोटांत कापडाचा गठ्ठा आहे काय ? तो कापूस, नेसणाराच्या दृष्टीनें, कापड झाला आहे. ७६ सोन्याचे जरी अलंकार झाले, तरी त्याचें सोनेपण मोडत नाहीं. सोन्याहून वेगळ्या आकाराचे अलंकार जे वरवर दिसतात, ते दागिने घालणाराच्या दृष्टीनें आहेत. ७७. प्रतिध्वनीचीं प्रत्युत्तरें अथवा आरशामध्यें जें प्रतिबिंबित होतें, ते शब्द आणि रूप, आपलेंच कीं खरोखर दुसरें तेथें उत्पन्न होतें ? सांग. ७८. त्याप्रमाणें ह्या माझ्या शुद्ध स्वरूपीं जो भूतांच्या कल्पनेचा आरोप करतो, त्याला त्याच्याच कल्पनेमध्यें भूतांचा भास होतो. ७९. तीच कल्पना करणारी प्रकृति संपली कीं, भूताभास मूळ-चाच संपलेला आहे. मग एकसारखें माझें शुद्ध स्वरूप रहातें. ८०. हें असूं दे, आपण आपल्या भोंवतीं गरगर फिरलें असतां, अंगांत भोंवळ आल्यामुळें जसें ( भोंव-तालच्या ) भिंती, नदीचा कांठ वगैरे सर्व कांहीं ( इकडे तिकडे ) फिरल्यासारखें दिसतें, त्याप्रमाणें आपल्या कल्पनेनें माझ्या अखंड स्वरूपीं भूतें भासतात. ८१. तीच कल्पना टाकून पाहिलें असतां, मी प्राण्यांत व प्राणी माझ्यामध्यें; असें हें स्वप्नामध्येंसुद्धां कल्पना करण्यासारखें नाहीं. ८२. आतां मी एक प्राण्यास धारण करणारा अथवा प्राण्यामध्यें मी असणारा, हीं बोलणीं संकल्परूप ( कल्पनारूप ) सन्निपात झालेल्या मनुष्याच्या बडबडी आहेत. ८३. म्हणून आवडत्यांमध्यें उत्तम आवडणाऱ्या अर्जुना, ऐक; याप्रमाणें मी विश्वासहित विश्वाचा आत्मा आहें, आणि तो मी या मिथ्या भूत-

किया भूतग्रामा । भाव्यु सदा ॥ ८४ ॥ रश्मीचेनि आधारें जैसें । नव्हतेंचि मृगजळ आभासे । माझां ठायीं भूतजात तैसें । आणि मातेंही भावीं ॥ ८५ ॥ मी ये परीचा भूतभावनु । परि सर्व भूतांसि अभिन्नु । जैसी प्रभा आणि भानु । एकचि ते ॥ ८६ ॥ हा आम्हुचा ऐश्वर्ययोगु । तुवां देखिला कीं चांगु । आतां सांगें कांहीं एथ लागु । भूतभेदाचा असे ॥ ८७ ॥ यालागीं मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें निरुतें । आणि भूतांवेगळिया मातें । कहींच न मनीं हो ॥ ८८ ॥

यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् । तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

पैं गगन जेवढें जैसें । पवनु गगनीं तेवढाचि असे । सहजें हालविलिया वेगळा दिसे । एऱ्हवीं गगन तेंचि तो ॥ ८९ ॥ तैसें भूतजात माझां ठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं । निर्विकल्पीं तरि नाहीं । तेथ मीचि मी आघवें ॥ ९० ॥ म्हणऊनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचेनि सौरसें । जे कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ॥ ९१ ॥ तेंचि कल्पितें मुदल जाये । तैं असे नाहीं हें कें आहे । म्हणऊनि पुढती तूं पाहें । हा ऐश्वर्ययोगु ॥ ९२ ॥ ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणेयातें कल्लोळु एक करीं । मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूंचि आहासी ॥ ९३ ॥ या जाणणेयाचा चेवो । तुज आला ना म्हणती देवो । तरी आतां द्वैतस्वप्न वावो । जालें कीं ना ॥ ९४ ॥ तरी पुढती जरी विपायें । बुद्धीसि कल्पनेची झोंप ये । तरी अभेदबोधु जाये । जैं स्वप्नीं पडिजे ॥ ९५ ॥ म्हणोनि ये निद्रेची वाट मोडे । निखळ उद्बोधाचेंचि आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ॥ ९६ ॥ तरी धनुर्धरा धैर्या । निकें अवधान देईं बा धनंजया । पैं सर्व भूतांतें माया । करी हरी गा ॥ ९७ ॥

सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् । कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

जिये नांव गा प्रकृती । जे द्विविध सांगितली तुजप्रती । एकी अष्टधा भेदव्यक्ती । दुजी जीवरूपा ॥ ९८ ॥ हा प्रकृतीविखो आघवा । तुवां मागां परिसिलासे पांडवा ॥ म्हणोनि असो काइ सांगावा । पुढतपुढती ॥ ९९ ॥ तरी ये माझिये प्रकृती । महाकल्पाचां अंतीं । सर्व भूतें अव्यक्तीं । ऐक्यासी येती ॥ १०० ॥ ग्रीष्माचां अतिरसीं । सबीजे तृणें जैसीं । मागुती भूमीसी । सुलीनें होती ॥ १ ॥ कां वार्षियें ढेंढें फिटे । जेव्हां शारदीयेचा अनुघट्ट फुटे । तेव्हां घनजात आटे । गगनींचें गगनीं ॥ २ ॥ नातरी आकाशाचिये खोंपे । वायु निवांताचि लोपे । कां तरंगता हारपे । जळीं जेवीं ॥ ३ ॥ अथवा जागिनलिये वेळे । स्वप्न मनींचें मनीं मावळे । तैसें प्राकृत प्रकृती मिळे । कल्पक्षयीं ॥ ४ ॥ मग कल्पादीं पुढती । मीचि सृजीं ऐसी वदंती । तरी इयेविषयीं निरुती । उपपत्ति आइक ॥ ५ ॥

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः । भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥

समुदायाला सदा आश्रय आहें. ८४. सूर्यकिरणांच्या आधारानें जसें नुसतें मृगजळ भासतें, त्याप्रमाणें प्राणिमात्र माझ्या ठिकाणीं मृगजलवत् मिथ्या समज आणि मलाही सूर्यकिरणाप्रमाणें सत्य समज. ८५. या प्रकारचा मी जग या कल्पनेला आश्रय आहें. परंतु मी सर्व जगाहून वेगळा नाहीं असा आहें. तो कसा तर, ज्याप्रमाणें सूर्य आणि सूर्याचा प्रकाश एकच आहे ( त्याप्रमाणें सर्व प्राणि आणि मी एक आहें. ) ८६. अर्जुना, हा आमचा ऐश्वर्ययोग तुला चांगला समजला ना ? आतां येथें महत्तत्वापासून देहापर्यंतचीं तत्त्वें व मी, यामधील भेदाचा कांहीं संबंध आहे का ? सांग. ८७. यांकरितां माझ्याहून सगळे प्राणी वेगळे नाहींत हें खास; आणि मलाही प्राण्याहून वेगळें कधींच मानूं नकोस हो ! ८८.

महान् व सर्वत्र संचार करणारा वायु आकाशाचे ठिकाणीं नित्य स्थित आहे, त्याप्रमाणें सर्व भूतें माझे ठिकाणीं स्थित आहेत असें जाण. ६.

परंतु आकाश जसें जेवढें आहे, तसाच व तेवढाच वायु आकाशांत आहे. सहज पंखा हालवून पाहिलें, तर तो वेगळा दिसतो; नाहींतर आकाश व तो एकच आहे. ८९. त्याप्रमाणें प्राणिमात्र माझ्या ठिकाणीं कांहीं कल्पिले तर भासतात व जर कल्पना केली नाहीं, तर ते नाहींतच. त्या ठिकाणीं सर्व मीच मी आहें. ९०. म्हणून प्राणिमात्राचा भास आहे आणि नाहीं, हें कल्पनेच्या योगानें आहे. कारण कीं, भूताभास हा, कल्पना नष्ट झाली कीं, तिजबरोबर नष्ट होतो; व कल्पना उत्पन्न झाली कीं, तिजबरोबर उत्पन्न होतो. ९१. तीच मूळ कल्पना ज्या वेळीं नाहींशी होते, तेव्हां भूतांचें असणें व भूतांचें नसणें, हा व्यवहार कोठून होणार ? म्हणून तूं आणखी या ऐश्वर्ययोगासंबंधीं पुनः विचार कर. ९२. अशा अनुभवाच्या ज्ञानसमुद्रामध्यें तूं आपल्याला एक लाट कर. मग चराचरांत जर तूं पहाशील, तर तूंच एक आहेस. ९३, देव म्हणतात, अर्जुना, या ज्ञानाची जागृति तुला आली ना ? जर आली असेल, तर आतां द्वैतस्वप्न मिथ्या झालें कीं नाहीं ? ९४. तरी पुनः जर कदाचित् बुद्धीला कल्पनेची झोंप येईल, तर अभेदज्ञान जाईल आणि त्यामुळें मग ( कल्पनारूपी झोंप लागल्यावर ) तूं द्वैतरूपी स्वप्नांत पडशील. ९५. म्हणून या कल्पनारूपी झोंपेचा मार्ग मोडेल आणि आपण केवळ स्वरूपजागृतिरूपच होऊन जाऊं, असें जें एक वर्म आहे, तें आतां तुला उघड दाखवितों. ९६. तरी हे धैर्यवंत अर्जुना, बाबा, चांगलें लक्ष दे. अरे, सर्व प्राणीमात्रांना मायाच उत्पन्न करते व तीच त्यांचा नाश करते. ९७.

हे कौन्तेया, कल्पक्षयकालीं माझ्या मायेप्रत सर्व भूतें जातात. त्यांना पुन्हा ( दुसऱ्या ) कल्पाचे आरंभीं मी निर्माण करतों. ७.

जिला प्रकृति असें नांव आहे आणि जी तुला दोन प्रकारांनीं सांगण्यांत आली; एक आठ प्रकारचा भेद दाखवून स्पष्ट केली व दुसरी जीवरूपा म्हणून सांगितली. ९८. हा सर्व प्रकृतीचा विषय, अर्जुना, तूं मागें ( अध्याय ७ वा श्लोक ४–५ मध्यें. ) ऐकला आहेस, म्हणून आतां तो राहूं दे. वारंवार कशास सांगावयास पाहिजे ? ९९. तरी हीं सर्व भूतें महाकल्पाच्या शेवटीं या माझ्या अव्यक्त प्रकृतींत ऐक्याला येतात. १००. ग्रीष्म ऋतूच्या प्रखर उन्हाळ्यांत बीजासहित गवतें ज्याप्रमाणें पुनः भूमीमध्यें चांगली लीन होतात. १०१ अथवा वर्षाऋतूचें अवडंबर नाहींसें होतें व जेव्हां शरदृतूचा गुप्तपणा नाहींसा होतो ( म्हणजे शरदृतु जेव्हां लागतो ) तेव्हां मेघमात्र आकाशाचे आकाशांत नाहींसे होतात. १०२. अथवा आकाशाच्या घरांत वायु शांतच होऊन नाहींसा होतो अथवा लाटेचा आकार पाण्यामध्यें ज्याप्रमाणें नाहींसा होतो; १०३. अथवा जागृतिकालीं स्वप्न मनांतल्यामनांत नाहींसें होतें, त्याप्रमाणें कल्पक्षयाचे वेळीं प्रकृतीपासून झालेलें सर्व जग पुनः प्रकृतींत ऐक्याला पावतें. १०४. नंतर पुनः कल्पाच्या आरंभीं मीच सृष्टि उत्पन्न करतों, असें लोक बोलतात; तर याविषयीं खरा विचार ऐक. १०५.

आपल्या प्रकृतीचें अवलंबन करून, मी प्रकृतीच्या आधीन असलेले अस्वतंत्र असे हे सर्व भूतमात्र पुनः पुनः निर्माण करतों. ८.

तरी हेचि प्रकृति किरीटी । मी स्वकीया सहजें अधिष्ठीं । तेथ तंतूसमवायपटीं । जेविं विणावणी दिसे ॥ ६ ॥ मग तिये विणावणीचेनि आधारें । लहानां चौकडियां पटत्व भरे । तैसी पंचात्मकें आकारें । प्रकृतिचि होय ॥ ७ ॥ जैसें विरजणियाचेनि संगें । दूधाचि आटेजों लागे । तैशी प्रकृति आंगा रिगे । सृष्टिपणाचिया ॥ ८ ॥ बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेंचि शाखोपशाखीं होये । तैसें मज करणें आहे । भूतांचें हें ॥ ९ ॥ अगा नगर हें रायें केलें । या म्हणणया साचपण कीर आलें । परि निरुतें पाहतां काय शिणले । रायाचे हात ॥ ११० ॥ आणि मी प्रकृति अधिष्ठीं तें कैसें । जैसा स्वप्नीं जो असे । मग तोचि प्रवेशे । जागृतावस्थे ॥ ११ ॥ तरि स्वप्नौनि जागृती येतां । काय पाय दुखती पंडुसुता । कीं स्वप्नामाजीं असतां । प्रवासु होय ॥ १२ ॥ या आघवियाचा अभिप्रावो कायी । जे हें भूतसृष्टीचें कांहीं । मज एकही करणें नाहीं । ऐसाचि अर्थु ॥ १३ ॥ जैशी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा । तैसा प्रकृतिसंगु माझा । येर करणें तें इयेचें ॥ १४ ॥ पाहें पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्र भरतें अपार दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उपखा पडे ॥ १५ ॥ जड परि जवळिका । लोह चळे तरि चळो कां । कवणु शीणु भ्रामका । सन्निधानाचा ॥ १६ ॥ किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगींकारीं । आणि भूतसृष्टी एकसरी । प्रसवोंचि लागे ॥ १७ ॥ जो हा भूतग्रामु आघवा । असे प्रकृतिआधीन पांडवा । जैसी बीजाचिया वेलपालवा । समर्थ भूमि ॥ १८ ॥ नातरी बाळादिकां वयसां । गोसावी देहसंगु जैसा । अथवा घनावळी आकाशा । वार्षियें जेवीं ॥ १९ ॥ कां स्वप्नासि कारण निद्रा । तैसी प्रकृति हे नरेंद्रा । या अशेषाहि भूतसमुद्रा । गोसाविणी गा ॥ १२० ॥ स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हे असो भूतग्रामा । प्रकृतिचि मूळ ॥ २१ ॥ म्हणोनि भूतें हन सृजावीं । कां सृजिलीं प्रतिपाळावीं । इयें करणीं न येती आघवीं । आम्हांचिया आंगा ॥ २२ ॥ जळीं चंद्रिकेचिया पसरती वेली । ते वाटी चंद्रें नाहीं वाढविली । तेविं मातें पावोनि ठेलीं । दुरी कर्में ॥ २३ ॥

न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय । उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

आणि सुटलिया सिंधुजळाचा लोटु । न शके धरूं सैंधवाचा घाटु । तेविं सकळ कर्मां मीच शेवटु । काइ बांधती मातें ॥ २४ ॥ धूम्ररजांची पिंजरी । वाजतिया वायूतें जरी होकारी । कां सूर्यबिंबामाझारीं । आंधारें रिगे ॥ २५ ॥ हें असो पर्वताचिये हृदयींचें । जेविं पर्जन्य-धारास्तव न खोंचे । तेविं कर्मजात प्रकृतीचें । न लगे मज ॥ २६ ॥ एऱ्हवीं इये प्राकृतीं विकारीं । एकु मीचि आहे अवधारीं । परि उदासीनाचिया परी । करीं ना करवीं ॥ २७ ॥ दीपु ठेविला परिवरीं । कवणातें नियमी ना निवारी । आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणे ॥ २८ ॥ तो जैसा कां साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु । तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें ॥ २९ ॥ हा एकाचि अभिप्रावो पुढतपुढती । काय सांगों बहुतां उपपत्तीं । येथ एकेवेळां सुभद्रापती । येतुलें जाण पां ॥ १३० ॥

तर अर्जुना, या माझ्या मायेचा जेव्हां मी स्वभावतः अंगीकार करतों, तेव्हां सुताचा नित्य संबंध असलेल्या वस्त्रामध्यें ज्याप्रमाणें विणकर दिसते, १०६. त्या विणकरीच्या आधारानें मग लहान लहान चौकड्या एकत्र होऊन, जसें वस्त्र होतें; तशी मायाच पंचमहाभूतात्मक जगाच्या आकारानें प्रगट होते. १०७ ज्याप्रमाणें विरजणाच्या संबंधानें पातळ दूध दह्यांरूपानें घट्ट होत जातें, त्याप्रमाणें प्रकृति सृष्टिपणाच्या आकाराला येते. १०८. बीजाला पाण्याचें सान्निध्य मिळालें म्हणजे तें बीजच जसें लहानमोठ्या फांद्यांच्या रूपानें विस्ताराला पावतें, त्याप्रमाणें मला प्राणिमात्रांचें हें करणें ( उत्पन्न करणें ) आहे. १०९. अरे अर्जुना, नगर हें राजानें केलें, या म्हणण्याला खरोखर खरेपणा आला आहे. पण वास्तविक पाहिलें तर, नगर रचण्यांत राजाच्या हाताला श्रम पडले आहेत काय ? ११०. आणि मी प्रकृतीचा अंगीकार करतों, तें कसें म्हणशील तर, जसा स्वप्नामध्यें जो असतो तोच मग जाग्रतावस्थेंत प्रवेश करतो, त्याप्रमाणें. १११. तर अर्जुना, स्वप्नांतून जागृतींत येतांना त्याचे पाय दुखतात काय ? अथवा स्वप्नामध्यें असतांना प्रवास होतो काय ? ११२. या सर्वांचा अभिप्राय काय म्हणून विचारशील तर, या भूतसृष्टीचें मला कांहीं एक देखील करावें लागत नाहीं; असाच याचा अर्थ आहे. ११३. ज्याप्रमाणें राजाची आश्रित प्रजा आपापल्या व्यवहारांत वागते, त्याप्रमाणें प्रकृतीला माझ्या सत्तेचा केवळ आधार असतो. बाकी सर्व कर्तृत्व हिचें ( प्रकृतीचें ) आहे. ११४. पहा, कीं, अर्जुना, पौर्णिमेच्या पूर्णचंद्राच्या भेटीनें समुद्र भरतीनें अफाट भरून येतो, त्या भरती येण्यांत चंद्राला श्रम पडतात काय ? ११५. ( लोहचुंबकाच्या ) जवळपणानें अचेतन लोखंड हालतें तर हालेना का ? पण जड लोखंडाला जवळ ओढून आणण्याचे श्रम लोहचुंबकाला काय पडले ? ११६. फार काय सांगावें ? याप्रमाणें मी आपल्या प्रकृतीचा अंगीकार करतों; व त्या योगानें ती प्रकृति भूतसृष्टीला एकसारखी उत्पन्न करूंच लागते. ११७. अर्जुना, हा जो सर्व प्राण्यांचा समुदाय आहे, तो प्रकृतीच्या स्वाधीन आहे. ज्याप्रमाणें बीजाच्या वेलाला आणि पानांना उत्पन्न करण्यास भूमि ( जमीन ) समर्थ आहे, ११८. अथवा बाल्यादि अवस्थांस जसा देहसंग आधार आहे किंवा ज्याप्रमाणें आकाशांत मेघांची फळी येण्यास वर्षाऋतु आधार आहे, ११९. अथवा स्वप्नाला कारण जशी झोंप आहे, त्याप्रमाणें हे श्रेष्ठ पुरुषा अर्जुना, या सर्वही भूतसमुद्राची मालकीण प्रकृति आहे. १२०. स्थावरांना अथवा जंगमांना, मोठ्यांना अथवा लहानांना हें राहूं द्या, सर्व भूतसमुदायास प्रकृतीच मूळ आहे. १२१. म्हणून भूतें उत्पन्न करावींत, अथवा उत्पन्न केलेलीं भूतें रक्षण करावींत, या सर्व गोष्टी करण्याचा संबंध आमच्याकडे मुळींच येत नाहीं. १२२. पाण्यामध्यें चांदण्याच्या वेली पसरलेल्या दिसतात, त्या वेली वाढविण्याचें काम जसें चंद्रानें केलें नाहीं, त्याप्रमाणें जगाचें उत्पत्ति, स्थिति वगैरे कर्म माझ्यापासून दूर राहिलें आहे. १२३.

हे धनंजया, या ( जगदुत्पत्तिसंहारात्मक ) कर्मांचे ठिकाणीं आसक्त व उदासीनाप्रमाणें असलेल्या मला हीं कर्में बंधन करूं शकत नाहींत. ९.

आणि समुद्राच्या पाण्याचा लोट सुटला असतां त्यास मिठाचा बांध थोपवून धरूं शकणार नाहीं. ( कारण मिठाचा अंत समुद्राच्या पाण्यांत होतो. ) त्याप्रमाणें सर्व कर्मांची समाप्ति जर माझ्या स्वरूपीं होते, तर तीं कर्में मला काय बांधणार ? १२४. धुराच्या कणांचें छत जर जोरानें वाहणाऱ्या वाऱ्यास थांबवील, अथवा सूर्यबिंबांत जर अंधार प्रवेश करील, १२५. हें राहूं दे. पर्वताच्या पोटांतील पदार्थ जसा पावसाच्या धारांनीं झोडला जात नाहीं, त्याप्रमाणें प्रकृतीचें कर्ममात्र मला बाधूं शकत नाहीं. १२६. सहज विचार करूंच पाहिलें तर, या प्रकृतीच्या विकारामध्यें ( जगामध्यें ) मीच एक आहें, हें लक्षांत ठेव. परंतु एकाद्या उदास पुरुषाप्रमाणें मी स्वतः कांहीं करीत नाहीं अथवा दुसऱ्याकडून कांहीं करवीत ( ही ) नाहीं. १२७. घरांत ठेवलेला दिवा, कोणाला तूं अमुक एक काम कर, असा नियम घालून देत नाहीं; अथवा कोणी कांहीं काम करीत असलें, तर, त्याचें निवारण करीत नाहीं; आणि घरामध्यें कोण काय काम करीत आहे, तेंही जाणत नाहीं, १२८. ज्याप्रमाणें तो दिवा घरांत तटस्थ असून घरांतील सर्व व्यापाराच्या प्रवृत्तीला कारण असतो, त्याप्रमाणें सर्व भूतांमध्यें मी असून, त्यांच्याकडून होणाऱ्या कर्मांमध्यें मी उदासीन आहें. १२९. हा एकच विचार पुनः पुनः अनेक युक्तिप्रयुक्तीनें काय सांगूं ? अर्जुना येथें ( आणखी ) एकवार एवढें समज म्हणजे झालें. १३०.

मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् । हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

जे लोकचेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता । तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ॥ ३१ ॥ कां जें मियां अधिष्ठिलिया प्रकृती । होती चराचराचिया संभूती । म्हणोनि मी हेतु हें उपपत्ती । घडे यया ॥ ३२ ॥ आतां येणें उजिवडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें । जे माझ्या ठायीं भूतें । परी भूतीं मी नसें ॥ ३३ ॥ अथवा भूतें ना माझां ठायीं । आणि भूतांमाजि मी नाहीं । या खुणा तूं कहीं । चुकों नको ॥ ३४ ॥ हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड । आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ॥ ३५ ॥ हा दंशु जंव नये हातां । तंव माझें साचोकारेपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेविं भुसीं कणु ॥ ३६ ॥ एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें । आवडे कीर कळलें ऐसें । परि मृगजळाचेनि वोलांशें । काय भूमि तिमे ॥ ३७ ॥ जें जाळ जळीं पांगिलें । तेथ चंद्रबिंब दिसे आंतुडलें । परि थडिये काढूनि झाडिलें । तेव्हां बिंब कें सांगें ॥ ३८ ॥ तैसें बोलवरि वाचाबळें । वायांचि झकविजती प्रतीतीचे डोळे । मग साचोकारें बोधावेळे । आथि ना होईजे ॥ ३९ ॥

अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् । परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥

किंबहुना भवा बिहा या । आणि साचें चाड आथि जरी मियां । तरि तुम्हीं गा उपपत्ती इया । जतन कीजे ॥ १४० ॥ एऱ्हवीं वेधली दिठी कवळें । तें चांदणियातें म्हणे पिंवळें । तेविं माझ्या स्वरूपीं निर्मळे । देखाल दोष ॥ ४१ ॥ नातरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे कडू विख । तेविं अमानुषा मानुष । मानाल मातें ॥ ४२ ॥ म्हणऊनि पुढती तूं धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया । जे इया स्थूलदृष्टी वायां । जाइजेल गा ॥ ४३ ॥ पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें । जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमरा नोहिजे ॥ ४४ ॥ एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ । परि तें जाणणेंचि जाणणेया आड । रिगोनि ठाके ॥४५॥ जैसा नक्षत्राचिया आभासा- । साठीं घातु झाला तया हंसा । माजीं रत्नबुद्धीचिया आशा । रिगोनियां ॥ ४६ ॥ सांगें गंगा या बुद्धी मृगजळ । ठाकोनि आलियाचें कवण फळ । काय सुरतरु म्हणोनि बाबुळ । सेविली करी ॥ ४७ ॥ हा निळयाचा दुसरा । या बुद्धी हातु घातला विखारा । कां रत्नें म्हणोनि गारा । वेंची जेविं ॥ ४८ ॥ अथवा निधान हें प्रगटलें । म्हणोनि खदिरांगार

हे कौंतेया, माझा आश्रय मिळाला असतांना माया चराचर जगत् निर्माण करते. या कारणास्तव ( म्हणजे मी जगाशीं प्रत्यक्ष संबद्ध नसल्यामुळें त्रिगुणात्मिका व अविद्यारूपी मायेच्या प्रभावानें ) जग पुनः पुनः उत्पन्न होतें ( व नाश पावतें ) १०.

तें हें कीं, लोकांच्या सर्व व्यापाराला सूर्य जसा निमित्त-मात्र आहे, त्याप्रमाणें अर्जुना, जगाच्या उत्पत्तीला मी हेतु आहे असें समज. १३१. कारण कीं, मी प्रकृतीचा अंगीकार केला, म्हणजे तिच्यापासून चराचरांची उत्पत्ति होते. म्हणून मी या चराचरांच्या उत्पत्तीला हेतु आहें, असें युक्तीला जुळतें. १३२. आतां या विचाराच्या प्रकाशानें तूं माझ्या स्वरूपऐश्वर्ययोगाला चांगलें न्याहा-ळून पहा. ( तें असें कीं, ) माझ्या ठिकाणीं सर्व प्राणी आहेत, पण मी प्राण्यांमध्यें नाहीं. १३३. अथवा भूतें माझ्या ठिकाणीं नाहींत आणि भूतांमध्यें मी नाहीं, हें वर्म तूं कधींही विसरूं नकोस. १३४. ही आमची सर्वस्वी गुप्त गोष्ट आहे; परंतु तुला उघड करून सांगि-तली आहे. आतां इंद्रियांचीं द्वारें बंद करून ( सर्व इंद्रियवृत्ति अंतर्मुख करून ) तूं ह्या गुह्य विचारांचा अंतःकरणांत अनुभव घे. १३५. अर्जुना, हें वर्म जो-पर्यंत स्वाधीन होणार नाहीं, तोंपर्यंत माझी खरी स्वरूप-स्थिति मुळींच अनुभवास येणार नाहीं. ( कशी तर ) ज्याप्रमाणें कोंडयांत दाणा शोधला असतां सांपडणार नाहीं त्याप्रमाणें. १३६. साधारणपणें पाहिलें असतां तर्कांच्या वाढीनें ( माझी स्वरूपस्थिति ) खरोखर कळल्या-सारखें वाटतें. ( पण तें खरें कळलें नाहीं. तें कसें तर पुढील उदाहरणानें सांगतात. ) परंतु मृगजलाच्या ओला-व्यानें जमीन भिजेल काय ? १३७. जेव्हां जाळें पाण्यांत पसरलें, तेव्हां त्यांत चंद्रबिंब सांपडल्यासारखें दिसतें; परंतु तें जाळें पाण्यांतून काढून कांठावर झाडलें, तेव्हां चंद्रबिंब कोठें आहे, सांग बरें ! १३८. त्याप्रमाणें वक्तृत्वाच्या जोरावर कित्येक आपल्या प्रतिपादनानें ( स्वतःच्या ) अनुभवाचे डोळे उगीच झांकण्यास लाव-तात. ( आपण आपल्याला फसवितात. ) मग खऱ्या बोधाची वेळ ( बोधाच्या परीक्षेची वेळ ) आली म्हणजे बोध असतही नाहीं व होतही नाहीं. १३९.

माझें उत्कृष्ट स्वरूप न जाणणारे मूढ, ( सर्व ) भूतांचा ईश्वर असलेल्या ( पण सांप्रत ) मानवदेह धारण करणाऱ्या ( मला मनुष्यच समजून, मनुष्य-धर्म माझेवर आरोपित करून ) माझी अवहेलना करतात. ११.

फार काय सांगावें ? जर तुम्ही या संसाराला भीत असाल आणि माझ्या स्वरूपप्राप्तीविषयीं जर तुम्हांला खरी खरी इच्छा असेल, तर आम्हीं हे सांगितलेले विचार तुम्ही ध्यानांत ठेवा. १४०. नाहींतर (ज्याप्रमाणें) काविळीनें व्यापलेली दृष्टि चांदण्याला पिवळें समजते; त्याप्रमाणें माझ्या शुद्ध स्वरूपांत दोष पहाल, १४१. अथवा तापानें बिघडलेलें तोंड, दुधाला कडू विष म्हणतें, त्याप्रमाणें मी जो देहधर्मरहित, त्या मला देहधर्मयुक्त आहे, असें मानाल. १४२. म्हणून अर्जुना, पुनः तुला एकवार बजावतों कीं, तूं कदाचित् या सांगित-लेल्या ( स्वरूपज्ञानाच्या ) अभिप्रायाला विसरशील, तर विसरूं नकोस. कारण या स्थूलदृष्टीनें मला पाहूं म्हटलें तर, तें पाहणें व्यर्थ जाणार आहे. १४३. ज्याप्रमाणें स्वप्नांतील अमृतानें अमर होतां येत नाहीं, ( कारण तें पिऊनही न प्यायल्याप्रमाणें आहे ), त्याप्रमाणें मी देहधारी आहे अशी बुद्धि ठेवून जे माझ्याकडे पहातात त्यांचें तें पाहणें खरोखर न पाहाण्यांत जमा आहे, असें समज. १४४. एऱ्हवीं मी स्थूल आहें, अशा दृष्टीनें माझ्याकडे पाहाणारे जे मूर्ख लोक, ते आपल्या समजुती-प्रमाणें पूर्णपणें जाणतात, हें खरें आहे; परंतु त्यांचें तें जाणणेंच, माझ्या स्वरूपाचें खरें ज्ञान होण्यास प्रति-बंध करतें. १४५. ज्याप्रमाणें पाण्यांतील नक्षत्रांच्या प्रतिबिंबामुळें, तीं रत्नें आहेत, अशा समजुतीनें त्या-विषयीं लोभ धरून व पाण्यांत शिरून ( तीं खाण्याच्या आशेनें पाण्यांतील खडकावर चोंच आपटून ) जसा एकाद्या हंसानें आपला घात केला. १४६. अर्जुना, सांग, ही गंगा आहे, अशा समजुतीनें मृगजळाजवळ येऊन पोहोंचलें, तर त्याचें फळ काय ? अथवा कल्पवृक्ष म्हणून बाभळीचा आश्रय केला, तर ती बाभळ इच्छिलेलें फळ देईल काय ? १४७. हा नीळ मण्यांचा दोन पदरी हार आहे. या बुद्धीनें तो घेण्याकरितां सापाला उचलून घेण्यास तयार झाला; अथवा हीं रत्नें आहेत अशा समजु-तीनें जशा गारगोट्या वेंचाव्यात; १४८. किंवा द्रव्याचा ठेवाच प्रगट झाला आहे, असें समजून खैराचे निखारे आपल्या पदरांत भरावेत अथवा ही आपली पडछाया

खोळे भरिले । कां साउली नेणतां घातलें । कुहां सिंहें । ॥ ४९ ॥ तेविं मी म्हणोनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची । तिहीं चंद्रासाठीं जेविं जळींची । प्रतिभा धरिली ॥ १५० ॥ तैसा कृतनिश्चय वायां गेला । जैसा कोण्ही एकु कांजी प्याला । मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ॥ ५१ ॥ तैसें स्थूलाकारीं नाशिवंते । भरंवसा बांधोनि चित्तें । पाहती मज अविनाशातें तरी कैंचा दिसें ॥ ५२ ॥ काइ पश्चिमसमुद्राचिया तटा । निघिजत आहे पूर्विलिया वाटा । कां कोंडा कांडतां सुभटा । कणु आतुडे ॥ ५३ ॥ तैसें विकारलें हें स्थूळ । जाणितलेया मी जाणवतसें केवळ । काइ फेण पितां जळ । सेविलें होय ॥ ५४ ॥ म्हणोनि मोहिलेनि मनोधर्मे । हेंचि मी मानूनि संभ्रमें । मग येथिंचीं जियें जन्मकर्मे । तियें मजचि म्हणती ॥ ५५ ॥ येतुलेनि अनामा नाम । मज अक्रियासि कर्म । विदेहासि देहधर्म । आरोपिती ॥ ५६ ॥ मज आकारशून्या आकारु । निरुपाधिका उपचारु । मज विधिविवर्जिता व्यवहारु । आचारादिक ॥ ५७ ॥ मज वर्णहीना वर्णु । गुणातीतासि गुणु । मज अचरणा चरणु । अपाणिया पाणी ॥ ५८ ॥ मज अमेया मान । सर्वगतासी स्थान । जैसें सेजेमाजी वन । निदेला देखे ॥ ५९ ॥ तैसें अश्रवणा श्रोत्र । मज अचक्षूसी नेत्र । अगोत्रा गोत्र । अरूपा रूप ॥ १६० ॥ मज अव्यक्तासि व्यक्ती । अनार्तासी आर्ती । स्वयंतृप्ता तृप्ती । भाविती गा ॥ ६१ ॥ मज अनावरणा प्रावरण । भूषणातीतासि भूषण । मज सकळकारणा कारण । देखती ते ॥ ६२ ॥ मज सहजातें करिती । स्वयंभातें प्रतिष्ठिती । निरंतरातें आव्हानिती । विसर्जिती गा ॥ ६३ ॥ मी सर्वदा स्वतःसिद्धु । तो कीं बाळ तरुण वृद्धु । मज एकरूपा संबंधु । जाणती ऐसे ॥ ६४ ॥ मज अद्वैतासि दुजें । मज अकर्तयासि काजें । मी अभोक्ता कीं भुंजें । ऐसें म्हणती ॥ ६५ ॥ मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचेनि निधनें शिणती । मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ॥ ६६ ॥ मी स्वानंदाभिरामु । तया मज अनेकां सुखांचा कामु । अघवाचि मी असे समु । कीं म्हणती एकदेशी ॥ ६७ ॥ मी आत्मा एक चराचरीं । म्हणती एकाचा कैंपक्ष करीं । आणि कोपोनि एकातें मारीं । हेंचि वाढविती ॥ ६८ ॥ किंबहुना ऐसे समस्त । जे हे मनुष्यधर्म प्राकृत । तयाचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयांचें ॥ ६९ ॥ जंव आकारु एक पुढां देखती । तंव हा देव येणें

आहे, असें न समजतां सिंहानें विहिरींत उडी घालावी; १४९. त्याप्रमाणें ज्यांनीं मी परमात्मा देहधारी आहें, असें समजून, आपल्या बुद्धीमध्यें माझ्याविषयींचा असा (मी देहधर्मवान आहे असा) कृतनिश्चय केला, त्यांनीं खरा चंद्र म्हणून पाण्यांतील चंद्राचें प्रतिबिंब घेतल्यासारखें आहे. १५०. तसा परमात्मा देहधारी आहे, असा त्यांचा ठाम निश्चय व्यर्थ गेला. (हें कसें झालें?) तर ज्याप्रमाणें कोणी एकाद्यानें भाताची पेच पिऊन मग अमृताचा परिणाम पहावा (त्याप्रमाणें.) १५१. तसें नाशवंत जो स्थूल आकार त्या ठिकाणींच (तेंच माझें खरें स्वरूप असा) आपल्या मनामध्यें निश्चय करून, ते जर मला अविनाशाला पहातात, तर त्यांना मी कसा दिसेन? १५२. अर्जुना, पूर्वेच्या मार्गाला निघून कोणाला पश्चिमसमुद्राच्या किनाऱ्यास पोहोंचतां येईल काय? अथवा अर्जुना, कोंडा कांडून त्यापासून दाणे प्राप्त होतील काय? १५३. त्याप्रमाणें आकाराला आलेलें हें शरीर, हेंच मी, असें मला जाणलें असतां माझें केवळ (खरें) स्वरूप जाणलें जाईल काय? फेस प्यायल्यानें पाणी प्यायल्यासारखें होईल काय? १५४. म्हणून मोहित झालेल्या मनोवृत्तीनें हें स्थूल शरीरच मी (परमात्मा) आहें असें मानून, मग या देहाचीं जीं जन्मादि कर्में, तीं माझ्यावर लादतात. १५५. एवढ्यामुळें नांव नसलेल्या मला नांव देतात. वस्तुतः मी क्रियाशून्य असून मी क्रिया करतों असें म्हणतात व देहादि मर्यादेनें रहित असलेल्या मला, जन्ममरणादिक जे देहधर्म, त्यांचा संबंध लावतात. १५६. जो मी निराकार आहे, त्या मला आकार आहे, असें मानतात व देहरहित जो मी, त्या मला पूजेचे उपचार अर्पण करितात. शास्त्रमर्यादेचें बंधन नसलेल्या मला, आचारादिक व्यवहार लावतात. १५७. ब्राह्मणादि जातींच्या पलीकडे असणाऱ्या मला एका विशिष्ट जातीचा समजतात; निर्गुणाला सगुण समजतात, पाय नसतांना माझे ठिकाणीं पायांची कल्पना करितात; व त्याचप्रमाणें हातांच्या कल्पनेस माझ्या ठिकाणीं जागा नसूनहि, हात या अवयवांची कल्पना करितात. १५८. मोजतां न येण्याइतकें माझें स्वरूप अमर्याद आहे. परंतु मलाही मर्यादेंत घालतात. मी खरोखर सर्व ठिकाणीं असूनही, मला एकादे ठिकाण कल्पितात. ज्याप्रमाणें निजलेला मनुष्य स्वप्नांत आपल्या अंथरुणावर अरण्य पाहतो, १५९. त्याप्रमाणें कान वगैरेंचा संबंध माझ्या ठिकाणीं नसतांना कानाची कल्पना करितात; डोळ्यांचा संबंध माझ्या ठिकाणीं नसतांनाही डोळे कल्पितात, व कोणत्याही नात्याचा संबंध नसतांना नातेवाईकांची कल्पना करितात. मी काळा गोरा वगैरे नसतांनाही तसल्या रूपाची माझ्या ठिकाणीं कल्पना करितात १६०. मी जो अदृश्य, त्या मला दृश्य असें समजतात; मी जो इच्छारहित, त्या मला इच्छा आहे असें मानतात. मी जो स्वतःसिद्ध तृप्त, त्या मला तृप्ति कल्पितात. १६१. मी वस्त्रांत गुंडाळता येण्यासारखा नसून, मला वस्त्र नेसवितात. शृंगाराच्या पलिकडे असतांना, माझ्याकरितां दागिन्यांची योजना करितात. सर्व जगाला मी उत्पन्न करणारा असून, माझ्याही उत्पन्न करण्याची कल्पना ते करितात १६२. नित्य असणारा जो मी, त्या मला (मूर्तिवगैरेंच्या द्वारें) घनवितात. मी जो नित्यसिद्ध, त्या माझी प्राणप्रतिष्ठा करितात. अर्जुना, सर्वांच्या आत्मत्वानें अखंडदंडायमान असणारा जो मी, त्या मला आवाहन करतात आणि माझें विसर्जन करतात. १६३. मी सर्वदा स्वतःसिद्ध आणि एकरूप आहें त्या मला बाल्य, तारुण्य व वृद्धावस्था यांचा संबंध आहे असें समजतात. १६४. माझी अद्वैतस्थिति असतांना, माझ्या मागें द्वैत लावतात व मी कर्मरहित असून, कर्में करतों असें मानतात. आणि मी जो अभोक्ता, तो मी भोग भोगतों असें मानतात. १६५. माझें कुळरहिताचें कूळ वर्णन करितात. मी जो नित्य, त्या माझ्या मरणानें दुःखी होतात व अर्जुना, मी सर्वांच्या अंतर्यामीं असणारा त्या मला शत्रु मित्र आहेत असें मानतात. १६६. स्वकीय आनंदांत रममाण असणारा जो मी, त्या मला अनेक सुखांची इच्छा आहे असें म्हणतात. मी सगळीकडे सारखा व्यापलेला असून, मला एका ठिकाणीं आहें, दुसऱ्या ठिकाणीं नाहीं असें म्हणतात. १६७ मी स्थावरजंगमाचा एकच असा आत्मा असतां, मी एकाचा कैवार घेतों असें म्हणतात, आणि रागावून एकाला मारतो, हेंच जगांत प्रसिद्ध करतात. १६८. फार काय सांगावें? असे हे जे मनुष्याचे सामान्यधर्म, तेच सर्व धर्म माझ्या ठिकाणीं आहेत, असें त्या अज्ञानी लोकांचें विपरित ज्ञान असतें. १६९. जेव्हां एकादी मूर्ति आपल्यापुढें पाहतात, त्या वेळेला ती मूर्ति हाच देव आहे, अशा समजुतीनें भक्ति करतात, आणि

भावें भजती । मग तोचि विघडलिया टाकिती । नाहीं म्हणोनि ॥ १७० ॥ मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसेनि आकारें । म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें । ज्ञानासि करी ॥ ७१ ॥

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः । राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥

यालागीं जन्मलेचि ते मोघ । जैसें वार्षियेवीण मेघ । कां मृगजळाचे तरंग । दुरूनीचि पाहावे ॥ ७२ ॥ अथवा कोल्हेरीचे असिवार । नातरीं वोडंबरीचे अळंकार । कीं गंधर्वनगरीचे आवार । आभासती कां ॥ ७३ ॥ साबरी वाढिन्नल्या सरळा । वरी फळ ना आंतु पोकळा । कां स्तन जाले गळां । शेळिये जैसे ॥ ७४ ॥ तैसें मूर्खांचें तयां जियालें । आणि धिग कर्म तयांचें निपजलें । जैसें सांवरी फळ आलें । घेपे ना दीजे ॥ ७५ ॥ मग जें कांहीं ते पढिन्नले । तें मर्कटें नारळ तोडिले । कां आंधळ्या हातीं पडिलें । मोतीं जैसें ॥ ७६ ॥ किंबहुना तयांचीं शास्त्रें । जैशीं कुमारीं हातीं दिधलीं शस्त्रें । कां अशौच्या मंत्रें । बीजें कथिलीं ॥ ७७ ॥ तैसें ज्ञानजात तयां । आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया । तें आघवेंचि गेलें वायां । जे चित्तहीन ॥ ७८ ॥ पैं तमोगुणाची राक्षसी । जे सद्‌बुद्धीतें ग्रासी । विवेकाचा ठावोचि पुसी । निशाचरी ॥ ७९ ॥ तिये प्रकृती वरपडे जाले । म्हणऊनि चिंतेचेनि कपोलें गेले । वरि तामसीयेचियेे पडिले । मुखामाजीं ॥ १८० ॥ जेथ आशेचिये लाळे । आंतु हिंसा जीभ लोळे । तेवींचि संतोषाचे चाकळे । अखंड चघळी ॥ ८१ ॥ जे अनर्थाचे कानवेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची दरी । सदाचि मातली ॥ ८२ ॥ जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । जे अगस्तीगवसणी मूढां । स्थूलबुद्धि ॥ ८३ ॥ ऐसे आसुरिये प्रकृतीचां तोंडीं । जे जाले गा भूतोंडीं । ते बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाचां ॥ ८४ ॥ एवं तमाचिये पडिले गर्तें । न पविजतीचि विचाराचेनि हातें । हें असो ते गेले जेथें । ते शुद्धीचि नाहीं ॥ ८५ ॥ म्हणोनि असोतु इयें वायाणीं । कायशीं मूर्खांचीं बोलणीं । वायां वाढवितां वाणी । शिणेल हन ॥ ८६ ॥

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः । भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

ऐसें बोलिलें देवें । तेथ जी म्हणितलें पांडवें । आइकें जेथ वाचा विसवे । ते साधुकथा ॥ ८७ ॥ तरी जयांचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जयां निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥ ८८ ॥ जयांचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा । जयांचें मन ओलावा । विवेकासी ॥ ८९ ॥ जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले । जे शांतीसि आले । पालव नवे ॥ १९० ॥ जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ । जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥ ९१ ॥ जयां भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती । जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥ ९२ ॥ जे आघवांचि करणीं । लेइले

मग तीच मूर्ति भंगली, म्हणजे हा परमात्मा नाहीं, असें समजून पूजा करण्याचें थांबवतात. १७०. अशा अशा या प्रकारांनीं, आकारावरून इतर देहधाऱ्यांसारखाच मी एक मनुष्य आहें; असें समजतात. म्हणून त्यांचें तें विपरीत ज्ञान माझ्या शुद्ध स्वरूपाच्या यथार्थ ज्ञानास झांकून टाकतें. १७१.

त्यांच्या ( मूढांच्या ) ( देवतोपासनेच्या फलांच्या ) इच्छा निष्फल आहेत, त्यांचीं कर्में निष्फल आहेत, त्यांचें ज्ञान निष्फल आहे, ते विवेकरहित आहेत. ( कारण ) राक्षसी ( तामसी ) आणि आसुरी ( कामक्रोधादिरूपी ) अशा मोहमय प्रकृतीचा त्यांनीं अवलंब केला आहे. १२.

म्हणून त्यांचें जन्माला येणेंच फुकट आहे. ज्याप्रमाणें पावसाळ्यावांचून आलेले ढग किंवा मृगजळांत दिसणाऱ्या लाटा ह्या गोष्टी दुरूनच दिसण्यास बऱ्या असतात; १७२. अथवा मातीचे घोडेस्वार किंवा गारुडीविद्येनें केलेले दागिने किंवा आकाशांत ढगांच्या आकृतीमुळें दिसणाऱ्या गावांचे गांवकूस, हे ज्याप्रमाणें दिसतात मात्र, पण वास्तविक मिथ्या असतात; १७३. सरळ वाढलेल्या कांडेनिवडुंगाला वर फळ नसतें व आंत गाभाही नसतो ( पोकळ असतो ); किंवा शेळीचे गलोल व्यर्थ असतात; १७४. त्याप्रमाणें त्या अविचारी लोकांचें जीवित व्यर्थ आहे. ज्याप्रमाणें सांवरीला आलेलें फळ देवघेवीच्या उपयोगाचें नसतें, ( त्याप्रमाणें त्यांचें कर्म व्यर्थ असतें ) म्हणून त्यांच्या हातून घडलेल्या कर्माला धिःकार असो. १७५. मग ते अज्ञानी जें कांहीं शिकलेले असतात तें त्यास, माकडानें नारळ तोडल्यासारखें अथवा आंधळ्याच्या हातांत मोतीं पडल्यासारखें, ( निरुपयोगी आहे. ) १७६. फार काय सांगावें ? त्यांचीं जेवढीं म्हणून शास्त्रें आहेत, तेवढीं जशीं कां लहान मुलींच्या हातांत दिलेलीं शस्त्रें अथवा अशुद्ध मनुष्यास सांगितलेले बीजमंत्र, (त्याप्रमाणें निरर्थक असतात.) १७७. त्याप्रमाणें अर्जुना, त्यांचें संपूर्ण ज्ञान व जें कांहीं त्यांनीं आचरण केलें असेल, तें संपूर्ण व्यर्थ जातें. कारण कीं, त्यांचें चित्त स्थिर नसतें. १७८. सद्बुद्धीला गिळून टाकणारी व विचाराचा ठावठिकाणा नाहींसा करणारी व (अज्ञानरूपी) रात्रींत संचार करणारी जी तमोगुणरूपी राक्षसी, १७९. त्या असुरी राक्षसीच्या स्वाधीन झाले, म्हणून ते चिंतारूपी गालाच्या द्वारें आणखी त्या तामसी राक्षसीच्या मुखांत पडले गेले. १८०. जिच्या मुखांत आशेच्या लाळेमध्यें हिंसारूपी जीभ लोळते व त्याचप्रमाणें जी राक्षसी संतोषरूपी चघळ नेहमीं चघळीत असते ; ( म्हणजे जी संतोष नेहमीं नाहींसा करते; ) १८१. जी राक्षसी अनर्थाच्या कानापर्यंत ओंठांचे कांठ चाटीत बाहेर निघते व जी राक्षसी नेहमींच प्रमादरूपी पर्वताची माजलेली ( भयप्रद ) दरी आहे; १८२. जिच्या तोंडामध्यें द्वेषरूपी दाढा ज्ञानाचा खसखसा चुराडा करीत आहेत व जी अगस्ति ऋषीस आवरण असलेल्या कुंभाप्रमाणें स्थूलबुद्धीच्या मूर्खांना आवरण करणारी आहे; १८३. अशा असुरी प्रकृतीच्या तोंडांत, जे भूताला टाकलेल्या बळीप्रमाणें पडले, ते भ्रांतीच्या कुंडांत बुडून गेले. १८४. याप्रमाणें ते तमोगुणाच्या खळग्यांत पडले; ते विचाराच्या हाताला लागत नाहींत. हें असो, ते अशा ठिकाणाला गेले कीं जेथें त्यांचा पत्ताच लागत नाहीं. १८५. म्हणून हें निष्फळ वर्णन राहूं दे. मूर्ख लोकांची कथा कशाला ? तिच्या विस्तारानें वाचेला व्यर्थ शीण मात्र होणार आहे. १८६.

हे पार्था, पण, दैवी स्वभावाचा आश्रय करणारे महात्मे, भूतांचे आदिकारण व क्षयरहित अशा मला जाणून, अनन्य होत्साते, माझी भक्ति करतात. १३.

श्रीकृष्ण असें म्हणाले, त्या प्रसंगीं अर्जुन म्हणाला, होय, महाराज. ( तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले ) ज्या साधूंच्या वर्णनांत वाणीला विश्रांति मिळते, ती साधुकथा ऐक. १८७. ज्यांच्या शुद्ध मनरूपी क्षेत्रांत मी क्षेत्रसंन्यासी होऊन असतों व जे पुरुष निजले असतां वैराग्य त्यांची उपासना करतें, ( म्हणजे स्वप्नांत सुद्धा ज्यांचें वैराग्य ढळत नाहीं. ) १८८. ज्यांच्या कळकळीच्या चांगल्या वासनेंत धर्म राज्य करतो ( ज्यांना अधर्माची इच्छा उत्पन्न होत नाहीं, ) व ज्यांचें मन विचारास जीवन आहे, १८९. ज्यांनीं ज्ञानरूपी गंगेंत स्नान केलेलें आहे व जे पुरुष पूर्णता जेऊन तृप्त झाले आहेत आणि जे पुरुष शांतीरूपी वेलीचीं कोंवळीं पानें आहेत, १९०. जे पुरुष परिणामाला ( पूर्ण अवस्थेला ) फुटलेले अंकुर आहेत, जे ( सात्विक ) धैर्यरूपी मांडवाचे खांब आहेत, जे पुरुष ब्रह्मानंदरूपी समुद्रांत तुडुंब बुडवून भरलेले घट आहेत, १९१. ज्यांना भक्तीची एवढी प्राप्ति असते कीं, ते मोक्षाला 'पलीकडे हो' असें म्हणतात; ज्यांच्या सहज कर्माचरणामध्यें नीति जगलेली दिसते, १९२. ज्यांनीं सर्व

शांतीची लेणीं । जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥ ९३ ॥ ऐसे जे महानुभाव । जे दैविये प्रकृतीचें दैव । जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥ ९४ ॥ मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे । परि दुजेपण मनोधर्में । शिवतलें नाहीं ॥ ९५ ॥ ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक ॥ ९६ ॥

सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः । नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे । जे नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ॥९७॥ यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं । यमलोकीं खुंटिली । राहाटी आघवी ॥ ९८ ॥ यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणती काय खावें । दोष ओखदासि नाहीं ॥९९॥ ऐसे माझेनि नामघोषें । नाहीं करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥२००॥ ते पाहांटेवीण पाहावित । अमृतेंवीण जीववित । योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ॥ १ ॥ परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ॥ २ ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥ ३ ॥ तेजें सूर्य तैसे सोज्वळ । परि तोहि अस्तवे हें किडाळ । चंद्र संपूर्ण एखादे वेळ । हे सदा पुरते ॥ ४ ॥ मेघ उदार परी वोसरे । म्हणऊनि उपमेसी न पुरे । हे निःशंकपणें सपांखरे । पंचानन ॥ ५ ॥ जयांचे वाचेपुढां भोजे । नाम नाचत असे माझें । जें जन्मसहस्रीं वोळगिजे । एकवेळ मुखासि यावया ॥ ६ ॥ तो मी वैकुंठीं नसें । एक वेळ भानुबिंबींही न दिसें । वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय ॥ ७ ॥ परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझे ॥ ८ ॥ कैसे माझां गुणीं घाले । देशकाळातें विसरले । कीर्तनसुखें झाले । आपणपांचि ॥ ९ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥२१०॥ हें बहु असो यापरी । कीर्तित मातें अवधारीं । एक विचरती चराचरीं । पांडुकुमरा ॥ ११ ॥ मग आणिक ते अर्जुना । सांविया बहुवा जतना । पंचप्राणा मना । पाढाऊ घेउनी ॥ १२ ॥ बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंतु वज्रासनाची पौळी पन्नासिली । वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाहातीं यंत्रें ॥ १३ ॥ तेथ उल्हाट शक्तीचेनि उजिवडें । मनपवनाचेनि सुरवाडें ।

इंद्रियांचे ठिकाणीं शांतीचे अलंकार धारण केले आहेत व त्यांचें चित्त मी जो सर्वव्यापक, त्या मला आच्छादणारी खोळ झालें आहे, १९३. असे जे प्रशस्त अनुभवाचे पुरुष आहेत, ते दैवी प्रकृतीचें दैव आहेत; ते महात्मे हें सर्व माझेंच स्वरूप आहे असें जाणून, १९४. मग वाढत्या प्रेमानें मला भजतात; पण त्यांची भक्ति अशी एकविध असते कीं, ते, आपल्या मनाच्या संकल्पानें, देव एक उपास्य, व मी एक उपासक निराळा आहें, अशा दुसरेपणाला शिवत नाहींत. १९५. अर्जुना, याप्रमाणें मीच होऊन ते माझी सेवा करतात; पण त्यांचा सेवा करण्याचा आश्चर्यकारक प्रकार सांगावयाचा आहे, तो ऐक. १९६.

सदा माझें नामस्मरण करणारे, ( अष्टांगयोग-मार्गानें माझ्या प्राप्तीसाठीं ) निश्चयपूर्वक प्रयत्न कर-णारे, व मला भक्तिपूर्वक ( सर्व मीच आहें असें समजून सर्वत्र मला ) नमस्कार करणारे, ( असें माझ्या ठिकाणीं ) नित्य चित्त लावणारे माझी उपा-सना करतात. १४.

तर त्यांनीं कीर्तनाच्या उत्कर्षानें प्रायश्चित्तांचीं कामें नाहींशीं करून टाकलीं, कारण कीं, त्यांनीं पापाचें नांवच नाहीं असें केलें. १९७. यमदमास निस्तेजता आणली, तीर्थांस पाप नाहींसें करणारें, असें जें श्रेष्ठ पद मिळालें होतें, त्या श्रेष्ठपदावरून तीर्थांस उठविलें; ( व ) पापें करून लोक यमलोकास जात होते, पण पापें कीर्तनानें नाहींशीं केल्यामुळें पापी लोक यमलोकास जात नाहींसे झाले. १९८. यमसाधन म्हणावयास लागलें कीं, निग्रह कोणाचा करावा ? ( कारण ज्याचा निग्रह करावयाचा, तें मन कीर्तनाच्या योगानें आत्मरूप झालें. ) दमसाधन म्हणूं लागलें, कोणत्या इंद्रियाचें दमन करावें ? ( कारण कीर्तनानें सर्व इंद्रियें आत्मस्वरूपांत तल्लीन झालीं. ) तीर्थें म्हणावयास लागलीं कीं, पापच जर औषधाला राहिलें नाहीं तर आम्हीं खावें काय ? १९९. याप्रमाणें माझ्या नामघोषानें विश्वाचीं दुःखें नाहींशीं करितात व सर्व जगच ब्रह्मसुखानें जिकडे तिकडे कोंदून भरतात. २००. ते ( महात्मे ) प्राकृत सूर्याच्या पहाटेशिवाय ज्ञानरूप दिव-साचा उदय करितात, व स्वर्गांतील प्राकृत अमृताशिवाय ते जगवितात व अष्टांगयोगाशिवाय मोक्ष डोळ्याला दाखवितात. ( अनुभवाला आणून देतात ). २०१. परंतु, हा राजा आहे, हा रंक आहे, असा योग्यताभेद ते मनांत धरीत नाहींत व लहान मोठा अशी निवड करीत नाहींत व जगाला एकसारखे आनंदाचे कोट होतात. २०२. ( पूर्वीं असें होतें कीं ) कधीं तरी एकाद्यानें वैकु-ठाला जावें, तें यांनीं सर्व वैकुंठच केलें. याप्रमाणें माझ्या नामघोषाच्या महात्म्यानें संपूर्ण विश्व प्रकाशित केलें. २०३. तेजानें ते महात्मे सूर्यासारखे लखलखीत आहेत असें म्हणावें; परंतु सूर्याचा अस्त होतो, हा सूर्यांत दोष आहे. ( व महात्म्यांच्या ज्ञानोदयाचा कधींच अस्त होत नाहीं. ) ( यांस चंद्राची उपमा द्यावी तर ) चंद्र एकादे वेळेसच ( फक्त पौर्णिमेसच ) पूर्ण असतो आणि हे महात्मे स्वरूपस्थितीनें नेहमींच पूर्ण असतात. २०४. मेघ वृष्टि करण्यांत उदार असतो पण तो वोसरतो; म्हणून तो मेघ या ( बोधाची सदैव वृष्टि करणाऱ्या ) महात्म्यांस उपमा देण्यास पुरेसा नाहीं. हे महात्मे निःसंशयपणें कृपाळु असे सिंह आहेत. २०५. जें माझें नाम एक वेळ मुखांत यावयास हजारों जन्म सेवा करावी लागते, तें माझें नाम त्यांच्या वाचेपुढें नेहमीं मोठ्या प्रेमानें नाचत असतें; २०६. तो मी एक वेळ वैकुंठांत नसतों, एक वेळ सूर्यबिंबांतही असत नाहीं, याशिवाय मी एक वेळ योग्यांचीं हृदयें देखील उल्लंघन करून जातो; २०७. परंतु अशा रीतीनें मी जरी हरवलों असलों, तरी पण माझे भक्त जेथें माझा नामघोष चांगला करतात, त्यांजपाशीं अर्जुना, मला शोधावा. ( मी तेथें सांपडावयाचाच. ) २०८. ते महात्मे माझे गुण गाण्यांत कसे तृप्त झाले आहेत कीं, त्यायोगानें त्यांस आपण कोठें आहोंत व आपला काल भजनांत किती गेला, याची त्यांस खबरच नसते. ते कीर्तनाच्या सुखानें आपल्या ठिकाणींच आपलें स्वरूप होऊन राहिले आहेत. २०९. ते महात्मे कृष्ण, विष्णु, हरि, गोविंद या नामांचेंच केवळ कथन करितात व मध्यें मध्यें स्पष्ट रीतीनें पुष्कळ आत्मचर्चा करितात. २१०. आतां हें फार वर्णन करणें राहूं दे. अर्जुना ऐक. याप्रमाणें कितीएक माझे भक्त माझी कथा करीत करीत चराचरांमध्यें संचार करीत असतात. २११. अर्जुना, मग कितीएक जे आहेत, त्यांनीं सहजच मोठ्या तत्परतेनें पांच प्राण व मन हे याटाडे बरोबर घेऊन, २१२. बाहे-रच्या बाजूला यमनियमांचे कांटेरी कुंपण लावलें आणि त्या कुंपणाच्या आंत मूळबंधाचा कोट तयार केला; व त्या कोटावर प्राणायामरूपी चालू असलेल्या तोफा ठेविल्या. २१३. तेथें कुंडलिनीच्या प्रकाशानें व मन आणि प्राणवायु यांच्या मदतीनें, सतरावी जी जीवनकला,

सतरावियेचें पाणियाडें। बळियाविलें ॥ १४ ॥ तेव्हां प्रत्याहारें ख्याति केली। विकारांची संपिलीं बोहली। इंद्रियें बांधोनि आणिलीं। हृदया आंतु ॥ १५ ॥ तंव धारणावारू दाटिले। महाभूतांतें एकवटिलें। मग चतुरंग सैन्य निवटिलें। संकल्पाचें ॥ १६ ॥ तयावरी जैत रे जैत। म्हणोनि ध्यानाचें निशाण वाजत। दिसे तन्मयाचें झळकत। एकछत्र ॥ १७ ॥ पाटीं समाधि-श्रियेचा अशेखा। आत्मानुभवराज्यसुखा। पट्टाभिषेकु देखां। समरसें जाहला ॥ १८ ॥ ऐसें हें गहन। अर्जुना माझें भजन। आतां ऐकें सांगेन। जे करिती एक ॥१९॥ तरी दोन्ही पालववेरी। जैसा एक तंतू अंबरीं। तैसा मीवांचूनि चराचरीं। जाणती ना ॥ २२० ॥ आदि ब्रह्मा करूनी। शेवटीं मशक धरूनी। माजी समस्त हें जाणोनी। स्वरूप माझें ॥ २१ ॥ मग वाड धाकुटें न म्हणती। सजीव निर्जीव नेणती। देखिलिये वस्तू उजू लुंटिती। मीचि म्हणोनि ॥ २२ ॥ आपुलें उत्तमत्व नाठवे। पुढील योग्यायोग्य नेणवे। एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें। नम्रूंचि आवडे ॥ २३ ॥ जैसें उंचीं उदक पडिलें। तें तळवटवरी ये उगेलें। तैसें नमिजे भुतजात देखिलें। ऐसा स्वभावोचि तयांचा ॥ २४ ॥ कां फळलिया तरूची शाखा। सहजें भुमीसी उतरे देखा। तैसें जीवमात्रां अशेखां। खालावती ते ॥ २५ ॥ अखंड अगर्वता होऊनि असती। तयांतें विनयो हेचि संपत्ती। जे जयजयमंत्रें अर्पिती। माझांचि ठायीं ॥ २६ ॥ नमितां मानाभिमान गळाले। म्हणोनि अवचितें ते मीचि जहाले। ऐसे निरंतर मिसळले। उपासिती ॥ २७ ॥ अर्जुना हे गरुवी भक्ती। सांगितली तुजप्रती। आतां ज्ञानयज्ञें यजिती। ते भक्त आइकें ॥ २८ ॥

ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते। एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

परि भजन करिती हातवटी। तूं जाणत आहासि किरीटी। जे मागां इया गोष्टी। केलिया आम्हीं ॥ २९ ॥ तंव आथि जी अर्जुन म्हणे। तें दैविकिया प्रसादाचें करणें। तरि काय अमृताचें आरोगणें। पुरे म्हणवे ॥ २३० ॥ या बोला अनंतें। लागटा देखिलें तयातें। कीं सुखावलेनि चित्तें। डोलतु असे ॥ ३१ ॥ म्हणे भलें केलें पार्था। एऱ्हवीं हा अनवसरु सर्वथा। परि बोलवीतसे आस्था। तुझी मातें ॥ ३२ ॥ तंव अर्जुन म्हणे हें कायी। चकोरेंवीण चांदिणेंचि नाहीं। जग निववीजे हा तयाचां ठायीं। स्वभावो कीं जी ॥ ३३ ॥ येरें चकोरें तियें आपुलिये चाडे। चांचू करिती चंद्राकडे। तेविं आम्ही विनवूं तें थोकडे। देवो कृपासिंधु ॥ ३४ ॥ जी मेघ आपुलिये प्रौढी। जगाची आर्ति दवडी। वांचूनि चातकाची ताहान केवढी। तो वर्षावो पाहुनी ॥ ३५ ॥ परि चुळा एकाचिया चाडे। जेविं गंगेतेंचि ठाकावें पडे। तेंवि आर्त बहु कां थोडें। तरि सांगावें देवा ॥ ३६ ॥ तेथें देवें म्हणितलें राहें। जो संतोपु आम्हां

हेंच कोणी एक तळें, तें (त्यांनीं) वळकाविलें. २१४. त्या वेळीं प्रत्याहारानें मोठा पराक्रम केला. (तो असा कीं,) त्यामुळें विकारांची भाषा संपली; (व त्यानें) इंद्रियांना हृदयाच्या आंत बांधून आणलें. २१५. तों इतक्यांत धारणारूपी घोड्यांनीं गर्दी केली, (व त्यांच्या बळानें) योगी साधकांनीं पृथ्वी वगैरे महाभूतांना एकत्र केलें व नंतर त्यांनीं संकल्पाचें चतुरंग सैन्य (मन बुद्धि चित्त, अहंकार) ठार केलें. २१६. त्यानंतर 'जय झाला रे झाला' म्हणून ध्यानाची नौबत वाजूं लागली व स्वरूपऐक्याचें एक छत्र (एकसत्ता) चमकत असलेलें दिसलें. २१७. नंतर समाधिरूपी लक्ष्मीचें जें आत्मानुभवरूपी संपूर्ण राज्यसुख, त्याचा समरसतेनें त्यांस राज्याभिषेक झाला, पहा. २१८. अर्जुना, याप्रमाणें हें माझें (अष्टांगयोगद्वारां होणारें) भजन फार कठीण आहे; आतां कितीएक मला दुसऱ्या प्रकारानें (नमनरूप भक्तीनें) भजतात, तो प्रकार सांगतों ऐक. २१९. तर वस्त्रामध्यें ज्याप्रमाणें एका पदरापासून दुसऱ्या पदरापर्यंत (येथून ते तेथून) एक सूतच असतें, त्याप्रमाणें सजीव व निर्जीव पदार्थांत माझ्यावांचून ते दुसऱ्यास ओळखीत नाहींत. २२०. ब्रम्हदेवापासून आरंभ करून, अखेर चिलटापर्यंत, मध्यें जें कांहीं सर्व आहे, तें माझें स्वरूप आहे, हें जाणून २२१. मग मोठें, लहान याचा विचार न करतां, किंवा सजीव अथवा निर्जीव हा भेद न करतां, जो पदार्थ नजरेपुढें येईल, त्यास मीच (परमात्माच) समजून सरळ लोटांगण घालतात. २२२. त्यांस आपले चांगलेपणाची आठवण नसते व समोर असलेले योग्य आहे किंवा अयोग्य आहे, हें कांहीं न जाणतां वस्तुमात्राला उद्देशून सरसकट नमस्कार करणेंच त्यांना आवडतें. २२३. उंच जागेवरून पडलेलें पाणी जसें सखल जागेकडे आपोआप येऊं लागतें, त्याचप्रमाणें पाहिलेल्या प्राणिमात्रांस नमस्कार करण्याचाच त्यांचा स्वभाव असतो. २२४. अथवा पहा कीं, फळभारानें लगटलेल्या झाडाची फांदी जशी सहजच जमीनीकडे लवते, त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रापुढें ते नम्रपणानें लवतात. २२५. ते नेहमीं निरभिमान होऊन राहिलेले असतात; व नम्रपणा हीच त्यांची संपत्ति असते. ती संपत्ति ते 'जय जय' मंत्रानें माझ्याच ठिकाणीं अर्पण करतात. २२६. नमस्कार करीत असतांना मान व अभिमान हे नाहींसे झाले, म्हणून ते सहजगत्या मद्रूप झाले. याप्रमाणें माझ्या स्वरूपांत मिसळून माझी निरंतर उपासना करितात. २२७. अर्जुना, तुला ही श्रेष्ठ प्रतीची भक्ति सांगितली, आतां ज्ञानरूप यज्ञानें माझी आराधना करितात, त्या भक्तांचा प्रकार ऐक. २२८.

तसेंच दुसरे कित्येक, सर्वतोमुख जो मी, त्या माझे एकत्वानें (आपल्या स्वप्नांतील पदार्थांशीं, जागृत झाल्यावर, जागृत पुरुष जसें ऐक्य पहातो, त्या अभेदज्ञानानें), वेगळेपणानें (आकारज्ञानभिन्न पण वृक्षशाखा दोन्ही एकच या अभेदज्ञानानेंच), व निरनिराळ्या प्रकारानें (जो आकार जेथें दिसेल, तो मीच आहें, अशा अभेदज्ञानानें), ज्ञानयज्ञानें यजन करून माझी उपासना करतात. १५.

परंतु (ही) भजन करण्याची रीति, अर्जुना, तुला माहीत आहेच. कारण आम्ही या गोष्टी मागें (अध्याय ४ था, श्लोक ३३–४२) तुला सांगितल्या आहेत. २२९. तेव्हां अर्जुन म्हणाला, होय महाराज, मी जाणत आहें व हें देवाच्या प्रसादाचें करणें आहे. परंतु अमृताचें भोजन मिळाल्यावर 'पुरे, आतां नको,' असें म्हणवेल काय? २३० अर्जुनाच्या वरील बोलण्यावरून, तो हें जाणण्याविषयीं उत्सुक आहे असें पाहून, लागलीच अंतःकरणांत संतोष झाल्यामुळें श्रीकृष्ण डोलावयास लागले. २३१. श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, फार चांगलें केलेंस. नाहींतर (मागें एकवार सांगितलें असल्यामुळें) हा मुळींच बोलण्याचा प्रसंग नव्हता; परंतु तुझी कळकळ मला बोलण्यास भाग पाडते. २३२ तेव्हां अर्जुन म्हणाला, (तुझी आस्था बोलविते) हें काय म्हणतां? चकोर पक्षी असला तरच चंद्र उगवतो, एऱ्हवीं उगवत नाहीं काय? महाराज, जगाला शांत करावें, हा त्याच्या (चंद्राच्या) ठिकाणीं स्वभावच आहे. २३३. आतां जे चकोर आहेत, ते केवळ आपलीच शांतता व्हावी, या इच्छेनें चंद्राकडे चोंच करितात; त्याप्रमाणें आमची विनंति ती किती थोडी आहे! पण देवा, आपण कृपासिंधु आहांत. २३४. महाराज, मेघ हा आपल्या उदारपणाच्या वर्षावानें संपूर्ण जगाची पीडा घालवितो. वास्तविक पाहिलें तर, त्या पावसाच्या वृष्टीच्या मानानें चातकाची तहान ती केवढी? २३५. परंतु एक चूळभर पाण्याची इच्छा असली, तरी त्याप्रमाणें गंगेलाच जावें लागतें, त्याप्रमाणें आमची ऐकण्याविषयींची इच्छा फार असो अथवा थोडी असो, तरी ते देवांनाच सांगितलें पाहिजे. २३६. त्या वेळीं

जाहला आहे । तयावरी स्तुति साहे । ऐसें उरलें नाहीं ॥ ३७ ॥ पैं परिसतु आहासि निकियापरी । तेंचि वक्तृत्वा वऱ्हाडीक करी । ऐसें पुरस्करोनि श्रीहरी । आदरिलें बोलों ॥ ३८ ॥ तरी ज्ञानयज्ञु तो एवंरूपु । तेथ आदिसंकल्पु हा यूपु । महाभूतें मंडपु । भेदु तो पशु ॥ ३९ ॥ मग पांचांचे जे विशेष गुण । अथवा इंद्रियें आणि प्राण । हेचि यज्ञोपचारभरण । अज्ञान घृत ॥ २४० ॥ तेथ मनबुद्धीचिया कुंडा- । आंतु ज्ञानाग्नि धडफुडा । साम्य तेचि सुहाडा । वेदि जाणें ॥ ४१ ॥ सविवेकमतिपाटव । तेचि मंत्रविद्यागौरव । शांति स्रुक्स्रुव । जीव यज्वा ॥ ४२ ॥ तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेकमहामंत्रें । ज्ञानाग्निहोत्रें । भेदु नाशी ॥ ४३ ॥ तेथ अज्ञान सरोनि जाये । आणि यजिता यजन हें ठाये । आत्मसमरसीं न्हाये । अवभृथीं जेव्हां ॥ ४४ ॥ तेव्हां भूतें विषय करणें । हें वेगळालें कांहीं न म्हणे । आघवें एकाचि ऐसें जाणे । आत्मबुद्धि ॥ ४५ ॥ जैसा चेइला तो अर्जुना । म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना । मीचि जाहालों होतों ना । निद्रावशें ॥ ४६ ॥ आतां सेना ते सेना नव्हे । हें मीच एक आघवें । ऐसें एकत्वें मानवे । विश्व तया ॥ ४७ ॥ मग तो जीवु हे भाष सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे । ऐसे भजती ज्ञानाध्वरें । एकत्वें येणें ॥ ४८ ॥ अथवा अनादि हें अनेक । जें आनासारिखें एका एक । आणि नामरूपादिक । तेंही विषम ॥ ४९ ॥ म्हणोनि विश्व भिन्न । परि न भेदे तयांचें ज्ञान । जैसे अवयव तरी आन आन । परि एकेचि देहींचे ॥ २५० ॥ कां शाखा सानिया थोरा । परि आहाति एकाचिये तरुवरा । बहु रश्मि परि दिनकरा । एकाचे जेवीं ॥ ५१ ॥ तेविं नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनानी वृत्ती । ऐसें जाणती भेदलां भूतीं । अभेदा मातें ॥ ५२ ॥ येणें वेगळालेपणें पांडवा । करिती ज्ञानयज्ञु बरवा । जे न भेदतीं जाणिवा । जाणते म्हणउनी ॥ ५३ ॥ ना तरी जेथवां जिये ठायीं । देखती कां जें जें कांहीं । तें मी-वांचूनि नाहीं । ऐसाचि बोधु ॥ ५४ ॥ पाहें पां बुडबुडा जेउता जाये । तेउतें जळचि एक तया आहे । मग विरे अथवा राहे । तऱ्ही जळाचिमाजि ॥ ५५ ॥ कां पवनें परमाणु उचलले । ते पृथ्वीपणावेगळे नाहीं गेले । आणि माघौतें जरी पडले । तरी पृथ्वीचिवरी ॥ ५६ ॥ तैसें भलतेथ भलतेणें भावें । भलतेंही न हो अथवा होआवें । परि तें मी ऐसें आघवें । होऊनि ठेलें ॥ ५७ ॥ अगा हे जेव्हडी माझी व्याप्ति । तेव्हडीचि तयांची प्रतीति । ऐसे बहुधाकारीं वर्तती । बहुचि होउनि ॥ ५८ ॥ हें भानुबिंब आवडेतया । सन्मुख जैसें धनंजया । तैसें ते विश्वा या । समोर सदा ॥ ५९ ॥ अगा तयांचिया ज्ञाना । पाठी पोट नाहीं अर्जुना । वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ॥ २६० ॥ तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुक तयांचिया सद्भावा । तरी न करितां

श्रीकृष्ण म्हणाले, हें असूं दे. तुझी आस्था पाहून जो कांहीं आम्हांस आनंद झाला आहे, त्याच्यावर आतां स्तुति सहन होईल असें राहिलें नाहीं. २३७. तूं उत्तम तऱ्हेनें ऐकत आहेस, तेंच आमच्या बोलण्याला बोलावून आणण्याचें काम करतें, याप्रमाणें अर्जुनास शाबासकी देऊन श्रीकृष्णांनीं बोलण्यास आरंभ केला. २३८. तर ज्ञानयज्ञ तो असा आहे. त्या ज्ञानयज्ञामध्यें मूळसंकल्प हा पशु बांधवयाचा खांब आहे; पंचमहाभूतें हा मांडव आहे व द्वैत हा पशु आहे. २३९. नंतर पंचमहाभूतांचे जे शब्दस्पर्शादि विशेष गुण, अथवा इंद्रियें व प्राण, हीच यज्ञाची साहित्यसामुग्री असून, अज्ञान हें तूप आहे. २४०. तेथें मन व बुद्धि या कुंडांत प्रज्वलित ज्ञानरूपी अग्नि असून, हे मित्रा अर्जुना, सुखदुःखादि द्वंद्वाविषयीं जी चित्ताची समता, ही वेदी ( त्या यज्ञांतील शुद्ध केलेला यज्ञाचा ओटा ) होय, असें समज. २४१. आत्मानात्मविचार करण्याविषयींची जी बुद्धीची कुशलता, तीच मंत्रविद्येची शोभा आहे. शांति ही सुक्सुवा नांवाचीं यज्ञपात्रें आहेत व जीव हा यज्ञ करणारा आहे. २४२. तो यज्ञ करणारा जीव, स्वरूपानुभवरूप पात्रानें व ब्रह्मविचाररूप महामंत्रानें व ज्ञानरूप अग्निहोत्रकर्मानें, जीव व ईश्वर यांच्या भिन्नपणाची आहुति देऊन, तो भेद नाहींसा करतो. २४३. त्या वेळेस अज्ञानरूपी तूप सरून जातें आणि यज्ञ करणारा व यज्ञ करणें, हें थांबतें. आणि जेव्हां यज्ञ करणारा जीव, अवभृथ स्नानाचे वेळीं, आत्मैक्यरूपी पाण्यानें स्नान करतो, २४४. तेव्हां तो यज्ञ करणारा पंचमहाभूतें, शब्दादिविषय व इंद्रियें, हीं कांहीं वेगळेपणानें समजत नाहीं; कारण, आत्मबुद्धीमुळें तो हीं सर्व एकच आहेत असें जाणतो. २४५ अर्जुना, जसा झोंपेंतून जागा झालेला पुरुष म्हणतो कीं झोंपेला वश होऊन स्वप्नांतील ही चित्रविचित्र सेना मीच झालों होतों ना ? २४६. जागें झाल्यावर तो म्हणतो कीं, स्वप्नांतील सैन्य तें आतां खरोखरीचें सैन्य नाहीं; तर स्वप्नामध्यें सैन्य वगैरे सर्व मीच एकटा होतों. अशा एकत्वानें संपूर्ण विश्व त्याचे अनुभवास येतें. २४७. अशा अनुभवावर आल्यावर मग, मी जीव आहें ही त्याची कल्पना नाहींशी होते; ब्रह्मदेवापासून तों मुंगीपर्यंत, सर्व ब्रह्मरूपच आहे, अशा ज्ञानानें तो परिपूर्ण होतो. याप्रमाणें ज्ञानयज्ञद्वारां या ऐक्यभावनेनें माझें भजन करितात. २४८ अथवा अनादिकालापासून हें अनेकत्व



असेंच आहे. कारण त्यांचीं नामेंरूपें मुद्दां भिन्न भिन्न आहेत. २४९. म्हणून जरी विश्वांत त्यांच्या दृष्टीस भिन्न भिन्न पदार्थ पडले, तरी त्यायोगानें त्यांचें ज्ञान भेद पावत नाहीं. ज्याप्रमाणें, अवयव जरी निरनिराळे आहेत खरे, परंतु ते सर्व एकाच देहाचे आहेत. २५०. अथवा जशा लहानमोठ्या फांद्या आहेत खऱ्या, परंतु त्या एकाच झाडाच्या असतात व ज्याप्रमाणें अनेक किरणें खरीं, परंतु तीं एकाच सूर्याचीं असतात, २५१. त्याप्रमाणें नाना प्रकारच्या व्यक्ती, त्यांचीं भिन्न भिन्न नांवें व त्यांचे भिन्न भिन्न स्वभाव, याप्रमाणें भेद असलेल्या प्राण्यांत, अभेद जो मी, त्या मला ते जाणतात. २५२. अर्जुना, अशा ( इंद्रियांना गोचर होणाऱ्या ) भेदप्रतीतिद्वारा ते चांगला ( अभेद ) ज्ञानयज्ञ करतात. कारण कीं ते पुरुष स्वरूपज्ञानी असल्याकारणानें, विश्वांतील भिन्न भिन्न पदार्थांच्या, भिन्न भिन्न ज्ञानानें भेदाला पावत नाहींत. ( त्या भिन्न भिन्न ज्ञानांतून अन्वयदृष्टीनें परमात्म्याला ते पहातात. ) २५३. अथवा जेव्हां, ज्या ठिकाणीं, जें जें कांहीं पहातात, तें माझ्या स्वरूपावांचून दुसरें कांहीं नाहीं, असाच त्यांचा बोध असतो. २५४. असें पहा कीं, बुडबुडा जेथें जाईल, तेथें त्याला एक पाणी मात्रच आहे; मग राहिला तरी पाण्यांतच अथवा नाहींसा झाला तरी पाण्यांतच ! २५५. अथवा वाऱ्यानें पृथ्वीचे कण वर उचलले, तरी ते पृथ्वीपणाहून वेगळे झाले नाहींत. आणि ते वर गेलेले कण जरी पुनः खालीं पडले, तरी ते पृथ्वीवरच पडतात. २५६. त्याप्रमाणें वाटेल तेथें, वाटेलत्या भावानें ( स्थितीनें ) वाटेल तेंही न व्हावें अथवा व्हावें, पण तें मी ( परमात्मा ) आहें, असें सर्व जग त्यास ( अनुभवानें ) होऊन राहिलेलें असतें. २५७. बा अर्जुना, ही जेवढी माझी व्याप्ति आहे, तेवढाच त्यांचा अनुभव आहे. याप्रमाणें ते अनुभवाच्या अंगानें, मद्रूप होऊन, अनेक होऊन अनेक आकारांनीं वावरत असतात. २५८. अरे अर्जुना, जसें हें सूर्यबिंब वाटेल त्याच्या सन्मुख ( प्रत्यक्ष ) असतें, त्याप्रमाणें ते ( पुरुष ) नेहमीं या विश्वाच्या समोर असतात. २५९. अर्जुना, त्यांच्या ज्ञानाला पुढली बाजू व मागली बाजू असें नाहीं; ज्याप्रमाणें वायु हा आकाशाच्या सर्व पोकळीभर आहे, २६०. त्याप्रमाणें जेवढा संपूर्ण मी आहें, तेंच वजन त्यांच्या सद्भावास असतें ( म्हणजे तेवढा संपूर्ण त्यांचा अनुभव असतो. ) असें असल्यामुळें, अर्जुना, त्यांनीं कृतीनें जरी भजन केलें

पांडवा ॥ भजन जहालें ॥ ६१ ॥ एऱ्हवीं तरी सकळ मीचि आहें । तरी कवणीं कें उपासिला नोहें । एथ एकें जाणणेनवीण ठाये । अप्राप्तासी ॥ ६२ ॥ परि तें असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितसांते । उपासिती मातें । ते सांगितले ॥ ६३ ॥ अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पत असे मज एकीं । कीं नेणणेयासाठीं मूर्खीं । न पविजेचि मातें ॥ ६४ ॥

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् । मंत्रोऽहमहमेवाऽऽज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

तोचि जाणिवेचा उदयो जरी होये । तरी श्रुदल वेदु मीचि आहें । आणि तो विधानातें जया विये । तो क्रतुही मीचि ॥ ६५ ॥ मग तया कर्मापासूनि बरवा । जो सांगोपांगु आघवा । यज्ञु प्रगटे पांडवा । तोही मी गा ॥ ६६ ॥ स्वाहा मी स्वधा । सोमादि औषधी विविधा । आज्य मी समिधा । मंत्रु मी हवि ॥ ६७ ॥ होता मी हवन कीजे । तेथ अग्नि तो स्वरूप माझें । आणि हुतक वस्तु जें जें । तेंही मीचि ॥ ६८ ॥

पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामहः । वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥

पैं जयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीस्तव अष्टांगे । जन्म पाविजत असे जगें । तो पिता मी गा ॥ ६९ ॥ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेविं मी चराचरीं । माताही होय ॥ २७० ॥ आणि जाहालें जग जेथ राहे । जेणें जित वाढत आहे । तें मीचि वांचूनि नोहे । आन निरुतें ॥ ७१ ॥ इयें प्रकृतिपुरुषें दोन्ही । उपजलीं जयाचिया अमनमनीं । तो पितामह त्रिभुवनीं । विश्वाचा मी ॥ ७२ ॥ आणि आघवेयां जाणणेयांचिया वाटा । जया गांवा येती गा सुभटा । जे वेदांचिया चोहटां । वेद्य जें म्हणिजे ॥ ७३ ॥ जेथ नानामतां बुझावणी जाहाली । एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली । चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं । जें पवित्र म्हणिजे ॥ ७४ ॥ पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु । घोषध्वनी- नादाकारु । तयांचें गा भुवन जो ॐकारु । तोही मी गा ॥ ७५ ॥ जया ॐकाराचिये कुशी । अक्षरें होती अउमकारेंसीं । जियें उपजत वेदेंसीं । उठलीं तिन्हीं ॥ ७६ ॥ म्हणोनि ऋग्यजुः सामु । हे तीन्ही म्हणे मी आत्मारामु । एवं मीचि कुळक्रमु । शब्दब्रह्माचा ॥ ७७ ॥

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् । प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

हें चराचर आघवें । जिये प्रकृती आंत सांठवे । ते शिणली जेथ विसवे । ते परमगती मी ॥ ७८ ॥ आणि जयाचेनि प्रकृति जिये । जेणें अधिष्ठिली विश्व विये । जो येऊनि प्रकृती इये । गुणातें भोगी ॥ ७९ ॥ तो विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा पंडुसुता । मी गोसावी समस्ता ।

नाहीं, तरी तें सहजच होत असतें. २६१. सहज विचार करून पाहिलें तर, जगांतील सर्व पदार्थ मीच आहे. मग कोणाकडून कोठें माझी उपासना होत नाहीं असें म्हणावें? असें असूनही ज्यांची अशा प्रकारची समजूत झाली नाहीं, त्यांची तशी समजूत न झाल्यामुळेंच, त्यांस हें भजन घडत नाहीं. २६२. परंतु तें असूं दे. अशा या योग्य ज्ञानयज्ञानें यजन करणारे माझी जे उपासना करतात ते भक्त मी तुला सांगितले. २६३. हें सर्व, सर्वांच्या द्वारें, सदोदित, माझ्या एकत्वाचे ठिकाणीं सहजच अर्पण होत आहे. ( म्हणजे सर्व प्राणी जें कांहीं करतात, तें सर्व मला एकट्यालाच अर्पण होतें; कारण त्या सर्वांच्या रूपानें मीच एक आहें ) पण मूर्खांनीं हें न जाणल्यामुळें ( तें सहज अर्पण होणारें सर्व कर्म ) मला प्राप्त होत नाहीं. २६४.

क्रतु, यज्ञ, स्वधा, औषधी, मंत्र, तूप, अग्नि आणि आहुति मीच आहें, १६.

त्याच ज्ञानाचा जर उदय होईल, तर ( असें लक्षांत येईल.) मुळांत वेद मीच आहें आणि तो वेद जीं जीं कर्में करावयास सांगतो, त्या कर्मांचें विधानरूप क्रतु ( यज्ञकर्म ) देखील मीच आहें. २६५. मग वेदांत करावयास सांगितलेल्या त्या क्रतुरूप कर्मापासून जी अंग व उपांग यांसहित सर्व चांगली क्रिया होते, अर्जुना, तो क्रियारूप यज्ञही मीच आहें. २६६. देवांना द्यावयाच्या आहुतीचें अन्न व पितरांना द्यावयाचें आहुतीचें अन्न व यज्ञांचे कामीं उपयोगांत येणाऱ्या सोमादिक अनेकवनस्पति, हें मी आहें. यज्ञांत हवन करण्याचें तूप व समिधा मीच आहें. यज्ञांत उच्चारावयाचे मंत्र व यज्ञाकरितां तयार केलेलें द्रव्य, हीं देखील मीच आहें. २६७. यज्ञकर्म करण्याकरितां नेमलेला ब्राह्मण मी आहें व ज्यांत हवन करतात तो अग्नि तर माझेंच स्वरूप आहे, आणि हवन करण्याचें जें जें द्रव्य, तें देखील, मीच आहे. २६८.

या जगाचा पिता, माता, पालनकर्ता, पितामह मी आहें. ज्ञेयवस्तु, पवित्रवस्तु, ॐकार, ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद हें सर्व मीच आहें. १७.

अरे अर्जुना, ज्याच्या अंगसंगानें या अष्टांग प्रकृतीपासून जगाला जन्म प्राप्त होतो, तो जगाचा पिता मी आहें. २६९. अर्धनारीनटेश्वराचे स्वरूपांत जसा, जो पुरुष तोच स्त्री असतो, त्याप्रमाणें चराचरांच्या बाबतींत माताही मीच होतों. २७०. आणि उत्पन्न झालेलें जग जेथें राहतें व ज्याच्यायोगानें जगाचें आयुष्य वाढत आहे, तें स्थान माझ्यावांचून खरोखर दुसरें नाहीं. २७१. प्रकृति व पुरुष हीं दोन्ही ज्याच्या, मन ह्या उपाधीनें रहित असलेल्या, मूळ संकल्पांत उत्पन्न झालीं, तो त्रैलोक्यांत विश्वाचा आजा मी आहे. २७२, आणि अर्जुना, सर्व ज्ञानरूपी वाटा ज्या गांवाला येऊन मिळतात व वेदांच्या चव्हाट्यावर ज्याला वेद्य ( समजून घेण्याची मुख्य गोष्ट ) म्हणतात. २७३. आणि ज्या परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं वेगवेगळ्या शास्त्रकारांचीं मतें जाऊन भिडलीं असतां, त्यांचा आपसांतील परमात्मस्वरूपाविषयींचा मतभेद नाहींसा होतो; व जेथें परमात्म्याचें स्वरूप ठरविणारीं शास्त्रें जाऊन पोहोंचलीं असतां, त्यांची एकमेकांत असलेली अनोळख दूर होते. ( सर्व शास्त्रें एकाच परमात्म्याचें प्रतिपादन करतात, अशा रूपानें शास्त्रांचा एकमेकांशीं परिचय होतो ) व चुकलेल्या ज्ञानांची ज्या परमात्मस्वरूपाचे ठिकाणीं एकमेकांशीं भेट होते ( त्यांची एकवाक्यता होते ) व ज्या परमात्मा स्वरूपाला पवित्र म्हणतात, ( तें मी आहें. ) २७४. ब्रह्मरूपी बीजाला फुटलेला जो अंकुर व घोष ( परा ) ध्वनी ( पश्यन्ती ), नाद (मध्यमा), आकार (वैखरी) यांचें मंदीर, असा जो ओंकार, तो मी आहें. २७५. ज्या ओंकारच्या पोटांत अ, उ, म्, अशीं अक्षरें होतीं, व तीं उपजतांक्षणींच तिन्ही वेदांना घेऊन प्रगट झालीं; २७६. म्हणून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे तिन्ही वेद मीच आहें. याप्रमाणें वेदाची संपूर्ण परंपरा मीच आहे; असें आत्माराम ( श्रीकृष्ण ) म्हणाले. २७७.

( प्रकृतीचें ) विश्रांतिस्थान, भर्ता ( पोषण करणारा ), ( जगाचा ) नाथ, साक्षी, निवासस्थान, शरण जाण्यास योग्य ठिकाण, ( जगाचा ) सुहृद्, जगाची उत्पत्ति, प्रलय, स्थिति, निधान ( रहाण्याचें स्थान ) आणि जगाचें अविनाशी कारण ( हें सर्व ) मी आहें. १८.

हें स्थावरजंगमात्मक सर्व जग ( महाप्रलयकाळीं ) ज्या मायेच्या पोटांत सांठवतें, ती माया श्रम पावली असतां ज्या ठिकाणीं विश्रांति घेते, ती परमगति मीच आहें. २७८. आणि ज्याच्या योगानें प्रकृति जगते, ज्यानें तिचा ( प्रकृतीचा ) अंगीकार केला असतां ती जगाला प्रसवते आणि जो ह्या प्रकृतीशीं तादात्म्य करून गुणांचा ( सत्व, रज, तमांचा ) भोग घेतो, २७९. अरे अर्जुना, तो विश्वलक्ष्मीचा नवरा मीच आहे. या सर्व

त्रैलोक्याचा ॥ २८० ॥ आकाशें सर्वत्र वसावें। वायूनें नावभरी उगें नसावें। पावकें दहावें। वर्षावें जळें ॥ ८१ ॥ पर्वतीं बैसका न संडावी। समुद्रीं रेखा नोलांडावी। पृथ्वीया भूतें वाहावीं। हे आज्ञा माझी ॥ ८२ ॥ म्यां बोलविल्या वेदु बोले। म्यां चालविल्या सूर्यु चाले। म्यां हालविल्या प्राणु हाले। जो जगातें चाळिता ॥ ८३ ॥ मियांचि नियमिलासांता। काळु ग्रासितसे भूतां। इयें म्हणियागतें पांडुसुता। सकळें जयाचीं ॥ ८४ ॥ ऐसा जो समर्थु। तो मी जगाचा नाथु। आणि गगनाऐसा साक्षिभूतु। तोही मीचि ॥ ८५ ॥ इहीं नामरूपीं आघवा। जो भरला असे पांडवा। आणि नामरूपांही वोल्हावा। आपणचि जो ॥ ८६ ॥ जैसे जळाचे कल्लोळ। आणि कल्लोळीं आथी जळ। ऐसेनि वसवीतसे सकळ। तो निवासु मी ॥ ८७ ॥ जो मज होय अनन्य शरण। त्याचें निवारीं मी जन्ममरण। यालागीं शरणागता शरण्य। मीचि एकु ॥ ८८ ॥ मीचि एक अनेकपणें। वेगळालेनि प्रकृतीगुणें। जीत जगाचेनि प्राणें। वर्तत असे ॥ ८९ ॥ जैसा समुद्र थिल्लर न म्हणतां। भलतेथ बिंबे सविता। तैसा ब्रह्मादि सर्वां भूतां। सुहृद तो मी ॥ २९० ॥ मीचि गा पांडवा। या त्रिभुवनासि वोलावा। सृष्टिक्षयप्रभावा। मूळ तें मी ॥ ९१ ॥ बीज शाखांतें प्रसवे। मग तें रूखपण बीजीं सामावे। तैसें संकल्पें होय आघवें। पाठीं संकल्पीं मिळे ॥ ९२ ॥ ऐसें जगाचें बीज जो संकल्पु। अव्यक्त वासनारूपु। तया कल्पांतीं जेथ निक्षेपु। होय तें मी ॥९३॥ इयें नामरूपें लोटती। वर्णव्यक्ती आटती। जातीचे भेद फिटती। जैं आकाश नाहीं ॥ ९४ ॥ तैं संकल्पुवासनासंस्कार। माघौतें रचावया आकार। जेथ राहोनि असती अमर। तें निधान मी ॥ ९५ ॥

तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च। अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

मी सूर्याचेनि वेषें। तपें तैं हें शोषे। पाठीं इंद्र होऊनि वर्षें। तैं पुढती भरे ॥ ९६ ॥ अग्नि काष्ठें खाये। तें काष्ठचि अग्नि होये। तेवि मरतें मारितें पाहें। स्वरूप माझें ॥९७॥ यालागीं मृत्यूचां भागीं जें जें। तेंही पैं रूप माझें। आणि न मरतें तंव सहजें। अविनाश मी ॥ ९८ ॥ आतां बहु बोलोनि सांगावें। तें एकिहेळां घे पां आघवें। तरी सतासतही जाणावें। मीचि पैं गा ॥ ९९ ॥ म्हणोनि अर्जुना मी नसें। ऐसा कवणु ठाव असे। परि प्राणियांचें दैव कैसें। जे न देखती मातें ॥ ३०० ॥ तरंग पाणियेंवीण सुकती। रश्मि वातीवीण न देखती। तैसे मीचि ते मी नव्हती। विस्मो देखें ॥ १ ॥ हें आंतबाहेर मियां कोंदलें। जग निखिल माझेंचि वोतिलें। कीं कैसें कर्म तयां आलें। जे मीचि नाहीं म्हणती ॥ २ ॥ परि अमृतकुहां पडिजे। कां आपणयातें कडिये काढिजे। ऐसें आथी काय कीजे। अप्राप्तासि ॥ ३ ॥ ग्रासा एका अन्नासाठीं। अंधु धांवताहे किरीटी। आडळला चिंतामणि पायें लोटी। आंधळेपणें ॥ ४ ॥ तैसें ज्ञान जैं सांडूनि

त्रैलोक्याचा धनी मी आहें. २८०. आकाशानें सर्वत्र ठिकाणीं रहावें, वाऱ्यानें क्षणभर देखील स्वस्थ राहूं नये, अग्नीनें जाळावें आणि पाण्यानें वर्षाव करावा; २८१. डोंगरांनीं आपलें आसन सोडूं नये, समुद्रांनीं आपल्यास असलेली मर्यादा उल्लंघन करूं नये, पृथ्वीनें सर्व प्राण्यांचा भार वहावा; हें सर्व माझ्या आज्ञेनें चाललें आहे. २८२ मी बोलण्यास लावलें तर वेद बोलतो; मी चालावयास लावलें, तर सूर्य चालतो; मी हालचाल करावयास लावलें, तर जगाचा प्रवर्तक प्राण आपलें काम करूं शकतो, २८३. मी नियम घालून दिल्याकारणानेंच मृत्यु हा प्राण्यांचा ग्रास करतो व ( आतांपर्यंत सांगितलेली ), अर्जुना, ही सर्व ( मंडळी ) ज्याच्या आज्ञेप्रमाणें वागणारी आहेत. २८४. असा जो सर्व शक्तिमान या जगाचा मालक, तो मी आहें, आणि आकाशासारखा सर्वांत मिळून उदासीन असणारा, तो देखील मीच आहें. २८५. या नामरूपानें जो सर्व व्यापून राहिलेला आहे आणि अर्जुना, नांवरूप यांना जो आपण स्वतःच आधार आहे, २८६. पाण्याच्या जशा लाटा होतात आणि लाटांत जसें पाणी असतें, याप्रमाणें जेथें सर्व जगाची रचना केली जाते, तें जगाचें राहण्याचें ठिकाण मीच आहें. ( या उदाहरणानें जगाचा आणि आपला अभेद सुचवितात. ) २८७. जो मला एकनिष्ठपणानें शरण येतो, त्याचें जन्म व मरण मी दूर करतों; एवढ्याकरितां शरण आलेल्यांना शरण येण्यास योग्य असा मीच एक आहें. २८८. मी एक असून अनेक स्वरूपें धारण करून प्राण्यांच्या वेगवेगळ्या स्वभावधर्मांप्रमाणें जिवंत असलेलें जें जग, त्याच्या प्राणाच्या रूपानें वागतों. २८९. ज्याप्रमाणें सूर्य हा, हें डबकें, हा समुद्र, असा भेद न पाहतां, वाटेल तेथें प्रतिबिंबित होतो, ( त्याप्रमाणें हा ब्रह्मदेव व हा कीटक आहे, असा भेद न करतां, मोबदल्याची अपेक्षा न करतां) ब्रह्मादि सर्व भूतांवर सारखा उपकार करणारा, तो मीच आहें. २९०. अर्जुना, या त्रैलोक्याचें जीवन मीच आहें. सृष्टीच्या नाशाला व उत्पत्तीला जें कारण, तें मीच आहें. २९१. बीजापासून फांद्या उत्पन्न होतात व मग तें सर्व वृक्षत्व त्या बीजामध्येंच लीन होतें, त्याप्रमाणें संकल्पाच्या योगानें सर्वांची उत्पत्ति होते आणि नंतर सर्व संकल्पांतच नाहींसें होतें. २९२. याप्रमाणें जगाचें मूळ बीज जो संकल्प, जो सूक्ष्म वासनारूप असतो; तो संकल्प कल्पाच्या अंतीं जेथें सूक्ष्म रूपानें राहतो, तें ( स्थान ) मीच आहें. २९३. हीं नामरूपें जेव्हां नाहींशीं होतात, वर्ण व व्यक्ति आटून जातात, जातींचे निरनिराळे प्रकार नाहींसे होतात आणि जेव्हां आकाशहि नाहींसें होतें, ( तात्पर्य, जेव्हां हा सर्व जगदाकार नाहींसा होतो, ) २९४. त्या वेळीं वासनारूप संकल्पाचे संस्कार हे पुनः जगदाकार रचण्याकरितां जेथें अमर होऊन असतात, तें ठिकाण मी आहें. २९५.

हे अर्जुना, मी उष्णता उत्पन्न करतों; मी पर्जन्य थांबवून धरतों व पर्जन्य सोडतों. अमरत्व, मृत्यु तसेंच सत्‌असत् हें सर्व मीच आहें. १९.

मी सूर्याच्या रूपानें प्रकाशतों, त्या वेळेला हें सर्व आटून जातें आणि मागाहून मीच इंद्र बनून ज्या वेळेला पाऊस पाडतों, त्या वेळीं पुन्हां आबादानी होते. २९६. अग्नि लाकडें खातो, तीं लाकडेंच अग्नि बनतात, त्याप्रमाणें मरणारे व मारणारे हे दोन्ही माझीं स्वरूपें आहेत असें समज. २९७. याकरितां मृत्यूनें घेरलेलें जें जें आहे, तें देखील माझेंच रूप आहे आणि त्याचप्रमाणें न मरणारें जें अविनाश, तें तर मी सहजच आहें. २९८. आतां पुष्कळ बोलून जें सांगावयाचें, तें सर्व एकदांच सांगतों, लक्षांत ठेव. तर विनाशी आणि अविनाशी म्हणून जे पदार्थ आहेत ते मीच आहें, असें समज २९९. म्हणून अर्जुना, जेथें मी नाहीं, असें कोणतें ठिकाण आहे ? परंतु या प्राण्यांचें दुर्दैव कसें आहे तें पहा, कीं मी सर्वव्यापी असूनही, ते मला कोठेंच पहात नाहींत. ३००. लाटा या ( जलरूप ) असून ( त्या ) जलाशिवाय ( वृक्षादिकांप्रमाणें ) सुकून जात आहेत, तसेंच प्रकाशरूप जीं सूर्यकिरणें, तीं दिव्याशिवाय पाहूं शकत नाहींत. त्याप्रमाणें सर्व प्राणी मद्रूपच असून, त्यांस आपण भगवद्रूप आहोंत, असें वाटत नाहीं, हें केवढें आश्चर्य आहे ! पहा. ३०१. हें सर्व जग आंतबाहेर माझ्याच रूपानें ठेंचून भरलें आहे. जग हें केवळ माझेंच ओतलेलें आहे; परंतु कसें दुर्दैव त्यांच्यावर ओढवलें आहे कीं, ते मीच ( देवच ) नाहीं असें म्हणतात ! ३०२. परंतु अमृताच्या आडांत पडावें आणि आपण आपल्याला कांठावर कां काढावें ? परंतु तें ज्याला अप्राप्त आहे अशाला असेंच होतें, त्याला काय करावें ! ३०३. अर्जुना; एक घासभर अन्नाकरितां एक आंधळा रस्त्यानें धांवत असतां चिंतामणि रत्नाला ठेंच लागून अडखळला; ( पण ) तो आंधळा होता. म्हणून त्यानें तो चिंतामणि लाथेनें उडविला. ३०४. त्याप्रमाणें

जाये। तें ऐसी हे दशा आहे। म्हणोनि कीजे तें केलें नोहे। ज्ञानेंवीण ॥ ५ ॥ आंधळेया गरुडाचे पांख आहाती। ते कवणा उपेगा जाती। तैसें सत्कर्माचे उपखे ठाती। ज्ञानेंवीण ॥ ६ ॥

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥

देख पां गा किरीटी। आश्रमधर्मांचिया राहाटी। विधिमार्गा कसवटी। जे आपणाचि होती ॥ ७ ॥ यजन करितां कौतुकें। तिहीं वेदांचा माथा तुके। क्रिया फळेंसि उभी ठाके। पुढां जयां ॥ ८ ॥ ऐसे दीक्षित जे सोमप। जे आपणाचि यज्ञाचें स्वरूप। तींहीं तया पुण्याचेनि नांवें पाप। जोडिलें देखें ॥ ९ ॥ जे श्रुतित्रयातें जाणोनि। शतवरी यज्ञ करूनि। यजिलिया मातें चुकोनि। स्वर्गु वरिती ॥ ३१० ॥ जैसें कल्पतरुतळवटीं। बैसोनि झोळिये पाडी गांठी। मग निदैव निघे किरीटी। दैन्यचि करूं ॥ ११ ॥ तैसे शतक्रतूं यजिलें मातें। कीं ईप्सिताति स्वर्गसुखातें। आतां पुण्य कीं हें निरुतें। पाप नोहे ॥ १२ ॥ म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्गु। तो अज्ञानाचा पुण्यमार्गु। ज्ञानिये तयातें उपसर्गु। हानि म्हणती ॥ १३ ॥ एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख। पावोनि स्वर्गा नाम कीं सुख। वांचूनि नित्यानंद गा निर्दोष। तें स्वरूप माझें ॥ १४ ॥ मज येतां पैं सुभटा। या द्विविधा गा अव्हांटा। स्वर्गु नरकु या वाटा। चोरांचिया ॥ १५ ॥ स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे। पापात्मकें पापें नरका जाइजे। मग मातें जेणें पाविजे। तें शुद्ध पुण्य ॥ १६ ॥ आणि मजचिमाजीं असतां। जेणें मी दूरी होय पांडुसुता। तें पुण्य ऐसें म्हणतां। जीभ न तुटे काई ॥ १७ ॥ परि हें असो आतां प्रस्तुत। ऐकें यापरी ते दीक्षित। यजुनि मातें याचित। स्वर्गभोगु ॥ १८ ॥ मग मी न पविजे ऐसें। जें पापरूप पुण्य असे। तेणें लाधलेनि सौरसें। स्वर्गा येती ॥ १९ ॥ जेथ अमरत्व हेंचि सिंहासन। ऐरावतासारिखें वाहन। राजधानी भुवन। अमरावती ॥३२०॥ जेथ महासिद्धींचीं भांडारें। अमृताचीं कोठारें। जियें गांवीं खिल्लारें। कामधेनूंचीं ॥ २१ ॥ जेथ वोळगे देव पाइका। सैंघ चिंतामणीचिया भूमिका। विनोदवनवाटिका। सुरतरूंचिया ॥ २२ ॥ गंधर्वगान गाणीं। जेथ रंभेऐशिया नाचणी। उर्वशी मुख्य विलासिनी। अंतौरिया ॥ २३ ॥ मदन वोळगे शेजारें। जेथ चंद्र शिंपे सांवरें। पवना ऐसें म्हाणियारें। धांवणें जेथ ॥ २४ ॥ पैं बृहस्पति आपण। ऐसे स्वस्तीश्रियेचे ब्राह्मण। ताटियेचे सुरगण। विर्कार जेथें ॥ २५ ॥ लोकपाळरांगेचे। राउत जिये पदींचे। उच्चैःश्रवा खांचे। खोलणिये ॥ २६ ॥ हें बहु असो जे ऐसे। भोग इंद्रसुखाहिसरिसे। ते भोगिजती जंव असे। पुण्यलेशु ॥ २७ ॥

जेव्हां जीवाला ज्ञान सोडून जातें, त्या वेळीं जीवाची वरील आंधळ्यासारखी अवस्था होते. म्हणून जें कांहीं करावें, तें ज्ञानाशिवाय, केल्यासारखें होत नाहीं. ३०५. आंधळ्याला जर गरुडाचे पंख असले, तर त्याला ते कोणत्या उपयोगाला पडतील ? त्याप्रमाणें ज्ञानाशिवाय सत्कर्माचरणाचे श्रम केले असतां व्यर्थ जातात. ३०६.

तीन वेद जाणणारे, ( यज्ञामध्यें ) सोमपान करणारे व ( तेणें करून ) पाप नष्ट झालेले याज्ञिक, हे यज्ञांनीं माझें यजन करून स्वर्गगति मागतात. पुण्याचें फल असा जो देवेंद्राचा लोक, तो प्राप्त करून ते त्या स्वर्गलोकीं दिव्य असे देवांचे भोग भोगतात. २०.

पहा, अरे अर्जुना, आश्रमधर्मांच्या आचरणानें विहित मार्गाला जे आपणच कसोटी होतात, ( ज्यांच्या आचरणावरून वागण्याचा विधि कळतो; असें ज्यांचें उत्तम आचरण असतें ) ३०७. ते सहज लीलेनें यज्ञ करावयास लागले असतां, तिन्ही वेद आपली मान डोलवितात व ज्यांच्यापुढें ती यज्ञक्रिया आपल्या फलासह मूर्तिमंत येऊन उभी रहाते, ३०८. याप्रमाणें जे यज्ञांत सोमरसाचें पान करणारे यज्ञकर्ते आहेत आणि जे आपण स्वतःच यज्ञमूर्ति झाले आहेत, त्यांनीं यज्ञापासून होणाऱ्या त्या पुण्याच्या नांवानें वास्तविक पापाचा लाभ पदरांत पाडला असें समज, ३०९. कारण कीं, त्यांनीं ऋग्वेदादि तिन्ही वेदांना जाणून, शंभरपर्यंत यज्ञ करून माझें आराधन केलें असतां मला अजिबात विसरून ते स्वर्गच पसंत करितात. ३१०. कल्पवृक्षाच्या खालीं बसून अभागी पुरुष भीक मागण्याच्या झोळीला गांठी मारतो, आणि मग अर्जुना, तो अभागी पुरुष ज्याप्रमाणें भीक मागावयासच निघतो ३११. त्याप्रमाणें शंभर यज्ञ करून माझें आराधन केलें आणि स्वर्गांतील सुखांची इच्छा करूं लागले. आतां हें पुण्य आहे का ? खरोखर हें पाप नव्हे काय ? ३१२. म्हणून माझी प्राप्ति करून न घेतां, स्वर्गाची प्राप्ति करून घेणें हा अज्ञानी लोकांचा पुण्यमार्ग आहे. ज्ञानी लोक या मार्गाला विघ्न व नाश म्हणतात. ३१३. सहज विचार करून पाहिलें तर, नरकाच्या दुःखाकडे दृष्टि देऊन स्वर्गाला सुख हें नांव आलें आहे. वास्तविक पाहिलें असतां, अर्जुना, निर्दोष असा जो त्रिकालाबाधित आनंद, तें माझें स्वरूप आहे ३१४. अर्जुना, माझ्याकडे येत असतांना माझ्या स्वरूपापासून भलतीकडे नेणाऱ्या, स्वर्ग व नरक, या दोन प्रकारच्या आडवाटा आहेत. त्या चोरांच्या आहेत. पुण्यरूप पापानें, ( बाहेरून दिसायला पुण्य व आंतून भरलेलें पाप ) स्वर्गाला येतां येतें; आणि ( आंतबाहेर जें पाप असा ) पापरूप पापानें, नरकाला जाणें होतें. मग माझी प्राप्ति ज्यानें होते, तें शुद्ध पुण्य होय. ३१६. आणि अर्जुना सर्व प्राणी माझ्या स्वरूपामध्यें असतांना ज्या कृत्यानें मी परमात्मा दुरावला जातों, त्या कृत्याला पुण्य असें म्हटलें, तर जिव्हा झडणार नाहीं का ? ३१७ परंतु या प्रसंगीं आतां हें राहूं दे. अर्जुना ऐक, याप्रमाणें ते यज्ञकर्ते वस्तुतः माझी आराधना करतात, पण स्वर्गांतील दिव्य पदार्थांच्या भोगाची याचना करतात. ३१८. मग मी ज्याच्यायोगानें प्राप्त होत नाहीं, असें जें पापरूप पुण्य आहे, त्याच्या योगानें मिळालेल्या योग्यतेनें ते स्वर्गाला येतात. ३१९. ज्या स्वर्गांत न मरणेपणा हेंच सिंहासन आहे, ऐरावती हत्तीसारखें वाहन आहे व राजधानीची जागा अमरावती नगर आहे; ३२०. ज्या स्वर्गांत अणिमा, लघिमा इत्यादि महासिद्धींचीं भांडारें आहेत, अमृताचीं कोठारें आहेत व ज्या गांवांत कामधेनूंचे कळप आहेत; ३२१. ज्या स्वर्गांत देवसमुदाय चाकर होऊन सेवा करतो, जेथें जिकडे तिकडे चिंतामणि नांवाच्या रत्नाच्या जमिनी आहेत व जेथें करमणुकीकरितां केलेले बगीचे कल्पवृक्षाचे आहेत; ३२२. जेथें गंधर्वांचीं गाणीं हींच गाणीं आहेत व जेथें रंभेसारख्या अप्सरा नाचणाऱ्या आहेत; आणि विलास करण्याकरितां ज्या स्त्रिया आहेत, त्यांत मुख्य उर्वशी आहे; ३२३. जेथें शय्यागृहांत मूर्तिमंत मदन सेवाचाकरी करतो, ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष चंद्र ( आपल्या अमृतकिरणांनीं ) सडासंमार्जन करतो व वाऱ्यासारखा चपळ जासूद जेथें म्हटलेलें करण्याला तयार आहे, ३२४. देवगुरु बृहस्पती स्वतः ज्यामध्यें मुख्य आहे, असे आशीर्वाद देणारे व कल्याण इच्छिणारे ब्राह्मण जेथें आहेत व जेथें पंक्तीला देवमंडळीचे समुदाय आहेत; ३२५. ज्या ठिकाणचे घोडेस्वार लोकपालांच्या ( पूर्वादि दिशांचे इंद्रादिक स्वामी ) बरोबरीचे आहेत, जेथें उच्चैःश्रवा नांवाचा इंद्राचा घोडा पुढें चालतो; ३२६. हें फार वर्णन करणें पुरे. याप्रमाणें इंद्राच्या सुखाहिसारखे ते भोग, यज्ञकर्त्यांच्या पदरांत जेथपर्यंत पुण्याचा अंश असतो, तेथपर्यंत भोगतात. ३२७.

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥

मग तया पुण्याची पाउटी सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे । आणि येऊं लागती माघारें । मृत्युलोका ॥ २८ ॥ जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग दारही चेपूं न ये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों ॥ २९ ॥ एवं थितिया मातें चुकले । जीहीं पुण्यें स्वर्ग कामिले । तयां अमरपण तें वावों जालें । आतां मृत्युलोकु ॥३३०॥ मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेचां दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ॥ ३१ ॥ अगा स्वप्नीं निधान फावे । परि चेइलिया हारपे आघवें । तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञाचें ॥ ३२ ॥ अर्जुना वेदु जन्ही जाहला । तरी मातें नेणतां वायां गेला । कणु सांडूनि उपणिला । कोंडा जैसा ॥ ३३ ॥ म्हणऊनि मज एकेंविण । हे त्रयीधर्म अकारण । आतां मातें जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ॥ ३४ ॥

अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

पैं सर्वभावेंसी उखितें । जे वोपिले मज चित्तें । जैसा गर्भगोळु उद्यमातें । कोणाही नेणे ॥ ३५ ॥ तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं । मजचि नाम पाहीं । जिणेया ठेविलें ॥ ३६ ॥ ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांते मातें । जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥ ३७ ॥ ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणी । तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ॥ ३८ ॥ मग तींहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें आघवें । जैशी अजातपक्षांचेनि जीवें । पक्षिणी जिये ॥ ३९ ॥ आपुली तहान भूक नेणे । तान्हया निकें तें माउलीसीचि करणें । तैसे अनुसरले जे मज प्राणें । तयांचेन काइसेनिहि न लजें मी ॥ ३४० ॥ तया माझिया सायुज्याची चाड । तरि तेंचि पुरवीं कोड । कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सुयें ॥ ४१ ॥ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो तो पुढां पुढां लागें तयां देवों । आणि दिघलियाचा निर्वाहो । तोही मीचि करीं ॥ ४२ ॥ हा योगक्षेमु आघवा । तयांचा मजचि पडिला पांडवा । जयांचियां सर्वभावां । आश्रयो मी ॥ ४३ ॥

येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयाऽन्विताः । तेऽपि मामेव कौन्तेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

आतां आणिकही संप्रदायें । परी मातें नेणती समवायें । जे अग्निइंद्रसूर्यसोमाये । म्हणऊनि यजिती ॥ ४४ ॥ तेंही कीर मातेंचि होये । कां जे हें आघवें मीचि आहें । परि ते भजती उजरी नव्हे । विषम पडे ॥ ४५ ॥ पाहें पां शाखा पल्लव वृक्षाचे । हे काय नव्हती

तो विशाल स्वर्गलोक भोगल्यावर पुण्य क्षीण झालें म्हणजे ते मर्त्यलोकीं प्रवेश करतात. विषयांची इच्छा करून, तीन वेदांनीं सांगितलेल्या फलरूपी धर्माला अनुसरून कर्ममार्ग आचरण करणारांना, या प्रकारें जाणें येणें ( जन्ममृत्यु ) प्राप्त होतें. २१.

मग त्या पुण्यानें प्राप्त झालेला दर्जा नाहींसा झाला, म्हणजे त्याबरोबरच यज्ञकर्त्यांत असलेलें इंद्राच्या ऐश्वर्याचें तेज कमी होतें. आणि मग ते मृत्युलोकाला परत येऊं लागतात. ३२८. ज्याप्रमाणें वेश्येच्या नादांत पैसा नाहींसा होतो, मग तिचें दारास हात लावण्याचीही सोय रहात नाहीं; त्याप्रमाणें ( पुण्याची पुंजी सरलेल्या ) यज्ञकर्त्यांची स्थिति लज्जास्पद आहे; त्याचें काय वर्णन करावें ! ३२९. याप्रमाणें ज्यांनीं पुण्याच्या जोरावर स्वर्गाची हांव धरली, ते नित्य जवळ असणाऱ्या मला चुकले; आणि त्यांचें तें अमरपणही व्यर्थ गेलें. आतां त्यांना ( पूर्वीचा मृत्युलोक ) पुनः प्राप्त झाला. ३३०. आईच्या पोटरूपी गुहेंत, नरकाच्या उकर्डीतील थरांत, नऊ महिनेपर्यंत उकडून पुनः पुनः ते जन्माला येऊन मरतात. ३३१. अर्जुना, स्वप्नामध्यें द्रव्याचा ठेवा सांपडतो, पण जागें झालें असतां तो सर्व नाहींसा होतो. त्याप्रमाणें वेद जाणणाऱ्या यज्ञकर्त्यांचें स्वर्गसुख समजावें. ३३२. ज्याप्रमाणें धान्य टाकून नुसता कोंडा उफणावा, त्याप्रमाणें अर्जुना, मला जाणलें नाहीं तर, प्रत्यक्ष एवढा वेद तरी तो व्यर्थ होय. ३३३. म्हणून एक मला सोडलें, तर तीनहि वेदांनीं सांगितलेले धर्म ( ज्योतिष्टोमादिक यज्ञकर्में ) निरर्थक ठरतात. यास्तव अर्जुना, मला जाणून मग जरी दुसरें कांहीं जाणलें नाहींस, तरी तूं सुखी होशील. ३३४.

एकनिष्ठतेनें माझें चिंतन करणारे जे जन माझी उपासना करतात, त्या सतत ( माझ्या ठिकाणीं चित्तानें ) युक्त असलेल्या जनांचा ( सायुज्य अथवा मत्सेवा यांपैकीं पाहिजे असेल त्या गोष्टीचा ) योग ( अप्राप्त वस्तूची प्राप्ति ) व क्षेम ( प्राप्त वस्तूचें रक्षण ) मी करतों. २२.

जे सर्व प्रकारच्या वृत्तींसहित चित्तानें मला उक्ते विकले गेले; ज्याप्रमाणें मातेच्या गर्भांतील मूल कोणत्याही व्यवहाराला जाणत नाहीं, ३३५. त्याप्रमाणें माझ्याशिवाय दुसरें कांहीं ज्यांना बरेंच वाटत नाहीं, आणि पहा, ज्यांनीं आपल्या जगण्यास माझेंच नांव ठेवलें आहे, ( ज्यांना माझी सेवा करण्यांतच आपल्या जीविताची सार्थकता वाटते. ) ३३६. याप्रमाणें एकनिष्ठ चित्तानें माझें चिंतन करीत असतां, जे माझी उपासना करतात, त्यांची सेवा मीच करतों. ३३७. ते ज्या क्षणांत एकनिष्ठ होऊन माझ्या मार्गाला लागले ( मला भजावयास लागले ) त्याच वेळेला त्यांच्या संबंधाच्या काळजीचा बोजा माझ्यावर येऊन पडला. ३३८. मग जें जें म्हणून त्यांस करावयाचें असतें, तें तें सर्व मलाच करावें लागतें. जसें पंख न फुटलेल्या पिलांच्या जीवित्वानें पक्षीण जगते. ३३९. आपली तहानभूक कांहीं न जाणतां लहान मुलाला जें हितकर असेल, तें आईलाच करणें भाग पडतें; त्या मुलाप्रमाणें जे मला अंतःकरणपूर्वक भजले, त्यांचें कांहींही करण्यास मी लाजत नाहीं. ३४० त्यांना जर माझ्या एकरूपतेची इच्छा असेल तर तीच त्यांची आवड मी पूर्ण करतों. किंवा ते माझ्या सेवेची मागणी करतील, तर आम्हां दोघांमध्यें प्रेम घालतों ( म्हणजे मद्विषयक प्रेम त्यांना देतों. ) ३४१. याप्रमाणें जो जो हेतु मनांत धरतात, तो तो मी त्यांच्या पुढें पुढें होऊन त्यांस द्यावयास लागतों; आणि दिलेल्याचें रक्षणही मीच करतों. ३४२ ज्यांच्या सर्व वृत्तींना मीच एक आश्रय आहें, त्यांस नसलेला इच्छित पदार्थ देणें, व दिलेला पदार्थ जतन करणें, हें सर्व, अर्जुना, मलाच करावें लागतें. ३४३.

जे श्रद्धेनें युक्त असलेले भक्त ( माझ्याहून ) अन्य देवतांची ( अन्य म्हणून ) पूजा करतात ते देखील, हे अर्जुना ( अज्ञानामुळें ) विधि सोडून ( पण ) माझीच पूजा करतात. २३.

आतां सांगितलेल्या संप्रदायाखेरीज इतर जे संप्रदाय आहेत, ते सर्वत्र समान असणारा जो मी, त्या मला जाणत नाहींत व ते अग्नये, इंद्राय, सूर्याय आणि सोमाय असें म्हणून यज्ञ करितात. ३४४. ते त्यांनीं इंद्रादिकांच्या भावनेनें केलेलें भजन, निश्चयेंकरून माझेंच ( भजन ) होत असतें. कारण कीं ह्या सर्व रूपांनीं मीच एक आहें, पण तो त्यांचा भजन करण्याचा संप्रदाय सरळ नसून वांकडा आहे. ३४५. अर्जुना, पहा झाडाच्या फांद्या आणि पानें, हीं एकाच बीजापासून झालेलीं नसतात

एकाचि बीजाचे । परी पाणी घेणें मुळाचें । तें मुळींचि घापे ॥ ४६ ॥ कां दहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकेचि देहींचीं होती । आणि इहीं सेविले विषयो जाती । एकाचि ठाया ॥ ४७ ॥ तरि करोनि रससोय बरवी । कानीं केविं भरावी । फुलें आणोनि बांधावीं । डोळां केविं ॥ ४८ ॥ तेथ रसु तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा । तैसा मी तो यजावा । मीचि म्हणोनि ॥ ४९ ॥ येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेंआन । म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ३५० ॥

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च । न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥

एऱ्हवीं पाहें पां पंडुसुता । या यज्ञोपहारां समस्तां । मीवांचूनि भोक्ता । कवणु आहे ॥ ५१ ॥ मी सकळां यज्ञांचा आदि । आणि यजना या मीचि अवधि । कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवां भजले ॥ ५२ ॥ गंगेचें उदक गंगे जैसें । अर्पिजे देवपितरोद्देशें । माझें मज देती तैसें । परि आनानीं भावीं ॥ ५३ ॥ म्हणऊनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा । मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले ॥ ५४ ॥

यांति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः । भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥

मनें वाचा करणीं । जयांचीं भजनें देवांचिया वाहणी । ते शरीर जातियेक्षणीं । देवचि जाले ॥ ५५ ॥ अथवा पितरांचीं व्रतें । वाहती जयांचीं चित्तें । जीवित सरलिया तयांतें । पितृत्व वरी ॥ ५६ ॥ कां क्षुद्रदेवतादि भूतें । तियेंचि जयांचीं परमदैवतें । जींहीं अभिचारिकीं तयांतें । उपासिलें ॥ ५७ ॥ तयां देहाची जवनिक फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति जाहली । एवं संकल्पवशें फळलीं । कर्में तयां ॥ ५८ ॥ मग मीचि डोळां देखिला । जींहीं कानीं मीचि ऐकिला । मनीं मी भाविला । वानिला वाचां ॥ ५९ ॥ सर्वांगीं सर्वांठायीं । मीचि नमस्कारिला जिहीं । दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरा ॥ ३६० ॥ जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले । जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ॥ ६१ ॥ जे अहंकारु वाहत आंगीं । आम्ही हरीचे भूषावयालागीं । जे लोभिये एकाचि जगीं । माझेनि लोभें ॥ ६२ ॥ जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भूली सभ्रम । नेणती लोक ॥ ६३ ॥ जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडें जयांचेनि मंत्रें । ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ॥ ६४ ॥ ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे । मग मरणीं आणिकीकडे । जातील केविं ॥ ६५ ॥ म्हणोनि मद्याजी जे जाहाले । ते माझिया सायुज्या आले । जिहीं उपचारमिषें दिधलें । आपणपें मज ॥ ६६ ॥ पैं अर्जुना माझां ठायीं । आपणपेनवीण सौरसु नाहीं । मी उपचारीं कवणाही । नाकळें गा ॥ ६७ ॥ एथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेंपण मिरवी तेंचि उणें । आम्ही जाहलों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नव्हे ॥ ६८ ॥ अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपें हन जे

काय ? परंतु पाणी घेणें हें मूळाचें काम असल्यामुळें पाणी मुळालाच घातलें पाहिजे. ३४६. किंवा हीं दहा इंद्रियें आहेत आणि हीं जरी एकाच देहांत आहेत आणि यांनीं भोगलेले विषय एकाच ठिकाणीं ( भोक्त्याला ) जाऊन पोहोंचतात; ३४७. असें जरी आहे तरी उत्तम पक्वान्न करून कानांत कसें भरावें ? फुलें आणून तीं डोळ्यांवर कशीं बांधावीं ? ३४८. त्या ठिकाणीं पक्वान्नें तीं तोंडानेंच खालीं पाहिजेत. जो वास, तो नाकानेंच घेतला पाहिजे. त्याप्रमाणें माझें भजन माझ्या भावनेनेंच करावें. ३४९. अर्जुना, दुसरे कित्येक जे मला न जाणून भजन करतात, तें त्यांचें भजन व्यर्थ, भलत्यास भलतें असें होतें. याकरितां माझें भजनकर्म ज्या ज्ञानानें होतें, त्या ज्ञानाची दृष्टि स्वच्छ पाहिजे. ३५०.

सर्व यज्ञांचा मीच भोक्ता आणि स्वामी आहें. ( लोक ) मला सत्य स्वरूपानें जाणत नाहींत. म्हणून ते घसरत असतात. २४.

एऱ्हवीं अर्जुना, पहा कीं, या सर्व यज्ञांतील सामुग्रीचा माझ्यावांचून भोग घेणारा दुसरा कोण आहे ? ३५१. सर्व यज्ञांचा आरंभ मी आहें आणि यज्ञांचा शेवटही मीच आहें. अशा प्रकारें या यज्ञांच्या आरंभीं व अंतीं असणारा जो मी, त्या मला टाकून, हे दुर्बुद्धिवान याज्ञिक इंद्रादि देवांना भजले. ३५२. ज्याप्रमाणें गंगेच्या कांठीं तर्पण करावयास बसलें, म्हणजे गंगेंतील पाणी घेऊन, तें देव आणि पितर यांना उद्देशून गंगेंतच पुन्हा टाकतात; त्याचप्रमाणें माझेंच मला देतात, परंतु तें वेगवेगळ्या भावनेनें देतात. ३५३. म्हणून हे अर्जुना, ते मुळींच माझ्या ठिकाणीं प्राप्त होत नाहींत. तर ते ज्याची इच्छा मनांत करतात त्या लोकाला जातात. ३५४.

देवांची भक्ति करणारे देवत्वाप्रत जातात, पितरांची भक्ति करणारे पितृत्वाप्रत जातात. भूतांचें पूजन करणारे भूतत्वाप्रत जातात आणि माझेंच पूजन करणारे मद्रूप होतात. २५.

मनानें, वाचेनें व सर्व इंद्रियांनीं ज्यांचा भजनप्रवाह इंद्रादि देवांचे मार्गाकडे आहे, त्यांचा देह पडतांक्षणींच त्यांना स्वर्गांत देवशरीर मिळतें. ३५५. अथवा श्राद्ध-पक्षादि जीं पितरांचीं व्रतें आहेत, तीं व्रतें जे अंतःकरण-पूर्वक पाळतात, ते मेल्यावर त्यांना पितृलोकाची प्राप्ति होते. ३५६. किंवा भूतखेतादि क्षुद्र देवता हींच ज्यांचीं श्रेष्ठ दैवतें आहेत व त्यांची ज्यांनीं जारण, मारण, उच्चाटन इत्यादि तामसकर्मांनीं उपासना केली आहे, ३५७. त्यांचा देहरूपी पडदा दूर होतो ( त्यांचें शरीर पडतें ) आणि नंतर त्यास भूतखेतादिकांची गति मिळते. याप्रमाणें ज्यांनीं ज्या हेतूनें कर्में केलीं असतील, तीं त्यांना तशीं फलद्रूप होतात. ३५८. मग ज्यांनीं डोळ्यांनीं मलाच पाहिलें, ज्यांनीं कानांनीं माझ्याच गोष्टी ऐकल्या मनामध्यें ज्यांनीं माझी कल्पना केली व वाणीनें माझें वर्णन केलें, ३५९. सर्व अवयवांनीं सर्व ठिकाणीं मीच समजून, ज्यांनीं नमस्कार केला व ज्यांनीं दानपुण्य इत्यादि जें कांहीं केलें, तें सर्व माझ्याच उद्देशानें केलेलें असतें; ३६०. ज्यांनीं माझें ज्ञान करून देणाऱ्या ज्ञानाचा अभ्यास केला, जे आंतबाहेर माझ्याच योगानें तृप्त झालेले आहेत, ज्यांना माझ्याकरितांच आयुष्य लाभलेलें आहे, ( म्हणजे जे आपलें आयुष्य माझाच लाभ होण्याकरितां खर्च करतात ) ३६१. आम्हीं हरीचे दास आहोंत असें भूषण मिरविण्याकरितां जे आपल्या ठिकाणीं अहंकार घेतात, जे जगांत एक माझ्याच लोभानें लोभी आहेत; ३६२. जे माझ्याविषयींच्या कामनेनेंच कामनायुक्त आहेत, जे माझ्याविषयींच्या प्रेमानें प्रेमयुक्त आहेत व जे माझ्या ठिकाणीं भुलल्यामुळें वेडे झाले आहेत, म्हणून लोकांना जाणत नाहींत. ३६३. ज्यांचीं शास्त्रें तर मलाच जाणतात, जे अशा मंत्राचा जप करतात कीं त्यापासून त्यांना माझीच प्राप्ति होते; अशा प्रकारें ज्यांनीं आपल्या कायिक, वाचिक, मानसिक या सर्व कर्मांनीं माझें भजन केलें, ३६४. त्यांना मरण येण्याच्या पूर्वींच, माझ्या स्वरूपाशीं त्यांचें निश्चयेंकरून ऐक्य झालें. ते मग मरणसमयीं इतर गतीस कसे जातील ? ३६५. याकरितां ज्यांनीं अर्पण करण्याच्या निमित्तानें मला आपला आत्मभाव अर्पण केला आहे असे माझें भजन करणारे जे आहेत, ते माझ्या सायुज्य ( मोक्ष ) गतीस जातात. ३६६. अर्जुना, भक्तानें आपला आत्मा अर्पण केल्याशिवाय मला आनंद होत नाहीं. अरे, मी ( इतर दुसऱ्या कोणत्याही ) उपचारांनीं कोणालाही वश होत नाहीं. ३६७. येथें जो, ' मी परमात्मस्वरूप जाणलें ' म्हणतो, त्यास तें खास कळलें नाहीं असें समजावें. माझ्यापुढें जो आपला संपन्नपणा मिरवतो, तोच त्याचा कमीपणा आहे. जो ' आम्ही कृतार्थ झालों ' असें म्हणतो, तो कांहींच झाला नाहीं, ( असें समजावें. ) ३६८. अथवा अर्जुना, यज्ञ, दान किंवा तप, यांच्या योगानें मी सहज भगवत्प्राप्ति करून घेईन, असा जर कोणाला गर्वाचा फुंज असेल,

हुटहुटी । ते तृणा एकासाठीं । न सरे एथ ॥ ६९ ॥ पाहें पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदापासूनि असे आगळें । कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथी ॥ ३७० ॥ तोही आंथरुणा-तळवटीं दडे । येरु नेति नेति म्हणोनि बहुडे । एथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ॥ ७१ ॥ करितां तापसांची कडसणी । कवणु जवळां ठेविजैल शूळपाणी । तोहि अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे ॥ ७२ ॥ नातरी आथिलेपणें सारिसी । कवणी आहे लक्ष्मियेऐसी । श्रियेसारिखिया दासी । घरीं जियेतें ॥ ७३ ॥ तियां खेळतां करिती घरकुली । तयां नामें अमरपुरें जरि ठेविलीं । तरि न होती काय बाहुलीं । इंद्रादिक तयांचीं ॥ ७४ ॥ तियां नावडोनि जेव्हां मोडती । तेव्हां महेंद्राचे रंक होती । तियां झाडां येउते जयां पाहती । ते कल्पवृक्ष ॥ ७५ ॥ ऐसें जियेचियां जवळिकां । सामर्थ्य घरींचियां पाइकां । ते लक्ष्मी मुख्य-नायका । न मनेचि एथ ॥ ७६ ॥ मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमानु सांडूनि पांडवा । ते पाय धुवावयाचिया दैवा । पात्र जाहाली ॥ ७७ ॥ म्हणोनि थोरपण पऱ्हांचि सांडिजे । व्युत्पत्ति आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥ ७८ ॥ अगा सहस्रकिरणाचिये दिठी । पुढा चंद्रुही लोपे किरीटी । तेथ खद्योत का हुटहुटी । आपुलेनि तेजें ॥ ७९ ॥ तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे । जेथ शंभूचेंही तप न पुरे । तेथ येर प्राकृत हेंदरें । केविं जाणों लाहे ॥ ३८० ॥ यालागीं शरीरसांडोवा कीजे । सकळगुणांचें लोण उतरिजे । संपत्तिमदु सांडिजे । कुरवंडी करुनी ॥ ८१ ॥

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

मग निस्सीमभावउल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें । फळ एक आवडे तैसें । भलतयाचें हो ॥ ८२ ॥ भक्तु माझियाकडे दावी । आणि मी दोन्ही हात वोडवीं । मग देंठु न फेडितां सेवीं । आदरेंशी ॥ ८३ ॥ पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें । तें लेखें तरि म्यां तुरंबावें । परि मुखींचि घालीं ॥ ८४ ॥ हें असो कायसीं फुलें । पानचि एक आवडे तें जाहलें । तें साजुकही न हो सुकलें । भलतैसें ॥ ८५ ॥ परि सर्वभावें भरलें देखें । आणि भुकेला अमृतें तोखे । तैसें पत्रचि परि तेणें सुखें । आरोगूं लागें ॥ ८६ ॥ अथवा ऐसेंही एक घडे । जे पालाही परी न जोडे । तरि उदकाचें तंव सांकडें । नव्हेल कीं ॥ ८७ ॥ तें भलतेथ निमोलें । न जोडितां आहे जोडलें । तेंचि सर्वस्व करूनि अर्पिलें । जेणें मज ॥ ८८ ॥ तेणें वैकुंठा-पासोनि विशाळें । मजलागीं केलीं राउळें । कौस्तुभाहोनि निर्मळें । लेणीं दिधलीं ॥ ८९ ॥ दूधाचीं शेजारें । क्षीराब्धी ऐसीं मनोहरें । मजलागीं अपारें । सृजिलीं तेणें ॥ ३९० ॥ कर्पूर चंदन अगरु । ऐसेया सुगंधाचा महामेरु । मज हातीं लाविला दिनकरु । दीपमाळे ॥ ९१ ॥ गरुडासारिखीं वाहनें । मज सुरतरूंचीं उद्यानें । कामधेनूंचीं गोधनें । अर्पिलीं तेणें ॥ ९२ ॥

तर त्या यज्ञ, दान, तप वगैरेंची गवताच्या काडीइतकी देखील माझ्याजवळ किंमत नाहीं. ३६९. अर्जुना, विचार कर. ज्ञानसंपन्नतेच्या बाबतींत वेदांपेक्षां श्रेष्ठ कोणी तरी आहे काय? किंवा शेषापेक्षां अधिक तोंडांनीं बोलणारा कोठें आहे काय? ३७०. तो शेषदेखील माझ्या अंथरुणाखालीं लपून बसतो. दुसरा जो ( वेद ) तो मी ( परमात्मा ) असा नाहीं, मी ( परमात्मा ) तसा नाहीं, असें म्हणून परत फिरतो. माझ्या ( परमात्मस्वरूपाचे ) ठिकाणीं सनकादिक अगदीं वेडेपिसे झाले आहेत. ३७१. तपस्व्यांची निवड करूं गेलें तर, असा कोण तपस्वी आहे, कीं जो महादेवाच्या पंक्तीला बसवितां येईल? तो शिव देखील, अभिमान टाकून माझें चरणोदक (गंगा) मस्तकावर धारण करिता झाला. ३७२. अथवा ऐश्वर्यानें लक्ष्मीच्या बरोबरीची दुसरी कोण आहे? त्या लक्ष्मीच्या घरीं श्रीयेसारख्या दासी आहेत, ३७३. त्यांनीं भातुकली खेळतांना केलेल्या घरकुलास अमरावती हें नांव दिलें, तर इंद्रादिक हे त्यांच्या खेळांतील बाहुल्या होणार नाहींत काय? ३७४. खेळाचा कंटाळा येऊन जेव्हां त्या दासी खेळ, घरकुलें वगैरे मोडतात, तेव्हां मोठे मोठे इंद्रासारखे असले तरी ते रंक होतात. त्या ज्या झाडांकडे एवढेसें पहातात, ते कल्पवृक्ष होतात. ३७५. जिच्या घरांतील सन्निध असलेल्या दासींची अशी शक्ति आहे, अशी जी ऐश्वर्याची मुख्य मालकीण लक्ष्मी, तिचीही येथें किंमत नाहीं. ३७६. हे अर्जुना, मग ती जेव्हां आपल्या ठिकाणीं असलेल्या ऐश्वर्य-अभिमानाचा त्याग करून सर्वस्वी माझी सेवा करूं लागली, त्या वेळीं ती माझे पाय धुण्याच्या भाग्याला पात्र झाली. ३७७. एवढ्याकरितां आपल्या ठिकाणचा मोठेपणा दूरच टाकून द्यावा, शास्त्राध्ययन केल्याचा फुंज असला तर तो सर्व टाकून, जसें कांहीं आपण शास्त्राध्ययन केलेंच नाहीं, अशी वृत्ति ठेवावी. अशा प्रकारचा जगतांत सर्व प्रकारें लहानपणा जेव्हां घ्यावा, तेव्हां माझें सान्निध्य प्राप्त होतें. ३७८. अरे अर्जुना, हजारों किरण असलेल्या सूर्याच्या प्रकाशांत चंद्र सुद्धां नाहींसा होतो; त्या सूर्यापुढें काजव्यांनीं आपल्या थोड्याशा प्रकाशाचा डौल कशाला मिरवावा? ३७९. त्याप्रमाणें लक्ष्मीचा मोठेपणा जेथें चालत नाहीं, आणि शिवाचें तपही जेथें पुरें पडत नाहीं, त्या माझ्या ( परमात्म्याचे ) ठिकाणीं सामान्य व अजागळ लोकांचा प्रवेश कसा होईल? ३८०. याकरितां परमात्म्यावरून आपलें शरीर ओंवाळून टाकावें आणि आपल्या अंगीं असलेल्या सर्व गुणांचें निंबलोण करावें, तसेंच संपत्तीचा फुंज ओंवाळून टाकून द्यावा. ३८१.

पान, फूल, फळ अथवा पाणी जो मला भक्तीनें अर्पण करतो, त्या शुद्धचित्त मनुष्याचें भक्तिपूर्वक आणलेलें तें ( पानफूल इत्यादि ) मी सेवन करतों. २६.

मग अमर्याद भक्तीच्या उत्कर्षानें मला अर्पण करण्याच्या निमित्तानें एकादें फळ वाटेल तसलें भलत्याच झाडाचें कां असेना? ३८२. भक्त माझ्यापुढें तें दाखवितो, आणि तें घेण्याकरितां मी माझे दोन्ही हात पुढें करतों आणि मग त्या फळाचा देठ काढून न टाकतां आदरानें त्याचें सेवन करतों. ३८३. अर्जुना, भक्तीच्या उद्देशानें भक्तानें एकादें फूल मला दिलें; विचार केला तर, मीं त्याचा वास घ्यावा, परंतु भक्तीनें भुलल्यामुळें प्रेमभरांत मी तें तोंडांतच घालतों. ३८४. हें राहूं दे, फुलाचीच काय गोष्ट आहे? वाटेल त्या झाडाचें एक पानच का होईना? मग तें ताजेंच पाहिजे असें नाहीं. वाळलेलें किंवा कसलेंही असलें तरी चालेल. ३८५. परंतु तें दिलेलें पान त्याच्या सर्व प्रेमानें भरलेलें आहे असें ( मी ) जाणतों आणि भुकेलेला अमृतामुळें जसा संतोषित होतो, त्याप्रमाणें तें पानच, परंतु तितक्या आनंदानें मी खाऊं लागतों. ३८६. अथवा एक वेळ असेंही झालें कीं, पाला खरा, पण तोहि मिळाला नाहीं; मग पाण्याचा तर ( कोठें ) दुष्काळ नाहींना! ३८७. तें पाणी वाटेल तेथें, विनखर्चानें व मिळविण्याचा कांहीं प्रयत्न न करतां स्वभावतःच प्राप्त झालेलें आहे. तेंच आपलें सर्व मांडवल समजून ज्यानें मला अर्पण केलें, ३८८. त्यानें त्या करण्यांत वैकुंठापेक्षां मोठीं भव्य मंदिरें माझ्याकरितां तयार केलीं व कौस्तुभ रत्नापेक्षां जास्त तेजस्वी रत्नांचे अलंकार मला अर्पण केले. ३८९. त्यानें क्षीरसागरासारखी मनोवेधक दुधाचीं अनेक शय्यागृहें माझ्याकरितां उत्पन्न केलीं. ३९०. त्याच्या त्या करण्यांत कापूर, चंदन, अगरु अशा या सुगंधी पदार्थांचा मेरूएवढा मोठा डोंगर त्यानें मला अर्पण केल्याप्रमाणें होतें. त्यानें आपल्या हातानें मजकरितां सूर्याला दीपमाळेवर लावलें. ( असें मी त्याच्या त्या भक्तियुक्त कृत्यानें समजतों. ) ३९१. त्यानें गरुडाच्या सारखीं वाहनें, कल्पवृक्षांचे बगीचे व कामधेनूंचे कळप मला अर्पण केले. ३९२. मला अमृतापेक्षां

मज अमृताहूनि सुरसें । बोनीं वोगरिलीं बहुवसें । ऐसा भक्तांचेनि उदकलेशें । परितोषें गा ॥ ९३ ॥ हें सांगावें काय किरीटी । तुम्हींचि देखिलें आपुलिया दिठी । मी सुदामयाचिया सोडीं गांठी । पव्हयालागीं ॥ ९४ ॥ पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणें । आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ॥ ९५ ॥ येर पत्र पुष्प फळ । तें भजावया मिस केवळ । वांचूनि आमुचा लाग निष्फळ । भक्तितत्त्व ॥ ९६ ॥ म्हणोनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धि एकी सोपारी करीं । तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबें मातें ॥ ९७ ॥

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

जे जे कांहीं व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी । अथवा यज्ञीं याजसी । नाना-विधीं ॥ ९८ ॥ नातरी पात्रविशेषें दानें । कां सेवकां देसी जीवनें । तपादि साधनें । व्रतें करिसी ॥ ९९ ॥ तें क्रियाजात आघवें । जें जैसें निपजेल स्वभावें । तें भावना करोनि करावें । माझिया मोहरा ॥ ४०० ॥

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः । संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

परि सर्वथा आपुलां जीवीं । केलियाची शंका कांहींचि नुरवीं । ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं । माझिया हातीं ॥ १ ॥ मग अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे जेवि मुकलीं । तेवि न फळतीचि मज अर्पिलीं । शुभाशुभें ॥ २ ॥ अगा कर्में जें उरावें । तें तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तयातें भोगावया यावें । देहा एका ॥ ३ ॥ तें उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म । जन्मासवें श्रम । वराचिलही गेले ॥ ४ ॥ म्हणऊनि अर्जुना यापरी । पाहेचा वेळु नव्हेल भारी । हे संन्यासयुक्ति सोपारी । दिधली तुज ॥ ५ ॥ या देहाचिया बांदोडी न पडिजे । सुखदुःखाचिया सागरीं न बुडिजे । सुखें सुखरूपा घडिजे । माझियाचि अंगा ॥ ६ ॥

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः । ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाऽप्यहम् ॥ २९ ॥

तो मी पुससी कैसा । तरि जो सर्वभूतीं सदा सरिसा । जेथ आपपरु ऐसा । भागु नाहीं ॥ ७ ॥ जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनि । जे जीवें कर्में करूनि । भजती मातें ॥ ८ ॥ ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझां ठायीं । आणि मी तयांचां हृदयीं । समग्र असें ॥ ९ ॥ सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजीं असे । आणि बीजकणु वसे । वटीं जेवीं ॥ ४१० ॥ तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरें । वांचुनि आंतुवट वस्तु-विचारें । मी तेचि ते ॥ ११ ॥ आतां जायाचें लेणें । जैसें आंगावरी आहाचवाणें । तैसें

रसभरित अशीं पुष्कळ पक्वान्नें त्यानें नैवेद्यास दिलीं. अर्जुना, मी भक्तांच्या थेंबभर पाण्यानें असा संतोषित होतों. ३९३. अर्जुना, हें सांगावयास कशाला पाहिजे ? तुम्हींच आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे कीं, मी पोह्यांकरितां सुदामदेवानें आणलेल्या पुरचुंडीच्या गांठी आपल्या हातानें सोडल्या. ३९४. मी एक भक्तीच ओळखतो. मग त्या ठिकाणीं लहानथोर अशी निवड करीत नाहीं. आम्ही वाटेल त्याच्या भक्तिरूपी मेजवानीला पाहुणे म्हणून हजर होत असतों. ३९५. बाकी पान, फूल, फळ यांचें अर्पण करणें, तें मला भजण्याचें केवळ निमित्त आहे. वास्तविक पाहिलें तर, आम्हांला आवडतें असें म्हटलें म्हणजे, भक्ताच्या ठिकाणीं असलेलें शुद्ध भक्तितत्त्वच होय. ३९६. म्हणून अर्जुना, ऐक. प्रथम तूं आपली एक बुद्धि वश करून घे. असें जर करणें असेल, तर मग सहजच आपल्या मनोरूप देवळांमध्यें तूं मला विसरूं नकोस. ३९७.

हे कौन्तेया, तूं जें करतोस, जें भोगतोस, जें हवन करतोस, जें दान करतोस, जें तप करतोस तें ( सर्व ) मला अर्पण कर. २७.

जे जे कांहीं तूं व्यवहार करशील किंवा शब्दादि विषयांचा अनुभव घेशील अथवा अनेक प्रकारच्या यज्ञरूप कर्मांनीं हवन करशील, ३९८. किंवा विशिष्ट योग्यता जाणून दानें देशील अथवा तूं आपल्या नोकरांना जीं वेतनें देशील किंवा तप वगैरे साधनें साधशील किंवा व्रतांचें आचरण करशील; ३९९. (तात्पर्य) जें जें कर्म, जसें जसें तुझ्याकडून स्वभावतः घडेल, ( मग तें सांग असो अथवा असांग असो ) तें सर्व कर्म माझ्या प्रीत्यर्थ आहे अशा समजुतीनें कर. ४००.

या प्रकारें ( केलें असतां ), कर्मांचीं शुभाशुभफलरूप जीं बंधनें, त्यांपासून तूं मुक्त होशील. ( या ) संन्यासरूपी ( कर्मफलत्यागरूपी ) कर्मयोगानें युक्तचित्त व ( कर्मबंधनांपासून ) मुक्त झालास, म्हणजे माझ्या समीप येशील. २८.

परंतु अमुक कर्म मीं केलें, अशी कर्तृत्वाची आठवण मुळींच आपल्या मनामध्यें ठेवूं नकोस. याप्रमाणें सर्व कर्में शुद्ध करून ( कर्तृत्व अभिमानरहित होऊन ) मला अर्पण कर. ४०१ मग ज्याप्रमाणें अग्नीच्या कुंडामध्यें टाकलेलें बीं, अंकुर उत्पन्न होण्याच्या योग्यतेला आंचवतें, त्याप्रमाणें मला अर्पण केलेलीं बरींवाईट कर्में कांहींच फळ देत नाहींत. ४०२. अर्जुना, ज्या वेळेला कर्में शिल्लक राहतात, त्या वेळेला त्यांचें सुखदुःखाचे रूपानें फळ तयार होतें व त्या फळाला भोगण्याकरितां एखादा देह घ्यावा लागतो. ४०३. तें कर्म ज्या वेळेला मला अर्पण केलें, त्या वेळेलाच जन्ममरण पार नाहींसें झालें आणि जन्म नाहींसा झाल्याबरोबर जन्मानंतर येणारें कष्टही नाहींसे झाले. ४०४. म्हणून अर्जुना, याप्रमाणें ही सोपी ( अनायासानें कर्मरहित होण्याची ) युक्ति तुला दिली आहे ( तर ही एकदम अमलांत आण. ) ती जर उद्यां अमलांत आणूं म्हणून म्हणशील, तर फलप्राप्तीस ( कर्मरहित होण्यास ) तितकाच जास्त वेळ लागणार नाहीं काय ? ४०५. ( वर सांगितलेली युक्ति अमलांत आणली असतां ) देहरूपी बंदीखान्यांत पडावें लागत नाहीं, आणि सुखदुःखरूपी समुद्रांत बुडावें लागत नाहीं; आणि सुखरूप जें माझें स्वरूप, त्याच्याशीं अनायासें ऐक्य होतें. ४०६.

मी सर्व भूतांचे ठिकाणीं सम आहें. मला परका व आपला कोणी नाहीं. पण जे मला भक्तिपूर्वक भजतात, ते माझ्या ठिकाणीं आहेत आणि मी देखील त्यांच्या ठिकाणीं आहें: २९.

( भक्त ज्याचें स्वरूप बनतो ) तो मी कसा आहें म्हणून विचारशील, तर ( सांगतों ऐक. ) जो मी सर्व प्राण्यांमध्यें सारखा व्यापून राहिलेला आहें व जेथें आपला व परका असा भेद नाहीं, ४०७. अशा प्रकारें सर्वत्र समान असणारा जो मी, त्या मला जाणून त्या ज्ञानानें जे कर्तृत्वाच्या अहंकाराचें ठिकाण नाहींसें करतात व मनोभावानें कर्में करून तद्वारां माझें भजन करतात; ४०८. ते देहांत वागतांना दिसतात, परंतु ते खरोखर देहतादात्म्यांत नसून, माझ्या ठिकाणीं रंगलेले आहेत आणि मी त्यांच्या अंतःकरणांत संपूर्ण आहें. ४०९. आपल्या विस्तारासह वडपणा ज्याप्रमाणें वडाच्या लहानशा बियामध्यें असतो आणि त्याचप्रमाणें तें लहानसें बीं ज्याप्रमाणें वडाच्या झाडांतही असतें. ४१०. तसें आमच्यांत आणि भक्तांत, एकमेकाशीं पाहतां, बाह्यनामरूपात्मक देहदृष्टीनें भेद आहे. वास्तविक विचार केला तर अंतरंग आत्मदृष्टीनें ते आणि मी एकच आहोंत. ४११. आतां उसने मागून आणलेले दागिने जरी अंगावर धारण केले, तरी त्या दागिन्यांविषयीं वाल्गान्याच्या मनांत

देहधरणें । उदास तयांचें ॥ १२ ॥ परिमळु निघालिया पवनापाठीं । मागें वोस फूल राहे देठीं । तैसें आयुष्याचिये मुठी । केवळ देह ॥ १३ ॥ येर अवष्टंभु जो आघवा । तो आरूढोनि मद्भावा । मजचि आंतु पांडवा । पैठा जाहला ॥ १४ ॥

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

ऐसें भजतेनि प्रेमभावें । जयां शरीरही पाठीं न पवे । तेणें भलतया व्हावें । जातीचिया ॥ १५ ॥ आणि आचरण पाहातां सुभटा । तो दुष्कृताचा कीर सेल वांटा । परि जीवित वेचिलें चोहटां । भक्तीचिया कीं ॥ १६ ॥ अगा अंतींचिया मती । साचपण पुढिले गती । म्हणोनि जीवित जेणें भक्ती । दिधलें शेखीं ॥१७॥ तो आधीं जरी अनाचारी । तरी सर्वोत्तमुचि अवधारीं । जैसा बुडाला महापूरीं । न मरतु निघाला ॥ १८ ॥ तयाचें जीवित ऐलथडिये आलें । म्हणोनि बुडालेपण जेवीं वायां गेलें । तेवीं नुरेचि पाप केलें । शेवटलिये भक्ती ॥ १९ ॥ यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहाला । तरि अनुतापतीर्थीं न्हाला । न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावें ॥ ४२० ॥ तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ । आभिजात्य तेंचि निर्मळ । जन्मलेया फळ । तयासीच जोडलें ॥ २१ ॥ तो सकळही पढिन्नला । तपें तोचि तपिन्नला । अष्टांग अभ्यासिला । योगु तेणें ॥२२॥ हें असो बहुत पार्था । तो उतरला कर्मे सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं ॥२३॥ अवघिया मनोबुद्धीचिया राहटी । भरोनि एकनिष्ठेचिया पेटी । जेणें मजमाजीं किरीटी । निक्षेपिली ॥ २४ ॥

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति । कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥

तो आतां अवसरें मजसारिखा होइल । ऐसाही भाव तुज जाईल । हां गा अमृताआंत राहील । तया मरण कैचें ॥ २५ ॥ पैं सूर्य जो वेळु नुदैजे । तया वेळा कीं रात्रि म्हणिजे । तेवीं माझिये भक्तीविण जें कीजे । तें महापाप नोहे ॥ २६ ॥ म्हणोनि तयाचिया चित्ता । माझी जवळीक पांडुसुता । तेव्हांचि तो तत्त्वता । स्वरूप माझें ॥ २७ ॥ जैसा दीपें दीपु लाविजे । तेथ आदील कोण हें नोळखिजे । तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मी होऊनि ठाके ॥ २८ ॥ मग माझी नित्य शांती । तया दशा तेचि कांती । किंबहुना जिती । माझेनि जीवें ॥ २९ ॥ एथ पार्था पुढतपुढती । तेंचि तें सांगों किती । जरी मियां चाड तरी भक्ती । न विसंबिजे गा ॥४३०॥ अगा कुळाचिया चोखटपणा नलगा । आभिजात्य झणीं श्लाघा । व्युत्पत्तीचा वाउगा । सोसु कां वहावा ॥ ३१ ॥ कां रूपें वयसा माजा । आथिलेपणें कां गाजा । एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ॥ ३२ ॥ कणेंविण सोपटें । कणसें लागलीं आथी एक दाटें । काय करावें गोमटें । वोस नगर ॥ ३३ ॥ नातरी सरोवर आटलें । रानीं दुःखिया दुःखी भेटलें । कां वांझ फुलीं

उदासीनता जशी असते, तसे ते भक्तही देहाविषयीं उदासीन असतात. ४१२. ( जर ते देहावर उदासीन आहेत, तर त्यांनीं देह ठेवलाच कां ? तर त्यांनीं ठेवला नाहीं किंतु केवळ त्यांच्या आयुष्यानें धरून ठेवला आहे. हीच गोष्ट येथें उदाहरणानें स्पष्ट करतात.) वायु आपल्या-बरोबर फुलांतील सर्व सुगंध घेऊन गेल्यावर मग, केवळ देंठाला जसें सुगंधशून्य फूल राहतें, त्याप्रमाणें भक्ताचा देह ( केवळ अवशेष प्रारब्धाच्या भोगार्थ ) आयुष्य धरून ठेवतें. ४१३. अर्जुना, एऱ्हवीं त्यांचा सर्व देहा-हंकार माझ्या स्वरूपीं घेऊन माझ्यांतच स्थित झाला. ४१४.

( पूर्वी ) अत्यंत दुराचरणी असला तरी तो जर अनन्यभक्त ( होऊन ) माझी भक्ति करील, तर तो साधूच मानला पाहिजे; कारण, तो योग्य मार्गानें प्रयत्न करणारा होय. ३०.

अशा प्रकारें प्रेमभावानें भजत असतां ज्याला पुनः शरीरही मिळत नाहीं, तो मग कोणत्या का जातीचा असेना ? ४१५. आणि अर्जुना, त्याच्या वागणुकीचा विचार केला तर, वाईट वागणुकीचा खरोखर तो शेलका भाग आहे. परंतु ज्यांनीं आपलें ( उरलेलें ) आयुष्य भक्तीच्या चव्हाट्यावर खर्च केलें आहे. ४१६. अरे, मरणप्रसंगीं ज्या वासनेला घेऊन बुद्धि असते,त्या वासना-नुरूप खरोखर पुढें जन्म मिळतो. याकरितां ज्यानें आपला जीव अखेरीस भक्तीला अर्पण केला, ४१७. तो पूर्वीचा जरी पापाचरण करणारा असला, तरी तो सर्व-तोपरी उत्तमच आहे, हें समज. जसें कोणीएक मनुष्य महापुरांत बुडत असतां त्या खिर्तीतून न मरतां बाहेर निघाला. ४१८. तो जिवंत कडेला लागल्यामुळें आतां त्याचें बुडालेपण व्यर्थ गेलें; त्याप्रमाणें पूर्वी केलेलें पाप शेवटीं भक्ति केल्यानें उरतच नाहीं. ४१९. याकरितां पूर्वीचा दुराचरण करणारा जरी असला, तरी नंतर त्या-विषयींच्या पश्चात्तापरूपी तीर्थांत त्यानें स्नान केलें; आणि अशा प्रकारचें स्नान करून सर्व भावांनीं ( तो ) माझ्या ठिकाणीं अनन्य झाला, ४२०. तर आतां त्याचेंच कूळ पवित्र आहे. तसेंच शुद्ध (अस्सल) आणि श्रेष्ठ असें तें कूळ आहे आणि जन्माला आल्याचें फळ त्यालाच मिळालें. ४२१. त्यानें सर्वही अध्ययन केलें, त्यानें तपांचीं आचरणें केलीं किंवा आसनादिक अष्टांग असलेल्या योगाचा त्यानें अभ्यास केला. ४२२. अर्जुना, हें फार वर्णन पुरे. ज्याची आवड अखंड माझ्या ठिकाणीं आहे. अरे अर्जुना, तो पूर्णपणें कर्मरूपी बंधनांतून पार पडला. ४२३. हे अर्जुना, ज्यानें आपल्या मनबुद्धीचे सर्व व्यव-हार माझ्याविषयींची जी एकनिष्ठा, त्या एकनिष्ठेच्या पेटींत घालून, ती पेटी माझ्या स्वरूपामध्यें पुरून टाकली, ४२४.



तो अल्पकाळांत धर्मात्मा होतो, त्याला शाश्वत अशी शान्ति प्राप्त होते. हे कौन्तेया, माझा भक्त ( कधींहि ) नाश पावत नाहीं, हें तूं निश्चयपूर्वक जाण. ३१.

तो भक्त आतां कालांतरानें मद्रूप होईल, अशीही कल्पना तुझ्या अंतःकरणांत येईल. अगा अर्जुना, अमृतांत राहाणाऱ्याला मरण कसें येईल ? ४२५. ज्या वेळेस सूर्य-उदय नसतो, त्या कालास रात्र असें म्हणावयाचें; तसें माझ्या भक्तीवांचून जें जें करणें, तें तें महापातक नव्हे काय ? ४२६. अर्जुना, याकरितां भक्ताच्या चित्तास माझें स्वरूपसान्निध्य ज्या वेळेस प्राप्त होतें, त्या वेळेसच खरोखर तो मद्रूप होतो. ४२७. ज्याप्रमाणें एका दिव्यानें दुसरा दिवा लावला असतां, त्यांतील पहिला कोणता हें ओळखतां येत नाहीं; त्याप्रमाणें जो सर्वभावांनीं माझें भजन करतो तो मद्रूप होऊन राहातो. ४२८. मग माझी नित्य असलेली जी स्वरूपशांति, तीच त्याची स्थिति व तेज आहे. फार काय सांगावें ? माझ्या जीवानें ते जगलेले आहेत. ४२९. हे अर्जुना, सांगितलेली गोष्ट पुनः पुनः तीच ती, किती सांगूं ? माझ्या प्राप्तीची जर तुला इच्छा असेल, तर माझी भक्ति क्षणभरही सोडूं नकोस. ४३०. अरे, आमचें कूळ शुद्ध आहे, या अभिमानांत राहूं नका, तसेंच आमचें कूळ श्रेष्ठ आहे, असा कदाचित आनंद मानाल, तर मानूं नका व शास्त्राध्ययनाची हांव व्यर्थ कां बाळगावी ? ४३१. उत्तम रूपानें व तारुण्यानें मस्त कां व्हावें ? संपन्नपणाचा डौल कशाला मिरवावा ? ( कारण ) माझ्याविषयीं एक भक्ति जर नसेल, तर हा सर्व पसारा निष्फल आहे. ४३२. धान्यांवांचून पिशा असलेली कणसें दाट एकसारखीं आलीं, तरी त्यांचा काय उपयोग ? शहर चांगलें आहे, पण त्यांत वस्ती नसेल तर त्याचा काय उपयोग ? ४३३. अथवा सरोवरांतील पाणी आटलें, किंवा रानामध्यें एका दुःखी मनुष्याची आणि दुसऱ्या दुःखी मनुष्याशीं गांठ पडली

फुललें । झाड जैसें ॥ ३४ ॥ तैसें सकळ तें वैभव । अथवा कुळजातिगौरव । जैसें शरीर आहे सावेव । परि जीवचि नाहीं ॥ ३५ ॥ तैसें माझिये भक्तीविण । जळो तें जियालेंपण । अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ॥ ३६ ॥ पैं हिंवराची दाट साउली । सज्जनीं जैसी वाळिली । तैसीं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तांतें ॥ ३७ ॥ निंब निंबोळियां मोडोनि आला । तरी तो काउळियांसीचि सुकाळु जाहला । तैसा भक्तिहीनु वाढिन्नला । दोषांचिलागीं ॥ ३८ ॥ कां षड्रस खापरीं वाढिले । वाहूनि चोहटां रात्रीं सांडिले । ते सुणियांचेचि ऐसे झाले । जियापरी ॥ ३९ ॥ तैसें भक्तिहीनाचें जिणें । जो स्वप्नींहि परि सुकृत नेणे । तेणें संसारदुःखासि आंवतणें । वोगरिलें गा ॥ ४४० ॥

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥ ३२ ॥

म्हणोनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्याहि व्हावें । वरि देहाचेनि नांवें । पशूचेंही लाभो ॥ ४१ ॥ पाहें पां सावजें हातिरू धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें । कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पातलिया मातें ॥ ४२ ॥ अगा नांवें घेतां वोखटीं । जे आघवेया अधमांचिये शेवटीं । तिये पापयोनीही किरीटी । जन्मले जे ॥ ४३ ॥ ते पापयोनि मूढ । मूर्ख ऐसे जे दगड । परि माझां ठायीं दृढ । सर्वभावें ॥ ४४ ॥ जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टि भोगी माझेंचि रूप । जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे ॥ ४५ ॥ माझिया कीर्तीविण । जयांचे रिते नाहीं श्रवण । जयां सर्वांगीं भूषण । माझी सेवा ॥ ४६ ॥ जयांचें ज्ञान विषो नेणे । जाणीव मजाचि एकातें जाणे । जया ऐसें लाभे तरी जिणें । एऱ्हवीं मरण ॥ ४७ ॥ ऐसा आघवाचि परी पांडवा । जिहीं आपुलिया सर्वभावा । जियावयालागीं वोलावा । मीचि केला ॥ ४८ ॥ ते पापयोनीही होतु कां । ते श्रुताधीतही न होतु कां । परि मजसीं तुकितां तुका । तुटी नाहीं ॥ ४९ ॥ पाहें पां भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यीं देवां आणिलें उणें । माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिये महिमे ॥ ४५० ॥ तो प्रल्हादु गा मजसाठीं । घेतां बहुतें सदा किरीटी । कां जें मियां द्यावें ते गोष्टी । तयाचिया जोडे ॥ ५१ ॥ एऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें । परि इंद्रही सरी न लाहे उपरें । म्हणोनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण ॥ ५२ ॥ राजाज्ञेचीं अक्षरें आहाती । तियें चामा एका जया पडती । तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥ ५३ ॥ वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे । तेंचि चाम एक जैं लाहे । तेणें विकती आघवीं ॥ ५४ ॥ तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे । जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ५५ ॥ म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझे-पण । सार्थक एक ॥ ५६ ॥ तेंचि भलतेणें भावें । मन मजआंतु येतें होआवें । आलें तरी आघवें । मागील वावो ॥ ५७ ॥ जैसे तंवचि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ । मग होऊनि ठाकती

अथवा एकाद्या झाडाला वांझ फुलांचा बार आला, ४३४. सर्व ऐश्वर्य अथवा कूळ व जाती यांचा मोठेपणा हें त्याप्रमाणें आहे. ज्याप्रमाणें एकादें शरीर सर्व अवयवांनीं पूर्ण असून, त्यांत फक्त जीवच नसावा; ४३५. त्याप्रमाणें माझ्या भक्तीवांचून जें जगणें आहे, त्याला आग लागो. अर्जुना, या पृथ्वीवर दगड नाहींत काय? ४३६. हिंवराची गर्द छाया ज्याप्रमाणें सत्पुरुष टाळतात, त्याप्रमाणें भक्तीहीन लोकांना चुकवून पुण्यें निघून जातात. ४३७. निंबाच्या झाडाला झाड मोडेल इतक्या निंबोळ्या आल्या, तर त्या सुबत्तेचा फायदा केवळ कावळ्यांनाच होतो; त्याप्रमाणें भक्तीहीन मनुष्य केवळ पापाकरितांच वाढलेला असतो. ४३८. अथवा षड्रसअन्न खापरांत वाढलें आणि वाढून तो उतारा रात्रीं चव्हाट्यावर टाकून दिला असतां, तें जसें कुत्र्याच्याच उपयोगाला येतें, ४३९. त्याप्रमाणें अभक्त मनुष्यांचें जीवित आहे. जो स्वप्नांत देखील पुण्य करण्याचें जाणत नाहीं; अरे, त्यानें संसाराच्या दुःखांना आमंत्रणच वाढून (देऊन) ठेवलें आहे. ४४०.

हे पार्था, ज्यांचा जन्म पापयोनींत झाला आहे असे, तसेंच स्त्रिया, वैश्य, शूद्र, हे सर्व, माझा आश्रय केल्यावर, उत्कृष्ट गति पावतात. ३२.

याकरितां कूळ उत्तमच असावयास पाहिजे असें नाहीं. जातीनें नीचयोनीचा असला तरी चालेल. (अंत्यजच काय) पण देहाच्या नांवानें पशूचा देह मिळाला तरी चालेल. (पण माझी भक्ति पाहिजे, म्हणजे कृतार्थता होईल.) ४४१. हें पहा कीं; मगरानें गजेंद्राला (पाण्यांत) धरलें; त्याच्या तडाख्यांतून सुटण्याकरितां त्यानें मोठ्या काकुळतीनें माझा धांवा केला, त्या योगानें त्यास माझी प्राप्ति झाली आणि त्याचा पशुपणा व्यर्थ गेला. ४४२. अर्जुना, ज्या जातींच्या नांवाचा उच्चार केला असतां वाईट आहे, (फार काय सांगावें?) जी जात सर्व निकृष्टांत निकृष्ट आहे, त्या पापरूप जातीमध्यें जे जन्मास आले आहेत, ४४३. ते पापजातींतील अविवेकी, दगडाप्रमाणें मूर्ख असे असेनात, परंतु सर्व भावानें ज्यांची माझ्या ठिकाणीं पक्की भक्ति आहे, ४४४. ज्यांच्या तोंडांत माझीच कथा आहे, ज्यांचे डोळे माझेंच रूप पहाण्यांत गुंतले आहेत, ज्यांचें मन माझ्याच विषयींचा विचार करीत रहातें, ४४५. माझे गुण ऐकण्यावांचून ज्यांचे कान रिकामे नसतात, ज्यांच्या शरीरांतील प्रत्येक अवयवाला माझी कोणतीना कोणती तरी सेवा, भूषण होऊन राहिली आहे, ४४६. ज्या भक्तांची ज्ञानवृत्ति विषयाचें ग्रहण न करितां मलाच एकाला जाणते, ज्यांना याप्रमाणें (सर्व इंद्रियांच्या व्यापारद्वारां भगवंताची सेवा करणें) मिळालें तरच जीविताची सार्थकता वाटते, नाहींतर जगणें मरणप्राय वाटतें; ४४७. याप्रमाणें अर्जुना, सर्व प्रकारांनीं ज्यांनीं आपल्या सर्व वृत्तींना जगण्याला मीच जीवन केलों आहे; ४४८. ते दुष्ट जातींत देखील जन्माला आलेले असेनात का? ते ऐकून व शिकून विद्वान झालेले नसेनात का? परंतु त्यांची माझ्याशीं तुलना केली असतां, ते वजनांत कमी भरत नाहींत. ४४९. अर्जुना, पहा, भक्तीच्या संपन्नतेनें राक्षसांनीं देवांनाही कमीपणा आणला. ज्याच्या मोठेपणाकरितां मला नरसिंहरूप अलंकार धारण करावा लागला, ४५०. अर्जुना, त्या प्रल्हादास माझ्याऐवजीं पुष्कळांनीं नेहमीं घेतला (माझी भक्ति करण्याचे ऐवजीं प्रल्हादाची भक्ति केली) कारण मी जें द्यावयाचें तें त्याचें, (प्रल्हादाचें) वर्णन केलें असतां मिळतें. ४५१. नाहींतर तो दैत्याचा वंश खरा, परंतु इंद्रालाही त्याच्यापेक्षां जास्त योग्यता मिळत नाहीं. म्हणून अर्जुना, या ठिकाणीं भक्तीच सरती होते, जातीला कांहीं किंमत नाहीं. ४५२. राजाच्या हुकमाचीं अक्षरें ज्या एका कातड्यावर उमटलेलीं आहेत, त्या कातड्याच्या बदला सर्व पदार्थ प्राप्त करून घेतां येतात. ४५३. प्रत्यक्ष सोनें, रुपें जरी असलें (आणि त्यांच्यावर राजाच्या हुकमाचीं अक्षरें नसलीं) तर त्या सोन्यारुप्याची योग्य किंमत कोणी कबूल करील अथवा करणार नाहीं. व्यवहारांत राजाच्या आज्ञेचाच जोर आहे. तींच राजाच्या हुकुमाचीं अक्षरें असलेला एक चामड्याचा तुकडा प्राप्त होतो, तेव्हां त्यानें सर्व माल विकत घेतां येतो. ४५४. त्याप्रमाणें आपला उत्तमपणा त्याच वेळेला टिकेल; त्याच वेळेला सर्व जाणतेपणा मान्य होईल, कीं ज्या वेळेला मन आणि बुद्धि माझ्या प्रेमानें भरून जाईल. ४५५. याकरितां, अरे उत्तम कूळ, जाति अगर वर्ण हे सर्व निष्फळ आहेत. अर्जुना, एक माझ्या ठिकाणीं अनन्य होण्यांतच सार्थकता आहे. ४५६. तेंच मन वाटेल त्या हेतूनें का होईना, पण माझ्या स्वरूपांत येईल (मद्रूप होईल) असें झालें पाहिजे. आणि एकदां माझ्या स्वरूपांत आलें तर मागील (जातिकुळ वगैरे) गोष्टी निष्फळ होतात, ४५७. ज्याप्रमाणें जेथपर्यंत गंगेच्या पाण्याला

केवळ। गंगारूप ॥५८॥ कां खैर चंदन काष्ठें। हे विवंचना तंवचि घटे। जंव न घापती एकवटें। अग्नीमाजीं ॥५९॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अंत्यादि इया। जाती तंवचि वेगळालिया। जंव न पवती मातें ॥ ४६० ॥ मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें। जेव्हां भाव होती मज मीनले। जैसे लवणकण घातले। सागरामाजीं ॥६१॥ तंववरी नदानदींचीं नांवें। तंवचि पूर्वपश्चिमेचे यावे। जंव न येती आघवे। समुद्रामाजीं ॥६२॥ हेंचि कवणें एकें मिसें। चित्त माझां ठायीं प्रवेशे। येतुलें हो मग आपैसें। मी होणें असे ॥ ६३ ॥ अगा वरी फोडावयाचि लागीं। लोहो मिळो कां परिसाचां आंगीं। कां जे मिळतिये प्रसंगीं। सोनेंचि होईल ॥ ६४ ॥ पाहें पां वालभाचेनि व्याजें। तिया व्रजांगनांचीं निजें। मज मीनलिया काय माझें। स्वरूप नव्हतीचि ॥ ६५ ॥ नातरी भयाचेनि मिसें। मातें न पविजेचि काय कंसें। कीं अखंड वैरवशें। चैद्यादिकीं ॥ ६६ ॥ अगा सोयरेपणेंचि पांडवा। माझें सायुज्य यादवां। कीं ममत्वें वसुदेवा-। दिकां सकळां ॥ ६७ ॥ नारदा ध्रुवा अक्रूरा। शुका हन सनत्कुमारा। यां भक्ती मी धनुर्धरा। प्राप्यु जैसा ॥ ६८ ॥ तैसाचि गोपिसि कामें। तया कंसा भयसंभ्रमें। येरां घातकेयां मनोधर्में। शिशुपालादिकां ॥ ६९ ॥ अगा मी एकुलाणीचें खाणें। मज येवों ये भलतेनि मार्गें। भक्ती कां विषयें विरागें। अथवा वैरें ॥४७०॥ म्हणोनि पार्था पाहीं। प्रवेशावया माझां ठायीं। उपायांची नाहीं। केणि'' एथ ॥७१॥ आणि भलतिया जाती जन्मावें। मग भजिजे कां विरोधावें। परि भक्त कां वैरिया व्हावें। माझियाचि ॥ ७२ ॥ अगा कवणें एके बोलें। माझेपण जन्ही जाहालें। तरी मी होणें आलें। हाता निरुतें ॥७३॥ यापरी पापयोनीही अर्जुना। कां वैश्य शूद्र अंगना। मातें भजतां सदना। माझिया येती ॥ ७४ ॥

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा। अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

मग वर्णांमाजीं छत्रचामर। स्वर्ग जयांचें अग्रहार। मंत्रविद्येसि माहेर। ब्राह्मण जे ॥ ७५ ॥ जेथ अखंड वसिजे यागीं। जे वेदांची वज्रांगी। जयांचिये दिठीचां उत्संगीं। मंगळ वाढे ॥ ७६ ॥ जे पृथ्वीतळींचे देव। जे तपोवतार सावयव। सकळ तीर्थांसि दैव। उदयलें जे ॥ ७७ ॥ जयांचिये आस्थेचिये बोले। सत्कर्म पाल्हाळीं गेलें। संकल्पें सत्य जियालें। जयांचेनि ॥ ७८ ॥ जयांचेनि गा बोलें। अग्नीसि आयुष्य जाहालें। म्हणोनि समुद्रें पाणी आपुलें। दिधलें यांचिया प्रीती ॥ ७९ ॥ मियां लक्ष्मी डावलोनि केली परौती। फेडोनि कौस्तुभ घेतला हातीं। मग वोढविली वक्षस्थळाची वाखती। चरणरजां ॥ ४८० ॥ आझूनि पाउलाची मुद्रा। मी हृदयीं वाहें गा सुभद्रा। जे आपुलिया दैवसमुद्रा। जतने-लागीं ॥ ८१ ॥ जयांचा कोप सुभटा। काळाग्निरुद्राचा वसौटा। जयांचां प्रसादीं फुकटा।

जाऊन मिळालें नाहीं, तेथपर्यंत नाल्या, ओढ्यांच्या पाण्याला नाले, ओढे असें म्हणतात; मग ते गंगेला येऊन मिळाल्यानंतर ते केवळ गंगारूपच होऊन राहतात. ४५८. किंवा खैराचें लांकूड, चंदनाचें लांकूड व इतर रायवळ लांकडें, ही निवड जेथपर्यंत एकत्र करून ती अग्नीमध्यें घातलीं नाहींत, तेथपर्यंतच होऊं शकते. ४५९. त्याप्रमाणें क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अंत्यज आणि स्त्रिया, ह्या जाती, जेथपर्यंत भक्त माझ्याशीं एकरूप झाले नाहींत, तेथपर्यंतच वेगवेगळ्या असतात. ४६०. जसे समुद्रामध्यें मिठाचे कण घातले असतां, ते समुद्ररूप होऊन, त्यांचा कणपणा नाहींसा होतो, त्याप्रमाणें मग जेव्हां सर्व वृत्ति मद्रूप होतात, तेव्हां त्या जाती व व्यक्ति यांच्या नांवानें शून्य पडतें. ४६१. तेथपर्यंतच ( शोण-भद्र व सिंधु अशीं ) नदांचीं नांवें व ( नर्मदा, गंगा अशीं ) हीं नद्यांचीं नांवें राहतात; आणि तेथपर्यंतच पूर्वेकडे व पश्चिमेकडे वाहणारे ओघ, असे भेद राहतात, कीं जेथ-पर्यंत हे सर्व समुद्रांत येऊन मिळत नाहींत. ४६२. कोणत्या एका निमित्तानें हेंच चित्त माझ्या स्वरूपांत शिरकाव करून राहील, एवढें झालें, म्हणजे मग आपो-आप मद्रूप होणें ( निश्चित ) आहे. ४६३. अर्जुना, फोडण्याकरितांच म्हणून लोखंडाचा घण परिसावर पडो तरी देखील घणाचा संबंध परिसाशीं येण्याच्या वेळेस तो घण सोनेंच बनून जाईल. ४६४. असें पहा कीं, त्या गोपींचीं अंतःकरणें प्रेमाच्या निमित्तानें मला येऊन मिळालीं असतां, त्या गोपी मद्रूप झाल्या नाहींतच काय ? ४६५. अथवा भीतीच्या निमित्तानें कंस मला येऊन मिळाला नाहीं काय ? किंवा निरंतर वैर करण्याचे जोरावर शिशुपालादिकांनीं माझी प्राप्ति करून घेतली नाहीं काय ? ४६६. अरे अर्जुना, नातेपणाच्या संबंधानेंच या यादवांना माझ्या स्वरूपाची प्राप्ति झाली. किंवा ममत्व ठेवल्यामुळें वसुदेवादिक सर्वांना माझी प्राप्ति झाली. ४६७. नारदाला, ध्रुवाला, अक्रूराला, शुकाला अथवा सनत्कुमार यांना, अर्जुना, ज्याप्रमाणें मी भक्तीच्या योगानें प्राप्त करून घेण्याला योग्य झालों. ४६८. त्याचप्रमाणें गोपिकांस कामानें ( विषयबुद्धीनें ), त्या कंसाला भयाच्या भ्रांतीनें आणि त्या इतर शिशुपाला-दिकांस त्यांच्या त्या घातक बुद्धीनें ( मी प्राप्त झालों. ) ४६९. अगा अर्जुना, मी सर्व मार्गांच्या मुक्कामाचें एक ठिकाण आहे. ( त्या वर सांगितलेल्या मार्गांपैकीं ) वाटेल त्या मार्गानें मजकडे ( माझ्या स्वरूपीं ) येतां येतें. ( ते वर सांगितलेले मार्ग म्हणजे ) भक्तीनें अथवा विषय-बुद्धीनें अथवा वैराग्यानें अथवा वैरानें. ४७०. म्हणून अर्जुना, पहा माझ्या स्वरूपांत मिळावयाचें असेल तर येथें साधनाचें बंधन नाहीं. ४७१. आणि वाटेल त्या जातींत जन्माला आलें तरी चालेल. मग भक्ति किंवा वैर केलें तरी हरकत नाहीं. परंतु भक्त किंवा वैरी व्हाव-याचें असेल, तर तें माझेंच झालें पाहिजे. ४७२. ( शत्रु म्हणून अथवा मित्र म्हणून ) कोणत्याही का निमित्तानें होईना, जर माझ्याशीं दृढसंबंध झाला, तर मद्रूप होणें हें खास हातीं आलें असें समजावें. ४७३. याप्रमाणें अर्जुना, दुष्ट जातींत जन्म झालेले, किंवा वैश्य, शूद्र अथवा स्त्रिया; यांनीं माझें भजन केलें असतां, ते माझ्या स्वरूपाला येऊन मिळतात. ४७४.

तर मग पुण्यकर्मी ब्राह्मण भक्त असलेले आणि ऋषींप्रमाणें आचरण करणारे राजे, हे उत्कृष्ट गति पावतात यांत नवल काय ! अनित्य व सुखहीन असा हा ( मर्त्य ) लोक प्राप्त झाला असतां ( त्यांतून मुक्त होण्याकरितां ) माझीच भक्ति कर. ३३.

मग चारही वर्णांमध्यें छत्रचामराप्रमाणें सर्वांच्यावर असलेले, ज्यांना स्वर्ग हा निर्वाहाकरितां दिलेला इनाम आहे, व जे वेदांतील मंत्ररूप विद्येचें माहेरघर आहेत, असे जे ब्राह्मण, ४७५. जेथें ( त्या ब्राह्मणांच्या ठिकाणीं ) नेहमीं यज्ञांचें राहाणें असतें, जे वेदांचें अभेद्य चिलखत आहेत, ज्यांच्या दृष्टिरूप मांडीवर कल्याणाची वाढ होत राहते; ४७६. जे या पृथ्वीवरील देव आहेत, जे मूर्ति-मंत तपाचे अवतार आहेत, जे सर्व तीर्थांना उदयास आलेलें दैवच आहेत, ४७७. ज्यांच्या इच्छारूप ओलीनें चांगलें कर्म हाच कोणी वेल, तो विस्तार पावला आहे, ज्यांच्या संकल्पानें सत्य जिवंत राहिलें आहे, ४७८. ज्यांच्या आशीर्वादानें अग्नीचें आयुष्य वाढलें म्हणून समुद्रानें आपलें पाणी यांच्या प्रीतीकरितां दिलें. ४७९. मी लक्ष्मीला सारून पलीकडे केली, गळ्यांतील कौस्तुभ काढून हातांत घेतला व मग ज्यांच्या पायधुळीकरितां छातीचा खळगा पुढें केला, ४८०. अर्जुना, अजूनपर्यंत ( त्या ) पावलाची खूण मी हृदयाच्या ठिकाणीं वागवीत आहे. ती कां वागवितों म्हणून म्हणशील तर आपल्या षड्गुणऐश्वर्यभाग्यरूप समुद्राचें रक्षण होण्याकरितां; ४८१. अर्जुना, ज्यांचा राग हा काळाग्नि नांवाच्या प्रळयकाळच्या

जोडती सिद्धी ॥ ८२ ॥ ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझां ठायीं अतिनिपुण । आतां मातें पावती हें कवण । समर्थणें ॥ ८३ ॥ पाहें पां चंदनाचेनि अंगानिळें । शिवतिले निंब होते जे जवळे । तिंहीं निर्जिवींही देवांचीं निडळें । बैसणीं केलीं ॥ ८४ ॥ मग तो चंदनु तेथ न पवे । ऐसें मनीं कैसेनि धरावें । अथवा पातला हें समर्थावें । तेव्हां कायि साच ॥ ८५ ॥ जेथ निववील ऐसिया आशा । हरें चंद्रमा आधा ऐसा । वाहिजत असे शिरसा । निरंतर ॥ ८६ ॥ तेथ निवविता आणि सगळा । परिमळें चंद्राहूनि आगळा । तो चंदनु केविं अवलीळा । सर्वांगीं न बैसे ॥ ८७ ॥ कां रथ्योदकें जियेचिये कासे । लागलिया समुद्र जालीं अनायासें । तिये गंगेसि काय अनारिसें । गत्यंतर असे ॥ ८८ ॥ म्हणोनि राजर्षि कां ब्राह्मण । जयां गती मती मीचि शरण । तयां त्रिशुद्धी मीच निर्वाण । स्थितिही मीचि ॥ ८९ ॥ यालागीं शतजर्जरे नावे । रिगोनि केविं निश्चिंत होआवें । कैसेनि उघडिया असावें । शस्त्रवर्षीं ॥ ४९० ॥ अंगावरी पडतां पाषाण । न सुवावें केविं वोडण । रोगें दाटलिया आणि उदासपण । वोखदेंसीं ॥ ९१ ॥ जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केविं पांडवा । तेविं लोका येऊनिया सोपद्रवा । केविं न भजिजे मातें ॥ ९२ ॥ अगा मातें न भजावया लागीं । कवण बळ पां आपुलां आंगीं । काइ घरीं कीं भोगीं । निश्चिंती केली ॥ ९३ ॥ नातरी विद्या कीं वयसा । यां प्राणियांसि हा ऐसा । मज न भजतां भरंवसा । सुखाचा कोण ॥ ९४ ॥ तरी भोग्यजात जेतुलें । तें एका देहाचिया निकिया लागलें । आणि येथ देह तंव असे पडिलें । काळाचां तोंडीं ॥ ९५ ॥ बाप दुःखाचें केणें सुटलें । जेथ मरणाचे भरे लोटले । तिये मृत्युलोकींचिये शेवटिले । येणें जाहालें हाटवेळे ॥ ९६ ॥ आतां सुखेंसि जीविता । कैची ग्राहिकी कीजेल पांडुसुता । काय राखोंडी फुंकिता । दीपु लागे ॥ ९७ ॥ अगा विषाचे कांदे वाटुनी । जो रसु घेइजे पिळुनी । तया नाम अमृत ठेउनी । जैसें अमर होणें ॥ ९८ ॥ तेविं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ९९ ॥ कां शीस खांडूनि आपुलें । पायींचां खतीं बांधिलें । तैसें मृत्युलोकींचें भलें । आहे आघवें ॥ ५०० ॥ म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचां श्रवणीं । कैंची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांचां ॥ १ ॥ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं । दुःख लेऊनि सुखाची आंगी । साळित जगातें ॥ २ ॥ जेथ मंगळाचां अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पोरी । मृत्यु उदराचां परिवरीं । गर्भु गिंवसी ॥ ३ ॥ जें नाहीं तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वीं । गेलियाची कवणे गांवीं । शुद्धि न लभे ॥ ४ ॥ अगा गिंवसितां आघवा वाटी । परतलें पाउलाचि नाहीं

रुद्रदेवतेचें वस्तीस्थान आहे व ज्यांच्या प्रसन्नतेनें अष्टमहासिद्धि फुकट म्हणजे अनायासें प्राप्त होतात, ४८२. याप्रमाणें पुण्याईनें पूज्य असलेले जे ब्राह्मण व जे माझ्या ठिकाणीं अतिशय तत्पर आहेत, ते मला मिळतात. हें काय आतां निराळें सिद्ध करावयास पाहिजे ? ४८३. पहा, चंदनाच्या झाडावरुन आलेल्या वाऱ्यानें स्पर्श केलेलीं लिंबाचीं झाडें जीं चंदनाच्या जवळ होतीं, तीं निर्जीव ( अचेतन ) असूनही त्यांनीं देखील देवांच्या मस्तकावर राहण्यास जागा मिळविली. ४८४. मग खास चंदन ती जागा मिळविणार नाहीं, असें मनांत तरी कसें आणतां येईल ? किंवा त्यास ती जागा मिळाली आहे, हें सिद्ध केलें, तरच तें खरें ठरणार, असें आहे काय ? ४८५. ज्याअर्थी शंकरांनीं ( हालाहलविषप्राशनानंतर आग होत होती ती ) थंड करील या आशेनें अर्धा असा चंद्र मस्तकावर निरंतर धारण केला आहे, ४८६. त्याअर्थी थंड करणारा आणि पूर्ण, व सुवासानें चंद्रापेक्षां अधिक असा जो चंदन, तो सहज सर्वांगाच्या ठिकाणीं कसा बसणार नाहीं ? ४८७. अथवा रस्त्यावरील पाण्यांनीं जिचा आश्रय केला असता, तीं ( रथ्योदकें ) अनायासानें समुद्ररूप होतात, त्या गंगेला कांहीं समुद्राशिवाय दुसरी गति आहे काय ? ४८८. म्हणून क्षत्रिय असून ऋषि झालेले असोत किंवा ब्राह्मण असोत, ज्यांच्या क्रियेला व बुद्धीला मीच आश्रयस्थान आहें, त्यांना निश्चयानें मीच परमगति आहें; आणि त्यांचें असणेंही मीच आहे. ४८९. याकरितां शेंकडों ठिकाणीं खिळखिळ्या झालेल्या नावेंत बसून स्वस्थ कसें राहावें ? व शस्त्रांचा वर्षाव होत असतां उघड्या अंगानें कसें असावें ? ४९०. अर्जुना, अंगावर धोंडे पडत असतांना मध्यें ढाल कशी घालूं नये ? रोगानें ग्रस्त झालें असतां औषधाविषयीं बेफिकीर कसें रहावें ? ४९१. अर्जुना, जेथें चोहोंकडून वणवा लागला आहे, तेथून बाहेर कसें पडूं नये ? त्याप्रमाणें अनेक दुःखांनीं भरलेल्या या मृत्युलोकांत येऊन मला कसें भजूं नये बरें ? ४९२. अरे अर्जुना, माझें भजन न करण्याला असें आपल्या ( प्राण्यांच्या ) अंगीं कोणतें सामर्थ्य आहे ? हे घराच्या जोरावर का भोगांच्या जोरावर बेफिकीर झाले आहेत ? ४९३. अथवा विद्येनें अथवा तारुण्यानें हे बेपर्वा होऊन बसले आहेत ? माझें भजन न करतां असें बेपर्वा होऊन बसण्यासारखी या प्राण्यांना सुखाची खात्री कोणाची आहे ? ४९४. तर जेवढे विषयमात्र म्हणून आहेत, ते सर्व एका देहाच्याच बऱ्याकरितां ( सुखाकरितां ) उपयोगांत आले आहेत ! आणि या मृत्युलोकांत देह तर काळाच्या तोंडीं पडलेला आहे ! ४९५. ' बाप रे बाप ! ' जेथें दुःखरूपी माल आलेला आहे, व तो मरणाच्या मऱ्यानें ( मापानें ) मोजला जात आहे अशा त्या मृत्युलोकांतील ( नरदेहरूपी ) शेवटच्या बाजाराच्या वेळीं येणें झालें आहे. ४९६. आतां अर्जुना, सुखानें जगणें, हा माल येथें खरेदी कसा करतां येईल ? राखुंडी फुंकून कधीं दिवा लागला आहे काय ? ४९७. अर्जुना, विषाचे कांदे वांटून जो रस निघेल, तो पिळून घ्यावा आणि त्या रसाचें नांव अमृत ठेवून ( त्याच्या सेवनानें ) ज्याप्रमाणें अमर होण्याची खात्री धरावी. ४९८. त्याप्रमाणें विषयांमध्यें जें सुख आहे, तें निव्वळ कडेलोटीचें दुःखच आहे. परंतु काय करावें ? लोक मूर्ख आहेत. विषयांचें सेवन केल्यावांचून त्यांचें चालतच नाहीं. ४९९. किंवा आपलें मस्तक तोडून तें पायास पडलेल्या जखमेवर जसें बांधावें, तसे या मृत्युलोकांतील सर्व व्यवहार चालले आहेत. ५००. एवढ्याकरितां या मृत्युलोकांत सुखाची नुसती गोष्ट कोणाला आपल्या कानानें ऐकतां येईल काय ? निखारे असणाऱ्या अंथरुणावर आनंदानें झोंप कोठून येणार ? ५०१. ज्या लोकांतील चंद्र क्षयरोगानें ग्रासलेला आहे, जेथें मावळण्याकरितांच ( सूर्याचा ) उदय होत असतो; ( जेथें ) दुःख हें सुखाचा पोषाख करून जगाला सारखें छळीत आहे, ५०२. जेथें मंगलकारक गोष्टींच्या कोंबा ( आरंभा ) बरोबरच त्यावर अमंगल गोष्टीची कीड पडते व ( जेथें ) पोटांत असतांनाच मरण गर्भाला घेरतें, ५०३. जें नाहीं ( अप्राप्य आहे ) त्याचें चिंतन करावयास ( मृत्युलोकची वस्ती ) लावते. ( बरें, तें प्राप्त झालें ) तेव्हां त्याच वेळीं तें गंधर्व ( अदृश्य पुरुष ) नेतात. बरें, तें घेऊन कोणच्या गांवाला गेले त्याचा शोधही लागत नाहीं. ५०४. अगा अर्जुना, सर्व वाटांनीं शोध केला, तरी मृत्यूच्या मुखांत गेलेल्यांचें एकही पाऊल परत फिरलेलें दिसत नाहीं. व

किरीटी । सैंघ निमालियांचियाचि गोठी । तियें पुराणें जेथिंचीं ॥ ५ ॥ जेथींचिये अनित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचें आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं । निपटूनियां ॥ ६ ॥ ऐसी लोकींची जिये नांदणूक । तेथ जन्मले आथि जे लोक । तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ॥ ७ ॥ पैं दृष्टादृष्टीचिये जोडी- । लागीं भांडवल न सुटे कवडी । जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी । वेंचिती गा ॥ ८ ॥ जो बहुवें विषयविलासें गुंफे । तो म्हणती उवायें पडिला सापें । जो अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ॥ ९ ॥ जयाचें आयुष्य धाकुटें होय । बळ प्रज्ञा जिरौनि जाय । तयाचे नमस्कारिती पाय । वडिल म्हणुनि ॥ ५१० ॥ जंव जंव बाळ बळिया वाढे । तंव तंव भोजें नाचती कोडें । आयुष्य निमालें आंतुलियेकडे । ते ग्लानीचि नाहीं ॥ ११ ॥ जन्मालिया दिवसदिवसें । हों लागे काळाचियाचि ऐसें । कीं वाढती करिती उल्हासें । उभविती गुढिया ॥ १२ ॥ अगा मर हा बोलु न साहती । आणि मेलिया तरी रडती । परि असतें जात न गणिती । गाहिंसपणें ॥ १३ ॥ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया वेटाळी जिभा । तैसे प्राणिये कवणा लोभा । वाढविती तृष्णा ॥ १४ ॥ अहा कटा हें वोखटें । मृत्युलोकींचें उफराटें । एथ अर्जुना जरी अवचटें । जन्मलासी तूं ॥ १५ ॥ तरि झडझडोनि वहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ १६ ॥

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

तूं मन हें मीचि करीं । माझां भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें ॥१७॥ माझेनि अनुसंधानें देख । संकल्पु जाळणें निःशेख । मद्याजी चोख । याचि नांव ॥ १८ ॥ ऐसा मियां आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा पावसी । हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलिजत असे ॥ १९ ॥ अगा आवघिया चोरिया आपुलें । जें सर्वस्व आम्हीं असे ठेविलें । तें पावोनि सुख संचलें । होऊनि ठासी ॥५२०॥ ऐसें सांवळेनि परब्रह्में । भक्तकामकल्पद्रुमें । बोलिलें आत्मारामें । संजयो म्हणे ॥ २१ ॥ अहो ऐकिजत असे कीं अवधारा । तंव इया बोला निवांत म्हातारा । जैसा म्हैसा नुठी कां पुरा । तैसा उगाचि असे ॥ २२ ॥ तेथ संजयें माथा तुकिला । अहा अमृताचा पाऊस वर्षला । कीं हा एथ असतुचि गेला । सेजिया गांवा ॥ २३ ॥ तऱ्ही दातारु हा आम्रुचा । म्हणोनि हें बोलतां मैळेल वाचा । काइ झालें ययाचा । स्वभावोचि ऐसा ॥ २४ ॥ परि बाप भाग्य माझें । जे वृत्तांतु सांगावयाचेनि व्याजें । कैसा रक्षिलों मुनिराजें । श्रीव्यासदेवें ॥ २५ ॥ येतुलें हें वाडें सायासें । जंव बोलत असे दर्डे मानसें । तंव न धरवेचि आपुलिया ऐसें । सात्त्विकें केलें ॥२६॥ चित्त चाकाटलें आदु घेत । वाचा पांगुळली जेथिंची तेथ । आपादकंचुकित ।

जेथली पुराणें, हीं सर्व मेलेल्यांच्याच गोष्टींनीं भरलेलीं आहेत. ५०५. या मृत्युलोकाची रचना करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या आयुष्यापर्यंत येथील क्षणभंगुरतेचा प्रभाव जाऊन भिडतो. अर्जुना, हें नाहींसें होणें कसें सरसकट व्यापक आहे, तें ऐक. ( सरसकट नाशाला पावणें कसें आहे ! पाहा कीं, ब्रह्मदेवापर्यंत सर्व नाशाला पावतात. ) ५०६. ( अशा तऱ्हेची ) ज्या लोकांतील वागणूक आहे, त्या लोकांत ज्यांनीं जन्म घेतला आहे, त्या लोकांच्या बेफिकीरपणाचें मोठें नवल दिसतें ! ( कसें ? तर ) ५०७. अरे, ज्यापासून इहपरलोकींचा लाभ होतो, त्याकरितां एक कवडीदेखील भांडवल सुटत नाहीं व ज्या ठिकाणीं सर्वस्वाची हानि होते, तेथें कोटयवधि रुपये खर्च करतात. ५०८. जो पुष्कळ विषयविलासांत निमग्न असतो, तो सर्व्यां सुखांत आहे, असें म्हणतात व जो लोभानें ग्रस्त झाला आहे, त्यास या जगांत ज्ञानी म्हणतात. ५०९. ज्याचें आयुष्य थोडें उरलें आहे व त्याचप्रमाणें ज्याचीं बल आणि बुद्धि हीं नाहींशीं झालीं आहेत, अशा म्हाताऱ्यास वडील म्हणून नमस्कार करितात. ५१०. जसजसें मूल बलानें वाढत जातें ( वयानें मोठें होतें ) तसतसे त्याचे आईबाप वगैरे आनंदानें व कौतुकानें नाचतात. पण वरून जरी मोठे वाढतांना दिसले, तरी वास्तविक पाहिलें तर आंतून आयुष्य सरून जात आहे, त्याची ( त्यांना ) खंतीच नाहीं. ५११. जन्मल्यापासून दिवसेंदिवस तें अधिकाधिक काळाच्या तावडींत जातें, असें असून, आनंदानें त्याच्या वाढदिवसाचा उत्सव करतात व आनंदप्रदर्शक गुढ्याही उभारतात. ५१२. अरे अर्जुना, कोणीं कोणाला ‘ तूं मर ’ असें म्हटलें तर तें त्यास सहन होत नाहीं आणि ( त्याच्या निवृत्तीचा उपाय न करतां ) मेल्यावर रडत बसतात. पण असलेलें आयुष्य व्यर्थ जात आहे, तें मूर्खपणानें समजत नाहींत. ५१३. बेडूक सापाकडून उभा गिळला जात आहे, अशा स्थितींत, तो बेडूक उडत असलेल्या माशांना पकडण्याकरितां जीभ बाहेर काढून वेटाळीत असतो. तशाच तऱ्हेनें प्राणी कोणत्या लोभानें तृष्णा वाढवितात कोण जाणे ? ५१४. अरेरे हें वाईट ! मृत्युलोकांतील सर्वच न्याय उफराटा आहे. अर्जुना, तूं जरी येथें अकस्मात जन्मला आहेस, ५१५. तरी या मृत्युलोकाच्या राहाटींतून झटकन मोकळा हो; आणि या भक्तीच्या मार्गाला लाग, कीं ज्या भक्तीच्या योगानें माझें निर्दोष स्वरूप पावशील. ५१६.

माझ्या ठिकाणीं मन अर्पण केलेला हो, माझा भक्त हो, माझें यजन करणारा हो. ( सर्वत्र ) मला ( एकाला ) वंदन कर. अशा रीतीनें मत्परायण होत्साता ( माझे ठिकाणीं ) चित्त योजल्यावर तूं माझ्याप्रतच येशील. ३४.

तूं आपलें मन मद्रूप कर; माझ्या भजनाच्या ठिकाणी प्रेम धर; आणि सर्व ठिकाणीं माझेंच स्वरूप आहे, असें समजून मला एकाला नमस्कार कर. ५१७. पहा, जो माझ्या वेधानें संकल्प पूर्णपणें जाळतो, त्यालाच माझें चांगलें यजन करणारा म्हणावें. ५१८. याप्रमाणें तूं माझ्या योगानें संपन्न होशील, तेव्हां मद्रूपास पावशील. ही माझ्या अंतःकरणांतील ( गुह्य गोष्ट ) तुझ्याजवळ मी सांगत आहें. ५१९. अरे, सर्वांपासून लपवून ठेवलेलें असें जें आमचें सर्व भांडवल, तें तुला प्राप्त होऊन तूं सुखरूप होऊन रहाशील. ५२०. भक्ताचे मनोरथ पूर्ण करणारा कल्पतरु जे मेघश्याम परब्रह्म श्रीकृष्ण, ते असें बोलले, असें संजय म्हणाला. ५२१.( ज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांना म्हणतात, ऐका. ) संजय धृतराष्ट्राला म्हणाला, ऐकत आहां काय ? त्या वेळेला या बोलण्याविषयीं वृद्ध धृतराष्ट्र, ज्याप्रमाणें पाण्याच्या पुरांत बसलेला रेडा हलत नाहीं, त्याप्रमाणें चित्तांत कांहींही हालचाल न होतां स्वस्थ असलेला दिसला. ५२२. त्या वेळीं संजयानें मान डोलविली, आणि ( आपल्याशीं ) म्हणाला, “ अहा ! आज अमृताची वृष्टि झाली; परंतु हा धृतराष्ट्र येथेंच असूनही शेजारच्या गांवाला गेल्यासारखा आहे. ५२३. तरी हा आमचा मालक आहे, त्याजविषयीं असें बोललें असतां वाचेस दोष लागेल; काय करावें ? याचा स्वभावच असा आहे. ५२४. परंतु धन्य माझें भाग्य कीं, महामुनि व्यास देवांनीं धृतराष्ट्राला युद्धांतील वृत्तांत सांगावयाच्या निमित्तानें माझें कसें रक्षण केलें ( म्हणजे ज्ञानपूर्ण संवादश्रवणानें जन्ममृत्यूपासून माझें रक्षण केलें. ) ” ५२५. मोठ्या कष्टानें मन आंवरून धरून, तो संजय इतकें बोलत आहे, तोंच अष्टसात्विक भाव उत्पन्न होऊन, त्यांनीं संजयास असें आपल्या आधीन करून घेतलें कीं, त्यास ते अष्टसात्विक भाव आंवरून धरवेनात. ५२६. चित्त चकित होऊन आटावयास लागलें आणि वाचा जागचे जागीं बलहीन होऊन राहिली व पायापासून मस्तकापर्यंत अंगरखा

रोमांच आले ॥ २७ ॥ अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें । आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ २८ ॥ पैं आघवांचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी । लेइला मोतियांचीं कडियाळीं । आवडे तैसा ॥ २९ ॥ ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी होईल जीवदशे । तेथ निरोविलें व्यासें । तें नेदीच हों ॥ ५३० ॥ आणि कृष्णार्जुनाचें बोलणें । घों करी आलें श्रवणें । कीं देहस्मृतीचा तेणें । वापसा केला ॥ ३१ ॥ तेव्हां नेत्रींचें जळ विसर्जी । सर्वांगींचा स्वेदु परिमार्जी । तेवींचि अवधान म्हणे हो जी । धृतराष्ट्रातें ॥ ३२ ॥ आतां कृष्ण-वाक्यबीजा निवाडु । आणि संजय सात्त्विकाचा विवडु । म्हणोनि श्रोतयां होईल सुरवाडु । प्रमेयपिकाचा ॥ ३३ ॥ अहो अळुमाळ अवधान देयावें । येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें । बाप श्रवणेंद्रिया दैवें । घातली माळ ॥ ३४ ॥ म्हणोनि विभूतींचा ठावो । अर्जुना दावील सिद्धांचा रावो । तो ऐका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ५३५ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगोनाम नवमोऽध्यायः ।
[ओंव्या ५३५. श्लोक ३४.]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



वातस्यासारखे सर्व अंगावर रोमांच आले. ५२७. अर्धे उघडलेले डोळे आनंदाश्रूंचा वर्षाव करूं लागले व आंत होणाऱ्या सुखाच्या लाटेच्या वेगानें त्याचें बाहेरील शरीर कांपूं लागलें. ५२८. सर्व रोमांच्या बुडाशीं निर्मळ घामाचे थेंब आले, त्यामुळें जसा एकाद्यानें मोत्यांचा जाळीदार अंगरखा घालावा तसा तो भासूं लागला. ५२९. याप्रमाणें महासुखाच्या भरानें जेव्हां जीवदशेची आटणी होण्याचा प्रसंग आला तेव्हां व्यासांनीं युद्धवृत्तान्त सांगण्याचा केलेला हुकूम ती आटणी होऊं देईना. ५३०. आणि त्यावर श्रीकृष्ण ( व ) अर्जुनाचें बोलणें 'घों घों' अशी गर्जना करीत संजयाच्या कानावर आलें. त्या बोलण्यानें संजयाचे ठिकाणीं देहस्मृतीचा वापस केला. ( संजय देहस्मृतीवर आला. ) ५३१. तेव्हां डोळ्यांतील आनंदाश्रु त्यानें पुसले व सर्व अंगास आलेला घाम पुसून टाकला व त्याचप्रमाणें 'महाराज लक्ष द्या' असें धृतराष्ट्रास म्हणाला. ५३२. आतां श्रीकृष्णाचीं वाक्यें, हींच कोणी एक उत्तम बीजें आणि त्यांस संजय हीच अष्टसात्विक भावरूपी पिकाच्या विवडाची जमीन मिळाली; त्यामुळें श्रोत्यांना प्रमेय पिकाचा सुकाळ होईल. ५३३. अहो, थोडकेंसें लक्ष द्यावें आणि एवढ्यानें आनंदाच्या राशीवर बसावें. धन्य आहे त्या कानांची! कीं आज त्यांस भाग्यानें माळ घातली आहे! ५३४. म्हणून ( आपल्या ) विभूतींचीं जीं स्थानें आहेत, तीं, सिद्धांचा राजा जो श्रीकृष्ण, तो, अर्जुनास दाखवील. श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानेश्वर म्हणतात, तो प्रसंग श्रोत्यांनीं ऐकावा. ५३५.



जेथ विभूती प्रतिविभूती। प्रस्तुत अर्जुना सांगिजेती ॥ अ. १०–४१

गीतेच्या उत्तर कांडावरील व्याख्यानास सुरुवात करण्यापूर्वी श्रीज्ञानदेव आपल्या गुरूंना संस्कृतप्रचुर शब्दांनीं नमन करतात. प्रथमतः श्रीनिवृत्तिनाथांचें अध्यात्मिक स्वरूप ( १–५ ); नंतर त्यांचें सामर्थ्य ( ६–९ ) व अवर्णनीय महिमान ( १०–१५ ) सांगून गीतारूपी ठेवा आपणांस प्राप्त झाला हें श्रीगुरूंच्या कृपेचें फळ आहे असें सांगतात ( १६–२३ ). आतांपर्यंतच्या नऊ अध्यायांतील विषय सूत्ररूपानें सांगून नववा अध्याय तर अवर्णनीय व अनिर्वाच्य असा आहे; परंतु निवृत्तिनाथांच्या कृपेमुळें मी त्याचा अनुवाद करू शकलों ( २४–४० ) व माझें मराठींतील प्रतिपादन मूळ संस्कृत गीतेच्या तोडीचें आहे असे ज्ञानदेवांनीं नम्रतेचे पण आत्मविश्वासाचे उद्गार काढले आहेत. ( ४१–४९ ). भगवंताच्या बोलण्याचा ज्ञानदेव खालीलप्रमाणें अनुवाद करतातः—

श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणालेः—तुझी ऐकण्याची आस्था व प्रेम पाहून, तुझ्या हिताचें आणखी सांगावें असें मला वाटतें. तुझ्यावरील माझें जें प्रेम आहे, त्यामुळें तर मला त्यांत विशेष आनंद होतो. तुझ्या लक्षांत असूं दे कीं, येथें जो मी तुझ्यापुढें उभा आहें, तेवढाच मी मर्यादित नसून सर्व विश्वाच्या आकारानें मीच आहें ( ५०–६३ ). हें समजण्यास कठीण आहे. प्रत्यक्ष सर्वज्ञ वेद, मोठमोठे ऋषि, देव यांना माझ्या यथार्थ स्वरूपाचा ( मी कोण, केवढा, केव्हां उत्पन्न झालों ) निर्णय करतां आला नाहीं; कारण तेच मुळांत माझ्यापासून उत्पन्न झाले. पोटांतल्या गर्भाला आपल्या आईचें वय कसें कळेल ? ( ६४–७१ ) मात्र, इंद्रियद्वारां बाहेर धांवणारी वृत्ति अंतर्मुख करून तिन्ही देहांचा विचारानें निरास करून जो पंचमहाभूतांच्या माथ्यावर चढतो, त्याला माझें अनादि व लोकमहेश्वर स्वरूप अनुभवाला येतें व तो सर्व संकल्पापासून मुक्त होतो. ( ७२–८० ) भिन्न भिन्न प्राण्यामध्ये प्रकृतिनुसार असणारे बुद्धि, ज्ञान वगैरे विकार माझाच विस्तार आहे. एका लहान बीजापासून बुंधा, फांद्या, पानें, फुलें असणारा वृक्ष विस्तार पावतो, तसा मी एकटाच असतो; पण माझ्यापासून व्यासादि सप्तऋषि, चार मनु, लोक, लोकपाल उत्पन्न झाले ( ८१–१०३ ). ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्व विश्वांत मीच व्यापून राहिलों आहें. मी, माझ्या विभूती व त्यांनीं व्याप्त सर्व विश्व हें सर्व एकच आहे, असा ऐक्याचा अनुभव येणें, हा अभेद भक्तियोग आहे. असे भक्त 'जें जें भेटे भूत, तें तें भगवंत' असें समजून त्रैलोक्यांत भक्तिप्रेमानें संचार करीत असतात ( १०४–११८ ) अशा भक्तांची एकमेकांशीं गांठ पडली तर त्यांच्या आनंदाला सीमा राहत नाहीं. ते देहभान विसरून जातात. रात्र अथवा दिवस याचें भानही त्यांच्या ठिकाणीं राहत नाहीं. ते देहभानाला विसरून माझेंच जगाला कथन करीत असतात. जगाचें मोठें कार्य भक्तांच्या या कीर्तनांत होतें. ( ११९–१२९ ).

स्वर्ग, मोक्ष इत्यादि सुखाकडे या भक्तांनीं केव्हांच पाठ फिरवलेली असते व माझें प्रेमसुख प्राप्त करून घेतलें असतें; पण त्यांच्या मनाचा मोठेपणा असा कीं हें आपण कमाविलें असतांही भगवंतांनीं तें आम्हांला दिलें असें जगांत प्रसिद्ध करतात. मी फक्त ते वाढीला लावून त्याचा क्षेम करतों; कारण माझ्या घरीं अशा प्रेमळ भक्तांची कमतरता आहे. स्वर्ग व मोक्ष मिळावे म्हणून पुष्कळ माझ्याकडे येतात. त्यांना त्या त्या गोष्टी देऊन वाटेला लावतों, परंतु माझ्या जवळचें जें खरें सुख आहे ते या प्रेमळांच्याचकरतां राखून ठेवतों. अज्ञानरात्रींतून माझे भक्त चालत असतांना ज्ञानाची मशाल हातांत घेऊन त्यांच्यापुढें मशालजी होऊन मी चालतों व त्यांना ज्ञानप्रकाश देतों.:( १३०–१४३ )



स्थावरां गिरीं आंतु । पुण्यपुंज जो हिमवंतु ।
तो मी म्हणे कांतु । लक्ष्मियेचा ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय १०, ओवी २३४

श्रीकृष्णाच्या या उपदेशामुळें अर्जुनाला आत्मज्ञानरूपी नवा जन्मच प्राप्त झाला. आपल्या आयुष्याची आज सफलता झाली असें वाटूं लागलें. श्रीकृष्णाला तो सखा समजत होता; त्याच्या ऐवजीं त्याला तो आतां 'परब्रह्म, परंधाम,' भासूं लागला, त्याच्या पायापाशीं उभे रहाण्याचीही आपली योग्यता नाहीं हें त्याला पटलें. आपल्या भाग्याचें तो वर्णन करूं लागला, 'आजपर्यंत मोठमोठया ऋषींच्या मुखांतून तुझें हें वर्णन मी ऐकलें होतें, पण त्यावेळीं त्या बोलण्याची माझ्याकडून उपेक्षा झाली. पण आज तुम्हीं मजवर कृपा केलीत म्हणून त्याच बोलण्याचा खरेपणा पटला व अनुभवहि आला. ( १४४-१७५ ).

जीवाला बुद्धीच्या सामर्थ्यावर तुझें ज्ञान केव्हांच होणार नाहीं. जर तूंच कृपाळूपणानें सांगितलेंस तर हें शक्य आहे. तुझ्या दिव्यशक्तीनें व्याप्त असलेल्या मुख्य मुख्य नामांकित विभूति माझ्या लक्षांत राहतील अशा सांग. सर्वच तूं आहेस हें जरी खरें असलें तरी चिंतनाकरितां परिमित विभूतिच पाहिजेत. ( १७६-१८९) पूर्वी ७ व्या व ९ व्या अध्यायांत विभूति जरी सांगितल्या आहेत, तरी त्या पुनः मला ऐकाव्याशा वाटतात; कारण त्यांत माझी आवड आहे. आवडीचा यःकश्चित् विषय पुनः पुनः सेवन करावासा वाटतो, मग हें तर जन्ममरण घालविणारें गोड अमृत आहे; शिवाय तुझ्या मुखांतून येत असल्यामुळें तें मूर्तिमंत नादब्रह्मच आहे. ( १९०-२०३ ).

अर्जुनाच्या बोलण्यानें भगवानही संतुष्ट होऊन म्हणाले 'आपल्या अंगावर किती रोम आहेत याची जशी गणना करतां येत नाहीं, त्याप्रमाणें माझ्या विभूतींला मोजदाद नाहीं. अनंत असणारें आकाश हें जेथें माझ्या पोटांत सामावलें त्या माझी व्याप्ति केवढी असली पाहिजे ?' ( २०४-२१४ ) असें म्हणून सर्वांच्या अंतर्यामी असणाऱ्या आत्म्यापासून सुरुवात करून भगवंतांनीं अर्जुनाला मुख्य मुख्य अशा ७५ विभूति सांगितल्या, त्याचा अनुवाद करून स्पष्टीकरणार्थ ज्ञानदेव म्हणतात 'झाडाच्या फांद्या, फळें, फुलें हीं सर्व एकाच वेळीं हस्तगत व्हावीं असें वाटत असेल तर त्या झाडाचें एक मूळच उपटून हातांत घेतलें पाहिजे. तसें माझ्या वेगवेगळ्या विभूति सांगेन म्हटलें तर हजारों जन्म देखील अपुरे पडतील. आम्ही सांगणार किती व तूं ऐकणार तरी किती ! वर्मांची गोष्ट लक्षांत ठेव कीं, सर्व प्राणीमात्रांचें बीज मी आहें व संपूर्ण विश्व त्याचाच विस्तार आहे; म्हणून लहानमोठा, सामान्य, विशेष असा आपल्या बुद्धींतील भेदाचा कलंक त्या शुद्ध स्वरूपाला लावूं नकोस.' ( २१५-३२१ ). श्रीकृष्णांनीं भेदाच्याद्वारां विभूति सांगून हा अभेदभाव शेवटीं सांगितला. तो अर्जुनाच्या मनाला पटून सर्व विश्व भगवंताच्या स्वरूपानेंच भरलें आहे असें त्याला वाटूं लागलें. हा अंतःकरणांतील अनुभव बाह्यचर्मचक्षूंना दिसावा अशी अचाट इच्छा त्यास उत्पन्न झाली. त्याचें दैवच मोठें; संपूर्ण परब्रह्म हातावर उदक सोडून दान दिल्याप्रमाणें त्याला प्राप्त झालें होतें, म्हणून त्याची इच्छा पुरी होण्यास काय अवकाश होता !

बिचाऱ्या दुर्दैवी धृतराष्ट्रावर याचा यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. तो बाहेर जसा आंधळा तसा आंतही आंधळाच राहिला होता. संजयाला त्याची कींव येत होती; अशा दोन प्रसंगांचें सुंदर चित्रण करून ज्ञानदेवांनीं हा अध्याय संपविला आहे. ( ३२२-३३५ ).



# ज्ञानेश्वरी

## अध्याय दहावा

नमो विशदबोधविद्वदा । विद्यारविंदप्रबोधा । पराप्रमेयप्रमदा- । विलासिया ॥ १ ॥ नमो संसारतमसूर्या । अप्रतिमपरमवीर्या । तरुणतरतूर्या- । लालनलीला ॥ २ ॥ नमो जगदखिल-पालना । मंगळमणिनिधाना । स्वजनवनचंदना । आराध्यलिंगा ॥ ३ ॥ नमो चतुराचित्तचकोर-चंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा । श्रुतिगुणसमुद्रा । मन्मथमन्मथा ॥ ४ ॥ नमो सुभावभजनभाजना । भवेभकुंभभंजना । विश्वोद्भवभुवना । श्रीगुरुराया ॥ ५ ॥ तुमचा अनुग्रहोगणेशु । जैं दे आपुला सौरसु । तैं सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥ ६ ॥ दैविकी उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभिकाराचा । तैं नवरसदीपांचा । थावो लाभे ॥ ७ ॥ जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी । जरी मुकेयातें अंगीकारी । तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधुहोडा ॥ ८ ॥ हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे । तो जीवाचि परि तुके । महेशेंशीं ॥ ९ ॥ एवढें जिये महिमेचें करणें । तें वाचाळपणें वानूं मी कवणें । का सूर्याचिया आंगा उटणें । लागत असे ॥ १० ॥ केउता कल्पतरूवरी फुलौरा । कायसेनि पाहुणेरु क्षीरसागरा । ऐसा कवणें वासीं कापुरा । सुवासु देवों ॥ ११ ॥ चंदनातें कायसेनि चर्चावें । अमृतातें केउतें रांधावें । गगनावरी उभवावें । घडे केवीं ॥ १२ ॥ तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें कें असे साधन । हें जाणोनि मियां नमन । निवांत केलें ॥ १३ ॥ तरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें । श्रीगुरुसमर्था रूप म्हणे । तरि मोतियांसी भिंग देणें । तैसें होईल ॥ १४ ॥ कां साडेपंधरया रजतवणी । तैशी स्तुतीची बोलणी । उगियाचि माथा ठेविजे चरणीं । हेंचि भलें ॥ १५ ॥ मग म्हणितलें जी स्वामी । भलेनि ममत्वें देखिलें तुम्हीं । म्हणोनि कृष्णार्जुनसंगमीं । प्रयागवटु जाहलों ॥ १६ ॥ मागां दूध दे म्हणतलियासाठीं । आघवियाचि क्षीराब्धीची करूनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥ १७ ॥ ना तरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें । बुझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ॥ १८ ॥ तैसी ब्रह्मविद्यारावो । सकळ शास्त्रांचा विसंवता ठावो । ते

# ज्ञानेश्वरी

## अध्याय दहावा

स्पष्ट बोध करण्यांत चतुर असलेल्या व विद्यारूपी कमलाचा विकास करणाऱ्या व परावाणीचा विषय (स्वरूप-स्थिति) हीच कोणी तरुण स्त्री, त्या स्त्रीशीं विलास करणाऱ्या, ( श्रीगुरो, ) तुम्हांस माझा नमस्कार असो. १. अहो, संसाररूपी अंधाराचा नाश करणारे सूर्य, निरुपम अशा श्रेष्ठ सामर्थ्यानें युक्त, ज्वानीच्या भरांत असलेल्या, ज्ञानरूप चौथ्या अवस्थेचें स्नेहानें पालन करणें ही ज्यांची क्रीडा आहे, अशा श्रीगुरो, तुम्हांस माझा नमस्कार असो. २. अहो, सर्व जगाचें पालन करणारे, कल्याणरूप रत्नांची खाण असलेले, भक्तरूपी अरण्यांतील चंदन असलेले आणि पूजा करण्यास योग्य असलेले देव, तुम्हांस माझा नमस्कार असो. ३. शहाण्या चित्तरूपी चकोरास आनंद देणाऱ्या चंद्रा, ब्रह्मानुभवाच्या राजा, वेदगुणांच्या समुद्रा व कामाला मोहित करणाऱ्या, तुला माझा नमस्कार असो. ४. शुद्ध भावानें भजन करण्यास योग्य पात्र असणारे, संसाररूपी हत्तींच्या गंडस्थळाचा नाश करणारे व विश्वाच्या उत्पत्तीचें ठिकाण असणारे, अहो श्रीगुरुराया, तुम्हांला माझा नमस्कार असो. ५. तुमची कृपा हाच कोणी गणेश, तो जेव्हां आपलें सामर्थ्य देतो, तेव्हां सर्व विद्येमध्यें बालकाचा देखील प्रवेश होतो. ६. आपण जे श्रीगुरुदेव, त्या आपली उदार वाणी जेव्हां ' भिऊं नकोस ' असें वचन देते, तेव्हां शांतादि नवरसरूपी दिव्यांचा ठाव लागतो म्हणजे नवरसरूपी दिवे प्रज्वलित केले जातात. ७. महाराज, आपलें प्रेम हेंच कोणी सरस्वती, तिनें जर मुक्याचा अंगीकार केला, तर तो पैजेनें बृहस्पतीबरोबर वादविवाद करील. ८. हें राहूं द्या; ज्याच्यावर आपली कृपादृष्टि पडेल अथवा आपला वरदहस्त ज्याच्या मस्तकावर स्थिर राहील, तो जीवच खरा, परंतु तो शिवाच्या बरोबरीला येईल. ९. एवढ्या सर्व गोष्टी ज्या सामर्थ्यानें होतात, त्याचें मी कोणत्या जास्त बोलण्यानें वर्णन करूं ? सूर्याचें शरीर चकाकित दिसावें म्हणून त्यास ( लोखंडाच्या आरशाप्रमाणें ) घासण्याची जरूर आहे काय ? १०. कल्पतरूला फलद्रूप होण्यास मोहोर कशास फुटावयास पाहिजे ? क्षीरसमुद्राला कशानें पाहुणचार करावा ? त्याचप्रमाणें कोणत्या वासाच्या योगानें कापुराला सुगंधित करावें ? ११. चंदनाला कशाची उटी लावावी ? अमृताचें पक्वान्न कसें तयार करावें ? आकाशावर मांडव घालणें शक्य आहे काय ? १२. त्याप्रमाणें श्रीगुरूच्या मोठेपणाचें आकलन करणारें साधन कोठें आहे ? ( कोठेंही नाहीं. ) हें लक्षांत घेऊन मी निमूटपणानें त्यांना नमस्कार केला. १३. जर बुद्धीच्या संपन्नतेवर समर्थ श्रीगुरूचें यथार्थ वर्णन करूं म्हणेन, तर तें माझें करणें खऱ्या मोत्यांना ( चकाकी येण्याकरितां ) अभ्रकाचें पूट देण्यासारखें होईल. १४. साडेपंधरा दराच्या बावनकशी सोन्याला ज्याप्रमाणें चांदीचा मुलामा द्यावा, त्याप्रमाणें मी केलेल्या स्तुतीच्या भाषणाचा प्रकार होणार आहे. म्हणून यापुढें कांहीं न बोलतां आपल्या पायावर मस्तक ठेवावें हेंच बरें. १५. नंतर ज्ञानेश्वर महाराज म्हणाले, अहो स्वामि, चांगल्या प्रेमानें, ' ज्ञानेश्वर आमचा आहे ' या भावनेनें तुम्ही माझ्याकडे पाहिलें, त्यामुळें कृष्णार्जुनसंवादरूपी गंगा-यमुनेचा संगम होण्याचें क्षेत्र जें प्रयाग, तेथील मी वड झालों. १६. मागें ' दूध दे ' अशी विनंति केल्यावरून सर्वच क्षीरसमुद्राची वाटी करून शंकरानें उपमन्यूच्या पुढें जशी ठेविली, १७. किंवा वैकुंठाधीश प्रभूनें रुसलेला जो ध्रुव, त्यास अढळपदाचा खाऊ देऊन कौतुकानें समजाविलें. १८. त्याप्रमाणें गीता ब्रह्मविद्येचा राजा आहे व सर्व शास्त्रांचें विश्रांतिस्थान आहे, ती भगवद्गीता

भगवद्गीता वोविया गावों । ऐसें केलें ॥ १९ ॥ जे बोलणियाचां रानीं हिंडतां । नायकिजे फळलिया अक्षरांची वार्ता । परि ते वाचाचि केली कल्पलता । विवेकाची ॥ २० ॥ होती देहबुद्धि एकसरी । ते आनंदभांडारा केली वोवरी । मन गीतार्थसागरीं । जळशयन जालें ॥ २१ ॥ तैसें एकैक देवांचें करणें । तें अपार बोलों केवीं मी जाणें । तऱ्ही अनुवादलों धीटपणें । तें उपसाहिजो जी ॥ २२ ॥ आतां आपुलेनि कृपाप्रसादें । मियां भगवद्गीता वोवीप्रबंधें । पूर्वखंड विनोदें । वाखाणिलें ॥ २३ ॥ प्रथमीं अर्जुनाचा विषादु । दुजीं बोलिला योगु विशदु । परि सांख्यबुद्धीसि भेदु । दाऊनियां ॥ २४ ॥ तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें । तेंचि चतुर्थीं ज्ञानेंशीं प्रगटिलें । पंचमीं गव्हरिलें । योगतत्त्व ॥ २५ ॥ तेंचि षष्ठामाजीं प्रगट । आसनालागोनि स्पष्ट । जीवात्मभाव एकवाट । होती जेणें ॥ २६ ॥ तैसीचि जे योगस्थिति । आणि योगभ्रष्टां जे गति । ते आघवीचि उपपत्ती । सांगितली ॥ २७ ॥ तयावरी सप्तमीं । प्रकृतिपरिहार उपक्रमीं । भजति जे पुरुषोत्तमीं । ते बोलिले चाऱ्ही ॥ २८ ॥ पाठीं सप्तमीची प्रश्नसिद्धी । बोलोनि प्रयाणसिद्धी । एवं ते सकळवाक्यअवधि । अष्टमाध्यायीं ॥ २९ ॥ आतां शब्दब्रह्मीं असंख्याकें । जेतुला कांहीं अभिप्राय पिके । तेतुला महाभारतें एकें । लक्षें जोडे ॥ ३० ॥ आतां आटरें पर्वीं भारतीं । तें लाभे कृष्णार्जुनवाचोक्तीं । आणि जो अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाचि नवमीं ॥ ३१ ॥ म्हणोनि नवमींचिया अभिप्राया । सहसा मुद्रा लावावया । बिहाला मी वायां । गा. कां करूं ॥ ३२ ॥ अहो गूळा साखरे मालेयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । औनआन जैसे ॥ ३३ ॥ एक जाणोनियां बोलती । एक ठायेंठावो जाणवि[illegible] एक जाणों जातां हारपती । जाणते गुणेंशीं ॥ ३४ ॥ हे ऐसे अध्याय गीतेचे । परि अनिर्वाच्य नवमाचें । तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ॥ ३५ ॥ कां एकाचि कौंठि तपिन्नली । एकीं सृष्टीवरी सृष्टी केली । एकीं पाषाण वाऊनि उतरलीं । समुद्रीं कटकें ॥ ३६ ॥ [illegible] आकाशीं सूर्यातें धरिलें । एकीं समुद्र चुळीं भरिलें । तैसें मज नेणतयाकरवीं बोलविलें । अनिर्वाच्य तुम्हीं ॥ ३७ ॥ परि हें असो एथ ऐसें । राम रावण झुंजिन्नले कैसे । राम रावण जैसे । मीनले समरीं ॥ ३८ ॥ तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें । तें नवमीचियाचि ऐसें मी म्हणें । या निवाडा तत्त्वज्ञु जाणे । जया गीतार्थु हातीं ॥ ३९ ॥ एवं नवही अध्याय पहिले । मियां मतीसारिखे वाखाणिले । आतां उत्तरखंड उपाइलें । ग्रंथाचें ऐका ॥ ४० ॥ येथ विभूती प्रतिविभूती ।

मी प्राकृत ओंवीछंदांत गावी, असें श्रीगुरूनें केलें. १९. ( हें पहा ) शब्दरूपी अरण्यामध्यें वाटेल तितकें भटकलें असतां, त्या वाचारूप वृक्षास विचाररूप फळें आल्याची गोष्ट कानांवर येत नाहीं; परंतु ती वाचाच माझ्या बाबतींत विचारांचा कल्पवृक्ष केली. २०. माझ्या बुद्धीनें जें देहाशीं एकसारखें तादात्म्य केलें होतें, त्या माझ्या बुद्धीला ( देहतादात्म्यापासून सोडवून ) आनंदरूपी खजिन्याची खोली केली आणि माझें मन गीतेच्या अर्थरूपी क्षीरसमुद्रांत महाविष्णु झालें. २१. त्याप्रमाणें श्रीगुरुंच्या एक एक लीला आहेत. त्या अनंत असल्यामुळें त्यांचें वर्णन करावयाचें मला कसें कळेल ? असें असूनही, बेडरपणानें जो कांहीं मीं अनुवाद केला, तो महाराज, सहन करा. २२. एवढा वेळ आपल्या कृपेच्या प्रसादानें मी भगवद्गीतेचा पहिला भाग विनोदानें ओंवीच्या छंदांत वर्णन केला. २३. पहिल्या अध्यायामध्यें अर्जुनाचा खेद सांगितला, दुसऱ्यामध्यें स्पष्ट निष्काम कर्मयोग सांगितला, परंतु ज्ञानयोग आणि बुद्धियोग यांच्यांत काय फरक आहे, तो दाखवून सांगितला. २४, तिसऱ्यांत केवळ कर्मयोग सांगितला. तोच कर्मयोग चौथ्यांत ज्ञानासह सांगितला आणि पांचव्यांत गूढपणानें अष्टांगयोग सांगितला. २५. ज्याच्या योगानें जीवात्म्याचें ऐक्य होतें, तेंच योगाचें तत्त्व आसनापासून प्रारंभ करून ( तों समाधीपर्यंत ) स्पष्ट तऱ्हेनें ( सहाव्यांत ) उघड केलें. २६. त्याचप्रमाणें योगसिद्ध झालेल्याची स्थिति आणि योगाचें आचरण करीत असतां मध्येंच मरण आलेल्याची जी गति होते, तो सर्व विचार ( सहाव्या ) अध्यायांत सांगितला. २७. त्यानंतर सातव्यांत आरंभीं ( कार्य कारण अशा दोन प्रकारानें ) प्रकृतीचें रूप सांगून, भगवंताला भजणारे जे चार प्रकारचे भक्त, त्यांचें वर्णन केलें. २८. नंतर सातव्या अध्यायांत शेवटीं सांगितलेल्या सात वाक्यासंबंधीं ( आठव्याच्या आरंभीं ) अर्जुनानें विचारलेल्या सात प्रश्नांचीं उत्तरें देऊन, प्रयाणाच्या सिद्धीचा प्रकार सांगितला; या प्रकारें सर्व सात प्रश्नांचीं उत्तरें देऊन आठव्यांत ते प्रश्न संपविले. २९. आतां असंख्यात असलेल्या वेदांमध्यें जेवढा म्हणून मतलब प्राप्त होतो, तेवढा सर्व एक लक्ष ग्रंथ असलेल्या महाभारतामध्यें सांपडतो. ३०. आतां भारताच्या अठरा पर्वांमध्यें जो कांहीं अभिप्राय आहे, तो कृष्णार्जुनांच्या संवादामध्यें ( गीतेंत ) प्राप्त होतो;



आणि गीतेच्या सातशें श्लोकांमध्यें जो अभिप्राय आहे, तो एकट्या नवव्या अध्यायांत आहे. ३१. म्हणून नवव्या अध्यायांतील मतलब पूर्ण झाला, असें दाखविणारा लेखनसीमेचा शिक्का, त्यावर एकदम घावयास भ्यालेला जो मी, तो, नवव्या अध्यायांतील अभिप्राय पूर्णपणें सांगितला, असा व्यर्थ अभिमान कशाकरितां धरूं ? ३२. अहो, गूळ, साखर व राब यांचे आकार जरी एकाच रसाचे झाले आहेत, परंतु त्यामध्यें गोडीचे स्वाद जसे निरनिराळे आहेत; ३३. ( त्याप्रमाणें अठरा अध्याय हे एकाच गीतेचे आहेत व त्यांमध्यें एकाच ब्रह्मरसाचें वर्णन आहे, पण त्यांच्या परिणामांकडे पाहिलें तर ते निरनिराळे आहेत. ते असें कीं ) कांहीं अध्याय, अधिष्ठानब्रह्मस्वरूपाला जाणून त्याचें वर्णन करितात; कांहीं अध्याय ठिकच्या ठिकाणींच 'तूं ब्रह्म आहेस' असें समजावितात व कांहीं अध्याय जाणावयास गेलें असतां, जाणण्याच्या धर्मासह जाणणारा हरपून जातो. ( ब्रह्मरूप होतो. ) ३४. असे हे गीतेचे अध्याय आहेत. परंतु नववा अध्याय शब्दानें सांगण्याच्या पलीकडचा आहे. तो देखील मी स्पष्ट करून सांगितला. महाराज, ही सर्व शक्ति आपली आहे. ३५. एकाच्या ( वसिष्ठ ऋषीच्या ) काठीनें सूर्याप्रमाणें प्रकाश केला, एकानें (विश्वामित्रानें) या जगाहून वेगळें जगच निर्माण केलें. एकानें ( नल वानरानें ) दगड पाण्यावर टाकून समुद्रावरून सैन्य पार उतरून नेलें ३६. एकानें ( मारुतीनें ) आकाशांत असलेल्या सूर्यास पकडलें; एकानें ( अगस्तीनें ) घोटांतच समुद्र प्राशन केला. त्याप्रमाणें मी जो अजाण, त्या माझ्याकडून बोलण्याच्या पलीकडे असलेला नवव्या अध्यायाचा अभिप्राय तुम्हीं बोलविला. ३७. परंतु हें असो; येथें असें आहे कीं, राम व रावण हे एकमेकाशीं कसे लढले हें सांगावयाचें असेल, तर जसें रामरावण हे एकमेकांस युद्धांत भिडले तसें, ( असें सांगावें लागेल. ) ३८. त्याप्रमाणें नवव्या अध्यायांतील श्रीकृष्णानें केलेला जो उपदेश, तो नवव्या अध्यायासारखाच आहे, असें माझें म्हणणें आहे. हा मीं केलेला निर्णय ज्याला गीतेच्या अर्थाचें आकलन झालें आहे, त्या तत्त्ववेत्त्याला पटेल. ३९. त्याप्रमाणें पहिल्या नऊही अध्यायांचें मीं आपल्या बुद्धीप्रमाणें व्याख्यान केलें. आतां गीताग्रंथाचा राहिलेला दुसरा भाग प्राप्त झालेला आहे, तो ऐका. ४०. या अध्यायांत आतां अर्जुनाला विशेष व सामान्य विभूति सांगितल्या जातील, ती कथा चातुर्यानें व रसयुक्त वर्ण-

प्रस्तुत अर्जुना सांगिजेती । ते विद्वदा रसवृत्ती । म्हणिपैल कथा ॥ ४१ ॥ देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जिणे । तरि ओंविया होती लेणें । साहित्यासी ॥ ४२ ॥ मूळग्रंथींचिया संस्कृता- । वरि मऱ्हाटी नीट पढतां । अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवे ॥ ४३ ॥ जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणियासी आंगचि होय लेणें । अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥ तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाचां सोकासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥ उठावलिया भावा रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडप । चातुर्य म्हणे पडप । जोडलें आम्हां ॥ ४६ ॥ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ॥ ४७ ॥ तैसा चराचरपरमगुरु । चतुरचित्तचमत्कारु । तो ऐका यादवेश्वरु । बोलता जाहला ॥ ४८ ॥ ज्ञानदेव निवृत्तीचा म्हणे । काई बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आघवियाचि मातू अंतःकरणें । घडौता आहासि ॥ ४९ ॥

श्रीभगवानुवाचः—भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः । यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

आम्हीं मागील जें निरूपण केलें । तें तुझें अवधानचि पाहिलें । तंव टांचें नव्हे भलें । पुरतें आहे ॥ ५० ॥ घटीं थोडेसें उदक घालिजे । तेणें न गळे तरी वरिता भरिजे । तैसा परिसौनि पाहिलासि तंव परिसविजे । ऐसेंचि होतसे ॥ ५१ ॥ अवचितयावरी सर्वस्व सांडिजे । चोख तरी तोचि भांडारी कीजे । तैसा तूं आतां माझें । निजधाम कीं ॥ ५२ ॥ तैसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें । पाहोनि बोलिलें आदरें । गिरी देखोनि सुभरे । मेघु जैसा ॥ ५३ ॥ तैसा कृपाळुवांचा रावो । म्हणे आइकें गा महाबाहो । सांगितलाचि अभिप्रावो । सांगेन पुढती ॥ ५४ ॥ प्रतिवर्षी क्षेत्र पेरिजे । पिके तरी वाहो नुबगिजे । पिकासी निवाडु देखिजे । अधिकाधिक ॥ ५५ ॥ पुढतपुढती पुटें देतां । जोडे वानियेची अधिकता । तें सोनें पांडुसुता । शोधूंचि आवडे ॥ ५६ ॥ तैसें एथ पार्था । तुज आभार नाहीं सर्वथा । आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलौनि आम्ही ॥ ५७ ॥ अगा बाळका लेवविजे ले । त्याप्रमाणें तें काय जाणें । तो सोहळा भोगणें । जननीयेसी दृष्टी ॥ ५८ ॥ तैसें तुझें हित आघवें । जंव जंव कां तुज फावे । तंव तंव आमुचें सुख दुणावे । ऐसें असे ॥ ५९ ॥ आतां असो हे विकडी । मज उघड तुझी आवडी । म्हणौनि तृप्तीची सवडी । बोलतां न पडे ॥ ६० ॥ आम्हां येतुलियाचि कारणें । तेंचि तें तुजशीं बोलणें । परि असो हें अंतःकरणें । अवधान दे ॥ ६१ ॥ ऐकें ऐकें सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊनि परब्रह्म । तुज खेंवासि आलें ॥ ६२ ॥

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः । अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥

तरी किरीटी तूं मातें । नेणसी ना निरुतें । तरि गा जो मी एथें । तें विश्वचि हें ॥ ६३ ॥ एथ वेद मुके जाहाले । मन पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशी ॥ ६४ ॥ उदरींचा

नानें सांगितली जाईल. ४१. मराठी भाषेच्या सुंदरपणानें शांतरस शृंगार रसाला जिंकील व ओव्या तर अलंकारशास्त्राला भूषण होतील. ४२. मूळ संस्कृत गीताग्रंथावर माझी असणारी मराठी टीका जर चांगली वाचली आणि योग्य रीतीनें दोन्हींचा अभिप्राय जर चांगला पटला, तर कोणता ग्रंथ मूळ आहे, हें कळणार नाहीं. ४३. ज्याप्रमाणें शरीराच्या सौंदर्यानें शरीर हेंच अलंकारास भूषण होतें; अशा स्थितींत कोणी कोणाला शोभा आणली, याची निवड होत नाहीं ४४. त्याचप्रमाणें माझी मराठी भाषा व संस्कृत भाषा या दोन्हीही एकाच अभिप्रायाच्या पालखींत शोभतात; त्या तुम्ही चांगल्या बुद्धीनें ऐका. ४५. गीतेचा पुढें आलेला अभिप्राय सांगत असतां शृंगारादि नवरसांचा वर्षाव होतो व चातुर्य म्हणतें, आम्हाला प्रतिष्ठा प्राप्त झाली. ४६. बरच्या ओवींत सांगितलेला परिणाम ज्याच्या योगानें होईल, तर्से मराठी भाषेचें सौंदर्य घेऊन, (नवरसांना) तारुण्य आणलें व मग अमर्याद गीतातत्त्व रचलें. (म्हणजे गीतेवर टीका केली.) ४७. याप्रमाणें संपूर्ण जगाचा श्रेष्ठ गुरु असलेला व शहाण्यांच्या चित्ताला आश्चर्यभूत असणारा, असा जो यादवांतील श्रेष्ठ श्रीकृष्ण, तो बोलला, तें ऐका. ४८. निवृत्तिनाथाचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात, त्या श्रीकृष्णानें काय भाषण केलें (तें ऐका.) श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना तूं सर्व गोष्टींनें अंतःकरणाचा धड आहेस. ४९.

श्रीकृष्ण म्हणाले, हे महाबाहो, (माझ्या भाषणानें) संतोष पावणाऱ्या तुला, तुझ्या हिताच्या इच्छेनें जें मी आणखी देखील सांगत आहें, तें माझें श्रेष्ठ भाषण ऐक. १.

आम्हीं पूर्वी जें व्याख्यान केलें तें तुझें लक्ष किती आहे, हेंच अजमावून पाहिलें; त्यांत तें अपुरें नाहीं, तर चांगलें पूर्ण आहे (असें आढळून आलें.) ५० धागरींत थोडेंसें पाणी घालावें व तें गळालें नाहीं, तर आणखी जास्त भरावें; त्याप्रमाणें तुला ऐकवून पाहिलें, तेव्हां तुला आणखी ऐकवावें असेंच वाटूं लागलें. ५१. एखाद्या अकस्मात आलेल्या मनुष्यावर आपलें सर्वस्व सोपवावें व तो प्रामाणिक आहे असें आढळून आलें तर, त्यालाच खजिनदार करावा. त्याप्रमाणें (आम्हीं तुला सांगितलेलें तूं लक्षपूर्वक ऐकतोस, अशी आमची खात्री झाल्यामुळें) तूं आतां आमचें राहण्याचें ठिकाण झाला आहेस. ५२. त्याप्रमाणें सर्वांचा प्रभु जो श्रीकृष्ण, तो अर्जुनाला एवढ्या योग्यतेचा पाहून प्रेमानें बोलावयास लागला. ज्याप्रमाणें डोंगर पाहून मेघांची दाट फळी येते; ५३. त्याप्रमाणें (मोठ्या प्रेमभरानें) कृपाळूंचा राजा श्रीकृष्ण म्हणाला, अरे आजानुबाहु अर्जुना, ऐक, सांगितलेलाच मतलब पुन्हा सांगतों. ५४. प्रत्येक वर्षाला शेताची पेरणी करावी, आणि जर तें पिकेल, तर त्याची मशागत करण्याचा कंटाळा करूं नये; कारण त्यामुळें पिकाची निष्पत्ति अधिकाधिक झालेली दिसते. ५५. ज्या सोन्याला वारंवार क्षाराचीं पुटें दिलीं असतां त्याचा कस अधिकाधिक वाढत जातो, अर्जुना, तें सोनें शुद्ध करावेंसेंच वाटतें. ५६. अर्जुना, त्याप्रमाणें येथेंही आहे. या सांगण्यांत तुझ्यावर मुळींच उपकाराचें ओझें नाहीं. कारण आम्हीं आपल्या स्वतःच्या कार्याकरितां बोलत आहोंत. ५७. अरे, मुलाला दागिने घालावेत; पण तें मूल त्याप्रमाणें (दागिन्यांना) आणतें काय? दागिन्यांनीं मुलाला आलेल्या शोभेचा आनंद आईनें आपल्या दृष्टीनें भोगावयाचा असतो. ५८. त्याप्रमाणें तुझें सर्व हित जसजसें तुला समजेल तसतसा आमचा आनंद दुप्पट होतो; अशी वस्तुस्थिति आहे. ५९. आतां हें अलंकारिक बोलणें राहूं दे. तुझ्यावर माझें उघड प्रेम आहे, म्हणून तुझ्याशीं बोलतांना तृप्तीचा शेवट होत नाहीं, (म्हणजे तुझ्याशीं बोलणें पुरेसें वाटत नाहीं.) ६०. आम्हांला एवढ्याकरितां तेंच तें फिरून तुझ्याशीं बोलावें लागतें, परंतु हें असूं दे. तूं मनापासून लक्ष दे. ६१. तर ऐक ऐक, मर्मज्ञ अर्जुना, माझें श्रेष्ठ बोलणें ऐक. हें माझें बोलणें म्हणजे ब्रह्मच अक्षरांचा अंगरखा घालून तुला आलिंगन देण्यास आलें आहे. ६२.

देवांना किंवा महर्षींना माझी उत्पत्ति माहीत नाहीं. कारण देव आणि महर्षि या सर्वांचें आदिकारण मी आहें. २.

तरी अर्जुना, तूं मला खरोखर जाणत नाहींस ना? (जर जाणत नसलास तर सांगतों.) येथें जो मी तुझ्यापुढें उभा आहें, तो दिसतो एवढा मर्यादित नसून, मी म्हणजे हें विश्वच आहें; ६३. या माझ्या स्वरूपीं वेदाला बोलतां येईना, मन आणि प्राण यांची गति माझ्या स्वरूपीं चालेना, सूर्य व चंद्र हे माझ्या स्वरूपीं रात्रींशिवाय मावळले. (ते माझ्या स्वरूपाचें प्रकाशन करूं शकत नाहींत.) ६४. पोटांत असलेला गर्भ ज्याप्रमाणें (आपल्या) आईचें वय जाणत नाहीं, त्याप्रमाणें देवांना

गर्भु जैसा । नेणे मायेची वयसा । देवांसि मी तैसा । चोजवेना ॥ ६५ ॥ आणि जळचरां उदधीचें मान । मशकां नोलांडवे गगन । तैसें महर्षींचें ज्ञान । नेणे मातें ॥ ६६ ॥ मी कवण केतुला । कवणाचा कैं जाहला । निरुती या करितां बोला । युगें गेलीं ॥ ६७ ॥ महर्षी आणि या देवां । येरां भूतजातां सर्वां । मी आदि म्हणोनि पांडवा । जाणतां अवघड ॥ ६८ ॥ उतरलें उदक पर्वत वळघे । कां वाढतें झाड मुळीं लागे । तरी मियां जालेनि जगें । जाणिजे मी ॥ ६९ ॥ कां गाभेवनें वटु गिंवसवे । तरंगीं सागरु सांठवे । कां परमाणूमाजीं सामावे । भूगोलु हा ॥ ७० ॥ तरी मियां जालियां जीवां । महर्षी अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाशु गा ॥ ७१ ॥

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् । असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

ऐसाही जरी विपायें । सांडुनि पुढील पाये । सर्वेंद्रियांसि होये । पाठिमोरा जो ॥ ७२ ॥ प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडुनि मागलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥ ७३ ॥ तैसा राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखें । आपुलिये डोळां ॥ ७४ ॥ मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु । ऐसिया मातें जो नरु । यापरी जाणे ॥ ७५ ॥ तो पाषाणामाजि परिसु । रसांमाजी सिद्धरसु । तैसा मनुष्याकृति अंशु । तो माझाचि जाण ॥ ७६ ॥ तो चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । परी माणुसपणाची भांब । लोकाचि भागु ॥ ७७ ॥ अगा अवचिता कापुरा– । माजीं सांपडला हिरा । वरि पडिलिया नीरा । न निगे केवीं ॥ ७८ ॥ तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरी जाहला प्राकृतु । तऱ्ही प्रकृतिदोषाची मातु । नेणिजे तेथ ॥ ७९ ॥ तो आपसयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदनु सर्पीं । तैसा मातें जाणे तो संकल्पीं । वर्जूनि घालिजे ॥ ८० ॥ तेंचि मातें कैसें जाणिजे । ऐसें कल्पी जरी चित्त तुझें । तरी मी ऐसा हे माझे । भाव ऐकें ॥ ८१ ॥ जे वेगळालिया भूतीं । सारिखें होऊनि प्रकृती । विखुरले आहेति त्रिजगतीं । आघवियें ॥ ८२ ॥

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः । सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥

ते प्रथम जाण बुद्धि । मग ज्ञान जें निरवधि । असंमोह सहनसिद्धि । क्षमा सत्य ॥ ८३ ॥ मग शम दम दोन्ही । सुखदुःख वर्तत जनीं । अर्जुना भावाभाव मानीं । भावाचिमाजीं ॥ ८४ ॥

अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः । भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

आतां भय आणि निर्भयता । अहिंसा आणि समता । हे मर्म रूपची पांडुसुता । ओळख तूं ॥ ८५ ॥ दान यश अपकीर्ति । ते जे भाव सर्वत्र वसती । ते मजाचि पासूनि होती । भूतांचां ठायीं ॥ ८६ ॥ जैसीं भूतें आहाती सिनानीं । तैसेचि हे वेगळाले मानीं । एक उपजती माझां

माझें ज्ञान होत नाहीं. ६५. आणि ज्याप्रमाणें पाण्यांत राहणाऱ्या प्राण्यांना समुद्राचें माप कळत नाहीं, ( किंवा ) चिलटांस आकाश ओलांडतां येत नाहीं, त्याप्रमाणें मोठाल्या ऋषींचें ज्ञान माझी ओळख करूं शकत नाहीं. ६६. मी कोण आहें, केवढा आहें, कोणापासून व केव्हां उत्पन्न झालों, या गोष्टींचा निर्णय करण्यांत किती एक युगें निघून गेलीं. ६७. मोठाले ऋषि आणि हे देव यांना आणि दुसरे जेवढे म्हणून प्राणी आहेत, त्या सर्वांना मीच कारण आहें. म्हणून अर्जुना, मला जाणणें, त्यांना कठीण आहे. ६८. पर्वतावरून खालीं आलेलें पाणी जर पुन्हां पर्वतावर चढेल, अथवा वाढणारें झाड शेंड्याकडून मुळाकडे येईल, तर माझ्यापासून झालेल्या जगाकडून मी जाणला जाईन. ६९. अथवा वडाच्या सूक्ष्म अंकुरांत जर वडाचें विस्तीर्ण झाड सांपडलें जाईल अथवा लाटांमध्यें जर समुद्र सांठवला जाईल अथवा ही पृथ्वी जर परमाणूंत सांपडली जाईल, ७०. असें होईल तर, अर्जुना, माझ्यापासून उत्पन्न झालेल्या प्राण्यांना, मोठाल्या ऋषींना अथवा देवांना माझी ओळख होण्याची सवड मिळेल. ७१.

जो मला जन्मरहित अनादि आणि सर्व ( भू, भुवर् इत्यादि ) लोकांचा महान् ईश्वर असें जाणतो, तो मानवांमध्यें ज्ञानी आहे व तो सर्व पापांपासून मुक्त होतो. ३.

असा जरी मी जाणण्याला कठीण आहें, तरी कदाचित जो कोणी बाह्य वृत्ति टाकून ( देहादि अनात्मतत्त्वांकडे जाणारी वृत्ति काढून ) सर्व इंद्रियांकडे पाठमोरा होतो; ( वृत्ति अंतर्मुख करतो; ) ७२. देहादि अनात्मतत्त्वाकडे जरी त्याची प्रवृत्ति झाली; तरी तेथून वेगानें माघारी फिरतो, स्थूल, सूक्ष्म व कारण हे देह मागें टाकून ( विचारानें यांचा निरास करून ) पंचमहाभूतांच्याही माथ्यावर ( जो ) चढतो, ( पंचमहाभूतांचा निरास करतो. ) ७३. याप्रमाणें चांगल्या रीतीनें त्या ठिकाणीं स्थिर राहून, शुद्ध आत्मप्रकाशाच्या योगानें, आपल्या डोळ्यानें ( प्रत्यक्ष ) माझें जन्मराहित्य ( जो ) जाणतो; ७४. मी आरंभाच्या पलीकडील ( अनादि ) आहें व सर्व लोकांचा मुख्य ईश्वर आहे, अशा मला जो पुरुष या प्रकारें जाणतो, ७५. तो पुरुष पाषाणामध्यें परीस जसा श्रेष्ठ किंवा सर्व रसांत अमृत जसें श्रेष्ठ, त्याप्रमाणें तो मनुष्याच्या आकारानें असलेला माझा ( श्रेष्ठ ) अंश आहे, असें समज. ७६. तो ज्ञानाची चालती मूर्ति आहे, त्याचे अवयव ते सुखाला फुटलेले अंकुर आहेत परंतु (त्याचे ठिकाणीं दिसणारा) माणुसपणा हा लोकांच्या दृष्टीला होणारा भ्रम आहे. ७७. अर्जुना, हिरा जर अकस्मात कापरांत सांपडला व त्यावर जर पाणी पडलें, तर त्या पाण्याकडून तो विरघळल्याशिवाय भिन्न असा बाहेर निराळा कसा पडणार नाहीं ? ( तर पडेल. तो कापरासारखा पाण्यांत विरघळणार नाहीं. ) ७८. त्याप्रमाणें मनुष्यप्राण्यांत जरी तो शरीरधारी दिसला, तरी पण त्याचे ठिकाणीं जन्ममृत्युआदिकरून प्रकृतिदोषांची गोष्टही माहीत नसते. ७९. त्या पुरुषाला आपोआपच पापें टाकून जातात. ज्याप्रमाणें आग लागलेल्या चंदनाच्या झाडाला, त्याला वेढा घालून असलेले साप सोडून जातात, त्याप्रमाणें मला जो ओळखतो, तो संकल्पांकडून टाकला जातो. ८०. तेंच मला कसें जाणावें, असें जर कांहीं तुझें मन कल्पील, तर मी असा आहें व हे माझ्यापासून झालेले निरनिराळे पदार्थ असे आहेत, ते ऐक. ८१. ते माझे विकार भिन्न भिन्न प्राण्यांमध्यें त्यांच्या त्यांच्या प्रकृतीसारखे बनून संपूर्ण त्रैलोक्यांत पसरले आहेत. ८२.

बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, होणें, नसणें, भय, अभय. ४.

त्यापैकीं पहिली बुद्धि आहे असें समज. नंतर अगाध ज्ञान, असंमोह ( सहज उपस्थित झालेल्या ज्ञेय गोष्टींकडे विवेकपूर्वक प्रवृत्ति ), सहज सहन करण्याचा स्वभाव म्हणजे क्षमा, आणि सत्य ( हीं समज ). ८३. मग शम ( मनोनिग्रह ) आणि दम ( इंद्रियनिग्रह ) हे दोन आणि लोकांत असलेलें सुख व दुःख आणि अर्जुना, होणें आणि नसणें, या सर्वांची माझ्याच विकारांत गणना कर. ८४.

अहिंसा, समता, तुष्टि, तप, दान, यश, अपकीर्ति इत्यादि भूतांचे निरनिराळ्या प्रकारचे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात. ५.

अर्जुना, भय आणि निर्भयपणा, अहिंसा आणि समबुद्धि, संतोष, अर्जुना, हीं माझींच रूपें आहेत हें तूं जाण. ८५. दान, यश व दुष्कीर्ति, हे जे विकार सर्व ठिकाणीं रहातात ते माझ्यापासून प्राण्याच्या ठिकाणीं उत्पन्न होतात. ८६. जशीं भूतें वेगवेगळालीं आहेत, तसेंच हे भाव वेगवेगळाले आहेत, असें समज. त्यापैकीं कित्येक भाव माझ्या ज्ञानांत उत्पन्न होतात आणि कित्येक मला जाणत

ज्ञानीं । एक नेणती मातें ॥ ८७ ॥ अगा प्रकाश आणि कडवसें । हें सूर्याचिस्तव जैसें । प्रकाश उदयीं दिसे । तम अस्तूसीं ॥ ८८ ॥ आणि माझें जें जाणणें नेणणें । तें तंव भूतांचिया दैवांचे करणें । म्हणोनि भूतीं भावाचें होणें । विषम पडे ॥ ८९ ॥ यापरी माझां भावीं । हे जीवसृष्टि आहे आघवी । गुंतली असे जाणावी । पंडुकुमरा ॥ ९० ॥ आतां इये सृष्टीचे पालक । तयां आधीन वर्तती लोक । ते अकरा भाव आणिक । सांगेन तुज ॥ ९१ ॥

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा । मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥

तरी आघवांचि गुणीं वृद्ध । जे महर्षींमाजि प्रबुद्ध । कश्यपादि प्रसिद्ध । सप्तऋषी ॥९२॥ आणिकही सांगिजतील । जे चौदा आंतील । स्वायंभू मुख्य मुदल । चारी मनु ॥ ९३ ॥ ऐसे हे अकरा । माझां मनीं जाहाले धनुर्धरा । सृष्टीचिया व्यापारा- । लागोनियां ॥ ९४ ॥ जैं लोकांची ये व्यवस्था न पडे । जैं या त्रिभुवनाचें कांहीं न मांडे । तैं महाभूतांचें दळवाडें । अचुंबित असे ॥ ९५ ॥ जैंचि जे जाहाले । इहीं लोकपाळ केले । अध्यक्ष रचुनि ठेविले । इहीं जन ॥९६॥ म्हणोनि अकरा हे राजा । मग येर लोक यांचिया प्रजा । ऐसा हा विस्तारु माझा । ओळख तूं ॥ ९७ ॥ पाहें पां आरंभीं बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया बुड जाहालें । बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ॥ ९८ ॥ खांदियांपासूनि अनेका । पसरलिया शाखोपशाखा । शाखां-स्तव देखा । पल्लव पानें ॥ ९९ ॥ पल्लवीं फूल फळ । एवं वृक्षत्व जाहालें सकळ । तें निर्धारितां केवळ । बीजचि तें ॥ १०० ॥ ऐसें मी एकचि पहिलें । मग मी तें मनातें व्यालें । तेथ सप्त ऋषि जाहाले । आणि चारी मनु ॥ १ ॥ इहीं लोकपाळ केले । लोकपाळीं विविध लोक स्रजिले । लोकांपासूनि निपजलें । प्रजाजात ॥ २ ॥ ऐसेनि हें विश्व येथें । मीचि प्रसवलाना निरुतें । परी भावाचेनि हातें । माने जया ॥ ३ ॥

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः । सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

यालागीं सुभद्रापती । हे भाव इया माझिया विभूती । आणि यांचिया व्याप्ती । व्यापिलें विश्व ॥ ४ ॥ म्हणोनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकावरी । मीवांचूनि दुसरी । गोठी नाहीं ॥५॥ ऐसें जाणे जो साचें । तया चेइरें जाहालें ज्ञानाचें । म्हणोनि उत्तममध्यम भेदाचें । दुःस्वप्न तया ॥ ६ ॥ मी माझिया विभूती । आणि विभूतीं व्यष्टलिया व्यक्ती । हें आघवें योगप्रतीती । एकचि मानी ॥ ७ ॥ म्हणोनि निःशंकें येणें महायोगें । मज मीनला मनाचेनि आंगें । एथ संशय करणें न लगे । तो त्रिशुद्धी जाहला ॥ ८ ॥

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते । इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥

कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी । तयाचिये भजनाचिये नाटीं । सूती मज ॥ ९ ॥ म्हणऊनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ शंका नाहीं नये खंगु । करितां ठेला तरी चांगु । तें सांगितलें पष्ठीं ॥११०॥ तोचि अभेदु कैसा । हें जाणावया मानसा । साद जाली तरी

नाहींत (माझ्या अज्ञानांत उत्पन्न होतात) ८७. अरे अर्जुना, प्रकाश आणि अंधार हे परस्पर विरुद्ध स्वभावाचे असूनही ते ज्याप्रमाणें एका सूर्यापासूनच होतात; सूर्याच्या उदयांत प्रकाश दिसतो आणि सूर्याच्या अस्ताबरोबर अंधार होतो. ८८. आणि माझें जें ज्ञान होणें अथवा माझें जें अज्ञान असणें, हें प्राण्यांच्या दैवाचें कर्तृत्व आहे, म्हणून प्राणिमात्रांच्या ठिकाणीं कमीजास्त प्रमाणांत ह्या विकारांस व्हावें लागतें. ८९. ह्याप्रमाणें माझ्या विकारांत ही संपूर्ण सृष्टि सांपडली आहे, असें अर्जुना, समज. ९०. आतां ह्या सृष्टीचें पालन करणारे आणि ज्यांच्या ताब्यांत सर्व लोक वागतात, ते आणखी अकरा विकार तुला सांगेन. ९१.

प्राचीन (कश्यपादि) सात महर्षि, तसेच चार (स्वायंभूआदि) मनु, हे माझे भाव माझ्या मनापासून उत्पन्न झाले. ही (सर्व) प्रजा त्यांची सृष्टि आहे. ६.

तरी अर्जुना, सर्व गुणांनीं श्रेष्ठ, मोठमोठ्या ऋषीं-मध्यें प्रसिद्ध असलेले ज्ञाते जे कश्यपादि सात ऋषि, ९२. चौदा मनूंपैकीं स्वायंभू आदिकरून मुख्य मूळ जे चार मनु तेही आणखी सांगितले जातील. ९३. अगा अर्जुना, सृष्टीची घडामोड चालावी, म्हणून वर सांगितल्याप्रमाणें हे अकराजण माझ्या मनापासून उत्पन्न झाले. ९४. ज्या वेळीं स्वर्गादि लोकांची कांहीं व्यवस्था लागली नव्हती व या त्रैलोक्याचा मांड मांडलेला नव्हता आणि महा-भूतांचे समुदाय उपयोगांत आले नव्हते, ९५. त्याच वेळीं हे कश्यपादि अकरा उत्पन्न झाले. मग त्या अकरा-जणांनीं इंद्रादि आठ लोकपालांना (दिशांच्या स्वामींना) उत्पन्न केलें व त्यांना त्या दिशांचे स्वामि नेमून ठेविले व त्या लोकपालांनीं नानाप्रकारचे लोक उत्पन्न केले.९६. म्हणून वर सांगितलेले महर्षि इत्यादिक हे अकरा राजे आहेत आणि बाकीचे लोकपालादिक ते यांची प्रजा आहे, असा हा माझा विस्तार आहे असें समज. ९७. अर्जुना, पहा. पहिल्या प्रथम फक्त एक बीं असतें, मग त्यालाच अंकुर फुटल्यावर तें बुड (बुंधा) होतें व बुंध्यांत फांद्यांचे अंकुर निघतात.९८. त्या फांद्यांपासून पुढें लहान-मोठ्या शाखा पसरतात आणि त्या फांद्यांपासून कोंवळीं पालवी व पानें फुटतात, असें समज. ९९. पालवीपासून फूल व फळ उत्पन्न होतें; याप्रमाणें सर्व झाड तयार होतें. विचार करून पाहिलें तर, तें झाड म्हणजे केवळ बींच आहे. १००. याप्रमाणें प्रथम एकटाच मी होतों, मग (तें) 'मीं' त्या मनाला उत्पन्न करतें झालें आणि त्या मना-पासून कश्यपादि सात ऋषि आणि स्वायंभूआदि चार मनु उत्पन्न झाले. १०१. त्यांनीं (इंद्र, अग्नि, यम, वरुण, नैर्ऋती, वायु, कुबेर व ईशान असे हे) लोकपाल उत्पन्न केले त्या लोकपालांनीं अनेक प्रकारच्या (स्वर्गादि) लोकांची रचना केली व त्या लोकांपासून ही सर्व प्रजा उत्पन्न झाली. १०२. याप्रमाणें हें प्रत्यक्ष असलेलें विश्व खरोखर माझ्यापासूनच झालें नाहीं काय? परंतु हा सर्व माझाच विकार आहे, अशा दृष्टीनें जो पाहील, त्याला पटेल. १०३.

हा माझा विस्तार (विभूति) व (अभेद) योग जो पूर्णपणें जाणतो, तो माझ्या अखंड अशा महा-(अभेद) योगानें युक्त होतो, याविषयीं संदेह नाहीं.७.

अर्जुना, म्हणून वर सांगितलेले हे बुद्ध्यादिक विकार ह्या माझ्या विभूति आहेत, आणि ह्यांच्या योगानें हें सर्व जग व्यापून राहिलें आहे. १०४. म्हणून अर्जुना, या-प्रमाणें ब्रह्मदेवापासून प्रारंभ करून, शेवट मुंगीपर्यंत, माझ्यावांचून दुसरी गोष्टच नाहीं. १०५. याप्रमाणें जो खरोखर समजतो, त्याला ज्ञानाची जागृति झाली आहे, म्हणून त्याला चांगलें व साधारण या भेदाचें स्वप्न पडेल का? नाहीं. १०६. मी आणि माझ्या विभूति व विभूतींनीं व्यापलेले प्राणी, हे सर्व एकच आहेत, असें ऐक्याच्या प्रतीतीनें जो जाणतो; १०७. म्हणून अशा या संशयरहित महायोगानें (ऐक्य भावनेनें) जो मनाच्या द्वारानें माझ्याशीं एकरूप झाला, तो खरोखर कृतार्थ झाला आहे, यांत शंका घेण्याचें कारण नाहीं.१०८.

मी सर्वांचें आदिकारण आहे, माझ्यापासून सर्व विश्वाची प्रवृत्ति होते. हें ज्ञान होऊन, प्रेमानें युक्त असे ज्ञानी माझी भक्ति करतात. ८.

कारण कीं, अर्जुना, अशा अभेद दृष्टीनें जो मला भजतो, त्याच्या भजनाच्या ठिकाणीं माझा प्रवेश आहे.१०९.म्हणून अभेद असा हा जो भक्तियोग, याजबद्दल कांहींएक शंका नसून यास खंडही नाहीं. शिवाय याचें आचरण करीत असतां, यास जरी थोडा बहुत व्यत्यय आला, तथापि त्यापासून चांगलेंच फल प्राप्त होतें, हें तुला सहाव्या अध्या-यांत (चाळीसाव्या श्लोकांत) सांगितलेंच आहे. ११०. तेंच माझें ऐक्य कसें आहे, हें समजण्याबद्दल मनांत

परियेसा । बोलिजेल ॥ ११ ॥ तरि मीचि एक सर्वा । या जगा जन्म पांडवा । आणि मजचि- पासूनि आघवा । निर्वाहो यांचा ॥ १२ ॥ कल्लोळमाळा अनेगा । जन्म जळींचि पैं गा । आणि तयां जळचि आश्रयो तरंगा । जीवनही जळ ॥ १३ ॥ ऐसें आघवांचि ठायीं । तया जळचि जेविं पाहीं । तैसा मीवांचूनि नाहीं । विश्वीं इये ॥ १४ ॥ ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें । परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ॥ १५ ॥ देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न । जैसा वायु होऊनि गगन । गगनींचि विचरे ॥ १६ ॥ ऐसेनि जे निजज्ञानीं । खेळत सुखें त्रिभुवनीं । जगद्रूपा मनीं । सांठऊनि मातें ॥ १७ ॥ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत । हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥ १८ ॥

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥

चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले । जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ॥ १९ ॥ मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवादसुखाचीं भोजें । आतां एकमेकां घेपे दीजे । बोधाचि वरी ॥ १२० ॥ जैशीं जवळिकेंचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें । मग तरंगासि धवळारें । तरंगाचि होती ॥ २१ ॥ तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंद- कल्लोळांची वेणी । तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥ २२ ॥ जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें । नातरी सरिसेनि पाडें मीनले । दोनी वोघ ॥ २३ ॥ तैसें प्रयाग होत सामरस्याचें । वरी वोसाण तरत सात्त्विकाचें । ते संवादचतुष्पथींचे । गणेश जाहले ॥ २४ ॥ तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गांवाबाहेरें । मियां धाले तेणें उद्गारें । लागती गाजों ॥ २५ ॥ पैं गुरुशिष्यांचां एकांतीं । जे अक्षरा एकाचि वदंती । ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती सैंघ ॥ २६ ॥ जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे । दे राया रंका पारणें । आमोदाचें ॥ २७ ॥ तैसेंनि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजीं विरत । आंगें जीवें ॥ २८ ॥ ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें । नाहीं राती दिवो जाणणें । केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेयां जिहीं ॥ २९ ॥

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥

तयां मग जें आम्हीं कांहीं । द्यावें अर्जुना पाहीं । ते ठायींचीच तिहीं । घेतली सेल ॥ १३० ॥ कां जे ते जिया वाटा । निगाले गा सुभटा । ते सोय पाहोनि अव्हांटा । स्वर्गा- पवर्ग ॥ ३१ ॥ म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उपाइलें । परि आम्हीं देयावें हेंहि केलें । तिहींची म्हाणियें ॥ ३२ ॥ आतां यावरी येतुलें घडे । जें तेंचि सुख

ध्वनि (इच्छा) उत्पन्न होत असेल तर ऐक, तें मी सांगतों. १११. तरी अर्जुना, या सर्व जगाला मीच जन्म देणारा आहें आणि या सर्वांची स्थिति माझ्यापासूनच आहे. ११२. लाटांच्या अनेक परंपरेचा जन्म, अर्जुना, पाण्यांतच होतो व त्या लाटांना आश्रय पाणीच असतें व त्यांचे असणें पाण्यावरच अवलंबून आहे. ११३. याप्रमाणें पहा सर्व स्थितींत त्या लाटांना ज्याप्रमाणें एक पाणीच आहे, त्याप्रमाणें माझ्याशिवाय ह्या सर्व विश्वांत दुसरें असें कांहीं नाहीं. ११४. याप्रमाणें मी व्यापक आहें असें समजून, ते मला वाटेल तेथें भजतात. परंतु तें त्यांचें भजन खरोखरच्या प्रगट अशा प्रेमभावनेनें केलेलें असतें. ११५. (ते कसे भजतात तर) वारा जसा आकाशरूप होऊन आकाशांतच वागतो, तसे देशकाळ वर्तमान हे सर्व माझ्या स्वरूपाशीं एकरूप आहेत, असें समजून ते वागतात. ११६. अशा माझ्या ज्ञानानें युक्त असलेले जे आत्मज्ञानी आहेत, ते, मी जो जगद्रूप, त्या मला अंतःकरणांत सांठवून त्रैलोक्यांत सुखानें व्यवहार करीत असतात. ११७. जो जो प्राणी दिसेल, तो तो प्रत्यक्ष परमात्मा आहे असें समजावें, हा माझा भक्तियोग आहे, असें निश्चित समज. ११८.

माझ्या ठिकाणीं ज्यांचें चित्त आहे (म्हणून जे मद्रूप झाले) व माझ्या ठिकाणीं ज्यांचे प्राण आहेत (म्हणून माझ्याच योगानें जे तृप्त झाले आहेत) असे (ते ज्ञानी) परस्परांना (माझ्याविषयीं) ज्ञान देत आणि नित्य माझ्या (गुणांचें) वर्णन करीत समाधान पावतात व आनंदांत मग्न होतात. ९.

अंतःकरणानें ते माझेंच स्वरूप बनून त्यांचे प्राण माझ्याच स्वरूपानुभवानें तृप्त झालेले असतात; व अशा स्थितींत बोधाच्या गुंगीमुळें जन्ममरणाला विसरतात. ११९. मग त्या ज्ञानाच्या मदानें, प्रश्नउत्तररूप चर्चेच्या आनंदांत प्रेमानें नाचतात. आतां ते एकमेकांस ज्ञानच देतात व घेतात. १२०. ज्याप्रमाणें जवळ असणारीं दोन तळीं उसळलीं असतां, त्यांचें पाणी उसळून एकमेकांत मिसळतें, अशा स्थितींत लाटांना लाटांचीच घरें होतात. १२१. त्याप्रमाणें भक्तांना भक्त मिळाले असतां आनंदाच्या लाटांची वेणी गुंफली जाते, अशा स्थितींत बोध बोधानेंच बोधाचे अलंकार मिरवतो. १२२. ज्याप्रमाणें सूर्यानें सूर्याला ओंवाळावें, किंवा चंद्रानें चंद्राला आलिंगन द्यावें, अथवा सारख्या योग्यतेनें दोन प्रवाह एके ठिकाणीं येऊन मिळावेत, १२३. (प्रयागास जसा गंगा व यमुना यांचा संगम होतो.) तसा तेथें (म्हणजे भक्ताला भक्त जेव्हां भेटतात तेथें) ऐक्यरसाचा संगम होतो व त्या ऐक्यरसाचे पुरावर अष्टसात्त्विक भावाचें पुराड तरतें. ते भक्त संवादरूपी चव्हाट्यावरचे गणपति झाले. १२४. तेव्हां त्या ब्रह्मसुखाच्या उत्कर्षानें ते देहरूप गांवाबाहेर पळून येऊन (देहतादात्म्य टाकून), माझें सुख मिळाल्यामुळें प्राप्त झालेल्या तृप्तीच्या उद्गारानें गर्जना करावयास लागतात. १२५. गुरु व शिष्य, हे उपदेशाकरितां एकान्त स्थलीं जाऊन तेथें ज्या एक अक्षराचा (ॐ संज्ञक ब्रह्माचा) उपदेश करितात, तोच उपदेश, ते महात्मे मेघांच्या गडगडाटाप्रमाणें तिन्ही लोकांमध्यें जिकडेतिकडे गर्जना करून सांगतात. १२६. ज्याप्रमाणें पक्व दशेला आलेली (पूर्ण उमललेली) कमळाची कळी, ही आपल्या आंत असलेल्या सुवासास दाबून ठेवूं शकत नाहीं, तर ती राजास अथवा गरिबास सुवासाची मेजवानी देते. १२७. त्याप्रमाणेंच सर्व जगांत माझें वर्णन करीत असतात व त्या वर्णन करण्याच्या आनंदानें वर्णन करण्याचें विसरतात व त्या विसरामध्यें अंगानें व जीवानें विरतात. १२८. याप्रमाणें ज्यांनीं माझें पूर्ण सुख आपलेंसें करून घेतलें आहे, त्यांस अशा प्रेमाच्या उत्कर्षांत दिवस अथवा रात्र याचें भान नसतें. १२९.

याप्रमाणें (माझ्या ठिकाणीं) सतत युक्त असलेल्या व प्रीतिपूर्वक (माझी) भक्ति करणाऱ्या, त्यांना, मी अशा प्रकारची बुद्धि देतों कीं, जेणेंकरून ते मजसमीप येतील. १०.

अर्जुना, असें समज कीं, मग त्यांना आम्हीं जें कांहीं (निरतिशय प्रेम) द्यावयाचें, तो उत्तम भाग, ते आपल्या ठिकाणीं, आम्हीं देण्याच्या अगोदरच कमावून बसलेले असतात. १३०. कारण कीं, अर्जुना, ते ज्या वाटेनें निघाले, त्या मार्गाशीं स्वर्ग व मोक्ष यांची तुलना केली असतां, त्या आडवाटा आहेत, अशा वाटतात. १३१. म्हणून त्यांनीं जें प्रेम धरिलें, तेंच आमचें देणें, त्यांनीं आपल्या कमाईनें मिळविलें. (अशा रीतीनें) आमचें काम त्यांनींच केलें. पण तें आम्हीं दिलें, म्हणून त्यांनीं प्रसिद्ध केलें. १३२. आतां यानंतर इतकें घडून येईल कीं, तें प्रेमसुख अधिक वाढावें आणि त्यावर काळाची दृष्टि पडूं

आगळें वाढे । आणि काळाची दिठी न पडे । हें आम्हां करणें ॥ ३३ ॥ लळेयाचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी । जैसी खेळतां पाठोपाठीं । माउली धांवे ॥ ३४ ॥ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा करूनि ठेवी । तैसी उपास्तीची पदवी । पोषित मी जायें ॥ ३५ ॥ जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें । हे पाळती मज विशेखें । आवडे करूं ॥ ३६ ॥ पैं गा भक्तांसि माझें कोड । मज तयाचें अनन्यगतीची चाड । कां जे प्रेमळांचें सांकड । आमते घरीं ॥ ३७ ॥ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले । दोन्ही मार्ग तयांचिये वाहणी केले । आम्हीं आंगही शेषा वेंचिलें । लक्ष्मीयेसीं ॥ ३८ ॥ परि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमळांलागीं देख । ठेविलें जतन ॥ ३९ ॥ हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळ घेवों आपणपयासाठीं । या बोलीं बोलिजत गोष्टी । तैसिया नव्हती गा ॥ १४० ॥

तेषामेवाऽनुकंपार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मीवांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ॥ ४१ ॥ तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी पोतासाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ॥ ४२ ॥ अज्ञानाचिये राती- । माजीं तमाची मिळणी दाटती । ते नाशूनि घाली परौती । करीं नित्योदयो ॥ ४३ ॥ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें । तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों म्हणतसे ॥ ४४ ॥

अर्जुन उवाचः—परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥

अहो जी अवधारा । भला केरु फेडिला संसारा । जाहलों जननीजठरजोहरा- । वेगळा प्रभू ॥ ४५ ॥ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हाता चढलें । आवडतसें ॥ ४६ ॥ आजि आयुष्या उजवण जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि मुखें ॥ ४७ ॥ आतां येणें वचनतेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ॥ ४८ ॥ तरी होसी गा तूं परब्रह्म । जें या महाभूतां विसंवतें धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ॥४९॥ तूं परम दैवत तिहीं देवां । तूं पुरुष जी पंचविसावा । दिव्य तूं प्रकृतिभावा- । पैलीकडील ॥ १५० ॥ अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नाकळिजसी जन्मधर्मीं । तो तूं हें आम्हीं । जाणितलें आतां ॥५१॥ तूं या कालयंत्रासि सूत्री । तूं जीवकळेची अधिष्ठात्री । तूं ब्रह्मकटाहधात्री । हें कळलें फुडें ॥ ५२ ॥

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा । असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥

पैं आणिकही एके परी । इयेचि प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूंतें ॥ ५३ ॥ परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां देखतसे अंतःकरण । जे

नये, हें आमचें कर्तव्य आहे. १३३. अर्जुना, ज्याप्रमाणें आई ही, आपल्या प्रेमाच्या दृष्टीचें पांघरूण करून, आपल्या आवडत्या मुलाच्या मागें मागें तें मूल खेळत असतांना धांवते, १३४. तें बालक जो जो खेळ दाखवील, तो तो खेळ ती आई त्याच्यापुढें सोन्याचा करून ठेवते; त्याचप्रमाणें माझ्या भक्तांच्या उपासनेचा अधिकार मी वाढवीत जातों. १३५. उपासनेच्या ज्या स्थितीच्या पोषणानें अनायासानें ते भक्त मला प्राप्त होतील, अशा तऱ्हेनें पालन करणें मला विशेषतः आवडतें. १३६. अरे, भक्ताला माझें कौतुक असतें व त्याच्या एकनिष्ठेची मला इच्छा असते. कारण कीं, घरीं आम्हांला प्रेमळ भक्तांचा दुष्काळ आहे. १३७. अर्जुना, पहा, उपायांनीं प्राप्त करून घेण्याचे स्वर्ग व मोक्ष हे दोन रस्ते आम्हीं त्यांच्या ( स्वर्गेच्छु व मुमुक्षु यांच्या ) रहदारीस खुले केले. आम्ही शेषाला लक्ष्मीसह आमचें शरीर देखील विकून टाकलें. १३८. परंतु आपलेपणावांचून ( ज्यांत मीपणाचा लेश नाहीं, ) असें जें एक ताजें प्रेमसुख, तें तसेंच प्रेमळ भक्तांकरितां जतन करून ठेवलें आहे असें समज. १३९. अर्जुना, येथपर्यंत ( वर सांगितल्याप्रमाणें ) आम्ही आपलेपणा देऊन प्रेमळ भक्त घेतों; ह्या गोष्टी शब्दांनीं सांगाव्यात अशा प्रकारच्या नाहींत. १४०.

केवळ त्यांच्यावर अनुग्रह करण्याकरितां, त्यांच्या अंतःकरणांत राहून मी, प्रकाशमान अशा ज्ञानरूपी दीपानें ( त्यांच्या ठिकाणच्या ) अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या मोहरूपी अंधकाराचा नाश करतों. ११.

म्हणून मी जो आत्मा, त्याविषयींची अखंड प्रेमवृत्ति, ज्यांनीं आपल्या जगण्याला ठिकाण केलें आहे; ज्यांनीं एक माझ्यावांचून बाकीचें सर्व फलकट मानिलें आहे; १४१. अर्जुना, त्या शुद्धतत्त्वज्ञ प्रेमळ भक्तांच्यापुढें ( ज्ञानरूपी ) कापराची मशाल धरणारा मशालजी मीच होऊन, त्यांच्या पुढें पुढें चालतों. १४२. अज्ञानाच्या रात्रीमध्यें ( त्या भक्तांपुढें ) दाट काळोख येऊन मिळाला असतां, त्या अज्ञानरूपी रात्रीचा नाश करून तिला पलीकडे सारतो व ज्ञानाचा नित्य उदय करतो. १४३. याप्रमाणें प्रेमळ भक्तांना अतिशय प्रिय असणारा जो पुरुषोत्तम, तो जेव्हां बोलला, तेव्हां अर्जुन म्हणाला, " माझें मन शांत झालें. " १४४.

अर्जुन म्हणाला, तूं परब्रह्म, ( महाभूतांचें ) विश्रांतिस्थान, श्रेष्ठस्थान व अत्यंत पवित्र आहेस. अनादिसिद्ध व दिव्य असा पुरुष, सर्व देवांनाहि दैवत असलेला देव, जन्मरहित व सर्वव्यापी तूं आहेस. १२.

अहो महाराज, ऐका. ( माझा ) जन्ममरणरूप कचरा तुम्हीं चांगला नाहींसा केला; यामुळें देवा, मी आईच्या पोटांतील अग्निकुंडांपासून मुक्त झालों. १४५. महाराज, मी आपला जन्म हा आज डोळ्यांनीं पाहिला ( आत्मज्ञान होणें हा नवा जन्म आहे व तें मला आज झालें ) त्यामुळें माझें जीवित माझ्या हातीं आलें, असें मला वाटतें. १४६. आज माझ्या आयुष्याची सफलता झाली व माझ्या दैवाला चांगले दिवस उगवले. कारण कीं, देवाच्या मुखानें उपदेशरूपी कृपा प्राप्त झाली. १४७. आतां या तुझ्या वाक्यरूपी प्रकाशानें आंतील अंधार ( स्वतःला आत्मरूप न समजतां जीवस्वरूप समजणें, हें अज्ञान ) व बाहेरील अंधार ( प्रपंचाला ब्रह्मरूप न पाहतां प्रपंचरूप पहाणें, हें अज्ञान ) हें सर्व नाहींसें झालें. म्हणून तुझें स्वरूप खरोखर मी पहात आहे. १४८. अर्जुन म्हणाला, श्रीकृष्णा, या पंचमहाभूतांच्या विश्रांतीचें ठिकाण असलेलें जें सर्वांत श्रेष्ठ ब्रह्म, तें तूं आहेस. हे जगन्नाथा, तूं अतिशय पवित्र आहेस. १४९. देवा, तूं ब्रह्मादि तिन्ही देवांचें श्रेष्ठ असें आराध्य दैवत आहेस. तूं चोवीस तत्त्वांपलीकडील पंचविसावें तत्त्व आहेस. तूं अलौकिक तेजस्वी असून प्रकृतीनें उत्पन्न केलेल्या पदार्थांपलीकडील आहेस १५०. हे नाथ, तूं नित्यसिद्ध आहेस व जन्मादिक धर्मांचा अंमल तुझ्यावर चालत नाहीं, असा तूं आहेस, हें आम्हांला आतां समजलें १५१. तूं या काळरूपी यंत्राचा सूत्रधार आहेस; तूं जीवितास आश्रयस्थान आहेस. तूं ब्रह्मांडरूपी कढईला आधार आहेस, हें मला निश्चित समजलें. १५२.

( असें ) तुम्हांला सर्व ऋषि, देवर्षि नारद, तसेंच असित, देवल आणि व्यासही म्हणतात. तूं स्वतःदेखील मला असेंच सांगतोस. १३.

आणखीही एका प्रकारानें याच अनुभवाचा थोरपणा वाटतो. कारण कीं, मागें मोठमोठ्या ऋषींनीं याचप्रमाणें तुझें वर्णन केलें होतें. १५३. परंतु त्या सांगितलेल्याचा खरेपणा (माझ्या) मनाला हा आतां पटत आहे. कारण देवा,

कृपा केली आपण । म्हणोनि देवा ॥ ५४ ॥ एऱ्हवीं नारदु अखंड जवळां ये । तोही ऐसेंचि वचनें गाये । परि अर्थ न बुजोनि ठाये । गीतसुखाचि ऐकों ॥ ५५ ॥ हां गा आंधळ्यांचां गांवीं । आपणपें प्रगटले रवी । तरि तिहीं वोतपलीचि घ्यावी । वांचूनि प्रकाशु कैंचा ॥ ५६ ॥ येरवीं देवर्षिही अध्यात्म गातां । आहाच रागांगेंसीं जे मधुरता । तेचि फावे येर चित्ता । नलगेचि कांहीं ॥ ५७ ॥ पैं असितादेवलाचेनहि मुखें । मी एवंविधा तूंतें आइकें । परि तैं बुद्धि विषयविखें । घारिली होती ॥ ५८ ॥ विषयविषाचा पडिपाडू । गोड परमार्थु लागे कडू । कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ॥ ५९ ॥ आणि हें आणिकांचें काय सांगावें । राउळा आपणाचि येऊनि व्यासदेवें । तुझें स्वरूप आघवें । सर्वदा सांगिजे ॥ १६० ॥ परि तो अंधारीं चिंतामणि देखिला । जेवीं नव्हे या बुद्धी उपेक्षिला । पाठीं दिनोदयीं वोळखिला । होय म्हणोनि ॥ ६१ ॥ तैशी व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी । परि उपेक्षया जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ॥ ६२ ॥

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव । न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥

ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फाकले । आणि ऋषीं मार्ग होते जे कथिले । तयां आघवयांचेंचि फिटलें । अनोळखपण ॥ ६३ ॥ जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल । माझिये हृदयभूमिके पडिले सखोल । वरि इये कृपेची जाहाली वोल । म्हणोनि संवादफळेंशीं उठले ॥ ६३ ॥ अहो नारदादिकां संतां । त्यांचिया युक्तिरूप सरिता । मी महोदधि जालां अनंता । संवादसुखाचा ॥ ६५ ॥ प्रभु आघवेनि येणें जन्में । जियें पुण्यें केलीं मियां उत्तमें । तयांचीं न ठकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ॥ ६६ ॥ एऱ्हवीं वडिलवडिलांचेनि मुखें । मी सदां तूंतें कानीं आइकें । परि कृपा न किजेचि तुवां एकें । तंव नेणवेचि कांहीं ॥ ६७ ॥ म्हणोनि भाग्य जैं सानकूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ । तैसें श्रुताधीत सकळ । गुरुकृपा साच ॥ ६८ ॥ जी वनकरु झाडेंसी जीवेंसाटीं । पाडूनि जन्में काढी आटी । परि फळेंसीं तैंचि भेटी । जैं वसंतु पावे ॥ ६९ ॥ अहो विषमा जैं वोहट पडे । तैं मधुर तें मधुर आवडे । पैं रसायनें तैं गोडें । जेव्हां आरोग्य देहीं ॥ १७० ॥ कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तैंचि सार्थकपण । जैं चैतन्य येउनि आपण । संचरे माजीं ॥ ७१ ॥ तैसें शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें । तें तैंचि म्हणों ये आपुलें । जैं सानुकूल गुरु ॥ ७२ ॥ ऐसिये जालिये प्रतीतीचेनि माजें । अर्जुन निश्चयाचि नाचतुसे भोजें । तेवींचि म्हणे देवा तुझें । वाक्य मज मानलें ॥ ७३ ॥ तरि साचचि हें कैवल्यपती । मज त्रिशुद्धी आली प्रतीती । जे तूं देवदानवांचिये मती- । जोगा नव्हसी ॥ ७४ ॥ तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा । आपुलिया जाणे जाणिवा । तैसा कहींचि नाहीं हें सद्भावा । भरंवसेनि आलें ॥ ७५ ॥

आपण कृपा केली म्हणून हें होत आहे. १५४. एऱ्हवीं देवऋषि नारद आमच्याकडे नेहमीं येत असत; आणि ते देखील अशाच अर्थाचीं गाणीं गात असत; परंतु त्याचें मर्म आम्हांला समजत नव्हतें आणि आम्हीं गाण्याचाच आनंद अनुभवीत होतों. १५५. हे देवा, आंधळ्यांच्या गांवामध्यें सूर्य स्वतः प्रगट झाला, तर त्यांना त्याच्या उष्णतेचाच अनुभव येणार. त्याखेरीज सूर्याच्या प्रकाशाचा त्यांना अनुभव कोठचा? १५६. एऱ्हवीं नारदही अध्यात्मपर गाणें गात असतांना, त्यांच्या गाण्याच्या रागाच्या आश्रयानें असणारी वरवरची मधुरता, तीच काय ती आमच्या अनुभवाला येत होती. त्यावांचून चित्ताला त्या गाण्यापैकीं दुसरें कांहीं कळत नव्हतें. १५७. त्याचप्रमाणें असित व देवल या ऋषींच्या तोंडून-सुद्धां तुझें स्वरूप 'असें आहे' म्हणून तुझ्याविषयीं मीं ऐकिलें. परंतु त्या वेळेला माझी बुद्धि विषयरूप विषानें व्यापली होती. १५८. विषयरूप विषाचा एवढा मोठा पराक्रम आहे कीं, वस्तुतः गोड असलेला जो परमार्थ, तो त्या विषयांच्या योगानें कडू लागतो व स्वाभाविक कडू असलेले शब्दादिक विषय, ते प्राण्यांना चांगले वाटतात. १५९. आणखी दुसऱ्याचें हें कशाला सांगूं ! व्यास-देवांनीं आपण स्वतः आमच्या राजवाड्यांत येऊन नेहमीं तुझ्या संपूर्ण स्वरूपाचें वर्णन करावें. १६०. परंतु त्यांचा तो उपदेश, म्हणजे अंधारांत पडलेल्या चिंतामणीसारखा होय. परंतु तो चिंतामणी नसावा, अशा समजुतीनें जसें त्याविषयीं उदास रहावें व मागाहून दिवस उजाडल्या-वर हा चिंतामणीच आहे म्हणून ओळख पटावी. १६१. त्याप्रमाणें व्यासादिकांचीं भाषणें, मजपाशीं ज्ञान-रूपी रत्नांच्या खाणी होत्या. परंतु कृष्णा, तूं जो सूर्य, त्या तुझ्याशिवाय त्यांचा अनादर केला जात होता. १६२.

हे केशवा, हें जें मला तूं सांगतोस तें सर्व मी सत्य समजतों. हे भगवन्, देव अथवा दानव (यांपैकीं कोणीही) तुझें स्वरूप जाणत नाहींत. १४.

आतां तीं तुझीं वाक्यरूपी सूर्याचीं किरणें माझ्या हृदयावर येऊन पडलीं आणि मग पूर्वी ऋषींनीं जे उपाय सांगितले होते, त्या सर्वांचाच अपरिचितपणा नाहींसा झाला. १६३. महाराज, त्यांचें वाक्यरूपी ज्ञान-बीज माझ्या हृदयरूपी खोल जमिनींत पेरलें गेलें व त्या-वर या आपल्या कृपेचा ओलावा झाला, म्हणून त्यास (तुम्हां-आम्हांमधील) संवादरूपी फल प्राप्त झालें. १६४. अहो देवा, नारदादि संतांच्या युक्तिरूपी नद्यांस मी संवादरूपी सुखाचा समुद्र झालों. १६५. महाराज, या जन्मासह सर्व जन्मांत मीं जीं उत्तम पुण्यें केलीं, त्यांच्याकडे माझी कामगिरी राहिली नाहीं. कारण त्यांनीं (पुण्यांनीं) तुझ्यासारखा योग्य गुरु जोडून दिला. १६६. एऱ्हवीं मी वाडवडिलांच्या मुखानें तुझें वर्णन नेहमीं कानानें ऐकत होतों; पण तुम्हीं एकव्यानें कृपा केली नव्हती, तेथपर्यंत मला कांहींच कळलें नाहीं. १६७. म्हणून ज्या वेळेला दैव अतिशय अनुकूल असतें, त्या वेळेला हातांत घेतलेले सर्व उद्योग नेहमीं फलद्रुप होतात; त्याप्रमाणें गुरूची कृपा झाली असतां ऐकलेलें व पढलेलें सर्व ज्ञान आपलें काम करतें. १६८. महाराज, माळी झाडांविषयीं जिवापाड मेहनत करून जन्म काढतो; परंतु ज्या वेळेला वसंत ऋतु येतो, त्याच वेळेला फळांची भेट होते. १६९. महाराज, ज्या वेळेला विषमज्वराला उतार पडतो, त्या वेळेला गोड असलेले पदार्थ गोड लागूं लागतात व ज्या वेळेला देहांत आरोग्य येतें, त्याच वेळेला घेतलेलें भस्मादिक औषध चांगलें परिणाम-कारक आहे असें ठरतें. १७०. अथवा (ज्या वेळेला) जीव आपण होऊन शरीरांत स्वतः प्रवेश करील, त्याच वेळेला इंद्रियें, वाचा व प्राण हे सर्व असल्याचें सार्थक होणार आहे, १७१. त्याप्रमाणें अध्ययन केलेलीं सर्व शास्त्रें किंवा अभ्यास केलेलीं योगादिक साधनें, ज्या वेळेला गुरु अनुकूल होतील, त्याच वेळेला आपलीं आहेत असें म्हणतां येतें. १७२. असें हें भगवंताचें खरें स्वरूप कळल्याच्या अनुभवमदांत, निश्चयाच्या संतोषानें नाचत असतां, अर्जुन म्हणाला, देवा, आपलें बोलणें मला फारच पटलें. १७३. हे मोक्षाच्या मालका, श्रीकृष्णा, खरोखर हा अनुभव मला निश्चयानें आलेला आहे कीं, तूं देव अथवा दैत्य, यांच्या बुद्धींना आकळण्यासारखा नाहींस. १७४. देवा, तुझा उपदेश प्रगट होण्याच्या अगोदरच, आपल्या शहाणपणानेंच तुझें ज्ञान करून घेतों म्हणेल तर, तसा जीवबुद्धीच्या सामर्थ्यावर समजला जाणारा तूं केव्हांच नाहींस, हें (माझ्या मनाला) आतां खात्री-पूर्वक पटलें. १७५.

त्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम । भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

एथ आपुलें वाडपण जैसें । आपणचि जाणिजे आकाशें । कां मी येतुली घनवट ऐसें । पृथ्वीचि जाणे ॥ ७६ ॥ तैसा आपुलिये सर्वशक्ती । तुज तूंचि जाणू लक्ष्मीपती । येर वेदादिक मती । मिरवती वायां ॥७७॥ हां गा मनातें मागां सांडावें । पवनातें वावीं मवावें । आदिशून्य उतरोनि जावें । केउतें बाहीं ॥ ७८ ॥ तैसें हें तुझें जाणणें आहे । म्हणोनि कोणाही ठाकतें नोहे । आतां तुझें ज्ञान होये । तुजचिजोगें ॥ ७९ ॥ जी आपणपयातें तूंचि जाणसी । आणिकातें सांगावयाही तूं समर्थ होसी । तरि आतां एक वेळ धाम पुसीं । आर्तींचिये निडळींचा ॥ १८० ॥ हें आइकिलें कीं भूतभावना । त्रिभुवनगजपंचानना । सकलदेवदेवतार्चना । जगन्नायका ॥ ८१ ॥ जरी थोरी तुझी पाहत आहों । तरी पासीं उभे ठाकावयाही योग्य नोहों । या शोच्यता विनवूं बिहों । तरी आन उपायो नाहीं ॥८२॥ भरले सरिता समुद्र चहूंकडे । परि ते वापियासि कोरडे । कां जैं मेघौनि थेंबुटा पडे । तैं पाणी कीं तया ॥ ८३ ॥ तैसें गुरु जी सर्वत्र आथी । परि कृष्णा आम्हां तूंचि गती । हें असो मजप्रती । विभुती सांगें ॥ ८४ ॥

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः । याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

जी तुझिया विभूती आघविया । परि व्यापिती या शक्ती दिव्या जिया । तिया आपुलिया दावाविया । आपण मज ॥ ८५ ॥ जिहीं विभूतीं ययां समस्तां । लोकांतें व्यापूनि आहाती अनंता । तिया प्रधानौ नामांकिता । प्रगटा करीं ॥ ८६ ॥

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् । केषु केषु च भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥

जी कैसें मियां तूंतें जाणावें । काय जाणोनि सदा चिंतावें । जरी तूंचि म्हणों आघवें । तरि चिंतनचि न घडे ॥ ८७ ॥ म्हणोनि मागां भाव जैसे । आपुले सांगितले तुवां उद्देशें । आतां विस्तारानि तैसे । एक वेळ बोलें ॥ ८८ ॥ जयां जयां भावांचां ठायीं । तूंतें चिंतितां मज सायासु नाहीं । तो विवळ करूनि देईं । योगु आपुला ॥ ८९ ॥

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन । भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

आणि पुसलिया जिया विभूती । त्याही बोलाविया भूतपती । एथ म्हणसी जरी पुढतीं । काय सांगों ॥ १९० ॥ तरी हा भाव मना । झणें जाय हो जनार्दना । पैं प्राकृताही अमृतपाना । ना न म्हणवे जी ॥ ९१ ॥ जें काळकूटाचें सहोदर । जें मृत्युभेणें प्याले अमर । तरि दिहाचे पुरंदर । चौदा जाती ॥ ९२ ॥ ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रसु । जया वायांचि अमृतपणाचा आभासु । तयाचाही मिठांशु । जे पुरे म्हणों नेदी ॥ ९३ ॥ तया पावळेयाही येतुलेवरी ।

हे भूतभावना, भूतनाथा, देवाधिदेवा, जगत्पालका, हे पुरुषोत्तमा, तूं स्वतःच यथार्थस्वरूपानें स्वतःला जाणतोस. १५.

ज्याप्रमाणें आपला विस्तार किती आहे हें आकाशाचें आकाशालाच माहीत; अथवा मी इतकी भरीव आहें, हें प्रमाण पृथ्वीचें पृथ्वीलाच माहीत. १७६. त्याप्रमाणें आपल्या सर्व सामर्थ्यानें, हे लक्ष्मीपति देवा, तुला तूंच जाणणारा आहेस. बाकी वेदादिक जे इतर आहेत, त्यांच्या मति ( आम्ही देवाच्या स्वरूपाला जाणतों ) अशी व्यर्थ बढाई मारतात. १७७. अहो, सर्वांत चपल असलेल्या मनालाही (शर्यतींत) कसें मागें टाकतां येईल? वारा हातानें कसा मोजतां येईल? मायेंतून आपल्या बाहूंच्या जोरावर कसें पार पाडतां येईल? १७८. ( हें जसें असंभाव्य, ) त्याप्रमाणें तुझें ज्ञान करून घेण्याचीही गोष्ट असंभवनीय आहे आणि म्हणूनच तुझें ज्ञान कोणालाही होत नाहीं; एवढ्याकरितां तुझ्या स्वरूपाचें ज्ञान करून घेण्याचें काम तुझ्याच फक्त योग्यतेचें आहे. १७९. अरे देवा, तूं आपल्या स्वरूपाला तूंच जाणतोस; आणि तें ज्ञान दुसऱ्यास सांगण्यास देखील तूंच समर्थ आहेस. तर आतां एक वेळ माझ्या इच्छारूपी कपाळावरचा घाम पुसून टाक. १८०. हे प्राणिमात्राची उत्पत्ति करणाऱ्या, त्रिभुवनरूपी हत्तीचा नाश करणाऱ्या सिंहा, अहो सर्व देव व देवता यांना पूज्य असणाऱ्या, हे जगाच्या स्वामी, श्रीकृष्णा, हें ऐकलें का? १८१. जर तुझ्या स्वरूपाची थोरवी पाहिली तर, आम्ही तुझ्याजवळ उभे राहाण्याला देखील योग्य नाहीं; या गोष्टीमुळें वाईट वाटून ( जर ) आम्ही तुझी विनंती करण्यास भ्यालों, तर तुझें स्वरूप जाणण्यास तुला विचारण्यावांचून दुसरा उपाय नाहीं. १८२. जिकडे तिकडे सर्व बाजूंना नद्या व समुद्र तुडुंब भरलेले आहेत. परंतु ते इतके भरलेले असूनही चातकाला कोरडे ठणठणीत असल्यासारखे आहेत. कारण, ज्या वेळेला खास मेघांतून थेंब पडतील, त्या वेळेलाच त्याला पाणी मिळणार. १८३. त्याप्रमाणें देवा, गुरु घरोघर आहेत, परंतु कृष्णा, आम्हाला तूंच आश्रयाचें ठिकाण आहेस. हें राहूं दे, मला विभूती सांग. १८४.

ज्या विभूतींनीं या सर्व लोकांना व्यापून तूं आहेस; त्या आपल्या दिव्य विभूति पूर्णत्वानें तूं मला सांग. १६.

महाराज, सर्व विभूती आपल्याच आहेत. परंतु दिव्य शक्तीनें व्याप्त असलेल्या अशा ज्या आपल्या विभूती आहेत त्या आपण मला दाखवाव्यात. १८५. कृष्णा, ज्या विभूतींनीं सर्व लोकांस व्यापून टाकलेलें आहे, त्या मुख्य मुख्य व नामांकित विभूती सांगाव्या. १८६.

हे योगिन्, सर्वदा तुझें चिंतन करण्याची इच्छा करणारा जो मी त्या मीं तुला कसें जाणावें? हे भगवन्, कोणकोणत्या भावांमध्यें ( विभूतीमध्यें ) मी तुझें चिंतन करणें शक्य आहे? १७.

कृष्णा, तुला मी जाणावें कसें? व काय जाणून नेहमीं चिंतन करावें? कारण तूंच सर्व आहेस, असें जर म्हटलें, तर चिंतनच घडणार नाहीं. १८७. म्हणून मागें ( सातव्या व नवव्या अध्यायांत व या अध्यायाच्या आरंभीं ) ज्या आपल्या विभूती तूं थोडक्यांत सांगितल्यास, त्याच आतां एक वेळ विस्तारानें सांग. १८८. ज्या ज्या विभूतींच्या ठिकाणीं तुझें स्मरण होण्याला मला अडचण पडणार नाहीं, तो आपला विभूतीयोग तूं मला स्पष्ट करून दे. १८९.

जनार्दना, आपला योग आणि विस्तार ( विभूति ) पुन्हा विस्तारानें मला कथन कर. कारण ( तो ) ऐकणाऱ्याची माझी ( एकदां ऐकून ) तृप्ति होत नाहीं. तें मला ( केवळ ) अमृत आहे. १८.

आणि ज्या विभूति मी विचारल्या त्यादेखील हे जगन्नाथा, मला सांगाव्यात. या प्रसंगीं वारंवार काय सांगावयाचें आहे? असें जर म्हणशील, १९०. कृष्णा, तर अशी कल्पना कदाचित तुझ्या मनांत येईल, पण ती येऊं देऊं नकोस. अहो महाराज, सामान्य असलेलें अमृतही प्यावयास लागलें असतां नको म्हणवत नाहीं. १९१. जें ( अमृत ) कालकूट विषाचें सख्खें भावंड आहे व जें ( अमृत ) मृत्यूच्या भीतीनें देव प्याले, तरी सुद्धां ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र होऊन जातात; १९२. असा कोणी एक क्षीरसमुद्रांतील पातळ पदार्थ, ज्याला व्यर्थच अमृतपणाचा आळ आला आहे, त्याची गोडीदेखील सेवन करणाराला आतां ' हें पुरें ' असें म्हणूं देत नाहीं. १९३. इतक्या हलक्या दर्जाच्या असलेल्या त्या

गोडियेची आथि थोरी । मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें ॥ ९४ ॥ जें मंदराचळु न ढाळितां । क्षीरसागरु न डहुळितां । अनादि स्वभावता । आइतें आहे ॥ ९५ ॥ जें द्रव ना नव्हे बद्ध । जेथ नेणिजती रस गंध । जें भलतयांही सिद्ध । आठवलेंचि फावे ॥९६॥ जयाची गोठीचि ऐकतखेंवो । आघवा संसारु होय वावो । बळिया नित्यता लागे येवों । आपणपेयां ॥ ९७ ॥ जन्ममृत्यूची भाख । हारपोनि जाय निःशेख । आंत बाहेरी महासुख । वाढोंचि लागे ॥ ९८ ॥ मग दैवगत्या जरी सेविजे । तरी तें आपणचि होऊनि ठाकिजे । तें तुज देतां चित्त माझें । पुरें म्हणों न शके ॥ ९९ ॥ तंव तुझें नामाचि जी आम्हां आवडे । वरि भेटी होय आणि जवळिक जोडे । पाठीं गोठी सांगसी सुरवाडें । आनंदाचेनि ॥ २०० ॥ आतां हें सुख कायिस-यासारिखें । कांहीं निर्वचेना मज परितोखें । तरि येतुलें जाणें जें येणें सुखें । पुनरुक्तही हो ॥ १ ॥ हां गा सूर्य काय शिळा । अग्नि म्हणों येत आहे वोंविळा । कां नित्य वाहातया गंगाजळा । पारसेपण असे ॥ २ ॥ तुवां स्वमुखें जें बोलिलें । हें आम्हीं नादासि रूप देखिलें । आजि चंदनतरूचीं फुलें । तुरंबीत आहों मां ॥ ३ ॥ या पार्थाचिया बोला । सर्वांगें कृष्ण डोलला । म्हणे भक्तिज्ञानासि जाहला । आगरु हा ॥ ४ ॥ ऐसा पतिकराचिया तोषाआंतु । प्रेमाचा वेग उचंबळतु । तो सायासें सांवरूनि अनंतु । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवानुवाच—हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः । प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

मी पितामहाचा पिता । हें आठवितांही नाठवे चित्ता । कीं म्हणतसे बा पांडुसुता । भलें केलें ॥ ६ ॥ अर्जुनातें बा म्हणे एथ कांहीं । आम्हां विस्मो करावया कारण नाहीं । अंगें तो लेंकरूं काई । नव्हेचि नंदाचें ॥ ७ ॥ परि प्रस्तुत ऐसें असो । हें करवी आवडीचा अतिसो । मग म्हणे आइकें सांगतसों । धनुर्धरा ॥ ८ ॥ तरि तुवां पुसलिया विभूती । तयांचें अपारपण सुभद्रापती । ज्या माझियाचि परि माझिये मती । आकळती ना ॥ ९ ॥ अंगींचिया रोमा किती । जयाचिया तयासि न गणवती । तैसिया माझिया विभूती । असंख्य मज ॥ २१० ॥ एऱ्हवीं तरी मी कैसा केवढा । म्हणोनि आपणपयाही नव्हेचि फुडा । यालागीं प्रधाना जिया रूढा । तिया विभूती आइकें ॥ ११ ॥ जिया जाणितलियासाठीं । आघवीया जाणितलिया होती किरीटी । जैसें बीज आलिया मुठीं । तरूचि आला होय ॥ १२ ॥ कां उद्यान हाता चढिलें । तरी आपैसीं सांपडलीं फळें फुलें । तेवीं देखिलिया जिया देखवलें । विश्व सकळ ॥ १३ ॥ एऱ्हवीं साचचि गा धनुर्धरा । नाहीं शेवटु माझिया विस्तारा । पैं गगना ऐशिया अपारा । मजमाजीं लपणें ॥ १४ ॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः । अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥

आइकें कुटिलालकमस्तका । धनुर्वेदत्र्यंबका । मी आत्मा असें एकैका । भूतमात्राचां ठायीं ॥ १५ ॥ आंतुलीकडे मीचि यांचे अंतःकरणीं । भूतांबाहेरी माझीच गंवसणी । आदि

अमृताला त्याच्या गोडीनें जर एवढें महत्त्व आलें आहे. मग पहा, हें तर खरोखर परमामृत आहे. १९४. परमामृत प्राकृत अमृताप्रमाणें मंदर नांवाच्या पर्वताला न हालवितां व क्षीरसमुद्राचें मंथन न करतां स्वभावतःच मूळचें नित्यसिद्ध आहे १९५. जें परमामृत पातळ नाहीं व घट्टही नाहीं, ज्या परमामृतामध्यें रस ( गोडी ) व गंध ( वास ) हीं माहीत पडत नाहींत, जें परमामृत नित्यप्राप्त असल्यामुळें स्मरण केल्याबरोबर वाटेल त्याला मिळतें. ( अनुभवाला येतें. ) १९६. ज्याची नुसती गोष्ट ऐकल्याबरोबर सर्व संसाराचा निरास होतो व कधीं न ढळणारी अशी नित्यता आपणास प्राप्त होते; १९७. ज्या परमामृताची ( बोधामृताची ) गोष्ट ऐकल्याबरोबर जन्ममृत्यूची भाषा समूळ नाहींशी होते आणि अंतर्बाह्य ब्रह्मसुखच वाढावयास लागतें. १९८. मग दैवयोगानें तें सेवन करण्याचा योग आला तर, सेवन करणारा आपण स्वतः परमामृत होऊन राहतो. असें जें परमामृत, तें तूं मला देत असतांना, माझें चित्त ' पुरे ' असें म्हणूं शकत नाहीं. १९९. महाराज, आधीं आपलें नांवच आम्हांस आवडतें. शिवाय आपली भेट होत असून आपलें सान्निध्य प्राप्त झालेलें आहे. तशांत आनंदाच्या भरानें आपण बोधाच्या गोष्टीही सांगत आहांत. २००. आतां हें सुख कशासारखें आहे म्हणून म्हणावें ! तर मला झालेल्या आनंदानें याजबद्दल कांहींच बोलवत नाहीं. तथापि मी इतकें मात्र समजतों कीं, आपणांस विचारलेल्या गोष्टींची पुनरुक्तीही झाली तरी हरकत नाहीं ( पण ती पुनः तुम्ही सांगा. ) २०१. अहो, रोज उगवतो म्हणून सूर्याला शिळा म्हणतां येईल काय ? ( अग्नीनें स्नान केलें नाहीं, म्हणून ) अग्नीला ओंवळा म्हणतां येईल काय ? अथवा नेहमीं वाहणाऱ्या गंगेच्या पाण्याला पारोसेपणा येतो काय ? २०२. तुम्हीं आपल्या मुखानें जें बोललांत, तें आम्हीं मूर्तिमंत नादब्रह्मच पाहिलें. तुमच्या मुखानें बोधाच्या गोष्टी ऐकणें, म्हणजे आज साक्षात चंदनाच्या झाडाच्या फुलांचा वास घेत आहों ना ? २०३. अर्जुनाच्या या बोलण्यानें कृष्ण सर्व अंगानें डोलला व म्हणाला, हा अर्जुन, भक्ति व ज्ञान यांचें ( चांगलें ) शेत झाला आहे. २०४. याप्रमाणें आपल्याला प्रिय असलेल्याच्या आनंदांत प्रेमाचा भर उसळत असतांना तो कष्टानें आंवरून धरून श्रीकृष्ण काय म्हणाले ( तें ऐका. ) २०५.



श्रीकृष्ण म्हणाले बरें तर बाबा, माझ्या ज्या दिव्य विभूती आहेत त्यांपैकीं मुख्य मुख्य तुला सांगतों. कारण हे कुरुश्रेष्ठा, माझ्या ( विभूतींच्या ) विस्ताराला अन्त नाहीं. १९.

मी ब्रह्मदेवाचा बाप आहे, हें ( श्रीकृष्णांस ) माहीत असूनही त्याची आठवण त्यांच्या चित्ताला होईना व ते अर्जुनाला म्हणाले, बाबा अर्जुना, ठीक केलें. २०६. (ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.) कृष्ण त्या प्रसंगीं अर्जुनाला 'बाबा' असें म्हणाले, यांत आम्हाला कांहीं आश्चर्य करावयाचें कारण नाहीं. ( हें पहा ) तो स्वतः नंदाचें मूल झाला नाहीं काय ? २०७. परंतु सांप्रत हें राहूं द्या. प्रेमाचा अतिरेक असल्या गोष्टी घडवून आणतो. मग श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, आम्ही सांगत आहोंत, तूं ऐक. २०८. अर्जुना, तूं माझ्या विभूति विचारल्यास त्या इतक्या असंख्य आहेत कीं, त्या जरी माझ्या आहेत, तरी पण त्या माझ्या बुद्धीच्या आटोक्यांत येत नाहींत. २०९. आपल्या अंगावर किती केस आहेत, हें ज्याचें त्याला मोजतां येत नाहींत, त्याचप्रमाणें माझ्याच विभूति असून त्यांची गणना मला होत नाहीं. २१०. खरोखर मी कसा व केवढा आहे, हें माझें मला देखील पक्कें ठाऊक नाहीं; म्हणून ज्या मुख्य नामांकित विभूती आहेत, त्या ऐक. २११. अर्जुना, ज्या विभूति समजल्या असतां बाकीच्या सर्व जाणल्यासारख्या होतील; ज्याप्रमाणें बीं हातांत आलें असतां, झाडच ताब्यांत आल्याप्रमाणें होतें; २१२. किंवा बगीचा ताब्यांत आला असतां, फळांची व फुलांची प्राप्ति सहजच होते, त्याप्रमाणें त्या विभूतींचा विचार केला असतां, सर्व विश्व विचारांत घेतल्याचें श्रेय येतें. २१३. एऱ्हवीं अर्जुना, खरोखरच माझ्या व्याप्तीचा अंत नाहीं. आकाशासारख्या अमर्याद विस्ताराच्या पदार्थालाही माझ्यांत लपून बसतां येतें. २१४.

हे अर्जुना, मी सर्व भूतांच्या अंतःकरणामध्यें असलेला आत्मा आहें. मीच (सर्व) भूतांचा आदि, मध्य व अन्तही आहें २०.

मस्तकावर कुरळे केस शोभणाऱ्या व धनुर्विद्येंत शंकरासारख्या निष्णात असणाऱ्या अर्जुना, ऐक, प्रत्येक प्राणिमात्राचे ठिकाणीं जो आत्मा आहे, तो मी आहें. २१५. आंतल्या बाजूनें मीच यांच्या अंतकरणांत आहें. भूतांच्या बाहेरही माझेंच आवरण आहे. प्रारंभीं व शेवटीं

मी निर्वाणीं । मध्यही मीचि ॥ १६ ॥ जैसें मेघां या तळीं वरी । एक आकाशचि आंत बाहेरी । आणि आकाशींचि जाले अवधारीं । असणेंही आकाशीं ॥ १७ ॥ पाठीं लया जे वेळीं जाती । ते वेळीं आकाशचि होऊनि ठाती । तेवीं आदि स्थिती अंतगती । भूतांसि मी ॥ १८ ॥ ऐसें बहुवस आणि व्यापकपण । माझें विभूतियोगें जाण । तरी जीवचि करूनि श्रवण । आइकोनि आइक ॥ १९ ॥ याहीवरी त्या विभूती । सांगणें ठेलें तुजप्रति । सांगेन म्हणितलें तुज प्रीती । त्या प्रधाना आइकें ॥ २२० ॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् । मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

हें बोलोनि तो कृपावंतु । म्हणे विष्णु मी आदित्यांआंतु । रवी मी रश्मिवंतु । सुप्रभांमाजीं ॥ २१ ॥ मरुद्गणांच्या वर्गीं । मरीचि म्हणे मी शार्ङ्गी । चंद्र मी गगनरंगीं । तारांमाजीं ॥ २२ ॥

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः । इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

वेदांआंतु सामवेदु । तो मी म्हणे गोविंदु । देवांमाजीं मरुद्बंधु । महेंद्र तो मी ॥ २३ ॥ इंद्रियांआंतु अकरावें । मन तें मी हें जाणावें । भूतांमाजीं स्वभावें । चेतना ते मी ॥ २४ ॥

रुद्राणां शंकरश्चाऽस्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् । वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥

अशेषांही रुद्रांमाझारीं । शंकर जो मदनारी । तो मी येथ न धरीं । भ्रांति कांहीं ॥ २५ ॥ यक्षरक्षोगणांआंतु । शंभूचा सखा जो धनवंतु । तो कुबेरु मी हें अनंतु । म्हणता जाहला ॥ २६ ॥ मग आठांही वसूंमाझारीं । पावकु तो मी अवधारीं । शिखराथिलियां सर्वोपरी । मेरु तो मी ॥ २७ ॥

पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् । सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मिसागरः ॥ २४ ॥

जो स्वर्गसिंहासना सावावो । सर्वज्ञते आदीचा ठावो । तो पुरोहितांमाजीं रावो । बृहस्पती मी ॥ २८ ॥ त्रिभुवनींचिया सेनापतीं– । आंत स्कंदु तो मी महामती । जो हरवीर्यें अग्निसंगती । कृत्तिकाआंतु जाहला ॥ २९ ॥ सकळिकां सरोवरांसी । माझारि समुद्र तो मी जळराशी । महर्षीं- आंतु तपोराशी । भृगु तो मी ॥ २३० ॥

महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् । यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

अशेषांही वाचा – । आंतु नडनाच सत्याचा । तें अक्षर एक मी वैकुंठींचा । वेल्हाळ म्हणे ॥ ३१ ॥ समस्तांही यज्ञांचां पैकीं । जपयज्ञु तो मी ये लोकीं । जो कर्मत्यागें प्रणवादिकीं । निफजविजे ॥ ३२ ॥ नामजपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थें ॥ ३३ ॥ स्थावरां गिरीवरां आंतु । पुण्यपुंज जो हिमवंतु । तो मी म्हणे कांतु । लक्ष्मीयेचा ॥ ३४ ॥

मी आहें आणि मध्यंतरी देखील मीच आहें. २१६. ज्याप्रमाणें या मेघांना खालीं वर, आंत बाहेर सर्वत्र एक आकाशच आहे आणि ऐक. ते मेघ आकाशांतच उत्पन्न झालेले आहेत आणि ते राहातातही आकाशांतच. २१७. शेवटीं ज्या वेळेला त्यांचा लय होतो, त्या वेळेला ते आकाशरूपच होऊन रहातात. त्याप्रमाणें प्राण्यांच्या उत्पत्तीला, राहाण्याला आणि मरण्याला मीच आश्रय आहें. २१८. असें हें माझें अनेकत्व व व्यापकत्व तूं विभूतियोगानें जाण. तर आतां जीवच ( अंतःकरण ) कानरूप करून ऐकलेलेंच ऐक. २१९. माझें व्यापक स्वरूप सांगितल्यावरही तुला माझ्या विभूति कांहीं निराळ्या सांगावयाच्या राहिल्या आहेत काय ? ( तर नाहींत. ) परंतु तुला प्रेमानें सांगतों म्हणून म्हटलें, तर आतां तुला मुख्य मुख्य विभूति सांगतों, त्या ऐक. २२०.

बारा आदित्यांमध्यें विष्णु मी आहें, प्रकाशमान पदार्थांमध्यें किरणवान रवि मी आहें, मरुद्गणांपैकीं मरीची मी आहें, नक्षत्रांमध्यें चंद्र मी आहें. २१.

हें बोलून तो कृपाळू श्रीकृष्ण म्हणाला, आदित्य नांवाच्या बारा देवतांत विष्णु नांवाची देवता माझी विभूती आहे व चांगल्या तेजस्वी पदार्थांमध्यें किरणें असलेला सूर्य माझी विभूति आहे. २२१. मरुद्गणाच्या ( एकूणपन्नास ) प्रकारांत मरीची ही माझी विभूति आहे असें शारङ्गधर श्रीकृष्ण म्हणाले व आकाशरूपी रंगणांत, नक्षत्रामध्यें चंद्र ही माझी विभूति आहे. २२२.

वेदांमध्यें सामवेद मी आहे, देवांमध्यें इंद्र मी आहें, इंद्रियांमध्यें मन मी आहें. भूतांच्या ठिकाणीं चेतना मी आहें. २२.

ऋग्वेदादि चार वेदांमध्यें सामवेद हा माझी विभूति आहे, असें गोविंद म्हणाला व देवांमध्यें मरुद्गणाचा भाऊ महेन्द्र, तो मी आहें. २२३. इंद्रियांमध्यें अकरावें असणारें जें मन, ही माझी विभूति आहे, असें समज व सर्व प्राण्यांमध्यें स्वाभाविक असलेली जी चेतना ( बुद्धिवृत्ति ) ती माझी विभूति आहे. २२४.

( अकरा ) रुद्रांमध्यें शंकर मी आहें, यक्ष-राक्षसांमध्यें कुबेर मी आहें, ( अष्ट ) वसूंमध्यें अग्नि मी आहें, पर्वतांमध्यें मेरु मी आहें. २३.

सगळ्या रुद्रांमध्यें कामाचा शत्रू जो शंकर, ती माझी विभूति आहे, याविषयीं कांहीं शंका ठेवूं नकोस. २२५. यक्षराक्षसांच्या समुदायामध्यें शंकराचा परम मित्र असलेला जो कुबेर, ती माझी विभूति आहे, असें श्रीकृष्ण म्हणाला. २२६. मग आठ वसूंमध्यें जो अग्नि ती माझी विभूति आहे, असें समज. मोठालीं शिखरें असलेल्या पर्वतांत सर्वांपेक्षां उंच असणारा जो मेरु पर्वत ती माझी विभूति आहे. २२७.

हे पार्था, पुरोहितांमध्यें मुख्य जो बृहस्पति, तो मी आहें असें जाण. सेनानायकांमध्यें कार्तिकेय मी आहें, जलाशयांमध्यें सागर मी आहें. २४.

जो स्वर्गाच्या राज्याला साह्य आहे आणि जो सर्वज्ञते-मध्यें अग्रगण्य आहे, असा जो कुलोपाध्यायांमध्यें श्रेष्ठ असलेला बृहस्पति, ती माझी विभूति आहे. २२८. हे बुद्धिमान अर्जुना, शंकराच्या वीर्यापासून अग्नीच्या संगतीनें कृत्तिकांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला जो कार्तिकस्वामी तो त्रिभुवनांतील सेनापतींमध्यें माझी विभूति आहे. २२९. सर्व जलाशयांमध्यें पाण्याचा मोठा सांठा जो समुद्र, ती माझी विभूति आहे आणि महर्षींमध्यें तपाचा राशि जो भृगु, ती माझी विभूति आहे. २३०.

महर्षींमध्यें भृगु मी आहें, ( चतुर्विध ) वाणींमध्यें एकाक्षर ( ॐ ) मी आहें, यज्ञांमध्यें जपयज्ञ मी आहें. स्थावर पदार्थांमध्यें हिमालय मी आहें. २५.

सर्व बोलण्यामध्यें ज्या अक्षरांत सत्याचा उत्कर्ष असतो, तें एक अक्षर ( ॐ ) मी आहें, असें वैकुंठ-प्रिय श्रीकृष्ण म्हणाला. २३१. या मृत्युलोकामध्यें कर्मांच्या त्यागांत ओंकारादिकांच्या योगानें ज्यास उत्पन्न करतात, तो जपरूपयज्ञ, सर्व यज्ञांमध्यें माझी विभूति आहे. २३२. नामजपयज्ञ हा श्रेष्ठ आहे. यास स्नानादि कर्में बाधूं शकत नाहींत. ( स्नानादि कर्मांवांचून नाम घेतलें तरी चालतें. ) नामानें धर्म व अधर्म पवित्र होतात आणि वेदाच्या अर्थानें नाम हें परब्रह्म आहे. २३३. अचल असलेल्या मोठ्या पर्वतांत पुण्याचा केवळ राशि जो हिमालय, ती माझी विभूति असें लक्ष्मीचे पति म्हणाले. २३४.

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः । गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥

कल्पद्रुम हन पारिजातु । गुणें चंदनुही वाड विख्यातु । तरि यया वृक्षजातां आंतु । अश्वत्थु तो मी ॥ ३५ ॥ देवऋषीं आंतु पांडवा । नारदु तो मी जाणावा । चित्ररथु मी गंधर्वा । सकाळिकांमाजीं ॥ ३६ ॥ ययां अशेषांही सिद्धां- । माजीं कपिलाचार्यु मी प्रबुद्धा । तुरंगजातां प्रसिद्धां- । आंत उच्चैःश्रवा मी ॥ ३७ ॥

उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् । ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥

राजभूषण गजांआंतु । अर्जुना मी गा ऐरावतु । पयोराशी सुरमाथितु । अमृतांशु तो मी ॥ ३८ ॥ ययां नरांमाजीं राजा । तो विभूतिविशेष माझा । जयातें सकळ लोक प्रजा । होऊनि सेविती ॥ ३९ ॥

आयुधानामहं वज्रं धेनुनामस्मि कामधुक् । प्रजनश्चाऽस्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥

पैं आघवेयां हातियेरां- । आंत वज्र तें मी धनुर्धरा । जें शतमखोचीर्णकरा । आरूढोनि असे ॥ २४० ॥ धेनूंमध्यें कामधेनु । ते मी म्हणे विष्वक्सेनु । जन्मावितयांआंत मदनु । तो मी जाणें ॥ ४१ ॥ सर्पकुळाआंतु अधिष्ठाता । वासुकी गा मी कुंतीसुता । नागांमाजीं समस्तां । अनंतु तो मी ॥ ४२ ॥

अनंतश्चाऽस्मि नागानां वरुणो यादसामहम् । पितृणामर्यमाचाऽस्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

अगा यादसांआंतु । जो पश्चिमप्रमदेचा कांतु । तो वरुण मी हें अनंतु । सांगत असे ॥ ४३ ॥ आणि पितृगणां समस्तां- । माजीं अर्यमा जो पितृदेवता । तो मी हें तत्त्वतां । बोलत आहें ॥ ४४ ॥ जगाचीं शुभाशुभें लिहिती । प्राणियांचया मानसांचा झाडा घेती । मग केलिया- नुरूप होती । भोगनियम जे ॥ ४५ ॥ तयां नियमितयांमाजीं यमु । जो कर्मसाक्षी धर्मु । तो मी म्हणे रामु । रमापती ॥ ४६ ॥

प्रल्हादश्चाऽस्मि दैत्यानां कालः कलयतामहम् । मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥

अगा दैत्यांचियां कुळीं । प्रल्हादु तो मी न्याहाळीं । म्हणोनि दैत्यभावादिमेळीं । लिंपेचिना ॥ ४७ ॥ पैं कळितयांमाजीं महाकाळु । तो मी म्हणे गोपाळु । श्वापदांआंतु शार्दूळु । तो मी जाण ॥ ४८ ॥ पक्षिजातीमाझारीं । गरुड तो मी अवधारीं । यालागीं जो पाठीवरी । वाहों शके मातें ॥ ४९ ॥

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् । झषाणां मकरश्चाऽस्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥

पृथ्वीचिया पैसारा- । माजीं घडी न लगतां धनुर्धरा । एकेचि उड्डाणें सातांहि सागरां । प्रदक्षिणा करी जो ॥ २५० ॥ तयां वहिलियां गतिमंतां- । आंत पवनु तो मी पांडुसुता । शस्त्रधरां समस्तां- । माजीं श्रीराम तो मी ॥ ५१ ॥ जेणें सांकडलिया धर्माचेनि कैवारें । आपणपयां धनुष्य करूनि दुसरें । विजयलक्ष्मीये एक मोहरें । केलें त्रेतीं ॥ ५२ ॥ पाठीं उभें

सर्व वृक्षांमध्यें पिंपळ वृक्ष, देवर्षींमध्यें नारद, गंधर्वांमध्यें चित्ररथ, सिद्धांमध्यें कपिल महामुनि मी आहें. २६.

कल्पवृक्ष, पारिजातक वृक्ष आणि गुणांनीं अतिशय प्रसिद्ध असलेला चंदन, हे जरी श्रेष्ठ वृक्ष आहेत, तरी या सर्व वृक्षांमध्यें जो पिंपळ, ती माझी विभूति आहे. २३५. अर्जुना, देवऋषींमध्यें जो नारद, ती माझी विभूति आहे, असें समज आणि सर्व गंधर्वांमध्यें चित्ररथ नांवाचा गंधर्व माझी विभूति आहे. २३६. हे बुद्धिमान अर्जुना, या संपूर्णही सिद्धांमध्यें कपिलाचार्य ही माझी विभूति आहे. प्रसिद्ध असलेल्या सर्व घोड्यांमध्यें चौदा रत्नांतील एक जो उच्चैःश्रवा नांवाचा घोडा ती माझी विभूति आहे. २३७.

अश्वांमध्यें उच्चैःश्रवा मी आहें असें जाण· गजेंद्रांमध्यें अमृतप्राप्त्यर्थ केलेल्या मंथनापासून उत्पन्न झालेला ऐरावत आणि नरांमध्यें राजा मी आहें. २७

अर्जुना, राज्याचें भूषण असलेल्या हत्तींमध्यें जो ऐरावत, ती माझी विभूति आहे. देवांनीं मंथन केलेल्या क्षीरसमुद्रांतून तो अमृताबरोबर निघाला. २३८. ज्याला सर्व लोक आपण प्रजा बनून करभार देतात, असा जो या सर्व मनुष्यांमध्यें राजा आहे, तो माझी महत्त्वाची विभूति आहे. २३९.

आयुधांमध्यें वज्र मी आहें, धेनूंमध्यें कामधेनु मी आहें, प्रजोत्पत्तीला कारण जो काम तो मी आहें, सर्पांमध्यें वासुकि मी आहें. २८.

अर्जुना, सर्व हत्यारांमध्यें, जें शंभर यज्ञ करून पार पडलेल्या इंद्राच्या हातांत असतें, तें वज्र माझी विभूति आहे. २४०. सर्व गायींमध्यें स्वर्गांतील कामधेनु, ही माझी विभूति आहे, असें श्रीकृष्ण म्हणाला. जन्म देवविणाऱ्यांमध्यें काम तो मी आहे असें समज. २४१. सापांच्या कुळांमध्यें मुख्य असलेला जो वासुकी नांवाचा साप, तो अर्जुना, माझी विभूति आहे. सर्व नागांमध्यें अनंत नांवाचा नाग, ती माझी विभूति आहे. २४२.

नागांमध्यें अनंत नामक नाग मी आहें, जलवासी प्राण्यांमध्यें वरुण मी आहें, पितरांमध्यें अर्यमा मी आहें, (नियमन) करणारांमध्यें यम मी आहें. २९.

अगा अर्जुना, जलचरांमध्यें पश्चिम दिशारूप तरुण स्त्रीचा स्वामी जो वरुण, तो मी आहें, असें अनंत सांगतात. २४३. आणि सर्व पितरांच्या समुदायांमध्यें अर्यमा नांवाची पितृदेवता आहे, ती माझी विभूति आहे, हें मी खरें खरें सांगत आहें. २४४. जगाचीं शुभाशुभें (पुण्यपापें) जे लिहितात, प्राण्यांच्या मनाचा जे झाडा घेतात, मग जशीं कर्में केलीं असतील त्याला अनुरूप जे भोगाचे नियमितें होतात, (कर्मानुरूप सुखदुःखाचा जे भोग देतात,) २४५. त्या निग्रहानुग्रह करणारांमध्यें जो यम–सर्व कर्मांचा साक्षी जो यमधर्म–तो मी आहें, असें लक्ष्मीपति आत्माराम म्हणाले. २४६.

दैत्यांपैकीं प्रल्हाद मी आहें, हरण करणाऱ्यांत काल मी आहें, पशूंमध्यें सिंह मी आहें, पक्ष्यांमध्यें गरुड मी आहें. ३०.

अरे, राक्षसांच्या कुळांमध्यें जो प्रल्हाद आहे, ती माझी विभूति होय, असें समज आणि म्हणूनच तो असुरी स्वभावादिकांच्या संसर्गानें लिप्त झाला नाहीं. २४७. मारणाऱ्यांमध्यें महाकाळ, ती माझी विभूति आहे असें श्रीकृष्ण म्हणाला, आणि हिंस्र पशूंमध्यें जो सिंह, ती माझी विभूति आहे असें समज. २४८. अर्जुना, ऐक. सर्व पक्ष्यांमध्यें गरुड ही माझी विभूति आहे आणि म्हणूनच तो आपल्या पाठीवर मला धारण करूं शकतो. २४९.

वेगवान वस्तूंमध्यें वायु मी आहें, शस्त्रधाऱ्यांमध्यें राम मी आहें, मत्स्यांमध्यें मकर मी आहें, नद्यांत भागीरथी नदी मी आहें. ३१.

पृथ्वीच्या विस्तारांमध्यें एक क्षण देखील न लागतां अर्जुना, एका उडीसरशी सातही समुद्रांना प्रदक्षिणा जो करतो, २५०. (असे जे आहेत) त्या अत्यंत वेग असलेल्या गतिवानांमध्यें जो वारा आहे, अर्जुना, तो माझी विभूति आहे. सर्व शस्त्रधरणाऱ्यांमध्यें जो श्रीराम, ती माझी विभूति आहे. २५१. ज्या रामचंद्रानें संकटांत पडलेल्या धर्माच्या कैवारानें, आपल्यास काय तें दुसरें धनुष्यच साह्यकारी करून, त्रेतायुगांत विजयरूप लक्ष्मीस आपल्या एकाकडेच वळविलें. २५२. नंतर ज्या रामचंद्रानें सुवेळ पर्वताच्या माथ्यावर उभे राहून, प्रतापवान

ठाकूनि सुवेळीं । प्रतापलंकेश्वराचीं सिसाळीं । गगनीं उदो म्हणतया हस्तबळी । दिधलीं भूतां ॥५३॥ जेणें देवांचा मानु गिंवसिला । धर्मासि जीर्णोद्धारु केला । सूर्यवंशीं उदेला । सूर्य जो कां ॥ ५४ ॥ तो हतियेरुपराजितयांआंतु । रामचंद्र मी जानकीकांतु । मकर मी पुच्छवंतु । जळचरांमाजीं ॥ ५५ ॥ पैं समस्तांही वोघां- । मध्यें जे भगीरथें आणितां गंगा । जन्हूनें गिळिली मग जंघा । फाडूनि दिधली ॥ ५६ ॥ ते त्रिभुवनैकसरिता । जान्हवी मी पांडुसुता । जळप्रवाहां समस्तां- । माझारीं जाणें ॥ ५७ ॥ ऐसेनि वेगळालां सृष्टीपैकीं । विभूती नाम सुतां एकेकी । सगळेन जन्मसहस्रें अवलोकीं । अर्ध्या नव्हती ॥ ५८ ॥

सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन । अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥

जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड उपजेल जैं जीवीं । तैं गगनाची बांधावी । लोथ जेवीं ॥ ५९ ॥ कां पृथ्वीये परमाणूंचा उगाणा घ्यावा । तरि भूगोलुचि काखे सुवावा । तैसा विस्तारु माझा पहावा । तरि जाणावें मातें ॥ २६० ॥ जैसें शाखांसी फूल फळ । एकिहेळां वेटाळूं म्हाणिजे सकळ । तरि उपडुनियां मूळ । जेवीं हातीं घेपे ॥ ६१ ॥ तेवीं माझे विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजेती अशेष । तरी स्वरूप एक निर्दोष । जाणिजे माझें ॥ ६२ ॥ एऱ्हवीं वेगळालिया विभूती । कायिएक परिससी किती । म्हणोनि एकिहेळां महामती । सर्व मी जाण ॥ ६३ ॥ मी आघवियेचि सृष्टी । आदिमध्यांतीं किरीटी । ओतप्रोत पटीं । तंतु जेवीं ॥ ६४ ॥ ऐसिया व्यापका मातें जैं जाणावें । तैं विभूतिभेदें काय करावें । परि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणोनि असो ॥ ६५ ॥ कां जे तुवां पुसिलिया विभूती । म्हणोनि तिया आईक सुभद्रापती । तरी आतां विद्यामांजीं प्रस्तुती । अध्यात्मविद्या ते मी ॥ ६६ ॥ अगा बोलतयांचिया ठायीं । वादु तो मी पाहीं । जो सकलशास्त्रसंमतें कहीं । सरेचिना ॥ ६७ ॥ जो निर्वचूं जातां वाढे । आइकिलयां उत्प्रेक्षे सळु चढे । जयावरी बोलतयांचीं गोडें । बोलणीं होतीं ॥ ६८ ॥ ऐसा प्रतिपादनामाजीं वादु । तो मी म्हणे गोविंदु । अक्षरांआंतु विशदु । अकारु तो मी ॥ ६९ ॥

अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च । अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

पैं गा समासांमाझारीं । द्वंद्व तो मी अवधारीं । मशकालागोनि ब्रह्मवेरीं । ग्रासिता तो मी ॥ २७० ॥ मेरुमंदरादिकीं सर्वीं । सहित पृथ्वीतें विरवी । जो एकार्णवातेंही जिरवी । जेथिंचा तेथें ॥ ७१ ॥ जो प्रळयतेजा देत मिठी । सगळिया पवनातें गिळी किरीटी । आकाश जयाचिया पोटीं । सामावलें ॥ ७२ ॥ ऐसा अपार जो काळु । तो मी म्हणे लक्ष्मीलीळु । मग पुढती सृष्टीचा मेळु । सजिता तो मी ॥ ७३ ॥

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् । कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥

असा जो लंकेचा राजा रावण, त्याचीं मस्तकें आकाशांत 'उदो उदो' म्हणणारीं जीं पिशाचें त्यांचे हातांत बळी म्हणून दिलीं. २५३. ज्या रामचंद्रानें देवांचा गेलेला मान शोधून काढला व धर्मांचा जीर्णोद्धार केला, सूर्यवंशांत जो प्रतिसूर्यच उदयास आला. २५४. असा जो जानकीनाथ रामचंद्र, तो शस्त्रधरणारांमध्यें माझी विभूति आहे. जलचरांमध्यें शेपूट असलेला मकर, ही माझी विभूति आहे. २५५. सर्वही जलप्रवाहांमध्यें जी गंगा, भगीरथ आणीत असतां मध्येंच जन्हु नांवाच्या ऋषीनें गिळली व नंतर भगीरथाच्याच प्रार्थनेवरून आपली मांडी फाडून परत त्याची त्यास मोकळी करून दिली ती, २५६. तिन्ही लोकांत एक असलेली जान्हवी नांवाची जी नदी, ती सर्व जलप्रवाहांमध्यें, अर्जुना, माझी विभूति आहे असें समज. २५७. अशा प्रकारानें जगांतील वेगवेगळ्या विभूतींचीं एक एक नांवें घेऊं लागलें असतां, पूर्ण आयुष्य असलेल्या हजारों जन्मांमध्यें त्या अर्ध्या देखील सांगून व्हावयाच्या नाहींत, हें पक्कें समज. २५८.

हे अर्जुना, सर्व सृष्ट वस्तूंचा आदि, अन्त तसाच मध्य मी आहें. विद्यांमध्यें अध्यात्मविद्या मी आहें आणि वादविवाद करणारांचा वाद मी आहें. ३२.

ज्याप्रमाणें आकाशांतील एकूणएक नक्षत्रें टिपून घ्यावींत, अशी ज्या वेळेला अंतःकरणांत इच्छा उत्पन्न होईल, त्या वेळेला आकाशाचेंच ज्याप्रमाणें गांठोडें बांधणें बरें. २५९. किंवा पृथ्वीच्या परमाणूंची मोजदाद करावी अशी जर इच्छा असेल, तर ही सर्व पृथ्वीच बगलेंत घालावी, त्याप्रमाणें माझी व्याप्ति जर पहावयाची असेल, तर माझेंच ज्ञान करून घ्यावें. २६०. फांद्यांसकट फुलें व फळें हीं सर्व एका वेळेंतच हस्तगत व्हावीं, असें जर मनांत असेल, तर जसें त्या झाडाचें एक मूळच उपटून हातांत घेतलें पाहिजे; २६१. त्याप्रमाणें माझ्या मुख्य मुख्य विभूति जर सर्वच जाणण्याची इच्छा असेल, तर दोषरहित एक माझेंच स्वरूप जाणावें. २६२. एऱ्हवीं वेगवेगळ्या विभूति तूं किती ऐकणार ! म्हणून बुद्धिमान अर्जुना, एकदांच समज कीं, हें सर्व मी आहें. २६३. ज्याप्रमाणें वस्त्रामध्यें आडवें उभें एक सूतच भरलेलें असतें, त्याप्रमाणें या सर्व जगाच्या प्रारंभीं, मध्यें आणि शेवटीं, अर्जुना मीच सर्व भरलेला आहें. २६४. अशा सर्व व्यापक असलेल्या मला जाणलें असतां, मग वेगवेगळ्या विभूति सांगून काय करावयाच्या आहेत? परंतु एवढी तुझी योग्यता नाही, म्हणून हें असूं दे. २६५. किंवा ज्याअर्थी तूं विभूति विचारल्यास त्याअर्थी अर्जुना, मी सांगतों, त्या तूं ऐक. तर आतां प्रस्तुत, सर्व विद्यांमध्यें जी अध्यात्मविद्या आहे ती माझी विभूति आहे. २६६. अरे बाबा, सर्व शास्त्रांच्या एकमतानें (एकमत होऊन) कधींच न संपणारा असा जो वक्त्यांचे ठिकाणीं वादविवाद, तो मी असें समज. २६७. वादांतील विषयाचा निश्चय करूं लागलें असतां, जो वाद वाढतो व जो ऐकला असतां तर्कास जोर येतो व ज्या तर्कांवर बोलणारांचीं गोड भाषणें होतात, २६८. याप्रमाणें प्रतिपादनामध्यें जी वाटाघाट चालते, ती माझी विभूति आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले. सर्व अक्षरांमध्यें स्पष्ट असें 'अ' हें अक्षर, ती माझी विभूति आहे २६९.

अक्षरांमध्यें अकार मी आहें, समाससमूहामध्यें द्वंद्वसमास मी आहें. क्षयरहित काल मी आहें, सर्व जगाला उत्पन्न करणारा विश्वमुखी पुरुष मी आहें. ३३.

अर्जुना, तत्पुरुष वगैरे सर्व समासांमध्यें द्वंद्व नांवाचा समास, ती माझी विभूति आहे. चिलटापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचा ग्रास करणारा जो काल, तो मी आहें. २७०. मेरु, मंदार इत्यादि सर्व पर्वतांसहित पृथ्वीला जो विरवतो व जो जळरूप झालेल्या जगालाही जेथल्या तेथेंच आटून टाकतो २७१. जो प्रलयकाळच्या तेजाला ग्रासून, अर्जुना, संपूर्ण वाऱ्याला गिळून टाकतो आणि हें राहिलेलें आकाश देखील ज्याच्या पोटांत मावतें, २७२. याप्रमाणें अमर्याद जो काळ, तो माझी विभूति आहे, असें लक्ष्मीशीं लीला करणारा श्रीकृष्ण म्हणाला. मग त्यानंतर पुनः सृष्टीचा जमाव उत्पन्न करणारा जो (ब्रह्मदेव), ती माझी विभूति आहे. २७३.

सर्वांचा संहार करणारा मृत्यु मी आहें, (पुनः कल्पांतरीं) उत्पत्ति पावणाऱ्या प्राण्यांना उत्पन्न करणारा (उद्भव) मी आहें. स्त्रीलिंगवाचक वस्तूंमध्यें कीर्ति, संपत्ति, वाणी, स्मृति, बुद्धि, धृति आणि क्षमा या सात मी आहें. ३४.

आणि सृजिलिया भूतातें मीचि धरीं । सकळां जीवनही मीचि अवधारीं । शेखीं सर्वांतें या संहारीं । तेव्हां मृत्युही मीचि ॥ ७४ ॥ आतां स्त्रीगणांचां पैकीं । माझिया विभूती सात आणिकी । तिया ऐक कवतिकीं । सांगिजतील ॥ ७५ ॥ तरी नीच नवी जे कीर्ति । अर्जुना ते माझी मूर्ती । आणि औदार्येंसीं जे संपत्ती । तेही मीचि जाणें ॥ ७६ ॥ आणि ते गा मी वाचा । जे सुखासनीं न्यायाचां । आरूढोनि विवेकाचां । मार्गीं चाले ॥ ७७ ॥ देखिलेनि पदार्थें । जे आठवूनि दे मातें । स्मृतिही पैं एथें । त्रिशुद्धी मी ॥ ७८ ॥ पैं स्वहिता अनुजायिनी । मेधा ते गा मी इये जनीं । धृती मी त्रिभुवनीं । क्षमा ते मी ॥ ७९ ॥ एवं नारीं-माझारीं । या सातही शक्ति मीचि अवधारीं । ऐसें संसारगजकेसरी । म्हणता जाहला ॥ २८० ॥

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् । मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥

वेदराशीचिया सामा – । आंत बृहत्साम जें प्रियोत्तमा । तें मी म्हणे रमा– । प्राणेश्वरु ॥ ८१ ॥ गायत्रीछंद जें म्हणिजे । तें सकळा छंदांमाजि माझें । स्वरूप हें जाणिजे । निभ्रांत तुवां ॥ ८२ ॥ मासांआंत मार्गशीरु । तो मी म्हणे शार्ङ्गधरु । ऋतूंमाजीं कुसुमाकरु । वसंतु तो मी ॥ ८३ ॥

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् । जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥

छळितयां विंदाणा– । माजीं जूं तें मी विचक्षणा । म्हणोनि चोहटां चोरी परि कवणा । निवारूं न ये ॥ ८४ ॥ अगा अशेषांही तेजसां– । आंत तेज तें मी भरंवसा । विजयो मी कार्योद्देशां । सकळांमाजीं ॥ ८५ ॥ जेणें चोखाळत दिसे न्याय । तो व्यवसायांत व्यवसाय । माझेंचि स्वरूप हें राय । सुरांचा म्हणे ॥ ८६ ॥ सत्त्वाथिलियांआंतु । सत्त्व मी म्हणे अनंतु । यादवांमाजीं श्रीमंतु । तोचि तो मी ॥ ८७ ॥

वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः । मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥

जो देवकीवसुदेवास्तव जाहला । कुमारीसाठीं गोकुळीं गेला । तो मी प्राणासकट पियाला । पूतनेतें ॥ ८८ ॥ नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मियां अदानवी सृष्टि केली । करीं गिरि धरूनि उमाणिली । महेंद्रमहिमा ॥ ८९ ॥ कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें । जेणें मियां जळत गोकुळ राखिलें । वासरुवांसाठीं लाविलें । विरंचीस पिसें ॥ २९० ॥ प्रथमदशेचिये पहांटे– । माजीं कंसाऐशीं अचाटें । महाधेंडीं अवचटें । लीळाचि नासिलीं ॥ ९१ ॥ हें काय कितीएक सांगावें । तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें । तरि यादवांमाजीं जाणावें । हेंचि स्वरूप माझें ॥ ९२ ॥ आणि सोमवंशीं तुझां पांडवां – । माजीं अर्जुन तो मी जाणावा । म्हणोनि एकमेकां-चिया प्रेमभावा । बिघडु न पडे ॥ ९३ ॥ संन्यासी तुवां होऊनि जनीं । चोरूनि नेली माझी भगिनी । तऱ्ही विकल्पु नुपजे मनीं । मी तूं दोन्ही स्वरूप एक ॥ ९४ ॥ मुनींआंत व्यास-देवो । तो मी म्हणे यादवरावो । कवीश्वरांमाजीं धैर्या रावो । उशनाचार्य मी ॥ ९५ ॥

आणि उत्पन्न झालेल्या भूतांना धारण करणारा मीच आहें. ऐक, या सर्वांना जीवन मीच आहें. शेवटीं ज्या वेळेला या सर्वांचा नाश करतो, त्या वेळेला मृत्यूदेखील मीच आहें. २७४. आतां आणखी माझ्या सात विभूति स्त्रीवर्गापैकीं आहेत. त्याही सहजच सांगितल्या जातील, तूं ऐक. २७५. तरी नेहमीं भरभराटींत असलेली जी कीर्ति, अर्जुना, ती माझी विभूति आहे आणि उदारपणाच्या जोडीनें असणारी जी संपत्ति, ती देखील माझी विभूति आहे असें समज. २७६. आणि जी वाचा न्यायाच्या सुखासनावर बसून विवेकाच्या वाटेनें चालते, ती वाचा मी आहें. २७७. कोणताही पदार्थ पाहिल्याबरोबर जी माझी आठवण करुन देते, अशी जी स्मृति, ती निश्चयेंकरून येथें मी आहें २७८. स्वहिताला अनुकूल अशी जी बुद्धि, ती या लोकांमध्यें मी आहे व त्रैलोक्यांत धैर्य व क्षमा मी आहें. २७९. याप्रमाणें स्त्रीवर्गांमध्यें या सातही शक्ति मीच आहें असें समज; असें संसाररूपी हत्तीला मारणारा श्रीकृष्णरूपी सिंह म्हणाला. २८०.

( आठ हजार चौदा ) सामांमध्यें ( सामवेदान्तर्गत ईश्वरस्तोत्रांमधील ) बृहत्साम मी आहें. ( उष्णिक्, अनुष्टुभ् इत्यादि छंदांमध्यें ) गायत्री छंद मी आहें, मासांमध्यें मार्गशीर्षमास मी आहें, ऋतूंमध्यें वसंत ऋतु मी आहें. ३५.

अत्यंत आवडत्या अर्जुना, वेदांमध्यें असलेल्या रथंतरादि सामांमध्यें, बृहत्साम ही माझी विभूति आहे, असें लक्ष्मीचा पति श्रीकृष्ण म्हणाला. २८१. ज्यास गायत्री छंद असें म्हणतात, तो सर्व छंदांमध्यें माझें स्वरूप आहे, असें तूं निःसंशय समज. २८२. सर्व महिन्यांमध्यें मार्गशीर्ष नांवाचा महिना, तो मी आहें, असें शारंगधर श्रीकृष्ण म्हणाले. सहा ऋतूंमध्यें पुष्पांची खाण जो वसंतऋतु तो मी आहे. २८३.

छलन करणाऱ्या वस्तूंमध्यें द्यूत मी आहें, तेजस्वी पदार्थांमधील तेज मी आहें, जय ( सिद्धी) मी आहें, उद्यम मी आहें, सात्विक वस्तूंमध्यें सत्त्व मी आहें. ३६.

हे चतुर अर्जुना, छलकारक कारस्थानांमध्यें जुगार, ती माझी विभूति आहे; म्हणून उघड उघड चव्हाट्यावर जरी चोरी होते, तरी कोणास निवारण करतां येत नाहीं. २८४. अर्जुना, एकूणएक तेजस्वी पदार्थांमध्यें असणारें जें तेज, तें मी आहें अशी खात्री असूं दे. मी सर्व व्यवहारांतील हेतूंमध्यें विजय आहें ( हातांत घेतलेल्या कामांत येणारें यश, ही माझी विभूति आहे. ) २८५. सर्व उद्योगांत ज्या उद्योगानें शुद्ध न्याय दिसतो, (म्हणजे जो उद्योग नीतीला सोडून नाहीं ) तो माझेंच स्वरूप आहे, असें सर्व देवांचे राजे भगवान म्हणाले. २८६. सत्त्वगुणसंपन्नांमध्यें जें सत्त्व आहे, तें मी आहें, असें अनंत म्हणाला; आणि यदुकुळांतील पुरुषांमध्यें ऐश्वर्यवान जो कृष्ण, तोच तो मी आहें. २८७.

यादवांमध्यें श्रीकृष्ण मी आहें, पांडवांमध्यें धनंजय मी आहें. मुनींमध्यें व्यासमुनि मीं आहें, कवींमध्यें शुक्र मी आहें. ३७.

जो देवकीवसुदेवापासून जन्मास आलेला व जो योगमाया नांवाच्या यशोदेच्या मुलीचे बदली गोकुळांत गेलेला, त्या मी कृष्णानें पूतना राक्षसीचें तिच्या प्राणांसह शोषण केलें. २८८. बाळपणाची दशा संपली नाहीं तोंच, ज्या मीं दैत्यरहित सृष्टि केली आणि करांगुलीवर गोवर्धन पर्वत धारण करून, इंद्राचा थोरपणा मोडून टाकला. ( म्हणजे इंद्राचा गर्व हरण केला. ) २८९. यमुनेच्या हृदयांत कांट्याप्रमाणें सलणारा ( जो कालिया नाग ) त्याचा नाश केला, ज्या मी दावाग्नीपासून जळत असलेलें गोकुळ, त्याचें रक्षण केलें व ब्रह्मदेवानें गाईवासरें व गोपाळ यांचें हरण केलें असतांना ( त्यांच्यासारखे दुसरे गोपाळ, गाई, वासरें वगैरे आपण बनून ) ब्रह्मदेवास वेड लाविलें; २९०. बाल्यावस्थेच्या सुरवातीमध्येंच कंसासारखी अचाट मोठालीं कैंडे अकस्मात सहज नाहींशीं केलीं. २९१. हें एक एक वेगवेगळें किती सांगणार ? हें सर्व तूं देखील पाहिलेलें व ऐकलेलें आहेस. तर यादवांमध्यें हेंच ( कृष्ण ) माझें स्वरूप आहे असें समज. २९२. आणि सोमवंशामधील तुम्हां पांडवांमध्यें जो तूं अर्जुन, तो मी आहें, असें समज, म्हणून तुमच्या आमच्या परस्परांमधील स्नेहसंबंधामध्यें बिघाड येत नाहीं २९३. या लोकांमध्यें तूं संन्यासी होऊन माझी बहीण चोरून नेलीस, तरी माझ्या मनांत कांहीं विकल्प उत्पन्न झाला नाहीं; कारण मी व तूं दोघेही एकरूपच आहोंत. २९४. सर्व मुनींमध्यें जे व्यासदेव, ती माझी विभूति आहे, असें यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणाले व मोठमोठाल्या पारदर्शी लोकांमध्यें धैर्यवान शुक्राचार्य, माझी विभूति आहे. २९५.

दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् । मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥

अगा दमितयांमाझारीं । अनिवार दंडु तो मी अवधारीं । जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं । नियमित पावे ॥ ९६ ॥ पैं सारासार निर्धारितयां । धर्मज्ञानाचा पक्षु धरितयां । सकळशास्त्रांमाजीं ययां । नीतिशास्त्र तें मी ॥ ९७ ॥ आघवियाचि गूढां- । आंतु मौन तें मी सुहाडा । म्हणोनि न बोलतयां पुढां । स्रष्टाही नेण होय ॥ ९८ ॥ अगा ज्ञानियांचां ठायीं । ज्ञान तें मी पाहीं । आतां असो हें ययां कांहीं । पार न देखों ॥ ९९ ॥

यच्चाऽपि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन । न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥

पैं पर्जन्याचिया धारां । वरी लेख करवेल धनुर्धरा । कां पृथ्वीचिया तृणांकुरां । होईल ठी ॥ ३०० ॥ पैं महोदधीचिया तरंगां । व्यवस्था धरूं नये जेवीं गा । तेवीं माझिया विशेष-लिंगां । नाहीं मिती ॥ १ ॥ ऐशियाही सातपांच प्रधाना । विभूती सांगितलिया तुज अर्जुना । तो हा उद्देशु जो गा मना । आहाच गमला ॥ २ ॥

नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप । एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

येरां विभूतिविस्तारांसि कांहीं । एथ सर्वथा लेख नाहीं । म्हणोनि परिससीं तूं काई । आम्ही सांगों किती ॥ ३ ॥ यालागीं एकिहेळां तुज । दाऊं आतां वर्म निज । सर्वभूतांकुरें बीज । विरूढत असे तें मी ॥४॥ म्हणोनि सानें थोर न म्हणावें । उंच नीच भाव सांडावे । एक मीचि ऐसें मानावें । वस्तुजातातें ॥ ५ ॥ तरी यावरी साधारण । आईक पां आणिकही खुण । तरी अर्जुना ते तूं जाण । विभूति माझी ॥ ६ ॥

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवाऽवगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

जेथ जेथ संपत्ति आणि दया । दोन्ही वसती आलिया असती ठाया । ते ते जाण धनंजया । विभूति माझी ॥ ७ ॥ अथवा एकलें एक बिंब गगनीं । तरी प्रभा फांके त्रिभुवनीं । तेवीं एकाकियाची सकळ जनीं । आज्ञा पाळिजे ॥८॥ तयांतें एकलें झणी म्हण । ते निर्धन या भाषा नेण । काय कामधेनूसवें सर्व साहान । चालत असे ॥ ९ ॥ तियेतें जें जेधवां जो मागे । तें ते एकसरेंचि प्रसवों लागे । तेवीं विश्वविभव तया अंगें । होऊनि आहाति ॥ ३१० ॥ तयातें वोळखावया हेचि संज्ञा । जे जगें नमस्कारिजे आज्ञा । ऐसें आथि ते जाण प्राज्ञा । अवतार माझे ॥ ११ ॥

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन । विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥

आतां सामान्य विशेष । हें जाणणें एथ महादोष । कां जे मीचि एक अशेष । विश्व आहे म्हणोनि ॥ १२ ॥ तरी आतां साधारण आणि चांगु । ऐसा कैसेनि पां कल्पावा विभागु । वायां आपुलियेचि मती वंगु । भेदाचा लावावा ॥ १३ ॥ एऱ्हवीं तरी तूप कासया घुसळावें । अमृत

दमन करणारांचा (दमनाला साधनीभूत) दंड मी आहें, जयाची इच्छा करणारांचें नीतिशास्त्र मी आहें. (सर्व) गुह्य वस्तूंमध्यें मौन मी आहें, ज्ञानी माणसांचें ज्ञान मी आहें. ३८.

अर्जुना, नियमन करणाऱ्यांमध्यें जें मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचें सारखें नियमन करतें, तें अनिवार्य शासन ही माझी विभूति आहे असें समज. २९६. सारासार विचार करणाऱ्या व धर्माच्या ज्ञानाचा पक्ष धरणाऱ्या, अशा सगळ्या शास्त्रांमध्यें नीतिशास्त्र तें मी आहें. २९७. हे राजा अर्जुना, सर्व गुह्यांमध्यें मौन, तें मी आहें, म्हणून न बोलणारापुढें ब्रह्मदेवही अज्ञानी होतो. २८. अर्जुना, ज्ञानवान पुरुषाचे ठिकाणीं असणारें जें ज्ञान, ती माझी विभूति आहे, असें समज. आतां हें राहूं दे. या विभूतींचा कांहीं अंतच दिसत नाहीं. २९९.

हे अर्जुना, सर्व भूतांचें जें बीज, तें मी आहें, स्थावर व जंगम अशी कोणतीही वस्तु नाहीं, कीं जी माझ्यावांचून (अस्तित्वांत) असूं शकेल. ३९.

अर्जुना, पावसाच्या धारांची गणना करतां येईल काय? अथवा पृथ्वीवर उगवणाऱ्या गवताचे अंकुर किती आहेत, याचा निश्चय करतां येईल काय? ३००. अर्जुना, महासागराच्या लाटांची गणति ज्याप्रमाणें ठेवतां येणार नाहीं, त्याप्रमाणें माझ्या विशेष विभूतींना मोजमाप नाहीं. ३०१. माझ्या मुख्य विभूतींना पार नाहीं असें जरी आहे, तरी तुझ्या विचारण्यावरून आम्हीं तुला सात पांच (म्हणजे पंच्याहात्तर) आमच्या मुख्य विभूति सांगितल्या. पण हें आमचें जें थोडक्यांत विभूति सांगणें तें अर्जुना, आमच्या मनाला व्यर्थ वाटलें. ३०२.

हे शत्रुतापना, माझ्या दिव्य विभूतींचा अन्त नाहीं. विभूतींचा विस्तार तर मीं केवळ संक्षेपार्थ सांगितला आहे. ४०.

बाकीच्या आमच्या विभूतिविस्ताराला येथें मुळींच कांहीं मर्यादा नाहीं. म्हणून आम्ही सांगणार किती व तूं ऐकणार काय? ३०३. याकरितां आम्ही आपलें वर्म आतां तुला एकदम सांगतों, तें असें कीं, सर्व प्राणिरूप-अंकुरानें वाढणारें जें बीज, तें मी आहें. ३०४. एवढ्याकरितां लहानमोठे अशी निवड करूं नये. एक कमी योग्यतेचें व एक जास्त योग्यतेचें असली कल्पना सोडून द्यावी व जेवढ्या म्हणून वस्तु आहेत, त्या मीच एक आहें असें समजावें. ३०५ अर्जुना, यापेक्षांही सर्व सामान्य आणखी एक खूण आहे, ती ऐक, त्यावरून ती माझी विभूति आहे असें तूं समज. ३०६.

जी जी वस्तु वैभवानें, संपत्तीनें अथवा उदारतेनें युक्त असेल, ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून उत्पन्न झाली आहे, असें जाण. ४१.

अर्जुना, ज्या ज्या (प्राण्याच्या) ठिकाणीं ऐश्वर्य आणि दया हीं दोन्हीं राहावयास आलेलीं असतील, तो तो प्राणी माझी विभूति आहे, असें समज. ३०७. अथवा सूर्यबिंब जसें आकाशांत एकटें असतें, पण त्याचा प्रकाश त्रैलोक्यांत पसरतो, त्याप्रमाणें या एका पुरुषाची आज्ञा सर्व लोक मानतात. ३०८. त्या पुरुषांना तूं कदाचित एकटे असें म्हणशील, तर असें म्हणूं नकोस. ते ऐश्वर्यशून्य आहेत, अशी गोष्ट तूं समजूं नकोस. (जरी त्यांच्याजवळ साधनें प्रत्यक्ष दिसलीं नाहींत, तरी तीं त्यांच्या अंगभूत आहेतच.) कामधेनूबरोबर सर्व सामुग्री चालत असते कीं काय? (नाहीं) ३०९. तिच्याजवळ जो जें जेव्हां मागेल, तें ती एकदम प्रसवूं लागते. त्याप्रमाणें विश्वांतील ऐश्वर्यें त्यांचे अंगभूत होऊन रहातात. ३१० त्यांना ओळखावयाची खूण हीच कीं, त्यांची आज्ञा जगाला शिरसावंद्य असते. बुद्धिवान अर्जुना, असे जे आहेत, ते माझे अवतार समज. ३११.

अथवा हे अर्जुना, हें (प्रत्येक वस्तूचें) वेगवेगळें ज्ञान काय करावयाचें? (कारण असा तूं मला कोठवर जाणशील? तर थोडक्यांत सांगतों,) मी आपल्या एकाच अंशानें हें सर्व विश्व व्यापून राहिलों आहें. ४२.

आतां हें संपूर्ण विश्व मीच आहें, म्हणून या विश्वांत एक साधारण व एक मुख्य, अशी निवड करणें म्हणजे मोठें पाप आहे. ३१२ तर आतां एक साधारण व एक चांगला असा भेद कसा करावा? आपल्याच बुद्धीनें माझ्या ठिकाणीं भेदाचा कलंक व्यर्थ कां लावावा? ३१३. नाहीं तर तूप कशाला घुसळावयाचें? अमृताला शिजवून काय

कां रांधूनि अन्नें करावें। हा गां वायूसि काय डावें। उजवें अंग आहे ॥ १४ ॥ पैं सूर्यबिंबासि पोट पाठीं। पाहतां नासेल आपुली दिठी। तेवीं माझां स्वरूपीं गोठी। सामान्यविशेषाची नाहीं ॥१५॥ आणि सिनाना विभूती। मज अपारातें मविसील किती। म्हणोनि किंबहुना सुभद्रापती। असो हें जाणणें ॥ १६ ॥ आतां पैं माझेनि एकें अंशें। हें जग व्यापिलें असे। यालागीं भेदु सांडुनि सरिसें। साम्यें भज ॥ १७ ॥ ऐसें विबुधवनवसंतें। तेणें विरक्तांचेनि एकांतें। बोलिलें जेथ श्रीमंतें। श्रीकृष्णदेवें ॥ १८ ॥ तेथ अर्जुन म्हणे स्वामी। येतुलें हें राभस्य बोलिलेती तुम्हीं। जे भेदु एक आणि आम्हीं। सांडावा एकीं ॥ १९ ॥ हां हो सूर्य म्हणे काय जगातें। अंधारें दवडा कां परौतें। केवीं धसाळ म्हणो देवा तूंतें। तरी अधिक हा बोलु ॥ ३२० ॥ तुझें नांवचि एक कोण्ही वेळे। जयांचिये मुखासि कां काना मिळे। तयांचिया हृदयातें सांडूनि पळे। भेदु जी साच ॥ २१ ॥ तो तूं परब्रह्मचि असकें। मज दैवें दिधलासि हस्तोदकें। तरी आतां भेदु कायसा कें। देखावा कवणें ॥ २२ ॥ जी चंद्रबिंबाचां गाभारां। रिगालियावरीही उबारा। परि राणेपणें शार्ङ्गधरा। बोला हें तुम्हीं ॥ २३ ॥ तेथ सावियाचि परितोषोनि देवें। अर्जुनातें आलिंगिलें जीवें। मग म्हणे तुवां न कोपावें। आमुचिया बोला ॥२४॥ आम्हीं तुज भेदाचिया वाहाणीं। सांगितली जे विभूतींची कहाणी। ते अभेदें काय अंतःकरणीं। मानिली कीं न मनें ॥ २५ ॥ हेंचि पहावयालागीं। नावेक बोलिलों बाहेरिसवडिया भंगीं। तंव विभूती तुज चांगी। आलिया बोधा ॥ २६ ॥ येथ अर्जुन म्हणे देवें। हें आपुलें आपण जाणावें। परि देखतसें विश्व आघवें। तुवां भरलें ॥ २७ ॥ पैं राया तो पांडुसुतु। ऐसिये प्रतीतीसि जाहला वरैतु। या संजयाचिया बोला निवांतु। धृतराष्ट्र राहे ॥ २८ ॥ कीं संजयो दुखवलेनि अंतःकरणें। म्हणतसे नवल नव्हे दैव दवडणें। हा जीवें धाडसा आहे मी म्हणे। तंव आंतुही आंधळा ॥ २९ ॥ परि असो हे तो अर्जुनु। स्वहिताचा वाढवितसे मानु। कीं याहीवरी तया आनु। धिंवसा उपनला ॥ ३३० ॥ म्हणे हेचि हृदयाआंतुली प्रतीती। बाहेरी अवतरो कां डोळ्यांप्रती। इये आर्तीचां पाउलीं मती। उठती जाहली ॥ ३१ ॥ मियां इहींच दोहीं डोळां। झोंबावें विश्वरूपा सकळा। एवढी हांव तो दैवाआगळा। म्हणऊनि करी ॥ ३२ ॥ आजि तो कल्पतरूची शाखा। म्हणोनि वांझोळें न लगती देखा। जें जें येईल तयाचिया मुखा। तें तें साच करीतसे येरु ॥ ३३ ॥ जो प्रल्हादाचिया बोला। विषाहीसकट आपण जाहला। तो सद्गुरु असे जोडला। किरीटीसी ॥३४॥ म्हणोनि विश्वरूप पुसावयालागीं। पार्थ रिगता होईल कवणें भंगीं। तें सांगेन पुढिलिये प्रसंगीं। ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा ॥ ३३५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ।

[ ओव्या ३३५. श्लोक ४२. ]

ॐ श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.

म्हणून अर्धे करावयाचें ? बाबा अर्जुना, वाऱ्याला उजवें व डावें असें वेगवेगळें अंग आहे काय ? ३१४. सूर्यबिंबाला पोट-पाठ आहे कां, म्हणून पाहावयास गेलें तर आपल्याच दृष्टीचा विघाड होईल. त्याप्रमाणें माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं सामान्य विशेषाची नुसती गोष्टही नाहीं ( असें असून ती मानली तर आपलीच बुद्धि बिघडेल. ) ३१५. आणि निरनिराळ्या विभूतींनीं जो अमर्याद मी, त्या मला किती मोजशील ? यास्तव अर्जुना, फार बोलून काय करावयाचें आहे ? हा विभूति जाणण्याचा प्रकार राहूं दे. ३१६. माझ्या एकाच अंशानें हें सर्व जग व्यापलेलें आहे; याकरितां आतां भेदभावना टाकून ऐक्यदृष्टीनें मला सर्व ठिकाणीं सारखें भज. ३१७. ज्ञानी पुरुषरूपीवनाचा वसंत व वैराग्यशील पुरुषांचें एकनिष्ठतेचें ठिकाण, असे जे श्रीमंत श्रीकृष्णदेव, ते या प्रमाणें बोलले. ३१८. तेव्हां अर्जुन म्हणाला, महाराज, भेद हा एक वेगळा असून, त्यास टाकणारे आम्ही एक वेगळे, असें आपण अविचारानें बोललां. ३१९ सूर्य काय लोकांना असें म्हणतो, कीं मला यावयाचें आहे, म्हणून तुम्ही अंधाराला बाजूला सारा. ( नाहीं तर मला ठेंच लागेल. सूर्यापुढें जसा अंधार, तसा तुमच्या स्वरूपापुढें भेद नाहीं. असें असून तुम्ही 'भेद टाक' म्हणून अविचारानें सांगतां, ) पण तुम्हांला दांडगे कसें म्हणावें ? कारण तो अधिकप्रसंग होतो. ३२०. कोणत्या एकाद्या वेळीं तुझें नांवच ज्यांच्या मुखांत येईल, अथवा कानावर पडेल, त्यांच्या अंतःकरणाला भेद खरोखर टाकून पळेल. ३२१ असा जो तूं पूर्ण परब्रह्म, तो मला माझ्या दैवानें हातावर उदक सोडून दान दिल्याप्रमाणें प्राप्त झाला आहेस; तर आतां भेद हा कसला, कोठें व कोणी पाहावयाचा आहे ? ३२२. अहो महाराज चंद्रबिंबाच्या मध्यभागांत प्रवेश केल्यावरही 'उकडतें' असें जर म्हटलें तर तें शोभेल काय ? परंतु हे श्रीकृष्णा, आपण आपल्या मोठेपणांत वरील ( असंबद्ध भाषण ) बोलत आहांत. ३२३. त्या प्रसंगांत देवानें सहजच अतिशय संतुष्ट होऊन अर्जुनाला मनापासून आलिंगन दिलें, आणि मग म्हटलें, अर्जुना, आमच्या बोलण्याविषयीं रागावूं नकोस. ३२४ आम्ही भेदाच्या मार्गानें जी तुला विभूतींची कथा सांगितली, ती अभेद भावानें तुझ्या मनाला पटली कीं नाहीं, ३२५. हेंच पाहण्याकरितां आम्हीं क्षणभर बाह्यदृष्टीच्या रीतीनें बोलून पाहिलें, तों आम्हांस असें आढळलें कीं, आम्हीं सांगितलेल्या विभूति तुला चांगल्या समजल्या. ३२६. यावर अर्जुन देवाला म्हणाला, मला तुम्ही सांगितलेल्या विभूति समजल्या कीं नाहीं, हें तुमचें तुम्ही समजा. पण माझा अनुभव जर म्हणाल, तर असा आहे कीं, हें सर्व विश्व तुमच्याच स्वरूपानें भरलेलें आहे. ३२७. संजय म्हणाला, धृतराष्ट्रा, त्या अर्जुनानें अशा प्रकारच्या अनुभवाला माळ घातली. त्या संजयाच्या बोलण्यावर धृतराष्ट्र स्वस्थ राहिला. ३२८. संजय हा अंतःकरणांत वाईट वाटून ( मनांत ) म्हणाला, असलें भाग्य आलें असतां तें दवडणें, हें आश्चर्य नाहीं काय ? हा धृतराष्ट्र अंतःकरणानें समजदार आहे, असें मला वाटत होतें. पण ( त्यास मी अर्जुनाच्या बोधाची थोरवी सांगत असतां हा अगदीं स्तब्ध व उदासीन आहे यावरून ) मला असें वाटतें कीं, हा धृतराष्ट्र जसा चर्मचक्षूंनीं आंधळा आहे, तसा अंतःकरणांतही ज्ञानचक्षूंनीं आंधळा आहे. ३२९. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात ) पण हें संजयाचें बोलणें राहूं द्या. तो अर्जुन आपल्या हिताचें प्रमाण वाढवीत आहे ( कशावरून ? ) तर हा विभूतीचा अनुभव त्याला मिळाल्यावर सुद्धां त्याला दुसरी एक अचाट इच्छा उत्पन्न झाली. ३३०. अर्जुन आपल्याशीं असें म्हणावयास लागला कीं, हा (सर्व विश्वांत एक भगवंताचें स्वरूप व्याप्त आहे) माझ्या अंतःकरणांतील अनुभव माझ्या बाह्य दृष्टीला दिसावा. अशा इच्छेच्या प्रवृत्तीनें माझ्या बुद्धीनें उचल घेतली. ३३१. मी याच दोन डोळ्यांनीं ( बाह्यचर्मचक्षूंनीं ) सर्व विश्वरूप पहावें, एवढी मोठी इच्छा तो दैवानें थोर म्हणून करीत होता. ३३२. आज अर्जुन कल्पतरूची फांदी आहे, म्हणून त्या फांदीला वांझ फुलें येणार नाहींत, असें समजा. जें जें अर्जुन म्हणेल, तें तें श्रीकृष्ण परमात्मा खरें करीत आहे. ३३३. प्रल्हादानें ( माझा नारायण सर्व पदार्थांत व्याप्त आहे असें हिरण्यकशिपूस ) सांगितल्याकारणानें जो विषादीसकट सर्व पदार्थ आपण झाला, असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो अर्जुनाला सद्गुरु लाभला होता. ३३४. म्हणून 'मला विश्वरूप दाखवा' हें श्रीकृष्णास विचारावयास अर्जुन कोणत्या पद्धतीनें सरसावेल, तें मी पुढच्या प्रसंगीं सांगेन, असें निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. ३३५.



म्हणौनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें । प्रयाग माधव विश्वरूप पहावें ।
येतुलेनि संसारासि द्यावें । तिलोदक ॥ ११–१० ॥

या अध्यायांत शांतरसास अद्‌भुत रस भेटणार, म्हणून श्रीज्ञानदेवांनीं या अध्यायाला प्रयाग क्षेत्राची उपमा दिली आहे व त्यामुळें वाटेल त्याला प्रयाग–माधवविश्वरूपाचें दर्शन घेऊन संसाराला तिलोदक देतां येईल. हें अशक्य कार्य ज्यांच्या कृपेमुळें सिद्धीस गेलें, त्या समर्थ श्रीनिवृत्तिनाथांना नमन करून ( १–२७ ) श्रीज्ञानदेव सांगतात:—

हें सर्व सर्वेश्वर आहे, हें जें बुद्धीला पटलें, तें प्रत्यक्ष बाहेर डोळ्यांना दिसावें, अशी अर्जुनाला विश्वरूप पहाण्याबद्दल अत्यंत मोठी तळमळ लागून राहिली होती. तेव्हां आपण कसें विचारावें, असा विचार अर्जुनाच्या मनांत आला; पण निकटवर्ती भक्तांनीही विचारलें नाहीं, म्हणून भीतिनें न विचारावें तर विश्वरूप पाहिल्याशिवाय त्याला जगणें सुद्धां अशक्य वाटूं लागलें. इतकी त्याला त्याची तळमळ लागली; तेव्हां देव दाखवोत वा न दाखवोत, आपण तर विचारावें असा निश्चय करून भीतभीत अर्जुन देवाला विनवीत आहे. आपण मला दुर्मिळ असें अध्यात्मज्ञान सांगितलें, त्यामुळें देहच मी, हे कौरव माझे आप्त व यांना जर मी मारलें तर मला पाप लागेल, असा अज्ञानजन्य अहंकार व मोह माझे ठिकाणीं उत्पन्न झाला होता, तो आतां दूर झाला आहे ( २८–६८ ); परंतु त्याबरोबरच तुम्ही प्रसंगविशेषीं जगत्कार्यासाठीं जीं द्विभुज, चतुर्भुज अशीं रूपें धारण करतां तीं ज्या मूळ रूपापासून उत्पन्न होतात तें तुमचें मूळ रूप पहावें अशी मला तळमळ लागली आहे. तुमचें औदार्य तर सुप्रसिद्धच आहे, तुम्हांला मारण्याच्या हेतूनें आलेल्या पूतना-शिशुपालादि शत्रूंनाही जेथें तुम्हीं मोक्षासारखें अत्यंत पवित्र दान दिलें आहे, तेथें मी तर तुमचाच; त्यामुळें तुम्हीं मला विश्वरूप दाखवाल यांत तिळमात्र संशय नाहीं. माझी अडचण एवढीच आहे कीं, तुम्ही मला विश्वरूप दाखविलें व तें पहाण्याची माझ्या अंगीं योग्यता नसल्यामुळें तें मी पाहूं शकलों नाहीं, तर तें फुकट जाईल. अर्जुन असें बोलला पण झालें वेगळेंच. अर्जुनाला विश्वरूप दाखविण्यासाठीं देव इतके उतावीळ झाले होते कीं, त्याच्या तोंडून ' विश्वरूप दाखवा ' असे शब्द निघाल्याबरोबर देव सर्व विश्वरूपमयच झाले व म्हणाले ' अरे माझें विश्वरूप पहा. ' ( ६९–१२३ )

देव म्हणाले, अर्जुना, या विश्वमूर्तीच्या प्रत्येक केसाच्या बुडाशीं सृष्ट्या पहा, आणि तुझ्या मनांत जर विश्वाहिपलिकडे पहावें असें वाटत असेल तर तें तूं माझ्या देहाच्या ठिकाणीं पहा. देव असें म्हणाले, पण अर्जुनाला दिव्य दृष्टि नसल्यामुळें त्याला तें दिसत नव्हतें. तो तसाच उत्कंठीत अवस्थेंत स्तब्धच बसला होता. (१२४–१५५) अर्जुनानें बजावलें असूनसुद्धां आपण विश्वरूप दाखविण्याच्या घाईत त्याला दिव्य दृष्टि देण्याचें विसरून गेलो हें जेव्हां देवाला कळून आलें तेव्हां त्याला ती दिव्य दृष्टि देऊन विश्वरूप पहावयास समर्थ केलें. ( १५६–१७७ )

हें चराचर विश्वाचें चित्र ज्या अनादि भूमिकेवर उमटतें तें विश्वरूप अर्जुन पाहूं लागला; तों त्याला तें सर्व आश्चर्यमय दिसलें. पहाण्याची तो जी जी इच्छा करीत होता, ती सफळ होत होती. परब्रह्मच विश्वरूपानें भरून गेलें होतें. एवढें मोठें आकाश, पंचमहाभूतें, पूर्वादिक दिशा यांचा मागमूसही शिल्लक न राहतां सर्व सृष्टीची चनाच नाहींशी झाली. त्याच्या मनाचा मनपणा नाहींसा झाला व स्वरूपसमाधान प्राप्त झालें ( १७८-१९६ ) पण विश्वरूपांतील सौंदर्ययुक्त व आनंददायक रूपाबरोबर महामृत्युसारखीं भयंकर अकाळविकाळ रूपें जेव्हां त्यानें पाहिलीं तेव्हां भयभीत होऊन त्यानें डोळे मिटून घेतले; परंतु दिव्यदृष्टीचा प्रभाव असा होता कीं, डोळे मिटले असतांही अर्जुनाला तें विश्वरूप दिसत होतें. व्यासमुनींच्या कृपेमुळें संजयालाही तें दिसत होतें म्हणून तोही आनंदित झाला होता ( १९७-२४१ )

विश्वरूपाच्या तेजापुढें हजारों सूर्यांचें तेज फिकें पडत होतें. व्यापकपणाच्या दृष्टीनें हें सर्व जग महासागरांतील बुडबुड्याप्रमाणें भासत होतें. अर्जुन विश्वरूप पहातां पहातां द्रष्टा व दृश्य हे द्वैत नाहींसें होऊन त्यांत नाहींसा झाला. अष्टसात्त्विक भावसंपन्न होऊन ब्रह्मानंदावर तो अधिष्ठित झाला. तो आनंदाचा पूर ओसरल्यावर अर्जुन देवाची स्तुति करूं लागला. ' मी यःकश्चित मानव असूनही आपण मला हें विश्वरूप दाखविलें हा खरोखरीं आपला थोरपणा आहे. या विश्वरूपांत मला स्वर्ग, कैलास, चतुर्दशभुवनें दिसत असून हें सर्व तुझी तूंच झाला आहेस. आतांपर्यंत माझ्या दृष्टीवर अज्ञानाचें पडळ असल्यामुळें तुला आम्ही चतुर्भुज रूपाएवढेच मर्यादित समजत होतों. परंतु आज तुझें आदिमध्यांतरहित, आकाराचें पैलतीर, असें खरें स्वरूप मला पहावयास मिळालें ( २४२-३०९ ). तुझ्या रूपांतील तेजाच्या राशीमुळें सर्व विश्व संतप्त होऊन या महामृत्युरूपी समुद्रांत गटांगळ्या खात असतांना मला दिसतें. प्रलयकाळचा रुद्रही मला भितो, पण तुझ्या विश्वरूपाची कोपदृष्टि पाहिल्यावर मी भयभीत झालों आहें. हे कौरव-वीर व त्यांचें सैन्य, पूज्य भीष्माचार्य, द्रोणाचार्य, कर्ण हे सर्व यांत नाहींसे होत आहेत असें मी पहात आहें. ( ३१०-३८२ )

मी मारणारा व हे कौरव मरणारे अशा अहंकारानें अर्जुन ग्रासला होता. तो अहंकार दूर करावा व सर्वांचा नाश करणारी भगवद्‌शक्ति निराळी आहे, हें त्याला पटवून द्यावें म्हणून श्रीकृष्णानें विश्वरूपदर्शनाचें निमित्त केलें होतें; परंतु देवाच्या मनांतील हा हेतू न समजल्यामुळें अर्जुन शोक करीत होता. ( ३८३-४५० ).

त्याचा शोक दूर करण्याकरितां भगवान त्याला सांगतात, ' सर्व संहार करणारा काय तो मीच आहें. मात्र तुम्ही पांडव फक्त या संहारांतून वांचणार आहांत; त्याशिवाय बाकीचें सर्व सैन्य यांत नाश पावणार आहे. मी मी म्हणविणाऱ्या या सर्व योद्धयांना मी मागेंच मारून मातीच्या चित्रांप्रमाणें निर्जीव केलें आहे. आतां ' अर्जुनानें शत्रूला मारलें ' एवढेंच फक्त जगांत प्रसिद्ध व्हावयाचें शिल्लक राहिलें आहे; तें काम तूं कर. ( ४५१-४८१ ).

याप्रमाणें विश्वरूपी श्रीकृष्णाचें गंगेच्या ओघाप्रमाणें गंभीर भाषण चालूं होतें व अर्जुन शरणागत होऊन तें ऐकत होता व वारंवार भगवंताला नमस्कार करीत होता. त्याला वाटत होतें कीं, सध्यांचा स्थितिकाळ असतांना भगवान् प्रलयकाळचें हें संहारक रूप कां दाखवीत आहेत; त्याचें समाधान भगवंतांनीं केलें कीं, हें संहारकरूप फक्त या दोन्ही सैन्यापुरतेंच आहे. बाकीचे सर्व लोक आपआपल्या योग्य समयीं मरण पावतील ( ४८२-४९९ ).

श्यामसुंदर श्रीकृष्णाचें अनादि निर्गुण हेंच मूळ रूप असून तेंच विश्वरूपानें विस्तारलें आहे, हें आतां अर्जुनाला पक्कें समजून आलें. आतांपर्यंत श्रीकृष्णाला तो बरोबरीचा समजून त्याची यट्टामस्करी, प्रसंगविशेषीं अवहेलना करीत होता. या सर्व गोष्टींचा त्याला आतां पश्चात्ताप झाला ( ५००-५४३ ) व त्रिभुवनांतही मावणार नाहींत, एवढे अपराध माझ्या हातून झाले आहेत, तर ते मातेप्रमाणें पोटांत घालावे व पुन्हां श्यामसुंदर चतुर्भुज रूप धारण करावें अशी त्यानें देवाला विनंती केली. ( ५४४-६०८ ).

आजपर्यंत कोणालाही प्राप्त झाली नाहीं, ती वस्तू आपण दिली व हा ती वस्तू नको म्हणतो, याबद्दल देवाला मनांत त्याचा रागच आला. हें त्याचें करणें शरीराला सोडून छायेलाच आलिंगन देण्यासारखें वेडेपणाचें होतें; म्हणून देव तसें त्याला बोलले. पण त्याच्या प्रेमास्तव पुन्हां तो देव चतुर्भुज झाला. सूर्य मावळल्यावर आकाशांत जशा चांदण्या प्रगट होतात, त्याप्रमाणें अर्जुनाला पुन्हां सर्व दृश्य पूर्ववत् दिसूं लागलें. शेवटीं देवांनीं त्याला महत्त्वाचा उपदेश केला, ' गाय जरी डोंगरांत चरावयास गेली, तरी तिचें चित्त घरांतील तिच्या वासरांवरच असतें; तसें तूं विश्वरूपावर आपलें खरें प्रेम ठेवून चतुर्भुज मर्यादित रूपावर वरवरचें बाह्यात्कारीं प्रेम ठेव ' ( ६०९-६६२ ). या विश्वरूपाच्या ठिकाणीं कोणत्याही साधनांचा, वेदपठण, तप, दान, यज्ञ यांचा लाग लागत नाहीं. चित्त जर माझ्या अनन्य भक्तिनें भरून गेलें तरच देहाहंकार व द्वैत नाहींसें होऊन मी विश्वरूप आहें हें अनुभवाला येईल ( ६६३-६९७ ).

अर्जुन हा सगुण रूपावर भाळला होता व देवांनीं तर तें कमी योग्यतेचें ठरविलें; म्हणून कोणतें रूप श्रेष्ठ आहे असा प्रश्न, देव रागावणार नाहींत, अशा चातुर्यानें देवापुढें मांडणार आहे व त्यांतूनच बारावा अध्याय निर्माण होत आहे.

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा

आतां यावरी एकादशीं। कथा आहे दोन्ही रसीं। जेथ पार्था विश्वरूपेंसीं। होईल भेटी ॥ १ ॥ जेथ शांताचिया घरा। अद्भुत आला आहे पाहुणेरा। आणि येरांही रसां पांतिकरां। जाहला मानु ॥ २ ॥ अहो वधुवरांचिये मिळणी। जैशीं वराडियांही लुगडीं लेणीं। तैसे देशियेचां सोकासनीं। मिरवले रस ॥ ३ ॥ परि शांताद्भुत बरवे। जे डोळियांचां अंजळीं घ्यावे। जैसे हरिहर प्रेमभावें। आले खेंवा ॥ ४ ॥ नातरी अंवसेचां दिवशीं। भेटलीं बिंबें दोनी जैशीं। तेवीं एकवळा रसीं। केला एथ ॥ ५ ॥ मीनले गंगेयमुनेचे ओघ। तैसें रसां जाहलें प्रयाग। म्हणोनि सुस्नात होत जग। आघवें एथ ॥ ६ ॥ माजीं गीता सरस्वती गुप्त। आणि दोनी रस ते ओघ मूर्त। यालागीं त्रिवेणी हे उचित। फावली बापा ॥ ७ ॥ एथ श्रवणाचेनि द्वारें। तीर्थीं रिघतां सोपारें। ज्ञानदेव म्हणे दातारें। माझेनि केलें ॥ ८ ॥ तीरें संस्कृताचीं गहनें। तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें। रचिलीं धर्मनिधानें। निवृत्तिदेवें ॥ ९ ॥ म्हणौनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें। प्रयागमाधव विश्वरूप पहावें। येतुलेनि संसारासि द्यावें। तिलोदक ॥ १० ॥ हें असो ऐसे सावयव। जेथ सासिन्नले आथी रसभाव। जे श्रवणसुखाची राणीव। जोडली जगा ॥ ११ ॥ जेथ शांताद्भुत रोकडे। आणि येरां रसां पडप जोडे। हें अल्पाचि परी उघडें। कैवल्य जेथ ॥ १२ ॥ तो हा अकरावा अध्यायो। जो देवाचा आपणपें विसंवता ठावो। परि अर्जुन सदैवांचा रावो। जे एथही पावला ॥ १३ ॥ एथ अर्जुनचि काय म्हणो पातला। आजि आवडतयाही सुकाळु जाहला। जे गीतार्थु हा आला। मऱ्हाठिये ॥ १४ ॥ याचिलागीं माझें। विनविलें तें आइकिजे। तरी अवधान दीजे। सज्जनीं तुम्हीं ॥ १५ ॥ तेंवींचि तुम्हां संतांचिये सभे। ऐसी सलगी कीर करूं न लभे। परि मानावें जी तुम्हीं लोभें। अपत्या मज ॥ १६ ॥ अहो पुंसा आपणचि पढविजे। मग पढे तरी माथा तुकिजे। कां करविले चोजें न रिझे। बाळका माय ॥ १७ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा

आतां यानंतर अकराव्या अध्यायामध्यें दोन ( शांत व अद्‌भुत ) रसांनीं भरलेली कथा आहे. या अध्यायांत अर्जुनाला विश्वरूपाचें दर्शन होणार आहे. १. या अध्यायांत शांत रसाच्या घरीं अद्‌भुत रस हा पाहुणचारास आला आहे आणि इतर रसांसही या दोन रसांच्या पंक्तीचा मान मिळाला आहे. २. अहो, नवरानवरीच्या लग्नसमारंभांत ज्याप्रमाणें वऱ्हाड्यांसही वस्त्रें व दागिने मिळतात, त्याप्रमाणें इतर रसांचीही मराठी भाषारूप पालखींत मिरवणूक होऊन, त्यांस शोभा आली आहे. ३. परंतु शांत व अद्‌भुत हे दोन चांगले रस या अध्यायांत इतके मुख्यत्वानें आहेत कीं, ते डोळ्यांना उघड दिसतील. जसे विष्णु व शंकर हे एका योग्यतेचे देव, प्रेमभावानें एकमेकांस भेटावयास यावे. ४. अथवा अमावास्येच्या दिवशीं ज्याप्रमाणें सूर्यबिंब व चंद्रबिंब यांच्यांत अंतर राहात नाहीं, (कारण तीं बिंबें एकाच दिशेला असतात.) त्याप्रमाणें या अध्यायांत हे दोन रस एकत्र आले आहेत. ५. ज्याप्रमाणें प्रयाग क्षेत्रांत गंगा व यमुना या दोन नद्यांच्या ओघांचा संगम झाला आहे, त्याप्रमाणें या अध्यायांत शांत व अद्‌भुत या दोन रसांचा मिलाफ होऊन, अकरावा अध्याय हा प्रयाग क्षेत्रच बनला आहे. म्हणून सर्व जग येथें स्नान करून पवित्र होतें. ६. ज्याप्रमाणें प्रयाग क्षेत्रांत गंगा व यमुना या दोन नद्यांचे ओघ प्रगट दिसतात व त्या दोन ओघांच्या मध्यें जशी सरस्वती नदी गुप्त आहे, त्याप्रमाणें या अध्यायांत शांत व अद्‌भुत हे दोन रस स्पष्ट दिसणारे आहेत व या दोन रसांत गीता ही गुप्त सरस्वतीच आहे. म्हणून बापहो, ही योग्य त्रिवेणी ( तीन नद्यांचा संगम ) सर्वांना प्राप्त झाली आहे. ७. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, मला कारणीभूत करून माझे गुरु जे निवृत्तीनाथ, त्यांनीं श्रवणाच्या द्वारानें या ( त्रिवेणी) तीर्थांत प्रवेश करणें सोपें केलें आहे. ८. धर्मांची खाण जे माझे गुरु निवृत्तीनाथ, त्यांनीं मला कारणीभूत करून, संस्कृतभाषारूपी कठीण ( उंच डगरीचे ) किनारे फोडून मराठी भाषेतील शब्दरूपी पायऱ्यांचा घाट बांधला. ९. म्हणून या त्रिवेणीसंगमांत हवें त्यानें आस्तिक्यबुद्धीनें स्नान करून, जसे प्रयाग क्षेत्रांत माधवाचें दर्शन घेतात, तसें तेथें विश्वरूप माधवाचें दर्शन घ्यावें; आणि एवढें करून संसाराला तिलांजली द्यावी. (संबंध सोडावा.) १०. हें रूपक पुरे. याप्रमाणें येथें ( नव ) रसांचें मूर्तिमंत स्वरूप भराला आलें आहे, कारण जगाला श्रवणसुखाचें राज्य प्राप्त झालें आहे, ११. ह्या अकराव्या अध्यायांत शांत रस व अद्‌भुत रस हे मूर्तिमंत आहेतच; पण इतर रसांनाही या अध्यायांत शोभा प्राप्त झाली आहे. हें यांचें वर्णन थोडेंच आहे, पण खरोखर या अध्यायांत मोक्ष स्पष्ट झालेला आहे. १२. तो हा अकरावा अध्याय आहे कीं, जो देवाचें खास विश्रांतीचें ठिकाण आहे. पण अर्जुन हा दैववान पुरुषांचा राजा आहे; कारण कीं, तो येथेंही प्राप्त झाला आहे. १३. येथें अर्जुनच एकटा प्राप्त झाला आहे असें काय म्हणावें ! तर गीतार्थ मराठी भाषेंत आल्याकारणानें आज वाटेल त्यालाही सुकाळ झाला आहे. १४. याचकरितां मी जी विनंती करीत आहें, ती तुम्ही ऐकावी. ती इतकीच कीं, तुम्ही संतांनीं ( मी कथा वर्णन करीत आहे ) इकडे लक्ष द्यावें. १५. तसेंच तुम्हां संतांच्या सभेमध्यें अशी ही सलगी करणें माझ्यासारख्यास खरोखर योग्य नाहीं; पण मी तें तुमचें लेंकरूं, त्या मला तुम्ही प्रेमानें मानावें. १६. अहो, आपणच राघूला शिकवावें आणि शिकविल्याप्रमाणें तो बोलूं लागला, म्हणजे आपणच पसंतीनें मान डोलवावी; किंवा मुलाकडून एकादी गोष्ट करवून घेऊन, मग त्यानें केलेल्या कृत्याच्या कौतुकानें आई आपल्या मनांत मुलाविषयीं संतुष्ट होत नाहीं काय ? १७. त्याप्रमाणें

तेवीं मी जें जें बोलें। तें प्रभु तुमचेंचि शिकविलें। म्हणोनि अवधारिजो आपुलें। आपण देवा ॥ १८ ॥ हें सारस्वताचें गोड। तुम्हींचि लाविलें जी झाड। तरी आतां अवधानामृतें वाड। सिंपोनि कीजो ॥ १९ ॥ मग हें रसभावफुलीं फुलेल। नानार्थ फळभारें फळा येईल। तुमचेनि धर्में होईल। सुकाळ जगा ॥ २० ॥ या बोला संत रिझले। म्हणती तोषलों गा भलें केलें। आतां सांगें जें बोलिलें। अर्जुनें तेथ ॥ २१ ॥ तंव निवृत्तिदास म्हणे। जी कृष्णार्जुनांचें बोलणें। मी प्राकृत काय सांगों जाणें। परि सांगवा तुम्ही ॥ २२ ॥ अहो रानींचिया पालेखाइरा। नेवाणें करविजे लंकेश्वरा। एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा। न जिणेची काई ॥ २३ ॥ म्हणोनि समर्थ जें जें करी। तें न हो न ये चराचरीं। तुम्ही संत तयापरी। बोलवा मातें ॥ २४ ॥ आतां बोलिजतसे आइका। हा गीताभाव निका। जो वैकुंठनायका। मुखौनि निघाला ॥ २५ ॥ बाप बाप ग्रंथ गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथीं ॥ २६ ॥ तेथिंचें गौरव कैसें वानावें। जें शंभूचिये मती नागवे। तें आतां नमस्कारिजे जीवें-भावें। हेंचि भलें ॥२७॥ मग आइका तो किरीटी। घालूनि विश्वरूपीं दिठी। पहिली कैसी गोठी। करिता जाहला ॥ २८ ॥ हें सर्वही सर्वेश्वरु। ऐसा प्रतीतिगत जो पतिकरु। तो बाहेरी होआवा गोचरु। लोचनासी ॥२९॥ हे जिवाआंतुली चाड। परि देवासि सांगतां सांकड। कां जें विश्वरूप गूढ। कैसेनि पुसावें ॥ ३० ॥ म्हणे मागां कवणीं कहीं। जें पढियंतेनें पुसिलें नाहीं। सहसा कैसें काई। सांगा म्हणों ॥ ३१ ॥ मी जरी सलगीचा चांगु। तरी काय आइसीहूनि अंतरंगु। परि तेही हा प्रसंगु। विहाली पुसों ॥ ३२ ॥ माझी आवडे तैसी सेवा जाहली। तरि काय होईल गरुडाचिया येतुली। परि तोही हे बोली। करीचिना ॥ ३३ ॥ मी काय सनकादिकांहूनि जवळां। परि तयांही नागवेचि हा चाळा। मी आवडेन काय प्रेमळां। गोकुळींचिया ऐसा ॥ ३४ ॥ तयांतेंही लेंकुरपणें झकविलें। एकाचे गर्भवासही साहिले। परि विश्वरूप हें राहविलें। न दावीच कवणा ॥ ३५ ॥ हा ठायवरी गुज। याचिये अंतरींचें हें निज। केविं उराउरी मज। पुसों ये पां ॥ ३६ ॥ आणि न पुसोंचि जरी म्हणें। तरी विश्वरूप देखिलियाविणें। सुख नोहेचि परि जिणें। तेंही विपायें ॥ ३७ ॥ म्हणोनि आतां पुसों अळुमाळसें। मग करूं देवा ठाके तैसें। येणें प्रवर्तला साध्वसें। पार्थु बोलों ॥ ३८ ॥ परि तेंचि ऐसेनि भावें। जें एका दों उत्तरांसवें। दावी विश्वरूप आघवें। झाडा देउनी ॥ ३९ ॥ अहो वांसरूं देखिलियाचि साठीं। धेनु खडबडोनि मोहें उठी। मग स्तनासुखाचिये भेटी। काय पान्हा न ये ॥ ४० ॥ पाहा पां तया पांडवाचेनि नांवें। जो कृष्ण रानींही प्रतिपाळूं धांवे। तयातें अर्जुनें जंव पुसावें। तंव साहील काई ॥ ४१ ॥ तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण। आणि येरु स्नेहा घातलें आहे माजवण। ऐसिये मिळणी वेगळेपण। उरे हेंचि बहु ॥ ४२ ॥ म्हणोनि अर्जुनाचिया बोलासरिसा। देव विश्वरूप होईल आपैसा। तोचि पहिला प्रसंगु ऐसा। ऐकिजो तरी ॥ ४३ ॥

मी जें जें प्रतिपादन करतों, महाराज, तें तुम्हीच शिकविलेलें आहे. एवढ्याकरितां, अहो संतजनहो, आपण शिकविलेलें आपणच ऐकावें. १८. महाराज, हें ज्ञानाचें सुंदर झाड आपणच लावलें आहे. तर आतां यास आपण, लक्ष देणें, हेंच कोणएक अमृत, तें शिंपून मोठें करावें. १९. मग हें ज्ञानाचें झाड नवरस भावरूपी फुलांनीं फुलेल आणि नानाप्रकारच्या अर्थरूपी फळभारानें फळास येईल; व तुम्ही लक्षदेणेंरूप धर्म केलात, म्हणजे जगास ( श्रवणसुखाचा ) सुकाळ होईल. २०. या बोलण्यावर संत खूष झाले व म्हणाले, ज्ञानोबा, आम्ही खूष झालों, तूं फार चांगलें केलेंस. आतां त्या प्रसंगीं अर्जुनानें जो प्रश्न केला, त्याचें व्याख्यान कर. २१. तेव्हां निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणाले, महाराज, कृष्ण व अर्जुन या दोघांमध्यें झालेलें भाषण माझ्यासारख्या सामान्य पुरुषाला सांगण्याचें काय ठाऊक ? परंतु तें माझ्याकडून सांगवून घेण्याचें काम तुम्हीं केलें तर होईल, २२. अहो, रानांतील पाले खाणाऱ्या वानरांकडून लंकेचा राजा जो रावण, त्याचा पराभव केला जावा; अर्जुन एकटाच होता, पण त्यानें अकरा अक्षौहिणी सैन्य जिंकलें नाहीं काय ? २३. म्हणून समर्थ जें जें करील, तें तें चराचरांत होणार नाहीं असें नाहीं. त्याप्रमाणें तुम्ही संत समर्थ आहांत, म्हणून तुम्ही जर मनांत आणाल, तर मजसारख्या ( नेणत्या ) कडून ( गूढ गीतार्थ ) बोलवाल ( म्हणून कृपा करून तो मजकडून बोलवा. ) २४. आतां जो ( प्रत्यक्ष ) वैकुंठाचा राजा, त्याचे मुखांतून निघालेल्या गीतेचा चांगला अभिप्राय सांगतों, तिकडे लक्ष द्यावें. २५. धन्य धन्य गीताग्रंथ कीं, ज्या गीताग्रंथाचा वक्ता, वेदांच्या प्रतिपादनाचा विषय जो कृष्ण परमात्मा, तो आहे. २६. त्या ठिकाणचा मोठेपणा कसा वर्णन करावा ? कारण जें गीतातत्त्व शिवाच्या बुद्धीला आकलन होत नाहीं त्याला आतां सर्व भावानें नमस्कार करावा हेंच बरें. २७. यानंतर तो अर्जुन विश्वरूपावर नजर ठेवून पहिल्या प्रथम कसें बोलला, तें ऐका. २८. हें सर्वही सर्वेश्वररूप आहे; अशा रूपानें अनुभवास पटलेला प्रियकर जो परमात्मा, तो आपल्यापुढें डोळ्याला प्रत्यक्ष दिसावा, २९. ही मनांतील इच्छा खरी. परंतु ती देवास सांगतांना अडचण वाटते; कारण ज्याअर्थी देवाचें विश्वरूप गुप्त आहे, त्याअर्थी उघड करून दाखवा, असें आपण कसें विचारावें ? ३०. अर्जुन मनांत म्हणतो, पूर्वी कोणीही केव्हांच जें मोठ्या आवडत्यानेंही विचारलें नाहीं, तें एकाएकीं सांगा, म्हणून कसें काय म्हणावें ? ३१. मी जरी चांगला दाट परिचयाचा असलों, तरी मातें लक्ष्मीपेक्षां जवळचा आहें काय ? परंतु इतक्या जवळची असूनही ती देखील हा विषय विचारावयास भ्याली. ३२. माझी वाटेल तशी जरी सेवा झाली असली, तरी ती गरुडाच्या सेवेच्या बरोबरीला येईल काय ? परंतु एवढी निकट सेवा केलेला जो गरुड, तो देखील ह्या संबंधाची गोष्ट काढीतच नाहीं ३३. मी सनकादिकांपेक्षां जास्त जवळचा आहें काय ? परंतु त्यांना देखील ही उठाठेव करतां आली नाहीं. मी गोकुळांमधील प्रेमळ गोपगोपींइतका आवडेन काय ? ३४. त्या गोकुळाच्या भाविक लोकांना सुद्धां, आपण केवळ मूल आहोंत, असें दाखवून फसविलें. एकाकरतां ( अंबरीष राजाकरतां ) दहा गर्भवास देखील सोसले. परंतु विश्वरूप हें गुप्त राखून ठेवलें, तें कोणाला दाखविलें नाहीं. ३५. इतकी ही गुह्य गोष्ट, याच्या अंतर्यामांतील खास गोष्ट आहे, तेव्हां ती मला एकदम कशी विचारतां येईल ? ३६. आणि पुसूं नये असें जर म्हटलें, तर तें विश्वरूप पाहिल्यावांचून सुख तर होत नाहींच, परंतु जगणें, तें देखील क्वचितच संभवणार आहे. ३७. तर आतां थोडेंसें विचारूंया; मग देवाची ज्याप्रमाणें मर्जी असेल तसें करूं. अशा रीतीनें अर्जुन भीत भीत बोलावयास लागला. ३८. परंतु तेंच त्याचें बोलणें अशा खुबीचें होतें कीं, एकदोन शब्दांबरोबरच देव आपला झाडा देऊन सर्व विश्वरूप दाखवील. ३९. अहो, वासरूं पाहिलें कीं, लागलीच प्रेमानें गाय खडबडून उभी राहते; मग प्रत्यक्ष तिच्या स्तनाची व त्याच्या मुखाची गांठ पडल्यावर तिला पान्हा येणार नाहीं काय ? ४०. पहा बरें, त्या पांडवांचें नांव ऐकल्याबरोबर जो कृष्ण त्यांचें रक्षण करण्याकरितां रानांतही धांव घेतो, त्याला, अर्जुनानें विचारावें व मग आपण सांगावें, एवढें तरी सहन होईल काय ? ४१. तो श्रीकृष्ण परमात्मा स्वभावतःच प्रेमाची मूर्ति असून, त्या प्रेमास अर्जुन हा अंमल आणणारा उत्तेजक पदार्थ घातला आहे. अशा एक होण्याच्या वेळेस त्यांचें वेगळेपण राहिलें हेंच फार आहे. ४२. म्हणून अर्जुनाच्या बोलण्यावर श्रीकृष्ण सहजच विश्वरूप धारण करील, तोच पहिला प्रसंग असा आहे; तर तो ऐकावा. ४३.

अर्जुन उवाचः—मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् । यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥

मग पार्थु देवातें म्हणे । जी तुम्हीं मजकारणें । वाच्य केलें न बोलणें । कृपानिधे ॥ ४४ ॥ जै महाभूतें ब्रह्मीं आटती । जीवमहदादींचे ठाय फिटती । तैं जें देव होऊनि ठाकती । तें विसवणें शेषींचें ॥ ४५ ॥ होतें हृदयाचां परीवरीं । रांविलें कृपणाचिये परी । शब्दब्रह्मासिही चोरी । जयाची केली ॥ ४६ ॥ तें तुम्हीं आजि आपुलें । मजपुढां हियें फोडिलें । जया अध्यात्मा वोवाळिलें । ऐश्वर्य हरें ॥ ४७ ॥ ते वस्तु मज स्वामी । एकिहेळां दिधली तुम्हीं । हें बोलों तरि आम्ही । तुज पावोनि कैंचे ॥ ४८ ॥ परि साचाचि महामोहाचां पुरीं । बुडालेया देखोनि सीसवरी । तुवां आपणपें घालोनि श्रीहरी । मग काढिलें मातें ॥ ४९ ॥ एक तूंवांचूनि कांहीं । विश्वीं दुजियाची भाष नाहीं । कीं आमुचें कर्म पाहीं । जे आम्ही आथी म्हणों ॥ ५० ॥ मी जगीं एक अर्जुनु । ऐसा देहीं बाहें अभिमानु । आणि कौरवांतें इया स्वजनु । आपुला म्हणें ॥ ५१ ॥ याहीवरी यांतें मी मारीन । म्हणें तेणें पापें के रिगेन । ऐसें देखत होतों दुःस्वप्न । तों चेवविला प्रभु ॥ ५२ ॥ देवा गंधर्वनगरीची वस्ती । सोडूनि निघालों लक्ष्मीपती । होतों उदकाचिया आर्ती । रोहिणी पीत ॥ ५३ ॥ जी किरडूं तरी कापडाचें । परी लहरी येत होतिया साचें । ऐसें वायां मरतया जीवाचें । श्रेय तुवां घेतलें ॥ ५४ ॥ आपुलें प्रतिबिंब नेणतां । सिंह कुहां घालील देखोनि आतां । ऐसा धरिजे तेवीं अनंता । राखिलें मातें ॥ ५५ ॥ एऱ्हवीं माझा तरी येतुलेवरी । एथ निश्चय होता अवधारीं । जे आतांचि सातांही सागरीं । एकत्र मिळिजे ॥ ५६ ॥ हें युगाचि आघवें बुडावें । वरि आकाशहि तुटोनि पडावें । परि झुंजणें न घडावें । गोत्रेशीं मज ॥ ५७ ॥ ऐसिया अहंकाराचिये बाढी । मियां आग्रहजळीं दिधली होती बुडी । चांगचि तूं एऱ्हवीं काढी । कवणु मातें ॥ ५८ ॥ नाथिलें आपणपें एक मानिलें । आणि नव्हतया नाम गोत्र ठेविलें । थोर पिसें होतें लागलें । परि राखिलें तुम्हीं ॥ ५९ ॥ मागां जळत काढिलों जोहरीं । तैं तें देहासीच भय अवधारीं । आतां हे जोहरवाहर दुसरी । चैतन्यासकट ॥ ६० ॥ दुराग्रहें हिरण्याक्षें । माझी बुद्धिवसुंधरा खूदली काखे । मग मोहार्णवगर्वाखें । रिघोनि ठेला ॥ ६१ ॥ तेथ तुझेनि गोसावीपणें । एकवेळ बुद्धीचिया ठाया येणें । हें दुसरें वराह होणें । पडिलें तुज ॥ ६२ ॥ ऐसें अपार तुझें केलें । एकी वाचा काय मी बोलें । परि पांचही पालव मोकलिले । मजप्रती ॥ ६३ ॥ तें कांहीं न वचेचि वायां । भलें यश फावलें देवराया । जे साद्यंत माया । निरसिली माझी ॥ ६४ ॥ जी आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे जे हे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिती ॥ ६५ ॥ हां हो तयाही आणि मोहाची भेटी । हे कायसी पाबळी गोठी । केउती मृगजळाची वृष्टी । वडवानळेंसी ॥ ६६ ॥ आणि मी तंव दातारा । कृपेचां ये रिघोनि गाभारां । घेत आहें चारा ।



कवणी ते उदार गदा । असुरां देत कैवल्य सदा ।
कैसें चक्रहन गोविंदा । सौम्य तेजें मिरवे ॥
किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठित पां मी ।
म्हणोनि आतां तुम्ही । तैसया होआवें ॥

ज्ञानेश्वरी अध्याय ११, ओव्या ६०४,६०५

अर्जुन म्हणाला, माझ्यावर अनुग्रह करण्याकरितां अध्यात्म नांवाचें अत्यंत गुह्य असें जें भाषण तूं बोललास, त्यानें हा माझा मोह निःशेष नाहींसा झाला. १.

मग अर्जुन कृष्णाला म्हणाला, हे कृपासागरा, जें बोलतां यावयाचें नाहीं, तें तुम्ही माझ्याकरितां बोललांत. ४४. ज्या वेळीं पंचमहाभूतें ब्रह्मामध्यें नाहींशीं होतात व जीव आणि महत्तत्त्व वगैरे यांचा पत्ता नाहींसा होतो, त्यावेळीं देवा, आपण जें ( ब्रह्मरूप ) होऊन राहतां, तें शेवटचें विश्रांतिस्थान आहे. ४५. जी स्वरूपस्थिति वेदांसही कळूं न देतां ( आपण आपल्या ) अंतःकरणरूपी घरांत कृपणासारखी पुरून ठेवली होती, ४६. आज ती तुम्हीं आपल्या अंतःकरणांतील गुप्त गोष्ट माझ्यापुढें प्रकट केली. ( ही गोष्ट म्हणजे आपलें स्वरूपज्ञान होय. ) या अध्यात्मज्ञानावरून शंकरानें आपलें ऐश्वर्य ओंवाळून टाकलें आहे. ४७. महाराज, अशी जी वस्तु, ती तुम्हीं मला एका क्षणांत दिलीत, असें म्हणावें तर आम्ही तुम्हांपासून वेगळे कोठें आहोंत ? ४८. पण खरोखर मोहाच्या महापुरांत मी डोक्यापर्यंत बुडतों आहे, असें पाहून, श्रीकृष्णा, तुम्ही आपण स्वतः उडी घालून मग मला बाहेर काढलें. ४९. एक तुझ्याशिवाय या अखिल विश्वामध्यें दुसऱ्याची कांहीं वार्ता नाहीं. ( अशी वास्तविक स्थिति असतांना ), आमचें दुर्दैव पहा कीं, आम्हीं अभिमानानें, आम्ही कोणी तरी एक आहोंत, असें समजतों. ५०. जगामध्यें मी एक अर्जुन आहें, असा देहाच्या ठिकाणीं अभिमान बाळगतों आणि या कौरवांना आपले भाऊबंद म्हणतों. ५१. यावर देखील यांना मी मारीन आणि त्या पापाच्या योगानें मग मला कोणती गति मिळेल, असें म्हणत होतों. याप्रमाणें मी वाईट स्वप्न पहात होतों; त्या मला, महाराज, इतक्यांत आपण जागें केलें. ५२. कृष्णा, गंधर्वनगराची वस्ती सोडून मी बाहेर पडलों. हे लक्ष्मीपते, मी पाण्याच्या इच्छेनें मृगजळ पीत होतों. ५३. महाराज, सर्प कापडाचाच होता. ( पण त्यावर पाय पडून तो चावला असा भ्रम होऊन ) विषाच्या लहरी मात्र खऱ्या येत होत्या ( आपण मरतों असें उगीच वाटत होतें. ). याप्रमाणें आपण मरतों, असें भ्रमानें वाटणाऱ्या जीवाला ( मला ) वांचविण्याचें पुण्य तुम्हीं घेतलें. ५४. विहिरींत दिसणारी ही आपली पडछाया आहे, हें न समजतां, आतां सिंह आंत उडी टाकणार, इतक्यांत त्याला कोणी येऊन धरावें, त्याप्रमाणें हे अनंता, आपण माझें रक्षण केलेंत. ५५. ऐक. बाकी माझा तर येथें इतका निश्चय झाला होता कीं, आतांच जरी सातही समुद्र एकवट झाले; ५६. हा प्रलय जरी झाला अथवा आकाशही तुटून पडलें ( तरी चालेल ), पण माझ्यावर माझ्या कुळाशीं लढण्याचा प्रसंग न यावा. ५७. अशा अहंकाराच्या उत्कर्षानें मी आग्रहरूपी पाण्यांत बुडी मारली होती. ( प्राण गेला तरी बेहत्तर, पण मी गोत्रजांशीं लढणार नाहीं, असा माझा कृतनिश्चय होता. ) पण आपण चांगले होता म्हणून ठीक झालें. नाहींतर मला त्यांतून कोणी काढलें असतें ? ५८. वास्तविक मी कोणीएक नसतांना, खोटेंच मी कोणी ( अर्जुन ) आहे, असें मानलें; आणि वास्तविक कांहीं नाहींत, असे जे कौरव, त्यांस नातलग असें नांव ठेविलें; याप्रमाणें मला मोठें वेड लागलें होतें, पण तुम्ही माझें रक्षण केलेंत, ५९, ऐक. मागें ( पूर्वी एकदां ) जेव्हां आम्हीं अग्नींत ( लाक्षागृहांत ) जळण्याच्या बेतांत होतों, तेव्हां तूं आम्हांला बाहेर काढलेंस. तेव्हां काय तें एक स्थूल देहासच भय होतें; पण आतां या ( मोहरूपी ) दुसऱ्या अग्नीच्या पीडेपासून चैतन्यासकट देहाला भय होतें. ६०. दुराग्रहरूपी हिरण्याक्ष दैत्यानें, माझी बुद्धीरूपी पृथ्वी काखेंत घातली व मग तो मोहरूपी समुद्राच्या द्वारानें आंत शिरून राहिला. ६१. देवा, आपल्या सामर्थ्यानें पुनः एक वेळ माझी बुद्धि आपल्या मूळ ठिकाणाला आली. हे देवा, या वेळीं तुम्हांला दुसऱ्यांदा वराह अवतार घ्यावा लागला. ६२. याप्रमाणें तुझीं अनंत उपकाराचीं कृत्यें आहेत. त्यांचें मी एका वाचेनें काय वर्णन करूं ? परंतु ( एवढें मात्र मी तुम्हांला सांगूं शकतों कीं, ) तुम्हीं आपले पंचप्राण मला अर्पण केले आहेत. ६३. देवा, तें आपलें करणें कांहीं एक व्यर्थ गेलें नाहीं. हें आपल्याला चांगलें यश प्राप्त झालें आहे, कारण कीं, माझें अज्ञान समूळ नाहींसें झालें. ६४. महाराज, आनंदरूप सरोवरांतील कमळासारखे हे तुमचे डोळे आपल्या कृपाप्रसादाचीं घरें ज्याला करतील, ६५. अहो महाराज, त्याला देखील, आणि भ्रांतीनें ग्रासावें ? ही दुबळी गोष्ट काय बोलावी ? वडवानळ ( समुद्रांत जळत असलेला अग्नि ) समुद्राच्या पाण्यानें विझला जात नाहीं, त्यावर मृगजळाच्या वृष्टीचा काय परिणाम होणार आहे ? ६६. आणि तशांत अहो श्रीकृष्णा, मी तर आपल्या या कृपेच्या गाभाऱ्यांत शिरून ब्रह्मरसाचें भोजन

ब्रह्मरसाचा ॥ ६७ ॥ तेणें माझा जी मोह जाये । एथ विस्मो कांहीं आहे । तरी उद्धरलों कीं तुझे पाये । शिवतले आहाती ॥ ६८ ॥

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया । त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाऽव्ययम् ॥ २ ॥

पैं कमलायतडोळसा । सूर्यकोटितेजसा । मियां तुजपासोनि महेशा । परिसिलें आजि ॥ ६९ ॥ इयें भूतें जयापरी होती । अथवा लया हन जैसेनि जाती । तें मजपुढां प्रकृती । विवंचिली देवें ॥ ७० ॥ आणि प्रकृती कीर उगाणा दिधला । परि पुरुषाचाही ठावो दाविला । जयाचा महिमा पांघरोनि जाहला । धडौता वेदु ॥ ७१ ॥ जी शब्दराशी वाढे जिये । कां धर्माऐशिया रत्नातें विये । ते एथिंचे प्रभेचे पाये । बोळगे म्हणोनि ॥ ७२ ॥ ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळमार्गैकगम्य । जें स्वात्मानुभवरम्य । तें इयापरी दाविलें ॥ ७३ ॥ जैसा केरु फिटलिया आभाळीं । दिठी रिगे सूर्यमंडळीं । कां हातें सारुनि बाबुळी । जळ दाविजे ॥ ७४ ॥ नातरि उकलतया सापाचे वेढे । जैसे चंदना खेंव देणें घडे । अथवा विवसी पळे मग चढे । निधान हातां ॥ ७५ ॥ तैसी प्रकृति हे आड होती । ते देवेंचि सारिली परौती । मग परतत्त्व माझिये मती । शेजार केलें ॥ ७६ ॥ म्हणोनि इयेविषयींचा मज देवा । भरंवसा कीर जाहला जीवा । परि आणीक एक हेवा । उपनला असे ॥ ७७ ॥ तो भिडां जरी म्हणों राहों । तरी आना कवणा पुसों जावों । काइ तूंवांचोनि ठावो । जाणत आहों आम्ही ॥ ७८ ॥ जळचरु जळाचा आभारु धरी । बाळक स्तनपानीं उपरोधु करी । तरी तया जिणयासी श्रीहरी । आन उपायो असे ॥ ७९ ॥ म्हणोनि भीडसांकडी न धरवे । जीवीं आवडे तेंही तुजपुढां बोलावें । तंव राहें म्हणितलें देवें । चाड सांगें ॥ ८० ॥

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर । द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

मग बोलिला तो किरीटी । म्हणे तुम्हीं केली जे गोठी । तिया प्रतीतीची दिठी । निवाली माझी ॥ ८१ ॥ आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपे । जया ठायातें आपणपें । मी ऐसें म्हणसी ॥ ८२ ॥ तें मुद्दल स्वरूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें । सुरकार्याचेनि व्याजें । घेवोंघेवों येसी ॥ ८३ ॥ पैं जळशयनाचिया अवगणिया । कां मत्स्य कूर्म इया मिरव- णिया । खेळु सरलिया तूं गुणिया । सांठविसी जेथ ॥ ८४ ॥ उपनिषदें जें गाती । योगिये हृदयीं रिगोनि पाहाती । जयातें सनकादिक आहाती । पोटाळूनियां ॥ ८५ ॥ ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥ ८६ ॥ देवें फेडूनियां साकड । लोभें पुसिली जरी चाड । तरि हेचि एकी वाड । आर्ती जी मज ॥ ८७ ॥ तुझें विश्वरूपपण आघवें । माझिये दिठीसि गोचर होआवें । ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहें ॥ ८८ ॥

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो । योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥

परि आणीक एक एथ शाङ्गीं । तुज विश्वरूपातें देखावयालागीं । योग्यता माझां आंगीं । असे कीं नाहीं ॥ ८९ ॥ हें आपलें आपण मी नेणें । तें कां नेणसी जरी देव म्हणे । तरी सरोगु

करीत आहे. ६७. महाराज, त्या योगानें माझी भ्रांति नष्ट होईल यांत काय आश्चर्य आहे ? पण माझी भ्रांति गेली इतकेंच नव्हे, तर माझा उद्धार झाला, हे तुमच्या पायाची शपथ घेऊन सांगतों. ६८.

हे कमलपत्राक्षा, भूतांची उत्पत्ति व नाश आणि तसेंच तुझें अपार माहात्म्यहि मीं तुझ्यापासून सविस्तर ऐकलें. २.

कमळासारखे मोठे डोळे आहेत ज्याचे व कोटिसूर्यांसारखें तेज आहे ज्याचें, अशा देवा महेशा, मी आपल्यापासून आजच असें ऐकिलें आहे कीं, ६९. हे सर्व प्राणी ज्या रीतीनें प्रकृतीपासून उत्पन्न होतात अथवा उत्पन्न झालेलीं भूतें ज्या रीतीनें पुनः प्रकृतीमध्यें लय पावतात, ती प्रकृति देवानें मला सांगितली. ७०. आणि प्रकृतीच्या स्वरूपाचा खरोखर सर्व हिशोब दिला आणि ज्या परमेश्वराचा महिमा पांघरून वेद सबळ (सुशोभित) झाला, त्या परमेश्वराचेंही ठिकाण तुम्हीं मला दाखविलें. ७१. महाराज, वेद वाढतो ( उत्कर्ष पावतो ) व जगतो ( टिकतो ) अथवा धर्मासारख्या रत्नाला प्रसवतो, तें सर्व या आपल्या स्वरूपसामर्थ्याचा आश्रय करतो म्हणून. ७२. असें आपलें अपार माहात्म्य आहे. आपलें माहात्म्य हें सर्व मार्गांनीं जाणण्याचा एकच विषय आहे. व जें आपल्या स्वतःच्या आत्म्याच्या अनुभवामुळें रममाण होण्यास योग्य असें जें आपलें माहात्म्य, तें आपण मला याप्रमाणें दाखविलें. ७३. ज्याप्रमाणें आकाशांतील ढग नाहींसे झाल्यावर दृष्टि सूर्यमंडळांत प्रवेश करते अथवा पाण्यावरील गोंडाळ हातानें दूर करून मग ज्याप्रमाणें पाणी दाखवावें, ७४. अथवा सापाचे वेढे उकलले असतां ज्याप्रमाणें चंदनाला भेटतां येतें अथवा पिशाच दूर गेल्यावर जसें पुरलेलें द्रव्य हातीं लागतें; ७५. त्याप्रमाणें माझ्या स्वरूपाच्या आड अज्ञान होतें, तें देवानींच दूर सारलें. नंतर माझ्या बुद्धीला आपणच परब्रह्माचें शेजघर केलें ( ब्रह्मस्वरूपीं माझी बुद्धि स्थिर केली. ) ७६. म्हणून देवा, याविषयीं माझ्या जिवाची खरोखर खात्री पटली; परंतु आणखी एक उत्कट इच्छा उत्पन्न झाली आहे. ७७. आम्ही भिडेमुळें ती गोष्ट जर विचारावयाची राहूं दिली, तर आम्हीं दुसऱ्या कोणास विचारावयास जावें ? तुझ्यावांचून दुसरी विचारण्याची जागा आम्हांस माहीत आहे काय ? ७८. पाण्यांत राहणाऱ्या प्राण्यांनीं जर पाण्याच्या उपकाराचें ओझें मानलें, अथवा मुलानें स्तनपान करण्याविषयीं आईची भीड धरली, तर देवा, त्यास जगण्यास दुसरा उपाय आहे काय ? ७९. म्हणून भीड अथवा संकोच धरवत नाहीं. मनाला जें बरें वाटेल, तें देखील तुझ्यापुढें बोलून दाखवावें. त्यावर श्रीकृष्ण म्हणाले, थांब, तुझी इच्छा काय असेल ती सांग. ८०.

हे परमेश्वरा, तूं स्वतःविषयीं हें जें सांगितलेंस, त्याप्रमाणें हे पुरुषोत्तमा, हें तुझें ऐश्वर्ययुक्त विश्वरूप ( प्रत्यक्ष ) पहाण्याची माझी इच्छा आहे. ३.

मग तो अर्जुन म्हणाला, देवा, तुम्हीं ( मागें दहाव्या अध्यायांत ) जी गोष्ट सांगितलीत, त्या योगानें माझ्या अनुभवाची दृष्टि शांत झाली. ८१. आतां ज्याच्या संकल्पानें ही लोकांची मालिका उत्पन्न होते व नाहींशी होते आणि ज्या स्थानास, तूं 'मी' असें म्हणतोस, ८२. जेथून हीं दोन हातांचीं अथवा चार हातांचीं रूपें देवांचें कार्य करण्याच्या निमित्तानें वारंवार घेऊन येतोस, तें तुझें मूळ स्वरूप होय. ८३. हा अवतारकृत्यांचा खेळ संपल्यानंतर क्षीरसमुद्रांत झोंप घेण्याचें सोंग किंवा मत्स्य, कूर्म इत्यादिक अलंकार, यांना तूं गारोडी जेथें ( ज्या मूळस्वरूपांत ) सांठवितोस, ८४. उपनिषदें ज्याचें वर्णन करितात, योगी लोक आपल्या हृदयांत शिरून ज्याचा साक्षात्कार करून घेतात, ज्याला सनकादिक संत मिठी मारून राहिलेले आहेत. ८५. असें जें अमर्याद असलेलें तुझें विश्वरूप कानांनीं मी ऐकतों, तें पहाण्याकरितां, देवा, माझें चित्त फारच उत्कंठित झालें आहे. ८६. माझा संकोच दूर करून देवानें प्रेमानें माझी इच्छा काय आहे, असें ज्या अर्थी विचारलें आहे, तर महाराज, मी असें सांगतों कीं, हीच एक मला मोठी तीव्र इच्छा आहे. ८७. तूंच या विश्वांत भरला आहेस, हें पूर्णपणें माझ्या या डोळ्यांना दिसावें, अशी मोठी इच्छा मी मनांत बाळगून राहिलों आहें. ८८.

हे प्रभो, तें मी पहाणें शक्य आहे असें जर तुला वाटत असेल तर, हे योगेश्वरा, क्षयरहित असें स्वतःचें रूप तूं मला दाखव. ४.

परंतु कृष्णा, आणखी एक गोष्ट आहे, ती ही कीं, विश्वरूप जो तूं, त्या तुला पहाण्याला माझ्या अंगांत योग्यता आहे कीं नाहीं, ८९. हें माझें मला समजत नाहीं. हें कां समजत नाहीं, असें जर आपण म्हणाल; तर ( सांगा ) रोग्यास आपल्या रोगाचें मूळ कारण

काय जाणे । निदान रोगाचें ॥ ९० ॥ आणि जी आर्तीचेनि पडिभरें । आर्तु आपुली ठाकी पैं विसरे । तान्हेला म्हणे न पुरे । समुद्र मज ॥ ९१ ॥ ऐशी सचाडपणाचिये भुली । न सांभाळवे समस्या आपुली । यालागीं योग्यता जेवीं माउली । बाळकाची जाणे ॥९२॥ तयापरी जनार्दना । विचारिजो माझी संभावना । मग विश्वरूपदर्शना । उपक्रम कीजे ॥ ९३ ॥ तरि तैसी ते कृपा करा । एऱ्हवीं नव्हे हें म्हणा अवधारा । वायां पंचमालापें बधिरा । सुख केउतें देणें ॥ ९४ ॥ एऱ्हवीं येकल्या बापियाचिया तृषे । मेघ जगापुरतें काय न वर्षे । परि जहालीही वृष्टि उपखे । जऱ्ही खडकीं होय ॥ ९५ ॥ चकोरा चंद्रामृत फावलें । येरां आण वाहूनि काय वारिलें । परि डोळ्यांवीण पाहलें । वायां जाय ॥ ९६ ॥ म्हणोनि विश्वरूप तूं सहसा । दाविसी हा कीर भरंवसा । कां जे कडाडां आणि गाहिंसां- । माजीं नीच नवा तूं कीं ॥ ९७ ॥ तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्याऐसें पवित्र । कीं वैरियांही दिधलें ॥ ९८ ॥ मोक्षु दुराराध्यु कीर होय । परि तोही आराधी तुझे पाय । म्हणोनि धाडिसी तेथ जाय । पाइकु जैसा ॥९९॥ तुवां सनकादिकांचेनि मानें । सायुज्यीं सौरसु केला पूतने । जे विषाचेनि स्तनपानें । मारूं आली ॥ १०० ॥ हां गा राजसूयांचा सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी । कैसा शतधा दुर्वादीं । निस्तेजिलासी ॥ १ ॥ ऐशिया अपराधिया शिशुपाळा । आपणपयां ठावो दिधला गोपाळा । आणि उत्तानचरणाचिया बाळा । काय ध्रुवपदीं चाड ॥ २ ॥ तो वना आला याचिलागीं । जे बैसावें पितयाचां उत्संगीं । कीं तो चंद्रसूर्यादिकांपरिस जगीं । श्लाघ्यु केला ॥ ३ ॥ ऐसा वनवासियां सकळां । देता एकचि तूं घसाळा । पुत्रा आळवितां अजामिळा । आपणपें देसी ॥ ४ ॥ जेणें उरीं हाणितलासि पांपरा । तयाचा चरणु वाहासी दातारा । अझुनी वैरियांचिया कलेवरा । विसंवसीना ॥ ५ ॥ ऐसा अपकारियां तुझा उपकारु । तूं अपात्रींही परि उदारु । दान मागोनि दारवंटेकरु । जाहलासी बळीचा ॥ ६ ॥ तूंतें आराधी ना आयके । होती पुंसा बोलावित कौतुकें । तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाडु केला ॥ ७ ॥ ऐसीं पाहुनि वायाणीं मिषें । लागलासी आपणपें देवों बानिवसें । तो तूं कां अनारिसें । मजलागीं करिसी ॥ ८ ॥ हां गा दुभतयाचेनि पवाडें । जे जगाचें फेडी सांकडें । तिये कामधेनूचे पाडे । काय भुकेले ठाती ॥९॥ म्हणोनि मियां जें विनविलें कांहीं । तें देव न दाखविती हें कीर नाहीं । परि देखावयालागीं देईं । पात्रता मज ॥ ११० ॥ तुझें विश्वरूप आकळे । ऐसें जरी जाणसी माझे डोळे । तरि आर्तीचे डोहळे । पुरवीं देवा ॥ ११ ॥ ऐसी ठायेंठावो विनंती । जंव करूं सरेल सुभद्रापती । तंव तया षड्गुणचक्रवर्ती । साहवेचिना ॥ १२ ॥ तो कृपापीयूषसजळु । आणि येरु जवळां आला वर्षाकाळु । नाना कृष्ण कोकिळु । अर्जुन वसंतु ॥ १३ ॥ नातरी चंद्रबिंब वाटोळें । देखोनि क्षीरसागर

समजतें काय ? ९०. महाराज, आणि इच्छेचा जोर झाला, म्हणजे उत्कंठित मनुष्य आपली योग्यता विसरतो. ( ज्याप्रमाणें ) फार तहान लागलेल्या मनुष्यास 'मला समुद्रही पुरणार नाहीं' असें वाटतें; ९१. याप्रमाणें तीव्र इच्छेच्या वेडानें मला माझ्या शक्तीचा अंदाज कळत नाहीं, म्हणून ज्याप्रमाणें आई ही आपल्या मुलाची योग्यता जाणते, ९२. त्याप्रमाणें हे जनार्दना, माझी योग्यता किती आहे, याचा आपण विचार करा व मग विश्वरूप दाखविण्यास आरंभ करा. ९३. तरी माझ्या योग्यतेनुरूप कृपा करा ( एन्हवीं माझी विश्वरूप पाहाण्याची योग्यता नसेल तर ) तुला विश्वरूप दाखविणें शक्य नाहीं, असें स्पष्ट सांगा. पहा, बहिऱ्या मनुष्याला पंचम स्वरांतील गायनानें सुख देण्याचा व्यर्थ प्रयत्न करणें, हें कोठचें ? ९४. सहज पाहिलें तर, मेघ हा एकट्या चातकाची तहान भागविण्याकरितां पर्जन्यवृष्टि करतो, ती वृष्टि जगापुरती होत नाहीं काय ? परंतु तीच पर्जन्यवृष्टि खडकावर झाली, तर ती वृष्टि होऊन सुद्धां व्यर्थ होते. ९५. चकोर पक्ष्याला चंद्रामृत प्राप्त झालें, तेंच चंद्रामृत इतर प्राण्यांना घेऊं नका, म्हणून शपथ घालून चंद्रानें त्यांचें निवारण केलें आहे काय ? परंतु जसें इतरांस ( अमृत सेवनाची ) दृष्टि ( हातवटी ) नसल्यामुळें चंद्रोदय होऊनही तो व्यर्थ जातो; ९६. म्हणून तूं विश्वरूप मला एकदम दाखविशील ही मला खरोखर खात्री आहे. कारण कीं जाणत्यांत आणि नेणत्यांत तूं नित्य नवा ( उदार ) आहेस. ९७. तुझा उदारपणा स्वतंत्र आहे ( याचकाच्या इच्छेवर अवलंबून नाहीं ). याववास लागलास म्हणजे, हा योग्य आहे अथवा हा अयोग्य आहे, अशी निवड तूं करीत नाहींस. मोक्षासारखी पवित्र वस्तु पण ती तूं आपल्या शत्रूंस देखील दिलीस. ९८. खरोखर मोक्ष हा मिळण्यास फार कठीण आहे; परंतु तो देखील तुझ्याच चरणाची सेवा करतो व म्हणूनच तूं धाडशील, तेथें तो चाकराप्रमाणें जातो. ९९. जी पूतनाराक्षसी, विषाचें स्तनपान करवून तुला मारावें म्हणून तुझ्याकडे आली, त्या पूतनेला तूं सनकादिकांच्या बरोबरीनें मोक्षाविषयीं योग्य केलेंस. १००. अहो, राजसूययज्ञाच्या सभासदांत त्रिभुवनांतील हजारों मंडळी पहात असतांना, शेंकडों प्रकारच्या वाईट शब्दांनीं ( शिशुपालाकडून ) तुझा पाणउतारा झाला. १०१. अशा अपराधी शिशुपालाला आपल्या स्वरूपाचे ठिकाणीं, श्रीकृष्णा, तूं जागा दिलीस आणि उत्तानपाद राजाच्या मुलाला ( ध्रुवाला ) अढळपदाची इच्छा होती काय ? १०२. तो एवढ्याचकरितां रानांत आला कीं, आपण बापाचे मांडीवर बसावें; परंतु त्याला या लोकांमध्यें चंद्रसूर्यादिकांपेक्षांही प्रशंसनीय केलेंस. १०३. याप्रमाणें दुःखानें व्यापलेल्या सर्वांना, देण्यांत सढळ असें, एक तुम्हींच आहांत. मुलाला हांक मारीत असतां अजामिळाला आपली तद्रूपता दिलीत. १०४. हे उदार श्रीकृष्णा, ज्या भृगूनें तुझ्या छातीवर लाथ हाणली, त्याच्या पावलांची खूण तूं आपल्या छातीवर धारण करतोस. ( शंखासुर ) शत्रु असूनही, तूं अजून त्याच्या शरीरास ( शंखास ) विसंबत नाहींस. १०५. याप्रमाणें तुझ्यावर अपकार करणाऱ्या लोकांवर तूं उपकार केलेले आहेस, तूं वास्तविक योग्यता नसलेल्यांचे ठिकाणींही आपलें औदार्य दाखविलें आहेस. दान मागून घेऊन तूं बळीचा द्वारपाळ झालास. ज्या गणिकेनें तुला कधीं पूजिलें नाहीं अथवा १०६. तुझें गुणवर्णन कधीं ऐकलें नाहीं व जी गणिका मरतेवेळीं सहज आपल्या पाळलेल्या राघूस 'राघोबा, राघोबा' म्हणून हांक मारीत होती, त्या गणिकेस त्वां वैकुंठामध्यें सुख दिलेंस. १०७. वरील गणिकेच्या राघोबा म्हणण्याप्रमाणें व्यर्थ निमित्यें पाहून, तूं सहज निजपद अपात्र माणसालाही देतोस; असा जो तूं कांहीं तरी निमित्त पाहून अपात्र माणसास निजपद देणारा, तो तूं मला वेगळें करशील काय ? १०८. जी कामधेनु आपल्या दुभत्याच्या विपुलतेनें सगळ्या जगाची अडचण दूर करते, त्या कामधेनूचीं वासरें भुकेलीं राहतील काय ? १०९. म्हणून मी जी कांहीं विनंति केली, ती मान्य करून, देव आपलें विश्वरूप दाखविणार नाहींत, असें खरोखर नाहीं; परंतु तें पाहण्याला लागणारी योग्यता मला द्यावी. ११०. तुझ्या विश्वरूपाचें आकलन होईल, असे माझे डोळे समर्थ आहेत; असें जर तुला वाटत असेल तर, हे श्रीकृष्णा, विश्वरूप पहाण्याच्या उत्कंठेचे हे डोहाळे पूर्ण करावेत. १११. याप्रमाणें जशी पाहिजे तशी त्या वेळेला अर्जुन विनंति करील तेव्हां ती त्या ऐश्वर्यादि सहा गुणांच्या सर्वभौम राजाला सहन होणार नाहीं. ११२. तो श्रीकृष्ण परमात्मा, कृपारूपी अमृतानें जलयुक्त मेघ होता आणि अर्जुन हा जवळ आलेला पावसाळा होता अथवा कृष्ण हा कोकीळ असून अर्जुन हा वसंत ऋतु होता. ११३. अथवा चंद्राचें गोल असलेलें पूर्ण बिंब पाहून क्षीरसमुद्राला जसें भरतें येतें, त्याप्रमाणें प्रेमाला दुपटीपेक्षां अधिक

उचंबळे । तैसा दुणेंही वरी प्रेमबळें । उल्लासितु जाहला ॥ १४ ॥ मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें । गाजोनि म्हणितलें सकृपें । पार्था देख देख उमपें । स्वरूपें माझीं ॥ १५ ॥

श्रीभगवानुवाचः— पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः । नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

एकाचि विश्वरूप देखावें । ऐसा मनोरथु केला पांडवें । कीं विश्वरूपमय आघवें । करूनि घातलें ॥ १६ ॥ बाप उदार देवो अपरिमितु । याचक स्वेच्छा सदोदितु । असे सहस्रवरी देतु । सर्वस्व आपुलें ॥ १७ ॥ अहो शेषाचेहि डोळे चोरिले । वेद जयालागीं झकविले । लक्ष्मीयेही परि राहिलें । जिव्हार जें ॥ १८ ॥ तें आतां प्रगटुनी अनेकधा । करीत विश्वरूप-दर्शनाचा धांदा । बाप भाग्या अगाधा । पार्थाचिया ॥ १९ ॥ जो जागता स्वप्नावस्थे जाये । तो जेवीं स्वप्नींचें आघवें होये । तेवीं अनंत ब्रह्मकटाह आहे । आपणचि जाहला ॥ १२० ॥ तेथिंची सहसा मुद्रा सोडिली । आणि स्थूळदृष्टीची जवनिका फाडिली । किंबहुना उघडिली । योगऋद्धी ॥ २१ ॥ परि हा हें देखेल कीं नाहीं । ऐसी सोचि न करी कांहीं । एकसरां म्हणतसे पाहीं । स्नेहातुर ॥ २२ ॥ अर्जुना तुवां एक दावा म्हणितलें । आणि तेंचि दावूं तरि काय दाविलें । आतां देखें आघवें भरिलें । माझांचि रूपीं ॥ २३ ॥ एकें कृशें एकें स्थूळें । एकें ऱ्हस्वें एकें विशाळें । पृथुतरें सरळें । अप्रांतें एकें ॥ २४ ॥ एकें अनावरें प्रांजळें । सव्यापारें एकें निश्चळें । उदासीनें स्नेहाळें । तीव्रें एकें ॥ २५ ॥ एकें घूर्णितें सावधें । असलगें एकें अगाधें । एकें उदारें अतिबद्धें । क्रुद्धें एकें ॥ २६ ॥ एकें संतें सदामदें । स्तब्धें एकें सानंदें । गर्जितें निःशब्दें । सौम्यें एकें ॥ २७ ॥ एकें साभिलाषें विरक्तें । उन्निद्रितें एकें निद्रितें । परितुष्टें एकें आर्तें । प्रसन्नें एकें ॥ २८ ॥ एकें अशस्त्रें सशस्त्रें । एकें रौद्रें अतिमित्रें । भयानकें एकें पवित्रें । लयस्थें एकें ॥ २९ ॥ एकें जनलीलाविलासें । एकें पालनशीलें लालसें । एकें संहारकें सावेशें । साक्षिभूतें एकें ॥ १३० ॥ एवं नानाविधें परि बहुवसें । आणि दिव्यतेज-प्रकाशें । तेवींचि एकएकाऐसे । वर्णेंही नव्हे ॥ ३१ ॥ एकें तातलें साडेपंधरें । तैसीं कपिलवर्णें अपारें । एकें सरागें जैसें सेंदुरें । डवरलें नभ ॥ ३२ ॥ एकें सावियाचि चुळकीं । जैसा ब्रह्मकटाह खाचिलें माणिकीं । एकें अरुणोदयासारिखीं । कुंकुमवर्णें ॥ ३३ ॥ एकें शुद्धस्फटिक-सोज्ज्वळें । एकें इंद्रनीळसुनीळें । एकें अंजनाचल सकाळें । रक्तवर्णें एकें ॥ ३४ ॥ एकें लसत्कांचनसम पिंवळीं । एकें नवजलदश्यामळीं । एकें चांपेगोरीं केवळीं । हरितें एकें ॥ ३५ ॥ एकें तप्तताम्रतांबडीं । एकें श्वेतचंद्र चोखडीं । ऐसीं नानावर्णें रूपडीं । देख माझीं ॥ ३६ ॥ हे जैसें कां आनान वर्ण । तैसें आकृतींही अनारिसेपण । लाजा कंदर्प रिघाला शरण । तैसें सुंदरें एकें ॥ ३७ ॥ एकें अतिलावण्यसाकारें । एकें स्निग्धवपु मनोहरें । शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ॥ ३८ ॥ एकें पीनावयव मांसाळें । एकें शुष्कें अतिविक्राळें । एकें दीर्घकंठें विताळें । विकटें एकें ॥ ३९ ॥ एवं नानाविधाकृती । इयां पाहतां पारु नाहीं सुभद्रापती । ययांच्या एकेकीं अंगप्रांतीं । देख पां जग ॥ १४० ॥

जोर येऊन श्रीकृष्ण आनंदित झाला. ११४. मग त्या प्रसन्न-पणाच्या आवेशांत गर्जना करून कृपावंत श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, पहा, पहा, हीं माझीं अनंत स्वरूपें. ११५.

श्रीकृष्ण म्हणाले, पार्था, नाना प्रकारचीं, नाना-वर्णांचीं (रंगांचीं) व नाना आकृतींचीं माझीं शेंकडों, हजारों, दिव्य रूपें पहा. ५.

एकच विश्वरूप पहावें, असा मनोरथ अर्जुनानें केला; इतक्यांत (देवानें) सर्वच विश्वरूप करून टेवलें. ११६. धन्य श्रीकृष्ण परमात्मा! तो अमर्याद उदार आहे. तो नेहमीं याचकाच्या इच्छेच्या सहस्रपट आपलें सर्वस्व देतो. ११७. अहो, जें दोन हजार डोळे असलेल्या शेषाचेही दृष्टीस पडूं दिलें नाहीं; वेदांना ज्याचा पत्ता लागूं दिला नाहीं (फार काय सांगावें?) लक्ष्मी हें भगवंताचें कुटुंब खरें, पण तिलाही जें दाखविलें नाहीं, असें जें भगवंताच्या जीवाचें गुह्य विश्वरूप, ११८. तें विश्वरूप आतां अनेक प्रकारांनीं प्रगट करून देव विश्वरूप दाखविण्याचा व्यवहार करूं लागले. अर्जुनाच्या अपार भाग्याची धन्य आहे! ११९. जागा असलेला मनुष्य स्वप्नावस्थेत गेल्यावर, तो जसा स्वप्नांतील सर्व वस्तु आपणच बनून राहतो, त्याप्रमाणें श्रीकृष्ण परमात्मा आपणच अनंत ब्रह्मांडें बनून राहिलेला आहे. १२०. श्रीकृष्णांनीं तेथील विश्वरूपाचा आकार एकदम प्रगट केला आणि स्थूलदृष्टीचा पडदा फाडला (दूर केला) फार काय सांगावें! त्यानें तो आकार म्हणजे आपलें योगाचें वैभव प्रगट केलें; १२१. परंतु हा अर्जुन हें विश्वरूप पाहूं शकेल कीं नाहीं, हें देवांनीं कांहीं लक्षांतच घेतलें नाहीं; तर अर्जुनाच्या प्रेमामुळें उतावळे होऊन एकाएकीं अर्जुनास 'पहा, पहा' असें म्हणावयास लागले. १२२. अर्जुना तूं, एक विश्वरूप दाखवा, असें म्हटलेंस आणि आम्हीं तेंच (एकच विश्वरूप) दाखविलें, तर त्यांत आम्हीं काय मोठेंसें दाखविलें? तर आतां तूं असें पहा कीं, सर्व (विश्व) माझ्या स्वरूपांत सामावलेलें आहे. १२३. कांहीं रोडकीं, कांहीं लठ्ठ, कांहीं ठेंगू, कांहीं प्रशस्त, कांहीं फारच विस्तृत, सडपातळ व कांहीं अमर्याद, १२४. कांहीं न आवरणारीं व कांहीं प्रामाणिक, कांहीं सक्रिय व निष्क्रिय, कांहीं उदासीन, प्रेमळ, कांहीं कडक, १२५. कांहीं धुंद, कांहीं सावध, कांहीं उघड व कांहीं गूढ, कांहीं उदार, कांहीं कृपण, आणि रागावलेलीं कांहीं. १२६. कांहीं सदाचरणी, कांहीं सदा मदोन्मत्त, कांहीं स्तब्ध, कांहीं आनंदित, कांहीं गर्जना करणारी, कांहीं शब्दरहित व कांहीं शांत. १२७. कांहीं आशाखोर आणि कांहीं निराश, कांहीं जागीं झालेलीं व कांहीं झोंपलेलीं, कांहीं सर्व बाजूंनीं संतुष्ट, कांहीं पीडित आणि कांहीं प्रसन्न. १२८. कांहीं विनहत्यारी व कांहीं हत्यारी, कांहीं तामसी व कांहीं अतिशय स्नेहाळू व कांहीं भयंकर, कांहीं पवित्र आणि कांहीं समाधींत असलेलीं. १२९. कांहीं उत्पन्न करण्याच्या लीलेंत क्रीडा करणारीं, कांहीं पालन करण्याचा स्वभाव असलेलीं, कांहीं मोठ्या आवेशानें संहार करणारीं, कांहीं तटस्थ म्हणून राहिलेलीं. १३०. याप्रमाणें अनेक प्रकारचीं परंतु पुष्कळ व दिव्य तेजानें प्रकाशरूप अशीं तीं रूपें होतीं. त्याचप्रमाणें वर्णांच्याही बाबतींत तीं रूपें एकासारखी एक नव्हतीं. १३१. कांहीं तावून काढलेल्या उत्तम सोन्यासारखीं, त्याचप्रमाणें पिंगट रंग असलेलीं अनंतरूपें; आणि कांहीं, ज्याप्रमाणें शेंदरानें माखलेलें आकाश असावें त्याप्रमाणें शेंदरीं, १३२. रत्नांनीं ब्रह्मांड जडल्यामुळें तें जसें चमकत असावें, तशा प्रकारचीं कित्येक रूपें स्वाभाविक सौंदर्यानें चमकणारीं होतीं व कित्येक अरुणोदयाच्या केशरी वर्णाप्रमाणें होतीं. १३३. कांहीं शुद्ध स्फटिकाप्रमाणें शुभ्र असलेलीं, कांहीं इंद्रनील मण्याप्रमाणें चांगलीं निळी असलेलीं, कांहीं काजळाच्या पर्वताप्रमाणें अतिशय काळीं असलेलीं, कांहीं तांबड्या रंगाचीं, १३४. कांहीं तेजदार सोन्याप्रमाणें पिवळ्या रंगाचीं, कांहीं नव्या मेघाप्रमाणें काळ्यासांवळ्या वर्णांचीं, कांहीं केवळ चाफ्याप्रमाणें गोरीं असलेलीं आणि कांहीं हिरव्या रंगाचीं १३५. कांहीं तापलेल्या तांब्यासारखीं तांबडीं, कांहीं शुभ्र चंद्रासारखीं शुद्ध, अशीं हीं माझीं नाना रंगांचीं स्वरूपें पहा. १३६. हे ज्याप्रमाणें वेगवेगळे रंग आहेत, त्याप्रमाणें आकृतीही वेगवेगळ्या आहेत. कित्येक, लाजेनें मदनही शरण येईल, अशीं सुंदर आहेत. १३७. कांहीं रूपें अति सुंदर बांध्याचीं आहेत, कांहीं तुळतुळींत शरीराचीं मनाला हरण करणारीं आहेत; जणूंकाय शृंगारलक्ष्मीचे भांडारखानेच उघडले आहेत, अशीं आहेत. १३८. कांहीं पुष्ट अवयवांचीं व खूप मांस असलेलीं, कांहीं वाळलेलीं, अतिशय भयंकर, कांहीं उंच मानेचीं, कांहीं मोठ्या टाळूचीं व कांहीं हिडीस रूपाचीं. १३९. ह्याप्रमाणें अनेक प्रकारच्या आकृती आहेत. अर्जुना, ह्या आकृति पहावयास लागलें तर, त्यांना अंत नाहीं आणि त्यांच्या एक एका शरीरभागावर तूं जग पहा. १४०.

पश्यादित्यान्वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा । बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

जेथ उन्मीलन होत आहे दिठी । तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी । पुढती निमीलनीं मिठी । देत आहाती ॥ ४१ ॥ वदनींचिया बाफेसवें । होत ज्वाळामय आघवें । जेथ पावकादिक पावे । समूह वसूंचे ॥ ४२ ॥ आणि भ्रूलतांचे शेवट । कोपें मिळों पाहती एकवाट । तेथ रुद्रगणांचे संघाट । अवतरत देखें ॥ ४३ ॥ पैं सौम्यतेचां वोलावां । मिती नेणिजे अश्विनौदेवां । श्रोत्रीं होती पांडवा । अनेक वायु ॥ ४४ ॥ यापरी एकेकाचिये लीळे । जन्मती सुरसिद्धांचीं कुळें । ऐसीं अपारें आणि विशाळें । रूपें इयें पाहीं ॥ ४५ ॥ जयांतें सांगावया वेद बोबडे । पहावया काळाचेंही आयुष्य थोडें । धातयाही परि न सांपडे । ठाव जयांचा ॥ ४६ ॥ जयांतें देवत्रयी कहीं नायके । तियें इयें प्रत्यक्ष देख अनेकें । भोगीं आश्चर्यांची कवतिकें । महाऋद्धी ॥ ४७ ॥

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् । मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥

इया मूर्तीचिया किरीटी । रोममूळीं देखें पां सृष्टी । सुरतरुतळवटीं । तृणांकुर जैसे ॥४८॥ आणि वाताचेनि प्रकाशें । उडतां परमाणु दिसती जैसे । भ्रमत ब्रह्मकटाह तैसे । अवयवसंधीं ॥ ४९ ॥ एथ एकैकाचिया प्रदेशीं । विश्व देख विस्तारेंशीं । आणि विश्वाही परौतें मानसीं । जरी देखावें वर्ते ॥ १५० ॥ तरी तियेही विषयींचें कांहीं । एथ सर्वथा सांकडें नाहीं । सुखें आवडे तें माझां देहीं । देखसी तूं ॥ ५१ ॥ ऐसें विश्वमूर्ती तेणें । बोलिलें कारुण्यपूर्णें । तंव देखत आहे कीं नाहीं न म्हणे । निवांतुचि येरु ॥ ५२ ॥ एथ कां पां हा उगला । म्हणोनि कृष्णें जंव पाहिला । तंव आर्तीचें लेणें लेइला । तैसाचि आहे ॥ ५३ ॥ मग म्हणे उत्कंठे बोहट न पडे । अझुनी सुखाची सोय न सांपडे । परि दाविलें तें फुडें । नाकळेचि यया ॥ ५४ ॥ हें बोलोनि देवो हांसिले । हांसोनि देखाणिया म्हाणितलें । आम्हीं विश्वरूप तरी दाविलें । परि न देखसीच तूं ॥५ ५ ॥ यया बोला येरें विचक्षणें । म्हणितलें हां जी कवणासि तें उणें । तुम्ही बकाकरवीं चांदिणें । चरऊं पहा मा ॥ ५६ ॥ हां हो उटोनियां आरिसा । आंधळिया दाऊं बैसा । बहिरीयापुढें हृषीकेशा । गाणीव करा ॥ ५७ ॥ मकरंदकणाचा चारा । जाणतां घालूनि दर्दुरा । वायां धाडा शार्ङ्गधरा । कोपा कवणा ॥ ५८ ॥ जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया विभागा फिटलें । तें तुम्हीं चर्मचक्षूंपुढें सूदलें । मी कैसेनि देखों ॥ ५९ ॥ परि हें तुमचें उणें न बोलावें । मीचि साहें तेंचि बरवें । एथ आथि म्हणितलें देवें । मानुं बापा ॥ १६० ॥ साच स्वरूप जरी आम्हीं दावावें । तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें । परि बोलत प्रेमभावें । धसाळ गेलों ॥ ६१ ॥ काय जाहलें न वाहतां भुई पेरिजे । तरी तो वेळु विलया जाइजे । तरी आतां माझें निजरूप देखिजे । ते दृष्टी देवों तुज ॥ ६२ ॥

आदित्य, वसु, रुद्र, अश्विन आणि वायू पहा. हे भरतकुलोत्पन्ना, पूर्वी कधीं न पाहिलेलीं अनेक आश्चर्यें अवलोकन कर. ६.

ज्या ठिकाणीं ( विश्वरूप भगवंताच्या ) दृष्टि उघडतात, त्या ठिकाणीं सूर्यांच्या सृष्टया पसरतात व जेथें त्या दृष्टया मिटतात तेथें त्या सूर्यांच्या सृष्टया मावळतात. १४१. तोंडांच्या वाफेबरोबर सर्व ज्वालामय होतें; त्या ठिकाणीं अग्निआदिकरून वसूंचा समुदाय प्राप्त होतो. १४२. आणि भिवयांचीं टोंकें रागानें एकत्र होऊं पहातात, त्या ठिकाणीं रुद्रगणांचे समुदाय उत्पन्न होतात, पहा. १४३. विश्वरूपाच्या सौम्यतेच्या ओलाव्यामध्यें अगणित अश्विनौदेव उत्पन्न होतात आणि अर्जुना, विश्वरूपाच्या कानांच्या ठिकाणीं अनेक वायू उत्पन्न होतात. १४४. याप्रमाणें एकएका स्वरूपाच्या सहज खेळामध्यें देवांचे व सिद्धांचे समुदाय उत्पन्न होतात. अशीं हीं अमर्याद व प्रचंड रूपें पहा. १४५. ज्या स्वरूपांचें वर्णन करण्यास वेद असमर्थ आहेत, जीं स्वरूपें पहावयास काळाचेंही आयुष्य थोडें आहे आणि ब्रह्मदेव सर्वज्ञ खरा, पण त्यालाही ज्या स्वरूपांचा पत्ता लागत नाहीं, १४६. ज्या स्वरूपांना तिन्ही देव कधींही ऐकत नाहींत, अशीं जीं हीं अनेक रूपें, तीं तूं प्रत्यक्ष पहा, आणि कौतुकानें आश्चर्याचें मोठें ऐश्वर्य भोग. १४७.

हे अर्जुना, चराचरयुक्त सर्व जग, व जर ( आणखी ) दुसरें पाहाण्याची तुझी इच्छा असेल तर येथें माझ्या शरीरामध्यें एका ठिकाणीं स्थित आहे, तें आतां पहा. ७.

अर्जुना, ज्याप्रमाणें कल्पतरूच्या बुडाशीं गवताचे शेकडों अंकुर असतात, त्याप्रमाणें या विश्वमूर्तीच्या प्रत्येक केसाच्या बुडाशीं सृष्टया पहा. १४८. आणि ज्याप्रमाणें वाऱ्यानें उडणारे परमाणू प्रकाशांत दिसतात, त्याप्रमाणें विश्वरूपाच्या सांध्यांत अनेक ब्रह्मांडें वरखालीं जातांना दिसतात. १४९. या विश्वरूपाच्या एक एक भागावर तूं संपूर्ण विस्तारासह विश्व पहा. आणि तुझ्या मनांत जर विश्वाही पलीकडे पाहावें असें वाटत असेल, १५०. तर त्याविषयींही येथें मुळींच तोटा नाहीं. तुला वाटेल तें तूं माझ्या देहाच्या ठिकाणीं पहा. १५१. याप्रमाणें करुणेनें पूर्ण भरलेले असे ते विश्वरूपधारी श्रीकृष्ण परमात्मा बोलले. तेव्हां मी विश्वरूप पहात आहें कीं नाहीं, असें कांहीं न बोलतां अर्जुन स्तब्धच राहिला. १५२. या प्रसंगीं हा स्तब्ध कां राहिला आहे, म्हणून कृष्णानें ज्या वेळेस त्याच्याकडे पाहिलें, तेव्हां तो इच्छेचा अलंकार घालून तसाच उत्कंठित असलेला असा आढळला. १५३. मग देव म्हणाले, अद्याप याची विश्वरूप पाहाण्याची इच्छा कमी झालेली दिसत नाहीं व अद्याप याला सुखाचा मार्ग सांपडला नाहीं; इतकेंच नव्हे, परंतु आम्हीं विश्वरूप दाखविलें तें याला मुळींच आकलन होत नाहीं. १५४. असें बोलून देव हंसले व हंसून अर्जुनास म्हणाले, खूप पाहाणारा आहेस ! आम्हीं तुला विश्वरूप तर दाखविलें, परंतु तूं तें पहातच नाहींस. १५५. या श्रीकृष्णाच्या भाषणावर दूरदर्शी अर्जुन म्हणाला, महाराज, तर मग हा कमीपणा कोणाला आहे ? तुम्ही बगळ्याला चंद्रामृताचा उपभोग देऊं पाहतां ना ? १५६. अहो महाराज, आपण आरसा घांसून तो आंधळ्यास दाखवावयास लागलां आहांत, किंवा हे श्रीकृष्णा, आपण बहिऱ्यापुढें गाणें सुरू केलें आहे. १५७. पुष्पांतील सुगंधी कणांचा चारा जाणून बुजून, चिखल खाणाऱ्या बेडकापुढें टाकून, श्रीकृष्णा, वायां घाल्वीत आहांत ! मग रागावतां कोणावर ? १५८. जें ( विश्वरूप ) इंद्रियांस प्रत्यक्ष दिसणें शक्य नाहीं म्हणून शास्त्रद्वारां ठरलें आहे व जें केवळ ज्ञानदृष्टीलाच विषय होणारें आहे, असें जें विश्वरूप, तें तुम्ही माझ्या चर्मचक्षूंपुढें ठेविलें; तर मी त्याला कसें पाहूं ! १५९. परंतु हा तुमचा कमीपणा बोलूं नये. मींच सहन करावें तें बरें. या अर्जुनाच्या बोलण्यावर देव म्हणाले, होय बाबा, तूं म्हणतोस तें मला मान्य आहे. १६०. खरोखरच आम्हांस जर स्वरूप दाखवावयाचें होतें, तर तुला प्रथम तें पाहाण्याचें सामर्थ्य द्यावयास पाहिजे होतें. परंतु प्रेमामुळें बोलत बोलत विसरून गेलों. ६१. ? हें कसें झालें म्हणशील तर जमिनीची मशागत न करितां तिच्यांत बीं पेरलें आणि त्यास पाणी घातलें, तर तो पेरण्याचा आणि पाणी घालण्याचा वेळ फुकट जाईल. ( त्याप्रमाणें तुला विश्वरूप पाहण्याची दृष्टि न देतां तुझ्यापुढें विश्वरूप मांडलें, तर तें मांडणें व्यर्थ जाणारच. ) परंतु आतां माझें स्वतःचें स्वरूप पाहाण्यास समर्थ असणारी दृष्टि तुला देतों. १६२.

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा । दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

मग तिया दृष्टी पांडवा । आमुचा ऐश्वर्ययोगु आघवा । देखोनियां अनुभवा । माजिवडा करीं ॥ ६३ ॥ ऐसें तेणें वेदांतवेद्यें । सकळलोकआद्यें । बोलिलें आराध्यें । जगाचेनि ॥ ६४ ॥

संजय उवाचः—एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः । दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

पैं कौरवकुळचक्रवर्ती । मज हाचि विस्मयो पुढतपुढती । जे श्रियेहूनि त्रिजगतीं । सदैव असे कवणी ॥ ६५ ॥ ना तरी श्रुणेचें वानावयालागीं । श्रुतीवांचूनि दावा पां जगीं । ना सेवकपण तरी अंगीं । शेषाचांचि आथि ॥ ६६ ॥ हां हो जयाचेनि सोसें । शिणत आठही पाहार योगी जैसे । अनुसरले गरुडाऐसे । कवण आहे ॥ ६७ ॥ परि तें आघवेंचि एकीकडे ठेलें । सापें कृष्णसुख एकंदरें जाहलें । जिये दिउनि जन्मले । पांडव हे ॥ ६८ ॥ परि पांचांही आंतु अर्जुना । कृष्ण सावियाचि जाहला अधीना । कामुक कां जैसा अंगना । आपैता कीजे ॥ ६९ ॥ पढविलें पाखिरूं ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले । कैसें दैव एथें सुरवाडलें । तें जाणों न ये ॥ १७० ॥ आजि परब्रह्म हें सगळें । भोगावया सदैव याचेचि डोळे । कैसे वाचेचे हन लळे । पाळीत असे ॥ ७१ ॥ हा कोपे कीं निवांतु साहे । हा रुसे तरी बुझावीत जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥ ७२ ॥ एऱ्हवीं विषय जिणोनि जन्मले । जे शुकादिक दादुले । ते विषयोचि वानितां जाहले । भाट ययाचे ॥ ७३ ॥ हा योगियांचें समाधिधन । कीं होऊनि ठेलें पार्थाअधीन । यालागीं विस्मयो माझें मन । करीतसे राया ॥ ७४ ॥ तेवींचि संजय म्हणे कायसा । विस्मयो एथें कौरवेशा । कृष्णें स्वीकारिजे तया ऐसा । भाग्योदय होय ॥ ७५ ॥ म्हणोनि तो देवांचा रावो । म्हणे पार्था ते तुज दृष्टि देवों । जया विश्वरूपाचा ठावो । देखसी तूं ॥ ७६ ॥ ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें । तंव अविद्येचें आंधारें । जावोंचि लागे ॥ ७७ ॥ तें अक्षरें नव्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका । अर्जुनालागीं चित्कळिका । उजळलिया कृष्णें ॥ ७८ ॥ मग दिव्यचक्षु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी पाटा फुटला । ययापरी दाविता जाहाला । ऐश्वर्य आपुलें ॥ ७९ ॥ हे अवतार जे सकळ । ते जिये समुद्रींचे कां कल्लोळ । विश्व हें मृगजळ । जया रश्मीस्तव दिसे ॥ १८० ॥ जिये अनादिभूमिके निटे । चराचर हें चित्र उमटे । आपणपें वैकुंठें । दाविले तया ॥ ८१ ॥ मागां बाळपणीं येणें श्रीपती । जैं एकवेळ खादली होती माती । तैं कोपोनियां हातीं । यशोदा धरिला ॥ ८२ ॥ मग भेणें भेणें जैसें । मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें । चवदाही भुवनें सावकाशें । दाविलीं तिये ॥ ८३ ॥ ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें । जैसें कपोल शंखें शिवतलें । आणि वेदांचियेही मती ठेलें । तें लागला बोलों ॥ ८४ ॥ तैसा अनुग्रहो पैं राया ।

केवळ या तुझ्या दृष्टीनें मला पाहाण्यास तूं समर्थ नाहींस. ( याकरितां ) मी तुला दिव्य दृष्टि देतों. ( आतां ) माझें ईश्वरी सामर्थ्य पहा. ८.

मग अर्जुना, त्या दृष्टीनें आमचा सर्व ऐश्वर्ययोग पाहून, त्याला अनुभवामध्यें घालून ठेव. १६३. वेदान्ताचा ( उपनिषदांचा ) जो जाणण्याचा विषय, सर्व लोकांचा जो मूळपुरुष व जो सर्व जगाला पूजनीय, असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो, याप्रमाणें बोलता झाला ( असें संजय म्हणाला. ) १६४.

संजय म्हणाला, हे राजा ( धृतराष्ट्र ), महायोगेश्वर्यसंपन्न हरि याप्रमाणें बोलून नंतर अर्जुनाला (आपलें) ऐश्वर्ययुक्त उत्कृष्ट रूप दाखविता झाला. ९.

संजय म्हणाला, हे कौरवकुळांतील सार्वभौम महाराजा, मला वारंवार हेंच आश्चर्य वाटतें कीं, लक्ष्मीपेक्षां त्रैलोक्यामध्यें जास्त दैववान कोणी आहे का ? १६५. अथवा तत्त्वाची गोष्ट वर्णन करण्यांत वेदांशिवाय जगांत दुसरा कोण समर्थ आहे, दाखवा बरें ? अथवा एकनिष्ठ सेवकपण जर पाहिलें, तर तें एक शेषाच्याच ठिकाणीं आहे. १६६. अहो महाराज; ज्या परमात्म्याच्या प्राप्तीच्या इच्छेनें योगी जसे आठही प्रहर शिणत असतात, ( तसे भगवंताकरितां कष्ट सोसणारे कोण आहेत ? ) व गरुडासारखा देवास आपल्याला वाहून घेतलेला (दुसरा) कोण आहे ? १६७. परंतु तें सर्व एका बाजूला राहिलें. प्रस्तुत ज्या दिवसापासून पांडव जन्माला आले, त्या दिवसापासून, तें श्रीकृष्णापासून भक्ताला होणारें सुख, त्यांच्याच ठिकाणीं एकवटलें. १६८. परंतु पांचही पांडवामध्यें कृष्ण हे सहजच अर्जुनाच्या स्वाधीन झाले, जसें एकाद्या विषयासक्त पुरुषाला स्त्री ही आपल्या आधीन करते. १६९. शिकवलेला पक्षीही असें बोलत नाहीं. याप्रमाणें करमणुकीकरितां पाळलेला पशूही इतका हुकमांत रहात नाहीं. इतके अर्जुनाच्या स्वाधीन श्रीकृष्ण झाले. या अर्जुनाच्या ठिकाणीं दैव कसें भरभराटीस आलें आहे, तें समजत नाहीं ! १७०. या प्रसंगीं संपूर्ण परब्रह्मवस्तूचा अनुभव घेण्याचें भाग्य याच्याच दृष्टीला लाभलें आहे ! पहा ! श्रीकृष्ण अर्जुनाच्या बोलण्याचे लाड कसे पुरवीत आहेत ! १७१. अर्जुन रागावला कीं कृष्ण निवांतपणें सहन करितात. अर्जुन रुसला म्हणजे देव त्याची समजूत करीत असतात. एकूण कृष्णाला अर्जुनाचें आश्चर्यकारक वेड लागलें आहे. १७२. सहज विचार करून पाहिलें तर, विषयाला जिंकून जन्माला आलेले जे शुकादिक खरे खरे पुरुष, ते भगवंताच्या केवळ वैषयिक लीलांचेंच वर्णन करणारे स्तुतिपाठक झाले १७३. योगी ज्याचें सुख समाधींतच भोगतात, असा हा योग्यांचें समाधींत भोगण्याचें ऐश्वर्य असून, तो अर्जुनाच्या अगदीं स्वाधीन झाला आहे. याकरितां राजा धृतराष्ट्रा, माझें मन आश्चर्य करतें. १७४. तसेंच संजय म्हणतो, कौरवांच्या राजा ( धृतराष्ट्र ), याच्यांत आश्चर्य तें काय ? कृष्ण ज्याचा स्वीकार करितात, त्याचा असा भाग्योदय होतो. १७५. म्हणून "अर्जुना, ज्या दृष्टीनें तूं संपूर्ण विश्वरूप पहाशील, ती दृष्टि मी तुला देतों." असा तो देवांचा राजा ( श्रीकृष्ण परमात्मा ) म्हणाला. १७६. अशीं अक्षरें भगवंताच्या मुखांतून निघतात न निघतात, तोंच अज्ञानअंधकार एकदम नाहीसा होऊं लागला. १७७. ( 'तुला दिव्य दृष्टि देतों.' अशीं भगवंताच्या मुखांतून जीं अक्षरें निघालीं ) तीं अक्षरें नसून ब्रह्मसाम्राज्याला प्रकाशित करणाऱ्या ज्ञानरूप ज्योतीच अर्जुनाकरितां कृष्णानें उजळल्या असें समजा. १७८. मग अर्जुनाच्या ठिकाणीं दिव्य दृष्टि उत्पन्न झाली व त्याच्या ज्ञानदृष्टीचें सामर्थ्य वाढलें. याप्रमाणें श्रीकृष्ण परमात्मा आपला ऐश्वर्ययोग दाखविता झाला. १७९. हे जे सर्व अवतार, ते ज्या विश्वरूपरूपी समुद्रावरील लाटा आहेत; आणि ज्या विश्वरूपरूपी किरणांमुळें विश्व हें मृगजळ भासतें, १८०. ज्या योग्य व अनादि भूमिकेवर हें स्थावर-जंगमाचें चित्र उमटतें, तें आपलें विश्वरूप कृष्णानें अर्जुनाला ( आपल्या ठिकाणीं ) दाखविलें. १८१. पूर्वी बाळपणीं जेव्हां एक वेळ या श्रीकृष्णानें माती खाल्ली होती, तेव्हां यशोदेनें त्यास रागावून हातानें धरिलें, १८२. नंतर त्या वेळीं भीत भीत जसें कांहीं तोंडांतील झाडा देण्याच्या निमित्तानें श्रीकृष्णांनीं यशोदेला विस्तारासह चौदाही लोक आपल्या मुखांत दाखविले; १८३. अथवा ( तपश्चर्या करीत असतांना ध्रुवाच्यापुढें भगवान् प्रगट झाल्यावर, ध्रुवाच्या मनांत भगवंताची स्तुति करावी असें आलें; पण ती कशी करावी हें त्यास कळेना तेव्हां ) मधुवनांमध्यें ध्रुवाला भगवंतानीं असें केलें कीं, आपला शंख त्याच्या गालास लावला; तेव्हां वेदांचीही बुद्धि जेथें कुंठित होते, तें तो बोलावयास लागला. १८४. ( संजय म्हणतो, ) राजा धृतराष्ट्रा, श्रीकृष्णानें अर्जुनावर त्याप्रमाणें अनुग्रह केला,

श्रीहरी केला धनंजया । आतां कवणेकडेही माया । ऐसी भाष नेणे तो ॥ ८५ ॥ एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें । तया चमत्काराचें एकार्णव जाहलें । चित्त समाजीं बुडोनि ठेलें । विस्मयाचां ॥ ८६ ॥ जैसा आब्रह्म पूर्णोदकीं । पव्हे मार्कंडेय एकाकी । तैसा विश्वरूपकौतुकीं । पार्थु लोळे ॥ ८७ ॥ म्हणे केवढें गगन एथ होतें । तें कवणें नेलें पां केउतें । तीं चराचरें महाभूतें । काय जाहलीं ॥ ८८ ॥ दिशांचे ठावही हारपले । अधोर्ध्व काय नेणों जाहले । चेइलिया स्वप्न तैसे गेले । लोकाकार ॥ ८९ ॥ नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारागण जैसें लोपे । तैसीं गिळिलीं विश्वरूपें । प्रपंचरचना ॥ १९० ॥ तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे । इंद्रियांचे रश्मी माघारे । हृदयवरी भरले ॥ ९१ ॥ तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडिलें । टकासी टक लागलें । जैसें मोहनास्त्र घातलें । विचारजातां ॥ ९२ ॥ तैसा विस्मितु पाहे कोडें । तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें । तेंचि नानारूप चहूंकडे । मांडोनि ठेलें ॥ ९३ ॥ जैसे वर्षाकाळींचें मेघौडे । कां महाप्रळयींचें तेज वाढे । तैसें आपणेनवीण कवणीकडे । नेदीचि उरों ॥ ९४ ॥

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् । अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

प्रथम स्वरूपसमाधान । पावोनि ठेला अर्जुन । सवेंचि उघडी लोचन । तंव विश्वरूप देखे ॥ ९५ ॥ इहींचि दोहीं डोळां । पाहावें विश्वरूपा सकळा । तोहि श्रीकृष्णें सोहळा । पुरविला ऐसा ॥ ९६ ॥ मग तेथ सैंघ देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें । नाना प्रगटलीं निधानें । लावण्यश्रियेचीं ॥ ९७ ॥ कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं । जैसी सौंदर्या राणीव जोडली । तैसीं मनोहरें देखिलीं । हरीचीं वक्त्रें तेणें ॥ ९८ ॥ तयांही माजीं एकेकें । सावियाचि भयानकें । काळरात्रीचीं कटकें । उठावलीं जैसीं ॥ ९९ ॥ कीं यें मृत्युसीचि मुखें जाहलीं । हो कां जे भयाचीं दुर्गें पन्नासिलीं । कीं महाकुंडें उघडलीं । प्रळयानळाचीं ॥ २०० ॥ तैसीं अद्भुतें भयासुरें । तेथ वदनें देखिलीं वीरें । आणिकें असाधारणें साळंकारें । सौम्यें बहुतें ॥ १ ॥ पैं ज्ञानदृष्टीचेनि अवलोकें । परि वदनांचा शेवटु न टके । मग लोचन ते कवतिकें । लागला पाहों ॥ २ ॥ तंव नानावर्णें कमळवनें । कीं विकासिलीं तैसें अर्जुनें । डोळे देखिले पालिंगनें । आदित्यांचीं ॥ ३ ॥ तेथेंचि कृष्णमेघाचिया दाटी- । माजीं कल्पांत विजूंचिया स्फुटी । तैसिया वन्हि पिंगळा दिठी । भ्रूभंगातळीं ॥ ४ ॥ हें एकैक आश्चर्य पाहतां । तिये एकोचि रूपीं पांडुसुता । दर्शनाची अनेकता । प्रतिफळली ॥ ५ ॥ मग म्हणे चरण ते कवणेकडे । केउते मुकुट कें दोर्दंडें । ऐसी वाढविताहे कोडें । चाड देखावयाची ॥ ६ ॥ तेथ भाग्यनिधि पार्था । कां विफलत्व होईल मनोरथा । काय पिनाकपाणीचां भातां । वायकांडीं आहाती ॥ ७ ॥ ना तरी चतुराननाचिये वाचे । आहाती लटिकिया अक्षरांचे सांचे । म्हणोनि साद्यंतपण अपारांचें । देखिलें तेणें ॥ ८ ॥ जयाची सोय वेदा नकळे । तयाचे सकळावयव एकेचि वेळे । अर्जुनाचे

त्यामुळें आतां माया कोणीकडे आहे, ही भाषा देखील तो जाणेनासा झाला. १८५. एकदम भगवंताचें स्वरूप-ऐश्वर्याचें तेज प्रगट झालें, त्यामुळें जसें कल्पांताचे वेळीं जलमय होतें, त्याप्रमाणें अर्जुनाला त्या वेळीं सर्व चमत्कारमय झालें आणि आश्चर्याच्या गर्दीत त्याचें चित्त बुडून गेलें. १८६. ज्याप्रमाणें ब्रह्मलोकापर्यंत परिपूर्ण झालेल्या उदकांत एकटाच मार्कंडेय ऋषि पोहत होता, त्याप्रमाणें विश्वरूपरूपी आश्चर्यांत अर्जुन लोळूं लागला. १८७. अर्जुन म्हणाला, एवढें मोठें येथें आकाश होतें, तें कोण कोठें घेऊन गेला ? ते स्थावर जंगम पदार्थ व महाभूतें कोठें गेलीं ? १८८. पूर्वादिक दिशांचे मागमूसही राहिले नाहींत. वर, खालीं हें कोण जाणें कोठें गेलें ? जागें झाल्यावर ज्याप्रमाणें स्वप्न नाहींसें होतें, त्याप्रमाणें सृष्टीचा आकारही नाहींसा झाला. १८९. अथवा सूर्याच्या तेजाच्या सामर्थ्यानें चंद्रासह सर्व नक्षत्रांचा समुदाय लोपून जातो, त्याप्रमाणें या विश्वरूपानें ही सृष्टीची रचना गिळून टाकली. १९०. तेव्हां मनाला मनपण स्फुरेनासें झालें. (मनाचे संकल्प-विकल्प करणें बंद झालें.) तसेंच बुद्धि आपण आपल्याला सांवरेनाशी झाली. (बुद्धि कोणत्याही गोष्टी-विषयीं निश्चय करीनाशी झाली.) आणि इंद्रियांच्या वृत्ति (आश्चर्यानें चकीत होऊन) माघारी परतून हृदयांत सांठवल्या. (इंद्रियवृत्ति अंतर्मुख झाल्या.) १९१. त्या स्थितींत स्तब्धपणाला स्तब्धता प्राप्त झाली आणि एकाग्रतेस एकाग्रता आली. जणूंकाय, ज्ञानमात्राला मोहनअस्त्रच घातलें ! १९२. याप्रमाणें चकित होऊन कौतुकानें पाहूं लागला, तों पुढें जें चार भुजांचें स्वरूप होतें, तेंच अनेक रूपें घेऊन चारही बाजूंना नटून राहिलें. १९३. ज्याप्रमाणें वर्षाकतूंत येणारे मेघ किंवा महाप्रळयाच्या वेळचें तेज, ही वाढून जिकडे तिकडे व्यापतात, त्याप्रमाणें आपल्या स्वरूपाशिवाय (त्या विश्वरूपानें) कोणतीही बाजू शिल्लक राहूं दिली नाहीं. १९४.

ज्यामध्यें अनेक मुखें व नयन होते, ज्यामध्यें अनेक आश्चर्यकारक देखावे होते, अनेक दिव्य अलंकारांनीं युक्त, अनेक दिव्य आयुधें धारण केलेलें, १०.

(दिलेल्या दिव्य दृष्टीनें) प्रथम विश्वरूप पाहिल्याबरोबर अर्जुनाच्या इच्छेची निवृत्ति झाल्यामुळें, त्याला समाधान झालें, (व त्यानें डोळे लावून घेतले आणि पुनः) त्याच क्षणीं डोळे उघडून पहातो तों विश्वरूप त्याच्या दृष्टीस पडलें. १९५. याच दोन्ही डोळ्यांनीं सर्व विश्वरूप पहावें, अशी त्याची इच्छा होती. त्या इच्छेचा लळा श्रीकृष्णांनीं याप्रमाणें पुरविला. १९६. मग तेथें त्यानें अनेक मुखें पाहिलीं. तीं मुखें (जणूंकाय) लक्ष्मीकांत श्रीकृष्ण यांच्या राजमंदिरासारखीं होतीं; अथवा सौंदर्यलक्ष्मीचीं प्रगट झालेलीं भांडारेंच होतीं. १९७. किंवा आनंदाचे बगीचेच बहराला आलेले किंवा जणूंकाय सौंदर्याला राज्य प्राप्त झालें; तशीं त्यानें मनहरण करणारीं श्रीकृष्णाचीं मुखें पाहिलीं. १९८. त्यांत देखील कित्येक मुखें जणूंकाय प्रळयरात्रीच्या सैन्यानें उठाव केला आहे अशीं सहजच भयंकर होतीं. १९९. किंवा ही मृत्यूलाच तोंडें उत्पन्न झालेलीं आहेत, अथवा जणूंकाय भयाचे किल्लेच रचलेले आहेत, अथवा प्रळयाग्नीचीं महाकुंडेंच उघडलेलीं आहेत २००. तशीं अद्भूत व भयंकर मुखें शूर अर्जुनानें तेथें (विश्वरूपांत) पाहिलीं. आणखी कितीएक निरुपम अलंकारयुक्त अशीं मुखें पाहिलीं व पुष्कळ सौम्य मुखें पाहिलीं. २०१. अर्जुनानें तीं मुखें ज्ञानदृष्टीनें पाहिलीं, परंतु मुखांचा अंत लागेना. म्हणून मुखें पहाणें सोडून देऊन, तों मग कौतुकानें (विश्वरूपाचे) डोळे पाहूं लागला. २०२. तेव्हां जणूंकाय अनेक रंगांच्या कमळांचे बाग प्रफुल्लित झाले आहेत, तसे (विस्तृत, व तेजानें) सूर्यांच्या समुदायासारखे (असे) डोळे अर्जुनानें पाहिले. २०३. डोळे पहात होता, तेथेंच काळ्या मेघांच्या गर्दीमध्यें प्रळयकाळची वीज चमकावी, तशा अग्नीनें पिंगट झालेल्या दृष्टी, चढवलेल्या भिंवयांच्या खालीं त्यानें पाहिल्या. २०४. हें एक एक आश्चर्य पहात असतां अर्जुनाला त्या एकाच विश्वरूपामध्यें दर्शनाची अनेकता फलद्रूप झाली. २०५. मग अर्जुन म्हणाला, विश्वरूपाचे पाय कोणीकडे आहेत ? मुकुट कोठें आहे ? व त्या बळकट भुजा कोठें आहेत? अशी कौतुकानें तो पहाण्याची इच्छा वाढवीत आहे. २०६. तेथें अर्जुन दैवाचा ठेवा असल्यानें त्याची इच्छा व्यर्थ कां होईल ? पिनाक नांवाचें धनुष्य हातांत असलेल्या शंकराच्या भात्यामध्यें निष्फळ बाण आहेत काय ? २०७. अथवा ब्रह्मदेवाच्या जिव्हेवर खोट्या अक्षरांचे ठसे आहेत काय ! म्हणून अर्जुनानें अमर्याद विश्वाचा आदि व अंत पाहिला. २०८. ज्या विश्वरूपाचा मार्ग वेदाला कळत नाहीं, त्या विश्वरूपाचीं

दोन्ही डोळे। भोगिते जाहले ॥ ९ ॥ चरणौनि मुकुटवरी । देखत विश्वरूपाची थोरी । जे नाना रत्न अलंकारीं । मिरवत असे ॥ २१० ॥ परब्रह्म आपुलेनि आंगें । ल्यावया आपणचि जाहला अनेगें । तियें लेणीं मी सांगें । काइसयासारिखीं ॥ ११ ॥ जिये प्रमेचिये झळाळा । उजाळू चंद्रादित्यमंडळा । जे महातेजाचा जिव्हाळा । जेणें विश्व प्रगटे ॥ १२ ॥ तो दिव्यतेज शृंगारु । कोणाचिये मतीसी होय गोचरु । देव आपणपेंचि लेइले ऐसें वीरु । देखत असे ॥ १३ ॥ आपण आंग आपण अलंकार । आपण हात आपण हातियेर । आपण जीव आपण शरीर । देखे चराचर कोंदलें देवें ॥ १४ ॥ मग तेथेंचि ज्ञानाचां डोळां । पहात करपल्लवां जंव सरळा । तंव तोडित कल्पांतींचिया ज्वाळा । तैसीं शस्त्रें झळकत देखे ॥ १५ ॥ जयांचिया किरणांचे निखेरपणें । नक्षत्रांचे होत फुटाणे । तेजें खिरडला वन्हि म्हणे । समुद्रीं रिघों ॥ १६ ॥ मग काळकूट-कल्लोळीं कवाळिलें । नाना महाविजूंचे दांग उमटले । तैसे अपार कर देखिले । उदितायुधीं ॥ १७ ॥

दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् । सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

कीं भेणें तेथूनि काढिली दिठी । मग कंठमुगुट पहातसे किरीटी । तंव सुरतरूंची सृष्टी । जयापासोनि का जाहली ॥ १८ ॥ जियें महासिद्धींचीं मूळपीठें । शिणली कमळा जेथ वावटे । तैसीं कुसुमें अति चोखटें । तुरंबिलीं देखिलीं ॥ १९ ॥ मुगुटावरी स्तबक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक । कंठीं रुळताति अलौकिक । माळादंड ॥ २२० ॥ स्वर्गें सूर्य-तेज वेढिलें । जैसें पंधरेनें मेरुतें मढिलें । तैसें नितंबावरी गाढिलें । पीतांबरु झळके ॥ २१ ॥ श्रीमहादेवो कापुरें उटिला । कां कैलासु पारदें डवरिला । नाना क्षीरोदकें पांघरविला । क्षीरार्णवो जैसा ॥ २२ ॥ जैसी चंद्रमयाची घडी उपलविली । मग गगनाकरवीं बुंथी घालविली । तैसी चंदनपिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें ॥ २३ ॥ जेणें स्वप्रकाशा कांती चढे । ब्रह्मानंदाचा निदाघु मोडे । जयाचेनि सौरभ्यें जीवित जोडे । वेदवतीये ॥ २४ ॥ जयाचे निर्लेप अनुलेपु करी । जे अनंगुही सर्वांगीं धरी । तया सुगंधाची थोरी । कवण वानी ॥ २५ ॥ ऐसी एकेक शृंगारशोभा । पाहतां अर्जुन जातसे क्षोभा । तेवींचि देवो बैसला कीं उभा । का सेयांतु हें नेणवे ॥ २६ ॥ बाहेर दिठी उघडोनि पाहे । तरि आघवें मूर्तिमय देखतु जाये । मग आतां न पाहे म्हणोनि उगा राहे । तरी आंतुही तैसेंचि ॥ २७ ॥ अनावरें मुखें समोर देखे । तयाभेणें पाठीमोरा जंव ठाके । तंव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसेचि ॥ २८ ॥ अहो पाहतां कीर प्रतिभासे । एथ कांहीं नवलावो काइ असे । परि न पाहतांही दिसे । चोज आइका ॥ २९ ॥ कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें । तयाहीसकट नारायणें । व्यापूनि घातलें ॥ २३० ॥ म्हणोनि आश्चर्याचां पुरीं एकीं । पाडिला ठायेंठाव थडी ठाकी । तंव चमत्काराचिये आणिकीं । महार्णवीं पडे ॥ ३१ ॥ ऐसा अर्जुनु असाधारणें । आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें । कवळूनि घेतला तेणें । अनंतरूपें ॥ ३२ ॥ तो विश्वतोमुख स्वभावें ।

सर्व अंगें अर्जुनाच्या दोन्ही डोळयांनीं एकाच वेळेला पूर्णपणें पाहिलीं. २०९. जें विश्वरूप अनेक प्रकारच्या रत्नांच्या अलंकारांनीं शोभत होतें, त्या विश्वरूपाचा विस्तार अर्जुन पायांपासून मुकुटापर्यंत पाहूं लागला. २१०. जे अनेक अलंकार देव ( परब्रह्म ) आपल्या अंगावर घालण्याकरितां आपण बनला, ते अलंकार कशासारखे आहेत म्हणून मी सांगूं ? २११. ज्या प्रभेच्या कांतीनें चंद्रसूर्यमंडळें प्रकाशित होतात व जी प्रभा महातेजाचें ( प्रळयकाळच्या तेजाचें ) जीवन आहे, व ज्या प्रभेनें विश्व दिसावयास लागतें. २१२. तें दिव्यतेज असलेले अलंकार कोणाच्या बुद्धीस विषय होतील? असे दागिने देवानें स्वतःच आपल्या अंगावर धारण केले आहेत, असें अर्जुन पहाता झाला. २१३. देव आपणच अवयव, आपणच दागिने, आपणच हात, आपणच शस्त्र, आपणच जीव, व आपणच देह वगैरे सर्व बनले होते. फार काय सांगावें ! सर्व स्थावरजंगमात्मक विश्व देवानेंच भरलें आहे, असें अर्जुनानें पाहिलें. २१४. मग तेथें ( विश्वरूपांत ) ज्ञानदृष्टीनें अर्जुन जेव्हां हाताचे सरळ पंजे पाहूं लागला, तेव्हा तेथें त्या हाताच्या पंजांत प्रळयकाळच्या अग्नीच्या ज्वाळांना तोडणारीं शस्त्रें झळकत असलेलीं त्यानें पाहिलीं. २१५. ज्यांच्या ( शस्त्रांच्या ) किरणांच्या प्रखरपणानें नक्षत्रांचे फुटाणे होतात; व ज्यांच्या ( शस्त्रांच्या ) तेजानें मागें सरलेला अग्नि ' समुद्रांत प्रवेश करावा ' असें म्हणावयास लागला. २१६. मग काळकूट विषाच्या ( जणूंकाय ) लाटाच बनल्या आहेत अथवा प्रळयकाळच्या विजेचें अरण्यच प्रगट झालें आहे, तसे उगारलेल्या शस्त्रांसहित अगणित हात पाहिले. २१७.

दिव्य पुष्पें व वस्त्रें धारण केलेलें, दिव्य गंधांची ज्यास उटी केली होती, सर्व आश्चर्यांनीं युक्त, अनंत, सर्वतोमुख, व दिव्य असें ( तें रूप होतें ) ११.

त्या हातांतील असंख्य शस्त्रांच्या भयानें तेथून दृष्टि काढून, मग जेव्हां अर्जुन कंठ व मुगूट पहावयास लागला तेव्हां कल्पतरूची सृष्टी ज्यापासून झाली ( असे कंठ व मुगुट त्याला दिसले. ) २१८. जीं फुलें महासिद्धींचीं मूळस्थानें ( आहेत ) व श्रम पावलेली लक्ष्मी जेथें विश्रांति पावते, अशी अतिशुद्ध फुलें मस्तकावर धारण केलेलीं त्यानें पाहिलीं. २१९. मुगुटावर फुलांचे घोंस होते; मस्तकावर ठिकठिकाणीं निरनिराळया पूजा बांधलेल्या होत्या, आणि गळयांत अवर्णनीय फुलांचे हार शोभत होते. २२०. स्वर्गानें जसें सूर्यतेज नेसावें, किंवा जसें मेरुपर्वताला सोन्यानें मढवावें, त्याप्रमाणें कमरेच्या खालच्या भागावर कसलेला पितांबर चमकत होता. २२१. श्रीशंकराला जशी कापराची उटी लावावी अथवा कैलासास जसा पाऱ्याचा लेप द्यावा अथवा क्षीरसमुद्राला जसें क्षीरोदकाचें पांघरूण घालावें, २२२. त्याप्रमाणें चंद्राची घडी उकलून, मग त्याचें पांघरूण आकाशाकडून घेववावें, त्याप्रमाणें पांढरी शुभ्र चंदनाची उटी विश्वरूपाच्या सर्व शरीरावर त्यानें पाहिली. २२३. ज्याच्या योगानें स्वरूपप्रकाशाला तेज चढतें व ब्रह्मानंदाची उष्णता नाहींशी होते व ज्याच्या सुवासानें पृथ्वीला जीवित म्हणजे अस्तित्व प्राप्त होतें. २२४. ज्या चंदनाची उटी ब्रह्मही आपल्या अंगास लावतें व मदन देखील ज्यास आपल्या सर्व अंगावर धारण करतो, त्या चंदनाच्या सुगंधाची थोरवी कोण वर्णन करील ! २२५. अशी एक एक शृंगाराची शोभा पहात असतां अर्जुन भांबावला, त्याचप्रमाणें देव बसले आहेत, कीं उभे आहेत, कीं निजले आहेत, हें त्यास कळेना. २२६. दृष्टि उघडून तो बाहेर पाहूं लागला, तरी सर्वच विश्वरूपमय आहे असें त्यास दिसूं लागलें. मग आतां मी कांहीं पहाणार नाहीं, असा निश्चय करून तो उगीच राहिला, ( त्यानें डोळे मिटून घेतले ), तरी आंतही त्याला तसेंच विश्वरूप दिसलें. २२७. अर्जुन आपल्यासमोर अगणित मुखें पहात होता. त्यांच्या भयानें जेव्हां तो त्यांच्याकडे पाठ करून उभा राहिला , तेव्हा तिकडेही विश्वरूपाची मुखें, हात, पाय हे तसेच होते, (असें त्यास दिसलें ) २२८. अहो, पाहूं लागलें म्हणजे ( खरोखर ) दिसतें, यांत कांहीं थोडें आश्चर्य आहे काय ! परंतु हें आश्चर्य ऐका कीं, या विश्वरूपाचे बाबतींत न पहांत असतांना देखील, ( डोळे मिटून घेतले असतांही ) विश्वरूप दिसत होतें. २२९. प्रभूच्या कृपेची करणी कशी अद्भुत आहे पहा! अर्जुनाचें पहाणें व न पहाणें हे सर्वच भगवंतांनीं व्यापून टाकलें. २३०. म्हणून आश्चर्यांच्या एका पुरांत पडला असतां तो तात्काळ किनारा गांठी, तों आणखी दुसऱ्या चमत्काराच्या मोठ्या समुद्रांत तो पडे. २३१. याप्रमाणें त्या अनंतरूपानें ( भगवंतानें ) अर्जुनाला आपल्या अलौकिक दर्शनाच्या कौशल्यानें व्यापून टाकलें. २३२. तो श्रीकृष्ण परमात्मा स्वाभाविकरीत्या विश्वतोमुख आहे, आणि तेंच त्यानें ( श्रीकृष्णानें ) आपलें स्वाभाविक रूप

आणि तेंचि दाखवावयालागीं पांडवें । प्रार्थिला आतां आघवें । होऊनि ठेला ॥ २३ ॥ आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुटलिया देखावेंचि खुंटे । तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें । दिधली आहे ॥ २४ ॥ म्हणोनि किरीटीसि दोहीं परी । तें देखणें देखे आंधारीं । हें संजयो हस्तिनापुरीं । सांगतसे राया ॥ २५ ॥ म्हणे किंबहुना अवधारिलें । पार्थें विश्वरूप देखिलें । नाना आभरणीं भरलें । विश्वतोमुख ॥ २६ ॥

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्यमहात्मनः ॥ १२ ॥

तिये अंगप्रभेचा देवा । नवलावो काइसयासारिखा सांगावा । कल्पांतीं एकुचि मेळावा । द्वादशादित्यांचा होय ॥ २७ ॥ तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी । जरी उदयजती कां एकेचि अवसरीं । तऱ्ही तया तेजाची थोरी । उपमूं न ये ॥ २८ ॥ आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तेवींचि दशकुही मेळविजे । महातेजांचा ॥ २९ ॥ तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पाडें । हें तेज कांहीं कांहीं होईल थोडें । आणि तयाऐसें कीर चोखडें । त्रिशुद्धी नोहे ॥ २४० ॥ ऐसें माहात्मया हरीचें सहज । फांकतसे सर्वांगींचें तेज । ते मुनिकृपा जी मज । दृष्ट जाहलें ॥ ४१ ॥

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा । अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥

आणि तिये विश्वरूपीं एकीकडे । जग आघवें आपुलेनि पवाडें । जैसें महोदधीमाजीं बुडबुडे । सिनाने दिसती ॥ ४२ ॥ कां आकाशीं गंधर्वनगर । भूतळीं पिपीलिका बांधे घर । नाना मेरूवरी सपूर । परमाणु बैसले ॥ ४३ ॥ विश्व आघवेंचि तयापरी । तया देवचक्रवर्तीचिया शरीरीं । अर्जुन तिये अवसरीं । देखता जाहला ॥ ४४ ॥ तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळुमाळ होतें जें दुजेंपण । तेंही आटोनि गेलें अंतःकरण । विरालें सहसा ॥ ४५ ॥

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः । प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥

आंतुला महानंदा चेइरें जाहलें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें । आपाद पां गुतलें । पुलकांचलें ॥ ४६ ॥ वार्षिये प्रथमदशे । वोहळलया शैलाचें सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच आले ॥ ४७ ॥ शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया ॥ ४८ ॥ माजीं सांपडलेनि अलिउळें । जळावरी कमळकळिका जेवीं आंदोळे । तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ ४९ ॥ कर्पूरकेळीचीं गर्भपुटें । उकलतां कापुराचेनि कोंदाटें । पुलिका गळती तेवीं थेंबुटें । नेत्रोनि पडती ॥ २५० ॥ ऐसा सात्त्विकांही आठां भावां । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फावली ॥ ५१ ॥ उदयलेनि सुधाकरें । जैसा भरलाचि समुद्र भरे । तैसा वेळोवेळां ऊर्मीभरें । उचंबळत असे ॥ ५२ ॥ तैसाचि तया सुखानुभवापाठीं । केला द्वैताचा सांभाळु दिठी । मग उससौनि

दाखवावें म्हणून अर्जुनानें प्रार्थना केली, म्हणून आतां तो ( श्रीकृष्ण परमात्मा ) सर्व विश्वरूपानें बनून राहिला. २३३. आणि श्रीकृष्णांनीं जी दृष्टि अर्जुनास दिली, ती दिव्याच्या अथवा सूर्यांच्या प्रकाशानें प्रकट होईल, ( तिला दिसेल, ) अथवा मिटली असतां, तिचें पहाण्याचेंच बंद राहील, अशी नव्हती. २३४. म्हणून अर्जुनाला दोन्ही प्रकारांनीं, उजेडांत अथवा अंधारांत म्हणजे डोळे उघडले तरी व मिटले तरी, तें विश्वरूप पहावेंच लागलें. हें संजय हस्तिनापुरांत राजा धृतराष्ट्राला सांगता झाला. २३५. संजय म्हणतो फार काय सांगावें ? अर्जुनानें नाना प्रकारच्या अलंकारांनीं भरलेलें व ज्यास सर्व बाजूंनीं मुखें आहेत, असें विश्वरूप पाहिलें हें तुम्हीं ऐकलें काय ? २३६.

आकाशामध्यें सहस्रावधि सूर्यांची प्रभा जर एकदम उत्पन्न झाली, तर ती त्या महात्मा श्रीहरीच्या प्रभेसारखी होईल. १२.

धृतराष्ट्र राजा, श्रीकृष्णाच्या त्या अंगकांतीची अथवा तेजाची अपूर्वता कशासारखी होती म्हणून सांगावी ? ( पण कांहीं कल्पना करतां यावी, म्हणून दृष्टांतानें सांगण्याचा यत्न करतों. ) प्रळयकाळीं बारा सूर्यांचा जो एकच मिलाफ होतो, २३७. तसे ते हजारो दिव्य सूर्य जर एकाच वेळेला उगवले, तरी त्या ( विश्वरूपाच्या ) तेजाच्या प्रभावाच्या उपमेला ते ( सूर्य ) येणार नाहींत. २३८. सर्वच विजांचा समुदाय एकत्र केला व प्रळयकाळच्या अग्नींचीं सर्व साहित्यें गोळा केलीं, तसेंच दहाही महातेजें एकत्र मिळविलीं. २३९. तथापि सर्वांचें हें एकत्र केलेलें तेज, त्या विश्वरूपाच्या अंगकांतीच्या साम्यास कांहीं अल्पस्वल्प मानानें आलें तर येईल. पण त्यासारखें शुद्ध तर खास असणार नाहीं. २४०. याप्रमाणें महात्मा जे हरी, त्यांचें सर्व अंगींचें तेज ( विश्वरूपाचें तेज ) स्वाभाविक रीतीनें फांकत होतें. हें व्यासमुनींच्या कृपेनें महाराज, मला दिसलें. २४१.

( देव, पितर, मनुष्य इत्यादि ) अनेक ( भिन्न ) रूपांनीं विभाग पावलेलें ( हें ) सर्व जग त्या वेळीं देवाधिदेवाच्या त्या शरीरामध्यें ( एका बाजूला ) एका ठिकाणीं स्थित असें अर्जुनानें पाहिलें. १३.

आणि त्या विश्वरूपामध्यें एका बाजूला सर्व जग आपल्या विस्तारासह आहे, ज्याप्रमाणें महासागरामध्यें बुडबुड अलग अलग दिसतात; २४२. अथवा आकाशामध्यें गंधर्वनगर ( ढगांच्या आकारांवर कल्पनेनें कल्पिलेलें शहर ) भासावें किंवा जमिनीवर मुंगीनें घर बांधावें अथवा मेरु पर्वतावर सूक्ष्म परमाणू पसरले असावेत, २४३. त्याप्रमाणें सर्वच विश्व देवांमधील सार्वभौमाच्या त्या शरीरामध्यें ( विश्वरूपांत ) त्या वेळेला अर्जुनानें पाहिलें. २४४. तेथें ( त्या वेळीं ) आपण विश्वाला पाहाणारा एक निराळा व विश्व ( पहाण्याचा विषय ) एक निराळें असें जें थोडेसें ( द्रष्टा व दृश्य असें ) द्वैत होतें, तेंही नाहींसें झालें, व अंतःकरण एकदम ( त्या विश्वरूपांत ) विरघळून गेलें. २४५.

तेव्हां तो आश्चर्ययुक्त व रोमांचयुक्त झालेला अर्जुन आपल्या मस्तकानें देवाला वंदन करून हात जोडून म्हणाला. १४.

अंतःकरणांत ब्रह्मानंद जागृत झाला. ( त्यामुळें ) बाहेर इंद्रियें ढिलीं पडलीं आणि मस्तकापासून पायापर्यंत सर्व शरीरावर रोमांच उभे राहिले. २४६. पावसाळ्याचे आरंभीं पर्वताच्या अंगावरून पाणी वाहून गेल्यावर, त्या पर्वताच्या सर्व अंगावर जसे कोंवळे गवताचे अंकूर उत्पन्न होतात, तसे ( अर्जुनाच्या सर्व शरीरावर ) रोमांच आले. २४७. चंद्रकिरणांनीं स्पर्श केलेला चंद्रकांतमणि जसा पाझरतो ( त्यावर पाण्याचे बिंदु येतात ) त्याप्रमाणें त्याच्या ( अर्जुनाच्या ) सर्व अंगावर घामाचे बिंदु दाट आले. २४८. कमळाच्या कळीमध्यें भुंग्यांचा समुदाय सांपडल्यामुळें ती कळी जशी पाण्यावर इकडून तिकडे आदळते, त्याप्रमाणें अंतःकरणांतील सुखांच्या लाटांच्या वेगानें बाहेर त्याचें सर्व अंग कांपत होतें. २४९. कापुराच्या विपुलतेनें, कापूरकेळीच्या गाभ्याचीं सोपटें उकलून, त्यांतून जसे एकामागून एक असे कापुराचे कण गळतात त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू गळत होते, २५०. याप्रमाणें अष्टसात्विक भावांत देखील एकमेकांत चढाओढ लागली होती. त्या स्थितींत ( अर्जुनाच्या ) जीवाला ब्रह्मानंदाचें राज्य प्राप्त झालें. २५१ भरलेल्या समुद्रास चंद्रोदयानें जशा भरत्यांवर भरत्या येतात, त्याप्रमाणें आनंदाच्या लहरीच्या वेगानें त्याचें अंतःकरण वेळोवेळीं उचंबळत होतें, २५२. तसेंच त्या सुखाच्या अनुभवानंतर, कृपादृष्टीनें श्रीकृष्णानें द्वैताचा सांभाळ केला. ( म्हणजे देव व भक्त असें वेगळेपण ठेवलें. ) म्हणून

किरीटी । वास पाहिली ॥ ५३ ॥ तेथ बैठला होता जिया सवा । तियाचिकडे मस्तक खालविला देवा । जोडूनि करसंपुट बरवा । बोलतु असे ॥ ५४ ॥

अर्जुन उवाचः—पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

म्हणे जयजयाजी स्वामी । नवल कृपा केली तुम्हीं । जें हें विश्वरूप कीं आम्ही । प्राकृत देखों ॥ ५५ ॥ परि साचचि भलें केलें गोसावियां । मज परितोषु जाहला साविया । जी देखिलासि जो इया । सृष्टीसी तूं आश्रयो ॥ ५६ ॥ देवा मंदराचेनि अंगलगें । ठायीं ठायीं श्वापदांचीं दांगें । तेसीं इयें तुझां देहीं अनेगें । देखतसें भुवनें ॥ ५७ ॥ अहो आकाशाचिये खोळे । दिसती ग्रहगणांचीं कुळें । कां महावृक्षीं अविसाळें । पक्षिजातीचीं ॥ ५८ ॥ तयापरी श्रीहरी । तुझां विश्वात्मकीं इये शरीरीं । स्वर्गु देखतसें अवधारीं । सुरगणेंसीं ॥ ५९ ॥ प्रभु महाभूतांचें पंचक । येथ देखत आहें अनेक । आणि भूतग्राम एकेक । भूतसृष्टीचे ॥ २६० ॥ जी सत्यलोकु तुजमाजीं आहे । देखिला चतुराननु हा नोहे । आणि येरीकडे जंव पाहें । तंव कैलासुही दिसे ॥ ६१ ॥ श्रीमहादेव भवानियेशीं । तुझां दिसतसे एके अंशीं । आणि तूंतेंहीं गा हृषीकेशी । तुजमाजीं देखें ॥ ६२ ॥ पैं कश्यपादि ऋषिकुळें । इयें तुझां स्वरूपीं सकळें । देखतसें पाताळें । पन्नगेंशीं ॥ ६३ ॥ किंबहुना त्रैलोक्यपती । तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती । इयें चतुर्दशभुवनें चित्राकृती । अंकुरलीं जाणों ॥ ६४ ॥ आणि तेथिंचे जे जे लोक । ते चित्ररचना जी अनेक । ऐसें देखतसें अलोकिक । गांभीर्य तुझें ॥ ६५ ॥

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।
नांतं न मध्यं न पुनस्तवाऽऽदिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥

त्या दिव्यचक्षूंचेनि पैसें । चहूंकडे जंव पाहत असें । तंव दोर्दंडीं जैसें । आकाश कोंभैलें ॥ ६६ ॥ तैसे एकाचि निरंतर । देवा देखतुसें तुझे कर । करीत आघवेचि व्यापार । एकी काळीं ॥ ६७ ॥ मग महाशून्याचेनि पैसारें । उघडलीं ब्रह्मकटाहाचीं भांडारें । तैसीं देखतुसें अपारें । उदरें तुझीं ॥ ६८ ॥ जी सहस्रशीर्षयाचें देखिलें । कोडीवरी होताति एकिवेळें । कीं परब्रह्माचि वदनफळें । मोडोनि आलें ॥ ६९ ॥ तैसीं वक्रें जी जेउतीं तेउतीं । तुझीं देखतसें विश्वमूर्ती । आणि तयाचिपरी नेत्रपंक्ति । अनेका सैंघ ॥ २७० ॥ हें असो स्वर्ग पाताळ । कीं भूमी दिशा अंतराळ । हे विवक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसें ॥ ७१ ॥ तुजवीण एकादियाकडे । परमाणुहि एतुला कोडें । अवकाशु पाहतसें परि न सांपडे । ऐसें व्यापिलें तुवां ॥ ७२ ॥ इहीं नाना भूतीं सहितें । जेतुलीं सांठविलीं होतीं महाभूतें । तेतुलाही पवाडु तुवां अनंतें । कोंदला देखतसें ॥ ७३ ॥ ऐसा कवणे ठायाहूनि तूं आलासी । एथ बैसलासि कीं उभा आहासी । आणि तूं कवणिये मायेचिये पोटीं होतासी । तुझें ठाण केवढें ॥ ७४ ॥ तुझें रूप वय कैसें । तुजपैलीकडे काय असे । तूं काइसयावरी आहासि ऐसें । पाहिलें मियां ॥ ७५ ॥ तंव देखिलें जी आघवेंचि । तरि आतां

मग अर्जुनानें दीर्घ श्वासोच्छ्वास सोडून श्रीकृष्णाकडे पाहिलें. २५३. आपण (अर्जुन) ज्या बाजूकडे तोंड करून बसला होता, त्याच बाजूला अर्जुनानें आपलें मस्तक लववून देवास नमस्कार केला व आपले दोन्हीं हात जोडून चांगल्या रीतीनें बोलावयास लागला. २५४.

हे देवा, तुझ्या देहामध्यें (सर्व) देव, (स्थावर-जंगमादि) भूतविशेषांचे सर्व समुदाय, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, सर्व ऋषि आणि दिव्य नाग मी पहात आहें. १५.

अर्जुन म्हणाला, हे प्रभो, तुमचा जयजयकार असो. आम्ही सामान्य असूनही हें विश्वरूप पाहण्यास समर्थ झालों ही तुम्ही अद्भुतच कृपा केली. २५५. पण महाराज, आपण खरोखर चांगलें केलेंत. तूं ह्या सर्व सृष्टीला आश्रय आहेस असें पाहिलें आणि सहजच मला समाधान वाटलें. २५६. देवा, मंदरपर्वताच्या आश्रयानें ज्याप्रमाणें ठिकठिकाणीं हिंस्र पशूंचीं अरण्यें असतात, त्याप्रमाणें ह्या तुझ्या शरीरावर मी अनंत लोक पहात आहें. २५७. महाराज, आकाशाच्या खोळेंत ग्रहसमुदायांचे मेळे दिसतात किंवा विस्तीर्ण वृक्षावर अनेक पक्ष्यांचीं घरटीं असावींत; २५८. हे श्रीहरि, ऐक. त्याप्रमाणें तुझ्या ह्या विश्वरूप शरीराचे ठिकाणीं देवसमुदायासह मला स्वर्ग दिसत आहे. २५९. महाराज, आपल्या स्वरूपाच्या ठिकाणीं पंचमहाभूतांच्या अनेक पंचकड्या मी पहात आहें आणि एकेक भूतसृष्टींतील प्राणीसमुदाय मी पहात आहें. २६०. महाराज, सत्यलोक तुमच्या विश्वरूपांत आहे. हा पाहिला, हा ब्रह्मदेव नव्हे काय? आणि दुसरीकडे पहातों तों कैलासही दिसतो. २६१. पार्वतीसुद्धां श्रीशंकर तुझ्या एका भागांत दिसत आहे. आणि हे श्रीकृष्णा, तुला देखील तुझ्या या विश्वरूपामध्यें पहात आहें. २६२. कश्यपादि ऋषींचे समुदाय, हे सर्व तुझ्या स्वरूपांत दृष्टीस पडतात. त्याचप्रमाणें सर्पांसह सातही पाताळें तुझ्या स्वरूपांत दृष्टीस पडत आहेत. २६३. फार काय सांगावें! हे त्रैलोक्याच्या राजा श्रीकृष्णा, तुझ्या शरीरावरील एक एक भाग हीच कोणी भिंत, तीवर हे चौदा लोक चित्राच्या आकृतीप्रमाणें स्पष्ट झालेले आहेत, असें वाटतें. २६४. आणि त्या लोकांतील जे जे प्राणी, तींच वेगवेगळीं चितारलेलीं चित्रें होत. याप्रमाणें तुझी अलौकिक गंभीरता दृष्टीस पडत आहे. २६५.

मी तुला अनेक हात, उदरें, मुखें व नेत्र असलेला व सर्वत्र अंतरहित रूपें धारण करणारा व विश्वरूप असा पहात आहें. हे विश्वेश्वरा, तुझा आरंभ, मध्य अथवा अन्त (यांपैकीं) मला (कांहींच) दिसत नाहीं. १६.

त्या दिव्य दृष्टीच्या बलानें मी जो चहूंकडे पहात आहें, तो बळकट भुजांच्या ठिकाणीं आकाश उत्पन्न झालेसें दिसतें. २६६. त्याचप्रमाणें देवा, एकटे तुझे हातच एक वेळीं सर्व व्यापार निरंतर करीत आहेत, असें मी पहातों. २६७. मग ब्रह्माच्या विस्तारानें जशीं कांहीं ब्रह्मांडाचीं भांडारेंच उघडावींत, तशीं अमर्याद तुझीं पोटें पहातों. २६८. महाराज, आपलीं हजारों मस्तकें आहेत, (असें जें आपलें श्रुतीनें वर्णन केलें आहे) त्याचा अनुभव या विश्वरूपांत एकाच वेळीं कोटीपेक्षांही अधिक वेळां घेतला. अथवा परब्रह्मच मुखरूपी फळांनीं दाट भरून आलें. (असें दिसतें,) २६९. त्याचप्रमाणें हे विश्वरूपी परमेश्वरा मी जिकडे तिकडे तुझीं तोंडें पहात आहें आणि त्याचप्रमाणें डोळ्यांच्याही अनेक पंक्तींच्या पंक्ति जिकडे तिकडे पहात आहें. २७०. हें असो. हा स्वर्ग, हें पाताळ किंवा ही पृथ्वी व ह्या दिशा व हें आकाश असें बोलण्याची सोय राहिली नाहीं. सर्वही विश्वरूपानें भरलेलें मी पहात आहें. २७१. तुझ्याशिवाय एकाद्याकडे परमाणूएवढी तरी जागा सांपडेल, म्हणून मी कौतुकानें शोधीत आहें, पण सांपडत नाहीं. असें तूं (सर्वत्र) व्यापलें आहेस. २७२. या नानाप्रकारच्या प्राण्यांसहित जितकीं महाभूतें सांठविलीं होतीं, तितकाही विस्तार, तूं जो अनंत, त्या तुझ्याकडून पूर्ण भरलेला मी पहात आहें. २७३. असा तूं कोणत्या ठिकाणाहून आलास? तूं येथें बसलेला आहेस कीं उभा आहेस? आणि तूं कोणत्या आईच्या पोटीं होतास? तुझी आकृति तरी केवढी आहे? २७४. तुझें रूप कसें, वय किती, तुझ्या पलीकडे काय आहे? (आणि) तूं कशावर बसलेला आहेस? असें जेव्हां मी पाहूं लागलों. २७५. तेव्हां महाराज, हें मीं सर्वच विचार करून

तुज देवा ठावो तूंचि । तूं कवणाचा नव्हेसि ऐसाचि । अनादि आयता ॥ ७६ ॥ तूं उभा ना बैठा । दिघडु ना खुजटा । तुज तळीं वरी वैकुंठा । तूंचि आहासी ॥ ७७ ॥ तूं रूपें आपणयांचि ऐसा । देवा तुझी तूंचि वयसा । पाठीं पोट परेशा । तुझें तूं गा ॥ ७८ ॥ किंबहुना आतां । तुज तूंचि आघवें अनंता । हें पुढत पुढती पाहतां । देखिलें मियां ॥७९॥ परि या तुझिया रूपाआंतु । जी उणीव एक असें देखतु । जे आदि मध्य अंतु । तिन्हीं नाहीं ॥ २८० ॥ एऱ्हवीं गिंवासिलें आघवां ठायीं । परि सोय न लाहेचि कहीं । म्हणोनि त्रिशुद्धी हे नाहीं । तिन्ही एथ ॥ ८१ ॥ एवं आदिमध्यांतरहिता । विश्वेश्वरा अपरिमिता । तूं देखिलासि जी तत्त्वता । विश्वरूपा ॥ ८२ ॥ तुज महामूर्तीचां आंगीं । उमटलिया पृथक् मूर्ती अनेगी । लेइलासि वानें परींचीं आंगीं । ऐसा आवडतु आहासी ॥ ८३ ॥ नाना पृथक् मूर्ती तिया द्रुमवेली । तुझां स्वरूपमहाचळीं । दिव्यालंकारफुलीं फळीं । सासिन्नलिया ॥ ८४ ॥ हो कां जे महोदधी तूं देवा । जाहलासि तरंगीं मूर्ती हेलावा । कीं तूं वृक्षु एक बरवा । मूर्तिफळीं फळलासि ॥ ८५ ॥ जी भूतीं भूतळ मांडिलें । जैसें नक्षत्रीं गगन गुढलें । तैसें मूर्तिमय भरलें । तुझें देखतसें रूप ॥ ८६ ॥ जी एकेकीचां अंगप्रांतीं । होय जाय हें त्रिजगती । एवढियाही तुझां आंगीं मूर्ती । कीं रोमां जालिया ॥८७॥ ऐसा पवाडु मांडूनि विश्वाचा । तूं कवण पां एथ कैचा । हें पाहिलें तंव आम्हुचा । सारथी तोचि तूं ॥८८॥ तरी मज पाहतां मुकुंदा । तूं ऐसाचि व्यापकु सर्वदा । भक्तानुग्रहें तया मुग्धा । रूपातें धरिसी ॥ ८९ ॥ कैसें चहूं भुजांचें सांवळें । पाहतां वोल्हावती मन डोळे । खेंव देऊं जाइजे तरि आकळे । दोहींचि बाहीं ॥ २९० ॥ ऐसी मूर्ति कोडिसवाणी कृपा । करूनि होसी विश्वरूपा । कीं आम्हुचियाचि दिठी सलेपा । जे सामान्यत्वें देखती ॥ ९१ ॥ तरी आतां दिठीचा विटाळु गेला । तुवां सहजें दिव्यचक्षू केला । म्हणोनि यथारूपें देखवला । माहिमा तुझा ॥ ९२ ॥ परि मकरतुंडामागिलेकडे । होतासि तोचि तूं एवडें । रूप जाहलासि हें फुडें । वोळखिलें मियां ॥ ९३ ॥

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

नोहे तोचि हा शिरीं । मुकुट लेइलासि श्रीहरी । परि आतांचें तेज आणि थोरी । नवल कीं बहुवें ॥ ९४ ॥ तेंचि हें वरिलिये हातीं । चक्र परिजितया आयती । सांवरितासि विश्वमूर्ती । ते न मोडे खुण ॥ ९५ ॥ येरीकडे तेचि हे नोहे गदा । आणि तळिलिया दोनी भुजा निरायुधा । वागोरे सांवरावया गोविंदा । संसरिलिया ॥ ९६ ॥ आणि तेणेंचि वेगें सहसा । माझिया मनोरथासरिसा । जाहलासि विश्वरूपा विश्वेशा । म्हणोनि जाणें ॥ ९७ ॥ परि कायसें बा हें चोज । विस्मयो करावयाहि पवाडु नाहीं मज । चित्त होऊनि जात आहे निर्बुज । आश्चर्यें येणें ॥ ९८ ॥ हें एथ आथि कां येथ नाहीं । ऐसें श्वसोंही नये कांहीं । नवल अंगप्रभेची नवाई । कैसी कोंदली

पाहिलें. तर आतां देवा, तुझें ठिकाण तूंच आहेस. तूं कोणाचा नाहींस; तर तूं अनादि व स्वतःसिद्ध असाच आहेस. २७६. तूं उभा नाहींस अथवा बसलेला नाहींस. तूं मोठा ( उंच ) नाहींस, अथवा ठेंगणा नाहींस. देवा, तुझ्या खालीं व तुझ्या वर तूंच आहेस. २७७. तूं रूपानें आपल्यासारखाच आहेस. देवा, तुझें वय तूंच आहेस व हे मायेच्या मालका, तुझी पाठ व पोट तूंच आहेस. २७८. आतां फार काय सांगावें ? हे अनंता, तुझें सर्व तूंच आहेस; मी वारंवार विचार केल्यावर हेंच मला कळलें. २७९. परंतु या तुझ्या रूपांत जो एक कमीपणा मी पहात आहें, तो हा कीं, अमूक ठिकाणीं तुझा आरंभ झाला व अमूक ठिकाणीं तुझा मध्य आहे व अमूक ठिकाणीं तुझा शेवट आहे, असें पाहूं लागलें असतां हे तिन्ही तुझ्या ठिकाणीं नाहींत. २८० खरें म्हटलें तर, तुझ्या विश्वरूपीं मी हे ( आदि, मध्य, अंत ) सर्व ठिकाणीं शोधले; पण त्यांचा कोठेंच पत्ता लागत नाहीं. म्हणून तुझ्या स्वरूपीं हे तिन्ही निश्चयेंकरून नाहींत. २८१. हे आरंभ, मध्य व शेवट नसलेल्या अमर्याद त्रैलोक्यनायका, विश्वरूपा, मी याप्रमाणें तुला खरोखरच पाहिलें. २८२. तूं जो विश्वरूप, त्या तुझ्या शरीरावर अनेक निरनिराळ्या मूर्ती उमटल्या आहेत. म्हणून नाना प्रकारचीं वस्त्रें अंगावर तूं धारण केलीं आहेस असें वाटतें. २८३. अथवा दिव्य अलंकाररूप फळाफुलांनीं अगदीं दाट भरून आलेल्या, अशा या अनेक प्रकारच्या मूर्तिरूप वृक्षवेली, तुझ्या या विश्वरूप महापर्वतावर उत्पन्न झालेल्या आहेत. २८४. अथवा हे परमेश्वरा, ( तुझ्या स्वरूपावर दिसणाऱ्या ) मूर्तिरूपी लाटांनीं उसळणारा, असा तूं मोठा समुद्र आहेस किंवा तूं एक चांगला वृक्ष असून मूर्तिरूपी फळांनीं फळभारास आला आहेस. २८५. महाराज, प्राण्यांनीं जसा पृथ्वीचा पृष्ठभाग व्यापलेला आहे, किंवा आकाश जसें नक्षत्रांनीं व्यापलेलें आहे, त्याप्रमाणें तुझें स्वरूप मूर्तींनीं भरलेलें आहे असें मी पहातों. २८६. महाराज, एक एका मूर्तीच्या अंगप्रदेशांत हें त्रैलोक्य उत्पन्न होत आहे व लयाला जात आहे. अशा प्रचंड मूर्ती असूनही त्या तुझ्या ( विश्वरूपाच्या ) शरीराच्या रोमाच्या ठिकाणीं झाल्या आहेत. २८७. असा विश्वाचा पसारा मांडून येथें तूं कोण ? तूं कसा ? असा विचार करून पाहिलें, तर आमचा जो सारथी, तोच तूं आहेस. २८८. तर श्रीकृष्णा विचार करून पाहिलें तर मला असें वाटतें कीं, तूं नेहमीं असाच व्यापक स्वरूपानें असतोस, पण भक्तावर कृपा करण्याकरितां तूं सुंदर सगुण अवतार घेतोस. २८९. ( तुझें ) श्यामसुंदर चतुर्भुज रूप कसें आहे कीं त्याला पाहिलें असतां मन व डोळे शांत होतात व आलिंगन घावयास लागलें तर दोन्ही हातांमध्यें कवटाळलें जातें ! २९०. हे विश्वरूपा देवा, तुम्हीं भक्तांवर कृपा करून असें सुंदररूप बनतां. परंतु आमच्याच दृष्टि मलीन आहेत, म्हणून त्या तुमच्या सगुण मूर्तीला सामान्यत्वानें पाहातात. २९१. तर आतां तो दृष्टीचा दोष दूर झाला. ( कारण ) तूं लीलेनें मला ज्ञानदृष्टिवान बनविलेंस, आणि म्हणूनच तुझा मोठेपणा जसा आहे, तसा मी पाहूं शकलों. २९२. परंतु मकरकुंडाच्या मागल्या बाजूला जो तूं बसलेला होतास, तोच तूं एवढे विश्वरूप बनला आहेस, हें मीं पक्कें जाणलें. २९३.

मुगट, गदा व ( सुदर्शन ) चक्र धारण करणारा, तेजाचा राशि, सर्वत्र प्रभायुक्त, ज्याच्याकडे एकसारखें पहाणें ( देखील ) अशक्य आहे असा, दीप्तिमान् अग्नि व सूर्य यांच्या प्रभेसारखी ज्याची प्रभा समन्ताद्भागीं ( पसरलेली ) आहे असा व अमर्याद असा, तुला मी पहात आहें. १७.

हे श्रीकृष्णा, तोच हा मुगट आपल्या मस्तकावर धारण केला आहेस नव्हे काय ? परंतु त्याचें आतांचें तेज आणि मोठेपणा, हे कांहीं मोठे विलक्षण आहेत. २९४. हे विश्वमूर्ति देवा, तेंच हे चक्र वरच्या हातांत फिरविण्याच्या तयारीनें तूं सांवरून धरीत आहेस, ती खूण नाहींशी झाली नाहीं. २९५. आणि दुसऱ्या हातांत असलेली तीच ही गदा नव्हे काय ? आणि चक्र व गदा घेतलेल्या दोन्ही हातांच्या खालचे हात शस्त्रावांचून असून तेही, श्रीकृष्णा, घोड्यांचे लगाम सांवरून धरण्याकरितां सरसावले नाहींत काय ? २९६. आणि त्याच आवेशानें मीं आपली इच्छा प्रदर्शित केल्याबरोबर, परमेश्वरा, तूं एकाएकीं विश्वरूप झालास, असें मी जाणतों. २९७. परंतु हें नवल कसलें आहे ! मला आश्चर्य करावयालाही अवकाश नाहीं. ( कारण ) या आश्चर्यानें माझें चित्त गोंधळून जात आहे. २९८. हें विश्वरूप येथें आहे कीं नाहीं, अशा विचारानें नुसता श्वाससुद्धां घेतां येत नाहीं. काय अंगप्रभेचा चमत्कार आश्चर्यकारक आहे, कीं ती

सैंघ ॥ ९९ ॥ एथचीही दिठी करपत । सूर्य खद्योतु तैसे हारपत । ऐसें तीव्रपण अद्भुत । तेजाचें यया ॥ ३०० ॥ हो कां जे महातेजाचां महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टि आघवी । कीं युगांतविजूंचां पालवीं । झांकलें गगन ॥१॥ नातरी संहारतेजाचिया ज्वाळा । तोडोनि माचु बांधला अंतराळां । आतां दिव्य ज्ञानाचांहि डोळां । पाहवेना ॥ २ ॥ उजाळु अधिकाधिक बहुवसु । धडाडीत आहे अतिदासु । पडत दिव्यचक्षूंही त्रासु । न्याहाळितां ॥ ३ ॥ हो कां जे महाप्रळयींचा भडाडु । होता काळाग्निरुद्राचां ठायीं गूढु । तो तृतीयनयनाचा मढु । फुटला जैसा ॥ ४ ॥ तैसें पसरलेनि प्रकाशें । सैंघ पांचवनिया ज्वाळांचे वळसे । पडतां ब्रह्मकटाह कोळिसे । होत आहाती ॥ ५ ॥ ऐसा अद्भुत तेजोराशी । जन्मा नवल म्यां देखिलासी । नाहीं व्याप्ती आणि कांतीसी । पारु जी तुझिये ॥ ६ ॥

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

देवा तूं अक्षर । औटाविये मात्रेसि पर । श्रुती जयाचें घर । गिंवसीत आहाती ॥ ७ ॥ जें आकाराचें आयतन । जें विश्वनिक्षेपैकनिधान । तें अव्यय तूं गहन । अविनाश जी ॥ ८ ॥ तूं धर्माचा वोलावा । अनादिसिद्ध तूं नीच नवा । जाणें मी सदतिसावा । पुरुष विशेष तूं ॥ ९ ॥

अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९ ॥

तूं आदिमध्यांतरहितु । स्वसामर्थ्यें तूं अनंतु । विश्वबाहु अपरिमितु । विश्वचरण तूं ॥ ३१० ॥ पैं चंद्रचंडांशुडोळां । दावितासि कोपप्रसाद लीळा । एकां रुससी तमाचां डोळां । एकां पाळितोसि कृपादृष्टी ॥ ११ ॥ जी एत्रांविधा तूंतें । मी देखतसें हें निरुतें । पेटलें प्रळयाग्नीचें उजितें । तैसें वक्त्र हें तुझें ॥ १२ ॥ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभड उठत । तैसी चाटीत दाढा दांत । जीभ लोळे ॥ १३ ॥ इये वदनींचिया उबा । आणि जी सर्वांगकांतीचिया प्रभा । विश्व तातलें अति क्षोभा । जात आहे ॥ १४ ॥

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

कां जे भूर्लोक पाताळ । पृथिवी हन अंतराळ । अथवा दशदिशा समाकुळ । दिशाचक्र ॥ १५ ॥ तें आघवेंचि तुवां एकें । भरलें देखत आहे कौतुकें । परि गगनाहीसकट भयानकें । आप्लविजे जेवीं ॥ १६ ॥ ना तरी अद्भुतरसाचां कल्लोळीं । जाहली चवदाही भुवनांसि कडियाळी । तैसें आश्चर्याचि मग मी आकळीं । काय एक ॥ १७ ॥ नावरे व्याप्ती हे असाधारण । न साहवे रूपाचें उग्रपण । सुख दूरी गेलें परी प्राण । विपायें धरी जग ॥ १८ ॥ देवा देखोनियां तूंतें । नेणों कैसें आलें भयाचें भरितें । आतां दुःखकल्लोळीं झळंबतें ।

कशी एकसारखी दाट भरलेली आहे! २९९. येथें (विश्वरूपाच्या तेजांत) दृष्टि करपून जाते व सूर्य काजव्या-सारखे या तेजांत मावळून जातात; असें या तेजाचें तीव्रपण अद्भुत आहे. ३००. जणूंकाय, या महातेजाच्या महा-समुद्रांत सर्व सृष्टि बुडून गेली आहे! अथवा आकाश तर प्रळयकाळच्या विजेच्या पदरानें झांकून गेलें आहे ३०१. अथवा प्रळयकाळच्या तेजाच्या ज्वाला तोडून त्यांचा आकाशांत मांडव बांधिला आहे. आतां असें तें विश्व-रूपाचें तेज दिव्य ज्ञानदृष्टीनेंही पहावत नाहीं. ३०२. अधिकाधिक पुष्कळ प्रकाश अतिदाह करणारा असा पेटत आहे, म्हणून तें तेज पहाण्यास दिव्यचक्षूलाही त्रास पडतो. ३०३. अथवा महाप्रलयकाळच्या अग्नीचा भड-भडाट, जो कालाग्निनामक रुद्राच्या ठिकाणीं गुप्त होता, तो ज्याप्रमाणें शंकराच्या तृतीय नेत्राची (अग्नीची) कळी उमलावी, त्याप्रमाणें पसरला आहे. ३०४. त्या-प्रमाणें त्या पसरलेल्या प्रकाशामुळें पांच अग्नींच्या ज्वालांचे वेढे जिकडे तिकडे पडत असतां ब्रह्मांडाचे कोळसे होत आहेत. ३०५. अशा प्रकाशाच्या अपूर्व तेजाची जणूं-काय राशीच, असें तुझें आश्चर्यकारक रूप माझ्या जन्मांत आजच मीं पाहिलें. महाराज, आपल्या तेजाला व व्याप्तीला सीमा नाहीं. ३०६.

वेदांकडून जाणण्याला योग्य असें अविनाशी ब्रह्म तूं आहेस. या विश्वाचा अखेरचा आश्रय तूं आहेस. अव्यय व शाश्वत अशा धर्माचा रक्षण करणारा आणि सनातन असा पुरुष तूं आहेस असें मला वाटतें १८.

देवा, आपण परब्रह्म आहांत. आपण (ओंकाराच्या) साडेतीन मात्रांच्या पलीकडे आहांत व आपलें ठिकाण वेद शोधीत आहेत. ३०७. जें आकारमात्राचें घर, जें विश्वरूपी ठेव्याची एकच खाण, असें जें अविकार, गहन व अविनाश, तें, महाराज आपण आहांत. ३०८. तूं धर्माचा जिव्हाळा आहेस. तूं मूळचाच सिद्ध आहेस व नित्य नवा आहेस व तूं छत्तीस तत्त्वांहून निराळा असा सदतिसावा एक अलौकिक पुरुष आहेस, असें मी जाणतों. ३०९.

ज्याला आदि नाहीं, मध्य नाहीं व अन्त नाहीं, ज्याच्या पराक्रमाला अन्त नाहीं, ज्याचे बाहु अनन्त आहेत, चंद्र, सूर्य ज्याचे नेत्र आहेत, दीप्तिमान् अग्नि ज्याचें मुख आहे व आपल्या तेजानें जो या विश्वाला (जणूंकाय) जाळून टाकीत आहे असा तुला मी पहात आहें. १९.

तूं आदि, मध्य व अंतरहित आहेस. स्वतःच्या साम-र्थ्यानें तूं अनंत आहेस. तुला सर्व बाजूंनीं असंख्य हात व पाय आहेत. (जगांतील सर्व हात व पाय हे तुझे हात व पाय आहेत.) व तुझ्या स्वरूपाला मर्यादा नाहीं. ३१०. आणि चंद्र व सूर्य या तुझ्या डोळ्यांनीं तूं कोपाच्या व कृपेच्या लीला दाखवीत आहेस व तूं कोणावर कोपकटा-क्षानें रागावतोस व कोणाचा कृपादृष्टीनें सांभाळ करितोस. ३११. देवा, मी याप्रमाणें तुझें हें स्वरूप खरोखर पहात आहें. पेटलेल्या प्रलयाच्या अग्नीचें तेज जसें असावें, तसें हें तुझें तोंड आहे. ३१२. वणव्यानें चोहोंकडून पर्वत पेटला, म्हणजे जसा ज्वालांचा भडका उठतो, त्याप्रमाणें दांत व दाढा चाटीत असलेली जीभ लोळत आहे. ३१३. या तोंडाच्या उष्णतेनें आणि सर्व शरीराच्या तेजाच्या प्रका-शानें, संतप्त झालेलें विश्व अतिशय खवळलें आहे. ३१४.

स्वर्ग व पृथ्वी यांच्यामधील हा (सर्व) प्रदेश (अंतरिक्ष) तूं एकट्यानें व्यापला आहेस. सर्व दिशाहि (तूं एकट्यानें व्यापल्या आहेस.) हे विश्व-रूपा, हें तुझें अद्भुत व उग्र रूप पाहून त्रैलोक्य भयानें व्याकुल झालें आहे. २०.

किंवा जे भू-लोक, पाताळ, पृथ्वी, अंतरिक्ष अथवा दहा दिशा व सर्व क्षितिज——३१५. वर सांगितलेलें ते सर्व (सर्व ठिकाणें) तूं एकट्यानें भरलेलें आहे हें मी कौतुकानें पहात आहें; परंतु जसें एकाद्या भयंकर (वस्तूनें) आका-शासुद्धां सर्व जग बुडवावें (तसें तुझ्या भयंकर स्वरूपानें वरील सर्व ठिकाणें व्यापलेलीं मी पहातों.) ३१६. अथवा ज्याप्रमाणें अद्भुत रसाच्या लाटांनीं चौदाही भुवनांना वेढा पडावा, त्याप्रमाणें ही अत्यंत आश्चर्यकारक गोष्ट आहे. मग मीं कशाकशाचें आकलन करावें? ३१७. (तुझी विश्वरूपाची) व्यापकता विलक्षण अस-ल्यामुळें तुझें आकलन होत नाहीं व तुझी रूपाची प्रखरता सहन होत नाहीं. (यामुळें) सुख तर दूरच राहिलें, परंतु जग हें आपले प्राण मोठ्या कष्टानें धरून राहिलें आहे. ३१८. देवा, तुला पाहून भयाची भरती कशी आली हें कळत नाहीं. प्रस्तुत दुःखांच्या

तिन्ही भुवनें ॥ १९ ॥ एऱ्हवीं तुज महात्मयाचें देखणें । तरि भयदुःखासि कां मेळवणें । परि हें सुख नव्हेचि जेणें गुणें । तें जाणवत आहे मज ॥ ३२० ॥ जंव तुझें रूप नोहे दिठें । तंव जगासि संसारिक गोमटें । आतां देखिलासि तरी विषयविटें । उपनला त्रासु ॥ २१ ॥ तेवींचि तूंतें देखिलियासाठीं । काइ सहसा तुज देवों येईल मिठी । आणि नेदीं तरी संकटीं । राहों केवीं ॥ २२ ॥ म्हणोनि मागां सरों तंव संसारु । आडवीत येतसे अनिवारु । आणि पुढां तूं तंव अनावरु । न येसि घेवों ॥ २३ ॥ ऐसा माझारिली सांकडां । बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा । हा ध्वनि जी फुडा । चोजवला मज ॥ २४ ॥ जैसा आरंबळला आगीं । समुद्रा ये निवावयालागीं । तंव कल्लोळपाणियाचां तरंगीं । आगळा बिहे ॥ २५ ॥ तैसें या जगासि जाहलें । तूंतें देखोनि तळमळित ठेलें । यामाजीं पैल भले । ज्ञानसुरांचे मेळावे ॥ २६ ॥

अमी हि त्वा सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥

हे तुझेनि आंगिकें तेजें । जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें । मिळत तुजआंतु निजें । सद्भावेंसीं ॥ २७ ॥ आणिक एक साविया भयभीरु । सर्वस्वें धरूनि तुझी मोहरु । तुज प्रार्थिताति करु । जोडोनियां ॥ २८ ॥ देवा अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवागुरें आंतुडलों । स्वर्गसंसाराचां सांकडलों । दोन्हीं भागीं ॥ २९ ॥ ऐसा आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें । तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणत देवा ॥ ३३० ॥ आणि महर्षी अथवा सिद्ध । कां विद्याधरसमूह विविध । हे बोलत तुज स्वस्तिवाद । करिती स्तवन ॥ ३१ ॥

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

हे रुद्रादित्यांचे मेळावे । वसु हन साध्य आघवे । अश्विनौदेव विश्वेदेव विभवें । वायुही हे जी ॥ ३२ ॥ अवधारा अग्नि हन गंधर्व । पैल यक्षरक्षोगण सर्व । जी महेंद्रमुख्य देव । कां सिद्धादिक ॥ ३३ ॥ हे आघवेची आपुलां लोकीं । सोत्कंठित अवलोकीं । हे महामूर्ती दैविकी । पाहत आहाती ॥ ३४ ॥ मग पाहात पाहात प्रतिक्षणीं । विस्मित होऊनि अंतः-करणीं । करित निजमुकुटीं वोवाळणी । प्रभुजी तुज ॥ ३५ ॥ ते जयजय घोष कलरवें । स्वर्ग गाजविताती आघवे । ठेवित ललाटावरी बरवे । करसंपुट ॥ ३६ ॥ तिये विनयद्रुमाचिये आरवीं । सुरवाडली सात्त्विकांची माधवी । म्हणोनि करसंपुटपल्लवीं । तूं होतासि फळ ॥ ३७ ॥ जी लोचना भाग्य उदेलें । जीवा सुखाचें सुयाणें पाहलें । जे अगाध तुझें देखिलें । विश्वरूप इहीं ॥ ३८ ॥ हें लोकव्यापक रूपडें । पाहतां देवांही चवकु पडे । याचें सन्मुखपण जोडे । भलतयाकडुनी ॥ ३९ ॥

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥ २३ ॥

लाटांत तिन्हीही लोक गटांगळ्या खात आहेत. ३१९. सहज विचार करून पाहिलें तर, तूं जो महात्मा, त्याचें दर्शन झालें तर भय व दुःख यांचा योग कां व्हावा? परंतु हें (विश्वरूपाचें दर्शन) सुख (सुखकारक) ज्या कारणांमुळें होत नाहीं, तें कारण मला (आतां) कळून आलें. ३२०. जोंपर्यंत तुझें रूप दृष्टीस पडलें नाहीं, तोंपर्यंत जगास विषयसुख चांगलें वाटतें. आतां ज्याअर्थी तुझ्या स्वरूपाचें दर्शन झालें, त्याअर्थी विषयाचा वीट आल्यामुळें कंटाळा उत्पन्न झाला आहे, ३२१. त्याचप्रमाणें तुला पाहिल्याबरोबर तुला एकदम आलिंगन देतां येईल काय ? बरें, आलिंगन जर न द्यावें तर या संकटांत कसें राहावें ? ३२२. म्हणून (तुला मिठी न देतां) मागें सरावें, तर अनिवार असा हा जन्ममरणरूप संसार मागें सरण्याला आडवा येतो आणि पुढें असणारा तूं तर अनावर असल्याकारणानें आकळतां येत नाहींस. ३२३. याप्रमाणें मध्येंच असलेल्या संकटांत (सांपडलेल्या) बिचाऱ्या त्रैलोक्याचा होरपळा होत आहे, असा माझा खरोखर अभिप्राय झाला आहे. ३२४. जसा अग्नीनें पोळलेला (मनुष्य) थंड होण्याकरितां समुद्राजवळ येतो, त्या वेळीं खवळलेल्या पाण्याच्या लाटांनीं जसा तो अधिकच भितो. ३२५. या जगाची तशी स्थिति झाली आहे. तुला पाहून (तुझ्या विश्वरूपाचें दर्शन झाल्यावर) तें तळमळत राहिलें. यांपैकीं पलीकडे गेलेले जे ज्ञानसंपन्न देवांचे चांगले समुदाय आहेत. ३२६.

हे देवांचे समुदाय तुझ्यामध्यें प्रवेश करीत आहेत; कोणी भयभीत होत्साते अंजलि करून (तुझें) स्तवन करीत आहेत; महर्षि व सिद्ध यांचें समुदाय 'स्वस्ति' असें म्हणून दीर्घस्तोत्रांनीं तुझी स्तुति करीत आहेत. २१.

हे ज्ञानसुरांचे (ज्ञानसंपन्न देवांचे) समुदाय तुझ्या अंगाच्या तेजानें सर्व कर्मांचीं बीजें (जीं अज्ञान, वासना वगैरे तीं) जाळून, आपल्या चांगल्या भावनेच्या जोरावर तुझ्या स्वरूपांत मिळतात. ३२७. आणखी कित्येक, जे स्वभावतः भयभीत झालेले आहेत, ते सर्व प्रकारांनीं तुझ्या मार्गाचा आश्रय करून, हात जोडून, तुझी प्रार्थना करतात. ३२८. (ती अशी कीं,) हे देवा, आम्ही अज्ञानरूपी समुद्रांत पडलों आहोंत व महाराज, विषयरूपी जाळ्यांत गुंतलों आहोंत व स्वर्ग आणि संसार या दोहोंच्या कचाटींत सांपडलों आहोंत. ३२९. असे जे आम्ही, त्या आमची मुक्तता तुझ्यावांचून कोण करील? देवा आम्ही तुला सर्व प्राणांनीं शरण आलों आहोंत, असें ते म्हणतात. ३३०. आणि महर्षि अथवा सिद्ध (कृतार्थ पुरुष) अथवा विद्याधरांचे नानाप्रकारचे समुदाय हे तुला 'तुझें कल्याण असो!' असें म्हणतात आणि स्तुति करितात. ३३१.

(एकादश) रुद्र, (द्वादश) आदित्य, (अष्ट) वसु, साध्य, विश्वेदेव, अश्विनीकुमार, वायु, पितर, गंधर्व, यक्ष, राक्षस, यांचे समुदाय सर्व विस्मययुक्त झालेले तुझ्याकडे पहात आहेत. २२.

हे अकरा रुद्र आणि बारा आदित्य यांचे समुदाय, आठ वसू व साध्य नांवाचे बारा देव हे सर्व, दोन अश्विनीकुमार, वैभवयुक्त विश्वेदेव आणि वायुदेवता देखील हे महाराज, ३३२ ऐका, अग्नि आणि गंधर्व, पलीकडे असलेले यक्षांचे व राक्षसांचे सर्व समुदाय, महाराज, इंद्र ज्यांमध्यें श्रेष्ठ आहे, असे देव आणि सिद्ध आदिकरून, ३३३. हे सर्व आपापल्या लोकांत उत्कंठेनें आपली दिव्य मूर्ति पहात आहेत, हें पहा. ३३४. मग पहात पहात प्रत्येक क्षणांत मनामध्यें चकित होऊन, हे देवा, ते तुला आपल्या मुकुटानें ओंवाळीत आहेत. ३३५. त्या 'जय जय' अशा घोषाच्या मंजुळ शब्दानें ते सर्व स्वर्गामध्यें गजर करितात व आपले दोन्ही हात चांगले जोडून मस्तकावर ठेवतात. (नमस्कार करितात.) ३३६. त्या नम्रतारूपी वृक्षांच्या अरण्यामध्यें, अष्टसात्त्विकभावरूपी वसंत ऋतु अनुकूल झाला, म्हणून (त्यांच्या) करसंपुटरूपी पालवीला तूं फल प्राप्त झाला आहेस. ३३७. महाराज, यांनीं (देवांनीं वगैरे) जें तुझें अगाध विश्वरूप पाहिलें, तें त्यांच्या डोळ्यांचें भाग्य उदयाला आलें आहे. अथवा त्यांच्या जीवाला सुखाचा सुकाळ उगवला. (प्राप्त झाला) ३३८. हें लोकाला व्यापणारें रूप पाहून देवांनाही दचका पडतो. वाटेल तिकडून यास (रूपास) पाहिलें असतां, हा समोर असा वाटतो. ३३९.

हे महाबाहो, अनंत मुखें व नेत्र असलेलें, अनंत बाहु, मांड्या व पाय असलेलें, अनंत उदरें असलेलें, अनंत दाढांच्या योगें भीषण असलेलें, तुझें प्रचंड रूप पाहून लोक, तसाच मी देखील व्याकूळ झालों आहें. २३.

ऐसें एकाचि परि विचित्रें । आणि भयानकें तेवींची बहु वक्त्रें । बहुलोचन हे सशस्त्रें । अनंतभुजा ॥ २४० ॥ हे अनंत चारु चरण । बहु उदर आणि नानावर्ण । कैसें प्रतिवदनीं मातलेपण । आवेशाचें ॥ ४१ ॥ हो कां जे महाकल्पाचां अंतीं । तवकलेनि यमें जेउत-तेउतीं । प्रळयाग्नीचीं उजिती । आंबुखिलीं जैसीं ॥ ४२ ॥ नातरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें । कीं प्रळयभैरवांचीं क्षेत्रें । नाना युगांतशक्तीचीं पात्रें । भूतखिचा वोढविलीं ॥ ४३ ॥ तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न समाती दरीमाजीं सिंहाडें । तैसें दांत दिसती रागीट ॥ ४४ ॥ जैसें काळरात्रीचेनि अंधारें । उल्हासत निघती संहारखेचरें । तैसिया वदनीं प्रळय-रुधिरें । काटलिया दाढा ॥ ४५ ॥ हें असो काळें अवंतिलें रण । कां सर्वसंहारें मातलें मरण । तैसें अतिभिंगुळवाणेंपण । वदनीं तुझिये ॥ ४६ ॥ हे बापडी लोकसृष्टी । मोटकीये विपाइली दिठी । आणि दुःखकालिंदीचां तटीं । झाड होऊनि ठेली ॥ ४७ ॥ तुज महामृत्यूचां सागरीं । हे त्रैलोक्यजीविताची तरी । शोकदुर्वातलहरी । आंदोळत असे ॥ ४८ ॥ एथ कोपोनि जरी वैकुंठें । ऐसें हन म्हणिपैल अवचटें । जे तुज लोकांचें काइ वाटे । तूं ध्यानसुख हें भोगीं ॥ ४९ ॥ वरी जी लोकांचें कीर साधारण । यांयां आड सूतसें वोडण । केवीं सहसा म्हणें प्राण । माझेचि कांपती ॥ ३५० ॥ ज्या मज संहाररुद्र वासिपे । ज्या मजभेणें मृत्यु लपे । तो मी अहाळबाहळीं कांपें । ऐसें तुवां केलें ॥ ५१ ॥ परि नवल बापा हे महामारी । इया नाम विश्वरूप जरी । हे भ्यासुरपणें हारी । भयासि आणी ॥ ५२ ॥

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रं ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥ २४ ॥

ठेलीं महाकाळेंसि हटेंतटें । तैसीं कितीएकें मुखें रागिटें । इहीं वाढोनियां धाकुटें । आकाश केलें ॥ ५३ ॥ गगनाचेनि वाडपणें नाकळे । त्रिभुवनींचियाही वारिया न वेंटाळे । ययाचेनि वाफा आगी जळे । कैसें धडाडीत असे ॥ ५४ ॥ तेवींचि एकासारिखें एक नोहे । एथ वर्णा-वर्णाचा भेदु आहे । हो कां जे प्रळयीं साचावो लाहे । वन्ही ययाचा ॥ ५५ ॥ जयाचिये आंगींची दीप्ती येवढी । जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडें आणि तोंडीं । दांत दाढा ॥ ५६ ॥ कैसा वारया धनुर्वात चढला । समुद्र कीं महापुरीं पडिला । विषाग्नि मारा प्रवर्तला । वडवानळासी ॥ ५७ ॥ हळाहळ आगी पियालें । नवल मरण मारा पेटलें । तैसें संहारतेजा या जाहलें । वदन देखा ॥ ५८ ॥ परी कोणें मानें विशाळ । जैसें तुटलिया अंतराळ । आकाशासि कव्हळ । पडोनि ठेलें ॥ ५९ ॥ नातरी काखे सूनि वसुंधरी । जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं । तैं उघडलें हाटकेश्वरीं । जेवीं पाताळकुहर ॥ ३६० ॥ तैसा वक्त्रांचा विकाशु । माजीं जिव्हांचा आगळाचि आवेशु । विश्व न पुरे म्हणोनि घांसु । न भरीचि कोडें ॥ ६१ ॥ आणि पाताळव्याळांचां फूत्कारीं । गरळज्वाळा लागती अंबरीं । तैसी पसरलिये वदनदरी- । माजीं हे जिव्हा ॥ ६२ ॥ काढूनि प्रळयविजूंचीं जुंबाडें । जैसे पन्नासिले गगनाचे हुडे । तैसे आवाळुवांवरी आंकडे ।

यांप्रमाणें आपलें एकच स्वरूप आहे, परंतु विचित्र आणि भयानक अशीं त्याला अनेक मुखें, अनेक नेत्र व शस्त्र धारण केलेले असे अगणित हात आहेत. ३४०. या विश्वरूपात अगणित सुंदर पाय आहेत, अनेक पोटें आहेत आणि नाना प्रकारचे रंग आहेत व प्रत्येक मुखाच्या ठिकाणीं क्षोभाचा मस्तपणा कसा आहे! ३४१. अथवा महाप्रळयाच्या शेवटीं जोर बांधलेल्या यमानें जशा कांहीं जिकडे तिकडे प्रळयाग्नीच्या आगठ्याच पेटविल्या. ३४२. अथवा संहार करणाऱ्या श्रीशंकराचा तोफखाना किंवा प्रळयकाळच्या भैरवदेवांचे समुदाय उत्पन्न व्हावेत अगर भूतांच्या (प्राण्यांच्या) नाशासाठीं युगांतशक्तीचीं पात्रें पुढें सरसावलीं आहेत. ३४३. त्याप्रमाणें जिकडे तिकडे तुझीं प्रचंड तोंडें मावत नाहींत आणि दरीमध्यें जसे सिंह तसे तुझ्या मुखांत दांत उग्र दिसतात. ३४४. प्रळयकाळच्या गडद रात्रींत नाश करणारीं पिशाचें जशीं उल्हासानें संचार करितात, त्याप्रमाणें प्रळयकाळच्या नाश पावणाऱ्या प्राण्यांच्या रक्तानें या मुखांतील दाढा भरलेल्या आहेत, (असें दिसतें.) ३४५. हें अहो, काळानें जसेंकाय युद्धास आमंत्रण करावें, अथवा सर्वांच्या संहारकालीं जसें मरण माजून रहातें, त्याप्रमाणें तुझ्या मुखांत अत्यंत भयानकपणा आहे. ३४६. त्या बिचाऱ्या त्रैलोक्यावर जेव्हां थोडीशी नजर टाकली, तेव्हां तें दुःखरूप कालिंदीच्या (यमुनेच्या) किनाऱ्यावर झाड बनून राहिलें आहे (असें दिसलें.) ३४७. तूं जो महामृत्युरूप समुद्र, त्यांत ही त्रैलोक्याच्या जीविताची नौका शोकरूप प्रतिकूल वाऱ्यानें उत्पन्न झालेल्या लाटांमुळें झोंके खात आहे. ३४८. 'तुला या लोकांचें काय वाटलें! तूं माझ्या या ध्यानाचें सुख भोग म्हणजे झालें,' अहो श्रीकृष्णा, असें जरी आपण आतां एकाएकीं रागावून बोललांत तरी—३४९. पण महाराज, माझ्याच जिवास भीतीनें कंप सुटला आहे, असें मीं एकदम कसें म्हणावें? म्हणून जगाचें साधारण दुःख उगीच आडपडद्यासारखें खरोखर मध्यें केलें आहे. ३५०. ज्या मला प्रळयकाळचा रुद्र (देखील) भितो, ज्या माझ्या भयानें मृत्यु लपून रहातो, असा जो मी, तो मी या ठिकाणीं भयानें अत्यंत कांपत आहें, असें तूं केलें आहेस, ३५१. परंतु हें पहा, ही महामारीच आहे. आणि यालाच जर विश्वरूप म्हणावयाचें, तर बापा, हें एक आश्चर्यच आहे. ही महामारी आपल्या विकाळ स्वरूपानें (साक्षात्) भयासही माघार घ्यावयास लावते. ३५२.

हे विष्णो, गगनाला स्पर्श करणारा, दीप्तिमान् अनेक रंगानीं युक्त, जबडा पसरलेला, दीप्तिमान् व विशाल नेत्र असलेला अशा तुला पाहून ज्याचा अंतरात्मा व्याकूळ झाला आहे, असा मी धैर्य धरूं शकत नाहीं व शांति देखील धरूं शकत नाहीं. २४.

महाकाळाबरोबर ज्यांनीं पैजेनें बरोबरीचा सामना बांधला आहे, अशीं कित्येक मुखें रागीट असून, यांनीं आपल्या विस्तारानें आकाश लहान केलें आहे. ३५३. आकाशाच्या मोठेपणास जीं आकळलीं जात नाहींत आणि त्रिभुवनांतील वाऱ्यानेंही जीं (मुखें) वेष्टिलीं जात नाहींत, त्या मुखाच्या वाफेनें अग्नि जळतो; या मुखांतून अग्नीचे लोळ कसे बाहेर येत आहेत! ३५४. त्याचप्रमाणें एकासारखें एक मुख नसून यांच्यांत (मुखांत) रंगारंगांचा भेद आहे. फार काय सांगावें! अशा या मुखांचें प्रळयकाळचा अग्नीसुद्धां साह्य घेतो. ३५५. ज्याच्या अंगाचें तेज एवढें आहे कीं, तें त्रैलोक्याची राखुंडी करील, त्यालाही तोंडें आहेत! व त्या तोंडांत दांत व दाढा आहेत! ३५६. पहा, हें कसें झालें! जसा वाऱ्याला धनुर्वात व्हावा, समुद्र महापुरांत पडावा किंवा विषाग्नि वडवानळाचा नाश करण्यास प्रवृत्त व्हावा. ३५७. अग्नीनें जसें हालाहल विष प्यावें अथवा आश्चर्य हें कीं, मरण जसें मारण्यास तयार व्हावें, त्याप्रमाणें या संहारतेजाला मुख झालें आहे, असें समजा! ३५८. परंतु तीं मुखें किती मोठीं आहेत म्हणून म्हणाल, तर आकाश तुटून पडल्यानें जशी आकाशास खिंड पडून राहते, ३५९. अथवा बगलेंत पृथ्वी मारून जेव्हां हिरण्याक्ष दैत्य गुहेंत शिरला, तेव्हां हाटकेश्वरानें जसें पाताळरूपी गुहेचें द्वार उघडलें, ३६०. त्याप्रमाणें तोंडें पसरलेलीं आहेत व त्यांमध्यें जिभांचे अधिकच जोर दिसून येत आहेत. त्यांच्या घासास विश्वानेंही पुरता येणार नाहीं, म्हणून हें विश्वरूप या विश्वाच्या लीलेनें घास घेत नाहीं. ३६१. आणि ज्याप्रमाणें पाताळांतील सर्पांच्या फुत्कारानें त्यांच्या विषाच्या ज्वाला आकाशांत पसराव्यात, त्या ज्वालांप्रमाणें जिव्हा ही (प्रत्येक) वदनरूपी दरींत पसरली आहे. ३६२. प्रळयकाळाच्या विजांचे समुदाय काढून जसे आकाशाचे बुरुज शृंगारावेत, तशीं ओंठाबाहेर तीक्ष्ण अशा दाढांचीं टोंकें दिसत

धगधगीत दाढांचे ॥ ६३ ॥ आणि ललाटपटाचिये खोले । कैसे भयातें भेडवितातीं डोळे । हो कां जे महामृत्यूचे उमाळे । कडवसां राहिले ॥ ६४ ॥ ऐसें वाऊनि महाभयाचें भोज । एथ काय निपजवूं पाहतोसि काज । तें नेणें परी मज । मरणभय आलें ॥ ६५ ॥ देवा विश्वरूप पहावयाचे डोहळे । केले तियें पावलों प्रतिफळें । बा देखिलासि आतां डोळे । निवावे तैसे निवाले ॥ ६६ ॥ अहो देहो पार्थिव कीर जाये । ययाची काकुळती कवणा आहे । परि आतां चैतन्य माझें विपायें । वांचे कीं न वांचे ॥ ६७ ॥ एऱ्हवीं भयास्तव आंग कांपे । नावेक आगळें तरी मन तापे । अथवा बुद्धिही वासिपे । अभिमानु विसरिजे ॥ ६८ ॥ परी येतुलियाही वेगळा । जो केवळ आनंदैककळा । तया अंतरात्मयाही निश्चळा । शियारी आली ॥ ६९ ॥ बाप साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी केला बोधु । हा गुरुशिष्यसंबंधु । विपायें नांदे ॥ ३७० ॥ देवा तुझां ये दर्शनीं । जें वैकल्य उपजलें आहे अंतःकरणीं । तें सांवरावयालागीं गंवसणी । धैर्याची करितसें ॥ ७१ ॥ तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन जाहलें । हें असो परि मज भलें आतुडविलें । उपदेशासी ॥ ७२ ॥ जीव विसंवावयाचिया चाडा । धांवाधांवी करितसे वापुडा । परि सोय ही कवणेकडा । न लभे एथ ॥ ७३ ॥ ऐसें विश्वरूपाचिया महामारी । जीवित्व गेलें आहे चराचरीं । जी न बोलें तरि काय करीं । कैसेनि राहें ॥ ७४ ॥

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

पैं अखंड डोळ्यांपुढें । फुटलें जैसें महाभयाचें भांडें । तैशी तुझीं मुखें वितंडें । पसरलीं देखें ॥ ७५ ॥ असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोंदों वोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा ॥ ७६ ॥ जैसें तक्षका विष भरलें । हो कां जे काळरात्रीं भूत संचरलें । कीं अग्नेयास्त्र पराजिलें । वज्राग्नि जैसें ॥ ७७ ॥ तैशीं तुझीं वक्त्रें प्रचंडें । वरि आवेश हा बाहेरी वोसंडे । आले मरणरसाचे लोंढे । आम्हांवरी ॥ ७८ ॥ संहारसमयींचा चंडानिळु । आणि महाकल्पांत प्रळयानळु । या दोहीं जैं होय मेळु । तैं काय एक न जळे ॥ ७९ ॥ तैसीं संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीरु कां आम्हां पारुखे । आतां भुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें ॥ ३८० ॥ मोटकें विश्वरूप डोळां देखिलें । आणि सुखाचें अवर्षण पडिलें । आतां जापाणीं जापाणीं आपुलें । अस्ताव्यस्त हें ॥ ८१ ॥ ऐसें करिसी म्हणोनि जरि जाणें । तरि हे गोष्टि सांगावी कां मी म्हणें । आतां एक वेळ वांचवीं जी प्राणें । या स्वरूपप्रळयापासोनि ॥ ८२ ॥ जरि तूं गोसावी आमुचा अनंता । तरि सुई वोडण माझिया जीविता । सांटवीं पसारा हा मागुता । महामारीचा ॥ ८३ ॥ आइकें सकळ देवांचिया परदेवते । तुवां चैतन्यें गा विश्व वसतें । तें विसरलासी

आहेत. ३६३. आणि ललाटरूप वस्त्राच्या खोळींत असलेले डोळे, हे जसे कांहीं भयासच भेडसावीत आहेत. अथवा ते डोळे, महामृत्यूचे लोटच असून ( भिवयांच्या ) अंधारांत राहिले आहेत ! ३६४. असें हें महाभयाचें ( मृत्यूचें ) कौतुक धारण करून ( म्हणजे आपल्या स्वरूपीं दाखवून ) या ठिकाणीं तूं काय कार्यसिद्धी करूं पहातोस, तें मला कळत नाहीं ! परंतु मला मात्र मृत्यूचें भय वाटूं लागलें आहे. ३६५. अहो देवा, विश्वरूप पहाण्याचे डोहाळे झाले होते, त्याची पूर्ण फलप्राप्ति होऊन, बाबा, तुमचें विश्वरूप आतां पाहिल्यानें डोळे शांत व्हावे तसें झालें ! ३६६. अहो देवा, हा देह पृथ्वीचा बनला असल्यानें तो तर निश्चयेंकरून नाश पावणारच. त्याची काळजी कोणी केली आहे ? परंतु आतां माझें चैतन्य कदाचित् वांचेल कीं न वांचेल, असें मला वाटूं लागलें आहे. ३६७. भयामुळें खरोखर अंग कांपावयास लागतें आणि तेंच भय क्षणभर अधिक वाढलें कीं, मनाला ताप होतो, अथवा बुद्धि दबकते आणि अभिमान विगलित होतो. ३६८. परंतु या सर्वांहून वेगळा, जो केवळ आनंदाचा अंश आहे, असा जो अंतरात्मा, त्या शांत आत्म्याला देखील भयानें शहारे आले. ३६९. काय आश्चर्य आहे ! विश्वरूपाच्या प्रत्यक्ष दर्शनाचा काय छंद लागला होता ! त्या दर्शनानें माझें ज्ञान देशोधडी केलें. असा गुरुशिष्यसंबंध क्वचितच असेल ! ३७०. देवा, तुझ्या या दर्शनानें अंतःकरणामध्यें जो विस्कळीतपणा उत्पन्न झाला आहे, तो विस्कळीतपणा सांवरण्याकरितां मी धैर्याची गवसणी करीत आहें. ३७१. तों माझ्या नांवानें धैर्य अगदींच नाहींसें झालें आणि त्यावर विश्वरूप दृष्टीस पडलें, मग काय विचारतां ? हें राहूं द्या. परंतु मला उपदेशांत चांगलें गुरफटून टाकलें ! ३७२. विश्रांति घेण्याच्या इच्छेनें बिचारा जीव धांवाधांव करीत आहे, परंतु या विश्वरूपांत त्याला कोठेंही आश्रय मिळत नाहीं. ३७३. याप्रमाणें विश्वरूपाच्या महामारीनें चराचरांतील जीवित्व गेलें आहे. महाराज, हें न बोलावें तर काय करावें ! व कसें रहावें ? ३७४.

दाढांच्या योगानें विक्राळ आणि प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें ( दिसणारीं ) तुझीं मुखें पाहून ( मी इतका गर्भगळित झालों आहें कीं, ) मला दिशाभूल झाली आहे; मला कांहीं समाधान वाटत नाहीं. हे देवाधिदेवा, जगन्निवासा, ( आतां ) प्रसन्न हो. २५.

त्याप्रमाणें महाभयाचें ( मृत्यूचें ) भांडें फुटावें, तशीं तुझीं विशाळ तोंडें डोळ्यांपुढें एकसारखीं पसरलेलीं मी पहात आहें. ३७५. हें असूं दे. जशीं प्रळयकाळच्या शस्त्रांचीं दाट कुंपणें एकसारखीं लागावींत, तशी दांतदाढांची गर्दी उडून गेली आहे. ती इतकी कीं, प्रत्येक मुखांतील दांत व दाढा, ह्या त्या मुखाच्या दोन दोन ओठांनीं देखील झांकल्या जात नाहींत. ३७६. तक्षक सर्प हा मूळचाच विषारी असून, त्याच्या तोंडांत जसें आणखी विष भरावें, किंवा अमावास्येची रात्र ही जशी पूर्ण काळोखामुळें मूळचीच भय उत्पन्न करणारी असून, तिच्यांत आणखी पिशाचांचा संचार व्हावा किंवा वज्राग्नि हा जसा स्वभावतःच अत्यंत दाहक असून त्यानें आणखी अग्निअस्त्र धारण करावें. ३७७. त्याप्रमाणें तुझ्या विश्वरूपाचीं तोंडें मूळचींच भयंकर असून, त्यांत आणखी त्यांचा आवेश त्यांत न मावतां बाहेर वाहात आहे.(तेव्हां) मला असें वाटतें कीं, तो वाहात असलेला आवेश नसून, ते जणूंकाय आमच्यावर मरणरसाचे लोंढेच आले आहेत. ३७८. प्रळयकाळचा प्रचंड वारा व महाप्रळयकाळचा अग्नि, हे जेव्हां एकत्र होतात, तेव्हां काय एक जळणार नाहीं ? ३७९. तशीं तुझीं संहार करणारीं मुखें पाहून, धैर्य तर आम्हांस नाहींसें झालें. आतां मी वेडा झाल्यामुळें मला दिशा दिसत नाहींत. एवढेंच नव्हे, तर माझी मलाही ओळख नाहीं, असें झालें आहे. ३८०. विश्वरूप डोळ्यानें जरासें पाहिलें नाहीं, तोंच सुखाचा दुष्काळ पडला. म्हणून आतां तूं आपलें हें अस्ताव्यस्त रूप आंवरून घे, आंवरून घे. ३८१. तूं असें करशील असें जर मला ठाऊक असतें, तर 'ही गोष्ट मला सांगा,' असें मीं कशाला म्हटलें असतें ? आतां या स्वरूपप्रळयापासून माझे एकवार प्राण वांचवा, महाराज, ३८२. अहो श्रीकृष्णा, जर आपण आमचे मालक आहांत, तर माझ्या जीविताच्या आड ढाल घाला, म्हणजे हा विश्वरूपरूपी महामारीचा पसारा पुनः आपल्या स्वरूपाच्या ठिकाणीं सांठवा. ३८३. हे सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ अशा देवा, ऐक. तूं जो चैतन्य, त्या तुझ्यामुळें सर्व विश्व वसतें आहे ( म्हणजे विश्वाचें अस्तित्व तुझ्या सत्तेवर आहे ) तें

हें उपरतें। संहारूं आदरिलें ॥ ८४ ॥ म्हणोनि वेगीं प्रसन्न होईं देवराया। संहरीं संहरीं आपुली माया। काढीं मातें महाभया- । पासोनियां ॥ ८५ ॥ हा ठायवरी पुढतपुढती। तुतें म्हाणिजे बहुवा काकुळती। ऐसा मी विश्वमूर्ती। भेडका जाहलों ॥ ८६ ॥ जैं अमरावतीये आला धाडा। तैं म्यां एकलेनि केला उवेडा। जो मी काळाचियाही तोंडा। वासिपु न धरीं ॥ ८७ ॥ परि तया आंतुल नव्हे हे देवा। एथ मृत्युसही करूनि चढावा। तुवां आमुचाचि घोटु भरावा। या सकळ विश्वेसीं ॥ ८८ ॥ कैसा नव्हता प्रळयाचा वेळु। गोखा तूंचि मिनलासि काळु। बापुडा हा त्रिभुवनगोळु। अल्पायु जाहला ॥ ८९ ॥

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ॥
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथाऽसौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

अहा भाग्या विपरीता। विघ्न उठिलें शांत करितां। कटा विश्व गेलें आतां। तूं लागलासि ग्रासूं ॥ ३९० ॥ हें नव्हे मा रोकडें। सैंघ पसरूनिया तोंडें। कवळितासि चहूंकडे। सैन्यें इयें ॥ ९१ ॥ नोहेति हे कौरवकुळींचे वीर। आंधळिया धृतराष्ट्राचे कुमर। हे गेले गेले सपरिवार। तुझां वदनीं ॥ ९२ ॥ आणि जे जे यांचेनि सावायें। आले देशोदेशींचें राये। तयांचें सांगावया जावों न लाहे। ऐसें सरकटितु आहासी ॥ ९३ ॥ मदमुखाचिया संघटा। घेत आहासि घटघटां। आरणीं हन थाटा। देतोसि मिठी ॥ ९४ ॥ जंत्रावरिचील मार। पदातींचे मोगर। मुखाआंत भार। हारपताति मा ॥ ९५ ॥ कृतांताचिया जावळी। जें एकचि विश्वातें गिळी। तियें कोटीवरील सगळीं। गिळितासि शस्त्रें ॥ ९६ ॥ चतुरंगा परिवारा। संजोडियां रहंवरां। दांत न लाविसी मा परमेश्वरा। कैसा तुष्टलासि बरवा ॥ ९७ ॥ हां गा भीष्माऐसा कवणु। सत्यशौर्यनिपुणु। तोही आणि ब्राह्मण द्रोणु। ग्रासिलासि कटकटा ॥ ९८ ॥ अहा सहस्रकराचा कुमरु। एथ गेला गेला कर्णवीरु। आणि आम्हुचिया आघवयांचा केरु। फेडिला देखें ॥ ९९ ॥ कटकटा धातया। कैसें जाहलें अनुग्रहा यया। मियां प्रार्थूनि जगा बापुडिया। आणिलें मरण ॥ ४०० ॥ मागां थोडिया बहुवा उपपत्ती। येणें सांगितलिया विभूती। तैसा नसेचि मा पुढती। बैसलों पुसों ॥ १ ॥ म्हणोनि भोग्य तें त्रिशुद्धी न चुके। आणि बुद्धिही होणारासारिखी ठाके। माझां कपाळीं पिटावें लोकें। तें लोटेल काह्या ॥ २ ॥ पूर्वीं अमृतही हातां आलें। परि देव नसतीचि उगले। मग काळकूट उठविलें। शेवटीं जैसें ॥ ३ ॥ परि तें एकवगीं थोडें। केलिया प्रतिकारामाजिवडें। आणि तिये अवसरींचें तें सांकडें। निस्तरविलें शंभू ॥ ४ ॥ आतां हा जळता वारा कें वेंटाळे। कोणाही विषा भरलें गगन गिळे। महाकाळेंसि खेळें। आंगवत असे ॥ ५ ॥ ऐसा अर्जुन दुःखें शिणतु। शोचित असे जिवाआंतु। परि न देखे तो प्रस्तुतु। अभिप्रावो देवाचा ॥ ६ ॥ जे मी मारिता हे कौरव मरते। ऐसोनि वेंटाळिला होता मोहें बहुतें। तो फेडावयालागीं अनंतें। हें दाखविलें निज ॥७॥ अरे कोण्ही कोणातें न मारी। एथ मीचि हो सर्व

विसरलास व हें उलटें संहार करण्याचें काम आरंभलें आहेस. ३८४. एवढ्याकरितां हे देवांतील राजा, श्रीकृष्णा, लवकर प्रसन्न हो व आपल्या मायाशक्तीला आवर, आवर. आणि मला या मरणासारख्या मोठ्या भयांतून बाहेर काढ. ३८५. इतकें तुला मोठ्या दीनपणें वारंवार म्हणावें, असा मी विश्वरूपाच्या योगानें खरोखर भ्यालों आहे. ३८६. ज्या वेळीं अमरावतीवर राक्षसांचा हल्ला आला, त्या वेळीं मीं एकट्यानें तो परतविला व जो मी, साक्षात् काळ समोर आला, तरी भय न धरणारा असा आहे, ३८७. परंतु देवा, ही विश्वरूप गोष्ट त्यांतली नव्हे, येथें (विश्वरूपांत) तूं मृत्यूवर ताण करून या सर्व विश्वासकट माझा देखील ग्रास करण्याचा दुर्घट प्रसंग आणला आहेस. ३८८. प्रळयाचा काळ नसतांना मध्येंच कसा (तूं) काळ प्राप्त झालास ? हें त्रैलोक्य बिचारें अल्पायुषी झालें असें वाटतें. ३८९.

हे धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, राजांच्या समुदायांसह-वर्तमान, भीष्म, द्रोण, तसाच कर्ण, त्याप्रमाणेंच आमच्या पक्षाच्या देखील मुख्य योद्ध्यांसह. २६.

अरेरे ! विपरीत देवा ! विश्वरूपदर्शनानें शांत व्हावें म्हणून खटपट केली, तों अकल्पित विघ्न उत्पन्न झालें. हाय ! हें त्रैलोक्य आतां नाहींसें झालें ! तूं हें आतां गिळावयास लागलास ! ३९०. एकसारखीं तोंडें पसरून हीं सैन्यें चाऱ्ही बाजूंनीं तूं ग्रासीत आहेस, हें प्रत्यक्ष (दिसत) नाहीं काय ? ३९१. हे कौरवांच्या वंशांतील वीर, आंधळ्या धृतराष्ट्राचे पुत्र नव्हेत का ? अरे अरे, हे तर आपल्या परिवारासुद्धां तुझ्या तोंडांत पूर्णपणें गेलेच म्हणावयाचे ! ३९२. आणि जे जे यांच्या मदतीकरितां देशोदेशींचे राजे आले आहेत, त्यांची वार्ताही सांगावयास जातां येणार नाहीं, (कोणी उरणार नाहीं.) असा तूं सर्वांचा सरसकट ग्रास करीत आहेस. ३९३. मदोन्मत्त हत्तींचे समुदाय तूं घटाघट गिळीत असून, युद्धभूमीवरील सेनासमुदाय तूं गिळून टाकीत आहेस. ३९४. तोफांवरून मारा करणारे लोक व पायांनीं चालणारें पायदळ, यांच्या झुंडीच्या झुंडी तुझ्या मुखांत नाहींशा होत आहेत, नाहीं का ? ३९५. जीं शस्त्रें यमाचीं भावंडें आहेत व ज्या शस्त्रांपैकीं एकच, सर्व विश्वाला गिळील, अशीं कोट्यावधि शस्त्रें तूं गिळीत आहेस. ३९६. हत्ती, घोडे, रथ, पायदळ असा चतुरंग सेनेचा परिवार व घोडे जोडलेले रथ यांस परमेश्वरा, तूं दांत न लावतां गिळीत आहेस व त्यायोगानें कसा चांगला संतुष्ट झाला आहेस खरें ! ३९७. अहो, भीष्मासारखा खरेपणांत प्रसिद्ध आणि शौर्यांत तरबेज, असा दुसरा कोण आहे ? तो देखील आणि द्रोणाचार्य ब्राह्मणही, अरेरे, तूं गिळलास. ३९८. अहाहा ! सूर्याचा मुलगा जो वीर कर्ण, तो आपल्या मुळांत गेला हो गेला. आणि आमच्याकडचे सर्व (योद्धे) तर तूं केरासारखें नाहींसे केलेले मी पहात आहें. ३९९. हाय, हाय ! ब्रह्मदेवा, भगवंताच्या या अनुग्रहानें कसें झालें ? या विपरीत फलप्राप्तीच्या योगानें असें झालें कीं, मला आपलें विश्वरूप दाखवा, अशी भगवंताची प्रार्थना करून, या दीन जगास (स्थितिकालीं) मीं मरण आणलें. ४००. आणि मागें (सातव्या व दहाव्या अध्यायांत) देवानें थोड्याबहुत युक्तीनें विभूति सांगितल्या; परंतु त्या व्यापकपणासारखा देव मला दिसेना. म्हणून तेवढ्यावर न थांबतां पुनः विश्वरूप दाखवा, म्हणून विनंति करण्यास मी सरसावलों. ४०१. म्हणून जें भोगावयाचें आहे, तें ठाम चुकणार नाहीं आणि जसें होणार असेल, त्यासारखी बुद्धि होऊन रहाते. माझ्या कपाळांत (प्रारब्धांत) लोकांनीं मला दोष द्यावा असें होतें, तें कसें चुकेल ? ४०२. पूर्वी (समुद्रमंथनकालीं) अमृत देखील देवांच्या हातीं लागलें (तेव्हां देवांना उगीच बसावें कीं नाहीं ?) परंतु देव उगीच बसले नाहींत. मग शेवटीं त्याप्रमाणें कालकूट विष समुद्रमंथनापासून उत्पन्न केलें. ४०३. परंतु तें एक प्रकारानें थोडें होतें. कारण ती केलेली गोष्ट (समुद्रमंथनानें कालकुटाची उत्पत्ति) निराकरण करण्याजोग्या गोष्टींपैकीं एक होती, आणि त्या वेळचें तें संकट शंकरानें निवारण केलें. ४०४. पण हल्लींचा जो हा विश्वरूपाचा प्रकार, हा प्रत्यक्ष पेटलेला वाराच आहे, तर तो कसा आंवरेल ? विषानें भरलेलें आकाश कोणास गिळतां येईल काय ? महाकाळाबरोबर खेळतां येईल, असें कोणाच्या अंगीं सामर्थ्य आहे ? ४०५. याप्रमाणें अर्जुन दुःखानें कष्टी होऊन मनामध्ये शोक करीत होता. परंतु तो सांप्रत देवाचें मनोगत काय आहे, हें ओळखत नव्हता. ४०६. कारण, मी अर्जुन मारणारा आणि हे कौरव माझ्याहातून मरणारे, अशा मोठ्या मोहानें तो अर्जुन घेरला होता. ती भुरळ दूर करण्याकरितां, श्रीकृष्णानें हें विश्वरूपरूपी आपलें खास स्वरूप त्याला दाखविलें. ४०७. 'अर्जुना, वास्तविक कोणी कोणाला मारीत नाहीं. यांत मी स्वतःच

संहारीं। हें विश्वरूपव्याजें हरी। प्रकटित असे ॥ ८ ॥ परि वायांचि व्याकुलता। ते न चोजवेचि पंडुसुता। मग अहा कंपु नव्हता। वाढवित असे ॥ ९ ॥ तेथ म्हणे पाहा हो एके वेळे। सासिकवचेंसि दोन्ही दळें। वदनीं गेलीं आभाळें। गगनीं कां जैसीं ॥ ४१० ॥ कां महाकल्पाचां शेवटीं। जैं कृतांतु कोपला होय सृष्टी। तैं एकविसांही स्वर्गां मिठी। पाताळासकट दे ॥ ११ ॥ नातरी उदासीनें दैवें। संचकाचीं वैभवें। जेथींचीं तेथ स्वभावें। विलया जाती ॥ १२ ॥ तैसीं सांचलीं सैन्यें एकवाटें। इये मुखीं जाहलीं प्रविष्टें। परि एकही तोंडौनि न सुटे। कैसें कर्म देखा ॥ १३ ॥ अशोकाचे अंगवसे। चघळिले कन्हेनि जैसें। लोक वक्त्रामाजीं तैसे। वायां गेले ॥१४॥

वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि।
केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥

परि सिसाळें मुकुटेंसीं। पडिलीं दाढांचां सांडसीं। पीठ होत कैसीं। दिसत आहाती ॥१५॥ तियें रत्नें दांतांचिये सवडी। कूट लागलें जिभेचां बुडीं। कांहीं कांहीं आगरडीं। दंष्ट्रांचीं माखलीं ॥ १६ ॥ हो कां जे विश्वरूपें काळें। ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें। परि जीवदेहींचीं सिसाळें। अवश्य कीं राखिलीं ॥१७॥ तैसीं शरीरामाजीं चोखडीं। होतीं उत्तमांगें इयें फुडीं। म्हणोनि महाकाळाचांहि तोंडीं। परि उरलीं शेखीं ॥ १८ ॥ मग म्हणे हें काई। जन्मलयां आन मोहरचि नाहीं। जग आपैसेंचि वदनडोहीं। संचरताहे ॥१९॥ या आवघियाचि सृष्टी। लागलिया आहाति वदनाचां वाटीं। आणि हा जेथिंचिया तेथ मिठी। देतसे उगला ॥४२०॥ ब्रह्मादिक समस्त। उंचा मुखामाजीं धांवत। येर सामान्य हे भरत। ऐलीच वदनीं ॥ २१ ॥ आणीकही भूतजात। तें उपजलेचि ठायीं ग्रासित। परि याचिया मुखा निभ्रांत। न सुटेचि कांहीं ॥ २२ ॥

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति।
तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति ॥ २८ ॥

जैसे महानदीचे वोघ। वहिले ठाकिती समुद्राचें आंग। तैसें आघवांचिकडूनि जग। प्रवेशत मुखीं ॥ २३ ॥ आयुष्यपंथें प्राणिगणीं। करोनि अहोरात्रांची सोवाणी। वेगें वक्त्रामिळणीं। साधिजत आहाती ॥ २४ ॥

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः।
तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

जळतया गिरीचिया गवखा–। माजीं घापती पतंगाचिया झाका। तैसे समग्र लोक देखा। इये वदनीं पडत ॥ २५ ॥ परि जेतुलें येथ प्रवेशलें। तेंतुलया लोहें पाणीचि पां गिळिलें। वहिवटींहि पुसिलें। नामरूप तयांचें ॥ २६ ॥ आणि येतुलाही आरोगण। करितां भुके नाहीं उणेपण। कैसें दीपन असाधारण। उदयलें यया ॥ २७ ॥ जैसा रोगिया ज्वराहूनि उठिला। कां भणगा दुष्काळु पाहला। तैसा जिभांचा लळलळाटु देखिला। आवाळुवें चाटितां ॥ २८ ॥

सर्वांचा नाश करतों;' हें तत्त्व विश्वरूपाच्या निमित्तानें श्रीकृष्ण उघड करून दाखवीत आहे. ४०८. परंतु तें (देवाचा अभिप्राय) अर्जुनास न कळल्यामुळें, तो व्यर्थ शोकाकुल होऊन नसलेली भीति उगीच वाढवीत होता. ४०९. त्या प्रसंगांत तो अर्जुन म्हणाला, अहो हें पहा; ज्याप्रमाणें ढग आकाशामध्यें नाहींसे व्हावेत, त्याप्रमाणें तरवार व चिलखतासह दोन्हींकडील सैन्यें एकाच वेळेला तोंडांत गेलीं आहेत. ४१०. अथवा महाकल्पांताच्या अखेरीस ज्या वेळेला विश्वावर सर्वनाशक यमाचा रोष होतो, त्या वेळेला पाताळासह एकवीस स्वर्गांना तो ग्रासून टाकतो. ४११. अथवा प्रतिकूल दैवाच्या योगानें संग्रह करणाराचीं ऐश्वर्यें (कृपणाचे ठेवे) सहजच जशीं जेथच्या तेथें नाश पावतात. ४१२. त्याप्रमाणें एकत्र झालेलीं सैन्यें या तोंडामध्यें एकदम शिरतात. परंतु कसें कर्म विपरीत आहे पहा, कीं, त्यांपैकीं एक देखील तोंडाच्या सपाट्यांतून सुटत नाहीं! ४१३. ज्याप्रमाणें उंटानें अशोक झाडाचे ढगळे चघळावेत, त्याप्रमाणें हे लोक तोंडामध्यें वायां गेलेले आहेत. ४१४.

त्वरा करणारे हे (अगोदर) भयानक व दाढांच्या योगानें (अधिक) भयानक अशा तुझ्या मुखांमध्यें शिरत आहेत. कोणी चूर्ण झालेल्या मस्तकांनीं दातांमध्यें अडकलेले दिसतात. २७.

परंतु मुगुटांसुद्धां मस्तकें दाढांच्या चिमट्यांत पडलेली कशीं पीठ होतांना दिसत आहेत! ४१५. मुगुटांवरील कांहीं रत्नें दातांच्या फटींत सांपडलीं आहेत. कित्येक रत्नांचें झालेलें पीठ, जिभेच्या बुडास लागलें असून, कांहीं कांहीं दाढांचे अग्रभागही त्या पिठानें माखून गेले आहेत. ४१६. अथवा ज्याप्रमाणें विश्वरूपी काळानें लोकांचीं शरीरें व बळें जरी ग्रासलीं तरी जीवांच्या देहाचे उत्तम भाग जीं लोकांचीं मस्तकें, तीं अवश्य राखलीं. ४१७. त्याप्रमाणें मस्तकें निश्चयेंकरून शरीराचे उत्तम भाग होतीं, म्हणून तीं महाकाळाच्या (विश्वरूपी काळाच्या) तोंडांत जरी गेलीं, तरी पण शेवटीं उरलीं. म्हणजे विश्वरूपी महाकाळाच्याही तोंडांत नाश पावलीं नाहींत. ४१८. नंतर अर्जुन म्हणावयास लागला, हें काय? जन्माला आलेल्या प्राण्याला दुसरी गतीच नाहीं. सर्व जग आपोआप विश्वरूपाच्या मुखरूपी डोहांत जात आहे. ४१९. या सर्वच सृष्टया मुखाच्या वाटेस लागल्या असून, हें विश्वरूप उगीच जागच्या जागींच त्यांस गिळून टाकीत आहे. ४२०. ब्रह्मदेव आदिकरून सर्व, हे उंच असलेल्या मुखामध्यें वेगानें जात आहेत आणि बाकीचे जे साधारण प्रतीचे लोक आहेत, ते अलीकडील तोंडांतच पडत आहेत. ४२१. आणखी देखील जेवढे प्राणी आहेत, तेवढ्या सर्वांस उत्पन्न झालेल्या ठिकाणींच मुख गिळून टाकीत आहे. पण याच्या मुखांतून खरोखर कांहींच सुटत नाहीं. ४२२.

ज्याप्रमाणें नद्यांचे अनेक जलप्रवाह समुद्राकडेच तोंड करून गमन करतात, त्याप्रमाणें सर्व बाजूंनीं जळत असलेल्या तुझ्या मुखामध्यें हे नरामधील वीर प्रवेश करीत आहेत. २८.

ज्याप्रमाणें मोठ्या नद्यांचे प्रवाह मोठ्या वेगानें समुद्रास येऊन मिळतात, त्याप्रमाणें (तितक्या वेगांत) सर्व बाजूंनीं हें जग त्याच्या मुखांत शिरत आहे. ४२३. आयुष्याच्या मार्गानें रात्रंदिवसाच्या पायऱ्या करून सर्व प्रकारच्या प्राण्यांचे समुदाय त्वरेनें मुखांत प्रवेश करण्याचें साधीत आहेत. ४२४.

अत्यंत वेगानें युक्त (होत्साते) पतंग ज्याप्रमाणें प्रदीप्त अग्नीमध्यें (स्वतःच्या) नाशाकरितांच प्रवेश करतात, त्याप्रमाणेंच (हे) प्राणी अत्यंत वेगानें युक्त होत्साते (स्वतःच्या) नाशाकरितांच तुझ्या मुखांमध्यें प्रवेश करीत आहेत. २९.

पेट घेतलेल्या डोंगराच्या दरीमध्यें ज्याप्रमाणें पतंगाचे समुदाय उड्या घालतात, त्याप्रमाणें पहा, हे सर्व लोक या तोंडामध्यें येऊन पडत आहेत. ४२५. परंतु लोखंड जसें पाण्याला शोषून टाकतें, त्याप्रमाणें जेवढे म्हणून प्राणी या मुखांत जात आहेत, तेवढ्यांचें बहिवाटीलासुद्धां नामरूप रहात नाहीं. ४२६. आणि इतकेंही खाणें खात असतां भूक कांहींच कमी होत नाहीं. याच्या जठराग्नीला कितीतरी विशेष प्रखरता आली आहे! ४२७. जसा एकादा रोगी तापांतून बरा व्हावा (म्हणजे त्याला खा खा सुटते) अथवा जसें एकाद्या भिकारी मनुष्याला दुष्काळ संपून सुकाळ झाला म्हणजे खाखा सुटते, त्याप्रमाणें ओठप्रांत चाटतांना जिभेची हलण्याची गडबड दिसते. ४२८.

लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ॥ ३० ॥

तैसें आहाराचेन नांवें कांहीं । तोंडापासूनि उरलेंचि नाहीं । कैसी समसमित नवाई । भुकेलेपणाची ॥ २९ ॥ काय सागराचा घोंटु भरावा । कीं पर्वताचा घांसु करावा । ब्रह्मकटाहो घालावा । आसकाचि दाढे ॥ ४३० ॥ दिशा सगळियाचि गिळावियां । चांदिणिया चाटूनि घ्यावियां । ऐसें वर्तत आहे साविया । लौल्य बा तुज ॥ ३१ ॥ जैसा भोगीं कामु वाढे । कां इंधनें आगीसि हाकाक चढे । तैसीं खातखातांचि तोंडें । खाखातें ठेलीं ॥ ३२ ॥ कैसें एकचि केवढें पसरलें । त्रिभुवन जिव्हाग्रीं आहे टेकलें । जैसें कां कवींठ घातलें । वडवानळीं ॥ ३३ ॥ ऐसीं अपारें वदनें । आतां येतुलीं कैंचीं त्रिभुवनें । कां आहारु न मिळतां येणें मानें । वाढविलीं असेंबा ॥ ३४ ॥ अगा हा लोकु बापुडा । जाहला वदनज्वाळां वरपडा । जैसीं वणवेयाचिया वेढां । सांपडती मृगें ॥ ३५ ॥ आतां तैसें विश्वासि जाहालें । देवो नव्हे हें कर्म आलें । कीं जगजळचरां पांगिलें । काळजाळें ॥ ३६ ॥ आतां इये अंगप्रभेचिये वागुरे । कोणीकडूनि निगिजैल चराचरें । वक्त्रें नव्हतीं जोहरें । वोडवलीं जगा ॥ ३७ ॥ आगी आपुलेनि दाहकपणें । कैसेनि पोळिजे तें नेणे । परि जया लागे तया प्राणें । सुटिका नाहीं ॥ ३८ ॥ माझेनि तिखटपणें । कैसें निवटे हें शस्त्र कायि जाणे । कां आपुलिया मारा नेणे । विष जैसें ॥ ३९ ॥ तैसी तुज कांहीं । आपुलिया उग्रपणाची सेचि नाहीं । परि ऐलीकडे मुखीं खाई । हों सरली जगाची ॥ ४४० ॥ अगा आत्मा तूं एकु । सकळविश्वव्यापकु । तरी कां आम्हां अंतकु । वोडवलासी ॥ ४१ ॥ तरि मियां सांडिली जीविताची चाड । आणि तुवांही न धरावी भीड । मनीं आहे तें उघड । बोल पां सुखें ॥ ४२ ॥ किती वाढविसी या उग्ररूपा । अंगींचें भगवंतपण आठवीं बापा । नाहीं तरि कृपा । मजपुरती पाहीं ॥ ४३ ॥ परि एक वेळ वेदवेद्या । त्रिभुवनाचिया आद्या । विनवणी विश्ववंद्या । आइकें माझी ॥ ४४ ॥

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

ऐसें बोलोनि वीरें । चरण नमस्कारिले शिरें । मग म्हणे तरि सर्वेश्वरें । अवधारिजो ॥ ४५ ॥ मियां होआवया समाधान । पुसिलें विश्वरूपध्यान । आणि एके काळें त्रिभुवन । गिळितुचि उठिलासी ॥ ४६ ॥ तरि तूं कोण कां येतुलीं । इयें भ्यासुरें मुखें कां मेळविलीं । आघवांचि करीं परिजिलीं । शस्त्रें काह्या ॥ ४७ ॥ जी जंव तंव रागीटपणें । वाढोनि गगना आणितासि उणें । कां डोळे करूनि भिंगुळवाणे । भेडसावीत आहासी ॥ ४८ ॥ एथ कृतांतेंसीं

जळत असणाऱ्या मुखांनीं सर्व लोकांना सर्व बाजूंनीं गिळित असणारा तूं ( अतृप्तीमुळें ) जिभा चाटीत आहेस. हे विष्णो, ( आपल्या ) तेजानें सर्व जग व्यापून, तुझीं प्रखर तेजें ( जगाला ) ताप देत आहेत. ३०.

तसेंच खाण्याचा जेवढा म्हणून पदार्थ आहे, त्यापैकीं तुझ्या तोंडापासून कशाचाच बचाव झाला नाहीं. खरमरीत भूक लागलेल्या स्थितीची ही कशी अपूर्वता आहे ! ४२९. सर्व समुद्रच पिऊन टाकावा कीं काय किंवा पर्वतच गट्ट करावा कीं काय अथवा हें संपूर्ण विश्व दाढेखालीं घालावें कीं काय, ४३०. सगळ्या दिशाच गिळून टाकाव्या अथवा चांदण्या चाटून पुसून घ्याव्यात, अशी ही, देवा, तुला साहजिक हांव दिसत आहे. ४३१. ज्याप्रमाणें विषयभोगानें भोगण्याची इच्छा वाढते, अथवा सर्पणानें अग्नीची खा खा अधिक होते, त्याप्रमाणें तुझीं तोंडें सारखीं खात असतांही, पुनः पुनः खा खा करीतच राहिलीं आहेत. ४३२. एकच तोंड ( पण ) कसें व केवढें पसरलें आहे ! ज्याप्रमाणें वडवानळामध्यें कवठ घालावें त्याप्रमाणें हे तिन्हीही लोक तुझ्या जिभेच्या टोकालाच लागलेले दिसतात. ४३३. ( एक तोंडाची अशी वाट झाली ) अशी ( आपल्या विश्वरूपांत ) असंख्य तोंडें आहेत ! आतां ( इतक्यां मुखांना ) इतकीं त्रिभुवनें कोठलीं ? तेव्हां ( ज्याच्या तेजाचा ताप ) सहन करणें अशक्य आहे अशा तूं त्यांना खायला न मिळतां तीं इतकीं कशाला वाढविलीं ? ४३४. अहो, विचारें हें जगत तुझ्या तोंडांतून निघणाऱ्या ज्वाळांच्या भडक्यांत सांपडलें आहे. ज्याप्रमाणें वणव्याच्या वेढ्यांत जनावरें सांपडावींत. ४३५. आतां त्याप्रमाणें जगाला झालें आहे. हा ( तारणारा ) देव नाहीं, तर हें सर्वांचें अनिष्ट कर्मच विश्वरूपानें ओढवलें आहे. अथवा जगद्रूपी जलचरांना ( विश्वरूप हें ) काळरूपी जाळेंच पसरलें आहे. ४३६. आतां या विश्वरूपाच्या शरीराचें तेज, हेंच कोणी एक ( पारध्याचें ) जाळें आहे. त्यांतून स्थावरजंगमाला कोणत्या बाजूनें निसटून जातां येईल ? ( मला वाटतें ) हीं तोंडें नाहींत, तर तीं पेटलेलीं लाखेचीं घरेंच जगाला प्राप्त झालीं आहेत ! ४३७. आपल्या आगीनें आपण ( दुसऱ्याला ) कसें पोळतों, हें अग्नीस जरी कळत नाहीं, तथापि ज्याला अग्नीची आग लागते, त्याचे प्राण वांचत नाहींत. ४३८ ( किंवा ) आपल्या तीक्ष्णपणानें ( दुसऱ्याचा ) कसा घात होतो, हें हत्यार काय जाणतें ? किंवा ( ज्याप्रमाणें ) विषास, आपण किती प्राणघातक आहोंत, याची खबरही नसते, ४३९. त्याप्रमाणें तुला आपल्या स्वतःच्या उग्रपणाची बिलकूल आठवणच नाहीं. पण ( इकडे ) अलिकडल्याच तोंडांत सर्व जगाचा नाश होऊन राहिला आहे. ४४०. देवा, तूं सर्व जगाला व्यापून असणारा जर एकच आत्मा आहेस, तर मग आम्हांला प्राण घेणाऱ्या यमाप्रमाणें कां झाला आहेस ? ४४१. मी तर आपल्या जगण्याची आशाच सोडली आहे आणि तूंही कांहीं भीडभाड धरूं नकोस. तुझ्या मनांत जें काय असेल, तें खुशाल स्पष्ट सांग पाहूं. ४४२. या उग्र रूपाला तूं किती वाढवीत आहेस ? देवा, आपल्या स्वतःच्या अंगीं असलेलें भगवंतपण ( पालन करण्याचा स्वभाव ) आठव; नाहीं तर ( तसें करण्याचें आपल्या मनांत नसेल तर ) माझ्यापुरती तरी कृपा कर. ४४३. परंतु वेदाकडून जाणले जाणाऱ्या, त्रैलोक्याच्या मूळकारणा, व सर्व जगाला नमस्कार करण्याला योग्य अशा ( हे श्रीकृष्णा ) एक वेळ माझी विनंति ऐक. ४४४.

( हें ) उग्र रूप धारण केलेला तूं कोण आहेस मला सांग. हे देवश्रेष्ठा, मी तुला नमस्कार करतों. माझ्यावर अनुग्रह कर. अगोदर मी तुला पूर्णत्वानें जाणण्याची इच्छा करीत आहें; कारण तुझी ही प्रवृत्ति ( अभिप्राय ) मला समजत नाहीं. ३१.

त्या शूर अर्जुनानें याप्रमाणें बोलून, आपल्या मस्तकानें प्रभूच्या चरणास वंदन केलें आणि मग म्हणाला, हे जगत्प्रभो, आतां आपण ऐकावें तर. ४४५. माझें समाधान व्हावें म्हणून मी विश्वरूपाचें ध्यान विचारलें आणि इतक्यांत एकदम तूं सर्व त्रैलोक्यसंहारच करीत सुटलास ! ४४६. तेव्हां तूं आहेस तरी कोण ? व इतकीं हीं भयंकर तोंडें कशाकरितां तयार केलींस ? व या सर्वच हातांत शस्त्रें कशाकरितां धारण केलीं आहेस ? ४४७. जेव्हां तेव्हां रागीटपणानें अधिक वाढून आकाशालाही कमीपणा आणीत आहेस ! तूं डोळे भयंकर वटारून आम्हांला भीति काय म्हणून दाखवीत आहेस ? ४४८. देवा, येथें सर्वनाश करणाऱ्या काळाबरोबर स्पर्धा काय

देवा। कासया किजतसे हेवा। आपुला तुवां सांगावा। अभिप्राय मज ॥ ४९ ॥ या बोला म्हणे अनंतु। मी कोण हें आहासी पुसतु। आणि कायिसयालागीं असे वाढतु। उग्रतेसीं ॥४५०॥

श्रीभगवानुवाचः—कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः।
ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥

तरि मी काळु गा हें फुडें। लोक संहारावयालागीं वाढें। सैंघ पसरिलीं आथि तोंडें। आतां ग्रासीन हें आघवें ॥ ५१ ॥ तेथ अर्जुन म्हणे कटकटां। उबगिलों मागिल्या संकटा। म्हणोनि आळविला तंव वोखटा। उधाइला हा ॥ ५२ ॥ तेवींचि कठिण बोलें आसतुटी। अर्जुन होईल हिंपुटी। म्हणोनि सर्वेचि म्हणे किरीटी। परि आन एक असे ॥ ५३ ॥ तरि आतांचि ये संहारवाहरे। तुम्ही पांडव असा बाहिरे। तेथ जातजात धनुर्धरें। सांवरिले प्राण ॥ ५४ ॥ होता मरणमहामारीं गेला। तो मागुता सावधु जाहला। मग लागला बोला। चित्त देऊं ॥ ५५ ॥ ऐसें म्हाणिजत आहे देवें। अर्जुना तुम्ही माझे हें जाणावें। येर जाण मी आघवें। सरलों ग्रासूं ॥ ५६ ॥ वज्रानळीं प्रचंडीं। जैसी घापे लोणियाची उंडी। तैसें जग हें माझां तोंडीं। तुवां देखिले जें ॥ ५७ ॥ तरि तयामाझारीं कांहीं। भरंवसेनि उणें नाहीं। इयें वायांचि सैन्यें पाहीं। वल्गिजत आहती ॥ ५८ ॥ हे जे मिळोनियां मेळे। कुंथती वीरवृत्तीचेनि बळें। यमावरी गजदळें। वाखाणिजताती ॥ ५९ ॥ म्हणती सृष्टीवरी सृष्टी करूं। आण वाहूनि मृत्यूतें मारूं। जगाचा भरूं। घोंटु यया ॥ ४६० ॥ पृथ्वी सगळीचि गिळूं। आकाश वरिच्यावरि जाळूं। कांइ बाणवरी खिळूं। वारयातें ॥ ६१ ॥ ऐशा चतुरंगाचिया संपदा। करित महाकाळेंसीं स्पर्धा। वांटिवेचिया मदा। वळघले जे ॥ ६२ ॥ बोल हातियेराहूनि तिखट। दिसती अग्निपरिस दासट। मारकपणें काळकूट। महुर म्हणत ॥ ६३ ॥ तरि हे गंधर्वनगरींचे उमाळे। जाण पोकळीचे पेंडवळे। अगा चित्रींचीं फळें। वीर हे देखें ॥ ६४ ॥ हा मृगजळाचा पूर आला। दळ नव्हे कापडाचा साप केला। इया शृंगारूनियां खाला। मांडिलिया पैं ॥ ६५ ॥ येर चेष्टवितें जें बळ। तें मियां मागांचि ग्रासिलें सकळ। आतां कोलौरिचे वेताळ। तैसे निर्जीव हे आहाती ॥ ६६ ॥ हालविती दोरी तुटली। तरि तियें खांबावरील बाहुलीं। भलतेणें लोटिलीं। उलथोनि पडती ॥ ६७ ॥

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम्।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

तैसा सैन्याचा यया बगा। मोडतां वेळु न लगेल पैं गा। म्हणोनि उठीं उठीं वेगां। शाहाणा होईं ॥ ६८ ॥ तुवां गोग्रहणाचेनि अवसरें। घातलें मोहनास्त्र एकसरें। मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें। आसडूनि नागविलें ॥ ६९ ॥ आतां हें त्याहूनि निपटारें जाहलें। निवटीं

म्हणून केली जात आहे ? या करण्यांत तुझा अभिप्राय काय आहे; तो तूं मला सांगावास. ४४९. अर्जुनाच्या या भाषणावर श्रीकृष्ण म्हणाले, मी कोण आहें आणि एवढ्या उग्रतेनें कशाकरितां वाढत आहें, हेंच तूं विचारीत आहेस ना ? ४५०.

श्रीकृष्ण म्हणाले, लोकांचा संहार करणारा (व त्यासाठीं) वृद्धि पावलेला काळ मी आहें, येथें मी लोकांचा संहार करण्यासाठीं प्रवृत्त झालों आहें. तुझ्याखेरीज दोन्ही (पक्षांच्या प्रत्येक) सेना-समुदायामध्यें जे योद्धे (उभे) आहेत, ते सर्व नाहींसे होतील. ३२.

तर अरे, मी काळ आहें, हें पक्कें समज. मी जगाचा नाश करण्याकरितां मोठा होत आहें. माझीं तोंडें चहूं-कडे पसरलेलीं आहेत व मी (त्या तोंडांनीं) हें सर्व आतां गिळून टाकीन. ४५१. असें ऐकून अर्जुन म्हणाला, हाय, हाय! (हें सर्व सैन्यच्या सैन्यच या विश्वरूपाच्या उग्र तोंडांत जात आहे. अशा) या पहिल्या संकटानें मी त्रासलों, म्हणून श्रीकृष्णाची प्रार्थना केली, त्यावर तो हा श्रीकृष्ण परमात्मा अनिष्ट रूपानें प्रगट झाला. ४५२. त्यावर त्या कठीण बोलण्यानें अर्जुन निराश व कष्टी होईल; म्हणून लागलीच श्रीकृष्ण म्हणाले, हे अर्जुना, पण यांत दुसरी आणखी एक गोष्ट आहे. ४५३. तर आतांच्या या संहाररूपी संकटाबाहेर फक्त तुम्ही पांडव आहांत; असें भगवंत बोलले, त्या वेळीं अर्जुनानें जाण्याच्या बेतांत आलेले आपले प्राण सांवरून धरले. ४५४. अर्जुन मरणरूप महामारींत सांपडला होता; तो पुन्हां सावध होऊन श्रीकृष्णाच्या बोलण्याकडे लक्ष देऊं लागला. ४५५. अर्जुना, तुम्हीं पांडव तेवढे माझे असल्यामुळें तुमच्यावांचून बाकी इतर सर्वांचा ग्रास करण्याला मी तयार झालों आहें, असें तूं पक्कें समज; असें देव त्या वेळीं म्हणाले. ४५६. विजेच्या प्रचंड अग्नीमध्यें ज्याप्रमाणें लोण्याचा गोळा घालावा, त्याप्रमाणें हें जग तूं माझ्या तोंडामध्यें जें पाहिलेंस; ४५७. तर त्यामध्यें खात्रीपूर्वक कांहींच शिल्लक रहाणार नाहीं. हें पहा, या सैन्याकडून व्यर्थ बडबड केली जात आहे. ४५८. हे जे सैन्याचे समुदाय जमवून शौर्यवृत्तीच्या बळानें गुरगुरत आहेत व हत्तीचे थवे वगैरे आपलीं सैन्यें यमाच्या वरचढ आहेत, असें त्यांचें वर्णन करीत आहेत. ४५९. तीं म्हणतात (तीं सैन्यें अशी कल्पना करितात) कीं, आम्ही प्रतिसृष्टि करूं, शपथ वाहून (प्रतिज्ञेनें) मृत्यूला मारूं आणि या विश्वाचा घोट भरूं. ४६०. आम्ही ही सर्वच पृथ्वी गिळूं व हें आकाश तर वरच्यावरच पेटवून भस्म करूं; इतकेंच काय, एवढा चंचल वारा, पण त्यास देखील आम्ही आपल्या बाणानें जागचे जागीं जखडून टाकूं. ४६१. पराक्रमाच्या मदावर स्वार झालेले जे सैनिक आहेत, ते अशा या चतुरंगसैन्यरूप संपत्तीच्या साह्यानें महाकाळाबरोबर स्पर्धा करितात. ४६२. त्यांचे शब्द शस्त्रापेक्षां तीक्ष्ण व अग्नीपेक्षां दाहक आहेत, असे वाट-तात आणि या शब्दांच्या मारकपणाची काळकूट विषाशीं तुलना केली, तर काळकूट विषाला मधुर म्हणावें लागेल. ४६३. (अशी जरी ते गर्वानें कल्पना करीत आहेत) तरी हे वीर गंधर्वनगराचे लोट आहेत, किंवा पोकळीचे भेंडोळे आहेत; अथवा जशीं चित्राचीं रंगीत पोकळ फळें करितात, त्याप्रमाणें हे वीर आहेत असें समज. ४६४. हा सैन्यसमुदाय म्हणजे मृगजळाचा पूर आलेला आहे. हें सैन्य नव्हे, तर कापडाचा साप केलेला आहे, अथवा हे सजवून मांडलेले मोत आहेत. ४६५. (यांच्या बाह्य स्वरूपा) शिवाय ज्या सामर्थ्यानें ते हालचाल करितात, तें सर्व सामर्थ्य मी मागेंच नाहींसें केलें आहे. आतां हे (सर्व वीर) मातीच्या चित्रांतील बेताळासारखे निर्जीव आहेत. ४६६. खांबावरल्या बाहु-ल्यांना हालविणारी दोरी तुटली म्हणजे हवें त्यानें त्या बाहुल्यांस ढकललें असतां त्या उलथून पडतात. ४६७.

म्हणून तूं (युद्धाला) उभा रहा. यश संपादन कर. शत्रूंना जिंकून समृद्धियुक्त अशा राज्याचा उपभोग घे. हे (सर्व) मीं पूर्वीच मारून टाकलेले आहेत. हे सव्यसाचिन्, (तूं) केवळ निमित्तमात्र हो. ३३.

त्याप्रमाणें सैन्याचा हा आकार नाहींसा करण्याला कांहींच वेळ लागणार नाहीं; एवढ्याकरितां अर्जुना, शहाणा हो, आणि लवकर ऊठ पाहूं. ४६८. विराट-राजाच्या गाई हरण करण्यास जेव्हां हे (कौरव) मत्स्य देशांत आले होते, त्या वेळेस सरसकट सर्वांसच तूं मोह-नास्त्र घातलेंस, म्हणून मग विराटाच्या अतिशय भित्र्या अशा उत्तर नांवाच्या मुलानें सुद्धां जशीं सर्वांचीं वस्त्रें हिसकावून त्यांस नग्न केलें. ४६९. आतां हे त्याहीपेक्षां

आयितें रण पडिलें । घेई यश रिपु जिंतिले । एकलेनि अर्जुनें ॥ ४७० ॥ आणि कोरडें यशचि नोहे । समग्र राज्यही आलें आहे । तूं निमित्तमात्रचि होय । सव्यसाची ॥ ७१ ॥

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युद्ध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

द्रोणाचा पाडु न करीं । भीष्माचें भय न धरीं । कैसेनि कर्णावरी । परजूं हें न म्हण ॥ ७२ ॥ कोण उपायो जयद्रथा कीजे । हें न चिंतू चित्त तुझें । आणिकही आथि जे जे । नावाणिगे वीर ॥ ७३ ॥ तेही एक एक आघवे । चित्रींचे सिंहाडे मानावे । जैसे वोलेनि हातें घ्यावें । पुसोनियां ॥ ७४ ॥ यावरी पांडवा । काइसा झुंजाचा मेळावा । हा आभासु गा आघवा । येर ग्रासिलें मियां ॥ ७५ ॥ जेव्हां तुवां देखिले । हे माझां वदनीं पडिले । तेव्हांचि यांचें आयुष्य सरलें । आतां रितीं सोपें ॥ ७६ ॥ म्हणोनि वहिला उठीं । मियां मारिले तूं निवटीं । न रिघे शोकसंकटीं । नाथिलिया ॥ ७७ ॥ आपणचि आडाखिला कीजे । तो कौतुकें जैसा विंधोनि पाडिजे । तैसें देखें गा तुझें । निमित्त आहे ॥ ७८ ॥ बापा विरुद्ध जें जाहलें । तें उपजतांचि वाघें नेलें । आतां राज्येंशीं संचलें । यश तूं भोगीं ॥ ७९ ॥ सावियाचि उतत होते दायाद । आणि बळिये जगीं दुर्मद । ते वधिले विशद । सायासु न लागतां ॥ ४८० ॥ ऐसिया इया गोष्टी । विश्वाचां वाक्पटीं । लिहूनि घालीं किरीटी । जगामाजीं ॥ ८१ ॥

संजय उवाचः—एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।
नमस्कृत्वा भूय एवाऽऽह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥

ऐसी आघवीचि हे कथा । तया अपूर्णमनोरथा । संजयो सांगे कुरुनाथा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ८२ ॥ मग सत्यलोकौनि गंगाजळ । सुटलिया वाजत खळाळ । तैशी वाचा विशाळ । बोलतां तया ॥ ८३ ॥ नातरी महामेघांचे उमाळे । घडघडीत एके वेळे । घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धी जैसा ॥ ८४ ॥ तैसें गंभीरें महानादें । हें वाक्य विश्वकंदें । बोलिलें अगाधें । अनंतरूपें ॥ ८५ ॥ तें अर्जुनें मोटकें ऐकिलें । आणि सुख कीं भय दुणावलें । हें नेणों परि कांपिन्नलें । सर्वांग तयाचें ॥ ८६ ॥ सखोलपणें वळली मोट । आणि तैसेचि जोडले करसंपुट । वेळोवेळां ललाट । चरणीं ठेवी ॥ ८७ ॥ तेवींचि कांहीं बोलों जाये । तंव गळा बुजालाचि ठाये । हें सुख कीं भय होये । हें विचारा तुम्ही ॥ ८८ ॥ परि तेव्हां देवाचेनि बोलें । अर्जुना हें ऐसें जाहलें । मियां पदांवरि देखिलें । श्लोकीचया ॥ ८९ ॥ मग तैसाचि भेणभेण । पुढती जोहारूनि चरण । मग म्हणे जी आपण । ऐसें बोलिलेति ॥ ४९० ॥

तेजोहीन झालेले आहेत व आयता युद्धाचा प्रसंग आलेला आहे, तर त्यांस तूं मार व एकट्या अर्जुनानें शत्रू जिंकले असें यश मिळीव. ४७०. आणि यांत केवळ रिकामें यशच मिळणार आहे असें नाहीं, तर संपूर्ण राज्य देखील त्यांत आलेलें आहे. अर्जुना, तूं केवळ नांवाला मात्र कारण हो. ४७१.

द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण तसेच इतरहि युद्धांतले वीर मीं मारलेले आहेत, त्यांना तूं ठार कर. भिऊं नको. युद्ध कर. प्रतिपक्षीयांना तूं जिंकशील. ३४.

द्रोणाची पर्वा करूं नकोस. भीष्माचें भय धरूं नकोस व कर्णावर शस्त्र कसें चालवूं, असें म्हणूं नकोस, ४७२. जयद्रथाकरितां काय उपाय करावा, याविषयीं तुझ्या बुद्धीला विचार करण्याचें कारण नाहीं. आणखी वरीलप्रमाणें जे जे नांवाजलेले वीर आहेत; ४७३. ते देखील एक एक पाहिले तर, सर्वच भिंतीवर काढलेल्या सिंहाच्या चित्रासारखे ओल्या हातानें पुसून घेण्यास योग्य आहेत, असें समज. ४७४. अर्जुना, अशी वास्तविक स्थिति असतांना युद्धाचा समुदाय तो काय उरलेला आहे ? हा सर्व नुसता आभास (पोकळ देखावा) आहे. बाकी (बाहेरील देखाव्याशिवाय इतर बल, तेज वगैरे) सर्व मी नाहींसें केलें आहे. ४७५. ज्या वेळेला तूं हे सैनिक माझ्या तोंडांत पडलेले पाहिलेस, त्याच वेळेला या सर्वांचें आयुष्य संपलें (असें समज.) आतां हे पोकळ सोपटाप्रमाणें राहिलेले आहेत. ४७६. म्हणून लवकर ऊठ. मी यांस आंतून मारिलें आहे, व तूं यांस (बाहेरून) मार. आणि नसत्या (मिथ्या) शोकसंकटांत पडूं नकोस. ४७७. आपणच निशाण (तारकिट वगैरे) उभें करावें व आपणच त्यास कौतुकानें बाण मारून तें पाडावें. (यांत जसे बाण हे निमित्तमात्र आहेत, त्याप्रमाणें या सर्वांस मींच उत्पन्न केलें व मीच मारलें आहे.) त्या बाणाप्रमाणें यांत तूं केवळ निमित्त आहेस (असें समज.) ४७८. बाबा अर्जुना, तुझ्या हिताला विरुद्ध असें जें कांहीं एक उत्पन्न झालें होतें, तें उत्पन्न होतां क्षणींच वाचानें नेलें. (उत्पन्न झाल्याबरोबरच तें नाहींसें झालें.) आतां (वाटेंतील कांटा आयताच निघाल्यामुळें) तुला मिळालेल्या राज्यासह यश तूं भोग. ४७९. तुझे भाऊबंद स्वभावतःच गर्वानें फुगून गेले होते व जगामध्यें ते बलवान् आणि मदोन्मत्त झाले होते. त्यांस मुळींच आयास न लागतां तूं शाक नाहींसे केलेस. ४८०. अर्जुना, या जगामध्यें अशा या गोष्टी सर्व जगताच्या वाचारूपी पटावर लिहून ठेव. ४८१.

संजय म्हणाला, श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून (भयानें) कांपत असलेला व हात जोडलेला अर्जुन भयभीत होत्साता साष्टांग नमस्कार घालून पुन्हां श्रीकृष्णाला सगद्गदित वाणीनें म्हणाला, ३५.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, याप्रमाणें ही सर्व हकिकत त्या मनोरथ पूर्ण न झालेल्या कुरुदेशाच्या राजाला (धृतराष्ट्राला) संजय सांगत आहे. ४८२. मग ज्याप्रमाणें गंगेचें पाणी सत्यलोकापासून सुटलें असतां सारखें खळखळ वाजत चालतें, त्याप्रमाणें तो श्रीकृष्ण बोलत असतां गंभीर वाणीचा ओघ खळखळाटानें चालला होता. ४८३. अथवा मोठमोठ्या मेघांचे लोट एकाच वेळेला उठले असतां जसा गडगडाट व्हावा किंवा मंदर नांवाच्या पर्वतानें क्षीरसमुद्रामध्यें ज्याप्रमाणें मंथनाचा आवाज एकसारखा घुमावा, ४८४. त्याप्रमाणें अगाध व अनंतरूपधारी, विश्वाचें कारण असलेल्या श्रीकृष्णानें गंभीर अशा मोठ्या शब्दानें भाषण केलें. ४८५. तें अर्जुनानें थोडेंसें ऐकलें नाहीं, तोंच सुखाचा म्हणा कीं भीतीचा म्हणा, दुप्पट जोर झाला; कशाचा, हें आम्हांस माहीत नाहीं; परंतु एवढें खरें कीं, त्यामुळें त्याचें सर्व शरीर थरथरां कांपावयास लागलें. ४८६. त्यास झालेलें सुख अथवा भय थेट हृदयापर्यंत भाऊन भिडल्यामुळें तो आपल्या पायापर्यंत लवला आणि त्याच सपाट्यांत कसें तरी करून त्यानें हात जोडले आणि तो आपलें मस्तक पुनःपुनः प्रभूच्या पायांवर ठेवूं लागला. ४८७. वाचप्रमाणें कांहीं बोलण्याचा प्रयत्न करावा, तों त्याचा कंठ भरून राही; हें सुख झाल्याचें लक्षण आहे, कीं भीतीचें आहे याचा तुम्हीं आपल्या मनांतच विचार करून निर्णय करावा; (असें ज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांस सांगतात.) ४८८. परंतु त्या वेळेला देवांनीं केलेलें भाषण ऐकून अर्जुनाची अशी ही स्थिति झाली, हें मी श्लोकाच्या वरील (भीतभीतः प्रणम्य,) या पदावरून जाणलें. ४८९. मग तसाच भीत भीत पुन्हां श्रीकृष्णाच्या चरणाला नमस्कार करून म्हणाला महाराज, आपण असें बोलतांत, ४९०.

अर्जुन उवाचः—स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।

रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥

ना अर्जुना मी काळु । आणि ग्रासिजे तो माझा खेळु। हा बोलु कीर अढळु । मानूं आम्ही ॥ ९१ ॥ परि तुवां जी काळें । आजि स्थितीचिये वेळे । ग्रासिजे हें न मिळे । विचारासी ॥ ९२ ॥ कैसेनि आंगींचें तारुण्य मोडावें । कैचें नव्हे तें वार्धक्य काढावें । म्हणोनि करूं म्हणसी तें नव्हे । बहुतकरुनी ॥ ९३ ॥ हां जी चौपाहारी न भरतां । कोणेही वेळे श्रीअनंता । काय माध्यान्हीं सविता । मावळतु आहे ॥ ९४ ॥ पैं तुज अखंडिता काळा । तिन्ही आहाती जी वेळा । त्या तिन्ही परी सबळा । आपुलालां समयीं ॥ ९५ ॥ जे वेळीं हो लागे उत्पत्ती । ते वेळीं स्थिति प्रळयो हारपती । आणि स्थितिकाळीं न मिरविती । उत्पत्ति प्रळयो ॥ ९६ ॥ पाठीं प्रळयाचिये वेळे । उत्पत्ति स्थिति मावळे । हें कायसेनही न ढळे । अनादि ऐसें ॥ ९७ ॥ म्हणोनि आजि तरी भरें भोगें । स्थिती वर्तिजत आहे जगें । एथ ग्रासिसी तूं हें नलगे । माझां जीवीं ॥ ९८ ॥ तंव संकेतें देव बोले । अगा या दोन्ही सैन्यांसीचि भरण पुरलें । तें प्रत्यक्ष तुज दाविलें । येर यथाकाळें जाण ॥ ९९ ॥ हा संकेतु जंव अनंता । वेळु लागला बोलतां । तंव अर्जुनें लोकु मागुता । देखिला यथास्थिति ॥ ५०० ॥ मग म्हणतसे देवा । तूं सूत्रीं विश्वलाघवा । जग आला मा आघवा । पूर्वस्थिती पुढती ॥ १ ॥ परि पडिलिया दुःखसागरीं । तूं काढिसी कां जयापरी । ते कीर्ति तुझी हरी । आठवित असें ॥ २ ॥ कीर्ति आठवितां वेळोवेळां । भोगीतसें महासुखाचा सोहळा । तेथ हर्षामृतकल्लोळा । वरि लोळत आहों ॥ ३ ॥ देवा जियालेपणें जग । धरी तुझां ठायीं अनुराग । आणि दुष्टां तयां भंग । अधिकाधिक ॥ ४ ॥ पैं त्रिभुवनींचिया राक्षसां । महाभय तूं हृषीकेशा । म्हणोनि पळताती दिशां । पैलीकडे ॥ ५ ॥ येर सुर सिद्ध किन्नर । किंबहुना चराचर । ते तुज देखोनि हर्षनिर्भर । नमस्कारित असती ॥ ६ ॥

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।

अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥

एथ गा कवणा कारणा । राक्षस हे नारायणा । न लगतीचि चरणा । पळते जाहले ॥ ७ ॥ आणि हें तूतें काइ पुसावें । येतुलालें आम्हांसिही जाणवे । तरी सूर्योदयीं राहावें । कैसेनि तमें ॥ ८ ॥ तूं स्वप्रकाशाचा आगरु । आणि जाला आहासि गोचरु । म्हणोनिया निशाचरां केरु । फिटला सहजें ॥ ९ ॥ हें येतुले दिवस आम्हां । कांहीं नेणवेचि श्रीरामा । आतां देखतसों महिमा । गंभीर तुझा ॥ ५१० ॥ जेथूनि नाना सृष्टीचिया वोळी । पसरती भूतग्रामाचिया वेली । तया महद्ब्रह्मातें व्याली । दैविकी इच्छा ॥ ११ ॥ देवो निःसीमतत्त्व सदोदितु । देवो निःसीमगुण अनंतु । देवो निःसीमसाम्य सततु । नरेंद्र देवांचा ॥ १२ ॥

हे हृषीकेशा तुझ्या महात्म्यानें जग हर्ष व प्रेम पावतें हें योग्यच आहे. भयभीत राक्षस दशदिशा पळत आहेत. सर्व सिद्धांचे समुदाय तुला वंदन करीत आहेत. ३६.

कीं, अर्जुना, मी सर्वभक्षक काळ आहें आणि सर्वांचा नाश करणें, ही तर माझी लीलाच आहे. हें जें तुझें बोलणें, तें आम्हीं खरोखर खरें मानूं. ४९१. परंतु हे परमेश्वरा, आपण जे काळ, त्यांनीं आज (स्थितिकालीं) पालन करण्याच्या वेळेसच जगाचा संहार करावा, हें माझ्या विचाराशीं जुळत नाहीं. ४९२. शरीरांत असलेलें तारुण्य कसें नाहींसें करावें व नसलेलें म्हातारपण कोठून आणावें, (या गोष्टी जर करूं म्हटलें, तर जशा व्हावयाच्या नाहींत, त्याप्रमाणें) जरी तूं या स्थितिकालीं संहार करूं म्हणतोस, तरी तें बहुतकरून होणार नाहीं. ४९३. अहो देवा, चार प्रहर दिवस भरला नसतांच कोणत्या तरी वेळीं सूर्य माध्यान्हीं (दोन प्रहरीं) मावळला आहे काय ? ४९४. देवा, अखंडित असे जे आपण काळ, त्या आपल्यास तिन्हीही वेळा (उत्पत्ति-स्थिति व लय) आहेत. परंतु त्या तिन्ही वेळा, आपापल्या समयास पूर्ण सामर्थ्यवान् आहेत. ४९५. ज्या वेळेस उत्पत्ति व्हावयास लागते, त्या वेळीं स्थिति व प्रलय या दोन्ही अवस्था नाहींशा होतात; आणि स्थितीच्या वेळेस, उत्पत्ति व प्रळय या दोन्हीही दिसत नाहींत. ४९६. उत्पत्ति, स्थितीचे मागून येणाऱ्या प्रळयाच्या वेळेला, उत्पत्ति व स्थिति या दोहोंचा लोप होतो. ही व्यवस्था कशानेंही बदलत नाहीं, असा हा क्रम अनादि कालापासूनचा आहे. ४९७. म्हणून आज तर स्थितिकालीं जग हें भोगाच्या भरांत वागत आहे. म्हणून या स्थितिकालीं, तूं (कालरूप श्रीकृष्ण) त्याचा (जगाचा) संहार करशील, हें माझ्या मनाला पटत नाहीं. ४९८. तेव्हां खुणेनें देव म्हणाले, अरे, अर्जुना, फक्त या दोन्ही सैन्याचेंच आयुष्य संपलें आहे, तें मी तुला प्रत्यक्ष दाखविलें. यांच्याशिवाय इतर सर्व लोक आपापल्या योग्य कालीं मरण पावतील. ४९९. हा इशारा देण्यास देवाला जितका वेळ लागला, तितक्या वेळांत अर्जुनानें पुनः पूर्वीप्रमाणें सर्व लोक सुखरूप असलेले पाहिले. ५०० मग अर्जुन म्हणावयास लागला, देवा, या विश्वरूपी सोंगांचा तूं सूत्रधार आहेस. हें सर्व जग पुनः पूर्वस्थितीला आलें ना ? ५०१. परंतु (या तुझ्या खेळांत) दुःखसागरांत पडलेल्या जीवांना तूं ज्या प्रकारानें बाहेर काढतोस, ती तुझी कीर्ति, हे हरि, मी आठवीत आहें. ५०२. वारंवार आपली कीर्ति आठवीत असतांना आम्ही ब्रह्मसुखाचा सोहोळा भोगतों, व त्या भोगांत हर्षरूप अमृताच्या लाटांवर आम्ही लोळत आहोंत. ५०३. अहो देवा, जग हें जगल्यामुळें तुझ्या ठिकाणीं प्रीति धरीत आहे आणि त्या दुष्टांना तुझ्यापासून अधिकाधिक नाश आहे. ५०४. परंतु हे देवा, त्रिभुवनांतील राक्षसांना तूं महाभय (साक्षात् मृत्यूच) आहेस; म्हणून ते भयानें (दहा) दिशांच्या पलीकडे पळून जातात. ५०५. बाकीचे सुर, सिद्ध, किन्नर, फार काय सांगावें, हें स्थावरजंगमात्मक जें जग आहे, तें सर्व तुला आनंदभरित होऊन नमस्कार करीत आहे. ५०६.

हे महात्मन्, अत्यंत महान्, महद्ब्रह्माचा देखील आदिकर्ता जो तूं, त्या तुला ते (राक्षस इत्यादि) कां नमस्कार करीत नाहींत ? हे अनन्ता देवाधिदेवा, जगन्निवासा, तूं अक्षर व सत् व असत् म्हणून जें आहे तें तूं आहेस व त्याच्या अतीत जें आहे, तेंही तूं आहेस. ३७.

हे श्रीकृष्णा, येथें हे राक्षस कोणत्या कारणामुळें तुमच्या चरणाला शरण न येतां दूर पळून गेले आहेत ? ५०७. आणि हें तुम्हाला तरी काय पुसावयाचें आहे ? एवढें तर आमच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. (तर हें पहा,) सूर्य उगवला असतां अंधार कसा टिकाव धरणार ? ५०८. तूं आत्मप्रकाशाची खाण आहेस आणि (आमच्यापुढें) प्रत्यक्ष प्रगट झाला आहेस. म्हणून सहजच राक्षसांची दुर्दशा उडाली आहे. ५०९. इतके दिवस, हे श्रीरामा, हें आमच्या कांहींच समजण्यांत आलें नाहीं. हें तुझें अगाध सामर्थ्य आतांच आमच्या नजरेस येत आहे. ५१०. ज्या (महद्ब्रह्म) पासून अनेक सृष्टींच्या पंक्ति व प्राणिमात्रांच्या समुदायरूप वेली उत्पन्न होत असतात, त्या महद्ब्रह्माला, प्रभु, आपली इच्छा प्रसवली आहे. ५११. देवा, आपण अंतरहित असून आपल्या गुणांची गणति नाहीं; आपण अमर्याद तत्त्वरूप असून आपलें अस्तित्व त्रिकालाबाधित आहे. आपण अखंड निष्प्रतिबंधपणानें सर्वत्र व्याप्त आहांत व आपण देवांचे राजे आहांत. ५१२. हे नित्यकल्याणरूप देवा,

जी तूं त्रिजगतिये वोलावा । अक्षर तूं सदाशिवा । तूंचि संतासंत देवा । तयाही अतीत तें तूं ॥ १३ ॥

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८ ॥

प्रकृतिपुरुषांचां आदी । जी महत्तत्त्वां तूंचि अवधी । स्वयें तूं अनादी । पुरातनु ॥ १४ ॥ सकळ विश्वजीवन । जीवांसि तूंचि निधान । भूतभविष्याचें ज्ञान । तुझांचि हातीं ॥ १५ ॥ जी श्रुतीचिया लोचना । स्वरूपसुख तूं अभिन्ना । त्रिभुवनाचिया आयतना । आयतन तूं ॥ १६ ॥ म्हणोनि जी परम । तूंतें म्हणिजे महाधाम । कल्पांतीं महद्ब्रह्म । तुझां अंकीं रिगे ॥ १७ ॥ किंबहुना देवें । विश्व विस्तारिलें आहे आघवें । अनंतरूपा वानावें । कवणें तूंतें ॥ १८ ॥

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥
नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

जी काय एक तूं नव्हसी । तूं कवणे ठायीं गा नससी । हें असो जैसा आहासी । तैसिया नमों ॥ १९ ॥ वायु तूं अनंता । यम तूं नियामिता । प्राणिगणीं वसता । अग्नि जी तूं ॥ ५२० ॥ वरुण तूं सोम । स्रष्टा तूं ब्रह्म । पितामहाचाही परम । आदिजनक तूं ॥ २१ ॥ आणीकही जें जें कांहीं । रूप आथि अथवा नाहीं । तया नमो तुज तैसयाही । जगन्नाथा ॥ २२ ॥ ऐसें सानुरागें चित्तें । स्तवन केलें पांडुसुतें । मग पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥२३॥ पाठीं तिये सावंते । न्याहाळी श्रीमूर्तीतें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २४ ॥ पाहतां पाहतां प्रांतें । समाधान पावे चित्तें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २५ ॥ इये चराचरीं समस्तें । अखंडिता देखे तयांतें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ॥ २६ ॥ ऐसीं रूपें तियें अद्भुतें । आश्चर्यें स्फुरती अनंतें । तंव तंव नमस्ते । नमस्तेचि म्हणे ॥ २७ ॥ आणिक स्तुति नाठवे । आणि निवांताही नसवे । नेणों कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे ॥ २८ ॥ किंबहुना इयापरी । नमन केलें सहस्रवरी । कीं पुढती म्हणे श्रीहरी । तुज सन्मुखा नमो ॥ २९ ॥ देवासि पाठी पोट आथि कीं नाहीं । येणें उपयोगु आम्हां काई । तरि तुज पाठिमोरेयाही । नमो स्वामी ॥ ५३० ॥ उभा माझिये पाठीसीं । म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी । सन्मुख विमुख जगेंसीं । न घडे तुज ॥ ३१ ॥ आतां वेगळालिया अवेवां । नेणें रूप करूं देवा । म्हणोनि नमो तुज सर्वा । सर्वात्मका ॥ ३२ ॥ जी अनंतबळसंभ्रमा । तुज नमो अमितविक्रमा । सकळकाळीं समा । सर्वदेवा ॥ ३३ ॥ आघवां अवकाशीं जैसें । अवकाशचि होऊनि आकाश असे । तूं सर्वपणें तैसें । पातलासि सर्व ॥ ३४ ॥ किंबहुना केवळ । सर्व हें तूंचि निखिळ । परि क्षीरार्णवीं कल्लोळ ।

महाराजा, तूं त्रैलोक्याला आश्रय आहेस. तूं अविनाशी आहेस. देवा, सत् व असत् तूंच आहेस व त्या पलीकडील जें तेंहीं तूंच आहेस. ५१३

तूं आदिदेव, पुराणपुरुष आहेस. तूं या विश्वाचें अखेरीचें निवासस्थान आहेस ( म्हणजे प्रलयकालीं विश्व तुझ्यामध्यें लीन होईल ). तूं सर्व जाणतोस, जाणण्याला ( अत्यंत ) योग्य तूं आहेस, अत्यंत श्रेष्ठ असें आश्रयस्थान तूंच आहेस. हे अनन्तरूपा, तूं ( हें ) विश्व विस्तारलें आहेस. ३८.

देवा, ( तूं ) प्रकृति व पुरुषाचें मूळ आहेस. महत्तत्त्वांचा शेवटही तूंच आहेस; तूं जन्मरहित आहेस व तूं सगळ्यांच्या पूर्वीचा आहेस. ५१४. ( देवा, ) तूं सर्व जगाचें जीवन आहेस आणि जीवांचा शेवटही तुझ्यांतच होतो व भूतभविष्याचें ज्ञान तुझ्याच हातीं आहे. ५१५. हे जीवांशीं अभिन्नतेनें असणाऱ्या देवा, श्रुतींच्या नेत्रांस ( ज्ञानास ) गोचर होणारें असें जें स्वरूपसुख, तें तूं आहेस आणि त्रैलोक्याला आधारभूत जी माया, त्या मायेला आधार तूंच आहेस. ५१६. म्हणून देवा, तुला श्रेष्ठ असें आश्रयस्थान म्हणतात; आणि प्रळयकाळच्या शेवटीं माया ही तुझ्या स्वरूपीं लीन होते. ५१७. फार काय सांगावें ! देवा, तुझ्याकडून सर्व विश्व विस्तारलें गेलें आहे. ज्या तुला अनंत रूपें आहेत, त्या तुझें वर्णन कोणी करावें ? ५१८.

वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, ब्रह्मदेव आणि ब्रह्मदेवाचाहि पिता तूं आहेस. तुला नमस्कार असो, सहस्रावधि नमस्कार असोत. पुनः पुनः तुला नमस्कार असो. ३९. हे सर्वत्र असणाऱ्या प्रभो, पुढून मागून, सर्व बाजूंनीं तुला नमस्कार असो. सामर्थ्याला अन्त नसलेला व पराक्रमाला इयत्ता नसलेला तूं आहेस. तूं सर्व व्यापतोस, तस्मात् सर्व तूंच आहेस. ४०

देवा, काय काय एक तूं नाहींस ? अरे, तूं कोणत्या ठिकाणीं नाहींस ? हें वर्णन करणें पुरे. तूं जसा असशील तसा त्या तुला नमस्कार असो. ५१९. हे अनंता, तूं वायु आहेस व जगाचें शासन करणारा यम तूं आहेस. सर्व प्राण्यांच्या समुदायांत असणारा जो अग्नि ( जठराग्नि ) तो तूं आहेस. ५२०. देवा, तूं वरुण, चंद्र व जगत उत्पन्न करणारा ब्रह्मदेव आहेस व त्या ब्रह्मदेवाचा श्रेष्ठ असा आदिजनक तूं आहेस. ५२१. आणि हे जगन्नाथा, आणखी जें जें म्हणून कांहीं ज्याला रूप आहे अथवा नाहीं, तें सर्व तूंच आहेस. म्हणून तशा त्या तुला मी नमस्कार करतों. ५२२. अशा प्रीतियुक्त अंतःकरणानें अर्जुनानें भगवंताची स्तुति केली; मग पुन्हां प्रभो, तुला नमस्कार असो, हें असें दोन वेळां म्हणाला. ५२३. पुनः त्या श्रीमूर्तीला साद्यंत पाहिली आणि पुनः प्रभो, आपणांस नमस्कार असो, असें दोन वेळां म्हणाला. ५२४. त्या मूर्तीचे ( एकेक ) अवयवाचे भाग पाहतां पाहतांना अंतःकरणास समाधान वाटलें आणि पुन्हा प्रभो, तुला नमस्कार असो असें दोन वेळां म्हणाला. ५२५. या सर्व स्थावरजंगमात्मक जगामध्यें अखंडित जो प्रभु त्याला पाहिलें आणि पुनः प्रभो, तुला नमस्कार असो, असें दोन वेळां म्हणाला. ५२६. अशीं तीं अनंत व अद्भुत रूपें जों जों आश्चर्यकारक रीतीनें अर्जुनाच्या पुढें प्रगट होत होतीं, तों तों अर्जुन प्रभो, तुला नमस्कार असो, नमस्कार असो, असें म्हणत होता. ५२७. ' नमस्ते, नमस्ते ' वाचून दुसरी स्तुति त्याला आठवेना, आणि निवान्तपणानें रहावें हेंहि सहन होईना, कशा प्रेमभावानें तो ( अर्जुन ) ' नमस्ते, नमस्ते ' अशीच गर्जना करीत होता, तें कळत नाहीं ! ५२८. फार काय सांगावें ! याप्रमाणें अर्जुनानें हजारों नमस्कार केले व पुनः म्हणाला कीं, हे माझ्यासमोर असणाऱ्या हरि, तुला नमस्कार असो. ५२९. देवाला पाठ व पोट आहे का नाहीं, याचा विचार करून आम्हांला काय प्रयोजन आहे ? परंतु महाराज, पाठमोरा जो तूं, त्या तुला नमस्कार असो. ५३०. माझे पाठीमागें तूं, उभा आहेस म्हणून मी आपल्यास पाठमोरें असें म्हणतों. परंतु हे परमेश्वरा, जगाशीं समोर अथवा पाठीमोरें होणें, हें तुझ्या ठिकाणीं संभवत नाहीं ( कारण जगद्रूप तूंच आहेस. ) ५३१. आतां वेगवेगळ्या अवयवांचें वर्णन करण्याचें देवा, मला कळत नाहीं. याकरितां सर्व चराचर बनून सर्वांच्या आंत आत्मरूपानें तूंच आहेस, त्या तुला नमस्कार असो. ५३२. देवा, अनंत बलाच्या आवेशाचें तूं ठिकाण आहेस व तुझ्या पराक्रमाला मोजतां येत नाहीं; तूं तिन्ही काळीं सारखा ( एकरूप ) असतोस; आणि सर्व देवांच्या रूपानें तूंच आहेस, त्या तुला नमस्कार असो. ५३३. ज्याप्रमाणें सर्व पोकळींत आकाश हें पोकळी होऊन असतें, त्याप्रमाणें तूं सर्वांना व्यापून सर्व झाला आहेस. ५३४. फार काय सांगावें ! हें सर्व त्रिभुवन केवळ तूंच आहेस; परंतु क्षीरसमुद्रावर जशा क्षीराच्या लाटा असतात, ( त्याप्रमाणें त्रिभुवन हें तुझ्या

पयाचे जैसे ॥ ३५ ॥ म्हणोनियां देवा। तूं वेगळा नव्हसी सर्वां। हें आलें मज सद्भावा। आतां तूंचि सर्व ॥ ३६ ॥

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥ ४१ ॥

परि ऐसिया तूतें स्वामी। कहींच नेणों जी आम्ही। म्हणोनि सोयरे संबंधधर्मी। राहाटलों तुजसीं ॥ ३७ ॥ अहा थोर वाउर जाहलें। अमृतें संमार्जन म्यां केलें। वारिकें घेऊनि दिधलें। कामधेनूतें ॥ ३८ ॥ परिसाचा खडवाचि जोडला। कीं फोडोनि गाडोरा आम्ही घातला। कल्पतरु तोडोनि केला। कुंपु शेता ॥ ३९ ॥ चिंतामणीची खाणी लागली। तेणेंवरी वोढाळें वोल्हांटिलीं। तैसी तुझी जवळिक धाडिली। सांगातीपणें॥५४०॥ हें आजिचेंचि पाहें पां रोकडें। कवण झुंज हें केवढें। परि परब्रह्म तूं उघडें। सारथी केलासी ॥ ४१ ॥ ययां कौरवांचिया घरा। शिष्टाई धाडिलासि दातारा। ऐसा वणिजेसाठीं जागेश्वरा। विकलासि आम्हीं ॥ ४२ ॥ तूं योगियांचें समाधिसुख। कैसा जाणोचिना मी मूर्ख। उपरोधु जी सन्मुख। तुजसीं करूं ॥ ४३ ॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु।
एकोऽथवाऽप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

तूं या विश्वाची अनादि आदी। बैससी जिये सभासदीं। तेथें सोयरीकीचिया शब्दीं। रळीं बोलों ॥ ४४ ॥ विपायें राउळा येवों। तरि तुझेनि अंगें मानु पावों। मानसी तरी जावों। रुसोनि सलगी ॥ ४५ ॥ पायां लागोनि बुझावणी। तुझां ठायीं शार्ङ्गपाणी। पाहिजे ऐशी करणी। बहु केली आम्हीं ॥४६॥ सजनपणाचिया वाटा। तुजपुढें बैसें उफराटा। हा पाडु काय वैकुंठा। परि चुकलों जी ॥ ४७ ॥ देवेंसि कोलकाठी धरूं। अखाडा झोंबीलोंबी करूं। सारी खेळतां अस्करूं। निकरेंही भांडों ॥ ४८ ॥ चांग तें उराउरीं मागों। देवासि कीं बुद्धि सांगों। तेवींचि म्हणों काय लागों। तुझें आम्ही ॥ ४९ ॥ ऐसा अपराधु हा आहे। जो त्रिभुवनीं न समाये। जी नेणोंचि कां पाये। शिवतिले तुझे ॥ ५५० ॥ देवो बोनयाचां अवसरीं। लोभें कीर आठवण करी। परि माझा निसुग गर्व अवधारीं। जे फुगूनाचि बैसें ॥ ५१ ॥ देवाचिया भोगायतनीं। खेळतां आशंकेना मनीं। जी रिगोनियां शयनीं। सरिसा पहुडे ॥ ५२ ॥ 'कृष्णा' म्हणोनि हाकारिजे। यादवपणें तूतें लेखिजे। आपली आण घालिजे। जातां तुज ॥ ५३ ॥ मज एकासनीं बैसणें। कां तुझा बोलु न मानणें। हें वोळखीचेनि दाटपणें। बहुत घडलें ॥ ५४ ॥ म्हणोनि काय काय आतां। निवेदिजेल अनंता। मी राशि आहें समस्तां। अपराधांची ॥ ५५ ॥ यालागीं पुढां अथवा पाठीं। जियें राहटलों बहुवें वोखटीं तियें। मायेचिया

ठिकाणीं आहे. ) ५३५. म्हणून देवा, तूं या सर्व जगाहून वेगळा नाहींस, हें माझ्या खरोखर अनुभवाला आलें. तर आतां देवा, सर्व तूंच आहेस. ५३६.

तुझा हा महिमा न जाणणाऱ्या मी प्रमादामुळें अथवा प्रेमामुळें मित्र समजून तुच्छतापूर्वक अरे कृष्णा, अरे यादवा, अरे सख्या, इत्यादि जें तुला बोल्लों; ४१.

परंतु एवढा मोठा तूं असूनही हे प्रभो, आम्हीं तुला केव्हांच जाणलें नाहीं, आणि त्यामुळें आम्हीं तुझ्याशीं असलेलें आप्तसंबंधाचेंच नातें लक्षांत घेऊन, त्या दृष्टीनें तुझ्याशीं वागणूक ठेविली. ५३७. अरे, अरे! ही फारच अनुचित गोष्ट झाली, कीं, मी सडयाचे कामीं अमृताचा उपयोग केला! आणि ल्हानसें शिंगरूं घेऊन त्याचे मोबदल्यांत कामधेनूच देऊन टाकली. ५३८. तूं म्हणजे आम्हांला प्रत्यक्ष परिसाचा खडकच लाभला होतास. पण तो फोडून आम्हीं त्याचा उपयोग ( भिंतीचा ) पाया भरण्याच्या कामीं केला; अथवा आम्हीं कल्पवृक्ष तोडून त्याचें, शेत राखण्याकरितां कुंपण केलें! ५३९. मला तूं ( म्हणजे ) चिंतामणि नामक रत्नांच्या खाणीचा लाभ झालास, परंतु त्या रत्नाचा उपयोग ओढाळ गुरांना हांकण्याकडे केला. याच तऱ्हेनें तुझी प्राप्ति झाली असतांही, ती प्राप्ति, तूं स्नेही म्हणून व्यर्थ घालविली. ५४०. ( मागच्या सर्व गोष्टी असूं दे. ) आजचीच प्रत्यक्ष गोष्ट पहा कीं, हें युद्ध कसलें व काय किंमतीचें आहे! पण तूं मूर्तिमंत परब्रह्म असतांही तुला या युद्धांत मी सारथि केलें आहे! ५४१. हे दातारा, तडजोड करण्याकरितां कौरवांच्या घरीं आम्हीं तुला पाठविलें. अशा प्रकारें देवा, तूं प्रत्यक्ष जागृत दैवत असून देखील, तुला आम्हीं तडजोडीसारख्या सामान्य व्यवहाराकरितां खर्ची घातलें. ५४२. तूं योग्यांचें समाधिसुख आहेस; मी कसा मूर्ख कीं, हें मी जाणलें नाहीं व तुझ्या तोंडावर तुला वर्मी लागेल, असें भाषण मी बोलत होतों. ५४३.

आणि क्रीडा, शयन, आसन, ( मंडळीमध्यें बसणें ), भोजन इत्यादि प्रसंगीं तूं एकटा असतांना किंवा ( लोकांच्या ) देखत तुझा उपहास करण्याकरितां जो तुझा अपमान केला त्याबद्दल, हे अप्रमेया ( ज्याच्या प्रभावाचें अथवा स्वरूपाचें प्रमाण करतां येत नाहीं ) अच्युता, मला क्षमा कर. ४२.

या विश्वाचें अनादि मूळ जो तूं, तो तूं ज्या सभासदांमध्यें बसत होतास तेथें जे शब्द नातलगाशीं बोलत असतांना शोभतील, त्या शब्दांनीं आम्ही तुझ्याशीं विनोद करीत होतों. ५४४. आम्हीं केव्हां तरी तुझ्या घरीं येत होतों, तेव्हां तूं स्वतःच ( आमचें आदरातिथ्य करून ) आम्हांस मान देत होतास व जरी तूं आम्हांस मान देत होतास, तरी ( मुद्दां ) तुझ्याशीं अतिपरिचय असल्यामुळें, आम्ही उलट तुझ्यावरच रुसून जात होतों. ५४५. देवा, तूं पायां पडून आमची समजूत केली पाहिजे ( असा आम्ही हट्ट करीत होतों ) व या हट्टाप्रमाणें आम्हीं तुझ्याशीं अनेक गोष्टी केल्या. ५४६. मी तुझा प्यारा मित्र या नात्यानें तुझ्यापुढें पाठ करून बसत होतों. श्रीकृष्णा, ही काय आमची योग्यता होती! पण महाराज आम्ही चुकलों. ५४७. देवाशीं दांडपट्टा खेळत होतों, आखाड्यांत देवांशीं कुस्ती करीत होतों व सोंगट्या खेळतांना देवाला धिक्कारून बोलत होतों व हातघाईवर येऊन देवाशीं भांडत होतों. ५४८. जी चांगली वस्तु असेल, ती झटपट मागत होतों. तूं देव सर्वज्ञ, पण तुला देखील शहाणपणाच्या गोष्टी सांगत होतों; त्याचप्रमाणें 'आम्हीं तुझें काय लागतों' असें म्हणत होतों. ५४९. हा अपराध असा आहे कीं, जो त्रिभुवनांतही मावणार नाहीं; परंतु देवा, मी तुझ्या पायावर हात ठेवून ( शपथ वाहून ) सांगतों कीं, हे अपराध आमच्या हातून न कळून ( अज्ञानामुळें ) झाले. ५५०. जेवणाच्या वेळीं देव माझी खरोखर प्रेमानें आठवण करीत असे, पण माझा निर्लज्ज गर्व पहा कीं, मी फुगूनच बसत होतों. ५५१. देवाच्या अंतःपुरांत खेळतांना मनांत शंका धरीत नव्हतों; इतकेंच काय पण देवा, तुझ्या बिछान्यावर जाऊन तुझ्या शेजारीं निजत होतों. ५५२. 'कृष्णा' म्हणून तुला हांक मारीत होतों. तूं एक यादव आहेस, असें तुला समजत होतों व तूं जाण्यास निघाला असतांना तुला आम्ही आपली शपथ घालीत होतों. ५५३. मी तुझ्याबरोबर तुझ्याच आसनावर बसत होतों अथवा तूं सांगितलेली गोष्ट मानीत नव्हतों, अशा गोष्टी अतिपरिचयामुळें पुष्कळ घडल्या. ५५४. म्हणून श्रीकृष्णा, आतां काय एक म्हणून सांगावें! मी सर्व अपराधांची रास आहें. ५५५. म्हणून प्रभो, हे तुझ्या समक्ष अथवा

परी पोटीं । सामावीं प्रभो ॥ ५६ ॥ जी कोण्ही एके वेळे । सरिता घेऊनि येती खडुळें । तियें सामाविजेति सिंधुजळें । आन उपायो नाहीं ॥ ५७ ॥ तैसीं प्रीती कां प्रमादें । देवेंसीं मज विरुद्धें । बोलविलीं तियें मुकुंदें । उपसाहावीं जी ॥ ५८ ॥ आणि देवाचेनि क्षमत्वें क्षमा । आधारु जाली आहे या भूतग्रामा । म्हणोनि पुरुषोत्तमा । विनवूं तें थोडें ॥ ५९ ॥ तरि आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया । क्षमा कीजो जी यया । अपराधांसी ॥ ५६० ॥

पिताऽसि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥

जी जाणितलें मियां साचें । महिमान आतां देवाचें । देवो होय चराचराचें । जन्मस्थान ॥ ६१ ॥ हरिहरादि समस्तां । देवा तूं परम देवता । वेदांतेंही पढविता । आदिगुरु तूं ॥ ६२ ॥ गंभीर तूं श्रीरामा । नानाभूतैकसमा । सकळगुणीं अप्रतिमा । अद्वितीया ॥ ६३ ॥ तुजसी नाहीं सरिसें । हें प्रतिपादनचि कायसें । तुवां जालेनि आकाशें । सामाविलें जग ॥ ६४ ॥ तया तुझेनि पाडें दुजें । ऐसें बोलतांचि लाजिजे । तेथ अधिकाचि कीजे । गोठी केवीं ॥ ६५ ॥ म्हणोनि त्रिभुवनीं तूं एकु । तुजसरिसा ना अधिकु । तुझा महिमा अलौकिकु । नेणिजे वानूं ॥ ६६ ॥

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

ऐसें अर्जुनें म्हाणितलें । मग पुढती दंडवत घातलें । तेथें सात्त्विकाचें आलें । भरतें तया ॥६७॥ मग म्हणतसे प्रसीद प्रसीद । वाचा होतसे सद्गद । काढी जी अपराध- । समुद्रौनि मातें ॥ ६८ ॥ तुज विश्वसुहृदातें कहीं । सोयरेपणें न मनूंचि पाहीं । तुज ईश्वरेश्वराचां ठायीं । ऐश्वर्य केलें ॥ ६९ ॥ तूं वर्णनीय परी लोभें । मातें वर्णिसी पां सभे । तरि मियां वल्गिजे क्षोभें । अधिकाधिक ॥ ५७० ॥ आतां ऐसऐसेया अपराधां । मर्यादा नाहीं मुकुंदा । म्हणोनि रक्ष रक्ष प्रमादा । पसावो म्हणुनी ॥ ७१ ॥ जी हेंचि विनवावयालागीं । कैंची योग्यता माझां आंगीं । परि अपत्य जैसें सलगी । बापेंसिं बोले ॥ ७२ ॥ पुत्राचे अपराध । जरी जाहले अगाध । तरी पिता साहे निर्द्वंद । तैसें साहिजो जी ॥ ७३ ॥ सख्याचें उद्धत । सखा साहे निवांत । तैसें तुवां समस्त । साहिजो जी ॥ ७४ ॥ प्रियाचां ठायीं सन्मान । प्रिय न पाहे सर्वथा जाण । तेवीं उच्छिष्ट

तुझ्या पश्चात ज्या अनेक वाईट गोष्टी माझ्या हातून घडल्या असतील, त्या, आई ज्याप्रमाणें मुलाचे सर्व अपराध पोटांत घालते त्याप्रमाणें तूं पोटांत घालाव्यास. ५५६. महाराज, कोणत्याही एकाद्या वेळीं जेव्हां नद्या गढूळ पाण्याचे लोट घेऊन येतात, तेव्हां समुद्राच्या पाण्यानें त्या गढूळ पाण्याच्या लोटांस आपल्या पोटांत सामाविलें पाहिजे, त्यास दुसरा उपाय नाहीं. ५५७. त्याप्रमाणें प्रीतीनें अथवा चुकीनें माझ्याकडून देवाला जी विरुद्ध भाषणें बोललीं गेलीं, हे श्रीकृष्णा, तीं तूं सर्व सहन करावींस. ५५८. आणि हे देवा, तुझ्याच क्षमावान् स्वभावामुळें, क्षमा ( पृथ्वी ) या प्राणिमात्रांस धारण करणारी झाली आहे. म्हणून श्रीकृष्णा, तुझी विनंति करावी तितकी थोडीच आहे. ५५९. तरी आतां हे अगम्या श्रीकृष्णा, मी जो आपल्याला शरण आलों आहें, त्या मला या अपराधाची क्षमा करावी. ५६०.

या चराचर जगाचा तूं पिता आहेस, अत्यंत पूज्य व आद्य असा गुरु आहेस. हे अप्रतिमप्रभावा ( ज्याच्या प्रभावाशीं तुलना करण्याला योग्य असा दुसऱ्या कोणाचाहि प्रभाव नाहीं अशा ), ( स्वर्ग, मृत्यु, पाताळ या ) तिन्ही लोकांमध्ये देखील तुझ्यासारखा दुसरा कोणीही नाहीं, मग तुझ्याहून अधिक कोठून असणार ? ४३.

महाराज, खरोखर आतां मी तुझें माहात्म्य जाणलें. हे परमात्मा, तूं या स्थावरजंगमात्मक जगाचें उत्पत्तिस्थान आहेस. ५६१. देवा, विष्णु, शंकर इत्यादिक देवतांचा तूं श्रेष्ठ देव आहेस व वेदांनाही शहाणपणा शिकविणारा मूळगुरु तूं आहेत. ५६२. हे श्रीकृष्णा, तूं फार गंभीर अंतःकरणाचा आहेस व तूं सर्व प्राण्यांशीं सारखा आहेस. तूं सर्व गुणांमध्ये बिनजोड आहेस व तुझ्यासारखें दुसरें कोणीही नाहीं. ५६३. तुझ्या बरोबरीचें कोणी नाहीं, हें सांगावयास कशाला पाहिजे ? तुझ्यापासून झालेल्या आकाशांत सर्व जग सामावलें आहे ? ५६४. त्या तुझ्या बरोबरीला दुसरा कांहीं पदार्थ आहे, असें बोलण्यांतच लाज वाटावयास पाहिजे. अशा प्रसंगांत तुझ्याहून कोणी मोठें आहे असें म्हणण्याची गोष्टच कशाला पाहिजे ? ५६५. म्हणूनच या सर्व त्रिभुवनांत नांव घेण्यासारखा तूं एकच आहेस. तुझ्या तोडीचा दुसरा कोणी नाहीं व तुझ्यापेक्षां अधिक कोणी नाहीं. तुझें माहात्म्य खरोखर लोकोत्तर आहे. त्याचें वर्णन कसें करावें, तें समजत नाहीं. ५६६.

यास्तव, ( जगताचा ) स्वामी व स्तवन करण्याला योग्य अशा तुला, मी देह नमवून नमस्कार करून, ( तुझ्याकडून ) अनुग्रह करवून घेतों. हे देवा, पिता ज्याप्रमाणें पुत्राचे, मित्र ज्याप्रमाणें मित्राचे, प्रियजन ज्याप्रमाणें प्रियजनाचे ( अपराध सहन करतो ) त्याप्रमाणें माझे अपराध सहन करण्याला तूं योग्य आहेस. ४४.

याप्रमाणें अर्जुनानें भाषण केलें आणि नंतर देवास साष्टांग नमस्कार केला. त्या वेळीं त्याच्यांत अष्टसात्त्विक भाव भरून आले. ५६७. मग त्याची वाचा सद्गदित होऊन तो म्हणावयास लागला, "प्रसन्न हो, प्रसन्न हो." देवा, मला अपराधरूपी समुद्रांतून काढ. ५६८. तूं सर्व जगाचा मित्र असून, तूं आमचा एक नातेवाईक आहेस, असें समजून तुला कधीं मान दिला नाहीं. सगळ्या ईश्वरांचा ( देवांचा ) जो तूं ईश्वर, त्या तुझ्या ठिकाणीं ( तुला सारथी करून ) प्रभुत्व ( धनीपणा ) गाजविलें. ५६९. सर्वांकडून वर्णन करण्यास तूं एकच योग्य आहेस. ( तेव्हां वास्तविक पहातां मीच तुझें वर्णन करणें योग्य होतें; ) पण माझ्यावर तुझें प्रेम असल्यामुळें, सभेमध्यें तूं माझेंच वर्णन करीत होतास. ( तेव्हां मी आपली स्वतःची योग्यता समजून उगीच बसावें कीं नाहीं ? तरी तसें न करतां ) तेव्हां मी गर्वानें चढून जाऊन अधिक अधिकच बडबड करीत होतों. ५७०. आतां देवा, अशा माझ्या हातून घडलेल्या अपराधांना मर्यादा नाहीं. याकरितां माझ्यावर प्रसाद म्हणून माझ्या चुकांपासून माझें रक्षण करा. ५७१. देवा, ही सुद्धां विनंति करण्याची योग्यता माझ्या अंगीं कोठें आहे ? परंतु लहान मूल ज्याप्रमाणें आपल्या बापाशीं सलगीनें भाषण करतें ( त्याप्रमाणें मी तुमच्याशीं सलगीचें भाषण करीत आहें ) ५७२. आपल्या मुलाच्या किती जरी चुका झाल्या तरी बाप ज्याप्रमाणें दुजेपणा सोडून त्या सहन करतो, त्याप्रमाणें अहो महाराज, माझे अपराध आपण सहन करा. ५७३. बरोबरीचा स्नेही, बरोबरीच्या स्नेह्याकडून कांहीं उपमर्द झाला असतां, त्याविषयीं कांहींच मनांत न घेतां सहन करतो, त्याप्रमाणें महाराज, मी केलेलीं सर्व अविचारी कृत्यें आपण सहन करा. ५७४. असें पहा कीं, स्नेह्याच्या ठिकाणीं स्नेही, सन्मानाची मुळींच इच्छा करीत नाहीं. त्याप्रमाणें आपण

काढिलें आपण। ते क्षमा कीजो ॥ ७५ ॥ नातरी प्राणाचें सोयरें भेटे। मग जीवें भूतलीं जियें संकटें। तियें निवेदितां न वाटे। संकोचु कांहीं ॥ ७६ ॥ कां उखितें आंगें जीवें। आपणपें दिधलें जिया भावें। तिये कांतु मिनलिया न राहवे। हृदय जेवीं ॥ ७७ ॥ तयापरी जी मियां। हें विनविलें तुमतें गोसाविया। आणि कांहीं एक म्हणावया। कारण असे ॥ ७८ ॥

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

तरि देवेसी सलगी केली। जे विश्वरूपाची आळी घेतली। ते मायबापें पुरविली। स्नेहाळाचेनि ॥ ७९ ॥ सुरतरूंचीं झाडें। आंगणीं लावावीं कोडें। देयावें कामधेनूचें पाडें। खेळावया ॥ ५८० ॥ मियां नक्षत्रीं डाव पाडावा। चंद्र चेंडुवालागीं देयावा। हा छंदु सिद्धी नेला आघवा। माउलिये तुवां ॥ ८१ ॥ जया अमृतलेशालागीं सायास। तयाचा पाउस केला चारी मास। पृथ्वी वाहून चासेचास। चिंतामणि पेरिले ॥ ८२ ॥ ऐसा कृतकृत्य केला स्वामी। बहुवे लळा पाळिला तुम्हीं। दाविलें जें हरब्रह्मीं। नायकिजे कानीं ॥ ८३ ॥ मग देखावयाची केउती गोठी। जयाची उपनिषदां नाहीं भेटी। ते जिव्हारींची गांठी। मजलागीं सोडिली ॥ ८४ ॥ जी कल्पादीलागोनि। आजिची घडी धरूनी। माझीं जेतुलीं होउनी। गेलीं जन्में ॥ ८५ ॥ तयां आघवियांचिआंतु। घरडोळी घेऊनि असें पाहतु। परि ही देखिली ऐकिली मातु। आतुडेचिना ॥ ८६ ॥ बुद्धीचें जाणणें। कहीं न वचेचि याचेनि आंगणें। हे सादही अंतःकरणें। करवेचिना ॥ ८७ ॥ तेथ डोळ्यां देखी होआवी। ही गोठीचि कायसया करावी। किंबहुना पूर्वी। दृष्ट ना श्रुत ॥ ८८ ॥ तें हें विश्वरूप आपुलें। तुम्हीं मज डोळां दाविलें। तरि माझें मन झालें। हृष्ट देवा ॥ ८९ ॥ परि आतां ऐसी चाड जीवीं। जे तुजसी गोठी करावी। जवळीक हे भोगावी। आलिंगावासी ॥ ५९० ॥ ते येचि स्वरूपीं करूं म्हणिजे। तरि कोणे एके मुखेंसीं चावळिजे। आणि कोणा खेंव देइजे। तुज लेख नाहीं ॥ ९१ ॥ म्हणोनि वारियासवें धांवणें। न ठके गगना खेंव देणें। जळकेली खेळणें। समुद्रीं केउतें ॥ ९२ ॥ यालागीं जी देवा। एथिंचें भय उपजतसे जीवा। म्हणोनि येतुला लळा पाळावा। जे पुरे हें आतां ॥ ९३ ॥ पैं चराचर विनोदें पाहिजे। मग तेणें सुखें घरीं राहिजे। तैसें चतुर्भुज रूप तुझें। तो विसांवा आम्हां ॥ ९४ ॥ आम्हीं योगजात अभ्यासावें। तेणें याचि अनुभवा यावें। शास्त्रातें आलोडावें। परि सिद्धांतु तो हाचि ॥ ९५ ॥ आम्हीं यजनें किजती सकळें। परि तियें फळावीं येणेंचि फळें। तीर्थें होतु सकळें। याचिलागीं ॥ ९६ ॥ आणीकही कांहीं जें जें। दान पुण्य आम्हीं कीजे। तया फळीं फळ हेंचि तुझें। चतुर्भुज रूप ॥ ९७ ॥ ऐसीं तेथिंची जीवा आवडी। म्हणोनि तेंचि देखावया लवडसवडी। वर्तत असे ते सांकडी। फेडीं वेगां ॥ ९८ ॥ अगा जीवींचें जाणतेया। सकळ विश्वसवितेया। प्रसन्न होईं पूजितया। देवांचिया देवा ॥ ९९ ॥

आमच्या घरीं उच्छिष्ट काढलें त्याची आपण क्षमा करावी. ५७५. अथवा जिवलग स्नेह्याची गांठ पडल्यावर, मग आपण भोगलेले जे संकटाचे सर्व प्रसंग, ते त्यास सांगावयास कांहींच संकोच वाटत नाहीं. ५७६. अथवा ज्या पतिव्रतेनें आपल्याला शरीरानें व प्राणानें सर्वस्वी प्रेमपूर्वक पतीला अर्पण केलें, तिची व पतीची भेट झाली असतां ज्याप्रमाणें तिच्या मनांतील कोणतीही गोष्ट पतीला सांगितल्यावांचून तिच्यानें रहावत नाहीं; ५७७. अहो महाराज, त्याप्रमाणें मी तुम्हांस ( माझे मागील अपराध क्षमा करण्याबद्दल ) विनंति केली व माझा आणखी कांहीं एक सांगावयाचा हेतु आहे. ५७८.

पूर्वी (कधीं) न पाहिलेलें हें (तुझें विश्वरूप) पाहून मी हर्ष पावलों आहें आणि भयानें माझें मन व्याकुळ झालें आहे. (म्हणून) देवा, मला तेंच (पूर्वीचें) रूप दाखव. हे देवाधिदेवा, हे जगन्निवासा, माझ्यावर अनुग्रह कर. ४५

तरी मी विश्वरूपदर्शनाचा हट्ट घेतला, हा जो देवाशीं मीं लडिवाळपणा केला, तो माझा लडिवाळपणाचा हट्ट आपण जे प्रेमळ भक्तांचे मायबाप, त्या तुम्हीं पुरविला. ५७९. कल्पवृक्षांचीं झाडें अंगणामध्येंच कौतुकानें लावून द्यावींत अथवा कामधेनूचें वासरूं खेळावयास आणून द्यावें; ५८०. मी नक्षत्रांच्या फांशांनीं डाव खेळावा, मला चेंडू म्हणून ( खेळावयास ) चंद्र द्यावा, हा माझा सर्व हट्ट माझ्या आई, तूं सिद्धीस नेलास. ५८१. ज्या अमृताच्या थेंबाकरितां कष्ट पडतात, त्या अमृताचा पाऊस आपण चार महिने पाडलात व सर्वच पृथ्वी पेरणीस लायक करून तीमध्यें पाभारीच्या प्रत्येक तासांत ( फणांच्या रेषांत ) चिंतामणि नांवाचीं रत्नें पेरिलींत. ५८२. महाराज, याप्रमाणें मला आपण कृतकृत्य केलेंत. तुम्हीं माझे पुष्कळ लाड पुरवलेत व जें शंकर व ब्रह्मदेव यांनीं कानांनीं देखील ऐकिलें नाहीं, तें तुम्हीं मला प्रत्यक्ष दाखविलेंत. ५८३. मग तें त्यांना ( प्रत्यक्ष ) पहावयाची गोष्ट काय ! ( कशाला पाहिजे ! ) ज्याचें उपनिषदांना दर्शन नाहीं, अशी आपल्या जीवांतील गुह्य गोष्ट तुम्हीं माझ्याकरितां उघड केली. ५८४. महाराज, कल्पाच्या आरंभापासून तों आजची घटका धरून (एवढ्या काळांत) माझे जितके जन्म होऊन गेले, ५८५. त्या सर्व जन्मांच्या आंत मी झाडा घेऊन पहात आहें, पण ही गोष्ट ( विश्वरूपाचें दर्शन ) ऐकिलेली किंवा पाहिलेली आढळतच नाहीं. ५८६. बुद्धीची जाणण्याची शक्ति कधीं याच्या ( विश्वरूपाच्या ) अंगणांतसुद्धां येत नाहीं व अंतःकरणाला ही कल्पनासुद्धां करतां येत नाहीं. ५८७. अशा स्थितींत डोळ्यांना पहावयास मिळावें, ही गोष्टच कशाला बोलावयास पाहिजे ! फार काय सांगावें ? हें पूर्वी कोणीही पाहिलें नाहीं, अथवा ऐकिलें नाहीं. ५८८. तें हें आपलें विश्वरूप तुम्हीं माझ्या डोळ्यांना प्रत्यक्ष दाखविलेंत, त्यामुळें देवा, माझें मन आनंदित झालें. ५८९. परंतु आतां अशी जीवामध्यें इच्छा आहे कीं, तुझ्याशीं गोष्टी कराव्यात व तुझें सान्निध्य भोगावें व तूं मजकडून आलिंगिला जावास. ५९०. ह्या सर्व गोष्टी या विश्वरूपाबरोबर करूं म्हटलें, तर अनंत मुखांपैकीं कोणत्या एका मुखाबरोबर बोलावें ! आणि तुझ्या विश्वरूपी शरीराला मर्यादा नसल्यामुळें कोणाला आलिंगन द्यावें ! ५९१. एवढ्याकरितां वाऱ्याबरोबर पळणें जुळणार नाहीं व आकाशाला आलिंगण देणें घडणार नाहीं व समुद्रामध्यें जलक्रीडा कशी खेळावी ! ५९२. याकरितां हे श्रीकृष्णा, माझ्या मनांत या विश्वरूपाविषयीं भय उत्पन्न झालें आहे; आणि म्हणूनच एवढा हट्ट पुरवावा कीं, आपण प्रगट केलेलें विश्वरूप आतां पुरें झालें. (तें परत आंवरून घ्यावें) ५९३. स्थावर जंगमात्मक जग मजेनें हिंडून पहावें (व त्या हिंडण्यांत वन्याचश्या हालअपेष्टा (भोगल्यावर) त्यामुळें घरीं सुखानें विश्रांति घेत राहावें, त्याप्रमाणें ( तुझें अफाट विश्वरूप पाहिल्यावर ) तुझें श्यामसुंदर चतुर्भुज हें आम्हांस विश्रांतीची जागा आहे. ५९४. आम्हीं योगमात्राचा अभ्यास करावा व त्यायोगानें याच अनुभवाला ( तुझें श्यामसुंदर चतुर्भुजरूप ही जीवास विश्रांतीची जागा आहे, अशा अनुभवाला ) यावें. आम्हीं शास्त्रांचा अभ्यास करावा, परंतु त्या शास्त्रांचा सिद्धांत हाच ( चतुर्भुजरूप हीच विश्रांतीची जागा ) आहे. ५९५. आम्हीं सर्व यज्ञ करावे परंतु त्याचें फळ हेंच ( चतुर्भुजरूप ) मिळावें. आमच्या सर्व तीर्थयात्रा याचकरितां असोत. ५९६. आणखी जें जें कांहीं दानपुण्य आम्ही करूं, त्याच्या फळाच्या ठिकाणीं तुझें चतुर्भुजरूप हेंच फळ होय. ५९७. याप्रमाणें तेथींची ( त्या चतुर्भुजरूपाची ) आवड आहे. म्हणून तेंच पाहण्याकरितां लवबग आहे. ती अडचण ( तळमळ ) आपण लवकर दूर करा. ५९८. हे अंतःकरणांतील सर्व गोष्टी जाणणाऱ्या देवा, सर्व विश्व वसविणाऱ्या देवा, व भजले जाणारे जे देव, त्या देवांच्या देवा, मला प्रसन्न हो. ५९९.

किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

कैसें नीलोत्पलातें रांवित । आकाशाही रंगु लावित । तेजाची वोज दावित । इंद्रनीळा ॥ ६०० ॥ जैसा परिमळ जाहला मरगजा । कां आनंदासीचि निवालिया भुजा । ज्याचे जानूवरी मकरध्वजा । जोडली बरव ॥ १ ॥ मस्तकीं मुगुटातें ठेविलें । कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें । शृंगारा लेणें लाधलें । आंगाचेनि जया ॥ २ ॥ इंद्रधनुष्याचिये आडणी । माजीं मेघ गगनरंगणीं । तैसें आवरिलें शार्ङ्गपाणी । वैजयंतिया ॥ ३ ॥ कवणी ते उदार गदा । असुरां देत कैवल्य सदा । कैसें चक्र हन गोविंदा । सौम्यतेजें मिरवे ॥ ४ ॥ किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठित पां मी । म्हणोनि आतां तुम्हीं । तैसया होआवें ॥५ ॥ हे विश्वरूपाचें सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आधले । कृष्णमूर्तीलागीं ॥ ६ ॥ तें साकार कृष्णरूपडें । वांचूनि पाहों नावडे । तें न देखतां थोडें । मानिताती हे ॥ ७ ॥ आम्हां भोगमोक्षाचां ठायीं । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं । म्हणोनि तैसाचि साकारु होईं । हें सांवरीं आतां ॥ ८ ॥

श्रीभगवानुवाचः—मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला । म्हणे ऐसा नाहीं देखिला । धसाळ कोणी ॥ ९ ॥ कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु न घेसी । मा भेणें काय नेणों बोलसी । हेकाडु ऐसा ॥ ६१० ॥ आम्हीं सावियाचि जैं प्रसन्न होणें । तैं आंगचिवरी म्हणे देणें । वांचोनि जीव असे वेंचणें । कवणासि गा ॥ ११ ॥ तें हें तुझिये चाडे । आजि जिवाचोंचि दळवाडें । कामऊनियां येवढें । रचिलें ध्यान ॥ १२ ॥ ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहली प्रसन्नता आमुची वेडी । म्हणोनि गौप्याचीही गुढी । उभविली जगीं ॥ १३ ॥ तें हें अपरांअपार । स्वरूप माझें परात्पर । एथूनि ते अवतार । कृष्णादिक ॥ १४ ॥ हें ज्ञानतेजाचें निखळ । विश्वात्मक केवळ । अनंत हें अढळ । आद्य सकळां ॥ १५ ॥ हें तुजवांचोनि अर्जुना । पूर्वीं श्रुत दृष्ट नाहीं आना । जे जोगें नव्हे साधना । म्हणोनियां ॥ १६ ॥

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

याची सोय पातले । आणि वेदीं मौनचि घेतलें । यज्ञ की मागौते आले । स्वर्गौनीचि ॥ १७ ॥ साधकीं देखिला आयासु । म्हणोनि वाळिला योगाभ्यासु । आणि अध्ययनें सौरसु । नाहीं एथ ॥ १८ ॥ सीगेचीं सत्कर्में । धाविन्नलीं संभ्रमें । तिहीं बहुतेकीं श्रमें । सत्यलोकु ठाकिला ॥ १९ ॥ तपीं ऐश्वर्य देखिलें । आणि उग्रपण उभयांचि सांडिलें । एवं तपसाधन जें ठेलें ।

किरीट धारण करणारा, गदा धारण करणारा, हातामध्ये चक्र धारण करणारा अशाच तुला पहाण्याची माझी इच्छा आहे. हे सहस्रबाहो, हे विश्वरूपधारिन्, तूं पुनः तेंच चतुर्भुज स्वरूप धारण कर. ४६.

त्या चतुर्भुज श्यामसुंदर रूपाचा नीलवर्ण कसा निळ्या कमळाला रंगविणारा, आकाशासही ( निळा ) रंग देणारा व इंद्रनील नांवाच्या रत्नाला निळ्या रंगाची शुद्धता ( निळ्या रंगाचें पाणी ) दाखविणारा आहे ! ६००. ज्याप्रमाणें पाचेच्या रत्नास सुगंध उत्पन्न व्हावा अथवा आनंदासच हात फुटावेत, ( त्याप्रमाणें भगवंताचें शरीर शोभत होतें. ) ज्याच्या गुडघ्यांचा आश्रय केल्यामुळें ( ज्याचा मुलगा होऊन मांडीवर खेळल्यामुळें ) मदनास सौंदर्य प्राप्त झालें, ६०१. प्रभूंनीं मुगुटाला मस्तकावर ठेविल्यावरोबर त्या मुगुटाला भगवंताचें मस्तक मुगुट झालें ( म्हणजे भगवंताच्या मस्तकानें मुगुटाला शोभा आली ) व ज्या भगवंताच्या शरीरानें शृंगारास ( वस्त्रें, अलंकार इत्यादिकांस ) अलंकार ( शोभा ) प्राप्त झाला. ६०२. आकाशमंडळांत इंद्रधनुष्याच्या वर्तुळांत जसा मेघ आवरलेला असतो, त्याप्रमाणें वैजयंती माळेनें श्रीकृष्ण आवरले गेले. ६०३. कोण ती ( कशी ती ) उदार गदा ! कीं जी गदा असुरांना नेहमीं मोक्षपदाला देते ! गोविंदा, तुमचें सुदर्शनचक्र खरोखर सौम्य तेजानें कसें शोभत आहे ? ६०४. फार काय सांगावें ! महाराज, तें आपलें चतुर्भुज श्यामसुंदर रूप पाहाण्यास मी उत्सुक आहे; म्हणून आतां आपण ( हें प्रचंड विश्वरूप आंवरून ) तें चतुर्भुजरूप धारण करावें. ६०५. महाराज, हे विश्वरूपाचे सोहळे भोगून माझे डोळे शांत झाले. आतां ते ( डोळे ) श्रीकृष्णमूर्ति पाहाण्याकरितां अत्यंत उत्सुक होत आहेत. ६०६. ह्या डोळ्यांस त्या सगुण कृष्णमूर्तीशिवाय इतर कांहीं पहाणें आवडत नाहीं. तें सगुण स्वरूप यांस पाहावयास मिळालें नाहीं, तर या विश्वरूपाची माझ्या डोळ्यांना कांहीं किंमत वाटत नाहीं. ६०७. आम्हांला ( ऐहिक व पारलौकिक ) भोगाच्या ठिकाणीं (फार काय सांगावें !) मोक्षाच्या (देखील) ठिकाणीं श्याम सुंदर मूर्तीवांचून दुसरें कांहीं नाहीं. म्हणून, देवा, आतां तूं तसाच ( चतुर्भुज ) हो व हें विश्वरूप आटोप. ६०८.

श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, प्रसन्न होत्सात्या मीं माझ्या ऐश्वर्याच्या सामर्थ्यानें तुला हें माझें तेजोमय, विश्वात्मक, अनन्त व आद्य असें श्रेष्ठ स्वरूप दाखविलें. हें माझें ( रूप ) तुझ्याखेरीज पूर्वी कोणीहि पाहिलेलें नाहीं. ४७.

अर्जुनाचें हें बोलणें ऐकून विश्वरूपधारी परमात्म्याला चमत्कार वाटला आणि तो म्हणाला, असा दुसरा कोणीच अविचारी पाहिला नाहीं ! ६०९. ही कोणती वस्तु तुला प्राप्त झाली आहे ! तिच्या प्राप्तीचा आनंद मानीत नाहींस. उलट, एककली मनुष्यासारखा भिऊन काय बोलतोस तें कळत नाहीं. ६१०. आम्हीं जेव्हां सहजच प्रसन्न होतों, तेव्हां आपलें शरीरापर्यंत सुद्धां भक्तानें म्हटलेलें त्यास देतो. पण ( याशिवाय ) अर्जुना, कोणास आपला जीव अर्पण करणें, अशी गोष्ट कोठें आहे काय ? ६११. आज तो माझा जीव सर्व एकत्र गोळा करून तुझ्या इच्छेकरितां हें एवढें विश्वरूप मूर्तीचें रूप तयार केलें आहे. ६१२. आमची प्रसन्नता तुझ्या आवडीमुळें वेडी झाली आहे कीं काय, हें कळत नाहीं. म्हणून आम्हीं गुप्त गोष्टीचा ( विश्वरूपाचा ) जगांत ध्वज लावला ( जगांत प्रसिद्ध केलें.) ६१३. तें हें माझें मायेपलीकडील स्वरूप सर्व अमर्याद वस्तूंपेक्षां अमर्याद आहे व कृष्णादिक जे अवतार होतात, ते येथूनच होतात. ६१४. हें स्वरूप केवळ ज्ञानतेजाचेंच बनलेलें आहे व विश्व हें केवळ त्याचें स्वरूप आहे. या स्वरूपाला कधीं अंत नाहीं व तें कधीं ढळत नाहीं व तें सर्वांचें मूळ आहे. ६१५. अर्जुना, हें ( विश्वरूप ) तुझ्याशिवाय पूर्वी दुसऱ्या कोणी एकिलेलें किंवा पाहिलेलें नाहीं. कारण हें कोणत्याही साधनांनीं प्राप्त होण्यासारखें नाहीं. ६१६.

हे कुरुकुलश्रेष्ठा, वेदपठन, यज्ञयागादि, शास्त्रपठन, दान, ( श्रौतस्मार्तादि ) कर्में, अथवा उग्र तपश्चर्या यांनीं देखील असें हें माझें रूप, मनुष्यलोकांमध्यें, तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही दिसणें शक्य नाहीं. ४८.

वेद याला ( विश्वरूपाला ) जाणण्याच्या मार्गाला लागले व ते चूप झाले आणि यज्ञ म्हणशील तर ( याच्या प्राप्तीच्या मार्गाला लागले, परंतु ) ते स्वर्गापासूनच माघारी आले. ६१७. साधकांनीं याच्या प्राप्तीचा त्रास पाहिला म्हणून त्यांनीं योगाभ्यास टाकिला आणि अध्ययनानें विश्वरूप पाहाण्याची योग्यता येत नाहीं. ६१८. पूर्ण आचरलेलीं सत्कर्में मोठ्या उत्कटेनें विश्वरूपप्राप्तीकरितां धांवलीं व त्या बहुतेकांनीं मोठ्या कष्टानें सत्यलोक गांठला. ६१९. तपांनीं विश्वरूपाचें ऐश्वर्य

अपारांतरीं ॥ ६२० ॥ तें हें तुवां अनायासें । विश्वरूप देखिलें जैसें । इये मनुष्यलोकीं तैसें । न फावेचि कवणा ॥ २१ ॥ आजि ध्यानसंपत्तीलागीं । तूंचि एकु आथिला जगीं । हें परमभाग्य आंगीं । विरंचीही नाहीं ॥ २२ ॥

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

म्हणोनि विश्वरूपलाभें श्लाघ । एथिंचें भय नेघ नेघ । हें वांचूनि चांग । न मनीं कांहीं ॥ २३ ॥ हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत वरपडा जाहला । मग कोणीही आथि वोसंडिला । बुडिजेल म्हणोनि ॥ २४ ॥ नातरी सोनयाचा डोंगरु । येसणा न चले हा थोरु । ऐसें म्हणोनि अव्हेरु । करणें घडे ॥ २५ ॥ दैवें चिंतामणि लेईजे । कीं हें ओझें म्हणोनि सांडिजे । कामधेनु दवडिजे । न पोसे म्हणोनि ॥ २६ ॥ चंद्रमा आलिया घरा । म्हणिजे निगें करितोसि उबारा । पडिसायि पाडितोसि दिनकरा । परता सर ॥ २७ ॥ तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज । कीं एथ तुज गजबज । होआवी कां ॥ २८ ॥ परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ॥ २९ ॥ हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनियां काचें । प्रेम धरिसी अवगणियेचें । चतुर्भुज जें ॥ ६३० ॥ तरि आझुनिवरी पार्था । सांडीं सांडीं हे व्यवस्था । इयेविषयीं आस्था । करिसी झणें ॥ ३१ ॥ हें रूप जरी घोर । विकृति आणि थोर । तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ॥ ३२ ॥ कृपण चित्तवृत्ति जैसी । रोंवोनि घाली ठेवयापासीं । मग तुसधेनि देहेंसीं । आपण असे ॥ ३३ ॥ कां अजातपक्षिया जवळा । जीव बैसवूनि अविसाळां । पक्षिणी अंतराळा- । माजीं जाय ॥ ३४ ॥ नाना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधिलें वत्सें घरीं । तैसें प्रेम एथिंचें करीं । स्थानपती ॥ ३५ ॥ येरें वरिचिलेनि चित्तें । बाह्य सखयासुखापुरतें । भोगिजो कां श्रीमूर्तीतें । चतुर्भुज ॥ ३६ ॥ परि पुढतपुढती पांडवा । हा एक बोलु न विसरावा । जे इये स्वरूपींनि सद्भावा । नेदावें निघों ॥ ३७ ॥ हें कहीं नव्हतें देखिलें । म्हणोनि भय जें तुज उपजलें । तें सांडीं एथ संचलें । असों दे प्रेम ॥ ३८ ॥ आतां करूं तुजयासारिखें । म्हणितलें विश्वतोमुखें । तरि मागील रूप सुखें । न्याहाळीं पां तूं ॥ ३९ ॥ ऐसें वाक्य जी बोलतखेंवो । मागुता मनुष्य जाहला देवो । हें ना परि नवलावो । आवडीचा तिये ॥६४०॥ श्रीकृष्णाचि कैवल्य उघडें । वरि सर्वस्व विश्वरूपायेवढें । हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासी ॥४१॥ वस्तु घेऊनि वाळिजे । जैसें रत्नासि दूषण ठेविजे ।

पाहिलें आणि आपला उमपणा उम्पाडम्याच टाकून दिला. याप्रमाणें जे विश्वरूप, तप वगैरे साधनांपासून अमर्याद अंतरावर राहिलें; ६२०. असें जें विश्वरूप, तें तूं कांहीं एक श्रम न पडतां जसें पाहिलेंस, तसें या मनुष्यलोकांत कोणासही पाहावयास सांपडणार नाहीं. ६२१. आज ध्यानरूप संपत्तीकरितां जगांत तूंच एक संपन्न आहेस. असलें श्रेष्ठ भाग्य ब्रह्मदेवाच्याही अंगीं नाहीं. ६२२.

हें माझें अशा प्रकारचें भयानक रूप पाहून तूं व्याकुल होऊं नकोस, तूं भ्रांतचित्त होऊं नकोस. गतभय व प्रीतियुक्त अंतःकरण होत्साता पुनः तूं तें माझें पूर्वींचें रूप पहा. ४९.

म्हणून विश्वरूपप्राप्तीनें तूं आपल्यास धन्य मान व या विश्वरूपाची भीति बाळगूं नकोस व या विश्वरूपावांचून कांहीं चांगलें मानूं नकोस. ६२३. अरे अर्जुना, प्रत्यक्ष अमृताचा समुद्र भरलेला असला आणि अकस्मात् कोणी तेथें प्राप्त झाला; मग आपण यांत बुडून मरून जाऊं, म्हणून कोणीतरी त्याचा त्याग केला आहे काय ? ६२४. अथवा (एकादा मनुष्य सोन्याच्या डोंगराजवळ प्राप्त झाला असतां ) हा एवढा मोठा सोन्याचा डोंगर 'आपल्याला नेतां येत नाहीं' असें म्हणून त्याचा त्याग करणें घडेल काय ? (तर नाहीं. तो मनुष्य आपल्याकडून जितकें सोनें नेववेल तितकें नेत राहील.) ६२५. दैवयोगानें चिंतामणि नांवाचें रत्न अंगावर धारण करावें व तें ओझें म्हणून ज्याप्रमाणें टाकून द्यावें किंवा आपल्याला पोसवत नाहीं म्हणून (ज्याप्रमाणें) कामधेनु हांकून द्यावी. ६२६. चंद्र आपल्या घरीं आला असतां 'तुझ्या योगानें उष्मा होतो' म्हणून त्याला ज्याप्रमाणें 'तूं चालता हो' असें म्हणावें; अथवा 'तूं सावली पाडतोस म्हणून पलीकडे जा' असें सूर्यास जसें म्हणावें. ६२७. त्याप्रमाणें हें महातेजरूपी (विश्वरूपी) ऐश्वर्य आज तुझ्या हातीं सहज आलें आहे, असें असून, येथें तुझी कासाविसी कां व्हावी ? ६२८. परंतु हे अडाण्या, तुला कांहीं कळत नाहीं. अर्जुना, आतां तुझ्यावर काय रागवावयाचें आहे ! प्रत्यक्ष अंग सोडून पडछायेला आलिंगन तूं देतो आहेस नव्हे काय ? ६२९. विश्वरूप हें माझें खरें रूप नाहीं काय ! पण त्या ठिकाणीं मन अधीर करून, क्षुल्लक असें जें चतुर्भुजरूप, त्या ठिकाणीं तूं प्रेम धरतोस, हें बरें नाहीं. ६३०. तर अर्जुना; अजूनपर्यंत तरी हें तुझें ठरलेलें मत (विश्वरूप हें भयंकर रूप आहे व चतुर्भुजरूप हें सुंदर आहे) टाकून दे. या सगुणरूपाविषयीं आस्था (प्रेम) कदाचित् करशील, तर करूं नकोस. ६३१. हें विश्वरूप जरी भयंकर अक्राळ-विक्राळ आणि अवाढव्य असें आहे, तरी (चतुर्भुजरूपापेक्षां) हें विश्वरूप माझें खरें रूप असल्याकारणानें, हेंच उपासनेला योग्य आहे, असा तूं पक्का निश्चय कर. ६३२. कंजूष मनुष्य आपलें सर्व लक्ष ज्याप्रमाणें आपण पुरून ठेवलेल्या द्रव्याच्या सांठ्यापाशीं जखडलेलें ठेवतो आणि मग केवळ देहानें आपले इतर सर्व व्यवहार करीत असतो; ६३३. किंवा पंख न फुटलेल्या पिलांचे जवळ त्या घरट्यांत आपला सर्व जीव ठेवून, त्या पिलांची आई (पक्षीण) जशी आकाशांत संचार करण्याकरितां जाते; ६३४. अथवा गाय डोंगरांत चरत असते, परंतु तिचें सर्व लक्ष घरीं आपल्या वासरावर अडकून राहिलेलें असतें; त्याप्रमाणें या (विश्वरूप) ठिकाणाचें तूं आपलें प्रेम मालक कर. ६३५. बाकी बाह्य अंतःकरणानें (वर वर बाह्यात्कारीं) बाहेरच्या मैत्रीच्या सुखापुरतां आमच्या चतुर्भुज श्यामसुंदर मूर्तीचा उपभोग घे. ६३६. परंतु अर्जुना, या विश्वरूपापासून आपल्या सद्भावास दुसरीकडे कोठें जाऊं देऊं नकोस. एवढें आमचें एक सांगणें तूं विसरूं नकोस, हेंच तुला वारंवार सांगणें आहे. ६३७ हें विश्वरूप म्हणजे कधीं न पाहिलेली गोष्ट, म्हणून तुला याचें भय उत्पन्न झालें आहे. तें भय टाक व या विश्वरूपाच्या ठिकाणीं प्रेम सांठवलेलें राहूं दे. ६३८. आतां तुझ्या म्हणण्यासारखें करूं. तर अर्जुना, मागील (सगुण) रूप तूं खुशाल पहा; असें सर्व बाजूंनीं ज्याला मुखें आहेत, असा विश्वरूप परमात्मा म्हणाला. ६३९. महाराज (राजा धृतराष्ट्रा), असें वाक्य बोलतांक्षणींच देव पुन्हा मनुष्य झाले, यांत कांहीं मोठेसें आश्चर्य नाहीं. परंतु श्रीकृष्णास अर्जुनाविषयींचें जें प्रेम होतें, त्या प्रेमाचेंच मोठें आश्चर्य आहे. (असें संजय म्हणाला.) ६४० श्रीकृष्ण प्रत्यक्ष परब्रह्म होतेच; असें असूनसुद्धां त्या परब्रह्म श्रीकृष्णानें विश्वरूपाएवढें आपलें सर्वस्व अर्जुनाच्या हातीं दिलें, असें असून तें (विश्वरूप) अर्जुनाला आवडलें नाहीं. ६४१. ज्याप्रमाणें एकाद्या वस्तूचा स्वीकार करून (मग ती वाईट म्हणून) टाकून द्यावी किंवा ज्याप्रमाणें अस्सल रत्नांत कांहीं तरी खोड

नातरी कन्या पाहूनियां म्हणिजे । मना नये हे ॥ ४२ ॥ तया विश्वरूपायेवढी दशा । करितां प्रीतीचा वाढु कैसा । शेल दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ॥ ४३ ॥ मोडोनी भांगाराचा रवा । लेणें घाडिलें आपलिया सवा । मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ॥ ४४ ॥ तैसें शिष्याचिये प्रीती जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें । तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ॥ ४५ ॥ हा ठायवरी शिष्याची निसी । सहाते गुरु आहाती कवणे देशीं । परी नेणिजे आवडी कैशी । संजयो म्हणे ॥ ४६ ॥

संजय उवाचः—इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

मग विश्वरूप व्यापूनि भोंवतें । जें दिव्य योगतेज प्रगटलें होतें । तेंचि सामावलें मागुतें । कृष्णरूपीं तिये ॥ ४७ ॥ जैसें त्वंपद हें आघवें । तत्पदार्थीं सामावे । अथवा द्रुमाकारु सांठवे । बीजकणिके जेवीं ॥ ४८ ॥ नातरी स्वप्नसंभ्रमु जैसा । गिळी चेइली जीवदशा । श्रीकृष्णें योगु तैसा । संहारिला तो ॥ ४९ ॥ जैसी प्रभा हारति बिंबीं । की जळदसंपत्ती नभीं । भरतें सिंधुगर्भीं । रिगालें राया ॥ ६५० ॥ हो कां जे कृष्णाकृतीचिये मोडी । होती विश्वरूपपटाची घडी । ते अर्जुनाचिये आवडी । उकलूनी दाविली ॥ ५१ ॥ तव परिमाणा रंगु । तेणें देखिला साविया चांगु । तेथ ग्राहकीये नव्होचि लागु । म्हणोनि घडी केली पुढती ॥ ५२ ॥ तैसें वाढी-चेनि बहुवसपणें । रूपें विश्व जिंतिलें जेणें । तें सौम्य कोडिसवाणें । साकार जाहलें ॥ ५३ ॥ किंबहुना अनंतें । धरिलें धाकुटपण मागुतें । परि आश्वासिलें पार्थातें । बिहालियासी ॥ ५४ ॥ तेथ जो स्वप्नीं स्वर्गा गेला । तो अवसांत जैसा चेइला । तैसा विस्मयो जाहला । किरीटीसी ॥ ५५ ॥ नातरी गुरुकृपेसवें । वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें । स्फुरे तत्त्व तेंवी पांडवें । मूर्ति देखिली ॥ ५६ ॥ तया पांडवा ऐसें चित्तीं । आड विश्वरूपाची जवनिका होती । ते फिटोनि गेली परौती । हें भलें जाहलें ॥ ५७ ॥ काय काळातें जिणोनि आला । कीं महावातु मागां सांडिला । आपुलिया बाहीं उतरला । सात सिंधु ॥ ५८ ॥ ऐसा संतोषु बहु चित्तें । घेइजत असे पांडुसुतें । विश्वरूपापाठीं कृष्णातें । देखोनियां ॥ ५९ ॥ मग सूर्याचां अस्तमानीं । मागुती तारा उगवती गगनीं । तैसी देखों लागला अवनी । लोकांसहित ॥ ६६० ॥ पाहे तंव तें कुरुक्षेत्र । तैसेंचि दोहीं भागीं झाले गोत्र । वीर वर्षताति शस्त्रास्त्र । संघाटवारी ॥ ६१ ॥ तया बाणांचिया मांडपा-आंतु । तैसाचि रथु आहे निवांतु । धुरे बैसला लक्ष्मीकांतु । आपण तळीं ॥ ६२ ॥ एवं मागील जैसें तैसें । तेणें देखिलें वीर्यविलासें । मग म्हणे जियालों ऐसें । जाहलें आतां ॥ ६३ ॥ बुद्धीतें सांडोनि ज्ञान । भेणें वळघलें रान । अहंकारेंसीं मन । देशधडी जाहलें ॥ ६४ ॥ इंद्रियें प्रवृत्ती

कादीत बसावें, अथवा मुलीला पाहून मग ती आपल्याला पटत नाहीं, असें ज्याप्रमाणें म्हणावें; ६४२. श्रीकृष्णांनीं आपल्या चतुर्भुज सगुण देहाचा विश्वरूपाएवढा विस्तार केला. या गोष्टीवरून अर्जुनाविषयीं श्रीकृष्णाच्या प्रेमाची वाढ करशी होती ( हें स्पष्ट दिसतें ). अर्जुनाला देवांनीं विश्वरूप दाखविलें, हा त्याला शेलका ( अति उत्कृष्ट ) उपदेश केला. ६४३. सोन्याची लगड मोडून त्याचा जसा आपल्या इच्छेनुरूप दागिना करावा व मग तो दागिना जर आपल्या मनाला आवडला नाहीं, तर तो पुनः जसा आटून टाकावा; ६४४. त्याप्रमाणें शिष्याच्या प्रीतीकरितां वरील दृष्टान्ताप्रमाणें गोष्ट घडली. ( कोणती म्हणाल, तर ) प्रथम सगुण श्रीकृष्णमूर्ति होती, त्याचें विश्वरूप केलें; तें अर्जुनाच्या मनाला येईना, मग सगुण कृष्णरूप पुनः आणलें. ६४५. येथपर्यंत शिष्यानें दिलेला त्रास सहन करणारे गुरु कोणत्या देशांत आहेत ? परंतु देवाचें अर्जुनाविषयीं कसें प्रेम आहे, तें कळत नाहीं, असें संजय म्हणाला. ६४६

संजय म्हणाला, असें वचन बोलून याप्रमाणें वासुदेवानें पुनः स्वतःचें ( पूर्वीचें ) रूप दाखविलें. पुनः सौम्यस्वरूपधारी होऊन त्या महात्म्यानें भयभीत अर्जुनाला धीर दिला. ५०.

मग श्रीकृष्णानें विश्वरूपाचा पसारा घालून आपल्या सभोंवतीं जें अलौकिक योगाचें तेज प्रगट केलें होतें, तेंच त्यानें पुनः त्या सगुण कृष्णरूपांत एकत्र करून सांठविलें. ६४७. ज्याप्रमाणें 'त्वं' हें सर्वपद ( अल्पज्ञ, अल्पशक्तिमान्, परतंत्र, परिच्छिन्न अशा जीवाचें लक्ष्य जें कूटस्थचैतन्य तें ) 'तत्' पदाच्या अर्थामध्यें ( सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, स्वतंत्र, विभु अशा ईश्वरतत्त्वाचें लक्ष्य जें ब्रह्म, त्यांत ) सामावतें. अथवा वृक्षाचा सर्व आकार जसा बीजाच्या कणांत सांठवतो. ६४८. अथवा जीवाची जाग्रतावस्था ही स्वप्नाच्या सर्व विस्ताराला ज्याप्रमाणें गिळते, त्याप्रमाणें तो योग ( विश्वरूपाचा विस्तार ) श्रीकृष्णांनीं आपल्यांत सामावून घेतला. ६४९. त्याप्रमाणें सूर्यादिकांचें तेज, हें सूर्यादिकांच्या बिंबांत सामावतें, किंवा मेघांचे समुदाय आकाशामध्यें लीन होतात, ( अथवा ) राजा धृतराष्ट्रा, समुद्राची भरती समुद्राच्या पोटांत गडप होते; ६५०. त्याप्रमाणें कृष्णाकृतीच्या रूपानें जी विश्वरूपरूपी वस्त्राची घडी होती, ती अर्जुनाच्या पसंतीकरितां देवांनीं उकलून दाखविली. ६५१. तेव्हां ( एखादें वस्त्र विकत घेणारें गिऱ्हाइक जसें त्या वस्त्राची लांबी, रुंदी व रंग सहज पाहातें त्याप्रमाणें ) अर्जुनानें या विश्वरूपरूपी वस्त्राची लांबी, रुंदी व रंग सहज चांगलीं पाहिलीं, त्या वेळीं अर्जुनाकडून वस्त्र घेतलें जाण्याचा संभवही नाहीं, म्हणून देवांनीं विश्वरूपरूपी वस्त्राची सगुण कृष्णाकृतिरूपी पुनः घडी केली. ६५२. त्याप्रमाणें आपल्या वाढीच्या अतिशय विस्तारानें ज्या कृष्णरूपानें विश्व जिंकलें होतें, तें विश्वरूपानें वाढलेलें कृष्णरूप ( पुनः ) शांत, सगुण व सुंदर असें झालें. ६५३. फार काय सांगावें ! श्रीकृष्णानें पुनः मर्यादित सगुण रूप धारण केलें, पण भ्यालेल्या अर्जुनाला धीर दिला. ६५४. त्या वेळीं स्वप्नांत स्वर्गांत गेलेला मनुष्य जसा अकस्मात् जागा व्हावा ( म्हणजे तो जसा एकदम बदललेल्या परिस्थितीमुळें आश्चर्यचकित होतो ) तसें अर्जुनास आश्चर्य वाटलें. ६५५. अथवा गुरुकृपा झाल्याबरोबर, प्रपंचाचें सर्व ज्ञान ओसरल्यावर, जसें एक ब्रह्ममात्र स्फुरतें, त्याप्रमाणें विश्वरूप ओसरल्यावर अर्जुनानें कृष्णमूर्ति पाहिली. ६५६. त्या अर्जुनाला मनांत असें वाटलें कीं, ( माझ्या आणि चतुर्भुज श्रीकृष्णमूर्तीच्या ) आड ( मध्यें ) जो विश्वरूपाचा पडदा होता, तो पलीकडे निघून गेला, हें चांगलें झालें. ६५७. जसा काय काळाला जिंकून आला किंवा प्रचंड वाऱ्यास मागें हटविलें अथवा आपल्या हातांनीं सात समुद्र पोहून उतरून आला; ६५८. अर्जुनानें विश्वरूपानंतर कृष्णरूपाला पाहून आपल्या मनानें असा फार आनंद मानला. ६५९. मग सूर्य मावळल्यावर पुनः आकाशांत चांदण्या प्रगट होतात, त्याप्रमाणें अर्जुन हा लोकांसहित पृथ्वी पहावयास लागला. ६६०. अर्जुन पहावयास लागला, तों तें कुरुक्षेत्र तसेंच होतें; दोन्ही बाजूंना नातलग मंडळी तशीच ( पूर्वीप्रमाणें ) उभी होती; आणि वीर शस्त्रांचे व अस्त्रांचे समुदायांचे समुदाय वर्षाव करीत होते. ६६१. त्या बाणांच्या मांडवाआंत रथ तसाच ( पूर्वीप्रमाणेंच ) स्थिर होता व घोडे हांकण्याच्या ठिकाणीं लक्ष्मीकांत श्रीकृष्ण विराजमान झाले होते व आपण खालीं होता. ६६२. पराक्रम हाच ज्याचा खेळ आहे, त्या अर्जुनानें याप्रमाणें पूर्वी जसें होतें तसें पाहिलें. मग श्रीकृष्णास म्हणाला, आतां मी जगलों असें मला वाटतें. ६६३. माझें ज्ञान बुद्धीला सोडून भयानें रानोमाळ झालें होतें आणि मन हें अहंकारासह परागंदा झालें होतें. ६६४. इंद्रियें विषयांकडे धावण्याचें विसरलीं होतीं व

भुललीं । वाचा प्राणा चुकली । ऐसी आपांपरी होती जाली । शरीरग्रामीं ॥ ६५ ॥ तियें आघवींचि मागुतीं । जिवंत भेटलीं प्रकृती । आतां जिताणें श्रीमूर्ती । जाहलें यियां ॥ ६६ ॥

अर्जुन उवाचः—दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन । इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

ऐसें सुख जीवीं घेतलें । मग कृष्णातें जी म्हणितलें । मियां तुमचें रूप देखिलें । मानुष हें ॥ ६७ ॥ हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपत्या चुकलिया । बुझावोनि तुवां माया । स्तनपान दिधलें ॥ ६८ ॥ जी विश्वरूपाचां सागरीं । होतों तरंग मावित बांवेवरी । तो इये निजमूर्तीचां तीरीं । निगालों आतां ॥ ६९ ॥ आइकें द्वारकापुरसुहाडा । मज सुकातिया जी झाडा । हे भेटी नव्हे बहुडा । मेघाचा केला ॥ ६७० ॥ सावियाचि तृषा फुटला । तया मज अमृतसिंधु हा भेटला । आतां जिणयाचा फिटला । अभरंवसा ॥ ७१ ॥ माझां हृदयरंगणीं । होताहे हरिखलतांची लावणी । सुखेंसीं बुझावणी । जाहली मज ॥ ७२ ॥

श्रीभगवानुवाचः—सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम । देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः ॥ ५२ ॥

यया पार्थाचिया बोलासवें । हें काय गा म्हणितलें देवें । तुवां प्रेम ठेवूनि यावें । विश्वरूपीं की ॥ ७३ ॥ मग इये श्रीमूर्ती । भेटावें सडिया आयती । ते शिकवण सुभद्रापती । विसरलासि ॥ ७४ ॥ अगा आंधळिया अर्जुना । हाता आलिया मेरुही होय साना । ऐसा आथी मना । चुकीचा भावो ॥ ७५ ॥ तरि विश्वात्मक रूपडें । जें दाविलें आम्हीं तुजपुढें । तें शंभूही परि न जोडे । तपें करितां ॥ ७६ ॥ आणि अष्टांगादिसंकटीं । योगी शिणताति किरीटी । परि अवसरु नाहीं भेटी । जयाचिये ॥ ७७ ॥ तें विश्वरूप एकादे वेळ । कें देखों अळुमाळ । ऐसें स्मरतां काळ । जातसे देवां ॥ ७८ ॥ आशेचिया अंजुळी । ठेऊनि हृदयाचां निडळीं । चातक निराळीं । लागले जैसे ॥ ७९ ॥ तैसे उत्कंठानिर्भर । होऊंनियां सुरनर । घोकीत आठही पाहार । भेटी जयाची ॥ ६८० ॥ परि विश्वरूपासारिखें । स्वप्नींही कोण्ही न देखे । तें प्रत्यक्ष तुवां सुखें । देखिलें हें ॥ ८१ ॥

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

पैं उपायांसि वाटा । न वाहती एथ सुभटा । साहीसहित वोहटा । वाहिला वेदीं ॥ ८२ ॥ मज विश्वरूपाचिया मोहरा । चालावया धनुर्धरा । तपांचियाही सर्वभारा । नव्हेचि लागु ॥ ८३ ॥ आणि दाना कीर कानडें । मी यज्ञींही तैसा न सांपडें । जैसेनि कां सुरवाडें । देखिला तुवां ॥ ८४ ॥ तैसा मी एकीचि परी । आतुडें गा अवधारीं । जरी भक्ति येऊनि वरी । चित्तातें गा ॥ ८५ ॥

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन । ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गतिचि नेणे ॥ ८६ ॥ कां सकळ जळसंपत्ती । घेऊनि समुद्रातें गिंवसिती । गंगा जैसी अनन्यगती ।

बाचाही प्राणास मुकली होती ( बंद पडली होती ). याप्रमाणें शरीररूपी गांवांत दुर्दशा उडाली होती. ६६५. तीं ( बुद्धि, मन व इंद्रियें ) सर्वच पुनः टवटवीत होऊन आपल्या मूळ पदावर आलीं. आतां श्रीकृष्णा, यांना जिवंतपण प्राप्त झालें. ( हीं आपल्या स्वभावावर येऊन आपापलीं कामें करावयास लागलीं ) ६६६.

अर्जुन म्हणाला, हे जनार्दना, हें तुझें सौम्य मानवरूप पाहून आतां मन ठिकाणावर येऊन मी पूर्ववत् सावध झालों आहें. ५१.

असा त्यानें मनांत आनंद मानला व मग तो कृष्णास म्हणाला, महाराज, तुमचें हें मनुष्यरूप ( एकदाचें ) माझ्या दृष्टीस पडलें. ६६७. हे देवाधिदेवा, हें रूप दाखविणें म्हणजे मी जें चुकलेलें मूल, त्या मला तूं जी माझी आई, तिनें माझी समजूत घालून मला स्तनपानच दिलें. ६६८. महाराज, विश्वरूपी समुद्रांत जो मी हातानें लाटेमागून लाट आक्रमीत होतों, तो मी या आपल्या चतुर्भुजमूर्तिरूप किनाऱ्यास आतां लागलों. ६६९. हे द्वारकेच्या राजा, ऐक, ( विश्वरूपदर्शनानंतर या चतुर्भुजरूपाची भेट ) ही भेट नव्हे. तर मी जें सुकावयास लागलेलें झाड, त्या मला ही भेट म्हणजे मेघांचा वर्षावच होय. ६७० तहानेनें पीडलेला जो मी, त्या मला हा चतुर्भुज श्रीकृष्ण म्हणजे अमृताचा सागरच अकस्मात् भेटला. आतां माझा जगण्याविषयींचा संशय दूर झाला. ६७१. माझ्या हृदयदेशांत आनंदाच्या वेलाची लावणी होत आहे. ( आज ) सुखाची व माझी गांठ पडत आहे. ६७२.

श्रीकृष्ण म्हणाले, महत्प्रयासानेंहि दिसण्याला कठिण, असें जें माझें हें रूप तूं पाहिलेंस, त्या रूपाचें दर्शन घेण्यासाठीं देव देखील उत्सुक आहेत. ५२.

या अर्जुनाच्या भाषणाबरोबर भगवंत म्हणाले, हें काय रे, तूं विश्वरूपाच्या ठिकाणीं प्रेम ठेवून (सगुणाकडे) ये. ६७३. मग या सगुण मूर्तीला ( विश्वरूपावर दृढ प्रेम ठेवून नुसतें रिकामें ) नुसत्या देहसामुग्रीनें भेटावें. हे सुभद्रापते अर्जुना, ही जी तुला आम्हीं मागें शिकवण दिली होती, ती विसरलास. ६७४. अरे अविचारी अर्जुना, एवढा मोठा मेरु ( सोन्याचा पर्वत ) पण तो एकदां का प्राप्त झाला, म्हणजे त्याचें कांहीं महत्त्व वाटत नाहीं, अशी जी मनाची समजूत असते, ती चुकीची आहे. ६७५. तरी आम्हीं तुझ्यापुढें जें विश्वरूप दाखविलें, तें शंकरालासुद्धां अनेक तपें केलीं तरी प्राप्त होत नाहीं. ६७६. अर्जुना, योगी हे अष्टांगयोगासारखीं संकटें आचरण करून शिणतात, परंतु ज्या विश्वरूपाच्या भेटीचा ( दर्शनाचा ) प्रसंग त्यांना येत नाहीं; ६७७. तें विश्वरूप 'एकादे वेळ तरी थोडेसें आम्ही केव्हां पाहूं' असें चिंतन करतांना देवांचा काळ जातो. ६७८. आशारूप ओंजळ हृदयरूप कपाळावर ठेवून चातक पक्षी जसे आकाशाकडे पहातात, ६७९. याप्रमाणें देव व मनुष्य हे विश्वरूपदर्शनाच्या उत्कंठेनें आतुर होऊन आठही प्रहर ( रात्रंदिवस ) विश्वरूपाची भेट होईल काय, म्हणून घोकीत बसतात. ६८०. परंतु विश्वरूपासारखी गोष्ट कोणीं स्वप्नांतसुद्धां पाहिली नाहीं. असें हें विश्वरूप, तें हें तूं आज प्रत्यक्ष सुखानें पाहिलेंस. ६८१.

ज्या प्रकारें तूं मला पाहिलेंस त्या प्रकारें वेदपठनानें, तपानें, दानानें अथवा यज्ञानें ( देखील ) मी ( कोणाला ) दिसणें शक्य नाहीं. ५३.

परंतु अर्जुना, या विश्वरूपाच्या ठिकाणीं कोणत्याही साधनास मार्ग नाहीं. ( मार्ग सांपडत नाहीं. ) व सहा शास्त्रांसह वेद, लाग न लागल्यानें, या विश्वरूपापासून मागें हटले. ६८२. मी जो विश्वरूप, त्या माझ्याकडे चालत येण्याला, अर्जुना, तपांच्या सर्व समुदायालासुद्धां सामर्थ्य नाहीं. ६८३. आणि तूं जशा विस्तारानें मला पाहिलास, तसा मी दानांनीं दिसण्यास खरोखर कठीण असून, यज्ञांनींही मी तसा पाहण्यास सांपडत नाहीं. ६८४. तूं ज्या विस्तारानें मला पाहिलास, तसा मी एकाच प्रकारानें ( मार्गानें ) पाहावयास सांपडतों व तो प्रकार हाच कीं, जर भक्ति येऊन चित्ताला वरील तरच मी पाहावयास सांपडतों, हें लक्षांत ठेव. ६८५.

पण, हे शत्रुनाशना अर्जुना, अशा स्वरूपाचा जो मी, त्या मला अनन्य भक्तीचे योगानें जाणणें, पहाणें आणि मत्स्वरूपानें माझ्यामध्यें लीन होणें शक्य आहे. ५४.

परंतु तीच भक्ति अशी कीं, पावसाच्या वृष्टीस पृथ्वीवांचून जशी निराळी गतीच ठाऊक नाहीं, तशी ( म्हणजे त्या भक्तीला मजवांचून दुसरा विषयच नाहीं अशी ) ६८६. अथवा सर्व जलरूप संपत्ति घेऊन भागीरथी जशी समुद्राचा शोध करीत करीत एकनिष्ठेनें

मिळालीचि मिळे ॥ ८७ ॥ तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें । मजमाजीं संचरे । मीचि होऊनि ॥ ८८ ॥ आणि तेवींचि मी ऐसा । थडिये माझारीं सरिसा । क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ॥ ८९ ॥ तैसें मजलागुनी भ्रुंगीवरी । किंबहुना चराचरीं । भजनासि कां दुसरी । भ्रांति नाहीं ॥ ६९० ॥ तयाचि क्षणासवें । एवंविध मी जाणवें । जाणितला तरी स्वभावें । दृष्ट होय ॥ ९१ ॥ मग इंधनीं अग्नि उद्दीपे । आणि इंधन हे भाप हारपे । तें अग्निचि होऊनि आरोपे । मूर्त जेवीं ॥ ९२ ॥ कां उदय न कीजे तेजाकारें । तंव गगनाचि होऊनि असे आंधारें । मग उदैलियां एकसरें । प्रकाशु होय ॥ ९३ ॥ तैसें माझां साक्षात्कारीं । सरे अहंकाराची वारी । अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥ ९४ ॥ मग मी तो हें आघवें । एक मीचि आथी स्वभावें । किंबहुना सामावे । समरसें तो ॥ ९५ ॥

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥

जो मजाचि एकालागीं । कर्में वाहातसे आंगीं । जया मीवांचोनि जगीं । गोमटें नाहीं ॥ ९६ ॥ दृष्टादृष्ट सकळ । जयाचें मीचि केवळ । जेणें जिणयाचें फळ । मजाचि नाम ठेविलें ॥ ९७ ॥ भूतें हें भाप विसरला । जे दिठी मीचि आहे बांधला । म्हणोनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ॥ ९८ ॥ ऐसा जो भक्तु होये । तयाचें त्रिधातुक हें जैं जाये । तैं मीचि होऊनि ठाये । पांडवा गा ॥ ९९ ॥ ऐसें जगदुदरदोंदिलें । तेणें करुणारसरसाळें । संजयो म्हणे बोलिलें । श्रीकृष्णादेवें ॥ ७०० ॥ ययावरी तो पांडुकुमरु । जाहला आनंदसंपदा थोरु । आणि कृष्णचरणचतुरु । एक तो जगीं ॥ १ ॥ तेणें देवाचिया दोनही मूर्तीं । निकिया न्याहाळिलिया चित्तीं । तंव विश्वरुपाहूनि कृष्णाकृती । देखिला लाभु ॥ २ ॥ परि तयाचिये जाणिवे । मानु न कीजेचि देवें । जे व्यापकाहूनि नव्हे । एकदेशी ॥ ३ ॥ हेंचि समर्थावयालागीं । एक दोन चांगी । उपपत्ती शार्ङ्गी । दाविता जाहला ॥ ४ ॥ तिया ऐकोनि सुभद्राकांतु । चित्तीं आहे म्हणतु । तरि होय बरवें दोन्हीआंतु । तें पुढती पुसों ॥ ५ ॥ ऐसा आलोचु करुनि जीवीं । आतां पुसती वोज बरवी । आदरील ते परिसावी । पुढां कथा ॥ ६ ॥ प्रांजळ ओंवीप्रबंधें । गोष्टी सांगिजेल विनोदें । निवृत्तिपादप्रसादें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७ ॥ भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोंवियाफुलें मोकळीं । अर्पिलीं अंघ्रियुगुळीं । विश्वरूपाचां ॥ ७०८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः ।

[ ओव्या ७०८. श्लोक ५५. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



समुद्रास मिळाली असून, पुनः मिळतच आहे. ६८७. त्याप्रमाणें सर्व भावांच्या समुदायांसह अनावर प्रेम, मद्रूप होऊन, एकसारखें माझ्यामध्यें प्रवेश करतें. ६८८. आणि क्षीरसमुद्र जसा कांठास व मध्येंही एकसारखा दूधमयच असतो, त्याचप्रमाणें मी सारखा सर्वव्यापी आहे. ६८९. त्याप्रमाणें माझ्यापासून तों मुंगीपर्यंत, फार काय सांगावें ? सर्व स्थावरजंगमात्मक जगामध्यें भजनाला माझ्याशिवाय दुसरें कांहीं आहे अशी शंकाच नाहीं. ६९०. ( असें ज्या वेळीं होईल ) त्याचक्षणाबरोबर ' मी ( भगवंत ) विश्वरूप आहें ' असें कळेल; आणि असा मी समजल्यावर साहजिक रीतीनें मी तसा ( विश्वरूप ) दिसेन. ६९१ मग काष्ठांत ( घर्षणानें ) अग्नि उत्पन्न झाल्यावर, काष्ठ हा शब्द नाहींसा होऊन, तें काष्ठच जसें मूर्तिमंत अग्नि बनतें; ६९२. अथवा जोंपर्यंत सूर्यानें उदय केला नाहीं, तोंपर्यंत आकाशच अंधार होऊन असतें, मग सूर्योदय झाल्यावर तें आकाशच एकसारखें प्रकाश होतें; ६९३. त्याप्रमाणें माझें प्रत्यक्ष दर्शन झाल्यावर अहंकाराची येरझार संपते आणि अहंकाराचा नाश झाल्यावर द्वैत जातें, हें लक्षांत ठेव. ६९४. मग मी, तो आणि सर्व ( विश्व ) हें एक मीच स्वभावतः आहे. फार काय सांगावें ? तो ऐक्यभावानें माझ्यामध्यें सामावला जातो. ६९५.

हे पांडवा, मत्प्रीत्यर्थ कर्म करणारा, मीच ज्याचें प्राधान्य आहे असा, माझा भक्त, संसारसंगरहित, सर्व भूतांचे ठिकाणीं मित्रभाव असलेला, असा जो पुरुष ( असेल ) तो मजप्रत येतो. ५५.

जो ( भक्त ) माझ्या एकट्याकरितांच शरीरानें कर्मे आचरतो आणि ज्याला जगामध्यें माझ्यावांचून दुसरें कांहीं चांगलें नाहीं, ६९६. ज्याचा इहपर लोक, हें सर्व केवळ मीच होऊन राहिलों आहे व ज्यानें आपलें जगण्याचें प्रयोजन माझीच प्राप्ति होणें, हेंच ठरविलें आहे. ६९७. तो प्राण्यांच्या कल्पनेची गोष्ट विसरला, कारण त्याच्या दृष्टीला माझ्याशिवाय दुसरा विषय नाहीं; म्हणून तो निर्वैर झाला. आतां तो सर्व ठिकाणीं मला ओळखून माझी भक्ति करतो. ६९८. अरे अर्जुना, असा जो भक्त आहे, त्याचें हें शरीर ज्या वेळीं पडतें त्यावेळीं तो मीच होऊन रहातो. ६९९. जगत उदरामध्यें असल्यामुळें दोंदील व करुणेच्या रसानें रसाळ, असे जे श्रीकृष्णदेव, ते याप्रमाणें बोलले, असें संजय ( धृतराष्ट्रास ) म्हणाला. ७००. असें श्रीकृष्ण बोलल्यानंतर तो अर्जुन आनंदरूपी धनानें थोर झाला आणि श्रीकृष्णाच्या चरणांचें सेवन करण्यांत जगामध्यें तोच एक चतुर होता. ७०१. त्यानें देवाच्या दोन्ही मूर्ति चित्तामध्यें चांगल्या न्याहाळून पाहिल्या, तेव्हां विश्वरूपापेक्षां कृष्णाच्या सगुण रूपामध्यें फायदा आहे, असें त्यास आढळून आलें. ७०२. परंतु त्याच्या या समजुतीला देवानें मान दिला नाहींच. कारण व्यापक रूपापेक्षां ( विश्वरूपापेक्षां ) एकदेशी रूप ( चतुर्भुजरूप ) बरें नव्हे, असें श्रीकृष्ण म्हणाले. ७०३. आणि हेंच ( चतुर्भुजरूपापेक्षां विश्वरूप बरें ही गोष्ट ) स्थापित करण्याकरितां एक दोन चांगल्या युक्ति श्रीकृष्ण दाखविते झाले. ७०४ त्या युक्ति ऐकून अर्जुन मनांत म्हणतो, या दोनही रूपांमध्यें कोणतें बरें आहे, तें देवाला आतां यापुढें विचारूं. ७०५. याप्रमाणें मनांत विचार करून आतां तो प्रश्न विचारण्याचा चांगला प्रकार स्वीकारील, ती कथा पुढें आहे ती ऐकावी. ७०६ निवृत्तिनाथांच्या पायांच्या कृपेनें ती कथा सोप्या अशा ओंवीछंदांत मजेनें सांगण्यांत येईल असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ७०७. मी शुद्ध भावनारूप ओंजळींत ओंव्यारूपी मोकळीं फुलें भरून विश्वरूपाच्या दोन्ही पायांवर अर्पण केलीं. ( असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ) ७०८.



जे हे अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत । भक्तियोगु समस्त । योगरूप ॥ ज्ञा. अ. १२-२२८

श्रीज्ञानदेवांनीं गीतेंतील अध्यायांची जी संगति लावली आहे, त्या दृष्टीनें या अध्यायांतील 'श्रेयोऽहि ज्ञानमभ्यासात्' या श्लोकापर्यंत उपासनाकांड असून 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' या श्लोकापासून पुढें पंधराव्या अध्यायाच्या समाप्तीपर्यंत ज्ञानकांड आलें आहे! म्हणून उपासनाकांड व ज्ञानकांड यांचा दुवा या दृष्टीनें या अध्यायास फार महत्त्व आहे. श्रीज्ञानदेवांची या अध्यायावरील टीका भक्तिमार्गी लोकांत अत्यंत प्रिय होऊन बसली आहे.

आपल्या गीतेवरील व्याख्यानास सुरवात करण्यापूर्वी आपल्या गुरूंच्या कृपादृष्टीला श्रीज्ञानदेव आईच्या प्रेमळ रूपकानें नमन करतात. पहिल्या दहा ओंव्यांत या अत्यंत प्रेमळ रूपकानें आई मुलाला जशी मांडीवर घेऊन वाढवते, त्याप्रमाणें श्रीगुरु आपल्या शिष्यास साधनांत मदत करून, त्यास वेगवेगळे अनुभव आणून देऊन त्याची समाधीपर्यंत कसकशी वाढ करतात, हें श्रीज्ञानदेवांनीं सांगितलें आहे. नंतर आपल्या ग्रंथांत नवरसाचा उत्कर्ष व्हावा, साहित्य व अलंकार यांची रेलचेल असावी व नास्तिकपणा, वितंडवाद, कुतर्क यांचा विटाळही आपल्या सद्ग्रंथाला होऊं नये व शेवटीं श्रीकृष्णाच्या गुणानुवादांत आपण निरंतर रमून जावें, म्हणून श्रीनिवृत्तिनाथांना विनंति करतात. त्यांची आज्ञा मिळतांच अत्यंत उल्हसित अंतःकरणानें श्रीज्ञानदेवांनीं आपल्या व्याख्यानास सुरवात केली आहे. (१-१९).

मागील अध्यायांत भगवंतांनीं व्यक्त व अव्यक्त अशीं आपलीं दोन्हीं रूपें अर्जुनाला दाखविलीं; परंतु श्रीकृष्णाच्या सगुणरूपाचीच नित्य संवय असल्यामुळें अर्जुनाला तेंच अधिक पसंत पडलें व तें मला पुनः दाखवा, अशी अर्जुनानें मागल्या अध्यायाच्या शेवटीं शेवटीं विनवणीहि केली. जरी देवानें पुनः सौम्य रूप धारण केलें तरी देवाला अर्जुनाचें हें करणें मान्य नव्हतें म्हणून त्याच्या म्हणण्याप्रमाणें श्यामसुंदररूप दाखवितांना 'नेणसीच गांवढिया' वगैरे बोलले; तेव्हां देवाला व्यक्त व अव्यक्त रूपांतील श्रेष्ठत्वासंबंधीं पुनः प्रश्न विचारावा असें अर्जुनास वाटूं लागलें; पण देवाला तसें विचारलें तर पुनः देव रागावतील, म्हणून तसें न करतां 'व्यक्तोपासक व अव्यक्तोपासक या दोहोंमध्यें भगवंताला तत्त्वता कोणी जाणलें' अशा आडपडद्यानें मूळचाच प्रश्न देवाला त्यांनीं विचारला. देवही त्याची प्रश्न करण्याची खुबीदार पद्धत पाहून संतोषित होऊन उत्तर देतात. ( २०-३४ )

भगवान् म्हणतात अर्जुना, माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं सर्वेंद्रियांसहित मनाची मोहर लावून जे भक्त जीवाभावानें रात्रंदिवस मला भजतात ते भक्त मी श्रेष्ठ प्रतीचे मानतों. याचा अर्थ व्यक्तोपासक व अव्यक्तोपासक हे जर खरे भक्त असतील, तर मला पावतात. यामुळें सर्वत्र समदृष्टि ठेवून योगमार्गानें निराकार अव्यक्ताची उपासना करणारे मला प्राप्त होत नाहींत असें नाहीं. तेही मलाच पावतात ( ३५-५८ ); परंतु अव्यक्तोपासकापेक्षां व्यक्तोपासक हे चांगले. याचा अर्थ भक्तिपंथ फार सोपा असा आहे. त्या सगुणभक्तीच्या मार्गाला डावलून निर्गुण ब्रह्माचे ठिकाणीं आसक्ति धरून योगाचा जो मार्ग आहे, तो अत्यंत कठीण आहे; त्या कष्टामुळें अधिक कांहीं मिळतें असेंही नाहीं. पति मेल्यावर त्याच्याबरोबर अग्नींत सहगमन करण्यापेक्षांही तो मार्ग कष्टदायक आहे. सतीला तोच पति पुढल्या जन्मीं मिळण्याची तरी आशा असते, पण येथें तर सर्व निराकार शून्यच आहे. ( ५९-७५ )

भक्तिमार्गांत हे दुःखदायक कष्ट नाहींत. उलट त्या मार्गांत साधकाचें रक्षण करण्यास मी सदा तयार असतों. वर्णाश्रमधर्माप्रमाणें आपल्या वांट्याला आलेलीं कर्में यथासांग व फळासक्ति टाकून केलीं व शरीर, वाणी व मनानें होणारे व्यापार परमात्म्याप्रीत्यर्थ केले, तर माझी प्राप्ति त्याला अनायासें होते. असे भक्त मला पोटच्या मुलाप्रमाणें आवडतात व त्यांच्या योगक्षेमाचा सर्व भार माझेवर येऊन पडतो. आपल्या बाहुबळानें तरून जाण्यास ब्रह्मादिकांनाही कठीण अशा संसारसागरांतून त्यांना मी लीलेनें पार नेतों. जसा त्यांचा अधिकार तसा त्यांना उपाय दाखवितों. संसारी असतील त्यांना नामस्मरणाचा मार्ग व सडे असतील त्यांना ध्यानमार्ग दाखवून त्यांचा मी उद्धार करतों. म्हणून अर्जुना तूं या भक्तिमार्गाचें अवलंबन कर. ( ७६-९९ ).

(प्रथमतः भक्तीचें रहस्य सांगून एकापेक्षां एक सोप्या साधनाची दिशा दाखवितात.) निश्चय करणारी बुद्धि व संकल्पविकल्प करणारें मन हीं दोन्हीं माझ्या प्रेमानें भरून जाणें, याचें नांव भक्ति. मन व बुद्धि माझ्या प्रेमांत बुडून गेलीं म्हणजे देहाचा अभिमान घेणारी वृत्ति देहाला सोडून माझ्याकडेच येते; परंतु हें एकदम साध्य होणें सर्वांना शक्य नाहीं. त्याला हलके हलके सुरुवात करून मनाला त्याची गोडी लावून पुनः पुन्हां तीच गोष्ट करीत रहावें लागतें यालाच अभ्यास म्हणतात. या अभ्यासाच्या बळावर एन्हवीं असाध्य वाटणाऱ्या गोष्टीही साध्य होतात. (१००-११३).

परंतु जगतांत विषयासक्त पामर लोक आहेत, त्यांना रोजच्या दिवसांतील एक क्षण देखील देणें जमत नाहीं. त्यांच्याकरितां उपाय सांगतो. भोग टाकण्याचें ज्यांना जमणार नाहीं, त्यांनीं आपलीं कर्में फक्त यथाविधि करावीत. परंतु ज्यानें हें सर्व विश्व निर्मियलें आहे. त्याच्याच सत्तेनें हीं कर्में होत आहेत एवढी खूणगांठ अंतःकरणांत ठेवावी 'उदका नेले तिकडे जावें' अशा निराग्रही वृत्तीनें रहावयाचें हें यांत मुख्य आहे. (११४-१२४).

आपण कर्म करावयाचें, पण त्याचें कर्तृत्व व फल मात्र भगवंताला द्यावयाचें, हेंहि ज्यांना होणार नाहीं त्यांना सोपा उपाय सांगतात. अशांनीं भगवंताला कर्म जरी अर्पण केलें नाहीं तरी चालेल; पण मग तें त्यांनीं स्वतः मात्र घेऊं नये. जणूं काय तीं कर्में आपण केलींच नाहींत अशा वृत्तीनें राहिलें, तर तीं कर्में पुढील जन्मांत सुखदुःखांचा भोग देण्यास शिल्लक रहात नाहींत; कारण, यानें अनायासें श्रेष्ठ प्रतीचा योग साध्य होतो व एका जन्मानेंच सर्व जन्मांचें निवारण होतें. अशा रीतीनें अभ्यास, ज्ञान, ध्यान व कर्मफलत्याग अशा पायरी-पायरीनें जाऊन माझी सर्वश्रेष्ठ पूर्ण ब्रह्मस्थिति साधकाला प्राप्त होते (१२५-१४३).

(येथून ज्ञानकांडाला सुरुवात होत आहे) ही ब्रह्मस्थिति ज्यांनी प्राप्त करून घेतली, त्यांच्या ठिकाणीं अनेक उत्तमोत्तम लक्षणें वास करावयास येतात. त्यांपैकीं कांहीं ठळक लक्षणें सांगतों असें भगवान् म्हणतात. (एथपासून शेवटच्या श्लोकापर्यंत भगवंतांनीं जीं लक्षणें सांगितलीं त्यांचा अनुवाद ज्ञानदेवांनीं केला आहे व तो करतांना तीं लक्षणें प्राप्त होण्याचीं साधनेंही स्पष्ट करून निरनिराळ्या चढत्या व उत्कृष्ट उपमांनीं हा भाग नटविला आहे.)

परमात्म्याशीं ऐक्य झाल्यामुळें भक्ताचा आपपरभाव नाहींसा होऊन त्याच्या ठिकाणचा द्वेष नाहींसा होतो. सर्व प्राणीमात्राशीं त्याची मैत्री असते. त्यांच्यावर तो कृपाच करतो. त्याच्याकडून जगाला तर त्रास नसतोच पण जग उन्मत्त झालें तरी त्याचेवर तो रागावत नाहीं. जगाला क्षमाच करतो. अशा आत्मसाक्षात्कारी महात्म्याला कांहीं मिळविण्याचें शिल्लक राहिलें नसते; म्हणून आपणांस लाभ झाला काय अथवा हानि झाली काय, याची त्याला दादही नसते. सदा संतुष्ट, निरपेक्ष, द्वंद्वरहित अशी त्याची स्थिति असते. याला इतरांपासून कांहीं मिळवायचें राहिलें नसलें तरी त्याच्यापासून जगाचा फायदा आहे. कारण त्याला स्वतःचें करणें असें त्यानें शिल्लक ठेवलेलें नसते. पण स्वतः मुक्त होऊन भक्तीच्या द्वारां ती मुक्ति जगाला देणें हाच त्यांचा व्यवसाय होऊन रहातो. याच्या सहवासानें गंगादि तीर्थें पवित्र होतात. इतकेंच काय पण परिपूर्ण असा जो मी, तोही त्याच्या सगुणभक्तीनें इतका वेडा होतो कीं, त्याचा सहवास घडावा म्हणून माझी अचक्षु, अनेत्र, अहस्त, अपाणि अशी मूळस्थिति बाजूस ठेवून, साकार होऊन त्याच्या चहुंपुरुषार्थांहून श्रेष्ठ अशा भक्तिप्रेमाचें सुख मी भोगतों. हे भक्त तर मला प्राणापेक्षांही जास्त आवडतात. पण जे या अमृततुल्य भक्तिकथेचें श्रवण करतात व त्याप्रमाणें वागून त्याचा अनुभव घेतात, त्या भक्तदासांनाही मी श्रेष्ठ मानतों. (१४४-२३८).

भक्तांची ही प्रेमळ कथा अत्यंत आनंदित होऊन श्रीकृष्ण अर्जुनाला सांगत होते. ज्ञानदेवही त्या प्रसंगाचें वर्णन करतांना सगुणभक्तींत बुडून गेलेले आपणांस दिसतात. येथें उत्कृष्ट ज्ञान व सगुणावरील नितांत प्रेम यांचा संगम परमावधीला पोंचलेला त्यांच्या वक्तृत्वांत आपणांस उत्कटतेनें दिसतो. निर्मळ, लोककृपाळु, शरणागतप्रतिपाळ, सत्यसेतु इत्यादि विशेषणांच्या रत्नांनीं त्यांनीं आपलें श्रीकृष्णाचें व्याख्यान सजविलेलें पाहतांना 'श्रीकृष्ण गुणी मातें। सर्वत्र करी जो सरितें' ही प्रार्थना सफलित झालेली आपणांस दिसते; म्हणून संतांच्या चरणांच्या सेवेचें दान मागून त्यांनीं हा विषय संपविला आहे. (२३९-२४७).

# ज्ञानेश्वरी

## अध्याय बारावा

जयजय शुद्धे। उदारे प्रसिद्धे। अनवरत आनंदे। वर्षतिये ॥ १ ॥ विषयव्याळें मिठी। दिधलिया नुठी ताठी। ते तुझिये गुरुकृपादृष्टी। निर्विष होय ॥ २ ॥ तरि कवणातें तापु पोळी। कैसेनि वो शोकु जाळी। जरि प्रसादरसकल्लोळीं। पूरें येसि तूं ॥ ३ ॥ योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळे। सोऽहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं ॥ ४ ॥ आधारशक्तीचां अंकीं। वाढविसी कौतुकीं। हृदयाकाशपल्लकीं। परिये देसी निजे ॥ ५ ॥ प्रत्यक्ज्योतिची वोवाळणी। करिसी मनपवनांचीं खेळणीं। आत्मसुखाचीं बाळलेणीं। लेवविसी ॥ ६ ॥ सतरावियेचें स्तन्य देसी। अनाहताचा हल्लरु गासी। समाधिबोधें निजविसी। बुझाऊनि ॥ ७ ॥ म्हणोनि साधकां तूं माउली। पिके सारस्वत तुझां पाउलीं। या कारणें मी साउली। न संडीं तुझी ॥ ८ ॥ अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी। तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी। तो सकळ विद्यांचिये सृष्टी। धात्रा होय ॥ ९ ॥ म्हणोनि अंबे श्रीमंतें। निजजनकल्पलते। आज्ञापीं मातें। ग्रंथनिरूपणीं ॥ १० ॥ नवरसां भरवीं सागरु। करवीं उचित रत्नांचे आगरु। भावार्थाचे गिरिवरु। निफजवीं माये ॥ ११ ॥ साहित्य-सोनियाचिया खाणी। उघडवीं देशियेचिया आक्षोणी। विवेकवेलीची लावणी। हों देईं सैंघ ॥ १२ ॥ संवादफळनिधानें। प्रमेयाचीं उद्यानें। लावीं म्हणें गहनें। निरंतर ॥ १३ ॥ पाखांडाचे दरकुटे। मोडीं वाग्वादअव्हांटे। कुतर्कांचीं दुष्टें। सावजें फेडीं ॥ १४ ॥ श्रीकृष्णगुणीं मातें। सर्वत्र करीं वो सरतें। राणिवे बैसवी श्रोते। श्रवणाचिये ॥ १५ ॥ मऱ्हाटियेचां नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं। घेणें देणें सुखचिवरी। हों देईं या जगा ॥ १६ ॥ तूं आपुलेनि स्नेहपल्लवें। मातें पांघुरविशील सदैवें। तरि आतांचि हें आघवें। निर्मीन माये ॥ १७ ॥ इये विनवणीयेसाठीं। अवलोकिलें गुरु कृपादृष्टी। म्हणें गीतार्थेंसीं उठीं। न बोलें बहु ॥ १८ ॥ तेथ जी जी महाप्रसादु। म्हणोनि साविया जाला स्वानंदु। आतां निरोपीन प्रबंधु। अवधान दीजे ॥ १९ ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय बारावा

तूं शुद्ध आहेस. तूं उदार म्हणून प्रसिद्ध आहेस आणि अखंड आनंदाची वृष्टि करणारी आहेस. गुरुकृपादृष्टि माते, तुझा जयजयकार असो. १. विषयरूपी सर्पानें दंश केला असतां मूर्च्छा येते, ती कांहीं केल्या जात नाहीं. हे गुरुकृपादृष्टि, तुझ्या योगानें ती मूर्च्छा नाहींशी होते आणि सर्पदंश झालेल्या प्राण्याची त्या विषापासून सुटका होते. २. प्रसन्नतारूप पाण्याच्या लाटांची जर तुला भरती येईल, तर संसाराच्या त्रासाचे (अध्यात्मादि त्रिविध तापांचे) चटके कोणाला बसतील? व खेद कसा वरें जाळूं शकेल! ३. हे प्रेमळ माते, भक्तांना अष्टांगयोगाच्या सुखाचे भोग तुझ्यामुळें प्राप्त होतात व भक्तांची 'तें ब्रह्म मी आहें' अशा स्वरूपसिद्धीची प्राप्ति होण्याची हौस तूं पुरवितेस. (ती कशी पुरवितेस हें पुढें स्पष्ट करतात.) ४. आधारचक्रावर असलेल्या कुंडलिनीच्या मांडीवर तूं आपल्या भक्तांना कौतुकानें वाढवितेस व त्यांना झोंप येण्याकरितां हृदयाकाशरूपी पाळण्यांत घालून झोंके देतेस. ५. आत्मप्रकाशरूप ज्योतीनें साधकरूपी बालकांस ओंवाळतेस आणि मन व प्राण यांचा निरोधकरणेंरूपी खेळणीं त्यांच्या हातांत देतेस व स्वरूपानंदाचे लहान मुलांना घालावयाचे दागिने, साधकरूपी बालकांच्या अंगावर घालतेस. ६. सतरावी जीवनकलारूपी (व्योमचक्रांतील चंद्रामृतरूपी) दूध देतेस आणि अनाहत ध्वनींचें गाणें गातेस, आणि समाधीच्या बोधानें समजूत घालून (स्वरूपीं) निजवितेस. (स्थिर करतेस). ७. म्हणून साधकांना तूं आई आहेस व सर्व विद्या तुझ्या चरणांच्या ठिकाणीं पिकतात; म्हणून मी तुझा आश्रय सोडणार नाहीं. ८. हे सद्गुरूचे कृपादृष्टि, तुझ्या कृपेचा आश्रय ज्याला मिळेल, तो सर्व विद्यारूपसृष्टीचा (उत्पन्नकर्ता) ब्रह्मदेवच बनतो. ९. एवढ्याकरितां हे आपल्या भक्तांचा कल्पतरु व श्रीमंत अशा आई, तूं मला हा ग्रंथ सांगण्याला आज्ञा दे. १०. शांत, अद्भुतादि नवरसांचे समुद्र माझ्या भाषेत भरती आलेले रहातील, असें कर व (परमार्थनिरूपणास शोभतील अशा) योग्य अलंकाररूपी रत्नांची (माझें निरूपण हें) खाणच होऊन राहील, असें कर. हे माउली, (माझ्या या व्याख्यानांत) गीतेंतील मतलबाचे मोठमोठे पर्वत तयार होतील असें कर. ११. मराठी भाषारूपी पृथ्वीमध्यें अलंकाररूपी सोन्याच्या खाणी उघड आणि आत्मानात्मविचाररूपी वेलींची लावणी जिकडे तिकडे होऊं दे. १२. प्रश्नोत्तरचर्चारूपी फळांचे भार असलेले सिद्धांताचे दाट व विस्तीर्ण बगीचे निरंतर तयार कर, असें ज्ञानेश्वर महाराज (आपल्या गुरूंना) म्हणतात. १३. (माझ्या देशीभाषारूप पृथ्वीवर पुढील गोष्टी नकोत, असें ज्ञानेश्वर महाराज आपल्या गुरूंना म्हणतात.) नास्तिकपणारूपी दऱ्या व वितंडवादरूपी आडवाटा नाहींशा कर आणि कुतर्करूपी दुष्ट जनावरें हांकून दे. १४. श्रीकृष्णगुणाच्या वर्णनांत मला सर्वत्र समर्थ कर व श्रोत्यांना श्रवणाच्या राज्यावर बसव. १५. या मराठी भाषेच्या गांवांत आत्मज्ञानाची रेलचेल कर व या जगाला केवळ ब्रह्मसुखाचेंच घेणें-देणें होऊं दे. १६. हे श्रीगुरुरूपी माते, जर तूं आपल्या प्रेमरूपी पदरानें मला पांघरूण घालशील, तर आतांच मी हें सर्व उत्पन्न करीन. १७. या (ज्ञानेश्वर महाराजांच्या) विनवणीबरोबर गुरूंनीं त्यांस कृपादृष्टीनें पाहिलें व म्हणाले, 'गीतार्थ करावयास लाग. फार बोलूं नकोस.' १८. (असें गुरु बोलले,) तेव्हां ज्ञानेश्वर महाराजांस तत्काळ आनंद झाला, व ते म्हणाले, महाराज, आपण जी मला आज्ञा केली, ती मी आपला महाप्रसाद समजतों. तर आतां आपल्या आज्ञेप्रमाणें मी कथा सांगेन. आपण लक्ष देण्याची कृपा करावी. १९.

अर्जुन उवाचः—एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते । ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥१॥

तरी सकळवीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु । बोलता जाहला आत्मजु । पांडुनृपाचा ॥ २० ॥ कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज दाविलें । तंव नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें ॥२१॥ आणि ये कृष्णमूर्तीची सवे । यालागीं सोय धरिली जीवें । तंव नको म्हणोनि देवें । वारिलें मातें ॥ २२ ॥ तरि व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत । भक्ती पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥ या दोनी जी वाटा । तूतें पावावया वैकुंठा । व्यक्ताव्यक्त दारवंठां । रिगिजे येथ ॥ २४ ॥ पैं जे वानी श्यातुका । तेचि वेगळिया वाला येका । म्हणोनि एकदेशीया व्यापका । सरिसा पाडू ॥ २५ ॥ अमृताचां सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी । तेचि दे अमृतलहरी । चुळीं घेतलिया ॥ २६ ॥ हे कीर माझां चित्तीं । प्रतीति आथि जी निरुती । परि पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥ जें देवां तुम्हीं नावेक । अंगिकारिलें व्यापक । तें साचाचि कीं कवतिक । हें जाणावया ॥ २८ ॥ तरि तुजलागीं कर्म । तूंचि जयांचें परम । भक्तीसी मनोधर्म । विकोनि घातला ॥ २९ ॥ इत्यादि सर्वोपरी । जे भक्त तूतें हरी । बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥ ३० ॥ आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसि जें कानडें । कायिसयाहि सांगडें । नव्हे जें वस्तु ॥ ३१ ॥ तें अक्षर जी अव्यक्त । निर्देश देशरहित । सोहंभावें उपासित । ज्ञानिये जें ॥ ३२ ॥ तयां आणि जी भक्तां । येरयेरांमाजीं अनंता । कवणें योगु तत्त्वता । जाणितला सांगा ॥ ३३ ॥ इया किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला । म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥

श्रीभगवानुवाच—मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते । श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

तरि अस्तुगिरीचां उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं । रश्मी जैसे किरीटी । संचरती ॥ ३५ ॥ वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता । तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥ परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु । तिये गंगेचिये ऐसा पडिभरु । प्रेमभावा ॥ ३७ ॥ तैसें सर्वेंद्रियांसहित । मजमाजीं सूनि चित्त । जे रातिदिवो न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥ यापरी जे भक्त । आपणपें मज देत । तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥३९॥

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते । सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥

आणि येर तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा । झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥ ४० ॥ मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे । इंद्रिया कीर जोगें । काइ



वृक्ष कां वेली । लोटती फळें आलीं ॥
तैसी सांडी निपजलीं । कर्मे सिद्धें ॥

—ज्ञानेश्वरी अध्याय १२, ओवी १२९

अर्जुन म्हणाला, याप्रमाणें सतत ( तुझ्या व्यक्त स्वरूपाचे ठिकाणीं ) युक्त असलेले जे भक्त तुझी उपासना करतात, आणि जे अव्यक्त अशा अक्षर ब्रह्माची उपासना करतात, त्या ( दोन प्रकारच्या ) योग्यांपैकीं उत्तम योगी कोणते ? १.

तरी सर्व वीरांचा सार्वभौम राजा व सोमवंशाच्या ( चंद्रवंशाच्या ) विजयाचा ध्वज व पंडुराजाचा मुलगा जो अर्जुन, तो बोलता झाला. २०. मग अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, ऐकलें महाराज. आपण मला विश्वरूप दाखविलें, तेव्हां तें विश्वरूप अपूर्व म्हणून माझें चित्त भ्यालें. २१. आणि ( मला ) या श्रीकृष्णाच्या सगुण रूपाची संवय आहे, म्हणून मनानें त्याचाच आश्रय केला. तों सगुण मूर्तीवर प्रेम ठेवणें चांगलें नाहीं, म्हणून तेथें प्रेम ठेवूं नकोस, असें देवांनीं ( आपण ) मला बजावलें. २२. तर व्यक्त रूपानें अथवा अव्यक्त रूपानें तूंच एक आहेस, याविषयीं संशय नाहीं. भक्तीनें व्यक्त स्वरूपाची व योगानें अव्यक्तस्वरूपाची प्राप्ति होते, २३. हे वैकुंठा, व्यक्त व अव्यक्त असा जो तूं, त्या तुझ्या उंबऱ्यांत सोडणारे, ( म्हणजे निखालस ) तुला प्राप्त करून देणारे, भक्ति व योग हे दोन मार्ग आहेत. २४. परंतु जो कस शंभरभार सोन्याच्या लगडीला असतो तोच कस त्या लगडींतील वेगळ्या काढलेल्या एका वालभर सोन्याला असतो. म्हणून मर्यादित व व्यापक यांची योग्यता सारखी आहे. २५. अमृताच्या समुद्रामध्यें जी सामर्थ्याची थोरवी आढळून येते, तीच थोरवी त्या अमृतसमुद्राच्या लाटेंतील एक चुळकाभर अमृत प्यालें असतां प्राप्त होते. ( त्याप्रमाणें व्यक्त रूप जरी परिच्छिन्न आहे व अव्यक्त रूप हें जरी व्यापक आहे, तरी तीं दोन्हीं रूपें एकाच योग्यतेचीं आहेत. ) २६. महाराज, माझ्या चित्तांत हाच ( व्यक्त व अव्यक्त हीं दोन्ही रूपें एकच आहेत ) खरोखरीं निश्चयें करून अनुभव आहे, परंतु योगेश्वरा, आपल्याला विचारावयाचें तें एवढ्याचकरितां कीं, २७. हे श्रीकृष्णा, तुम्ही जी मागें क्षणभर व्यापकरूपाची ग्राह्य म्हणून शिफारस केलीत, तें तुमचें प्रतिपालन खरोखर मनापासूनचें आहे किंवा तो एक तुम्हीं क्षणभर केलेला विनोद आहे, हें नीट समजून यावें, म्हणून ( मी आपल्यास खुलासा विचारीत आहें. ) २८. तरी जे भक्त तुझ्या प्राप्तीकरितां कर्म करितात व तूं ज्यांची परमगति आहेस व ज्यांनीं आपले सर्व संकल्प तुझ्या भक्तीला विकल्यासारखे वाहिले आहेत. २९. हे कृष्णा, या व अशाच इतर सर्व प्रकारांनीं, जे भक्त तुला आपल्या अंतःकरणांत दृढ धारण करून तुझी उपासना करतात; ३०. आणि जी वस्तु ओंकारापलीकडे आहे व वैखरी नांवाच्या वाचेस जी दुर्बोध आहे व जी वस्तु कशाही सारखी नाहीं, ३१. ती वस्तु अविनाशी व इंद्रियांना विषय न होणारी आहे, ती वस्तु दाखवितां येण्याजोगी नाहीं व ती देशानें मर्यादित नाहीं, अशी आहे; अशा वस्तूची जे ज्ञानी, 'ती वस्तु मी आहें' अशा भावनेनें उपासना करतात, ३२. महाराज, असे ते वर सांगितलेले योगी व भक्त, या दोहोंपैकीं कोणी एकानें हे अनंता खरोखर योग जाणला, सांगा बरें ? ३३. या अर्जुनाच्या बोलण्यानें ते जगद्बंधु श्रीकृष्ण परमात्मा संतुष्ट होऊन म्हणाले, 'अरे अर्जुना, तूं प्रश्न करण्याचें चांगलें जाणतोस.' ३४.

श्रीकृष्ण म्हणाले, माझे ठिकाणीं मन ठेवून, नित्ययुक्त होत्साते, अतिशय श्रद्धेनें युक्त असे जे माझी उपासना करतात, ते सर्वांत उत्कृष्ट योगी मी समजतों. २.

तर अर्जुना, अस्ताचलाच्या समीप सूर्य गेल्यानंतर सूर्यबिंबामागून जशीं किरणें जातात, ३५. अर्जुना, त्याप्रमाणें पावसाळ्यांत नदीचें पाणी रोज वाढूं लागतें, त्याप्रमाणें माझें भजन करीत असतांना माझ्या भक्तांचें मजविषयींचें प्रेम नित्य नवें ( वाढणारें ) दिसतें. ३६. परंतु गंगा नदी समुद्रास प्राप्त झाल्यानंतरही जसा (तिच्या) मागील पाण्याचा अनिवार लोट येत राहतो, त्या गंगेच्यासारखे ज्याच्या प्रेमभावाला आधिक्य असतें, ३७. तसेंच रात्र आणि दिवस असें कांहीं न म्हणतां, सर्व इंद्रियांसहित माझ्या स्वरूपीं दृढ अंतःकरण ठेवून माझी उपासना करतात. ३८. याप्रमाणें जे भक्त मला आपला आत्मभाव देतात, त्यांनाच मी श्रेष्ठ प्रतीचे योगयुक्त मानतों. ३९.

तथापि, जे अक्षर, अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य, अविकारी, अचल, ध्रुव, ३.

आणि अर्जुना, याशिवाय दुसरे ( निर्गुण उपासक ) जे 'तें ब्रह्म मी आहें' अशी दृढ भावना करून अवयवरहित व अविनाश अशा ब्रह्माला धरावयास पाहतात; ४०. ज्या ब्रह्माचे ठिकाणीं मनाचा प्रवेश होत नाहीं, आणि बुद्धीची दृष्टि जेथें प्रवेश करीत नाहीं, तें इंद्रियांना

होईल ॥ ४१ ॥ परि ध्यानाही कुवाडें । म्हणोनि एके ठायीं न संपडे । व्यक्तीसि माजिवडें । कवणेही नोहे ॥ ४२ ॥ जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें । जें पावूनि चिंतवणें । हिंपुटी जाइलें ॥ ४३ ॥ जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे । ऐसें म्हणोनि उपाये । उपजतीचिना ॥ ४४ ॥ जें चळे ना ढळे । सरे ना मैळे । तें आपुलेनिचि बळें । आंगविलें जिहीं ॥ ४५ ॥

संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः । ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें । अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६ ॥ मग संयमाची धाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं । इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचां ॥ ४७ ॥ अपानींचिया कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा । मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८ ॥ आशेचे लाग तोडिले । अधैर्याचें कडे झाडिले । निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥ ४९ ॥ वज्राग्रीचां ज्वाळीं । करूनि अपानधातूंची होळी । व्याधींचां सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥ ५० ॥ मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा । तया चोजवलें प्रभा । निमथावरी ॥ ५१ ॥ नवद्वारांचां चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी । उघडली खिडकी । ककारांतींची ॥ ५२ ॥ प्राणशक्तिचामुंडे । प्रहारूनि संकल्पमेंढे । मनोमहिषाचेनि मुंडें । दिधलीं बळी ॥ ५३ ॥ चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनाहताची सुडावणी । सतरावियेचें पाणी । जिंतिलें वेगें ॥ ५४ ॥ मग मध्यमामध्यविवरें । तेणें कोरिवें दादरें । ठाकिलें चवरें । ब्रह्मरंध्रींचें ॥ ५५ ॥ वरी मकारांत सोपन । तें सांडोनिया गहन । काखे सूनियां गगन । भरलें ब्रह्मीं ॥ ५६ ॥ ऐसेन जे समबुद्धी । गिळावया सोहंसिद्धी । आंगविताति निरवधी । योगदुर्गें ॥ ५७ ॥ आपुलिया साटोवाटी । शून्य घेती उठाउठी । तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥ ५८ ॥ वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे । ऐसें नाहीं आगळें । कष्टचि तया ॥ ५९ ॥

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

जिहीं सकळभूतांचां हितीं । निरालंबीं अव्यक्तीं । पसरलिया आसक्ती । भक्तीवीण ॥ ६० ॥ तयां महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें । आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥ कामक्रोधांचे विलग । उठावती अनेग । आणि शून्येंसीं आंग । झुंझवावें कीं ॥ ६२ ॥ ताहाने ताहानाचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वावीं । मवावा वारा ॥ ६३ ॥ उन्निद्रेयाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें । झाडासि साजणें । चाळावें गा ॥ ६४ ॥ शीत वेढावें । उष्ण पांघुरावें । वृष्टीचिया असावें । घराआंतु ॥ ६५ ॥ किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा । भातारेंवीण करावा । तो हा योगु ॥ ६६ ॥ एथ स्वामीचें काज । ना बापिकें व्याज । परि मरणेंसीं झुंझ । नीच नवें ॥ ६७ ॥ ऐसें मृत्यूहूनि तिख ।

खरोखर गोचर होईल काय ? ४१. परंतु जें ब्रह्म एका ठिकाणीं न सांपडल्यामुळेंच व कोणत्याही आकारांत तें येत नसल्यामुळें, जें ध्यानालाही कठीण आहे, ४२. जी वस्तु सर्व ठिकाणीं, सर्व रूपानें व सर्व कालीं असते, त्या स्वरूपाचें ध्यान करण्याकरितां गेलें असतां, ती चिंतन करण्याची क्रिया, तेथें आपला कांहीं लाग न लागल्यामुळें खजील होते, ४३. जी वस्तु उत्पन्न होत नसून, नाशही पावत नाहीं व जी वस्तु नाहीं असेंही नाहीं व आहे असेंही नाहीं; व जी वस्तु अशी असल्यामुळें जिच्या प्राप्तीविषयीं साधनें संभवतच नाहींत. ४४. जें चळत नाहीं व हालत नाहीं, जें संपत नाहीं व मळत नाहीं, तें (ब्रह्म) आपल्या बळानेंच ज्यांनीं स्वाधीन करून घेतलें आहे. ४५.

अशा ब्रह्माची, इंद्रियसमुदायांचें नियमन करून सर्वत्र समान बुद्धि ठेवणारे व सर्वभूतांचे हित त्यामध्यें रत असणारे, उपासना करतात, ते देखील माझ्याप्रतच येतात. ४.

(ज्यांनीं) वैराग्यरूपी मोठ्या अग्नीनें विषयांचीं सैन्यें जाळून त्या योगानें होरपळलेलीं इंद्रियें धैर्यानें आवरून धरिलीं; ४६. मग इंद्रियांस (निग्रहाच्या) पाशांत घालून उलट फिरविलें (म्हणजे अंतर्मुख केलें) व अशा तऱ्हेनें त्यांस हृदयाच्या कपाटांत कोंडलें. ४७. हे सुजाण अर्जुना, गुदद्वाराला आसनमुद्रा लावून मूळबंधाचा किल्ला तयार केला. ४८. आशांचे संबंध तोडून टाकिले, भित्रेपणाचे कडे ढासळून दिले आणि निद्रारूपी अंधार नाहींसा करून टाकला. ४९. वज्राग्नीच्या ज्वाळानें अपानरूप धातूंची होळी करून, रोगरूपी मुंडक्यांनीं प्राणायामरूपी तोफा पुजिल्या. ५०. मग कुंडलिनीची मशाल आधारचक्रावर उभी केली व तिच्या प्रकाशानें ब्रह्मरंध्रापर्यंत मार्ग समजला. ५१. शरीरांतील नवही द्वारांच्या कवाडावर संयमाचा अडसर घालून सुषुम्ना नाडीचे मुख उघडलें. ५२. प्राणशक्तिरूपी चामुंडा देवीला संकल्परूपी मेंढे मारून ते व मनोरूपी महिषाचें मस्तक, हे बळी दिले. ५३. इडा व पिंगळा नाड्यांचा सुषुम्नेंत प्रवेश करून अनाहत शब्दांचा गजर खुला केला व चंद्रामृत त्वरेनें जिंकून घेतलें. ५४. मग सुषुम्ना नाडीच्या मधील कोरीव अशा विवररूपी दादरावरून ब्रह्मरंध्राचें शिखर प्राप्त करून घेतलें. ५५ व शिवाय आज्ञाचक्ररूप अथवा ओंकाराची तिसरी मात्रा जो मकार, त्या मकाररूपी जिन्याचा बिकट शेवट जे चढून जातात व मूर्ध्न्याकाशाला बगलेंत मारून ब्रह्माशीं ऐक्याला पावतात. ५६. अशा प्रकारें सर्वत्र सारखी बुद्धि ठेवलेले जे असतात, ते सोऽहंसिद्धि (मी ब्रह्म अशी भावना) काबीज करण्याकरितां योगरूपी अमर्याद किल्ले स्वाधीन करून घेतात. ५७. आपल्याला मोबदल्यांत देऊन त्वरित शून्य (निराकार ब्रह्म) घेतात, तेही अर्जुना मलाच पावतात. ५८. एऱ्हवीं योगाचरणाच्या जोरावर विशेष कांहीं लाभ होतो, असें मुळींच नाहीं. त्यांत करणाऱ्याला अधिक कांहीं मिळत असेल, तर जास्त श्रममात्र त्याच्या पदरांत पडतात. दुसरें कांहीं नाहीं. ५९.

अव्यक्त ब्रह्माचे ठिकाणीं ज्यांचें चित्त आसक्त आहे त्यांना अधिक क्लेश असतो. कारण, देहधाऱ्यांना अव्यक्त ब्रह्माच्या प्राप्तीचा मार्ग कष्टानें साध्य होतो. ५.

सगुणाच्या भक्तीस डावलून निराश्रय निर्गुण, आणि सर्व प्राण्यांचें मूर्तिमंत हितच, असें जें ब्रह्म, त्या ब्रह्माची प्राप्ति होण्याकरितां ज्या योग्यानें त्या ठिकाणीं आसक्ति धरलेली असते, ६०. त्यास (त्या योग्यास) इंद्रपदादि पदें वाटमारेपणा करीत असून (म्हणजे इंद्रपदादि स्थानें आपणास प्राप्त व्हावीं, अशी घातक इच्छा त्यांना उत्पन्न होऊन) ऋद्धिसिद्धीपासून उत्पन्न होणारीं सुखदुःखें त्या योग्याच्या ब्रह्मप्राप्तीच्या आड पडून रहातात. ६१. कामक्रोधांचे अनेक उपद्रव उद्भवतात व निराकाराबरोबर शरीर लढवावें लागतें. ६२. तहानेनें तहानच प्यावी, भूक लागली असतां भूकच खावी आणि रात्रंदिवस वाऱ्यांनीं वारा मोजावा. ६३. जेथें जागणें हेंच निजणें, इंद्रियांचा निरोध करणें हेंच विषयांचें प्रशस्त भोगणें आणि अरे, झाडाबरोबर बोलणें हेंच मित्राबरोबर बोलणें होय. ६४. थंडी नेसावी, ऊन पांघरावें आणि पावसाच्या घरांत असावें. ६५. अर्जुना, फार काय सांगावें ! हा योग करणें, म्हणजे नवऱ्यावांचून नित्य नवा अग्निप्रवेश करणें (सती जाणें) आहे. ६६. या योग करण्याचे कामांत नवऱ्याचें (नवऱ्याबरोबर सती गेले असतां जसा पुढें तोच नवरा मिळतो, तसें नवरा मिळण्याचें) काम नाहीं, अथवा कांहीं (कुलाचारानिमित्त योगासारखे कष्ट सोसावे असें) कुलाचाराचें निमित्तही नाहीं, परंतु मरणाबरोबर नित्य नवी लढाई आहे, ६७. याप्रमाणें योगाचें दुःख मृत्यूहून तीक्ष्ण आहे अथवा

कां घोंटे कढत विख । डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ॥ ६८ ॥ म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाचि वाटा । भागा आला ॥ ६९ ॥ पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया पडती खाणें । तैं पोट भरणें कीं प्राणें । शुद्धी म्हणों ॥ ७० ॥ म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथि केंही । कां गगनामाजीं पाईं । खोलिजतु असे ॥ ७१ ॥ वळघलिया रणाची थाटी । आंगीं न लगतां काठी । सूर्याची पाउटी । कां होय गा ॥ ७२ ॥ यालागीं पांगुळा हेवा । नव्हे वायूसि पांडवा । तेवीं देहवंता जीवां । अव्यक्तीं गति ॥ ७३ ॥ ऐसाही जरी धिंवसा । बांधोनियां आकाशा । झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥ म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा । जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥ ७५ ॥

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः । अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्मे अशेखें । जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥ ७६ ॥ विधीतें पाळित । निषेधातें गाळित । मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ ७७ ॥ ययापरी पाहीं । अर्जुना माझां ठाईं । संन्यासूनि नाहीं । करिती कर्मे ॥ ७८ ॥ आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव । तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥ ७९ ॥ ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर । ध्यानमिषें घर । माझें झाले ॥ ८० ॥ जयांचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी । भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ८१ ॥ ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें । तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करीं ॥ ८२ ॥

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् । भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥ ८३ ॥ तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां । कळिकाळ नोकोनियां । घेतला पटा ॥ ८४ ॥ एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ ८५ ॥ तैसे ते माझें । कलत्र हें जाणिजे । कायिसेनिही न लाजें । तयांचेनि मी ॥ ८६ ॥ जन्ममृत्यूचां लाटीं । झळंबती इया सृष्टी । ते देखोनियां पोटीं । ऐसें जाहलें ॥ ८७ ॥ भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे । येथ जरी कीं माझे । बिहिती हन ॥ ८८ ॥ म्हणोनि गा पांडवा । मूर्तींचा मेळावा । करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ ८९ ॥ नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं । तारू जाहलों ॥ ९० ॥ सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले । परिग्रही घातले । तरियावरी ॥ ९१ ॥ प्रेमाची पेटी । बांधली एकाचां पोटीं । मग आणिले तटीं । सायुज्याचां ॥ ९२ ॥ परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे । वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥ म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता । तयातें समुद्धर्ता । आथि मी सदा ॥ ९४ ॥ आणि जेव्हांचि का भक्तीं । दिधली चित्तवृत्ती । तेव्हांचि मज सूती । तयांचिये नाटीं ॥ ९५ ॥

कढत विष पिववेल काय ? डोंगर गिळतांना मुख फाटणार नाहीं काय ? ६८. म्हणून अर्जुना, या योगाच्या वाटेनें माझी प्राप्ति करून घेण्याकरितां जे निघाले, त्यांच्या वांट्याला दुःखाचाच भाग आला. ६९. असें पहा कीं, जेव्हां बोचऱ्या माणसास लोखंडाचे चणे खाण्याचा प्रसंग येतो, तेव्हां तें त्याचें पोट भरणें म्हणावें, कीं प्राणाशीं त्याचा वियोग म्हणावा ? ७०. म्हणून बाहूंनीं समुद्र तरून जाणें, हें कोठें ( शक्य ) आहे काय ? अथवा आकाशांत पायानें चालणें होतें काय ? ७१. युद्धाच्या गर्दींत गेल्यावर अंगाला काठीचा घाव न लागतां सूर्याची पायरी करून ( सूर्यमंडळाचा भेद करून ) जातां येईल काय ? ७२. म्हणून अर्जुना, ज्याप्रमाणें पांगळ्याला वायूशीं स्पर्धा करतां येणार नाहीं, त्याप्रमाणें शरीरधारी जीवांची अव्यक्ताच्या ( निर्गुण ब्रह्माच्या ) ठिकाणीं गति नाहीं. ७३. असें असूनही जर ते जीव धैर्य धरून निर्गुणाचाच पिच्छा पुरवतील, तर ते दुःखाला प्राप्त होतील. ७४. म्हणून अर्जुना, याहून दुसरे जे भक्तिमार्गाला लागले ते हें दुःख जाणतच नाहींत. ७५.

पण, हे पार्था, जे सर्व कर्में मला अर्पण करून मत्पर होत्साते अनन्य योगानें ( भक्तीनें ) माझें ध्यान करीत उपासना करतात. ६.

( येथून भक्तिमार्गाला लागलेल्या पुरुषाचें वर्णन करितात. ) त्या भक्तिमार्गाला लागलेल्या पुरुषाचीं कर्मेंद्रियें हीं वर्णाश्रमधर्मानुसार सर्व कर्में आनंदानें करीत असतात. ७६. ते पुरुष शास्त्रानें सांगितलेल्या आज्ञांचें पालन करितात व शास्त्रानें मनाई केलेलीं कर्में ते करीत नाहींत व केलेल्या कर्मांचीं फळें, तीं कर्में मला अर्पण करून, जाळून टाकतात. ७७. अर्जुना, याप्रमाणें माझ्या ठिकाणीं कर्मांचा त्याग करून ( कर्में मला अर्पण करून ) ते कर्में नाहींशीं करितात. ७८. आणखी ज्या ज्या म्हणून कांहीं शरीराच्या, वाणीच्या व मनाच्या क्रिया असतात, त्या सर्वांची प्रवृत्ति माझ्याशिवाय दुसरीकडे नसते. ७९. असें जे माझ्या ठिकाणीं गढून माझी निरंतर उपासना करतात व जे माझें निरंतर ध्यान करितात व त्या ध्यानाच्या निमित्तानें जे माझें घर झाले आहेत; ८०. ज्यांच्या प्रेमानें माझ्याशीं देवघेव केलेली असते व ऐहिक व पारत्रिक भोग व मोक्ष, या अशाम्या दीन आहेत असें समजून, त्यांचा त्याग केलेला असतो. ८१. याप्रमाणें एकनिष्ठ भक्तीनें जीव, शरीर व मन, यांसह जे मला विकलेले असतात, त्यांचे काय एक मी करतों म्हणून सांगूं ? कारण, सर्वच मी करतों. ८२.

त्या माझ्या ( सगुण स्वरूपाच्या ) ठिकाणीं ज्यांनीं चित्त ठेविलें आहे, अशांना मी अल्पकाळांत मृत्यु व जन्मरूपी संसारसागरामधून वर काढतों. ७.

फार काय सांगावें ! अर्जुना, जो आईच्या पोटीं जन्म घेतो, तो आईचा किती आवडता असतो बरें ! ८३. त्याप्रमाणें माझे भक्त ज्या स्थितींत असतील, त्या स्थितींत मी त्यांच्यावर प्रेम करतों व कळिकाळाचा पराभव करून त्यांस मी आपल्या पदरांत घेतों. ८४. सहज विचार करून पाहिलें तर, ( कोणीही ) एकदां माझा भक्त म्हणून ठरला, मग त्यास संसाराच्या काळजीची गोष्ट कशाला ? सांग. राजाचे कुटुंबास भीक मागण्याचें कारण पडेल काय ? ८५. त्याप्रमाणें ते भक्त माझें कुटुंब आहेत असें समजावें. त्यांचें कोणतेंही पडलेलें काम करण्यांत मला कमीपणा वाटत नाहीं. ८६. जन्ममृत्यूच्या लाटांत हें जग गटांगळ्या खात असलेलें पाहून, माझ्या पोटांत असा विचार आला. ८७. संसारसागराच्या खवळण्यानें कोणास भय उत्पन्न होणार नाहीं ? या योगानें ( संसारसागराच्या क्षोभानें ) माझे भक्त कदाचित् भितील; ८८ म्हणून अर्जुना, सगुणरूप धारण करून, भक्तांच्या गांवाला मी धांवत आलों. ८९. माझीं हजारों नांवें, हाच कोणी नावा, त्या तयार करून संसारसागरांतून भक्तांना तारणारा मी नावाडी झालों, असें समज. ९०. जे भक्त एकटे ( अंतर्बाह्य परिग्रहरहित ) आहेत असे पाहिले, त्यांस ( माझे ) ध्यानरूपी कांसेला लाविलें व जे कुटुंबवाले त्यांना नामरूपी नावेवर बसविलें ९१. एकाच्या पोटीं प्रेमाची पेटी बांधली आणि मग त्यांस मोक्षाच्या कांठावर आणिलें. ९२. परंतु जे माझे भक्त असे ( माझ्या दृष्टीनें ) ठरलेले आहेत, मग ते ( गजेंद्रासारखे ) चार पायांचीं जनावरें वगैरे का असेनात, पण त्या सर्वांस वैकुंठाच्या राज्यास योग्य केलें. ९३. म्हणून माझ्या भक्तांना एकही चिंता नाहीं. कारण त्यांचा मी नेहमीं उद्धार करणारा तयार आहें. ९४ आणि जेव्हां भक्तांनीं ( आपली ) चित्तवृत्ति मला दिली, त्या वेळीं त्यांनीं मला ( आपल्या ) छंदांत घातलें. ९५.

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय । निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

याकारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया । कीजे जे यया । मार्गा भजिजे ॥९६॥ अगा मानस हें एक । माझां स्वरूपीं वृत्तिक । करूनि घाली निष्टंक । बुद्धिनिश्चयेंसी ॥ ९७ ॥ इयें दोनी सरिसीं । मजमाजीं प्रेमेंसीं । रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ॥ ९८ ॥ जे मन बुद्धि इहीं । घर केलें माझां ठायीं । तरि सांगें मग काई । मी तूं ऐसें उरे ॥ ९९ ॥ म्हणोनि दिवा पालवे । सवेंचि तेज मालवे । कां रविबिंबासवें । प्रकाशु जाय ॥ १०० ॥ उचल-लेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं । तैसा मनोबुद्धिपाशीं । अहंकारु ये ॥ १ ॥ म्हणोनि माझां स्वरूपीं । मनबुद्धि इयें निक्षेपीं । येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ॥ २ ॥ यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं । आपली आण पाहीं । वाहतु असें गा ॥ ३ ॥

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् । अभ्यासयोगेन ततो मामिच्छाऽऽप्तुं धनंजय ॥ ९ ॥

अथवा हें चित्त । मनबुद्धीसहीत । माझां हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥ ४ ॥ तरि गा ऐसें करीं । यां आठां पाहारांमाझारीं । मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥ ५ ॥ मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख । तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥ ६ ॥ जैसा शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटु लागे । तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनी ॥ ७ ॥ मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें । हारपत अंवसे । नाहींचि होय ॥ ८ ॥ तैसें भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाजीं रिगतां । हळू हळू पांडुसुता । मीचि होईल ॥ ९ ॥ अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥ पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें । व्याघ्र सर्प प्रांजळे । केले एकीं ॥ ११ ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ १२ ॥ म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । यालागीं माझां ठायीं । अभ्यासें मिळ ॥ १३ ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव । मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

कां अभ्यासाही लागीं । कसु नाहीं तुझां आंगीं । तरी आहासी जया भंगीं । तैसाचि अस ॥ १४ ॥ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमानु न संडीं । स्वजातीचा ॥ १५ ॥ कुळधर्मु चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥ १६ ॥ परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये । तो मी करितु आहें । ऐसें न म्हणे ॥ १७ ॥ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ १८ ॥ उणयापुरेयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलां ठायीं । स्वजातीचि करूनि घेईं । जीवित हें ॥ १९ ॥ माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ १२० ॥ एऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां

माझ्या ठिकाणीं मन वृत्तिवंत करून घाल, माझ्या ठिकाणीं बुद्धि स्थिर कर. ( म्हणजे ) यापुढें तूं माझ्या ठिकाणीं निवास करशील ( मद्रूप होशील ) यांत संशय नाहीं. ८.

याकरितां हे भक्तश्रेष्ठा अर्जुना, या भक्तिमार्गाचें आचरण करावें, हा विचार पक्का लक्षांत ठेव. ९६. अरे अर्जुना, बुद्धीच्या निश्चयासह, तूं आपलें मन फक्त माझ्या स्वरूपीं अखंड वतनदार करून ठेव. ९७. बा अर्जुना, या दोघांनीं ( बुद्धि व मन यांनीं ) जर माझ्यामध्यें प्रेमानें बरोबर प्रवेश केला, तर तूं मला पावशील. ९८. कारण कीं, मन व बुद्धि हीं माझ्या ठिकाणीं कायमचीं राहिलीं तर मग, मी व तूं असें द्वैत उरेल काय ? सांग. ९९. म्हणून पदराच्या वाऱ्यानें दिवा मालवला असतां त्या दिव्याचें तेज ( जसें ) लागलीच नाहींसें होतें, अथवा सूर्यास्ताचे वेळीं त्या सूर्याच्या बिंबाबरोबर ( जसा ) प्रकाश जातो. १००. शरीरांतून प्राण निघाल्याबरोबर इंद्रियें जशीं त्याच्याबरोबर निघतात, त्याप्रमाणें जिकडे मन व बुद्धि जाईल, तिकडे त्यांच्याबरोबर अहंकार येतो. १०१. म्हणून माझ्या स्वरूपीं मन व बुद्धि हीं दोन्ही ठेव. एवढ्यानें सर्वव्यापी जो मी, तोच तूं होशील. १०२. अर्जुना, हें जें मी बोललों, यांत कांहीं अन्यथा नाहीं, असें मी आपली शपथ वाहून तुला सांगतों. १०३.

अथवा हे धनंजया, माझ्या ठिकाणीं चित्त स्थिर करण्याला समर्थ नसलास, तर ( चित्तैकाग्रतेचा अथवा ध्यानाचा ) अभ्यास करून माझी प्राप्ति करून घेण्याची इच्छा कर. ९.

अथवा जर मन बुद्धिसहित हें चित्त माझ्या हातीं अनुच्छिष्ट ( सकलवासनारहित असें संपूर्ण ) तूं देऊं शकणार नाहींस, १०४ तर अर्जुना, असें कर कीं, या आठ प्रहरांमध्यें थोडकेंसें निमिषभर चित्त देत जा. १०५. मग जितकें जितकें निमिष तुझें चित्त माझें सुख पाहील, तितकें तितकें तुझें चित्त विषयांचे ठिकाणीं अरुचि घेईल. १०६. ज्याप्रमाणें शरदृतुचा प्रवेश झाला असतां नद्यांचें पाणी कमी होऊं लागतें, त्याप्रमाणें तुझ्या चित्ताचा माझ्या स्वरूपांत जसजसा प्रवेश होईल, त्या मानानें तुझें चित्त प्रपंचापासून वेगानें निघेल. १०७. मग ज्याप्रमाणें पौर्णिमेपासून दिवसेंदिवस चंद्राचें बिंब कमी होत होत अमावास्येला अगदीं दिसेनासें होतें; १०८. त्याप्रमाणें भोगांतून तुझें चित्त निघून माझ्यामध्यें प्रवेश करतां करतां, अर्जुना, तें तुझें चित्त हळू हळू मद्रूप होईल. १०९. अरे, अभ्यासयोग जो म्हणतात, तो हाच एक आहे, असें समज. याच्या योगानें कोणतीही गोष्ट प्राप्त होणार नाहीं, असें नाहीं. ११०. अभ्यासाचे सामर्थ्यानें कित्येक आकाशाचे पोकळींत चालूं शकतात व कित्येकांनीं वाघ व साप यांसारखे दुष्ट प्राणी स्वाधीन करून घेतले. १११. विष खाण्याचा अभ्यास केला असतां, तें विषदेखील पचनीं पडतें. अभ्यासाच्या योगानें समुद्रावरून पायानें जातां येतें. कित्येकांनीं वेदांचा अभ्यास करून ते वेद आटोक्यांत आणले. ११२. म्हणून अभ्यासाला कोणतीही गोष्ट मुळींच कठीण नाहीं. याकरितां माझ्या स्वरूपीं तूं अभ्यासानें एकरूप हो. ११३.

अभ्यासयोगाला देखील असमर्थ असलास, तर सर्वस्वी माझ्याकरितां कर्में करणारा हो. माझ्याकरितां कर्में केलींस तरी देखील तूं सिद्धि मिळविशील. १०.

अथवा असा अभ्यास करण्याविषयीं सुद्धां जर तुझ्या अंगीं सामर्थ्य नसेल, तर हल्लीं ज्या स्थितींत तूं आहेस, त्या स्थितींत रहा. ११४. इंद्रियांचा निग्रह करूं नकोस, विषयभोगांना कमी करूं नकोस. आपल्या जातीचा अभिमान सोडूं नकोस. ११५. आपल्या कुळांतील आचारांचें आचरण कर व शास्त्रांनीं जीं कर्में करावीं असा विधि सांगितला आहे, तीं कर्में कर व जीं कर्में करूं नकोस, असा निषेध केला आहे, तीं कर्में करूं नकोस. एवढें तूं केलेस, म्हणजे सुखानें तुला वाटेल तसें वागावयास मोकळीक दिली आहे. ११६. परंतु मनानें, वाचेनें व देहानें, जसें जें कर्म होईल, तें कर्म मी करीत आहें, असें म्हणूं नकोस ११७. ( कारण ) ज्या परमेश्वराच्या सत्तेनें हें विश्व चाललें आहे, तोच कोणतीही गोष्ट करणें अथवा न करणें, हें सर्व जाणत आहे. ११८. कर्मांत कांहीं कमी अथवा पूर्ण झालें, तर त्याच्या संबंधानें तूं आपल्या चित्ताच्या ठिकाणीं कांहीं ( खंती अथवा संतोष ) उरूं देऊं नकोस. आणि तूं हें जीवित आपल्या जातीचें करून टाक म्हणजे आपला आयुष्यक्रम आपल्या जातीला योग्य अशीं कर्में करण्यांत घालव. ११९. अरे, माळ्यानें जिकडे नेलें, तिकडे कांहीं एक तक्रार न करतां जाणाऱ्या पाण्याप्रमाणें तुझें जीवित निरभिमानपणानें कर्में करणारें होऊं दे. १२०. अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर, आपला मार्ग सरळ आहे किंवा तो आडमार्ग आहे,

अव्हांटा। रथु काई खटपटा। करितु असे ॥ २१ ॥ म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती। इयें वोझीं नेघें मती। अखंड चित्तवृत्ती। आठवीं मातें ॥ २२ ॥ आणि जें जें कर्म निपजे। तें थोडें बहु न म्हणिजे। निवांतचि अर्पिजे। माझां ठायीं ॥ २३ ॥

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः। सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

ऐसिया मद्भावना। तनुत्यागीं अर्जुना। तूं सायुज्यसदना। माझिया ऐसी ॥ २४ ॥ ना तरी हेंही तुज। नेदवे कर्म मज। तरी गा तूं भज। पांडुकुमरा ॥ २५ ॥ बुद्धीचां पाठीं पोटीं। कर्माआदि कां शेवटीं। मातें बांधणें किरीटी। दुवाड जरी ॥ २६ ॥ तरि हेंही असो। सांडीं माझा अतिसो। परि संयतिसीं वसो। बुद्धि तुझी ॥ २७ ॥ आणि जेणें जेणें वेळें। घडती कर्में सकळें। तयांचीं तियें फळें। त्यजितु जाय ॥ २८ ॥ वृक्ष कां वेली। लोटती फळें आलीं। तैसीं सांडीं निपजलीं। कर्में सिद्धें ॥ २९ ॥ परि मातें मनीं धरावें। कां मजउद्देशें करावें। हें कांहीं नको आघवें। जाऊं दे शून्यीं ॥ १३० ॥ खडकीं जैसें वर्षलें। कां आगीमाजीं पेरिलें। कर्म मानीं देखिलें। स्वप्न जैसें ॥ ३१ ॥ अगा आत्मजेचां विषीं। जिवु जैसा निरभिलाषी। तैसा कर्मीं अशेषीं। निकामु होये ॥ ३२ ॥ वन्हीची ज्वाळा जैशी। वायां जाय आकाशीं। क्रिया जिरों दे तैसी। शून्यामाजीं ॥ ३३ ॥ अर्जुना हा फलत्यागु। आवडे कीर असलगु। परि योगामाजीं योगु। धुरेचा हा ॥ ३४ ॥ येणें फलत्यागें सांडे। तें तें कर्म न विरूढे। एकाचि वेळें वेळुझाडें। वांझें जैसीं ॥ ३५ ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते। ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥

तैसें येणेंचि शरीरें। शरीरा येणें सरे। किंबहुना येरझारे। चिरा पडे ॥ ३६ ॥ पैं अभ्यासाचां पाउटीं। ठाकिजे ज्ञान किरीटी। ज्ञानें येइजे भेटी। ध्यानाचिये ॥ ३७ ॥ मग ध्यानासि खेंव। देती आघवेचि भाव। तेव्हां कर्मजात सर्व। दूरी ठाके ॥ ३८ ॥ कर्म जेथ

याची वाटाघाट रथ केव्हां तरी करतो काय ? १२१. म्हणून कोणतेंही कर्म करण्याची प्रवृत्ति अथवा न करण्याची निवृत्ति, हीं ओझीं, तूं आपल्या बुद्धीवर घेऊं नकोस. तर तूं आपल्या चित्तवृत्तीनें, मी जो परमेश्वर, त्या मला निरंतर स्मर. १२२. आणि जें जें कर्म घडेल, तें कमी अथवा जास्त म्हणूं नकोस; तर तें निमूटपणानें माझ्या ठिकाणीं अर्पण कर. १२३.

मद्योगाचा आश्रय करून, माझ्या ठिकाणीं कर्मांचा संन्यास करण्यास देखील जर तूं असमर्थ असलास, तर नियतचित्त होत्साता सर्व कर्मफलाचा त्याग कर. ११.

अर्जुना, अशा माझ्या रूपाच्या अनुसंधानानें शरीरत्यागानंतर तूं सायुज्यमुक्तिरूप माझ्या घरीं येशील. १२४. अथवा, हेंही कर्म जर तुला मला देववत नसेल, ( म्हणजे मला अर्पण करवत नसेल. ) तर अर्जुना, ( आम्हीं तुला पुढें सांगतों तें ) तूं आचरण कर. १२५. बुद्धीच्या मागें व पुढें, व कर्मांच्या आरंभीं व शेवटीं, हे अर्जुना, मला बांधणें जर तुला कठीण वाटत असेल, ( अभिप्राय असा कीं, कर्मांची प्रेरणा करणाऱ्या बुद्धीचा प्रेरक परमात्माच आहे, असा विचार करणें, हें बुद्धीच्या पाठीमागें परमात्म्यास बांधणें होय; व तें कर्म झाल्यावर परमात्म्यालाच अर्पण करणें, योग्य आहे, असा बुद्धीनें निश्चय करणें, हेंच परमात्म्यास बुद्धीच्या पुढें बांधणें होय. आणि कर्म करण्याच्या अगोदर ज्या कर्तृत्वाच्या अभिमानानें कर्मास प्रारंभ होतो तें कर्तृत्व आपलें नसून खरोखर परमात्म्याचेंच आहे, अशा समजुतीनें कर्म करावयास लागणें, हें कर्मांच्या प्रारंभीं परमात्म्यास बांधणें होय; व आरंभिलेल्या कर्मांपासून मिळणारें फळ, त्या कर्माचें शेवटीं परमात्म्यास समर्पण करणें, हेंच कर्मांच्या शेवटीं परमात्म्यास बांधणें होय; याप्रमाणें बुद्धीच्या अगोदर व बुद्धीच्या शेवटीं व कर्मांच्या आरंभीं व कर्मांच्या शेवटीं मला परमात्म्याला त्यांत गोंवणें हें जर तुला कठीण वाटत असेल, ) १२६. तर हें देखील राहूं दे. माझ्याकरितां कर्म करून मला अर्पण करण्याचा जो विचार सांगितला, त्याविषयींचा आग्रहही एकीकडे राहूं दे. परंतु तुझी बुद्धि ( कर्मफलाविषयीं ) नियमयुक्त असूं दे. ( म्हणजे तूं आपल्या बुद्धींत कर्तृत्वमद व फलास्वाद घेऊं नकोस. ) १२७. आणि ज्या ज्या वेळीं कर्में घडतील, त्या त्या वेळीं त्यांचीं ( कर्मांचीं ) तीं सर्व फळें तूं टाकीत जा. १२८. झाडांस अथवा वेलींस आलेलीं फळें जशीं तीं झाडें व त्या वेली टाकून देतात, त्याप्रमाणें पूर्ण झालेलीं कर्में (तूं) टाकून दे, ( म्हणजे त्यांच्या फळांची आशा चित्तांत ठेवूं नकोस. ) १२९. परंतु मनामध्यें माझी आठवण करावी अथवा मला अर्पण करण्याच्या हेतूनें कर्म करावें. हें कांहीं नको, तर तें शून्यांत जाऊं दे. ( तूंही घेऊं नकोस व मलाही अर्पण करूं नकोस तर तें कर्म तसेंच रिकामें राहूं दे. ) १३०. खडकावर पडलेला पाऊस अथवा अग्नींत पेरलेलें बीं अथवा पाहिलेलें स्वप्न, हें जसें व्यर्थ असतें, त्याप्रमाणें सर्व कर्में व्यर्थ मान. १३१. अरे अर्जुना, आपल्या मुलीविषयीं जसा आपला जीव निष्काम असतो, त्याप्रमाणें सर्व कर्मांचे फलांविषयीं तूं निष्काम हो. १३२. अग्नीची ज्वाळा जशी आकाशांत व्यर्थ जाते, म्हणजे तिचा कांहीं परिणाम होत नाहीं, त्याप्रमाणें तुझ्याकडून होणारीं कर्में शून्यामध्यें जिरूं दे ( म्हणजे जणूंकाय तीं कर्में केलींच नाहींत, अशी तुझी चित्तवृत्ति असूं दे. ) १३३. अर्जुना, हा फलत्याग सोपा वाटतो खरा, पण सर्व योगांमध्यें हा योग श्रेष्ठ आहे. १३४. जसें वेळूचें झाड एक वेळ व्यालें म्हणजे पुनः वीत नाहीं, त्याप्रमाणें या फलत्यागानें जें जें कर्म टाकलें जातें, त्या त्या कर्मास पुनः अंकुर फुटत नाहीं. ( तें कर्म सुखदुःखाचा भोग देण्याकरितां पुढें जन्माला कारणीभूत होत नाहीं. ) १३५.

अभ्यासापेक्षां ज्ञान श्रेष्ठ आहे, ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ आहे, ध्यानापेक्षां कर्मफलत्याग श्रेष्ठ आहे आणि नंतर कर्मफलत्यागापेक्षांहि शांति श्रेष्ठ आहे. १२.

त्याप्रमाणें याच शरीरानें शरीराला येणें ( जन्माला येणें ) संपतें. फार काय सांगावें ? जन्ममरणाच्या खेपांवर दगड पडतो. (जन्ममरणाच्या खेपा बंद पडतात.) १३६. मग अर्जुना, अभ्यासाच्या ( वरील ९ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ) पायरीनें ज्ञान (परमेश्वराचें परोक्षज्ञान) प्राप्त करून घ्यावें व त्या ज्ञानाच्या योगानें ध्यानाच्या भेटीस यावें. (त्या ज्ञानानें माझ्या स्वरूपाचें ध्यान करावें.) १३७. मग सर्व भाव ( कायिक, वाचिक, मानसिक भाव ) ध्यानाला आलिंगन देतात म्हणजे ध्यानांत गढून जातात. त्या वेळेला कर्म मात्र जेवढें आहे, तें दूर रहातें. ( म्हणजे होत नाहीं. कारण कर्म करण्याचीं साधनें किंवा द्वारें जीं काया, वाचा व मन, तीं सर्व ध्यानांत गढून गेल्यामुळें, कर्म करण्यास जाग्यावर कोणीच नसतात; म्हणूनच कर्में होत नाहींत. ) १३८. फलाला उत्पन्न

दुरावे । तेथ फलत्यागु संभवे । त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ॥ ३९ ॥ म्हणोनि यावया शांति । हाचि अनुक्रम सुभद्रापती । अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥ १४० ॥ अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान । ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥ ४१ ॥ मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु । त्यागाहूनि भोगु । शांतिसुखाचा ॥ ४२ ॥ ऐसिया या वाटा । इहींचि पेणां सुभटा । शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणें ॥ ४३ ॥

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

जो सर्व भूतांचां ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं । आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥ ४४ ॥ उत्तमातें धरिजे । अधमतरि अव्हेरिजे । हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवीं ॥ ४५ ॥ कां रायाचे देह चाळूं । रंकापरौतें गाळूं । हें न म्हणेचि कृपाळू । प्राणु पैं गा ॥ ४६ ॥ गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेचि का करूं । तोय जैसें ॥ ४७ ॥ तैसी आघवांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेशीं धात्री । आपणपां जो ॥ ४८ ॥ आणि मी तूं हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥ ४९ ॥ तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं । संतोषा उत्संगीं । दिधलें घर ॥ १५० ॥

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः । मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

वार्षियेंवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु । तैसा निरुपचारु । संतोषी जो ॥ ५१ ॥ वाहूनि आपुली आण । धरी जो अंतःकरण । निश्चया साचपण । जयाचेनि ॥ ५२ ॥ जीवु परमात्मा दोन्ही । बैसोनि ऐक्यासनीं । जयाचां हृदयभुवनीं । विराजती ॥ ५३ ॥ ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि । अर्पी मनोबुद्धि । माझां ठायीं ॥ ५४ ॥ आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाही चांगु । तरि माझा अनुरागु । सप्रेम जया ॥ ५५ ॥ अर्जुना गा तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु । तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ॥ ५६ ॥ हें ना तो आवडे । मज जीवाचेनि पाडें । हेंहीं एथ थोडें । रूप करणें ॥ ५७ ॥ तरी पढियं-तयाची कहाणी । हे भुलीची भारणी । इयें तंव न बोलणीं । परि बोलवी श्रद्धा ॥ ५८ ॥ म्हणोनि गा आम्हां । वेगा आली उपमा । एऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादु असे ॥ ५९ ॥ आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी । दुणा थांव उठी । आवडी गा ॥ १६० ॥ तयाही वरी विपायें । प्रेमळु संवादिया होये । तिये गोडीसी आहे । कांटाळें मग ॥ ६१ ॥ म्हणोनि गा पांडुसुता । तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता । वरी प्रियाची वार्ता । प्रसंगें आली ॥ ६२ ॥ तरि आतां बोलों । भलें या सुखा मीनलों । ऐसें म्हणतखेंवीं डोलों । लागले देवो ॥ ६३ ॥

करणारें जें कर्म, तें जेव्हां नाहींसें होतें, तेव्हां फलत्याग संभवतो आणि अशा त्या त्यागामुळें पूर्णशांति ( पूर्णब्रह्मस्थिति ) हस्तगत होते. १३९. म्हणूनच अर्जुना, शांति प्राप्त होण्याकरितां हाच ( आतां सांगितलेला ) काय तो क्रम आहे; ( म्हणून ) सांप्रतकाळीं तुला अभ्यासच केला पाहिजे. १४०. अर्जुना, मग अभ्यासापेक्षां ज्ञान हें खोल आहे आणि ज्ञानापेक्षां ध्यान अधिक महत्त्वाचें आहे. १४१. मग कर्मफलत्याग जो आहे, तो ध्यानापेक्षां चांगला आहे आणि कर्मफलत्यागापेक्षां शांतिसुखाचा भोग ( म्हणजे ब्रह्मसुखाचा अनुभव ) चांगला आहे. १४२. अर्जुना, अशा या वाटेनें व याच मुक्कामाच्या क्रमानें ज्यानें शांतीचा मध्य गांठला, १४३.

सर्व भूतांचे ठिकाणीं द्वेषरहित, ( सर्व भूतांचे ठिकाणीं) मैत्री असणारा, कृपायुक्त, मी माझेपणारहित, सुख व दुःख समान मानणारा, क्षमाशील, १३.

सर्वव्यापी चैतन्याला ज्याप्रमाणें आपला व परकेपणाचा भाव कोठेंच नसतो, त्याप्रमाणें त्याला लोकांविषयीं आपला व परकेपणा राहिला नाहीं, म्हणून तो कोणत्याही प्राण्याचा द्वेष करण्याची गोष्ट जाणत नाहीं. १४४. उत्तमाचा स्वीकार करावा, आणि नीच म्हणून ( नीचाचा ) त्याग करावा, हें ज्याप्रमाणें पृथ्वी मुळींच जाणत नाहीं; १४५. किंवा अर्जुना, राजाच्या देहाची हालचाल करावी व दरिद्री पुरुषाचा देह टाकून द्यावा, असें कृपाळू प्राण केव्हांही म्हणतच नाहीं; १४६. गाईचीं तहान भागवूं आणि वाघाला विष होऊन मारूं, असें करणें पाण्याला जसें ठाऊकच नसतें; १४७. त्याप्रमाणें एकपणाच्या बोधानें संपूर्ण प्राणिमात्राशीं ज्याची मैत्री असते व जो आपण स्वतः कृपेची जन्मभूमि असतो; १४८. आणखी 'मी तूं' अशी भाषा त्याला माहीत नसते आणि माझें असें तो कांहींच म्हणत नाहीं व ज्याला सुखदुःखाची जाणीव नसते; १४९. त्याचप्रमाणें क्षमेच्या बाबतींत, ज्याची योग्यता पृथ्वीसारखी आहे व त्यानें आपल्या मांडीवर संतोषाला घर दिलें आहे. ( संतोष ज्याच्यामुळें वाढता आहे. ) १५०.

सर्वदा संतुष्ट, योगी, नियतचित्त, माझ्या ठिकाणीं ज्याचें मन दृढ आहे असा, माझे ठिकाणीं ज्यानें मन व बुद्धि अर्पण केलीं आहेत, असा जो माझा भक्त असतो, तो मला प्रिय आहे. १४.

वर्षाऋतुशिवाय जसा समुद्र पाण्यानें नेहमीं पूर्ण भरलेला असतो, तसा जो कोणत्याही बाह्य कारणाशिवाय संतोषानें नेहमीं पूर्ण भरलेला असतो; १५१. जो अंतःकरणाला आपली शपथ घालून आंवरून धरतो आणि ज्याच्या योगानें निश्चयाला खरेपणा असतो; १५२. ज्याच्या अंतःकरणरूपी घरामध्यें जीव व परमात्मा हे दोन्हीं ऐक्यरूपी आसनावर बसून शोभत आहेत, ( जीव व परमात्मा यांचें ऐक्य, ज्याच्या अनुभवाला आलें आहे. ) १५३. असा ऐक्यरूपी ऐश्वर्यानें संपन्न होऊन जो आपलें मन व बुद्धि अखंड माझ्या ( सगुण रूपाच्या ) ठिकाणीं अर्पण करितो; १५४. अंतःकरणांत आत्मैक्यप्रतीतीच्या दृढतेनें व बाह्य शरीरांत ध्यान, धारणा इत्यादिकांच्या द्वारें, चांगल्या तऱ्हेनें योगांत तयार होऊन देखील, ज्याला माझ्या सगुण स्वरूपाविषयीं दृढ प्रेम असतें. १५५. अर्जुना तो भक्त, तोच योगी आणि तोच मुक्त; तो जशी कांहीं ( माझी ) आवडती बायको व मी नवरा, असा तो मला आवडतो. १५६. इतकेंच नाहीं, तर तो मला जिवाइतका प्यार आहे. पण माझें जें त्याच्यावर प्रेम आहे, त्याला ही देखील उपमा, अपुरी आहे. १५७. परंतु प्रेमळ भक्तांच्या गोष्टी हा मला भुरळ पाडणारा मंत्र आहे. प्रेमळ भक्तांच्या गोष्टी बोलून दाखविण्यासारख्या नाहींत. पण अर्जुना तुझी माझ्यावरील श्रद्धा, मला असली न बोलावयाची गोष्ट, बोलावयास लावते. १५८. म्हणून आम्हीं ( बायकोची व जीवाची ) झटकन् उपमा देऊं शकलों. नाहींतर या प्रेमाला बोलून दाखवितां येईल काय ? १५९. आतां अर्जुना, हें असूं दे. पण प्रियकर भक्तांच्या गोष्टी बोलण्यांत प्रेमास दुप्पट बळ चढतें. १६०. त्यांत आणखी कदाचित् चर्चा करणारा प्रेमळ मनुष्य मिळाला, तर मग त्या आनंदाला दुसरी उपमा आहे काय ? १६१. म्हणून अर्जुना, तूंच प्रेमळ भक्त आणि तूंच श्रोता आहेस; शिवाय आणखी प्रसंगानुसार प्रेमळाचीच गोष्ट बोलण्याची वेळ आली. १६२. ( जरी प्रेमळाची गोष्ट शब्दांनीं बोलून दाखवितां येत नाहीं, तरी मागील ओंवींत सांगितल्याप्रमाणें प्रेमळाच्या त्रिपुटीचा प्रसंग आला आहे) तर आतां मी बोलतोंच. या बोलण्याच्या सुखाचा आपल्याला कसा चांगला योग आला आहे ! असें म्हणतां क्षणींच देव डोलावयास लागले. १६३.

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः । हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः॥ १५ ॥

मग म्हणे जाण । तया भक्ताचें लक्षण । जया मी अंतःकरण । बैसों घालीं ॥ ६४ ॥ तरी सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे । आणि जळचरीं नुबगिजे । समुद्रु जैसा ॥ ६५ ॥ तेविं उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे । आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोकु ॥ ६६ ॥ किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां । तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ॥ ६७ ॥ जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें । हर्षामर्ष ठेले । दुजेनविण ॥ ६८ ॥ ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु । याही वरि भक्तु । माझां ठायीं ॥ ६९ ॥ तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो । हें असो जीवें जीवो । माझेनि तो ॥ १७० ॥ जो निजानंदें धाला । परिणामु आयुष्या आला । पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥ ७१ ॥

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः । सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

जयाचां ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा । सुखासि चढावा । जयाचें असणें ॥ ७२ ॥ मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परि वेचे शरीर । तिये गांवीं ॥ ७३ ॥ हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये । तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥ ७४ ॥ शुचि शुचि गांग होये । आणि पाप तापही जाये । परि तेथें आहे । बुडणें एक ॥ ७५ ॥ खोलिये पारु नेणिजे । तरी भक्तीं न बुडिजे । रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ॥ ७६ ॥ संताचेनि अंगलगें । पापातें जिणणें गंगें । तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ॥ ७७ ॥ म्हणोनि असो जो ऐसा । शुचित्वें तीर्था कुवासा । जेणें लंघविले दिशा । मनोमळ ॥ ७८ ॥ आंतु बाहेरि चोखाळु । सूर्य तैसा उजाळु । आणि तत्त्वार्थींचा पायाळु । देखणा जो ॥ ७९ ॥ व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश । तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥ संसारव्यथे फिटला । जो नैराश्यें विनटला । व्याधाहातोनि सुटला । विहंगमु जैसा ॥ ८१ ॥ तैसा सतत जो सुखें । कोणींही टवंच न देखे । नेणिजे गतायुषें । लज्जा जेवीं ॥ ८२ ॥ आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृती नाहीं आंगीं । जैसा निरिंधन आगी । विझोनि जाय ॥ ८३ ॥ तैसा उपशमुचि भागा । जयासि आला पैं गा । जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥ ८४ ॥ अर्जुना हा ठावोवरी । जो सोहंभावो सरोभरी । तो द्वैताचां पैलतीरीं । निगों सरला ॥ ८५ ॥ कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोही भागीं । वांटूनिया

ज्याच्यापासून लोक उद्वेग पावत नाहींत व जो लोकांपासून उद्वेग पावत नाहीं, जो हर्ष, क्रोध, भय आणि उद्वेग यांपासून सुटला आहे, तोच मला प्रिय आहे. १५.

मग श्रीकृष्ण म्हणाले, ज्या भक्ताला मी आपलें अंतःकरण बसावयास घालतों, त्या भक्ताचीं लक्षणें समजून घे. १६४. तरी ज्याप्रमाणें समुद्राच्या खवळण्यानें पाण्यांत रहाणाऱ्या प्राण्यांस भय उत्पन्न होत नाहीं आणि जलचरांना समुद्र कंटाळत नाहीं, १६५. त्याप्रमाणें उन्मत्त जगाच्या योगानें ज्याला खेद होत नाहीं आणि ज्याच्या स्वतःकडून लोकांना शीण होत नाहीं. १६६. फार काय सांगावें ! अर्जुना, शरीर जसें अवयवांना कंटाळत नाहीं, त्याप्रमाणें आपण सर्वांचा जीव आहों अशी त्याची आत्मैक्यबुद्धि असल्यामुळें तो प्राणीमात्रांना कंटाळत नाहीं. १६७. हें जगत त्याचा देह झाल्यामुळें, आवडते व नावडते, हे भाव त्याच्या चित्तांतून गेले व त्याच्या ठिकाणीं द्वैत नसल्यामुळें, त्याची आनंद व क्रोध यांसारखीं द्वंद्वें बंद पडलीं. १६८. असा सुखदुःखादि द्वंद्वांपासून पूर्णपणें मुक्त झालेला, भय आणि चित्तक्षोभ या रहित झालेला आणि इतकें असून शिवाय माझ्या ठिकाणीं अनन्य असलेला, १६९. तर त्याचा मला मोह असतो. ती आवड काय सांगूं ! हें राहूं दे, तो माझ्याच जिवानें जगतो ( म्हणजे त्याचें जगण्यास माझ्या प्रेमाची जरूर असते.) १७०. जो आत्मानंदानें तृप्त झाला व जो पुरुष म्हणजे सर्वांचा शेवट असलेलें ब्रह्मच जन्मास आलें, आणि जो पूर्ण ब्रह्मस्थितीरूपी जी स्त्री, तिचा प्रियपति झाला. १७१.

निरपेक्ष, शुद्ध, तत्त्वार्थीचा देखणा, उदासीन, संसारदुःखविरहित, कर्मारंभास अवश्य असणारा जो अहंकार, तद्विरहित असा जो माझा भक्त असतो, तो मला प्रिय आहे. १६.

अर्जुना, ज्याचे ठिकाणीं इच्छेला प्रवेश नाहीं ( ज्याला कशाचीही जरूर नाहीं ) आणि ज्याच्या जगण्यानें त्याच्या आंतील आत्मसुखाचा उत्कर्षच होत रहातो; १७२. काशीक्षेत्र हें ( जीवांना ) मोक्ष देण्यांत खरोखर उदार आहे, परंतु त्या क्षेत्रामध्यें मुमुक्षूचें शरीर खर्ची पडतें १७३. हिमालय पर्वत पाप नाहींसें करतो; परंतु तेथें मरण्याचा फार संभव आहे. साधूचा पवित्रपणा तसा धोक्याचा नाहीं. १७४. गंगोदक अत्यंत पवित्र आहे आणि त्या गंगोदकानें पाप व ताप नाश पावतात, परंतु तेथें ( गंगोदकांत ) बुडी मारण्याची जरूरी असल्याकारणानें तेथें बुडण्याचा संभव असतो. १७५. गंगेप्रमाणेंच साधूच्या ( ज्ञानाच्या ) खोलीचा अंत लक्षांत येत नाहीं, तरी पण त्याचे संगतींत साधकांस बुडण्याची भीति नसते. तेथें ( साधुसंगतींत ) मरावयाचा प्रसंग न येतां, याच देहांत रोख मोक्ष पदरांत पडतो. १७६. संताच्या शरीरस्पर्शानें गंगेचीं पापें जातात. तेव्हां त्या संताच्या संगतीनें किती पवित्रपणा येतो ! १७७. म्हणून आतां हें वर्णन पुरे. जो याप्रमाणें पवित्रपणाच्या बाबतींत तीर्थांला आश्रय असतो व ज्यानें अज्ञानादि मनांतील मळ देशोधडीस लावले, १७८. सूर्य जसा आंत-बाहेर प्रकाशित असतो, त्याप्रमाणें तो आंत मनानें व बाहेर शरीरानें पवित्र असतो. आणि जो ( अज्ञानरूपी भूमींत असलेल्या ) ब्रह्मरूपी धनाचा पायाळू पाहणारा आहे. १७९. ज्याप्रमाणें आकाश सर्वव्यापक असून उदास असतें; त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वत्र व्यापक असून उदास असतें; म्हणून त्याच्या मनाची कोठेंही आसक्ति नसते. १८०. जो निराशारूपी अलंकारानें भूषित झाल्यामुळें संसाराच्या पीडेपासून मुक्त झालेला असतो; ज्याप्रमाणें पारध्याच्या हातांतून पक्षी सुटून जावा, ( आणि म्हणून त्या पक्ष्याला आनंद व्हावा. ) १८१. ( वरील पक्ष्याला मोकळेपणाचा आनंद क्षणिक असतो. म्हणजे पारध्याच्या हातून सुटल्याबरोबर त्यास आनंद होतो, पण तो एकसारखा टिकत नाहीं. ) ( परंतु ) तसा या पुरुषाला आनंद सतत असतो व मेलेला पुरुष उघडा-नागवा जरी असला, तरी तो लाजेला जसा जाणत नाहीं, तसा तो कोणीकडेही ( कोणत्याही स्थितींत ) दुःखाला जाणत नाहीं. १८२. आणि कर्मांचा आरंभ करण्याकरितां ज्याच्या ठिकाणीं अहंकार नसतो, ज्याप्रमाणें काष्ठरहित अग्नि विझून जातो, १८३. त्याप्रमाणें ज्याच्या वांट्याला शांति आली व जो मोक्षाच्या अंगाला लिहिलेला आहे.' ( म्हणजे ज्याचें नांव मोक्षाच्या सदरांत दाखल झालेलें आहे;) १८४. अर्जुना, इतका जो 'तें ब्रह्म मी आहें' अशा भावनेनें भरलेला आहे, तो द्वैताच्या पलीकडच्या कांठावर निघाला ( तो अद्वैत झाला ). [ आतां त्याचा भक्तीशीं कांहीं संबंध नसेल, अशी शंका येईल. म्हणून त्याचें निराकरण पुढें करतात. ] १८५. तथापि भक्तिसुखाकरतां आपल्यांतच ( देव व भक्त असे ) दोन भाग

आंगीं। सेवकें बाणी ॥ ८६ ॥ येरा नाम मी ठेवी। मग भजती वोज बरवी। न भजतया दावी। योगिया जो ॥ ८७ ॥ तयाचें आम्हां व्यसन। आम्हुचें तो निजध्यान। किंबहुना समाधान। तो मिळे तैं ॥ ८८ ॥ तयालागीं मज रूपा येणें। तयाचेनि मज एथें असणें। तया लोण कीजे जीवें प्राणें। ऐसा पढिये ॥ ८९ ॥

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति। शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७॥

जो आत्मलाभासारिखें। गोमटें कांहींचि न देखे। म्हणोनि भोगविशेखें। हरिखेजेना ॥ १९० ॥ आपणचि विश्व जाहला। तरि भेदभावो सहजचि गेला। म्हणोनि द्वेषु ठेला। जया पुरुषा ॥ ९१ ॥ पैं आपुलें जें साचें। तें कल्पांतींही न वचे। हें जाणोनि गतातें। न शोची जो ॥ ९२ ॥ आणि जयापरौतें कांहीं नाहीं। तें आपणपेंचि आपुलां ठायीं। जाहला यालागीं जो कांहीं। आकांक्षी ना ॥ ९३ ॥ वोखटें कां गोमटें। हें कांहींचि तया नुमटे। रात्रिदिवस न घटे। सूर्यासि जेवीं ॥ ९४ ॥ ऐसा बोधुचि केवळु। जो होऊनि असे निष्कळु। त्याहीवरी भजनशीळु। माझां ठायीं ॥ ९५ ॥ तरि तया ऐसें दुसरें। आम्हां पढियंतें सोयरें। नाहीं गा साचोकारें। तुझी आण ॥ ९६ ॥ पार्था जयाचां ठायीं। वैषम्याची वार्ता नाहीं। रिपुमित्रां दोहीं। सरिसा पाडु ॥ ९७ ॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः। शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

कां घरिचियां उजियेडु करावा। पारखियां आंधारु पाडावा। हें नेणेचि गा पांडवा। दीपु जैसा ॥ ९८ ॥ जो खांडावया घावो घाली। कां लावणी जयानें केली। दोघां एकचि साउली। वृक्ष दे जैसा ॥ ९९ ॥ नातरी इक्षुदंडु। पाळितया गोडु। गाळितया कडु। नोहेचि जेवीं ॥ २०० ॥ अरिमित्रीं तैसा। अर्जुना जया भावो ऐसा। मानापमानीं सरिसा। होतु जाय ॥ १ ॥ तिहीं ऋतूं समान। जैसें कां गगन। तैसें एकचि मान। शीतोष्णीं जया ॥ २ ॥ दक्षिण उत्तर मारुता। मेरु जैसा पांडुसुता। तैसा सुखदुःखप्राप्ता। मध्यस्थु जो ॥ ३ ॥ माधुर्यें चंद्रिका। सरिसी राया रंका। तैसा जो सकळिकां। भूतां समु ॥ ४ ॥ आघवियां जगा एक। सेव्य जैसें उदक। तैसें तयातें तिन्हीं लोक। आकांक्षिती ॥ ५ ॥ जो सबाह्यसंगु। सांडोनिया लागु। एकाकी असे आंगु। आंगीं सूनी ॥ ६ ॥

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित्। अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

जो निंदेतें नेघे। स्तुति न श्लाघे। आकाशा न लगे। लेपु जैसा ॥ ७ ॥ तैसें निंदे आणि स्तुती। मानु करूनि एके पांती। विचरे प्राणवृत्ती। जनीं वनीं ॥ ८ ॥ साच लटिकें

करून तो आपल्या ठिकाणीं सेवाधर्म स्वीकारतो. १८६. व दुसऱ्या भागाला मी ( देव ) असें नांव ठेवितो ( म्हणजे देव असें कल्पितों. ) याप्रमाणें देव व भक्त, या दोन्हीं कल्पना आपल्यांतच खरख्या करून, अद्वैतांत भजन करणें शक्य नाहीं, अशा समजुतीनें भजन न करणाऱ्या लोकांना, जो योगी भजनाची चांगली पद्धत (आचरून) दाखवितो. १८७. त्या भक्ताचा आम्हांला छंद असतो. तो भक्त आमच्या स्वतःच्या ध्यानाचा विषय असतो. फार काय सांगावें ! त्याची जेव्हां आम्हांस भेट होईल, तेव्हांच आम्हांला समाधान वाटतें. १८८. त्याच्याकरितां मला सगुण मूर्ति धारण करावी लागते, आणि त्याच्याकरितांच ( मला सगुण विग्रहानें ) या जगांत रहावें लागतें. तो मला इतका आवडतो कीं, त्यावरून जीव व प्राण ओंवाळून टाकावेत. १८९.

जो हर्ष पावत नाहीं, द्वेष करीत नाहीं, शोक करीत नाहीं. ( अप्राप्त वस्तूची ) इच्छा करीत नाहीं, चांगले व वाईट या दोहींविरहित जो भक्तिमान् मनुष्य असतो, तो मला प्रिय आहे. १७.

जो आत्मप्राप्तीच्या तोडीचें दुसरें कांहींच चांगलें समजत नाहीं, म्हणून जो एकाद्या विशेष भोगानें आनंदित होत नाहीं; १९०. आपणच विश्व आहोंत, अशी समजूत बनलेली असल्यामुळें, त्याचा भेदभाव अनायासेंनेंच नाहींसा झालेला असतो, म्हणून ज्या पुरुषाचे ठिकाणीं द्वेषबुद्धि राहिलेली नसते. १९१. आपलें जें खरें (त्रिकालाबाधित आत्मस्वरूप) आहे, तें कल्पाच्या अंताच्या वेळीं देखील ( आपल्यापासून ) जात नाहीं; हें जाणून जो गेल्याचा शोक करीत नाहीं; १९२. आणि ज्याच्या पलीकडे कांहीं नाहीं, असें जें ब्रह्म तें तो पुरुष आपण आपल्या ठिकाणीं झाल्यामुळें कशाचीच इच्छा करीत नाहीं; १९३. सूर्याच्या ठिकाणीं रात्र किंवा दिवस, हे दोन्ही जसे घडत नाहींत, त्याप्रमाणें वाईट किंवा बरें हें त्याला कांहींच वाटत नाहीं; १९४. असा जो केवळ अखंड बोधरूप असून, त्याशिवाय आणखी, जो माझ्या ठिकाणीं भजनशील असतो. १९५. तरी अरे अर्जुना, त्याच्यासारखें दुसरें आवडतें नातलग मनुष्य आम्हांला खरोखर कोणी नाहीं, हें तुझी शपथ वाहून सांगतों. १९६. अर्जुना, ज्याच्या ठिकाणीं मनाच्या वांकडेपणाची गोष्टही नाहीं, शत्रु आणि मित्र या दोघांची ज्याच्या ठिकाणीं सारखी योग्यता आहे; १९७.

शत्रु व मित्र, मान व अपमान यांचे ठिकाणीं समान असणारा, शीत व उष्ण, सुख व दुःख यांचे ठिकाणीं समान असणारा, ( अंतर्बाह्य ) संगरहित, १८.

अथवा घरच्या माणसांना ( तेवढा ) उजेड पाडावा व परक्या माणसांना अंधार पाडावा, हें जसें दिव्याला माहीत नाहीं; १९८ जो तोडण्याकरितां घाव घालतो किंवा जो लागवड करतो, त्या दोघांना वृक्ष जसा सारखी सांवली देतो; १९९. अथवा ज्याप्रमाणें ऊंस हा, त्याचे पिकास पाणी घालून वाढविणाराला गोड, व चरकांत त्याला घालून गाळणाराला कडू, असा असत नाहीं. २००. अर्जुना, त्याप्रमाणें शत्रुमित्रांचे ठिकाणीं ज्याचा असा भाव आहे व ज्याच्या मनाची स्थिति मान व अपमानाचे वेळीं सारखीच रहाते. २०१. तिन्ही ऋतूंमध्यें आकाश जसें सारखें असतें. त्याप्रमाणें थंड व उष्ण इत्यादि द्वंद्वांची किंमत ज्याचेजवळ सारखीच असते. २०२ अर्जुना, दक्षिण दिशेकडील व उत्तर दिशेकडील वाऱ्यांमध्यें जसा मेरु पर्वत ( अचल असतो ) तसा प्राप्त होणारीं जीं सुखदुःखें, त्यांमध्यें जो अचल असतो, २०३. ज्याप्रमाणें चांदणें आपली मधुरता, राजा आणि रंक यांस सारखीच अनुभविण्यास देतें, तसा जो सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं सारखा असतो, २०४. ज्याप्रमाणें पाणी हें सर्व जगाला एकच सेव्य आहे, त्याप्रमाणें ज्या भक्ताची स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तिन्ही लोक इच्छा करितात; २०५. जो अंतरबाह्य संगाचा संबंध सोडून, जीवस्वरूपाचा ब्रह्मस्वरूपांत प्रवेश करून एकाकी असतो. २०६.

निंदा व स्तुति समान मानणारा, मौनी, जें जें कांहीं होईल त्यामध्यें संतोषवृत्ति ठेवणारा, कोठेंच आश्रय धरून न रहाणारा, स्थिर बुद्धि असलेला जो भक्तिमान् मनुष्य, तो मला प्रिय आहे. १९.

जो निंदेनें खिन्न होत नाहीं व स्तुतीनें चढून जात नाहीं; ज्याप्रमाणें आकाशाला रंगाचा लेप लागणें शक्य नाहीं, २०७. त्याप्रमाणें निंदा अथवा स्तुति यांचा त्याच्या मनावर कांहींएक परिणाम होत नसल्यामुळें, तो निंदा आणि स्तुति यांस सारखाच मान देऊन, प्राणासारख्या उदासवृत्तीनें लोकांमध्यें व रानामध्यें संचार करितो. २०८. खरें व खोटें ही दोन्ही बोलून न

दोन्ही । बोलोनि न बोले जाहला मौनी । जे भोगितां उन्मनी । आरायेना ॥ ९ ॥ जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे । पाउसेंवीण न सुके । समुद्रु जैसा ॥ २१० ॥ आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं । तैसा न धरीच केंहीं । आश्रयो जो ॥ ११ ॥ आघवाचि आकाशस्थिति । जेवीं वायूसि नित्य वसति । तेवीं जगाचि विश्रांति- । स्थान जया ॥ १२ ॥ हें विश्वाचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ १३ ॥ मग याहीवरी पार्था । माझां भजनीं आस्था । तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ॥ १४ ॥ उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक । परि मानु करिती तिन्ही लोक । पायवणिया ॥ १५ ॥ तरि श्रद्धावस्तूसि आदरु । करिता जाणिजे प्रकारु । जरी होय श्रीगुरु । सदाशिवु ॥ १६ ॥ परि हें असो आतां । महेशातें वानितां । आत्मस्तुति होता । संचारु असे ॥ १७ ॥ ययालागीं हें नोहे । म्हणितलें रमानाहें । अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ॥ १८ ॥ जे पुरुषार्थ- सिद्धि चौथी । घेऊनि आपुलां हातीं । रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥ १९ ॥ कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडीबांधी करी । कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ २२० ॥ म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुकुट करूं । तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही ॥ २१ ॥ तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणी । तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥ २२ ॥ तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पुजूं तयातें ॥ २३ ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ २४ ॥ तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे । किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २५ ॥ तेणेंसीं आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र । परि तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २६ ॥ तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें । जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २७ ॥ जें हें अर्जुना साद्यंत । सांगितलें प्रस्तुत । भक्तियोगु समस्त । योगरूप ॥ २८ ॥ जे मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं । येवढी थोरी । जया स्थितीये ॥ २९ ॥

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते । श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य । करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥ २३० ॥ तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचां ठायीं विस्तरे । जीवीं जया थारे । जे अनुष्ठिती ॥ ३१ ॥ परि निरूपली जैसी । तैसीच स्थिति मानसीं । मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥ ३२ ॥

बोलल्यासारखें असल्यामुळें तो मौनी झाला आहे; कारण कीं, तो उन्मनी अवस्था भोगीत असतां, त्यास पुरेसें वाटत नाहीं. ( तो एकसारखा उन्मनीचा भोग घेतो. ) २०९. जो ज्या वेळेला जें मिळेल त्यानें हर्षित होत नाहीं व ज्याप्रमाणें समुद्र पावसावांचून सुकत नाहीं, त्याप्रमाणें कांहीं न मिळालें तर जो खिन्न होत नाहीं; २१०. आणि ज्याप्रमाणें वायु हा कोठें तरी एकच जागा धरून राहात नाहीं, त्याप्रमाणें जो कोठेंही आश्रय धरीत नाहीं; २११. ज्याप्रमाणें आकाशाच्या सर्व विस्तारांत वायूची नित्य वस्ती आहे, त्याप्रमाणें संपूर्ण जग हें ज्याचें विश्रांतिस्थान आहे; २१२. हें विश्वच माझें घर आहे, असा ज्याचा दृढनिश्चय झालेला असतो, फार काय सांगावें ! सर्व स्थावरजंगमात्मक जग जो ( अनुभवाच्या अंगानें ) आपणच बनला आहे. २१३. अर्जुना, इतकें असूनही आणखी ज्याची माझ्या भजनाच्या ठिकाणीं उत्सुकता असते, तर त्याला मी आपल्या डोक्यावरचा मुकुट करितों. २१४. उत्तम भक्तांपुढें मस्तक नम्र करणें, यांत काय मोठें नवल आहे ? पण उत्तम भक्ताच्या चरणोदकाला त्रैलोक्य मान देतें. २१५. जर शंकर श्रीगुरु होतील तरच भक्तितत्त्वाचा आदर करण्याचा प्रकार जाणतां येईल. २१६. पण, आतां हें शंकराचें वर्णन पुरे. कारण शंकराचें वर्णन करण्यांत आत्मस्तुतीच केल्यासारखी होते. [ भक्तितत्त्वाचा आदर कसा करावा, हें शंकरच जाणतात. हें कशावरून ? तर माझ्या ठिकाणीं असलेली भक्ति, ही त्यांनीं, माझें चरणोदक ( गंगा ) मस्तकावर धारण करून व्यक्त केली. असें माझें चरणोदक मस्तकावर धारण करणारे गुरु पाहिजेत, असें म्हणण्यांत अप्रत्यक्ष रीतीनें मी आपली स्वतःची स्तुति केल्यासारखी होते, म्हणून शंकराचें वर्णन पुरे, असें भगवान् ह्या ओंवींत सांगतात. ] २१७. एवढ्याकरितां हें बोलणें नको, असें लक्ष्मीपति श्रीकृष्ण म्हणाले. अर्जुना, मी त्याला डोक्यावर वाहातों, २१८. कारण कीं, तो भक्त चौथी पुरुषार्थसिद्धि जो मोक्ष, तो आपल्या हातांत घेऊन भक्तीच्या मार्गानें जगाला मोक्ष देत निघाला. २१९. तो मोक्षाचा अधिकारी म्हणजे मोक्ष देण्यास समर्थ ( असा ) असतो, म्हणून तो मोक्षाचा व्यवहार चालवितो; ( म्हणजे मोक्ष कोणाला द्यावा अथवा न द्यावा, हें तो ठरवितो. ) व इतका समर्थ असूनही, तो पाण्यासारखा नम्र असतो. २२०. म्हणून आम्हीं त्याला नमस्कार करूं, त्याला आम्हीं डोक्यावर मुगुट करूं व त्याची टांच आम्हीं हृदयावर धरूं. २२१. त्याच्या गुणांचे अलंकार आम्हीं आपल्या वाचेला घालूं ( आम्ही आपल्या वाचेनें त्याचे गुण गाऊं ), आणि त्याची कीर्ति, हाच कोणी दागिना, तो आम्ही आपल्या कानांत घालूं. ( कानांनीं आम्ही त्याची कीर्ति ऐकूं. ) २२२. तो पहावा, ही आम्हाला इच्छा होते, म्हणून आम्ही डोळेरहित आहोंत तरी, डोळे घेतों, आणि आमच्या हातांतील क्रीडेच्या कमळानें आम्ही त्याची पूजा करतों. २२३. त्याच्या शरीराला आलिंगन देण्याकरितां दोन हातांवर आणखी दोन हात घेऊन आलों ( म्हणजे मी चतुर्भुज सगुण रूप धारण केलें.) २२४. त्याच्या संगतीच्या सुखाकरितां मी जो देहरहित, त्या मला देह धारण करावा लागतो. फार काय सांगावें ? तो मला किती आवडतो याला उपमाच नाहीं. २२५. त्याच्याशीं आमची मैत्री असते, यांत काय आश्चर्य आहे ? परंतु त्याचें चरित्र जे ऐकतात, २२६. जे भक्ताच्या चरित्राची वाखाणणी करितात, ते देखील आम्हाला प्राणापलीकडे आवडतात, हें खरें आहे. २२७. अर्जुना, जें हें समस्त योगरूप आम्हीं तुला सांगितलें तें म्हणजे आम्ही तुला ( आतां ) आदिअंतासहित भक्तियोग पूर्णपणें सांगितला. २२८. ज्या भक्तियोगाच्या स्थितीची थोरवी एवढी आहे कीं, त्या भक्तियोगयुक्त पुरुषावर मी स्वतः प्रीति करतों, मी त्याचें ध्यान करतों, अथवा त्याला मस्तकावर धारण करतों. २२९

श्रद्धायुक्त व मी ज्यांना अत्यंत प्रिय आहें असे जे भक्त, वर सांगितल्याप्रमाणें धर्मसंबंधीं अमृताचें सेवन करतात ( म्हणजे त्याप्रमाणें आचरण करतात ) ते मला अत्यंत प्रिय आहेत. २०.

ती ही गोष्ट ( वर सांगितलेलें भक्तियोगाचें वर्णन ) जी चित्ताला रंजविणारी, अमृताच्या धारेप्रमाणें मधुर व धर्माला अनुकूल अशी आहे, ती ऐकून जे पुरुष तिला ( त्या गोष्टीला ) स्वानुभवानें जाणतात. २३०, त्याचप्रमाणें ज्यांच्या ठिकाणीं श्रद्धेचा आदर असल्यामुळें, हा भक्तियोग विस्तार पावतो; एवढेंच नव्हे, तर ज्यांच्या चित्ताच्या ठिकाणीं टिकतो व जे त्याचें अनुष्ठान करतात, २३१. पण ज्याप्रमाणें मी मनाची स्थिति निरूपण केली, त्याचप्रमाणें मनाच्या ठिकाणीं स्थिति असेल, तर तशा मनांत हा भक्तियोग म्हणजे उत्तम शेतांत पेरणी केल्याप्रमाणें आहे. २३२. परंतु जे प्राप्त करून घेण्याला

परि मातें परम करूनि । इये अर्थी प्रेम धरूनि । हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥ ३३ ॥ पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी । उत्कंठा तयालागीं । अखंड मज ॥ ३४ ॥ ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र । भक्तिकथेसी मैत्र । जयां पुरुषां ॥ ३५ ॥ आम्ही तयाचें करूं ध्यान । तो आम्हुचें देवतार्चन । तेवांचूनि आन । गोमटें नाहीं ॥ ३६ ॥ तयाचें आम्हां व्यसन । तो आम्हुचें निधिनिधान । किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ ३७ ॥ पैं प्रेमळाचि वार्ता । जे अनुवादती पांडुसुता । ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ॥ ३८ ॥ ऐसें निज-जनानंदें । तेणें जगदादिकंदें । बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥ ३९ ॥ राया जो निर्मळु । निष्कल लोककृपाळु । शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ॥ २४० ॥ जो धर्मकीर्तिधवळु । अगाधदातृत्वें सरळु । अतुलबळें प्रबळु । बळिबंधनु ॥ ४१ ॥ जो पैं सुरसहायशीळु । लोकलालनलीळु । प्रणतप्रतिपाळु । हा खेळु जयाचा ॥ ४२ ॥ जो भक्तजनवत्सलु । प्रेमजन प्रांजलु । सत्यसेतु सरळु । कलानिधि ॥ ४३ ॥ तो कृष्णजी वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा । सांगतुसे येरु दैवाचा । आइकतु असे ॥ ४४ ॥ आतां यथावरी । निरूपिती परि । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ ४५ ॥ तेचि रसाळ कथा । मऱ्हाठिया प्रतिपथा । आणिजेल आतां । अवधारिजो ॥ ४६ ॥ ज्ञानदेव म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्ही । हें पढविलों जी स्वामी । निवृत्तिदेवीं ॥ २४७ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ।

[ ऑव्या २४७. श्लोक २०. ]

ॐ श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु



योग्य असें श्रेष्ठ ठिकाण आहे, असें मला समजतात व या भक्तितत्त्वाविषयीं आपले मनांत प्रेम बाळगून व हेंच आपलें सर्व भांडवल आहे, अशी समजूत ठेवून, जे या भक्तियोगाचा अंगीकार करतात. २३३. अगा अर्जुना, या जगामध्यें तेच भक्त व तेच योगी आहेत व त्यांची मला निरंतर उत्कंठा लागलेली असते. २३४. तेच तीर्थ तेच क्षेत्र, जगामध्यें तेच पवित्र कीं, ज्या पुरुषांचा भक्तिकथेशीं स्नेह असतो. २३५. आम्ही त्याचें ध्यान करूं, तो आमची पूजन करण्याची देवता आहे. त्याच्यावांचून आम्ही दुसरें कांहीं चांगलें मानीत नाहीं. २३६. त्याचें आम्हांस व्यसन (छंद) असतें व तोच आमच्या ठेव्याची खाण आहे. फार काय सांगावें! तो आम्हास भेटेल तेव्हांच आम्हांस समाधान वाटतें. २३७. परंतु अर्जुना, जे पुरुष प्रेमळ भक्तांची कथा गातात, ते पुरुष आम्ही आपलें श्रेष्ठ दैवत समजतों. २३८. आपल्या भक्तांचा जो आनंद आहे व जो जगाचें मूळ कारण आहे, तो मुकुंद याप्रमाणें बोलला, असें संजय धृतराष्ट्राला म्हणाला. २३९. हे धृतराष्ट्र राजा, जो श्रीकृष्ण परमात्मा निर्मळ, पूर्ण, लोकांवर कृपा करणारा, शरणागतांचा प्रतिपाळ करणारा व शरण जाण्याला योग्य आहे, २४०. ज्याची धर्मसंबंधीं (धर्मरक्षक म्हणून) कीर्ति उज्वल आहे, अपार औदार्यानें जो वैषम्यभावरहित आहे, तुलना करतां यावयाची नाहीं, अशा पराक्रमानें जो फार बलाढ्य आहे, व जो बळीच्या बंधनांत राहिला. २४१. देवांचें साह्य करणें हा ज्याचा स्वभाव आहे, लोकांचें संगोपन करणें ही ज्याची लीला आहे, शरण आलेल्यांचा प्रतिपाळ करणें हा ज्याचा खेळ आहे, २४२. जो भक्ताविषयीं मायाळू आहे व जो प्रेमळ जनांना सोपा आहे आणि ज्या परमात्म्याकडे जाण्यास सत्य हाच सरळ पूल आहे व जो कलांचा ठेवा आहे, २४३. तो भक्तांचा सार्वभौम राजा व वैकुंठीचा श्रीकृष्ण परमात्मा सांगत आहे व भाग्यवान् अर्जुन ऐकत आहे. २४४. आतां यानंतर भगवंताचा व्याख्यान करण्याचा प्रकार ऐका, असें संजय धृतराष्ट्रास म्हणाला. २४५. तीच रसानें भरलेली कथा मराठी भाषेच्या रूपांतरांत आणली जाईल, ती आपण ऐकावी. २४६. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, महाराज, प्रभु निवृत्तिदेवांनीं आम्हांला हें शिकविलें आहे कीं, आम्हीं तुम्हां संतांची सेवा करावी. २४७.



अध्याय तेरावा : : : सारांश

मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । अंतर देखती साचें । ज्ञानें उन्मेख तयांचें । बोवाळूं आम्ही ॥

अ. १३-११३५

या अध्यायांत मनुष्याच्या देहाचा व तो देह ज्याच्या सत्तेनें चालतो, त्या पुरुषाचा विचार केला आहे. ह्यालाच क्षेत्रक्षेत्रज्ञांचा विचार म्हणतात. सुरुवातीस ज्यांच्या स्मरणानें शब्दसृष्टि स्वाधीन होऊन वक्तृत्वाला नवरसांचा बहर येतो, त्या श्रीनिवृत्तिनाथांना वंदन करून श्रीज्ञानदेव विषयप्रतिपादनास सुरुवात करतात. ( १-६ ).

या शरीराला क्षेत्र म्हणतात, तें कां म्हणतात, तें कसें आहे, त्याच्यावर कोणाची सत्ता आहे, याबद्दलचें ज्ञान प्रत्येकास असणें अवश्य आहे. ब्रह्मदेव व शंकर यांच्यासारख्या थोरांनींसुद्धां या क्षेत्राचा निर्णय लावण्याकरितां मोठा अट्टाहास केला आहे. वेद म्हणतात, या शरीरावर सत्ता कोणाची आहे यावद्दल अद्यापि निश्चित निर्णय झालेला नाहीं. जीववादी, प्रकृतिवादी, संकल्पवादी, स्वभाववादी व काळवादी यांनीं आपआपल्यापरीनें याबाबतींत निर्णय देण्याचा प्रयत्न केला आहे व माझाच निर्णय बरोबर आहे, असें प्रत्येकजण अट्टाहासानें प्रतिपादीत आहे; परंतु हें शरीर नक्की कसें आहे व कोणाच्या मालकीचें आहे, हें त्यांपैकीं कोणालाही कळलें नाहीं. एवढें वेदांतील बृहत्सामसूत्र पण त्यालासुद्धां याचा अजून निर्णय लागला नाहीं. तें क्षेत्र मी तुला आतां सांगतों. ( ७-७१ ).

हें शरीर छत्तीस तत्त्वांचें मिळून झालेलें आहे. तीं तत्त्वें पुढीलप्रमाणें आहेतः— १-५:- पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं **पंचमहाभूतें**; ६:—**अहंकार**—याच्याशीं वरील पंचमहाभूतांची गांठ पडल्यावर देहाचा आकार स्पष्ट होतो. हा अहंकार मायेच्या पोटांत सूक्ष्मपणें राहतो व देहाला चोहोंकडे नाचवितो. ७:- **बुद्धि**—ही सुखदुःख, बरेंवाईट यांतील निवड करते; ८:—**अव्यक्त**—पंचमहाभूतांपासून निर्माण झालेले प्राणी स्थूल धर्म टाकल्यावर सूक्ष्म रूपानें यांत राहतात; ९-१८:—कान, नाक, डोळे, त्वचा व जिव्हा हीं पांच **ज्ञानेंद्रियें**; आणि हात, पाय, वाणी, उपस्थ व गुद हीं पांच **कर्मेंद्रियें**; १९:—**मन**—हें रजोगुणाचें बनलें असून तें अत्यंत चंचल आहे. तें म्हणजे मूर्तिमंत कल्पनाच होय. २०-२९:—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, या **पंच विषयामुळें** ज्ञान बाहेर धांवतें. त्याचप्रमाणें चालणें, बोलणें, घेणें-देणें, मळ, मूत्रांचा त्याग करणें हे **कर्मेंद्रियांचे पांच विषय** आहेत; ३०:—ज्यामुळें विषयांची गोडी उत्पन्न होते ती **इच्छा**; ३१:—इच्छित वस्तु प्राप्त झाली नाहीं तर उत्पन्न होणारा **द्वेष**; ३२:—इच्छित वस्तूचा लाभ झाला म्हणजे अनुभवाला येतें तें **सुख**; ३३:—सुखाच्या विरुद्धधर्माचें **दुःख**; ३४:—जडाला सचेतन करणारी साक्षीभूत चैतन्याची सत्ता ती **चेतना**; ३५:—परस्परांतील स्वभाववैर टाकून देऊन पंचमहाभूतें या शरीरांत जिच्यामुळें एकत्र मैत्रीनें राहतात ती **धृति**; ३६:—वरील पस्तीस तत्त्वांच्या समुदायाला **संघात** म्हणतात. व हीं छत्तीस तत्त्वें मिळून शरीर तयार होतें. या शरीरांत पापपुण्य निर्माण होतें म्हणून त्याला कौतुकानें क्षेत्र म्हणतात व याची व्याप्ति एवढी आहे कीं, स्थावरापासून परब्रह्माच्या अलिकडील सर्व स्थावरजंगम सृष्टीचा या क्षेत्रांत समावेश होतो. (७२-१६०).

आतां अत्यंत महत्त्वाचें जें ज्ञान त्याचा विचार सांगतों. हें प्राप्त करून घेण्याकरितां तपी, योगी, मुनी, वेदाध्ययनी हे आपआपल्या साधनांची पराकाष्ठा करून राहिले आहेत; कारण या अफाट संसाराला मुळासकट उपटून टाकून जीवाला साक्षात परब्रह्माची भेट करून देण्याचें सामर्थ्य या ज्ञानांत आहे; परंतु शब्दानें या ज्ञानाचें व्याख्यान करतां येत नाहीं. हृदयांत ज्ञान उत्पन्न झालें म्हणजे इंद्रियांच्या क्रिया पालटतात. त्या लक्षणांवरून तें ओळखलें जातें. म्हणून तीं लक्षणें सांगतों ( १६१-१८३ ).

( १ ) **अमानित्वः**—अंगीं विद्वत्ता, मोठेपणा असूनसुद्धां मी अमका आहें, अशी इतरांना कल्पनाहि येऊं नये व आपलें नाम, रूप, मोठेपणा-विद्वत्ता लोकांसमोर येऊं नये अशा पद्धतीनें जो वागण्याचें पसंत करतो. (१८४-२०१). ( २ ) **अदंभित्वः**— प्राण जाण्याचा प्रसंग आला, तरी आपल्या पुण्यकर्मांची दाद लोकांना लागूं देत नाहीं. ( २०२–२१६ ). ( ३ ) **अहिंसाः**— ( या पदाचें व्याख्यान करतांना ज्ञानदेवांनीं आपल्या मताच्या मंडनाकरितां त्या काळीं प्रचलित असलेली अहिंसेबद्दलचीं कर्मकांडांतील हास्यास्पद मतें सांगून त्यांचें खंडन केलें आहे. ज्ञानेश्वरींत पूर्वपक्ष केलेलीं जीं थोडीं स्थळें आहेत, त्यांपैकीं हें एक आहे. ) खरी अहिंसा मनांत उत्पन्न होत असते. मन हें सर्व इंद्रियांचें प्रेरक असल्यामुळें मनांत अहिंसा उत्पन्न झाली, कीं त्याचें चालणें, बोलणें, पाहणें वगैरे सर्व क्रियांत प्राणिमात्राविषयीं कृपा व प्रेम ओतप्रोत दिसून येतें. ( २१७–३१३ ). अहिंसेचें व्याख्यान मर्यादे-बाहेर वाढलें म्हणून ज्ञानदेवांनीं मननीय असा परिहार दिला आहे. श्रोत्यांना आपलें व्याख्यान पसंत पडून ते प्रसन्न व्हावेत, असें वाटत असले, तर वक्त्यानें प्रचलित मतांतरांचें निरसन करणें फार अगत्याचें आहे; असें आपण विस्तार केल्याचें कारण त्यांनीं सांगितलें आहे. ( ३१४–३३८ ). ( ४ ) **क्षांतिः**— दुःखाचे प्रसंग अंगावर आदळले, तरी ते आपलेंच स्वरूप आहे, असें समजून ते निमूटपणें सहन करतो व आपण सहन करतो याची जाणीवहि त्याचे ठिकाणीं नसते ( ३३९–३५३ ). ( ५ ) **आर्जवः**— अमृताच्या धारेप्रमाणें अंतःकरण सरळ व शुद्ध असून त्याचें सर्वांशीं वागणेंहि त्याचप्रमाणें असतें. ( ३५४–३६७ ).

( ६ ) **गुरुभक्तिः**–( ज्ञानदेवांच्या अंतःकरणांत गुरुसेवेविषयीं नितान्त प्रेम व त्यांतून समोर श्रीनिवृत्तिनाथ बसलेले; यामुळें या पदाचें व्याख्यान प्रेमानें ओथंबलेलें व विस्तारपूर्वक झालेलें आहे. ) शोकग्रस्त जीवाला ब्रह्म-स्थिति प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य गुरुसेवेंत आहे. गुरुभक्त स्वतःला गुरुसेवेला विकून घेतो, तो गुरुचें घर, गांव, देश, गुरुसंबंधीं निर्जीव व सजीव वस्तू यांच्या प्रेमानें वेडा झालेला असतो. त्याला गुरुसेवेशिवाय इतर कांहीं गोड लागत नाहीं. ध्यानीं मनीं गुरुसेवाच ! आपण एकट्यानेंच गुरूंची सर्वभावानें व सर्व प्रकारानें सेवा करावी अशी मनांत वृत्ति असते व प्रत्यक्ष क्रिया तर मनाच्या पुढें धांवते. देह पडल्यावरही आपल्या मृत देहांतील पंचमहाभूतें गुरुसेवेसाठींच खर्च व्हावीत व जन्मोजन्मीं त्यांची चरणसेवा घडावी, अशी उत्कट इच्छा तो बाळगून असतो. ( ३६८-४६० ). ( ७ ) **शुचित्वः**–आंत विमल आत्मज्ञान व बाहेर शुद्ध कर्माचरण असल्यामुळें तो स्फटिकाच्या तावदानांत ठेवलेल्या दिव्याप्रमाणें शोभून दिसतो. (४६१-४८३). ( ८ ) **स्थैर्यः**–प्रारब्धानुसार दुःखशोकाचे प्रसंग देहावर प्राप्त झाले तरी त्याच्या मनाची बैठक विघडत नाहीं. ( ४८४-५०० ). ( ९ ) **अंतःकरणनिग्रहः**–यम-दमादि साधनांनीं त्यानें आपलें मन इंद्रियाच्या तावडींतून दूर करून चैतन्याशीं समरस केलेलें असतें. (५०१-५११).

( १० ) **वैराग्यः**–ऐहिक व पारत्रिक भोगांबद्दल अरुचि व एकान्तात शमदमादि पारमार्थिक साधनें करण्याकडे अंतःकरणाची ओढ त्याला असते. ( ५१२–५२३ ). ( ११ ) **अनहंकारः**— उत्तम रीतीनें कर्में करूनही तीं मीं केलीं असा अभिमान यत्किंचितही त्याला वाटत नाहीं (५२४-५३४). ( १२ ) **जन्ममृत्यु जराव्याधि दुःखदोष यांचें अनुदर्शनः**—मागें झालेल्या जन्मांचीं दुःखें ज्याला सारखीं सलत असतात व ऐन तारुण्यांतच सावध होऊन तीं पुनः प्राप्त होऊं नयेत म्हणून प्रयत्न करीत असतो; तसेंच मृत्यु, म्हातारपण, रोग हे येण्यापूर्वींच जो सावध असतो. ( ५३५-५९३ ). ( १३ ) **अनासक्तिः**— देह व तत्संबंधीं स्त्री, मुलें व घरदार यांत राहत असूनही त्यांना चिकटलेला नसतो व वाटसरूप्रमाणें उदास वृत्तीनें राहण्याची अनासक्त वृत्ति दिसून येते. ( ५९४–५९९ ). ( १४ ) **समचित्तः**— सुखदुःखाच्या प्रसंगीं स्वतः सुखी अथवा दुःखी होत नाहीं. ( ६००–६०२ ). ( १५ ) **अव्यभिचारी भक्तिः**— माझ्याशिवाय ह्या जगांत दुसरें गोमटें नाहीं, या निश्चयानें कायवाचामनेंकरून माझी सेवा करतो. ( ६०३-६१० ). ( १६ ) **एकान्तप्रियताः**— त्याची एकान्तावर प्रीति असते व त्याला लोकांचा कंटाळा असतो. ( ६११-६१३ ). ( १७ ) **अध्यात्मज्ञाननित्यत्वः**— परमात्मा एक खरा, बाकीचा वाउगा पसारा असा निश्चय त्याचे ठिकाणीं झालेला असतो. ( ६१४-६२२ ). ( १८ ) **तत्त्वज्ञानार्थ दर्शनः**—

मन व बुद्धि शुद्ध करून परब्रह्माचा साक्षात्कार करून घेतो ( तत्वज्ञानाचा अभ्यासाचें फल जें ज्ञेय ब्रह्म तें त्याला सर्वत्र अनुभवाला येतें ) ( ६२३–६३१ ).

तळहातावरील आंवळ्याप्रमाणें हीं ज्ञानाचीं अठरा लक्षणें ज्ञानदेवांनीं स्पष्ट करून रसाळपणानें सांगितलीं. त्यामुळें श्रोते संतुष्ट झाले; तें पाहून पुढील व्याख्यान करण्यास ज्ञानदेवांना अधिकच स्फूर्ति आली. (६३२–६५२) वास्तविक अज्ञान म्हणजे ज्ञानलक्षणांत जें सांगितलें त्याच्या उलट स्थिति; असें भगवंताप्रमाणें ज्ञानदेवांनाही म्हणतां आलें असतें; परंतु त्याज्य गोष्टींचा त्याग करण्यास सोपें व्हावें म्हणून त्यांनीं या अज्ञानलक्षणांचेंही विस्तारानें वर्णन केलें आहे. त्याचा थोडक्यांत मथितार्थ असा—' गर्वानें फुगून जातो, आपण केलेल्या पुण्यकर्मांची दवंडी पिटून लोकांकडून मानमान्यता मिळवतो, जगाला पीडा व दुःख देतो, दुःखानें दडपून जातो, मनांत घात करण्याची वृत्ति ठेवून बाहेरून प्रामाणिकपणाचें ढोंग ठेवतो; गुरुपासून विद्या घेऊन त्यांच्यावरच उलटतो, त्याचें मन अमंगळ व क्रियाही निषिद्ध असते; यत्किंचित लाभासाठीं नियमापासून ढळतो; त्याच्या मनाला कोणताच निग्रह नसून तें सैराट हिंडत असतें; जन्मभर विषय भोगूनही त्याचा त्याला वीट येत नाहीं; या जगांत मीच काय तो आहे, अशा अभिमानवृत्तीनें व दुसऱ्याविषयीं मत्सर ठेवून राहातो; हें कलेवर पडून जाईल, याची कल्पनाही नसल्यामुळें स्त्री-पुत्रादिकांत गुंतून राहतो; पुढें येणारें म्हातारपण, रोग व दुःखें याबद्दल चुकूनसुद्धां विचार करीत नाहीं; आज एक, उद्यां दुसरा अशी देवतान्तरें विषयप्राप्तीकरितां पूजीत असतो; त्याला एकांताचें वावडें असून सदा लोकांच्या गलबल्यांत राहतो, लौकिक प्राप्त करून देणाऱ्या शास्त्राध्ययनाकडे त्याची ओढ असते व आत्मदर्शन करून देणारें योगशास्त्र व उपनिषदें यांच्याकडे चुकूनही पहात नाहीं. त्याला अर्थातच ज्ञेयब्रह्माचें दर्शन होत नाहीं. ( ६५३–८४८ ).

ज्ञानदेवांच्या व्याख्यानावर श्रोते संतुष्ट झाले व 'देवाचें मनोगत । तूं दावीत आहासी मूर्त ॥' अशी त्यांनीं ज्ञानदेवांना शाबासकी दिली. आतां देव यापुढें ज्ञेयाचें व्याख्यान करीत आहेत असें म्हणून ज्ञानदेव ज्ञेयाचें कथन करतात. ( ८४९–८५६ ).

परमात्म वस्तूला ज्ञेय म्हणतात, कारण ज्ञानावांचून ती कोणत्याच उपायानें प्राप्त होत नाहीं. हें ज्ञेय जाणलें असतां मनुष्य कृतकृत्य होऊन नित्यानंदानें भरून जातो. तें ज्ञेय निराकार, रंगरूपरहित आहे; म्हणून नाम, जाति, क्रिया हा संबंध त्याच्या ठिकाणीं नाहीं; परंतु तें दिसत नसलें तरी सर्व पदार्थांना, सर्व काळांत तें व्यापून राहिलें आहे. व्यापून राहिलें हेंहि म्हणणें त्याला खपत नाहीं; कारण जेथें एकच एक आहे तेथें कोण कोणाला व्यापणार ? पण शिष्याची समजूत पटावी म्हणून गुरु ही भाषा वापरतात, इतकेंच. ( ८५७–८९० ).

पंचमहाभूतांतील गुण, विकार व इंद्रियें या सर्वांना याच्याच सत्तेचा आधार आहे. असें सर्वांना व्यापून राहिल्यामुळें अज्ञानी लोकांना तें पदार्थांतील सत्त्वादि गुणासारखें भासतें; पण तें त्यापासून पूर्णपणें अलिप्त आहे. या तिन्ही गुणांचा नाश झाला तरी तें उरतेंच. जगताच्या उत्पत्ति, स्थिति व लय या अवस्थांप्रमाणें लोक त्याला ब्रह्मा, विष्णु व महेश अशीं नांवें देतात; पण ते यांविरहित अखंड एकरसच आहे. देहादि परिग्रहाचा त्याग करून ज्यांनीं या ब्रह्माला यथार्थप्रमाणें जाणलें त्यांना पुढें कांहीं करावयाचें शिल्लक रहात नाहीं. ( ८९१–९३८ )

अवघा एक आत्माच आहे; पण हें बुद्धीला पटत नाहीं म्हणून क्षेत्र, ज्ञान, अज्ञान व ज्ञेय असे चार भेद करून ते सांगावे लागले. तुझी ऐकण्याची तीव्रता पाहून पुनः हाच विचार कपिलमुनींच्या सांख्यशास्त्रांतील परिभाषेंत सांगतों. ( ९३९–९५८ ).

आतांच जे क्षेत्र व क्षेत्रज्ञ सांगितले, त्यांनाच साख्यशास्त्रांत प्रकृति व पुरुष म्हणतात. हीं दोन्हीं अनादि सिद्ध असून अगदीं जुळ्याप्रमाणें आहेत. बुद्धि, इंद्रियें, गुण वगैरे हे प्रकृतीपासून उत्पन्न झाले व त्यांपासून कार्यांची उभारणी होते. गुणाच्या कमीअधिक्याप्रमाणें त्या कर्माला सत्कर्म व निषिद्ध कर्म असें म्हणतात व त्यापासून सुख व दुःख उत्पन्न होतें. हें प्रकृतीपासून उत्पन्न झालेलें सुखदुःख तिचा भर्ता जो पुरुष त्याला भोगावें लागतें, असें आपणांस दिसतें. ( ९५९–९७८ ).

पण वास्तविक पुरुष निराकार, निर्गुण, अकर्ता व अभोक्ता आहे; असें जरी आहे, तरी ही गुणमयी प्रकृति त्याचें सर्व बनून त्याला संसार करावयास लावते व जगाची उभारणी होते. पुरुषानें या प्रकृतिरूपी स्त्रीचा नुसता संग केला म्हणून, त्याला ही जन्ममरणाची अनर्थ परंपरा भोगावी लागली. तो भोगतो असें आपणांस प्रकृतीच्या गुणामुळें वाटतें; पण खरें सांगावयाचें तर तो त्याच्यावर आळ आला आहे. केवळ पुरुषाला जन्मही नाहीं व भोगणेंही नाहीं. ( ९७९–१०२८ ).

हा पुरुषप्रकृतीचा विचार ज्यांनीं यथार्थपणानें जाणला, ते पुरुष देहांत वावरतांना दिसले तरी देहाच्या मोहानें ते भुलत नाहींत. आत्मा व अनात्मा यांच्या सरभेसळींत आत्म्याला निवडून काढण्यासाठीं सांख्य, योग, कर्म असे प्रसिद्ध पण कठीण मार्ग आहेत; पण ज्यांना ही वेगळीक करण्याची सूक्ष्म दृष्टि नाहीं, अशा अज्ञानी जीवांनाही तरणोपाय आहे. त्यांनीं जर निरभिमान होऊन हिताहित जाणणारे जे दयाळू संत आहेत, त्यांच्या पायीं पूर्ण विश्वास ठेवून त्यांचें सर्वभावानें दास्यत्व पत्करलें व त्यांनीं सांगितल्याप्रमाणें जर ते वागले तर तेही या जन्ममरणांतून मुक्त होतात. ( १०२९–१०४६ ).

सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, हे सर्व भिन्न दिसणारे प्राणि एकाच वस्तूपासून उत्पन्न झाले आहेत. या चित्रविचित्र भूतांना व्यापून असणारी वस्तु एकच व अविनाशी आहे; परंतु दुर्दैवी लोकांना त्यांतील एकत्व न दिसतां अनेकत्व दिसतें. जे अगदीं थोडे भाग्यवान आहेत, त्यांची द्वैत कल्पना नाहींशी झाल्यामुळें त्यांना अनेकांत एक असणारी वस्तु दिसते. ते पहातील तिकडे त्यांना एक ब्रह्मच दिसतें. अशा 'साम्यस्थिति-शय्येवर' ते सुखानें निजलेले असतात. ( १०४७–१०८२ ).

देह गुणवान्, नाशिवंत व दुःखरूप आहे व देहांत राहणारा परमात्मा हा निर्गुण, नित्य व आनंदरूप आहे. तो देहाच्या गुणधर्मानें यत्किंचितही लिप्त होत नाहीं. तो या देहाचा प्रकाशक आहे. देह व आत्मा यांतील ही वेगळीक जाणून घेण्यासाठीं साधक अहर्निश खटपट करीत असतात. पदार्थांच्या भिन्न भिन्न रूपानें ही नाशिवंत प्रकृति पसरली आहे व आत्मा त्यापासून अगदीं वेगळा आहे, असा अपरोक्ष अनुभव आल्यावर ते ब्रह्मापासून भिन्न राहत नाहींत. ( १०८३–११४२ ).

याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला प्रकृतिपुरुषाचा संपूर्ण विचार सांगितला. ज्याप्रमाणें दिव्यांत तेल घातलें म्हणजे तो अधिकच प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची उत्कंठा वाढतच होती. भगवंतालाही आपल्या सांगण्याचें सार्थक होत आहे, हें पाहून आनंद झाला व यापुढें सर्व विश्व आनंदमय करण्याचा विचार देव सांगणार आहेत. ( ११४३–११५२ ).

ज्ञानदेवांनाहि यामुळें व्याख्यान करण्यास अधिकच स्फूर्ति आली. शृंगाररसाला मागें टाकील अशा शान्तरसानें-युक्त, अमृतही ज्याच्यापुढें फिकें पडेल अशा अक्षरांनीं भरलेलें, उपमा व अलंकार यांनीं परिपूर्ण असें व्याख्यान यापुढें मी करीन, त्यामुळें खेचर वृत्तीच्या लोकांचाही उद्धार होईल व संपूर्ण जगाला परतत्त्वाचा साक्षात्कार होऊन महानंद अनुभवास येईल, अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली. ती पूर्ण करण्याकरितां श्रीनिवृत्तिनाथ समोरच बसले होते. त्यांना आशिर्वाद देण्याविषयीं लडिवाळपणानें विनवून ज्ञानदेवांनीं हा अध्याय संपविला आहे. (११५३–११५९)



# ज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

आत्मरूप गणेशु स्मरण । सकळ विद्यांचें अधिकरण । तेचि वंदूं श्रीचरण । श्रीगुरूचे ॥ १ ॥ जयांचेनि आठवें । शब्दसृष्टी आंगवे । सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥ २ ॥ वक्तृत्व गोडपणें । अमृतातें पारु म्हणे । रस होती वोळगणें । अक्षरांसी ॥ ३ ॥ भावाचें अवतरण । अवतरविती खूण । हाता चढे संपूर्ण । तत्त्वभेदें ॥ ४ ॥ श्रीगुरूचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय । तैं येवढें भाग्य होय । उन्मेषासी ॥५॥ ते नमस्कारुनि आतां । तो पितामहाचा पिता । लक्ष्मीयेचा भर्ता । ऐसें म्हणे ॥ ६ ॥

श्रीभगवानुवाचः—इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते । एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥
क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत । क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

पार्था परिसिजे । देह हें क्षेत्र म्हणिजे । हेंचि जाणे तो बोलिजे । क्षेत्रज्ञु एथें ॥ ७ ॥ तरि क्षेत्रज्ञु जो एथें । तो मी जाण निरुतें । जो सर्व क्षेत्रातें । संगोपोनि असे ॥ ८ ॥ क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें । ज्ञान ऐसें तयातें । मानूं आम्ही ॥ ९ ॥

तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत् । स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥

तरि क्षेत्र येणें नांवें । हें शरीर जेणें भावें । म्हणितलें तें आघवें । सांगों आतां ॥१०॥ हें क्षेत्र कां म्हणिजे । कैसें कें हें उपजे । कवणकवणीं वाढविजे । विकारा एथ ॥ ११ ॥ हें औट हात मोटकें । कीं केवढें पां केतुकें । बरड कीं पिकें । कोणाचें हें ॥ १२ ॥ इत्यादि सर्व । जे जे याचे भाव । ते बोलिजती सावेव । अवधान देईं ॥ १३ ॥ पैं याचि स्थळाकारणें । श्रुति सदा बोबाणे । तर्कु येणेंचि ठिकाणें । तोंडाळु केला ॥१४॥ चाळितां हेचि बोली । दर्शनें शेवटा आलीं । तेवींचि नाहीं बुझाविलीं । अझुनि द्वंद्वें ॥ १५ ॥ शास्त्रांचिये सोयरिके । विचळिजे येणेंचि एकें । याचेनि एकवंकें । जगासि वादु ॥१६॥ तोंडेसीं तोंडा न पडे । बोलेंसी बोला न घडे । इया युक्ती बडबडे । त्राय जाहली ॥ १७ ॥ नेणों कोणाचें हें स्थळ । परि कैसें अभिलाषाचें बळ । जे



पैं व्याकरणीं चोखडा । तर्कीं अतिगाढा ।
परि एक आत्मज्ञानीं फुडा । जात्यंध जो ॥
मोरा आंगीं अशेषें । पिसें असतीं डोळसें ।
परि एकली दृष्टी नसे । तैसें तें गा ॥

ज्ञानेश्वरी अध्याय १३, ओवी ८३४।३५

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

सर्व विद्यांचें आश्रयस्थान जें आत्मरूप गणेशाचें स्मरण तेंच श्रीगुरूचे श्रीचरण होत. त्यांस नमस्कार करूं. १. ज्या श्रीगुरूंच्या चरणांच्या स्मरणानें शब्दसृष्टि स्वाधीन होते ( म्हणजे शब्दमात्रावर प्रभुत्व येऊन, मनांत स्फुरणारे विचार योग्य शब्दांनीं स्पष्ट सांगण्याचें सामर्थ्य येतें. ) व सकल विद्या जिव्हेवर येतात. २. वक्तृत्व आपल्या गोड-पणानें अमृताला 'पलीकडे सर' असें म्हणतें, व नवरस हे वक्तृत्वांतील शब्दांची सेवा करतात. ३. निरनिराळ्या तत्त्वांतील फरक दाखवून अभिप्रायांची स्पष्टता करणारी जी मार्मिक खूण, ती सर्वांच्या सर्वच आपले स्वाधीन होते. ४. जेव्हां हृदय श्रीगुरूचे पाय धरून राहातें, तेव्हां ज्ञानाला एवढें दैव प्राप्त होतें. ५. त्या श्रीगुरूंच्या चरणांना आतां नमस्कार करून ( मी, ज्ञानेश्वर, ग्रंथ सांगणें पुढें चालू करतों तें असें:—) तो ब्रह्मदेवाचा बाप व लक्ष्मीचा पति श्रीकृष्ण असें म्हणाला. ६.

श्रीकृष्ण म्हणाले, हे कौन्तेया, या शरीराला 'क्षेत्र' असें म्हणतात, ( आणि ) जो हें जाणतो, त्याला 'क्षेत्रज्ञ', असें क्षेत्रक्षेत्रज्ञांस जाणणारे म्हणतात. १. हे भरतकुलोत्पन्ना, सर्व क्षेत्रांचे ठिकाणीं जो क्षेत्रज्ञ, तो मी आहें असें जाण. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ( यथार्थ ) ज्ञान, तें ज्ञान आहे असें माझें मत आहे. २.

अर्जुना, ऐक. या देहाला क्षेत्र म्हणावें व या देहरूपी क्षेत्राला जो जाणतो, त्याला येथें क्षेत्रज्ञ म्हणावें. ७. तरी सर्व क्षेत्रांना पालन करून असतो, असा जो क्षेत्रज्ञ, तो येथें मी आहें, हें पक्कें समज. ८. क्षेत्राला आणि क्षेत्रज्ञाला जें यथार्थ जाणणें, त्याला ज्ञान असें आम्ही समजतों. ९.

तें क्षेत्र कोणतें, कोणत्या प्रकारचें, कोणत्या विकारांनीं युक्त, आणि त्यापासून कोणतें कार्य उत्पन्न होतें, आणि तो क्षेत्रज्ञ कोण व त्याचा प्रभाव कोणता, हें माझ्यापासून संक्षेपानें श्रवण कर. ३.

तर आतां या शरीराचा आम्ही ज्या अभिप्रायानें क्षेत्र या नांवानें उल्लेख केला, तो सर्व अभिप्राय आम्ही सांगतों. १०. याला 'क्षेत्र' असें कां म्हणावें, हें कसें व कोठें उत्पन्न होतें व कोणकोणत्या विकारांमुळें याची वाढ होते; ११. हें मोजकें साडेतीन हातांचेंच आहे अथवा केवढें व कसलें आहे? हें क्षेत्र ( शेत ) माळजमीन आहे अथवा सुपीक जमीन आहे? व कोणाच्या मालकीचें आहे? १२. इत्यादि जे जे सर्व याचे धर्म आहेत, ते पूर्णपणें सांगितले जातील, तिकडे लक्ष दे. १३. याच ठिकाणाकरितां ( क्षेत्राच्या स्वरूपाचा निर्णय करण्या-करितां ) वेदाची नेहमीं बडबड सुरू आहे व याच ठिकाणानें तर्काला वाटाघाट करावयास लावलें. १४. हीच ( क्षेत्रनिर्णयाची ) वाटाघाट करतांना सहा दर्शनें हातटेकीस आलीं; तथापि अजूनपर्यंत त्यांचे भेद मिटले नाहींत. १५. शास्त्रांचें एकमेकाचें नातें याच एकाच्या योगानें मोडलें जातें व याच्या एकनिश्चयासंबंधानें जगांत वादविवाद चालू आहे. १६. एकाचा निर्णय दुसऱ्याचे निर्णयाशीं जुळतां येत नाहीं व एका प्रति-पादनाचा दुसऱ्या प्रतिपादनाशीं मेळ घालतां येत नाहीं. ( उलट ) त्या युक्तीनें बडबडीला जोर आला. १७. हें क्षेत्र कोणाचें आहे, हें कळत नाहीं; परंतु याच्या संबंधानें ज्यानें ज्यानें निर्णय केला आहे, त्यास आपापल्या निर्णयासंबंधानें जो अभिलाष आहे ( माझाच निर्णय बरोबर आहे असा ) त्याचें बळ

घरोघरीं कपाळ । पिटवीत असे ॥ १८ ॥ नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाढें बंड । तें देखोनि पाखांड । आनचि वाजे ॥ १९ ॥ म्हणे तुम्ही निर्मूळ । लटिकें हें वाग्जाळ । ना म्हणसी तरी पोफळ । घातलें आहे ॥ २० ॥ पाखांडाचे कडे । नागवीं लुंचिती मुंडे । नियोजिलीं वितंडें । ताळासि येती ॥ २१ ॥ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वीण काजें । ते देखोनियां व्याजें । निघाले योगी ॥२२॥ मृत्यूनि आधाधिले । तिहीं निरंजन सेविलें । यमदमांचे केले । मेळावे पुरे ॥ २३ ॥ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें । गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला ॥ २४ ॥ ऐसिया पैंजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकरू म्हणोनि कोळसा । कामु केला ॥ २५ ॥ पैं सत्यलोकनाथा । वदनें आलीं बळार्था । तरी तो सर्वथा । जाणेचिना ॥ २६ ॥

ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

एक म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ । मग प्राण हें कूळ । तयाचें एथ ॥ २७ ॥ जे प्राणाचां घरीं । अंगें राबते भाऊ चारी । आणि मना ऐसा आवारी । कुळवाडीकरु ॥ २८ ॥ तयातें इंद्रियबैलांची पेटी । न म्हणे अवसीं पाहाटीं । विषयक्षेत्रीं आटी । काढी भली ॥ २९ ॥ मग विधीची वाफ चुकवी । आणि अन्यायाचें बीं वाफवी । कुकर्माचा करवी । राबु जरी ॥ ३० ॥ तरी तयाचिसारिखें । असंभाड पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीवु ॥ ३१ ॥ नातरी विधीचिये वाफे । सत्क्रियाबीज आरोपे । तरी जन्मशत मापें । सुखचि मविजे ॥ ३२ ॥ तंव आणिक म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आम्हुतें पुसा आघवें । शेताचें या ॥ ३३ ॥ अहो जीवु एथ उखिता । वस्तीकरु वाटे जातां । आणि प्राणु हा बलैता । म्हणोनि जागे ॥ ३४ ॥ अनादि जे प्रकृती । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र हे वृत्ती । इयेचि जाणें ॥ ३५ ॥ आणि इयेतेंचि आघवा । आथी घरमेळावा । म्हणोनि वाहिवा । घरीं वाहे ॥ ३६ ॥ वाहिव्याचिये रहाटी । जे कां मुदल तिघे इये सृष्टी । ते इयेचांचि पोटीं । जहाले गुण ॥ ३७ ॥ रजोगुण पेरी । तेतुलें सत्त्व सोंकरी । एकलें तम करी । संवगणा ॥ ३८ ॥ रचूनि महत्तत्त्वाचें खळें । मळी एकें काळुगेनि पोळें ।

कसें आहे पहा, कीं या निर्णयासंबंधाचा अभिलाष घरोघर याचाच काथ्याकूट करावयास लावतो. १८. नास्तिक लोकांबरोबर वादविवाद करण्याकरितां वेदांचें प्रचंड बंड असल्याचें पाहून, ते पाखंडी लोक निराळीच बडबड करावयास लागले. १९. तो पाखंडी वेदांस असें म्हणतो कीं, तुम्ही निर्मूळ आहांत व तुमचें शब्दपांडित्य खोटें आहे. हें आमचें बोलणें खरें नाहीं. असें जर कोणी ( वेदानुयायी ) म्हणत असेल, तर आम्ही पैजेची सुपारी ( विडा ) ठेविली आहे. ( आमच्याशीं वाद करण्याची ज्याची ताकद असेल त्यानें तो विडा उचलावा. ) २०. पाखंडी लोकांच्या पक्षाकडील दिगंबर वगैरे जैन श्रमणक आपल्या मस्तकावरील केस हातानें उपटून काढण्याचा लोच विधि करितात ( व वेदोक्त कर्म मात्र निंदितात. ) त्यांच्याशीं चर्चा करूं लागलें म्हणजे, त्यांचीं ती ठराविक वितंडाचीं भाषणें आपोआप जाम्यावर येतात. २१. मृत्यूच्या तडाक्यानें हें शरीर व्यर्थ जाईल, असें पाहून त्या निमित्तानें योगी क्षेत्रनिर्णयाकडे सरसावले २२. मृत्यूच्या योगानें भ्यालेल्या त्या योग्यांनीं वनाचा रस्ता धरला व तेथें ( वनांत ) यम व दम यांचा अभ्यास पूर्ण केला. २३. या क्षेत्राचा आपण पक्का निर्णय करूं, या अभिमानानें व क्षेत्रनिर्णयास कैलासाचें राज्य अडथळा करील, म्हणून तें टाकून शंकरानें स्मशानांत वास केला. २४. या प्रतिज्ञेच्या योगानें शंकरास दाही दिशा पांघराव्या लागल्या ( सर्वसंग सोडावा लागला ) व त्यानें काम हा योगभ्रष्ट करणारा ( क्षेत्रनिर्णयाच्या आड पडणारा ) लांचखाऊ आहे, म्हणून त्यास जाळून टाकला. २५. ब्रह्मदेवाला असलेलीं चार मुखें क्षेत्राचा निर्णय करण्याकरितां जोरावर आलीं, तरी त्यांस क्षेत्राचा निर्णय मुळींच कळला नाहीं. २६.

हें ( क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान ) ऋषींनीं आणि छंदोबद्ध ग्रंथांनीं अनेक प्रकारांनीं वर्णन केलें आहे; वेदांतील बृहत्सामसूत्रांनीं व हेतुमान पंडितांनीं हें चांगलें निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. ४.

( येथून क्षेत्रासंबंधानें निरनिराळ्या मतांचा अनुवाद करितात. ) कित्येक ( जीववादी ) असें म्हणतात कीं, " क्षेत्र हें स्थळ जीवाचेंच संपूर्ण आहे. मग प्राण हें त्याचें येथें कूळ आहे. [ जीव हा घरचा एकटाच असल्यामुळें व त्याच्या घरीं शेतकी चालविण्याचा बारदाना, बैल, नांगर, गडी, माणसें वगैरे नसल्यामुळें, त्यानें क्षेत्र ( हें शेत ) प्राण या कुळास वटाईनें दिलें. कारण प्राण या कुळाजवळ शेतकी चालविण्याचा सर्व बारदाना आहे, तो पुढें सांगतात ] २७. कारण प्राणाच्या घरीं अंगानें मेहनत करणारे चार भाऊ ( अपान, व्यान, उदान व समान हे चार वायु ) आहेत आणि मनासारखा ( चपल कारभारी ) शेतीचा कारभार करणारा आहे. २८. त्या प्राणाजवळ इंद्रियरूपी बैलांचा समुदाय आहे. तो प्राण रात्र अथवा दिवस म्हणत नाहीं; आणि विषयरूपी शेतांत चांगली मेहनत करितो. २९. मग कर्तव्याची वाफ चुकवून ( विहित कर्म करण्याची संधि दवडून ) आणि अन्यायाचें बीज पेरून ( श्रुति आज्ञेचें उल्लंघन वगैरे, न्यायाच्या विरुद्ध गोष्टी करून ) कुकर्मरूपी सर्व ( पेरणीपासून तों मळणीपर्यंत ) आटोकाट मेहनत जर त्यानें करविली, ३०. तर जें बीज पेरतो, त्याचें मेहनतीप्रमाणें अतिशय पापाचें पीक येतें आणि मग जीव हा कोट्यवधि जन्म दुःखें भोगतो. ३१. अथवा विधीची योग्य वाफ साधून जर सत्कर्मरूप बीज पेरलें, तर शेकडों जन्मांच्या मापानें सुखच मोजावें " ( म्हणजे शेंकडोंचे शेंकडों जन्म सुख भोगावें. एवढें अचाट पीक येतें ) ३२. ( येथून प्रकृतिवाद्यांच्या मताचा अनुवाद करितात. ) त्यावर आणखी कित्येक ( प्रकृतिवादी ) म्हणतात कीं, " तुम्ही ( जीववादी ) म्हणतां हें बरोबर नाहीं. हें क्षेत्र जीवाचें असें तुम्ही म्हणूं नका. तर या शेताविषयीं तुम्ही सर्व आम्हांला विचारा. ३३. अहो, जीव हा येथें वाटेनें जातां जातां वस्ती करणारा वाटसरू आहे आणि प्राण हा क्षेत्राचा बलुतेदार असल्यामुळें रात्रंदिवस जागतो ( क्षेत्राचें संरक्षण करितो. ) ३४. अनादि जी प्रकृति, जिचें सांख्यशास्त्र वर्णन करितें तिचें हें क्षेत्र, वतन आहे असें समज. ३५. आणि हिच्याजवळ शेतकी चालविण्याचा सर्व बारदाना घरचा आहे, म्हणून ( शेत वटाईनें न देतां ) ही शेत घरींच वाहाते. ३६. या जगांत हे क्षेत्र वाहण्याचे कामीं मुख्य खटपट करणारे जे तीन गुण ( सत्त्व, रज, तम ) हे हिच्याच पोटीं उत्पन्न झाले आहेत. ३७. ( प्रकृतीनें तीन कामें या तिघांकडे नेमून दिलीं, तीं येणेंप्रमाणें–) रजोगुण पेरणी करतो आणि जितकें रजोगुणानें पेरिलें, तितकें सत्त्वगुण रक्षण करितो व एकटा तमोगुण कादणी करतो. ( कापणी करतो. ) ३८. ( आणि मग तमोगुण हा ) महत्तत्त्वाचें खळें तयार करून एकट्या काळ नांवाच्या पोळाकडून मळणी करतो. तेव्हां तेथें ( त्या महत्तत्त्वाचे खळ्यांत ) सूक्ष्म

तेथ अव्यक्ताची मिळे। सांज भली ॥ ३९ ॥ तंव एकीं मतिवंतीं। या बोलाचिया खंती। म्हणितलें या ज्ञप्ती। अर्वाचीना ॥ ४० ॥ हां हो परतत्त्वाआंतु। कें प्रकृतीची मातु। हा क्षेत्रवृत्तांतु उगें आइका ॥ ४१ ॥ शून्यसेजसाळिये। सुलीनतेचिये तुळिये। निद्रा केली होती बळियें। संकल्पें येणें ॥ ४२ ॥ तो अवसांत चेइला। उद्यमीं सदैव भला। म्हणोनि ठेवा झाला। इच्छेसवें ॥ ४३ ॥ निरालंबींची वाडी। त्रिभुवनायेवढी। हे तयाचिये जोडी। रुपा आली ॥ ४४ ॥ महाभूतांचें एकवाट। सैरा वेंटाळूनि भाट। भूतग्रामांचे आघाट। चिरिले चारी ॥ ४५ ॥ यावरी आदी। पांचवटेयाची बांधी। बांधली प्रभेदीं। पंचभूतिकीं ॥ ४६ ॥ कर्माकर्मांचे गुंडे। बांध घातले दोहींकडे। नपुंसकें बरडें। रानें केलीं ॥ ४७ ॥ तेथ येरझारेलागीं। जन्ममृत्यूची सुरंगी। सुहाविली निलागी। संकल्पें येणें ॥ ४८ ॥ मग अहंकारासि एकलाधी। करूनि जीवितावधी। वहाविलें बुद्धी। चराचर ॥ ४९ ॥ यापरी निराळीं। वाढे संकल्पाची डाहाळी। म्हणोनि तो मुळीं। प्रपंचा यया ॥ ५० ॥ इया मतमुक्तकीं। तेथ पडिघायिले आणिकीं। म्हणती हां हो विवेकी। तरी तुम्ही भले ॥ ५१ ॥ परतत्त्वाचां गांवीं। संकल्पसेज देखावी। तरी कां पां न मनावी। प्रकृति तयांची ॥ ५२ ॥ परि हें असो नव्हे। तुम्हीं या न लगावें। आतांचि हें आघवें। सांगिजेल ॥ ५३ ॥ तरि आकाशीं कवणें। केलीं मेघाचीं भरणें। अंतरिक्षीं तारागणें। धरी कवण ॥ ५४ ॥ गगनाचा तडवा। कोणें वोढिला केधवां। वारा हिंडतु असावा। हें कवणाचें मत ॥ ५५ ॥ रोमां कवण पेरी। कोण समुद्र भरी। पर्जन्याचिया करी। धारा कवण ॥ ५६ ॥ तैसें क्षेत्र हें स्वभावें। हे वृत्ती कवणाची नव्हे। हें वाहे तया फावे। येरां तुटे ॥ ५७ ॥ तंव आणिकें एकें। क्षोभें म्हणितलें निकें। तरि भोगिजे एकें। काळें केवीं ॥ ५८ ॥ हें जाणों मृत्यू रागिटा। सिंहाडयाचा दरकुटा। परी काय वांजटा। पूरीजत असे ॥ ५९ ॥ तरि याचा मारु। देखताति अनिवारु। परी स्वमतीं भरु। अभिमानियां ॥ ६० ॥ महाकल्पापरौती। कव घालूनि अवचितीं। सत्यलोकभद्रजाती। आंगीं वाजे ॥ ६१ ॥ लोकपाळ नीच नवे। दिग्गज मेळावे। स्वर्गींचिये आडवे। रिगोनि मोडी ॥ ६२ ॥ येरें याचेनि अंगवातें। जन्ममृत्यूचिये गर्तें। निर्जिवें होऊनि भ्रमतें। जीवमृगें ॥ ६३ ॥ न्याहाळा पां केव्हडा। पसरलासे चवडा। जो करूनियां माजिवडा। आकारगजु ॥ ६४ ॥ म्हणोनि काळाची सत्ता। हा बोलु निरुता। ऐसे वाद पांडुसुता। क्षेत्रालागीं ॥ ६५ ॥ हे बहु उखिविखी। ऋषीं केली नैमिषीं। पुराणें इयेविषीं। मतपात्रिका ॥ ६६ ॥ अनुष्टुभादि छंदें। प्रबंधीं जियें विविधें। तें पत्रावलंबन मदें। करिताति अझुनी ॥ ६७ ॥ वेदींचें बृहत्सामसूत्र। देखणेपणें पवित्र। परी तयाही हें क्षेत्र। नेणवेचि ॥ ६८ ॥ आणीक आणीकींही बहुतीं। महाकवीं हेतुमंतीं।

सृष्टीची चांगली रास बनते." (याप्रमाणें प्रकृति ही क्षेत्राचा उपभोग घेते) ३९. (येथून संकल्पवाद्यांचे मताचा अनुवाद करितात.) तेव्हां कित्येक बुद्धिवानांनीं (संकल्पवाद्यांनीं) या प्रकृतिवाद्यांच्या बोलण्याचें दुःख वाटून म्हटलें कीं, "हें तुमचें ज्ञान अलीकडील आहे. ४०. अहो, परब्रह्म स्वरूपाचे ठिकाणीं (तुमच्या) या प्रकृतीची गोष्ट कोठें आहे ? तर या क्षेत्राची आम्ही बरोबर हकीकत सांगतों, ती तुम्ही निवांतपणें ऐका. ४१. शून्य जें ब्रह्म, त्या ब्रह्मरूपी शय्यागृहामध्यें, पूर्ण लीन अवस्थेच्या गादीवर, या बलवान अशा संकल्पानें निद्रा केली होती. ४२. तो (संकल्प) एकाएकीं जागा झाला व तो उद्योगधंद्यामध्यें चांगला भाग्यवान असल्याकारणानें, त्यानें इच्छा केल्याबरोबर त्यास (त्रिभुवनरूपी) ठेवा प्राप्त झाला. ४३. निराकार परब्रह्मरूपी बागेत लीन दशेंत असणारा त्रिभुवनाएवढा लाभ हा त्याच्यामुळें व्यक्त दशेला आला. ४४. जिकडे तिकडे निरुपयोगी म्हणून पडलेली (अपंचीकृत) महाभूतरूपी पडजमीन (पंचीकरणरूप) मशागतीनें शारखी करून स्वेदजादि प्राणिवर्गांच्या चार हद्दी कायम केल्या. ४५. यानंतर प्रारंभास वेगवेगळ्या पंचमहाभूतांच्या योगानें पंचात्मक मिश्रणाचीं शरीरें तयार केलीं. ४६. मनुष्य शरीररूपी शेताच्या दोन बाजूंस कर्माकर्मांच्या दगडांचे बांध घालून निकस अशा माळजमिनीचीं रानें (सुपीक जमीन) तयार केलीं. ४७. त्या रानांत येण्याजाण्याकरितां संकल्पानें कोणाचाही लाग जेथें लागणार नाहीं, असें जन्ममृत्युरूपी भुयार उत्तम प्रकारचें तयार केलें. ४८. मग या संकल्पानें आपलें आयुष्य आहे, तेथपर्यंत अहंकाराबरोबर एकरूपता करून भेदबुद्धीकडून चराचराची लागवड करविली. ४९. याप्रमाणें निराळीं (परब्रह्मस्वरूपीं) संकल्पाची शाखा वाढते, म्हणून तो संकल्प या प्रपंचाला मूळ आहे" ५०. याप्रमाणें संकल्पवाद्यांच्या तोंडांतून मतरूपी मोती बाहेर आल्यावर त्यांस दुसरे जे स्वभाववादी, त्यांनीं दाबलें. (येथून स्वभाववाद्यांचें मत सांगतात.) ते म्हणाले 'अहो महाराज, आपण तर चांगलेच विचारवंत दिसतां. ५१. परब्रह्मरूपी गांवांत संकल्पाची शेज (लीनअवस्था) जर मानावयाची, तर प्रकृतिवाद्यांची प्रकृति ब्रह्माच्या ठिकाणीं कां मानूं नये ? ५२. पण हें बोलणें राहूं द्या. तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. तुम्ही या क्षेत्रनिर्णयाच्या नादीं लागूं नका. आतां हें सर्व (आमच्याकडून) सांगण्यांत येईल. ५३.



तर आकाशांत मेघामध्यें पाणी कोणी भरलें ? पोकळींत ताऱ्यांचे समूहास कोणीं धारण केलें ? ५४. आकाशाचें छत कोणीं व कधीं उभविलें ? वाऱ्यानें नेहमीं हिंडत असावें ही कोणाची आज्ञा ? ५५. (शरीरावरील) केसांची पेरणी कोण करतो ? समुद्र कोण भरतो ? पावसाच्या धारा कोण करतो ? ५६. त्याप्रमाणें क्षेत्र हें स्वभावतःच झालें असून, हें कोणाचेंही वतन नाहीं. याची जो वहातूक करील (त्याला जो नीटनेटकें जपेल) त्यासच हें उपभोगास मिळतें व इतरांना उपभोगास मिळत नाहीं." ५७. असें स्वभाववादी बोलले, तेव्हां (येथून काळवाद्यांच्या मताचा अनुवाद करतात.) आणखी एक (काळवादी) रागानें म्हणाले कीं, "हें तुमचें बोलणें फार चांगलें आहे बुवा ! तुम्ही म्हणतां असें जर आहे, तर एकटा काळच या क्षेत्राचा उपभोग कसा घेतो ? ५८. मृत्युरूपी रागीट सिंहाची (क्षेत्र हें) दरी आहे असें आम्हांस वाटतें. पण या निरनिराळ्या मताभिमानी लोकांच्या व्यर्थ बडबडीला पुरें पडवेल काय ? ५९. तर या काळाचा अनिवार तडाखा पाहतात, परंतु स्वमताभिमानी लोकांचा आपल्या मतावरच भर असतो. ६०. या काळानें महाकल्पापलीकडे अकस्मात मिठी घातल्यामुळें ब्रह्मदेवाचा राहण्याचा जो सत्यलोक त्या सत्यलोकरूपी हत्तीवरसुद्धां या काळाचा चपेट घात वाजतो. ६१. हा काळरूपी सिंह स्वर्गरूपी अरण्यांत शिरून रोज नवे लोकपाल व दिग्गजांचे समुदाय नाहींसे करतो. ६२. या काळरूपी सिंहाच्या आंगच्या वाऱ्यानें इतर जीवरूप पशु निर्जीव होऊन (निःसत्त्व होऊन) जन्ममृत्यूच्या खळग्यांत भ्रमत राहतात. ६३. सर्व आकारमात्र पदार्थ हाच कोणी हत्ती, तो ज्या चवड्यामध्यें धरला गेला आहे, तो काळरूपी सिंहाचा पंजा केवढा पसरला आहे ! पहा. ६४ म्हणून सर्व काळाची सत्ता आहे, हें बोलणें खरें आहे" (असें काळवादी म्हणतात. येथें काळवाद्यांचें मत संपलें.) अर्जुना, असे हे क्षेत्राविषयीं वाद आहेत. ६५. नैमिषारण्यांत ऋषींनीं या क्षेत्रासंबंधानें पुष्कळ वादविवाद केला आहे. याविषयीं पुराणेंहि साक्षीभूत आधार आहेत. ६६. अनुष्टुप् छंदादि जी निरनिराळ्या प्रकारची (या क्षेत्रासंबंधीं) काव्यरचना आहे, ती ज्या ग्रंथांत आहे, त्या ग्रंथाचा अद्यापपर्यंत लोक गर्वानें आश्रय करतात. ६७. ऋग्वेदांतील जें बृहत्सामनामक सूत्र आहे, तें ज्ञानदृष्टीनें पवित्र आहे. (त्यामध्यें पुष्कळ ज्ञान भरलेलें आहे.) तथापि या सूत्रासहि हें क्षेत्र समजलें नाहीं. ६८. आणखी

ययालागीं मती । वेंचिलिया ॥ ६९ ॥ परी ऐसें हें एवढें । कीं अमुकेयाचेंचि फुडें । हें कोणाही वरपडे । होयचिना ॥ ७० ॥ आतां यावरी जैसें । क्षेत्र हें असे । तुज सांगों तैसें । साद्यंतु गा ॥ ७१ ॥

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च । इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः । एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

तरि महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु । बुद्धि अव्यक्त दशकु । इंद्रियांचा ॥ ७२ ॥ आणिकही एकु । विषयांचा दशकु । सुख दुःख द्वेषु । संघात इच्छा ॥ ७३ ॥ आणि चेतना धृती । एवं क्षेत्रव्यक्ती । सांगितली तुजप्रती । आघवीचि ॥ ७४ ॥ आतां महाभूतें कवणें । कवण विषयो कैसीं करणें । हें वेगळालेपणें । एकैक सांगों ॥ ७५ ॥ तरी पृथ्वी आप तेज । वायु व्योम इयें तुज । सांगितलीं बुझ । महाभूतें पांचें ॥ ७६ ॥ आणि जागातिये दशे । स्वप्न लपालें असे । नातरी अंवसे । चंद्र गूढु ॥ ७७ ॥ नाना अप्रौढबाळकीं । तारुण्य राहे थोकीं । कां न फुलतां कळिकीं । आमोदु जैसा ॥ ७८ ॥ किंबहुना काष्ठीं । वन्हि जेवीं किरीटी । तेवीं प्रकृतिचां पोटीं । गोप्यु जो असे ॥ ७९ ॥ जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पहातु । मग जालिया आंतु । बाहेरी व्यापी ॥ ८० ॥ तैसी पांचांही गांठी पडे । जैं देहाकारु उघडे । तैं नाचवी चहूंकडे । तो अहंकारु गा ॥ ८१ ॥ नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञानापाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥ ८२ ॥ आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐसां चिन्हीं जाणिजे । बोलिलें यदुराजें । तें आइकें सांगों ॥ ८३ ॥ तरी कंदर्पाचेनि बळें । इंद्रियें वृत्तीचेनि मेळे । विभांडूनि येती पाळे । विषयांचे ॥ ८४ ॥ तो सुखदुःखांचा नागोवा । जेथ उमाणों लागे जीवा । तेथ दोहींसीही बरवा । पाडु जे धरी ॥ ८५ ॥ हें सुख हें दुःख । हें पुण्य हें दोष । कां हें मैळ हें चोख । ऐसें निवडी ॥ ८६ ॥ जिये अधमोत्तम सुझे । जिये सानें थोर बुझे । जिया दिठी पारखिजे । विषो जीवें ॥ ८७ ॥ जे तेजतत्त्वाची आदी । जे सत्त्वगुणाची वृद्धी । जे आत्मया जीवाची संधी । वसवीत असे ॥ ८८ ॥ अर्जुना ते गा जाण । बुद्धि तूं संपूर्ण । आतां आइकें वोळखण । अव्यक्ताची ॥ ८९ ॥ पैं सांख्यांचां सिद्धांतीं । प्रकृती जे महामती । तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥ ९० ॥ आणि सांख्ययोगमतें । प्रकृती परिसाविली तूतें । ऐसी दोहीं परी जेथें । विवंचिली ॥ ९१ ॥ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव विशेषा । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ॥ ९२ ॥ तन्ही पाहालया रजनी । तारा लोपती गगनीं । कां हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ॥ ९३ ॥ नातरी देहो गेलिया पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्माचां ॥ ९४ ॥ कां बीजमुद्रेआंतु । थोके तरु समस्तु । कां वस्त्रपण तंतु - । दशे राहे ॥ ९५ ॥ तैसें सांडोनियां स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम । लया जाती सूक्ष्म । होऊनि जेथें ॥ ९६ ॥ अर्जुना तया नांवें । अव्यक्त हें जाणावें । आतां आइकें आघवे । इंद्रियभेद ॥ ९७ ॥ तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन । इयें जाणें ज्ञान - । करणें पांचें ॥ ९८ ॥ इये तत्त्वमेळापकीं । सुखदुःखाची उखिविखी ।

पुष्कळ युक्तियुक्त अशा महाकवींनीं (मोठ्या शास्त्र्यांनीं) या क्षेत्रनिर्णयाकरितां आपल्या बुद्धि खर्च केल्या. ६९. परंतु हें क्षेत्र असें आहे अथवा एवढें आहे, अथवा हें अमक्याच्या मालकीचें नक्की आहे, असें अजूनपर्यंत कोणासहि कळलेंच नाहीं. ७०. आतां अर्जुना, यानंतर क्षेत्र जसें आहे, तसें आरंभापासून शेवटपर्यंत तुला सांगतों. ७१.

पांच महाभूतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त ( मूलप्रकृति ), दहा इंद्रियें व ( अकरावें ) मन, आणि इंद्रियांना गोचर ( असे शब्दादि ) दहा विषय ५. इच्छा, द्वेष, सुख, दुःख, चेतना, धैर्य आणि संघात हें विकारांसह क्षेत्र आहे, असें संक्षेपानें सांगितलें आहे. ६.

तर पांच महाभूतांचा समुदाय आणि एक अहंकार, बुद्धि, अव्यक्त, दहा इंद्रियांचा समुदाय. ७२. आणखी एक ( मन ), दहा विषयांचा समुदाय, सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा, ७३. आणि चेतना व धृति ( सर्व मिळून छत्तीस तत्वें ) याप्रमाणें तुला सर्व क्षेत्र स्पष्ट सांगितलें. ७४. आतां महाभूतें कोणतीं व विषय कोणते, इंद्रियें तीं कशीं, हें निरनिराळें एकेक सांगतों. ७५. तर पृथ्वी, जल, अग्नि, वायु, आकाश हीं तुला सांगितलीं तीं पंचमहाभूतें समज. ७६. आणि जागृतावस्थेंत स्वप्न जसें लीन असतें, अथवा अमावास्येच्या दिवशीं चंद्र जसा गुप्त असतो, ७७. अथवा लहान बालकांमध्यें तारुण्य जसें गुप्त असतें अथवा न उमललेल्या कळींत जसा सुवास गुप्त असतो, ७८. फार काय सांगावें ! अर्जुना, लाकडामध्यें अग्नि जसा गुप्त असतो, त्याप्रमाणें प्रकृतीच्या पोटांत जो ( अहंकार ) गुप्त असतो. ७९. ज्याप्रमाणें शरीरांतील धातूमध्यें गुप्त असलेला ज्वर ( हाडी ज्वर ) प्रगट होण्याकरितां कुपथ्याच्या निमित्ताची वाट पहात असतो; मग कुपथ्य झाल्याबरोबर तो ( ज्वर ) शरीराला जसा आंतून बाहेरून व्यापून टाकतो; ८०. त्याप्रमाणें अर्जुना, पंचमहाभूतांची गांठ पडल्यावर ( पंचीकरण झाल्यावर ) ज्या वेळेस देहाचा आकार स्पष्ट होतो, त्या वेळेस देहाला चोहोंकडे नाचवितो, ( कर्म करण्यास लावतो, ) तो अहंकार होय. ८१. अहंकाराची गोष्ट कांहीं विलक्षणच आहे. ती अशी कीं, अहंकार हा विशेषें-करून अज्ञानी पुरुषाच्या मागें लागत नाहीं; परंतु ज्ञानवान् पुरुषाचें नरडें धरतो आणि त्याला नाना प्रकारच्या संकटांत गोते खावयास लावतो. ८२. आतां बुद्धि जी म्हणावयाची, ती पुढें सांगितलेल्या लक्षणांनीं समजावी; ती सांगतों, अर्जुना, ऐक. असें यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणाले. ८३. तर कामाच्या जोरावर वृत्तीसह इंद्रियें हीं विषयांचे समुदाय जिंकून घेतात. ८४. त्या सुखदुःखांच्या लुटीचा अंतःकरण जेव्हां जीवाला हिशोब दाखवास लागतें, तेव्हां सुख व दुःख या दोहोंविषयीं ही जी योग्य निवड निश्चित करते. ८५. हें सुख, हें दुःख, हें पुण्य, हें पाप अथवा हें अशुद्ध, हें शुद्ध, याप्रमाणें जी निवड करते, ८६. जिला निंद्य व उत्तम हें कळतें, जी लहान अथवा थोर समजते व ज्या दृष्टीनें जीव विषयांची परीक्षा करितो, ८७. जी, ज्ञान या पदार्थाचें उत्पत्तिस्थान आहे, जी सत्वगुणाची वाढती अवस्था आहे आणि जी आत्मा व जीव यांच्यामधील जागेंत रहाते, ८८. अर्जुना, ती सर्व बुद्धि होय, असें तूं समज. आतां अव्यक्ताचें चिन्ह ऐक. ८९. हे महामते अर्जुना, सांख्यांच्या सिद्धान्तामध्यें जी प्रकृति म्हणून सांगितली आहे, तीच येथें सांप्रत अव्यक्त आहे. ९०. आणि सांख्यनामक योगाच्या मताप्रमाणें तुला प्रकृति ऐकविली. ( तेव्हां ) परा व अपरा अशा दोन्ही प्रकारांनीं जेथें ( अध्याय ७ श्लोक ४–५ ) तुला प्रकृतीची फोड करून सांगितली, ९१. तेथें त्यापैकीं दुसरी परा म्हणजे जीवदशानामक प्रकृति आहे, अर्जुना, तिला 'अव्यक्त' हें येथें दुसरें नांव आहे. ९२. ( जीवरूपा प्रकृतीला येथें अव्यक्त कां म्हणावयाचें? याची स्पष्टता येथून करितात. ) तर रात्र उजाडल्यावर तारे जसे आकाशांत लीन होतात, अथवा सूर्यास्त झाल्यावर प्राण्यांचे व्यवहार जसे थांबतात, ९३. अथवा, अर्जुना, देह गेल्यावर देहादिक उपाधि केलेल्या कर्मांच्या पोटांत लीन होऊन असते, ९४. अथवा बीजाच्या आकारांत ज्याप्रमाणें संपूर्ण झाड लीनरूपानें असतें, किंवा वस्त्रपण तंतूरूपानें रहातें, ९५. त्याप्रमाणें स्थूल धर्म टाकून, पंचमहाभूतें व पंचमहाभूतांपासून झालेले प्राण्यांचे समुदाय, हे सूक्ष्म होऊन, जेथें लीन होऊन असतात, ९६. अर्जुना, तें म्हणजे अव्यक्त असें समज. आतां इंद्रियांचे सर्व प्रकार ऐक. ९७. तर कान, डोळे, त्वचा, नाक, जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत, असें समज. ९८. या छत्तीस तत्त्वांच्या मेळ्यांत बुद्धि ही या

बुद्धि करिते मुखीं । पांचें इहीं ॥ ९९ ॥ मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार । पायु हे प्रकार । पांच आणिक ॥१००॥ कर्मेंद्रियें म्हाणिपती । तीं इयें जाणिजती । आइकें कैवल्यपती । सांगतसे ॥१॥ पैं प्राणाची अंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं । तियेचि रिगीनिगी द्वारीं । पांचें इहीं ॥२॥ एवं दाहाही करणें । सांगितलीं देवो म्हणे । परिस आतां फुडेपणें । मन तें ऐसें ॥३॥ जें इंद्रियां आणि बुद्धी । माझारिलिये संधी । रजोगुणाचां खांदीं । तरळत असे ॥ ४ ॥ नीळिमा अंबरीं । कां मृगतृष्णालहरी । तैसें वायांचि फरारी । वावो जाहलें ॥५॥ आणि शुक्रशोणिताचा सांधा । मिळतां पांचांचा बांधा । वायुतत्त्व दशधा । एकाचि जाहलें ॥ ६ ॥ मग तिहीं दाहीभागीं । देहधर्माचां खैवंगीं । अधिष्ठिलें आंगीं । आपुलालां ॥ ७ ॥ तेथ चांचल्य निखळ । एकलें ठेलें निढाळ । म्हणोनि रजाचें बळ । धरिलें तेणें ॥ ८ ॥ तें बुद्धीसी बाहेरी । अहंकाराच्या उरावरी । ऐसां ठायीं माझारीं । बळियावलें ॥ ९ ॥ वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव । जयाचेनि संगें जीव- । दशा वस्तू ॥ ११० ॥ जें प्रवृत्तीसि मूळ । कामा जयाचें बळ । जें अखंड सूये छळ । अहंकारासी ॥ ११ ॥ जें इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी । जें पाठी पुरवी । भयासि गा ॥ १२ ॥ द्वैत जेथें उठी । अविद्या जेणें लाठी । जें इंद्रियातें लोटी । विषयांमाजी ॥ १३ ॥ संकल्पें सृष्टी घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी । मनोरथांचिया उतरंडी । उतरी रची ॥१४॥ जें भुलीचें कुहर । वायुतत्त्वाचें अंतर । बुद्धीचें द्वार । झांकविलें जेणें ॥ १५ ॥ तें गा किरीटी मन । या बोला नाहीं आन । आतां विषयाभिधान । भेदु आइकें ॥ १६ ॥ तरी स्पर्शु आणि शब्दु । रूप रस गंधु । हा विषयो पंचविधु । ज्ञानेंद्रियांचा ॥ १७ ॥ एहींचि पांचै द्वारीं । ज्ञानासि धांव बाहेरी । जैसा कां हिरवे चारीं । भांबावे पशु ॥ १८ ॥ मग स्वर वर्ण विसर्गु । अथवा स्वीकार त्यागु । चंक्रमण उत्सर्गु । विण्मूत्राचा ॥ १९ ॥ हे कर्मेंद्रियांचे पांच । विषय गा साच । जे बांधोनियां माच । क्रिया धांवे ॥ १२० ॥ ऐसे हे दाही । विषय इये देहीं । आतां इच्छा तेही । सांगिजेल ॥ २१ ॥ तरि भूतलें आठवे । कां बोलें कानु झांकवे । ऐसियावरि चेतवे । जे गा वृत्ती ॥ २२ ॥ इंद्रिया-विषयांचिये भेटी- । सरसीच वेगें उठी । कामाची वाहुटी । धरुनियां ॥ २३ ॥ जियेचेनि उठिलेपणें । मना सैंघ धांवणें । न रिगावें तेथ करणें । तोंडें सुती ॥ २४ ॥ जिये वृत्तीचिया आवडी । बुद्धी होय वेडी । विषयां जिया गोडी । ते गा इच्छा ॥ २५ ॥ आणि इच्छिलिया सांगडें । इंद्रियां आमिष न जोडे । तेथ जोडे ऐसा जो डावो पडे । तोचि द्वेषु ॥ २६ ॥ आतां यावरी सुख । तें एवंविध देख । जेणें एकेंचि अशेष । विसरे जीवु ॥ २७ ॥ मना वाचे काये । जें आपुली आण वाये । देहस्मृतीची त्राये । मोडित जें ये ॥ २८ ॥ जयाचेनि जालेपणें । पांगुळा होईजे प्राणें । सात्त्विकासी दुणें । वरीही लाभु ॥ २९ ॥ कां आघावियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचां एकांतीं । थापटूनि सुषुप्ती । आणी जें गा ॥ १३० ॥ किंबहुना सोये । जीव आत्मयाची लाहे । तेथ जें होये । तया नाम सुख ॥ ३१ ॥ आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था । जीजे तेंचि सर्वथा । दुःख जाणें ॥ ३२ ॥ तें मनोरथसंगें नव्हे । एऱ्हवीं सिद्धि गेलेंचि आहे । हे दोनीचि

पांच इंद्रियांच्या द्वारानें सुखदुःखाची वाटाघाट करिते. ९९. नंतर वाचा ( जीभ ), हात, पाय, उपस्थ आणि गुद, हे आणखी पांच इंद्रियांचे प्रकार आहेत. १००. कर्मेंद्रियें ज्यास म्हणतात, तीं हीं समज; असें मोक्षाचे स्वामी ( श्रीकृष्ण ) सांगतात. अर्जुना, ऐक. १०१. शरीरामध्यें क्रियाशक्ति म्हणून जी प्राणाची स्त्री आहे, तिचें शरीराच्या आंत येणें व बाहेर जाणें, या पांच द्वारांनीं होतें. १०२. याप्रमाणें दहाही इंद्रियें सांगितलीं, असें देव म्हणतात. आतां मन हें अशा प्रकारचें आहे; तें निश्चयानें ऐक. १०३. जें मन, इंद्रियें आणि बुद्धि यांच्या मधील जागेंत रजोगुणाच्या खांद्यावर ( आश्रयावर ) चंचलपणानें असतें; १०४. आकाशांतील निळ्या रंगाप्रमाणें अथवा मृगजळावरील लाटांप्रमाणें ज्याचा व्यर्थ खोटा भास होतो; १०५. आणखी, रेत व रक्त यांचा मिलाफ झाला असतां, पंचभूतात्मक शरीराचा आकार तयार होतो. मग तेथें ( त्या शरीरांत ) एकच वायुतत्त्व स्थानभेदेकरून ( पंचप्राण व पंच उपप्राण असें ) दहा प्रकारचें झालें. १०६. मग त्या दहा भागांनीं ( दहा प्रकारच्या वायूंनीं ) देहधर्मांच्या बळकटीनें ( त्या त्या प्राण्याच्या ) शरीरामधील ज्या जागा ठरल्या होत्या, त्या जागांचा आश्रय केला. १०७. त्या ठिकाणीं शुद्ध चांचल्य केवळ एकटें ( आश्रयरहित ) राहिलें, म्हणून त्या चांचल्यानें रजोगुणाचें बळ धरिलें. ( आश्रय केला. ) १०८. तें ( चांचल्य ) बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर, म्हणजे बुद्धि व अहंकार यांच्यामधील जागेंत, बळकट होऊन बसलें. १०९. त्या चांचल्याला मन हें व्यर्थ नांव आहे. वास्तविक पाहिलें तर, ती एक मूर्तिमंत कल्पनाच आहे व त्या मनाच्या संगतीनें वस्तूला ( ब्रह्माला ) जीवदशा प्राप्त झाली आहे. ११०. जें प्रवृत्तीला मूळ आहे व कामाला ज्याचें बळ आहे आणि जें अहंकाराला अखंड चेतवितें; १११. जें इच्छेला वाढवितें, आशेला चढवितें व जें अर्जुना, भयाचें संरक्षण करितें, ११२. जें द्वैताच्या उत्पत्तीची जागा आहे, ज्या योगानें अविद्या बलवान् झाली आहे व जें इंद्रियांना विषयांत ढकलतें; ११३. जें आपल्या संकल्पानें सृष्टि बनवितें व लागलीच विकल्पानें मोडतें; आणि मनोरथांच्या उतरंडी उतरतें व रचतें, ११४. जें भ्रांतीचें कोठार आहे, जें वायुतत्त्वाच्या आंतला गाभा आहे व ज्यानें बुद्धीचें द्वार झांकिलें आहे. ११५. अर्जुना, तें मन होय, यांत कांहीं अन्यथा नाहीं. आतां विषयांची वेगवेगळीं नांवें ऐक. ११६, तर शब्द आणि स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचे पांच प्रकारचे विषय आहेत. ११७. या पांच द्वारांनींच ज्ञान बाहेर धांवतें. तें कसें ? तर जसें हिरवेंगार गवत उगवलेल्या कुरणामध्यें जनावरें भांबावतात. ( तसें ज्ञान भांबावतें ) ११८. मग तोंडानें स्वर आणि अक्षरें व विसर्ग यांचा उच्चार करणें, अथवा हातानें घेण्याची व टाकण्याची क्रिया करणें, पायानें चालणें, उपस्थानें मूत्राचा त्याग करणें व गुदानें मलाचा त्याग करणें; ११९. हे पांच कर्मेंद्रियांचे पांच विषय खरे आहेत. व यांचा पहाड बांधून त्यावरून क्रियेचा व्यवहार चालू रहातो. १२०. याप्रमाणें हे दहा विषय या देहामध्यें आहेत व आतां इच्छा काय, तेंही सांगण्यांत येईल. १२१. तर मागील भोगलेल्या गोष्टींच्या आठवणीनें अथवा दुसऱ्याच्या मुखांतून ऐकिलेल्या शब्दांनीं, कान झांकावेसे वाटतात; अशानें जी वृत्ति जागी होते. १२२. इंद्रियें व विषय यांची भेट होताक्षणींच कामाचा हात धरून जी वृत्ति वेगानें उठते, १२३. जी वृत्ति उठली असतां मन एकसारखें धांवावयास लागतें व जेथें प्रवेश करूं नये तेथें इंद्रियें तोंडें खुपसतात, १२४. ज्या वृत्तीच्या प्रेमामुळें बुद्धि वेडी होते व ज्या वृत्तीला विषयांची गोडी असते, अरे अर्जुना, ती इच्छा ( असें तूं समज. ) १२५. आणि इच्छा केल्याप्रमाणें इंद्रियांना इच्छित विषय प्राप्त न होणें, अशी स्थिति घडून आली असतां, तेथें उत्पन्न होणारी जी वृत्ति, तिला द्वेष असें म्हणतात. १२६. आतां यानंतर सुख तें या प्रकारचें आहे; तें असें समज कीं, ज्या एकाच्या योगानेंच जीव सर्व विसरून जातो, १२७. जें मनाला, वाचेला आणि कायेला आपली शपथ घालतें, ( व्यापार बंद करतें ) आणि जें देहस्मृतीचें बळ मोडीत येतें, १२८. जें उत्पन्न झालें असतां, प्राण पांगळा ( शांत ) होतो व सात्विकवृत्ति पूर्वीपेक्षां दुपटीचे वर वाढते, १२९ आणि अर्जुना, जें सर्व इंद्रियवृत्तींना हृदयरूपी एकांत स्थळांत आणून व त्यांस तेथें थापटून गाढ निद्रा आणतें, १३०. फार काय सांगावें ! जीवाला आत्म्याचा लाभ ( ऐक्य ) जेथें प्राप्त होतो, तेथें जी स्थिति होते, त्या स्थितीला सुख हें नांव आहे. १३१. आणि अर्जुना, अशी ही स्थिति प्राप्त न होतां जें जगणें, तेंच सर्वथा दुःख आहे, असें समज. १३२. तें सुख मनोरथांच्या संगतीनें प्राप्त होत नाहीं. एऱ्हवीं ( मनानें मनोरथ करण्याचें सोडून दिलें

उपाये। सुखदुःखासी ॥ ३३ ॥ आतां असंगा साक्षिभूता। देहीं चैतन्याची जे सत्ता। तिये नांव पांडुसुता। चेतना येथें ॥ ३४ ॥ जे नखौनि केशवरी। उभी जागे शरीरीं। जे तिहीं अवस्थांतरीं। पालटेना ॥ ३५ ॥ मनबुद्ध्यादि आघवीं। जियेचेनि टवटवी। प्रकृतिवनमाधवी। सदांचि जे ॥ ३६ ॥ जडाजडीं अंशीं। राहाटे जे सरिसी। ते चेतना गा तुजसीं। लटिकें नाहीं ॥ ३७ ॥ पैं रावो परिवारु नेणे। आज्ञाचि परचक्र जिणे। कां चंद्राचेनि पूर्णपणें। सिंधू भरती ॥ ३८ ॥ नाना भ्रामकाचें सान्निधान। लोहो करी सचेतन। कां सूर्यसंगु जन। चेष्टवी गा ॥ ३९ ॥ अगा मुखमेळेंविण। पिलियाचें पोषण। करी निरीक्षण। कूर्मी जेवीं ॥ १४० ॥ पार्था तियापरी। आत्मसंगती इये शरीरीं। सजीवत्वाचा करी। उपेगु जडा ॥ ४१ ॥ मग तियेतें चेतना। म्हणिपे पैं अर्जुना। आतां धृतिविवंचना – । भेदु आइक ॥ ४२ ॥ तरी तत्त्वां परस्परें। उघड जातिस्वभाववैरें। नव्हे पृथ्वीतें नीरें। न नाशिजे ॥ ४३ ॥ नीरातें आटी तेज। तेजा वायूसिं झुंझ। आणि गगन तंव सहज। वायू भक्षी ॥ ४४ ॥ तेवींचि कोणेही वेळे। आपण कायिसयाही न मिळे। आंत रिगोनि वेगळें। आकाश हें ॥ ४५ ॥ ऐसीं पांचही भूतें। न साहती एकमेकांतें। कीं तियेंही ऐक्यातें। देहासी येती ॥ ४६ ॥ द्वंद्वाची उखिविखी। सोडूनि वसती एकीं। एकेकातें पोखी। निजगुणें गा ॥ ४७ ॥ ऐसें न मिळे तयां साजणें। चळे धैर्यें जेणें। तयां नांव म्हणें। धृती मी गा ॥ ४८ ॥ आणि जीवेंसी पांडवा। या छत्तिसांचा मेळावा। तो हा एथ जाणावा। संघातु पैं गा ॥ ४९ ॥ एवं छत्तीसही भेद। सांगितले तुज विशद। यया येतुलेयातें प्रसिद्ध। क्षेत्र म्हणिजे ॥ १५० ॥ रथांगांचा मेळावा। जेवीं रथु म्हणिजे पांडवा। कां अधोर्ध्व अवेवां। नांव देहो ॥ ५१ ॥ करीतुरंगसमाजें। सेना नाम निफजे। कां वाक्यें म्हणिजती पुंजे। अक्षरांचे ॥ ५२ ॥ कां जळधरांचा मेळा। वाच्य होय आभाळा। नाना लोकां सकळां। नाम जग ॥ ५३ ॥ कां स्नेहसूत्रवन्ही। मेळु एके स्थानीं। धरिजे तो जनीं। दीपु होय ॥ ५४ ॥ तैसीं छत्तीसही इयें तत्त्वें। मिळती जेणें एकत्वें। तेणें समूहपरत्वें। क्षेत्र म्हणिपे ॥ ५५ ॥ आणि वाहतेनि भौतिकें। पाप पुण्य येथें पिके। म्हणोनि आम्ही कौतुकें। क्षेत्र म्हणों ॥ ५६ ॥ एकाचेनि मतें। देह म्हणती ययातें। परि असो हें अनंतें। नामें यया ॥५७॥ पैं परतत्त्वाअरौतें। आणि स्थावरांताआंतौतें। जें कांहीं होतें जातें। क्षेत्रचि हें ॥ ५८ ॥ परि सुरनरउरगीं। घडत आहे योनिविभागीं। तें गुणकर्मसंगीं। पडिलेंसातें ॥ ५९ ॥ हेंचि गुणविवंचना। पुढां म्हाणिपैल अर्जुना। प्रस्तुत आतां ज्ञाना। रूप दावूं ॥ १६० ॥ क्षेत्र तंव सविस्तर। सांगितलें सविकार। म्हणोनि आतां उदार। ज्ञान आइक ॥६१॥ जया ज्ञानालागीं। गगन गिळिताती योगी। स्वर्गाची आडवंगी। उमरडोनि ॥ ६२ ॥ न करिती सिद्धीची चाड। न धरिती ऋद्धीची भीड। योगाऐसें दुवाड। हेळसिती ॥ ६३ ॥ तपोदुर्गें वोलांडित। क्रतुकोटि वोवांडित। उलथूनि

की ) ते स्वतः सिद्ध आहेच. हे दोनच उपाय ( मनाची स्थिरता व मनाची चंचलता ) सुखदुःखाला कारणीभूत आहेत. १३३. अर्जुना, आतां असंग साक्षी-भूत अशा चैतन्याची देहामध्यें जी सत्ता आहे, तिला येथें चेतना हें नांव आहे. १३४. जी ( पायांच्या ) नखापासून तों ( मस्तकाच्या ) केसापर्यंत शरीरामध्यें नेहमीं खडखडीत जागत असते आणि जी तीन्ही अवस्थां-मध्यें बदलत नाहीं, १३५. मन, बुद्धि वगैरे जिच्या योगानें प्रसन्न असतात व जी नेहमीं प्रकृति–( शरीर ) रूपी वनाचा वसंत ऋतु आहे, १३६ जी जड व चेतन पदार्थांत सारखी वागते, ती अर्जुना, चेतना होय, हें मी तुला खोटें सांगत नाहीं. १३७. आपला लवाजमा वगैरे किती आहे, हें राजास ठाऊक नसतांही, त्याची आज्ञाच जशी परचक्राचें निवारण करते अथवा पूर्ण चंद्राच्या उदयानें समुद्रास जशी भरती येते, ( पण आपल्या योगानें समुद्रास भरती आली, हें असें चंद्रास माहीत नसतें. ) १३८. अथवा लोहचुंबकाची जवळीक लोखं-डास सचेतन करते ( हालचाल करावयास लावते ) अथवा सूर्याची संगति जशी लोकांस व्यापार करावयास लावते, १३९. अरे अर्जुना, कासवी ज्याप्रमाणें आपल्या पिलांचें पोषण मुख लावल्याशिवाय पाहाण्यानें करते, १४०. अर्जुना, त्याप्रमाणें या शरीरांत आत्मसंगति ही जडाला सजीवत्वाचा उपयोग करते, ( म्हणजे जडाला चेतनदशेला आणते, ) १४१. याप्रमाणें अर्जुना, जडाला चेतनदशा आणल्याकारणानें, त्या आत्मसत्तेला 'चेतना' असें म्हटलें जातें. आतां धैर्याच्या विचाराचा प्रकार ऐक. १४२. तर पंचमहाभूतांमध्यें एकमेकांशीं त्यांच्या त्यांच्या जातीच्या स्वभावानें उघड वैर आहे. पाणी पृथ्वीचा नाश करीत नाहीं काय? १४३. पाण्याला तेज आटवून टाकतें, तेजाचें आणि वायूचें वैर आहे आणि आकाश तर सहज ( स्वभावतः ) वायूला नाहींसा करतें. १४४. त्याप्रमाणें कोणत्याही वेळीं आपण कशानेंही न मळतां जें सर्व वस्तूंमध्यें शिरून, पुनः सर्वांहून स्वरूपतः अलग असतें, तें हें आकाश होय. १४५. अशीं पांचही महाभूतें एकमेकांला सहन करीत नाहींत; असें त्यांचें स्वभावतः वैर असूनही, तीं पंचमहाभूतें एक होऊन देहाच्या रूपानें प्रगट होतात, १४६. म्हणजे द्वंद्वाची उखीविखी ( वैराविषयीं वादविवाद ) सोडून एकोप्यानें राहतात; इतकेंच नव्हे तर अर्जुना, आपल्या गुणानें एक दुसऱ्याला पोषीत असतो. १४७. याप्रमाणें ज्यांचें स्वभावतः एकमेकांशीं पटत नाहीं, त्यांची एकमेकांशीं मैत्री असणें, हें ज्या धैर्याच्या योगानें चालतें, त्याचें नांव धृति असें मी म्हणतों. १४८. आणि अर्जुना, वर सांगितलेल्या या पस्तीस तत्त्वांचा जीवाभावानें असणारा समुदाय, हा समुदाय येथें छत्तिसावें संघात नांवाचें तत्त्व जाणावें. १४९. याप्रमाणें छत्तीसही प्रकार तुला स्पष्ट सांगितले. या एकत्र्यांना क्षेत्र म्हणतात, हें प्रसिद्ध आहे. १५०. चाक, जूं वगैरे रथाच्या भागांच्या समुदायास, अर्जुना, ज्याप्रमाणें रथ म्हणावें किंवा ( शरीराच्या ) वरच्या व खालच्या अवयवांस एकत्र मिळून, जसें देह हें नांव येतें; १५१. हत्ती, घोडे वगैरेंच्या समुदायास जसें सैन्य हें नांव उत्पन्न होतें किंवा अक्षरांच्या समुदायांना वाक्यें म्हणतात; १५२. अथवा ढगांचा समुदाय, आभाळ या नांवानें बोलला जातो अथवा सर्व लोकांस मिळून जग हें नांव येतें; १५३. अथवा तेल, वात व अग्नि, यांचा एके ठिकाणीं संयोग करून ठेवणें, तोच लोकांत दिवा म्हणून प्रसिद्ध होतो, १५४. त्याप्रमाणें हीं छत्तीस तत्त्वें ज्या एकत्वानें जमा होतात, त्या समुदायपरत्वानें त्यास क्षेत्र असें म्हटलें जातें. १५५. लागवडीस आणलेल्या या शरीराच्या योगानें येथें ( शरीररूप शेतांत ) पाप-पुण्यरूप पीक पिकतें, म्हणून आम्ही कौतुकानें ह्या देहाला क्षेत्र असें म्हणतों. १५६. कित्येकांच्या मतानें याला देह असें म्हणतात; पण आतां हें राहूं दे. या क्षेत्राला अनंत नांवें आहेत. १५७. परंतु परब्रह्माच्या अलीकडे व स्थावराअखेरपर्यंत धरून, त्या दोहोंच्या दरम्यान जें जें कांहीं उत्पन्न होतें व नाहींसें होतें, तें सर्व क्षेत्रच होय. १५८. परंतु गुण व कर्म यांच्या संगतींत सांपडलें असतां, देव, मनुष्य, सर्प वगैरे जातींच्या वेगळेपणानें या क्षेत्राची रचना होते. १५९. अर्जुना, ह्याच गुणांचा विचार तुला पुढें ( अध्याय १४ मध्यें ) सांगण्यांत येईल. सांप्रत आतां ज्ञानाचें स्वरूप सांगतों. १६०. क्षेत्र तर आम्हीं तुला विकारांसह विस्तारपूर्वक सांगितलें. म्हणून आतां उदार ज्ञान ऐक. १६१. ज्या ज्ञानाकरितां योगी हे स्वर्गाचा आडमार्ग उलंघून आकाश गिळतात ( म्हणजे मूर्ध्निआकाशाचा लय करतात. ) १६२. ( ज्या ज्ञानाकरितां योगी ) सिद्धीची इच्छा करीत नाहींत आणि ऐश्वर्याची परवा करीत नाहींत, आणि योगासारखी कष्टसाध्य गोष्ट तुच्छ मानतात, १६३. ( ज्या ज्ञानाकरितां कित्येक लोक ) तपरूपी डोंगरी किल्ले ओलांडून पलीकडे जातात आणि कोट्यावधि यज्ञ

सांडित । कर्मवल्ली ॥ ६४ ॥ नाना भजनमार्गीं । धांवत उघडां आंगीं । एक रिगताति सुरंगी । सुषुम्नेचिये ॥ ६५ ॥ ऐसी जिये ज्ञानीं । मुनीश्वरांसी उतान्ही । वेदतरूचां पानोवानीं । हिंडताती ॥ ६६ ॥ देईल गुरुसेवा । इया बुद्धी पांडवा । जन्माचा सांडोवा । टाकित जे ॥ ६७ ॥ जया ज्ञानाची रिगवणी । आविद्ये उणें आणी । जीवाआत्मया बुझावणी । मांडूनि दे ॥ ६८ ॥ जें इंद्रियांचीं द्वारें आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी । जें दैन्याचि फेडी । मानसाचें ॥ ६९ ॥ द्वैताचा दुकाळु पाहे । साम्याचें सुयाणें होये । जया ज्ञानाची सोये । ऐसें करी ॥ १७० ॥ मदाचा ठावोचि पुसी । जें महामोहातें ग्रासी । नेदी आपपरु ऐसी । भाष उरों ॥ ७१ ॥ जें संसारातें उन्मूळी । संकल्पपंकु पाखाळी । अनावरा वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥ ७२ ॥ जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे । जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥ ७३ ॥ ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान । जेथ विटाळलें मन । चोख कीजे ॥ ७४ ॥ आत्मया जीवबुद्धी । जे लागली होती क्षयव्याधी । ते जयाचिया सन्निधी । निरुजा करी ॥ ७५ ॥ तें अनिरूप कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धी आणिजे । वांचूनि डोळां देखिजे । ऐसें नाहीं ॥ ७६ ॥ मग तेंचि इये शरीरीं । जें आपुला प्रभावो करी । तैं इंद्रियांचां व्यापारीं । डोळांहि दिसे ॥ ७७ ॥ पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें । जाणिजे तेवीं करणें । सांगती ज्ञान ॥ ७८ ॥ अगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळीं । तें शाखांचिये बाहाळीं । बाहेर दिसे ॥ ७९ ॥ कां भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचार गौरव । सुकुलीनाचें ॥ १८० ॥ अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्ती । कां दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्यपुरुष ॥ ८१ ॥ नातरी केळीं कापूर जाहला । जेवीं परिमळें जाणों आला । कां भिंगारीं दीपु ठेविला । बाहेरि फांके ॥ ८२ ॥ तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जिये देहीं उमटती चिन्हें । तियें सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥ ८३ ॥

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे । संभावितपणाचें । वोझें जया ॥ ८४ ॥ आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां । योग्यतेचें येतां । रूप आंगा ॥ ८५ ॥ तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा । कां बाहीं तरतां वळसां । दाटला जेवीं ॥ ८६ ॥ पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे । गरिमेतें आंगाकडे । येवोंचि नेदी ॥ ८७ ॥ पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥ ८८ ॥ तेथ सत्काराची गोठी । कें आदरा देईल भेटी । मरणेंसीं साटी । नमस्कारितां ॥ ८९ ॥ वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजीं दडे ।

आचरून त्या अनुष्ठानांतून पार पडतात; आणि कर्मरूपी वेलाची उलथापालथ करून (आचरण करून) त्याचा त्याग करितात. १६४. अथवा (ज्या ज्ञानाकरितां) कित्येक उघड्या अंगांनीं (अंतर्बाह्य परिग्रह टाकून) भजन मार्गानें धांवतात; व कित्येक सुषुम्नेच्या भुयारांत शिरतात; १६५. याप्रमाणें मुनीश्वरांस ज्या ज्ञानाच्या ठिकाणीं इच्छा असते व ते मुनीश्वर ज्या ज्ञानाकरितां वेदरूपी झाडाचें पान ना पान हिंडतात; (म्हणजे संपूर्ण वेदाचें अध्ययन करितात.) १६६. अर्जुना, गुरुसेवेनें तें ज्ञान मिळेल, या बुद्धीनें त्या सेवेवरून आपला जन्म ओंवाळून टाकतात, (जन्मभर गुरुसेवा करतात); १६७. ज्या ज्ञानाचा प्रवेश अविद्येला नाहींसें करतो, आणि जीव व ब्रह्म यांचें ऐक्य करून देतो, १६८. जें ज्ञान इंद्रियांचीं द्वारें बंद करतें, बहिर्मुखवृत्तीचे पाय मोडतें आणि जें मनाचें दारिद्र्यच नाहींसें करतें; १६९. द्वैतरूपी दुष्काळ नाहींसा होतो व सर्वत्र समबुद्धीच्या बोधरूपी सुबत्तेचे दिवस येतात, ज्या ज्ञानाची प्राप्ति अशी स्थिति प्राप्त करून देते; १७०. जें ज्ञान उन्मत्तपणाचा ठावठिकाण नाहींसा करतें व जें जबरदस्त भ्रांतीस नाहींसें करतें, व (जें) आपलें आणि दुसऱ्याचें, ही गोष्टच शिलक राहूं देत नाहीं, १७१. अर्जुना, जें ज्ञान संसाराला मूळासकट उपटून टाकतें व संकल्परूपी चिखल साफ धुवून टाकतें व आकलन करण्यास कठीण अशा परब्रह्माला जें ज्ञान व्यापून टाकतें; १७२. ज्या ज्ञानाच्या प्रकाशानें बुद्धीची दृष्टि उघडते व जीव आनंदाच्या पोटावर लोळतो; १७३. असें जें ज्ञान, जें पवित्रपणाचा एकच ठेवा आहे व जेथें (जें प्राप्त झालें असतां) (विषयानें) विटाळलेलें मन शुद्ध करतां येतें; १७४. देहबुद्ध्यादि अनात्म पदार्थ मी आहें (म्हणजे मी जीव आहें.) असा (भ्रमाचा) क्षयरोग आत्म्याला जो झाला होता, तो रोग, ज्याचा सहवास बरा करतो. १७५. तें ज्ञान निरूपण करण्यासारखें नाहीं, तथापि त्याचें निरूपण केलें जाईल; आणि तें ज्ञानाचें निरूपण ऐकल्यावर (ज्ञान) बुद्धीला जाणतां येईल. याशिवाय डोळ्यांनीं पाहतां येईल असें (तें ज्ञान) नाहीं. १७६. मग तेंच ज्ञान जेव्हां या शरीरांत आपली शक्ति प्रगट करतें, तेव्हां तें इंद्रियांच्या क्रियेवरून डोळ्यांनाही दिसतें. १७७. वसंताचा प्रवेश झाडांच्या टवटवीतपणावरून जाणतां येतो, त्याप्रमाणें ज्ञानवान पुरुषांचीं इंद्रियें त्या



पुरुषांत ज्ञानाचें अस्तित्व दाखवितात. १७८. अरे अर्जुना, वृक्षाला जमिनीमध्यें पाणी सांपडतें. (तें पाणी जरी डोळ्याला प्रत्यक्ष दिसत नाहीं) तरी तें बाहेर फांद्यांच्या विस्तारावरून दिसतें. १७९. अथवा अंकुराचा लुसलुशीतपणा हा जमिनीचा मृदुपणा सांगतो किंवा आचार हा चांगल्या कुलवानाचा थोरपणा दाखवितो. १८०. अथवा आदरातिथ्याच्या तयारीवरून जसा स्नेह प्रगट होतो किंवा दर्शनानें होणाऱ्या समाधानावरून पुण्यपुरुष ओळखूं येतो; १८१. अथवा केळींत उत्पन्न झालेला कापूर जसा सुवासानें कळण्यांत येतो अथवा भिंगाच्या आंत ठेवलेला जो दिवा, त्याचा प्रकाश जसा भिंगाच्या बाहेर पसरतो. १८२. त्याप्रमाणें हृदयांतील ज्ञानानें देहाच्या ठिकाणीं जीं लक्षणें उमटतात, तीं आतां सांगतों. चांगलें लक्ष देऊन ऐक. १८३.

अमानित्व, दंभरहितता, अहिंसा, सर्वसहनशीलता, सरळपणा, सद्गुरुसेवा, (आंतर व बाह्य) शुद्धि, स्थैर्य, अंतःकरणनिग्रह, ७.

तर कोणत्याही बाबतींत कोणाचीही बरोबरी करणें, ज्याला आवडत नाहीं व मोठेपणाचें ज्याला ओझें वाटतें, १८४. त्याच्या अंगीं असलेल्या गुणांचें वर्णन केलें तर व तो खरोखर मानास योग्य आहे म्हणून त्यास मान देऊं लागलें तर, अथवा लोकांनीं मागण्याजोगी पात्रता आपल्या अंगीं आली आहे अशी त्या पात्रतेची प्रगटता झाली तर, १८५. त्या वेळीं तो कसा गडबडून जातो, तर ज्याप्रमाणें पारध्यानें चोहोंकडून वेढिलेलें हरीण घाबरें होतें अथवा हातांनीं पोहून जात असतां, तो पोहणारा मनुष्य ज्याप्रमाणें भोंवऱ्यांत सांपडावा, १८६. अर्जुना, तितक्या प्रमाणानें सन्मानाच्या योगानें ज्याला संकट वाटतें आणि जो मोठेपणाला आपल्या अंगाकडे येऊंच देत नाहीं; १८७. आपली पूज्यता आपण डोळ्यांनीं पाहूं नये, आपली कीर्ति आपण कानांनीं ऐकूं नये, हा एक अमुक मनुष्य आहे, अशी आपली लोकांना आठवणच होऊं नये; १८८. (असें ज्याला वाटतें) अशा पुरुषाच्या ठिकाणीं सत्काराची गोष्ट कोठें आहे? (म्हणजे अशा पुरुषाला आपला सत्कार व्हावा, असें कसें वाटेल?) असा मनुष्य आदराला भेट कशी देईल? (म्हणजे आपला आदर व्हावा, अशी कशी इच्छा करील?) त्याला जर कोणी नमस्कार केला, तर त्याला तें मरणासारखें वाटतें. १८९. बृहस्पतीच्या तोडीची सर्वज्ञता तर

महिमेभेणें ॥ १९० ॥ चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनि ॥ ९१ ॥ लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु । उगेपणीं चांगु । आथी भरु ॥ ९२ ॥ जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयचि न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ ९३ ॥ तळौटेपण बाणे । आंगीं हिणावो खेवणें । तें तेंचि करणें । बहुतकरुनी ॥ ९४ ॥ हा जीतु ना नोहे । लोक कल्पी येणें भावें । तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ॥ ९५ ॥ पैं चालतु कां नोहे । कीं वारेनि जातु आहे । जना ऐसा भ्रमु जाये । तैसें होइजे ॥ ९६ ॥ माझें असतेपण लोपो । नांवरूप हारपो । मज झणें वासिपो । भूतजात ॥ ९७ ॥ ऐसी जयाचीं नवसियें । जो नित्य एकांता जातु जाये । नांवेंचि जो जिये । विजनाचेनि ॥ ९८ ॥ वायू आणि तया पडे । गगनेसीं बोलों आवडे । जीवें प्राणें झाडें । पढियंतीं जया ॥ ९९ ॥ किंबहुना ऐसीं । चिन्हें जया देखसी । जाण तया ज्ञानेंसीं । शेज जाहली ॥ २०० ॥ पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणावें इहीं मिषीं । आतां अदंभाचिया वोळखिसी । सौरसु देवों ॥ १ ॥ तरि अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें । जीवु जावो परि नुमसे । ठेविला ठावो ॥ २ ॥ तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं । परि सुकृत न प्रकटी । आंगें बोलें ॥ ३ ॥ खडाणे आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना । कां राहे पण्यांगना । वडिलपणें ॥ ४ ॥ आढ्यु आतुडे आडवीं । मग आढ्यता हारवी । नातरी कुळवधू लपवी । अवेवांतें ॥ ५ ॥ नाना कृषीवळु आपुलें । पांघुरवी पेरिलें । तैसें झांकी निपजलें । दानपुण्य ॥ ६ ॥ वरिवरी देह न पूजी । लोकांतें न रंजी । स्वधर्मु वाग्ध्वजीं । बांधों नेणे ॥ ७ ॥ परोपकारु न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विकूं जोडलें । स्फीतीसाठीं ॥ ८ ॥ अंगभोगांकडे । पाहातां कृपणु आवडे । एऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥ ९ ॥ घरीं दिसे सांकड । देहींची आयती रोड । परी दानीं जया होड । सुरतरूसीं ॥ २१० ॥ किंबहुना स्वधर्मीं थोरु । अवसरीं उदारु । आत्मचर्चे चतुरु । एऱ्हवीं वेडा ॥ ११ ॥ केळीचें दळवाडें । हळू पोकळ आवडे । परि फळोनियां गाढें । रसाळ जैसें ॥ १२ ॥ कां मेघाचें आंग झील । दिसे वारेनि जैसें जाईल । परि वर्षती नवल । घनवट तें ॥ १३ ॥ तैसा जो पूर्णपणीं । पाहतां धाती आयणी । एऱ्हवीं तरी वाणी । तोचि ठावो ॥ १४ ॥ हें असो

त्याला प्राप्त झालेली असते, परंतु महत्त्वाच्या भीतीनें तो वेडांत लपतो. १९०. आपले ठिकाणीं असलेलें शहाणपण तो लपवून ठेवतो, आपल्यांत असलेला मोठेपणा बेपत्ता करून टाकतो व मोठ्या आवडीनें वेडेपण लोकांत दाखवितो. १९१. लोकांत होणाऱ्या प्रसिद्धीची त्यास शिसारी असते व शास्त्रांचा वादविवाद करण्याचा त्याला कंटाळा असतो; कांहीं न करतां उगाच राहण्यावर त्याचा अतिशय भर असतो, १९२. लोकांनीं आपला अनादरच करावा व नातलगांनीं आपला थाराच धरूं नये ( आपल्या नादीं लागूं नये ) अशा अशा प्रकारची त्याच्या जीवामध्ये फार इच्छा असते. १९३. ज्या कृतीच्या योगानें नम्रता अंगीं बाणेल व स्वतःच्या ठिकाणीं कमीपणा हें भूषण होईल, त्या त्याच गोष्टी बहुतेक तो करतो. १९४. ज्याच्या योगानें हा जिवंत आहे कीं नाहीं, अशी लोक आपल्याविषयीं कल्पना करतील, अशा प्रकारचा आपला आयुष्यक्रम असावा, अशी त्यास आशा असते. १९५. पलीकडे असलेला तो चालतो आहे कीं नाहीं, किंवा वाऱ्यानेंच जात आहे, अशा प्रकारचा आपल्याविषयीं जगांत भ्रम उत्पन्न व्हावा, तसें आपण व्हावें ( असें त्यास वाटतें. ) १९६. माझ्या असतेपणाचा लोप व्हावा, ( म्हणजे मी एक अमका आहे अशी माझ्या अस्तित्वाची कोणास आठवणच होऊं नये ) माझें नांव व रूप नाहींसें व्हावें ( म्हणजे माझें नांव अथवा रूप कोणाच्या डोळ्यासमोर येऊं नये, ) कदाचित मला पाहून प्राणीमात्र भितील, तर तसें होऊं नये, १९७. याप्रमाणें ज्याचे नवस असतात व जो सदोदित एकान्तामध्यें जात असतो व एकान्ताच्या नांवानेंच जो जगतो ( म्हणजे ज्याला एकान्त इतका आवडतो. ) १९८. वायूचें व त्याचें पटतें, आकाशाशीं बोलणें त्याला आवडतें ( त्यास बोलण्याचा कंटाळा असतो ) व ज्याला झाडें हीं जीवाप्रमाणें आवडतात. १९९. फार काय सांगावें ! अशीं लक्षणें तूं ज्या पुरुषाचे ठिकाणीं पाहशील, त्या पुरुषाचें व ज्ञानाचें एकच आंथरूण झालें आहे, असें तूं समज. २००. साधकामध्यें असणारा अमानित्व हा जो गुण म्हणतात, तो या लक्षणांनीं जाणावा. आतां अदंभाच्या ओळखीकरितां त्याच्या लक्षणांचा अभिप्राय सांगतों. २०१. तर ऐक, अदंभित्व असें आहे. ज्याप्रमाणें लोभ्याचें मन आपल्या धनाविषयीं इतकें आसक्त असतें कीं जीव गेला तरी तो आपली धन ठेवलेली जागा सांगत नाहीं. २०२. अर्जुना, त्याप्रमाणें त्याच्या प्राणावर जरी संकट आलें, तथापि आपण केलेलें पुण्यकर्म हें देहचेष्टेनें अथवा वाचेनें उघड करीत नाहीं. २०३. खोड्याळ गाईला आलेला पान्हा ती गाय जशी चोरते अथवा उतार वयाला आलेली वेश्या उतार वयानें राहते काय ? ( तर नाहीं. मग ती आपलें उतार वय झांकते. ) २०४. श्रीमंत मनुष्य एकटा अरण्यांत सांपडला असतां तो ( जसा ) आपली श्रीमंती लपवितो, अथवा कुलीन स्त्री ( जशी ) आपले अवयव झांकते. २०५. अथवा शेतकरी पेरलेलें बीज ( जसें माती टाकून ) झांकतो, त्याप्रमाणें आपल्या हातून झालेलें दान आणि पुण्य झांकतो. २०६. वरवर देहाची पूजा करीत नाहीं, ( लोकांना फसविणारा बाह्यवेष धारण करून देहाला सजवीत नाहीं, ) व लोकांच्या मनाजोगतें बोलून त्यांचें मनोरंजन करीत नाहीं व आपण केलेला धर्म आपल्या वाचारूपी ध्वजेवर बांधण्याचें त्यास माहीत नसतें, (आपण केलेला धर्म तो आपल्या तोंडानें बोलून दाखवीत नाहीं ) २०७. आपण दुसऱ्यावर केलेल्या उपकाराचा तोंडानें उच्चार करीत नाहीं, आपण जो कांहीं (वेदशास्त्र वगैरेचा ) अभ्यास केला असेल, त्याचा डौल मिरवीत नाहीं व आपली भरभराट व्हावी म्हणून, जो आपण मिळविलेलें पुण्य विकण्यास धजत नाहीं. २०८. तो आपल्या शरीराला जे (विषय) भोग देतो त्यावरून (त्याच्या उदारपणाचा) अंदाज केला, तर तो कृपण आहे असें वाटेल. याशिवाय धर्माच्या कामीं त्याचें औदार्य पाहिलें तर, तो आपल्या जवळचें धन वगैरे खर्च करण्यास थोडें फार असें म्हणत नाहीं. २०९. घरामध्यें सर्व गोष्टींची टंचाई दिसते, शरीराचा बांधा रोडका असतो, परंतु दानाच्या बाबतींत तो कल्पतरूशीं प्रतिज्ञेनें चढाओढ करितो. २१०. फार काय सांगावें ! स्वधर्मामध्यें तो थोर असतो, योग्य प्रसंगीं तो उदार असतो, आत्मचर्चा करण्यांत तो हुषार असतो. एऱ्हवीं ( इतर गोष्टींत ) तो वेडा असतो. २११. केळीचें सर्व अंग हलकें व पोकळ असें वाटतें; पण त्या केळीला फळें आल्यावर तें केळीचें सर्व अंग रसानें दाट भरलेलें असें वाटतें. २१२. अथवा मेघाचें अंग पाहिलें तर तें अगदीं हलकें व दिसण्यांत वाऱ्यानें नाहींसें होईलसें दिसतें; पण तेच मेघ एकदां वर्षाव करावयास लागले कीं, जिकडे तिकडे आश्चर्यकारक रीतीनें एकसारखे जलमय करून टाकतात. २१३. त्याप्रमाणें पूर्णतेच्या दृष्टीनें तो पुरुष पाहिला तर, इच्छा तृप्त होतात. एऱ्हवीं पाहिलें तर, कमीपणाला तोच जागा आहे. ( त्याच्या येथें सर्व गोष्टींचें दारिद्र्य आहे. ) २१४. हें वर्णन पुरें. या वर सांगितलेल्या गुणांचा उत्कर्ष ज्याचे ठिकाणीं असेल, त्याच्या हाताला

या चिन्हांचा । नटनाचु ठायीं जयाचां । जाण ज्ञान तयाचिया । हाता चढलें ॥ १५ ॥ पैं गा अदंभपण । म्हाणितलें तें हें जाण । आतां आईक खूण । अहिंसेची ॥ १६ ॥ तरी अहिंसा बहुतीं परी । बोलिली असे अवधारीं । आपुलालां मतांतरीं । निरूपितां ॥ १७ ॥ परि ते ऐसी देखा । जैशा खांडुनियां शाखा । मग तयाचिया बुडुखा । कुंप कीजे ॥ १८ ॥ कां बाहु तोडोनि विकिजे । मग भुकेची पीडा राखिजे । नाना देऊळ मोडूनि कीजे । पौळी देवा ॥ १९ ॥ तैसी हिंसाचि करूनि अहिंसा । निफजविजे हा ऐसा । पैं पूर्वमीमांसा । निर्णो केला ॥ २२० ॥ जे अवृष्टीचेनि उपद्रवें । गादलें विश्व आघवें । म्हणोनि पर्जन्येष्टी करावे । नाना याग ॥ २१ ॥ तंव तिये इष्टीचां बुडीं । पशुहिंसा रोकडी । मग अहिंसेची थडी । कैंची दिसे ॥ २२ ॥ पेरिजे नुसधी हिंसा । तेथ उगवैल काय अहिंसा । परि नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा ॥ २३ ॥ आणि आयुर्वेदुही आघवा । याचि मोहोरा पांडवा । जे जीवाकारणें करावा । जीवघातु ॥ २४ ॥ नाना रोगीं अहाळलीं । लोळतीं भूतें देखिलीं । ते हिंसा निवारावया केली । चिकित्सा कां ॥ २५ ॥ तंव ते चिकित्से पहिलें । एकाचे कंद खणविले । एका उपडविलें । समूळीं सपत्रीं ॥ २६ ॥ एकें आड मोडविली । अजंगमाची खाल काढविली । एकें गर्भी उकडविली । पुटामाजीं ॥ २७ ॥ अजातशत्रु तरुवरां । सर्वांगीं देवविलिया शिरा । ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा । कोरडे केले ॥ २८ ॥ आणि जंगमाही हात । लाऊनि काढिलें पित्त । मग राखिले शिणत । आणिक जीव ॥ २९ ॥ अहो वसतीं धवळारें । मोडूनि केले देऊळ देव्हारे । नागौनि वेव्हारें । गवादी घातली ॥ २३० ॥ मस्तक पांघुरविलें । तंव तळवटीं उघडें पडलें । घर मोडोनि केले । मांडव पुढें ॥ ३१ ॥ नाना पांघुरणें । जाळूनि जैसें तापणें । जालें आंगधुणें । कुंजराचें ॥ ३२ ॥ बैल विकूनि कोठा । पुंसा लावोनि गांठा । इया करणी कीं चेष्टा । काइ हंसों ॥ ३३ ॥ एकीं धर्माचिया बाहणी । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया आहाळणीं । जीव मेले ॥ ३४ ॥ एक न पचितीचि कण । इये हिंसेचे भेण । तेथ कदर्थले प्राण । हेचि हिंसा ॥ ३५ ॥ एवं हिंसाचि अहिंसा । कर्मकांडीं हा ऐसा । सिद्धांतु सुमनसा । बोळखें तूं ॥ ३६ ॥ पहिलें अहिंसेचें नांव । आम्हीं केलें जंव । तव स्फूर्ति बांधली हांव । इये मती ॥ ३७ ॥ तरि कैसेनि ययातें गाळावें । म्हणोनि पडिलें बोलावें । तेवींचि तुवांही जाणावें । ऐसा भावो ॥ ३८ ॥ बहुतकरूनि किरीटी । हाचि विषयो इये गोष्टी । एऱ्हवीं कां आडवाटीं । धांविजैल ॥ ३९ ॥ आणि स्वमताचिया निर्धारा – । लागोनियां धनुर्धरा । प्राप्तां मतांतरां । निर्वेचु कीजे ॥ २४० ॥ ऐसी हे अवधारीं । निरूपिती परी । आतां ययावरी । मुख्य जें गा ॥ ४१ ॥ तें स्वमत बोलिजेल । अहिंसे रूप

ज्ञान आलें असें समज. २१५. अर्जुना, अदंभपण म्हटलें तें हें असें समज. आतां अहिंसेचें लक्षण ऐक. २१६. आपापल्या निरनिराळ्या मतांचें निरूपण करतांना पुष्कळ प्रकारांनीं अनेक लोकांनीं अहिंसा सांगितली आहे, ऐक. २१७. परंतु त्यांनीं सांगितलेली अहिंसा ही, जशा वृक्षाच्या फांद्या तोडून मग त्या शाखांनीं त्या वृक्षाच्या बुडाशीं ( त्या वृक्षाच्या रक्षणार्थ ) कुंपण करावें, तशी आहे. २१८. किंवा हात तोडून तो विकावा व जे पैसे येतील त्यांनीं भुकेची पीडा शांत करावी, अथवा देऊळ मोडून देवाच्या रक्षणाकरितां देवळाच्या सामानानें आवाराची भिंत बांधावी. २१९. त्याप्रमाणें हिंसाच करून अहिंसा उत्पन्न करावी, असा हा निर्णय पूर्वमीमांसेनें ( कर्मकांडानें ) केला आहे. २२०. पाऊस न पडल्यामुळें अतिशय पीडा होऊन तीमुळें सर्व प्राणी जर्जर झाले, म्हणजे त्यावर उपाय म्हणून, पाऊस पाडणारे कारिरियाग वगैरे अनेक यज्ञ करावेत; २२१. तर प्राण्यांच्या बचावाकरितां करावयाच्या या यज्ञामध्यें आरंभींच जनावरांचे प्रत्यक्षपणेंच प्राण घेतले जातात; अशा स्थितींत अहिंसेचें पलीकडचें तीर कसें दिसणार ? २२२. नुसती हिंसा पेरिली असतां तेथें अहिंसा उगवेल काय ? ( तर, नाहीं. ) परंतु या याज्ञिकांचें धाडस आश्चर्यकारक आहे. २२३. आणि सर्व आयुर्वेदही ( वैद्यशास्त्रही ) अर्जुना, याच धोरणाचा आहे. कारण कीं, एका जीवाचें रक्षण करण्याकरितां दुसऱ्या जीवाचा घात करावा, असें तो प्रतिपादन करितो. २२४. नाना प्रकारच्या रोगांनीं पोळलेले व त्या दुःखानें लोळत पडलेले प्राणी पाहिले व मग आयुर्वेदानें ती हिंसा ( दुःख ) निवारण करण्याकरितां औषधाची योजना केली, २२५. तों, औषधीयोजनेंत पहिल्याप्रथम कित्येक झाडांचे कंद खणविले व कित्येकांना मुळांसकट व पानांसकट उपटविलें; २२६. कांहीं झाडें मध्येंच मोडलीं ( म्हणजे त्यांच्या मधल्या भागाचा औषधांत उपयोग केला, ) कांहीं झाडांची साल काढविली व कांहीं फळ देण्याच्या बेतांत आलेल्या वनस्पति, त्यांवर क्षाराचे वगैरे कसले तरी थर देऊन उकडविल्या; २२७. ( ज्यांनीं ) कोणाचें केव्हांच वांकडें केलें नाहीं, म्हणून ज्यांना शत्रु उत्पन्न झाला नाहीं, अशा बिचाऱ्या झाडांना ( त्यांचा चीक काढण्याकरितां ) त्यांच्या सर्वांगावर भेगा पाडून, याप्रमाणें अर्जुना, त्या वृक्षांचे जीव घेऊन त्यांना कोरडें केलें. २२८. आणि हालचाल करणाऱ्या प्राण्यांसही हात घालून त्यांचें पित्त काढून मग त्या योगानें रोगांनीं पीडित अशा दुसऱ्या जीवांचें रक्षण केलें. २२९. अहो राहतीं घरें मोडून त्या घराच्या सामानानें देऊळ व देव्हारे केलें व व्यवहारांत लोकांस फसवून, लुटून जें द्रव्य मिळविलें, त्या द्रव्याच्या योगानें अन्नसत्र घातलें. २३०. डोक्यास गुंडाळण्याकरितां नेसलेलें वस्त्र सोडून, तें जर मस्तकास बांधलें, तर शरीराचा खालचा भाग उघडा पडतो, अथवा जसें घर मोडून त्या घरापुढें मांडव केले. २३१. अथवा पांघरुणें जाळून मग जसा शेक घेणें किंवा हत्तीचें असें आंगधुणें झालें; ( हत्ती हा स्नान केल्याबरोबर आपल्या ओल्या अंगावर सोंडेनें माती घेऊन जास्त मलीन होतो. ) २३२. बैल विकून जसा गोठा बांधावा, अथवा राघू हांकून देऊन मग पिंजरा तयार करावा; असल्या कृतींना योग्य करणें म्हणावें किंवा चेष्टा म्हणाव्यात ? कां वाला हंसावें ? २३३. कित्येकांनीं धर्ममार्ग म्हणून पाणी गाळण्याला आरंभ केला, तेव्हां त्या गाळण्याच्या तापानें जीव मेले. २३४. कित्येक या हिंसेच्या भयानें धान्य शिजवीत नाहींत ( तर कोरडेंच धान्य खातात. तें कच्चे धान्य त्यांस पचत नाहीं यामुळें ) त्यांचे प्राण कासावीस होतात. हीच हिंसा होय. २३५. याप्रमाणें हे चांगल्या मनाच्या अर्जुना, हिंसेलाच अहिंसा ठरविण्याचा असा हा कर्मकांडांत सिद्धान्त आहे, तो तूं नीट समजून ठेव. २३६. जेव्हां आम्हीं पहिल्या प्रथम अहिंसेच्या नांवाचा उच्चार केला, तेव्हां हीं मतें सांगावींत अशी स्फूर्तीला हांव झाली. २३७. तर या मतांना कसें गाळावें ? म्हणून आम्हाला बोलणें भाग पडलें. त्याचप्रमाणें तुलाही निरनिराळीं मतें माहीत व्हावींत, असा हें प्रतिपादन करण्यांत आमचा हेतु होता. २३८. अर्जुना, बहुतकरून या अहिंसेसंबंधीं कांहीं बोलावयास लागलें कीं त्या प्रतिपादनांत हाच ( वर सांगितलेला हिंसात्मक अहिंसेचा ) विषय आढळतो. ( म्हणून आम्हीं त्याची चर्चा केली. ) नाहींतर हातीं घेतलेल्या विषयाच्या प्रतिपादनाचा धोपट मार्ग सोडून मतमतांतरें सांगण्याच्या आडवाटेला कशाला जावें लागलें असतें ? २३९. आणि अर्जुना, आपल्या स्वतःच्या मताच्या निश्चयाकरितां जीं दुसरीं मतें विचारांत घेणें जरूर असेल, त्यांचाही निर्णय केलाच पाहिजे. २४०. याप्रमाणें ही निरूपण करण्याची पद्धति आहे, असें समज. आतां अर्जुना, यानंतर मुख्य जें, २४१. तें आमचें मत सांगण्यांत येईल. अहिंसेची नीट कल्पना येईल, असें लक्षण करण्यांत येईल. ही अहिंसा

किजैल। जेणें उठलिया आंतुल। ज्ञान दिसे ॥ ४२ ॥ परि तें अधिष्टिलेनि आंगें। जाणिजे आचरतेनि बगें। जैसी कसवटी सांगे। वानियातें ॥ ४३ ॥ तैसें ज्ञानामनाचिये भेटी। सरिसेंचि अहिंसेचे बिंब उठी। तेंचि ऐसें किरीटी। परिस आतां ॥ ४४ ॥ तरि तरंगु नोलांडितु। लहरी पायें न फोडितु। सांचलु न मोडितु। पाणियाचा ॥ ४५ ॥ वेगें आणि लेसा। दिठी घालूनि आंविसा। जळीं बकु जैसा। पाउल सुये ॥ ४६ ॥ कां कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबैल केसर। इया शंका ॥ ४७ ॥ तैसें परमाणु पांगुंतले। जाणूनि जीव सानुले। कारुण्यामाजीं पाउलें। लपवूनि चाले ॥ ४८ ॥ ते वाट कृपेची करितु। ते दिशाचि स्नेहा भरितु। जीवातळीं आंथरितु। आपुला जीवु ॥ ४९ ॥ ऐसिया जतना। चालणें जया अर्जुना। हें अनिर्वाच्य परिमाणा। पुरिजेना ॥ २५० ॥ पैं मोहाचेनि सांगडें। लासी पिलें धरी तोंडें। तेथ दांतांचे आगरडे। लागती जैसे ॥ ५१ ॥ कां स्नेहाळु माये। तान्हयाची वास पाहे। तिये दिठी आहे। हळुवार जें ॥ ५२ ॥ नाना कमळदळें। डोलविजती ढाळें। तो जेणें पाडें बुबुळें। वारा घेपे ॥ ५३ ॥ तैसेनि मार्दवें पाय। भूमीवरी न्यसीतु जाय। लागती तेथ होय। जनां सुख ॥ ५४ ॥ ऐसिया लघिमा चालतां। कृमि कीटक पांडुसुता। देखे तरि माघौता। हळूचि निघे ॥ ५५ ॥ म्हणे पावो धडफडील। तरि स्वामीची निद्रा मोडैल। रचलेपणा पडैल। झोती हन ॥ ५६ ॥ इया काकुळती। वाहणी घे माघौती। कोणेही व्यक्ती। न वचे वरी ॥ ५७ ॥ जीवाचेनि नांवें। तृणातेंही नोलांडवे। मग न लेखितां जावें। हें कें गोठी ॥ ५८ ॥ भ्रुंगिये मेरु नोलांडवे। मशका सिंधु न तरवे। तैसा भेटलियां न करवे। अतिक्रमु ॥ ५९ ॥ ऐसी जयाची चाली। कृपाफळीं फळा आली। देखसी जियाली। दया वाचे ॥ २६० ॥ स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार। मुख मोहाचें माहेर। माधुर्या जाहले अंकुर। दशन तैसे ॥ ६१ ॥ पुढां स्नेह पाझरे। मागां चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं ॥ ६२ ॥ तंव बोलणेंचि नाहीं। बोलों म्हणे जरी कांहीं। तरि बोल कोणाही। खुपेल कां ॥ ६३ ॥ बोलतां अधिकुही निघे। तरि कोण्हाही वर्मी न लगे। कोण्हासि न रिघे। शंका मनीं ॥ ६४ ॥ मांडिली गोठी हन मोडैल। वासिपैल कोणी उडैल। आइकोनिचि वोवांडिल। कोण्ही जरी ॥ ६५ ॥ तरि दुवाळी कोणा न व्हावी। कवणाची भंवई नुचलावी। ऐसा भावो जीवीं। म्हणोनि उगा ॥ ६६ ॥ मग प्रार्थिला विपायें। जरि लोभें बोलों जाये। तरि परिसे तया होये। मायबापु ॥ ६७ ॥ कां नादब्रह्मचि मुसे आलें। कीं गंगापय असललें। पतिव्रते आलें। वार्धक्य कां ॥ ६८ ॥ तैसें साच आणि मवाळ। मितलें परि सरळ। बोल जैसे

चित्तांत प्रगट झाली असतां त्या चित्तांत ज्ञान आहे असें दिसेल. २४२. पण ज्याप्रमाणें कसोटी सोन्याच्या कसाला सांगते; त्याप्रमाणें अहिंसेनें वास्तव्य केलेल्या शरीराच्या आचरणाच्या रीतीवरून त्या शरीरांत अहिंसा राहात आहे, असें जाणलें जातें. २४३. त्याप्रमाणें ज्ञानमनाच्या भेटीबरोबरच ( मनांत ज्ञान उत्पन्न झाल्याबरोबर ) अहिंसेचें चित्र उमटतें; तें चित्र असें असतें. अर्जुना, ऐक. २४४. तर लाटांचें उल्लंघन न करतां किंवा पायानें त्यांना न मोडतां व पाण्याचा आवाज ( खळखळ ) न मोडूं देतां. २४५. वेगानें व फार जपून आमिषावर दृष्टि ठेवून, बगळा जसा पाण्यांत पाय घालतो. २४६. अथवा भ्रमर जसे कमळावर, कमळांतील बारीक तंतू चुरगळतील या शंकेनें नाजूक रीतीनें पाय ठेवतात; २४७. त्याप्रमाणें परमाणूंमध्यें लहान जीव आहेत ,असें जाणून दयेमध्यें आपलीं पाऊलें लपवून चालतो, २४८. तो ज्या रस्त्यानें चालतो, तो रस्ताच कृपेनें भरतो व ज्या बाजूकडे त्याची नजर जाते, ती दिशाच प्रेमानें भरलेली करतो व प्राण्यांच्या खालीं आपला स्वतःचा प्राण आंथरतो ( मग त्यावर चालतो. ) २४९. अर्जुना, अशा रीतीनें जपून ज्याचें चालणें असतें, त्या चालण्याचें वर्णन वाचेनें करतां येत नाहीं; आणि तें चालणें अमक्यासारखें आहे म्हणून प्रमाण दिलें, तर तें पुरें पडत नाहीं. २५०. जेव्हां मांजरी मोहाच्या योगानें आपलें पिल्लूं आपल्या तोंडांत धरते, त्या वेळीं त्या पिल्लास जशीं तिच्या दातांचीं टोंकें लागतात ( मांजरीनें दातांनीं पिल्लूं जरी बळकट धरलेलें असतें, तरी त्यास दांत लागत नाहींत.) २५१. अथवा प्रेमळ आई जशी आपल्या तान्ह्या मुलाची वाट पहाते, त्या दृष्टीमध्यें जो नाजुकपणा असतो, २५२. अथवा वारा घेण्याकरितां कमळाचें फूल हळू हळू हलविलें असतां, त्यापासून निघालेला वारा, तो ज्याप्रमाणें डोळ्याच्या बुबुळास मोठा सुखकर वाटतो ( बुबुळास खुपत नाहीं. ) २५३. तितक्या मऊपणानें भूमीवर पाय ठेवीत ( तो ) जातो. ते पाय जेथें लागतील तेथें लोकांना सुख होतें. २५४. अर्जुना, अशा हळूपणानें चालत असतांना कृमीकीटक पाहिले तर, हळूच माघारा फिरतो. २५५. तो म्हणतो पाय जोरानें पडल्यामुळें आवाज निघाला, तर ( सर्व भूतांना व्यापून असलेल्या ) प्रभूची झोंप मोडेल व असलेल्या सुखरूपतेस विक्षेप येईल. २५६. या कवणेनें मागें परततो व कोणत्याही व्यक्तीवर ( प्राण्यावर ) पाय ठेवीत नाहीं. २५७. गवताच्या काडींत जीव आहे, असें समजून ती ओलांडीत नाहीं ( तुडवून जात नाहीं. ) मग समोर प्राणी पाहिल्यावर त्याला न जुमानतां तो त्याला तुडवीत जाईल, ही गोष्ट कोठली ? २५८. मुंगीला ज्याप्रमाणें मेरु पर्वताचें उल्लंघन करतां येत नाहीं, चिलटाला ज्याप्रमाणें समुद्र तरून जातां येत नाहीं, त्याप्रमाणें कोणताही प्राणी भेटला असतां, त्याच्यानें त्याचें उल्लंघन करवत नाहीं. २५९. याप्रमाणें ज्याची चालण्याची रीत कृपारूपी फळांनीं फळाला आली व जेथें वाचेमध्यें दया जगलेली तूं पहाशील. २६०. स्वतः श्वासोच्छ्वास नाजूक रीतीनें करतो, त्याचें मुख प्रीतीचें माहेर असतें व त्याचे दांत हे जणूंकाय मधुरपणाला अंकुरच फुटले आहेत ! २६१. ( तो कोणाशीं बोलत असतां ) पुढें प्रेम पाझरतें व मागून अक्षरें चालतात आणि कृपा आधीं प्रगट होते व शब्द मागून प्रगट होतात. २६२. अगोदर तर त्याचें कोणाशीं बोलणेंच नसतें आणि जर कांहीं कोणाशीं बोलूं म्हणेल ( बोलण्याचें मनांत आणील ) तर आपलें बोलणें कोणाला खुपेल का ( लागेल का ) ( अशी त्याच्या मनांत शंका येते. ) २६३. ( त्याला असें वाटत असतें कीं,) यदा कदाचित बोलतांना कांहीं जास्त बोलणें झालें, तर तें कोणाच्या वर्मी तर लागणार नाहीं ना ? आणि त्या जास्त बोलण्यानें कोणाच्या मनांत शंका तर येणार नाहीं ना ? २६४. कोणी एखाद्या गोष्टीविषयीं आरंभिलेल्या बोलण्याचा रंग आपल्या बोलण्यानें बिघडेल, कोणी भिईल, कोणी दचकून उठेल आणि आपलें बोलणें ऐकूनच कोणी त्या बोलण्याची उपेक्षा करील, २६५. तरी आपल्या बोलण्यानें कोणास क्लेश होऊं नयेत, ( अथवा रागानें ) कोणाची भिंवई उचलूं नये, असा त्याच्या मनांत अभिप्राय असतो, म्हणून तो उगा असतो. २६६. मग आपण बोलावें, अशी कोणी कदाचित प्रार्थना केल्यावर, तो प्रेमानें बोलावयास लागला तर, त्याचें बोलणें जे ऐकतात, त्यांना तो आपला आईबापच आहे कीं काय, असें वाटतें. २६७. त्याचें बोलणें म्हणजे जणूंकाय नादब्रह्मच आकार धरून आलें ( असें मधुर ), किंवा गंगेचें पाणीच उसळलें ( असें पवित्र ) अथवा पतिव्रतेला जसें कांहीं म्हातारपण आलें आहे. २६८. त्याप्रमाणें खरें आणि मऊ ( कोणास न खुपणारें )

कल्लोळ । अमृताचें ॥ ६९ ॥ उरोधु वादुबळु । प्राणुपोंपढाळु । उपहासु चाळु । वर्मस्पर्शु ॥२७०॥ आडु वेगु विंदाणु । आशा शंका प्रतारणु । हे संन्यसिले अवगुणु । जिया वाचा ॥ ७१ ॥ आणि तयाचि परी किरीटी । थाउ जयाचिये दिठी । सांडिलिया भ्रूकुटी । मोकळिया ॥ ७२ ॥ भूतीं वस्तु आहे । तिये रूपों शके विपायें । म्हणोनि वास न पाहे । बहुतकरूनि ॥ ७३ ॥ ऐसाही कोणे एके वेळे । आंतुली कृपेचेनि बळें । उघडोनियां डोळे । दिठी घाली ॥ ७४ ॥ तरि चंद्रबिंबौनि धारा । निघतां नव्हती गोचरा । परि एकसरें चकोरां । निघती दोंदें ॥ ७५ ॥ तैसें प्राणियांसि होये । जरी तो वास पाहे । तया अवलोकनाची सोये । कूर्मींही नेणे ॥ ७६ ॥ किंबहुना ऐसी । दिठी जयाची भूतांसी । करही देखसी । तैसेचि ते ॥ ७७ ॥ होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धाचे मनोरथ । तैसे जयाचे हात । निर्व्यापार ॥७८॥ अक्षमें आणि संन्यासिलें । कां निरिंधन आणि विझालें । मुकेनि घेतलें । मौन जैसें ॥ ७९ ॥ तयापरी कांहीं । जयां करां करणें नाहीं । जे अकर्तयाचां ठायीं । बैसों येती ॥ २८० ॥ आसुडैल वारा । नख लागेल अंबरा । इया बुद्धी करां । चळों नेदी ॥ ८१ ॥ तेथ आंगावरिलीं उडवावीं । कां डोळां रिगतें झाडावीं । पशुपक्ष्यां दावावी । त्रासमुद्रा ॥ ८२ ॥ इया केउतिया गोठी । नावडे दंडु काठी । मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें ॥ ८३ ॥ लीलाकमळें खेळणें । पुष्पमाळा झेलणें । न करी म्हणे गोफणें । ऐसें होईल ॥ ८४ ॥ हालवती रोमावळी । यालागीं आंग न कुरवाळी । नखांची गुंडाळी । बोटांवरी ॥ ८५ ॥ तंव करणेयाचाचि अभावो । परि ऐसाही पडे ठावो । तरि हातां हाचि सरावो । जे जोडिजती ॥ ८६ ॥ कां नाभिकारा उचलिजे । हातु पडिलिया देइजे । आर्तातें स्पर्शिजे । अळुमाळु ॥ ८७ ॥ हेंही उपरोधें करणें । तरी आर्तभय हरणें । नेणती चंद्रकिरणें । जिव्हाळा तो ॥ ८८ ॥ पावोनि तो स्पर्शु । मलयानिळु खरपुसु । तेणें मानें पशु । कुरवाळणें ॥८९॥ जे सदा रिते मोकळे । जैशीं चंदनांगें नसळे । न फळतांही निफळें । होतीचि ना ॥ २९० ॥ आतां असो हें वाग्जाळ । जाणें तें करतळ । सज्जनाचें शीळ । स्वभाव जैसें ॥ ९१ ॥ आतां मन तयाचें । सांगों म्हणों जरी साचें । तरी सांगितले कोणाचे । विलास हे ॥ ९२ ॥ काइ शाखा नव्हे तरु । जळेंवीण असे सागरु । तेज आणि तेजाकारु । आन काई ॥ ९३ ॥ अवयव आणि शरीर । हे वेगळाले काइ जर । कीं रसु आणि नीर । सिनीं आथी ॥ ९४ ॥ म्हणोनि हे जे सर्व । सांगितलें बाह्यभाव । ते मनाचि गा सावयव । ऐसें जाणें ॥ ९५ ॥ जें बीज भुईं खोंविलें । तेंचि वरी रुख जाहलें । तैसें इंद्रियद्वारीं फांकलें । अंतरचि ॥ ९६ ॥ पैं मानसींचि जरी । अहिंसेची अवसरी । तरी कैंची बाहेरी । वोसंडेल ॥ ९७ ॥ आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनौनी उठी । मग ते

मोजकें परंतु सरळ, त्याचें बोलणें म्हणजे जशा कांहीं अमृताच्या लाटाच. २६९. उपरोधिक बोलणें, तंट्यास उत्तेजन देणें, प्राण्यांत पाप उत्पन्न करण्यास वाहवणें, टर उडविणें, टाकून बोलणें, वर्मास झोंबणारे शब्द बोलणें, २७०. हट्ट, आवेश, कपट, आशा लावणें, संशयांत पाडणें, फसवेगिरी (वगैरे) हे जे बोलण्यांतील दोष आहेत, त्या सर्वांचा ज्या वाचेनें पूर्णपणें त्याग केलेला असतो. २७१. आणि अर्जुना, त्याचप्रमाणें ज्याच्या दृष्टीची स्थिति आहे व ज्याच्या भिंवया मोकळ्या टाकलेल्या आहेत (म्हणजे ज्यानें रागानें भिंवया चढविल्या नाहींत). २७२. प्राणिमात्रामध्यें वस्तु (परब्रह्म) आहे, तिला कदाचित आपली दृष्टि बोचण्याचा संभव आहे, म्हणून बहुतकरून तो कोणाकडे पहात नाहीं. २७३. असाही कोणा एका वेळेला आंतल्या कृपेच्या जोरानें डोळे उघडून त्यानें कोणाकडे दृष्टि घातली; २७४. तर चंद्रबिंबांतून निघणाऱ्या अमृताच्या धारा जरी निघतांना डोळ्यांना दिसत नाहींत, परंतु त्या धारांच्या योगानें चकोर पक्षांना एकदरली दोंदें निघतात, (चकोरपक्षी पुष्ट होतात.) २७५. त्याप्रमाणें त्यानें जर कोणा प्राण्याकडे पाहिलें, तर तसें होतें. त्या पहाण्याचा प्रकार कासवीसुद्धां जाणत नाहीं. २७६. फार काय सांगावें! याप्रमाणें ज्याची दृष्टि प्राण्याकडे असते व त्याचे हात जे आहेत तेही तसेच आहेत, असें तुझ्या दृष्टीस पडेल. २७७. सिद्ध पुरुषाचे मनोरथ ज्याप्रमाणें कृतार्थ होऊन रहातात; (म्हणजे सिद्ध पुरुषाचें मन जसें कर्तव्यशून्य झालेलें असतें). त्याप्रमाणें ज्याचे हात चेष्टारहित असतात. (व्यापाररहित असतात.) २७८. अगोदरच आंधळा, आणखी त्यानें पहाण्याचें टाकलें; अथवा आधींच काष्ठरहित अग्नि, आणि पुनः तो विझालेला किंवा मुळचाच मुका व त्यांत आणखी मौनव्रत घेतलेलें. २७९. अर्जुना, त्याप्रमाणें ज्या हातांना कांहीं करावयाचें असें राहिलेलें नाहीं, कारण कांहींच कर्तव्य न उरलेल्या सिद्ध पुरुषाचे ठिकाणीं ते रहावयास येतात. २८०. वाऱ्याला झटका बसेल व आकाशाला नख लागेल अशा बुद्धीनें हात हालूं देत नाहीं. २८१. (अशी जेथें स्थिति आहे) तेथें अंगावर बसलेले (माशा, डांस वगैरे प्राणी) उडवावेत अथवा डोळ्यांत जाणारीं चिलटें वगैरे झाडून टाकावीत अथवा पशुपक्ष्यांना आपल्या पहाण्यानें भीति वाटेल, असा आविर्भाव आणावा, २८२. या गोष्टी कोठल्या? त्याला हातांत दंड अथवा काठी घेणें आवडत नाहीं. असें जर आहे, तर मग अर्जुना, हातांत शस्त्र घेण्याचें बोलणें कोठलें? २८३. सहज मजेनें कमळानें खेळावयाचें अथवा फुलांच्या माळा झेलावयाच्या (हें करणें चिलट वगैरे अतिसूक्ष्म प्राण्यांना) गोफणीप्रमाणें होईल, असें म्हणून जो वरील गोष्टी करीत नाहीं. २८४. अंगावरील केसांच्या रांगा हलतील (व त्यायोगानें केसांच्या आश्रयाला असलेल्या सूक्ष्म जीवांना त्रास होईल) याकरितां जो अंग कुरवाळीत नाहीं व नखांच्या गुंडाळ्या बोटांवर वाढतात. २८५. आधीं तर हातांना कांहीं कर्तव्यच नसतें; परंतु अशाही स्थितींत त्या हातांना कांहीं करण्याचा प्रसंग आला, तर हातांना हीच संवय असते की, ते जोडावेत. २८६. अथवा "भिऊं नकोस" असें सांगण्यास हात उचलावेत अथवा कोणी पडलेल्यास वर काढण्याकरितां हात द्यावेत किंवा पीडित मनुष्याला त्याची पीडा कमी होण्याकरितां त्याला हातानें थोडासा स्पर्श करावा. २८७. तरी दुःखानें पीडित मनुष्याचें भय नाहींसें करणें, हें देखील तो मोठ्या जुलमानें करतो; पण त्याच्या हस्तस्पर्शाचा ओलावा चंद्रकिरणांनासुद्धां माहीत नसतो. २८८. त्याच्या हस्तस्पर्शाच्या मानानें पाहिलें असतां, मलय पर्वतावरून येणाऱ्या वाऱ्याचा स्पर्श कडक भासेल इतका त्याच्या हाताचा स्पर्श मृदु व सुखकर असतो. अशा प्रकारच्या स्पर्शानें त्याचें पशूंना कुरवाळणें असतें. २८९. जे हात नेहमीं रिकामे व मोकळे असतात, (परंतु) ज्याप्रमाणें चंदनाच्या वृक्षाचे सर्व भाग शुद्ध असल्यामुळें तीं झाडें फळलीं नाहींत तर तीं निष्फळ आहेत, असें म्हणतां येत नाहीं. २९०. आतां हें भाराभर बोलणें राहूंदे; सज्जन मनुष्याची वागणूक व स्वभाव हीं ज्याप्रमाणें असतात, त्याप्रमाणें त्याचे ते करतल असतात असें समज. २९१. आतां त्याचें मन खरोखर सांगतों म्हणून जर म्हटलें, तर आतांपर्यंत जे व्यापार सांगितले, ते कोणाचे? २९२. फांद्या म्हणजेच झाड नव्हे काय? समुद्र हा जलाशिवाय आहे काय? प्रकाश आणि सूर्य हे वेगळे आहेत काय? २९३. शरीर आणि शरीराचे अवयव हे खरोखर वेगळे आहेत काय? किंवा ओलावा आणि पाणी निराळीं आहेत काय? २९४. म्हणून हीं जीं सर्व बाह्य लक्षणें सांगितलीं तीं मूर्तिमंत मनच असें समज. (वर सांगितलेले सर्व व्यवहार मनाचेच आहेत). २९५. ज्याप्रमाणें भुईत पेरलेलें बीं तेंच वर वृक्ष होतें, त्याप्रमाणें मनच इंद्रियद्वारा पसरलें आहे. २९६. परंतु मनांतच जर अहिंसा नसेल, तर बाहेर कशी येईल? २९७. अर्जुना,

वाचे दिठी । करांसि ये ॥ ९८ ॥ वांचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसि उमटेल काई । बीजेंवीण भुई । अंकुर असे ॥ ९९ ॥ उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे । जीवु गेलिया आहे । चेष्टा देहीं ॥ ३०० ॥ म्हणोनि मनपण मोडे । तैं इंद्रिया आधींचि उबडें । सूत्रधारेंवीण साइखडें । वावो जैसें ॥ १ ॥ तैसें मन हें पांडवा । मूळ यया इंद्रियभावां । हेंचि राहटे आघवां । द्वारीं इहीं ॥ २ ॥ परि जिये वेळीं जैसें । जें होऊनि आंतु असे । बाहेरि ये तैसें । व्यापाररूपें ॥ ३ ॥ यालागीं साचोकारें । मनीं अहिंसा थांवे थोरें । पिकली द्रुती आदरें । बोभात निघे ॥ ४ ॥ म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा । वेचितांही उदावादा । अहिंसेचा धंदा । करितें आहाती ॥ ५ ॥ समुद्रीं दाटे भरितें । तैं समुद्रचि भरी तरियांतें । तैसें स्वसंपत्ती चित्तें । इंद्रियां केलें ॥ ६ ॥ हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु । वोळी लिही व्यक्तु । आपणचि ॥ ७ ॥ तैसें दयालुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें । मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ॥ ८ ॥ याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी । मनाचियेचि राहाटी । रूप केलें ॥ ९ ॥ ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा । जाहला ठायीं जयाचां । देखशील ॥ ३१० ॥ तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ । हें असो निखळ । ज्ञानचि तो ॥ ११ ॥ जे अहिंसा कानें ऐकिजे । ग्रंथाधारें निरूपिजे । ते पाहावी हें उपजे । तैं तोचि पाहावा ॥ १२ ॥ ऐसें म्हणितलें देवें । तें बोलें एकें सांगावें । परि फांकला हें उपसाहावें । । तुम्हीं मज ॥ १३ ॥ म्हणाल हिरवे चारीं गुरूं । विसरे मागील मोहर धरूं । कां वारेलगें पांखिरूं । गगनीं भरे ॥ १४ ॥ तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती । फावलिया रसवृत्ती । वाहविला मती । आकळेना ॥ १५ ॥ तरि तैसें नोहे अवधारा । कारण आहे विस्तारा । एऱ्हवीं पद तरी अक्षरां । तिहींचेंचि ॥ १६ ॥ अहिंसा म्हणतां थोडी । परि तेचि होय जी उघडी । जैं लोटिजती कोडी । मतांचिया ॥ १७ ॥ एऱ्हवीं प्राप्तें मतांतरें । थातंबूनि आंगभरें । बोलिजैल तें न सरे । तुम्हांपाशीं ॥ १८ ॥ रत्नपारखियांचां गांवीं । जाईल गंडकी तरि सोडावी । कास्मीरीं न करावी । मिडगणे जे ॥ १९ ॥ काइसा वासु कापुरा । मंद जेथ अवधारा । पिठाचा विकरा । तिये सातें ॥ ३२० ॥ म्हणोनि इये सभे । बोलकेपणाचेनि क्षोभें । लागसर न लभे । बोला प्रभु ॥ २१ ॥ सामान्या आणि विशेषा । सकळे कीजेल देखा । तरि कानाचेया मुखा- । कडे नेनाल ना तुम्ही ॥ २२ ॥ शंकेचेनि गदळ । जैं शुद्ध प्रमेय मैळे । तैं मागुतां पाउलीं पळे । अवधान येतें ॥ २३ ॥ कां करूनि बाबुळियेची बुंथी । जळें जियें ठाती । तयांची वास पाहाती । हंस काई ॥ २४ ॥

कोणतीही वृत्ति प्रथम मनांत उत्पन्न होते; व मग ती (वृत्ति) वाचा, दृष्टि, हात वगैरे इंद्रियांकडे येते. २९८. याशिवाय जे मनांतच नाहीं, तें वाचेंत प्रगट होईल काय ? बीजाशिवाय जमिनींत अंकुर आहे काय ? २९९. जें पाणी उगमाच्या ठिकाणींच वाळून गेलें आहे, तें (नदीच्या) ओघामध्यें कोठून वाहील ? (शरीरांतून) जीव गेल्यानंतर त्या देहाच्या ठिकाणीं हालचाल आहे काय ? ३००. म्हणून (ज्या वेळीं) मनाचा मनपणा नाहींसा होतो, त्या वेळीं अगोदरच इंद्रियांचीं कर्में राहातात. (म्हणजे इंद्रियांची कर्में करण्याची शक्ति बंद पडते.) ज्याप्रमाणें सुताच्या दोरीनें हालणारी बाहुली सूत्रधाराशिवाय व्यर्थ असते. ३०१. अर्जुना, त्याप्रमाणें मन हें सर्व या इंद्रियांच्या व्यापारांत मूळ आहे व हेंच या सर्व इंद्रियांच्या द्वारानें वागत असतें. ३०२. परंतु ज्या वेळेला जसें ज्या वासनेच्या रूपानें मन आंत होऊन असतें, तसेंच तें इंद्रियांच्या व्यापाररूपानें बाहेर येतें. ३०३. ज्याप्रमाणें पक्व झालेला सुगंध मोठ्या उत्साहानें गाजावाजा करीत बाहेर पडतो, त्याप्रमाणें मनामध्यें अहिंसा चांगली बळावली म्हणजे तीच इंद्रियव्यापारांतून दिसून येते. ३०४. म्हणून (हीं सर्व) इंद्रियें (मनांत असलेल्या) त्याच अहिंसारूप संपत्तीच्या भांडवलाचा खर्च करीत असतांनाही आपला अहिंसेचा व्यवहार पूर्णपणें करीत असतात. (म्हणजे अहिंसेचा इंद्रियांकडून अव्याहत खर्च होऊनसुद्धां अहिंसारूप भांडवल संपत नाहीं.) ३०५. समुद्रास पूर्ण भरती आली म्हणजे, जसा तो समुद्रच आपल्या भरतीच्या पाण्यानें खाड्या भरून टाकतो, त्याप्रमाणें (चित्तांत अहिंसेची दाट भरती झाली म्हणजे) चित्तच या सर्व इंद्रियांना आपल्या अहिंसारूप जलसंपत्तीनें भरून टाकतें. ३०६. हें फार बोलणें राहूं दे. पंतोजी ज्या वेळीं मुलाचा हात धरून त्याला अक्षरांच्या ओळी काढावयास शिकवितो, त्या वेळीं मुलाचा हात धरून पंतोजी आपणच स्पष्ट अक्षरांच्या ओळी लिहितो. ३०७. त्याप्रमाणें मनानें आपलें दयालुत्व हातापायांस आणिलें व मग तेथें (म्हणजे हातापायांचे ठिकाणीं) मनानेंच अहिंसेला उत्पन्न केलें. ३०८. म्हणून अर्जुना, इंद्रियांच्या अहिंसेच्या वर्णनानें मनाच्याच अहिंसेच्या वागणुकीचें स्पष्ट वर्णन केलें. ३०९ याप्रमाणें मनानें, देहानें, वाचेनें सर्व हिंसेचा त्याग झालेला ज्याच्या ठिकाणीं तुला दिसेल; ३१० तो पुरुष ज्ञानाचें विस्तृत मंदीर आहे असें समज. हें राहूं दे. तो पुरुष म्हणजे केवळ ज्ञानाची मूर्तिच होय. ३११. जी अहिंसा आपण कानानें ऐकतों अथवा ज्या ग्रंथाचा आधार घेऊन आपण निरूपण (वर्णन) करतों, ती अहिंसा डोळ्यांनीं पहावी अशी इच्छा जेव्हां उत्पन्न होईल, तेव्हां त्या पुरुषालाच पहावें. ३१२. (ज्ञानेश्वर महाराज श्रोत्यांच्या जवळ परिहार देतात) "असें जे देव म्हणाले तें मी वास्तविक एका शब्दानें सांगावें; परंतु माझ्या सांगण्याचा फार विस्तार झाला, याबद्दल मला आपण क्षमा करावी. ३१३. कदाचित् आपण असें म्हणाल कीं, हिरव्या चाऱ्यांत (गाय, म्हैस वगैरे) जनावर सुटलें असतां तें जसें (चाऱ्याच्या लोभानें) पुनः मागें घरांचे वाटेस लागण्याचें विसरतें अथवा वाऱ्याच्या वेगानें पक्षी जसा आकाशांत आपल्या घरट्यापासून दूर दूर उडत जातो. ३१४. त्याप्रमाणें आवडीच्या योगानें स्फुरण येऊन वेगवेगळ्या रसांचा स्वाद मिळाल्यानें, माझी बुद्धि वाहवत गेली, ती आवरत नाहीं. ३१५. तर ऐका; महाराज, तसें नाहीं. विस्तार करण्याला कारण आहे. नाहीं तर अहिंसा हें पद तीन अक्षरांचेंच आहे. ३१६. अहिंसा म्हणावयास थोडी आहे. परंतु जेव्हां कोट्यावधि मतांचा विचार करून त्यांचें खंडण करावें, तेव्हां महाराज, ती स्पष्ट होते. ३१७. एऱ्हवीं प्राप्त झालेल्या अन्य मतांचें निरसन न करतां आंगच्या जोरानें तुमच्या पुढें बोललों, तर तें चालणार नाहीं. ३१८. रत्न पारखणाऱ्या लोकांच्या गांवांत गंडकी (कसोटीचा शालिग्रामासारखा दगड) रत्न म्हणून विकली जाईल, असें वाटत असेल, तर ती गाठोड्यांतून सोडून बाहेर काढावी व सरस्वतीची स्तुति कितीही केली तरी पुरी होणार नाहीं, म्हणून तिची स्तुति करूं नये. ३१९. ऐका, जेथें (ज्या बाजारांत) कापराला 'वास मंद आहे' असें म्हणतात, त्या बाजारांत (कापूर म्हणून) पिठाची विक्री कशी होईल ? ३२०. म्हणून महाराज, या सभेमध्यें (नुसत्या) बोलकेपणाच्या आवेशानें बोलण्याला जवळीक (पसंती) मिळणार नाहीं. ३२१. सर्वसाधारण अशी अहिंसेची कल्पना व निरनिराळ्या मतांप्रमाणें अहिंसेसंबंधानें विशेष कल्पना, यांचा काला करून जर मी बोललों तर तें व्याख्यान आपण आपल्या कानाच्या मुलाकडे नेणार नाहीं, ३२२. शंकारूपी कचऱ्यानें जेव्हां स्वच्छ सिद्धान्त मळला जातो, तेव्हां त्या सिद्धान्ताकडे येत असलेलें तुमचें लक्ष मागल्या पाउलींच पळेल ३२३. गौंडाळाची खोळ पांघरून जीं उदकें असतात, त्या उदकाची हंस वाट पहातात काय ? ३२४.

कां अभ्रापैलीकडे । येत चांदिणें कोडें । तें चकोरें चांचुवडें । उचलितीना ॥ २५ ॥
तैसें तुम्ही वास न पाहाल । ग्रंथु नेघा वरि कोपाल । जरी निर्विवाद नव्हैल । निरूपण ॥ २६ ॥
न बुझावितां मतें । न फिटे आक्षेपाचें लागतें । तें व्याख्यान जी तुमतें । जोडूनि नेदी ॥ २७ ॥
आणि माझें तंव आघवें । ग्रथन येणेंचि भावें । जे तुम्हीं संतीं होआवें । सन्मुख सदा ॥ २८ ॥
एन्हवीं तरी साचोकारें । तुम्ही गीतार्थाचे सोइरे । जाणोनि गीता जीवसरें । धरिली मियां ॥२९॥
जें आपुलें सर्वस्व घाल । मग इयेतें सोडवूनि न्याल । म्हणोनि ग्रंथु नव्हे बोल । साचचि हे
॥ ३३० ॥ कां सर्वस्वाचा लोभु धरा । बोलेचा अन्हेरु करा । तरि गीते मज अवधारा । एकचि
गती ॥ ३१ ॥ किंबहुना मज । तुमचिया कृपा काज । तियेलागीं व्याज । ग्रंथाचें केलें ॥३२॥
तरि तुम्हां रसिकांजोगें । व्याख्यान शोधावें लागे । म्हणूनि मतांगें । बोलों ठेला ॥ ३३ ॥ तंव
कथे पसरु जाहला । श्लोकार्थु दूरि गेला । कीजो क्षमा या बोला । अपत्या मज ॥ ३४ ॥ आणि
घांसाआंतिल हरळु । फेडितां लागे वेळु । तें दूषण नव्हे खडळु । सांडावा कीं ॥ ३५ ॥ कां
संवचोरां चुकवितां । दिवस लागलिया माता । कोपावें कीं जीवितां । जिताणें कीजे ॥ ३६ ॥ परि
यावरील हें नव्हे । तुम्ही साहिलें तेंचि बरवें । आतां अवधारिजो देवें । बोलिलें ऐसें ॥ ३७ ॥ म्हणे
उन्मेखसुलोचना । सावध होईं अर्जुना । करूं तुज ज्ञाना । वोळखी आतां ॥ ३८ ॥ तरि ज्ञान गा
तें एथें । वोळख तूं निरुतें । आक्रोशेंवीण जेथें । क्षमा असे ॥ ३९ ॥ अगाध सरोवरीं । कमळिणी
जियापरी । कां सदैवाचां घरीं । संपत्ति जैसी ॥ ३४० ॥ पार्था तेणें पाडें । क्षमा जयातें वाढे ।
तेही लक्षे तें फुडें । लक्षण सांगों ॥ ४१ ॥ तरि पढिये तें लेणें । आंगीं भावें जेणें । धरिजे तेवीं
साहणें । सर्वांचि जया ॥ ४२ ॥ त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वरि पडिलिया नव्हे ।
वांकुडा जो ॥४३॥ अपेक्षित पावें । ते जेणें तोषें मानवे । अनपेक्षिताही करवे । तोचि मानु ॥४४॥
जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये । निंदास्तुती नोहे । दुखंडु जो ॥ ४५ ॥ उन्हाळेनि
जो न तापे । हिमवंतीं न कांपे । कायसेनिही न वासिपे । पातलेया ॥ ४६ ॥ स्वशिखरांचा भारु ।
नेणें जैसा मेरु । धरा यज्ञसुकरु । वोझें न म्हणे ॥ ४७ ॥ नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे
क्षिती । तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं । घामेजेना ॥ ४८ ॥ घेउनी जळाचे लोट । आलिया नदीनदांचे
संघाट । करी वाड पोट । समुद्र जेवीं ॥ ४९ ॥ तैसें जयाचां ठायीं । न साहणें कहींचि नाहीं ।
आणि साहतु असे ऐसेंही । स्मरण नुरे ॥ ३५० ॥ आंगा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें ।
येथ साहतेनि नवलें । घेपिजेना ॥ ५१ ॥ हे अनाक्रोश क्षमा । जयापाशीं प्रियोत्तमा । जाण

किंवा ढगांमधून ज्या वेळेला चांदणें येतें, त्या वेळेला त्या मळकट चंद्रप्रकाशाचा उपभोग घेण्याकरितां चकोर पक्षी कौतुकानें देखील आपली चोंच सरसावीत नाहींत. ३२५. त्याप्रमाणें जर माझें निरूपण निर्विवाद ( शंकारहित ) होणार नाहीं, तर तुम्हीं माझ्या ग्रंथाविषयीं उत्सुक असणार नाहीं व ग्रंथाचा स्वीकार करणार नाहीं; इतकेंच नव्हे, तर शिवाय आणखी तुम्हीं रागवाल. ३२६. निरनिराळ्या मतांचें निराकरण न करतां जर ( अहिंसेचें ) व्याख्यान केलें, तर त्या व्याख्यानांत आक्षेपाचा संबंध दूर होणार नाहीं. ( त्यामध्यें शंकेच्या पुष्कळ जागा राहातील ) व महाराज, तसलें व्याख्यान मला तुमची प्राप्ति होऊं देणार नाहीं. ३२७. आणि माझें ग्रंथ रचणें तर याच हेतूनें आहे कीं, तुम्हीं संतांनीं नेहमीं प्रसन्न असावें. ३२८. सहज विचार करून पाहिलें तर, तुम्ही खरोखर गीतार्थाचे चाहाते आहांत, असें समजून, मीं गीतेचा आश्रय केला. तिला जिवासारखी प्रिय मानून तिचें व्याख्यान करूं लागलों. ३२९. जी आपली सर्व मालमत्ता ( पूर्ण कृपा ) आहे, ती घाल व हिला ( गीतेला ) सोडवून न्याल, म्हणून गीता हा खरोखर ग्रंथ नव्हे, तर माझ्याजवळ तुमचें हें तारण आहे. ३३०. अथवा तुम्ही आपल्या सर्वस्वाचा लोभ धराल व तारणाचा अव्हेर कराल, तर गीतेची व माझी एकच गति आहे असें समजा. ३३१. फार काय सांगावें! मला तुमच्या कृपेशीं काम आहे व त्या कृपेकरितां हें ग्रंथाचें निमित्त केलें. ३३२. तरी तुम्हीं जे रसिक, त्या तुम्हांयोग्य व्याख्यान योजावें लागलें, म्हणून माझ्याकडून अन्य मतांची चर्चा झाली. ३३३. तो व्याख्यानाचा विस्तार झाला; श्लोकाचा अर्थ एकीकडे राहिला, या माझ्या बोलण्याबद्दल मला लेंकराला आपण क्षमा करावी ३३४. आणि ( जेवीत असतांना ) घासांतील खडा काढतांना वेळ लागतो; तर जेवणाराला तो घासांतील खडा काढण्याला वेळ लागला व आपलें जेवण आटोपण्यास त्यानें उशीर केला, तर त्यांत जेवणाराचा दोष नाहीं, कारण घासांतील खडे वगैरे कचरा काढून टाकलाच पाहिजे. ३३५. अथवा सोबतीच्या संभावीत चोराला चुकवून आल्यामुळें, घरीं येण्यास मुलाला जास्त दिवस लागले, तर आईनें मुलावर रागवावें किंवा तो जिवंत घरीं आला म्हणून त्याच्यावरून मीठमोहऱ्या वगैरे ओंवाळून त्याची दृष्ट काढावी? ३३६. परंतु हें माझें बोलणें बरच्यासारखें ( शाबासकी देण्यासारखें ) नाहीं, तर माझें बोलणें पाल्हाळाचें होतें व तें तुम्हीं सहन केलें, हें म्हणणेंच बरें." तर आतां महाराज, ऐका. देव असें बोलले. ३३७. भगवान म्हणतात, हे ज्ञानरूपी उत्तम दृष्टि असणाऱ्या अर्जुना, आतां तुला ज्ञानाचा परिचय करून देतों, तूं इकडे लक्ष दे. ३३८. तर जेथें चरफडल्याशिवाय क्षमा असेल तेथें ज्ञान आहे, हें तूं पक्कें ओळख. ३३९. फार खोल तळ्यांत ज्याप्रमाणें कमळाचे वेल ( विपुल वाढतात ) अथवा भाग्यवान पुरुषाच्या येथें जशी संपत्ति ( अलोट येत असते. ) ३४०. अर्जुना, त्या मानानें ज्याच्या ठिकाणीं क्षमा वाढत असते, तेंही ज्या लक्षणांपासून कळतें, तीं लक्षणें आम्हीं निश्चितपणें सांगतों. ३४१. ज्या भावनेनें आवडता अलंकार अंगावर धारण करतात, त्याप्रमाणें जो सर्व सहन करतो, ३४२. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशा मुख्य तीन प्रकारच्या तापांचे समुदाय आहेत, ते सर्व जरी एकदम त्याच्यावर कोसळले तथापि जो डगमगत नाहीं. ३४३. इच्छा असलेली एखादी वस्तु मिळाली असतां जेवढा संतोष होतो, तेवढ्याच संतोषानें अनपेक्षित वस्तु प्राप्त झाली असतां तिचा आदर करतो. ३४४. जो मान व अपमान ( मनाच्या सारख्या स्थितीनें ) सहन करतो व सुखदुःखें हीं ज्याच्या ठिकाणीं सामावलीं जातात, ( सारखीं मानलीं जातात ) व निंदा आणि स्तुतीनें ज्याचे मनाची स्थिति दोन प्रकारची ( दुःखाची व संतोषाची अशी ) होत नाहीं. ३४५. उन्हाळ्यानें जो तापत नाहीं व हिंवानें जो कांपत नाहीं आणि कांहीं जरी प्राप्त झालें तरी जो भीत नाहीं; ३४६. मेरु पर्वत आपल्या शिखरांचें जसें ओझें मानीत नाहीं अथवा वराहअवतार ज्याप्रमाणें पृथ्वीला ओझें म्हणत नाहीं; ३४७. ज्याप्रमाणें अनेक चराचर प्राण्यांनीं पृथ्वी जशी दडपली जात नाहीं, त्याप्रमाणें नाना प्रकारचीं सुखदुःखादि द्वंद्वें प्राप्त झालीं असतां जो श्रमी होत नाहीं. ३४८. पाण्याचे लोट घेऊन नदी व नद यांचे समुदाय आले असतां, समुद्र ज्याप्रमाणें आपल्यांत सर्वांचा समावेश करून घेतो. ३४९. त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं सहन न करणें हें कधींच नसतें आणि आपण सहन करीत आहोंत, अशी आठवणही ज्याचे ठिकाणीं राहात नाहीं. ३५०. जे जे कांहीं सुखदुःखादि भोग शरीराला प्राप्त होतात, ते सर्व आपलें स्वरूपच आहे, असें तो समजतो व म्हणून आपण अलौकिक असें कांहीं सहन करतों, असा अभिमानाचा पगडा त्याचेवर बसत नाहीं. ३५१. हे प्रियोत्तमा अर्जुना, दांत ओठ न

तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥ ५२ ॥ तो पुरुषु पांडवा । ज्ञानाचा वोलावा । आतां परिस आर्जवा । रूप करूं ॥५३॥ तरि आर्जव तें ऐसें । प्राणाचें सौजन्य जैसें । आवडे तयाही दोषें । एकचि गा ॥ ५४ ॥ कां तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेवीं चंडांशु । जगा एकुचि अवकाशु । आकाश जैसें ॥ ५५ ॥ तैसें जयाचें मन । माणुसाप्रती आन आन । नव्हे आणि वर्तन । ऐसें पैं तें ॥५६॥ जे जगचि सनोळख । जगेंसीं जुनाट सोयरिक । आप पर हे भाख । जाणणें नाहीं ॥५७॥ भलतेणेंसींहि मेळु । पाणिया ऐसा ढाळु । कवणेविखीं आडळु । नेघे चित्त ॥५८॥ वारियाची धांव । तैसे सरळ भाव । शंका आणि हांव । नाहीं जया ॥ ५९ ॥ मायेपुढें बाळका । रिगतां न पडे आवांका । तैसें मन देतां लोकां । नालोची जो ॥ ३६० ॥ फांकलिया इंदीवरा । परिवारु नाहीं धनुर्धरा । तैसा कोनकोंपरा । नेणे जीव ॥ ६१ ॥ चोखाळपण रत्नाचें । रत्नावरी किरणाचें । तैसे पुढां मन जयाचें । करणें पाठी ॥ ६२ ॥ आलोचूं जो नेणे । अनुभवचि जोगावणें । धरी मोकली अंतः-करणें । नव्हेचि जया ॥ ६३ ॥ दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धी । कवणेंसीं हीनबुद्धी । राहाटीजे ना ॥६४॥ दाहाही इंद्रियें प्रांजळें । निष्प्रपंचें निर्मळें । पांचही पालव मोकळे । आठही पाहर ॥ ६५ ॥ अमृताची धार । तैसें उजू अंतर । किंबहुना जो माहेर । या चिन्हांचें ॥ ६६ ॥ तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवठा । जाण तेथेंचि घरटा । ज्ञानें केला ॥ ६७ ॥ आतां ययावरी । गुरुभक्तीची परी । सांगों गा अवधारीं । चतुरनाथा ॥ ६८ ॥ आघवियांचि दैवां । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । शोच्यातें ॥ ६९ ॥ ते आचार्योपास्ती । प्रकटिजैल तुजप्रती । बैसों दे एकपांती । अवधानाची ॥ ३७० ॥ तरि सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा रिगाली उदधी । कीं श्रुति हे महापदीं । पैठी जाहाली ॥ ७१ ॥ नाना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण उखितें । प्राणनाथा उचितें । दिधलें प्रिया ॥ ७२ ॥ तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें । आपणपें केलें । भक्तीचें घर ॥ ७३ ॥ गुरुगृह जिये देशीं । तो देशुचि वसे मानसीं । विरहिणी कां जैसी । वल्लभातें ॥ ७४ ॥ तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धांवे सामोरा । आड पडे म्हणे घरा । बीजें कीजो ॥ ७५ ॥ साचा प्रेमाचिया भुली । तया दिशेसीचि आवडे बोली । जीवु थानापती करुनि घाली । गुरुगृहीं जो ॥ ७६ ॥ परि गुरु आज्ञा धरिलें । देह गांवीं असे एकलें । वांसरुवा लाविलें । दावें जैसें ॥ ७७ ॥ म्हणे कैं हें बिरडें फिटेल । कैं तो स्वामी भेटेल । युगाहिहूनि वडिल । निमिष मानी ॥ ७८ ॥ ऐसेया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरूंनींच धाडिलें । तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ७९ ॥ कां सुकतया अंकुरा- । वरि पडिलिया पीयूषधारा । नाना अल्पोदकींचा सागरा । आला मासा ॥ ३८० ॥ नातरी रंकें निधान देखिलें । आंधळिया डोळे उघडले । भणंगाचिया आंगा आलें । इंद्रपद ॥८१॥ तैसें गुरुकुळींचेनि नांवें । महासुखें अति थोरावे । जे कोडेंही पोटाळावे । आकाश कां ॥ ८२ ॥

चावतां स्वभावतःच असलेली ही क्षमा ज्याच्या ठिकाणीं असते, त्या पुरुषाच्या योगानें ज्ञानास मोठेपण प्राप्त होतें असें समज. ३५२. अर्जुना, तो पुरुष, ज्ञानाचें जीवन आहे. आतां आर्जवाचें स्वरूप तुला सांगतों, ऐक. ३५३. अर्जुना, तर ज्यास आर्जव म्हणून म्हणतात, तें असें कीं, ज्याप्रमाणें प्राणाचें प्रेम कोणासंबंधींही असेना का? तें सर्वांवर एकसारखेंच असतें. ३५४. अथवा सूर्य जसा तोंड पाहून प्रकाश करीत नाहीं किंवा आकाश जसें सर्व जगाला सारखीच जागा देतें. ३५५. त्याप्रमाणें ज्याचें मन निरनिराळ्या माणसांशीं निरनिराळें नसतें आणि ज्याची वागणूकही अशा प्रकारची असते, ३५६. कीं सर्व जगच त्याच्या ओळखीचें आहे; त्याचें जगाशीं फार जुनें नातें आहे, आणि आपलें व परकें, ही भाषा तो जाणत नाहीं. ३५७. त्याचें वाटेल त्याच्याशींही पटतें आणि पाण्याच्या सारखी ज्याची वागण्याची रीत असते आणि कोणाही विषयीं त्याचें चित्त विकल्प घेत नाहीं. ३५८. वाऱ्याचें वाहणें जसें सरळ असतें, तसें ज्याच्या मनांतील विचार सरळ असतात आणि ज्याला संशय व लोभ नसतात. ३५९. आईपुढें येण्यास मुलास जशी शंका वाटत नाहीं, त्याप्रमाणें आपल्या मनांतील विचार लोकांस सांगतांना जो मागेंपुढें पहात नाहीं. ३६०. ज्याप्रमाणें उमललेल्या कमलाला आपला सुवास जसा मर्यादित जागेंत दाबून ठेवतां येत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचा जीव कोनाकोपरा जाणतच नाहीं. ( म्हणजे ज्याच्या अंतःकरणाला गुप्त जागा माहीत नाहीं. ) ३६१. रत्नाचा निर्मळपणा असतो, (पण) त्याच्यापेक्षां त्याच्या किरणांचा निर्मळपणा अधिक पुढें असतो, त्याप्रमाणें ज्याचें मन पुढें असतें व करणें पाठीमागून असतें. ३६२. जो कोणत्याही बाबतींत आगाऊ विचार करण्याचें जाणतच नाहीं व जो आत्मानुभवांत तृप्त असतो, जो आपल्या मनानें कशाशीं चिकटतही नाहीं व कशाचा मुद्दाम त्यागही करीत नाहीं. ३६३. ज्याची दृष्टि कपटी ( अथवा ओशाळी ) नसते व ज्याचें बोलणें संशययुक्त नसतें आणि कोणाशींही हलकट बुद्धीनें वागत नाहीं. ३६४. ज्याचीं दहाही इंद्रियें सरळ, निष्कपट आणि शुद्ध असतात, ज्याचे पंचप्राण सदा सर्वदा मोकळे असतात, ३६५. अमृताच्या धारेप्रमाणें त्याचें अंतःकरण सरळ असतें. फार काय सांगावें! जो या चिन्हांचें माहेर असतो, ३६६. अर्जुना, तो पुरुष आर्जवाची मूर्तीच आहे व तो पुरुष ज्ञानानें आपलें राहावयाचें ठिकाण केलें आहे, असें समज. ३६७. आतां

यानंतर गुरुभक्तीचा प्रकार सांगूं. हे चतुरांच्या राजा, तो तूं ऐक. ३६८. ही गुरुसेवा सर्व भाग्यांची उत्पन्न होण्याची जमीन आहे व जी सेवा शोकग्रस्त जीवाला ब्रह्म करते, ३६९. ती गुरुभक्ति आतां तुला स्पष्ट सांगितली जाईल. मात्र तूं तिकडे एकसारखें लक्ष दे. ३७०. तरी सर्व जलसंपत्ति घेऊन गंगा ही जशी समुद्रांत प्रवेश करते अथवा वेद जसे ब्रह्मपदांत प्रविष्ट होतात, ३७१. अथवा आपल्या जिवासह व आपल्या अंगच्या गुणावगुणांसह सरसकट आपल्या स्वतःला पतिव्रतेनें उत्तम प्रकारानें आपल्या पतीस दिलें. ३७२. त्याप्रमाणें ज्यानें आपलें अंतर, मनादिक व बाह्य इंद्रियादिक गुरुकुळाला अर्पण केलें व आपल्याला गुरुभक्तीचें घर केलें आहे, ३७३. ज्याप्रमाणें विरहिणीचे चित्तांत प्रियकर असतो, त्याप्रमाणें ज्या देशांत गुरूचें घर असतें, तो देश ज्याच्या मनामध्यें असतो. ३७४. गुरूच्या देशाकडून जो वारा येत असेल, त्या वाऱ्याला पाहून त्याला सामोरा धांवून जातो व त्याच्या मार्गांत आडवा पडून म्हणतो, 'आपण माझ्या घरीं यावें.' ३७५. सद्गुरुविषयींच्या खऱ्या प्रेमानें जो वेडा झाल्यामुळें ज्याला त्या दिशेचींच बोलणें आवडतें व जो आपल्या जीवाला गुरूच्या घरांत मिरासदार करून ठेवतो, ३७६. परंतु वांसरास दोरीनें बांधून ठेवल्यामुळें त्यास गाईकडे जाण्याची इच्छा असूनही जसें हालतां येत नाहीं; त्याप्रमाणें गुरूची आज्ञा हेंच कोणी एक दावें, त्यानें देहास बांधून टाकल्यामुळें, त्याला पडल्याला आपल्या गांवीं राहाणें पडून गुरूच्या गांवाकडे धांव घेतां येत नाहीं. ३७७. जो म्हणतो, ही गुरुआज्ञारूपी दाव्याची गांठ केव्हां सुटेल व केव्हां तो गुरु भेटेल! तो ( गुरूच्या वियोगांत जाणाऱ्या ) निमिषाला युगाहून मोठें मानतो. ३७८. अशांत जर कोणी गुरूच्या गांवचें आलें, अथवा स्वतः गुरूनेंच पाठविलें, तर जसें मरावयास टेकलेल्या पुरुषाला आयुष्य प्राप्त व्हावें; ३७९. अथवा सुकणाऱ्या अंकुरावर जशा अमृताच्या धारा पडाव्यात, अथवा थोड्या पाण्यांतला मासा जसा समुद्रांत यावा, ३८०. अथवा दरिद्री पुरुषाला जसा द्रव्याचा ठेवा सांपडावा किंवा आंधळ्याला जशी पुनः दृष्टि यावी अथवा भिकाऱ्याला जसें इंद्रपद मिळावें, ३८१. त्याप्रमाणें गुरुकुळाच्या निमित्तानें मोठा आनंद झाल्यामुळें ज्याला आपण इतके वाढलों असें वाटतें कीं, आकाशाला आपण सहजच कवटाळूं. ३८२. ज्या पुरुषाच्या ठिकाणीं

पैं गुरुकुळीं ऐसी। आवडी जया देखसी। जाण ज्ञान तयापासीं। पाइकी करी ॥ ८३ ॥ आणि अभ्यंतरिलियेकडे। प्रेमाचेनि पवाडे। श्रीगुरूचें रूपडें। उपासी ध्यानीं ॥ ८४ ॥ हृदय-शुद्धीचां आवारीं। आराध्यु तो धुरु करी। मग सर्व भावेंसी परिवारीं। आपण होय ॥ ८५ ॥ कां चैतन्याचिये पोवळी-। माजीं आनंदाचां राउळीं। गुरुलिंगा ढाळी। ध्यानामृत ॥ ८६ ॥ उदयिजतां बोधार्का। बुद्धीची डाल सात्त्विका। भरोनि त्र्यंबका। लाखोली वाहे ॥ ८७ ॥ काळशुद्धी त्रिकाळीं। जीवदशाधूप जाळी। ज्ञानदीपें वोंवाळी। निरंतर ॥ ८८ ॥ सामरस्याची रससोय। अखंड अर्पितु जाय। आपण भराडा होय। गुरु तो लिंग ॥ ८९ ॥ नातरी जीवाचिये सेजे। गुरु कांतु करूनि भुंजे। ऐसीं प्रेमाचीं भोजें। बुद्धी वाहे ॥ ३९० ॥ कोणेएके अवसरीं। अनुरागु भरे अंतरीं। कीं तया नांव करी। क्षीराब्धी ॥ ९१ ॥ तेथ ध्येयध्यान बहु सुख। तेचि शेषतुली निर्दोख। वरि जलसेजु देख। भावी गुरु ॥ ९२ ॥ मग वोळगती पाय। लक्ष्मी आपण होय। गरुड होऊनि उभा राहे। आपणचि ॥ ९३ ॥ नाभीं आपणचि जन्मे। ऐसें गुरुमूर्तिप्रेमें। अनुभवी मनोधर्में। ध्यानसुख ॥ ९४ ॥ एकाधेनि वेळे। गुरु माय करी भावबळें। मग स्तन्यसुखें लोळे। अंकावरी ॥ ९५ ॥ नातरी गा किरीटी। चैतन्यतरुतळवटीं। गुरु धेनु आपण पाठीं। वत्स होय ॥ ९६ ॥ गुरुकृपास्नेहसलिलीं। आपण होय मासोळी। कोणे एके वेळीं। हेंचि भावी ॥ ९७ ॥ गुरुकृपामृताचें वडप। आपण सेवावृत्तीचें होय रोप। ऐसेसे संकल्प। विये मन ॥ ९८ ॥ चक्षुपक्षेवीण। पिलूं होय आपण। कैसे पैं अपारपण। आवडीचें ॥ ९९ ॥ गुरूतें पक्षिणी करी। चारा घे चांचूवरी। गुरू तारू धरी। आपण कास ॥ ४०० ॥ ऐसें प्रेमाचेनि थावें। ध्यानचि ध्यानातें प्रसवे। पूर्णसिंधू हेलावे। फुटती जैसे ॥ १ ॥ किंबहुना यापरी। श्रीगुरुमूर्ती अंतरीं। भोगी आतां अवधारीं। बाह्यसेवा ॥ २ ॥ तरि जीवीं ऐसें आवांके। म्हणे दास्य करीन निकें। जैसे गुरु कौतुकें। माग म्हणती ॥ ३ ॥ तैसिया साचा उपास्ती। गोसावी सुप्रसन्न होती। तेथ मी विनंती। ऐसी करीन ॥ ४ ॥ म्हणेन तुमचा देवा। परिवारु जो आघवा। तेतुलें रूपें होआवा। मीचि एकु ॥ ५ ॥ आणि उपकरतीं आपुलीं। उपकरणें आथि जेतुलीं। माझीं रूपें तेतुलीं। होआवीं जी ॥ ६ ॥ ऐसा मागेन वरु। तेथ हो म्हणती गुरु। मग तो परिवारु। मीचि होईन ॥ ७ ॥ उपकरणजात सकाळिक। तेंहि मीचि होईन एकैक। तेव्हां उपास्तीचें कवतिक। देखिजेल ॥ ८ ॥ गुरु बहुतांची माये। परि एकलौति होऊनि ठाये। तैसें करूनि आण वाये। कृपे तिये ॥ ९ ॥ तया अनुरागा वेधु लावी। एकपत्नीव्रतचि घेववीं। क्षेत्रसंन्यासु करवीं। लोभाकरवीं ॥ ४१० ॥ चतुर्दिक्षु वारा। न लाहे निघों बाहिरा। तैसा गुरुकृपे पांजिरा। मीचि होईन ॥ ११ ॥ आपुलिया गुणांचीं लेणीं। करीन गुरुसेवे स्वामिणी। हें असो होईन गंवसणी। मीचि भक्ती ॥ १२ ॥ गुरुस्नेहाचिये वृष्टी। मी पृथ्वी होईन तळवटीं। ऐसिया मनोरथांचिया सृष्टी। अनंता रची ॥ १३ ॥ म्हणे गुरूचें भुवन। आपण मी होईन। आणि दास होऊनि करीन। दास्य तेथिंचें ॥ १४ ॥ निर्गमागमीं

गुरुकुळासंबंधानें असें प्रेम तूं पहाशील, त्याच्यापाशीं ज्ञान चाकरी करतें, असें समज. ३८३. आणि आंतल्या बाजूकडे ( अंतःकरणांत ) प्रेमाच्या जोरानें श्रीगुरुमूर्तीची ध्यानानें उपासना करतो. ३८४. अंतःकरणाची शुद्धता हेंच कोणी एक आवार, त्या आवारामध्यें आराधना करण्याला योग्य जो गुरु, त्याची प्राणप्रतिष्ठा करितो व मग काया, वाचा, मनानें श्रीगुरूचा लवाजमा आपण बनतो; ३८५. अथवा ज्ञानाच्या आवारांत असणाऱ्या आनंदाच्या देवळामध्यें गुरुरूपी लिंगाला ध्यानरूपी अमृताचा अभिषेक करतो; ३८६. बोधरूपी सूर्य उगवतांच बुद्धिरूपी टोपलींत अष्टसात्त्विकभाव भरून तो त्यांची लाखोली श्रीगुरुरूपी शंकराला वाहतो. ३८७. पवित्र काल, हाच कोणी शिवपूजनाच्या तीन वेळां, त्यांत जीवपणरूपी धूप जाळून ज्ञानरूपी दिव्यानें निरंतर ओंवाळतो. ३८८. गुरूला ऐक्यभावरूपी नैवेद्य नेहमीं अर्पीत राहातो व आपण पूजा करणारा गोसावी होऊन गुरूला शंकराची पिंडी करतो. ३८९. अथवा जीवरूपी शय्येवर गुरूला पति करून भोगतो; अशी प्रेमाची आवड त्याची बुद्धि बाळगते. ३९०. कोणा एका वेळीं मनांत गुरुविषयीं प्रेम भरलें, कीं त्याला ( त्या प्रेमाला ) क्षीरसमुद्र असें नांव देतो. ३९१. त्या प्रेमरूपी क्षीरसागरामध्यें ध्येय जे गुरु, त्यांच्या ध्यानापासून होणारें जें अपार सुख, तें ( सुखच ) शेषरूपी शुद्ध गादी समजतो व त्यावर ( श्रीविष्णुप्रमाणें ) जलशयन करणारे श्रीगुरु आहेत, असें समजतो. ३९२. श्रीगुरुरूपी विष्णूच्या पायांची सेवा करणारी लक्ष्मी आपणच होतो व आपणच गुरुड होऊन पुढें उभा राहतो. ३९३. आपणच श्रीगुरुरूपी विष्णूच्या नाभीकमळांत जन्म घेतो म्हणजे ब्रह्मदेव होतो. गुरुमूर्तीच्या प्रेमानें असें ध्यानसुख अंतःकरणांत अनुभवितो. ३९४. एखादे वेळीं आपल्या भावाच्या बळानें गुरूला आई मानतो व मग आपण त्या आईच्या मांडीवर स्तनपानाच्या सुखानें लोळतो. ३९५. अथवा अर्जुना, चैतन्यरूपी झाडाच्या खालीं गुरूला गाय कल्पून, आपण तिच्या पाठीमागें असणारें वांसरू होतो. ३९६. गुरूच्या प्रेमरूपी जळांत आपण मासोळी बनतो. कोणा एका वेळेला हीच कल्पना करतो. ३९७. गुरुकृपेच्या ठिकाणीं अमृताच्या वृष्टीची कल्पना करतो व आपल्या ठिकाणीं सेवावृत्तीरूपी रोपाची कल्पना करतो. असे असे संकल्प त्याचें मन करतें. ३९८. डोळे उघडले नाहींत व पंख फुटले नाहींत असें ( पक्ष्याचें ) पिल्लूं आपणच होतो त्याच्या प्रेमाचें अमर्यादपण कसें आहे ! ३९९. गुरूला पक्षिणी करतो व आपण ( पिल्लूं बनलेला ) तिच्या चोंचेंतून चारा घेतो; गुरूला पोहणारा करून आपण त्यांच्या कांसेला लागतो. ४००. ज्याप्रमाणें पूर्ण भरलेल्या समुद्रांत लाटामागून लाटा उत्पन्न होतात त्याप्रमाणें अशा प्रेमाच्या बळानें ध्यानच ध्यानाला प्रसवतें. ४०१. फार काय सांगावें ! याप्रमाणें तो श्रीगुरुमूर्ति आपल्या अंतःकरणांत भोगतो. आतां त्याची बाहेरील ( शारीरिक ) सेवा ऐक. ४०२. तर त्याच्या मनांत असा विचार असतो कीं, मी गुरूचें असें चांगलें दास्य करीन कीं, जेणेंकरून गुरु मला प्रेमानें 'माग' म्हणून म्हणतील. ४०३, तशा खऱ्या उपासनेनें प्रभु सुप्रसन्न होतील, त्या वेळीं मी अशी विनंति करीन; ४०४. मी असें म्हणेन कीं, देवा, हा जो तुमचा सर्व परिवार आहे, तितक्या रूपानें मीं एकट्यानेंच बनावें. ४०५. आणि आपल्या उपयोगीं पडणारीं जेवढीं उपकरणें ( पूजेचीं भांडीं वगैरे वस्तु ) आहेत, महाराज, तेवढें सर्व मीं व्हावें. ४०६. असा मी ( श्रीगुरूला ) वर मागेन, तेव्हां गुरु 'हो' म्हणतील. मग तो त्यांचा सर्व परिवार मीच होईन. ४०७. गुरूंच्या उपयोगीं पडणाऱ्या जेवढ्या वस्तुमात्र आहेत, त्यांपैकीं प्रत्येक जेव्हां मी होईन, तेव्हां उपासनेचें कौतुक दृष्टीस पडेल. ४०८. श्रीगुरु हे पुष्कळांची आई आहेत; परंतु ते माझी एकट्याचीच आई होऊन राहतील असें करून ( म्हणजे अनन्यभावानें त्यांची सेवा करून ) त्यांच्या कृपेकडून शपथ वाहवीन ४०९. श्रीगुरूच्या त्या प्रेमाला माझा छंद लावीन व त्या प्रेमाकडून एकपत्नीव्रतच घेववीन आणि त्यांच्या लोभाकडून क्षेत्रसंन्यास करवीन ( म्हणजे त्यांचा लोभ मला सोडून दुसरीकडे कोठें जाणार नाहीं असें करीन. ) ४१०. वारा किती जरी धांवला तरी तो जसा चार दिशांच्या बाहेर निघूं शकत नाहीं, त्याप्रमाणें मीच गुरुकृपेला पिंजरा होईन. ४११. गुरुसेवा जी ( माझी ) मालकीण, तिला मी आपल्या गुणांचे अलंकार करीन, हें असो. ( एवढेंच काय पण ) गुरुभक्तीला मीच गवसणी होईन. ४१२. गुरूच्या स्नेहाच्या वृष्टीला मीच खालीं पृथ्वी होईन; याप्रमाणें मनोरथांच्या अनंत सृष्टि तयार करतो. ४१३. तो म्हणतो, गुरूचें राहतें घर, मी स्वतः होईन व त्यांच्या घरचा चाकर होऊन तेथील चाकरी ( मीच ) करीन. ४१४. श्रीगुरु बाहेर जातेवेळीं व घरांत येतेवेळीं

दातारें। जे वोलांडिजती उंबरे। ते मी होईन आणि द्वारें। द्वारपाल ॥ १५ ॥ पाउवा मी होईन। तियां मीचि लेववीन। छत्र मी आणि करीन। वारीपण ॥ १६ ॥ मी तळ उपरु जाणविता। चंवरधरु हातुदेता। स्वामीपुढां खोलता। होईन मी ॥ १७ ॥ मीचि होईन सागळा। करूं सुईन गुळळां। सांडिती तो नेपाळा। पडिघा मीचि ॥ १८ ॥ हडप मी वोळगेन। मीचि उगाळु घेईन। उळिग मी करीन। आंबोळीचें ॥ १९ ॥ होईन गुरूचें आसन। अळंकार परिधान। चंदनादि होईन। उपचार ते ॥४२०॥ मीचि होईन सुआरु। वोगरीन उपहारु। आपणपेनि श्रीगुरु। वोंवाळीन ॥ २१ ॥ जे वेळीं देवो आरोगिती। तेव्हां पांतीकरु मीचि पांतीं। मीचि होईन पुढती। देईन विडा ॥ २२ ॥ ताट मी काढीन। सेज मी झाडीन। चरणसंवाहन। करीन मीचि ॥ २३ ॥ सिंहासन होईन आपण। वरि श्रीगुरु करिती आरोहण। होईन पुरेपण। वोळगेचें ॥ २४ ॥ श्रीगुरूचें मन। जया देईल अवधान। ते मी पुढां होईन। चमत्कारु ॥ २५ ॥ तया श्रवणाचां आंगणीं। होईन शब्दांचिया आक्षोणि। परिसुं होईन घसणी। आंगाचिया ॥ २६ ॥ श्रीगुरूचे डोळे। अवलोकनें स्नेहाळें। पाहाती तियें सकळें। होईन रूपें ॥ २७ ॥ तिये रसने जो जो रुचेल। तो तो रसु म्यां होईजेल। गंधरूपें कीजेल। घ्राणसेवा ॥ २८ ॥ एवं बाह्यमनोगत। गुरुसेवा समस्त। वेंटाळीन वस्तुजात। होऊनियां ॥ २९ ॥ जंव देह हें असेल। तंव ऐसी वोळगी कीजेल। मग देहातीं नवल। बुद्धि आहे ॥ ४३० ॥ इये शरीरींची माती। मेळवीन तिये क्षिती। जेथ श्रीचरण उभे ठाती। आराध्याचे ॥ ३१ ॥ माझा स्वामी कवतिकें। स्परिशति जियें उदकें। तेथ लया नेईन निकें। आपीं आप ॥ ३२ ॥ श्रीगुरु वोंवाळिजती। कां भुवनीं जे उजळिती। तयां दीपांचिया दीप्ती। ठेवीन तेज ॥ ३३ ॥ चंवरी हन विंजणा। तेथ लयो करीन प्राणा। मग आंगाचा वोळगणा। होईन मी ॥ ३४ ॥ जिये जिये अवकाशीं। गुरु असती परिवारेंसीं। आकाश लया आकाशीं। नेईन तिये ॥ ३५ ॥ परि जीतु मेला न संडीं। निमेषु लोकां न घडीं। ऐसेनि गणाविया कोडी। कल्पांचिया ॥ ३६ ॥ येतुलेवरी धिंवसा। जयाचिया मानसा। आणि करूनियांहि तैसा। अपारुचि ॥३७॥ रात्री देवो नेणे। थोडें बहु न म्हणे। म्हणियाचेनि दाटपणें। साजा होय ॥ ३८ ॥ तो व्यापारु येणें नांवें। गगनाहूनि थोरावे। एकला करी आघवें। एके काळीं ॥३९॥ हृदयवृत्ती पुढां। आंगचि घे दवडा। काज करी होडा। मानसेंशीं ॥ ४४० ॥ एकादिया आळामाळा। श्रीगुरुचिया खेळा। लोण करी सकळा। जीविताचें ॥ ४१ ॥ जो गुरुदास्यें कृशु। जो गुरुप्रेमें सपोषु। गुरु आज्ञे-निजवासु। आपणचि जो ॥ ४२ ॥ जो गुरुकुळें सुकुलीनु। जो गुरुबंधुसौजन्यें सुजनु। जो गुरुसेवाव्यसनें सव्यसनु। निरंतर ॥ ४३ ॥ गुरुसंप्रदायधर्म। ते जयाचे वर्णाश्रम। गुरुपरिचर्या नित्यकर्म। जयाचें गा ॥ ४४ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता। गुरु माय गुरु पिता। जो गुरुपूजे-परौता। मार्गु नेणे ॥ ४५ ॥ श्रीगुरुचें द्वार। तें जयाचें सर्वस्व सार। गुरुसेवकां सहोदर-। प्रेमें

जे उंबरे ओलांडतात, ते उंबरे मी होईन आणि घराची द्वारें व द्वारांवरील राखणकरणारे गडी मीच होईन. ४१५. श्रीगुरूंच्या खडावा मीच होईन व त्या खडावा त्यांच्या पायांत मीच घालीन व त्यांचें छत्र मी होईन व छत्र धरण्याचें काम मीच करीन. ४१६. श्रीगुरूला खालीं-वर जाणविणारा ( चोपदार ) मीच होईन, त्यांच्यावर चवरी धरणारा मीच होईन, त्यांना हात देणारा मीच होईन आणि श्रीगुरूपुढें चालणारा वाटाड्या मीच होईन. ४१७. श्रीगुरूंचा झारी धरणारा शागीर्द मीच होईन व त्यांस चूळ भरण्याकरितां पाणी मीच घालीन व ती चूळ ते ज्या तस्तांत टाकतील तें तस्त मीच होईन. ४१८. श्रीगुरूला विडा देण्याची सेवा मीच करीन, त्यांनीं पान खाऊन थुंकलेला थुंका मीच घेईन आणि त्यांना स्नान घालण्याची खटपट मीच करीन. ४१९. गुरूंचें आसन मी होईन, त्यांचे अंगावर घालण्याचे अलंकार व नेसा-वयाचें वस्त्र आणि चंदनादि उपचार मीच होईन. ४२०. श्रीगुरूंचा स्वयंपाक करणारा आचारी मीच होईन व त्यास फराळाचें वाढीन व मी आपल्या आपले-पणानें श्रीगुरूंस ओंवाळीन. ४२१. श्रीगुरु जेव्हां भोजन करतील तेव्हां त्यांच्या पंक्तीला बसणारा मीच होईन व ( भोजन झाल्यानंतर त्यांना ) मीच पुढें होईन आणि विडा देईन. ४२२. श्रीगुरूंचें भोजन केलेलें पात्र मीच काढीन व त्यांचा बिछाना मी झाडीन व त्यांचे पाय मीच चेपीन. ४२३. मी स्वतः सिंहासन होईन, त्यावर गुरु बसतील व सेवेचें पुरेपण होईन ( म्हणजे संपूर्ण सेवा करीन. ) ४२४. श्रीगुरुचें मन जिकडे लक्ष्य देईल ती वस्तु मीच होईन, असा चमत्कार करीन. ४२५. श्रीगुरूंच्या श्रवणरूप अंगणांत, असंख्य शब्द मी होईन, त्यांचें अंग ज्याला घासेल तो स्पर्शविषय मीच होईन. ४२६. श्रीगुरूंचे डोळे कृपादृष्टीनें ज्या ज्या वस्तु पाहा-तील, त्या सर्व मीच होईन. ४२७. त्यांच्या जिव्हेला जो जो रस आवडेल, तो तो रस मी होईन आणि मी गंधरूप होऊन त्यांच्या घ्राणाची सेवा करीन. ४२८. याप्रमाणें सर्व वस्तुमात्र मी होऊन, श्रीगुरूची सर्व बाह्यसेवा मी व्यापीन, असें त्याचें मनोगत असतें. ४२९. हा देह जेथपर्यंत उभा आहे, तेथपर्यंत माझ्याकडून अशी सेवा केली जाईल व देह पडल्यानंतरही सेवा करण्याची आश्चर्य-कारक आवड बुद्धीमध्यें मी धरीन. ( ती अशी ) ४३०. जेथें पूजनीय श्रीगुरूचे चरण उभे राहातील, त्या जागीं या ( माझ्या ) शरीराची माती मिळवीन. ४३१. माझे स्वामी ज्या पाण्याला सहज स्पर्श करतील, त्या पाण्यांत माझ्या शरीरांतील पाणी चांगलें ल्याला नेईन. ४३२. ज्या दिव्यांनीं श्रीगुरूंस ओंवाळतात अथवा जे दिवे श्रीगुरूंच्या मंदिरांत लावतात, त्या दिव्याच्या तेजांत मी आपल्या शरीरांतील तेज मिळवीन. ४३३. श्रीगुरूंची चवरी व पंखा जो असेल, तेथें ( त्या चवरींत व पंख्यांत ) मी माझ्या प्राणांचा लय करीन व मग त्यांच्या शरीराची सेवा करणारा ( वारा ) मी होईन. ४३४. ज्या ज्या पोक-ळींत गुरु आपल्या परिवारासह असतील, त्या पोकळींत मी आपल्या शरीरांतील आकाश ल्याला नेईन. ४३५. परंतु जिवंत असतांना अथवा मेल्यावर श्रीगुरूंची सेवा सोडणार नाहीं व एक निमिष ( एक निमिषभर गुरूची सेवा ) लोकांवर सोपविणार नाहीं व अशी ही सेवा कोट्यवधि कल्पनांचा काल मोजला तरी ती चालू राहील ४३६. येथपर्यंत त्याच्या मनाला गुरुसेवेविषयीं उत्कट इच्छा असते आणि त्याचप्रमाणें तो सेवा करूनही अपारच असतो (म्हणजे गुरुसेवेविषयीं त्याची उत्कट इच्छा राहि-लेलीच असते) ४३७. ( गुरुसेवेपुढें ) तो रात्रदिवस जाणत नाहीं, थोडेंफार म्हणत नाहीं आणि सेवेची गर्दी असली म्हणजे तो प्रसन्न असतो. ४३८. गुरुसेवा करावयाची म्हटलें, म्हणजे तो आकाशाहून मोठा होतो व तो एकटा गुरूची सर्व सेवा एकाच काळीं करतो. ४३९. त्याच्या अंतःकरणाच्या वृत्तीपुढें शरीरच धांव घेतें, त्याची प्रत्यक्ष कृति मनाशीं सेवेच्या कामांत चढाओढीची प्रतिज्ञा करते. ४४०. श्रीगुरूंच्या एखाद्या जराशा लीलेला आपल्या सर्व जीविताचें लोण करतो ( म्हणजे आपलें सर्व जीवित त्यांच्या थोड्याशा खेळावरून ओंवाळून टाकतो. ) ४४१. जो गुरुसेवेच्या योगानें रोडका झालेला असतो, जो गुरुप्रेमानें पुष्ट झालेला असतो व जो आपण स्वतः गुरूच्या आज्ञेचें स्वतःच्या राहण्याचें ठिकाण असतो. ४४२. जो गुरूच्या कुळामुळें चांगला कुलीन असतो, जो आपल्या गुरुबंधु-वरील स्नेहाचे योगानें भला मनुष्य ठरलेला असतो व जो नेहमीं गुरुसेवेच्या छंदामुळें व्यसनी असतो ४४३. गुरुसंप्रदायाचे जे आचार असतात, ते ज्याचे वर्णाश्रम विहित कर्में असतात, अरे गुरुसेवा, हें ज्याचें नित्यकर्म असतें. ४४४. गुरु हेंच क्षेत्र, गुरु हीच देवता, गुरुच माता, गुरुच पिता, तो गुरुपूजेपलीकडे दुसरा मार्ग जाणत नाहीं. ४४५. श्रीगुरूचें द्वार हेंच ज्याचें सर्वस्व सार आहे

भजे ॥ ४६ ॥ जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र । गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥४७॥ शिवतलें गुरुचरणीं । भलतें जें पाणी । तया तीर्थेयात्रे आणी । तीर्थें त्रैलोक्यींचीं ॥४८॥ श्रीगुरूचें उशिटें । लाहे जैं अवचटें । तैं तेणें लाभें विटे । समाधीसी ॥ ४९ ॥ कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी । उधळती पायांपाठीं । चालतां जे ॥ ४५० ॥ हें असो सांगों किती । नाहीं पारु गुरुभक्ती । परी गा उत्क्रांतमती । कारण हें ॥ ५१ ॥ जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचें कोड । जो हे सेवेवांचून गोड । नमनी कांहीं ॥ ५२ ॥ तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो । हें असो तो देवो । ज्ञान भक्तु ॥ ५३ ॥ हें जाण पां साचोकारें । तेथ ज्ञान उघडेनि द्वारें । नांदत असे जगा पुरे । इया रीती ॥ ५४ ॥ जिये गुरुसेवेविखीं । माझा जीव अभिलाखी । म्हणोनि सोयचुकी । बोली केली ॥५५॥ एऱ्हवीं असतां हातीं खुळा । भजनावधानीं आंधळा । परिचर्येलागीं पांगुळा- । पासूनि मंदु ॥ ५६ ॥ गुरुवर्णनीं मुका । आळशी पोशिजे फुका । परि मनीं आथी निका । सानुरागु ॥ ५७ ॥ तेणेंचि पैं कारणें । हें स्थळ पोखणें । पडलें मज म्हणे । ज्ञानदेवो ॥ ५८ ॥ परि तो बोलु उपसाहावा । आणि बोलणे अवसरु देयावा । आतां म्हणेन जी बरवा । ग्रंथार्थुचि ॥ ५९ ॥ परिसा परिसा श्रीकृष्णु । जो भूतभार-सहिष्णु । तो बोलतसे विष्णु । पार्थु ऐके ॥ ४६० ॥ म्हणे शुचित्व गा ऐसें । जया-पाशीं दिसे । आंग मन जैसें । कापुराचें ॥ ६१ ॥ कां रत्नाचें दळवाडें । तैसें सबाह्य चोखडें । आंत बाहेरि एकें पाडें । सुर्यु जैसा ॥ ६२ ॥ बाहेरीं कर्में क्षाळला । भितरीं ज्ञानें उजळला । इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥ ६३ ॥ मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें मेळें । निर्मळु होय बोलें । वेदाचेनि ॥ ६४ ॥ भलतेथ बुद्धी बळी । रजें आरिसा उजळी । सौंदणी फेडी थिगळी । वस्त्रांचिया ॥ ६५ ॥ किंबहुना इयापरी । बाह्य चोख अवधारीं । आणि ज्ञानदीपु अंतरीं । म्हणौनि शुद्ध ॥ ६६ ॥ एऱ्हवीं तरी पांडुसुता । आंत शुद्ध नसतां । बाहेरि कर्म तो तत्त्वतां । विटंबु गा ॥ ६७ ॥ मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थीं न्हाणिला । कडु-दुधिया माखिला । गुळें जैसा ॥ ६८ ॥ वोस गृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिंपिलें । कुंकुमेंदुर केलें । कांतहीने ॥ ६९ ॥ कळस ढिमाचे पोकळ । जळो वरीले झळाळ । काय करूं चित्रींव फळ । आंतु शेण ॥ ४७० ॥ तैसें कर्मवरिचिलेकडां । न सरे थोर मोलें कुडा । नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगे ॥ ७१ ॥ म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभेल स्वभावें । वरि ज्ञानकर्में संभवे । ऐसें कें जोडे ॥ ७२ ॥ यालागीं बाह्य विभागु । कर्में धुतला चांगु । आणि ज्ञानें फेडिला बंगु । अंतरींचा ॥ ७३ ॥ तेथ अंतरबाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहलें । किंबहुना

व गुरुसेवकांना तो सख्या भावाच्या प्रेमानें भजतो. ४४६. ज्याचें मुख गुरुनामाचा मंत्र धारण करतें व गुरुवाक्यावांचून दुसऱ्या शास्त्राला हात लावीत नाहीं. ४४७. ज्या कोणत्याही पाण्याला श्रीगुरुचरणाचा स्पर्श झाला आहे; त्या पाण्याला तीर्थ असें समजून, त्या तीर्थाच्या यात्रेला त्रैलोक्याचीं तीर्थें आणतो, ( म्हणजे त्रैलोक्यांतील तीर्थें त्या पाण्यांत आलीं आहेत असें समजतो. ) ४४८. त्याला जेव्हां श्रीगुरुचें उच्छिष्ट अकस्मात प्राप्त होतें, तेव्हां त्या लाभानें तो समाधीस विटतो. ४४९. अर्जुना, श्रीगुरु चालत असतांना त्यांच्या पायामागें जी धूळ उडते, त्यांतील रजःकण तो गुरुभक्त मोक्षसुखाच्या किंमतीचे समजतो. ४५०. हें राहूं दे. मी गुरुभक्तीसंबंधानें किती सांगूं ! गुरुवरील प्रेमाला अंत नाहीं, परंतु माझ्या बुद्धींत अफाट स्फूर्ति झाली, हेंच या विस्ताराचें कारण आहे. ४५१. ज्याला या भक्तीची इच्छा आहे, ज्याला याविषयींचें कौतुक आहे व जो या सेवेवांचून दुसरें कांहीं चांगलें मानीत नाहीं; ४५२. तो पुरुष तत्त्वज्ञानाचें ठिकाण आहे. ज्ञानाला त्याच्याच योगानें इभ्रत असते. हें वर्णन पुरे. अशी गुरुची सेवा करणारा जो आहे, तो देव आहे व ज्ञान त्याचा भक्त आहे. ४५३. ह्या रीतीनें खरोखर तेथें ( त्या गुरुभक्ताच्या ठिकाणीं ) जगाला पुरेल इतकें ज्ञान उघड्या दारानें नांदतें, हें तूं खरोखर समज, ४५४. ( ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ) ह्या गुरुसेवेविषयीं माझ्या अंतःकरणांत उत्कट इच्छा आहे, म्हणून मार्ग सोडून गुरुभक्तीचें व्याख्यान केलें ४५५. नाहींतर मी गुरुसेवेविषयीं हात असून थोटा, मला डोळे असून मी भजनाकडे लक्ष देण्याचे कामीं आंधळा आहें व सेवा करण्याविषयीं पाय असून पांगळ्यापेक्षां मंद आहे. ४५६. वाचा असून गुरुवर्णनाविषयीं मुका व ज्यास फुकट पोसावें लागतें असा मी आळशी आहें; परंतु माझ्या मनामध्यें गुरुभक्तीविषयीं चांगलें प्रेम आहे. ४५७. त्याच कारणामुळें ह्या ( आचार्योपास्ति ) पदाचें व्याख्यान विस्तृत करणें भाग पडलें असें ज्ञानदेव म्हणतात. ४५८. तरी तें माझें लांबलचक व्याख्यान सहन करावें आणि मला सेवा करण्याला सवड द्यावी. आतां पुढें ग्रंथाचा अर्थच चांगला सांगेन. ४५९. ऐका ! ऐका ! भूतांचें ओझें सहन करणारा विष्णु जो श्रीकृष्ण, तो बोलत आहे व अर्जुन ऐकत आहे. ४६०. श्रीकृष्ण म्हणतात, ज्याप्रमाणें कापूर हा आंत व बाहेर दोन्ही बाजूंनी स्वच्छ असतो, त्याप्रमाणें ज्याचें शरीर आणि अंतःकरण, हीं शुद्ध असतात. अर्जुना, तशा प्रकारचें शुचित्व ज्याचे ठिकाणीं असतें. ४६१. जसें रत्नाचें स्वरूप आंतबाहेर चोख असतें; अथवा सूर्य जसा आंतबाहेर एकसारखा ( प्रकाशमय ) असतो. ४६२. ( तसा ) बाहेरून जो कर्मानें शुद्ध झालेला आहे व आंतून जो ज्ञानानें शुद्ध झालेला आहे; अशा रीतीनें जो या दोन्ही प्रकारांनीं शुद्धत्वाला प्राप्त झाला आहे. ४६३. वेदांच्या आज्ञेप्रमाणें माती आणि पाणी, ह्यांच्या योगानें बाह्य जें शरीर, तें निर्मळ होतें. ४६४. बुद्धीच्या बळानें वाटेल तेथें आरसा धुळीनें ( मातीनें ) स्वच्छ करतां येतो व परिटाच्या भट्टीच्या पात्रांतील पाणी वस्त्राचे डाग नाहींसे करतें. ४६५. फार काय सांगावें ! ऐक. याप्रमाणें त्याचें शरीर शुद्ध असतें व मनांत ज्ञानरूपी दिवा असतो म्हणून अंतर शुद्ध असतें असें समज. ४६६. अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर आंत मन शुद्ध नसतांना बाहेर केवळ शरीरानें कर्म करणें, ही विटंबना होय. ४६७. प्रेतास जसे अलंकार घालून सजविलें किंवा गाढवाला जसें तीर्थांत स्नान घातलें अथवा कडू असलेला दुध्या भोपळा जसा गुळानें चोपडला; ४६८. ओसाड घराला जसें तोरण बांधलें किंवा उपवाशी मनुष्याच्या अंगाला बाहेरून अन्न चोपडलें अथवा विधवा स्त्रीनें कुंकु व शेंदूर लावला; ४६९. आंतून पोकळ व बाहेरून सोन्याचा मुलामा केलेले कळस जे असतात, त्यांच्या वरील नुसत्या दिखाऊ चकाकीला आग लागो. शेणाचीं फळाचीं चित्रें करून, त्यांना बाहेरून रंग देऊन, जरी तीं हुबेहूब फळांसारखीं दिसणारीं केलीं, तरी त्यांना घेऊन काय करावयाचें आहे ? कारण त्यांच्या आंत शेण आहे. ४७०. आंत शुद्ध नसून केवळ बाह्यात्कारी कर्म करणें, हें त्याप्रमाणें आहे. वाईट पदार्थाला मोठी किंमत लावली तर तो खपत नाहीं. जशी दारूनें भरलेली घागर गंगोदकांत बुचकळली, तरी त्यायोगानें ती घागर पवित्र होत नाहीं. ४७१. म्हणून मनामध्यें ज्ञान असावें, मग बाह्य शुद्धि सहजच प्राप्त होईल. शिवाय ज्ञान व कर्म या दोहोंनीं उत्पन्न होणारी अशी पवित्रता कोठें मिळेल ? ४७२. याकरितां अर्जुना, बाहेरील भाग कर्मानें चांगला धुतलेला ( शुद्ध केलेला ) आहे आणि ज्ञानानें आंतील मळ काढून टाकलेला आहे, ४७३. त्या स्थितींत आंतील व बाहेरील शुचित्व, हा भेद गेला व दोन्हीं शुचित्वें एक

उरलें । शुचित्वाचि ॥ ७४ ॥ म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरि दिसती फांकत । ते स्फटिक-गृहींचे डोलत । दीप जैसे ॥ ७५ ॥ विकल्प जेणें जेणें उपजे । नाथिली विकृति निपजे । अप्रवृत्तीचीं बीजें । अंकुर घेती ॥ ७६ ॥ तें आइके देखे अथवा भेटे । परि मनीं कांहींचि नुमटे । मेघरंगें न कांटे । व्योम जैसें ॥ ७७ ॥ एऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें । विषयांवरी तरी लोळे । परि विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥ ७८ ॥ भेटलेया वाटेवरी । चोखी आणि माहारी । तेथ नातळे तियापरी । राहाटों जाणे ॥ ७९ ॥ कां पतिपुत्रांतें आलिंगी । एकाचि ते तरुणांगी । तेथ पुत्रभावाचां आंगीं । न लगेचि कामु ॥ ४८० ॥ तैसें हृदय चोख । संकल्पविकल्पीं सनोळख । कृत्याकृत्य विशेख । फुडें जाणे ॥ ८१ ॥ पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ न शिजे । तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ती ॥ ८२ ॥ तया नांव शुचित्वपण । पार्था गा संपूर्ण । हे देखसी तेथ जाण । ज्ञान आहे ॥ ८३ ॥ आणि स्थिरता साचें । घर रिगाली जयाचें । तो पुरुष ज्ञानाचें । आयुष्य गा ॥ ८४ ॥ देह तरी वरीलीकडे । आपुलिया परी हिंडे । परि बैसका न मोडे । मानसींची ॥ ८५ ॥ वत्सावरूनि धेनूचें । स्नेह राना न वचे । नव्हती भोग सतियेचे । प्रेमभोग ॥ ८६ ॥ कां लोभिया दूर जाये । परि जीव ठेवाचि ठाये । तैसा देहो चालितां नव्हे । चळु चित्ता ॥ ८७ ॥ जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे । भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥ ८८ ॥ पांथिकाचिया येरझारा । सवें पंथु न वचे धनुर्धरा । कां नाहीं जेवीं तरुवरां । येणें जाणें ॥ ८९ ॥ तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं । भूतोर्मी एकी । चाळिजेना ॥ ४९० ॥ वाहुटोळीचेनि बळें । पृथ्वी जैसी न ढळे । तैसा उपद्रवउमाळें । न लोटे जो ॥ ९१ ॥ दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे । देहमृत्यु न वासिपे । पातलेनि ॥ ९२ ॥ आर्तिआशापाडिभरें । वयव्याधीगजरें । उजू असतां पाठिमोरें । नव्हे चित्त ॥ ९३ ॥ निंदा निस्तेज दंडी । कामलोभा वरपडी । परी रोमा नव्हे वांकुडी । मानसाची ॥ ९४ ॥ आकाश हे वोसरो । पृथ्वी वरि विरो । परी नेणे मोहरों । हृदय-वृत्ती ॥ ९५ ॥ हाती हाला फुलीं । पासवणा जेवीं न घाली । तैसा नोहोटे दुर्वाक्यशेलीं । सेलिला सांता ॥ ९६ ॥ क्षीरार्णवाचां कल्लोळीं । कंपु नाहीं मंदराचळीं । कां आकाश न जळे जाळीं । वणवियाचां ॥ ९७ ॥ तैसा आल्या गेल्या ऊर्मी । नव्हे गजबज मनोधर्मीं । किंबहुना धिरु क्षमी । कल्पांतींही ॥ ९८ ॥ पैं स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे जे सविशेष । ते हे दशा गा देख । देखणेया ॥ ९९ ॥ हें स्थैर्य निधडें । जेथ आंगें जीवें जोडे । तें ज्ञानाचें उघडें । निधान साचें ॥ ५०० ॥ आणि इसाळु जैसा घरा । कां दंदिया हतियेरा । न विसंबे भांडारा ।

झालीं. फार काय सांगावें ! केवळ एक शुचित्व मात्र राहिलें. ४७४. म्हणून स्फटिकाच्या तावदानांत ठेवलेले दिवे मंद मंद हालतांना जसे बाहेरून दिसतात, तशा अंतःकरणांतील चांगल्या मनोवृत्ति बाहेर ( इंद्रियद्वारां ) प्रगट झालेल्या दिसतात. ४७५. ज्या ज्या योगानें संशय उत्पन्न होतो, ज्या योगानें वाईट मनोविकार उत्पन्न होतात व ज्या योगानें कुकर्मांचीं बीजें अंकुर घेतात (ज्या योगानें निषिद्ध कर्मांकडे प्रवृत्ति होते.) ४७६. अशा ज्या गोष्टी, त्या ऐकिल्या, पाहिल्या किंवा भेटल्या, तरी त्या योगानें, ज्याप्रमाणें मेघांच्या रंगांचे डाग आकाशावर पडत नाहींत, त्याप्रमाणें मनामध्यें कांहीं विकार उत्पन्न होत नाहींत. ४७७. एऱ्हवीं इंद्रियांच्या संगतीनें विषयांशा संबंध त्याला जरी घडला, तरी तो विकाराच्या विटाळानें लिप्त होत नाहीं. ४७८. वाटेवरून ब्राह्मणस्त्री अथवा महाराची स्त्री ह्या दोघी गेल्या असतां, ती वाट एकीचे स्पर्शानें पवित्र होत नाहीं अथवा दुसरीचे संगतीनें ती अपवित्र होत नाहीं; तर ती वाट दोहींपासून अलिप्त असते, त्याप्रमाणें अलिप्तपणानें व्यवहारांत वागण्याची त्यास माहिती असते. ४७९. एकच तरुण स्त्री पतीला व पुत्राला आलिंगन देते; परंतु पुत्राला आलिंगन देतेवेळीं तिच्या मनांत जें पुत्राविषयीं प्रेम असतें, त्या प्रेमांत कामाचा स्पर्श नसतो. ४८०. त्याप्रमाणें त्याचें हृदय शुद्ध असतें. संकल्प व विकल्प, या दोहींची त्या अंतःकरणास ओळख असते. विशेषतः कृत्य आणि अकृत्य काय आहे, हें तें अंतःकरण पक्के जाणतें. ४८१. जसा हिरा पाण्यानें भिजत नाहीं व आधणांत खडा शिजत नाहीं, त्याप्रमाणें कोणत्याही मनोविकारानें त्याची वृत्ति लिप्त होत नाहीं. ४८२. अर्जुना, यास पुरें शुचित्व म्हणतात. हीं वर सांगितलेलीं शुचित्वाचीं लक्षणें तूं जेथें पहाशील, तेथें ज्ञान आहे असें समज. ४८३. आणि ज्या पुरुषाच्या घरांत स्थिरतेनें खरोखर प्रवेश केला आहे, तो पुरुष ज्ञानाचें आयुष्य आहे. ४८४. त्या पुरुषाचा देह तर वरच्या दृष्टीनें पाहिलें असतां, आपल्या स्वभावानुसार हिंडत असतो; परंतु मनांतील विचारांची स्थिरता विसकटत नाहीं. ४८५. गाय जरी रानांत गेली, तरी तिचें वांसरावरील प्रेम रानांत जात नाहीं ( वासरावरून हालत नाहीं ). सती जाणाऱ्या स्त्रीचे भोग, म्हणजे वस्त्रालंकारादि उपचार, ते प्रेमाचे भोग नसतात. कारण तिचें लक्ष पतीकडे लागलेलें असतें, तें भोगांकडे येत नाहीं. ४८६. अथवा लोभी पुरुष दूर जातो, परंतु त्याचा जीव ठेव्यापाशीं राहातो. त्याप्रमाणें त्या स्थिरचित्त पुरुषाचा देह जरी फिरत असला, तरी त्याच्या चित्ताला चंचलता नसते. ४८७. इकडून तिकडे फिरणाऱ्या मेघांबरोबर जसें आकाश धांवत नाहीं, अथवा गति असलेल्या ग्रहांच्या चक्राबरोबर जसा ध्रुवाचा तारा फिरत नाहीं; ४८८. अर्जुना वाटसरूंच्या येण्याजाण्याबरोबर जसा रस्ता चालत नाहीं अथवा ज्याप्रमाणें वृक्षास जाणेंयेणें नाहीं. ४८९. त्याप्रमाणें चलनवलन करणाऱ्या या पंचमहाभूतात्मक देहांत तो स्थिरचित्त पुरुष असूनही, प्राणिमात्राच्या ठिकाणीं असणाऱ्या क्षुधादि षडूर्मींपैकीं एकीनेंही त्याच्या चित्ताची गडबड होत नाहीं. ४९०. वावटळीच्या बळानें पृथ्वी जशी हालत नाहीं, त्याप्रमाणें उपद्रवाच्या लोंढ्यांनीं तो वाहवला जात नाहीं. ४९१. दारिद्र्यापासून होणाऱ्या त्रासमुळें दुःखी होत नाहीं व भय व शोक यांनीं कांपत नाहीं. शरीराला मृत्यु आला असतां भयानें त्याची गाळण उडत नाहीं. ४९२. कोणती एखादी मानसिक पीडा आणि आशा, यांचे भरानें व म्हातारपण आणि रोग यांच्या गडबडीनें, त्याचें चित्त जें नीट आत्मसन्मुख झालेलें असतें, तें पुनः बहिर्मुख होत नाहीं. ४९३. निंदा व अपमान यांचे तडाके बसले अथवा काम व लोभ हे जरी त्याच्या अंगावर येऊन आदळले, तरी त्याच्या मनाचा एक वाल वांकडा होत नाहीं. ४९४. आकाश नाहींसें होवो शिवाय पृथ्वी विरघळून जावो; परंतु त्याच्या मनोवृत्तीला आत्म्यास सोडून परत फिरण्याचें माहीत नसतें. ४९५. हत्तीला फुलांनीं मारिलें असतां तो ज्याप्रमाणें माघारी फिरत नाहीं, त्याप्रमाणें त्याच्यावर बोलक्या अपशब्दांचा मारा केला असतां जो निस्तेज होत नाहीं. ४९६. क्षीरसमुद्राच्या लाटांनीं जसा मंदर पर्वत कांपत नाहीं अथवा आकाश जसें वणव्याच्या जाळानें जळत नाहीं. ४९७. त्याप्रमाणें शोकमोहादि षडूर्मींच्या लाटा आल्या-गेल्या, तरी त्याच्या मनोधर्मामध्यें ( चित्तस्थिरतेमध्यें ) गडबड उडत नाहीं. फार काय सांगावें ! कल्पांतसमय जरी आला तरी तो धैर्यवान सहनशील असतो. ४९८. हे डोळस अर्जुना, स्थैर्य या नांवानें जिचें विशेष वर्णन केलें जातें, ती हीच अवस्था होय, असें समज. ४९९. हें न ढळणारें स्थैर्य ज्या पुरुषांत शरीराच्या व मनाच्या ठिकाणीं प्राप्त झालें आहे, तो पुरुष ज्ञानाचा खरा उघडा ठेवा आहे. ५००. आणि ब्रह्मराक्षस अथवा अस्सल सर्प जसा ( आपलें धन असलेल्या ) घराला विसरत नाहीं किंवा योद्धा जसा हत्याराला विसरत नाहीं अथवा लोभी पुरुष जसा आपल्या

बद्धकु जैसा ॥ १ ॥ एकलौतिया बाळका- । वरि पडौनि ठाके अंबिका । मधुविषीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ॥ २ ॥ अर्जुना जो यापरी । अंतःकरण जतन करी । नेदी उभें ठाको द्वारीं । इंद्रियांचां ॥३॥ म्हणे काम बागुल ऐकेल । हे आशा सियारी देखैल । तरी जीवा टेंकैल । म्हणोनि बिहे ॥४॥ बाहेरी धीट जैसी । दादुगा पति कळासी । करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसीं ॥५॥ सचेतनीं वाणेपणें । देहासकट आटणें । संयमावरी करणें । बुझूनि घाली ॥ ६ ॥ मनाचां महाद्वारीं । प्रत्याहाराचिया ठाणांतरीं । जो यमदम शरीरीं । जागवी उभे ॥ ७ ॥ आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाचीं घरटीं । चंद्रसूर्यसंपुटीं । सुये चित्त ॥ ८ ॥ समाधीचे शेजेपासीं । बांधोनि घाली ध्यानेंसीं । चित्त चैतन्यसमरसीं । आंतु रते ॥ ९ ॥ अगा अंतःकरणनिग्रहो जो । तो हा हें जाणिजो । हा आथी तेथ विजयो । ज्ञानाचा पैं ॥ ५१० ॥ जयाची आज्ञा आपण । शिरीं वाहे अंतःकरण । मनुष्याकारें जाण । ज्ञानचि तो ॥ ११ ॥

इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च । जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी । पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥ १२ ॥ वमिलेया अन्ना । लाळ न घोंटीं जेवीं रसना । आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ १३ ॥ विष खाणें नागवे । जळत घरीं न रिगवे । व्याघ्रविवरां न वचवे । वस्ती जेवीं ॥ १४ ॥ धडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी । न करवे उशी । अजगराची ॥ १५ ॥ अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींच जावों ॥ १६ ॥ जयाचां मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य । यमदमीं सामरस्य । जयासि गा ॥ १७ ॥ तपोव्रतांचा मेळावा । जयाचां ठायीं पांडवा । युगांत जया गांवा- । आंतु येतां ॥ १८ ॥ बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे धांव । न साहे जो नांव । संघाताचें ॥ १९ ॥ नाराचाचीं आंथुरणें । पूयपंकीं लोळणें । तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें ॥ ५२० ॥ स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानीं ऐसें । कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां ॥ २१ ॥ तें हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें भाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । जीव होती ॥ २२ ॥ ऐसा उभयभोगीं त्रासु । देखसी जेथ बहुवसु । तेथ जाण रहिवासु । ज्ञानाचा तूं ॥ २३ ॥ आणि सचाडाचिये परी । इष्टापूर्ते करी । परी केलेपण शरीरीं । वसों नेदी ॥ २४ ॥ वर्णाश्रमपोषकें । कर्में नित्य-नैमित्तिकें । तयांमाजीं कांहीं न ठके । आचरतां ॥ २५ ॥ परि हें मियां केलें । कीं हें माझेनि जालें । ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजीं ॥ २६ ॥ जैसें अवचितपणें । वायूसि सर्वत्र विचरणें । का निराभिमान उदेजणें । सूर्याचें जैसें ॥ २७ ॥ कां श्रुति स्वभावता बोले । गंगा काजेविण

खजिन्याला विसरत नाहीं. ५०१. एकुलत्या एका मुलावर जशी आई पडून रहाते ( म्हणजे त्याला कधीं विसंबत नाहीं ) अथवा जशी मधमाशी मधाविषयीं लोभी असते. ५०२. अर्जुना, याप्रमाणें जो आपल्या अंतःकरणाला जपतो व इंद्रियांच्या द्वारांत अंतःकरणाला उभे राहूं देत नाहीं. ५०३. तो म्हणतो कीं, माझें अंतःकरण जर इंद्रियांच्या द्वारांत गेल्याचें, त्या इंद्रियांच्या ठिकाणीं असलेल्या कामानें ऐकलें, तर तो कामरूपी बागुलबोवा त्या अंतःकरणाला झपाटील व मग त्या कामाच्या तडाक्यांतून सुटणें कठीण ! तसेंच इंद्रियांच्या ठिकाणीं असणारी आशारूपी डाकीण, ही अंतःकरणाला इंद्रियांच्या द्वारीं पाहिल्याबरोबर, त्याला झपाटील. मग जिवावरच घेऊन बेतेल, म्हणून तो पुरुष भितो. ५०४. ज्याप्रमाणें घराबाहेर ढालगजपणानें वागणाऱ्या स्त्रीला, तिचा दांडगा नवरा ( ती बिघडण्याचा संभव असतो म्हणून ) बाहेर फिरकूं न देतां तिला घरांत कोंडून ठेवतो; त्याप्रमाणें आपली मनोवृत्ती बाहेर इंद्रियांकडे जाऊं नये, म्हणून तिच्यावर जो पहारा करतो; ५०५. चित्ताचा संकोच होण्याकरितां देहासुद्धां झिजतो, व इंद्रियांची समजूत घालून, त्यांना चुचकारून नियहावर आणून ठेवतो. ५०६. या शरीरांत मनरूपी महाद्वारांत, अंतर्मुखतेच्या पहाऱ्याच्या जागेंत, जो यम व दम यांस उभे जागे ठेवतो, ५०७. गुद व मेंढू यांच्या मध्यभागीं आधारचक्राचे ठिकाणीं मूळबंधाची व नाभीमध्यें मणिपूर चक्राचे ठिकाणीं ओडियाणा बंधाची व कंठामध्यें विशुद्ध चक्राचे ठिकाणीं जालंदर बंधाची, याप्रमाणें तीन बंधांची गस्त घालतो ( अथवा वर करितो ) आणि इडा व पिंगळा यांच्या संगमस्थानीं म्हणजे सुषुम्नेंत चित्त घालतो. ५०८. समाधिरूपी शय्येजवळ ध्यानाला बांधून टाकतो ( म्हणजे समाधि लागेपर्यंत ध्यान दृढ करतो ) व चित्त आणि चैतन्य यांचे समरसतेनें अंतर्मुखतेंत रममाण होतो. ५०९ अर्जुना, अंतःकरणनिग्रह जो म्हणतात, तो हा, हें समज; व जेथें हा ( अंतःकरणनिग्रह ) आहे, तेथेंच ज्ञानाचा विजय आहे. ५१०, ज्याची आज्ञा अंतःकरणाला शिरसावंद्य असते, तो मनुष्यरूपानें साक्षात् ज्ञानच आहे, असें समज. ५११.

इंद्रियांच्या विषयांचे ठिकाणीं वैराग्य, ( कर्माचे विषयीं ) अहंकाराचा अभाव, जन्म–मृत्यु–जरा–व्याधि इत्यादिकांचे ठिकाणीं दुःखाचें व दोषाचें अनुदर्शन, ८.



आणि विषयांच्या संबंधानें ज्याच्या मनांत वैराग्याचा चांगला जिवंत पुरवठा असतो. ५१२. ओकलेल्या अन्नाला पाहून ज्याप्रमाणें जीभ लाळ घोटीत नाहीं अथवा प्रेतास आलिंगन देण्याकरितां जसें कोणीही अंग पुढें करीत नाहीं; ५१३. जसें ( कोणालाही ) विष खाववत नाहीं; जळत असलेल्या घरांत प्रवेश करवत नाहीं व वाघाच्या दरीमध्यें वस्ती करण्याकरितां जाववत नाहीं. ५१४. रसरशीत तापलेल्या लोखंडाच्या रसामध्यें जशी उडी घालवत नाहीं किंवा अजगराची उशी करवत नाहीं. ५१५. अर्जुना, तितक्या मानानें ज्याला विषयांची गोष्ट आवडत नाहीं व जो इंद्रियांच्या द्वारानें ( मनाकडे ) कोणत्याच विषयाला जाऊं देत नाहीं, ५१६. ज्याच्या मनांत विषयसेवनाचा कंटाळा असतो, देहाच्या ठिकाणीं रोडपणा असतो व यमदमाच्या ठिकाणीं जो समरस झालेला असतो ( म्हणजे ते करण्यांत ज्याला आनंद वाटतो. ) ५१७. अर्जुना, ज्याच्या ठिकाणीं तपांची व व्रतांची गर्दी असते व ज्याला गांवांत येतांना प्रलयकालाप्रमाणें संकट वाटतें; ५१८. योगाभ्यासाविषयीं ज्याची अति उत्कट इच्छा असते व एकांतांत राहण्यासंबंधानें ज्याच्या मनाची ओढ असते व जनसमुदायाचें ज्याला नांवही सहन नाहीं, ५१९. बाणांच्या शय्येवर जसें निजणें अथवा पुवाच्या चिखलांत जसें लोळणें, तसें तो इहलोकींचे भोग भोगणें मानतो, ५२०. स्वर्गाचे भोग ऐकून मनानें असें मानतो कीं, ते, जसें कुत्र्याचें कुजलेलें मांस, आहेत. ५२१. वर सांगितलेलें विषयांविषयींचें वैराग्य हें आत्मप्राप्तीचें दैवच आहे. याच्यामुळें साधक ब्रह्माच्या आनंदाचा उपभोग घेण्यास लायक होतात. ५२२. जेथें असा ऐहिक व पारत्रिक भोगासंबंधानें अत्यंत कंटाळा तुला दिसेल, तेथें ज्ञानाची वस्ती आहे असें समज. ५२३ आणि सकाम पुरुषांप्रमाणें इष्टापूर्त कर्में करतो; परंतु केल्याचा फुंज शरीरांत राहूं देत नाहीं. ५२४. वर्णाश्रमधर्माला पोषक अशीं नित्य नैमित्तिक कर्में करीत असतां, त्यांत कांहींही राहात नाहीं. ५२५. परंतु हें कर्म मीं केलें अथवा माझ्यानें सिद्धीला गेलें असा अहंकार वासनेमध्यें ठेवला नाहीं. ५२६. ज्याप्रमाणें अहंकारावांचून वायूचा सर्वत्र संचार असतो किंवा सूर्याचें उगवणें जसें निरभिमान असतें. ५२७. अथवा वेद जसे स्वभावतः बोलतात अथवा गंगा नदी

चाले । तैसें अवष्टंभहीन भलें । वर्तणें जयाचें ॥ २८ ॥ ऋतुकाळीं तरी फळती । परी फळलों हें नेणती । तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मीं सदा ॥ २९ ॥ एवं मनीं कर्मीं बोलीं । जेथ अहंकारा उखी जाहली । एकावळीची काढिली । दोरी जैसी ॥ ५३० ॥ संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असती आकाशीं । देहीं कर्में तैसीं । जयासि गा ॥ ३१ ॥ मद्यपाआंगींचें वस्त्र । लेपाहातींचें शस्त्र । बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ॥ ३२ ॥ तया पाडें देहीं । जया आहे हे सेचि नाहीं । निरहंकारता पाहीं । तया नांव ॥ ३३ ॥ हें संपूर्ण जेथें दिसे । तेथेंचि ज्ञान असे । इयेंविषीं अनारिसें । बोलों नये ॥ ३४ ॥ आणि जन्ममृत्युदुःखें । व्याधिवार्धक्यकलुषें । इयें आंगा न येतां देखे । दुरूनि जो ॥ ३५ ॥ साधकु विवसिया । कां उपसर्गु योगिया । पावे उणेया-पुरेया । वोथंबा जेवीं ॥ ३६ ॥ वैर जन्मांतरींचें । सर्पा मनौनि न वचे । तेवीं अतीता जन्माचें । उणें जो वाहे ॥ ३७ ॥ डोळां हरळ न विरे । घायीं कोत न जिरे । तैसें काळींचें न विसरे । जन्मदुःख ॥ ३८ ॥ म्हणे पूयगर्तें रिगाला । अहा मूत्ररंध्रें निघाला । कटा मियां चाटिला । कुचस्वेदु ॥ ३९ ॥ ऐसिऐसियापरी । जन्माचा कांटाळा धरी । म्हणे आतां तें न करीं । जेणें ऐसें होय ॥ ५४० ॥ हारी उमचावया । जुंवारी जैसा ये डाया । कीं वैरा बापाचेया । पुत्र जचे ॥ ४१ ॥ मारिलियाचेनि रागें । पाठीचा जेवीं सूड मागे । तेणें आक्षेपें लागे । जन्मापाठीं ॥ ४२ ॥ परि जन्मती ते लाज । न सांडी जयाचें निज । संभाविता निस्तेज । न जिरे जेवीं ॥ ४३ ॥ आणि मृत्यु पुढें आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे । परि आजीचि होये । सावधु जो ॥ ४४ ॥ माजीं अथांव म्हणता । थडियेची पांडुसुता । पोहणार आइता । कासे जेवीं ॥ ४५ ॥ कां न पवतां रणाचा ठावो । सांभाळिजे जैसा आवो । वोडण सुइजे घावो । न लगतांचि ॥ ४६ ॥ पाहेचा पेणा वाटवंधा । तंव आजीचि होइजे सावधा । जीव न निगतां औषधा । धांविजे जेवीं ॥ ४७ ॥ येऱ्हवी ऐसें घडे । जो जळतां घरीं सांपडे । तो मग न पवाडे । कुहा खणों ॥ ४८ ॥ चोंढिये पाथरु गेला । तैसेनि जो बुडाला । तो बोंबेहि-सकट निमाला । कोण सांगे ॥ ४९ ॥ म्हणोनि समर्थेंसि वैर । जया पडिलें हाडखाइर । तो जैसा आठही पाहर । परजूनि असे ॥५५०॥ नातरी केळवली नोवरी । कां संन्यासी जियापरी । तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना ॥ ५१ ॥ पैं गा जो ययापरी । जन्मेंची जन्म निवारी । मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥ ५२ ॥ तया घरीं ज्ञानाचें । सांकडें नाहीं साचें । जया जन्म-मृत्यूचें । हृदयीं शल्य ॥ ५३ ॥ आणि तयाचिपरी जरा । न टेंकता शरीरा । तारुण्याचिया

जशी हेतूवांचून वाहते, त्याप्रमाणें अहंकारावांचून त्याचें चांगलें वागणें असतें. ५२८. वृक्षांस तर योग्य ऋतुकाळांत फळें येतात परंतु आपणांस फळें आलीं, हें वृक्ष जाणत नाहींत. त्या वृक्षांप्रमाणें सर्व कर्मांमध्यें त्या पुरुषाच्या मनाची स्थिति नेहमीं असते. ५२९. याप्रमाणें जशी एकपदरी माळेची दोरी काढली असतां तिचे मणी जसे गळून पडतात, त्याप्रमाणें जेथें मनांतून, कर्मांतून आणि वाचेंतून अहंकाराची हकालपट्टी होते. ५३०. ज्याप्रमाणें आकाशांतील ढग आकाशांत चिकटल्याशिवाय असतात, त्याप्रमाणें देहांत झालेलीं जीं त्याचीं कर्में, त्या कर्मांचे ठिकाणीं त्याचा अहंकार असल्याशिवाय तीं कर्में असतात. ५३१. मद्यपान केलेल्या मनुष्यास जशी आपल्या वस्त्राची आठवण नसते किंवा चित्राच्या हातांत दिलेल्या शस्त्राचें जसें त्या चित्रास भान नसतें, अथवा बैलाच्या पाठीवर लादलेल्या शास्त्रांच्या पोथ्यांची त्याला जाणीव नसते, ५३२. त्याप्रमाणें ज्याला (आपण) देहामध्यें आहों, अशी आठवण नसते; त्याच्या त्या स्थितीला निरहंकारता हें नांव आहे, असें समज. ५३३. ही निरहंकारता जेथें संपूर्ण दिसेल, तेथेंच ज्ञान आहे, याविषयीं अन्यथा बोलूं नये. ५३४. आणि जन्म, मृत्यु, दुःख, रोग, जरा आणि पातकें हीं अंगावर आलीं नाहींत तोंच, जो दुरून ( प्राप्त होण्याच्या आधींपासूनच ) पाहातो. ५३५. जसें ठेव्यावर असलेल्या पिशाचाचा आधीं प्रतिबंध दूर करण्याविषयीं साधक (मांत्रिक किंवा ठेवा काढणारा मनुष्य) जसा दक्ष असतो, अथवा योगाभ्यासास येणाऱ्या अडथळ्यासंबंधानें योगी जसा दक्ष असतो किंवा भिंत वांकडीतिकडी येऊं नये, म्हणून गवंडी जसा आधींच ओळंब्याची व्यवस्था करून ठेवतो. ५३६. जसें सर्पाच्या मनांतून जन्मांतरींचें वैर जात नाहीं, त्याप्रमाणें मागील जन्मांतील दोष जो मनांत बाळगतो, ५३७. डोळ्यांत गेलेला खडा जसा डोळ्यांत विरघळत नाहीं, ( म्हणजे सारखा खुपत राहतो ) अथवा जखमेंत जसें शस्त्र जिरत नाहीं, ( तर तें एकसारखें खुपत राहतें ) त्याप्रमाणें जो मागील जन्मांचें दुःख विसरत नाहीं. ५३८, तो म्हणतो, हाय ! हाय ! मी कसा या (जन्मामुळें) पुवाच्या खड्ड्यांत शिरलों व मूत्रद्वारानें बाहेर निघालों ! अरेरे, मी स्तनावरील घाम चाटला ! ५३९. याप्रमाणें जन्माचा तिरस्कार बाळगतो व तो म्हणतो कीं, ज्या योगानें असें होईल, (जन्म घ्यावा लागेल ) तें मी यापुढें करणार नाहीं. ५४० पणास लावून हरलेलें द्रव्य परत मिळविण्याकरितां, जुगार खेळणारा जसा पुनः डाव खेळण्यास तयार होतो; अथवा वडिलांच्या वैराबद्दल जसा मुलगा ( सूड घेण्यास ) परिश्रम करतो. ५४१. ( वडील भावाला ) मारल्याचे रागानें जसा पाठचा भाऊ सूड मागतो ( सूड घेण्यास खटपट करितो ) तितक्या हट्टानें जो जन्माचे पाठीस लागतो. ५४२. परंतु संभावित मनुष्यास जसा अपमान सहन होत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या मनाला जन्मास आल्याची लाज केव्हांही सोडीत नाहीं. ५४३. आणि पुढें कल्पांतीं येणारा, असा इतका दूर जरी मृत्यु असला, तथापि तो आजच आला आहे, असें समजून तो सावध असतो. ५४४. नदीमध्यें अथांग पाणी आहे असें म्हणतात, अर्जुना, पोहावयास तयार झालेला मनुष्य कांठावर असतांच जसा कासोटा बळकट घालतो. ५४५. अथवा युद्धाच्या जागीं जाण्यापूर्वींच जसें आपलें अवसान सांभाळावें अथवा शस्त्राचा घाव लागण्यापूर्वींच ढाल पुढें करावी, ५४६. उद्यांचा मुक्काम वाटमाऱ्याचा आहे, म्हणून जसें आजच सावध व्हावें अथवा जीव जाण्यापूर्वींच औषधाकरितां धांवाधांव करावी. ५४७. ( पुढें येणाऱ्या संकटाची जर आधीं सावध होऊन तरतूद करून ठेविली नाहीं, ) तर ज्याप्रमाणें जो जळत्या घरांत सांपडतो तो जसा आपल्या सामर्थ्यानें विहीर खणूं शकत नाहीं, तसें होतें. ५४८. खोल पाण्यांत जसा दगड पडला, त्याप्रमाणें जो पाण्यांत बुडला, तो ' मी बुडतों ' अशा ओरडण्यासह मेला. आतां तो याप्रमाणें मेला असें कोण सांगेल ? ५४९. म्हणून ज्याचें समर्थ पुरुषाशीं हाडवैर पडलें आहे, तो जसा आठही प्रहर शस्त्र हातांत घेऊन सज्ज असतो. ५५०. अथवा लग्नाचा निश्चय होऊन गडंगनेर झालेली कुमारी माहेराविषयीं उदासीन असते व सासरीं जाण्याविषयीं मनाची आगाऊ तयारी करून ठेवते; किंवा संन्यासी सर्वस्वाविषयीं ज्याप्रमाणें अगोदरच उदासीन असतो, त्याप्रमाणें प्रत्यक्ष मरण येण्याचे अगोदरच तो पुढें येणाऱ्या मरणासंबंधीं विचार करून उदास झालेला असतो. ५५१. अर्जुना, याप्रमाणें जो या मनुष्यजन्मानें भावी जन्माचें निवारण करतो व जो या मनुष्यदेहाच्या मूळूनें पुढें येणारा मृत्यु नाहींसा करतो व आपण ( जन्मक्षयांतील अशा स्वरूपानें ) उरतो. ५५२. अशा रीतीनें ज्याच्या अंतःकरणांत जन्ममृत्यु हे कांट्यासारखे सलत राहातात, त्याच्या ठिकाणीं खरोखर ज्ञानाची कांहींच उणीव नसते. ५५३. आणि त्याचप्रमाणें शरीराला म्हातारपण येण्याच्या अगोदरच, ऐन उमेदींत असतांनाच,

भरा— । माजीं देखे ॥५४॥ म्हणे आजिचां अवसरीं । पुष्टि जे शरीरीं । ते पाहे होईल काचरी । वाळली जैसी ॥ ५५ ॥ निर्दैव्याचें व्यवसाय । तैसे ठाकती हातपाय । अमंत्रिया राज्याची परी आहे । बळा यया ॥ ५६ ॥ फुलांचिया भोगा— । लागीं प्रेम टांगा । तें करेयाचा गुडघा । तैसें होईल ॥५७॥ वोढाळाचां खुरीं । आखरु आतें बुरी । ते दशा माझां शिरीं । पावेल गा ॥५८॥ पद्मदळेंसी इसाळे । भांडताति जे हे डोळे । ते होती पडवळें । पिकलीं जैसी ॥ ५९ ॥ भंवईचीं पडळें । वोमथती सिनसाळे । उरु कुहिजेल जळें । आंसुवांचेनि ॥ ५६० ॥ जैसे बाभुळीचें खोड । गिरबडुनी जाती सरड । तैसे पिचडीं तोंड । सरकाटिजेल ॥ ६१ ॥ रांधवणी वोलीपुढें । पऱ्हे उन्मादती खातवडे । तैसीचि यें नाकाडें । बिडबिडती ॥ ६२ ॥ तांबूल ओठ राऊं । हांसतां दांत दाऊं । सनागर मिरऊं । बोल जेणें ॥ ६३ ॥ तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा । इया उमळती दाढा । दातांसिहि ॥ ६४ ॥ कुळवाडी रिणें दाटलीं । कां वांकडिया ढोरें बैसली । तेसी बुठील कांहीं केली । जीभचि हे ॥ ६५ ॥ कुसळें कोरडीं । वारेनि जाती बरडीं । तैसी आपल्य तोंडीं । दाढियेसी ॥ ६६ ॥ आषाढींचेनि जळें । जैसी झिरपती शैलाचीं मौळें । तैसे खांडीहूनि लाळें । पडती पूर ॥ ६७ ॥ वाचेसि अपवाडु । कानीं अनुघडु । पिंड गरूवा माकडु । होईल हा ॥ ६८ ॥ तृणाचें बुजवणें । आंदोळे वारेगुणें । तैसें येईल कांपणें । सर्वांगासी ॥ ६९ ॥ पायां पडती वेंगडी । हात वळती मुरकुंडी । बरवेपणा बागडी । नाचविजेल ॥६७०॥ मळमूत्रद्वारें । होऊनि ठाकती खोंकरें । नवसियें होती इतरें । माझां निधनीं ॥ ७१ ॥ देखोनि थुंकील जगु । मरणाचा पडेल पांगु । सोयरियां उबगु । येईल माझा ॥ ७२ ॥ स्त्रिया म्हणती विवसी । बाळें जाती मूर्च्छी । किंबहुना चिळसी । पात्र होईन ॥ ७३ ॥ उभळीचा उजगरा । सेजेया साइलिया घरा । शिणवील म्हणती म्हातारा । बहुतांतें हा ॥ ७४ ॥ ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणिया तरुणपणीं । देखे मग मनीं । विटे जो गा ॥ ७५ ॥ म्हणे पाहे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल । मग काय उरेल । हितालागीं ॥ ७६ ॥ म्हणोनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घाली आघवें । पंगु न होतां जावें । तेथ जाय ॥ ७७ ॥ दिठी जंव जाये । तंव पाहावें तेतुलें पाहे । मूकत्वा आधी वाचा वाहे । सुभाषितें ॥ ७८ ॥ हात होती खुळे । हें पुढील मोटकें कळे । आणि करूनि घाली सकळें । दानादिकें ॥ ७९ ॥ तेव्हां ऐसी दशा येईल पुढें । तें मन होईल वेडें । तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥ ५८० ॥ जैसे चोर पाहे झोंबती । तंव आजीचि रुसिजे संपत्ती । कां झांकाझांकी वाती । न वचतां कीजे ॥ ८१ ॥ तैसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें । तें आतांचि आघवें । सवतें केलें ॥ ८२ ॥ आतां मोडूनि

जो पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दल विचार करतो. ५५४. तो म्हणतो, आजच्या वेळीं ( भर तारुण्यांत ) ही जी शरीरांत पुष्टि आहे, ती उद्यां वाळलेल्या काचरीसारखी होईल. ५५५. दैवहीनानें केलेले सर्व उद्योग जसे आंतबट्ट्याचे असतात, तसे हातपायांच्या सर्व सामर्थ्यास ओहोटी लागून ते थकतील. आज तारुण्यांत असलेल्या सर्व शक्तींची परिस्थिति, प्रधान नसलेल्या राज्यासारखी दुबळी होणारी आहे. ५५६. फुलांच्या ( सुवासाच्या ) भोगाकरितां ज्या नाकाचें प्रेम गुंतलेलें असतें, तें (नाक) उंटाचा गुडघा जसा असतो, तसें विद्रूप व वास घेण्याला असमर्थ असें होईल. ५५७. ओढाळ गुरांच्या खुरांनीं जशी गुरें बसण्याच्या जागेची दुर्दशा झालेली असते ( म्हणजे त्यांत कोठें गवत उगवतें व कोठें उगवत नाहीं. ) त्याप्रमाणें माझ्या मस्तकाची अवस्था होईल. ५५८. कमळाच्या पाकळीशीं स्पर्धेनें भांडणारे जे हे डोळे, ते म्हातारपणांत जशीं पिकलेलीं पडवळें असतात तसे होतील. ५५९. भिवईचे पडदे झाडाच्या जुन्या सालीप्रमाणें खालीं लोंबतील व अश्रूंच्या पाण्यानें ऊर कुजेल. ५६०. ज्याप्रमाणें बाभळीचें खोड सरड गिरबिडून टाकतात, त्याप्रमाणें तोंड थुंकीच्या पिचकारीनें गिरबिडून जाईल. ५६१. स्वयंपाक करण्याच्या चुलीपुढें खाचेंत अगर चरांत ( उष्टें वगैरे पाणी सांचून ) जसे दुर्गंधयुक्त बुडबुडे उसळतात, त्याप्रमाणें नाकांत शेंबडाचे दुर्गंधीयुक्त बुडबुडे येतील. ५६२. ज्या मुखाचे ओंठ मी विड्यानें ( हल्लीं तारुण्यावस्थेंत ) रंगवितों व ज्यांतील दांत हंसतांना दाखवितों व ज्या मुखानें चांगलें सुंदर बोलतों; ५६३. त्याच तोंडाला उद्यां ( म्हातारपणीं ) कफाचा लोंढा येईल आणि या दाढा दांतासकट उखडून जातील. ५६४. शेतकीचा धंदा जसा कर्जानें ग्रस्त झाला असतां ऊर्जित दशेला येत नाहीं, अथवा वाकडीच्या पावसानें ( झडीच्या पावसानें ) जशीं एकदां गुरें बसलीं म्हणजे तीं उठत नाहींत, त्याप्रमाणें म्हातारपणीं कांहीं केल्यानें जीभ उठणार नाहीं. ५६५. माळजमिनींतील वाळलेलीं कुसळें जशीं वाऱ्यानें उडून जातात, त्याप्रमाणें मुखाच्या ठिकाणीं दाढीची दुर्दशा होते. ५६६. आषाढ महिन्यांतील पावसाच्या झडीनें जशीं पर्वताचीं शिखरें पाझरतात, त्याप्रमाणें दातांच्या खिंडींतून लाळेचे पूर वाहतील. ५६७. वाणीला नीट बोलण्याचें सामर्थ्य रहाणार नाहीं, कानाचीं कवाडें बंद होतील व हें ( पुष्ट असलेलें ) शरीर म्हाताऱ्या माकडासारखें बेडौल होईल. ५६८. गवताचें बुजगावणें जसें वाऱ्यानें हालतें, त्याप्रमाणें पुढें म्हातारपणीं सर्वांगांत कांपरें भरेल. ५६९. पायांत पाय अडकतील, हात वांकडे पडतील व हलींचा सुंदरपणा त्या वेळीं ( म्हातारपणीं ) सोंगासारखा नाचविला जाईल. (म्हणजे हलींचा सुंदरपणा जाऊन देहाची आकृती सोंगासारखी होईल.) ५७०. मळमूत्रांचीं द्वारें फुटक्या भांड्यासारखीं होतील व इतर लोक माझ्या मरणाविषयीं नवस करतील. ५७१. अशी माझी अवस्था पाहून सर्व लोक माझ्यावर थुंकतील व मला मरण लवकर येणार नाहीं आणि सोयऱ्याधायऱ्या लोकांस माझा कंटाळा येईल. ५७२. बायका मला पिशाच म्हणतील व मुलें मला भिऊन मूर्च्छित होतील. फार काय सांगावें ! मी सर्वांच्या किळसेला पात्र होईन. ५७३. शेजारच्या घरांत निजलेल्या माणसांना माझ्या खोकल्याच्या ढांसेनें होणाऱ्या जागरणामुळें ' हा म्हातारा पुष्कळांना शिणवील ' असें ते म्हणतील. ५७४. असा (पुढें येणाऱ्या ) म्हातारपणाचा इशारा आपल्या ठिकाणीं तरुणपणीं विचारानें पाहतो आणि मग जो त्याविषयीं मनांत विटतो. ५७५. तो मनांत म्हणतो, उद्यां ही वृद्धावस्था येईल आणि सध्यांची तारुण्यावस्था विषयभोगांत निघून जाईल, मग आपलें हित साधण्यास काय उरणार आहे ! ५७६. म्हणून बहिरेपणा आला नाहीं, तोंपर्यंत सर्व ऐकण्यास योग्य असेल तें सर्व ऐकून घेतो; आपण पांगळे झालों नाहीं; तोंपर्यंत आपणास जेथें ( देवस्थान, तीर्थ वगैरे ठिकाणीं ) जावयाचें असेल तेथें जातो. ५७७. जोंपर्यंत दृष्टीचें सामर्थ्य टिकून राहिलें आहे, तोंपर्यंत जितकें पाहावयाचें तितकें पाहून घेतो, आणि वाचा बंद होण्यापूर्वी, चांगलें बोलावयाचें तें बोलून घेतो. ५७८. हात लुळे होतील, ही पुढली गोष्ट त्याला थोडीशी कळते, आणि ( म्हणून ) तो हातांनीं दानादि सर्व सत्कृत्यें करून टाकतो. ५७९. अशी अवस्था पुढें येईल, त्या वेळीं मन वेडें होईल. तेव्हां त्याच्या आधींच तो शुद्ध आत्मज्ञानाचा विचार करून ठेवतो. ५८०. जसे चोर उद्यां द्रव्यावर तुटून पडतील, म्हणून आजच आपली संपत्ति आपल्यापासून दूर करावी, अथवा दिवा गेला नाहीं तोंच झाकापाक करून ठेवावी. ५८१. त्याप्रमाणें म्हातारपण यावें आणि मग जें व्यर्थ जावें, तें आतांच (तारुण्यांतच ) त्यानें सर्व हातावेगळें करून टाकलें. ( जें करावयाचें तें सर्व केलें. ) ५८२. आतां जिकडे तिकडे

ठेलीं दुर्गें। कां बळित धरिलें खगें। तेथ उपेक्षूनि जो रिगे। तो नागवला कीं ॥ ८३ ॥ तैसें वृद्धाप्य होये। आलेपणें वायां जाये। जे तो शतवृद्ध आहे। नेणों कैंचा ॥ ८४ ॥ झाडिलीं कोळें झाडी। तया न फळे जेवीं वोंडीं। जाहला अग्नि तरी राखोंडीं। जाळील काई ॥ ८५ ॥ म्हणोनि वृद्धाप्याचेनि आठवें। वृद्धाप्या जो नागवे। तयाचां ठायीं जाणावें। ज्ञान आहे ॥ ८६ ॥ तैसेचि नाना रोग। पडिघाती पुढां आंग। तंव आरोग्याचे उपेग। करूनि घाली ॥ ८७ ॥ सापाचां तोंडीं। पडिली जे उंडी। ते लाऊनि सांडी। प्रबुद्धु जैसा ॥ ८८ ॥ तैसा वियोग जेणें दुःखें। विपात्ति शोक पोखे। तें स्नेह सांडूनि सुखें। उदासु होय ॥ ८९ ॥ आणि जेणें जेणें कडे। दोष सूतील तोंडें। तयां कर्मरंध्रां गुंडे। नियमाचे दाटी ॥ ५९० ॥ ऐसऐसिया आइती। जयाची परी असती। तोचि तो ज्ञानसंपत्ती-। गोसावी गा ॥ ९१ ॥ आतां आणीकही एक। लक्षण अलौकिक। सांगेन आइक। धनंजया ॥ ९२ ॥

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु। नित्यं च समचित्तत्वमिष्टाऽनिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥

तरि जो या देहावरी। उदासु ऐसिया परी। उखिता जैसा बिढारीं। बैसविला आहे ॥ ९३ ॥ कां झाडाची साउली। वाटे जातां मीनली। घरावरी तेतुली। आस्था नाहीं ॥ ९४ ॥ साउली सरिसीच असे। परी असें हें नेणिजे जैसें। स्त्रियेचें तैसें। लोलुप्य नाहीं ॥ ९५ ॥ आणि प्रजा जे जाली। तियें वस्ती कीर आलीं। कां गोरुवें बैसलीं। रुखातळीं ॥ ९६ ॥ जो संपत्तीमाजी असतां। ऐसा गमे पांडुसुता। जैसा कां वाटे जातां। साक्षी ठेविला ॥ ९७ ॥ किंबहुना पुंसा। पांजरियामाजीं जैसा। वेदाज्ञेसी तैसा। बिहूनि असे ॥ ९८ ॥ एऱ्हवीं दारागृहपुत्रीं। नाहीं जया मैत्री। तो जाण पां धात्री। ज्ञानासि गा ॥ ९९ ॥ आणि महासिंधू जैसे। ग्रीष्मवर्षीं सरिसे। इष्टानिष्ट तैसें। जयाचां ठायीं ॥ ६०० ॥ कां तिन्ही काळ होतां। त्रिधा नव्हे सविता। तैसा सुखदुःखी चित्ता। भेदु नाहीं ॥ १ ॥ जेथ नभाचेनि पाडें। समत्वा उणें न पडे। तेथचि ज्ञान रोकडें। वोळख तूं ॥ २ ॥

मयि चाऽनन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी। विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥

किल्लेच किल्ले आहेत, अशा ठिकाणीं, पक्षी आपल्या घरट्यांकडे परत फिरण्याच्या वेळीं (ऐन संध्याकाळीं) जर एखादा प्रवाशी प्रवास करीत असतां आला व त्या वेळीं त्यानें पुढें जाण्याचें टाकून जर किल्ल्यांतच प्रवेश केला, तर तो नागवला जाईल काय? (तो नागवला जात नाहीं.) ५८३. तसें, "म्हातारपण येईल व व जन्माला आलेपण व्यर्थ जाईल; कारण (शंभर वर्षें आयुष्य आहे तेव्हां भरज्वानींत मजा करूं व पुढें परमार्थ करूं" असें म्हणणारा) तो तरी शतायु आहे? (कीं नाहीं) हें कोणास ठाऊक? ५८४. तिळाचें कोळ (तिळाचें उपटलेलें झाड) एकदां झाडून त्यांतील सगळे तीळ निघाल्यावर पुन्हा जर तीं कोळें झाडलीं, तर त्या कोळांच्या बोंडांतून जसे तीळ निघत नाहींत; तसेंच अग्नि जरी असला, पण तो एकदां राखोंडी झाला मग तो कोणत्याही पदार्थास जाळूं शकेल काय? ५८५. (त्याप्रमाणें तारुण्यांत शक्ति व बुद्धि विषयसेवनांत खर्च झाल्यावर, म्हातारपणांत शरीर काय करील?) असें वृद्धावस्थेंत होणाऱ्या दुर्दशेचें त्याला तारुण्यावस्थेंत स्मरण असल्यामुळें, जो वृद्धावस्थेनें ग्रासला जात नाहीं, त्याच्या ठिकाणीं ज्ञान आहे असें समजावें. ५८६. त्याचप्रमाणें नाना प्रकारचे रोग पुढें अंगावर आदळतील, तेव्हां ते रोग येण्याच्या आधींच, तो आरोग्याचा उपयोग करून घेतो. ५८७. सापाच्या तोंडांत एखादा पडलेला पदार्थ प्राप्त झाला असतां शहाणा मनुष्य जसा तो पदार्थ टाकून देतो. ५८८. त्याप्रमाणें ज्या स्नेहाच्या योगानें, वियोग व दुःखें, विपत्ति व शोक हीं पोसलीं जातात, तो स्नेह टाकून जो समाधानवृत्ति ठेवून उदास होऊन रहातो. ५८९. आणि ज्या ज्या इंद्रियांच्या द्वारानें, निषिद्ध आचरणें आपला चंचुप्रवेश करतील, त्या त्या कर्म करणाऱ्या इंद्रियरूपी बिळांत निग्रहाचे धोंडे ठोकून, तो ते प्रवेशाचे मार्गच बंद करतो. ५९०. अशा अशा सामुग्रीनें ज्याचा वागण्याचा प्रकार असतो, तोच तो अर्जुना, ज्ञानरूपी ऐश्वर्याचा मालक आहे असें समज. ५९१. आतां आणखीही एक ज्ञान्याचें लोकोत्तर लक्षण सांगतों, अर्जुना, ऐक. ५९२.

(देहासंबंधीं) अनासक्ति, स्त्रीपुत्रगृह इत्यादिकांविषयीं अलोलुपता व इष्ट अथवा अनिष्ट (प्रकार) घडले असतां चित्ताचें समत्व ढळूं न देणें, ९.

तर बिऱ्हाडीं बसविलेला वाटसरू जसा त्या बिऱ्हाडाविषयीं उदास असतो, तशा प्रकारानें जो स्वतःच्या शरीराविषयीं उदास असतो. ५९३. अथवा वाटेनें जात असतां मध्येंच प्राप्त झालेल्या झाडाच्या सांवलीवर ज्याप्रमाणें आस्था नसते, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाचें स्वतःच्या घरावर किंचितही ममत्व नसतें. ५९४. आपली सांवली आपल्याबरोबरच नेहमीं असते; परंतु ती सांवली आपल्याबरोबर आहे, याची आपल्याला खबरही नसते, त्याप्रमाणें स्त्रीविषयीं ज्याला आसक्ति नसते. ५९५. आणि त्याला जीं मुलेंबाळें झालेलीं असतात, त्यांस तो खरोखर वस्तीला आलेल्या वाटसरूप्रमाणें मानतो अथवा झाडाखालीं बसलेल्या गुरांसंबंधीं झाड जसें उदास असतें (तसा तो ज्ञानी प्रजेसंबंधीं उदास असतो.) ५९६. अर्जुना, वाटेनें जात असतां कांहीं घडलेल्या गोष्टींविषयीं, एखादा ठेविलेला साक्षीदार, ती गोष्ट पाहूनही, त्याविषयीं जसा अनासक्त असतो, तसा सर्व ऐश्वर्यांत नांदत असूनही तो अनासक्त असल्याचें दिसतें. ५९७. फार काय सांगावें! राघू जसा पिंजऱ्यांत असतो, तसा जो वेदाज्ञेला भिऊन संसारांत असतो. ५९८. एऱ्हवीं ज्याचें स्त्रीपुत्रगृहादिकांवर प्रेम नसतें, तो पुरुष ज्ञानाला आधार आहे असें समज. ५९९. आणि महासागर जसे उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत सारखेच भरलेले असतात, त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं प्रिय-अप्रिय गोष्टी सारख्या असतात; (म्हणजे प्रिय गोष्टींनीं ज्याला हर्ष होत नाहीं व अप्रिय गोष्टींनीं ज्याला वाईट वाटत नाहीं.) ६००. अथवा सकाळ, दुपार व संध्याकाळ या तीन काळीं सूर्य जसा तीन प्रकारचा होत नाहीं, त्याप्रमाणें सुखाचे अथवा दुःखाचे प्रसंग त्याच्या अंगावर येऊन आदळले, तरी त्याचें अंतःकरण सुखी अथवा दुःखी, असें वेगवेगळ्या अवस्थेनें बदललें जात नाहीं. ६०१. कोणत्याही ऋतूच्या येण्याजाण्यानें आकाशांत जसा कांहींच फेरबदल होत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचे ठिकाणीं प्रिय अथवा अप्रिय वस्तूंच्या हानि अथवा लाभामुळें चित्ताच्या समतेला कमीपणा येत नाहीं; अर्जुना त्याच्या ठिकाणीं मूर्तिमंत ज्ञान आहे, असें तूं समज. ६०२.

माझ्या ठिकाणीं अनन्यपूर्वक अव्यभिचारिणी अशी भक्ति, एकान्त प्रदेशामध्यें रहाणें, (व अर्थात) जनांच्या समुदायामध्यें (रहाण्याची) खंति, १०.

आणि मीवांचूनी कांहीं । आणीक गोमटें नाहीं । ऐसा निश्चयोचि तिहीं । जयाचा केला ॥ ३ ॥ शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश । एक मीवांचूनि वास । न पाहती आन ॥ ४ ॥ किंबहुना निकट निज । जयाचें जाहलें मज । तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ॥ ५ ॥ रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सांकडें । तिये कांतिचिनि पाडें । एकसरला जो ॥ ६ ॥ मिळोनि मिळताचि असे। समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ७ ॥ सूर्याचां होणां होइजे । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेपण साजे । प्रभेसी जेवीं ॥ ८ ॥ पैं पाणियाचियें भूमिके । पाणी तळपे कौतुकें । ते लहरी म्हणती लौकिकें । एऱ्हवीं तें पाणीं ॥ ९ ॥ जो अनन्य यापरी । मी जाहलाहि मातें वरी । तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ॥ ६१० ॥ आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें । आवडती कपाटें । वसवूं जया ॥ ११ ॥ शैलकक्षांचीं कुहरें । जळाशयपरिसरें । अधिष्ठी जो आदरें । नगरा न ये ॥ १२ ॥ बहु एकांतावरी प्रीति । जया जनपदावरी खंति । जाण मनुष्यकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ १३ ॥ आणिकहि पुढती । चिन्हें गा सुमती । ज्ञानाचिये निरुती- । लागीं सांगों ॥ १४ ॥

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे । तें जया दिसे । ज्ञानास्तव ॥ १५ ॥ तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें । तें अज्ञान ऐसें मनें । निश्चयो करी ॥ १६ ॥ स्वर्गा जाणें हें सांडी । भवविषयीं कान झाडी । दे आत्मज्ञानीं बुडी । सद्भावाची ॥ १७ ॥ भंगलिये वाटे । शोधूनियां अव्हांटे । निघिजे जेवीं निटें । राजपंथें ॥ १८ ॥ तैसें ज्ञानजाता करी । आघवेंचि एकीकडे सारी । मग मन बुद्धि मोहरी । आत्मज्ञानीं ॥ १९ ॥ म्हणे एक हेंचि आथी । येर जाणणें ते भ्रांती । ऐसी निकुरेंसीं मती । मेरु होय ॥ ६२० ॥ एवं निश्चयो जयाचा । द्वारीं अध्यात्मज्ञानाचां । ध्रुव देवो गगनींचा । तैसा राहिला ॥ २१ ॥ तयाचां ठायीं ज्ञान । या बोला म्हणसी व्यवधान । जे ज्ञानीं बैसलें मन । तेव्हांचि तें तो ॥ २२ ॥ तरि बैसलेपणें जें होये । तें बैसतांचि बोलें न होये । तरि ज्ञाना तया आहे । सरिसा पाडु ॥ २३ ॥ आणि तत्त्वज्ञान निर्मळ । फळे जें एक फळ । तें ज्ञेयहीवरी सरळ । दिठी जया ॥ २४ ॥ एऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें । जरी ज्ञेय न दिसेचि मनें । तरी ज्ञानलाभुही न मनें । जाहला सांता ॥ २५ ॥ आंधळेनि हातीं दिवा । घेऊनि काय करावा । तैसा ज्ञाननिश्चयो आघवा । वायां जाय ॥ २६ ॥ जरि ज्ञानाचेनि प्रकाशें । परतत्त्वीं दिठी न पैसे । ते स्फूर्तीचि असे । अंध होउनी ॥ २७ ॥ म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली ही वस्तुचि आघवी । ते देखे

आणि माझ्याशिवाय दुसरें कांहींच चांगलें नाहीं असा ज्याच्या तिघांनीं (कायेनें, वाचेनें व मनानें) निश्चयच केलेला आहे; ६०३. ज्याचें शरीर, वाचा व मन, ह्या तिघांनीं वरीलप्रमाणें केलेल्या निश्चयाचा कोश घ्यायला आहे (प्रतिज्ञापूर्वक शपथ घेतली आहे) आणि एक माझ्यावांचून आणखी कशाची इच्छा ते करीत नाहींत. ६०४. फार काय सांगावें ! ज्याचें अंतःकरण माझ्याशीं अगदीं जडून राहिलें आहे, त्यानें आपलें व आमचें एक आंथरूण केलें आहे. (माझ्या स्वरूपीं अनुरक्ततेनें तल्लीन होऊन गेला आहे.) ६०५. पतीकडे जातांना पतिव्रता स्त्रीला शरीरानें व अंतःकरणानें जसा संकोच वाटत नाहीं, त्याप्रमाणें जो मला एकनिष्ठेनें अनुसरला आहे ६०६. गंगेचे उदक समुद्रास मिळून जसें आणखी एकसारखें मिळतच असतें, त्याप्रमाणें माझ्या स्वरूपीं ऐक्य झालें असतांही, जे सर्व प्रकारांनीं माझें भजन करीत असतात. ६०७. सूर्याच्या उदयाबरोबर प्रगट व्हावें आणि सूर्याच्या अस्ताबरोबर नाहींसें व्हावें, हा सूर्याशीं असणारा प्रभेचा चिकटेपणा (अनन्यता) प्रभेला जसा शोभतो. ६०८. पाण्याच्या सपाटीवर मौजेनें हालत असलेल्या पाण्यास लोकांच्या दृष्टीनें लाटा असें म्हटलें जातें; तथापि खरा विचार करून पाहिलें तर, तें पाणीच आहे. ६०९ जो याप्रमाणें एकनिष्ठ असतो, म्हणजे जो माझ्याशीं ऐक्य पावूनही माझें भजन करतो. अर्जुना, तोच तो मूर्तिमंत ज्ञान होय. ६१०. आणि तीर्थे, (नदी व समुद्र यांचे) पवित्र किनारे, तप करण्याच्या शुद्ध जागा आणि गुहा ह्या ठिकाणीं ज्यास रहावयास आवडतें, ६११. डोंगराच्या बगलेतील गुहामध्यें व सरोवराच्या आसपास जो प्रेमानें राहतो आणि शहरांत येत नाहीं. ६१२. ज्याची एकांतावर फार प्रीति असते व ज्याला लोकांचा कंटाळा असतो, तो मनुष्यरूपानें ज्ञानाची केवळ मूर्तीच आहे, असें समज. ६१३. हे बुद्धिवान् अर्जुना, ज्ञानाचा निश्चय करण्याकरितां आणखी कांहीं चिन्हें तुला पुढें सांगतों. ६१४.

अध्यात्मज्ञानच नित्य आहे, अशी बुद्धि असणें, तत्त्वज्ञानाचा अर्थ जें ज्ञेयब्रह्म, तेथें दृष्टि स्थित होणें या सर्वाला ज्ञान असें म्हणतात. याखेरीज जें इतर तें (सर्व) अज्ञान होय. ११.

तर परमात्मा म्हणून जी एक वस्तु आहे, ती ज्या ज्ञानामुळें अनुभवाला येते. ६१५. त्या अध्यात्मज्ञानावांचून, इतर जीं स्वर्ग व संसारसंबंधाचीं ज्ञानें आहेत, तीं अज्ञानें आहेत, असा जो मनानें निश्चय करतो, ६१६. स्वर्गाला जाणें ही गोष्ट तो सोडून देतो आणि संसारासंबंधानें कानावर गोष्ट येऊं देत नाहीं व आत्मज्ञानाविषयीं चांगली भावना ठेवून त्यांत रममाण होतो. ६१७. (जसें एखाद्या प्रवाशानें जेथें) वाट फुटते, तेथें आल्यावर पुढें आडमार्ग कोणते आहेत, त्यांचा शोध करून मग जसें सरळ राजमार्गानें निघावें, ६१८. त्याप्रमाणें तो जेवढीं ज्ञानें आहेत, त्यांचा नीट विचार करतो व आत्मज्ञानाशिवाय इतर सर्व (ज्ञानें) एकीकडे सारतो आणि नंतर मन व बुद्धि यांस अध्यात्मज्ञानाच्या मार्गाला लावतो. ६१९. तो म्हणतो कीं, हें आत्मज्ञान हेंच एक खरें आहे व इतर ज्ञानें ती भ्रांति होय; अशा निश्चयाला त्याची बुद्धि मेरु (आधार) होते; ६२०. याप्रमाणें ज्याच्या बुद्धीचा निश्चय अध्यात्मज्ञानाच्या द्वारांत आकाशांतील ध्रुवाच्या ताऱ्याप्रमाणें स्थिर राहिलेला असतो. ६२१. 'त्याच्या ठिकाणीं ज्ञान आहे' या माझ्या (भगवंताच्या) बोलण्यांत आडपडदा आहे, असें जर अर्जुना, तूं म्हणशील (तर तुला स्पष्ट सांगतों कीं,) जेव्हां त्या पुरुषाचें मन ज्ञानाच्या ठिकाणीं स्थिर झालें, तेव्हांच तो (पुरुष) तें (ज्ञान) झाला. ६२२. तरी ज्ञानाच्या ठिकाणीं मनाची स्थिरता झाली असतां जी स्थिति प्राप्त होते, ती स्थिति ज्ञानाचे ठिकाणीं स्थिरता होत असण्याचे वेळींच होते, असें नाहीं; तरी पण ज्ञानाची व ज्ञानाच्या ठिकाणीं मन स्थिर होण्यास प्रारंभ झालेल्याची, योग्यता सारखीच आहे. ६२३. आणखी शुद्ध आत्मज्ञान जें एक फल उत्पन्न करतें, तें फल म्हणजे ज्ञेय (ब्रह्म) होय. त्या येट ज्ञेयापर्यंत ज्याची दृष्टि नीट जाऊन भिडते. ६२४. वास्तविक ज्ञानाविषयीं मनांत समजूत पटली असूनही, जर ज्ञानानें जाणण्याच्या वस्तूचा मनाला नीट बोध होत नसेल तर तो ज्ञानाचा लाभ झाला असला, तरी देखील आमच्या मनाला नीटसा पटत नाहीं. ६२५. आंधळ्यानें आपल्या हातीं दिवा घेऊन त्याचा काय उपयोग करावा ? त्याप्रमाणें आपल्यास झालेलें ज्ञान, जर ज्ञेय दाखवूं शकलें नाहीं, तर तें (ज्ञेयाचें) ज्ञान म्हणून जें कांहीं तें हेंच असा ज्याचा निश्चय असतो, त्याचा तो असला निश्चय सर्व व्यर्थच जातो. ६२६. जर ज्ञानाच्या प्रकाशानें परमात्म्याचें ठिकाणीं बुद्धीचा प्रवेश होत नसेल, तर ती बुद्धीच आंधळी होऊन राहिली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. ६२७. म्हणून ज्ञान जेवढें दाखवील तेवढें

ऐसी व्हावी । बुद्धि चोख ॥ २८ ॥ यालागीं ज्ञानें निर्दोखें । दाविलें ज्ञेय देखे । तैसेनि उन्मेखें । आथिला जो ॥ २९ ॥ जेवढी ज्ञानाची वृद्धी । तेवढीच जयाची बुद्धी । तो ज्ञान हें शाब्दीं । करणें न लगे ॥६३० ॥ पैं ज्ञानाचिये प्रभेसवें । जयाची मती ज्ञेयीं पावे । तो हातधरणिया शिवे । परतत्त्वातें ॥ ३१ ॥ तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मो कवण पांडुसुता । काय सवितयातें सविता । म्हणावें असे ॥ ३२ ॥ तंव श्रोतां म्हणितलें असो । न संगतियाचा अतिसो । ग्रंथोक्ती तेथ आडसो । घालिसी कां ॥ ३३ ॥ तुझा हाचि आम्हां थोरु । वक्तृत्वाचा पाहुणेरु । जे ज्ञानविषो फारु । निरोपिला ॥ ३४ ॥ रसु होआवा अतिमात्रु । हा घेतासि कविमंत्रु । तरि अवंतूनि शत्रु । करितोसि कां गा ॥ ३५ ॥ ठायीं बैसातिये वेळे । जे रससोय घेऊनि पळे । तियेचा येरु वोडव मिळे । कोणा अर्था ॥ ३६ ॥ आघवांचि विषयीं भादी । परि सांजवणी टेंकों नेदी । ते खुरतोडी दुसधी । पोषी कवण ॥ ३७ ॥ तैसी ज्ञानीं मती न फंके । येर जल्पती नेणों केतुकें । परि तें असो निकें । केलें तुवां ॥ ३८ ॥ जया ज्ञानलेशोद्देशें । किजती योगादि सायासें । तें धणीचें आणि तुझिया ऐसें । निरूपण ॥ ३९ ॥ अमृताची सांतवांकुडी । लागो कां अनुघडी । सुखाचां दिसींकोडी । गणिजतु कां ॥ ६४० ॥ पूर्णचंद्रेसीं राती । युग एक असो न पाहती । तरि काय पाहत आहाती । चकोरें ते ॥ ४१ ॥ तैसें ज्ञानाचें बोलणें । आणि येणें रसाळपणें । आतां पुरे कोण म्हणे । आकर्णितां ॥ ४२ ॥ आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगचि वाढती होये । तैं सरों नेणे रससोये । ऐसें आथी ॥ ४३ ॥ तैसा जाहला प्रसंगु । जे ज्ञानीं आम्हांसि लागु । आणि तुजही अनुरागु । आथि येथ ॥ ४४ ॥ म्हणोनि यया वाखाणा- । पासीं से आली चौगुणा । ना म्हणों नये देखणा । होसी ज्ञानी ॥ ४५ ॥ तरी आतां यया- वरी । प्रज्ञेचा माजु धरीं । पदें साच करीं । निरूपणीं ॥ ४६ ॥ या संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । माझेंही जी ऐसें । मनोगत ॥ ४७ ॥ यावरी आतां तुम्हीं । आज्ञापिला स्वामी । वार्या वाग् मी । वाढों नेदी ॥ ४८ ॥ एवं इयें अवधारा । ज्ञानलक्षणें अठरा । श्रीकृष्णें धनुर्धरा । निरूपिलीं ॥ ४९ ॥ मग म्हणे या नांवें । ज्ञान एथ जाणावें । हें स्वमत आणि आघवें । ज्ञानियेंही म्हणती ॥ ६५० ॥ करतळावरी वाटोळा । डोलतु देखिजे आंवळा । तैसें ज्ञान आम्हीं डोळां । दाविलें तुज ॥ ५१ ॥ आतां धनंजया महामती । अज्ञान ऐसी वदंती । तेही सांगों व्यक्ती । लक्षणेंसीं ॥ ५२ ॥ एऱ्हवीं ज्ञान फुडें जालिया । अज्ञान जाणवे धनंजया । जें ज्ञान नव्हे तें अपैसया । अज्ञानचि ॥ ५३ ॥ पाहें पां दिवसु आघवा सरे । मग रात्रीची बारी उरे । वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ॥ ५४ ॥ तैसें ज्ञान जेथ नाहीं । तेंचि अज्ञान पाहीं । तरि सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ॥ ५५ ॥ तरि संभावने जिये । जो मानाची वाट पाहे । सत्कारें होये । तोषु जया ॥ ५६ ॥ गर्वें पर्वताचीं शिखरें । तैसा महत्वावरूनि नुतरे । तयाचां ठायीं पुरें । अज्ञान आहे ॥ ५७ ॥ आणि स्वधर्माची मांगळी । बांधे

सर्व ज्ञेय वस्तूच असते, परंतु ती ज्ञेय वस्तु पाहील, अशी बुद्धि शुद्ध पाहिजे. ६२८. याकरितां निर्मळ ज्ञानानें दाखविलेलें ज्ञेय, जी पाहते, अशा शुद्ध बुद्धीनें जो संपन्न आहे; ६२९. जेवढा ज्ञानाचा विकास आहे, तेवढाच ज्याच्या बुद्धीचा विकास झालेला आहे, तो ज्ञानाचें रूप आहे, हें शब्दानें सांगावयास नको. ६३०. ( एवढेंच काय ) परंतु ( ज्याच्या बुद्धींत ) ज्ञानाचा प्रकाश पडल्याबरोबर, ज्याची बुद्धि ब्रह्मस्वरूपाला जाऊन भिडते, तो परब्रह्माला हातों-हात जाऊन भेटतो. ६३१. अर्जुना, तोच ज्ञान आहे, असें म्हटलें तर त्यांत आश्चर्य तें काय आहे ? सूर्याला सूर्य म्हणावयाला पाहिजे काय ? ६३२. तेव्हां श्रोत्यांनीं म्हटलें, हें राहूं दे. त्या पुरुषाचेंच अतिशय वर्णन करूं नकोस. ग्रंथाच्या चाललेल्या विचारांत मध्येंच खोळंबा कां करितोस ? ६३३. आत्मज्ञानाचा विषय तूं पुष्कळ विस्तारानें सांगितलास, हाच आम्हांला तुझ्या वक्तृत्वाचा मोठा पाहुणचार झाला. ६३४. आपल्या व्याख्यानांत विषयाचें प्रतिपादन करितांना, त्याचें पाल्हाळानें अतिशय रसभरित वर्णन करावें, ही जी सामान्य कवींची क्लृप्ति तिचा आश्रय जर केला असता तर तूं श्रोत्यांस मुद्दाम बोलावून आणून शत्रु केल्याचा दोष केला असतास. ६३५. भोजन करण्यास पात्रावर बसावयाचे वेळीं, जी बाई स्वयंपाक घेऊन पळते, तिच्या इतर आदरसत्काराचा काय उपयोग ? ६३६. इतर सर्व गोष्टींत चांगली, परंतु दूध काढावयाचे वेळीं जी कांसेखालीं बसूं देत नाहीं, ( खालीं बसल्याबरोबर लाथेचा फटकारा मारते ) तर अशी ती नुसती लाथरी गाय कोण पोशील ? ६३७. त्याप्रमाणें ज्ञानांत बुद्धिविस्तार न पावतांना ( इतर कवि ) ज्ञानावांचून इतर गोष्टींचे किती पाल्हाळ लावतात, तें कळत नाहीं. परंतु त्यांची गोष्ट राहूं दे. तूं चांगलें केलेंस. ६३८. ज्या ब्रह्मज्ञानाच्या अंशाच्या हेतूनें लोक योगादिक कष्ट करतात, त्या ब्रह्मज्ञानाचें पोटभर आणि तुझ्यासारखें रसाळ व्याख्यान ( आम्हांस मिळाल्यावर तें पुरें कसें वाटेल ? ) ६३९. अमृताची झड एकसारखी सात दिवस लागेना का ? ( तिचा कंटाळा यावयाचा नाहीं, ) ( दुःखाचे दिवस जसे आपण मोजतों व प्रत्येक दिवस जातां जात नाहीं, इतका मोठा वाटतो तसे ) सुखाचे दिवस कोट्यावधि गेले तरी त्यांना कोणी मोजतो का ? ६४०. पूर्णचंद्रासह रात्र एक युगभर न उजाडणारी अशी एकसारखी असली, तरी चकोरांना ती उजाडावी असें वाटेल काय ? ६४१. त्याप्रमाणें ज्ञानाचें व्याख्यान आणि अशा गोडपणानें तें व्याख्यान केलेलें, आतां तें व्याख्यान ऐकतांना पुरे कोण म्हणेल ? ६४२. आणि भाग्यशाली पाहुणा आला व त्याला भाग्यशाली स्त्रीच वाढणारी असली तर त्या वेळेला स्वयंपाकाला संपावयाचें माहीत नसतें असें असतें. ( म्हणजे स्वयंपाक इतका भरपूर केलेला असतो कीं, अन्न संपेल, अशी कल्पना त्या पाहुण्याच्या आणि त्या वाढणारणीचे मनांत येतच नाहीं, अशी स्थिति असते. ) ६४३. तसा हा प्रसंग झाला, कारण कीं आम्हांला ज्ञानाची प्रीति आहे आणि तुलाही येथें ( ज्ञानाचे ठिकाणीं ) प्रीति आहे. ६४४. म्हणून तुझ्या या ज्ञानाच्या निरूपणाला चौपट स्फूर्ति आली. तूं ज्ञानामध्यें डोळस आहेस, हें नाहीं म्हणतां येत नाहीं. ६४५. तर आतां यानंतर तूं आपल्या व्याख्यानांत बुद्धीचा चांगला विकास करून श्लोकांतील पदांचें यथार्थ निरूपण कर. ६४६. या संतांच्या आज्ञेवरोवर, 'महाराज, माझाही हेतु असाच आहे' असें निवृत्तीचे दास ज्ञानदेव यांनीं म्हटलें. ६४७. ( माझाही मूळचा हेतु असाच होता आणि ) यावर महाराज, मला तुमचाही तसाच हुकूम झाला, तर आतां मी व्यर्थ बोलणें वाढूं देत नाहीं. ६४८. याप्रमाणें ज्ञानाचीं हीं अठरा लक्षणें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलीं, ऐका. ६४९. यानंतर या लक्षणां-वरून ज्ञान ओळखावें, हें माझें स्वतःचें मत आहे आणि सर्व ज्ञानीही असेंच म्हणतात, असें श्रीकृष्ण म्हणाले. ६५०. तळहातावर डोलत असलेला आंवळा जसा सर्व अंगांनीं पूर्णपणें दिसतो, त्याप्रमाणें आम्हीं तुला डोळ्यांनीं स्पष्ट दिसेल असें ज्ञान दाखविलें. ६५१. यानंतर, विशाल-बुद्धीच्या अर्जुना, अज्ञान असें जें म्हणतात, तेंही स्पष्ट लक्षणांनीं सांगतों. ६५२. अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर ज्ञान स्पष्ट झाल्यावर अज्ञान जाणतां येईल. कारण कीं, जें ज्ञान नाहीं तें आपोआप ( कोणी न सांगतां ) अज्ञानच आहे. ६५३. अर्जुना, असें पाहा कीं, ज्याप्रमाणें सर्व दिवस संपल्यावर मग रात्रीच्या येण्याची पाळी असते, याशिवाय तिसरें कांहीं नसतें; ६५४. त्याप्रमाणें जेथें ज्ञान नाहीं, तेंच अज्ञान समज. तरी पण तीं कांहीं कांहीं लक्षणें सांगतों. ६५५. तरी जो प्रतिष्ठेकरितां जगतो, जो मानाची वाट पहातो आणि ज्याला सत्कारानें संतोष होतो. ६५६. पर्वताचीं शिखरें जशीं खालीं लवत नाहींत, तसा जो गर्वानें मोठेपणावरून खालीं येत नाहीं; त्याच्या ठिकाणीं पुरें अज्ञान आहे असें समज. ६५७. आणि पिंपळाची मुंज केली म्हणजे त्या

वाचेचां पिंपळीं । उभिला जैसा देउळीं । जाणोनि कुंचा ॥ ५८ ॥ घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहरा । स्फीतीचिया ॥ ५९ ॥ आंग वरिवरी चर्ची । जनातें अभ्यर्चितां वंची । तो जाण पां अज्ञानाची । खाणी एथ ॥ ६६० ॥ आणि वन्ही वनीं विचरे । तेथ जळती जैसीं जंगमें स्थावरें । तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ॥ ६१ ॥ कौतुकें जें जें जल्पे । तें सबळाहूनि तीख रुपे । विषाहूनि संकल्पें । मारकु जो ॥ ६२ ॥ तयातें बहु अज्ञान । तोचि अज्ञानाचें निधान । हिंसेसि आयतन । जयाचें जिणें ॥ ६३ ॥ आणि फुंकें भाती फुगे । रेचिलिया सवेंचि उफगे । तैसा संयोगवियोगें । चढे वोहटे ॥ ६४ ॥ पडली वारयाचां वळसां । धुळी चढे आकाशा । हरिखा वळघे तैसा । स्तुतीवेळे ॥ ६५ ॥ निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके । थेंबें विरे वारेनि शोखे । चिखलु जैसा ॥ ६६ ॥ तैसा मानापमानीं होये । जो कोण्हीही उर्मी न साहे । तयाचां ठायीं आहे । अज्ञान पुरें ॥ ६७ ॥ आणि जयाचां मनीं गांठी । वरिवरी मोकळी वाचा दिठी । आंगें मिळे जीवें पाठी । भलतया दे ॥ ६८ ॥ व्याधाचें चारा घालणें । तैसें प्रांजळ जोगावणें । चांगाचीं अंतःकरणें । विरु करी ॥ ६९ ॥ गार शेवाळें गुंडाळलीं । कां निंबोळी जैसी पिकली । तैसी जयाची भली । बाह्य क्रिया ॥ ६७० ॥ अज्ञान तयाचां ठायीं । ठेविलें असे पाहीं । या बोला आन नाहीं । सत्य मानीं ॥ ७१ ॥ आणि गुरुकुळें लाजे । जो गुरुभक्ती उभजे । विद्या घेऊनि माजे । गुरूसींचि ॥ ७२ ॥ तयाचें नांव घेणें । हें वाचे शूद्रान्न होणें । परि घडलें लक्षणें । बोलतां इयें ॥ ७३ ॥ आतां गुरुभक्तांचें नांव घेवों । तेणें वाचे प्रायश्चित्त देवों । गुरुसेवका नांव पाहा हो । सूर्य जैसा ॥ ७४ ॥ येतुलेनि पांगु पापाचा । निस्तरेल हे वाचा । जो गुरुतल्पगाचा । नामीं जाला ॥ ७५ ॥ हा ठायवरी । तया नांवाचें भय हरी । मग म्हणे अवधारीं । आणिकें चिन्हें ॥ ७६ ॥ तरी आंगें कर्में ढिला । जो मनें विकल्पें भरला । अडवींचा अवगळला । कुहा जैसा ॥ ७७ ॥ तया तोंडीं कांटिवडें । आंतु नुसतीं हाडें । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ॥ ७८ ॥ जैसें पोटालागीं सुणें । उघडें झांकलें न म्हणे । तैसें आपुलें परावें नेणे । द्रव्यालागीं ॥ ७९ ॥ एया ग्रामकुलाचां ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं । तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ॥ ६८० ॥ कर्माचा वेळु चुके । कां नित्य नैमित्तिक ठाके । तें जया न दुखे । जीवामाजीं ॥ ८१ ॥ पापी जो निसुगु । पुण्याविषयीं अति निलागु । जयाचां मनीं वेगु । विकल्पाचा ॥ ८२ ॥ तो जाण निखळा । अज्ञानाचा पुतळा ।

पिंपळाला जशी मुंज ( मोळाची दोरी ) सर्वांना उघड दिसेल अशी बांधतात, त्याप्रमाणें जो आपण केलेल्या स्वधर्मांची मुंज आपल्या वाचारूपी पिंपळाला बांधतो; ( म्हणजे आपण केलेला धर्म वाचेनें लोकांना सांगतो. ) अथवा जसें देवळांत सर्वांना उघड दिसेल, असें मोचेंल जाणून बुजून ठेवलेलें असतें. ६५८. विद्येचा पसारा ( दुकान ) घालतो, केलेल्या पुण्यकर्मांची दवंडी पिटतो; आणि जेवढें म्हणून कांहीं करतो, तेवढ्याचा मोर्चा कीर्तीकडे असतो. ६५९. स्वतःच्या अंगाला भस्म, गंध वगैरे लोकांना दिसेल, अशा तऱ्हेनें फांसतो व लोक याची पूज्य म्हणून पूजा करीत असतां, ह्या त्यांस फसवीत राहतो; तो अज्ञानाची खाण आहे, असें समज. ६६०. आणि ज्याप्रमाणें रानास वणवा लागला म्हणजे वृक्ष, प्राणी वगैरे सर्व पदार्थ जळतात, त्याप्रमाणें ज्याच्या वागणुकीनें सर्व जगास दुःख होतें. ६६१. आणि तो सहज जें जें बोलेल, तें भाल्यापेक्षां जास्त तीक्ष्ण टोंचतें व जो संकल्पानें विषापेक्षां जास्त घात करणारा असतो. ६६२. आणि ज्याचें जगणें हिंसेचें घरच असतें, त्याच्याजवळ फार अज्ञान आहे ( इतकेंच नव्हे ) तर तोच अज्ञानाचा खजीना आहे. ६६३. जसा भाता फुंकल्यानें फुगतो व त्यांतील वारा सोडल्यानें तो लागलीच रिकामा पडतो, ( संकोचित होतो) त्याप्रमाणें जो इच्छित वस्तूच्या लाभानें अथवा हानीनें हर्षित होतो अथवा दुःखी होतो; ६६४. वाऱ्याच्या भोंवऱ्यांत धूळ सांपडली असतां ती जशी वर आकाशाकडे चढते, तसा स्तुतीच्या वेळीं आनंदानें चढून जातो. ६६५. जराशी निंदा ऐकली कीं, कपाळ धरून राहतो व जसा चिखल पाण्याच्या एका थेंबानें विरघळतो व थोड्याशा वाऱ्यानें तो वाळतो, ६६६. त्याप्रमाणें मानानें व अपमानानें ज्याची स्थिति होते व ज्याला कोणत्याही विकाराचा वेग सहन होत नाहीं, त्याच्या ठिकाणीं पूर्ण अज्ञान आहे. ६६७. आणि ज्याच्या मनामध्यें गांठ असते, ( आपल्या मनांतील गोष्ट दुसऱ्यास कधींही कळूं देत नाहीं ) ज्याचें बोलणें व पाहणें वरून वरून मोकळ्या मनाचें असतें व तो वाटेल त्याच्याशीं शरीरानें मिळतो, पण मनानें मात्र त्यांस तोंडघशीं पाडतो. ६६८. पारध्याचें जनावरास चारा घालणें हें जसें असतें ( वरून पाहणारास प्रामाणिक व सरळपणाचें दिसतें, पण त्याच्या मनांत घात करण्याचा हेतु असतो; ) त्याप्रमाणें सरळ ज्याचें दुसऱ्यास पोसणें अथवा सांभाळणें असतें; ( पण तें केवळ त्या पोसलें जाणाऱ्या माणसाच्या घातकरितांच असतें; ) व जो चांगल्या माणसाचीं अंतःकरणें विरुद्ध करतो. ६६९. शेवाळानें आच्छादिलेली गारगोटी जशी वरून सुंदर दिसते अथवा पिकलेली लिंबोळी जशी वरून सुंदर दिसते, ( परंतु आंत कडू असते ) तसें ज्याचें बाह्य आचरण दिसण्यांत चांगलें असतें, ६७०. त्याच्या ठिकाणीं अज्ञान ठेवलेलें आहे असें समज, यांत अन्यथा नाहीं. हें खरें असें मान. ६७१. आणि गुरुकुळाची ज्याला लाज वाटते, (जो) गुरुभक्तीला कंटाळतो व गुरुपासून विद्या शिकून गुरुवरच उलटतो; ६७२. त्या अभक्ताचें नांव घेणें, हें ( ब्राह्मणाच्या ) जिव्हेला शूद्राच्या अन्नाच्या स्पर्शाप्रमाणें आहे. पण काय करावें ? अज्ञानाचीं हीं लक्षणें सांगतांना त्या अभक्ताचें नांव घेणें भाग पडलें. ६७३. म्हणून आतां गुरूच्या भक्ताचें नामस्मरण करूं व त्यायोगानें वाचेस प्रायश्चित देऊं. गुरुभक्ताचें नांव म्हणजे जणूंकाय सूर्यच आहे असें समजा. ६७४. एवढ्यानें ( गुरुभक्ताचें नांव घेतल्यानें ) ती वाचा गुरुविषयीं मात्रागमनी असणाराचें नांव घेण्याच्या पापाचा जो हीनपणा झाला, तो घालवील. ६७५. ( गुरुभक्ताच्या नांवाचा उच्चार ) येथपर्यंत अभक्ताच्या नामोच्चारणाचें भय ( दोष ) हरण करतो, मग आणखी ( अज्ञानाचीं ) चिन्हें ऐक, असें देव म्हणाले. ६७६. तरी जो शरीरानें कर्म करण्याविषयीं आळशी असतो, ज्याचें मन विकल्पानें भरलेलें असतें, तो म्हणजे रानांतील त्याज्य म्हणून टाकलेला आडच होय. ६७७. त्या रानांतील आडाच्या तोंडावर कांटे वगैरे घाण पडलेली असते आणि आंत फक्त हाडें असतात. ( पाणी नसतें ) त्या आडाप्रमाणें जो आंतबाहेर अमंगल असतो. ६७८. ज्याप्रमाणें कुत्रें पोटाला अन्न मिळण्याकरितां एखादा पदार्थ झांकलेला आहे कीं उघडा आहे, हा विचार करीत नाहीं, त्याप्रमाणें द्रव्याकरितां जो आपलें व परकें अशी निवड जाणत नाहीं. ६७९. या कुत्र्याच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें कुत्रीच्या संगाला योग्य किंवा अयोग्य जागा याचा विचार नसतो, त्याप्रमाणें स्त्री ( संग ) विषयीं जो कांहीं विचार करीत नाहीं. ६८०. विहित कर्म करण्याची वेळ चुकली अथवा नित्य नैमित्तिक कर्में राहिलीं, तर त्याचें ज्याला मनांत दुःख वाटत नाहीं, ६८१. पाप करण्यास ज्याला कांहीं लाज वाटत नाहीं आणि पुण्याविषयीं जो अतिशय निःसंग बनलेला असतो व ज्याच्या मनांत विकल्पाचें वारें भरलेलें असतें, ६८२. जो आपल्या डोळ्यांपुढें धनाच्या इच्छेस कायम करून चालतो,

जो बांधोनि असे डोळां । विचारेंतें ॥ ८३ ॥ आणि स्वार्थें अळुमाळें । जो धैर्यापासोनि चळे । जैसें तृणबीज ढळे । मुंगियेचेनि ॥ ८४ ॥ पावो सूदलिया सवें । जैसें थिल्लर कालवे । तैसा भयाचेनि नांवें । गजबजे जो ॥ ८५ ॥ वायुचेनि सावायें । धू दिगंतवरी जाये । दुःखवार्ता होये । तैसें जया ॥ ८६ ॥ मनोरथांचिया धारसा । वाहणें जयाचिया मानसा । पूरीं पडिला जैसा । दुथिया पाहीं ॥८७॥ वाउधणाचिया परी । जो आश्रो केहींचि न धरी । क्षेत्रीं तीर्थीं पुरीं । थारों नेणे ॥ ८८ ॥ कां मातलिया सरडा । पुढती बुड पुढती शेंडा । हिंडणवारा कोरडा । तैसा जया ॥ ८९ ॥ जैसा रोंबिल्याविणें । रांजणु थारों नेणे । तैसा पडे तैं राहणें । एऱ्हवीं हिंडे ॥ ६९० ॥ तयाचां ठायीं उदंड । अज्ञान असे वितंड । जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ ९१ ॥ आणि पैं गा धनुर्धरा । जयाचिया अंतरा । नाहीं बोढावारा । संयमाचा ॥ ९२ ॥ लेंडिये आला लोंढा । न मनी वाळुवेचा वरंडा । तैसा निषेधाचिया तोंडा । बिहेना जो ॥ ९३ ॥ व्रतातें आड मोडी । धर्मातें पायें वोलांडी । नियमाची आस तोडी । जयाची क्रिया ॥ ९४ ॥ नाहीं पापाचा कंटाळा । नेदी पुण्यासी जिव्हाळा । लाजेचा पेंडवळा । खाणोनि घाली ॥ ९५ ॥ कुळेंसीं जो पाठमोरा । वेदाज्ञेसी दुऱ्हा । कृत्याकृत्यव्यापारा । निवाडु नेणे ॥ ९६ ॥ वसो जैसा मोकाटु । वारा जैसा अफाटु । फुटला जैसा पाटु । निरंजनीं ॥ ९७ ॥ आंधळें हातिरूं मातलें । डोंगरीं जैसें पेटलें । तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें ॥९८॥ पैं उघडां काइ न पडे । मोकाटु कोणां नातुडे । ग्रामद्वारींचें आडें । नोलांडी कोण ॥ ९९ ॥ जैसें सत्रीं अन्न जालें । कीं सामान्या बीक आलें । वाणासियेचें उभलें । कोण न रिगे ॥ ७०० ॥ तैसें जयाचें अंतःकरण । तयाचां ठायीं संपूर्ण । अज्ञानाची जाण । ऋद्धि आहे ॥ १ ॥ आणि विषयांची गोडी । जो जीतु मेला न संडी । स्वर्गींही खावया जोडी । येथौनिचि ॥ २ ॥ जो अखंड भोगा जचे । जया व्यसन काम्यक्रियेचें । मुख देखोनि विरक्ताचें । सचैल करी ॥ ३ ॥ विषो शिणोनि जाये । परि न शिणे सावधु नोहे । कुहिला हातीं खाये । कोढी जैसा ॥ ४ ॥ खरी टेंको नेदी उडे । लातौनि फोडी नाकाडें । तऱ्ही जेवीं न काढे । माघौता खरु ॥ ५ ॥ तैसा जो विषयांलागीं । घाली जळतिये आगीं । व्यसनाची आंगीं । लेणीं मिरवी ॥ ६ ॥ फुटोनि पडे तंव । मृग वाढवी हांव । परि न म्हणे ते माव । रोहिणीची ॥ ७ ॥ तैसा जन्मोनि मृत्यूवरी । विषयीं त्रासितां बहुतीं परी । तऱ्ही त्रासु नेघे धरी । अधिक प्रेम ॥ ८ ॥ पहिलिये बाळदशे । आई बा होंचि पिसें । तें सरे मग स्त्रीमांसें । भुलोनि ठाके ॥ ९ ॥ मग स्त्री भोगितां थावो । वृद्धाप्य लागे येवों । तेव्हां तोचि प्रेमभावो । बाळकासि आणी ॥ ७१० ॥ आंधळें व्यालें जैसें । तैसा बाळें परिवसे ।

तो एकरस अज्ञानाचा पुतळा आहे असें समज. ६८३. आणि ज्याप्रमाणें गवताचें बीज मुंगीच्या धक्क्यानें आपली जागा सोडतें, त्याप्रमाणें थोड्याशा स्वार्थाकरितां जो केलेल्या निश्चयापासून ढळतो; ६८४. डबक्यांत पाय घातल्याबरोबर जसें डबक्यांतील पाणी गढूळ होतें, त्याप्रमाणें भयाचें नांव ऐकल्याबरोबर जो घाबरून जातो. ६८५. वायूच्या वेगानें धूर जसा दिशेच्या अंतापर्यंत पसरतो, त्याप्रमाणें दुःखाची बातमी ऐकल्याबरोबर, ज्याचें मन दुःखानें पुरें व्यापलें जातें. ६८६. पुरांत पडलेला भोंपळा जसा पाण्याच्या ओघाबरोबर हवा तिकडे वहात जातो, त्याप्रमाणें मनोरथांच्या ओघानें ज्याचें मन भटकत असतें, असें समज. ६८७. वावटळीप्रमाणें जो कोठें स्थिर रहात नाहीं व जो क्षेत्रांत, तीर्थांचे ठिकाणीं अथवा सप्तपुऱ्यांपैकीं कोण्या एका पुरींत कायम रहाण्याचें जाणत नाहीं. ६८८. माजलेला सरड जसा झाडाच्या बुडापासून तों शेंड्यापर्यंत व पुन्हा शेंड्यापासून बुडापर्यंत रिकाम्या खेपा करतो, त्याप्रमाणें ज्याचें भटकणें निरर्थक असतें. ६८९. ज्याप्रमाणें रांजण जमिनींत रोवल्याशिवाय बसावयाचें जाणत नाहीं, त्याप्रमाणें अज्ञानी पुरुष पडेल, तरच तो एके ठिकाणीं राहील, नाहींतर तो सारखा हिंडतो. ६९०. जो चंचलपणानें माकडाचें भावंड आहे, त्याच्या ठिकाणीं मोठें अज्ञान पुष्कळ आहे. ६९१. आणि अर्जुना, ज्याच्या मनाला निग्रहाचा धरबंध नाहीं. ६९२. ओहोळाला पूर आला असतां, तो लोंढा जसा वाळूच्या बांधाला जुमानीत नाहीं, तसा जो निषिद्ध कर्माला तोंड देण्यास भीत नाहीं. ६९३. व्रतांना मध्येंच मोडतो, स्वधर्माला लाथेनें झुगारतो व ज्याच्या कर्मे करण्यांत नियमानें वागण्याची आशाच रहात नाहीं. ६९४. ज्याला पापाचा कंटाळा नाहीं, जो पुण्याला आश्रय देत नाहीं व जो लाजेची मर्यादा समूळ खणून टाकतो. ६९५. जो आपल्या कुळांतील आचार मानीत नाहीं, जो वेदाची आज्ञा एकीकडे ठेवतो व करण्यास योग्य कर्म कोणतें व न करण्यास योग्य कर्म कोणतें, यांतील निवड जो जाणत नाहीं. ६९६. सोडलेला पोळ जसा पाहिजे तिकडे मोकळा हिंडत असतो किंवा वारा जसा अफाट ( पाहिजे तिकडे ) वाहात असतो अथवा अरण्यांत पाण्याचा फुटलेला पाट जसा पाहिजे तिकडे वाहात असतो; ६९७. आंधळा हत्ती माजला असतां तो जसा वाटेल तिकडे हिंडतो, अथवा डोंगरावर पेटलेला वणवा जसा वाटेल तिकडे पेटत जातो, त्याप्रमाणें ज्याचें चित्त विषयाच्या ठिकाणीं वाटेल तिकडे भटकत असतें. ६९८. पण उघड्यावर काय काय पडत नाहीं ? मोकळें सुटलेलें जनावर कोणास सांपडत नाहीं ? गांवच्या वेशीचा उंबरा कोण ओलांडीत नाहीं ? ६९९. ज्याप्रमाणें सत्रांतील अन्न असतें, ( तें वाटेल त्याला मिळतें ) किंवा सामान्य मनुष्यास एखादां अधिकार प्राप्त झाला असतां तो काय करणार नाहीं ? अथवा वेश्येच्या उंबऱ्याचे आंत कोण प्रवेश करणार नाहीं ? ७००. त्याचप्रमाणें ज्याचें अंतःकरण असतें ( म्हणजे वरील उदाहरणाप्रमाणें जें बऱ्यावाईट कल्पनांनीं व्यापलें जातें. ) त्या पुरुषाचे ठिकाणीं अज्ञानाची पूर्ण भरभराट आहे. ७०१. आणि जिवंत अथवा मेला असला तरी जो विषयांचें प्रेम सोडीत नाहीं व मेल्यानंतर स्वर्गांतही खावयास ( भोगावयास ) मिळावें म्हणून जो येथूनच सामुग्री (सकाम कर्मे ) करून ठेवतो. ७०२. जो भोगाकरितां एकसारखा कष्ट करतो आणि ज्याला काम्यकर्मे करण्याचें व्यसन असतें व जो विरक्त पुरुषांचें मुख पाहून कपडे वगैरेसह स्नान करतो. ७०३. विषय त्रासून जातो परंतु हा विषय सेवन करणारा अज्ञानी पुरुष त्रासत नाहीं व सावधही होत नाहीं. तो कसा तर, जसा कोढी पुरुष सडलेल्या हातांनीं खातो पण त्याला जशी कुजलेल्या हातांची किळस येत नाहीं ७०४. ज्याप्रमाणें गाढवाला गाढवी आपल्या अंगास स्पर्श करूं देत नाहीं व गाढव तिच्याजवळ आला असतां, ती त्यास उलट लाथा मारून त्याचें नाकाड फोडते, तरी पण तो गाढव मागें हटत नाहीं. ७०५. जो विषयाकरितां जळत्या आगींत उडी घालतो व आपलें व्यसन हें दूषण नसून भूषणच आहे म्हणून मिरवितो. ७०६. हरण हा मृगजळ पिण्याची तीव्र इच्छा इतकी वाढवितो कीं, तो मृगजळाच्या मागें लागून उर फुटून पडला तरी मृगजळाची हांव सोडीत नाहीं व असें म्हणत नाहीं कीं, ही मृगजळाची भ्रांती आहे ७०७. त्याप्रमाणें जन्मापासून मरेपर्यंत विषयांनीं जरी अनेक प्रकारांनीं त्यास त्रास दिला तरी तो कंटाळत नाहीं, तर उलट विषयांच्या ठिकाणीं अधिकच प्रेम धरतो. ७०८. पहिल्या प्रथमच्या बाळपणांत आई, बाबा असें आईबापांचें वेड असतें, तें संपतें आणि मग ( तारुण्यांत ) स्त्रीच्या देहानें वेडा होऊन राहतो. ७०९. मग तारुण्याच्या भरांत स्त्री भोगीत असतां म्हातारपण येऊं लागतें. त्या वेळीं तेंच स्त्रीवरील प्रेम मुलांबाळांवर आणून ठेवतो. ७१०. एकाद्या

परी जी मरे तो न त्रासे। विषयांसि जो ॥ ११ ॥ जाण तयाचां ठायीं। अज्ञानासि पारु नाहीं। आतां आणीकें कांहीं। चिन्हें सांगों ॥ १२ ॥ तरि देह हेंचि आत्मा। ऐसेया जो मनोधर्मा। वळघोनियां कर्मा। आरंभु करी ॥ १३ ॥ आणि उणें कां पुरें। जें जें कांहीं आचरे। तयाचेनि आविष्कारें। कुंथों लागे ॥१४॥ डोईये ठेविलेनि भोजें। देवलविसें जेवीं फुंजे। तैसा विद्यावयसा माजे। उताणा चाले ॥१५॥ म्हणे मीचि एकु आथी। माझांचि घरीं संपत्ती। माझी आचरती रिती। कोणा आहे ॥ १६ ॥ नाहीं माझेनि पाडें वाडु। मी सर्वज्ञु एकुचि रूढु। ऐसा गर्वतुष्टीगंडु। घेऊनि ठाके ॥१७॥ व्याधि लागलिया माणुसा। नये भोग दाऊं जैसा। निकें न साहे जो तैसा। पुढिलांचें ॥ १८ ॥ पैं गुणु तेतुला खाय। स्नेह कीं जाळितु जाय। जेथ ठेविजे तेथ होय। मसीऐसें ॥ १९ ॥ जीवनें शिंपिला तिडपिडी। विजिला प्राण सांडी। लागला तरी काडी। उरों नेदी ॥ ७२० ॥ आळुमाळ प्रकाशु करी। तेतुलेनीचि उबारा धरी। तैसिया दीपाचिया परी। सुविद्यु जो ॥ २१ ॥ औषधाचेनि नांवें अमृतें। नवज्वरु जैसा आंबुथे। कां विषाचि होऊनि परतें। सर्पा दूध ॥ २२ ॥ तैसा सद्गुणीं मत्सरु। व्युत्पत्ती अहंकारु। तपोज्ञानें अपारु। ताठा चढे ॥ २३ ॥ अंत्यु राणिवे बैसविला। आरें धारणु गिळिला। तैसा गर्वें फुगला। देखसी जो ॥ २४ ॥ जो लाटणें ऐसा न लवे। पाथरु तेवीं न द्रवे। गुणियासि नागवे। फोडसें जैसें ॥ २५ ॥ किंबहुना तयापासीं। अज्ञान आहे वाढीसी। हें निकें गा तुजसीं। बोलत असों ॥ २६ ॥ आणीक पाहीं धनंजया। जो गृहदेह सामग्रिया। न देखे कालचेया। जन्मातें गा ॥ २७ ॥ कृतघ्ना उपेगु केला। कां चोरा व्यवहारु दिधला। निसुगु स्ताविला। विसरे जैसा ॥ २८ ॥ बोढाळितां लाविलें। तें तैसेंच कान पूंस बोलें। कीं पुढती वोढाळूं आलें। सुणें जैसें ॥ २९ ॥ वेडूक सापाचां तोंडीं। जातसे सवुडवुडीं। तो मक्षिकांचिया कोडीं। स्मरेना कांहीं ॥ ७३० ॥ तैसीं नवही द्वारें स्रवती। आंगीं देहाची लुती जिती। जेणें जाली तें चित्तीं। सलेना जया ॥ ३१ ॥ मातृकोदरकुहरीं। खूनि विष्ठेचां दाथरीं। जठरीं नवमासवरी। उकडला जें ॥ ३२ ॥ ते गर्भींची व्यथा। कां जे जालें उपजतां। तें कांहींचि सर्वथा। नाठवी जो ॥ ३३ ॥ मलमूत्रपंकीं। लोळतें बाळ अंकीं। तें देखोनि जो न थुंकी। त्रासु नेघे ॥ ३४ ॥ कालचि ना जन्म गेलें। पाहेचि पुढती आलें। हें ऐसें कांहीं वाटलें। नाहीं जया ॥ ३५ ॥ आणि पैं तयाची परी। जीविताची फरारी। देखोनि जो न करी। मृत्युचिंता ॥ ३६ ॥ जिणेयाचेनि विश्वासें। मृत्यु एक एथ असे। हें जयाचेनि मानसें। मानिजेना ॥ ३७ ॥ अल्पोदकींचा मासा। हें नाटे ऐसिया आशा। न वचेचि कां जैसा। अगाध डोहा ॥ ३८ ॥

आंधळ्या मुलास जन्म दिला म्हणजे त्याची आई जशी आपल्या तान्ह्या मुलास विसंबत नाहीं, तसें जो आपल्या मुलाबाळांस धरून राहतो आणि महाराज, मरतो परंतु विषयाविषयीं त्यास वीट येत नाहीं. ७११. त्याच्या ठिकाणीं अज्ञानाला अंत नाहीं, असें समज. आतां (अज्ञानाचीं ) आणखी कांहीं लक्षणें सांगतों. ७१२. तर देह हाच आत्मा आहे. ( देहच मी आहे ) अशा मनाच्या समजुतीवर स्वार होऊन जो कर्म करण्यास आरंभ करतो ७१३. आणि त्याच्या हातून जें जें कांहीं पूर्ण किंवा अपूर्ण कर्म घडतें, त्यामध्यें तो पूर्ण झालेल्या कर्मानें गर्वानें फुगतो व अपूर्ण झालेल्या कर्मानें खंती करतो. ७१४. बाधेनें घेरलेल्या एखाद्यानें मंत्रतंत्र करणाऱ्याच्या डोक्यावर सर्व जबाबदारी ठेवल्यावर तो मंत्रतंत्र करणारा जसा आनंदानें फुगून जातो, त्याप्रमाणें जो विद्येनें व तारुण्यानें मस्त होऊन छाती काढून चालतो. ७१५. तो म्हणतो, जगांत काय तो एक मीच ( महत्त्वाचा मनुष्य ) आहें, माझ्याच घरीं सर्व संपत्ति आहे व माझी वागण्याची पद्धत दुसऱ्या कोणाला आहे ? ७१६. माझ्यासारखा कोणी मोठा नाहीं. प्रसिद्ध असा सर्वज्ञ काय तो मीच एक आहें. अशा गर्वानें संतुष्ट झालेला ताठ होऊन राहतो. ७१७. रोग झालेल्या माणसाला विषय दाखवूं नयेत, ( दाखविल्यास जशी त्याची तळमळ होते ) त्याप्रमाणें जो लोकांचें बरें सहन करीत नाहीं. ७१८. परंतु ( जसा एखादा दिवा ) वात तेवढी खातो; तेल जाळून टाकतो व जेथें तो ठेवावा तेथें काजळासारखें काळें होतें, ७१९. पाणी शिंपडल्यानें तो तडतड करतो, वारा लागला तर विझून जातो. एखाद्या ठिकाणीं लागला तर सर्व जाळून टाकतो, एक काडी उरूं देत नाहीं. ७२०. थोडकासा प्रकाश करतो व तेवढ्यानेंच उष्णता वाढवितो, त्या दिव्याप्रमाणें जो विद्वान असतो, ( म्हणजे ज्याला ज्ञान थोडें असतें पण अवगुण बरेच असतात; ) ७२१. नवज्वर झालेल्या माणसाला औषध म्हणून दूध दिलें असतां तो नवज्वर जसा वाढतो अथवा सर्पाला दूध पाजलें असतां तें जसें विष होऊन उलटतें, ७२२. त्याप्रमाणें चांगल्या गुणांविषयीं जो मत्सरी असतो, विद्वत्तेचा ज्याला अहंकार असतो आणि तपानें व ज्ञानानें ज्याला अमर्याद गर्व चढतो. ७२३. अंत्यजाला जसें राज्यावर बसवावें म्हणजे तो गर्वानें फुगतो अथवा अजगरानें खांबाचें लांकूड गिळलें असतां तो जसा फुगतो, त्याप्रमाणें अभिमानानें फुगलेला जो तुला दिसेल; ७२४. जो लाटण्यासारखा लवत नाहीं, ( जसा ) दगडाला, तसा त्याला पाझर फुटत नाहीं. ज्याप्रमाणें फुरसें चावलें असतां मांत्रिकाला उतरतां येत नाहीं, ( त्याप्रमाणें मोठा ज्ञाता देखील त्याला ताळ्यावर आणूं शकत नाहीं. ) ७२५. फार काय सांगावें ! त्याच्याजवळ अर्जुना, अज्ञान वाढत्या प्रमाणांत आहे, हें तुला आम्हीं निक्षून सांगतों. ७२६. अर्जुना, आणखी असें पहा, कीं, जो घर, शरीरसामुग्रीच्या योगानें ( घर, देह वगैरे पसाऱ्यांत गुंतल्यानें ) मागील जन्माची आठवण ठेवीत नाहीं. ७२७. ( मागील जन्माला कसा विसरतो, हें दृष्टांतानें सांगतात, ) कृतघ्न मनुष्याच्या उपयोगी पडलेलें ( तें जसें तो विसरतो ) अथवा चोराला भांडवल दिलें असतां ( तो जसा तें विसरतो ) अथवा कोडग्या पुरुषाची स्तुति केली असतां तो जशी ती विसरतो. ७२८. कुत्रें ओढाळपणा करतें म्हणून त्याचे कान व शेंपूट कापून त्यांस घराबाहेर हांकलून दिलें, तरी तें ओढाळ कुत्रें कान व शेपूट रक्तानें ओले असतानांच, तें सर्व विसरून, ज्याप्रमाणें पुनः घरांत खोडी करण्याकरितां शिरतें; ७२९. बेडूक सापाच्या तोंडांत सगळा गिळला जात असतांनाही माशांचे समुदाय गिळतो पण 'आपण मरतों,' ही आठवण ठेवीत नाहीं. ७३०. त्याप्रमाणें शरीराचीं नाक तोंड वगैरे हीं नऊ द्वारें ( मळानें ) पाझरत असून व शरीराला झालेलें कुष्ठ अंगावर प्रत्यक्ष असूनही, ही स्थिति ज्या ( जन्माच्या ) योगानें प्राप्त झाली, ती गोष्ट ज्याच्या अंतःकरणांत सलत नाहीं. ७३१. आईच्या उदररूप गुहेत विष्ठेच्या थरांमध्यें घालून, त्या पोटांत नऊ महिनेपर्यंत ज्या वेळीं शिजला. ७३२. ती गर्भांत असतां झालेली पीडा अथवा जन्माच्या कालीं झालेले कष्ट, ते कांहींच जो मुळीं आठवीत नाहीं. ७३३. विष्ठा व मूत्र यांच्या चिखलांत लोळणारीं मुलें मांडीवर पाहून जो चिळस घेत नाहीं व कंटाळत नाहीं. ७३४. (मागला ) जन्म नुकताच संपला नाहीं काय ? व लागलीच पुनः उद्यां दुसरा जन्म मिळणार, असें हें कांहीं ज्याला वाटलें नाहीं. ७३५. आणि त्याचप्रमाणें आयुष्याची भरभराट पाहून ज्याला मरणाची काळजी वाटत नाहीं. ७३६. जगण्याचा त्याला इतका विश्वास असतो कीं, येथें एक मृत्यु आहे, हें ज्याच्या मनाला पटत नाहीं. ७३७. थोडक्या पाण्यांतला मासा, हें पाणी आटणार नाहीं, अशा आशेनें जसा खोल डोहाला जात नाहीं. ७३८.

कां गोरीचिया भुली । मृग व्याधा दिठी न घाली । गळु न पाहतां गिळिली । उंडी मीनें ॥ ३९ ॥ दीपाचिया झगमगा । जाळील हे पतंगा । नेणवेचि पैं गा । जयापरी ॥ ७४० ॥ गव्हारु निद्रासुखें । घर जळत असे तें न देखे । नेणतां जेवीं विखें । रांधिलें अन्न ॥ ४१ ॥ तैसा जीविताचेनि मिषें । हा मृत्यूचि आला असे । हें नेणेचि राजसें । सुखें जो गा ॥ ४२ ॥ शरीरींची वाढी । अहोरात्रांची जोडी । विषयसुखप्रौढी । साचचि मानी ॥ ४३ ॥ परि बापुडा ऐसें नेणे । जें वेश्येचें सर्वस्व देणें । तेंचि नागवणें । रूप एथ ॥ ४४ ॥ संवचोराचें साजणें । तेंचि तें प्राण घेणें । लेपा स्नपन करणें । तेंचि मरण ॥ ४५ ॥ पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । तैसें नेणे भुललें । आहारनिद्रा ॥ ४६ ॥ सन्मुख शूळा । धांवतया पायें चपळा । प्रतिपदीं ये जवळा । मृत्यु जेवीं ॥ ४७ ॥ तेवीं देहा जंव जंव वाढु । जंव जंव दिवसांचा पवाडु । जंव जंव सुरवाडु । भोगांचा हा ॥ ४८ ॥ तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके । मीठ जैसें उदकें । घांसिजत असे ॥ ४९ ॥ तैसें जीवित जाये । तयास्तव काळु पाहे । हें हातोहातींचें नव्हे । ठाउकें जया ॥ ७५० ॥ किंबहुना पांडवा । हा आंगींचा मृत्यु नीच नवा । न देखे जो मावा । विषयांचिया ॥ ५१ ॥ तो अज्ञानदेशींचा रावो । या बोला महाबाहो । न पडे गा वाटावो । आणिकांचा ॥ ५२ ॥ पैं जीविताचेनि सुखें । जैसा कां मृत्यु न देखे । तैसाचि तारुण्यतोषें । जरा न गणी ॥ ५३ ॥ कडाडीं लोटला गाडा । शिखरौनि सुटला धोंडा । तैसा न देखे जो पुढां । वृद्धाप्य आहे ॥ ५४ ॥ कां आडवोहळा पाणी आलें । म्हैसयाचें झुंज मातलें । तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जया ॥ ५५ ॥ पुष्टि लागे विघरों । कांति पाहे निसरों । माथा आदरी शिरों । बागीवळें ॥ ५६ ॥ दाढी साउळ धरी । मान हालौनि वारी । तरी जो करी । प्रीयेचा पैसु ॥ ५७ ॥ पुढील उंगीं आदळे । तंव न देखे जेवीं आंधळें । कां डोळ्यावरलें निगळें । आळशी तोपे ॥ ५८ ॥ तैसे तरुणेपण आजिचें । भोगितां वृद्धाप्य पाहेचें । न देखे तोचि साचें । अज्ञानु गा ॥ ५९ ॥ देखे अक्षमें कुब्जें । कीं विटावूं लागे फुंजें । परि न म्हणे पाहे माझें । हेंचि भवे ॥ ७६० ॥ आणि आंगीं वृद्धतेची । संज्ञा ये मरणाची । परि जया तारुण्याची । भुली न फिटे ॥ ६१ ॥ तो अज्ञानाचें घर । हें साचचि घे उत्तर । तेवींचि परियेसीं थोर । चिन्हें आणिक ॥ ६२ ॥ तरि वाघाचिये अडवे । चरोनि एक वेळ आला दैवें । तेणें विश्वासें पुढती धांवे । वद्ध जैसा ॥ ६३ ॥ कां सर्पघराआंतु । अवचटें ठेवा आणिला स्वस्थु । येतुलियासाठीं निश्चितु । नास्तिकु होय ॥ ६४ ॥ तैसेंनि अवचटें हें । एकदोनी वेळां

अथवा पारध्याच्या गाण्यानें भुलून हरिणाची नजर जशी पारध्यावर जात नाहीं, अथवा गळास न पाहतां, गळास लावलेलें आमिष माशानें गिळावें. ७३९. दिव्याच्या चकाकीनें, हा दिवा आपल्याला जाळील, हें ज्याप्रमाणें पतंगाला मुळींच कळत नाहीं. ७४०. जसा एखादा मूर्ख आळशी मनुष्य, निद्रेच्या सुखामुळें, घर जळत असलें, तरी तिकडे लक्ष देत नाहीं, किंवा एखादा मूर्ख खादाड मनुष्य विष घालून शिजविलेलें अन्न असलें, तरी तिकडे लक्ष न देतां खातो, ७४१. त्याप्रमाणें जगण्याच्या निमित्तानें हा मृत्यूच आला आहे, हें जो रजोगुणापासून होणाऱ्या सुखामुळें जाणतच नाहीं. ७४२. शरीराची होत असलेली वाढ, दिवस व रात्र यांचा (आयुष्याचा) लाभ, विषयसुखाचें महत्त्व, ह्या सर्व गोष्टी जो खऱ्याच मानतो. ७४३. वेश्येचें एकाद्या माणसाला सर्वस्व अर्पण करणें, हेंच त्या मनुष्यास साक्षात लुटणें होय. (त्याप्रमाणें राजससुखानें शरीराची वाढ होणें म्हणजे आत्मनाश आहे.) पण त्या विचाऱ्याच्या हें कांहींच लक्षांत येत नाहीं. ७४४. आपल्या सोबतीस संभावित असलेल्या चोराची मैत्री, ती मैत्री नव्हे, तर प्राण घेणें होय. अथवा भिंतीवर काढलेल्या चित्रास स्नान घालणें, म्हणजे त्या चित्राचा नाश होय. ७४५. पंडुरोगाच्या सुजेनें अंगाला पुष्टता आली, तर ती वास्तविक आरोग्याची पुष्टता नव्हे; मग त्यांतच पंडुरोग्याचें आयुष्य संपलें आहे, असें समजावें. त्याप्रमाणें खाणें व झोंप यांच्या योगानें (मोहित झालेले) मूर्ख लोक, विषयवृद्धींत खरी वृद्धि नसून खराखरा नाशच आहे, हें जाणत नाहींत. ७४६. समोर असलेल्या शुळाकडे जलद पावलानें धांवून जाणारास ज्याप्रमाणें पावलोंपावलीं मृत्यु जवळ येतो. ७४७. त्याप्रमाणें जसजसा देह वाढेल, जसजशी दिवसाची वाढ होते, म्हणजे जसजसे आयुष्याचे दिवस अधिक जातात, आणि जसजशी ही विषयभोगांची विपुलता होईल; ७४८. तसतसें अधिक अधिक मरण आयुष्याला जिंकतें. ज्याप्रमाणें मीठ पाण्यानें जसजसें घांसलें जाईल (तसतसें विरघळत जातें.) ७४९. त्याप्रमाणें (वरील मिठाच्या उदाहरणाप्रमाणें) दिवसानुदिवस आयुष्य कमी कमी होत जातें; त्यामुळें काळाला उजाडतें, (म्हणजे मरण जवळ येतें.) ही त्वरेनें एकसारखी चालू असलेली गोष्ट ज्याला कळत नाहीं. ७५०. अर्जुना, फार काय सांगावें! हें शरीराचें नित्य नवें मरण, जो विषयांच्या भ्रांतीनें जाणत नाहीं; ७५१. हे महाबाहो अर्जुना, तो (पुरुष) अज्ञानदेशाचा राजा आहे. या बोलण्यांत अज्ञानाच्या आणखी कांहीं लक्षणांची न्यूनता राहिली असें नाहीं, (तर हें अज्ञानाचें पूर्ण वर्णन झालें;) ७५२. जगण्याच्या सुखानें ज्याप्रमाणें मृत्यूकडे लक्ष देत नाहीं; त्याचप्रमाणें तारुण्याच्या संतोषानें म्हातारपणाविषयीं बेपरवा असतो. ७५३. डोंगराच्या कड्यावरून लोटलेला गाडा अथवा पर्वताच्या शिखरावरून सुटलेला धोंडा (जसा पुढील परिणामाला, म्हणजे आपले तुकडे तुकडे होतील, हें पहात नाहीं) तसा जो पुढें म्हातारपण (येणार) आहे, हें पाहात नाहीं. ७५४. अथवा आडरानांतील ओढ्यास जसा पूर यावा किंवा रेड्यांची जशी टक्कर माजावी, त्याप्रमाणें ज्याला तारुण्याची भुरळ चढलेली असते. ७५५. शरीराचा लठ्ठपणा नाहींसा होण्यास लागतो व शरीरांतील तेज कमी होण्यास लागतें व मस्तकास कांपरे सुटतें. ७५६. दाढी पांढरी होते, मान हालून 'नाहीं नाहीं' अशी निवारण्याची खूण करिते, तरी देखील जो प्रीय वस्तूंचा पसारा वाढवीत रहातो. ७५७ पुढें असलेला पदार्थ उरावर आदळेपर्यंत, आंधळा जसा पुढें काय आहे, हें पहात नाहीं अथवा डोळ्यांवर आलेल्या चिपड्याच्या योगानें (डोळे उघडत नाहींत, या सबबीवर अधिकच झोंप घेण्यास संधि सांपडते म्हणून) आळशी मनुष्य (चिळस येण्याऐवजीं अधिकच) संतुष्ट होतो. ७५८. अरे अर्जुना, त्याप्रमाणें आजचें तारुण्य भोगीत असतां, उद्यांचें येणारें म्हातारपण जो पहात नाहीं, तोच खरोखर अज्ञान आहे. ७५९. आंधळ्या माणसांकडे किंवा कुबड्या माणसांकडे पाहून त्यांस गर्वानें वेडावूं लागतो; पण असें म्हणत नाहीं कीं, माझीही उद्यां हीच अवस्था होईल. ७६०. आणि मरणाचें चिन्ह जें म्हातारपण, तें शरीरावर आलें, परंतु ज्याला तारुण्याची भ्रांति सुटत नाहीं; ७६१. तो पुरुष अज्ञानाचें घर आहे, हें बोलणें खरें मान. त्याचप्रमाणें अज्ञानाचीं आणखीं मोठीं लक्षणें ऐक. ७६२. तर वाघाच्या अरण्यांतून दैवयोगानें एक वेळां (सुरक्षितपणें) पोळ (बैल) चरून आला, त्या विश्वासानें जसा तो पोळ पुनः त्या अरण्यांत धांवतो. ७६३. (ज्या जागेंत) पुरलेल्या द्रव्यावर सर्प होता, अशा जागेंतून एकदां चुकून सुरक्षितपणें द्रव्य आणलें; एवढ्यावरून जो खास नास्तिक होतो, (म्हणजे पुरलेल्या द्रव्यावर सर्प असतो व तो द्रव्य घेऊं देत नाहीं, ही गोष्ट खोटी आहे असें मानतो.) ७६४. त्याप्रमाणें आरोग्य, हें एखादें दुसरे वेळीं चुकून मिळालेलें असलें, तर तेवढ्यावरच या शरीरांत रोग

लाहे । एथ रोग एक आहे । हें मानीना जो ॥ ६५ ॥ वैरिया नीद आली । आतां द्वंद्वें माझीं सरलीं । हें मानी तो सर्पिलीं । मुकला जेवीं ॥ ६६ ॥ तैसी आहारनिद्रेची उजरी । रोग निवांतु जोंवरी । तंव जो न करी । व्याधीचिंता ॥ ६७ ॥ आणि स्त्रीपुत्रादिमेळें । संपत्ति जंव जंव फळे । तेणें रजें डोळे । जाती जयाचे ॥ ६८ ॥ सवळेचि वियोगु पडैल । विळौनि विपत्ति येईल । हें दुःख पुढील । देखेना जो ॥ ६९ ॥ तो अज्ञान गा पांडवा । आणि तोही तोचि जाणावा । जो इंद्रियें अव्हासवा । चारी एथ ॥ ७७० ॥ वयसेचेनि उवायें । संपत्तीचेनि सावायें । सेव्यासेव्य जाये । सरकटितु ॥ ७१ ॥ न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी । चिंतूं नये तें विचारी । जयाची मती ॥ ७२ ॥ रिघे जेथ न रिघावें । मागे जें न घ्यावें । स्पर्शे जेथ न लागावें । आंग मन ॥ ७३ ॥ न वचावें तेथ जाये । न पाहावें तें जो पाहे । न खावें तें खाये । तेवींचि तोषे ॥ ७४ ॥ न धरावा तो संगु । न लगावें तेथ लागु । नाचरावा तो मार्गु । आचरे जो ॥ ७५ ॥ नायकावें तें आइके । न बोलावें तें भुंके । परि दोष होईल हें न देखे । प्रवर्ततां ॥ ७६ ॥ अंगा मनासि रुचि यावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे । जो करणेंयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥ ७७ ॥ परि पाप मज होईल । कां नरकयातना येईल । हें कांहींचि पुढील । देखेना जो ॥ ७८ ॥ तयाचेनि आंगलगें । अज्ञान जगीं दादुगें । जें सज्ञानाही संगें । झोंबों सके ॥ ७९ ॥ असो हें आइक । अज्ञानचिन्हें आणिक । जेणें तुज सम्यक । जाणवे तें ॥ ७८० ॥ तरी जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं । नवगंधकेसरीं । भ्रमरी जैशी ॥ ८१ ॥ साकरेचिया राशी । बैसली नुडे माशी । तैसेनि स्त्रीचित्त आवेशी । जयाचें मन ॥ ८२ ॥ ठेला बेडूक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं । ढोरु सबुडबुडीं । रुतला पंकीं ॥ ८३ ॥ तैसें घरींहूनि निघणें । नाहीं जीवितें मरणें । जया साप होऊनि असणें । भाटीं तिये ॥ ८४ ॥ प्रियोत्तमाचां कंठीं । प्रमदा घे आटी । तैशी जीवेंसी कोंपटी । धरूनि ठाके ॥ ८५ ॥ मधुरसादोषें । मधुकरी जचे जैसें । गृहसंगोपन तैसें । करी जो गा ॥ ८६ ॥ म्हातारपणीं जालें । माणिक एक विपायिलें । तयाचें कां जेतुलें । मातापितरां ॥ ८७ ॥ तेतुलेनि पाडें पार्था । घरीं जया प्रेम आस्था । आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ॥ ८८ ॥ महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगत । ठाके व्यवहारजात । जयापरी ॥ ८९ ॥ तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडोनियां सर्वभावें । कोण मी काय करावें । कांहीं नेणे ॥७९०॥ हानि लाज न देखे । परापवादु नाइके । जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ ९१ ॥ चित्त आराधी स्त्रियेचें । स्त्रियेचेनि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ॥ ९२ ॥ आपणपेंहीं शिणवी । इष्टमित्र दुरावी । मग कवडाचि वाढवी । लोभी जैसा ॥ ९३ ॥ तैसा दानपुण्यें खांची । गोत्रकुटुंबा वंची । परी गारी भरी स्त्रियेची । उणी हों नेदी ॥ ९४ ॥ पूजितीं दैवतें जोगावी । गुरूतें बोलें झकवी । मायबापां दावी । निदारपण ॥ ९५ ॥ स्त्रियेचां तरी विखीं । भोगुसंपत्ति अनेकीं । आणी वस्तु

म्हणून कांहीं एक आहे, ही गोष्ट जो मानीतच नाहीं. ७६५. शत्रूला झोंप लागली एवढ्यावरून जो असें मानतो कीं, आतां आपलें भांडणतंटे संपले, ( असें मानून जो स्वस्थ राहतो ) तो ज्याप्रमाणें आपल्या मुलांबाळांसह नाश पावतो. ७६६. त्याप्रमाणें आहार व निद्रा हीं जेथ-पर्यंत यथास्थित चालू आहेत व जोंपर्यंत रोग निवांत आहे, तोंपर्यंत जो रोगाची काळजी करीत नाहीं. ७६७. आणि स्त्रीपुत्रादिकांच्या संगतींत जसजशी संपत्ति अधिकाधिक मिळत जाते, तसतसा त्या संपत्तीच्या धुरानें ज्याच्यांतील विचार नाहींसा होतो. ७६८. या स्त्रीपुत्रादि व संपत्ति यांचा तात्काळ वियोग होईल व एका दिवसांत वाईट अवस्था येईल, हें पुढलें दुःख जो आगाऊ जाणत नाहीं. ७६९. अर्जुना, तो अज्ञानी आहे, आणि जो इंद्रियांना हवें तें ( बरेंवाईट न पाहतां ) विषय देतो, तो देखील तोच ( अज्ञानीच ) समजावा. ७७०. तारुण्याच्या उत्कर्षानें आणि संपत्तीच्या साह्यानें, जो सेवन करण्यास योग्य-अयोग्य, अशी निवड न करतां, सरसकट विषय सेवन करतो. ७७१. जें करूं नये तें करतो, न होणाऱ्या गोष्टी मनांत आणतो आणि ज्याविषयीं विचार करूं नये, त्याविषयींच ज्याची बुद्धि विचार करते. ७७२. जेथें प्रवेश करूं नये, तेथें प्रवेश करतो; जें घेऊं नये, तें मागतो व जेथें अंग किंवा मन लावूं नये, त्यांना जाऊन खेटतो. ७७३. जेथें जाऊं नये, तेथें जातो, जें पाहूं नये, तें पाहतो व खाऊं नये, तें खातो व ( त्या निषिद्ध गोष्टी केल्याबद्दल वाईट न वाटतां ) त्याविषयीं आनंद मानतो. ७७४. ज्याची संगति धरूं नये त्याची धरतो, जेथें संबंध करूं नये, तेथें संबंध करतो व ज्या मार्गांचें आचरण करूं नये, त्या मार्गांचें जो आचरण करतो. ७७५. जें ऐकूं नये, तें ऐकतो, जें बोलूं नये, तें मोठ्यानें बडबडतो, परंतु असें केल्यानें दोष घडेल, हें पाहात नाहीं. ७७६. शरीरास व मनास आवडेल, एवढें असलें म्हणजे झालें. मग तें कर्म करण्यास योग्य असो वा नसो, याचा तो कांहीं विचार करीत नाहीं व जो करावयाचें म्हणून भलतेंच करतो. ७७७. परंतु ( या-पासून ) मला पाप लागेल अथवा ( या योगानें ) नरक-यातना भोगाव्या लागतील, या पुढील होणाऱ्या गोष्टी जो कांहींच पहात नाहीं. ७७८. त्याच्या आश्रयानें अज्ञान जगांत बलाढ्य होतें व तें बलवान् झालेलें अज्ञान ज्ञानवान् पुरुषाबरोबरही झगडूं शकेल. ७७९. परंतु हें राहूं दे. आणखी कांहीं अज्ञानाचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. ज्या योगानें तुला त्या अज्ञानाची चांगली ओळख पटेल. ७८०. तर ताज्या, सुवासिक कमळाच्या केसरांत जशी भ्रमरी गुंतून राहते, त्याप्रमाणें घराच्या ठिकाणीं ज्याची पूर्ण प्रीति गुंतलेली पहाशील, ७८१. साखरेच्या राशीवर बसलेली माशी जशी उडत नाहीं ( अथवा ) त्याचप्रमाणें जसें एखाद्याचें मन स्त्रीच्या चित्ताला धरून बसतें. ( तेथून हालत नाहीं. ) ७८२. बेडूक जसा पाण्याच्या कुंडांत राहिलेला असतो अथवा चिलट जसें शेंबडांत गुंतलेलें असतें, अथवा गुरूं ( जसें ) चिखलांत पूर्णपणें फसतें, ७८३. त्याप्रमाणें जिवंतपणीं अथवा मेल्यावर, जो घरांतून बाहेर पडत नाहीं व जो ( मेल्यावर ) त्या जागेत सर्प होऊन असतो, ७८४. नवऱ्याच्या गळ्यांत जशी तरुण स्त्री मिठी घालते, त्याप्रमाणें जो आपल्या जीवाशीं झोंपडीला धरून राहतो. ७८५. पुष्पांतील मध मिळ-ण्याच्या हेतूनें मधमाशी जशी श्रम करते, तशा श्रमांनीं जो घराची जोपासना करतो. ७८६. म्हातारपणीं झालेलें एकुलतें एक पुत्ररत्न, त्याचें आईबापास जितकें प्रेम असतें, ७८७. अर्जुना, तितक्या मानानें ज्याला घराची आस्था व प्रेम असतें आणि जो स्त्रीवांचून दुसरें कांहीं मुळींच जाणत नाहीं. ७८८. ब्रह्मनिष्ठाचें अंतःकरण, ब्रह्मस्वरूपीं निमग्न झालें असतां, त्याचे जसे सर्व व्यापार बंद पडतात. ७८९. त्याप्रमाणें स्त्रीच्या शरीराच्या ठिकाणीं, जो जीवानें व सर्व भावांनीं आसक्त असतो व मी कोण व माझें कर्तव्य काय, हें कांहीं जो समजत नाहीं, ७९०. जो नुकसान, लाज पहात नाहीं, दुसऱ्यांनीं केलेल्या आपल्या निंदेकडे लक्ष देत नाहीं, ज्याच्या सर्व इंद्रियांची धांव एक स्त्रीविषयाकडेच असते. ७९१. ज्याप्रमाणें गारुड्याचें माकड गारुड्याच्या छंदाप्रमाणें वागणारें असतें, तसा जो स्त्रीच्या चित्ताचें आराधन करतो व जो स्त्रीच्या छंदानें नाचतो. ७९२. ज्याप्रमाणें एखादा लोभी पुरुष आपल्यालाही शिणवितो व इष्ट मित्रास दूर करतो आणि मग द्रव्यच वाढवितो; ७९३. त्याप्रमाणें ( स्त्रीची भर करण्याकरितां ) दान व पुण्य करण्याचें कमी करतो, तो कुटुंबांतील माणसांना फसवितो, परंतु स्त्रीची खांच भरीत असतो. तिची खांच भरण्याला कमी पडूं देत नाहीं. ७९४. पुजल्या जाणाऱ्या देवतांची ( बिगार टाळल्याप्रमाणें ) गंधफूल वाहून जेमतेम पूजा करतो, गुरूला ठकवितो आणि आईबापांना दरिद्रपण दाखवितो. ७९५. तथापि स्त्रीच्या विषयीं मात्र भोगांचीं अनेक ऐश्वर्यें ( साधनें ) व जी जी म्हणून चांगली वस्तु

निकी। जे जे देखे ॥ ९६ ॥ प्रेमाथिलेनि भक्तें । जैसेनि भजिजे कुळदैवतें । तैसा एकाग्रचित्तें । स्त्री जो उपासी ॥ ९७ ॥ साच आणि चोख । तें स्त्रियेसीचि अशेख । येरींविषयीं जोगावणूक । तेही नाहीं ॥ ९८ ॥ इयेतें हन कोणी देखैल । इयेसी वेखासें जाईल । तरि युगाचि बुडैल । ऐसें जया ॥ ९९ ॥ नायटेयांभेण । न मोडिजे नागांची आण । तैसी पाळी उणखुण । स्त्रियेची जो ॥ ८०० ॥ किंबहुना धनंजया । स्त्रीचि सर्वस्व जया । आणि तियेचिया जालियां- । लागीं प्रेम ॥ १ ॥ आणिकही जें समस्त । तेथिंचें संपत्तिजात । तें जीवाहूनि आप्त । मानी जो गा ॥ २ ॥ तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना तेणें बळ । हें असो केवळ । तो तेंचि रूप ॥ ३ ॥ आणि मातलिया सागरीं । मोकलिलिया तरी । लाटांचां येरझारीं । आंदोळे जेवीं ॥ ४ ॥ तेवीं प्रिय वस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे । तैसाचि अप्रियासवें । तळवटु घे ॥ ५ ॥ ऐसेनि जयाचां चित्तीं । वैषम्यसाम्याची वोखती । वाहे तो महामती । अज्ञान गा ॥ ६ ॥ आणि माझां ठायीं भक्ती । फळालागीं जया आर्ती । धनोद्देशें विरक्ती । नटणें जेवीं ॥ ७ ॥ कां कांताचां मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी । राहाटे जारेंसी । जावयालागीं ॥ ८ ॥ तैसा मातें किरीटी । भजती गा पाउटी । करूनि जो दिठी । विषो सूये ॥ ९ ॥ आणि भजिन्नलियासवें । तो विषो जरी न पवे । तरी सांडी म्हणे आघवें । टवाळ हें ॥ ८१० ॥ कुणब्रट कुळवाडी । तैसा आन आन देव मांडी । आदिलाची परवडी । वरी तया ॥ ११ ॥ तया गुरुमार्गा टेंके । जयाचा सुगरवा देखे । तरी तयाचा मंत्र शिके । येरु नेघे ॥ १२ ॥ प्राणिजातेंसी निष्ठुरु । स्थावरी बहु भरु । तेवींचि नाहीं एकसरु । निर्वाहो जया ॥ १३ ॥ माझी मूर्ति निफजवी । ते घराचां कोनीं बैसवी । आपण देवो देवी । यात्रे जाय ॥ १४ ॥ नीच आराधन माझें । काजीं कुळदेवता भजे । पर्वविशेषें कीजे । पूजा आना ॥ १५ ॥ माझें अधिष्ठान घरीं । आणि वोवसे आनाचे करी । पितृकार्यावसरीं । पितरांचा होय ॥ १६ ॥ एकादशीचां दिवसीं । जेतुला पाड आम्हांसी । तेतुलाचि नागांसी । पंचमीचां दिवशीं ॥ १७ ॥ चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये । चावदसी म्हणे माये । तुझाच वो दुर्गे ॥ १८ ॥ नित्य नैमित्तिकें कर्में सांडी । मग बैसे नवचंडी । आदित्यवारीं वाढी । भैरवां पात्रीं ॥ १९ ॥ पाठी सोमवार पावे । आणि बेलेंसी लिंगा धांवे । ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥ ८२० ॥ ऐसा अखंड भजन करी । उगा नसे क्षणभरी । आघवेनि गांवद्वारीं । अहेव जैसी ॥ २१ ॥ तैसेनि जो गा भक्तु । सैरा देखसी धांवतु । जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतार तो ॥ २२ ॥ आणि एकांतें चोखटें । तपोवनें तीर्थें तटें । देखोनि जो गा विटे । तोहि तोचि ॥ २३ ॥ जया जनपदीं सुख । गजबजेचें कवतिक । वानूं आवडे लौकिक । तोहि तोचि ॥ २४ ॥ आणि आत्मा गोचरु होये । ऐसी जे विद्या आहे । ते आइकोनि डौर वाहे । विद्वांसु जो ॥ २५ ॥ उपनिषदांकडे न वचे ।

दिसेल, ती ती आणतो. ७९६. प्रेमळ भक्तानें जसें कुलदेवतेला भजावें, त्याप्रमाणें जो स्त्रीची उपासना एकाग्रचित्तानें करतो. ७९७. जें खरें चांगलें असेल, तें सर्व स्त्रीला देतो व कुटुंबांतील इतर माणसांची नुसती जोगावणूक ( देहरक्षण ) देखील करीत नाहीं. ७९८. हिला कोणी ( वांकड्या दृष्टीनें ) पाहील, हिच्याशीं कोणी विरुद्ध वागेल, तर युगांतच होईल असें ज्याला वाटतें. ७९९. ज्याप्रमाणें नायट्यांच्या भयानें देवींची शपथ मोडीत नाहींत, त्याप्रमाणें जो स्त्रीचें मनोगत पाळतो. ८००. अर्जुना, फार काय सांगावें ! ज्याचें सर्वस्व कायतें एक स्त्रीच असते आणि तिच्यापासून झालेल्या ( मुलां )वर ज्याचें प्रेम असतें. ८०१. अरे तिची जी आणखीही सर्व चीजवस्तु असेल ती जो जीवापेक्षां अत्यंत जवळची मानतो. ८०२. तो पुरुष अज्ञानाचें मूळ आहे. अज्ञानाला त्याच्या योगानें बळ असतें, हें बोलणें राहूं दे. ( फार काय सांगावें ! ) तो अज्ञानाची मूर्तीच आहे. ८०३. आणि खवळलेल्या समुद्रांत नाव मोकळी सोडली असतां, जशी ती लाटांच्या येण्याजाण्यानें झोंके खात असते. ८०४. त्याप्रमाणें आवडती वस्तु प्राप्त झाली असतां, जो सुखानें फुगतो व त्याचप्रमाणें नावडती वस्तु प्राप्त झाल्याबरोबर जो संकोच पावतो. ८०५. याप्रमाणें ज्याच्या अंतःकरणांत ( अप्रियवस्तुप्राप्तीनें ) दुःख व ( प्रियवस्तुप्राप्तीनें ) सुख यांची चिंता असते, तो, हे महामति अर्जुना, अज्ञान आहे. ८०६. आणि माझ्या ठिकाणीं ज्याची भक्ति असते, पण फलाच्या उत्कट इच्छेनें असते, ती कशी तर जसें धनाच्या हेतूनें वैराग्याचें सोंग आणावें. ८०७. अथवा जाराकडे जाण्याकरितां जारिणी स्त्री जशी नवऱ्याच्या अंतःकरणांत शिरून वागते. ८०८. अर्जुना, त्याप्रमाणें माझ्या भजनाची पायरी करून, जो दृष्टीमध्यें विषय ठेवतो ( म्हणजे जो विषयप्राप्तीच्या इच्छेनें माझें भजन करतो. ) ८०९. आणि ( मला ) भजल्याबरोबर, तो ( इच्छित ) विषय जर मिळाला नाहीं, तर तो हें भजन टाकतो, व सर्व खोटें आहे, असें तो म्हणतो. ८१०. अडाणी शेतकरी जसा नवीन नवीन उदीम करतो, त्याप्रमाणें हा अज्ञानी पुरुष रोज नव्या नव्या देवांची स्थापना करतो व पहिल्याप्रथम जेवढ्या उत्सुकतेनें पहिल्याची पूजा करतो, तितक्याच जोरानें पुन्हा दुसऱ्याचीही करतो. ८११. ज्या गुरूचा जास्त थाटमाट पाहतो, त्या गुरूच्या संप्रदायावर विश्वास ठेवतो आणि त्याचा मंत्र घेतो, दुसऱ्याचा घेत नाहीं. ८१२. सर्व प्राण्यांशीं तो निर्दयपणानें वागतो व पाषाणाच्या प्रतिमेवर त्याचा पुष्कळ भर असतो. त्याचप्रमाणें ज्याच्या वागण्यांत एकनिष्ठता नसते. ८१३. माझी मूर्ति तयार करतो आणि तिला घराच्या कोपऱ्यांत बसवितो व आपण देवतेच्या यात्रेला जातो. ८१४. दररोज माझें पूजन करतो व कांहीं विशेष प्रसंगीं कुलदेवतेला भजतो व कांहीं विशेष पर्वकालीं तिसऱ्याच देवतांची पूजा करतो. ८१५. घरांत माझी स्थापना असतांनाच, दुसऱ्या देवतांचीं व्रतें करितो आणि पितृकार्याचे वेळीं ( श्राद्ध, पक्ष वगैरे काळीं ) पितरांचा ( भक्त ) होतो. ८१६. एकादशीच्या दिवशीं आम्हाला जितका मान ( देतो ); तितकाच नागपंचमीच्या दिवशीं नागाला मान देतो. ८१७. चतुर्थी नेमकी उगवल्याबरोबर तो गणपतीचाच ( उपासक ) होतो आणि चतुर्दशीच्या दिवशीं 'आई दुर्गे ( देवी ) मी तुझा ( भक्त ) आहें' असें म्हणतो. ८१८. नित्य कर्में व नैमित्तिक ( श्राद्धादिक ) कर्में टाकतो आणि मग नवचंडीच्या ( नवरात्रांतील देवीच्या ) अनुष्ठानास बसतो व रविवारीं बहिरोबाला त्याच्या पत्तरांत नैवेद्य वाढतो. ८१९. नंतर सोमवार आला कीं, बेलासह ( बेलास घेऊन ) शिवलिंगाकडे धावतो, ( म्हणजे शिवाची पूजा करतो. ) याप्रमाणें जो एकटाच सर्व देवांची कशीबशी उपासना करतो. ८२०. वेशींत पाल ठोकून बसलेली वेश्या, गांवांतील सर्व लोकांचेंच कुटुंब असल्यामुळें त्या सर्वांच्या योगानें अखंड सौभाग्यवतीच राहते, त्याचप्रमाणें जो, असतलि तेवढ्या देवांची एकसारखी भक्ति करतो व क्षणभर रिकामा रहात नाहीं ( व म्हणूनच ज्याचा भक्तपणा कायम असतो. ) ८२१. त्याप्रमाणें जो भक्त मनानें वाटेल तसा धांवणारा तूं पाहशील, तो अज्ञानाचा मूर्तिमंत अवतार आहे, असें समज. ८२२. आणि पवित्र एकांत स्थानें, तपोवनें, तीर्थांचीं स्थानें व पवित्र नद्यांचे किनारे, ह्यांस पाहून ज्याला कंटाळा येतो, तो देखील अज्ञानीच आहे. ८२३. ज्याला लोकसमाजांत सुख वाटतें व लोकांच्या गलबल्याचें कौतुक वाटतें व आपल्या लौकिकाचें वर्णन ज्याला आवडतें, तोहि तोच ( अज्ञानी ) आहे. ८२४. आणि आत्म्याचा साक्षात्कार होईल, अशी जी विद्या (ब्रह्मविद्या) आहे ती ऐकून जो (अध्यात्मशास्त्रावांचून इतर पढलेला) विद्वान त्या ब्रह्मविद्येची निंदा करतो. ८२५. जो उपनिषदाकडे जात नाहीं, ज्याला योगशास्त्र आवडत

योगशास्त्र न रुचे । अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं ॥ २६ ॥ आत्मचर्चा एकी आथी । ऐसियें बुद्धीची भिंती । पाडूनि जयाची मती । वोढाळ जाहली ॥ २७ ॥ कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें । ज्योतिषीं तो म्हणे । तैसेंचि होय ॥ २८ ॥ शिल्पीं अति निपुण । सूपकर्मीही प्रवीण । विधि आथर्वण । हातीं आथी ॥ २९ ॥ कोकीं नाहीं ठेलें । भारत तरी म्हाणितलें । आगम आफाविले । मूर्त होती ॥ ८३० ॥ नीतिजात सुझे । वैद्यकही बुझे । काव्यनाटकीं दुजें । चतुर नाहीं ॥ ३१ ॥ स्मृतींची चर्चा । दंशु जाणे गारुडियाचा । निघंटु प्रज्ञेचा । पाइकी करी ॥ ३२ ॥ व्याकरणीं चोखडा । तर्कीं अतिगाढा । परि एक अध्यात्मज्ञानीं फुडा । जात्यंधु जो ॥ ३३ ॥ तें एकवांचूनि आघवां शास्त्रीं । सिद्धांतनिर्माणधात्री । परि जळो तें मूळनक्षत्रीं । न पाहें गा ॥ ३४ ॥ मोराचां आंगीं असोसें । पिसें आहाति डोळसें । परी एकली दिठी नसे । तैसें तें गा ॥ ३५ ॥ जरी परमाणूएवढें । संजीवनीमूळ जोडे । तरी बहु काय गाडे- । भरणें येरें ॥ ३६ ॥ आयुष्येंवीण लक्षणें । सिसेंवीण अळंकरणें । वोहरेंवीण वाधावणें । तो विटंबु गा ॥ ३७ ॥ तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण । अध्यात्म-ज्ञानेंविण । एकलेनी ॥ ३८ ॥ यालागीं अर्जुना पाहीं । अध्यात्मज्ञानाचां ठायीं । जया नित्यबोधु नाहीं । शास्त्रमूढा ॥ ३९ ॥ तया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बीं विरूढलें । तयाचें वित्पत्तित्व गेलें । अज्ञानवेलीं ॥ ८४० ॥ तो जें जें बोले । तें अज्ञानचि फुललें । तयाचें पुण्य जें फळलें । तें अज्ञानचि गा ॥ ४१ ॥ आणि अध्यात्मज्ञान कहीं । जेणें मानिलेंचि नाहीं । तो ज्ञानार्थु न देखे काई । हें बोलावें असे ॥ ४२ ॥ ऐलीचि थडी न पवतां । पळे जो मागौता । तया पैलद्वीपीची वार्ता । काय होय ॥ ४३ ॥ कां दारवंठांचि जयाचें । शीर रोंविलें खांचे । तो केवीं परिवरींचें । ठेविलें देखे ॥ ४४ ॥ तेवीं अध्यात्मज्ञानीं जया । अनोळख धनंजया । तया ज्ञानार्थु देखावया । विषो काई ॥ ४५ ॥ म्हणोनि आतां विशेषें । तो ज्ञानाचें तत्त्व न देखे । हें सांगावें आंखेंलेखें । न लगे तुज ॥ ४६ ॥ जेव्हां सगर्भ वाढिलें । तेव्हांचि पोटींचें धालें । तैसें मागिलें पदें बोलिलें । हेंचि होय ॥ ४७ ॥ वांचूनियां वेगळें । रूप करणें हें न मिळे । येइं अवंतिलें आंधळें । तें दुजेनसीं ये ॥ ४८ ॥ एवं इये उपरतीं । ज्ञानचिन्हें मागुती । अमानित्वादि प्रभृति । वाखाणिलीं ॥ ४९ ॥ जे ज्ञानपदें अठरा । केलियां येरी मोहरां । अज्ञान या आकारा । सहजें येती ॥ ८५० ॥ मागां श्लोकाचेनि अर्धार्धें । ऐसें सांगितलें मुकुंदें । ना उफराटीं इयें ज्ञानपदें । तेंचि अज्ञान ॥ ५१ ॥ म्हणोनि इया वाहणी । केली म्यां उपलवणी । वांचूनि दुधा मेळऊनि पाणी । फार कीजे ॥ ५२ ॥ तैसें जी न बडबडी । पदाची कोर न

नाहीं आणि अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं ज्याचें लक्षच लागत नाहीं; ८२६. आत्मनिरूपण म्हणून कांहींएक महत्त्वाची गोष्ट आहे, अशा समजुतीची भिंत (मर्यादा) पाडून ज्याची बुद्धि स्वैर भटकणारी झाली आहे. ८२७ तो सर्व कर्मकांड जाणतो; पुराणें त्याला तोंडपाठ आहेत आणि जो ज्योतिषशास्त्रांत इतका निष्णात आहे कीं, तो भविष्य करील तसेंच घडतें. ८२८. कलाकौशल्याच्या कामांत अति निपुण असतो; पाकक्रियेंत अति प्रवीण असतो व अथर्वणवेदाचे विधि (मंत्रशास्त्राचे विधि-जारण, मारण, उच्चाटन वगैरे) त्यास हस्तगत झालेले असतात. ८२९. कामशास्त्रांत त्यास कांहीं जाणावयाचें राहिलें नाहीं, भारत तर त्यास पाठ असतें व मंत्रशास्त्रहीं मूर्तिमंत त्याच्या स्वाधीन झालेलें असतें ८३०. नीतिसंबंधीचीं सर्व शास्त्रें त्यास अवगत असतात, वैद्यशास्त्र तो जाणतो व काव्यांत व नाटकांत त्याहून दुसरा कोणी चतुर नाहीं. ८३१. स्मृतीचा विचार त्याला कळतो, इंद्रजाल विद्येचें मर्म त्याला कळतें व वैदिक शब्दांच्या कोशाला तो आपल्या बुद्धीचा चाकर करतो. ८३२. तो व्याकरणशास्त्रांत अति प्रवीण, तर्कशास्त्रांत फार पटाईत असतो, परंतु एक अध्यात्मज्ञानांत जो खरोखर जन्मांध आहे. ८३३. त्या एक अध्यात्मज्ञानावांचून इतर सर्व शास्त्रांच्या सिद्धांतास निर्माण होण्याची तो पृथ्वीच आहे; (असा जरी तो असला) तरी पण त्याच्या त्या सर्व ज्ञानाला आग लागो. मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलाला जसें आईबापांनीं पाहूं नये, तसें तूं त्याच्याकडे पाहूं नकोस. ८३४. मोराच्या अंगावर जशी डोळेवाली पिसें पुष्कळ असतात, परंतु मोर ज्या आपल्या दृष्टीनें पाहतो ती, एकटी दृष्टि त्या मोरास जर नसली, तर त्या पिसावरील डोळ्यांचा जसा कांहीं एक उपयोग नाहीं, त्याप्रमाणें अर्जुना, एक अध्यात्मज्ञानावांचून त्याच्या इतर ज्ञानाचा कांहीं उपयोग नाहीं ८३५. परमाणूएवढें जर संजिवनी वनस्पतीचें मूळ मिळालें तर इतर पुष्कळशा गाडेभरुन असलेल्या वनस्पतीच्या मुळ्या काय करावयाच्या आहेत? ८३६. ज्याप्रमाणें आयुष्याशिवाय इतर सर्व सामुद्रिक उत्तम चिन्हें आहेत अथवा शीर नसलेल्या केवळ धडास जसे अलंकार घालावेत अथवा नवरानवरीशिवाय जसा वर्धावा काढावा, ही जशी केवळ विटंबना आहे. ८३७. त्याप्रमाणें एक अध्यात्मज्ञानाशिवाय तें इतर सर्व शास्त्राचें ज्ञान पूर्णपणें अप्रमाण आहे असें समज. ८३८ याकरितां अर्जुना, असें पहा कीं, ज्या शास्त्रमूढाला अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं नित्य जागृति नाहीं, ८३९. त्याला शरीर जें प्राप्त झालें, तें अज्ञानाच्या बीजाचा अंकूरच होय आणि त्याची विद्वत्ता ही अज्ञानाचा वेल (विस्तार) होय. ८४०. तो जें जें बोलतो, तें फुललेलें अज्ञानाचें झाडच आहे व अरे, त्याचीं जीं पुण्यकर्में आहेत, तें अज्ञानच फळास आलेलें आहे. ८४१. आणि ज्यानें अध्यात्मज्ञानाला कधींच मानलें नाहीं, तो ज्ञानाचा विषय जें ब्रह्म त्यास पहात नाहीं, हें सांगावयास पाहिजे काय? ८४२. नदीच्या अलीकडच्या कांठाला आला नाहीं, तोंच जो माघारीं पळून जातो, त्याला नदीच्या पलीकडल्या बेटाची खबर काय ठाऊक असणार? ८४३. अथवा घराच्या दाराच्या उंबऱ्यांतच ज्याचें मस्तक कांपून खाचेंत पुरलेलें आहे, तो घरांत ठेवलेले पदार्थ कसे पाहील? ८४४. त्याप्रमाणें अर्जुना, अध्यात्मज्ञानाशीं ज्याचा मुळीच परिचय नाहीं, त्याला ज्ञानाचा अर्थ जें ब्रह्म, तें समजण्याला विषय होईल काय? ८४५. म्हणून आतां तो ज्ञानाचें तत्त्व पाहात नाहीं, हें तुला आंकडे मांडून लिहून विशेष सांगावयास नको. ८४६. जेव्हां गरोदर स्त्रीला जेवावयास वाढावें, तेव्हांच तिच्या पोटांतलें मूल तृप्त होतें; (त्या मुलास निराळें वाढणें नको.) त्याप्रमाणें वरती ज्ञानाचें जें वर्णन केलें गेलें, त्यांत अज्ञानाच्या लक्षणाचा अंतर्भाव होत आहे. ८४७. वास्तविक पाहिलें तर मागें वर्णन केलेल्या पदाहून निराळें स्पष्टीकरण करण्यास नको. आंधळा मनुष्य जेवावयाला बोलविला असतां तो दुसऱ्या डोळस वाटाड्याला बरोबर घेऊन यावयाचा; तसेंच हेंहि आहे असें समज. ८४८. याप्रमाणें ही 'अमानित्वादी' ज्ञानाचीं चिन्हें पुनः उलट रीतीनें सांगितलीं. ८४९. कारण कीं ज्ञानाची अठरा पदें उलट फिरविलीं (उदाहरणार्थ अमानित्वाच्या उलट मानित्व वगैरे) असतां, अज्ञानाचीं लक्षणें सहजच सिद्ध होतात. ८५०. मागें (या अध्यायाच्या) अकराव्या श्लोकाच्या उत्तरार्धाच्या दुसऱ्या अर्ध्यामध्यें श्रीमुकुंदानें असें सांगितलें कीं, हीं ज्ञानपदें उलट केलीं कीं तेंच अज्ञान होय! ८५१. म्हणून अशा रीतीनें ('अज्ञानं यदतोऽन्यथा' या पदाचें) मीं विस्तारपूर्वक वर्णन केलें; नाहीं तर दुधांत पाणी मिसळून जसें दूध वाढवावयाचें ८५२. महाराज, त्याप्रमाणें (पाणी घालून दूध वाढविल्याप्रमाणें) मी बडबडत नाहीं. श्लोकांतील पदांची हद्द मी सोडीत नाहीं. परंतु मूळश्लोकांत जें थोडक्यांत

सांडीं । परी मूळध्वनींचिये वाढी । निमित्त जाला ॥ ५३ ॥ तंव श्रोते म्हणती राहें । कें परिहारा ठावो आहे । विहिसी कां वायें । कविपोषका ॥ ५४ ॥ तूतें श्रीमुरारी । म्हणितलें प्रगट करीं । जे अभिप्राय गव्हरीं । झांकिले आम्हीं ॥ ५५ ॥ तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त । हेंहीं म्हणतां चित्त । दाटैल तुझें ॥ ५६ ॥ म्हणौनि असो हें न बोलें । परि साविया गा तोषलों । जे ज्ञानतरिये मेळविलों । श्रवणसुखाचिये ॥ ५७ ॥ आतां इयावरी । जे तो श्रीहरी । बोलिला तें करीं । कथन वेगां ॥ ५८ ॥ इया संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । जी अवधारा तरी ऐसें । बोलिलें देवें ॥ ५९ ॥ म्हणती तुवां पांडवा । हा चिन्हसमुचयो आघवा । आयकिला तो जाणावा । अज्ञानभागु ॥ ८६० ॥ इया अज्ञानविभागा । पाठी देऊनि पैं गा । ज्ञानविखीं चांगा । दृढा होइजे ॥ ६१ ॥ मग निर्वाळिलेनि ज्ञानें । ज्ञेय भेटैल मनें । तें जाणावया अर्जुनें । आस केली ॥ ६२ ॥ तंव सर्वज्ञांचा रावो । म्हणे जाणोनि तयाचा भावो । परिसें ज्ञेयाचा अभिप्रावो । सांगों आतां ॥ ६३ ॥

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते । अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तुतें येणेंचि कारणें । जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ॥ ६४ ॥ आणि जाणितलेयावरौतें । कांहीं करणें नाहीं जेथें । जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ॥ ६५ ॥ जें जाणितलेयाचिसाठीं । संसाराची काढूनियां कांटी । जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाचां ॥ ६६ ॥ तें ज्ञेय गा ऐसें । आदि जया नसे । परब्रह्म आपैसें । नांव जया ॥ ६७ ॥ जें नाहीं म्हणों जाइजे । तंव विश्वाकार देखिजे । आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ॥ ६८ ॥ रूप वर्ण व्यक्ती । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती । तरि कोणें कैसें आथी । म्हणावें पां ॥ ६९ ॥ आणि साचचि जरी नाहीं । तरि महदादिक कोणें ठाईं । स्फुरत कैचें काई । तेणेंवीण असे ॥ ८७० ॥ म्हणोनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली । विचारासीं मोडली । वाट जेथें ॥ ७१ ॥ जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु ॥ ७२ ॥

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

आघवांचि देशीं काळीं । नव्हतां देशकाळांवेगळी । जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ॥ ७३ ॥ तयातें याकारणें । विश्वबाहु ऐसें म्हणणें । जें सर्वांचि सर्वपणें । सर्वदा करी ॥ ७४ ॥ आणि समस्तांही ठायां । एके काळीं धनंजया । आलें असे म्हणोनि जया । विश्वांघ्रि नांव ॥ ७५ ॥ पैं सवितया आंग डोळे । नाहींत वेगळवेगळे । तैसें सर्वद्रष्टें सकळें । स्वरूपें जें ॥ ७६ ॥

सांगितलें, त्याचें विस्तारपूर्वक वर्णन करण्यास मी निमित्त झालों, ८५३. तेव्हां श्रवणास बसलेली संतमंडळी म्हणतात, थांब; परिहाराला जागा कोठें आहे? हे कविपोषका, (तूं) व्यर्थ कां भितोस? ८५४. "जे अभिप्राय आम्ही गीतारूपी गुहेंत गुप्त ठेविले होते, ते तूं प्रगट कर," असें तुला श्रीमुरारींनीं सांगितलें. ८५५. देवाचे गुप्त अभिप्राय तूं प्रगट करावेस, हें जें देवाचें मनोगत, तें तूं आपल्या वक्तृत्वानें (अज्ञानाचीं लक्षणें सांगण्यानें) स्पष्ट दाखवीत आहेस; असें म्हणण्यानें देखील तुझें चित्त (संतमंडळी माझी स्तुति करीत आहेत असें तुला वाटून) त्या भारानें दडपून जाईल. ८५६. म्हणून हें राहूं दे. आम्ही हें बोलत नाहीं; परंतु अरे, आम्हांस सहज संतोष झाला आहे. कारण कीं, श्रवणसुखाच्या ज्ञानरूपी नौकेचा तूं आम्हांस योग करून दिला आहेस. ८५७. तर आतां यानंतर तो श्रीहरि जें बोलला, तें लवकर सांग. ८५८. असें संतांनीं सांगितल्याबरोबर निवृत्तिदास (ज्ञानेश्वरमहाराज) म्हणाले कीं, तर महाराज, ऐका, देव असें म्हणाले. ८५९. देव म्हणतात, अर्जुना, हा जो तूं सर्व लक्षणांचा समुदाय ऐकलास तो अज्ञानाचा भाग आहे असें समज. ८६०. अर्जुना, या अज्ञानभागाकडे पाठ करून (या अज्ञानभागाचा त्याग करून) ज्ञानाविषयीं चांगला दृढ हो. ८६१. मग या शुद्ध ज्ञानाच्या योगानें मनाचा ज्या ज्ञेयांत (ब्रह्मवस्तूंत) प्रवेश होईल. तें ज्ञेयस्वरूप जाणण्याची अर्जुनानें इच्छा केली. ८६२. तेव्हां सर्वज्ञांचे राजे, जे श्रीकृष्ण, ते अर्जुनाचा अभिप्राय जाणून म्हणतात. आतां ज्ञेयाचें स्वरूप तूं ऐक, आम्ही तुला सांगतों. ८६३.

जें जाणलें असतां (मनुष्य) अमृतत्व पावतो, तें जें ज्ञेय, तें मी सांगतों (तें हें—) आदिरहित परब्रह्म होय. तें सतही नाहीं व असतही नाहीं असें (ज्ञाते) म्हणतात. १२.

तर ब्रह्माला ज्ञेय म्हणावयाचें, तें एवढ्याचकरितां कीं, तें (ब्रह्म) ज्ञानावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायांनीं जाणलें जात नाहीं. ८६४. आणि जें ब्रह्म जाणल्यावर कांहींच करावयाचें राहात नाहीं व ज्याचें ज्ञान जाणणाराला ज्ञेयस्वरूप करतें. ८६५. जें ज्ञेयस्वरूप जाणल्यामुळेंच संसाराचें कुंपण काढून टाकून (संसाराचा निरास करून) नित्यानंदाच्या पोटांत जिरून जावें (म्हणजे नित्यानंदरूप व्हावें.) ८६६. अर्जुना, तें ज्ञेय असें आहे कीं, ज्याला आरंभ नाहीं व ज्याला परब्रह्म असें स्वभावतः नांव आहे. ८६७. जें नाहीं म्हणावयाला जावें, तर जें विश्वाच्या आकारानें दिसतें आणि तें ब्रह्म विश्वच आहे, असें म्हटलें, तर विश्व हा मिथ्याभास आहे. ८६८. त्या ब्रह्माच्या ठिकाणीं रूप, रंग व आकार, हीं नाहींत व दृश्य (पाहण्याचा विषय) व द्रष्टा (पाहणारा) ही स्थिति नाहीं. असें असल्यामुळें तें आहे, हें कोणीं व कसें म्हणावें? ८६९. आणि (असें आहे म्हणून) जर तें खरोखरच नाहीं असें म्हणावें, तर महत्तत्त्वादिक कोणाच्या ठिकाणीं स्फुरतात? व त्याच्यावांचून कोठलें काय आहे? (त्याच्यावांचून दुसरें कांहींच नाहीं.) ८७०. म्हणून जें (ब्रह्म) पाहून, 'आहे नाहीं' ही भाषा मुकी झाली (जें आहे म्हणतां येत नाहीं व जें नाहीं म्हणतां येत नाहीं) व ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं विचाराची वाट मोडली आहे (ज्याच्या संबंधानें कांहीं विचार करतां येत नाहीं.) ८७१. डेरा, घागर व परळ यामध्यें माती जशी त्या त्या आकारानें असते, त्याप्रमाणें जी वस्तु (ब्रह्मवस्तु) सर्व जगतांत सर्व पदार्थ होऊन राहिली आहे. ८७२.

त्याचे हस्तपाद सर्वत्र आहेत, (ते विश्वबाहु व विश्वांघ्रि आहे) त्याचे नेत्र–शिर–मुख सर्वत्र आहेत, (तें विश्वतश्चक्षु, विश्वमूर्धा व विश्वतोमुख आहे,) त्याचे कान सर्वत्र आहेत, (त्यास सर्व ऐकूं येतें); (याप्रमाणें) तें विश्वामध्यें सर्वाला व्यापून राहिलें आहे. १३.

सर्व देशांमध्यें व सर्व कालांमध्यें, देशकालाहून जी वस्तु वेगळी न होतां, जी क्रिया स्थूल व सूक्ष्माकडून (देहाकडून व अंतःकरणाकडून) होते, तेच (ती क्रियाच) ज्याचे (ब्रह्माचे) हात आहेत. ८७३. या कारणास्तव त्या वस्तूला 'विश्वबाहु' असें म्हटलेलें आहे. कारण कीं, ती वस्तु सर्व होऊन सर्व काळ सर्वच करते. ८७४. आणि सर्व ठिकाणीं एकाच कालीं तें (ब्रह्म) आहे; म्हणून अर्जुना, त्यास 'विश्वांघ्री' (ज्याचे चरण सर्वत्र आहेत असा) हें नांव आहे. ८७५. जसें सूर्याला अंग व डोळे, हे वेगळे वेगळे नाहींत, तशी जी वस्तु, ही पदार्थांच्या स्वरूपानें असल्यामुळें ती सर्वांस पाहणारी आहे. ८७६.

म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूचां ठायीं पक्षु । बोलावया दक्षु । जाहला वेदु ॥ ७७ ॥ जें सर्वांच्या शिरावरी । जे नित्य नांदे सर्वांपरा । ऐसिये स्थितीवरी । विश्वमूर्धा म्हणिपे ॥ ७८ ॥ पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशनीं जैसें देख । तैसें सर्वपणें अशेख । भोक्तें जें ॥ ७९ ॥ यालागीं तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था । आली वाक्पथा । श्रुतीचिया ॥ ८० ॥ आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे संलग्न । तैसे शब्दजातीं कान । सर्वत्र जया ॥ ८१ ॥ म्हणोनि आम्ही तयातें । म्हणों सर्वत्र आइकतें । एवं जें सर्वातें । आवरूनि असे ॥ ८२ ॥ एऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती । तयाचिये व्याप्ती । रूप केलें ॥ ८३ ॥ वांचूनि हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ कें आहे । सर्व शून्यत्वाचा न साहे । निष्कर्षु जें ॥ ८४ ॥ पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रासिजत असे ऐसें कळे । परि ग्रसितें ग्रासावेगळें । आहे काई ॥ ८५ ॥ तैसें साचाचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक । परि बोलावया नावेक । करावें लागे ॥ ८६ ॥ पैं शून्य जें दावावें जाहलें । तें बिंदुलें एक पाहिजे केलें । तैसें अद्वैत सांगावें बोलें । तें द्वैत कीजे ॥ ८७ ॥ एऱ्हवीं तरी पार्था । गुरुशिष्यसत्पथा । आडळु पडे सर्वथा । बोल खुंटे ॥ ८८ ॥ म्हणोनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैतीं । निरूपणाची वाहती । वाट केली ॥ ८९ ॥

सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् । असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

तेंचि आतां अवधारीं । इयें नेत्रगोचरें आकारीं । तें ज्ञेय जियापरी । व्यापक असे ॥ ८९० ॥ तरी तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं आकाश जैसें । पटीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं ॥ ९१ ॥ उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकीं । दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥ ९२ ॥ कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी । शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं ॥ ९३ ॥ किंबहुना जैसें पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा । तैसें जें या सर्वा । सर्वांगीं असे ॥ ९४ ॥ परी रवेपणामाजिवडे । तंव रवा ऐसे आवडे । वांचूनि सोनें सांगडें । सोनया जेवीं ॥ ९५ ॥ पैं गा वोघुचि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा । वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे कीं ॥ ९६ ॥ घटाकारें वेंटाळें । तेथ नभ गमे वाटोळें । मठीं तरी चौफळें । आयें दिसे ॥ ९७ ॥ परि ते अवकाश जैसे । नोहेजतीचि कां आकाशें । जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥ ९८ ॥ मन मुख्य इंद्रियां । सत्त्वादि गुणां ययां- । सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥ ९९ ॥ परि पैं गुळाची गोडी । नोहे बांधया सांगडी । तैसीं गुण इंद्रियें फुडीं । नाहीं तेथ ॥ ९०० ॥ अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परि क्षीराचि नोहे जैसें । कपिध्वजा ॥ १ ॥ तैसें

म्हणून ‘ विश्वतश्चक्षु ’ ( ज्याला सर्वत्र नेत्र आहेत असा ) असा हा प्रकार, नेत्ररहिताच्या ठिकाणीं, बोलण्यास वेद तयार झाला. ८७७. जें सर्वांच्या मस्तकांवर नित्य सर्व प्रकारानें नांदत आहे, अशी स्थिति असल्यामुळें, त्यास ‘ विश्वमूर्धा ’ ( सर्वत्र मस्तकें असलेला ) असें म्हटलें जातें. ८७८. अर्जुना, असें पहा कीं, अग्नीच्या ठिकाणीं जसें अग्नीचें स्वरूप, तेंच मुख असतें, तसें जें ( ब्रह्म ) सर्व अंगानें सर्व भोगीत आहे. ८७९. या कारणानें अर्जुना, त्याला ‘ विश्वतोमुख ’ ( म्हणजे ज्याला सर्वत्र मुखें आहेत असा ) हा प्रकार श्रुतीच्या बोलण्यांत आला. ८८०. आणि जसें आकाश सर्व वस्तूंत मिळून आहे, त्याप्रमाणें ज्याला सर्वत्र शब्दमात्राच्या ठिकाणीं कान आहेत. ८८१. म्हणून आम्ही त्यास ‘ सर्व ठिकाणीं ऐकणारे ’ असें म्हणतों. याप्रमाणें जें सर्व पदार्थमात्रांस व्यापून आहे. ८८२. हे बुद्धिवान् अर्जुना, सहज विचार करून पाहिलें तर ‘ विश्वतश्चक्षु ’ या श्रुतीनें त्या वस्तूच्या व्याप्तीचें वर्णन केलें. ८८३. एऱ्हवीं ब्रह्म हें सर्व शून्यपणाचा शेवट आहे, हाही सिद्धांत ज्या ठिकाणीं सहन होत नाहीं, त्या ठिकाणीं ( ब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं ) हात, पाय, डोळे हें बोलणें कोठें आहे ? ८८४. एका लाटेनें दुसऱ्या लाटेला गिळून टाकलें असें कळतें (वाटतें), परंतु तेथें ग्रासणारें हें, ग्रासिलें जाणाऱ्याहून वेगळें आहे काय ? ८८५. त्याप्रमाणें खरोखर जें एक आहे, तेथें व्याप्य ( व्यापलें जाणारें ) व व्यापक ( व्यापणारें ) कोठें आहे ? परंतु बोलण्याकरितां व्याप्य व व्यापक असा भेद क्षणभर करावा लागतो. ८८६. शून्य ( कांहीं नाहीं ) हें जेव्हां दाखवावयाचें असतें, तेव्हां एक बिंदुलें ( शून्य म्हणजे कांहीं नाहीं, हें दाखविणारी आकृति ) करावें लागतें; त्याप्रमाणें, अद्वैत जेव्हां शब्दांनीं सांगावयाचें असतें, तेव्हां द्वैत करावें लागतें. ८८७. अर्जुना, अद्वैताचें वर्णन करण्याकरितां द्वैत केलें, नाहीं तर गुरुशिष्यांच्या सन्मार्गाला ( संप्रदायाला ) पूर्णपणें अडथळा येईल व बोलणेंच खुंटेल. ८८८. अर्जुना, म्हणून श्रुतीनें द्वैताच्या साहाय्यानें, अद्वैताच्या ठिकाणीं, वर्णन करण्याचा मार्ग मोकळा करून दिला. ८८९.

सर्व चक्षुआदि इंद्रियें व ( सत्त्वादि ) गुण यांच्या आकारानें तें भासतें (असें दिसतें), पण तें (स्वतः) सर्व इंद्रियांनीं विरहित आहे. तें ( सर्वत्र ) असक्त ( आहे ), तथापि सर्वभृत् ( सर्व धारण करणारें ) आहे. तें निर्गुण आहे, परंतु सर्व गुणांचें पालन करणारें आहे. १४.

तें ज्ञेय ( ब्रह्म ), ज्या प्रकारानें या सर्व दृश्य आकारमात्रामध्यें व्यापून आहे, तोच प्रकार आतां ऐक. ८९०. तरी हे अर्जुना, तें ब्रह्म असें आहे कीं, जसें अवकाशाच्या ठिकाणीं आकाश व्यापून आहे, (अथवा) वस्त्रामध्यें तंतू जसा वस्त्र होऊन आहे; ८९१. पहा कीं, पाण्यामध्यें रस, जसा पाणी होऊन असतो, अथवा दिव्यामध्यें दिवा होऊन, जसें तेज असतें. ८९२. त्याप्रमाणें कापुरामध्यें सुगंध, कापूर होऊन असतो अथवा शरीरामध्यें जसें कर्म, शरीर होऊन असतें. ८९३. फार काय सांगावें ! अर्जुना, जसा सोनेंच सोन्याचा तुकडा ( होऊन ) असतो, त्याप्रमाणें जें ब्रह्म या सर्वांच्या सर्व अंगांत आहे. ८९४. ( येथून ब्रह्माची व्याप्ति जगामध्यें कशी आहे, हें व्यतिरेक दृष्टीनें दाखवितात.) परंतु तें सोनें, तुकडेपणामध्यें असतें, तेव्हां तो सोन्याचा तुकडा, असें वाटतें; पण वास्तविक पाहिलें तर, ( तुकड्याच्या आकारानें असणारें ) सोनें, हें असें सोन्यासारखें आहे. ८९५. हे मित्रा अर्जुना, पाण्याचा ओघ जरी वांकडा असला, तरी पाणी जसें सरळच असतें, अथवा लोखंडांत अग्नीचा प्रवेश झाला, म्हणून तो अग्नि जसा लोखंड होत नाहीं. ८९६. घटाच्या आकारानें वेटाळलेलें आकाश घटामध्यें जसें वाटोळें आहे, असें वाटतें व मठामध्यें सांपडलेलें आकाश हें चौकोनी आकाराचें दिसतें, ८९७. परंतु आकाश हें, जसें ते अवकाश ( घटांतील वाटोळी पोकळी अथवा मठांतील चौकोनी पोकळी ) झालें नाहीं, त्याप्रमाणें, जें ब्रह्म सर्व विकार ( मनादि इंद्रियें अथवा सत्त्वादि गुणादिक ) होऊन, जें विकारवान् झालें नाहीं. ८९८. अर्जुना, तें ब्रह्म, मन ज्यांत मुख्य आहे, अशा इंद्रियांसारखें आणि सत्वरजादि गुणांसारखें असल्याचें ( वरून वरून ) दिसतें खरें; ८९९. परंतु गुळाची गोडी जरी ढेपेंत सांपडलेली असते, तरी ती गोडी ढेपेच्या आकारासारखी झालेली नसते, त्याप्रमाणें ( गुण व इंद्रियें यांत जरी ब्रह्म वस्तु आहे तरी ) ब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं गुण व इंद्रियें हीं खरोखर नाहींत. ९००. हे कपिध्वजा अर्जुना, दुधाच्या अवस्थेंत तूप हें दुधाच्या आकारानें असतें, परंतु तें दूधच जसें ( तूप ) नसतें, ९०१. त्याप्रमाणें जें (ब्रह्म),

जें इये विकारीं । विकार नोहे अवधारीं । पैं आकारा नाम भोंवरी । येर सोनें तें सोनें ॥ २ ॥ इया उघड मऱ्हाटिया । तें वेगळेपण धनंजया । जाण गुणइंद्रियां– । पासोनियां ॥ ३ ॥ नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु । हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥ ४ ॥ तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंधु नाहीं । परि तयाचांचि ठायीं । आभासती ॥ ५ ॥ येतुलेयासाठीं । संभ्रांताचां पोटीं । ऐसें जाय किरीटी । ना हेंचि धरीं ॥ ६ ॥ तरि तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जेवीं आकाशें । कां प्रतिवदन जैसें । आरसेनि ॥ ७ ॥ सूर्य प्रतिमंडळ । जैसेनि धरी सलिल । कां रश्मिकरीं मृगजळ । धरिजे जेवीं ॥ ८ ॥ तैसें गा संबंधेंवीण । यया सर्वांतें धरी निर्गुण । येरी तें वायां जाण । मिथ्यादृष्टी ॥ ९ ॥ आणि यापरी निर्गुणें । गुणातें भोगणें । रंका राज्य करणें । स्वप्नीं जैसें ॥ ९१० ॥ म्हणोनि गुणाचा संगु । अथवा गुणभोगु । हा निर्गुणीं लागु । बोलों नये ॥ ११ ॥

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च । सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

जें चराचर भूतां– । माजीं असे पांडुसुता । नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसी ॥ १२ ॥ तैसेनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥ १३ ॥ जें एक आंतुबाहेरी । जें एक जवळ दुरी । जें एकवांचूनि परी । दुजी नाहीं ॥ १४ ॥ क्षीरसागरींची गोडी । माजीं बहु थडिये थोडी । हें नाहीं तया परवडी । पूर्ण जें गा ॥ १५ ॥ स्वेदजप्रभृती । वेगळाल्या भूतीं । जयाचिये अनुस्यूती । खोमणें नाहीं ॥ १६ ॥ पैं श्रोतेमुखटिळका । घटसहस्रा अनेकां– । माजीं बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवीं ॥ १७ ॥ नाना लवणकणाचिये राशी । क्षारता एकाचि जैसी । कां कोडी एकीं उसीं । एकचि गोडी ॥ १८ ॥

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् । भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती । विश्वकार्या सुमती । कारण जें गा ॥ १९ ॥ म्हणोनि हा भूताकारु । जेथौनि तेंचि तया आधारु । कल्लोळा सागरु । जियापरी ॥ ९२० ॥ बाल्यादि तिन्ही वयसी । काया एकाचि जैसी । तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें ॥ २१ ॥ सायंप्रातर्मध्यान्ह । होतां जातां दिनमान । जैसें कां गगन । पालटेना ॥ २२ ॥ अगा सृष्टीवेळे प्रियोत्तमा । जया नांव म्हणती ब्रह्मा । व्यापि जें विष्णुनामा । पात्र जाहलें ॥ २३ ॥ मग आकारु हा हारपे । तेव्हां रुद्र जें म्हणिपे । तेंहीं गुणत्रय जेव्हां लोपे । तें जें शून्य ॥ २४ ॥ नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें तुरऊन । तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत ॥ २५ ॥

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते । ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

या विकारांत आहे; परंतु जें विकार नाहीं, असें समज. ( तें कसें तर ) ज्याप्रमाणें आकाराला बुगडी हें नांव आहे, बाकी सोनें तें सोनेंच आहे. ९०२. अर्जुना, या उघड उघड मराठी ( सोप्या ) भाषेनें सांगावयाचें म्हटलें म्हणजे, तूं गुणेंद्रियांपासून वस्तूचें वेगळेपण समज. ९०३. नाम, रूप, संबंध, जाति, क्रिया व भेद, हें सर्व आकारालाच बोलणें आहे, वस्तूला हें बोलणें नाहीं. ९०४. तें ( ब्रह्म ) कधींही गुण होत नाहीं आणि त्याचा व गुणांचा कांहीं एक संबंधही नाहीं, पण गुण हे, त्याच्याच ठिकाणीं भासतात. ९०५. अर्जुना, एवढ्या-मुळेंच अज्ञानी लोकांच्या पोटांत ( मनांत ) असें वाटतें कीं, ही वस्तूच गुणाला धारण करते. ९०६. पण अर्जुना, त्या वस्तूचें तें गुणाला धारण करणें असें आहे कीं, जसें आकाश ढगांना धारण करतें अथवा आरसा जसा प्रतिबिंबाला धारण करतो. ९०७. पाणी जसें सूर्याच्या प्रतिबिंबाला धारण करतें, अथवा सूर्याचीं किरणें जशी मृगजळाला धारण करतात. ९०८. अर्जुना, त्याप्रमाणें वास्तविक संबंधावांचून, या सर्व विकारांना, तें निर्गुण ब्रह्म आधार होतें. परंतु, विकारास आधार आहे, हेंही म्हणणें व्यर्थच आहे; कारण तें भ्रमाच्या कल्पनेचा अंगीकार करून म्हटलेलें आहे, असें समज. ९०९. आणि एखाद्या दरिद्री पुरुषानें स्वप्नांत जसें राज्य करावें, त्याप्रमाणें निर्गुण ब्रह्मानें गुणांचा भोग घेणें होय. ९१०. म्हणून गुणांचा संबंध अथवा गुणांचा भोग, यांचा निर्गुण ब्रह्माचे ठिकाणीं संबंध आहे, हें बोलूं नये. ९११.

तें भूतमात्रांच्या बाहेर आहे, आंत आहे, तें अचर आहे, चर आहे, सूक्ष्मत्वामुळें तें पूर्णपणें जाणण्याला अशक्य आहे, तें दूर आहे, समीप आहे. १५.

अर्जुना, अनेक अग्नींतून जशी एकच उष्णता, भेदरहित रूपानें असते, त्याप्रमाणें जें ब्रह्म, चराचर भूतांमध्यें असतें. ९१२. त्या प्रकारच्या ( वरील दृष्टांताप्रमाणें ) अविनाशरूपानें व सूक्ष्म स्थितीनें जें ब्रह्म सर्व स्थावर-जंगमाला व्यापून आहे, तें येथें ज्ञेय आहे असें समजावें. ९१३. जें एक ( चराचरांच्या ) आंत व बाहेर, जें एक जवळ व दूर ( आहे), इतकेंच नव्हे तर, ज्या एकावांचून दुसरा प्रकार मुळींच नाहीं. ९१४. अर्जुना, क्षीरसमुद्राची गोडी, क्षीरसागराच्या मध्यभागीं फार, व कांठाशीं थोडी हे प्रकार जसे क्षीरसागराच्या ठिकाणीं नाहींत, त्याप्रमाणें जें सर्व बाजूंनीं पूर्ण आहे. ९१५. स्वेदजादिकरून वेग-ळाल्या प्राण्यांत, ज्याच्या व्याप्तीस न्यूनता नाहीं. ९१६. हे श्रोत्यांच्या भूषणा, अर्जुना, ज्याप्रमाणें कित्येक हजारों घागरींमध्यें, चंद्राचें प्रतिबिंब पडलें असतांही, चंद्रबिंबास अनेकता येत नाहीं. ९१७. मिठाच्या अनेक कणांच्या ढिगांतून जसा एकच खारेपणा असतो, अथवा कोट्यवधि उसांत गोडी जशी एकच असते; ९१८.

तें (तत्त्वतः) अविभक्त आहे, तरी भूतांचे ठिकाणीं ( नाना प्रकारच्या रूपांनीं ) विभागल्यासारखें आहे. भूतांचें पालन करणारें तें आहे. (संहारकालीं भूतांचा) ग्रास करणारें व ( निर्माण कालीं ) उत्पन्न करणारें तें आहे, याप्रमाणें जाणावें. १६.

त्याप्रमाणें अनेक भूतमात्रांमध्यें जें एकसारखें व्यापून राहिलें आहे व हे चांगल्या बुद्धीच्या अर्जुना, जें ( ब्रह्म ), विश्व ह्याच कोणी एका कार्याला कारण आहे. ९१९. म्हणून ज्याप्रमाणें लाटा समुद्रापासून उत्पन्न होतात व त्या लाटांना जसा समुद्रच आधार असतो, त्याप्रमाणें ज्या ब्रह्मापासून हा भूताकार उत्पन्न होतो, तेंच ब्रह्म, त्या भूताकाराला आधार आहे. ९२०. बाल्य, तारुण्य व वृद्धावस्था, या तिन्ही अवस्थांत शरीर जसें एकच आहे, त्याप्रमाणें जगाच्या उत्पत्ति, स्थिति व लय, या तिन्हीं स्थितींत, जें ब्रह्म अखंड ( एकसारखें ) असतें. ९२१. सायंकाल, प्रातःकाल व मध्यान्हकाल, या क्रमानें सबंध दिवसही होत जात असतांना, जसें आकाश बदलत नाहीं. ९२२. हे प्रियोत्तमा अर्जुना, जगाच्या उत्पत्तीच्या कालीं, ज्याला ब्रह्मदेव असें म्हणतात व व्याप्तिकालीं ( पालन कालीं ), जें विष्णु या नामाला प्राप्त झालें. ९२३. मग जेव्हां हा जगदाकार नाहींसा होतो, त्या वेळीं ज्यास रुद्र असें म्हणतात व रजसत्त्वतमादि तीन गुण ( उत्पत्ति, स्थिति, लय ) ते देखील नाहींसे होतात, त्या वेळेला जें ब्रह्म शून्य ( निर्धर्म ) होऊन रहातें. ९२४. आकाशाचें शून्यत्व गिळून, सत्त्वादि तिन्ही गुणांचा नाश करून, जें शून्य असतें, तेंच महाशून्य होय, अशाबद्दल वेदवचन प्रमाण आहे. ९२५.

( त्यालाच ) तेजाचेंही तेज व अंधाराच्या पलि-कडील आहे असें ( ज्ञाते ) म्हणतात. ज्ञान तरी तेंच आहे, ज्ञेय तेंच आहे, ज्ञानाच्या योगानें जाणलें जाणारें तेंही तेंच आहे, सर्व भूतमात्रांचे हृदयामध्यें ( तेंच ) स्थित आहे. १७.

जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणें ॥ २६ ॥ जयाचेनि उजियेडें । तारागण उबडें । महातेज सुरवाडें । जेणें राहाटे ॥ २७ ॥ जें आदीची आदी । जें वृद्धीची वृद्धी । बुद्धीची जें बुद्धी । जीवाचा जीवु ॥ २८ ॥ जें मनाचें मन । जें नेत्राचे नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ॥ २९ ॥ जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण । क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ॥ ९३० ॥ आकारु जेणें आकारे । विस्तारू जेणें विस्तारे । संहारू जेणें संहारे । पांडुकुमरा ॥ ३१ ॥ जें मेदिनीची मेदिनी । जें पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥ ३२ ॥ जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु । हें असो आघवाचि आभासु । आभासे जेणें ॥ ३३ ॥ किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा । जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥ ३४ ॥ जें देखिलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें । एकवाट कालवे । सामरस्यें ॥ ३५ ॥ मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन । ज्ञानें गमिजे स्थान । तेंहि तेंचि ॥ ३६ ॥ जैसें सरलियां लेख । आंख होती एक । तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥ ३७ ॥ अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । हें असो जें हृदयीं । सर्वांचां असे ॥ ३८ ॥

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः । मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

एवं तुजपुढां । आदीं क्षेत्र सुहाडा । दाविलें फाडोवाडां । विवंचुनी ॥ ३९ ॥ तैसेंचि क्षेत्रापाठीं । जैसेनि देखसी दिठी । तैसें ज्ञान किरीटी । सांगितलें ॥ ९४० ॥ अज्ञानाही कौतुकें । रूप केलें निकें । जंव आयणी तुझी टेकें । पुरे म्हणे ॥ ४१ ॥ आणि आतां हें रोकडें । उपपत्तीचेनि पवाडें । निरुपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥ ४२ ॥ हे आघवीच विवंचना । बुद्धी भरोनि अर्जुना । मत्सिद्धिभावना । माझिया येती ॥ ४३ ॥ देहादि परिग्रहीं । संन्यासु करूनियां जिहीं । जीवु माझां ठाईं । वृत्तिकु केला ॥ ४४ ॥ ते मातें किरीटी । हेंचि जाणोनियां शेवटीं । आपणपयां साटोवाटीं । मीचि होती ॥ ४५ ॥ मीचि होती परी । हे मुख्य गा अवधारीं । सोहोपी सर्वांपरी । रचिली आम्हीं ॥ ४६ ॥ कडां पायरी कीजे । निराळीं माचु बांधिजे । अथावीं सुइजे । तरी जैसी ॥ ४७ ॥ एऱ्हवीं अवघेंचि आत्मा । हें सांगों जरी वीरोत्तमा । तरी तुझिया मनोधर्मा । गिळेल ना ॥ ४८ ॥ म्हणोनि एकचि संचलें । चतुर्धा आम्हीं केलें । जें अदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥ ४९ ॥ पैं बाळ जैं जेवविजे । तैं घांसु विसा ठायीं कीजे । तैसें एकचि चतुर्थ्याजें । कथिलें आम्हीं ॥ ९५० ॥ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान । हे भाग केले अवधान । जाणोनि तुझें ॥ ५१ ॥ आणि ऐसेनही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज होता । नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ॥ ५२ ॥ आतां चौठायीं न करूं । एकही म्हणोनि न सरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसा पाडु ॥ ५३ ॥ परि तुवां येतुलें करावें । मागोनि तें आम्हां देआवें । जे कानाचि नांव ठेवावें । आपण पैं गा ॥ ५४ ॥ या श्रीकृष्णाचिया

जें ब्रह्म अग्नीला चेतविणारें आहे व चंद्राचें जीवन ( चंद्राला अमृत देणारें ) आहे व ज्या ब्रह्माच्या प्रकाशानें सूर्याचे डोळे पाहतात; ९२६. ज्याच्या उजेडानें तारे ( ताऱ्यांचे समुदाय ) प्रकाशले जातात व ज्याच्या तेजानें सूर्य सुखानें वावरतो; ९२७. जें ब्रह्म आरंभाचा आरंभ आहे, वाढीची वाढ आहे, बुद्धीची बुद्धि आहे व जें जीवाचा जीव आहे; ९२८. जें मनाचें मन आहे, जें डोळ्याचा डोळा आहे; जें कानाचे कान आहे व वाचेची वाचा आहे, ९२९. जें प्राणाचा प्राण आहे, जें गतीचे पाय आहे व ज्याच्यामुळें कर्माचें घडणें होतें; ९३०. अर्जुना, ज्याच्या योगानें आकार आकाराला येतो, ज्याच्या योगानें विस्तार विस्तारतो व ज्याच्या योगानें संहार नाश करतो; ९३१. जें पृथ्वीची पृथ्वी आहे, ज्या ब्रह्मरूपी पाण्याला पिऊन पाणी हें पाणीपणानें आहे, ज्याच्या तेजानें तेजास प्रकाश दिला जातो. ९३२. जें ब्रह्म वायूचा श्वासोच्छ्वास आहे व ज्या ब्रह्मरूपी पोकळींत आकाश राहिलें आहे. हें राहूं दे; हा सर्व जगद्रूपी भास ज्याच्यायोगानें भासतो. ९३३. फार काय सांगावें ! अर्जुना, जें सर्वांच्या ठिकाणीं सर्व आहे व जेथें द्वैतपणाचा प्रवेश होत नाहीं. ९३४. जें पाहिल्याबरोबर दृश्य ( जगत् ) व द्रष्टा ( पाहणारा ) हे सर्व, ऐक्यभावानें एक होऊन जातात. ९३५. मग तें ब्रह्मच ज्ञान होतें व ज्ञाता, ज्ञेय व ज्ञानानें जाणलें जाणारें ठिकाण तेंही तेंच ( ब्रह्मच ) आहे. ९३६. ज्याप्रमाणें हिशोब करण्याचें संपल्यावर हिशोबांतील निरनिराळ्या रकमा एक होतात, त्याप्रमाणें साध्य साधनादिक, हे ब्रह्माचे ठिकाणीं ऐक्यास येतात. ९३७. अर्जुना, ज्या ठिकाणीं द्वैताचा व्यवहार चालत नाहीं. हें असो; जें ( ब्रह्म ) सर्वांच्या अंतःकरणांत असतें. ९३८.

याप्रमाणें क्षेत्र, तसेंच ज्ञान आणि ज्ञेय हीं संक्षेपानें सांगितलीं. हें ( सर्व ) जाणून माझा भक्त मत्स्वरूप पावतो. १८

हे सुजाण अर्जुना, याप्रमाणें प्रथम हें क्षेत्र तुला स्पष्टपणानें व्यक्त करून दाखविलें. ९३९. त्याचप्रमाणें क्षेत्राचा प्रकार सांगितल्यानंतर आम्हीं ज्या रीतीनें तुला डोळ्यानें दिसेल, त्या रीतीनें तुला ज्ञान सांगितलें. ९४०. तुझी बुद्धि 'पुरे' म्हणून तृप्त होईतोंपर्यंत, कौतुकानें आम्हीं अज्ञानाचेंही चांगलें वर्णन केलें. ९४१. आणि अर्जुना, आतांच विचाराच्या विस्तारानें ज्ञेय मूर्तिमंत स्पष्ट करून सांगितलें. ९४२. अर्जुना, हा सर्व विचार बुद्धींत भरून, जे माझ्या भावनेनें माझ्या स्वरूपसिद्धीला येतात; ९४३. ज्यांनीं देहादि परिग्रहाचा त्याग करून, आपला जीव माझ्या ठिकाणीं वतनदार केला. ९४४. अर्जुना, ( असे जे माझे भक्त ), ते शेवट हाच विचार जाणून व आपल्या मोबदला मला घेऊन, मद्रूपच होतात. ९४५. अर्जुना, मीच होण्याचा मुख्य प्रकार हा आहे असें समज, ( व इतर ) सर्व (मद्रूप) होण्याच्या प्रकारापेक्षां हा सोपा प्रकार आम्हीं तयार केला आहे. ९४६. डोंगराच्या कड्याला ( वर जाण्याकरितां ) जशा पायऱ्या कराव्यात व आकाशाच्या पोकळींत वर जाण्यास जशी माच बांधावी किंवा खोल पाण्यांतून जाण्याकरितां जशी त्या पाण्यांत नाव घालावी. ९४७. सहज विचार करून पाहिलें तर सर्वच आत्मा आहे, हा विचार जर तुला एकदम सांगितला असता, तर हे वीरोत्तमा, तो विचार तुझ्या बुद्धीला गिळला गेला नसता. ( म्हणजे तुझ्या कल्पनेंत आला नसता. ) ९४८. तुझ्या बुद्धीचा असमर्थपणा पाहिल्याकारणानें, एकच सभराभरित भरलेलें जें परब्रह्म, तें आम्हीं चार प्रकारचें केलें. ९४९. मुलाला जेव्हां जेवावयास घालावयाचें असतें, तेव्हां एक घांस वीस ठिकाणीं करावा लागतो; त्याप्रमाणें एकच परब्रह्म चार प्रकारच्या निमित्तानें आम्हीं तुला सांगितलें. ९५०. तुझें लक्ष पाहून ( तुझी ग्रहणशक्ति पाहून ) ( एकाच ब्रह्माचे ) एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय, एक अज्ञान, असे आम्हीं हे चार भाग केले. ९५१. आणि अर्जुना, असें सांगूनही, जर हा अभिप्राय तुला कळला नसेल, तर हाच प्रकार पुनः एक वेळ सांगूं. ९५२. आतां त्या ब्रह्माचे चार ठिकाणीं विभाग करणार नाहीं व सर्व एक ब्रह्मच आहे, असें करून संपविणार नाहीं. तर आत्मा व अनात्मा यांची सारखी योग्यता धरून प्रतिपादन करूं. [ एकाच ब्रह्माचे आत्मा ( पुरुष ) व अनात्मा ( प्रकृति ) असे भाग सारखे करून सांगूं. ] ९५३. परंतु तूं मात्र एवढें कर कीं, आम्हीं तुझ्याजवळ जें मागूं, तें तूं आम्हांस दिलें पाहिजे. तें मागणें हें कीं, तूं आपल्या स्वतःस कानाचें नांव ठेव. ( इतर सर्व इंद्रियांचे व्यापार बंद ठेवून, फक्त ऐकण्याचें काम चालूं दे. ) ९५४. या श्रीकृष्णाच्या बोलण्यानें अर्जुनाच्या अंगावर

बोला । पार्थु रोमांचितु जाला । तेथ देवो म्हणती भला । उचंबळेना ॥ ५५ ॥ ऐसेनि तो येतां वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु । प्रकृतिपुरुषविभागु । परिसें सांगों ॥ ५६ ॥

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि । विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥

जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी । जयाचिये भाटिवेलागीं । मी कपिल जाहलों ॥ ५७ ॥ तो आईक निर्दोखु । प्रकृतिपुरुषविवेकु । म्हणे आदिपुरुखु । अर्जुनातें ॥५८॥ तरी पुरुष अनादि आथी । आणि तैंचि लागोनि प्रकृती । संवसरिसी दिवोराती । दोनी जैसी ॥ ५९ ॥ कां रूप नोहे वायां । परी रूपा लागली छाया । निकणु वाढे धनंजया । कणेंसी कोंडा ॥ ९६० ॥ तैसीं जाण जवटें । दोन्ही इयें एकवाटें । प्रकृतिपुरुष प्रकटें । अनादिसिद्धें ॥ ६१ ॥ पैं क्षेत्र येणें नांवें । जें सांगितलें आघवें । तेंचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ॥६२॥ आणि क्षेत्रज्ञु ऐसें । जयातें म्हाणितलें असे । तो पुरुष हें अनारिसें । न बोलों घेईं ॥ ६३ ॥ इयें आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें । पुढतपुढती ॥ ६४ ॥ तरी केवळ जे सत्ता । ते पुरुष गा पांडुसुता । प्रकृति तें समस्ता । क्रिया नांव ॥ ६५ ॥ बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरण । आणि ते तीन्ही गुण । सत्त्वादिक ॥ ६६ ॥ हा आघवाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्माचिया ॥ ६७ ॥ तेथ इच्छा आणि बुद्धि । घडवी अहंकारेंसीं आधीं । मग तिया लाविती वेधीं । कारणाचां ॥ ६८ ॥

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

तेंचि कारण ठाकावया । जें सूत्र धरणें उपाया । तया नांव धनंजया । कार्य पैं गा ॥ ६९ ॥ आणि इच्छा मदाचां थावीं । लागली मनातें उठवी । तें इंद्रियें राहाटवी । हें कर्तृत्व पैं ॥ ९७० ॥ म्हणोनि तिन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा । प्रकृति मूळ हे राणा । सिद्धांचा म्हणे ॥ ७१ ॥ एवं तिहींचेनि समवायें । प्रकृति कर्मरूप होये । परि जया गुणा वाढे त्राये । त्याचि सारिखी ॥ ७२ ॥ जें सत्त्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म म्हाणिजे । रजोगुणें निपजे । मध्यम तें ॥ ७३ ॥ जें कां केवळें तमें । होती जियें कर्में । निषिद्धें अधर्में । जाण तिये ॥ ७४ ॥ ऐसेनि संतासंतें कर्में प्रकृतीस्तव होतें । तयापासोनि निर्वाळतें । सुखदुःख गा ॥ ७५ ॥ असंतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निपजे । तया दोहींचा बोलिजे । भोगु पुरुषा ॥ ७६ ॥

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् । कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥

सुखदुःखें जंववरी । निफजती साचोकारीं । तंव प्रकृति उद्यमु करी । पुरुषु भोगी ॥ ७७ ॥ प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी । जे आंधुली जोडी । आमुला

रोमांच उभे राहिले. ते पाहून देव म्हणाले, तूं चांगला आहेस, पण हर्षवेगानें अनावर होऊं नकोस. ९५५. अर्जुनाला येणारा हर्षांचा वेग याप्रमाणें श्रीकृष्णांनीं आंवरून, श्रीकृष्ण म्हणाले कीं, प्रकृतिपुरुषांचा विभाग सांगतों ऐक. ९५६.

प्रकृति आणि पुरुष हीं दोन्हीही अनादि आहेत असें जाण. ( देहेंद्रियादि ) विकार आणि ( सत्त्व इत्यादि ) गुण, हे प्रकृतीपासून उत्पन्न झाले आहेत असें जाण. १९.

ज्या मार्गाला जगामध्यें योगी सांख्य असें म्हणतात आणि ज्या सांख्यमार्गाचें महत्त्व वर्णन करण्याकरितां मी कपिल झालों. ९५७. तो प्रकृतिपुरुषांचा शुद्ध विचार तूं ऐक, असें आदिपुरुष जे श्रीकृष्ण, ते अर्जुनास म्हणाले. ९५८. तर दिवस आणि रात्र हीं दोन्ही जशीं बरोबर चालणारीं ( चिकटलेली ) आहेत, त्याप्रमाणें पुरुष अनादि आहे आणि प्रकृति ही त्या वेळेपासून ( अनादि ) आहे. ९५९. किंवा शरीर हें सांवलीप्रमाणें आभासिक नाहीं, तरी पण त्या खऱ्या शरीरास ज्याप्रमाणें ती सांवली नेहमीं जडलेलीच असते किंवा अर्जुना, ज्याप्रमाणें दाणे येण्याच्या पूर्वींचें कणीस, हें असार भूस व साररूप दाणे यांसह वाढतें. ९६०. त्याप्रमाणें उघड अनादिसिद्ध असलेले व एकमेकांत मिसळलेले, हे प्रकृतिपुरुष जुळ्यासारखे आहेत असें समज. ९६१. अरे, क्षेत्र या नांवानें जें सर्व सांगितलें, तेंच येथें ही प्रकृति होय, असें समजावें. ९६२. आणि ( आम्हीं ) ज्याला क्षेत्रज्ञ असे म्हटलें, तोच पुरुष आहे, असें समज. आम्हीं अन्यथा कांहीं बोलत नाहीं. ९६३. ह्यास हीं निरनिराळीं नांवें आहेत, परंतु ज्याच्याविषयीं निरूपण करावयाचें तें वेगळें नाहीं, हें वर्म तूं वारंवार चुकूं नकोस. ९६४. अर्जुना, केवळ जी सत्ता ( सदत्व ) तिला पुरुष हें नांव आहे आणि ( संपूर्ण ) क्रियेस प्रकृति हें नांव आहे. ९६५. बुद्धि, इंद्रियें, अंतःकरण इत्यादि विकारांचा समुदाय सत्वादि ( सत्त्व, रज, तम ) तिन्ही गुण, ९६६. हा सर्व समुदाय प्रकृतिपासून झाला असें समज, आणि ही प्रकृतीच कर्मांच्या उत्पत्तीला हेतु ( कारण ) आहे. ९६७. तेथें ( प्रकृतीच्या ठिकाणीं ) अगोदर इच्छा आणि बुद्धि हीं अहंकारास उत्पन्न करतात आणि मग त्या ( इच्छा व बुद्धि ) जीवाला कारणाच्या म्हणजे इच्छित वस्तु ( मिळविण्याच्या ) नादीं लावतात. ९६८.

कार्य ( मनाच्या प्रेरणेनें इच्छित वस्तु मिळविण्याकरितां इंद्रियांकडून होणारी क्रिया ) कारण ( ज्याविषयीं इच्छा उत्पन्न झाली असते तो पदार्थ, इच्छित वस्तु ) कर्तृत्व ( इच्छित वस्तुच्या प्राप्तीच्या उद्योगास मनाकडून होणारी प्रेरणारूप क्रिया ) या सर्वांस मूळ प्रकृति आहे असें म्हणतात; आणि सुखदुःखांच्या भोगाला कारण पुरुष आहे असें म्हणतात. २०.

ज्याच्या प्राप्तीचा मनास चटका लागला असेल, तो पदार्थ प्राप्त करून घेण्याकरितां जें शारीरिक क्रियेचें सूत्र हातांत धरून हालवावयाचें, अर्जुना, ह्या बाह्य प्रयत्नास 'कार्य' असें म्हणतात. ९६९. आणि मदाच्या (धुंदीच्या) आश्रयानें जीवास झालेली इच्छा, मनाला चिथावते व नंतर तें मन इंद्रियांकडून इच्छित करवून घेतें. इच्छेनें उत्तेजित केलेल्या मनाकडून कर्मेंद्रियांस होणाऱ्या, या प्रेरणारूप क्रियेस, अर्जुना, कर्तृत्व असें म्हणतात. ९७०. आणि म्हणूनच, या तिन्ही कारण, कर्तृत्व व कार्य यांना प्रकृति ही मूळ आहे, असें समज; असें सिद्धांचे राजे श्रीकृष्ण म्हणाले. ९७१. याप्रमाणें या तिघांच्या समुदायानें प्रकृति कर्मरूप होते. परंतु ज्या गुणांचें आधिक्य होईल, त्यासारखी ती बनते. ९७२. ज्या कर्मांचा सत्वगुण अंगीकार करतो, त्याला सत्कर्म म्हणावें व जें कर्म रजोगुणांपासून उत्पन्न होतें, तें मध्यम जाणावें. ९७३. व जीं कर्में केवळ तमोगुणापासून होतात, तीं कर्में शास्त्रविरुद्ध व निकृष्ट प्रतीचीं समजावींत. ९७४. अरे, याप्रमाणें बरींवाईट कर्में प्रकृतीपासून होतात; मग त्या कर्मांपासून जें उत्पन्न होतें, तें सुखदुःख होय. ९७५. वाईट कर्मांपासून दुःख उत्पन्न होतें व सत्कर्मांपासून सुख उत्पन्न होतें व त्या दोहींचा ( सुखदुःखांचा ) भोग पुरुषाला होतो, असें म्हणतात. ९७६.

प्रकृतीचे ठिकाणीं स्थित असलेला ( प्रकृतितंत्र झालेला ) पुरुष प्रकृतीच्या गुणांचा भोग घेतो व हा गुणसंयोगच त्याच्या चांगल्या व वाईट जन्मांना कारण होय. २१.

सुख, दुःख जोंपर्यंत खरोखर उत्पन्न होतात, तोंपर्यंत प्रकृति व्यापार करते व पुरुष भोगतो. ९७७. प्रकृतिपुरुषांचा व्यवहार सांगावयास लागलें असतां, तो अघटित आहे. कारण कीं, या व्यवहारांत स्त्री मिळविते व नवरा

खाय ॥ ७८ ॥ आमुलया आंबुलिये । संगती ना सोये । कीं आंबुली जग विये । चोज ऐकें ॥ ७९ ॥ जे अनंगु तो पैंधा । निकवडा नुसधा । जीर्णु अतिवृद्धा । पासोनि वृद्धु ॥ ९८० ॥ तया आडनांव पुरुषु । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकु । निश्चयो नव्हे ॥ ८१ ॥ अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ॥ ८२ ॥ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखाचें ॥ ८३ ॥ तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । परि इया पतिव्रता । भोगविजे ॥ ८४ ॥ जियेतें अळुमाळु । रूपा गुणाचा चाळढाळु । ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ॥ ८५ ॥ मा इये प्रकृती तंव । गुणमयी हेंचि नांव । किंबहुना सावेव । गुण तेचि हे ॥ ८६ ॥ हे प्रकृति क्षणीं नीच नवी । रूपाचीच आधवी । जडातेंही माजवी । इयेचा माजु ॥ ८७ ॥ नांवें इयें प्रसिद्धें । स्नेहो इया स्निग्धें । इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ॥ ८८ ॥ कायि मन हें नपुंसक । कीं तें भोगवी तिन्ही लोक । ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥ ८९ ॥ हे भ्रमाचें महाद्वीप । हे व्याप्तीचेंचि रूप । विकार उमप । इया केले ॥ ९९० ॥ हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी । इये प्रसिद्धाचि दैवी । माया हें नांव ॥ ९१ ॥ हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी । प्रपंचाची धाडी । अभंग हे ॥ ९२ ॥ कळा एथूनि जालिया । विद्या इयेचिया केलिया । इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ९३ ॥ हे नादाची टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ । किंबहुना सकळ । खेळु इयेचा ॥ ९४ ॥ जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात । हें असो अद्भुत । मोहन हे ॥ ९५ ॥ हे अद्वयाचें दुसरें । हे निःसंगाचें सोयरें । हें निराळेंसि घरें । नांदत असे ॥ ९६ ॥ इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी । म्हणोनि तया आवरी । अनावरातें ॥९७॥ तयाचां तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं । कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥ ९८ ॥ तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती । आपण होय स्थिति । ठावो तया ॥ ९९ ॥ तया अनार्ताची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती । तया अकुळाची जाती । गोत होय ॥ १००० ॥ निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु । निरहंकाराचा अहंकारु । होऊनि ठाके ॥ १ ॥ तया अचर्चाचें चिन्ह । तया अपाराचें मान । तया अमनस्काचें मन । बुद्धीही होय ॥ २ ॥ तया अनामाचें नाम । तया अजाचें जन्म । आपण होय कर्म । क्रिया तया ॥ ३ ॥ तया निर्गुणाचे गुण । तया अचरणाचे चरण । तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ॥ ४ ॥ तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव । किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे ॥ ५ ॥ ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्व व्याप्ती । अविकारातें विकृती– । माजीं कीजे ॥ ६ ॥ तेथ पुरुषत्व जें असे । तें ये इये प्रकृतिदशे । चंद्रमा अंवसे । पाडिला जैसा ॥ ७ ॥

खातो. ९७८. या प्रकृतिपुरुषरूप नवरावायकोचा संबंध नसतो व त्यांच्यांत मेळही नसतो, परंतु बायको (प्रकृति) जग प्रसवते, हें आश्चर्य ऐक. ९७९. कारण कीं तो (पुरुष) अंगहीन (निराकार), पांगळा, द्रव्य-हीन, एकटा, जुनापुराणा, अति म्हाताऱ्यापेक्षां म्हातारा (आहे.) ९८०. त्याला पुरुष हें आडनांव आहे. वास्तविक विचार करून पाहिलें तर, तो स्त्री नाहीं अथवा नपुंसक नाहीं. फार काय सांगावें! अमूक एक तो आहे, असा त्याच्याबद्दल कांहीं एक निश्चय करतां येत नाहीं. ९८१. (त्याला) डोळे, कान, हात, पाय, रूप, रंग व नांव हें कांहीं नाहीं. ९८२. अर्जुना, ज्याच्या ठिकाणीं कांहींच नाहीं, तो प्रकृतीचा नवरा आहे, असें समज. पण अशा नवऱ्यास (पुरुषासही) सुखदुःखें भोगावीं लागतात. ९८३. तो पुरुष तर अकर्ता, प्रीतिद्वेष-शून्य व अभोक्ता आहे; परंतु ही प्रकृति त्याला भोगावयाला लावते. ९८४. ज्या स्त्रीला आपल्या रूपाची व गुणांची थोडीशी हालचाल करतां येते (आपल्या रूपानें व गुणानें कोणत्याही पुरुषास मोहीत करतां येतें) ती स्त्री वाटेल तो खेळ आकाराला आणते, म्हणजे न घडणाऱ्या गोष्टी घडविते. ९८५. मग या प्रकृतीला तर गुणमयी हेंच नांव आहे; फार काय सांगावें! प्रकृति म्हणजे मूर्तिमंत गुणच होत. ९८६. ही प्रकृति क्षणोक्षणीं नित्य नवें रूप धारण करणारी आहे व ही सर्व रूपानेंच भरलेली आहे आणि हिचा उन्मत्तपणा जडालाही उन्मत्त करतो, (म्हणजे जडाला हालचाल करावयास लावतो.) ९८७. हिच्यामुळें नाममात्र प्रसिद्धीला आलें व स्नेह हिच्यामुळें प्रेमळ आहे व हिच्यामुळें इंद्रियें आपापल्या कामांत तरबेज आहेत. ९८८. मन हें नपुंसक नाहीं काय? पण ही प्रकृति त्याला सर्व त्रैलोक्यांतील भोग भोगविते. याप्रमाणें या प्रकृतीची सर्वच कृति चमत्कारिक आहे. ९८९. ही प्रकृति भ्रमाचें मोठें बेट आहे व ही मूर्तिमंत व्यापकपणाच आहे आणि हिनेंच विकार असंख्य केले आहेत. ९९० ही प्रकृति, कामरूपी वेलाचा मांडव (आधार) आहे व ही मोहरूपी वनांतील वसंतऋतु आहे व हिला दैवीमाया हें नांव प्रसिद्धच आहे. ९९१. ही शब्दसृष्टीची वृद्धि आहे, ही साकारपणाची प्राप्ति आहे व ही प्रपंचाची न भंगणारी धाडी (हल्ला) आहे. ९९२. (सर्व) कला येथूनच झाल्या आहेत. विद्या हिनेंच केल्या आहेत व हीच इच्छा, ज्ञान व क्रिया यांस प्रसवली आहे. ९९३. ही नादाची टांकसाळ आहे. (म्हणजे शब्दमात्र हिच्यापासून उत्पन्न झाला आहे.) ही चमत्काराचें घर आहे. फार काय सांगावें! सर्व खेळ हिचा आहे. ९९४. जे उत्पत्ति व प्रलय आहेत, ते हिचेच सकाळ, संध्याकाळ आहेत. हें असो; ही प्रकृति अद्भुत भुरळ आहे. ९९५. ही प्रकृति एकाकी असणाऱ्या पुरुषाची जोडीदारीण आहे व संग नसणाऱ्या पुरुषाची संबंधी आहे व ही प्रकृति निराकारी पुरुषासह संसार करून कालक्रमणा करीत आहे. ९९६. हिच्या सौभाग्याच्या विस्ताराचा मोठेपणा एवढा आहे, म्हणून ही त्या अनावराला (पुरुषाला) आपल्या आटोक्यांत आणते. ९९७. त्याच्या (पुरुषाच्या) ठिकाणीं तर मुळींच कांहीं नाहीं, असें जरी आहे, तरी ती आपणच त्या पुरुषाचें सर्व कांहीं होते (हेंच पुढें सांगतात.) ९९८. त्या स्वतःसिद्ध असणाऱ्या पुरुषाची उत्पत्ति आपण होते व त्या निराकाराचा आकार आपण बनते. त्याचें राहणें व राहण्याचें ठिकाण आपणच होते. ९९९. त्या इच्छारहिताची इच्छा, त्या पूर्णाची तृप्ति व त्या कुलरहिताची जाती व गोत देखील ही प्रकृति होते. १०००. त्या निराकार पुरुषाचा ही आकार होते, त्या व्यापाररहिताचा व्यापार आपण होते व त्या अहंकाररहित पुरुषाचा ही अहंकार होऊन रहाते. १००१. ज्याच्या-विषयीं कांहीं चर्चा करता येत नाहीं, अशा पुरुषाचें ही प्रकृति लक्षण होते, त्या अमर्याद पुरुषाचें ही माप होते व त्या मनरहित पुरुषाचें मन व बुद्धि, ही प्रकृति होते. १००२. त्या नामरहिताचें नाम ही होते व त्या जन्मरहित पुरुषाचा जन्म ही होते आणि त्याची क्रिया, कर्म आपण होते. १००३. त्या निर्गुणाचे गुण ही होते, त्या पायरहिताचे पाय ही होते, त्या कानरहिताचे कान ही होते व त्या नेत्ररहिताचे नेत्र ही होते. १००४. त्या भावातीताचे (जन्मादि सहा) भाव (विकार) ही होते व त्या अवयवरहित पुरुषाचे ही अवयव होते; फार काय सांगावें! ही प्रकृति त्या पुरुषाचें सर्व कांहीं होते. १००५ याप्रमाणें प्रकृति ही आपल्या सर्व व्यापकपणानें, अविकार जो पुरुष, त्याला विकारवान करते. १००६. तेथें (त्या पुरुषाचे ठिकाणीं) जें पुरुषपण आलेलें आहे, तें या प्रकृतीच्या अवस्थेमुळें आलेलें आहे. (प्रकृतीशीं संबंध केल्यामुळें पुरुष हा आपल्या तेजाला कसा मुकतो, तें पुढें अनेक दृष्टांतांनीं अकरा ओव्यांपर्यंत सांगतात.) ज्या-प्रमाणें चंद्र अवसेंत पडतो म्हणजे तेजोहीन होतो. १००७

विदळ बहु चोखा । मीनलिया वाला एका । कसु होय पांचिका । जयापरी ॥ ८ ॥ कां साधूतें गोंदळी । संचरोनि सुये मैळीं । नाना सुदिनाचा आभाळीं । दुर्दिनु कीजे ॥ ९ ॥ तेथ पय पशूचां पोटीं । कां वन्हि जैसा काष्ठीं । गुंडूनि घेतला पटीं । रत्नदीपु ॥ १०१० ॥ राजा पराधीनु जाहला । कां सिंहु रोगें रुंधला । तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥ ११ ॥ जागता नरु सहसा । निद्रा पाडूनि जैसा । स्वप्नींचिया सोसा । वश्यु कीजे ॥ १२ ॥ तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें । उदास अंतुरींगुणें । आतुडे जेवीं ॥ १३ ॥ तैसें अजा नित्या होये । आंगीं जन्ममृत्यूचे घाये । वाजती जैं लाहे । गुणसंगातें ॥ १४ ॥ परि तें ऐसें पंडुसुता । तातलें लोह पिटितां । जेवीं वन्हीसीचि घाता । बोलती तया ॥ १५ ॥ कां आंदोळलिया उदक । प्रतिभा होय अनेक । तें नानात्व म्हणती लोक । चंद्रीं जेवीं ॥ १६ ॥ दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा । कां कुंकुमें स्फटिका । लोहित्व ये ॥ १७ ॥ तैसा गुण-संगमें । अजन्मा हा जन्मे । पावतु ऐसा गमे । एऱ्हवीं नाहीं ॥ १८ ॥ अधमोत्तमा योनी । यासि ऐसिया मानीं । जैसा संन्यासी होय स्वप्नीं । अंत्यादि जाती ॥ १९ ॥ म्हणोनि केवळा पुरुषा । नाहीं होणें भोगणें देखा । येथ गुणसंगुचि अशेखा- । लागी मूळ ॥ १०२० ॥

उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः । परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

हा प्रकृतिमाजीं उभा । परि जुई जैसा बोथंबा । यया प्रकृति पृथ्वीनभा । तेतुला पाडु ॥ २१ ॥ प्रकृतिसरितेचां तटीं । मेरु हा किरीटी । माजीं बिंबे परी लोटीं । लोटों नेणे ॥ २२ ॥ प्रकृति होय जाये । हा तो असतुचि आहे । म्हणोनि आब्रह्माचें होये । शासन हा ॥ २३ ॥ प्रकृति येणें जिये । याचिया सत्ता जग विये । इयालागीं इये । वरयतु हा ॥ २४ ॥ अनंतें काळें किरीटी । जिया मिळती इया सृष्टी । तिया रिगती ययाचां पोटीं । कल्पांतसमयीं ॥ २५ ॥ हा महद्ब्रह्मगोसावी । ब्रह्मगोललाघवी । अपारपणें मवी । प्रपंचातें ॥ २६ ॥ पैं या देहामाझारीं । परमात्मा ऐसी जे परी । बोलिजे तें अवधारीं । ययातेंचि ॥ २७ ॥ अगा प्रकृतिपरौता । एकु आथी पंडुसुता । ऐसा प्रवादु तो तत्त्वता । पुरुषु हा पैं ॥ २८ ॥

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह । सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

अतिशय शुद्ध असलेल्या वालभर सोन्यांत अन्य हिणकस धातु मिसळली तर, ज्याप्रमाणें त्याचा कस पांचावर येऊन बसतो. १००८. अथवा पिशाच हें चांगल्या मनुष्याच्या अंगांत संचार करून, ज्याप्रमाणें त्यास पापकर्मांत घालतें. अथवा ढग हे चांगल्या दिवसाचा उदासीन असा दिवस करतात. १००९. गाईच्या पोटांत दूध असतांना जसें तें पांढरें स्वच्छ असें दिसत नाहीं, अथवा लांकडांत अग्नि असतांना जसा तो चकचकीत दिसत नाहीं अथवा वस्त्रांत तेजस्वी रत्न गुंडाळलें असतां, त्याचें तेज जसें दिसत नाहीं. १०१०. राजा शत्रूच्या स्वाधीन झाला असतां, जसा निस्तेज होतो अथवा सिंह हा रोगानें व्यापला म्हणजे जसा निस्तेज होतो, तसा पुरुष हा प्रकृतीच्या स्वाधीन झाला कीं स्वतःच्या तेजाला मुकतो. १०११. जाग्रत पुरुष जसा निद्रेनें एकदम पाडला असतां (झोंपेच्या स्वाधीन झाला असतां) तो स्वप्नांतील हांवेच्या भरीस पडून सुखदुःखभोगास पात्र केला जातो. १०१२. त्याप्रमाणें पुरुष प्रकृतीच्या स्वाधीन झाल्याकारणानें, त्याला गुण भोगणें भाग पडतें. ज्याप्रमाणें विरक्त पुरुष स्त्रीच्या योगानें ( सुखदुःखांच्या फेऱ्यांत ) सांपडला जातो. १०१३. जेव्हां पुरुषास गुणांची संगति घडते, तेव्हां तो स्वभावतः जन्मशून्य व नित्य असूनही, त्याच्या अंगावर जन्ममृत्यूचे तडाखे बसतात. १०१४. परंतु अर्जुना, तें असें आहे कीं, जसें तापलेल्या लोखंडावर घण मारले असतां, ते घणाचे तडाखे अग्नीलाच बसतात असें जसें म्हणतात. १०१५. अथवा पाणी हाललें असतां चंद्राचीं अनेक प्रतिबिंबें होतात, त्या वेळीं ( अज्ञानी ) लोक चंद्राचे ठिकाणीं जसें अनेकत्व आहे असें म्हणतात. १०१६. आरशाच्या जवळपणामुळें पहाणाऱ्याच्या मुखाला दुसरेपण येतें, अथवा केशराच्या सान्निध्यामुळें स्फटिकाला तांबडेपणा येतो. १०१७. त्याप्रमाणें, हा पुरुष स्वतः अजन्मा असून गुणसंबंधानें जन्म पावतो असें वाटतें, एऱ्हवीं ( गुणांचा संबंध टाकून पाहिलें तर ) तो जन्म पावत नाहीं. १०१८. ज्याप्रमाणें संन्यासी स्वप्नामध्यें अंत्यजादि जाति होतो, त्याप्रमाणें या पुरुषास नीच व उच्च योनी आहेत, असें समज. १०१९. म्हणून केवळ पुरुषाला जन्मणें व भोगणें हें नाहीं असें समजा. त्याचें जन्मणें व भोगणें वगैरे सर्व गोष्टींशीं जो संबंध दिसतो, त्याला कारण पुरुषाला असलेली गुणांची संगति ही होय. १०२०.

प्रकृतीच्या जवळ राहून प्रकृतिकार्याहून आपणांस वेगळा पहाणारा, अनुमोदन देणारा ( शास्ता ) भर्ता, उपभोग घेणारा, महेश्वर, या शरीरामध्यें परमात्मा असें ज्याला म्हणतात, प्रकृतीच्या पलीकडचा असा पुरुष, अशी ज्यासंबंधीं वदंता आहे, ( तो हाच ) २२.

हा पुरुष प्रकृतीमध्यें उभा आहे ( खरा ), परंतु जुईच्या वेलास जसा आश्रयभूत खांब उभा केलेला असतो, त्या खांबाप्रमाणें हा पुरुष प्रकृतीला केवळ आश्रयभूत आहे; पृथ्वी व आकाश यांमध्यें जेवढें अंतर आहे, तेवढें अंतर प्रकृति व पुरुष यांमध्यें आहे. १०२१. ( अर्जुना ) प्रकृतिरूप नदीच्या तीरावर मेरुपर्वतासारखा हा असून, तिच्यामध्यें याचें प्रतिबिंब पडतें; परंतु तिच्या प्रवाहाबरोबर हा वाहात जात नाहीं. १०२२ प्रकृति होते व जाते; परंतु हा ( पुरुष ) आहे तसाच आहे; म्हणून हा मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचें नियमन करणारा आहे. १०२३. प्रकृति याच्या योगानें जगते व याच्या सत्तेनें जगास प्रसवते, म्हणून हिला हा नवरा आहे, १०२४. अर्जुना, अनंत कालापासून ज्या ज्या सृष्टया उत्पन्न होतात, त्या कल्पांताच्या वेळेस ह्याच्या पोटांत प्रवेश करितात. १०२५. हा ( पुरुष ) प्रकृतीचा धनी आहे, हा ब्रह्मांडाचा सूत्रधार आहे व आपल्या अनंतत्वानें तो या मर्यादित प्रपंचाला मोजून टाकतो ( म्हणजे याच्या व्याप्तीचा विचार केला असतां, संसाराचा बाध होतो. ) १०२६. आणि या देहामध्यें परमात्मा आहे, अशा प्रकारचें जें बोलतात, तें यालाच असें समज. १०२७. अरे अर्जुना, प्रकृतीपलीकडे ( कोणी ) एक आहे. अशी जी वदंता आहे ( असें जे लोक म्हणतात ), तो वस्तुतः हाच पुरुष आहे. १०२८.

पुरुष आणि प्रकृति, यांना जो ( या त्यांच्या ) गुणांसह याप्रमाणें ( म्हणजे पुरुष हा, प्रकृति व तत्कार्य गुण यांहून, भिन्न आहे असें ) जाणतो, तो सर्व कर्में करीत असला, तरी पुनः कधींही जन्म पावत नाहीं. २३.

जो निखळपणें येणें । पुरुषातें यया जाणे । आणि गुणाचें करणें । प्रकृतीचें तें ॥२९॥ हें रूप हे छाया । पैल जळ हे माया । ऐसा निवाडु धनंजया । जेवीं कीजे ॥ १०३० ॥ तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवंचना । जयाचिया मना । गोचर जाहली ॥ ३१ ॥ तो शरीराचेनि मेळें । करू कां कर्मे सकळें । परि आकाश धुये न मैळे । तैसा असे ॥ ३२ ॥ आथिलेनि देहें । जो न घेपे देहमोहें । देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥ ३३ ॥ ऐसा तया एकु । प्रकृतिपुरुषविवेकु । उपकारु अलौकिकु । करी पैं गा ॥ ३४ ॥ परि हाचि अंतरीं । विवेक भानूचियापरी । उदैजे ते अवधारीं । उपाय बहुत ॥ ३५ ॥

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना । अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चाऽपरे ॥ २४ ॥

कोणी एकु सुभटा । विचाराचां आगिटां । आत्मानात्मकिटा । पुटें देउनी ॥ ३६ ॥ छत्तीसही वानीभेद । तोडोनियां निर्विवाद । निवडिती शुद्ध । आपणपें ॥३७॥ तया आपणपयाचां पोटीं । आत्मध्यानाचिया दिठी । देखती गा किरीटी । आपणपेंचि ॥ ३८ ॥ आणिक पैं दैववशें । चित्त देती सांख्ययोगें । एक ते अंगलगें । कर्माचेनि ॥ ३९ ॥

अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते । तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

येणें येणें प्रकारें । निस्तरती साचोकारें । हें भवभेउरें । आघवेंचि ॥ १०४० ॥ परि ते करिती ऐसें । अभिमानु दवडूनि देशें । एकाचिया विश्वासें । टेंकती बोला ॥ ४१ ॥ जे हिताहित देखती । हानि कणवा घेपती । पुसोनि शिणु हरिती । देती सुख ॥ ४२ ॥ तयांचेनि मुखें निघे । तेतुलें आदरें चांगें । ऐकोनियां आंगें । मनें होती ॥ ४३ ॥ तया ऐकणेयाचि नांवें । ठेविती गा आघवें । तया अक्षरांसी जीवें । लोण करिती ॥ ४४ ॥ तेही अंतीं कपिध्वजा । इया मरणार्णव- समाजा– । पावूनि निघती वोजा । गोमटिया ॥ ४५ ॥ ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहे । जाणावया होये । एकी वस्तु ॥ ४६ ॥ आतां पुरे हें बहुत । पैं सर्वार्थाचें मथित । सिद्धांतनवनीत देऊं तुज ॥ ४७ ॥ येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता । येर तंव तुज होतां । सायास नाहीं ॥ ४८ ॥ म्हणोनि बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं । सोलींव निर्वचूं । फलितार्थुचि ॥ ४९ ॥

यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् । क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥

तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें । तुज आपणपें जें दाविलें । आणि क्षेत्र सांगितलें । आघवें जें ॥ १०५० ॥ तया येरयेरांचां मेळीं । होइजे भूतीं सकळीं । अनिलसंगें जळीं । कल्लोळ जैसें ॥ ५१ ॥ कां तेजा आणि उखरा । भेटी जालिया वीरा । मृगजळाचिया पुरा । रूप होय ॥५२॥

अशा या शुद्धपणानें या पुरुषाला जो जाणतो आणि गुणांचें करणें, तें प्रकृतीचें आहे असें जाणतो. १०२९. हा देह व ही त्याची छाया, पलीकडे दिसतें तें ( खरें ) पाणी आहे व येथें जें पाण्यासारखें दिसत आहे तें खोटें ( मृगजल ) आहे, अर्जुना, याप्रमाणें जशी निवड करावी; १०३०. अर्जुना, त्याप्रमाणें ज्याच्या मनाला प्रकृतिपुरुषांतील भेदाचा विचार स्पष्ट कळला, १०३१. तो शरीराच्या संगतीनें सर्व कर्में करीना का ? परंतु आकाश जसें धुरानें मळत नाहीं, तसा तो आहे. ( सर्व कर्में करीत असतांना तो त्या कर्मांकडून लिप्त होत नाहीं. ) १०३२. देह असतांना जो त्या देहाच्या मोहानें भुलला जात नाहीं; तो देह पडल्यावर पुनः जन्म पावत नाहीं. १०३३. हा प्रकृतिपुरुषविचार, त्या मनुष्यावर, असा एक लोकोत्तर उपकार करतो. १०३४. परंतु हाच विचार अंतःकरणांत सूर्याप्रमाणें प्रकाशित होण्यास पुष्कळ उपाय आहेत, ते ऐक. १०३५.

कित्येक आपल्या ठिकाणीं ( आत्मानात्म्याच्या सरमेसळींत ) आपणांस ( आपल्या शुद्ध आत्मस्वरूपास ) आत्मध्यानाच्या योगानें ( आत्मानात्मविचारानें, निवडून ) पहातात. दुसरे कोणी सांख्ययोगानें आणि कांहीं कर्मयोगानें जाणतात. २४.

हे चांगल्या योद्धया, अर्जुना, कित्येक पुरुष विचाररूप अग्नींत आत्मानात्ममिश्रणरूपी हिणकस सोन्यास पुटें देऊन, १०३६. छत्तीसही अनात्मरूप प्रकारचे भेद निःसंशय जाळून, ( म्हणजे विचारानें त्यांचें निरसन करून ), आपला शुद्ध आत्मभाव निवडतात. १०३७. त्या आत्मभावाच्या पोटांत ( स्वरूपांत ) आत्मध्यानरूपी दृष्टीनें अर्जुना, ते आपण आपल्यालाच पहातात. १०३८. आणि कित्येक लोक दैववशात् सांख्ययोगाच्या द्वारें ( आत्म्याकडे ) चित्त देतात, आणखी कित्येक कर्मयोगाचा आश्रय करून ( आत्म्यास ) पहातात. १०३९.

दुसरे कोणी याप्रमाणें ( आत्म्याला ) न जाणणारे दुसऱ्यांपासून ( म्हणजे आचार्यादिकांपासून ) श्रवण करून उपासना करतात. श्रवण केलेल्या गोष्टी प्रमाण मानणारे असे ते देखील मृत्यूला तरून जातात. २५.



याहून कित्येक दुसरे–स्वतः आत्म्याला न जाणणारे– या प्रकारांनींच सर्व संसारभय खरोखर निस्तरतात ( चांगल्या तऱ्हेनें तरून जातात. ) १०४०. परंतु ते असें करतात कीं, अभिमान देशोधडी करून एकाच्या ( गुरूच्या ) उपदेशावर विश्वासानें अवलंबून राहतात. १०४१. जे ( गुरु ) हिताहित पाहतात, जे शिष्याच्या हानींच्या बाबतींत दयेनें व्यापले जातात व शिष्याला दुःख कशानें होतें, हें विचारून त्याचें दुःख हरण करतात आणि सुख देतात, १०४२. त्यांच्या (गुरूंच्या) मुखांतून जेवढें निघेल, तेवढें चांगल्या आदरानें ऐकून, अंगानें व मनानें ते तसेच होतात. १०४३. आपल्या सर्व कर्तव्यास, ऐकण्याचेंच नांव ठेवतात ( ऐकणें हेंच एक आपलें जन्मास येऊन कर्तव्य आहे असें समजतात. ) आणि त्या गुरुमुखांतल्या अक्षरांवरून आपला जीव ओंवाळून टाकतात. १०४४. हे कपिध्वजा, ते देखील या मरणरूपी समुद्राच्या समुदायापासून ( जन्ममरणपरंपरेपासून ) चांगल्या रीतीनें बाहेर पडतात. १०४५. एक परमात्मा जाणावयाला येथें हे पुष्कळ असे उपाय आहेत; पहा ! १०४६. आतां याविषयीं फार बोलणें पुरे. ( आतांपर्यंत सांगितलेलें ) सर्व अभिप्राय घुसळून काढलेलें सिद्धांतरूप लोणी तुला देतों ( आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व अर्थांचें तात्पर्य सांगतों. ) १०४७. अर्जुना, एवढ्यानें तुला आयता अनुभव मिळणारा आहे. मग इतर ( म्हणजे ब्रह्मानुभवानंतर होणारा विलक्षण आनंद, शांति वगैरे ) होण्याला तर तुला श्रम पडणार नाहींत. १०४८. म्हणून त्या सिद्धांताची व्यवस्थित मांडणी बुद्धीनें करूं व इतर मतांच्या दुराग्रहाचें खंडन करूं व स्वच्छ गर्भित अर्थच विस्तारानें सांगूं. १०४९.

हे भरतश्रेष्ठा, जो जो स्थावर अथवा जंगम पदार्थ उत्पन्न होतो, तो तो क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून उत्पन्न होतो, असें जाण. २६.

तर क्षेत्रज्ञ या शब्दानें जें मीं आपलें स्वरूप तुला दाखविलें आणि जें सर्व क्षेत्र सांगितलें, १०५०. वाऱ्याच्या संबंधानें जशा पाण्यावर लाटा येतात, त्याप्रमाणें या क्षेत्र-क्षेत्रज्ञांच्या एकमेकांच्या मिलाफांत ( संबंधांत ) सर्व प्राणी उत्पन्न होतात. १०५१. अथवा सूर्यकिरणें व बरड जमीन यांचा संबंध झाला म्हणजे अर्जुना, मृगजळाचा महापूर जसा प्रत्यक्ष दिसतो. १०५२.

नाना धाराधरधारीं । झळंबलिया वसुंधरी । उठिजे जेवीं अंकुरीं । नानाविधीं ॥ ५३ ॥ तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीवु नांवें । तें तों उभययोगें संभवे । ऐसें जाण ॥ ५४ ॥ इयालागीं अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना- । पासूनि न होती भिन्ना । भूतव्यक्ति ॥ ५५ ॥

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् । विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥

पैं पटत्व तंतु नव्हे । तरि तंतूसीचि तें आहे । ऐसां खोलीं डोळां पाहें । ऐक्य हें गा ॥ ५६ ॥ भूतें आघवींचि होती । एकाचीं एक आहाती । परी पैं भूतप्रतीतीं । वेगळीक असे ॥ ५७ ॥ यांचीं नामेंही आनानें । अनारिसीं वर्तनें । वेषही सिनाने । आघवेयांचे ॥ ५८ ॥ ऐसें देखोनि किरीटी । भेद सूसी हन पोटीं । तरि जन्माचिया कोटी । न लाहसी निघों ॥ ५९ ॥ पैं नानाप्रयोजनशीळें । दीर्घें वक्रें वर्तुळें । होती एकीचींच फळें । तुंबिणीयेचीं ॥ १०६० ॥ होतु कां उजू वांकुडें । परि बोरीचें हें न मोडे । तैसीं भूतें अवघडें । वस्तु उजू ॥६१॥ अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैसी । तैसा नाना जीवराशीं । परेशु असे ॥ ६२ ॥

समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् । न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥

गगनभरी धारा । परी पाणी एकचि वीरा । तैसा या भूताकारा । सर्वांगीं तो ॥ ६३ ॥ हे भूतग्राम विषम । परी वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योम । जियापरी ॥ ६४ ॥ हा नाशतां भूताभासु । एथ आत्मा तो अविनाशु । जैसा केयूरादिकीं कसु । सुवर्णाचा ॥ ६५ ॥ एवं जीव- धर्महीनु । जो जीवासीं अभिन्नु । देखे तो सुनयनु । ज्ञानियांमाजीं ॥ ६६ ॥ ज्ञानाचा डोळा डोळसां- । माजीं डोळसु तो वीरेशा । हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ ६७ ॥ जे गुणेंद्रियधोकटी । देह धातूंची त्रिकुटी । पांचमेळावा वोखटी । दारुण हे ॥ ६८ ॥ हे उघड पांचवेउली । हे पंचधा आंगीं लागली । जीवपंचानना सांपडली । हरिणकुटी हे ॥ ६९ ॥ ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाचां उदरीं । दाटीचिना ॥ १०७० ॥ परी इये देहीं असतां । जो नयेचि आपणया घाता । आणि शेखीं पंडुसुता । तेथेंचि मिळे ॥ ७१ ॥ जे योगज्ञानाचिया प्रौढी । वोलांडूनियां जन्मकोडी । न निगों इया भाषा बुडी । देती योगी ॥ ७२ ॥ जें आकाराचें पैल तीर । जें नादाची पैल मेर । तुर्येचें माजघर ।

अथवा पर्जन्याच्या धारांनीं ( वृष्टीनें ) भिजलेल्या पृथ्वीमध्यें, जसे नाना प्रकारचे अंकूर उगवतात. १०५३. त्याप्रमाणें जीव या नांवानें जें कांहीं सर्व चराचर आहे, तें तर या उभयतांच्या ( क्षेत्र-क्षेत्रज्ञांच्या ) मिलाफानें उत्पन्न होतें, असें समज. १०५४. अर्जुना, याकरितां आकाराला आलेले सर्व पदार्थ, हे पुरुष व प्रकृति यांच्यापासून भिन्न नाहींत. १०५५.

सर्व भूतांच्या ठिकाणीं सारखाच असणाऱ्या व या नाश पावणाऱ्या भूतांमध्यें अविनाश असलेल्या अशा परमेश्वरास जो जाणतो, तोच ज्ञान्यांतील डोळस होय. २७.

वस्त्रपणा हें जरी सूत नाहीं, तरी पण वस्त्रपणा हा सुतावरच आहे. अशा सूक्ष्म विचारानें हें ऐक्य समजून घे. १०५६. सर्व भूतें हीं एकाच वस्तूपासून होतात व तीं सर्व एकच आहेत; परंतु हीं भूतें पहाणारास भिन्न भिन्न रूपानें अनुभवास येतात. १०५७. या भूतांचीं नांवेंही निरनिराळीं आहेत; यांच्या वागणुकी भिन्न भिन्न आहेत व या सर्वांचे वेषही वेगवेगळे आहेत. १०५८. अर्जुना, असें पाहून जर तूं आपल्या पोटांत ( मनांत ) द्वैताच्या कल्पनेचा शिरकाव होऊं देशील, तर कोट्यावधि जन्म गेले तरी तुला या जन्मांतून बाहेर पडतां यावयाचें नाहीं. १०५९. अनेक कारणांमुळें लांब, वाकडीं व वाटोळीं अशा वेगवेगळ्या आकाराचीं दुध्या भोपळ्याचीं फळें, जशीं एकाच भोपळ्याच्या वेलीपासून उत्पन्न होतात. १०६०. बोरीचें लांकूड सरळ अथवा वांकडें असेना का ? पण बोरीचें, यांत अन्यथा होत नाहीं. त्याप्रमाणें प्राणी जरी भिन्न भिन्न प्रकारचे असले, तरी ( त्यांत व्यापून असणारी ) ब्रह्मवस्तु सरळ आहे. १०६१. निखाऱ्याच्या पुष्कळ ठिणग्यांतून उष्णता जशी एकसारखी असते, त्याप्रमाणें अनेक जीवराशींतून एक परमात्मा आहे. १०६२.

ईश्वर सर्वत्र समानत्वानें स्थित आहे असें जाणणारा स्वतःचा घात करीत नाहीं ( देह मी आहें असें समजत नाहीं. ) नंतर (म्हणजे असें जाणल्यानंतर ) तो श्रेष्ठ गति ( परब्रह्मस्वरूप ) पावतो. २८.

अर्जुना, पावसाच्या धारा जरी सर्व आकाशभर असल्या, तरी पण त्या सर्वांतून जसें पाणी एकच आहे; त्याप्रमाणें या भूताकाराच्या सर्वांगांत तो परमात्मा आहे. १०६३. ज्याप्रमाणें घागरींत व घरांत आकाश एकच असतें, त्याप्रमाणें हे भूतसमुदाय जरी वेगवेगळे आहेत, तरी यांत व्यापून असणारी जी वस्तु, ती एकसारखीच आहे. १०६४. ज्याप्रमाणें बाहुभूषणादिक अनेक अलंकारांतून सोन्याचा कस एकच असतो ( आणि ) त्या केयूरादिक अलंकारांची वांटणी केली असतां, जसा सोन्याचा कस नाश पावत नाहीं, त्याप्रमाणें हा भूताभास नाश पावणारा आहे, पण या भूताभासांत असणारा आत्मा अविनाश आहे. १०६५. याप्रमाणें परमात्मा हा जीवधर्मरहित आहे व तो सर्व जीवांत व्यापून आहे. याप्रमाणें जो परमात्म्याला जाणतो, तो ज्ञान्यांमध्यें चांगला डोळस आहे. १०६६. अर्जुना, ज्ञानाच्या दृष्टीनें जे चांगले डोळस आहेत, त्यांमध्यें तो डोळस आहे. ही त्याची स्तुति नसून तो फारच भाग्यवान आहे. १०६७. कारण कीं, देह हा, गुण व इंद्रियें यांची राहण्याची थोकटी आहे; देह हा ( कफ, वात, पित्त या ) तीन धातूंनीं बनलेला आहे; हा पंचमहाभूतांचा समुदाय आहे, तो वाईट व भयंकर आहे; १०६८. हा देह म्हणजे उघड पांच नाग्यांची इंगळी आहे; (अथवा) वेगवेगळ्या पांच ठिकाणीं दंश करणारी आहे. जीवरूप सिंहाला हा देह, हें एक हरणाचें ( रहाण्याचें ) घरच सांपडलें आहे. १०६९. त्याप्रमाणें या देहांत, हा जीव असा ( सिंहासारखा ) असंग, नित्य, शुद्ध, बुद्ध व स्वतंत्र असून आपण नित्य आहोंत, अशी ही बुद्धिरूपी सुरी, अनित्य भावाच्या पोटांत कशी चालवीत नाहीं ? ( आपल्या नित्यभावाच्या स्फूर्तीनें, अनित्यभावाचा नाश कां करीत नाहीं, हें आश्चर्य आहे.) १०७०. ( येथपर्यंत देहाशीं तादात्म्य करून असणाऱ्या मूर्खांची स्थिति सांगितली व या ओंवीपासून पुढें, मागें सांगितलेल्या भाग्यवान् ज्ञानी पुरुषाचें वर्णन करितात.) परंतु ज्ञानी पुरुष या देहांत असतांना, ( देहतादात्म्यानें ) आपल्या घातावर येत नाहीं, ( म्हणजे आपला घात करून घेत नाहीं;) आणि अर्जुना, शेवटीं (मरणानंतर) तो तेथें (ब्रह्मस्वरूपांत) मिळतो. १०७१. कोट्यवधि जन्म ओलांडून, योग व ज्ञान यांच्या बळानें, योगी लोक, आपण त्या ब्रह्मस्वरूपांतून बाहेर पडणार नाहीं, अशा कृतनिश्चयानें, ज्या ब्रह्मस्वरूपाचें ठिकाणीं बुडी देऊन राहातात, १०७२. जें आकाररूप नदीचा पलीकडला कांठ आहे, ( निराकार आहे ), व जें ब्रह्म नादाची पलीकडली कड आहे ( शब्दातीत आहे ), व

परब्रह्म जें ॥ ७३ ॥ मोक्षासकट गती । जेथें येती विश्रांती । गंगादि अपांपती । सरिता जेवीं ॥७४॥ तें सुख येणेंचि देहें । पायपाखाळणिया लाहे । जो भूतवैषम्यें नोहे । विषमबुद्धी ॥७५॥ दीपांचां कोडीं जैसें । एकाचि तेज सरिसें । तैसा जो असे । सर्वत्र ईशु ॥ ७६ ॥ ऐसेनि समत्वें पंडुसुता । जिये जो देखतसाता । तो मरणा आणि जीविता । नागवे फुडा ॥ ७७ ॥ म्हणोनि तो दैवागळा । वानीत असों वेळोवेळां । जे साम्यसेजे डोळा । लागला तया ॥ ७८ ॥

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः । यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

आणि मनोबुद्धिप्रमुखें । कर्मेंद्रियें अशेखें । करी प्रकृतीचि हें देखे । साचें जो गा ॥ ७९ ॥ घरींचीं राहटती घरीं । घर कांहीं न करी । अभ्र धांवे अंबरीं । अंबर उगें ॥१०८०॥ तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणीं विविधारंभा । येथ आत्मा तो वोथंबा । नेणे कोण ॥८१॥ ऐसेनि ग्रेणें निवाडें । जयाचां जीवीं उजिवडें । अकर्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥ ८२ ॥ एऱ्हवीं तेंचि अर्जुना । होईजे ब्रह्मसंपन्ना । जैं या भूताकृती भिन्ना । दिसती एकी ॥ ८३ ॥

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति । तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥

लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका स्थळीं । रश्मीकर मंडळीं । सूर्याचां ॥ ८४ ॥ नातरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव । विस्फुलिंग सावेव । वन्हीं एकीं ॥ ८५ ॥ तैसे भूताकार एकाचे । हें दिठी रिगे जैं साचें । तैंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारूं लागे ॥ ८६ ॥ मग जयातयाकडे । ब्रह्मेंचि दिठी उघडे । किंबहुना जोडे । अपार सुख ॥ ८७ ॥ येतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुषव्यवस्था । ठायेंठावो प्रतीतिपथा- । माजीं जाहली ॥ ८८ ॥ अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळां । तेतुला जिव्हाळा । मानावा गा ॥ ८९ ॥ हा जी जाहलिये प्रतीती । घर बांधणें जें चित्तीं । तें आतां ना सुभद्रापती । इयावरी ॥ १०९० ॥ तरी एकदोन्ही ते बोल । बोलिजती सखोल । देईं मनातें बोल । मग ते घेईं ॥ ९१ ॥ ऐसें देवें म्हणितलें । मग बोलों आदरिलें । तेथें अवधानाचेंचि केलें । सर्वांग येरें ॥ ९२ ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः । शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

म्हणे परमात्मा म्हणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें । जळीं जळें न लिंपे । सूर्यु जैसा ॥९३॥ कां जे जळा आदीं पाठीं । सूर्य असतुचि असे किरीटी । माजीं बिंबे तें दृष्टी । आणिकांचिये ॥९४॥ तैसा आत्मा देहीं । आथि म्हणिपे हें कांहीं । साचें तरी नाहीं । तो जेथिंचा तेथें ॥९५॥ आरिसां

जें परब्रह्म तूर्यावस्थेचें मध्यघर (गाभा) आहे, १०७३. ज्याप्रमाणें गंगा वगैरे नद्या समुद्राच्या ठिकाणीं विश्रांतीला येतात, त्याप्रमाणें मोक्षासुद्धां सर्व साध्यें, जेथें (ब्रह्माच्या ठिकाणीं), विश्रांतीला येतात. १०७४. भूतांच्या भिन्नपणानें ज्याची बुद्धि भिन्न होत नाहीं (भेदाला पावत नाहीं) त्याला तें सुख याच देहांत पाय धुण्यास प्राप्त होतें (म्हणजे विपुल मिळतें.) १०७५. कोट्यवधि दिव्यांत जसें एकच तेज सारखें असतें; तसा जो ईश्वर सर्वत्र (चराचरांत) भरलेला आहे. १०७६. अर्जुना, अशा समत्वानें (चराचराकडे) पहात असतां जो जगतो, तो खरोखर जन्ममरणाच्या स्वाधीन होत नाहीं. १०७७. म्हणून तो फार भाग्यवान् आहे, असें आम्ही त्याचें वारंवार वर्णन करितों. कारण कीं, त्याला अभेदभावरूपी बिछान्यावर डोळा लागला आहे. (तो अभेदभावांत स्थिर झाला आहे.) १०७८.

सर्व प्रकारें कर्मे प्रकृतीकडून केलीं जातात आणि आत्मा अकर्ता आहे असें जो जाणतो, तोच खरा ज्ञानी होय. २९.

आणि मन व बुद्धि ज्यांत प्रमुख आहेत, अशीं ज्ञानेंद्रियें व सर्व कर्मेंद्रियें यांच्यापासून होणारीं जीं कर्में, तीं प्रकृतीच करते, असें जो खरोखर जाणतो. १०७९. घरांतील माणसें घरांत वागतात व घर कांहींएक करीत नाहीं व आकाशांत ढग धांवतात, पण आकाश स्थिर असतें. १०८०. त्याप्रमाणें प्रकृति ही आत्म्याच्या प्रकाशानें नाना प्रकारच्या कर्मांचा आरंभ करून त्रिगुणांनीं खेळत असते व येथें (सर्व कर्मांत) आत्मा हा खांबासारखा (केवळ आधारभूत) असतो व कोण कर्में करतो, हें तो जाणत नाहीं. १०८१. अशा या निर्णयानें ज्याच्या अंतःकरणांत प्रकाश पडला त्यानें खरोखर अकर्त्या आत्म्याला जाणलें. १०८२. सहज विचार करून पाहिलें तर, अर्जुना, ज्या वेळीं या भिन्न आकारांचीं भूतें एक आहेत असा बोध होईल, त्याच वेळीं ब्रह्मसंपन्न होता येईल. १०८३.

भूतांचा पृथग्भाव (निरनिराळेपणा) एका (आत्म्याचे) ठिकाणीं स्थित आहे आणि त्याचाच (आत्म्याचाच हा) विस्तार आहे, असें जेव्हां तो नीट जाणतो, तेव्हां त्याला ब्रह्माची प्राप्ति होते. ३०.

लाटा जशा पाण्यावर, परमाणूंचे कण जसे पृथ्वीवर, (अथवा) किरणें जशीं सूर्यमंडलावर; १०८४. अथवा देहाच्या ठिकाणीं जसे अवयव अथवा मनाच्या ठिकाणीं जशा सर्व कल्पना अथवा एका अग्नीच्या ठिकाणीं जशा सर्व ठिणग्या, १०८५. त्याप्रमाणें एका ब्रह्माचे सर्व भूताकार आहेत, हें ज्या वेळेला खरोखर दृष्टींत प्रवेश करील (खरोखर अनुभवाला येईल) त्याच वेळीं ब्रह्मरूप संपत्तीचें जहाज मिळेल. १०८६. मग जिकडे तिकडे डोळ्याला ब्रह्मच दिसेल. फार काय सांगावें! त्याच अमर्याद सुख प्राप्त होईल. १०८७. अर्जुना, एवढ्यानें प्रकृतिपुरुषविचार जसा पाहिजे तसा तुझ्या अनुभवाच्या मार्गांत आला. (तुला पूर्णपणें कळला) १०८८. अरे, चूळ भरावयास जसें अमृत मिळावें अथवा ठेवा जसा डोळ्यांनीं पाहावा, त्याप्रमाणें हा प्रकृतिपुरुषविचाराचा तुला मिळालेला लाभ तितक्याच योग्यतेचा समजावा. १०८९. बा अर्जुना, जो अनुभव प्राप्त झाला असतांना त्या अनुभवाचें चित्तांत घर बांधावयाचें, (म्हणजे तो अनुभव चित्तांत कायम ठेवावयाचा) तें आतांच नाहीं, तर यानंतर १०९०. आतां त्या एकदोन गूढ गोष्टी तुला सांगितल्या जातील, तर तूं मनाला जामीन दे आणि मग त्या घे, (म्हणजे ऐक.) १०९१. असें देवानें म्हटलें व मग बोलावयास आरंभ केला. तेव्हां अर्जुनानें, आपलें सर्व अंग अवधानरूप केलें. १०९२.

हे कौन्तेया, अनादि आणि गुणरहित असल्या-मुळें हा परमात्मा अव्यय आहे व तो जरी शरीराचे ठिकाणीं स्थित असला तरी (कांहीं कर्म) करीत नाहीं; (सर्व कर्मांपासून) अलिप्त असतो. ३१.

(श्रीकृष्ण) म्हणाले, ज्याप्रमाणें सूर्य पाण्यांत प्रतिबिंबित झालेला दिसला, तरी तो पाण्यानें ओला होत नाहीं, त्याप्रमाणें परमात्मा म्हणून ज्यास म्हणतात, तो प्रकृतींत असूनही, प्रकृतीच्या गुणांनीं लिप्त होत नाहीं, (तो शुद्धच राहतो) अशा स्वरूपाचा तो आहे असें समज. १०९३ कारण कीं, अर्जुना जळाच्या आधीं आणि नंतर सूर्य आहेच आहे. पाण्यामध्यें तो प्रतिबिंबित होतो, तें दुसऱ्या-च्या दृष्टीनें. (वास्तविक सूर्य कांहीं पाण्यांत सांपड-लेला नाहीं.) १०९४. त्याप्रमाणें आत्मा देहांत आहे, असें जें म्हटलें जातें, तें कांहीं खरें नाहीं, तर आत्मा जेथें आहे तेथेंच आहे. १०९५. आरशांत मुख बिंबलें असतां,

सुख जैसें। विंबलिया नाम असे। देहीं वसणें तैसें। आत्मतत्त्वा ॥ ९६ ॥ तया देहा म्हणती भेटी। हे सपायी निर्जिव गोठी। वारिया वाळुवे गांठी। कैंही आहे ॥ ९७ ॥ आगी आणि पींसा। दोरा सुवावा कैसा। केउता सांदा आकाशा। पाषाणेंसी ॥९८॥ एक निघे पूर्वेकडे। एक तें पश्चिमेकडे। तियें भेटीचेनि पाडें। संबंधु हा ॥९९॥ उजिवडा आणि अंधारेया। जो पाडु मृता उभया। तोचि गा आत्मया। देहा जाण ॥११००॥ रात्री आणि दिवसा। कनका आणि कापुसा। अपाडु कां जैसा। तैसाचि हा ॥१॥ देह तंव पांचांचें जालें। हें कर्माचां गुणीं गुंथलें। भंवतसे चाकी सूदलें। जन्ममृत्यूचां ॥ २ ॥ हें काळानळाचां कुंडीं। घातली लोणियाची उंडी। माशी पांखु पाखडी। तंव हें सरे ॥३॥ हें विषायें आगी पडे। तरी भस्म होऊनि उडे। जाहलें श्वाना वरपडें। तरी ते विष्ठा ॥४॥ या चुके दोन्हीं काजा। तरी होय कृमींचा पुंजा। हा परिणामु कपिध्वजा। कश्मलु गा ॥५॥ या देहाची हे दशा। आणि आत्मा तो एथ ऐसा। पैं नित्य सिद्ध आपैसा। अनादिपणें ॥६॥ सकळु ना निष्कळु। अक्रियु ना क्रियाशीळु। कृश ना स्थुळु। निर्गुणपणें ॥७॥ आभासु ना निराभासु। प्रकाशु ना अप्रकाशु। अल्प ना बहुवसु। अरूपपणें ॥८॥ रिता ना भरितु। रहितु ना सहितु। मूर्तु ना अमूर्तु। शून्यपणें ॥९॥ आनंदु ना निरानंदु। एकु ना विविधु। मोकळा ना बद्धु। आत्मपणें ॥ १११० ॥ येतुला ना तेतुला। आइता ना रचिला। बोलता ना उगला। अलक्षपणें ॥११॥ सृष्टीचां होणां न रचे। सर्वसंहारें न वेंचे। आथी नाथी या दोहींचें। पंचत्व तो॥१२॥ मवे ना चर्चे। वाढे ना खांचे। विटे ना वेंचे। अव्ययपणें ॥ १३ ॥ एवंरूप पैं आत्मा। देहीं जें म्हणती प्रियोत्तमा। तें मठाकारें व्योमा। नाम जैसें ॥१४॥ तैसें तयाचिये अनुस्यूती। होती जाती देहाकृती। तो घे ना सांडी सुमती। जैसा तैसा ॥१५॥ अहोरात्रें जैशीं। येती जाती आकाशीं। आत्मसत्ते तैसीं। देहें जाण ॥ १६ ॥ म्हणोनि इये शरीरीं। कांहीं करवी ना करी। आयताही व्यापारीं। सज्जु नव्हे ॥ १७ ॥ यालागीं स्वरूपें। उणा पुरा न घेपे। हें असो तो न लिंपे। देहीं देहा ॥ १८ ॥

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते। सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥

अगा आकाश कें नाहीं। हें न रिघेचि कवणे ठायीं। परि कायिसेनि कहीं। गादिजेना जैसें ॥ १९ ॥ तैसा सर्वत्र सर्व देहीं। आत्मा असतुचि असे पाहीं। संगदोषें एक्रेंही। लिप्तु नव्हे ॥ ११२० ॥ पुढतपुढती एथें। हेंचि लक्षण निरुतें। जे जाणावें क्षेत्रज्ञातें। क्षेत्रविहिना ॥ २१ ॥ संसर्गें चेष्टिजे लोहें। परि लोह भ्रामक नोहे। क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे। तेतुला

त्यास प्रतिबिंब असें आपण म्हणतों, त्याप्रमाणें देहामध्यें आत्मतत्त्वाचें राहणें आहे. ( देहांत आत्मतत्त्व प्रतिबिंबरूपानें असतें. ) १०९६. त्याचा व देहाचा संबंध आहे असें जें म्हणतात, तें म्हणणें सर्वथैव निर्जीव आहे. वाऱ्याची व वाळूची गांठ बांधणें, हें कोठें आहे काय ? १०९७. अग्नि आणि पींस यांना दोरा कसा घालावयाचा, ( म्हणजे या दोघांचा संबंध कसा जोडावयाचा ? ) आकाश व दगड यांचा सांधा कसा जोडावयाचा ? १०९८. एक मनुष्य पूर्वेकडे निघाला व दुसरा पश्चिमेकडे निघाला. त्यांच्या भेटीप्रमाणें देहाचा व आत्म्याचा संबंध आहे. १०९९. उजेड आणि अंधार यांत जें सादृश्य, अथवा मेलेला व जिवंत यांत जें सादृश्य, तेंच सादृश्य, अर्जुना, आत्मा व देह यांमध्यें आहे, असें समज. ११००. रात्र व दिवस, सोनें व कापूस, यांमध्यें जितकें असादृश्य ( अंतर ) आहे, तसेंच असादृश्य आत्मा व देह यांमध्यें आहे. ११०१. हा देह तर पंचमहाभूतांचा आहे व कर्मांच्या दोरानें गुंफलेला आहे व जन्ममृत्यूच्या चाकावर घातलेला असून गरगरा फिरत आहे. ११०२. काळरूपी अग्नीच्या कुंडांत हा ( देह ) लोण्याचा गोळा घातलेला आहे व माशी आपले पंख फडकावते तोंच (तितक्या काळांतच), हा (देह) नाश पावतो. ११०३. हा देह कदाचित् अग्नींत पडला, तर राख होऊन उडून जातो व कुत्र्याच्या तावडींत जर हा देह सांपडला, तर त्याची विष्ठा होते. ११०४. वरील या दोन परिणामाला जर तो चुकला, तर तो ( देह ) किड्यांचा ढीग होतो. असा हा देहाचा परिणाम, अर्जुना, वाईट आहे. ११०५. या देहाची अशी अवस्था आहे आणि आत्मा तर असा आहे कीं, अनादिपणामुळें तो ( आत्मा ) स्वभावतः नित्य व सिद्ध आहे. ११०६. तो ( आत्मा ) निर्गुण असल्यामुळें भागसहित नाहीं अथवा भागरहित नाहीं, तो कर्मसहित नाहीं अथवा कर्मरहित नाहीं, तो रोडका नाहीं किंवा लठ्ठ नाहीं. ११०७. तो (आत्मा) अरूप असल्यामुळें दृश्य नाहीं अथवा अदृश्य नाहीं, तो प्रकाशयुक्त नाहीं किंवा प्रकाशरहित नाहीं, थोडा नाहीं अथवा पुष्कळ नाहीं. ११०८. तो (आत्मा) शून्य असल्यामुळें रिकामा नाहीं अथवा भरलेला नाहीं, तो कोणत्याही गोष्टीनें रहित नाहीं अथवा कोणत्याही गोष्टीनें सहित नाहीं, तो प्रकट ( साकार ) नाहीं अथवा अप्रगट ( निराकार ) नाहीं. ११०९. तो ( आत्मा ) आत्मा असल्यामुळें आनंद ( सुख ) नाहीं अथवा आनंदरहित ( दुःख ) नाहीं, तो एक नाहीं अथवा नाना प्रकारचा नाहीं, तो मुक्त नाहीं अथवा बद्ध नाहीं. १११०. तो ( आत्मा ) कोणास विषय होत नसल्यामुळें इतका नाहीं अथवा तितका नाहीं, स्वतःसिद्ध नाहीं अथवा तयार केलेला नाहीं, बोलणारा नाहीं अथवा मुका नाहीं. ११११. सृष्टीच्या होण्याबरोबर तो होत नाहीं अथवा सर्व सृष्टीचा संहार झाला तरी याचा नाश होत नाहीं. हा ( आत्मा ) आहेपणाचें व नाहींपणाचें स्थान आहे. १११२. तो ( आत्मा ) अव्यय असल्यामुळें, तो मोजला जात नाहीं व त्याचें वर्णन करतां येत नाहीं; तो वाढत नाहीं अथवा कमी होत नाहीं, तो विकार पावत नाहीं व खर्च होत नाहीं. १११३. हे प्रियोत्तमा अर्जुना, अशा प्रकारचा तो आत्मा देहांत आहे असें जें म्हणतात, तें म्हणणें, मठाच्या आकारांत सांपडलेल्या आकाशास मठाकाश म्हणण्यासारखें आहे. १११४. त्याप्रमाणें त्याच्या अखंड असण्यावर देहाचे आकार होतात व जातात; ( पण ) अर्जुना, तो आत्मा देहाकृति घेत नाहीं अथवा टाकीत नाहीं, तर जसाचा तसाच असतो. १११५. आकाशामध्यें जसे दिवस व रात्र येतात व जातात, त्याप्रमाणें आत्मसत्तेवर देह ( येतात व जातात ), असें समज. १११६. म्हणून या शरीरांत आत्मा कांहीं करीत नाहीं व करवीत नाहीं व सहज घडून येणाऱ्या व्यापाराचे ठिकाणीं, तो ' व्यापार मीं केला ' असें म्हणत नाहीं. १११७. याकरितां तो ( आत्मा ) स्वरूपानें उणेपणास व पुरेपणास वश होत नाहीं. हें असो. तो ( आत्मा ) देहाच्या ठिकाणीं असून देहानें लिप्त होत नाहीं. १११८.

ज्याप्रमाणें सर्वव्यापी आकाश सूक्ष्मत्वामुळें ( कोणत्याही वस्तुशीं ) लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा सर्व देहांमध्यें स्थित असला तरी लिप्त होत नाहीं ३२.

अर्जुना, आकाश कोठें नाहीं ! व हें ( आकाश ) कोणत्या ठिकाणीं प्रवेश करीत नाहीं ! परंतु ज्याप्रमाणें तें आकाश कशानेंही व कधींही लिप्त होत नाहीं; १११९. तसा आत्मा सर्वत्र सर्व देहांत आहेच आहे. (परंतु) पहा, तो एकाही संबंधाच्या विकारानें विटाळला जात नाहीं. ११२०. वारंवार येथें आत्म्याचें हेंच लक्षण खरें आहे; तें हें कीं, शरीरस्थ आत्म्याला देहादिसंघातरहित असा ओळखावा. ११२१. लोहचुंबक हा आपल्या संबंधानें लोखंडाला हलवितो, पण लोहचुंबक हा लोखंड नाहीं;

पाडु ॥ २२ ॥ दीपकाची अर्चीं । राहाटी वाहे घरींची । परी वेगळीक कोडीची । दीपा आणि घरा ॥२३॥ काष्ठांचां पोटीं । वन्हि असे किरीटी । परी काष्ठ नोहे या दिठी । पाहिजे गा ॥२४॥ अपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखसी जरी ॥ २५ ॥

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः । क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु । प्रगटवी लोकु । नांवें नांवें ॥ २६ ॥ एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु क्षेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥२७॥ शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणी तेचि प्रज्ञा । जे क्षेत्रा क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ २८ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा । भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥

इया दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ २९ ॥ याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांचीं दुभतीं । पोसिती घरीं ॥ ११३० ॥ योगाचिया आकाशा । वळघिजे येवढाचि धिंवसा । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ३१ ॥ शरीरादि समस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचें होत । वाहणधरु ॥ ३२ ॥ ऐसैसियापरी । ज्ञानाचिया भरोवरी । करुनियां अंतरीं । निरुते होत ॥ ३३ ॥ मग क्षेत्रज्ञा क्षेत्राचें । जे अंतर देखती साचें । ज्ञानें उन्मेख तयांचें । वोवाळूं आम्ही ॥ ३४ ॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं । पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ॥ ३५ ॥ ते शुकनळिकान्यायें । न लगती लागली आहे । हें जैसें तैसें होये । ठावें जयां ॥ ३६ ॥ जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टवाळा । उखी होउनी ॥ ३७ ॥ कां शुक्ति ते शुक्ती । हे साच होय प्रतीती । रुपेयाची भ्रांती । जाऊनियां ॥ ३८ ॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें । देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ॥ ३९ ॥ जें आकाशाहूनि वाड । जें अव्यक्ताची पैल कड । जें भेटलिया अपाडा पाड । पडों नेदी ॥ ११४० ॥ आकारु जेथ सरे । जीवत्व जेथें विरे । द्वैत जेथ जुरे । अद्वय जें ॥४१॥ तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था– । राजहंसु ॥ ४२ ॥ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा । उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ॥ ४३ ॥ येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी । आपणपें तया हरी । दिधलें तैसें ॥ ४४ ॥ आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण । वरी अर्जुनातें कृष्णु । हा मी म्हणे ॥ ४५ ॥ परि असो तें नाथिलें । न पुसतां कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ॥ ४६ ॥

तसें क्षेत्र (देह) व क्षेत्रज्ञ (आत्मा) यांमध्यें अंतर आहे. ११२२. दिव्याची ज्योत घरांतील सर्व व्यवहार चालविते. परंतु दिवा व घर, यांत स्वभावतः अतिशय अंतर आहे. ११२३. अर्जुना, काष्ठांच्या पोटांत अग्नि आहे, पण अग्नि कांहीं काष्ठ नाहीं. या दृष्टीनें देह व आत्मा यांतील फरक समजावा. ११२४. आकाश व ढग यांत जो भेद आहे, अथवा सूर्य आणि मृगजळ यांत जो भेद आहे, तितकाच हाही (देह व आत्मा यांतील) भेद जर तूं बुद्धीच्या डोळ्यानें पाहशील, ११२५.

हे भारता, ज्याप्रमाणें एकटा सूर्य या सर्व जगताला प्रकाशित करतो, त्याप्रमाणें सर्व क्षेत्रांना (देहांना) एकटा क्षेत्रज्ञ प्रकाशित करतो. ३३.

हें सर्व राहूं दे. आकाशांतून जसा एकटाच सूर्य वेळोवेळीं (दररोज) त्रैलोक्य प्रकाशित करतो. ११२६. त्याप्रमाणें येथें क्षेत्रज्ञ हा क्षेत्राच्या भासाला (प्रतीतीला) प्रकाशक आहे. याउपर आतां यासंबंधानें कांहीं विचारूं नका व शंका घेऊं नका. ११२७. हे शब्दांच्या खऱ्या खऱ्या स्वरूपाचें मर्म जाणणाऱ्या अर्जुना, तीच बुद्धि डोलस, कीं जी क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांतील अंतर पहाते. ११२८.

याप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें अन्तर आणि भूतांच्या रूपानें असणाऱ्या प्रकृतीचा मोक्ष (म्हणजे तिचें मिथ्यात्व अथवा अनात्मत्व) जे ज्ञानदृष्टीनें जाणतात ते परमपदाला जातात. ३४.

या दोहींचें अंतर समजण्याकरितां चतुर पुरुष, ज्ञानी पुरुषांची सेवा करितात. ११२९. चांगल्या बुद्धीचे लोक याचकरितां शांतिरूप संपत्ति मिळवितात. व शास्त्ररूपी दुभत्या गाई घरीं पोसतात. ११३०. योगाच्या आकाशावर आरूढ होण्याचें एवढें धाडस पुरुषांना याच्याच (क्षेत्र-क्षेत्रज्ञांतील अंतर समजण्याच्या) आशेनें करावें लागतें. ११३१. शरीरादि सर्व गोष्टी तृणवत् मानतात व जीवाभावापासून संतांचे जोडे उचलणारे होतात. ११३२. मग अशा अशा प्रकारांनीं ज्ञानाचे



सायास करून अंतःकरणांत निश्चित होतात. ११३३. मग देह व आत्मा यांतील अंतर जे खरोखर पहातात, त्यांचें ज्ञान आम्ही आपल्या ज्ञानानें ओवाळूं. ११३४. आणि पंचमहाभूतादि अनेक पदार्थांच्या भिन्न भिन्न रूपानें, जी ही मिथ्या प्रकृति पसरली आहे, ११३५. ती (प्रकृति) शुकनलिकान्यायाप्रमाणें वास्तविक (जीवात्म्याला) चिकटलेली नसतांनाही, चिकटलेल्यासारखी आहे; हें तत्त्व जसें आहे, तसेंच ज्याला ठाऊक आहे; ११३६. ज्याप्रमाणें (माळेवर भासलेल्या मिथ्या सर्पासंबंधीं) मिथ्या सर्पबुद्धीचा नाश होऊन, माळ ही माळच आहे, असें जो डोळ्यांनीं पाहतो. ११३७. अथवा (शिंपेवर भासलेल्या) रुप्याची भ्रांति जाऊन, शिंप ही शिंपच आहे, असा खरा अनुभव जसा यावा. ११३८. त्याप्रमाणें आत्म्याहून वेगळी असणारी जी प्रकृति, तिला वेगळेपणानें अंतःकरणानें जे पहातात ते ब्रह्म होतात, असें मी (श्रीकृष्ण) म्हणतों. ११३९. जें ब्रह्म आकाशाहून मोठें आहे, जें (ब्रह्म) प्रकृतिरूप नदीच्या पलीकडला कांठ आहे व जें (ब्रह्म) प्राप्त झालें असतां साम्यासाम्य उरूं देत नाहीं, ११४०. ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं आकार संपतो, जीवपणा विरघळून जातो व जेथें द्वैत उरत नाहीं, असें जें एकाकी आहे, ११४१. अर्जुना, असें जें परब्रह्म, तें जे सत्पुरुष अनात्मा व आत्मा यांस विचारानें वेगळें जाणण्यांत राजहंस असतात, ते पूर्णपणें होतात. ११४२. (संजय धृतराष्ट्रास म्हणतो ११४३–११५२.) महाराज, श्रीकृष्णांनीं आपल्या जिवाचा जीव जो अर्जुन, त्यास असा हा प्रकृतिपुरुषविचाराचा सर्व हिशोब दिला. ११४३. ज्याप्रमाणें एका घागरींतील (पाणी) दुसऱ्या घागरींत सर्व ओतावें, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं आपल्या स्वतःला (आपल्या बोधाला) त्या अर्जुनाला दिलें. (आपल्या आंत असणारा सर्व बोध अर्जुनाच्या आंत ओतला.) ११४४. आणि कोण कोणाला देणारा आहे? कारण अर्जुन हा नराचा अवतार व श्रीकृष्ण हे नारायणाचा अवतार असल्यामुळें, ते दोघेही विष्णूचेच अंश होत. याशिवाय अर्जुनाला हा (अर्जुन) मी (श्रीकृष्ण) आहे असें (अ. १० श्लोक ३७ मध्यें) श्रीकृष्ण म्हणालेही. ११४५. परंतु हें संबंध नसलेलें बोलणें राहूं द्या. कोणी विचारलें नसतां मी कां बोलतों आहे? फार काय सांगावें! श्रीकृष्णांनीं आपलें सर्वस्व अर्जुनाला दिलें. ११४६.

कीं तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे ॥ ४७ ॥ स्नेहाचिया भरोवरी । आंवुथिला दीपु घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ॥ ४८ ॥ तेथ सुगरणी उदारे । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे । हातु जैसा ॥ ४९ ॥ तैसें जी होतसे देवा । तया अवधानाचिया लवलवा । पाहातां व्याख्यान चढलें थांवा । चौगुणें वरी ॥ ११५० ॥ सुवायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे । तैसा मातुला रसु आदरें । श्रोतयाचेनि ॥ ५१ ॥ आतां आनंदमय आघवें । विश्व कीजेल देवें । तें रायें परिसावें । संजयो म्हणे ॥ ५२ ॥ एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें अभ्रांतमती । भीष्मपर्वीं शांती । म्हणितली कथा ॥ ५३ ॥ तो कृष्णार्जुन-संवादु । नागरीं बोलीं विशदु । सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा ॥ ५४ ॥ नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराचां माथां । पाय ठेविती ॥ ५५ ॥ दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वोजावी । अमृतातें चुकी ठेवी । गोडिसेपणें ॥ ५६ ॥ बोल बोल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे । रसरंगीं भुलवणें । नादु लोपी ॥ ५७ ॥ खेचराचियाही मना । आणी सात्त्विकाचा पान्हा । श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ५८ ॥ तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थें विश्व भरूं । आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥ ५९ ॥ फिटो विवेकाची वाणी । हो काना मनाची जिणी । देखो आवडे ते खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६० ॥ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोधसुकाळा— । माजीं विश्व ॥ ६१ ॥ हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जे अधिष्ठिला असें परमदेवें । निवृत्ती मी ॥ ६२ ॥ म्हणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोकें कोंदाकोंदी । झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ६३ ॥ हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असें श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥ ६४ ॥ तेणें जी कृपासावायें । मी बोलें तेतुलें सामाये । आणि तुमचिये सभे लाहें । गीता म्हणों ॥ ६५ ॥ वरि तुम्हां संतांचे पाये । आजि मी पातलां आहें । म्हणोनि जी नोहे । अटकु कांहीं ॥ ६६ ॥ प्रभु काश्मिरीं मुकें । नुपजे हें कौतुकें । नाहीं उणीं सामुद्रिकें । लक्ष्मीयेसी ॥ ६७ ॥ तैसी तुम्हां संतांपासीं । अज्ञानाची गोठी कायसी । यालागीं नवरसीं । वरुषेन मी ॥ ६८ ॥ किंबहुना आतां देवा । अवसरु मज देयावा । ज्ञानदेव म्हणे बरवा । सांगेन ग्रंथु ॥ ६९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
प्रकृतिपुरुषविवेकयोगोनाम त्रयोदशोऽध्यायः

[ ओंव्या ११६९. श्लोक ३४. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



तथापि तो अर्जुन मनामध्यें अजून तृप्ति मानीत नव्हता, ( तर उलट ) अधिकाधिकच (ज्ञानश्रवणाची ) इच्छा वाढवीत होता. ११४७. भरपूर तेल घातल्यानें प्रदीप्त झालेला दिवा जसा आणखी मोठा होतो, त्याप्रमाणें भरपूर श्रवणानंतर अर्जुनाच्या मनांत तशी ( अधिक वाढलेली ) इच्छा झाली. ११४८. जेथें उत्तम स्वयंपाकीण असून तीच उदार वाढणारीही आहे व रसमर्मज्ञ असे जेवणारे भोक्ते मिळाले आहेत, तेथें मग जेवण्यास व वाढण्यास, हात जसा पुढें सरसावतो. ११४९. महाराज, तसें श्रीकृष्णास झालें. त्या अर्जुनाची ऐकण्याची विशेष टवटवी ( उत्सुकता ) पाहून व्याख्यानास चौपटीपेक्षां जास्त जोर आला. ११५०. अनुकूल वाऱ्यानें पाऊस पडणारे मेघ जसे जमतात अथवा जशी ( पौर्णिमेच्या ) चंद्रानें समुद्राला भरती येते, त्याप्रमाणें श्रोत्याच्या ( अर्जुनाच्या ) ऐकण्याच्या आदरानें व्याख्यानाच्या रसभरितपणास भरतें आलें आहे. ११५१. संजय म्हणतो, आतां देवाकडून संपूर्ण विश्व आनंदमय केलें जाईल, तें महाराजांनीं ( धृतराष्ट्र राजांनीं ) ऐकावें. ११५२. (ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ) याप्रमाणें विशालबुद्धि व्यासांनीं महाभारतांत भीष्मपर्वामध्यें शांतरसानें भरलेली कथा सांगितली. ११५३. तो कृष्णार्जुनाचा संवाद ओवीबद्ध काव्यांत सुंदर शब्दांनीं स्पष्ट सांगून दाखवूं. ११५४. केवळ शांतरसाची कथा वाणीच्या मार्गास आणली जाईल, ( म्हणजे शब्दांनीं सांगितली जाईल ) परंतु ती शृंगाररसाच्या मस्तकावर पाय ठेवणारी ( शृंगाररसावर ताण करणारी ) अशी सांगितली जाईल ११५५. ज्या रीतीनें देशी भाषा साहित्याला (अलंकाराला) सजवील व अमृताला आपल्या गोडपणानें मागें सारील, अशा रीतीनें अपूर्व व सुंदर देशी भाषा (मराठी भाषा) उपयोगांत आणूं. ११५६. माझे शब्द, त्यांतील शांत करणारी शक्ति पाहिली तर, चंद्राच्या वर ताण करतील व माझे शब्द आपल्या रसांतील रंगाच्या मोहक शक्तींनें नादब्रह्मास लोपवतील. ११५७. पिशाचादि अज्ञानी योनी आहेत, पण त्यांवही माझे शब्द सत्वगुणाचा पान्हा फोडतील आणि शुद्ध अंतःकरणाच्या लोकांना तर, माझे शब्द ऐकल्याबरोबर समाधि लागेल. ११५८. ( वरीलप्रमाणें परिणाम घडतील. ) तसा वाणीच्या विलासाचा विस्तार करूं व गीतार्थानें विश्व भरून टाकूं व सगळ्या जगाला आनंदाचा कोट करूं. ११५९. आत्मानात्मविवेकाचा कमीपणा नाहींसा होवो, कानाचें व मनाचें जगण्याचें सार्थक होवो व वाटेल त्याला ब्रह्मविद्येची खाण बघतां येवो. ११६०. परब्रह्म ( सर्वांच्या ) डोळ्यांना दिसो व सुखाचा उत्सव उदयास येवो व सर्व जग ब्रह्मज्ञानाच्या विपुलतेंत प्रवेश करो. ११६१. श्रेष्ठ देव जे निवृत्तिनाथ, त्यांनीं माझा अंगीकार केला असल्यामुळें; हें ( वर सांगितलेलें ) सर्व आतां उत्पन्न होईल, ( घडून येईल. ) असें मी चांगलें बोलेन ११६२. एवढ्याकरितां मर्म स्पष्ट करणाऱ्या शब्दांनीं, उपमा व काव्य यांची रेलचेल करून; या गीताग्रंथांतील प्रत्येक पदाचा अर्थ स्पष्ट करून सांगेन. ११६३. माझ्या श्रीमंत श्रीगुरुरायांनीं मला इतक्या पूर्ण विद्येनें युक्त केला आहे. ११६४. महाराज, त्या कृपेच्या सामर्थ्यानें मी जितकें बोलेन, तितकें तुम्हांला मान्य होत आहे आणि तुम्हा संतमंडळीमध्यें गीतार्थ सांगण्याचें सामर्थ्य मला आलें आहे. ११६५. शिवाय आणखी तुम्हां संतांच्या चरणांजवळ आज मी प्राप्त झालों आहे, म्हणून कांहीं अडचण राहिली नाहीं. ११६६. महाराज, सरस्वतीच्या पोटीं सहज देखील मुकें बालक उत्पन्न होणार नाहीं, ( व तसेंच ) लक्ष्मीला चांगल्या सामुद्रिक चिन्हांचा कमीपणा नाहीं. ११६७. त्याप्रमाणें तुम्हा संतांजवळ अज्ञानाची गोष्ट कसली ? म्हणून मी नवरसांचा वर्षाव करीन. ११६८. फार काय सांगावें ! देवा, ( श्रीगुरुराया, ) मला बोलण्याला आतां संधि द्यावी, म्हणजे मी ग्रंथ चांगल्या रीतीनें सांगेन, असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ११६९.



गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती । ना तरी गुणातीतीं । चिन्हें काई ॥
एवं इया आघवेया । अर्थी रूप करावया । विषो एथ चौदाविया । अध्यायासी ॥ अ. १४-३६-३७

विषयप्रतिपादनास सुरुवात करण्यापूर्वी श्रीनिवृत्तिनाथांची स्तुती 'प्रज्ञाप्रभात सूर्य व निरंतर कारुण्य-सिंधु आचार्य' इत्यादि विशेषणांनीं श्रीज्ञानदेवांनीं मोठ्या आदरानें केली आहे. शेवटीं ते म्हणतात, आपल्या खास स्वरूपाचें वर्णन करावयास, जेथें वेदालाहि अडचण पडली तेथें माझा काय लाग लागणार आहे ? म्हणून निवान्तपणें आपल्या चरणीं मस्तक ठेवून आपल्या जवळ एवढीच भिक्षा मागतों कीं, गीतेंतील गूढ अभिप्राय स्पष्ट करून तो मराठी भाषेंत नवरसांनीं भरून आणण्याच्या माझ्या कार्यांत आपली पूर्ण कृपा असावी.' प्रथमतः तेराव्या अध्यायांतून चौदावा अध्याय कसा निर्माण झाला, ही अध्यायसंगति त्यांनीं सांगितली आहे, (१–३९). भगवान् म्हणतात, 'ज्ञान हें कांहीं बाहेरून यावयाचें नाहीं; तें ज्याचें त्याच्यापाशीच आहे; नव्हे तें त्याचें स्वरूपच आहे; परंतु जीवाला भवस्वर्गांतील नाशिवंत विषयांची चटक लागली, त्यांमुळें या जवळच्या ज्ञानाला तो विसरला. जर जीवानें विषयांत गुंतलेलें मन पुनः अंतःर्मुख करून या सर्वोत्कृष्ट ज्ञानाकडे लावलें, तर त्याच्या मागची जन्ममरणाची–दुःखाची परंपरा कायमची सुटून तो माझ्या स्वरूपाला पावेल व मी जेवढा अनंत व आनंदरूप आहे, तेवढा तो होईल.' (४०–६०). ते पुढें म्हणतात, 'जीव आपल्या या स्वरूपज्ञानाला विसरतो, त्या स्थितीलाच शास्त्रांत अज्ञान म्हटलें आहे. या स्थितींत जसें त्याला आपल्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञान नसतें, तसें 'मी देह' अशा विपरीत अवस्थेचेंही भान नसतें. हें अज्ञान चिद्–प्रकाशावर आवरण घालतें; या आवृत प्रकाशालाच क्षेत्रज्ञ म्हणतात. आपण कोण आहों, हें विसरून अज्ञानाशीं संबंध ठेवून त्याचेंच महत्त्व वाढवावयाचें, हा या क्षेत्रज्ञाचा स्वभावच आहे. या स्वभावामुळें वस्तु आपल्या यथार्थ स्वरूपाला जाणूं शकत तर नाहींच; पण ती आपणांस दृश्य करून नानाप्रकारानें पाहते. अज्ञानाच्या कार्यास अशी सुरुवात होते. पुढें मन, बुद्धि, अहंकार इत्यादि आठ विकारांच्या सहाय्यानें त्रिगुणात्मक अशा अनेक ब्रह्मांडांची उत्पत्ति होते; आपलें जग हें त्यांतीलच भाग आहे. (६१–११५).

या दृश्यमान विश्वाच्या रूपानें देखील मीच ओतप्रोत भरून राहिलों आहें. या विश्वांतील चित्रविचित्र भूतांचें प्रकाशन मीच करतों. जीवाला आपल्या मूळ स्वरूपाची यथार्थ जाणीव झाली म्हणजे वेगळेपणानें दृश्य रूपानें प्रतीत होणारें हें जग मावळतें (११६–१३५). मात्र ज्या वेळीं जीव स्वतःला ओळखत नाहीं, त्या वेळीं तो अज्ञानाला वश होऊन देहच मी, जन्ममरणादि देहाचे धर्म ते माझे आहेत असें विपरीतपणें मानूं लागतो. सत्त्व, रज व तम या तीन गुणांमुळें जीव पुढील जन्मासाठीं बांधला जातो. देहांत सत्त्वगुणाची वाढ झाली म्हणजे विषयां-कडे धावण्याची मनाची धांव कमी झालेली असते. विवेक त्याचें ठिकाणीं जागृत असतो. परंतु 'मी सुखी व ज्ञानी' असा त्याचें ठिकाणीं फुंज असतोच, त्यामुळें सत्त्वगुणाच्या सुख व ज्ञान या दोन पाशांनीं तो बांधलेला असतो. म्हणून मृत्यूनंतर त्याला पुनः जन्म घ्यावा लागतो; परंतु त्याच्या ठिकाणीं असलेल्या सत्त्वगुणाच्या उत्कर्षामुळें, ज्या कुळांत ब्रह्मप्राप्ती सुलभ आहे अशा ज्ञानी पुरुषांच्या कुळांत त्याला जन्म प्राप्त होतो. रजोगुणाची वृद्धि ज्यांचे ठिकाणीं असते त्यांची स्वैरपणें विषय सेवन करण्याकडे प्रवृत्ति असते. इहपरलोकचे भोग प्राप्त व्हावे म्हणून त्याची सारखी धडपड असते, उसंत अशी क्षणाची नसते, असा पुरुष मृत्यु पावला तर पुनः काम्य कर्में करणारांच्या घरींच जन्माला येतो. तिसरा जो तमोगुण आहे, त्याचें आधिक्य झालें तर तो मोहग्रस्त, कमालीचा आळशी, विचारशून्य, बुद्धीनें दगडासारखा (मठ्ठ) असतोच, भ्रष्टाचरणांत त्याचें आयुष्य जातें व प्रमाद, आळस व निद्रा या तमोगुणाच्या पाशांनीं बद्ध असणाऱ्या या पुरुषास मरणानंतर पशु, पक्षी, झाड अथवा कीडा यापैकीं कोणता तरी निकृष्ट जन्म मिळतो. (१३६–२५९).



अगा विश्वैकधामा । तुझा प्रसाद चंद्रमा ।
करू मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥
जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें ।
वोसंडेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचे ॥

—ज्ञानेश्वरी अध्याय १४, ओवी २३।२४

सात्त्विक गुणाच्या पुरुषाच्या हातून होणाऱ्या पुण्यकर्मांचें फळ सुख असतें. रजोगुणापासून होणारीं कर्में सुरुवातीस बाहेरून मोठीं दिखाऊ अशा सुखाची प्राप्ति करून देणारीं वाटतात; परंतु अंतिम फळ दुःखच असतें. तामसगुणांच्या कर्मांविषयीं तर बोलावयासच नको. मोह, अज्ञान व प्रमाद या तिन्हींमुळें तमोगुणापासून दुःखाशिवाय कांहींच मिळावयाचें नाहीं. ज्ञानी पुरुषांना या तीन गुण व त्यांच्या क्रिया व फळें यांची पुरी कल्पना असल्यामुळें ते जन्मभर स्वस्थ वृत्तीनें राहतात व त्यामुळें त्यांना सुखाचा लाभ होतो. ( २६०–२७० ).

सांगण्याचें तात्पर्य एवढेंच कीं, वस्तु ही कोणत्याही अवस्थेंत वस्तुत्वानें आपल्या ठिकाणीं पूर्णच आहे; परंतु आपल्या स्वरूपाचा जर का विसर पडला, तर ती आपल्याला वस्तुरूपानें न पाहतां नाना पदार्थ व त्यांतील गुणांप्रमाणें पाहूं लागते. या तीन गुणांतील ज्या गुणांतील गुणांचें आधिक्य असेल त्याप्रमाणें सुख अथवा दुःखाचा भोग मिळून मृत्यूनंतर स्वर्ग, मनुष्य अथवा नरक अशी अनुरूप गती प्राप्त होते व तीन गुण पुनः देहाच्या रूपानें त्या अज्ञानी जीवाला बंधनांत घालतात. आत्मा त्या स्थितींतही मुक्तच असतो. साक्षित्वानें या गुणांकडे पाहून त्या गुणांच्या पलीकडे असलेलें स्वतःसिद्ध स्वरूप आपलें आहे ही खूणगांठ जर दैववशात प्राप्त झाली तर मुक्त स्थितीचा अनुभव या देहांतच येईल. मग देहाकडून होणाऱ्या क्रिया प्रकृति ही गुणाधारें करते, मी फक्त साक्षीभूत अधिष्ठान आहे, अशी मूळ अहंतेची बैठक त्याचें ठिकाणीं दृढ होईल. मग कोणत्याही गुणांचा कितीही आविष्कार देहाचें ठिकाणीं झाला, तरी त्यामुळें त्याचा अंतर्यामीचा बोध यत्किंचितही मरणार नाहीं. फार काय जन्म, मरण हे इत्यादि जे देहाचे धर्म आहेत, यांचाही संबंध त्याच्याशीं राहणार नाहीं, असा थोर बोध त्याच्या ठिकाणीं राहील. ( २७१–३१९ ).

गुणातीत पुरुषाचें आचरण कसें असतें व तो या तीन गुणांतून कसा मुक्त होतो, हें भगवंताला अर्जुन विचारूं लागला. अर्जुनाचा हा प्रश्न भगवंतांनीं सुधारून मांडला. तो असा कीं ' गुणातीत पुरुष गुणांच्या गुंताड्यांत असतांना तो गुणांच्या आधीन आहे का त्यांतून सुटला आहे हें कसें ओळखावयाचें ? ' त्याचें उत्तर देव सांगतात, ' तिन्ही गुणांचा आपआपल्या प्रौढीनें अविष्कार झालेला त्याच्या ठिकाणीं दिसला तरी तो त्या गुणाशीं तादात्म्य करीत नाहीं; म्हणून त्या विशिष्ट गुणांचे परिणाम त्याचे चित्तावर होत नाहींत. सत्त्वगुणांमुळें तो स्वतःला सुखी अथवा ज्ञानी, रजोगुणामुळें कर्मठ अथवा तमोगुणामुळें मोहग्रस्त असें समजत नाहीं. त्यामुळें त्या गुणांपासून उत्पन्न होणारें सुखदुःख त्याचे ठिकाणीं नसतें. ( ३२०–३४७ ).

गुणातीत पुरुषाचें लक्षण म्हणजे देहतादात्म्याचा संपूर्ण अभाव त्यामुळें सुखदुःख, मान-अपमान, निंदास्तुति, सोनें–माति वगैरे द्वंद्वांची त्याला कांहींच बाधा होत नाहीं. देहाचें तादात्म्य तर त्यानें सोडलेलें असतें, म्हणून भोगप्राप्तीसाठीं क्रियांची प्रवृत्तिहि नष्ट झालेली असते. ( ३४८–३७० ).

गुणांतून सुटका करून घेण्याचा उपाय म्हणजे माझी अव्यभिचारी भक्ति करणें हा होय. मी कोण, माझी भक्ति म्हणजे काय, हें नीट समजून घेऊन, माझ्यावांचून चित्ताला कोठेंही बंधन न ठेवतां, माझ्या स्वरूपांत संपूर्ण नाहींसें होणें; हीच माझी श्रेष्ठ व थोर भक्ति आहे. असें झालें म्हणजे विश्व व मी यांत भेद राहणार नाहीं, व विश्वाच्या रूपानें मीच आहे हें दिसून येईल. त्याचप्रमाणें भक्त माझ्यापासून वेगळा असूं शकत नाहीं हें वर्मही त्याचे हातीं येईल. या अनादि ऐक्यानें दृष्टि उघडणें हेंच भक्तीचें सार; हीच अव्यभिचारी भक्ति होय. हें जर नीट समजलें नाहीं, तर माझी भक्ति ही ब्रह्मस्थितीला प्राप्त करून देण्याचें साधन आहे व मी ब्रह्मापासून निराळा आहे, अशी समजूत होईल; पण तें खरें नाहीं. नित्य अचल सुखरूप असें ब्रह्मच मी आहें. ( ३७१–४०७ ).

श्रीकृष्ण व अर्जुन यांतील हा चित्तवेधक संवाद हर्षयुक्त होऊन संजय धृतराष्ट्राला सांगत होता; परंतु धृतराष्ट्र हा पुत्रस्नेहरूपी महारोगानें ग्रस्त झाला असल्यामुळें आपल्या पुत्रांच्या विजयाचीच वार्ता ऐकण्याकडे त्याचे कान लागून राहिले होते; म्हणून भगवंताचे हे बहुमोल बोल त्याला वायफळ वाटत होते. संजयाची यामुळें मोठी चमत्कारित स्थिति झाली. एकीकडे त्याला आपल्या मालकाची कींव येऊन त्याची या मोहांतून सुटका व्हावी, अशी तळमळ वाटत होती; तर दुसऱ्या बाजूनें त्याच्या अंतःकरणांत श्रीकृष्णाच्या वाक्यामुळें आनंदाच्या ऊर्मी येत होत्या. सात्त्विक अंतःकरणाच्या संजयाच्या स्थितीचें असें वर्णन करून ज्ञानदेवांनीं हा अध्याय संपविला आहे. (४०८-१५).

---

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

जयजय आचार्य । समस्तसुरवर्या । प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया ॥ १ ॥ जयजय सर्व विसांवया । सोहंभावसुहावया । नाना लोक हेलावया । समुद्रा तूं ॥ २ ॥ आइकें गा आर्तबंधू । निरंतरकारुण्यसिंधू । विशदविद्यावधू- । वल्लभा जी ॥ ३ ॥ तूं जयांप्रति लपसी । तयां जग हें दाविसी । प्रकटु तें करिसी । आघवेंचि तूं ॥ ४ ॥ कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे । परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरे ॥ ५ ॥ जे तूंचि तूं सर्वां यया । मा कोणा बोधु कोणा माया । ऐसिया आपेंआप लाघविया । नमों तुज ॥ ६ ॥ जाणों जगीं आप बोलें । तें तुझिया बोला सुरस जालें । तुझेनि क्षमत्व आलें । पृथ्वीयेसी ॥ ७ ॥ रविचंद्रादि शुक्ति । उदो करिती त्रिजगतीं । तें तुझिया दीप्ती । तेज तेजां ॥ ८ ॥ चळवाळिजे अनिळें । तें देविकेनि जी निजबळें । नभ तुजमाजीं खेळे । लपीथपी ॥ ९ ॥ किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें सायास । श्रुतीसि हें ॥१०॥ वेद वानूनि तंव चांग । जंव न दिसे तुझें आंग । मग आम्हां तया मूग । एकी पांती ॥ ११ ॥ जी एकार्णवाचां ठाईं । पाहतां थेंबाचा पाड नाहीं । मा महानदी काई । जाणिजती ॥ १२ ॥ कां उदयलिया भास्वतु । चंद्र जैसा खद्योतु । आम्हां श्रुती तुजआंतु । तो पाडु असे ॥ १३ ॥ आणि दुजया थांवो मोडे । जेथ परेशीं वैखरी बुडे । तो तूं मा कोणें तोंडें । वानावासी ॥ १४ ॥ यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥ १५ ॥ तरी तुज तैसिया । नमो जी श्रीगुरुराया । मज ग्रंथोद्यमु फळावया । वेव्हारा होईं ॥ १६ ॥ आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं

# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

अहो, सर्व देवांमध्यें श्रेष्ठ, ( आत्मविषयक ) बुद्धिरूपी प्रातःकाळ करणारे सूर्य, सुखाचा उदय करणारे श्रीगुरु महाराज, आपला जयजयकार असो ! १. तुम्ही सर्व जगास विश्रांतिस्थान आहांत. 'मी ब्रह्म आहें' अशा भावनेस सेवन करविणारे ( तुम्ही आहांत ) तुम्ही अनेक लोकरूपी लाटांचे समुद्र आहांत; तुमचा जयजयकार असो. २. पीडितांना संकटांतून सोडविणारे, अखंड भरलेले ( ओहोटी नसलेले ) दयेचे समुद्र, शुद्धविद्यारूप ( अध्यात्मविद्यारूप ) स्त्रियेचे प्रियकर असे महाराज, तुम्ही ऐका. ३. तूं ज्यांना लपतोस, त्यांना हें जग दाखवितोस ( म्हणजे ज्यांच्यामध्यें तुझ्यासंबंधानें अज्ञान असतें, त्यांना तुझें स्वरूप न दिसतां जग दिसतें ) व तूं ज्यांना प्रगट होतोस, त्या वेळीं त्यांना सर्व तूंच करतोस ( म्हणजे ज्यांच्यामध्यें तुझ्यासंबंधानें ज्ञान असतें, त्यांना जग न दिसतां, सर्व तूंच दिसतोस. ) ४. दुसऱ्याची नजर बंद करणें, असा नजरबंदीचा खेळ ( गारुडी लोकांस ) उत्पन्न करतां येतो. ( पण त्यास आपली स्वतःची नजरबंदी करतां येत नाहीं ). परंतु आपण आपल्याला चोरून रहाणें ( स्वतःस स्वतः विषय न होणें ) ही तुझी अद्भुत जादू आहे. [ गुरु ( ब्रह्म ) हे जगतालाही आपलें भान होऊं देत नाहींत व आपण स्वतः ज्ञानरूप असल्या-मुळें आपलें भानही आपल्या ठिकाणीं घेत नाहींत. ] ५. कारण कीं, या सर्व जगताला तूंच तूं आहेस; ( म्हणजे या जगांत सर्व कांहीं तूंच आहेस; ) असें असून सुद्धां कोणाचे ठिकाणीं ( तुझें ) ज्ञान आहे, तर कोणाचे ठिकाणीं ( तुझ्यासंबंधीं ) माया ( अज्ञान ) आहे ! असा जो तूं स्वभावतः जादुगार, त्या तुला नमस्कार असो. ६. आम्हांला असें वाटतें कीं, जगामध्यें पाणी ओलें आहे, तें ( पाणी ) तुझ्या ओलेपणानें चांगलें द्रवयुक्त झालें आहे व पृथ्वीच्या ठिकाणीं जी सहनशीलता आहे, ती तुझ्या योगानें आहे. ७. सूर्य व चंद्र इत्यादिक शिंपले त्रैलोक्यांत प्रकाश करितात. या तेजस्वी पदार्थांत असणारें जें तेज, तें तेज तुझ्या तेजामुळें आहे. ८. वायु जी हालचाल करतो, महाराज, ती तुमच्या बळानें करतो व आकाश तुमच्या स्वरूपामध्यें लपंडाव खेळतें. ९. फार काय सांगावें ! महाराज, अमर्याद असें जें माया-ज्ञान ( संपूर्ण अन्यथाज्ञान ) त्याचेही प्रकाशक तुम्हीच आहांत. हें तुमचें वर्णन राहूं द्या; ( कारण ) हें वर्णन करणें श्रुतीलाही कष्टप्रद आहे. १०. जोंपर्यंत तुझ्या स्वरूपापर्यंत पोहचला नाहीं, तोंपर्यंत वेद वर्णन करून अतृप्त राहातो; मग तुझ्या स्वरूपाचें वर्णन करण्याचा प्रसंग आला, म्हणजे त्याला ( वेदाला ) व आम्हाला एका पंक्तीला बसून मुगा गिळावे लागतात. ( मुकाट्यानें बसावें लागतें. ) ११. महाराज, प्रळयकाळच्या महा-समुद्रांत थेंबाचा पत्ता नाहीं, मग महानद्या तरी जाणल्या जातील काय ! ( तर नाहीं. महानद्यांचा देखील प्रळयकाळच्या महासमुद्रांत पत्ता लागणार नाहीं. ) १२. अथवा सूर्य उगवल्यावर जसा चंद्र हा काजव्या-सारखा, त्याप्रमाणें तुझ्या वर्णनाविषयीं आमची व वेदाची अवस्था होते. १३. आणि द्वैताचा जेथें जोर नाहींसा होतो व वैखरी वाचाही परावाणीसह जेथें नाहींशी होते, असा जो तूं, त्या तुझें मग 'परा पश्यन्ती' इत्यादि वाचांपैकीं कोणत्या वाचेनें वर्णन करावें ? १४. याकरितां आतां स्तुती करण्याचें सोडून देऊन मुकाट्यानें आपल्या चरणावर मस्तक ठेवावें हेंच चांगलें. १५. तर अहो गुरुमहाराज, ( आपण जसे आहांत, ) तसाच तुम्हांला मी आतां नमस्कार करितों. ( आपण मजवर एवढी कृपा करा कीं, ) माझा ग्रंथरूप उद्योग ( व्यापार ) सफल होण्यास आपण सावकार व्हा. १६. आतां कृपारूपी भांडवल सोडा व माझी बुद्धिरूपी पिशवी

ज्ञानपद्मजोडी । थोरा मातें ॥ १७ ॥ मग मी संसरेन तेणें । करीन संतांसी कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं ॥ १८ ॥ जी गीतार्थनिधान । काढू माझें मन । सुयीं स्नेहांजन । आपलें तूं ॥ १९ ॥ हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ २० ॥ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सुफळ । तो वसंतु होय स्नेहाळ— । शिरोमणी ॥२१॥ प्रमेयमहापूरें । हे मतिगंगा ये थोरे । तैसा वरिष उदारे । दिठीवेनी ॥ २२ ॥ अगा विश्वैकधामा । तुझा प्रसादुचंद्रमा । करू मज पूर्णिमा । स्फुर्तीची जी ॥ २३ ॥ जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें । वोसंडेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचे ॥ २४ ॥ तंव तोषोनि गुरुराजें । म्हणितलें विनतिव्याजें । मांडिलें देखो दुजें । स्तवनमिषें ॥ २५ ॥ हें असो आतां वांजटा । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा । ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगों नेदीं ॥२६॥ हो कां जी स्वामी । हेंचि पाहतु होतों मी । जे श्रीमुखें म्हणा तुम्हीं । ग्रंथु सांग ॥२७॥ सहजें दुर्वेचा हिरु । आंगोंचि तंव अमरु । वरी आला पूरु । पीयुषाचा ॥ २८ ॥ तरी आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें । मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥ २९ ॥ परी जीवा आंतुलीकडे । जैसी संदेहाची डोणी बुडे । ना श्रवणीं तरी चाडे । वाढु दिसे ॥ ३० ॥ तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी । माले मागूनि घरीं । गुरुकृपेचां ॥ ३१ ॥ तरी मागां त्रयोदशीं । अध्यायीं गोष्टि ऐसी । श्रीकृष्णु अर्जुनेसी । चावळले ॥ ३२ ॥ जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होइजे येणें जगें । आत्मा गुणसंगें । संसारिया ॥ ३३ ॥ आणि हाचि प्रकृतिगतु । सुखदुःखभोगीं हेतु । अथवा गुणातीतु । केवळ हा ॥ ३४ ॥ तरी कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगु । सुखदुःखादि भोगु । केवीं तया ॥३५॥ गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती । नातरी गुणातीतीं । चिन्हें काई ॥३६॥ एवं यया आघवेया । अर्था रूप करावया । विषो एथ चौदाविया । अध्यायासी ॥ ३७ ॥ तरि तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा । अभिप्रावो विश्वेशा । वैकुंठाचा ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाचः—परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् । यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥

तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना । मेळौनि इया ज्ञाना । झोंबावें हो ॥ ३९ ॥ आम्हीं मागां तुज बहुतीं । दाविलें हें उपपत्तीं । तरी आझुनी प्रतीती— । कुशी न निघे ॥ ४० ॥ म्हणौनि गा पुढती । सांगिजेल तुजप्रती । पर म्हण म्हणो श्रुतीं । डाहारिलें जें ॥ ४१ ॥ एऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परि पर ऐसेनि जालें । जे आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक ॥४२॥ अगा याचि कारणें । हें उत्तम सर्वोपरी मी म्हणें । जे वन्हि हें तृणें । येरें ज्ञानें ॥ ४३ ॥ जियें भवस्वर्गातें जाणती । यागचि चांग म्हणती । पारखी फुडी आथी । भेदीं जेयां ॥ ४४ ॥ तियें आघवींचि ज्ञानें । केलीं येणें स्वप्नें । जैशा वातोर्मी गगनें । गिळिजती अंतीं ॥ ४५ ॥ कां

भरा आणि ज्ञानानें भरलेल्या काव्याच्या लाभानें मला थोर करा. १७. मग मी त्या योगानें सांवरेन आणि मग विचारांचीं चांगलीं लक्षणें असलेलीं सुंदर कर्णभूषणें (भिकबाळी) करून तीं संतांना घालीन. १८. महाराज, माझें मन गीतार्थरूपी ठेवा काढण्यास समर्थ व्हावें, याकरितां तुम्ही आपलें कृपारूपी अंजन (माझ्या बुद्धिरूपी डोळ्यांत) घाला. १९. जेणेंकरून हें शब्दरूपी जगत एकाच सपाट्यांत माझ्या बुद्धीच्या ज्ञानाला आकलन करतां येईल, त्या तऱ्हेनें हे श्रीगुरुसूर्या, आपण आपल्या करुणारूप शुद्ध बिंबानें उदयास यावें. २०. हे कृपाळुश्रेष्ठा श्रीगुरो, माझ्या बुद्धिरूपी सुंदर वेलाला काव्यरूपी चांगलें फळ ज्या योगानें येईल, तो वसंतऋतु आपण व्हा. २१. ज्या योगानें ही बुद्धिरूप गंगा ब्रह्मसिद्धांतरूपी बोधाचा महापूर येऊन चांगली फोंफावेल, त्या प्रकारानें उदार दृष्टीचा वर्षाव होऊं दे. २२. हे सर्व जगताला एकच आश्रय असणाऱ्या श्रीगुरुराया, तुझा प्रसन्नतारूप चंद्र माझ्या अंतःकरणांत ( उदयास येऊन ) स्फूर्तिरूप पौर्णिमा करो. २३. महाराज, आपण मला कृपादृष्टीनें पाहिलें असतां, माझ्या बुद्धिरूपी समुद्रांत स्फूर्तीला शांतिआदि नवरसांची मोठी भरति येईल. २४. तेव्हां संतोषित होऊन श्रीगुरुराय म्हणाले, ज्ञानदेवा, विनंति करण्याचे मिषानें स्तुतीच्या पांघरुणाखालीं, तूं द्वैत केलें असें आम्हांस दिसून येतें. २५. हें वायफळ बोलणें आतां राहूं दे. गीतेंतील ज्ञानरूपी विषय चांगला स्पष्ट करून गीताग्रंथ सांग. श्रोत्यांची ऐकण्याविषयीं उत्कट इच्छा मोडूं नकोस. २६. स्वामी महाराज, अशी का आपली इच्छा आहे ? मी याचीच वाट पहात होतों, कीं प्रभूंनीं आपल्या मुखानें ' ग्रंथ सांग ' असें म्हणावें २७. इरळीची मुळी स्वभावतः तर अंगानें अमर आहेच; ( तशांत ) जर तिच्यावर आणखी अमृताचा पूर आला ( तर मग तिच्या अमरपणाविषयीं शंका धरणें नको. ) २८. तर आतां या श्रीगुरूंच्या प्रसादानें, मूळ जीं गीताशास्त्रांतील पदें, तीं विस्तारानें चातुर्यपूर्वक मी वर्णन करीन २९. पण ( असें वर्णन करीन कीं, ) जेणेंकरून जीवाच्या आंत असलेली संशयरूप होडी बुडून जाईल ( संशय नाहींसे होतील ), एवढेंच नाहीं, तर श्रवणाची इच्छा वाढलेली दिसेल. ३०. श्रीगुरूच्या कृपेच्या घरांत कर्जफेडीची भिक्षा मागून माझ्या भाषणांत त्या प्रकारची खरी खरी गोडी प्रगट होवो. ३१. तर मागें तेराव्या अध्यायांत श्रीकृष्ण अर्जुनास अशी गोष्ट बोलले ३२. कीं; हें जग क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संबंधांत उत्पन्न होतें व आत्मा हा गुणांच्या तादात्म्यानें संसारी झाला आहे. ३३. आणि हाच ( आत्माच ) प्रकृतीच्या तावडींत गेल्याकारणानें सुखदुःख भोगण्यास कारण होतो ( त्यास सुखदुःखाचा भोग होतो. ). एऱ्हवीं खरोखर पाहिलें तर हा केवळ गुणातीतच आहे. ३४. तर असंगाला संग कसा व क्षेत्र-क्षेत्रज्ञ यांमधील संबंध तो कोणचा ? व त्याला सुख दुःखादि भोग कसे ? ३५. गुण ते कसे व किती आहेत व ते ( आत्म्याला ) कोणत्या प्रकारानें बांधतात, अथवा गुणातीताचीं लक्षणें काय आहेत ? ३६. याप्रमाणें या वरील सर्व गोष्टींचा अर्थ स्पष्ट सांगणें, हा येथें चौदाव्या अध्यायाचा प्रतिपाद्य विषय आहे. ३७. तर प्रस्तुत जगाचा स्वामी जो श्रीकृष्ण त्याचा अभिप्राय असा आहे, तो आतां ऐका. ३८.

श्रीकृष्ण म्हणाले, ज्याला ( श्रुतींनीं ) ' पर ' म्हणून म्हटलें आहे, जें सर्व ज्ञानांमध्यें उत्तम आहे व जें जाणून सर्व मुनी या देहबंधनापासून मुक्त होऊन अत्यंत श्रेष्ठ सिद्धि पावले, असें हें ज्ञान मी तुला पुनः सांगतों. १.

श्रीकृष्ण म्हणाले, हे अर्जुना; अवधानरूपी सर्व सेना एकत्र जुळवून आणून या ज्ञानास बिलगावें बरें ! ३९. आम्हीं मागें तुला पुष्कळ प्रकारच्या युक्तिवादांनीं हा विचार समजाविला आहे; परंतु अजून तुझी अनुभवाची कुशी बाहेर आलेली दिसत नाहीं. ४०. याकरितां श्रुतीनें पर ( सर्वांच्या पलीकडलें ) म्हणून जें ( ज्ञान ) वारंवार प्रसिद्ध केलें आहे, तें ज्ञान तुला पुनः सांगण्यांत येईल. ४१. सहज विचार करून पाहिलें तर, ज्ञान हें आपलें रूपच आहे; परंतु संसार ( मृत्युलोक ) स्वर्गलोक वगैरे आवडून घेतल्यामुळें, तें ( ज्ञान आपलें स्वरूप असून ) पर ( परकें ) असें झालें आहे. ४२. हें ज्ञान अग्नि व इतर ज्ञानें हीं गवत ( गवताप्रमाणें ) आहेत; म्हणून अर्जुना, हें ज्ञान सर्वां ( ज्ञान ) पेक्षां उत्तम आहे, असें मी म्हणतों, ४३. जीं ( इतर ज्ञानें ) संसाराला व स्वर्गाला विषय करतात व यज्ञच चांगले असें म्हणतात व द्वैतभावाची ज्यांना चांगली ओळख असते. ४४. तीं सर्व इतर ज्ञानें, या ज्ञानानें, स्वप्नासारखीं मिथ्या केलीं आहेत. ज्याप्रमाणें वाऱ्याच्या लाटा अखेरीस आकाशाकडून गिळल्या जातात; ४५. अथवा सूर्य उगवला असतां

उदितें रश्मिराजें । लोपिलीं चंद्रादि तेजें । नाना प्रळयांबुमाजें । नदी नद ॥ ४६ ॥ तैसें हें येणें पाहलेया । ज्ञानजात जाय लया । म्हणोनियां धनंजया । उत्तम हें ॥ ४७ ॥ अनादि जे मुक्तता । आपुली असे पंडुसुता । तो मोक्षु हाता येता । होय येणें ॥ ४८ ॥ जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं । नेदिजेचि संसृती । माथां उघऊं ॥ ४९ ॥ मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें । ते देहीं देहाजोगे । होतीचि ना ॥ ५० ॥ मग तें देहाचें बेळें । बोलांडूनि एकेचि वेळे । संवतुकी कांटाळें । माझें जाले ॥ ५१ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः । सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथंति च ॥ २ ॥

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्ण पूर्णता । माझियाचि ॥ ५२ ॥ मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिंधु । तैसेचि ते भेदु । उरेचि ना ॥५३॥ जें मी जेवढें जैसें । तेंचि ते जाले तैसें । घटभंगीं घटाकाशें । आकाश जेवीं ॥ ५४ ॥ नातरी दीपमूळकीं । दीपशिखा अनेकी । मीनलिया अवलोकीं । होय जैसें ॥ ५५ ॥ अर्जुना तयापरी । सरली द्वैताची वारी । नांदो नामार्थ एकाहारीं । मीतूंविण ॥ ५६ ॥ येणेंचि पैं कारणें । जें पहिलें सृष्टीचें जुंपणें । तें ही तया होणें । पडेचिना ॥५७॥ सृष्टीचिये सर्वादी । जेयां देहाची नाहीं बांधी । तें कैचें प्रळयावधी । निमतील पां ॥ ५८ ॥ म्हणौनि जन्मक्षयां- । अतीत ते धनंजया । मी जाले ज्ञाना यया । अनुसरोनी ॥ ५९ ॥ ऐसी ज्ञानाची वाढी । वानिली देवें आवडी । तेवींचि पार्थाही गोडी । लावावया ॥ ६० ॥ तंव तया जालें आन । सर्वांगीं निघाले कान । सपाई अवधान । आतला पां ॥ ६१ ॥ आतां देवाचिया ऐसें । जाकळीजतु असे बोरसें । म्हणौनि निरूपण आकाशें । वेंटाळेना ॥ ६२ ॥ मग म्हणे गा प्रज्ञाकांता । उजवली आजि वक्तृत्वता । जे बोलायेवढा श्रोता । जोडलासि ॥६३॥ तरि एकु मी अनेकीं । गोंविजे देहपाशकीं । त्रिगुणीं लुब्धकीं । कोणी परी ॥६४॥ कैसा क्षेत्रयोगें । वियें इयें जगें । तें परिस सांगें । कोणे परी ॥ ६५ ॥ पैं क्षेत्र येणें व्याजें । हें यालागीं बोलिजे । जे मत्संगबीजें । भूतीं पिके ॥ ६६ ॥

मम योनिर्महद्‍ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् । संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

एऱ्हवीं तरी महद्‍ब्रह्म । यालागीं हें ऐसें नाम । जे महदादिविश्राम- । शालिका हें ॥६७॥ विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी । म्हणोनि अवधारीं । महद्‍ब्रह्म ॥ ६८ ॥ अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती । सांख्याचिया प्रतीती । प्रकृति हेचि ॥ ६९ ॥ वेदांतीं यीतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया । असो किती बोलों वाया । अज्ञान हें ॥ ७० ॥ आपला

जशीं चंद्रादिक तेजें लोपतात अथवा प्रळयकाळच्या पाण्याच्या महापुरानें जसें नदी व नद नाहींसे होतात. ४६. अर्जुना, त्याप्रमाणें हें ज्ञान उदय पावलें असतां, इतर सर्व ज्ञानें लय पावतात. म्हणून अर्जुना, हें ज्ञान उत्तम आहे. ४७. अर्जुना, आपली जी अनादि मुक्तता आहे ती मुक्तता ( मोक्ष ) या ज्ञानानें हस्तगत होते. ४८. ज्याच्या अनुभवानें सर्व विचारशूर पुरुष संसाराला डोकें वर करूंच देत नाहींत. ४९. ते विचारशूर पुरुष, आपली विषयाकडे असलेली मनाची प्रवृत्ति मनानेंच मार्गे हटवून, अंगानें विश्रांति झाल्यावर ( स्वतः ब्रह्मरूप झाल्यावर ), जरी देहांत असतात, तरी पण ते देहाजोगे होत नाहींत, ( देहाएवढेच आपल्याला समजत नाहींत. ) ५०. मग देहाचें दुबेळकें ( स्थूल व सूक्ष्म देह ) एकाच वेळेला ओलांडून ( निरास करून ) ते पुरुष वजनांत माझ्या बरोबरीचे झाले. ५१.

या ज्ञानाचा आश्रय करून माझ्या साधर्म्याप्रत प्राप्त झालेले ( मजशीं समानधर्म होणारे ) ( पुरुष ) सृष्टिनिर्माणकालीं जन्म पावत नाहींत आणि प्रलय-कालीं ( मरण ) दुःख पावत नाहींत. २.

अर्जुना, जी माझी नित्यता आहे, त्या नित्यतेनें ते ( पुरुष ) नित्य आहेत व माझ्याच परिपूर्णतेनें ते परिपूर्ण आहेत. ५२. मी जसा अमर्याद आनंद आहें व जसा मी सत्याचा समुद्र आहें, तसेंच ते आहेत. ( त्यांच्यांत व माझ्यांत ) भेद शिल्लक राहतच नाहीं. ५३. कारण कीं, मी जसा व जेवढा आहें, तसेच व तेवढे ते ( ज्ञानाच्या योगानें ) झालेले असतात. ( कसें तर ) ज्याप्रमाणें घट फुटल्यावर घटाकाश जसें महाकाश होतें. ५४. अथवा दिव्याच्या मूळ ज्योतींत दुसऱ्या अनेक ज्योती मिळाल्या असतां जसें होतें ( जशा त्या सर्व ज्योती एकरूप होऊन जातात,) त्याप्रमाणें समज. ५५. अर्जुना, त्याप्रमाणें त्या पुरुषाचे ठिकाणीं द्वैताची येरझार संपली व ( आतां ) तो व मी असे दोघे, देव व भक्त या दोघांच्या नामांचा अर्थ जें स्वरूप, त्या स्वरूपाचे ठिकाणीं एका पंक्तीला ( ऐक्यानें ) मी व तूं अशा द्वैतभावाशिवाय नांदत आहोंत. ५६. या कारणामुळें जेव्हां मूळ सृष्टि उत्पन्न होते, तेव्हांही त्यास जन्मास यावें लागत नाहीं. ५७. सर्व सृष्टीच्या आरंभीं ज्यांना देहाचा आकार घ्यावा लागत नाहीं, तें ( आत्मज्ञानी पुरुष ) प्रळयकाळच्या वेळेस कसे मरतील ? ५८. अर्जुना, म्हणून ते पुरुष या ज्ञानाचा मार्ग स्वीकारून जन्मक्षयातीत असे मद्रूप झाले. ५९. असा ज्ञानाचा महिमा वर्णन करणें देवास प्रिय असल्यामुळें व त्याचप्रमाणें अर्जुनालाही गोडी लावण्याकरितां देवांनीं याप्रमाणें ज्ञानाचा महिमा वर्णन केला. ६०. ( असें भगवंतांनीं ज्ञानाचें महत्त्व वर्णन केलें.) तेव्हां अर्जुनाची दुसरी ( वेगळी ) स्थिति झाली. ती ही कीं, त्याच्या सर्व अंगाला कान फुटले. फार काय सांगावें ! तो अवधानानें संपूर्ण व्यापला गेला. ( अवधानाची मूर्तीच बनला.) ६१. अर्जुन सर्व अंगानें अवधानरूप झाला, तेव्हां देवासारख्या सर्वज्ञाकडून केलें जाणारें अफाट व्याख्यानही त्याचेकडून आकलन केलें जात होतें आणि ( आपण जें सांगतों त्याचा उपयोग होत आहे, असें देवानें जाणलें.) म्हणून देवाचें व्याख्यान आकाशाच्याही कवळींत येणार नाहीं, एवढें विस्तृत होऊं लागलें. ६२. मग श्रीकृष्ण म्हणाले, हे बुद्धिरूपी स्त्रीच्या पति अर्जुना, आमचें जेवढें व्याख्यान, तेवढेंच ज्याचें अवधान, असा तूं श्रोता मिळाल्यामुळें, आज आमची वक्तृत्वतारूपी कन्या विवाहित झाली. ( कारण तिला तुझ्यासारखें योग्य स्थळ मिळालें.) ६३. तरी मी एक ( अक्षर ) त्रिगुणरूपी पारध्याकडून अनेक देहपाशांत कोणत्या प्रकारानें अडकला जातों, ६४. व ( मी ) क्षेत्राच्या योगानें हीं जगें कोणत्या प्रकारानें व कसा प्रसवतों, तें सांगतों ऐक. ६५. माझ्या संगरूपी बीजानें यांत ( अज्ञानांत ) प्राणिरूपी पीक येतें. याच कारणामुळें याचा ( अज्ञानाचा ) क्षेत्र नांवानें उल्लेख केला जातो. ६६.

माया ( महद्‌ब्रह्म ) ही माझें ( सृष्टीरूप ) गर्भ ठेवण्याचें ठिकाण आहे, तिच्यामध्यें मी गर्भ ठेवतों. हे भारता, त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते. ३.

सहज विचार करून पाहिलें तर, महत्तत्त्वादिक तत्त्वांना हें विश्रांतिस्थान असल्यामुळें, याला ( अज्ञानाला ) महद्‌ब्रह्म असें नांव आहे. ६७. अर्जुना, हेंच विकारांना पुष्कळसें वाढवितें, म्हणून हें महद्‌ब्रह्म आहे असें समज. ६८. अव्यक्तवादी लोकांच्या मताप्रमाणें याला ' अव्यक्त ' असें म्हणतात व सांख्यांच्या अनुभवा-प्रमाणें यालाच ' प्रकृति ' असें म्हणतात. ६९. हे बुद्धिमंतांच्या राजा अर्जुना, वेदांती लोक याला ' माया ' असें म्हणतात. उगीच पाल्हाळ किती करावयाचा ? तर हें बोलणें राहूं दे. ( थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ) हें अज्ञान आहे. ७०. अर्जुना, आपला आपल्याला जो

आपणपेयां । विसरु जो धनंजया । तेंचि रूप यया । अज्ञानासी ॥७१॥ आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं पाहतां जैसें । आंधारें कां ॥ ७२ ॥ हालविलिया जाये । निश्चळीं तरी होये । दुधीं जैसी साये । दुधाची ते ॥ ७३ ॥ पैं जागरु ना स्वप्न । ना स्वरूपअवस्थान । ते सुषुप्ति कां घन । जैसी होय ॥ ७४ ॥ कां न वियतां वायूतें । वांझें आकाश रितें । तयाऐसें निरुतें । अज्ञान गा ॥ ७५ ॥ पैल खांब कां पुरुखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु । परी काय नेणो आलोकु । दिसत असे ॥ ७६ ॥ तेवीं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परी कांहीं अनारिसें । देखिजेना ॥ ७७ ॥ ना राती ना तेज । ते संधि जेवीं सांज । तेवीं विरुद्ध ना निज । अज्ञानें आथी ॥ ७८ ॥ ऐसी कोण्ही एकी दशा । तिये वादु अज्ञान ऐसा । तया गुंडालिया प्रकाशा । क्षेत्रज्ञु नांव ॥ ७९ ॥ अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ॥ ८० ॥ हाचि उभय योगु । बुझें बापा चांगु । सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ॥ ८१ ॥ आतां अज्ञानासारिखें । वस्तु आपणपेंचि देखे । परी रूपें अनेकें । नेणों कोणें ॥८२॥ जैसा रंकु भ्रमला । म्हणे जारे मी रावो आला । कां मूर्च्छितु गेला । स्वर्गलोका ॥ ८३ ॥ तेवीं लचकलिया दिठी । मग देखणें जें जें उठी । तया नांव सृष्टी । मीचि वियें पैं गा ॥ ८४ ॥ जैसें कां स्वप्नमोहा । तो एकाकी देखिजे बहुवा । तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे ॥ ८५ ॥ हेंचि आनी भांती । प्रमेय उपलवूं पुढती । परी तूं प्रतीती । याचि घे पां ॥ ८६ ॥ तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ ८७ ॥ इये नाहीं हेंचि रूप । ठाणें हें अति उमप । हें निद्रितां समीप । चेतां दुरी ॥ ८८ ॥ पैं माझेनिचि आंगें । पौढल्या हे जागे । आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होय ॥ ८९ ॥ महद्ब्रह्मउदरीं । प्राकृतीं आठै विकारीं । गर्भाची करी । पेलोवेली ॥ ९० ॥ उभयसंगु पहिलें । बुद्धितत्त्व प्रसवलें । बुद्धितत्त्व मोरेलें । होय मन ॥ ९१ ॥ तरुणी ममता मनाची । ते अहंकार तत्त्व रची । तेणें महाभूतांची । अभिव्यक्ति होय ॥ ९२ ॥ आणि विषयेंद्रियां गोसी । स्वभावें तंव भूतांसी । म्हणोनि येती सरिसीं । तियेंही रूपा ॥ ९३ ॥ जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें । तेव्हां ये वासनागर्भें । ठायेंठावो ॥ ९४ ॥ रुखाचा आवांका । जैसी बीजकणिका । जीवीं बांधे उदका । भेटतखेंवो ॥ ९५ ॥ तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें । आर घेवों लागे । अणियाची ॥ ९६ ॥ मग गर्भगोळा तया । कैसें रूप तैं ये आया । तें परियेसें राया । सुजनांचिया ॥ ९७ ॥ पैं अंडज स्वेदज । उद्भिज जारज । उमटती सहज । अवेव हे ॥ ९८ ॥ व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें । अंडजु उससे । अवयु तो ॥ ९९ ॥ पोटीं ख्रानि तमरजें । आगळिकां तोय तेजें ।

विसर ( आपण आपलें स्वकीय आत्मस्वरूप विसरणें ), तेंच या अज्ञानाचें रूप आहे. ७१. या अज्ञानाचा आणखी एक स्वभाव असा आहे कीं, ज्याप्रमाणें दिव्यानें अंधार पाहूं गेलें असतां तो दिसत नाहीं, त्याप्रमाणें तें ( अज्ञान ) विचाराचे वेळीं दिसत नाहीं. ७२. ज्याप्रमाणें दुधाची साय दुधांत, दूध निश्चल असतांना दिसते, व दूध ढवळिलें असतां दिसेनाशी होते. ७३. जीमध्यें जागेपणा नाहीं व स्वप्न नाहीं अथवा स्वरूपस्थिति नाहीं, अशी गाढ सुषुप्ति जशी असते, ७४. अथवा अर्जुना, वायु उत्पन्न होण्यापूर्वी आकाश जसें निष्फळ रिकामें असतें, त्यासारखें खरोखर अज्ञान आहे. ( जेथें यथार्थस्वरूपाचें भान नाहीं, अथवा विपरीत देहादिकांचें भान नाहीं, अशी जी स्फुरणरहित अवस्था, त्यासच अज्ञान म्हणावयाचें. ) ७५. पलीकडे दिसत आहे तो खांब आहे का पुरुष आहे, असा एक निश्चय होत नाहीं; परंतु काय भास होतो, हें कळत नाहीं. ७६. त्याप्रमाणें ब्रह्मवस्तु जशी असते तशी खरोखर दिसत नाहीं, परंतु कांहीं विपरीत दिसत असेल, तर तेंही दिसत नाहीं; ७७. रात्र नाहीं व दिवसही नाहीं त्या वेळेला जशी सांजवेळ म्हणतात, त्याप्रमाणें ( ज्या अवस्थेंत ) विपरीतज्ञान नसतें अथवा स्वरूपज्ञान नसतें, ( केवळ ) अज्ञान असतें. ७८. अशी कोणी एक अवस्था आहे, तिला अज्ञान असें म्हणतात आणि त्या अज्ञानानें गुंडाळलेला जो चित्प्रकाश, त्याला 'क्षेत्रज्ञ' असें नांव आहे. ७९. ( आतां क्षेत्रज्ञाचा स्वभाव सांगतात. ) अज्ञानास महत्त्व आणावें आणि आपल्या स्वरूपाला तर जाणूं नये, तें क्षेत्रज्ञाचें स्वरूप जाणावें. ८०. हाच क्षेत्रज्ञ व क्षेत्र या दोघांचा संबंध आहे, तो तूं बाबा, चांगला समज. हा ( अज्ञानाशीं संबंध असणें, हा ) सत्तेचा ( सामान्य चैतन्याचा ) सहजच स्वभाव आहे. ८१. आतां वस्तु ( आपण ) आपल्यालाच अज्ञानाप्रमाणें ( म्हणजे दृश्यत्वानें व नानात्वानें ) पहाते, परंतु कोणत्या ( किती ) अनेक रूपांनीं पहाते तें कळत नाहीं. ८२. जसा एकादा भ्रमिष्ट झालेला दरिद्री मनुष्य म्हणतो कीं, 'जारे, मी राजा आलों आहें' अथवा जसा एखादा मूर्च्छा आलेला मनुष्य भ्रमानें आपण स्वर्गास गेलों आहोंत असें मानतो, ८३. त्याप्रमाणें आत्मस्वरूपावरून दृष्टि घसरल्यावर मग जें जें दृश्य पुढें मांडलें जातें, त्याचेंच नांव मी सृष्टि प्रसवतों. ८४. ज्याप्रमाणें एकटा निजलेला पुरुष स्वप्नाच्या भ्रमानें अनेक पदार्थरूपानें पाहावा, ( पाहिला जातो ) तीच स्थिति आत्म्याची ( आपल्या स्वरूपाच्या ) स्मरणावांचून आहे. ८५. हीच गोष्ट दुसऱ्या प्रकारानें पुनः उघड सांगूं. परंतु हें सर्व ( मी सृष्टीला प्रसवतों वगैरे ) स्वप्नाप्रमाणें मिथ्या आहे, ही दृढ प्रतीति आंत ठेवून तूं ऐक. ८६. तरी ही अविद्या माझी विवाहित स्त्री आहे. ही अनादि आहे, परंतु ती तारुण्यांत आहे व इच्यामध्यें जे गुण आहेत, ते सांगतां येणें शक्य नाहीं. ( ती सद्, असद्, विलक्षण, अनिर्वचनीय आहे. ) ८७. हिला वस्तुतः अस्तित्व नाहीं, हेंच हिचें स्वरूप आहे. आकारानें किंवा व्याप्तीनें ही अमर्याद अफाट आहे. ही अविद्या ( स्वरूपीं ) निजलेल्यांना जवळ आहे व ( स्वरूपीं ) जागे असलेल्यांना दूर आहे. ८८. परंतु मी स्वतः झोंपलों म्हणजे ही जागृत असते ( स्वरूपज्ञानाच्या गैरहजेरींत अविद्येच्या गमजा चालतात. ) माझ्या सत्वाचा आश्रय उपयोगांत आणून ( उपभोगून ) ही ( ब्रह्मांडें पोटांत सांठविलेली एवढी ) मोठी गरोदर होते. ८९. महद्ब्रह्म आपल्या उदरामध्यें प्राकृत आठ विकारांनीं जगद्रूप गर्भाची वाढ करतें. ९०. उभयतांच्या ( माझ्या व मायेच्या ) संगांत प्रथम बुद्धितत्त्व जन्मास आलें, तें बुद्धितत्त्व ( रजोगुणानें ) भारलें गेलें, म्हणजे मन तयार होतें. ९१. मनाची तरुण स्त्री जी ममता, ती अहंकारतत्त्वास तयार करते व त्यायोगानें पंचमहाभूतें स्पष्ट दशेस येतात. ९२. आणि विषय व इंद्रियें यांचा स्वभावतःच पंचमहाभूतांत अंतर्भाव होत असल्यामुळें, विषय व इंद्रियें हीं देखील, त्या भूतांबरोबरच आकारास येतात. ९३. पंचभूतें, विषय व इंद्रियें हीं तयार झाल्यानंतर मागील सूक्ष्मप्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या आठ विकारांच्या हालचालीनें, त्रिगुणांचा तयार झालेला हा गर्भपिंड व्यक्त होतो; त्या वेळीं वासनेंत सूक्ष्मरूपानें राहिलेला जीव जसा असावयास पाहिजे, तसा त्या गर्भपिंडांत प्रवेश करतो. ९४. ज्याप्रमाणें बीजाचा दाणा पाण्याला भेटल्याबरोबर आपल्यामध्यें वृक्षाचा सूक्ष्म आकार तयार करतो, ९५. त्याप्रमाणें माझ्या संगानें, अविद्या हीं अनेक जगरूपी अणकुचीदार अंकुर घेऊं लागते. ९६. हे सुजनांच्या राजा, ( अर्जुना, ) त्या वेळीं मग, त्या गर्भगोलाचा आकार कसा व्यक्त होतो, तें ऐक. ९७. तेव्हां अंडज, स्वेदज, उद्भिज व जारज असे हे अवयव स्वभावतः उमटतात. ९८. मणीज हा अवयव आकाश व वायु यांच्या योगानें गर्भरस वाढल्यानें जीवन पावतो. ९९. तम व रज हे दोन गुण पोटांत घालून, आप आणि

उठितां निफजे । स्वेदजु मा ॥ १०० ॥ आपपृथ्वीउत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें । स्थावरु उमटे । उद्भिजु हा ॥ १ ॥ पांचां पांचही विरजीं । होती मनबुद्धयादि साजीं । हीं हेतु जारजीं । ऐसें जाण ॥ २ ॥ ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ । महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥ ३ ॥ प्रवृत्ति पेललें पोट । निवृत्ति ते पाठी नीट । सुरयोनी आंगें आठ । ऊर्ध्वाचीं ॥ ४ ॥ कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यअर्धभागु । अधोदेशु चांगु । नितंबु तो ॥ ५ ॥ ऐसें लेंकरूं एक । प्रसवली हे देख । जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ ६ ॥ चौऱ्यांयशी लक्ष योनी । तियें कांडां पेरां सांदणी । वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ॥ ७ ॥ नाना देहअवयवीं । नामाचीं लेणीं लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नीच नवेन ॥ ८ ॥ सृष्टी वेगवेगळीया । तिया करांग्रीं आंगोळियां । भिन्नाभिमान सूदालिया । मुदिया तेथें ॥ ९ ॥ हें एकलौतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली ॥ ११० ॥ पैं ब्रह्मा प्रातःकाळु । विष्णु तो माध्यान्ह वेळु । सदाशिव सायंकाळु । बाळा यया ॥ ११ ॥ महाप्रळयसेजे । खेळौनि आलें निदिजे । विषमज्ञानें उमजे । कल्पोदयीं ॥ १२ ॥ अर्जुना यापरी । मिथ्यादृष्टीचां घरीं । युगानुवृत्तीचीं करी । चोज पाउलें ॥ १३ ॥

सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवंति याः । तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

संकल्पु एयाचा इष्टु । अहंकारु विनटु । ऐसिया होय तैं शेवटु । ज्ञानें यया ॥ १४ ॥ आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ जांधुं जाली । माझी सत्ता ॥ १५ ॥ याकारणें मी पिता । महद्ब्रह्म माता । अपत्य पंडुसुता । जगडंबरु ॥ १६ ॥ आतां शरीरें बहुतें । देखौनि न भेद हो चित्तें । जें मनबुद्धयादि भूतें । एकेंचि येथें ॥ १७ ॥ हां गा एकेचि देहीं । काय अनारिसे अवयव नाहीं । तेवीं विचित्र विश्व पाहीं । एकाचि हें ॥ १८ ॥ पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया । येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥ १९ ॥ आणि संबंधु तोही ऐसा । मृत्तिके घटु लेंकु जैसा । कां पटत्व कापुसा । नातू होय ॥ १२० ॥ नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा । आम्हां आणि चराचरा । संबंधु तैसा ॥ २१ ॥ म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ । तेवीं मी गा सकळ । संबंधु वावो ॥ २२ ॥ जालेंनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके । किळेवरी माणिकें । लोपिजे काई ॥ २३ ॥ अळंकारातें आलें । तरी सोनेंपण काइ गेलें । कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके ॥ २४ ॥ सांग पां धनंजया । अवयवीं अवयविया । आच्छादिजे कीं तया । तेंचि रूप ॥ २५ ॥ कीं विरूढलेया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा । वेंचला कीं आगळा । दिसतसे ॥ २६ ॥ म्हणोनि जग परौतें । सारुनि पाहिजे मातें । तैसा नव्हे उखितें । आघवें मीचि ॥ २७ ॥ हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा । गांठी बांध वीरा । जीवाचिये ॥ २८ ॥ आतां मियां मज दाविला । शरीरीं वेगळाला ।

तेज यांचें आधिक्य झालें असतां, निश्चयेंकरून स्वेदज हा अवयव उत्पन्न होतो. १००. आप आणि पृथ्वी यांच्या आधिक्यानें आणि केवळ नीच अशा तमोगुणानें स्थावर असा उद्भिज उत्पन्न होतो. १०१. पंचमहाभूतें हीं सर्वच आपसांत सहकारिता करितात व मन व बुद्धि इत्यादि ज्ञानसाधनें तत्तरीत होतात; हीं मनुष्यादि जारज योनी उत्पन्न होण्याची कारणें आहेत, असें समज. १०२. याप्रमाणें ह्या चार भूतयोनी, हे ज्याचे सरळ चार हात व पाय आहेत व स्थूल जी महाप्रकृति, हें (ज्याचें) मस्तक आहे. १०३ प्रवृत्ति हें ज्याचें पुढें आलेलें पोट आहे व निवृत्ति ही नीट (सरळ) पाठ आहे व अष्ट देवयोनी ही ज्याची वरचीं (कमरेच्या वरचीं) अंगें आहेत. १०४. आनंदभरित असा जो स्वर्ग, हा ज्याचा कंठ (गळा) आहे, मृत्युलोक ही ज्याची कंबर आहे व पाताळ ज्याचा चांगला कमरेभागचा पृष्ठभाग आहे, १०५. अर्जुना, ज्याचें बाळसें तिन्ही लोक आहेत, असें एक मूल ही प्रसवली आहे, पहा. १०६. चौऱ्यांशीं लक्ष योनी ह्या ज्याच्या (त्या बालकाच्या) कांड्यांचे व पेरांचे सांधे आहेत; असें हें बालक दिवसेंदिवस वाढत आहे. १०७. (माया ही त्या बालकाच्या) देहाच्या निरनिराळ्या अवयवांवर नामांचे अलंकार घालते व मोहरूपी दुधानें ती माया या बालकाला नित्य नवे-पणानें वाढविते. १०८. वेगवेगळ्या सृष्ट्या, त्या या बालकाचीं हातांचीं व पायांचीं बोटें आहेत व प्रत्येक योनींत असणारे निरनिराळे अभिमान हे, त्या बोटांत घातलेल्या आंगठ्या होत. १०९. स्थावरजंगमात्मक जगद्रूपी एकुलतें एक व अविचारकालीं सुंदर वाटणारें असें हें मोठें बालक, त्याला जन्म देऊन ही (माया) थोर झाली (म्हणजे वाढली, ). ११०. ब्रह्मदेव हा या बालकाचा प्रातःकाळ आहे. विष्णु हा मध्यान्ह काळ आहे व सदाशिव हा सायंकाळ आहे. १११. हें बालक खेळून आलें, म्हणजे महाप्रलयरूप शेजेवर निजतें व पुनः कल्पाच्या आरंभीं भेदज्ञानानें जागें होतें. ११२. अर्जुना, याप्रमाणें हें बालक मिथ्या दृष्टीच्या घरांत युगांच्या मालिकांची पाऊलें कौतुकानें टाकितें. ११३.

हे कौंतेया, सर्व योनीमध्यें जीं जीं शरीरें निर्माण होतात, त्या सर्वांचें कारण (आई) माया आहे आणि बीजप्रद पिता मी आहें. ४.

या बालकाचा संकल्प हा आवडता आहे व अहंकार हा खेळगडी आहे. अशा या बालकाचा शेवट (नाश) त्यावेळीं ज्ञानानें होतो. ११४. आतां हें फार बोलणें राहूं दे. वर वर्णन केल्याप्रमाणें, माया ही सर्व जगताला जन्म देते. या क्रमांत त्या मायेला माझ्या अधिष्ठानाचा आधार मिळतो. ११५. या कारणास्तव मी बाप, महद्ब्रह्म ही आई व अर्जुना, जगडंबर हें मूल आहे. ११६. आतां निरनिराळीं शरीरें पाहून तुझ्या चित्तांत भेद येऊं देऊं नकोस. कारण कीं, या सर्व शरीरांत मन, बुद्धि, अहंकार व पंचमहाभूतें, हीं जीं या जगांतील आठ तत्त्वें आहेत, तीं एकच आहेत. ११७. अरे अर्जुना, एकाच देहामध्यें निरनिराळे (भिन्नभिन्न आकाराचे) अवयव नाहींत काय ? त्याप्रमाणें हें विचित्र विश्व एकच आहे, असें समज. ११८. त्याप्रमाणें वरच्या, खालच्या व भिन्न भिन्न आकाराच्या अशा वेगवेगळ्या डाहाळ्या एकाच बीजाच्या झालेल्या असतात, ११९. आणि आमचा या जगाशीं संबंध आहे; पण तो देखील कसा आहे म्हणून म्हणशील, तर मृत्तिकेचें मूल जसा घट, अथवा कापसाचें नातवंड जसें वस्त्रपण आहे; १२०. अथवा लाटाची परंपरा ही जशी समुद्राला संतति आहे, तसा आमचा व चराचराचा संबंध आहे. १२१. म्हणून अग्नि व ज्वाळा, हे दोन्ही जसे केवळ एक अग्नीच आहेत, त्याप्रमाणें मीच सर्व जग आहें व हा सर्व संबंध मिथ्या आहे. १२२. झालेल्या जगानें जर मी झांकला गेलों, तर जगपणानें कोण प्रकाशतो ? माणकाच्या तेजानें माणीक लोपलें जातें काय ? १२३. सोनें हें अलंकारदशेला आलें असतां त्याचें सोनेंपण गेलें काय ? अथवा कमळ उमललें असतां कमळत्वाला मुकतें काय ? १२४. अवयवी हा अवयवांकडून झांकला जातो, कीं अवयव हेच त्या अवयवीचें रूप आहे ? अर्जुना, सांग बाबा. १२५. जोंधळ्याचा कण पेरून त्याला अंकुर फुटून कणीस निवडून आल्यावर (म्हणजे कणीस परिपक्व झाल्यावर) तो पहिला पेरलेला दाणा नाहींसा झाला, का पुष्कळ पटींनें वाढला ? १२६. म्हणून जग पलीकडे सारून (म्हणजे जगाचा निरास करून) मला पहावें, तसा मी नाहीं, तर सर्व सरसकट मीच आहें. १२७. हे वीरा, (अर्जुना,) हा निश्चयाचा खरा सिद्धांत तूं जीवाच्या गांठीस बांधून ठेव. (म्हणजे तूं आपले अंतःकरणांत या सिद्धांताचा दृढनिश्चय कर.) १२८. आतां निरनिराळ्या शरीरांत माझें प्रकाशन माझ्याकडूनच होतें आणि त्या

गुणीं मीचि बांधला। ऐसा आवडें ॥ २९ ॥ जैसें स्वप्नीं आपण। उठवूनियां आत्ममरण। भोगिजे गा जाण। कपिध्वजा ॥ १३० ॥ कां कवळातें डोळे। प्रकाशूनि पिंवळें। देखती तेंही कळे। तयांसीचि ॥ ३१ ॥ नाना सूर्य प्रकाशें। प्रकटी तैं अभ्र भासे। तो लोपला हेंही दिसे। सूर्योंचि कीं ॥३२॥ पैं आपणपेनि जालिया। छाया गा आपुलिया। बिहोनि बिहालिया। आन आहे ॥ ३३ ॥ तैसीं इयें नाना देहें। दाऊनि मी नाना होयें। तेथ ऐसा बंधु आहे। तेंही देखें ॥ ३४ ॥ बंधु कां न बंधिजे। हें जाणणें मज माझें। नेणणेनि उपजे। आपलेनि ॥ ३५ ॥

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः। निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

तरी कोणें गुणें कैसा। मजचि मी बंधु ऐसा। आवडे तें परियेसा। अर्जुनदेवा ॥ ३६ ॥ गुण किती किंधर्म। कायि ययां रूपनाम। कें जालें हें वर्म। अवधारिजे ॥ ३७ ॥ तरी सत्त्वरजतम। तिघांसिहि हें नाम। आणि प्रकृति जन्म–। भूमिका ययां ॥ ३८ ॥ येथ सत्त्व तें उत्तम। रज तें मध्यम। तिहींमाजीं तम। सावियाधारें ॥ ३९ ॥ हें एकेचि वृत्तीचां ठायीं। त्रिगुणत्व आवडे पाहीं। वयसात्रय देहीं। येकीं जेवीं ॥ १४० ॥ कां मीनलेनि कीडें। जंवजंव तूक वाढे। तंवतंव सोनें हीन पडे। पांचिकां कसीं ॥४१॥ पैं सावधपण जैसें। वाहविलें आळसें। सुषुप्ति बैसे। घणावोनी ॥ ४२ ॥ तैसी अज्ञानांगीकारें। निगाली वृत्तिचि विखुरे। ते सत्त्वरजद्वारें। तमही होय ॥ ४३ ॥ अर्जुना गा जाण। ययां नाम गुण। आतां दाखऊं खुण। बांधिती ते ॥ ४४ ॥

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम्। सुखसंगेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥

तरी क्षेत्रज्ञदशे। आत्मा मोटका पैसे। हें देह मी ऐसें। मुहूर्त करी ॥४५॥ आजन्ममरणांतीं। देहधर्मीं समस्तीं। ममत्वाची सुती। घे ना जंव ॥ ४६ ॥ जैसी मीनाचां तोंडीं। पडेना जंव उंडी। तंव गळ आसुडी। जळपारधी ॥ ४७ ॥ तेवीं सत्त्वें लुब्धकें। सुखज्ञानाचीं पासिकें। बोढिजती मग खुडके। मृगु जैसा ॥ ४८ ॥ मग ज्ञानें चडफडी। जाणिवेचे खुरखोडी। स्वयं-सुख हें धाडी। हातींचें गा ॥ ४९ ॥ तेव्हां विद्यामानें तोखे। लाभमात्रें हरिखे। मी संतुष्ट हेंही देखे। श्लाघों लागे ॥ १५० ॥ म्हणे भाग्य ना माझें। आजि सुखियें नाहीं दुजें। विकाराष्टकें फुंजे। सात्त्विकाचेनि ॥ ५१ ॥ आणि येणेंही न सरे। लांकण लागे दुसरें। जें विद्वत्तेचें भरे।

शरीरामध्यें गुणांनीं मीच बांधला गेल्यासारखा दिसतों. १२९. हे अर्जुना, ज्याप्रमाणें स्वप्नामध्यें आपलें मरण आपणच आपल्या कल्पनेनें तयार करून, त्या स्वकल्पित मरणाचें दुःख आपण स्वतःच भोगावें. १३०. अथवा एकादी पांढरी वस्तु पिंवळी दिसली म्हणजे आपल्यास कावीळ झाली असें समजतें. हें कावीळ झाल्याचें ज्ञान आपल्यास डोळ्यांमुळें होतें व तेच डोळे पिंवळ्याचें प्रकाशन करतात. ( ह्याप्रमाणें डोळ्याकडून काविळीचें ज्ञान होऊन, त्यामुळें दिसणाऱ्या पिंवळेपणाचेंही तेच डोळे प्रकाशन करतात. ) १३१. अथवा सूर्य आपल्या प्रकाशानें ज्या वेळेस आपल्यावर आलेल्या ढगांचें प्रकाशन करितो, त्या वेळेस ते ढग आपणास दिसतात व सूर्यबिंबावर आलेल्या ढगानें सूर्यास झांकून टाकलेलें आहे, हें देखील सूर्याचे प्रकाशामुळेंच समजण्यांत येतें. १३२. अर्जुना, आपल्यापासूनच झालेल्या छायेला भ्यालें असतां, ती छाया भ्यालेल्या पुरुषाहून कांहीं वेगळी आहे काय ? तर नाहीं. म्हणजे त्या छायेचें प्रकाशन आपणच केलें आहे. १३३. त्याप्रमाणें हे अनेक देह दाखवून ( प्रकाशून ) मी अनेक होतों आणि त्या अनेक शरीरांत मी गुणांकडून बांधला गेलों आहे, असें जें वाटतें, त्या वाटण्याचेंही प्रकाशन मीच करतों. १३४. माझें मला यथार्थ ज्ञान असणें, हें गुणांचा बंध ( दिसत ) असून त्या बंधाकडून न बांधलें जाण्यास कारणीभूत होतें व आपल्या नेणण्यानेंच ( आपल्या यथार्थस्वरूपाच्या अज्ञानानेंच ) ( बंध ) उत्पन्न होतो. १३५.

हे महाबाहो, सत्त्व, रज व तम, असे हे गुण आहेत व प्रकृति यांची जन्मभूमि आहे, हे गुण देहामध्यें अविनाशी जो देही ( आत्मा ), त्याला बंधन करतात. ५.

तर अर्जुनदेवा, कोणत्या गुणानें व कसा मलाच मी बंधन आहें असें वाटतें, तें ऐका. १३६. गुण किती आहेत ? त्यांचे धर्म काय ? त्यांचें नांव व रूप काय ? व ते कोठें उत्पन्न झाले ? हें वर्म ऐक. १३७. तरी सत्त्व, रज, तम ह्या तिघांनाहि गुण म्हणतात आणि यांची प्रकृति ही जन्मभूमि आहे. १३८. या तीन गुणांत सत्त्वगुण हा उत्तम आहे, रजोगुण मध्यम आहे व तिन्ही गुणांत तमोगुण हा सहज कनिष्ट आहे. १३९. ज्याप्रमाणें एका देहाचे ठिकाणीं वयाच्या तीन अवस्था ( बाल्य, तारुण्य व वार्धक्य ) भासतात, त्याप्रमाणें एकाच अंतःकरणवृत्तीच्या ठिकाणीं त्रिगुणत्व भासतें, असें समज. १४०. अथवा हिणकस धातु सोन्यांत मिळविली असतां जसें जसें त्या सोन्याचें वजन वाढतें, तसें तसें सोनें पांच रुपये तोळा किंमतीपर्यंतच्या कसाचें हलकें होतें; १४१. आळसानें सावधपणा नाहींसा झाल्यावर मग, गाढ झोंप दृढ होऊन बसते; १४२. त्याप्रमाणें अज्ञानाचा अंगीकार करून बाहेर पडलेली वृत्ति ज्या वेळेस पैलावते, त्या वेळेस ती सत्त्व, रज होऊन तम देखील होते. १४३. अर्जुना, यांना गुण असें म्हणतात, असें समज. आतां हे गुण ( आत्म्याला ) कसे बांधतात, तें वर्म दाखवितों. १४४.

त्यामध्यें, सत्त्वगुण निर्मल असल्यामुळें प्रकाश करणारा व उपद्रवरहित आहे. हे पापरहिता ( अर्जुना ), तो सत्त्वगुण सुखाच्या व ज्ञानाच्या संगतीनें ( या दोन पाशांनीं ) प्राण्याला बद्ध करतो ( म्हणजे मी सुखी आहें, मी ज्ञानी आहें अशी जाणीव उत्पन्न करतो ). ६.

तर आत्मा हा जीवदशेत थोडासा प्रवेश करतो न करतो ( अज्ञानाचा थोडासा स्वीकार करतो न करतो ) तोंच 'हा देह मी आहे' असें म्हणण्यास आरंभ करतो. १४५. जन्मापासून तों मरणापर्यंत सर्व देहधर्मांच्या ठिकाणीं ममत्वाचा ( जन्ममरण वगैरे जे देहाचे सर्व धर्म आहेत, ते माझे आहेत असा ) अभिमान घेतो न घेतो इतक्यांत, १४६. ज्याप्रमाणें माशाच्या तोंडांत आमिष पडतें न पडतें तोंच, धीवर गळास हिसका देतो; १४७. त्याप्रमाणें सत्त्वगुणरूपी पारध्याकडून सुख व ज्ञानरूपी पाश ओढले जातात; पण हरण जसा पारध्याच्या पाशांत अडकतो, तसा तो सुख आणि ज्ञान या पाशांत अडकतो. १४८. मग ज्ञानानें चरफडावयास लागतो व जाणीवरूपी लाथा झाडतो आणि अरे, आपल्यापाशीं असलेलें आपलें आत्मसुख आपणच व्यर्थ घालवतो. १४९. तेव्हां विद्येनें व मानानें संतुष्ट होतो. कोणताही लाभ झाला तर आनंद पावतो, आपण संतुष्ट आहोंत हेंही पहातो व आपणास धन्य मानतो १५०. आणि म्हणतो, " माझें भाग्य उत्तम नाहीं काय ? आज माझ्यासारखा दुसरा कोणी सुखी नाहीं. " असा अष्टसात्त्विक भावांनीं गर्वाला चढतो. १५१. आणि एवढ्यानेंच सरत नाहीं तर त्याच्या मागें दुसरें बंधन लागतें; तें हें कीं, त्याच्या

भूत आंगीं ॥५२॥ आपणाचि ज्ञानस्वरूप आहे। तें गेलें हें दुःख न वाहे। कीं विषयज्ञानें होये। गगनायेवढा ॥ ५३ ॥ रावो जैसा स्वप्नीं। रंकपणें रिगे धानीं। तो दों दाणा मानी। इंदु ना मी ॥ ५४ ॥ तैसें गा देहातीता। जालेया देहवंता। हों लागे पंडुसुता। बाह्यज्ञानें ॥५५॥ प्रवृत्तिशास्त्र बुझे। यज्ञविद्या उमजे। किंबहुना सुझे। स्वर्गवरी ॥ ५६ ॥ आणि म्हणे आजि आन। मीवांचूनि नाहीं सज्ञान। चातुर्यचंद्रा गगन। चित्त माझें ॥ ५७ ॥ ऐसें सत्त्व सुखज्ञानीं। जीवासि लावूनि कानी। बैलाची करी वानी। पांगुळाचीया ॥ ५८ ॥ आतां हाचि शरीरीं। रजें जियापरी। बांधिजे तें अवधारीं। सांगिजेल ॥ ५९ ॥

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम्। तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥

हें रज याचि कारणें। जीवातें रंजऊं जाणे। हें अभिलाखाचें तरुणें। सदाचि गा ॥ १६० ॥ हें जीवीं मोटकें रिगे। आणि कामाचां मदीं लागे। मग वारया वळघे। चिंतेचिया ॥ ६१ ॥ घृतें आंबुखूनि आगियाळें। वज्राग्नीचें सादुकलें। आतां बहु थेंकुलें। आहे तेथ ॥६२॥ तैसी खवळे चाड। होय दुःखासकट गोड। इंद्रश्रीहि सांकड। गमों लागे ॥ ६३ ॥ तैसी तृष्णा वाढिनलिया। मेरुही हाता आलिया। तऱ्ही म्हणे एखादिया। दारुणाहि वळघो ॥ ६४ ॥ आजि असतें वेंचिजेल। परी पाहे काय कीजेल। ऐसा पांगीं वडील। व्यवसाय मांडी ॥ ६५ ॥ जीविताची कुरोंडी। वोंवाळूं लागे कवडी। मानी तृणाचिये जोडी। कृतकृत्यता ॥ ६६ ॥ म्हणे स्वर्गा हन जावें। तरी काय तेथें खावें। ययालागीं धांवे। याग करूं ॥ ६७ ॥ व्रतापाठीं व्रतें। आचरे इष्टापूर्तें। काम्यावांचूनि हातें। शिवणें नाहीं ॥ ६८ ॥ पैं ग्रीष्मांतींचा वारा। विसवो नेणे वीरा। तैसा न म्हणे व्यापारा। रातिदेवो ॥ ६९ ॥ काय चंचळु मासा। कामिनीकटाक्षु जैसा। लवलाहो तैसा। विजू नाहीं ॥ १७० ॥ तेतुलेनि गा वेगें। स्वर्गसंसारपांगें। आगीमाजीं रिगे। क्रियांचिये ॥ ७१ ॥ ऐसा देहीं देहावेगळा। ले तृष्णेचिया सांखळा। खटाटोपु वाहे गळां। व्यापाराचा ॥७२॥ हें रजोगुणाचें दारुण। देहीं देहियासि बंधन। परिस आतां विंदाण। तमाचें तें ॥ ७३ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्। प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

व्यवहाराचेहि डोळे। मंद जेणें पडळें। मोहरात्रीचें काळें। मेहुडें जें ॥ ७४ ॥ अज्ञानाचें जियालें। तया एका लागलें। जेणें विश्व भुललें। नाचत असे ॥ ७५ ॥ अविवेकमहामंत्र। जें मौढ्यमद्याचें पात्र। हें असो मोहनास्त्र। जीवांसि जें ॥ ७६ ॥ पार्था तें गा तम। रचूनि

अंगांत विद्वत्तारूपी भुताचा संचार होतो. १५२. आपण स्वतः ज्ञानरूप आहे, तें ( आपलें ज्ञानरूपत्व ) गेलें, त्याचें दुःख मानीत नाहीं; तर उलट विषयज्ञानानें आकाशाएवढा होतो ( आपणास अत्यंत श्रेष्ठ मानतो. ) १५३. जसा एखादा राजा स्वप्नांत आपण भिकारी आहोंत, असें समजून नगरांत प्रवेश करतो व त्यास भिक्षा मागून दोन दाणे मिळाले असतां मी इंद्र नाहीं काय, असें मानतो. १५४. अर्जुना, देहातीत जो आत्मा, तो देहवंत झाल्यावर ( म्हणजे त्यानें देहाशीं तादात्म्य केल्यावर ) त्याला बाह्यज्ञानानें तसें होऊं लागतें. १५५. संसारसंबंधीं शास्त्रें तो जाणतो, यज्ञविद्या त्यास समजते, फार काय सांगावें ! त्यास स्वर्गापर्यंत सर्व दिसतें. १५६. आणि सांप्रत माझ्यावांचून दुसरा कोणी जाणता नाहीं व माझें चित्त हें चातुर्यरूपी चंद्राला आकाश आहे, असें म्हणतो. १५७. याप्रमाणें सत्त्वगुण हा जीवाला सुख व ज्ञानरूपी दावें लावून, पांगुळाच्या बैलासारखी ( नंदीबैलासारखी ) त्याची स्थिति करतो. १५८. आतां हाच ( आत्मा ) देहामध्यें ज्या प्रकारानें रजोगुणानें बांधला जातो, तो प्रकार सांगण्यांत येईल तो ऐक. १५९.

रजोगुण हा अभिलाषरूप असून तृष्णा व आसक्ति हीं यापासून उत्पन्न होतात असें समज. हे कौंतेया, तो कर्मसंगतीनें प्राण्याला बद्ध करतो ( म्हणजे मी अमुक करीन, मी तमुक करीन, अशा इच्छांनीं बद्ध करतो ). ७.

रजोगुणाला रज हें नांव याच कारणाकरितां आहे कीं, तो रजोगुण जीवाला विषयांत रंजविण्याची कला जाणतो व रजोगुण हा अभिलाषाचें ( लोभाचें ) नेहमींचें ( कधीं कमी न होणारें ) तारुण्य आहे. १६०. या रजोगुणानें जीवांत ( अंतःकरणांत ) थोडासा प्रवेश केल्याबरोबर, तो जीव कामाच्या मस्तींत येतो आणि मग तो विषयाच्या चिंतनरूपी वाऱ्यावर स्वार होतो. १६१. पेटलेल्या अग्निकुंडांत तूप शिंपडलें व त्यांत आणखी विजेच्या अग्नीनें तें प्रदीप्त झालें असतां त्या अग्नीस, 'हें कमी आहे' अथवा 'हें जास्त आहे' असें म्हणतां येईल काय ? १६२. त्याप्रमाणें इच्छा खवळते व दुःखासकट सर्व गोष्टी गोड वाटतात व इंद्राचें वैभव ( ऐश्वर्य ) सुद्धां थोडें वाटूं लागतें. १६३. तशा प्रकारें इच्छा वाढल्यावर मग, जरी मेरु पर्वत हातीं आला, तरी असें म्हणतो कीं, याहीपेक्षां आणखी भयंकर श्रमानें मिळणारें असें एखादें स्थान असेल, तर तेंही मिळविण्याच्या खटपटीस लागूं. १६४. जवळचें असलेलें आज खर्च केलें तर उद्यां काय करावें, असा तो अतितृष्णेनें मोठ्या धंद्याला आरंभ करतो. १६५. कवडीवरून आपलें जीवित ओंवाळून टाकतो आणि गवताच्या काडीच्या प्राप्तीनें कृतकृत्यता ( जन्माला आल्याचें सार्थक ) समजतो. १६६. स्वर्गाला गेलें असतां तेथें काय खावें असें म्हणतो व याकरितां यज्ञ करण्यास धांवतो. १६७. व्रतामागें व्रतें आचरण करतो, इष्ट व पूर्त कर्में करतो व काम्यकर्मांवांचून दुसऱ्या कशाला हातानें स्पर्श करीत नाहीं. १६८, हे अर्जुना, जसा ग्रीष्म ऋतूचा शेवटला वारा एक क्षणभर विश्रांति घेणें जाणत नाहीं, त्याप्रमाणें हा रजोगुणी पुरुष व्यापार करीत असतां दिवस अथवा रात्र म्हणत नाहीं. १६९. रजोगुणापुढें मासा कसला चंचल आहे ? जसा स्त्रीचा नेत्रकटाक्ष चंचल असतो, तसा तो रजोगुणी पुरुष चंचल असतो. विजेमध्यें तसा ( त्या रजोगुणी पुरुषाइतका ) चंचलतेचा वेग नसतो. १७०. तितक्या वेगानें स्वर्ग व संसार यांच्या उत्कट इच्छेनें कर्मरूपी अग्नीमध्यें प्रवेश करतो. १७१. देहापासून जीवात्मा वेगळा असतां, तो देहामध्यें असतो तेव्हां तृष्णेची बेडी ( आपल्या पायामध्यें ) अडकवून, याप्रमाणें व्यापाराचा खटाटोप आपल्या गळ्यांत अडकवून घेतो. १७२. देहधारी जो आत्मा त्यास देहामध्यें असतांना, हें रजोगुणाचें भयंकर बंधन असतें, आतां तमोगुणाचें कौशल्य ऐक. १७२.

तमोगुण अज्ञानापासून उत्पन्न होतो व म्हणून तो सर्व प्राण्यांना मोह पाडतो असें जाण, हे भारता, प्रमाद, आळस आणि निद्रा यांनीं (या तीन पाशांनीं) तो ( प्राण्याला ) बद्ध करतो. ८.

व्यवहाराचीही दृष्टि ज्या पडद्यानें मंद होते ( असा तमोगुण पडदा आहे. ) व जो तमोगुण मोहरूपी रात्रींतील काळा ढग आहे. १७४. त्या तमोगुणाला केवळ अज्ञानाचा जिव्हाळा आहे व ज्या तमोगुणाच्या योगानें सर्व जीव भ्रमिष्ट होऊन वाटेल तसें कर्म करितात. १७५. अविचार हाच या तमोगुणाचा महामंत्र आहे व तो तमोगुण मूर्खपणारूपी दारूचें भांडें आहे; हें राहूं दे. ( फार काय सांगावें ! ) जो तमोगुण जीवाला मोहनास्त्र ( भूल पाडणारें अस्त्र ) आहे. १७६. अर्जुना, तो

ऐसें वर्म । चौखुरी देहात्म– । मानियातें ॥ ७७ ॥ हें एकचि कीर शरीरीं । माजों लागे चराचरीं । आणि तेथ दुसरी । गोठी नाहीं ॥ ७८ ॥ सर्वेंद्रियां जाड्य । मनामाजीं मौढ्य । माल्हाती दार्ढ्य । आलस्याचें ॥ ७९ ॥ आंगें आंग मोडामोडी । कार्यजातीं अनावडी । नुसती परवडी । जांभयांची ॥ १८० ॥ उघडियाचि दिठी । देखणें नाहीं किरीटी । नाळवितांचि उठी । वो म्हणौनि ॥ ८१ ॥ पडलिये धोंडी । नेणे कानी मुरडी । तयाचि परी मुरकुंडी । उकलूं नेणे ॥ ८२ ॥ पृथ्वी पाताळीं जावो । कां आकाशही वरी येवो । परी उठणें हा भावो । उपजों नेणे ॥ ८३ ॥ उचितानुचित आघवें । झांसुरतां नाठवे जीवें । जेथींचा तेथ लोळावें । ऐसी मेधा ॥ ८४ ॥ उभऊनि करतळें । पडिघाये कपोळें । पायाचें शिरियाळें । मांडूं लागे ॥ ८५ ॥ आणि निद्रेविषयीं चांगु । जीवीं आथि लागु । झोंपीं जातां स्वर्गु । वावो म्हणे ॥ ८६ ॥ ब्रह्मायु होइजे । मा निजेलियाचि असिजे । हें वांचूनि दुजें । व्यसन नाहीं ॥ ८७ ॥ वाटा जातां वोघें । कल्हातांही डोळा लागे । अमृतही परी नेघे । जरी नीद आली ॥ ८८ ॥ तेवींचि आक्रोशबळें । व्यापारे कोणे एके वेळे । निगालें तरी आंधळें । रोषें जैसें ॥ ८९ ॥ केधवां कैसें राहाटावें । कोणेसीं काय बोलावें । हें ठाकतें कीं नागवे । हेंही नेणे ॥ १९० ॥ वणवा मियां आघवा । पांखेंचि पुसोनि घेयावा । पतंगु या हांवा । घाली जेवीं ॥ ९१ ॥ तैसा वळघे साहसा । अकरणींच धिंवसा । किंबहुना ऐसा । प्रमाद रुचे ॥ ९२ ॥ एवं निद्रालस्यप्रमादीं । तम इहीं त्रिविधीं । बांधे निरुपाधी । चोखटातें ॥ ९३ ॥

सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत । ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥

जैसा वन्ही काष्ठीं भरे । तैं दिसे काष्ठाकारें । व्योम घटें आवरे । तें घटाकाश ॥ ९४ ॥ नाना सरोवर भरलें । तैं चंद्रत्व तेथें बिंबलें । तैसें गुणाभासीं बांधलें । आत्मत्व गमे ॥ ९५ ॥ परि हरुनि कफवात । जैं देहीं आटोपे पित्त । तैं करी संतप्त । देह जेवीं ॥ ९६ ॥ कां वरिष आतप जैसें । जिणोनि शीतचि दिसे । तेव्हां होय हिंव ऐसें । आकाश हें ॥ ९७ ॥ नाना स्वप्न जागृती । लोपूनि ये सुषुप्ति । तैं क्षणु एक चित्तवृत्ती । तेचि होय ॥ ९८ ॥

रजस्तमश्चाऽभिभूय सत्त्वं भवति भारत । रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

तैसीं रजतमें हारवी । जैं सत्त्व माजु मिरवी । तैं जीवाकरवीं म्हणवी । सुखिया ना मी ॥ ९९ ॥ तैसेंचि सत्त्व रज । लोपूनि तमाचें भोज । वळघे तैं सहज । प्रमादी होय ॥ २०० ॥ तयाचि गा परिपाठीं । सत्त्व तमातें पोटीं । घालूनि जेव्हां उठी । रजोगुण ॥ १ ॥ तेव्हां

तमोगुण अशा प्रकारें युक्ति रचून (तयार करून) देह हाच आत्मा असें समजणाऱ्याला जखडून बांधितो. १७७. आणि चराचरांत कोणत्याही शरीरामध्यें हा खरोखर एकच माजूं लागला कीं, मग तेथें तमोगुणाशिवाय दुसरी गोष्टच नसते. १७८. सर्व इंद्रियांचे ठिकाणीं जडपणा येतो, मनामध्यें मूर्खपणा उत्पन्न होतो व तीं दोघें (मन व इंद्रियें) आळसाच्या दृढपणाचा आश्रय करितात. १७९. अंगानें अंग मोडतो (अंगाला आळेपिळे देतो) व कोणतेंही काम करण्याविषयीं त्याला कंटाळा असतो व एका पाठीमागून एक अशा एकसारख्या नुसत्या जांभया देतो. १८०. अर्जुना, त्याचे डोळे जरी उघडे असले, तरी त्याला दिसत नाहीं व कोणी हांक मारली नसतां 'ओ' म्हणून उठतो. १८१. जमिनीवर पडलेल्या धोंड्यास जसें एका बाजूहून दुसऱ्या बाजूला फिरणें माहीत नसतें, त्याप्रमाणें तो मारलेली मुरकुंडी केव्हांही सोडीत नाहीं. १८२. पृथ्वी पाताळांत जावो अथवा आकाश अंगावर कोसळून पडो, परंतु 'उठावें' हा विचार उत्पन्न होण्याचें (मनांत येण्याचें) माहीत नसतें. १८३. आळसानें स्वस्थ (निचेष्ट) पडलें असतां, योग्य काय अथवा अयोग्य काय, हें सर्व अंतःकरणांत आठवत नाहीं व जेथच्या तेथें (जेथें पडला असेल तेथें) लोळावें अशी त्याची बुद्धि असते. १८४. दोन्ही तळहात वर करून गाल धरतो आणि दोन्ही गुडघ्यांत डोकें घालतो. १८५. आणि निद्रेविषयीं अंतःकरणांत चांगली आवड असते आणि झोंप यावयास लागली, म्हणजे स्वर्गसुखही तुच्छ आहे असें म्हणतो. १८६. ब्रह्मदेवाच्या आयुष्याचें व्हावें आणि मग निजूनच राहावें, यावांचून दुसरा नादच नाहीं. १८७. सहज वाटेनें जात असतां, कलंडून जरी पडला, तरी त्याचा डोळा लागतो आणि जर त्यास झोंप आली तर तो अमृतसुद्धां घेत नाहीं. १८८. जसा एखादा आंधळा रागावून कामाला निघाला म्हणजे तो कोणीकडे जाईल व कोठें पडेल याचा नेमच नाहीं, त्याप्रमाणें हा तमोगुणी पुरुष त्वेषाच्या आवेशांत कोणत्या एखाद्या वेळीं काम करण्यास निघाला असतां, काय करील याचा नेम नाहीं. १८९. केव्हां कसें वागावें, कोणाशीं काय बोलावें, अमुक एक गोष्ट साध्य आहे कीं असाध्य आहे, हेंही त्यास कळत नाहीं. १९०. अरे, त्याप्रमाणें पतंग हा सर्व वणवा मी आपल्या पंखानेंच पुसून घ्यावा, या उत्कट इच्छेनें वणव्यांत उडी घालतो. १९१. त्या पतंगाप्रमाणें हा तमोगुणी पुरुष एखाद्या धोक्याच्या कामाकडे वळतो व जें काम करूं नये, तें करण्याची त्यास प्रबळ इच्छा असते. फार काय सांगावें! याप्रमाणें त्यास प्रमाद (भलतेंच करणें) आवडतो. १९२. याप्रमाणें तमोगुण हा निद्रा, आळस व प्रमाद या तीन प्रकारांनीं निरुपाधिक व शुद्ध अशा आत्म्याला बांधितो. १९३.

हे भारता, सत्त्वगुण सुखाचे ठिकाणीं व रजोगुण कर्माचें ठिकाणीं आसक्ति उत्पन्न करतो आणि तमोगुण ज्ञानाला झांकून प्रमादाचे ठिकाणीं आसक्ति उत्पन्न करतो. ९.

ज्याप्रमाणें अग्नीनें लांकूड व्यापलें असतां, अग्नि हा लाकडाच्या आकाराचा दिसतो अथवा पोकळी ही घटांत सांपडली असतां, तिला घटाकाश म्हणतात. १९४. अथवा (ज्या वेळीं) सरोवर पाण्यानें भरलें असतें, तेव्हां त्यांत चंद्रपणा प्रतिबिंबित होतो. (व त्यामुळें चंद्र सरोवरांत बांधला गेल्यासारखा वाटतो.) तसें आत्मत्व हें गुणांत भासल्यामुळें, आत्मा हा गुणांनीं बांधल्यासारखा वाटतो. १९५. परंतु कफ व वात यांस मागें सारून जेव्हां पित्त देहांत व्यापतें, तेव्हां तें पित्त देहाला जसें संतप्त करतें; १९६. अथवा पावसाळा व उन्हाळा यांस जिंकून (हे गेल्यानंतर) जेव्हां थंडीच दिसते, तेव्हां आकाश हें थंडगार असें होतें. १९७. अथवा जाग्रत अवस्था व स्वप्नावस्था नाहींशी होऊन, जेव्हां गाढ निद्रेची अवस्था प्राप्त होते, तेव्हां क्षणभर चित्तवृत्ति सुषुप्तीच (जडमूढ) होते. १९८.

हे भरतकुलोत्पन्ना, रज व तम यांना जिंकून सत्त्व प्रकट होतो, रज व सत्त्व यांना जिंकून तम प्रकट होतो आणि तम व सत्त्व यांना जिंकून रज प्रकट होतो. १०.

त्याप्रमाणेंच रजोगुण व तमोगुण नाहींसे करून, जेव्हां सत्त्वगुण हा आपली वृद्धि मिरवितो, त्या वेळीं तो सत्त्वगुण जीवाकडून 'मी सुखी आहें ना?' असें म्हणवितो. १९९. त्याचप्रमाणें सत्त्वगुण व रजोगुण हे नाहींसे होऊन जेव्हां तमोगुणाची वृद्धि होते, तेव्हां आत्मा हा सहजच प्रमादी (चुकी करणारा) होतो. २००. त्याच रीतीनें सत्त्वगुणास व तमोगुणास पाठीमागें सारून जेव्हां रजोगुण उठतो, २०१. तेव्हां कर्मावांचून दुसरें कांहीं सुंदरच

कर्मीवांचूनि कांहीं । आन सौंदरची नाहीं । ऐसें मानी देहीं । देहराजु ॥ २ ॥ त्रिगुणवृद्धिनिरूपण । तीं श्लोकीं सांगितलें जाण । आतां सत्त्वादिवृद्धिलक्षण । सादर परिसा ॥ ३ ॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते । ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥

पैं रजतमविजयें । सत्त्व गा देहीं इये । वाढतां चिन्हें तियें । ऐसीं होती ॥ ४ ॥ जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाती बाहेरी वोसंडे । वसंतीं पद्मखंडें । द्रुती जैसी ॥५॥ सर्वेंद्रियांचां आंगणीं । विवेक करी रावणी । साचचि करचरणीं । होती डोळे ॥ ६ ॥ राजहंसापुढें । चांचूचें आगरडें । तोडी जेवीं झगडे । क्षीरनीराचे ॥ ७ ॥ तेवीं दोषादोषविवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं । नियमु वारे पायिकी । वोळगे तें ॥ ८ ॥ नाइकणें तें कानाचि वाळी । न पहाणें तें दिठीचि गाळी । अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ ९ ॥ वाती पुढां जैसें । पळों लागे काळवसें । निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ २१० ॥ धाराधरकाळे । महानदी उचंबळे । तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥ ११ ॥ अगा पुनवेचां दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं । ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंध ॥ १२ ॥ वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे । मानस विटे । विषयांवरी ॥ १३ ॥ एवं सत्त्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें । आणि निधनही घडे । तेव्हांचि जरी ॥ १४ ॥ तरी जैसीचि घरींची संपत्ती । आणि तैसीच उदार्यधैर्यवृत्ती । मा परत्रा आणि कीर्ती । कां नोहावें ॥ १५ ॥ कां पाहालेनि सुयाणें । जालया परगुणें । पढियंतें ये पाहुणें । स्वर्गोनियां ॥ १६ ॥ मग गोमटेया तया । जावळी असे धनंजया । तेवीं सत्त्वीं जाणे देहा । कें आथि गा ॥ १७ ॥ जे स्वगुणीं उद्भट । घेऊनि सत्त्व चोखट । निगे सांडूनि कोपट । भोगक्षम हें ॥ १८ ॥ अवचटें ऐसा जो जाये । तो सत्त्वाचाचि नवा होये । किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजीं ॥१९॥ सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा । गेलिया अपुरा । होय काई ॥ २२० ॥ नातरी येथिंचा दिवा । नेलिया सेजिया गांवा । तो तेथें तरी पांडवा । दीपचि कीं ॥ २१ ॥ तैसी ते सत्त्वशुद्धी । आगळी ज्ञानेंसी वृद्धी । तरंगावों लागे बुद्धी । विवेकावरी ॥ २२ ॥ पैं महदादि परिपाटी । विचारूनि शेवटीं । विचारासकट पोटीं । जिरोनि जाय ॥ २३ ॥ छत्तिसां सदतिसावें । चोविसां पंचविसावें । तिन्ही जुरोनि स्वभावें । चतुर्थ जें ॥ २४ ॥ ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सुगम । तयासवें निरुपम । लाहे देह ॥ २५ ॥ इयाचि परी देख । तमसत्त्व अधोमुख । बैसोनि जैं आगळीक । धरी रज ॥ २६ ॥

लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा । रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥

नाहीं, असें देहांत, देहराज जो आत्मा, तो मानतो. २०२. तीन गुणांची वृद्धि कशी होते, याचें निरूपण तीन श्लोकांनीं तुला सांगितलें हें समज. आतां सत्वादि वृद्धींचें लक्षण आदरपूर्वक ऐका. २०३.

या देहामध्यें सर्व इंद्रियांचे ठिकाणीं प्रकाश म्हणजे ज्ञान जेव्हां उत्पन्न होतें, तेव्हां सत्त्वगुणाची वृद्धि झाली आहे असें जाणावें. ११.

बाबा अर्जुना, रजोगुण व तमोगुण यांच्यावर जय मिळवून, जेव्हां सत्त्वगुण या देहांत वाढतो, तेव्हां जीं लक्षणें होतात, तीं अशीं असतात. २०४. कीं वसंत ऋतूंत ज्याप्रमाणें सुवास कमलांच्या पाकळ्यामध्यें न मावतां बाहेर पडतो, तशी बुद्धि आंतमध्यें न मावतां बाहेर पडते. २०५. सर्व इंद्रियांचे अंगणांत विवेक पहारा करतो व हातापायांच्या ठिकाणीं खरोखरच डोळे होतात (म्हणजे हातपाय हे कर्मेंद्रियें असूनही त्यांना चांगलें व वाईट निवडण्याची शक्ति येते.) २०६. राजहंसापुढें दूध व पाणी यांचें मिश्रण ठेविलें असतां, त्या राजहंसाच्या चोंचीचें टोंक जसें त्या मिश्रणांतील दूध व पाणी यांची वेगळीक करतें. २०७. त्याप्रमाणें पापपुण्य निवडण्यांत इंद्रियेंच परीक्षा करणारीं होतात व त्या वेळेला अरे अर्जुना, इंद्रियनिग्रह हाच (आपण होऊन) सेवाचाकरी करीत असतो २०८. जें ऐकूं नये, तें कानच वर्ज करितात; जें पाहूं नये, तें दृष्टीच टाकून देते; ज्याचा उच्चार करूं नये, तें जीभच टाळते. २०९. दिव्यापुढें जसा काळोख पळावयास लागतो, त्याप्रमाणें इंद्रियांसमोर निषिद्ध विषय येत नाहीं. २१०. पावसाळ्याच्या दिवसांत जसा महानदीला अपरंपार पूर येतो, त्याप्रमाणें सर्व शास्त्रांत बुद्धि पसरते. २११. अर्जुना, पौर्णिमेच्या दिवशीं ज्याप्रमाणें चंद्राचा प्रकाश आकाशांत जिकडे तिकडे पसरतो, त्याप्रमाणें ज्ञानांत वृत्ति सर्वत्र पसरते. २१२. वासना एकत्र होतात. (एक ब्रह्मप्राप्तीविषयींच काय ती वासना असते.) संसाराकडे मनाची असलेली धांव कमी होते व मन विषयांवर विटतें. २१३. याप्रमाणें सत्त्वगुण वाढतो, तेव्हां हीं लक्षणें खरोखर असतात आणि अशा स्थितींत जर मृत्यु घडला, २१४. तर जशी घरामध्यें (विपुल) संपत्ति आहे आणि त्याचप्रमाणें त्या संपत्तीवाल्याची वृत्ति उदार असून त्याच्या अंगीं धैर्य आहे, तर मग इहलोकांत कीर्ति आणि नंतर स्वर्गसुख, त्यास कां मिळूं नये ? २१५. अथवा सुकाळ (धान्य व जल यांची विपुलता) प्राप्त होऊन मेजवानीचा प्रसंग यावा आणि त्याच वेळीं आपलें आवडतें मनुष्य (जें मृत होऊन गेलेलें असल्यामुळें, ज्याच्या भेटीचा बिलकूल संभव नव्हता, असें आवडतें मनुष्य) स्वर्गांतून पाहुणें म्हणून यावें. २१६. अर्जुना, मग त्या चांगल्या गोष्टीला दुसरी जोड आहे काय ? त्याप्रमाणें सत्वगुणाच्या वृद्धींत मरण आलें असतां, तो (सत्त्वगुणानें स्वभावतः युक्त अशा जन्माशिवाय) दुसरीकडे कोठें जाईल ? २१७. कारण कीं, आपल्या गुणांनीं श्रेष्ठ, असा जो चांगला सत्त्वगुण, तो बरोबर घेऊन जो पुरुष भोगांना योग्य असें हें खोपट (शरीर) टाकून निघतो, २१८. असा जो अकस्मात् जातो, तो पुनः सत्वाचाच नवा होतो. (त्याला पुनः सत्त्वगुणानें युक्त असा जन्म मिळतो.) फार काय सांगावें ! त्याला ज्ञानी पुरुषांमध्यें जन्म मिळतो. २१९. राजा हा राजेपणानें (गादीवर असतांना) डोंगरावर गेला असतां, त्याच्या राजेपणांत कांहीं कमीपणा येईल काय ? अर्जुना, सांग बरें. २२०. अथवा अर्जुना, येथील (या गांवांतील) दिवा शेजारच्या गांवांत नेला असतां तेथें तरी तो दिवाच आहे. २२१. त्या दिव्याच्या तेजाप्रमाणें त्याच्या सत्त्वगुणाचें निर्मलत्व (प्रकाश) ज्ञानासह विशेषच वाढतें व त्याची बुद्धि विवेकावर पोहूं लागते. २२२. महत्तत्त्वादि अनुक्रमाचा विचार करून अखेरीस (विचार करणारा) त्या विचारांसकट (ज्या ब्रह्मस्वरूपांत) लीन होतो, २२३. वेदांतांत (गीतेंत १३ व्या अध्यायांत ५।६ श्लोकांत सांगितल्याप्रमाणें) छत्तीस तत्त्वें मानलीं आहेत; त्यांच्या मतें जें ब्रह्म सदतिसावें आहे; सांख्यांत चोवीस तत्त्वें मानलीं आहेत, म्हणून त्यांच्या मतें जें ब्रह्म पंचविसावें आहे व सत्त्वगुणादि तीन गुणांस नाहींसें करून, जें स्वभावतः चौथें आहे; २२४. असें जें ब्रह्म, सर्व असून सर्वांत उत्तम आहे, तें ब्रह्म ज्यांस (ज्या कुलांत) सुलभ झालें आहे, त्यांचे बरोबर (त्या कुलांत) त्यास निरुपम देह मिळतो. २२५. हें पहा, याचप्रमाणें ज्या वेळीं तमोगुण व सत्त्वगुण खालीं तोंड करून बसतात (कमी होतात) व रजोगुण ज्या वेळेला वृद्धि पावतो, २२६.

हे भरतश्रेष्ठा, रजोगुण अधिक झाला असतां लोभ, प्रवृत्ति, (शहरें रचणें वगैरेसारख्या अफाट) कर्मांचा आरंभ, दुर्धर अभिलाष, इच्छा हीं उत्पन्न होतात. १२.

आपलिया कार्याचा । धुमाड गांवीं देहाचा । माजवी तें चिन्हांचा । उदयो ऐसा ॥२७॥ पांजरली बाहुली । करी वेगळ वेंटाळी । तैसी विषयीं सरळी । इंद्रियां होय ॥ २८ ॥ परदारादिक पडे । परी विरुद्ध ऐसें नावडे । मग शेळियेचेनि तोंडें । सैंघ चारी ॥ २९ ॥ हा ठायवरी लोभु । करी स्वैरत्वाचा राबु । वेंटाळितां अलाभु । तें तें उरे ॥ २३० ॥ आणि आड पडलिया । उद्यमजातां भलतेया । प्रवृत्ति धनंजया । हातु न काढी ॥ ३१ ॥ तेवींचि एखादा प्रासादु । कां करावा अश्वमेधु । ऐसा अचाट छंदु । घेऊनि उठी ॥ ३२ ॥ नगरेंचि रचावीं । जळाशयें निर्मावीं । महावनें लावावीं । नानाविधें ॥ ३३ ॥ ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमी । आणि दृष्टादृष्ट कामीं । पुरे न म्हणे ॥ ३४ ॥ सागरुही सांडीं पडे । आगी न लाहे तीन कवडे । ऐसें अभिलाषीं जोडे । दुर्भरत्व ॥ ३५ ॥ स्पृहा मना पुढां पुढां । आशेचा घे दवडा । विश्व घापे चाडा । पायांतळीं ॥ ३६ ॥ इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होती साजीं । आणि ऐशा समाजीं । वेंचे जरी देह ॥ ३७ ॥ तरी आघवाचि इहीं । परिवारला आनीं देहीं । रिगे परी योनिही । मानुषीचि ॥ ३८ ॥ सुरवाडेंसि भिकारी । वसो पां राजमंदिरीं । तरी काय अवधारीं । रावो होईल ॥ ३९ ॥ बैल तेथें करबाडें । हें न चुके गा फुडें । नेइजो कां वऱ्हाडें । समर्थाचेनी ॥ २४० ॥ म्हणौनि व्यापाराहातीं । उसंतु देहा ना राती । तैसयांचिये पांती । जुंपिजे तो ॥ ४१ ॥ कर्मजडाचां ठायीं । किंबहुना होय देहीं । जो रजोवृद्धीचां डोहीं । बुडोनि निमे ॥ ४२ ॥ मग तैसाचि पुढती । रजसत्त्ववृत्ती । गिळूनि ये उन्नती । तमोगुण ॥४३॥

अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च । तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥

तेंचि जियें लिंगें । देहींचीं सबाह्य सांगें । तियें परिस चांगें । श्रोत्रबळें ॥ ४४ ॥ तरी होय ऐसें मन । जैसें रविचंद्रहीन । रात्रींचें का गगन । अंवसेचिये ॥ ४५ ॥ तैसें अंतर असोस । होय स्फूर्तिहीन उद्वस । विचाराची भाष । हारपे तें ॥ ४६ ॥ बुद्धि मेचवेना धोंडीं । हा ठायवरी मवाळें सांडी । आठवो देशधडी । जाला दिसे ॥ ४७ ॥ अविवेकाचेनि माजें । सबाह्य शरीर गाजे । एकलेनि घेपे दीजे । मौढ्यें तेथ ॥ ४८ ॥ आचारभंगाचीं हाडें । रुपती इंद्रियापुढें । मरे जरी तेणेंकडे । क्रिया जाय ॥ ४९ ॥ पाहीं आणिकही एक दिसे । जे दुष्कृतीं चित्त उल्हासे । आंधारीं देखणें जैसें । डुडुळाचें ॥ २५० ॥ तैसें निषिद्धाचेनि नांवें । भलतेही भरे हांवें । तियेविषयीं धांवें । घेती करणें ॥ ५१ ॥ मदिरा न घेतां डुले । सन्निपातेंवीण बरळे ।

तेव्हां रजोगुण शरीररूपगांवांत आपल्या कार्यांचा धुमाकूळ घालतो. त्या वेळीं त्या शरीरांत लक्षणांचा असा उदय होतो. २२७. पसरलेली वाहुटळ निरनिराळ्या पदार्थांचें ( बरें वाईट न पहातां ) एकीकरण करते, त्याप्रमाणें इंद्रियांना विषयांमध्यें मोकळीक असते. २२८. परस्त्री वगैरेंशीं प्रसंग आला असतां, या गोष्टी शास्त्रनिषिद्ध आहेत, असें त्यास वाटत नाहीं व मग तो शेळीप्रमाणें इंद्रियांना बरेवाईट विषय सरसकट चारतो. २२९. येथपर्यंत त्या रजोगुणी पुरुषाचा लोभ स्वेच्छाचारीपणाचा धुमाकूळ घालतो व दुसऱ्याच्या वस्तू लुबाडतांना जेवढ्या वस्तू प्राप्त करून घेणें अशक्य असतें, तेवढ्याच वस्तू शिल्लक राहतात. २३०. आणि अर्जुना, कोणताही धंदा समोर आला असतां ( करण्याचा प्रसंग आला असतां ), तो धंदा करण्याविषयींचा मनाचा कल मागें घेत नाहीं. २३१. त्याचप्रमाणें एखादें मंदीर बांधावें अथवा अश्वमेध यज्ञ करावा, असा अघटित नाद घेऊन उठतो. २३२. शहरेंच वसवावींत, जलाशय ( तळीं, विहिरी ) वगैरे पाण्याचे साठे बांधावेत व नाना प्रकारचे मोठे बगीचे लावावेत. २३३. अशा अशा अचाट कर्मांना आरंभ करतो आणि इहलोकींचे व परलोकींचे भोग मिळण्याचे कामांत ( इच्छेंत ) 'पुरे' म्हणत नाहीं. २३४. समुद्र दुर्भर खरा, पण तो या रजोगुणी पुरुषाच्या अभिलाषापुढें हार खाईल. अग्नीला कितीही जळण घातलें तरी, त्याची तृप्ति होत नाहीं, असा तो दुर्भर आहे खरा; परंतु त्याच्या अभिलाषांच्या दुर्भरत्वापुढें अग्नीची तीन कवड्या किंमत नाहीं, असें त्याच्या अभिलाषांच्या ठिकाणीं दुर्भरत्व असतें. २३५. विषयतृष्णा ही मनाच्या पुढें पुढें आशेची धांव घेते व सर्व विश्व इच्छेच्या पायाखालीं घातलें जातें. २३६. याप्रमाणें रजोगुणाचा उत्कर्ष झाला, म्हणजे हीं लक्षणें टवटवीत ( व्यक्त ) होतात व अशा लक्षणांच्या समुदायांत जर देह पडला, ( मृत्यु आला ), २३७. तर या सर्व लक्षणांनीं युक्त असा तो रजोगुणी पुरुष दुसऱ्या देहांत प्रवेश करितो; परंतु ( त्या देहाची ) मनुष्याचीच योनी असते. २३८. हें पहा, एखादा भिकारी चैनीनें राजवाड्यांत वसेना का ! तर तेवढ्यावरून तो राजा होईल काय ! २३९. बैलाला जरी श्रीमंताच्या लग्नाबरोबरच्या मंडळींनीं ( गाडीला जोडून ) नेला, तरी त्याच्या कपाळाचा कडबा खरोखर चुकत



नाहीं. २४०. म्हणून व्यापारामुळें ज्यांना दिवस आणि रात्रीं विश्रांति मिळत नाहीं, अशा प्रकारच्या लोकांच्या पंक्तीस तो जुंपला जातो. ( तशांच्या कुळांत तो जन्मतो. ) २४१. फार काय सांगावें ! जो रजोगुणांनीं बनलेल्या वृत्तींच्या उत्कर्षरूपी डोहांत बुडून मरण पावतो, तो काम्य कर्में करणाऱ्या लोकांच्या कुळांत जन्मतो. २४२. त्याचप्रमाणें जेव्हां पुढें रजोगुण व सत्त्वगुण नाहींसे करून तमोगुण उन्नतीला येतो ( म्हणजे वाढतो, ) २४३.

हे कुरुनंदना, तमोगुण अधिक झाला असतां अविवेक, कर्मप्रवृत्तीचा अभाव, प्रमाद, मोह हीं उत्पन्न होतात. १३.

त्या वेळचीं जीं लक्षणें देहाच्या आंत व बाहेर असतात, तीं आतां आम्हीं सांगतों, तीं चांगल्या श्रोत्रबळानें ( लक्षपूर्वक ) ऐक. २४४. तर जसें अमावास्येच्या रात्रीचें आकाश, सूर्य व चंद्र यांनीं रहित असतें, तसें त्याचें मन होतें. २४५. त्याप्रमाणें अंतःकरण पूर्णपणें विचारशून्य व रिकामें असतें व तेव्हां त्या अंतःकरणांत सारासारविवेकाची गोष्ट नाहींशी होते. २४६. बुद्धि मढपणांत धोंड्यालाही दाद देत नाहीं, ( मागें सारते, ) येथपर्यंत तिनें मऊपणा टाकलेला असतो आणि त्याची स्मरणशक्ति तर देशोधडी झालेली दिसते. २४७. शरीराच्या आंतबाहेर अविवेकाचा अतिरेक दळदळीत दिसतो व त्या तमोगुणाच्या ठिकाणीं एकट्या मूर्खपणाची देवघेव होते. २४८. ( ज्याप्रमाणें महारवाड्यापुढें हाडें रोंवलेलीं पाहून पहाणारा जसा हा महारवाडा आहे, असें समजतो, त्याप्रमाणें ) या तमोगुणी पुरुषाच्या इंद्रियरूपी महारवाड्यावर आचारभ्रष्टतारूपी हाडें रोंवलेलीं असतात, (त्यावरून हा तमोगुणी आहे, असें समजलें जातें ) व हा तमोगुणी पुरुष मरेतोंपर्यंत, त्याच्या क्रिया आचारभ्रष्टतेकडे जातात. ( म्हणजे मरेपर्यंत तो भ्रष्टाचरणच करतो ) २४९. पहा, आणखी ( त्याचे ठिकाणीं ) एक लक्षण दिसतें. तें हें कीं, जसें घुबडास अंधारांतच दिसतें, त्याप्रमाणें या तमोगुणी पुरुषास वाईट कर्में करण्यांत चित्ताला स्फुरण चढतें. २५०. त्याप्रमाणें निषिद्ध कर्म म्हटलें कीं, वाटेल त्या निषिद्ध कर्म करण्याच्या उत्कट इच्छेंत सांपडतो व ती निषिद्ध कर्माविषयींची इच्छा पूर्ण करण्याकरितां इंद्रियें धांव घेतात. २५१. हा तमोगुणी पुरुष दारू न पितां झोकांड्या खातो, सन्निपात वायू-

निष्प्रेमेंचि भुले। पिसें जैसें ॥ ५२ ॥ चित्त तरी गेलें आहे। परी उन्मनी ते नोहे। ऐसें माल्हातिजे मोहें। माजिरेनि ॥ ५३ ॥ किंबहुना ऐसैसीं। इयें चिन्हें तम पोषी। जैं वाढे आयितीसी। आपुलिया ॥ ५४ ॥ आणि हेंचि होय प्रसंगें। मरणाचें जरी खागें। तरी तेतुलेनि रिगे। तमेंसीं तो ॥ ५५ ॥ राई राईपण बीजीं। सांठवूनियां अंग त्यजी। मग विरूढे तैं दुजी। गोठी आहे गा ॥ ५६ ॥ पैं होऊनि दीपकलिका। येरु आगी विझो कां। कां जेथ लागे तेथ असका। तोचि आहे ॥ ५७ ॥ म्हणोनि तमाचिये लोथे। बांधोनियां संकल्पातें। देह जाय तैं मागौतें। तमाचेंचि होय ॥ ५८ ॥ आतां काय येणें बव्हें। जो तमोवृद्धि मृत्यु लाहे। तो पशु कां पक्षी होये। झाड कां कृमी ॥ ५९ ॥

यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्। तदोत्तमविदाँल्लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥

येणेंचि पैं कारणें। जें निपजे सत्त्वगुणें। तें सुकृत ऐसें म्हणे। श्रौतसमो ॥ २६० ॥ म्हणौनि तया निर्मळा। सुखज्ञानी सरळा। अपूर्व ये फळा। सात्त्विक तें ॥ ६१ ॥

रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते। तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

मग राजसा जिया क्रिया। तया इंद्रावणी पिकलिया। जे सुखें चितारूनियां। फळती दुःखें ॥ ६२ ॥ कां निंबोळियेचें पिक। वरि गोड आंत विख। तैसें तें राजस देख। क्रियाफळ ॥ ६३ ॥ तामस कर्म जितुकें। अज्ञानफळेंचि पिके। विषांकुर विखें। जियापरी ॥ ६४ ॥

कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलं। रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

म्हणौनि बारे अर्जुना। येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना। जैसा कां दिनमाना। सूर्य हा पैं ॥६५॥ आणि तैसेंचि हें जाण। लोभासि रज कारण। आपलें विस्मरण। अद्वैतीं जेवीं ॥ ६६ ॥ मोह अज्ञान प्रमादा। ययां मैळेंया दोषवृंदा। पुढती पुढती प्रबुद्धा। तमचि मूळ ॥ ६७ ॥ ऐसें विचाराचां डोळां। तिन्हीं गुण हे वेगळवेगळां। दाविले जैसा आंवळा। तळहातींचा ॥ ६८ ॥

सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च। प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

तंव रजतमें दोन्हीं। देखिलीं प्रौढपतनीं। सत्त्वावांचूनि नाणी। ज्ञानाकडे ॥ ६९ ॥ म्हणौनि सात्त्विका वृत्ती। एक जाले गा जन्मव्रती। सर्वत्यागें चतुर्थी। भक्ति जैसी ॥ २७०॥

ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः। जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १८ ॥

शिवाय बरळतो आणि वेडा मनुष्य जसा प्रेमावांचून भुलतो, तसा हा भुलतो. २५२. त्याचें चित्त तर नाहींसें झालेलें असतें; पण ती उन्मनी अवस्था नाहीं. याप्रमाणें जे उन्मत्तकारक मोहाकडून वश केले जातात; २५३. फार काय सांगावें ! जेव्हां तमोगुण आपल्या सामुग्रीनें ( पूर्णपणें ) वाढतो, तेव्हां तो अशीं अशीं हीं चिन्हें पोसतो. २५४. आणि ह्याच तमोगुणाच्या उन्नतीचा प्रसंग असतांना जर मरणाचें ठिकाण प्राप्त झालें, तर तो तमोगुणी पुरुष तितक्या तमोगुणांसह पुढला जन्म घेतो. २५५. मोहरीचें झाड आपला मोहरीपणा बियांत सांठवून मग जर आपलें अंग टाकील ( तें मोहरीचें झाड मरेल ) मग त्या बीजापासून जो अंकुर फुटेल, त्याला मोहरीपणाशिवाय दुसरी गोष्ट आहे काय ? २५६. अग्नि हा दिव्याची ज्योत होऊन ( अग्नीपासून दिवा लाविल्यावर ) मग तो ( पहिला ) अग्नि जरी विझाला, तरी विझेना का ? कारण कीं, ज्या ठिकाणीं त्या दिव्याची ज्योत लागेल, त्या ठिकाणीं तो पूर्वीचाच सगळा अग्नि आहे. २५७. म्हणून तमाच्या मोटेंत संकल्पाला बांधून ( म्हणजे तामस संकल्प करीत असतांना ) ज्याचा देह जातो, त्याला पुनः तमाचाच देह मिळतो. २५८. आतां असें हें पुष्कळ बोलून काय करावयाचें आहे ? जो तमाच्या उत्कर्षांत मरण पावतो, तो पशु अथवा पक्षी अथवा झाड किंवा किडा होतो. २५९.

जर सत्त्वगुणाची वृद्धि असतांना मनुष्य नाश पावला, तर तो ब्रह्मज्ञानी व शुद्ध अशा लोकांमध्यें जन्म पावतो. १४.

याच कारणाकरितां जें सत्त्वगुणापासून उत्पन्न होतें तें पुण्यकर्म, असें श्रुतीचा संकेत सुचवितो. २६०. म्हणून त्या निर्मळ सुकृताला सरळ असें सुख व ज्ञान हें लोकोत्तर फळ येतें व तेंच सात्त्विक फळ होय. २६१.

रजोगुणाची वृद्धि असतांना मरण पावल्यास कर्मासक्तीनें युक्त अशा ( मनुष्य– ) लोकीं जन्म पावतो. त्याचप्रमाणें तमोगुणाची वृद्धि असतांना मरण पावल्यास पुरुष ( झाड, कृमी, लोह, लोष्ट, पाषाण इत्यादि) ज्ञानहीन योनींमध्यें जन्म पावतो. १५.

मग राजस क्रिया ज्या आहेत, त्या पिकलेल्या इंद्रावणीच्या फळांप्रमाणें आहेत; कारण कीं, त्या क्रिया बाहेरून दिसण्यांत जरी सुखानें रंगविलेल्या असतात, तरी त्या क्रियांचें फळ दुःख हें असतें. २६२. अथवा कडूनिंबाच्या निंबोळ्या बाहेरून सुंदर दिसतात, पण आंत विष ( विषासारख्या कडू ) असतात; त्याप्रमाणें तें राजस क्रियांचें फळ आहे, असें समज. २६३. ज्याप्रमाणें विषाच्या अंकुराला विषच फळ येतें, त्याप्रमाणें जितकें तामस कर्म आहे, तितकें अज्ञानरूप फळानें पिकतें. २६४.

सात्त्विक ( सुकृत ) कर्माचें निर्मल सत्त्वप्रधान फल मिळतें, असें ( ज्ञाते ) सांगतात. राजस कर्माचें फल दुःख आणि तामस कर्माचें फल अज्ञान ( असतें. ) १६.

म्हणून बा अर्जुना, जसा सूर्य हा दिनमानाला हेतु आहे, तसा येथें सत्त्वगुणच ज्ञानाला हेतु आहे. २६५. ज्याप्रमाणें अद्वैत परमात्म्याला, आपलें स्वरूपविस्मरण हें, जसें जीवदशेला येण्यास कारण आहे, त्याप्रमाणेंच लोभाला रज कारण आहे. २६६. हे शहाण्या अर्जुना, मोह, अज्ञान व प्रमाद, या मलिन दोषसमुदायाला वारंवार तमोगुणच कारण आहे. तळहातावरील आंवळा जसा सर्व बाजूंनीं दाखवावा, त्याप्रमाणें हे वेगवेगळे तिन्ही गुण, विचाराच्या डोळ्यांना ( दिसतील ) असे दाखविले. २६८.

सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होतें, रजोगुणापासून केवळ लोभ उत्पन्न होतो, तमोगुणापासून प्रमाद व मोह एवढेंच नव्हे, तर अज्ञानसुद्धां उत्पन्न होतें. १७.

तेव्हां रजोगुण व तमोगुण हे दोन्ही पतन घडवून आणण्यास समर्थ आहेत आणि सत्त्वगुणावांचून ज्ञानाकडे कोणी नेत नाहीं, असें दिसून आलें; २६९. म्हणून ज्याप्रमाणें सर्व गोष्टींचा ( आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी या तीन भक्तींचा ) त्याग करून ( ज्ञानी भक्त ) ज्ञानरूप भक्तीचें जन्मभर आचरण करतात, त्याप्रमाणें कित्येक पुरुष आमरणांत सात्त्विक वृत्तीनें राहण्याचा निश्चय करतात. २७०.

सत्त्वगुणी पुरुष उच्च ठिकाणीं (स्वर्गादि लोकीं) जातात. रजोगुणी पुरुष मध्येंच ( मनुष्यलोकीं ) रहातात. निंद्य गुणांमध्यें असलेले तामसी पुरुष अधोगतीला ( पशुपक्ष्यादिकांच्या जन्माला ) जातात. १८.

तैसें सत्त्वाचेनि नटनाचें । असणें जाणें जयांचें । ते तनुत्यागीं स्वर्गींचे । राय होती ॥ ७१ ॥ इयाचि परी रजें । जिहीं कां जीजे मरिजे । तिहीं मनुष्य होइजे । मृत्युलोकीं ॥ ७२ ॥ तेथ सुखदुःखाचें खिचटें । जेविजे एकेचि ताटें । जेथ इये मरणवाटे । पडिलें नुठी ॥ ७३ ॥ आणि तयाचि स्थिति तमीं । जे वाढोनि निमती भोगक्षमीं । ते घेती नरकभूमी । मूळपत्र ॥७४॥ एवं वस्तूचिया सत्ता । त्रिगुणासी पंडुसुता । दाविली सकारणता । आघवीचि ॥ ७५ ॥

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टाऽनुपश्यति । गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

पैं वस्तु वस्तुत्वें असिकें । तें आपणपें गुणासारिखें । देखोनि कार्यविशेखें । अनुकरे गा ॥ ७६ ॥ जैसें कां स्वर्मीचेनि राजें । जैं परचक्र देखिजे । तैं हारी जैत होइजे । आपणाचि ॥ ७७ ॥ तैसे मध्योर्ध्वअध । हे जे गुणवृत्तिभेद । ते दृष्टीवांचूनि शुद्ध । वस्तुचि असे ॥ ७८ ॥ परी हे वाहणी असो । तरी आन न दिसो । परिसें तें सांगतसों । मागील गोठी ॥ ७९ ॥ तरी ऐसें निजनिजें । सामर्थ्यें तिन्ही सहजें । होती देहव्याजें । गुणचि हे ॥ २८० ॥ इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे । कां अवगे तरुवरें । भूमिरसु ॥ ८१ ॥ नाना दहियाचेनि मिसें । परिणमे दूधाचि जैसें । कां मूर्त होय ऊंसें । गोडी जेवीं ॥ ८२ ॥ तैसे हे सांतःकरण । देहाचि होती त्रिगुण । म्हणोनि बंधा कारण । घडे कीर ॥ ८३ ॥ परी चोज हें धनुर्धरा । जे एवढा गुंफिरा । मोक्षाचा संसारा । उणा नोहे ॥ ८४ ॥ गुण आपुलालेनि धर्मे । देहींचे माघुत साउमें । चाळितांही न खोमे । गुणातीतता ॥ ८५ ॥ ऐसी मुक्ति असे सहज । ते आतां परिसऊं तुज । जे तूं ज्ञानांबुज- । द्विरेफु कीं ॥ ८६ ॥ आणि गुणीं गुणाजोगें । चैतन्य नोहे मागें । बोलिलों तें खागें । तेवींचि हें ॥ ८७ ॥ तरी पार्था जैं ऐसें । बोधलेनि जीवें दिसे । स्वप्न कां जैसें । चेइलेनी ॥ ८८ ॥ नातरी आपण जळीं । बिंबलों तीरोनी न्याहाळी । चळण होतां कल्लोळीं । अनेकधा ॥ ८९ ॥ कां नटलेनि लाघवें । नटु जैसा न झकवे । तैसें गुणजात देखावें । न होनियां ॥ २९० ॥ पैं ऋतुत्रय आकाशें । धरूनियांही जैसें । नेदिजेचि येवों वोसें । वेगळेपणा ॥ ९१ ॥ तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें । तिये अहं बैसे अहंते । मूळकेचिये ॥ ९२ ॥ तैं तेथूनि मग पाहातां । म्हणे साक्षी मी अकर्ता । हे गुणाचि क्रियाजातां । नियोजना ॥ ९३ ॥ सत्त्वरजतमांचां । भेदीं पसरु कर्माचां । होत असे तो गुणांचा । विकारु हा ॥ ९४ ॥ ययामाजीं मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा । वनलक्ष्मीविलासा । हेतुभूत ॥ ९५ ॥ कां तारागणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें । कमळीं विकासावें । जावें तमें ॥ ९६ ॥ ये कोणाचीं काजीं कहीं । सविता जैसा नाहीं । तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ ९७ ॥ मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां

त्याप्रमाणें सत्त्वाच्या उत्कर्षानें ज्यांचें जगणें व मरणें असतें, ते देहत्यागानंतर स्वर्गाचे राजे होतात. २७१. याचप्रमाणें जे रजोगुणानें जगतात व मरतात, ते मृत्युलोकांत मनुष्य होतात. २७२. त्या मृत्युलोकांत सुखदुःखाची खिचडी, देहरूपी एकाच ताटांत जेवावी लागते व जेथें ( ज्या मृत्युलोकांत रजोगुणाच्या स्वाधीन झाले तर ) मरणरूपी वाटेंत सांपडलें असतां बाहेर पडतां येत नाहीं २७३. व त्याच स्थितीनें शरीरांत तमोगुणाचें उत्कर्षांत जे मरतात, ते नरकभूमीला जाण्याचा दाखला घेतात. २७४. अशा रीतीनें वस्तूच्या सत्तेनें सत्त्वादि तिन्ही गुण ऊर्ध्वादिगतींना कसे कारण आहेत, हें अर्जुना तुला संपूर्ण सांगितलें. २७५.

जेव्हां गुणातीत पुरुष ( गुणांचा ) द्रष्टा होऊन गुणावांचून इतर कर्ता नाहीं ( म्हणजे गुणच कर्मे करतात ) असें जाणतो व गुणांहून वेगळा जो ( साक्षी ) आत्मा त्याला जाणतो तेव्हां तो पुरुष गुणातीत जें मत्स्वरूप, त्याप्रत पावतो. १९.

वस्तु ही वस्तुत्वानें आपल्या ठिकाणीं पूर्णत्वानें आहेच; तरी ती वस्तु (विस्मृतीनें) आपण आपल्याला गुणांसारखें पाहून त्या त्या गुणाच्या विशेष कार्याप्रमाणें वागते. २७६. आपल्यावर परचक्र आलें आहे, असें ज्या वेळेस राजा स्वप्न पाहतो, त्या वेळेस तें परचक्र निवारण करण्याच्या कामीं घडलेला जय अथवा पराजय आपणच होतो ( त्या स्वप्नांतील जयामुळें अथवा पराजयामुळें राजाचा मूळचा राजेपणा वाढला नाहीं अथवा कमी झाला नाहीं, तर तो आहे तसाच आहे, ) २७७. त्याप्रमाणें ( वरील राजाच्या दृष्टान्ताप्रमाणें ) उत्तम गति, मध्यम गति व अधोगति, हे गतीचे भेद गुणवृत्तींच्या भेदामुळें आहेत. ती गुणांची दृष्टि जर टाकली, तर ब्रह्म वस्तु शुद्ध आहे तशीच आहे. २७८. परंतु हा बोलण्याचा ओघ राहूं दे. तर हें आमचें सांगणें विषयान्तर झालें, असें तुला वाटूं देऊं नकोस. आतां मागील विषय पुढें सांगतों. ऐक. २७९. तर हे तिन्ही गुणच, आपापल्या सामर्थ्यानें, याप्रमाणें स्वभावतःच देहाच्या निमित्तानें होतात. ( देहच बनतात. ) २८०. लांकडाच्या आकारानें अग्नि जसा आकाराला येतो अथवा जमिनींतील रस हाच मोठमोठाल्या झाडांच्या रूपानें दिसतो. २८१. अथवा दह्याच्या रूपानें जसें दूधच परिणाम पावतें अथवा उंसाच्या रूपानें जशी गोडीच प्रगट होते. २८२. त्याप्रमाणें हे तीन गुण अंतःकरणासह देहच ( सूक्ष्म व स्थूल देह ) होतात; म्हणून खरोखर ( जिवाच्या ) बंधाला कारण घडतें, २८३. परंतु अर्जुना, आश्चर्य हें आहे कीं, येवढें हें बंधन जिवास असतांही, जिवाच्या मुक्त स्थितीला कमीपणा येत नाहीं. २८४. तिन्ही गुण आपापल्या धर्माप्रमाणें देहाच्या मागें व पुढें हालचाल करीत असतांही आत्म्याच्या गुणातीतपणास धक्का लागत नाहीं. २८५. अशी ( आत्म्याची ) स्वभावतः मुक्तस्थिति आहे, ती आतां तुला ऐकवितों. कारण तूं ज्ञानरूपी कमळाचा भ्रमर ( भोक्ता ) आहेस. २८६. आणि चैतन्य हें गुणांत असून गुणांस वश होणारें नसतें, ही जी मागें ( अध्याय १३ श्लोक २३ मध्यें ) तुला गोष्ट सांगितली, तशीच ही गोष्ट आहे. २८७. तरी अर्जुना, ज्या वेळेस अंतःकरणांत समजूत पटून याप्रमाणें ज्ञानप्रतीति होईल; ( त्या वेळेला गुणादि हे सर्व मिथ्या भासेल. ) ज्याप्रमाणें जागें झालें असतां स्वप्न नाहींसें होतें. २८८. अथवा लाटा हालत असतां आपल्या प्रतिबिंबाचे अनेक तुकडे झालेले जसे कांठावर उभें राहून ( एकादा मनुष्य ) पाहतो, २८९. आपण घेतलेल्या सोंगानें जसा नट फसला जात नाहीं, त्याप्रमाणें गुण न होऊन ( साक्षित्वानें ) सर्व गुण पाहावेत. २९०. अथवा आकाश हें तिन्ही ऋतूंस आपल्या पोटामध्यें धारण करून, आपल्या वेगळेपणाला जसा कमीपणा येऊं देत नाहीं. २९१. त्याप्रमाणें गुणांत असून, जें गुणांच्या पलीकडे असें आपल्या ठिकाणीं स्वतःसिद्ध आहे, त्या मूळच्या स्वरूपअहंपणावर ( ब्रह्मस्वरूपअहंतेवर ) जेव्हां अहंकार बसतो, ( देहअहंता जाऊन स्वरूपअहंता येते; ) २९२. तेव्हां तेथून ( स्वरूपअहंतेहून ) पहात असतां, तो असें म्हणतो कीं, मी साक्षी व अकर्ता असा आहे व सर्व कर्मांना हे गुणच कारण आहेत. २९३. सत्त्वरजतमांच्या भेदाप्रमाणें कर्मांचा विस्तार होत आहे, तो हा गुणांचा विकार आहे. २९४. वनामध्यें जसा वसंतऋतु वनशोभेच्या विलासाला कारणीभूत असतो, तसा मी या गुणांच्या विकारांमध्यें ( साक्षी असा कारणीभूत ) आहे. २९५. अथवा ताऱ्यांच्या समुदायांनीं लोपावें, सूर्यकांतमण्यानें अग्नि उत्पन्न करावा, सूर्यविकासी कमळांनीं विकासावें व अंधारानें नाहींसें व्हावें; २९६. या पैकीं कोणाच्याही कार्यामध्यें सूर्य जसा केव्हांही कोणाचा कारण होत नाहीं, त्याप्रमाणें या देहांत, मी क्रियारहित, केवळ साक्षित्वानें अधिष्ठानरूप होऊन, राहिलों आहें. २९७. मी गुणांचें प्रकाशन करून (परत)

पोखे। ययाचेनि निःशेखें। उरे तें मी ॥ ९८ ॥ ऐसेनि विवेकें जया। उदो होय धनंजया। ये गुणातीतत्व तया। ओंधपंथें ॥ ९९ ॥

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान्। जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

आतां निर्गुण असे आणिक। तें तो जाणे अचुक। जे ज्ञानें केलें टीक। तयाचिवरी ॥ ३०० ॥ किंबहुना पंडुसुता। ऐसा तो माझी सत्ता। पावे जैसी सरिता। सिंधुत्व गा ॥ १ ॥ नळिकेवरुनि उठिला। जैसा शुक शाखे बैसला। तैसा मूळअहंते वेढिला। तो म्हणौनियां ॥ २ ॥ अगा अज्ञानाचिया निदा। जो घोरत होता बदबदा। तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा। चेइला कीं ॥ ३ ॥ पैं बुद्धिभेदाचा आरिसा। तया हातोनि पडिला वीरेशा। म्हणौनि प्रतिमुखाभासा। मुकला तो ॥ ४ ॥ देहाभिमानाचा वारा। आतां वाजों ठेला वीरा। तें ऐक्य वीचिसागरां। जीवेशां हें ॥ ५ ॥ म्हणौनि मद्भावेंसी। प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी। वर्षोतीं आकाशीं। घनजात जेवीं ॥ ६ ॥ तेवीं मी होऊनि निरुता। मग देहींचि ये असतां। नांगवे देहसंभूतां। गुणांसि तो ॥ ७ ॥ जैसा भिंगाचेनि घरें। दीपप्रकाशु नावरे। कां न विझेचि सागरें। बडवानळु ॥ ८ ॥ तैसा आलागेला गुणांचा। बोधु न मैळे तयाचा। तो देहीं जैसा व्योमींचा। चंद्र जळीं ॥ ९ ॥ तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी। देहीं नाचविती बागडीं। तो पाहोंही न धाडी। अहंतेतें ॥ ३१० ॥ हा ठायवरी। नेहटोनि ठेला अंतरीं। आतां काय वर्ते शरीरीं। कांहीं नेणे ॥ ११ ॥ सांडूनि आंगींची खोळी। सर्प रिगालिया पाताळीं। ते त्वचा कोण सांभाळी। तैसें जालें ॥ १२ ॥ कां सौरभ्यजीर्णु जैसा। आमोदु मिळोनि जाय आकाशा। माघारा कमळकोशा। नयेचि तो ॥ १३ ॥ पैं स्वरूपसमरसें। तयाही गा जालें तैसें। तेथ किंधर्म हें कैसें। नेणे देह ॥ १४ ॥ म्हणौनि जन्मजरामरण। इत्यादि जे साही गुण। ते देहींचि ठेले कारण। नाहीं तया ॥ १५ ॥ घटाचिया खापरिया। घटभंगीं फेडिलिया। महदाकाश आपैसया। जालेंचि असे ॥ १६ ॥ तैसी देहबुद्धि जाये। जैं आपणपां आठौ होये। तैं आन कांहीं आहे। तेंवांचुनी ॥ १७ ॥ येणें थोर बोधलेपणें। तयासि गा देहीं असणें। म्हणूनि तो मी म्हणें। गुणातीत ॥ १८ ॥ यया देवाचिया बोला। पार्थु अतिसुखावला। मेघें संबोखिला। मोरु जैसा ॥ १९ ॥

अर्जुन उवाचः—कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो। किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

तेणें तोषें वीर पुसे। जी कोण्हीं चिन्हीं तो दिसे। जयामाजीं वसे। ऐसा बोधु ॥ ३२० ॥ तो निर्गुण काय आचरे। कैसेनि गुण निस्तरे। हें सांगिजो माहेरें। कृपेचेनि ॥ २१ ॥ यया अर्जुनाचिया प्रश्ना। तो षड्गुणांचा राणा। परिहारु आकर्णा। बोलतु असे ॥ २२ ॥

गुणांस पाहतों; गुणांच्या ठिकाणीं ( असणारा ) गुणपणा माझ्याकडून घेतला जातो व या गुणांचा निरास झाल्यावर जें उरतें, तें मी आहें. २९८. अर्जुना, अशा या विचाराचा ज्याच्या ठिकाणीं उदय होतो, त्यास गुणातीतपणा ( उच्च ) स्थानाच्या मार्गानें प्राप्त होतो. २९९.

देहाला कारण असणाऱ्या या तीन गुणांच्या पलीकडे जाऊन जन्म, मृत्यु, जरा व (इतर) दुःखें यांनीं मुक्त होत्साता, मनुष्य मोक्ष (अमृतत्व) पावतो. २०.

आतां निर्गुण म्हणून जें आणखी आहे, तें तो बिनचूक जाणतो. कारण कीं, ज्ञानानें आपलें ( राहाण्याचें) ठिकाण त्याच्याच ठिकाणीं केलें आहे. ३००. फार काय सांगावें ! अर्जुना, जशी नदी समुद्रपणाला पावते, त्याप्रमाणें असा तो पुरुष माझी सत्ता पावतो. ३०१. जसा राघू नळिकेवरून उठून ( मोकळेपणानें ) झाडाच्या फांदीवर बसावा, तसा तो देहअहंता सोडून, स्वरूप ( ब्रह्म ) हेंच मी आहें, म्हणून तो स्वरूपअहंतेनें वेष्टिला गेला. ३०२. अज्ञानरूपी निद्रेनें जो बदबदा ( मोठमोठ्यानें ) घोरत होता, तो, हे शहाण्या अर्जुना, आत्मस्वरूपीं जागा झाला. ३०३. अर्जुना, भेदप्रतीति हाच कोणी एक आरसा, तो त्याच्या हातून पडून फुटल्यामुळें, तो ( पुरुष ) प्रतिबिंबाच्या ( जीवपणाच्या ) भावाला मुकला. ३०४. हे वीरा, आतां ह्या पुरुषाचे ठिकाणीं देहाहंकाररूप वारा वाहण्याचा बंद झाल्यामुळें, लाटांचें जसें समुद्राशीं ऐक्य होतें, त्याप्रमाणें त्याच्या ठिकाणीं जीवाचें ईशाशीं ऐक्य होतें. ३०५. म्हणून त्या पुरुषाला लागलीच मद्भावाची प्राप्ति होते. ज्याप्रमाणें पावसाळा संपल्यावर ढग आकाशरूप होतात, ३०६. त्याप्रमाणें वस्तुतः मद्रूप झाल्यावर, मग जरी तो या देहांत असला, तरी तो देहाला उत्पन्न करणाऱ्या गुणांच्या तावडींत सांपडत नाहीं. ३०७. ज्याप्रमाणें अभ्रकाच्या कंदिलानें दिव्याचा प्रकाश आंवरला जात नाहीं अथवा समुद्रानें जसा वडवानळ विझला जात नाहीं. ३०८. त्याप्रमाणें गुणांच्या येण्याजाण्यानें त्याचा बोध मळत नाहीं. जसा आकाशांतील चंद्र जळांत असतो, तसा तो देहांत असतो. ३०९. तिन्ही गुण आपापल्या सामर्थ्यानें देहामध्यें (नाना प्रकारच्या) चेष्टा करतात, पण तो आपल्या अहंतेला त्या चेष्टा पहाण्यालाही पाठवीत नाहीं. ३१०. येथपर्यंत तो अंतःकरणांत निश्चयाचा मोर करून राहिला आहे. आतां शरीराच्या ठिकाणीं काय घडत आहे, हें तो कांहीं जाणत नाहीं. ३११. आपल्या अंगावरची कात टाकून सर्पानें बिळांत प्रवेश केल्यावर, ती त्याची कात कोणी सांभाळावी ? तसें ( त्या पुरुषाच्या देहाचें ) झालें आहे. ३१२. अथवा कमळांतील सुवास परिपक्व झाल्यावर, जसा तो सुवास आकाशांत मिळून जातो व तो पुनः कमळाच्या फुलाकडे माघारी येत नाहीं. ३१३. अर्जुना, ब्रह्माशीं ऐक्य पावल्यामुळें त्या पुरुषाचीही तशी स्थिति झाली आहे. तशा स्थितींत देहाचे धर्म काय आहेत व देह कसा आहे, हें तो जाणत नाहीं. ३१४. म्हणून जन्म, म्हातारपण व मरण इत्यादि देहाचे जे सहा गुण, ते त्याच्या देहाच्या ठिकाणींच राहिले; त्याला ( तो आत्मस्वरूप असल्यामुळें ) त्यांचा कांहीं एक संबंध राहिला नाहीं. ३१५. घट फुटल्यावर व घटाच्या खापऱ्या फेंकून दिल्यावर, तें घटाकाश आपोआपच महाकाश होतें; ३१६. त्याप्रमाणें देहबुद्धि गेल्यावर, ज्या वेळीं आपल्याला आपल्या आत्मस्वरूपाचें स्मरण होतें, तेव्हां आत्मस्वरूपावांचुन दुसरें कांहीं आहे काय ? ३१७. अशा थोर ज्ञानसंपन्नतेनें युक्त असे, त्याचें देहामध्यें असणें असतें; म्हणून मी त्याला गुणातीत असें म्हणतों. ३१८. जसा कांहीं मेघांच्या गर्जनेनें बोलावलेला मोर सुखावतो, त्याप्रमाणें या देवाच्या भाषणानें अर्जुन अतिशय सुखी झाला. ३१९.

अर्जुन म्हणाला, हे प्रभो, या तीन गुणांच्या पलीकडे जो जातो, तो कोणत्या लक्षणांनीं ओळखावा ? त्याचें आचरण कसें असतें ? या तीन गुणांच्या पलीकडे तो कसा जातो ? २१.

त्या संतोषानें वीर अर्जुन विचारूं लागला कीं, महाराज, ज्या पुरुषामध्यें असा बोध राहतो, तो पुरुष कोणत्या लक्षणांनीं ओळखला जातो ? ३२०. तो गुणातीत पुरुष काय आचरण करतो व तो गुणांचें निवारण कसें करतो ? आपण कृपेचें माहेरघर आहांत, आपण हें आम्हांला सांगावें. ३२१. ह्या अर्जुनाच्या प्रश्नावर तो ऐश्वर्यादि सहा गुणांचा राजा ( श्रीकृष्ण ) उत्तर देत आहे, ऐका. ३२२.

श्रीभगवानुवाचः—प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव। न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥ २२ ॥

म्हणे पार्था तुझी नवाई। हें येतुलेंचि पुससी काई। तें नामचि तया पाहीं। साचें लटिकें ॥ २३ ॥ गुणातीत जया नांवें। तो गुणाधीन तरी नव्हे। ना होय तरी नांगवे। गुणां यया ॥ २४ ॥ परी अधीन कां नांगवें। हेंचि कैसेनि जाणावें। गुणांचिये उखरवे-। माजीं असतां ॥ २५ ॥ हा संदेह जरी वाहसी। तरी सुखें पुसों लाहसी। परिस आतां तयासी। रूप करूं ॥ २६ ॥ तरी रजाचेनि माजें। देहीं कर्माचें आणोजें। प्रवृत्ति जैं घेइजे। वेंटाळूनि ॥ २७ ॥ तैं मीचि कां कर्मठ। ऐसा न ये श्रीमाठ। कां दरिद्रलिये बुद्धी वीट। तोही नाहीं ॥ २८ ॥ अथवा सत्त्वेंचि अधिकें। जैं सर्वेंद्रियीं ज्ञान फांके। तैं सुविद्यता तोखे। उभजेही ना ॥ २९ ॥ कां वाढिनलेनि तमें। नैं गिळेंजेचि मोहभ्रमें। तैं अज्ञानत्वें न श्रमे। घेणेंही नाहीं ॥ ३३० ॥ पैं मोहाचां अवसरीं। ज्ञानाची चाड न धरी। ज्ञानें कर्में नादरी। होतां न दुःखी ॥ ३१ ॥ सायंप्रातर्मध्यान्हा। या तिही काळांची गणना। नाहीं जेवीं तपना। तैसा असे ॥ ३२ ॥ तया वेगळाचि काय प्रकाशें। ज्ञानित्व यावें असे। कायि जळार्णव पाउसें। साजा होय ॥ ३३ ॥ ना प्रवर्तलेनि कर्में। कर्मठत्व तया का गमे। सांगें हिमवंतु हिमें। कांपे कायि ॥ ३४ ॥ नातरी मोह आलिया। काइ पां ज्ञाना मुकिजेल तया। महा आगीतें उन्हाळेया। जाळवत असे ॥ ३५ ॥

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते। गुणा वर्तंत इत्येवं योऽवतिष्ठति नेङ्गते ॥ २३ ॥

तैसें गुणागुणकार्य हें। आघवेंचि आपण आहे। म्हणौनि एकेका नोहे। तडातोडी ॥ ३६ ॥ येवढेया गा प्रतीती। तो देहा आलासे वस्ती। वाटे जातां गुंती-। माजीं जैसा ॥ ३७ ॥ तो जिणता ना हारवी। तैसा गुण नव्हे ना करवी। जैसी कां श्रोणवी। संग्रामींची ॥ ३८ ॥ कां शरीराआंतील प्राणु। घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु। नाना चोहटाचा स्थाणु। उदासु जैसा ॥ ३९ ॥ आणि गुणाचा यावाजावा। ढळे चळे ना पांडवा। मृगजळाचा हेलावा। मेरु जैसा ॥३४०॥ हें बहुत कायि बोलिजे। व्योम वारेनि न वचिजे। कां सूर्य ना गिळिजे।

श्रीकृष्ण म्हणाले, हे पांडवा, (सत्वगुणाचें कार्य) प्रकाश, ( रजोगुणाचें कार्य ) प्रवृत्ति आणि ( तमोगुणाचें कार्य ) मोह, हीं प्राप्त झालीं असतां गुणातीत झालेला मनुष्य त्यांचा तिरस्कार करीत नाहीं व प्राप्त झालीं नसतां तो त्यांची इच्छा करीत नाहीं. २२.

श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना, तुझी प्रश्न करण्याची पद्धत अपूर्वच आहे. तो गुणातीत काय कर्मे करितो व गुणांतून कसा तरून जातो, हें एवढेंच असंबद्ध काय विचारतोस? हें तुझें विचारणें 'खरें हें कसें खोटें आहे?' ह्या विचारण्यासारखें विसंगत आहे. ३२३. ( अर्जुनाचा प्रश्न विसंगत कसा आहे हें भगवान् या ओंवींत सांगतात, ) गुणातीत ज्याला म्हणतात, तो गुणांच्या स्वाधीन तर नसतोच अथवा तो जरी गुणांत असला तरी तो त्या गुणांच्या स्वाधीन होत नाहीं. ३२४. ( या ओवींत अर्जुनाच्या प्रश्नाची दुरुस्ती करतात ) पण तो गुणातीत पुरुष गुणांच्या गुंताड्यांत असतांना, तो गुणांच्या आधीन आहे किंवा तो गुणांच्या आधीन नाहीं, हें कसें ओळखावें? ३२५. हा संशय जर तुझ्या मनांत असेल, तर तुला तो प्रश्न सुखानें विचारतां येईल. आतां आम्ही त्याचें स्पष्ट उत्तर देतों, तूं ऐक. ३२६. तर रजोगुणाच्या उत्कर्षानें तो गुणातीत पुरुष ज्या वेळेला प्रवृत्तीनें वेढला जातो, त्या वेळीं त्याच्या देहांत कर्मांचे अंकुर फुटतात. ३२७. तेव्हां ( त्या गुणातीत पुरुषाला ) 'मी एक कर्मठ आहें' असा अभिमान चढत नाहीं अथवा कर्मे करण्याचीं राहिलीं, तरी त्याच्या बुद्धीला खेद तोही होत नाहीं. ३२८. अथवा सत्त्वगुणाच्या आधिक्यानें जेव्हां सर्व इंद्रियांत ज्ञान फांकतें, त्या वेळीं चांगल्या विद्वत्तेनें ( मी ज्ञानी आहें असा ) हर्षभरित होत नाहीं. ( अथवा चांगली विद्वत्ता प्राप्त झाली नाहीं ) तरी त्याला खेदही होत नाहीं. ३२९. अथवा जेव्हां तमोगुण वाढतो तेव्हां तो गुणातीत पुरुष, मोह व भ्रम यांजकडून ग्रासला जात नाहीं ( त्याचप्रमाणें ) तेव्हां तो अज्ञानामुळें कष्टी होत नाहीं; अथवा तो अज्ञानाचा स्वीकार करीत नाहीं. ३३०. मोहाच्या वेळीं, तो गुणातीत पुरुष ज्ञानाची इच्छा करीत नाहीं आणि ज्ञानानें कर्मांचा आरंभ करीत नाहीं व त्याच्या हातून सहज कर्म झालें, तर त्याचा खेदही करीत नाहीं. ३३१. ज्याप्रमाणें सूर्याला प्रातःकाल, मध्यान्हकाल व सायंकाल या तिन्ही कालांची गणना नाहीं, तसा तो गुणातीत पुरुष असतो, ( म्हणजे त्याला तिन्ही गुणांची खबर नसते. ) ३३२. त्याला कांहीं वेगळ्याच ( सत्वगुणाच्या शास्त्राच्या वगैरे ) प्रकाशानें ज्ञानपणा यावयाचा आहे काय? ( तर नाहीं, तो ज्ञानाची मूर्तीच आहे. ) समुद्र हा पावसाच्या योगानें पूर्ण भरलेला होतो काय? ३३३. अथवा त्या गुणातीत पुरुषाची कर्मांकडे प्रवृत्ति झाली तर, त्याला कर्मठत्व ('मी यथासांग कर्म करणारा आहें' असा अभिमान) वाटेल काय? अर्जुना, सांग पाहूं. हिमालय पर्वत थंडीनें थरथर कांपेल काय? ३३४. अथवा (तमाधिक्यानें ) त्याच्यासमोर मोह आला असतां त्या मोहामुळें तो ज्ञानाला मुकला जाईल काय? उन्हाळ्याकडून महाअग्नि जाळला जाईल काय? ३३५.

उदासीनासारखा राहणारा, जो गुणांच्या ( गुणकार्य जें सुखदु:खादिक यांच्या ) येण्याजाण्यानें चलन पावत नाहीं, गुण आपआपलीं कर्में करीत आहेत ( माझा त्यांच्याशीं संबंध नाहीं ) असें जाणून तटस्थ राहातो, ( जो गुणाच्या हालचालीबरोबर ) डोलत नाहीं. २३.

त्याप्रमाणें गुण व गुणांचें जें कार्य आहे, हें तो सर्व आपणच आहे. म्हणून एक एका गुणाच्या उत्कर्षानें त्याचें चित्त विस्कळित होत नाहीं. ३३६. वाटेनें जाणारा वाटसरू संध्याकाळ वगैरे अडचणींत सांपडल्यामुळें जसा वस्तीला ( धर्मशाळेत वगैरे ) राहातो, तसा तो गुणातीत पुरुष ( प्रारब्धभोगाच्या अडचणींत सांपडल्यामुळें ), एवढ्या ( थोर ) अनुभवानें देहांत उदासीनतेनें वस्तीला आलेला असतो, ३३७. ज्याप्रमाणें युद्धाची भूमि (उदास) असते ( म्हणजे जशी रणभूमि ही जिंकणारी नसते अथवा पराभव पावणारी नसते ) त्याप्रमाणें तो गुणांना जिंकणारा नसतो व गुणांकडून पराभव पावणारा नसतो व त्याचप्रमाणें तो गुण नसतो अथवा तो गुणाकडून करवीत नाहीं. ३३८. अथवा शरीरांतील प्राण जसा उदास असतो किंवा घरीं आलेला पांथस्थ ब्राह्मण जसा त्या घरासंबंधानें उदास असतो अथवा चव्हाट्यावरील खांब जसा उदास असतो ( त्याप्रमाणें जो देहादि गुणकार्यावर उदास असतो ). ३३९. आणि अर्जुना, मृगजळाच्या हेलकाव्यानें जसा मेरु पर्वत यत्किंचितही हालत नाहीं, तसा तो गुणातीत पुरुष गुणांच्या येण्याजाण्यानें गडबडत नाहीं, ३४०. हें फार बोलून काय करावयाचें आहे? आकाश जसें वाऱ्यानें हालत नाहीं अथवा सूर्य जसा

अंधकारें ॥ ४१ ॥ स्वप्न कां गा जियापरी । जागतयातें न सिंतरी । गुणीं तैसा अवधारीं । न बंधिजे तो ॥ ४२ ॥ गुणां कीर नातुडे । परी दुरूनि जैं पाहे कोडें । तैं गुणदोष सायिखडें । सभ्यु जैसा ॥ ४३ ॥ सत्कर्मे सात्त्विकीं । रज तें रजोविषयकीं । तम मोहादिकीं । वर्तत असे ॥ ४४ ॥ परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणाक्रिया समस्ता । हें फुडें जाणे सविता । लौकिका जेवीं ॥ ४५ ॥ समुद्राचि भरती । सोमकांतचि पाझरती । कुमुदें विकासती । चंद्रु तो उगा ॥४६॥ कां वाराचि वाजे विझे । गगनें निश्चळ असिजे । तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ॥ ४७॥ अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीतु जाणणें । परिस आतां आचरणें । तयाचियें ॥ ४८ ॥

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः । तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

तरी वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी । ऐसें सुये दिठी । चराचर मद्रूपें ॥ ४९ ॥ म्हणोनि सुखदुःखासरिसें । कांटाळे आचरे ऐसें । रिपुभक्तां जैसें । हरीचें देणें ॥३५०॥ एऱ्हवीं तरी सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे । देहजळीं होइजे । मासोळी जैं ॥ ५१ ॥ आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसीचि मांडिलें । सस्यांतीं निवाडिलें । बीज जैसें ॥ ५२ ॥ कां वोघ सांडूनि गांग । रिघोनी समुद्राचें आंग । निस्तरली लगबग । खळाळाची ॥ ५३ ॥ तेवीं आपणपांचि जया । वस्ती जाली गा धनंजया । तया देहीं आपसया । सुख तैसें दुःख ॥ ५४ ॥ रात्रि तैसें पाहलें । हें धारणा जेवीं एक जालें । आत्मारामु देहआतलें । द्वंद्व तैसें ॥ ५५ ॥ पैं निद्रिताचेनि आंगेंशी । सापु तैशी उर्वशी । तेवीं स्वरूपस्था सरिसीं । देहीं द्वंद्वें ॥ ५६ ॥ म्हणौनि तयाचां ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं । रत्ना गुंडेया कांहीं । नेणिजे भेदु ॥ ५७ ॥ घरा येवो पां स्वर्गु । कां वरिपडो वाघ । परी आत्मबुद्धीसि भंग । कदा नव्हे ॥ ५८ ॥ निवटलें न उपवडे । जळीनलें न विरूढे । साम्यबुद्धी न मोडे । तयापरी ॥ ५९ ॥ हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । कां नीच म्हणेनि निंदिजो । परी नेणे जळों विझों । राखोंडी जैसी ॥ ३६० ॥ तैसी निंदा आणि स्तुती । नये कोण्हेचि व्यक्ती । नाहीं अंधारें कां वाती । सूर्या घरीं ॥ ६१ ॥

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः । सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

ईश्वरबुद्धी पूजिला । कां चोरु म्हणोनि गांजिला । वृषगजीं वेढिला । केला रावो ॥६२॥ कां सुहृद पासीं आलें । अथवा वैरी वरपडे जाले । परी नेणे राती पाहालें । तेज जेवीं ॥६३॥ साही ऋतु येतां आकाशें । लिंपिजेचि ना जैसें । तेवीं वैषम्य मानसें । जाणिजेना ॥६४॥ आणीकही एकु

अंधाराकडून गिळला जात नाहीं. ३४१. जागे असलेल्या मनुष्यास स्वप्न जसें भ्रमांत पाडीत नाहीं, अर्जुना, तसा तो गुणांकडून बांधला जात नाहीं, हें समज. ३४२. गुणांच्या तडाख्यांत तर तो सांपडतच नाहीं; परंतु जेव्हां तो गुणांचें कमीजास्तपण पाहातो, तेव्हां, जसा एकादा सभ्य गृहस्थ ( प्रेक्षक ) हालणाऱ्या लांकडी बाहुल्यांच्या चेष्टा दुरून पाहातो, तसा गुणांचें कमीजास्तपण दुरून कौतुकानें ( साक्षीरूपानें ) पाहातो. ३४३. सात्त्विक गुण सत्कर्में करितो, रजोगुण रजोगुणी कर्में करितो व तमोगुण मोहादिक तामसी कर्में करितो. ३४४. अर्जुना ऐक. जशा लोकांच्या क्रिया सूर्याच्या सत्तेनें चालतात, त्याप्रमाणें गुणांच्या सर्व क्रिया त्याच्या ( गुणातीत पुरुषाच्या ) सत्तेनें चालतात, हें तूं पक्कें समज. ३४५. ( चंद्रोदयानें ) समुद्रांनाच भरति येते, चंद्रकांत मण्यांनाच पाझर फुटतो व चंद्रविकासी कमळें उमलतात; पण चंद्र तर कांहीं हालचाल करीत नाहीं. ३४६. अथवा वाराच वाहतो अथवा वाहण्याचा बंद होतो, पण आकाश स्थिर असतें; त्याप्रमाणें गुणांच्या हालचालीनें जो गडबडत नाहीं. ३४७. अर्जुना, या लक्षणांनीं तो गुणातीत पुरुष ओळखावा. आतां त्याची जी वागणूक आहे, ती ऐक. ३४८.

सुखदुःखाचे ठिकाणीं समान ( दृष्टि ठेवणारा ), स्व-स्वरूपीं स्थित; माती, दगड व सोनें हीं सारखींच वाटणारा; प्रिय अथवा अप्रिय दोन्हीं समान मानणारा, ज्याची आत्मबुद्धि अभंग आहे असा, स्वतःची निंदा किंवा स्तुति समान मानणारा, २४.

तर अर्जुना, वस्त्राच्या आंतबाहेर जसें सुताशिवाय कांहीं नसतें, त्याप्रमाणें चराचरासहित सर्व विश्व मद्रूप आहे असें तो पहातो. ३४९. म्हणून ज्याप्रमाणें हरीचें देणें भक्तांना व शत्रूंना सारखें असतें, तसें तो सुखदुःखाला सारख्या ताजव्यांत घालून ( सारखें मानून ) वागतो. ३५०. सहज विचार करून पाहिलें तर, देहरूपी-जळामध्यें जेव्हां मासोळी होऊन रहावें ( पूर्ण देहतादात्म्य घ्यावें ) तेव्हांच सुखदुःख भोगावें लागतें. ३५१. ज्याप्रमाणें मळणी झाल्यावर दाणे हे कोंड्यापासून वेगळे काढावे, त्याप्रमाणें आतां त्यानें तें देहतादात्म्य टाकलें आहे व तो आपल्या आत्मस्वरूपानें स्थिर राहिला आहे. ३५२. अथवा गंगेच्या पाण्यानें गंगेच्या पात्राला सोडून आणि समुद्राच्या पात्रांत प्रवेश करून आपली खळबळ वाहाण्याची लगबग नाहींशी केली, ३५३. अर्जुना, त्याप्रमाणें ज्याची वस्ती आपल्या ठिकाणीं ( आत्मस्वरूपीं ) झाली, त्याला सहजच, देहामध्यें जसें सुख, तसेंच दुःख असतें. ३५४. जशी रात्र तसेंच उजाडणें, हें खांबाला जसें ( एकसारखें ) असतें, त्याप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं रममाण झालेल्या गुणातीतास देहाला व्यापून असणारी ( सुखदुःखादि ) द्वंद्वें आहेत. ३५५. ज्याप्रमाणें निजलेल्या पुरुषाच्या अंगावर जसा साप तशीच उर्वशी त्याप्रमाणें आत्मस्वरूपीं ज्याची वस्ती झाली आहे, त्यास देहांत द्वंद्वें सारखीं आहेत. ३५६. म्हणून त्याच्या ठिकाणीं शेण व सोनें यांत कमीअधिकपणा नाहीं व रत्न आणि दगड यांमध्यें त्यास कांहीं फरक वाटत नाहीं. ३५७. घराला स्वर्ग येवो अथवा त्याच्या अंगावर वाघ उडी घालो, परंतु त्याच्या आत्मबुद्धीला केव्हांही भंग होत नाहीं. ३५८. ज्याप्रमाणें मेलेला मनुष्य जागा होत नाहीं अथवा जळलेल्या बीजाला अंकुर फुटत नाहीं, त्याप्रमाणें त्याची आत्मैक्यबुद्धि मोडत नाहीं. ३५९. 'हा ब्रह्मदेव आहे' असें म्हणून त्याची स्तुति केली अथवा 'नीच' म्हणून त्याची निंदा केली, पण राख जशी जाळणें अथवा विझणें जाणत नाहीं. ३६०. त्याप्रमाणें निंदा अथवा स्तुति हीं ( खेद आणि संतोष अशा ) कोणत्याच रूपानें व्यक्त होत नाहींत. सूर्याच्या घरीं अंधार आणि उजेड नाहीं. ( सूर्याच्या ठिकाणीं जशी अंधार व उजेड ही कल्पना नाहीं, तशी त्याच्या ठिकाणीं सुखदुःखाची कल्पना नाहीं. ) ३६१.

मान व अपमान समान मानणारा, मित्र व शत्रु दोन्हीं ठिकाणीं समान (बुद्धि ठेवणारा), (प्रकृति सर्व करते अशा बोधावर आल्यामुळें बऱ्यावाईट ) सर्व कर्मांचा आरंभ न करणें हें ज्याचें शील, असा जो असतो, त्याला गुणातीत म्हणतात. २५.

तो ईश्वर आहे, या बुद्धीनें त्याची पूजा केली अथवा तो चोर आहे, म्हणून त्यास छळिलें; तो बैल व हत्ती यांनीं वेढला गेला ( अथवा ) त्याला राजा केला. ३६२ अथवा मित्र जवळ आले अथवा शत्रु अंगावर प्राप्त झाले, तरी पण ज्याप्रमाणें सूर्य हा रात्र व उजाडलें जाणत नाहीं, त्याप्रमाणें तो तें जाणत नाहीं. ३६३. आकाशाच्या पोटांत जरी सहा ऋतु येतात, तरी आकाश जसें त्यांच्याकडून लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें तो मनानें भेदभाव जाणत नाहीं. ३६४. आणखीं एक आचार

पाहीं। आचारु तयाचां ठायीं। तरी व्यापारासि नाहीं। जालें दिसे ॥ ६५ ॥ सर्वारंभा उटकलें। प्रवृत्तीचें तेथ मावळे। जळती गा कर्मफळें। ते तो आगी ॥ ६६ ॥ दृष्टादृष्टाचेनि नांवें। भावोचि जीवीं नुगवे। सेवी जें स्वभावें। पैठें होये ॥ ६७ ॥ सुखे ना शिणे। पाषाणु कां जेणें मानें। तैसी सांडीमांडी मनें। वर्जिली असे ॥ ६८ ॥ आतां किती हाचि विस्तारु। जाणें ऐसा आचारु। जया तोचि साचारु। गुणातीतु ॥ ६९ ॥ गुणांतें अतिक्रमणें। घडे उपायें जेणें। तो आतां आणिकु आईक म्हणे। श्रीकृष्णनाथु ॥ ३७० ॥

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते। स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

तरी व्यभिचाररहितें चित्तें। भक्तियोगें मातें। सेवी तो गुणातें। जाकळूं शके ॥ ७१ ॥ तरी कोणु मी कैसी भक्ती। अव्यभिचारा काय व्यक्ती। हे आघवीचि निरुती। होआवी लागे ॥ ७२ ॥ तरी पार्था परियेसा। मी तंव येथ ऐसा। रत्नीं किळावो जैसा। रत्नचि तो ॥ ७३ ॥ कां द्रवपणचि नीर। अवकाशुचि अंबर। गोडी तेचि साखर। आन नाहीं ॥ ७४ ॥ वन्हि तेचि ज्वाळ। दळाचि नांव कमळ। रूख तेंचि डाळ। फळादिक ॥ ७५ ॥ अगा हिंव जें आकर्षलें। तेंचि हिमवंत जेवीं जालें। नाना दूध मुरालें। तेंचि दहीं ॥७६॥ तैसें विश्व येणें नांवें। हें मीचि पैं आघवें। घेईं चंद्रबिंब सोलावें। न लगे जेवीं ॥ ७७ ॥ घृताचें थिजलेंपण। न मोडितां घृतचि जाण। कां नाटितां कांकण। सोनेंचि तें ॥ ७८ ॥ नुकलितां पटु। तंतुचि असे स्पष्टु। न विरवितां घटु। मृत्तिका जेवीं ॥ ७९ ॥ म्हणोनि विश्वपण जावें। मग मातें घेयावें। तैसा नव्हे आघवें। सकटचि मी ॥३८०॥ ऐसेनि मातें जाणिजे। ते अव्यभिचार भक्ति म्हणिजे। येथ भेदु कांहीं देखिजे। तरी व्यभिचारु तो॥ ८१ ॥ याकारणें भेदातें। सांडूनि अभेदें चित्तें। आपणया सकट मातें। जाणावें गा ॥८२॥ पार्था सोनयाची टिक। सोनयासी लागली देख। तैसें आपणपें आणिक। मानावें ना ॥ ८३ ॥ तेजाचा तेजौनि निघाला। परी तेजींचि असे लागला। तया रश्मी ऐसा भला। बोधु होआवा ॥ ८४ ॥ पैं परमाणु भूतळीं। हिमकणु हिमाचळीं। मजमाजीं न्याहाळीं। अहं तैसें ॥ ८५ ॥ हो कां तरंगु लहानु। परी सिंधूसी नाहीं भिन्नु। तैसा ईश्वरीं मी आनु। नोहेचि मा ॥ ८६ ॥ ऐसेनि बा समरसें। दृष्टि जें उल्हासे। ते भक्ति पैं ऐसें। आम्ही म्हणों ॥ ८७ ॥ आणि ज्ञानाचें चांगावें। इयेचि दृष्टि नांवें। योगाचेंही आघवें। सर्वस्व हें ॥८८॥ सिंधू आणि जळधरा- । माजीं लागली अखंड धारा। तैसी वृत्ति वीरा। प्रवर्ते ते ॥ ८९ ॥ कां कुहेसीं आकाशा। तोंडीं सांदा नाहीं जैसा। तो परमरसु तैसा। एकवटे गा ॥ ३९० ॥ प्रतिबिंबौनि बिंबवरी। प्रभेची जैसी उजरी। ते सोहंवृत्ती अवधारीं। तैसी होय ॥ ९१ ॥ ऐसेनि मग

त्याच्या ठिकाणीं आहे पहा. ( तो हाच कीं, ) त्याच्या ठिकाणीं कर्ममात्राचा अभाव झालेला दिसतो. ३६५. सर्व आरंभांना त्याच्या ठिकाणीं उच्चाटन झालेलें असतें. ( सर्व प्रकारचे कर्मारंभ त्याच्यापासून दूर होतात. ) प्रवृत्तीचें त्याच्या ठिकाणीं मावळणें असतें, ( संसाराची त्याच्या ठिकाणीं वार्ताही नसते. ) अथवा ( ज्या अग्नींत ) कर्मफळें जळतात, तो अग्नि तो गुणातीत पुरुष आहे. ३६६. आपल्याला इहलोकींचे अथवा परलोकींचे भोग मिळावेत, अशी इच्छाच त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न होत नाहीं. प्रारब्धानें जें सहज प्राप्त होईल, त्याचें सेवन करून तो असतो. ३६७. ज्याप्रमाणें दगड सुखावत नाहीं व दुःखही पावत नाहीं; त्याप्रमाणें ज्याच्या मनानें त्याग ( अमुक एक कर्म करावयाचें नाहीं ) व स्वीकार ( अमुक एक कर्म करावयाचें ) टाकलेला असतो. ३६८. आतां ह्या बोलण्याचा किती विस्तार करावा ? ज्या पुरुषाचें असें आचरण असेल, तोच खरोखर गुणातीत आहे असें समज. ३६९. ज्या उपयांनीं गुणांचें उल्लंघन करतां येतें, तो प्रकार आतां आणखी ऐक, असें श्रीकृष्ण म्हणाले. ३७०.

अव्यभिचारी ( अभेद ) भक्तियोगानें जो माझी उपासना करतो, तो या गुणांच्या पूर्णपणें पलीकडे जाऊन, त्यास ब्रह्मत्व प्राप्त होण्याची योग्यता येते. २६.

तर ( माझ्यावांचून ) दुसरीकडे कोठेंही मन गुंतूं न देतां भजनरूप मार्गाच्या द्वारां जो माझी उपासना करतो, तो गुणांना ताब्यांत ठेवूं शकतो. ३७१. तर मी कोण आहे, भक्ति ती कशी असते व एकनिष्ठतेचें स्पष्ट स्वरूप काय, हा सर्व निर्णय झाला पाहिजे. ३७२, ( या विश्वांत मीं कोण आहे हें तुला सांगतों ) तर अर्जुना, ऐक, मी तर या विश्वांत असा आहे कीं, ज्याप्रमाणें रत्नाचे ठिकाणीं असलेलें तेज रत्नच आहे. ३७३. अथवा ओलेपणाच जसें पाणी आहे किंवा पोकळीच आकाश आहे अथवा गोडी तीच जशी साखर आहे, वेगळी नाहीं. ३७४. अग्नि तोच जसा जाळ आहे, पाकळ्यांचेंच नांव जसें कमळ आहे, वृक्ष तोच जसें फांद्या, फळें वगैरे आहे; ३७५. अर्जुना, बर्फ जें एकत्र गोठून झालें, तेंच जसें हिमालय पर्वत होय अथवा विरजलेलें दूध तेंच जसें दहीं असतें; ३७६. त्याप्रमाणें विश्व म्हणून जें म्हणतात, तें सर्व मीच आहें. पहा, चंद्रबिंब जसें सोलावें लागत नाहीं, ( चंद्र पहाणें असल्यास चंद्राच्या कला वेगळ्या करण्याची जरुरी नाहीं ) ३७७. तुपाचा घट्टपणा न मोडणें तें जसें तूपच आहे अथवा ( सोन्याचें ) कडें हें आटविलें नसतांना तें सोनेंच आहे; ३७८. वस्त्राचे धागे न उकलतां, तें वस्त्रच जसें उघड दोराच आहे; ( अथवा ) मातीची घागर न विरघळवितां जशी ती घागर मातीच आहे. ३७९. म्हणून विश्वपण काढून टाकावें ( विश्वाचा निरास करावा ) व मग मला घ्यावें, तसा मी नाहीं; तर विश्वासकट सर्व मीच आहें. ३८०. अशा प्रकारें मला जाणणें, ती अव्यभिचारी भक्ति असें म्हणतात. येथें ( या विश्वांत व माझ्यांत ) कांहीं भेद पाहिला, तर तो व्यभिचार होतो. ३८१. या कारणास्तव अर्जुना, भेदाला टाकून अभेद अशा चित्तानें आपल्यासकट ( आपणांस माझ्यावेगळें न मानून ) मला जाणावें. ३८२. अर्जुना, सोन्याचीच टिकली जशी सोन्यावर बसविली असते, पहा त्याप्रमाणें आपल्याला ( माझ्याहून ) वेगळें मानूं नये. ३८३. किरण हें तेजोमय असतें व तेजापासून उत्पन्न झालेलें असतें व तें तेजालाच लागलेलें असतें; त्या किरणासारखा चांगला बोध असावा; म्हणजे तूं आपल्याला माझ्याहून भिन्न समजूं नकोस ३८४. पृथ्वीवर असलेला अल्प परमाणु जसा पृथ्वीरूप आहे अथवा बर्फाच्या पर्वतावरील बर्फाचा कण जसा बर्फाच्या पर्वतरूपच आहे, त्याप्रमाणें ( तूं आपला ) मीपणा माझ्या ठिकाणीं पहा. ३८५. समुद्रावरची लाट जरी लहान असली, तरी ती समुद्राहून वेगळी नाहीं; तसा मी ईश्वराचे ठिकाणीं दुसरा ( ईश्वराहून वेगळा ) खरोखर नाहीं, ३८६. बा अर्जुना, अशा ऐक्यानें जेव्हां दृष्टि विकसित होते, त्याला आम्ही भक्ति असें म्हणतों. ३८७. हीच दृष्टि म्हणजे ज्ञानाचा चांगलेपणा होय आणि योगाचें सर्व सार हेंच आहे. ३८८. मेघ आणि समुद्र ह्यांच्यामध्यें जशी अखंड जलधारा लागलेली असते, अर्जुना, त्याप्रमाणें ( त्या पुरुषाची ) वृत्ति वहात असते, ( म्हणजे जेथून वृत्ति उत्पन्न होते, तेंही ब्रह्म, ज्याला विषय करते तेंही ब्रह्म व वृत्तीही ब्रह्म, अशी त्याची ही त्रिपुटी एक ब्रह्मरूपच असते. ) ३८९. अथवा आडाच्या तोंडीं असलेल्या आकाशाचा महाकाशाशीं जोड दिलेला नाहीं ( तर जसें आडांतलें आकाश हें महाकाशाशीं नेहमीं मिळालेलेंच असतें ) त्याप्रमाणें अर्जुना, तो परमरसाशीं ( परब्रह्माशीं ) ऐक्याला पावतो. ३९०. प्रतिबिंबापासून बिंबापर्यंत जसा प्रभेचा एकसारखा सरळपणा असतो, तशी ती सोहंवृत्ति आहे हें समज. ३९१. याप्रमाणें

परस्परें । ते सोहंवृत्ति जैं अवतरे । तैं तियेंहि सकट सरे । आपैसया ॥९२॥ जैसा सैंधवाचा रवा । सिंधूमाजीं पांडवा । विरालेया विरवावा । हेंही ठाके ॥ ९३ ॥ नातरी जाळूनि तृण । वन्हिही विझे आपण । तैसें भेदु नाशूनि जाण । ज्ञान नुरे ॥९४॥ माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये । अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे ॥९५॥ आतां गुणातें तो किरीटी । जिणे या नव्हती गोष्टी । जे एकपणाही मिठी । पडों सरली ॥९६॥ किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंशा । हें तो पावे जो ऐसा । मातें भजे ॥ ९७ ॥ पुढती इहीं लिंगीं । भक्तु जो माझा जगीं । हे ब्रह्मता तयालागीं । पतिव्रता ॥ ९८ ॥ जैसें गंगेचेनि वोघें । डळमळीत जळ जें निघे । सिंधुपद तयाजोगें । आन नाहीं ॥ ९९ ॥ तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी । तो होय ब्रह्मतेचां मुकुटीं । चूडारत्न ॥ ४०० ॥ यया ब्रह्मत्वासीचि पार्थी । सायुज्य ऐसी व्यवस्था । याचि नांवें चौथा । पुरुषार्थु गा ॥ १ ॥ परी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान । येथ मी हन साधन । गमेन हो ॥ २ ॥

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च । शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥

तरी झणें झणें ऐसें । तुझां चित्तीं पैसें । पै ब्रह्म आन नसे । मीवांचूनि ॥३॥ अगा ब्रह्म या नांवा । अभिप्रावो मी पांडवा । मीचि बोलिजे आघवां । शब्दीं इहीं ॥४॥ पैं मंडळ आणि चंद्रमा । दोनी नव्हती सुवर्मा । तैसा मज आणि ब्रह्मा । भेदु नाहीं ॥५॥ अगा नित्य जें निष्कंप । अनावृत धर्मरूप । सुख जें उमप । अद्वितीय ॥६॥ विवेकु आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम । निष्कर्षाचें निःसीम । किंबहुना मी ॥ ७ ॥ ऐसेंसें हो अवधारा । तो अनन्याचा सोयरा । सांगतसे वीरा । पार्थासी ॥ ८ ॥ येथ धृतराष्ट्र म्हणे । संजया हें तूतें कोणें । पुसलेनिविण वायाणें । कां बोलसी ॥९॥ माझी अवसरी ते फेडीं । विजयाची सांगें गुढी । येरु जीवीं म्हणे सांडीं । गोठी यिया ॥४१०॥ संजयो विस्मयें मानसीं । आहा करूनी रसरसीं । म्हणे कैसें पां देवेसी । द्वंद्व यया ॥११॥ तरी कृपाळु तो तुष्टो । यया विवेकु हा घोंटो । मोहाचा फिटो । महारोगु ॥१२॥ संजयो ऐसें चिंतितां । संवादु तो सांभाळितां । हरिखाचा येतु चित्ता । महापूर ॥ १३ ॥ म्हणोनि आतां येणें । उत्साहाचेनि अवतरणें । श्रीकृष्णाचें बोलणें । सांगिजेल ॥ १४ ॥ तया अक्षरांआंतील भावो । पाववीन मी तुमचा ठावो । आइका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ४१५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणातीतयोगोनाम चतुर्दशोऽध्यायः

[ श्लोक २७, ओंव्या ४१५. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु



जीव व ब्रह्म या दोहोंत (जीवाच्या ठिकाणीं) जेव्हां सोऽहंवृत्ति (तें ब्रह्म मी आहें अशी वृत्ति) प्रगट होते, तेव्हां ती सोऽहंवृत्तीसुद्धां आपोआप सरते (नाहींशी होते.) ३९२. अर्जुना, ज्याप्रमाणें मिठाचा खडा समुद्रांत विरघळल्यावर तो (मिठाचा खडा) विरघळावा हेंही थांबतें (नाहींसें होतें.) ३९३. अथवा गवत जाळून जसा अग्नीही आपण विझतो, त्याप्रमाणें भेदाचा नाश करून ज्ञान रहात नाहीं. ३९४. मी मायेच्या पलीकडे आहे व भक्त मायेच्या अलीकडे आहे, असा माझ्यांत व भक्तांत असलेला पलीकडेपणा व अलीकडेपणा नाहींसा होतो. (आणि माझ्यांत व भक्तांमध्यें) अनादि जें ऐक्य आहे, तेंच प्रगट होतें. ३९५. अर्जुना, आतां तो गुणाला जिंकतो, ही भाषाच राहात नाहीं; कारण कीं, आतां एकपणाही सरला. ३९६. फार काय सांगावें! अशा प्रकारची जी अवस्था तें, हे मर्मज्ञ अर्जुना, ब्रह्मत्व होय. वर सांगितल्याप्रमाणें जो अव्यभिचारित्वानें मला भजतो, त्यास तें प्राप्त होतें. ३९७. शिवाय, आणखी या लक्षणांनीं युक्त असा जो या जगांत माझा भक्त आहे, त्याच्याकरितां ही ब्रह्मता पतिव्रता आहे. ३९८. ज्याप्रमाणें गंगेच्या प्रवाहानें खळखळ वाहणारें पाणी जें निघतें, त्याला समुद्राचें स्थान अवश्य मिळतेंच, यांत अन्यथा नाहीं. ३९९. त्याप्रमाणें अर्जुना, ज्ञानाच्या दृष्टीनें जो माझें सेवन करतो, तो ब्रह्मस्थितीच्या मुगुटावर अग्रभागीं असणारें रत्न तो (मुकुटमणि) होतो. ४००. अर्जुना, या ब्रह्मत्वालाच 'सायुज्य' असें म्हणतात व चौथा पुरुषार्थ हें यालाच नांव आहे. ४०१. परंतु माझी (श्रीकृष्णाची) भक्ति ही ब्रह्मस्थितीच्या ठिकाणीं (पोहोंचण्याचें) साधन आहे. म्हणून ब्रह्मत्वीं पोहोंचण्याचें मी (कृष्ण) साधन आहें, असें तुला कदाचित् वाटेल. ४०२.

नित्य, अमृत, शाश्वत, धर्मरूप व अखंड सुख असें जें ब्रह्म तें ज्यांत राहातें, तें (ब्रह्माची मूर्तीच) मी आहें. २७.

तर अशी कल्पना कदाचित् तुझ्या मनांत येईल; तर ती येऊं देऊं नकोस. अरे, माझ्यावांचून ब्रह्म दुसरें नाहीं. ४०३. अर्जुना, ब्रह्म या नांवाला विषय मी आहें आणि या सर्व शब्दांनीं (म्हणजे अमृत, अव्यय, शाश्वत वगैरे शब्दांनीं) मीच बोलला जातों. ४०४. चंद्र आणि चंद्राचें बिंब हीं जशीं भिन्न नाहींत, त्याप्रमाणें, हे चतुर अर्जुना, माझ्यांत व ब्रह्मांत भेद नाहीं. ४०५. अर्जुना, जें ब्रह्म नित्य, अचल, प्रगट, धर्मरूप, अमर्याद सुख व अद्वितीय (असें आहे.) ४०६. विचार (अज्ञान नष्ट करण्याचें) आपलें काम करून ज्या ठिकाणीं प्राप्त होतो, तें स्थान मी आहें. फार काय सांगावें! सिद्धान्ताचें कडेलोटीचें स्थान तें मीच समज. ४०७. अहो महाराज, ऐका. अशा अशाप्रमाणें, तो अनन्य भक्तांचा आवडता (श्रीकृष्ण परमात्मा) वीर जो अर्जुन, त्याला सांगता झाला. ४०८. तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला, संजया, हें तुला कोणी विचारल्यावांचून तूं व्यर्थ कां बोलतोस? ४०९. (माझ्या मुलांच्या) विजयाची बातमी सांगून माझी शंका दूर कर. तेव्हां संजय मनांत म्हणतो कीं, तूं या विजयाच्या गोष्टी सोडून दे. ४१०. (धृतराष्ट्राची अशी ही अवस्था पाहून) संजय आश्चर्ययुक्त होऊन व संतापून मनांत म्हणाला, अहो काय आश्चर्य आहे! याचें देवाशीं कसें वैर आहे! ४११. तरी तो कृपाळू (श्रीकृष्ण परमात्मा) संतुष्ट होवो आणि यास (धृतराष्ट्रास) हा आत्मानात्मविचार सेवन करण्याचें सामर्थ्य येवो! आणि याचा मोहरूपी महारोग नाहींसा होवो. ४१२. संजय आपल्या मनांत धृतराष्ट्रासंबंधीं असा विचार करीत असतां आणि कृष्णार्जुनाच्या संवादाचें मनन करीत असतां, त्याच्या चित्ताला आनंदाचा महापूर आला. ४१३. म्हणून आतां या उत्साहाच्या आवेशानें तो श्रीकृष्णाचें बोलणें सांगेल. ४१४. त्या अक्षरांतील अभिप्राय मी तुमच्या ठिकाणीं पोहोंचवीन (तुम्हांला सांगेन) तें तुम्ही ऐका; असें निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानेश्वर (महाराज) म्हणतात. ४१५.



## अध्याय पंधरावा : : : सारांश

करूनि संसार वावो । स्वरूपीं अहंते ठावो । होआवया अध्यावो । पंधरावा हा ॥ अ. १५–४३

ज्ञानेश्वर महाराजांच्या दृष्टीनें हा अध्याय ज्ञानकांडाचा व पर्यायानें गीताशास्त्राचा शेवटचा व महत्त्वाचा अध्याय आहे. संसाराचें मिथ्यात्व दाखवून व जीवाला आत्मस्वरूपाची प्राप्ति करून देऊन त्याच्यामागची जन्म-मरणाची येरझार संपविणें, हा या अध्ययाचा विषय आहे. श्रीज्ञानदेवांनीं सुरुवातीस ज्ञानाच्या अंगानें केलेल्या श्रीगुरु-चरणांच्या मानसिक पूजेचें उत्कटतेनें वर्णन केलें आहे. या श्रीगुरुचरणसेवेनें गुरुभक्तास धर्मादि चारी पुरुषार्थांच्या सिंहासनावर अभिषेक होतो व ज्याचा पत्ता लागत नाहीं, म्हणून मनासह वाचा परतते असें निर्विषय ब्रह्म तें या सेवेनें वाणींत सांपडतें व त्यायोगानें श्रोत्यांना वाचा ज्ञानाची दिवाळी करूं शकते. एवढें सामर्थ्य या श्रीगुरुचरणसेवेंत आहे असें श्रीज्ञानदेव सांगतात. आपण आपल्या गुरूंचें एकुलतें एक शिष्य असल्यामुळें श्रीगुरूंनीं आपणांवर कृपा करून आपला संपूर्ण तत्वबोध देऊन आपलें अज्ञान नाहींसें केलें, याबद्दल वाटणारी धन्यता व कृतज्ञता त्यांनीं व्यक्त केली आहे ( १–२८ ) यापुढें चौदाव्या व पंधराव्या अध्यायाचा संबंध सांगतात. ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो, असा सिद्धान्त मागील अध्यायाच्या शेवटीं भगवंतानीं सांगितला; परंतु तें ज्ञान कायम टिकण्यासाठीं अंगांत वैराग्याचें चांगलें बळ असणें अत्यंत अवश्य आहे. जर हा सर्व संसार अनित्य व क्षणभंगुर आहे, असें खरोखरीं मनाला पटेल, तरच हें वैराग्य स्वाधीन होईल. म्हणून हा संसार कसा आहे, ते या अध्यायाच्या प्रारंभीं अश्वत्थ वृक्षाच्या रूपकानें भगवान सांगत आहेत.

'आपल्या स्वरूपाच्या प्राप्तीच्या आड जर कोणी येत असेल, तर हा प्रपंच. हा प्रपंच म्हणजे एक प्रकारचा बळकट वृक्षच आहे. इतर लौकिक वृक्षाला खालीं मूळ व वरच्या बाजूस फांद्या असतात; त्यामुळें त्याचा अंत लागतो व त्याच्या मुळाशीं घाव घातला तर तो समूळ तोडतांही येतो; पण हा वृक्ष त्याच्या उलट म्हणजे याचें वर मूळ व फांद्या खालीं आहेत; त्यामुळें याचा शेवट लागत नाहीं व तोडतांही येत नाहीं. शिवाय चोहोंकडे बळावलेल्या पिंपळाप्रमाणें याच्या पारंब्यामध्येंही उन्हाळ्या आहेत.' या वृक्षाचे ऊर्ध्व, मूळ, फांद्या, आडफांद्या, याला अश्वत्थ कां म्हणतात, वगैरे सर्व विवेचन, अर्जुनाच्या ठिकाणची श्रवणाची अमर्याद आवड पाहून श्रीकृष्ण करीत आहेत. ( २९–७१ )

अद्वय, आनंद व निराकार असें जें ब्रह्म तें या वृक्षाचें ऊर्ध्व आहे व अनादि सदसद् विलक्षण अनिर्वचनीय पण असद् अशी जी माया ती या वृक्षाचें मूळ आहे. मायेचा ब्रह्माशीं संबंध होऊन म्हणजेच स्वस्वरूपविषयक अज्ञान उत्पन्न होऊन संसारवृक्षाची उभारणी होते. मग प्रथम महत्तत्व हें एक लुसलुशीत पान निघतें, त्या पानाला त्रिगुणात्मक अहंकाराचा देठा फुटतो व त्यापासून अंतःकरण-चतुष्टयाच्या लहान फांद्या फुटतात. पंचमहा-भूतें, पंचज्ञानेंद्रियें व सूक्ष्म विषय यानंतर उत्पन्न होतात व अशा रीतीनें एकाकी ब्रह्मापासून संपूर्ण संसाराची आंखणी तयार होते. याला अश्वत्थ म्हणण्याचें कारण हें कीं, हा क्षणभंगुर आहे. उद्यांपर्यंत सारखा रहात नाहीं. हाच अभिप्राय अश्वत्थ या शब्दांतून निघतो. अ म्हणजे नाहीं व श्वः म्हणजे उद्यां. उद्यापर्यंत न टिकणारा म्हणूनच यास अश्वत्थ म्हणतात. हा प्रतिक्षणाला नाश पावत असूनही तसें सामान्य दृष्टीला दिसून येत नाहीं. याचें कारण या वृक्षाचें उत्पन्न होणें व नाहींसें होणें, इतकें वेगानें होतें व एक फांदी केव्हां नाश पावली व तिच्या जागीं अनेक नवीन शाखा केव्हां उत्पन्न झाल्या हें समजूनही येत नाहीं. महाप्रलयाच्या वेळीं संहारकारक प्रचंड वारा सुटला म्हणजे या वृक्षाची साल गळून पडते. नंतर पुन्हा कल्पाच्या आरंभीं नवीन सृष्टयांचे समुदाय उत्पन्न होतात.अज्ञानी लोकांना हा वृक्ष नेहमीं हिरवागार टवटवीत असाच वाटतो; परंतु ज्ञानी लोक याचा वेग ओळखतात, त्याचें क्षणभंगुरत्व जाणतात. त्यांना पक्कें कळून आलें असतें कीं याचें मूळ अज्ञानांत असून जो दिसतो तो मिथ्या आभास आहे. हे पुरुष फार थोर व मलाही पूज्य आहेत. ( ७२–१४३ ).

सामान्यपणें भववृक्षाचें असें वर्णन करून भगवान् त्याची वाढ कशी होते, तें सांगतात. स्वेदज, जारज, अंडज व उद्भिज या चार प्रकारचे मोठे शेंट तयार होऊन त्यापासून चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी उत्पन्न होतात. गुणक्षोभरूपी वारा वेगानें वाहूं लागला, कीं हा वृक्ष तीन ठिकाणीं भेदला जातो. रजोगुणाचा वारा सुटला कीं, मनुष्यरूपी खांद्यांची मध्यभागीं वाढ होते. त्याला चार वर्णांच्या आडफांद्या फुटतात व त्यास वेदवाक्यांची अपूर्व पालवी शोभा देते. हीं तिन्हीं वेदरूपी पानें मनुष्यशाखाखेरीज इतर ठिकाणीं लागत नाहींत. म्हणून मनुष्यतनु या जरी मुळाच्या दृष्टीनें खालच्या शाखा आहेत, तरी कर्मांच्या व परंपरेनें भववृक्षाच्या विस्ताराला याच शाखा कारण आहेत. म्हणून एका दृष्टीनें ह्या शाखा खालचीं मूळें आहेत असें म्हटलें तरी चालेल. तमोगुणाचा वारा सुटला, म्हणजे कुवासनांचा फैलाव होतो. जारणमारणादि शास्त्रांवरील श्रद्धारूपी वेल वाढतो व दुसऱ्याचा घात करणारे यज्ञ इत्यादि क्रिया होऊं लागतात. मग या कुकर्मांचा परिणाम चांडाळादि निकृष्ट जातींच्या फांद्या वाढतात व पुढें पशुपक्षी इत्यादि आडशाखांचाहि विस्तार होतो. अशा रीतीनें तमोगुणाच्या आधिक्यांत या मनुष्यशाखांना नरकभोगरूपी फळाची प्राप्ती होते. तेथें असेंच हिंसादि निषिद्ध कर्म होतां होतां शेवटीं झाडें, दगड वगैरे फांद्या वाढतात. फांद्याही याच व फळेंही हींच. सत्त्वगुणाचा वारा वाहूं लागला म्हणजे धर्मरूपी शाखा विस्तार पावतात व त्याला स्वर्गादिक फळांनीं युक्त अशा फांद्या येतात. इंद्र, चंद्र, सूर्य, ब्रह्मदेव व शंकर हे अगदीं वरच्या शाखांना असणारे अणकुचीदार कोंभ आहेत. ते उत्पन्न होतात. मनुष्यरूपी शाखा सत्कर्मरूपी फळांनीं अगदीं ब्रह्मलोकापर्यंत जातात. मात्र सनकादिक निवृत्तिमार्गांच्या शाखा फळांत व मुळांत कोठेंही न सांपडतां ब्रह्मस्वरूपीं भरलेल्या आहेत. ( १४४–२०८ ).

( येथपर्यंत प्रपंचरूपवृक्षाचा अध्यारोप सांगून आतां त्याचा अपवाद सांगतात. ) निराकार ब्रह्मापर्यंत ज्याचें मूळ आहे, खालच्या शाखा वृक्षादि स्थावरापर्यंत असून मनुष्यरूपी मुळें ज्याच्या मध्यभागीं आहेत व वरच्या शाखा तर ब्रह्मदेवापर्यंत विस्तारलेल्या आहेत, असा हा स्थूलदर्शनीं बळकट व अफाट वृक्ष दिसतो व याला उपटून टाकणें अशक्य वाटतें; पण खरोखरी तसें तें अशक्य नाहीं. कारण या वृक्षाचें मूळ जें अज्ञान तेंच जर खोटें आहे, तर त्याचा हा प्रचंड विस्तार तरी कोठून खरा असणार ? तो खोटा असूनही 'अनादि' 'अनंत' असें त्याला म्हणतात, तेंहि एका दृष्टीनें बरोबर आहे. जी वस्तु खरोखरी उत्पन्न होते, त्या वस्तूचा आरंभ झाला हें म्हणणें शोभतें; पण संसारवृक्ष हा तर स्वरूपेंकरून खराच नाहीं. मग त्याचा आरंभ कोणापासून झाला असें म्हणावयाचें ? या दृष्टीनें याला अनादि म्हणतात. जोपर्यंत विचारानें डोकें वर केलें नाहीं तोंपर्यंत या वृक्षाला अंत नाहीं. म्हणून त्याला अनंत म्हणतात. बरें ज्या वेळीं तो भासतो त्या वेळींही एक क्षण स्थिर नसतो, सारखें स्थित्यंतर होत असतें. अशा मिथ्या व भासमान वृक्षाला उन्मळून टाकण्यास श्रम ते कसले ? पण येथें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ज्या अज्ञानामुळें हा उत्पन्न झाला आहे, त्याला नाहींसें करणारें यथार्थज्ञान हाच एकमेव उपाय आहे. इतर उपायांचा येथें लाग नाहीं. उलट शीण मात्र होईल. या ज्ञानउपायास अंगीं वैराग्याच्या बळाचीही अत्यंत आवश्यकता आहे. ( २०९–२६६ ).

देहादि अनात्म प्रपंचाचा मिथ्या म्हणून निरास केल्यावर 'अहं' 'इदं' वृत्तीविरहित जें आपलें स्वरूप आहे, त्याचें दर्शन करून घ्यावयाचें आहे; पण तें पहाणें म्हणजे आरशाच्या सहाय्यानें द्दश्यसापेक्ष द्दश्य करून आपणांस आपण पहातों तसें नाहीं. तें मी नाहीं अशा अद्वैतरूपानें त्यास पहावयाचें आहे. विरक्त मुमुक्षु हें दर्शन घेण्यास निघतात तेव्हां संसारांतील ब्रह्मलोकादि पदापर्यंत सर्व पदार्थ त्यांना अडथळा करतात. पण हे साधक त्यांना लाथाडून पुढें जातात व आपण सर्वत्र सारखे व्यापून राहिलों आहों, अशा अपरोक्ष अनुभवाला प्राप्त होऊन त्या स्वरूपाची भेट घेतात. या पुरुषाच्या ठिकाणचें मोह, मान, विकार, देहाहंकार, द्वैत सर्व नाहींसें झालेलें असतें. विषयांची इच्छा नसल्यामुळें तत्प्राप्त्यर्थ क्रियाही नाहीं, या पुरुषाला ज्या ब्रह्मपदाची प्राप्ति होते ते अमुक म्हणून निर्देश करतां येत नाहीं अथवा शब्दानें सांगतांही येत नाहीं. सूर्यादि तेजांच्या ठिकाणचें तेज या आत्मवस्तूपासून प्राप्त झालें असतें म्हणून जगतांतील कोणतीही वस्तू याचें प्रकाशन करूं शकत नाहीं ( २६७–३२० ).

( या ठिकाणीं अर्जुन शंका विचारीत आहे असें दाखवून श्रीज्ञानदेवांनीं पुढच्या श्लोकाची संगति लावली आहे. पूर्वपक्ष केलेलीं ज्ञानेश्वरींत जीं थोडीं स्थळें आहेत, त्यांपैकीं हें एक आहे. १४, १५ व १६ या श्लोकांची ही लावलेली संगति मननीय आहे. ) ज्ञानाच्या योगानें जे माझ्याशीं एकरूप झाले त्यांना पुनर्जन्म नाहीं, असें देवांनीं सांगितल्यावर अर्जुनानें खुबीदार प्रश्न केला कीं ' जे पुरुष याप्रमाणें देवाशीं एकवट होतात, ते मूळचे देवाशीं भिन्न असतात का अभिन्न ? मूळचे जर भिन्न असतील तर ते ऐक्याला पावतात हें म्हणणें संभवत नाहीं व जर अभिन्नच असले तर अभिन्न वस्तुविषयीं संयोग अथवा वियोग संभवेल कसा ? ' या अर्जुनाच्या मार्मिक प्रश्नाचें कौतुक करून देव उत्तर देतात; खोल दृष्टीनें पाहिलें तर ते पुरुष स्वभावतः मजशीं अभिन्नच आहेत; पण देहदृष्टीनें पाहिलें तर ते भिन्न आहेत. पाण्यावरील लाटेकडे जसें तुम्ही पहाल तसें आहे. अज्ञान असेल तर वेगळेपणा दिसेल व ज्ञान असेल तर ऐक्य दिसेल. मी मायेमुळें वेटाळला जातों, तेव्हां हें अज्ञान उत्पन्न होतें व व्यापक स्वरूपाला विसरून आत्मा मी देहच आहे असें परिच्छिन्नपणें म्हणूं लागतो व त्यामुळें जन्मणें, मरणें वगैरे देहाचे धर्म आपल्यावर ओढून घेतो; मनादि सहा इंद्रियांना जवळ घेऊन त्यांना गोड वाटणाऱ्या विषयांचा भोग घेतो. हें कर्तेपण व भोक्तेपण एकाच देहांत संपत नाहीं; एक देह पडल्यावर ज्ञानेंद्रियें वासना बरोबर घेतात. त्यामुळें तो पुनश्च अनुरूप देहाचा आश्रय करतो व पुनः जन्मास येतो. ( ३२१–३६८ ).

अज्ञानी लोकांना या सर्व व्यवहारांत आत्माच जन्मतो, करतो, भोगतो व मरतो असें वाटतें. वास्तविक हे सर्व धर्म प्रकृतीचे आहेत. हे फक्त ज्ञानी लोकांना समजतें. ते ज्ञानदृष्टीनें, देहांत सांपडलेल्या निर्विकार असंग अलिप्त आत्म्यास, प्रकृतीपासून वेगळे काढून पाहतात. पण हे ज्ञानीपुरुष म्हणजे अंतःकरण विषयानें मस्त ठेवून तोंडानें ज्ञानाच्या गप्पा मारणारे नव्हत. कडकडीत व बळकट वैराग्याचा आश्रय करून सर्व विषय वमनवत् मानणारे खरे ज्ञानी असतात. ( ३६९–३९६ )

मी एका देहापुरताच मर्यादित नसून सर्व चराचर वस्तूमध्यें व्यापून राहिलों आहे हें अपरोक्ष ज्ञानानेंच अनुभवास येतें. तेजांतील तेज, शीतळतेंतील शीतळता, माझ्यामुळेंच आहे. सर्व भूतांचें धारण, पोषण, मीच करतों. या विश्वांत सर्व ठिकाणीं मीच आहें; परंतु सर्वत्र माझी व्याप्ति असूनही कांहीं प्राणी सुखी तर कांहीं दुःखी दिसतात, यामुळें तूं असें म्हणशील कीं, जर तूं सर्वत्र आहेस तर असा भेद कां असावा ? यावर उत्तर असें आहे कीं, वास्तविक माझ्या स्वरूपांत कांहीं न्यून नाहीं; पहाणाराच्या अंतःकरण-उपाधीचाच हा दोष आहे. मी एकच असून बुद्धीच्या भिन्नत्वानें निरनिराळ्या लोकांना निरनिराळ्या प्रकारचा दिसतों. ज्ञानवानांना एकत्वामुळें सुख होतें, तर अज्ञानी जीवांना द्वैत दिसल्यामुळें दुःख होतें ( ३९७-४२० ). हा एकत्वाचा अनुभव येण्यास वैराग्ययुक्त होऊन संतांनीं सांगितल्याप्रमाणें योगज्ञानाचा अभ्यास करून सत्कर्माचें आचरण केलें पाहिजे. मग अंतःकरण शुद्ध होऊन ' मी देह आहें ' ही परिच्छिन्नता जाऊन ' मी वासुदेव आहें ' असा अनुभव येईल. याउलट देहासक्त पुरुषाच्या संगतींत इंद्रियांचे चोचले पुरवीत बसलें तर दुःखाचाच अनुभव येईल. या ज्ञानी व अज्ञानी दोन्ही पुरुषांच्या ज्ञानाचें प्रकाशन मात्र माझ्या निरुपाधिक सत्तेमुळेंच होतें. अशा रीतीनें भगवंतांनीं चराचरांतील व्याप्तीचें वर्णन शेवटीं निरुपाधिक स्वरूपांत संपविलें. तें ऐकून त्या निरुपाधिकस्वरूपासंबंधीं आणखी पुनः ऐकण्यास मिळावें म्हणून अर्जुन अगदीं उतावीळ झाला, व देवाला म्हणाला. तुमचे तें निरुपाधिक स्वरूप पुनः एकदा सांगा. भगवंतालाही असा प्रेमळ व दुर्मिळ संवादिया भेटला म्हणून अनावर आनंद झाला व त्यांनीं अर्जुनाला दृढ आलिंगन दिलें; हा प्रेमाचा पूर ओसरल्यावर देव त्याला दोन प्रकारची उपाधि सांगू लागले. वास्तविक अर्जुन निरुपाधिक रूप विचारीत होता; पण देव त्याला उपाधि सांगत आहेत, याचें स्पष्टीकरण श्री ज्ञानदेव करतात कीं, खास निरुपाधिक वस्तूचें वर्णन वेदालाही करता येईना; म्हणून त्यानें इतर दृश्य वस्तूंचें वर्णन करून ' नेति नेति ' म्हटलें व अशा रीतीनें गप्प बसून त्या वस्तूचें वर्णन केलें. त्याच न्यायानें 'तें हें नाहीं' हें सांगण्याकरितां देव उपाधि सांगत आहेत. शाखाचंद्रन्यायानें उपाधीचा विचार सांगून निरुपाधिक स्वरूपांत अर्जुनाला नेणार आहेत ( ४२१–४७० ).

‘ या जगांत क्षर आणि अक्षर असे दोन पुरुष आहेत; यांपैकीं एक ( क्षर पुरुष ) ज्ञानदृष्टिहीन ( अंध ) देहासक्त ( वेडा ) व उपाधितंत्र ( पांगळा ) असून दुसरा मात्र सर्वांगानें परिपूर्ण आहे. हे दोघेही एकाच ठिकाणीं राहतात; म्हणून त्यांची संगत जमली. महत्तत्त्वापासून गवताच्या काडीपर्यंत जे स्थूल, सूक्ष्म, नामरूपात्मक आहे, त्यांच्याशीं क्षर पुरुष तादात्म्य करतो व त्या उपाधीच्या नाशिवंत स्वभावाप्रमाणें तो स्वतःला क्षर समजतो ( ४७१–५०१ ). मी ब्रह्म आहे, हें यथार्थ ज्ञान अथवा मी देह आहे, हें विपरीत ज्ञान हीं दोन्ही दुसऱ्या अक्षर पुरुषाच्या ठिकाणीं नाहींत. केवळ अज्ञान हें त्याच्या उपाधीचें स्वरूप आहे. क्षर पुरुषाची देहादि उपाधि व त्या उपाधीमुळें उपहित बनलेला क्षर पुरुष हीं दोन्ही या अज्ञानांत लीन होतात. जीवत्वकल्पना विश्वकल्पनेला घेऊन येथूनच उत्पन्न होते व याच ठिकाणीं नाहींशी होते. संसारवृक्षाचें मूळ जें अज्ञान सांगितलें तें हेंच आहे. अशा मायेच्या संगतीनें असणारा व जीवकार्याचें कारण असणारा तो अक्षर पुरुष समजावा. ( ५०२–५२४ ).

या क्षर व अक्षर पुरुषाहून अगदीं वेगळा, श्रेष्ठ, उपाधिरहित व एकाकी असा आणखी एक तिसरा उत्तम पुरुष आहे व तो प्रगट झाला असतांना या दोन्ही पुरुषांना त्यांच्या उपाधीसह नाहींसें करतो. मी ब्रह्म आहें, या ज्ञानानें मी देह आहे हें अज्ञान नाहींसें होतें व पुढें मी ब्रह्म आहे हें ज्ञानही ज्या ठिकाणीं नाहींसें होतें, तें या उत्तम पुरुषाचें रूप आहे. या ठिकाणीं द्वैत तर नाहींसें होतेंच; पण द्वैत सापेक्ष अद्वैतही राहत नाहीं. याला लौकिकांत परमात्मा म्हणतात; पण तेंही जीवदशेंत राहूनच; क्षराक्षर पुरुष हे अलीकडचे; हा सापेक्ष उत्तमपुरुष पलीकडचा म्हणून परमात्मा म्हणावयाचा इतकेंच; याचें दर्शन झाल्यावर पाहणाराच नाहींसा होतो. मग याचें वर्णन कोण कसें करणार ? पण वर्णन करतां येत नाहीं म्हणून तो नाहीं असें मात्र नाहीं. सर्व विश्व नाहींसें झालें, तरी हा नाहींसा होत नाहीं. हा विश्वाला धारण करतो, त्याच्या सदत्त्वानें जग आहे व त्याच्या प्रकाशानें जग भासतें; तो सदा सर्वत्र आहेच. विश्वाचा नाश झाल्यावर कमी होत नाहीं व उत्पन्न झाल्यावर जास्त होत नाहीं. ( ५२५–५५७ ).

जेव्हां हें जग मिथ्या आहे व आपणच सर्व ब्रह्म आहों हा अनुभव येतो तेव्हांच माझें भजन करण्याची योग्यता येते. मद्रूप झाल्याशिवाय माझें यथार्थ भजन होऊंच शकत नाहीं ( ५५८–५६९ ). हें सर्व वेदांचें सार, माझें गुह्यांतलें गुह्यज्ञान तूं श्रद्धावान, एकनिष्ठ व शुद्ध बुद्धीचा आहेस म्हणूनच तुला सांगितलें. गीता हा ग्रंथ पांडित्य दाखविण्यासाठीं नाहीं, तर त्यांतील तत्त्व अंगानें होऊन जाण्याचा (अनुभविण्याचा) ग्रंथ आहे. हा ग्रंथ जर याप्रमाणें जाणला, तर जीवाचें ठिकाणीं असणारा मोह दूर होईल व जीव कृतकृत्य होऊन त्यास अक्षयपदाची प्राप्ति होईल. ( ५७०–५८७ ).

ज्ञानदेव समारोप करतांना म्हणतात ‘ श्रीकृष्णाच्या मुखांतून निघालेलें बोधामृत व्यासांच्या कृपेनें संजयालाही मिळत होतें व संजय धृतराष्ट्राला सांगत होता, पण तो बिचारा अनधिकारी पडला; पण त्या वेळीं जरी धृतराष्ट्राला त्याचा उपयोग झाला नाहीं, तरी या श्रवणामुळें त्याच्या अंतकाळीं त्याच्या चित्ताची गडबड उडाली नाहीं. मलाही हा संवाद श्रीगुरुकृपेनें मराठी भाषेत सांगता आला, त्यांत न्यून असेल तर तें आपण पुरें करून घ्यालच. मी बोलूनचालून आपलें लेकरूं आहें. मी तुम्हांसमोर लडिवाळपणानें बोलतों, त्याचें तुम्ही प्रेमानें कौतुक करता. हा मायबापांचा स्वभावच आहे.’ ( ५८८–५९८ ).



# ज्ञानेश्वरी

## अध्याय पंधरावा

आता हृदय हें आपुलें। चौफळूनियां भलें। वरी बैसऊं पाउलें। श्रीगुरूचीं ॥ १ ॥ ऐक्य-भावाची अंजुळी। सर्वेंद्रियकुड्मुळीं। भरूनियां पुष्पांजुळी। अर्घ्यु देवों ॥२॥ अनन्योदकें धुवट। वासना जे तन्निष्ठ। तें लागलेसे अवोट। चंदनाचें ॥ ३ ॥ प्रेमाचेनि भांगारें। निर्वाळूनि नूपुरें। लेवऊं सुकुमारें। पदें तियें ॥ ४ ॥ घणावली आवडी। अव्यभिचारें चोखडी। तिये घालूं जोडी। आंगोळिया ॥५॥ आनंदामोदबहळ। सात्त्विकाचें मुकुळ। तें उमललें अष्टदळ। ठेऊं वरी ॥ ६ ॥ तेथें अहं हा धूप जाळूं। नाहंतेजें वोवाळूं। सामरस्यें पोटाळूं। निरंतर ॥ ७ ॥ माझी तनु आणि प्राण। इया दोनी पाउवा लेऊं श्रीचरण। करूं भोगमोक्षनिंवलोण। पायां तयां ॥ ८ ॥ इया गुरुचरणसेवा। हों पात्र तया दैवा। जें सकळार्थमेळावा। पाट्ट बांधे ॥ ९ ॥ ब्रह्मींचें विसवणेंवरी। उन्मेख लाहे उजरी। जें वाचेतें इये करी। सुधासिंधु ॥ १० ॥ पूर्णचंद्राचिया कोडी। वक्तृत्वा वापे कुरोंडी। तैसी आणी गोडी। अक्षरांतें ॥ ११ ॥ सूर्यें अधिष्ठिली प्राची। जगा राणीव दे प्रकाशाची। तैशी वाचा श्रोतयां ज्ञानाची। दिवाळी करी ॥ १२ ॥ नादब्रह्म खुजें। कैवल्यही तैसें न सजे। ऐसा बोलु देखिजे। जेणें दैवें ॥ १३ ॥ श्रवणसुखाचां मांडवीं। विश्व भोगी माधवी। तैसी सासिने बरवी। वाचावल्ली ॥ १४ ॥ ठावो न पवता जयाचा। मनेंसी मुरडली वाचा। तो देवो होय शब्दाचा। चमत्कारु ॥१५॥ जें ज्ञानासि न चोजवे। ध्यानासिही जें नांगवे। तें अगोचर फावे। गोठीमाजीं ॥ १६ ॥ येवढें एक सौभग। वळघे वाचेचें आंग। गुरुपदपद्मपराग। लाहे जैं कां ॥१७॥ तरी बहु बोलूं काई। आजि तें आनीं ठाई। मातेंवाचूनि नाहीं। ज्ञानदेवो म्हणे ॥१८॥ जे तान्हेनि मियां अपत्यें। आणि माझे गुरु एकलौते। म्हणोनि कृपेसि एकहातें। जालें तिये ॥१९॥ पाहा पां भरोवरी आघवी। मेघ चातकांसी रिचवी। मजलागीं गोसावीं। तैसें केलें ॥२०॥ म्हणोनि रिकामें तोंड। करूं गेलें बडबड। कीं गीता ऐसें गोड। आतुडलें ॥२१॥ होय अदृष्ट



आगी लागलेया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी ।
तैसें मांडिलें अशेखीं । विकल्पीं जे ॥

—ज्ञानेश्वरी अध्याय १५ वा, ओवी २८८

# ज्ञानेश्वरी

## अध्याय पंधरावा

आतां आपलें शुद्ध असलेलें अंतःकरण चौरंग करून, त्यावर श्रीगुरूंच्या पाउलांची स्थापना करूं. १. श्रीगुरु व आपण एक आहोंत, अशा ऐक्यतेच्या समजूतरूपी ओंजळींत, संपूर्ण इंद्रियरूपी कमळकळ्या भरून, त्या पुष्पांजुळीचें अर्घ्य श्रीगुरूंच्या चरणांवर देऊं. २. एकनिष्ठतारूप स्वच्छ पाण्यानें स्नान घालून, श्रीगुरूंच्या विषयीं असलेली वासना, तेंच श्रीगुरूंस ( अनामिका नांवाचें ) गंधाचें बोट लावूं. ३. ( श्रीगुरुविषयींचें ) प्रेमरूपी सोनें शुद्ध करून त्याचे घागऱ्यांचे वाळे सद्‌गुरूच्या सुकुमार पायांत घालूं. ४. अनन्यतेनें शुद्ध झालेलें सद्‌गुरुविषयींचें दृढ प्रेम, हींच कोणी रणजोडवीं, तीं सद्‌गुरूंच्या पायांच्या आंगठ्यांत घालूं. ५. आनंदरूपी सुवासानें पूर्ण भरलेली अष्टसात्त्विकभावांची उमललेली कमळकळी, हेंच कोणी एक आठ पाकळ्यांचें कमळ, तें सद्‌गुरूंच्या पायांवर वाहूं. ६. देहादिकांचा अभिनिवेश घेणारी जी अहंवृत्ति, हाच कोणी एक धूप, तो श्रीगुरुचरणांजवळ जाळूं. या देहादिकांपैकीं मी कोणी नाहीं, अशी जी उत्पन्न झालेली निरभिमान बोधवृत्ति, हेंच कोणीएक तेज, त्या तेजानें श्रीगुरूस ओंवाळूं व त्या सद्‌गुरुचरणांस तदाकारतेनें नेहमीं आलिंगन देऊं. ७. श्रीगुरूंच्या दोन्ही पायांत माझें शरीर व प्राण ( स्थूलशरीर व लिंगदेह ) या दोन खडावा करून घालूं व ऐहिक पारत्रिक भोग व मोक्ष हे श्रीगुरुचरणांवरून उतारा म्हणून ओंवाळून टाकूं. ८. ज्याच्या योगानें धर्म, अर्थ, काम व मोक्ष या सर्व पुरुषार्थांच्या सिंहासनावर राज्याभिषेक होतो, त्या देवास, या श्रीगुरूच्या चरणांच्या उपासनेनें आम्ही योग्य होऊं. ९. ज्या देवाच्या योगानें ब्रह्माच्या ठिकाणची विश्रांति मिळेपर्यंत ज्ञान उत्कर्षाला पावतें व जें देव या वाचेला अमृताचा समुद्र करतें; १०. कोट्यवधि पूर्णचंद्र वक्तृत्वावरून ओंवाळून टाकावे, अशी गोडी जें देव अक्षरांना आणतें; ११. ज्याप्रमाणें सूर्यानें पूर्व दिशेचा अंगीकार केला, म्हणजे ती दिशा जगाला प्रकाशाचें राज्य देते, त्याप्रमाणें ( ज्या देवाच्या योगानें ) वाचा श्रोत्यांना ज्ञानाची दिवाळी करते; १२. ज्या देवाच्या योगानें असें व्याख्यान स्फुरतें कीं, त्या व्याख्यानापुढें नादब्रह्म ठेंगणें होतें, ( फार काय सांगावें ! ) त्या व्याख्यानापुढें मोक्षसुद्धां तसा ( व्याख्यानासारखा ) शोभत नाहीं. १३. श्रवणसुखाच्या मांडवामध्यें सर्व जगाला वसंतऋतूचा उपभोग घेतां येईल, अशा प्रकारें व्याख्यानरूप वेली चांगली भरास येते; १४. ज्या देवाचा पत्ता लागत नाहीं, म्हणून मनासह वाचा परतते, असा जो देव, तो त्या दैववान् पुरुषाच्या शब्दाचा विषय होतो. ( शब्दानें त्याचें वर्णन त्याला करतां येतें. ) हें केवढें आश्चर्य आहे ! १५. जें ज्ञानाला कळत नाहीं व ध्यानासही सांपडत नाहीं, असें जें निर्विषय ब्रह्म, तें त्याच्या बोलण्यांत सांपडतें; १६. गुरूच्या चरणरूपी कमलांतील सुगंध ज्या वेळीं प्राप्त होतो, त्या वेळीं ( वर सांगितलेलें ) एवढें एक चांगलें भाग्य वाचेच्या ठिकाणीं येतें. १७. तर या संबंधानें फार काय सांगूं ! आज तें दैव माझ्याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं नाहीं, असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. १८. कारण कीं, मी श्रीगुरूचें तान्हें मूल आहें आणि माझे गुरु एकपुत्री आहेत ( म्हणजे माझ्या गुरूंना मी एकटाच मुलगा आहें ) म्हणून त्यांच्या त्या कृपेला मी एकटा ठिकाण झालों. १९. पहा, चातक पक्ष्याकरितां मेघ जसा आपल्यांतील सर्व पाण्याच्या सामुग्रीची वृष्टि करितो, त्याप्रमाणें सद्‌गुरूंनीं माझ्याकरितां केलें आहे. ( त्यांनीं आपल्या बोधाचा सर्व सांठा माझ्यांत ओतला. ) २०. म्हणून माझें रिकामें ( शास्त्र वगैरे न पढलेलें ) तोंड बडबड करूं गेलें, तों त्या बोलण्यांत गीतेसारखें, म्हणजे ब्रह्मरसानें भरलेलें, गोड शास्त्र सहज सांपडलें. २१. दैव जर अनुकूल झालें, तर वाळूची

आर्पेतें । तें वाळूचि रत्नें परते । उजू आयुष्य तें मारितें । लोभु करी ॥ २२ ॥ आधर्णी घातलिया हरळ । होती अमृताचे तांदुळ । जरी भुकेची राखे वेळ । जगन्नाथु ॥ २३ ॥ तयापरी श्रीगुरु । करिती जें अंगीकारु । तें होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥ २४ ॥ पाहा पां काई नारायणें । तया पांडवांचें उणें । कीजेचि ना पुराणें । विश्ववंद्यें ॥ २५ ॥ तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें माझें । आणिलें वोजे । ज्ञानाचिया ॥ २६ ॥ परि हें असो आतां । प्रेम रुळतसे बोलतां । कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेष असे ॥ २७ ॥ आतां तेणेंचि पसायें । तुम्हां संतांचें मी पायें । बोळगेन अभिप्रायें । गीतेचेनि ॥ २८ ॥ तरी तोचि प्रस्तुतीं । चौदाविया अध्यायाचां अंतीं । निर्णयो कैवल्यपती । ऐसा केला ॥ २९ ॥ जें ज्ञान जयाचां हातीं । तोचि समर्थु मुक्ती । जैसा शतमख संपत्ती । स्वर्गींचिये ॥ ३० ॥ कां शत एक जन्मां । जो जन्मोनि ब्रह्मकर्मा । करी तोचि ब्रह्मा । आनु नोहे ॥ ३१ ॥ नाना सूर्याचा प्रकाशु । लाहे जेवीं डोळसु । तेवीं ज्ञानेंचि सौरसु । मोक्षाचा तो ॥ ३२ ॥ तरी तया ज्ञानालागीं । कवणा पा योग्यता आंगीं । हें पाहतां जगीं । देखिला एकु ॥ ३३ ॥ जें पाताळींचेंही निधान । दावील कीर अंजन । परी होआवें लोचन । पायाळाचे ॥ ३४ ॥ तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन । परी तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥ तरी विरक्तीवांचूनि केहीं । ज्ञानासि तगणें नाहीं । हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ॥ ३६ ॥ आतां विरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी हेंहीं सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ॥ ३७ ॥ जे विषें रांधिली रससोये । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं तो ताटचि सांडूनि जाये । जयापरी ॥ ३८ ॥ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ॥ ३९ ॥ आतां अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकारमिषें । सांगिजत असे विशेषें । पंचदशीं ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाचः—ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् । छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

उपडिलें कवतिकें । झाड येरी मोहरा ठाके । तें वेगें जैसें सुके । तैसें हें नव्हे जाण ॥ ४१ ॥ याचि एकेपरी । रूपकाचिया कुसरी । सारीतसे वारी । संसाराची ॥ ४२ ॥ करूनि संसार वावो । स्वरूपीं अहंते ठावो । होआवया अध्यावो । पंधरावा हा ॥ ४३ ॥ आतां हेंचि आघवें । ग्रंथगर्भीचें चांगावें । उपलविजेल जीवें । आकर्णिजे ॥४४॥ तरी महानंदसमुद्र । जो पूर्णपूर्णिमाचंद्र । तो द्वारकेचा नरेंद्र । ऐसें म्हणे ॥४५॥ अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया घरा । करीतसे आडवारा । विश्वाभासु जो ॥ ४६॥ तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु । हा जाणें महातरु । थांवला असे ॥ ४७ ॥ परी येरां रुखांसारिखा । तळीं मूळें वरी शाखा । तैसा नोहे म्हणोनि

रलें होतात अथवा जर आयुष्य अनुकूल असलें, तर जीव घ्यावयास आलेलाही प्रेम करतो. २२. श्रीजगन्नाथाच्या मनांतून जर कोणाच्या भुकेची वेळ निभावून न्यावी असें आलें, तर आधणांत घातलेले वाळूचे खडेही अमृताचे तांदूळ बनतात. २३. त्याप्रमाणें श्रीगुरु जेव्हां एखाद्याचा अंगीकार करितात, तेव्हां त्याचें सर्व जीवित सुखमय होऊन राहातें. २४. असें पाहा कीं, त्या पांडवांच्या ठिकाणीं कित्येक प्रकारचीं वैगुण्यें असतांही, जगास पूज्य अशीं त्यांचीं ( त्या पांडवांच्या वैगुण्याचीं ) पुराणें श्रीकृष्णांनीं करून टाकिलीं नाहींत काय? २५. त्याप्रमाणें श्रीनिवृत्तिनाथांनीं माझें अज्ञानपण ज्ञानाच्या योग्यतेस आणलें. २६. पण आतां हें गुरुकृपेचें वर्णन राहूं द्या; कारण कीं, त्या वर्णनानें गुरुविषयींचें शुद्ध प्रेम मलिन होतें. श्रीगुरूचें महत्त्व वर्णन करणारें ज्ञान कोठें आहे? २७. आतां त्याच श्रीगुरूच्या प्रसन्नतेच्या जोरावर गीतेचें हृद्गत सांगण्याचे साधनानें, मी (ज्ञानदेव) तुम्हां संतांच्या चरणांची सेवा करीन. २८. तर आतां तोच अभिप्राय ( ऐका ) कीं, मोक्षाचे स्वामी जे श्रीकृष्ण परमात्मा, त्यांनीं चौदाव्या अध्यायाच्या शेवटीं असा सिद्धांत केला. २९. कीं, ज्याप्रमाणें शंभर यज्ञ केलेला पुरुष स्वर्गाचें ऐश्वर्य ( इंद्रपद ) मिळविण्यास समर्थ होतो, त्याप्रमाणें ज्ञान ज्याच्या हस्तगत झालेलें आहे, तोच मोक्ष मिळविण्यास समर्थ होतो. ३०. अथवा लागोपाठ शंभर ब्राह्मणजन्म प्राप्त होऊन त्या त्या जन्मांत जो ब्रह्मकर्म करतो, तोच काय तो ब्रह्मदेव होतो, दुसरा कोणी होत नाहीं. ३१. अथवा ज्याप्रमाणें डोळसालाच सूर्यप्रकाशाचा लाभ घेतां येतो, त्याप्रमाणें ज्ञानानेंच ( ज्ञानी पुरुषाला ) मोक्षाची योग्यता प्राप्त होते. ३२. तर त्या ज्ञानाकरितां कोणाच्या अंगांत योग्यता आहे, याचा विचार करतां, तशी योग्यता असणारा जगांत एक नजरेस पडला. ३३. हें जमिनींत खोल पुरलेलें देखील द्रव्य निश्चयेंकरून दाखवील, परंतु तें द्रव्यांजन घालण्यास पायाळाचे डोळे पाहिजेत. ३४. त्याप्रमाणें ज्ञान मोक्ष देईल, यांत खरोखर अन्यथा नाहीं, पण तें ज्ञान टिकेल, असें मन शुद्ध पाहिजे. ३५. तर वैराग्यावांचून कोठेंही ज्ञान टिकावयाचें नाहीं, हें देवानें आपल्याशीं विचार करून ठेवलें आहे. ३६. आतां वैराग्याचा असा कोणता प्रकार आहे कीं, जो आपण होऊन येऊन मुमुक्षूच्या मनाला माळ घालील? हें देखील सर्व जाणणाऱ्या श्रीहरीनें विचार करून पाहिलें आहे. ३७. ज्याप्रमाणें विष घालून तयार केलेलें अन्न जेव्हां जेवणारास माहीत होतें, तेव्हां तो जसा त्याच्यापुढें असलेलें अन्न वाढलेलें पात्रच टाकून निघून जातो, ३८ त्याप्रमाणें या सर्व संसाराला अनित्यता आहे, असें ज्या वेळेला कळेल, त्या वेळीं वैराग्याला घालवून दिलें तरी, तें वैराग्य आपण होऊन साधकाच्या पाठीमागें लागेल. ३९. आतां या संसाराला क्षणभंगुरपणा कसा आहे, तेंच वृक्षाच्या रूपकानें जगाचे स्वामी श्रीकृष्ण परमात्मा पंधराव्या अध्यायांत सांगतात. ४०.

श्रीकृष्ण म्हणाले, ज्याचें मूळ ऊर्ध्व आहे, ज्याच्या शाखा खालीं आहेत, जो विनाशी ( अश्वत्थ=दुसऱ्या दिवसापर्यंत देखील न टिकणारा ) आहे, तरी ज्याला अविनाशी ( अव्यय ) असें ( सामान्य जन ) म्हणतात, वेद ज्याचीं पानें आहेत, असा जो प्रपंचरूपी वृक्ष, त्याला जाणणारा ( या वृक्षाला मूलकारण परम पुरुष असून वृक्षरूपी विस्तार ही माया आहे व त्यापासून वस्तुतः भिन्न नाही असें जाणणारा ) तो खरा वेदवेत्ता (अथवा ज्ञानी) होय. १.

सहज उमळून पडलेलें झाड, शेंडा खालीं व बुड वर असें पडलें असतां, तें जसें लवकर सुकतें, त्याप्रमाणें हा संसारवृक्ष नाहीं, असें समज. ४१. याच एका प्रकारच्या ( म्हणजे संसार हाच कोणी एक, बुड वर व शेंडा खालीं असलेला, वृक्ष आहे अशा ) रूपकाच्या चातुर्यानें ( भगवान ) जन्ममृत्युरूपी संसाराची येरझार संपवितात. ४२. संसाराचें मिथ्यात्व दाखवून, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं ( जिवाच्या ) अहंतेचें ठिकाण होण्याकरितां हा पंधरावा अध्याय आहे. ४३. आतां हेच ग्रंथांतील सर्व चांगले सिद्धांत विस्तारानें स्पष्ट सांगण्यांत येतील, ते तुम्हीं ( श्रोत्यांनीं ) मन लावून ऐकावे. ४४. तर ब्रह्मानंदाचा समुद्र, पूर्ण पौर्णिमेचा ( राका पौर्णिमेचा ) चंद्र व द्वारकेचा राजा, जो भगवान् श्रीकृष्ण परमात्मा, तो असें म्हणाला. ४५. अरे, बाबा अर्जुना, आपण आपल्या स्वरूपाच्या घराकडे येत असतांना, जें विश्वरूपी दृश्य मध्यें अडथळा करतें. ४६. तें हें विश्वरूपी दृश्य हा संसार नाहीं, तर हा एक प्रकारचा मोठा वाढलेला वृक्ष आहे, असें समज. ४७. परंतु इतर सामान्य वृक्षासारखा, खालीं मुळें व वर फांद्या

लेखा । नये कवणा ॥ ४८ ॥ आगी कां कुन्हाडी । होय रिगावा जरी बुडीं । तरी हो कां भलतेवढी । वरिचील वाढी ॥ ४९ ॥ जे तुटलिया मूळापाशीं । उलंडेल कां शाखांशीं । परी तैशी गोठी कायशी । हा सोपा नव्हे ॥ ५० ॥ अर्जुना हें कवतिक । सांगतां असे अलौकिक । जे वाढी अधोमुख । रुखा यया ॥ ५१ ॥ जैसा भानु उंची नेणो कें । रश्मिजाळ तळीं फांके । संसार हें कावरुखें । झाड तैसें ॥ ५२ ॥ आणि आथी नाथी तितुकें । रुंधलें असें येणेंचि एकें । कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥ कां रवीचां अस्तमानीं । आंधारेनि कोंदे रजनी । तैसा हाचि गगनीं । मांडला असे ॥ ५४ ॥ यया फळ ना चुंबितां । फूल ना तुरंबितां । जें कांहीं पंडुसुता । तें रुखुचि हा ॥ ५५ ॥ हा ऊर्ध्वमूळ आहे । परी उन्मूळिला नोहे । येणेंचि हा होये । शाड्वळु गा ॥ ५६ ॥ आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगदिलें कीर असे । परी अधींही असोसें । मूळें यया ॥ ५७ ॥ पैं वल्वचेचि महामारी । पिंपळा कां वडाचिया परी । जे पारंबियांमाझारीं । डहाळिया असती ॥ ५८ ॥ तेवींचि गा धनंजया । संसारतरु यया । अधींचि आथी खांदिया । हेंही नाहीं ॥ ५९ ॥ तरी ऊर्ध्वाहीकडे । शाखांचे मांदोडे । दिसताति अपाडें । सासिन्नले ॥ ६० ॥ जालें गगनाचि पां वेलीये । कां वारा मांडला रुखाचेनि आयें । नाना अवस्थात्रयें । उदयला असे ॥ ६१ ॥ ऐसा हा एकु । विश्वाकार विटंकु । उदयला जाण रुखु । ऊर्ध्वमूळु ॥ ६२ ॥ आतां ऊर्ध्व या कवण । येथें मूळ तें किं लक्षण । कां अधोमुखपण । शाखा कैसिया ॥ ६३ ॥ अथवा द्रुमा यया । अधीं जिया मूळिया । तिया कोण कैसिया । ऊर्ध्व शाखा ॥ ६४ ॥ आणि अश्वत्थु हा ऐसी । प्रसिद्धि कायसी । आत्मविदविलासीं । निर्णयो केला ॥ ६५ ॥ हें आघवेंचि बरवें । तुझिये प्रतीतीसि फावे । तैसेनि सांगों सोलिवें । विन्यासें गा ॥ ६६ ॥ परी ऐकें गा सुभगा । हा प्रसंगु असे तुजाचि जोगा । कानचि करी हो सर्वांगा । हियें आथिलिया ॥ ६७ ॥ ऐसें प्रेमरसें सुरफुरें । बोलिलें जंव यादववरें । तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जालें ॥ ६८ ॥ देव निरुपिती तें थेंकुलें । येवढें श्रोतेपण फांकलें । जैसें आकाश खेंव पसरिलें । दाहीं दिशीं ॥ ६९ ॥ श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा । म्हणौनि घोंटु भरों पाहे एकसरा । अवघेयाचा ॥ ७० ॥ ऐसी सोय सांडूनि खवळिली । आवडी अर्जुनीं देवें देखिली । तेथ जालेनि सुखें केली । कुरवंडी तया ॥ ७१ ॥ मग म्हणे धनंजया । तें ऊर्ध्व गा तरू यया । येणें रुखेंचि कां जया । ऊर्ध्वता गमे ॥ ७२ ॥ एऱ्हवीं मध्य ऊर्ध्व अध । हे नाहीं जेथ भेद । अद्वयासीं एकवद । जया ठायीं ॥ ७३ ॥ जो नाइकिजतां नादु । जो असौरभ्य मकरंदु । जो आंगाथिला आनंदु । सुरतेंविण ॥ ७४ ॥ जया जें आऱ्हां परौतें । जया जें पुढें मागौतें । दिसतेनविण दिसते । अदृश्य जें ॥ ७५ ॥ उपाधीचा दुसरा । घालितां वोपसरा ।

असलेला असा, हा वृक्ष नाहीं, म्हणून याचा कोणाला अंत लागत नाहीं. ४८. जर ( इतर वृक्षाप्रमाणें याच्या) बुडाशीं अग्नि अथवा कुऱ्हाड यांचा प्रवेश झाला असता, तर वरचा विस्तार केवढा का असेना ? ४९. तरी (इतर) वृक्ष जसा मुळाशीं तुटला असतां फांद्यांसह उमळून पडतो, तसा हा पडला असता; पण या संसारवृक्षाची तसली गोष्ट कोठली ? म्हणून हा सोपा नाहीं. ५०. अर्जुना, या संसारवृक्षाचें आश्चर्य सांगावयास लागलें तर लोकोत्तर आहे. कारण कीं, या संसारवृक्षाची वाढ खालीं आहे. ५१. ज्याप्रमाणें, सूर्य किती उंच आहे हें कळत नाहीं, परंतु त्याचा किरणसमुदाय खालीं पसरतो, तसा हा संसारवृक्ष आश्चर्यकारक आहे. ५२. ज्याप्रमाणें प्रळयकाळच्या उदकानें आकाश व्यापलें जातें, त्याप्रमाणें जितकें म्हणून आहे व नाहीं, तेवढें या एकट्या संसारवृक्षानें अडविलें ( व्यापलें ) आहे. ५३. अथवा सूर्याचा अस्त झाला म्हणजे जशी रात्र अंधारानें व्यापून जाते, त्याप्रमाणें ह्याच एका वृक्षानें आकाश व्यापलें आहे. ५४. अर्जुना, या संसारवृक्षाचें फळ खाण्याकरितां पाहूं गेलें, तर याला फळ नाहीं; व वास घेण्याकरितां फूल पाहूं गेलें, तर याला फूल नाहीं मग जें कांहीं आहे, तें हा वृक्षच आहे. ५५. हा ( संसारवृक्ष ) वर मूळ असलेला आहे, परंतु हा उपटून पडलेला नाहीं. याचकारणानें अर्जुना, हा ( नेहमीं ) हिरवागार आहे. ५६. आणि हा संसारवृक्ष वर मूळ असलेला आहे, असें सांगितलें खरें; परंतु याला खालींही पुष्कळ मुळें आहेत. ५७ झपाट्यानें वाढणाऱ्या लव्हाळ्याच्या गवताप्रमाणें ( जो आहे. ) तसाच पिंपळाप्रमाणें अथवा वडाच्या वृक्षाप्रमाणें हा संसारवृक्ष आहे. कारण कीं, पिंपळाप्रमाणें अथवा वडाप्रमाणें याच्या पारंब्यांमध्यें डहाळ्या आहेत. ५८. त्याचप्रमाणें अर्जुना, या संसारवृक्षाला खालींच फांद्या आहेत असेंही नाहीं. ५९. तर वरच्याही बाजूस ( या संसारवृक्षाला ) फांद्यांचे पुष्कळ समुदाय विस्तारलेले दिसतात. ६०. हा संसारवृक्ष म्हटला म्हणजे आकाशच जणूंकाय वेलाच्या रूपानें नटलें आहे अथवा ( संसार ) वृक्षाच्या आकारानें वारा विस्तारला आहे किंवा या ( संसार ) वृक्षाच्या रूपानें अवस्थात्रयानें उदय केला आहे. ६१. असा हा एक वर मूळ असलेला विश्वाकार वृक्ष घनदाट उगवलेला आहे, असें समज. ६२. आतां या संसारवृक्षाचा वरचा



भाग काय आहे ? संसारवृक्षाचें जें मूळ आहे, त्याचें लक्षण काय आहे ? याचा खालीं वाढण्याचा कां स्वभाव आहे ? व याच्या फांद्या कशा आहेत ? ६३. अथवा या वृक्षाला खालीं ज्या मुळ्या आहेत, त्या कोणत्या व वरच्या शाखा कोणत्या व कशा आहेत ? ६४. आणि याची अश्वत्थ अशी प्रसिद्धि ( कशाकरितां ) आहे ? आणि आत्मज्ञानी लोकांनीं या अश्वत्थाबद्दल जो कांहीं निर्णय केला आहे, ६५. अर्जुना, या सर्व गोष्टी तुझ्या चांगल्या अनुभवाला येतील, तशा निर्मळ खुलाशानें तुला सांगूं. ६६. परंतु हे भाग्यवान् अर्जुना, ऐक. हा विषय श्रवण करण्यास तूंच योग्य आहेस ( म्हणून ) हे अंतःकरणसंपन्न अर्जुना, तूं आपल्या सर्व अंगास कानच कर. ६७. तेव्हां श्रीकृष्णपरमात्म्यांनीं प्रेमरसाच्या अतिशय भरानें असें भाषण केलें, तेव्हां अर्जुनाच्या आकारानें अवधान प्रगट झालें. ६८. आकाश एवढें अपरिमित असून, त्यास जरें दाही दिशांनीं कवटाळलें आहे, त्याप्रमाणें श्रीकृष्णाचें बोलणें व्यापक असतांही, तें अर्जुनाच्या अवधानापुढें अगदीं अल्प असें झालें, इतकें अर्जुनाचें अवधान वाढलें. ६९. श्रीकृष्णाच्या निरूपणरूप समुद्रास ( गट्ट करणारा ) अर्जुन हा दुसरा अगस्ति ऋषीच उत्पन्न झाला; म्हणून तो श्रीकृष्णाच्या संपूर्ण निरूपणाचा एकदम घोट घेण्यास पाहूं लागला. ७०. श्रीकृष्णानें याप्रमाणें अर्जुनाच्या ठिकाणीं ( श्रवणाविषयीं ) अमर्याद आवड उत्पन्न झालेली पाहिली; तेव्हां त्यास ( श्रीकृष्णास ) जें सुख झालें, त्या सुखाची त्यांनीं अर्जुनावरून ओंवाळणी केली. ७१. मग भगवान् म्हणतात, हे अर्जुना, या संसारवृक्षाला ब्रह्म हें ऊर्ध्व ( वर ) आहे आणि ब्रह्माच्या ठिकाणीं ऊर्ध्वपणा ( खालीं असलेल्या या ) संसारवृक्षामुळेंच वाटत आहे; ७२. वास्तविक विचार केला तर, ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं वरील, मधला व खालचा असे भेद नाहींत; फार काय सांगावें ! ज्याच्या ठिकाणीं दुसरें नाहीं, अशाविषयीं एकवाक्यता आहे; ७३. जो कानाला विषय न होणारा नाद व नाकानें सुवास न घेतां येण्यासारखा मकरंद आणि जो मैथुनादि साधनाशिवाय असलेला मूर्तिमंत आनंद होय; ७४. ज्याला जें अलीकडे व पलीकडे आहे, ज्याला जें पुढें व मागें आहे व पाहणाऱ्यावांचून जें पाहणें आहे व स्वभावतः इंद्रियांना जें अगोचर आहे; ७५. ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं मायोपाधीचा दुसरा

नामरूपाचा संसारा । होय जयातें ॥ ७६ ॥ ज्ञातृज्ञेयाविहीन । तुसधोंचि जें ज्ञान । सुखा भरलें गगन । गाळींव जें ॥ ७७ ॥ जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण । आपणयां जें जाण । आपणाचि ॥ ७८ ॥ ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें । तेथ आर घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥ ७९ ॥ तरी माया ऐसी ख्याती । नसतीच यया आथी । कां वांझेची संतती । वानणें जैशी ॥ ८० ॥ तैसी सत् ना असत् होये । जे विचाराचें नाम न साहे । ऐसेया परीची आहे । अनादि म्हणती ॥ ८१ ॥ जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचाची भूमिका । विपरीतज्ञानदीपिका । सांचली जे ॥ ८२ ॥ जे नानाशक्तींची मांदुस । जे जगदभ्राचें आकाश । जे आकारजाताचें दुस । घडी केलें ॥ ८३ ॥ ते माया वस्तूचां ठायीं । असे जैसेनि नाहीं । मग वस्तुप्रभाचि पाही । प्रगट होय ॥ ८४ ॥ जेव्हां आपणया आली निद । करी आपणपें जेवीं मुग्ध । कां काजळी आणी मंद । प्रभा दीपीं ॥ ८५ ॥ स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवऊनि वेगीं । आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकाम करी ॥ ८६ ॥ तैसी स्वरूपीं जाली माया । आणी स्वाश्रयीं नेणणे धनंजया । तेंचि रुखा यया । मूळ पहिलें ॥ ८७ ॥ वस्तूसी आपुला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आठुळैजे कंदु । वेदांतींही हाचि प्रसिध्दु । बीजभावो ॥ ८८ ॥ घन अज्ञान-सुषुप्ती । तो बीजांकुरभावो म्हणती । येर स्वप्न हन जागृती । हा फळभावो तयाचा ॥ ८९ ॥ ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीती । परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ॥ ९० ॥ तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें । अधोर्ध्व सूचिती मूळें । बाळिया बांधोनि आळें । मायायोगाचें ॥ ९१ ॥ मग आधिलीं सदेहांतेंरें । उठती जियें अपारें । तें चौपासि घेऊनि आगारें । खोलावती ॥ ९२ ॥ ऐसें भवद्रुमाचें मूळ । हें ऊर्ध्वीं करी बळ । मग आणियांचें बेंचळ । अधीं दावी ॥ ९३ ॥ तेथ चिद्रुचीं पहिलें । महत्तत्त्व उमललें । तें पान वाल्हेंदुल्हें । एक निघे ॥ ९४ ॥ मग सत्त्वरजतमात्मकु । त्रिविध अहंकारु जो एकु । तो तिवणा अधोमुखु । डिरु फुटे ॥ ९५ ॥ तो बुद्धीची घेऊनि आगारी । भेदाची वृद्धि करी । तेथें मनाचें डाळ धरी । साजेपणें ॥ ९६ ॥ ऐसा मूळाचिया गाढिका । विकल्परस कोंवळिका । चित्तचतुष्टय डाहाळिका । कोंभैजेतो ॥ ९७ ॥ मग आकाश वायु द्योतक । आप पृथ्वी हे पांच फोंक । महाभूतांचे सारोख । सरळे होती ॥ ९८ ॥ तैसींचि श्रोत्रादि तन्मात्रें । तियें अंगवसां गर्भपत्रें । लुव्लुलितें विचित्रें । उमळती गा ॥ ९९ ॥ तेथ शब्दांकुर वरिपडी । श्रोत्रा वाढी दे्व्हडी । होता करित कांडीं । आकांक्षेचीं ॥ १०० ॥ अंगत्वचेचे वेलपल्लव । स्पर्शांकुरीं घेती धांव । तेथ बांबळ पडे अभिनव । विकारांचें ॥ १ ॥ पाठीं रूपपत्र पेलोवेलीं । चक्षु लांब तें कांडें घाली । तेथ व्यामोहता भली । पाहाळीं जाय ॥ २ ॥ आणि रसाचें आंगवसें । वाढतां वेगें बहुवसें । जिव्हे आर्तीची

संबंध कल्पिला असतां, नामरूपाचा व्यवहार होतो; ७६. जें ब्रह्म, ज्ञाता आणि ज्ञेय यांवाचून, केवळ ज्ञानमात्र आहे आणि जें ब्रह्म आकाशांतून गाळलेलें ( आकाशापेक्षां सूक्ष्म) असून, जें सुखानें भरलेलें आहे;७७. जें कोणाचें कार्य नाहीं व जें कोणाचें कारणही नाहीं, ज्याला कोणी दुसरें नाहीं व दुसऱ्याचे अपेक्षेनें येणारा एकपणाही त्याच्या ठिकाणीं नाहीं, जें आपणच आपल्याला आहे, असें समज; ७८. अशी जी सत्यवस्तु ( ब्रह्मवस्तु ), ती या संसारवृक्षाचें ऊर्ध्व आहे. तिचे ठिकाणीं संसारवृक्षाच्या मुळाचे अंकुर निघाले, तें असें आहे. ( तो प्रकार पुढीलप्रमाणें आहे ) ७९. तर या संसारवृक्षाच्या मुळाची माया म्हणून जी प्रसिद्धि आहे, ती नसलेलीच आलेली आहे किंवा ज्याप्रमाणें वांझेच्या संततीचें वर्णन करणें, हें केवळ नुसते शब्द आहेत; ८०. त्याप्रमाणें जी ( माया ) 'आहे' म्हणतां येत नाहीं व 'नाहीं' म्हणतां येत नाहीं. ( कारण 'आहे' म्हणावें तर विचारानें तिचा बाध होतो; बरें 'नाहीं' म्हणावें, तर जगत्कार्यांवरून ती असावी, असें तिचें अनुमान करतां येतें. ) जिला विचाराचें नांव सहन होत नाहीं, अशा प्रकारची ती आहे व तिला अनादि ( आरंभरहित ) असें म्हणतात. ८१. जी माया संसारवृक्षाचें बीज आहे व जी माया प्रपंचरूपवृक्षाची जमीन आहे व जी माया विपरीतज्ञानास प्रकाशन करणारी प्रज्वलित मशाल आहे. ८२. जी ( माया ) अनेक शक्तींची पेटी आहे, जी माया जगद्रूपी ढग येण्याचें आकाश आहे अथवा जी माया संपूर्ण विश्वाकाररूपी वस्त्राची घडी केलेली आहे. ८३. ती माया ब्रह्माच्या ठिकाणीं, जशी नाहीं, अशी आहे. मग वस्तूचा प्रकाशच ( जगद्रूपानें ) प्रगट होतो. ८४. जेव्हां आपल्याला झोंप येते, तेव्हां ती आपल्याला जशी मूढ करते; अथवा दिव्याच्या ज्योतीच्या ठिकाणीं काजळी वाढली असतां ती काजळी ( जशी ) दिव्याचा प्रकाश मंद करते ८५. स्वप्नांत आपल्या नवऱ्यापुढें निजलेली तरुण स्त्री, स्वप्नांतच नवऱ्याला जागें करून, त्याला खरेंखरें आलिंगन दिल्याशिवाय, स्वप्नांतच आलिंगन देऊन, त्याला खरोखर सकाम करते; ८६. त्याप्रमाणें स्वरूपाच्या ठिकाणीं झालेली माया, आपला आश्रय जें स्वरूप, त्याच्या ठिकाणीं नेणणें ( अज्ञान ) आणते, तेंच या संसारवृक्षाला पहिलें मूळ आहे. ८७. ब्रह्मवस्तूला जें आपलें अज्ञान आहे, तेंच या संसारवृक्षाचा, ब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं बांधला गेलेला, कांदा आहे आणि वेदांतांतही यालाच बीजभाव असें प्रसिद्ध नांव आहे. ८८. पूर्ण अज्ञान अशी जी निद्रावस्था, तिला वस्तूच्या अबोधरूपी बीजाची अंकुरअवस्था असें म्हणतात व इतर ज्या दोन जागृति व स्वप्न अवस्था आहेत, त्यांस त्या सुषुप्तिरूपी अंकुराची फळअवस्था असें म्हणतात. ८९. वेदांतांमध्यें प्रतिपादन करावयाच्या भाषेत, या संज्ञांना वरीलप्रमाणें प्रसिद्धी आहे, परंतु तें राहू दे. या सर्वांस कारण अज्ञान आहे. ९०. त्या उपाधिरहित व सर्वांचे पलीकडे असलेल्या चैतन्याचे ठिकाणीं, मायेचा दृढ संबंध होणें, हें आळें तयार होऊन, त्यांतील मूळें संसारवृक्षाचा खालचा व वरचा भाग दाखवितात. ९१. मग अपार असे निरनिराळे देह खालीं चोहींकडे अंकुर घेऊन खोल जातात. ९२. असें जें संसारवृक्षाचें मूळ ( माया ), तें वरच्या बाजूस ( ब्रह्माच्या ठिकाणीं ) बळ बांधण्यास लागलें, म्हणजे मग अधाचे जुंबाडेच्या जुंबाडे खालीं येतात. ९३. त्या जुंबाडांत, चिद्वृत्ति म्हणजे जी माया, त्या मायेपासून, पहिल्याप्रथम, महत्तत्त्व हेंच काय तें एक उमललेलें कोंवळें लुसलुशीत पान निघतें. ९४. मग त्या पानास, सत्त्वरजतमात्मक जो तीन प्रकारचा अहंकार आहे, तोच खालीं मुख असलेला असा तीन पानांचा एक देंठा फुटतो. ९५. तो ( त्रिगुणात्मक अहंकार ) सत्त्वापासून उत्पन्न होणाऱ्या बुद्धीचे देंठे घेऊन भेदाची वृद्धि करतो, तेव्हां टवटवीत अशी मनाची डहाळी वाढावयास लागते. ९६. याप्रमाणें मुळाच्या दृढतेबरोबर विकल्परूपी रसाच्या कोंवळेपणानें भरलेल्या अशा, मन, बुद्धि, चित्त, अहंकाररूपी लहान लहान फांद्या, या त्रिगुणात्मक अहंकारांत फुटतात. ९७. मग ( तामस अहंकारापासून उत्पन्न होणाऱ्या ) आकाश, वायु, तेज, उदक व पृथ्वी, या पंचमहाभूतांचे फोक सरळ जोरानें फुटतात. ९८. त्याचप्रमाणें श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियें व सूक्ष्म विषय, तीं ढगळ्यांचे शेवटास असलेलीं पूर्णपणें न उमललेलीं लुसलुशीत व एकासारखीं एक नसलेलीं पानें व्यक्त होतात. ९९. तेव्हां शब्दांकुरापर्यंत श्रोत्राची मोठी वाढ होत असतां श्रोत्रेंद्रिय हें विषयविषयींच्या आशेचें कांडें तयार करतें. १००. शरीरांतील त्वगिंद्रियाचे वेल आणि पानें स्पर्शांकुरापर्यंत धांव घेतात. त्यावेळीं नव्या नव्या विकारांची पुष्कळ वृद्धि होते. १०१. नंतर रूपविषयाचीं पानें वाढलीं असतां तेथपर्यंत चक्षुइंद्रिय लांबलचक कांडें घालतें. त्यावेळीं भ्रमाचा चांगला विस्तार होतो. १०२. आणि रसविषयरूपी ढगळे फार वेगानें वाढले

असोसें । निघती बेंचें ॥ ३ ॥ तैसेंचि कोंभेलेनि गंधें । घ्राणाची डिरी थांवु बांधे । तेथ तळु घे स्वानंदें । प्रलोभाचा ॥ ४ ॥ एवं महदहंबुद्धी । मनें महाभूतसमृद्धि । इया संसाराचिया अवधि । सासनिजे ॥ ५ ॥ किंबहुना इहीं आठें । आंगीं हा अधिक फांटे । परी शिंपीचि येवढें उमटे । रुपें जेवीं ॥ ६ ॥ कां समुद्राचेनि पैसारें । वरी तरंगता असारे । तैसें ब्रह्मचि होय वृक्षाकारें । अज्ञानमूळ ॥ ७ ॥ आतां याचा हाचि विस्तारु । हाचि यया पैसारु । जैसा आपणपें स्वप्नीं परिवारु । येकाकिया ॥ ८ ॥ परी तें असो हें ऐसें । कावरें झाड उससे । यया महदादि आरवसें । अधोशाखा ॥ ९ ॥ आणि अश्वत्थु ऐसें ययातें । म्हणती जे जाणते । तेंही परिस हो येथें । सांगिजेल ॥ ११० ॥ तरी श्वः म्हणिजे उखा । तोंवरि एकसारिखा । नाहीं निर्वाहो यया रुखा । प्रपंचरूपा ॥ ११ ॥ जैसा न लोटतां क्षणु । मेघु होय नानावर्णु । कां विजु नसे संपूर्णु । निमेषभरी ॥ १२ ॥ ना कांपतया पद्मदळा । वरीलिया बैसका नाहीं जळा । कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें ॥ १३ ॥ तैसीचि ययाची स्थिती । नासत जाय क्षणक्षणाप्रती । म्हणौनि ययातें म्हणती । अश्वत्थु हा ॥ १४ ॥ आणि अश्वत्थु येणें नांवें । पिंपळु म्हणती स्वभावें । परी तो अभिप्रावो नव्हे । श्रीहरीचा ॥ १५ ॥ एऱ्हवीं पिंपळु घडतां विखीं । मियां गति देखिली असे निकी । परी तें असो काय लौकिकीं । हेतु काज ॥ १६ ॥ म्हणौनि हा प्रस्तुतु । अलौकिकु परियेसा ग्रंथु । तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थु । बोलिजे हा ॥ १७ ॥ आणीकही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु । आथी परी तो भीतरु । ऐसा असे ॥ १८ ॥ जैसा मेघांचेनि तोंडें । सिंधु एके आंगें काढे । आणि नदी येरीकडे । भरितीचि असती ॥ १९ ॥ तेथ वोहटे ना चढे । ऐसा परिपूर्णुचि आवडे । परी ते कुली जंव तुघडे । मेघांनदींची ॥ १२० ॥ ऐसें या रुखाचें होणेंजाणें । न तर्के होतेनि वहिलेपणें । म्हणौनि लोकु यातें म्हणे । अव्ययु हा ॥ २१ ॥ एऱ्हवीं दानशीळु पुरुषु । वेंचकपणेंचि संचकु । तैसा व्ययेंही हा रुखु । अव्ययो गमे ॥ २२ ॥ जातां वेगें बहुवसें । न वचे कां भूमी रुतलें असे । रथाचें चक्र दिसे । जिया परी ॥ २३ ॥ तैसें काळातिक्रमें जे वाळे । ते भूतशाखा जेथ गळे । तेथ कोडीवरी उमाळे । उठती आणिक ॥ २४ ॥ परी येकी केधवां गेली । शाखाकोडी केधवां जाली । हें नेणवे जेवीं उमललीं । आषाढअभ्रें ॥ २५ ॥ महाकल्पाचां शेवटीं । उदेलिया उमळती सृष्टी । तैसींचि आणिखीचें दांग उठी । सासिन्नलें ॥ २६ ॥ संहारवातें प्रचंडें । पडती प्रळयांतींचीं सालडें । तंव कल्पादीचीं ज़ुंबाडें । पाल्हेजती ॥ २७ ॥ रिगे मन्वंतर मनूपुढें । वंशावरी वंशांचें मांडे । जैसी इक्षुवृद्धी कांडेंनकांडें ।

असतां, जिव्हेला इच्छेचीं अतिशय पानांत पानें फुटतात. १०३. त्याचप्रमाणें गंधविषयरूप अंकुराची वाढ होण्यास लागली म्हणजे, घ्राणेंद्रियाचा शेंडा बळ बांधण्यास लागतो; तेव्हां घ्राणेंद्रिय आनंदानें अतिशय लोभाचा तळ घेतें, म्हणजे घ्राणेंद्रियास गंधाचा अतिशय लोभ सुटतो. १०४. याप्रमाणें महत्तत्त्वापासून उत्पन्न झालेला अहंकार, बुद्धि, मन व पंचमहाभूतांचा समुदाय ही सर्व संसाराची मर्यादा तयार होते. १०५. फार काय सांगावें! या आठ अंगानीं हा संसारवृक्ष अधिक वाढतो. परंतु (हा संसार किती वाढला तरी, त्याचें अधिष्ठान जें ब्रह्म, त्याच्यापेक्षां अधिक वाढत नाहीं.) जसें शिंपीवर भासणारें रुपें, हें आपलें अधिष्ठान जी शिंप, तेवढेंच भासतें. १०६. अथवा समुद्राच्या विस्ताराइतका त्यावर लाटपणा पसरतो; त्याप्रमाणें ब्रह्मच, अज्ञानमूळ असलेल्या संसारवृक्षाच्या आकारानें होतें. १०७. जसा एकादा पुरुष स्वप्नांत आपण एकटाच आपला सर्व परिवार होतो, त्याप्रमाणें एकाकी जें ब्रह्म, त्याचा सर्व विस्तार हाच संसारवृक्ष आहे व त्याचा सर्व अवकाश हाच आहे. १०८. परंतु हें वरील वर्णन करणें राहूं दे. अशा या तऱ्हेनें हा भ्रमात्मक संसारवृक्ष वाढत असून, महत्तत्त्वादिकांच्या अंकुरापासून यास खालीं फांद्या उत्पन्न होतात. १०९. आणि ज्ञाते पुरुष याला 'अश्वत्थ' असें म्हणतात, (त्याचें कारण काय?) तेंही येथें सांगण्यांत येईल; ऐक. ११०. तर श्वः म्हणजे उद्यां, तोंपर्यंत या प्रपंचरूप वृक्षाला एकसारखें टिकणें नाहीं (म्हणून याला अश्वत्थ असें म्हणतात.) १११. त्याप्रमाणें एक क्षण लोटला नाहीं तोंच, मेघ नाना रंगांचा होतो, अथवा वीज ही एक पूर्ण निमिषभर देखील टिकत नाहीं, ११२. अथवा हलणाऱ्या कमळाच्या पाकळीवरील पाण्याच्या थेंबाला जशी स्थिरता नाहीं अथवा व्याकुळ माणसाच्या चित्ताला जशी स्थिरता नसते; ११३. त्याप्रमाणेंच या संसारवृक्षाची स्थिति आहे; म्हणजे हा प्रतिक्षणाला नाश पावतो, म्हणून याला (ज्ञाते लोक) अश्वत्थ असें म्हणतात. ११४. आणि अश्वत्थ या नांवानें स्वभावतः पिंपळ असें म्हणतात, परंतु भगवंताचा तो (अश्वत्थ म्हणजे पिंपळ म्हणण्याचा) अभिप्राय नाहीं. ११५. एऱ्हवीं पिंपळ या अर्थानें संसाराला भगवंतांनीं अश्वत्थ ही उपमा दिली असती, तरीसुद्धां ती मला चांगली पटली असती. परंतु तें राहूं द्या. आपल्याला लौकिकार्थाशीं काय करावयाचें आहे? (भगवंताच्या हेतूशीं आपलें काम आहे.) ११६. म्हणून आतां (या संसारवृक्षासंबंधीं) अलौकिक व्याख्यान ऐका. तर या वृक्षास क्षणभंगुरतेच्याच दृष्टीनें शास्त्रांत अश्वत्थ असें म्हटलें जातें. ११७. आणखीं एक याच्या अविनाशपणाबद्दल मोठी प्रसिद्धि आहे. परंतु तो अविनाशपणा आंतून असा आहे. ११८. त्याप्रमाणें मेघांच्या मुखांनीं समुद्र एका बाजूनें उपसला जातो आणि दुसऱ्या बाजूनें नद्या त्यास भरीतच असतात. ११९. त्यायोगानें तो (समुद्र) कमी अथवा जास्त होत नाहीं, असा परिपूर्णच आहे, असा वाटतो; परंतु त्याचें तें परिपूर्णत्व, मेघाचा आणि नदीचा त्याच्याशीं (समुद्राशीं) जोंपर्यंत संयोग बिघडला नाहीं, तोंपर्यंतच असतें. १२०. त्याप्रमाणें या संसारवृक्षाचें होणेंजाणें वेगानें होत असल्यामुळें, त्या होण्याजाण्याचा तर्क करतां येत नाहीं; म्हणून लोक याला अविनाश असें म्हणतात. १२१. एऱ्हवीं जसा दान करणारा पुरुष दानधर्मांत खर्च करतो असें जरी दिसलें तरी तो खर्च करीत नसून, त्या खर्चाच्या रूपानेंच द्रव्यसंचय करतो; तसा हा संसारवृक्ष नाश पावत असतांही अविनाश असा भासतो. १२२. अथवा रथाचें चाक अति वेगानें फिरत असतांना, तें फिरत नाहीं, तर जमिनींत रोवलेलें आहे, असें ज्याप्रमाणें दिसतें. १२३. त्याप्रमाणें कालाच्या अतिशय गतीनें, या संसारवृक्षाची जी प्राणिरूपी फांदी वाळते व त्या योगानें गळून पडते, त्या ठिकाणीं आणखीं कोट्यवधि अंकुर या संसारवृक्षास फुटतात. १२४. ज्याप्रमाणें आषाढ महिन्यांतील उत्पन्न झालेल्या ढगांत, एक ढग नाहींसा झाला केव्हां व त्या ठिकाणीं दुसरे अनेक ढग आले केव्हां, हें जसें कळत नाहीं; त्याप्रमाणें या संसारवृक्षाची एक फांदी केव्हां नाश पावली व त्या ठिकाणीं कोट्यवधि (शरीररूपी) शाखा केव्हां उत्पन्न झाल्या हें कळत नाहीं. १२५. उत्पन्न झालेलीं चतुर्दश भुवनें, कल्प संपण्याचे वेळीं उन्मळून पडतात व पुन्हां कल्प सुरू झाला म्हणजे भरास आलेले तितकेच जगताचे अनेक समुदाय तयार होतात १२६. संहारकारक प्रचंड वाऱ्यानें महाप्रळयकाळच्या अखेरीची जीर्ण झालेली (संसारवृक्षाची) साल वगैरे गळून जाते न जाते तोंच, कल्पाच्या आरंभास (ब्रह्मदेवाचे दिवसाच्या आरंभास) सृष्टीचे समुदायचे समुदाय उत्पन्न होतात; १२७. कांड्यामागून कांडें उत्पन्न होऊन जसा ऊंस वाढत जातो, त्याप्रमाणें एका मनूच्या काळापुढें दुसऱ्या मनूचा काळ येऊन,

जिंके जेवीं ॥२८॥ कलियुगांतीं कोरडीं। चहूं युगांचीं सालें सांडी। तव कृतयुगाची पेली देव्हडी। पडे पुढती ॥ २९ ॥ वर्ततें वर्ष जाये। तें पुढिला मुळहारी होये। जैसा दिवसु जात कीं येत आहे। हें चोजवेना ॥ १३० ॥ जैशा वारियाचां झुळकां। सांदा ठाउवा नव्हे देखा। तैसिया उठती पडती शाखा। नेणों किती ॥ ३१ ॥ एकी देहाची डिरी तुटे। तंव देहांकुरीं बहुवी फुटे। ऐसेनि भवतरु हा वाटे। अव्ययो ऐसा ॥ ३२ ॥ जैसें वाहतें पाणी जाय वेगें। तैसेंचि आणिक मिळे मार्गे। तेवीं असंतचि असिजे जगें। मानिजे संत ॥ ३३ ॥ कां लागोनि डोळां उघडे। तंव कोडीवरी घडे मोडे। तें नेणतया तरंगु आवडे। नित्यु ऐसा ॥ ३४ ॥ वायसा एकें बुबुळें दोहींकडे। डोळा चाळितां अपाडें। दोन्ही आथी ऐसा पडे। भ्रमु जेवीं जगा ॥ ३५ ॥ पैं भिंगोरी निधिये पडली। ते गमे भूमीसी जैसी जडली। ऐसा वेगातिशयो भुली। हेतु होय ॥ ३६ ॥ हें बहु असो झडती। आंधारें भोवंडितां कोलती। ते दिसे जैसी आयती। चक्राकार ॥ ३७ ॥ हा संसारवृक्षु तैसा। मोडतु मांडतु सहसा। न देखोनि लोकु पिसा। अव्ययो मानी ॥ ३८ ॥ परि ययाचा वेगु देखे। जो हा क्षणिक ऐसा वोळखे। जाणे कोडिवेळां निमिखें। होत जात ॥ ३९ ॥ नाहीं अज्ञानावांचूनि मूळ। ययाचें असिलेपण टवाळ। ऐसें झाड सिनसाळ। देखिलें जेणें ॥ १४० ॥ तयातें गा पंडुसुता। मी सर्वज्ञुही म्हणें जाणता। पैं वाग्ब्रह्मसिद्धांता। वंद्यु तोचि ॥ ४१ ॥ योगजाताचें जोडलें। तया एकासीचि उपेगा गेलें। किंबहुना जियालें। ज्ञानही तेणें ॥ ४२ ॥ असो बहु हें बोलणें। वानिजेल तो कवणे। जो भवरुखु जाणे। उखि ऐसा ॥ ४३ ॥

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

मग ययाचि प्रपंचरूपा। अधोशाखिया पादपा। डाहाळिया जाती उमपा। ऊर्ध्वांही उजू ॥ ४४ ॥ आणि अधीं फांकलीं डाळें। तियें होती मूळें। तयांही तळीं पघळे। वेल पालवु ॥ ४५ ॥ ऐसें जें आम्हीं। म्हणितलें उपक्रमीं। तेंही परिसें सुगमीं। बोलीं सांगों ॥ ४६ ॥ तरी बद्धमूळें अज्ञानें। महदादिकीं शासनें। वेदांचीं थोरवनें। घेऊनियां ॥ ४७ ॥ परि आधीं तंव स्वेदज। जारज उद्भिज अंडज। हे बुडौनि महाभुज। उठती चारी ॥ ४८ ॥ यया एकैकाचेनि आणगटें। चौऱ्यांशीं लक्षधा फुटे। ते वेळीं जीवशाखीं फांटे। सैंघ होती ॥ ४९ ॥ प्रसवती शाखा सरळिया। नानासृष्टि डाहाळिया। आड फांटती माळिया। जातिचिया ॥ १५० ॥ स्त्री पुरुष नपुंसकें। हे व्यक्तिभेदांचे टके। आंदोळती आंगिकें। विकारभारें ॥ ५१ ॥ जैसा वर्षाकाळु गगनीं। पाल्हेजे नवघनीं। तैसें आकारजात अज्ञानीं। वेलीं जाय ॥ ५२ ॥ मग शाखांचेनि आंगभारें। लवोनि गुंफती परस्परें। गुणक्षोभाचे वारे।

एका वंशामागून दुसरा वंश, असा वंशवृद्धीचा विस्तार होतो. १२८. कलियुगाच्या अखेरीस चार युगांचीं जीर्ण झालेलीं सालपटें वगैरे गळून पडतात न पडतात, इतक्यांत कृतयुगाची पहिली अशी मोठी साल उत्पन्न होण्यास लागते. १२९. चालू जें वर्ष जातें, तें पुढच्या वर्षास मूळ ( बोलावणें ) होतें. ज्याप्रमाणें दिवस जातो कीं येतो हें कळत नाहीं; १३०. ज्याप्रमाणें वाऱ्याच्या झुळकामागून झुळुका वाहात असल्यामुळें त्यांचा जोड कोठें आहे, हें कळत नाहीं, त्याप्रमाणें या संसारवृक्षाच्या उत्पन्न होणाऱ्या व नाश पावणाऱ्या फांद्यांचा आदि अंत न समजल्यानें त्या किती आहेत, हें कळत नाहीं. १३१. या संसारवृक्षाचा शरीररूपी एक शेंडा गळून पडतो, तों अनेक देहरूपी अंकूर त्याला ( संसारवृक्षाला ) फुटतात. अशा तऱ्हेनें हा संसारवृक्ष अव्यय ( अविनाश ) आहे, असा वाटतो. १३२. जसें वाहणारें पाणी जोरानें जात असतें व त्यास मागून तसेंच वाहणारें पाणी मिळत असतें; ( त्यामुळें पाहणारास एकसारखें तेंच पाणी आहे असें वाटतें,) त्याप्रमाणें हा संसारवृक्ष अस्थिर असतांनाच लोक याला स्थिर असें मानतात. १३३. अथवा डोळा मिटून उघडावा, इतक्या अवकाशांत लाट, कोट वेळां पडते व मोडते; ( परंतु ) तें लाटांचें कोटी वेळां होणें-जाणें ज्यास कळत नाहीं, त्याला लाट नित्य (एकासारखी टिकणारी ) अशी वाटते. १३४. एकच बुबुळ आपल्या दोन्ही डोळ्यांत असाधारणपणानें कावळा फिरवीत असल्यामुळें, त्याच्या दोन्ही डोळ्यांत बुबुळें आहेत, असा लोकांना भ्रम पडतो. १३५. भिंगरी जेव्हां अतिशय वेगानें फिरत असते, तेव्हां ती जमिनीला उभी चिकटली आहे जसें वाटतें, याप्रमाणें अतिशय वेग हा ( स्थिरतेच्या ) भ्रमाला कारण होतो. १३६. हें राहूं दे. अंधारामध्यें कोलती फार लवकर फिरविली असतां ती ज्याप्रमाणें अखंडचक्राच्या आकाराची दिसते. १३७. त्याप्रमाणें हा संसारवृक्ष मोठ्या झपाट्यानें नाश पावत आहे व रचला जात आहे, हें जगास न कळल्यामुळें, वेडे लोक याला अविनाशी असें मानतात. १३८. परंतु जो याचा वेग पाहातो व हा क्षणभंगूर आहे असें समजतो आणि एका निमिषांत कोट्यवधि वेळा हा उत्पन्न होतो व नाहींसा होतो, असें ज्यास ज्ञान असतें; १३९. या संसारवृक्षास अज्ञानाशिवाय दुसरें मूळ नसून याचें अस्तित्वही मिथ्या आहे, असा हा वृक्ष जीर्ण सालीचा ( नाशवंत ) भासमात्र आहे, असें ज्यानें जाणलें, १४०. अर्जुना, त्याला ( संसारवृक्षाचें क्षणिकत्व जाणणाऱ्याला ) मी जो सर्वज्ञ, तोही ज्ञानी असें म्हणतो; आणि वेदांच्या सिद्धान्ताला तोच पूज्य आहे. १४१. सर्व प्रकारच्या योगाच्या अभ्यासाचें मिळालेलें फळ, त्या एकत्याच्याच उपयोगाला गेलें. फार काय सांगावें ! ज्ञानदेखील त्या पुरुषाचे योगानें जगलें. १४२. हें फार बोलणें राहूं दे. जो पुरुष हा संसारवृक्ष केवळ मिथ्याभास आहे असें जाणतो, त्याचें कोणाला वर्णन करतां येईल ! १४३.

( सत्वादि ) गुणाच्या योगानें वृद्धि पावलेल्या व ( शब्दादि ) विषयरूपी पल्लवांनीं युक्त, अशा त्या वृक्षाच्या ( अनेक ) शाखा, खालीं व वर पसरलेल्या आहेत. कर्माच्या अधीन असणारीं ( कर्माला अनुसरणारीं ) त्याचीं ( अनेक ) मूळें ( खालीं ) मनुष्यलोकीं विस्तार पावलीं आहेत. २.

मग याच खालीं शाखा असलेल्या संसारवृक्षाच्या पुष्कळ फांद्या सरळ वर देखील जातात. १४४. आणि ( त्या संसारवृक्षाच्या ) खालीं ज्या फांद्या विस्तारलेल्या आहेत, त्या फांद्या ( पारंब्यांप्रमाणें ) मूळें होतात व त्या मुळांपासून खालींही वेल व पाला फुटतो. १४५. असें जें आम्हीं आरंभीं ( ओंवी ५७ ते ६४ मध्यें ) म्हटलें होतें, तेंही आम्ही सोप्या भाषेंत सांगतों, ऐक. १४६. तरी अज्ञानरूपी बळकट बनलेल्या मुळानें महत्तत्त्वादिकांच्या भारानें व वेदरूपी मोठीं पानें फुटून ( हा संसारवृक्ष पुढें सांगितल्याप्रमाणें वाढतो. ) १४७. परंतु प्रारंभीं तर स्वेदज, जारज, अंडज व उद्भिज हे बुडापासून ( मुळापासून ) चार मोठे फोक उत्पन्न होतात. १४८. या एकेक खाणीच्या मुळापासून अंकूर फुटून एकंदर चौऱ्यांयशीं लक्ष प्रकारचे अंकूर फुटतात, त्या वेळेला जीवरूपी फांदीच्या ठिकाणीं पुष्कळसे फांटे उत्पन्न होतात. १४९. मागें सांगितलेल्या चार खाणीरूप सरळ शाखांनीं आणखी सृष्टिरूपी डाहाळ्या फुटतात आणि अनेक जातिरूपी आडव्या फांद्या ह्या-संसारवृक्षाला उत्पन्न होतात. १५०. स्त्री, पुरुष व नपुंसक हे भेदात्मक आकाराचे घोंस अंगीं असलेल्या कामादिक विकारांच्या भारानें ( ओझ्यानें ) एकमेकांवर आदळतात. १५१. ज्याप्रमाणें वर्षाकाळ हा आकाशामध्यें नव्या मेघांच्या रूपानें पसरतो, त्याप्रमाणें अज्ञानाच्या ठिकाणीं आकारमात्राचा वेल पसरतो. १५२. मग शाखा आपल्या अंगभारानें लवून एकमेकांमध्यें गुंततात व

उदयजती ॥ ५३ ॥ तेथ तेणें अचाटें । गुणांचेनि झडझडाटें । तिहीं ठायीं हा फांटे । ऊर्ध्व-मूळ ॥ ५४ ॥ ऐसा रजाचिया झुळुका । झडाडितां आगळिका । मनुष्यजातीशाखा । थोरावती ॥ ५५ ॥ तिया ऊर्ध्वीं ना अधीं । माझारींचि कोंदाकोंदी । आड फांटती खांदी । चतुर्वर्णाचिया ॥ ५६ ॥ तेथ विधिनिषेधीं सपल्लव । वेदवाक्यांचे अभिनव । पालव डोलती बरव । आणिती तयां ॥ ५७ ॥ अर्थु कामु पसरे । अग्रवनें घेती थारे । तेथ क्षणिकें पदांतरें । इहभोगांचीं ॥ ५८ ॥ तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धिलोभें । खांकरेजती शुभाशुभें । नानाकर्मांचे खांबे । नेणों किती ॥ ५९ ॥ तेवींचि भोगक्षयें मागिलें । पडती देहांचीं बुडसळें । तंव पुढां वाढी पेले । नवेया देहांची ॥१६०॥ आणि शब्दादिक सुहावे । सहज रंगें हवावे । विषयपल्लव नवे । नीचचि होती ॥ ६१ ॥ ऐसे रजोवातें प्रचंडें । मनुष्यशाखांचे मांदोडे । वाढती तो एथ रूढे । मनुष्यलोकु ॥ ६२ ॥ तैसाचि तो रजाचा वारा । नावेक धरी वोसरा । मग वाजों लागे घोरा । तमाचा तो ॥ ६३ ॥ तेधवां याचि मनुष्यशाखा । नीच वासना अधीं देखा । पाल्हेजती डाळुका । कुकर्माचिया ॥ ६४ ॥ अप्रवृत्तीचे खगुवाळे । फोक निघती सरळे । घेत पान पालव डाळें । प्रमादाचीं ॥ ६५ ॥ बोलती निषेधनियमें । जिया ऋचा यजुःसामें । तो पाला तया घुमे । टकेयावरी ॥ ६६ ॥ प्रतिपादिती अभिचार । आगम जे परमार । तेही पानीं घेती प्रसर । वासना वेली ॥ ६७ ॥ तंव तंव होती थोराडें । अकर्माचीं तळबुडें । आणि जन्मशाखा पुढेंपुढें । घेती धांव ॥ ६८ ॥ तेथ चांडाळादि निकृष्टा । दोषजातीचा थोर फांटा । जाळ पडे कर्मभ्रष्टां । भुलोनियां ॥ ६९ ॥ पशु पक्षी सूकर । व्याघ्र वृश्चिक विखार । हे आडशाखानिकर । थोरावती ॥ १७० ॥ परी ऐशा शाखा पांडवा । सर्वांगींही नित्य नवा । निरयभोग यावा । फळाचा तो ॥ ७१ ॥ आणि हिंसाविषयपुढारी । कुकर्मसंगें धुरधुरी । जन्मवरी आगारी । वाढतीचि असे ॥ ७२ ॥ ऐसे होती तरु तृण । लोह लोष्ट पाषाण । इया खांदिया तेवीं जाण । फळेंही हेंचि ॥ ७३ ॥ अर्जुना गा अवधारीं । मनुष्यालागोनि इया परी । वृद्धि स्थावरांतवरी । अधोशाखांची ॥ ७४ ॥ म्हणोनि जीं मनुष्यडाळें । येचि जाणावीं अधींचीं मूळें । जे एथूनि मग पघळे । संसारतरु ॥ ७५ ॥ एऱ्हवीं ऊर्ध्वीचें पार्था । मुद्दल मूळ पाहतां । अधींचिया मध्यस्था । शाखा इया ॥ ७६ ॥ परी तामसीं सात्त्विकीं । सुकृतदुष्कृतात्मकीं । विरूढती या शाखीं । अधोर्ध्वींचां ॥ ७७ ॥ आणि वेदत्रयीचिया पाना । नये अन्यत्र लागों अर्जुना । जे मनुष्या-वांचूनि विधाना । विषो नाहीं ॥ ७८ ॥ म्हणोनि तनु मानुषा । इया ऊर्ध्वमूळीनि जरी शाखा । तरी कर्मवृद्धीसि देखा । इयाचि मूळें ॥ ७९ ॥ आणि आनीं तरी झाडीं । शाखा वाढतां मुळें

गुणक्षोभाचे ( उत्कर्षाचे ) वारे उत्पन्न होतात. १५३. तेव्हां गुणक्षोभरूपी भयंकर वाहणाऱ्या वाऱ्याच्या जोरानें ऊर्ध्व ( वर ) मूळ आहे ज्याचें, असा हा संसारवृक्ष, तीन ठिकाणीं चिरला जातो. १५४. याप्रमाणें रजोगुणाचा वारा अधिक जोरानें वाहूं लागला असतां, मनुष्यजातिरूपी खांद्या जोरानें वाढतात. १५५. त्या मनुष्यरूपी शाखा वरही नसतात व खालींही नसतात; तर मधल्या भागांतच त्यांची अतिशय गर्दी होऊन, त्या मनुष्यरूपी शाखांना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशा चार वर्णांच्या आडव्या फांद्या फुटतात. १५६, विधिनिषेधरूपी कोंवळ्या पानांचे झुपके असलेली, अशी वेदवाक्यांची डोलत असलेली पालवी त्या मनुष्यशाखांना अपूर्व शोभा आणते. १५७. तेव्हां ऐहिक भोगांचीं नाशवंत अशीं अनेक स्थानें हेच कोणी अंकूर, ते अर्थ व काम यांच्या विस्तारानें जोरानें वाढतात. १५८. त्या वेळीं संसाराची वृद्धि व्हावी, या लोभानें अनेक शुभाशुभ कर्मांचे सोट किती फुटतात, हें कळत नाहीं. १५९. त्याचप्रमाणें मागील जन्मांत केलेल्या कर्मभोगांचा क्षय झाला, म्हणजे (संसारवृक्षाचीं) देहरूपी शुष्क काष्ठें गळून पडतात, तोंच पुढें नव्या देहाचा विस्तार तयार होतो. १६०. आणि नैसर्गिक असलेल्या आकर्षक शोभेनें सुशोभित झालेली, जी शब्दादिक विषयरूप पालवी ती नेहमींच नवीन नवीन तयार होत असते. १६१. याप्रमाणें रजोगुणाच्या प्रचंड वाऱ्यानें मनुष्यशाखांचे समुदाय तयार होतात. त्यास या संसाररूपी वृक्षाचे ठिकाणीं मनुष्यलोक म्हणण्याचा प्रचार आहे. १६२. त्याचप्रमाणें तो रजोगुणाचा वारा क्षणभर वाहण्याचा बंद होतो. मग तमोगुणाचा भयंकर वारा वाहण्यास लागतो. १६३. तेव्हां ( तमोगुणाचा वारा सुटल्यावर ) याच मनुष्यरूपी शाखांना खालच्या बाजूला वाईट कर्मांच्या इलकट वासना, ह्याच कोणी फांद्या, त्या विस्ताराला पावतात असें समज. १६४. निषिद्ध कर्मरूपी खणु असलेले सरळ फोंक, हे ( मनुष्यरूपी शाखेला ) प्रमादरूपी पानें, पाला व डहाळ्या उत्पन्न करीत फुटतात. १६५. यजुर्वेद व सामवेद यांच्यांतील जे मंत्र निश्चयानें निषिद्ध कर्में ( अमुक आहेत असें ) सांगतात, ते मंत्ररूपी पल्लव त्या डाहाळ्यांच्या अग्रभागावर वाढूं लागतात. १६६. दुसऱ्याच्या नाशाकरितां जारणमारण प्रतिपादन करणारीं जीं शास्त्रें, हीं कोणी पानें, त्या पानांसह वासनारूप वेल विस्तारतात.



१६७. ( मागील ओंवींत सांगितल्याप्रमाणें जों जों वासना वेली विस्तारतात ) तों तों निषिद्ध कर्मांची तळांतील मुळें मोठीं होतात. आणि त्यामुळें जन्मरूपी शाखा पुढें पुढें धांव घेतात. ( म्हणजे श्रेष्ठ योनींतून नीच योनींत जन्म प्राप्त होतात. ) १६८. तेव्हां तमोगुणामुळें मोहित झालेल्या कर्मभ्रष्टांना चांडाळादि निकृष्ट पापयोनीरूपी मोठ्या फांद्यांचें जाळें पडतें. १६९. पशु, पक्षी, डुक्कर वाघ, विंचू, साप ह्या आड शाखांचे समुदाय विस्तार पावतात. १७०. परंतु अर्जुना, (तमोगुणाच्या उत्कर्षांत ) अशा या मनुष्यशाखांना, सर्व अंगाचे ठिकाणीं, नित्य नवी नरकभोग हीच फलाची प्राप्ति होते. १७१. आणि तेथें हिंसा व मैथुन ह्या गोष्टी मुख्य आहेत व वाईट कर्मांची संगति, ही तेथें अग्रगण्य आहे व ते हिंसादि निषिद्ध कर्मांचे अंकूर अनेक जन्मांतून वाढतच असतात. १७२. (ज्या माणसांमध्यें तमोगुणाचा अशा रीतीनें उत्कर्ष झालेला आहे ) तीं माणसें अशा या प्रकारची अवस्था भोगतां भोगतां मग पुढें अखेरीस गवत, लोखंड, माती आणि दगड अशा जड योनींत जातात. येथें शाखा तरी ह्याच आणि फळें तरी हींच. १७३. अर्जुना, ऐक. याप्रमाणें या संसारवृक्षाच्या खालच्या शाखांची वाढ मनुष्यापासून तों स्थावरापर्यंत होते. १७४. म्हणून मनुष्यरूपी ज्या डहाळ्या आहेत, ह्याच खालच्या शाखांचीं मुळें आहेत, असें समजावें. कारण कीं, मग येथून संसारवृक्ष विस्ताराला पावतो. १७५. एऱ्हवीं अर्जुना, संसारवृक्षाचें वरच्या बाजूचें मुख्य अज्ञानरूप मूळ जर पाहिलें, तर खालीं वाढलेल्या शाखांत मनुष्यप्राणि ह्या मध्यावर असलेल्या शाखा होत. १७६. परंतु चांगल्या व वाईट कर्मांनीं भरलेल्या ज्या सत्त्वगुणी व तमोगुणी वरच्या व खालच्या फांद्या आहेत, त्यारूपानें ह्या मनुष्यरूपी शाखाच वाढतात. १७७. अर्जुना, तीन वेदरूपी (ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद ) पानें, ह्या मनुष्यरूप शाखे-शिवाय दुसऱ्या ठिकाणीं लागत नाहींत. कारण कीं, तिन्हीं वेदांच्या आज्ञेला मनुष्याशिवाय दुसरें कोणी पात्र नाहीं. १७८. म्हणून मनुष्यतनु ह्या जरी संसारवृक्षाच्या वरच्या मुळाच्या दृष्टीनें शाखा आहेत, तरी कर्मांच्या विस्ताराला याच (शाखा) मुळें आहेत, असें समज. १७९. आणि इतर प्राकृत वृक्षांचेंही असें आहे कीं, त्यांच्या फांद्या जसजशा वाढतात, तसतशीं त्यांचीं मुळें जमिनीमध्यें खोल बळावलेलीं असतात; आणि जसजशी त्यांचीं

गाढीं । मूळ गाढें तंव वाढी । पैस आथी ॥ १८० ॥ तैसोंचि इया शरीरा । कर्में तंव देहा संसारा । आणि देह तंव व्यापारा । म्हणोंनि नये ॥ ८१ ॥ म्हणोंनि देहें मानुषें । इयें मुळें होती न चुके । ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ॥ ८२ ॥ मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वाउधाण । सत्त्वाची सुटे सत्राण । वाहुटळी ॥ ८३ ॥ तैं याचि मनुष्याकारा । मुळीं सुवासना निघती आरा । घेऊनी फुटती कोंबारा । सुकृतांकुरीं ॥ ८४ ॥ उकलतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशल-तेंचि तिखें । डिरिया निघती निमिखें । बावळेंजुनी ॥ ८५ ॥ मतीचे सोट वावे । घालिती स्फूर्तीचेनि थांवें । बुद्धि प्रकाश घे धांवे । विवेकाचोनि ॥ ८६ ॥ तेथ मेधारसें सगर्भ । आस्था-पत्रीं सबोंब । सरळ निघती कोंभ । सद्वृत्तीचे ॥ ८७ ॥ सदाचाराचिया सहसा । टका उठती बहुवसा । घुमघुमिती घोषां । वेदपद्यांचां ॥ ८८ ॥ शिष्टागमविधानें । विविधयागवितानें । इयें पानावरी पानें । पांजरती ॥ ८९ ॥ ऐशा यमदमीं घोंसाळिया । उठती तपाचिया डाहाळिया । देती वैराग्यशाखा कवळिया । वेल्हाळपणें ॥ १९० ॥ विशिष्टां व्रतांचे फोक । धीराचां अणगटीं तिख । जन्मवेगें उर्ध्वमुख । उंचावती ॥ ९१ ॥ माजीं वेदांचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्त्वानिळ तो ॥ ९२ ॥ तेथ धर्मडाळ बाहाळी । दिसती जन्मशाखा सरळी । तिया आड फुटती फळीं । स्वर्गादिकीं ॥ ९३ ॥ पुढां उपरति रागें लोहिवी । धर्ममोक्षाची शाखा पालवी । लाहलाहात नित्य नवी । वाढतीचि असे ॥ ९४ ॥ पैं रविचंद्रादि ग्रहवर । पितृ ऋषी विद्याधर । हे आडशाखा प्रकार । पैसु घेती ॥ ९५ ॥ याहीपासून उंच-वडें । गुढले फळाचेनि बुडें । इंद्रादिक ते मांदोडे । थोर शाखांचे ॥ ९६ ॥ मग तयांही उपरी डाहाळिया । तपोज्ञानीं उंचावलिया । मरीचि कश्यपादि इया । उपरी शाखा ॥ ९७ ॥ एवं माळोवाळी उत्तरोतरु । ऊर्ध्वशाखांचा हा पैसारु । बुडीं साना अग्रीं थोरु । फलाढ्य-पणें ॥ ९८ ॥ वरी उपरिशाखाही पाठीं । येती फळभार ते किरीटी । ते ब्रह्मेशांत अण-गटीं । कोंभ निघती ॥ ९९ ॥ फळाचेनि वोझेपणें । ऊर्ध्वीं वोवांडें दुणें । जंव माघौतें बैसणें । मूळींचि होय ॥ २०० ॥ प्राकृताही तरी रुखा । जे फळें दाटलीं होय शाखा । ते वोवांडली देखा । बुडासि ये ॥ १ ॥ तैसें जेथूनि हा आघवा । संसारतरूचा उठावा । तियें मूळीं टेंकती पांडवा । वाढतेनि ज्ञानें ॥ २ ॥ म्हणौनि ब्रह्मेशानापरौतें । वाढणें नाहीं जीवातें । तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं ॥ ३ ॥ परी हें असो ऐसें । ब्रह्मादिक ते आंगवसें । ऊर्ध्वमूळासरिसें । न तुकती गा ॥ ४ ॥ आणीकही शाखा उपरता । जिया सनकादिकनामें विख्याता । तिया फळीं मूळीं नाडळतां । भरलिया ब्रह्मीं ॥ ५ ॥ ऐसी मनुष्यालागौनि जाणावी ।

मूळें जमिनीमध्यें खोल वळावलेलीं असतात; तसतसा त्या वृक्षांचा वरचा विस्तारही अधिकाधिकच फैलावतो. १८०. या मनुष्यशरीराच्या बाबतींतही त्याचप्रमाणें आहे. ( तें असें कीं, ) जेथपर्यंत कर्में आहेत, तेथपर्यंत देहाचें रहाणें आहे आणि जेथपर्यंत देह आहे, तोंपर्यंत कर्में करण्यास नाहीं म्हणतांच येत नाहीं. १८१. म्हणून मनुष्यदेह ही ( या संसारवृक्षाच्या खालच्या व वरच्या शाखांचीं ) मुळें आहेत; यांत चूक नाहीं; असें त्या जगाच्या जनकानें ( श्रीकृष्णानें ) सांगितलें. १८२. मग ती तमाची भयंकर ( सुटलेली ) वाहुटळ शांत झाल्यावर, सत्त्वाची वाहुटळ जोरानें सुटते. १८३. त्या वेळीं ह्याच मनुष्याकाररूपी मुळांस सुवासनारूपी मोड निघतात व ते मोड कोंबास येऊन ( म्हणजे त्याच सद्‌वासना दृढ होऊन ) नंतर त्यास ( त्या कोंबास ) सत्कर्मरूपी अंकुर फुटतात. १८४. विकासणाऱ्या ज्ञानाच्या योगानें, बुद्धिचातुर्याचे तीक्ष्ण अंकुर एका क्षणांत विस्तारून निघतात. १८५. बुद्धीचे फोंक स्फूर्तीच्या बळानें विस्ताराला पावतात व विवेकाच्या जोरानें बुद्धि प्रकाशाला येते ( म्हणजे बुद्धींत प्रकाश पडतो. ) १८६ त्या वेळीं मेधारस ( धारणाशक्तिरूपी रस ) ज्यांच्या आंत भरलेला आहे व जे आस्था ( आदर ) रूपीं पानांनीं सुशोभित आहेत, असे सद्‌वृत्तीचे सरळ कोंब फुटतात. १८७. सदाचाराचे अंकुर एकदम पुष्कळच फुटतात व ते वेदपद्यांच्या घोषानें गर्जना करूं लागतात. १८८. श्रेष्ठ पुरुष व शास्त्रें यांनीं सांगितलेलें आचरण व नाना प्रकारच्या यज्ञांचे विस्तार, हींच कोणी पानांवर पानें पसरतात. १८९. अशा यमदमांचे घोस असलेल्या तपांच्या डहाळ्या उत्पन्न होतात व त्यांस वैराग्यरूपी शाखा विस्तारानें आलिंगन देतात. १९०. आणि जे धैर्यांच्या अंकुरानें तीक्ष्ण असतात असे श्रेष्ठ व्रतरूपी फोंक, उत्पत्तीच्या वेगानें वर टोंक असलेले असे, उंच वाढतात. ( श्रेष्ठव्रतांच्या योगानें वरवरचे जन्म त्यांस प्राप्त होतात. ) १९१. जोंपर्यंत सत्त्वगुणाचा प्रचंड वारा सुटतो, तोंपर्यंत ( मनुष्यरूपी शाखेच्या ) मध्यें असलेला वेदरूपी दाट पाला विद्यांचा ( ज्ञानांचा ) झडझडाट ( गर्जना ) करतो. १९२. तेव्हां धर्मरूपी शाखेच्या विस्तारांत जन्माच्या सरळ वाढलेल्या फांद्या दिसतात व त्या फांद्यांना स्वर्गादिक फळानें युक्त असे अनेक आडफाटे फुटतात. १९३. पुढें रंगानें तांबड्या असलेल्या वैराग्यरूपी शाखेस धर्म व मोक्षरूप लुसलुशीत पालवी नित्य नवीन येऊन वाढतच रहाते, १९४. नंतर याच धर्मरूपी शाखेला सूर्य, चंद्र वगैरे श्रेष्ठ ग्रह, पितर, ऋषि विद्याधर, हे आणखी आडव्या शाखांचे प्रकार विस्तार घेतात. ( अभिप्राय असा कीं, धर्माचरणापासून श्रद्धेनुसार हे लोक प्राप्त होतात. ) १९५. ह्याही फांद्यांपेक्षां वर उंच गेलेल्या इंद्रादिक मोठ्या फांद्यांचे झुबके असून त्या फांद्यांची बुडें फळांनीं झांकलेलीं असतात. १९६. मग त्याही डहाळ्यांवर ( इंद्रादि शाखेवर ) तपानें व ज्ञानानें उंच वाढलेल्या मरीचि-कश्यपादि वरच्या शाखा आहेत. १९७. याप्रमाणें वर असलेल्या शाखांचा शाखोपशाखीं अधिक अधिक होणारा हा विस्तार, या फांद्यांच्या बुडाशीं लहान व शेंड्यास जास्त फळें असल्यामुळें, थोर असा आहे. १९८. अर्जुना, शिवाय या वरच्या शाखांनंतर या संसारवृक्षाला जे फळभार येतात, ते ब्रह्मदेव आणि शंकररूपी अणकुचिदार कोंब येतात. ( अभिप्राय असा कीं, ब्रह्मदेव आणि शंकर हेच फळभार आणि कोंब आहेत. कोंबही तेच व फळही तेच ) १९९. हा संसारवृक्ष, मनुष्यरूपी शाखेत वरच्या भागाला इतका लवलेला आहे कीं, ती मनुष्यरूपी शाखा ( सत्कर्मांच्या ) फळांच्या भारानें, मूळ जें माया, त्याला पुनः येऊन टेंकते. ( ब्रह्माच्या जवळ जवळ येते. ) २००. आणि हें पहा, इतर लौकिक वृक्षाला तरी फळांनीं लगडलेली जी फांदी असते, ती लवली असतां पुनः मुळाकडे येते. २०१. त्याप्रमाणें जेथून या संसारवृक्षाचा सर्व विस्तार उत्पन्न झाला आहे, अर्जुना, त्या मुळाच्या ठिकाणीं, वाढणाऱ्या ज्ञानाच्या योगानें, मनुष्यरूपी शाखा येऊन टेकतात. २०२. म्हणून ब्रह्मदेव आणि शंकर यांच्या पलीकडे जीवांना वाढणें नाहीं. मग तेथून वर केवळ ब्रह्मच आहे. २०३. परंतु हें असूं दे. याप्रमाणें अर्जुना, ब्रह्मादिक या डहाळ्या, या, संसारवृक्षाचें वरचें मूळ जी माया, तिच्या तुलनेला येत नाहींत. २०४. आणखी कांहीं ज्या सनकादिक नांवांनीं वरच्या (निवृत्ति मार्गांच्या) प्रसिद्ध शाखा आहेत, त्या या संसारवृक्षाच्या मुळांत अथवा फळांत न सांपडतां ब्रह्मस्वरूपीं भरलेल्या आहेत. २०५. याप्रमाणें मनुष्यापासून तों थेट वरचे जे ब्रह्मादिक, ही जी ( संसारवृक्षाची ) शेवटची पालवी

ऊर्ध्वीं ब्रह्मादिशेष पालवी । शाखांची वाढी बरवी । उंचावे पैं ॥ ६ ॥ पार्था ऊर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वचि होय आदि । म्हणौनि इयें अर्धी । म्हणितलीं मूळें ॥ ७ ॥

न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥

एवं तुज अलौकिकु । हा अधोर्ध्वशाखु । सांगितला भवरुखु । ऊर्ध्वमूळु ॥ ८ ॥ आणि अर्धीचीं हीं मूळें । उपपत्तीं परिसविली साविवळें । आतां परिस उन्मूळे । कैसेनि हा ॥ ९ ॥ परी तुझां हन पोटीं । ऐसें गमेल किरीटी । जे एवढें झाड उत्पाटी । ऐसें कायि असे ॥२१०॥ कें ब्रह्मयाचां शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ॥ ११ ॥ हा स्थावराही तळीं । फांकत असे अर्धीचां डाळीं । माजीं धांवतसे दुजां मूळीं । मनुष्यरूपीं ॥ १२ ॥ ऐसा गाढा आणि अफाटु । आतां कोण करी यया शेवटु । तरी झणी हा हळुवटु । धरिसी भावो ॥ १३ ॥ परी हा उन्मूळावया दोषें । येथ सायासाचि कायिसे । काय बाळा बागुल देशें । दवडावा आहे ॥ १४ ॥ गंधर्वदुर्ग कायी पाडावे । काय शशविषाण मोडावें । होआवें मग तोडावें । खपुष्प कीं ॥ १५ ॥ तैसा संसारु हा वीरा । रूख नाहीं साचोकारा । मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी ॥ १६ ॥ आम्हीं सांगितली जे परी । मूळडाळांची उजरी । ते वांझेचि घरभरीं । लेंकुरें जैशीं ॥ १७ ॥ काय कीजती चेइलेपणीं । स्वप्नींची तियें बोलणीं । तैशी जाण ते काहाणी । दुगळीचि ते ॥१८॥ वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥ १९ ॥ तरी कोणाचेनि संतानें । निपजती या उन्मूळणें । काय फुंकिलिया गगनें । जाइजेल गा ॥ २२० ॥ म्हणौनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें रूप तें माया । कासवीचेनि तुपें राया । वोगरिलें जैसें ॥ २१ ॥ मृगजळाचीं गा तळीं । तियें दिठी दुरूनिचि न्याहाळीं । वांचूनि तेणें पाणियें साळी केळी । लाविसी काई ॥ २२ ॥ मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केतुकें । म्हणोनि संसाररुख सत्य कें । वावोचि गा ॥ २३ ॥ आणि अंतु यया नाहीं । ऐसें बोलिजे जें कांहीं । तेंही साचचि पाहीं । परी येकी ॥ २४ ॥ तरी प्रबोधु जंव नोहे । तंव निद्रे काय अंतु आहे । कीं रात्री न सरे तंव न पाहे । तया आरौतें ॥ २५ ॥ तैसा जंव पार्था । विवेकु नुघवी माथा । तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा या ॥ २६ ॥ वाजतें वारें निवांत । जंव न राहे जेथिंचें तेथ । तंव तरंगता अनंत । म्हणावीचि कीं ॥ २७ ॥ म्हणौनि सूर्य जैं हारपे । तैं मृगजळाभासु लोपे । कां प्रभा जाय दीपें । मालवलेनि ॥ २८ ॥ तैसें मूळ अविद्या खाये । तें ज्ञान जैं उभें होये । तैंचि यया अंतु आहे । एऱ्हवीं नाहीं ॥ २९ ॥ तेवींचि हा अनादी । ऐसी आथी शाब्दी । तो आळु नोहे तुरोधी । बोल तया ॥ २३० ॥ जे संसारवृक्षाचां ठायीं । साचोकार तंव नाहीं । मा नाहीं तया आदि काई । कोण होईल ॥ ३१ ॥ जो साच जेथूनि

तेथपर्यंत, या संसारवृक्षाच्या फांद्यांची वाढ चांगली उंचावते, हें समज. २०६. अर्जुना, वरचे जे ब्रह्मादिक लोक आहेत, त्यांना मनुष्यत्वच (मनुष्यपणा) मूळ कारण आहे; म्हणून मनुष्यत्व हीं खालचीं मूळें आहेत, असें आम्हीं म्हटलें. २०७

परंतु ( वर जसें वर्णन केलें ) त्याप्रमाणें इहलोकीं याचें स्वरूप उपलब्ध होत नाहीं. याला अंत नाहीं, आदीही नाहीं व स्थितीही नाहीं. अत्यंत दृढमूल अशा या अश्वत्थवृक्षाला बळकट अशा असंगरूपी ( वैराग्यजन्यज्ञानरूपी ) शस्त्रानें छेदून, ३.

याप्रमाणें खालीं आणि वर शाखा असलेला व वर मूळ असलेला, हा लोकोत्तर संसारवृक्ष तुला सांगितला. २०८. आणि खालचीं हीं मुळें तुला खुलाशासह स्पष्ट दाखविलीं, आतां हा संसारवृक्ष कशा प्रकारानें उपटला जातो, तें ऐक. २०९. परंतु अर्जुना, तुझ्या मनांत कदाचित् असें वाटेल कीं, या एवढ्या झाडाला उपटील, असें एवढें (साधन) कांहीं आहे काय ? २१०. कोठें शेवट ब्रह्मदेवापर्यंत याच्या वरच्या शाखांचा विस्तार आणि मूळ तर ( कोठें ) वर निराकार ब्रह्मामध्यें आहे ! २११. हा संसारवृक्ष खालच्या फांद्यांनीं शेवटीं असलेल्या वृक्षादि स्थावरापर्यंत विस्तारतो व दुसऱ्या मनुष्यरूपी मुळांनीं मध्यें विस्तारतो. २१२. असा हा संसारवृक्ष बळकट आणि अमर्याद आहे, तर आतां याचा शेवट (उपटून टाकणें) कोण करील ? असा क्षुद्र विचार तूं कदाचित् मनांत आणशील, तर आणूं नकोस. २१३, परंतु याला उपटून टाकण्याचा हेतु जर असेल, तर याला उपटून टाकण्याच्या कामीं श्रमच ते काय आहेत ? ( म्हणजे श्रम नाहींतच. ) मुलाकरितां ( लेंकरांची भीति नाहींशी व्हावी म्हणून ) बागुलबुवास खरोखर देशोधडीस लावावा लागतो काय ? २१४. ढगांच्या आकृतींत दिसणारे किल्ले पाडून टाकले पाहिजेत काय ? सशाचें शिंग मोडून टाकलें पाहिजे काय ? आकाशाचें फूल असावें आणि मग तें तोडावें ! २१५. त्याप्रमाणें अर्जुना, हा संसारवृक्ष जर खरा नाहीं ( केवळ मिथ्याभास आहे ), तर मग त्याला उपटून टाकण्याची भीति तरी कसली ? २१६. आम्ही संसारवृक्षाच्या मुळाच्या व फांद्यांच्या उत्कर्षांचा ( विस्ताराचा ) जो प्रकार सांगितला, तो ( प्रकार ) जसें कांहीं वांझेचीं घर भरून लेंकरें आहेत, ( असें सांगण्याच्या प्रकारापैकींच होय. ) २१७. जागें झाल्यावर मग ती स्वप्नांतील बडबड काय कामाची ? त्याप्रमाणें ही संसारवृक्षाची गोष्ट पोकळ आहे, असें समज. २१८. याशिवाय आम्हीं ज्याप्रमाणें सांगितलें, त्याप्रमाणें याचें मूळ जर दृढ असतें आणि हा (संसारवृक्ष) जर आम्ही सांगितल्याप्रमाणेंच (स्वरूपें करून) खरा असतां, २१९. तर कोणता असा मायेचा पूत आहे कीं, ज्याच्या सामर्थ्यानें याचीं पाळेंमुळें खणून काढण्याचें काम घडून येईल ? अर्जुना, नुसत्या फुंकण्यानें हें ( एवढें ) आकाश उडून जाईल काय ? २२०. म्हणून अर्जुना आम्हीं जें या संसारवृक्षाचें वर्णन केलें, तें खोटें आहे, ( कसें ? तर ) जशी राजाला कासवीच्या तुपानें मेजवानी करावी तसें. २२१. बा अर्जुना, मृगजळाचीं जीं तळीं आहेत, तीं दृष्टीनें दुरूनच पहा, याशिवाय त्या मृगजळाच्या पाण्यानें भात व केळी लावतां येतील काय ? २२२. बा अर्जुना, या संसारवृक्षाचें मूळ जें अज्ञान, तेंच आधीं खोटें आहे, तर मग त्याचें कार्य तें केवढें ! ( काय किंमतीचें असणार ! ) म्हणून संसारवृक्ष खरा कोठून असणार ? तर तो मिथ्याच आहे. २२३. आणि या संसारवृक्षाला अंत नाहीं, असें जें कांहीं म्हणतात, तेंही एक प्रकारानें खरेंच आहे असें समज. २२४. तर जोंपर्यंत जाग येत नाहीं, तोंपर्यंत झोंपेला अंत आहे काय ? अथवा रात्र सरली नाहीं, तोंपर्यंत त्याच्या आधीं उजाडत नाहीं. २२५. त्याप्रमाणें अर्जुना, जोंपर्यंत विचारानें डोकें वर केलें नाहीं, तोंपर्यंत या संसाररूपी अश्वत्थ वृक्षाला अंत नाहीं. २२६. जोंपर्यंत वाहणारा वारा जागच्या जागीं शांत रहात नाहीं, तोंपर्यंत लाटपणा अनंतच म्हटला पाहिजे. २२७. येवढ्याकरितां सूर्य जेव्हां मावळतो, तेव्हां मृगजळ भासण्याचें नाहींसें होतें; अथवा दिवा मालवल्यानें ( दिव्याचा ) प्रकाश नाहींसा होतो; २२८. त्याप्रमाणें संसारवृक्षास मूळ असलेल्या अविद्येला खाऊन टाकणारें ( नाहींसें करणारें ) ज्ञान जेव्हां उठाव करील, तेव्हांच या संसारवृक्षाला शेवट आहे, एऱ्हवीं नाहीं. २२९. त्याप्रमाणें हा संसारवृक्ष अनादि ( आरंभरहित ) आहे, असें जें म्हणतात, तें म्हणणें या संसारवृक्षावर आरोप नाहीं, तर ( एका दृष्टीनें ) तें म्हणणें ( 'अनादि' म्हणणें ) या ( संसारवृक्षाच्या ) अनादित्वास अनुसरून आहे. २३०. कारण कीं, संसारवृक्ष तर स्वरूपानें खरा नाहीं. तर मग जो ( स्वरूपानें खरा ) नाहीं त्याला कोणी आरंभ ( असेल ) काय ? २३१. जो खरोखर जेथून ( कोठून तरी ) उत्पन्न होतो,

उपजे । तयातें आदि हें साजे । आतां नाहींचि तो म्हणिजे । कोठूनियां ॥ ३२ ॥ म्हणौनि जन्मे ना आहे । तैसिया सांगों कवण माये । यालागीं नाहींपणोंचि होये । अनादि हा ॥ ३३ ॥ वांझेचिया लेंका । कैंची जन्मपत्रिका । नभीं निळी भूमिका । कें कल्पूं पां ॥ ३४ ॥ व्योम-कुसुमाचा पांडवा । कवणें देंठ तोडावा । म्हणौनि नाहीं ऐसिया भवा । आदि कैंची ॥ ३५ ॥ जैसें घटाचें नाहींपण । असतचि असे केलेनिवीण । तैसा समूळ वृक्षु जाण । अनादि हा ॥ ३६ ॥ अर्जुना ऐसेनि पाहीं । आद्यंतु ययासि नाहीं । माजीं स्थिती आभासे कांहीं । परी टवाळ ते गा ॥ ३७ ॥ ब्रह्मगिरीहूनि न निगे । आणि समुद्रींही कीर न रिगे । तरी माजीं दिसे वाउगें । मृगांबु जैसें ॥ ३८ ॥ तैसा आद्यंतीं कीर नाहीं । आणि साचही नोहे कहीं । परि लटिकेपणाची नवाई । पडिभासे गा ॥ ३९ ॥ नाना रंगीं गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे । तैसा नेणतया आपजे । आहे ऐसा ॥ २४० ॥ ऐसेनि स्थितीचिये वेळे । भुलवी अज्ञानाचे डोळे । लाघवी हरी मेखळे । लोकु जैसा ॥ ४१ ॥ आणि नसतीचि श्यामिका । व्योमीं दिसे तैसी दिसो कां । तरी दिसणेंही क्षणा एका । होय जाय ॥ ४२ ॥ स्वप्नींही मानिलें लटिकें । तरी निर्वाहो कां एकसारिखें । तेवीं आभासु हा क्षणिके । रीतीचा गा ॥ ४३ ॥ देखतां आहे आवडे । घेऊं जाइजे तरी नातुडे । जैसा टिकु कीजे माकडें । जळामाजीं ॥ ४४ ॥ तरंगभंगु सांडीं पडे । विजूही न पुरे होडे । आभासासि तेणें पाडें । होणें जाणें गा ॥ ४५ ॥ जैसा ग्रीष्म-शेषींचा वारा । नेणिजे समोर कीं पाठीमोरा । तैसी स्थिती नाहीं तरुवरा । भवरूपा यया ॥ ४६ ॥ एवं आदि ना अंत स्थिती । ना रूप ययासि आथी । आतां कायसी कुंथाकुंथी । उन्मूळणीं गा ॥ ४७ ॥ आपुलिया अज्ञानासाठीं । नव्हता थांवला किरीटी । तरि आतां आत्मज्ञानाचेनि लोटीं । खांडेनि गा ॥ ४८ ॥ वांचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुके । तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ॥ ४९ ॥ मग किती खांदोखांदीं । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं । म्हणौनि मूळचि अज्ञान छेदीं । सम्यक्ज्ञानें ॥ २५० ॥ एऱ्हवीं दोरीचिया उरगा । डांगा मेळवितां पैं गा । तो वावोचि भारु गा । केला होय ॥ ५१ ॥ तरावया मृगजळाची गंगा । डोणीलागीं धांवतां दांगा– । माजीं बोहळें बुडिजे पैं गा । साच जेवीं ॥ ५२ ॥ तेवीं नाथिलिया संसारा । उपायीं जाचतया वीरा । आपणपें लोपे वारा । विकोपीं जाय ॥ ५३ ॥ म्हणोनि स्वप्नींचिया भेया । ओखद चेवोचि धनंजया । तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥ ५४ ॥ परि तेचि लीला परजवे । तैसें वैराग्याचें नीच नवें । अभंगबळ होआवें । बुद्धीसी गा ॥ ५५ ॥ उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु ऐसा सांडणें । जैसें वमुनियां सुणें ।

त्याला आरंभ ( उत्पत्ति ) आहे, हें म्हणणें शोभतें. आतां जो स्वरूपेंकरून नाहींच, त्याचा आरंभ कोठून ( कोणापासून ) म्हणावयाचा ? २३२. म्हणून जो उत्पन्न होत नाहीं व ज्याला अस्तित्व नाहीं, तशाला कोण आई ( आहे ) म्हणून सांगूं ? ( अर्थात् त्याचा आरंभ काय सांगावयाचा ? ) एवढ्याकरितां हा संसारवृक्ष नाहींपणानेंच अनादि आहे. २३३. वांझेच्या मुलाला जन्मपत्रिका कोठची ? आकाशांत निळी जमीन कोठें कल्पावयाची ? २३४. अर्जुना, आकाशाच्या फुलाचा देठ कोणीं तोडावा ? म्हणून स्वरूपेंकरून जो नाहीं, अशा संसाराला आरंभ कसला ? २३५. ज्याप्रमाणें घटाचा नाहींपणा ( प्रागभाव ), हा कोणी उत्पन्न केल्याशिवाय आहेच आहे; त्याप्रमाणें हा संपूर्ण संसारवृक्ष अनादि आहे असें समज. २३६. अर्जुना, याप्रमाणें पहा कीं, या संसारवृक्षाला आदि व अंत नाहीं; मध्यें स्थितिकालीं तो कांहीं भासतो; पण तें त्याचें भासणें मिथ्या आहे. २३७. ज्याप्रमाणें ब्रह्मगिरी पर्वतापासून निघत नाहीं, आणि ( शेवटीं ) खरोखर समुद्रांतही मिळत नाहीं, तरी मध्येंच जसें मिथ्या मृगजळ दिसतें. २३८. त्याप्रमाणें अर्जुना, संसारवृक्ष आरंभीं व अंतीं खरोखर नाहीं आणि तो कधींही खरा नाहीं. परंतु खोटेपणाचें नवल असें आहे कीं, तो नसून भासतो. २३९. ज्याप्रमाणें अनेक रंगांनीं भरलेलें इंद्रधनुष्य दिसतें, त्याप्रमाणें अज्ञान्याला हा संसारवृक्ष आहे असें भासतें. २४०. अशा रीतीनें स्थितिकालीं हा संसारवृक्ष अज्ञानी मनुष्याच्या दृष्टीला चकवितो. तो कसा तर, जसा बहुरूपी हा कफनी धारण करून ( साधूचीं सोंगें आणून ) लोकांना फसवितो तसा. २४१. आणि नसलेलाच निळेपणा आकाशांत दिसतो, तसा दिसेना का ? तरी तें दिसणेंही एका क्षणांत होतें व जातें. २४२. स्वप्नांतील खोटे पदार्थ वस्तुतः नाहींत; तरी पण, ते खरे आहेत असें जरी मानलें, तरी ते एकसारखे टिकतात का ? तर टिकत नाहींत. ( ते जसे क्षणिक भासणारे आहेत ) तशा क्षणिक भासणाऱ्या पद्धतीचा हा संसारवृक्षाचा आभास आहे. २४३. आपलें पाण्यांत दिसणारें प्रतिबिंब धरण्याकरितां माकडानें ज्याप्रमाणें बोट घालावें, ( तरी पण तें प्रतिबिंब त्यास सांपडत नाहीं, ) त्याप्रमाणें हा संसारवृक्षाचा भास पाहिला असतां 'आहे' असा वाटतो आणि त्यास धरावयाला गेलें तर ( म्हणजे विचारानें त्याचें अस्तित्व पाहूं गेलें तर ) तो सांपडत नाहीं. २४४. वा अर्जुना, लाटांचें होणें व जाणें ( ह्या संसारभासाच्या होण्याजाण्याच्या उपमेला ) कमी पडतें. ( विजेचा उदयास्त जरी अति त्वरित असतो ) तरी ती वीज देखील याच्या बरोबरीला येत नाहीं, तितक्या मानानें ( त्वरेनें ) संसारभासाचें होणें–जाणें आहे. २४५. ज्याप्रमाणें ग्रीष्मांतीचा वारा, हा समोरून वाहतो किंवा पाठीमागून वाहतो, हें कळत नाहीं, ( त्याची स्थिति जशी एकच नसते, ) त्याप्रमाणें या संसाररूपी श्रेष्ठ वृक्षाला स्थितिकालीं एकच अवस्था नाहीं, म्हणजे प्रत्येक क्षणीं त्याचें स्थित्यंतर होतें. ( म्हणजे संसाराला स्थितीहि नाहीं. ) २४६. याप्रमाणें संसारवृक्षाला आदि, अंत व स्थिति हीं नाहींत व याला रूपही नाहीं. आतां ( असें जर आहे तर ) अर्जुना, याला उपटून टाकण्यांत श्रम ते काय ? २४७. अर्जुना, हा नसलेला संसारवृक्ष ( केवळ ) आपल्या अज्ञानामुळें बळावला आहे. तर आतां ( त्याला ) आत्मज्ञानरूपी दुधारी तरवारीनें नाहींसा कर. २४८. याशिवाय एका ज्ञानावांचून ( त्याच्या नाशाकरितां ) जितके उपाय तूं करशील, त्यांच्या ( त्या उपायांच्या ) योगानें तूं या संसारवृक्षांत अधिक अडकशील. २४९. मग ( त्या संसारवृक्षाच्या ) फांद्या-फांद्यांनीं खालीं व वर किती फिरावें ? ( त्या फिरण्याला अंतच नाहीं. ) म्हणून या संसारवृक्षाचें अज्ञानरूपी मूळच यथार्थज्ञानानें तोडून टाक. २५०. सहज विचार करून पाहिलें तर, दोरीवर भासणाऱ्या सर्पाला मारण्याकरितां लांब लांब काठ्या गोळा केल्या असतां त्या काठ्यांचें ओझें उगीच गोळा केल्यासारखें होतें. २५१. मृगजळाची नदी उतरून जाण्याकरितां नावेसाठीं कोणी रानोमाळ धांवावयास लागलें, तर त्यानें खऱ्या ओढ्यांत सांपडून जसें बुडावें. २५२. अर्जुना, त्याप्रमाणें खोट्या संसाराचा नाश करण्याच्या उपायामध्यें खटपट करणाराला साधनांचे जिवापाड श्रम होऊन, तो ( खटपट करणारा ) आपण स्वतः मरतो. २५३. म्हणून अर्जुना, स्वप्नांतील भीतीला जागें होणें हेंच औषध आहे; त्याप्रमाणें अज्ञानरूपी मूळ असलेल्या याला ( या संसारवृक्षाला ) नाश करण्यास समर्थ एक ज्ञानखड्गच आहे. २५४. परंतु अरे, तेंच ज्ञानरूपी खड्ग सहज फिरवितां येईल, तसें वैराग्याचें न खचणारें सामर्थ्य बुद्धीला नित्य नवें पाहिजे. २५५. ज्या वैराग्याचा उठाव झाला असतां, ह्या त्रिवर्गाचा ( स्वर्ग, मृत्यु, पाताळाचा ) असा त्याग होतो कीं, जसें कांहीं कुत्रें

आतांचि गेलें ॥ ५६ ॥ हा ठायवरी पांडवा । पदार्थजातीं आघवा । विटवी तो होआवा । वैराग्यलाडु ॥ ५७ ॥ मग देहाहंतेचें दळें । सांडूनि एकेचि वेळे । प्रत्यक्बुद्धी करतळें । हातवसावें ॥ ५८ ॥ निसिलें विवेकसाहणे । जे ब्रह्माहमस्मिबोधें सणाणें । मग पुरतेनि बोधें उटणें । एकलेंचि ॥ ५९ ॥ परि निश्चयाचें मुष्टिबळ । पाहावें एकदोनी वेळ । मग तुळावें अति चोखाळ । मननवेरी ॥ २६० ॥ पाठीं हतियेरां आपणयां । निदिध्यासें एक जालिया । पुढां दुजें नुरेल घाया- । पुरतें गा ॥ ६१ ॥ तें आत्मज्ञानाचें खांडें । अद्वैतप्रभेचेनि वाढें । नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासि ॥ ६२ ॥ शरदागमींचा वारा । जैसा केरु फेडी अंबरा । कां उदयला रवी आंधारा । घोंटु भरी ॥ ६३ ॥ नाना उपवढ होतां खेंवो । नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो । स्वप्रतीतिधारेचा वाहो । करील तैसें ॥ ६४ ॥ तेव्हां ऊर्ध्व कां ऊर्ध्वींचें मूळ । कां अधींचें हन शाखाजाळ । तें कांहींचि न दिसे मृगजळ । चांदिणां जेवीं ॥ ६५ ॥ ऐसेनि गा वीरनाथा । आत्मज्ञानाचिया खड्गलता । छेदुनियां भवाश्वत्था । ऊर्ध्वमूळातें ॥ ६६ ॥ मग इदंतेसि बाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें । तें रूप पाहिजे आपलें । आपणाचि ॥ ६७ ॥ परि दर्पणाचेनि आधारें । एकाचि करून दुसेरं । मुख पाहाती गव्हारें । तैसें नको हें ॥ ६८ ॥ हें पाहाणें ऐसें असे वीरा । जैसा न मोडलिया विहिरा । मग आपलिया उगमीं झरा । भरोनि ठाके ॥ ६९ ॥ नातरी आटालिया अंभ । निजबिंबीं प्रतिबिंब । नेहटे कां नभीं नभ । घटाभावीं ॥ २७० ॥ ना ना इंधनांशु सरलेया । वन्हि परते जेवीं आपणपयां । तैसें आपेंआप धनंजया । न्याहाळणें जें गा ॥ ७१ ॥ जिव्हे आपली चवी चाखणें । चक्षु निज बुबुळ देखणें । आहे तया ऐसें निरीक्षणें । आपुलें पैं ॥ ७२ ॥ कां प्रभेसि प्रभा मिळे । गगन गगनावरी लोळे । नाना पाणी भरलें खोळे । पाणियाचिये ॥ ७३ ॥ आपणचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होय निरुतें । बोलिजतु असे ॥ ७४ ॥

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तन्ति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

जें पाहिजतेनवीण पाहिजे । कांहीं नेणणाचि जाणिजे । आद्यपुरुष कां म्हणिजे । जया ठायातें ॥ ७५ ॥ तेथही उपाधीचा बोथंबा । घेऊनि श्रुति उघविती जिभा । मग नामरूपाचा बडंबा । करिती वायां ॥ ७६ ॥ पैं भवस्वर्गा उबगले । मुमुक्षु योगज्ञाना वळघले । पुढती न

आतांच ऐकून गेलें आहे. २५६. अर्जुना, येथपर्यंत सर्व पदार्थमात्रासंबंधानें वीट उत्पन्न करील, असें हें दांडगें वैराग्य पाहिजे. २५७. मग त्या ज्ञानखड्गावरील देहाभिमानरूपी म्यान एकदम काढून अंतर्मुख झालेल्या बुद्धिरूपी मुठींत तें धरावें. २५८. तें ज्ञानरूपी खड्ग विवेकरूपी सहाणेवर पाजळलेलें (लावलेलें) असावें व 'अहं ब्रह्मास्मि' (मी ब्रह्म आहें) अशा बोधाची त्यास सणसणीत (तीक्ष्ण) अशी धार असावी व मग तें एकव्या पूर्णबोधानें घासावें. २५९. परंतु ('मी ब्रह्म आहें' असा) निश्चयरूपी मुठीचें बळ एकदोन वेळ पाहावें (आणि 'मी ब्रह्म आहें' असा दृढनिश्चय झाला आहे असें वाटलें कीं,) मग तें अति शुद्ध मननापर्यंत तोलून धरावें. (म्हणजे अद्वैतबोधाचें अति शुद्ध असें चिंतन करावें.) २६०. नंतर (ज्ञानरूपी) हत्यार व आपण निजध्यासानें एक झाल्यावर (आपण ज्ञानरूप झाल्यावर) अर्जुना, आपल्यापुढें घाव मारण्यापुरतें दुसरें उरणार नाहीं. २६१, ती आत्मज्ञानरूपी दुधारी तलवार आपल्या अद्वैतप्रकाशाच्या आधिक्यानें संसारवृक्षाला कोणीकडेही उरूं देणार नाहीं. २६२. शरदृतूच्या आरंभींचा वारा, जसा आकाशांतील ढगरूपी कचरा नाहींसा करतो अथवा उगवलेला सूर्य, जसा अंधाराचा घोंट भरतो; २६३. अथवा जागें होतांक्षणींच स्वप्नांच्या गर्दीचा ठावठिकाण उरत नाहीं, त्याप्रमाणें, आत्मानुभवरूपी धारेचा प्रहार करील (म्हणजे संसारवृक्षाचा ठावठिकाण उरूं देणार नाहीं.) २६४. तेव्हां या संसारवृक्षाचा वरला भाग अथवा वरचें मूळ अथवा खालच्या शाखांचा विस्तार, हें जसें चांदण्यांत मृगजळ दिसत नाहीं, तसें कांहीं एक दिसणार नाहीं. २६५. अर्जुना, अशा रीतीनें आत्मज्ञानरूपी तरवारीच्या पात्यानें, वर मूळ आहे असा जो संसारवृक्ष, तो छेदून (म्हणजे आत्मविचारानें त्याचा निरास करून,) २६६. (वर सांगितल्याप्रमाणें आत्मविचारानें देहादि अनात्मतत्वरूप प्रपंचाचा निरास झाल्यावर) मग आपल्याहून जें भिन्न प्रतीत होतें, त्यासंबंधानें इदंभाव (हें-तें–पणा) स्फुरतो, त्याचा ज्या वस्तूच्या ठिकाणीं किंचित्‌ही संबंध नसतो व [इदंच्या सापेक्ष आपल्यासंबंधानें अहंभाव (मीपणा) असतो. आत्मस्वरूप एकरस असल्याकारणानें तेथें भिन्न प्रतीति नाहीं, म्हणून तेथें इदं स्फुरण नाहीं; आणि इदं स्फुरण नाहीं, म्हणून] अहंस्फुरणही जेथें नसतें असें जें अहं–इदं–वृत्तिशून्य, प्रसिद्ध असलेलें आत्मस्वरूप, तें आपलें स्वरूप आपणच पाहावें. २६७. परंतु आरशाच्या आधारानें (समोर आरसा घेऊन) जसे अज्ञानी लोक एका मुखाचीं दोन मुखें करून (म्हणजे बिंब व प्रतिबिंब अशा तऱ्हेनें) आपणच आपल्याला पाहातात, तसें हें आत्मस्वरूपाला (दृश्य-द्रष्टा-करून) पाहणें नको. २६८. अर्जुना, हें आपल्या आत्मस्वरूपाचें पाहणें असें आहे कीं, विहीर उकरण्याचे पूर्वी झरा जसा आपल्या उगमाच्या ठिकाणीं (पाण्यानें) भरलेला असतो, (तो जरी दृश्य झाला नाहीं, तरी तो आपल्या स्वरूपानें आहेच.) २६९. अथवा पाणी आटल्यावर प्रतिबिंब जसें आपल्या बिंबाच्या ठिकाणीं मिळतें; अथवा घट फुटल्यावर जसें घटाकाश महाकाशाच्या ठिकाणीं मिळतें; २७०. अथवा अग्नींतील जळणारीं लाकडें निःशेष संपल्यावर अग्नि जसा मूळ स्वरूपांत येऊन मिळतो; त्याचप्रमाणें अर्जुना, जें आपण आपल्याला सहज पहाणें आहे. २७१. जिभेनें जशी आपली चव चाखावी अथवा डोळ्यानें जसें आपलें बुबूळ पाहावें, त्याप्रमाणें आपण आपल्याला पहाणें आहे. २७२. अथवा तेज जसें तेजास मिळावें, अथवा आकाशानें जसें आकाशावर लोळावें किंवा पाणी जसें पाण्याच्याच पदरांत भरावें, २७३. आपणच आपल्याला अद्वैतभावानें जें पाहावयाचें तें असें (वर सांगितल्याप्रमाणें) आहे हें मी खरें सांगतों. २७४.

नंतर त्या (आपल्या) रूपास पहावें, कीं ज्या ठिकाणीं गेलें असतां (मुमुक्षु) पुनः परत येत नाहींत; ज्यापासून ही (विश्व) परंपरा वाढली, अशा त्या आद्यपुरुषास (आत्मस्वरूपास ज्ञानाच्या अंगानें) शरण जावें. ४.

जें आत्मस्वरूप पहाणेपणा घेतल्याशिवाय पहावें, (दृश्यसापेक्ष द्रष्ट्याची कल्पना टाकून पहावें); कांहीं न जाणणें, हेंच त्याचें जाणणें होय व ज्या ठिकाणाला (ज्या आत्मस्वरूपाला) आद्य (आरंभींचा) पुरुष असें म्हणतात. २७५. त्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं देखील, मायाउपाधीचा आश्रय घेऊन वेद आत्मस्वरूपाचें वर्णन करण्यास तयार होतात; आणि मग त्या ठिकाणीं नामरूपाचा व्यर्थ गलबला करतात. २७६. संसार व स्वर्ग यास कंटाळलेले व योग (अष्टांगयोग) व ज्ञान, यांचा आश्रय केलेले मुमुक्षु लोक, पुनः स्वर्ग व संसार

यों इया निगाले । पैजा जेथ ॥ ७७ ॥ संसाराचिया पायां पुढां । पळती वीतराग होडा । ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा । घालिती मागां ॥ ७८ ॥ अहंतादिभावां आपुलियां । झाडा देऊनि आघवेयां । पत्र घेती ज्ञानिये जया । मूळघरासी ॥ ७९ ॥ जिये कां वस्तुचें नेणणें । आणिलें थोर जगा जाणणें । नाहीं तें नांदविलें जेणें । मी तूं जगीं ॥ २८० ॥ पैं जेथुनी हे एवढी । विश्वपरंपरेची वेलांडी । वाढती आशा जैसी कोरडी । निर्दैवाची ॥ ८१ ॥ पार्था तें वस्तु पहिलें । आपणपें पैं आपुलें । पाहिजे जैसें हिंवलें । हिंव हिंवें ॥ ८२ ॥ आणीकही एक तया । वोळखण असे धनंजया । तरी जया कां भेटलिया । येणेंचि नाहीं ॥ ८३ ॥ परी तया भेटती ऐसे । जे ज्ञानें सर्वत्र सरिसे । महाप्रळयांबूचें जैसें । भरलेपण ॥ ८४ ॥

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

जया पुरुषांचें कां मन । सांडोनि गेलें मोहमान । वर्षांतीं जैसें घन । आकाशातें ॥ ८५ ॥ निकवडया निष्ठुरा । उबगिजे जेवीं सोयरा । तैसे नागवती विकारां । वेटाळू जे ॥ ८६ ॥ फळली केळी उन्मळे । तैसी आत्मलाभें प्रबळे । जयांची क्रिया ढाळेंढाळें । गळती आहे ॥ ८७ ॥ आगी लागलिया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी । तैसें सांडिले अशेखीं । विकल्पीं जे ॥ ८८ ॥ आइकें सकळ दोषतृणीं । अंकुरिजती जिये मेदिनी । तिये भेदबुद्धीची काहाणी । नाहीं जयातें ॥ ८९ ॥ सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय आपैसी । गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें ॥ २९० ॥ पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेवीं अवचितें । तेवीं निदसुरें द्वैतें । सांडिले जे ॥ ९१ ॥ लोहाचें सांकडें परिसा । न जोडे अंधार रवि जैसा । द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुकाळ जया ॥ ९२ ॥ अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें । तियें जयां कां समोरें । होतीचिना ॥ ९३ ॥ स्वप्नींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकासि कारण । उपवढलिया जाण । जियापरी ॥ ९४ ॥ तैसे सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं । न घेपिजती सर्पीं । गरुड जैसे ॥ ९५ ॥ आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर । चरताति जे साविचार । राजहंस ॥ ९६ ॥ जैसा वर्षोनि भूतळीं । आपला रसु अंशुमाळी । मागौता आणी रश्मिजाळीं । बिंबासीचि ॥ ९७ ॥ तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बारावाटीं । ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे ॥ ९८ ॥ किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेकु जयांचा । बुडाला बोधु गंगेचा । सिंधू जैसा ॥ ९९ ॥ पैं आघवेंचि आपुलेपणें । नुरेचि जयां अभिलाषणें । जैसें येथूनि पऱ्हां जाणें । आकाशा नाहीं ॥ ३०० ॥ जैसा अग्नीचा डोंगरु । नेघे कोणी बीजअंकुरु । तैसा मनीं जयां विकारु । उदेजेना ॥ १ ॥

यांच्याकडे येणार नाहीं, अशा प्रतिज्ञेनें ज्या आत्मस्वरूपाकडे जाण्यास निघाले; २७७. ते वैराग्यशील पुरुष (संसार त्यांचा पाठलाग करीत असतांना) त्या संसाराच्या पायापुढें प्रतिज्ञेनें पळतात व कर्मांचा शेवट जें ब्रह्मपद (सत्यलोक), हाच कोणी कडा, त्या कड्याचें उल्लंघन करून, त्यास मागें टाकतात. २७८. आपल्या अहंकारादि सर्व अनात्मवृत्तींचा झाडा देऊन, ज्या मूळच्या आत्मस्वरूपरूपी घरास जाण्याकरितां, ज्ञानी लोक दाखला घेतात; २७९. ज्या वस्तूच्या अज्ञानानें, जगाचें विपरीत असलेलें जबरदस्त मिथ्या ज्ञान उत्पन्न केलें आणि ज्या वस्तूच्या अज्ञानानें, नसलेलें मीतूंपण जगांत प्रचारांत आणलें; २८०. ज्याप्रमाणें निर्दैवी पुरुषाची पोकळ आशा वाढत असते, त्याप्रमाणें ज्या स्वरूपापासून विश्वपरंपरेच्या विस्ताराची एवढी वाढ होते, २८१. अर्जुना, ती आपली पहिली वस्तू (आपलें मूळ आत्मस्वरूप) आपण आपल्याच ठिकाणीं पहावी. ती कशी तर, जसें थंडीनें थंडी थंड व्हावी त्याप्रमाणें [ अभिप्राय असा कीं, या हिंवाच्या (थंडीच्या) दृष्टांतांत त्रिपुटी जशी एक आहे त्याप्रमाणें आत्मस्वरूपांत दृश्य, द्रष्टा व दर्शन ही त्रिपुटी एक आहे असें समजणें, हेंच आपण आपल्या मूळ स्वरूपाला पाहाणें होय. ] २८२. अर्जुना, त्याला (आत्मवस्तूला) ओळखण्याची आणखी एक खूण आहे, ती ही कीं, ज्याच्याशीं ऐक्य झालें असतां, पुनर्जन्मच प्राप्त होत नाहीं. २८३. परंतु महाप्रळयकाळच्या पाण्यानें जसें सर्वत्र सारखें भरलेपण असतें, तसें ज्ञानानें ज्यांचा आत्मभाव सर्वत्र सारखा पसरलेला असतो, असें जे पुरुष, ते त्या आत्मवस्तूला भेटतात. २८४.

मोहमानरहित, संगरूपी दोष जिंकलेले, आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं ज्यांची नित्य स्थिति आहे असे, सर्व काम पूर्णपणें निवृत्त झालेले, सुख व दुःखनामक द्वंद्वापासून मुक्त झालेले असे ज्ञानी, तें अच्युत पद पावतात. ५.

वर्षाऋतूच्या शेवटीं ज्याप्रमाणें ढग आकाशाला टाकून जातात, त्याप्रमाणें ज्या पुरुषांच्या मनाला मोह व मान आपण स्वतः टाकून गेले. २८५. ज्याप्रमाणें दरिद्री व निर्दय अशा पुरुषाला त्याचे नातलग कंटाळतात त्याप्रमाणें जे पुरुष विकाराच्या तावडींत सांपडत नाहींत. २८६. ज्याप्रमाणें फळें आलेलें केळीचें झाड आपोआप उपटून पडतें, त्याप्रमाणें प्रबल आत्मलाभामुळें (आत्मानुभवामुळें) ज्यांची क्रिया हळू हळू (आपोआप) सुटत आहे. २८७. ज्याप्रमाणें वृक्षाला आग लागली असें पाहून (त्या वृक्षावर असलेले पक्षी) जिकडे रस्ता सांपडेल तिकडे पळतात, त्याप्रमाणें सर्व विकल्पांनीं ज्या पुरुषास टाकलें. २८८. अर्जुना, ऐक. ज्या भेदरूपी जमिनीवर सर्व प्रकारचे दोषरूपी गवत वाढतें, त्या भेदबुद्धीची ज्यांच्या ठिकाणीं वार्ताही नसते. २८९. सूर्योदयाबरोबर ज्याप्रमाणें रात्र आपोआप पळून जाते, त्याप्रमाणें ज्या (पुरुषांपासून) अविवेकसह देहाहंता पळून गेली. २९०. ज्याप्रमाणें आयुष्य नसलेल्या जीवाला शरीर एकदम टाकून देतें, त्याप्रमाणें जे पुरुष अज्ञानात्मक द्वैताकडून टाकले गेलेले आहेत. २९१. ज्याप्रमाणें परिसाला लोखंडाचा दुष्काळ असतो अथवा ज्याप्रमाणें सूर्याला काळोख मिळत नाहीं, त्याप्रमाणें ज्या पुरुषांना द्वैतबुद्धीचा नेहमीं दुष्काळ असतो. २९२. अरे अर्जुना, सुखदुःखरूपी द्वंद्वें, जीं या देहांत अनुभवास येतात, तीं ज्या पुरुषांच्या समोर येतच नाहींत. २९३. ज्याप्रमाणें जागें झालें असतां स्वप्नांतील राज्यप्राप्ति अथवा मरण हीं आनंदास व दुःखास कारण होत नाहींत, असें समज. २९४. सर्पांकडून गरुड जसा धरला जात नाहीं, त्याप्रमाणें सुखदुःख व पुण्यपापरूपी द्वंद्वाकडून जे वेढले जात नाहींत २९५. आणि जे ज्ञानीपुरुषरूपी राजहंस अनात्म पदार्थमात्ररूपी पाणी टाकून, आत्मरसरूपी दूध सेवन करतात. २९६. ज्याप्रमाणें सूर्य हा, आपलाच रस पृथ्वीवर वर्षून, पुनः तोच रस आपल्या किरणसमुदायाच्या द्वारें (आकर्षून) आपल्या बिंबाच्या ठिकाणींच आणतो. २९७. त्याप्रमाणें जो आत्मभाव, खऱ्या स्वरूपाच्या भ्रांतीमुळें, देहादि अनेक अनात्म वस्तूंच्या ठिकाणीं पसरलेला आहे, तो आत्मभाव, जे सत्पुरुष, (पुन्हा) आपल्या ज्ञानदृष्टीद्वारां नेहमीं आपल्या ठिकाणींच एकत्र पाहतात. (एकत्वानें पहातात.) २९८. फार काय सांगावें! गंगेचा ओघ जसा समुद्रांत बुडतो (म्हणजे तद्रूप होतो,) तसा त्या सत्पुरुषांचा विवेक आत्म्याच्या निश्चयामध्यें तद्रूप होतो. २९९. ज्याप्रमाणें (आकाश हें सर्वव्यापी असल्यामुळें) आकाशाला या ठिकाणाहून पलीकडच्या ठिकाणाला जाण्याचें कारण नाहीं, त्याप्रमाणें आपणच सर्व झाल्याकारणानें, ज्यांना इच्छा करण्याचें कारणच रहात नाहीं. ३००. जसा अग्नीचा डोंगर कोणत्याही बीजाचा अंकुर घेत नाहीं, त्याप्रमाणें ज्यांच्या मनामध्यें कोणताच विकार उत्पन्न होत नाहीं. ३०१.

जैसा काढिलिया मंदराचळु। राहे क्षीराब्धि निश्चळु। तैसा तुटी जयां सळू। कामोर्मींचा ॥ २ ॥ चंद्रमा कळीं धाला । न दिसे कोणें आंगीं वोसावला । तेवीं अपेक्षेचा अवखळा । न पडे जयां ॥ ३ ॥ हें किती बोलूं असांगडें । जेवीं परमाणु नुरे वायूपुढें । तैसें विषयांचें नावडे । नांवाचि जयां ॥ ४ ॥ एवं जे जे कोणी ऐसे । केले ज्ञानाख्यहुताशें । ते तेथ मिळती जैसें । हेमीं हेम ॥ ५ ॥ तेथ म्हणिजे कवणें ठाईं । ऐसेंही पुससी कांहीं । तरी तें पद गा नाहीं । वेंचु जया ॥ ६ ॥ दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयत्वें जाणिजे । अमुकें ऐसें म्हणिजे । तें जें नव्हे ॥ ७ ॥ पैं दिपाचिया बंबाळीं । कां चंद्र हन जें उजळी । हें काय बोलों अंशुमाळी । प्रकाशी जें ॥ ८ ॥ तें आघवेंचि दिसणें । जयातें कां न देखणें । विश्व भासतसे जेणें । लपालेन ॥ ९ ॥ जैसें शिंपीपण हारपे । तंव तंव खरें होय रुपें । कां दोरी लपतां सापें । फार होइजे ॥ ३१० ॥

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः । यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें । तियें जयाचेनि आंधारें । प्रकाशती ॥११॥ ते वस्तु कीं तेजोराशी । सर्वभूतात्मक सरिसी । चंद्रसूर्यांचां मानसीं । प्रकाशे जे ॥ १२ ॥ म्हणौनि चंद्रसूर्य कडवसां । पडती वस्तूच्या प्रकाशा । यालागीं तेज जें तेजसा । तें वस्तूचें आंग ॥१३॥ आणि जयाचां प्रकाशीं । जग हारपे चंद्रार्केंसीं । सचंद्र नक्षत्रें जैसीं । दिनोदयीं ॥ १४ ॥ नातरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नींची डिंडी मावळे । कां नुरेचि सांजवेळे । मृगतृष्णिका ॥१५॥ तैसा जिये वस्तूचां ठायीं । कोण्हीच कां आभासु नाहीं । तें माझें निजधाम पाहीं । पाटाचें गा ॥ १६ ॥ पुढती जे तेथ गेले । ते न घेतीचि माघौतीं पाउलें । महोदधीं कां मिनले । स्रोत जैसे ॥ १७ ॥ कां लवणाची कुंजरी । सूदालिया लवणसागरीं । होयाचि ना माघारी । परती जैसी ॥ १८ ॥ नाना गेलिया अंतराळा । न येतीचि वन्हिज्वाळा । नाहीं तप्तलोहौनि जळा । निघणें जेवीं ॥ १९ ॥ तेवीं मजसीं एकवाट । जे जाले ज्ञानें चोखट । तयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥ ३२० ॥ तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो । पार्थु म्हणे जी जी महापसावो । परी विनंती एकी देवो । चित्त देतु ॥ २१ ॥ तरी देवेंसि स्वयें एक होती । मग माघौते जे न येती । तें देवेंसि भिन्न आथी । कीं अभिन्न जी ॥ २२ ॥ जरी भिन्नचि अनादिसिद्ध । तरी न येती हें असंबद्ध । जे फुलां गेलें षट्पद । ते फुलेंचि होतु पां ॥ २३ ॥ पैं लक्ष्याहुनि अनारिसें । बाण

( समुद्रमंथनाचे वेळीं मंदारपर्वताची रवी केली होती ) ती मंदारपर्वताची रवी क्षीरसागरांतून काढल्यानंतर, तो क्षीरसागर जसा शांत राहिला, त्याप्रमाणें ज्यांच्या अंतः-करणांत कामरूपी लाटेची उसळी उत्पन्न होत नाहीं. ३०२. जसा थोड्या कलांनीं युक्त चंद्र कोणत्याही बाजूला अपूर्ण दिसत नाहीं, त्याप्रमाणें कसलीही इच्छा उत्पन्न होणें, हें न्यून ज्यांचे ठिकाणीं नसतें. ३०३. त्या पुरुषाची गोष्ट निरुपम आहे, तेव्हां त्या पुरुषांचें मी किती वर्णन करूं ! ज्याप्रमाणें वायूच्या जोरापुढें रजः-कणांचा टिकाव लागत नाहीं, त्याप्रमाणें ज्यांना विषयाचें नांव देखील आवडत नाहीं. ३०४. याप्रमाणें आत्मज्ञान म्हणून प्रसिद्ध असलेल्या अग्नीनें जे कोणी असे ( वर वर्णन केल्याप्रमाणें ) केलेले आहेत, ते त्या आत्मस्वरूपांत, जसें सोन्यांत सोनें मिळतें, त्याप्रमाणें मिळतात. ३०५. परंतु तेथें म्हणजे कोणत्या ठिकाणीं, असें देखील कांहीं तूं विचारशील, ( तर तुला सांगतों ) तर ज्या ठिकाणाला नाश नाहीं, तें तें ठिकाण होय. ३०६. जे पाहण्याचा विषय म्हणून पाहिलें जातें व जे ज्ञानाचा (जाणण्याचा) पदार्थ म्हणून समजलें जातें किंवा जें कांहीं एक विशेष प्रकारचें आहे, असा ज्याविषयीं व्यवहार होतो, असें जें जें आहे, त्यापैकीं जें नाहीं. ( तेथें ते मिळतात ) ३०७. परंतु दिव्याच्या दिपवून टाकणाऱ्या प्रकाशानें जें प्रकाशलें जातें अथवा चंद्र ज्याला प्रकाशित करतो, ह्यां-चीच गोष्ट काय सांगावी ! ( परंतु ) सूर्यही ज्याचें प्रकाशन करतो, ३०८. वरील तीन प्रकारच्या प्रकाशानें जगांतील सर्व वस्तूंचें दिसणें, म्हणजे ज्याला ( आत्मस्वरूपाला ) न पाहणें होय. ( कारण कीं, आत्मस्वरूपाला पाहण्यांत इतर वस्तूंचा निरास होतो. ) जें आत्मस्वरूप लपलें असतां विश्व भासतें. ( आत्मस्वरूपाच्या अज्ञानांत विश्व भासतें. ) ३०९. ज्याप्रमाणें शिंपीचे शिंप म्हणून यथार्थ ज्ञान जसजसें नाहींसें होतें, तसतसें त्या शिंपीवर मिथ्या भासणारें रुपें खरें आहे, असें भासावयास लागतें. अथवा दोरीच्या यथार्थ स्वरूपाचें अज्ञान असतां सापाचा भास जसा जास्त दृढ होत जातो; ३१०.

तें ( पद ) सूर्य प्रकाशित करीत नाहीं, चंद्र प्रकाशित करीत नाहीं, अग्नि प्रकाशित करीत नाहीं. ज्या ठिकाणीं गेल्यावर ( गेलेले लोक ) परत मागें पाउलच घेत नाहींत, तें माझें अत्यंत श्रेष्ठ निजधाम होय. ६.

त्याप्रमाणें चंद्रसूर्य इत्यादिक जीं हीं मोठमोठालीं तेजें आहेत, तीं ज्या आत्मवस्तूंच्या अज्ञानांत प्रकाश करतात. ३११. ती आत्मवस्तु केवळ तेजाची रास आहे आणि ती आत्मवस्तु सर्व प्राण्यांमध्यें आत्मत्वेंकरून सारखी व्याप्त आहे व जी चंद्रसूर्यांच्या मनांत प्रकाशते. ३१२. म्हणून वस्तूच्या प्रकाशाच्या मानानें चंद्र, सूर्य हे अंधारांत पडतात. ( निस्तेज होतात. ) याकरितां तेजस्वी वस्तूमध्यें जें तेज आहे, तें वस्तूंचें अंग आहे. ३१३. आणि ज्याप्रमाणें सूर्योदयीं चंद्रासह नक्षत्रें लोपतात, त्याप्रमाणें ज्या आत्मवस्तूच्या प्रकाशांत चंद्रसूर्यांसह सर्व जग लोपून जातें. ३१४. अथवा जागें झाल्यावर जसा स्वप्नांतील पसारा नाहींसा होतो अथवा संध्याकाळीं जसें मृगजळ रहात नाहीं; ३१५. त्याप्रमाणें ज्या आत्मवस्तूच्या ठिकाणीं कोणताच भास नाहीं, अर्जुना, तें माझें मुख्य ठिकाण आहे, असें समज. ३१६. तेथें ( निजधामाच्या ठिकाणीं ) जे लोक गेले, ते पुन्हा मागें पाऊल घेत नाहींत. ( म्हणजे पुन्हा जन्माला येत नाहींत ), ( तें कसें तर ) जसे महासागरास मिळालेले नद्यांचे ओघ ( जसे माघारी येत नाहींत तसे. ) ३१७. अथवा मिठाची हत्तीण ज्याप्रमाणें खाऱ्या समुद्रांत घातली असतां, ती जशी परत माघारी येतच नाहीं. ३१८. अथवा आकाशांत मिळालेल्या अग्नीच्या ज्वाळा जशा परत येत नाहींत, (अथवा ) ज्याप्रमाणें तापलेल्या लोखंडाकडून पाण्याला परत येणें नाहीं; ३१९. त्याप्रमाणें शुद्ध ज्ञानानें जे माझ्या स्वरूपीं मिळाले, त्यांना पुनर्जन्माचा मार्ग मोडला; ( त्यांना पुनर्जन्म नाहीं. ) ३२०. येथें ( असें देव बोलल्यावर ) बुद्धिरूपी पृथ्वीचा राजा जो अर्जुन, तो म्हणतो, महाराज, ( हें आपलें आत्मबोध सांगणें हा ) मोठा प्रसाद आहे. परंतु माझ्या एका विनंतीकडे देवांनीं लक्ष द्यावें. ३२१. तर महाराज, जे पुरुष देवाशीं स्वतः एक होतात, ( तुमच्या स्वरूपाशीं ऐक्याला पावतात ) व मग माघारीं येत नाहींत, ते पुरुष ( मूळचे ) आपल्याशीं ( देवाशीं ) भिन्न असतात अथवा अभिन्न असतात ? ३२२. जर ते पुरुष स्वरूपैंकरून मूळचे भिन्नच असले, तर ते माघारीं येत नाहींत, हें आपलें म्हणणें विसंगत आहे. कारण कीं, हें आपलें म्हणणें खरें असेल तर मग, फुलांत गुंग झालेले भ्रमर खरोखर फुलेंच व्हावयास पाहिजेत. ३२३. स्वरूपानें लक्ष्याहून वेगळे असलेले बाण, लक्ष्याला विंधून (लक्ष्यरूप

लक्ष्मीं शिवोनि जैसे । मागुते पडती तैसे । येतीचि ते ॥ २४ ॥ नातरी तूंचि ते स्वभावें । तरी कोणें कोणासि मिळावें । आपणयासी आपण रुपावें । शस्त्रें केवीं ॥ २५ ॥ म्हणोनि तुजसी अभिन्ना जीवां । तुझा संयोगवियोगु देवा । नये बोलों अवयवां । शरीरेंसीं ॥ २६ ॥ आणि जे सदां वेगळे तुजसीं । तयां मिळणी नाहीं कोणे दिवसीं । मा येती न येती हे कायसी । वायबुद्धि ॥ २७ ॥ तरी कोण गा तूतें । पावोनि न येती माघौते । हे विश्वतोमुखा मातें । बुझावीं जी ॥ २८ ॥ इये आक्षेपीं अर्जुनाचां । तो शिरोमणि सर्वज्ञांचा । तोषला बोध शिष्याचा । देखोनियां ॥ २९ ॥ मग म्हणे गा महामती । मातें पावोनि न येती पुढती । ते भिन्नाभिन्न रिती । आहाती दोनी ॥ ३३० ॥ जैं विवेकें खोलें पाहिजे । तरी मी तेचि ते सहजें । ना आहाचवाहाच तरी दुजे । ऐसेंही गमती ॥ ३१ ॥ जैसे पाणियांहि वेगळ । आपजतां दिसती कल्लोळ । एऱ्हवीं तरी निखिळ । पाणीचि तें ॥ ३२ ॥ कां सुवर्णाहुनि आनें । लेणीं गमती भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । आघवेंचि तें ॥ ३३ ॥ तैसें ज्ञानाचिये दिठी । मजसीं अभिन्नचि ते किरीटी । येर भिन्नपण तें उठी । अज्ञानास्तव ॥ ३४ ॥ आणि साचोकारेनि वस्तुविचारें । कैंचें मज एकासि दुसरें । जें भिन्नाभिन्नव्यवहारें । उमसिजेल ॥ ३५ ॥ आघवोंचि आकाश ग्रसूनि पोटीं । बिंबाचि जैं आते खोटी । तैं प्रतिबिंब कें उठी । कें रश्मि शिरे ॥ ३६ ॥ कां कल्पांतींचिया पाणिया । काय वोत भरताती धनंजया । म्हणोनि कैंचे अंश अविक्रिया । एका मज ॥ ३७ ॥ परी ओघाचेनि मेळें । पाणी उजू परी वांकुडें जालें । रवी दुजेपण आलें । तोयबगें ॥ ३८ ॥ व्योम चौफळें कीं वाटोळें । हें ऐसें कायिसयाही मिळे । परी घटमठीं वेंटाळे । तैसेंही आथी ॥ ३९ ॥ हां गा निद्रेचेनि आधारें । काय एकलेनि जग न भरे । स्वप्नीचेनि जैं अवतरे । रायपणें ॥ ३४० ॥ कां मिनलेनि किडाळें । वानिभेदासि ये सोळें । तैसा स्वमाया वेंटाळें । शुद्ध जैं मी ॥ ४१ ॥ तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहंविकल्पांचें मांडे । मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ॥ ४२ ॥

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः । मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

ऐसें शरीराचि येवढें । जैं आत्मज्ञान वेगळें पडे । तैं माझा अंशु ऐसें आवडे । थोडेपणें ॥ ४३ ॥ समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्हसे । तो समुद्रांशु ऐसा दिसे । सानिवा जेवीं ॥ ४४ ॥ तेवीं जडातें जीवविता । देहअहंता उपजविता । मी जीव गमें पंडुसुता । जीवलोकीं ॥ ४५ ॥ पैं जीवाचिया बोधा । गोचरु जो हा धांदा । तो जीवलोकशब्दा । अभिप्रावो ॥ ४६ ॥ अगा उपजणें

न होतां ) जसे पुन्हा वेगळे पडतात, तसे ते पुरुष, देवाच्या स्वरूपाला स्पर्श करून, देवाशीं ऐक्याला न पावतां, पुन्हा माघारीं येतीलच (म्हणजे वेगळे पडतीलच.) ३२४. अथवा ते पुरुष जर स्वभावतः तूंच असले ( म्हणजे त्यांचें व तुझें स्वरूप मूळचें एकच असलें ) तर मग कोणी कोणाला मिळावयाचें? शस्त्रानें आपण आपल्याला कसें रुपावयाचें ? ३२५. देवा, म्हणून तुझ्याशीं अभिन्न जे जीव, त्यांचा तुझ्याशीं संयोग अथवा वियोग ( होतो ), हें म्हणतां येत नाहीं; कसें तर, जसें शरीर व शरीराचे अवयव, यांचा संयोग अथवा वियोग म्हणतां येत नाहीं त्याप्रमाणें. ३२६. आणि तुझ्याशीं जे सदा भिन्न आहेत, त्यांना कोणत्याही दिवशीं तुझ्यांत मिळतां यावयाचें नाहीं. मग ते तुझ्या स्वरूपाहून माघारीं येतात अथवा येत नाहींत, ही कसली व्यर्थ समजूत ! ३२७. तरी तुला ( तुझ्या स्वरूपाला ) पावून माघारीं येत नाहींत, ते कोण ? हे सर्व बाजूंला मुख असलेल्या देवा, हें मला समजावून सांगा. ३२८. अर्जुनानें अशी शंका केल्यावर, तो जाणत्यांमध्यें श्रेष्ठ असलेला श्रीकृष्ण परमात्मा, आपल्या शिष्याचा बोध पाहून, संतुष्ट झाला. ३२९. मग देव म्हणतात, हे विशालबुद्धीच्या अर्जुना, माझ्या स्वरूपीं ऐक्याला पावून जे पुनः माघारीं येत नाहींत, त्यांच्या मूळस्वरूपासंबंधानें ते वेगळे आहेत व वेगळे नाहींत, हे दोन्हीही प्रकार संभवतात. ३३०. जर खोल विचारानें ( आत्मदृष्टीनें ) पाहिलें, तर ते पुरुष स्वभावतः मद्रूपच आहेत आणि जर वरवरच्या दृष्टीनें ( देहदृष्टीनें ) पाहिलें तर ते भिन्न ( माझ्याहून वेगळे ) आहेत, असेंही वाटतात. ३३१. ज्याप्रमाणें लाटा उत्पन्न होत असतां, त्या पाण्याहून वेगळ्या आहेत असें दिसतें; पण सहज विचार करून पाहिलें तर, त्या लाटा केवळ पाणीच आहेत. ३३२. अथवा ( आकाराच्या दृष्टीनें पाहिलें असतां ) दागिने सोन्याहून भिन्न आहेत, असें वाटतें. मग ( विचाराच्या दृष्टीनें ) पाहिलें असतां ते दागिने सर्व सोनेंच आहेत. ३३३. त्याप्रमाणें ज्ञानाच्या दृष्टीनें, अर्जुना, ते पुरुष माझ्याशीं अभिन्नच आहेत. दुसरें जें वेगळेपण उत्पन्न होतें, तें अज्ञानामुळें होतें. ३३४. आणि खरोखर वस्तुविचारानें ( आत्मदृष्टीनें ) पाहिलें असतां, मी जो एक, त्या मला दुसरें कोठलें ? कीं, जे वेगळें आहे किंवा एक आहे, असा व्यवहार होऊन, तद्द्वारां उघड करतां येईल ? ३३५. जर सर्वच्या सर्व आकाश पोटांत घालून ( सूर्य ) बिंबानें ब्रह्मांडगोल व्यापून टाकला, तर त्या सूर्याचें प्रतिबिंब कोठें उत्पन्न होईल ? आणि त्याचीं किरणें कोठें शिरतील ? ३३६. अथवा कल्पांतकाळचें जें आब्रह्मस्तंबपर्यंत उदक असतें, तें ( उदक ) अनेक ( नद्यांच्या ) प्रवाहांचें पाणी भरून बनलें आहे काय ? एवढ्याकरितां मी जो एक अविक्रिय, त्या मला अंश कोठले ? ३३७. परंतु पात्राच्या संबंधानें ( नदीचें ) पाणी सरळ ( असतां ) पण वाकडें झालें. पाण्याच्या संबंधानें ( पाण्यांत प्रतिबिंब पडल्या कारणानें ) सूर्याला दोनपणा ( बिंबपणा व प्रतिबिंबपणा असा ) आला. ३३८. हें आकाश चौकोनी अथवा वाटोळें, असें कशानें मिळणार आहे ? परंतु आकाश जेव्हां घटाकडून अथवा मठाकडून वेढिलें जातें, तेव्हां तसेंही ( वाटोळें अथवा चौकोनी ) असतें. ३३९. अरे, निद्रेच्या आधारावर उत्पन्न झालेल्या स्वप्नांत जेव्हां ( निजणारा ) आपण राजा म्हणून प्रगट होतो, तेव्हां त्याच्या एकट्याकडून ( स्वप्नांतील ) सर्व जग भरलें जात नाहीं काय ? ३४०. अथवा हिणकस धातु मिसळली असतां शंभर नंबरी सोनें जसें निरनिराळ्या कसाला येतें, त्याप्रमाणें शुद्ध जो मी, तो जेव्हां आपल्या मायेनें वेटाळला जातो, ३४१. तेव्हां ( माझ्या ठिकाणीं ) एक अज्ञानाचा मुख्यतः व्यवहार होतो. त्या योगानें, मी कोण, अशा संशयास आरंभ होतो आणि मग विचार करून, देह मी, असा निश्चय केला जातो. ३४२.

जीवलोकामध्यें जीवरूप पावलेला माझाच सनातन अंश प्रकृतीचे ठिकाणीं स्थित अशा मनासह सहा इंद्रियांना (आपल्याजवळ) ओढून घेतो. ७.

याप्रमाणें, जेव्हां आपल्या स्वतःच्या विषयींचें ज्ञान, शरीर तेंच आपण इतकें मर्यादित होऊन व्यापक स्वरूपापासून अलग होतें, त्या वेळेस त्याच्या मर्यादितपणाच्या धर्मावरून, तो माझा एक भाग आहे, असें वाटतें. ३४३. समुद्र हा वायूच्या योगानें, लाटांच्या आकारानें प्रगट होतो; तो लाटांचा आकार जसा समुद्राचा लहानसा अंश असा दिसतो. ३४४. त्याप्रमाणें, अर्जुना, जड देहाला सचेतन करणारा आणि त्या एकदेशी देहासंबंधानें अहंकार उत्पन्न करणारा जो मी, तोच मी, जीवलोकांत जीव असा वाटतो. ३४५. जीवाच्या ज्ञानाला जी ही घडामोड चाललेली दिसते, ती जीवलोक या शब्दाचा अर्थ होय. ३४६. अर्जुना, शरीर उत्पन्न झालें असतां, मी जन्मास आलों व तें नाहींसें झालें, म्हणजे मी मेलों, अशी जी

निमणें । हें साचचि जें कां मानणें । तो जीवलोकु मी म्हणें । संसारु हन ॥ ४७ ॥ एवंविध जीवलोकीं । तूं मातें ऐसा अवलोकीं । जैसा चंद्रु कां उदकीं । उदकातीत ॥४८॥ पैं काश्मिराचा रवा । कुंकुमावरी पांडवा । आणिका गमे लोहिवा । तो तरी नव्हे ॥ ४९ ॥ तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडे । परी कर्ता भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांती ॥ ३५० ॥ किंबहुना आत्मा चोखटु । होऊनि प्रकृतीसी एकवटु । बांधे प्रकृतिधर्मांचा पाटु । आपणपयां ॥ ५१ ॥ पैं मनादि साही इंद्रियें । श्रोत्रादि प्रकृतिकार्यें । तियें माझीं म्हणौनि होये । व्यापारारूढ ॥ ५२ ॥ जैसें स्वप्नीं परिव्राजें । आपणपयां आपण कुटुंब होईजे । मग तयाचेनि धांविजे । मोहें सैरा ॥ ५३ ॥ तैसा आपलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती- । सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥ ५४ ॥ मनाचां रथीं वळघे । श्रवणाचां द्वारें निघे । मग शब्दाचिया रिघे । रानामाजीं ॥ ५५ ॥ तोचि प्रकृतीचा वागोरा । करी त्वचेचिया मोहरा । आणि स्पर्शाचिया घोरा । वना जाय ॥ ५६ ॥ कोणे एके अवसरीं । रिघोनि नेत्राचां द्वारीं । मग रूपाचां डोंगरीं । सैरा हिंडे ॥ ५७ ॥ कां रसनेचिया वाटा । निघोनि गा सुभटा । रसाचा दरकुटा । भरोंचि लागे ॥ ५८ ॥ नातरी येणेंचि घ्राणें । देहेशु करी निघणें । मग गंधाचीं दारुणें । आडवें लंघी ॥ ५९ ॥ ऐसेनि देहेंद्रियनायकें । धरूनि मन जवळिकें । भोगिजती शब्दादिकें । विषय-भरणें ॥ ३६० ॥

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः । गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥ ८ ॥

परी कर्ता भोक्ता ऐसें । हें जीवाचें तैंचि दिसे । जैं शरीरीं कां पैसे । येकाधिये ॥ ६१ ॥ जैसा आथिला आणि विलासिया । तैंचि वोळखों ये धनंजया । जैं राजसेव्या ठाया । वस्तीसि ये ॥ ६२ ॥ तैसा अहंकर्तृत्वाचा वाढु । कां विषयेंद्रियांचा धुमाड्ड । हा जाणिजे तैं निवाड्ड । जै देह पावे ॥ ६३ ॥ अथवा शरीरातें सांडी । तऱ्ही इंद्रियांची तांडी । हे आपणपयांसवें काढी । घेऊनि जाय ॥ ६४ ॥ जैसा अपमानिला अतिथि । ने सुकृताची संपत्ति । कां सूत्रखडेयाची गति । सूत्रतंतू ॥ ६५ ॥ ना ना मावळतेनि तपनें । नेइजती लोकांचीं दर्शनें । हें असो दुती पवनें । नेईजे जैसी ॥ ६६ ॥

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च । अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

तेवीं मनःषष्ठां ययां । इंद्रियांतें धनंजया । देहराजु ने देहा- । पासूनि गेला ॥ ६७ ॥ मग येथ अथवा स्वर्गीं । जेथ जें देह आपंगी । तेथ तैसेंचि पुढती पांगी । मनादिक ॥ ६८ ॥ जैसा मालवलिया दिवा । प्रभेसि जाय पांडवा । मग उजळिजे तेथ तेथवां । तैसाचि फांके ॥ ६९ ॥ परी ऐसैसिया राहाटी । अविवेकियांचिये दिठी । येतुलें हें किरीटी । गमेचि गा ॥ ३७० ॥ जे आत्मा देहा आला । आणि विषयो येणेंचि भोगिला । अथवा देहोनि गेला । हें

खरोखरच समजूत होऊन बसलेली असते, त्या समजुतीस मी जीवलोक अथवा संसार म्हणतों. ३४७. अशा प्रकारच्या जीवलोकांत, तूं मला अशा तऱ्हेनें पहा कीं, ज्याप्रमाणें चंद्र हा ( प्रतिबिंबरूपानें ) पाण्यांत असून ( बिंबरूपानें ) पाण्याबाहेर आहे, त्याप्रमाणें ( पहा ). ३४८. अर्जुना, स्फटिकाचा तुकडा केशरावर ठेविला असतां ( पहाणाराला ) तो तांबड्या रंगाचा आहे असें वाटतें; परंतु ( वास्तविक पाहिलें असतां ) तो तर स्फटिक ( स्वरूपानें ) तांबडा नाहीं. ३४९. त्याप्रमाणें ( जरी जीवलोकाच्या व्यापारांत मी सांपडलों आहे असा भासलों तरी ) माझा आरंभरहितपणा नाहींसा होत नाहीं व त्याचप्रमाणें माझा अक्रियपणा ( कर्मरहितपणा ) मोडत नाहीं. परंतु ( असें असूनही ) मी कर्ता भोक्ता आहे असें जें वाटतें, ती भ्रांति आहे, असें समज. ३५०. फार काय सांगावें ! निर्लेप जो आत्मा, तो अविद्याकार्य जें शरीर, त्याच्याशीं एक होऊन, शरीराचे धर्म आपल्या ठिकाणीं पाहूं लागतो ( शरीराचे धर्म जे जन्ममरणादि, त्यांचा आपल्यावर अध्यास करतो. ) ३५१. मनासहित श्रोत्रआदिकरून जीं सहा ज्ञानेंद्रियें, जीं वास्तविक प्रकृतीचीं कार्यें असतांना, तीं माझीं आहेत म्हणून ( जीव ) व्यापार करण्यास प्रवृत्त होतो. ३५२. ज्याप्रमाणें एकाद्या संन्याशानें स्वप्नामध्यें आपण आपलें कुटुंब व्हावें आणि मग त्या बायकामुलांच्या मोहानें इकडे तिकडे धांवावें; ३५३. त्याप्रमाणें आत्मा आपल्या मूळस्वरूपाच्या विसरामुळें, आपणच प्रकृति ( शरीर ) आहोंत, असें समजून पुनः ( विषयोपार्जनद्वारां ) शरीरालाच भजतो. ३५४. जीवात्मा मनाच्या रथावर आरूढ होऊन ( मनाचा आश्रय करून ) श्रवणेंद्रियाच्या द्वारानें निघतो आणि मग शब्दांच्या रानांत प्रवेश करतो. ३५५. तोच प्रकृतीचा लगाम त्वचेकडे वळवून, मग स्पर्शविषयरूपी भयंकर रानांत जातो. ३५६. कोणा एका वेळेला नेत्रांच्या द्वारानें बाहेर पडून, रूपाच्या डोंगरांत मोकाट फिरतो. ३५७. अथवा अर्जुना, जिव्हाद्वारें बाहेर पडून, रसाची दरी ( पोट ) भरावयासच लागतो. ३५८. अथवा याच नाकाचे द्वारानें, देहाचा स्वामी जो जीव, तो बाहेर निघतो व मग गंधविषयाचीं भयंकर रानें ओलांडतो. ३५९. अशा तऱ्हेनें देह आणि इंद्रियें, यांचा स्वामी जीव, तो मनास हाताशीं धरून शब्दादिक विषयांचा समुदाय भोगतो. ३६०.



जें ( नवीन जन्मांतलें नवीन ) शरीर पावतो आणि जें (पूर्वींच्या जन्मांतलें जीर्ण) शरीर टाकून देतो ( त्यामध्यें आणि त्यामधून ) तो ( जीवरूपी ) ईश्वर, गंधाश्रयापासून ( पुष्पादिकांपासून ) वायु ज्याप्रमाणें गंध नेतो त्याप्रमाणें, हीं इंद्रियें घेऊन जातो. ८.

परंतु कर्ता, भोक्ता अशी जीवाची स्थिति तेव्हांच दिसते कीं, जेव्हां तो जीव ( कर्मानुसार ) एकाद्या स्थूल देहांत प्रवेश करतो. ३६१. अर्जुना, जसा एकादा पुरुष ऐश्वर्यसंपन्न व विलासी आहे, हें तेव्हांच ओळखतां येतें कीं, जेव्हां तो एकाद्या प्रसिद्ध अशा राजधानीच्या ठिकाणीं रहावयास येतो, ३६२. त्याप्रमाणें अहंकाराचें आधिक्य अथवा विषय व इंद्रियें यांचा धुमाकूळ, यांची स्पष्टता त्याच वेळेला दिसून येते कीं, जेव्हां जीवाला (कर्मानुसार एकादा ) स्थूलदेह प्राप्त होतो. ३६३. अथवा जीव ( जेव्हां एका ) शरीरास टाकतो ( तेव्हां ) तरी तो आपल्याबरोबरच हा इंद्रियांचा समुदाय त्या शरीरांतून काढतो व आपल्याबरोबरच तो इंद्रियसमुदाय दुसऱ्या शरीरांत ) घेऊन जातो. ३६४. अपमान केलेला अतिथि ज्याप्रमाणें ( अपमान करणाराची ) पुण्यरूप संपत्ति घेऊन जातो अथवा दोरा तुटला असतां तो कळसूत्री बाहुल्यांची गति ( हालणें चालणें ) घेऊन जातो. ३६५. अथवा मावळत्या सूर्याकडून (ज्याप्रमाणें) लोकांच्या दृष्टया नेल्या जातात; हा दृष्टान्त राहूं दे. वाऱ्याकडून जसा सुवास नेला जातो. ३६६. त्याप्रमाणें, अर्जुना, देहराज जो जीव, तो एका देहांतून बाहेर पडला असतां ( आपल्याबरोबर ) मनासह पांच ज्ञानेंद्रियें नेतो. ३६७. मग इहलोकीं अथवा स्वर्गांत, तो जीव जेथें ज्या देहाचा आश्रय करतो, तेथें त्या देहांत मनादिकांचा पुनः तसाच विस्तार करतो. ३६८.

श्रोत्र, चक्षु, त्वक्, जिव्हा आणि घ्राण तसेंच मन, यांचा अंगिकार करून ( तीं पुनः मांडून ) हा ( आत्मा ) ( शब्दादि ) विषयांचा उपभोग घेतो. ९.

अर्जुना, जसा दिवा मालविला असतां तो प्रभेसह जातो, मग तो लाविला असतां त्या वेळीं लावलेल्या ठिकाणीं तो ( पूर्वीप्रमाणेंच ) प्रकाशतो. ३६९. परंतु अर्जुना, अशा या व्यवहारामध्यें अविचारी लोकांच्या दृष्टीला एवढें हें वाटतेंच. ३७०. कीं, आत्मा देहाला आला ( जन्माला आला ) आणि या आत्म्यानेंच विषय

साचचि मानी ॥ ७१ ॥ एऱ्हवीं येणें आणि जाणें । कां करणें आणि भोगणें । हें प्रकृतीचें तेणें । मानियेलें ॥ ७२ ॥ परी देहाचें मोटकें उभें । आणि चेतना तेथ उपलभे । तिये चळवळेचेनि लोभें । आला म्हणती ॥ ७३ ॥

उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् । विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥

तैसेंचि तयां संगती । इंद्रियें आपलालां अर्थीं वर्तती । तया नांव सुभद्रापती । भोगणें जया ॥ ७४ ॥ पाठीं भोगक्षीण आपैसें । देह गेलिया तें न दिसे । तेथें गेला गेला ऐसें । बोभाती गा ॥ ७५ ॥ पैं रुखु डोलतु देखावा । तरी वारा वाजतु मानावा । रुखु नसे तेथें पांडवा । नाहीं तो गा ॥ ७६ ॥ कां आरसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे । तरी तेथवांचि जालें मानिजे । काय आधीं नाहीं ॥ ७७ ॥ कां परता केलिया आरिसा । लोपु जाला तया आभासा । तरी आपणपें नाहीं ऐसा । निश्चयो करावा ॥ ७८ ॥ शब्द तरी आकाशाचा । परी कपाळीं पिटे मेघांचा । कां चंद्रीं वेगु अभ्राचा । आरोपिजे ॥ ७९ ॥ तैसें होईजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रिये । निष्टंकिती गा मोहें । आंधळे ते ॥ ३८० ॥ येथ आत्मा आत्मयाचां ठायीं । देखिजे देहींचा धर्मु देहीं । ऐसे देखणें ते पाहीं । आन आहाती ॥ ८१ ॥ ज्ञानें कां जयांचे डोळे । देखोनि न राहाती देहींचे खोळे । सूर्यरश्मी आणियाळे । ग्रीष्मीं जैसे ॥ ८२ ॥ तैसी विवेकाचेनि पैसें । जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे । ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ॥ ८३ ॥ जैसें तारागणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें । परी तें तुटोनि नाहीं पडिलें । ऐसें निवडे ॥ ८४ ॥ गगन गगनींचि आहे । हें आभासे तें वाये । तैसा आत्मा देखती देहें । गंवसिलाही ॥ ८५ ॥ खळाळाचां लगबगीं । फेडूनि खळाळाचां भागीं । देखिजे चंद्रिका कां उगी । चंद्रीं जेवीं ॥ ८६ ॥ कां नाडराचि भरे शोषे । सूर्यु तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें ॥ ८७ ॥ घट मठु घडले । तोचि पाठीं मोडले । परी आकाश तें संचलें । असतचि असे ॥ ८८ ॥ तैसें अखंडे आत्मसत्ते । अज्ञानदृष्टिकल्पितें । हें देहचि होतें जातें । जाणती फुडें ॥ ८९ ॥

भोगला, अथवा ( आत्मा ) देहांतून गेला ( मेला ), हें ( सर्व ) खरेंच मानतो. ३७१. सहज विचार करून पाहिलें तर, जन्माला येणें व मरणें अथवा कर्म करणें आणि ( कर्मांचें फळ सुखदुःख तें ) भोगणें, हें धर्म प्रकृतीचे ( म्हणजे देहाचे ) असतांना तो अविचारी मनुष्य ( ते आत्म्याचे धर्म आहेत असें ) मानतो. ३७२. परंतु लहानसा देह उत्पन्न झाला आणि त्या देहाचे ठिकाणीं चेतना प्रगट झाली कीं, त्या हालचालीच्या योगानें ( आत्मा जन्मास ) आला असें म्हणतात. ३७३.

( शरीर ) सोडून जात असतां, ( शरीर ) धरून रहात असतां, ( विषयांचा ) उपभोग घेत असतां अथवा ( सुखादि ) गुणांनीं युक्त असतां, याला ( आत्म्याला देहाहून वेगळा असा ) अज्ञानी पाहूं शकत नाहींत, ज्ञानरूपी चक्षूनें युक्त असलेले पहातात. १०.

त्याप्रमाणें त्या चेतनेच्या ( जीवाच्या ) संगतीनें इंद्रियें आपआपल्या विषयांत व्यवहार करतात; अर्जुना, त्या व्यवहार करण्यालाच, जे अविचारी लोक, ( जीवाचें ) भोगणें असें म्हणतात. ३७४. नंतर भोगक्षीण झाल्यावर देह आपोआप पडला, म्हणजे ती हालचाल दिसत नाहीं. त्या वेळीं अर्जुना, आत्मा गेला गेला असें ओरडतात. ३७५. झाड हालत असतांना पाहावें, तरच वारा वाहतो आहे, असें मानावें. अर्जुना, जेथें झाडच नाहीं, तेथें तो ( वारा ) नाहीं काय? ३७६. अथवा आरसा समोर ठेवावा आणि त्यांत आपल्याला ( आपल्या प्रतिबिंबाला ) पाहावें, तेव्हांच आपण उत्पन्न झालों असें मानावें? तर त्याच्या ( आरसा पाहाण्याच्या ) पूर्वी आपण नाहीं काय? ३७७. अथवा आरसा बाजूला केल्यावर व त्या आरशांतील प्रतिबिंबाचा लोप झाल्यावर, मग आपण स्वतः नाहीं, असा निश्चय करावा काय? ३७८. ( वास्तविक पाहिलें तर ) शब्द हा तर आकाशाचा ( गुण ) आहे, परंतु तो मेघांच्या कपाळावर हाणला जातो. ( म्हणजे त्या शब्दाचा आरोप मेघावर केला जातो ) अथवा चंद्रावर ढगांच्या वेगाचा आरोप केला जातो. ३७९. त्याप्रमाणें देहानें उत्पन्न व्हावें व नाश पावावें; तें ( देहाचें उत्पन्न होणें व नाश पावणें ), विकाररहित अशा आत्मसत्तेवर, ते आंधळे ( अविचारी ) लोक, भ्रमानें निश्चयपूर्वक आरोपित करितात. ३८०. त्या ठिकाणीं ( म्हणजे जन्ममरणादि विकार होत असतांना ) आत्मा ( जीवात्मा ) आत्म्याच्या ठिकाणीं पहावा ( म्हणजे जीवात्मा हा निर्विकार ब्रह्म आहे, असें समजावें. ) व देहाचे धर्म (जन्ममरणादि विकार) देहाचे ठिकाणीं पाहावेत. (म्हणजे जन्ममरणादि विकार देहाचे आहेत असें समजावें. ) असें पाहणारे ( जाणणारे ) ते वेगळेच आहेत असें समज. ३८१. ज्यांची दृष्टि, देहाला पाहून, ज्ञानाच्या योगानें देहाच्या आकारावर थांबत नाहीं, तर देहाचें निरसन करून आत्म्याला स्पर्श करते. तें कसें तर ग्रीष्म ऋतूमध्यें सूर्याचीं किरणें अणकुचिदार असतात, तीं मेघांच्या पळीला भेदन करून ज्याप्रमाणें बाहेर येतात, त्याप्रमाणें. ३८२. तसे विवेकाच्या विस्तारानें ज्या ज्ञान्यांची बुद्धि आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होते, ते ज्ञानी आत्म्याला पुढें सांगितल्याप्रमाणें पाहातात. ३८३. ज्याप्रमाणें नक्षत्रांनीं भरलेलें आकाश समुद्रांत प्रतिबिंबित होतें, परंतु तें ( आकाश, खरोखर ) तुटून ( समुद्रांत ) पडलें नाहीं, असें निःसंशय ओळखतां येतें. ३८४. आकाश आकाशाच्याच ठिकाणीं आहे, हें ( प्रतिबिंब ) भासतें तें मिथ्या आहे; त्याप्रमाणें ते ( ज्ञानी ), आत्मा देहांत सांपडला असतांही तो देहाहून वेगळा आहे असें ( म्हणजे आत्म्याच्याच ठिकाणीं आत्मा आहे. तो देहांत वास्तविक सांपडलेला नाहीं असें ) जाणतात. ३८५. खळखळ वाहणाऱ्या पाण्याची चंचलता खळखळ वाहणाऱ्या पाण्याच्याच ठिकाणीं आहे असें समजून, ( आतां त्या खळखळ वाहणाऱ्या पाण्यांत प्रतिबिंबीत झालेलें चांदणें जरी चंचल दिसलें तरी ) जसें चांदणें हें चंद्राच्या ठिकाणीं स्थिर आहे, असें पाहावें. ३८६. अथवा पाण्याचें डबकेंच भरतें व वाळतें ( व सूर्य जरी त्या डबक्यांत प्रतिबिंबीत झाला आहे तरी ) तो सूर्य आपण आपल्या ठिकाणीं आहे तसाच आहे, त्याप्रमाणें देह उत्पन्न होत असतांना व नाश पावत असतांना ते ( ज्ञानी ) मला तसा पाहातात. ( म्हणजे देहाच्या उत्पत्तीबरोबर मी उत्पन्न होत नाहीं व देहाच्या नाशाबरोबर मी नाश पावत नाहीं, तर मी आहे तसाच आहें, असें ज्ञानी लोक मला जाणतात.) ३८७. घट व मठ हे तयार केले व नंतर ते मोडून टाकले, परंतु ( घटमठाबरोबर त्यांतील ) आकाश न होतां व न मोडतां भरलेलें आहे तसेंच आहे. ३८८. त्याप्रमाणें अखंड ( त्रिकालाबाधित ) आत्मसत्तेवर अज्ञानदृष्टीनें कल्पिलेले हे देहच उत्पन्न होतात व नाश पावतात, ( व आत्मा आहे तसाच आहे ) हें ते ज्ञानी लोक पक्कें जाणतात. ३८९.

यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् । यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥

चैतन्य चढे ना वोहटे । चेष्टवी ना चेष्टे । ऐसें आत्मज्ञानें चोखटें । जाणती ते ॥ ३९० ॥ आणि ज्ञानही आपैतें होईल । प्रज्ञा परमाणुही उगाणा देईल । सकळ शास्त्रांचें येईल । सर्वस्व हातां ॥ ९१ ॥ परी ते व्युत्पत्ती ऐसी । जरी विरक्ती न रिगे मानसीं । तरी सर्वात्मका मजसीं । नव्हेचि भेटी ॥ ९२ ॥ पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयांसी थारा । तरी नातुडें धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ॥ ९३ ॥ हां गा वोसणतयाचां ग्रंथीं । काइ तुटती संसारगुंती । कीं परिवसिलेया पोथी । वाचिली होय ॥ ९४ ॥ नाना बांधोनियां डोळे । घ्राणीं लाविजती मुक्ताफळें । तरी तयांचें काय कळे । मोल मान ॥ ९५ ॥ तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो । ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे मातें ॥ ९६ ॥ जो एक मी कां समस्तीं । व्यापकु असें भूतजातीं । ऐक तिये व्याप्ती । रूप करूं ॥ ९७ ॥

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् । यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी । ते दीप्ति माझी जाणावी । आद्यंतीं आहे ॥ ९८ ॥ जळ शोषूनि गेलिया सविता । ओलांश पुरवीतसे जे मागौता । ते चंद्रीं पंडुसुता । ज्योत्स्ना माझी ॥ ९९ ॥ आणि दहनपचनसिद्धी । करीतसे जे निरवधी । ते हुताशीं तेजोवृद्धी । माझीचि गा ॥ ४०० ॥

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा । पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥

मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्रमहाजळीं । हे पांसूची ढेंपुळी । विरेचिना ॥ १ ॥ आणि भूतेंही चराचरें । हे धरितसे जियें अपारें । तियें मीचि धरीं धरे । रिगोनियां ॥ २ ॥ गगनीं मी पंडुसुता । चंद्राचेनि मिसें अमृता । भरला जालों चालता । सरोवरु ॥ ३ ॥ तेथूनि फांकती रश्मिकर । ते पाट पेलुनि अपार । सर्वौषधींचे आगर । भरितु असें मी ॥ ४ ॥ ऐसेनि सस्यादिकां सकळां । करीं धान्यजाती सुकाळा । दें अन्नद्वारा जिव्हाळा । भूतजातां ॥ ५ ॥

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधं ॥ १४ ॥

आणि निपजविलें अन्न । तरी तैसें कैंचें दीपन । जेणें जिरूनि समाधान । भोगिती जीव ॥ ६ ॥ म्हणौनि प्राणिजातांचां घटीं । करूनि कंदावरी आगिठी । दीप्ति जठरीं किरीटी । मीचि जालों ॥ ७ ॥ प्राणापानाचां जोडभातीं । फुंकफुंकोनियां अहोरातीं । आटीतसें नेणों किती । उदरामाजीं ॥ ८ ॥ शुष्कें अथवा स्निग्धें । सुपक्कें कां विदग्धें । परी मीचि गा चतुर्विधें । अन्नें पचीं ॥ ९ ॥ एवं मीचि आघवें जन । जना जीववितें मीचि जीवन । जीवनीं मुख्य साधन । वन्हिही मीचि ॥ ४१० ॥ आतां ऐसियाहीवरी काई । सांगों व्याप्तीची नवाई । येथ दुजें

( त्यांपैकीं ) यत्न करणारे योगी ( असतात ते ) याला ( आत्म्याला ) स्वतःमध्यें स्थित असा पहातात. यत्न करणारे पण ज्यांचें मन संस्कृत नाहीं ( ज्यांना वैराग्य नाहीं ), असे अविवेकी यत्न करून देखील ( आत्म्याला ) पाहूं शकत नाहींत. ११.

चैतन्य वाढत नाहीं व कमीही होत नाहीं व तें कोणाला कर्म करावयास लावीत नाहीं अथवा स्वतः कर्म करीत नाहीं, असें ते ( ज्ञानी लोक ) शुद्ध आत्मज्ञानानें जाणतात. ३९०. आणि ज्ञानही आपल्या स्वाधीन होईल, बुद्धि ही ( सृष्टींतील ) परिमाणूंचा देखील हिशेब देईल, व सर्व शास्त्रांचें सार हस्तगत होईल; ३९१. परंतु जर वैराग्यानें मनामध्यें प्रवेश केला नाहीं, तर सर्वांच्या अंतर्यामीं असणारा जो मी, त्या माझ्याशीं अशा त्या विद्वत्तेनें त्यांची भेट व्हावयाची नाहीं. ३९२. अर्जुना, कितीही विचारानें (ज्ञानानें) तोंड भरलेलें असेना का ? परंतु जर अंतःकरणामध्यें विषयांना आश्रय मिळत असेल, तर मी निश्चयेंकरून सांपडणार नाहीं. ३९३. बाबा अर्जुना, झोंपेंत ग्रंथ बरळण्यानें, त्या बरळणाऱ्याच्या संसाराचें बंधन तुटतें काय ? किंवा पोथीस स्पर्श केला असतां पोथी वाचल्यासारखी होईल काय ? ३९४. अथवा डोळे बांधून जर मोतें नाकास लाविलीं, तर त्या मोत्यांची किंमत व पाणी कळेल काय ? ३९५. त्याप्रमाणें चित्तामध्यें अभिमानाला जागा दिली आहे आणि जिव्हेला सर्व शास्त्रांचा अभ्यास झाला आहे, अशा तऱ्हेनें कोट्यवधि जन्म जाईनात का ? परंतु अशा पुरुषास माझ्या स्वरूपाची प्राप्ति करून घेतां यावयाची नाहीं. ३९६. जो मी एक सर्व प्राण्यांमध्यें व्यापक आहे, त्या माझ्या व्याप्तीचें स्पष्ट वर्णन करूं, ऐक. ३९७.

जें तेज आदित्याचे ठिकाणीं असून अखिल जगाला प्रकाशित करतें, जें चंद्राचे अथवा अग्नीचे ठिकाणीं आहे, तें तेज माझें आहे असें जाण. १२.

तर सूर्यासह ही सर्व विश्वरचना जो प्रकाश दाखवितो, तो प्रकाश माझा आहे व तो प्रकाश विश्वाच्या आदिअंतीं आहे असें समज. ३९८. अर्जुना, सूर्य ( पृथ्वींतील सर्व ) पाणी ( ओलावा ) शोषून गेल्यावर, जो प्रकाश पुनः ओलावा पुरवितो, तो चंद्राच्या ठिकाणीं असणारा प्रकाश माझा होय. ३९९. आणि जें ( प्रखर तेज ) सतत जाळण्याची व शिजविण्याची क्रिया शेवटास नेतें, तें अग्नीच्या ठिकाणीं असणारें प्रखर तेज माझेंच आहे. ४००.

मी पृथ्वीमध्यें प्रवेश करून आपल्या सामर्थ्यानें भूतांचें धारण करतों; रसात्मक चंद्र होऊन सर्व ओषधींचें मीच पोषण करतों. १३.

मीं पृथ्वीच्या खालीं प्रवेश केला आहे, म्हणून समुद्राच्या महाजलानें हें पृथ्वीरूपी मातीचें ढेकूळ विरघळून जातच नाहीं. ४०१. आणि ही पृथ्वी ज्या असंख्य स्थावरजंगम भूतांना धारण करते, त्या सर्व भूतांना पृथ्वींत प्रवेश करून मीच धारण करतों. ४०२. अर्जुना, आकाशामध्यें चंद्राच्या रूपानें अमृतानें भरलेलें चालतें सरोवर मी झालों. ४०३. तेथून ( त्या चंद्रापासून ) जीं किरणें फांकतात, तेच कोणी असंख्य ओघ, त्यांना धारण करून मी सर्व औषधींचे ( वनस्पतींचे ) मळे भरीत आहें. ४०४. अशा तऱ्हेनें ( मी ) इत्यादि सर्व धान्यजातींना विपुलता करतों व अन्नाच्या द्वारें सर्व प्राणिमात्रांना जीवन देतों. ४०५.

प्राण्यांच्या देहाचा आश्रय करून असलेला आणि प्राण व अपान यांनीं युक्त असा जठराग्नि मी होऊन, ( शुष्क, स्निग्ध, सुपक्व व विदग्ध या ) चार प्रकारचें अन्न पचवितों. १४.

आणि अन्न शिजवून तयार केलें असतांना, ज्याच्या योगानें अन्न पचून जीव समाधान भोगतील, अशी भुकेची प्रखरता कोठून आणावयाची ? ( कीं तशी भुकेची प्रखरता उत्पन्न करण्याकरितां पोटांत अग्नि लागतो. ) ४०६. एवढ्याकरितां प्राणिमात्रांच्या शरीरांत नाभिस्कंदावर आगटी तयार करून, अर्जुना, पोटांतील अग्नि, मीच झालों. ४०७. प्राण व अपानरूपी जोड भात्यानें रात्रंदिवस फुंकफुंकून पोटामध्यें किती ( अन्न ) पचवितों हें कळत नाहीं. ४०८. कोरडीं अथवा तुपट, चांगलीं शिजलेलीं अथवा करपलेलीं, अशीं चार प्रकारचीं अन्नें आहेत. परंतु त्या चार प्रकारच्या अन्नांना, अर्जुना, मी ( एकटाच ) पचवितों. ४०९. याप्रमाणें सर्व प्राणी मीच आहे. प्राण्यांना जगविणारें जीवन ( अन्न ) मीच आहे व अन्नाच्या ठिकाणीं ( अन्न जिरविण्याचें कामीं ) मुख्य साधन जो जठराग्नि, तोही मीच आहें. ४१०. आतां माझ्या व्याप्तीची अपूर्वता यापेक्षां अधिक काय सांगूं ! अर्जुना, या विश्वांत सर्व ठिकाणीं माझ्याशिवाय दुसरें

नाहींचि घेईं । सर्वत्र मी गा ॥ ११ ॥ तरी कैसेंनि पां वेखें । सदा सुखियें एकें । एकें तियें दुःखें । क्रांतें भूतें ॥ १२ ॥ जैसी सगाळिये पाटणीं । एकेंचि दीपें दिवेलावणी । जालिया कां न देखणीं । उरलीं एकें ॥ १३ ॥ ऐसी हन उखिविखी । करित आहासी मानसीं कीं । तरी परिस तेही निकी । शंका फेडी ॥ १४ ॥ पैं आघवा मीचि असे । येथ नाहीं कीर अनारिसें । परी प्राणियांचिया उल्लासें । बुद्धी ऐसा ॥ १५ ॥ जैसें एकाचि आकाशध्वनी । वाद्यविशेषीं आनानीं । वाजावें पडे भिन्नीं । नादांतरीं ॥ १६ ॥ कां लोकचेष्टीं वेगळाला । जो हा एकाचि भानु उदैला । तो आनानी परी गेला । उपेयागासी ॥ १७ ॥ नाना बीजधर्मानुरूप । झाडीं उपजवी आप । तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवां ॥ १८ ॥ अगा नेणा आणि चतुरा । पुढां निळ्यांचा दुसरा । नेणा सर्पत्वें जाला येरा । सुखालागीं ॥ १९ ॥ हें असो स्वातीचें उदक । शुक्तीं मोतीं व्याळीं विख । तैसा सज्ञानांसी मी सुख । दुःख तों अज्ञानासी ॥ ४२० ॥

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

एऱ्हवीं सर्वांचां हृदयदेशीं । मी असुका आहें ऐसी । जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ॥ २१ ॥ परी संतासवें वसतां । योगज्ञानीं पैसतां । गुरुचरण उपासितां । वैराग्येंसी ॥ २२ ॥ येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे । जयांचें अहं विश्रामे । आत्मरूपीं ॥ २३ ॥ ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी । येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे ॥ २४ ॥ अगा सूर्योदयो जालिया । सूर्यें सूर्यचि पहावा धनंजया । तेवीं मातें मियां जाणावया । मीचि हेतु ॥ २५ ॥ ना शरीरपरातें सेवितां । संसारगौरवाचि ऐकतां । देहीं जयाची अहंता । बुडोनि ठेली ॥ २६ ॥ ते स्वर्गसंसारालागीं । धांवतां कर्ममार्गीं । दुःखाचां सेलभागीं । भागीन होती ॥ २७ ॥ परी हेंही होणें अर्जुना । मजचिस्तव तया अज्ञाना । जैसा जागताचि हेतु स्वप्ना । निद्रेतें होय ॥ २८ ॥ पैं अभ्रें दिवसु हरपला । तोही दिवसेंचि जाणों आला । तेवीं मी नेणोनि विषयो देखिला । मजचिस्तव भूतीं ॥ २९ ॥ एवं निद्रा कां जागणिया । प्रबोधुचि हेतु धनंजया । तेवीं ज्ञाना अज्ञाना जीवांचिया । मीचि मूळ ॥४३०॥ जैसें सर्पत्वा कां दोरा । दोरुचि मूळ धनुर्धरा । तैसा ज्ञाना अज्ञानाचिया संसारा ।

( कोणी ) नाहींच, तर मीच सर्व ठिकाणीं आहें, असें समज. ४११. मग या विश्वांत कित्येक प्राणी दिसण्यांत सदा सुखी आणि कित्येक प्राणी दुःखानें व्याकूळ झालेले असे आढळतात. असें स्वरूपवैचित्र्य कशानें उत्पन्न झालें ? ४१२. ज्याप्रमाणे संपूर्ण नगरांत एकाच दिव्यानें दिवे लावल्यावर कांहीं दिवे प्रकाश न करणारे ( मंद प्रकाश देणारे ) असे कां राहिले ? ४१३. असे तर्कवितर्क तूं आपल्या मनांत करीत असलास, तर त्याविषयीं ऐक व तूं आपल्या शंकेचें चांगलें निवारण करून घे. ४१४. सर्वच मी आहें, यांत खरोखर अन्यथा नाहीं; परंतु त्या प्राण्यांची अंतःकरणरूप उपाधि जशी शुद्ध अथवा अशुद्ध असेल, त्याप्रमाणें मी ( त्यांच्या ठिकाणीं ) तसा व्यक्त होतों. ४१५. ज्याप्रमाणें एकच आकाशध्वनि, निरनिराळ्या विशेष वाद्यांतून निरनिराळ्या अनेक नादांच्या रूपांनीं बाहेर येतो. ४१६. अथवा हा जो उगवलेला सूर्य, तो एकच आहे, परंतु लोकांच्या वेगवेगळ्या व्यापारामध्यें निरनिराळ्या उपयोगास गेला. ४१७. एकच पाणी निरनिराळ्या बीजांच्या धर्माप्रमाणें निरनिराळ्या झाडांत निरनिराळ्या रसांच्या परिणामाला पावतें; त्याप्रमाणें माझें एकच स्वरूप निरनिराळ्या जीवांच्या ठिकाणीं त्यांच्या त्यांच्या बुद्धीप्रमाणें निरनिराळ्या परिणामाला पावलें आहे. ४१८. अरे अर्जुना, अज्ञानी व ज्ञानी यांच्यापुढें असलेला दोन सरांचा ( पदरांचा ) नीळ मण्यांचा हार, हा अज्ञान्याला सर्पपणानें ( भीति उत्पन्न करणारा ) झाला व तोच हार ज्ञान्याला ( हार नीळ मण्यांचा आहे असें यथार्थ समजल्यामुळें ) सुख उत्पन्न करणारा झाला. ४१९. हे दृष्टान्त राहूं दे. एकच स्वाति नक्षत्राचें पाणी, तें शिंपीमध्यें मोती होतें व सर्पांत विष होतें. त्याप्रमाणें मी ज्ञानवानाला सुख ( रूप ) आहें व अज्ञान्याला दुःख ( रूप ) आहें. ४२०.

सर्व प्राण्यांच्या हृदयांमध्यें मी प्रवेश करून राहिलों आहें. ( त्यांना ) स्मृति, ज्ञान व विस्मृति माझ्यापासून होतात. सर्व वेदांकडून मीच जाणला जातों. मी उपनिषदांचा कर्ता ( वेदांत सांप्रदाय यथावत् प्रगट करणारा ) आहें, वेदांना ( वेदांच्या अर्थाला–ब्रह्माला ) मीच जाणतों. १५.

अर्जुना, वास्तविक विचार करून पाहिलें तर, सर्वांच्या हृदयदेशांत 'मी अमका आहें' अशी जी बुद्धि रात्रंदिवस स्फुरते, ती वस्तु मी आहें. ४२१. परंतु संतांच्या संगतींत राहिलें असतां आणि योग व ज्ञान यांत प्रवेश केला असतां ( यांचा अभ्यास केला असतां ) आणि वैराग्यानें युक्त होऊन गुरुचरणाची सेवा केली असतां, ४२२. याच सत्कर्मांच्या योगानें, संपूर्ण अज्ञान नाहींसें होतें व ज्यांचा ( देहाच्या ठिकाणीं असलेला ) अहंकार आत्मस्वरूपीं विश्रांतीला पावतो ( आत्मस्वरूपीं स्थिर होतो. ) ४२३. ते पुरुष आपलें स्वरूप आपण ज्ञानानें पाहून, त्यांचा आत्मा मी असल्यानें, माझ्या सुखरूपत्वानें नेहमीं आनंदांत असतात. या ठिकाणीं होणाऱ्या आत्मदर्शनांत माझ्याशिवाय दुसरें कोणी कारण आहे काय ? ४२४. अरे अर्जुना, सूर्योदय झाला असतां जसें सूर्यानेंच सूर्याला पहावयाचें, त्याप्रमाणें मला मी जाणण्याला ( माझें ज्ञान मला होण्याला ) मीच कारण आहे. ४२५. ( येथपर्यंत माझ्या ज्ञानाला मीच हेतु आहें असें सांगितलें व या ओंवीपासून तों ४२९ ओंवीपर्यंत माझ्या अज्ञानाला मीच हेतु आहें असें सांगतात. ) अथवा शरीराच्या सेवेंत गुंतलेल्या देहासक्तलोकांच्या संगतींत राहून, संसाराचें महत्त्वच ऐकत असतां, ज्यांचा अहंकार देहाच्या ठिकाणीं स्थित झाला आहे, ४२६. ते ( देहउपासक ) स्वर्ग संसाराकरितां कर्ममार्गानें धांवत असतां ( म्हणजे स्वर्ग व संसार यांची प्राप्ति करून घेण्याकरितां कर्माचरण करीत असतां ) दुःखाच्या शेलक्या भागाचे वांटेकरी होतात. ४२७. परंतु अर्जुना, त्या अज्ञानी लोकांना हेंही होणें ( म्हणजे ते अज्ञानी शेलक्या दुःखाचे वांटेकरी होणें, हें देखील ) माझ्याचमुळें होतें; ( तें कसें तर ) ज्याप्रमाणें जागा असलेलाच पुरुष निद्रा व स्वप्नाला कारण होतो. ४२८. ढगाच्या योगानें झांकला गेलेला सूर्य जसा सूर्यानेंच जाणण्यांत आला, त्याप्रमाणें मला न जाणून प्राणिमात्रांनीं माझ्यामुळें विषय पाहिला.(भोगिला). ४२९. ( या व पुढच्या ओंवींत जीवांच्या ज्ञान व अज्ञानाला मीच कारण आहें असें सांगतात. ) अर्जुना, ज्याप्रमाणें ( प्राण्यांच्या ) निद्रेला किंवा जागृत होण्याला जसा मूळचा ( झोंप लागण्याच्या पूर्वीचा ) जागेपणा कारण आहे, त्याप्रमाणें जीवांच्या ज्ञान व अज्ञानालाच मीच मूळ ( कारण ) आहें. ४३०. अर्जुना, ज्याप्रमाणें सर्पत्वाला ( दोराच्या अज्ञानाला ) अथवा दोरपणाला ( दोराच्या यथार्थ ज्ञानाला ) मूळ ( कारण, जसा ) दोरच ( दोराचें मूळचें स्वरूपच ) आहे, त्याप्रमाणें ज्ञानाचा अथवा अज्ञानाचा व्यवहार माझ्याकडूनच सिद्ध

मियांचि सिध्दु ॥३१॥ म्हणौनि जैसा असें तैसया । मातें नेणोनि धनंजया । वेदु जाणों गेला तंव तया । जालिया शाखा ॥ ३२ ॥ तरी तिहीं शाखाभेदीं । मीचि जाणिजे त्रिशुद्धी । जैसा पूर्वापरा नदी । समुद्रचि ठी ॥ ३३ ॥ आणि महासिद्धांतापासीं । श्रुति हारपती शब्देसीं । जैसिया सगंधा आकाशीं । वातलहरी ॥ ३४ ॥ तैसें समस्तही श्रुतिजात । ठाके लाजिलें ऐसें निवांत । तें मीचि करीं यथावत । प्रकटोनियां ॥ ३५ ॥ पाठीं श्रुतीसकट अशेष । जग हारपे जेथ निःशेष । तें निजज्ञानही चोख । जाणता मीचि ॥ ३६ ॥ जैसें निदेलिया जागिजे । तेव्हां स्वप्नींचें कीर नाहीं दुजें । परि एकत्वही देखों पाविजे । आपलेंचि ॥ ३७ ॥ तैसें आपलें अद्वयपण । मी जाणतसें दुजेनवीण । तयाही बोधाकारण । जाणता मीचि ॥ ३८ ॥ मग आगी लागलिया कापुरा । ना काजळी ना वैश्वानरा । उरणें नाहीं वीरा । जयापरी ॥ ३९ ॥ तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । तऱ्ही जें नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही ॥ ४४० ॥ पैं विश्व घेऊनि गेला मार्गेसीं । तया चोरातें कवण कें गिवसी । जे कोणी एकी दशा ऐसी । शुद्ध ते मी ॥ ४१ ॥ ऐसें जडाजडव्याप्ती । रूप करितां कैवल्यपती । ठी केली निरुपहितीं । आपुलां रूपीं ॥ ४२ ॥ तो आघवाचि बोधु सहसा । अर्जुनीं उमटला कैसा । व्योमींचा चंद्रोदयो जैसा । क्षीरार्णवीं ॥ ४३ ॥ कां प्रतिभिंती चोखटे । समोरील चित्र उमटे । तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे बोधु ॥ ४४ ॥ तरी बाप वस्तुस्वभावो । फावे तंव तंव गोडिये थांवो । म्हणौनि अनुभवियांचा रावो । अर्जुन म्हणे ॥ ४५ ॥ जी व्यापकपण बोलतां । निरुपाधिक जें आतां । स्वरूप प्रसंगता । बोलिले देवो ॥ ४६ ॥ तें एक वेळ अव्यंगवाणें । कीजो कां मज सांगणें । तेथ द्वारकेचा नाथु म्हणे । भलें केलें ॥ ४७ ॥ पैं अर्जुना आम्हांहि वाडेंकोडें । अखंड बोलों आवडे । परी काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें ॥ ४८ ॥ आजि मनोरथांसि फळ । जोडलासि तूं केवळ । जे तोंड भरूनि निखळ । आलासि पुसों ॥ ४९ ॥ जें अद्वैतावरीही भोगिजे । तें अनुभवींचें तूं विरजें । पुसोनि मज माझें । देतासि सुख ॥ ४५० ॥ जैसा आरिसा आलिया जवळा । दिसे आपणपें आपलां डोळां । तैसा संवादिया तूं निर्मळा । शिरोमणी ॥ ५१ ॥ तुवां नेणोनि पुसावें । मग आम्हीं परिसऊं बैसावें । तो गा हा पाडु नव्हे । सोयरेया ॥ ५२ ॥ ऐसें म्हणौनि आलिंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें । मग देवो काय बोलिले । अर्जुनेंसीं ॥ ५३ ॥ पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें । तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ॥ ५४ ॥ एवं आम्हीं

होतो ( म्हणजे या दोन्ही व्यवहारांना माझी सत्ताच कारणीभूत आहे ). ४३१. म्हणून अर्जुना, जसा मी आहे, तसा मला न जाणून, वेद जाणायला गेला, तो ( मी वेदाकडून यथार्थ जाणला न गेल्यामुळे ) त्या वेदाचे भाग झाले. ४३२. तरी वेदाच्या त्या वेगवेगळ्या शाखांनी मीच ( एक ) खरोखर जाणला जातो. ( तो कसा तर ) ज्याप्रमाणें पूर्वेकडून अथवा पश्चिमेकडून वाहणाऱ्या नद्यांना ( एक ) समुद्रच शेवटीं मिळण्याचें ठिकाण होतो; ४३३. आणि "एकमेवाद्वितीयं ब्रह्म" या महासिद्धांताजवळ ज्याप्रमाणें वेद शब्दांसह नाहींसे होतात; ज्याप्रमाणें वाऱ्याच्या गंधयुक्त झुळुका आकाशांत नाहींशा होतात, ४३४. त्याप्रमाणें सर्व वेद लाजल्यासारखे निवांत रहातात, ( त्यांच्या अर्थाचा बहुतेक लोप झालेला असतो. ) ते मी प्रगट करून यथावत् करतों. ( वेदांतील अर्थाचा संप्रदाय यथायोग्य प्रवृत्त करणारा मीच आहे. ) ४३५. नंतर वेदासह संपूर्ण जगत जेथें ( ज्या शुद्ध आत्मज्ञानांत ) संपूर्ण नाहींसें होतें, तें शुद्ध आत्मज्ञान जाणणारा मीच आहें. ४३६. ज्याप्रमाणें निजलेल्यास जागें केलें म्हणजे त्या वेळींच त्यास स्वप्नांत भासलेलें द्वैत अजिबात नाहींसें होतें, एवढेंच नव्हे, परंतु त्यास पूर्ववत् आपल्या एकाकीपणाचें भानही होतें. ४३७. त्याप्रमाणें माझा अद्वैतपणा मी द्वैतसंबंधाशिवाय जाणतो. ( म्हणजे द्वैत कांहीं नाहीं, तर मीच एक आहें, असें जाणतो. ) व मीच एक आहें, अशा ज्ञानालाही जाणण्यास कारण मीच आहें. ४३८. मग कापुराला अग्नि लागला असतां, अर्जुना, ज्याप्रमाणें काजळी ( राख ) अथवा अग्नि ( कांहींच ) उरत नाहीं; ४३९. त्याप्रमाणें संपूर्ण अविद्येला नाहींसें करणारें जें ज्ञान, तें देखील जेव्हां नाहींसें होतें, तेव्हां जें ( आत्मस्वरूप ) 'नाहीं' असें खरोखर नाहीं ( मग आत्मस्वरूप आहे असें म्हणा ) तर त्याला 'आहे' हेंही म्हणणें सहन होत नाहीं. ४४०. मागासह जो विश्व घेऊन गेला, त्या चोराला कोण कोठें शोधील ? अशी जी कोणी एक शुद्धावस्था आहे, ती मी आहे. ४४१. याप्रमाणें मोक्षाचे स्वामींनीं ( श्रीकृष्णांनीं ) चराचरांतील आपल्या व्याप्तीचें वर्णन करतां करतां आपल्या निरुपाधिक रूपांत त्या व्याख्यानाचें पर्यवसान केलें. ४४२. तो सर्व बोध अर्जुनाच्या ठिकाणीं एकदम कसा उमटला म्हणाल तर, आकाशांतील चंद्राचा उदय जसा क्षीरसमुद्रांत प्रतिबिंबीत होतो तसा ४४३. अथवा ज्या भिंतीवर चित्रें काढलीं आहेत, त्या भिंतीच्या समोरील भिंत जर आरशासारखी प्रतिबिंब ग्रहण करणारी अशी चकचकीत असेल, तर तिच्यांत त्या चित्रांचें प्रतिबिंब जसें ( स्वच्छ ) उमटतें, त्याप्रमाणें अर्जुनामध्यें व श्रीकृष्णामध्यें ( एक ) बोध नांदत आहे. ४४४. तरी काय आश्चर्य आहे ! पहा कीं, तें वस्तूचें स्वरूप जों जों अनुभवास येतें, तों तों त्याच्या संबंधींची गोडी अधिक वाढवत जाते; आणि म्हणूनच अनुभव्यांचा राजा अर्जुन म्हणाला, ४४५. महाराज, आपल्या व्यापकपणाचें वर्णन आपण करीत असतां, प्रसंगानुसार, हें देवानें ( आपण ) आपलें जें निरुपाधिक स्वरूप सांगितलें, ४४६. तेंच ( निरुपाधिक स्वरूप ) मला पुनः एक वेळ कांहीं न्यून न ठेवतां सांगा. येथें ( असें अर्जुन म्हणाला तेव्हां ) द्वारकेचे राजे श्रीकृष्ण म्हणाले, चांगलें केलेंस. ४४७. अर्जुना, आम्हांला देखील मोठ्या कौतुकानें नेहमीं याविषयीं बोलणें आवडतें. परंतु काय करावें ! तसा विचारणारा मिळत नाहीं. ४४८. आज तूं एकटाच आमच्या मनोरथाला फळ मिळाला आहेस ( आमची जी निरुपाधिकस्वरूप वर्णन करण्याची इच्छा, ती सफल करणारा आज तूं एकटाच भेटला आहेस. ) कारण कीं, तूं मोठ्या हौसेनें केवळ हेंच ( निरुपाधिक स्वरूपाविषयींच ) विचारण्यास आला आहेस. ४४९. अद्वैताही पलीकडला जो अनुभव भोगावयाचा, त्या अनुभवाचा ( तो अनुभव घेण्यास ) तूं ग्राह्य करणारा आहेस व ( निरुपाधिक स्वरूपाविषयीं प्रश्न ) विचारून तूं माझें सुख मला देत आहेस. ४५०. ज्याप्रमाणें आरसा जवळ आला असतां आपल्या दृष्टीनें आपलें स्वरूप आपल्यास दिसतें, त्याप्रमाणें शुद्ध संवाद करणाऱ्यामध्यें तूं श्रेष्ठ आहेस. ४५१. तुला ही गोष्ट कळत नाहीं, म्हणून तूं ती विचारावीस आणि मग ती गोष्ट तुला ऐकविण्याकरितां आम्हीं ( तयार व्हावें ), आवडत्या अर्जुना, त्यासारखा हा प्रकार नाहीं. ४५२. असें म्हणून देवांनीं अर्जुनास आलिंगन दिलें व कृपादृष्टीनें त्याला पाहिलें व मग अर्जुनाशीं देव काय बोलले ? ४५३. जसे दोन ओंठ पण बोलणें एक, पाय दोन पण चालणें एक; त्याप्रमाणें तूं पुसणारा व मी सांगणारा ह्या आपल्या दोघांचा अभिप्राय एकच आहे. ४५४. याप्रमाणें प्रस्तुत श्रीकृष्ण म्हणतात, अर्जुना, आम्ही व तूं, एकवस्तुरूप आहोंत

तुम्हीं येथें । देखावें एका अर्थातें । सांगतें पुसतें येथें । दोन्ही एक ॥ ५५ ॥ ऐसा भुलला देवो मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये । मग विहाला म्हणे नोहे । आवडी हे ॥ ५६ ॥ जाले इक्षु-रसाचे ढाळ । तरी लवण देणें किडाळ । जे संवादसुखाचें रसाळ । नासेल थितें ॥ ५७ ॥ आधींच आम्हां यया कांहीं । नरनारायणा सिनें नाहीं । परी आतां जिरो माझां ठाईं । वेगु हा माझा ॥ ५८ ॥ इया बुद्धी सहसा । श्रीकृष्ण म्हणे वीरेशा । पैं गा तो तुवां कैसा । प्रश्न केला ॥५९॥ जो अर्जुन कृष्णीं विरत होता । तो परतोनिया मागुता । प्रश्नावळीची कथा । ऐकों आला ॥४६०॥ येथ सद्गदें बोलें । अर्जुनें जी जी म्हाणितलें । निरुपाधिक आपुलें । रूप सांगा ॥ ६१ ॥ यया बोला तो शार्ङ्गी । तेंचि सांगावयालागीं । उपाधी दोहीं भागीं । निरूपीत असे ॥ ६२ ॥ पुसि-लिया निरुपाहित । उपाधि कां सांगे येथ । हें कोण्हाही प्रस्तुत । गमे जरी ॥ ६३ ॥ तरी ताकाचे अंश फेडणें । याचि नांव लोणी काढणें । चोखाचिये शुद्धी तोडणें । कीडचि जेवीं ॥ ६४ ॥ बावुळीचि सारावी हातें । परी पाणी तंव असे आइतें । अभ्राचि जावें गगन तें । सिद्धचि कीं ॥ ६५ ॥ वरील कोंड्याचा गुंडाळा । झाडूनि केलिया वेगळा । कणु घेतां विरंगोळा । असे काई ॥ ६६ ॥ तैसा उपाधि उपहितां । शेवटु जेथ विचारितां । तें कोणातेंही न पुसतां । निरुपाधिक ॥ ६७ ॥ जैसें न संघणेवरी । बाळा पतीसी रूप करी । बोलु निमालेपणें विवरी । अचर्चातें ॥ ६८ ॥ पैं सांगणेयाजोगें नव्हे । तेथिंचें सांगणें ऐसें आहे । म्हणौनि उपाधि लक्ष्मीनाहे । बोलिजे आदीं ॥ ६९ ॥ पाडिव्याची चंद्ररेखा । निरुता दावावया शाखा । दाविजे तेवीं औपाधिका । बोली इया ॥ ४७० ॥ मग तो म्हणे गा सव्यसाची । पैं इये संसारपाटणींची । वस्ती सांविया टांची । दुपुरुषीं ॥ ७१ ॥

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च । क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

जैसी आघवांचि गगनीं । नांदतें दिवोरात्री दोन्ही । तैसे संसारराजधानीं । दोन्हीचि हे ॥ ७२ ॥ आणिकही तिजा पुरुषु आहे । परी तो या दोहींचें नांव न साहे । जो उदेला गांवेंसीं खाये । दोहींतें यया ॥ ७३ ॥ परी ते तंव गोठी असो । आधीं दोहींची हे परियेसो । संसारग्रामा वसों । आले असती ॥ ७४ ॥ एक आंधळा वेडा पंगु । येर सर्वांगें पुरता चांगु । परी ग्रामगुणें संगु । घडला दोघां ॥ ७५ ॥ तया एका नाम क्षरु । येरातें म्हणती अक्षरु । इहीं दोहींचि परी

असें तूं समज. या प्रसंगीं व्याख्यान करणारा उपदेशक मी व प्रश्न करणारा श्रोता तूं असे तत्वतः दोघेही एकच आहोंत. ४५५. असें देव प्रेमानें भुलून जाऊन अर्जुनाला मिठी मारून राहिले; मग चिचकले व म्हणाले कीं, हें ऐक्याचें प्रेम या ठिकाणीं उपयोगी नाहीं. ४५६. कोणत्याही पदार्थाला मीठ लाविलें असतां त्या पदार्थाला रुचि येते, तरी पण उसाच्या रसाच्या बनलेल्या ढेपीला रुचिकरितां मीठ लावणें वाईट आहे ( कारण त्या योगानें गुळाला रुचि न येतां गुळाच्या असलेल्या गोडीचा नाश होईल ) त्याप्रमाणें ऐक्याचें प्रेम हें चांगलें आहे, परंतु संवादाच्या प्रसंगीं तें चांगलें नाहीं; कारण त्यामुळें संवाद-सुखाची असलेली गोडी नाहींशी होईल. ४५७. आम्हीं नारायण व हा अर्जुन नर असल्यामुळें, आम्हा दोघांमध्यें मूळचाच भिन्नपणा नाहीं. पण ही माझी ऐक्यप्रेमाची उकळी माझ्या ठिकाणीं आतां नाहींशी होवो. ४५८. अशा बुद्धीनें श्रीकृष्ण एकदम म्हणाले, हे वीरश्रेष्ठा अर्जुना, तो प्रश्न तूं कसा केलास ? ४५९. जो अर्जुन श्रीकृष्णस्वरूपांत ( देहबुद्धी विरून ) नाहींसा होत होता, ( देवाशीं ऐक्यास येत होता. ) तो आपण केलेल्या अनेक प्रश्नांचीं उत्तरें ऐकण्याकरितां पुन्हा माघारी (देहबुद्धीवर) आला. ४६०. यावर अर्जुन कंठ दाटून म्हणाला, महाराज, आपलें निरुपाधिक स्वरूप तुम्ही सांगा, असें मी म्हणालों. ४६१. असें अर्जुनानें म्हटल्यावर तो शार्ङ्गधर श्रीकृष्ण तेंच सांगण्याकरितां उपाधि दोन प्रकारांनीं सांगावयास लागला. ४६२. अर्जुनानें निरुपाधिक स्वरूपासंबंधानें प्रश्न विचारला असतां, देव येथें उपाधि कां सांगत आहेत, असें जर सध्यां कोणासही वाटत असेल, ४६३. तर मंथन करून दह्यांतून ताकाचा भाग वेगळा करणें, यालाच लोणी काढणें असें म्हणतात; अथवा ज्याप्रमाणें शुद्ध सोनें शोधण्यास अशोधित धातु निवडून त्यांतून हिणकस धातु बाहेर काढावी लागते; ४६४. पाण्यावरचें गोंडाळ हातानें एका बाजूला सारावें पण पाणी जसें आयतें असतें; ( अथवा ) आकाशांतील ढगच गेले कीं, आकाश स्वतःसिद्ध आहेच. ४६५. धान्यावरील कोंड्याचें आच्छादन झाडून वेगळें केलें असतां, शुद्ध धान्य घेण्यास कांहीं हरकत आहे काय ? ४६६. त्याप्रमाणें विचार करावयास लागलें असतां, अज्ञानादि उपाधि व त्या उपाधींच्या संबंधानें असणारें उपहित चैतन्य, या दोहोंचा ज्या स्वरूपीं शेवट होतो, ते निरुपाधिक ( शुद्ध चैतन्य ) होय, हें कोणालाही न पुसतां खुशाल समजावें. ४६७. नवीन लग्न झालेल्या लहान मुलीस वेगवेगळ्या पुरुषांचें नांव घेऊन, 'हा तुझा नवरा काय ?' असें विचारत असतां, प्रत्येक नांवास 'नाहीं, नाहीं' म्हणून म्हणणारी ती मुलगी, ज्या नांवाच्या उच्चाराबरोबर लाजेनें मुरकून गप्प रहाते, त्या न बोलण्यांतच ती आपला नवरा दाखविते; त्याप्रमाणें स्थूलसूक्ष्म प्रपंच हा परमात्मा आहे काय ? असें विचारलें असतां ती श्रुतिवधू, तो प्रपंच परमात्मा नाहीं, असें सांगते व शब्दांकडून न होणाऱ्या परमात्म्याचें स्वरूप-लक्षण आलें, म्हणजे गप्प बसते व या गप्प बसण्यांतच परमात्म्याच्या स्वरूपास सुचविते. ४६८. त्याप्रमाणें जें ( निरुपाधिक स्वरूप ) सांगण्याजोगें नाहीं, तें स्वरूप सांगण्याचा असा प्रकार आहे. ( म्हणजे तें स्वरूप साक्षात् शब्दांनीं सांगतां येत नाहीं, म्हणून उपाधीचें वर्णन करणें, हेंच त्याचें सांगणें होय. ) म्हणून लक्ष्मीपति जे श्रीकृष्ण, ते प्रथम उपाधि सांगतात. ४६९. शुद्ध पक्षांतील प्रतिपदेच्या चंद्राची कोर नेमकी दाखविण्याकरितां, जशी झाडाची फांदी दाखवावी लागते, त्याप्रमाणें हें उपाधीचें वर्णन करणें आहे. ४७०. मग ते श्रीकृष्ण म्हणाले, अरे अर्जुना, या संसाररूपी नगरांतील वस्ती स्वभावतःच अल्प अशा दोन पुरुषांचीच आहे. ४७१.

या जगामध्यें क्षर आणि अक्षर असे हे दोन पुरुष आहेत. क्षर म्हणजे सर्व भूतें. मायोपाधीनें युक्त जें चैतन्य, त्यास अक्षर असें म्हणतात. १६.

ज्याप्रमाणें सर्व आकाशामध्यें दिवस व रात्र हीं दोनच नांदतात, त्याप्रमाणें या संसाररूपी राजधानींत हे दोघेच नांदतात. ४७२. आणखीही एक तिसरा पुरुष आहे; परंतु तो या दोघांचें नांव सहन करीत नाहीं व तो प्रगट झाला असतां, या दोघांना त्यांच्या गांवासकट खातो. ४७३. परंतु ती ( तिसऱ्या पुरुषाची ) तर गोष्ट राहूं दे. आधीं हे जे दोन संसाररूपी गांवांत वस्तीला आले आहेत, त्यांच्याविषयींच तुला ऐकवितो. ४७४. त्या दोघांपैकीं एक आंधळा ( ज्ञानदृष्टिहीन ), वेडा ( भ्रमानें देहादिकास मी म्हणणारा ) व पांगळा ( उपाधीच्या तंत्र झाल्यामुळें तिच्याशिवाय ज्याला कांहींच करतां येत नाहीं असा ) आहे व दुसरा सर्वांगानें पुरता व चांगला आहे. परंतु दोघेही एकाच गांवांत रहात असल्याकारणानें उभयतांची संगत जडली आहे. ४७५. त्यांपैकीं एकाचें नांव क्षर आहे व दुसऱ्यास

संसारु । कोंदला असे ।।७६।। आतां क्षरु तो कवणु । अक्षरु तो किंलक्षणु । हा अभिप्रावो संपूर्णु । विवंचूं गा ।। ७७ ।। तरी महदहंकारा । लागुनियां धनुर्धरा । तृणांतीचा पांगोरा– । वरी पैं गा ।। ७८ ।। जें कांहीं सानें थोर । चालतें अथवा स्थिर । किंबहुना गोचर । मनबुद्धी जें ।। ७९ ।। जेतुलें पांचभौतिक घडतें । जें नामरूपा सांपडतें । गुणत्रयाचां पडतें । कामठां जें ।। ४८० ।। भूताकृतीचें नाणें । घडत भांगारें जेणें । काळासिं जूं खेळणें । जिहीं कवडां ।। ८१ ।। जाणणेंचि विपरीतें । जें जें कांहीं जाणिजतें । जें प्रतिक्षणीं निमतें । होऊनियां ।। ८२ ।। अगा काढूनि भ्रांतीचें दांग । उभवी सृष्टीचें आंग । हें असो बहु जग । जया नाम ।। ८३ ।। पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें । जें क्षेत्रद्वारा छत्तिसें । भागीं केलें ।। ८४ ।। हें मागील सांगों किती । अगा आतांचि जें प्रस्तुती । वृक्षाकाररुपकरीती । निरूपिलें ।। ८५ ।। तें आघवेंचि साकारें । कल्पूनी आपणपयां पुरें । जालें असे तदनुसारें । चैतन्याचि ।। ८६ ।। जैसा कुहां आपणचि बिंबे । सिंह प्रतिबिंब पाहतां क्षोभे । मग क्षोभला समारंभें । घाली तेथ ।। ८७ ।। कां सलिलीं असताचि असे । व्योमावरी व्योम बिंबे जैसें । अद्वैत होऊनि तैसें । द्वैतें घेपे ।। ८८ ।। अर्जुना गा यापरी । साकार कल्पूनि पुरी । आत्मा विस्मृतीची करी । निद्रा तेथ ।। ८९ ।। पैं स्वप्नीं सेजार देखिजे । मग पहुडणें जैसें तेथ कीजे । तैसें पुरीं शयन जाणिजे । आत्मयासी ।। ४९० ।। पाठीं तिये निद्रेचेनि भरें । मी सुखी दुःखी म्हणत घोरें । अहंसमोंधीचेनि थोरें । बोसणाये सादें ।। ९१ ।। हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना ।। ९२ ।। ऐसिया बैंघौनि स्वप्ना । धांवत भवस्वर्गाचिया राना । तया चैतन्या नाम अर्जुना । क्षर पुरुषु गा ।। ९३ ।। आतां ऐक क्षेत्रज्ञु येणें । नामें जयातें बोलणें । जग जीवु कां म्हणे । जिये दशेतें ।। ९४ ।। जो आपुलेनि विसरें । सर्वभूतत्वें अनुकरे । तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुषुनांवें ।। ९५ ।। जे तो वस्तुस्थिती पुरता । म्हणौनि आली पुरुषता । वरी देहपुरीं निदैजतां ।। पुरुषुनांवें ।। ९६ ।। आणि क्षरपणाचा नाथिला । आळु यया ऐसेनि आला । जे उपाधीचि आतला । म्हणोनियां ।।९७।। जैसी खळाळीचिया उदका– । सरसीं उदाळे चंद्रिका । तैसा विकारां औपाधिकां । ऐसाचि गमे ।।९८।। कां खळाळ मोटका शोषे । आणि चंद्रिका तें सारिसींच भ्रंशे । तैसा उपाधिनाशीं न दिसे । उपाधिकु ।।९९।। ऐसें उपाधीचेनि पाडें । क्षणिकत्व यातें जोडे । तेणें खोंकरपणें घडे । क्षर हें नांव ।। ५०० ।। एवं जीवचैतन्य

अक्षर असें म्हणतात. हे आहेत दोघेच, परंतु या दोघांनींच सर्व संसार ठेचून भरला आहे. ४७६. आतां क्षरपुरुष तो कोण व अक्षरपुरुषाचें लक्षण काय आहे, हा सर्व अभिप्राय अर्जुना, स्पष्ट सांगूं. ४७७. (या ओंवीपासून तो ४८६ ओंवीच्या पूर्वार्धाअखेर, क्षर पुरुषाच्या उपाधीचें वर्णन करितात) तर अर्जुना, महत्तत्त्व अहंकारापासून तों शेवट गवताच्या टोंकापर्यंत– ४७८. जें कांहीं लहान व मोठें, जंगम अथवा स्थावर, फार काय सांगावें ! जें मन व बुद्धि यांचेकडून जाणलें जातें; ४७९. जेवढें म्हणून पंचमहाभूतांनीं तयार झालें आहे, नाम व रूप यांमध्यें जें जें सांपडलें आहे व जें तीन गुणांच्या टांकसाळीपासून उत्पन्न होतें; ४८०. प्राणिमात्रांचें आकाररूपी नाणें ज्या सोन्याचें बनतें, अथवा काळ ज्या धनानें जुगार खेळतो; ४८१. विपरीत ज्ञानानेंच जें जें कांहीं समजलें जातें अथवा जें जें प्रत्येक क्षणांत उत्पन्न होऊन नाहींसें होतें; ४८२. अरे अर्जुना, भ्रांतिरूपी जंगल कापून ( त्या जंगलांतील लांकडांनीं ) जो सृष्टीचा आकार उभारला जातो; हें फार वर्णन करणें राहूं दे; ज्याला जग असें म्हणतात. ४८३. जें आठ प्रकारचें वेगळे वेगळे करून प्रकृतीच्या रूपानें, मागें ( अध्याय ७ श्लोक ४ मध्यें ) दाखविलें आणि जें क्षेत्र म्हणून छत्तीस भाग करून ( अध्याय १३ श्लोक ५ व ६ मध्यें ) वर्णन केलें. ४८४. हें मागलें किती सांगूं ! अरे अर्जुना, आतांच या पंधराव्या अध्यायांत ( श्लोक १ व २ मध्यें ) वृक्षाच्या आकाराच्या रूपकानें जें कांहीं सांगितलें; ४८५. तें सर्व साकार जगत् ( स्थूल व सूक्ष्म देह ) आपल्याला ( राहाण्याला ) गांव, असें कल्पून त्यासारखें चैतन्य आपणच बनलें. ( तो गांवच म्हणजे स्थूल, सूक्ष्म देहच, आपण आहोंत, असें चैतन्य समजूं लागलें ) ४८६. ज्याप्रमाणें सिंह आडांत आपणच प्रतिबिंबीत होतो व त्यांत पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहून तो खवळतो आणि मग त्या आवेशानें आडांत उडी घालतो; ४८७. अथवा पाण्यामध्यें मूळचें आकाश असून, त्या आकाशावरच बाहेरल्या आकाशाचें प्रतिबिंब पडतें, त्याप्रमाणें चैतन्य हें मूळचें अद्वैत असून, द्वैताशीं तादात्म्य करतें. ४८८. अरे अर्जुना, याप्रमाणें आकारवान् शरीर हेंच नगर कल्पून आत्मा तेथें ( आपला आपल्याला ) विसर, हीच झोंप घेतो. ४८९. ( मागील ओंवीवरून कोणाला असें वाटेल कीं, चैतन्य खरोखरच निजतें कीं काय ? तर त्याचें समाधान या ओंवींत उदाहरणानें करतात.) स्वप्नांत बिछाना पहावा व तेथें स्वप्नांतच जसें निजावें, त्याप्रमाणें आत्म्याला साकार शरीररूपी नगरांत निजणें आहे, असें समज. ४९०. नंतर त्या निद्रेच्या भरानें ( विसररूपी गाढ झोंप लागल्यामुळें ) मी सुखी मी दुःखी असें म्हणणेंरूप घोरतो व मी, या गाढ झोंपेंत मोठ्यानें बरळतो. ४९१. हा बाप, ही आई, हा मी गोरा, व्यंग असलेला किंवा पुरता ( अव्यंग ) हा मुलगा, हें धन आणि ही स्त्री, हीं माझीं नाहींत काय ? ४९२. अशा स्वप्नावर स्वार होऊन, जें चैतन्य संसार व स्वर्गरूपी रानांत धांवतें, अर्जुना, त्या चैतन्याला क्षर पुरुष हें नांव आहे. ४९३. आतां अर्जुना, ऐक, क्षेत्रज्ञ या नांवानें ज्याचा उल्लेख करतात अथवा ज्या अवस्थेला सर्व लोक जीव असें म्हणतात, ४९४. जो आपल्या स्वरूपाच्या विसरामुळें सर्व भूतांच्यासारखा होतो ( म्हणजे ज्या ज्या शरीरादि उपाधीशीं संबंध येईल, त्या त्या सर्व उपाधीच माझें स्वरूप आहेत, असा अभिमान घेतो ) त्या आत्म्याला क्षरपुरुष असें म्हणतात. ४९५. ( आतां क्षर चैतन्याला पुरुष कां म्हणावयाचें, त्याचीं दोन कारणें या ओंवींत सांगतात. ) ( जरी या क्षर चैतन्यानें उपाधीशीं तादात्म्य केलें आहे तरी ) तो वस्तुस्थितीनें ( आत्मस्वरूपानें ) पूर्ण आहे, म्हणून त्याचे ठिकाणीं पुरुषपणा आला आहे. शिवाय तो देहरूपी नगरांत निजणारा आहे, म्हणून त्याला पुरुष हें नांव आहे. ४९६. ( आतां याला क्षर कां म्हणावयाचें, त्याचें कारण या ओंवीपासून ५०० ओंवीअखेर सांगतात. ) आणि तो ( कामानें ) उपाधीशीं तादात्म्य करून राहिला आहे म्हणून याच्यावर क्षरपणाचा नसलेला आरोप आला. ४९७. ज्याप्रमाणें खळखळ वाहणाऱ्या पाण्याबरोबर त्या पाण्यांत पडलेलें चंद्राचें प्रतिबिंब उसळतें, ( खालींवर झाल्यासारखें वाटतें ) त्याप्रमाणें हा क्षरपुरुष उपाधीच्या विकारामुळें क्षर ( नाश पावणारा ) असाच वाटतो. ४९८. अथवा खळखळा वाहणारें पाणी आटतें आणि त्याबरोबरच चंद्राच्या तेजाचें प्रतिबिंब नाहींसें होतें, त्याप्रमाणें उपाधीनें युक्त असलेलें उपहित चैतन्य, हें उपाधीच्या नाशाबरोबर दिसेनासें होतें. ४९९. याप्रमाणें याला उपाधीच्या योगानें क्षणिकत्व प्राप्त झालें आहे. उपाधीच्या त्या नाशवंतपणामुळें यांस क्षर हें नांव आलें आहे. ५००. याप्रमाणें सर्व जीवचैतन्य, हें क्षरपुरुष

आघवें। हें क्षर पुरुष जाणावें। आतां रूप करूं बरवें। अक्षरासी ॥ १ ॥ तरी अक्षरु जो दुसरा। पुरुष पैं धनुर्धरा। तो मध्यस्थु गा गिरिवरां। मेरु जैसा ॥ २ ॥ जे तो पृथ्वी पाताळ स्वर्गीं। इहीं न भेदे तिहीं भागीं। तैसा दोहीं ज्ञानाज्ञानांगीं। पडेना जो ॥ ३ ॥ ना येथ यथार्थ-ज्ञानें एक होणें। ना अन्यत्वें दुजें घेणें। ऐसें निखळ जें नेणणें। तेंचि तें रूप ॥ ४ ॥ पांसुता निःशेष जाये। ना घटभांडादिकें होये। तया मृत्पिंडा ऐसें आहे। मध्यस्थ जें ॥ ५ ॥ पैं आटोनि गेलिया सागरु। मग तरंगु ना नीरु। तया ऐशी अनाकारु। जे दशा गा ॥ ६ ॥ पार्था जागणें तरी बुडे। परी स्वप्नाचें कांहीं न मांडे। तैसिये निद्रे सांगडें। निहाळिजे ॥ ७ ॥ विश्व आघवेंचि मावळे। आणि आत्मबोधु तरी नुजळे। तिये अज्ञानदशे केवळे। अक्षरु नांव ॥ ८ ॥ अजामेंकां। अजा म्हणतां जन्म नाहीं। त्यासि नाशु कैंचा कायी। यालागीं अक्षरु पाही। अज्ञानघन ॥५०८ अ॥ सर्वां कळीं सांडिलें जैसें। चंद्रपण उरे अंवसे। रूप जाणावें तैसें। अक्षराचें ॥ ९ ॥ पैं सर्वोपाधिविनाशें। हे जीवदशा जेथ पैसे। फळपाकांत जैसें। झाड बीजीं ॥५१०॥ तैसें उपाधी उपहित। थोकोनि ठाके जेथ। तयातें अव्यक्त। बोलती गा ॥ ११ ॥ जयासी कां बीजभावो। वेदांतीं केला ऐसा आवो। तो तया पुरुषा ठावो। अक्षराचा ॥ १२ ॥ जेथुनी अन्यथाज्ञान। फांकोनि जागृति स्वप्न। नानाबुद्धीचें रान। रिगालें असे ॥ १३ ॥ जीवत्व जेथुनी किरीटी। विश्व उठविताचि उठी। ते उभय बोधांची मिठी। अक्षरु पुरुषु ॥ १४ ॥ येरु क्षरु पुरुषु कां जनीं। जिहीं खेळे जागृतीं स्वप्नीं। तिया अवस्था जो दोन्ही। वियाला गा ॥ १५ ॥ पैं अज्ञान-घनसुषुप्ती। ऐसैसी जे कां ख्याती। या उणी येकी प्राप्ती। ब्रह्माची जे ॥ १६ ॥ साचचि पुढती वीरा। जरी न येतां स्वप्न जागरा। तरी ब्रह्मभावो साचोकारा। म्हणों येता ॥ १७ ॥ परी प्रकृतिपुरुषें दोनी। अभ्रें जालीं जिये गगनीं। क्षेत्रक्षेत्रज्ञु स्वप्नीं। देखिला जियें ॥ १८ ॥ हें असो अधोशाखा। या संसाररूपा रुखा। मूळ तें पुरुषा। अक्षराचें ॥१९॥ हा पुरुषु कां म्हणिजे। जे पूर्णपणेंचि निजे। पैं मायापुरीं पहुडिजे। तेणेंही बोलें ॥ ५२० ॥ आणि विकारांची जे वारी। ते विपरीत ज्ञानाची परी। नेणिजे जिये माझारीं। ते सुषुप्ती गा हा ॥२१॥ म्हणौनि यया आपैसें। क्षरणें पां नसे। आणिकहीं हा न नाशे। ज्ञानाउणें ॥२२॥ यालागीं हा अक्षरु। ऐसा वेदांतीं डगरु। केला देखसी थोरु। सिद्धांताचा ॥ २३ ॥ ऐसें जीवकार्यकारण। जया मायासंगुचि लक्षण। अक्षर पुरुषु जाण। चैतन्य तें ॥ २४ ॥ आतां अन्यथाज्ञानीं। या दोनी अवस्था जया जनीं। तया हरपती घनीं। अज्ञानतत्त्वीं ॥ २५ ॥ तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया। ज्ञानें कीर्तिंमुखत्व

आहे असें समजावें. आतां अक्षरपुरुषाची चांगली कल्पना येईल, असें वर्णन करून सांगतों. ५०१. (या ओंवीपासून तों ५२० ओंवीअखेर अक्षरपुरुषाची उपाधि सांगतात.) तर अर्जुना, दुसरा जो अक्षरपुरुष आहे, तो (यथार्थज्ञान व विपरीतज्ञान यांच्या) मध्यभागीं आहे. त्याप्रमाणें मेरु पर्वत हा मोठमोठ्या पर्वतांच्या मध्यभागीं आहे; ५०२. कारण कीं, तो मेरु पर्वत पृथ्वी, पाताळ व स्वर्ग या तीन लोकांमुळें तीन ठिकाणीं वांटला जात नाहीं. त्याप्रमाणें जो, ज्ञान (यथार्थज्ञान) व अज्ञान (विपरीतज्ञान), या दोहोंशीं संबंध करीत नाहीं, (यथार्थज्ञानानें 'मी ब्रह्म आहें' असें समजत नाहीं अथवा विपरीतज्ञानानें 'मी देह' असेंही समजत नाहीं.) ५०३. 'मी ब्रह्म' अशा यथार्थज्ञानानें ब्रह्माशीं एक न होणें (अथवा) विपरीतज्ञानानें द्वैत न घेणें—याप्रमाणें यथार्थज्ञान व विपरीतज्ञान हीं दोन्हींही जेथें नाहींत,—असें निव्वळ जें अज्ञान, तेंच त्या अक्षरपुरुषाचें स्वरूप होय. ५०४. (मातीचा) धुळपणा पूर्णपणें जातो व घागर अथवा भांडें वगैरे कांहीं होत नाहीं, (अशा) त्या चिखलाच्या गोळ्यासारखें जें (अक्षरपुरुषाचें स्वरूप) मध्यस्थ आहे; ५०५. समुद्र आटल्यावर मग लाट नाहीं अथवा पाणी नाहीं, त्यासारखी जी आकाररहित अवस्था (आहे); ५०६. अर्जुना, जागणें तर पार नाहींसें होतें, परंतु स्वप्नाचा कांहीं आरंभ होत नाहीं (अशी जी गाढ निद्रा), त्या गाढ निद्रेसारखें अक्षरपुरुषाचें स्वरूप समजावें. ५०७. संपूर्ण विश्वाभास नाहींसा होतो आणि आत्मबोध तर प्रकाशित होत नाहीं, त्या केवळ अज्ञानावस्थेला अक्षर हें नांव आहे. ५०८. अज्ञानाला श्रुतींत 'अजा' म्हटलें आहे, त्याचा अर्थ जन्म नाहीं असा आहे. अजाचा (अज्ञानाचा) नाश कोठचा व कसा? म्हणून अज्ञानघन हें अक्षर समज. ॥५०८ अ॥ सर्व कळांनीं रहित, असें चंद्राचें कलाशून्य मूळ स्वरूप, जसें अमावास्येस असतें, त्याप्रमाणें अक्षराचें स्वरूप आहे, असें समजावें. ५०९. फळ पिकल्यावर झाड जसें (लीन रूपानें) बीजांत रहातें, त्याप्रमाणें सर्व (स्थूल, सूक्ष्म) उपाधींचा नाश झाल्यावर, ही जीवदशा जेथें लीन रूपानें असते. ५१० क्षरपुरुषाची देहादि उपाधी व त्या उपाधीचे संबंधानें असणारा क्षरपुरुष (उपहित), हीं दोन्ही जेथें लीन होऊन राहातात, त्यास अर्जुना, अव्यक्त असें म्हणतात. ५११. त्या (अव्यक्ताला) वेदांतानें बीजभाव असें नांव दिलें, तें या अक्षरपुरुषाचें राहण्याचें ठिकाण आहे. ५१२. जेथून (त्या अव्यक्तापासून), विपरीत ज्ञान हें, जागृति व स्वप्न या अवस्थांचा विस्तार करून, अनेक बुद्धीचे तरंगरूपी रानांत शिरलें आहे. ५१३. अर्जुना, त्या अव्यक्तापासून जीवत्व ही कल्पना, विश्व या कल्पनेस उत्पन्न करीत उत्पन्न होते व त्या दोन्ही कल्पनांचा जेथें लय होतो, तो अक्षरपुरुष (समजावा.) ५१४. दुसरा जो क्षरपुरुष आहे, तो जगांत जागृति व स्वप्न या दोन अवस्थांनीं खेळतो. त्या दोन अवस्था जो (अक्षरपुरुष) प्रसवला. ५१५. त्या अवस्थेला 'अज्ञानघनसुषुप्ति' असें प्रसिद्ध नांव आहे, त्या अवस्थेच्या प्राप्तीलाच आम्ही ब्रह्मप्राप्ति म्हटलें असतें; पण हिच्यांत पुढील एक उणीव आहे, नाहीं तर हीच ब्रह्माची प्राप्ति असें म्हटलें असतें. ५१६. खरोखरच अर्जुना, जर हा अक्षरपुरुष पुनः स्वप्न व जागृति अवस्थांप्रत न येता, तर यालाच खरोखर ब्रह्मभाव म्हणतां आलें असतें. ५१७. परंतु प्रकृति व पुरुष हे ढग ज्या आकाशांत झाले आहेत व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ हेच कोणी स्वप्नांतील पदार्थ ज्या निद्रेंत दिसतात, ती निद्रा जो (अक्षरपुरुष) आहे, ५१८. हें राहूं दे. खालीं शाखा असलेल्या या संसारवृक्षाला अक्षरपुरुष हेंच मूळ आहे. ५१९. याला पुरुष कां म्हणावयाचें? तर हा आपल्या स्वरूपानें पूर्णच आहे; शिवाय हा मायापुरींत निजतो; त्या कारणानेंही याला पुरुष असें म्हणतात. ५२०. आणि विकारांची येरझार, हा जो एक विपरीत ज्ञानाचा प्रकार आहे, तो प्रकार ज्या सुषुप्ति अवस्थेमध्यें समजत नाहीं, ती सुषुप्ति, हा (अक्षरपुरुष) आहे. ५२१. म्हणून याला स्वभावतः गळणें (नाश) नाहीं आणि हा पुरुष ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायानें कधींच नाश पावत नाहीं. ५२२. एवढ्याकरितां वेदांत शास्त्रामध्यें हा अक्षर आहे, अशा सिद्धांताची मोठी प्रसिद्धि आहे, असें दिसून येईल. ५२३. याप्रमाणें जें चैतन्य जीवरूपी (क्षरपुरुष) कार्याचें कारक आहे व मायाउपाधीचा आश्रय करून असणें, हेंच ज्याचें स्वरूप आहे, त्या चैतन्यास अक्षरपुरुष असें समज. ५२४. आतां लोकांमध्यें अन्यथा (विपरीत) ज्ञानाच्या ज्या दोन (जागृति आणि स्वप्न) अवस्था आहेत, त्या गाढ अज्ञानरूप तत्त्वामध्यें (सुषुप्तींत) नाहींशा होतात. ५२५. तें अज्ञान ज्ञानांत बुडून नाहींसें झाल्यावर व त्या ज्ञानानें ('मी ब्रह्म आहें' या वृत्तिज्ञानानें) कीर्तिमुखत्व

केलिया। जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां। स्वयें जळे ॥ २६ ॥ तैसें अज्ञान ज्ञानें नेलें। आपण वस्तु देऊनि गेलें। ऐसें जाणणेंनिवीण उरलें। जाणतें जे ॥ २७ ॥

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः। यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥

तें तो गा उत्तमपुरुषु। जो तृतीय कां निष्कर्षु। दोहींहून आणिकु। मागिला जो ॥२८॥ सुषुप्ती आणि स्वप्ना–। पासूनि बहुवें अर्जुना। जागणें जैसें आना। बोधाचेंचि ॥ २९ ॥ कां रश्मी हन मृगजळा–। पासूनि अर्कमंडळा। अफाटु तेवीं वेगळा। उत्तमु गा ॥ ५३० ॥ हें ना काष्ठींचा काष्ठाहुनी। अनारिसा जैसा वन्ही। तैसा क्षराक्षरापासुनी। आनचि तो ॥ ३१ ॥ पैं ग्रसूनि आपली मर्यादा। एक करीत नदीनदां। उठी कल्पांतीं उदावादा। एकार्णवाचा ॥ ३२ ॥ तैसें स्वप्न ना सुषुप्ती। ना जागराची गोठी आथी। जैसी गिळिली दिवोराती। प्रळयतेजें ॥३३॥ मग एकपण ना दुजें। असें नाहीं हें नेणिजे। अनुभव निर्बुजे। बुडाला जेथें ॥ ३४ ॥ ऐसें आथि जें कांहीं। तें तो उत्तमपुरुषु पाहीं। जें परमात्मा इहीं। बोलिजे नामीं ॥ ३५ ॥ तेंही एथ न मिसळतां। बोलणें जीवत्वें पंडुसुता। जैसी बुडणेयाची वार्ता। थडियेचा कीजे ॥ ३६ ॥ तैसें विवेकाचिये कांठीं। उभे केलेया किरीटी। पारावाराचिया गोठी। करणें वेदां ॥ ३७ ॥

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः। अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

म्हणौनि पुरुषु क्षराक्षर। दोन्ही देखोनि अवर। यातें म्हणती पर। आत्मरूप ॥ ३८ ॥ अर्जुना ऐसिया परी। परमात्मा शब्दवरी। सूचिजे गा अवधारीं। पुरुषोत्तमु ॥ ३९ ॥ एऱ्हवीं न बोलणेंनि बोलणें। जेथिंचें सर्व नेणिवा जाणणें। कांहींच न होनि होणें। जे वस्तु गा ॥ ५४० ॥ सोहं तेंही अस्तवलें। जेथ सांगतेंचि सांगणें जालें। द्रष्टत्वेंसी गेलें। दृश्य जेथ ॥४१॥ आतां बिंबा आणि प्रतिबिंबा–। माजीं कैंची हें म्हणों नये प्रभा। जऱ्ही कैसेनि हे लाभा। जायेचि ना ॥ ४२ ॥ कां प्राणा फुला दोहीं। द्रुती असे जे माझारिलां ठायीं। ते न दिसे तरी नाहीं। ऐसें बोलों नये ॥ ४३ ॥ तैसें द्रष्टा दृश्य हें जाये। मग कोण म्हणे काय आहे। हेंचि अनुभवें तेंचि पाहे। रूप तया ॥ ४४ ॥ जो प्रकाश्येंवीण प्रकाशु। ईशितव्येंवीण ईशु। आपणेनीचि अवकाशु। वसवीत असे जो ॥४५॥ जो नादें ऐकिजता नादु। स्वादें चाखिजता स्वादु। जो भोगिजतसे आनंदु। आनंदेंचि ॥४६॥ सुखासि सुख जोडिलें। जें तेज तेजासि सांपडलें। शून्यही बुडालें। महाशून्यीं

केल्यावर ( म्हणजे तें ज्ञान नाहींसें झाल्यावर, ) त्याप्रमाणें लांकडास लागलेला अग्नि, लांकूड जाळून शेवटीं आपणही नाहींसा होतो, ५२६. त्याप्रमाणें अहंब्रह्मास्मि-वृत्तिरूप ज्ञानानें अज्ञान नाहींसें केल्यावर, तें ज्ञान आत्मसाक्षात्कार देऊन आपण नाहींसें झालें. याप्रमाणें ( 'मी ब्रह्म' या वृत्ति ) ज्ञानावांचून जें केवळज्ञान उरलें; ५२७.

या दोहोंहून वेगळा, ज्याला परमात्मा असें म्हणतात, जो त्रैलोक्यांत प्रवेश करून त्यास धारण करतो व जो अव्यय व ईश आहे, असा उत्तम पुरुष आहे. १७.

अर्जुना, असें वृत्तिज्ञानावांचुन जें केवळज्ञान राहिलें तें ( केवळज्ञान ) तो उत्तमपुरुष होय. जो मागील दोहों-हून ( क्षराक्षराहून ) वेगळा, तिसरा व शेवटचा आहे. ५२८. अर्जुना, सुषुप्ति आणि स्वप्नाहून जागृति जशी पुष्कळ पटीनें वेगळ्या बोधाचीच असते. ५२९. अथवा अर्जुना, सूर्यकिरणें व मृगजळ यांहून सूर्यमंडळ जसें फारच फार वेगळें आहे, त्याप्रमाणें हा उत्तमपुरुष मागील दोन पुरुषांहून फारच फार वेगळा आहे. ५३०. हें उदाहरण राहूं दे. लांकडांतील सामान्य स्वरूपाचा अग्नि, जसा लांकडांत असून लांकडाहून भिन्न असतो, तसा तो उत्तमपुरुष क्षराक्षरांत असून, क्षराक्षरपुरुषांहून भिन्न आहे. ५३१. कल्पाच्या शेवटीं सर्वत्र एक समुद्रच ( जलमय ) झाला असतां, त्याचें पूर्णत्व आपली मर्यादा नाहींशी करून नद व नद्या ह्यास एकत्र करीत ( असें ) प्रगट होतें. ५३२. ज्याप्रमाणें प्रळयकाळाच्या तेजानें दिवस व रात्र या दोहींचा ग्रास करावा, त्याप्रमाणें स्वप्न, सुषुप्ति अथवा जागृति यांची गोष्टही ( उत्तमपुरुषाचे ठिकाणीं ) नाहीं. ५३३. मग ज्या ठिकाणीं एकपण नाहीं व त्याच्या सापेक्ष असलेलें द्वैतही नाहीं व आहे अथवा नाहीं हें जेथें कळत नाहीं व जेथें अनुभव दिपून नाहींसा झाला; ५३४. अशा तऱ्हेनें जें कांहीं आहे, तें तो उत्तम पुरुष आहे, असें समज; आणि त्या उत्तम-पुरुषाचा 'परमात्मा' या नांवानें उल्लेख करतात. ५३५. अर्जुना, परमात्मा म्हणून त्याविषयीं ( उत्तम-पुरुषाविषयीं ) जें बोलावयाचें, तेंही त्याच्याशीं ऐक्याला न पावतां, जीवदशेंत राहून बोलावयाचें. ज्याप्रमाणें बुडणाऱ्याची गोष्ट ( नदीच्या ) कांठावर उभा राहिलेला मनुष्य सांगतो, ५३६. त्याप्रमाणें विचाराच्या हद्दीवर उभें राहून, वेदांना अलीकडील व पलीकडील तीरावरच्या गोष्टी करतां आल्या ( क्षराक्षरपुरुष हे अलिकडले आहेत व उत्तमपुरुष हा पलीकडचा आहे. ह्या दोघांविषयींच्या गोष्टी बोलतां आल्या. ) ५३७.



ज्याअर्थीं मी क्षराच्या पलीकडचा आहें आणि अक्षराहून देखील उत्कृष्ट आहें, त्याअर्थीं जगा-मध्यें आणि वेदांमध्यें 'पुरुषोत्तम' म्हणून प्रसिद्ध आहें. १८.

म्हणून क्षराक्षर हे दोन्ही पुरुष अलिकडले ( सोपाधिक ) आहेत, असें पाहून या उत्तमपुरुषाला पलीकडचा आत्मरूप असें म्हणतात. ५३८. अर्जुना, ऐक. अशा प्रकारें परमात्मा या शब्दानें त्या उत्तमपुरुषाला सुचवितात. ५३९. वास्तविक विचार करून पाहिलें तर, न बोलण्यानेंच त्याचें वर्णन होतें, कांहीं न जाणणें, हें त्याचें ( उत्तम पुरुषाचें ) जाणणें होय व इतर कांहीं ( म्हणजे जीव, शिव व ब्रह्म ) न होऊन, ज्या वस्तुचें होणें आहे. ५४०. ज्या ठिकाणीं 'मी ब्रह्म' अशी समजूत देखील मावळली, ज्या स्वरूपीं सांगणाराच सांगणें झाला व जेथें दृश्य ही कल्पना, द्रष्टा या कल्पनेसह नाहींशी झाली; ५४१. आतां सूर्याचें बिंब व त्याचें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब, यांच्या दरम्यान असणारें तेज, जरी कोणत्याही उपायांनीं घेतां आलें नाहीं, तरी त्यांच्या दरम्यान तेज कोठलें ? असें म्हणूं नये. ५४२. अथवा नाक व फुलें या दोहोंच्या दरम्यान जो सुवास असतो, तो जरी डोळ्यांना दिसत नाहीं, तरी तो नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. ५४३. त्याप्रमाणें द्रष्टा ( पहाणारा ) दृश्य ( पहाण्याचा विषय ) ह्या दोन्ही कल्पना नाहींशा झाल्यावर, कोणी असें म्हणेल कीं, त्या ठिकाणीं मग काय शिल्लक रहातें ? तर द्रष्टा व दृश्य ह्या कल्पना जाऊन, जी उर्वरीत स्थिति उरते, ती ( स्थिति ) जो अनुभवानें पहातो, तेंच त्याचें स्वरूप होय. ५४४. जो प्रकाश्याशिवाय प्रकाश आहे व जो नियम्य पदार्थाशिवाय नियामक आहे व जो आपल्यानेंच सर्व पोकळी आपणच भरून टाकतो. ५४५. जो ध्वनीकडून ऐकला जाणारा ध्वनी आहे, जी चव, चवीनें चाखावी व जो आनंद, आनंदानेंच भोगावा; ५४६. जें सुखाला प्राप्त झालेलें सुख आहे, जें तेजाला सांपडलेलें तेज आहे आणि ज्या ( ब्रह्मरूपी )

जिये ॥ ४७ ॥ जो पूर्णतेचा परिणामु । पुरुषु गा सर्वोत्तमु । विश्रांतीचाही विश्रामु । विराला जेथें ॥४८॥ जो विकासाहीवरी उरता । ग्रासातेंही ग्रासूनि पुरता । जो बहुतें पाडें बहुतां- । पासूनि बहु ॥ ४९ ॥ पैं नेणतयाप्रती । रुपेपणाची प्रतीती । रुपें न होउनि शुक्ती । दावी जेवीं ॥५५०॥ कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे । विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी ॥५१॥ हें असो जलतरंगा । नाहीं सिनानेंपण जेवीं गा । तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणाचि जो ॥ ५२ ॥ आपलिया संकोचविकाशा । आपणाचि रूप वीरेशा । हा जळीं चंद्र हन जैसा । समग्र गा ॥ ५३ ॥ तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं केंहीं न जाये । जैसा रात्री दिवसें नोहे । द्विधा रवि ॥ ५४ ॥ तैसा कहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं न पडे । जयाचें सांगडें । जयासीचि ॥ ५५ ॥ जो आपणपेंचि आपणया । प्रकाशीतसे धनंजया । काय बहु बोलों जया । नाहीं दुजें ॥ ५६ ॥ तो गा मी निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु । म्हणोनि म्हणे वेद लोकु । पुरुषोत्तमु ॥ ५७ ॥

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् । स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

परी हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें ॥५८॥ चेइलिया आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न । तैसें स्फुरतें जया त्रिभुवन । वावों जालें ॥५९॥ कां हातीं घेतालिया माळा । फिटे सर्पाभासाचा कंटाळा । तैसा माझेनि बोधें टवाळा । नागवे जो ॥ ५६० ॥ लेणें सोनेंचि जो जाणे । तो लेणेपण तें वावो म्हणे । तेवीं मी जाणोनि जेणें । वाळिला भेदु ॥६१॥ मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिध्दु । जो आपणेनसीं भेदु । नेणोनि जाणे ॥ ६२ ॥ तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही म्हणणें थेंकुलें । जे तया सर्व उरलें । द्वैत नाहीं ॥ ६३ ॥ म्हणोनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना । गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ॥ ६४ ॥ क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें । अमृताचि होऊनि मिळणें । अमृतीं जेवीं ॥ ६५ ॥ साडेपंधरा मिसळावें । तैं साडेपंधरेंचि होआवें । तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥ ६६ ॥ हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती । म्हणौनि मी न होतां भक्ती । अन्वयो आहे ॥६७॥ ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्यु सागरीं । तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ॥ ६८ ॥ सूर्या आणि प्रभे । एकवंकी जेणें लोभें । तो पाडु मानूं लाभे । भजना तया ॥ ६९ ॥ एवं कथिलयादारम्य । जें हें सर्व शास्त्रैकलभ्य । उपनिषदां सौरम्य । कमळदळां जेवीं ॥ ५७० ॥ हें शब्दब्रह्माचें मथितें । व्यासप्रज्ञेचेनि हातें । मथूनि काढिलें आयितें । सार आम्हीं ॥ ७१ ॥

महाशून्यामध्यें (आकाशादि) शून्यही नाहींसें झालें. ५४७. जो पूर्णतेचा शेवट आहे, जो पुरुष सर्वांत श्रेष्ठ आहे, विश्रांतीचाही विसावा जेथें शांत झाला आहे. ५४८. जो विश्वाच्या विस्ताराला व्यापून उरला आहे; जो ग्रासालाही ग्रासून पुरता आहे, ( म्हणजे ग्रासाचाही ज्याच्या ठिकाणीं लय होतो, ) असा जो पूर्ण आहे व जो पुष्कळां-पेक्षां पुष्कळ पटीनें पुष्कळ आहे; ५४९. [ वर सांगितल्या-प्रमाणें जर सर्वच स्वरूप ( चैतन्य ) आहे तर मग स्वरूप न भासतां विश्व कां भासतें ? या शंकेचें पुढें समाधान करितात. ] ज्याप्रमाणें शिंप ही आपण स्वतः रुपें न होऊन, आपल्या शिंपपणाचें अज्ञान ज्याच्यामध्यें आहे, अशा अज्ञान्याला आपल्या ठिकाणीं रुपें भासविते. ५५०. अथवा अनेक अलंकारांच्या स्थितींत ( आकारांत ), जसें सोनें न लपतां झांकलेलें आहे, त्याप्रमाणें जो, विश्व न होऊन, विश्वाला धारण करतो. ५५१. हें राहूं दे. ज्याप्रमाणें पाणी व लाटा यांत भिन्नपणा नाहीं, ( म्हणजे लाट ही कांहीं वेगळा पदार्थ नसून, त्या रूपानें भासणारें एक पाणीच आहे. ) त्याप्रमाणें जो ( उत्तमपुरुष ) आपण जगाला प्रतीतीस येणारा प्रकाश आहे, ( म्हणजे ज्याच्या सद्रूपानें जग आहे व ज्याच्या प्रकाशानें जग भासतें, ) ५५२. ज्याप्रमाणें पाण्यांत दिसणारा संपूर्ण चंद्र हा आपल्या संकोचविकासास आपणच कारण आहे, त्याप्रमाणें वीरा अर्जुना, जगद्भासरूपी आपला विकास व जगताचा प्रलयरूप आपला संकोच, या आपल्या संकोचविकासास तो आपणच कारण आहे. ५५३. ज्याप्रमाणें रात्र व दिवस यांच्या योगानें सूर्य दोन प्रकारचा होत नाहीं, त्याप्रमाणें विश्वपणानें हा कांहीं होत नाहीं आणि विश्वाचा लोप झाला असतां हा कोठेंही जात नाहीं. ५५४. त्याप्रमाणें कधींच, कोणीकडे, कशानेंही हा ( उत्तमपुरुष ) कमी होत नाहीं व ज्याच्या सारखाच जो आहे, ५५५. अर्जुना, जो आपणच आपल्याला प्रकाशतो; फार काय सांगूं ! ज्याला दुसरें नाहीं ( म्हणजे जो एकाकी आहे, ) ५५६. क्षर व अक्षर या दोन पुरुषांहून श्रेष्ठ व उपाधिरहित असा काय तो मीच आहें, म्हणून वेद व सर्व जग मला पुरुषोत्तम म्हणतात. ५५७

हे भारता, जो या प्रकारें ज्ञानानें युक्त होत्साता मला पुरुषोत्तमाला जाणतो, तो सर्वज्ञ होय. तो सर्व प्रकारें ( मद्रूप होऊन ) माझी भक्ति करतो. १९.

परंतु हें राहूं दे. अर्जुना, ज्ञानसूर्याचा उदय झाल्यावर ( त्या ज्ञानानें ) असा मी जो पुरुषोत्तम, त्या मला जो जाणतो. ५५८. आपलें ज्ञान ( जागृतीचें ज्ञान ) जागें झालें असतां, जसें स्वप्न नाहींसेंच होतें, त्याप्रमाणें हें भासणारें त्रिभुवन, ज्याला आपल्या आत्मस्वरूपाच्या ज्ञानाच्या योगानें मिथ्या झालें आहे. ५५९. अथवा हातांत माळ घेतल्यावर ( त्या माळेवर ) भासत असलेल्या सर्पाचें भय नाहींसें होतें, त्याप्रमाणें माझ्या ज्ञानानें जो ( पुरुष ) मिथ्या जगदाभासाच्या तडाख्यांत सांपडत नाहीं. ५६०. दागिना हा सोनेंच आहे, असें जो जाणतो, तो, दागिनेपण ( दागिन्याचा आकार ) जसें मिथ्याभास आहे असें म्हणतो, त्याप्रमाणें ज्यानें मला जाणून भेद टाकला. ५६१. मग तो आपणासह भेद न जाणून ( मला ) जाणतो व त्यामुळें मीच एक स्वतःसिद्ध सच्चिदानंद सर्वत्र आहे, असें म्हणतो. ५६२. त्यानेंच सर्व जाणलें, हें म्हणणें सुद्धां थोडें आहे. कारण कीं, त्याला सर्व ब्रह्म असल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं द्वैत उरलें नाहीं. ५६३. म्हणून अर्जुना, माझ्या भजनाला तोच योग्य आहे. ( तें कसें तर ) आकाश जसें आकाशाच्या आलिंगनास योग्य आहे. ५६४. क्षीरसागराला मेजवानी क्षीरसागरपणानेंच करावी आणि अमृतच होऊन जसें अमृतांत मिळावें; ५६५. अस्सल सोन्याशीं तद्रूप होणें असेल, तर अस्सल सोनेंच झालें पाहिजे; त्याप्रमाणें मद्रूप झाल्यानेंच, माझी भक्ति शक्य आहे. ५६६. बाबा अर्जुना, गंगा जर समुद्राहून भिन्न असती, ( म्हणजे विजातीय असती ) तर ती समुद्राशीं तद्रूप कशी झाली असती ? ( कारण तद्रूपता सजातीय पदार्थांत होते. ) म्हणून मद्रूप न होतां, माझ्या भक्तींत प्रवेश होईल काय ? ५६७. एवढ्याकरितां जशी लाट सर्व रीतींनीं समुद्राशीं अभिन्न असते, त्याप्रमाणें जो मला ( मद्रूप होऊन ) भजला, ऐक. ५६८. सूर्याला व प्रभेला ज्या मानानें ( जशी ) एकरूपता असते, ती योग्यता त्या भजनाला मानतां येईल. ५६९. या गीतारूपी उपदेशाचा पहिला अध्याय सांगण्याला सुरवात केल्यापासून, तों आतां या अध्यायाच्या अखेरपर्यंत, ही जी केवळ सर्व शास्त्रांच्या अभ्यासानें प्राप्त होणारी एक वस्तु, ती उपनिषद्रूपी कमलांतील सुगंध आहे. ५७०. सर्व वेदरूपी घुसळा-वयाच्या दह्यापासून, व्यासांच्या बुद्धिरूप रवीनें घुसळून, आम्हीं हें अनादिसिद्ध लोणी काढलें आहे. ५७१.

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ । एतद्बुध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी । विचारक्षीरार्णवींची नवी । लक्ष्मी जे हे ॥ ७२ ॥ म्हणोनि आपुलेनि पदें वर्णें । अर्थाचेनि जीवेंप्राणें । मीवांचोनि हों नेणे । आन कांहीं ॥ ७३ ॥ क्षराक्षरत्वें समोर जालें । तयांचें पुरुखत्व वाळिलें । मग सर्वस्व मज दिधलें । पुरुषोत्तमीं ॥ ७४ ॥ म्हणौनि जगीं गीता । मियां आत्मेनि पतिव्रता । जे हे प्रस्तुत तुवां आतां । आकर्णिली ॥ ७५ ॥ साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसारु जिणतें हें शस्त्र । आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ॥ ७६ ॥ परी तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें । जें गौप्यधन काढिलें । माझें आजि ॥ ७७ ॥ मज चैतन्यशंभूचां माथां । जो निक्षेपु होता पार्था । तया गौतमु जालासि आस्था- । निधी तूं गा ॥ ७८ ॥ चोखटिवा आपुलिया । पुढिला उगाणा घेयावया । तया दर्पणाचीचि परी धनंजया । केली आम्हां ॥ ७९ ॥ कां भरलें चंद्रतारांगणीं । नभ सिंधू आपणयामाजीं आणी । तैसा गीतेसीं मी अंतःकरणीं । स्रदला तुवां ॥५८०॥ जे त्रिविधमळकटा । तूं सांडिलासि सुभटा । म्हणौनि गीतेसीं मज वसौटा । जालासि गा ॥ ८१ ॥ परी हें बोलों काय गीता । जे हे माझी उन्मेषलता । जाणे तो समस्ता । मोहा मुके ॥ ८२ ॥ सेविली अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता । अमरपण उचिता । देऊनि घाली ॥ ८३ ॥ तैसी गीता हे जाणितलिया । काय विस्मयो मोह जावया । परी आत्मज्ञानें आपणपयां । मिळिजे येथ ॥ ८४ ॥ जया आत्मज्ञानाचां ठायीं । कर्म आपुलेया जीविता पाहीं । होऊनियां उतराई । लया जाय ॥ ८५ ॥ हारपलें दावूनि जैसा । मागु सरे वीरविलासा । ज्ञानचि कळस वळघे तैसा । कर्मप्रासादा ॥ ८६ ॥ म्हणौनि ज्ञानिया पुरुषा । कृत्य करूं सरलें देखा । ऐसा अनाथांचा सखा । बोलिला तो ॥८७॥ तें श्रीकृष्णवदनामृत । पार्थी भरोनि असे वोसंडत । मग व्यासकृपा प्राप्त । संजयासी ॥ ८८ ॥ तो धृतराष्ट्रराया । स्रतसे पान करावया । म्हणौनि जीवितान्तु तेया । नव्हेचि भारी ॥ ८९ ॥ एऱ्हवीं गीताश्रवणअवसरीं । आवडों लागतां अनधिकारी । परी शेखीं तेचि उजरी । पातला भली ॥ ५९० ॥ जेव्हां द्राक्षीं दूध घातलें । तेव्हां वायां गेलें गमलें । परी फळपाकीं दुणावलें । देखिजे जेवीं ॥ ९१ ॥ तैसीं हरीवक्त्रींचीं अक्षरें । संजयें सांगितलीं आदरें । तिहीं अंधु तोही अवसरें । सुखिया जाला ॥ ९२ ॥ तेंचि मऱ्हाटेनि विन्यासें । मियां उन्मेषें ठसेंठोंवसें । जाणें नेणें तैसें । निरोपिलें ॥ ९३ ॥ सेवंतीये अरसिकांही । आंग पाहतां विशेषु तरी नाहीं । परी सौरभ्य नेलें

हे पापरहिता, याप्रमाणें हें अत्यंत गुह्य शास्त्र मी तुला सांगितलें. हे भारता, याचें ज्ञान करून घेऊन, ( मनुष्य ) आत्मज्ञानसंपन्न आणि कृतकृत्य होतो. २०.

जी (गीता) ज्ञानरूपी अमृताची गंगा आहे, जी आनंदरूपी चंद्राची सतरावी जीवनकला आहे व जी ही विचाररूपी क्षीरसमुद्राचें मंथन करून काढलेली नवी ( दुसरी ) लक्ष्मी आहे. ५७२. म्हणून ही गीतारूप लक्ष्मी, आपल्या पदांनीं, वर्णांनीं व आपल्या अर्थांच्या जीवाप्राणांनीं, माझ्याशिवाय दुसरें कांहीं होणें जाणत नाहीं. ५७३. क्षरपुरुष क्षरपणानें व अक्षरपुरुष अक्षरपणानें ( गीतेनें आपणास वरावें म्हणून तिच्या ) समोर आले; परंतु गीतेनें त्यांच्या पुरुषत्वाचा त्याग केला. ( म्हणजे हे खरे पुरुष नाहींत, कारण हे सोपाधिक आहेत, असें ठरविलें ) आणि तिनें आपलें सर्वस्व (पद, वर्ण, अर्थ वगैरे) मी जो पुरुषोत्तम, त्या मला अर्पण केलें. ५७४. म्हणून जी ही आतां या अध्यायापर्यंत गीता तूं ऐकलीस, ती गीता, या जगामध्यें आत्मरूप जो मी, त्या माझ्याच ठिकाणीं अनन्य असल्यामुळें पतिव्रता आहे. ५७५. खरोखरच गीता हें ( नुसतें ) शब्दपांडित्याचें शास्त्र नाहीं, तर ही गीता, संसार जिंकणारें हत्यार आहे. (फार काय सांगावें !) या गीतेचीं हीं अक्षरें, आत्म्याला प्रकट करणारे मंत्र आहेत. ५७६. परंतु अर्जुना, तुझ्यापुढें जें आम्हीं गीताशास्त्र सांगितलें, तें तूं माझें गुप्त धन आज बाहेर काढलेंस, असा प्रकार झाला. ५७७. अर्जुना, [ पूर्वी शंकराच्या मस्तकांत (जटेंत) गुप्त असलेली गंगा ( गोदावरी ) बाहेर काढण्यास जसा गौतम कारणीभूत झाला, तसा ] मी जो चैतन्यरूपी शंकर, त्या माझ्या मस्तकांत जो गीतारूपी ठेवा होता, त्याला बाहेर काढणारा, श्रद्धेचें भांडार जो तूं अर्जुन, तो तूं गौतम झालास. ५७८. आपल्या स्वच्छपणानें पुढें असलेल्याचें आकलन करून घेण्याचे कामीं, अर्जुना, तूं आम्हांस आरशाप्रमाणें झालास. ( आरसा ज्याप्रमाणें आपल्यांत समोरच्याचें प्रतिबिंब घेतो, त्याप्रमाणें अर्जुना, तूं माझें आकलन केलेंस.) ५७९. अथवा ज्याप्रमाणें चंद्र व ताऱ्यांचे समुदाय यांनीं भरलेलें आकाश, समुद्र आपल्यामध्यें ( प्रतिबिंबरूपानें ) आणतो, त्याप्रमाणें गीतेसकट मला तूं आपल्या अंतःकरणांत घातलें आहेत. ५८०. अर्जुना, तुझ्या चित्तास तीन प्रकारचे मळ सोडून गेले, म्हणून तूं गीतेसह माझें राहण्याचें ठिकाण झाला आहेस. ५८१. परंतु हें काय बोलूं ? माझी ज्ञानाची वेली, जी ही गीता, हिला जो जाणील, तो संपूर्ण मोहापासून मुक्त होईल. ५८२. अर्जुना, अमृताच्या नदीचें सेवन केलें असतां, तें सेवन, रोग नाहींसे करून, योग्य अशा अमरपणाला देऊन टाकतें. ५८३. त्याप्रमाणें ही गीता जाणली असतां, मोह नाहींसा होण्याचें आश्चर्य काय आहे ? ( मोह तर जाईलच ) पण या गीतेच्या योगानें आत्मज्ञान होऊन आत्मस्वरूपीं मिळतां येतें. ५८४. पहा, ज्या आत्मज्ञानाच्या ठिकाणीं कर्म आपल्या जीवितानें मुक्त होऊन लयाला जातें. ५८५. हे वीरविलासा अर्जुना, हरवलेली वस्तु दाखवून जसा माग नाहींसा होतो, त्याप्रमाणें कर्मरूपी देऊळावर ज्ञानरूपी कळस चढतो ( कर्म हें ज्ञानाची प्राप्ति करून देऊन आपण संपतें. ) ५८६. म्हणून ज्ञानी पुरुषाला कर्तव्य करणें संपलें, असें समजा. याप्रमाणें अनाथांचे सहाय्यकर्ते ( श्रीकृष्ण ) बोलले. ५८७. तें श्रीकृष्णाच्या मुखांतून निघालेलें बोधामृत अर्जुनरूपी भांडें भरून सांडत होतें. मग तें बोधामृत व्यासांच्या कृपेनें संजयाला प्राप्त झालें. ५८८. नंतर त्या संजयानें तें बोधामृत धृतराष्ट्रराजाला पिण्याकरितां दिलें; म्हणून धृतराष्ट्राला अंतसमय कठीण गेला नाहीं. ( म्हणजे मरणसमयीं त्याच्या चित्ताची गडबड उडाली नाहीं. ) ५८९. वास्तविक विचार करून पाहिलें तर, गीता ऐकण्याच्या वेळीं तो ( धृतराष्ट्र ) अनधिकारी आहे असें वाटावयाला लावणारा होता. परंतु शेवटीं ( अंतसमयीं ) तोच ( बोधाचा ) प्रकाश त्याला चांगला पावला. (म्हणजे त्याच्या चांगला उपयोगाला आला. ) ५९०. ज्या वेळीं खत म्हणून द्राक्षांच्या वेलास दूध घातलें, त्या वेळीं त्याचा तत्काळ उपयोग दिसून न आल्यानें, तें व्यर्थ नासलें, असा समज होतो; परंतु त्या खताचा परिणाम होऊन, ज्या वेळेस द्राक्षांचें पीक तयार होतें, त्या वेळेस वायां गेल्यासारखें वाटलेलें दूध, दुप्पट फायद्याचें झालें, असा ज्याप्रमाणें अनुभव येतो; ५९१. त्याप्रमाणें संजयानें हरीच्या मुखांतील अक्षरें धृतराष्ट्राला आदरानें सांगितलीं; त्या अक्षरांच्या योगानें तो आंधळा धृतराष्ट्र देखील कांहीं काळानें ( मरणकाळीं ) सुखी झाला. ५९२. तेंच मी मराठी भाषेच्या रचनेनें, ओबडधोबड ज्ञानानें, मला कळलें न कळलें तसें, सांगितलें. ५९३. अरसिकांनीं शेवंतीच्या झाडाकडे पाहिलें, तर त्यांत त्यांना कांहीं विशेष महत्त्व दिसत नाहीं; परंतु त्याच झाडास आलेल्या

तिहीं । भ्रमरीं जाणिजे ॥ ९४ ॥ तैसें घडतें प्रमेय घेइजे । उणें तें मज देइजे । जें नेणणें हेंचि सहजें । रूप कीं बाळा ॥ ९५ ॥ परी नेणतें जऱ्ही होये । तऱ्ही देखोनि बाप कीं माये । हर्षें केंहीं न समाये । चोज करिती ॥ ९६ ॥ तैसें संत माहेर माझें । तुम्हीं मिनलिया मी लडैजे । तेंचि ग्रंथाचेनि व्याजें । जाणिजो जी ॥९७॥ आतां विश्वात्मकु हा माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा । तो अवधारू वाक्यपूजा । ज्ञानदेवो म्हणे ॥ ५९८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगोनाम पंचदशोऽध्यायः

[ श्लोक २०. ओंव्या ५९८. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



फुलांतील सुगंधावर नजर ठेवून, जे भ्रमर त्यांतील पराग घेऊन जातात, तेच त्यांतील सार जाणतात. ५९४. गीतेंतील विषयाच्या चालू असलेल्या प्रतिपादनांत योग्य असेल, त्याचा ( श्रोत्यांनीं ) अंगीकार करावा व यांत जी उणीव दिसून येईल, ती माझे पदरांत टाकावी. बरोबरच आहे कीं, स्वभावतः कांहींच न समजणें, हेंच लहान मुलाचें स्वरूप आहे. ५९५. परंतु मूल जरी अज्ञानी असलें, तरी आई व बाप यांनीं त्याला पाहिलें असतां त्यांचा आनंद कोठेंही मावत नाहीं आणि मग ते त्या मुलाचें कौतुक करतात. ५९६. त्याप्रमाणें तुम्ही संत माझे आईबाप आहांत. तुम्ही भेटल्यावर मी लडिवाळपणा करितों. महाराज, तो लडिवाळपणा म्हणजे हा ग्रंथ होय, असें आपण समजावें. ५९७. आतां विश्वस्वरूपी माझा गुरु जो श्रीनिवृत्तिराजा, तो माझी ही शब्दांची पूजा ऐको, असें ज्ञानदेव म्हणतात. ५९८.



अध्याय सोळावा : : : सारांश

सहज इष्टानिष्टकरणी । दोघीचि इया कवतुकिणी । हे नवमाध्यायीं उभारणी । केली होती ॥
तेथ सातमा घेयावा उवावो । तंव वोडवला आन प्रस्तावो ।
तरी तया प्रसंगें आतां देवो । निरूपीत असे ॥ अ. १६–६१-६२

ज्ञानसूर्याचा उदय झाला म्हणजे पुरुषोत्तमाचें यथार्थ स्वरूप अनुभवास येतें, असें भगवंतांनीं मागील अध्यायाच्या शेवटीं सांगितलें, त्याच चित्सूर्याचें रूपक या अध्यायाच्या आरंभीं घेऊन श्रीज्ञानदेव आपल्या गुरूंच्या अलौकिक अध्यात्मिक सामर्थ्याचें लौकिक सूर्याच्या सामर्थ्याशीं तुलना करून वर्णन करतात. [ हें चित्सूर्याचें रूपक इतकें उत्कृष्ट आहे कीं, त्याला अशा प्रकारच्या वाङ्मयांत क्वचितच तोड असेल. हें सतरा ओंव्यापर्यंत पसरलेलें आहे. ] प्रथम या चित्सूर्याच्या उदयाच्या व लौकिक सूर्याच्या उदयाच्या परिणामांतील महदंतर दाखवून पुढें लौकिक सूर्य उदयास आला असतां ज्या अनेक तारागणांचा लोप, कमळाचा विकास व भ्रमराचा बंदीमोक्ष, चक्रवाक दांपत्याची रात्रीच्या विरहानंतरची पुनर्भेट, मृगजळोत्पत्ति इत्यादि घटना घडतात, त्याचा उपयोग करून हा श्रीगुरुरूपी चित्सूर्य पारमार्थिक जगांत काय काय कार्यें करतो हें उत्कृष्ट रीतीनें श्रीज्ञानदेवांनीं सांगितलें आहे. शेवटीं ते म्हणतात, एकदां या निजधामव्योमींच्या राजाचा उदय झाला म्हणजे प्रकाश्य–प्रकाशकभाव संपलाच. अशा या प्रकाश्यवीण प्रकाशक असणाऱ्या सूर्याचा उदय झाला कीं, पूर्व पश्चिम, रात्र व दिवस, उदय व अस्त या कल्पनाही नाहींशा होतात. मग अशा या अद्वयबोधरूपी नगरांत आनंदाची रेलचेल होते. (१–१६) वास्तविक लौकिक सूर्याशीं श्रीगुरूंची तुलना करणें, हें त्यांच्या स्वरूपाला उणेपणा आणणारें असल्यामुळें आपण सूर्याच्या रूपकानें वर्णन केलें, त्याबद्दल क्षमा मागून, असें वर्णन करण्यांतील शुद्ध प्रेमाचा भावच पहावा अशी त्यांनीं गुरूंना विनंति केली आहे. (१७-३०) ज्ञानदेव पुढें म्हणतात. ‘ माझ्या वाचेनें सत्य बोलण्याचें तप अनेक कल्पपर्यंत केलें, त्या पुण्याईचें फळ म्हणून श्रीगुरूंची भेट होऊन त्यांच्या कृपेमुळें गीतेसारख्या अगाध व अगम्य अशा ग्रंथावर टीका करण्याचें अत्यंत अवघड कार्य मजकडून होत आहे. ’ ( ३१-४० ) यानंतर अध्यायसंगति सांगतात. ‘ ज्ञानी पुरुषाला आत्मलाभ झाला म्हणजे त्याला निरतिशय परमानंदाची प्राप्ति होते व त्यामुळें त्याला कांहीं मिळवावयाचें शिल्लक राहात नाहीं, असें पंधराव्या अध्यायाच्या उपसंहारांत भगवंतांनीं सांगितलें आहे; परंतु ज्या ज्ञानामुळें ही कृतकृत्यतेची स्थिति प्राप्त होते तें ज्ञान कशामुळें प्राप्त होईल व प्राप्त झाल्यावरही आडमार्गाला न जातां त्याचा क्षेम कसा होईल; हें समजणें अत्यंत अवश्य आहे. एवढ्यासाठीं ज्ञानाला अनुकूल अशी दैवी संपत्ति व प्रतिकूल अशी आसुरी संपत्ति या अध्यायांत भगवान सांगणार आहेत. हाच विचार सांगण्यास भगवंतांनीं नवव्या अध्यायांत सुरवात केली होती; परंतु दुसरा प्रसंग मध्यें आल्यामुळें तो सांगून झाल्यावर पुनः तोच विचार विस्तारानें देव, या अध्यायांत सांगत आहेत. प्रथमतः मोक्षाची अचुक प्राप्ति करून देणाऱ्या दैवी संपत्तीच्या सव्वीस गुणांचें वर्णन भगवान करतात. ( ४१-६७ ).

सर्वांत श्रेष्ठ गुण म्हणजे अभय; मृत्युची भीति नाहींशीं होणें. तें अभय निरहंकार वृत्तीनें व फळाशा टाकून कर्म करण्यानें प्राप्त होतें अथवा आपलेंच स्वरूप सर्वत्र भरलें आहे, मग कोण कोणाला मारणार या विचारानें जो अद्वैतरूप बनला त्यालाहि अभय प्राप्त होतें. ( ६८–७३ ) बुद्धींतील रज–तम जाऊन, अंतःकरणांत

संकल्प-विकल्प उठण्याचें थांबून जिला सत्स्वरूप रुचलें; अशी स्वरूपाच्या ठिकाणीं अनन्य जी बुद्धि तिला **सत्त्वशुद्धि** म्हणतात. ( ७४-८० ) आत्मलाभ व्हावा म्हणून ज्ञान अथवा योगाच्या ठिकाणीं चित्तवृत्ति अनन्य करून ठेवणें ही **ज्ञानयोगव्यवस्थिति** ( ८१-८४ ). आपपर भाव न ठेवतां कायावाचामनेंकरून संकटग्रस्तांना मदत करणें तें **दान** आहे. ( ८५-८८ ) इंद्रियांचा विषयापासून संबंध तोडून त्यांना व्रताचरणांत गुंतविणें हा **दम** होय. (८९-९३) वर्णाश्रमाप्रमाणें स्वकर्माचें आचरण निरहंकार बुद्धीनें व फळाशा न ठेवतां करणें, याला **यज्ञ** म्हणतात. ( ९४-९९ ) ईश्वरदर्शनासाठीं श्रुतीचा अभ्यास अथवा अखंड नामस्मरण ( अधिकारपरत्वें ) करीत राहणें हा **स्वाध्याय** होय. ( १००-१०५ ) **तप** दोन प्रकारचें आहे; प्राण, इंद्रियें व शरीर यांना स्वरूपाच्या प्रसाराकरितां आटवणें हें एक तप आहे अथवा आपल्या शरीरांत आत्मा व देह यांची जी सरमेसळ झाली आहे, त्यांतून विवेकानें आत्म्याची वेगळीक करून स्वरूपीं सदा जाग्रत राहणें, हें दुसऱ्या प्रकारचें तप आहे. ( १०६-११२ ) सर्वांशीं सौजन्यानें वागणें हें **आर्जव** आहे. ( ११३ ) कायावाचामनेंकरून होणाऱ्या क्रिया जगाच्या कल्याणाकरितांच करीत राहणें ती **अहिंसा** आहे. ( ११४ ) ऐकणाऱ्याला गोड वाटून निःसंदेह करणारें परिणामी कल्याणकारक असें जें बोलणें त्याला **सत्य** म्हणतात. ( ११५-१२४ ) राग उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति प्राप्त झाली, तरी अंतःकरणांत रागाची उर्मीही उठत नाहीं तें **अक्रोध** आहे. ( १२५-१३० ) मूळ देहाचीच अहंता टाकून देणें तो **त्याग** होय. ( १३१-१३५ ) जाणण्याचा विषय गिळून जाणणाऱ्यासकट जेथें जाणणेंहि नाहींसें होतें, ती **शांति** आहे. ( १३६-१४० ) दुसऱ्याच्या दोषावर न टोचतां त्याला सन्मार्गाला लावण्यासाठीं आपल्या गुणांचा उपयोग करणें तें **अपैशून्य** आहे. ( १४१-१५३ ) दुःखी लोकांचें दुःख नाहींसें करण्याकरितां त्यांना आपपर दृष्टि न ठेवतां, सर्वस्वानें मदत करण्यासाठीं तळमळ ती **दया** होय. ( १५४-१६२ ) ऐहिक अथवा पारलौकिक भोग स्वाधीन झाले असतांही त्या भोगाबद्दल मनांत कंटाळा असणें तें **अलौलुप्य** ( १६३-१६७ ) सर्वांशीं हळुवार प्रेमानें वागणें तें **मार्दव** होय. ( १६८-१७४ ) देहाच्या रूपानें नामरूपास येणें याबद्दल खंती वाटणें ती **लाज** होय. ( १७५-१८२ ) मन व प्राण यांचें नियमन होऊन दाही इंद्रियें शांत होतात, तें **अचापल्य** होय. ( १८३-१८५ ) ईश्वराकडे मन धांवत असतां त्याच्या आड येणाऱ्या संकटांना तोंड देण्याचें सामर्थ्य ज्यामुळें येतें, त्याला **तेज** म्हणतात. ( १८६-१९० ) लोकांचे सर्व अपराध सहन करूनही त्याबद्दल यत्किंचितही अभिमान नसणें ती **क्षमा** आहे. ( १९१-१९६ ) त्रिविध ताप उत्पन्न झाले असतां त्यांचा प्रतिकार करणारें तें **धैर्य.** ( १९७-१९८ ) अंतरीं विमल आत्मज्ञान व बाह्यमार्गी शुद्ध कर्माचरण तें **शौच** होय. ( १९९-२०४ ) आत्महिताचा मार्ग आक्रमीत असतां ओघानें इतरांचेंही सुख साधणें त्यास **अद्रोहत्व** म्हणतात. ( २०५-२०६ ) मानाला पूर्णपणें योग्य असूनही लोकांनीं सन्मान केला असतां, अवघड वाटतो त्या स्थितीला **अमानित्व** म्हणतात. ( २०७-२१२ ).

असा हा दैवी संपत्तीचा विचार सांगून दैवी संपत्तीच्या अगदीं विरुद्ध असणारी व सर्व दोषांनीं युक्त अशी आसुरी संपत्ति यापुढें देव सांगतात. दैवी संपत्ति सांगितल्यावर आसुरी संपत्ति सांगण्याचें वरवर पाहतां कारण उरत नाहीं; पण जोंपर्यंत दोहोंतील भेद बरोबर कळला नाहीं, तोंपर्यंत घोटाळा होण्याचा संभव असतो; म्हणून टाकण्याकरितांच पण आसुरी संपत्तीचेंहि लक्षण सांगणें अवश्य आहे. मोक्षाला देणारी दैवी संपत्ति व नरकाला नेणारी आसुरी संपत्ति हे दोन अनादिसिद्ध भिन्न मार्ग आहेत. एवढ्या करितां त्यांची ओळख नीट असणें अवश्य आहे. म्हणून ही आसुरी संपत्ति देव सांगत आहेत. ( २१३-२१६ )

' आपण केलेला धर्म आपल्या तोंडानें चव्हाट्यावर सांगत सुटणें हा दंभ होय. ( २१७–२२३ ) विद्या, पैसा अथवा मान यांची अल्पशी जरी प्राप्ति झाली तरी त्यामुळें मस्त होणें याला दर्प म्हणतात. ( २२४-२२९ ) सर्व जगाला वंद्य व पूज्य अशा ईश्वर व वेदाचें नांव काढलें कीं ज्यामुळें डोकें फिरतें तो अभिमान आहे. ( २३०–२३६ ) दुसऱ्याचा उत्कर्ष, वैभव पाहून मनांत जळफळणें, याला क्रोध म्हणतात. ( २३७–२४२ ) दगडाप्रमाणें अंतःकरणाच्या निर्दय स्थितीला पारुष्य नांव आहे. ( २४३–२४५ ) विधिनिषेध, व पापपुण्य यांतील फरक कळत नाहीं तें अज्ञान होय. ( २४६–२५२ ) आसुरी संपत्ति जरी सहाच गुणांची असली तरी तिचा पराक्रम फार मोठा आहे. जीवाचा सर्व प्रकारानें नाश करून त्याला हमखास नरकांत पोंचविण्याची शक्ति तिच्यांत आहे. ( २५३–२६३ )

यापुढें आसुरी प्रकृतीच्या पुरुषाचें आणखी वर्णन करून त्या दोषांतून सुटण्याचा उपाय देव सांगत आहेत. ( २६४–२८० )

' या आसुरी प्रकृतीच्या पुरुषांना आपण सदा पापकर्मच करावें असें वाटतें. चुकूनसुद्धां पुण्यकर्मांकडे त्यांची प्रवृत्ति होत नाहीं. या जगाची व्यवस्था लावणारा ईश्वर आहे, असें मानावयास ते तयारच नाहींत. त्यामुळें ईश्वर, वेद, स्वर्ग यांबद्दल त्यांच्या मनांत तिरस्कार असतो. जगाच्या उत्पत्ति, स्थिति व लयाला कारण काम आहे, एवढेंच त्यांचें तत्वज्ञान; त्यामुळें स्त्रीसुखासारखे मिळतील ते भोग यथेच्छ भोगावेत, अशी त्यांना हांव असते व म्हणून भोगाकरितां अवश्य असणारा पैसा मिळाला नाहीं, तर दुसऱ्याचा घात करून पण ते पैसा मिळवितात. ( २८१–३३६ ) ही विषयभोगाची हांव कधीं संपतच नाहीं. दररोज वाढतच असते; शेवटीं मीच एकटा या विश्वाच्या धनाचा मालक होईन व त्याच्या जोरावर हवे ते विषय सेवन करीन; माझ्यापुढें ईश्वर, ब्रह्मदेव, कुबेर, इंद्र कस्पटाप्रमाणें आहेत, अशा बाष्कळ वल्गना ते आसुरी प्रकृतीचे पुरुष करतात. आपणच एकट्यानें सर्व भोगावें म्हणून जारण-मारणादि क्रियाही हे करतात. ( ३३७–३६३ ) कधीं कधीं महंतपणाचा आव आणून यज्ञ करतांनाही ते दिसतात; परंतु तो नुसता बाहेरचा देखावा असतो; आहेराच्या रूपानें जगाला लुटण्याची ती युक्ति असते. ( ३६४–३८८ )

या स्वैर, आसुरी व घोर वागण्यानें सर्वांच्या अंतर्यामीं असणाऱ्या आत्म्याला मात्र फार कष्ट होतात व जेव्हां ते पतिव्रता, सत्पुरुष, माझे भक्त अशा थोर महात्म्यांचा छळ करूं लागतात तेव्हां मला माझ्या भक्तांचा कैवार घेऊन या दुष्टांचा समाचार घेणें भाग पडतें. मग मी त्या दुष्टांची मनुष्यपणाची पदवी हिरावून घेऊन क्लेश व दुःख यांनीं पुरेपुर भरलेल्या रौरव नरकांत त्यांना कोट्यावधि वर्षेपर्यंत ठेवतों. ' ( ३८९–४१६ ).

आसुरी संपत्तीच्या लोकांना ज्या घोर यातना भोगाव्या लागतात, त्यांचें वर्णन करतांना श्रीज्ञानदेवांच्या अंगावर शहारे येऊन त्यांची वाणी रडकुंडीला आलेली दिसते व ' आसुरी लोक कां बरें असें वागतात ! ' असे निराशेचे पण कळवळ्याचे उद्गार त्यांच्या मुखांतून निघाले आहेत. ( ४१७--४२४ ).

भगवान समारोप करितात. ' काम, क्रोध व लोभ आहेत, तेथें पाप व नरक ठेवलेलेच आहेत. यांची कांस धरून विषयाच्या मागें धांवणाऱ्याला परलोक गतीविषयीं तर बोलावयासच नको; परंतु त्याला इहलोकींहि चांगल्या रीतीनें राहतां येणार नाहीं व सुखही मिळणार नाहीं. ज्या पुरुषांना आपलें खरें कल्याण व्हावें असें वाटत असेल, त्यांनीं या काम, क्रोध व लोभ यांची संगत प्रथम टाकली पाहिजे. मग मोक्षमार्गाचें सांगाति असे सज्जन त्यांना

भेटतील; त्यांच्या संगतींत राहून सच्छास्त्र श्रवण केलें पाहिजे, मग शास्त्रांनीं सांगितलेल्या मार्गानें तो आत्मकल्याणेच्छू चालूं लागला, कीं त्याला गुरुकृपेचें नगर लागेल. तेथें प्रियाची परम सीमा जो आत्मा त्याची भेट होईल व त्याच्या पाठीमागची जन्ममरणाची यातायात संपेल व दुःख कायमचे नाहींसें होऊन त्यास नित्यानंदाचा लाभ होईल. तात्पर्य, आपणांस करण्यास योग्य काय व अयोग्य काय हें आपल्या बुद्धीनें ठरवून चालणार नाहीं. त्याचा निर्णय शास्त्राच्या दृष्टीनेंच केला पाहिजे. वेद हा आईप्रमाणें जगांतील सर्वांचें हित पाहतो म्हणून त्याच्या आज्ञा शिरसावंद्य मानाव्यात. तात्पर्य, वेदैकनिष्ठ झाल्यावर अनिष्ट कोठून प्राप्त होईल ? म्हणून प्रत्येकानें ब्रह्मप्राप्ति होईपर्यंत वेदांची कास सोडूं नये.

एवढ्यासाठीं कामक्रोधाच्या वाटेनें चुकूनसुद्धां न जातां वेदाज्ञेशीं सर्वांनीं एकनिष्ठ राहावें. अर्जुना, तुझ्यावर तर लोकसंग्रहाच्या दृष्टीनें फार मोठी जबाबदारी आहे. कारण आज तूं करशील तें प्रमाण मानून त्याप्रमाणें इतर लोक वागणार आहेत. ( ४२५-४६८ ).

याप्रमाणें भगवंताच्या बोलण्याचा अनुवाद करून श्रीज्ञानदेवांनीं आपल्या व्याख्यानास स्फूर्ति देणाऱ्या श्रीगुरूंच्या दृष्टीकडे कृतज्ञतापूर्वक पाहून व त्यांच्या कृपेची याचना करून हा अध्याय संपविला आहे.( ४६९–४७३ ).



# ज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा

मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु । अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥ १ ॥ जो अविद्ये राती रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणियां । जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥ २ ॥ जेणें विवळतिये सवळे । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे । सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ॥ ३ ॥ लिंगदेहकमळाचां । पोटीं वेंचतया चिद्भ्रमराचा । बंदिमोक्षु जयाचा । उदैला होय ॥ ४ ॥ शब्दाचिया आसकडीं । भेदनदीचां दोहीं थडीं । आरडाते विरहवेडीं । बुद्धिबोधु ॥ ५ ॥ तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान । भोगवी जो चिद्गगन- । भुवनदिवा ॥ ६ ॥ जेणें पाहालिये पाहांटे । भेदाची चोरली फिटे । रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥ ७ ॥ जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतकुणगे । दीपले जाळिती दांगें । संसाराचीं ॥ ८ ॥ जयाचा रश्मिपुंजु निवरु । होता स्वरूप उखरीं स्थिरु । ये महासिद्धीचा पूरु । मृगजळाचा तें ॥९॥ जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेचां मध्यान्हीं आलिया । लपे आत्मभ्रांति- छाया । आपणपां तळीं ॥ १० ॥ तेव्हां विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामतिनिद्रेतें । सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥ ११ ॥ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी । मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती ॥१२॥ किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्य सुदिवसें । सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥ १३ ॥ जो निजधामव्योमींचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो । फेडी पूर्वादि दिशांसि ठावो । उदोअस्तूचा ॥१४॥ न दिसणें दिसणेनसीं मावळवी । दोहीं झांकिलें तें सैंघ पालवी । काय बहु बोलों ते आघवी । उखाचि आनी ॥१५॥ तो अहोरात्रांचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु । जो प्रकाश्येंवीण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १६ ॥ तया चित्सूर्या



मातलिया कुंजरा । आगळी जाली मदिरा ॥
तैसा मदाचा ताठा तंव जरा । चढतां आंगीं ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय १६, ओवी ३२५

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा

जगत्संबंधीच्या ज्ञानाला नाहींसा करणारा ( बाधित करणारा ) व अद्वैतस्थितिरूपी कमलाचा विकास करणारा, हा ( श्रीगुरुनिवृत्तीरूपी ) आश्चर्यकारक सूर्य उगवला आहे. ( हा सूर्य आश्चर्यकारक आहे; कारण लौकिक सूर्य हा उगवला असतां जगताचें प्रकाशन करतो व द्वैत वाढवितो. आणि हा श्रीगुरुरूपी सूर्य जगदाभास नाहींसा करतो व अद्वैतस्थितीचा विकास करतो. ) त्याला आतां आम्ही नमस्कार करतों. १. जो ( गुरुरूपी ) सूर्य मायेच्या रात्रीचा नाश करून, ज्ञान व अज्ञानरूपी चांदण्या नाहींशा करतो व जो ज्ञानीलोकांना अध्यात्मज्ञानाच्या चांगल्या निरभ्र दिवसाची जोड करून देतो; ज्याच्या उदयानें प्रकाशित होणाऱ्या प्रातःकाळीं आत्मज्ञानरूपी दृष्टि प्राप्त होऊन, जीवरूपी पक्षी, 'मी देह आहें' अशा समजुतीचीं घरटीं टाकतात. ३. ज्या श्रीगुरुरूपी सूर्याचा उदय झाला असतां, लिंगदेहरूपी कमळाच्या पोटांत ( अडकल्यामुळें ) नाश पावणाऱ्या जीवचैतन्यरूपी भ्रमराची, त्या लिंगदेहरूपी कमळाच्या बंधनापासून सुटका होते. ४. भेदरूपी नदीच्या दोन्ही कांठावर, बुद्धीला मोह पाडणाऱ्या शास्त्रादिकांचा असंगतपणा, हीच कोणी अडचणीची जागा, त्या जागेत एकमेकांच्या वियोगानें वेडी होऊन बुद्धि व बोध ( हेच कोणी चक्रवाक पक्षी ) ओरडणारे. ५. अशा त्या बुद्धि व बोधरूपी चक्रवाकांच्या जोडप्याला, जो चिदाकाशरूपी भुवनांतील श्रीगुरुरूपी सूर्य, ऐक्याचा आनंद भोगवितो. ६. ज्या गुरुरूपी सूर्यानें प्रकाशलेल्या पहांटेच्या वेळीं, भेदाची चोरवेळ नाहींशी होते व प्रवास करणारे ( आत्मप्राप्तीचा मुक्काम गांठण्याकरितां ध्यानादिक अभ्यास करणारे ) साधक, आत्मानुभवाच्या वाटेनें निघतात. ७. ज्याच्या विवेकरूपी किरणांच्या संबंधानें, बुद्धिरूपी सूर्यकांतमण्यांतून निघालेल्या ज्ञानरूपी ठिणग्या पेटल्या असतां, त्या संसाराचीं जंगलें जाळून टाकतात. ८. ब्रह्मस्वरूपरूपी माळजमिनीवर, ज्याच्या प्रखर किरणांचा समुदाय स्थिर झाला असतां, त्या ठिकाणीं अष्टमहासिद्धिरूप मृगजळाचा पूर येतो. ९. तें ब्रह्म मी आहें, अशा या मध्यान्हकाळीं, शिष्याच्या अंतर्मुख वृत्तिरूपी माथ्यावर श्रीगुरुसूर्य आला असतां, शिष्याची आत्मस्वरूपाविषयीं भ्रांति हीच कोणी छाया, ती शिष्याच्या आत्मानुभवरूपी पायांखालीं दडते. ( नाहींशी होते. ) १०. त्या वेळीं जर मायारूपी रात्रच उरत नाहीं, तर ( त्या रात्रींतील ) विश्वाभासरूपी स्वप्नासहित, विपरीतज्ञानरूप निद्रेचा, कोण सांभाळ करणार आहे ? ( म्हणजे याची आठवण कोण ठेवणार ? ) ११. म्हणून त्या अद्वैतज्ञानरूप नगरांत, ब्रह्मानंदाची रेलचेल होते आणि मग त्या आनंदानुभवाची देवघेव कमी पडावयास लागते. १२. फार काय सांगावें ! ज्याच्या ( श्रीगुरुसूर्याच्या ) प्रकाशानें, अशा अशा प्रकारें, मोकळें कैवल्य ( केवलस्वरूपभाव ) रूपी उत्तम दिवस सदा प्राप्त होतो. १३. जो श्रीगुरुसूर्य, आत्मस्वरूपरूपी आकाशाचा राजा आहे; तो आपल्या स्वरूपानें नेहमीं उगवलेलाच आहे. परंतु तो उगवल्याबरोबर ( अनुभवाला आल्याबरोबर ) तो पूर्वादि दिशांसह उदय व अस्ताचा ठावठिकाणा नाहींसा करतो. १४. न दिसणें ( अज्ञान ) दिसण्यासह ( ज्ञानासह ) नाहींसें करतो व या दोहोंनीं ( ज्ञान व अज्ञान यांनीं ) तें झांकलेलें स्वरूप आहे, तें ( ज्ञानाज्ञानातीत स्वरूप ) चहूंकडे प्रगट करतो. फार काय सांगूं ! तो सर्व प्रातःकाळच वेगळा आहे. १५. जो, रात्र व दिवस या सापेक्षभावापलीकडला, केवळ प्रकाशरूप ज्ञानसूर्य आहे, व जो प्रकाश्याशिवाय (प्रकाशित होणाऱ्या पदार्थाशिवाय ) प्रकाशाचा सुकाळ आहे, तो ज्ञानरूपीसूर्य कोणी पहावा ? ( जाणावा ? ) १६. श्रीगुरूंची शब्दांनीं केलेली

श्रीनिवृत्ती । आतां नमो म्हणों पुढतपुढती । जे बाधका येइजतसे स्तुती । बोलाचिया ॥ १७ ॥ देवाचें महिमान पाहोनियां । स्तुति तरी येइजे चांगावया । जरी स्तव्यबुद्धीसीं लया । जाइजे कां ॥ १८ ॥ जो सर्वनेणिवां जाणिजे । मौनाचिया मिठीया वानिजे । कांहींच न होनि आणिजे । आपणपयां जो ॥ १९ ॥ जया तुझिया उद्देशासाठीं । पश्यंती मध्यमा पोटीं । सूनि परेसींही पाठीं । वैखरी विरे ॥ २० ॥ तया तूतें मी सेवकपणें । लेववीं बोलकेया स्तोत्राचें लेणें । हें उपसाहावेंही म्हणतां उणें । अद्वयानंदा ॥ २१ ॥ परी रंकें अमृताचा सागरु । देखिलिया पडे उचिताचा विसरु । मग करूं धांवे पाहुणेरु । शाकांचा तया ॥ २२ ॥ तेथ शाकुही कीर बहुत म्हणावा । तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा । उजळोनि दिव्यतेजा हातिवा । ते भक्तीचि पाहावी ॥ २३ ॥ बाळा उचित जाणणें होये । तरी बाळपणाचि कें आहे । परी साचाचि येरी माये । म्हणोनि तोषे ॥ २४ ॥ हां गा गांवरसें भरलें । पाणी पाठीं पाय देत आलें । तें गंगा काय म्हणितलें । परतें सर ॥ २५ ॥ जी भृगूचा कैसा अपकारु । कीं तो मानूनि प्रियोपचारु । तोषे-चिना शार्ङ्गधरु । गुरुत्वासीं ॥ २६ ॥ कीं आंधारें खतेलें अंबर । झालेया दिवसनाथासमोर । तेणें तयातें पऱ्हा सर । म्हणितलें काई ॥ २७ ॥ तेवीं भेदबुद्धीचिये तुळे । घालूनि सूर्यश्लेपाचें कांटाळें । तुकिलासि ते येकी वेळे । उपसाहिजो जी ॥ २८ ॥ जिहीं ध्यानाचां डोळां पाहिलासी । वेदादि वाचां वानिलासी । जें उपसाहिलें तयांसी । तें आम्हांही करीं ॥ २९ ॥ परी मी आजि तुझां गुणीं । लांचावलों अपराधु न गणीं । भलतें करीं परी अर्धघणीं । नुठीं कदा ॥ ३० ॥ मियां गीता येणें नांवें । तुझें पसायामृत सुहावें । वानूं लाधलों तें दुणेन थावें । दैवलें दैव ॥३१॥ माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प । तया फळाचें हें महाद्वीप । पातली प्रभु ॥ ३२ ॥ पुण्यें पोशिलीं असाधारणें । तियें तुझे गुण वानणें । देवूनि मज उत्तीर्णें । जालीं आजी ॥ ३३ ॥ जी जीवित्वाचां आडवीं । आतुडलों होतों मरणगांवीं । ते अवदसाचि आघवी । फेडिली आजी ॥ ३४ ॥ जे गीता येणें नांवें नावाणिगी । जे अविद्या जिणोनि दाटुगी । ते कीर्ती तुझी आम्हांजोगी । वानावया जाली ॥ ३५ ॥ पैं निर्धना घरीं वानिवसें । महालक्ष्मीचि येऊनि बैसे । तयातें निर्धन ऐसें । म्हणों ये काई ॥ ३६ ॥ कां अंधकाराचिया ठाया । दैवें सुर्यु आलिया । तो अंधारुचि जगा यया । प्रकाशु नोहे ॥ ३७ ॥ जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भावाचिये सरोभरी । नव्हेचि काई ॥३८॥ तैसा मी गीता वाखाणीं । हे खपुष्पाची तुरंबणी ।

स्तुति ही बाधकतेला येत असल्याकारणानें, त्या श्रीनिवृत्तिरूप ज्ञानसूर्याला आतां वारंवार नमस्कार असो, असें मी (ज्ञानदेव) म्हणतों. १७. गुरूचा महिमा पाहिला असतां, जर स्तव्यबुद्धीसह स्तवन करणारा लयाला जाईल, तरच स्तुति चांगलेपणाला येईल (अभिप्राय असा कीं, जेव्हां स्तव्य, स्तविता आणि स्तवन, ही त्रिपुटी श्रीगुरूच्या स्वरूपांत लयाला जाईल, तेव्हांच श्रीगुरूच्या महात्म्याला शोभेल अशी स्तुति होईल.) १८. कांहीं न जाणल्यानें जे श्रीगुरू जाणले जातात व मौनाला नाहींसें करून (म्हणजे मौन ही कल्पना टाकून) ज्यांचें वर्णन केलें जातें व आपण कांहीं न होऊन, जे श्रीगुरू आपल्या ठिकाणीं आणतां येतात; (म्हणजे जीव, शिव अथवा ब्रह्म वगैरे कांहींच अहंकार आपण न घ्यावा, तेव्हांच जे श्रीगुरू आपल्या ठिकाणीं वास्तव्य करण्यास येतात.) १९. ज्या तुझी स्तुति करण्याच्या हेतूनें, मध्यमा व पश्यन्ती या वाचा पोटांत घालून, नंतर परेसह वैखरी विरते. (नाहींशी होते). २०. असा जो तूं, त्या तुला मी सेवकपणाच्या नात्यानें शब्दांनीं स्तुति करण्याचा अलंकार घालतों, तर हें माझें करणें सहन करावें–हेंही माझें आपणास म्हणणें, अहो अद्वितीय आनंदा श्रीगुरो, आपणांस कमीपणा आणणारें आहे. २१. परंतु दरिद्री पुरुषाला अमृताच्या सागराचें दर्शन झाल्यावर त्याचें (त्यास अति हर्ष होतो व त्या हर्षाचे भरांत त्या अमृतसागराचें) योग्य आदरातिथ्य कसें करावें, याचा त्यास विसर पडतो आणि मग तो त्या अमृतसागराला भाजीपाल्याची मेजवानी करण्यास धांवतो. २२. अशा स्थितींत त्याचा भाजीपालादेखील (खरोखर पक्वान्नाप्रमाणे) फार किंमतीचा समजावा व केवळ त्याच्या भाजीपाल्याकडे न पाहतां, अमृतसागराच्या दर्शनानें त्यास होणाऱ्या आनंदाकडेच लक्ष द्यावें; सूर्याला काडवातीनें ओंवाळण्यांत, काडवातीकडे लक्ष न देतां, (सूर्यानें) त्या ओंवाळणाराची भक्तीच पहावी. २३. बाळकाला जर योग्य काय तें कळेल, तर मग बाळपणच कोठें आहे? (त्याच्या अज्ञानपणानें कोणासही संतोष वाटणार नाहीं.) परंतु जी बाई त्याची आई असते, तिला खरोखरच संतोष होतो. २४. अहो, गांवांतील घाणीनें भरलेलें (ओढ्याचें) पाणी गंगेला तुडवीत येऊन मिळालें, तर त्याला गंगा 'बाजूला सर' असें म्हणते काय? २५. महाराज, भृगूचा अन्याय कशा चीड आणण्यासारखा होता? पण भृगूनें मारलेली ती लाथ हा प्रेमाचा उपचार समजून, भगवान् तो लत्ताप्रहार म्हणजे गुरूचा अनुग्रहच आहे असें मानून, संतोष पावले नाहींत काय? २६. अंधारानें भरलेलें आकाश सूर्यासमोर आलें असतां, सूर्यानें त्यास 'पलीकडे सर' असें म्हटलें आहे काय? २७. त्याप्रमाणें भेदबुद्धीच्या ताजव्यांत एका पारड्यांत सूर्याची उपमा व दुसऱ्या पारड्यांत तुम्हांस (श्रीगुरूस) घालून तुमचें वजन केलें; महाराज, तें आपण एक वेळ सहन करावें. २८. ज्यांनीं तुला ध्यानाच्या डोळ्यांनीं पाहिलें व ज्या वेदादिकांच्या वाचेकडून तूं वर्णन केला गेला आहेस, त्यांना जें सहन केलें, तें आम्हांलाही करा. (त्यांचे अपराध जसे सहन केले, तसे आमचेही करा.) २९. परंतु मी आज तुझ्या गुणांचें वर्णन करण्याला चटावलों आहें, म्हणून (वास्तविक तुझें वर्णन करणें हा जरी अपराध आहे तरी) मी तो अपराध मोजणार नाहीं; (त्याबद्दल) तुम्ही वाटेल तें करा. (तुम्ही अपराध सहन करा अगर करूं नका.) पण मी अर्धपोटीं कधींही उठणार नाहीं. (माझी तृप्ति होईपर्यंत मी तुमचें वर्णन करीन.) ३०. मी गीता या नांवानें तुझें प्रसादामृत सेवावें, म्हणून मी तें (गीता) वर्णन करूं लागलों, तें माझें दैव दुप्पट जोरानें उत्कर्षाला पावलें. ३१. महाराज, माझ्या वाचेनें सत्य बोलण्याचें तप पुष्कळ कल्पपर्यंत केलें, त्या तपाचें जें फळ त्या फळाचें हें गीताव्याख्यानरूपी मोठें बेट तिला (माझ्या वाचेला) प्राप्त झालें. ३२. मी लोकोत्तर पुण्यकर्माचें आचरण केलें; त्या पुण्यकर्मांनीं तुझें गुणवर्णन करणें मला देऊन, तीं पुण्यकर्में आज ऋणमुक्त झालीं. ३३. महाराज, जीवदशेच्या रानांतील मरणरूपी गांवांत सांपडलों होतों; (तेथें माझी फार दुर्दशा उडाली होती.) ती सर्व दुर्दशा आज तुम्ही नाहींशी केलीत; ३४. कारण कीं जी तुझी कीर्ति, गीता या नांवानें नांवाजलेली आहे आणि जी (गीता) अविद्या जिंकून बलिष्ठ झाली आहे, ती गीतारूपी तुझी कीर्ति, आम्हांला वर्णन करण्यायोग्य झाली आहे. ३५. दरिद्री पुरुषाचे घरीं सहज कौतुकानें महालक्ष्मीच जर येऊन बसेल, तर त्याला दरिद्री असें म्हणतां येईल काय? ३६. अथवा अंधाराच्या जागीं दैववशात् सूर्य आला, तर तो अंधारच या जगाला प्रकाश (होणार) नाहीं काय? ३७. ज्या देवाचें थोरपण पाहिलें असतां, (एवढें मोठें) विश्व, (पण तें) परमाणूच्याही योग्यतेला येत नाहीं, तो भक्तांच्या भावासारखा होत नाहीं काय? ३८ त्याप्रमाणें मी गीतेचें व्याख्यान करणें, हें आकाशपुष्पांचा

परी समर्थें तुवा शिरयाणी । फेडिली ते ॥३९॥ म्हणौनि तुझेनि प्रसादें । मी गीतापद्यें अगाधें । निरूपीन जी विशदें । ज्ञानदेवो म्हणे ॥ ४० ॥ तरी अध्यायीं पंधरावां । श्रीकृष्णें तया पांडवा । शास्त्रसिद्धांतु आघवा । उगाणिला ॥ ४१ ॥ जे वृक्षरूपक परिभाषा । केलें उपाधि रूप अशेषा । सद्वैद्यें जैसें दोषा । अंगलीना ॥ ४२ ॥ आणि कूटस्थु जो अक्षरु । दाविला पुरुषप्रकारु । तेणें उपहिताही आकारु । चैतन्या केला ॥ ४३ ॥ पाठीं उत्तमपुरुष । शब्दाचें करूनि मिष । दाविलें चोख । आत्मतत्त्व ॥ ४४ ॥ आत्मविषयीं आंतुवट । साधन जें आंगदट । ज्ञान हेंही स्पष्ट । चावळला ॥ ४५ ॥ म्हणौनि इये अध्यायीं । निरूप्य नुरेचि कांहीं । आतां गुरुशिष्यां दोहीं । स्नेहो लाहणा ॥ ४६ ॥ एवं इयेविषयीं कीर । जाणते बुझावले अपार । परी मुमुक्षु इतर । साकांक्ष जाले ॥ ४७ ॥ त्या मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे जो सुवर्मा । तो सर्वज्ञु तोचि सीमा । भक्तीचीही ॥ ४८ ॥ ऐसें हें त्रैलोक्यनायकें । बोलिलें अध्यायांत श्लोकें । तेथें ज्ञानाचि बहुतेकें । वानिलें तोषें ॥ ४९ ॥ भरूनि प्रपंचाचा घोंटु । कीजे देखतयाचि देखतां द्रष्टु । आनंदसाम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ॥ ५० ॥ येवढेया लाठेपणाचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो । हा सम्यक्‌ज्ञानाचा रावो । उपायांमाजीं ॥ ५१ ॥ ऐसे आत्मजिज्ञासु जे होते । तिहीं तोषलेनि चित्तें । आदरें तया ज्ञानातें । वोंवाळिलें जीवें ॥ ५२ ॥ आतां आवडी जेथ पडे । तयाचि अवसरीं पुढें पुढें । रिगों लागे हें घडे । प्रेम ऐसें ॥ ५३ ॥ म्हणौनि जिज्ञासूंचां पैकीं । ज्ञानीं प्रतीती होय ना जंव निकी । तंव योगक्षेमु ज्ञानविखीं । स्फुरेलचि कीं ॥ ५४ ॥ म्हणोनि तेंचि सम्यक्‌ज्ञान । कैसेनि होय स्वाधीन । जालिया वृद्धियत्न । घडेल केवीं ॥ ५५ ॥ कां उपजोंचि जें न लाहे । जें उपजलेंही अव्हांटा सूये । तें ज्ञानीं विरुद्ध काय आहे । हें जाणावें कीं ॥ ५६ ॥ मग जाणतया जें विरू । तयाची वाट वाहती करूं । ज्ञाना हित तेंचि विचारूं । सर्वभावें ॥ ५७ ॥ ऐसा जिज्ञासु तुम्हीं समस्तीं । भावो जो धरिला असे चित्तीं । तो पुरवावया लक्ष्मीपती । बोलिजेल ॥ ५८ ॥ ज्ञानासि सुजन्म जोडे । आपली विश्रांतिही वरी वाढे । ते संपत्तीचे पवाडे । सांगिजेल दैवी ॥ ५९ ॥ आणि ज्ञानाचेनि कामाकारें । जे रागद्वेषांसि दे थारे । तिये आसुरियेहि घोरे । करील रूप ॥ ६० ॥ सहज इष्टानिष्टकरणी । दोघीचि इया कवतुकिणी । हे नवमाध्यायीं उभारणी । केली होती ॥ ६१ ॥ तेथ साउमा घेयावा उवावो । तंव वोडवला आन प्रस्तावो । तरी तयां प्रसंगें आतां देवो । निरूपीत असे ॥ ६२ ॥ या निरूपणाचेनि नांवें । अध्याय पद सोळावें । लावणी पाहतां जाणावें । मागिलावरी ॥ ६३ ॥ परी हें असो आतां प्रस्तुतीं । ज्ञानाचां हिताहितीं । समर्था संपत्ती । इयाचि दोन्ही ॥ ६४ ॥ जे मुमुक्षुमार्गींची बोळावी । जे मोहरात्रीची धर्मदिवी । ते आधी तंव दैवी । संपत्ती ऐका ॥ ६५ ॥ जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकीं ।

वास घेण्यासारखें (असंभवनीय) आहे. परंतु तुम्हीं समर्थांनीं ती आवड पुरविली. ३९. म्हणून महाराज, तुमच्या प्रसादानें मी गीतेचे गंभीर अर्थानें भरलेले श्लोक, स्पष्ट रीतीनें व्याख्यान करून सांगेन, असें ज्ञानदेव म्हणतात. ४०. तर पंधराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं त्या अर्जुनाला शास्त्रांचा संपूर्ण सिद्धांत सांगितला. ४१. कारण कीं, (देवांनीं) वृक्षरूपकाच्या परिभाषेनें संपूर्ण (कार्यकारण) उपाधीचें स्वरूप सांगितलें; (तें कसें तर) अंगांत गुप्त असलेल्या सर्व दोषांना जसा चांगला वैद्य स्पष्ट रूपानें सांगतो तसें. ४२. आणि कूटस्थ (मायारूप उपाधीचा आश्रय करून राहणारा) अक्षर म्हणून जो पुरुषाचा प्रकार दाखविला, त्या योगानें उपहित चैतन्य देखील (क्षर अक्षर दोन्हीं) स्पष्ट दाखविलें. ४३. नंतर उत्तमपुरुष या शब्दाचें निमित्त करून शुद्ध आत्मतत्त्व दाखविलें. ४४. आत्म्याविषयीं (आत्मप्राप्तीविषयीं) अंतरंग बळकट साधन जें ज्ञान, तेंही स्पष्ट सांगितलें. ४५. म्हणून या अध्यायांत सांगण्यास योग्य असें कांहीं राहिलें नाहीं. आतां गुरु व शिष्य या दोघांना प्रेमाचीच जोड होणार. ४६. याप्रमाणें या विषयाविषयीं असंख्य ज्ञाते लोकांची पुरी समजूत पटली. परंतु त्यांच्याहून इतर, जे मोक्षाची इच्छा करणारे होते, त्यांची ह्याविषयींची इच्छा जास्तच वाढली. ४७. हे मर्मज्ञ अर्जुना, त्या मला पुरुषोत्तमाला ज्ञानानें जो भेटतो (ऐक्याला पावतो), तोच सर्वज्ञ आहे व भक्तीची सीमाही तोच आहे. ४८. पंधराव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत त्रैलोक्याचे स्वामी भगवान् श्रीकृष्ण परमात्मा असें बोलले. त्या प्रसंगीं त्यांनीं आनंदानें पुष्कळसें ज्ञानाचेंच वर्णन केलें. ४९. हें ज्ञान, सर्व संसाराचा निरास करून, पाहतां पाहतां पाहणाऱ्या जीवालाच त्याच्या स्वतःच्या आत्मस्वरूपाचें ज्ञान करून देतें; व त्या जीवास सुखाचे साम्राज्यावर पट्टाभिषेक करितें. ५०. (प्रपंचाचा बाध करून जीवाला ब्रह्मसाक्षात्कार करून देणारा, ज्ञानाशिवाय) एवढ्या सामर्थ्याचा दुसरा उपाय नाहींच. हा यथार्थज्ञानाचा उपाय सर्व उपायांमध्यें राजा आहे, असें देव म्हणाले. ५१. म्हणून असे जे आत्मजिज्ञासू होते (आत्म्याला जाणण्याची इच्छा करणारे होते) त्यांनीं संतुष्ट चित्तानें व आदरानें त्या ज्ञानावरून आपला जीव ओंवाळून टाकला. ५२. आतां असें आहे कीं, ज्या वस्तूवर प्रेम जडतें, तीच वस्तु इतर वस्तूंना मागें सारून वेळोवेळीं मनांत पुढें पुढें घुसूं लागते, असा प्रकार होतो. प्रेमाची गोष्टच अशी आहे. ५३. म्हणून एकंदर जिज्ञासूंपैकीं जे मुमुक्षु होते, त्यांस जोंपर्यंत ज्ञानाचा वास्तविक संशयविपर्ययरहित अनुभव आला नाहीं, तोंपर्यंत तें ज्ञान कसें प्राप्त होईल व प्राप्त झालेल्या ज्ञानाचें संरक्षण कशानें घडेल, अशाविषयीं त्यांच्या मनांत वारंवार विचार घोटाळत असणें, हें स्वाभाविकच आहे. ५४. म्हणून तेंच यथार्थज्ञान कशानें हस्तगत होईल व हस्तगत झाल्यावर त्याच्या वाढण्याचा प्रयत्न कसा घडेल? ५५. अथवा जें ज्ञानास उत्पन्नच होऊं देत नाहीं अथवा ज्ञान उत्पन्न झालें असतां, जें ज्ञानाला भलत्या मार्गांत घालतें; असें ज्ञानाच्या विरुद्ध काय आहे, हें समजलें पाहिजे. ५६. मग ज्ञानाला जें विरुद्ध असेल, त्याची वाट मोकळी करून देऊं (त्यास घालवून देऊं) व जें ज्ञानाला अनुकूल असेल त्याचाच सर्व भावांनीं विचार करूं, ५७. अशी तुम्हीं सर्व जिज्ञासूंनीं जी इच्छा मनांत धरली आहे, ती इच्छा पूर्ण करण्याकरितां देव (आतां या अध्यायांत) बोलतील. (असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.) ५८. जिच्या योगानें ज्ञान चांगलें उत्पन्न होईल, शिवाय आपली विश्रांतीहि जिच्या योगानें वाढेल, अशी जी दैवी संपत्ति, त्या दैवी संपत्तीचें वर्णन (देवाकडून) सांगण्यांत येईल. ५९. आणि ज्ञानाचें काम काढून (ज्ञानाला नाहींसें करून) जी असुरी संपत्ति राग व द्वेष यांना आश्रय देते, त्या भयंकर असुरी संपत्तीचेंही स्वरूप (देव) सांगेल. ६०. इष्टानिष्ट करणें, हें स्वभावतःच ज्यांचें कौतुक आहे, अशा या दोघी (दैवी व असुरी) संपत्ति आहेत. यांची मांडणी नवव्या अध्यायांत (श्लोक १३ मध्यें) केली होती. ६१. त्या नवव्या अध्यायांतच त्यांचा विस्तार प्रत्यक्ष करावयास पाहिजे होता, तो तितक्यांत दुसरा प्रसंग प्राप्त झाला. तर आतां प्रसंगानुसार देव त्यांचें (दैवी-असुरी संपत्तीचें) व्याख्यान करीत आहेत. ६२. मागील क्रमाप्रमाणें संख्या पाहतां, हें निरूपण म्हणजेच सोळावा अध्याय समजावा. ६३. परंतु हें आतां राहूं दे. सांप्रत ज्ञानाचें इष्ट किंवा अनिष्ट करण्याचे कामीं सांगितलेल्या याच दोन संपत्ति समर्थ आहेत. ६४. जी मुमुक्षूंना (आत्मस्वरूपाच्या) मार्गानें पोहोंचविणारी व जी मोहरूप रात्रींत धर्मार्थ लावलेला दिवा आहे, ती दैवी संपत्ति तर प्रथम ऐका. ६५. जेथें एकमेकाला पोसणारे असे पुष्कळ पदार्थ एके ठिकाणीं मिळविले जातात,

संपादिजती ते लोकीं । संपत्ति म्हणजे ॥ ६६ ॥ ते दैवी सुख संभवी । तेथ दैवां गुणां येकोपजीवी । जाली म्हणौनि दैवी । संपत्ति हे ॥ ६७ ॥

श्रीभगवानुवाचः—अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः । दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

आतां तयाचि दैवगुणां- । माजीं धुरेचा बैसणा । बैसे तया आकर्णा । अभय ऐसें ॥६८॥ तरी न घलूनि महापुरीं । न घेपे बुडणयाची शियारी । कां रोगु न गणिजे घरीं । पथ्याचिया ॥ ६९ ॥ तैसा कर्माकर्माचिया मोहरा । उठूं नेदूनि अहंकारा । संसाराचा दरारा । सांडणें येणें ॥ ७० ॥ अथवा ऐक्यभावाचेनि पैसें । दुजे मानूनि आत्मा ऐसें । भयवार्ता देशें । दवडणें जे ॥ ७१ ॥ पाणी बुडऊं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आतें । तेवीं आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥ ७२ ॥ अगा अभय येणें नांवें । बोलिजे तें हें जाणावें । सम्यक्ज्ञानाचें आघवें । धांवणें हें ॥ ७३ ॥ आतां सत्त्वशुद्धी जे म्हणिजे । ते ऐशा चिन्हीं जाणिजे । तरी जळे ना विझे । राखोंडी जैसी ॥ ७४ ॥ कां पाडिवा वाढी न मगे । अंवसे तुटी सांडूनि मागें । माजीं अतिसूक्ष्म अंगें । चंद्रु जैसा राहे ॥ ७५ ॥ नातरी वार्षिया सांडिली । ग्रीष्में नाहीं मांडिली । माजीं निजरूपें निवडली । गंगा जैसी ॥ ७६ ॥ तैसी संकल्पविकल्पाची वोढी । सांडूनि रजतमाची कावडी । भोगितां निजधर्माची आवडी । बुद्धि उरे ॥ ७७ ॥ इंद्रियवर्गें दाखविलिया । विरुद्धा अथवा भलीया । विस्मयो कांहीं केलिया । जुठी चित्तीं ॥ ७८ ॥ गांवा गेलिया वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु । भलतेसणी हानिलाभु । न मनी जेवीं ॥ ७९ ॥ तेवीं सत्स्वरूप रुचलेपणें । बुद्धी जें ऐसें अनन्य होणें । ते सत्त्वशुद्धी म्हणे । केशिहंता ॥ ८० ॥ आतां आत्मलाभाविखीं । ज्ञानयोगामाजीं एकीं । जे आपुलिया ठाकीं । हांवे भरे ॥ ८१ ॥ तेथ सगळिये चित्तवृत्ती । त्यागु करणें ऐशा रीती । निष्कामें पूर्णाहुती । हुताशीं जैसी ॥ ८२ ॥ कां सुकुळीनें आपुली । आत्मजा सत्कुळींचि दिधली । हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी ॥ ८३ ॥ तसेंनि विकल्पणें । जें योगज्ञानींच या व्रात्तिक होणें । तो तिजा गुण म्हणे । श्रीकृष्णनाथु ॥ ८४ ॥ आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें । वैरी जालियाही आर्तातें । न वंचणें जें कां ॥ ८५ ॥ पत्र पुष्प छाया । फळें मूळें धनंजया । वाटेचा न चुके आलिया । वृक्षु जैसा ॥ ८६ ॥ तैसें मनौनि धनवरी । विद्यमानें आल्या अवसरीं । श्रांतांचिये मनोहारीं । उपयोगा जाणें ॥ ८७ ॥ तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन । हें असो ऐक चिन्ह । दमाचें तें ॥ ८८ ॥ तरी विषयेंद्रियमिळणी । करूनि घापे वितुटणी । जैसें तोडिजे खड्ग पाणी । पारकेया ॥ ८९ ॥ तैसा विषयजातांचा वारा । वाजों नेदिजे इंद्रियद्वारां । इये बांधोनि

त्याला ( अशा पदार्थसमुदायाला ) लोकांत संपत्ति म्हटलें जातें. ६६. ती दैवी संपत्ति सुखाला उत्पन्न करणारी आहे व सर्व दैवी गुणांना ही एकच निर्वाहाचें साधन आहे. म्हणून हिला येथें ( या सोळाव्या अध्यायांत ) दैवी संपत्ति असें म्हटलें आहे. ६७.

श्रीकृष्ण म्हणाले, निर्भयता, शुद्धसत्त्वात्मक बुद्धि, ज्ञान व योग यांचें ठिकाणीं तत्परता, दान, दम, आणि यज्ञ ( स्वधर्माप्रमाणें आचरण ), स्वाध्याय ( आपआपल्या अधिकाराप्रमाणें वेदाध्ययन अथवा नामपाठ ) तप, सौजन्य. १.

आतां त्याच दैवी संपत्तीच्या गुणांत, श्रेष्ठ अशा पहिल्या आसनावर जो बसतो, त्या गुणाला 'अभय' असें म्हणतात. ऐका. ६८. तर ज्याप्रमाणें महापुरांत उडीच घातली नाहीं, म्हणजे बुडण्याचें भय धरण्याचें कारण नाहीं, अथवा पथ्याच्या घरीं रोगाचा हिरोव नाहीं; ( पथ्यानें वागत असतां तेथें रोगाचें भय नाहीं. ) ६९. त्याप्रमाणें विहित व निषिद्ध कर्म, यांच्यासंबंधानें अहंकाराला उत्पन्न न होऊं देणें व अशा रीतीनें संसाराचा धाक टाकणें ( याला अभय असें म्हणतात. ) ७०. अथवा ( दुसऱ्या रीतीनें ) अद्वैतभावाच्या विकासानें, आपल्याहून दुसरें हें आपला आत्मा आहे, असें मानून, भयाची गोष्ट हद्दपार करून जें टाकणें ( त्यास अभय असें म्हणावें. ) ७१. पाणी मिठाला बुडवावयाला येतें, तों मीठच पाणी होतें ( मग त्यास बुडण्याचें भय कसलें ? ) त्याप्रमाणें आपण अद्वैतस्वरूप झालों असतां भयाचा नाश होतो. ७२. बाबा अर्जुना, अभय या नांवानें ज्याचा उल्लेख केला जातो तें हें समजावें. हें अभय म्हणजे, सम्यक् ( यथार्थ ) ज्ञानाच्या बरोबर असणारा व त्याचें सर्व प्रकारें रक्षण करणारा शिपाई आहे. ७३. आतां सत्त्वशुद्धि म्हणून जिला म्हणतात, ती ही अशा लक्षणांनीं ओळखावी. तर राखुंडी जशी जळत नाहीं व विझत नाहीं; ७४. अथवा शुक्ल प्रतिपदेच्या कलेची वाढ न घेऊन, किंवा अंवसेस झालेला कलांचा ऱ्हास मागें टाकून, या दोन स्थितींच्या मध्यें, चंद्र जसा अतिशय सूक्ष्म रूपानें ( आपल्या मूळ स्वरूपानें ) राहतो; ७५. अथवा वर्षाऋतूंतील पूर ओसरला आहे व ग्रीष्मऋतूंतील ओहोटीस आरंभ झाला नाहीं, या दरम्यानचे काळांत गंगेचें स्वाभाविक स्वरूप जसें स्पष्ट दिसतें; ७६. त्याप्रमाणें संकल्पविकल्पाची ओढ टाकून आणि रजतमाची कावड ( ओझें ) टाकून आत्मचिंतनाचें प्रेम भोगणारी बुद्धि ( आपल्या मूळ स्वरूपानें ) राहते. ७७. वाईट अथवा चांगल्या विषयांना इंद्रियसमुदायानें दाखविलें असतां, कांहीं केल्या चित्तांत चलबिचल उत्पन्न होत नाहीं. ७८. पति गांवाला गेला असतां पतिवियोगजन्य मोठ्या दुःखांत, कितीही नुकसान अथवा लाभ हे झाले असतां, जशी पतिव्रता मनावर घेत नाहीं. ७९. त्याप्रमाणें आत्मस्वरूपाची गोडी लागल्यामुळें बुद्धीनें जें, पतिव्रतेप्रमाणें आत्मस्वरूपीं अनन्य होणें, त्या बुद्धीच्या अनन्य होण्याला, केशी दैत्याला मारणारे जे ( भगवान् श्रीकृष्ण ) ते सत्त्वशुद्धि असें म्हणतात. ८०. आतां आत्मप्राप्तीविषयीं ज्ञान व अष्टांगयोग, या दोहोंपैकीं जें आपल्याला अधिकारानुरूप साधेल, त्याची उत्कट इच्छा अंतःकरणांत बाळगणें; ८१. ज्ञान अथवा अष्टांग योग, या दोहोंपैकीं ज्याची उत्कट इच्छा उत्पन्न होईल, त्या ठिकाणीं सर्व चित्तवृत्तींना अशा रीतीनें अर्पण करावें कीं, जसें निष्काम पुरुषानें अग्नीमध्यें पूर्णाहुति द्यावी; ८२. अथवा ज्याप्रमाणें कुलवान् पुरुषानें आपली मुलगी चांगल्या कुळांतच दिली. हा दृष्टांत राहूं द्या. ज्याप्रमाणें लक्ष्मी भगवंताच्या ठिकाणीं स्थिर झाली; ८३. त्याप्रमाणें अनन्यभावानें योगाचे ठिकाणीं अथवा ज्ञानाचे ठिकाणीं जें वतनदार होऊन राहणें, तो दैवी संपत्तीचा तिसरा गुण होय, असें श्रीकृष्णनाथ म्हणतात. ८४. आतां जो कोणी संकटानें पीडित असेल—तो शत्रु देखील असेना—त्याला आपल्या अनुकूलतेनुरूप द्रव्यानें, कायावाचामनानें, प्रतारणा न करितां, जें अर्पण करणें; ८५. अर्जुना, ज्याप्रमाणें वृक्ष, वाटेनें येणाऱ्यास पानें, फुलें, छाया, फळें, मुळें देण्यास चुकत नाहीं, ८६. त्याप्रमाणें मनापासून धनापर्यंत, जें कांहीं आपल्याला प्राप्त असेल, त्या योगानें प्रसंगानुसार ( पीडेनें ) श्रमलेल्यांच्या मनास आनंद होईल, अशा प्रकारें उपयोगास येणें; ८७. त्याला दान म्हणावयाचें असें समज. तें दान मोक्षरूपी ठेवा दाखविणारें अंजनच आहे. हें दानाचें लक्षण पुरे, आतां दमाचें लक्षण ऐक. ८८. तर विषयांशीं इंद्रियांच्या झालेल्या एकतानतेची जी ताटातूट करून ठेवावी ( त्याला दम म्हणतात ), ज्याप्रमाणें मातीं मिसळलेल्या गढूळ पाण्यांत निवळीचें बीं घातलें, तर तें पाण्यांतील मातीस तळास नेऊन, स्वच्छ पाण्यास अलग करितें, ८९. त्याप्रमाणें कोणत्याही विषयाचा वारा इंद्रियांच्या द्वारांत वाहूं देत नाहीं; ( विषयांचा व इंद्रियांचा संबंध घडूं देत नाहीं. ) इंद्रियांस नियमानें जखडून

प्रत्याहारा। हातीं वोपी ॥ ९० ॥ आंतुला चित्ताचे अंगवरी। सांडोनी प्रवृत्ति पळे परबाहेरी। आगी सुयिजे दार्हीही द्वारीं। वैराग्याची ॥ ९१ ॥ श्वासोश्वासाहुनी बहुवसें। व्रतें आचरे खरपुसें। वोसंतिता रात्रिदिवसें। नाराणुकु जया ॥ ९२ ॥ पैं दमु ऐसें म्हाणिपे। तो हा जाण स्वरूपें। यागार्थुही संक्षेपें। सांगों ऐक ॥ ९३ ॥ तरी ब्राह्मण करूनि धुरे। स्त्रियादिक पैल मेरे। माझारीं अधिकारें। आपुलालेनि ॥ ९४ ॥ जया जे सर्वोत्तम। भजनीय देवताधर्म। ते तेणें यथागम- । विधी यजिजे ॥९५॥ जैसा द्विज षट्कर्मे करी। शूद्र तयातें नमस्कारी। कीं दोहींसिही सरोभरी। निपजे यागु ॥ ९६ ॥ तैसें अधिकारपर्यालोचें। हें यज्ञ करणें सर्वांचें। परी विष फळाशेचें। न घापे माजीं ॥ ९७ ॥ आणि मी कर्ता ऐसा भावो। नेदिजे देहाचेनि द्वारें जावों। ना वेदाज्ञेसि तरी ठावो। होइजे स्वयें ॥ ९८ ॥ अर्जुना एवं संज्ञु। सर्वत्र जाण यज्ञु। कैवल्यमार्गींचा अभिज्ञु। सांगाती हा ॥ ९९ ॥ आतां चेंडुवें भूमी हाणिजे। हें नव्हे तो हाता आणिजे। कीं शेतीं बीं विखुरिजे। परी पिकीं लक्ष ॥ १०० ॥ नातरी ठेविलें देखावया। आदर कीजे दिविया। कां शाखा फळें यावया। सिंपिजे मूळ ॥ १ ॥ हें बहु असो आरिसा। आपणपें देखावया जैसा। पुढतपुढती बहुवसा। उटिजे प्रीती ॥ २ ॥ तैसा प्रतिपाद्यु जो ईश्वरु। तो होआवयालागीं गोचरु। श्रुतीचा निरंतरु। अभ्यासु करणें ॥ ३ ॥ तें द्विजांसीच ब्रह्मसूत्र। येरां स्तोत्र कां नाममंत्र। आवर्तणें पवित्र। पावावया तत्त्व ॥४॥ पार्था गा स्वाध्यावो। बोलिजे तो हा म्हणे देवो। आतां तप शब्दाभिप्रावो। आईक सांगों ॥ ५ ॥ तरी दानें सर्वस्व देणें। वेंचणें तें व्यर्थ करणें। जैसें फळोनि स्वयें सुकणें। ओषधीचें जेवीं ॥ ६ ॥ नाना धूपाचा अग्निप्रवेशु। कनकीं तुकाचा नाशु। कां पितृपक्षु पोषितां ऱ्हासु। चंद्राचा जैसा ॥७॥ तैसा स्वरूपाचिया प्रसरा- । लागीं प्राणेंद्रिय-शरीरां। आटणी करणें जें वीरा। तेंचि तप ॥ ८ ॥ अथवा अनारिसें। तपाचें रूप जरी असे। तरी जाण जेवीं दुधीं हंसें। सूदली चांचू ॥ ९ ॥ तैसें देहजीवाचिये मिळणी। जो उदयजत सूये पाणी। तो विवेक अंतःकरणीं। जागवीजे ॥ ११० ॥ पाहतां आत्मयाकडे। परी बुद्धीचा पैंसु सांकडे। सानिद्र स्वप्न बुडे। जागणीं जैसें ॥ ११ ॥ तैसा आत्मपर्यालोचु। प्रवर्ते जो साचु। तपाचा हा निर्वेचु। धनुर्धरा ॥ १२ ॥ आतां बाळाचां हितीं स्तन्य। जैसें नानाभूतीं चैतन्य। तैसें प्राणिमात्रीं सौजन्य। आर्जव तें ॥ १३ ॥

प्रत्याहाराच्या हातांत त्यांस कायमचें देऊन टाकतो. ९०. प्रवृत्ति आंत चित्तापर्यंत सर्वांचा त्याग करून साधकाला संपूर्णतया सोडून बाहेर निघून जाते व (पुनः प्रवृत्ति उत्पन्न होऊं नये म्हणून) दाहाही इंद्रियांच्या द्वारांत वैराग्याचा अग्नि ठेवतो. ९१. श्वासोच्छ्वासाहून पुष्कळ व कडक अशा व्रतांचें आचरण करतो व तीं व्रतें रात्रंदिवस आचरण करीत असतां, ज्याला एक क्षणभरही विश्रांति सांपडत नाहीं. ९२. दम असें ज्याला म्हणतात, त्याचें हें वर सांगितल्याप्रमाणें लक्षण आहे, असें समज. आतां यज्ञाचाही अर्थ थोडक्यांत सांगतों, तो ऐक. ९३. तर मुख्य ब्राह्मणापासून आरंभ करून तो अखेर स्त्रियादिक शेवटापर्यंत, मधील सर्वांनीं आपापल्या वर्णाश्रमधर्मानुसार जें कांहीं करणें; ९४. ज्याला जे आश्रय करण्याला योग्य असे सर्वांत चांगले देवधर्म वगैरे असतील, त्यांचें त्यानें शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें अनुष्ठान करावें ९५. उदाहरणार्थ, ब्राह्मण अध्ययनादि सहा प्रकारचीं कर्में करितो व शूद्र त्याला नमस्कार करतो; कीं, दोघांनाहीं सारखाच यज्ञ उत्पन्न होतो (म्हणजे दोघांनाही आपापल्या अधिकाराप्रमाणें यज्ञ केल्याचें सारखेंच फळ मिळतें.) ९६. त्याप्रमाणें आपापल्या अधिकाराचा विचार करून, हें सर्वांचें यज्ञ करणें आहे. परंतु त्यांत (त्या यज्ञाचें आचरण करण्यांत) फलाशेचें विष कालवूं नये. ९७. आणि देहाच्या हातून होणाऱ्या कर्मांच्या कर्तेपणाचा अहंकार उत्पन्न होऊं देऊं नये. पण वेदानें करावयास सांगितलेल्या कर्मांच्या विधानांना आपण स्वतःच ठिकाण होऊन रहावें; ९८. अर्जुना, अशा प्रकारचें लक्षण असलेला व सर्वांच्या आचरणांत येणारा हा यज्ञ आहे, असें समज. हा यज्ञ म्हणजे मोक्षाच्या वाटेवरील माहितगार वाटाड्या आहे. ९९. आतां चेंडू जमिनीवर आपटावयाचा, तो चेंडूनें जमिनीला मारण्याकरितां नव्हे; तर चेंडूला उडी येऊन, तो आपल्या हातांत यावा म्हणून. अथवा शेतांत बीं जें फेकावयाचें (पेरावयाचें), तें नुसतें बीं फेकणें नसतें, परंतु त्या फेकण्यांत पिकावर नजर असते. १००. अथवा अंधारांत ठेवलेली वस्तु दिसण्याकरितां जसा दिवा घ्यावा अथवा फांद्या, फळें येण्याकरितां ज्याप्रमाणें वृक्षांच्या मुळांना पाणी घालावें, १०१. हें फार बोलणें राहूं दे. ज्याप्रमाणें आपण आपल्याला पहाण्याकरितां आरसा आवडीनें वारंवार पुष्कळ स्वच्छ करावा; १०२. त्याप्रमाणें श्रुतींनीं ज्याचें प्रतिपादन केलें, असा जो ईश्वर त्याचा साक्षात्कार होण्याकरितां श्रुतींचा नेहमीं अभ्यास करणें, १०३. पवित्र आत्मतत्त्व पावण्याकरितां द्विजांनींच तें ब्रह्मसूत्र घोकावें (अभ्यास करावा) इतरांनीं स्तोत्रें अथवा नाममंत्र घोकावेत; १०४. अर्जुना, स्वाध्याय म्हणून जो म्हटला जातो तो हा, असें देव म्हणतात. आतां तप शब्दाचा अभिप्राय सांगतों, ऐक. १०५. तर दान म्हणजे सर्वस्व देणें, दानामध्यें जो खर्च करावयाचा तो व्यर्थ करावयाचा, (म्हणजे त्याच्या फलाची आशा टाकावयाची.) ज्याप्रमाणें वनस्पति स्वतः फळून सुकते (म्हणजे ती जशी फलाशा टाकून व्यर्थ जाते, तसें फलाशा टाकून दान व्यर्थ करावयाचें.) १०६. अथवा धूपाचा अग्नींत प्रवेश झाल्यावर धूप नाहींसा होतो, हिणकस सोन्याला शुद्ध करण्यांत त्याचें वजन कमी होतें; अथवा पक्ष वाढत असतांना चंद्र जसा कमी कमी होत जातो. १०७. अर्जुना, त्याप्रमाणें आत्मानुभवाच्या विकासाकरितां प्राण, इंद्रियें व शरीर यांची जी आटणी करावयाची (म्हणजे प्राण व शरीर यांस आत्मप्राप्तीच्या मार्गांत जें झिजविणें) तेंच तप होय. १०८. अथवा वर सांगितलेल्या तपाच्या स्वरूपापेक्षां जर कांहीं तपाचें दुसरें स्वरूप असेल, तर तें दुधामध्यें (जलमिश्रीत दुधामध्यें) हंसानें जशी चोंच घालावी (तसें आहे, म्हणजे हंस जसा दूध व पाणी आपल्या चोंचीनें वेगळें करतो.) १०९. त्याप्रमाणें जो उत्पन्न होतांच देह व आत्मा यांच्या कालवाकालवींत हात घालतो (व पाण्यापासून हंसाची चोंच ज्याप्रमाणें दुधास अलग करिते, त्याप्रमाणें आत्म्यास देहापासून, समजुतीनें अलग करितो,) तो आत्मानात्मविचार आपल्या अंतःकरणांत सारखा जागृत ठेवावा. ११०. (अनात्म पदार्थांत पांगलेली जी बुद्धि, तिचा संकोच होणें कठीण आहे.) परंतु ती बुद्धि आत्म्यास पहावयास लागली असतां, तिचा संकोच होतो. (ती एकवटून अंतर्मुख होते.) तें कसें तर, जागृतीमध्यें निद्रेसकट स्वप्न नाहींसें होतें, तसें. १११. त्याप्रमाणें अर्जुना, जो आत्मविचार चालू होतो, हाच तप शब्दाचा वास्तविक अभिप्राय आहे. ११२. आतां स्तनांतील दूध जसें सर्व मुलांचें हित करणारें असतें (अथवा) भिन्न भिन्न प्राण्यांच्या ठिकाणीं जसें चैतन्य सारखें असतें, त्याप्रमाणें प्राणिमात्रांशीं वागण्याचा जो (सरळ) भलेपणा, तें आर्जव होय. ११३.

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् । दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥

आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरें वाचा मानसें । राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ १४ ॥ आतां तीख होऊनी मवाळ । जैसें जातीचें मुकुळ । कां तेज परी शीतळ । शशांकाचें ॥ १५ ॥ शके दावितांचि रोगु फेडूं । आणि जिभे तरी नव्हे कडु । तें वोखदु नाहीं मा घडु । उपमा कैंची ॥ १६ ॥ तरी मऊपणें बुबुळें । झगडतांही परी नाडळे । एऱ्हवीं फोडी कोंराळें । पाणी जैसें ॥ १७ ॥ तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह । श्राव्यत्वें तरी माधुर्य । पायीं घाली ॥ १८ ॥ आइकतां कौतुकें । कानातेंचि निघती मुखें । जें साचारिवेचेनि बिकें । ब्रह्मही भेदी ॥ १९ ॥ किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकवूं नेणे । यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा ॥ १२० ॥ एऱ्हवीं गोरी कीर काना गोड । परी साचाचां पाखाळीं कीड । आगीचें करणें उघड । परी जळो तें साच ॥ २१ ॥ कानीं लागतां महुर । अर्थे विभांडी जिव्हार । तें वाचा नव्हे सुंदर । लांवचि पां ॥ २२ ॥ परी अहितीं कोपोनि सोप । लालनीं मऊ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय ॥ २३ ॥ तैसें श्रवणसुख चतुर । परिणमोनि साचार । बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥ २४ ॥ आतां घालितांही पाणी । जैसी पाषाणीं न निघे आणी । कां मथिलिया लोणी । कांजी नेदी ॥ २५ ॥ त्वचा पायें शिरीं । हालेयाही फडे न करी । वसंतींही अंबरीं । न होती पुष्पें ॥ २६ ॥ नाना रंभेचेनिही रूपें । शुकीं नुठिजेचि कंदर्पें । कां भस्मीं वन्हि न उद्दीपे । घृतेंही जेवीं ॥ २७ ॥ तेवींचि कुमारु क्रोधें भरे । तैसिया मंत्राचीं बीजाक्षरें । तियें निमित्तेंही अपारें । मीनलिया ॥ २८ ॥ परि धातयाही पायां पडतां । नुठी गतायु पंडुसुता । तैसी नुपजे उपजवितां । क्रोधोर्मी गा ॥ २९ ॥ अक्रोधत्व ऐसें । नांव तें ये दशे । जाण श्रीनिवासें । म्हणितलें तया ॥ १३० ॥ आतां मृत्तिकात्यागें घटु । तंतुत्यागें पटु । त्यजिजे जेवीं वटु । बीजत्यागें ॥ ३१ ॥ कां त्यजूनि भिंतिमात्र । त्यजिजे आघवेंचि चित्र । कां निद्रात्यागें विचित्र । स्वप्नजाळ ॥ ३२ ॥ नाना जळत्यागें तरंग । वर्षात्यागें मेघ । त्यजिजती जैसे भोग । धनत्यागें ॥ ३३ ॥ तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडूनि पाहीं । सांडिजे अशेषही । संसारजात ॥ ३४ ॥ तया नांव त्यागु । म्हणे तो यज्ञांगु । हें मानूनि सुभगु । पार्थु पुसे ॥ ३५ ॥ आतां शांतीचें जी लिंग । तें व्यक्त मज सांग । देवो म्हणती चांग । अवधान

अहिंसा, सत्य, क्रोधराहित्य, (अहंतेचा) त्याग, शांति (ज्ञेयाला गिळून, ज्ञाता व ज्ञानही नाहींसें होऊन उरणारी स्थिति), दोष टाकून गुण घेण्याची दृष्टि, भूतमात्राचे ठिकाणीं दया, अनासक्ति, मृदुता, लज्जा, इंद्रियांच्या क्रियेचा थंडपणा, २.

आणि जगाला सुख व्हावें म्हणून शरीरानें, वाचेनें व मनानें जें वागणें, तें अहिंसेचें स्वरूप होय, असें समज. ११४. आतां (कमळ) कळिका जशी स्वभावतः तीक्ष्ण असून मऊ असते (कारण ती पाण्याचें भेदन करते, म्हणून तिला तीक्ष्ण म्हणावयाचें आणि स्पर्शाला मऊ असते, म्हणून तिला मऊ म्हणावयाचें), अथवा चंद्राचें तेजच खरें, परंतु तें थंड असतें. ११५. दाखविल्या-बरोबर रोग नाहींसा करूं शकेल आणि जिव्हेला जें कडू लागणार नाहीं, असें औषधच नाहीं. मग मी असल्या औषधाची उपमा कोठची देऊं ? ११६. तरी जसें पाणी बुबुळाला घासलें तरी तें मऊपणामुळें (डोळ्यामध्यें) खुपत नाहीं; पण त्याच पाण्यासंबंधीं विचार करून पाहिलें तर, ज्याप्रमाणें पाणी हें डोंगराचा कडा फोडतें. ११७. त्याप्रमाणें जें (सत्यभाषण) संशय नाहींसा करण्याचें कामीं तरवारीसारखें तीक्ष्ण असतें आणि ऐकण्याच्या बाबतींत गोडपणाला पायाखालीं तुडवितें (ऐकलें असतां तें कानाला इतकें मधुर लागतें कीं, त्याच्यापुढें इतर गोडी फिकी पडते.) ११८. जें (सत्यभाषण) सहज ऐकत असतां, कानालाच मुखें उत्पन्न होतात (पुनः पुनः ऐकावें अशी कानाला इच्छा उत्पन्न होते.) आणि जें (सत्यभाषण) आपल्या खरेपणाच्या जोरावर ब्रह्मालाही भेदून जातें (ब्रह्माचा साक्षात्कार करून देतें.) ११९. फार काय सांगावें ! जें भाषण प्रियपणानें कोणालाही फसवूं जाणत नाहीं व जरी तें खरें असतें, तरी तें कोणाला खुपत नाहीं. १२०. बाह्य दृष्टीनें पाहिलें तर, पारध्याचें गाणें खरोखर कानास गोड लागतें, पण खऱ्या पक्षानें पाहिलें तर, तें अति घातकर असल्याचें दिसून येतें. अग्नि आपलें जाळण्याचें काम खरोखर उघडपणानें करतो. पण (तो त्याचा उघडपणा काय करावयाचा ?) असल्या प्रकारच्या सत्यास आग लागो ! (त्याची कांहींच किंमत नाहीं.) १२१. जें भाषण कानांनें ऐकलें असतां गोड लागतें, परंतु अर्थानें जें काळजाला झोंबतें, असें भाषण, हें भाषणच नाहीं, तर तें भाषण म्हणजे, सुंदर रूप धारण करणारी हडळच आहे. १२२. परंतु (मुलाच्या) अकल्याणाच्या बाबतींत (मुलावर) लटकें रागावणारी व लाड करण्यांत फुलासारखी मऊ, अशा त्या आईचें स्वरूप जसें असतें; १२३. त्याप्रमाणें जें ऐकल्यानें सुख देण्यांत वस्ताद, जें परिणामी सत्य असतें व ज्या बोलण्यानें ऐकणाराच्या अंतःकरणांत द्वेषादि विकार येत नाहींत, त्या बोलण्यास येथें सत्य असें म्हटलें आहे. १२४. आतां दगडाला पाणी घातलें तरी देखील जसा त्याला अंकूर फुटत नाहीं, अथवा कांजी घुसळली तरी लोणी मिळणार नाही. १२५. सर्पाच्या कातीच्या मस्तकावर लाथ मारली असतां ती जशी फडा करीत नाहीं, अथवा वसंतऋतूंत देखील आकाशांत फुलें येत नाहींत. १२६. अथवा रंभेच्याही रूपानें शुकाच्या ठिकाणीं काम उत्पन्न झालाच नाहीं, अथवा राखेमध्यें तुपानेंही अग्नि प्रदीप्त होत नाहीं. १२७. त्याप्रमाणें लहान मुलाला देखील राग येईल, अशा शेलक्या शिव्या उच्चारल्या आणि तशीच दुसरी आणखी कित्येक कारणें एकत्र मिळालीं असतांही, १२८. परंतु अर्जुना, ब्रह्मदेवाच्याही पाया पडलें असतां आयुष्य संपलेला पुरुष ज्याप्रमाणें उठत नाहीं, त्याप्रमाणें क्रोध उत्पन्न होण्याची शिकस्त केली असतां त्याच्या ठिकाणीं क्रोधाचा विकार उत्पन्न होत नाहीं. १२९. अक्रोधत्व असें ज्यास म्हणतात, तें या स्थितीलाच होय, असें समज. असें श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले. १३०. आतां मातीचा त्याग केला असतां जसा घटाचा (सकारण) त्याग होतो व सुताचा त्याग केला असतां वस्त्राचा त्याग होतो. अथवा वडाच्या बीजाचा त्याग केला असतां जसा वडाच्या झाडाचा त्याग होतो; १३१. अथवा ज्याप्रमाणें सर्व भिंतीचा त्याग (नाश) केला असतां (त्या भिंतीवरील) सर्व चित्रांचा त्याग होतो अथवा झोंपेचा त्याग केला असतां नाना प्रकारच्या स्वप्नांच्या समुदायाचा त्याग होतो; १३२. अथवा जलाचा त्याग केला असतां जसा लाटांचा त्याग होतो (अथवा) वर्षाऋतूचा त्याग केला असतां जसा मेघांचा त्याग होतो (अथवा) द्रव्याचा त्याग केला असतां भोगांचा जसा त्याग होतो; १३३. (अर्जुना), पहा त्याप्रमाणें बुद्धिवान् पुरुष देहाच्या ठिकाणीं असलेल्या अहंतेचा त्याग करून, सर्वही संसारमात्राचा (कारणासह) त्याग करतात. १३४. त्याला त्याग असें नांव आहे; असें, यशस्वरूप श्रीकृष्ण म्हणाला. त्या दैववान् अर्जुनाला हें श्रीकृष्णाचें सांगणें मान्य होऊन तो विचारूं लागला. १३५. अर्जुन म्हणाला, आतां महाराज, मला शांतीचें लक्षण स्पष्ट सांगा. तेव्हां देव म्हणाले चांगलें लक्ष

देईं ॥ ३६ ॥ तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही मागौतें । हारपे निरुतें । ते शांति पैं गा ॥३७॥ जैसा प्रळयांबूचा उभडु । बुडवूनि विश्वाचा पवाडु । होय आपणपें निविडु । आपणपांचि ॥ ३८ ॥ मग उगम ओघ सिंधु । हा तुरेचि व्यवहारभेदु । परी जलैक्याचा बोधु । तोही कवणा ॥ ३९ ॥ तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं । मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥ १४० ॥ आतां कदर्थवित व्याधी । बळीकरणाचिया आधीं । आपपरु न शोधी । सद्वैद्यु जैसा ॥ ४१ ॥ कां चिखलीं रुतली गाये । धड भाकड न पाहे । जो तियेचिया ग्लानी होये । कालाभुला ॥ ४२ ॥ नाना बुडतयातें सकरुणु । न पुसे अंत्यजु कीं ब्राह्मणु । काढूनि राखे प्राणु । हेंचि जाणे ॥ ४३ ॥ कीं महावनीं पापिये । उघडी केली विपायें । ते नेसविल्यावीण न पाहे । शिष्टु जैसा ॥ ४४ ॥ तैसे अज्ञानप्रमादादिकीं । कां प्राक्तनींही सदोखीं । निंद्यत्वाचां सर्वविखीं । खिळिले जे ॥ ४५ ॥ तयां आंगींक आपुलें । देऊनियां भलें । विसरविजती सलें । सलतीं तियें ॥ ४६ ॥ अगा पुढिलाचा दोषु । करूनि आपुलिये दिठी चोखु । मग घापे अवलोकु । तयावरी ॥ ४७ ॥ जैसा पुजूनि देवो पाहिजे । पेरूनि शेता जाइजे । तोषौनि प्रसादु घेइजे । अतिथीचा ॥ ४८ ॥ तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें । फेडुनियां पाहणें । तयाकडे ॥ ४९ ॥ वांचूनि न विंधिजे वर्मी । नातुडविजे अकर्मी । न बोलविजे नामीं । सदोषीं तिहीं ॥ १५० ॥ वरी कोणे एकें उपायें । पडिलें तें उभें होये । तेंचि कीजे परी घाये । नेदावे वर्मी ॥ ५१ ॥ पैं उत्तमाचियासाठीं । नीच मानिजे किरीटी । हें वांचोनि दिठी । दोषु न घेपे ॥ ५२ ॥ अपैशून्याचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण । मोक्षमार्गीचें सुखासन । मुमुक्षूं हें ॥ ५३ ॥ आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी । निववितां न कडसी । सानें थोर ॥ ५४ ॥ तैसें दुःखिताचें शिणणें । हिरतां सकणवपणें । उत्तमाधम नेणे । विंचूं गा ॥ ५५ ॥ पैं जगीं जीवनासारिखें । वस्तु अंगवरी उपखे । परी जातें जीवित राखे । तृणाचेंही ॥ ५६ ॥ तैसें पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपे । सर्वस्वेंसीं दिधलें आपणपें । तरी थोडेंचि गमे ॥ ५७ ॥ निम्न भरलिया उणें । पाणी ढळोंचि नेणे । तेवीं श्रांता तोषौनि जाणें । सामोरेया ॥ ५८ ॥ पैं पायीं कांटा नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥ ५९ ॥ कां पावो शीतळता लाहे । कीं ते डोळयांचिलागीं होये । तैसा परसुखें जाये । सुखावतु ॥ १६० ॥ किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं । तैसें दुःखितांचां सेलभागीं । जिणें जयाचें ॥ ६१ ॥ तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें ॥ ६२ ॥ आतां सूर्यासि जीवें । अनुसरलिया राजीवें । परी तें तो न शिवे । सौरभ्य जैसें ॥ ६३ ॥ कां वसंताचिया वाहाणी । आलिया वनश्रीच्या अक्षौहिणी । ते न करीतुचि वेणी । निगाला तो ॥ ६४ ॥ हें असो महासिद्धीसी । लक्ष्मीही आलिया पाशीं । परी महाविष्णु जैसी । गणीचिना ते ॥ ६५ ॥ तैसे ऐहिकींचे स्वर्गींचे । भोग पाइक जालिया इच्छेचे । परी भोगावें हें न रुचे । मनामाजीं ॥ ६६ ॥ बहुवें

देऊन ऐक. १३६. अर्जुना, तर ज्ञेयाला ( जाणावयाच्या विषयाला ) गिळून ( बाध करून ) मागून ज्ञाता ( जाणणारा ) व ज्ञान देखील खरोखर जेथें नाहींसें होतें, ती शांति होय. १३७. ज्याप्रमाणें प्रळयकाळच्या पाण्याचा लोट, विश्वाचा पसारा बुडवून आपणच आपल्या ठिकाणीं घनदाट भरून असतो. १३८. मग नद्यांचे प्रवाह व समुद्र ( नद्या मिळण्याचें ठिकाण, ) हा भेदाचा व्यवहार उरतच नाहीं. ( इतकेंच नाहीं ) परंतु उदकाच्या एकरसतेचा बोध तो तरी कोणाला आहे? १३९. त्याप्रमाणें ज्ञेयाचा लय झाल्यावर, ज्ञातेपणाचाही लय होतो. मग अर्जुना, ( ज्ञेय व ज्ञाता गेल्यावर ) जें कांहीं रहातें, तेंच शांतीचें रूप होय. १४०. आतां, रोग नाहींसा करून ( रोग्याला ) बळकट करण्याच्या काळजींत, जसा चांगला वैद्य आपलें व परकें असा भेद करीत नाहीं. ( तर काळजीपूर्वक औषधाची योजना करतो. ) १४१. अथवा गाळांत फसलेली गाय दृष्टीस पडल्यावर, ती दूध देणारी आहे किंवा नाहीं हें न पाहतां, तिची दीनवाणी स्थिति पाहून त्या योगानें कासावीस होतो; १४२. अथवा दयावान् पुरुष, बुडणाऱ्या मनुष्याला, तूं ब्राह्मण आहेस कीं चांडाळ आहेस हें विचारीत नाहीं, तर तो त्याला पाण्याबाहेर काढून त्याचे प्राण वांचविणें हेंच जाणतो १४३. मोठ्या अरण्यांत एकाद्या पापी मनुष्यानें (एखाद्या स्त्रीला) अकस्मात् उघडी केली असतां, तिला वस्त्र नेसविल्याबांचून जसा सभ्य गृहस्थ तिला पाहात नाहीं. १४४. त्याप्रमाणें अज्ञान, उन्मत्तपणा वगैरेंमुळें अथवा वाईट नशिबामुळेंही, निंद्यपणाच्या सर्व बाबतींत जे जखडलेले आहेत, १४५. त्यांस आपल्या अंगचे गुण देऊन त्यांना डांचत असणारीं शल्यें विसरावयास लावतात. १४६. अरे अर्जुना, दुसऱ्याचे दोष आपल्या दृष्टीनें ( आपल्या समजुतीनें ) शुद्ध करून, मग त्याच्याकडे दृष्टि फेकावी. १४७. ज्याप्रमाणें पुजून देव पाहावा, शेतांत धान्य पेरून मग शेतांत जावें व अतिथीला संतुष्ट करून मग त्याचा आशीर्वाद घ्यावा; १४८. त्याप्रमाणें आपल्या चांगलेपणानें दुसऱ्यांचा कमीपणा नाहींसा करून मग त्याच्याकडे पाहावें. १४९. एऱ्हवीं असें न करतां कोणाच्या वर्मावर टोंचूं नये, पापकर्मांमध्यें ( त्या पापकर्मांचें समर्थन करून ) कोणास गुंतवूं नये आणि ज्या नामामध्यें त्यांच्या दोषाचा उल्लेख होतो, अशा नामांनीं त्यांस हांका मारूं नये. १५०. शिवाय कोणी वाईट स्थितींत असेल तर, तो ज्या कोणत्या उपायांनीं चांगल्या स्थितीला येईल, तेंच करावें; परंतु वर्मावर घाव घालूं नयेत. १५१. अर्जुना, नीच मनुष्याला उत्तम मनुष्याच्या बरोबरीनें मानावें; याशिवाय आणखी आपल्या दृष्टीनें कोणाचा दोष पाहूं नये. १५२. अर्जुना, हें अपैशुन्याचें लक्षण आहे, असें तूं पक्कें समज व हें अपैशुन्य मुमुक्षूंना मोक्षमार्गाचें सुखकर वाहन आहे. १५३. आतां दया ती अशी कीं, ज्याप्रमाणें पौर्णिमेच्या चंद्राचें चांदणें थंडावा देत असतां लहान, थोर, अशी निवड करीत नाहीं, १५४. त्याप्रमाणें (ती दया) दुःखितांचे क्लेश कृपाळूपणानें हरण करीत असतां, श्रेष्ठ अथवा कनिष्ठ असा भेद करणें जाणत नाहीं. १५५. जगामध्यें पाण्यासारखी वस्तु स्वतः अंगानें नाश पावते, परंतु गवताच्या देखील जात असलेल्या जीविताचें रक्षण करते. १५६. त्याप्रमाणें दुसऱ्यांच्या दुःखानें, कृपेनें कळवळलें असतां ( व त्यांच्या दुःखनिवारणार्थ ) सर्वस्वासह आपल्या स्वतःला अर्पण केलें, तरी देखील त्यास (अर्पण करणारास) तें थोडेंच वाटतें. १५७. वाहात असलेलें पाणी खड्डा अपुरा भरला तर पुढें सरकावयाचें जाणतच नाहीं, त्याप्रमाणें पुढें आलेल्या दुःखिताला संतुष्ट करून मग (ज्याचे) पुढें जाणें. १५८. पायांत कांटा शिरतो व त्याच क्षणीं तें दुःख अंतःकरणांत प्रगट होतें, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या दुःखानें जो पोळला जातो; १५९. अथवा पायाला थंडावा मिळतो, तो डोळ्यांच्या उपयोगास येतो, त्याप्रमाणें जो दुसऱ्याच्या सुखानें सुखी होत असतो; १६०. फार काय सांगावें ! तान्हेल्याकरितां जसें जगांत पाणी राहिलें आहे, त्याप्रमाणें अत्यंत दुःखितांच्या दुःखनिवारणार्थ ज्याचें आयुष्य खर्च होतें. १६१. हे वीरांच्या राजा, ( अर्जुना, ) तो पुरुष दयेची प्रत्यक्ष मूर्ति आहे असें समज व ती दया त्याचे ठिकाणीं उत्पन्न होतांच, मी त्याचा ऋणी होतों. १६२. आतां सूर्यकमळ सूर्याला जीवाभावानें अनुसरलें असतें ( हें खरें ), परंतु तो सूर्य जसा त्या कमळाच्या सुवासाला स्पर्श करीत नाहीं. १६३. अथवा वसंतऋतूच्या ओघांत वनाच्या शोभेचे अनेक समुदाय आले असतां, त्यांचा स्वीकार न करतांच तो वसंतऋतु निघून जातो. १६४. हें राहूं दे. अष्टमहासिद्धीसह लक्ष्मीदेखील जवळ आली तरी पण महाविष्णूनें जसें तिला मोजलेंच नाहीं; १६५. त्याप्रमाणेंच इहलोकींचे व स्वर्गांतले भोग, हे आपल्या इच्छेचे दास झाले असतां, ते भोगावे हें ज्यास मनांतून आवडत नाहीं; १६६. फार काय सांगावें ! सहज

काय कौतुकीं । जीव नोहे विषयाभिलाखी । अलोलुप्त्वदशा ठाउकी । जाण ते हे ॥ ६७ ॥ आतां माशियां जैसें मोहळ । जळचरां जेवीं जळ । कां पक्षियां अंतराळ । मोकळें हें ॥ ६८ ॥ नातरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें । कां वसंतींचां स्पर्शे । मऊ मलयानिळु ॥ ६९ ॥ डोळयां प्रियाची भेटी । कां पिलियां कूर्मीची दिठी । तैसी भूतमात्रीं राहटी । मवाळ ते ॥ १७० ॥ स्पर्शे अतिमृदु । मुखीं घेतां सुस्वादु । घ्राणासि सुगंधु । उजाळु आंगें ॥ ७१ ॥ तो आवडे तेवढा घेतां । भलत्या विरुद्ध जरी न होता । तरी उपमे येता । कापूर कीं ॥ ७२ ॥ परी महाभूतें पोटीं वाहे । तेंवींचि परमाणूमाजीं सामाये । या विश्वानुसार होये । गगन जैसें ॥ ७३ ॥ काय सांगों ऐसें जिणें । जें जगाचेनि जीवें प्राणें । तयां नांव म्हणें । मार्दव मी ॥ ७४ ॥ आतां पराजयें राजा । जैसा कदर्थिजे लाजा । कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव ॥ ७५ ॥ नाना चांडाळ-मंदिराशीं । अवचटें आलिया संन्यासी । मग लाज होय जैसी । उत्तमा तया ॥ ७६ ॥ क्षत्रिया रणीं पळोनि जाणें । तें कोण साहे लाजिरवाणें । कां वैधव्यें पाचारणें । महासतियेतें ॥ ७७ ॥ रूपसा उदयलें कुष्ट । संभाविता कुटीचें बोट । तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ॥ ७८ ॥ तैसें औटहातपणें । जें शव होऊनि जिणें । उपजों उपजों मरणें । नावांनावां ॥ ७९ ॥ तियें गर्भ-मेदमुसें । रक्तमूत्ररसें । वोतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें ॥ १८० ॥ हें बहु असो देहपणें । नांवारूपासि येणें । नाहीं लाजिरवाणें । याहूनि ॥ ८१ ॥ ऐसैसिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा । ते लाज पैं निर्मळा । निसुगा गोड ॥ ८२ ॥ आतां सूत्रतंतु तुटालिया । चेष्टाचि ठाके सायखडिया । तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां । खुंटे गती ॥ ८३ ॥ कीं मावळलिया दिनकरु । सरे किरणांचा पसरु । तैसा मनोजयें प्रचारु । बुद्धींद्रियांचा ॥ ८४ ॥ एवं मनपवननियमें । होती दाही इंद्रियें अक्षमें । तें अचापल्य वर्मे । येणें होय ॥ ८५ ॥

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता । भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

बोखटें मरणाऐसें । तेंही आलें अग्निप्रवेशें । परी प्राणेश्वरोद्देशें । न गणीची सती ॥ ८६ ॥ तैसें आत्मनाथाचिया आधी । लाऊनि विषयविषाची बाधी । धांवों आवडे पाणधी । शून्याचिये ॥ ८७ ॥ न ठाके निषेधु आड । न पडे विधीची भीड । नुपजेचि जीवीं कोड । महासिद्धींचें ॥ ८८ ॥ ऐसें ईश्वराकडे निज । धांवे आपसया सहज । तया नांव तेज । अध्यात्मिक तें ॥८९॥ आतां सर्वही साहातिया गारिमा । गर्वा न ये तेचि क्षमा । जैसें देह वाहोनि रोमा । वाहणें नेणें ॥ १९० ॥ आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीने खवळले रोग । अथवा योगावियोग । प्रियाप्रियांचे ॥ ९१ ॥ यया आघवियांचाचि थोरु । एके वेळे आलिया पुरु । तरी अगस्ति कां होऊनि धीरु । उभा ठाके ॥ ९२ ॥ आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका । ते

कौतुकानें सुद्धां, जीव विषयांची इच्छा करीत नाहीं. अलोलुपत्वाची ( अनासक्ततेची ) प्रसिद्ध अवस्था ती ही ( आहे ), असें समज. १६७. आतां मधमाशांना जसें मोहोळ ( सुखकर वाटतें ) अथवा जलचरांना जल ( जसें सुखकर असतें ), अथवा पक्ष्यांना जसें आकाश संचार करण्याला मोकळें असतें, १६८. अथवा आईचें लेंकराविषयीं प्रेम जसें हळूवार असतें अथवा वसंतऋतूंतील मलयपर्वतावरून वाहात येणारा वारा स्पर्शाला जसा मऊ असतो; १६९. डोळ्यांना प्रिय वस्तूची भेट जशी सुखकर असते अथवा कासवीची दृष्टि तिच्या पिलांना जशी सुखकर असते, त्याप्रमाणें जें प्राणिमात्रांचे ठिकाणीं वागणें मऊ ( सुखकर ) असतें; १७०. स्पर्शाला अति मऊ, तोंडांत टाकला असतां चांगला रुचिकर आणि नाकाला चांगला वास देणारा आणि अंगानें स्वच्छ ( निर्मळ. ) १७१. तो वाटेल तेवढा घेतला असतां जर कोणालाही अपायकारक झाला नसता, तर तो कापूर ( या मार्दवाच्या ) उपमेला आला असता. १७२. जसें आकाश आपल्या पोटांत ( वायुआदि ) महाभूतांस धारण करतें; परंतु त्याचप्रमाणें तें ( आकाश ) परमाणूंमध्यें मावलें जातें आणि जसें हें विश्व आहे, तसें तें होतें. १७३. फार काय सांगूं ! असें जें जगाच्या जीवाप्राणांकरितां जगणें आहे, त्याचें नांव मार्दव आहे, असें मी ( श्रीकृष्ण ) म्हणतों. १७४. आतां ज्याप्रमाणें राजा पराभवामुळें लज्जेनें कष्टी होतो अथवा मानी पुरुष हीनदशेमुळें ( लाजेनें ) निस्तेज होतो; १७५. अथवा अंत्यजाच्या घराला जर सहज चुकून संन्यासी आला ( व हें चांडाळाचें घर आहे, असें त्यास कळलें तर ) मग त्या उत्तम पुरुषाला जशी लज्जा प्राप्त होते; १७६. क्षत्रियानें रणांतून पळून जाणें, हें लाजिरवाणें कृत्य कोणता क्षत्रिय सहन करील ? अथवा महापतिव्रतेला वैधव्य दाखविणाऱ्या नांवानें हांका मारणें ( कसें सहन होईल ? ) १७७. रूपवानाला जर कोड फुटलें तर अथवा संभावित पुरुषाला जर आळाचा डाग लागला तर त्या लाजेनें त्यांना जसें प्राणांवर संकट बेतल्यासारखें होतें; १७८. त्याप्रमाणें साडेतीन हात ( शरीरच ) स्वतःस समजून जें प्रेतासारखें होऊन जगावें व वारंवार जन्मास येऊन मरावें, १७९. गर्भांतील त्या मेदाच्या मुशींत, रक्त व वीर्य या रसांचा ओतलेला पुतळा होऊन राहाणें, तें लाजिरवाणें होय, १८०. हें फार बोलणें पुरे. आपण देहच आहोंत, अशी समजूत ठेवून नामरूप यांचा अंगीकार करणें, याहून दुसरी लाजिरवाणी गोष्ट नाहीं. १८१. अशी दुर्दशा होते, म्हणून ते शरीराची शिसारी घेतात; जड देहाशीं तादात्म्य करून राहाण्याची लाज समजुतदार पुरुषास असते. पण निर्लज्ज पुरुषाला शरीराशीं तादात्म्य करून राहण्याचें बरें वाटतें. १८२. आतां कळसूत्री बाहुली नाचविण्याची दोरी तुटली, म्हणजे त्या बाहुलीची हालचाल जशी बंद पडते, त्याप्रमाणें प्राणांच्या जयानें कर्मेंद्रियांचे व्यापार बंद पडतात. १८३. अथवा सूर्य मावळल्यावर जसा किरणांचा विस्तार नाहींसा होतो, त्याप्रमाणें मन जिंकलें असतां ज्ञानेंद्रियांचे व्यापार बंद पडतात. १८४. याप्रमाणें मन व प्राण यांचें नियमन केलें, म्हणजे दहाही इंद्रियें पंगु होतात. अचापल्य जें म्हणतात, तें या वर्मानें होतें. १८५.

तेज, क्षमा, धैर्य, शौच, अद्रोह, स्वतःच्या मानाचा अभाव, ( हे गुण ) दैवी संपत्तींत जन्म पावलेल्या मनुष्यामध्यें असतात. ३.

मरणासारखी वाईट गोष्ट प्राप्त झाली व तीही अग्निप्रवेशानें करण्याचा प्रसंग आला, परंतु ती गोष्ट नवऱ्याच्या हेतूनें करावयाची असल्यामुळें, पतिव्रता स्त्री त्या गोष्टीला मोजीतच नाहीं. १८६. त्याप्रमाणें आत्मनाथाच्या चिंतेमुळें विषयरूप विषाची बाधा नाहींशी करून, शून्याच्या कांटेरी मार्गानें त्यास धांवणें आवडतें. १८७. निषेध त्याच्या आड येत नाहीं, त्याला विधीची भीड पडत नाहीं व महासिद्धींची आवड त्याच्या जीवांत उत्पन्न होत नाहीं, १८८. अशा प्रकारें परमेश्वराकडे अंतःकरण सहज आपोआप धांव घेतें; अध्यात्मिक तेज, हें त्याला म्हणतात. १८९. आतां ' आपण सर्वही सहन करतों ' या विचारानें येणाऱ्या मोठेपणाच्या योगानें जें गर्वाला न येणें, तीच क्षमा होय. तें कसें, तर ज्याप्रमाणें देह जरी आपल्यावरील सर्व केसांना धारण करतो, तरी ' आपण सर्व केंस धारण करतो ' याची त्यास खबरही नसते, त्याप्रमाणें. १९०. आणि विषयसेवनाविषयीं इंद्रियांची प्रवृत्ति हद्दीबाहेर वाढली असतां अथवा प्रारब्धयोगानें रोग खवळले असतां अथवा प्रिय वस्तूचा वियोग व अप्रिय वस्तूचा योग झाला असतां, १९१. या सर्वांचा एकाच वेळीं पूर आला असतां, तो सहन करण्यास जें धैर्य अगस्ति होऊन उभें राहतें, ( प्रतिकार करण्यास तयार होतें. ) १९२. आकाशामध्यें मोठ्या जोरानें धुराचा लोट सहसा उठला असतां, त्या धुराच्या लोटाला

गिळी येकीं झुळुका । वारा जेवीं ॥ ९३ ॥ तैसें अधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां । पातलेया पांडवा । गिळूनि घाली ॥ ९४ ॥ आतां ईश्वरप्राप्तीलागीं । प्रवर्तता ज्ञानयोगीं । धिंवसेयाची आंगीं । उणीव नोहे ॥ ९५ ॥ ऐसें चित्तक्षोभाचां अवसरीं । उचलूनि धैर्या जें चांगावें करी । धृती म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥ ९६ ॥ आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगें पीयूखें । तया कलशाचियासारिखें । शौच असे ॥ ९७ ॥ जे आंगीं निष्काम आचारु । जीवीं विवेकु साचारु । तो सबाह्य घडला आकारु । शुचित्वाचा ॥ ९८ ॥ कां फेडित पाप ताप । पोखीत तीरींचे पादप । समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ ९९ ॥ कां जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचीं राउळें उघाडितु । निघे जैसा भास्वतु । प्रदक्षिणे ॥ २०० ॥ तैसीं बांधलीं सोडित । बुडालीं काढित । सांकडी फेडित । आर्तांचिया ॥ १ ॥ किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नति । आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥ २ ॥ वांचूनि आपुलिया काजालागीं । प्राणिजातांचां अहितभागीं । संकल्पाचीही आडवंगी । न करणें जें ॥ ३ ॥ पैं अद्रोहत्व ऐशिया गोष्टी । ऐकसी जिया किरीटी । तें सांगितलें हें दिठी । पाहों ये तैसें ॥ ४ ॥ आणि गंगा शंभूचां माथां । पावोनि संकोचे जेवीं पार्था । तेवीं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें ॥ ५ ॥ तें हें पुढत पुढती । अमानित्व जाण सुमती । मागां सांगितलेंसे किती । तेंचि तें बोलों ॥ ६ ॥ एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे । मोक्षचक्रवर्तीचें जैसें । अग्रहार होय ॥ ७ ॥ नाना हें संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीच नवी । निर्विण्णसगरांची दैवी । गंगाचि आली ॥ ८ ॥ कीं गुणकुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा । वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ॥ ९ ॥ कीं सव्विसेंगुणज्योती । इहीं उजळूनि आरती । गीता आत्मया निजपती । नीरांजना आली ॥ २१० ॥ उगाळितीं निर्मळें । गुण इयेंचि मुक्ताफळें । दैवीशुक्तिकळें । गीतार्णवींची ॥ ११ ॥ काय बहु वानूं ऐसी । अभिव्यक्ती ये अपैसी । केले दैवी गुणराशी । संपत्तिरूप ॥ १२ ॥ आतां दुःखाची आंतुवट वेली । दोषकाट्यांची जरी भरली । तरीं निजाभिधानीं घाली । आसुरी ते ॥ १३ ॥ पैं त्याज्य त्यजावयालागीं । जाणावी जरी अनुपयोगी । तरी ऐका ते चांगी । श्रोत्रशक्ती ॥ १४ ॥ तरी नरकव्यथा थोरी । आणावया दोषीं अघोरीं । मेळु केला ते आसुरी । संपत्ति हे ॥ १५ ॥ नाना विषवर्गु एकवटु । तया नांव जैसा वासटु । आसुरी संपत्ति हा खोटु । दोषांचा तैसा ॥ १६ ॥

दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च । अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

तरी तयाचि आसुरां । दोषांमाजीं जया वीरा । वाडपणाचा डांगोरा । तो दंभु ऐसा ॥१७॥ जैसी आपुली जननी । नग्न दाविलिया जनीं । तें तीर्थचि परी पतनीं । कारण होय ॥१८॥ कां विद्या गुरूपदिष्टा । बोभाइलिया चोहटां । इष्टदा परी अनिष्टा । हेतु होती ॥१९॥ पैं आंगें बुडतां

जसा वारा एका बुळुकेसरसा गिळून टाकतो; १९३. अर्जुना, त्याप्रमाणें आधिभौतिक, आधिदैविक, आणि अध्यात्मिक ताप (दुःख) प्राप्त झालें असतां, त्या सर्वांस जें धैर्य गिळून टाकतें. १९४. आतां ईश्वर-प्राप्तीचे दोन मार्ग जे ज्ञान व योग (अष्टांगयोग) यांचें आचरण करीत असतां अंगामध्यें धैर्याचा कमी-पणा नसतो. १९५. याप्रमाणें चित्तांत गडबड होण्याचे प्रसंगीं जी सहनशीलतेला उचलून धरून चांगला पराक्रम गाजविते, तिला धृति असें म्हणतात, ऐक. १९६. आतां सोनें शुद्ध करून त्याची घागर केली व त्यांत गंगेचें अमृततुल्य पाणी भरून ठेवलें. त्या गंगेच्या पाण्यानें भरून ठेवलेल्या आंतबाहेर स्वच्छ असलेल्या सोन्याच्या घागरीप्रमाणें शौच (शुद्धपणा) आहे. १९७ ज्याचे शरीराच्या ठिकाणीं कर्माचें निष्काम आचरण आहे व अंतःकरणांत खराखरा विवेक (आत्मानात्म-विचार) आहे, तो आंतबाहेर शुचित्वाची मूर्तीच बनलेली आहे. १९८. अथवा ज्याप्रमाणें गंगेचें पाणी, जगाचें पाप व ताप नाहींसें करीत आणि कांठावरील झाडांचें पोषण करीत, समुद्राला जाऊन मिळतें; १९९. अथवा जगाचा अंधार नाहींसा करीत अथवा लक्ष्मीचें निवासस्थान जें सूर्यविकासनी कमळ, त्याचा विकास करीत, जसा सूर्य प्रदक्षिणेला निघतो. २००. त्याप्रमाणें अविद्येनें बांधलेल्यास मुक्त करीत, संसारसमुद्रांत बुडा-लेल्यांना बाहेर काढीत व अध्यात्मादि दुःखांनीं पिडलेल्यांच्या संकटांचें निवारण करीत, २०१. फार काय सांगावें! रात्रंदिवस दुसऱ्याचें सुख वाढवीत वाढवीत आत्महितांत प्रवेश करणें, २०२. एवढेंच काय! पण आपल्या कामाकरितां प्राणिमात्रांच्या अहिताविषयीं संकल्पाचीही आडकाठी जें न करणें (म्हणजे आपल्या कामाकरितां कोणाही प्राण्याचें अहित झालें तरी त्याची पर्वा नाहीं, असा विचारही मनांत जें न आणणें.) २०३. अर्जुना, अद्रोहत्व अशा ज्या गोष्टी तूं ऐकतोस, तें अद्रोहत्व तुला प्रत्यक्ष दृष्टीनें पाहतां येईल, अशा तऱ्हेनें हें सांगितलें आहे. २०४. आणि अर्जुना, शंकराच्या मस्तकावर येऊन जशी गंगा संकोचित झाली, त्याप्रमाणें स्वतः मानाला योग्य असूनही, लोकांनीं मानलें असतां, जें पूर्णपणें लज्जित होणें, २०५. अर्जुना, अमानित्व जें म्हणतात, तें हें समज, हें मीं मागें तुला तेराव्या अध्यायांत सांगितलेंच आहे. तेंच तें पुनः पुनः किती सांगूं? २०६. याप्रमाणें या सव्वीस गुणांच्या रूपानें, हें ब्रह्मऐश्वर्य वास्तव्य करीत आहे. मोक्षरूपी सार्वभौम राजाचे, हे सव्वीस गुण, जणूंकाय दिलेलें गांव अगर इनामी जमीन आहेत. २०७. अथवा या सव्वीस गुणरूप तीर्थांनीं नित्य नवी भरलेली अशी ही दैवी संपत्तिरूपी गंगा, विरक्तपुरुषरूपी सगरांच्या दैवानें प्राप्त झाली आहे. २०८. अथवा मुक्तिरूपी मुलगी, या सव्वीस गुणरूपी फुलांची माळा घेऊन, वैराग्यानें निरपेक्ष झालेल्या पुरुषाचा गळा शोधीत आहे; २०९. अथवा सव्वीस गुणरूपी वाती पेटवून (जणूंकाय) गीता ही, आपला पति जो आत्मा, त्याला आरती ओंवाळण्या-करितां आली आहे; २१०. गीतारूपी समुद्रांतील दैवी संपत्तिरूपी शिंपला आहे व त्या शिंपल्याच्या शकलांतून हीं सव्वीस गुणरूपी बाहेर पडणारीं निर्मळ मोत्यें आहेत. २११. फार काय वर्णन करूं! आपोआप स्पष्ट होईल अशा रीतीनें दैवी संपत्तीच्या गुणांच्या समुदायाचें वर्णन केलें. २१२. आतां दुःखाची बळकट वेली (असून) दोषरूपी काट्यांनीं जरी ती भरलेली आहे, तरी ती आसुरी संपत्ति मी माझ्या सांगण्याच्या व्याख्यानांत घालतों. २१३. परंतु आसुरी संपत्ति ही त्याज्य असल्यामुळें जरी अनुपयोगी आहे, तरी तिचा त्याग करण्याकरितां ती जाणली पाहिजे; म्हणून तूं ती आसुरी संपत्ति कानाच्या चांगल्या बळानें ऐक. २१४. तरी नरकांतील दुःख वाढविण्याकरितां भयंकर दोषांनीं जो जमाव केला, ती ही आसुरी संपत्ति होय. २१५. अथवा सर्व विषें एकत्र झालीं म्हणजे त्याला जसें कालकूट विष नांव आहे, त्याप्रमाणें सर्व दोषांच्या लगडीला आसुरी संपत्ति हें नांव आहे. २१६.

हे पार्था, दांभिकपणा, मस्ति, अभिमान, क्रोध, निष्ठुरता, अज्ञान (हे गुण) आसुरी संपत्तींत जन्म पावलेल्या मनुष्यामध्यें असतात. ४.

अर्जुना, त्या आसुर दोषांमध्यें ज्याची मोठेपणाची ख्याति आहे, तो दंभ असा आहे. २१७. ज्याप्रमाणें आपली आई ही तीर्थाप्रमाणेंच पावन करणारी आहे, परंतु लोकांत तिची उघडपणें निर्भत्सना केली असतां, ती अधोगतीला नेण्याला कारण होते. २१८. अथवा, गुरूनें उपदेशिलेली (ब्रह्म) विद्या ही इष्ट फल देणारी खरी, परंतु ती चव्हाट्यावर प्रसिद्ध केली असतां अकल्याणास कारणीभूत होते. २१९. आपण स्वतः महापुरांत

महापूरीं। जे वेगें काढी पैलतीरीं। ते नावचि बांधिलिया शिरीं। बुडवी जैसी ॥ २२० ॥ कारण जें जीविता। तें वानिलें जरी सेवितां। तरी अन्नाचि पंडुसुता। होय विष ॥ २१ ॥ तैसा दृष्टादृष्टाचा सखा। धर्मु जाला तो फोकारिजे देखा। तरी तारिता तोचि दोखा–। लागीं होय ॥ २२ ॥ म्हणौनि वाचेचा चौबारा। घातलिया धर्माचा पसारा। धर्मुचि तो अधर्मु होय वीरा। तो दंभु जाणे ॥ २३ ॥ आतां मूर्खाचिये जिभे। अक्षराचा आंबुखा सुभे। आणि तो ब्रह्मसभे। न रिझे जैसा ॥ २४ ॥ कां मादुरी लोकांचा घोडा। गजपतिही मानी थोडा। कां कांटियेवरिलिया सरडा। स्वर्गुही नीच ॥ २५ ॥ तृणाचेनि इंधनें। आगी धांवे गगनें। थिल्लरवळें मीनें। न गणिजे सिंधु ॥२६॥ तैसा माजे स्त्रिया धनें। विद्या स्तुती बहुतें मानें। एकें दिवसींचेनि परान्नें। अल्पकु जैसा ॥ २७ ॥ अभ्रच्छायेचिया जोडी। निदैवु घर मोडी। मृगांबु देखोनि फोडी। पाणियाडें मूर्ख ॥ २८ ॥ किंबहुना ऐसैसें। उतणें जें संपत्तिमिसें। तो दर्पु गा अनारिसें। न बोलें घेईं ॥ २९ ॥ आणि जगा वेदीं विश्वासु। आणि विश्वासीं पूज्य ईशु। जगीं एक तेजसु। सूर्यचि हा ॥ २३० ॥ जगस्पृहे आस्पद। एक सार्वभौमपद। न मरणें निर्विवाद। जगा पाढियें ॥ ३१ ॥ म्हणौनि जरी उत्साहें। यांतें वानूं जाये। कीं तें आइकोनि मत्सरु वाहे। फुगों लागे ॥ ३२ ॥ म्हणे ईश्वरातें खायें। तया वेदा विष सूयें। गौरवामाजीं त्राये। भंगीत असे ॥ ३३ ॥ पतंगा नावडे ज्योती। खद्योता भानूची खंती। कां टिटिभेनें अपांपती। वैरी केला ॥ ३४ ॥ तैसा अहंनामाचेनि मोहें। ईश्वराचें नामही न साहे। वेदातें म्हणे मज हे। सवती जाली ॥ ३५ ॥ ऐसा मान्यतेचा पुष्टगंडु। तो अभिमानी परमलंडु। रौरवाचा रूढु। मार्गुचि तो हा ॥ ३६ ॥ आणि पुढिलांचे सुख। देखणियाचें होय मिख। चढे क्रोधाचें विख। मनोवृत्ती ॥ ३७ ॥ शीतळाचिये भेटी। तातला तेलीं आगी उठी। चंद्रु देखोनि जळे पोटीं। कोल्हा जैसा ॥ ३८ ॥ विश्वाचें आयुष्य जेणें उजळे। तो सूर्यु उदैला देखोनि सवळे। पापिया फुटती डोळे। डुडुळाचे ॥ ३९ ॥ जगाची सुखपहांट। चोरां मरणाहूनि निकृष्ट। दुधाचें काळकूट। होय व्याळीं ॥ २४० ॥ अगाधें समुद्रजळें। प्राशितां अधिकें जळे। वडवाग्नि न मिळे। शांति कहीं ॥४१॥ तैसा विद्याविनोदविभवें। देखे पुढिलांचीं दैवें। तंव तंव रोषु दुणावे। क्रोधु तो जाण ॥ ४२ ॥ आणि मन सर्पाची कुटी। डोळे नाराचांची सुटी। बोलणें ते वृष्टी। इंगळांची ॥ ४३ ॥ येर जें क्रियाजात। तें तिखयाचें कर्वत। ऐसें सबाह्य खसासित। जयाचें गा ॥ ४४ ॥ तो मनुष्यांत अधमु जाण। पारुष्याचें अवतरण। आतां आइक खुण। अज्ञानाची ॥ ४५ ॥ तरी शीतोष्णस्पर्शा। निवाडु नेणे पाषाणु जैसा। कां रात्री आणि दिवसा। जात्यंधु तो ॥ ४६ ॥ आगी उठिला आरोगणे। जैसा खाद्या-खाद्य न म्हणे। कां परिस पाडु नेणे। सोनया लोहा ॥ ४७ ॥ नातरी नानारसीं। रिघोनि दर्वी जैसी। परी रसस्वादासी। नेणे जेवीं ॥ ४८ ॥ कां वारा जैसा पारखी। नव्हेचि गा मार्गामार्गी-

बुडत असतांना जी नाव आपल्याला त्वरित काढून पलीकडच्या कांठाला पोहोंचविते, ती नावच आपण डोक्यावर बांधिली असतां जशी आपणाला बुडविते; २२०. अर्जुना, जगण्याला कारण जें अन्न, तें खात असतांना वर्णन करून बाजवीपेक्षां जास्त खाल्लें असतां ( अजीर्णामुळें ), तें अन्नच विषासारखें मारक होतें; २२१. त्याप्रमाणें इहपरलोकीं साह्य करणारा जो झालेला धर्म, तो प्रसिद्ध केला असतां, तो तारणाराच धर्म पातकाला कारण होतो. २२२. म्हणून आपण केलेल्या सर्व धर्मांचा विस्तार वाचेच्या चव्हाट्यावर ठेविला असतां, अर्जुना, तो धर्मच अधर्म होतो आणि तोच दंभ असें समज. २२३. आतां मूर्खांच्या जिभेवर एखाद्या अक्षराचा शितोडा पडला असतां ( त्याला चार अक्षरें आलीं असतां ), तो ब्रह्मदेवाच्या सभेमध्यें समाधान पावत नाहीं. ( प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या सभेला तुच्छ मानतो. ) २२४. अथवा तबेला ठेवणाऱ्या लोकांचा तबेल्यांतील ठाणबंदी घोडा जसा ऐरावतालाही कमी योग्यतेचा मानतो अथवा कांटेरी कुंपणावरील सरडाला स्वर्गही ठेंगणा वाटतो. २२५. गवताच्या जळणानें जशा अग्नीच्या ज्वाला आकाशांत धांवतात अथवा डबक्यांतील मासा आपल्या डबक्याच्या बळावर समुद्र मोजीत नाहीं. २२६. एक दिवसाच्या परान्नानें जसा दरिद्री-पुरुष उन्मत्त होतो, तसा जो स्त्रिया, धन, विद्या, स्तुति व बहुमान यांनी मस्त होतो. २२७. ढगांची छाया मिळाली असतां, जसा निर्दैवी पुरुष आपलें घर मोडतो अथवा ज्याप्रमाणें मूर्ख मनुष्य मृगजळ पाहून तळें फोडून टाकतो; २२८. फार काय सांगावें ! संपत्तीच्या योगानें अशा तऱ्हेनें जें मस्त होणें, तोच दर्प आहे, असें समज; वेगळें कांहीं बोलावयास नको. २२९. आणि सर्व जगाच्या विश्वासाचें ठिकाण ( एक ) वेद आहे अथवा सर्व विश्वाचा एक ईश्वरावर पूज्यभाव आहे. या जगांत तेजस्वी असा एक ( निर्विवादपणें ) ज्याप्रमाणें सूर्यच आहे. २३०. अथवा सार्वभौम राजाची गादी हेंच ज्याप्रमाणें सर्व जगाच्या महत्त्वाकांक्षेचें एक ठिकाण आहे अथवा आपण मरूं नये, हें निर्विवादपणें सर्व जगाला आवडतें. २३१. ( जगाचा वेदाच्या ठिकाणीं विश्वास आहे व ईश्वर जगाला वंद्य आहे. ) म्हणून जर आनंदानें कोणी यांचें ( वेद व ईश्वर यांचें ) वर्णन करूं लागले, तर तें ऐकून यांच्याविषयीं मत्सर वाहतो व गर्वानें फुगतो. २३२. तो म्हणतो, मी ईश्वराला खाईन, त्या वेदाला विष घालीन. आपला मोठेपणा मिरवण्यांत तो आपलें बळ नाहींसें करतो. २३३. पतंगाला दिव्याची ज्योत आवडत नाहीं, काजव्याला सूर्याचा त्रास वाटतो अथवा टिटवीनें समुद्राशीं वैर मांडलें, २३४. त्याप्रमाणें 'मी' या नांवाच्या भुलीनें त्याला ईश्वराचें नांवही सहन होत नाहीं व वेदाला म्हणतो, मला ही एक सवतच झाली. २३५. अशा प्रकारें त्याच मान्यतेचा असा मोठा ताठा असतो व तो अभिमानी पुरुष अतिशय उन्मत्त असून, खरच नरकाला जाण्याचा जो रहदारीचा मार्ग, तो हा ( पुरुष समजावा ). २३६. आणि दुसऱ्याचें सुख पाहावयाचें निमित्त झालें कीं, वृत्तींत क्रोधाचें विष चढतें; २३७. तापलेल्या तेलाची व थंड पाण्याची भेट झाली असतां, त्या तापलेल्या तेलांत जसा जाळ उत्पन्न होतो ( अथवा ) ज्याप्रमाणें चंद्राला पाहून कोल्हा मनांत जळत असतो. २३८. ज्या सूर्याच्या योगानें विश्वाचें आयुष्य उजळतें, तो सूर्य प्रातःकाळीं उगवलेला पाहून, पापी घुबडाचे डोळे फुटतात. २३९. जगाला पहांट झाली कीं सुख होतें, परंतु चोराला पहांट ही मरणापेक्षां वाईट वाटते.(अथवा) सर्पांमध्यें दुधाचें काळकूट विष होतें. २४०. वडवाग्नि ( जसजसें अधिकाधिक ) अगाध समुद्राचें पाणी पितो, तसतसा तो अधिकाधिक भडकतो. त्याची कधीं तृप्ति होत नाहीं. २४१. त्याप्रमाणें विद्या, विनोद, ऐश्वर्य इत्यादिकांनीं युक्त अशीं दुसऱ्याचीं भाग्यें जों जों पहातो, तों तों, जो संताप दुप्पट होतो, तो क्रोध समज. २४२. आणि ज्याचें मन सर्पाचें वारूळ असतें ( म्हणजे ज्याच्या मनांत घातक संकल्प असतात ), ज्याचे डोळे म्हणजे बाणांची वृष्टि आहे व ज्याचें बोलणें म्हणजे निखाऱ्यांची वृष्टीच होय. २४३. इतर ज्या त्याच्या सर्व क्रिया, त्या पोलादाच्या करवतासारख्या असतात. याप्रमाणें ज्याचें अंतर्बाह्य कठोर आहे. २४४. तो मनुष्यांमध्यें अधम आहे, असें समज. तो कठीणपणाची मूर्ति आहे. आतां अज्ञानाचें लक्षण ऐक. २४५. तरी ज्याप्रमाणें दगड थंड व उष्ण या स्पर्शांचा भेद जाणत नाहीं; अथवा जन्मांध जसा रात्र व दिवस हा भेद जाणत नाहीं. २४६. अग्नि खावयास उठला म्हणजे जसा खाण्याचे कामीं योग्यायोग्य म्हणत नाहीं; अथवा परीस हा लोखंड व सोनें यांचा भेद जाणत नाहीं. २४७. अथवा ज्याप्रमाणें स्वयंपाकाची पळी अनेक रसांत प्रवेश करते, पण ती रसाची रुचि जाणत नाहीं. २४८. अथवा वारा जसा मार्गामार्गांची परीक्षा करणारा नसतो ( म्हणजे वारा

विखीं । तैसें कृत्याकृत्यविवेकीं । अंधपण जें ॥ ४९ ॥ हें चोख हें मैळ । ऐसें नेणोनियां बाळ । देखे तें केवळ । मुखींचि घाली ॥ २५० ॥ तैसें पापपुण्याचें खिचटें । करोनि खातां बुद्धिचेष्टे । कडु महुर न वाटे । ऐसी जे दशा ॥५१॥ तियें नाम अज्ञान । या बोला नाहीं आन । एवं साही दोषांचें चिन्ह । सांगितलें ॥ ५२ ॥ इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति दाटुगी । जैसें थोर विषय सुभगे अंगीं । अंग सानें ॥५३॥ कां तिघा वन्हींची पांती । पाहतां थोडे ठाय गमती । परी विश्वही प्राणाहुती । करूं न पुरे ॥ ५४ ॥ धातयाही गेलिया शरण । त्रिदोषीं न चुके मरण । तया तिहींची दुणी जाण । साही दोष हे ॥ ५५ ॥ इहीं साही दोषीं संपूर्णा । जाली इयेचि उभारणी । म्हणौनि आसुरी उणी । संपदा नव्हे ॥ ५६ ॥ परी क्रूरग्रहांची जैसी । मांदी मिळे एकेचि राशी । कां येती निंदकापासीं । अशेष पापें ॥ ५७ ॥ मरणाराचें आंग । पडिघाती अघवे रोग । कां कुमुहूर्तीं दुर्योग । एकवटती ॥ ५८ ॥ कां आयुष्य जातिये वेळे । शेळिये सातवेउळि मिळे । तैसे साही दोष सगळे । जोडती तया ॥ ५९ ॥ विश्वासला आतुडवीजे चोरा । शिणला सुइजे महापुरा । तैसें दोषीं इहीं नरा । अनिष्ट कीजे ॥ २६० ॥ मोक्षमार्ग्याकडे । जैं यांचा आंबुखा पडे । तैं न निघेचि ऐसें म्हणौनि बुडे । संसारीं तो ॥ ६१ ॥ अधमां योनींचां पाउटीं । उतरत जो किरीटी । स्थावरांही तळवटीं । बैसणें घे ॥ ६२ ॥ हें असो तयाचां ठायीं । मिळोनि साही दोषीं इहीं । आसुरी संपत्ति पाहीं । वाढविजे ॥ ६३ ॥ ऐसिया या दोन्ही । संपदा प्रसिद्धा जनीं । सांगितालिया चिन्हीं । वेगळाला ॥ ६४ ॥

दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता । मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥

इया दोन्हींमाजीं पहिली । दैवी जे म्हणितली । ते मोक्षसूर्यें पाहली । उखाचि जाण ॥ ६५ ॥ येरी जे दुसरी । संपत्ति कां आसुरी । ते मोहलोहाची खरी । सांखळी जीवां ॥ ६६ ॥ परि हें आइकोनि झणें । भय घेसी हो मनें । काय रात्रीचा दिनें । धाकु धरिजे ॥ ६७ ॥ हे आसुरी संपत्ति तया । बंधालागीं धनंजया । जो साही दोषां ययां । आश्रो होये ॥ ६८ ॥ तूं तंव पांडवा । सांगितलेया दैवा । गुणनिधी बरवा । जन्मलासी ॥ ६९ ॥ म्हणौनि पार्था तूं या । दैवी संपत्ती स्वामिया । होऊनि यावें उवाया । कैवल्याचिया ॥ २७० ॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च । दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

आणि दैवां आसुरां । संपत्तिवंतां नरां । अनादिसिद्ध उजरा । राहाटीचा आहे ॥ ७१ ॥ जैसें रात्रीचां अवसरीं । व्यापारिजे निशाचरीं । दिवसा सुव्यवहारीं । मनुष्यादिकीं ॥ ७२ ॥ तैसिया आपुलालिया रहाटीं । वर्तती दोनी सृष्टी । दैवी आणि किरीटी । आसुरी येथ ॥ ७३ ॥ तेवींचि विस्तारूनि दैवी । ज्ञानकथनादि प्रस्तावीं । मागील ग्रंथीं बरवी । सांगितली ॥७४॥ आतां आसुरी जे सृष्टि । तेथिंची उपलऊं गोठी । अवधानाची दिठी । दे पां निकी ॥ ७५ ॥

जसा बऱ्यावाईट मार्गांनीं वाहात असतो ), त्याप्रमाणें कृत्याकृत्याच्या विचाराविषयीं जें आंधळेपण ( असतें ). २४९. हें स्वच्छ, हें मळकट, असें न जाणून लहान मूल जी वस्तु पाहातें, ती केवळ मुखांतच घालतें; २५०. त्याप्रमाणें पाप व पुण्य यांची सरमेसळ करून, ती खिचडी बनवून खात असतां त्याच्या बुद्धीच्या व्यापारास ती चांगली–वाईट असें कांहींच तारतम्य कळेनासें होतें, अशी जी परिस्थिति. २५१. तिला अज्ञान हें नांव आहे. या बोलण्यांत कांहीं अन्यथा नाहीं. अशा प्रकारें दंभादि सहाही दोषांचीं लक्षणें सांगितलीं. २५२. या दंभादि सहा दोषांच्याच अंगांनीं ही आसुरी संपत्ति बलवान् झाली आहे. ( जरी ही सहाच दोषांनीं बनलेली आहे, तरी ही कमी समजूं नये. तें कसें, तर ) ज्याप्रमाणें एखाद्या सुंदर स्त्रीचा बांधा आटोपशीर असला, तरी तिच्यांत कामेच्छा फार असते. २५३. अथवा तीन अग्नींची ( प्रलयाग्नि, विद्युताग्नि, वडवाग्नि ) पंगत ( संख्या ) पाहतां ते थोडे आहेत, असें वाटतें. पण ते ( जर खायला निघाले तर ) त्यांना प्राणाहुति करण्याला विश्व पुरणार नाहीं. २५४. कफ, वात, पित्ताचा क्षोभ, हा त्रिदोष झाला असतां, ब्रह्मदेवाला जरी शरण गेलें तरी देखील मरण चुकत नाहीं. त्या तीन दोषांची, हे सहा दोष, ही दुप्पट आहे, असें समज ! ( मग हे किती भयंकर असतील !) २५५. या संपूर्ण सहा दोषांनीं या आसुरी संपत्तीची उभारणी झाली आहे. म्हणून आसुरी संपत्ति कमी आहे असें नाहीं. २५६. परंतु अनिष्ट ग्रहांचा योग जसा एकाच राशीला यावा अथवा निंदकाजवळ जशीं सर्व पापें येतात; २५७. मरणाऱ्या पुरुषाचें शरीर जसें सर्व रोग व्यापतात; अथवा वाईट मुहूर्तांचे ठिकाणीं वाईट योग एकत्र होतात. २५८. अथवा शेळीचें आयुष्य संपत आलें म्हणजे तिला सात नांग्यांच्या इंगळीचा योग व्हावा, त्याप्रमाणें हे सर्वच्या सर्व साही दोष ( ज्याचा नाशकाल येतो ) त्यास प्राप्त होतात. २५९. एखाद्यावर विश्वास ठेवलेल्या मनुष्यास जसें ( ज्याच्यावर विश्वास ठेवला ) त्यानें चोराकडून सांपडवावें अथवा दमलेल्या भागलेल्या मनुष्यास जसें महापुरांत घालावें, त्याप्रमाणें या सहा दोषांकडून मनुष्याचें अकल्याण केलें जातें. २६०. मोक्षाच्या मार्गानें जाणारावर जर यांचा ( दंभादि सहा दोषांचा ) शिंतोडा पडला ( म्हणजे यांचा त्या मोक्ष-मार्गास थोडासा संबंध झाला ), तर 'मी संसारांतून निघणारच नाहीं,' असें म्हणून तो संसारांत बुडी देतो. २६१. अर्जुना, जो अधम योनींच्या पायऱ्यांनीं उतरत उतरत ( अधम योनींत खालीं खालीं जन्म घेत घेत ) स्थावर योनींच्याही तळापर्यंत येऊन पडतो. २६२. हें बोलणें राहूं दे. हे सहा दोष एकत्र होऊन त्यांच्या-कडून, त्याच्या ठिकाणीं, आसुरी संपत्ति वाढविली जाते. पहा. २६३. अशा या लोकांत प्रसिद्ध असलेल्या दोन्ही संपत्ती वेगवेगळ्या लक्षणांनीं सांगितल्या. २६४.

**दैवी संपत्ति मोक्षाला कारण होते, आसुरी (संपत्ति) बंधनाला कारण होते, असें मानलें आहे. हे पांडवा, तूं शोक करूं नकोस, (कारण) तूं दैवी संपत्तींत जन्माला आला आहेस. ५.**

या दोहींमधील पहिली, जी दैवी संपत्ति म्हणून म्हटलेली आहे, ती मोक्षरूपी सूर्यानें उजाडलेली पहांटच आहे, असें समज. २६५. इतर दुसरी जी आसुरी संपत्ति, ती मोहरूपी लोखंडाची जिवाला खरोखर सांखळी (बेडी) होय. २६६. परंतु हें आसुरी संपत्तीचें वर्णन ऐकून कदाचित् तूं मनांत भय घेशील हो ! ( तर तुला भय घ्यावयास नको. कां तर ) दिवसानें रात्रीचा धाक धरावा काय ! २६७. अर्जुना, ही आसुरी संपत्ति त्याला बंधनकारक होते कीं, जो ह्या सहा दोषांना आश्रय होतो. २६८. अर्जुना, तूं तर सांगितलेल्या दैवी संपत्तींतील गुणांचा चांगला ठेवाच जन्मला आहेस. २६९. म्हणून अर्जुना, तूं या दैवी संपत्तीचा स्वामी होऊन मोक्षाच्या सुखाला प्राप्त हो. २७०.

**या लोकीं दैवी आणि आसुरी अशा दोन प्रकारचे प्राणी उत्पन्न होत असतात. हे पार्था, दैवी मी विस्तारानें सांगितली, (आतां) आसुरी श्रवण कर. ६.**

आणि दैवीसंपत्तीवान् व आसुरीसंपत्तीवान् लोकांचे वागणुकीचे अनादिसिद्ध मार्ग आहेत. २७१. ज्याप्रमाणें रात्रीचे वेळीं निशाचरांनीं ( पिशाच वगैरेंनीं ) व्यापार करावा व दिवसा मनुष्यादिकांनीं चांगल्या व्यवहारामध्यें वागणूक करावी; २७२. त्याप्रमाणें अर्जुना, दैवी सृष्टीचे व आसुरी सृष्टीचे लोक या जगांत आपापल्या वागणुकीच्या रीतीनें वागतात. २७३. या ग्रंथाच्या मागच्या भागांत ज्या वेळेस ज्ञान सांगण्याचा प्रसंग आला, त्याहि वेळेस दैवी संपत्तीचा चांगला विस्तार केला होता. २७४. आतां आसुरी संपत्तीचे जे लोक आहेत, त्यांची गोष्ट विस्तार करून सांगूं, तूं अवधानाची चांगली दृष्टि दे. २७५.

तरी वाद्येंवीण नादु । नेदी कवणाही सादु । कां अपुष्पीं मकरंदु । न लभे जैसा ॥७६॥ तैसी प्रकृति हे आसुर । एकली नोहे गोचर । जंव एकाधें शरीर । माल्हातीना ॥ ७७ ॥ मग आविष्करला लांकुडें । पावकु जैसा जोडे । तैसी प्राणिदेहीं सांपडे । आटोपली हे ॥ ७८ ॥ ते वेळीं जे वाढी ऊंसा । तेचि आंतुला रसा । देहाकारु होय तैसा । प्राणियांचा ॥७९॥ आतां तयांचि प्राणियां । रूप करूं धनंजया । घडले जे आसुरीया । दोषवृद्धी ॥ २८० ॥ तरि पुण्यालागीं प्रवृत्ती । कां पापाविषयीं निवृत्ती । या जाणणेयाची राती । तयांचें मन ॥ ८१ ॥ निगणेया आणि प्रवेशा । चित्त नेदीतु आवेशा । कोशकिटु जैसा । जाचिन्नला पैं ॥ ८२ ॥ कां दिधलें मागुती येईल । कीं न ये हें पुढील । न पाहातां दे भांडवल । मूर्ख चोरां ॥ ८३ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः । न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोनी । नेणिजती आसुरीं जनीं । आणि शुचित्व स्वप्नीं । न देखती ते ॥ ८४ ॥ काळिमा सांडील कोळसा । वरी चोखी होईल वायसा । राक्षसही मांसा । विटों शके ॥ ८५ ॥ परी आसुरां प्राणियां । शौच नाहीं धनंजया । पवित्रत्व जेवीं भांडिया । मद्याचिया ॥ ८६ ॥ वाढविती विधीची आस । कां पाहाती वडिलांची वास । आचाराची भाष । नेणतीचि ते ॥ ८७ ॥ जैसें चरणें शेळियेचें । कां धांवणें वारियाचें । जाळणें आगीचें । भलतेउतें ॥ ८८ ॥ तैसें पुढां खांनि स्वैर । आचरती ते आसुर । सत्येंसि वैर । सदाचि तयां ॥ ८९ ॥ जरी नांगिया आपुलिया । विंचू करी गुदगुलिया । तरी साचा बोलिया । बोलती ते ॥ २९० ॥ अपानाचेनि तोंडें । जरी सुगंधा येणें घडे । तरी सत्य तयां जोडे । आसुरांतें ॥ ९१ ॥ ऐसें ते न करितां कांहीं । आंगेंचि वोखटे पाहीं । आतां बोलती ते नवाई । सांगिजेल ॥ ९२ ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् । अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

एऱ्हवीं करेयाचां ठायीं चांग । तें तयासि कैंचें नीट आंग । तैसा असुरांचा प्रसंग । प्रसंगें परिस ॥ ९३ ॥ उधवणीचें जेवीं तोंड । उगळी धुंवाचे उभड । हें जाणिजे तेवीं उघड । सांगों ते बोल ॥ ९४ ॥ तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो । चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेदु ॥ ९५ ॥ वेदीं अन्यायीं पडे । तो निरयभोगें दंडे । सन्यायी तो सुरवाडें । स्वर्गीं जिये ॥ ९६ ॥ ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था । इयेतें म्हणती ते वृथा । अवघेंचि हें ॥ ९७ ॥ यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसे प्रतिमालिंगीं । नागविले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ ९८ ॥ तेथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें वेंटाळें । हें वांचोनि कें वेगळें । पुण्य आहे ॥ ९९ ॥ ना अशक्तपणें आंगिकें । वेगळवेंटाळीं न टके । ऐसा गा।दिजे वीण विषयसुखें । तेंचि पाप ॥ ३०० ॥ प्राण घेपती संपन्नांचे । तें पाप जरी साचें । तरी सर्वस्व हाता ये तयांचें ।

तर वाद्याशिवाय जसा नाद कोणालाही शब्द देत नाहीं ( ऐकूं येत नाहीं ) अथवा फुलावांचून जसा सुवास मिळत नाहीं; २७६. त्याप्रमाणें ही आसुरी प्रकृति जेथपर्यंत एखाद्या शरीराचा आश्रय धरीत नाहीं, तोंपर्यंत ही एकटी अनुभवाला येत नाहीं. २७७. मग ज्याप्रमाणें लांकडांत अग्नि प्रगट झाला म्हणजे तो प्राप्त होतो, त्याप्रमाणें प्राण्यांच्या देहांत ही सांपडली गेली असतां, ही अनुभवास येते. २७८. त्या वेळीं, ज्याप्रमाणें उसाची जी वाढ असते, तीच आंतल्या रसाची वाढ असते; त्याप्रमाणें हिनें आश्रय केलेल्या प्राण्याचा देहाकार जसा वाढेल, तशीच ही आंत वाढत असते. २७९. अर्जुना, आतां जे प्राणी आसुरी प्रकृतीच्या दोषांच्या वाढीनें बनलेले आहेत, त्यांचें वर्णन करूं. २८०. तर पुण्याविषयीं प्रवृत्ति अथवा पापाविषयीं निवृत्ति यांना ( प्रवृत्ति व निवृत्ति यांना ) जाणण्याची रात्र, त्यांचें मन असतें ( म्हणजे पुण्यकर्म करावें, पापकर्म करूं नये, हा विचार त्यांच्या मनांत केव्हांही येत नाहीं. ) २८१. ज्याप्रमाणें कोशकीट आपलें घर बांधण्याच्या भरांत, आंत जाण्यायेण्याला दार ठेविलें पाहिजे, इकडे लक्ष न देतां, घर तयार करून त्यांत कोंडला जातो, २८२. अथवा आपण दिलेलें भांडवल हें परत येईल किंवा न येईल, या पुढील गोष्टीकडे लक्ष न देतां, जसा मूर्ख मनुष्य एखाद्या चोराला भांडवल देतो; २८३.

आसुरी ( संपत्तीचे ) मनुष्य ( धर्माचे ठिकाणीं ) प्रवृत्ति व ( अधर्माचे ठिकाणीं ) निवृत्ति जाणत नाहींत. पवित्रता, सदाचार अथवा सत्य यांपैकीं कांहीं त्यांच्यामध्यें नसतें. ७.

त्याप्रमाणें ( पुण्यकर्मांकडे ) प्रवृत्ति व ( पापकर्मांपासून) निवृत्ति, या दोन्ही आसुरी लोकांकडून जाणल्या जात नाहींत आणि शुचित्व तर ते स्वप्नांत सुद्धा पहात नाहींत. २८४. एखादे वेळीं कोळसा काळेपणाला टाकील, शिवाय कावळा पांढरा होईल, कदाचित्, राक्षस देखील मांसाला त्रिटूं शकेल; २८५. परंतु, अर्जुना, आसुरीसंपत्तीवान् प्राण्यांना शुचित्व ( कधींही ) नाहीं. ( तें कसें, तर ) ज्याप्रमाणें दारूच्या भांड्याला कधींही पवित्रत्व यावयाचें नाहीं त्याप्रमाणें, २८६. शास्त्राच्या विधीची आज्ञा वाढवतील अथवा वडिलांची आचरणाची रीत पाहातील अथवा धर्मशास्त्रानें सांगितलेल्या आचारानें वागतील, ही गोष्ट ते जाणत नाहींत. २८७. ज्याप्रमाणें शेळी वाटेल तें चरते अथवा वारा वाटेल तिकडे वाहातो किंवा अग्नि वाटेल त्या पदार्थाला जाळतो, २८८. त्याप्रमाणें स्वच्छंदीपणा पुढें करून, ते असुर आचरण करतात व त्यांचें नेहमींचेंच सत्याशीं वाकडें असतें. २८९. जर विंचू आपल्या नांगीनें गुदगुल्या करील, तर ते खरें भाषण करतील. २९०. जर गुदद्वारानें सुगंधाचें येणें घडेल, तर त्या आसुराना सत्याची प्राप्ति होईल. २९१. याप्रमाणें ते कांहीं एक न करतां स्वभावतःच वाईट असतात, पहा. आतां त्यांच्या बोलण्याचा विलक्षणपणा सांगण्यांत येईल. २९२.

( हें ) जग असत्य, ( धर्माधर्म ) व्यवस्थितिरहित आणि ईश्वररहित आहे; तें कामहेतुक व ( स्त्री पुरुषांच्या ) परस्पर संयोगानें उत्पन्न होणारें आहे, दुसरें काय ? असें ते म्हणतात. ८.

एऱ्हवीं उंटाचे अवयव, मग त्यांत चांगलें नीट अंग तें कोठचें ! त्याप्रमाणें असुरांचा प्रसंग आहे. पण प्रसंगानुसार सांगतों ऐक. २९३. धुराड्याचे तोंडांतून जसे धुराचे लोट निघतात, त्याप्रमाणें हें ( पुढील ) त्या असुरांचें बोलणें आहे, असें समज. तीं बोलणीं स्पष्ट सांगतों. २९४. तर विश्व हें ठिकाण अनादि चालत आलेलें आहे, व याचें नियमन करणारा राजा ईश्वर आहे; व न्याय व अन्याय यांचा निवाडा वेद, चावडीवर करतात. २९५. वेदाच्या दृष्टीनें जो अन्यायी ठरतो; त्यास नरकभोगाची शिक्षा होते व त्याच्या ( वेदाच्या ) दृष्टीनें जो न्यायी ठरतो, तो सुखानें स्वर्गांत राहतो. २९६. अर्जुना, अशी जी ही जगांतली व्यवस्था पुरातन कालापासून चालत आलेली आहे; तिला ते ( असुर ) हें सर्वच थोतांड आहे असें म्हणतात. २९७. यज्ञांचें ज्यांना वेड आहे, ते यज्ञांनीं फसले, देवाचें ज्यांना वेड आहे, ते प्रतिमा ( मूर्ति ) व लिंग यांनीं फसले. भगवें वस्त्र धारण करणारे ( संन्यासी ) व योगी, हे समाधीच्या भ्रमानें फसले. २९८. या जगांत आपल्या सामर्थ्यानें जें जें प्राप्त करून घेतां येईल, तें तें भोगावें; याशिवाय निराळें पुण्य कोठें आहे ! २९९. अथवा शरीराच्या अशक्तपणामुळें निरनिराळे भोग गोळा करतां येत नाहींत; अशा तऱ्हेनें जें विषयसुखावांचून पिडलें जाणें, तेंच पाप होय. ३००. श्रीमंतांचे प्राण घेणें हें जर खरोखर पाप आहे, तर त्यांचें सर्वस्व आपल्या हातीं येतें, हें खात्रीनें

हें पुण्यफळ कीं ॥ १ ॥ बळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय । तरी मासया कां न होय । निसंतान ॥ २ ॥ आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं । मेळवीजती प्रजासाधनीं । हेतु जरी ॥ ३ ॥ तरी पशुपक्षादि जाती । जया मिती नाहीं संतती । तयां कोणें प्रतिपत्ती । विवाह केले ॥ ४ ॥ चोरियेचें धन आलें । तरी तें कोणासि विष जालें । वालभें परद्वार केलें । कोढी कोणी होय ॥ ५ ॥ म्हणोनि देवो गोसावी । तो धर्माधर्मु भोगवी । आणि परत्राचां गांवीं । करी तो भोगी ॥ ६ ॥ परी परत्र ना देवो । न दिसे म्हणोनि तें वावो । आणि कर्ता निमे मा ठावो । भोग्यासि कवणु ॥ ७ ॥ येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं । तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु श्लाघे ॥ ८ ॥ म्हणौनि नरक स्वर्गु । नव्हे पापपुण्यभागु । जे दोहीं ठायीं सुखभोगु । कामाचाचि तो ॥ ९ ॥ याकारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में । मिळती तेथ जन्मे । आघवें जग ॥ ३१० ॥ आणि जें जें अभिलाषें । स्वार्थालागीं हें पोषे । पाठीं परस्परें द्वेषें । कामचि नाशी ॥ ११ ॥ एवं कामावांचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं । ऐसें बोलती पाहीं । आसुर ते ॥ १२ ॥ आतां असो हें किडाळ । बोली न करूं पघळ । सांगतांचि सफोल । होतसे वाचा ॥ १३ ॥

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः । प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

आणि ईश्वराचिया खंती । नुसधियाचि करिती चांथी । हेंही नाहीं चित्तीं । निश्चयो एकु ॥ १४ ॥ किंबहुना उघड । आंगीं भरूनियां पाखांड । नास्तिकपणाचें हाड । रोंविलें जीवीं ॥ १५ ॥ ते वेळीं स्वर्गालागीं आदरु । कां नरकाचा अडदरु । या वासनांचा अंकुरु । जळोनि गेला ॥ १६ ॥ मग केवळ ये देहखोडां । अमेध्योदकाचा बुडबुडा । विषयपंकीं सुहाडा । बुडाले गा ॥ १७ ॥ जैं आटावे होती जळचर । तैं डोहीं मिळती ढीवर । कां पडावें होय शरीर । तैं रोगा उदयो ॥ १८ ॥ उदैजणें केतूचें जैसें । विश्वा अनिष्टाचि दोषें । जन्मती ते तैसे । लोकां आटूं ॥ १९ ॥ विरूढलिया अशुभ । फुटती तैं ते कोंभ । पापाचे कीर्तिस्तंभ । चालते ते ॥ ३२० ॥ आणि मागांपुढां जाळणें । वांचूनि आगी कांहीं नेणे । तैसें विरुचि एक करणें । भलतेयां ॥२१॥ परी तेंचि गा करणें । आदरिती संभ्रमें जेणें । तो आइक पार्था म्हणे । श्रीनिवासु ॥ २२ ॥

काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः । मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्ततेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

तरी जाळ पाणियें न भरे । आगी इंधन न पुरे । तयां दुर्भरांचिये धुरे । भुकाळु जो ॥२३॥ तया कामाचा वोलावा । जीवीं धरूनि पांडवा । दंभमानाचा मेळावा । मेळविती ॥२४॥ मातलिया कुंजरा । आगळी जाली मदिरा । तैसा मदाचा ताठा तंव जरा । चढतां आंगीं ॥२५॥ आणि आग्रहा तोचि ठावो । वरि मोढ्याऐसा सावावो । मग काय वानूं निर्वाहो । निश्चयाचा ॥ २६ ॥ जिहीं

पुण्याचें फळ नाहीं काय ? ३०१. बलवान् हा अशक्ताला खातो, हेंच जर बाधक असेल, तर माशांचें निसंतान कां होत नाहीं ? ३०२. आणि दोन्हीं कुलांचा शोध करून, मुलगा व मुलगी यांचें शुभ ग्रहांनीं युक्त अशा वेळीं लग्न केलें जावें, हाच जर प्रजेचे उत्पत्तीविषयीं हेतु असेल, ३०३. तर पशुपक्ष्यादि ज्या जाति आहेत, त्यांच्या संततीची गणति नाहीं, त्यांचें कोणत्या विधिविधानानें लग्न केलें ? ३०४. चोरीचें द्रव्य कोणाजवळ आलें, तर तें कोणाला विष झालें आहे काय ? विषयावरील प्रेमानें जर कोणी व्यभिचार केला, तर तो कोडी होतो कीं काय ? ३०५. म्हणून देव मालक आहे, तो धर्माधर्म भोगावयास लावतो आणि जो येथें जें करतो, तें तो परलोकच्या गांवीं भोगतो, ३०६. परंतु परलोक ( भोगावयाचें ठिकाण ) अथवा ( भोगविणारा ) देव, हे दोन्ही प्रत्यक्ष दिसत नाहींत म्हणून ते व्यर्थ आहेत आणि धर्माधर्म करणारा ( देह ) तर मरून जातो. मग भोगायला ठिकाण कोण ? ३०७. या भोगाच्या कामीं इंद्र जितका उर्वशीच्या योगानें स्वर्गलोकांत सुखी आहे, तितकाच नरकांत लोळत असणारा किडादेखील (स्वतःला) सुखी समजतो. ३०८. म्हणून नरक व स्वर्ग हीं, पाप व पुण्य यांनीं मिळणारी ठिकाणें नाहींत. कारण कीं, दोन्ही ठिकाणीं कामाचाच सुखभोग ( सारखा ) आहे. ३०९. ह्या कारणास्तव स्त्री व पुरुषांची जोडपीं जेथें कामाच्या योगानें एकत्र होतील तेथें सर्व जग उत्पन्न होतें. ३१०. आणि आपल्या फायद्याकरितां जें जें लागेल, तें तें सर्व कामाकडून पोसलें जातें, नंतर परस्परांत द्वेष उत्पन्न करून कामच जगाचा नाश करतो. ३११. ह्याप्रमाणें जगाला कामाशिवाय दुसरें कांहीं मूळच नाहीं, असें ते असुर बोलतात, पहा ! ३१२. आतां हें वाईट बोलणें पुरे. ह्यासंबंधींच्या बोलण्यानें व्याख्यानाचा विस्तार करीत नाहीं, हें बोलण्यांतच वाचा निष्फळ होते. ३१३.

ह्या दृष्टीचा अंगीकार करून ज्ञान नष्ट झालेले अल्पबुद्धि, उग्रकर्मी व ( जगताचे ) शत्रु, असे ते जगताच्या नाशाला प्रवृत्त होतात. ९.

आणि ईश्वराच्या तिरस्कारानें ते नुसतीच बडबड करतात, इतकेंच नव्हे; त्यासंबंधींचा त्यांचे मनांत ( ईश्वर नाहीं हा ) एक दृढ निश्चय झालेला असतो. ३१४. फार काय सांगावें ! अंगामध्ये उघडपणें धर्मलंडपणा भरून, या ( नास्तिकांच्या ) अंतःकरणाचे वेशींत नास्तिकपणाचें हाड रोविलेलें असतें; ३१५. त्या वेळेस स्वर्गाविषयीं आदर अथवा नरकाविषयीं भय, ह्या वासनांचा अंकुर त्यांच्या चित्तांत जळून गेलेला असतो. ३१६. मग अर्जुना, अपवित्र उदकाच्या बुडबुड्याप्रमाणें केवळ क्षणिक जें शरीर, त्या शरीररूपी खोड्यांत सांपडून विषयरूपी चिखलांत बुडतात. ३१७. ज्या वेळेस जलचरांचा नाश व्हावयाचा असतो, त्या वेळेस त्या डोहावर धीवर प्राप्त होतात. अथवा शरीर पडण्याची वेळ आली म्हणजे रोगांचा उदय होतो, ३१८. जगाचें अनिष्ट होण्याकरितांच धूमकेतूचा जसा उदय होतो; त्याप्रमाणें लोकांचा नाश होण्याकरितां ते ( आसुरी लोक ) जन्मास येतात. ३१९. पाप उगवल्यावर त्याला जे कोंब फुटतात, ते, ते आसुरी लोक होत व ते आसुरी लोक पापाचे चालतेबोलते कीर्तिस्तंभच ( स्मारक ) आहेत ! ३२० आणि मार्गेपुढें असलेल्या पदार्थांस जाळावयाचें, यावांचून दुसरें जसें अग्नीला कांहीं ठाऊक नाहीं; त्याप्रमाणें वाटेल त्याला एक विरुद्धच करावयाचें ( एवढेंच ते आसुरी लोक जाणतात. ) ३२१. अर्जुना, परंतु तेंच विरुद्ध करण्याचें काम ज्या उत्साहानें ते आरंभ करितात, तो त्यांचा उत्साहाचा प्रकार ऐक; असें श्रीकृष्ण म्हणाले. ३२२.

दुर्भर अशा कामाचा आश्रय करून, दांभिकपणा, मान व गर्व यांनीं युक्त होत्साते मोहानें दुराग्रह धरून, ते अशुद्ध कर्मांचे ठिकाणीं प्रवृत्त होतात. १०.

तर जसें मासे धरण्याचें जाळें पाण्यानें भरत नाहीं, अग्नीला लांकडें कधीं पुरींशीं होत नाहींत, अशा कधींही तृप्त न होणाऱ्या वस्तूंमध्यें जो पहिल्या प्रतीचा हपापलेला आहे; ३२३. असा जो काम, अर्जुना, त्या कामाचा जीवाभावानें आश्रय करून, दंभ व मान यांचा समुदाय जमवितात. ३२४. अगोदरच हत्ती माजलेला व त्यांत आणखी दारूची भर पडलेली ( म्हणजे तो अधिकच उन्मत्त होतो ), त्याप्रमाणें हा आसुरी प्रकृतीचा मनुष्य मूळचाच मदाच्या ताठ्यानें भरलेला असून, त्यांत आणखी म्हातारपण शरीरावर येऊं लागलें म्हणजे तो अधिकच ताठून जातो; ३२५. आणि हट्टाला जागा तोच. त्याशिवाय मूर्खपणासारखा साह्य करणारा ( असें असल्यावर ) मग त्याच्या निश्चयाची स्थिरता काय वर्णन करावी ! ३२६. ज्याच्या योगानें दुसऱ्याला

परोपतापु घडे। परावा जीवु रगडे। तिहीं कर्मी होऊनि गाढे। जन्मवृत्ती ॥ २७ ॥ मग आपुलें केलें फोकारिती। आणि जगातें धिक्कारिती। दाहीं दिशीं पसरिती। स्पृहाजाळ ॥ २८ ॥ ऐसेनि गा आटोपें। थोरिये आणती पापें। धर्मधेनु खुरपें। सुटलें जैसें ॥ २९ ॥

चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः। कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

याचि येका आयती। तयाचिया कर्मप्रवृत्ती। आणि जिणियाही परौती। वाहती चिंता ॥ २३० ॥ पाताळाहूनि निम्न। जियेचिये उंचिये सानें गगन। जें पाहतां त्रिभुवन। अणुही नोहे ॥ ३१ ॥ ते योगपटाची मवणी। जीवीं अनियम चिंतवणी। जे सांडूं नेणे मरणीं। वल्लभा जैसी ॥ ३२ ॥ तैसी चिंता अपार। वाढविती निरंतर। जीवीं सूनि असार। विषयादिक ॥ ३३ ॥ स्त्रिया गाइलें आइकावें। स्त्रीरूप डोळां देखावें। सर्वेंद्रियीं आलिंगावें। स्त्रियेतेंचि ॥ ३४ ॥ कुरवंडी कीजे अमृतें। ऐसें सुख स्त्रियेपरौतें। नाहींचि म्हणौनि चित्तें। निश्चयो केला ॥ ३५ ॥ मग तयाचि स्त्रीभोगा–। लागीं पाताळ स्वर्गा। धांवती दिग्विभागा–। परौतेही ॥ ३६ ॥

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः। ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

आमिषकवळु थोरी आशा। न विचारितां गिळी मासा। तैसें कीजे विषयाशा। तयांसि गा ॥ ३७ ॥ वांछित तंव न पवती। मग कोरडियेचि आशेची संतती। वाढऊं वाढऊं होती। कोशकिडे ॥ ३८ ॥ आणि पसरिला अभिलाषु। अपूर्ण होय तोचि द्वेषु। एवं कामक्रोधांहूनि अधिकु। पुरुषार्थु नाहीं ॥ ३९ ॥ दिहा खोलणें रात्रीं जागोवा। ठाणांतरियां जैसा पांडवा। अहोरात्रींही विसांवा। भेटेचिना ॥ ३४० ॥ तैसें उंचौनि लोटिलें कामें। नेहटती क्रोधाचिये ढेमे। तरी रागद्वेष प्रेमें। न माती केंही ॥ ४१ ॥ तेविंचि जीवींचिया हांवा। विषयवासनांचा मेळावा। केला परी तो भोगावा। अर्थें कीं ना ॥ ४२ ॥ म्हणोनि भोगावयाजोगा। पुरता अर्थु पैं गा। आणावया जगा। झोंबती सैरा ॥ ४३ ॥ एकातें साधूनि मारिती। एकाचि सर्वस्वें हरिती। एकालागीं उभारिती। अपाययंत्रें ॥ ४४ ॥ पाशिकें पोतीं वागुरा। सुणीं ससाणे चिकाटी खोंचरा। घेऊनि निघती डोंगरा। पारधी जैसे ॥ ४५ ॥ ते पोसावया पोट। मारूनि प्राणियांचें संघाट। आणिती ऐसें निकृष्ट। तेंही करिती ॥ ४६ ॥ परप्राणघातें। मेळविती वित्तें। मिनलयां चित्तें। तोषणें कैसें ॥ ४७ ॥

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्। इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

म्हणे आजि मियां। संपत्ति बहुतेकांचिया। आपुलां हातीं केलिया। धन्यु ना मी ॥ ४८ ॥ ऐसा श्लाघों जंव जाये। तंव मन आणीकही वाहे। सर्वांचि म्हणे पाहे। आणिकांचेंही आणूं ॥ ४९ ॥ हें जेतुलें असे जोडिलें। तयाचेनि भांडवलें। लाभा घेईन उरलें।

पीडा होईल, परक्या जीवाचा नाश होईल, अशा कर्मांत ते ( असुर ) जन्मभर पक्के वतनदार होऊन रहातात. ३२७. मग आपण केलेल्या गोष्टीचा मोठा गाजावाजा करितात व सर्व जगाला तुच्छ मानतात व आपले हांवरूपी जाळें दाही दिशांना पसरतात. ३२८. याप्रमाणें वर सांगितलेल्या विकारांनीं व्यापले जाऊन, ते असुर पापें वाढवितात. ज्याप्रमाणें देवाला धर्मार्थ सोडून दिलेली गाय गवत, धान्य वगैरे सरसकट तोडीत जाते. ३२९.

तसेंच आमरणान्त ( विषयसुखोपभोगाच्या ) अमर्याद चिंतेनें ग्रासलेले, कामोपभोग हेंच अंतिम-साध्य आहे, असा ( मनाचा ) निश्चय केलेले ते असतात. ११.

याच एका सामुग्रीनें त्यांची कर्मप्रवृत्ति असते आणि ( ते असुर ) जगण्याच्याही पलीकडली चिंता वाहतात. ३३०. जी चिंता पाताळापेक्षां खोल असून तिच्या उंचीच्या मानानें आकाश ठेंगणें आहे व तिच्या विस्ताराकडे पाहिलें असतां त्रिभुवन हें अणूएवढेंही नाहीं; ३३१, नवीनच संन्यास घेतलेल्या मनुष्यास संन्यासदीक्षे-बरोबर आलेल्या नियमांची जशी सारखी घोकणी लागते, त्याप्रमाणें त्याच्या अंतःकरणांत अमर्याद चालणारी विवंचना असते, अथवा पतिव्रता स्त्री, पति मेला तरी त्याचा त्याग करण्याचा विचारही मनास शिवूं न देतां, त्याबरोबर सती जाते, तशी अखेरपर्यंत न सोडणारी चिंता त्याचे ठिकाणीं असते. ३३२. असार जे विषयादिक, त्याविषयीं इच्छा मनांत ठेवून, ते निरंतर अशी अमर्याद चिंता वाढवितात. ३३३. स्त्रियांनीं गाइलेलें ऐकावें, स्त्रीचें रूप डोळ्यांनीं पहावें व सर्वेंद्रियांनीं स्त्रीलाच आलिंगन द्यावें. ३३४. ज्या सुखावरून अमृत ओंवाळून टाकावें, असें सुख स्त्रीशिवाय इतर ठिकाणीं नाहींच, असा त्यांच्या चित्तानें निश्चय केलेला असतो. ३३५. मग त्याच स्त्रीभोगाकरितां पाताळ, स्वर्ग व (दाही) दिशांच्या विभागापलीकडेही धांवतात. ३३६.

शेंकडो आशापाशांनीं बद्ध झालेले काम-क्रोधपरायण होत्साते, आपल्या कामाच्या उप-भोगाकरितां, ते अन्यायानें द्रव्यसंचय करण्याची इच्छा करतात. १२.

ज्याप्रमाणें मासा विचार न करतां मोठ्या आशेनें आमिषाची उंडी गिळतो, त्याप्रमाणें विषयांच्या ठिकाणीं त्यांनीं आपली आसक्ति ठेवल्यामुळें त्यांची स्थिति होते. ३३७. इच्छित तर त्यांस प्राप्त होत नाहीं, मग कोरड्याच आशेपासून आशा वाढवीत वाढवीत कोशकिडे होतात. ३३८. आणि जी इच्छा वाढविलेली असेल, ती अपूर्ण होणें, तोच द्वेष होय. याप्रमाणें कामक्रोधापेक्षां ( त्यांच्या मतें ) अधिक योग्यतेचा पुरुषार्थ नाहीं. ३३९. अर्जुना, दिवसा यजमानापुढें चालणें व रात्रीं जागणें, ( पहारा करणें ) असा पहारा करणाऱ्या शिपायास जसा रात्रंदिवस विसांवा मिळतच नाहीं. ३४०. त्याप्रमाणें कामानें उंचावरून लोटलें असतां, क्रोधाच्या खडकावर आपटतात, तरी विषयांवरील प्रेमानें ( कोडगे बनून ) विषयासंबंधींची आवड व द्वेष हीं कोठें मावत नाहींत, एवढीं वाढतात. ३४१. त्याचप्रमाणें अंतःकरणांत हांव असल्यानें विषयवासनांचा समुदाय गोळा केला खरा; पण त्या अनेक विषयभोगांच्या वासना तृप्त करण्यास द्रव्य पाहिजेना ! ३४२. म्हणून विषयभोगाची पूर्तता होण्यास पुरेल इतकें द्रव्य आणावयाकरितां, मनाला येईल तसें जगाला लुटतात. ३४३. एकाला संधि साधून मारतात, एकाचें सर्वस्व हरण करतात व एकाकरितां अपायकारक युक्त्या योजितात. ३४४. फांसे, पोतीं, जाळीं, कुत्रीं, ससाणे, चिकाटे, भाले वगैरे घेऊन, जसे पारधी डोंगराकडे निघतात; ३४५. ते पारधी आपलें पोट पोसण्याकरितां जसे प्राण्यांचे समुदाय मारून आणतात, तसें नीच काम ते आसुरीप्रकृतीचे लोकही करतात. ३४६. दुसऱ्यांच्या प्राणांचा घात करून द्रव्य मिळवि-तात व तें द्रव्य मिळाल्यावर चित्ताच्या ठिकाणीं कसा संतोष मानतात ! ३४७.

आज मीं हें मिळविलें ( उद्यां ) माझा हा मनोरथ प्राप्त करून घेईन, माझें हें धन आहे, हें धन पुनरपि माझें होईल, १३.

तो म्हणतो, बहुतेकांचें द्रव्य आज मीं आपल्या हातीं आणलें. ( तेव्हां आतां ) मी धन्य नाहीं काय ? ३४८. असा जों जों आपली ( गर्वानें ) स्तुति करतो, तों तों मनांत आणखींच लोकांना लुटण्याची हांव बाळगतो व लागलीच म्हणतो कीं, उद्यां आणखीं दुसऱ्यांचेंही द्रव्य आणूं. ३४९. हें जेवढें द्रव्य मिळविलें आहे, त्याच्या भांडवलावर, उरलेलें स्थावरजंगमात्मक जगत् मीं फायद्यांत

चराचर हें ॥ ३५० ॥ ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया । मग दिठी पडे तया । उरों नेदी ॥ ५१ ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि । ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

हे मारिले ते वर थोडे । आणीकही साधीन गाढे । मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ॥ ५२ ॥ माझीं होतील कामारीं । तियेंवांचूनि येरें मारीं । किंबहुना चराचरीं । ईश्वरु तो मी ॥ ५३ ॥ मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखासी ठावो । म्हणोनि इंदुही वावो । मातें पाहूनि ॥ ५४ ॥ मी मनें वाचा देहें । करीं तें कैसें नोहे । के मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ॥ ५५ ॥ तंवचि बळिया काळु । जंव न दिसें मी अतुर्बळु । सुखाचा कीर निखळु । रासिवा मीचि ॥ ५६ ॥

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥

कुबेरु आथिला होये । परी तो नेणे माझी सोये । संपत्ती मजसम नव्हे । श्रीनाथाही ॥ ५७ ॥ माझिया कुळाचा उजाळू । कां जातिगोतांचा मेळू । पाहतां ब्रह्माही हळू । उणाचि दिसे ॥ ५८ ॥ म्हणोनि मिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवे । नाहीं मजसीं सरी पावे । ऐसें कोण्ही ॥ ५९ ॥ आतां लोपला अभिचारु । त्याचा करीन मी जीर्णोद्धारु । प्रतिष्ठीन परमारु । यागवरी ॥ ३६० ॥ मातें गाती वानिती । नटनाचें रिझविती । तयां देईन मागती । ते ते वस्तु ॥ ६१ ॥ माजिरा अन्नपानीं । प्रमदांचां आलिंगनीं । मी होईन त्रिभुवनीं । आनंदाकारु ॥ ६२ ॥ काय बहु सांगों ऐसें । ते आसुरीप्रकृतीपिसें । तुरंबिती असोसें । गगनौळें तियें ॥ ६३ ॥

अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः । प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

ज्वराचेनि आटोपें । रोगी भलतैसें जल्पे । चावळती संकल्पें । जाण ते तैसे ॥ ६४ ॥ अज्ञान आतलें धुळी । म्हणौनि आशा वाहटुळी । भोवंडीजती अंतराळीं । मनोरथांचां ॥ ६५ ॥ आनियम आषाढ मेघ । कां समुद्रोर्मी अभंग । तैसे कामिती अनेग । अखंड काम ॥ ६६ ॥ मग पैं कामनाचि तया । जिवीं जाल्या वेलरिया । वोरपिलीं कांटिया । कमळें जैसीं ॥ ६७ ॥ कां पाषाणाचिया माथां । हांडी फुटली पार्था । जीवीं तैसे सर्वथा । कुटके जाले ॥ ६८ ॥ तेव्हां चढतिये रजनी । तमाची होय पुरवणी । तैसा मोहो अंतःकरणीं । वाढोंचि लागे ॥ ६९ ॥ आणि वाढे जंव जंव मोहो । तंव तंव विषयीं रोहो । विषय तेथ ठावो । पातकांसी ॥ ३७० ॥ पापें आपलेनि थांवें । जंव करिती मेळावे । तंव जितांचि आघवे । येती नरक ॥ ७१ ॥ म्हणौनि गा सुमती । जे कुमनोरथां पाळिती । ते असुर येती वस्ती । तया ठाया ॥ ७२ ॥ जेथ असिपत्र-तरुवर । खादिरांगाराचे डोंगर । तातलां तेलीं सागर । उतताती ॥ ७३ ॥ जेथ यातनांची श्रेणी ।

प्राप्त करून घेईन. ३५०. अशा रीतीनें विश्वाच्या धनाला मी एकटाच मालक होईन. मग माझी दृष्टि ज्याच्यावर पडेल, त्याला मी उरूं देणार नाहीं. ( त्याचा नाश करीन. ) ३५१.

हा ( माझा ) शत्रु मीं मारला; दुसऱ्या शत्रूंना देखील मी मारीन; मी ईश्वर आहें, मी भोगी ( सुख भोगणारा ) आहें, मीं आज्ञासिद्ध, बलवान् व सुखी आहें. १४.

आजपर्यंत ( शत्रु ) मारले, परंतु हे थोडे असून आणखीही बलाढ्य ( शत्रु ) संधि साधून मारीन. मग मीच एकटा महत्त्वानें नांदेन. ३५२. जे माझे दास होतील, त्यांशिवाय इतरांना मी मारीन. फार काय सांगावें ! चराचरांत ईश्वर जो आहे, तो मी आहें. ३५३. मी भोगरूपी भूमीचा राजा ( सर्व भोगांचा मालक ) असल्याकारणानें आज सर्व सुखाला मी स्थान आहें. म्हणून, माझ्याशीं तुलना करून पाहिली असतां, इंद्र देखील तुच्छ आहे. ३५४. मी मनानें, वाचेनें अगर देहानें करीन तें कसें होणार नाहीं ? ज्याची आज्ञा सिद्धवत् आहे, असा माझ्याशिवाय दुसरा कोठें आहे ? ३५५. बिनजोड जो मी, त्या मला पाहिलें नाहीं, तोंपर्यंतच काळ हा बलवान् आहे. सुखाची केवळ सरोवर रास मीच आहें. ३५६.

मी धनवान् आहें, मी कुलीन आहें, माझ्यासारखा दुसरा कोणी आहे काय ? मी यज्ञ करीन, दान देईन, आनंद पावेन, इत्यादि प्रकारें अज्ञानानें मोहित झालेले, १५.

कुबेर संपन्न आहे, परंतु त्यास माझ्या ऐश्वर्याची योग्यता नाहीं. संपत्तीचे बाबतींत लक्ष्मीपति भगवान् देखील माझी बरोबरी करणार नाहीं. ३५७. माझ्या कुळाची शुद्धता अथवा जातीचा व गोताचा समुदाय पाहतां, ब्रह्मदेव देखील हलका व कमीच दिसतो. ३५८. म्हणून ईश्वर वगैरे सर्व आपलीं नांवें व्यर्थ मिरवितात. माझ्याशीं बरोबर पावेल, असा कोणी नाहीं. ३५९. आतां जारणमारण वगैरे लोपलें आहे, त्यांचा मी जीर्णोद्धार करीन व यज्ञाचे योगानें दुसऱ्याचा कांटा काढावा ( नाश करावा ) अशी रीत प्रचारांत आणीन. ३६०. मला जे गातील अथवा जे माझें वर्णन करतील अथवा नाचण्यानें



किंवा सोंगें आणण्यानें जे माझी करमणूक करतील, ते जी वस्तु मागतील, ती ती वस्तु मी त्यांना देईन. ३६१. मादक पदार्थांच्या खाण्यापिण्यानें व तरुण स्त्रियांच्या आलिंगनानें, मी त्रिभुवनांत आनंदाची मूर्ति होईन. ३६२. फार काय सांगूं ! आसुरीप्रकृतीनें असे वेडे झालेले ते, अशा त्या आकाशांच्या फुलांचा, अपरिमित वास घेतात. ३६३.

अनेक कल्पनांनीं चित्त भ्रमण पावलेले, मोहाच्या जाळ्यामध्यें गुरफटलेले, विषयोपभोग घेण्यामध्यें गर्क झालेले ( असे हे ), घाण अशा नरकामध्यें पतन पावतात. १६.

ज्वरानें व्यापल्यावर रोगी जसा वाटेल तसें बडबडतो, त्याप्रमाणें ते मनोरथांची वाटेल तशी बडबड करीत असतात, असें समज. ३६४. अज्ञानरूपी धुळींत सांपडले म्हणून आशारूपी वावटळीनें मनोरथरूपी आकाशांत (ते) फिरविले जातात. ३६५. आषाढ महिन्यांतील मेघ जसे अमर्यादित येत असतात अथवा समुद्रावर लाटा जशा एकसारख्या येत असतात, तसे ते आसुरी स्वभावाचे लोक सदोदित अनेक इच्छा करीत असतात. ३६६. मग त्या कामनाच अंतःकरणांत वेलीच्या जाळ्या झाल्या. जशी कांट्यावरून कमळें ओढावींत. ( म्हणजे त्या कमळांच्या जशा चिंधट्या होतात.) ३६७. अथवा अर्जुना, दगडावर मातीची घागर फुटली असतां जसे तिचे तुकडे तुकडे होतात, त्याप्रमाणें ( त्यांच्या ) अंतःकरणाचे अगदीं तुकडे तुकडे झालेले असतात. ३६८. रात्र जसजशी वाढते तसतसा जसा अंधकार वाढतो, त्याप्रमाणें तेव्हां अंतःकरणांत मोह वाढूं लागतो. ३६९. आणि जों जों मोह वाढतो, तों तों विषयांच्या ठिकाणीं वाढ व्हावयास लागते व जेथें विषय असतात, तेथें पापांना आश्रय असतो. ३७०. पापें आपल्या बळानें जों जों गर्दी करितात; तों तों जिवंतपणींच सर्व नरक येतात ( सर्व दुःखें येतात.) ३७१. म्हणून हे शुद्धबुद्धीच्या अर्जुना, या वाईट वासना बाळगणारे जे असुर, ते त्या नरकांत रहावयास येतात. ३७२. ज्या नरकाचे ठिकाणीं तरवारीच्या पानांचीं झाडें आहेत, खैराच्या निखाऱ्यांचे डोंगर आहेत व तापलेल्या तेलाचे समुद्र उसळत आहेत. ३७३. ज्या ठिकाणीं यातनांची पंगतची पंगत, ही यमाची नाचणी नित्यशः नवी नवीच होत असते; अशा

हे नित्य नवी यमजाचणी। पडती तिये दारुणीं । नरकलोकीं ॥ ७४ ॥ ऐसे नरकाचिये सेले। भागीन जे जे जन्मले । तेही देखों भुलले । यजिती यागीं ॥ ७५ ॥ एऱ्हवीं यागादिक क्रिया । लाहणें तेंचि धनंजया । परी विफळती आचरोनियां । नाटकी जैसे ॥ ७६ ॥ वल्लभाचिया उजरिया । आपणया पति कुस्त्रिया । जोडोनि तोषिती जैसिया । अहेवपणें ॥ ७७ ॥

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः । यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाऽविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

तैसें आपणयां आपण । मानिता महंतपण । फुगती असाधारण । गर्वें तेणें ॥ ७८ ॥ मग लवों नेणती कैसे । आटिवा लोहाचे खांब जैसे । कां उधवले आकाशे । शिळाराशी ॥ ७९ ॥ तैसे आपुलिये बरवे । आपणचि रिझतां जीवें । तृणाहीहूनि आघवें । मानिती नीच ॥ ३८० ॥ वरी धनाचिया मदिरा । माजूनि धनुर्धरा । कृत्याकृत्यविसरा । सवतें केलें ॥ ८१ ॥ जया आंगीं आयती ऐसी । तेथ यज्ञाची गोठी कायसी । तरी काय काय पिसीं । न करिती गा ॥ ८२ ॥ म्हणौनि कोणे एके वेळे । मौढ्यमद्याचेनि बळें । यागाचींही टवाळें । आदरिती ॥ ८३ ॥ ना कुंड मंडप वेदी । ना उचित साधनसमृद्धी । आणि तयांसी तंव विधी । द्वंद्वचि सदा ॥ ८४ ॥ देवां ब्राह्मणांचेनि नांवें । आडवारेनहि नोहावें । ऐसें आथी तेथ यावें । लागे कवणा ॥ ८५ ॥ पैं वासरुवाचा भोकसा । गाईपुढें ठेवूनि जैसा । उगाणा घेती क्षीररसा । बुद्धिवंत ॥ ८६ ॥ तैसें यागाचेनि नांवें । जग बाऊनि हांवे । नागविती आघवें । अहेरावारीं ॥ ८७ ॥ ऐसा कांहीं आपुलिया । होमिती जे उजरिया । तेणें कामिती प्राणिया । सर्वनाशु ॥ ८८ ॥ मग पुढां भेरी निशाण । लाउनी ते दीक्षितपण । जगीं फोकारिती आपण । वावो वावो ॥ ८९ ॥ तेव्हां महत्त्वें तेणें अधमां । गर्वा चढे महिमा । जैसे लेवे दिधले तमा । काजळाचे ॥ ३९० ॥ तैसें मौढ्य घणावे । औद्धत्य उंचावे । अहंकारु दुणावे । अविवेकुही ॥ ९१ ॥ मग दुजयाची भाष । नुरवावया निशेष । बळीयेपणा अधिक । होय बळ ॥ ९२ ॥ ऐसा अहंकार बळा । जालिया एकवळा । दर्पसागरु वेळा । सांडूनि उते ॥ ९३ ॥ मग वोसंडिलेनि दर्पें । कामाही पित्त कुरुपे । तया धर्गीं सैंघ पळिपे । क्रोधाग्नि तो ॥ ९४ ॥ तेथ उन्हाळा आगी खरमरा । तेलातुपाचिया कोठारा । लागला आणि वारा । सुटला जैसा ॥ ९५ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

तैसा अहंकारु बळा आला । दर्पु कामक्रोधीं गुढला । या दोहींचा मेळु जाला । जयांचां ठायीं ॥ ९६ ॥ ते आपुलियासवेशा । मग कोणी कोणी हिंसा । या प्राणियांतें वीरेशा । न साधिती गा ॥ ९७ ॥ पहिलें तंव धनुर्धरा । आपुलिया मांसरुधिरा । वेंचु करिती अभिचारा- । लागोनियां ॥ ९८ ॥ तेथ जाळिती जियें देहें । यांमाजीं जो मी आहे । तया आत्मया मज बाये । वाजती ते ॥ ९९ ॥ आणि अभिचारकीं तिहीं । उपद्रविजे जेतुलें कांहीं । तेथ चैतन्य मी पाहीं । शीणु पावे ॥ ४०० ॥ आणि अभिचारावेगळें । विषायें जें अवगळे । तया टाकिती इटाळें । पैशुन्याचीं ॥१॥ सती आणि सत्पुरुख । दानशील याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥२॥

त्या भयंकर नरकलोकांत ते आसुरी स्वभावाचे लोक पडतात. ३७४. अशा शेलक्या नरकाचे भागीदार जे जे जन्मले आहेत, तेही भ्रमिष्ट होऊन यज्ञ करतांना दिसतात. ३७५. एरवी यज्ञादिक कर्मांचें जें फळ आहे, तेंच वास्तविक त्यांच्या आचरणानें प्राप्त व्हावयाचें; परंतु नाटकी लोकांप्रमाणें त्या कर्मांच्या आचरणाचा नुसता देखावा करून, ते असुर त्या कर्माचरणास निष्फळ करितात. ३७६. वाईट चालीच्या बाया आपल्या प्रियकराचा आश्रय करून, तोच आपला पति समजून, जशा आपणांस सौभाग्यवती मानून, मनांत संतोषित होतात. ३७७.

आपणच आपला मान करणारे, नम्रताहीन, धन, मान व गर्व यांनीं युक्त, असे हे, दांभिकपणानें अविधिपूर्वक, केवळ नांवाचे यज्ञ करतात. १७.

त्याप्रमाणें आपल्या ठिकाणीं आपण महंतपणा मानून, त्या गर्वानें अतिशय फुगतात. ३७८. मग लोखंडाचे ओतीव खांब जसे लवत नाहींत, त्याप्रमाणें नम्र होण्याचें त्यांस ठाऊक नसतें; अथवा आकाशांत उंच गेलेल्या पर्वताप्रमाणें ते लीनता जाणत नाहींत. ३७९. त्याप्रमाणें आपल्या चांगुलपणानें आपणच आपल्या मनांत संतुष्ट होऊन, गवतापेक्षां देखील इतर सर्व हलकें मानतात. ३८०. शिवाय धनरूपी दारूनें मस्त होऊन, अर्जुना, करण्यास योग्य काय व अयोग्य काय हें विसरून त्यांनीं आपणांस ( जगा ) वेगळें केलें ( म्हणजे आपण जगाहून कोणी मोठें आहोंत असें समजूं लागले. ) ३८१. ज्यांच्या जवळ अशी सामुग्री आहे, तेथें यज्ञाची गोष्ट कसली ? परंतु, अरे, वेडे काय करीत नाहींत ? ३८२. म्हणून कोण्या एखाद्या वेळेला मूर्खपणारूपी दारूच्या बळानें यज्ञांचीही नक्कल करितात. ३८३. कुंड, मंडप, वेदी वगैरे कांहीं एक नसतें. योग्य साधनांचा पुरवठा नसतो व विधीचें व त्यांचें नेहमीं वांकडेंच असतें. ३८४. देवाब्राह्मणांच्या नांवानें चुकून पुढें आलेला वारा देखील त्यास खपत नाहीं असें जेथें आहे, तेथें मग कोणास यावें असें वाटेल ? ३८५. ज्याप्रमाणें हिकमती लोक वासरू मेलेल्या दुभत्या गाईच्या पुढें, त्या मेलेल्या वासराचा भोत ( मेलेल्या वासराच्या कातडीनें मढवून तयार केलेलें कृत्रीम वासरूं ) ठेवून तिच्या कांसेंत असेलनसेल तेवढ्या दुधाचा झाडा घेतात; ३८६. त्याप्रमाणें आपल्या हाविला सर्व जग अर्पण करून, यज्ञाच्या निमित्तानें आहेराच्या रुपानें सर्व जगाला लुटतात. ३८७. आपल्या उत्कर्षासाठीं असें जें कांहीं होमहवन करतात, त्याच्या योगानें सर्व प्राण्यांचा नाश इच्छितात. ३८८. मग पुढें नौबत, डंका वगैरे लावून, ते ( असुर ) आपणच आपलें दीक्षितपण जगांत उगीच व्यर्थ प्रसिद्ध करतात. ३८९. तेव्हां त्या दीक्षितपणाच्या महत्त्वानें त्या नीच आसुरी मनुष्यांचा गर्व अधिक वाढतो. ज्याप्रमाणें अगोदरच काळेकुट्ट असलेल्या अंधारास जसे आणखी काजळाचे लेप यावेत. ३९०. त्याप्रमाणें मूर्खपणा दृढ होतो, उद्धटपणा वाढतो व अहंकार आणि अविचारही दुप्पट होतात. ३९१. मग आपल्याशिवाय इतर कोणाचें नांव देखील मुळींच निघूं नये, एवढ्याकरितां त्यांच्या सामर्थ्यास जास्तच जोर येतो. ३९२. याप्रमाणें अहंकाराचा व बळाचा मिलाफ झाल्यावर, उन्मत्तपणाचा समुद्र आपला किनारा टाकून बाहेर वाढतो. ३९३. मग उन्मत्तपणा अमर्याद वाढल्यावर कामाचें पित्त खवळतें. मग त्या उष्णतेनें तो क्रोधाग्नि एकदम पेटतो. ३९४. तेव्हां रखरखीत उन्हाळ्यांत तेलतुपाच्या कोठाराला जसा अग्नि लागावा आणि त्यांत वारा सुटावा; ३९५.

अहंकार, बल, गर्व, काम आणि क्रोध यांचा आश्रय केलेले, मत्सरयुक्त होत्साते, आपल्या देहामध्यें व इतरांच्या देहामध्यें ( असणारा जो मी, त्या ) माझा द्वेष करतात. १८.

त्याप्रमाणें बळाचें साह्य मिळालेला अहंकार व कामक्रोधांनीं व्यापलेला उन्मत्तपणा, या दोघांचा मिलाफ ज्यांच्या ठिकाणीं झाला आहे, ३९६. हे वीरश्रेष्ठा, ( अर्जुना, ) ते आपल्या स्वेच्छेनुरूप मग कोणकोणत्या हिंसेनें या प्राण्यांना मारीत नाहींत ! ३९७. अर्जुना, प्रथम तर ते आपल्या मांसाला व रक्ताला जारणमारणाकरितां खर्च करितात. ३९८. त्या कामीं जे देह ते जाळतात, त्या देहामध्यें जो मी ( आत्मरूपानें ) आहे, त्या मला ( आत्म्याला ) ते तडाखे बसतात. ३९९. आणि ते जारणमारण करणारे जितक्या वस्तूंना पीडा देतात, त्या तितक्या ठिकाणीं असलेला चैतन्यरूप आत्मा जो मी, त्या मला दुःख प्राप्त होतें, असें समज. ४००. आणि अभिचाराच्या ( जारणमारणाच्या ) तडाख्यांतून जे क्वचित उरून राहिले असतील, त्यांच्यावर दोषदृष्टीरूपी धोंड्यांचा मारा करितात. ४०१. पतिव्रता, सत्पुरुष, दानशील पुरुष, याज्ञिक, लोकोत्तर तपस्वी व संन्यासी, ४०२.

कां भक्त हन महात्मे । इयें माझीं निजाचीं धामें । निर्वाळलीं होमधर्में । श्रौतादिकीं ॥ ३ ॥ तयां द्वेषाचेनि काळकूटें । बासटोनि तिखटें । कुबोलांचीं सदटें । सूति कांडें ॥ ४ ॥

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

ऐसे आघवांचि परी । प्रवर्तले माझां वैरीं । तरी तयां पापियां जें मी करीं । तें आइक पां ॥ ५ ॥ तरी मनुष्यदेहाचा तागा । घेऊनि रुसती जे जगा । ते पदवी हिरोनि पैं गा । ऐसें ठेवीं ॥ ६ ॥ जे क्लेशगांवींचा उकरडा । भवपुरींचा पानवडा । ते तमोयोनि तयां मूढां । वृत्तीचि दें ॥ ७ ॥ मग आहाराचेनि नांवें । तृणही जेथ नुगवे । ते व्याघ्र वृश्चिक आडवे । तैसिये करीं ॥ ८ ॥ तेथ क्षुधादुःखें बहुतें । तोडूनि खाती आपणयातें । मरमरों मागुतें । होतचि असती ॥ ९ ॥ कां आपला गरळजाळीं । जळतया आंगाची पेंदळी । ते सर्पचि करीं बिळीं । निरुंधला ॥ ४१० ॥ परी घेतला श्वासु घापे । येतुलेनही मापें । विसांवा तयां नाटोपे । दुर्जनांसी ॥ ११ ॥ ऐसेनि कल्पांचिया कोडी । गणितांही संख्या थोडी । तेतुला वेळु न काढीं । क्लेशौनि तयां ॥ १२ ॥ तरी तयांसी जेथ जाणें । तेथिंचें हें पहिलें पेणें । तें पावोनि येरें दारुणें । न होती दुःखें ॥ १३ ॥

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि । मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥

हा ठायवरी । संपत्ति ते आसुरी । अधोगति अवधारीं । जोडिली तिहीं ॥ १४ ॥ पाठीं व्याघ्रादि तामसा । योनी तो अळुमाळु ऐसा । देहाधाराचा उसासा । आथी जोही ॥ १५ ॥ तोही मी वोल्हावा हिरें । मग तमचि होती एकसरें । जेथ गेलें आंधारें । काळवंडेजे ॥ १६ ॥ जयाची पापा चिळसी । नरक घेती विवसी । शीण जाय मूर्च्छी । शिणें जेणें ॥ १७ ॥ मळु जेणें मैळे । तापु जेणें पोळे । जयाचेनि नांवें सळे । महाभय ॥ १८ ॥ पापा जयाचा कंटाळा । उपजे अमंगळ अमंगळा । विटाळही विटाळा । बिहे जया ॥ १९ ॥ ऐसें विश्वाचेया वोखटेया । अधम जे धनंजया । तें ते होती भोगूनियां । तामसा योनि ॥ ४२० ॥ अहा सांगतां वाचा रडे । आठवितां मन खिरडे । कटारे मूर्खीं केवढे । जोडिले निरय ॥ २१ ॥ कायिसया ते असुर । संपत्ति पोषिती बाउर । जिया दिधलें घोर । पतन ऐसें ॥ २२ ॥ म्हणौनि तुवां धनुर्धरा । नोहावें गा तिया मोहरा । जेउता वासु आसुरा । संपत्तिवंता ॥ २३ ॥

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः । कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

आणि दंभादि दोष साही । हे संपूर्ण जयांचां ठायीं । ते त्यजावे हें काई । म्हणों कीर ॥ २४ ॥ परी काम क्रोध लोभ । या तिहींचेचि थोंब । थांवे तेथें अशुभ । पिकलें जाण ॥ २५ ॥ सर्व दुःखीं आपुलिया । दर्शना धनंजया । पाढाऊ हे भलतया । दिधले आहाती ॥ २६ ॥ कां पापियां नरकभोगीं । सुवावयालागीं जगीं । पातकांची दाटुगी । सभाचि हे ॥ २७ ॥ ते रौरव गा तंवचिवरी । आइकिजती पटांतरीं । जंव हे तिन्ही अंतरीं ।

अथवा भक्त आणि महात्मे वगैरे, हीं माझीं स्वतःची घरें श्रौतादिक यज्ञक्रियांनीं शुद्ध झालेलीं असतात. ४०३. त्यांना वाईट शब्दाचे बळकट व तीक्ष्ण बाण, द्वेषरूपी विष चोपडून मारतात. ४०४.

**( माझा अथवा माझ्या भक्त वगैरेंचा ) द्वेष करणाऱ्या त्या दुष्ट नराधमांना मी निरंतर संसारामध्यें ( म्हणजे जन्ममृत्युमध्यें ) ( आणि त्यांतही ) अशुद्ध अशा आसुरी जन्मांमध्यें ढकलतों. १९.**

याप्रमाणें सर्व प्रकारांनीं जे माझ्याशीं शत्रुत्व करण्यास प्रवृत्त झाले आहेत, तर त्या पाप्यांना जें मी करतों, तें तूं ऐक. ४०५. तरी मनुष्यदेहाचा आश्रय घेऊन जे जगाचा नाश करतात, त्यांची ती मनुष्यपणाची पदवी हिसकावून घेऊन, त्यांस मी असें ठेवितों; ४०६. कीं क्लेशरूपी गांवाचा जो उकीरडा आहे, संसाररूपी शहराचा जो पाणवठा आहे, ती तमोयोनी त्या मूर्खांना ( मी ) वतनदारीसारखी देतों. ४०७. मग खाण्याकरितां जेथें गवतही उगवत नाहीं, तसल्या अरण्यांत मी त्यांना वाघ विंचू वगैरे करतों. ४०८. त्या अरण्यांत भुकेच्या तीव्र वेदनांनीं ते आपल्यास तोडून खात असतांना, मरमरून पुनः ( तेथें ) उत्पन्न होतच असतात. ४०९. अथवा आपल्या विषाच्या आगीनें ज्यांच्या अंगाची त्वचा जळत असते, ते बिळांत अडकून राहिलेले सर्पच मी त्यांना करतों. ४१०. परंतु आंत घेतलेला श्वास बाहेर सोडण्यास जितका वेळ लागतो, तितक्याही प्रमाणानें त्या दुर्जनास विसावा मिळत नाहीं. ४११. अशा स्थितींत कोट्यवधि कल्पांची संख्या मोजली तरी थोडीच; तितका वेळ त्यांना मी दुःखांतून काढीत नाहीं. ४१२. तर त्यांस ( असुरांस ) जेथें जावयाचें आहे, तेथचा हा पहिला मुक्काम आहे. तेव्हां त्यांस ज्या ठिकाणीं जावयाचें आहे, त्या ठिकाणचा विचार केला असतां, इतर ( वर सांगितलेलीं ) दुःखें त्याच्यापुढें कांहींच भयंकर नाहींत. ४१३.

**हे कौन्तेया, जन्मोजन्मीं आसुरी जन्म पावणाऱ्या त्या मूढांना माझी प्राप्ति होत नाहीं. असें झाल्यावर ते अत्यंत अधम ( लोहलोष्ट पाषाण वगैरे ) गतीला जातात. २०.**

त्या आसुरी संपत्तीच्या योगानें अशा या प्रकारची अधोगति त्यांनीं मिळविलेली असते; ऐक. ४१४. नंतर व्याघ्रादि तामसी योनींत देहाच्या आधाराचा असा जो थोडासा विसावा असतो, ४१५. तोही ओलावा मी हिसकावून घेतों. मग ते ( आसुरी संपत्तीचे लोक ) अशा केवळ तमाच्याच मूर्ति बनतात कीं, जेथें अंधार गेला असतां काळवंडला जातो, ४१६. पाप ज्याची किळस घेतें व नरक ज्याचें भय घेतात व ज्या शीणानें ( श्रमानें ) शीण ( श्रम ) मूर्च्छा पावतो, ४१७. घाण ज्याच्या योगानें मळते, ताप ज्याच्या योगानें पोळतो व ज्याचें नांव घेतलें असतां महाभय ( मृत्यु ) भय पावतें; ४१८. पापांना ज्याचा कंटाळा असतो, अशुभाला ज्यापासून अशुभ उत्पन्न होतें व विटाळ सुद्धां ज्या विटाळाला भितो. ४१९. अर्जुना, याप्रमाणें विश्वाच्या वाईटांतील जें निकृष्ट, तें ( निकृष्ट ठिकाण ), ते आसुरी लोक ( व्याघ्रादि ) तामसयोनी भोगल्यावर होतात. ४२०. अरेरे ! त्या असुरांची कथा सांगतांना वाचा रडकुंडीला येते, त्यांच्या कथेची आठवण झाली कीं मन मागें हटतें. हाय हाय ! त्या मूर्खांनीं केवढा नरक प्राप्त करून घेतला आहे बरें ! ४२१. ज्या आसुरी संपत्तीनें असली भयंकर अधोगति दिली, ती वाईट आसुरी संपत्ति ते असुर कशा करितां वाढवितात ! ४२२. म्हणून अर्जुना, ज्या ठिकाणीं आसुरी संपत्तिवाल्यांचें राहाणें असेल, त्या बाजूला तूं जाऊं नकोस. ४२३.

**काम, क्रोध व लोभरूपी तीन प्रकारचें हें नरकाचें द्वार आहे, व आत्म्याचा नाश करणारें आहे, म्हणून या तिहींचा त्याग करावा. २१.**

आणि दंभआदिकरून सहा दोष, हे सर्वच्या सर्व ज्यांच्या ठिकाणीं असतील, त्यांचा त्याग करावा, हें खरोखर सांगितलें पाहिजे काय ! ४२४. परंतु काम, क्रोध व लोभ या तिघांचें बंड जेथें माजलें आहे, तेथें पाप उत्पन्न झालें आहे, असें समज. ४२५. अर्जुना, वाटेल त्यास आपली भेट होण्यास सुलभ जावें म्हणून सर्व दुःखांनीं आपला मार्ग अचूक दाखविण्याकरितां, त्या कामक्रोधादिकांस वाटाडे म्हणून नेमून दिले आहे. ४२६. अथवा पाप्याला नरकभोगांत घालण्याकरितां जगामध्यें ही ( काम, क्रोध, लोभांची ) पातकांची पराक्रमी सभाच आहे. ४२७. जोंपर्यंत हे तीन विकार अंतःकरणांत उठले नाहींत, तोंपर्यंतच रौरवादि भयंकर नरक आहेत, असें परोक्ष रीतीनें ( पुराणादिकांतून )

उठती ना ॥ २८ ॥ अपाय इहीं आसलग । यातना इहीं सवंग । हाणी हाणी नोहे हे तिघ । हेचि हाणी ॥ २९ ॥ काय बहु बोलों सुभटा । सांगितलिया निकृष्टा । नरकाचा दारवंटा । त्रिशंकु हा ॥ ४३० ॥ या कामक्रोध लोभां- । माजीं जीवें जो होय उभा । तो निरयपुरीची सभा । सन्मानु पावे ॥ ३१ ॥

एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः । आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

म्हणौनि पुढतपुढतीं किरीटी । हे कामादिदोषत्रिपुटी । त्यजावीचि गा वोखटी । आथवां विषीं ॥ ३२ ॥ धर्मादिकां चौंहीआंतु । पुरुषार्थांची तैंचि मातु । करावी जैं संघातु । सांडील हा ॥ ३३ ॥ हे तिन्ही जीवीं जंव जागती । तंववरी निकियाची प्राप्ती । हे माझे कान नाइकती । देवोही म्हणे ॥ ३४ ॥ जया आपणपें पढिये । आत्मनाशा जो बिहे । तेणें न धरावी हे सोये । सावधा होइजे ॥ ३५ ॥ पोटीं बांधोनि पाषाण । समुद्रीं बाहीं आंगवण । कां जियावया जेवण । काळकूटाचें ॥ ३६ ॥ इहीं कामक्रोधलोभेंसीं । कार्यसिद्धि जाण तैसी । म्हणोनि ठावोचि पुसीं । ययांचा गा ॥ ३७ ॥ जैं कहीं अवचटें । हे तिकडी सांखळ तुटे । तैं सुखें आपुलिये वाटे । चालों लाभे ॥ ३८ ॥ त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं फिटलिया नगर । त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ॥ ३९ ॥ तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं । संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ॥ ४४० ॥ मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें । जन्ममृत्यूचीं निमाळें । निस्तरें रानें ॥ ४१ ॥ ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें । तें तैसेंचि पाटण पावे । गुरुकृपेचें ॥ ४२ ॥ तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा । तये खेंवीं आटे डिंडिमा । सांसारिक हे ॥ ४३ ॥ ऐसा जो कामक्रोधलोभां । झाडी करूनि ठाके उभा । तो येवढिया लाभा । गोसावी होय ॥ ४४ ॥

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः । न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

ना हें नावडोनि कांहीं । कामादिकांचांचि ठायीं । दाटिली जेणें डोई । आत्मचोरें ॥ ४५ ॥ जो जगीं समान सकृपु । हिताहित दाविता दीपु । तो अमान्यु केला बापु । वेदु जेणें ॥ ४६ ॥ न धरीचि विधीची भीड । न करीचि आपली चाड । वाढवीत गेला कोड । इंद्रियांचें ॥ ४७ ॥ कामक्रोधलोभांची कास । न सोडीच पाळिली भाष । स्वैराचाराचें असोस । बळघला रान ॥ ४८ ॥ तो सुटकेचिया वाहणीं । मग पिवों न लाहे पाणी । स्वप्नींही ते काहाणी । दूरीचि तया ॥ ४९ ॥ आणि परत्र तंव जाये । हें कीर तया आहे । परी ऐहिकही न लाहे । भोग भोगूं ॥ ४५० ॥ तरी माशालागीं भुलला । ब्राह्मण पाणबुडां रिघाला । कीं तेथही पावला । नास्तिकवादु ॥ ५१ ॥ तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उबडें । तंव तोचि आणिकीकडे । मरणें नेला ॥ ५२ ॥ एवं परत्र ना स्वर्गु । ना ऐहिकही विषयभोगु । तेथ केउता प्रसंगु ।

घेतलें जातें. ४२८. यांच्या योगानें अपाय सोपे आहेत; यांच्या योगानें यातना स्वस्त आहेत; हानि ही हानि नाहीं; तर हे तिघेच ( मूर्तिमंत ) हानि आहेत. ४२९. फार काय सांगूं ! अर्जुना, ते तिघे म्हणजे सांगितलेल्या निकृष्ट नरकाचा तीन खिळे मारलेला उंबराच आहे. ४३०. या कामक्रोधलोभामध्यें जो जीवाभावानें उभा असतो, ( म्हणजे जो या तिघांचा आश्रय करतो ) तो नरकरूपी नगराच्या सभेमध्यें सन्मान पावतो. ४३१.

हे कौन्तेया, नरकाचीं द्वारें असलेल्या या तिन्हींपासून जो मुक्त होतो, तो ( आपल्या ) आत्म्याचें कल्याण( आत्मकल्याणाचें साधन ) करतो, नंतर तो श्रेष्ठ गति पावतो. २२.

म्हणून अर्जुना, ह्या कामादि दोषांची, सर्व बाबतींत निंद्य असलेली त्रिपुटी टाकावी, असें मी तुला वारंवार बजावून सांगतों. ४३२. कोणीही जेव्हां या कामक्रोध-लोभ यांच्या समुदायाची संगति सोडील, तेव्हांच त्यानें धर्मादि चार पुरुषार्थांपैकीं एखाद्या पुरुषार्थाची गोष्ट करावी. ४३३. हे तिन्हीं जोंपर्यंत अंतःकरणांत जागृत आहेत, तोंपर्यंत कल्याणाची प्राप्ति होईल, हें माझे कान ऐकत नाहींत, असें देव देखील म्हणाले. ( असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. ) ४३४. ज्याचें आपल्या स्वतःवर प्रेम असेल व जो आत्मनाशाला भीत असेल, त्यानें या वाटेस (काम, क्रोध व लोभ यांच्या मार्गास) जाऊं नये; सावध व्हावें. ४३५. पोटाशीं दगड बांधून बाहूंच्या जोरावर जसें समुद्रांत पोहणें अथवा जगण्या-करितां जसें काळकूट विषाचें भोजन करणें; ४३६. ह्या कामक्रोधलोभांनीं कार्यसिद्धि तशी आहे असें समज. म्हणून अर्जुना, यांचा मागमूस नाहींसा कर. ४३७. जेव्हां कधीं अकस्मात् ही तीन कड्यांची सांखळी तुटेल; तेव्हां आपल्या वाटेनें ( आत्मानुभवाच्या वाटेनें ) सुखानें चालण्याला मिळेल. ४३८. त्रिदोषांनीं ( कफ, वात, पित्त यांचा अतिरेक यांनीं ) शरीरास टाकल्यावर जसें शरीरास आरोग्य होतें, किंवा त्रिकुटीचा ( चोरी, चहाडी, शिंदळकी यांचा ) नाश झाल्यावर नगरांत जशी सुखानें नांदणूक होते; अथवा त्रिताप ( अध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक ) नाहींसे झाल्यावर अंतःकरण जसें आनंदित होतें, ४३९. त्याप्रमाणें कामादिक तिघांनीं जो ( पुरुष ) टाकलेला आहे, तो जगामध्यें सुख पावून, त्यास मोक्षमार्गांत सज्जनांचा संग मिळतो. ४४०. मग प्रबळ साधुसंगतीच्या योगानें, सच्छास्त्राच्या साह्यानें, जन्ममृत्युरूपी माळरानांतून पार पडतो. ४४१. त्या वेळीं ज्या सर्व गांवामध्यें आत्मानंद नेहमीं राहात असतो, असेंच तें गुरुकृपारूपी सुंदर नगर त्यास प्राप्त होतें. ४४२. मग तेथें ( गुरुकृपेच्या गांवांत ) आवड-णाऱ्या वस्तूंतील शेवटली हद्द ( सर्वांत अत्यंत आवडता ) जो माउली आत्मा तो भेटतो. त्या क्षणींच ही संसार-रूपी ( जन्ममृत्युरूपी ) गडबड नाहींशी होते. ४४३. याप्रमाणें जो कामक्रोधलोभास पार नाहींसें करून अगदीं मोकळा होतो, तो एवढ्या लाभाचा मालक होतो. ४४४.

जो शास्त्रविधीचा त्याग करून कामाची कांस धरून वागतो, त्याला सिद्धि ( सुटकेचा मार्ग ) प्राप्त होत नाहीं, अथवा ( ऐहिक ) सुख मिळत नाहीं, अथवा श्रेष्ठ गतीहि ( स्वर्ग अथवा मोक्ष ) मिळत नाहीं. २३.

अथवा हें कांहीं एक न मानून कामादिकांच्याच ठिकाणीं ज्या आत्मघातक्यानें आपलें डोकें खुपसलें आहे, ४४५. जो जगांत सर्वांवर सारखी कृपा करणारा व हिताहित दाखविणारा दिवा, असा जो वेदरूपी बाप, त्यास जो जुमानीत नाहीं; ४४६, जो वेदादिकांच्या आज्ञेची भीड धरीतच नाहीं व ज्याला आत्महिताची चाडच नाहीं व जो इंद्रियांचेच लाड वाढवीत गेला; ४४७. कामक्रोधलोभांची कास सोडणारच नाहीं, म्हणून त्यांना दिलेलें वचन जो पाळतो व स्वेच्छाचाराच्या अफाट रानाचा ज्यानें आश्रय केला आहे, ४४८. तो ( जन्ममरणाच्या ) सुटकेच्या ओघांतील पाणी पिऊं शकत नाहीं; एवढेंच काय, पण त्याला ती सुटकेची गोष्ट स्वप्नांत देखील दूर असते. ४४९. आणि पर-लोकास तर तो मुकतोच हें ठाम ठरल्यासारखें आहे. परंतु ऐहिक भोग देखील त्यास भोगावयास सांपडत नाहींत.४५०. तरी माशांच्या लोभानें ब्राह्मण कोळ्यांच्या जातींत शिरला, तों त्या कोळ्यांच्या जातींतही त्याला 'असला नास्तिक आम्हांला नको' म्हणून घेईनात. [ याप्रमाणें तो आपल्या जातीस व परक्या ( कोळ्यांच्या ) जातीसही मुकला. ] ४५१. त्याप्रमाणें विषयांच्या गोडीनें ज्यानें परलोक पारखा केला ( घालविला ), तो हलक्यांतच मरणानें त्यास दुसरीकडे नेलें. ४५२, ह्या प्रमाणें परलोक नाहीं व स्वर्ग नाहीं व ऐहिक विषयांचा

मोक्षाचा तो ॥ ५३ ॥ म्हणौनि कामाचेनि बळें । जो विषय सेऊं पाहे सळें । तया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ॥ ५४ ॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ । ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

याकारणें पैं बापा । जया आथी आपली कृपा । तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ॥ ५५ ॥ पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटेचि ते ॥ ५६ ॥ नातरी श्रीगुरुवचना । दिठी देतु जतना । शिष्य आत्मभुवना- । माजीं पैसे ॥ ५७ ॥ हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा । तरी आदरें जेवीं दिवा । पुढां कीजे ॥ ५८ ॥ तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हों म्हणे पार्था । तेणें श्रुतिस्मृति माथां । बैसणें घापे ॥ ५९ ॥ शास्त्र म्हणेल सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरुद्ध ॥ ४६० ॥ ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा । तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ॥ ६१ ॥ पैं अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती । नाहीं श्रुतीपरौती । माउली जगा ॥ ६२ ॥ म्हणौनि ब्रह्मेंसीं मेळवी । तंव हे कोणें न संडावी । अगा तुवांही ऐसीचि भजावी । विशेषेंसी ॥ ६३ ॥ जे आजि अर्जुना तूं येथें । करावया सत्य शास्त्रें सार्थें । जन्मलासि बळार्थें । धर्माचेनि ॥ ६४ ॥ आणि धर्मानुज हें ऐसें । बोधेंचि आलें आपैसें । म्हणौनि अनारिसें । करूं नये ॥ ६५ ॥ कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं । अकृत्य कुडें तें लोकीं । वाळावें गा ॥ ६६ ॥ मग कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपलेनि आंगें । आचरौनि आदरें चांगें । सारावें गा ॥ ६७ ॥ जे विश्वप्रामाण्याची मुद्दी । आजि तुझां हातीं असे सुबुद्धी । लोकसंग्रहासि त्रिशुद्धी । योग्यु होसी ॥ ६८ ॥ एवं आसुरवर्गु आघवा । सांगोनि तेथिंचा निगावा । तोही देवें पांडवा । निरूपिला ॥ ६९ ॥ इयावरी तो पंडूचा । कुमरु सद्भावो जीवींचा । पुसेल तो चैतन्याचां । कानीं ऐका ॥ ४७० ॥ संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळु फेडिला तया नृपा । तैसा मीही निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ॥ ७१ ॥ तुम्ही संत माझिया कडा । दिठीचा कराल बहुडा । तरी तुम्हां माने येवढा । होईन मी ॥ ७२ ॥ म्हणोनि निज अवधान । मज वोळगे पसायदान । दीजो जी समर्थ होईन । ज्ञानदेवो म्हणे ॥ ४७३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगोनाम षोडशोऽध्यायः

[ श्लोक २४, ओंव्या ४७३. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु



भोगही नाहीं, तेथें मोक्षाचा प्रसंग तो कोठला ? ४५३. म्हणून कामाच्या बळानें जो आग्रहानें विषय सेवूं पहातो त्याला विषय ( सुख ) मिळत नाहीं अथवा स्वर्ग मिळत नाहीं किंवा तो उद्धरतही नाहीं. ४५४.

म्हणून, कार्य कोणतें व अकार्य कोणतें याची व्यवस्था जाणण्याला शास्त्र ( वेद ) हेंच तुला प्रमाण आहे. शास्त्रांतील विधानांनीं सांगितलेलें कर्म जाणून तें करणें, हें या लोकीं तुला योग्य आहे. २४.

बाबा अर्जुना, याकरितां ज्याला आपली स्वतःची कींव असेल, त्यानें वेदांच्या आज्ञेबाहेर वागतां कामा नये. ४५५. पतीच्या मताप्रमाणें वागून पतिव्रता स्त्री सहजच स्वतःच्या कल्याणाला प्राप्त होते. ४५६. अथवा श्रीगुरुवचनाच्या पालनाकडे दृष्टि देणारा शिष्य आत्मानुभवांत प्रवेश करतो. ४५७. हें राहूं दे. आपण ( अंधारांत ) ठेविलेली वस्तु आपल्या हाताला यावी असें जर वाटेल, तर ज्याप्रमाणें अगत्यानें दिवा पुढें करावा. ४५८. त्याप्रमाणें अर्जुना, संपूर्णही पुरुषार्थांचा ( धर्म, अर्थ, काम, मोक्षाचा ) जो मालक होईन म्हणतो, त्यानें श्रुति व स्मृति यांस वश्यास आपलें मस्तक घालावें. ( श्रुति व स्मृति यांच्या आज्ञा शिरसावंद्य मानाव्या. ) ४५९. शास्त्र जें टाकावें म्हणून म्हणेल, तें जरी राज्य असलें, तरी तें गवताच्या काडीप्रमाणें समजावें व शास्त्र जें घ्यावें म्हणून सांगेल, तें जरी विष असलें, तरी तें प्रतिकूल समजूं नये. ४६०. अर्जुना, केवळ याप्रमाणें वेदाच्या ठिकाणीं जर एकनिष्ठ झालें, तर अकल्याणाची गांठ कोठून पडणार ? ४६१. अकल्याणापासून काढणारी व हित देऊन वाढवणारी, अशी श्रुतीशिवाय दुसरी कोणी माऊली जगांत नाहीं. ४६२. अशी ही श्रुति हित करणारी माऊली आहे. ती जीवाचें ब्रह्माशीं ऐक्य करते. त्याअर्थीं हिची कोणी हेळसांड करूं नये. अरे, तूं देखील तिला एकनिष्ठपणानें भज. ४६३. कारण कीं, अर्जुना, सांप्रत तूं धर्माचरणाचे जोरावर शास्त्रांना सार्थकता आणण्याकरितां खरोखर जन्माला आला आहेस. ४६४. आणि धर्मानुज ( धर्माचा धाकटा भाऊ ) हें जें नांव तुला प्राप्त झालें आहे, त्यावरून सहज हाच बोध होतो. म्हणून तूं धर्मविरुद्ध वागूं नकोस. ४६५. करण्याला योग्य काय व करण्याला अयोग्य काय, याचा विचार करण्याचे कामीं शास्त्रांनाच परीक्षा करणारे ठरवावें व अर्जुना, या जगांत जें करण्यास योग्य नसेल, तें वाईट आहे म्हणून टाकावें, ४६६. मग करण्यास योग्य म्हणून जें खरें निघेल, तें तूं स्वतः अतिशय आदरानें आचरण करून पुरें करावेंस. ४६७. कारण कीं, हे सात्त्विक बुद्धीच्या अर्जुना, आज तुझ्या हातांत विश्वप्रामाण्याचा शिक्का असल्यामुळें (तूं ज्या आचरणावर प्रामाण्याचा शिक्का मारशील, त्या आचरणास लोक प्रमाण मानीत असल्यामुळें ) तूं लोकसंग्रहाला खरोखर योग्य आहेस. ४६८. याप्रमाणें आसुरी दोष-समुदायांचीं लक्षणें सांगून, आसुरी दोषांपासून सुटण्याचा प्रकारही देवानें अर्जुनाला सांगितला. ४६९. यानंतर तो पंडूचा मुलगा ( अर्जुन ) आपल्या अंतःकरणांतील योग्य विचार देवाला विचारील. तो विचार तुम्ही चैतन्याच्या ( चित्ताच्या ) कानांनीं ऐका, असें ज्ञानेश्वरमहाराज श्रोत्यांना म्हणाले, ४७०. व्यासांच्या आज्ञेनुरूप ( सर्व इतिहास सांगून ) संजयानें जसा त्या धृतराष्ट्राचा वेळ घालविला, तसें मीही निवृत्तिनाथांच्या कृपेनें तुम्हांला सांगेन. ४७१. तुम्हीं संतमंडळी जर माझ्यावर कृपा-दृष्टीचा वर्षाव कराल, तर तुम्हांला मान्य होईल, एवढा मी होईन ( म्हणजे तुम्हांस पसंत पडेल असें व्याख्यान करणारा मी होईन ). ४७२. म्हणून महाराज, माझ्या व्याख्यानरूपी सेवेबद्दल मला आपलें अवधानरूपी प्रसादाचें दान द्यावें, म्हणजे मी समर्थ होईन, असें ज्ञानेश्वरमहाराज श्रोते संतमंडळीस म्हणतात. ४७३.



म्हणौनि शास्त्राचें घडतें । नोहे प्रकारें बहुतें । तरी मूर्खां मुमुक्षां येथें । काय गति पां ॥
हा पुसावया अभिप्रावो । जो अर्जुन करी प्रस्तावो । तो सतराविया ठावो । अध्याया येथ ॥
( अ. १७, ओंवी २९–३०. )

या अध्यायाच्या प्रारंभीं श्रीज्ञानदेवांनीं श्रीनिवृत्तिनाथांचें गणपतीच्या रूपानें स्तवन केलें आहे. गणपतीच्या स्मरणानें शंकरांनीं त्रिपुरासुराचा वध करून देवांची केलेली मुक्तता, गणपतीचें वक्रतुंड, सूक्ष्म डोळे, हालणारे कान, तसेंच त्याचें नृत्यक्रीडेंतील कौशल्य या सर्वांचा उपयोग या रूपकांत करून ज्ञानदेवांनीं आपल्या गुरूंचें आध्यात्मिक सामर्थ्य वर्णन केलें आहे. शेवटीं ते म्हणतात, 'सेवक होऊन तुमची भक्ति करणें, हेंही आपल्या एकरस स्वरूपाचे ठिकाणीं खपत नाहीं. आपल्यांत संपूर्णपणें नाहींसें होण्यांतच आपली खरी भक्ति होईल. मला पूर्ण काम करून गीतेसारख्या अगाध ग्रंथावर व्याख्यान करण्याची योग्यता प्राप्त करून दिली, या आपल्या सामर्थ्याचें शब्दांनीं वर्णन करण्यास मी असमर्थ आहें.' ( १–२० )

'सोळाव्या अध्यायाच्या शेवटीं भगवंतांनीं असें सांगितलें कीं, ज्याला आपलें कल्याण खरोखरी व्हावें असें वाटत असेल, त्यानें आपलें कर्तव्यकर्म शास्त्राच्या कसोटीवर ठरवून त्याप्रमाणें वागणें अवश्य आहे. जो याप्रमाणें शास्त्राला अनुसरून कर्म करीत नाहीं, त्याला ऐहिक वा पारत्रिक कोणत्याही प्रकारचें सुख मिळत नाहीं.' यावर अर्जुनानें जी शंका देवापुढें मांडली त्यांतून सतरावा अध्याय निर्माण झाला आहे. शास्त्र जाणून शास्त्राप्रमाणें श्रद्धापूर्वक कर्म करतो हा एक वर्ग व शास्त्राला डावलून कामाचा अंकित होऊन वागतो हा दुसरा वर्ग; यापेक्षां आणखी एक तिसरा वर्ग आहे. त्याला शास्त्राबद्दल आदर आहे; पण शास्त्रवचन समजण्याइतकी बुद्धि नाहीं. या लोकांची अडचण अर्जुन भगवंतापुढें मांडत आहे. 'शास्त्रानुसार कर्म करावयाचें म्हटलें तर आधीं शास्त्रांत एक-वाक्यता असत नाहीं; नाना मतांतरें दिसून येतात. त्यांचा समन्वय करण्यासाठीं लागणारी बुद्धि सर्वांना कोठून असणार ? शिवाय शास्त्रानुसार कर्म करावयाचें असें म्हटलें, तरी कर्म बिनचूकपणें सिद्धीस जाण्यासाठीं लागणारी सामुग्री व देश, काळ यांची अनुकूलता हें सर्व जमून येणें जवळ जवळ असंभवनीयच आहे. अशा स्थितींत ज्यांच्या ठिकाणीं श्रद्धा आहे पण जे अज्ञानी आहेत, त्यांनीं कर्म केल्यावर त्यांना कोणती गति मिळते ?' अर्जुनाच्या शंकेचें सविस्तर उत्तर श्रीभगवान देत आहेत. ( २१–४८ )

'नुसत्या श्रद्धेच्या भांडवलावर मोक्ष मिळवणें हें वाटतें तितकें सोपें नाही. कारण श्रद्धा जरी सर्वत्र दिसून येत असली, तरी ती कोणत्या प्रकारची आहे हें खरें महत्त्वाचें आहे. जगांतील प्राणिमात्र त्रिगुणांनीं बनलेले आहेत. या तीन गुणांपैकीं कोणता तरी एक गुण इतर दोन गुणांपेक्षां अधिक प्रमाणांत आढळून येतो व त्या गुणाप्रमाणें ही श्रद्धा बनत असते. पुरुषाच्या ठिकाणच्या गुणानुसार ही श्रद्धा कशी दिसून येते तें सांगतों. ( ४९–७५ ) सात्त्विक पुरुषाच्या ठिकाणीं, श्रद्धेचें रूपान्तर, विद्या संपादन करावी, यज्ञ करावे यांत होतें. राजसी श्रद्धेचे लोक राक्षस व यक्ष यांचें भजन करतांना दिसतात व तामसी पुरुषांच्या ठिकाणची श्रद्धा प्राणिमात्रांच्या घातपाताकडे वळते; त्यासाठीं हे लोक भूतें व प्रेतें यांचे अमंगळ समुदाय गोळा करतात. या तीन श्रद्धांपैकीं राजस व तामस प्रकार टाकून देऊन सात्त्विक श्रद्धेचाच अंगीकार मुमुक्षूनें करावा. सात्त्विक श्रद्धा असणारा पुरुष मतिमंद असला व त्याला जरी

शास्त्राध्ययन घडलें नाहीं, तरी तेवढ्यावरून त्याला मोक्ष दुरावत नाहीं. ज्यांना शास्त्र अवगत आहे व त्याप्रमाणें जे वागतात, अशा पुरुषांच्या पाउलावर पाउल टाकून तो सात्त्विक श्रद्धायुक्त पुरुष जर जाईल तर ते ज्ञानी पुरुष ज्या मोक्षाच्या मुक्कामाला जातात, त्याच मुक्कामाला हाही निःसंशय जाईल. ( ७६–९२ ).

पण स्वतःला शास्त्र कळत तर नाहींच, पण त्याबद्दल आस्था व आदर म्हणजे श्रद्धाही नाहीं; असेही कांहीं पुरुष असतात. ते क्षणिक ऐश्वर्याच्या जोरावर शास्त्रानुसार वागणाऱ्या पुरुषाचा तिरस्कार करतात व मनाला येईल तसें शास्त्रबाह्य वागतात. लोकांना पीडा करणें हेंच त्यांचें ब्रीद असतें. त्यांच्या या वागण्यानें सर्वान्तर्यामीं असणारा जो मी त्या मलाच पर्यायानें दुःख होतें. वास्तविक या लोकांचें चुकूनसुद्धां नांवही घेऊं नये, पण या लोकांचा त्याग करण्याकरितां, हे कोणत्या प्रकारचे लोक आहेत तें समजणें अवश्य आहे; म्हणून त्यांचा मी उल्लेख केला. या दुष्ट लोकांचा त्याग करून जेणेंकरून सात्त्विक वृत्ति वाढेल असेंच आचरण मनुष्यानें ठेवावें व सात्त्विक आहार सेवन करून सात्त्विक कर्मेंच ( यज्ञ, तप, दान ) करावींत; म्हणजे मोक्षाच्या वाटेवरच त्याचीं पाउलें पडतील. आहाराचा व वृत्तीचा फार निकटचा संबंध आहे. मनुष्य ज्या प्रकारचा आहार घेतो, त्याप्रमाणें त्याचे शरीरांतील रक्तमांसादि धातू बनत असतात व धातूप्रमाणें मनुष्याचा स्वभाव तयार होतो. ( ९३–११९ )

प्रत्येक मनुष्याचा आहार त्याच्या आवडीवर अवलंबून असतो. ही रुची त्याच्या गुणावर अवलंबून असते, म्हणून तीन गुणांप्रमाणें प्राणिमात्रांचे आहारही तीन प्रकारचे झाले आहेत. सत्त्वगुणी पुरुषाला मधुर, गोड, रसभरीत व स्निग्ध असा आहार आवडतो. हा आहार जरी डोळ्यांत एकदम भरत नसला, तरी त्याचा परिणाम मात्र फार मोठा आहे. सात्त्विक आहार सेवन करणाराचें शरीर रोगमुक्त व मन प्रसन्न असतें. ( १२०–१३७ ) राजस पुरुषाला कडू, आंबट, खारट, अति उष्ण व झणझणीत तिखटाचे. असे पदार्थ आवडतात. त्याचा परिणामही तसाच म्हणजे शरीर रोगमय व मन दुःखी असा होतो. ( १३८–१५२ ) तमोगुणी पुरुषाचा आहार पाहिला कीं किळस उत्पन्न होते. कुजलेले, सडलेले घाण पदार्थ तो तमोगुणी पुरुष आपल्या बायकापोरांना एकाच ताटांत घेऊन, चिवडून खातो. शास्त्रांनीं जे खाऊ व पिऊं नये म्हणून सांगितलें तेंच हा सेवन करतो. त्यापासून यातना, दुःख व क्लेश हें फळ त्याक्षणींच त्याला भोगावें लागतें. ( १५३–१६८ ).

प्राणिमात्राचा आहार जसा तीन प्रकारचा आहे, तसे ते जें कर्म करतात तेंही गुणाप्रमाणें तीन प्रकारचें आहे. त्यापैकीं यज्ञ, तप व दान यांचे प्रकार सांगतों. प्रथम यज्ञाचे प्रकार सांगतों. सात्त्विक यज्ञ करणारा आपलें कर्म विधिप्रमाणें यथासांग करतो व तसें करूनही त्या यज्ञापासून फळाची यत्किंचितही अपेक्षा ठेवीत नाहीं, किंवा मी तें कर्म केलें असा फुंज बाळगीत नाहीं. ( १६९–१८४ ) यज्ञ करणारा राजसी पुरुष सात्त्विक पुरुषाप्रमाणें यज्ञाचें आचरण करतांना दिसतो; परंतु त्याची नजर यज्ञांतून निर्माण होणाऱ्या फळावर असते व आपलें याज्ञिकपण जगांत प्रसिद्ध व्हावें अशी त्याला हांव असते. ( १८५–१८८ ) तामसी पुरुषांच्या यज्ञांत विधि, उपचार, पूजा दक्षिणा यांचा पत्ता नसतो. त्यांचा यज्ञ म्हणजे यज्ञाचें नांव पुढें करून स्वैर आचरणच असतें. ( १८९–१९५ ).

तपाचे गुणानुसार तीन प्रकार आहेत; पण त्यांतही पुनः शारीरिक, वाचिक व मानसिक असे ज्या अंगानें ते तप घडतें त्यास अनुसरून भेद आहेत. स्वधर्माप्रमाणें आचरण करून देह झिजवावा व देहाची आसक्ति घालवावी, असा हेतु शारीरिक तपांत असतो. त्यासाठीं देवाची पूजा, यात्रा करणें, पीडलेल्या व संकटग्रस्तांना मदत करणें, विधियुक्त आचार व विनय यांनीं संपन्न ब्राह्मण, आईवडील, गुरु यांची सेवा करणें, सर्वांपुढें नमून वागणें, परोपकार, ब्रह्मचर्य हे मार्ग आहेत. ( १९६–२१४ ).

हें सर्व मुख्यतः शरीरानें घडणारें म्हणून याला शारीरिक तप म्हटलें. वाणीच्या तपांत मृदु, पथ्यकर, सत्य व गोड व ऐकणाराचे ठिकाणचें अज्ञान जाऊन तो त्याच्या योगानें निःसंदेह होईल, असें बोलणें येतें. वेद अथवा नाम या ठिकाणीं वाणी रंगून जाणें, हें या तपाचें ठळक लक्षण आहे. ( २१५–२२३ ) मानस तपामुळें आत्म-दर्शन होतें व त्यामुळें मन निःसंदेह व निश्चळ होतें, कृतकृत्यता प्राप्त होते, वैराग्यादिक साधनांचा शीणभाग नाहींसा झालेला असतो. ( २२४–२३७ ) आतां हेच तीन प्रकार गुणांप्रमाणें तीन प्रकारचे कसे होतात तें सांगतो. सात्त्विक तपी पुरुष शुद्ध अंतःकरणाचा व आस्तिक बुद्धीचा असतो. तो फळाशा टाकून तप करीत असतो. ( २३८–२४१ ) पैसा मिळावा, लोकांत प्रतिष्ठा वाढावी या हेतूनें जें तप केलें जातें तें राजस तप होय. हें तप करतांना अपेक्षेप्रमाणें फळ आलें नाहीं तर तें मध्येंच टाकून देण्यास राजसी पुरुष कमी करीत नाहीं. ( २४२–२५२ ) तमोगुणी पुरुषाच्या तपांत मूर्खपणाच आढळून येतो. तो आपल्या शरीराला पीडा व क्लेश देतो आणि शिवाय असें करण्यांत दुसऱ्याचा घात व्हावा असा दुष्ट हेतु असतो. ( २५३–२६३ ).

कर्मांचा आणखी एक प्रकार जें दान तेंही गुणाच्या अनुरोधानें तीन प्रकारचें झालें आहे. स्वधर्मानें मिळविलेला पैसा स्वधर्मांतच (योग्य देश काल व पात्र पाहून) खर्च करणें हें सात्त्विक दान होय; यांत दुसऱ्याला दान द्यावयाचें तें सन्मानानें, दान करणें, आपलें कर्तव्य आहे या बुद्धीनें देऊन पुनः त्यापासून प्रत्युपकाराची अपेक्षा मुळींच ठेवावयाची नाहीं. ( २६४–२८३ ) रजोगुणी पुरुषाचें दान देश, काल व पात्र या बाबतींत सात्त्विक दानाप्रमाणेंच असतें, पण त्यांत फळाशेची व प्रत्युपकाराची जबरदस्त इच्छा असते. दान घेणाराच्या हातावर तो आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळींच्या पापांचें प्रायश्चित्त सोडतो व देतो तेंही अल्पच असतें. शिवाय दिलें म्हणून त्याला हळहळ लागून राहिलेली असते. ( २८४–२९३ ) तामस दानाचे ठिकाणीं देश, काल व पात्र यांचा अभाव असतो. उलट ज्या नको त्याच गोष्टी दिसून येतात. चोरून आणलेलें द्रव्य रात्रीच्या वेळीं वेश्यागारासारख्या ठिकाणीं खर्च होतें. चांगलें सत्पात्रीं दान देण्याचा क्वचित योग आला तरी त्याच्याहातून कवडीही सुटायची नाहीं; पण शिव्या व निर्भर्त्सना मात्र हटकून मिळतील. ( २९४–३०७ ).

राजस व तामस या दोन्हींचा त्याग करून एका सत्त्वगुणाचाच अंगीकार करावा; म्हणून श्रद्धा, यज्ञ, तप व दानांचे तीन प्रकार भगवंतांनीं स्पष्टपणें सांगून शेवटीं ते म्हणतात, 'शुद्ध सत्त्वगुणानें युक्त होऊन शास्त्रविहित कर्म केलें तर उत्तम लोकलोकांतरांचें फळ जीवाला मिळेल; पण त्यांत आणखी एका गोष्टीची भर घातली तरच साक्षात् मोक्षाचीही प्राप्ति होईल. एऱ्हवीं स्वतंत्रपणें सात्त्विककर्मसुद्धां मोक्षाला देणार नाहीं.' मोक्षाप्रत नेणारी अशी कोणती गोष्ट आहे, ती जाणून घेण्याची अर्जुनाला उत्कंठा लागून राहिली. ती पाहून भगवान् ती वस्तु व तिचें महात्म्य सांगत आहेत. ( ३०८–३२७ ).

'ॐ तत् सत्' हें जें परब्रह्माचें नांव आहे, तें घेऊन सात्त्विक कर्में केलीं, तर मोक्षापर्यंत नेण्याचें सामर्थ्य कर्मांत आणून ठेवण्याची शक्ति या नांवांत आहे. वास्तविक अनादि निर्गुण निराकार ब्रह्माला नांव कोठून असणार ? पण श्रुतिमाउलीला, संसारतापानें पीडलेल्या लोकांची दया आली व या दुःखांतून सोडवून जीवाला महत्त्व प्राप्त करून देण्यासाठीं हें नांव तिनें ब्रह्माला ठेवलें. खुद्द ब्रह्मदेवाच्या ठिकाणीं सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति या नामाच्या आवर्तनानेंच आली. सात्त्विक कर्म या ब्रह्मनामानें युक्त होऊन आचरलें असतां, मोक्ष त्याचा चाकर होऊन पुढें येतो. हें नाम कसें घ्यावें, तें मात्र कळलें पाहिजे. नाहींतर तें सात्त्विक कर्म करून व नाम जपून उपयोग होणार नाहीं. ( ३२८–३५३ )



स्थळीं नावा जिया दाटिजें । जळीं तियांचि जेवीं तरिजे ।
तेवीं बंधकीं कर्मी सुटिजें । नामें येणें ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय १७ वा, ओवी ३६६

या नामाचा विनियोग असा आहे कीं, कर्मांच्या आरंभीं ध्यानानें ओंकाराचा अर्थ वृत्तीवर आरूढ करून मग तो वाचेनें ( ॐ असा ) स्पष्ट उच्चार करून घ्यावयाचें आहे. ओंकाराचें सहाय्य झालेल्या या विधियुक्त क्रियांना पुढें फळ येऊं लागलें कीं 'तत्' शब्दाचा विनियोग करावा, म्हणजे तत् शब्दानें वाचक जें ब्रह्म त्या ब्रह्माला तें कर्म व फळ हीं दोन्हीं आपल्या ठिकाणीं भोगावयास कांहीं शिल्लक न ठेवतां, अर्पण करावींत. याप्रमाणें कर्म ब्रह्मरूप होतें; परंतु कर्म जरी ब्रह्मरूप झालें तरी तेवढ्यानें पुरें काम होत नाहीं; कारण ब्रह्मार्पण करणारा ( मी तें ब्रह्मार्पण केलें या भावनेनें ) शिल्लक राहिलेलाच असतो व कर्ता जोंपर्यंत असा वेगळा राहिलेला आहे, तोंपर्यंत त्याची संसारांतून सुटका नाहीं; म्हणून कर्ता ब्रह्मरूप होण्यासाठीं 'सत्' शब्दाचा विनियोग कर्मांचे शेवटीं सांगितला आहे. ( ३५४–३७९ ).

जेवढें म्हणून आकाराला आलें आहे तें मिथ्या असून एक ब्रह्मच निर्दोष आहे असें 'सत्' शब्द सांगतो. ब्रह्मरूप झालेल्या कर्माचें या 'सत्' शब्दाशीं ऐक्य झालें म्हणजे शिल्लक कांहींच राहत नाहीं. आपल्यासह सर्व ब्रह्मच आहे, असा अद्वैत अनुभव त्याला प्राप्त होतो. ( हें व्याख्यान करतांनाहि श्रीज्ञानदेवही ब्रह्मस्वरूप श्रीकृष्णांत नाहींसे झालेले दिसतात. ) या सत् शब्दाचा जीवावर आणखी एक मोठा उपकार आहे. कर्म करणारा बोलूनचालून मनुष्यच असतो. त्यानें आपल्याकडून कर्म करण्यांत कितीही शिकस्त केली, तर त्यांत कांहींतरी न्यून राहणें व शास्त्रमर्यादेचें क्वचितच उल्लंघनही होणें संभवनीय आहे. आपल्या सत्पणाच्या सामर्थ्यानें कर्मांतील हा न्यूनत्वाचा व असत्पणाचा दोष घालवून त्याला पूर्ण व सत्कर्माच्या योग्यतेला हा सत् शब्द आणतो. अशा रीतीनें एरवीं जीवाला जन्ममरणाच्या संसारांत बांधणाऱ्या यज्ञदानादि कर्मांना त्यांच्या कर्त्यांसह ब्रह्मापर्यंत पोंचविण्याचें सामर्थ्य 'ॐ तत् सत्' या नामामध्यें आहे. परंतु या नामाची काय जरुरी आहे ? आपण फक्त नुसतीं मोठमोठीं यज्ञ, तप, दान, कर्मेंच करीत बसावें म्हणजे झालें; असा दुराग्रह धरला, तर त्यांच्या त्या तपश्चर्या, दानें, सर्व फुकट जातील. त्यांना ऐहिक भोगही मिळणार नाहीं. मग परलोकची गोष्ट बोलावयासच नको ( ३८०-४२३ ).

जीवाला ब्रह्मप्राप्ति करून देणाऱ्या नामाचें महात्म्य श्रीकृष्णांच्या मुखांतून ऐकत असतां त्या ब्रह्मानंदांत अर्जुन विरून गेला, त्याला युद्धाच्या घनघोर प्रसंगींही समाधि लागली. हें पाहून सात्त्विक अंतःकरणाचा संजयही त्या आनंदांत नाहींसा होऊं लागला. अर्जुन हा त्यांचा शत्रु; पण त्याच्यामुळें भगवंताच्या मुखांतून हें अलौकिक भाषण ऐकावयास मिळालें, या उपकाराची त्याला आठवण होत होती; व तो ती बोलून दाखवूं लागला, परंतु धृतराष्ट्राला त्यामुळें राग येईल, म्हणून उघड स्तुति करण्याचें त्यानें आवरतें घेतलें. असें या प्रसंगाचें बहारीचें वर्णन करून ज्ञानदेवांनीं श्रीनिवृत्तिनाथांचें स्मरण करून हा अध्याय संपविला आहे. ( ४२४–४३३ ).



# ज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा

विश्वविकासित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा । तया नमो जीवगणेंद्रा । सद्गुरू तुज ॥ १ ॥ त्रिगुणत्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला । तो आत्मा शंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ॥ २ ॥ म्हणौनि शिवेंसीं कांटाळा । गुरुत्वें तूंचि आगळा । तऱ्ही हळु मायाजळीं- । माजीं तारुनि ॥ ३ ॥ जे तुझ्याविखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड । ज्ञानियांसि तरी अखंड । उजूचि आहासि ॥ ४ ॥ दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्ही मीलनोन्मीलनीं । उत्पत्ति प्रळयो दोन्ही । लीलाचि करिसी ॥ ५ ॥ प्रवृत्तिकर्णाचां चाळीं । उठिला मदगंधानिळीं । पूजीजसी नीलोत्पळीं । जीवभृंगाचां ॥ ६ ॥ पाठीं निवृत्तिकर्णताळें । आहाळी ते पूजा विघुळे । तेव्हां मिरविसी मोकळें । आंगाचें लेणें ॥७॥ वामांगीचा लास्यविलासु । जो हा जगद्रूप आभासु । तो तांडवमिसें कळासु । दाविसी तूं ॥८॥ हें असो विस्मो दातारा । तूं होसी जयाचा सोयरा । सोइरिकेचिया व्यवहारा । मुकेचि तो ॥ ९ ॥ फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्बंधु ऐसा भावो । धरूं बोलणें उवावो । तुझांचि आंगीं ॥ १० ॥ दुजयाचेनि नांवें तया । देहही नुरेचि पैं देवराया । जेणें तूं आपण- पयां । केलें दुजें ॥ ११ ॥ तूतें करूनि पुढें । जे उपायें घेती दवडे । तयां ठासी बहुवें पाडें । मार्गांचि तूं ॥ १२ ॥ जो ध्यानें सूये मानसीं । तयालागीं नाहीं तूं त्याचे देशीं । ध्यानही विसरे तेणेंसीं । वालभ तुज ॥ १३ ॥ तूतें सिद्धाचि जो नेणे । तो नांदें सर्वज्ञपणें । वेदांही येवढें बोलणें । नेघसी कानीं ॥ १४ ॥ मौन गा तुझें राशिनांव । आतां स्तोत्रीं कें बांधों हाव । दिससी

# ज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा

ज्या तुझी योगमाया विश्वरूपी प्रफुल्लित आकाराला प्रगट करते व जो जीवरूपी गणांचा तूं स्वामी ( गणपति ) त्या सद्गुरो, तुला नमस्कार असो. १. ( पूर्वी त्रिपुरासुराचा वध करून देवांस मुक्त करण्याचे वेळीं शंकरास गणपतीची स्तुति करावी लागली. तो प्रसंग मनांत आणून ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ) सत्त्व, रज, तमरूपी तीन शहरांनीं वेढलेला व जीवभावरूपी किल्ल्यांत अडकलेला, जो आपला आत्मा, तो शिवानें, गुरुरूपी तूं जो गणेश, त्या तुझें स्मरण करून सोडविला. २. म्हणून शिवाबरोबर तुझी तुलना केली असतां श्रेष्ठत्वानें तूंच अधिक आहेस. तरी पण ( मुमुक्षु जीवांना ) मायारूपी जळांतून तारतोस, म्हणून तूं ( भोपळ्यासारखा ) हलका आहेस. ३. जे तुझ्याविषयीं अज्ञानी आहेत, त्यांचेपासून तूं आपलें मुख एकीकडे फिरविलें आहेस आणि ज्ञानवानांना तर तूं नेहमीं सन्मुखच आहेस. ४. आपली दृष्टि ( डोळे ) पाहिली तर बारीक आहे; तरी त्या दृष्टीच्या झांकण्यांत व उघडण्यांत ( ज्ञानाच्या संकोच व विकासांत ), ( जगाचें ) उत्पत्ति व प्रलय हे दोन्ही आपण सहज करतां. ५. प्रवृत्तिरूपी कानाच्या हालण्यानें जो गंडस्थळांतून वाहणाऱ्या मदाच्या सुवासानें युक्त असलेला वारा सुटला, त्याला भुलून जीवरूपी भ्रमर तुझ्या मस्तकावर जमा झाले. त्या जीवभ्रमररूपी निळ्या कमलांनीं तूं पूजिला गेला आहेस. ६. नंतर निवृत्तिरूपी कानाच्या हालण्यानें ती बांधलेली पूजा उधळून जाते; तेव्हां आपल्या मोकळ्या शरीराचा अलंकार तूं मिरवितोस. ७. माया हीच कोणी तुझी स्त्री, तिची नृत्यक्रीडा, हाच जो जगद्रूपी आभास, त्यांतील कौशल्य ( मायेचें आपल्या नृत्यक्रीडेंत जगदाभास दाखविणें हें ) तूं आपल्या नृत्याच्या द्वारें दाखवितोस. ( तुझ्या आश्रयानें असणारी जी माया, तिची जगदाभासरूपी नृत्यक्रीडा तूं आपल्या अस्तित्वावर दाखवितोस. ) ८. हे श्रीगुरो, हें राहूं द्या. आश्चर्य हें आहे, तूं ज्याचा सोयरा होतोस, तो सोयरेपणाच्या व्यवहाराला मुकतोच. ( म्हणजे तूं ज्याच्यावर प्रेम करतोस, त्याला सर्वत्र आत्मप्रतीति होत असल्यामुळें, त्याची आपपरभावना नाहींशी होते. ) ९. तूं ( अहंकारादिसंसार ) बंधनाचा ठावठिकाण नाहींसा करणारा आहेस, म्हणून ' जगद्बंधु ' या नांवाचा अभिप्राय तुझ्याच ठिकाणीं प्रशस्तपणानें लागतो ( जगद्बंधु हें नांव तुला यथार्थ शोभतें. ) १०. हे देवराया, ( देहदृष्ट्या ) दुसरा जो तूं, त्या तुला, ज्यानें आपलें रूप मानलें त्याला द्वैताच्या नांवानें स्वतःचा देहही ( वेगळा ) उरत नाहींच. ( म्हणजे जो तुला आपला आत्मा समजला, त्याला आपल्यासहवर्तमान संपूर्ण जग आत्मरूप दिसतें. ) ११. तुला विषय करून तुझ्या प्राप्तीच्या साधनद्वारां जे धांवा घेतात, त्यांना तूं पुष्कळ प्रमाणांत मागेंच रहातोस. १२. जो ध्यानाच्या योगानें तुला मनांत आणूं पहातो, त्याच्याकरितां ( त्याच्या ध्यानाला विषय होईल असा ) तूं त्याच्या देशांत ( वृत्तींत ) नाहींस व जो ऐक्यबोधांत तुझें ध्यानही विसरतो, त्यावर तुझें प्रेम असतें. १३. जो तुला सिद्धच ( कृतीनें प्राप्त होण्याजोगा नव्हे ) असा जाणत नाहीं; ( उलट जो शब्दादि साधनांनीं तुझें आकलन करण्याचा प्रयत्न करतो ) तोच सर्व जाणणारा म्हणून मिरवतो. त्या शब्दज्ञान्याच्या शब्दरूप साधनानें, ( हे श्रीगुरो, ) तुमची सिद्धि कशी होणार ? कारण सर्वज्ञ म्हणून गाजलेल्या शब्दराशिरूप वेदानें केलेलें आपलें वर्णन, जेथें आपल्या कानापर्यंत येण्याची पंचाईत पडते, तेथें त्याचा काय पाड ! १४. महाराज, मौन हें आपल्या जन्मराशीवरून काढलेलें आपलें नांव आहे. असें असल्याकारणानें मी स्तुति करण्याची उत्कट इच्छा कोठें बाळगूं !

वेतुली भाव । भजों काई ॥१५॥ दैविकें सेवक्ु हों पाहों । तरी भेदितां द्रोहोचि लाहों। म्हणोनि आतां कांहीं नोहों । तुजलागीं जी ॥ १६ ॥ जैं सर्वथा सर्वही नोहिजे । तैं अद्वया तूतें लाहिजे । हें जाणें मी वर्म तुझें । आराध्यालिंगा ॥ १७ ॥ तरी जुरोनि वेगळेंपण । रसीं भजिन्नलें लवण । तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों ॥ १८ ॥ आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे । कां दशी दीपसंगें । दीपुचि होय ॥ १९ ॥ तैसा तुझिया प्रणती । मी पूर्णु जाहलों श्रीनिवृत्ति । आतां आणीन व्यक्ती । गीतार्थु तो ॥ २० ॥ तरी षोडशाध्यायशेखीं । तिये समाप्तीचां श्लोकीं । जो ऐसा निर्णयो निष्टंकीं । ठेविला देवें ॥ २१ ॥ जे कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था । शास्त्राचि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥ २२ ॥ तेथ अर्जुन मानसें । म्हणे हें ऐसें कैसें । जे शास्त्रेंवीण नसे । सुटिका कर्मा ॥ २३ ॥ तरी तक्षकांची फडे । ठाकोनि कैं तो मणि काढे । कैं नाकींचा केशु जोडे । सिंहाचिये ॥ २४ ॥ मग तेणें तो वोंविजे । तरीच लेणें पाविजे । एऱ्हवीं काय असिजे । रिक्तकंठीं ॥ २५ ॥ तैसी शास्त्रांची मोकळी । यां कैं कोण येटाळी । एकवाक्यतेचां फळीं । पैसिजे कैं ॥ २६ ॥ जालयाही एकवाक्यता । कां लाभे वेळ अनुष्ठितां । कैंचा पैसारु जीविता । येतुलालिया ॥ २७ ॥ आणि शास्त्रें अर्थें देशें काळें । या चहूंही जें एक फळे । तो विपावो कीं कां मिळे । आघवयांसी ॥ २८ ॥ म्हणौनि शास्त्राचें घडतें । नोहे प्रकारें बहुतें । तरी मूर्खां मुमुक्षां येथें । काय गति पां ॥ २९ ॥ हा पुसावया अभिप्रावो । जो अर्जुन करी प्रस्तावो । तो सतराविया ठावो । अध्याया येथ ॥ ३० ॥ तरी सर्वविषयीं वितृष्णु । जो सकळकळीं प्रवीणु । कृष्णाही नवल कृष्णु । अर्जुनत्वें जो ॥ ३१ ॥ शौर्या जोडला आधारु । जो सोमवंशाचा शृंगारु । सुखादि उपकारु । जयाची लीला ॥ ३२ ॥ जो प्रज्ञेचा प्रियोत्तमु । ब्रह्म-विद्येचा विश्रामु । सहचरु मनोधर्मु । देवाचा जो ॥ ३३ ॥

अर्जुन उवाचः—ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः । तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा । इंद्रियां फांवलिया ब्रह्मा । तुझा बोलु आम्हां । साकांक्षु पैं जी ॥३४॥ जें शास्त्रेंवांचूनि आणिकें । प्राणिया स्वमोक्षु न देखे । ऐसें कां कैंपखें । बोलिलासी ॥ ३५ ॥ तरी न मिळेचि तो देशु । नव्हेचि काळा अवकाशु । जो करवी शास्त्राभ्यासु । तोही दुरी ॥ ३६ ॥ आणि अभ्यासीं विरजिया । होती जिया सामुग्रिया । त्याही नाहीं आपैतिया । तिये वेळीं ॥ ३७ ॥ उजू नोहेचि प्राचीन । नेदिचि प्रज्ञा संवाहन । ऐसें ठेलें आपादन । शास्त्रांचें जयां ॥ ३८ ॥ किंबहुना शास्त्रविखीं । एकही न लाहातीचि नखी । म्हणूनि उखिविखी । सांडिली जिहीं ॥ ३९ ॥ परी निर्धारूनि शास्त्रें । अर्थानुष्ठानें पवित्रें । नांदतात परत्रें ।

जें तुझें स्वरूप मला दृश्यत्वेंकरून दिसत आहे, तें सर्व मिथ्या आहे. तर मग मीं भजन कशाचें करावें ? १५. हे देवा, जर मी तुमचा सेवक होऊं पाहीन, तर (तुमच्या एकरस स्वरूपांत सेव्य व सेवक असा) भेद उत्पन्न केल्यामुळें मला तुमचा द्रोह केल्याचें पातक प्राप्त होईल. म्हणून महाराज, तुमच्या संबंधानें मी स्वतः कांहींच होत नाहीं. (तुमच्याहून कोणच्याच प्रकारानें वेगळा रहात नाहीं,) १६. जेव्हां सर्व प्रकारें सर्वही न व्हावें (म्हणजे जेव्हां कशाची अहंता घेऊं नये) तेव्हां अद्वितीय जो तूं त्या तुझी प्राप्ति होते. हे आराध्यमूर्ते, हें तुझें वर्म मी जाणत आहें. १७. तर फार काय सांगूं ? जसें मीठ वेगळेपणानें न उरून पाण्याला भजतें (म्हणजे पाण्याशीं तद्रूप होऊन रहातें.) तसें माझें नमन आहे असें समजा. १८. आतां, रित्या घागरीनें समुद्रांत प्रवेश केल्यावर ती उचंबळत भरून निघते, अथवा वात, दिव्याच्या संगतीनें दिवाच होते; १९. त्याप्रमाणें हे श्रीनिवृत्तिनाथा, तुम्हांला नमस्कार करून मी पूर्ण झालों. आतां मी तो गीतेचा अर्थ प्रगट करीन २०. तर सोळाव्या अध्यायाच्या अखेरीस, त्या समाप्तीच्या शेवटच्या श्लोकांत, जो असा सिद्धांत देवानें निश्चयात्मक रीतीनें स्थापित केला, २१. तो हा कीं अर्जुना, कृत्य व अकृत्य यांची रीति आचरणांत आणण्यास तुला एक शास्त्रच पूर्णपणें प्रमाण मानलें पाहिजे. २२. तेव्हां अर्जुन मनांमध्यें असें म्हणाला कीं, (देवाचें सांगणें) हें असें कसें कीं, शास्त्राशिवाय कर्म करण्याला मोकळीक नाहीं ? २३. तर तक्षक नांवाच्या नागाजवळ जाऊन त्याच्या फणींतील मणि कसा काढावयाचा ? व सिंहाच्या नाकां-तील केस कोठें मिळावयाचा ? २४. मग त्या केसांत तो मणि ओंवावा तरच दागिना प्राप्त करून घ्यावा; नाहीं तर काय मोकळ्या गळ्यानें रहावें ? २५. त्या-प्रमाणें शास्त्राचा जो मतभेद, याला कोण कधीं आकलन करील ? व एकवाक्यतेच्या फळांत केव्हां प्रवेश होईल ? २६. जरी एकवाक्यता झाली, तरी त्याप्रमाणें वागण्यास (आचरण करण्यास) वेळ कसा मिळेल ? एवढ्याला (शास्त्रांची एकवाक्यता करणें व त्याप्रमाणें कर्माचरण करण्याला) आयुष्याचा विस्तार कोठला ? २७. आणि शास्त्रांचें ज्ञान, लागणारी द्रव्यादि सामुग्री, सांगितलेलें ठिकाण व योग्य काल, या चार साधनांचा एकत्र योग येऊन, जें कृत्य पार पडणार, हें तर क्वचितच घडणार; (कारण) सर्वांना हा असला योग कोठून साधणार ? २८. म्हणून शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें सर्व घडून येणें, हें पुष्कळ अंशीं असंभवनीयच आहे. असें आहे, तर मग अशा स्थितींत अज्ञानी मुमुक्षु लोकांस कोणता मार्ग आहे ? २९. हा अभिप्राय विचारण्याकरितां अर्जुन ही प्रस्तावना करतो, तो येथें सतराव्या अध्यायाचा प्रसंग होय. ३०. तर सर्व विषयांच्या ठिकाणीं जो (अर्जुन) निरिच्छ व जो सकल कलांमध्यें प्रवीण, आणि (आश्चर्य-रूप) श्रीकृष्ण खरा, परंतु त्यासही आश्चर्य देणारा अर्जुन-रूपी जो हा एक दुसरा कृष्णच आहे; ३१. जो अर्जुन शूरत्वास आधार प्राप्त झाला आहे, जो अर्जुन चंद्रवंशाचें भूषण आहे, दुसऱ्यास सुख देणें वगैरे उपकार करणें ही ज्याची लीला आहे; ३२. जो अर्जुन बुद्धीचा प्रियपति आहे, जो ब्रह्मज्ञानाची विसाव्याची जागा आहे आणि जो देवाच्या मनोधर्माप्रमाणें वागणारा सोबती आहे, ३३.

अर्जुन म्हणाला, हे कृष्णा, जे शास्त्रविधीचें (तो माहीत नाहीं म्हणून) उल्लंघन करून (केवळ) श्रद्धेनें युक्त होत्साते पूजनादि करितात, त्यांची गति काय होते बरें ? सात्त्विक, राजस कीं तामस ? १.

तो अर्जुन म्हणाला; तमाल वृक्षाप्रमाणें श्यामवर्ण असलेल्या श्रीकृष्णा, हे आमच्या इंद्रियांच्या अनुभवाला आलेल्या ब्रह्मरूप कृष्णा, तुझें बोलणें आम्हांला संशययुक्त वाटतें. ३४. कारण कीं, शास्त्रावांचून दुसऱ्या कोणत्याही उपायानें प्राण्याला आपल्या मोक्षाचें दर्शनही होणार नाहीं, असें शास्त्राचा पक्षपात धरून तूं काय म्हणून बोललास ? ३५. तर शास्त्राप्रमाणें कर्माचरण करण्याला योग्य म्हणून सांगितलेलें असें स्थळच मिळत नाहीं व तें कर्म करावयास लागतें तितकें आयुष्य मिळत नाहीं व शास्त्राचा अभ्यास करविणारा जो गुरु तोही दूर असतो, (त्याचाही योग होत नाहीं.) ३६. आणि ज्या सामुग्र्यांची अभ्यासाला मदत होते, त्या सामुग्र्या देखील अभ्यास करण्याच्या वेळेला अनकूल नसतात, ३७. ज्यांना पूर्वकर्म अनुकूल नाहींच, ज्यांना बुद्धि साह्य देत नाहींच, ह्याप्रमाणें ज्यांना शास्त्रांचें संपादन दूर राहिलें; ३८. फार काय सांगावें ! शास्त्राभ्यासाविषयीं टेकण्याला एकही आधार मिळत नाहींच म्हणून ज्यांनीं (शास्त्रांची) वाटाघाट टाकली; ३९. परंतु शास्त्रांचा (विचारानें) निश्चय करून व शास्त्रांच्या अर्था-

साचारें जे ॥ ४० ॥ तयांऐसें आम्हीं होआवें । ऐसी चाड बांधोनि जीवें । घेती तयांचे मागावे । आचरावया ॥ ४१ ॥ धव्याचियां आखरां । तळीं बाळ लिहे दातारा । कां पुढांथूनि पाडिकरा । अक्षम्रु चाले ॥ ४२ ॥ तैसें सर्वशास्त्रनिपुण । तयांचें जें आचरण । तेंचि करिती प्रमाण । आपलिये श्रद्धे ॥ ४३ ॥ मग शिवादिकें पूजनें । भूम्यादिकें महादानें । अग्निहोत्रादि यजनें । करिती जे श्रद्धा ॥ ४४ ॥ तयां सत्त्वरजतमां- । माजीं कोण पुरुषोत्तमा । गति होय ते आम्हां । सांगिजो जी ॥ ४५ ॥ तंव वैकुंठपिठींचें लिंग । जो निगमपद्माचा पराग । जिये जयाचेनि हें जग । अंगच्छाया ॥ ४६ ॥ काळ सावियाचि बाढु । लोकोत्तर प्रौढु । अद्वितीय गूढु । आनंदघनु ॥ ४७ ॥ इयें श्लाघिजती जेणें विकें । तें जयाचें आंगीं असिकें । तो श्रीकृष्ण स्वमुखें । बोलत असे ॥ ४८ ॥

श्रीभगवानुवाचः—त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा । सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥

म्हणे पार्था तुझा अतिसो । घेईं गा आम्ही जाणतसों । शास्त्राभ्यासाचा आडसो । मानितोसि कीं ॥ ४९ ॥ नुसधियाची श्रद्धा । झोंबों पाहसी परमपदा । तरी तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे ॥ ५० ॥ श्रद्धा म्हणितलियासाठीं । पातेजो नये किरीटी । काय द्विजु अंत्यजघृष्टीं । अंत्याचि नोहे ॥ ५१ ॥ गंगोदक जरी जालें । तरी मद्यभांडां आलें । तें घेवों ये कांहीं केलें । विचारीं पां ॥ ५२ ॥ चंदनु होय शीतळु । परी अग्नीसी पावे मेळु । तैं हातीं धरिला जाळू । न शके काई ॥ ५३ ॥ कां किडाचिये आटतिये पुटीं । पडिलें सोळें किरीटी । घेतलें चोखासाठीं । नागवीना ॥ ५४ ॥ तैसें श्रद्धेचें दळवाडें । आंगें कीर चोखडें । परी प्राणियांचां पडे । विभागीं जें ॥ ५५ ॥ तें प्राणिये तंव स्वभावें । अनादिमायाप्रभावें । त्रिगुणाचेचि आघवे । वळिले आहाती ॥ ५६ ॥ तेथही दोन गुण खांचती । मग एक धरी उन्नती । तैं तैसियाचि होती वृत्ती । जीवां-चिया ॥ ५७ ॥ वृत्तीऐसें मन धरिती । मनाऐसी क्रिया करिती । केलियाऐसी वरिती । मरोनि देहें ॥ ५८ ॥ बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजीं सामाये । ऐसेनि कल्पकोडी जाये । परी जाति न नशे ॥ ५९ ॥ तियापरी यियें अपारें । होतां जातां जन्मांतरें । परी त्रिगुणत्व न व्यभिचरे । प्राणियांचें ॥ ६० ॥ म्हणूनि प्राणियांचां पैकीं । पडिली श्रद्धा अवलोकीं । ते होय गुणासारिखी । तिहीं ययां ॥ ६१ ॥ विपायें वाढे सत्त्व शुद्ध । तेव्हां ज्ञानासी करी साद । परी एका दोघे बोखद । येर आहाती ॥ ६२ ॥ सत्त्वाचेनि आंगलगें । ते श्रद्धा मोक्षफळा रिगे । तंव रज तम उगे । कां पां राहाती ॥ ६३ ॥ मोडोनि सत्त्वाची त्राये । रजोगुण आकाशें जाये । तेव्हां तेचि श्रद्धा होये । कर्मकेरसुणी ॥ ६४ ॥ मग तमाची उठी आगी । तेव्हां तेचि श्रद्धा भंगी । हों लागे भोगालागीं । भलतेया ॥ ६५ ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत । श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

प्रमाणें पवित्र आचरण करून, परलोकांत जे खरोखर नांदत आहेत, ४०. त्यांच्यासारखे आम्हीं व्हावें, अशी जीवाशीं इच्छा बाळगून, तसें आचरण करण्याकरितां जे त्यांचे कित्ते घेतात. ४१. अहो महाराज, धड्यांतील अक्षरें पाहून त्याखालीं तसें हुबेहूब मूळ लिहितें, अथवा डोळस पुढें करून जसा आंधळा त्याच्या धोरणानें चालतो. ४२. त्याप्रमाणें जे सर्व शास्त्रांत निपुण असतात, त्यांचें जें आचरण असतें, तेंच ( आचरण ) आपल्या श्रद्धेला जे प्रमाण करतात, ( त्यांच्यावर श्रद्धा ठेवून त्याप्रमाणें वागतात. ) ४३. मग शिवादिक देवांच्या पूजा, भूमिदानादिक मोठीं दानें व अग्निहोत्रादिक यज्ञ जे श्रद्धेनें करतात, ४४. त्यांना, हे पुरुषोत्तमा, सत्त्व, रज व तम यांपैकीं कोणती गती प्राप्त होते तें आम्हांला सांगा. ४५. तेव्हां जो ( श्रीकृष्ण ) वैकुंठस्थानाचें आराध्यदैवत आहे व जो ( श्रीकृष्ण ) वेदरूपी कमलांतील पराग आहे व ज्याच्या अंगाच्या छायेनें ( ज्याच्या आश्रित मायेनें ) हें जग जगतें, ४६. स्वभावतःच असलेली काळाच्या ठिकाणची प्रबलता व ( जगांत आढळून येणारे ) लोकोत्तरता व प्रौढपणा, अद्वैतत्त्व, गूढता आणि आनंदघनता ( हे गुण ) ४७. त्या गुणांचा जो बोलबाला आहे, तो ज्याच्या जोरावर आलेला आहे, तें सामर्थ्य, ज्याच्या ठिकाणीं पूर्णपणें आहे, तो, श्रीकृष्ण प्रभु, आपल्या तोंडानें सांगत आहे. ४८.

श्रीकृष्ण म्हणाले, प्राण्यांची ती स्वाभाविक श्रद्धा तीन प्रकारची असते. सात्त्विक, राजस आणि तामस, ती ऐक. २

देव म्हणतात, अर्जुना, तुझा आग्रह आम्ही जाणत आहों असें समज. तूं शास्त्राभ्यासाची अडचण मानीत आहेसना ? ४९. नुसत्या ( हव्या त्या ) श्रद्धेनें परमपदाला ( मोक्षाला ) स्वाधीन करून घेण्यास पाहातोस, तर चतुर अर्जुना, हें तसें सोपें नाहीं. ५०. अर्जुना, श्रद्धा म्हणून म्हटलें कीं, तेवढ्यावरच केवळ श्रद्धेनेंच कार्यभाग होईल, असा विश्वास धरूं नये. ( कारण, कीं ती श्रद्धा कोणच्या प्रकारची असेल, तें सांगतां येत नाहीं. ) महाराच्या संसर्गानें ब्राह्मणही महारच होत नाहीं काय ? ५१. गंगेचें पाणी जरी असलें तरी तें दारूच्या भांड्यांत आलें, तर तें घेतां येईल काय ? विचार कर बरें. ५२. चंदन हा स्वभावतः थंड आहे; परंतु त्याचा अग्नीशीं संबंध झाला असतां, तो हातीं धरला तर जाळूं शकणार नाहीं काय ? ५३. अथवा अर्जुना, हिणकस सोनें आटवीत असलेल्या मुशींत, उत्तम सोनें पडलें असतां, त्याचा हिणकसाशीं संयोग झाल्यानें तें हिणकस होईल, असें असतां, तें सोनें उत्तम आहे, अशा समजुतीनें घेतलें तर त्यापासून नुकसान होणार नाहीं काय ? ५४. त्याप्रमाणें श्रद्धेचें स्वरूप स्वभावतः शुद्ध आहे; परंतु ज्या वेळीं ती प्राण्यांच्या वांटणीस येते; ५५. तेव्हां प्राणी तर स्वभावतः अनादि असलेल्या मायेच्या सामर्थ्यानें सर्व त्रिगुणांचेच बनलेले आहेत. ५६. त्या त्रिगुणांत देखील दोन गुण दबतात ( कमी होतात, ) व मग एक वाढतो, त्या वेळेला जीवांच्या वृत्ती तशा वाढत्या गुणासारख्या होतात. ५७. ते जीव अंतःकरणाच्या स्थितीप्रमाणें संकल्प करतात; संकल्पाप्रमाणें कर्में करतात आणि मेल्यावर केलेल्या कर्मांप्रमाणें देह स्वीकारतात. ५८. बीज नाहींसें होऊन त्याचें झाड होतें, झाड नाहींसें होऊन त्याचा बीजांत समावेश होतो; हा क्रम कोट्यवधि कल्पें चालला तरी ( झाडाची ) जात नष्ट होत नाहीं. ५९. त्याप्रमाणें हीं असंख्य जन्मांतरें होत-जात असतां, प्राण्यांचें त्रिगुणत्व बदलत नाहीं. ६०. म्हणून प्राण्यांच्या वांट्याला आलेली जी श्रद्धा, ती या तीन गुणांसारखी होते, असें समज. ६१. कदाचित् जेव्हां शुद्ध सत्त्वगुण वाढतो, तेव्हां तो ज्ञानाला हांक मारतो. ( ज्ञानाची इच्छा करतो. ) परंतु एकाला ( शुद्ध सत्त्व गुणाला ) इतर दोघे ( रज, तम ) विरुद्ध आहेत. ६२. सत्त्वाच्या संबंधानें ती श्रद्धा मोक्षरूप फलापर्यंत जाते, तेव्हां रज व तम स्वस्थ कां बरें राहातील ? ६३. सत्त्वाचें बल नाहींसें करून जेव्हां रजोगुण आकाशांत जातो ( अतिशय वाढतो ), तेव्हां तीच श्रद्धा कर्मकेरसुणी होते. ( त्याची वृत्ति, ही कर्मरूपी केर सरसकट झाडणारी केरसुणी होते. ) ६४. मग तमाची जेव्हां आग उठते, ( जेव्हां तमोगुण अतिशय वाढतो, ) तेव्हां त्याच श्रद्धेचा प्रकार भलत्याच भोगाकरितां होऊं लागतो. ( निषिद्धविषयसेवनाकडे त्या श्रद्धेची प्रवृत्ति होते. ) ६५.

हे अर्जुना, प्रत्येकाची श्रद्धा ( त्याच्यात्याच्या ) सत्त्वानुरूप ( सत्त्वादिसंस्काराप्रमाणें ) असते. मनुष्यप्राणि हा श्रद्धामय असतो, ज्याची ज्यावर श्रद्धा असते, तसा तो बनत असतो. ३

एवं सत्त्वरजतमा- । वेगळी श्रद्धा सुवर्मा । नाहीं गा जीवग्रामा- । माजीं यया ॥ ६६ ॥ म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक । रजतमसात्त्विक । भेदीं इहीं ॥ ६७ ॥ जैसें जीवनचि उदक । परी विषीं होय मारक । कां मिरयामाजीं तीख । ऊंसीं गोड ॥ ६८ ॥ तैसा बहुवसें तमें । जो सदाचि होय निमे । तेथ श्रद्धा परिणमे । तेंचि होऊनि ॥ ६९ ॥ मग काजळा आणि मसी । न दिसे विवंचना जैसी । तेवीं श्रद्धा तामसी । सिनी नाहीं ॥ ७० ॥ तैसीच राजसीं जीवीं । रजोमय जाणावी । सात्त्विकीं आघवी । सत्त्वाचीच ॥ ७१ ॥ ऐसेनि हा सकळ । जगडंबरु निखिळ । श्रद्धेचाचि केवळु । वोतला असे ॥ ७२ ॥ परी गुणत्रयवशें । त्रिविधपणाचें लासें । श्रद्धे जें उठिलें असे । तें वोळख तूं ॥ ७३ ॥ तरी जाणिजे झाड फुलें । कां मानस जाणिजे बोलें । भोगें जाणिजे केलें । पूर्वजन्मींचें ॥ ७४ ॥ तैसीं जिहीं जिहीं चिन्हीं । श्रद्धेचीं रूपें तीन्ही । देखिजती ते वानी । अवधारीं पां ॥ ७५ ॥

यजंते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः । प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥

तरी सात्त्विक श्रद्धा । जयांचा होय बांधा । तयां बहुतकरूनि मेधा । स्वर्गीं आथी ॥ ७६ ॥ ते विद्याजात पढती । यज्ञक्रिये निवडती । किंबहुना पडती । देवलोकीं ॥ ७७ ॥ आणि श्रद्धा राजसा । घडले जे वीरेशा । ते भजती राक्षसां । खेचरां इन ॥ ७८ ॥ श्रद्धा जे कां तामसी । ते मी सांगेन तुजपाशीं । जे कां केवळ पापराशी । अतिकर्कशी निर्दयत्वें ॥ ७९ ॥ जीववधें साधूनि बळी । भूतप्रेतकुळें मैळीं । स्मशानीं संध्याकाळीं । पूजिती ते ॥८०॥ ते तमोगुणाचें सार । काढूनि निर्मिले नर । जाण तामसियेचें घर । श्रद्धेचें तें ॥ ८१ ॥ ऐसी इहीं तिहीं लिंगीं । त्रिविध श्रद्धा जगीं । पैं हें ययालागीं । सांगत असें ॥ ८२ ॥ जे हे सात्त्विक श्रद्धा । जतन करावी प्रबुद्धा । येरी दोनी विरुद्धा । सांडाविया ॥ ८३ ॥ हे सात्त्विक मति जया । निर्वाहती होय धनंजया । बागुल नोहे तया । कैवल्य तें ॥ ८४ ॥ तो न पढो कां ब्रह्मसूत्र । न लोढो सर्व शास्त्र । सिद्धांत न होत स्वतंत्र । तयाचां हातीं ॥ ८५ ॥ परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त । अनुष्ठानें जगा देत । वडील जे जे ॥ ८६ ॥ तयांचीं आचरतीं पाउलें । पाऊनि सात्त्विका श्रद्धा चाले । तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ॥ ८७ ॥ पैं एक दीपु लावी सायासें । आणिक तेथें लाऊं बैसे । तरी तो काय प्रकाशें । वंचिजे गा ॥ ८८ ॥ कां येकें मोल अपार । वेंचोनि केलें धवळार । तो सुरवाडु वस्तीकर । न भोगी काई ॥ ८९ ॥ हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी । कीं सुआरासीचि अन्न घरीं । येरां नोहे ॥ ९० ॥ बहुत काय बोलों पैं गा । येका गौतमासीचि गंगा । येरां समस्तां काय जगा । वाहाळ जाली ॥ ९१ ॥ म्हणोनि आपुलियापरी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी । जाणे तयातें श्रद्धा जो वरी । तो मूर्खही तरे ॥ ९२ ॥

हे चांगलें वर्म जाणणाऱ्या अर्जुना, याप्रमाणें या जीव-समुदायामध्यें सत्त्व, रज व तम या तीन गुणांविरहित श्रद्धा नाहीं. ६६. म्हणून स्वाभाविक रीतीनें राजसी, तामसी व सात्त्विक, या (प्राण्यांच्या) तीन प्रकारामुळें श्रद्धा ही तीन गुणांच्या रूपाची बनली आहे. ६७. ज्याप्रमाणें पाणी हें स्वभावतः जगवणारेंच आहे; परंतु विषाशीं युक्त झालें असतां तें मारक होतें अथवा मिऱ्याशीं युक्त झालें असतां तिखट होतें व उंसाशीं युक्त झालें असतां गोड होतें. ६८. त्याप्रमाणें तमाच्या आधिक्यांत जो नेहमींच जन्मतो व मरतो, त्याच्या ठिकाणीं श्रद्धा तें (तमोगुणच) होऊन परिणामाला पावते. ६९. मग काजळ आणि शाई यांमध्यें (रंगांत) जसा फरक दिसत नाहीं, त्याप्रमाणें तामसी श्रद्धा ही (तमोगुणाहून) वेगळी नाहीं. ७०. त्याप्रमाणें श्रद्धा ही रजोगुणी अंतःकरणांत रजोगुणाच्या रूपानेंच असते अशी समजावी व सत्त्वगुणयुक्त अंतःकरणामध्यें ती सर्व सत्त्वाचीच असते. ७१. अशा तऱ्हेनें हें सर्व जग केवळ सर्व श्रद्धेचेंच ओतलें आहे. ७२. परंतु हें जगडंबर (सर्व प्राणी), तीन गुणांच्या आधीन असल्याकारणानें त्यांच्या ठिकाणीं असलेल्या श्रद्धेमध्येंही तीन प्रकारचें चिन्ह उत्पन्न झालें आहे, असें तूं समज. ७३. तर झाड जसें फुलावरून ओळखतां येतें, अथवा बोलण्यावरून जसें मन जाणतां येतें अथवा या जन्मांतील सुखदुःखांच्या भोगांवरून जसें मागील जन्मांत केलेलें कर्म ओळखतां येतें; ७४. त्याप्रमाणें ज्या ज्या लक्षणांनीं श्रद्धेचीं तिन्ही रूपें समजलीं जातात, तो प्रकार ऐक. ७५.

सात्त्विक श्रद्धेनें युक्त असे मनुष्य देवांची उपासना करतात; राजस श्रद्धेनें घडलेले, यक्ष–राक्षसांची उपासना करतात; आणि तामसी श्रद्धेनें बळलेले मनुष्य प्रेतें व भूतें यांची उपासना करतात. ४.

तर सात्त्विक श्रद्धेनें ज्यांचा पिंड बनलेला आहे, त्यांची बुद्धि बहुतकरून स्वर्गाच्या ठिकाणीं (स्वर्गप्राप्तीकडे) असते. ७६. ते सर्व विद्यांचें अध्ययन करितात, यज्ञक्रियेंत निष्णात होतात. फार काय सांगावें! ते देवलोकीं जातात. ७७. हे वीरश्रेष्ठा अर्जुना, आणि जे राजसी श्रद्धेनें बनलेले आहेत, ते राक्षस व यक्ष यांचें भजन करतात. ७८. तामसी श्रद्धा जी केवळ अनेक पापांनीं भरलेली आहे व जी निर्दयपणानें फार कठोर आहे, ती मी तुला सांगतों. ७९. जीवांच्या वधानें बळी सिद्ध करून ते (तामसी श्रद्धावान् लोक) स्मशानामध्यें संध्याकाळीं भूतें व प्रेतें यांचे अमंगल समुदाय पूजतात. ८०. ते पुरुष तमोगुणाचा अर्क काढून बनविलेले आहेत; आणि ते तामसी श्रद्धेचें घर आहेत, असें समज. ८१. याप्रमाणें जगामध्यें या तीन लक्षणांनीं तीन प्रकारची श्रद्धा होते; पण मी हें एवढ्याकरितां सांगत आहें कीं, ८२. जी ही सात्त्विक श्रद्धा आहे, ती, शहाण्या अर्जुना, जतन करावी व दुसऱ्या दोन विरुद्ध (अकल्याणकारक) आहेत, त्या टाकाव्यात. ८३. अर्जुना, या सात्त्विक बुद्धीची ज्यांच्याकडून जोपासना होईल, त्याला मोक्षाचा कांहींच बाऊ नाहीं. ८४. तो व्यासांचीं ब्रह्मसूत्रें न शिकेना का? तो सर्व शास्त्रांचें परिशीलन न करीना का? स्वतंत्र बुद्धीनें स्थापलेले (नवीन) सिद्धांत त्याचें स्वाधीन नसेनात का! ८५. परंतु जे जे थोर पुरुष श्रुतिस्मृतींचे अर्थ आपणच मूर्तिमंत होऊन, आपल्या आचरणानें (त्या अर्थाप्रमाणें वागून) ते अर्थ जगास देतात, ८६. त्यांचीं आचरणरूपी पाऊलें पाहून मग जो कोणी आपलें पाऊल ठेवून सात्त्विक श्रद्धेनें चालतो, त्याला तेंच फळ अगदीं ठेवल्यासारखें प्राप्त होतें. ८७. अर्जुना, एकानें मोठ्या श्रमानें प्रथम दिवा लावला आणि त्या दिव्यावर दुसरा कोणी आपला दिवा लावावयास लागला, तर तो आयता दिवा लावणारा पुरुष, पहिल्या दिव्याच्या प्रकाशाकडून फसविला जाईल काय? (श्रम करून पेटवलेल्या दिव्यावर दुसरा दिवा कांहीं श्रमांवांचून लावून घेतला तर, तोही कांहीं कमी प्रकाश देणार नाहीं.) ८८. अथवा एकाद्यानें अपार द्रव्य खर्च करून घर बांधलें असतां, त्या घरांत कांहीं वेळ राहणारा वाटसरू त्या घराचें सुख भोगीत नाहीं काय! ८९. हें राहूं दे. जो तळें बांधतो, त्याचीच तहान तें तळें नाहींशीं करतें काय? अथवा स्वयंपाक्यासच घरांत अन्न मिळतें; दुसऱ्याला मिळत नाहीं काय? ९० अर्जुना, फार काय सांगूं? (त्रिंबकेश्वरी गौतमानें आणलेली गंगा म्हणजे गोदावरी ही) एका गौतमालाच गंगा व इतर सर्व जगाला ती ओढा झाली आहे काय? ९१. म्हणून आपल्या अधिकारानुरूप शास्त्राप्रमाणें अनुष्ठान करण्याचें चातुर्य जो जाणतो, त्याला जो आपल्या श्रद्धेनें वरतो (त्याच्या आचरणाचा कित्ता जो वळवितो) तो मूर्ख देखील तरतो. ९२.

अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः । दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥

ना शास्त्राचेनि कीर नांवें । खाकरोंही नेणती जीवें । परी शास्त्रज्ञांही शिवे । टेंकों नेदिती ॥९३॥ वडिलांचिया क्रिया । देखोनि वाती वांकुलिया । पंडितां डाकुलिया । वाजविती ॥९४॥ आपलेनीचि आटोपें । धनित्वाचेनि दर्पें । साचचि पाखांडाचीं तपें । आदरिती ॥९५॥ आपुलिया पुढिलांचिया । आंगीं घालूनि कातिया । रक्तमांसा प्रणीतया । भरभरों ॥ ९६ ॥ रिचविती जळतकुंडीं । लाविती चेव्याचां तोंडीं । नवसियां देती उंडी । बाळकांची ॥ ९७ ॥ आग्रहांचिया उजरिया । क्षुद्र देवतां वरिया । अन्नत्यागें सातरिया । ठाकती एक ॥९८॥ अगा आत्मपरपीडा । बीज तमक्षेत्रीं सुहाडा । पेरिती मग पुढां । तेंचि पिके ॥ ९९ ॥ बाहू नाहीं आपलिया । आणि नावेतेंही धनंजया । न धरी होय तया । समुद्रीं जैसें ॥ १०० ॥ कां वैद्यातें करी सळा । रसु सांडी पायखोळां । तो रोगिया जेवीं विव्हळा- । सवता होय ॥ १ ॥ नाना पडिकराचेनि सळें । काढी आपलेचि डोळे । तें बानवसां आंधळें । जैसें ठाके ॥ २ ॥ तैसें तया असुरां होये । जे निंदूनि शास्त्रांची सोये । सैंघ धांवताती मोहें । आडवीं जे कां ॥ ३ ॥ कामु करवी तें करिती । क्रोधु मारवी तें मारिती । किंबहुना मातें पुरिती । दुःखाचां गुंडां ॥ ४ ॥

कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः । मां चैवांतः शरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

आपुला परावां देहीं । दुःख देती जें जें कांहीं । मज आत्मया तेतुलाही । होय शीणु ॥ ५ ॥ पैं वाचेचेनिही पालवें । पापियां तया नातळावें । परी पडिलें सांगावें । त्यजावया ॥६॥ प्रेत बाहिरें घालिजे । कां अंत्यजु संभाषणीं त्यजिजे । हें असो हातें क्षाळिजे । कश्मलातें ॥ ७ ॥ तेथ शुद्धीचिया आशा । तो लेपु न मनवे जैसा । तयांतें सांडावया तैसा । अनुवादु हा ॥ ८ ॥ परी अर्जुना तूं तयांतें । देखसी तैं स्मर हो मातें । जे आन प्रायश्चित्त येथें । मानेल ना ॥ ९ ॥ म्हणौनि श्रद्धा जे सात्त्विकी । पुढती तेचि पैं येकी । जतन करावी निकी । सर्वांपरी ॥ ११० ॥ तरी धरावा तैसा संगु । जेणें पोखे सात्त्विक लागु । सत्त्ववृद्धीचा भागु । आहारु घेपे ॥ ११ ॥ एऱ्हवीं तरी पाहीं । स्वभाववृद्धीचां ठाईं । आहारावांचूनि नाहीं । बळी हेतु ॥ १२ ॥ प्रत्यक्ष पाहें पां वीरा । जो सावध घे मदिरा । तो होउनि ठाके माजिरा । तियेचि क्षणीं ॥ १३ ॥ कां जो साविया अन्नरसु सेवी । तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं । काय ज्वरु जालिया निववी । पयादिक ॥ १४ ॥ नातरी अमृत जयापरी । घेतलिया मरण वारी । कां आपुलियाऐसें करी । जैसें विष ॥ १५ ॥ तेवीं जैसा घेपे आहारु । धातु तैसाचि होय आकारु । आणि धातुऐसा अंतरु । भावो पोखे ॥ १६ ॥ जैसें भांडियाचेनि तापें । आंतुलें उदकही तापे । तैसी धातुवशें आटोपे । चित्तवृत्ती ॥ १७ ॥ म्हणोनि सात्त्विकु रसु सेविजे । तैं सत्त्वाची वाढी पाविजे । राजसा तामसा होइजे । येरीं रसीं ॥ १८ ॥ तरी सात्त्विकु कोण आहारु । राजसा तामसा कायी आकारु । हें

जे लोक दंभ व अहंकार यांनीं युक्त होऊन अभिलाष, आसक्ति यांच्या आग्रहाच्या जोरावर शास्त्राला संमत नसलेलें घोर तप आचरण करतात, ५.

अथवा शास्त्राच्या नांवानें जें खरोखर अंतःकरणापासून आरंभही करण्याचें जाणत नाहींत, इतकेंच नव्हे, परंतु शास्त्रज्ञाला आपल्या गांवच्या हद्दीवर देखील टेकूं देत नाहींत; ९३. वडिलांच्या क्रिया पाहून जे वेडावून दाखवितात व पंडिताला चुटक्या वाजवितात (त्यांचा तिरस्कार करतात.) ९४. आपल्याच अभिमानानें व श्रीमंतीच्या गर्वानें पाखांड्यांचीं तपें खरोखरच स्वीकारतात. (शास्त्रबाह्य आचारांचा अंगीकार करितात.) ९५. आपल्या व दुसऱ्याच्या अंगांत शस्त्रें खुपसून रक्तमांसानें प्रणितपात्रें भरभरून–९६. तीं (रक्तमांसानें भरलेलीं पात्रें) जळत्या अग्नींत ओततात व चेड्याच्या तोंडाला लावतात आणि नवस केलेल्या देवतांना मुलांचा बळी देतात. ९७. (म्हसोबा इत्यादिक) क्षुद्र देवता श्रेष्ठ आहेत, अशा आग्रहाच्या अधिक्यानें, कोणी लोक सात्रीच्या सात्री (सात दिवस) अन्नत्याग करून राहतात. ९८. हे सुज्ञा अर्जुना, आपल्या तमोगुणी अंतःकरणरूपी क्षेत्रामध्यें आपल्यास त्रास व दुसऱ्यास त्रास देणेंरूपी बीं पेरतात. मग पुढें त्या ठिकाणीं तेंच पिकतें. ९९. अर्जुना, समुद्रांतून तरून जाण्यास समर्थ असे आपल्याला हात नाहींत आणि नावेचा सुद्धां आश्रय करीत नाहीं, त्याची समुद्रांत जशी दुर्दशा होते. १००. अथवा ज्याप्रमाणें जो रोगी वैद्याचा द्वेष करतो व औषधाला लाथेनें उडवतो, तो रोगी यातनांपासून मोकळा होतो काय? १०१ अथवा डोळसाच्या द्वेषानें, जो आपले डोळे काढतो, तो आंधळा जसा माजघरांत पडून राहातो, १०२. त्याप्रमाणें शास्त्राचें वळण धिक्कारून अविचारानें सारखे अरण्यांत धांवतात, त्या असुरांची स्थिति वरील उदाहरणाप्रमाणें होतें. १०३. काम जें करवील तें करतात; क्रोध ज्याला मारवील त्याला मारतात. फार काय सांगावें! मला दुःखरूपी दगडांत पुरतात, १०४.

(जे) शरीरामध्यें असलेल्या भूतांच्या समुदायाला कृश करतात आणि शरीरामध्यें असलेल्या मला दुःख देतात, ते अविवेकी आसुरी बुद्धीचे आहेत असें जाण. ६.

जें जें कांहीं दुःख तें आपल्या अथवा परक्याच्या देहाला देतात, तेवढें सर्व दुःख मला आत्म्याला होतें. १०५. वाचेच्या पदरानेंही त्या पाप्यांना स्पर्श करूं नये; परंतु त्यांचा त्याग करण्याकरितां आम्हांला त्यांजविषयीं बोलावें लागलें. १०६. प्रेताला स्पर्श करूं नये, परंतु त्यास बाहेर काढण्याकरितां जसा स्पर्श करावा लागतो; अथवा (अंत्यजाशीं बोलूं नये, परंतु) अंत्यजाचा त्याग करण्याकरितां (दूर हो, म्हणून) बोलावें लागतें; हें राहूं दे. विष्ठेला हात लावूं नये, परंतु शौचाचे वेळीं हातानें मळाला धुतलें पाहिजे. १०७. त्या प्रसंगीं शुद्ध होण्याची इच्छा असते, म्हणून तो दोषकारक संसर्ग जसा मानतां येत नाहीं, त्याप्रमाणें त्या आसुरी लोकांचा त्याग करण्याकरितां हें त्यांच्याविषयीं बोलणें आहे. १०८. परंतु अर्जुना, तूं जेव्हां त्या आसुरी लोकांना पहाशील तेव्हां माझें स्मरण कर हो! कारण या कामीं दुसरें प्रायश्चित्त चालणार नाहीं. १०९. म्हणून सात्त्विक श्रद्धा जी आहे, तीच एक सर्व प्रकारानें चांगली सर्वदा जतन करावी; हें मी पुन्हां सांगतों. ११०. ज्या योगानें सात्त्विक संबंधाचें (वृत्तीचें) पोषण होईल, तशी संगति धरावी आणि ज्या योगानें सत्त्वाचा उत्कर्ष होईल, असाच आहार घ्यावा. १११. वास्तविक पहा, स्वभाव वाढण्याचें (बनण्याचें) कामीं आहाराशिवाय दुसरें जोरदार कारण नाहीं. ११२. अर्जुना, प्रत्यक्ष पहा कीं, एकादा शुद्धीवर असलेला पुरुष जेव्हां दारू पितो, तेव्हां तो त्याच क्षणीं उन्मत्त होऊन रहातो. ११३. अथवा जो आपल्या मनाला येईल त्याप्रमाणें अन्नाचें सेवन करतो, तो त्या अन्नपाण्याच्या वातकारक व कफकारक स्वभावानें व्यापला जातो (अथवा) एखाद्याला ताप आल्यावर दूध वगैरे त्याला शांत करील काय? ११४. अथवा ज्याप्रमाणें अमृत सेवन केलें असतां, तें मरणाला टाळतें अथवा विष हें (सेवन केलें असतां,) आपल्यासारखें करतें. (मारतें) ११५. त्याचप्रमाणें जसा आहार घ्यावा, तसा देहांतील रक्तमांसादि धातूंचा आकार बनतो आणि त्या रक्तादि धातूप्रमाणें अंतःकरणाचा स्वभाव जास्त जास्त पुष्ट होतो. ११६. ज्याप्रमाणें भांड्याच्या तापण्यानें आंतलें पाणीही तापतें; त्याप्रमाणें आहाराच्या योगानें, धातूंच्या वश असल्यामुळें, चित्तवृत्ती व्यापिली जाते. ११७. म्हणून सात्त्विक रस सेवन करावेत, तेव्हां सत्वाची (सत्वगुणाची) वृद्धि होते व इतर रसांनीं रजोगुणाची व तमोगुणाची वृद्धि होते. ११८. तर सात्त्विक आहार कोणता, राजस

सांगों करीं आदरु । आकर्णनीं ॥ १९ ॥ आणि एकसरें आहारा । कैसेनि तिनी मोहरा । जालिया तेही वीरा । रोकडें दाऊं ॥ १२० ॥ तरी जेवणाराचिया रुची । निष्पत्ति कीं बोनियांची । आणि जेविता तंव गुणांची । दासी येथ ॥ २१ ॥ जे जीव कर्ता भोक्ता । तो गुणास्तव स्वभावता । पावोनियां त्रिविधता । चेष्टे त्रिधा ॥ २२ ॥

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः । यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

म्हणौनि त्रिविधु आहारु । यज्ञुही करित त्रिप्रकारु । तप दान हन व्यापारु । त्रिविधचि ते ॥ २३ ॥ पैं आहारलक्षण पहिलें । सांगों जें म्हणितलें । तें आईक गा भलें । रूप करूं ॥२४॥

आयुः सत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः । रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥८॥

तरी सत्त्वगुणाकडे । जैं दैवें भोक्ता पडे । तैं मधुरीं रसीं वाढे । मेचु तया ॥ २५ ॥ आंगेंचि द्रव्यें सुरसें । जे आंगेंचि पदार्थ गोडसे । आंगेंचि स्नेहें बहुवसें । सुपक्कें जियें ॥ २६ ॥ आकारें नव्हती डगळें । स्पर्शें अति मवाळें । जिभेलागीं स्नेहाळें । स्वादें जियें ॥ २७ ॥ रसें गाढीं वरी ढिलीं । द्रवभावें आथिलीं । ठायेंठावो सांडिलीं । अग्नितापें ॥ २८ ॥ आंगें सानें परिणामें थोरु । जैसें गुरुमुखींचें अक्षरु । तैशी अल्पीं जिहीं अपारु । तृप्ति राहे ॥ २९ ॥ आणि मुखीं जैसीं गोडें । तैसीचिहि तें आंतुलेहीकडे । तिये अन्नीं प्रीति वाढे । सात्त्विकांसी ॥ १३० ॥ एवंगुणलक्षण । सात्त्विक भोज्य जाण । आयुष्याचें त्राण । नीच नवें हें ॥ ३१ ॥ येणें सात्त्विक रसें । जंव देहीं मेहो वरिषे । तंव आयुष्यनदी उससे । देहाचि देहा ॥ ३२ ॥ सत्त्वाचिये कीर पाळती । कारण हाचि सुमती । दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ॥ ३३ ॥ आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं कुवासा । हा आहारु तरी दशा । कैंची रोगां ॥ ३४ ॥ हा सात्त्विकु होय भोग्यु । तैं भोगावया आरोग्यु । शरीरासी भाग्यु । उदयलें जाणों ॥ ३५ ॥ आणि सुखाचें घेणें देणें । निकें उवाया ये येणें । हें असो वाढे साजणें । आनंदेंसीं ॥ ३६ ॥ ऐसा सात्त्विकु आहारु । परिणमला थोरु । करी हा उपकारु । सबाह्यासी ॥ ३७ ॥ आतां राजसासि प्रीती । जिहीं रसीं आथी । करूं तयाही व्यक्ती । प्रसंगें गा ॥ ३८ ॥

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः । आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

तरी मारें उणें काळकूट । तेणें मानें जें कडुवट । कां चुनियाहूनि दासट । आम्लीं हन ॥ ३९ ॥ कणिकीतें जैसें पाणी । तैसेंचि मीठ बांधया आणी । तेतुलीच मेळवणी । रसांतरांची ॥ १४० ॥ ऐसें खारट अपाडें । राजसा तया आवडे । उन्हाचेनि मिषें तोंडें । आगीचि गिळी ॥ ४१ ॥ वाफेचिया सिगे । वातीही लाविल्या लागे । तैसें उन्ह मागे

व तामस आहाराचें स्वरूप काय, हें सांगतों. तूं चांगलें लक्षपूर्वक ऐक. ११९. आणि आहाराचे एकदम तीन प्रकार कशानें झाले, तेही अर्जुना, आतांच दाखवूं. १२०. तरी जेवणाराच्या रुचीप्रमाणें अन्न तयार केलें जातें आणि या जगांत जेवणारा तर तीन गुणांचा गुलाम झालेला असतो. १२१. कारण कीं, कर्ता, भोक्ता जो जीव, तो तीन गुणांमुळें स्वभावतः तीन प्रकारचा होऊन तीन प्रकारचीं कर्में करितो. १२२.

प्राणिमात्रांना प्रिय ( असणारा ) आहार देखील तीन प्रकारचा असतो. यज्ञ, तप, तसेंच दान हीं देखील तीन प्रकारचीं असतात. त्यांचा हा भेद ऐक. ७.

म्हणून आहार तीन प्रकारचा आहे व यज्ञांतहि तीन प्रकार करतात; आणि दानतपादि व्यापारही तीन प्रकारचे आहेत. १२३. परंतु प्रथम आहाराचें लक्षण सांगतों म्हणून जें म्हटलें, त्याची चांगली स्पष्टता करतों; ऐक. १२४.

आयुष्य, सत्त्व, बल, आरोग्य, सुख व प्रीति यांची वृद्धि करणारे, ( अंगानेंच ) सुरस, स्निग्ध, शरीरामध्यें बहुत काळ रहाणारे, मनास आनंद-दायक असे आहार सत्त्ववृत्तीच्या लोकांना प्रिय असतात. ८.

तर जेव्हां प्रारब्धयोगानें भोक्ता ( जेवणारा जीव ) सत्त्वगुणाच्या उत्कर्षांत पडतो, तेव्हां मधुर पदार्थांच्या ठिकाणीं त्याची आवड वाढते. १२५. जे पदार्थ स्वभावतःच चांगले रसभरित असतात, व जे पदार्थ स्वभावतःच गोड असतात; जे पदार्थ स्वभावतःच स्निग्ध असतात व जे पदार्थ चांगले परिपक्व असतात; १२६. आकारानें मोठे व बेढब असत नाहींत आणि स्पर्शाला अति मऊ आणि जिभेला आवडणारे आणि जे चवदार असतात; १२७. रसानें अतिशय भरलेले, शिवाय त्याची साल पोकळ असलेले, ओलेपणानें संपन्न आणि खरोखर अग्नीच्या उष्णतेपासून सुटलेले, १२८. ज्याप्रमाणें गुरूनें केलेल्या उपदेशाचे शब्द ( महावाक्य ) दिसण्यांत थोडकेच असतात; परंतु तेच आपला पराक्रम मात्र मोठा करून दाखवितात; त्याप्रमाणें जो आहार दिसा-वयास अगदींच थोडा असतो, परंतु जो सेवनानें कल्पने-



बाहेर पूर्ण तृप्ति देतो; १२९. आणि ते पदार्थ जसे तोंडाला गोड लागतात, तसेच अंत ( परिणामीं ) हितकर असतात, त्या अन्नाच्या ठिकाणीं सत्त्वगुणी लोकांचें प्रेम वाढतें. १३०. याप्रमाणें सात्त्विक आहार असे 'गुण असलेल्या लक्षणांचा असतो आणि हें नित्य नवें आयु-ष्याचें रक्षण आहे असें समज. १३१. जेव्हां हा सात्त्विक आहाररूपी मेघ देहांत वर्षाव करतो, तेव्हां आयुष्यरूपी नदी दिवसेंदिवस जास्त वाढत जाते. १३२. बुद्धिमंता अर्जुना, ज्याप्रमाणें दिवसाची वाढ करण्याला सूर्य हा कारण आहे, त्याप्रमाणें सत्त्वगुणाचें पोषण करावयाला हाच आहार कारण आहे. १३३. आणि शरीराला अथवा मनाला सामर्थ्य पुरविणारा असा हा आहार जर असेल तर रोगांना अस्तित्व कोठचें ? १३४. हा सात्त्विक आहार जेव्हां सेवन करण्यांत येईल, तेव्हां आरोग्य भोगण्याला शरीराचें भाग्यच उदयाला आलें, असें आम्ही समजतों. १३५. आणि या सात्त्विक आहारानें सुखाच्या देवघेवीचा व्यवहार चांगला भरभराटीला येतो, हें राहूं दे. ( एवढेंच काय पण ) त्याचें आनंदाशीं सख्य वाढतें. १३६. वर सांगितल्याप्रमाणें सात्त्विक आहार चांगला परिणत झाला ( मानवला ) असतां, हा आंत मनास व बाहेर शरीरास, मोठा उपयोग करतो. १३७. आतां रजोगुणी मनुष्याला ज्या रसांची प्रीति आहे, त्याचीही अर्जुना, प्रसंगानुसार स्पष्टता करतों. १३८.

कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तीक्ष्ण, रूक्ष, दाह करणारे, असे आहार रजोवृत्तीच्या लोकांना इष्ट असतात. हे दुःख, शोक व रोग ( प्राप्त करून ) देणारे आहेत. ९.

तर प्राणहरण करण्याविषयीं मात्र काय तो कमीपणा, नाहींपेक्षां काळकूट विषाप्रमाणें जें कडू असतें अथवा आंबटपणामध्यें जें चुन्यापेक्षां ( जिभेला ) जास्त चटका देणारें असतें. १३९. कणकीचा गोळा करण्यास जितकें पाणी लागतें, तितकेंच त्यांत मीठ घालतो व इतर पदार्थांचेंही मिठाशीं तितक्या प्रमाणांत मिश्रण करतो. ( म्हणजे कण-केंत जितकें मीठ तितकेंच इतर रसांतही तें घालतो. ) १४०. असें अतिशय खारट त्या रजोगुण्याला आवडतें व पदार्थ इतके ऊन ऊन खातो कीं, त्या कढत पदा-र्थांच्या रूपानें तो अग्नीच तोंडानें गिळीत आहे, असें वाटतें. १४१. कढत पदार्थांच्या वाफेच्या टोंकावर लावली असतां वात देखील पेटेल, असे कढत पदार्थ तो

राजसु तो ॥ ४२ ॥ वावदळ पाडुनि ठाये। सावळ डाहारला आहे। तैसें तीख तो खाये। जें घायेंविण रुपे ॥ ४३ ॥ आणि राखेहुनि कोरडें। आंत बाहेरी येकें पाडें। तो जिव्हादंशु आवडे। बहु तया ॥ ४४ ॥ परस्परें दांतां। आदळ होय खातां। तो गा तोंडीं घेतां। तोषों लागे ॥४५॥ आधींच द्रव्यें चुरमुरीं। वरि परिवडिजती मोहरी। जियें घेतां होती धुवारी। नाकेंतोंडें ॥ ४६ ॥ हें असो उगें आगीतें। म्हणे तैसें राइतें। पढियें प्राणापरौतें। राजसासि गा ॥४७॥ ऐसा न पुरोनि तोंडा। जिभा केला वेडा। अन्नमिषें अग्नि भडाडा। पोटीं भरी ॥४८॥ तैसाचि लवंघा सुटे। मग भुई ना सेजे सांटे। पाणियाचें न सुटे। तोंडोनि पात्र ॥ ४९ ॥ ते आहार नव्हती घेतले। व्याधिव्याळ जे सुतले। ते चेववावया घातलें। माजवण पोटीं ॥ १५० ॥ तैसें एकमेकां सळें। रोग उठती एके वेळे। ऐसा राजसु आहारु फळे। केवळ दुःखें ॥ ५१ ॥ एवं राजसा आहारा। रूप केलें धनुर्धरा। परिणामाचाही विसुरा। सांगितला ॥ ५२ ॥ आतां तया तामसा। आवडे आहारु जैसा। तेंही सांगों चिळसा। झणें तुम्ही ॥ ५३ ॥

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्। उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

तरी कुहिजलें उष्टें खातां। न मनिजे तेणें अनहिता। जैसें कां उपाहिता। म्हैसी खाय ॥ ५४ ॥ निपजलें अन्न तैसें। दुपाहरीं कां येरें दिवसें। अतिकरें तें तामसें। घेईजे तें ॥ ५५ ॥ नातरी अर्ध उकाडिलें। का निपट करपोनि गेलें। तैसेंही खाय चुकलें। रसा जें येवों ॥ ५६ ॥ जया का आथि निष्पत्ती। जेथ रसु धरी व्यक्ती। तें अन्न ऐसी प्रतीती। तामसा नाहीं ॥ ५७ ॥ ऐसेनि कहीं विपायें। सदन्न वरपडा होये। तरी घाणी सुटे तंव राहे। व्याघ्रु जैसा ॥ ५८ ॥ का बहुवे दिवशीं वोलांडिलें। स्वादपणें सांडिलें। शुष्क अथवा सडलें। गामिणेंही हो ॥ ५९ ॥ तेंही बाळाचे हातवरी। चिवाडिलें जैसी राडी करी। का सवें बैसोनि नारी। गोतांबील करी ॥१६०॥ ऐसेनि कश्मळें जैं खाय। जैं तया सुखभोजन ऐसें होय। परी येणेंही न धाय। पापिया तो ॥ ६१ ॥ मग चमत्कारु देखा। निषेधाचा आंवुखा। जया का सदोखा। कुद्रव्यासी ॥ ६२ ॥ तया अपेयांचां पानीं। अखाद्यांचां भोजनीं। वाढविजे उतान्ही। तामसें तेणें ॥ ६३ ॥ एवं तामस जेवणारा। ऐसैसी मेचु हे वीरा। याचें फल दुसरां। क्षणीं नाहीं ॥ ६४ ॥ जे जेव्हांचि हें अपवित्र। शिवे तयाचें वक्त्र। तेव्हांचि पापा पात्र। जाला तो कीं ॥ ६५ ॥ यावरतें जे जेवी। ते जेविती वोज न म्हणावी। पोटभरती जाणावी। यातना ते ॥ ६६ ॥ शिरच्छेदें काय होये। का आगीं रिघतां कैसें आहे। हें जाणावें काई पाहें। परी साहातुचि असे ॥ ६७ ॥ म्हणोनि

रजोगुणी पुरुष मागतो. १४२. भयंकर वावटळीस मार्गे टाकील असें, ( किंवा ) पहारीचा घाव लागला असतां जसें रुपतें तसें, घावावांचून रुपणारें क्षणक्षणीत असें तिखट तो खातो. १४३. जें तोंडीं लावणें आंत व बाहेर राखेपेक्षां कोरडें असतें, तें त्याला फार आवडतें. १४४. जो पदार्थ खात असतांना एकमेकांवर दांत आदळतील, तो पदार्थ तोंडांत घेतांना त्यास संतोष होऊं लागतो. १४५. पदार्थ मूळचेच क्षणक्षणीत असून शिवाय मोहरी लावून त्याचे अनेक प्रकार केले जातात, ते असे कीं, जे सेवन केले असतां नाकातोंडांतून वाफा चालतात. १४६. हें राहूं दे. अर्जुना, अग्नीला 'गप्प बैस' असें म्हणेल, तसें ( तिखट ) रायतें रजोगुण्याला प्राणापेक्षां जास्त आवडतें. १४७. याप्रमाणें तोंडाला पुरेसें न होऊन, तो जिभेनें वेडा केलेला रजोगुणी पुरुष अन्नाच्या निमित्तानें पोटांत प्रज्वलित अग्नीच भरतो. १४८. त्या सरसाच त्याच्या अंगाचा दाह होतो. मग भुईवर अथवा अंथरुणावर त्यास चैन पडत नाहीं व पाण्याचें भांडें तोंडापासून सुटत नाहीं. १४९. रजोगुण्यानें खाल्लेले ते पदार्थ, हें जेवण नव्हे, तर शरीरांत रोगरूपी निवांत निजलेले साप जागे करण्याकरितां उत्तेजक पदार्थच पोटांत घालणें होय. १५०. त्याप्रमाणें एकमेकांच्या स्पर्धेनें एकदम रोग उठतात ( उत्पन्न होतात. ) अशा रीतीनें रजोगुणी आहाराचें केवळ दुःखरूप फळ प्राप्त होतें. १५१. अर्जुना, याप्रमाणें राजस आहाराचें वर्णन केलें व त्या आहाराच्या परिणामाचा विचार सांगितला. १५२. आतां त्या तमोगुणी पुरुषाला जसा आहार आवडतो, तेंही सांगतों. कदाचित तुमच्या मनाला त्याची किळस येईल, पण चिळस घेऊं नका. १५३.

ज्याला ( तयार होऊन ) प्रहराहून अधिक वेळ झाला आहे, अथवा जें अर्धवट शिजवलेलें आहे, ज्यामधील रस गेला आहे, दुर्गंधयुक्त, आदल्या दिवसाचें, उष्टें आणि सदोष, असें भोजन तमोवृत्तीच्या लोकांना प्रिय असतें. १०.

तर कुजलेलें, अथवा उष्टें खात असतांना त्यामुळें आपलें अनहित होईल, असें तो मानीत नाहीं. जशी म्हैस ( कुजलेलें उष्टें न म्हणतां ) अंबोण खाते, (तसें) तें खातो. १५४. त्याप्रमाणें सकाळीं शिजविलेलें अन्न, दोन प्रहरीं अथवा तो दिवस गेल्यावर दुसरे दिवशीं, तमोगुणी पुरुष घेतो. १५५. अथवा अर्धवट शिजलेलें किंवा पारच करपून गेलेले आणि ज्यांत गोडी आलेली नाहीं, तसेंही पदार्थ तमोगुणी खातो. १५६. जें अन्न शिजवून तयार झालेलें असतें व ज्या अन्नांत गोडी चांगली आलेली आहे, तें अन्न आहे, असा तमोगुणी पुरुषाचा अनुभव नाहीं, ( म्हणजे अशा अन्नाला तो अन्न समजत नाहीं. ) १५७. असें असूनही जर कदाचित् चांगल्या पक्वान्नाचा त्याला योग झाला, तर त्या अन्नास घाण सुटेपर्यंत वाघाप्रमाणें थांबून राहातो, (म्हणजे त्या अन्नास घाण सुटेपर्यंत खात नाहीं. ) १५८. जें अन्न तयार होऊन पुष्कळ दिवस झाले आहेत, ज्याचा रुचकरपणा निघून गेला आहे, जें वाळलेलें अथवा सडलेलें आहे अथवा जें ( अन्न ) फदफदलें असून त्यांत किडेही पडलेले असोत; १५९. व तसें घाण सुटलेलें अन्न, तेंही मुलाच्या हातानें चिवडून जशी कांहीं राड करतो, अथवा बायकोबरोबर बसून गोतांबिल करतो, ( म्हणजे तिच्याबरोबर परिवारासह एका ताटांत जेवतो. ) १६०. अशा घाणेरडेपणानें जेव्हां तो खातो, तेव्हां त्याला सुखाचें असें भोजन होतें, म्हणजे अशा भोजनापासून त्याला सुख होतें; परंतु तो पापी एवढ्यानेंही समाधान पावत नाहीं. १६१. मग चमत्कार पहा. ज्या दोषयुक्त वाईट पदार्थांना निषेधाचा शितोडा असतो ( ज्या दोषयुक्त वाईट पदार्थांचा शास्त्रांनीं सेवन करण्यास योग्य नाहींत, असा निषेध केलेला असतो. ) १६२. त्या पिण्यास अयोग्य अशा पदार्थांच्या पिण्याच्या ठिकाणीं व खाण्यास योग्य नाहींत अशा पदार्थांच्या खाण्यांत, त्या तामसी पुरुषाकडून उत्कट हांव वाढविली जाते. १६३. हे वीरा अर्जुना, तमोगुणी जेवणाराला अशी अशी आवड असते. त्याचें फळ दुसऱ्या क्षणीं मिळत नाहीं. ( तर त्याच क्षणांत तावडतोब मिळतें. ) १६४. कारण कीं, त्याचें तोंड जेव्हां या अपवित्र अन्नाला शिवतें, तेव्हांच तो पापाला पात्र झाला. १६५. याशिवाय आणखी तो जें जेवतो, ती जेवण्याची रीत म्हणूं नये, तर तें जेवण ही पोट भरणारी यातना ( दुःख ) समजावी. १६६. शिरच्छेदानें काय होतें अथवा अग्नींत प्रवेश केला असतां कसें असतें, या गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव का घ्यावा लागतो ? विचार कर. परंतु तो तमोगुणी पुरुष तसले परिणाम सहनच करतो. १६७. म्हणून अर्जुना, तामस

तामसा अन्ना । परिणामु गा सिनाना । न सांगोंचि गा अर्जुना । देवो म्हणे ॥ ६८ ॥ आतां ययावरी । आहाराचिया परी । यज्ञुही अवधारीं । त्रिधा असे ॥ ६९ ॥ परी तिहींमाजीं प्रथम । सात्त्विक यज्ञाचें वर्म । आईक पां सुमहिम- । शिरोमणी ॥ १७० ॥

अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते । यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥

तरी एकु प्रियोत्तमु- । वांचोनि वाढों नेदी कामु । जैसा का मनोधर्मु । पतिव्रतेचा ॥ ७१ ॥ नाना सिंधूतें ठाकोनि गंगा । पुढारां न करीचि निगा । का आत्मा देखोनि उगा । वेदु ठेला ॥ ७२ ॥ तैसें जे आपुलां स्वाहितीं । वेंचूनियां चित्तवृत्ती । नुरवितीचि अहंकृती । फळालागीं ॥ ७३ ॥ पातलेया झाडाचें मूळ । मागुतें सरों नेणेचि जळ । जिरालें कां केवळ । तयाचांचि आंगीं ॥ ७४ ॥ तैसें मनें देहें दोहीं । यजननिश्चयाचां ठाईं । हारपोनि जे कांहीं । वांछितीना ॥ ७५ ॥ तिहीं फळवांच्छात्यागीं । स्वधर्मावांचूनि विरागीं । कीजे जो यज्ञु सर्वांगीं । अलंकृतु ॥ ७६ ॥ परी आरिसां आपणपें । डोळां जैसें घेपे । कां तळहातींचें दीपें । रत्न पाहिजे ॥ ७७ ॥ नाना उदितें दिवाकरें । गमावा मार्गु दिठी भरे । तैसा वेदनिर्धारें । देखोनियां ॥ ७८ ॥ तियें कुंडें मंडप वेदी । आणीकही संभारसमृद्धी । ते मेळवणी जैसी विधी । आपण केली ॥ ७९ ॥ सकळावयवउचितें । लेणीं पातलीं जैसी आंगातें । तैसे पदार्थ जेथिंचे तेथें । विनियोगुनी ॥ १८० ॥ काय वानूं बहुतीं बोलीं । जैसी सर्वाभरणीं भरली । ते यज्ञविद्याचि रूपा आली । यजनामिषें ॥ ८१ ॥ तैसा सांगोपांगु । निपजे जो यागु । नुठऊनियां लागु । महत्त्वाचा ॥ ८२ ॥ प्रतिपाळु तरी पाटाचा । झाडीं कीजे तुळसीचा । परी फळा फुला छायेचा । आश्रयो नाहीं ॥ ८३ ॥ किंबहुना फळाशेवीण । ऐसेया निगुती यज्ञ निर्माण । होय तो यागु जाण । सात्त्विकु गा ॥ ८४ ॥

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् । इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

आतां यज्ञु कीर विरेखा । करी पैं याचिऐसा । परी श्राद्धालागीं जैसा । अवंतिला रावो ॥ ८५ ॥ जरी राजा घरासि ये । तरी बहुत उपेगा जाये । आणि कीर्तीही होये । श्राद्ध न ठके ॥ ८६ ॥ तैसा धरूनि आवांका । म्हणे स्वर्गु जोडेल असिका । दीक्षितु होईन मान्यु लोकां । घडेल यागु ॥ ८७ ॥ ऐसी केवळ फळालागीं । महत्त्व फोकारावया जगीं । पार्था निष्पत्ति जे यागीं । राजस पैं ते ॥ ८८ ॥

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् । श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

पशुपक्षिविवाहीं । जोशी कामापरौता नाहीं । तैसा तामसा यज्ञा पाहीं । आग्रहोचि मूळ ॥ ८९ ॥ वारया वाट न वाहे । कीं मरण मुहूर्त पाहे । निषिद्धांसी बिहे । आगी जरी ॥ १९० ॥ तरी तामसाचिया आचारा । विधीचा आथी वोढावारा । म्हणूनि तो धनुर्धरा । उत्सृंखळु ॥ ९१ ॥ नाहीं विधीची तेथ चाड । नये मंत्रादिक तयाकड । अन्नजाता न सुये

अन्नाचा परिणाम वेगळा सांगण्याची जरूरी नाहीं, ( कारण तामस अन्न खाण्यांत जें दुःख होतें, तेंच त्याचा परिणाम होय. ) असें देव म्हणाले. १६८. आतां यानंतर आहाराप्रमाणेंच यज्ञही तीन प्रकारचा आहे, ऐक. १६९. हे चांगल्या सुकीर्तिवंतामध्यें श्रेष्ठ अर्जुना, पण आतां या तीहींमध्यें पहिल्या प्रथम सात्त्विक यज्ञाचें रहस्य सांगतों, ऐक. १७०.

फलाकांक्षा न धरणारांकडून, विधीला अनुसरून असलेला व यज्ञ करणें कर्तव्य आहे, म्हणून समाधानयुक्त मनानें जो यज्ञ केला जातो. तो सात्त्विक ( यज्ञ ) होय. ११.

तर ज्याप्रमाणें पतिव्रतेच्या मनाचा संकल्प एक नवऱ्याशिवाय इतर ठिकाणीं काम वाढूं देत नाहीं; १७१. अथवा समुद्राला मिळाल्यावर गंगा पुढें धांव घेतच नाहीं; अथवा आत्म्याला पाहून वेद स्तब्ध राहिला. १७२. त्याप्रमाणें जे ( लोक ) आपल्या हिताच्या ठिकाणीं चित्तवृत्ती खर्च करून कर्माच्या फळाच्या प्राप्तीविषयीं कर्तेपणाचा अहंकार शिल्लक राहूं देत नाहींत. १७३. झाडाच्या मुळाशीं पोहोंचल्यावर मग पाणी जसें मागें सरणें जाणतच नाहीं, तर केवळ त्याच्याच ठिकाणीं जिरतें. १७४. त्याप्रमाणें देह व मन ह्या दोहोंनीं यज्ञनिश्चयाचे ठिकाणीं गढून जाऊन ( जे ) कांहीं इच्छीत नाहींत. १७५. फलाचा अभिलाष टाकून आपल्या धर्माशिवाय इतर बाबींची आसक्ति सोडून सर्व अंगांनीं परिपूर्ण अशा ज्या यज्ञाचें ते आचरण करितात. १७६' परंतु आरशांत जसें आपण आपल्याला डोळ्यांकडून पाहिलें जातें अथवा ( अंधारांत ) तळहातावर असलेलें रत्न जसें दिव्यानें पाहावें. १७७. अथवा सूर्य उगवला असतां त्यायोगानें आपल्याला जाण्याचा मार्ग जसा दृष्टीच्या आटोक्यांत येतो; त्याप्रमाणें वेदाच्या साहाय्यानें निश्चित करून, १७८. तीं कुंडें व मंडप आणि वेदी आणखीही साहित्याची विपुलता, यांची जमवाजमव जणूंकाय शास्त्रानें आपण स्वतः केली आहे, त्याप्रमाणें तो करतो. ( म्हणजे यज्ञाचें सर्व साहित्य, शास्त्राप्रमाणें बिनचुक जमवितो. ) १७९. अंगावर सर्व अवयवांचे ठिकाणीं जसे त्या त्या अवयवांना योग्य असे अलंकार घातलेले असावेत, त्याप्रमाणें जेथें जो पदार्थ पाहिजे तेथें तो पदार्थ व्यवस्थेनें योजून, १८०. फार शब्दांनीं काय वर्णन करूं ! जसे कांहीं सर्व अलंकार घातलेली अशी यज्ञविद्याच यज्ञाच्या निमित्तानें प्रत्यक्ष मूर्तिमंत आली आहे. १८१. त्याप्रमाणें जो यज्ञ, अंगें व उपांगें यासहित मोठेपणाच्या संबंधास डोकें वर काढूं न देता केला जातो. १८२. तुळशीच्या झाडाचें तर उत्तम प्रकारचें संरक्षण केलें जातें; परंतु त्या संरक्षण करण्यांत फळांचा, फुलांचा अथवा छायेच्या हेतूचा संबंध नसतो. १८३. अर्जुना, फार काय सांगावें ! फळाशेशिवाय अशा युक्तीनें जो यज्ञ केला जातो, तो सात्त्विक यज्ञ आहे असें समज. १८४.

हे भरतश्रेष्ठा, ( क्रियेनें वरच्या सारखाच, ) पण फलाचा उद्देश धरून व दांभिकपणानें जो यज्ञ केला जातो तो राजस यज्ञ जाण. १२.

अर्जुना, आतां ( रजोगुणी पुरुष ) खरोखर याच्याच ( सत्त्वगुणाच्या यज्ञाच्याच ) सारखा यज्ञ करतो; परंतु ( फलेच्छेनें वगैरे ) करतो. जसें श्राद्धाच्या दिवशीं राजाला भोजनाला आमंत्रण यावें; १८५. जर राजा घराला आला, तर त्यापासून फार उपयोग होईल. तो असा कीं, आपली कीर्तीही होईल आणि श्राद्धही रहाणार नाहीं. १८६. त्याप्रमाणें विचार मनांत धरून, तो रजोगुणी पुरुष म्हणतो कीं, मला संपूर्ण स्वर्गप्राप्ति होईल व मी दीक्षित म्हणून लोकांना मान्य होईन आणि यज्ञही घडेल. १८७. अर्जुना, अशा तऱ्हेनें केवळ फळाकरितांच व आपलें महत्त्व जगांत प्रसिद्ध करण्याकरितां, जो यज्ञ करणें, तो राजस यज्ञ होय. १८८.

शास्त्रविधीला सोडून असलेला, ज्यामध्यें ब्राह्मणांना अन्न दिलें जात नाहीं असा मंत्रहीन, दक्षिणाविरहित, श्रद्धाविरहित, अशा यज्ञाला तामस यज्ञ म्हणतात. १३.

पशुपक्ष्यांच्या लग्नांमध्यें जसा विषयवासनेपेक्षां दुसरा जोशी नाहीं, त्याप्रमाणें तामस यज्ञाला आग्रहच मूळ आहे. १८९. जर कोणताही एखादा मार्ग वाऱ्याकडून चालवला जाणार नाहीं, अथवा मरण जर येण्यास मुहूर्त पाहील, किंवा अग्नि जर निषिद्ध पदार्थास ( जाळण्यास ) भिईल. १९०. तर तमोगुणी पुरुषाच्या आचरणाला वेदविधीचा धरबंध असेल; म्हणून अर्जुना, तो तमोगुणी पुरुषाचा आचार स्वैर असतो. ( तो कसा ? तर पुढें सांगतात. ) १९१. येथें विधीची पर्वा नसते. त्याच्याकडे मंत्र वगैरे येत नाहींत. ( म्हणजे त्याला ऋग्वेदादि मंत्रांची व त्यांतील स्वरवर्णांची जरूर लागत

तोंड । मासिये जेवीं ॥ ९२ ॥ वैराचा बोधु ब्राह्मणा । तेथ कें रिगेल दक्षिणा । अग्नि जाला बाउधाणा । वरपडा जैसा ॥ ९३ ॥ तैसें वायांचि सर्वही वेंचे । सुख न देखतां श्रद्धेचें । नागविलें निपुत्रिकाचें । जैसें घर ॥ ९४ ॥ ऐसा जो यज्ञाभासु । तया नाम यागु तामसु । आइकें म्हणे निवासु । श्रियेचा तो ॥ ९५ ॥ आतां गंगेचें एक पाणी । परी नेलें आनानीं वाहणीं । एक मळी एक आणी । शुद्धत्व जैसें ॥ ९६ ॥ तैसें तिहीं गुणीं तप । येथ जाहालें आहे त्रिरूप । तें एक केलें दे पाप । उद्धरी एक ॥ ९७ ॥ तरी तेंचि तिहीं भेदीं । कैसेनि पां म्हणोनि सुबुद्धी । जाणों पाहासी तरी आधीं । तपाचि जाण ॥ ९८ ॥ येथ तप म्हणिजे काई । तें स्वरूप दाऊं पाहीं । मग भेदिलें गुणीं तिहीं । तें पाठीं बोलों ॥ ९९ ॥ तरी तप जें कां सम्यक । तेंही त्रिविध आइक । शारीर मानसिक । शाब्द गा ॥ २०० ॥ आतां या तिहीं- माझारीं । शारीर तंव अवधारीं । तरी शंभू कां श्रीहरी । पढियंता होय ॥ १ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् । ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

तया प्रिया देवतालया । यात्रादिकें करावया । अष्टौ पाहार जैसें पायां । उळिग घापे ॥ २ ॥ देवांगणमिरवणियां । आंगोपचार पुरवणियां । करावया म्हणियां । शोभती हात ॥ ३ ॥ लिंग का प्रतिमा दिठीं । देखतखेंवों अंगेठी । लोटिजे कां काठी । पडली जैसी ॥ ४ ॥ आणि विधिविनयादिकीं । गुणीं वडील जे लोकीं । तया ब्राह्मणांची निकी । पाइकी कीजे ॥ ५ ॥ अथवा प्रवासें का पीडा । का शिणले जे सांकडां । ते जीव सुरवाडा । आणिजती ॥ ६ ॥ सकल तीर्थांचिये धुरे । जियें का मातापितरें । तयां सेवेसि कीर शरीरें । लोण कीजे ॥ ७ ॥ आणि संसाराऐसा दारुणु । जो भेटलाचि हरी शीणु । तो ज्ञानदानीं सकरुणु । भजिजे गुरु ॥ ८ ॥ आणि स्वधर्माचां आगिठां । देहजाड्याचिया किटा । आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजे ॥ ९ ॥ वस्तु भूतमात्रीं नमिजे । परोपकारीं भजिजे । स्त्रीविषयीं नियमिजे । नांवेंनांवें ॥२१०॥ जन्मतेनि प्रसंगें । स्त्रीदेह शिवणें आंगें । तेथूनि जन्म आघवें । सोंविळें कीजे ॥ ११ ॥ भूतमात्राचेनि नांवें । तृणही नासुडावें । किंबहुना सांडावे । छेद भेद ॥ १२ ॥ ऐसैसी जैं शरीरीं । राहाटीची पडे उजरी । तैं शारीर तप घुमरी । आलें जाण ॥ १३ ॥ पार्था समस्तही हें करणें । देहाचेनि प्रधानपणें । म्हणौनि ययातें मी म्हणें । शारीर तप ॥ १४ ॥ एवं शारीर जें तप । तयाचें दाविलें रूप । आतां आइक निष्पाप । वाङ्मय तें ॥ १५ ॥ तरी लोहाचें आंग तुक । न तोडितांचि कनक । केलें जैसें देख । परिसें तेणें ॥ १६ ॥

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् । स्वाध्यायाभ्यासनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

तैसें न दुखवितां सेजे । जावळिया सुख निपजे । ऐसें साधुत्व का देखिजे । बोलणां जिये ॥ १७ ॥ पाणी मुदल झाडा जाये । तृण ते प्रसंगेंचि जिये । तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित ॥१८॥ जोडे अमृताची सुरसरी । तैं प्राणांतें अमर करी । स्नानें पाप ताप वारी ।

नाहीं. ) ज्याप्रमाणें माशीच्या तोंडाकडून अन्नमात्र सुटत नाहीं (त्याप्रमाणें तमोगुणी पुरुष शास्त्रदृष्ट्या विहित निषिद्ध हें न पाहतां स्वैर वागतो. ) १९२. ब्राह्मणासंबंधानें जेथें ब्राह्मण हा शत्रु अशी समजूत असते, तेथें दक्षिणेचा विचार कोठून होणार ? वाहुटळ सुटली असतां त्यास जसें अग्नीचें सहाय्य मिळावें; ( त्याप्रमाणें त्या यज्ञांत विधि, मंत्र, ब्राह्मण, दक्षिणा वगैरेंचा अभाव एकत्र होतो. ) १९३. जसें निपुत्रिकाचें घर नागविलें जातें, त्याप्रमाणें श्रद्धेचें तोंड न पाहातां सर्वही व्यर्थच खर्च होतें. १९४. असा जो यज्ञाचा नुसता देखावा असतो, त्याला तामस यज्ञ म्हणावें. अर्जुना, हें ऐक, असें तो लक्ष्मीचें निवासस्थान श्रीकृष्ण म्हणाला. १९५. आतां गंगेचें एकच पाणी, परंतु तें निरनिराळ्या मार्गांनीं नेलें असतां, तें एका मार्गानें अमंगलता प्राप्त करून देतें व एका मार्गानें पवित्रत्व उत्पन्न करणारें होतें. १९६. त्याप्रमाणें या जगांत तीन गुणांच्या योगानें तप तीन स्वरूपाचें झालें आहे. तें ( तप ) एक प्रकारचें केलें असतां पाप देतें आणि दुसऱ्या एका प्रकारचें केलें असतां उद्धरतें. १९७. हे बुद्धिमान् अर्जुना, तें तपच तीन भेदांनीं कसें झालें आहे, म्हणून जाणूं पाहाशील, तर आधीं तपच काय आहे, समजून घे. १९८. या जगांत तप म्हणजे काय, त्याचें स्वरूप तुला दाखवूं, पहा. नंतर तीन गुणांनीं तें तीन प्रकारचें झालें आहे, तें मागाहून सांगूं. १९९. तर शुद्ध जें तप, तेंही शारीरिक, मानसिक व वाचिक, असें तीन प्रकारचें आहे, ऐक. २००. आतां या तिहींपैकीं शारीरिक तप तर ऐक. तर ( त्या तप-करणाराला ) शंकर अथवा विष्णु यांपैकीं जो देव आवडत असेल तो. २०१.

देव, ब्राह्मण, आईबाप व गुरु यांचें पूजन, शुद्धता, सरळपणा, ब्रह्मचर्य आणि अहिंसा, यांना शारीर तप म्हणतात. १४.

त्या प्रिय देवतेच्या मंदिराला यात्रादिक करण्याकरितां आठही प्रहर जसा पायाला भोंवरा बांधला आहे. २०२. देवाचें अंगण ( झाडून, सारवून, रांगोळी घालून वगैरे ) सुशोभीत करण्याकरितां, देवाच्या पूजेला जे उपचार लागतील, ते पुरवण्याकरितां ( शास्त्रांनीं सांगितलेल्या ) आज्ञेप्रमाणें करण्याकरितां त्याचे हात शोभतात. २०३. लिंग अथवा प्रतिमा डोळ्यांनीं पाहिल्याबरोबर, काठी ज्याप्रमाणें पडावी त्याप्रमाणें शरीररूप काठी टाकतो. २०४. आणि शास्त्रोक्त आचरण व नम्रताआदिकरून गुणांनीं लोकांत जे श्रेष्ठ असतील, त्या ब्राह्मणांची चांगली सेवा करतो. २०५. अथवा प्रवासानें किंवा पीडेनें अथवा संकटानें जे शिणलेले असतील, त्या जीवांना सुख प्राप्त करून देतो. २०६. सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ जे आई-बाप, त्यांच्या सेवेवरून शरीराला खरोखर ओंवाळून टाकतो. २०७. आणि जो भेटल्याबरोबर संसारासारखें भयंकर दुःख नाहींसें करतो, त्या ज्ञानदान करणाऱ्या व दयावान् अशा गुरुला भजतो. २०८. आणि अर्जुना, स्वधर्मरूपी अग्नीमध्यें, देहअहंकाररूपी जो मळ, त्याला वारंवार स्वधर्माचरण करणें, हींच कोणीं पुटें ( आंच ) देऊन, तो नाहींसा करतो. २०९. भूतमात्रांमध्यें ब्रह्म जाणून, तेथें त्यास नमन करतो. परोपकार करण्यांत तत्पर असतो व स्त्रीविषयीं क्षणोक्षणीं मनोनिग्रह करतो. ( तो असा कीं:– ) २१०. जन्माच्या प्रसंगीं मात्र स्त्रीदेहाला अंगानें स्पर्श झाला; तेथून पुढें ( तो ) सर्व जन्म सोंवळा करतो. २११. भूतमात्रांच्या नांवानें गवताच्या काडीसही ( तींत जीव आहे म्हणून ) हिसका देत नाहीं. फार काय सांगावें! तोडमोड करणें टाकून देतो. २१२. अशा अशा प्रकारच्या वागण्याचा जेव्हां शरीरांत उत्कर्ष होतो, तेव्हां शारीरिक तप भरास आलें, असें समज. २१३. अर्जुना, हें सर्व करणें मुख्यत्वेंकरून देहाच्या आधारावर आहे; म्हणून मी याला शारीरिक तप म्हणतों. २१४. याप्रमाणें जें शारीरिक तप आहे, त्याचें स्पष्टीकरण केलें. आतां पाप-रहित असें जें वाचिक तप, तें ऐक. २१५. तरी लोखंडाचा आकार व वजन, ही मुळींच कमी होऊं न देतां जसें त्या लोखंडास परिसानें सोनें केलें, पहा. २१६.

जेणेंकरून उद्वेग होणार नाहीं ( एवढेंच नव्हे तर ऐकणाराचें कल्याण होईल ) असें सत्य, प्रिय आणि हितकर वाक्य, स्वाध्यायाचा ( वेदाचा अथवा नामाचा) अभ्यास, यांना वाङ्मय तप म्हणतात. १५.

त्याप्रमाणें जें बोलणें ऐकणाऱ्याच्या जवळ असलेल्या जोडीदाराला दुःख न होतां, सुख होईल, असा चांगले-पणा ज्या बोलण्यांत दृष्टीस पडतो. २१७. पाणी मुख्य झाडाला जातें आणि पाटाच्या कांठावर असणारें गवत सहजच जगतें. त्याप्रमाणें कोणा एकाला उद्देशून बोललें असतां ( त्या बोलण्यांत ) सर्वांचें हित होतें. २१८. जेव्हां अमृताची गंगा प्राप्त होते, तेव्हां ती प्राणांना अमर करते व स्नानानें पाप व ताप नाहींसे करते, आणि

गोडीही दे ॥१९॥ तैसा अविवेकुही फिटे । आपुलें अनादित्व भेटे । आइकतां रुचि न विटे । पीयुषीं जैसी ॥ २२० ॥ जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें । नातरी आवर्तवणें । निगमु का नाम ॥ २१ ॥ ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं । केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळ ॥ २२ ॥ नातरी एकाधें नांव । तेंचि शैव कां वैष्णव । वाचे वसे तें वाग्भव । तप जाणावें ॥ २३ ॥ आतां तप जें मानसिक । तेंही सांगों आइक । म्हणे लोकनाथनायक– । नायकु तो ॥२४॥ तरी सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं । का चंदनाचें उरगीं । उद्यान जैसें ॥ २५ ॥ नाना कळावैषम्यें चंदु । कां सांडिला आधीं नरेंद्रु । नातरी क्षीरसमुद्रु । मंदराचळें ॥ २६ ॥

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः । भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें । मन राहे कां केवळें । स्वरूपें जें ॥ २७ ॥ तपनेंवीण प्रकाशु । जाडयेंवीण रसीं रसु । पोकळीवीण अवकाशु । होय जैसा ॥ २८ ॥ तैसी आपली सोय देखे । आणि आपलिया स्वभावा मुके । हिंवलीं जैसी आंगिकें । हिंवों नेदी निजांग ॥ २९ ॥ तैसे नचलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें परिपूर्ण । तैसें चोखी शृंगारपण । मनाचें जें ॥ २३० ॥ बुजाली वैराग्याची वोरप । जिराली मनाची धांप कांप । तेथ केवळ जाली वाफ । निजबोधाची ॥ ३१ ॥ म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र । तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥ ३२ ॥ तें स्वलाभलाभलेपणें । मन मनपणाही धरूं नेणे । शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥ ३३ ॥ तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव । घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥ ३४ ॥ म्हणौनि तियें मानसीं । भावशुद्धीचि असे अपैसीं । रोमशुचि जैसी । तळहातासी ॥ ३५ ॥ काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना । तैं मनस्तपोभिधाना । पात्र होय ती ॥ ३६ ॥ परी तें असो हें जाण । मानस तपाचें लक्षण । देवो म्हणे संपूर्ण । सांगितलें ॥ ३७ ॥ म्हणोनि देहवाचाचित्तें । जें पातलें त्रिविधत्वातें । तें सामान्य तप तूतें । परिसाविलें गा ॥ ३८ ॥ आतां गुणत्रयसंगें । हेंचि विशेषीं त्रिविधीं रिगें । तेंही आइक चांगें । प्रज्ञाबळें ॥ ३९ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः । अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

तरी हेंचि तप त्रिविधा । जें दाविलें तुज प्रबुद्धा । तेंचि करीं पूर्णश्रद्धा । सांडूनि फळ ॥ २४० ॥ जैं पुरतिया सत्त्वशुद्धी । आचरिजे आस्तिक्यबुद्धी । तैं तयातेंचि गा प्रबुद्धीं । सात्त्विक म्हणिपे ॥ ४१ ॥ नातरी तपस्थापनेलागीं । दुजेपण मांडूनि जगीं । महत्त्वाद्रीचां शृंगीं । बैसावया ॥ ४२ ॥

( तिचें अमृत प्यावलें असतां ) गोडीही देते. २१९. त्याप्रमाणें अज्ञानही नाहींसें होतें, आपला अनादिपणा पुनः प्राप्त होतो व ज्याप्रमाणें अमृताचें कितीही सेवन केलें तरी त्याचा वीट येत नाहीं, त्याप्रमाणें जें कितीही ऐकलें, तरी त्याच्या बोलण्याच्या गोडीचा वीट येत नाहीं. २२०. जर कोणीं विचारलें, तर असें बोलण्याचा प्रघात असावा; नाहीं तर वेद अथवा भगवन्नाम यांचें वाचेनें आवर्तन ( पुनः पुनः पठण ) चाललेलें असावें. २२१. ऋग्वेदादि तिन्ही वेद वाचारूपी मंदिरामध्यें ( तोंडांत ) स्थापन केले जातात. ( फार काय सांगावें ! ) मुखामध्यें जशी काय वेदशाळाच ( स्थापन ) केली आहे. २२२. अथवा एखादें नांव–तेंच शिवाचें असो अथवा विष्णूचें असो–वाचेंत राहावें, तें वाचेपासून होणारें तप समजावें. २२३. आतां जें मानसिक तप आहे, तेंही सांगूं, ऐक, असें लोकनाथांच्या नायकांचे ( इंद्रादिक देवाचे ) स्वामी श्रीकृष्ण म्हणाले. २२४. तर लाटांनीं सरोवर टाकलें असतां अथवा मेघांनीं आकाश टाकलें असतां अथवा चंदनाच्या बागेचा सर्पांनीं जसा त्याग केला असतां, २२५. अथवा कलांच्या कमीजास्त होण्यानें जसें चंद्रास टाकावें, अथवा मानसिक चिंतेनें जसें राजास टाकावें अथवा क्षीरसमुद्र जसा मंदराचलानें टाकावा; २२६.

मनाची प्रसन्नता, शांत स्वभाव, मौनवृत्ति, आत्मसंयम, कल्पनाविरहित अशी अंत:करणाची शुद्धस्थिति, याला मानस तप म्हणतात. १६.

त्याप्रमाणें अनेक प्रकारच्या संकल्पांच्या सर्व समुदायांनीं ( मनाला ) सोडल्यावर, जें मन केवळ स्वरूपस्थितीनें रहातें. २२७. उष्णतेशिवाय जसा प्रकाश असावा अथवा जडत्वाशिवाय जसा अन्नाच्या ठिकाणीं रस असावा, आणि पोकळीशिवाय जसा अवकाश असावा, २२८. त्याप्रमाणें ( मनानें ) आपलें विश्रांतिस्थान ( जो आत्मा त्यास ) पाहिल्यावर मन आपल्या स्वभावास ( चंचलतेस अथवा संकल्पविकल्प करण्यास ) मुकतें. तें कसें ? तर जशी थंडी आपल्या अंगच्या थंडीनें आपलें अंग कांपू देत नाहीं तसें. २२९. ज्याप्रमाणें न चालणारें म्हणजे अचल व कलंकरहित म्हणजे स्वच्छ, असें चंद्राचें बिंब, नित्य परिपूर्ण असावें, तितक्या शुद्धपणानें ( व निश्चल-पणानें ) मनाची जी शोभा ( असते.) २३०. वैराग्याचे ओरखडे नाहींसे झाले व मनाची अस्वस्थता नाहींशी झाली व त्या मनाचे ठिकाणीं आत्मज्ञानास योग्य अशी शुद्ध भूमिका तयार झाली. २३१. म्हणून शास्त्राचा विचार करण्याकरितां ज्या तोंडाचा उपयोग करावा, तें तोंड वाचेचेंही सूत्र हातीं धरीत नाहीं ( बोलतच नाहीं.) २३२. ज्याप्रमाणें मिठानें आपलें मूळस्वरूप जें पाणी, त्यास स्पर्श केल्याबरोबर ( तें मीठ जलरूप होतें ) त्याप्रमाणें आत्मलाभाच्या प्राप्तीमुळें, मन आपला मनपणाही धरूं जाणत नाहीं. ( म्हणजे संकल्प करण्याचें टाकून आत्म्याशीं तद्रूप होतें.) २३३. तथा मनाच्या ठिकाणीं त्या कल्पना कोठें उत्पन्न होतील, कीं ज्या कल्पनांनीं इंद्रियमार्गांनीं धांव घेऊन, विषयरूपी त्या गांवांत येऊन प्राप्त व्हावें ? २३४. म्हणून त्याप्रमाणें तळहाताला केसरहितपणा, ही निर्मळता स्वभावतःच आहे, त्याप्रमाणें त्या मनामध्यें स्वभावतःच भावशुद्धि असते. २३५. अर्जुना, फार काय सांगावें ! जेव्हां मनाला ( वर सांगितलेली ) स्थिति प्राप्त होते, तेव्हां ती स्थिति 'मानस तप' या नांवाला प्राप्त होते. २३६. परंतु तें असूं दे. हें मनाच्या तपाचें लक्षण तुला संपूर्ण सांगितलें, असें समज, असें देव म्हणाले. २३७. म्हणून अर्जुना, कायावाचामनानें जें त्रिविधत्वाला प्राप्त झालें आहे, तें सामान्य तप तुला ऐकविलें. २३८. आतां तीन गुणांच्या संगतीनें हेंच ( सामान्य तप ) विशेषेंकरून तीन प्रकारांत शिरतें. ( याच सामान्य तपाचे तीन प्रकार होतात. ) तेंही बुद्धि स्थिर ठेवून चांगलें ऐक. २३९.

तें तीन प्रकारचें तप ( जर ), फलाची आकांक्षा न धरणारांनीं आणि पूर्ण सत्वशुद्धीनें युक्त अशा मनुष्यांनीं अत्यंत श्रद्धेनें आचरलें, तर त्याला सात्त्विक ( तप ) म्हणतात. १७.

तर हे प्रबुद्धा अर्जुना, हेंच ( सामान्य ) तप जें तुला तीन प्रकारचें सांगितलें, तेंच पूर्ण श्रद्धेनें व फलाशा टाकून, २४०. जेव्हां पूर्ण अंतःकरण शुद्धीनें व आस्तिक्यबुद्धीनें आचरलें जातें, तेव्हां त्यालाच बुद्धिवान् लोकांकडून सात्त्विक तप म्हटलें जातें. २४१. अथवा तपाच्या स्थापनेकरितां जगांत द्वैतभाव उत्पन्न करून, मोठेपणाचे शिखरावर बसण्याकरितां, २४२.

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् । क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

त्रिभुवनींचिया सन्माना । न वचावें ठाया आना । धुरेचिया आसना । भोजनालागीं ॥ ४३ ॥ विश्वाचिया स्तोत्रा । आपण होआवया पात्रा । विश्वें आपलिया यात्रा । कराविया यावें ॥ ४४ ॥ लोकांचिया विविधा पूजा । आश्रयो न धरावया दुजा । भोग भोगावे वोजां । महत्त्वाचिया ॥ ४५ ॥ अंग बोल माखूनि तपें । विकावया आपणपें । अंगहीन पडपे । जियापरी ॥ ४६ ॥ हें असो धनमानीं आस । बाढउनी तप कीजे सायास । तें तेंचि तप राजस । बोलिजे गा ॥ ४७ ॥ परी पहुरणीं जे दुहिलें । तें तें गुरूं न दुभेचि व्यालें । का उभें शेत चारिलें । पिकावया नुरे ॥ ४८ ॥ तैसें फोकारितां तप । कीजे जें साक्षेप । तें फळीं तंव सोप । निःशेष जाय ॥ ४९ ॥ ऐसें निर्फळ देखोनि करितां । माझारीं सांडी पंडुसुता । म्हणौनि नाहीं स्थिरता । तपा तया ॥ २५० ॥ एऱ्हवीं तरी आकाश मांडी । जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी । तो अवकाळ मेघु काय घडी । राहात आहे ॥ ५१ ॥ तैसें राजस तप जें होये । तें फळीं कीर वांझ जाये । परी आचरणींही नोहे । निर्वाहतें गा ॥ ५२ ॥ आतां तेंचि तप पुढती । तामसाचिये रीतीं । पैं परत्रा आणि कीर्ती । म्रुकोनि कीजे ॥ ५३ ॥

मूढग्राहेणात्मनो यत् पीडया क्रियते तपः । परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

केवळ मूर्खपणाचा वारा । जीवीं घेऊनि धनुर्धरा । नाम ठेविजे शरीरा । वैरियाचें ॥५४॥ पंचाग्नीची दडगी । खोलवीजती शरीरालागीं । का इंधन कीजे हें आगी- । आंतु लावी ॥ ५५ ॥ माथां जालिजती गुगुळ । पाठीं घालिजती गळ । आंग जाळिती इंगळ । जळतभीतां ॥ ५६ ॥ दवडोनि श्वासोश्वास । कीजती वायांचि उपवास । कां घेपती धूमाचे घांस । अधोमुखें ॥ ५७ ॥ हिमोदकें आकंठें । खडकें सेविजती तटें । जितया मांसाचे चिमुटे । तोडिती जेथ ॥ ५८ ॥ ऐसी नानापरी हे काया । घाय सूतां पैं धनंजया । तप कीजे नाशावया । पुढिलातें ॥ ५९ ॥ आंगभारें सुटला धोंडा । आपण फुटोनि होय खंडखंडा । का आड जालियातें रगडा । करी जैसा ॥ २६० ॥ तेवीं आपलिया आटाणिया । सुखें असतया प्राणिया । जिणावया शिराणिया । कीजती गा ॥ ६१ ॥ किंबहुना हे वोखटी । घेऊनि क्लेशाची हातवटी । तप निफजे तें किरीटी । तामस होय ॥ ६२ ॥ एवं सत्त्वादिकांचां आंगीं । पडिलें तप तिहीं भागीं । जालें तेंही तुज चांगी । दाविलें व्यक्ती ॥ ६३ ॥ आतां बोलतां प्रसंगा । आलें म्हणोनि पैं गा । करूं रूप दानलिंगा । त्रिविधा तया ॥ ६४ ॥ येथ गुणाचेनि बोलें । दानही त्रिविध असे जालें । तेंचि आइक पहिलें । सात्त्विक ऐसें ॥ ६५ ॥

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे । देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥

सत्कार, मान, पूजा यांच्याकरितां आणि दांभिकपणानें जें तप करतात, त्याला या लोकीं राजस तप म्हणतात. तें चंचल व अनित्य आहे. १८.

त्रिभुवनाच्या सन्मानानें ( आपल्या शिवाय ) दुसऱ्या ठिकाणीं जाऊं नये व जेवणाच्या पंक्तींत पहिला पाट मिळावा म्हणून. २४३. विश्वाच्या स्तुतीला आपण पात्र व्हावें व सगळें जग आपली यात्रा ( आपलें दर्शन ) करण्यास यावें म्हणून. २४४. लोकांच्या निरनिराळ्या प्रकारच्या पूजांनीं ( आपल्याशिवाय ) दुसरा आश्रय न धरावा, महत्त्वाच्या पांघरुणाखालीं ( आपल्याला ) भोग भोगण्यास ( मिळावे म्हणून ) २४५. त्याप्रमाणें वेश्या आपलें शरीर विकण्याकरितां शृंगार करते, त्याप्रमाणें जो आपणांस विकण्याकरितां ( लोकांत आपली प्रतिष्ठा वाढविण्याकरितां ) आपलें शरीर व बोलणें तपानें माखतो. ( म्हणजे आपल्या शरीरचेष्टेनें, वेषानें अथवा बोलण्यानें आपण तपी आहोंत, असें लोकांना भासवतो. ) २४६. हें राहूं दे. धनाच्या ठिकाणीं व मानाच्या ठिकाणीं आशा बाळगून जें आयासयुक्त ( कष्टानें भरलेलें ) तप केलें जातें, त्या तपाला अर्जुना, राजस तप म्हणावें. २४७. परंतु पहुरणी नांवाच्या किड्यानें गाभण गुराचें थान चोखलें असतां तें गुरूं व्याल्यावर दूध देत नाहीं; अथवा शेतांत पीक उभें असतां तें जनावराकडून चारलें गेलें, तर तें शेत पीक देण्यास राहात नाहीं. २४८. त्याप्रमाणें जें तप कष्ट करून केलें जातें, त्या तपाची प्रसिद्धि केली असतां तें तप फळाच्या संबंधानें पूर्णपणें निष्फळ होतें. २४९. अशा प्रकारें तें तप निष्फळ आहे, असें पाहून तो तें तप करीत असतांना, मध्येंच तें टाकतो म्हणून, अर्जुना, त्या तपाला स्थिरता नाहीं. २५०. सहज विचार करून पाहिलें तर जो अकालीं आलेला मेघ ( आपल्या दाट फळीनें ) सर्व आकाश भरून टाकतो व जो ( मेघ ) आपल्या गर्जनेनें ब्रह्मांड फोडतो, तो ( अकालीं मेघ ) घटकाभर तरी टिकतो काय ? २५१. त्याप्रमाणें राजस तप जें आहे, तें फलाच्या बाबतींत तर व्यर्थ जातेंच; परंतु अर्जुना, तें आचरणांत सुद्धां ( शेवटपर्यंत ) टिकणारें नसतें. २५२. आतां तेंच ( म्हणजे सामान्य ) तप जेव्हां तमोगुणाच्या रीतीनें केलें जातें, तेव्हां ऐहिक कीर्ति व परलोकप्राप्ति, यांस अंतरून तें केलें जातें. २५३.

मूर्खपणाचा हट्ट घेऊन बसणारा स्वतःला पीडा देऊन जें तप करतो, अथवा दुसऱ्या मनुष्याच्या नाशाकरितां जें तप करतो, त्याला तामस ( तप ) म्हणतात. १९.

अर्जुना, केवळ मूर्खपणाचा संचार अंतःकरणांत घेऊन शरीराला शत्रुसारखें समजलें जातें. २५४. ( व ) पंचाग्नीच्या ज्वाळा शरीराला लावल्या जातात, अथवा शरीराला सरपण समजून अग्नींत ( पंचाग्नींत ) तें लावलें जातें. २५५. मस्तकावर गुग्गूळ जाळले जातात व पाठींत गळ घातले जातात आणि पाहातांच भीति वाटेल, अशा रखरखीत निखाऱ्यांनीं अंग जाळतात. २५६. श्वासोच्छ्वास वाया दवडले जातात, आणि व्यर्थच उपास केले जातात. अथवा झाडाला टांगून घेऊन खालीं तोंड करून धुराचे घास घेतले जातात. २५७. ( थंडीच्या दिवसांत ) गळ्यापर्यंत थंड पाण्यांत उभे राहातात. खडकावर किंवा नदीच्या कांठावर बसतात व त्या तपांत आपल्या अंगाचे जिवंतपणी मांसाचे लचके तोडतात. २५८. अर्जुना, अशा नाना प्रकारांनीं या शरीरावर घाव घालून जे तप करितात आणि तेंही दुसऱ्याचा घात करण्याकरितां करितात. २५९. ( पर्वतावरून ) अंगाच्या वजनानें सुटलेला धोंडा आपण स्वतः फुटून तुकडे तुकडे होतो; शिवाय जें कांहीं आपल्या आड येईल त्याचा जसा चुराडा करतो; २६०. त्याप्रमाणें आपल्याला त्रास घेऊन, सुखांत असलेल्या प्राण्यांना जिंकण्याच्या इच्छेनें जीं तपें केलीं जातात. २६१. फार काय सांगावें ! ही दुःखाची वाईट रीत अंगीकारून, अर्जुना, जें तप उत्पन्न होतें, तें तामस होय. २६२. याप्रमाणें सत्त्वादि तीन गुणांत पडलेलें तप तीन प्रकारचें झालें, तें देखील तुला चांगलें स्पष्ट दाखविलें. २६३. आतां बोलतांना प्रसंगांत आलें म्हणून त्या तीन प्रकारच्या दानांच्या लक्षणांचें स्वरूप सांगूं. २६४. आतां गुण म्हटले, कीं त्यानें दानही तीन प्रकारचें झालें आहे. त्यांपैकी पहिलें सात्त्विक दान असें आहे, ऐक. २६५.

( स्वधर्मानें मिळवलेल्या पैशांतून ) दान करणें, कर्तव्य आहे अशा बुद्धीनें जें दान ज्याच्यापासून परत उपकाराची अपेक्षा नाहीं अशाला ( योग्य ) ठिकाण, काळ व पात्र पाहून दिलें जातें, त्या दानाला सात्त्विक दान म्हणतात. २०.

तरी स्वधर्माआंतौतें । जें जें मिळे आपणयातें । तें तें दीजे बहुतें । सन्मानयोगें ॥ ६६ ॥ जालया सुबीजप्रसंगु । पडे क्षेत्रवाफेचा पांगु । तैसाचि दानाचा हा लागु । देखतसें ॥ ६७ ॥ अनर्घ्य रत्न हाता चढे । तैं भांगाराची वोढी पडे । दोनीं जालीं तरी न जोडे । लेतें आंग ॥६८॥ परी सण सुहृद संपत्ती । हे तिन्ही येकीं मिळती । जैं भाग्य घरीं उन्नती । आपुलां विषीं ॥ ६९ ॥ तैसें निफजवावया दान । जैं सत्त्वासि ये संवाहन । तैं देश काळ भाजन । द्रव्यही मिळे ॥२७०॥ तरी आधीं तंव प्रयत्नेंसीं । होआवें कुरुक्षेत्र का काशी । नातरी तुके जो इहींसीं । तो देशही हो ॥ ७१ ॥ तेथ रविचंद्रराहुमेळु । होतां पाहे पुण्यकाळु । का तयासारिखा निर्मळु । आनुही जाला ॥ ७२ ॥ तैसां काळीं तिये देशीं । होआवी पात्रसंपत्ती ऐसी । मूर्ति आहे घरीली जैसी । शुचित्वेंचि का ॥ ७३ ॥ आचाराचें मूळपीठ । वेदांची उतारपेठ । तैसें द्विजरत्न चोखट । पावोनियां ॥ ७४ ॥ मग तयाचां ठाईं वित्ता । निवर्तवावी स्वसत्ता । परी प्रियापुढें कांता । रिगे जैसेंनि ॥ ७५ ॥ का जयाचें ठेविलें तया । देऊनि होइजे उतराइया । नाना हडपें विडा राया । दिधला जैसा ॥ ७६ ॥ तैसेनि निष्कामें जीवें । भूम्यादिक अर्पावे । किंबहुना हांवे । नेदावें उठों ॥७७॥ आणि दान जया द्यावें । तयातें ऐसेया पाहावें । जया घेतलें तुमचवे । कायसेंनही ॥ ७८ ॥ साद घातलिया आकाशा । नेदी प्रतिशब्दु जैसा । कां पाहिला आरसा । येरीकडे ॥ ७९ ॥ उदकाचिये भूमिके । आफाळिलेनि कंदुकें । उधळौनि कवतिकें । न येइजे हाता ॥ २८० ॥ नाना वसो घातला चारू । माथां तुरंबिला बुरु । न करी प्रत्युपकारू । जियापरी ॥ ८१ ॥ तैसें दिधलें दातयाचें । जो कोणेही आंगें तुमचे । अर्पिलया साम्य तयाचें । कीजे पैं गा ॥ ८२ ॥ ऐसिया जें सामाग्रिया । दान निफजे वीरराया । तें सात्त्विक दानवरिया । सर्वांही जाण ॥ ८३ ॥ आणि तोचि देशु काळु । घडे तैसाचि पात्रमेळु । दानभागुही निर्मुळु । न्यायगतु ॥ ८४ ॥

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः । दीयते च परिक्लिष्टं तद्राजसमुदाहृतम् ॥ २१ ॥

परी मनीं धरुनि दुभतें । चारिजे जेवीं गाईतें । का पेंव करुनि आइतें । पेरूं जाइजे ॥८५॥ नाना दिठी घालुनि आहेरा । अवंतु जाइजे सोयिरा । का वाण धाडिजे घरा । वौसयाचिया ॥ ८६ ॥ पैं कळांतर गांठीं बांधिजे । मग पुढिलांचें काज कीजे । पूजा घेऊनि रसु दीजे । पीडितांसी ॥ ८७ ॥ ऐसें जया जें दान देणें । तो तेणेंचि गा जीवनें । पुढती भुंजावा भावें येणें । दीजे जें का ॥ ८८ ॥ अथवा कोणी वाटे जातां । घेतलें उमचों न शकता । मिळे जैं पंडुसुता । द्विजोत्तमु ॥ ८९ ॥ तरी कवडया एकासाठीं । अशेषां गोत्रांचींच किरीटी । सर्व प्रायश्चित्तें सुये

तरी स्वधर्मांचरणानें जें जें आपणांस मिळालेलें असेल, तें तें मोठ्या सन्मानानें द्यावें. २६६. ( पेरण्याकरितां ) चांगलें बीज प्राप्त झालें असतां, जशी चांगल्या जमिनींच्या वाफशाची उणीव पडते, तसा हा सात्त्विक दानाचा योग दिसतो. ( अभिप्राय असा कीं, पेरणी करण्याला जसें चांगलें बीं, योग्य काळ, उत्तम शेत व वाफसा, यांचा एकदम योग होणें दुर्मिळ असतें; त्याप्रमाणें सात्त्विक दानाला योग्य देश, योग्य काल, योग्य पात्र व योग्य द्रव्य, यांचा एकदम योग होणें, हें दुर्मिळ असतें.) २६७. मोलवान् रत्न हातीं येतें, तेव्हां सोन्याची टंचाई पडते. ( रत्न व सोनें ) दोन्हीं प्राप्त झालीं तर घालणारें अंग ( दागिना ज्या अवयवावर घालावयाचा तो शरीराचा अवयव–उदाहरणार्थ सरळ नाक वगैरे ) चांगलें मिळत नाहीं. २६८. परंतु आपल्या भाग्याची ऊर्जित अवस्था झाली असतां, सण, इष्ट, मित्र व ऐश्वर्य या तिहींचा एकत्र योग्य होतो. २६९. त्याप्रमाणें उत्कृष्ट प्रकारचें दान घडवून आणण्याविषयीं जेव्हां सत्त्वगुणास उत्तेजन येतें, तेव्हां देश, काल, पात्र व द्रव्य, अशा चार योग्य गोष्टींचा संगम होतो. २७०. तरी प्रथम तर प्रयत्न करून कुरुक्षेत्र अथवा काशी हें स्थळ असावें; अथवा यांच्या बरोबरीला जो येईल, तो देश (स्थळ) असला तरी चालेल. २७१. तशा त्या पवित्र स्थळीं सूर्य किंवा चंद्र आणि राहू व केतु यांचा योग ( सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण ) येतो, तो ( दानाला ) पवित्र काळ असतो, अथवा तशासारखा इतर पवित्र काळही असला ( तरी चालेल. ) २७२. तशा काळीं, त्या स्थळीं, दानाला असें उत्कृष्ट पात्र असावें कीं, जणूंकाय ( त्या पात्राच्या रूपानें ) मूर्तिमंत पवित्रपणाच अवतरला आहे. २७३. सदाचरणाची मूळ जागा व वेदांतील सर्व प्रकारचा माल उतरण्याची जागा ( वेदाध्ययन केलेला ) असा अतिशय श्रेष्ठ ब्राह्मण प्राप्त झाला असतां, २७४. मग त्याच्या ठिकाणीं ( द्रव्य ) अर्पण करून, त्या द्रव्यावरील आपली सत्ता काढावी; परंतु पतीसमोर जशी आपलें स्वामित्व त्यास देऊन पत्नी येते; २७५. अथवा ज्याचें ( द्रव्य वगैरे ) ठेवलेलें असतें, तें त्यास परत देऊन जसें उतराई व्हावें, अथवा विडा देणाऱ्या हुजऱ्यानें जसा राजास विडा द्यावा, २७६. तशा निष्काम अंतःकरणानें जमीन वगैरे अर्पण करावी. फार काय सांगावें ! फलेच्छेला बिलकूल डोकें वर करूं देऊं नये. २७७. आणि ज्याला दान द्यावें, तो असा पहावा कीं, ज्याला आपण केलेल्या दानाची कोणत्याही तऱ्हेनें फेड करतां येणार नाहीं. २७८. आकाशाला हांक मारली असतां, जसें आकाश प्रतिध्वनि देत नाहीं अथवा आरसा मागच्या बाजूला पाहिला असतां, तो प्रतिबिंब दाखवीत नाहीं. २७९. पाण्याच्या सपाटीवर हापटलेला चेंडू उडी घेऊन जसा आपण होऊन हातावर येत नाहीं; २८०. अथवा पोळ जर चरावयास सोडला अथवा कृतघ्न मनुष्याचें मस्तक ( प्रेमानें ) हुंगलें, ( त्यावर कितीहि प्रेम केलें ) तर तो ज्याप्रमाणें त्या प्रेमाचा मोबदला करीत नाहीं. २८१. त्याप्रमाणें जो दान घेणारा, दात्यानें दिलेल्या दानाचा कोणत्या प्रकारें मोबदला करूं शकणार नाहीं, त्यास ( दान ) अर्पण केल्यावर, दात्यानें त्याची आठवणही चित्तांत राहूं देऊं नये. २८२. हे वीरराजा अर्जुना, अशा सामुग्रीनें जें दान उत्पन्न होतें तें सर्व दानांपेक्षां श्रेष्ठ असें सात्त्विक दान होय, असें समज. २८३. आणि ( रजोगुणी दानाच्या बाबतींत ) तेंच ( सत्त्वगुणी दानासारखाच ) देश व काल आणि सत्पात्र वगैरेंचा योग जुळतो आणि ( तसाच ) निर्मळ व न्यायानें मिळालेले असे दानभाग, यांचा एकत्र योग आलेला असतो. २८४.

जें दान ( पूर्वी झालेल्या अथवा पुढें होणाऱ्या ) उपकाराचा मोबदला म्हणून अथवा फलाची अपेक्षा धरून अतिशय कष्टानें दिलें जातें, त्या दानाला राजस दान म्हणतात. २१.

परंतु मनांत दुभत्याची इच्छा धरून ज्याप्रमाणें गाईला पोसावें किंवा दाणे सांठविण्याकरितां अगोदर चांगलें पेंव तयार करून मग पेरावयास जावें. २८५. अथवा आहेराच्या प्राप्तीवर दृष्टि ठेवून सोयऱ्याधायऱ्यांस जसें आमंत्रण करण्यास जावें, अथवा ओंवसा करणारीचे घरीं जसें वाण पाठवावें, २८६. आधीं व्याजाचे पैसे गांठीला बांधून मग दुसऱ्याचें काम जसें करावें अथवा पूजा ( द्रव्य ) घेऊन मग जसें रोग्यास औषध द्यावें. २८७. असें ज्याचें दान देणें असतें आणि आपण जें दान केलें आहे, तेवढ्याच साधनानें तो दान घेणारा पुनः आपल्या उपयोगी पडावा, अशा भावनेनें जेव्हां ( दान ) दिलें जातें. २८८. अथवा अर्जुना, कोणी एक वाटेनें जाणारा कीं, जो घेतलेल्या दानाचा मोबदला करूं शकणार नाहीं, असा चांगला ब्राह्मण जर मिळाला, २८९. तर एका पैशाच्या दानाबद्दल अर्जुना, गोत्राच्या ( कुटुंबाच्या संपूर्ण माणसांच्या ) सर्व प्रायश्चित्तांचें उदक

मुठी। तयाचिये ॥ २९० ॥ तेवींचि पारलौकिकें। फळें वांछिजती अनेकें। आणि दीजे तरी भुके। येकाही नोहे ॥ ९१ ॥ तेंही ब्राह्मणु नेवों सरे। कीं हाणिचेनि शिणें झांसरे। सर्वस्व जैसें चोरें। नागऊनि नेलें ॥ ९२ ॥ काय बहु सांगों सुमती। जें दीजे या मनोवृत्ती। तें दान गा त्रिजगतीं। राजस पैं ॥ ९३ ॥

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते। असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

मग म्लेंच्छांचे वसौटे। दांगाणे हन कैकटे। का शिबिरें चोहटे। नगरींचे ते ॥ ९४ ॥ तेही तेंही ठाईं मिळणी। समयो सांजवेळु कां रजनी। तेव्हां उदार होणें धनीं। चोरियेचां ॥ ९५ ॥ पात्रें भाट नागारी। सामान्य स्त्रिया का जुवारी। जियें मूर्तिमंतें भुररीं। भुले तयां ॥ ९६ ॥ रूपानृत्याची पुरवणी। ते पुढां डोळेभारणी। गीत भाटीव तो श्रवणीं। कर्णजपु ॥ ९७ ॥ तयाहीवरी अळुमाळु। जैं घे फुलागंधाचा गुळुळु। तंव भ्रमाचा तो वेताळु। अवतरे तैसा ॥९८॥ तेथ विभांडुनियां जग। आणिले पदार्थ अनेग। तेणें घालूं लागे मातंग– । गवादीसी ॥९९॥ एवं ऐसेनि जें जें देणें। तें तामसदान मी म्हणें। आणि घडे दैवगुणें। आणिकही एक ॥३००॥ विपायें घुणाक्षर पडे। टाळिये काउळा सांपडे। तैसें तामसा पर्व जोडे। पुण्यदेशीं ॥१॥ तेथ देखोनि तो आथिला। योग्यु मार्गोही आला। तोही दर्पा चढला। भांबावे जरी ॥२॥ तरी श्रद्धा न धरी जीवीं। तया माथाही न खालवी। स्वयें न करी ना करवी। अर्घ्यादिक ॥ ३ ॥ आलिया न घली बैसों। तेथ गंधाक्षतांचा काय अतिसो। हा अप्रसंगु कीर असो। तामसीं नरीं ॥ ४ ॥ पैं बोळविजे रिणाइतु। तैसा झकवी तयाचा हातु। तूं करणें याचा बहुतु। प्रयोगु तेथ ॥ ५ ॥ आणि जया जें दे किरीटी। तयातें उमाणी तयासाठीं। मग कुवोलें का लोटी। अवज्ञाचि ॥ ६ ॥ हें बहु असो यापरी। मोल वेंचणें जें अवधारीं। तया नांव चराचरीं। तामस दान ॥ ७ ॥ ऐशीं आपुलालां चिन्हीं। अळंकृतें तिन्हीं। दानें दाविलीं अवधानीं। रजतमा या ॥ ८ ॥ तेथ मी जाणत असें। विपायें तूं गा ऐसें। कल्पिसील मानसें। विचक्षणा ॥ ९ ॥ जे भवबंधमोचक। येकलें कर्म सात्त्विक। तरी कां वेखासी सदोख। येर बोलावीं ॥ ३१० ॥ परी नोसंतितां विवसी। भेटी नाहीं निधीसी। कां धूं न साहतां जैसी। वाती न लगे ॥ ११ ॥ तैसें शुद्धसत्त्वाआड। आहे रजतमाचें कवाड। तें भेदणेंयातें कीड। का म्हणावें गा ॥ १२ ॥ आम्हीं श्रद्धादिदानांत। जें समस्तही क्रियाजात। सांगितलें का व्याप्त। तिहीं गुणीं ॥ १३ ॥ तेथ भरंवसेनि तिन्ही। न सांगोंचि ऐसें मानीं। परी सत्त्व दावावया दोन्ही। बोलिलों येरें ॥ १४ ॥ जें दोहींमाजीं

त्याच्या हातावर सोडतो. २९०. त्याचप्रमाणें अनेक पारलौकिक फळांची इच्छा करतो आणि दिलेलें तर ( तें इतकें थोडें असतें कीं, ) तें (एका वेळच्या) भुकेलाही पुरत नाहीं. २९१. तें (अल्पदान) देखील, तो ब्राह्मण घेऊन गेला कीं, नुकसानीच्या शीणानें तो राजस दान करणारा मनांत झुरतो. जणूंकाय चोरानें त्याचें सर्वस्व लुटून नेलें ! २९२. हे सुमति अर्जुना, फार काय सांगूं ! अशा संकल्पानें जें दिलें जातें, तें दान ह्या जगांतलि राजस दान होय. २९३.

अयोग्य ठिकाणीं, अयोग्य कालीं, अपात्र मनुष्यांना जें सत्काररहित व अवहेलनापूर्वक दान दिलें जातें, त्याला तामस दान असें म्हणतात. २२.

मग म्लेंच्छांच्या राहाण्याच्या ठिकाणीं, अरण्यांत, धर्मकृत्यास अयोग्य ठरलेल्या देशांत अथवा छावणींत अथवा शहरांच्या चव्हाट्यावर, २९४. तशांत त्या ठिकाणीं तिन्हीसांजा अथवा रात्रीची वेळ प्राप्त झाली असतां, त्या प्रसंगीं चोरून आणलेल्या द्रव्यावर उदार होणें, २९५. ( तेथें दान देण्यास योग्य कोण ? ) तर भाट, गारुडी, वेश्या, जुगार खेळणारे लोक वगैरे जे मूर्तिमंत भूलच आहेत, त्यांना भुलतो, २९६. त्यांत रूपाची व नृत्याची भर पुढें असतां, ती डोळ्याला भूल पाडते व भाटांचें ( स्तुतिपाठकांचें ) गाणें हा कानांत कर्णजप असतो, २९७. त्यांत आणखीं जेव्हां थोडासा फुलांचा व चंदनादि सुगंधी द्रव्यांचा वासरूपी गुग्गुळाचा धूप घेतो, तेव्हां तो ( तमोगुणी ) जसा वेताळ प्रगट व्हावा, तसा जणूंकाय भ्रमाचा वेताळच प्रगट होतो. २९८. तेव्हां मग लोकांना लुटून आणलेले जे अनेक पदार्थ, त्या योगानें मांगांना अन्नछत्र घालतो. २९९. अशा प्रकारें जें जें दान करितात, तें तामस दान असें मी म्हणतों. आणि आणखीही दैववशात् एकादा ( सुयोग ) घडून आला, ३००. तर लांकडें कोरणाऱ्या घुणा नामक किड्याकडून कोरण्याच्या क्रियेंत जसें क्वचितच अक्षर कोरलें जावें. किंवा टाळी वाजवितांना तींमध्यें जसा कावळा क्वचितच सांपडावा, त्याप्रमाणें तमोगुण्याला पुण्य स्थळीं पर्वकालाचा योग क्वचितच सांपडावा. ३०१. त्या वेळीं, तो तमोगुणी पुरुष संपन्न आहे असें पाहून, योग्य ( सत्पात्र ) असा ब्राह्मण मागावयासही आला व हा ( तमोगुणी दाता ) तशांत अभिमानाच्या अतिरेकामुळें भांबावलेला ( गुंग ) असलाच ( आणि त्याच्या मनांत त्या ब्राह्मणाला कांहीं द्यावेंसें आलेंच; ) ३०२. तर अंतःकरणांत श्रद्धा धरीत नाहीं, त्याला मस्तक खालीं लववून नमस्कारही करीत नाहीं व त्या ब्राह्मणाचे अर्घ्यादिक आदरसत्कार आपण स्वतः करीत नाहीं अगर दुसऱ्याकडून करवीत नाहीं. ३०३. जेथें आलेल्या सत्पात्र ब्राह्मणाला बसावयास आसन घालीत नाहीं, तेथें गंध अक्षता वगैरे अर्पण करणें, हा अधिकपणा कोठचा ? हे सर्व प्रकार त्या तामस पुरुषाच्या ठिकाणीं खरोखर असंभवनीयच होत. ३०४. ज्याप्रमाणें कांहीं तरी थोडेसें देऊन सावकाराची रवानगी करावी, त्याप्रमाणें सत्पात्र ब्राह्मणाच्या हातावर अल्प दान देऊन, त्याची बोळवणूक करून, फसवतो. त्या तमोगुणाच्या ठिकाणीं अरे तुरे, म्हणण्याची रीत फार असते. ३०५. आणि अर्जुना, ज्याला जें देतो, तेवढ्यावर त्याला मोजतो, ( म्हणजे येवढेंच तुला देण्याची तुझी योग्यता आहे, असें त्या दान घेणारास म्हणतो. ) आणि नंतर वाईट शब्द बोलून अथवा अपमान करून त्यास लावून देतो. ३०६. हें फार बोलणें राहूं दे. या प्रकारानें जें द्रव्य खर्च करणें, त्याला चराचरांत तामस दान असें म्हणतात. ३०७. याप्रमाणें आपआपल्या लक्षणांनीं सुशोभित ( युक्त ) अशीं तिन्ही दानें तुला दाखविलीं ( सांगितलीं, परंतु ) या रजोगुणी व तमोगुणी दानाकडे (तीं टाळण्याकरितां) तूं लक्ष दे. ३०८. हे बुद्धिमान् अर्जुना, मी हें जाणत आहें कीं, येथें तूं कदाचित् मनानें अशा तऱ्हेची कल्पना करशील कीं, ३०९. एकटें सात्त्विक कर्म संसारपाशापासून सोडविणारें आहे. असें जर आहे, तर संसारपाशापासून सोडविण्याच्या कामीं विरुद्ध जे इतर दोषयुक्त रज व तम, यांचें वर्णन कशाला करावें ? ३१०. परंतु ज्याप्रमाणें पिशाचाला दूर केल्याशिवाय, पुरलेलें द्रव्य हातीं येत नाहीं. अथवा धूर सहन केला नाहीं, तर दिवा जसा लागणार नाहीं; ३११. त्याप्रमाणें शुद्ध सत्त्वगुणाच्या आड रजोगुण व तमोगुण यांचा पडदा आहे. तो नाहींसा करण्याला, अर्जुना, वाईट कां म्हणावें ? ३१२. श्रद्धेपासून आरंभ करून, अखेर दानापर्यंत, सर्वक्रियामात्र तिन्ही गुणांनीं व्याप्त आहेत, म्हणून जें आम्ही सांगितलें; ३१३. तेथें खरोखरच तीन गुण सांगण्याचा आमचा इरादा नव्हता; परंतु सत्त्वगुणाचें स्वरूप स्पष्ट समजाविण्याकरितां, दुसरे रजोगुण व तमोगुण हे दोन आम्ही बोललों, असें समज. ३१४. ज्याप्रमाणें दिवस व रात्र

तिजें असे । तें दोन्ही सांडितांचि दिसे । अहोरात्रत्यागें जैसें । संध्यारूप ॥ १५ ॥ तैसें रजतम-विनाशें । तिजें जें उत्तम दिसे । तें सत्त्व हें आपैसें । फावासि ये ॥ १६ ॥ एवं दावावया सत्त्व तुज । निरूपिलें तम रज । तें सांडूनि सत्त्वें काज । साधीं आपलें ॥ १७ ॥ सत्त्वेंचि येणें चोखाळें । करीं यज्ञादिकें सकळें । पावसी तें करतळें । आपुलें निज ॥ १८ ॥ सूर्यें दाविलें सांतें । काय एक न दिसे तेथें । तेवीं सत्त्वें केलें फळातें । काय नेदी ॥१९॥ हे कीर आवडतांविखीं । रीति सत्त्वीं आथी निकी । परी मोक्षेंसी एकी । मिसळणें जें ॥ ३२० ॥ तें एक आनचि आहे । तयाचा सावावो जैं लाहे । तैं मोक्षाचाही होये । गांवीं सरतें ॥ २१ ॥ पैं भांगार जऱ्ही पंधरें । तऱ्ही राजावळीचीं अक्षरें । लाहे तैंचि सरे । जियापरी ॥ २२ ॥ स्वच्छें शीतळें सुगंधें । जळें होतीं सुखप्रदें । परी पवित्रत्व संबंधें । तीर्थांचेनि ॥ २३ ॥ नई हो कां भलतैसी थोरी । परी गंगा जैं अंगीकारी । तैंचि तिये सागरीं । प्रवेशु गा ॥२४॥ तैसें सात्त्विका कर्मा किरीटी । येतां मोक्षाचिये भेटी । न पडे आडकाठी । तें वेगळें आहे ॥ २५ ॥ हा बोलु आइकतखेवीं । अर्जुना आधि न माये जीवीं । म्हणे देवें कृपा करावी । सांगावें तें ॥ २६ ॥ तेथ कृपाळुचक्रवर्ती । म्हणे आईक तयाची व्यक्ती । जेणें सात्त्विक तें मुक्ती- । रत्न देखिलें ॥ २७ ॥ तरी अनादि परब्रह्म । जें जगदादिविश्रामधाम । तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ॥ २८ ॥ तें कीर अनाम अजाती । परी अविद्यावर्गाचिये राती- । माजीं वोळखावया श्रुती । खूण केली ते ॥२९॥ उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापासीं । ठेविलेनि नांवेंसीं । ओ देत उठी ॥३३०॥ कष्टले संसारशिणें । जे देवों येती गाऱ्हाणें । तयां ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ॥३१॥ ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्वें तो भेटावा । ऐसा मंत्रु देखिला कणवा । वेदें बापें ॥ ३२ ॥ मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कव्हतिकें । मागां असत ठाके । पुढां उभें ॥ ३३ ॥ परी निगमाचळशिखरीं । उपनिषदार्थनगरीं । आहाति जे ब्रह्माचां येकाहारीं । तयांसीच कळे ॥ ३४ ॥ हेंही असो प्रजापती । शक्ति जे सृष्टिकरिती । ते जया एका आवृत्ती । नामाचिये ॥ ३५ ॥ पैं सृष्टीचिया उपक्रमा- । पूर्वीं गा वीरोत्तमा । वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ॥ ३६ ॥ मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टिही करूं न शके । तो थोरु केला एकें । नामें जेणें ॥ ३७॥ जयाचा अर्थु जीवीं ध्यातां । जें वर्णत्रयचि जपतां । विश्वसृजनयोग्यता । आली तया ॥ ३८ ॥ तेधवां रचिले ब्रह्मजन । तयां वेद दिधलें शासन । यज्ञऐसें वर्तन । जीविकें केलें ॥ ३९ ॥ पाठीं नेणों किती येर । सृजिले लोक अपार । जाले ब्रह्मदत्त अग्रहार । तिन्हीं भुवनें ॥ ३४० ॥ ऐसें नाममंत्रें जेणें । धातया अहंच करणें । तयाचें स्वरूप आइक म्हणे । श्रीकांतु तो ॥ ४१ ॥ तरी सर्व मंत्रांचा राजा । तो प्रणवो आदिवर्णु बुझा । आणि तत्कारु जो दुजा । तिजा सत्कारु ॥ ४२ ॥

यांचा त्याग केला असतां, या दोहोंमधील असणाऱ्या संध्याकालाचें रूप दिसतें, त्याप्रमाणें दोन्हींमध्यें जें तिसरें आहे, तें दोन्हींचा त्याग केला असतां दिसतें. ३१५. त्याप्रमाणें रज व तमाच्या नाशानें तिसरें उत्तम जें दृष्टोत्पत्तीस येतें, तो सत्त्वगुण होय, हें आपोआपच कळून येतें. ३१६. याप्रमाणें तुला सत्त्वगुण स्पष्ट समजण्याकरितां रजोगुण व तमोगुण यांचें वर्णन केलें. त्या रजतमांचा त्याग करून सत्त्वगुणाच्या योगानें तूं आपलें काम साधून घे. ३१७. या शुद्ध सत्त्वगुणानेंच यज्ञादिक सर्व ( क्रिया ) कर, म्हणजे त्या योगानें तुला तें आपलें स्वरूप तळहातावर घेतलेल्या पदार्थासारखें प्राप्त होईल. ३१८. सूर्यानें प्रकाशित केलें असतां या जगांत काय एक दिसणार नाहीं ? त्याप्रमाणें सत्त्वगुणानें केलेलें कर्म कोणत्या फळाला देणार नाहीं ? ३१९. खरोखर वाटेल तें फळ प्राप्त करून देण्याच्या बाबतींत सात्त्विक कर्माची पद्धति चांगली आहे. परंतु ज्या एकानें मोक्षाशीं एकरूप होतां येतें; ३२०. तें एक निराळेंच आहे. त्याचें साह्य जेव्हां ( सात्त्विक कर्माला ) मिळतें, तेव्हां त्या सात्त्विक कर्माचा मोक्षाच्या गांवांतही प्रवेश होतो. ३२१. सोनें पंधराच्या दराचें ( शंभर नंबरी ) असलें, तरी त्यास जेव्हां राजमुद्रेचीं अक्षरें प्राप्त होतात, तेव्हांच तें ज्याप्रमाणें चालतें; ( त्याची किंमत होते; ) ३२२. स्वच्छ, थंड व सुगंधी असे पाण्याचे प्रकार सुख देणारे असतात, परंतु, त्या पाण्यांत पवित्रपणा तीर्थाच्या संबंधानें येतो. ३२३. नदी वाटेल तितकी मोठी असेना का ? परंतु गंगा जेव्हां तिचा अंगीकार करील तेव्हांच, अर्जुना, तिचा समुद्रांत प्रवेश होईल. ३२४. त्याप्रमाणें अर्जुना, सात्त्विक कर्माला मोक्षाच्या भेटीला येत असतांना, ज्याच्या योगानें विघ्न येत नाहीं, तें वेगळेंच आहे. ३२५. हें देवाचें बोलणें ऐकतांक्षणींच, अर्जुनाच्या अंतःकरणांत उत्कंठा मावेना व तो म्हणाला, देवांनीं कृपा करावी व तें सांगावें. ३२६. तेव्हां सर्व कृपाळुवांचे सार्वभौम राजे, श्रीकृष्णपरमात्मा म्हणाले, ज्याच्या योगानें त्या सात्त्विक कर्माच्या आटोक्यांत तें मोक्षरूपी रत्न येतें ( त्याची स्पष्टता होते ) तें ऐक. ३२७. तरी जें परब्रह्म आरंभरहित असून, जगाचें उत्पत्तिस्थान व विश्रांतिस्थान आहे, त्याचें एक नांव तीन प्रकारचें आहे. ३२८. तें ब्रह्म खरोखर नामरहित व जातिरहित आहे; परंतु अविद्यासमुदायरूपी रात्रींत सांपडलेल्या जीवांनीं ब्रह्मास ओळखावें,



एवढ्यासाठीं श्रुतींनीं त्या परब्रह्मास जी खूण केली, तें त्या ब्रह्माचें नाम होय. ३२९. नुकतेंच जन्मास आलेलें मूल आपल्याबरोबर नांव घेऊन येत नाहीं; ( परंतु त्या मुलाला ) ठेवलेल्या नांवानें हांक मारली असतां, तें ओ देत उठतें. ३३०. संसारदुःखानें शिणलेले जे जीव, ब्रह्माकडे आपलें दुःख निवेदन करण्याकरितां येतात, त्या जीवांना, ज्या नांवानें ब्रह्म ओ देत उठतें, तो हा संकेत ( नामरूपी खूण ) होय. ३३१. जीवाचा व ब्रह्माचा फार काळापासून अबोला आहे, तो नाहींसा व्हावा व तें ब्रह्म अद्वैतपणानें ( जीवास ) भेटावें, म्हणून वेदरूपी बापानें ( सर्व जीवांची ) दया मनांत घेऊन हा नाममंत्र शोधून काढला. ३३२. मग वेदानें दाखविलेल्या ज्या एका नांवानें ब्रह्मास हांक मारली असतां तें ब्रह्म (वृत्तीच्या) मागें असूनही (वृत्तीच्या) पुढें उभें राहातें. ३३३. परंतु वेदरूपी पर्वताच्या शिखरावर असलेल्या उपनिषदाच्या अर्थरूपी शहरांत, जे परब्रह्माच्या एका पंक्तीला आहेत, त्यांसच हें नाममाहात्म्य कळतें. ३३४. हें देखील राहूं दे. ब्रह्मदेवामध्यें जी सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति आहे, ती ज्या एका नामाच्या आवर्तनानें आली आहे; ३३५. परंतु सृष्टीच्या आरंभापूर्वीं, हे वीरोत्तमा अर्जुना, ब्रह्मदेव एकटा वेड्यासारखा गोंधळलेला असा होता; ३३६. मला ईश्वराला तो ओळखत नव्हता अथवा सृष्टीही करण्याचें त्यास सामर्थ्य नव्हतें; तो ज्या एका नांवानें समर्थ केला; ३३७. ज्या नामाच्या अर्थाचें अंतःकरणांत चिंतन केल्यामुळें आणि ज्या नामाच्या तीन शब्दांचा ( ॐ, तत् , सत् ) जप केल्यामुळें, त्याला (ब्रह्मदेवाला) सृष्टि उत्पन्न करण्याची योग्यता आली. ३३८. तेव्हां त्यानें ब्राह्मण लोक उत्पन्न केले व त्यांना आचरणाची पद्धति शिकविणारे वेद दिले आणि यज्ञासारखा धंदा ( कर्म ) उदरनिर्वाहार्थ उत्पन्न केला. ३३९. नंतर किती असंख्य लोक ( ब्रह्मदेवानें ) उत्पन्न केले, हें कळत नाहीं. ( व त्या उत्पन्न केलेल्या लोकांना ) तिन्ही भुवनें, हें ब्रह्मदेवानें दिलेलें इनाम झालें. ३४०. असें ज्या नाममंत्रानें ब्रह्मदेवाला थोर केलें, त्याचें स्वरूप तूं ऐक, असें तो लक्ष्मीचा भर्ता श्रीकृष्ण म्हणाला. ३४१. तरी सर्व मंत्रांचा राजा तो, ' ॐ ' तें त्या नांवांतील पहिलें अक्षर समजा; 'तत्' हें दुसरें अक्षर होय व तिसरें अक्षर ' सत् ' हें होय. ३४२.

ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः । ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

एवं ॐतत्सदाकारु । ब्रह्मनाम हें त्रिप्रकारु । हें फुल तुरंबी सुंदरु । उपनिषद तें ॥ ४३ ॥ येणेंसीं गा होऊनि एक । जें चाले कर्म सात्त्विक । तें कैवल्यातें पाइक । घरींचें करी ॥ ४४ ॥ परी कापुराचें थळींव । आणूनि देईल दैव । लेवों जाणणेंचि आडव । तेथ असे बापा ॥ ४५ ॥ तैसें आदरिजेल सत्कर्म । उच्चारैल ब्रह्मनाम । परी नेणिजेल जरी वर्म । विनियोगाचें ॥ ४६ ॥ तरी महंताचिया कोडी । घरा आलियाही वोढी । मानूं नेणतां अपरवडी । मुद्दल तुटे ॥ ४७ ॥ कां ल्यावया चोखट । टीक भांगार एकवट । घालूनि बांधली मोट । गळा जेवीं ॥ ४८ ॥ तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म । विनियोगेंवीण काम । विफळ होय ॥४९॥ अगा अन्न आणि भूक । पासीं असे परी देख । जेऊं नेणतां बाळक । लंघनचि कीं ॥ ३५० ॥ का स्नेहा सूत्रा वैश्वानरा । जालियाही संसारा । हातवटी नेणतां वीरा । प्रकाशु नोहे ॥ ५१ ॥ तैसें वेळे कृत्य पावे । तेथिंचा मंत्रुही आठवे । परी व्यर्थ तें आघवें । विनियोगेंवीण ॥ ५२ ॥ म्हणौनि वर्ण-त्रयात्मक । जें हें परब्रह्मनाम एक । विनियोगु तूं आइक । याचा आतां ॥ ५३ ॥ नामींचीं अक्षरें तिन्हीं । कर्मा आदिमध्यनिदानीं । प्रयोजावीं पैं स्थानीं । इहीं तिन्हीं ॥ ५४ ॥ हेचि एकी हातवटी । घेउनी हन किरीटी । आले ब्रह्मविद भेटी । ब्रह्माचिये ॥ ५५ ॥ ब्रह्मेंसीं होआवया एकी । ते न वंचती यज्ञादिकीं । जें चावळलें बोलखी । शास्त्रांचिया ॥ ५६ ॥

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपः क्रियाः । प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥

तो आदि तंव ओंकारु । ध्यानें करिती गोचरु । पाठीं आणिती उच्चारु । वाचेही तो ॥ ५७ ॥ तेणें ध्यानें प्रकटें । प्रणवोच्चारें स्पष्टें । लागती मग वाटे । क्रियांचिये ॥ ५८ ॥ आंधारीं अभंगु दिवा । आडवीं समर्थु बोळावा । तैसा प्रणवो जाणावा । कर्मारंभीं ॥ ५९ ॥ उचितदेवोद्देशें । द्रव्यें धर्म्यें आणि बहुवसें । द्विजद्वारां हन हुताशें । यजिती पैं ते ॥ ३६० ॥ आहवनीयादि वन्ही । निक्षेपरूपीं हवनीं । यजिती पैं विधानीं । फुडे होउनि ॥ ६१ ॥ किंबहुना नाना याग । निष्पत्तीचें घेउनी अंग । करिती नावडतेया त्याग । उपाधींचे ॥ ६२ ॥ का न्यायें जोडला पवित्रीं । भूम्यादिकीं स्वतंत्रीं । देशकाळशुद्ध पात्रीं । देती दानें ॥ ६३ ॥ अथवा एकांतरा कृच्छ्रीं । चांद्रायणें मासोपवासीं । शोषोनि गा धातुराशी । करिती तपें ॥ ६४ ॥ एवं यज्ञदानतपें । जियें गाजती बंधरूपें । तिहींच होय सोपें । मोक्षाचें तयां ॥ ६५ ॥ स्थळीं नावा जिया दाटिजे । जळीं तियांचि जेवीं तरिजे । तेवीं बंधकीं कर्मीं सुटिजे । नामें येणें ॥ ६६ ॥ परी हें असो ऐसिया । या यज्ञदानादि क्रिया । ओंकारें सावायिलिया । प्रवर्तती ॥६७॥ तिया मोटकिया

ॐ, तत्, सत् असा तीन प्रकारचा ब्रह्माचा नामनिर्देश ( श्रुतीनें ) सांगितला आहे. या नामाच्या योगानें पूर्वी ( प्रजापतीनें ) ब्राह्मण, वेद आणि यज्ञ निर्माण केलेले आहेत. २३.

याप्रमाणें 'ॐ, तत्, सत्' या रूपानें ब्रह्माचें हें नाम, तीन प्रकारचें आहे. ह्या सुंदर फुलाचा उपनिषदें वास घेतात. म्हणजे उपनिषदांनीं याचा चांगला विचार केला आहे. ३४३. जेव्हां सात्त्विक कर्म या नामाशीं मिळून चालतें ( म्हणजे जेव्हां सात्त्विक कर्म या ब्रह्म नामाच्या विनियोगासहित होतें ) तेव्हां तें ( सात्त्विक कर्म ) मोक्षाला घरचा चाकर करतें. ३४४. कापुराचे दागिने दैव आणून देईल; परंतु बाबा, ते दागिने ( अंगावर ) कसे घालावें हें समजण्याचीच अडचण आहे. ३४५. त्याप्रमाणें सत्कर्म करण्याचा आरंभ केला जाईल आणि ब्रह्मनामही उच्चारलें जाईल, परंतु विनियोगाचें रहस्य जर समजलें जाणार नाहीं; ३४६. तर साधूंचे समुदाय आपण होऊन घरीं आले असतांही, त्यांचा आदरसत्कार कसा करावा, हें न समजून जर गैररीतीनें त्यांच्याशीं वर्तन केलें, तर पुण्यक्षय होतो. ३४७. अथवा चांगला शृंगार करण्याकरितां सोन्याचे व जडावाचे दागिने एके ठिकाणीं करून त्याची गाठोडी जशी गळ्यांत अडकवावी; ३४८. त्याप्रमाणें मुखानें ब्रह्मनामाचा उच्चार करतो आणि हातानें सात्त्विक कर्म करतो ( परंतु ) योजनेच्या हातवटीशिवाय तें कर्म निष्फळ होतें. ३४९. विचार कर. अर्जुना, जवळ अन्नही तयार आहे आणि भूक देखील लागलेली आहे, तरी तान्ह्या मुलाला जेवावें कसें, हें कळत नसल्यामुळें जसा उपवासच घडेल. ३५०. अथवा, अर्जुना, तेल, वात व अग्नि, हीं एकत्र झालीं असतां, जर दिवा लावण्याची युक्ति माहीत नसेल तर प्रकाश होणार नाहीं; ३५१. त्याप्रमाणें योग्य वेळेवर योग्य कर्म करण्याचा प्रसंग आला व त्या कर्मासंबंधाचा मंत्रही आठवला, परंतु तें सर्व विनियोगावांचून व्यर्थ आहे. ३५२. म्हणून तीन शब्दांचें जें हें एक परब्रह्माचें नांव आहे, या ब्रह्मनामाचा कर्माच्या ठिकाणीं विनियोग कसा करावयाचा, तें तूं आतां ऐक. ३५३. ( तरी या ) नामाचीं जीं तीन अक्षरें आहेत, तीं कर्माच्या आरंभीं, मध्यें व शेवटीं या तीन ठिकाणीं योजावीं. ३५४. अर्जुना, हीच एक हातवटी घेऊन ब्रह्मवेत्ते ब्रह्मसाक्षात्काराला प्राप्त झाले. ३५५. शास्त्राला जाणून जे बोलतात, ते ( आपलें ) ब्रह्माशीं ऐक्य होण्याकरितां, यज्ञादिक कर्मांचा त्याग करीत नाहींत. ३५६.

म्हणून नेहमीं ब्रह्मवाद्यांच्या ( मोक्षार्थी मनुष्यांच्या ) शास्त्राला अनुसरून होणाऱ्या यज्ञ, दान, तप इत्यादि क्रिया, ॐ अक्षराचा उच्चार करून सुरू होत असतात. २४.

ते पुरुष, कर्माच्या आरंभीं तर ध्यानानें ओंकार सिद्ध करतात आणि मग वाचेनें ॐ असा स्पष्ट उच्चार करतात. ३५७. त्या ध्यानानें ओंकार सिद्ध झाल्यावर व नंतर ओंकाराचा उच्चार स्पष्ट केल्यावर मग ते कर्माच्या आचरणाला लागतात. ३५८. अंधारामध्यें जसा केव्हांही न विझणारा दिवा अथवा अरण्यांतून बरोबर पोहोंचविण्याला जसा सामर्थ्यवान् सोबती असावा, त्याप्रमाणें कर्माच्या आरंभीं ओंकार समजावा; ( कर्मारंभीं ओंकाराची योजना केली असतां, तें कर्म निर्विघ्नपणें पार पडतें. ) ३५९. धर्मानें मिळविलेलें पुष्कळ द्रव्य वेदांत सांगितलेल्या योग्य देवतेला अर्पण करण्याच्या हेतूनें ब्राह्मणद्वारां अथवा अग्नीद्वारां यज्ञ करितात. ३६०. आहवनियादि अग्नींत त्यागात्मक हवनानें यज्ञ करितात, परंतु विधानांत निष्णात होऊन करितात. ३६१. फार काय सांगावें ! अनेक यज्ञ चांगल्या तऱ्हेनें पार पाडून ज्या ज्या उपाधींचा ( देहाहंकाराचा वगैरे ) आपल्यास उपसर्ग होत असेल, त्यांचा त्याग करितात; ३६२. अथवा न्यायानें ( धर्मानें ) मिळविलेल्या व पवित्र अशा आपल्या मालकीच्या जमिनी वगैरे मालमत्तेचें, शुद्ध अशा देशकाल व पात्राचे ठिकाणीं दान देतात. ३६३. अथवा अर्जुना, एकांतरानें, कृच्छ्रानें, चांद्रायणानें अथवा मासोपवासानें शरीरशोषण करून तप करितात. ३६४. याप्रमाणें यज्ञ, दान, तपें हीं बंधरूप म्हणून प्रसिद्ध आहेत खरीं; परंतु त्यांच्या आरंभीं प्रणवोच्चार केला असतां तींच यज्ञादिक कर्में, त्या करणाराला मोक्ष सोपा करून देतात. ३६५. जमिनीवर ज्या नावेचें ओझें वाटतें, त्याच नावेच्या योगानें पाण्यांत चांगलें तरतां येतें. त्याप्रमाणें बांधणारी कर्में करूनच, या नामाच्या योगानें सुटका होते. ( म्हणजे मोक्ष मिळतो. ), ३६६. परंतु आतां हें राहूं दे. अशा तऱ्हेनें या यज्ञदानादिक क्रिया ओंकाराच्या सहाय्यानें चालू होतात, ३६७. त्या क्रिया जेव्हां फला-

जेथ फळीं । रिगो पाहाती निहाळीं । प्रयोजिती तियें काळीं । तच्छब्दु तो ॥ ६८ ॥ जे सर्वांही जगापरौतें । जें एक सर्वेंही देखतें । जें तच्छब्दें बोलिजे तें । पैल वस्तु ॥ ६९ ॥ तें सर्वादिकत्वें चित्तीं । तद्रूप ध्यावूनियां सुमती । उचारेंही व्यक्ती । आणिती पुढती ॥ ३७० ॥

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपः क्रियाः । दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥

म्हणती तद्रूपा ब्रह्मा तया । फळेंसीं क्रियां इयां । तेचि होतु आम्हां भोगावया । कांहींचि नुरो ॥ ७१ ॥ ऐसेनि तदात्मकें ब्रह्में । तेथ उगाणूनि कर्में । आंग झाडिती न ममें । येणें बोलें ॥ ७२ ॥ आतां ओंकारें आदरिलें । तत्कारें समर्पिलें । इया रिती जया आलें । ब्रह्मत्व कर्मा ॥ ७३ ॥ तें कर्म कीर ब्रह्माकारें । जालें तेणेंही न सरे । जे करीतेणेंसी दुसरें । आहे म्हणौनि ॥ ७४ ॥ मीठ आंगें जळीं विरे । परी क्षारता वेगळी उरे । तैसें कर्म ब्रह्माकारें । गमे तें द्वैत ॥ ७५ ॥ आणि दुजें जंव जंव घडे । तंव तंव संसारभय जोडे । हें देवो आपुलेनि तोंडें । बोलती वेदें ॥ ७६ ॥ म्हणोनि परत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परियवसे । सच्छब्द या रिणादोषें । ठेविला देवें ॥ ७७ ॥ तरी ओंकार तत्कारीं । कर्म केलें जें ब्रह्म शरीरीं । जें प्रशस्तादि बोलवरी । वाखाणिलें ॥ ७८ ॥ प्रशस्तकर्मीं तिये । सच्छब्दा विनियोग आहे । तोचि आइका होये । तैसा सांगों ॥ ७९ ॥

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते । प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

तरी सच्छब्दें येणें । आटूनि असताचें नाणें । दाविजे अव्यंगवाणें । सत्तेचें रूप ॥३८०॥ जें सताचि काळें देशें । होऊं नेणेचि अनारिसें । आपणपां आपण असे । अखंडित ॥ ८१ ॥ हें दिसतें जेतुलें आहे । तें असतपणें जें नोहे । देखतां रूपीं सोये । लाभे जयाची ॥ ८२ ॥ तेणेंसीं प्रशस्त तें कर्म । जें जालें सर्वात्मक ब्रह्म । देखिजे करूनि सम । ऐक्यबोधें ॥ ८३ ॥ तरी ओंकारें तत्कारें । जें कर्म दाविलें ब्रह्माकारें । तें गिळूनि होइजे एकसरें । सन्मात्रचि ॥ ८४ ॥ ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा विनियोगु । जाण म्हणे श्रीरंगु । मी ना म्हणें हो ॥ ८५ ॥ ना मीचि जरी हो म्हणें । तरी श्रीरंगीं दुजें हेंचि उणें । म्हणौनि हें बोलणें । देवाचेंचि ॥८६॥ आतां आणिकीही परी । सच्छब्दु हा अवधारीं । सात्त्विका कर्मा करी । उपकारु जो ॥८७॥ तरी सत्कर्में चांगें । चालिलीं अधिकारबगें । परी एकाधें का आंगें । हिणावती जें ॥ ८८ ॥ तें उणें एकें अवयवें । शरीर ठाके

मध्यें अल्पसा प्रवेश करूं पाहातात, तेव्हां पहा कीं, ( त्या कर्मफलाचे ठिकाणीं ) ते पुरुष ' तत् ' शब्दाचा विनियोग करितात, म्हणजे तत् शब्दानें बोधित होणारें जें ब्रह्म, त्याला फळासह कर्म अर्पण करतात. ३६८. जी वस्तु सर्वही जगापलीकडे आहे, जी एक वस्तु सर्वांचाही द्रष्टा आहे आणि जी सर्वांच्या पलीकडे आहे, ती वस्तु ' तत् ' शब्दानें सांगितली जाते. ३६९. हे बुद्धिमान् अर्जुना, तें तत् नामाचें ब्रह्म सर्वांच्या आरंभींचें आहे, असें त्याचें चित्तांत ध्यान करून, मग उच्चारानेंही ते स्पष्टतेस आणतात. ( तत् असा स्पष्ट उच्चार करितात. ) ३७०.

मोक्षाची इच्छा करणारे मनुष्य, फलाची अपेक्षा न धरितां यज्ञ, तप आणि दान यांच्या विविध क्रिया, ' तत् ' अक्षराचा उच्चार करून करीत असतात. ( फलाचे ठिकाणीं तत् शब्दाचा विनियोग करतात. ) २५.

आणि ते म्हणतात कीं, या सर्व यज्ञादिक क्रिया फळासह त्या ' तत् ' स्वरूप ब्रह्मालाच होवोत, ( अर्पण असोत, ) आम्हांला भोगावयाला कांहीं उरूं नये. ३७१. याप्रमाणें तत् शब्दात्मक ब्रह्मानें ( तत् असा ब्रह्मनामाचा उच्चार करून ) व तेथें ( तत् शब्दानें दर्शविलेल्या ब्रह्माचे ठिकाणीं ) कर्में अर्पण करून ' न मम ' ( माझी नाहीं ) या शब्दानें अंग झाडतात. ( आपला व कर्मांचा संबंध तोडतात. ) ३७२. आतां ओंकाराच्या विनियोगानें ज्या कर्मांचा आरंभ झाला आहे व तत् शब्दाच्या विनियोगानें जें ब्रह्माचे ठिकाणीं अर्पण केलें आहे, अशा प्रकारें ज्या कर्मांला ब्रह्मत्व आलें आहे; ३७३. तें कर्म ब्रह्मरूप झालें खरें, परंतु तेवढ्यानें संपत नाहीं; कारण ब्रह्मरूप झालेलें कर्म व कर्ता यांत भेद राहातो म्हणून ( कारण कर्ता, आपल्याला ब्रह्माहून वेगळा समजतो म्हणून. ) ३७४. मीठ अंगानें पाण्यांत विरतें, परंतु मिठाचा खारटपणा पाण्याहून वेगळा राहतो; त्याप्रमाणें कर्म जरी ब्रह्माकार झालें, तरी कर्ता वेगळा उरतो हें द्वैत भासतें. ३७५. आणि जसजसें द्वैत उत्पन्न होतें, तसतसें संसारभय प्राप्त होतें. देव आपल्या तोंडानें व वेदाच्या द्वारां हें बोलतात. ३७६. म्हणून जें ब्रह्म दुसरेपणानें आहे, तें आत्मत्वानें अनुभवास येईल, ही उणीव भरून काढण्याचे उद्देशानें देवानें ' सत् ' शब्द ठेविला आहे. ३७७. तर ओंकार व तत्कार यांच्या विनियोगानें जें कर्म शरीरांत ब्रह्मरूप केलेलें आहे व ज्या कर्मांची प्रशस्त ( श्रेष्ठ ) वगैरे शब्दांनीं स्तुति केली आहे, ३७८. त्या प्रशस्त कर्मांचे ठिकाणीं सत् शब्दाचा विनियोग आहे, तोच ऐका. तो आहे तसा सांगतों. ३७९.

( कर्ता ) सद्रूप ( ब्रह्मरूप ) होण्याकरितां व ( व्यंगसहित कर्म, ) अव्यंग होण्याकरितां, सत् अक्षराचा उपयोग करतात. तसेंच हे पार्था, ( ओंकारतत्कारांनीं युक्त अशा ) प्रशस्त कर्मांचे ठिकाणीं सत् शब्दाचा उपयोग करतात. २६.

तर या ' सत् ' शब्दानें असत् पदार्थमात्राचा निरास करून, सत्तेचें ( ब्रह्माचें ) निर्दोष स्वरूप दाखविलें जातें. ३८०. ज्या सत्तेचें स्वरूप देशानें अथवा कालानें बदलणें जाणत नाहीं व जी ( सत्ता ) आपण आपल्या ठिकाणीं अखंडित आहे, ३८१. हें जेवढें साकार जगत् दिसत आहे तेवढें असत् असल्याकारणानें जी ब्रह्मवस्तु, तें जगत् नाहीं, असें पाहिल्याबरोबर, ( अनुभवल्याबरोबर ) ज्या ब्रह्मवस्तूच्या स्वरूपाचा आश्रय मिळतो. ३८२. सर्वात्मक ब्रह्म झालेलें जें प्रशस्त कर्म, त्याचें त्या सत् रूपक ब्रह्माशीं ऐक्य करून, त्यास आपल्यासह अद्वैत अनुभवानें पाहावें. ३८३. तर ओंकार व तत्कार यांनीं जें कर्म ब्रह्मस्वरूप झाल्याचें दाखविलें, तें गिळून ( तें कर्म ब्रह्मस्वरूप झालें खरें, पण तें कृत्य करणारा मी वेगळा आहें, ही भावना नाहींशी करून ) एकदम ब्रह्ममात्रच व्हावें, ३८४. असा हा सत् शब्दाचा अंतरंग विनियोग समज, असें श्रीकृष्ण म्हणतात. अहो, मी ( ज्ञानदेव ) म्हणत नाहीं. ३८५. अथवा ' असें माझें म्हणणें आहे ' असें जर मी म्हटलें असतें, तर भगवंताहून मी वेगळा आहें, असें होऊन, त्याचे स्वरूपांत द्वैत उत्पन्न झाल्याचा दोष पडला असता व ( भगवत्स्वरूपाचे ठिकाणीं द्वैत उत्पन्न करणें ) हाच कमीपणा आहे. म्हणून हें बोलणें माझें नसून देवाचें आहे. ३८६. आतां हा सत् शब्द आणखीही एका प्रकारानें, जो सात्त्विक कर्मांवर उपकार करतो, तो ऐक. ३८७. तर सत्कर्में हीं आपापल्या अधिकाराप्रमाणें चांगलीं चालली असलीं, तरीपण जेव्हां तीं एखाद्या अंगानें कमी पडतात, ३८८. तर ज्याप्रमाणें एक अवयव कमी असल्यानें सर्व शरीर ( शरीराचे सर्व व्यापार ) थांबते अथवा चाक वगैरे

आघवें । का अंगहीन भांडावे । रथाची गती ॥८९॥ तैसें एकेंचि गुणेंवीण । संतचि परी असंतपण । कर्म धरी गा जाण । जिये वेळे ॥ ३९० ॥ तेव्हां ओंकार तत्कारीं । सावायिला हा चांगी परी । सच्छब्दु कर्मा करी । जीर्णोद्धारु ॥९१॥ तें असतपण फेडी । आणी सद्भावाचिये रूढी । निजसत्त्वाचिये प्रौढी । सच्छब्दु हा ॥ ९२ ॥ दिव्यौषध जैसें रोगिया । कां सावावो ये भंगलिया । सच्छब्दु कर्मा व्यंगलिया । तैसा जाण ॥९३॥ अथवा कांहीं प्रमादें । कर्म आपुलिये मर्यादे । चुकोनि पडे निषिद्धें । वाटे हन ॥९४॥ चालतयाही मार्गु सांडे । पारखिया अखरें पडे । राहाटीमाजीं न घडे । काइ काइ ॥ ९५ ॥ म्हणौनि तैसी कर्मा । राभस्यें सांडे सीमा । असाधुत्वाचिया दुर्नामा । येवों पाहे जें ॥ ९६ ॥ तेथ गा हा सच्छब्दु । येरां दोहींपरीस प्रबुध्दु । प्रयोजिला करी साधु । कर्मातें यया ॥ ९७ ॥ लोहा परिसाची घृष्टी । वोहळा गंगेची भेटी । कां मृता जैसी वृष्टी । पीयूषाची ॥९८॥ पैं असाधुकर्मा तैसा । सच्छब्दुप्रयोगु वीरेशा । हें असो गौरवुचि ऐसा । नामाचा यया ॥ ९९ ॥ घेऊनि येथिंचें वर्म । जें विचारिसी हें नाम । तैं केवळ हेंचि ब्रह्म । जाणसी तूं ॥ ४०० ॥ पाहें पां ॐतत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेतसे । जेथूनि का हें प्रकाशे । दृश्यजात ॥ १ ॥ तें तंव निर्विशिष्ट । परब्रह्म चोखट । तयाचें हें आंतुवट । व्यंजक नाम ॥ २ ॥ परी आश्रयो आकाशा । आकाशचि का जैसा । या नामा नामी आश्रयो तैसा । अभेदु असे ॥ ३ ॥ उदायिला आकाशीं । रवीचि रवीतें प्रकाशी । हे नामव्यक्ती तैसी । ब्रह्मा करी ॥ ४ ॥ म्हणौनि त्र्यक्षर हें नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म । ययालागीं कर्म । जें जें कीजे ॥ ५ ॥

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते । कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

तें याग अथवा दानें । तपादिकें गहनें । तियें निफजतु कां न्यूनें । होऊनि ठातु ॥ ६ ॥ परी परिसाचां बरकलीं । नाहीं चोखाकिडाची बोली । तैसीं ब्रह्मीं अर्पितां केलीं । ब्रह्मचि होती ॥ ७ ॥ उणिया पुरियाची परी । तुरेचि तेथ अवधारीं । निवडूं न येती सागरीं । जैसिया नदी ॥ ८ ॥ एवं पार्था तुजप्रती । ब्रह्मनामाची हे शक्ती । सांगितली उपपत्ती । डोळसा गा ॥ ९ ॥ आणि येकेकाही अक्षरा । वेगळवेगळा वीरा । विनियोगु नागरा । बोलिलों रीती ॥ ४१० ॥ आतां ऐसें एवं सुमहिम । म्हणौनि हें ब्रह्मनाम । जाणितलें कीं सुवर्म । राया तुवां ॥ ११ ॥ तरी येथूनियाचि श्रद्धा । उपलविली हो सर्वदा । जयाचें जालें बंधा । उरों नेदी ॥ १२ ॥ जिये कर्मीं हा प्रयोगु । अनुष्ठिजे सद्विनियोगु । तेथ अनुष्ठिला सांगु । वेदुचि जाणा ॥ १३ ॥

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् । असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

एखाद्या अवयव नसलेल्या रथाची गति बंद पडते; ३८९. त्याप्रमाणें असें समज कीं, ज्या वेळेला एकच गुण ( एखादें अंग ) नसल्या कारणानें सत्कर्मच असत्कर्मपणा धारण करतें. ३९०. तेव्हां ॐकार व तत्कार यांनीं चांगल्या प्रकारें साह्य केलेला हा 'सत्' शब्द कर्मांचा जीर्णोद्धार करतो. ३९१. हा 'सत्' शब्द आपल्या सत्पणाच्या सामर्थ्यानें, तें कर्माचें असत्पण नाहींसें करतो व त्या कर्माला सत्पणाच्या व्यवहाराला आणतो. ३९२. रोग्याला जशी दिव्यौषधी मिळाली ( असतां तो जसा निरोगी होतो ) अथवा धैर्य खचलेल्या मनुष्याला जसें साह्य मिळालें असतां, त्यास पुनः धैर्य येतें, त्याप्रमाणें न्यून झालेल्या कर्माला 'सत्' शब्द तसा ( पूर्ण करणारा ) आहे असें समज. ३९३. अथवा कांहीं चुकीनें कर्म आपली मर्यादा सोडून निषिद्ध वाटेला पडलें. ३९४. एखाद्या वाटेनें नेहमीं चालणारा मनुष्यही ती वाट चुकतो; परीक्षकाच्याच पदरांत ( नजरचुकीनें ) अलरें ( म्हणजे खोटें ) पडतें, व्यवहारामध्यें काय काय घडत नाहीं ? ( व्यवहारांत कोणती चूक घडत नाहीं ? ) ३९५. म्हणून त्याप्रमाणें अविचारानें कर्माची मर्यादा सुटते व तें कर्म जेव्हां दुष्कर्माच्या वाईट नांवाला येऊं पाहातें, ३९६. अर्जुना, तेथें हा 'सत्' शब्द जो इतर दोन ( ॐकार व तत्कार ) पेक्षां प्रौढ आहे; तो योजिला असतां, त्या कर्माला सत्कर्मत्व आणतो. ३९७. लोखंडाला जसें परिसाचें घांसणें, ओढ्याला जशी गंगेची भेट, अथवा मेलेल्याला जसा अमृताचा वर्षाव, ३९८. हे वीरेशा अर्जुना, 'सत्' शब्दाचा प्रयोग ( विनियोग ) वाईट कर्माला तसा आहे. हें राहूं दे. या नामाचा मोठेपणाच असा आहे. ३९९. वर सांगितलेल्या ब्रह्मनामाच्या विनियोगाचें वर्म लक्षांत घेऊन, जेव्हां तूं या ब्रह्मनामाचा विचार करशील, तेव्हां केवळ हें नामच ब्रह्म आहे, असें तुला कळेल. ४००. हें पहा, ज्याचेकडून हें सर्व दृश्यमात्र प्रकाशलें जातें, त्या ठिकाणीं 'ॐ तत् सत्' हें बोलणें ( हा नामोच्चार ) नेतें. ४०१. तें ठिकाण तर निर्धर्म व शुद्ध असें परब्रह्म आहे, पण ( ॐ तत् सत् ) हें त्याचें अंतरंग व त्यास व्यक्त करून दाखविणारें नाम आहे. ४०२. आकाश या नांवाला आकाश हाच एक जसा आधार आहे ( कारण ते दोघे एक आहेत. ) त्याप्रमाणें 'ॐ तत् सत्' या नामाला व नामीला ( ब्रह्माला ) आश्रय अभेद आहे. ( म्हणजे ॐ तत् सत् या नांवाचा व परब्रह्म वस्तूचा अभेद आहे. ) ४०३. आकाशांत उगवलेला सूर्यच जसा सूर्याला प्रकाशतो त्याप्रमाणें 'ॐ तत्सत्' या नामाचा उच्चार ब्रह्माला प्रकाशित करतो. ४०४. म्हणून, हें तीन अक्षरी नाम, हें नांव नव्हे, तर केवळ ब्रह्म आहे, असें समज. एवढ्याकरितां जें जें कर्म करावें, ४०५.

यज्ञ, तप व दान यांच्यांतील न्यूनता जाऊन संपूर्णता प्राप्त होणें, यालाही 'सत्' म्हणतात, त्याच्याकरितां केलेल्या व म्हणून तद्रूप बनलेल्या कर्मालाही 'सत्' असें म्हणतात. २७.

तीं कर्में यज्ञ असोत, दानें असोत अथवा कठीण तपादिक असोत व तीं पूर्ण होवोत अथवा अपुरीं होऊन राहोत; ४०६. परंतु परिसाच्या कसोटीवर जशी चांगलेंवाईट सोनें ही भाषा नाहीं, त्याप्रमाणें ( या नामाच्या विनियोगानें ) केलेलीं कर्में ब्रह्माच्या ठिकाणीं अर्पण केलीं असतां, ब्रह्मच होतात, ४०७. ज्याप्रमाणें समुद्रांत लहानमोठ्या नद्या वेगळेपणानें ओळखतां येत नाहींत, त्याप्रमाणें नामाच्या विनियोगानें ब्रह्माच्या ठिकाणीं अर्पण केलेल्या कर्मांत न्यून कर्में व सांग कर्में, असा हा प्रकार रहात नाहीं, असें समज. ४०८. हे डोळस अर्जुना, याप्रमाणें तुला ब्रह्मनामाच्या सामर्थ्याचा विचार सांगितला. ४०९. हे वीरा अर्जुना, आणि एक एका अक्षराची वेगवेगळी योजना ( कर्माच्या ठिकाणीं कोठें व कशी करावयाची ही ) चांगल्या रीतीनें मीं सांगितली. ४१०. आतां याप्रमाणें असें चांगलें माहात्म्य असलेलें जें ब्रह्मनाम आहे; म्हणून मर्मज्ञ राजा अर्जुना, तूं हें ब्रह्मनाम जाणलेंस काय ? ४११. तर या नामाविषयींच तुझी श्रद्धा नेहमीं विस्तारलेली असूं दे; ( कारण ) या नामाच्या विनियोगानें झालेलें कर्म, जन्ममरणरूपी बंधाला उरूं देत नाहीं. ४१२. ज्या कर्मांमध्यें ( या नामाचा ) सद्विनियोगासह प्रयोग अनुष्ठिला जातो, तेथें संपूर्ण वेदच अनुष्ठिला असें समजा. ४१३.

हे पार्था, अश्रद्धेनें केलेलें हवन, दिलेलें दान, आचरलेलें तप व केलेलें कर्म जें असेल, त्याला 'असत्' असें म्हणतात. मरण पावल्यावर ( म्हणजे परलोकीं ) त्याचें फल नाहीं व इहलोकींहि नाहीं. २८.

ना सांडूनि हे सोये। मोडूनि श्रद्धेची बाहे। दुराग्रहाची त्राये। वाढऊनियां ॥ १४ ॥ मग अश्वमेध कोडी कीजे। रत्नें भरोनि पृथ्वी दीजे। एकांगुष्ठींही तपिजे। तपसाहस्त्रीं ॥ १५ ॥ जळाशयाचेनि नांवें। समुद्र कीजती नवे। परी किंबहुना आघवें। वृथाचि तें ॥ १६ ॥ खडकावरी वर्षलें। जैसें भस्मीं हवन केलें। कां खेंव दिधलें। साउलिये ॥ १७ ॥ नातरी चडकणा। गगन हाणितलें अर्जुना। तैसा समारंभु सुणा। गेलाचि तो ॥ १८ ॥ घाणां गाळिले गुंडे। तेथ तेल ना पेंडी जोडे। तैसें दरिद्र तेवढें। ठेलोंचि आंगीं ॥ १९ ॥ गांठीं बांधली खापरीं। येथें अथवा पैलतीरीं। न सरोनि जैसी मारी। उपवासीं गा ॥ ४२० ॥ तैसें कर्मजातें तेणें। नाहीं ऐहिकीचें भोगणें। तेथ परत्रु तो कवणें। आक्षेपावा ॥ २१ ॥ म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा। सांडूनि कीजे जो धांदा। हें असो सिणु लुसधा। दृष्टादृष्टीं तो ॥ २२ ॥ ऐसें कुलुपकरिकेसरी। त्रितापतिमिरतमारी। श्रीवीरवरनरहरी। बोलिलें तेणें ॥ २३ ॥ तेथ निजानंदा बहुवसा-। माजीं अर्जुन तो सहसा। हरपला चंद्रु जैसा। चांदिणेनि ॥ २४ ॥ अहो संग्रामु हा वाणिया। मार्पे नाराचांचिया आणिया। खुनि मांस घे मवाणिया। जीवितेंसी ॥ २५ ॥ ऐसिया समयीं कर्कशें। भोगीजत स्वानंदराज्य कैसें। आजि भाग्योदयो हा नसे। आणिके ठाईं ॥ २६ ॥ संजयो म्हणे कौरवराया। गुणा रिझों ये रिपूचिया। आणि गुरुही हा आम्नुचिया। सुखाचा येथ ॥ २७ ॥ हा न पुसता हे गोठी। तरी देवो कां सोडिते गांठी। तरी कैसेनि आम्हां भेटी। परमार्थेंसी ॥ २८ ॥ होतों अज्ञानाचां आंधारां। बोसंतीत जन्मवाहरा। तों आत्मप्रकाशमंदिरा-। आंतु आणिलें ॥ २९ ॥ एवढा आम्हां तुम्हां थोरु। केला येणें उपकारु। म्हणोनि हा व्याससहोदरु। गुरुत्वें होय ॥ ४३० ॥ तेवींचि संजयो म्हणे चित्तीं। हा अतिशयो या नृपती। खुपेल म्हणौनि किती। बोलत असों ॥ ३१ ॥ ऐसी हे बोली सांडिली। मग येरीचि गोठी आदरिली। जे पार्थें कां पुसिली। श्रीकृष्णातें ॥ ३२ ॥ याचें जैसें कां करणें। तैसें मीही करीन बोलणें। ऐकिजो ज्ञानदेवो म्हणे। निवृत्तीचा ॥ ४३३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धादिनिरूपणयोगोनाम सप्तदशोऽध्यायः

[ श्लोक २८. ओंव्या ४३३. ]

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



अथवा नामाचा हा मार्ग टाकून, श्रद्धेचा आधार नाहींसा करून व दुराग्रहाचें बल वाढवून–४१४. मग कोट्यवधि अश्वमेध केले, रत्नांनीं भरून पृथ्वीचें दान दिलें अथवा एका आंगठ्यावर उभें राहून हजारों वर्षें तपश्चर्या केली. ४१५. तलाव म्हणून समुद्र जरी नवे बनविले, परंतु फार काय सांगावें ! तें सर्व व्यर्थच आहे. ४१६. ज्याप्रमाणें खडकावर पाऊस पडावा अथवा राखेंत जसा होम करावा, अथवा सावलीला जसें आलिंगन द्यावें; ४१७. अथवा अर्जुना, आकाशाला चापटीनें मारावें, त्याप्रमाणें तो खटाटोप व्यर्थ गेला. ४१८. घाण्यामध्यें गोटे गाळले असतां ज्याप्रमाणें तेल अथवा पेंड कांहींच प्राप्त होत नाहीं, परंतु स्वतःस दारिद्र्य तेवढें राहातेंच; ४१९. पदरांत बांधलेली खापरखुंटी नदीच्या अलिकडल्या तीरावरील गांवांत अथवा पलीकडल्या तीरावरील गांवांत ( पैसा म्हणून ) न चालल्याकारणानें ज्याप्रमाणें उपाशी मारते, ४२०. त्याप्रमाणें या नामाच्या श्रद्धेशिवाय केलेल्या सर्व कर्मांनीं ऐहिक भोग मिळत नाहींत, तेथें परलोकाची कोणीं आशा करावी ! ४२१. म्हणून ब्रह्मनामावरील श्रद्धा सोडून जी खटपट करावयाची, ती राहूं दे. कारण तो इहपरलोकीं नुसता शीण आहे. ४२२. पापरूपी हत्तीचे ( नाश करणारे ) सिंह, त्रिविधतापरूपी अंधःकाराचे सूर्य, वीरांमध्यें श्रेष्ठ, असे जे श्रीनरहरि ( श्रीकृष्ण ), ते असें बोलले. ४२३. चंद्र जसा चांदण्यानें झांकला जातो म्हणजे तद्रूप होतो, तसा तो अर्जुन त्या वेळीं अतिशय स्वानंदांत एकदम तद्रूप ( तल्लीन ) झाला. ४२४. अहो, ( धृतराष्ट्र राजा ) युद्ध हा वाणी, वाणांचीं अग्रें हींच कोणी मापें, तीं घालून ( तो ) जीवितासह मांसाचें माप घेतो, ( मांसाची मोजणी करतो. ) ४२५. अशा कर्कश वेळेला ( अर्जुन ) स्वानंदराज्य कसें भोगीत आहे हें पहा ! आज ( अर्जुनाशिवाय ) दुसऱ्या ठिकाणीं असा भाग्योदय नाहीं. ४२६. संजय म्हणतो, हे कौरवांच्या राजा, ( धृतराष्ट्रा ) शत्रूंच्या गुणांना पाहून संतोष होतो आणि हा अर्जुन तर या वेळीं आमच्या सुखाचा ( आम्हांला आत्मसुख देणारा ) गुरुही आहे. ४२७. हा ( अर्जुन ) जर ही गोष्ट न विचारता, तर देवांनीं आत्मज्ञानाच्या गाठोड्याची गांठ कशी सोडली असती ? आणि मग परमार्थाचा आम्हांला लाभ कशानें झाला असता ! ४२८. अज्ञानाच्या अंधारांत जन्म ( मरण ) रूपी रस्ता ( आपण ) काढीत होतों, तों आपणांला आत्मप्रकाशरूपी मंदिरांत आणलें. ४२९. या अर्जुनानें तुम्हां-आम्हांवर एवढा मोठा उपकार केला आहे, म्हणून गुरूच्या नात्यानेंही ( अर्जुन ) व्यासाचा भाऊच आहे. ४३०. त्याचप्रमाणें संजय आपल्या मनांत म्हणतो, हा अतिप्रसंग ह्या धृतराष्ट्राला वर्मी लागेल म्हणून आपण किती बोलत आहोंत ! ( बोललों हें फार झालें. ) ४३१ असें हें अर्जुनाच्या गुणवर्णनाचें भाषण ( संजयानें ) पुरें केलें आणि मग अर्जुनानें जी गोष्ट श्रीकृष्णनाथाला विचारली होती, ती तिसरीच गोष्ट बोलण्यास आरंभ केला. ४३२. संजयानें, अर्जुनाचें गुणवर्णन करण्याचें सोडून अर्जुनानें श्रीकृष्णास विचारलेली गोष्ट सांगण्यास जसा आरंभ केला, तसें व्याख्यान मीही करीन, तें श्रोत्यांनीं ऐकावें, असें निवृत्तिनाथाचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. ४३३.



याळागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेउनि मिस । उपरतविलोंचि दुस । गीतेचें तें ॥
अठरावा अध्यावो नोहे । हे एकाध्यायी गीताची आहे । अ. १८ ओं. ८३–८४

[ समुद्राला मिळण्याच्या वेळीं जसें गंगेचें पात्र विस्तार पावतें, त्याप्रमाणें या शेवटच्या अध्यायावरील श्रीज्ञानदेवांची टीका विस्तृत झाली असून काव्य, उपमा, अलंकार यांनीं पूर्णपणें नटलेली आहे. ] गीतेच्या श्लोकांचें प्रतिपादन करण्यास सुरवात करण्यापूर्वीं श्रीज्ञानदेव आपल्या गुरुंच्या निर्मळ, शुद्ध व मायागम्य स्वरूपाचें वर्णन करून त्यांचें सामर्थ्य सांगतात. [ या वर्णनापैकीं पहिल्या दहा ओंव्या संस्कृतप्रचुर अशा शब्दांनीं अलंकृत केलेल्या आहेत. ] हे श्रीगुरो, जे आपणाकडे येतात, त्या सर्वांचें आपण कल्याणच करतो; पण आपलें खरें प्रेम विरक्त पुरुषावर आहे. साधकाचें चंचल चित्त स्थिर करून व त्याच्यामागच्या त्रिविध तापाची बोळवण करून त्याचें जन्ममरणाचें भय घालविण्याचें सामर्थ्य आपल्याच अंगीं आहे. आपण जसे खरोखरीं आहांत त्या स्वरूपाचें यथार्थ वर्णन शब्दांनीं करतां येणें अशक्य आहे. कारण वर्णन करायचें म्हटलें म्हणजे लौकिकांत ज्यांना आपण पूज्य मानतों त्या आई, बाप, स्वामी अशा कोणत्यातरी उपमानाची योजना करावी लागते; पण तसें वर्णन करण्यांतही आपल्या निरुपाधिक स्वरूपाला गौणपणाच येतो. कारण हें सर्व वर्णन उपाधीवरच उभारलेलें असणार. तेव्हां मौन स्वीकारून स्वस्थ बसूनच आपली स्तुति करावें हें चांगलें. परंतु आपलें स्मरण झालें म्हणजे हें सर्व मी विसरतों, माझी वाचा मला अनावर होते व वेड्यासारखा मी विशेषणांनींच आपली स्तुति करू लागतों; पण हा अपराध आपण पोटांत घालावा. माझा हेतु एवढाच आहे कीं, श्रोते मंडळींना पसंत पडेल असें व्याख्यान माझ्या मुखांतून बाहेर पडावें. एकदां आपणास तें आवडलें म्हणजे मग संतश्रोत्यांना तें आपोआपच पसंत पडेल. ( १–२७ ) श्रीनिवृत्तिनाथांची आज्ञा मिळाल्यावर श्रीज्ञानदेव अठराव्या अध्यायाचें महत्त्व सांगतात. ‘वेदरत्नाच्या डोंगरावर उपनिषदाच्या पठारांतून उत्तम रत्नें काढून शिल्पज्ञ व्यासांनीं त्यांचें हें गीतामंदीर तयार केलें. हा अठरावा अध्याय त्या मंदीराचा कळस आहे. देवळाच्या कळसाचें दर्शन झालें म्हणजे त्या देवालयांतील मूर्तीचेंच दर्शन घेतल्याचें जसें फळ मिळतें; त्याप्रमाणें या अठराव्या अध्यायाच्या अध्ययनानें संपूर्ण गीताशास्त्राचें आलोडन केल्याचें श्रेय मिळतें. हा अठरावा अध्याय म्हणजे मागील सर्व अध्यायांचें तात्पर्य सांगणारी एकाध्यायी गीताच आहे. अठराव्या अध्यायाचें असें जरी वैशिष्ट्य असलें तरी गीतेचे बाकीचे सर्व अध्याय, त्या अध्यायांतील श्लोक व श्लोकाचीं पदें हीं सर्व मूळ सिद्धान्ताच्या दृष्टीनें सारख्याच महत्त्वाचीं आहेत. अठरा अध्याय व सातशें श्लोक मिळून एकच सिद्धान्त गीतेनें सांगितला आहे व तो म्हणजे जीवाच्या मागचें संसारदुःख जाण्यास ज्ञान हाच एक उपाय आहे. ( २८–५९ ) सतराव्या अध्यायांतून अठरावा अध्याय कसा निर्माण झाला हें सांगतात. ‘भगवंतांनीं मागील अध्यायाच्या शेवटीं असें सांगितलें कीं, ब्रह्मनामाचें सहाय्य घेतल्यावांचून जर कर्में केलीं तर त्यामुळें मोक्षाची प्राप्ति तर होणारच नाहीं; परंतु जर का त्या कर्मांत न्यूनता अथवा व्यंग राहिलें तर उलट अधोगति मात्र ठेवलेली आहे. चुकूनच कधीं तें अव्यंग व सांग होऊन करणाऱ्यास ज्ञानाची योग्यता आणून देणार; अशा कर्मांतील अडचणी लक्षांत घेतल्या म्हणजे कर्मठाला मोक्ष मिळणें जवळजवळ दुरापास्त आहे असें म्हणावयास हरकत नाहीं, तेव्हां कर्मांचा पाश तुटून ज्याच्या योगानें कर्मबाधा नाहींशी होईल असें त्याग व संन्यास यांचें एकदां शेवटीं स्पष्टीकरण करून द्यावें म्हणून अर्जुनानें देवास जी विनंति केली, त्या विनंतींतून हा अठरावा अध्याय निर्माण झाला आहे. वास्तविक अर्जुन या बाबतींत स्वतः निःशंक झाला होता; परंतु भगवंताचें बोलणें ऐकण्यास लाचावल्यामुळें त्यानें ही शंका मुद्दाम निर्माण केली ( ६०-८९ ). भगवान् त्याला उत्तर देतात.

' त्याग व संन्यास या दोन शब्दांनीं त्यागच सूचित आहे हें जरी खरें असलें, तरी त्यांत एक सूक्ष्म भेद आहे. कर्में न करतां तें अजिबात टाकणें याला संन्यास म्हणतात व कर्मे तर करायचें पण त्याचें फळ टाकायचें याला त्याग म्हणतात. आतां कर्मच कोणतें टाकायचें व कोणत्या कर्माचें (तें करून) फल टाकायचें हें कळणें अवश्य आहे. नित्य-नैमित्तिक कर्में अवश्य केलीं पाहिजेत; पण त्यांचें फळ घेऊं नये व काम्य कर्में अजिबात टाकावींत, असा निर्णय या बाबतींत शास्त्रानें केला आहे. काम्य कर्में म्हणजे मनांत कामना ठेवून केलेलीं कर्में; पण एखादे वेळीं मनांत कामना नसतांही चुकून काम्य कर्म घडलें तरी त्याचें फळ इच्छा असो वा नसो, भोगावेंच लागतें. म्हणून मुमुक्षूनें हीं काम्य कर्में चुकूनसुद्धां करूं नयेत. त्यांचा संन्यास करावा. (९०-१०९) अशा रीतीनें काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग व नित्यनैमित्तिक कर्मांच्या फळाचा त्याग केला, तर कर्मकर्त्याच्या अंगचा मल-दोष जाऊन तो आत्मज्ञानाचा अधिकारी होतो. मात्र कोणत्या कर्मांचा त्याग करावयाचा व कोणत्या कर्मफळाचा त्याग करावयाचा हें नीट कळलें पाहिजे. या बाबतींत भिन्न भिन्न मतें आहेत. त्यांचा विचार न करतां कांहीं तरी त्याग केला, तर कर्मांच्या कचाट्यांतून सुटण्या-ऐवजीं त्यांत अधिकच गुंतून पडावें लागेल. कांहीं लोकांना कर्मांचें फळ टाकणें अशक्य वाटतें, म्हणून यज्ञादिक कर्मेंच टाकावींत असा त्यांचा आग्रह आहे. याउलट कांहींचा कर्मांवरच भर असतो. खरें असें आहे कीं, नित्य-नैमित्तिक कर्मांचा कोणीही त्याग करूं नये, तीं दक्षतापूर्वक म्हणजे कर्तृत्वमद व फळास्वाद टाकून करावींत. ज्याला आपलें चित्त शुद्ध करून आत्मज्ञानसंपन्न व्हावयाचें असेल त्यानें माझें सांगणें नीट लक्षांत ठेवावें. (११०–१७७).

कर्म करण्यामुळें जन्ममरणाची परंपरा पाठीमागें लागते, हा जो कर्मांतील दोष तो कर्म करण्यानेंच दूर होतो, हें अज्ञाणीपणानें न कळल्यामुळें आपल्या विहित कर्मांचा त्याग केला, तर तो तामसी त्याग होईल; कर्म करावयास आरंभ करून, त्यांत देहाला कष्ट होऊं लागले म्हणून तें जर टाकलें तर तो राजस त्याग होईल; परंतु खरा सात्त्विकत्यागी विहित कर्में केव्हांही टाकीत नाहीं, त्यांतील कर्तृत्वमद व फळास्वाद हा जो बंध आहे तो टाकतो. अशीं फळत्यागपूर्वक कर्में केलीं म्हणजे अंतःकरण शुद्ध होऊन त्यांत आत्मज्ञान निर्माण होतें. त्या वेळीं त्याच्या दृष्टीपुढें असणारा विश्वाभास मावळतो. मग कर्मांतील शुभ अथवा अशुभ हा भेदही नाहींसा होतो. त्या वेळीं कर्म आणि कर्ता हा भेद उरतच नाहीं. अशीं टाकलीं तरच कर्में टाकली जातात, एऱ्हवीं बाधतात. या त्यागास सात्त्विक त्याग म्हणतात. ( १७८-२१७ )

कर्में करावीं असा माझा आग्रह आहे. याला कारण म्हणजे मनुष्याला जो देह प्राप्त झाला आहे, तो मागील जन्मांतील कर्मांचें फळ भोगण्याकरितां आहे. म्हणून जोंपर्यंत देह आहे तोंपर्यंत कर्में होतच रहाणार. कर्मांचा त्याग संपूर्णतया होऊंच शकत नाहीं. जेव्हां आत्मज्ञान होतें तेव्हांच कर्म सुटतें म्हणजे कर्मांचें तादात्म्य सुटतें. आत्मज्ञानी पुरुषाच्या संघाताकडून कांहीं कर्में होतच राहतात. मनुष्य फार तर विहित कर्में कष्टदायक म्हणून टाकून देईल. पण त्याऐवजीं विषयोपभोगाचीं दुसरीं कर्में करील व त्यामुळें पुढील अनेक जन्मांच्या भोगाचीं फळें निर्माण करील. जोंपर्यंत अज्ञान आहे तोंपर्यंत भोगाची इच्छा अंतःकरणांत राहणारच व त्या भोगासाठीं कर्में करावीं लागणारच. हीं कर्में ज्या प्रकारचीं होतात त्या प्रकारचें त्यांचें फळही असतें. स्वैर विषयोपभोगप्रधान पापकर्म केल्यामुळें जंतु, किडे अशी अधोगति प्राप्त होते. पुण्यकर्म केलें तर स्वर्गादिक उच्च गति मिळते. ज्या वेळीं पाप व पुण्य कर्में समान होतात तेव्हांच मनुष्यदेह प्राप्त होतो. जीवात्मा एका जन्माच्या कर्मांचीं फळें भोगीत असतांना पुनः पुढील अनेक जन्मांची परंपरा निर्माण होईल अशीं कर्में करीत असतो. अशा रीतीनें हें जन्ममरणाचें रहाटगाडगें अखंड सुरू राहतें. मात्र ज्यांची भोगाची इच्छा संपली तेच या चक्रांतून सुटूं शकतात. हें कर्म ज्यामुळें निर्माण होतें, त्या कर्मांचीं कारणें सांख्यसिद्धांतांत सांगितलीं आहेत. ( २१८-२८७ )

कर्मांचीं कारणें सांगत असतांना देव अर्जुनावरील प्रेमामुळें स्वतःला विसरून जाऊन बोलत होते व अर्जुनही त्या प्रेमरसांत बुडून गेला होता. हा देव भक्ताच्या प्रेमाचा संगम ज्ञानदेवांनीं मोठ्या हळुवारपणें रेखाटला आहे. ( २८८–३०३ ).

देव कर्मांचीं कारणें सांगतात; पण आरंभीं बजावतात कीं, ज्याच्या सत्तेवर कर्मांची उभारणी होते तो आत्मा मात्र या सर्वांहून सर्वस्वी अलिप्त आहे हें नीट लक्षांत ठेवलें पाहिजे. कर्मांचीं कारणें पांच आहेत. त्यापैकीं पहिलें कारण म्हणजे हा देह. या देहांत मनुष्य इंद्रियद्वारां विषय गोळा करून त्यांचा भोग घेऊं शकतो व या देहांतच जर त्यानें मनांत आणलें तर त्याला जन्ममरणांतून सुटका करून घेतां येते. कर्मांचें दुसरें कारण म्हणजे आपल्या मूळ स्वरूपाला विसरलेला जीव; त्याच्या या विसरामुळें प्रकृतीनें केलेलीं कर्में मीं केलीं असें तो म्हणतो. तिसरें कारण म्हणजे ज्ञानेंद्रियें, त्यांच्यां द्वारा बुद्धीचें ज्ञान फाकतें. एकाच प्राणवायूचे जे प्राण अपान असे निरनिराळे भेद होतात तें कर्माचें चौथें कारण आहे व दहाही इंद्रियांवर अनुग्रह करणाऱ्या ज्या देवता आहेत, तें कर्मांचें पांचवें कारण आहे. ( ३०४–३५२ ) हीं पांचही कारणें त्या कर्माचे हेतुही आहेत. कोणत्याही कर्मांचा संकल्प प्रथम मनांत उत्पन्न होतो. मग तो वाणी व शरीरद्वारां प्रगट होतो. तें कर्म जर शास्त्राप्रमाणें घडत असेल, तर त्याला पुण्यकर्म म्हणतात. शास्त्राचें सहाय्य नसेल तर तें अन्यायकर्म असून त्याचा उपयोग कांहीं नाहीं. ( ३५३–३७६ ) या सर्व कर्मांहून व कर्मकर्त्यांहून आत्मा अलिप्तच असतो. परंतु देहच मी आहें, अशा समजुतीच्या मूढ लोकांना हें कळत नाहीं. ते वरवरच्या देखाव्यावरून आत्म्यालाच कर्मकर्ता म्हणतात; कांहीं तर देहालाच कर्मकर्ता म्हणतात. अशा लोकांची जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका कल्पांतींही होणें शक्य नाहीं. फक्त एकच उपाय आहे. तो हा कीं ' कर्म करून जे या कर्मपाशांतून मुक्त झाले त्या पुरुषांची राहणी वारंवार डोळ्यापुढें ठेवून त्याचा निरंतर विचार केला तर त्यांनाही मुक्त होतां येईल ' ( ३७७–४०२ ).

हा मुक्तपुरुष मुक्त होण्यापूर्वी इतरांप्रमाणें विश्व हें वेगळेपणानें पहात होता; परंतु त्याच्यावर गुरूंची कृपा होऊन त्यांनीं त्याला तत्त्वमसि महावाक्याचा उपदेश केला. त्या वाक्याच्या निदिध्यासामुळें त्याला त्याचें मूळचें ' आनंद अद्वय ' असें स्वरूप सगळीकडे दिसूं लागलें. सर्व ठिकाणीं मीच ओतप्रोत भरून राहिलों आहे असा अनुभव आल्यामुळें त्याला कर्म हे भिन्नत्वानें उरतच नाहीं व त्यामुळें कर्माचा कर्तेपणाही नाहींसा होतो; परंतु ज्या कारणांमुळें त्याला देह प्राप्त झाला, तीं जोपर्यंत शिल्लक आहेत व देह उभा आहे, तोंपर्यंत त्याच्या संघाताकडून कर्में होतच असतात; फक्त त्याचा त्या कर्माशीं आतां संबंध राहिलेला नसतो. त्या कर्म होण्यांत जगाचें कल्याण झालें काय अथवा हानि झाली काय त्याला त्याची खबरही नसते. बहिर्मुख लोकांना ही अंतःस्थिति समजत नाहीं. ते त्यालाच कर्ता म्हणतात. ( ४०३-४५९ ) वास्तविक तो देहापासून पूर्णपणें सुटला असल्यामुळें त्याला कोणतेंही कर्म बद्ध करूं शकत नाहीं. जो अज्ञानामुळें ' मी कर्म करतों ' असें म्हणतो त्याला हा बंध आहे. या अज्ञानानें एकाच ज्ञानाची ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान अशी त्रिपुटी निर्माण केली. तिचेंच पुढें कर्म, कर्ता व कार्य या त्रिपुटींत रूपांतर होतें. समोर विषय पाहून तो हवा असें वाटूं लागलें कीं ज्ञाता निर्माण होऊन, विषय हे ज्ञेय व त्यांना जाणणारें ज्ञान अशी ही त्रिपुटी तयार होते. पाहिलेला विषय जर अनुकूल असेल तर स्वीकार करण्याकरितां व प्रतिकूल असेल तर तो विषय टाकण्यासाठीं ज्ञाता प्रवृत्त होतो; याप्रमाणें ज्ञाता हा कर्ता या हीनदशेला येतो. ज्ञेय हें कर्म व ज्ञान कर्म-करण ( साधनें ) होतें. तात्पर्य ज्ञाता ज्ञान ज्ञेय हें कर्माचें प्रवृत्तित्रय आहे व कर्ता, करण व कार्य हा कर्मसंग्रह आहे. या सर्व व्यवहारांतही आत्मा संपूर्णपणें अलिप्तच आहे. ( ४६०-५१६ )

हें जग ज्या तीन गुणांनीं भरलेलें आहे त्या तीन गुणांनीं या ज्ञान, कर्म व कर्मकर्ता यांचे सात्त्विक, राजस व तामस असे भेद झाले आहेत. हा विचार सर्व शास्त्रांत जें श्रेष्ठ असें सांख्यशास्त्र त्याच्या मतानुसार तुला सांगतों. तीन प्रकारच्या ज्ञानांत सात्त्विक ज्ञान श्रेष्ठ आहे. तें ज्ञान झालें म्हणजे शिवापासून थेट गवताच्या काडीपर्यंत एकच अभिन्न स्वरूप दिसतें; निराळें ज्ञेय शिल्लक राहत नाहीं. (५१७-५३७) राजसज्ञान द्वैताच्या आश्रयानें चालतें; त्यामुळें प्राणिमात्रांच्या आकाराप्रमाणें त्याला भिन्नभिन्न आकार एकाच वस्तूच्या ठिकाणीं दिसतात. (५३८-५४७) तामस ज्ञानाला आत्मा म्हणजे कांहीं आहे याचा पत्ताही नसतो. डोळ्याला दिसेल तें भोग्य आहे, असें समजून विधिनिषेध न पाहतां त्यांचा स्वैर उपभोग घ्यावा एवढेंच ज्ञान तें जाणतें. त्याला ज्ञान म्हणणें देखील योग्य नाहीं. (५४८-५८३).

या तीन प्रकारच्या ज्ञानांमुळें तीन प्रकारच्या क्रिया होतात. जें विहित कर्म संतोषानें व निर्विकार बुद्धीनें केलें जातें व ज्याचें फळ ब्रह्मार्पण होतें तें सात्त्विक कर्म होय. ( ५८४-५९३ ) आपणाला अवश्य करणीय अशीं नित्यनैमित्तिक कर्में प्राप्त झालीं तर तो बसलेला उठावयास तयार नाहीं. पण काम्य करावयाचा प्रसंग आला तर तें दौंडी पिटून करील. लाभ थोडा पण कष्ट फार असें सक्लेश काम्य त्याला राजस कर्म म्हणतात. ( ५९४-६१० ) तामस कर्म म्हणजे निषिद्ध कर्म; त्याचें आपपरपीडा हेंच फळ ( ६११-६२७ ).

या तीन कर्मांचे कर्तेही तीन प्रकारचे आहेत. विहित कर्में कर्तृमत्वद व फळास्वाद टाकून आदरानें यथाविधि करणारा सात्त्विक कर्ता आपलें कर्म करतांना देहाला कितीही कष्ट पडले तरी त्याची पर्वा करीत नाहीं व कर्म सांग झालें तरी त्याबद्दल त्याला फुंज होत नाहीं अथवा असांग राहिलें तरी त्यामुळें कष्टी होत नाहीं. ( ६२८-६४९ ) राजस कर्मकर्ता हा कर्माचें फळ सोप्या रीतीनें ( स्वतःच्या पदराला खार न लागूं देतां ) पदरांत पाडून घेण्याच्या मार्गें असतो व तें कर्म सिद्धीस गेलें कीं लोकांना वेडावून दाखवतो व मध्येंच जर बंद पडलें तर त्याचा राग जगावर काढतो. (६५०-६६२) तामस कर्ता म्हणजे निव्वळ लुटारूच. त्याच्यामुळें इतरांना पीडा होते. त्याच्या अंगीं ताठा, मन कपटी व वागणूक चोरटी असते. दुसऱ्याचें बरें झालें कीं याचें डोकें दुखतें. चांगलें कर्म तो स्वतः होऊन करणारच नाहीं; परंतु असा योग आलाच तर त्या वेळीं निद्रा व आळस हे त्याला हटकून यावयाचे; पण दुसऱ्याचा घात करण्याचें काम असलें म्हणजे हा एक पायावर तयार असावयाचा (६६३-६८९) यानंतर कर्म करण्याचा निश्चय बुद्धि करते व तें धैर्यामुळें शेवटास जातें. या बुद्धि व धैर्य यांचे तीन गुणाप्रमाणें झालेले भेद भगवान यापुढें सांगतात.

'आत्मप्राप्तीसाठीं विहित कर्माचा निश्चय करावयास लावणारी बुद्धि ही सात्त्विक आहे. हीच पुढें नैष्कर्म्य स्थितीला नेऊन पोचविते. ( ६९०-७१७ ) राजस बुद्धीला पापकर्म व पुण्यकर्म यांची निवड करतां येत नाहीं. ( ७१८-७२३ ) तामस बुद्धीला श्रुतीनें करणीय म्हणून सांगितलेलें सर्व विपरीत वाटतें. पुण्य तें पाप, खरें तें खोटें, गुण तेवढे दोष असे सर्व तिला उलटेंच दिसतें ( ७२४-७२९ ).

अंगांत सात्त्विक धैर्याचा उदय झाला म्हणजे इंद्रियें विषयापासून परावृत्त होऊन अंतर्मुख होतात. मन संकल्पविकल्प करण्याचें विसरतें. हें धैर्य परमात्म्याचें दर्शन होईपर्यंत सर्व कठीण प्रसंगांत टिकून राहतें. ( ७३०-७४४ ) राजस धैर्य देहावर जास्त आसक्ति उत्पन्न करतें व ऐहिक पारत्रिक भोगार्थ अहर्निश खटपट करावयास लावतें. ( ७४५-७४८ ) तामस धैर्य आळस, निद्रा, भय, शोक, खेद व मद या दुर्गुणांची वाढ करण्यांत खर्च होतें. ( ७४९-७६२ )

कर्म केल्यावर त्याचें जें ( अनुकूल ) फळ प्राप्त होतें त्याला सुख म्हणतात व तेंही तीन गुणांप्रमाणें तीन प्रकारचें असतें. खरें सुख जीवाला आत्म्याच्या भेटींत प्राप्त होतें; हें सात्त्विक सुख जीवाला प्राप्त होण्याच्या अगोदर त्याला वैराग्याचे फार मोठे कष्ट सहन करावे लागतात. हें सुख इंद्रियजन्य नसून, उलट वैराग्यानें विषयाची व इंद्रियांची ताटातूट झाल्यावरच आत्मबुद्धिप्रसादानें उत्पन्न होतें. ( ७६३-७९३ ) राजस सुख, विषय व इंद्रियें यांच्या संयोगांत उत्पन्न होतें; पण तें क्षणिक असतें. तें भोगल्यानंतर मागें दुःख उरतें. ( ७९४-८०५ ) तामस सुख निषिद्ध विषयांच्या स्वैर उपभोगांत उत्पन्न होतें. दुसऱ्याचा नाश करणाऱ्या आसुरी लोकांच्या ठिकाणीं हें सुख असतें. ( ८०६-८२० )

सत्व, रज व तम या तीन गुणांनीं या सर्व सृष्टींत तीन प्रकार केले आहेत. आतांपर्यंत कर्म, कर्ता, बुद्धि, धैर्य व कर्मफळ यांचे प्रकार सांगितले. या तीन गुणांनीं ब्रह्मा, विष्णु, महेश असे तीन देव; स्वर्ग, नरक, पाताळ असे तीन लोक; त्याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्ण निर्माण केले आहेत. या चार वर्णांना शास्त्रांनीं यथायोग्य अशीं चार प्रकारचीं कर्में लावून दिलीं आहेत. ब्राह्मणाला उत्कृष्ट अशा नऊ गुणांचें कर्म सांगितलें आहे. ते गुण म्हणजे शम ( इंद्रियें स्वाधीन करून घेऊन बुद्धि अंतर्मुख करणें ), दम ( बाह्य इंद्रियें विहित कर्माचरणांत बांधून अधर्माकडे चुकूनहि जाऊं न देणें ), तप ( ईश्वरचिंतनांत मन निमग्न करणें ), शौच ( निर्विकार

मन व शुद्ध आचरण ), क्षमा ( सर्व सहन करणें ), आर्जव ( शत्रु असला तरी त्याच्याशीं सरळ वागणें ), ज्ञान ( ईश्वरप्राप्तीचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून शास्त्राचा अभ्यास ), विज्ञान ( अंतःकरण शुद्ध करून बुद्धीला ईश्वर-दर्शन होणें ), आस्तिक्य ( शास्त्राबद्दल निःसीम आदर ) (८२१-८५५). क्षत्रियांना पुढील सद्गुणांचें कर्म लावून दिले आहे. शौर्य ( दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा न ठेवतां आपलें कार्य शेवटास नेणें ), तेज ( आपल्या अंगच्या सामर्थ्यानें व गुणानें जगाला विस्मित करून टाकणें; पण आपली वृत्ति त्यामुळें क्षुब्ध होऊ न देणें ), धैर्य ( कोणत्याही प्रसंगीं ज्यामुळें बुद्धि स्थिर राहते ), दक्षता ( विकारावर मात करते ती ), युद्धभूमीवर शत्रूला कधींही पाठ न दाखविणें, ज्याला जरूर असेल त्याप्रमाणें उदारपणें दान देणें व प्रजेचें पालन केल्यामुळें प्रजा प्रेमानें याची आज्ञा शिरसावंद्य मानते तो ईश्वरभाव. ( ८५६-८७६ ) वैश्य हा शेतकी व गोरक्षण करून स्वस्तांत वस्तू घेऊन त्या नफा घेऊन विकतो. ( ८७७-८८२ ) ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांची सेवा करणें हें शूद्राचें कर्म आहे. ( ८८३-८८४ ) हीं चार प्रकारचीं कर्में त्या त्या वर्णाला अनुरूप अशीं शास्त्रानें सांगितलीं आहेत, तीं समजून घेऊन जर त्यांचें योग्य रीतीनें आचरण केलें तर तीं चारी वर्णांचीं कर्में जरी निरनिराळीं असलीं तरी त्या त्या वर्णांना एकाच आत्मज्ञानाच्या मुक्कामाला नेतात, म्हणून कोणींही आपलें विहित कार्य टाकूं नये व निषिद्ध कर्म करूं नये. मी जो सर्वात्मक त्याची खरी सेवा व त्याच्या प्राप्तीचा उपाय म्हणजे प्रत्येकानें आपलें कर्म माझी सेवा म्हणून करावें. यामुळें मी प्रसन्न होऊन त्याला प्रसाद म्हणून वैराग्य देतो. हें वैराग्य म्हणजे मोक्षप्राप्तीच्या अलीकडचा मुक्कामच आहे. त्या अवस्थेंत ईश्वराचा वेध लागल्यामुळें विषय नकोसे होतात. ( ८८५-९२१ )

स्वकर्माचे आचरण करीत असतांना कष्ट असतात हें खरें आहे; पण मोक्षाच्या फळाकडे दृष्टि ठेवून ते सोसणेंच श्रेयस्कर आहे. कष्ट पडतात म्हणून कर्म टाकून देऊं नये. ज्यामुळें जीवाच्या मागचे जन्ममरणाचे कष्ट कायमचे संपतील अशा कर्मांतील कष्टाची कळ थोडा वेळ कां सोसूं नये? परंतु असें न करतां इंद्रियांचा लळा पुरविण्यांत हा नरदेह फुकट घालविला, तर पदरांत पाप व अनर्थ याशिवाय कांहीं पडणार नाहीं. ( ९२२-९५४ )

विहित कर्में करून ईशप्रसादानें वैराग्य प्राप्त झालें म्हणजे तो देहादिक संसारांत असून सुद्धां त्यामध्यें त्याचें ममत्व राहिलेलें नसतें. संसारांतील सर्व विषय अनुकूल असले तरी त्यांना तो जवळ करीत नाहीं. त्याची बुद्धि अंतर्मुख होते. या जन्मांत तो प्रारब्ध कर्म भोगून संपवितो व नवें क्रियमाण त्याचे हातून होत नाहीं. मग श्रीगुरूची भेट होण्यास वेळ कोठला! गुरु अशा शिष्याची वाटच पहात असतात. कर्मसाम्यदशा कां प्राप्त झाली म्हणजे मग त्याचेवर कृपा करून त्याला कृतकार्य करतात. त्या वेळीं अज्ञानांतील कर्म, कर्ता, कार्य ही त्रिपुटी आपोआप नाहींशी होते. इतकेंच नव्हे तर अज्ञानाला दूर करणारे वृत्तिज्ञानही नाहींसें होऊन केवळ 'नैष्कर्म्य स्थिति' शिल्लक राहते. वास्तविक त्या स्थितीला नैष्कर्म्य म्हणणेंही खपत नाहीं. ( ९५५-९८३ )

ही स्थिति एखाद्या भाग्यवंतालाच श्रीगुरुकृपेनें एकदम प्राप्त होते; परंतु ज्याच्या बुद्धीवरील ज्ञानप्रतिबंध दोष गेलेले नाहीत, अशांना ही स्थिति एकदम प्राप्त होणें शक्य नाहीं; असा पुरुष क्रमाक्रमानें तें पद प्राप्त करून घेतो. व तो प्रथम काम्य-निषिद्ध कर्मांचा त्याग करून स्वधर्माचें निष्काम बुद्धीनें आचरण करतो. त्या स्वधर्मसेवेनें ईश्वरास संतुष्ट करून ऐहिक व पारत्रिक फळभोग, व वैराग्य यांची त्याला प्राप्ति होते. असें अढळ वैराग्यपद ज्यांनीं प्राप्त केलें त्यांना सद्गुरूचा लाभ होतो. मग सद्गुरु त्याला ज्ञानोपदेश करतात; पण तो साधक तीव्र अधिकारी नसल्यामुळें त्याची वृत्ति एकदम ब्रह्मरूप होऊन उठत नाहीं; म्हणून त्यांनीं सांगितलेल्या विवेकाचा तो पुनः पुनः अभ्यास करून आपल्या बुद्धीवरील मळ नाहींसे करतो. मग ती बुद्धि आत्मचिंतनांत रत होते. इंद्रियांचा निग्रह धैर्यानें करून, विषयवासना नाहींशी केल्यावर तो इंद्रियें व मन योगधारणेकडे लावतो. अशा स्थितींत त्याला इष्ट, अनिष्ट गोष्टींबद्दल प्रेम अथवा खेद कांहींच शिल्लक राहत नाहीं. मग तो एकटाच निर्जन वनांत जाऊन मिताहारी होऊन गुरुवाक्यचिंतनांत वेळ घालवितो. 'मी ब्रह्म आहे' असा अपरोक्ष अनुभव येईपर्यंत तो ध्यान करीत राहतो. शिवाय आधींच त्यानें वैराग्यासारखा सोबती जोडून ठेवलेला असतो व ध्यानाला मदत म्हणून तो योगाभ्यासाचीही जोड घेतो. तात्पर्य, वैराग्य ज्ञानाभ्यास करून तो आत्मलाभाचा अधिकारी झालेला असतो, परंतु मोक्षप्राप्ती करतां निघाला असतां त्याच्या आड

अहंकारादि प्रबळ शत्रु येतात, त्यांचा तो नायनाट करतो. हे शत्रु एकाहून एक बलिष्ठ आहेत; त्यापैकीं पहिला म्हणजे देहाहंकार. मनुष्य मेला तरी त्याला जो सोडीत नाही व जन्मला तरी जगूं देत नाहीं; जन्मोजन्मीं त्याच्या पाठीस लागतो. हा साधक या अहंकाराचा आश्रय जो देह त्याचाच निरास करून देहाहंकाररूपी शत्रूला जिंकतो. दुसरा शत्रु बल. हा कामादिकांना सहाय्य करतो. त्याचा तो ध्यानानें नाश करतो. तिसरा शत्रु दर्प. म्हणजे अनुकूल विषय प्राप्त झाला असतां होणाऱ्या सुखानें मस्ति येते. चवथा शत्रु म्हणजे काम. यानें आजपर्यंत मोठमोठ्या तापसी लोकांना आपल्या मार्गापासून भुलविलें आहे. त्या कामाच्या अपूर्णतेंतच क्रोध उत्पन्न होतो. शेवटचा शत्रु जो परिग्रह तो आपला भोग जीवाला देऊन पुनः त्याच्यावरच स्वार होतो. यानें मोठमोठ्या साधकांना शिष्यशास्त्रविलास यांच्या रूपानें अडवून ठेवलें आहे. या साही खळांना जिंकल्यावर अमानित्वादि दैवी संपत्तीचेच जे गुण त्या गुणासह यथार्थ ज्ञान त्याला शोधीत येतें. या विश्वांत सर्वत्र माझीच सत्ता भरून राहिली आहे, असा अद्वैतबोध प्राप्त झाल्यामुळें त्याला यापुढें आणखी कांहीं मिळवावयाचें शिल्लक राहिलेलें नसतें. वैराग्य, ध्यान इत्यादि साधनांनीं जें फल मिळवावयाचें तें हातीं आल्यामुळें तीं साधनेंही कमी होतात, ज्ञानाचा पूर्ण परिपाक अशी जी शांति ती त्याला प्राप्त होऊन तो ब्रह्मस्थितीच्या अगदीं जवळ आलेला असतो. ( ९८४-१०९० ) त्यानंतर विश्वांतील भेदप्रतीति मावळून एक माझ्यावांचुन दुसरें कांहींच नाहीं असा अद्वैत अनुभव त्याला येतो. हीच माझी श्रेष्ठ भक्ति आहे. आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी या दृष्टीनें हिला चौथी भक्ति म्हणतात. वास्तविक ती माझी सहजस्थिति आहे. या माझ्या सहजस्थितीलाच भक्ति हें नांव आहे. इतर तीन भक्तींत अज्ञानामुळें द्रष्ट्यालाच दृश्य केलें जातें. सहजभक्तींत एक द्रष्टाच उरतो ( १०९१-११२० ) हा ज्ञानी भक्त जरी शरीरानें वेगळा दिसत असला तरी तो माझें स्वरूपच झालेला आहे. या अभिन्न स्थितींत स्वभाववशात् त्याच्या संघाताकडून जी जी क्रिया होते, ती माझ्या महापूजेंत जमा होते. त्याला जन्म-जरा मरण उरत नाहीं. तो आतां अज, अमर, आनंदमय अशा स्थितीला पोचलेला असतो. ही स्थिति शब्दानें वर्णन करण्यापलीकडची आहे. ( ११२१-१२२३ ).

या परमोच्च स्थितीचें वर्णन केल्यावर 'सर्वकर्माण्यपि कुर्वाणो' या श्लोकांपासून भगवान् पुनः साधन कर्म कां सांगतात, याचें स्पष्टीकरण श्रीज्ञानदेव करतात. हा महत्त्वाचा तत्त्वविचार साधकाच्या अंतःकरणांत एकाच श्रवणानें दृढ होणारा नाहीं म्हणून तो पुनः थोडक्यांत भगवान् सांगत आहेत. गीताशास्त्र हें इतर शास्त्रांपेक्षां फार श्रेष्ठ आहे. कारण इतर शास्त्रांनीं जरी मोक्षप्राप्तीचे उपाय सांगितले तरी त्यांना स्वतःप्रामाण्य नाहीं; परंतु गीता ही वेदांचीच लहान मूर्ति असल्यामुळें तिचें स्वतःप्रामाण्य आहे. अविद्येचा निरास केल्यावर आत्मा आपल्याच प्रकाशानें प्रकाशित होतो. हा आत्मलाभ करून देण्याचे मार्ग गीतेंत नानाप्रकारांनीं ठिकठिकाणीं सांगितले आहेत, तेच पुनः भगवान् सांगतात ( १२२४-१२४५ ).

'तो कर्मयोगी पुरुष माझ्या प्रीत्यर्थ सर्व कर्में केल्यामुळें मद्रूप होतो. मग त्याच्या हातून चुकून एखादे वेळीं जरी निषिद्ध कर्म घडलें, तरी तीं कर्में माझ्याप्रत आल्यामुळें त्याला तीं बंधन करूं शकत नाहींत. तो पुरुष माझें जें अविनाशी, आनंदमय पद त्यावर आरूढ झालेला असतो; त्या वेळीं कर्मांला उत्पन्न करणारी प्रकृतीही वेगळेपणानें उरत नाहीं. अज्ञानासहित सर्व कर्मांचा त्याग होऊन एक आत्माच उरलेला असतो. अर्जुना, या स्वरूपाचे ठिकाणीं तूं अनन्य होऊन रहा. याप्रमाणें माझ्या स्वरूपीं चित्त जडून राहणें हा माझा संपूर्ण प्रसाद आहे. जन्ममरणाची यातायात यामुळें कायमची नाहींशी होते ( १२४६–१२७३ ).

परंतु मी जें सांगतों त्याकडे दुर्लक्ष करून स्वतःला अर्जुन व बाकीच्यांना आपले आप्त, असें देहरूपानें समजून त्यांना युद्धांत मारणें हें पाप आहे असा अहंकार घेशील, तर तूं नित्य अव्यय असूनसुद्धां जन्ममरणाचे आघात तुला चुकणार नाहींत. दुसऱ्याही दृष्टीनें पाहिलें तर 'मी लढणार नाहीं' असा तुझा निश्चय फार वेळ टिकणार नाहीं; कारण तुझा क्षात्रस्वभाव तूं कितीही नाहीं म्हटलेस तरी तुझ्याकडून युद्ध करवीलच, या जगांत मनुष्याला नको असलेल्या अनेक गोष्टी अदृष्टामुळें भोगाव्या लागतातच. तेंच अदृष्ट आतां तुझ्याकडून युद्ध करविणार आहे. तूं एवढें कर कीं हें अदृष्ट ज्या ईश्वराच्या अधीन आहे, त्याला शरण जा, म्हणजे त्याच्या

तडाक्यांतून सुटशील. हा ईश्वर सर्वांच्याप्रमाणें तुझ्याही हृदयांत आहे. पण मायेचा पडदा आड लावून तो सर्वांना फिरवीत असल्यामुळें तो दिसत नाहीं. 'मी कर्म करणारा' हा जीवाच्या ठिकाणीं अहर्निश स्फुरणारा अहंकार गेला कीं तो जीवच ईश्वराच्या रूपानें प्रगट होतो. अर्जुनपणा न घेतां मी म्हणून जें शुद्ध स्फुरणें स्फुरतें तें त्याचें रूप होय. ईश्वर हा सर्व विश्वाचा नियंता असून त्याची सत्ता प्रकृतीवर चालते. ही प्रकृति मनुष्याकडून कर्म करून घेते. कर्म करणें किंवा न करणें हें प्रकृतिअधीन आहे. म्हणून मनुष्यानें कर्मांचें कर्तृत्व प्रकृतीवर सोंपवून हृदयस्थ ईश्वराला शरण जावें म्हणजे तो त्याला अक्षय्य अशा स्वरूपशांतीचा लाभ करून देतो. (१२७४-१३२२).

आतांपर्यंत सर्व ज्ञानाचें सार व आजपर्यंत कोणाला न सांगितलेली गुप्त गोष्ट तुझ्या प्रेमामुळें तुला सांगितली; याचा तूं नीट विचार कर व तुला पटेल त्याप्रमाणें कर. (श्रीज्ञानदेव पुढील श्लोकाची संगति लावतात.) याप्रमाणें देव जेव्हां अर्जुनाला म्हणाले, तेव्हां अर्जुन कांहींच बोलला नाहीं. त्याच्या या स्वस्थ बसण्यावरून देवांनीं जाणलें कीं आपण याला जें सांगितलें तें पुनः ऐकण्याची त्याला इच्छा आहे, म्हणून देव त्याला पुनः सारांशरूपानें सांगतात. 'मी तुला जें सांगितलें तें बोलण्या-ऐकण्यापलीकडचें आहे. तें अद्वैत स्थितींत भोगावयाचें आहे. तूं माझा प्राणच आहेस म्हणून माझें बोलणें दुसऱ्या कोणापाशीं नसून माझें माझ्या प्राणाशीच (स्वतःशीच) होत आहे. तुला पुनः महत्त्वाची गोष्ट सांगतों कीं तुझ्या इंद्रियांकडून जे जे व्यापार होतील त्यांची मोहर माझ्याकडे लाव. आपल्याकडे सेवक भाव ठेवून जगाला माझ्या ठिकाणीं मान. मग देहाच्या उपाधीमुळें जें द्वैत असतें तें द्वैत देहाचा निरास झाला म्हणजे नाहींसें होऊन तूं मद्रूपच होशील व माझें सुख कोणत्याही अवस्थेंत तुला भोगता येईल; हें मी तुला कळकळीनें शपथपूर्वक सांगत आहें. मी स्वभावतःच सत्यवचनी असल्यामुळें अशी शपथ घेणें हें बरोबर नाहीं; परंतु आज तूं आपलीं सर्व कर्में मला अर्पण करून मला प्रसन्न करून घेतलें आहेस; त्यामुळें भुलून जाऊन युद्धाच्या घनघोर प्रसंगींही मी तुला उपदेश करीत आहें. (१३२३-१३८७) तुला एवढीच अडचण वाटत आहे कीं युद्धकर्मामुळें आपणांस पाप लागेल; पण माझ्या स्वरूपाला मिळाल्यावर पाप व पुण्य कांहीं निराळें राहत नाहीं. पापपुण्यात्मक कर्में हीं अज्ञानामुळें उत्पन्न होतात. परंतु माझ्या स्वरूपाच्या ज्ञानानें अज्ञानच नाहींसें झालें कीं कर्मांतील पापपुण्याचा भेद नाहींसा होतो. एवढ्यासाठीं अनन्य होऊन तूं स्वतःला वेगळा न समजतां मला शरणागति कर. असें वेगळेपणानें न राहणें हीच माझी भक्ति आहे. त्यामुळें तुझ्या संघाताकडून जीं जीं बरींवाईट कर्में होतील त्याचें पापपुण्य तुला लागणार नाहीं. तूं माझ्याच ठिकाणीं येशील, अशा रीतीनें मी तुला सर्व पातकां- पासून मुक्त करीन. इतका ऐक्य बोधाचा उपदेश करून जो अनुभव, बुद्धि व वाचा या दोघांच्या द्वारें प्रगट करून दाखवतां येत नव्हता, तो सत्यानुभव आपल्या प्रियतम शिष्याला करून देण्यासाठीं देवानें त्याला प्रेमभरानें दृढ आलिंगन दिलें व त्याला आपल्या स्वरूपांत मिळवून घेतलें (१३८८-१४२५).

ज्ञानदेव म्हणतात 'याप्रमाणें गीतेच्या रूपानें प्रत्यक्ष वेदच श्रीकृष्णानें अर्जुनाला उघड करून दाखविला. एका दृष्टीनें वेदापेक्षां गीतेची योग्यता अधिक; कारण वेद हा भगवंताच्या निश्वासांतून निर्माण झाला होता, पण गीता भगवंतांनीं जागृतावस्थेंत अर्जुनाला सांगितली. कांडत्रयात्मक वेदाचें बीज गीतेंतच आहे.' ज्ञानदेवांनीं यापुढें आपण वेदाचें मूळ गीता कां म्हणतो, वेदांचीं तीन कांडें—कर्म उपासना व ज्ञान-गीतेंत कोठें कोठें आलीं आहेत व प्रत्येक अध्यायांतील विषय कसकसा आहे याचा सारांशरूपानें आढावा घेतला आहे. (१४२६-१४५५.) वेदाचा अधिकार फक्त तीन वर्णांनाच आहे. स्त्रिया व शूद्रांना नाहीं, हें त्याचें न्यून गीतेनें घालविलें; ही गोष्ट ज्ञान- देवांनीं वेदाची प्रतिष्ठा कमी न करतां मोठ्या चातुर्यानें सांगितली आहे. 'संसारदुःखांत सांपडलेल्या शूद्र व स्त्रिया यांचा उद्धार करणारा कोणी नाहीं हें पाहून वेदानेंच गीतेचा अवतार घेऊन ती अडचण दूर केली. आतां यापुढें मोक्षाचें अन्नछत्र सर्वांस सर्वांना मोकळें केलें आहे.' ज्ञानदेव अर्जुनाची प्रशंसा करतात. 'याच्या प्रेमामुळेंच भगवंतांनीं हें गुह्य सांगितलें, त्यामुळें जगाला जन्ममरणाच्या संसारांतून सुटण्याचा मार्ग मिळाला. धन्य तो अर्जुन व धन्य त्याचें पवित्र कुळ.' (१४५६-१४७२).

अनंत जन्मींचे पुण्य गांठीं असेल तरच हें गीताशास्त्र ऐकण्यास मिळतें; पण ऐकावयास मिळून सुद्धां, त्याचें जर शास्त्रसंप्रदायपूर्वक अनुष्ठान घडलें नाहीं, तर तें उपयोगाला येत नाहीं, संप्रदाय म्हणजे ऐकणाऱ्याचा अधिकार. गीतेचा अधिकारी म्हणजे तपी, देव व गुरु यांचा भक्त. ऐकण्याची चाड बाळगणारा व माझ्यासंबंधीं ज्याला आदर आहे, अशा गुणांनीं संपन्न असणारा, परंतु हे गुण जर अंगीं नसतील, मग तो ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा असला तरी त्याला कौतुकानें देखील गीता सांगूं नये. त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. अधिकारसंपन्न पुरुषाला ईश्वर प्रसन्न व्हावा या एका हेतूनें जो गीता सांगेल, तो गीतेचा वक्ता, मला फार प्रिय आहे. त्याला मरणानंतर मी माझ्या स्वरूपीं मिसळून घेतों. जे श्रोते श्रद्धेनें व आदरानें गीता ऐकतात त्यांनाही तेंच फळ मिळतें. ( १४७३-१५३९ )

गीतेचा संप्रदाय व फळ सांगितल्यावर देवांनीं अर्जुनाला प्रश्न केला आहे. त्याची संगति श्रीज्ञानदेव सांगतात. भगवंतांनीं दृढ आलिंगन दिल्यावर अर्जुन हा पूर्ण ब्रह्मस्थितींतील समाधिसुख भोगीत होता; परंतु पुढें त्याच्या हातून भगवंताला युद्ध करावयाचें होतें; म्हणून प्रश्न विचारण्याच्या निमित्तानें त्यांनीं त्याला देहस्थितीवर आणलें. देवांनीं प्रश्न विचारला कीं, अर्जुना तुझ्या ठिकाणीं मी 'कर्म करणार नाहीं' असा आग्रह अद्याप शिल्लक राहिला आहे कां ! या प्रश्नाचें उत्तर अर्जुन देहभानावर येऊन सद्गदीत अंतःकरणानें देत आहे. ( १५४०-१५५७ ) देवा, तुझ्यासारखा समर्थ सद्गुरु इतक्या कळकळीनें ज्ञानाचा उपदेश करीत असतांना, माझ्या ठिकाणीं मोह राहील असें तुला कसें वाटतें ? जेथून मोह उत्पन्न होतो तें अज्ञानच तुझ्या प्रसादानें नाहींसें झालें आहे. मला तुझ्याशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं, मी कर्म करीन अथवा कर्म करणार नाहीं, हें जेव्हां तुझ्याहून विभक्त होतों, त्यावेळीं स्फुरत होतें. आतां ऐक्यस्थितींत हें कांहींच शिल्लक राहिलें नाहीं. आतां तूं सांगशील तेंच एक मला प्रमाण आहे. वाटेल तें करण्याविषयीं मला आज्ञा दे. आपल्या उपदेशाचा अपेक्षेबाहेर चांगला परिणाम झालेला पाहून देव आपला देवपणा विसरून आनंदानें नाचायला लागले. अर्जुन हा कधीं ब्रह्मस्थितींत तर कधीं देहभानावर सद्गदित होऊन त्यांचे पुढें उभा राहिलेला होता. हें सर्व दृश्य पाहून सात्त्विक अंतःकरणाच्या संजयाला अष्टसात्त्विक भावाचें भरतें आलें. तो 'श्रीकृष्ण श्रीकृष्ण' असें म्हणूं लागला. आपण काय यःकश्चित घोडे हांकणारे पण युद्धासारख्या प्रसंगींही आपणांस हा ब्रह्मानंद भोगावयास मिळत आहे, याबद्दल ज्यांच्या कृपेनें घडून आलें त्या श्रीव्यासांचे उपकार तो वारंवार आठवीत होता. त्याला आपल्या मालकाची ( धृतराष्ट्राची ) ही आठवण झाली. धृतराष्ट्र बाहेर चर्मचक्षूनीं आंधळा, व आंत पुत्रस्नेहानें आंधळा त्यामुळें त्याला संजयाचे हे भगवत्प्रेमानें उंचबळून येणारे उद्गार मानवेनात. त्याचें मन पुत्रस्नेहांत गुंतून जाऊन पुत्राच्या जयाची वार्ता ऐकण्याकडेच लागलें होतें. म्हणून संजयानें जरी धृतराष्ट्राला हांक मारून या प्रसंगाकडे त्याचें लक्ष वेधलें, तरी त्याच्यावर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. उलट तो संजयावर रागावून म्हणाला, 'तुला व्यासांनीं लढाईचा वृत्तान्त सांगण्याकरितां येथें बसवलें आहे का श्रीकृष्णार्जुनाच्या प्रेमाची भाकडकथा वर्णन करण्याकरितां बसविलें आहे ! आतां जें युद्ध सुरूं झालें त्यांत जय कोणाचा होणार हें जाणण्याची मला उत्कंठा लागून राहिली आहे. मला स्वतःला तर असें वाटतें कीं दुर्योधन हा अर्जुनापेक्षां अधिक पराक्रमी व त्याचें सैन्यही संख्येनें दीडपट असल्यामुळें त्याचाच जय होईल. मी बोलतों तें बरोबर आहे ना ! तुझें मत जसें असेल तसें सांग.' ( १५५८-१६३१ )

अशा रीतीनें धृतराष्ट्राच्या प्रश्नांच्या आधारें श्रीज्ञानदेवांनीं गीतेच्या शेवटच्या श्लोकांची संगति कौशल्यानें लावली आहे. संजयाच्या उत्तराचा अनुवाद करतांना ज्ञानदेवांनीं एका वेळीं अनेक अलंकारांचा आश्रय करून एका-पाठीमागें एक अनेक दृष्टान्त दिले आहेत. अर्जुनाचा जय होईल असें एकदम सांगितलें तर तें आपल्या मालकाला रुचणार नाहीं, म्हणून तेंच उत्तर खुबीदार रीतीनें सांगून संजय शेवटीं आडपडद्यानें म्हणतो, विजयस्वरूप श्रीकृष्ण व विजय तर अर्जुनाचें नांवच. तेव्हां हे दोघे ज्या बाजूला आहेत तेथें जय निःसंशय आहे, त्याचप्रमाणें सुख व कल्याण हीं आहेत. हें मी व्यासांचें नांव घेऊन, प्रतिज्ञेनें सांगत आहें. ( १६३२-१६५८ ).

गीतेचा अनुवाद केल्यानंतर गीतेची महति व फळ सांगतात. ' वेद अनंत बोलला आहे. त्याचें सार महाभारताच्या सवालक्ष श्लोकांत आलें आहे व त्या महाभारताचेंही सार या गीतेच्या सातशें श्लोकांत आलें आहे. पुनः त्या सातशेंचेंही सार म्हणजे हा गीतेचा शेवटचा श्लोक आहे. जो या एकाच श्लोकावर विश्वास ठेवून वागेल त्यानें संपूर्ण विश्वमात्र जिंकलें असें म्हणावयास हरकत नाहीं. या गीतेचे सातशें श्लोक जरी निरनिराळे असले तरी त्यांचें महत्त्व निरनिराळें नाहीं. ते सर्व एकाच योग्यतेचे आहेत. ही गीता म्हणजे संसारांत शिणलेल्या लोकांना विश्रांतीची जागा आहे. जो कायावाचामनेंकरून, गीतेची सेवा करील त्याला संसारांतील दुःख भासणार नाहींच. पण शिवाय अचिंत्य अशा ब्रह्माचा आनंद उपभोगावयास मिळेल. इतर शास्त्रांत वाच्य व वाचक वेगळे असतात. तसें गीतेंत नाहीं. गीतेंत वाच्य व वाचक एक श्रीकृष्णच आहेत. फार काय! गीता ही प्रभु श्रीकृष्णाची वाङ्मयमूर्तीच आहे. विश्व संसार-दुःखानें ग्रस्त झालेलें पाहून, भगवंतांनीं हा ब्रह्मानंद अर्जुनाचें निमित्त करून सर्वांना सुलभ करून दिला आहे. गीतेच्या अर्थाचा जो विचार करील तो तर ब्रह्म होईलच; पण नुसतें श्रवणपठण केलें तरी त्यालाही तीच योग्यता प्राप्त होईल. असें असल्यामुळें इतर शास्त्रें घेऊन काय करावयाचें आहे! एका गीतेचीच सर्वांनीं अनन्य भावानें सेवा करावी ( १६५९-१६९५ ).

( श्रीव्यासांचा गौरव करतात; ) वाचेला अगम्य असा ब्रह्मविषयक संवाद श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांमध्यें रणांगणावर झाला होता. तो संवाद सातशें श्लोकांत सुसंगत रीतीनें ग्रथित करून सर्व जगाला सुलभ करून दिला हा व्यासांचा जगावर मोठा उपकार आहे. ( गीतेवर टीका करण्यास महामुनींच्या पुढें आपला पाड लागणार नाहीं, याची जाणीव ठेवून अत्यंत नम्रपणानें परिहार देतात. ) गीतेचा अर्थ लावतांना जेथें थोर भाष्यकारांच्या मति कुंठित होतात, येथें माझ्यासारख्याचा लाग लागणार नाहीं हें खरें; परंतु माझी भिस्त गीतामाउलीवर आहे. ती थोर मुनींच्याबरोबर माझाही अंगीकार करील; शिवाय मी व्यास व भाष्यकार यांच्याच मार्गानें चाललों असल्यामुळें ते ज्या मुक्कामाला पोचले तेथेंच मी न चुकतां जाईन. ( श्रीगुरु निवृत्तिनाथांचे उपकार स्मरतात ) परंतु मला खरा आधार माझ्या समर्थ व सर्वतोपकारी गुरुंचा आहे. त्यांनीं माझ्या पाठीशीं उभे राहून हें कार्य मजकडून करविलें. थोरांनीं अंगीकार केला असतां निर्जीव वस्तूनांही मोठें सामर्थ्य येतें, असें पुराणांतरीं दाखले आहेत. मी तर चित्तसंपन्न व समर्थ गुरुंचा अनुगृहीत आहें; मग माझ्या मुखांतूनच काय पण श्वासोच्छ्वासांतूनही गीतेचें व्याख्यान निघेल यांत नवल नाहीं. ( १६९६-१७३५ ) मी संस्कृतांतील गीतेचा मराठींत अनुवाद केल्यामुळें ज्यांना संस्कृत येत नाहीं त्यांची मोठी सोय झाली आहे. त्यांना माझी ही प्राकृत टीका वाचून मूळ गीता-पठणाचेंच फळ मिळेल. ज्यांना संस्कृत येतें अशांनीं संस्कृत गीतेबरोबर माझी टीका वाचली तर त्यांना अधिकच संतोष होईल. अंतर्मुख वृत्तीचे श्रोते या ग्रंथाचे खरे अधिकारी आहेत; पण इतर जनांना साहित्य व काव्य या बहिरंगाचें सुख मिळाल्यावांचून राहणार नाहीं. ( १७३६-१७५० ).

( आपली गुरुपरंपरा सांगतात ) क्षीरसमुद्राचे ठिकाणीं आदिगुरु श्रीशंकरांनीं प्राचीन काळीं, आपलें गुह्यज्ञान पार्वतीला एकान्तांत सांगितलें; पण त्या ठिकाणीं माशाच्या रूपानें मत्स्येंद्रनाथ हजर होते, त्यांना ते ऐकावयास मिळालें. त्यानंतर तें गोरखनाथ व गैनीनाथ यांस परंपरेनें मिळालें. गैनीनाथांनीं मात्र ' एक शिष्य एक गुरु ' एवढेंच मर्यादित न ठेवतां सर्व संसारग्रस्त जीवांना तें मिळावें म्हणून श्रीनिवृत्तिनाथांना देऊन त्याचा प्रसार सर्वत्र करण्यास त्यांना सांगितलें. श्रीनिवृत्तिनाथांनीं त्याप्रमाणें मला निमित्त करून श्रीशंकराचें समाधिधन जगाला प्राप्त करून दिलें आहे. त्यामुळें त्रैलोक्यांत निरुपम होऊन राहील असा हा ग्रंथ निर्माण झाला. हें केवळ श्रीनिवृत्तिनाथांच्या कृपेचें सामर्थ्य आहे. ( १७५१-१७६४ ) एऱ्हवीं गीतेसारख्या असामान्य ग्रंथावर टीका करण्याची माझी काय योग्यता आहे! अंगीं प्रज्ञाहि नाहीं व गुरुसेवाही घडली नाहीं. गुरूचें पाईकपण पत्करलें व त्यांनीं सांगितलें तें पुरोहितासारखें बोललों. ( संत श्रोते मंडळींना वंदन करतात ) ग्रंथ सांगतांना माझ्याकडून जें उणें अधिक झालें असेल तें आपण पोटांत घालावें. आपल्या पायाची भेट झाली हें माझें भाग्यच उदयाला आलें. आपण माझी व गीतामाउलीची भेट करून देऊन माझे सर्व मनोरथ पूर्ण केले आहेत. ( १७६५-१७९२ )

( ग्रंथाचा शेवट करतांना मराठी वाङ्मयांत अमर होऊन राहिलेलें अलौकिक पसायदान आपल्या गुरू-जवळ मागतात. खळ व दुष्ट लोकांचा उद्धार होऊन ते ईश्वरनिष्ठ कसे होतील याची काळजी माऊलीला लागलेली स्पष्ट दिसते, म्हणून प्रथम त्यांच्याबद्दल कळकळीनें माऊली प्रार्थना करते. ) जगांतील खळ व दुष्ट लोकांच्या वृत्तींत पालट पडून दुष्ट कर्में टाकून सत्कर्में करावीं अशी त्यांना बुद्धि व्हावी. जगांतील सर्व लोकांनीं एकमेकांशीं बंधुभावानें वागावें. सगळीकडे धर्माची वाढ होऊन सर्व लोक सुखी व्हावेत. त्यांनीं भगवंताची सेवा करण्यांत आयुष्य घालवावें व हें घडून येण्यासाठीं संत महात्मे यांचें वास्तव्य या पृथ्वीतलावर निरंतर असावें. ( १७९३-१८०१ ) 'तुझ्या म्हणण्याप्रमाणें होईल' असा श्रीनिवृत्तिनाथांचा आशीर्वाद मिळाल्यावर श्रीज्ञानदेवांनीं, ज्ञानेश्वरीलेखनाचें स्थळ ( नेवासें ) काळ ( शके १२१२ ) व लिहून घेणारे लेखक ( सच्चिदानंद बाबा ) यांचा उल्लेख करून प्रसन्न अंतःकरणानें ग्रंथ समाप्त केला आहे. ( १८०१-१८१० )

ज्ञानेश्वरी ग्रंथांत काळांतरानें पाठभेद, अपपाठ शिरले ते काढून टाकून श्रीएकनाथांनीं ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली, त्यासंबंधींच्या ओव्या शेवटीं आहेत. ( १-४ )



# ज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा

जयजय देव निर्मळ । निजजनाखिलमंगळ । जन्मजराजलदजाळ- । प्रभंजन ॥१॥ जयजय देव प्रबळ । विदळितामंगळकुळ । निगमागमद्रुमफळ । फलप्रद ॥ २ ॥ जयजय देव सकळ । विगतविषयवत्सल । कलितकाळकौतुहल । कलातीत ॥३॥ जयजय देव निष्कळ । स्फुरदमंदानंदबहळ । नित्यनिरस्ताखिलमळ । मूळभूत ॥ ४ ॥ जयजय देव स्वप्रभ । जगदंबुदगर्भनभ । भुवनोद्भवारंभस्तंभ । भवध्वंस ॥ ५ ॥ जयजय देव निश्चळ । चलितचित्तपानतुंदिल । जगदुन्मीलनाविरल- । केलिप्रिय ॥ ६ ॥ जयजय देव विशुद्ध । विदुदयोद्यानद्विरद । शमदममदनमदभेद । दयार्णव ॥७॥ जयजय देवैकरूप । अतिकृतकंदर्पसर्पदर्प । भक्तभावभुवनदीप । तापापह ॥८॥ जयजय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय । निजजनजित भजनीय । मायागम्य ॥९॥ जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्य-कल्पतरो । स्वसंविद्द्रुमबीजप्ररो- । हणावनी ॥ १० ॥ हें काय एकैक ऐसैसें । नानापरिभाषावशें । स्तोत्र करूं तुजोद्देशें । निर्विशेषा ॥ ११ ॥ जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें । हें जाणें मी म्हणोनि लाजें । वानणां इहीं ॥ १२ ॥ परी मर्यादेचा सागरु । हा तंवचि तया डगरु । जंव न देखे सुधाकरु । उदया आला ॥ १३ ॥ सोमकांतु निजनिर्झरीं । चंद्रा अर्घ्यादिक न करी । तें तोचि अवधारीं । करवी कीं जी ॥ १४ ॥ नेणों कैसी वसंतसंगें । अवचितिया वृक्षाचीं अंगें । फुटती तैं तयांही जोगें । धरणें नोहे ॥ १५ ॥ पद्मिनी रविकिरण । लाहे मग लाजे कवण । कां जळें शिवतलें लवण । आंग भुले ॥ १६ ॥ तैसा तुतें जेथ



चातकाचिये कणवे । मेघु पाणियेसिं धांवे ॥
तेथ चराचर आघवें । निवालें जेविं ॥

— ज्ञानेश्वरी अध्याय १८ वा, ओवी १४६८

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा

हे निष्पापा, आपल्या सेवकांचें संपूर्ण कल्याणरूप असलेल्या (कल्याण करणाऱ्या) आणि जन्म व म्हातारपण-रूपी मेघांच्या फळीची धूळधाण करणाऱ्या वायुरूपी हे श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो. १. हे अतिशय सामर्थ्यवान्, (अहंकारादि) अशुभांच्या समुदायांचा ज्यानें नायनाट केला आहे अशा, वेदशास्त्ररूपी वृक्षांचें फल असलेल्या व त्या फलाची प्राप्ति करून देणाऱ्या, हे श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो. २. हे स्वरूपत: पूर्ण असलेल्या; विषयवासना दवडलेल्यांचे कैवार घेणाऱ्या; कालाच्या करामतीसही अंकित करून ठेवलेल्या, अंशादि विभागापलीकडे असलेल्या, हे श्रीगुरुदेवा, तुमचा जय-जयकार असो. ३. हे निरुपाधिका, ज्याचे ठिकाणीं जोराचा व विपुल आनंद प्रगट आहे अशा, संपूर्ण दोष नेहमींच नाहींसे केलेल्या व सर्वांस कारण असलेल्या, श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो. ४. हे स्वयंप्रकाशा, जगद्रूपी ढगाचा गर्भ ज्यांत संभवतो, अशा आकाशा, स्वर्गादि लोकांच्या उत्पत्तीचे आधारभूत खांबच असलेल्या, (तसेंच) संसाराचा फडशा पाडणाऱ्या श्रीगुरो, तुमचा जयजयकार असो. ५. हे स्थिर असणाऱ्या, चंचल चित्तास पिऊन मोठें पोट झालेल्या, जगत प्रकट करण्याचा एकसारखा खेळ खेळण्याची आवड असलेल्या श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो. ६. हे अत्यंत शुद्धा, ज्ञानोदयरूपी अरण्यांतील हत्ती (म्हणजे ज्ञाना-भिमान गलित करणारे) अशा, तसेंच शमदमैकरून कामाच्या भयाचा नाश करणाऱ्या, दयासागरा, श्रीगुरुदेवा तुमचा जयजयकार असो. ७. हे अविकारी अशा, मदनरूपी सापाच्या घमेंडीचा धुव्वा उडविणाऱ्या, भक्तांच्या प्रेमरूपी घरांतील दिवा असणाऱ्या व तापांचा नायनाट करणाऱ्या, श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो. ८. हे अद्वितीया, परिपक्क झालेल्या वैराग्ययानाचेंच काय तें फक्त प्रेम असलेल्या, आपल्या दासांच्या स्वाधीन होऊन असलेल्या, भजन करण्यास योग्य असलेल्या, मायेच्या ताब्यांत न सांपडणाऱ्या, श्रीगुरुदेवा, तुमचा जयजयकार असो. ९. कल्पनारहित अशी ज्याची प्रसिद्धि आहे अशा (परमात्म) स्वरूपास देणाऱ्या कल्पवृक्षा, स्वरूपज्ञानरूपी वृक्षाचें बीं वाढण्याची जमीन असलेल्या देवा, श्रीगुरो, तुमचा जयजयकार असो १०. हे भेदरहित श्रीगुरो, असे असे तुम्हीं आहांत, अशी पृथक् पृथक् अनेक विवेचनांच्या द्वारां तुमच्यासंबंधानें स्तुति तरी काय करावी ? ११. ज्या ज्या विशेषणांनीं तुमचें वर्णन करावें त्या त्या विशेषणांनीं दाखविलेलें जें जें दृश्यस्वरूप तें तें तुमचें रूप नाहीं, हें मी समजतों व म्हणूनच (या) स्तुतीच्या शब्दांनीं वर्णन करण्याची मला शरम वाटते. १२. समुद्र आपली मर्यादा उल्लंघन करीत नाहीं, अशी त्याची प्रसिद्धि आहे; परंतु जोंपर्यंत त्यानें पूर्णचंद्र उदयाला आलेला पाहिला नाहीं, तोंपर्यंतच ती प्रसिद्धि खरी असते. १३. महाराज, ऐका. चंद्रकांतमणि आपल्या पाझरानें (पाण्यानें) चंद्रास आपण होऊन अर्घ्य वगैरे देत नाहीं, तर तें अर्घ्यादिक देवविण्याचें काम तो चंद्रच त्या चंद्रकांतमण्याकडून करवितो. १४. वसंत ऋतूच्या संबंधांत, झाडांच्या फांद्यांस कशी अकस्मात् पालवी फुटते, हें कळत नाहीं; परंतु जेव्हां वसंत येतो, तेव्हां तें पालवी फुटणें थांबून ठेवणें, हें झाडांच्याही स्वाधीन नसतें. १५. सूर्यविकासिनी कमळाला सूर्यकिरणांचा योग झाला म्हणजे मग कोण संकोचून राहणार ? अथवा पाण्याच्या संसर्गांत आलेलें मीठ आपल्या शरीराला विसरतें. (विरघळतें.) १६. त्याप्रमाणें जेव्हां मी तुझ स्मरण करता, तेव्हां मी

मी स्मरें । तेथ मीपण मी विसरें । मग जाकळिला ढेंकरें । तृप्तु जैसा ॥ १७ ॥ मज तुवां जी केलें तैसें । माझें मीपण घाडूनि देशें । स्तुतिमिषें पांचापिसें । बांधलें वाचे ॥ १८ ॥ ना एऱ्हवीं तरी आठवीं । राहोनि स्तुति जैं करावी । तैं गुणागुणिया धरावी । सरोभरी कीं ॥१९॥ तरी तूं जी एकरसाचें लिंग । केवीं करूं गुणागुणीं विभाग । मोतीं फोडोनि सांधितां चांग । कीं तैसेंचि भलें ॥ २० ॥ आणि तूं बापु तूंचि माय । इहीं बोलीं ना स्तुति होय । डिंभोपाधिक आहे । विटाळु तेथें ॥ २१ ॥ जी जालेनि पाइकें आलें । तें गोसावीपण केवीं बोलें । ऐसें उपाधी उशिटलें । काइ वानूं ॥ २२ ॥ तरी आत्मा तूं एकसरा । हेंही म्हणतां दातारा । आंतुल तूं बाहेरा । घापतासी ॥ २३ ॥ म्हणूनि साचा तुजलागीं । स्तुती नेदखे जी जगीं । मौनावांचूनि लेणें आंगीं । सुसीना मा ॥ २४ ॥ स्तुती कांहीं न बोलणें । पूजा कांहीं न करणें । सन्निधीं कांहीं न होणें । तुझां ठायीं ॥ २५ ॥ तरी जिंतलें जैसें भुली । पिसें आलापु घाली । तैसें वानूं तें माउली । उपसाहें तूं ॥२६॥ आतां गीतार्थाची मुक्तमुदी । लावीं माझिये वाग्वृद्धी । जें माने हे सभासदीं । सज्जनांचां ॥ २७ ॥ येथ म्हाणितलें श्रीनिवृत्ती । नको हें पुढतपुढती । परिसीं लोहा घृष्टी किती । वेळवेळां कीजे गा ॥ २८ ॥ तंव विनवी ज्ञानदेवो । म्हणे हो कां जी पसावो । तरी अवधान देतु देवो । ग्रंथा आतां ॥ २९ ॥ जी गीतारत्नप्रासादाचा । कळसु अर्थ चिंतामणीचा । सर्व गीतादर्शनाचा । पाढाऊ जो ॥ ३० ॥ लोकीं तरी आथी ऐसें । जे दुरूनि कळसु दिसे । आणि भेटीचि हातवसे । देवतेची तिये ॥ ३१ ॥ तैसेंचि एथही आहे । जे एकेंचि येणें अध्यायें । आघवाचि दृष्ट होये । गीतागमु हा ॥ ३२ ॥ मी कळसु याचि कारणें । अठरावा अध्यायो म्हणें । उवाइला बादरायणें । गीताप्रासादा ॥ ३३ ॥ नोहे कळसापरतें कांहीं । प्रासादीं काम नाहीं । तें सांगतसे गीता ही । संपलेपणें ॥३४॥ व्यासु सहजें सूत्री बळी । तेणें निगमरत्ना-चळीं । उपनिषदर्थाची माळी । माजीं खांडिली ॥ ३५ ॥ तेथ त्रिवर्गाचा अणुआरु । आडऊ निघाला जो अपारु । तें महाभारतप्राकारु । भोंवता केला ॥ ३६ ॥ माजीं आत्मज्ञानाचें एकवट । दळवाडें झाडूनि चोखट । घडिलें पार्थवैकुंठ- । संवाद कुसरी ॥३७॥ निवृत्तिसूत्र सोडणिया । सर्व शास्त्रार्थ पुरवणिया । आवो साधिला मांडणिया । मोक्षरेखेचा ॥ ३८ ॥ ऐसेनि करितां उभारा । पंधराअध्यायांत पंधरा । भूमी निर्वाळलिया पुरा । प्रासादु जाहला ॥ ३९ ॥ उपरि सोळावा अध्यावो । तो ग्रीवेघंटेचा आवो । सप्तदशु तोचि ठावो । पडघाणिये ॥४०॥ तयाहीवरी अष्टादशु । तो अपैसा मांडला कळसु । उपरि गीतादिकीं व्यासु । ध्वजें लागला ॥ ४१ ॥ म्हणोनि

आपला मीपणा विसरतों. मग जसा तृप्त पुरुष ढेकरेनें व्यापला असतां, त्यास आपली ढेकर आवरून धरतां येत नाहीं; १७. महाराज, मला तुम्हीं तसें केलें आहे. आपण माझ्या मीपणाचा नाश करून स्तुतीच्या निमित्तानें माझ्या वाचेला वेड लावलें आहे. १८. अथवा एऱ्हवीं तरी मी शुद्धीवर राहून जेव्हां स्तुति करीन, तेव्हांच माझे हातून गुण व गुणातीत यांची तुलना केल्यासारखें होईल. १९. आणि महाराज, तुमचें स्वरूप एकरस आहे; मग तुमच्या ठिकाणीं गुण व गुणातीत ही निवड कशी करतां येईल ? हें पहा, मोती अगोदर फोडून मग सांधणें चांगलें, किंवा तें आहे तसेंच सबंध ठेवणें चांगलें ? २०. आणि तूं बाप आहेस व तूंच आई आहेस, अशा वर्णनानें तुझी स्तुति होत नाहीं. कारण कीं, त्या प्रतिपादनांत 'लेंकरूं' या उपाधीचा विटाळ आहे. २१. महाराज, दुसरी एकादी व्यक्ति दास झाल्यानें आलेलें परावलंबी स्वामित्व तुमच्या ठिकाणीं प्रतिपादण्यांत काय अर्थ आहे ? असें सापेक्षतेच्या उपाधीनें उष्टें झालेल्या मोठेपणानें तुमचें वर्णन कशाला करूं ? २२. हे स्वामिन्, तूं अंतर्बाह्य एकसारखा व्यापून असणारा आत्मा आहेस, असेंही म्हटलें असतां, आंत असणारा जो तूं, त्या तुला बाहेर घालविला असें होईल. २३. म्हणून महाराज, आपण जसे खरोखर आहांत, तशा आपल्या खऱ्या स्वरूपायोग्य स्तुतिकरितां लागणारीं विशेषणें जगामध्यें मला दिसत नाहींत; कारण कीं, मौनावांचून दुसरा दागिना आपण आंगावर घालीतच नाहीं. २४. तुमच्या-संबंधानें कांहीं न बोलणें ही स्तुति होय; कांहीं न करणें ही पूजा आणि ( साधकानें ) आपण जीव, शिव अथवा ब्रह्म, यापैकीं कोणाचाच अभिमान न घेणें, हीच तुमची जवळीक होय. २५. तरी पण भ्रमानें भुलून वेडा झालेला मनुष्य जसा बडबडतो, त्याप्रमाणें मी तुमचें वर्णन करतों. तें, हे श्रीगुरुमाउली, तूं सहन कर. २६. आतां माझ्या व्याख्यानाच्या विस्तारास, ह्यांत गीतेंतील योग्य भावार्थ आला आहे, अशी आपली संमति दाखविणारा मोत्यांचे आंगठीचा मोर्तब ( शिक्का ) करा. कारण त्या योगानें माझें हें बोलणें सज्जनांच्या सभेतील सर्व संतांस मान्य होईल. २७. यावर श्रीगुरु निवृत्तिनाथ म्हणाले, अशी वारवार विनंति करूं नकोस. अरे, सोनें होण्या-करितां परिसावर लोखंड किती वेळां घांसावयास पाहिजे ? ( एकदां घासलें कीं पुरे. ) २८. तेव्हां ज्ञानदेव विनंति करून म्हणतात, महाराज, आपली आज्ञा हा आपला प्रसादच आहे. तर आतां आपण व्याख्यानाकडे लक्ष द्यावें. २९. ( या ओंवीपासून तों ४९ ओंवीअखेर अठराव्या अध्यायाचें माहात्म्य सांगतात. ) महाराज, गीतारूपी रत्नमंदिराचा हा जो ( अठरावा अध्याय ) तो अर्थरूपी चिंतामणीचा ( बनविलेला ) कळस आहे व सर्व गीतेचें दर्शन करविणारा अठरावा अध्याय हा वाटाड्या आहे. ३०. लोकांत तरी अशी समजूत आहे कीं, दुरून देवळाचा कळस दिसल्याबरोबर त्या देवळां-तील देवतेची भेटच ( दर्शनच ) हस्तगत झाली असें होतें. ३१. येथेंही ( म्हणजे या अठराव्या अध्यायाच्या बाबतींतही ) तसेंच आहे. कारण कीं, या एकाच अध्यायानें सर्व गीताशास्त्र पाहिलें असें होतें. ३२. म्हणून याच कारणाकरितां श्रीव्यासांनीं गीतारूपी मंदिरावर अठरावा अध्याय हा कळस चढविला, असें मी म्हणतों. ३३. मंदीर बांधण्यांत कळसापलीकडे कांहीं काम उरत नाहीं, असें नव्हे काय ! तीच गोष्ट गीतादेखील आपल्या समाप्तीनें सांगत आहे. ३४. व्यास हे स्वभावतः मोठे बुद्धिमान् कारागीर ( मोठे सूत्रकार ) होते. त्यांनीं वेदरूप रत्नांच्या पर्वतावर ( असलेल्या ) उपनिषदर्थरूपी पठारावर खणायला आरंभ केला. ( म्हणजे उपनिषदर्थांचा विचार करण्यास आरंभ केला. ) ३५. तेव्हां धर्म, अर्थ व काम हा त्रिविध पुरुषार्थरूपी जो पुष्कळसा अवार चाराचुरा निघाला, त्याचा महाभारतरूपी कोट गीता-मंदिरासभोंवतीं केला. ३६. या खाणींमध्यें आत्मज्ञानरूपी एकजीवाचा ( अखंड ) दगड निघाला. तो चातुर्यानें साफसूफ करून त्याचा श्रीकृष्णअर्जुनसंवादरूपी चांगला चिरा तयार केला. ३७. निवृत्तिरूपी ओळंबा लावून, सर्व शास्त्रार्थांची पुरणी घालून, व्यासांनीं त्या चिऱ्याच्या मांडणीनें मोक्षाच्या स्वरूपाचा आकार साधला. ३८. अशा तऱ्हेनें गीतारूपी मंदिराची उभारणी करीत असतांना, जमीन शुद्ध करण्यापासून तों पंधरावा अध्याय संपेपर्यंतचें पंधरा अध्यायाचें गीतारूपी मंदीर गच्चीपर्यंत पुरें झालें. ३९. वरतीं सोळावा अध्याय हा गळ्यावरील ढेऱ्याचा आकार होय आणि जो सतरावा अध्याय आहे, तोच कळसाच्या बैठकीचा ओटा होय. ४०. त्याच्याहीवर अठरावा अध्याय हाच कोणी एक सहजच उभारलेला कळस होय. त्यावर गीतादिक शास्त्रांमुळें व्यास हे ध्वजेचे ठिकाणीं लागले. ( म्हणजे श्रीव्यासांनीं गीतादिक शास्त्र केलें, या कीर्तीचा वर ध्वज लागला आहे. ) ४१. म्हणून

मागील जे अध्याय । ते चढते भूमीचे आय । तयांचें पुरें दाविताहे । आपुलां आंगीं ॥ ४२ ॥ जालया कामा नाहीं चोरी । ते कळसें होय उजरी । तेवीं अष्टादशु विवरी । साद्यंत गीता ॥ ४३ ॥ ऐसा व्यासें विंदाणिये । गीताप्रासादु सोडणिये । आणूनि राखिले प्राणिये । नानापरी ॥ ४४ ॥ एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहेरोनि करिती यया । एक ते श्रवण- मिषें छाया । सेविती ययाची ॥ ४५ ॥ एक ते अवधानाचा पुरा । विडापाऊड भीतरां । देऊनि रिघती गाभारां । अर्थज्ञानाचां ॥ ४६ ॥ ते निजबोधें उराउरी । भेटती आत्मया श्रीहरी । परी मोक्षप्रसादीं सरी । सर्वांही आथी ॥ ४७ ॥ समर्थाचिये पंक्तिभोजनें । तळिल्या वरिल्या एक पक्वान्नें । तेवीं श्रवणें अर्थें पठणें । मोक्षुचि लाभे ॥ ४८ ॥ ऐसा गीता वैष्णवप्रासादु । अठरावा अध्याय कळसु विशदु । म्यां म्हणितला हा भेदु । जाणोनियां ॥ ४९ ॥ आतां सप्तदशापाठीं । अध्याय कैसेनि उठी । तो संबंधु सांगों दिठी । दिसे तैसा ॥ ५० ॥ न मोडतां दोन्ही आकार । घडिलें एक शरीर । हें अर्धनारीनटेश्वर- । रूपीं दिसे ॥ ५१ ॥ कां गंगायमुनाउदक । वोघबगें वेगळिक । दावी होऊनि एक । पाणीपणें ॥ ५२ ॥ नाना वाढिली दिवसें । कळा बिंबीं पैसे । परी सिनानें लेवे जैसें । चंद्रीं नाहीं ॥५३॥ तैसीं सिनानीं चारीं पदें । श्लोक श्लोकावच्छेदें । अध्यावो अध्यायभेदें । गमे कीर ॥ ५४ ॥ परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी । नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी ॥ ५५ ॥ मोतियें मिळोनि बहुवें । एकावळीचा पाडु आहे । परी शोभे रूप होये । एकचि तेथ ॥ ५६ ॥ फुलां फुलसरां लेख चढे । दुतीं दुजी अंगुळी न पडे । श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥ ५७ ॥ सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख । परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥ ५८ ॥ आणि म्यांही न सांडूनि ते सोये । ग्रंथा व्यक्ती केली आहे । प्रस्तुत तेणें निर्वाहें । निरूपण आइका ॥ ५९ ॥ तरी सतरावा अध्यावो । पावतां पुरता ठावो । जें संपता श्लोकीं देवो । ऐसें बोलिले ॥ ६० ॥ ना ब्रह्मनामाचां विखीं । बुद्धि सांडूनि आस्तिकीं । कर्में कीजती तितुकीं । असंतें होतीं ॥ ६१ ॥ हा ऐकोनि देवाचा बोलु । अर्जुना आला डोलु । म्हणे कर्मनिष्ठां मळु । ठेविला देखों ॥ ६२ ॥ तो अज्ञानांधु तंव बापुडा । ईश्वरुचि न देखे एवढा । तेथ नाम एक पुढां । कां सुझे तया ॥ ६३ ॥ आणि रजतमें दोन्ही । गेलियावीण श्रद्धा सानी । ते कां लागे अभिधानीं । ब्रह्माचिये ॥ ६४ ॥ मग कोता खेंव देणें । वातेंवरील धांवणें । सैंडीं पडे खेळणें । नागिणीचें तें ॥ ६५ ॥ तैसीं कर्में दुवाडें ।

पहिल्या अध्यायापासून सतराव्या अध्यायापर्यंत जे मागील अध्याय आहेत, ते चढत्या चढत्या भूमिकेचे आकार असून, तें सर्व काम पुरें झाल्याचें अठरावा अध्याय आपल्या ठिकाणीं दाखवीत आहे. ४२. मंदिराचें पुरें झालेलें काम, कळसाच्या योगानें, चोरटें ( अपुरें ) राहिलें नाहीं ( तर पुरें झालें ) हें उघड होतें. त्याप्रमाणें अठरावा अध्याय हा कळस असल्यामुळें तो गीतारूपी मंदिराचें काम संपूर्ण झालें असें स्पष्ट दाखवितो. ४३. याप्रमाणें कारागीर व्यासांनीं, गीतारूपी मंदीर मोक्षाकरितां तयार करून, प्राण्यांचें नाना प्रकारांनीं रक्षण केलें. ४४. कोणी या गीतारूपी मंदिराला आवर्तनरूपी प्रदक्षिणा बाहेरूनच करितात व कोणी श्रवणाच्या निमित्तानें या गीतामंदिराच्या सावलीचा उपभोग घेतात. ४५. कित्येक पुरते अवधानरूपी विडापैसा देऊन गीतारूपी मंदिराच्या अर्थज्ञानरूपी गाभाऱ्यांत प्रवेश करितात. ४६. ते आत्मज्ञानानें आत्मरूप श्रीहरीची तात्काळ भेट घेतात. परंतु ( या गीतारूपी मंदिराचे ठिकाणीं ) मोक्षरूपी प्रसाद सर्वांनाही एकसारखाच मिळतो. ४७. ( खऱ्या ) श्रीमंताच्या पंक्तीला भोजनांत खालच्यावरच्या माणसांना एक ( च ) पक्वान्न असतें, त्याप्रमाणें या गीतेच्या श्रवणानें, अर्थज्ञानानें व आवर्तनानें मोक्षच मिळतो. ४८. हें ( वरील ) मर्म जाणूनच हें गीतारूपी वैष्णवमंदिर आहे व अठरावा अध्याय हा कळस आहे, असें मी स्पष्ट म्हटलें. ४९. आतां सतराव्या अध्यायानंतर अठराव्या अध्यायाची उत्पत्ति कशी झाली, तो संबंध डोळ्याला दिसेल तसा सांगतों. ५०. शरीराचें एकत्व न बिघडवितां, त्याच्यावर स्त्री व पुरुष असे दोन आकार बनविलेले आहेत, हें अर्धनारी नटेश्वराच्या रूपांत दिसतें. ५१. अथवा गंगायमुना यांचें पाणी ओघाकडे दृष्टि दिली असतां वेगवेगळें दिसून येतें; परंतु त्या दोन्ही नद्यांचें उदक, पाणी या दृष्टीनें पाहिलें असतां एक होऊन दाखवितें. ( एकच आहे असें दिसतें. ) ५२. अथवा चंद्रबिंबाचे ठिकाणीं ( शुक्ल पक्षांतील तिथींच्या मानानें ) प्रत्येक दिवसाला अधिक अधिक कला प्राप्त होत असते. परंतु ( पौर्णिमेचे दिवशीं जर पाहिलें तर ) असें चंद्रबिंबाच्या ठिकाणीं तितक्या निरनिराळ्या कलांचे वेगळे थर दिसत नाहींत. ५३. त्याप्रमाणें ( या गीतेंत ) एकापासून एक चरण पृथक् केल्यानें, एका श्लोकाचे चार चरण झाले; तसेच एका अध्यायांत एका श्लोकाहून दुसरा श्लोक निराळा असा तोडल्यानें एकाच अध्यायाचें अनेक श्लोक झाले. त्याचप्रमाणें एक अध्याय संपून दुसऱ्या अध्यायास आरंभ केला म्हणून ( गीतेचे ) पुष्कळ निरनिराळे अध्याय झाल्यासारखे खरोखर जरी वाटतात; ५४. परंतु ( पदें, श्लोक व अध्याय यांच्या अनेकतेमुळें ) ग्रंथांत प्रतिपादिलेल्या सिद्धांताच्या अभिप्रायांत अनेकत्व येत नाहीं. रत्नाच्या हारांत रत्नें अनेक असलीं तरी दोरी जशी एकच असते; ५५. पुष्कळ मोत्यें मिळून एकपदरी हार केला असतां, त्यास एकावळी म्हणतां येतें. परंतु त्या एकावळीच्या ठिकाणीं मोत्यें जरी अनेक असलीं, तरी शोभा एकच असते. ५६. फुलें व फुलांच्या हारांचे पदर मोजतां येतील, पण त्यांतील सुवास मोजण्याकरितां एक, दोन अशीं बोटें घालतां येणार नाहींत. या गीतेंतील श्लोक व अध्यायाचें तसेंच समजावें. ( म्हणजे या गीतेंत जरी श्लोक व अध्याय वेगवेगळे आहेत, तरी त्या सर्वांतून सिद्धांत एकच आहे. ) ५७. या गीतेंत श्लोक सातशें आहेत व अध्यायांची संख्या अठरा आहे. परंतु देवांनीं जें सांगितलें, तें एकच तत्त्व ( ज्ञान ) सांगितलें, दुसरें नाहीं. ५८. आणि मीही ती संगति न सोडतां ग्रंथाचें विवरण केलें आहे व सांप्रत माझें अठराव्या अध्यायाचें निरूपण तुम्हीं त्याच धोरणानें ऐका. ५९. तर सतराव्या अध्यायाच्या शेवट होण्याच्या वेळीं, शेवटच्या श्लोकांत देव असें म्हणाले कीं, ६०. तरी ब्रह्मनामाविषयीं श्रद्धा सोडून देऊन जितकीं कर्में करावींत तितकीं सर्व व्यर्थ होतात. ६१. हें देवाचें बोलणें ऐकून अर्जुन डोलूं लागला व मनांत म्हणाला, कर्मांवर भर असलेल्यास ( देवांनीं ) कमी प्रतीचे लेखिलें आहे, असें मला वाटतें. ६२. अज्ञानानें आंधळा झालेला तो दीन कर्मठ वर्ग जर एवढ्या ( सर्वव्यापक ) ईश्वराला पाहात नाहीं, तर अशा स्थितींत त्या कर्मठ वर्गाला प्रथम त्याचें ( ईश्वराचें ) एक नांव व त्यावर अवलंबून असलेल्या पुढच्या श्रद्धादिक गोष्टी कशा कळणार ? ६३. आणि मनुष्याच्या अंतःकरणांतून रजोगुण व तमोगुण हे नाहींसे झाल्याशिवाय जी श्रद्धा असते, ती अगदींच कमी प्रतीची असते. ती ब्रह्मनामाच्या ठिकाणीं कशी जडेल ? ६४. ( ब्रह्मनामाच्या श्रद्धेशिवाय कर्म करणें, हें कसें घातक असतें तें अर्जुन सांगतो. ) मग शस्त्राच्या अग्राला आलिंगन देणें, दोरीवर धांवणें अथवा नागिणीबरोबर खेळणें, या गोष्टीदेखील त्या श्रद्धाविरहित कर्मापुढें घातकपणाच्या बाबतींत हार खातील. ६५. ब्रह्मनामावरील

तयां जन्मांतराची कडे । दुर्मेळावे येवढे । कर्मामाजीं ॥ ६६ ॥ ना विपायें हें उजू होये । तरी ज्ञानाचीच योग्यता लाहे । एऱ्हवीं येणेंचि जाये । निरयालया ॥६७॥ कर्मीं हा ठावोवरी । आहाती बहुवा अवसरी । आतां कर्मठां कैं वारी । मोक्षाची हे ॥ ६८ ॥ तरी फिटो कर्माचा पांगु । कीजो अवघाचि त्यागु । आदरिजो अव्यंगु । संन्यासु तो ॥६९॥ कर्मबाधेची कहीं । जेथ भयाची गोष्टी नाहीं । तें आत्मज्ञान जिहीं । स्वाधीन होय ॥७०॥ ज्ञानीचे आवाहनमंत्र । जें ज्ञानपिकतें सुक्षेत्र । ज्ञानआकर्षितें सूत्र– । तंतु जे का ॥७१॥ ते दोनी संन्यास त्याग । अनुष्ठूनि सुटो जग । तरी हेंचि आतां चांग । व्यक्त पुसों ॥ ७२ ॥ ऐसें म्हणोनि पार्थें । त्यागसंन्यासव्यवस्थे । रूप होआवया जेथें । प्रश्नु केला ॥ ७३ ॥ तेथ प्रत्युत्तरें बोली । श्रीकृष्णें जे चावळिली । तया व्यक्ती जाली । अष्टादशा ॥ ७४ ॥ एवं जन्यजनकभावें । अध्यावो अध्यायातें प्रसवे । आतां ऐका बरवें । पुसिलें तें ॥७५॥ तरी पंडुकुमरें तेणें । देवाचें सरतें बोलणें । जाणोनि अंतःकरणें । काणी घेतली ॥७६॥ एऱ्हवीं तत्त्वविषयीं भला । तो निश्चितु असे कीर जाहला । परी देवो राहे उगला । तें साहावेना ॥ ७७ ॥ वत्स धालयाही वरी । धेनु न वचावी दुरी । अनन्य प्रीतीची परी । ऐसीच आहे ॥ ७८ ॥ तेणें काजेंवीणही बोलावें । तें देखिलें तरी पाहावें । भोगितां चाड दुणावे । पढियंतया- ठायीं ॥७९॥ ऐसी प्रेमाची हे जाती । पार्थ तंव तेचि मूर्ती । म्हणूनि करूं लाहे खंती । उगेपणाची ॥ ८० ॥ आणि संवादाचेनि मिषें । जें अव्यवहारी वस्तु असे । तेचि भोगिजे कीं जैसें । आरिसां रूप ॥ ८१ ॥ मग संवादु तोही पारुखे । तरी भोगणें भोगिता थोके । हें कां साहावेल सुखें । लांचावलेया ॥ ८२ ॥ यालागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेऊनि मिस । परतविलेंचि दुस । गीतेचें तें ॥ ८३ ॥ अठरावा अध्यावो नोहे । हे एकाध्यायी गीताचि आहे । जैं वांसरुंचि गाय दुहे । तैं वेळु कायसा ॥८४॥ तैसी संपतां अवसरीं । गीता आदरविली माघारीं । स्वामीभृत्याचा न करी । संवादु काई ॥ ८५ ॥ परी हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे । म्हणे विनंती विश्वेशें । अवधारिजो ॥ ८६ ॥

अर्जुन उवाचः—संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् । त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

हां जी संन्यासु आणि त्यागु । इयां दोहीं एक अर्थीं लागु । जैसा संघातु आणि संगु । सांगातेंचि बोले ॥८७॥ त्यागें तैसा संन्यासें । त्यागुचि बोलिजतु असे । आमचेनि तंव मानसें । जाणिजे हेंचि ॥ ८८ ॥ ना कांहीं आथी अर्थभेदु । तो देव करोतु विशदु । येथ म्हणती मुकुंदु । भिन्नचि पैं ॥ ८९ ॥

श्रीभगवानुवाच—काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः । सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

श्रद्धेशिवाय कर्में तशीं घातक आहेत. शिवाय त्या कर्मांची प्रवृत्ति दुसरे जन्म देण्याकडे असते; एवढे सर्व कुयोग कर्मांत असतात. ६६. अथवा हें कर्म जर चुकून यथासांग झालें, तर तें कर्म करणाराला ज्ञानाचीच योग्यता प्राप्त होते व कर्म नीट झालें नाहीं, तर या कर्मानेंच तो कर्म करणारा नरकाच्या घराला जातो. ६७. कर्मामध्यें इतक्या पुष्कळ अडचणी आहेत. असें जर आहे तर कर्मठाला मोक्षाकडे जाणें कोठून घडणार ? ६८. तर आतां कर्माचें हें दारिद्य नाहींसें होवो व सर्व कर्मांचा त्याग केला जावो आणि त्या दोषरहित संन्यासाचा स्वीकार केला जावो; ६९. जेथें कर्मबाधेच्या ( जन्ममरणाच्या ) भयाचें मुळीं नांव देखील नसतें, असें आत्मज्ञान ज्या योगांनीं स्वाधीन होईल; ७० जे ज्ञानाला बोलावणारे मंत्र आहेत, जे ज्ञान पिकवणारें चांगलें शेत आहेत व जे ज्ञानाला आकर्षण करणारे सुताचे दोर आहेत; ७१. असे जे दोन, संन्यास व त्याग या दोघांचें आचरण करून जग कर्मांच्या बंधनांतून सुटावें म्हणून आतां त्याग व संन्यास ह्याविषयीं देवास चांगलें स्पष्ट विचारूं. ७२. असें अर्जुनानें ( मनांत ) म्हणून त्याग व संन्यास यांचें ज्ञान पृथक्त्वानें व चांगलें स्पष्ट कळण्याकरितां जेव्हां त्यानें प्रश्न केला, ७३. तेव्हां त्या प्रश्नाला उत्तर देण्याकरितां म्हणून श्रीकृष्णांनीं जें भाषण केलें, त्यांत अठरावा अध्याय प्रगट झाला. ७४. याप्रमाणें एक उत्पन्न करणारा व त्यापासून दुसरा उत्पन्न होणारा, या नात्यानें एका अध्यायापासून दुसरा अध्याय उत्पन्न झाला. आतां अर्जुनानें जें विचारलें तें चांगलें ऐका. ७५. तरी, त्या पंडुराजाच्या मुलानें ( अर्जुनानें ) देवाचें बोलणें ( सतराव्या अध्यायांत ) संपलेलें पाहिलें व तो मनांत खिन्न झाला. ७६. वास्तविक विचार करून पाहिलें तर त्याचा आत्मज्ञानाच्या सिद्धांताविषयीं खरोखर ठाम निश्चय झाला होता. परंतु आतां देव स्वस्थ बसतील, हें त्याला सहन होईना. ७७. वांसरूं तृप्त झाल्यावर देखील गाय आपल्यापासून दूर जाऊं नये ( असें त्या वांसरास वाटतें ). एकनिष्ठ प्रीतीचा प्रकार असाच आहे. ७८. त्या प्रेमाच्या योगानें आपल्या आवडत्याशीं कांहीं कारण नसतांही बोलावेंसें वाटतें व तें एकदां पाहिलेलें असलें तरी पुनः डोळे भरून पाहावेंसें वाटतें. आवडता विषय एकदां उपभोगिला तरी त्याचे भोगाविषयींची इच्छा त्या भोगानें दुपटीनें वाढतच जाते. ७९. प्रेमाचा हा प्रकार असा आहे. ( आणि ) अर्जुन तर प्रेमाचीच मूर्ति आहे; म्हणून देवाचें स्तब्ध बसणें त्याच्या मनास बरें वाटेना. ८०. आणि एऱ्हवीं न दिसणारें आपलें रूप आरशांत ज्याप्रमाणें पाहातां येतें, त्याप्रमाणें ( देणें, घेणें, बोलणें, ऐकणें वगैरे ) व्यवहार जिच्या संबंधानें होत नाहींत, ती ब्रह्मवस्तु प्रश्नोत्तराच्या निमित्तानें अनुभवितां येते. ८१ मग तो संवाद जर बंद पडला, तर ब्रह्मवस्तूच्या आनंदाचा अनुभव घेत असतांना, तो अनुभव घेणें मध्येंच बंद पडेल, तेव्हां मग आत्मसुखाच्या भोगाला चटावलेल्या अर्जुनास हें ( आत्मवस्तूचें भोगणें बंद पडणें ) कसें सहन होईल ? ८२. याकरितां त्याग व संन्यास विचारण्याचें निमित्त घेऊन तें गीतारूपी वस्त्र ( अर्जुनानें ) पुनः उलगडावयास लाविलें. ८३. हा अठरावा अध्याय नाहीं, तर ही एकअध्यायी गीताच आहे. ज्या वेळेला वासरूंच दूध काढावयाला लागेल, त्या वेळेला पान्हा सोडण्यास गाईस कितीसा वेळ लागेल ? ८४. त्याप्रमाणें गीता संपल्याच्याही वेळीं पुन्हा गीताव्याख्यानाचा आरंभ करावयास भाग पाडलें ( यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण ) गुरु-शिष्याचा संवाद काय करणार नाहीं ? ८५. परंतु तूर्त हें राहूं द्या. अर्जुन याप्रमाणें विचारावयास लागला, तो म्हणाला, हे जगाच्या नाथा, माझी विनंति ऐकावी. ८६.

अर्जुन म्हणाला, हे महाबाहो, हृषीकेशा, केशिनिषूदना, संन्यासाचें आणि त्यागाचें तत्त्व पृथक्पणें जाणण्याची माझी इच्छा आहे. १.

अहो महाराज, संन्यास व त्याग या दोन शब्दांचा एकाच अर्थाशीं संबंध असल्याचें दिसून येतें. संघात आणि संघ, या दोन शब्दांनीं सारखेंच ( समुदायाचें ) जसें ज्ञान होतें; ८७. त्याग या शब्दानें त्याप्रमाणेंच संन्यास या शब्दानें, त्यागच सांगावयाचा आहे, अशी आमच्या मनाची तर ठाम समजूत आहे. ८८. अथवा त्याग व संन्यास या दोन शब्दांच्या अर्थांत जर कांहीं भेद असेल, तर तो देवांनीं स्पष्ट करावा. यावर देव म्हणाले, या दोन शब्दांचे अर्थ वेगवेगळे आहेत. ८९.

श्रीकृष्ण म्हणाले, काम्यकर्मांचा त्याग म्हणजेच 'संन्यास' होय, असें ज्ञात्यांचें मत आहे. सर्व कर्मांच्या फलाचा त्याग म्हणजे 'त्याग' होय, असें ज्ञाते म्हणतात. २.

एऱ्हवीं अर्जुना तुझां मनीं । त्याग संन्यास दोनी । एकार्थ गमले हें मानीं । मी ही साच ॥९०॥ इहीं दोहीं कीर शब्दीं । त्यागुचि बोलिजे त्रिशुद्धी । परी कारण एथ भेदीं । येतुलेंचि ॥९१॥ जें निपटूनि कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यासु म्हणिजे । आणि फलमात्र का त्यजिजे । तो त्यागु गा ॥ ९२ ॥ तरी कोणा कर्माचें फळ । सांडिजे कोण कर्म केवळ । हेंही सांगों विवळ । चित्त दे पां ॥ ९३ ॥ तरी आपैसीं दांगीं डोंगर । झाडालि विति असार । तैसें लांबे राजागर । तुठिती ते ॥ ९४ ॥ न पेरितां सैंघ तृणें । उठती तैसें साळीचें होणें । नाहीं गा रावाउणें । जयापरी ॥ ९५ ॥ कां अंग जाहलें सहजें । परी लेणें उद्यमें कीजे । नदी आपैसी आपादिजे । विहिरी जेवीं ॥ ९६ ॥ तैसें नित्य नैमित्तिक । कर्म होय स्वाभाविक । परी न कामितां कामिक । न निफजे जें ॥ ९७ ॥ कामनेचेचि दळवाडें । जें उभारावया घडे । अश्वमेधादिक फुडे । याग जेथ ॥ ९८ ॥ वापी कूप आराम । अग्रहारें हन महाग्राम । आणीकही नानासंभ्रम । व्रतांचे ते ॥ ९९ ॥ ऐसें इष्टापूर्त सकळ । जया कामना एक मूळ । जें केलें भोगवी फळ । बांधोनियां ॥ १०० ॥ देहाचिया गांवा आलिया । जन्ममृत्यूचिया सोहळिया । ना म्हणों नये धनंजया । जियापरी ॥ १ ॥ का ललाटींचें लिहिलें । न मोडे गा कांहीं केलें । काळेंगोरेपण धुतलें । फिटों नेणे ॥ २ ॥ केलें काम्य कर्म तैसें । फळ भोगावया धरणें बैसे । न फेडितां ऋण जैसें । बोसंडीना ॥ ३ ॥ का कामनाही न करितां । अवसांत घडे पंडुसुता । तरी वायकांडें न झुंझता । लागे जैसें ॥ ४ ॥ गूळ नेणतां तोंडीं । घातला देचि गोडी । आगी मानूनि राखोंडी । चेपिला पोळी ॥ ५ ॥ काम्यकर्मीं हें एक । सामर्थ्य आथी स्वाभाविक । म्हणोनि नको कौतुक । मुमुक्षू एथ ॥ ६ ॥ किंबहुना पार्था ऐसें । जें काम्यकर्म गा असे । तें त्यजिजे विष जैसें । वोकूनियां ॥ ७ ॥ मग तया त्यागातें जगीं । संन्यासु ऐसिया भंगीं । बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टा ॥ ८ ॥ हें काम्यकर्म सांडणें । तें कामनेतेंचि उपडणें । धनत्यागें दवडणें । भय जैसें ॥ ९ ॥ आणि सोमसूर्यग्रहणें । येऊनि करविती पार्वणें । कां मातापितरमरणें । आंकित जे दिवस ॥११०॥ अथवा अतिथी हन पावे । ऐसैसें पडे जें करावें । तें तें कर्म जाणावें । नैमित्तिक गा ॥ ११ ॥ वार्षिया क्षोभे गगन । वसंतें दुणावे वन । देहा शृंगारी यौवन- । दशा जैसी ॥ १२ ॥ का सोमकांतु सोमें पघळे । सूर्यें फांकती कमळें । एथ असे तेंचि पाल्हाळे । आन नये ॥ १३ ॥ तैसें नित्य जें का कर्म । तेंचि निमित्ताचे लाहे नियम । एथ उंचावे तेणें नाम । नैमित्तिक होय ॥ १४ ॥ आणि सायंप्रातर्मध्यान्हीं । जें करणें तेंही

एऱ्हवीं अर्जुना, तुझ्या मनामध्यें त्याग व संन्यास हे दोन्ही एकार्थवाचक आहेत असें वाटलें व ( एका दृष्टीनें ) हें मीही खरें मानतों. ९०. खरोखर त्याग व संन्यास या दोन शब्दांनीं निश्चयेंकरून त्यागच म्हटला जातो. परंतु यांच्या अर्थांत भिन्नता असण्याचें कारण इतकेंच आहे:—९१. अर्जुना, मुळीं कर्मच करावयाचें नाहीं, ह्या कर्मांच्या त्यागाला संन्यास असें म्हणावें आणि कर्म करून त्या कर्मांचें जें केवळ फल टाकणें, त्याला त्याग म्हणावें, ९२. परंतु कोणत्या कर्मांचें फल टाकावयाचें व कोणतें कर्म मुळींच करावयाचें नाहीं, हें आम्ही स्पष्ट सांगतों, तूं लक्ष दे. ९३. तरी रानांत व डोंगरांत आपोआप भिकार ( बाईट ) झाडें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें चांगल्या बागा व भाताचीं पिकें सहज उगवत नाहींत. ९४. ज्याप्रमाणें न पेरतां गवत जिकडे तिकडे आपोआप उगवतें, त्याप्रमाणें साळी आपोआप उगवत नाहींत. साळीच्या पिकांस पेरणी व राब हीं लागतात. ९५. अथवा ज्याप्रमाणें शरीराचे अवयव स्वाभाविकच असतात; परंतु दागिने प्रयत्नानें मुद्दाम घडवून तयार करावे लागतात; नदीचा ओघ स्वाभाविकपणें झालेला असतो, परंतु विहीर मुद्दाम खणून तयार करावी लागते. ९६. त्याप्रमाणें नित्य ( स्नानसंध्यादिक ) कर्म व नैमित्तिक ( श्राद्ध करणें वगैरे ) कर्म, हीं कर्में स्वाभाविक रीतीनें ( वेदाज्ञे-प्रमाणें ) होत असतात. परंतु जें काम्यकर्म असतें, तें मात्र फलाची इच्छा न करतां होत नाहीं. ९७. ज्या काम्यकर्मांची उभारणी होण्याकरितां फलांच्या इच्छांचा समुदाय कारण असतो, व ज्या काम्यकर्मांत प्रसिद्ध अश्वमेधादिक यज्ञ आहेत ९८. ( आणखी ) ज्या काम्यकर्मांत बारव, आड, बगीचा वगैरे परोपकारार्थ तयार करितात व जमिनी, गांव वगैरे ब्राह्मणास इनाम करून देतात व मोठालें गांव वसवितात; याशिवाय अनेक प्रकारच्या व्रतांचे पसारे ९९. अशीं हीं सर्व इष्ट व पूर्त कर्में होत. त्यांचा उगम केवळ एक फलेच्छेवर अवलंबून असतो व त्या काम्यकर्मांचें आचरण आपलें फळ, ( कर्मकर्त्यांस ) अगदीं बांधून बळेंच भोगावयास लावतें. १००. अर्जुना, ज्याप्रमाणें देहरूप गांवास आल्यावर जन्ममरणाचे सोहळे भोगण्यास नाहीं म्हणतां येत नाहीं; १०१. अथवा ( ब्रह्मदेवानें ) कपाळीं जें लिहिलेलें असतें, तें अरे, जसें कांहीं केलें असतां पुसतां येत नाहीं; अथवा कितीही धुतलें तरी काळेपणा अथवा गोरेपणा नाहींसा होत नाहीं; १०२. ज्याप्रमाणें कर्ज फेडलें नाहीं, तर त्यापासून जशी सुटका होत नाहीं, त्याप्रमाणें फलेच्छेनें केलेलें कर्म, फल भोगविण्याकरितां धरणें घेऊन बसतें. १०३. अथवा अर्जुना, फलेच्छाही न करतां जर सहजच काम्यकर्म घडेल तर ज्याप्रमाणें लढाईच्या जागीं (समरांगणांत) गेलें असतां युद्ध न करतां विनाकारण बाण लागतो. १०४. गूळ आहे असें न समजून तो तोंडांत घातला असतां तो जसा आपल्या गोडीचा अनुभव करून देतो; अथवा राखोंडी असें समजून जरी अग्नीवर पाय दिला तरी तो जसा चटका देतोच; १०५. जाणून अथवा न जाणून केलेल्या कर्मांचें फल अवश्य भोगावयास लावणें, हें एक काम्यकर्मांमध्यें स्वाभाविक सामर्थ्य आहे. म्हणून काम्यकर्मांचें ठिकाणीं मुमुक्षूनें आवड ठेवूं नये. १०६. फार काय सांगावें ! अर्जुना, पोटांत गेलेलें विष जसें (वांतीचें औषध घेऊन) ओकून टाकावें, त्याप्रमाणें जें काम्यकर्म आहे, त्याचा (साधकांनीं) त्याग करावा. १०७ मग त्या त्यागाची या जगतामध्यें, अंतरंगी सर्व द्रष्टे लोक ( साधु ), ‘ संन्यास ’ या सदरांत गणना करतात. १०८. भय समूळ नाहींसें करणें म्हणजे भयाचें मूळ जें द्रव्य, त्याचा त्याग करणें; त्याप्रमाणें हें काम्यकर्म टाकणें म्हणजे फलेच्छेलाच मुळासकट उपटणें होय. १०९. आणि चंद्र व सूर्य यांचीं ग्रहणें येऊन, तीं पर्वण नांवाचीं श्राद्धें करण्याचे प्रसंग आणतात अथवा आईबापांच्या मरणानें निश्चित झालेले ( श्राद्धाचे ) जे दिवस, ११०. अथवा अतिथि जेव्हां येतो ( तेव्हां त्याचें जें आदरातिथ्य करावें लागतें तें ) अशा अशा वेळीं जें करावें लागतें, तें तें कर्म नैमित्तिक कर्म समजावें. १११. ज्याप्रमाणें वर्षाऋतु आला, कीं आकाशच ढगाच्या रूपानें क्षुब्ध होतें, किंवा वसंत ऋतु आला असतां वनाची शोभा दुप्पट वाढते अथवा तारुण्यावस्था जशी शरीराला सुशोभित करते; ११२. अथवा चंद्रकांतमणि जसा चंद्राच्या योगानें पाझरतो, अथवा सूर्यविकासिनी कमळें जशीं सूर्याच्या योगानें विकास पावतात; या वरील सर्व दृष्टांतांत जें मूळांत असतें, तेंच विस्ताराला पावतें दुसरें ( बाहेरून कोठून ) येत नाहीं. ११३. त्याप्रमाणें जें नित्यकर्म असतें त्यालाच कांहीं कारणाचे नियम प्राप्त झाले असतां तें ( नित्यकर्म ) वाढतें व त्या योगानें त्या नित्य कर्माला नैमित्तिक असें नांव येतें. ११४. आणि जें ( कर्म ) सकाळीं, दोन प्रहरीं व संध्याकाळीं आणि तें देखील दररोज करावें लागतें, ( यावरून तें अधिक आहे असें वाटेल; ) परंतु

प्रतिदिनीं । परी दृष्टि जैसी लोचनीं । अधिक नोहे ॥ १५ ॥ कां नापादितां गती । चरणीं जैसी आथी । नातरी ते दीप्ती । दीपबिंबीं ॥ १६ ॥ वासु नेदितां जैसें । चंदनीं सौगंध्य असे । अधिकाराचें तैसें । रूपचि जें ॥ १७ ॥ नित्य कर्म ऐसें जनीं । पार्था बोलिजे तें मानीं । एवं नित्य नैमित्तिक दोन्हीं । दाविलीं तुज ॥ १८ ॥ हेंचि नित्यनैमित्तिक । अनुष्ठेय आवश्यक । म्हणोनि म्हणों पाहती एक । वांझ ययातें ॥ १९ ॥ परी भोजनीं जैसें होये । तृप्ति लाभे भूक जाये । तैसें नित्यनैमित्तिकीं आहे । सर्वांगीं फळ ॥ १२० ॥ कीड आगिठां पडे । तरी मळ तुटे वानी चढे । या कर्मा तया सांगडें । फळ जाणावें ॥ २१ ॥ जे प्रत्यवाय तंव गळे । स्वाधिकार बहुवें उजळे । तेथ हातोफळिया मिळे । सद्गतीसी ॥ २२ ॥ येवढेवरी ढिसाळ । नित्यनैमित्तिकीं आहे फळ । परी तें त्यजिजे मूळ । नक्षत्रीं जैसें ॥२३॥ लता पिके आधवी । तंव चूत बांधे पालवी । मग हात न लावित माधवीं । सोडूनि घाली ॥ २४ ॥ तैसी नोलांडिता रेखा । चित्त दीजे नित्यनैमित्तिका । पाठीं फळा कीजे अशेखा । वांताचे वानी ॥ २५ ॥ यया कर्मफळत्यागातें । त्यागु म्हणती पैं जाणते । एवं संन्यास त्याग तूतें । परिसविले ॥ २६ ॥ हा संन्यासु जैं संभवे । तैं काम्य बाधूं न पावे । निषिद्ध तंव स्वभावें । निषेधें गेलें ॥ २७ ॥ आणि नित्यादिक जें असे । तें येणें फळत्यागें नासे । शिर लोटलिया जैसें । येर आंग ॥ २८ ॥ मग सस्य फळपाकांत । तैसें निमालिया कर्मजात । आत्मज्ञान गिंवसित । अपैसें ये ॥ २९ ॥ ऐसिया निगुती दोनी । त्याग संन्यास अनुष्ठानीं । पडले गा आत्मज्ञानीं । बांधती पाटु ॥१३०॥ नातरी हे निगुती चुके । मग त्यागु कीजे हाततुकें । तैं कांहीं न त्यजे अधिकें । गोवींचि पडे ॥ ३१ ॥ जें औषध व्याधी अनोळख । तें घेतालिया परतें विख । का अन्न न मानितां भूक । न मारी काय ॥ ३२ ॥ म्हणोनि त्याज्य जें नोहे । तेथ त्यागातें न सुवावें । त्याज्यालागीं नोहावें । लोभापर ॥ ३३ ॥ चुकलिया त्यागाचें वेझें । केला सर्वत्यागुही होय वोझें । नेदखति सर्वत्र जुंझें । वीतराग ते ॥ ३४ ॥

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः । यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

एकां फळाभिलाष न ठाके । ते कर्मातें म्हणती बंधकें । जैसें आपण नग्न भांडकें । जगातें म्हणे ॥ ३५ ॥ का जिव्हालंपट रोगिया । अन्नें दूषी धनंजया । आंगा न रुसे कुष्टिया । मासियां कोपे ॥ ३६ ॥ तैसें फळकाम दुर्बळ । म्हणती कर्मचि किडाळ । मग निर्णो देती केवळ । त्यजावें ऐसा ॥ ३७ ॥ एक म्हणती यागादिक । करावेंचि आवश्यक । जे यावांचूनि शोधक । आन नाही ॥ ३८ ॥ मनशुद्धीचां मार्गीं । जैं विजयी व्हावें वेगीं । तै कर्म सबळालागीं । आळसु

डोळ्यांतील दृष्टि जशी डोळ्याला केव्हांही अधिक होत नाहीं; ११५. अथवा गति ( बाहेरून कोठून ) संपादन न करतां जशी ती पायांत ( स्वाभाविक ) आहे, अथवा दिव्याच्या ज्योतीमध्यें प्रकाश जसा स्वाभाविक आहे; ११६. चंदनाला सुगंधाचीं पुटें न देतां त्याचे अंगीं सुवास जसा स्वाभाविक आहे; नित्यकर्मांच्या अधिकाराचें त्याचप्रमाणें स्वरूप आहे. ११७. अर्जुना, लोकांमध्यें नित्यकर्म असें जें म्हणतात तें हें समज. याप्रमाणें तुला नित्य व नैमित्तिक अशीं दोन्हीं कर्मांचीं स्वरूपें सांगितलीं. ११८. हेंच नित्यनैमित्तिक कर्म ( वर्णाश्रमधर्मानुरूप ) करणें भागच असल्यामुळें, कित्येक लोक तें निष्फळ आहे, असें प्रतिपादण्याचा प्रयत्न करितात. ११९. परंतु तृप्ति प्राप्त होणें व भूक जाणें हीं भोजनाच्या जशीं अंगभूत आहेत, त्याप्रमाणें नित्यनैमित्तिक कर्में, हीं सर्व अंगांनीं फलद्रूप आहेत. १२०. हिणकस सोनें अग्नींत पडलें असतां, त्यांतील मळ नाहींसा होतो आणि रंग (कस) वाढतो. त्यासारखें या नित्यनैमित्तिक कर्माचें फळ आहे असें समजावें. १२१. कारण कीं, असलेले दोष झडून जातात; (व) आपल्या अधिकाराला ( योग्यतेला ) चांगला उजळा चढतो. त्यामुळें तो (नित्यनैमित्तिक कर्म करणारा) तावडतोब सद्गतीला प्राप्त होतो. १२२. नित्यनैमित्तिक कर्मांच्या ठिकाणीं इतकें भारी फळ आहे. परंतु मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलाचा जसा त्याग करावयाचा असतो, तसें तें फळ टाकणें जरूर आहे. १२३. वसंतऋतु येतो, तेव्हां सबंध वेलीला फळें येतात व आंब्याच्या झाडास नवीन पालवी फुटते. परंतु वसंतऋतु त्यास नुसता हातही न लावतां जसा तें टाकून जातो, १२४. त्याप्रमाणें ( कर्मांची ) मर्यादा न सोडतां नित्यनैमित्तिक कर्मांकडे लक्ष द्यावें. नंतर त्या कर्माचे सर्व फलास ओकारीसारखें मानावें. १२५. अशा या कर्मफलत्यागाला जाणते पुरुष 'त्याग' असें म्हणतात. याप्रमाणें तुला 'त्याग' व 'संन्यास' ऐकविले आहेत. १२६. असा हा संन्यास जेव्हां हातून घडतो, तेव्हां काम्यकर्मांची पीडा होऊं शकत नाहीं व निषिद्ध कर्म तर शास्त्रानें निषिद्ध केल्यामुळें सहज टाकलें गेलें आहे, १२७. आणि नित्यनैमित्तिक जें कर्म आहे, तें या फलत्यागानें नाहींसें होतें. तें कसें तर, मस्तक तोडून टाकल्यानें बाकीच्या शरीराचा जसा सहजच नाश होतो; १२८. मग धान्यास पीक आल्यावर जसें तें वाळून जातें, त्याप्रमाणें कर्ममात्र नाहींसें झाल्यावर, त्या पुरुषाला आत्मज्ञान आपोआप शोधीत येतें. १२९. अशा रीतीनें हे दोन्ही, त्याग व संन्यास, आचरणांत आले असतां ते आत्मज्ञानाच्या ठिकाणीं पट्टाभिषेक करितात. १३०. अथवा ही कर्मत्यागाची हातवटी जर चुकली व मग अनुमानानेंच त्याग जर केला गेला, तर त्याग तर होत नाहीं, पण उलट असा त्याग करणारा मात्र अधिक गुंताड्यांत पडतो. १३१. रोगाची परीक्षा न होतां जें औषध घेतलें जातें, तें ( रोग्याला बरें न करतां ) उलटें विषासारखें मारक मात्र होतें. अथवा ( भुकेचे वेळीं ) जर अन्नाचा आदर केला नाहीं, तर भूक मारणार नाहीं काय? १३२. म्हणून त्याग करण्यास जें योग्य नाहीं, तेथें त्यागाचा उपयोग करूं नये व जें त्याग करण्यास योग्य आहे, त्याविषयीं इच्छा करूं नये. १३३. त्यागाचें वर्म चुकलें असतां जो त्याग केला जातो, त्या सर्व त्यागाचेंही ओझें होतें. ( म्हणजे त्या त्यागानेंच तो कर्मबंधांत पडतो. ) ( टाळावयाच्या गोष्टींस ) सर्व वेळीं तोंड देणारे वैराग्यशील पुरुष अशा गोष्टींकडे बघतही नाहींत. (म्हणजे निषिद्ध कर्मांकडे ते वळतहि नाहींत- ) १३४.

कर्म दोषवत् ( बंधक ) म्हणून त्याज्य होय असें कित्येक पंडित सांगतात. यज्ञ, दान, तप हें कर्म त्याज्य नाहीं, असे दुसरे कोणी सांगतात. ३.

कित्येकास फलाची इच्छा केल्यावांचून राहवत नाहीं. ते ( सांख्यशास्त्रकर्त्या कपिलाचे अनुयायी ) लोक कर्माला बंधकारक असें म्हणतात. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य आपण स्वतः नग्न असतां ( त्यास जग हंसलें म्हणजे ) तो जगाला भांडखोर म्हणतो. १३५. अथवा अर्जुना, जिव्हेच्या स्वाधीन असलेला रोगी अन्नाला नांवें ठेवतो अथवा रक्तपितीनें सडलेला मनुष्य आपल्या शरीरावर न रागावतां उलट माशांवर रागावतो; १३६. त्याप्रमाणें फलाची इच्छा टाकण्याविषयीं असमर्थ असलेले लोक, कर्मच वाईट आहे, असें म्हणतात व मग तें कर्मच टाकावें असा निर्णय देतात. १३७. कित्येक ( पूर्वमीमांसक ) असें म्हणतात कीं, यज्ञादिक कर्में अवश्य करावींतच. कारण यांवाचून शुद्धि घडवून आणणारें दुसरें ( साधन ) नाहीं. १३८. मनाची शुद्धता होण्याच्या मार्गांत आपण लवकरच विजयी व्हावें असें वाटत असेल तर, चित्तशुद्ध करण्याचे कामीं समर्थ असणारें जें कर्म, तें आचरण करण्याचे कामीं आळस

न कीजे ॥ ३९ ॥ भांगार आधी शोधावें । तरी आगी जेवीं नुबगावें । कां आरिसयालागीं सांचावें । अधिक रज ॥ १४० ॥ ना लुगडीं चोखें होआवीं । ऐसें आधी जरी जीवीं । तरी संवदणी न मानावी । मलिन जैसी ॥४१॥ तैसीं कर्मे क्लेशकारें । म्हणोनि न न्यावीं अव्हेरें । कां अन्न लाभे अरुवारें । रांधितिये उणें ॥ ४२ ॥ इहीं इहीं गा शब्दीं । एक कर्मीं बांधविती बुद्धी । ऐसा त्यागु विसंवादीं । पडोनि ठेला ॥ ४३ ॥

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम । त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

परी आतां विसंवादु तो फिटे । त्यागाचा निश्चयो भेटे । तैसें बोलों गोमटें । अवधान देईं ॥ ४४ ॥ तरी त्यागु एथें पांडवा । त्रिविधु पैं जाणावा । तया त्रिविधाही बरवा । विभागु सांगों ॥ ४५ ॥ त्यागाचे तिन्ही प्रकार । कीजती जरी गोचर । तरी तूं इत्यर्थाचें सार । इतुलें जाण ॥ ४६ ॥ मज सर्वज्ञाचिये बुद्धी । जें आलोट माने त्रिशुद्धी । तें निश्चयतत्त्व आधीं । अवधारीं पां ॥ ४७ ॥ तरी आपुलीये सोडवणे । जो मुमुक्षु जागों म्हणे । तया सर्वस्वें करणें । हेंचि एक ॥ ४८ ॥

यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् । यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

जियें यज्ञदानतपादिकें । इयें कर्मे जियें आवश्यकें । तियें न सांडावीं पांथिकें । पाउलें जैसीं ॥ ४९ ॥ हारतलें न देखिजे । तंव मागु न संडिजे । का न धातां न लोटिजे । भाणें जेवीं ॥ १५० ॥ नाव थडी न पवतां । न सांडिजे केळी न फळतां । का ठेविलें न दिसतां । दीपु जैसा ॥ ५१ ॥ तैसी आत्मज्ञानविखीं । जंव निश्चिती नाहीं निकी । तंव नोहावें यागादिकीं । उदासीना ॥ ५२ ॥ पै स्वाधिकारानुरूपें । तियें दानें याग तपें । अनुष्ठावींचि आक्षेपें । अधिकेंवर ॥ ५३ ॥ जें चालणें वेगावत जाये । तो वेगु बैसावयाचि होये । तैसा कर्मातिशयो आहे । नैष्कर्म्यालागीं ॥ ५४ ॥ अधिकें जंव जंव औषधी । सेवेचि मांडी बांधी । तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥ ५५ ॥ तैसीं कर्मे हातोपातीं । जैं कीजती यथानिगुती । तैं रजतमें झडती । झाडा देऊनी ॥ ५६ ॥ का पाठोवाटीं पुटें । भांगारा खारु देणें घटे । तैं कीड झडकरी तुटे । निर्व्याजु होय ॥ ५७ ॥ तैसें निष्ठा केलें कर्म । झाडी करूनि रजतम । सत्त्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ॥ ५८ ॥ म्हणोनियां धनंजया । सत्त्वशुद्धी गिंवासितया । तीर्थांचिया सावाया । आलीं कर्मे ॥ ५९ ॥ तीर्थें बाह्यमळ क्षाळे । कर्मे अभ्यंतर उजळे । एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंचि ॥ १६० ॥ तृषार्ता मरुदेशीं । झळे अमृतें वोळली जैसी । कीं अंधालागीं डोळ्यांसीं । सूर्यु आला ॥ ६१ ॥ बुडतया नयेचि धाविन्नली । पडतया पृथ्वीच कळवळिली । निमतया मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धी ॥ ६२ ॥ तैसें कर्मे कर्मबद्धता । मुमुक्षु सोडविले पंडुसुता ।

करूं नये. १३९. (हिणकस) सोनें जर शुद्ध करावयाचें असेल, तर अग्नीला कंटाळतां कामा नये. अथवा (लोखंडाच्या) आरशाला स्वच्छ करण्याकरितां पुष्कळ धूळ वगैरे सांठवून ठेवण्यात कंटाळतां कामा नये. १४०. अथवा वस्त्रें स्वच्छ असावींत असें जर मनापासून वाटत असेल, तर परटाच्या वस्त्रें धुण्याच्या पात्राला घाणेरडें मानून ज्याप्रमाणें चालणार नाहीं; १४१. त्याप्रमाणें कर्में त्रास देणारीं आहेत, म्हणून त्यांचा त्याग करतां कामा नये. स्वयंपाका ( च्या क्लेशा ) शिवाय सुंदर अन्नाचा लाभ होईल का? १४२. अशा अशा प्रकारच्या बोलण्यानें कित्येक लोक कर्मांच्या ठिकाणीं बुद्धीस जखडून टाकतात. ( म्हणजे कर्म करावें असाच बुद्धीचा निश्चय करतात ) अशा रीतीनें त्याग अमेळांत पडून राहिला. ( म्हणजे त्यागाविषयीं एक असा निश्चय कांहींच झाला नाहीं. ) १४३.

हे भरतोत्तमा, त्यांपैकीं त्यागासंबंधानें माझा निर्णय काय आहे, तें तूं ऐक. हे नरश्रेष्ठा, त्याग तीन प्रकारचा सांगितला आहे. ४.

तर आतां ज्या योगानें हा त्यागासंबंधाचा अमेळ मिटेल व त्यासंबंधाचा ठाम निर्णय लागेल, तशा प्रकारानें मी सांगतों. तूं चांगलें लक्ष देऊन ऐक. १४४. तरी अर्जुना, या कर्मत्यागाचे बाबतींत त्याग तीन प्रकारचा आहे असें समज. या तिन्ही प्रकारांचें चांगलें वेगवेगळें वर्णन करून सांगूं. १४५. त्यागाचे तीन प्रकार जरी पुढें स्पष्ट सांगावयाचे आहेत, तरी तूर्त त्यागाच्या तात्पर्यार्थाचें सार एवढें आहे असें समज. १४६. जें त्यागाच्या निर्णयाचें तत्त्व, मी जो सर्वज्ञ, त्या माझ्याही बुद्धीला खरोखर फारच पटतें, तें त्यागासंबंधींचें ठाम मत अगोदर ऐक. १४७. तर ( संसारबंधनापासून ) आपल्या सुटकेविषयीं सावध राहूं असें जो मुमुक्षु म्हणतो, त्याला सर्व प्रकारानें हेंच करण्यास योग्य आहे. १४८.

यज्ञ, दान, तप हें कर्म त्याज्य नाहीं, तें केलेंच पाहिजे. ( कारण ) यज्ञ, दान व तप हीं फलेच्छा टाकून तीं करणाऱ्यांना, चित्त शुद्ध करणारीं आहेत. ५.

तें हें कीं, यज्ञ, दान, तप वगैरे हीं जीं आवश्यक कर्में आहेत, तीं ( कर्में ) टाकूं नयेत. ते कसें तर, ज्याप्रमाणें प्रवास करणारानें पाऊलापुढें पाऊल टाकणें ( चालणें ) सोडूं नये. १४९. हरवलेली वस्तु जोंपर्यंत दिसली नाहीं, तोंपर्यंत तिचा माग टाकूं नये. अथवा तृप्ति झाली नाहीं, तोंपर्यंत वाढलेलें ताट ज्याप्रमाणें पलीकडे सारूं नये. १५०. ( नदीच्या ) किनाऱ्याला न पोहोंचतां जसा नावेचा त्याग करूं नये अथवा केळीला फळें येण्याच्या अगोदर जशी ती टाकूं नये, किंवा आपली ठेवलेली वस्तु दिसली नाहीं, तोंपर्यंत दिव्याचा जसा त्याग करूं नये; १५१. त्याप्रमाणें जोंपर्यंत आत्मज्ञानाविषयीं पक्का निश्चय झाला नाहीं, तोंपर्यंत यज्ञादिक कर्मांविषयीं उदासीन होऊं नये. १५२. ( तीं टाकूं तर नयेत, पण ) आपल्या अधिकाराप्रमाणेंच तीं यज्ञ, दान, तप वगैरे कर्में अधिक दक्षतेनें आचरावींतच. १५३. कारण कीं, चालणें जसें जलद होईल; तसा तो चालण्याचा वेग बसण्याकरितां ( विश्रांतीकरितांच ) कारण होतो, त्याप्रमाणें कर्माचरणाचा भर नैष्कर्म्य स्थितीला पोहोंचण्याकरितां असतो. १५४. ( एकादा रोगी मनुष्य ) औषध घेण्याचा जसजसा अधिक नियम करील, तसतसा त्या औषधाच्या सेवनामुळें रोग नाहींसा होईल. १५५. त्याप्रमाणें जेव्हां कर्में योग्य हातवटीनें जलद केलीं जातात तेव्हां ( चित्तावरचे ) रजोगुण व तमोगुण ( चंचलता व पापवासना ) साफ नाहींसे होतात. १५६. अथवा हिणकस सोन्याला वरचेवर क्षाराचीं पुटें देणें जेव्हां घडतें, तेव्हां त्यांतील हिणकस भाग लवकर नाहींसा होतो व तें सोनें निर्दोष होतें. १५७. त्याप्रमाणें आस्थापूर्वक केलेलें कर्म ( चित्तावरील ) रजतम नाहींसें करून अंतःकरणशुद्धीचें ठिकाण प्रत्यक्ष अनुभवाला आणतें. १५८. अर्जुना, म्हणून अंतःकरणशुद्धीची इच्छा करणाऱ्यास कर्में हीं तीर्थांच्या बरोबरीला येतात. १५९. तीर्थांच्या योगानें बाहेरील ( शरीरावरील ) मळ धुतला जातो व कर्मानें चित्तशुद्धी होते. याप्रमाणें सत्कर्में हींच पवित्र तीर्थें आहेत असें समज. १६०. तान्हेनें पीडलेल्या मनुष्यास मारवाडच्या निर्जल प्रदेशांत झऱ्याबरोबर अमृताची वृष्टि व्हावी किंवा आंधळ्याच्या सोयीकरितां त्याच्या डोळ्यांत प्रत्यक्ष सूर्यच येऊन प्रगट व्हावा. १६१. नदींत बुडणाऱ्याचें रक्षण करण्यास नदीच जशी धांवून यावी अथवा पडणाराविषयीं जसा पृथ्वीलच कळवळा यावा किंवा मरणाराला मृत्यूनेंच आयुष्य वाढवून द्यावें, १६२. अर्जुना, मारक जें विष, तें रसायनरूपानें दिलें असतां मरत असलेल्या मनुष्याला जसें वांचवितें,

जैसा रसरीति भरतां । राखिला विषें ॥ ६३ ॥ तैसीं एके हातवटिया । कर्में केली धनंजया । बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होती ॥ ६४ ॥

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च । कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

आतां तेचि हातवटी । तुज सांगों गोमटी । जया कर्मासि किरीटी । कर्मचि रुसे ॥ १६५ ॥ तरी महायागप्रमुखें । कर्में निफजतांही अचुकें । कर्तेपणाचें न ठाके । फुंजणें आंगीं ॥ ६६ ॥ जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहें । ऐसी श्लाघाचि नोहे । तोषु जीवीं ॥ ६७ ॥ का मुद्रा समर्थाचिया । जो एकटु झोंबे राया । तो मी जिणता ऐसिया । गर्वा नये ॥ ६८ ॥ जो कांसे लागोनि तरे । तया पोहती उर्मी नुरे । पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ॥ ६९ ॥ तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथा अवसरें । कृत्यजाताचीं निर्हरें । सारीजती ॥ १७० ॥ आणि केलां कर्मीं पांडवा । जो आथी फळाचा यावा । तया मोहरा हों नेदावा । मनोरथु ॥ ७१ ॥ आधींचि फळीं आस तुटिया । कर्में आरंभावीं धनंजया । परावें बाळ धाया । पाहिजे जैसें ॥ ७२ ॥ पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळु जैसा । तैसिया फळनिराशा । कीजती कर्में ॥ ७३ ॥ सांडूनि दुधाची टकळी । गोंवारी गांवधनें वेंटाळी । किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ ७४ ॥ ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी । आपुलिया आपण गांठी । लाहेचि तो ॥ ७५ ॥ म्हणोनि फळीं लागु । सांडोनी देहसंगु । कर्में करावीं हा चांगु । निरोपु माझा ॥ ७६ ॥ जो जीव बंधें शिणला । सुटके जाचे आपला । तेणें पुढतपुढतीं या बोला । आन न कीजे ॥ ७७ ॥

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते । मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

ना आंधाराचेनि रोखें । जैसीं डोळां रोंविजती नखें । तैसा कर्मद्वेषें जो अशेखें । कर्मेंचि सांडी ॥ ७८ ॥ तयाचें जें कर्मसांडणें । तें तामस पैं मी म्हणें । शिसासचां रागीं लावणें । शिसचि जैसें ॥ ७९ ॥ हां गा मार्गु दुवाड होये । तरी निस्तारितील पाये । कीं तेचि खांडणें आहे । मार्गापराधें ॥ १८० ॥ भुकेलियापुढें अन्न । हो का भलतैसें उन्ह । तरी बुद्धी न घेतां लंघन । भाणें पापरां हालयां ॥ ८१ ॥ तैसा कर्माचा बाधु कर्में । निस्तरिजे करितेनि वर्में । हें तामसु नेणे भ्रमें । माजविला ॥ ८२ ॥ कीं स्वभावें आलें विभागा । तें कर्मचि वोसंडी पैं गा । परी झणें आतळा त्यागा । तामसा तया ॥ ८३ ॥

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् । स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

अथवा स्वाधिकारु बुझे । आपलें विहितही सुजे । परी करितया उभजे । निबरपणा ॥ ८४ ॥ जे कर्मारंभाची कड । नावेक होय दुवाड । वाहतिये वेळे जड । शिदोरी जैसी ॥ ८५ ॥ निंब जिभे कडवटु । हिरडा पहिलें तुरटु । तैसा कर्मा ऐल शेवटु । खणुवाळा होय ॥ ८६ ॥

त्याप्रमाणें बांधणारीं जीं कर्में, त्या कर्मांनींच मुमुक्षूंना कर्मबंधनापासून सोडविलें ( जातें ), १६३. अर्जुना त्याप्रमाणें कर्में जरी सामान्यतः बंधच ( बांधणारीं ) असतात, तरी कर्म करण्याची जी एक हातवटी ठरलेली आहे, त्या हातवटीनें केलेलीं कर्में सोडविण्याला ( मुक्त करण्याला ) कारणीभूत होतात. १६४.

मात्र हीं कर्में आसक्ति ( कर्तृत्वमद ) आणि फलेच्छा सोडून केलीं पाहिजेत, असा हे पार्था माझा निश्चित व उत्तम निरोप आहे असें जाण. ६.

अर्जुना, ज्या हातवटीनें कर्में केलीं असतां कर्मच कर्माला नाहींसें करतें, ती चांगली हातवटी आतां तुला सांगूं. १६५. तर पंचमहायज्ञादि कर्में बिनचूक हातून घडलीं असतांही कर्तेपणाचा ताठा अंगामध्यें मुळींच राहात नाहीं. १६६. जो मोलानें तीर्थयात्रेला जातो, त्याला मी यात्रा करतों आहें, असा मोठेपणा नसतो ( म्हणून ) त्याच्या अंतःकरणांत आनंद होत नाहीं. १६७. अथवा ( आपल्या ) राजाच्या शिक्क्याच्या जोरावर जो एखादा कोणी नोकर ( दुसऱ्या ) राजाशीं लढतो, त्याच्या मनांत 'मी त्या राजास जिंकणारा' असा अभिमान येत नाहीं. १६८. जो दुसऱ्याच्या कासेला लागून तरून जातो, त्याला मी पोहणारा आहें असा गर्व रहात नाहीं. अथवा यजमानाच्या तर्फे दानधर्म करणारा उपाध्याय 'मी दान करणारा' असा गर्व मिरवीत नाहीं. १६९. त्याप्रमाणें कर्मांच्या अभिमानानें येणारें जें कर्तृत्व, तें आपल्याकडे न घेतां, योग्य काळीं सर्व कर्में येतील तशीं करून संपवावींत. १७०. आणि अर्जुना, केलेल्या कर्मांच्या ठिकाणीं जी फलाची प्राप्ति असते, त्या फलाच्या प्राप्तीकडे इच्छेला वळूं देऊं नये. १७१. अर्जुना, आरंभींच फळाची आशा सोडून कर्मांचा आरंभ करावा; तें कसें तर ज्याप्रमाणें दुसऱ्याच्या मुलाकडे दाई ज्या ( निर्हेतुक ) दृष्टीनें पाहाते त्याप्रमाणें. १७२. पिंपळाच्या आशेनें जसें पिंपळाला पाणी घातलें जात नाहीं, त्याप्रमाणें फलाची आशा टाकून कर्में करावींत. १७३. ज्याप्रमाणें गुराखी दुधाचा ध्यास सोडून गांवांतील गाई सांभाळतो. फार काय सांगावें ! कर्मफलाचे ठिकाणीं तसें करावें ( कर्मांच्या फलाच्या ठिकाणीं लोभ न ठेवतां कर्में करावींत. ) १७४. अशा युक्तीनें जें कर्म घडतें, त्या कर्माचें आचरण करणारास आपल्या आत्मस्वरूपाचा लाभ होतो. १७५. म्हणून फलाचा संबंध ( इच्छा ) सोडून व देहाचा अहंकार टाकून कर्में करावींत, हा माझा ( सर्वांना ) चांगला निरोप आहे. १७६. जो जीव संसारबंधानें दुःख पावला आहे व जो आपल्या मुक्ततेविषयीं खटपट करीत आहे, त्यानें या सांगितलेल्या गोष्टीशिवाय दुसरें ( कांहीं ) करूं नये; असें वारंवार सांगणें आहे. १७७.

नित्यकर्माचा संन्यास करणें योग्य नाहीं, मोहानें केलेल्या त्याच्या त्यागास तामस त्याग म्हणतात. ७.

अथवा अंधारांत दिसत नाहीं म्हणून त्या रागानें डोळ्यांत जशीं नखें खुपसावींत, त्याप्रमाणें कर्मांच्या द्वेषानें जो सर्व कर्में टाकतो, १७८. त्याचें जें हें कर्म टाकण्याचें कृत्य, तें तामस आहे असें मी म्हणतों. अर्धशिशीच्या रागानें जसें डोकेंच तोडावें तसें हें करणें आहे. १७९. अरे अर्जुना, रस्ता अवघड असला तर तो रस्ता पायचालून संपवितील; तें सोडून रस्त्याच्या अपराधामुळे ते पायच तोडावेत काय ? १८०. भुकेलेल्या मनुष्याच्या पुढें आलेलें अन्न वाटेल तितकें जरी ऊन असलें, तरी बुद्धीनें लंघनाचा विचार न करतां, जसें तें ताट त्यानें लाथेनें उडवावें. १८१. त्याप्रमाणें भ्रमानें मस्त झालेला तामसी मनुष्य, कर्मांचें बंधन, कर्म करण्याच्या हातवटीनें कर्में करून कर्मांनेंच नाहींसें करावें, हें जाणत नाहीं. १८२. तर उलट वर्णाश्रमधर्मांप्रमाणें वांट्याला आलेलें जें कर्म, तें कर्मच टाकतो. परंतु अशा त्या तामस त्यागाचा तूं चुकूनही विटाळ होऊं देऊं नकोस. १८३.

कर्म दुःखरूप आहे म्हणून त्याचा शरीरत्रासाच्या भीतीनें जो त्याग केला जातो, तो ( राजस त्याग होय. ) त्या राजस त्याग करणाऱ्यास त्यागाचें फळ मिळत नाहीं. ८.

अथवा आश्रमधर्मांप्रमाणें आपला धर्म काय आहे, हें तो जाणतो व आपल्यास सांगितलेलें कर्तव्य सुद्धां त्याला उमजतें, परंतु करण्याच्या त्रासाला कंटाळतो. १८४. कारण कीं, कर्मांच्या आरंभाची बाजू प्रथम थोडा वेळ कष्टदायक असते. शिदोरी वाहात असतांना ( प्रथम ) जशी जड वाटते; १८५. प्रथम ( कडू ) लिंब जिभेला ( जसा ) कडू लागतो व हिरडा पहिल्यांदा ( जसा ) तुरट लागतो; त्याप्रमाणें कर्मांचा अलिकडला शेवट ( आरंभाची बाजू ) त्रासदायक असतो. १८६.

गाई दुवाड शिंग । शेंवतीये अडव आंग । भोजनसुख महाग । रांधितां ठाईं ॥८७॥ तैसें पुढतपुढती कर्म । आरंभींच अति विषम । म्हणोनि तो तें श्रम । करितां मानी ॥ ८८ ॥ एऱ्हवीं विहितत्वें मांडी । परी घालितां असुरवाडीं । येथ पोळला ऐसा सांडी । आदरिलेंही ॥ ८९ ॥ म्हणे वस्तु देहासारिखी । आली बहुवें भाग्यविशेखीं । मा जाचूं कां कर्मादिकीं । पापिया जैसा ॥ १९० ॥ केले कर्मीं जें द्यावें । तें क्षणें मज होआवें । आजि भोगूं ना कां बरवे । हातींचे भोग ॥ ९१ ॥ ऐसा शरीराचिया क्लेशा- । भेणें कर्में वीरेशा । सांडी तो परियेसा । राजसु त्यागु ॥ ९२ ॥ एऱ्हवीं तेथही कर्म सांडे । परी त्यागफळ न जोडे । जैसें उतलें आगीं पडे । तें होमा नलगे ॥ ९३ ॥ का बुडोनि प्राण गेले । ते अर्धोदकीं निमाले । हें म्हणों नये जाहलें । दुर्मरणाचि ॥ ९४ ॥ तैसें देहाचेनि लोभें । जेणें कर्मा पाणी सुभे । तेणें साच न लभे । त्यागाचें फळ ॥ ९५ ॥ किंबहुना आपुलें । जैं ज्ञान होय उदया आलें । तैं नक्षत्रातें पाहलें । गिळी जैसें ॥ ९६ ॥ तेशा सकारण क्रिया । हारपती धनंजया । तो कर्मत्यागु ये जया । मोक्षफळासी ॥ ९७ ॥ तें मोक्षफळ अज्ञाना । त्यागिया नाहीं अर्जुना । म्हणोनि तो त्यागु न माना । राजसु तो ॥ ९८ ॥ तरी कोणे पां एथ त्यागें । तें मोक्षफळ घर रिघे । हेंही आइक प्रसंगें । बोलिजेल ॥ ९९ ॥

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन । संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

तरी स्वाधिकाराचेनि नांवें । जें वांटिया आलें स्वभावें । तें आचरे विधिगौरवें । शृंगारोनि ॥२००॥ परी हें मी करितु असें । ऐसा आठवु त्यजी मानसें । तैसेंचि पाणी दे आशे । फळाचिये ॥ १ ॥ पैं अवज्ञा आणि कामना । मातेचां ठायीं अर्जुना । केलिया दोनी पतना । हेतु होती ॥ २ ॥ तरी दोनीं यें त्यजावीं । मग माताचि ते भजावी । वांचूनि मुखालागीं वाळावी । गायचि सगळी ॥ ३ ॥ आवडातिये फळीं । असारें साली आंठोळी । त्यासाठीं अवगळी । फळातें कोण्ही ॥ ४ ॥ तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफळाचा आस्वादु । या दोहींचें नांव बंधु । कर्माचा कीं ॥ ५ ॥ तरी या दोहींचां विखीं । जैसा बापु नातळे लेंकी । तैसा हों न शके दुःखी । विहिता क्रिया ॥ ६ ॥ हा तो त्यागतरुवरू । जो गा मोक्षफळें ये थोरु । सात्त्विक ऐसा डगरु । यासीचि जगीं ॥ ७ ॥ जाळूनि बीज जैसें । झाडा कीजे निर्वंशें । फळ त्यागूनि कर्म तैसें । त्यजिलें जेणें ॥ ८ ॥ तया लागतखेंवो परिसीं । धातूची गंधिकाळिक जैसी । जाती रजतमें तैसीं । तुटलीं दोन्ही ॥ ९ ॥ मग सत्त्वें तेणें चोखाळें । उघडती आत्मबोधाचे डोळे । तेथ मृगांबु सांजवेळे ।

गाय स्वरूपतः चांगली असते, परंतु शिंगाचा ( मारकेपणाचा ) दोष तींत आहेच. शेवंती सुवासिक फुलाच्या दृष्टीनें उत्तम, परंतु तिलाही काट्यांच्या फांचांची अडचण आहेच. भोजनाचें सुख चांगलें खरें; परंतु स्वयंपाकाच्या दगदगीमुळें तेंही कष्टसाध्यच होतें, १८७. त्याप्रमाणें कर्म आरंभालाच अतिशय त्रासदायक असतें. म्हणून तेंच तेंच वारंवार करतांना तो श्रम मानतो. १८८. वास्तविक पाहातां शास्त्रानें कर्म करावयास सांगितलें आहे, म्हणून तो कर्म करावयास आरंभ करतो; परंतु त्या कर्मानें त्यास क्लेशांत घातलें, तर जसा अग्नीनें पोळलेला मनुष्य अग्नीला टाकून देतो, त्याप्रमाणें आरंभिलेलेंही कर्म तो मध्येंच टाकतो. १८९. तो म्हणतो, देहासारखी वस्तु फार विशेष भाग्यानें प्राप्त झाली आहे, तर मग पाप्यासारखा कर्मादिकांचा शीण कां करूं ? १९०. केलेलें कर्म कांहीं फल देईल, परंतु तसलें तें उधार मला नको. सांप्रत हातांत असलेले ( उपलब्ध ) उत्तम भोग भोगावेत, हेंच बरें नव्हे काय ? १९१. वीरश्रेष्ठा अर्जुना, अशा रीतीनें तो शरीरास कष्ट होतील या भयानें कर्म टाकतो; हें पहा, तो राजस त्याग होय. १९२. वास्तविक विचार करून पाहिलें, तर राजस त्यागांतही कर्मत्याग होतो; परंतु त्यामुळें खऱ्या त्यागाचें फल प्राप्त होत नाहीं. ज्याप्रमाणें उतू गेलेलें ( तूप अथवा दूध ) अग्नींत पडलें असतां तें होमाला लागलें असें होत नाहीं. १९३. अथवा पाण्यांत बुडून ज्यांचे प्राण गेले, ते अधोंदकांत समाधिस्थ झाले, असें म्हणूं नये. तर त्यांचा तो मृत्यु, वाईट प्रकरणांतच जमा होय. १९४. त्याप्रमाणें देहावर लोभ ठेवल्यानें, त्याचे हातून तीं कष्टकारक कर्में होत नाहींत, तो त्यावर पाणी सोडतो. ( तो कर्म टाकतो. ) परंतु या त्याच्या त्यागानें त्यास वास्तविक खऱ्या त्यागाचें फळ मिळत नाहीं. १९५. फार काय सांगावें ? आत्मज्ञानाचा जेव्हां उदय होतो, तेव्हां ज्याप्रमाणें प्रातःकाळ झाला कीं, तो नक्षत्रांना नाहींसें करतो; १९६. त्याप्रमाणें अर्जुना, सर्व क्रिया आपल्या कारणांसुद्धां ( अज्ञानासह ) नाहींशा होतात. त्या कर्मत्यागाला जे मोक्षफळ येतें, १९७. तें मोक्षफळ अज्ञानी त्याग करणाऱ्याला ( राजस त्याग्याला ) मिळत नाहीं; म्हणून तो राजस त्याग होय. तो ( खरा ) त्याग ( आहे ) असें मानूं नका. १९८. तर कोणत्या त्यागानें तें मोक्ष फळ घरांत घुसतें ( आपण होऊन मिळतें ) हेंही प्रसंगानुसार येथें सांगण्यांत येईल. ऐक. १९९.

हे अर्जुना, कर्तव्य म्हणून, जें नित्यकर्म आसक्ति ( कर्तृत्वमद ) सोडून आणि फलाकांक्षा सोडून केलें जातें, त्याला सात्त्विक त्याग म्हणतात ९.

तरी आपल्या अधिकाराप्रमाणें ( वर्णाश्रमधर्मानुसार ) जें ( कर्म ) स्वाभाविक रीतीनें आपल्या वांट्याला आलें आहे, तें ( कर्म ), शास्त्राचा मान ठेवणें हाच कोणी अलंकार, तो त्या कर्मावर चढवून ( शास्त्राला मान देऊन ) यथासांग आचरतो. २००. परंतु हें कर्म मी करतों असें कर्तृत्वाचें स्मरणही मनांतून टाकतो व त्याचप्रमाणें फलेच्छेवरही तो पाणी सोडतो. २०१. अर्जुना, आईच्या सांगण्याची हेळसांड केली अगर तिची ( विषयोपभोगासाठीं ) इच्छा केली तर त्या दोन्ही गोष्टी मुलाच्या अधःपाताला कारणीभूत होतात. २०२. तरी या दोन्ही गोष्टी ( आईसंबंधानें ) टाकाव्यात आणि मग ती केवळ आई म्हणून तिची सेवा करावी. एऱ्हवीं गाईचें एक मुख अपवित्र म्हणून सगळी गायच टाकावी कीं काय ? २०३. आपल्या आवडत्या ( उदाहरणार्थ आंब्याच्या वगैरे ) फळांत साल व आंठोळी ( बी ) हीं दोन असार आहेत, तेव्हां या दोन असार गोष्टींकरितां सर्व फळाचा कोणी त्याग करील काय ? २०४. त्याप्रमाणें कर्तेपणाचा अहंकार आणि कर्मफलाची लालसा, या दोहींचेंच नांव कर्माचा बंध आहे. २०५. तर ज्याप्रमाणें बाप लेकीच्या संबंधानें विषयवासना टाकून तिचें संगोपन केवळ कर्तव्य म्हणून करण्यास दुःखी होत नाहीं, त्याप्रमाणें तो कर्तृत्वमद व फलास्वाद टाकून केवळ कर्तव्य म्हणून विहितकर्में करतो व म्हणून दुःखी होत नाहीं. २०६. ज्याला मोक्षरूपी मोठें फल येतें, तो हा त्यागरूपी श्रेष्ठ वृक्ष आहे व अर्जुना सात्त्विक त्याग अशी जगांत याचीच प्रसिद्धि आहे. २०७. जसें बीजच जाळून झाडाला निर्वंश करावें, त्याप्रमाणें ज्यानें फल टाकून कर्म टाकलें आहे. २०८. त्या परिसाला लोखंड लागतांक्षणींच जशी त्याची गंज व काळेपणा हीं जातात, त्याप्रमाणें चित्तावरील रजोगुण व तमोगुण हे दोन्ही या सात्त्विक कर्मत्यागानें नाहींसे होतात. २०९. मग त्या शुद्ध सत्त्वगुणानें आत्मज्ञानाचे डोळे उघडतात. तेव्हां मृगजलाची अवस्था संध्याकाळीं जशी होते ( तें

होय जैसें ॥ २१० ॥ तैसा बुद्धयादिकांपुढां । असतु विश्वाभासु हा येवढा । तो न देखे कवणीकडां । आकाश जैसें ॥ ११ ॥

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते । त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

म्हणोनि प्राचीनाचेनि बळे । आलीं कृत्यें कुशलाकुशलें । तियें व्योमाआंगीं आभाळें । जिरालीं जैसीं ॥ १२ ॥ तैसीं तयाचिये दिठी । कर्में चोखाळलीं किरीटी । म्हणोनि सुखदुःखीं उठी । पडे ना तो ॥ १३ ॥ तेणें शुभकर्म जाणावें । मग तें हर्षे करावें । का अशुभालागीं होआवें । द्वेषिया ना ॥ १४ ॥ तरी इयाविषयींचा कांहीं । तया एकुही संदेहो नाहीं । जैसा स्वप्नाचां का ठायीं । जागिन्नलिया ॥ १५ ॥ म्हणऊनि कर्म आणि कर्ता । या द्वैतभावाची वार्ता । नेणे तो पांडुसुता । सात्त्विक त्यागु ॥ १६ ॥ ऐसेनि कर्में पार्था । त्यजिलीं त्यजिती सर्वथा । अधिकें बांधती अन्यथा । सांडिलीं तरी ॥ १७ ॥

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः । यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

आणि हां गा सव्यसाची । मूर्तिचि होउनी देहाची । खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ १८ ॥ मृत्तिकेचा वीटु । घेऊनि काय करील घटु । केउता ताथु पटु । सांडील तो ॥ १९ ॥ तेवींचि वन्हित्व आंगीं । आणि उबे उबगणें आगी । तो दीपु प्रभेलागीं । द्वेषु करील काई ॥ २२० ॥ हिंगु त्रासिला घाणी । तरी कैचें सुगंधत्व आणी । द्रवपण सांडूनि पाणी । केवीं राहे तें ॥ २१ ॥ तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जंव असे । तंव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी ॥ २२ ॥ आपण लाविजे टिळा । म्हणोनि पुसों ये वेळोवेळा । मा घाली फेडी निडळा । कां करूं ये गा ॥ २३ ॥ तैसें विहित स्वयें आदरिलें । म्हणोनि त्यजूं ये त्यजिलें । परी कर्मचि देह आतलें । तें कां सांडे ॥ २४ ॥ जें श्वासोच्छ्वासवरी । होत निजेलियाही वरी । कांहीं न करणेंचि परी । होती जयाची ॥ २५ ॥ या शरीराचेनि मिसकें । कर्मचि लागलें तें असिकें । जिता मेलया न ठाके । इया रीती ॥ २६ ॥ यया कर्मातें सांडिती परी । एकीचि ते अवधारीं । जे करितां न जाइजे हारी । फळाशेचिये ॥ २७ ॥ कर्मफळ ईश्वरीं अर्पे । तत्प्रसादें बोधु उदीपे । तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्याळशंका ॥ २८ ॥ तेणें आत्मबोधें तैसें । अविद्येसीं कर्म नाशे । पार्था त्यजिजे जैं ऐसें । तैं त्यजिलें होय ॥ २९ ॥ म्हणोनि इयापरी जगीं । कर्में करितां मानूं त्यागी । येर मूर्च्छने नांव रोगीं । विसांवा जैसा ॥ २३० ॥ तैसा कर्मीं शिणे एकीं । कीं विसांवों पाहे आणिकीं । दांडियाचे घाय बुकी । धाडणें जैसें ॥ ३१ ॥ परी हें असो पुढती । तोचि त्यागी त्रिजगतीं । जेणें फळत्यागें निष्कृती । नेलें कर्म ॥ ३२ ॥

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् । भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

कोठेंच दिसेनासें होतें; ) २१०. जसें आकाश एवढें मोठें चोहींकडे असूनही तें कोणीकडेच दिसत नाहीं, त्याप्रमाणें त्याच्या बुद्ध्यादिकांपुढें जो एवढा मोठा विश्वाभास आहे, तो त्याला कोणीकडेच दिसत नाहीं. २११.

बुद्धिमान्, संशय दूर झालेला आणि सात्त्विक त्यागानें युक्त असलेला त्यागी, अशुभ कर्माचा द्वेष करीत नाहीं व शुभ कर्माचे ठिकाणी आसक्त होत नाहीं. १०.

म्हणून प्रारब्धकर्माच्या बळानें बरींवाईट कर्मे प्राप्त झालीं असतां, तीं आकाशाचे अंगीं जसे ढग जिरून जातात; २१२. त्याप्रमाणें अर्जुना, त्याच्या दृष्टीनें कर्में ब्रह्मरूप झालेलीं असतात; म्हणून तो सुखदुःखाच्या योगानें हर्षविषादाला पावत नाहीं. २१३. त्यानें शुभ कर्म जाणावें, ( व ) मग तें आनंदानें करावें अथवा ( अशुभ कर्म जाणावें व मग त्या ) अशुभ कर्मांचा द्वेष-करावा ना ? २१४. तर जागें झाल्यावर स्वप्नांतील सुखदुःखें हीं दोन्ही जशीं मिथ्याच असतात, त्याप्रमाणें अशा या शुभाशुभ कर्मांविषयीं त्यांच्या ठिकाणीं कोणतीच शंका ( भ्रांति ) नसते. २१५. म्हणून अर्जुना, ज्या त्यागांत कर्म व कर्ता या द्वैतभावाची वार्तादेखील कानावर येत नाहीं, त्याला सात्त्विक त्याग असें म्हणतात २१६. अर्जुना, अशा रीतीनें कर्में टाकलीं असतां, तीं पूर्णपणें टाकलीं जातात व त्याहून अन्य रीतीनें टाकलीं असतां, तीं अधिक बांधतात. २१७.

पूर्णपणें त्याग करणें देहधाऱ्यास शक्य नाहीं. परंतु जो कर्मफळाचा त्याग करतो त्याला त्यागी असें म्हणतात. ११.

आणि अरे अर्जुना, देहाची मूर्तीच होऊन जे कर्म करण्याला कंटाळा करतात, ते खेडवळ ( अज्ञानी ) होत. २१८. मातीचा कंटाळा करून मडकें काय करील? वस्त्र तंतूचा त्याग कोठंचा करील ? २१९. त्याचप्रमाणें अग्नीच्या आंगीं अग्निपणा असून तो उष्णतेला कसा कंटाळेल ? ( अथवा ) तो दिवा प्रकाशाचा द्वेष करूं शकेल काय ? २२०. हिंग जरी घाणीला कंटाळला तरी सुवासिकपणा कोठून आणील ? पाणी ओलेपणा सोडून कसें राहील ? २२१. त्याप्रमाणें ( हा विहितकर्मांचा त्याग करणारा ) जोपर्यंत शरीराच्या आकारानें व्यवहार करीत आहे, तोंपर्यंत कर्मत्यागाचें वेड तरी काय कामाचें? २२२. आपण आपल्या कपाळाला गंध लावलेलें असतें म्हणून तें ( वेडेंवाकडें असलें तर ) वारंवार पुसतां येतें; परंतु ( कपाळच जर मूळचें वांकडें असेल तर तें वांकडें ) कपाळ काढून दुसरें नीट बसवितां येईल काय ? २२३. त्याप्रमाणें शास्त्रानें सांगितलेलें कर्म आपण स्वीकारलेलें असतें म्हणून तें टाकलें तर टाकतां येतें; परंतु शरीराच्या रूपानें कर्मच अवतरलें आहे, तेव्हां तें ( कर्म ) टाकतां येईल काय ? २२४. जें ( स्वाभाविक कर्म ) श्वासोच्छ्वासाच्या रूपानें निजल्यावर देखील होत असतें व ज्या स्वाभाविक कर्मांचा होण्याचा प्रकार कांहीं न करण्यांत सारखा चालूच असतो; २२५. अशा रीतीनें या शरीराच्या निमित्तानें संपूर्ण कर्मच ( जीवाच्या मागें ) लागलें आहे. ( तें इतकें कीं, ) जिवंत असतां अथवा मेल्यावरही बंद पडत नाहीं. २२६. या विहित कर्माला टाकण्याचा या जगांत एकच प्रकार आहे. ऐक. तो हा कीं, विहित कर्म करीत असतांना त्याच्या फलापेक्षेच्या तावांत जाऊं नये. २२७. कर्मांचें फळ ईश्वराच्या ठिकाणीं अर्पण झालें असतां, त्याच्या प्रसादानें आत्मज्ञान प्रगट होतें व त्या वेळीं ज्याप्रमाणें दोरीच्या ज्ञानानें सर्पाचा भ्रम नाहींसा होतो; २२८. त्याप्रमाणें त्या आत्मज्ञानानें अज्ञानासह कर्मांचा नाश होतो. अर्जुना, असा जेव्हां ( कर्मांचा ) त्याग केला जातो, तेव्हांच त्याग केला असें होतें. २२९. म्हणून जगामध्यें जो या प्रकारानें कर्म करणारा असेल, त्याला आम्ही त्यागी मानूं. याहून इतर त्याग म्हणजे, रोग्याला मूर्च्छा आली असतां रोगी विसांवा घेतो आहे, असें म्हणण्यासारखें होय. २३०. त्याप्रमाणें एका कर्माच्या ठिकाणीं दुःख झालें असतां ( तो ) दुसऱ्या कर्मांत विसांवा घेण्यास पाहातो; हें त्याचें करणें म्हणजे जसा दांडक्याचा मार बुक्क्यांच्या मारावर घालवावा तसें आहे. २३१. परंतु आतां हें जास्त बोलणें राहूं दे. ज्यानें कर्मांच्या फलाचा त्याग करून कर्मच नैष्कर्म्यस्थितीला नेलें, तोच त्रैलोक्यांत ( खराखरा ) त्यागी होय. २३२.

जे त्यागी नसतात, त्यांना मरण पावल्यावर अनिष्ट ( नरकादि ), इष्ट ( स्वर्गादि ), अथवा मिश्र ( मनुष्यलोकादि ), असें तीन प्रकारचें कर्मांचें फल मिळतें. पण जे ( ज्ञानप्रधान ) संन्यासी आहेत, त्यांना तें कर्मफल कधींच बाधूं शकत नाहीं. १२.

एऱ्हवीं तरी धनंजया । त्रिविधा कर्मफळा गा यया । समर्थ ते कीं भोगावया । जे न सांडितीचि आशा ॥ ३३ ॥ आपणाचि विऊनि दुहिता । कीं न मम म्हणे पिता । तो सुटे कीं प्रतिग्राहिता । जांवाई शिरके ॥ ३४ ॥ विषाचे आगरही वाहती । ते विकितां सुखें लाभें जिती । येर निमाले जे घेती । वेंचोनि मोलें ॥३५॥ तैसें कर्ता कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू । एथ न शके आवरूं । दोघातेंही कर्म ॥३६॥ वाटे पिकलिया रुखाचें । फळ अपेक्षी तयाचें । तेवीं साधारण कर्माचें । फळ घे तया ॥ ३७ ॥ परी करूनि फळ नेघे । तो जगाचां कामीं न रिघे । जे त्रिविध जग अवघें । कर्मफळ हें ॥ ३८ ॥ देव मनुष्य स्थावर । यया नांव जगडंबर । तरि हे तंव त्रिप्रकार । कर्मफळ पैं ॥ ३९ ॥ तेंचि एक गा अनिष्ट । एक तें केवळ इष्ट । आणि एक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसें ॥ २४० ॥ परी विषयमंता बुद्धी । आंगीं ध्रुनि अविधी । प्रवर्तती जे निषिद्धीं । कुव्यापारीं ॥४१॥ तेथ कृमि कीट लोष्ट । हे देह लाहती निकृष्ट । तया नाम तें अनिष्ट । कर्मफळ ॥४२॥ का स्वधर्मा मानु देतां । स्वाधिकारु पुढां सूतां । सुकृत कीजे पुसतां । आम्नायातें ॥ ४३ ॥ तें इंद्रादिक देवांचीं । देहें लाहिजती सव्यसाची । तया कर्मफळा इष्टाची । प्रसिद्धि गा ॥ ४४ ॥ आणि गोड आंबट मिळे । तेथ रसांतर फरसाळें । उठी दोहीं वेगळें । दोहीं जिणतें ॥४५॥ रेचकुचि योगवशें । होय स्तंभावयादोषें । तेवीं सत्यासत्य समरसें । असत्य जिणिजे ॥४६॥ म्हणौनि समभागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानाचें उभें । तेणें मनुष्यत्व लाभे । तें मिश्र फळ ॥४७॥ ऐसें त्रिविध यया भागीं । कर्मफळ मांडलेंसे जगीं । हें न संडी तयांसी भोगीं । जे स्रदले आशा ॥४८॥ एथ जिव्हेचा हातु फांटे । तंव जेवितां वाटे गोमटें । परि परिणामीं शेवटें । अवश्य मरण ॥ ४९ ॥ संवचोरमैत्री चांग । जंव न पविजे तें दांग । सामान्या भली आंग । न शिवे तंव ॥ २५० ॥ तैसीं कर्मे करितां शरीरीं । लाहती महत्त्वाची फरारी । पाठीं निधनीं एकसरी । पावती फळें ॥ ५१ ॥ समर्थु आणि ऋणिया । मागों आला बाइणिया । न लोटे तैसा प्राणिया । पडे तो भोगु ॥ ५२ ॥ मग कणिसौनि कणु झडे । तो विरूढला कणिसा चढे । पुढती भूमी पडे । पुढती उठी ॥ ५३ ॥ तैसें भोगीं जें फळ होय । तें फळांतरें बीत जाय । चालतां पावो पाय । जिणिजे जैसा ॥ ५४ ॥ उताराचिये सांगडी । ठाके ते ऐलीच थडी । तेवीं न मुकिजती वोढी । भोग्याचिये ॥ ५५ ॥ पैं साध्यसाधनप्रकारें । फळभोगु तो गा पसरे । एवं गोंविले संसारें । अत्यागी ते ॥ ५६ ॥ एरी जाईचियां फुलां फांकणें ।

अर्जुना, वास्तविक विचार करून पाहिलें तर जे पुरुष कर्मफलाची आशा सोडीतच नाहींत, तेच या तीन प्रकारच्या कर्मांच्या फलाला भोगावयास पात्र होतात. २३३. आपणच मुलीला जन्म देऊन (कन्यादानाचे वेळीं ही मुलगी ) आतां माझ्या मालकीची नाहीं, असें बाप म्हणतो ( कन्यादानाचे वेळीं असें म्हणून ) तो ( मुलीला जन्म देणारा बाप तिच्या मायापाशांतून ) सुटतो व दान घेणारा जांवई ( आपली म्हणून तिला पत्करल्यामुळें मायापाशांत ) अडकला जातो. २३४. जे विषांच्या शेतांचीही लागवड करतात, ते त्यांतील माल विकून त्या नफ्यावर सुखानें जगतात आणि दुसरे जे पैसे खर्चून ( ते विष, अफू, वगैरे ) विकत घेतात ते मरतात. २३५. त्याप्रमाणें कर्तृत्वअहंकारानें कोणी कर्म करो अथवा कर्तृत्वअहंकार व फलाशा हीं दोन्हीं सोडून कर्म करो, तथापि या दोघांसही नुसतें केवळ कर्मच बद्ध करूं शकत नाहीं. २३६. रस्त्यावरील पिकलेल्या ( आम्र ) वृक्षाच्या फळाची जो इच्छा करील त्याचें तें फळ असतें, ( म्हणजे त्यास तें फळ बंधनकारक होतें. ) त्याप्रमाणें सामान्य कर्मांचें फळ जो घेईल त्याला मिळतें, ( म्हणजे त्या कर्मांच्या फळाची जो इच्छा करील त्यास तें बंधनकारक होतें. ) २३७. परंतु ( तीन प्रकारचें कर्म ) करून जो फलाशा ठेवीत नाहीं, तो जगाच्या धडामोडींत सांपडत नाहीं; कारण कीं, त्रिविध जग हें सर्व कर्मांचें फल आहे. २३८. देव, मनुष्य व स्थावर या सर्वांना जगडंबर असें म्हणतात आणि हे तीन प्रकार तर तीन मूर्तिमंत कर्मफलच आहे. २३९. तेंच कर्मफल एक अनिष्ट आहे. एक तें केवळ इष्ट आहे आणि एक इष्टानिष्ट असें मिश्र आहे. असें तीन प्रकारचें कर्मफल आहे. २४०. परंतु जे विषयासक्त बुद्धीनें स्वैराचार अंगवळणी पाडून निषिद्ध अशा वाईट कर्मांत प्रवृत्त होतात, २४१. तेव्हां ( त्या पुरुषास ) जंत, किडे व मातीचें ढेकूळ असे हे वाईट देह प्राप्त होतात; त्यास अनिष्ट कर्मांचें फळ म्हणावें. २४२. अथवा स्वधर्माला मान देऊन आपल्या अधिकारानुरूप वेदांना विचारून जें पुण्यकर्म केलें जातें. २४३. हे अर्जुना, तेव्हां इंद्रादि देवांचे देह प्राप्त होतात. त्या कर्मफलाला इष्ट कर्मफल अशी प्रसिद्धी आहे. २४४. आणि गोड व आंबट यांचें जेथें मिश्रण होतें, तेथें आंबट व गोड या दोन्ही रसांहून वेगळा, पण या दोहींला स्वादानें मागें सारणारा, असा भिन्न



रुचीचा तिसराच रस उत्पन्न होतो. २४५. जसें योगमार्गांत योगाभ्यासानें रेचक ( वाहणारा वायूच ) थांबविला कीं, तोच त्याहून उलट स्वभावाच्या कुंभकास ( वायूच्या निश्चलतेस ) कारणीभूत होतो; तसेंच सत्य व असत्य यांची सरमिसळ झाली, म्हणजे असत्यास जिंकून तिसरेंच अनिर्वचनीय निर्माण होतें. २४६. म्हणून पुण्यकारक व पापकारक कर्में सारख्या प्रमाणांत मिळून, जें आचरण होतें, त्या योगानें मनुष्यपणा प्राप्त होतो; तें मिश्र फल होय. २४७. याप्रमाणें या तीन प्रकारच्या रीतीनें जगामध्यें कर्मफळ मांडलेलें आहे आणि जे भोगाच्या आशेंत सांपडलेले आहेत, त्यास हें कर्मफल सोडीत नाहीं. २४८. जिभेचे स्वाद घेणें जसजसें वाढत जातें, तसतसें जेवतांना गोड वाटतें. परंतु शेवटीं त्याचा परिणाम म्हणजे ( अजीर्ण होऊन ) मरणाची बिनचुक प्राप्ति हा होय. २४९. जेथपर्यंत अरण्य लागलें नाहीं, तेथपर्यंत संभावित चोरांची मैत्री चांगली व जोंपर्यंत वेश्येचा अंगस्पर्श झाला नाहीं, तोंपर्यंत वेश्या चांगली. २५०. त्याप्रमाणें शरीरानें कर्में करीत असतांना मोठेपणाची भरभराट होते, नंतर मरणाचे वेळीं त्यास केलेल्या कर्मांचीं फलें एकदम प्राप्त होतात. २५१. समर्थ असून सावकार आहे आणि तो मुदतीला पैसे मागावयास आला, तर तो जसा पैसे घेतल्याशिवाय परत जात नाहीं; त्याप्रमाणें प्राण्यास कर्मफलाचा भोग भोगल्याशिवाय सुटका नाहीं. २५२. मग कणसांतून बीं पडतें. त्या बीजाला अंकुर फुटल्यावर त्याला कणीस येतें. पुन्हा त्या कणसांतील दाणे जमिनीवर पडतात; पुन्हा त्या दाण्यापासून कणसें उत्पन्न होतात. २५३. त्याप्रमाणें मागील कर्मफल भोगीत असतांना जीं कर्में होतात, तीं आणखीं दुसऱ्या कर्मफलांना उत्पन्न करीत राहातात. चालूं लागलें कीं, एक पाय जसा दुसऱ्या पायाला जिंकून पुढें जात असतो; २५४. उताराची नाव ज्या कांठाला लागून थांबेल, तो कांठ तिला अलीकडलाच कांठ होय, ( कारण तिला पुनः दुसऱ्या तीराकडे जावयाचें असतें; ) त्याप्रमाणें कर्मफलाच्या भोगाच्या प्रयासापासून केव्हांच सुटका होत नाहीं. २५५. अगा अर्जुना, कर्मफल व त्यास उत्पन्न करणारें कर्म, या परंपरेच्या रूपानें कर्मफलाच्या भोगाची वाढच होत रहाते. याप्रमाणें कर्मफलाची आशा न सोडलेल्यास जन्ममरणाचें चक्र आपल्या फेऱ्यांत गुरफटून घेतें. २५६. एऱ्हवीं जाईच्या फुलांचें उमलणें म्हणजेच जसें त्या फुलाचें सुकणें होय, त्याप्रमाणें ज्यांनीं

त्याचि नाम जैसें सुकणें । तैसें कर्ममिषें न करणें । केलें जिहीं ॥ ५७ ॥ बींजाचि वरोसि बेंचे । तैं वाढती कुळवाडी खांचे । तेवीं फळत्यागें कर्माचें । सारिलें काम ॥ ५८ ॥ ते सत्त्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपामृततुषारें । सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥ ५९ ॥ तेव्हां जगदाभासमिषें । स्फुरे तें त्रिविध फळ नाशे । येथ भोक्ता भोग्य आपैसें । निमालें हें ॥ २६० ॥ घडे ज्ञानप्रधानु हा ऐसा । संन्यासु जयां वीरेशा । ते फळभोगसोसा । मुकले गा ॥ ६१ ॥ आणि येणें कीर संन्यासें । जैं आत्मरूपीं दिठी पैसे । तैं कर्म एक ऐसें । देखणें आहे ॥ ६२ ॥ पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती । कीं पाहालेया राती । आंधारें उरे ॥ ६३ ॥ जैं रूपचि नाहीं उभें । तैं साउली काह्याची शोभे । आरसेनवीण बिंबे । वदन कें पां ॥ ६४ ॥ फिटलिया निद्रेचा ठावो । कैंचा स्वप्नासि प्रस्तावो । मग तें साच का वावो । कोण म्हणे ॥ ६५ ॥ तैसें गा संन्यासें येणें । मूळ अविद्येसीचि नाहीं जिणें । मा तियेचें कार्य कोणें । घेपे दीजे ॥ ६६ ॥ म्हणोनि संन्यासीं ये पाहीं । कर्माची गोठी कीजेल काई । परी अविद्या आपुलां देहीं । आहे जैं कां ॥ ६७ ॥ जैं कर्तेपणाचेनि थांवें । आत्मा शुभाशुभीं धांवे । दृष्टि भेदाचिये राणिवे । रचलीसे जैं ॥ ६८ ॥ तैं तरी गा सुवर्मा । विजावळी आत्मया कर्मा । अपाडें जैसी पश्चिमा । पूर्वेसि कां ॥ ६९ ॥ नातरी आकाशा का आभाळा । सूर्या आणि मृगजळा । विजावळी भूतळा । वायूसि जैसी ॥ २७० ॥ पांघरोनि नईचें उदक । असे नईचिमाजीं खडक । परी जाणसी का वेगळिक । कोडीचि ते ॥ ७१ ॥ हो कां उदकाजवळी । परी सीनानीचि ते बाबुळी । काय संगास्तव काजळी । दीपु म्हणों ये ॥ ७२ ॥ जरी चंद्रीं जाला कलंकु । तरी चंद्रेंसीं नव्हे एकु । आहे दिठी डोळ्यां विवेकु । अपाडु जैसा ॥ ७३ ॥ नाना वाटा वाटेजातया । वोघा वोघींवाहतया । आरिसया आरिसांपाहतया । अपाडु जेतुला ॥ ७४ ॥ पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनिसीं कर्म सिनें । परी घेवविजे अज्ञानें । तें कीर ऐसें ॥ ७५ ॥ विकासें रवीतें उपजवी । दुती अलीकरवीं भोगवी । ते सरोवरीं कां बरवी । अब्जिनी जैसी ॥ ७६ ॥ पुढतपुढती आत्मक्रिया । अन्यकारणकाचि तेंशिया । करूं पांचांही तयां । कारणां रूप ॥ ७७ ॥

पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे । सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥

आणि पांचही कारणें तियें । तूंही जाणसील विपायें । जे शास्त्रें उभऊनी बाहे । बोलती तयांतें ॥ ७८ ॥ वेदरायाचिया राजधानीं । सांख्यवेदांताचां भुवनीं । निरूपणाचां निशाणध्वनीं । गर्जती तियें ॥ ७९ ॥ जे सर्वकर्मसिद्धीलागीं । इयेंचि मुद्दलें हो जगीं । येथ न सुवावा अभंगीं । आत्मराजु ॥ २८० ॥ या बोलाची डांगुरटी । तियें प्रसिद्धी आलीं किरीटी । म्हणोनि तुझां हन कर्णपुटीं । वसों कां जें ॥ ८१ ॥ आणि मुखांतरीं

फलाशा टाकून कर्में करून ( फलभोगाच्या दृष्टीनें ) कर्में केलीं नाहींत, असें केलें; २५७. बियाचें धान्य जेव्हां पोटगीस खर्च होतें, तेव्हां वाढणारा शेतकीचा उदीम नाश पावतो; त्याप्रमाणें कर्मफलाचा त्याग करून ज्यांनीं कर्माचें काम ( फलाची वाढ ) संपवून टाकलें आहे; २५८. तेव्हां त्यांना अंतःकरणशुद्धतेचें सहाय्य मिळून, त्यावर श्रीगुरूंच्या कृपेचा अमृतमय वर्षाव झाला म्हणजे, भरभराटीस आलेल्या बोधाच्या जोरावर, भेदामुळें उत्पन्न होणारी दीनता पारच हटते. २५९. जगताची प्रतीति होण्याच्या निमित्तानें जे तीन प्रकारच्या कर्मांचें फळ स्फुरतें, तें त्या वेळीं नाहींसें होतें. त्या वेळीं स्वाभाविकपणेंच भोक्ता व भोग्य हे सर्व प्रकार पार तेथें मावळलेले असतात. २६०. हे वीरश्रेष्ठा अर्जुना, ज्यांना हा ज्ञानप्रधान संन्यास ( कर्मत्याग ) साधला, ते कर्मफलभोगाच्या ( जन्ममरणाच्या ) त्रासापासून मुक्त झाले. २६१. आणि या कर्मत्यागानें खरोखर आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जेव्हां दृष्टि ( वृत्ति ) पोहोंचते, तेव्हां कर्म हें एक असें आहे, अशी दृष्टि शिल्लक राहते काय ? ( म्हणजे तेव्हां कर्म म्हणून कांहीं एक निराळें आहे असें कोठें दिसतें ? ) २६२. भिंत पडून गेल्यावर भिंतीवर काढलेल्या चित्रांची केवळ माती होते. अथवा रात्र उजाडल्यावर काळोख राहतो काय ? २६३, जेव्हां शरीराचा आकारच उभा नसतो, तेव्हां सावली कशाची शोभेल ? आरशावांचून मुख प्रतिबिंबीत कोठें होईल बरें ? २६४. झोंपेचा ठावठिकाणा नाहींसा झाल्यावर स्वप्नाचा प्रसंग कोठचा ? मग तें स्वप्न खरें अथवा खोटें आहे असें कोण म्हणेल ? २६५. त्याप्रमाणें या ज्ञानप्रधान संन्यासानें जर अज्ञानालाच जगणें शक्य होत नाहीं, तर मग त्या अज्ञानाचें कार्य जें कर्म, तें कोणी करावें किंवा सोडावें ? २६६. म्हणून असें पाहा कीं, या ज्ञानप्रधान संन्यासामध्यें कर्माची गोष्ट केली जाईल काय ? परंतु जेव्हां अज्ञान आपल्या देहामध्यें असतें, २६७. जेव्हां कर्तेपणाच्या जोरावर आत्मा बऱ्याबाईट कर्मांत प्रवृत्त होतो व जेव्हां वृत्ति द्वैताच्या राज्यावर स्थित झालेली असते; २६८. मर्मज्ञ अर्जुना, त्या वेळेलाही, पूर्व दिशा आणि पश्चिम दिशा यांमध्यें जसा अतिशय वेगळेपणा असतो, तसाच आत्मा आणि कर्म यांमध्यें अतिशय वेगळेपणा असतो. २६९. अथवा आकाश आणि ढग, सूर्य आणि मृगजळ, पृथ्वी आणि वायु, यांत जसा वेगळेपणा आहे; २७०. नदीचें पाणी अंगावर घेऊन खडक नदीमध्येंच असतो; परंतु नदी व खडक यांमध्यें अतिशय फरक असतो, हें तुला ठाऊक आहे. २७१. पाण्याच्या अगदीं जवळ गोंडाळ असेना का ? परंतु गोंडाळ हें पाण्याहून केव्हांही वेगळेंच आहे. दिव्याच्या संगतीला असल्यामुळें ( त्या दिव्यांतील ) काजळीला दिवा म्हणतां येईल काय ? २७२. चंद्राच्या ठिकाणीं जरी कलंक असलेला दिसतो, तरी तो चंद्राशीं एकरूप नाहीं व दृष्टि आणि डोळा ( चर्मगोलक ) यामध्यें जसा अतिशय वेगळेपणा आहे; २७३. अथवा वाट आणि वाटेनें जाणारा, नदीचें पात्र आणि पात्रांत वाहणारें पाणी, आरसा व आरशांत पहाणारा, यांच्यामध्यें जितका विलक्षण फरक आहे; २७४. अर्जुना, तितक्या मानानें आत्म्याहून कर्म वेगळें आहे. परंतु अज्ञानामुळें आत्म्याच्या ठिकाणीं कर्म भासतें, तें खरोखर असें आहे. २७५. कमलिनी आपल्या प्रफुल्लित होण्यानें रवीचा उदय झाल्याचें सुचवितें व परागांतील सुगंध भुंग्यांकडून भोगवितें. कमलिनीकडून त्या क्रिया झालेल्या दिसतात परंतु ती तर आपल्याकडून कांहीं न करतां सरोवरांत स्तब्धच असते. तें सर्व सूर्यच करतो आणि त्याचें तें कर्तृत्व मात्र कमलिनीच्या ठिकाणीं दिसून येतें. २७६. पुनः पुनः तुला असें सांगतों कीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं दिसणाऱ्या क्रिया, या वस्तुतः दुसऱ्या कारणांकडूनच घडून येतात. तीं कारणें पांच आहेत. त्यांचें स्वरूप तुला स्पष्ट करून सांगतों. २७७.

हे महाबाहो, सर्व कर्मांच्या सिद्धीला आवश्यक अशीं हीं पांच कारणें सांख्यसिद्धान्तामध्यें सांगितलेलीं आहेत, तीं तूं माझ्यापासून ऐक. १३.

आणि कर्मांचीं तीं पांच कारणें तूंही कदाचित् जाणत असशील. कारण कीं, शास्त्रें हात वर करून (उघडपणानें) तीं कारणें सांगतात. २७८. वेदरूपी राजाच्या राजधानींत असलेल्या वेदांतसांख्यरूपी मंदिरांत व्याख्यानरूप नौबदीच्या आवाजानें तीं ( कारणें ) गाजत आहेत. २७९. ते असें कीं, जगामध्यें सर्व कर्मांची सिद्धि होण्याकरितां हीं पांच कारणें कारण आहेत. या कारणांच्या ठिकाणीं आत्मराजास अयोग्य रीतीनें घालूं नये. २८०. अर्जुना, अशा वर्णनाच्या दौंडीनें तीं कारणें प्रसिद्धीला आलीं, म्हणून तीं कारणें तुझ्या कानावर असूं देत. ( तूं ऐकून ठेव. ) २८१. आणि मी ज्ञानरत्न तुझ्या स्वाधीन

आइकिजे । तैसें कायसें हें ओझें । मी चिद्रत्न तुझें । असतां हातीं ॥ ८२ ॥ आरिसा पुढां मांडलेया । कां लोकांचियां डोळयां । मानु द्यावा पहावया । आपुलें निकें ॥ ८३ ॥ भक्त जैसेनि जेथ पाहे । तेथ तें तेंचि होत जाये । तो मी तुझें जाहालों आहें । खेळणें आजि ॥ ८४ ॥ ऐसें प्रीतीचेनि वेगें । देवो बोलतां से नेघे । तंव आनंदामाजीं आंगें । विरतसे येरु ॥ ८५ ॥ चांदिणियाचा पडिभरु । जालयां सोमकांताचा डोंगरु । विघरोनि सरोवरु । हों पाहे जैसा ॥ ८६ ॥ तैसें सुख आणि अनुभूती । या भावांचीं मोडूनि भिंतीं । आतलें अर्जुनाकृती । सुखचि जेथ ॥ ८७ ॥ तेथ समर्थु म्हणोनि देवा । अवकाशु जाहला आठवा । मग बुडतयाचा धांवा । जीवें केला ॥ ८८ ॥ अर्जुनायेसणें धेंडें । प्रज्ञापसरेंसीं बुडे । आलें भरतें एवढें । तें काढूनि पुढती ॥ ८९ ॥ देवो म्हणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा । तंव श्वासूनि येरें माथा । तुकियेला ॥ २९० ॥ म्हणे जाणसी दातारा । मी तुजशीं व्यक्तिशेजारा । उबगला आर्दी एकाहारा । येवों पाहें ॥ ९१ ॥ तयाही हा ऐसा । लोभें देतसां जरी लालसा । तरी कां जी घालीतसां । आड आड जीवा ॥ ९२ ॥ तेथ श्रीकृष्ण म्हणती निकें । अद्यापि नाहीं मा ठाउकें । वेडया चंद्रा आणि चंद्रिकें । न मिळणें आहे ॥ ९३ ॥ आणि हाही बोलोनि भावो । तुज दाऊं आम्हीं भिवों । जे रुसतां बांधे थांवो । तें प्रेम गा हें ॥ ९४ ॥ एथ एकमेकांचिये खुणे । विसंवादु तंवचि जिणें । म्हणोनि असो हें बोलणें । इयेविषयींचें ॥ ९५ ॥ मग कैशी कैशी ते आतां । बोलत होतों पंडुसुता । सर्व कर्मा भिन्नता । आत्मेनिसीं ॥ ९६ ॥ तंव अर्जुन म्हणे देवें । माझिये मनींचेंचि स्वभावें । प्रस्ताविलें बरवें । प्रमेय तें जी ॥ ९७ ॥ जें सकळ कर्मांचें बीज । कारणपंचक तुज । सांगेन ऐसी पैज । घेतली कां ॥ ९८ ॥ आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा लागु नाहीं । हें पुढारलासि तें देईं । लाहाणें माझें ॥ ९९ ॥ यया बोला विश्वेशें । म्हणितलें तोषें बहुवसे । इयेविषयीं धरणें बैसे । ऐसें कें जोडे ॥ ३०० ॥ तरी अर्जुना निरूपिजेल । तें कीर भाषेआंतुल । परी मेचु ये होइजेल । ऋणिया तुज ॥१॥ तंव अर्जुन म्हणे देवो । काई विसरले मागील भावो । इये गोठीं कीं राखत आहों । मीतूंपण जी ॥ २ ॥ एथ श्रीकृष्ण म्हणती हो का । आतां अवधानाचा पसरु निका । करूनियां आइका । पुढारलों तें ॥ ३ ॥ तरी साचाचि गा धनुर्धरा । सर्व कर्मांचा उभारा । होये बाहिरबाहिरा । करणीं पांचें ॥ ४ ॥ आणि पंचकारणदळवाडें । जिहीं कर्मकारु मांडे । ते हेतु तंव उघडे । पांच आथी ॥५॥ येर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादान । ना अंगें करी संवाहन । कार्यसिद्धीचें ॥ ६ ॥ तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजती कर्में ऐसीं । राती दिवो आकाशीं । जियापरी ॥ ७ ॥ तोय तेज धूमु । ययां वायूसीं संगमु । जालिया होय अभ्रागमु । व्योम तें नेणे ॥ ८ ॥ नाना काष्ठीं नाव मिळे । ते नावाडेनि चळे । चालविजे अनिळें । उदक तें साक्षी ॥ ९ ॥ का कवणे एकें

असतांना दुसऱ्याकडून ऐकावें असें संकट तरी कशाला ? २८२. आरसा पुढें मांडला असतांना आपलें सौंदर्य पाहण्याकरितां लोकांच्या डोळ्यांना कशाकरितां किंमत द्यावी ? २८३. भक्त ज्या भावनेनें जेथें पाहील, त्या भावनेप्रमाणें मी तेथें तसा होत जातों. असा जो मी तो आज तुझ्या पूर्ण स्वाधीन झालों आहे. २८४. प्रेमाच्या भरानें असें बोलत असतां देव भानावर राहिले नाहींत व इकडे त्याच वेळीं आनंदामुळें अर्जुनाचेंही देहभान नाहींसें होऊं लागलें. २८५. चंद्रकांत मण्याच्या डोंगरावर चांदण्याचा भर पडला असतां, तो पाझरून जसें सरोवर व्हावयास लागतें; २८६. त्याप्रमाणें सुख आणि सुखाचा अनुभव, अशा द्वैतभावाची भिंत मोडून अर्जुनाच्या आकारानें जेव्हां केवळ सुखच झालें, २८७. तेव्हां श्रीकृष्ण सर्व शक्तिमान म्हणून ते देहभानावर आले व मग आनंदांत विरणाऱ्या अर्जुनाची मनापासून कींव केली. (त्यास देहस्मृतीवर आणण्याची खटपट चालविली.) २८८. अर्जुनाएवढें मोठें प्रस्थ, पण तो आपल्या विस्तृत ज्ञानासह बुडत होता, एवढें आनंदाला भरतें आलें होतें. त्यांतून त्यास बाहेर काढून नंतर २८९. देव म्हणतात, अरे अर्जुना, तूं चांगला शुद्धीवर ये. तेव्हां अर्जुनानें श्वास सोडून मस्तक डोलविलें. (देहभानावर आला) २९०. अर्जुन म्हणतो, हे प्रभो, तूं जाणतोस कीं, तुझ्याहून वेगळा देह धारण करून, तुझी (तुझ्या शरीराची) संगति करण्याला कंटाळलेला मी, मूळ ऐक्याला येऊं पाहात होतों. २९१. त्या माझीही लोभानें जर तुम्ही उत्कट इच्छा पुरवीत आहांत, तर मग माझा सुखाचा योग होण्यास मध्येंच (जीवदशा ही) आडकाठी कां घालीत आहांत ? २९२. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, वाहवा ! (तुझें व आमचें मूळचें ऐक्य आहे हें तुला) अजून माहीत नाहीं काय ? वेड्या, चंद्राचा व चांदण्याचा कधीं वियोग आहे काय ? २९३. आणि हा एकतेचा अभिप्राय तुला बोलून दाखविण्याला आम्हाला भय वाटतें. कारण आवडीचे कोणी रुसल्यानें जसें प्रेम अधिक बळकट होतें, तसें हें तुमच्या व आमच्या मधील प्रेम आहे. २९४. अशा प्रसंगीं जोंपर्यंत एकमेकांचा आत्मस्वरूपाशीं वेगळेपणा आहे, तोंपर्यंतच तुझें आमचें जगणें शक्य आहे. (म्हणजे मी देव, तुला उपदेश करणारा व तूं भक्त, उपदेश ऐकणारा, अशा द्वैतभावानें असणें शक्य आहे.) म्हणून याविषयींचें (परमार्थतः ऐक्याविषयींचें) बोलणें राहूं दे. २९५. अर्जुना, मग आत्म्याहून सर्व कर्म वेगळें आहे, हें आतां आपण कसकसे बोलत होतों ! २९६. त्या वेळीं अर्जुन म्हणाला देवांनीं माझ्या मनांत असलेला जो चांगला विषय, तोच सांगण्यास स्वाभाविकपणें सुरवात केली आहे. २९७. सर्व कर्मांचें बीज (कारण) जीं पांच कारणें, 'तीं तुला मी सांगेन' अशी आपण प्रतिज्ञा केली; २९८. आणि कर्मांच्या कारणाशीं आत्म्याचा कांहीं एक संबंध नाहीं, हें जें तूं बोललास, तो माझा आवडीचा विषय मला सांग. २९९. या अर्जुनाच्या बोलण्यावर विश्वाचे मालक जे श्रीकृष्ण भगवान्, ते मोठ्या समाधानानें म्हणाले, या गोष्टीविषयीं हट्ट धरून बसेल, असा (माणूस) कोठें मिळणार आहे ? ३००. तर अर्जुना, तुला तें खरोखर सोप्या भाषेत सांगण्यांत येईल. परंतु या प्रेमाचे तुला कर्जदार व्हावें लागेल. ३०१. तेव्हां अर्जुन म्हणाला, देवा, आपण मागें (२९३ ओंवींत) बोललांत तें सर्व विसरलांत वाटतें ? अहो महाराज, या गोष्टींत अजून आपण मीतूंपणा हा ठेवलातच कीं ! ३०२. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, असें आहे काय ? तर जें मी सांगेन म्हणून म्हणालों, तें आतां अवधानाचा चांगला विस्तार करून ऐका. ३०३. तर अर्जुना, खरोखरच सर्व कर्मांची उभारणी या पांच कारणांनीं (आत्मस्वरूपाच्या) बाहेरच्या बाहेर होते. ३०४. आणि ज्या पांच कारणांच्या समुदायाकडून कर्मास सुरवात होते, तींच कारणें हेतु असल्यामुळें, ते हेतूही उघड उघड पांच आहेत. ३०५. या कारणांहून वेगळा जो आत्मा आहे, तो अलिप्त असून कर्माच्या उत्पत्तीचें निमित्तकारण अथवा उपादानकारण तो होत नाहीं. अथवा तो स्वतः कर्म पार पाडण्याचें कामीं साहाय्य करीत नाहीं. ३०६. ज्याप्रमाणें रात्र आणि दिवस ह्यांचा संबंध नसूनही, तीं आकाशांत उत्पन्न होतात, त्याप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं शुभ अथवा अशुभ प्रकारचीं कर्में (संबंधाशिवाय) उत्पन्न होतात. ३०७. पाणी, उष्णता व वाफ यांचा वायूशीं संबंध झाला असतां आकाशांत ढगांची उत्पत्ति होते, पण आकाशाला तर त्या ढगांच्या उत्पत्तीची खबरही नसते. ३०८. अनेक लांकडांनीं नाव तयार होते व ती नाव नावाड्याकडून पुढें ढकलली जाते आणि वाऱ्याकडून चालविली जाते. (हा सर्व व्यवहार पाण्यांत होतो, पण) पाणी (त्या सर्व व्यवहाराला) केवळ आधारभूत असतें. ३०९. अथवा पृथ्वी एखाद्या चिखलाच्या गोळ्याच्या

पिंडें । वेंचितां अवतरे भांडें । मग भवंडीजे दंडें । भ्रमें चक्र ॥ ३१० ॥ आणि कर्तृत्व कुलालाचें । तेथ काय तें पृथ्वीयेचें । आधारावांचूनि वेंचे । विचारीं पां ॥ ११ ॥ हेंही असो लोकांचिया । राहाटी होतां आघविया । कोण काम सवितया । आंगा आलें ॥ १२ ॥ तैसें पांचहेतुमिळणीं । पांचींचि इहीं कारणीं । कीजे कर्मलतांचि लावणी । आत्मा सिना ॥ १३ ॥ आतां तेंचि वेगळालीं । पांचही विवंचूं गा भलीं । तुकोनि घेतलीं । मोतियें जैसीं ॥ १४ ॥

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् । विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवाऽत्र पंचमम् ॥ १४ ॥

तैसीं यथालक्षणें । आइक पां कर्मकारणें । तरी देह हें मी म्हणें । पहिलें एथ ॥ १५ ॥ ययातें अधिष्ठान ऐसें । म्हणिजे तें याचि उद्देशें । जे स्वभोग्येंसीं वसे । भोक्ता येथ ॥ १६ ॥ इंद्रियांचां दाहीं हातीं । जाचोनियां दिवोराती । सुखदुःखें प्रकृती । जोडीजती जियें ॥ १७ ॥ तियें भोगावया पुरुखा । आन ठावोचि नाहीं देखा । म्हणोनि अधिष्ठानभाखा । बोलिजे देह ॥ १८ ॥ हें चोविसांही तत्त्वांचें । कुटुंब घर वस्तीचें । तुटे बंधमोक्षाचें । गुंतलें एथ ॥ १९ ॥ किंबहुना अवस्थात्रया । अधिष्ठान धनंजया । म्हणोनि देहा यया । हेंचि नाम ॥ ३२० ॥ आणि कर्ता तें दुजें । कर्माचें कारण जाणिजे । प्रतिबिंब म्हणिजे । चैतन्याचें जें ॥ २१ ॥ आकाशचि वर्षे नीर । तें तळवटीं बांधे डाबर । मग बिंबोनि तदाकार । होय जेवीं ॥ २२ ॥ कां निद्राभरें बहुवें । राया आपणपें ठाउवें नव्हे । मग स्वप्नीचिये सामावे । रंकपणीं ॥ २३ ॥ तैसें आपुलेनि विसरें । चैतन्यचि देहाकारें । आभासोनि आविष्करे । देहपणें जें ॥२४॥ जया विचाराचां देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी । जेणें भाप केली देहेंसी । आघवाविषयीं ॥ २५ ॥ प्रकृति करी कर्में । तीं म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु ॥ २६ ॥ मग पातेयांचां केशीं । एकीच उठी दिठी जैसी । मोकळी चवरी ऐसी । चिरीव गमे ॥२७॥ कां घरा आंतुल एकु । दीपाचा तो अवलोकु । गवाक्षभेदें अनेकु । आवडे जेवीं ॥ २८ ॥ तेवीं बुद्धीचें जाणणें । श्रोत्रादिभेदें येणें । बाहेरी इंद्रियपणें । फांके जें कां ॥ २९ ॥ तें पृथग्विध करण । कर्माचें इया कारण । तिसरें गा जाण । नृपनंदना ॥ ३३० ॥ आणि पूर्वपश्चिमवाहणीं । निघालिया वोघाचिया मिळणी । होय नदी नद पाणी । एकचि जेवीं ॥ ३१ ॥ कां एकुचि पुरुषु जैसा । अनुसरत नवां रसां । नवविधु ऐसा । आवडों लागे ॥ ३२ ॥ तैसी क्रियाशक्ति पवनीं । असे जे अनपायिनी । ते पडिली नानास्थानी । नाना होय ॥ ३३ ॥ जैं वाचे करी येणें । तैं तेंचि होय बोलणें । हाता आली तरी घेणें । देणें होय ॥ ३४ ॥ अगा चरणाचां ठायीं । तरी गति तेचि पाहीं । अधोद्वारीं दोहीं । क्षरणें तेचि ॥ ३५ ॥ कंदौनि हृदयवरी । प्रणवाची उजरी । करितां तेचि शरीरीं । प्राणु म्हणिपे ॥३६॥ मग उर्ध्वींचिया रिगिनिगा । पुढती तेचि शक्ति पैं गा । उदानु ऐसिया लिंगा । पात्र जाहली ॥ ३७ ॥ अधोरंध्राचेनि वाहें । अपानु हें नाम लाहे । व्यापकपणें होये । व्यानु तेचि॥ ३८ ॥

रूपानें खर्ची पडून, ज्या चाकावर तो गोळा टाकला, त्या चाकाला दंडानें फिरविलें असतां तें चाक फिरत रहातें, व त्यांतून मडकें तयार होतें. ३१०. आणि त्या चिखलाच्या गोळ्याचें मडकें बनविण्याचें काम कुंभार करतो. आतां या चिखलाच्या गोळ्याचें मडकें बनविण्यांत एक आधाराशिवाय पृथ्वीचें काय खर्च होतें ? विचार कर बरें. ३११. हेंही राहूं दे. सूर्याच्या उदयानें लोकांचे सर्व व्यवहार होत असतांना सूर्याकडे कोणत्या कामाचें ( प्रत्यक्ष ) कर्तृत्व आलें ? ३१२. त्याप्रमाणें हे पांच हेतु एकत्र झाल्यावर या पांचच कारणाकडून कर्मरूपी वेलीची लावणी केली जाते. आत्मा त्या कारणांहून व क्रियेहून निराळा आहे. ३१३. आतां ज्याप्रमाणें मोत्यें तंतोतंत वजन करून घ्यावींत, त्याप्रमाणें हीं पांच कारणें आतां तुला निरनिराळीं खुलासेवार बारकाईनें सांगतों. ३१४.

शरीर, जीव, निरनिराळ्या प्रकारचीं इंद्रियें, ( प्राणापानादिकांचे ) निरनिराळे व्यापार आणि पांचवें कारण म्हणजे इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवता ह्या होत. १४

त्या ( मोत्यांच्या वजनाच्या बारकाई प्रमाणें ) कर्मांचीं कारणें ज्यांच्या त्यांच्या लक्षणांस धरून सांगतों तीं ऐक, आतां या पांच कारणांपैकीं देह हें पहिलें कारण आहे, असें माझें म्हणणें आहे. ३१५. या देहाला अधिष्ठान असें म्हणतात, याचें कारण एवढेंच कीं, भोक्ता जो जीव, तो आपल्या सुखदुःखादि भोगांसह ( येथें ) या देहांत राहातो. ३१६. इंद्रियरूपी दहा हातांनीं रात्रंदिवस श्रम करून जीं सुखदुःखें प्रकृतीकडून मिळविलीं जातात, ३१७. तीं ( सुखदुःखें ) भोगण्याकरितां देहाशिवाय जीवाला दुसरी जागाच नाहीं, म्हणून देहास अधिष्ठान असें म्हणतात. ३१८. चोवीस तत्त्वरूपी कुटुंबाच्या राहाण्याचें देह हें घर आहे आणि या देहांत बंधमोक्षाची गुंतागुंत उलगडली जाते. ३१९. फार काय सांगावें ! अर्जुना, जाग्रति, स्वप्न आणि सुषुप्ति, या तिन्ही अवस्थांना हा देह आधार आहे; म्हणून या देहाला अधिष्ठान हेंच नांव आहे. ३२०. आणि कर्माचें दुसरें कारण कर्ता हें समजावें. ज्या कर्त्याला ( जीवाला ) चैतन्याचें प्रतिबिंब असें म्हणतात. ३२१. आकाशच पाण्याची वृष्टि करतें. त्या पाण्याचे खालीं पृथ्वीवर डबकें बनतें. मग आकाश त्या डबक्यांत प्रतिबिंबीत होऊन ज्याप्रमाणें त्या डबक्याच्या आकाराचें होतें; ३२२. अथवा अतिशय निद्रेच्या भरानें राजा आपण आपल्याला स्मरत नाहीं. मग त्याला आपण दरिद्री आहोंत असें स्वप्न पडतें, तेव्हां तो स्वप्नांतील भिकारीपणांत तद्रूप होतो. ३२३. त्याप्रमाणें आपल्या स्वरूपाची आठवण न राहिल्यानें चैतन्यच देहाच्या आकारानें भासून 'मी देह आहें' असें मानावयास लागतें. ३२४. अर्जुना, अशी चैतन्यानें आपली विपरीत समजूत करून घेतली म्हणजे त्याला जीव असें म्हणतात. त्या आभासरूपी जीवानें देहाबरोबर सर्व गोष्टींसंबंधीं शपथपूर्वक करारमदार केला आहे. ३२५. प्रकृति जीं कर्मे करिते, तीं कर्में म्यां केलीं असें जीव भ्रमानें म्हणतो; म्हणूनच जीवास कर्ता असें म्हणतात. ३२६. मग ज्याप्रमाणें एकच दृष्टि पापण्यांच्या केसांतून बाहेर पडली असतां ती दृष्टि अखंड असते, परंतु चवरीच्या केसाप्रमाणें चिरलेली वाटते. ३२७. घरांत असणाऱ्या दिव्याचा एकच प्रकाश निरनिराळ्या झरोक्यांतून बाहेर पडला म्हणजे ज्याप्रमाणें अनेक प्रकाश आहेत असें भासतें; ३२८. त्याप्रमाणें बुद्धीचें ( एकच ) ज्ञान या वेगवेगळ्या श्रोत्रादि इंद्रियांच्या द्वारां वेगवेगळें होऊन इंद्रियांच्या आकारानें बाहेर पसरतें. ३२९. हे राजपुत्रा ( अर्जुना ), तीं निरनिराळीं ज्ञानेंद्रियें या कर्माचें तिसरें कारण आहे असें समज. ३३०. आणि ज्याप्रमाणें एकच पाणी पूर्वपश्चिम वाहाणाऱ्या ओघांत मिळून वाहूं लागलें असतां, तें नदी व नद या नांवानें ओळखलें जातें; ३३१. अथवा शृंगारादि नवरसांच्या अनुरोधानें वागण्यास लागला म्हणजे जसा एकच पुरुष नऊ प्रकारचा आहे असें वाटावयास लागतें; ३३२. त्याप्रमाणें प्राणवायूमध्यें जी अखंड क्रियाशक्ति आहे, ती एकच शक्ति निरनिराळ्या ठिकाणीं वांटली गेली असतां निरनिराळ्या नांवाची होते. ३३३. ती ( क्रियाशक्ति ) जेव्हां वाचेंत येते, तेव्हां तीच बोलणें होते व हाताच्या ठिकाणीं आली असतां देण्याघेण्याचे व्यवहार तीच होते. ३३४. अरे अर्जुना, पायाच्या ठिकाणीं गति तरी तीच समज व दोन्ही अधोद्वारांच्या ठिकाणीं गळणें तीच होय. ३३५. नाभिकमलापासून हृदयापर्यंत ओंकाराची स्पष्टता करीत असतांना तिलाच शरीरांत 'प्राण' असें म्हणतात. ३३६. मग पुढें त्याच शक्तीच्या हृदयावरच्या येण्याजाण्याच्या क्रियेमुळें तिला 'उदान' नांव आलें. ३३७. खालच्या द्वाराच्या गतीमुळें 'अपान' हें नांव त्या क्रियाशक्तीस मिळालें आहे व व्यापकपणानें ती शक्ति 'व्यान' झालेली आहे. ३३८.

आरोगिलेनि रसें। शरीर भरी सरिसें। आणि न सांडितां असे। सर्वसंधीं ॥ ३९ ॥ ऐसिया इया राहटीं। मग तेचि क्रिया पाठीं। समान ऐसी किरीटी। बोलिजे गा ॥ ३४० ॥ आणि जांभई शिंक ढेंकर। ऐसैसा होतसे व्यापार। नाग कुर्म कृकर। इत्यादि होय ॥ ४१ ॥ एवं वायूची हे चेष्टा। एकीचि परी सुभटा। वर्तनास्तव पालटा। येतसे जे ॥ ४२ ॥ ते भेदली वृत्तिपंथें। वायुशक्ति गा एथें। कर्मकारण चौथें। ऐसें जाण ॥ ४३ ॥ आणि ऋतु बरवा शारदु। शारदीं पुढती चांदु। चंद्रीं जैसा संबंधु। पूर्णिमेचा ॥४४॥ कां वसंतीं बरवा आरामु। आरामींही प्रियसंगमु। संगमीं आगमु। उपचारांचा ॥ ४५ ॥ नाना कमळीं पांडवा। विकासु जैसा बरवा। विकासींही यावा। परागाचा ॥ ४६ ॥ वाचे बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वीं परतत्त्व। स्पर्शु जैसा ॥ ४७ ॥ तैसी सर्ववृत्तिवैभवीं। बुद्धिचि एकली बरवी। बुद्धीही बरव नवी। इंद्रियप्रौढी ॥ ४८ ॥ इंद्रियप्रौढीमंडळा। शृंगारु एकचि निर्मळा। जैं अधिष्ठात्रीयां कां मेळा। देवतांचा जो ॥४९॥ म्हणूनि चक्षुरादिकीं दाहें। इंद्रियां पाठीं स्वानुग्रहें। सूर्यादिकां कां आहे। सुरांचें वृंद ॥ ३५० ॥ तें देववृंद बरवें। कर्मकारण पांचवें। अर्जुना एथ जाणावें। देवो म्हणे ॥ ५१ ॥ एवं माने तुझिये आयणी। तैसी कर्मजातांचि हे खाणी। पंचविध आकर्णीं। निरूपिली ॥ ५२ ॥ आतां हेचि खाणी वाढे। मग कर्मांची सृष्टि घडे। जिहीं ते हेतुही उघडे। दाऊं पांचै ॥ ५३ ॥

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः। न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

तरी अवसांत आली माधवी। ते हेतु होय नवपल्लवीं। पल्लव पुष्पपुंज दावी। पुष्प फळातें ॥ ५४ ॥ कां वार्षिये आणिजे मेघु। मेघें वृष्टिप्रसंगु। वृष्टीस्तव भोगु। सस्यसुखाचा ॥ ५५ ॥ नातरी प्राची अरुणातें विये। अरुणें सूर्योदयो होये। सूर्यें सगळा पाहे। दिवो जैसा ॥ ५६ ॥ तैसें मन हेतु पांडवा। होय कर्मसंकल्पभावा। तो संकल्पु लावी दिवा। वाचेचा गा ॥ ५७ ॥ मग वाचेचा तो दिवटा। दावी कृत्यजातांचिया वाटा। तेव्हां कर्ता रिगे कामठां। कर्तृत्वाचां ॥ ५८ ॥ तेथ शरीरादिक दळवाडें। शरीरादिकां हेतुचि घडे। लोहकाम लोखंडें। निर्वाळिजे जैसें ॥ ५९ ॥ कां तांथुवाचा ताणा। तांथु घालितां वैरणा। तो तंतूचि विचक्षणा। होय पटु ॥३६०॥ तैसें मनवाचादेहांचें। कर्म मनादि हेतुचि रचे। रत्नीं घडे रत्नाचें। दळवाडें जेवीं ॥ ६१ ॥ एथ शरीरादिकें कारणें। तेचि हेतु केवीं हें कोणें। अपेक्षिजे तरी तेणें। अवधारिजो ॥ ६२ ॥ आइका सूर्याचिया प्रकाशा। हेतु कारण सूर्युचि जैसा। कां ऊंसाचें कांडें ऊंसा। वाढी हेतु ॥ ६३ ॥ नाना वाग्देवता वानावी। तैं वाचाचि लागे कामवावी। कां वेदां वेदेंचि बोलावी। प्रतिष्ठा जे ॥ ६४ ॥ तैसें कर्मा शरीरादिकें। कारण हें कीर ठाउकें। परी हेंचि हेतु न चुके। हेंही एथ ॥ ६५ ॥ आणि देहादिकीं कारणीं। देहादि हेतुमिळणीं। होय जया उभारणी।

भक्षण केलेल्या सर्व रसानें शरीर सारख्या प्रमाणानें ती भरते व कोणत्याही सांध्याचा त्याग न करतां सर्व सांध्यांमध्यें ती भरलेली असते, ३३९. अर्जुना, अशा या व्यापारामुळें मग नंतर त्याच क्रियेला 'समान' असें म्हणतात. ३४०. आणि जांभई, शिंक, ढेंकर असे व्यापार झाले असतां, ती क्रियाशक्ति नाग, कूर्म, कृकल वगैरे नांवांनीं निरनिराळ्या रूपांत बनते. ३४१. याप्रमाणें अर्जुना, वायूची ही क्रियाशक्ति एकच आहे. परंतु निरनिराळ्या व्यापारांमुळें जी (क्रिया) निरनिराळ्या बदललेल्या रूपाची होते, ३४२. ती निरनिराळ्या कार्यामुळें निरनिराळी झालेली वायुशक्ति, हेंच येथें कर्माचें चौथें कारण आहे, असें समज. ३४३. आणि सर्व ऋतूंमध्यें शरदृतु चांगला, त्यांतल्यात्यांत शरदृतूंतील चंद्र उत्तम आणि त्या चंद्राला पौर्णिमेचा योग जसा उत्तमच होय; ३४४. अथवा वसंत ऋतूंत बाग जसा आल्हादकारक व त्या बागेंत प्रिय मनुष्याचा योग घडेल तर चांगलें व त्या योगांत जशी इतर उपचारांची प्राप्ति व्हावी. ३४५. अथवा अर्जुना, कमलाच्या ठिकाणीं जसा विकास शोभादायक असतो आणि त्या विकासांत देखील जसा परागाचा उठाव विशेष चांगला, ३४६. जसें वाचेला शोभादायक कवित्व आहे व त्या कवित्वांत जशी सुरसतेची बहार असावी व ह्या सुरसतेंत त्याप्रमाणें परमात्म–वर्णनाचा संबंध यावा. ३४७. त्याप्रमाणें मनादि सर्व वृत्तींच्या ऐश्वर्यांत जशी एकटी बुद्धीच चांगली आणि बुद्धीला जशी इंद्रियांच्या सामर्थ्यांची अपूर्व शोभा आहे. ३४८. इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवतांच्या समुदायाची अनुकूलता, हीच एक सुदृढ इंद्रियांच्या समुदायाला चांगली शोभा आहे. ३४९. म्हणून चक्षुरादि दहा इंद्रियांच्या पाठीवर आपल्या अनुग्रहासह सूर्यादि देवतांचा समुदाय आहे. ३५०. अर्जुना, तो देवतांचा समुदाय हें कर्माचें एक पांचवें चांगलें कारण आहे, असें समज; असें देव म्हणाले. ३५१. याप्रमाणें तुझ्या बुद्धीला पटेल तशा रीतीनें हें कर्म म्हणून जेवढें आहे तेवढें सर्व उत्पन्न होण्याची ही पांच प्रकारच्या कारणांची खाण तुला सांगितली, ती ऐक. ३५२. आतां ज्या हेतूच्या योगानें ही पांच कारणरूपी खाण वाढते व मग सर्व कर्मांची रचना होते, ते पांच हेतु देखील तुला स्पष्ट करून सांगतों. ३५३.

न्यायाला अनुसरून ( विहित ) अथवा(न्यायाला) सोडून ( निषिद्ध ) असें जें जें कर्म, मनुष्य शरीर, वाणी आणि मन यांचें योगानें करीत असतो, त्या त्या कर्माचे हे पांच हेतु आहेत. १५.

हे पहा, अकस्मात् वसंतऋतु आला तर तो वृक्ष-वेलींना नवीन पालवी उत्पन्न करण्यास कारण होतो. त्या नव्या फुटलेल्या पालवींतून पुष्पांचे गुच्छ दृष्टोत्पत्तीला येतात व तीं फुलें, फलांची प्राप्ति करून देतात. ३५४. अथवा वर्षाऋतु मेघांना आणतो, मेघांच्या योगानें वृष्टि होते आणि वृष्टीमुळें धान्यापासून मिळणाऱ्या सुखाचा भोग होतो. ३५५. अथवा पूर्वदिशा अरुणाला विते, अरुणाच्या योगानें सूर्योदय होतो व सूर्याच्या योगानें त्याप्रमाणें सगळा दिवस उजाडतो. ३५६. त्याप्रमाणें अर्जुना, कर्मासंबंधीं संकल्प होण्याला मन हें हेतु आहे व अरे, तो कर्मसंकल्प वाचेचा दिवा लावतो. ( म्हणजे वाचेकडून बोलण्याची क्रिया करतो ) ३५७. मग वाचेची ती मशाल सर्व कर्मांचा रस्ता दाखवते तेव्हां कर्ता ( जीव ) कर्तृत्वाच्या व्यापारांत सांपडतो ( म्हणजे कर्ता कर्तृत्वबुद्धीनें कर्म करूं लागला असतां त्याचेकडे कर्तेपणा येतो. ) ३५८. तेथें शरीरादि समुदाय शरीरादिकांस हेतुच आहे. जसें लोखंडाची वस्तु लोखंडानेंच तयार करावी. ३५९. अथवा हे चतुरा अर्जुना, तंतूच्या ताण्यामध्यें आडवा तंतु भरीला ( घातला ) असतां तोच तंतु वस्त्र होतो. ३६०. रत्नाचा आकार ( पैलु वगैरे ) जसा रत्नानेंच तयार केला जातो, त्याप्रमाणें मन, वाचा आणि देह यांचें कर्म मनवाचादि हेतूकडूनच तयार होतें. ३६१. येथें शरीरादिक कारणें तींच हेतु कशीं होतात, हें जाणावयाची जर कोणी इच्छा करीत असेल तर त्यानें ऐकावें. ३६२. ऐका, सूर्याच्या प्रकाशाला कारण व हेतु जसा सूर्यच आहे, अथवा ऊंसाचें एक कांडें जसें ऊंसाच्या दुसऱ्या कांड्याच्या वाढीला हेतु असतें. ३६३. अथवा वाचेच्या देवतेचें ( सरस्वतीचें ) जेव्हां वर्णन करावयाचें असतें तेव्हां वाचेचाच उपयोग करावा लागतो; अथवा वेदांचा मोठेपणा ( जसा ) वेदांनींच सांगावा. ३६४. त्याप्रमाणें शरीर, वाचा व मन हीं सर्व कर्मांचीं कारणें आहेत, हें सर्वांस पक्कें माहीत आहे. परंतु हीं अधिष्ठानादिकांत येऊन गेल्यामुळें हेतुही होतात, यांतही कांहीं चूक नाहीं. ३६५. आणि पूर्वी सांगितलेल्या देहादि पांच कारणांना शरीर, वाणी

कर्मजातां ॥६६॥ तें शास्त्रार्थें मानिलेया । मार्गा अनुसरे धनंजया । तरी न्याय तो न्याया । हेतु होय ॥ ६७ ॥ जैसा पर्जन्योदकाचा लोटु । विपायें धरी साळीचा पाटु । तऱ्ही जिरे परी अचाटु । उपयोगु आथी ॥ ६८ ॥ कां रोषें निघालें अवचटें । पडिलें द्वारकेचिया वाटे । तें शिणे परी सुनाटें । न वचती पदें ॥ ६९ ॥ तैसें हेतुकारणमेळें । उठी कर्म जें आंधळें । शास्त्राचे लाहे डोळे । तें न्याय्य म्हणिपे ॥ ३७० ॥ ना दूध वाढितां ठावो पावे । तंव उतोनि जाय स्वभावें । तोही वेंचु परी नव्हे । वेंचिलें तें ॥ ७१ ॥ तैसें शास्त्रसाह्येंवीण । केलें नोहे जरी अकारण । तरी लागो कां नागवण । दानलेखीं ॥ ७२ ॥ अगा बावन्ना वर्णांपरता । कोण मंत्रु आहे पंडुसुता । कां बावन्नही नुच्चारितां । जीवु आथी ॥ ७३ ॥ परी मंत्राची कडसणी । जंव नेणिजे कोदंडपाणी । तंव उच्चारफळ वाणी । न पवे जेवीं ॥ ७४ ॥ तेवीं कारणहेतुयोगें । जें बिसाट कर्म निगे । तें शास्त्राचिये न लगे । कांसे जंव ॥ ७५ ॥ कर्म होतचि असे तेव्हांही । परी तें होणें नव्हे पाहीं । तो अन्यायो गा अन्यायीं । हेतु जाणावा ॥ ७६ ॥ एवं पंचकारणा कर्मा । पांचही हेतु हे सुमहिमा । आतां एथें पाहें पां आत्मा । सांपडला असे ॥ ७७ ॥

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः । पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

भानु न होनि रूपें जैसीं । चक्षुरूपातें प्रकाशी । आत्मा न होनि कर्में तैसीं । प्रकटित असे गा ॥७८॥ पाहीं प्रतिबिंब आरिसा । दोन्ही न होनि वीरेशा । दोहींतें प्रकाशी जैसा । न्याहाळिता तो ॥ ७९ ॥ कां अहोरात्र सविता । न होनि करी पांडुसुता । तैसा आत्मा कर्मकर्ता । न होनी दावी ॥३८०॥ परी देहाहंमानभुली । जयाची बुद्धि देहींच आतली । जया आत्मविषयीं जाली । मध्यरात्री ॥ ८१ ॥ जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देहचि केलें परमसीमा । तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे ॥ ८२ ॥ आत्माचि कर्ता । हाही निश्चयो नाहीं तत्त्वतां । देहोचि मी कर्मकर्ता । मानी तो साच ॥८३॥ जे आत्मा मी कर्मातीतु । सर्वकर्मसाक्षिभूतु । हे आपली कहीं मातु । नायकेचि कानीं ॥८४॥ म्हणोनि उमपा आत्मयातें । देहचिवरी मविजे एथें । विचित्र काई रात्रि दिवसातें । डुडुळ न करी ॥ ८५ ॥ पैं जेणें आकाशींचा कहीं । साचु सूर्यु देखिला नाहीं । तो थिल्लरींचें बिंब काई । मानूं न लाहे ॥ ८६ ॥ थिल्लराचेनि जालेपणें । सूर्यासि आणी होणें । तयाचां नाशीं नाशणें । कंपें कंपु ॥ ८७ ॥ अगा निद्रिता चेवो नये । तंव

व मन या हेतूंची जोड मिळाली असतां, ज्या सर्व कर्मांची उत्पत्ति होते, ३६६. तीं कर्में शास्त्रानें मानलेल्या मार्गाला अनुसरून असतील तर तो न्यायमार्गच न्याय्य कर्माला हेतु होतो. ३६७. ज्याप्रमाणें पावसाच्या पाण्याचा लोट, सहजच भाताच्या शेतांत शिरला, तर तो शेतांत जिरतो, परंतु त्याचा अतिशय उपयोग होतो. ३६८. अथवा एकादा घरांतून रागावून निघालेला मनुष्य अकस्मात् द्वारकेच्या वाटेला लागला तर त्याला ( चालण्याचे ) श्रम होतील खरे, पण त्याचें चालणें व्यर्थ जाणार नाहीं. ३६९. त्याप्रमाणें हेतु व कारण यांच्या मिलाफानें जें आंधळें ( शास्त्राला न जाणून झालेलें ) कर्म उत्पन्न होतें, त्याला शास्त्राची दृष्टि प्राप्त झाली ( म्हणजे तें यथाशास्त्र झालें ) असतां, त्या वेळेला त्यास न्याय्य ( पुण्यकर्म ) असें म्हणतात. ३७०. अथवा दूध वाढावयाची वेळ आली आणि तोंच तें आपोआप उतास गेलें. तोही दुधाचा खर्च झालाच, पण तो योग्य कारणाला खर्च झाला, असें होत नाहीं. ३७१. त्याप्रमाणें शास्त्राच्या साहाय्याशिवाय केलेलें कर्म जर निष्फळ होत नसेल, तर चोरीस गेलेलें द्रव्य दानांत जमा धरावें लागेल. ( म्हणजे चोरांनीं लुटून नेलेलें द्रव्य जसें दानांत जमा होत नाहीं, तसें शास्त्राच्या साहाय्याशिवाय केलेलें कर्म सफल होत नाहीं. ) ३७२. अर्जुना, बावन वर्णांपलीकडे कोणता मंत्र आहे ? आणि बावन वर्णांचा उच्चार केल्याशिवाय कोणी मनुष्य राहिला आहे काय ? ३७३. परंतु अर्जुना, जोंपर्यंत मंत्राची हातवटी कळली नाहीं, तोंपर्यंत वाणीला मंत्रउच्चाराचें फल जसें प्राप्त होत नाहीं; ३७४. त्याप्रमाणें कारण व हेतु यांच्या योगानें जें यदृच्छेनें कर्म उत्पन्न होतें तें ( कर्म ) जोंपर्यंत शास्त्राच्या कांसेला लागणार नाहीं, ( म्हणजे शास्त्राधारानें होणार नाहीं, ) ३७५. तेव्हां देखील कर्म होतेंच, परंतु तें कर्माचें ( योग्य ) होणें नव्हे, पहा. तो अन्याय्य मार्ग आहे व तो अन्याय्य कर्मालाच हेतु आहे असें समजावें. ३७६. हे सत्कीर्तिवान् अर्जुना, याप्रमाणें पांच कारणें असलेल्या कर्माला हे पांचही हेतु आहेत, तर आतां या कर्मांच्या कारणांत व हेतूंत आत्मा कोठें गोंवला गेला आहे काय ? विचार कर, ३७७.

असें असतांना, असंस्कृत बुद्धि असल्यामुळें जो शुद्ध आत्म्यालाच कर्ता असें समजतो, तो मूढबुद्धि होय, त्याला ( कांहीं यथार्थज्ञान ) समजत नाहीं. १६.

ज्याप्रमाणें सूर्य दृश्य पदार्थ न होऊन डोळ्यांना व दृश्य पदार्थांना प्रकाशतो; त्याप्रमाणें आत्मा ( कर्माचें कारण आणि ) कर्म न बनतां कर्माचें प्रकाशन करतो. ३७८. हे वीरश्रेष्ठा अर्जुना, असें पहा कीं, आरशांत पाहणारा, हा जसा प्रतिबिंब व आरसा हे दोन्ही न होऊन, या दोहींला प्रकाशतो. ३७९. अथवा अर्जुना, सूर्य हा दिवस व रात्र न होऊन जशी दिवस व रात्र आपल्या अस्तित्वावर दाखवितो, त्याप्रमाणें आत्मा हा कर्म व कर्माचा कर्ता न होऊन त्या दोघांचें प्रकाशन करतो. ३८०. परंतु देहाहंकाराच्या मोहानें, ज्याच्या बुद्धीनें देहच मी असा निश्चय केला आहे आणि ज्याला आत्म्याविषयीं मध्यरात्र झाली आहे; ( ज्याच्या ठिकाणीं आत्म्याच्या ज्ञानाविषयीं पूर्ण अंधार आहे. ) ३८१. ज्यानें चैतन्य, ईश्वर व ब्रह्म ह्यांना केवळ देहाच्याच मर्यादेंत आणून ठेवलें, त्याची ' आत्मा कर्ता आहे, ' अशा प्रकारची दृढ समजूत होऊन बसते. ३८२. आत्माच कर्मकर्ता आहे, असाही त्याचा खरोखर निश्चय नसतो. तो ' देहच मी आहें ' असें समजतो व म्हणून सर्व कर्मांचा कर्ता आपणच आहों, असें तो खरोखर मानतो. ३८३. कारण कर्मांतील सर्व कर्मांना साक्षीभूत असा आत्मा मी आहें, ही जी आपल्या खऱ्या स्वरूपाची हकीकत, ती तो कानांनीं कधीं ऐकतच नाहीं. ( आपल्या अकर्तृआत्मभावाची त्यास खबरही नसते. ) ३८४. म्हणून असल्या समजुतीच्या माणसानें अपरिमित आत्म्याला देहानेंच मोजावें, ( देशकालवस्तुपरिच्छेदरहित आत्म्याला परिछिन्न अशा साडेतीन हाताच्या देहानें मर्यादित करावें, ) यांत नवल तें काय ? घुबड दिवसाला धडधडीत रात्र मानीत नाहीं काय ? ३८५. ज्यानें आकाशांतील खरा सूर्य केव्हांच पाहिला नाहीं, तो डबक्यांत पडलेलें सूर्याचें प्रतिबिंब हाच खरा सूर्य म्हणून मानणार नाहीं काय ? ३८६. ( तो प्रतिबिंबच खरा सूर्य मानून मग ) डबक्याच्या उत्पत्तीनें सूर्याला उत्पत्ति मानतो. त्या डबक्याच्या नाशानें सूर्याला नाश मानतो व त्या डबक्यांतील पाण्याच्या हालचालीनें सूर्य कापतो आहे, असें मानतो. ३८७. अरे अर्जुना, झोंपलेला पुरुष जोंपर्यंत जागा झाला नाहीं,

स्वप्न साच हों लाहे । रज्जु नेणतां सापा विहे । विस्मो कवण ॥ ८८ ॥ जंव कवळ आथि डोळां । तंव चंद्रु देखावा कीं पिंवळा । काय मृगींही मृगजळा । भाळावें नाहीं ॥ ८९ ॥ तैसा शास्त्रागुरूंचेनि नांवें । जो वाराही टेंकों नेदी सिंवे । केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ॥ ३९० ॥ तेणें देहात्मदृष्टीमुळें । आत्मया घापे देहाचें जाळें । जैसा अभ्राचा वेगु कोल्हें । चंद्रीं मानी ॥ ९१ ॥ मग तया मानणयासाठीं । देहबंदिशाळे किरीटी । कर्माचां वज्रगांठी । कळासे तो ॥ ९२ ॥ पाहें पां बंधभावना दृढा । नळियेवरी तो बापुडा । काय मोकळेयाही चवडा । न ठकेचि पुंसा ॥ ९३ ॥ म्हणोनि निर्मळे आत्मस्वरूपीं । जो प्रकृतीचें केलें आरोपी । तो कल्पकोडीचां मापीं । मवीचि कर्में ॥ ९४ ॥ आतां कर्मामाजीं असे । परी तयातें कर्म न स्पर्शे । वडवानळातें जैसें । समुद्रोदक ॥ ९५ ॥ तैसेनि वेगळेपणें । जयाचें कर्मीं असणें । तो कीर जाणावा कवणें । तरी सांगों ॥ ९६ ॥ जे मुक्तातें निर्धारितां । लाभे आपलीच मुक्तता । जैसी दीपें दिसे पाहतां । आपली वस्तु ॥ ९७ ॥ नाना आरिसा जंव उटिजे । तंव आपणपयां आपण भेटिजे । कां पाणी पावतां पाणी होइजे । लवणें जेवीं ॥ ९८ ॥ हें असो परतोनि मागुतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें । तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय ॥ ९९ ॥ तैसें हारपलें आपणपें पावे । तें संतांतें पाहातां गिंवसावें । म्हणोनि वानावे ऐकावे । तेचि सदा ॥ ४०० ॥ तरी कर्मीं असोनि कर्में । जो नावरे समेंविषमें । चर्मचक्षूंचेनि चामें । दृष्टि जैसी ॥ १ ॥ तैसा सोडवला जो आहे । तयाचें रूप आतां पाहें । उपपत्तीची बाहे । उभऊनि सांगों ॥ २ ॥ तरी अविद्येचिया निदा । विश्वस्वप्नाचा हा धांदा । भोगीत होता प्रबुद्धा । अनादि जो ॥ ३ ॥ तो महावाक्याचेनि नांवें । गुरुकृपेचेनि थांवें । माथां हातु ठेविला नव्हे । थापटिला जैसा ॥ ४ ॥ तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया । सहसा चेइला अद्वया- । नंदपणें जो ॥ ५ ॥ तेव्हां मृगजळाचे पूर । दिसते एक निरंतर । हारपती कां चंद्रकर । फांकतां जैसें ॥ ६ ॥ कां बाळत्व निघोनि जाय । तें बागुला नाहीं त्राय । पैं जळालिया इंधन न होय । रंधन जेवीं ॥ ७ ॥

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ १७ ॥

नाना चेवो आलिया पाठीं । तें स्वप्न न दिसे दिठी । तैसी अहंममता किरीटी । नुरेचि तया ॥ ८ ॥ मग सूर्य आंधारालागीं । रिघो कां भलते सुरंगी । परी तो तयाचां भागीं । नाहींचि जैसा ॥ ९ ॥ तैसा आत्मत्वें वेठिला होये । तो जयातया दृश्यातें पाहे । तें दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये । तयाचेंचि रूप ॥ ४१० ॥ जैसा वन्हि जया लागे । तें वन्हिचि जालिया आंगें ।

तेथपर्यंत स्वप्न सत्य मानलें जाणें शक्य आहे; ( एखादा मनुष्य ) ही दोरी आहे असें न जाणून ( त्या दोरीला ) साप असें समजून भ्याला, तर यांत आश्चर्य तें कोणतें ? ३८८. डोळ्यांमध्यें जेथपर्यंत काविळीचा विकार आहे, तेथपर्यंत चंद्र पिवळा असा दिसणार; मृगजळाला पाहून हरिणांनीं मोहित होऊं नये काय ? ३८९. त्याप्रमाणें जो शास्त्रांच्या व गुरूच्या नांवानें (त्यांच्याकडून आलेला) वाराही आपल्या गांवाच्या शिवेवर टेकूं देत नाहीं ( शास्त्र व गुरु यांना जो मुळींच मानीत नाहीं ) व जो केवळ मूर्खपणाच्याच जीविताने जगला आहे. ३९०. जसा ढगांचा वेग कोल्हा चंद्राच्या ठिकाणीं मानतो, ( ढग पळत असतांना चंद्र पळतो असें मानतो, ) तसा देहालाच तो आत्मा मानीत असल्यामुळे त्याच्याकडून आत्म्याला देहाच्या जाळ्यांत घातलें जातें. (तो आत्म्याच्या ठिकाणीं देहाचे धर्म पहातो. ) ३९१. अर्जुना, मग तो जीव त्या मानण्यानें देहरूपी तुरुंगांत कर्मांच्या पक्क्या गांठीनें जखडला जातो. ३९२. पहा कीं, नळीवरील तो बापुडा राघु, त्याचे पंजे मोकळे असतांही 'आपण बांधले गेलों आहोंत' या दृढ भावनेनें फसत नाहीं का ? ( आपण खरोखरच बांधले गेलों आहों असें त्यास वाटत नाहीं का ! ) ३९३. म्हणून निर्मळ आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जो प्रकृतीनें केलेल्या कर्माचा आरोप करतो, तो कोट्यवधि कालपर्यंत कर्मांतच गुंडाळलेला राहातो. ३९४. आतां ज्याप्रमाणें वडवानल समुद्रांत असून समुद्राचें पाणी त्याला स्पर्श करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें कर्मांमध्यें असूनही ज्याला कर्म स्पर्श करूं शकत नाहीं, ( कर्मपाशानें बांधला जात नाहीं, ) ३९५. वरील दृष्टान्ताप्रमाणें जो कर्मांत असून ( कर्मे करीत असून ) कर्मांपासून वेगळेपणानें असतो, तो खरोखर कोणत्या लक्षणानें जाणावा ( असें विचारशील ), तर सांगतों. ३९६. कारण कीं, ज्याप्रमाणें ( अंधारांतील ) आपली वस्तु दिव्याच्या सहाय्यानें पाहिली असतां दिसते, त्याप्रमाणें मुक्त पुरुषाविषयीं विचार केला असतां आपलीच मुक्तता आपणांस प्राप्त होते. ३९७. अथवा पोलादाचा आरसा जसजसा घांसावा, तसतसें आपणांस आपल्याला भेटतां येतें, ( म्हणजे आपलें प्रतिबिंब आपणांस अधिक स्वच्छ दिसतें; ) अथवा ज्याप्रमाणें मीठ पाण्याला मिळालें म्हणजे पाणी होतें. ३९८. हें राहूं दे. प्रतिबिंब जेव्हां उलटून पुनः बिंबाला पाहातें, तेव्हां पाहाण्याची क्रिया नाहींशी होऊन मूळचें बिंबच रहातें;

३९९. त्याप्रमाणें आपला हरवलेला आत्मभाव आपल्याला प्राप्त व्हावा अशी जर ( कोणाला ) इच्छा असेल तर संतांसंबंधींचा विचार केला असतां तो ( आत्मभाव ) त्यास शोधीत येतो; म्हणून नेहमीं संतांचेंच वर्णन करावें व संतांचेंच वर्णन ऐकावें. ४००. तर कर्मांत असून जो बऱ्यावाईट कर्मानें लिप्त होत नाहीं; तें कसें तर, ज्याप्रमाणें कातडीच्या डोळ्याच्या कातड्यांत दृष्टि असून ती त्यानें लिप्त होत नाहीं. ४०१. त्याप्रमाणें जो सर्व कर्मांच्या बंधनांपासून मुक्त झाला आहे त्याचें स्वरूप आतां विचाराचा बाहू उभारून सांगतों, पहा. ४०२. तर जागे असलेल्या अर्जुना, अविद्यारूपी निद्रेमध्यें विश्वरूपी स्वप्नाचा व्यवहार ( अनुभव ) जो अनादि कालापासून भोगीत होता, म्हणजे करीत होता. ४०३. त्यास महावाक्याच्या उपदेशाच्या शब्दांनीं (हाक मारून), मग आपल्या कृपेच्या सामर्थ्यानें, गुरूंनीं त्याचे मस्तकावर हात ठेविला असेंच नव्हे, तर त्यास थापटून जागें केलें; ४०४. अर्जुना, त्या क्षणीं विश्वरूपी स्वप्नासह ती मायारूपी निद्रा टाकून देऊन, जो अद्वयानंदपणानें सहज जागा झाला. ( म्हणजे जो, मी अद्वयानंदरूप आहें, अशा मूळच्या आठवणीवर आला. ) ४०५. त्या वेळीं मृगजळाचे नेहमीं एकसारखे दिसणारे पूर, चंद्रकिरणें फांकतांक्षणींच, ज्याप्रमाणें नाहींसे होतात; ४०६. अथवा बाळपण निघून गेल्यावर बागुलबुवाला जसें बळ नाहीं; किंवा लाकूड जळाल्यावर जसा स्वयंपाक होत नाहीं; ४०७.

ज्याचे ठिकाणीं ( मी कर्मकर्ता ) हा अहंकार नाहीं, ज्याची बुद्धि अलिप्त असते, त्यानें जरी या सर्व जगताला मारलें, तरी तो कोणालाहि मारीत नाहीं, ( घात केल्याच्या पातकानें ) बद्ध होत नाहीं. १७.

अथवा जागृति आल्यावर नंतर स्वप्न जसें दृष्टीला दिसत नाहीं, त्याप्रमाणें अर्जुना, त्याला मी व माझें हें उरत नाहीं. ४०८. मग सूर्य अंधाराकरितां वाटेल त्या भुयारांत प्रवेश करो, परंतु तो अंधार जसा सूर्याच्या वांट्याला येतच नाहीं; ४०९. त्याप्रमाणें जो आत्मभावानें व्यापला गेला आहे, तो ज्या ज्या दृश्य पदार्थाला पाहील, तो दृश्य पदार्थ द्रष्टेपणासह त्याचेंच रूप होत जातो. ४१०. ज्याप्रमाणें अग्नि ज्या पदार्थाला लागतो, तो पदार्थ अंगानें अग्नीच

दाह्यदाहकविभागें । सांडिजे तें ॥ ११ ॥ तैसा कर्माकारा दुजेया । तो कर्तेपणाचा आत्मया । अवलाहो ये तें गेलया । कांहीं बाहीं जें उरे ॥ १२ ॥ तिये आत्मस्थितीचा जो रावो । मग तो देहीं इये जाणेल ठावो । काय प्रलयांबूचा उन्नाहो । वोघु मानी ॥ १३ ॥ तैसी ते पूर्ण अहंता । काई देहपणें पंडुसुता । आवरे काई सविता । बिंबें धरिला ॥ १४ ॥ पैं मथूनि लोणी घेपे । तें मागुती ताकीं घापे । तरी तें अलिप्तपणें सिंपे । तेणेंसीं काई ॥ १५ ॥ नाना काष्ठौनि वीरेशा । वेगळाविलिया हुताशा । राहे काष्ठाचिया मांदुसा । कोंडलेपणें ॥ १६ ॥ कां रात्रीचिया पोटा आंतु । निगाला जो हा भास्वतु । तो रात्री ऐसी मातु । ऐके कायी ॥ १७ ॥ तैसें वेद्य वेदकपणेंसी । पडिलें कां जयाचां ग्रासीं । तया देह मी ऐसी । अहंता कैंची ॥ १८ ॥ आणि आकाशें जेथें जेथुनी । जाइजे तेथ असे भरोनि । म्हणोनि ठेलें कोंदोनि । आपेंआप ॥१९॥ तैसें जें तेणें करावें । तो तेंचि आहे स्वभावें । मा कोणें कर्मीं बेठावें । कर्तेपणें ॥ ४२० ॥ नुरेचि गगनावीण ठावो । नोहेचि समुद्रा प्रवाहो । नुठीचि ध्रुवा जावों । तैसें जाहालें ॥ २१ ॥ ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचां बोधीं जाहाला वावो । तऱ्ही देहा जंव निर्वाहो । तंव आथी कर्में ॥ २२ ॥ अगा वारा जरी वाजोनि वोसरे । तरी तो डोल रुखीं उरे । कां सेंदें द्रुति राहे कापुरें । वेंचलेनी ॥ २३ ॥ कां सरलेया गीताचा समारंभु । न वचे राहवलेपणाचा क्षोभु । भूमी लोळोनी गेलिया अंबु । वोल थारे ॥ २४ ॥ अगा मावळलेनि अर्कें । संध्येचिये भूमिके । ज्योतिदीप्ती कौतुकें । दिसे जैसी ॥ २५ ॥ पैं लक्ष भेदिलियाहीवरी । बाण धांवेचि तंववरी । जंव भरली आथी उरी । बळाची ते ॥ २६ ॥ नाना चाकीं भांडें जालें । तें कुंभारें परतें नेलें । परी भ्रमेचि तें मागिले । भोंवाडिलेपणें ॥ २७ ॥ तैसा देहाभिमानु गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जालें तें अपैसया । चेष्टवीच तें ॥ २८ ॥ संकल्पेंवीण स्वप्न । न लावितां दांगीचें बन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें ॥ २९ ॥ आत्मयाचेनि उद्यमेंवीण । तैसें देहादिपंचकारण । होय आपणयां आपण । क्रियाजात ॥ ४३० ॥ पैं प्राचीनसंस्कारशेषें । पांचही कारणें सहेतुकें । कामवीजती गा अनेकें । कर्माकारें ॥ ३१ ॥ तया कर्मामाजीं मग । संहरो आघवें जग । अथवा नवें चांग । अनुकरो ॥ ३२ ॥ परी कुमुद कैसेनि सुके । तें कमळ कैसें फांके । हीं दोन्हीं रवी न देखे । जयापरी ॥ ३३ ॥ कां वीजु वर्षोनि आभाळ । ठिकरिया आतो भूतळ । अथवा करू शाड्वळ । पर्जन्यवृष्टी ॥३४॥ परी तया दोहींतें जैसें । नेणिजेचि कां आकाशें । तैसा देहींच जो असे । विदेहदृष्टी ॥ ३५ ॥ तो देहादिकीं चेष्टीं । घडतां मोडतां हे सृष्टी । न देखे स्वप्न किरीटी । चेइला जैसा ॥ ३६ ॥ एऱ्हवीं चामाचे डोळेवरी । जे देखती देहचिवरी । ते कीर तो व्यापारी । ऐसेंचि मानिती ॥ ३७ ॥ कां तणाचा बाहुला । जो आगरामेरे ठेविला । तो साचाचि राखता कोल्हा ।

झाल्यावर, मग जाळणारा व जळणारें, असा भेद शिल्लक राहात नाहीं. ४११. त्याप्रमाणें आत्म्याहून भिन्न भासणारें जें कर्म; त्या कर्मामुळें आत्म्यावर जो कर्तेपणाचा आरोप आला होता, तो आरोप गेल्यावर जें कांहींबाहीं (शब्दांनीं अमुक आहे असें न सांगतां येण्याजोगें) उरतें, ४१२. त्या आत्मस्थितीचा जो राजा आहे, तो मग या देहाला आपलें ठिकाण असें समजेल काय? (तो 'मी देह' असें मानील काय?) प्रळयकाळच्या पाण्याची भरती 'आपण एक ओघ आहोंत,' असें आपल्याला मानील काय? ४१३. अर्जुना, त्याप्रमाणें ती पूर्णअहंता ('सर्व ठिकाणीं मीच भरलेला आहें' अशी व्यापक अहंता) देहभावानें आंवरली जाईल काय? जगाचें प्रकाशन करणाऱ्या सूर्याचा व्यापक प्रकाश, सूर्याचें बिंब जितकें असतें, तितका मर्यादित होईल काय? ४१४. ताक घुसळून लोणी काढल्यावर पुनः तें ताकांत घातलें असतां, तें (लोणी) ताकांत अलिप्तपणानें असल्यामुळें, त्या ताकांत मिसळेल काय? ४१५. अथवा हे वीरश्रेष्ठा अर्जुना, काष्ठापासून अग्नि वेगळा केल्यावर, तो पुनः पेटींत कोंडून ठेविल्यास राहील काय? ४१६. अथवा रात्रीच्या पोटांतून बाहेर निघालेला जो सूर्य, तो रात्र अशी गोष्ट तरी ऐकेल काय? ४१७. त्याप्रमाणें ज्ञात्यासह संपूर्ण ज्ञेय जो गिळून बसला आहे, (हें ज्यांच्या अनुभवांत नाहींसें झालें आहे), त्याला 'मी देह' अशी अहंता कोठून असणार? ४१८. आणि आकाशानें जेथून जेथें जावें तेथें तें (आकाश) भरलेलेंच असतें; कारण तें (आकाश) स्वभावतः सर्वत्र गच्च भरून राहिलें आहे; ४१९. त्याप्रमाणें ज्यानें जें कांहीं कर्म करावयाचें असतें, तें कर्म स्वभावतः त्याचेंच रूप आहे; मग कोणत्या कर्मानें त्याला कर्तेपणानें गुंडाळावें? (म्हणजे कोणत्या कर्मासंबंधाचा त्यानें आपणाकडे कर्तेपणा घ्यावा? कारण त्याला कर्म हें आपल्या स्वरूपाहून वेगळें उरलें नाहीं.) ४२०. आकाशाशिवाय जशी कोठें (रिकामी) जागा नाहीं, अथवा समुद्राला जसा प्रवाह नाहीं, अथवा ध्रुवाला जशी आपली जागा सोडून उठून जाणें नाहीं, त्याप्रमाणें त्याची स्थिति झाली. ४२१. याप्रमाणें देहाहंकाराचें असणें, त्याच्या बोधांत (स्वरूपानुभवांत) बाधीत झालें आहे. तरीपण जोंपर्यंत देह आहे, तोंपर्यंत कर्में आहेत. (म्हणजे शरीर आहे तेथपर्यंत त्याच्या संघाताकडून कर्में होतात.) ४२२. अरे अर्जुना, वारा जरी वाहून थांबला, तरी वाऱ्यानें उत्पन्न झालेला कंप झाडाच्या ठिकाणीं राहतो. अथवा करंडींतील कापूर जरी संपला, तरी करंडींत त्याचा वास राहतो; ४२३. गाण्याचा समारंभ संपल्यावर गाण्याच्या रंगाचा मनावरील परिणाम जात नाहीं, अथवा जमिनीवर पाणी वाहून गेलें तरी ओल रहाते; ४२४. अर्जुना, सूर्य मावळल्यावर देखील संध्याकाळच्या वेळेला सूर्याच्या ज्योतीचें तेज जसें सहज दिसतें; ४२५. लक्ष्य भेदल्यावर देखील बाणांत वेगाचा जोर शिल्लक राहिला आहे तेथपर्यंत बाण सारखा पुढें जातच रहातो; ४२६. अथवा चाकावर मडकें तयार झालें व तें कुंभारानें बाजूला काढलें, तरी आधींच्या फिरविण्याच्या गतीमुळें, तें चाक फिरतच राहातें. ४२७. त्याप्रमाणें देहाभिमान गेल्यावर सुद्धां, अर्जुना, देह ज्या स्वभावानें (प्रारब्धानें) झाला आहे, तें प्रारब्ध देहाला आपोआप कर्म करावयास लावतेंच. ४२८. आपणांस अमुक एक स्वप्न पडावें, अशा संकल्पाशिवाय जसें आपणांस स्वप्न पडतें, अथवा अरण्यांतील झाडें जशीं न लावतां उगवतात, अथवा ज्याप्रमाणें गंधर्वनगर कोणी तयार न करतां (आपोआप) उत्पन्न होतें; ४२९. त्याप्रमाणें आत्म्याच्या व्यापाराशिवाय देहादि पांच कारणांकडून आपोआप कर्ममात्र होतात. ४३०. प्रारब्धसंस्काराच्या शेषामुळें, शरीरवाचादिहेतुसह, देहादि पांच कारणाकडून अनेक प्रकारचीं कर्में निर्माण होतात. ४३१. मग त्या कर्मामध्यें सर्व जगाचा नाश होवो, अथवा दुसरें चांगलें नवें जग उत्पन्न होवो; ४३२. परंतु चंद्रविकासिनी कमल कसें संकोचित होतें व सूर्यविकासिनी कमल कसें उमलतें, हे दोन्ही ज्याप्रमाणें सूर्य जाणत नाहीं; ४३३. अथवा मेघांतून विजेचा वर्षाव होऊन पृथ्वीच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होवोत अथवा मेघ पर्जन्याची वृष्टि करून सगळें भूतळ हिरवेंगार करून टाको; ४३४. परंतु त्या दोहोंची जशी आकाशास खबरही नसते; त्याप्रमाणें जो देहांतच देहाभिमानरहित स्थितीनें असतो; ४३५. अर्जुना, ज्याप्रमाणें जागा झालेला मनुष्य स्वप्न पाहात नाहीं, त्याप्रमाणें देहादिकाच्या कर्मांनीं सृष्टि उत्पन्न झाली किंवा नाश पावली, तरी देखील त्याला त्याची खबर नसते. ४३६. एऱ्हवीं कातड्याच्या डोळ्यांनीं (स्थूल दृष्टीनें) जे त्याला 'देहधारी' अशा बुद्धीनें पाहातात, ते खरोखर तो कर्म करणारा आहे, असेंच मानतात. ४३७. गवताचें बुजगावणें करून जें शेताच्या बांधावर ठेवलेलें असतें, तें बुजगावणें खरोखरच रखवालदार आहे, असें कोल्हा

मानिजे ना ॥ ३८ ॥ पिसें नेसलें कां नागवें । हें लोकीं येऊनि जाणावें । ठाणोरियाचे मवावे । आणिकीं घाय ॥ ३९ ॥ का महासतीचे भोग । देखे कीर सकळ जग । परी ते आगी ना आंग । ना लोकु देखे ॥ ४४० ॥ तैसा स्वस्वरूपें उठिला । जो दृश्येंसीं द्रष्टा आटला । तो नेणे काय राहटला । इंद्रियग्रामु ॥४१॥ अगा थोरीं कल्लोळीं कल्लोळ साने । लोपतां तिरींचेनि जनें । एकीं एक गिळिलें हें मनें । मानिजे जऱ्हीं ॥ ४२ ॥ तऱ्ही पाणियाकडे पाहीं । कोणें गिळिजत आहे काइ । तैसें पूर्णा दुजें नाहीं । जें तो मारी ॥ ४३ ॥ सोनयाचिया चंडिका । सुवर्णशूळेंचि देखा । सोनयाचिया महिखा । नाशु केला ॥४४॥ तो देवलवासिया कडा । व्यवहारु गमला फुडा । वांचूनि शूळ महिष चामुंडा । सोनेंचि आहे ॥ ४५ ॥ पैं चित्रीचें पाणी हुताशु । तो दिठीचि भागु आभासु । पटीं आगी वोलांशु । दोन्ही नाहीं ॥४६॥ मुक्ताचें देह तैसें । हालत संस्कारवशें । देखोनि लोक पिसे । कर्ता म्हणती ॥ ४७ ॥ आणि तयां करणेयाआंतु । घडो तिहीं लोकां घातु । परी तेणें केला हे मातु । बोलोंचि नये ॥ ४८ ॥ तंव अंधाराचि देखावा तेजें । मा तें फेडी हें कें बोलिजे । तैसें ज्ञानिया नाहीं दुजें । करील कायी ॥ ४९ ॥ म्हणोनि तयाची बुद्धी । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळु जैसा ॥४५०॥ आगीसि आगी झगटलया । काय पोळे धनंजया । कीं शस्त्र रुपे आपणया । आपणाचि ॥ ५१ ॥ तैसें आपणपयापरतें । जो नेणे क्रियाजाततें । तेथ काय लिंपवी बुद्धीतें । तयाचिये ॥ ५२ ॥ म्हणोनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहालें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मी बाधु ॥५३॥ जो कर्ता जीव विंदाणी । काढूनि पांचही खाणी । घडित आहे करणीं । आउतीं दाहें ॥५४॥ तेथ न्यावो आणि अन्यावो । हा द्विविधु साधूनि आवो । उभवितां न लवी खेंवो । कर्मभुवनें ॥५५॥ या थोराडा कीर कामा । विरजा नोहे आत्मा । परी म्हणसी हन उपक्रमा । हातु लावी ॥ ५६ ॥ तो साक्षी चिद्रुपु । कर्मप्रवृत्तीचा संकल्पु । उठी तो कां निरोपु । आपणाचि दे ॥ ५७ ॥ तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं । तया आयासु नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचेही उळिगीं । लोकुचि आथी ॥ ५८ ॥ म्हणोनि आत्मयाचें केवळ । जो रूपचि जाहला निखिळ । तया नाहीं बंदिशाळ । कर्मांची हे ॥५९॥ परी अज्ञानाचां पटीं । अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी । तेथ चितारणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे कां ॥ ४६० ॥

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना । करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय । हें जगाचें बीजत्रय । तें कर्माची निःसंदेह । प्रवृत्ति जाण ॥ ६१ ॥ आतां ययाचि गा त्रया । व्यक्ती वेगळालिया । आइकें धनंजया । करूं रूप ॥ ६२ ॥ तरी जीवसूर्यबिंबाचे । रश्मी श्रोत्रादिकें पांचें । धांवोनि विषयपद्माचे । फोडिती मढ ॥ ६३ ॥ कीं जीवनृपाचे वारु उपलाणें । घेऊनि इंद्रियांचीं केंकाणें । विषयदेशींचें नागवणें ।

मानीत नाहीं काय ४३८. वेडा मनुष्य ( वस्त्र ) नेसलेला आहे कीं नागवा आहे, हें लोकांनीं येऊन जाणावयाचें; अथवा युद्धांत वीरश्री संचारलेल्या योद्ध्याच्या जखमा दुसऱ्यांनीं मोजावयाच्या; ( त्याला जखमांची खबरही नसते. ) ४३९. अथवा सती जावयास निघालेल्या पतिव्रता स्त्रीचे भोग ( शृंगारादि ) सर्व लोक खरोखर पहातात; परंतु त्या सती जाणाऱ्या स्त्रीस अग्नि, स्वतःचें शरीर अथवा लोक यांचें भानही नसतें. ४४०. त्याप्रमाणें जो आत्मस्वरूपाच्या बोधानें जागा झालेला आहे आणि ज्याच्या दृश्य व द्रष्टा या दोन्ही सापेक्ष भावना नाहींशा झालेल्या आहेत, तो आपल्या सर्व इंद्रियांनीं काय केलें, हें जाणत नाहीं. ४४१. अरे अर्जुना, मोठ्या लाटेंत लहानशा लाटा नाहींशा होत असतांना एका ( मोठ्या ) लाटेनें एका ( लहान ) लाटेला गिळलें, हें जरी नदीच्या कांठावरच्या मनुष्यानें मनानें मानलें; ४४२. तरी पाण्याच्या दृष्टीनें पहा; कोण कोणाचा ग्रास करीत आहे ? त्याप्रमाणें पूर्ण पुरुषाला ( तो अद्वैतभानावर आल्यामुळें, ) असा दुसरा पदार्थच प्रतीत होत नाहीं, कीं ज्याला तो मग मारील. ४४३. हें पहा, सोन्याच्या देवीनें सोन्याच्याच शूळानें सोन्याच्या महिषासुराचा नाश केला. ४४४. हा व्यवहार पुजाऱ्याच्या दृष्टीनें जरी खरा वाटला, तरी वास्तविक पाहतां शूळ, महिषासुर व देवी हें सर्व सोनेंच आहे. ( मग कोणी कोणाला व कशानें मारलें ? ) ४४५. चित्रांतील पाणी व अग्नि हा केवळ दृष्टीला होणारा भास आहे. चित्र काढलेल्या वस्त्रांत अग्नि अथवा ओलेपणाचा अंश हीं दोन्हीही नाहींत. ४४६. त्याप्रमाणें मुक्त पुरुषाचा देह प्रारब्धसंस्कारानें हालत ( कर्में करीत ) असतांना पाहून मूर्ख लोक त्याला कर्ता असें म्हणतात. ४४७. आणि त्या मुक्त पुरुषाच्या कर्म करण्यामध्यें तिन्ही लोकांचा नाश होवो, पण तो त्या मुक्त पुरुषानें केला, अशी गोष्ट बोलूंच नये. ४४८. आधीं तर तेजानें ( सूर्यानें ) अंधार पहावा, ( पण तेजापुढें अंधार येतच नाहीं. ) मग तेज अंधाराचा नाश करतें, हें कोठें बोलतां येईल ? त्याप्रमाणें ज्ञान्याला जर दुसरें नाहीं, मग तो काय करणार ? ४४९. म्हणून त्या मुक्त पुरुषाची बुद्धि पापपुण्याचा मळ जाणत नाहीं. ज्याप्रमाणें नदी गंगेला मिळाल्यावर त्या नदीचा (पूर्वीचा) अपवित्रपणा रहात नाहीं; ४५०. अर्जुना, अग्नीला अग्नीचा स्पर्श झाला तर कोण कोणाला पोळील ? का शस्त्र आपणच आपल्याला कातेल काय ? ४५१. त्याप्रमाणें जो कर्ममात्राला आपणाहून वेगळें समजत नाहीं, तेथें ( अशा स्थितींत ) कोणतें कर्म त्याच्या बुद्धीला कर्तेपणानें लिप्त करील ? ४५२. म्हणून कार्य, कर्ता व क्रिया हें ज्याला आपलें स्वरूपच झालें आहे, त्याला शरीरादिकांकडून कर्म झालें असतां, त्या कर्माचें बंधन नाहीं. ४५३. आपल्या बुद्धीच्या कौशल्यानें, कर्तृत्ववान् जो जीवात्मा, तो कर्माचीं कारणें असलेले शरीरादिक पांच, ह्या खाणी काढून, इंद्रियरूपी दहा आउतांच्या साहाय्यानें ( कर्ममात्र ) तयार करीत आहे. ४५४. तेथें न्याय व अन्याय ( विधिनिषेध ) असे दोन आकार साधून, कर्मांच्या इमारती उभारण्याला एक क्षण लावीत नाहीं. ४५५. या एवढ्या मोठ्या कामाला आत्मा खरोखर ग्राह्य होत नाहीं. पण तो ( या कामाच्या ) आरंभाला हात लावतो असें म्हणशील ( तर तेंही नाहीं. ) ४५६. ज्ञानस्वरूप असा जो केवळ साक्षीभूत आत्मा, तो त्या उत्पन्न होत असलेल्या कर्म करण्याच्या प्रेरणेच्या संकल्पाला तरी निरोप आपण देतो काय ? ( नाहीं. ) ४५७. तर कर्मप्रवृत्तीकरितां आत्म्याला स्वतःला कांहीं श्रम पडत नाहींत, कारण कीं, प्रवृत्तीची देखील बिगार वाहणारे लोकच ( देहबुद्धिवान् जीवच ) आहेत. ४५८. म्हणून जो आत्म्याचें केवळ शुद्धरूप झाला, त्याला हा कर्माचा तुरुंग नाहीं ४५९. परंतु अज्ञानरूपी वस्त्रावर जे विपरीत ज्ञानाचें ( स्थूल, सूक्ष्म प्रपंचाचें ) चित्र उमटतें, तेथें चित्र काढणारी जी ही त्रिपुटी प्रसिद्ध आहे. ४६०.

ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता हें कर्माचें प्रवृत्तित्रय आहे; करण ( इंद्रियें ), कर्म व कर्ता असा तीन प्रकारचा कर्मसंचय आहे. १८.

तीच ज्ञाता, ज्ञान व ज्ञेयरूपी त्रिपुटी होय. ही त्रिपुटी जगाचें कारण आहे आणि ही ( त्रिपुटी ) च कर्मांची निःसंशय प्रवृत्ति आहे, ( म्हणजे खरोखर कर्मांचा आरंभ ही त्रिपुटी करते ) असें समज. ४६१. अर्जुना, आतां याच त्रिपुटींतील एक एक निराळें घेऊन त्याचें चांगलें खुलासेवार वर्णन करूं, ऐक. ४६२. तर जीवरूपी सूर्यबिंबाचीं श्रोत्रादि पांच इंद्रियरूपी किरणें, हीं विषयरूपी कमलाकडे धांवत येऊन, त्या विषयरूपी कमलाच्या कळ्यांचा विकास करितात. ४६३. अथवा जीवरूपी राजाचे बिनखोगीराचे (मोकळ्या पाठीचे) मनाचे संकल्परूपी घोडे बरोबर घेऊन, जे इंद्रियांचे समुदाय विषयरूपी देशावर स्वारी करून

आणीत जे ॥६४॥ हें असो इहीं इंद्रियीं राहटे। जें सुखदुःखेंसीं जीवा भेटे। तें सुषुप्तिकाळीं वोहटे। जेथ ज्ञान ॥ ६५ ॥ तया जीवा नांव ज्ञाता। आणि जें हें सांगितलें आतां। तेंचि एथ पंडुसुता। ज्ञान जाण ॥ ६६ ॥ जें अविद्येचिये पोटीं। उपजतखेंवों किरीटी। आपणयातें वांटी। तिहीं ठायीं ॥ ६७ ॥ आपुलिये धांवे पुढां। घालूनि ज्ञेयाचा गुंडा। उभारी मागिली-कडां। ज्ञातृत्वातें ॥ ६८ ॥ मग ज्ञातया ज्ञेया दोघां। तो नांदणुकेचा बगा। माजीं जालेनि पैंगा। वाहे जेणें ॥ ६९ ॥ ठाकूनि ज्ञेयाची शिंव। पुरे जयाची धांव। सकळ पदार्थां नांव। ठेवितसे जें ॥ ४७० ॥ तें गा सामान्यज्ञान। या बोला नाहीं आन। ज्ञेयाचेंही चिन्ह। आइक आतां ॥ ७१ ॥ तरी शब्द स्पर्शु। रूप गंध रसु। हा पंचविध आभासु। ज्ञेयाचा जो ॥ ७२ ॥ जैसें एकेंचि चूतफळें। इंद्रियां वेगळवेगळें। रसें वर्णें परिमळें। भेटिजे स्पर्शें ॥ ७३ ॥ तैसें ज्ञेय तरी एकसरें। परी ज्ञान इंद्रियद्वारें। घे म्हणोनि प्रकारें। पांचें जालें ॥ ७४ ॥ आणि समुद्रीं वोघाचें जाणें। सरे लाणीपासीं धांवणें। कां फळीं सरे वाढणें। सस्याचें जेवीं ॥ ७५ ॥ तैसें इंद्रियांचां वाहवटीं। धांवतया ज्ञाना जेथ ठी। होय तें गा किरीटी। विषय ज्ञेय ॥७६॥ एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया। तिहीं रूप केलें धनंजया। हे त्रिविध सर्व क्रिया- । प्रवृत्ति जाण ॥७७॥ जे शब्दादि विषय। हें पंचविध जें ज्ञेय। तेंचि प्रिय कां अप्रिय। एके परीचें ॥ ७८ ॥ ज्ञान मोटकें ज्ञातया। दावी ना जंव धनंजया। तंव स्वीकारा कीं त्यजावया। प्रवर्तेचि तो ॥ ७९ ॥ परी मीनातें देखोनि बकु। जैसा निधानातें रंकु। कां स्त्री देखोनि कामुकु। प्रवृत्ति धरी ॥४८०॥ जैसें खालारा धांवे पाणी। भ्रमर फुलाचिये घाणीं। नाना सुटला सांजवणीं। वत्सुचि पां ॥ ८१ ॥ अगा स्वर्गींची उर्वशी। ऐकोनि जेवीं माणुसीं। बारल्या लावीजती आकाशीं। यागांचिया ॥ ८२ ॥ पैं पारिवा जैसा किरीटी। चढला नभाचियेहि पाठीं। पारवी देखोनि लोटी। आंगचि सगळें ॥ ८३ ॥ हें ना घनगर्जनासारिसा। मयूर वोवांडे आकाशा। ज्ञाता ज्ञेय देखोनि तैसा। धांवचि घे ॥ ८४ ॥ म्हणोनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता। हे त्रिविध गा पंडुसुता। होयचि कर्मा समस्तां। प्रवृत्ति येथ ॥ ८५ ॥ परी तेंचि ज्ञेय विपायें। जरी ज्ञातयातें प्रिय होये। तरी भोगावया न साहे। क्षणही विलंबु ॥ ८६ ॥ नातरी अवचटें। तें विरु होऊनि भेटे। तरी युगांत वाटे। सांडावया ॥ ८७ ॥ व्याळा कां हारा। वरपडा जालेया नरा। हरिखु आणि दरारा। सरसाचि उठी ॥ ८८ ॥ तैसें ज्ञेय प्रियाप्रियें। देखिलेनि ज्ञातया होये। मग त्यागस्वीकारीं वाहे। व्यापारातें ॥ ८९ ॥ तेथ रागी प्रतिमल्लाचा। गोसांवी सर्वदळाचा। रथु

सुखदुःखांची लूट आणतात, ४६४. हें राहूं दे. जें ज्ञान ह्या इंद्रियांच्या द्वारानें आपला व्यवहार चालवितें व जें ज्ञान जीवाला सुखदुःखें अनुभवाला आणून देतें, तें ज्ञान सुषुप्तीकालीं जेथें लीन होऊन राहातें. ४६५. त्या ( सुषुप्त्यभिमानी प्राज्ञ ) जीवाला ज्ञाता असें म्हणतात. आणि अर्जुना, आतां (मागील ओंवीत) जें हें येथें सांगितलें, तेंच ज्ञान होय, असें समज. ४६६. अर्जुना, तें जीवाचें ज्ञान ( विपरीतज्ञान ) अविद्येच्या पोटीं उपजतांक्षणींच आपलेच तीन विभाग करतें. ४६७. आपल्या धांवेपुढें ज्ञेयाचा ( विषयाचा ) धोंडा ( बांध ) घालून आपल्या मागल्या बाजूला ज्ञातेपणाला ( ज्ञात्याला ) उभारतें. ( अभिप्राय असा कीं, विपरीत ज्ञान हें अविद्येंतून बाहेर पडल्याबरोबर जेथें आपली धांव संपवितें, येथें विषयाची सिद्धि करून मागच्या बाजूला ज्ञात्याची सिद्धि करतें. ) ४६८. जें ज्ञान, ज्ञाता आणि ज्ञेय यांचे मध्यें असल्यानें, ज्ञाता व ज्ञेय या दोघांच्या व्यवहाराचा प्रकार चालत असतो; ४६९. ज्ञेयाच्या ( विषयाच्या ) हद्दीवर प्राप्त झालें असतां, ज्या ज्ञानाची धांव संपते. ( जें ज्ञान केवळ विषयांनाच जाणतें आणि विषयाच्या पुढें ज्याची जाणण्याची शक्ति नाहीं) आणि मग जें ज्ञान सर्व पदार्थांना नांवें देतें; ४७०. अर्जुना, तें सामान्य ज्ञान होय, यांत अन्यथा नाहीं. आतां ज्ञेयाचेंही लक्षण ऐक. ४७१. तरी शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध असे पांच प्रकाराच्या विषयांचे भेद दिसून येतात. ४७२. ज्याप्रमाणें एकाच आंब्याच्या फळानें निरनिराळ्या इंद्रियांना वेगवेगळे भोग द्यावेत; रसानें ( जिव्हेला, ) वर्णानें ( डोळ्यांना ), परिमळानें ( घ्राणाला ) आणि स्पर्शानें ( मृदु अथवा कठीणपणानें ) ( त्वचेला ) भेटावें. ( अशा रीतीनें वेगवेगळ्या इंद्रियांच्या द्वारां, वेगवेगळ्या प्रकारचें ज्ञान होतें, परंतु फळ एकच असतें. ) ४७३. याप्रमाणें ज्ञेय ( विषय ) एकच आहे, परंतु जीव हा एकाच ज्ञेयाचें ज्ञान, निरनिराळ्या पांच इंद्रियद्वारां करून घेतो; म्हणून शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध असे त्या ज्ञेयाचे पांच प्रकार झाले आहेत. ४७४. आणि ज्याप्रमाणें ओघाचें वाहाणें समुद्रांत थांबतें अथवा मुक्कामापाशीं प्रवास करणाराचें चालणें बंद पडतें अथवा धान्यादि पिकांची वाढ कणसें आलीं कीं खुंटते; ४७५. त्याप्रमाणें इंद्रियांच्या द्वारें धांवणाऱ्या ज्ञानाचा जेथें शेवट होतो, अर्जुना, तो विषय ज्ञेय होय. ४७६. अर्जुना, याप्रमाणें ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय या तिघांचें वर्णन केलें. ही त्रिपुटी सर्व कर्मांच्या प्रेरणेचें कारण आहे, असें समज. ४७७. शब्दादि विषय हें पांच प्रकारचें ज्ञेय आहे. तेंच प्रिय किंवा अप्रिय, या दोन प्रकारांपैकीं कोणत्याही एक प्रकारचें असतें–४७८. अर्जुना, ज्ञान हें ज्ञात्याला तो विषय जरा दाखवितें न दाखवितें तोंच तो ज्ञाता त्या विषयाचा ( प्रिय असल्यास ) स्वीकार अथवा ( अप्रिय असल्यास ) त्याग करण्यास प्रवृत्तच होतो. ४७९. परंतु माशाला पाहून त्याला पकडण्यास बगळा जसा त्वरेनें झडप घालतो अथवा ठेवा पाहून तो घेण्यास दरिद्री मनुष्य जितक्या वेगानें धांवतो, अथवा स्त्रीला पाहून कामी पुरुष जितक्या वेगानें तिला धरण्यास पुढें सरसावतो. ४८०. ज्याप्रमाणें पाणी उतारावर धांवतें अथवा भुंगा फुलाच्या वासाकडे धांवतो अथवा धार काढावयाच्या वेळेला सोडलेलें वांसरूं जसें ( गाईकडे ) धांवतें; ४८१. अरे अर्जुना, स्वर्गलोकींची उर्वशी ऐकून, ज्याप्रमाणें मनुष्याकडून आकाशांत यज्ञांच्या शिड्या लावल्या जातात; ४८२. अर्जुना, आकाशांत उंच चढलेला पारवा, पारवीला पाहून, ज्याप्रमाणें आपलें सगळें अंगच तिच्याकडे लोटून देतो; ४८३. अथवा हें राहूं दे. ढगांच्या गडगडाटाबरोबर मोर जसा आकाशाकडे कौतुकानें उडण्याचा प्रयत्न करतो, त्याप्रमाणें ज्ञेयाला पाहून ज्ञाता ( जीव ) तिकडे धांवच घेतो. ४८४. म्हणून अर्जुना, ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान हे तिन्ही या जगांत सर्व कर्मांना प्रवृत्ति ( प्रेरणा ) करणारे आहेत. ४८५. परंतु तेंच ज्ञेय ( तोच विषय ) जर कदाचित् ज्ञात्याला ( जीवाला ) प्रिय असेल, तर तो विषय भोगण्याला एक क्षणाचा ही विलंब झाल्यास सहन होत नाहीं. ४८६. अथवा कदाचित् तो विषय अप्रिय असा त्यास वाटला, तर त्यास तो टाकी तोंपर्यंत, प्रलयकाल आल्यासारखें दुःख होऊन, त्या विषयाचा त्याग केव्हां होईल असें त्यास वाटतें व त्यागास थोडा वेळ लागला, तर त्यास तो वेळ युग गेल्याप्रमाणें वाटतो. ४८७. एखादा मनुष्य सर्पाजवळ प्राप्त झाला व तो सर्प नसून नीळमण्यांचा हार आहे अशी जर त्याची समजूत झाली कीं लगेच त्यास हर्ष होतो; पण त्या हर्षामुळें तो हार घेण्याकरतां त्यानें त्यास हात लावला व तो हार नसून साप आहे, असें त्यास कळलें कीं, तत्क्षणींच त्याचे ठिकाणीं भीति उत्पन्न होते. ४८८. ज्ञेयाविषयीं प्रियाप्रियबुद्धि झाल्यानें ज्ञात्याची त्याप्रमाणें अवस्था होते व मग तो स्वीकार व त्याग करण्याच्या क्रियेकडे प्रवृत्त होतो. ४८९. तेव्हां, ( रथावर बसून जाणारा ) जोडीच्या पहिलवानाबरोबर कुस्ती करण्याचा शोक

सांडूनि पायांचा । होय जैसा ॥ ४९० ॥ तैसें ज्ञातेपणें जें असे । तें ये कर्ता ऐसिये दशे । जेवितें बैसलें जैसें । रंधन करूं ॥ ९१ ॥ कां भंवरेंचि केला मळा । वरकलुचि जाला अंकसळा । नाना देवो रिगाला देउळा- । चिया कामा ॥ ९२ ॥ तैसा ज्ञेयाचिया हांवा । ज्ञाता इंद्रियांचा मेळावा । राहाटवी तेथ पांडवा । कर्ता होय ॥ ९३ ॥ आणि आपण होउनी कर्ता । ज्ञाना आणी करणता । तेथें ज्ञेयचि स्वभावतां । कार्य होय ॥ ९४ ॥ ऐसा ज्ञानाचिये निजगती । पालटु पडे गा सुमती । डोळ्यांची शोभा रातीं । पालटे जैसी ॥ ९५ ॥ कां अदृष्ट जालिया उदासु । पालटे श्रीमंताचा विलासु । पुनिवेपाठीं शीतांशु । पालटे जैसा ॥ ९६ ॥ तैसा चाळितां करणें । ज्ञाता वेठिजे कर्तेपणें । तेथिंचीं तियें लक्षणें । ऐक आतां ॥ ९७ ॥ तरी बुद्धि आणि मन । चित्त अहंकार हन । हें चतुर्विध चिन्ह । अंतःकरणाचें ॥ ९८ ॥ बाहिरि त्वचा श्रवण । चक्षु रसना घ्राण । हें पंचविध जाण । इंद्रियें गा ॥ ९९ ॥ तेथ आंतुलें तंव करणें । कर्ता कर्तव्या घे उमाणें । मग तें जरी जाणें । सुखा येतें ॥ ५०० ॥ तरी बाहेरिलें तियेंही । चक्षुरादिकें दाहाही । उठौनि लवलाहीं । व्यापारा सूये ॥ १ ॥ मग तो इंद्रियकदंबु । करविजे तंव राबु । जंव कर्तव्याचा लाभु । हातासि ये ॥ २ ॥ ना तें कर्तव्य जरी दुःखें । फळेल ऐसें देखे । तो लावी त्यागमुखें । तियें दाहाही ॥ ३ ॥ मग फिटे दुःखाचा ठावो । तंव राहटवी रात्रिदिवो । विकणुवातें कां रावो । जयापरी ॥ ४ ॥ तैसेनि त्यागस्वीकारीं । वाहातां इंद्रियांची धुरी । ज्ञातयातें अवधारीं । कर्ता म्हणिपे ॥ ५ ॥ आणि कर्तयाचां सर्व कर्मीं । आउतांचिया परी क्षमी । म्हणोनि इंद्रियांतें आम्ही । करणें म्हणों ॥ ६ ॥ आणि हेचि करणेंवरी । कर्ता क्रिया ज्या उभारी । तिया व्यापे तें अवधारीं । कर्म एथ ॥ ७ ॥ सोनाराचिया बुद्धी लेणें । व्यापे चंद्रकरीं चांदिणें । कां व्यापे वेल्हाळपणें । वेली जैसी ॥८॥ नाना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु । हें असो अवकाशु । आकाशीं जैसा ॥ ९ ॥ तैसें कर्तयाचिया क्रिया । व्यापलें जें धनंजया । तें कर्म गा बोलावया । आन नाहीं ॥ ५१० ॥ एवं कर्ता कर्म करण । या तिहींचेंही लक्षण । सांगितलें तुज विचक्षण- । शिरोमणी ॥ ११ ॥ एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । हें कर्माचें प्रवृत्तित्रय । तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्मसंचयो ॥ १२ ॥ वन्हीं ठेविला असे धूमु । आथी बीजीं जेवीं द्रुमु । कां मनीं जोडे कामु । सदा जैसा ॥ १३ ॥ तैसा कर्ता क्रिया करणीं । कर्माचें आहे जितवणीं । सोनें जैसें खाणी । सुवर्णाचिये ॥ १४ ॥ म्हणोनि हें कार्य मी कर्ता । ऐसें आथि जेथ पांडुसुता । तेथ आत्मा दूरी समस्तां- । क्रियांपासीं ॥ १५ ॥ यालागीं पुढती । आत्मा वेगळाचि सुमती । आतां असो हे किती । जाणतासि तूं ॥ १६ ॥

असलेला सर्व चतुरंग सैन्याचा सेनापति, ज्याप्रमाणें समोर येणारा पहिलवान पाहून, त्याचे बरोबर लढण्याकरितां रथावरून खालीं उतरून ( जमिनीवर ) पवित्र्यावर दंड थोपटून उभा रहावा, ४९०. त्याप्रमाणें ज्ञातेपणानें जो असतो, तोच ( त्याग स्वीकाराच्या क्रियेमुळें ) कर्ता अशा ( हीन ) अवस्थेला येतो. ( अशा कर्ता ह्या हीन अवस्थेला तो आला म्हणजे त्याची वाईट दशा होते. ती कशी तर ) ज्याप्रमाणें ( आयत्या ) जेवणाऱ्या माणसानें स्वयंपाक करावयास बसावें; ४९१. अथवा भुंग्यानेंच जसा बाग करावा, सोन्याची परीक्षा करणारा ( सराफ ) जसा कसोटीचा दगड व्हावा अथवा देवानेंच जसें देवळाच्या कामाला ( देऊळ बांधण्याच्या कामाला ) लागावें; ४९२. अर्जुना, त्याप्रमाणें विषयाच्या लोभानें ज्ञाता ( जीव ) इंद्रियसमुदायास व्यापार ( कर्में ) करावयाला लावतो, तेव्हां तो कर्ता होतो. ४९३. आणि ज्ञाता आपण कर्ता होऊन, ज्ञानाला करणता ( साधनपणा ) आणतो, तेव्हां ज्ञेय हें स्वभावतःच कार्य ( क्रियेचें फळ ) होतें. ४९४. हे बुद्धिवान् अर्जुना, याप्रमाणें ज्ञानाच्या स्वतःच्या गतीला पालट पडतो ( ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी जाऊन तिच्या ठिकाणीं कर्ता, करण व कर्म ही त्रिपुटी येते; कारण ज्ञानच ज्ञाता झालेलें असल्यामुळें, ज्ञात्यांत प्रथम पालट झाला कीं, ज्ञान व ज्ञेय हींही बदलतात. ) ज्याप्रमाणें रात्रीं डोळ्यांची शोभा बदलते ( त्यांचें तेज कमी होतें ) त्याप्रमाणें. ४९५. अथवा प्रारब्ध उदास झालें म्हणजे श्रीमंताच्या विलासास उतरती कळा लागते; ज्याप्रमाणें पौर्णिमेच्या नंतर चंद्राची स्थिति बदलते ( दिवसेंदिवस त्याची एक एक कला कमी होते. ) ४९६. त्याप्रमाणें ज्ञाता इंद्रियद्वारां व्यवहार करावयास लागल्याबरोबर तो ज्ञाता कर्तेपणानें व्यापला जातो. आतां ज्ञाता हा जेव्हां कर्ता होतो त्या वेळचीं लक्षणें ऐक. ४९७. तर बुद्धि, मन, चित्त आणि अहंकार, हे अंतःकरणाचे चार प्रकार आहेत. ४९८. ( अंतःकरणाच्या ) बाहेर त्वचा, कान, डोळे, जिव्हा व नाक हीं पांच प्रकारचीं ज्ञानेंद्रियें आहेत, असें समज. ४९९. तेव्हां कर्ता जो जीव, तो आंतल्या इंद्रियांनीं ( अंतःकरण चतुष्टयानें ) कर्तव्याचा (कर्माचा) हिशोब घेतो. ( म्हणजे विचार करतो. ) व तें कर्म करणें आपल्याला सुखकारक होईल असें जर त्याला वाटलें, ५००. तर बाहेरील त्या चक्षु वगैरे दहा इंद्रियांनाही लगबगीनें उठवून व्यापाराला लावतो. ( कर्म करावयास लावतो. ) ५०१. मग आरंभ केलेल्या कर्मांचें फल हस्तगत होईपर्यंत त्या इंद्रियसमुदायाकडून मेहनत करवितो. ५०२. अथवा त्या कर्तव्याचें दुःख हें फल होईल, असें जर त्याला वाटलें, तर तींच दहाही इंद्रियें त्या कर्तव्याच्या त्यागाकडे लावतो. ५०३. मग ज्याप्रमाणें धान्याचा कणही जवळ नसलेल्या शेतकरी मनुष्याला राजा, शेतसाऱ्याबद्दल राबवितो, त्याप्रमाणें मग तो दुःखाचा ठावठिकाण नाहींसा होईपर्यंत रात्रंदिवस इंद्रियसमुदायाला राबवितो. ५०४. अर्जुना,ऐक. त्याप्रमाणें त्यागस्वीकाराच्या क्रियेंत ( कर्मांत ) इंद्रियांचें जूं वाहात असतांना ज्ञात्याला कर्ता असें म्हणतात५०५. आणि कर्त्यांच्या सर्व कर्मांत इंद्रियें हीं आउताप्रमाणें ( कर्म करण्यास ) समर्थ असतात म्हणून इंद्रियांना आम्ही करण म्हणतों. ५०६. आणि ह्याच इंद्रियांच्या योगानें कर्ता ज्या क्रिया उभारतो, त्या क्रियाकडून जें व्यापलें जातें, तें येथें ( या जगांत ) कर्म होय. ( कर्त्यांच्या क्रियेनें जें तयार होतें, त्याला कर्म म्हणतात. ) ५०७. सोनाराच्या बुद्धीनें जसा दागिना व्यापला जातो, अथवा चंद्राच्या किरणांनीं जसें चांदणें व्यापलें जातें, अथवा विस्तृतपणानें जसा वेल व्यापला जातो, ५०८. अथवा प्रभेनें जसा प्रकाश व्यापला जातो अथवा उंसाचा रस जसा गोडीनें व्यापला जातो; हें राहूं दे. अवकाश जसा आकाशानें व्यापला जातो; ५०९. अर्जुना, त्याप्रमाणें कर्त्यांच्या क्रियेनें जें व्यापलें जातें, तें कर्म होय, या प्रतिपादनांत अन्यथा नाहीं. ५१०. हे चतुरांच्या श्रेष्ठ अर्जुना, याप्रमाणें कर्ता, कर्म व करण, या तीहींचेंही तुला लक्षण सांगितलें. ५११. येथें ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय हे तीन, कर्मांची प्रेरणा करणारे आहेत; व त्याचप्रमाणें कर्ता, करण व कार्य, हा कर्मांचा सांठा आहे. ५१२. जसा अग्नीच्या ठिकाणीं धूरही अगदीं ठेविल्यासारखाच आहे, बीजामध्यें झाड जसें ( ठेवलेलें ) आहे अथवा मनामध्यें काम जसा सदा प्राप्त आहे; ५१३. त्याप्रमाणें कर्ता, क्रिया व करण ( इंद्रियें ) हीं सर्व कर्मांचें जीवन आहेत. ज्याप्रमाणें सोन्याच्या खाणीला सोनेंच जीवन आहे. ५१४. म्हणून अर्जुना, जेथें हें कार्य व मी कर्ता, असा भाव आहे, त्या वेळीं देखील आत्मा सर्व कर्मांपासून दूर असतो. ५१५. हे सुमति अर्जुना, एवढ्याकरितां आत्मा कर्मांपासून वेगळा आहे. आतां हे पुनः किती सांगावें ? आतां हें राहूं दे. हें तूं जाणतच आहेस. ५१६.

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः । प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

परी सांगितलें जें ज्ञान । कर्म कर्ता हन । ते तिन्ही तिहीं ठायीं भिन्न । गुणीं आहाती ॥ १७ ॥ म्हणोनि ज्ञाना कर्मा कर्तया । पातेजों नये धनंजया । जे दोनी बांधती सोडावया । एकचि प्रौढ ॥ १८ ॥ तें साच्चिक ठाउवें होये । तो गुणभेदु सांगों पाहें । जो सांख्यशास्त्रीं आहे । उवाइला ॥ १९ ॥ जें विचारक्षीरसमुद्र । स्वबोधकुमुदिनीचंद्र । ज्ञानडोळसां नरेंद्र । शास्त्रांचा जें ॥ ५२० ॥ कीं प्रकृतिपुरुष दोनीं । मिसळलीं दिवोरजनीं । तियें निवाडितां त्रिभुवनीं । मार्तंडु जें ॥ २१ ॥ जेथ अपारा मोहराशी । तत्त्वाचां मापीं चोविसीं । उमाणा घेऊनि परेशीं । सुखाडिजे ॥ २२ ॥ अर्जुना तें सांख्यशास्त्र । पढे जयाचें स्तोत्र । तें गुणभेदचरित्र । ऐसें आहे ॥ २३ ॥ जे आपुलेनि आंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें । दृश्यजात तितुकें । अंकित केलें ॥ २४ ॥ एवं सत्त्वरजतमा । तिहींची एवढी असे महिमा । जे त्रैविध्य आदी ब्रह्मा । अंतीं कृमी ॥ २५ ॥ परी विश्वींची आघवी मांदी । जेणें भेदलेनि गुणभेदीं । पडिली तें तव आदी । ज्ञान सांगों ॥ २६ ॥ जे दिठी जरी चोख कीजे । तरी भलतेंही चोख सुजे । तैसें ज्ञानें शुद्धें लाहिजे । सर्वही शुद्ध ॥ २७ ॥ म्हणोनि तें साच्चिक ज्ञान । आतां सांगों दे अवधान । कैवल्यगुणनिधान । श्रीकृष्ण म्हणे ॥ २८ ॥

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते । अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥

तरी अर्जुना गा तें फुडें । साच्चिक ज्ञान चोखडें । जयाचां उदयीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसीं ॥ २९ ॥ जैसा सूर्य न देखे आंधारें । सरिता नेणिजती सागरें । कां कवळिलिया न धरे । आत्मच्छाया ॥ ५३० ॥ तयापरी जया ज्ञाना । शिवादि तृणावसाना । इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ॥ ३१ ॥ जैसें हातें चित्र पाहातां । होय पाणियें मीठ धुतां । कां चेवोनि स्वप्ना येतां । जैसें होय ॥ ३२ ॥ तैसें ज्ञानें जेणें । करितां ज्ञातव्यातें पाहाणें । जाणता ना जाणणें । जाणावें उरे ॥ ३३ ॥ पैं सोनें आटूनि लेणीं । न काढिती आपुलिया आयणी । कां तरंग न घेपती पाणी । गाळूनि जैसें ॥ ३४ ॥ तैसी जया ज्ञानाचिया हाता । न लगेचि दृश्यकथा । तें ज्ञान जाण सर्वथा । साच्चिक गा ॥ ३५ ॥ आरिसा पाहों जातां कोडें । जैसें पाहातेंचि कां रिगे पुढें । तैसें ज्ञेय लोटोनि पडे । ज्ञाताचि जें ॥ ३६ ॥ पुढतीं तेंचि साच्चिक ज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन । हें असो ऐक चिन्ह । राजसाचें ॥ ३७ ॥

ज्ञान, कर्म आणि कर्ता हीं तीन देखील ( सत्त्व रज आणि तम अशा ) गुणभेदानें तीन प्रकारचीं आहेत, असें सांख्यशास्त्रामध्यें सांगितलें आहे. त्या प्रत्येकाचे तीन तीन प्रकार जसेच्या तसे मी सांगतों तूं ऐक. १९.

परंतु ज्ञान, कर्म व कर्ता हे जे आतां तुला तीन सांगितले, या तिघांचे, गुणांच्या योगानें तीन ठिकाणीं भेद झालेले आहेत. ५१७. म्हणून अर्जुना, ज्ञान, कर्म व कर्ता यांच्यावर विश्वासूं नये. कारण राजसिक व तामसिक हे दोन प्रकार बांधणारे आहेत व सात्त्विक हा एक प्रकार सोडवण्यास समर्थ आहे. ५१८. तो सात्त्विक प्रकार तुला ठाऊक व्हावा, म्हणून सांख्यशास्त्रामध्यें जे गुणांचे प्रकार स्पष्ट केले आहेत, ते प्रकार तुला सांगतों, पहा. ५१९. जें सांख्यशास्त्र विचाराचा क्षीरसागर आहे, आत्मज्ञानरूपी ( चंद्रविकासिनी ) कमलाचा ( विकास करणारा ) चंद्र आहे व जें सांख्यशास्त्र ज्ञानानें डोळस अशा शास्त्रांचा राजा आहे. ५२०. अथवा प्रकृति व पुरुष हींच जणूंकाय एकमेकांत मिसळलेली दिवसरात्र होत; यांस वेगवेगळें करून दाखविणारें जें सांख्यशास्त्र तें ह्या तिन्ही लोकांत सूर्यच आहे. ५२१. ज्या सांख्यशास्त्राच्या योगानें, अपार अशा मोहाच्या राशीचे ( संसाराचे ) चोवीस तत्त्वांच्या मापानें मोजमाप करून ( संसार जरी अपार आहे तरी तो चोवीस तत्त्वांचा आहे, असें सांख्यशास्त्रानें ठरविलें आहे, त्याप्रमाणें विचार करून त्या तत्त्वांचा निरास करून ) परतत्त्वासह सुखी होऊन राहातां येतें. ५२२. अर्जुना, तें सांख्यशास्त्र ज्या गुणभेदाचें वर्णन करतें, त्या गुणभेदाचा प्रकार असा आहे. ५२३. कीं त्या गुणभेदांनीं, आपल्या अंगच्या सामर्थ्यानें त्रिविधपणाच्या शिक्क्यांनीं, ( जेवढें दृश्य, तितकें सर्व ) चिन्हित केलें ( सर्व दृश्यावर त्रिविधपणाचा शिक्का मारला. ) ५२४. याप्रमाणें सत्त्व, रज, तम या तिघांचा एवढा महिमा आहे कीं, या तीन गुणांनीं ब्रह्मदेवापासून तों अखेर किड्यापर्यंत तीन प्रकार केले आहेत. ५२५. परंतु जें ( ज्ञान ) भेदलें गेल्यामुळें, जगांतील सर्व ( पदार्थांचे ) समुदाय गुणभेदांत पडले, तें ज्ञान तर अगोदर सांगतों. ५२६. कारण कीं, दृष्टि निर्मळ केली, तर वाटेल तें शुद्ध दिसतें; त्याप्रमाणें शुद्ध ज्ञानाच्या योगानें सर्व शुद्धच प्राप्त होतें. ५२७. म्हणून तें सात्त्विक ज्ञान आतां सांगतों, लक्ष दे, असें मोक्षरूपी गुणांचा ठेवा जे श्रीकृष्ण, ते म्हणाले. ५२८.

भिन्न भिन्न असलेल्या सर्व भूतांचे ठिकाणीं एकच, अविनाशी व अविभक्त असा आत्मा, ( मनुष्य ) ज्याच्या योगानें पहातो, तें ज्ञान तूं सात्त्विक असें समज. २०.

तर अर्जुना, तें खरोखर शुद्ध सात्त्विक ज्ञान होय, ( कीं ) ज्याच्या उदयांत ज्ञात्यासह ज्ञेय बुडतें ( म्हणजे नाहींसें होतें. ) ५२९. ज्याप्रमाणें सूर्याला अंधकाराचें दर्शनही नसतें, समुद्रास नद्यांची खबरही नसते; किंवा कितीही मिठी मारून धरावयास गेलें तरी आपली सावली पकडली जात नाहीं; ५३०. त्याप्रमाणें ज्या ज्ञानाला शिवापासून तों शेवट तृणापर्यंतचीं हीं वेगवेगळीं भूतें भिन्न दिसत नाहींत. ५३१. ज्याप्रमाणें ( पाटीवर काढलेलें ) चित्र पाटीवर हात फिरवून पाहूं लागलें असतां तें चित्र नाहींसें होतें, अथवा मीठ पाण्यानें धुतलें असतां जसें नाहींसें होतें; अथवा जागें होऊन स्वप्न पाहूं गेलें असतां जसें तें नाहींसें होतें; ५३२. त्याप्रमाणें ज्या ज्ञानानें विषय पाहिले असतां, तेथें जाणता ( ज्ञाता ) अथवा जाणणें ( ज्ञान करून घेण्याची क्रिया ) अथवा जाणावें ( ज्ञेयविषय ) हीं उरत नाहींत. ५३३. बुद्धिवान् लोक जसे आपल्या बुद्धीनें दागिने आटवून सोनें काढीत नाहींत; ( तर मग दागिन्यांच्या रूपानें सोनेंच आहे असें समजतात. ) अथवा ( शहाणे लोक ) लाटा गाळून त्यांतील पाणी बाजूला काढून, मग ते पाणी घेत नाहींत ( तर लाटांच्या रूपानें देखील पाणीच आहे असें समजतात. ) ५३४. त्याप्रमाणें ज्या ज्ञानाच्या हाताला ही दृश्याची गोष्ट लागतच नाहीं, तें ज्ञान सर्व प्रकारानें सात्त्विक आहे असें समज, ५३५ कौतुकानें आरसा पहावयास लागलें असतां, पाहाणाराच जसा प्रतिबिंबाचे रूपानें समोर अनुभवास येतो, त्याप्रमाणें ज्ञानाच्या द्वारां ज्ञाता पाहूं लागला कीं, ज्ञेयाच्या रूपानें ( ज्ञेय दूर करून ) ज्ञाताच त्या जागीं असल्याचें अनुभवास येतें. ५३६. असें जें तेंच सात्त्विक ज्ञान होय, तेंच मोक्षलक्ष्मीचें मंदीर होय. हें सात्त्विक ज्ञानाचें वर्णन पुरे. आतां पुढें राजस ज्ञानाचें लक्षण ऐक. ५३७.

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् । वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥

तरी पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस । जे भेदाची कांस । धरूनि चाले ॥ ३८ ॥ विचित्रता भूतांचिया । आपण आंतोनि ठिकरिया । बहु चकें ज्ञातया । आणिली जेणें ॥ ३९ ॥ जैसें साचा रूपाआड । घालूनि विसराचें कवाड । मग स्वप्नाचें कावाड । वोइरी निद्रा ॥ ५४० ॥ तैसें स्वज्ञानाचिये पौळी– । बाहेरि मिथ्याचे मढीं खळीं । तिहीं अवस्थाचिया वह्याळी । दावी जें जीवा ॥ ४१ ॥ अलंकारपणें झांकलें । बाळा सोनें कां वायां गेलें । तैसें नामीं रूपीं दुरावलें । अद्वैत जया ॥ ४२ ॥ अवतरली गाडुगां घडां । पृथ्वी अनोळख जाली मूढां । वन्हि जाला कानडा । दीपत्वासाठीं ॥ ४३ ॥ कां वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे । नाना मुग्धा पटु लोपे । दाऊनि चित्र ॥ ४४ ॥ तैशी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ती भिन्ना । ऐक्यबोधाची वासना । निमोनि गेली ॥ ४५ ॥ मग इंधनीं भेदला अनळु । फुलावरी परिमळु । कां जळभेदें सकळु । चंद्रु जैसा ॥४६॥ तैसे पदार्थभेद बहुवस । जाणोनि लहान थोर वेष । आंतलें तें राजस । ज्ञान येथ ॥ ४७ ॥ आतां तामसाचेंही लिंग । सांगेन तें वोळख चांग । डावलावया मातंग– । सदन जैसें ॥ ४८ ॥

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् । अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

तरी किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रेंहीन । श्रुति पाठमोरी नग्न । म्हणौनि तया ॥ ४९ ॥ येरीही शास्त्र बाटिकरीं । जें निंदेचे विटाळवरी । बोळविलेंसे डोंगरीं । म्लेंच्छधर्माचां ॥५५०॥ जें गा ज्ञान ऐसें । गुणग्रहें तामसें । घेतलें भोंवे पिसें । होऊनियां ॥५१॥ जें सोयरिके बाधु नेणे । पदार्थीं निषेधु न म्हणे । निरोविलें जैसें सुणें । शून्यग्रामीं ॥ ५२ ॥ तया तोंडीं जें नाडळे । कां खातां जेणें पोळे । तेंचि एक वाळे । येर घेणेंचि ॥५३॥ पाहीं सोनें चोरितां उंदिरु । न म्हणे थरुविथरु । नेणे मांसखाइरु । काळें गोरें ॥ ५४ ॥ नाना वनामाजीं वोहरी । कडसणी जेवीं न करी । कां जीत मेलें न विचारी । बैसतां माशी ॥ ५५ ॥ अगा वांता कां वाढिलेया । साजुक कां सडलिया । विवेकु कावळिया । नाहीं जैसा ॥ ५६ ॥ तैसें निषिद्ध सांडूनि द्यावें । कां विहित आदरें घ्यावें । हें विषयांचेनि नांवें । नेणेचि जें ॥ ५७ ॥ जेतुलें आड पडे दिठी । तेतुलें घे विषयाचि साठीं । मग तें स्त्री द्रव्य वाटी । शिश्नोदरां ॥ ५८ ॥ तीर्थातीर्थ हे भाष । उदकीं नाहीं सनोळख । तहान वोळे तेंचि सुख । वांछुनियां ॥ ५९ ॥ तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य । तोंडा आवडे तें मेध्य । ऐसाचि बोधु ॥ ५६० ॥ आणि स्त्रीजात तितुकें ।

सर्व भूतांचे ठिकाणीं, हे भिन्न भिन्न प्रकारचे पदार्थ आहेत, असा ( अद्वितीय आत्म्याविषयीं ) भेदकारक बोध ज्या ज्ञानानें होतो, तें राजस ज्ञान होय असें जाण. २१.

तर अर्जुना, ऐक. जें ज्ञान द्वैताचा आश्रय धरून चालतें, तें ज्ञान राजस होय.५३८. भूतांच्या विचित्रतेमुळें, आपण स्वतः तुकडे तुकडे होऊन, ज्या ज्ञानानें ज्ञात्याला (जीवाला) बराच भ्रमिष्टपणा आणला; ५३९. ज्याप्रमाणें जागृतींतील आपल्या खऱ्या स्वरूपाच्या आड, विसराचें दार लावून, झोंप ही स्वप्नाचें ओझें डोक्यावर ठेवते; ५४०. त्याप्रमाणें जें ज्ञान आत्मज्ञानाच्या आवाराबाहेर, असार संसाराच्या मोकळ्या माळावर, जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांचे खेळ जीवांना दाखवितें. ५४१. अलंकाररूपानें असणारें सोनें, जसें मुलाला सोनें वाटत नाहीं, त्याप्रमाणें नामरूपाच्या योगानें ज्या ज्ञानाला ब्रह्म दिसत नाहीं; ५४२. गाडगीं व घागरी यांच्या रूपाला आलेली जी माती, तिची मूर्खाला (जशी) अनोळख झाली, अथवा दीपपणामुळें अग्नि जसा ( मूर्खाला ) दुर्बोध झाला; ५४३. अथवा वस्त्रपणाच्या आरोपानें मूर्खाला जसा तंतू (सूत) नाहींसा होतो अथवा ज्याप्रमाणें कापड आपणावरील चित्र दाखवून मूर्खाला ( मूर्खाच्या दृष्टीला ) आपण नाहींसें होतें ( म्हणजे त्या मूर्खास चित्र दिसतें व कापड दिसत नाहीं; ) ५४४. त्याप्रमाणें ज्या ज्ञानानें भूतव्यक्ति ( प्राणिमात्रांचे आकार ) निरनिराळ्या आहेत असें समजल्यामुळें, ज्या ज्ञानाची ऐक्यबोधाची कल्पना नाहींशी झालेली असते; ५४५. मग अनेक काष्ठांनीं जसा अग्नि भेदला जावा अथवा अनेक फुलांनीं जसा सुवास भेदला जावा अथवा निरनिराळ्या लाटांतील पाण्यानीं जसा चंद्र भेदला जावा ( अग्नि, सुवास व चंद्र हे एकच असून, जसे उपाधिभेदामुळें मूर्खाला ते अनेक वाटतात ), ५४६. त्याप्रमाणें पदार्थांचे अनेक प्रकार जाणून,जें लहानथोर आकार बनलें आहे (अनेकत्वाला पावलें आहे ) तें येथें राजस ज्ञान होय. ५४७. ज्याप्रमाणें मांगाच्या घराचा त्याग करण्याकरितां त्या घराची माहिती सांगावी लागते, त्याप्रमाणें ( तामस ज्ञानाचा त्याग करण्याकरितां ) तामस ज्ञानाचेंही लक्षण सांगेन, तें चांगलें समजून घे. ५४८.



एका कार्याचे ठिकाणीं पूर्णत्वानें जडलेलें, प्रमाणरहित ( वेदबाह्य ), तत्त्वार्थशून्य व क्षुद्र, असें जें ज्ञान, त्याला तामस ज्ञान म्हणतात. २२,

तरी अर्जुना, जें ज्ञान विधीच्या वस्त्रानें रहित असें नागवें हिंडतें म्हणून (सर्वांची माउली)जी श्रुति,ती त्याला पाठमोरी झाली. ( म्हणजे श्रुतीनें ज्या ज्ञानाचा अव्हेर केला आहे.) ५४९. इतरही (श्रुतीच्या) कांसीं असलेल्या ( श्रुतीच्या अनुरोधानें चालणाऱ्या ) शास्त्रांनीं, ज्या तामस ज्ञानाला, निंदेच्या विटाळाच्या योगानें (तामस ज्ञान निंद्य आहे असा दोष देऊन )म्लेंच्छधर्मांच्या डोंगरावर घालवून दिलें आहे, ( ज्याच्यावर बहिष्कार घातला आहे;) ५५०. अर्जुना, जें ज्ञान तमोगुणरूपी पिशाचानें पछाडल्यामुळें वेडें होऊन भ्रमण करतें; ५५१. जें ज्ञान(विषयोपभोगाकरितां) नात्याची आडकाठी जाणत नाहीं व कोणताही पदार्थ निषिद्ध म्हणत नाहीं; ज्याप्रमाणें एखादें कुत्रें ओसाड गांवांत सोडलेलें असावें, ५५२. ( म्हणजे मग ) त्याच्या तोंडाच्या आटोक्यांत जो पदार्थ सांपडत नाहीं अथवा जो पदार्थ खातांना तोंड पोळतें, त्याच एका पदार्थाचा तें त्याग करतें; इतर सर्व पदार्थ घेतेंच. ५५३. पहा कीं, उंदीर ( लाखेचा डाक वगैरे लागलेलें ) सोनें चोरीत असतांना चांगलेंवाईट म्हणत नाहीं; अथवा मांस खाणारा जसें काळेंगोरें म्हणत नाहीं. ५५४. अथवा ज्याप्रमाणें रानामध्यें वणवा (जाळतांना) बरेंवाईट अशी निवड करीत नाहीं; अथवा माशी पदार्थावर बसतांना तो जिवंत का मेलेला आहे, याचा विचार करीत नाहीं; ५५५. अरे अर्जुना, अन्न ओकलेलें किंवा वाढलेलें अथवा ताजे किंवा सडकें, हा विचार जसा कावळ्याला नाहीं; ५५६. त्याप्रमाणें निषिद्धाचा अत्यंत त्याग करावा अथवा विहिताचा आदरानें स्वीकार करावा, हें विषयांच्या बाबतींत तें ज्ञान जाणत नाहीं. ५५७. जेवढें डोळ्यासमोर येईल, तेवढें भोगावयाचाच विषय आहे, असें मानून त्याचा जें ज्ञान स्वीकार करतें आणि मग तें मिळविलेलें स्त्री व द्रव्य शिस्नाकडे व पोटाकडे वांटून देतें. ५५८. पाण्यानें तहान भागेल तें सुख; यावांचून हें पाणी पवित्र अथवा हें पाणी अपवित्र, अशी ही उदकासंबंधानें भाषा ज्याच्या ओळखीची नसते. ५५९. त्याचप्रमाणें खाण्यास योग्य व अयोग्य व निंद्यानिंद्य, हें तें(तामस ज्ञान) म्हणत नाहीं. जें तोंडाला आवडेल तें पवित्र, अशी त्या तामस ज्ञानाची समजूत असते. ५६०. आणि जितकी

त्वचेंद्रियेंचि वोळखे । तियेविषयीं सोयरिके । एकाचि बोधु ॥ ६१ ॥ पैं स्वार्थी जें उपकरे । तयाचि नाम सोयिरें । देहसंबंधु न सरे । जिये ज्ञानीं ॥ ६२ ॥ मृत्यूचें आघवेंचि अन्न । आघवेंचि आगी इंधन । तैसें जगाचि आपलें धन । तामसज्ञाना ॥ ६३ ॥ ऐसेनि विश्व सकळ । जेणें विषोचि मानिलें केवळ । तया एक जाणें फळ । देहभरण ॥ ६४ ॥ आकाशपतिता नीरा । जैसा सिंधूचि येक थारा । तैसें कृत्यजात उदरा । लार्गोचि बुझे ॥ ६५ ॥ वांचूनि स्वर्गु नरकु आथी । तया हेतु प्रवृत्ति निवृत्ती । इयें आघवियेचि राती । जाणिवेची जें ॥ ६६ ॥ जें देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाणप्रतिमा । ययापरौती प्रमा । ढळों नेणे ॥ ६७ ॥ म्हणोनि पडिलेनि शरीरें । केलेंनिसीं आत्मा विसंरे । मा भोगावया उरे । कोण बेषें ॥ ६८ ॥ ना ईश्वरु पाहतां आहे । तो भोगवी हें जरी होये । तरी देवाचि खाये । विकूनियां ॥ ६९ ॥ गांवींचे देवळेश्वर । नियामकाचि होती साचार । तरी देशींचे डोंगर । उगे कां असती ॥५७०॥ ऐसा विषायें देवो मानिजे । तरी पाषाणमात्राचि जाणिजे । आणि आत्मा तंव म्हणिजे । देहातेंचि ॥७१॥ येरें पापपुण्यादिकें । तें आघवेंचि करोनि लटिकें । हित मानी अग्निमुखें । चरणें जें कां ॥ ७२ ॥ जे चामाचे डोळे दाविती । जें इंद्रियें गोडी लाविती । तेंचि साच हे प्रतीती । फुडी जया ॥ ७३ ॥ किंबहुना ऐसी प्रथा । वाढती देखसी पार्था । धुंवाचि वेली वृथा । आकाशीं जैसी ॥ ७४ ॥ कोरडा ना वोला । उपेगा आथी गेला । तो वाढोनि मोडला । भेंडु जैसा ॥ ७५ ॥ नाना उंसांचीं कणसें । कां नपुंसकें माणुसें । वन लागलें जैसें । साबरींचें ॥ ७६ ॥ नातरी बाळकाचें मन । कां चोराघरींचें धन । अथवा गळस्तन । शेळियेचे ॥ ७७ ॥ तैसें जें वायाणें । वोसाळ दिसे जाणणें । तयातें मी म्हणें । तामसज्ञान ॥ ७८ ॥ तेंही ज्ञान इया भाषा । बोलिजे तो भावो ऐसा । जात्यंधाचा कां जैसा । डोळा वाडु ॥ ७९ ॥ कां बधिराचे नीट कान । अपेया नाम पान । तैसें आडनांव ज्ञान । तामसा तया ॥ ५८० ॥ हें असो किती बोलावें । तरी ऐसें जें देखावें । तें ज्ञान नोहे जाणावें । डोळस तम ॥ ८१ ॥ एवं तिहीं गुणीं । भेदलें यथालक्षणीं । ज्ञान श्रोतेशिरोमणी । दाविलें तुज ॥ ८२ ॥ आतां याचि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्धरा । प्रकाशें होती गोचरा । कर्तयाच्या क्रिया ॥ ८३ ॥ म्हणौनि कर्म पैं गा । अनुसरे तिहीं भागां । मोहरें जालिया वोघा । पाणी जैसें ॥ ८४ ॥ तेंचि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें असे । तेथ सात्त्विक तंव ऐसें । परिस आधीं ॥ ८५ ॥

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् । अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥

तरी स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मानिलें आंगें । पतिव्रतेचेनि परिष्वंगें । प्रियातें जैसें ॥ ८६ ॥ सांवळ्या आंगा चंदन । प्रमदालोचनीं अंजन । तैसें अधिकारासी मंडण ।

स्त्रीजात आहे, तितकी त्वगिंद्रियानें ओळखतें, ( स्त्री ही त्वगिंद्रियाचा भोग्य विषय आहे असें समजतें)आणि त्या स्त्रीजातीशीं संबंध करण्याविषयीं ज्या तामस ज्ञानाची एकच समजूत असते. ५६१. जो आपल्या कामाच्या उपयोगीं पडेल, त्याचेंच नांव नातलग; आणि ज्या तामस ज्ञानापाशीं शरीराच्या नात्याची किंमत नसते. ५६२. सर्व जगच मृत्यूचें अन्न आहे,सर्व पदार्थच अग्नीचें सरपण आहेत, त्याप्रमाणें तामस ज्ञानाला सर्व जग आपलें भोग्य आहे असें वाटतें. ५६३. अशा रीतीनें सर्व विश्व हें केवळ भोग्य विषयच आहे, असें तामस ज्ञान मानतें; व त्या तामस ज्ञानास देहभरण हेंच एक फळ आहे असें समज. ५६४. आकाशांतून पडलेल्या पाण्यास ज्याप्रमाणें एक समुद्रच आश्रय असतो, त्याप्रमाणें तें तामस ज्ञान कर्ममात्र पोटाकरितांच आहे असें समजतें. ५६५. याशिवाय स्वर्ग व नरक आहेत व त्यांना हेतु प्रवृत्ति व निवृत्ति आहेत, ( विहित कर्मांकडे प्रवृत्ति असणें हें स्वर्गाला हेतु आहे व विहितकर्मापासून निवृत्ति ही नरकाला हेतु आहे) या सर्व ज्ञानाची तें तामस ज्ञान रात्र आहे. (स्वर्ग व नरक व त्यांना हेतु प्रवृत्ति व निवृत्ति, या विषयींचें तामस ज्ञानामध्यें पूर्ण अज्ञान असतें. ) ५६६. कारण कीं, हा साडेतीन हात देह म्हणजेच आत्मा व पाषाणाची मूर्ति हाच ईश्वर होय, या पलीकडे तामस ज्ञानाची समजूत जात नाहीं. ५६७. म्हणून त्या तामस ज्ञानाची अशी समजूत असते कीं, शरीर पडलें असतां केलेल्या कर्मांसह आत्म्याचा ठावठिकाणा नाहींसा होतो. मग तो ( आत्मा ) कोणत्या रूपानें भोगावयास उरेल ? ५६८. अथवा विचार करून कोणी असें म्हटलें तर, कीं ईश्वर आहे व तो केलेल्या कर्माचें फळ भोगावयास लावतो, तर तो तामसज्ञानी, तो ( मानलेले, दगडाचे, धातूचे ) देवच विकून खातो. ५६९. गांवांतील देवळांतले देव जर खरोखर ( सृष्टीचे ) नियामक असतील, तर देशांतले डोंगर गुपचुप कां राहातील ? ५७०. कदाचित् देव मानला, तर याप्रमाणें देव म्हणजे फक्त दगडच ( दगडाची मूर्तीच ) समजतो आणि आत्मा तर देहालाच समजतो. ५७१. इतर जें पापपुण्य वगैरे, तें सर्वच झूट करून अग्नीच्या मुखानें जें चरणें ( पापपुण्य, बरेंवाईट न म्हणतां जो विषय पुढें येईल तो सरसकट भोगणें ) तें तो हित मानतो. ५७२. चामड्याचे डोळे जें दाखवतील ( स्थूल दृष्टीला जें दिसून येईल) व इंद्रियें ज्याची गोडी लावतील, तेंच खरें, ही ज्याची पक्की खात्री असते. ५७३. अर्जुना, फार काय सांगावें ! असा हा( व्यर्थच ) वाढत गेलेला अनुभव तुला आढळून येईल. आकाशांत धुराचा वेल जसा व्यर्थच वाढतो, ५७४. जो वाळलेला अथवा ओला उपयोगाला येत नाहीं, असा जो मेढाचा वृक्ष, तो वाढून जसा व्यर्थ मोडून जावा. ५७५. अथवा उंसांची कणसें अथवा नपुंसक माणसें अथवा साबरीची झाडी ही जशी व्यर्थ असतात. ५७६. अथवा मुलांचें मन, अथवा चोराच्या घरचें द्रव्य, अथवा शेळीच्या गळ्याचें स्तन जसें निरुपयोगी असतात, ५७७. त्याप्रमाणें जें ज्ञान निरर्थक व स्वैर असें दिसतें त्याला मी तामस ज्ञान असें म्हणतों. ५७८. त्या तामस ज्ञानालाही ' ज्ञान ' असेंच म्हणतात. त्यांतील हेतु हा कीं, जसा जन्मांधाचा डोळा मोठा म्हणावयाचा. ५७९. अथवा बहिऱ्या मनुष्याचे जसे सरळ कान किंवा अपेयांना ( मद्यादिकांना ) जसें पान ( पिण्यास योग्य ) म्हणावयाचें; त्याप्रमाणें त्या तामस ज्ञानाला, ज्ञान हें ( केवळ ) आडनांव आहे. ५८०. हें राहूं दे. आतां आणखी या संबंधानें किती सांगावें ? तर असें जें दृष्टीला पडेल, तें ज्ञान नाहीं, तर तो स्वच्छ तमोगुण आहे असें समजावें. ५८१. हे श्रोत्यांच्या मुख्य अर्जुना, याप्रमाणें तीन गुणांनीं तीन प्रकारचें झालेलें ज्ञान, ज्यांचें जसें लक्षण होतें, तशा लक्षणांनीं तुला सांगितलें ५८२. अर्जुना, आतां याच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या प्रकाशानें कर्त्यांच्या क्रिया गोचर होतात, ५८३, म्हणून एकच पाणी जसें निरनिराळ्या पात्रांतून वहाणाऱ्या ओघांशीं मिळालें कीं त्या त्या ओघासारखें बनतें; त्याप्रमाणें ( ज्ञानाच्या तीन प्रकारामुळें ) कर्म तीन प्रकारचें होतें. ५८४. तेंच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या योगानें जें तीन प्रकारचें कर्म झालेलें आहे, त्यांपैकीं सात्त्विक कर्मांचा प्रकार तर असा आहे, तो सांगतों, तूं प्रथम ऐक. ५८५.

नित्य, ( व नैमित्तिक पावेल तेव्हा तेंही ) आसक्तिरहित, प्रीति अथवा द्वेष यांनीं वर्जित, असें फलाकांक्षा न धरणाऱ्या मनुष्यानें केलेलें जें कर्म, त्याला सात्त्विक ( कर्म ) म्हणतात. २३.

तरी पतिव्रतेच्या आलिंगनानें जसा नवऱ्याला संतोष होतो, त्याप्रमाणें वर्णाश्रमधर्माच्या मार्गानें वांट्यास आलेलें जें कर्म, तें त्यास स्वभावतःच मानवतें, ( म्हणजे त्याचें आचरण संतोषानें केलें जातें, ) ५८६, सावळ्या अंगाला ज्याप्रमाणें चंदन भूषण असतें, तरुण स्त्रीच्या

नित्यपणें जें ॥ ८७ ॥ तें नित्य कर्म भलें । होय नैमित्तिकीं सावाइलें । सोनयासि जोडलें । सौरभ्य जैसें ॥ ८८ ॥ आणि आंगा जीवाची संपत्ती । वेंचुनि बाळाची करी पाळती । परी जीवें उबगणें हे स्थिती । न पाहे माय ॥ ८९ ॥ तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी । परी फळ न सूये दिठी । उखितीं क्रिया पैठी । ब्रह्मींचि करी ॥ ५९० ॥ आणि प्रिय आलिया स्वभावें । सवळ उरे वेचे ठाउवें नव्हे । तैसें सत्प्रसंगें करावें । पारुषे जरी ॥ ९१ ॥ तरी अकरणाचेनि खेदें । द्वेषातें जिवीं न बांधे । जालियाचेनि आनंदें । फुंजों नेणे ॥ ९२ ॥ ऐसेऐसिया हातवटिया । कर्म निफजे जें धनंजया । जाण सात्त्विक हें तया । गुणनाम गा ॥ ९३ ॥ ययावरी राजसाचें । लक्षण सांगिजेल साचें । न करी अवधानाचें । वाणेपण ॥ ९४ ॥

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः । क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

तरी घरीं मातापितरां । धड बोली नाहीं संसारां । येर विश्व भरी आदरा । मूर्खु जैसा ॥ ९५ ॥ कां तुळशीचिया झाडा । दुरूनि न घापे सिंतोडा । द्राक्षीचिया तरी बुडा । दूधाचि लाविजे ॥ ९६ ॥ तैसी नित्यनैमित्तिकें । कर्में जियें आवश्यकें । तयांचेविषीं न शके । बैठला उठूं ॥ ९७ ॥ येरां काम्याचेनि तरी नांवें । देह सर्वस्व आघवें । वेंचितांही न मनवे । बहु ऐसें ॥ ९८ ॥ अगा देवढी वाढी लाहिजे । तेथ मोल देतां न धाइजे । पेरितां पुरे न म्हाणिजे । बीज जेवीं ॥ ९९ ॥ कां परिसु जालिया हातीं । लोहालागीं सर्वसंपत्ती । वेंचु करितां ये उन्नती । साधकु जैसा ॥ ६०० ॥ तैसीं फळें देखोनि पुढें । काम्यकर्में दुवाडें । करी परी तें थोकडें । केलेंही मानी ॥ १ ॥ तेणें फळकामुकें । यथाविधि नेटकें । काम्य कीजे तितुकें । क्रियाजात ॥ २ ॥ आणि तयाही केलियाचे । तोंडीं लावी डोंडीचें । कर्मीं या नांवपाठाचे । वाणें सारी ॥ ३ ॥ तैसा भरे कर्माहंकारु । मग पिता अथवा गुरु । ते न मनी काळज्वरु । औषध जैसें ॥ ४ ॥ तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें । कीजे गा आदरें । जें जें कांहीं ॥ ५ ॥ परी तेंहि करणें बहुवसा । वळघोनि करी सायासा । जीवनोपावो कां जैसा । कोल्हाटियांचा ॥ ६ ॥ एका कणालागीं उंदिरु । आसका उपसे डोंगरु । कां शेवाळोद्देशें दर्दुरु । समुद्रु डहुळी ॥ ७ ॥ पाहीं भिकेपरतें न लाहे । तऱ्ही गारुडी सापु वाहे । काय कीजे शीणुचि होये । गोड येकां ॥ ८ ॥ हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे । तैसें स्वर्गसुखलोभें । विचंवणें जें ॥ ९ ॥ तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें येथ राजस । आतां चिन्ह परिस । तामसाचें ॥ ६१० ॥

अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् । मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

डोळ्यांना जसें अंजनाचें भूषण असतें, त्याप्रमाणें जें कर्म नित्य कर्तव्य असल्यामुळें अधिकाराला भूषण आहे. ५८७. सोन्याला ज्याप्रमाणें, सुगंध प्राप्त व्हावा, त्याप्रमाणें त्या नित्य कर्माला नैमित्तिक कर्मांची जोड मिळाली असतां, त्या नित्य कर्माला शोभा येते. ५८८. आणि शरीर व प्राणाचें सामर्थ्य खर्च करूनही आई मुलाचें पालन करते. परंतु आईच्या जीवाला मुलाचें पालन करण्याचा केव्हांही कंटाळा येत नाहीं. ५८९. त्याप्रमाणें सर्व प्रकारानें कर्माचें अनुष्ठान करतो; परंतु फळावर लोभदृष्टि ठेवीत नाहीं, तर एकंदर कर्म ब्रह्माच्या ठिकाणीं अर्पण करतो. ५९०. प्रियकर मित्र वगैरे आला असतां त्याच्या सन्मानार्थ आपल्याजवळील अन्नसामुग्री सर्व खर्च झाली अथवा कांहीं शिल्लक आहे, याचें जसें स्वाभाविकच भान रहात नाहीं; त्याप्रमाणें एखादा योग्य प्रसंग (सत्पुरुषाशीं आत्मचर्चा करणें वगैरेचा प्रसंग) प्राप्त झाला असतां भान न राहून आपलें नित्यकर्म करावयाचें जर राहिलें, ५९१. तरी नित्यकर्म करावयाचें राहिलें, त्याच्या खेदानें मनाला वाईट वाटूं देत नाहीं अथवा नित्यकर्म जर त्याच्या हातून यथासांग झालें, तर त्याच्या आनंदानें अभिमान मिरविण्याचें जाणत नाहीं. ५९२. अर्जुना, अशा अशा हातवटीनें जें कर्म घडतें, त्याला 'सात्त्विक कर्म' हें त्याचें गुणावरून आलेलें नांव आहे, असें समज. ५९३. यानंतर राजस कर्माचें खरोखर लक्षण सांगण्यांत येईल; तर तूं लक्ष देण्याचें कामीं कसूर करूं नकोस. ५९४.

कर्मफलेच्छु अथवा अहंकारयुक्त मनुष्याकडून जें मोठ्या प्रयासानें कर्म करण्यांत येतें, त्याला राजस (कर्म) म्हणतात. २४.

तर जसा एखादा मूर्ख मनुष्य घरीं आईबापाशीं व्यवहारांत नीट बोलत देखील नाहीं, परंतु जगतांतील इतर माणसांशीं मात्र प्रेमानें वागतो; ५९५. अथवा तुळशीच्या झाडाला दुरून पाण्याचा शितोडा घालीत नाहीं आणि द्राक्षाच्या बुडाला तर रोज दूधच लोटीत असतो. ५९६. त्याप्रमाणें नित्य नैमित्तिक कर्में, जीं अवश्य आचरणीय आहेत, तीं करण्याकरितां बसलेला उठूं देखील शकत नाहीं. ५९७. इतर काम्यकर्मांच्या नांवांनीं तर धन, देह वगैरे सर्व खर्च करीत असतांनाही, आपण फार खर्च केला, असें त्याला वाटत नाहीं. ५९८. अरे अर्जुना, जेथें वाढीदिढीची प्राप्ति होते, तेथें द्रव्य देतांना तृप्ति होत नाहीं, अथवा ज्याप्रमाणें बीज पेरीत असतांना पुरे म्हणवत नाहीं; ५९९. अथवा परीस हातीं आल्यावर लोखंड विकत घेण्याकरितां सर्व संपत्ति खर्च करतांना जसा (पैसा हे ज्याचें साध्य आहे असा) साधकास उत्साह वाटत असतो. ६००. त्याप्रमाणें पुढें प्राप्त होणारीं कर्मांचीं फळें पाहून कठीण अशीं काम्य कर्में करितो, परंतु तीं केलेलेंही अगदींच थोडें झालें असें समजतो. ६०१. त्या फलाची इच्छा करणाराकडून जितकीं म्हणून काम्य कर्में आहेत, तितकीं शास्त्रानें सांगितलेल्या विधीप्रमाणें बरोबर केलीं जातात. ६०२. आणि तें काम्य कर्म केल्याचेंही लोकांत दौंडी देऊन प्रसिद्ध करतो, तें असें कीं, मी अमुक कर्म केलें, अशा या नांवाचा सारखा उच्चार करून (केलेल्या कर्माचे सर्व) प्रकार संपवून टाकतो. (व्यर्थ घालवितो.) ६०३. तसा त्याला 'मी कर्म करणारा' असा गर्व चढतो. मग बाप अथवा गुरु त्यांना तो मानीत नाहीं; ज्याप्रमाणें काळज्वर औषधाला मानीत नाहीं; ६०४. तसा त्या अहंकाराच्या भरांत फलाची इच्छा करणारा मनुष्य, जें जें कांहीं आदरानें करितो, ६०५. परंतु तें करणें देखील पुष्कळशा सायासांवर स्वार होऊन करतो (म्हणजे थोड्या फायद्याकरितां जिवापाड कष्ट करतो.) तें कसें तर, ज्याप्रमाणें कोल्हाट्यांचा पोट भरण्याचा धंदा असतो त्याप्रमाणें. ६०६. धान्याच्या एका दाण्याकरितां उंदीर जसा सर्व डोंगर पोखरतो, अथवा शेवाळाचे हेतूनें बेडूक जसा समुद्र ढवळतो; ६०७. पहा कीं, भिकेपलीकडे कांहीं प्राप्ति होत नाहीं, तरी गारुडी साप बागवितो. काय करावें ? एखाद्याला शीणच (कष्टच) गोड वाटतो. ६०८. हें राहूं दे. परमाणूच्या लाभाकरितां ज्याप्रमाणें वाळवी पाताळाचें उल्लंघन करते, त्याप्रमाणें स्वर्गसुखाच्या लोभानें एकसारखें जें श्रम करणें, ६०९. तें त्रासानें भरलेलें काम्यकर्म, येथें राजस कर्म असें समजावें, आतां तामसकर्माचें लक्षण ऐक. ६१०.

भावी परिणाम, नाश, प्राणीपीडा आणि (आपलें कर्म करण्याचें) सामर्थ्य, यांकडे लक्ष न देऊन (म्हणजे यांचा विचार न करतां) अविचारानें ज्या कर्माला आरंभ करण्यांत येतो, त्याला तामस (कर्म) म्हणतात. २५.

तरी तें गा तामस कर्म । जें निंदेचें काळें धाम । निषेधाचें जन्म । साच जेणें ॥ ११ ॥ जें निपजविल्यापाठीं । कांहींच न दिसे दिठी । रेघ काढिलिया पोटीं । तोयाचां जेवीं ॥ १२ ॥ कां कांजी घुसळलिया । कां सारखेंरु फुंकलिया । कांहीं न दिसे गाळिलिया । वाळु घाणां ॥ १३ ॥ नाना उपणिलिया भूंस । कां विंधिलिया आकाश । नाना मांडिलिया पाश । वारयासी ॥ १४ ॥ हें अवघेंचि जैसें । वांझें होऊनि नासे । जें केलिया पाठीं तैसें । वायांचि जाय ॥ १५ ॥ एऱ्हवीं नरदेहाही येवढें । धन आटणीये पडे । जें निफजवितां मोडे । जगाचें सुख ॥ १६ ॥ जैसा कमळवनीं फांसु । काढिलिया कांटसु । आपण झिजे नाशु । कमळां करी ॥ १७ ॥ कां आपण आंगें जळे । आणि नागवी जगाचे डोळे । पतंगु जैसा सळे । दीपाचेनि ॥ १८ ॥ तैसें सर्वस्व वायां जावो । वरी देहाही होय घावो । परी पुढीलां आपावो । निफजविजे जेणें ॥ १९ ॥ मासी आपणयातें गिळवी । परी पुढीला वांती शिणवी । तें कश्मळ आठवी । आचरण जें ॥ ६२० ॥ तेंही करावया दोषें । मज सामर्थ्य असे कीं नसे । हेंही पुढील तैसें । न पाहतां करी ॥२१॥ केवढा माझा उवावो । करितां कोण प्रस्तावो । केलियाही आवो । काय येथ ॥ २२ ॥ इये जाणिवेची सोये । अविवेकाचेनि पायें । पुसोनियां होये । साटोप कर्मी ॥ २३ ॥ आपुला वसौटा जाळुनी । विसाटे जैसा वन्ही । कां स्वमर्यादा गिळोनि । सिंधु उठी ॥ २४ ॥ मग नेणे बहु थोडें । न पाहे मागें पुढें । मार्गामार्ग येकवढे । करीत चाले ॥ २५ ॥ तैसें कृत्याकृत्य सरकटित । आपपर नुरवित । कर्म होय तें निश्चित । तामस जाण ॥ २६ ॥ ऐसी गुणत्रयभिन्ना । कर्माची गा अर्जुना । हे केली विवंचना । उपपत्तींसीं ॥ २७ ॥ आतां ययाचि कर्मा भजतां । कर्माभिमानिया कर्ता । तो जीवुही त्रिविधता । पातला असे ॥२८॥ चतुराश्रमवशें । एकु पुरुषु चतुर्धा दिसे । कर्तया त्रैविध्य तैसें । कर्मभेदें ॥ २९ ॥ परी तयां तिहींआंतु । सात्त्विक तंव प्रस्तुतु । सांगेन दत्तचित्तु । आकर्णीं तूं ॥ ६३० ॥

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः । सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥

तरी फळोद्देशें सांडिलिया । वाढिती जेवीं सरळिया । शाखा कां चंदनाचिया । बावन्नया ॥ ३१ ॥ कां न फळतांही सार्थका । जैसिया नागलतिका । तैसिया करी नित्यादिकां । क्रिया जो कां ॥ ३२ ॥ परी फलशून्यता । नाहीं तया विफळता । पैं फळासीचि पांडुसुता । फळें कायिसी ॥ ३३ ॥ आणि आदरें करी बहुवसें । परी कर्ता मी हें नुमसे । वर्षाकाळींचें जैसें । मेघवृंद ॥ ३४ ॥ तेवींचि परमात्मलिंगा । समर्पावयाजोगा । कर्मकलापु पैं गा । निपजावया ॥ ३५ ॥ तया काळातें नुलंघणें । देशशुद्धिही साधणें । कां शास्त्रांचां वातीं पाहणे । क्रियानिर्णयो ॥ ३६ ॥ वृत्ती करणें येकवळा ।

तरी जें निंदेचें काळें ( दोष आणणारें ) वसतिस्थान आहे व ज्यामुळें निषिद्ध कर्माचें जन्म खरें (सफल) झालें आहे, अर्जुना, तें तामस कर्म होय. ६११. जें तामस कर्म उत्पन्न झाल्यानंतर पाण्यावर रेघ काढिली असतां जसें कांहीं दिसत नाहीं, तसें ( त्याचें फल ) दृष्टीला कांहींच दिसत नाहीं. ६१२. अथवा ताकावरची निवळी घुसळली असतां किंवा विझलेल्या कोळशावर फुंकर घातली असतां किंवा घाण्यामध्यें वाळू गाळिली असतां कांहींच निष्पन्न झालेलें दिसत नाहीं; ६१३. अथवा भूस वाऱ्यावर धरणें अथवा आकाशाचें बाणानें भेदन करणें अथवा वाऱ्याला धरण्याकरितां फांस लावणें; ६१४. हें सर्वच जसें निष्फळ होऊन व्यर्थ जातें, त्याप्रमाणें जें तामस कर्म केल्यावर वांयाच जातें. ६१५. एऱ्हवी तामस कर्म करण्यांत नरदेहाएवढें धनही नाहींसें होतें व तें करीत असतां जगाच्या सुखाचा विघाड होतो. ६१६. ज्याप्रमाणें कमलाच्या वनावरून कांट्याचा फांस ओढीत नेला असतां, तो फांस आपण स्वतः झिजतो व कमळांचा नाश करतो; ६१७. अथवा दिव्याच्या द्वेषानें पतंग ज्याप्रमाणें ( दिव्यावर उडी टाकून ) आपण स्वतः जळतो व लोकांच्या डोळ्यांना दिसेनासें करतो; ६१८. त्याप्रमाणें सर्वस्वाचाही नाश झाला तरी चालेल आणि शिवाय ( स्वतःच्या ) देहालाही इजा झाली तरी बेहेत्तर; परंतु ज्याच्या योगानें दुसऱ्यास अपाय उत्पन्न होतो; ६१९. माशी आपल्या स्वतःला गिळविते, परंतु दुसऱ्याला ( माशी गिळणाराला ) ओकारीनें शिणविते, त्या माशीच्या घाणेरड्या कृत्याची ( आपपरपीडक अशा कृत्याची ) जें ( तामस कर्म ) आठवण करून देतें. ६२०. तेंही करण्याकरितां मला सामर्थ्य आहे कीं नाहीं, हा पुढील विचार तर करावा, पण तसें कांहीं न पाहतां कर्म करतो. ६२१. माझें सामर्थ्य केवढें आहे? कर्म करीत असतांना प्रसंग कोणता आहे? आणि कर्म केल्यावरही येथें काय प्राप्ति आहे? ६२२. या विचाराचा मार्ग अविवेकाच्या पायानें पुसून 'मी हें कर्म करणार.' अशा अभिमानानें कर्म करण्यास उद्युक्त होतो. ६२३. आपला आश्रय जाळून जसा अग्नि फैलावा अथवा आपल्या मर्यादेचें उल्लंघन करून समुद्र जसा खवळावा, ६२४. मग ( तो अग्नि अथवा समुद्र ) थोडें फार जाणत नाहीं व मागें पुढें पाहात नाहीं. मार्ग व अमार्ग एकवट करीत चालतो. ६२५. त्याप्रमाणें करण्यास योग्य व अयोग्य असें कर्म रगडीत, आपलें व परकें याचा विचार न करतां, जें कर्म होतें, तें खरोखर तामस कर्म आहे असें समज. ६२६. अर्जुना, तीन भिन्न गुणांमुळें तीन भिन्न प्रकारच्या झालेल्या कर्मांचें असें हें उपपत्तिसहित विवेचन केलें. ६२७. आतां याच कर्माचें आचरण करीत असतांना कर्माभिमानी कर्ता जो जीव, तो देखील तीन प्रकारचा झाला आहे. ६२८. ज्याप्रमाणें ( ब्रह्मचर्यादि ) चार आश्रमांच्या योगानें एक पुरुष चार प्रकारचा दिसतो; त्याप्रमाणें कर्माच्या तीन प्रकारांमुळें कर्ता तीन प्रकारचा झाला आहे. ६२९. परंतु त्या तिहींपैकीं आतां तर सात्त्विक कर्ता तुला सांगेन, तूं लक्ष देऊन ऐक. ६३०.

आसक्तिरहित, अहंकाररहित, धैर्य व उत्साह यांनीं युक्त, ( कर्माची ) सिद्धि अथवा असिद्धि यासंबंधानें ( सुख किंवा दुःखरूपी ) विकाररहित, अशा कर्त्याला सात्त्विक कर्ता म्हणतात. २६.

तर ज्याप्रमाणें बावन नामक चंदनाच्या फांद्या फळाचा हेतु टाकून नीट वाढतात. ( चंदन हा सर्व अंगांनीं फलरूप असल्यानें त्याच्या फांद्यापासून पुढें फळाची कोणी अपेक्षा करीत नाहीं. ) ६३१. अथवा ज्याप्रमाणें नागवेलीस फळें न येतांच त्या सफल आहेत; त्याप्रमाणें जो फलेच्छा टाकून नित्यादिक कर्में करतो. ६३२. ( जर तो फलेच्छा टाकून कर्में करतो, तर त्याच्या त्या नित्यादिक कर्मांला फल नसेल, तर तसें नाहीं हें या ओवींत सांगतात. ) परंतु त्याच्या नित्यादिक कर्मांना मुळींच फल नाहीं असें नाहीं, अथवा त्या नित्यादिक कर्मांचें फळ व्यर्थ जातें असेंही नाहीं. ( तर तीं नित्यादिक कर्में स्वभावतःच फलरूप आहेत, असें जर आहे तर मग ) अर्जुना, फळालाच फळें कसलीं ? ६३३. आणि नित्यादिक कर्में फार आदरानें करतो. परंतु ज्याप्रमाणें वर्षाऋतूंतील ढग गडबड अथवा गर्जना करीत नाहींत, त्याप्रमाणें तो ' मी नित्यादिक कर्में केलीं ' असें कर्माचा अभिमान घेऊन बोलत नाहीं. ६३४. त्याचप्रमाणें परमात्म्याच्या प्रतिमेला अर्पण करण्यास योग्य असा कर्माचा समुदाय उत्पन्न होण्याकरितां, ६३५. त्या नित्यानित्य कर्मांना जो योग्य काल असेल, त्याचें उल्लंघन न करणें व त्या कर्मांना जें शुद्ध स्थळ पाहिजे तसें साधणें आणि कर्मांचा निर्णय शास्त्रांच्या प्रकाशानें ( दृष्टीनें ) पाहणें, ६३६. कर्मांची व वृत्तीची सांगड घालणें

चित्त जावों न देणें फळा । नियमांचिया सांखळा । वाहणे हन ॥ ३७ ॥ हा निरोधु साहावयालागीं । धैर्याचिया चांगचांगी । चिंतवणी जिती आंगीं । वाहे जो कां ॥ ३८ ॥ आणि आत्मयाचिये आवडी । कर्मे करितां वरपडीं । देहसुखाचिये परवडी । येवों न लाहे ॥ ३९ ॥ ऐसा निद्रा दुन्हावे । क्षुधा न बाणवे । सुखाडु न पावे । आंगाचा ठावो ॥ ६४० ॥ तंव अधिकाधिक । उत्साहो धरी आगळीक । सोनें जैसें तुक । तुटलिया कसीं ॥ ४१ ॥ जरी आवडी आथी साच । तरी जीवितही सलंच । आगीं घालितां रोमांच । देखिजती सतिये ॥ ४२ ॥ मा आत्मयायेवढीया प्रिया । वालभेला जो धनंजया । देहाचि सिदतां तया । काय खेदु होईल ॥ ४३ ॥ म्हणौनि विषयसुखाडु तुटे । जंव जंव देहबुद्धि आटे । तंव तंव आनंदु दुणवटे । कर्मीं जया ॥ ४४ ॥ ऐसेनि जो कर्म करी । आणि कोणे एके अवसरीं । तें ठाके ऐसी परी । वाहे जरी ॥ ४५ ॥ तरी कडाडीं मोडे जै गाडा । तो आपणपें न मनी अवघडा । तैसा ठाकलेनिही थोडा । नोहे जो कां ॥ ४६ ॥ नातरी आदरिलें । अव्यंग सिद्धी गेलें । तरी तेंही जिंतिलें । मिरवूं नेणे ॥ ४७ ॥ इया खुणा कर्म करितां । देखिजे जो पंडुसुता । तयातें म्हणिपे तत्त्वतां । सात्त्विकु कर्ता ॥ ४८ ॥ आतां राजसा कर्तेया । वोळखणें हें धनंजया । जे अभिलाषा जगाचिया । वसौटा तो ॥ ४९ ॥

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः । हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

जैसा गांवींचिया कश्मळा । उकरडा होय येकवळा । कां स्मशानीं अमंगळा । आघवयांचि ॥ ६५० ॥ तयापरी जो अशेषा । विश्वाचिया अभिलाषा । पायपाखाळणिया देखा । घरटा जाला ॥ ५१ ॥ म्हणोनि फळाचा लागु । देखे जिये असलगु । तिये कर्मीं चांगु । रोहो मांडी ॥ ५२ ॥ आणि आपण जालिये जोडी । उपखों नेदी कवडी । क्षणक्षणा कुरोंडी । जीवाची करी ॥ ५३ ॥ कृपणु चित्तीं ठेवा आपुला । तैसा दक्षु पराविया मोला । बकु जैसा खुतला । मासेयासी ॥ ५४ ॥ आणि गोंवी गेलिया जवळी । झगटलिया अंग फाळी । फळे आंतु पोळी । बोरांटी जैसी ॥ ५५ ॥ तैसें मनें वाचा कायें । भलतया दुखावितु जाये । स्वार्थु साधितां न पाहे । पराचें हित ॥ ५६ ॥ तेवींच आंगें कर्मीं । आचरणें नोहे क्षमी । न निघे मनोधर्मीं । अरोचकु ॥ ५७ ॥ कनकाचिया फळा । आंतु माज बाहेरी मौळा । तैसा सबाह्य दुबळा । शुचित्वें जो ॥ ५८ ॥ आणि कर्मजात केलिया । फळ लाहे जरी धनंजया । तरी हरिखें जगा यया । वांकुलिया वाये ॥ ५९ ॥ अथवा जें आदरिलें । हीनफळ होय केलें । तरी शोकें तेणें जिंतिलें ।

( कर्मांवांचून दुसरीकडे वृत्ति जाऊं न देणें ), कर्मांच्या फलाकडे मनाला जाऊं न देणें व कर्माचरणासंबंधानें शास्त्रांनीं घालून दिलेलीं नियमरूपी बंधनें ( मर्यादा ) पाळणें. ६३७. हा निग्रह सहन करण्याकरितां चांगल्या सर्वोत्कृष्ट धैर्याची जागती चिंता,जो मनांत बाळगतो; ६३८. आणि आत्मप्राप्तीच्या प्रेमानें विहित कर्में करणें प्राप्त झालें असतां, तो देहसुखाची पर्वा करीत नाहीं. ६३९. याप्रमाणें नित्यादिक कर्में करीत असतां जसजशी त्याची निद्रा दुरावते, भुकेची आठवण होत नाहीं, व सुखाची त्याच्या शरीराला भेट होत नाहीं, ६४०. तसतसा कर्में करण्यांत त्याचा उत्साह अधिक वाढतो. ज्याप्रमाणें सोनें अग्नींत तापविलें असतां वजनांत कमी झालें तरी कसांत वाढतें त्याप्रमाणें. ६४१. स्त्रीचें जर पतीवर खरें प्रेम असेल, तर पतीच्या मरणानंतर जिवंत राहाणेंही तिला लजिरवाणें वाटतें. म्हणून पति मृत झाला असतां सती जाणाऱ्या पतिव्रतेच्या अंगावर अग्नींत उडी घालीत असतांना ( भीतीचे ) रोमांच दृष्टीस पडतील काय ? ६४२. अर्जुना, तर मग आत्म्याएवढ्या अत्यंत प्रिय वस्तूवर ज्याचें प्रेम बसलें आहे, ( त्या आत्म्याच्या प्राप्तीकरितां कर्म करीत असतांना जर ) त्याच्या देहाला सुद्धां कितीही दुःख होत असलें, तरी त्यास त्याचा खेद होईल काय ? ६४३. म्हणून जों जों विषयसुख कमी होईल व देहाहंकार नाहींसा होईल, तों तों कर्में करण्यांत ज्याचा आनंद दुप्पट वाढतो. ६४४. अशा रीतीनें जो कर्में करितो. आणि एखादे वेळीं तें कर्म करणें बंद पडतें असा प्रकार जर घडून आला, ६४५. तर जेव्हां एखादा गाडा झपाट्याच्या वेगांत कड्यावरून खालीं येतांना मोडतो; तेव्हां तो ( गाडा ) जसा आपणावर कठीण प्रसंग आला असें मानीत नाहीं; त्याप्रमाणें कर्में करीत असतांना जरी कर्में करणें बंद पडलें, तरी जो संकोचित होत नाहीं. ६४६. अथवा आरंभलेलें कर्म जर पूर्णपणें सिद्धीस गेलें,तर तोही आपण एक मोठा जय मिळविला, असें मिरवावयाचें तो जाणत नाहीं. ६४७. अर्जुना, अशा मर्मानें जो कर्में करतांना दिसतो, त्याला खरोखर सात्त्विक कर्ता असें म्हणावें. ६४८. अर्जुना, आतां राजस कर्ता ओळखण्याची खूण अशी आहे की, जगांतील सर्व अभिलाषांचें तो आश्रयस्थान झालेला असतो. ६४९.



अभिलाषी, कर्मफलाची इच्छा करणारा, लोभी, परपीडा देणारा, ( बाह्य व आन्तर ) शुद्धिविरहित, ( सिद्धि व असिद्धि यांचेमुळें ) हर्ष व शोक यांनीं युक्त, अशा कर्त्याला राजस कर्ता म्हणतात. २७.

ज्याप्रमाणें गांवांतील कचरा वगैरे सर्व घाणीला एकत्र होण्याला उकिरडा ही जागा असते अथवा स्मशानांत जसे सर्व अमंगळ पदार्थ एकत्र झालेले असतात; ६५०. त्याप्रमाणें जो सर्व जगांतील हांवेला पाय धुण्याचें ठिकाण झालेला आहे, पहा. ६५१. म्हणून ज्या कर्मांमध्यें सोप्या रीतीनें फळ मिळण्याची शक्यता पाहातो, त्या कर्मांच्या ठिकाणीं आदरानें आरंभ करितो. ६५२. आणि आपण मिळविलेल्या द्रव्यापैकीं एक कवडीसुद्धां खर्चूं देत नाहीं. आणि क्षणोक्षणीं त्या द्रव्यावरून आपला जीव ओंवाळून टाकतो. ६५३. कृपण जसा आपल्या ठेव्याविषयीं मनामध्यें सावध असतो, अथवा ज्याप्रमाणें बगळा माशाकरितां ध्यान धरून तटस्थ बसतो, त्याप्रमाणें राजसकर्ता दुसऱ्याच्या मौल्यवान वस्तूंच्या ठिकाणीं दक्ष असतो. ६५४. ज्याप्रमाणें खाट्या ( अंबट ) बोरीचे झाडाजवळून गेले असतां, तें झाड जवळून जाणाऱ्यास गुंतवतें, जर त्या झाडाला अंग घासलें तर घासणाराची कातडी फाडते व कदाचित् त्याला फळें आलीं, तर तीं इतकीं आंबट असतात कीं तीं खाल्लीं तर जिभेला पोळतात. ६५५. त्याप्रमाणें जो मनानें, वाचेनें व शरीरानें वाटेल त्याला दुखवीतच जातो व जो स्वार्थ साधीत असतां दुसऱ्याचें हित पाहात नाहीं. ६५६. त्याचप्रमाणें आरंभिलेलें कार्य शेवटापर्यंत पार पाडण्यांत तो शरीरानें अथवा आचरणानें समर्थ नसतो व ( जरी तें मोठें काम्यकर्म शक्तीच्या बाहेर असलें तरी त्या ) कर्मासंबंधानें त्याच्या मनांत अरुचि उत्पन्न होत नाहीं. ६५७. ज्याप्रमाणें धोतऱ्याच्या फळाला आंत माज ( कैफ ) आणणाऱ्या बिया असतात, व बाहेर काटे असतात; त्याप्रमाणें जो आंतबाहेर पवित्रपणाचे बाबतींत दरिद्री असतो. ६५८. आणि अर्जुना, कर्में केल्यावर त्यास इच्छित फल प्राप्त झालें, तर आनंदानें तो या जगास वेडावून दाखवितो. ६५९. अथवा आरंभिलेलें कर्म जर फलहीन झालें तर त्या शोकानें जिंकला जाऊन

धिकारों लागे ॥ ६६० ॥ कर्मी राहाटी ऐसी । जयातें होती देखसी । तोचि जाण त्रिशुद्धीसी । राजस कर्ता ॥ ६१ ॥ आतां यया पाठीं येरु । जो कुकर्मांचा आगरु । तोही करूं गोचरु । तामस कर्ता ॥ ६२ ॥

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः । विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥२८॥

तरी मी लागालिया कैसें । पुढील जळत असे । हें नेणिजे हुताशें । जियापरी ॥ ६३ ॥ पैं शस्त्रें मियां तिखटें । नेणिजे कैसेनि निवटे । कां नेणिजे काळकूटें । आपलें केलें ॥ ६४ ॥ तैसा पुढीलया आपुलया । घातु करीत धनंजया । आदरी वोखटिया । क्रिया जो कां ॥ ६५ ॥ तिया करितांही वेळीं । काय जालें हें न सांभाळी । चळला वायू वाहटुळी । चेष्टे तैसा ॥ ६६ ॥ पैं करणिया आणि जया । मेळु नाहीं धनंजया । तो पाहुनी पिसेया । कैंची त्राय ॥ ६७ ॥ आणि इंद्रियांचें वोइरिलें । चरोनि राखे जो जियालें । बैलातळीं लागले । गोचिड जैसें ॥ ६८ ॥ हांसया रुदना वेळु । नेणता आदरी बाळु । राहटे उच्छृंखळु । तयापरी ॥ ६९ ॥ जो प्रकृती आंतलेपणें । कृत्याकृत्यस्वादु नेणे । फुगे केलें घालेपणें । उकरडा जैसा ॥ ६७० ॥ म्हणौनि मान्याचेनि नांवें । ईश्वराही परी न खालवे । स्तब्धपणें न मनवे । डोंगरासी ॥ ७१ ॥ आणि मन जयाचें कलाली । राहाटी फुडी चोरिली । दिठी कीर ते वोली । पण्यांगनेची ॥ ७२ ॥ किंबहुना कपटाचें । देहचि वळिलें तयाचें । तें जिणें कीं जुवाराचें । टिटेघर ॥ ७३ ॥ नोहे तयाचा प्रादुर्भावो । तो साभिलाष भिल्लांचा गांवो । म्हणोनि नये येवों जावों । तया वाटा ॥ ७४ ॥ आणि आणिकांचें निकें केलें । विरु होय जया आलें । जैसें अपेय पया मिनलें । लवण करी ॥ ७५ ॥ कां हींव ऐसा पदार्थु । घातला आंगीआंतु । तेचि क्षणीं धडाडितु । अग्नि होय ॥ ७६ ॥ नाना सुद्रव्यें गोमटीं । जालिया शरीरीं पैठीं । होऊनि ठाती किरीटी । मळाचि जेवीं ॥ ७७ ॥ तैसें पुढिलाचें बरवें । जयाचां भीतरीं पावे । आणि विरुद्धचि आघवें । हों हों निगे ॥ ७८ ॥ जो गुण घे दे दोष । अमृताचें करी विष । दूध पाजिलिया देख । व्याळु जैसा ॥ ७९ ॥ आणि ऐहिकीं जियावें । जेणें परत्रा साच यावें । तें उचित कृत्य पावे । अवसरीं जिये ॥ ६८० ॥ तेव्हां जया आपैसी । निद्रा ये ठेविली ऐसी । दुर्व्यवहारीं जैसी । विटाळें लोटे ॥ ८१ ॥ पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे वायसा । कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ॥ ८२ ॥ तैसा कल्याणकाळु पाहे । तैं तयातें आळसु खाये । ना प्रमादीं तरी होये । तो म्हणे तैसें ॥ ८३ ॥ जेवींचि सागराचां पोटीं । जळे अखंड आगिठी । तैसा विषादु वाहे गांठीं । जिवाचिये जो ॥ ८४ ॥ लेंडोराआगीं धूमावधि । कां अपाना आंगीं दुर्गंधि । तैसा जो जीवितावधि । विषादें केला ॥ ८५ ॥ आणि कल्पांताचिया पारा । वेगळेंही जो वीरा । सूत्र

त्या कर्मांचा धिक्कार करावयास लागतो. ६६०. ज्याची कर्मांच्या ठिकाणीं अशी वागणूक पाहाशील, तो राजस-कर्ता होय, असें पक्कें समज. ६६१. आतां यानंतर दुसरा जो कुकर्मांचें केवळ शेत, असा तामसकर्ता, तोही स्पष्ट सांगूं. ६६२.

नियमरहित, असंस्कृतबुद्धि, फुगलेला, कपटी, दुसऱ्याच्या कर्माला विघ्न आणणारा, आळशी, सदा असंतुष्ट, दीर्घसूत्री, अशा कर्त्याला तामस कर्ता म्हणतात. २८.

तर, मी लागलों असतां दुसरा पदार्थ कसा जळतो, हें ज्याप्रमाणें अग्नीला समजत नाहीं; ६६३. आपल्या-कडून दुसऱ्याचा जीव कसा घेतला जातो, त्याची तीक्ष्ण शस्त्राला खबरही नसते; अथवा आपल्या परिणामाची काळकूट विषाला कल्पना नसते. ६६४. अर्जुना, त्याप्रमाणें ज्या क्रिया दुसऱ्याचा व आपला घात करणाऱ्या असतील, त्या वाईट क्रिया करण्यास आरंभ करितो. ६६५. त्या क्रिया करतेवेळीं सुद्धां त्यांचा परिणाम काय झाला, याविषयीं सावधपणा ठेवीत नाहीं. वावटळींत सुटलेला वारा जसा हवा तिकडे भडकतो, त्याप्रमाणें तो स्वैरीतीनें वागतो. ६६६. अर्जुना, त्या तामसकर्त्यांचा व त्याच्या क्रियांचा कांहीं मेळ नसतो. तो तामसकर्ता पाहिला असतां त्याच्यापुढें वेड्याची काय किंमत! ६६७. आणि ज्याप्रमाणें बैलाच्या वृषणाला गोचीड लागलेले असतात, त्याप्रमाणें इंद्रियांना प्राप्त झालेल्या विषयांचें सेवन करून जो आपलें जीवित रक्षण करितो. ६६८. ज्याप्रमाणें मूल योग्यायोग्य वेळ न जाणतां हंसण्याला व रडण्याला आरंभ करतें, त्याप्रमाणें जो (तामसकर्ता) स्वैर वागतो. ६६९. जो (तामसकर्ता) प्रकृतीच्या स्वाधीन झाल्यामुळें करण्यास योग्य काय व अयोग्य काय, हा भेद जाणत नाहीं व उकिरडा जसा केरानें फुगतो, तसा जो आपल्या स्वैराचारानें तृप्त होऊन फुगतो. ६७०. म्हणून मान्य पुरुषांना मान द्यावा, हा जरी सर्वसाधारण नियम आहे, परंतु हा (तामसकर्ता) मान्यपणाच्या नांवानें (ईश्वर सर्वांना मान्य असून देखील) ईश्वरापुढेंही लवत नाहीं. आणि न बोलण्याच्या बाबतींत डोंगराचीही ज्याच्यापुढें किंमत नाहीं. ६७१. आणि ज्याचें मन कपटी असतें व ज्याची वागणूक पक्की चोरटी असते व ज्याची दृष्टि खरोखर वेश्येच्या दृष्टीप्रमाणें कपटीप्रेमानें युक्त असते. ६७२. फार काय सांगावें! त्याचा देहच कपटाचा बनविलेला असतो व त्याचें जगणें म्हणजे द्यूतकर्मांच्या तिवाठ्या-वरचें घरच असतें. ६७३. त्याचा तो अवतार म्हणजे अभिलाषानें भारलेल्या लुटारू भिल्लांचें प्रत्यक्ष वसति-स्थानच नव्हे काय? म्हणून त्या रस्त्यानें जाऊं येऊं नये. ६७४. आणि दुसऱ्याचें बरें केलेलें (झालेलें) पाहून ज्याला आपणावर कांहीं विरुद्ध गोष्ट कोसळली असें वाटतें. ज्याप्रमाणें दुधाशीं मीठ मिसळलें असतां, दुधास पिण्याला अयोग्य करतें. ६७५. अथवा थंड असा पदार्थ अग्नींत घातला तर तो तत्क्षणींच धडधडीत अग्नि होतो; ६७६. अथवा अर्जुना, चांगले पदार्थ (पक्वान्नें) पोटामध्यें गेलीं असतां त्यांचा ज्याप्रमाणें नरकच होऊन रहातो. ६७७. त्याप्रमाणें दुसऱ्याचें बरें (झालेलें) ज्याला कळून चुकलें कीं, (तत्क्षणींच) तें सर्व विपरीत बनून बाहेर येतें. ६७८. पहा. ज्याप्रमाणें सर्पाला दूध पाजलें असतां, तो सर्प दुधाचें विष करतो, त्याप्रमाणें जो दुसऱ्याचे गुण घेतो व त्यास नांवें ठेवितो. ६७९. आणि ज्या योगानें इहलोकीं सुखानें जगणें होईल व खरोखर परलोकीं गति मिळेल, असें योग्य कर्म करण्याचा प्रसंग ज्या वेळीं येतो, ६८०. त्या वेळेला तर त्याला स्वाभाविकच झोंप कशी ठेवल्यासारखी येते. आणि दुष्ट कर्म करण्याचा प्रसंग आला, कीं तीच झोंप, (विटाळशी) विटाळामुळें जशी दूर रहाते, तशी त्यास सोडून दूर रहाते. ६८१. ज्याप्रमाणें द्राक्षांचा व आंब्यांचा उपभोग घेण्याच्या वेळेला कावळ्याचें तोंड सडतें अथवा घुबडाचे डोळे जसे दिवसा फुटतात; (त्याला दिसेनासें होतें) ६८२. त्याप्रमाणें कल्याणाची वेळ आली असतां त्यास आळस ग्रासून टाकतो आणि उलट चूक घडण्याच्या वेळीं, तो म्हणेल तसें होतें. (प्रमाद करतांना त्याच्या अंगांतील आळस जाऊन त्यास अधिक स्फुरण येतें.) ६८३. ज्याप्रमाणें समुद्राच्या पोटांत वडवाग्नि अखंड जळत असतो, त्याप्रमाणें जो अंतःकरणांत खेद अखंड वाहतो. ६८४. ज्याप्रमाणें लेंड्यांच्या विस्तवांत शेवटपर्यंत धूर असतो अथवा अधोद्वारावाटे येणाऱ्या वायूच्या अंगांत जशी दुर्गंधी असते, त्याप्रमाणें जो मरेपर्यंत खेदानें ग्रासलेला असतो. ६८५. हे वीरा अर्जुना, जो कल्पांताच्या पारापलीकडेही अभिलाषानें व्यापाराचें सूत्र धरतो (कल्पाच्या अंतानंतर ही फलप्राप्ति

धरी व्यापारा । साभिलाषा ॥ ८६ ॥ अगा जगाही परौती । शुचा वाहे पैं चित्तीं । करितां विषीं हातीं । तृणही न लगे ॥ ८७ ॥ ऐसा जो लोकाआंतु । पापपुंजु मूर्तु । देखसी तो अव्याहतु । तामसु कर्ता ॥ ८८ ॥ एवं कर्म कर्ता ज्ञान । या तिहींचें त्रिधा चिन्ह । दाविलें तुज सुजन- । चक्रवर्ती ॥ ८९ ॥ आतां अविद्येचां गांवीं । मोहाची वेढूनि मदवी । संदेहाचीं आघवीं । लेऊनि लेणीं ॥ ६९० ॥ आत्मनिश्चयाची बरव । जया आरिसां पाहे सावयव । तिये बुद्धीचीही धांव । त्रिधा असे ॥ ९१ ॥

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु । प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥

अगा सत्त्वादि गुणीं इहीं । काइ एक तिहीं ठायीं । न कीजेचि येथ पाहीं । जगामाजीं ॥ ९२ ॥ आगी नसतां पोटीं । कवण काष्ठ असे सृष्टी । तैसें तें कैचें दृश्यकोटीं । त्रिधा जें नोहे ॥ ९३ ॥ म्हणौनि तिहीं गुणीं । बुद्धी केली त्रिगुणीं । धृतीसिही वांटणी । तैसीचि असे ॥ ९४ ॥ तेंचि येक वेगळालें । तेथ चिन्हीं अळंकारलें । सांगिजेल उपाइलें । भेदलेपणें ॥ ९५ ॥ परी बुद्धि धृति इयां । दोहीं भागामाजीं धनंजया । आधीं रूप बुद्धीचिया । भेदासि करूं ॥ ९६ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये । बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥

तरी उत्तमा मध्यमा निकृष्टा । संसारासि गा सुभटा । प्राणियां येतियां वाटा । तिनी आथी ॥ ९७ ॥ जे अकरण काम्य निषिद्ध । ते हे मार्ग तिन्ही प्रसिद्ध । संसारभयें सबाध । जिवा ययां ॥ ९८ ॥ म्हणौनि अधिकारें मानिलें । जें विधीचेनि वोधें आलें । तें येकाचि येथ भलें । नित्य कर्म ॥ ९९ ॥ तेंचि आत्मप्राप्तिफळ । दिठी ठूनि केवळ । कीजे जैसें कां जळ । सेविजे ताहने ॥ ७०० ॥ येतुलेनि तें कर्म । सांडी जन्मभय विषम । करूनि दे सुगम । मोक्षसिद्धि ॥ १ ॥ ऐसें कर्म करी तो भला । संसारभयें सांडिला । करणीयत्वें आला । मुमुक्षुभागा ॥ २ ॥ तेथ जे बुद्धि ऐसा । बळी बांधे भरंवसा । मोक्षु ठेविला ऐसा । जोडेल येथ ॥ ३ ॥ म्हणौनि निवृत्तीचि मांडिली । ठूनि प्रवृत्तितळीं । इये कर्मीं बुडकुळी । द्यावी कीं ना ॥ ४ ॥ तृषार्ता पाणियें जिणें । कां पुरीं पडलिया प्रवाहणें । अंधकूपगता किरणें । सुर्याचेनि ॥ ५ ॥ नाना पथ्येंसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही जिये । कां मीना जिव्हाळा होये । जळाचा जरी ॥ ६ ॥ तरी तया जीविता । नाहीं जेवीं अन्यथा । तैसें कर्मीं इये प्रवर्ततां । जोडेचि मोक्षु ॥ ७ ॥ हें करणीयाचिया कडे । जें ज्ञान आथी चोखडें । आणि अकरणीय हें फुडें । ऐसें जाण ॥ ८ ॥ जीं तियें काम्यादिकें । संसारभयदायकें । अकृत्यपणाचें आंबुखें । पडिलें जयां ॥ ९ ॥ तिये कर्मीं अकार्यीं । जन्ममरणसमयीं । प्रवृत्ति पळवी पायीं । मागिलींचि ॥ ७१० ॥ पैं आगीमाजीं न रिघवे । अथावीं न

व्हावी, अशा इच्छेनें व्यापाराचें धोरण बांधतो. ) ६८६. अरे, जगाच्या पलिकडल्या गोष्टींविषयीं अंतःकरणांत चिंता वाहतो. पण अशी चिंता करीत असतां, ज्याविषयीं चिंता करतो, त्यापैकीं त्याला एका गवताच्या काडीचाही लाभ होत नाहीं. ६८७. असा जो लोकांमध्यें पापाची मूर्तिमान् राशी आहे असें तूं पहाशील, तो निर्विवाद तामसकर्ता होय. ६८८. हे सुजनांच्या राजा अर्जुना, याप्रमाणें तुला कर्म, कर्ता व ज्ञान या तिहींचें तीन प्रकारचें लक्षण स्पष्टपणानें सांगितलें. ६८९. आतां अविद्येच्या गांवांत मोहाचें कोरें वस्त्र नेसून व संशयाचे सर्व दागिने अंगावर घालून ६९०. जी बुद्धि म्हणजे जीवाच्या स्वस्वरूपाच्या निश्चयाची शोभा पहाण्याचा मूर्तिमंत आरसा आहे; त्या बुद्धीची ही प्रवृत्ति तीन प्रकारची आहे. ६९१.

बुद्धि आणि धैर्य यांचे ( सत्त्व रज व तम या ) गुणामुळें होणारे तीन प्रकार मीं पूर्णपणें वेगवेगळे सांगतों. हे धनंजया, ऐक. २९.

अरे अर्जुना, विचार कर. या सत्वादि तिन्ही गुणांनीं या जगामध्यें कोणती म्हणून एक वस्तु तीन ठिकाणीं केलेली नाहीं ? ६९२. ज्याप्रमाणें पोटांत अग्नि नसलेलें लांकूड जगांत कोणतें आहे ? त्याप्रमाणें गुणाच्या योगानें जी तीन प्रकारची झाली नाहीं, अशी दृश्य वर्गामध्यें वस्तु कोठें आहे ? ६९३. म्हणून तीन गुणांनीं, बुद्धि तीन गुणांची केली आहे व धैर्याचे सुद्धां तसेच ( तीन गुणांनीं केलेले तीन ) भाग आहेत. ६९४. तीच एक बुद्धि व धैर्य वेगवेगळीं यथायोग्य लक्षणांनीं अलंकृत झालेली अशी त्यांच्या ( तीन गुणांनीं केलेल्या ) भेदाप्रमाणें विस्तारानें सांगण्यांत येईल ६९५. परंतु अर्जुना, बुद्धि व धैर्य या दोन गोष्टींमध्यें प्रथम बुद्धीचे ( तीन ) प्रकार सांगूं. ६९६.

( नित्य व नैमित्तिक हीं ) करणीय व ( काम्य व निषिद्ध हीं ) अकरणीय, त्यांचे ठिकाणीं (अनुक्रमें) प्रवृत्ति व निवृत्ति, (त्यापासून उत्पन्न होणारे जन्ममरणाचें ) भय व अभय, बंध व मोक्ष, हे जी जाणते, ती सात्त्विकी बुद्धि होय. ३०.

हे चांगल्या योद्धया अर्जुना, संसाराला येणाऱ्या प्राण्याला उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा तीन वाटा आहेत. ६९७. कारण कीं, विहिताचें न करणें, काम्य व निषिद्ध हे तीन मार्ग आहेत व यांपासून या जीवांना संसारभय असल्यामुळें हे दोषयुक्त आहेत. ६९८. म्हणून अधिकारानुरूप व विधीच्या मार्गानें वांट्याला आलेलें जें नित्यकर्म, तेंच काय तें एक या जगांत आचरण करण्यास चांगलें आहे. ६९९. ज्याप्रमाणें तहान लागली तर केवळ ती भागविण्याकरितां पाणी प्यावें ( त्याशिवाय पाणी पिण्यांत दुसरा हेतूच नाहीं, ) त्याप्रमाणें केवळ आत्मप्राप्ति या फळाकडे दृष्टि ठेवून, तें शास्त्रविहित नित्यकर्मच करावें. ७००. एवढ्यानेंच तें कर्म अनिष्ट असलेल्या जन्माच्या भयाला घालवितें व मोक्षाची प्राप्ति सोपी करून देतें. ७०१. असें जो कर्म करितो, तो संसारभयाकडून चांगल्या रीतीनें सुटला जातो व त्यानें विहित कर्म निष्काम बुद्धीनें केलें म्हणून तो मुमुक्षूच्या योग्यतेला आला. ७०२, त्या मुमुक्षुस्थितींत जी बुद्धि असा बळकट भरंवसा बांधते कीं, अशा रीतीनें ( केवळ आत्मप्राप्तीकडे दृष्टि ठेवून कर्म करण्यानें ) मोक्ष अगदीं ठेवल्यासारखा प्राप्त होईल.७०३. म्हणून(ती बुद्धि म्हणजे) प्रवृत्तीच खालीं घालून वर निवृत्ति मांडली आहे. ( अशा रीतीनें कर्म करण्यांत जरी बाहेरून प्रवृत्ति दिसते; तरी आंतून खरोखर निवृत्तिच आहे. ) अशा कर्मांच्या ठिकाणीं बुद्धी देतो न देतो तोंच. (अशा रीतीनें कर्म करण्याचा बुद्धीनें निश्चय करतो न करतो तोंच.)७०४. तान्हेलेला मनुष्य पाण्यानें जगतो अथवा पुरांत पडलेला मनुष्य नाव मिळाली असतां जगतो व अंधाऱ्या विहिरींत पडलेला मनुष्य सूर्यकिरणें प्राप्त झालीं असतां जगतो. ७०५ अथवा पथ्य सांभाळून औषध घेतलें असतां जरी रोगानें ग्रासला असला तरी जगतो अथवा माशाला जर पाण्याचा जिव्हाळा मिळाला. ७०६. तर तो जगेलच यांत जसें अन्यथा नाहीं; याप्रमाणें या कर्मांच्या ठिकाणीं प्रवृत्त झालें असतां मोक्ष मिळतोंच. ७०७. करणीय कर्मांसंबंधानें हें जें चांगलें ज्ञान ( ज्या बुद्धीला ) आहे व जी बुद्धि अकरणीय कर्म असें ( पुढील ओंवींत सांगितल्याप्रमाणें ) आहे, हें पक्कें जाणते. ७०८. तीं काम्यादिक कर्में संसारभयदायक आहेत. म्हणून ज्या कर्मांवर अकृत्यपणाचे शितोडे पडले आहेत ( जीं करण्यास योग्य नाहींत अशीं ठरलीं आहेत.) ७०९. त्या अकरणीय व जन्ममरणाच्या भयानें युक्त अशा कर्मांच्या ठिकाणीं जी बुद्धि प्रवृत्तीला मागल्या पायींच पळावयास लावते. ७१०. अग्नींत जसा प्रवेश करवत नाहीं, अथांग

घलवे । धगधगीत नागवे । शूळ जेवीं ॥ ११ ॥ कां काळयाणा धुंधुवातु । देखोनि न घलवे हातु । न बचवे खोपेआंतु । वाघाचिये ॥ १२ ॥ तैसें कर्म अकरणीय । देखोनि महाभय । उपजे निःसंदेह । बुद्धी जिये ॥ १३ ॥ वाढिलें रांधूनि बिखें । तेथें जाणिजे मृत्यु न चुके । तेवीं निषेधीं कां देखे । बंधातें जे ॥ १४ ॥ मग बंधभयभरितीं । तियें निषिद्धीं प्राप्तीं । विनियोगु जाणे निवृत्ती । कर्मांचिये ॥ १५ ॥ ऐसेनि कार्याकार्यविवेकी । जे प्रवृत्तिनिवृत्तिमापकीं । खरा कुडीं पारखी । जिया परी ॥ १६ ॥ तैसी कृत्याकृत्यशुद्धी । बुझे जे निरवधी । सात्त्विक म्हणिपे बुद्धी । तेचि तूं जाण ॥ १७ ॥

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च । अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

आणि बकांचां गांवीं । घेपे क्षीरनीर सकलवी । कां अहोरात्रींची गोंवी । आंधळें नेणे ॥ १८ ॥ जया फुलांचा मकरंदु फावे । तो काष्ठें कोरूं धांवे । परी भ्रमरपणें नव्हे । अव्हां जेवीं ॥ १९ ॥ तैसीं इयें कार्याकार्यें । धर्माधर्मरूपें जियें । तियें न चोजवितां जाये । जाणती जे कां ॥ ७२० ॥ अगा डोळांवीण मोतियें । घेतां पाडु मिळे विपायें । न मिळणें तें आहे । ठेविलें तेथें ॥ २१ ॥ तैसें अकरणीय अवचटें । नोडवे तरीच लोटे । एऱ्हवीं जाणे एकवटें । दोन्ही जे कां ॥ २२ ॥ ते गा बुद्धि चोखविषीं । जाण येथ राजसी । अक्षत टाकिली जैसी । मांदियेसी ॥ २३ ॥

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽऽवृता । सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥

आणि राजा जिया वाटा जाये । ते चोरांसि आडव होये । कां राक्षसां दिवो पाहे । राति होऊनि ॥ २४ ॥ नाना निधानचि निदैवा । होये कोळसयाचा उडवा । पैं असतें आपणपें जीवा । नाहीं जालें ॥ २५ ॥ तैसें धर्मजात तितुकें । जिये बुद्धीसी पातकें । साच तें लटिकें । ऐसेंचि बुझे ॥ २६ ॥ ते आघवेचि अर्थ । करूनि घाली अनर्थ । गुण ते ते व्यवस्थित । दोषचि मानी ॥ २७ ॥ किंबहुना श्रुतिजातें । अधिष्ठूनि केलें सरतें । तेतुलेंही उपरतें । जाणे जे बुद्धी ॥ २८ ॥ ते कोणातेंही न पुसतां । तामसी जाणावी पांडुसुता । रात्री काय धर्मार्था । साच करावी ॥ २९ ॥ एवं बुद्धीचे भेद । तिन्ही तुज विशद । सांगितले स्वबोध- । कुमुदचंद्रा ॥ ७३० ॥ आतां याची बुद्धिवृत्ती । निष्टंकिला कर्मजातीं । खांदु मांडिजे धृती । त्रिविधा जया ॥ ३१ ॥ तिये धृतीचेही विभाग । तिन्ही यथालिंग । सांगिजती चांग । अवधान दे ॥ ३२ ॥

धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः । योगेनाऽव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

तरी उदेलिया दिनकरु । चोरीसिं थोके अंधारु । कां राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवीं ॥ ३३ ॥ नाना पवनाचा साटु । वाजीनलिया नीटु । आंगेंसीं बोभाटु । सांडिती मेघ ॥ ३४ ॥ कां अगस्त्याचेनि दर्शनें । सिंधु घेऊनी ठाती मौनें । चंद्रोदयीं कमळवनें ।

पाण्यांत जशी उडी टाकवत नाहीं, अथवा धगधगीत शूळ जसा धरवत नाहीं. ७११. अथवा फूं फूं करणारा काळा नाग पाहून त्याला धरण्याकरितां जसा हात घालवत नाहीं अथवा वाघाच्या गुहेंत असें जाववत नाहीं. ७१२. त्याप्रमाणें अकरणीय कर्म पाहून ज्या बुद्धींत निःसंशय मोठें भय उत्पन्न होतें; ७१३. विष मिळवून तयार करून वाढलेलें अन्न सेवन केलें असतां मृत्यु चुकणार नाहीं, हें जसें पक्कें समजावें, त्याप्रमाणें जी बुद्धि निषिद्ध कर्मांच्या ठिकाणीं बंधाला पहाते; ७१४. मग तें बंधभयानें भरलेलें निषिद्ध कर्म प्राप्त असतां, त्या कर्मांच्या निवृत्तीचा विनियोग जी बुद्धि जाणते. ७१५. ज्याप्रमाणें रत्नपारखी खऱ्याखोट्या रत्नाची परीक्षा करतो, त्याप्रमाणें जी प्रवृत्ति-निवृत्तीच्या मापानें कार्याकार्याचा निर्णय करते. ७१६. त्याप्रमाणें कृत्याकृत्याचा विचार जी अखंड जाणते, तिलाच सात्त्विक बुद्धि असें म्हणतात, असें तूं समज. ७१७.

ज्या बुद्धीनें धर्म व अधर्म, किंवा कार्य व अकार्य यांचा यथार्थ निर्णय होत नाहीं, ती बुद्धि हे पार्था ! राजस होय. ३१.

आणि बगळ्यांच्या गांवांत ज्याप्रमाणें पाणी घातलेलें दूध सेवन केलें जातें ( कारण बगळ्यास दूध व पाणी हे वेगवेगळे करतां येत नाहीं ) अथवा आंधळा जसा दिवस व रात्र यांचा गुंताडा जाणत नाहीं. ७१८. जो भ्रमर फुलांच्या मकरंदाचें सेवन करतो, तो लाकडें कोरण्या-करितां धांवतो. परंतु हें त्याचें कृत्य जसें भ्रमराच्या स्वभावाशीं विसंगत नाहीं ७१९. त्याप्रमाणें जी बुद्धि हीं जीं धर्माधर्मरूप कृत्याकृत्यें, त्यांची निवड न करतां सरसकट आचरण करीत जाते, ७२०. अरे अर्जुना, ( मोत्यांच्या ) परीक्षेची दृष्टि नसतां मोतीं घेतलें तर योग्य सवदा झाला तर तो चुकूनच होणार; परंतु त्या व्यवहारांत फसणें हें मात्र नेमकें ठेवल्यासारखें व्हावयाचेंच. ७२१. त्याप्रमाणें अकरणीय कर्म जर कदाचित् पुढें येऊन उभें राहिलें नाहीं, तरच करावयाचें राहातें, एऱ्हवीं जी बुद्धि दोन्ही ( अकरणीय व करणीय ) सरसकट सारखीच समजते; ७२२. लग्नसमारंभांत जमलेल्या सर्व जातीच्या मंडळींना जशी जातीची निवडानिवड न करतां सरसकट भोजनाच्या आमंत्रणाची अक्षत यावी,(त्याप्रमाणें कार्याकार्यांची निवड जी जाणत नाहीं ) अशी ती राजस बुद्धि आहे, असें तूं चांगल्या रीतीनें ओळख. ७२३.

हे पार्था, अधर्माला जी धर्म समजते व सर्व अर्थांना विपरीत मानते, ती तमानें आच्छादिलेली ( बुद्धि ) तामसी बुद्धि होय. ३२.

आणि राजा ज्या वाटेनें जातो ती वाट चोराला अडचणीचें ठिकाण होते अथवा राक्षसांना दिवस, रात्र होऊन उजाडतो. ( त्यांस दिवस उजाडला असतां ती रात्र आहे असें वाटते. ) ७२४. अथवा भाग्यहीन पुरुषाला पुरलेलें द्रव्यच कोळशाचा ढीग होतो आणि म्हणून तें द्रव्य त्याच्याजवळ असून सुद्धां त्याच्या जीवाला तें नसल्यासारखें होतें. ७२५. त्याप्रमाणें जितकें शास्त्रानुसार वागणें असेल, तितकें सर्व ज्या बुद्धीला पातक असें वाटतें व खरें तें खोटें असेंच जी बुद्धि समजते. ७२६. जी बुद्धि सर्वच अर्थ, अनर्थ असें समजते व गुण तेवढे नेमके दोष आहेत असें मानते. ७२७. फार काय सांगावें ! जितकें सर्व श्रुतीनें अंगीकार करून मान्य केलें आहे, तितकेंही जी बुद्धि उलट जाणते ७२८. अर्जुना, कोणालाही न विचारतां ती बुद्धि तामसी आहे, असें समजावें आणि ज्या बुद्धीला धर्मार्थाची खरी खरी रात्र आहे (म्हणजे धर्म व अर्थ यांचें खरें खरें अज्ञान आहे, ) त्या बुद्धीला काय करावयाचें ? ७२९. हे आत्मबोधरूपी कमलाचा विकास करणाऱ्या चंद्रा अर्जुना, याप्रमाणें तुला बुद्धीचे तिन्हीं भेद स्पष्ट सांगितले. ७३०. आतां याच (तीन प्रकारच्या) बुद्धिवृत्तीनें कर्ममात्राचा निश्चय केला असतां, त्या बुद्धीला ज्या तीन प्रकारच्या धैर्यानें आधार दिला जातो,७३१. त्या धैर्यांचेही तीन प्रकार त्यांच्या योग्य लक्षणांसह सांगण्यांत येतील. तूं चांगलें लक्ष दे. ७३२.

हे पार्था, योगाला सोडून न जाणाऱ्या ज्या धृतीनें मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया ( मनुष्य ) आंवरून धरीत असतो, ती सात्त्विकी धृति होय. ३३.

तर सूर्य उगवल्याबरोबर चौर्यकर्मासकट अंधार थांबतो. ( नाहींसा होतो ) अथवा राजाचा हुकूम ( ज्याप्रमाणें ) नियमकर्म थांबवितो. ७३३. अथवा वारा वेगानें चांगला वाहिला असतां ढग जसे गर्जनेसह आपण नाहींसे होतात. ७३४. किंवा अगस्ति ऋषी दृष्टीस पडला असतां समुद्र जसे मौन धारण करून रहातात अथवा सूर्यविकासिनी

मिठी देती ॥३५॥ हें असो पावो उचालिला । मदमुख न ठेविती खालां । गाजौनि पुढां जाला । सिंहु जरी ॥ ३६ ॥ तैसा जो धीरु । उठलिया अंतरु । मनादिकें व्यापारु । सांडिती उभीं ॥ ३७ ॥ इंद्रियांविषयांचिया गांठी । अपैसया सुटती किरीटी । मना मायेचां पोटीं । रिगती दाहीं ॥ ३८ ॥ अधोर्ध्व गुढें काढी । प्राण नवांची पेंडी । बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजीं ॥ ३९ ॥ संकल्पविकल्पांचें लुगडें । सांडूनि मन उघडें । बुद्धिही मागिलेकडे । उगीचि बैसे ॥ ७४० ॥ ऐसी धैर्यराजें जेणें । मन प्राण करणें । स्वचेष्टांचीं संभाषणें । सांडविजती ॥४१॥ मग आघवींचि सडीं । ध्यानाचां आंतुलां मढीं । कोंडिजती निरवडी । योगाचिये ॥ ४२ ॥ परी परमात्मया चक्रवर्ती । उगाणिती जंव हातीं । तंव लांचु न घेतां धृती । धरिजती जिया ॥ ४३ ॥ ते गा धृती येथें । सात्त्विक हें निरुतें । आईक अर्जुनातें । श्रीकांतु म्हणे ॥ ४४ ॥

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन । प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥

आणि होऊनियां शरीरी । स्वर्गसंसाराचां दोहीं घरीं । नांदे जो पोटभरी । त्रिवर्गोपायें ॥४५॥ तो मनोरथांचां सागरीं । धर्मार्थकामांचां तारुवावरी । जेणें धैर्यबळें करी । क्रियावाणिज्य ॥ ४६ ॥ जें कर्म भांडवला सूये । तयाची चौगुणी येती पाहे । येवढें सायास साहे । जया धृती ॥ ४७ ॥ ते गा धृती राजस । पार्था येथ परियेस । आतां आइक तामस । तिसरी जे ॥ ४८ ॥

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च । न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा तामसी मता ॥ ३५ ॥

तरी सर्वाधमें गुणें । जयाचें कां रूपा येणें । कोळसा काळेपणें । घडला जैसा ॥ ४९ ॥ अहो प्राकृत आणि हीनु । तयाही कीं गुणत्वाचा मानु । परी न म्हणिजे पुण्यजनु । राक्षसु काई ॥ ७५० ॥ पैं ग्रहांमाजीं इंगुळु । तयातें म्हणिपे मंगळु । तैसा तमीं धसाळु । गुणशब्दु हा ॥५१ ॥ जे सर्वदोषांचा वसौटा । तमचि कामऊनि सुभटा । उभारिला आंगवठा । जया नराचा ॥ ५२ ॥ तो आळसु सूनि असे कांखे । म्हणौनि निद्रे कहीं न मुके । पापें पोषितां दुःखें । न सांडिजे जेवीं ॥ ५३ ॥ आणि देहधनाचिया आवडी । सदा भय तयातें न सांडी । विसंवूं न सके धोंडीं । काठिण्य जैसें ॥ ५४ ॥ आणि पदार्थजातीं स्नेहो । बांधे म्हणोनि तो शोकें ठावो । केला न शके पाप जावों । कृतघ्नौनि जैसें ॥ ५५ ॥ आणि असंतोष जीवेंसीं । धरूनि ठेला अहर्निशीं । म्हणौनि मैत्री तेणेंसीं । विषादें केली ॥ ५६ ॥ लसणातें न सांडी गंधी । का अपथ्यशीळातें व्याधी । तैसी केली मरणावधी । विषादें तया ॥ ५७ ॥ आणि वयसा वित्तकामु । यांचा वाढवी संभ्रमु । म्हणौनि मदें आश्रमु । तोचि केला ॥५८॥ आगीतें न सांडी

कमळांचे समुदाय चंद्रोदयाबरोबर मिटतात. ७३५. हें राहूं दे. मदोन्मत्त हत्ती जात असतांना जर गर्जना करून सिंह पुढें आला, तर टाकण्याकरितां उचललेलें पाऊल ते खालीं जमिनीवर ठेवीत नाहींत. ७३६. त्याप्रमाणें जें धैर्य अंतःकरणांत उत्पन्न झाल्याबरोबर मनादिक इंद्रियें आपआपला व्यापार उभ्या उभ्याच टाकून देतात. ७३७. अर्जुना, इंद्रियांच्या विषयांशीं पडलेल्या गांठी आपोआप सुटतात व दहाही इंद्रियें आपल्या मनरूपी आईच्या पोटांत प्रवेश करितात. ( आपआपल्या विषयांचा संबंध सोडून अंतर्मुख होतात. ) ७३८. जें धैर्य खालील अपानवायु व वर वाहणारा प्राणवायु, या मर्यादा काढून, प्राण, अपान, व्यान, समान, उदान, नाग, कूर्म, कृकल व देवदत्त ह्या नऊही वायूंची एक जुडी करून, नंतर सुषुम्नेमध्यें उडी घालतें. ( म्हणजे ज्या धैर्याच्या योगानें नऊही वायु सुषुम्नेंत उडी घालतात. ) ७३९. ज्या धैर्याचे योगानें मन हें संकल्पविकल्पाचें वस्त्र टाकून देऊन उघडें होतें आणि बुद्धीच्याही मार्गे जाऊन उगीच बसतें. ७४०. जो धैर्यरूपी राजा, याप्रमाणें मनाला, प्राणांना व इंद्रियांना आपआपल्या कर्मांचीं बोलणीं टाकावयाला लावतो. ७४१. मग अष्टांगयोगाच्या युक्तीनें त्या एकट्या ( आपआपल्या कर्मांचा संबंध सुटलेल्या ) सर्व इंद्रियांना ध्यानरूपी आंतल्या कोठडींत जें धैर्य कोंडून टाकतें. ७४२. परंतु सार्वभौम राजा जो परमात्मा, त्याच्या स्वाधीन होईतोंपर्यंत ज्या धैर्याकडून लांच न घेतां तीं धरलीं जातात (त्यांचा निग्रह केला जातो.) ७४३. अरे अर्जुना, ऐक. तें धैर्य या जगांत खरोखर सात्त्विक आहे, असें लक्ष्मीकांत जे श्रीकृष्ण, ते अर्जुनाला म्हणाले. ७४४.

हे अर्जुना, ज्या धृतीच्या योगानें ( मनुष्य ) धर्म, अर्थ व काम यांचें अवलंबन करतो ती, प्रसंगवशात् फलाची आकांक्षा धरणारी धृति, हे पार्था, राजसी होय. ३४.

आणि जो जीवात्मा देहच आपण आहोंत असें मानून, धर्म, अर्थ व काम या तीन उपायांनीं स्वर्गसंसाररूपी दोन्ही घरांत आनंदानें रहातो. ७४५. मनोरथरूपी सागरामध्यें धर्म, अर्थ व कामरूपी जहाजांवर क्रियारूपी व्यापार, तो जीवात्मा ज्या धैर्याच्या बळानें करतो, ७४६. त्या व्यापारांत जें कर्मरूपी भांडवल



घालतो, त्याची निदान चौपट तरी ( प्राप्ति ) होईल, असें धोरण बांधतो, एवढें सायास तो जीवात्मा त्या धैर्यानें सहन करतो, ७४७. अर्जुना, ऐक. तें या जगांत राजस धैर्य होय. आतां तिसरें धैर्य जें तामस, तें ऐक. ७४८.

जिच्या योगानें निद्रा, भय, शोक, असंतोष आणि मद हीं दुर्बुद्धि ( मनुष्य ) सोडीत नाहीं तिला तामसी धृति समजतात. ३५.

तर कोळसा जसा काळेपणाचा बनला आहे, त्याप्रमाणें ज्या ( तामसी ) धैर्याचें, सर्वांत नीच जो तमोगुण, त्या गुणानें रूपाला येणें असतें. ७४९. अहो, जो तमोगुण साधारण आहे आणि नीच आहे, त्याला देखील गुणपणाची पदवी कशी ? तर राक्षस हे दुष्ट, पापी असून देखील त्यांस ' पुण्यजन ' असें नांव नाहीं काय ? ७५० नवग्रहांमध्यें जो विस्तव ( विस्तवासारखा ) आहे, त्याला मंगळ ( कल्याण करणारा ) म्हणतात. त्याप्रमाणें तमोगुणाच्या ठिकाणीं ' गुण ' हा शब्द अविचारी ( अविचारानें लावलेला )आहे. ७५१. हे चांगल्या योद्ध्या अर्जुना, सर्व दोषांचें आश्रयस्थान जो तमोगुण, तो कमवून ज्या पुरुषाचें शरीर उभारलें आहे. ( तयार झालें आहे. ) ७५२. त्याप्रमाणें पापें पोषिलीं असतां ( एकसारखें पापेंच करीत गेलें असतां ) त्या पाप करणाराला दुःख कधींच सोडीत नाहीं, त्याप्रमाणें तो ( तमोगुणी पुरुष ) आळस खाकेंत वाळगून असतो, म्हणून निद्रा त्याला कधींच सोडीत नाहीं. ७५३. आणि ज्याप्रमाणें धोंड्याला कठीणपणा सोडणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें देहाच्या व धनाच्या प्रेमामुळें त्याला भय केव्हांच सोडीत नाहीं. ७५४. आणि ज्याप्रमाणें कृतघ्न पुरुषापासून पाप जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें तो तामसी पुरुष सर्व पदार्थांच्या ठिकाणीं स्नेह जोडून ठेवतो, म्हणून शोकानें त्यास आपलें घर केलेलें असतें. ( शोक त्याच्यापासून जाऊं शकत नाहीं.) ७५५. आणि तो तामसी पुरुष असंतोषाला रात्रंदिवस जिवाशीं धरून राहिला, म्हणून खेदानें त्याच्याशीं मैत्री केली. ७५६. ज्याप्रमाणें लसूणाला घाण कधींच सोडीत नाहीं, अथवा पथ्य न करणाराला रोग सोडीत नाहीं; त्याप्रमाणें त्या तामसी पुरुषाला मरणाच्या वेळेपर्यंत खेद सोडीत नाहीं. ७५७. आणि तारुण्य, द्रव्य व विषयेच्छा यांचे तो तामसी पुरुष महत्त्व वाढवितो; म्हणून मदानें त्यास आपलें राहण्याचें ठिकाण केलें आहे, ७५८. ज्याप्रमाणें अग्नीला उष्णता सोडीत नाहीं

तापु । सळातें जातीचा सापु । कां जगाचा वैरी बासिपु । अखंड जैसा ।। ५९ ।। नातरी शरीरातें काळ । न विसंबे कवणे वेळ । तैसा आथी अढळ । तामसीं मदु ।। ७६० ।। एवं पांचही हे निद्रादिक । तामसाचां ठाईं दोख । जिया धृती देख । धरिलें आहाती ।। ६१ ।। तिये गा धृती नांवें । तामसी येथ हें जाणावें । म्हणितलें तेणें देवें । जगाचेनि ।। ६२ ।। एवं त्रिविध जे बुद्धि । कीजे कर्मनिश्चयो आधि । तो धृती या सिद्धि । नेइजो येथ ।। ६३ ।। सूर्यें मार्गु गोचरु होये । आणि तो चालती कीर पाये । परी चालणें तें आहे । धैर्यें जेवीं ।। ६४ ।। तैसी बुद्धि कर्मातें दावी । तें करणसामग्री निफजवी । परी निफजावया होआवी । धीरता जे ।। ६५ ।। ते हे गा तुजप्रति । सांगितली त्रिविध धृती । यया कर्मत्रया निष्पत्ति । जालिया मग ।। ६६ ।। येथ फळ जें एक निफजे । सुख जयातें म्हणिजे । तेंही त्रिविध जाणिजे । कर्मवशें ।। ६७ ।। तरी फळरूप तें सुख । त्रिगुणीं भेदलें देख । विवंचूं आतां चोख । चोखीं बोलीं ।। ६८ ।। परी चोखी ते कैसी सांगे । पैं घेवों जातां बोलवगें । कानींचियेही लागे । हातींचा मळु ।। ६९ ।। म्हणौनि जयाचेनि अव्हेरें । अवधानही होय बाहिरें । तेणें आइक हो आंतरें । जिवाचेनि जीवें ।। ७७० ।। ऐसें म्हणौनि देवो । त्रिविधा सुखाचा प्रस्तावो । मांडला तो निर्वाहो । निरूपितसे ।। ७१ ।।

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ । अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ ३६ ॥

म्हणे सुखत्रयसंज्ञा । सांगों म्हणौनि प्रतिज्ञा । बोलिलों तें प्राज्ञा । ऐक आतां ।। ७२ ।। तरी सुख तें गा किरीटी । दाविजेल तुज दिठी । जें आत्मयाचिये भेटी । जीवासि होय ।। ७३ ।। परी मात्रेचेनि मापें । दिव्यौषध जैसें घेपे । कां कथिलाचें कीजे रूपें । रसभावनीं ।। ७४ ।। नाना लवणाचें जळ । होआवया दोनि चार वेळ । देऊनि सांडिजती ढाळु । तोयाचे जेवीं ।। ७५ ।। तेवीं जालेनि सुखलेशें । जीवु भाविलिया अभ्यासें । जीवपणाचें नासे । दुःख जेथें ।। ७६ ।। तें येथ आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक । तेंही सांगों एकैक । रूप आतां ।। ७७ ।।

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् । तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥

आतां चंदनाचें बुड । सर्पीं जैसें दुवाड । कां निधानाचें तोंड । विवसिया जेवीं ।। ७८ ।। अगा स्वर्गींचें गोमटें । आडव यागसंकटें । कां बाळपण दासटें । त्रासकाळें ।। ७९ ।। हें असो दीपाचिये सिद्धी । अवघड धू आधीं । नातरी तो औषधीं । जिभेचा ठावो ।। ७८० ।। तयापरी पांडवा । जया सुखाचा रिगावा । विषम तेथ मेळावा । यमदमांचा ।। ८१ ।। देत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसें वैराग्य उठी । स्वर्गसंसारा कांटी । काढितची ।।८२।। विवेकश्रवणें अतित्रासें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाती भोकसे । बुद्ध्यादिकांचे ।। ८३ ।। सुषुम्नेचेनि तोंडें । गिळिजे प्राणापानाचे लोंढे । बोहणियेसीचि येवढें । भारी जेथ ।। ८४ ।। जें सारसांही बिघडतां । होय वोहाहूनि वत्स काढितां । नव्हे भणंगु दवाडितां । भाणयावरुनी ।। ८५ ।।

अथवा जातीवान् सर्प जसा वैर सोडीत नाहीं अथवा भय जसें नेहमीं जगाचा शत्रु आहे. ७५९. अथवा ज्याप्रमाणें शरीराला काळ कोणत्याही वेळीं विसरत नाहीं, त्याप्रमाणें तामसी पुरुषाच्या ठिकाणीं मद कायमचा असतो. ७६०. पहा, याप्रमाणें हे निद्रादिक पांच दोष तामसी पुरुषाच्या ठिकाणीं ज्या धैर्यानें धरले आहेत, ७६१. अर्जुना, त्या धृतीला या जगांत तामस धृति म्हणतात, असें तूं समज. असें त्या जगाच्या देवानें ( श्रीकृष्णानें ) म्हटलें. ७६२. याप्रमाणें तीन प्रकारच्या बुद्धीनें अगोदर जो कर्मनिश्चय केला जातो, तो या जगांत, ( या तीन प्रकारच्या ) धैर्यानें सिद्धीस नेला जातो. ७६३. सूर्याच्या योगानें रस्ता दिसतो आणि खरोखर तो मार्ग पाय चालतील. परंतु चालणें हें ज्याप्रमाणें धैर्याच्या योगानें होणारें आहे; ७६४. त्याप्रमाणें बुद्धि कर्माला दाखविते आणि इंद्रियसमुदाय तें कर्म घडवून आणतो, परंतु घडवून आणण्याला जें धैर्य लागतें, ७६५. अर्जुना, तें तीन प्रकारचें धैर्य तुला सांगितलें. या धैर्यानें तीन प्रकारचें कर्म उत्पन्न झाल्यावर मग—७६६. या तीन प्रकारच्या कर्मांपासून जें एक फळ उत्पन्न होतें; ज्याला सुख असें म्हटलें जातें, तेंही ( सुख ) कर्मांच्या आधीन असल्यामुळें तीन प्रकारचें आहे असें समजावें. ७६७. तर त्रिगुणांनीं तीन प्रकारचें झालेलें तें फलरूप सुख आतां चांगल्या शब्दांनीं चांगलें स्पष्ट सांगूं. पहा. ७६८. परंतु आमच्या सांगण्याचा चोखपणा विचारशील तर तो असा आहे कीं, शब्दांच्या मार्गानें ग्रहण करूं म्हणशील, तर कानांनीं ग्रहण करीत असतांना, त्याला कानाच्या हाताचाही मळ लागेल. ७६९. म्हणून ज्याच्या योगानें बाहेरच्या अवधानाचाही त्याग होईल, अशा अंतर्मुख वृत्तीच्या अंतःकरणानें ऐक. ७७०. असें बोलून देवांनीं तीन प्रकारचें सुख सांगण्याचा आरंभ केला, तो प्रकार आतां सांगतों. ७७१.

हे भरतश्रेष्ठा, तीन प्रकारचें सुख माझ्यापासून ऐक. ज्याचे ठिकाणीं (जीव) अभ्यासाचे योगानें रममाण होतो व ज्या योगानें जीवाच्या (जीवपणाच्या) दुःखाचा नाश खात्रीनें होतो. ३६.

देव म्हणतात, तीन प्रकारच्या सुखाचीं लक्षणें सांगूं म्हणून जी आम्ही प्रतिज्ञा केली, तें तीन प्रकारचें सुख सांगतों; बुद्धिवान अर्जुना, आतां ऐक. ७७२. तर अर्जुना, जें आत्म्याच्या दर्शनानें ( अनुभवानें ) जीवास होतें, तें सुख तुला दृष्टीनें दाखविण्यांत येईल. ( म्हणजे समजेल असें सांगण्यांत येईल. ) ७७३. परंतु प्रमाणाच्या मापानें जसें दिव्य औषध घेतलें जातें अथवा रसाची पुटें देऊन जसें कथिलाचें रुपें केलें जातें. ७७४. अथवा मिठाचें पाणी होण्याकरितां जसे दोन-चार वेळ त्या मिठास पाण्याचे हापके देऊन टाकावे लागतात, ७७५. त्याप्रमाणें आत्मा आणि जीव, यांच्या भेटींत झालेल्या सुखलेशानें ( गोडी लागून ) जीवाला अभ्यासानें त्या सुखलेशाचीं पुटें दिलीं असतां, ज्या (आत्मसुखाचे ) ठिकाणीं जीवपणाचें दुःख नाश पावतें. ७७६. तें आत्मसुख या जगांत त्रिगुणात्मक झालें आहे. आतां त्यापैकीं देखील एकएकाचें लक्षण सांगतों. ७७७.

जें आरंभीं विषासारखें (पण) परिणामीं अमृताची उपमा देण्याला योग्य असतें, जें आत्म-बुद्धिप्रसादानें उत्पन्न होतें, त्या सुखास सात्त्विक (सुख) म्हणतात. ३७.

आतां चंदनाच्या झाडाचें बूड जसें सर्पांमुळें ( प्राप्त होण्यास ) अवघड झालेलें असतें अथवा ठेव्याचें तोंडावरील पिशाचामुळें तो ठेवा प्राप्त होणें कठीण झालेलें असतें. ७७८. अरे अर्जुना, स्वर्गांतील चांगले भोग प्राप्त होण्यास यज्ञरूपी संकटाची अडचण असते. अथवा प्रथम त्रासाचे प्रसंग येण्यानें बाळपणदेखील पीडाकारक झालेलें असतें. ७७९. हें राहूं दे. दिव्याच्या सिद्धीला आधीं धुराची पीडा आहे. अथवा औषध परिणामीं हितकर असेल, परंतु तें सेवन करतेवेळीं जिभेला त्रासदायक असतें. ७८०. अर्जुना, त्याप्रमाणें ज्या सुखाचा आरंभ यमदमांच्या समुदायामुळें कठीण असतो ( जें प्राप्त होण्याच्या आधीं यमदमाचा त्रास सोसावा लागतो. ) ७८१. ( ज्या सुखांत आरंभीं ) सर्व स्नेहाला नाहींसें करीत अंगांत असें वैराग्य उत्पन्न होतें कीं, तें स्वर्ग व संसाररूपी कुंपण काढून टाकतेंच. ७८२. ज्या ठिकाणीं नित्यानित्यविवेकाच्या श्रवणाच्या अति त्रासानें व कठीण व्रतांचें आचरण केल्यानें बुद्ध्यादिकांचे भोकसे जातात; ( लचकेच्या लचके जातात. ) ७८३. सुषुम्नेच्या तोंडानें प्राण व अपानाचे लोंढे मिळावे लागतात. ज्या सुखाकरितां आरंभींच एवढे भारी कष्ट भोगावे लागतात. ७८४. चक्रवाक पक्ष्याच्या जोडप्याचा वियोग झाला असतां अथवा कांसेपासून वासरूं पलीकडे ओढीत असतां जसें होतें; हें कांहींच नाहीं, तर वाढलेल्या पानावरून अन्नार्थी दरिद्री मनुष्याला हाकून देत असतां जसें होतें. ७८५.

पैं मायेपुढोनि बाळक । काळें नेता जें एक । होय का उदक । तुटता मीना ॥ ८६ ॥ तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर । युगांतु होय तें वीर । विराग साहाती ॥ ८७ ॥ ऐसा जया सुखाचा आरंभु । दावी काठिण्याचा क्षोभु । मग क्षीराब्धीं लाभु । अमृताचा जैसा ॥ ८८ ॥ पहिलया वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडवी गळा । तरी ज्ञानामृतें सोहळा । पाहे जेथें ॥ ८९ ॥ पैं कोलिताही कोपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आते ॥ ७९० ॥ तें वैराग्यादिक तैसें । पिकलिया आत्मप्रकाशें । मग वैराग्येंसींही नाशे । अविद्याजात ॥ ९१ ॥ तेव्हां सागरीं गंगा जैसी । आत्मा मीनल्या बुद्धि तैसी । अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥ ९२ ॥ ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे । तें सात्त्विक येणें नामें । बोलिजे सुख ॥ ९३ ॥

विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् । परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

आणि विषयेंद्रियां । मेळ होतां धनंजया । जें सुख जाय थडिया । सांडूनि दोन्ही ॥ ९४ ॥ अधिकारिया रिगतां गांवो । होय जैसा उत्साहो । कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ॥ ९५ ॥ नाना रोगिया जिभेपासीं । केळें गोड साखरेंसी । कां बचनागाची जैसी । महुरता पहिली ॥ ९६ ॥ पहिलें संवचोराचें मैत्र । हाटभेटीचें कलत्र । कां लाघवियाचे विचित्र । विनोद ते ॥ ९७ ॥ तैसें विषयेंद्रियदोखीं । जें सुख जिवातें पोखी । मग उपडिला खडकीं । हंसु जैसा ॥ ९८ ॥ तैसी जोडी आघवी आटे । जीविताचा ठावो फिटे । सुकृताचियाही सुटे । धनाची गांठी ॥ ९९ ॥ आणिक भोगिलें जें कांहीं । तें स्वप्न तैसें होय नाहीं । मग हाणिचांचि घाई । लोळावें उरे ॥ ८०० ॥ ऐसें आपत्ती जें सुख । ऐहिकीं परिणमे देख । परत्रीं कीर विख । होऊनि परते ॥ १ ॥ जे इंद्रियजाता लळा । दिधलिया धर्माचा मळा । जाळूनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ ॥ २ ॥ तेथ पातकें बांधिती थावो । तियें नरकीं देती ठावो । जेणें सुखें हा अपावो । परत्रीं ऐसा ॥ ३ ॥ पैं नामें विष महुरें । परी मारूनि अंतीं खरें । तैसें आदि जें गोडिरें । अंतीं कडू ॥ ४ ॥ पार्था तें सुख साचें । वळिलें आहे रजाचें । म्हणौनि न शिवें तयाचें । आंग कहीं ॥ ५ ॥

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः । निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें । स्वैरस्त्रीसंनिधानें । होय जें सुख ॥ ६ ॥ कां पुढीलांचेनि मारें । नातरी परस्वापहारें । जें सुख अवतरे । भाटांचां बोलीं ॥ ७ ॥ जें आलस्यावरी पोखिजे । निद्रेमाजीं जें देखिजे । जयाचां आद्यंतीं भुलिजे । आपुली वाट ॥ ८ ॥ तें गा सुख पार्था । तामस जाण सर्वथा । हें बहु न

आईपुढून काळानें जें (एकुलतें) एक मूल नेत असतां अथवा माशाला पाण्याचा वियोग झाला असतां जें दुःख होतें; ७८६. त्याप्रमाणें विषयांच्या घराचा (विषयरूपी घराचा) त्याग करतांना इंद्रियांना मोठा युगान्त होतो (म्हणजे मोठें संकट ओढवल्यासारखें वाटतें.) तो ते वैराग्यशाली वीर पुरुष सहन करितात. ७८७. ज्या सुखाचा आरंभ अशा कठीणपणाच्या त्रासाचा अनुभव देतो;परंतु मग ज्याप्रमाणें क्षीरसमुद्र मंथन करण्याचा त्रास सोसल्यावर, जसा अमृताचा लाभ (देवांदानवांना) झाला. ७८८. या सुखाच्या अभ्यासाच्या आरंभीं वैराग्यरूपी विष जें निघालें, त्याला धैर्यरूपी शंकरानें आपला गळा पुढें केला, (तें प्राशन केलें).मग ज्या सुखाच्या ठिकाणीं ज्ञानरूपी अमृताचा आनंद प्रगट झाला. ७८९. हिरवें द्राक्ष इतकें आंबट असतें कीं, तोंडांत टाकल्याबरोबर जिभेला तें कोलितापेक्षां जास्त चटका देतें. परंतु तें द्राक्ष पिकलें असतां तेंच हिरवेपण (अत्यंत आंबटपणा) गोडपण होतें. ७९०. त्याप्रमाणें ते वैराग्यादिक आत्मज्ञानानें परिपक्व झाल्यावर मग, वैराग्यासुद्धां सर्व अविद्या नाहींशी होते. ७९१. तेव्हां ज्याप्रमाणें गंगा समुद्राला मिळते (व समुद्र होते) त्याप्रमाणें आत्म्याला बुद्धि मिळाल्यावर (ती आत्मरूप होते आणि मग) अद्वयानंदाची आपोआप खाण उघडते. ७९२ याप्रमाणें ज्या सुखाला वैराग्य हें मूळ असून, जें आत्मानुभवाच्या विश्रांतिरूपानें परिणामाला पावतें, त्यास सात्त्विक सुख असें म्हणावें. ७९३.

विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून उत्पन्न होणारें, आरंभीं अमृताची उपमा देण्याला योग्य (पण) परिणामीं विषासारखें, असें जें सुख, तें राजस (सुख) म्हटलें आहे. ३८

आणि अर्जुना, विषयांचा व इंद्रियांचा संबंध झाला असतां जें सुख दोन्ही कांठांच्या बाहेर वाहून जातें. (म्हणजे ज्या सुखाचा अंतःकरणांत अफाट पूर येतो.) ७९४. सरकारी अधिकारी गांवांत आला असतां जसा गांवांत उत्सव होतो, अथवा कर्ज काढून लग्नाचा पसारा मांडावा. ७९५. अथवा रोग्याच्या जिभेला जसें साखरेसह केळें गोड लागतें अथवा बचनागाची जशी पहिल्यांदाच गोडी भासते; ७९६. प्रवासांत सोबत असलेल्या संभावित चोराची जशी पहिल्याप्रथम (कृत्रिम) मैत्री असते किंवा बाजारांतील कुटुंबाची (वेश्येची) जशी आरंभीं लवटव असते अथवा बहुरूप्याचे विनोद जसे विचित्र असतात. ७९७. त्याप्रमाणें विषय व इंद्रियें यांच्या संबंधामध्यें जें सुख जीवाला पोसतें व मग परिणामीं, जसा हंस (रात्रीं आकाशांत संचार करीत असतां, खालीं पाण्यांत चांदण्याचें प्रतिबिंब पाहून, तीं रत्नें आहेत अशा समजुतीनें त्यांवर झडप घालतो व) खडकावर आपटून मरतो, ७९८. त्याप्रमाणें (धन वगैरे मिळवलेली) सर्व कमाई संपते, जीविताचा नाश होतो व पुण्यरूपी मिळविलेल्या धनाचीही गांठ सुटते. (पुण्याचा क्षय होतो). ७९९. आणि जें कांहीं विषयसुख भोगिलें, तें स्वप्नासारखें (भोगल्याबरोबर) नाहींसें होतें व मग हानीच्या आघातांत लोळणें उरतें, (नाशाचे तडाखे सोशीत बसावें लागतें;) ८००. जें राजस सुख इहलोकीं असें संकटाच्या परिणामाला पावतें, पहा; आणि परलोकांत तर खरोखर तें विष होऊन उलटतें. (परलोकप्राप्तीचा सर्वस्वी नाश करतें.) ८०१. कारण कीं, सर्व इंद्रियांना लाड दिला असतां, धर्मांचा मळा (शेत) जाळून ज्या राजस सुखांत विषयांचा सोहळा भोगला जातो; ८०२. तेव्हां पातकास बल येतें व तीं (विषयसुख भोगणाऱ्यास) नरकांत जागा देतात. याप्रमाणें ज्या सुखानें परलोकांत असा अपाय होतो; ८०३. बचनाग हें विष नांवाला गोड आहे, परंतु त्याचें सेवन करणारास मारून, तें आपलें मारकत्व परिणामीं खरें करतें. त्याप्रमाणें जें सुख प्रथम गोड असतें व शेवटीं कडू असतें, ८०४. अर्जुना, तें सुख खरोखर रजोगुणाचें बनलेलें आहे. म्हणून तूं कधींही त्या सुखाला स्पर्श करूं नकोस. ८०५.

जें आरंभीं आणि परिणामीं अंतःकरणाला मोह पाडणारें, निद्रा, आळस आणि प्रमाद यांपासून उत्पन्न होणारें, जें सुख, त्याला तामस (सुख) म्हणतात. ३९.

आणि अपेयाच्या (मद्य वगैरेच्या) पिण्यानें व अखाद्याच्या (मांस वगैरेच्या) भोजनानें अथवा स्वैर स्त्रीच्या (वेश्येच्या) संगतीनें जें सुख होतें; ८०६. अथवा जें सुख दुसऱ्यास ठार मारण्यानें अथवा दुसऱ्याचें द्रव्य हरण करण्यानें अथवा भाटांच्या (स्तुतिपाठकांच्या) बोलण्यानें प्रगट होतें; ८०७. जें सुख आळसानें वाढतें अथवा जें झोंपेंत अनुभवाला येतें व ज्या सुखाच्या आरंभीं व शेवटीं आत्मसुखाच्या मार्गाविषयीं भुरळ पडते;८०८ अर्जुना, तें सुख पूर्णपणें तामस आहे, असें तूं समज.

सांगोंचि जे कथा । असंभाव्य हे ॥ ९ ॥ ऐसें कर्मभेदें मुदलें । फळसुखही त्रिधा जालें । तें हें यथागमें केलें । गोचर तुज ॥ ८१० ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः । सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

तें कर्ता कर्म कर्मफळ । ये त्रिपुटी येकी केवळ । वांचूनि कांहींचि नसे स्थूळ- । सूक्ष्मीं इये ॥ ११ ॥ आणि हे तंव त्रिपुटी । तिहीं गुणीं इहीं किरीटी । गुंफिली असे पटीं । तांतुवीं जैसी ॥ १२ ॥ म्हणौनि प्रकृतीचां आलोकीं । न बंधिजे इहीं सत्त्वादिकीं । तैसी स्वर्गी ना मृत्युलोकीं । आथी वस्तु ॥ १३ ॥ कैंचा लोंवेवीण कांवळा । मातियेवीण मोदळा । कां जळेंवीण कल्लोळा । होणें आहे ॥ १४ ॥ तैसें न होनि गुणाचें । सृष्टीच्या रचना रचे । ऐसें नाहींच गा साचें । प्राणिजात ॥ १५ ॥ यालागीं हें सकळ । तिहीं गुणांचेंचि केवळ । घडलें आहे निखिळ । ऐसें जाण ॥ १६ ॥ गुणीं देवां त्रयी लाविली । गुणीं लोकीं तिकुटी पाडिली । चतुर्वर्णा घातली । सिनानीं उळिगे ॥ १७ ॥

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप । कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

तेचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण । तरी जयां मुख्य ब्राह्मण । धुरेचे कां ॥१८॥ येर क्षत्रिय वैश्य दोन्ही । तेही ब्राह्मणाचांचि मानिजे मानीं । जे ते वैदिकविधानी । योग्य म्हणौनि ॥१९॥ चौथा शूद्रु जो धनंजया । वेदीं लागु कीर नाहीं तया । तर्‍ही वृत्ति वर्णत्रया- । अधीन तयाची ॥ ८२० ॥ तिये वृत्तीचिया जवळिका । वर्णा ब्राह्मणादिकां । शूद्रही कीं देखा । चौथा जाला ॥ २१ ॥ जैसा फुलाचेनि सांगातें । तांतु तुरंबिजे श्रीमंतें । तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती ॥२२॥ ऐसेसी गा पार्था । हे चतुर्वर्ण्यव्यवस्था । करूं आतां कर्मपथा । यांचिया रूपा ॥ २३ ॥ जिहीं गुणीं ते वर्ण चारी । जन्ममृत्यूचिये कातरी । चुकोनियां ईश्वरीं । पैठे होती ॥ २४ ॥ जियें आत्मप्रकृतीचे इहीं । गुणीं सत्त्वादिकीं तिहीं । कर्में चौघां चहूं ठाईं । वांटिलीं वर्णा ॥ २५ ॥ जैसें बापें जोडिलें लेंकां । वांटिलें सूर्यें मार्ग पांथिकां । नाना व्यापार सेवकां । स्वामी जैसे ॥ २६ ॥ तैसी प्रकृतीचां गुणीं । जया कर्माची वेल्हावणी । केली आहे वर्णीं । चहूं इहीं ॥२७॥ तेथ सत्त्वें आपलां आंगीं । समीननिमीन भागीं । दोघे केले नियोगी । ब्राह्मण क्षत्रिय ॥ २८ ॥ आणि रज परी सात्त्विक । तेथ ठेविले वैश्य लोक । रजचि तमभेसक । तेथ शूद्र ते गा ॥ २९ ॥ ऐसा येकाचि प्राणिवृंदा । भेदु चतुर्वर्णधा । गुणींचि प्रबुद्धा । केला जाण ॥ ८३० ॥ मग आपलें ठेविलें जैसें । आइतेंचि दीपें दिसे । गुणभिन्न कर्म तैसें । शास्त्र दावी ॥ ३१ ॥ तेंचि आतां कोण कोण । वर्णविहिताचें लक्षण । हें सांगों ऐक श्रवण- । सौभाग्यनिधी ॥ ३२ ॥

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च । ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

याचें मी फार वर्णन करीतच नाहीं, कारण तामस सुखाला सुख असें म्हणणें संभवत नाहीं. ८०९. याप्रमाणें सुखाला कारण जें कर्म, तें तीन प्रकारचें असल्यामुळें, त्याकर्मांचें फळ जें सुख, तेंही तीन प्रकारचें झालें आहे. तें हें यथाशास्त्र तुला स्पष्ट केलें आहे. ८१०.

या प्रकृतिजन्य तीन गुणांपासून मुक्त असा ( कोणताही ) प्राणी पृथिवीमध्यें, स्वर्गामध्यें अथवा देवांमध्यें नाहीं. ४०.

तें कर्ता, कर्म व कर्मफळ ही जी केवळ एक त्रिपुटी आहे त्या त्रिपुटी वांचून,या स्थूलसूक्ष्म सृष्टींत दुसरें कांहींच नाहीं. ८११ आणि अर्जुना, ही त्रिपुटी तर ज्याप्रमाणें वस्त्रामध्यें तंतूच गुंफलेले असतात,त्याप्रमाणें या तीन गुणांनीं गुंफलेली आहे. ८१२. म्हणून प्रकृतीच्या आभासांत या सत्त्वादिक गुणांनीं गोंविली जात नाहीं, अशी वस्तु स्वर्गांत अथवा मृत्युलोकांत आहे, असें नाहीं. ८१३. लोंकरीशिवाय घोंगडी कोठली ? मातीशिवाय मोदळा ( चिखलाचा गोळा ) कोठला ? अथवा पाण्याशिवाय लाटांना अस्तित्व आहे काय ? ८१४. त्याप्रमाणें गुणांचें न बनतां, या सृष्टीच्या रचनेमध्यें जो तयार होतो, अर्जुना असा खरोखर कोणीच प्राणी नाहीं. ८१५. याकरितां हें सर्व ( जग ) केवळ तीन गुणांचें शुद्ध बनलें आहे, असें समज. ८१६. ( गुणांची अशी अचाट शक्ति आहे कीं, ) गुणांनीं देवाच्या पाठीमागें ( ब्रह्मा, विष्णु, शंकर असे ) तीन प्रकार लावले; गुणांनीं लोकांत तीन ( स्वर्ग, मृत्युलोक आणि पाताळ असे ) भेद उत्पन्न केले व या गुणांनीं चार वर्णांना निरनिराळे व्यवसाय लावून दिले. ८१७.

हे शत्रुतापना, स्वभावज गुणांचे योगानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचीं कर्में विभागलेलीं आहेत. ४१.

तेच चार वर्ण कोणकोणते आहेत म्हणून जर तूं विचारशील, तर ज्या चार वर्णांत ब्राह्मण हे मुख्य श्रेष्ठ आहेत. ८१८. इतर जे दोन वर्ण क्षत्रिय व वैश्य, तेही ब्राह्मणाच्या मानानें ( बरोबरीनें ) मानावेत. कारण ते वेदोक्तकर्मांला अधिकारी आहेत म्हणून. ८१९. अर्जुना, चौथा जो शूद्र वर्ण आहे, त्याचा खरोखर वेदाशीं संबंध नाहीं. तरी त्याची वृत्ति तीन वर्णांच्या आधीन आहे. ८२०. अहो, त्या वृत्तीच्या निकट संबंधामुळें ब्राह्मणादिक तीन वर्णांबरोबर शूद्रदेखील चौथा वर्ण झाला पहा. ८२१. ज्याप्रमाणें फुलाच्या बरोबर श्रीमंत मनुष्य सुताचा वास घेतो, त्याप्रमाणें ब्राह्मणादि तिन्ही वर्णांबरोबर शूद्रांचा निकट संबंध असल्यामुळें श्रुतीनें शूद्राला स्वीकारलें आहे. ८२२. अर्जुना, ही चातुर्वर्ण्य-व्यवस्था अशी आहे. आतां यांनीं करावयाच्या कर्ममार्गाचें स्वरूप सांगूं; ८२३. कीं, ज्या गुणांनीं ( स्वाभाविक कर्मांनीं ) ते चारी वर्ण, जन्ममृत्यूच्या कात्रींतून चुकवून, ईश्वराचे ठिकाणीं पोहोंचतील. ८२४. ज्या आत्मप्रकृतीच्या (मायेच्या) या सत्त्वादि तीन गुणांनीं चार वर्णांना चार ठिकाणीं कर्में वांटून दिलीं. ८२५. ज्याप्रमाणें बापानें मिळविलेलें द्रव्य मुलास वांटून द्यावें अथवा प्रवाशांना जसे सूर्यानें योग्य मार्ग दाखवावेत, अथवा मालकानें नोकरांस जशीं कामें वांटून द्यावींत; ८२६. त्याप्रमाणें प्रकृतीच्या गुणांनीं या चार वर्णांत ज्या कर्मांचा विस्तार केला आहे. ८२७. तेथें ( सत्त्वगुणानें आपल्या ठिकाणच्या समविषम भागानें (कमीजास्तपणानें) ब्राह्मण व क्षत्रिय हे दोघे अधिकारी केले. ८२८. आणि रजोगुण, परंतु ज्यांत थोडासा सत्त्वगुण मिसळलेला आहे, तेथें वैश्य लोक ठेविले आहेत आणि रजोगुणच, पण ज्यांत तमोगुण मिसळलेला आहे, त्या ठिकाणीं शूद्र ठेविले आहेत. ८२९. हे बुद्धिमंता अर्जुना, याप्रमाणें एकच ( मनुष्य ) प्राण्यांच्या समुदायांत या गुणांनींच चार प्रकारच्या वर्णांचा भेद केला आहे, असें तूं समज. ८३०. ज्याप्रमाणें आपली ठेविलेली वस्तु दिव्यानें आयतीच दिसते, तसें गुणांनीं भिन्न झालेलें कर्म, शास्त्र दाखवितें. ८३१. तेंच आतां कोणत्या वर्णाला कोणतें कर्म विहित आहे व त्याचें लक्षण काय, हें सांगूं. हे श्रवणसौभाग्यनिधि अर्जुना, ऐक, ८३२.

शम ( चित्ताची शांति ), दम ( इंद्रियदमन ), तप, शुद्धि ( बाह्य व अंतर ), क्षमा, सरळपणा, ज्ञान ( शास्त्राचारानें एक ईश्वराची प्राप्ति करून घ्यावयाची हें ज्ञान ), अनुभवयुक्त ज्ञान आणि आस्तिक्यबुद्धि ( शास्त्रांनीं सांगितलेल्या मार्गाचा आदरयुक्त स्वीकार ), हीं ब्राह्मणाचीं स्वभावज कर्में आहेत. ४२.

तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ती । घेऊनि आपलां हातीं । बुद्धि आत्मया मिळे कांतीं । प्रिया जैसी ॥ ३३ ॥ ऐसा बुद्धीचा उपरमु । तया नाम म्हणिपे शमु । तो गुण गा उपक्रमु । जया कर्मांचा ॥ ३४ ॥ आणि बाह्येंद्रियांचें धेंडें । पिटूनि विधीचेनि दंडें । नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ॥ ३५ ॥ तो पैं गा शमा विरजा । दम गुण जेथ दुजा । आणि स्वधर्माचिया वोजा । जिणें जें कां ॥ ३६ ॥ तेवींचि सटवीचिये रातीं । न विसंबिजे जेवीं वाती । तैसा ईश्वरनिर्णयो चित्तीं । वाहणें सदा ॥ ३७ ॥ तया नाम तप । तें तिजया गुणाचें रूप । आणि शौचही निष्पाप । द्विविध जेथ ॥ ३८ ॥ मन भावशुद्धी भरलें । आंग क्रिया अळंकारिलें । ऐसें सबाह्य जियालें । साजिरें जें का ॥ ३९ ॥ तया नांव शौच पार्था । तो कर्मीं गुण जये चौथा । आणि पृथ्वीचिया परी सर्वथा । सर्व जें साहाणें ॥ ८४० ॥ ते गा क्षमा पांडवा । गुण जेथ पांचवा । स्वरांमाजीं सुहावा । पंचमु जैसा ॥ ४१ ॥ आणि वांकडेनि वोवेसीं । गंगा वाहे उजूचि जैसी । कां पुढीं बळला ऊंसीं । गोडी जेवीं ॥ ४२ ॥ तैसा विषमांहि जीवां- । लागीं उजुकारु बरवा । तें आर्जव गा सहावा । जेथींचा गुण ॥ ४३ ॥ आणि पाणियें प्रयत्नें माळी । अखंड जचे झाडामुळीं । परी तें आघवेंचि फळीं । जाणे जेवीं ॥ ४४ ॥ तैसें शास्त्राचारें तेणें । ईश्वरुचि येक पावणें । हें फुडें जें कां जाणणें । तें येथ ज्ञान ॥४५॥ तें गा कर्मीं जिये । सातवा गुण होये । आणि विज्ञान हें पाहें । एवंरूप ॥ ४६ ॥ तरी सत्त्वशुद्धीचिये वेळे । शास्त्रें कां ध्यानबळें । ईश्वरतत्त्वींचि मिळे । निष्टंकबुद्धी ॥ ४७ ॥ हें विज्ञान बरवें । तें गुणरत्न जेथ आठवें । आणि आस्तिक्य जाणावें । नववा गुण ॥ ४८ ॥ पैं राजमुद्रा आथिलिया । प्रजा भजे भलतया । तेवीं शास्त्रें स्वीकारिलिया । मार्गमात्रातें ॥ ४९ ॥ आदरें जें कां मानणें । तें आस्तिक्य मी म्हणें । तो नववा गुण जेणें । कर्म तें साच ॥ ८५० ॥ एवं नवही शमादिक । गुण जेथ निर्दोष । तें कर्म जाण स्वाभाविक । ब्राह्मणाचें ॥ ५१ ॥ तो नवगुणरत्नाकरु । या नवरत्नांचा हारु । न फेडित ले दिनकरु । प्रकाशु जैसा ॥ ५२ ॥ नाना चांपा चांपेळी पूजिला । चंद्र चंद्रिका धवळला । कां चंदनु निजें चर्चिला । सौरभ्यें जेवीं ॥ ५३ ॥ तेवीं नवगुणटिकलग । लेणें ब्राह्मणाचें अव्यंग । कहींचि न संडी आंग । ब्राह्मणाचें ॥ ५४ ॥ आतां उचित तें क्षत्रिया । तेंही कर्म धनंजया । सांगों ऐक प्रज्ञेचिया । भरोवरी ॥ ५५ ॥

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् । दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥

तरी भानु हा तेजें । नापेक्षी जेवीं विरजें । कां सिंहें न पाहिजे । जावाळिया ॥ ५६ ॥ ऐसा स्वयंभ जो जीवें लाठु । सावायेंवीण उद्भटु । तें शौर्य गा जेथ श्रेष्ठु । पहिला गुण ॥ ५७ ॥ आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडिही नक्षत्र हारपे । ना तो तरी न लोपे । सचंद्रीं तिहीं ॥ ५८ ॥ तैसेनि आपुले प्रौढिगुणें । जगासि विस्मयो देणें । आपण तरी न क्षोभणें । कायसेनही ॥ ५९ ॥ तें प्रागल्भ्यरूप तेजा । जिये कर्मीं गुण दुजा । आणि धीरु तो तिजा । जेथींचा गुण ॥ ८६० ॥ वरि पडलिया आकाश । बुद्धीचे डोळे मानस । झांकी ना तें परियेस ।

तर ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्री मोठ्या प्रेमानें आपल्या नवऱ्याच्या ठिकाणीं अनुसरते; त्याप्रमाणें सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपल्या हातामध्यें घेऊन बुद्धि आत्म्याला भेटते. ८३३. याप्रमाणें बुद्धीचें आत्म्याच्या ठिकाणीं जें अंतर्मुख होणें, त्याचें नांव शम असें आहे. तो ( शम ) ज्या ब्राह्मणकर्मांचा आरंभ ( पहिला गुण ) आहे. ८३४. आणि बाह्य इंद्रियांचें समुदाय विधीच्या दंडानें पिटून त्यांना अधर्माकडे कधींच जाऊं न देणें. ८३५. अरे अर्जुना, तो शमाला सहाय्य करणारा दम, हा ज्या ब्राह्मणाच्या कर्मांत दुसरा गुण आहे आणि स्वधर्माच्या रीतीनें जें जगणें. ८३६. त्याचप्रमाणें सटवीच्या ( पांचवीच्या ) रात्रीं दिव्याला जसें विसरत नाहींत, त्याप्रमाणें ईश्वराविषयीं विचार चित्तांत बाळगणें, ८३७. त्याला तप असें नांव आहे व हें तिसऱ्या गुणाचें स्वरूप आहे. आणि पापरहित शौच देखील ज्या कर्मांत दोन प्रकारचें आहे. ८३८. मन निर्विकारपणानें भरलेलें व शरीर विहितकर्मांच्या आचरणानें सुशोभित झालेलें, असें जें आंतबाहेर चांगलें जगणें. ८३९. अर्जुना, त्याला शौच हें नांव आहे; तो ज्या कर्मांमध्यें चौथा गुण आहे आणि पृथ्वीप्रमाणें पूर्णपणें जें सर्व सहन करणें. ८४०. अरे अर्जुना, ती क्षमा होय. तो गुण जेथें पांचवा आहे,( तो कसा तर ) जसा सप्त स्वरांत पंचम स्वर मधुर आहे त्याप्रमाणें. ८४१. आणि वांकड्या ओघांतून गंगा जशी सरळच वाहाते, अथवा पाठीकडे वळलेल्या ( वांकडा असलेल्या ) उंसांत गोडी जशी सरळ असते. ८४२. त्याप्रमाणें प्रतिकूल प्राण्यासंबंधीं जो चांगला सरळपणा, तें आर्जव होय व तें या ठिकाणीं सहावा गुण आहे. ८४३. आणि माळी हा प्रयत्नानें नेहमीं परिश्रम करून झाडाच्या मुळाच्या ठिकाणीं पाणी घालतो. परंतु तो (माळी ) ते आपले सर्व श्रम जसे (एक) फळाच्या ठिकाणीं पाहातो ८४४. त्याप्रमाणें शास्त्रानुसार जें आचरण करणें व त्या योगानें एक ईश्वरप्राप्तीच होणें, हें जें पक्कें जाणणें, तें या कर्मांत ज्ञान आहे. ८४५. तें ज्ञान ज्या कर्मांमध्यें सातवा गुण आहे आणि विज्ञान हें अशा (पुढें सांगितलेल्या) स्वरूपाचें आहे. पहा.८४६. तर अंतःकरणशुद्धीच्या वेळीं शास्त्रानें अथवा ध्यानाच्या बळानें ईश्वरतत्त्वामध्येंच बुद्धि निश्चयेंकरून मिळते. ८४७. अर्जुना हें चांगलें विज्ञान आहे, तें या गुणकर्मांत आठवें गुणरत्न आहे. आणि 'आस्तिक्य' हा नववा गुण आहे, असें समजावें. ८४८. राजाच्या हुकुमाचा शिक्का असलेल्या कोणत्याही पुरुषाला जशी प्रजा मानते, त्याप्रमाणें शास्त्रानें स्वीकारलेल्या सर्व मार्गांना–८४९. जें आदरानें मानणें, त्याला मी आस्तिक्य म्हणतों. तो ब्राह्मणकर्मांतील नववा गुण होय. आणि ( त्या ) आस्तिक्यामुळें तें ब्राह्मणकर्म खरें (घडणें शक्य) होतें. ८५०. याप्रमाणें शमादिक नऊ निर्दोष गुण ज्या कर्मांत आहेत, तें ब्राह्मणाचें स्वाभाविक कर्म समज. ८५१. तो ब्राह्मण या नऊ गुणांचा समुद्रच आहे. सूर्य जसा अखंड प्रकाशाला धारण करतो, तसा तो ब्राह्मण या नवगुणरूपी रत्नांचा हार अखंड धारण करतो, ८५२. अथवा चाफा जसा चाफ्याच्या फुलांनीं पुजलेला असतो, ( चाफ्याच्या झाडाला जशीं नेहमीं फुलें असतात,) चंद्र जसा चांदण्यानें नेहमीं शुभ्र झालेला असतो, अथवा चंदन जसा आपल्या सुवासानें नेहमीं चोपडलेला असतो, ८५३. त्याप्रमाणें नवगुणांनीं जडित असा ब्राह्मणाचा निर्दोष अलंकार असतो व तो अलंकार ब्राह्मणाचें अंग कधींच सोडीत नाहीं ८५४. अर्जुना, आतां क्षत्रियाला जें योग्य कर्म आहे, तेंही सांगतों; तूं बुद्धीच्या सामुग्रीनें ऐक. ८५५.

शौर्य, तेज ( पाणीदारपणा ), धैर्य, दक्षता, युद्धामध्यें पराङ्मुख न होणें, दातृत्व आणि ईश्वरभाव हीं क्षत्रियांचीं स्वभावज कर्में आहेत. ४३.

तर सूर्य हा प्रकाशाच्या बाबतींत जशी सहाय्याची अपेक्षा करीत नाहीं; अथवा सिंह जसा शिकारीच्या बाबतींत सोबतीची अपेक्षा करीत नाहीं ८५६.तसा जो स्वभावतः अंगानेंच जोरकस व सहाय्याशिवाय उत्कर्षास आलेला आहे, असा जो शौर्य नांवाचा श्रेष्ठ गुण,अर्जुना, तो ह्या क्षत्रियाच्या गुणांतील पहिला होय. ८५७.आणि सूर्याच्या प्रकाशाच्या सामर्थ्यानें कोट्यवधि देखील नक्षत्रें निस्तेज होतात. परंतु तीं कोट्यवधि नक्षत्रें चंद्रासह जरी असलीं, तरी त्यांच्याकडून तो सूर्य जसा निस्तेज होत नाहीं. ८५८. त्याप्रमाणें आपल्या सामर्थ्यानें व गुणानें ह्या जगाला चकित करून टाकणें व आपली तर कशानेंही चलबिचल न होऊं देणें;८५९.तें पाणीदारपणारूप तेज, ज्या क्षत्रियाच्या कर्मांत दुसरा गुण आहे व धैर्य हा क्षत्रियकर्मांतील तिसरा गुण आहे. ८६०. आकाश कोसळून अंगावर पडलें, तरी देखील मनाकडून बुद्धीचे डोळे झांकले जात नाहींत, तें या क्षत्रियकर्मांत

धैर्य जेथें ॥६१॥ आणि पाणी हो भलतेतुकें । परी तें जिणौनि पद्म फांके । कां आकाश उंचिया जिंके । आवडे तयातें ॥६२॥ तेवीं विविधा अवस्था । पातलिया जिणौनि पार्था । प्रज्ञा फळतया अर्था । वेह्न देंणे जें ॥६३॥ तें दक्षत्व गा चोख । जेथ चौथा गुण देख । आणि झुंझ अलौकिक । तो पांचवा गुण ॥६४॥ आदित्याचीं झाडें । सदा सन्मुख सूर्याकडे । तेवीं समोर शत्रूपुढें । होणें सदा ॥ ६५ ॥ माहेवणी प्रयत्नेंसीं । चुकविजे सेजे जैसी । रिपू पाठी नेदिजे तैसी । समरांगणीं ॥ ६६ ॥ हा क्षत्रियांचां आचारीं । पांचवा गुणेंदु अवधारीं । चहूं पुरुषार्थां शिरीं । भक्ति जैसी ॥ ६७ ॥ आणि जालेनि फुलें फळें । शाखिया जैसी मोकळें । का उदार परिमळें । पद्माकरु ॥ ६८ ॥ नाना आवडीचेनि मापें । चांदिणें भलतेणें घेपे । पुढिलांचेनि संकल्पें । तैसें जें देणें ॥ ६९ ॥ तें उमप गा दान । जेथ सहावें गुणरत्न । आणि आज्ञे एकायतन । होणें जें कां ॥८७०॥ पोषूनि अवयव आपुले । करविजती मानविले । तेवीं पालणें लोभविलें । जग जें भोगणें ॥ ७१ ॥ तया नाम ईश्वरभावो । जो सर्वसामर्थ्याचा ठावो । तो गुणांमाजीं रावो । सातवा जेथ ॥ ७२ ॥ ऐसें जें शौर्यादिकीं । इहीं सात गुणविशेखीं । अळंकृत सप्तऋखीं । आकाश जैसें ॥ ७३ ॥ तैसें सप्तगुणीं विचित्र । कर्म जें जगीं पवित्र । तें सहज जाण क्षात्र । क्षत्रियाचें ॥ ७४ ॥ नाना क्षत्रिय नव्हे नरु । तो सत्त्वसोनयाचा मेरु । म्हणौनि गुणस्वर्गा आधारु । सातां इयां ॥ ७५ ॥ नातरी सप्तगुणार्णवीं । परिवारली बरवी । हे क्रिया नव्हे पृथ्वी । भोगीतसे तो ॥ ७६ ॥ कां गुणाचे सातांही ओघीं । हे क्रिया ते गंगा जगीं । तया महोदधीचां आंगीं । विलसे जैसी ॥ ७७ ॥ परी हें बहु असो देख । शौर्यादि गुणात्मक । कर्म गा नैसर्गिक । क्षत्रजातीसी ॥ ७८ ॥ आतां वैश्याचिये जाती । उचित जे महामती । तें ऐकें गा निरुती । क्रिया सांगों ॥ ७९ ॥

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् । परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

तरी भूमि बीज नांगरु । यया भांडवलाचा आधारु । घेऊनि लाभु अपारु । मेळवणें जें ॥ ८८० ॥ किंबहुना कृषी जिणें । गोधनें राखोनि वर्तणें । कां समर्घाची विकणें । महर्घी वस्तु ॥ ८१ ॥ येतुलाचि पांडवा । वैश्यातें कर्माचा मेळावा । हा वैश्यजातिस्वभावा- । आंतुला जाण ॥ ८२ ॥ आणि वैश्य क्षत्रिय ब्राह्मण । हे द्विजन्मे तिन्ही वर्ण । ययांचें जें शुश्रूषण । तें शूद्रकर्म ॥ ८३ ॥ पैं द्विजसेवेपरौतें । धांवणें नाहीं शूद्रातें । एवं चतुर्वर्णोचितें । दाविलीं कर्में ॥ ८४ ॥

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः । स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥

आतां इयेचि विचक्षणा । वेगळालिया वर्णा । उचित जैसें करणां । शब्दादिक ॥ ८५ ॥ नातरी जळदच्युता । पाणिया उचित सरिता । सरितेंसीं पांडुसुता । सिंधु उचितु ॥ ८६ ॥ तैसें वर्णाश्रमवशें । जें करणीय आलें असे । गोरेया आंगा जैसें । गोरेपण ॥८७॥ तया स्वभावविहिता

धैर्य होय. ऐक. ८६१. आणि पाणी वाटेल तितकें खोल असो, परंतु त्या पाण्याच्या वर येऊन तें कमल विकासतें; अथवा आकाश हें उंचीच्या कामीं वाटेल त्याला जिंकतें. ८६२. त्याप्रमाणें अर्जुना, नाना प्रकारच्या अवस्था प्राप्त झाल्या असतां, त्या जिंकून, त्या नाना प्रकारच्या अवस्थांचे फळणारे अर्थ जे हर्ष, भय, शोकादि, त्यांचें बुद्धीनें जें भेदन करणें, असें जें बुद्धीचें स्थिर असणें; ८६३. तें चांगलें दक्षत्व, अर्जुना, क्षत्रियकर्मांतील चौथा गुण आहे असें समज आणि लोकोत्तर युद्ध तो पांचवा गुण होय. ८६४. ज्याप्रमाणें सूर्याच्या झाडाचीं फुलें सदा सूर्याकडे सन्मुख असतात, त्याप्रमाणें शत्रुपुढें नेहमीं समोर होणें. ( शत्रूला कधीं पाठ न दाखविणें.) ८६५. ज्याप्रमाणें गरोदर स्त्रीस तिच्या पतीनें आपल्या अंथरुणावर येऊं देण्याचें हरप्रयत्न करून टाळावें; त्याप्रमाणें युद्धभूमीवर असतांना आपली पाठ शत्रूस दाखविण्याचें जें टाळावें, ८६६. अर्जुना, ऐक. धर्मअर्थादि चार पुरुषार्थांच्याही वरचढ जशी भक्ति ही एक पांचवी आहे त्याप्रमाणें क्षत्रियांच्या आचारांतील हा सर्वश्रेष्ठ असा पांचवा गुण आहे. ८६७. आणि ज्याप्रमाणें वृक्ष आपल्या आलेल्या फुलांफळांच्या बाबतींत उदार असतात अथवा कमळांचे समुदाय आपला सुवास देण्यास उदार असतात; ८६८. अथवा वाटेल त्याला हवें तितकें चांदणें जसें घेतां येतें, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या इच्छेप्रमाणें त्याला हवें तें जें देणें, ८६९. तें अपरिमित दान जेथें ( ज्या क्षत्रियाच्या कर्मांत ) सहावें गुणरत्न आहे आणि आज्ञेला जें एकच ठिकाण होणें ( म्हणजे ज्याची आज्ञा सर्वांनीं ऐकणें. ) ८७०. आपले हस्तपादादि अवयव पोसून आपल्या पसंतीप्रमाणें त्यांच्याकडून जसें काम करून घेतां येतें; त्याप्रमाणें आपल्या पालन करण्याच्या योगानें ( कौशल्यानें ) ज्या प्रजेमध्यें आपल्याविषयीं प्रेम उत्पन्न झालें आहे, अशा प्रजेचा उपभोग घेणें; ८७१. त्याचें नांव ईश्वरभाव ( नियामकशक्ति ) होय व तो सर्व सामर्थ्यांचें ठिकाण आहे. तो ईश्वरभाव क्षत्रियाच्या आचारांत सातवा गुण असून, तो सर्व गुणांचा राजा आहे. ८७२. ज्याप्रमाणें आकाश हें सप्तर्षींनीं सुशोभित दिसतें, त्याप्रमाणें जें कर्म या शौर्यादिक, उत्तम सात गुणांनीं सुशोभित असतें. ८७३. जें कर्म या सात अलौकिक गुणांनीं पवित्र असतें, तें क्षत्रियांचें सहज क्षात्रकर्म आहे, असें समज. ८७४. अथवा, ( ज्याच्या अंगीं सात गुण आहेत ) तो क्षत्रिय मनुष्य नव्हे, तर तो सत्त्वगुणरूपी सोन्याचा मेरुपर्वत आहे. म्हणूनच तो हा सात गुणरूपी सप्तस्वर्गाला आधार आहे. ८७५. अथवा हें कर्म नव्हे, तर सात गुणरूपी समुद्रांनीं चांगली वेढलेली ही पृथ्वीच आहे व ती तो क्षत्रिय भोगीत आहे. ८७६ अथवा या सात गुणरूपी सात ओघांनीं युक्त ( वाहणारी ) अशी ही क्रियारूप गंगा, या जगांत, क्षत्रियरूपी महासागराच्या अंगीं जशी कांहीं शोभत आहे. ८७७. परंतु हें फार वर्णन राहूं दे. अर्जुना, पहा शौर्यादि गुणांनीं युक्त असें हें कर्म, क्षत्रिय जातीला स्वाभाविक आहे, ८७८. हे विशालबुद्धि अर्जुना, आतां वैश्याच्या जातीला योग्य जें कर्म आहे, तें निश्चयात्मक सांगतों, ऐक. ८७९

शेतकी, गोरक्षण आणि व्यापार हीं वैश्याचीं स्वभावज कर्में आहेत. सेवारूपी कर्म हें शूद्राचें स्वभावज ( कर्म ) आहे. ४४.

तर जमीन, बीं व नांगर, या भांडवलाचा आधार घेऊन जो पुष्कळसा नफा मिळविणें. ८८० फार काय सांगावें ! शेतकीनें जगणें, गायी बाळगून राहणें अथवा स्वस्त वस्तु घेऊन महाग विकणें. ८८१. अर्जुना, वैश्यांना एवढाच कर्मसमुदाय आहे. हा कर्मसमुदाय वैश्य जातीच्या स्वभावाच्या आंतला आहे, असें समज. ८८२. आणि वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण हे तिन्ही वर्ण द्विजन्मे आहेत. यांची जी सेवा करणें, तें शूद्राचें कर्म आहे. ८८३. द्विजसेवेपलीकडे शूद्राला जाणें नाहीं. ( कर्म करणें नाहीं. ) याप्रमाणें चार वर्णांना योग्य अशीं कर्में तुला दाखविलीं ( सांगितलीं. ) ८८४.

आपापल्या कर्मामध्यें पूर्णपणें रत असलेला मनुष्य सिद्धि ( वैराग्य ) पावतो. स्वकर्मरत ( मनुष्य ) कोणत्या प्रकारें सिद्धि पावतो तें ऐक ४५.

हे चतुरा अर्जुना, आतां हींच ( आम्हीं सांगितलेलीं कर्में ) या वेगवेगळ्या (चार) वर्णांना योग्य आहेत. ( तीं कशीं तर ) ज्याप्रमाणें शब्दादि विषय श्रोत्रादि इंद्रियांना योग्य आहेत. ८८५. अथवा मेघापासून पडलेल्या पाण्याला जशी नदी योग्य, आणि अर्जुना, नदीला समुद्र योग्य आहे. ८८६. गोऱ्या अंगाला जसा गोरेपणा ( शोभतो ) त्याप्रमाणें वर्णाश्रमधर्माप्रमाणें जें कर्तव्यकर्म ज्याच्या भागाला आलें असेल, तें ( त्यालाच शोभतें ). ८८७. हे वीरोत्तमा अर्जुना, त्या स्वाभाविक

कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा । प्रवर्तावयालागीं प्रमा । अढळ कीजे ॥ ८८ ॥ पैं आपुलेचि रत्न थितें । घेपे पारखियाचेनि हातें । तैसें स्वकर्म आपैतें । शास्त्रें करावें ॥ ८९ ॥ जैसी दिठी असे आपुलां ठायीं । परी दीपेंवीण भोग नाहीं । मार्गु न लाहतां काई । पाय असतां होय ॥८९०॥ म्हणौनि ज्ञातिवशें साचारु । सहज असे जो अधिकारु । तो आपुलालिया शास्त्रें गोचरु । आपण कीजे ॥९१॥ मग घरींचाचि ठेवा । जेवीं डोळयां दावी दिवा । तरी घेतां काय पांडवा । आडळु असे ॥ ९२ ॥ तैसें स्वभावें भागा आलें । वरी शास्त्रें खरें केलें । तें विहित जो आपुलें । आचरे गा ॥ ९३ ॥ परी आळसु सांडुनी । फळकाम दवडुनी । आंगें जीवें मांडुनी । तेथेंचि भरु ॥ ९४ ॥ वोघीं पडिलें पाणी । नेणे आनानी वाहणी । तैसा जाय आचरणीं । व्यवस्थोनी ॥ ९५ ॥ अर्जुना जो यापरी । तें विहित कर्म स्वयें करी । तो मोक्षाचां ऐलद्वारीं । पैठा होय ॥ ९६ ॥ जे अकरणा आणि निषिद्धा । न वचेचि कांहीं संबंधा । म्हणौनि भवा विरुद्धा । मुकला तो ॥ ९७ ॥ आणि काम्यकर्माकडे । न परतेंचि जेथ कोडें । तेथ चंदनाचेही खोडें । न लेचि तो ॥ ९८ ॥ येर नित्य कर्म तंव । फलत्यागें वेंचिलें सर्व । म्हणौनि मोक्षाची शिंव । ठाकूं लाहे ॥ ९९ ॥ ऐसेंनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं । वैराग्यमोक्षद्वारीं । उभा ठाके ॥ ९०० ॥ जें सकळ भाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रमा । नाना कर्ममार्गश्रमा । शेवटु जेथ ॥ १ ॥ मोक्षफळें दिघली बोल । जें सुकृततरूचें फूल । तये वैराग्यीं ठेवी पाउल । भंवरु जैसा ॥ २ ॥ पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वाधावा सांगतया अरुणाचा । उदयो त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥ ३ ॥ किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ये निधान । तें वैराग्य दिव्यांजन । जीवें ले तो ॥४॥ ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पांडुसुता । अनुसरोनि विहिता । कर्मा यया ॥ ५ ॥

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् । स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥

हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य वोलावा । आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ॥ ६ ॥ पैं आघवाचि भोगेंसीं । पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं । कीं तयाचीं नामें जैसीं । तपें तिया केलीं ॥ ७ ॥ कां बाळका एकी माये- । वांचोनि जिणें काय आहे । म्हणौनि सेविजे कीं तो होये । पाटाचा धर्मु ॥ ८ ॥ नाना पाणी म्हणौनि मासा । गंगा न सांडितां जैसा । सर्वतीर्थसहवासा । वरपडा जाला ॥ ९ ॥ तैसें आपलिया विहिता । उपावो असे न विसंबितां । ऐसा कीजे कीं जगन्नाथा । आभारु पडे ॥ ९१० ॥ अगा जया जें विहित । तें ईश्वराचें मनोगत । म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ११ ॥ पैं जीवींचां कसीं उतरली । ते दासी कीं गोसांवीण जाली । सिसे वेंची तया मविली ।

विहितकर्मांकडे शास्त्र सांगेल, त्याप्रमाणें प्रवृत्ति होण्याकरितां ( शास्त्रांनीं काय सांगितलें आहे याविषयींची ) आपली यथार्थ समजूत ठाम करून घ्यावी. ८८८. जसें मूळचें आपलेंच रत्न ( परंतु जर त्याची आपल्याला परीक्षा नसेल तर तें ) परीक्षकाच्या हातून पारखून घ्यावें त्याप्रमाणें आपल्या वांट्यास आलेलें कर्म, शास्त्रद्वारां ठाम करून घ्यावें. ८८९. ज्याप्रमाणें दृष्टि आपल्या ठिकाणीं आहे, परंतु दिव्यावांचून ( रात्रीं ) तिचा उपयोग नाहीं; अथवा रस्ता जर सांपडला नाहीं तर पाय असून काय होणार ? ८९०. म्हणून जातीप्रमाणें जो अधिकार ( आपणाला ) खरा स्वाभाविक असेल, तो आपापला अधिकार आपल्या शास्त्राकडून आपण समजून घ्यावा. ८९१. मग घरीं असलेलाच ठेवा ज्याप्रमाणें दिव्यानें डोळ्यांना दाखविला तर, अर्जुना, तो घेण्यास कांहीं अडथळा आहे काय ? ८९२. त्याप्रमाणें ( वर्णाश्रम-धर्माप्रमाणें ) वांट्याला आलेलें व शिवाय शास्त्रानें निश्चित केलेलें, तें आपलें विहित कर्म जो आचरण करतो. ८९३. परंतु आळस टाकून, फळाची आशा सोडून, शरीरानें व मनानें त्या कर्माला आरंभून, तेथेंच सर्व भर ठेवावा. ८९४. ( जसें ) प्रवाहांत सांपडलेलें पाणी त्याहून उलट अशा निरनिराळ्या ओघानें वाहाण्याचें जाणत नाहीं, त्याप्रमाणें व्यवस्थित होऊन ( शास्त्रानें सांगितलेल्या कर्मांचें यथाशास्त्र ) आचरण करीत रहातो. ८९५. अर्जुना, जो याप्रमाणें विहित कर्म स्वतः करतो, तो मोक्षाच्या अलीकडल्या द्वाराला ( वैराग्याप्रत ) प्राप्त होतो. ८९६. कारण कीं, विहित कर्में मुळींच न करणें आणि शास्त्रांनीं मना केलेलीं कर्में करणें, या दोहींच्या संबंधाकडे तो कधींच जात नाहीं, म्हणून [ तो विरुद्ध-संसाराला ( दुःखयोनीला ) मुकला. ] ८९७. आणि तो काम्य कर्मांकडे कौतुकानेंही वळत नसल्यामुळें, तो स्वर्गादि फलभोगरूपी चंदनाचे देखील खोडे घालीत नाहींच. ( म्हणजे तो काम्यकर्म करीत नाहीं, म्हणून सुखकर दिसणाऱ्या स्वर्गादिक गतीला जात नाहीं. ) ८९८. दुसरें जें नित्यकर्म, तें तर त्यानें, त्याच्या फलाचा त्याग करून, नाहींसें केलें, म्हणून तो मोक्षाच्या शिवेवर प्राप्त होऊं शकला. ८९९. ऐक, अशा रीतीनें तो पापपुण्यात्मक संसाराकडून टाकला जातो व वैराग्यरूपी मोक्षाच्या द्वारांत उभा रहातो. ९०० जें वैराग्य सर्व भाग्याची सीमा आहे व जें वैराग्य मोक्षप्राप्तीचें ज्ञान करून देणारें आहे ( ज्या वैराग्यानें मोक्ष खात्रीनें मिळेल असें कळतें ) अथवा कर्ममार्गाच्या श्रमांचा ज्या वैराग्याच्या ठिकाणीं शेवट होतो. ९०१. जें वैराग्य म्हणजे मोक्षफळानें दिलेलें तारण होय, व जें पुण्यरूप वृक्षाचें फूल आहे, त्या वैराग्यरूपी फुलावर भ्रमराप्रमाणें तो पाऊल ठेवतो. ९०२. अर्जुना, हें पहा, आत्मज्ञानरूपी स्वच्छ प्रकाशाचा दिवस उगवत आहे, म्हणून आगाऊच वर्धाव्याप्रमाणें सूचना देणारें वैराग्य, हा अरुणाचा उदय होय. त्या वैराग्याची त्यास प्राप्ति होते. ९०३. फार काय सांगावें ? आत्मज्ञानरूपी ठेवा ज्या वैराग्यरूपी अंजनाच्या योगानें प्राप्त होतो, तें वैराग्यरूप दिव्यांजन तो आपल्या बुद्धींत धारण करतो. ९०४. अर्जुना, या विहितकर्माला अनुसरल्यामुळें येणेंप्रमाणें मोक्षाचा अधिकार प्राप्त होतो. ९०५.

ज्याच्यापासून भूतमात्राची उत्पत्ति होते, व ज्यानें हें सर्व ( विश्व ) व्यापिलें आहे त्या ईश्वराची आपापल्या कर्मानें आराधना करून मनुष्य सिद्धि ( वैराग्य ) मिळवितो. ४६.

अर्जुना, हें विहितकर्म आपलें केवळ एकच जीवन आहे व हें विहितकर्म करणें हीच, मी जो सर्वात्मक, त्या माझी श्रेष्ठ सेवा आहे. ९०६. पतिव्रता स्त्री सर्व भोगांसह आपल्या पतिबरोबर क्रीडा करते. ती क्रीडा करणें ( म्हणजे ) त्याचेंच नांव तिनें सर्व तपें केलीं असें होय. ९०७. अथवा बालकाला जगण्याला एक आई-वांचून दुसरें काय साधन आहे ? म्हणून तिची सेवा करावी ( आश्रय करावा ), हा त्या बालकाचा मुख्य धर्म आहे. ९०८ अथवा केवळ पाणी म्हणून ( आपलें जीवन म्हणून ) गंगेला न सोडतां मासा गंगेंत राहिला, तर तो सर्वतीर्थांच्या सहवासाला ( समुद्राला ) सहज प्राप्त झाला. ९०९, त्याप्रमाणें आपल्या विहितकर्माला न विसरणें हा उपाय आहे. पण तोही उपाय असा करावा कीं, त्या योगानें जगाच्या मालकासही ( देवासही ) त्याचें ओझेंच वाटेल. ९१०. अरे अर्जुना, ज्याला जें उचित कर्म सांगितलेलें आहे, तेंच त्यानें करावें असें ईश्वराचें मनोगत आहे, म्हणून तें विहित कर्म केलें म्हणजे तो ईश्वर निःसंशय प्राप्त होतो. ९११. एकादी बटीक एकाद्याच्या जीवाच्या (मनाच्या) कसोटीस उतरली असतां, ती प्रथमची दासी खरी पण पुढें मालकीण बनते; अथवा स्वामिकार्यांत जो आपलें डोकें देणारा ( मरणारा ) त्याला स्वामी(मालक)जसा इनामपत्र करून देऊन त्याचा दासला

वही जेवीं ॥ १२ ॥ तैसें स्वामीचिया मनोभावा । न चुकिजे हेचि परमसेवा । येर तें गा पांडवा । वाणिज्य करणें ॥ १३ ॥ म्हणोनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खुण पाळिली । जयापासूनि कां आलीं । आकारा भूतें ॥ १४ ॥ जो अविद्येचिया चिंधिया । गुंडूनि जीव बाहुलिया । खेळवीतसे तिगुणिया । अहंकाररज्जू ॥ १५ ॥ जेणें जग हें समस्त । आंत बाहेरी पूर्ण भरित । जालें आहे दीपजात । तेजें जैसें ॥ १६ ॥ तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्म-कुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥ १७ ॥ म्हणौनि तिये पुजे । रिझलेनि आत्मराजे । वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥ १८ ॥ जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें । हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ॥ १९ ॥ प्राणनाथाचिया आधी । विरहणीतें जिणेंही बाधी । तैसें सुखजात बाधी । दुःखाचां लागे ॥ ९२० ॥ सम्यक्ज्ञान नुदैजतां । वेधेंचि तन्मयता । उपजे ऐसी योग्यता । बोधाचि लाहे ॥ २१ ॥ म्हणौनि मोक्षलाभालागीं । जो व्रतें वाहतसे आंगीं । तेणें स्वधर्मु आस्था चांगी । अनुष्ठावा ॥ २२ ॥

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥

अगा आपुला हा स्वधर्मु । आचरणीं जरी विषमु । तरी पाहावा तो परिणामु । फळेल जेणें ॥ २३ ॥ जैं सुखालागीं आपणपयां । निंबाचि आथी धनंजया । तैं कडुवटपणा तयाचिया । उबगिजेना ॥ २४ ॥ फळणया ऐलीकडे । केळीतें पाहतां आस मोडे । ऐसी त्यजिली तरी जोडे । तैसें कें गोमटें ॥ २५ ॥ तेवीं स्वधर्मु सांकडु । देखोनि केला जरी कडु । तरी मोक्षसुरवाडु । अंतरला कीं ॥ २६ ॥ आणि आपुली माये । कुब्ज जरी आहे । तरी जीजें तें नोहे । स्नेह कुव्हें कीं ॥ २७ ॥ येरी जिया पराविया । रंभेहूनि बरविया । तिया काय कराविया । बाळकें तेणें ॥ २८ ॥ अगा पाणियाहूनि बहुवें । तुपीं गुण कीर आहे । परी मीना काय होय । असणें तेथें ॥ २९ ॥ पैं आघविया जगा जें विख । तें विख कीडिया पीयूख । आणि जगा गुळ तें देख । मरण तया ॥ ९३० ॥ म्हणौनि जे विहित जया जेणें । फिटे संसाराचें धरणें । क्रिया कठोर तन्ही तेणें । तेचि करावी ॥ ३१ ॥ येरा पराचारा बरविया । ऐसें होईल टेंकलेया । पायांचें चालणें डोइया । केलें जैसें ॥ ३२ ॥ यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असें आलें । तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें ॥ ३३ ॥ आणि स्वधर्मुचि पाळावा । परधर्मु तो गाळावा । हा नेमुही पांडवा । न कीजेचि मा ॥ ३४ ॥

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् । सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

तरी आत्मा दृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां ठाये । आणि करणें तेथ आहे । आयासु आधीं ॥३५॥ म्हणौनि भलतिये कर्मीं । आयासु जन्ही उपक्रमीं । तरी काइ स्वधर्मीं । दोषु सांगें ॥३६॥ अगा उजू वाटा चालावें । तन्ही पायाचि शिणवावें । ना आडरानें धांवावें । तन्ही तेंचि ॥ ३७ ॥

आपल्या दप्तरीं ठेवितो. ९१२. त्याप्रमाणें मालकाच्या इच्छेप्रमाणें करण्यास न चुकणें, हीच त्याची श्रेष्ठ सेवा होय. त्यावांचून दुसरें कांहीं करणें, म्हणजे अर्जुना, तो केवळ व्यापार होय. ९१३. म्हणून विहितकर्म केलें असतां, तें कर्म केलें असें नाहीं, तर ज्या ईश्वरापासून हे सर्व प्राणी आकाराला आले आहेत, त्या ईश्वराची आज्ञाच पाळली (असें होय). ९१४. तो ईश्वर, अविद्यारूपी चिंध्या गुंडाळून बनविलेल्या जीवरूपी बाहुल्या, त्रिगुणात्मक अहंकाररूपी दोरीनें खेळवीत आहे (म्हणजे जीवाकडून त्रिगुणात्मक कर्म करवीत आहे.) ९१५. ज्याप्रमाणें सर्व दिव्यांच्या आंतबाहेर एक तेज व्यापून आहे, त्याप्रमाणें ज्या ईश्वराच्या योगानें हें सर्व जग आंतबाहेर पूर्णपणें भरलेलें आहे, ९१६. हे वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराला स्वकर्मरूपी फुलांची पूजा केली असतां, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते. ९१७. म्हणून त्या पूजेनें संतुष्ट झालेल्या आत्मराजाकडून त्याला वैराग्यसिद्धि हा प्रसाद दिला जातो. ९१८. त्या वैराग्यावस्थेमध्यें ईश्वराचा वेध लागल्याकारणानें, हें सर्व (स्वर्ग, संसार वगैरे) ओकलेल्या पदार्थाप्रमाणें आवडेनासें होतें. ९१९. नवऱ्याच्या ध्यासामुळें (नवऱ्याचा वियोग झालेल्या) स्त्रीस जगणें देखील त्रासदायक वाटतें, त्याप्रमाणें संसारांतील जीं सर्व सुखें आहेत, तीं दुःखाप्रमाणें त्रासदायक वाटूं लागतात. ९२०. यथार्थ ज्ञानाचा उदय न होतां ईश्वराच्या वेधानेंच तन्मयता उत्पन्न होते, अशी बोधाची योग्यता त्याला प्राप्त होते. ९२१. म्हणून मोक्षाच्या प्राप्तीकरितां जो अंगानें व्रताचें आचरण करतो, त्यानें स्वधर्माचें चांगल्या आस्थेनें आचरण करावें. ९२२.

परक्याचा धर्म सुखानें आचरतां आला आणि त्यापेक्षां आपला धर्म (वर्णाश्रमास अनुसरून असलेलें कर्म) सदोष जरी असला, तरी तोच श्रेयस्कर आहे. जातिस्वभावानें येणारें कर्म करणारा मनुष्य पाप पावत नाहीं. ४७.

अरे अर्जुना, आपला हा स्वधर्म आचरण करण्याच्या बाबतींत जरी कठीण असला, तरी ज्या परिणामानें तो फलद्रूप होईल, त्या परिणामाकडे दृष्टि ठेवावी. ९२३. अर्जुना, जेव्हां आपल्याला निंबच सुखकारक होत आहे, तेव्हां त्याच्या कडूपणाला कंटाळू नये. ९२४. फळण्याच्या आधीं केळींच्या झाडाकडे पाहिलें, तर आशाभंग होतो. अशा वेळीं तें केळीचें झाड जर उपटून टाकलें, तर तसें चांगलें (केळीच्या घडासारखें) कोठें मिळेल? ९२५. त्याप्रमाणें स्वधर्म हा आचरण्यास कठीण आहे, असें पाहून तो जर कडू केला (म्हणजे तो आचरण्यास कंटाळा केला), तर मोक्षाचें सुख अंतरलेंच. ९२६. आणि आपली आई कुबडी जरी असली, तरी तिच्या ज्या प्रेमानें आपण जगतों, तें तिचें प्रेम खरोखर वांकडें नाहीं. ९२७. इतर परक्या स्त्रिया, रंभेहून सुंदर अशा असल्या तरी, त्या मुलानें त्या काय कराव्या? ९२८. अरे अर्जुना, पाण्यापेक्षां तुपांत गुण खरोखर पुष्कळ आहेत, परंतु त्यांत राहाणें माशाला काय कामाचें? ९२९. सगळ्या जगाला जें विष, तें विष (विषांतील) किड्यांना अमृत (जीवन) असतें. आणि (सगळ्या) जगाला गूळ जो (गोड), तो त्या विषांतील किड्यांना मारक असतो. ९३०. म्हणून ज्याला जें शास्त्रानें सांगितलेलें असेल व ज्या योगानें संसाराचें धरणें फिटेल, तें विहितकर्माचरण जरी कष्टदायक असलें, तरी त्यानें तें विहितकर्माचरणच करावें. ९३१. आपल्या विहितकर्मावांचून इतरांच्या दुसऱ्या चांगल्या आचाराचा स्वीकार केला असतां, जसें पायाचें चालणें डोक्यानें करावें तसें होईल. ९३२. याकरितां जें आपलें कर्म आपल्या जातीच्या स्वभावाप्रमाणें आपल्या वांट्यास आलें आहे, तें जो करतो, त्यानें (पुण्यपापरूप) कर्मबंधाला जिंकलें. ९३३. आणि अर्जुना, स्वधर्माचेंच आचरण करावें व दुसऱ्याचा धर्म असेल तो टाकावा, हा नियम जर पाळला नाहीं, ९३४.

हे कौन्तेया, (आपल्या) जन्माबरोबर उत्पन्न झालेलें (आपलें) कर्म दोषयुक्त जरी असलें, तरी त्याचा त्याग करूं नये. कारण ज्याप्रमाणें अग्नि धूमानें आच्छादिलेला असतो, त्याप्रमाणें सर्व कर्में दोषानें आच्छादिलेलीं आहेत. ४८.

तर जोंपर्यंत आत्मा अनुभवाला आला नाहीं, तोंपर्यंत कर्म करणें थांबतें काय? (नाहीं.) आणि जेथें कर्म करणें आहे तेथें आरंभीं श्रम आहेच. ९३५. म्हणून कोणत्याही कर्मांत जर आरंभामध्यें कष्ट आहेत, तर स्वधर्माप्रमाणें कर्माचरण करण्यांत काय दोष आहे? सांग. ९३६. अरे अर्जुना, सरळ वाटेनें चाललें तरी पायच शिणवावे लागतात; अथवा आडरानानें धांवलें तरी तेंच. (तेथेंही पायच शिणवावे लागतात.) ९३७.

पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें एक धनंजया । परी जें वाहतां विसांवया । मिळिजे तें घेपे ॥ ३८ ॥ एऱ्हवीं कणा आणि भूसा । कांडितांही सोसु सरिसा । जेंचि रंधन श्वानमांसा । तेंचि हवी ॥ ३९ ॥ दधी जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा । वाळुवे तिळा घाणा । गाळणें एक ॥ ९४० ॥ पैं नित्य होम देयावया । कां सैरा आगी सुवावया । फुंकितां धूम धनंजया । साहणें तेंचि ॥ ४१ ॥ परी धर्मपत्नी धांगडी । पोसितां जरी एकी वोढी । तरी कां अपरवडी । आणावी आंगा ॥ ४२ ॥ हां गा पाठीं लागला घायीं । मरण न चुकेचि पाहीं । तरी समोरला काई । आगळें न कीजे ॥ ४३ ॥ अकुळस्त्री दांडयाचे घाये । परघर रिगालीहि जरी साहे । तरी स्वपतीतें वायें । सांडिलें कीं ॥ ४४ ॥ तैसें आवडतेंही करणें । न निपजे शिणल्याविणें । तरी विहित बा रे कोणें । बोलें भारी ॥ ४५ ॥ वरी थोडेचि अमृत घेतां । सर्वस्व वेंचों कां पंडुसुता । जेणें जोडे जीविता । अक्षय्यत्व ॥ ४६ ॥ येर काह्यां मोलें वेंचूनि । विष पियावें घेउनि । आत्महत्येसि निमोनि । जायिजे जेणें ॥ ४७ ॥ तैसें जाचूनियां इंद्रियें । वेचुनि आयुष्याचेनि दियें । सांचला पापीं आन आहे । दुःखावांचुनि ॥४८॥ म्हणोनि करावा स्वधर्मु । जो करितां हिरोनि घे श्रमु । उचित देईल परमु । पुरुषार्थराजु ॥४९॥ याकारणें किरीटी । स्वधर्माचिये रहाटी । न विसंबिजे संकटीं । सिद्धमंत्र जैसा ॥ ९५० ॥ का नाव जैसीं उदधीं । महारोगी दिव्यौषधी । न विसंबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥ ५१ ॥ मग ययाचि गा कपिध्वजा । स्वकर्माचिया महापूजा । तोषला ईशु तमरजा । झाडा करूनि ॥५२॥ शुद्धसत्त्वाचिया वाटा । आणी आपुली उत्कंठा । भव स्वर्ग कालकुटा । ऐसें दावी ॥ ५३ ॥ जियें वैराग्य येणें बोलें । मागां संसिद्धी रूप केलें । किंबहुना तें आपुलें । मेळवी खागें ॥५४॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः । नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

मग जिंतिलिया हे भोये । पुरुष सर्वत्र जैसा होये । कां जालाही जें लाहे । तें आतां सांगों ॥ ५५ ॥ तरी देहादिक हें संसारें । सर्वही मांडलेंसे जें गुंफिरें । तेथ नातुडे तो वागुरें । वारा जैसा ॥ ५६ ॥ पैं परिपाकाचिये वेळे । फळ देठें ना देठ फळें । न धरे तैसें स्नेह खुळें । सर्वत्र होय ॥ ५७ ॥ पुत्र वित्त कलत्र । हे जालियाही स्वतंत्र । माझें न म्हणे पात्र । विषाचें जैसें ॥ ५८ ॥ हें असो विषयजातीं । बुद्धी पोळली ऐसी मागौती । पाउलें घेऊनि

अर्जुना, दगड अथवा दशमी, या दोहोंच्याही ओझ्याचा भार सारखाच असतो. परंतु ज्याचें ओझें वाहिलें असतां विश्रांतीच्या जागीं जें सुखकर होईल, त्याचें ओझें बाळगावें हें बरें. ९३८. सहज पाहिलें तर, दाणे कांडणें व भूस कांडणें, यांत कष्ट सारखेच आहेत व कुत्र्याकरितां मांसाला जितकें शिजवावें लागतें, तितकेंच अग्नीला आहुति देण्याकरितां लागणाऱ्या अन्नालाही शिजवावें लागतें. (अर्थात् दोहोंतही श्रम सारखेच आहेत.) ९३९. हे चतुरा अर्जुना, दह्याच्या व पाण्याच्या घुसळण्याला खटपट सारखीच आहे; घाण्यांत तीळ अथवा वाळू गाळण्याची खटपट सारखीच आहे. ९४०. अर्जुना, नित्यहोम करण्याकरितां अथवा स्वैर अग्नि घालण्याकरितां (आग लावण्याकरितां) विस्तव फुंकून तयार करण्याचें कामीं धूर सोसणें सारखेंच आहे. ९४१. परंतु लग्नाची बायको व राखलेली वेश्या यांना पोसण्यांत जर सारखेच श्रम पडतात, तर मग वेश्येला पोसून आपल्या अंगीं अन्याय कां लावावा? ९४२. अर्जुना, असें पाहा कीं, (शत्रूला पाठ दाखविली असतां त्यानें तरवार वगैरे मारल्यानें) पाठीला लागलेल्या जखमेमुळें मरण जर चुकत नाहीं, तर मग शत्रूच्या पुढें उभें राहून (शत्रूशीं सामना करून) अधिक पराक्रम कां करूं नये? ९४३. वाईट कुलांतील स्त्री, (आपल्या नवऱ्याचा त्रास चुकवावा म्हणून त्यास सोडून) दुसऱ्याच्या घरीं शिरली असतांही टिकुऱ्याचे तडाखे जर सहन करीत असेल, तर तिनें आपल्या लग्नाच्या नवऱ्याला व्यर्थ सोडलें नव्हे काय? ९४४. त्याप्रमाणें वाटेल तें कर्म श्रमल्याशिवाय उत्पन्न होत नाहीं, (असें जर आहे) तर बाबा, विहितकर्म करणें कोणत्या शब्दांनीं कठीण आहे असें म्हणावें? ९४५ अर्जुना, याशिवाय ज्यानें जीवाला अमरत्व मिळतें, असें जें अमृत, तें थोडेंच घेण्याला सर्वस्व खर्च होईना का? (सर्वस्व खर्च झालें तरी कांहीं हरकत नाहीं; पण थोडेंसें मिळालें तरी अमृतच घ्यावें.) ९४६. जें घ्यालें असतां आत्महत्या करून मरून जावें लागतें असें तें विष, द्रव्य खर्च करून विकत घेऊन कशाला घ्यावें? ९४७. त्याप्रमाणें इंद्रियांना कष्ट देऊन व आयुष्याचे दिवस खर्च करून पाप सांचलें असतां त्याचा दुःखावांचून कांहीं दुसरा परिणाम आहे का? ९४८. म्हणून ज्याचें आचरण केलें असतां (जन्ममरणाचे) श्रम नाहींसे करून योग्य व श्रेष्ठ पुरुषार्थ असा जो मोक्ष, त्याची जो प्राप्ती करून देईल,



त्या स्वधर्माचें आचरण करावें. ९४९. अर्जुना, या कारणास्तव जसें संकटकालीं सिद्धमंत्राला विसरूं नये, त्याप्रमाणें स्वकर्माच्या आचरणाला विसरूं नये. ९५०. अथवा समुद्रांत ज्याप्रमाणें नावेला विसरूं नये; महारोग झाला असतां ज्याप्रमाणें दिव्य औषधाला विसरूं नये; त्याच विचारानें जगांत स्वकर्माला विसरूं नये. ९५१. हे ध्वजेवर हनुमान् असलेल्या अर्जुना, मग स्वकर्माच्या महापूजेनें संतुष्ट झालेला ईश्वर, चित्तावरच्या तमरजाचा नाश करून, ९५२. आपली (स्वकर्म करणाराची) उत्कंठा शुद्ध सत्त्वगुणाच्या मार्गाला आणतो आणि संसार व स्वर्ग हे काळकूट विषासारखे आहेत, असें वाटावयास लावतो. ९५३. फार काय सांगावें! ज्या संसिद्धीची पूर्वी (याच अध्यायांतील श्लोक ४५ मध्यें) वैराग्याच्या लक्षणाच्या रूपानें स्पष्टता केली, त्या आपल्या मुक्कामाला ईश्वर त्या साधकास आणतो. ९५४.

ज्याचें अंतःकरण कोठेंच सक्त नाहीं, (एवढेंच नव्हे तर) ज्याचे ताब्यांत तें येऊन राहिलें आहे, आणि ज्याची इच्छा निःशेष नाहींशी झाली आहे, अशा (पुरुषास) संन्यासाच्या (अज्ञानाच्या त्यागाच्या) योगानें उत्कृष्ट नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते. ४९.

मग ही (वैराग्यरूपी) भूमिका जिंकल्यावर तो साधक पुरुष सर्वत्र (देहादि प्रपंच्याच्या ठिकाणीं) जसा होतो, आणि तसा झाला असतांही, त्याला जें प्राप्त होतें, तें आतां सांगतों. ९५५. तर जसा वारा पारध्याच्या जाळ्यांत (असून) अडकत नाहीं, तसा तो (साधक), हा जो देहादिक संसाररूपी पसरलेला गुंताडा आहे, त्यांत(असूनही) सांपडत नाहीं. ९५६. ज्याप्रमाणें पिकण्याच्या वेळेला फळ देंठास धरीत नाहीं, अथवा देंठ फळास धरीत नाहीं; त्याप्रमाणें त्याची ममता सर्व ठिकाणीं लुळी पडते. ९५७. ज्याप्रमाणें विषयुक्त अन्नानें वाढलेलें ताट (त्यांतील अन्न विषयुक्त आहे असें कळल्यावर) त्याला कोणी माझें म्हणत नाहीं, (भोजनाकरितां त्या वाढलेल्या ताटाचा कोणी स्वीकार करीत नाहीं) त्याप्रमाणें पुत्र, धन व कुटुंब हीं सर्व त्याच्या मनाप्रमाणें वागणारीं असलीं, तरी तो त्यांना 'माझें' असें म्हणत नाहीं. ९५८. हें राहूं दे. ज्याप्रमाणें कढत पदार्थास हात लागून पोळला असतां मनुष्य हात एकदम माघारा घेतो, त्याप्रमाणें बुद्धि, पोळल्याप्रमाणें सर्व विषयांपासून एकदम माघारी फिरून, हृदयाच्या

एकांतीं । हृदयाचां रिगे ॥ ५९ ॥ ऐसया अंतःकरण । बाह्य येतां तयाची आण । न मोडी समर्था भेण । दासी जैसी ॥ ९६० ॥ तैसें ऐक्याचिये मुठी– । माजिवडें चित्त किरीटी । करूनि वेधीं नेहटी । आत्मयाचां ॥ ६१ ॥ तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे । निमणें जालेंचि आहे । आगी दडपलिया धुयें । राहिजे जैसें ॥ ६२ ॥ म्हणौनि नियमिलिया मानसीं । स्पृहा नासोनि जाय आपैसी । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ ६३ ॥ पैं अन्यथा बोधु आघवा । मावळोनि तया पांडवा । बोधमात्रींचि जीवा । ठावो होय ॥ ६४ ॥ धरवणी वेंचें सरे । तैसें भोगें प्राचीन पुरे । नवें तंव नुपकरे । कांहींचि करूं ॥ ६५ ॥ ऐशी कर्मसाम्यदशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ॥ ६६ ॥ रात्रीची चौपाहरी । वेंचलिया अवधारीं । डोळयां तमारी । मिळे जैसा ॥ ६७ ॥ का येऊनि फळाचा घडु । पारुखवी केळीची वाढु । गुरु भेटोनि करी पाडु । मुमुक्षु तैसा ॥ ६८ ॥ मग आलिंगिला पूर्णिमा । उणीव सांडी चंद्रमा । तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ॥ ६९ ॥ तेव्हां अबोधुमात्र असे । तो तंव तया कृपा नासे । तेथ रात्रीसवें जैसें । आंधारें जाय ॥ ९७० ॥ तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ॥ ७१ ॥ तैसें अबोधनाशासवें । नाशे क्रियाजात आघवें । ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ॥ ७२ ॥ येणें मूळज्ञानसंन्यासें । दृश्याचा ठावो जेथ पुसे । तेथ बुझावें तें आपैसें । तोचि आहे ॥ ७३ ॥ चेइलियावरी पाहीं । स्वप्नींचिया तिये डोहीं । आपणयातें काई । काढूं जाइजे ॥ ७४ ॥ तैं मी नेणें आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न । जाला ज्ञातृज्ञेयाविहीन । चिदाकाश ॥ ७५ ॥ मुखाभासेंसीं आरिसा । परौता नेलिया वीरेशा । पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता ठाके ॥ ७६ ॥ तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें । मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रचि ॥ ७७ ॥ तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणीचि क्रिया । म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ॥ ७८ ॥ तें आपुलें आपणपें । असें तेंचि होऊनि आरोपे । तरंगु कां वायुलोपें । समुद्रु जैसा ॥ ७९ ॥ तैसें नहोणें निपजे । ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे । सर्वसिद्धींत सहजें । परम हेचि ॥ ९८० ॥ देउळाचिया कामा कळसु । परम गंगेसी सिंधुप्रवेशु । कां सुवर्णशुद्धी कसु । सोळावा जैसा ॥ ८१ ॥ तैसें आपुलें नेणणें । फेडी जे का जाणणें । तेंही गिळूनि असणें । ऐसी जे दशा ॥ ८२ ॥ तियेपरतें कांहीं । निपजणें येथ नाहीं । म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमासिद्धि ते ॥ ८३ ॥

एकांतांत प्रवेश करितें, ( अंतर्मुख होऊन आत्मविचाराकडे लागते. ) ९५९. राजानें दासीस शपथ घातली असतां राजाच्या भयानें ती शपथ दासी जशी मोडीत नाहीं; त्याप्रमाणें या साधकानें ' बाहेर ( विषयाकडे ) जाऊं नकोस तुला माझी शपथ आहे. ' अशी अंतःकरणास शपथ घातली असतां तें अंतःकरण बाहेर ( विषयांकडे ) येण्याविषयीं त्याची शपथ मोडीत नाहीं. ९६०. अर्जुना, त्याप्रमाणें ऐक्याच्या मुठीमध्यें चित्त धरून ( चित्त एकाग्र करून ) त्यास आत्म्याच्या वेधांत जोरानें लावतो. ९६१. तेव्हां राखेनें अग्नि दडपला असतां जसा धूर थांबतो, त्याप्रमाणें ऐहिक-पारलौकिक विषयासंबंधानें जी इच्छा असते ती मरतेच. ९६२. म्हणून अंतर्मुख केलेल्या मनामधून इच्छा आपोआप नाश पावते. फार काय सांगावें ! तो साधक अशा (आतां सांगितलेल्या) भूमिकेला प्राप्त होतो. ९६३. अर्जुना, त्याचें सर्व विपरीतज्ञान नाहींसें होऊन, केवळ ज्ञानाच्या ठिकाणीं त्याच्या अंतःकरणाचा निश्चय स्थिर होतो. ( तो कसा होतो हें पुढें सांगतात. ) ९६४. सांचलेलें पाणी जसें खर्चून संपतें, तसें भोगून प्रारब्ध संपतें. आणि नवें ( क्रियमाण ) तर कांहींच करण्याला उपयोगी पडत नाहीं. ( त्या साधकाला पुढचा जन्म देण्याला उपयोगी पडत नाहीं. ) ९६५. अरे वीरश्रेष्ठ अर्जुना, त्यावेळीं अशी कर्मसाम्य-अवस्था होते, तेव्हां मग श्रीगुरु आपण होऊन खात्रीनें भेट देतात. ९६६. अर्जुना, ऐक. रात्रीचे चार प्रहर संपल्यानंतर, जसा अंधाराचा नाश करणारा सूर्य डोळ्यांना दिसतोच; ९६७. अथवा फळाचा घड येऊन जशी केळीची वाढ बंद करतो. त्याप्रमाणें त्या जिज्ञासू पुरुषाला ( साधकाला ) गुरु भेटून तसा प्रकार करतात. ( साधकाचें कर्मकर्तृत्व बंद करितात. ) ९६८. पौर्णिमेनें आलिंगिलेला चंद्र ( ज्याप्रमाणें ) आपल्या स्वरूपांतील कलेचा कमीपणा ठेवीत नाहीं, त्याप्रमाणें अर्जुना, त्या साधकाला गुरुकृपेनें ( पूर्णत्व प्राप्त ) होतें. ९६९. तेव्हां साधकाच्या ठिकाणीं जें अज्ञान मात्र असतें, तें ( सर्व अज्ञान ) तर त्या गुरुकृपेनें नाश पावतें. तेव्हां रात्रीबरोबर जसा काळोख नाहींसा होतो, ९७०. त्याप्रमाणें ( अज्ञानाबरोबर ) अज्ञानाच्या पोटांत कर्म, कर्ता व कार्य अशी जी त्रिपुटी होती, ( तीही नाहींशी होते. अथवा ) जशी गर्भिणी मारावी, ( ज्याप्रमाणें गरोदर स्त्री मारली असतां गर्भाला वेगळें मारावें लागत नाहीं, तर तो गर्भ आपोआपच मरतो. ) ९७१. त्याप्रमाणें अज्ञानाच्या नाशाबरोबर सर्व कर्ममात्र नाश पावतें. याप्रमाणें हा समूळ ( कर्माचें कारण जें अज्ञान, त्या अज्ञानासह ) कर्मत्याग होतो. ९७२. याप्रमाणें सर्व कर्मांस मूळ असलेल्या अज्ञानाच्या त्यागानें, जेव्हां दृश्याचा ठावठिकाण नाहींसा होतो, तेव्हां जें ( आत्मतत्त्व ) जाणावयाचें, तें स्वभावतः तोच आहे. ९७३. अर्जुना, असें पाहा कीं, स्वप्नांत आपण आपल्याला डोहांत बुडतांना पाहिल्यावर जागें झाल्यानंतर, स्वप्नांतील डोहांतून आपण आपल्याला काढण्याकरितां जाणें जरूर आहे काय ? ९७४. तेव्हां मी ( आपल्या स्वरूपाला ) जाणत नव्हतों; आतां ( मी आपल्या स्वरूपाला ) जाणेन, हें त्याचें अनिष्ट स्वप्न त्याला दिसेनासें झालें. आतां, जाणणारा व जाणण्याचा विषय, या भेदावांचून केवळ ज्ञानरूप आकाश तो झाला. ९७५. हे वीरश्रेष्ठा अर्जुना, आपल्या मुखाचें प्रतिबिंब पडलेल्या आरशास बाजूला नेला असतां ज्याप्रमाणें पहाणेपणाशिवाय पहाणारा रहातो. ९७६. त्याप्रमाणें अज्ञान जें गेलें, त्यानें आपल्याबरोबरचें सापेक्ष ज्ञानही नेलें व मग क्रियारहित असें जें केवल ज्ञानमात्रच, तें राहिलें. ९७७. अर्जुना, त्या ज्ञानमात्र स्वरूपीं कोणतेंच कर्म स्वभावतः नाहीं. म्हणून त्या ज्ञानमात्र स्वरूपस्थितीस ' नैष्कर्म्य ' ( कर्मशून्यता ) असें म्हणतात. ९७८. तें आपलें असलेलें मूळचें स्वरूप आपल्या ठिकाणीं होऊन रहातो. तें कसें तर, वाऱ्याच्या नाशानें जशी लाट आपल्या मूळच्या समुद्ररूपानें रहाते तसें. ९७९. वर सांगितल्या-प्रमाणें जें कर्मांचें न होणें सिद्ध होतें,त्याला 'नैष्कर्म्यसिद्धि' असें म्हणावें व हीच सिद्धि सर्वही सिद्धींत स्वभावतःच श्रेष्ठ आहे. ९८०. देऊळाच्या कामाला जशी कळस ही शेवटली मर्यादा आहे अथवा गंगेस जसा समुद्रप्रवेश ही शेवटली हद्द आहे; अथवा ज्याप्रमाणें सोन्याच्या शुद्धपणांत सोळावा कस ( शंभर नंबरी कस ) हा शेवटला कस आहे; ९८१. त्याप्रमाणें जें ज्ञान आत्मस्वरूपाचें अज्ञान नाहींसें करतें, तें ज्ञानही गिळून असणें, अशी जी अवस्था, ९८२. त्या नैष्कर्म्य स्थितीच्या पलीकडे या जगांत ( परमार्थानें ) कांहीं मिळविण्याचें राहिलें नाहीं, म्हणून सर्व सिद्धींत ही ( नैष्कर्म्य ) सिद्धि श्रेष्ठ म्हटली जाते पहा. ९८३.

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽऽप्नोति निबोध मे। समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥

परी हेचि आत्मसिद्धि। जो कोणी भाग्यनिधि। श्रीगुरुकृपालब्धि–। काळीं पावे ॥ ८४ ॥ उदयजतांचि दिनकरु। प्रकाशुचि आते आंधारु। कां दीपसंगें कापुरु। दीपुचि होय ॥ ८५ ॥ तया लवणाची कणिका। मिळतखेंवो उदका। उदकचि होऊनि देखा। ठाके जेवीं ॥ ८६ ॥ कां निद्रित चेवविलिया। स्वप्नेंसि निद वायां। जाऊनि आपणपया। मिळे जैसा ॥ ८७ ॥ तैसें जया कोण्हासि दैवें। गुरुवाक्य श्रवणाचिसवें। द्वैत गिळोनि विसंवे। आपणया वृत्ती ॥ ८८ ॥ कानावचनाचिये भेटी–। सरिसाचि पैं किरीटी। वस्तु होऊनि उठी। कवणि एकु जो ॥ ८९ ॥ तयासी मग करणें। हें बोलिजैलचि कवणें। आकाशा येणें जाणें। आहे काई ॥ ९९० ॥ म्हणौनि तयासि कांहीं। त्रिशुद्धि करणें नाहीं। परी ऐसें जरी हें कांहीं। नव्हे जया ॥ ९१ ॥ एऱ्हवीं स्वकर्माचेनि वन्हीं। काम्यनिषिद्धाचां इंधनीं। रजतमें कीर दोन्ही। जाळिलीं आधीं ॥ ९२ ॥ पुत्र वित्त परलोकु। यया तिहींचा अभिलाखु। घरीं होय पाइकु। हेंही जालें ॥ ९३ ॥ इंद्रियें सैरा पदार्थीं। रिगतां विटाळलीं होतीं। तियें प्रत्याहारतीर्थीं। न्हाणिलीं कीर ॥ ९४ ॥ आणि स्वधर्माचें फळ। ईश्वरीं अर्पूनि बळ। घेऊनि केलें अढळ। वैराग्यपद ॥ ९५ ॥ ऐसी आत्मसाक्षात्कारीं। लाभे ज्ञानाची उजरी। ते सामुग्री कीर पुरी। मेळविली ॥ ९६ ॥ आणि तेचि समयीं। सद्गुरु भेटले पाहीं। तेवींचि तिहीं कांहीं। वंचिजेना ॥ ९७ ॥ परी वोखद घेतखेंवो। काय लाभे आपुला ठावो। का उदयजतांचि दिवो। मध्यान्ह होय ॥ ९८ ॥ सुक्षेत्रीं आणि वोलटें। बीजही पेरिलें गोमटें। तरी आलोट फळ भेटे। परी वेळे कीं गा ॥ ९९ ॥ जोडला मार्गु प्रांजळु। मिनला सुसंगाचाही मेळु। तरी पाविजे वांचूनि वेळु। लागेचि कीं ॥ १००० ॥ तैसा वैराग्यलाभु जाला। वरी सद्गुरुही भेटला। जीवीं अंकुरु फुटला। विवेकाचा ॥ १ ॥ तेणें ब्रह्म एक आथी। येर आघवीचि भ्रांती। हेही कीर प्रतीती। गाढी केली ॥ २ ॥ परी तेंचि जें परब्रह्म। सर्वात्मक सर्वोत्तम। मोक्षाचेंही काम। सरे जेथ ॥ ३ ॥ यया तिन्ही अवस्था पोटीं। जिरवी जें गा किरीटी। यया ज्ञानासिही मिठी। दे जें वस्तु ॥ ४ ॥ ऐक्याचें एकपण सरे। जेथ आनंदकणुही विरे। कांहींचि नुरोनि उरे। जें कांहीं गा ॥ ५ ॥ तियें ब्रह्मीं ऐक्यपणें। ब्रह्मचि होऊनि असणें। तें क्रमेंचि करुन तेणें। पाविजे पैं ॥ ६ ॥ भुकेलियापासीं। वोगरिलें षड्रसीं। तो तृप्ति प्रतिग्रासीं। लाहे जेवीं ॥ ७ ॥ तैसा वैराग्याचा वोलावा। विचाराचा तो दिवा। आंबुथितां आत्मठेवा।

हे कौन्तेया, ज्ञानाची अखेरची मर्यादा असें जें ब्रह्म, तें ( ब्रह्म ) सिद्धि पावलेला आत्मैश्वर्य भोगण्याची योग्यता पावलेला मंद अधिकारी पुरुष, कोणत्या क्रमानें मिळवितो, तें संक्षेपानें माझ्यापासून श्रवण कर. ५०.

परंतु जो कोणी भाग्याचा केवळ ठेवा असलेला असा पुरुष, सद्गुरुकृपेचा लाभ होण्याच्या वेळीं, ही आत्मसिद्धि पावतो. ९८४. सूर्य उगवताक्षणींच अंधार जसा प्रकाशच होतो, अथवा दिव्याच्या संगतीनें कापूर जसा दिवाच होतो. ९८५. हें पाहा, त्या मिठाचा खडा पाण्याला मिळाल्याबरोबर ज्याप्रमाणें पाणीच होऊन रहातो. ९८६. अथवा निजलेल्या पुरुषाला जागें केलें असतां, स्वप्नासह झोंप नाहींशी होऊन, तो ( निजलेला ) पुरुष जसा आपल्या जागृतीच्या रूपाला मिळतो. ९८७. त्याप्रमाणें ज्या कोणाला दैवानें गुरूंनीं केलेला उपदेश ऐकल्याबरोबरच द्वैत नाहींसें होऊन, वृत्ति आत्मस्वरूपीं स्थिर होते, ९८८ अर्जुना, गुरूनें केलेला महावाक्याचा उपदेश कानांनीं ऐकताक्षणींच, जो कोणी एक आत्मरूप होऊन जातो. ९८९; त्याला मग कांहीं एक कर्तव्यकर्म आहे, असें कोणीं म्हणावें ? येणें, जाणें वगैरे कांहीं क्रिया आकाशाच्या ठिकाणीं आहे काय ? ९९०. म्हणून असा जो वस्तुरूप झालेला, त्याला निश्चयेंकरून कांहीं कर्तव्यकर्म उरत नाहीं. परंतु ज्या मंद अधिकाऱ्याला महावाक्याच्या श्रवणाबरोबर वस्तुरूप होतां येत नाहीं; ( अशा मंद अधिकाऱ्याला बुद्धीवरील असंभावनादिक ज्ञानप्रतिबंधक दोषनिवारणार्थ कर्मादिक करावें लागतें, तें कसें, तें पुढें ९९२ ओवीपासून सांगतात. ) ९९१. त्याहून उलट ज्या मंद अधिकाऱ्यानें ( म्हणजे ज्याला बुद्धिदोषामुळें महावाक्याच्या श्रवणाबरोबर वस्तुरूप होतां येत नाहीं, त्यानें ) स्वधर्मरूपी अग्नीमध्यें काम्य व निषिद्ध कर्मरूप काष्ठाच्या योगानें प्रथम ( चित्तावरील ) रज, तम ( विक्षेप व मल ), हे दोष जाळले. ९९२. शिवाय पुत्र, द्रव्य आणि स्वर्गादिक लोक, या तिहींच्या विषयींची इच्छा, चाकराप्रमाणें त्याच्या आधीन होऊन राहिलेली असते. हेंही त्याच्याकडून झालें. ( इतर लोक इच्छेच्या आधीन असतात, परंतु यानें इच्छा आपल्या आधीन ठेविलेली असते. ) ९९३. इंद्रियांनीं विषयाविषयीं त्याज्यात्याज्य असा विचार न करतां हव्या त्या विषयांत तोंड घातल्यामुळें तीं इंद्रियें विटाळलीं होतीं; त्या इंद्रियांना ( तो विटाळ जाऊन शुद्ध होण्याकरितां ) प्रत्याहाररूपी तीर्थांत खरोखर स्नान घातलें. ९९४. आणि स्वधर्माचरणाचें फळ ईश्वराला अर्पण करून, त्याच्या मोबदला ईश्वरापासून वैराग्याचें बळ मागून घेऊन, वैराग्यपद अढळ केलें. ९९५. ज्ञानाच्या ज्या उत्कर्षानें आत्मसाक्षात्कार होईल, त्या उत्कर्षाच्या प्राप्तीची, अशी ही ( वर सांगितल्याप्रमाणें ) सर्व ( साधन ) सामुग्री, त्यानें खरोखर मिळविली. ९९६. आणि पहा, त्याच वेळीं सद्गुरु भेटले व त्याचप्रमाणें ( साधकाच्या सर्व सामुग्रीच्या प्राप्तीप्रमाणें ) त्यांनीं कांहींही ( ज्ञानाचा उपदेश करण्यांत ) प्रतारणा केली नाहीं, ९९७. परंतु औषध घेतांक्षणींच रोगाची निवृत्ति होऊन, आपली मूळची आरोग्याची स्थिति प्राप्त होते काय ? अथवा दिवस उगवतांक्षणींच मध्याह्नकाल होतो काय ? ९९८. ओल असलेल्या चांगल्या शेतांत, चांगलें बीजही पेरलें तर अपार फळ मिळेल. परंतु अरे अर्जुना, कांहीं कालानंतर मिळेल. ( पेरल्याबरोबर मिळणार नाहीं. ) ९९९. सोपा मार्ग प्राप्त झाला आणि चांगल्या संगतीचा योगही जुळून आला, तर मुक्कामाला पोहोंचणें होईल. परंतु त्यास कांहीं काळ हा पाहिजेच. १०००. त्याप्रमाणें वैराग्याची प्राप्ति झाली; शिवाय सद्गुरुच्याही भेटीचा योग झाला व अंतःकरणांत नित्यानित्यविचाराचा अंकुरही फुटला. १००१. त्या नित्यानित्यविचाराच्या योगानें ब्रह्मच एक ( सत्य ) आहे, इतर सर्व भ्रांति आहे, हाही अनुभव खरोखर दृढ केला. १००२. परंतु तेंच परब्रह्म, जें सर्वात्मक व सर्वांत उत्तम आहे. मोक्षाचेंही प्रयोजन ज्या ब्रह्माच्या अनुभवांत नाहींसें होतें, १००३ जें ज्ञान आपल्या पोटांत जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तिन्हीं अवस्था नाहींशा करतें, त्या ज्ञानालाही नाहींसें करणारी जी वस्तु—१००४. ऐक्याचें एकपण ज्या ठिकाणीं संपतें व आत्मदर्शनांत प्रथम होणारा लेशमात्र आनंद, तोही ज्या ब्रह्मस्वरूपांत विरून जातो व कांहीं न उरतां, जें कांहीं शिल्लक असतें. १००५. त्या ब्रह्माच्या ठिकाणीं ब्रह्मच होऊन ऐक्यानें असणें, तें ( ही स्थिति ) त्या साधकाकडून क्रमानें मिळविलें जातें. १००६. ज्याप्रमाणें भुकेलेल्या पुरुषास षड्रस पक्वान्न वाढलें असतां त्याला जशी प्रत्येक घांसाबरोबर तृप्ति होत जाते. १००७. त्याप्रमाणें वैराग्यरूपी तेलाचें भरण मिळालें असतां, विचाराचा दिवा प्रज्वलित होऊन,

काढीची तो ॥ ८ ॥ तरी भोगिजे आत्मऋद्धी । येवढी योग्यतेची सिद्धी । जयाचां आंगीं निरवधी । लेणें जाली ॥ ९ ॥ तो जेणें क्रमें ब्रह्म । होणें करी गा सुगम । तया क्रमाचें आतां वर्म । आईक सांगों ॥ १०१० ॥

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च । शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१॥

तरी गुरु दाविलिया वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा । धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणें ॥ ११ ॥ मग राहूनें उगाळिली । प्रभा चंद्रें आलिंगिली । तैसी शुद्धते जडली । आपणयां बुद्धि ॥ १२ ॥ सांडूनि कुळें दोन्ही । प्रियासी अनुसरे कामिनी । द्वंद्वत्यागें स्वचिंतनीं । पडली तैसी ॥ १३ ॥ आणि ज्ञाना ऐसें जिव्हार । नेवों नेवों निरंतर । इंद्रियीं केले थोर । शब्दादिक जे ॥ १४ ॥ ते रश्मिजाळ काढलेया । मृगजळ जाय लया । तैसें धृतिरोधें तयां । पांचांही केलें ॥ १५ ॥ नेणतां अधमाचिया अन्ना । खादालिया कीजे वमना । तैसीं बोकविलीं सवासना । इंद्रियें विषयीं ॥ १६ ॥ मग प्रत्यगावृत्ती चोखटें । लाविलीं गंगेचेनि तटें । ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें । केलीं येणें ॥ १७ ॥ पाठीं सात्त्विकें धीरें तेणें । शोधारलीं तियें करणें । मग मनेंसीं योगधारणें । मेळविलीं ॥ १८ ॥ तेवींचि प्राचीनें इष्टानिष्टें । भोगेंसीं येउनी भेटे । तेथ देखिलियाहि चोखटें । द्वेषु न करी ॥ १९ ॥ ना गोमटेंचि विपायें । तें आणूनि पुढां सूये । तयालागीं न होये । साभिलाषु ॥ १०२० ॥ यापरी इष्टानिष्टीं । रागद्वेष किरीटी । त्यजूनि गिरिकपाटीं । निकुंजीं वसे ॥ २१ ॥

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः । ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥

गजबजा सांडिलिया । वसवी वनस्थळिया । अंगाचियाचि मांदिया । एकलेया ॥ २२ ॥ शमदमादिकीं खेळे । न बोलणेंचि चावळे । गुरुवाक्याचेनि मेळें । नेणे वेळु ॥ २३ ॥ आणि आंगा बळ यावें । नातरी क्षुधा जावें । कां जीभेचे पुरावे । मनोरथ ॥ २४ ॥ भोजन करितांविखीं । यया तिहींतें न लेखी । आहारीं मिती संतोषीं । माप न सूये ॥ २५ ॥ आसनाचेनि पावकें । हारपतां प्राणु पोखे । याचि भागु मोटकें । अशन करी ॥ २६ ॥ आणि परपुरुषें कामिली । कुळवधू आंग न घाली । निद्रालस्या न मोकली । अशन तैसें ॥ २७ ॥ दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं हन अंग लागे । वांचूनि येर नेघे । राभस्य तेथ ॥ २८ ॥ देहनिर्वाहापुरतें । राहाटवी हातांपायांतें । किंबहुना आपैतें । सबाह्य केलें ॥ २९ ॥ आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखों नेदी वीरा । तेथ कें वाग्व्यापारा । अवकाशु असे ॥ १०३० ॥ ऐसेनि देह वाचा मानस । हे जिणौनि बाह्यप्रदेश । आकळिलें आकाश । ध्यानाचें तेणें ॥ ३१ ॥ गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला । न्याहाळी

तो साधक आत्मरूपी ठेवा काढतोच. १००८. तरी आत्मस्वरूपाचें ऐश्वर्य भोगावें एवढ्या योग्यतेची (अधिकाराची) सिद्धि ज्याच्या अंगावर कायमचा अलंकार होऊन राहिली आहे. १००९. तो (साधक) ज्या क्रमाचा अंगीकार केला असतां सुलभ रीतीनें ब्रह्म होतो, त्या क्रमाचें आतां वर्म सांगतों, ऐक. १०१०

शुद्धबुद्धीनें युक्त, धैर्यानें स्वतःचें मन व इंद्रियें यांचें नियमन करून, शब्दादि विषयांचा त्याग करून, प्रीति अथवा द्वेष सोडून, ५१.

तर गुरूनें दाखविलेल्या वाटेनें विवेकरूपी तीर्थाच्या कांठावर येऊन, तेथें त्या साधकानें (आपल्या) बुद्धीचा मळ धुऊन टाकल्यामुळें, १०११. मग (चंद्रग्रहण सुटलें असतां) राहूच्या तोंडांतून बाहेर आलेली चंद्राची प्रभा जशी चंद्राकडून आलिंगिली जाते, त्याप्रमाणें ती शुद्ध बुद्धि आपल्या मूळच्या स्वरूपाला प्राप्त झाली. १०१२. सासर व माहेर ह्या दोन्ही कुळांचा स्नेह टाकून, पतिव्रता स्त्री, ज्याप्रमाणें आपल्या पतीस अनुसरते, त्याप्रमाणें द्वंद्वाचा त्याग करून बुद्धि (केवळ) आत्मचिंतनांत रत झाली. १०१३, आणि ज्ञानासारखें जीवन नेहमीं (विषयाकडे) नेऊन, शब्दादिक जे विषय, त्यांना इंद्रियांनीं थोर केलें, (त्यांचा बडेजाव वाढविला.) १०१४. ज्याप्रमाणें सूर्याच्या किरणांचे समुदाय दूर केले असतां मृगजळ नाहींसें होतें, त्याप्रमाणें इंद्रियांचा निग्रह करून (त्या साधकानें) शब्दादिक पंच विषयांचा निरास केला. १०१५. न समजून नीच पुरुषाचें अन्न खाल्लें असतां, जसें तें ओकून टाकावें, त्याप्रमाणें इंद्रियांकडून वासनांसह विषयांचा त्याग करविला. १०१६. मग विषयांपासून परत फिरविलेलीं इंद्रियें, आत्माकारवृत्तिरूपी पवित्र गंगेच्या तीराला आणून ठेविलीं. याप्रमाणें या साधकानें शुद्धिकारक प्रायश्चित्तें केलीं. १०१७. नंतर त्या साधकानें तीं शुद्ध केलेलीं इंद्रियें मनासह सात्त्विक धैर्याच्या जोरावर योगधारणेला लावलीं. १०१८. त्याचप्रमाणें प्रारब्धाच्या योगानें इष्टानिष्ट भोगाची प्राप्ति झाली असतां, त्या वेळीं वाईटाचा अनुभव आला तरी द्वेष करीत नाहीं. १०१९. अथवा कदाचित् त्या प्रारब्धानें अनुकूल विषय आणून पुढें ठेवला, तर त्या विषयाचा तो आपल्या मनांत अभिलाष धरीत नाहीं. १०२०. याप्रमाणें इष्ट विषयाच्या ठिकाणीं प्रीति व अनिष्ट विषयांच्या ठिकाणीं द्वेष सोडून देऊन, अर्जुना, डोंगराच्या गुहेंत अथवा दाट वेली व झाडें असलेल्या गुहेंत राहातो. १०२१.

एकान्त सेवन करणारा, मिताहारी, वाणी, शरीर व मन यांचें नियमन केलेला, ध्यानयोगपर, नित्य वैराग्याचा आश्रय केलेला, ५२.

जेथें गजबज नाहीं अशा वनांतील जागेंत, एकट्या (फक्त) शरीरावयवाच्या समुदायासह राहातो, (शरीराचे अवयव हेंच तेथें त्याचे सोबती असतात.) १०२२. तो (साधक) शमदमादिकांनीं खेळतो, (तो नेहमीं शमदमाचा अभ्यास करतो); न बोलणेंच बोलतो व गुरुवाक्यांच्या विचारांत वेळ किती गेला हें जाणत नाहीं. १०२३. आणि शरीरात शक्ति यावी अथवा भूक नाहींशी व्हावी अथवा जिव्हेच्या इच्छा पुराव्यात; १०२४. भोजनाकरितां या तिन्ही गोष्टी तो लक्षांत घेत नाहीं. तो थोडक्या आहारांत संतोषी असतो, माप घालीत नाहीं, (म्हणजे फार खात नाहीं.) १०२५. जठराग्नीच्या भडक्यानें नाहींसा होणारा जो प्राण, तो खाण्यानें जीव धरून राहील, इतक्याच बेतानें थोडेसें अन्न सेवन करतो. १०२६. आणि परपुरुषानें इच्छा केली असतां जशी कुलवान् स्त्री आपलें शरीर त्याच्या स्वाधीन करीत नाहीं, त्याप्रमाणें तो साधक आपला आहार, निद्रा व आळस यांकडे धाडीत नाहीं. (म्हणजे आळस, झोंप येईल असा आहार करीत नाहीं.) १०२७. देवाला साष्टांग नमस्कार करण्याच्या वेळीं काय तें अंग जमिनीला लागतें, (म्हणजे तेव्हांच काय तो त्याच्या अंगाला जमिनीचा स्पर्श होतो) याशिवाय जमिनीवर अविचारानें लोळत पडत नाहीं. १०२८. देहाचा निर्वाह होण्यापुरती हातापायांची हालचाल करीत असतो. फार काय सांगावें! अशा रीतीनें त्यानें अंतर्बाह्य (शरीर व मनादिक इंद्रियें) आपल्या स्वाधीन केलें आहे १०२९. आणि अर्जुना, तो आपल्या वृत्तीला मनाचा उंबरा देखील पाहूं देत नाहीं (आपल्या वृत्तीला संकल्पविकल्पापर्यंत येऊं देत नाहीं.) अशा स्थितींत वाचेच्या व्यापाराला (बोलण्याला) संधि कोठें मिळणार आहे? १०३०. अशा तऱ्हेनें, शरीर वाणी व मन हीं बाहेरचीं ठिकाणें जिंकून त्यानें ध्यानाचें आकाश आपल्या स्वाधीन करून घेतलें. १०३१. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य हातीं घेतलेल्या आरशांत आपलें प्रतिबिंब स्वच्छ पाहातो, त्याप्रमाणें गुरूच्या उपदेशानें जागा झालेला जो बोध (ज्ञान), त्या बोधाच्या ठिकाणीं तो

हातीं घेतला । आरिसा जैसा ॥ ३२ ॥ पैं ध्याता आपणचि परी । ध्यानरूप वृत्तिमाझारीं । ध्येयत्वें घे हे अवधारीं । ध्यानरूढी गा ॥ ३३ ॥ तेथ ध्यान ध्येय ध्याता । ययां तिहीं एकरूपता । होय तंव पंडुसुता । कीजे तें गा ॥ ३४ ॥ म्हणौनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला दक्षु । परी पुढां स्रुनि पक्षु । योगाभ्यासाचा ॥ ३५ ॥ अपानरंध्रद्वया- । माझारीं धनंजया । पार्ष्णी पिडूनियां । कांवरुमूळ ॥ ३६ ॥ आकुंचूनि अध । देऊनि तिन्हीं बंध । करूनि एकवद । वायुभेदा ॥ ३७ ॥ कुंडलिनी जागवूनि । मध्यमा विकाशूनि । आधारादि भेदूनि । आज्ञावरी ॥ ३८ ॥ सहस्रदळाचा मेघु । पीयूषें वर्षोनि चांगु । तो मूळवरी वोघु । आणूनियां ॥ ३९ ॥ नाचतया पुण्यगिरी । चिद्भैरवाचां खापरीं । मनपवनाची खीचपुरी । वाढूनियां ॥ १०४० ॥ जालिया योगाचा गाढा । मेळावा स्रुनि हा पुढां- । ध्यान मागिलीकडां । स्वयंभ केलें ॥ ४१ ॥ आणि ध्यान योग दोन्ही । इये आत्मतत्त्वज्ञानीं । पैठी होआवया निर्विघ्नीं । आधींचि तेणें ॥ ४२ ॥ वीतरागतेसारिखा । जोडूनि ठेविला सखा । तो आघवियाचि भूमिका- । सवें चाले ॥ ४३ ॥ पहावें तें दिसें तंववरी । दिठीतें न संडी दीप जरी । तरी कें आहे अवसरी । देखावया ॥ ४४ ॥ तैसें मोक्षीं प्रवर्तलया । वृत्ती ब्रह्मीं जाय लया । तंव वैराग्य आथी तया । भंगु कैंचा ॥ ४५ ॥ म्हणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु । करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥ ४६ ॥ ऐसी वैराग्याची अंगीं । बाणूनियां वज्रांगी । राजयोगतुरंगीं । आरूढला ॥ ४७ ॥ वरी आड पडिलें दिठी । सानें थोर निवटी । तें बळी विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें ॥ ४८ ॥ ऐसेनि संसाररणाआंतु । आंधारीं सूर्यु तैसा असे जातु । मोक्षविजयश्रीये वरैतु । होआवयालागीं ॥ ४९ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् । विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

तेथ आडवावया आले । दोषवैरी जे धोपटिले । तयांमाजीं पहिले । देहाहंकारु ॥ १०५० ॥ जो न मोकली मारुनी । जीवों नेदी उपजवोनी । विचंबवी खोडां घालुनी । हाडांचिया ॥ ५१ ॥ तयाचा देहदुर्ग हा थारा । मोडूनि घेतला तो वीरा । आणि बळ हा दुसरा । मारिला वैरी ॥ ५२ ॥ जो विषयाचेनि नांवें । चौगुणेंही वरी थांवे । जेणें मृतावस्था धांवे । सर्वत्र जगा ॥ ५३ ॥ तो विषयविषाचा अथावो । आघविया दोषांचा रावो । परी ध्यानखड्गाचा घावो । साहेल कैंचा ॥ ५४ ॥ आणि प्रियविषयप्राप्ती । करी जया सुखाची व्यक्ति । तेचि घालूनि वुंथी । आंगीं जो वाजे ॥ ५५ ॥ जो सन्मार्गु भुलवी । मग अधर्माचां आडवीं- । स्रुनि वाघां सांपडवी । नरकादिकां ॥ ५६ ॥ तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि घातला दर्पु । आणि जयाचा अहा कंपु । तापसांसी ॥ ५७ ॥ क्रोधा ऐसा महादोखु । जयाचा देखा परिपाकु । भरिजे तंव अधिकु । रिता होय जो ॥ ५८ ॥ तो कामु कोणेच ठायीं । नसे ऐसें केलें पाहीं । कीं तेंचि क्रोधाही । सहजें

आपला स्वरूपनिश्चय पाहातो. ( म्हणजे 'मी ब्रह्म' असा निश्चय करतो. ) १०३२. अर्जुना, ऐक. ध्यान करणारा आपल्यालाच, परंतु ध्यानाच्या योगानें वृत्तीमध्यें ध्येयपणानें घेतो; ही ध्यान करण्याची प्रसिद्ध रीत आहे. १०३३. अर्जुना, असें ध्यान करीत असतांना ध्यान, ध्येय व ध्याता या तिहींची एकरूपता होईपर्यंत तें ध्यान करावें. १०३४. म्हणून तो मुमुक्षु आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेण्याकरितां तत्पर झाला, परंतु योगाभ्यासाच्या बाजूचा आश्रय करून झाला. ( म्हणजे अष्टांगयोगानें तो आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यास प्रवृत्त झाला. ) १०३५. अर्जुना, गुद व उपस्थ या दोन द्वारांमधील जी शिवण आहे, तिचा मध्य, टांचेनें दाबून, १०३६. गुदाचें आकुंचन करून व मूळबंधादि तिन्ही बंध देऊन आणि प्राणापानादि निरनिराळे वायु एकत्र करून, १०३७. कुंडलिनी जागी करून, सुषुम्ना नाडीचा विकास करून व आधारचक्रापासून तों आज्ञाचक्रापर्यंत चक्रांचें भेदन करून, १०३८. सहस्रदलरूपी मेघाच्या अमृताचा चांगला वर्षाव करून तो अमृताचा प्रवाह मूलाधार चक्रापर्यंत आणून १०३९. आज्ञाचक्ररूपी पर्वतावर नाचत असलेल्या चैतन्यरूपी भैरवाच्या भिक्षापात्रांत मन व प्राण यांची ऐक्यरूपी खिचडी वाढून, १०४०. योगाभ्यास चांगला दृढ झाल्यावर मग हा वर सांगितलेला (तीन बंधांचा) समुदाय पुढें करून, मागल्या बाजूस ब्रह्मस्वरूपाचें ध्यान सिद्ध केलें. १०४१. आणि ध्यान व योग हे दोन्हीं निर्विघ्नपणें आत्मज्ञानाच्या ठिकाणीं प्राप्त होण्याकरितां त्यानें अगोदरच १०४२. वैराग्यासारखा मित्र जोडून ठेविला. तो आरंभापासून तों ब्रह्मप्राप्तीपर्यंत सर्व भूमीकेवर त्याच्याबरोबर चालतो. १०४३. पहावयाची वस्तु दिसेपर्यंत जर दिव्यानें डोळ्यांना सोडलें नाहीं, तर ती वस्तु दिसावला वेळ कोठें लागेल ? १०४४. त्याप्रमाणें मोक्षाच्या ठिकाणीं प्रवृत्त झालेल्या पुरुषाची वृत्ति ब्रह्माच्या ठिकाणीं लयाला जाईतोंपर्यंत, त्याच्याबरोबर वैराग्य आहे, त्याला नाश कसला ? १०४५. म्हणून तो भाग्यवान् पुरुष वैराग्यासह ज्ञानाभ्यास करून आत्मप्राप्तीला योग्य झाला. १०४६. याप्रमाणें वैराग्याचें चिलखत अंगांत नीटनेटकें घालून राजयोगरूपी घोड्यावर स्वार झाला. १०४७. शिवाय जें दृश्य दृष्टीस पडेल, त्यांतील लहान, मोठा वगैरे भेद नाहींसा करणारी ध्यानरूपी तीक्ष्ण तरवार, विवेकरूपी



मुठींत धारण केली. १०४८. अंधारांत सूर्य जसा बेडर जातो, तसा तो ( साधक ) मोक्षविजयरूपी लक्ष्मीला वरणारा भर्ता होण्याकरितां, संसाररूपी समरांगणांत निर्भयपणानें जातो. १०४९.

अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह हीं ( सर्व ) टाकून ममत्वबुद्धिविरहित व शान्त झालेला असा मनुष्य, ब्रह्मरूप होण्याला योग्य होतो. ५३.

तेथें ( संसाररूपी समरांगणांत ) प्रतिबंध करण्याकरितां आलेले जे दोषरूपी शत्रु, ज्यांस त्यानें चांगला मार दिला, त्यांमध्यें पहिला शत्रु देहअहंकार होय. १०५०. जो ( देहाहंकार ) मारून सोडून देत नाहीं; ( तर पुनः जन्म देतो ) आणि जन्माला घालून जगूं देत नाहीं; ( तर पुन्हां मारतो, ) याप्रमाणें हाडांच्या खोड्यांत ( देहांत ) घालून कुचंबत ठेवतो. १०५१. हे वीरा अर्जुना, देहरूपी किल्ला हा त्या देहाहंकाराचा आश्रय होय. तो पाडाव करून त्यानें काबीज केला ( विचारानें देहाचा निरास केला. ) आणि बळ ( कामादि रागाचें सामर्थ्य) हा दुसरा शत्रु मारला. १०५२. जो बलरूपी शत्रु, विषय म्हटला कीं, चौपटीपेक्षांही जास्त वाढतो व ज्याच्या योगानें सर्व जगाला मृतावस्था प्राप्त होते. १०५३. तो ( बलरूपी शत्रु ) विषयरूपी विषांनीं भरलेला अगाध डोह आहे व सर्व दोषांचा राजा आहे; परंतु तो ध्यानरूपी तरवारीचा घाव कसचा सहन करणार ? १०५४. आणि प्रिय विषयाची प्राप्ति, ज्या सुखाची प्रगटता करते, त्याच सुखाची अंगांत खोळ घालून, जो गर्जना करावयास लागतो, १०५५. जो ( दर्पशत्रु ) सन्मार्ग चुकवितो व मग अधर्मरूपी रानांत घालून नरकादिक वाघांच्या तडाक्यांत सांपडवून देतो, १०५६. तो विश्वास देऊन मारणारा शत्रु जो दर्प तो मारून टाकला. आणि बापरे ! ज्या कामाचें नांव ऐकिलें असतां तपस्व्यांना थरकांप होतो, १०५७. क्रोधासारखा भयंकर दोष, ही ज्याची (कामाची) परिपक्व अवस्था आहे (अतिशय वाढलेल्या कामाच्या अपूर्णतेंत क्रोधाची उत्पत्ति होते) व जो (काम) भरला असतां अधिक रिकामा होतो. ( म्हणजे त्यास जसजसे विषय द्यावेत तसतसा जो अतिशय वाढतो, ) १०५८. ( असा जो काम ) तो कोणत्याही ठिकाणीं नाहीं असें केलें. ( म्हणजे तो निःशेष नाहींसा केला. ) ( अशी कामाची स्थिति झाल्यावर ) क्रोधाची देखील तीच स्थिति सहज झाली,

जालें ॥ ५९ ॥ मुळाचें तोडणें जैसें । होय कां शाखोद्देशें । कामु नाशलेनि नाशे । तैसा क्रोधु ॥ १०६० ॥ म्हणौनि काम वैरी । जाला जेथ ठाणोरी । तेथ सरली वारी । क्रोधाचीही ॥ ६१ ॥ आणि समर्थु आपुला खोडा । शिसें वाहवी जैसा होडा । तैसा भुंजौनि जो गाढा । परिग्रहो ॥ ६२ ॥ जो माथांचि पालाणवी । अंगा अवगुण घालवी । जीवें दांडी घेववी । ममत्वाची ॥ ६३ ॥ शिष्यशास्त्रादिविलासें । मठादिमुद्रेचेनि मिसें । घातले आहाती फांसे । निसंगा जेणें ॥ ६४ ॥ घरीं कुटुंबपणें सरे । तरी वनीं वन्य होऊनि अवतरे । नागवीयाही शरीरें । लागला आहे ॥ ६५ ॥ ऐसा दुर्जयो जो परिग्रहो । तयाचा फेडूनि ठावो । भवविजयाचा उत्साहो । भोगीतसे जो ॥ ६६ ॥ तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणाचे जे मेळावे । ते कैवल्यदेशींचे आघवे । रावो जैसे आले ॥ ६७ ॥ तेव्हां सम्यक्ज्ञानाचिया । राणिवा उगाणूनि तया । परिवारु होऊनियां । राहत अंगें ॥ ६८ ॥ प्रवृत्तीचिये राजबिदीं । अवस्था-भेदप्रमदीं । कीजत आहे प्रतिपदीं । सुखाचें लोण ॥ ६९ ॥ पुढां बोधाचिये कांबीवरी । विवेक दृश्याची मांदी सारी । योगभूमिका आरती करी । येती जैसिया ॥ १०७० ॥ तेथ ऋद्धि-सिद्धींची अनेगें । वृंदें मिळती प्रसंगें । तये पुष्पवर्षी आंगें । नाहातसे तो ॥ ७१ ॥ ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखें । स्वराज्य येतां जवळिकें । झळंबित आहे हरिखें । तिन्ही लोक ॥ ७२ ॥ तेव्हां वैरिया कां मैत्रिया । तयासि माझें म्हणावया । समानता धनंजया । उरेचिही ना ॥ ७३ ॥ हें ना भलतेणें व्याजें । तो जयातें म्हणे माझें । तें नोडवेचि कां दुजें । अद्वितीय जाला ॥ ७४ ॥ पैं आपुलिया एकी सत्ता । सर्वही कवळूनिया पंडुसुता । कही न लगती ममता । धाडिली तेणें ॥ ७५ ॥ ऐसा जिंतिलिया रिपुवर्ग । आपु मानलयां हें जग । अपैसा योगतुरंग । स्थिर जाला ॥ ७६ ॥ वैराग्याचें गाढलें । अंगीं त्राण होतें भलें । तेंही नावेक ढिलें । तेव्हां करी ॥ ७७ ॥ आणि निवटी ध्यानाचें खांडें । तें दुजें नाहींचि पुढें । म्हणूनि हातु आसुडे । वृत्तीचाही ॥ ७८ ॥ जैसें रसौषध खरें । आपुलें काज करूनि पुरें । आपणही नुरे । तैसें होतसे ॥ ७९ ॥ देखोनि ठाकिता ठावो । धांवता थिरावे पावो । तैसा ब्रह्मसामीप्यें थांवो । अभ्यासु सांडी ॥ १०८० ॥ घडतां महोदधीसी । गंगा वेगें सांडिजे जैसी । कां कामिनी कांतापासीं । स्थिर होय ॥ ८१ ॥ नाना फळातिये वेळे । केळीची वाढी मांडुळे । कां गांवापुढें वळे । मार्गु जैसा ॥ ८२ ॥ तैसा आत्मसाक्षात्कारु । होईल देखोनि गोचरु । ऐसा साधनहतियेरु । हळूचि ठेवी ॥ ८३ ॥ म्हणौनि ब्रह्मेंसीं तया । ऐक्याचा समो धनंजया । होतसे तैं उपाया । वोहटु पडे ॥ ८४ ॥ मग वैराग्याची गोंधळुक । जे ज्ञानाभ्यासाचें वार्धक्य । योगफळाचाही परिपाक । दशा जे कां ॥ ८५ ॥ ते शांति पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा । तैं ब्रह्म होआवयाजोगा । होय तो पुरुषु ॥ ८६ ॥ पुनवेहुनी चतुर्दशी । जेतुलें उणेपण शशी । कां सोळेपाऊनि जैसी । पंधरावी वानी ॥ ८७ ॥ सागरींही पाणी वेगें । संचरे तें रूप गंगे । येर

पडा. १०५९. झाडाचें मूळ तोडलें म्हणजे त्याच्या फांद्या जशा तुटतात; त्याप्रमाणें काम नाहल्यानें क्रोध नाश पावतो. १०६०. म्हणून कामरूपी शत्रु जेव्हां (साधकाशीं चाललेल्या या) लढाईत मेला, तेव्हां क्रोधाचेंही येणें-जाणें खुटलें. १०६१. आणि ज्याप्रमाणें राजा आपला खोडा ज्या गुन्हेगाराच्या पायांत घालावयाचा त्याच्याच डोक्यावर प्रतिष्ठेनें वहावयास लावतो; त्याप्रमाणें जो परिग्रह भोग देऊन बलवत्तर आहे. १०६२ जो परिग्रह आपलें खोगीर जीवाच्या मस्तकावर ठेवतो, अंगामध्यें अवगुण घालतो आणि जीवाकडून ममत्वाची काठी घ्यावयास लावतो. (म्हणजे जीवाला स्त्रीपुत्रादि विषयांचे ठिकाणीं आसक्ति धरावयास लावतो.) १०६३ ज्या परिग्रहानें शिष्यशाखादिक मिळविण्याच्या कोडेनें व मठ बांधणें, खेचरी वगैरे मुद्रा दाखविणें इत्यादि लक्षणांच्या निमित्तानें निःसंग पुरुषाला (संगाचे) पाशांत घातलें आहे; १०६४. जो परिग्रह घरामध्यें कुटुंबाच्या रूपानें जरी संपतो, तरी तो परिग्रह वनांत वन्य (झाडें, गुहा, जनावरें वगैरे वनांत असणारे पदार्थ यांच्या) रूपानें प्रगट होतो व शरीर जरी अगदीं उघडें असलें, तरी देखील त्याला जो (परिग्रह) लागलेला असतो; १०६५. असा जिंकण्यास कठीण जो परिग्रह, त्याचा ठावठिकाण नाहींसा करून संसार जिंकल्याचा तो (साधक) आनंद भोगतो. १०६६. तेव्हां अमानित्वादि ज्ञानाच्या गुणांचे सर्व समुदाय, हेच कोणी मोक्षदेशाचे जसे सर्व राजेच आले; १०६७. तेव्हां त्यांनीं यथार्थज्ञानाचें राज्य त्या साधकाला अर्पण करून, ते गुण आपण स्वतः त्याचा परिवार होऊन राहिले. १०६८. प्रवृत्तिरूपी राजमार्गांत (असणाऱ्या) तीन निरनिराळ्या (जागृतादि) अवस्थारूपी तरुण स्त्रियांनीं आपआपल्या सुखाचें पावलोपावलीं त्याच्यावरून निंबलोण उतरलें. १०६९. त्या साधकाच्यापुढें विवेक हा (चोपदाराप्रमाणें) बोधरूपी काठीनें दृश्याची गर्दी दूर करतो व योगभूमिका जशा कांहीं हातांत आरत्या घेऊन (त्याला ओंवाळावयास) येतात. १०७०. तेव्हां त्या प्रसंगीं ऋद्धिसिद्धींचे अनेक समुदाय येतात. त्या ऋद्धिसिद्धिसमुदायरूपी पुष्पवृष्टीनें तो स्वतः नहात असतो. १०७१. याप्रमाणें ब्रह्मैक्यासारखें स्वराज्य जवळ येत असतांना तो (साधक) तिन्ही लोक आनंदानें भरून टाकीत आहे. १०७२. अर्जुना, तेव्हां 'हा माझा वैरी आहे' अथवा 'हा माझा मित्र आहे' असें म्हणण्याला त्याला (त्या पुरुषाला) समसाम्यभावामुळें द्वैत उरतच नाहीं. १०७३. इतकेंच नाहीं, तर कोणत्याही निमित्तानें तो (पुरुष) ज्याला 'माझें' असें म्हणेल, एवढें देखील द्वैत, द्वैतपणानें त्याच्यापुढें येत नाहीं. असा तो अद्वितीय (द्वैतरहित) झालेला असतो. १०७४. अर्जुना, आपल्या एकछत्री सत्तेनें त्यानें सर्व (विश्व) व्यापून, आपल्या ममतेला कोठेंही चिकटूं न देतां त्यानें ममता दूर केलेली असते. १०७५. याप्रमाणें शत्रुसमुदाय जिंकल्यावर व हें सर्व विश्व आपण आहोंत अशी समजूत झाल्यावर, राजयोगरूपी घोडा आपोआप स्थिर झाला. १०७६. आणि वैराग्याचें चिलखत जें अंगांत बळकट घातलेलें होतें, तेंही तेव्हां क्षणभर ढिलें करतो. १०७७. आणि ज्या द्वैताला ध्यानरूपी तरवार मारील, तें द्वैत त्याच्यापुढें नसल्यामुळें ध्यान करणाऱ्या वृत्तीच्याही हाताला हिसडा बसतो. १०७८. ज्याप्रमाणें पाऱ्याचें रसायन आपलें काम (रोगनिवृत्ति) पुरें करून आपणही उरत नाहीं, त्याप्रमाणें होतें. १०७९. ज्या ठिकाणाला पोहोंचावयाचें तें ठिकाण पाहिल्याबरोबर ज्याप्रमाणें धांवणारे पाय स्थिर होत जातात, त्याप्रमाणें ब्रह्मप्राप्ति जवळ आली आहे असें जाणून अभ्यास बळ टाकतो. (म्हणजे अभ्यास मंदावतो.) १०८०. गंगा समुद्रास मिळाली असतां जसा गंगेचा वहाण्याचा वेग कमी होतो अथवा स्त्री आपल्या नवऱ्यापाशीं जशी स्थिर होते १०८१. अथवा केळीला फळांचा घड आला असता, जशी केळीची वाढ खुंटते अथवा गांवापुढें जसा रस्ता वळतो. (संपतो) १०८२. त्याप्रमाणें आत्मसाक्षात्कार अनुभवाला येईल असें पाहून (तो साधक) याप्रमाणें साधनरूपी हत्यार हळूच (खालीं) ठेवितो. १०८३. म्हणून अर्जुना, ब्रह्माशीं त्याचें ऐक्य होण्याची वेळ जेव्हां येते, तेव्हां साधनें कमी कमी होण्यास लागतात. १०८४. मग वैराग्याची (जी) मावळती वेळ आहे अथवा ज्ञानाभ्यासाचें जी म्हातारपण आहे व योगरूप फळाची जी परिपक्व अवस्था आहे, १०८५. हे भाग्यवंता अर्जुना, ती शांति जेव्हां संपूर्ण त्याच्या अंगीं येते, तेव्हां तो पुरुष ब्रह्म होण्याला योग्य होतो. १०८६. पौर्णिमेपेक्षां चतुर्दशीला चंद्राचे ठिकाणीं जितकें उणेपण असतें अथवा सोळा कशी (शंभर नंबरी) सोन्यापेक्षां पंधरा कशी (नव्याण्व नंबरी) सोनें जितक्या कमी कसाचें असतें; १०८७. समुद्रामध्यें वेगानें जें पाणी जात असतें, तें गंगेचें स्वरूप असून, त्याशिवाय दुसरें वेगरहित स्थिर असलेलें

निश्चळ जें उगें । तें समुद्र जैसा ॥ ८८ ॥ ब्रह्म आणि ब्रह्महोतिये । योग्यतें तैसा पाडु आहे । तेचि शांतीचेनि लवलाहें । होय तो गा ॥ ८९ ॥ पैं तेंचि होणेनवीण । प्रतीता आलें जें ब्रह्मपण । ते ब्रह्म होती जाण । योग्यता येथ ॥ १०९० ॥

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति । समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥

ते ब्रह्मभावयोग्यता । पुरुषु तो मग पंडुसुता । आत्मबोधप्रसन्नता– । पदीं बैसे ॥ ९१ ॥ जेणें निपजे रससोय । तो तापुही जैं जाय । तैं ते कां होय । प्रसन्न जैसी ॥ ९२ ॥ नाना भरतिया लगबगा । शरत्काळीं सांडिजे गंगा । कां गीत राहतां उपांगा । वोहटु पडे ॥ ९३ ॥ तैसा आत्मबोधीं उद्यमु । करितां होय जो श्रमु । तोही जेथें समु । होऊनि जाय ॥ ९४ ॥ आत्मबोधप्रशस्ती । हे तिये दशेची ख्याती । ते भोगीतसे महामती । योग्यु तो गा ॥ ९५ ॥ तेव्हां आत्मत्वें शोचावें । कांहीं पावावया कामावें । हें सरलें समभावें । भरितें तया ॥ ९६ ॥ उदया येतां गभस्ती । नाना नक्षत्रव्यक्ती । हारवीजती दीप्ती । आंगिका जेवीं ॥ ९७ ॥ तेवीं उठतिया आत्मप्रथा । हे भूतभेदव्यवस्था । मोडीत मोडीत पार्था । वास पाहे तो ॥ ९८ ॥ पाटियेवरील अक्षरें । जैसीं पुसतां येती करें । तैसीं हारपती भेदांतरें । तयाचिया दिठी ॥ ९९ ॥ तैसेनि अन्यथाज्ञानें । जिये घेपती जागरस्वप्नें । तियें दोन्ही केलीं लीनें । अव्यक्तामाजीं ॥ ११०० ॥ मग तेंही अव्यक्त । बोध वाढतां झिजत । पुरलां बोधीं समस्त । बुडोनि जाय ॥ १ ॥ जैसी भोजनाचां व्यापारीं । क्षुधा जिरती अवधारीं । तृप्तीचां अवसरीं । नाहींच होय ॥ २ ॥ नाना चालीचिया वाढी । वाट होत जाय थोडी । मग पातला ठायीं बुडी । देऊनि निमे ॥ ३ ॥ कां जागृती जंव उद्दीपे । तंव तंव निद्रा हारपे । मग जागीनालिया स्वरूपें । नाहींच होय ॥ ४ ॥ हें ना आपुलें पूर्णत्व भेटे । जेथ चंद्रासीं वाढी खुंटे । तेथ शुक्लपक्षु आटे । निःशेषु जैसा ॥ ५ ॥ तैसा बोध्यजात गिळितु । बोधु बोधें ये मज आंतु । मिसळला तेथ सावंतु । अबोधु गेला ॥ ६ ॥ तेव्हां कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचें पेंडवळें । मोडूनि भरलें जळें । आब्रह्म जैसें ॥ ७ ॥ नाना गेलिया घट मठ । आकाश ठाके एकवट । कां जळोनि काष्ठें काष्ठ । वन्हीचि होय ॥ ८ ॥ नातरी लेणियांचे ठसे । आटोनि गेलिया मुसे । नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें ॥ ९ ॥ हेंही असो चेइलया । तें स्वप्न नाहीं जालिया । मग आपणचि आपणयां । उरिजे जैसें ॥१११०॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं । हे चौथी भक्ति पाहीं । माझी तो लाहे ॥ ११ ॥ येर आर्तु जिज्ञासु अर्थार्थी । हे भजती जिये पंथीं । ते तिन्ही पावोनि चौथी । म्हणिपत आहे ॥ १२ ॥ एऱ्हवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती । पैं माझिये सहजस्थिती । भक्ति नांव ॥ १३ ॥ जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि । सर्वही सर्वी भजौनि । बुझावीतसे ॥ १४ ॥ जो जेथ जैसें पाहों बैसे ।

पाणी तेंच जसें समुद्राचें स्वरूप असतें १०८८. ब्रह्म आणि ब्रह्म होणारा, यांच्या योग्यतेमध्यें तसें अंतर आहे व अर्जुना, शांतीच्या योगानें तो ( पुरुष ) तेंच ब्रह्म त्वरित होतो. १०८९. परंतु तेंच ब्रह्म झाल्याशिवाय जें ब्रह्मपण अनुभवास आलेलें असतें, ती ब्रह्म होण्याची योग्यता आहे असें तूं समज. १०९०.

ब्रह्मभावयोग्यता प्राप्त झालेला तो पुरुष आत्मबोधप्रशस्तिपदावर आरूढ होतो. ते वेळीं तो शोक करीत नाहीं व इच्छाही करीत नाहीं. सर्व भूतांच्या ठिकाणीं समत्व प्राप्त झालेला तो पुरुष माझी श्रेष्ठ (चौथी) भक्ति प्राप्त करून घेतो. ५४.

अर्जुना, मग तो ब्रह्म होण्याच्या योग्यतेस पावलेला पुरुष, आत्मज्ञानामुळें येणाऱ्या प्रसन्नतेच्या पदावर बसतो. १०९१. ज्या उष्णतेच्या योगानें स्वयंपाक होतो, ती उष्णता देखील जेव्हां जाते, तेव्हां तो स्वयंपाक जसा मनास आल्हादकारक असतो. १०९२. अथवा शरद् ऋतूंत भरतीची लगबग गंगेला सोडते, अथवा गाणें थांबलें असतां ( मृदंग, तंबोरा वगैरे ) गाण्याचीं उपसाधनें जशीं मागाहून बंद पडतात. १०९३. त्याप्रमाणें आत्मबोधाच्या प्राप्तीकरितां वैराग्यादि साधनांची खटपट करीत असतांना जे श्रम होतात, ते श्रमसुद्धां जेथें शांत होऊन जातात, १०९४. 'आत्मबोध प्रसन्नता' या नांवानें त्या अवस्थेची प्रसिद्धि आहे. हे अतिबुद्धिमान् अर्जुना, तो योग्य पुरुष ती अवस्था भोगतो. १०९५. त्या वेळीं अमुक एक वस्तु माझी आहे म्हणून तिच्याकरितां शोक करावा अथवा कांहीं प्राप्त होण्याकरितां इच्छा करावी, हें त्या पुरुषाला ऐक्यभावाच्या भरतीमुळें संपलें. १०९६. सूर्योदय झाल्याबरोबर, स्पष्टपणें चमकणाऱ्या अनेक नक्षत्रांना, त्यांच्या अंगच्या तेजासह, जसा सूर्य लोपून टाकतो. १०९७. त्याप्रमाणें आत्मानुभवाचा उदय होतांक्षणींच ही प्राणिमात्रांच्या भेदाची रचना करीत करीत, तो ( जिकडे तिकडे ) आपल्या स्वरूपाला पहात जातो, १०९८. पाटीवरील अक्षरें जशीं हातानें पुसतां येतात त्याप्रमाणें त्याच्या दृष्टीनें (दृष्टीपुढील) अनेक भेद नाहींसे होतात. १०९९. त्याप्रमाणें अन्यथाज्ञानाकडून ज्या जागृति व स्वप्न ह्या अवस्था दाखविल्या जातात, त्या दोन्ही अवस्था अव्यक्तामध्यें ( अज्ञानामध्यें ) लीन होतात. ११००. मग तेंही अज्ञान, जसजसा बोध वाढत जाईल, तसतसें नाहींसें होतें व पूर्णबोधांत तें अज्ञान संपूर्ण नाहींसें होतें. ११०१. ऐक, ज्याप्रमाणें भोजन करीत असतांना ( प्रत्येक घांसाबरोबर ) भूक कमी कमी होत जाते व मग तृप्तीच्या वेळीं ती अगदींच नाहींशी होते. ११०२. अथवा चालण्याचा वेग जसजसा वाढेल, तसतशी वाट कमी होत होत, मग मुक्कामाला पोहोंचल्यावर, ती वाट बुडी देऊन नाहींशी होते. (संपते) ११०३. अथवा जसा जागृतीचा उदय होईल, तसतशी झोंप नाहींशी होते व मग पूर्ण जागें झाल्यावर, झोंप स्वरूपानें ( पूर्णपणें ) नाहींशी होते. ११०४. हे दृष्टांत राहूं दे, पौर्णिमेचे दिवशीं चंद्राला आपलें पूर्णत्व प्राप्त होतें व जेव्हां चंद्राचें वाढणें थांबतें, तेव्हां जसा शुक्लपक्ष निःशेष नाहींसा होतो; ११०५. त्याप्रमाणें पदार्थमात्र नाहींसे करणारें जें ज्ञान, त्या ज्ञानानें तो माझ्या स्वरूपीं येतो व माझ्या स्वरूपांत तो ऐक्याला पावला असतां, सांचत अज्ञान नाहींसें होतें. ११०६. तेव्हां कल्पांताच्या वेळेला नदी व समुद्र यांची मर्यादा मोडून ज्याप्रमाणें ब्रह्मलोकापर्यंत सर्व जग पाण्यानें भरून जातें; ११०७. अथवा घट, मठ नाहींसे झाल्यावर, जसें एकटें एकसारखें आकाश राहातें अथवा काष्ठाकाष्ठांच्या घर्षणानें काष्ठ जळून, जसें तें काष्ठ अग्नि होऊनच रहातें. ११०८. अथवा मुशीमध्यें अलंकाराचे आकार आटून गेल्यावर सोन्यांतील नांव, रूप वगैरे भेदाचे प्रकार जसे नाहींसे होतात व सोनें मात्र जसें रहातें. ११०९. हा दृष्टांतही राहूं दे. पूर्ण जागें होऊन स्वप्न नाहींसें झाल्यावर आपणच आपल्याला जसे ( एकटे ) उरतों. १११०. त्याप्रमाणें एक माझ्यावांचून त्याला त्याच्याहीसकट दुसरें कांहींच नसतें, अर्जुना, पहा, यासच चौथी भक्ति असें म्हणतात. ही चौथी भक्ति त्याला प्राप्त होते. ११११. इतर जे आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी भक्त हे मला ज्या मार्गांनीं भजतात, ते भक्तीचे तीन मार्ग पाहून या भक्तीस मी चौथी भक्ति म्हणत आहे. १११२. सहज विचार करून पाहिलें तर, भक्ति तिसरी नाहीं, चौथी नाहीं, पहिली नाहीं, शेवटली नाहीं. तर माझ्या सहजस्वरूपस्थितीला भक्ति हें नांव आहे. १११३. जी सहजस्वरूपस्थिति मद्विषयक अज्ञानाचें प्रकाशन करून, मला विपरीतपणानें भासवून, सर्वांना सर्व ठिकाणीं भक्ति करावयास लावून, सर्वांची समजूत घालते, १११४. जो ज्या ठिकाणीं जशी कल्पना करतो, त्याला त्या ठिकाणीं

तया तेथ तैसेंचि असे । हें उजियेडें कां दिसे । अखंडें जेणें ॥ १५ ॥ स्वप्नाचें दिसणें न दिसणें । जैसें आपलेनि असलेपणें । विश्वाचें आहे नाहीं जेणें । प्रकाशे तैसें ॥ १६ ॥ ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा । तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ॥ १७ ॥ म्हणौनि आर्ताचां ठायीं । हे आर्ति होऊनि पाहीं । अपेक्षणीय जें कांहीं । तें मीचि केला ॥ १८ ॥ जिज्ञासुपुढां वीरेशा । हेचि होऊनि जिज्ञासा । मी कां जिज्ञास्यु ऐसा । दाखविला ॥ १९ ॥ हेचि होऊनि अर्थना । मीचि माझां अर्थी अर्जुना । करूनि अर्थाभिधाना । आणी मातें ॥ ११२० ॥ एवं घेऊनि अज्ञानातें । माझी भक्ति जे हे वर्ते । ते दावी मज द्रष्टयातें । दृश्य करूनि ॥ २१ ॥ येथें मुखचि दिसे मुखें । या बोला कांहीं न चुके । परी दुजेपण हें लटिकें । आरिसा करी ॥ २२ ॥ दिठी चंद्राचि घे साचें । परी येतुलें हें तिमिराचें । जे एकाचि असे तयाचे । दोनी दावी ॥ २३ ॥ तैसा सर्वत्र मीचि मियां । घेपतसें भक्ति इया । परी दृश्यत्व हें वायां । अज्ञानवशें ॥ २४ ॥ तें अज्ञान आतां फिटलें । माझें द्रष्टृत्व मज भेटलें । निजबिंबीं एकवटलें । प्रतिबिंब जैसें ॥ २५ ॥ पैं जेव्हांही असे किडाळ । तेव्हांही सोनेंचि अढळ । परी तें गेलिया केवळ । उरे जैसें ॥ २६ ॥ हां गा पूर्णिमेआधीं कायी । चंद्रु सावयवुचि नाहीं । परी तिये दिवशीं भेटे पाहीं । पूर्णता तया ॥ २७ ॥ तैसा मीचि ज्ञानद्वारें । दिसें परी हस्तांतरें । मग द्रष्टृत्वीं तें सरे । मियांचि मी लाभें ॥ २८ ॥ म्हणौनि दृश्यपथा- । अतीतु माझा पार्था । भक्तियोगु चवथा । म्हणितला गा ॥ २९ ॥

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः । ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥

या ज्ञानभक्ति सहज । भक्तु एकवटला मज । तो मीचि केवळ हें तुज । श्रुतही आहे ॥११३०॥ जे उभऊनियां भुजा । ज्ञानिया आत्मा माझा । हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ॥ ३१ ॥ ते हे कल्पादीं भक्ति मियां । भागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणौनि धनंजया । उपदेशिली ॥ ३२ ॥ ज्ञानी इयेतें स्वसंविति । शैव म्हणती शक्ति । आम्ही परमभक्ति । आपुली म्हणों ॥ ३३ ॥ हे मज मिळतिये वेळे । तयां क्रमयोगियां फळे । मग समस्तही निखळें । मियांचि भरे ॥ ३४ ॥ तेथ वैराग्यविवेकेंसीं । आटे बंध मोक्षेंसीं । वृत्ती तये आवृत्तीसीं । बुडोनि जाय ॥ ३५ ॥ घेऊनि ऐलपणातें । परत्व हारपे जेथें । गिळूनि चाऱ्ही भूतें । आकाश जैसें ॥ ३६ ॥ तया परी थडथांद । साध्यसाधनातीत शुद्ध । तें मी होऊनि एकवद । भोगी तो मातें ॥ ३७ ॥ घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाडु तया भोगा । अवधारिजो ॥ ३८ ॥ का आरिसयासि आरिसा । उटूनि दाविलिया जैसा । देखणा अतिशयो तैसा । भोगणां तिये ॥ ३९ ॥ चेइलिया स्वप्न नाशे । आपलें ऐक्यचि दिसे । तें दुजेनवीण जैसें । भोगिजे का ॥ ११४० ॥ हें असो दर्पणु नेलिया । तो मुखबोधुही गेलिया । देखलेपण एकलेया । आस्वादिजे जेवीं ॥ ४१ ॥ तोचि जाल्या भोगु तयाचा । न घडे हा भावो

त्याच्या कल्पनेप्रमाणें जें भासतें, तें माझ्या ( सहज ) अखंड चित्प्रकाशानें दिसतें. ११२५. ज्याप्रमाणें स्वप्नाचें दिसणें, अथवा न दिसणें, हें आपल्या ( पहाणाराच्या ) अस्तित्वावर अवलंबून आहे; त्याप्रमाणें विश्वाचें असणें व नसणें, ज्याच्या ( ज्या प्रकाशाच्या ) योगानें प्रकाशतें. ११२६. हे कपिध्वजा अर्जुना, असा जो माझा सहजप्रकाश, तो भक्ति या रीतीनें बोलला जातो. ११२७. म्हणून आर्तांच्या ठिकाणीं ही भक्ति उत्कट इच्छेच्या रूपानें बनून, त्या इच्छेचा जो कांहीं विषय आहे, तो मलाच बनविला आहे. ११२८. अर्जुना, जाणण्याची इच्छा करणाऱ्याच्या पुढें ही भक्तीच जिज्ञासा होऊन, मी जिज्ञास्य ( जाणण्याची इच्छेचा विषय ) असा दाखविला गेलों. ११२९. हीच भक्ति अर्थप्राप्तीची इच्छा होऊन, मीच माझी याचना करून मला अर्थ या नांवाला आणते. ११२०. याप्रमाणें अज्ञानाचा अंगीकार करून ही माझी भक्ति व्यवहार करूं लागली कीं, ती भक्ति मला द्रष्ट्याला दृश्य करून दाखविते. ११२१. आरशांत पाहिलें असतां मुखाच्या योगानें ( मुखाला ) मुखच दिसतें, या म्हणण्यांत कांहीं चूक नाहीं. परंतु प्रतिबिंबरूपानें मिथ्या भासणारा जो दुसरेपणा तो आरसा तयार करतो. ११२२. दृष्टि खरोखर चंद्रालाच पाहाते, परंतु तिमिर एवढें मात्र करतें कीं, एकच असलेल्या चंद्राला दोन करून दाखवतें. ११२३. त्याप्रमाणें सर्वत्र मीच माझ्याकडून भक्तीच्या योगानें आकलन केला जातों; परंतु दृश्यत्व हें खोटें आहे व तें अज्ञानाला वश झाल्यामुळें आहे. ११२४. तें अज्ञान आतां नाहींसें झालें व जसें प्रतिबिंब आपल्या बिंबांत एक व्हावें, तसें माझें द्रष्टत्व मला भेटलें. ११२५ जेव्हां हिणकस धातु सोन्यांत मिसळलेली असते, तेव्हांही निश्चयानें तें सोनेंच आहे. परंतु ती ( हिणकस धातु ) निघाली असतां जसें केवळ सोनें उरतें. ११२६. अरे अर्जुना, पौर्णिमेच्या आधीं चंद्र सावयवच नाहीं काय ? परंतु ( पौर्णिमेच्या दिवशीं ) त्याला ( प्रकाशाच्या दृष्टीनें ) पूर्णता भेटते. ११२७. तसा मीच अन्यथा ज्ञानाच्या द्वारानें दिसतों, परंतु अप्रत्यक्ष अन्यरूपानें ( दृश्यरूपानें ) दिसतों. मग ( ज्ञानानें ) दृश्याचा निरास होऊन भिन्नरूपानें दिसणारें दृश्य, एकद्रष्टेपणामध्यें नाहींसें होतें आणि मलाच मी प्राप्त होतों. ११२८. अर्जुना, म्हणून माझा चौथा भक्तियोग, हा दृश्यरूप मार्गांच्या पलीकडला आहे, असें मीं म्हटलें. ११२९.

या सहजज्ञानभक्तीच्या योगानें मी कोण आहें व केवढा आहें, हें तो तत्त्वतः जाणतो. तत्त्वतः जाणलें म्हणजे त्यानंतर तो माझ्यामध्यें प्रवेश करतो. ५५.

या ज्ञानभक्तीनें जो भक्त माझ्याशीं सहज ऐक्याला पावला आहे, तो भक्त केवळ मीच आहे, हें तूं ऐकलेंही आहेस. ११३०. कारण कीं, मागें सातव्या अध्यायांत ज्ञानी माझा आत्मा आहे हें मी, अर्जुना, हात वर करून बोललों आहे. ११३१. अर्जुना, ती ही भक्ति उत्तम म्हणून मी कल्पाच्या आरंभीं भागवताच्या द्वारें ब्रह्मदेवाला सांगितली. ११३२. ज्ञानी हिला ( चौथ्या भक्तीला ) 'स्वसंवित्ती' म्हणतात. शैव हिला 'शक्ति' म्हणतात, आणि आम्ही आपली 'श्रेष्ठभक्ति' म्हणतों. ११३३. ही भक्ति त्या मागें सांगितलेल्या क्रमयोग्याला माझ्याशीं ऐक्याला पावण्याच्या वेळीं फलद्रूप होते. मग त्याला हें सर्व विश्व केवळ माझ्याच स्वरूपानें भरून जातें. ११३४ तेव्हां वैराग्य विवेकासह नाहींसें होतें, बंध मोक्षासह आटतो व वृत्ति आपल्या वारंवार चिंतनासह बुडून जाते. ११३५. (लयाच्या वेळीं) आकाश जसें चारी भूतें गिळून आपणच असतें; त्याप्रमाणें अलीकडीलपणासह पलीकडले-पणा जेथें नाहींसा होतो. ११३६. त्याप्रमाणें अलीकडील पलीकडील कांठ अगर मध्यभाग आणि साध्यसाधन, यांच्या पलीकडील शुद्ध जो मी, त्या माझें स्वरूप तो क्रमयोगी होऊन मला ऐक्यानें भोगतो. ११३७. समुद्राच्या अंगाला मिळून गंगा जशी समुद्रावर स्पष्ट दिसून येते, तोच प्रकार त्याच्या भोगाचा आहे. ऐक. ११३८. अथवा ज्याप्रमाणें एका आरशाला दुसरा आरसा स्वच्छ करून दाखवला असतां, तेथें द्रष्टेपणाचा भर असतो ( म्हणजे पहाणारा व पाहिलें जाणारें, हे दोघे द्रष्टेच असतात. ) तसाच त्या भोगण्यांत द्रष्टेपणाचाच भर असतो. ११३९. जागें झाल्यामुळें स्वप्न नाश पावतें व आपला एकपणाच आपल्या अनुभवास येतो. तो जागृतीचा एकपणा जसा द्वैताशिवाय अनुभवला जातो. ११४०. हें राहूं दे. आरशांत पहाणाऱ्यापुढून आरसा काढून नेला असतां व प्रतिबिंबाचें दिसणेंही गेलें असतां, ज्याप्रमाणें आपलें मुखसौंदर्य आपल्या एकट्याकडून भोगिलें जातें. ११४१. तोच झाल्यावर त्याचा भोग घडत नाहीं, असा ज्यांचा अभिप्राय असेल, त्यांनीं शब्दांनीं शब्दांचा उच्चार कसा केला जातो

जयांचा। तिहीं बोलें केवीं बोलाचा। उच्चारु कीजे ॥ ४२ ॥ तयांचां नेणों गांवीं। रवी प्रकाशी हन दिवी। कीं व्योमालागीं मांडवी। उभिली तिहीं ॥ ४३ ॥ हां गा राजन्यत्व नव्हतां आंगीं। रावो रायपण काय भोगी। का आंधारु हन आलिंगी। दिनकरातें ॥ ४४ ॥ आणि आकाश जें नव्हें। तया आकाश काय जाणवे। रत्नाचां रूपीं मिरवे। गुंजांचें लेणें ॥ ४५ ॥ म्हणौनि मी होणें नाहीं। तया मीचि आहें केहीं। मग भजेल हें कायी। बोलों कीर ॥ ४६ ॥ यालागीं तो क्रमयोगी। मी जालाचि मातें भोगी। तारुण्य कां तरुणांगीं। जियापरी ॥ ४७ ॥ तरंग सर्वांगीं तोय चुंबी। प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं। नाना अवकाश नभीं। लुंठतु जैसा ॥४८॥ तैसा रूप होऊनि माझें। मातें क्रियावीण तो भजे। अलंकारु का सहजें। सोनयातें जेवीं ॥ ४९ ॥ का चंदनाची दुती जैसी। चंदनीं भजे अपैसी। का अकृत्रिम शशीं। चंद्रिका ते ॥११५०॥ तैसी क्रिया कीर न साहे। तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे। हें अनुभवाचिजोगें नव्हे। बोलाऐसें ॥ ५१ ॥ तेव्हां पूर्वसंस्कारछंदें। जें कांहीं तो अनुवादे। तेणें आळविलेनि वो दें। बोलतां मीचि ॥ ५२ ॥ बोलतया बोलताचि भेटे। तेथें बोलिलें हें न घटे। तें मौन तंव गोमटें। स्तवन माझें ॥ ५३ ॥ म्हणौनि तया बोलतां। बोली बोलतां मी भेटतां। मौन होय तेणें तत्त्वतां। स्तवी तो मातें ॥ ५४ ॥ तैसेंचि बुद्धी का दिठी। जें तो देखों जाय किरीटी। तें देखणें दृश्य लोटी। देखतेंचि दावी ॥ ५५ ॥ आरिसया आधीं जैसें। देखतेंचि मुख दिसे। तयाचें देखणें तैसें। मेळवी द्रष्टें ॥ ५६ ॥ दृश्य जाउनियां द्रष्टें। द्रष्टयासीचि जें भेटे। तें एकलेपणें न घटे। द्रष्टेपणही ॥५७॥ तेथ स्वप्नींचिया प्रिया। चेवोनि झोंबों गेलिया। ठायिजे दोन्ही न होनियां। आपणाचि जैसें ॥ ५८ ॥ का दोहीं काष्ठांचिये घृष्टी-। माजीं वान्हि एक उठी। तो दोन्ही हे भाष आटी। आपणाचि होय ॥ ५९ ॥ नाना प्रतिबिंब हातीं। घेऊं गेलिया गभस्ती। बिंबताही असती। जाय जैसी ॥ ११६० ॥ तैसा मी होऊनि देखतें। तो घेऊं जाय दृश्यातें। तेथ दृश्य ने तिथें। द्रष्टृत्वेंसीं ॥ ६१ ॥ रवि आंधारु प्रकाशिता। नुरेचि जेवीं प्रकाश्यता। तेवीं दृश्यीं नाहीं द्रष्टृता। मी जालिया ॥ ६२ ॥ मग देखिजे ना न देखिजे। ऐसी जे दशा निपजे। ते तें दर्शन माझें। साचोकारें ॥ ६३ ॥ तें भलतयाही किरीटी। पदार्थाचिया भेटी। द्रष्टृदृश्यातीता दृष्टी। भोगी तो सदा ॥ ६४ ॥ आणि आकाश हें आकाशें। दाटलें न ढळे जैसें। मिया आत्मेन आपणपें तैसें। जालें तया ॥ ६५ ॥ कल्पांतीं उदक उदकें। रुंधिलिया वाहों ठाके। तैसा आत्मेनि मियां येकें। कोंदला तो ॥ ६६ ॥ पावो आपणपयां

( म्हणजे शब्दांनींच शब्दांची स्तुति अथवा निंदा कशी केली जाते, हें उदाहरण ध्यानांत घ्यावें. ) ११४२. ( ऐक्यांत भोग घडत नाहीं, असें म्हणणारे ) त्यांच्या गांवांत दिव्याकडून सूर्य प्रकाशाला जात असेल तर नकळे ! अथवा त्यांनीं आकाशाला ( आंत घेण्याकरितां ) मांडव उभारला आहे कीं काय कळत नाहीं. ११४३. राजेपणा अंगीं नसतां, राजा आपला राजेपणा भोगूं शकेल काय ? अथवा अंधार आपण, अंधकाररूप राहून, सूर्याला आलिंगन देऊं शकेल काय ? ११४४. आणि जें आकाश नाहीं, त्याला आकाश काय आहे, हें कसें कळेल ? अथवा गुंजांचा अलंकार ( रत्नांच्या अलंकारासारखा ) रत्नाच्या अलंकारांत शोभेल काय ? ११४५. म्हणून जो मी ( मद्रूप ) झाला नाहीं, त्याला मीच कोठें आहे ? मग तो माझी भक्ति करील, हें खरोखर बोलावयासच नको. ११४६. एवढ्याकरितां ज्याप्रमाणें तरुण स्त्रीच्या शरीरांत तारुण्य असतें ( ती जसा तारुण्याचा उपभोग घेते ) तसा तो क्रमयोगी मी (मद्रूप) होऊन मला भोगतो. ११४७. लाट जशी सर्वांगांनीं पाण्याचाच उपभोग घेते, अथवा प्रभा बिंबाशीं एक होऊन बिंबाच्या रूपानें शोभते, अथवा पोकळी जशी आकाशांत आकाश होऊन लोळते. ११४८. जसा दागिना स्वतः ( सोनें असून ) सोन्याला भजतो, त्याप्रमाणें तो क्रमयोगी मद्रूप होऊन, क्रियेशिवाय मला भजतो. ( म्हणजे दागिन्यानें सोन्याशीं अभिन्न असणें, हेंच त्याचें सोन्यास भजणें; तसें जीवानें माझ्याशीं अभिन्न होऊन असणें, हेंच त्याचें मला भजणें. ) ११४९. अथवा चंदनाचा सुवास जसा चंदनाला स्वभावतः भजतो अथवा चांदणें जसें स्वभावतः चंद्राला भजतें. ११५०. त्याप्रमाणें ( अद्वैतांत ) क्रिया करणें खरोखर जरी सोसत नाहीं, तरी अद्वैतांत भक्ति आहे, ही गोष्ट अनुभवानेंच पटण्यासारखी आहे, बोलण्यासारखी नाहीं. ११५१. तेव्हां पूर्वसंस्कारांच्या अनुरोधानें तो जें कांहीं बोलेल, त्या विनवणीनें ओ देऊन बोलणारा मीच होतों. ११५२. बोलणाऱ्याला जेव्हां बोलणाराच स्वतः भेटतो, तेव्हा ' बोलला ' हा व्यवहार घडत नाहीं, तें मौन म्हणजेच माझी उत्तम स्तुति होय. ११५३. म्हणून तो बोलत असतांना त्याच्या बोलण्यांत बोलणारा जो मी, तो भेटत असल्याकारणानें तें त्याचें बोलणें मौन होतें. त्या मौनानें खरोखर तो माझें स्तवन करतो ११५४. त्याचप्रमाणें अर्जुना, बुद्धीनें अथवा डोळ्यानें तो जें पाहावयास जातो, त्याचें तें पाहणें, दृश्याला एकीकडे सारून, पहाणारासच दाखवितें. ११५५. आरसा पुढें येण्याच्या अगोदर असलेलें आपलें तोंड, हें पहाणारें असून, तेंच प्रतिबिंबरूपानें आपल्यास पहातें. त्याप्रमाणें त्याच्या दर्शनानें द्रष्ट्याच्याच दर्शनाचा योग येतो. ११५६. जेव्हां दृश्य जाऊन ( म्हणजे दृश्यकल्पनेचा निरास होऊन ) द्रष्टा द्रष्ट्यालाच भेटतो, तेव्हां एकटा द्रष्टाच राहिल्यामुळें, आतां त्याच्या ठिकाणीं द्रष्टेपणाही घडत नाहीं. ११५७. तेव्हां ( एखादा पुरुष ) स्वप्नांत दिसलेल्या स्त्रीला जागें होऊन आलिंगन देण्यास गेला असतां स्वप्नांतील नवरा व बायको हे दोन्हीं नाहींसे होऊन, जसा केवळ आपण मात्र रहातो. ११५८ अथवा दोन लांकडांच्या घासण्यांत एक अग्नि उत्पन्न होतो, तो ( अग्नि ) दोन लांकडें ही भाषा नाहींशीं करून, जसा आपणच एकटा राहतो. ११५९. सूर्य आपलें प्रतिबिंब हातांत घेऊं गेला असतां, प्रतिबिंब तर जातेंच, पण प्रतिबिंबसापेक्ष असणारा बिंबाचा जो बिंबपणा तोही जसा जातो. ११६०. त्याप्रमाणें द्रष्टा जो मी, तो मी होऊन तो पुरुष जव्हां दृश्याला घेऊं जातो ( पहातो ), तेव्हां दृश्य तर नाहींसें होतेंच, परंतु दृश्यसापेक्ष असलेला द्रष्टेपणाही असलेल्या दृश्यासह नाहींसा होतो. ११६१. सूर्य अंधाराला प्रकाशूं लागला तर, ज्याप्रमाणें प्रकाश्य अंधार तर उरत नाहींच, ( पण सूर्याचा प्रकाशितेपणाही उरत नाहीं. ) त्याप्रमाणें दृश्याच्या ठिकाणीं मी झालों असतां ( दृश्य मद्रूप झालें असतां दृश्यसापेक्ष ) द्रष्टेपणा उरत नाहीं. ११६२. मग पाहाणेंही नाहीं व न पाहाणेंही नाहीं, अशी अवस्था जी उत्पन्न होते, तें माझें खरें दर्शन होय. ११६३. अर्जुना, वाटेल त्या पदार्थाच्या भेटींत, तो क्रमयोगी पुरुष, द्रष्टा व दृश्य या सापेक्षभावरहित असलेल्या ( स्वरूपाला ) आपल्या दृष्टीनें सदा अनुभवितो. ११६४. आणि आकाशानेंच हें आकाश अगदीं दाट भरून गेलें असल्यामुळें जसें तें ( इकडे तिकडे ) मुळींच हालत नाहीं, त्याप्रमाणें मी जो आत्मा, त्या माझ्यामुळें त्याला आपल्या ठिकाणीं तसें झालें. ( त्याच्याकडे सर्व विश्व आत्मरूप झाल्यामुळें त्याला येणें-जाणें राहिलें नाहीं. ) ११६५. कल्पाच्या शेवटीं पाणी पाण्यानें अडविल्यामुळें तें जसें वाहण्याचें थांबतें, त्याप्रमाणें मी जो एक आत्मा, त्यानें तो सर्वत्र पूर्ण भरला. ११६६. पाय आपण आपल्यावर कसा चढेल ? अग्नि आपल्या

वळघे । केवीं वान्हि आपणपयां लागे । आपणपां पाणी रिघे । स्नाना कैसें ॥ ६७ ॥ म्हणोनि सर्व मी जालेपणें । ठेलें तया येणेंजाणें । हेंचि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ६८ ॥ पैं जळावरील तरंगु । जरी धांविन्नला सवेगु । तरी नाहीं भूमिभागु । क्रमिला जैसा ॥ ६९ ॥ जें सांडावें कां मांडावें । जें चालणें जेणें चालावें । तें तोयचि एक आघवें । म्हणोनियां ॥११७०॥ गेलियाही भलतेउता । उदकपणें पांडुसुता । तरंगाची एकात्मता । न मोडेचि जेवीं ॥ ७१ ॥ तैसा मीपणें हा लोटला । तो आघवेंयाचि मज आला । या यात्रा होय भला । कापडी माझा ॥ ७२ ॥ आणि शरीरस्वभाववशें । कांहीं येक करूं जरी बैसे । तरी मीचि तो तेणें मिषें । भेटें तया ॥ ७३ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । हें जाऊनि पांडुसुता । मीच आत्मेनि मज पाहतां । मीचि होय ॥ ७४ ॥ पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलिया होय न पाहणें । सोनें झांकिलिया सुवर्णें । न झांके जेवीं ॥ ७५ ॥ दीपातें दीपें प्रकाशिजे । तें न प्रकाशणेंचि निपजे । तैसें कर्म मियां कीजे । तें करणें कैंचें ॥ ७६ ॥ कर्मही करिताचि आहे । जैं करावें हें भाष जाये । तैं न करणेंचि होये । तयाचें केलें ॥ ७७ ॥ क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें । तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ॥ ७८ ॥ म्हणौनि करीतयाही वोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा । निफजे तिया महापूजा । पूजी तो मातें ॥ ७९ ॥ एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ॥ ११८० ॥ तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा । तो असे तेचि कपिध्वजा । समाधी माझी ॥ ८१ ॥ जैसें कनकेंसीं कांकणें । असिजे अनन्यपणें । तो भक्तियोगें येणें । मजसीं तैसा ॥ ८२ ॥ उदकीं कल्लोळु । कापुरीं परिमळु । रत्नीं उजाळु । अनन्यु जैसा ॥ ८३ ॥ किंबहुना तंतूसीं पटु । कां मृत्तिकेसी घटु । तैसा तो एकवटु । मजसीं माझा ॥ ८४ ॥ इया अनन्यासिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं । मज आपणपेंया सुमती । द्रष्टयातें जाणें ॥ ८५ ॥ तिन्ही अवस्थांचेनि द्वारें । उपाध्युपहिताकारें । भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥ ८६ ॥ तें हें आघवेंचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा । अनुभवाचा सुभटा । धेंडा तो नाचे ॥ ८७ ॥ रज्जु जालिया गोचरु । आभासतां तो व्याळाकारु । रज्जुचि ऐसा निर्धारु । होय जेवीं ॥ ८८ ॥ भांगारापरतें कांहीं । लेणें गुंजहीभरी नाहीं । हें आटुनियां ठायीं । कीजे जैसें ॥ ८९ ॥ उदका येकापरतें । तरंग नाहींचि हें निरुतें । जाणोनि तया आकारातें । न घेपे जेवीं ॥ ११९० ॥ नातरी स्वप्नविकारां समस्तां । चेऊनियां उमाणें घेतां । तो आपणयापरौता । न दिसे जैसा ॥ ९१ ॥ तैसें जें कांहीं आथी नाथी । येणें होय ज्ञेयस्फूर्ती । तें ज्ञाताचि मी हे प्रतीती । होऊनि भोगी ॥ ९२ ॥ जाणे अजु मी अजरु । अक्षयो मी अक्षरु । अपूर्व मी अपारु । आनंदु मी ॥ ९३ ॥ अचळु मी अच्युतु । अनंतु मी अद्वैतु । आद्यु मी अव्यक्तु । व्यक्तुही मी ॥ ९४ ॥ ईश्य मी ईश्वरु ।

स्वतःलाच कसा लागेल ? पाणी हेंच स्नान करण्याकरितां पाण्यांत कसें प्रवेश करील ? ११६७. म्हणून अर्जुना, सर्व मी झाल्याकारणानें त्याचें येणेंजाणें थांबतें. मी जो एकाकी (द्वैतशून्य), त्या माझी, हीच यात्रा करणें आहे. ११६८. पाण्यावरील लाट जरी वेगानें धांवली, तरी ज्याप्रमाणें ती लाट पाण्याला सोडून जमिनीचा भाग चालून गेली नाहीं. ११६९. त्या लाटेनें जें ठिकाण टाकावें अथवा ज्या ठिकाणीं जावें, जें चालणें व ज्याच्या योगानें चालावयाचें, तें सर्व एक पाणीच आहे म्हणून ११७०. अर्जुना, ती लाट वाटेल तिकडे गेली असतांही पाणीपणामुळें जी लाटेची पाण्याशीं एकरूपता असते, ती ज्याप्रमाणें खात्रीनें बिघडत नाहीं. ११७१. त्याप्रमाणें हा ( क्रमयोगी ) मी (परमात्म) पणानें पूर्ण भरलेला असतो; तो सर्व बाजूंनीं मला प्राप्त झाला (असें होणें, हीच माझी यात्रा होय.) या यात्रेनें तो माझा चांगल्या प्रकारानें यात्रेकरू होतो. ११७२. आणि शरीरस्वभाववशात् तो कांहीं एक जरी करावयास बसला, तरी त्या निमित्तानें मीच त्याला भेटतों. ११७३. अर्जुना, तेव्हां कर्म आणि कर्ता हे जाऊन, मी जो आत्मा, त्या माझ्याशीं ऐक्याला पावून, मला पाहिलें असतां मीच होतों. ११७४. आरशानें आरशाला पाहिलें असतां, तें न पाहाणेंच होतें अथवा ज्याप्रमाणें सोन्यानें सोनें झांकलें असतां, तें न झांकणेंच होतें. ११७५. दिव्यानें दिव्याला प्रकाशलें असतां, तें न प्रकाशणेंच उत्पन्न होतें; त्याप्रमाणें मद्रूप होऊन कर्म करणें, तें करणें कोठचें ? ११७६. तो क्रमयोगी कर्म देखील करीतच असतो. परंतु अमुक एक कर्म मला कर्तव्य आहे, ही गोष्ट जेव्हां जाते (जेव्हां कर्तृत्व-अभिमानरहित कर्म होतें) तेव्हां तें त्याचें करणें न करणेंच होतें. (न केल्याप्रमाणेंच आहे,) ११७७. कर्ममात्र मी झाल्यामुळें (मद्रूप झाल्यामुळें) जें कांहींच न करणें होतें; त्याचेंच नांव माझें मर्माचें पूजन होय. ११७८. म्हणून चांगल्या रीतीनें कर्म करीत असतांही, अर्जुना, तें त्याचें न करणेंच उत्पन्न होतें. त्या महापूजेनें (तो) माझी पूजा करतो. ११७९. याप्रमाणें तो बोलेल ती माझी स्तुति आहे, तो पाहील तें माझें दर्शन आहे, तो चालेल तेंच, मी जो अद्वितीय, त्या माझ्याकडे त्याचें येणें (माझी यात्रा करणें) आहे. ११८०. अर्जुना, तो जें कर्म करील, ती माझी पूजा होय; तो जी कल्पना करील तो माझा जप आहे, आणि तो ज्या स्थितींत असेल, ती माझी समाधिअवस्था होय. ११८१. ज्याप्रमाणें सोन्याचें कांकण सोन्याशीं नेहमीं अभिन्न असतें, त्याप्रमाणें तो माझ्याशीं या भक्तियोगानें नेहमीं अभिन्न असतो. ११८२. पाण्यांत जशी लाट, कापुरांत जसा सुवास अथवा रत्नांत जसें तेज अभिन्न असतें. ११८३. फार काय सांगावें ! सुताशीं ज्याप्रमाणें वस्त्र अथवा मातीशीं ज्याप्रमाणें मडकें अभिन्न असतें, त्याप्रमाणें तो माझा भक्त माझ्याशीं अभिन्न असतो. ११८४. हे सुबुद्धि अर्जुना, या स्वयंसिद्ध असलेल्या अभेदभक्तीनें, या सर्वच दृश्यमात्रामध्यें तो ज्ञानी भक्त मला द्रष्टयाला आत्मत्वानें जाणतो. ११८५. (जागृति, स्वप्न, सुषुप्ति या) तिन्ही अवस्थांच्या द्वारानें व (स्थूल, सूक्ष्म व कारण या) तीन प्रकारच्या उपाधींच्या व (विश्व, तैजस आणि प्राज्ञ या) तीन उपहितांच्या (अभिमानी जीवांच्या) आकारानें व भावरूपानें (जे जागृति व स्वप्न या दोन अवस्थेमध्यें असणें-पणानें) व अभावरूपानें (सुषुप्ति अवस्थेमध्यें नसणेपणानें) जें हें दृश्य (संपूर्ण विश्व) अनुभवास येतें, ११८६. हे चांगल्या योद्ध्या अर्जुना, तें हें सर्वच मी द्रष्टा आहें, अशा या बोधाच्या भरांत, तो (ज्ञानी भक्त) लग्नामध्यें जसा घेंडा नाचतो, तसा तो अनुभवानें नाचूं लागतो. ११८७. रज्जू आपल्या स्वरूपानें दिसल्यावर तिच्यावर भासणारा सर्पाकार (वास्तविक खरा नसून), रज्जूच आहे, असा ज्याप्रमाणें निश्चय होतो. ११८८. अलंकार हा सोन्यापलीकडे गुंजभर देखील नाहीं, हें जसें दागिना आटून पक्कें करावें. ११८९. एका पाण्याशिवाय लाट (दुसरें) कांहीं नाहींच, हें पक्कें जाणून जसें लाटेला स्वतंत्र अस्तित्व आहे, असें मानीत नाहींत. (पाण्याहून वेगळी समजली जात नाहीं.) ११९०. अथवा स्वप्नांतील सर्व पदार्थांचे जागे होऊन माप घेतलें असतां, ते स्वप्नांतील सर्व पदार्थ आपल्याहून वेगळे आहेत, असें ज्याप्रमाणें अनुभवास येत नाहीं, ११९१. त्याप्रमाणें आहे, नाहीं (भावाभाव) या रूपानें जें कांहीं ज्ञेय स्फुरतें, तें मी ज्ञाताच आहे, हा त्याला अनुभव होऊन तो (ज्ञानी भक्त) तो अनुभव भोगतो. ११९२. तो असें जाणतो कीं, मी जन्मरहित आहे, वृद्धपणरहित आहें, मी नाशरहित आहें, मी न गळणारा आहें, मी अपूर्व (विलक्षण) आहें, मी अपार (अमर्याद) आहें व मी आनंद आहें. ११९३. मी न ढळणारा आहें, मी अच्युत (आपल्या स्थानापासून भ्रष्ट न होणारा) आहें; मी अंतरहित आहें, मी द्वैतरहित आहें, मी सर्वांच्या आरंभीचा आहें, निराकार व साकारही मीच आहें. ११९४. नियम्य मी

अनादि मी अमरु । अभय मी आधारु । आधेय मी ॥ ९५ ॥ स्वामी मी सदोदितु । सहजु मी सततु । सर्व मी सर्वगतु । सर्वातीतु मी ॥ ९६ ॥ नवा मी पुराणु । शून्यु मी संपूर्णु । स्थूलु मी अणु । जें कांहीं तें मी ॥ ९७ ॥ अक्रियु मी येकु । असंगु मी अशोकु । व्याप्यु मी व्यापकु । पुरुषोत्तमु मी ॥ ९८ ॥ अशब्दु मी अश्रोत्रु । अरूपु मी अगोत्रु । समु मी स्वतंत्रु । ब्रह्म मी परु ॥ ९९ ॥ ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें । आणि याही बोधा जाणतें । तेंही मीचि जाणें ॥१२००॥ पैं चेइलेयानंतरें । आपुलें एकपण उरे । तेंही तोंवरी स्फुरे । तयाशींचि जैसें ॥ १ ॥ कां प्रकाशतां अर्कु । तोचि होय प्रकाशकु । तयाही अभेदा द्योतकु । तोचि जैसा ॥ २ ॥ तैसा वेद्याचां विलयीं । केवळ वेदकु उरे पाहीं । तेणें जाणवे तयातेंही । हेंही जो जाणे ॥ ३ ॥ तया अद्वयपणा आपुलिया । जाणती ज्ञप्ती जे धनंजया । ते ईश्वराचि मी हे तया । बोधासि ये ॥ ४ ॥ मग द्वैताद्वैतातीत । मीचि आत्मा एकु निभ्रांत । हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ॥ ५ ॥ तेथ चेइलयां येकपण । दिसे जें आपुलया आपण । तेंही जातां नेणों कोण । होइजे जेवीं ॥ ६ ॥ कां डोळां देखतिये क्षणीं । सुवर्णपण सुवर्णीं । नाटितां होय आटणी । अळंकाराचीही ॥ ७ ॥ नाना लवण तोय होये । मग क्षारता तोयत्वें राहे । तेही जिरतां जेवीं जाये । जालेपण तें ॥ ८ ॥ तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभव-समरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं ॥ ९ ॥ आणि तो हे भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझांचि रूपीं ॥ १२१० ॥ जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे । मग उभयातीत उरे । आकाश जेवीं ॥ ११ ॥ कां धाडलिया एका एकु । वाढे तो शून्य विशेखु । तैसा आहेनाहींचा शेखु । मीचि मग आथी ॥ १२ ॥ तेथ ब्रह्म आत्मा ईशु । यया बोला मोडे सौरसु । न बोलणेंयाही पैसु । नाहीं तेथ ॥ १३ ॥ न बोलणेंही न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरुनी । जाणिव नेणिव नेणोनी । जाणिजे तें ॥ १४ ॥ तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें । सुखवरी सुसयें । सुखचि भोगिजे ॥ १५ ॥ तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा । विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥ १६ ॥ समु तेथ सामावला । विश्रामु विश्रांति आला । अनुभव वेडावला । अनुभूतिपणें ॥ १७ ॥ किंबहुना ऐसें निखळ । मीपणा जोडे तया फळ । सेवूनि वेली वेल्हाळ । क्रमयोगाची ते ॥ १८ ॥ पैं क्रमयोगा किरीटी । चक्रवर्तीचां मुकुटीं । मी चिद्रत्न ते साटोवाटीं । होय तो माझा ॥ १९ ॥ कीं क्रमयोगप्रसादाचा । कळसु

आहें, नियामक मीच आहें, मी आरंभरहित आहें, मी अमर आहें, मी भयरहित आहें, मी सर्वांचा आश्रय आहें व आश्रित मीच आहें. ११९५. मी स्वामी व निरंतर असणारा आहें व स्वतःसिद्ध व अखंड आहें, मी सर्व आहें व सर्वव्यापी आहें, मी सर्वांच्या पलिकडला आहें. ११९६. मी नवा व जुना आहें, मी शून्य आहें व मी संपूर्ण आहे, जें कांहीं मोठें आहे व सूक्ष्म आहे, तें मी आहें. ११९७. मी क्रियारहित आहें, मी एक आहें, ( अद्वितीय आहें ), मी संगरहित व शोकरहित आहें, व्याप्य व व्यापक मी आहें, उत्तमपुरुष मी आहें. ११९८. मी शब्दरहित व कर्णरहित आहें, मी रूपरहित व कुळरहित आहें, मी सारखा व स्वतंत्र आहें, सर्वांहून पलीकडचें जें ब्रह्म, तें मी आहें. ११९९. याप्रमाणें मला एकाला या अद्वयभक्तीनें आत्मत्वेंकरून ( आत्मपणानें ) खरोखर जाणतो, आणि याही बोधाला (अनुभवाला ) जाणणारा तोही मीच आहें, हें तो जाणतो. १२०० जागें झाल्यानंतर (स्वप्नांतील) अनेकत्व जाऊन, आपलें एकपण जें उरतें, तेंही आपल्याला जसें आपल्या ठिकाणींच कांहीं काळ स्फुरतें. १२०१ अथवा सूर्य ज्या वेळेला आपलें प्रकाशन करतो, तेव्हां सूर्यच प्रकाशक होतो व या प्रकाशक व प्रकाश्य यांच्या अभेदालाही दाखविणारा ज्याप्रमाणें तोच आहे. १२०२. त्याप्रमाणें वेद्याचा ( ज्ञेय वस्तूचा ) लय झाला असतां केवळ वेदक ( द्रष्टा, जाणणारा ) उरतो, पहा. तो वेदकही ( जाणणाराही ) त्या वेदकाकडून जाणला जातो, हेंही जो जाणतो. ( वेद्याच्या निरासाअंतीं उरलेला जो वेदक, तो ज्या वेळीं आपण आपल्याला जाणतो, त्या वेळेला वेद्य व वेदक यांचा अभेद आहे, हेंही जो जाणतो. ) १२०३ अर्जुना, त्या आपल्या अद्वयपणाला जाणणारें जें ज्ञान, तें ज्ञान ईश्वर आहे व तो ईश्वरच मी आहें, हें त्याच्या अनुभवाला येतें. १२०४. मग द्वैत व अद्वैत यांच्या पलीकडला मीच एक आत्मा निःसंशय आहे हें जाणून तें जाणणें जेव्हां अनुभवांत प्रवेश करतें. ( म्हणजे ज्या अनुभवांत जाणण्याची ऊर्मि उरत नाहीं ) १२०५. तेव्हां जागें झाल्यावर ( स्वप्नांतील अनेकत्व जाऊन ) आपलें एकपण जसें आपल्याआपण दिसतें व तेंही जागृतीच्या एकाकीपणाचा अनुभव गेल्यावर, ज्याप्रमाणें काय होऊन रहातें, हें कळत नाहीं. १२०६ सोन्याच्या दागिन्याकडे सोन्याच्या दृष्टीनें पाहिल्याबरोबर अलंकार न आटतां त्याची आटणी होते. १२०७ अथवा पाण्याशीं मिळून पाणी झाल्यावर मग त्या मिठाचा खारेपणा जसा पाण्याच्या रूपानें राहतो व तो खारेपणाही नाहींसा झाल्यावर, ज्याप्रमाणें तें मिठाचें पाणी झालें, हा व्यवहारही संपतो. १२०८ त्याप्रमाणें मी देव व तो भक्त, हें जें द्वैत आहे, तें ( द्वैत ) स्वानंदानुभवाच्या ऐक्यानें कालवून माझ्याचमध्यें तो प्रवेश करतो १२०९ आणि तो ही भाषा जेथें ( ज्या अनुभवांत ) संपते, तेथें मी हें कोणाला ( म्हणावयाचें ) ? ( कारण 'तो' च्या सापेक्ष मी आहे व जेथें तो नाहीं, तेथें मी कोण आहें ? ) याप्रमाणें जेथें मी नाहीं व तोही नाहीं, त्या माझ्या स्वरूपीं तो सामावतो. १२१०. जेव्हां कापूर जळून संपतो, त्याच वेळेला अग्नीचीही समाप्ति होते. मग ( दाह्य ) कापूर व ( दाहक ) अग्नि, यांच्याहून वेगळें असलेलें एक आकाशमात्र जसें उरतें. १२११ अथवा एकांत एक वजा केला असतां जसें केवळ शून्य शिल्लक राहातें, त्याप्रमाणें आहेनाहींचा शेष ( आहे व नाहीं हे सापेक्षभाव गेल्यावर जें उरतें तें ) मीच मग आहें, १२१२. त्या स्वरूपीं ब्रह्म, आत्मा, ईश, या शब्दांचा कांहीं लाग लागत नाहीं; ( कारण एकरस स्वरूपांत अल्प, अनात्मा व नियम्य, यांच्या सापेक्ष असणारे जे ब्रह्म, आत्मा व ईश, हे भाव त्या स्वरूपीं नाहींत; ) ( व ब्रह्म, आत्मा, ईश, हें जें बोलणें, त्याच्या सापेक्ष जें न बोलणें, त्या ) न बोलण्यालाही तेथें अवकाश रहात नाहीं. १२१३ न बोलणें देखील न बोलून, तें तोंड भरून बोलावें व जाणीव नेणीव या दोन्हींचें भान टाकून तें जाणावें. १२१४. त्या स्वरूपीं बोधानेंच बोध जाणावयाचा, आनंदानेंच आनंद घ्यावयाचा व सुखानेंच केवळ सुख भोगावयाचें. १२१५. तेथें लाभाला लाभ प्राप्त झाला, प्रभा प्रभेकडून आलिंगिली गेली व आश्चर्यांत आश्चर्य उमें बुडालें. १२१६. तेथें ऐक्यभाव ऐक्याला आला, विश्राम विश्रांतीला आला, अनुभव अनुभवानें वेडा झाला. १२१७. फार काय सांगावें ! असें शुद्ध मीपण हें फळ, त्या क्रमयोग्याला, क्रमयोगाच्या विस्तृत अशा वेलीचें सेवन करून( क्रमयोगाचें आचरण करून) मिळालें. १२१८. अर्जुना, क्रमयोगरूपी सार्वभौम राजाच्या मुकुटावर असणारें जें मी ज्ञानरत्न, तें, तो क्रमयोगी, मोबदल्यांत आपली जीवदशा मला अर्पण करून, होतो. १२१९. अथवा क्रमयोगरूपी मंदिराचा जो हा मोक्षरूपी कळस, त्या मोक्षरूपी

जो हा मोक्षाचा । तयावरील अवकाशाचा । उवावो जाला तो ॥ १२२० ॥ नाना संसारआडवीं। क्रमयोग वाट बरवी । जोडिली ते मदैक्यगांवीं । पैठी जालीसे ॥ २१ ॥ हें असो क्रमयोगबोधें । तेणें भक्ताचित्तें गांगें । मी स्वानंदोदधी वेगें । ठाकिला कीं गा ॥ २२ ॥ हा ठायवरी सुवर्मा । क्रमयोगीं आहे माहिमा । म्हणौनि वेळोवेळां तुम्हां । सांगतों आम्ही ॥ २३ ॥ पैं देशें काळें पदार्थें । साधूनि घेईजे मातें । तेसा नव्हे मी आयतें । सर्वांचें सर्वही ॥ २४ ॥ म्हणौनि माझां ठायीं । जाचावें न लगे कांहीं । मी लाभें इयें उपायीं । साचचि गा ॥ २५ ॥ एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ॥ २६ ॥ अगा वसुधेचां पोटीं । निधान सिद्ध किरीटी । वन्हि सिद्ध काष्ठीं । वोहां दूध ॥ २७ ॥ परी लाभें तें असतें । तया कीजे उपायातें । येर सिद्धचि तैसा येथें । उपायीं मी ॥ २८ ॥ हा फळहीवरी उपावो । कां पां प्रस्तावीतसे देवो । हें पुसतां तरी अभिप्रावो । येथिंचा ऐसा ॥ २९ ॥ जे गीतार्थाचें चांगावें । मोक्षोपायपर आघवें । आणि शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध ॥१२३०॥ वारा आभाळाचि फेडी । वांचूनि सूर्यातें न घडी । कां हातु बाबुळी धाडी । तोय न करी ॥ ३१ ॥ तैसा आत्मदर्शनीं आडळु । असे अविद्येचा जो मळु । तो शास्त्र नाशी येरु निर्मळु । मी प्रकाशें स्वयें ॥ ३२ ॥ म्हणोनि आघवींचि शास्त्रें । अविद्याविनाशाचीं पात्रें । वांचोनि न होती स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥ ३३ ॥ तया अध्यात्मशास्त्रांसीं । जैं साचपणाची ये पुसी । तैं येइजे जया ठायासी । ते हे गीता ॥ ३४ ॥ भानुभूषिता प्राचिया । सतेजा दिशा आघविया । तैसी शास्त्रेश्वरा गीता या । सनाथें शास्त्रें ॥ ३५ ॥ हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागां उपाय बहुवे विस्तारें । सांगितला जैसा करें । घेवों ये आत्मा ॥ ३६ ॥ परी प्रथमश्रवणासवें । अर्जुना विपायें हें फावे । हा भावो सकणवे । धरूनि श्रीहरी ॥ ३७ ॥ तेंचि प्रमेय एक वेळ । शिष्यीं होआवया अढळ । सांगतसे मुकुळ- । मुद्रा आतां ॥ ३८ ॥ आणि प्रसंगें गीता । ठावोही हा संपता । म्हणौनि दावी आद्यंता । एकार्थत्व ॥ ३९ ॥ जे ग्रंथाचां मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं । निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ॥ १२४० ॥ तरी तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत । हें पूर्वापर नेणत । कोण्ही जैं मानी ॥ ४१ ॥ तैं महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका । भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे ॥ ४२ ॥ एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥४३॥ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारीं । तें आतां दोहीं अक्षरीं । अनुवादावें ॥ ४४ ॥ म्हणौनि उपेयही हातीं । जालया उपायस्थिती । देव प्रवर्तले तें पुढती । येणेंचि भावें ॥ ४५ ॥

कळसावरील पोकळीचा विस्तार तो क्रमयोगी झाला. १२२०. अथवा संसाररूपी अरण्यांत जी क्रमयोगरूपी चांगली वाट मिळाली आहे, ती ( क्रमयोगरूपी वाट ) माझ्या ऐक्यरूपी गांवांत प्रविष्ट झाली आहे. १२२१. हें राहूं दे; त्या भक्तचित्तरूपी गंगोदकानें, या क्रमयोगरूपी ओघानें, मी जो स्वानंदरूपी सागर, त्या मला वेगानें गांठलें. १२२२. हे चांगलें मर्म जाणणाऱ्या अर्जुना, क्रमयोगाची एवढी मोठी थोरवी आहे, म्हणून आम्ही हा क्रमयोग तुम्हांला वारंवार सांगतों. १२२३. देशानें, कालानें आणि पदार्थांनें मला प्राप्त करून घ्यावें असा ( म्हणजे योग्य देश, योग्य काल व योग्य पदार्थ ह्यांच्या साधनानें प्राप्त करून घेतला तर मी प्राप्त आहें, एऱ्हवीं नाहीं, असा ) मी नाहीं, तर मी स्वतःसिद्ध सर्वांचें सर्वही आहे. ( म्हणजे सर्वांच्या सर्वरूपानें मीच आहे. ) १२२४. म्हणून माझ्या ठिकाणीं ( माझ्या प्राप्तीविषयीं ) कांहीं श्रमावयाची जरुर नाहीं. या उपायानें ( क्रमयोगानें ) खरोखरच मी प्राप्त होतों. १२२५. एक शिष्य व एक गुरु, हा जो संप्रदाय खरोखर प्रसिद्धीस आला आहे, तो माझ्या प्राप्तीचा प्रकार जाणण्याकरितां आहे. १२२६. अरे अर्जुना, पृथ्वीच्या पोटांत ठेवा आयता आहे, लांकडांत अग्नि आयताच आहे व कासेंत दूध आयतेंच आहे. १२२७. एऱ्हवीं पाहिलें तर, जी गोष्ट स्वतःसिद्ध असते, तीच प्राप्त होते; परंतु ती गोष्ट ज्या उपायांनीं प्राप्त होईल, ते उपाय करावे लागतात. त्याप्रमाणें मी स्वतःसिद्ध आहें खरा, परंतु मला प्राप्त करून घेण्याकरितां उपाय करावे लागतात. १२२८. ( १२१८ ओंवीत उपाय सांगून ) फळ सांगितल्यानंतर देखील, हा साधनप्रकार सांगण्याचा देव पुनः कां उपक्रम करीत आहेत असें कोणी विचारील, तर या (साधनप्रकार) सांगण्याचा अभिप्राय असा आहे. १२२९. कारण कीं, गीतेंतील बोधाचा चांगलेपणा हा आहे कीं, संपूर्ण गीताशास्त्र हें मोक्षप्राप्तीचें उपाय सांगणारें आहे, आणि ( दुसऱ्या ) शास्त्रांनीं सांगितलेलें मोक्षप्राप्तीचे उपाय प्रमाणसिद्ध नाहींत. १२३०. वारा हा सूर्याआड आलेले ढग नाहींसे करतो, याशिवाय सूर्याला नवा बनवीत नाहीं. अथवा पाण्यावर आलेलें गोंडाळ हात दूर करतो, नवें पाणी उत्पन्न करीत नाहीं. १२३१. त्याप्रमाणें आत्मदर्शनाला प्रतिबंधक असा जो अविद्येचा मळ आहे, तो ( मळ ) इतर शास्त्रें नाहींसा करतात एवढेंच; याशिवाय मी जो स्वतःसिद्ध निर्मळ, तो आपल्याच प्रकाशानें प्रकाशित होतों. १२३२. म्हणून सर्वच शास्त्रें ही अविद्येचा नाश करण्याला योग्य अशीं आहेत. याशिवाय तीं आत्मस्वरूपाचें ज्ञान करून देण्यास स्वतंत्र नाहींत १२३३. त्या तत्त्वज्ञानप्रतिपादक शास्त्रांना जेव्हां त्यांच्या खरेपणाविषयींचा प्रश्न येतो, तेव्हां त्यांना ( आपला खरेपणा सिद्ध करण्यास ) ज्या ठिकाणास यावें लागतें, तें ठिकाण हें गीताशास्त्र होय. १२३४. पूर्व दिशा सूर्यानें अलंकृत झाली असतां, सर्व दिशा जशा तेजानें युक्त होतात, त्याप्रमाणें सर्व शास्त्रांत श्रेष्ठ असलेल्या या गीतेच्या योगानें बाकीचीं सर्व शास्त्रें सनाथ आहेत. १२३५. हें राहूं दे. या गीताशास्त्रेश्वरानें, जसा हातानें आत्मा घेतां येईल, असा उपाय मागें पुष्कळ विस्तारानें सांगितला. १२३६. परंतु पहिल्या-ऐकण्याबरोबर हें (देवाचें सांगणें) अर्जुनाला क्वचितच समजेल असा अभिप्राय सकरुण अशा श्रीहरीनें मनांत धरून, १२३७. तोच विचार शिष्याच्या अंतःकरणांत पक्का दृढ होण्याकरितां, श्रीकृष्ण आतां थोडक्यांत पुनः एकवेळ ( तोच विचार ) सांगत आहेत. १२३८. आणि हें गीता संपण्याचें ठिकाणही आहे, म्हणून, प्रसंगानुसार, (गीतेच्या) आरंभापासून तों शेवटापर्यंत एकाच अर्थाचें प्रतिपादन आहे, हें श्रीकृष्ण दाखवीत आहेत. १२३९. या गीताग्रंथाच्या मध्यभागीं निरनिराळ्या अधिकारप्रसंगीं अनेक सिद्धांत मांडून जें निरूपण केलें, १२४०. तरी तितकेही सिद्धांत या गीताशास्त्रांत वर्णिलेले आहेत, असें जर कोणी या ग्रंथाचा मागलापुढला संबंध न जाणून मानील; १२४१. तर महासिद्धांताच्या अभिप्रायांत अनेक सिद्धांतांच्या बाजू अंतर्भूत आहेत, असें सिद्ध करून, जो सिद्धांत आरंभीं सांगितला होता, त्या सिद्धांतानेंच ग्रंथाची समाप्ति करीत आहेत. १२४२. या गीतेंत अविद्येचा निरास करणें हा विषय आहे व त्या योगानें मोक्ष मिळविणें हें फळ ( प्रयोजन ) आहे; अविद्यानाश व मोक्षप्राप्ति या दोहोंस साधन केवळ ज्ञान आहे; १२४३. हें इतकेंच नाना प्रकारांनीं या ग्रंथांत विस्तृत रीतीनें सांगितलें आहे. तें आतां दोन अक्षरांत ( थोडक्यांत ) पुन्हां सांगावें. १२४४. म्हणून साध्यही प्राप्त झाल्यावर साधनांचें स्वरूप पुनः सांगण्यास देव याच ( वर सांगितलेल्या ) अभिप्रायानें प्रवृत्त झाले. १२४५.

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः । मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

मग म्हणे गा सुभटा । तो क्रमयोगी या निष्ठा । मी होउनी होय पैठा । माझां रूपीं ॥ ४६ ॥ स्वकर्माचां चोखौळीं । मज पूजा करूनि भली । तेणें प्रसादें आकळी । ज्ञाननिष्ठेतें ॥ ४७ ॥ ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे । तिया मजसी समरसें । सुखिया होय ॥ ४८ ॥ आणि विश्वप्रकाशितया । आत्मया मज आपुलिया । अनुसरे जो करूनियां । सर्वत्रता हे ॥ ४९ ॥ सांडूनि आपला आडळ । लवण आश्रयी जळ । का हिंडोनि राहे निश्चळ । वायु व्योमीं ॥ १२५० ॥ तैसा बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्रऊनि ठाये । तो निषिद्धेंही विषायें । कर्मे करू ॥ ५१ ॥ परी गंगेचां संबंधीं । विदी आणि महानदी । एक तेवीं माझां बोधीं । शुभाशुभांसी ॥ ५२ ॥ का बावनें आणि धुरें । हा निवाडु तंवचि सरे । जंव न घेपती वैश्वानरें । कवळूनि दोन्ही ॥ ५३ ॥ नाना पांचिकें आणि सोळें । हें सोनया तंवचि आलें । जंव परिसु आंगमेळें । एकवटीना ॥ ५४ ॥ तैसें शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे । जंव येकु न प्रकाशे । सर्वत्र मी ॥ ५५ ॥ अगा रात्री आणि दिवो । हा तंवचि द्वैतभावो । जंव न रिगिजे गांवो । गभस्तीचा ॥ ५६ ॥ म्हणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्व कर्मे किरीटी । जाऊनि बैसे तो पाटीं । सायुज्याचां ॥ ५७ ॥ देशें काळें स्वभावें । वेंचु जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो ॥ ५८ ॥ किंबहुना पांडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पविजतां । लाभु कवणु असे ॥ ५९ ॥ याकारणें गा तुवां । सर्व कर्मा आपुलिया । माझां स्वरूपीं धनंजया । संन्यासु कीजे ॥ १२६० ॥

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः । बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

परी तोचि संन्यासु वीरा । करणीयेचा झणें करा । आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ॥ ६१ ॥ मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मावेगळें । माझां स्वरूपीं निर्मळें । देखिजेल ॥ ६२॥ आणि कर्माचीं जन्मभोये । प्रकृति जे का आहे । ते आपणयाहूनि बहुवे । देखसी दूरीं ॥ ६३॥ तेथ प्रकृति आपणयां- । वेगळी नुरे धनंजया । रूपेंवीण का छाया । जयापरी ॥ ६४ ॥ ऐसेनि प्रकृतिनाशु । जालया कर्मसंन्यासु । निफजेल अनायासु । सकारणु ॥ ६५ ॥ मग कर्मजात गेलया । मी आत्मा उरें आपणपयां । तेथ बुद्धि घापे करूनियां । पतिव्रता ॥ ६६ ॥ बुद्धि अनन्यें येणें योगें । मजमाजीं जैं रिगे । तैं चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ॥ ६७ ॥ ऐसें चैत्यजातें सांडिलें । चित्त माझां ठायीं जडलें । ठाके तैसें वहिलें । सर्वदा करी ॥ ६८ ॥

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि । अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥ ५८ ॥

मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेव्हां । माझा प्रसादु जाण तेव्हां । संपूर्ण जाहला ॥ ६९ ॥ तेथ सकळदुःखधामें । भुंजीजती जियें मृत्युजन्में । तियें दुर्गमेंचि सुगमें । होती तुज ॥ १२७० ॥ सूर्याचेनि सावायें । डोळा सावाइला होये । तैं आंधाराचा

( बुद्धिकायावाचा यांनीं ) माझा आश्रय केलेला पुरुष सर्वदा सर्व कर्में करीत असला तरी, माझ्या प्रसादानें शाश्वत व अविनाशी असें पद मिळवितो. ५६.

मग देव म्हणतात, अर्जुना, तो कर्मयोगी या मार्गानें मी होऊन माझ्या स्वरूपीं प्रविष्ट होतो. १२४६. स्वकर्मरूप पवित्र फुलांनीं माझी चांगली पूजा करून त्या ( माझ्या ) प्रसादानें ज्ञाननिष्ठा प्राप्त करून घेतो. १२४७. तो ज्ञानमार्ग जेव्हां हस्तगत होतो, तेव्हां माझी भक्ति प्रगट होते व त्या भक्तीच्या योगानें माझ्याशीं एकरस होऊन सुखी होतो. १२४८. आणि विश्वाचें प्रकाशन करणारा आत्मा जो मी, त्या मला जो माझें सर्वव्यापित्व जाणून अनुसरतो. १२४९. आपला कठीणपणा टाकून जसें मीठ पाण्याशीं मिळतें अथवा इकडे तिकडे वाहून वायू जसा आकाशांत शांत राहतो. १२५०. त्याप्रमाणें जो बुद्धीनें, वाचेनें व शरीरानें माझा आश्रय करून राहतो, तो चुकून निषिद्ध कर्मेंही करो,—१२५१. परंतु गंगेला मिळाल्यावर रस्त्यांतून वाहणारें पाणी व महानदीचें पाणी जसें ( दोन्ही गंगारूप झाल्यामुळें ) एक होतात, त्याप्रमाणें माझें यथार्थ ज्ञान झाल्यावर पुण्यपापाची तशी ऐक्यस्थिति होत असते. १२५२. अथवा बावन चंदन व धुरें ( एक घाणेरडें लांकूड ) हा फरक, जोंपर्यंत अग्नीनें दोन्हीं कवळलीं नसतात, तेथपर्यंतच राहतो. १२५३. अथवा पांच कसाचें व सोळा कसाचें सोनें, हे ( फरक ) सोन्यांत तेव्हांच येतात कीं, जोंपर्यंत परीस आपल्या अंगाच्या स्पर्शानें त्या दोन्ही सोन्यांना एक कसाचें करीत नाहीं. १२५४. त्याप्रमाणें शुभाशुभ हें तोंपर्यंतच भासतें कीं, जोंपर्यंत केवळ एक जो मी, तो सर्वव्यापीपणानें अनुभवाला येत नाहीं. १२५५. अरे अर्जुना, रात्र आणि दिवस हा भेद तेथपर्यंतच असतो कीं, जोंपर्यंत सूर्याच्या गांवांत प्रवेश केला नाहीं. १२५६. अर्जुना, म्हणून माझी भेट ( अपरोक्ष अनुभव ) झाल्यावर त्याचीं सर्व कर्में नाहींशीं होऊन, तो सायुज्याच्या ( मोक्षाच्या ) पदावर बसतो. १२५७. देशानें, कालानें, स्वभावानें ज्याचा नाश संभवत नाहीं, त्या माझ्या अविनाशपदाला तो प्राप्त होतो. १२५८. फार काय सांगावें ! अर्जुना, त्याला मी जो आत्मा, त्याची प्रसन्नता ( सुख ) प्राप्त होते. त्या योगानें न मिळणारा असा कोणता लाभ राहिला आहे ? १२५९. अर्जुना, या कारणास्तव, आपलीं सर्व कर्में तूं माझ्या स्वरूपीं अर्पण कर. १२६०.

विवेकानें सर्व कर्मांचें माझ्या ठिकाणीं समर्पण करून मत्पर होत्साता ( मदनन्यतारूप ) बुद्धियोगाचा आश्रय करून सर्वकाल माझ्या ठिकाणीं चित्त जडलेला असा हो. ५७.

हे वीरा अर्जुना, परंतु तो त्याग कदाचित् तूं कृत्रिम करशील, तर तसें करूं नकोस हो ! तर तो संन्यास असा कर कीं, कर्म करीत असतांना तूं आपली चित्तवृत्ति आत्मविचाराकडे लाव. १२६१. मग त्या आत्मविचाराच्या बलानें तूं आपल्याला सर्व कर्मांहून निराळा असा माझ्या निर्मल स्वरूपीं पाहाशील. १२६२. आणि कर्मांची जन्मभूमि जी प्रकृति आहे, ती ( प्रकृति ) आपल्या स्वरूपापासून फार दूर ( म्हणजे अगदीं भिन्न ) अशी तूं पाहाशील. १२६३. अर्जुना, तेव्हां प्रकृति आपणाहून ( तुझ्याहून ) वेगळी उरणार नाहीं. ती कशी तर, ज्याप्रमाणें शरीराहून छाया वेगळी उरत नाहीं त्याप्रमाणें. १२६४. याप्रमाणें अज्ञानाचा नाश झाल्यावर कांहीं श्रम न पडतां कारणासहित कर्मांचा त्याग होईल. १२६५. मग कर्म मात्र नाहींसें झाल्यावर, केवळ मी आत्मा आपल्या ठिकाणीं उरतो. त्या केवळ आत्म्याच्या ठिकाणीं तूं आपली बुद्धि पतिव्रता ( एकनिष्ठ ) करून ठेव. १२६६. जेव्हां अनन्ययोगानें बुद्धि माझ्यामध्यें प्रवेश करते, तेव्हां चिंतन करण्याचा विषय टाकून चित्त मलाच भजतें. १२६७. याप्रमाणें चिंतन करण्याचे सर्व विषय ज्या चित्तांतून टाकलेले आहेत, असें चित्त माझ्या ठिकाणीं नेहमीं जडलेलें राहील, असें तूं लवकर कर. १२६८.

मच्चित्त झालेला तूं माझ्या प्रसादानें सर्व संकटें ( सर्व दुःखांस कारण असलेलीं जन्ममरणरूप संकटें) तरून जाशील; परंतु जर तूं अहंकारानें मी सांगतों तें ऐकणार नाहींस, तर नाश पावशील. ५८.

मग जेव्हां या अभिन्न सेवेनें चित्तांत मी भरून जाईन, तेव्हां माझा प्रसाद पूर्ण झाला असें समज. १२६९. तेव्हां सकळ दुःखांचीं घरें जीं मृत्यु व जन्म, ( सर्व जीवांकडून ) भोगिलीं जातात, तीं कठीण असून देखील तुला सोपीं होतील. ( कठीण अशा जन्ममृत्यूंतून तूं सहज तरून जाशील. ) १२७०. सूर्याच्या साह्याचा जेव्हां डोळ्यांना आश्रय मिळालेला असतो, तेव्हां त्या

आहे । पाडु तया ॥ ७१ ॥ तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे । तो संसाराचेनि बाधे । बागुलें केवीं ॥ ७२ ॥ म्हणौनि धनंजया । तूं संसारदुर्गती यया । तरसील माझिया । प्रसादास्तव ॥ ७३ ॥

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे । मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

अथवा हन अहंभावें । माझें बोलणें हें आघवें । कानामनाचिये शिंवे । नेदिसी टेंकों ॥ ७४ ॥ तरी नित्य मुक्त अव्ययो । तूं आहासि तें होऊनि वावो । देहसंबंधाचा घावो । वाजेल आंगीं ॥ ७५ ॥ जया देहसंबंधाआंतु । प्रतिपदीं आत्मघातु । भुंजतां उसंतु । कहींच नाहीं ॥ ७६ ॥ येवढेनि दारुणें । निमणेनवीण निमणें । पडेल जरी बोलणें । नेघसी माझें ॥ ७७ ॥ पथ्यद्वेषिया पोषी ज्वरु । कां दीपद्वेषिया अंधकारु । विवेकद्वेषें अहंकारु । पोषूनि तैसा ॥७८॥ स्वदेहा नाम अर्जुनु । परदेहा नाम स्वजनु । संग्रामा नाम मलिनु । पापाचारु ॥ ७९ ॥ इया मती आपुलिया । तिघां तीन नामें ययां । ठेऊनियां धनंजया । न जुंझें ऐसा ॥१२८०॥ जीवामाजीं निष्टंकु । करिसी जो आत्यंतिकु । तो वायां धाडील नैसर्गिकु । स्वभावोचि तुझा ॥ ८१ ॥ आणि मी अर्जुनु हे आत्मिक । ययां वधु करणें हें पातक । हें माया वांचूनि तात्त्विक । कांहीं आहे ॥ ८२ ॥ आधीं जुंझार तुवां होआवें । मग जुंझावया शस्त्र घेयावें । कां न जुंझावया करावें । देवांगण ॥ ८३ ॥ म्हणौनि न जुंझणें । म्हणसी तें वायाणें । ना मानूं लोकपणें । लोकदृष्टीही ॥ ८४ ॥ तऱ्ही न जुंझें ऐसें । निष्टंकिसी जें मानसें । तें प्रकृति अनारिसें । करवीलचि ॥८५॥

स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा । कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

पैं पूर्वे वाहतां पाणी । पव्हिजे पश्चिमेचे वाहणीं । तरी आग्रहो उरे तें आणी । आपुलिया लेखा ॥ ८६ ॥ का साळीचा कणु म्हणे । मी नुगवें साळीपणें । तरी आहे आन करणें । स्वभावासी ॥ ८७ ॥ तैसा क्षात्रसंस्कारसिद्धा । प्रकृती घडिलासी प्रबुद्धा । आतां नुठी म्हणसी हा धांदा । परी उठविजसीचि तूं ॥ ८८ ॥ शौर्य तेज दक्षता । एवमादिक पंडुसुता । गुण दिधले जन्मतां । प्रकृती तुज ॥ ८९ ॥ तरी तयांचिया समवाया- । अनुरूप धनंजया । न करितां उगलिया । नयेल असों ॥ १२९० ॥ म्हणौनियां तिहीं गुणीं । बांधलासि तूं कोदंडपाणी । त्रिशुद्धी निघसी वाहणीं । क्षात्राचिया ॥ ९१ ॥ ना हें आपुलें जन्ममूळ । न विचारीतचि केवळ । न जुंझें ऐसें अढळ । व्रत जरी घेसी ॥ ९२ ॥ तरी बांधोनि हात पाये । जो रथीं घातला होये । तो न चले तरी जाये । दिगंता जेवीं ॥ ९३ ॥ तैसा तूं आपुलिया- कडुनी । मी कांहींच न करीं म्हणौनी । ठासी परी भरंवसेनि । तूंचि करिसी ॥ ९४ ॥ उत्तरु वैराटींचा राजा । पळतां तूं कां निघालासि जुंझा । हा क्षात्रस्वभावो तुझा । जुंझवील तुज ॥ ९५ ॥ महावीर अकरा अक्षौहिणी । तुवां येकें नागविले रणांगणीं । तो स्वभावो कोदंडपाणी ।

डोळ्यांना अंधाराची कांहीं किंमत आहे काय ? १२७१. त्याप्रमाणें माझ्या प्रसादानें ज्याची अल्पजीवदशा नाश पावते, तो संसाररूपी बागुलबोवाकडून कसा पीडा पावेल? १२७२ म्हणून अर्जुना, या संसाररूपी वाईट गर्तीतून माझ्या प्रसादामुळें तूं तरशील. १२७३.

अहंकाराचा आश्रय करून 'मी युद्ध करणार नाहीं' असा जो तूं विचार करीत आहेस तो तुझा निश्चय व्यर्थ आहे. (कारण तुझी) प्रकृति तुला (युद्धाचे ठिकाणीं) प्रवृत्त करीत आहे (ती तुला तिच्याविरुद्ध करूं देणार नाहीं.) ५९.

अथवा हें माझें सर्व बोलणें तूं अभिमानानें कानाच्या व मनाच्या हद्दीवर टेकूं न देशील, १२७४. तर तूं नित्यमुक्त व अव्यय (अविनाश) असा आहेस, तें व्यर्थ होऊन देहतादात्म्याचा तडाका तुझ्या अंगावर आदळेल. १२७५. ज्या देहतादात्म्यांत पावलोपावलीं आत्मघात आहे व त्या आत्मघाताचें पाप भोगीत असतां विसांवा कधींच मिळत नाहीं. १२७६. जर तूं माझ्या बोलण्याचा विचार केला नाहींस, तर तुझ्या स्वरूपीं मरण नसतांना एवढें भयंकर मरण तुझ्या अंगावर आदळेल. १२७७. पथ्याचा द्वेष करणारा जसा ज्वराला वाढवितो, अथवा दिव्याचा कंटाळा करणारा जसा अंधकाराला वाढवितो, त्याप्रमाणें विवेकाच्या द्वेषानें अहंकाराला वाढवून—१२७८. आपल्या देहाला अर्जुन नांव देऊन व दुसऱ्यांच्या देहांना आप्तसंबंधीं असें नांव देऊन व युद्धाला वाईट व पापकारक कृत्य असें नांव देऊन—१२७९. अर्जुना, अशा या आपल्या बुद्धीनें या तिघांना तीन नांवें ठेवून (मी) लढणार नाहीं असा १२८०. जो अंतःकरणामध्यें तूं पक्का निश्चय करशील, त्या निश्चयाला तुझा नैसर्गिक स्वभावच व्यर्थ करील. १२८१. आणि मी अर्जुन, हे माझे सर्व नातलग व यांचा वध करणें हें पाप, या कल्पना ही भ्रांति आहे. याशिवाय तात्त्विक दृष्टीनें पाहिलें तर यांत कांहीं तथ्य आहे काय ? १२८२. (वर सांगितल्याप्रमाणें मी अर्जुन, हे माझे आप्त व यांना मारणें हें पातक, ही सर्व भ्रांति असल्यामुळें तूं युद्ध करणाराच ठरत नाहींस, म्हणून) अगोदर तूं लढणारा व्हावास, (ठरावास) आणि मग लढण्याकरितां शस्त्र घ्यावेंस अथवा न लढण्याची शपथ घ्यावीस. १२८३. म्हणून लढणार नाहीं असें जें तूं म्हणतोस, तें (तात्त्विकदृष्ट्या) व्यर्थ आहे अथवा जगाप्रमाणें लोकांच्या दृष्टीनें देखील तूं लढणारा आहेस असें जर घटकाभर मानलें, १२८४. तरी मी लढणार नाहीं, असा जो तूं मनानें निश्चय करीत आहेस, तो निश्चय तुझा क्षात्रस्वभाव उलट करवीलच. १२८५.

हे कौन्तेया, स्वतःच्या स्वभावजकर्मानें बद्ध झालेला तूं मोहामुळें जें (कर्म) करूं इच्छित नाहींस, तें तूं (पूर्वसंस्कारानें) परतंत्र आहेस, म्हणून करशीलच (म्हणजे तुला करणें भागच आहे). ६०.

पूर्वेकडील दिशेनें पाणी जोरानें वाहात असतांना, जर कोणी पश्चिमेच्या दिशेनें पोहत जाईल, तर त्याचा हट्ट उरेल; बाकी त्याला पाणी आपल्या वळणाला आणील १२८६. अथवा साळीचा दाणा 'मी साळीपणानें उगवणार नाहीं' असें जर म्हणाला, तर त्याचा तो स्वभाव बदलणें शक्य आहे काय ? १२८७. त्याप्रमाणें हे बुद्धिमंता अर्जुना, क्षात्रसंस्कारांनीं सिद्ध झालेल्या प्रकृतीनें (स्वभावानें) तूं उत्पन्न झाला आहेस. आतां 'मी युद्ध करण्यास उठत नाहीं' असें तूं म्हणत आहेस; परंतु या युद्धाच्या व्यवहाराकडून (तूं क्षात्र प्रकृतीचा असल्यामुळें) तूं उठविला जाशीलच. १२८८. अर्जुना, शौर्य, तेज, दक्षता वगैरे गुण तुला तुझ्या क्षात्रप्रकृतीनें जन्मतः दिल्यामुळें १२८९ तर अर्जुना, त्या क्षात्रगुणांच्या समुदायानुरूप (युद्ध) न करतांना तुला मुकाट्यानें राहतां यावयाचें नाहीं. १२९०. म्हणून हे अर्जुना, तूं त्या शौर्यादि क्षात्रगुणांनीं बांधला गेला आहेस, त्या अर्थी क्षत्रियाला योग्य अशा मार्गाच्या ओघांत तूं खरोखर पडशील. १२९१. अथवा आपल्या जन्माच्या मूळ ठिकाणाचा विचार न करितां, 'मी लढणार नाहीं' असें केवळ अढळ व्रत जर घेशील, १२९२. तर, ज्याप्रमाणें हातपाय बांधून, ज्याला रथांत घातला आहे, तो चालला नाहीं, तरी (रथाबरोबर) दूर देशांत जाणारच. १२९३. त्याप्रमाणें तूं आपल्याकडून 'मी कांहींच करणार नाहीं' असें म्हणून राहाशील, परंतु खात्रीनें तूंच (युद्धादिक सर्व) करशील. १२९४. विराट देशाचा राजा उत्तर, तो युद्धाच्या वेळीं पळत असतां, तूं लढाईला कां निघालास ? तोच तुझा क्षात्रस्वभाव तुला (आतां) लढावयास लावील. १२९५. अकरा अक्षौहिणी मोठे बलाढ्य योद्धे तूं एकट्यानेंच रणांगणावर शस्त्ररहित केलेस; अर्जुना, तो

जुंझवील तूतें ॥ ९६ ॥ हां गा रोगु कायी रोगिया । आवडे दरिद्र दरिद्रिया । परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें ॥ ९७ ॥ तें अदृष्ट अनारिसें । न करील ईश्वरवशें । तो ईश्वरुही असे । हृदयीं तुझां ॥ ९८ ॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

सर्व भूतांचां अंतरीं । हृदयमहाअंबरीं । चिद्वृत्तीचां सहस्रकरीं । उदयला असे जो ॥ ९९ ॥ अवस्थात्रय तिन्ही लोक । प्रकाशूनि अशेख । अन्यथादृष्टि पांथिक । चेवविले ॥ १३०० ॥ वेद्योदकाचां सरोवरीं । फांकतां विषयकल्हारीं । इंद्रियषट्पदा चारी । जीवभंवरातें ॥ १ ॥ असो रूपक हें तो ईश्वरु । सकल भूतांचा अहंकारु । पांघरोनि निरंतरु । उल्हासत असे ॥ २ ॥ स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छायाचित्र । चौऱ्याशीं लक्ष ॥ ३ ॥ तया ब्रह्मादिकीटांता । अशेषांहीं भूतजातां । देहाकार योग्यता । पावोनि दावी ॥ ४ ॥ तेथ जें देह जयापुढें । अनुरूपपणें मांडे । तें भूत तिये आरूढे । हें मीं म्हणौनि ॥ ५ ॥ सूत सूतें गुंतलें । तृण तृणेंचि बांधलें । का आत्मबिंबा घेतलें । बाळकें जळीं ॥ ६ ॥ तयापरी देहाकारें । आपणपेंचि दुसरें । देखोनि जीव आविष्करे । आत्मबुद्धी ॥ ७ ॥ ऐसेनि शरीराकारीं । यंत्रीं भूतें अवधारीं । वाहूनि हालवी दोरी । प्राचीनाची ॥ ८ ॥ तेथ जया जें कर्मसूत्र । मांडूनि ठेविलें स्वतंत्र । तें तिये गती पात्र । होंचि लागे ॥ ९ ॥ किंबहुना धनुर्धरा । भूतांतें स्वर्गसंसारा- । माजीं भोंवडी तृणें वारा । आकाशीं जैसी ॥ १३१० ॥ भ्रामकाचेनि संगें । जैसें लोहो चेढा रिगे । तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती भूतें ॥ ११ ॥ जैसे चेष्टा आपुलिया । समुद्रादिक धनंजया । चेष्टती चंद्राचिया । सन्निधी येकीं ॥ १२ ॥ तया सिंधू भरितें दाटे । सोमकांता पाझरु फुटे । कुमुदांचकोरांचा फिटे । संकोचु तो ॥ १३ ॥ तैसीं बीजप्रकृतिवशें । अनेकें भूतें येकें ईशें । चेष्टविजती तो असे । तुझां हृदयीं ॥ १४ ॥ अर्जुनपण न घेतां । मी ऐसें जें पंडुसुता । उठतसे तें तत्त्वता । तयाचें रूप ॥ १५ ॥ यालागीं तो प्रकृतीतें । प्रवर्तवील हें निरुतें । आणि ते जुंझवील तूतें । न जुंझसी जऱ्ही ॥ १६ ॥ म्हणोनि ईश्वरु तो गोसावी । तेणें प्रकृती हे नेमावी । तिया सुखें राबवावीं । इंद्रियें आपुलीं ॥ १७ ॥ तूं करणें न करणें दोन्ही । लाऊनि प्रकृतीचां मानीं । प्रकृतीही का अधीनी । हृदयस्था जया ॥ १८ ॥

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत । तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

तया अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिग । महोदधी का गांग । रिगालें जैसें ॥ १९ ॥ मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे । कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींच रमसी ॥ १३२० ॥

तुझा स्वभाव तुला लढण्यास लावील. १२९६. अर्जुना, रोग्याला रोग आवडतो काय ? दरिद्याला दारिद्य आवडतें काय ? परंतु ज्या बलवान् प्रारब्धानें या अनिष्ट गोष्टी भोगविल्या जातात. १२९७. तें अदृष्ट (प्रारब्ध) ईश्वराच्या अधीन असल्यामुळें याहून वेगळें कांहीं करणार नाहीं व तो ईश्वरही तुझ्या हृदयांत आहेच. १२९८.

हे अर्जुना, ( शरीररूप ) यंत्रावर जणूंकाय चढवलेल्या सर्व भूतांना ( आपल्या ) मायेच्या योगानें फिरवणारा ( हालवणारा ) ईश्वर सर्व भूतांच्या हृदयांत स्थित आहे. ६१.

सर्व प्राण्यांमध्यें हृदयरूपी मोठ्या आकाशांत ज्ञानवृत्तीच्या सहस्र किरणांनीं युक्त असा जो ( ईश्वररूपी सूर्य ) उगवलेला आहे; १२९९. जागृति इत्यादि तीन अवस्था हेच कोणी स्वर्गादि तिन्ही लोक, ते संपूर्ण प्रकाशून, 'देह मी' अशा विपरीतज्ञानानें भुललेले ( देह मी व देहसंबंधीं माझे, अशा विपरीत ज्ञानाच्या वाटेनें जाणारे ) वाटसरू ( त्या सूर्यानें ) जागे केले. १३००. दृश्य जगद्रूपी पाण्याच्या सरोवरांत, विषयरूपी कमळें उमललीं असतां, पंच ज्ञानेंद्रियें व सहावें मन, हे सहा पाय असलेल्या जीवरूपी भ्रमराकडून त्या कमळाचें सेवन तो ईश्वररूपी सूर्य करवितो. १३०१. हें (सूर्याचें) रूपक राहूं दे. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं 'मी अमुक आहें' अशा रीतीनें स्फुरणारा जो अहंकार ( समष्टि अहंकार ), तो पांघरून तो ईश्वर अखंड प्रगट आहे. १३०२. तो ईश्वर आपल्या मायेचा पडदा पुढें लावून आंतून एकटाच दोरी हालवितो व पडद्याच्या बाहेरच्या बाजूला चौऱ्यांशीं लक्ष ( योनीरूपी ) छायाचित्रें नाचवितो, १३०३. ब्रह्मदेवापासून तों किड्यांपर्यंत सर्व प्राणिमात्रांना त्यांची योग्यता पाहून देहाकार (शरीराकार) दाखवितो. १३०४. तेव्हां जो देहाकार ज्या प्राण्याच्या कर्मानुरूप त्याच्यापुढें मांडला जातो, त्या देहाकारावर तो प्राणी 'देहच मी आहें' अशा अभिमानानें स्वार होतो. १३०५. सुताची गुंडी जशी सुतानें अडकलेली असते, अथवा गवताची पेंडी जशी गवताच्या आळ्यानें बांधलेली असते अथवा पाण्यांतील आपल्या प्रतिबिंबाला, मूल जसें आपणच आहोंत, असें समजतें; १३०६, त्याप्रमाणें देहाच्या आकारानें आपल्यालाच दुसरें कल्पून जीव त्या देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धीनें प्रगट होतो. १३०७. एक; याप्रमाणें शरीराकाररूपी यंत्रावर प्राणी बसवून, ईश्वर हा, प्रारब्ध कर्मांचे सूत्र हालवितो. १३०८. तेव्हां ज्या प्राण्याला जें स्वतंत्र प्रारब्धकर्मरूपी सूत्र मांडून ठेवलेलें असतें, तो प्राणी त्या गतीला पात्र होऊंच लागतो. १३०९. फार काय सांगावें ! अर्जुना, वारा जसा गवताच्या काड्या आकाशांत फिरवितो, त्याप्रमाणें ईश्वर हा प्राण्यांना स्वर्गसंसारामध्यें फिरवितो. १३१०. लोहचुंबकाच्या योगानें ज्याप्रमाणें लोखंड फिरूं लागतें, त्याप्रमाणें ईश्वरसत्तेच्या योगानें प्राणी कर्मे करितात. १३११. अर्जुना, जसे एका चंद्राच्या सान्निध्यानें समुद्रादिक आपापली हालचाल करितात. १३१२. त्या समुद्राला भरती येते, चंद्रकांत दगडाला पाझर फुटतो, चंद्रविकासी कमलांचा व चकोर पक्ष्यांचा संकोच नाहींसा होतो. १३१३. त्याप्रमाणें कारणरूप अज्ञानाच्या ताब्यांत असलेले अनेक प्राणी, एका ईश्वराकडून चेष्टविले जातात व तो ईश्वर तुझ्या हृदयांत आहे. १३१४. अर्जुना, ( देहसंबंधीय ) अर्जुनपण न घेतां तुझ्या हृदयांत 'मी' असें जें स्फुरतें, तें खरोखर त्या ईश्वराचें रूप आहे. १३१५. याकरितां तो ईश्वर प्रकृतीला प्रवृत्त करील, हें खरें आहे आणि तूं जरी लढणार नाहींस, तरी ती ( प्रकृति ) तुला लढावयास लावील. १३१६. म्हणून तो ईश्वर हा मालक आहे. तो ह्या प्रकृतीवर हुकमत चालवितो व ती प्रकृति प्राण्यांच्या इंद्रियांकडून ज्यांचीं त्यांचीं कामें अनायासानें करून घेते. १३१७. करणें न करणें, या दोन्ही गोष्टी तूं प्रकृतीच्या माथ्यावर ठेवून, ती प्रकृतीदेखील ज्या हृदयस्थ ईश्वराच्या स्वाधीन आहे, १३१८.

त्यालाच हे भरतकुलोत्पन्ना, सर्व भावानें, (मनानें, वाणीनें व शरीरानें ) शरण जा. त्याच्या प्रसादानें तूं अत्यंत श्रेष्ठ शान्ति व शाश्वत स्थान ( निजात्मपद ) पावशील. ६२.

गंगेचें पाणी जसें महासागराला सर्वांगांनीं मिळतें, त्याप्रमाणें अहंकार, वाचा, चित्त व शरीर, हीं त्या ईश्वराला अर्पण करून शरण जा. १३१९. मग त्या ईश्वराच्या प्रसादानें, सर्वांचा लय जिच्यामध्यें होतो, अशा स्वरूपशांतिरूपी तरुण स्त्रीचा पति होऊन, तूं आत्मानंदानें स्वरूपांतच रममाण होशील. १३२०.

संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे । अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ॥२१॥ तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो । म्हणे लक्ष्मीनाहो । पार्था तूं ॥ २२ ॥

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया । विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

हें गीतानाम विख्यात । सर्ववाङ्मयाचें मथित । आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥ २३ ॥ ज्ञान ऐसिया रूढी । वेदांतें जयाची प्रौढी । वानितां कीर्ति चोखडी । पातली जगीं ॥ २४ ॥ बुद्ध्यादिकें डोळसें । हें जयाचें का कडवसें । मी सर्वद्रष्टाही दिसें । पाहला जये ॥ २५ ॥ तें हें गा आत्मज्ञान । मज गोप्याचेंही गुप्त धन । परी तूं म्हणूनि आन । केवीं करूं ॥ २६ ॥ याकारणें गा पांडवा । आम्हीं आपला हा गुह्य ठेवा । तुज दिधला कणवा । जाकळिलेपणें ॥ २७ ॥ परी भुलली वोरसें । माय बोले बाळादोषें । प्रीति ही परी तैसें । न करूंचि हो ॥२८॥ येथ आकाश आणि गाळिजे । अमृताही सालि फेडिजे । का दिव्याकरवीं करविजे । दिव्य जैसें ॥ २९ ॥ जयाचेनि अंगप्रकाशें । पाताळींचा परमाणु दिसे । तया सूर्याहि का जैसें । अंजन सूदलें ॥ १३३० ॥ तैसें सर्वज्ञेंही मियां । सर्वही निर्धारूनियां । निकें होय तें धनंजया । सांगितलें तुज ॥ ३१ ॥ आतां तूं ययावरी । निकें हें निर्धारीं । निर्धारूनि करीं । आवडे तैसें ॥ ३२ ॥

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः । इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

यया देवाचिया बोला । अर्जुनु उगाचि ठेला । तेथ देवो म्हणती भला । अवंचकु होसी ॥ ३३ ॥ वाढितया पुढें भुकेला । उपरोधें म्हणे मी धाला । तैं तोचि पीडे आपुला । आणि दोषुही तया ॥ ३४ ॥ तैसा सर्वज्ञु श्रीगुरु । भेटलिया आत्मनिर्धारु । न पुसिजे जैं आभारु । धरूनियां ॥ ३५ ॥ तैं आपणपेंचि वंचे । आणि पापही वंचनाचें । आपणयाचि साचे । चुकविलें तेणें ॥ ३६ ॥ पैं उगेपणा तुझिया । हा अभिप्रावो कीं धनंजया । जें एकवेळ आवांकुनियां । सांगावें ज्ञान ॥३७॥ तेथ पार्थु म्हणे दातारा । भलें जाणसी माझिया अंतरा । हें म्हणों तरी दुसरा । जाणता असे काई ॥३८॥ येर ज्ञेय हें जी आघवें । तूं ज्ञाता एकचि स्वभावें । मा सूर्यु म्हणौनि वानावें । सूर्यातें काई ॥३९॥ या बोला श्रीकृष्णें । म्हणितलें काय येणें । हेंचि थोडें गा वानणें । जें बुझतासि तूं ॥१३४०॥ तरी अवधान पघळ । करूनियां आणिक एक वेळ । वाक्य माझें निर्मळ । अवधारीं पां ॥ ४१ ॥ हें वाच्य म्हणौनि बोलिजे । का श्राव्य मग आयिकिजे । तैसें नव्हे परी तुझें । भाग्य बरवें ॥४२॥ कूर्मीचिया पिलियां । दिठी पान्हा ये धनंजया । आकाश वाहे बापिया । घरींचें पाणी ॥ ४३ ॥ जो व्यवहारु जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडे । काय दैवें न सांपडे । सानुकूळें ॥ ४४ ॥ एऱ्हवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याचां परिवरीं । भोगिजे तें

उत्पत्ति ज्याच्याकडून उत्पन्न होते, विश्रांति जेथें विसावा घेते, अनूभव देखील ज्या अनुभवाला अनुभवितो, १३२१. अर्जुना त्या आपल्या आत्मस्थितीचा तूं अक्षय राजा होऊन राहाशील, असें लक्ष्मीपति ( श्रीकृष्ण ) म्हणाले. १३२२.

गूढाहून अत्यंत गूढ, असें हें ज्ञान मीं तुला सांगितलें. याचा पूर्णपणें विचार करून ( मग ) तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें कर. ६३.

हें ' गीता ' नांवानें प्रसिद्ध असलेलें सर्व वाङ्मयाचें सार आहे व ज्याच्या योगानें आत्मरूपी रत्न स्वाधीन होतें ( अनुभवाला येतें. ) १३२३. वेदांतानें ' ज्ञान ' या नांवानें ज्या गीताशास्त्राचा मोठेपणा वर्णन केल्यामुळें त्या वेदांताला जगांत शुद्ध कीर्ति प्राप्त झाली. १३२४. बुद्धयादिक डोळस ( ज्ञानवान् ) पदार्थ हे ज्या ( गीताशास्त्राच्या ज्ञानाचे ) कवडसे आहेत, ( म्हणजे ज्या गीताशास्त्राच्या ज्ञानाकडून प्रकाशले गेले आहेत. ) व मी सर्व द्रष्टा देखील ज्या गीताशास्त्राचा उदय झाला असतां अनुभवाला येतों; १३२५. अरे तें हें ( गीतारूपी ) आत्मज्ञान, जो मी गूढ, त्या गूढाचाही गुप्त ठेवा आहे. परंतु तूं ( अर्जुन माझा सखा ) म्हणून प्रतारणा कशी करूं ? १३२६. म्हणून अर्जुना, आम्हीं आपला हा गुप्त ठेवा करुणेनें व्याप्त झाल्यामुळें तुला दिला आहे. १३२७ परंतु प्रेमानें वेडी झालेली आई आपल्या मुलाला उद्देशून ( माझा बाबा, माझी आई, असें अयथार्थ ) बोलते. आमचेंही तुझ्यावर तसेंच अलोट प्रेम आहे. परंतु आम्हीं तसें करीत नाहीं. ( अयथार्थ बोलत नाहीं. ) १३२८. येथें आकाश अतिसूक्ष्म असतांही तें जसें गाळून घ्यावें, अमृताची देखील जशी साल काढावी अथवा शपथेकडून जशी शपथ करवावी; १३२९. ज्याच्या अंगच्या प्रकाशानें पाताळांतील परमाणु दिसतो, त्या सूर्याला देखील जसें अंजन घालावें. १३३०. अर्जुना, त्याप्रमाणें सर्वज्ञ जो मी, त्या सर्वज्ञानें देखील सर्व गोष्टींचाही विचार करून, जें चांगलें आहे तें तुला सांगितलें. १३३१. आतां यानंतर आम्हीं हें जें तुला सांगितलें, याचाच चांगल्या रीतीनें विचार कर आणि विचार करून नंतर तुला वाटेल तसें कर. १३३२.

सर्वांत अत्यंत गुह्य असें माझें उत्कृष्ट भाषण पुनः ऐक. तूं मला अत्यंत प्रिय आहेस, म्हणून तुला मी हित सांगतों. ६४.

या देवाच्या बोलण्यावर अर्जुन उगाच राहिला. ( तेव्हां त्याच्या उगीच राहण्यांत देवांना असें वाटलें कीं, अर्जुनाच्या मनांत असें आहे कीं, सांगितलेलें ज्ञान पुनः थोडक्यांत सांगावें. हें मनांत येऊन ) देव अर्जुनाला म्हणतात. तूं खरोखर चांगला आपण आपल्याला न फसविणारा आहेस. १३३३. वाढणारापुढें भुकेलेला मनुष्य, भूक असून भिडेनें, ' मी तृप्त झालों ' असें म्हणाला, तर त्याला स्वतःलाच भुकेची पीडा होते व मिथ्या भाषण केल्याचा दोषही त्याला लागतो. १३३४. त्याप्रमाणें सर्वज्ञ श्रीगुरु भेटला असतां, भीड धरून जेव्हां त्याला आत्मविचार विचारला जात नाहीं, १३३५. तेव्हां तो ( न विचारणारा ) आपल्यालाच फसवितो व फसविल्याचें पातकही त्यालाच लागतें आणि त्यानें आपल्यालाच सत्यस्वरूपाला मुकविलें. १३३६. पण अर्जुना, तुझ्या निवांत राहण्यांत तुझा असा अभिप्राय असल्याचें दिसतें कीं, पुनः एक वेळ ज्ञान सारांशरूपानें ( थोडक्यांत ) सांगावें. १३३७. यावर अर्जुन म्हणाला, महाराज आपण माझें मन चांगलें जाणत आहांत; आणि माझ्या मनाला जाणतां असें जर म्हणावें तर तुमच्याशिवाय दुसरा कोणी जाणता आहे काय ? १३३८. तुझ्या शिवाय इतर जें हें सर्व आहे; तें ज्ञेय आहे. त्यास जाणणारा स्वभावतः तूंच एक आहे; मग सूर्य म्हणून सूर्याचेंच काय वर्णन करावें ? १३३९. या अर्जुनाच्या बोलण्यावर श्रीकृष्ण म्हणाले, हें वर्णन कशाला? आम्हीं सांगितलेलें तूं समजतोस, हेंच काय आमचें थोडें वर्णन आहे ? १३४०. तर आपलें लक्ष विस्तृत करून माझा शुद्ध उपदेश आणखी एक वेळ ऐक. १३४१. हें बोलण्यासारखें आहे म्हणून मग तें बोलावें अथवा ऐकण्यासारखें आहे म्हणून तें ऐकावें असें हें नाहीं. परंतु तुझें भाग्यच चांगलें आहे. १३४२. अर्जुना, ( दृष्टीला पान्हा फुटणें शक्य नाहीं, पण ) कासवीच्या पिलाकरितां ( कासवीच्या ) दृष्टीला पान्हा फुटतो व ( आकाशाच्या पोकळींत कांहीं सांठवलें जात नाहीं, पण ) चातकाच्या करचें ( चातकाला लागणारें ) पाणी आकाश वाहातें, ( धारण करतें. ) १३४३. जो व्यवहार जेथें घडत नाहीं, तेथें त्या व्यवहाराचें फळच मिळतें. दैव जर अनुकूल असेल, तर काय मिळणार नाहीं ? १३४४. ऐक, ( याविषयीं ) सहज विचार करून पाहिलें तर, द्वैताची येरझार नाहींशी करून ऐक्याच्या

अवधारीं । रहस्य हें ॥ ४५ ॥ आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जें प्रियोत्तमा । तें दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावें ॥ ४६ ॥ आरिसाचिया देखिलया । गोमटें कीजे धनंजया । तें तया नोहे आपणयां- । लागीं जैसें ॥ ४७ ॥ तैसें पार्था तुझेनि मिषें । मी बोलें आपणयाचि दोषें । माझां तुझां ठाईं असे । मीतूंपण गा ॥४८॥ म्हणौनि जिव्हारींचें गुज । सांगतसें जीवासि तुज । हें अनन्यगतीचें मज । आथी व्यसन ॥ ४९ ॥ पैं जळा आपणपें देतां । लवण भुललें पंडुसुता । कीं आघवें तयाचें होतां । न लजेचि तें ॥ १३५० ॥ तैसा तूं माझां ठाईं । राखों नेणसीचि कांहीं । तरी आतां तुज काई । गोप्य मी करीं ॥ ५१ ॥ म्हणौनि आघवींचि गूढें । जें पाऊनि अति उघडें । तें गोप्य माझें चोखडें । वाक्य आइक ॥ ५२ ॥ तरी बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा । मज व्यापकातें वीरा । विषो करी ॥ ५३ ॥ आघवां आंगीं जैसा । वायु मिळोनि आहे आकाशा । तूं सर्व कर्मीं तैसा । मजसीचि अस ॥ ५४ ॥

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥

किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन । माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं ॥५५॥ आत्मज्ञानें चोखडीं । संत जे माझीं रूपडीं । तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ॥ ५६ ॥ मी सर्व वस्तीचें वसौटें । माझीं नामें जियें चोखटें । तियें जीवा यावया वाटे । वाचेचिये लावीं ॥५७॥ हाताचें करणें । का पायांचें चालणें । तें होय मजकारणें । तैसें करीं ॥ ५८ ॥ आपुला अथवा परावा । ठायीं उपकरसी पांडवा । तेणें यज्ञें होईं बरवा । याज्ञिकु माझा ॥ ५९ ॥ हें एकैक शिकऊं काई । पैं सेवकें आपुलां ठाईं । उरौनि येर सर्वही । मी सेव्यचि करीं ॥ १३६० ॥ तेथ जाऊनिया भूतद्वेषु । सर्वत्र नम वें नम मीचि एकु । ऐसेनि आश्रयो आत्यंतिकु । लाहासी तूं माझा ॥ ६१ ॥ मग भरलेया जगाआंतु । जाऊनिया तिजयाची मातु । होऊनि ठायील एकांतु । आम्हां तुम्हां ॥ ६२ ॥ तेव्हां भलतिये आवस्थे । मी तूंतें तूं मातें । भोगिसीं ऐसें आइतें । वाढेल सुख ॥ ६३ ॥ आणि तिजें आडळ करितें । निमालें अर्जुना जेथें । तें मीचि म्हणौनि तूं मातें । पावसी शेखीं ॥ ६४ ॥ जैसी जळींची प्रतिभा । जळनाशीं बिंबा । येतां गाभागोभा । कांहीं आहे ॥ ६५ ॥ पैं पवनु अंबरा । कां कल्लोळु सागरा । मिळतां आडवारा । कोणाचा गा ॥ ६६ ॥ म्हणौनि तूं आणि आम्हीं । हें दिसताहे देहधर्मीं । मग याचां विरामीं । मीचि होसी ॥ ६७ ॥ यया बोलामाझारीं । होय न होय झणें करीं । येथ आन आथी तरी । तुझीच आण ॥ ६८ ॥ पैं तुझी आण वाणें । हें आत्मलिंगातें शिवणें । प्रीतीची जाति लाजणें । आठवों नेदी ॥ ६९ ॥ एऱ्हवीं वेदु निष्प्रपंचु । जेणें विश्वाभासु हा साचु । आज्ञेचा नटनाचु । काळातें जिणें ॥ १३७० ॥ तो देवो मी सत्यसंकल्पु । आणि जगाचा हितु

परंतु जी गुह्य गोष्ट भोगावयाची (ती ही होय.) १३४५. आणि प्रियतमा अर्जुना, जे निर्निमित्त प्रेमाचा विषय असतें, तें दुसरें कोणी नाहीं, तर आत्माच होय, असेंच समजावें. १३४६. अर्जुना, आरशांत पाहण्याकरितां, जें आरशाला चांगलें ( धुणें, पुसणें इत्यादिक ) करावयाचें तें त्या आरशाकरितां नाहीं, तर ते जसें आपल्या ( पाहणाऱ्या ) करितां असतें. १३४७. त्याप्रमाणें अर्जुना, तुझ्या निमित्तानें मी आपल्याकरितांच बोलतों. माझ्या व तुझ्या ठिकाणीं मीतूंपणा असा भेद आहे काय ? १३४८. म्हणून जिव्हाळ्याची गुप्त गोष्ट, तूं जो माझा जीव, त्या तुला मी सांगत आहें. हें अनन्यगतीच्या भक्ताचें मला वेड आहे. १३४९. अर्जुना, आपल्या स्वतःला पाण्याला देतांना, मीठ जसें आपल्या खडेपणाला विसरतें व ( मीठ ) आपण सर्व त्या पाण्याचें होतांना ( जलरूप होतांना ) तें लाजतच नाहीं. १३५०. त्या मिठाप्रमाणें तूं माझ्या ठिकाणीं कांहीं चोरून ठेवणें जाणतच नाहींस; तर आतां मी तुजपासून गुप्त ठेवीन काय ? ( माझें ज्ञान किती जरी गुप्त असलें तरी तुला चोरून कसें ठेवीन ? ) १३५१. म्हणून ज्या माझ्या उपदेशाची तुलना केली असतां, इतर सर्व गुप्त गोष्टी उघड असल्यासारख्या आहेत, तो माझा गूढ व शुद्ध उपदेश तूं ऐक. १३५२. तरी अर्जुना, तूं आपल्या सर्व बाहेर ( इंद्रियांकडून ) आणि आंतून ( मनादिकांकडून ) होणाऱ्या कर्मांना, मी जो व्यापक, त्या मला विषय कर. १३५३. ज्याप्रमाणें वायु सर्वांगानीं आकाशाशीं मिळून असतो, त्याप्रमाणें सर्व कर्मांमध्यें तूं माझ्याशींच मिळून राहा. १३५४.

माझ्या ठिकाणीं मन ठेवणारा हो, माझा भक्त हो, माझें यजन करणारा हो, मला नमस्कार कर; ( म्हणजे ) माझ्याप्रतच येशील; तूं मला प्रिय असल्यामुळें, हें मी तुला प्रतिज्ञेवर सत्य सांगत आहें. ६५.

फार काय सांगावें ! तूं आपलें मन माझ्या एकट्याचेंच रहाण्याचें ठिकाण कर व तूं आपले कान माझ्या श्रवणानें भरून ठेव. १३५५. आत्मज्ञानानें शुद्ध असलेले जे संत, तीं माझीं रूपें आहेत. त्या संतांच्या ठिकाणीं, जशी सुंदर स्त्रीवर प्रेमानें ( कामुकाची ) दृष्टि पडते, तशी तुझी दृष्टि प्रेमानें पडूं दे. १३५६. मी सर्व जगाच्या राहाण्याचें ठिकाण आहें, त्या माझीं जीं चांगलीं नांवें आहेत, तीं अंतःकरणीं उतरण्याकरितां वाचेच्या वाटेला लाव. १३५७. हातानें करावयाचीं कामें अथवा पायाचें चालणें, तें माझ्याकरितां होईल तसें कर. १३५८. अर्जुना, आपल्या ठिकाणीं अथवा दुसऱ्याच्या ठिकाणीं जो कांहीं तूं उपयोगी पडशील, त्या यज्ञाच्या योगानें तूं माझा चांगला यज्ञ करणारा हो. १३५९. हें एक एक ( वेगळें वेगळें ) काय शिकवूं ? तूं आपल्या ठिकाणीं सेवकपणा बाणवून घेऊन, इतर सर्व जग मद्रूप समजून, तें सेवा करण्याला योग्य आहे, असें समज. १३६०. तेव्हां प्राण्यांचा द्वेष नाहींसा होऊन सर्व ठिकाणीं वारंवार नमस्कार करण्याला मीच काय तो एकटा शिल्लक राहीन. असें केलें म्हणजे माझा परम आश्रय (अतिजवळचें सान्निध्य) तुला प्राप्त होईल. १३६१ असें झाल्यावर मग या सर्व भरलेल्या जगांत तिसऱ्याची गोष्ट जाऊन आम्हांतुम्हांला एकान्त होऊन राहील. १३६२. त्यावेळीं कोणत्याही अवस्थेंत तुला माझा व मला तुझा भोग घेतां येईल, असें आयतें सुख वाढेल. १३६३. आणि अर्जुना, प्रतिबंध करणारें तिसरें ( जगत्कल्पना ) जेव्हां नाहींसें होईल, तेव्हां तूं म्हणजे मीच आहेस, असें जाणून शेवटीं तूं मला पावशील. १३६४. पाण्यांत पडलेलें सूर्याचें प्रतिबिंब पाणी आटून गेल्यावर आपल्या बिंबाशीं ऐक्याला येतांना कांहीं प्रतिबंध आहे काय ? १३६५. अरे, वारा आकाशाला मिळत असतांना अथवा लाट समुद्राला मिळतांना त्यास कोणाचा प्रतिबंध आहे ? १३६६. म्हणून एक तूं व एक आम्हीं, असें द्वैत देहउपाधीमुळें दिसत आहे. मग देहाचा निरास झाल्यावर तूं मद्रूपच होशील. १३६७. या माझ्या सांगण्यामध्यें, मी म्हणतों त्याप्रमाणें होईल न होईल, अशी कदाचित् शंका घेशील, तर तशी शंका घेऊं नकोस हो ! या माझ्या बोलण्यांत अन्यथा असेल तर तुझी शपथ. १३६८. तुझी शपथ वाहाणें म्हणजे आम्हीं आपली शपथ वाहाण्यासारखें आहे. ( मी स्वभावतः सत्यवचनी असल्यामुळें मी शपथ वाहाणें ही लज्जेची गोष्ट आहे. ) परंतु प्रेमाची जातच अशी आहे कीं, ती लज्जेची आठवण होऊं देत नाहीं. १३६९. सहजच विचार करून पाहिलें तर वेदांनीं निष्प्रपंच ( भेदशून्य ) असें ज्याचें वर्णन केलें आहे व ज्याच्या आधारामुळें हा विश्वाभास खरा वाटतो व ज्याच्या आज्ञेचा प्रताप काळाला जिंकतो, १३७०. तो मी सत्यसंकल्पी देव असून, जगाचें कल्याण करणारा बाप

बापु । मा आणेचा आक्षेपु । कां करावा ॥ ७१ ॥ परी अर्जुना तुझेनि वेधें । मियां देवपणाचीं बिरुदें । सांडिलीं गा मी हें आधें । सगळेनि तुवां ॥ ७२ ॥ पैं काजा आपुलिया । रावो आपुली आपणया । आण वाहे धनंजया । तैसें हें कीं ॥ ७३ ॥ तेथ अर्जुनु म्हणे देवें । अचाट हें न बोलावें । जे आमचें काज नांवें । तुझेनि एकें ॥ ७४ ॥ यावरी सांगों बैससी । कां सांगतां भापही देसी । या तुझिया विनोदासी । पारु आहे जी ॥ ७५ ॥ कमळवना विकाशु । करी रवीचा एक अंशु । तेथ आघवाचि प्रकाशु । नित्य दे तो ॥७६॥ पृथ्वी निवऊनि सागर । भरीजती येवढें थोर । वर्षे तेथ मिषांतर । चातकु कीं ॥ ७७ ॥ म्हणौनि औदार्या तुझेया । मज निमित्त ना म्हणावया । प्राप्ति असे दानीं राया । कृपानिधी ॥ ७८ ॥ तंव देवो म्हणती राहें । या बोलाचा प्रस्तावो नोहे । पैं मातें पावसी उपायें । साचाचि येणें ॥ ७९ ॥ सैंधव सिंधू पडलिया । जो क्षणु धनंजया । तेणें विरेचि कीं उरावया । कारण कायी ॥ १३८० ॥ तैसें सर्वत्र मातें भजतां । सर्व मी होतां अहंता । निःशेष जाऊनि तत्त्वता । मीचि होसी ॥८१॥ एवं माझिये प्राप्तीवरी । कर्मालागोनि अवधारीं । दाविली तुज उजरी । उपायांची ॥ ८२ ॥

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज । अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

जे आधीं तंव पांडुसुता । सर्व कर्मे मज अर्पितां । सर्वत्र प्रसन्नता । लाहिजे माझी ॥ ८३ ॥ पाठीं माझां तिये प्रसादीं । माझें ज्ञान जाय सिद्धी । तेणें मिसळिजे त्रिशुद्धी । स्वरूपीं माझां ॥ ८४ ॥ मग पार्था तिये ठायीं । साध्य साधन होये नाहीं । किंबहुना तुज कांहीं । उरेचि ना ॥ ८५ ॥ तरी सर्व कर्मे आपुलीं । तुवां सर्वदा मज अर्पिलीं । तेणें प्रसन्नता लाधली । आजि हे माझी ॥ ८६ ॥ म्हणौनि येणें प्रसादबळें । नव्हे झुंजाचेनि आडळे । न ठकोचि येकेंवळे । भाळलों तुज ॥ ८७ ॥ जेणें सप्रपंच अज्ञान जाये । येकु मी गोचरु होये । तें उपपत्तीचेनि उपायें । गीतारूप हें ॥ ८८ ॥ मियां ज्ञान तुज आपुलें । नानापरी उपदेशिलें । येणें अज्ञानजात सांडीं वियालें । धर्माधर्म जें ॥ ८९ ॥ आशा जैसी दुःखातें । व्याली निंदा दुरितें । हें असो जैसें दैन्यातें । दुर्भगत्व ॥ १३९० ॥ तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक । तें सांडूनि घाली अशेख । ज्ञानें येणें ॥ ९१ ॥ हातीं घेऊनि तो दोरु । सांडिजे जैसा सर्पाकारु । कां निद्रात्यागें घराचारु । स्वप्नींचा जैसा ॥ ९२ ॥ नाना सांडिलेनि कवळें । चंद्रींचें धुपे पिंवळें । व्याधित्यागें कडुवाळें- । पण मुखाचें ॥ ९३ ॥ अगा दिवसा पाठीं देउनी । मृगजळ घापे त्यजुनी । कां काष्ठत्यागें वन्ही । त्यजिजे जैसा ॥ ९४ ॥ तैसें धर्माधर्मांचें टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ । तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥ ९५ ॥ मग अज्ञान निमालिया । मीचि येकु असें अपैसया । सनिद्र स्वप्न गेलया । आपणपें जैसें ॥ ९६ ॥ तैसा मी एकवांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं । सोऽहंबोधें तयाचां ठायीं । अनन्यु होय ॥ ९७ ॥ पैं आपलेंनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥ ९८ ॥

आहे; असें जर आहे, तर मग शपथेचा आग्रह मीं कां करावा ? १३७१. परंतु अर्जुना, तुझ्या बेधानें मी देवपणाच्या बाण्याचीं चिन्हें टाकिलीं आहेत. तुझ्या बेधानें मी हा अर्धा ( जवळ जवळ जीव ) झालों आहे व तूं माझ्या वेधानें पूर्णपणें ( ईश्वर ) झाला आहेस. १३७२. अर्जुना, आपल्या कामाकरितां राजा आपली शपथ आपण वाहतो, त्याप्रमाणें हें आहे. १३७३. यावर अर्जुन म्हणाला, देवानें हें अचाट बोलूं नये. महाराज, तुमच्या एका नांवानेंच आमचें सर्व काम होतें. १३७४. असें असून तूं सांगावयास लागतोस आणि शिवाय सांगत असतांना शपथही घेतोस; महाराज, या तुमच्या विनोदाला पार आहे काय ? १३७५. सूर्याचें ( केवळ ) एक किरण कमलवनाचा विकास करण्यास पुरें आहे; असें असतां देखील कमलाचें निमित्त करून तो (सूर्य) आपला सर्व प्रकाश ( जगाला ) नित्य देत असतो. १३७६. मेघ हा पृथ्वीला शांत करून समुद्र भरले जातील, एवढी मोठी पर्जन्यवृष्टि करतो. त्या मेघाच्या वृष्टि करण्याच्या कामांत चातक हा निमित्त मात्र असतो. १३७७. म्हणून तुझ्या औदार्याला मी एक म्हणावयास निमित्त झालों नाहीं काय ? हे राजा, कृपानिधे, तुझ्या या ( ज्ञान– ) दानांत ( जगाला ) प्राप्ति ( लाभ ) होणारी आहे. १३७८. तेव्हां देव म्हणाले, थांब, आमचें हें वर्णन करण्याचें कांहींच कारण नाहीं. पण या उपायानें तूं खरोखर माझ्या स्वरूपाला पावशील. १३७९. अर्जुना, ज्या क्षणांत मिठाचा खडा समुद्रांत पडतो, त्या क्षणींच तो विरावयास लागतो. त्याला खडेपणानें उरण्याचें कारण काय ? १३८०. त्याप्रमाणें सर्व पदार्थमात्राचे ठायीं मला भजलें असतां व सर्व मद्रूप व्हावयास लागलें असतां, देहाहंकार निःशेष होऊन तूं खरोखर मीच होशील. १३८१. याप्रमाणें कर्मापासून तों माझ्या स्वरूपप्राप्तीपर्यंत उपाय स्पष्ट करून मी तुला सांगितले, ऐक. १३८२.

सर्व धर्मांचा ( धर्माधर्माला कारणीभूत असणारें जें अज्ञान, त्याचा ) त्याग करून मला एकट्यालाच ( अद्वैतभावानें ) शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. तूं शोक करूं नकोस. ६६.

कारण कीं, अर्जुना, अगोदर तर, सर्व कर्में मला अर्पण केलीं असतां माझी प्रसन्नता तुला सर्वत्र प्राप्त होईल. १३८३. नंतर माझा तो प्रसाद झाला असतां माझ्यासंबंधीचें ज्ञान सिद्धीला जाईल व त्या योगानें निश्चयेंकरून माझ्या शुद्ध स्वरूपीं मिळतां येईल. १३८४. अर्जुना, मग त्या ठिकाणीं साध्य व साधन हीं नाहींशीं होतात. फार काय सांगावें ! तुला कांहीं उरणारच नाहीं. ( तूं कृतार्थ झाल्यामुळें तुला कांहीं करावयाचें राहणार नाहीं. ) १३८५. तर तूं आपलीं सर्व कर्में मला सर्वदा अर्पिल्या कारणानें ही माझी प्रसन्नता आज तुला प्राप्त झाली आहे. १३८६. म्हणून ( जरी युद्ध हा उपदेश करण्याला प्रतिबंध आहे तरी ) या प्रसन्नतेच्या बलानें, हा लढाईचा प्रतिबंध, तुला सांगण्याच्या आड येतच नाहीं, असा मी एकवार तुझ्यावर भुलून गेलों नाहीं काय ? १३८७. ( तर आतां ) ज्या योगानें प्रपंचासह अज्ञान जाऊन, मी जो एक, तो गोचर होतों, तें आपलें गीतारूप ज्ञान अनेक युक्तींच्या उपायांनीं, १३८८.मी तुला नाना प्रकारांनीं सांगितलें. या ज्ञानाच्या योगानें धर्माधर्मांचें मूळ कारण जें अज्ञान, तें सर्व टाकून दे. १३८९. आशा जशी दुःखाला प्रसवते, निंदा जशी पापाला प्रसवते, हें राहूं दे. ज्याप्रमाणें दुर्भाग्य हीन स्थितीला प्रसवतें. १३९०. त्याप्रमाणें स्वर्ग व नरकाला सुचविणारे जे धर्माधर्म, त्या धर्माधर्मास अज्ञान प्रसवतें. तें संपूर्ण अज्ञान या ज्ञानानें नाहींसें करून टाक. १३९१. हातांत दोरी घेऊन ज्याप्रमाणें ( त्या दोरीवर भासणारी ) सर्पाची कल्पना टाकून द्यावी, अथवा निद्रेच्या त्यागानें ज्याप्रमाणें स्वप्नांतील प्रपंच टाकून द्यावा. १३९२. किंवा काविळीनें टाकल्यावर ज्याप्रमाणें चंद्राचा ( भासणारा ) पिवळेपणा नाहींसा होतो, अथवा रोग नाहींसा झाला म्हणजे तोंडाचा कडूपणा नाहींसा होतो. १३९३. अरे अर्जुना, दिवस मावळल्यावर मृगजळ नाहींसें होतें, अथवा लांकडाच्या त्यागानें जसा अग्नि टाकला जातो. १३९४. त्याप्रमाणें मिथ्या धर्माधर्माला दाखविणारें जें मूळ अज्ञान,त्या अज्ञानाचा त्याग करून धर्ममात्रांचा त्याग कर. १३९५. मग ज्याप्रमाणें निद्रेसह स्वप्न गेलें असतां, आपण एकटे उरतों, त्याप्रमाणें अज्ञान नाहींसें झाल्यावर आपोआप मीच एकटा राहतों. १३९६. त्याप्रमाणें मग मी एकट्यावांचून दुसरें भिन्न भिन्न कांहींच नाहीं, ( असें जें माझें स्वरूप ) त्याच्या ठिकाणीं, ' तोच मी आहे ' अशा ज्ञानानें अनन्य हो. १३९७. अर्जुना, आपल्याला माझ्याहून भिन्न न मानतां जें माझें एकपण जाणावयाचें, त्याचेंच नांव मला शरण येणें होय. १३९८

म्हणौनि घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे । मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥ ९९ ॥ सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया । तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ १४०० ॥ वांचूनि सागराचां पोटीं । वडवानळु शरण आला किरीटी । जाळूं न ठाके तया गोठी । वाळूनि दे पां ॥ १ ॥ मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंचि असिजे । धिग् बोली यिया न लजे । प्रज्ञा केवीं ॥ २ ॥ अगा प्राकृताही राया । आंगीं पडे जें धनंजया । तें दासिरूंही कीं तया । समान होय ॥ ३ ॥ मा मी विश्वेश्वरु भेटे । आणि जीवग्रंथी न सुटे । हे बोल नको वोखटे । कानीं लाऊं ॥ ४ ॥ म्हणौनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें । तें करीं हाता येतें । ज्ञानें येणें ॥ ५ ॥ मग ताकौनिया काढिलें । लोणी मागौतें ताकीं घातलें । परी न घेपे कांहीं केलें । तेणें जेवीं ॥ ६ ॥ लोह उभें खाय माती । तें परिसाचिये संगती । सोनें जालया पुढती । न शिविजे मळें ॥ ७ ॥ हें असो काष्टापासोनी । मथूनि घेतलिया वन्ही । मग काष्टेंही कोंडोनि । न ठके जैसा ॥ ८ ॥ तैसें अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज । धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥ ९ ॥ अर्जुना काय दिनकरु । देखत आहे अंधारु । कीं प्रबोधीं होय गोचरु । स्वप्नभ्रमु ॥ १४१० ॥ तैसें मजसीं येकवटलेया । मी सर्वरूप वांचूनियां । आन कांहीं उरावया । कारण असे ॥ ११ ॥ म्हणौनि तयाचें कांहीं । चिंतीं ना आपुलां ठाईं । तुझें पापपुण्य पाहीं । मीचि होईन ॥ १२ ॥ जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा । तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ॥ १३ ॥ तेथ सर्वबंधलक्षणें । पापें उरावें दुजेपणें । तें माझां बोधीं वायाणें । होऊनि जाईल ॥ १४ ॥ येतुलेनि आपैसया । सुटलाचि आहासी धनंजया । घेईं मज प्रकाशोनियां । सोडवीन तूतें ॥ १५ ॥ याकारणें पुढती । हे आथी न वाहें चित्तीं । मज एकासि ये सुमती । जाणोनि शरण ॥ १६ ॥ ऐसें सर्वरूपरूपसें । सर्वदृष्टिडोळसें । सर्वदेशनिवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १७ ॥ मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ १८ ॥ न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें । बोलणें मागौतें । वोसरलें ॥ १९ ॥ ऐसें जें कांहीं एक । बोला बुद्धीसीही अटक । तें द्यावया मिख । खेवाचें केलें ॥ १४२० ॥ हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें तें हृदयीं घातलें । द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥ २१ ॥ दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला । द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥ २२ ॥ तेव्हां सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया । तेथ वाडु तऱ्हीं बुडोनियां । ठेला देवो ॥ २३ ॥ सिंधु सिंधूतें पावों जाये । तें पावणें ठाके दुणा होये । वरी रिगे पुरवणिये । आकाशही ॥ २४ ॥

म्हणून ( त्याप्रमाणें ) घट फुटल्यानें घटाकाश जसें महाकाशांत ऐक्यानें प्रवेश करतें, त्याप्रमाणें ऐक्यानें मला शरण येणें कर ( म्हणजे माझ्याशी ऐक्याला पाव, असा मला शरण ये. ) १३९९. अर्जुना, सोन्याचा मणि जसा सोन्याशीं शरण येतो, ( ऐक्याला पावतो ); अथवा लाट जशी पाण्याशीं शरण येते ( ऐक्याला पावते, ) त्याप्रमाणें तूं मला ( अभिन्नत्वानें ) शरण ये. १४००. याशिवाय ( ऐक्यानें शरण न येतां ) अर्जुना, समुद्राच्या पोटांत वडनावळ जसा शरण आला खरा; पण तो समुद्रास ( समुद्रापासून भिन्न राहून त्यास ) जाळीत नाहीं काय ? तसें माझ्याहून भिन्न राहून शरण येण्याच्या त्या गोष्टी टाकून दे. १४०१. मलाही शरण यावयाचें आणि जीवपणानेंच असावयाचें; धिक्कार असो या बोलण्याला ! या बोलण्याची बुद्धीला लाज कशी वाटत नाहीं ? १४०२. अरे अर्जुना, एखाद्या सामान्य राजानेंही जिचा अंगीकार केलेला असतो, ती बटीक देखील असली तरी त्या राजाच्या बरोबरीची होते. १४०३. मग मी जो विश्वाचा स्वामी, तो भेटतो आणि जीवाची ग्रंथी ( जीवदशेचें बंधन ) मात्र सुटत नाहीं; असल्या ओंगळ गोष्टी तूं कानांवर देखील येऊं देऊं नकोस. १४०४. म्हणून मद्रूप होऊन माझी सेवा ( भक्ति ) करणें, ही माझी सहजभक्ति आहे. ती माझी सहजभक्ति या ज्ञानानें हस्तगत होईल असें कर. १४०५. मग ताकांतून काढलेलें लोणी ताकांत पुनः घातलें, परंतु तें लोणी जसें त्या ताकांत कांहीं एक केल्यानें मिसळत नाहीं. १४०६. लोखंड जरी उभें टांगून ठेवलें तरी त्याला गंज चढतो; पण तेंच लोखंड परिसाच्या योगानें सोनें झालें असतां त्यास गंजाचा स्पर्श होत नाहीं. १४०७. हें राहूं दे. काष्ठापासून मंथन करून अग्नि उत्पन्न केल्यावर मग तो जसा लांकडांनींही कोंडून राहात नाहीं. १४०८. त्याप्रमाणें अद्वैतभावानें मला शरण आल्यास तुला धर्माधर्म हे सहजच बाधक होणार नाहींत ( कारण तुझीं सर्व कर्में मद्रूप होतील. ) १४०९, अर्जुना, सूर्याला अंधाराची खबर असते काय ? अथवा जाग्रत अवस्थेंत स्वप्नभ्रम दिसेल काय ? १४१०. त्याप्रमाणें माझ्याशीं ऐक्य पावल्यावर, मी जो सर्वरूप त्या माझ्याशिवाय दुसरें कांहीं उरण्याला कारण आहे काय ? १४११. म्हणून तूं आपल्या ठिकाणीं तुझ्या धर्माधर्माविषयीं कांहीं काळजी करूं नकोस. तुझें पुण्य व पाप मीच होईन, पहा. १४१२. हे चतुर अर्जुना, मीठ पाण्यांत पडलें असतां त्याचें सर्व पाणी होतें. मला अनन्यभावानें शरण येणारा जो तूं, त्या तुला मी त्याप्रमाणें होईन. ( म्हणजे तुझें सर्वच मी होईन. ) १४१३. तेव्हां माझ्याहून भिन्नपणानें असणें, हें जें सर्व, बंधरूपी पाप आहे, तें (द्वैतभावरूपी) पाप माझ्या बोधांत नाहींसें होईल. १४१४. अर्जुना, एवढ्यानें तूं आपोआप सुटलाच आहेस. तूं मला चांगल्या प्रकारानें समजून घे म्हणजे मी तुला मुक्त करीन. १४१५. या कारणास्तव येथून पुढेंही चित्तांत तूं चिंता बाळगूं नकोस. हे सुबुद्धि अर्जुना, तूं मला एकाला जाणून शरण ये. १४१६. सर्व रूपांच्या योगानें जो रूपवान् आहे, सर्व दृष्टींच्या योगानें जो डोळस आहे व जो सर्व देशांत राहणारा आहे, त्या श्रीकृष्णानें याप्रमाणें अर्जुनाला सांगितलें. १४१७. मग शामसुंदर श्रीकृष्णानें आपला कंकणयुक्त उजवा बाहू पसरून, आपल्याला शरण आलेला, सर्व भक्तांचा राजा जो अर्जुन, त्याला आलिंगन दिलें. १४१८. ज्या ठिकाणीं प्राप्त न होतां वाचाही बुद्धीला काखेंत मारून माघारी परतली; १४१९. असें जें कांहीं एक वाचेला व बुद्धीला प्रवेश करण्यास कठीण, तें अर्जुनास देण्याकरितां देवांनीं आलिंगनाचें निमित्त केलें ( म्हणजे वाचेला व बुद्धीला अगम्य असें जें ब्रह्मस्वरूप, त्याचा अनुभव अर्जुनास आणून देण्याकरितां देवांनीं आलिंगनाचें निमित्त केलें. ) १४२०. तेव्हां आलिंगनाचे वेळीं देवांचें हृदय व अर्जुनाचें हृदय एक झालें; देवांनीं आपल्या हृदयांत असलेला बोध अर्जुनाच्या हृदयांत घातला आणि देव व भक्त, हें द्वैत न मोडतां, देवांनीं अर्जुनाला आपल्यासारखें केलें. १४२१. एका दिव्यानें दुसरा दिवा लावला असतां, दिसावयास जरी ते दोन दिसतात, तरी प्रकाशाच्या दृष्टीनें त्यांचें ऐक्य मोडत नाहीं; त्याप्रमाणें तो आलिंगनाचा प्रकार झाला, म्हणजे द्वैत ( देवभक्तपणा ) न मोडतां देवानें अर्जुनाला आपल्या स्वरूपीं मिळवून घेतला. १४२२. तेव्हां मग त्या अर्जुनाला जो सुखाचा पूर आला, त्या पुरांत (त्याजबरोबर देवासही सुखाचा पूर आला. तो इतका मोठा होता कीं ) देव जरी सर्व शक्तिमान् होते, तरी बुडून राहिले. १४२३. समुद्राला समुद्र जेव्हां मिळावयास जातो, तेव्हां तें मिळणें एकीकडेच राहातें व पाणी दुप्पट होतें व शिवाय भरणीला आकाशांत वर वाढतें. १४२४.

तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें । किंबहुना नारायणें । विश्व कोंदलें ॥२५॥ एवं वेदाचें मूळसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ २६ ॥ येथ गीता मूळ वेदां । ऐसें पां केवीं आलें बोधा । हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगों ॥ २७ ॥ तरी जयाचां निश्वासीं । जन्म झालें वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बोलिला स्वमुखें ॥ २८ ॥ म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित । आणिकही येकी येथ । उपपत्ति असे ॥ २९ ॥ जें न नशतु स्वरूपें । जयाचा विस्तारु जेथ लपे । तें तयाचें म्हणिपे । बीज जगीं ॥ १४३० ॥ तरी कांडत्रयात्मकु । शब्दराशी अशेखु । गीतेमाजीं असे रुखु । बीजीं जैसा ॥३१॥ म्हणौनि वेदाचें बीज । श्रीगीता होये हें मज । गमे आणि सहज । दिसतही आहे ॥ ३२ ॥ जे वेदाचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग । भूषणरत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ॥ ३३ ॥ तियेंचि कर्मादिकें तिन्हीं । कांडें कोणकोणे स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आईक ॥३४॥ तरी पहिला जो अध्यावो । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्तावो । द्वितीयीं सांख्यसद्भावो । प्रकाशिला ॥ ३५ ॥ मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र । येतुलालें दुजीं सूत्र । उभारिलें ॥ ३६ ॥ मग अज्ञानें बांधलेयां । मोक्षपदीं बैसावया । साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ॥ ३७ ॥ जे देहाभिमानबंधें । सांडूनि काम्यनिषिद्धें । विहित परी अप्रमादें । अनुष्ठावें ॥ ३८ ॥ ऐसेनि सद्भावें कर्म करावें । हा तिजा अध्यावो जो देवें । निर्णय केला तें जाणावें । कर्मकांड येथ ॥ ३९ ॥ आणि तेंचि नित्यादिक । अज्ञानाचें आवश्यक । आचरतां मोचक । केवीं होय पां ॥ १४४० ॥ ऐसी अपेक्षा जालिया । बद्ध मुमुक्षुते आलिया । देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया । सांगितली ॥ ४१ ॥ जे देहवाचामानसें । विहित निपजे जें जैसें । तें एक ईश्वरोद्देशें । कीजे म्हणितलें ॥ ४२ ॥ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खागें । आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनी ॥ ४३ ॥ तें विश्वरूप अकरावा । अध्यावो संपे जंव आघवा । तंव कर्मी ईशु भजावा । हे जें बोलिलें ॥ ४४ ॥ तें अष्टाध्यायीं उघड । जाण येथें देवताकांड । शास्त्र सांगतसे आड । मोडूनि बोलें ॥ ४५ ॥ आणि तेणेंचि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्रदायलब्धें । साच ज्ञान उद्बोधे । कोंवळें जें ॥ ४६ ॥ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानित्वादिकीं । वाढविजे म्हणोनि लेखीं । बारावा गणूं ॥ ४७ ॥ तो बारावा अध्याय आदी । आणि पंधरावा अवधी । ज्ञानफळपाकसिद्धि । निरूपणासी ॥ ४८ ॥ म्हणौनि चहूंही इहीं । ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं । ज्ञानकांड ये ठायीं । निरूपिजे ॥ ४९ ॥ एवं कांडत्रयनिरूपणी । श्रुतीचि हे कोडिसवाणी । गीतापद्यरत्नांचीं लेणीं । लेयिली आहे ॥ १४५० ॥ हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फळ येक । बोभाये जें आवश्यक । ठाकावें म्हणौनि ॥५१॥ तयाचेनि साधनज्ञानेंसीं । वैर करी जो प्रतिदिवशीं । तो अज्ञान-वर्ग षोडशीं । प्रतिपादिजे ॥५२॥ तोचि शास्त्राचा बोळावा । घेवोनि वैरी जिणावा । हा

त्याप्रमाणें त्या दोघांचें मिळणें त्या दोघांस आवरत नव्हतें, तें कोणीं जाणावें ? फार काय सांगावें ! नारायणानें विश्व कोंदून भरलें. १४२५. याप्रमाणें वेदाचें सूत्ररूपानें असलेलें मूळ व सर्व अधिकारांचें केवळ एकच एक पवित्र असें ठिकाण जें गीताशास्त्र, तें श्रीकृष्णानें प्रगट केलें. १४२६. येथें 'वेदाला मूळ गीता आहे' हें कसें समजण्यांत आलें, असें जर म्हणाल, तर त्याचा प्रसिद्ध कार्यकारणसंबंध युक्तिपूर्वक सांगतों. १४२७. तर ज्याच्या निश्वासांत वेदराशि उत्पन्न झाले, तो सत्यप्रतिज्ञ श्रीकृष्ण, जें गीताशास्त्र, प्रतिज्ञापूर्वक (जाणून बुजून) आपल्या मुखानें बोलला, १४२८. म्हणून वेदाला मूलभूत गीता आहे, हें म्हणणें योग्य आहे. या म्हणण्यास आणखींही एक युक्ति आहे. १४२९. जें स्वरूपानें नाश न पावतां, ज्याचा विस्तार जेथें लीन होऊन राहातो, तें त्याचें बीज, असें जगांत म्हणतात. १४३०. तर ज्याप्रमाणें वृक्ष बीजामध्यें सूक्ष्मरूपानें असतो, त्याप्रमाणें कांडत्रयात्मक संपूर्ण वेद गीतेमध्यें सूक्ष्मरूपानें आहे. १४३१. म्हणून वेदाचें मूळ श्रीगीता आहे, असें मला वाटतें आणि तें सहज देखील दिसत आहे. १४३२. कारण कीं, ज्याप्रमाणें अलंकारांतील रत्नांनीं सर्व अंग शोभतें, त्याप्रमाणें वेदाचीं तिन्ही कांडें गीतेंत चांगलीं उमटलेलीं आहेत. १४३३. तींच कर्मादिक तीन कांडें कोणत्या कोणत्या ठिकाणीं गीतेमध्यें आहेत, तीं डोळ्यांना (स्पष्ट दिसतील अशीं) दाखवितों, ऐक. १४३४. तर पहिला जो अध्याय आहे तो गीताशास्त्राच्या प्रवृत्तीची प्रस्तावना आहे व दुसऱ्या अध्यायांत सांख्यशास्त्राचा अभिप्राय थोडक्यांत स्पष्ट सांगितला आहे. १४३५. हें गीताशास्त्र ज्ञानप्रधान असून मोक्ष देण्यास स्वतंत्र आहे, इतकेंच दुसऱ्या अध्यायांत थोडक्यांत सांगितलें आहे. १४३६. मग अज्ञानानें बांधलेल्या जीवास मोक्षपदाची प्राप्ति होण्याकरतां साधनांचा जो आरंभ (कर्ममार्ग) तो तिसऱ्या अध्यायांत सांगितला आहे. १४३७. कारण कीं, देहाहंकाररूपी बंधनानें बद्ध झालेल्या जीवांनीं, काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून, विहित कर्मांचें आचरण करावें; परंतु त्या विहित कर्माचरणांत चुका करूं नयेत. १४३८. अशा रीतीनें शुद्ध भावानें कर्म करावें, हा जो तिसऱ्या अध्यायांत देवांनीं निर्णय केला, तें या गीतेंत कर्मकांड जाणावें. १४३९. आणि तेंच नित्यादिक कर्म आचरलें असतां, अज्ञानापासून खास सोडविणारें (अज्ञानाचा नाश करणारें) कसें होईल ! १४४०. अशी इच्छा झाली असतां व बद्ध पुरुष मुमुक्षुतेला आला असतां (बद्ध पुरुषाला मोक्षाची इच्छा झाली असतां) त्याच्याकरितां देवानें ब्रह्मार्पणबुद्धीनें कर्म करावयास सांगितलें आहे. १४४१. तें असें कीं, शरीर, वाचा व मन ह्यांच्याकडून जें जें विहित कर्म जसें जसें उत्पन्न होईल, तें तें (विहित) कर्म एका ईश्वराच्या उद्देशानें करावें, असें देवांनीं सांगितलें. १४४२. कर्मयोगानें ईश्वराचे ठिकाणीं उपासना कशी करावी, ह्या सांगण्याच्या विषयास चौथ्या अध्यायाच्या शेवटच्या भागांत आरंभ केला आहे. १४४३. चौथ्या अध्यायाच्या अखेरपासून तों विश्वरूपाचा अकरावा अध्याय सर्व संपेपर्यंत, कर्मांच्या योगानें ईश्वर भजावा, (ईश्वराची उपासना करावी) हें जें सांगितलें. १४४४. या गीतेमध्यें त्या आठ अध्यायांत स्पष्ट देवताकांड (उपासनाकांड) आहे. असें गीताशास्त्र सांगत आहे, हें पडदा दूर करून (मी) स्पष्ट सांगतों. १४४५. आणि (उपासनेनें प्रसन्न होऊन मिळविलेल्या) ईश्वराच्या त्या प्रसादानें व गुरूंच्या संप्रदायांतून प्राप्त झाल्यानें, जें खरें कोंवळें (अदृढ) ज्ञान अनुभवाला येतें, १४४६. तें कोंवळें ज्ञान 'अद्वेष्टा' वगैरे बाराव्या अध्यायाच्या भागानें अथवा तेराव्या अध्यायाच्या 'अमानित्व' वगैरे भागानें, दृढ (कसें) करावें, हें सांगितलें आहे म्हणून आम्ही बाराव्या अध्यायाची गणना ज्ञानकांडांत करतों. १४४७. तो बारावा अध्याय पहिल्यांदा धरून आणि पंधरावा अध्याय शेवटीं धरून, या चार अध्यायांत निरूपणाला, ज्ञानरूपी फळाच्या परिपक्वतेची पूर्णता, हा विषय आहे. १४४८. म्हणून 'ऊर्ध्वमूल' हा श्लोक ज्या अध्यायांत आहे तो अध्याय (अध्याय १५.) शेवटीं धरून, या चार (१२ ते १५) अध्यायांनीं या गीतेंत ज्ञानकांड सांगितलें आहे. १४४९. याप्रमाणें गीता ही कांडत्रयाचें निरूपण करणारी गोजिरवाणी श्रुतीच आहे व ह्या श्रुतीनें गीतेंतील श्लोकरूपी रत्नांचे अलंकार घातलेले आहेत. १४५०. हें राहूं द्या. हे तीन भाग असलेली गीतारूपी श्रुति, जें एक मोक्षरूपी फळ अवश्य प्राप्त करून द्यावें म्हणून गर्जना करीत आहे, १४५१. त्या मोक्षाचें साधन जें ज्ञान, त्या ज्ञानाशीं नेहमीं वैर करणारा जो (दंभादि सहा) अज्ञानाच्या दोषांचा समुदाय तो सोळाव्या अध्यायांत प्रतिपादन केला आहे. १४५२. (आपल्या स्वरूपरूपी) मुक्कामावर पोहोंचविणारा शास्त्ररूपी रक्षक बरोबर घेऊन, तो अज्ञानगुणांचा समुदायरूपी

निरोपु तो सतरावा । अध्याय येथ ॥ ५३ ॥ ऐसा प्रथमालागोनी । सतरावा लाणी करूनी । आत्मनिश्वास विवरूनि । दाविला देवें ॥ ५४ ॥ तया अर्थजातां अशेषां । केला तात्पर्याचा आवांका । तो अठरावा हा देखा । कलशाध्यायो ॥ ५५ ॥ एवं सकळसांख्यसिंधु । श्रीभगवद्गीताप्रबंधु । हा औदार्यें आगळा वेदु । मूर्तु जाण ॥ ५६ ॥ वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांचांचि ॥ ५७ ॥ येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसरु मांडूनियां । राहिला आहे ॥५८॥ तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥ ५९ ॥ नव्हे अर्थें रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं । जपमिषें वदनीं । वसोनियां ॥ १४६० ॥ गीतेचा पाठु जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें । गीता लिहोनि वाहाणें । पुस्तकमिषें ॥ ६१ ॥ ऐसैसा मिसकटा । संसाराचां चोहटां । गवादी घालीत चोखटा । मोक्षसुखाची ॥ ६२ ॥ परी आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया । रविदीप्ती राहाटावया । आवारु नभ ॥ ६३ ॥ तेवीं उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे । कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥ ६४ ॥ यालागीं मागिली कुटी । भ्याला वेदु गीतेचां पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ ६५ ॥ म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पांडुसुता । उपदेशिली ॥६६॥ परी वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरोदेशें । जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ॥ ६७ ॥ चातकाचिये कणवे । मेघु पाणियेसिं धांवे । तेथ चराचर आववें । निवालें जेवीं ॥ ६८ ॥ कां अनन्यगतीकमळा- । लागीं सूर्य ये वेळोवेळां । कीं सुखिया होइजे डोळां । त्रिभुवनींचां ॥६९॥ तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें । संसारायेवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें ॥१४७०॥ सर्वशास्त्ररत्नदीप्ती । उजळिता हा त्रिजगती । सूर्यु नव्हे लक्ष्मीपती- । वक्त्राकाशींचा ॥ ७१ ॥ बाप कुळ तें पवित्र । जेथिंचा पार्थु या ज्ञाना पात्र । जेणें गीता केलें स्वतंत्र । आवारु जगा ॥ ७२ ॥ हें असो मग तेणें । सद्गुरुश्रीकृष्णें । पार्थाचें मिसळणें । आणिलें द्वैता ॥७३॥ पाठीं म्हणतसे पांडवा । शास्त्र हें मानलें कीं जीवा । तेथ येरु म्हणे देवा । आपुलिया कृपा ॥ ७४ ॥ तरी निधान जोडावया । भाग्य घडे गा धनंजया । परी जोडिलें भोगावया । विपायें होय ॥ ७५ ॥ पैं क्षीरसागरायेवढें । अविरजी दुधाचें भांडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ॥ ७६ ॥ ते सायासही फळा आले । जें अमृतही डोळां देखिलें । परी वरिली चुकले । जतने ते ॥ ७७ ॥ तेथ अमरत्वा वोगरिलें । तें मरणाचिलागीं जालें । भोगों नेणतां जोडले । ऐसें आहे ॥ ७८ ॥ नहुषु स्वर्गाधिपति जाहला । परी राहाटीं भांबावला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ॥ ७९ ॥ म्हणौनि बहुत पुण्य तुवां । केलें तेणें धनंजया । आजि शास्त्रराजा इया । जालासि विषो ॥ १४८० ॥ तरी याचि शास्त्राचेनी । संप्रदायें पांघुरौनी । शास्त्रार्थु हा निकेनी ।

वैरीच जिंकावा, हा देवानें निरोप जेथें सांगितला आहे, तोच या गीतेंतील सतरावा अध्याय होय. १४५३. याप्रमाणें पहिल्या अध्यायापासून तों शेवट सतराव्या अध्यायापर्यंत, देवांनीं आपला निःश्वास जो वेद, तो स्पष्ट करून दाखविला. १४५४. त्या पहिल्या अध्यायापासून तों सतराव्या अध्यायअखेरपर्यंत, सतरा अध्यायांत सांगितलेल्या संपूर्ण अर्थमात्रांच्या तात्पर्यांचें एकीकरण जेथें केलें आहे, तो हा अठरावा-शेवटला-अध्याय आहे, पहा. १४५५. याप्रमाणें श्रीभगवद्गीतारूपी काव्यग्रंथ, हा सर्वज्ञानाचा समुद्र आहे व हा औदार्यानें अधिक असलेला मूर्तिमंत वेदच आहे, असें समज. १४५६. वेद मूळचाच संपन्न आहे; परंतु त्याच्यासारखा दुसरा कोणीच कृपण नाहीं. कारण कीं, तो ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या ) तीन वर्णांच्याच कानाला लागला. ( म्हणजे वेद हा तीन वर्णांनींच ऐकावा, अशी त्याची आज्ञा आहे.) १४५७. संसारदुःखांत सांपडलेल्या इतर स्त्रीशूद्रादिक प्राण्यांना, आपल्या ज्ञानाचा लाभ घेण्यास अधिकार नाहीं, असें ठरवून वेद स्वस्थ राहिला आहे. १४५८. तर विचार केला असतां मला असें दिसतें कीं, तो आपला मागील कमीपणा नाहींसा करण्यासाठीं व वाटेल त्याला सेवन करण्याला योग्य होण्याकरिता, वेद गीतारूपानें प्रगट झाला आहे. १४५९. ( कारण कीं पुढें सांगितल्याप्रमाणें ) वेद सर्वांना सेवन करण्यास योग्य झाला नाहीं काय ? हा गीतारूपी वेद अर्थानें मनांत प्रवेश करून, श्रवणानें कानाला लागून व जपाच्या ( पारायणाच्या ) निमित्तानें मुखांत वास्तव्य करून. १४६०. गीतेचा जो पाठ जाणणारा आहे, त्याच्या संगतीला राहून व गीता लिहून ती पुस्तकरूपानें बाळगणें, १४६१. अशा अशा निमित्तानें संसाराच्या चव्हाट्यावर शुद्ध मोक्षसुखाचें चांगलें अन्नछत्र गीतेच्या रूपानें वेद घालीत आहे. १४६२. परंतु अंतरिक्षांत विहार करण्यास, पृथ्वीवर बसण्यास व सूर्याच्या प्रकाशाला वावरण्याला आधार जसें आकाश आहे. १४६३. त्याप्रमाणें गीता सेवन करीत असतांना ती कोणाही सेवन करणाराविषयीं ' उत्तम ' ' अधम ' अशी निवड करीत नाहीं व मोक्षाच्या दानानें सर्व जगाला सारखी शांत करते. १४६४. याकरितां मागल्या अपवादाला भिऊन, वेद हा गीतेच्या पोटांत शिरला आणि आतां तो (वेद) चांगली कीर्ति पावला आहे. १४६५. म्हणून वेदाचें चांगलें सेवन करण्यासारखें जें मूर्तिमंत रूप तें हें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला उपदेशिलेली श्रीगीता आहे. १४६६. परंतु वांसराच्या प्रेमानें लाभणारें गाईचें दुभतें, जसें घरांतील सर्व माणसांच्या उपयोगास येतें, त्याप्रमाणें अर्जुनाच्या निमित्तानें जगाचा उद्धार झाला. १४६७. चातकाच्या दयेनें मेघ जसा पाणी घेऊन धांवून येतो, तेव्हां जसें सर्व स्थावरजंगमात्मक जग शांत होतें. १४६८. अथवा अनन्यगतीच्या कमळाकरितां सूर्य वेळोवेळीं उदयास येतो कीं, त्याबरोबरच त्रिभुवनांतील लोकांच्या डोळ्यांना सुख होतें. १४६९. त्याप्रमाणें अर्जुनाच्या निमित्तानें लक्ष्मीपति श्रीकृष्णांनीं गीता प्रगट करून, जगाचें जन्ममरणाएवढें ओझें दूर केलें. १४७०. सर्व शास्त्ररूपी रत्नांचें तेज प्रगट करणारा, हा त्रैलोक्यांत लक्ष्मीपतीच्या मुखरूपी आकाशांतला गीतारूपी सूर्य नाहीं काय ? १४७१. जो अर्जुन या गीतारूपी ज्ञानाला योग्य झाला व ज्या अर्जुनानें गीताशास्त्ररूपी स्वतंत्र कोट जगाला केला आहे, तो अर्जुन ज्या कुळांत उत्पन्न झाला, तें कुळ पवित्र व धन्य आहे. १४७२. हें राहूं द्या. मग त्या सद्गुरु श्रीकृष्णानें अर्जुनाचें आपल्याशीं झालेलें ऐक्य परत द्वैताला आणलें. ( अर्जुनाला देहबुद्धीवर आणला. ) १४७३. नंतर देव अर्जुनास म्हणाले कीं, अर्जुना, हें गीताशास्त्र तुझ्या अंतःकरणाला पटलें ना ? तेव्हां अर्जुन म्हणाला देवा, आपल्या कृपेनें ( हें शास्त्र ) मला पटलें. १४७४. तर अर्जुना, ठेवा प्राप्त होण्याचें भाग्य असतें; परंतु प्राप्त झालेला ठेवा भोगण्याचें भाग्य हें क्वचित् असतें. १४७५. क्षीरसमुद्राएवढें विरजलें न जाणारें दुधाचें भांडें मंथन करतांना देवांस व दैत्यांस किती तरी सायास पडले ! १४७६. त्या केलेल्या कष्टाला देखील फळ आलें ! कारण कीं, त्यांनीं ( देव व दानवांनीं ) अमृत देखील डोळ्यांनीं पाहिलें ! परंतु नंतर त्या अमृताचें रक्षण करावयास ते चुकले. १४७७. तेव्हां तें ( अमृत ) अमरत्व घेण्याकरितां वाटलें तें ( अमृत दैत्यांना ) मरणाला कारण झालें. तेव्हां प्राप्त झालेलें कसें भोगावें हें माहीत नसलें, म्हणजे तें असें ( उलटपरिणामाला कारणीभूत ) होतें. १४७८. नहुष राजा स्वर्गाचा मालक झाला होता. परंतु तेथें वर्तन कसें करावें, हें माहीत नसल्यामुळें त्याची चूक झाली. तेव्हां तो सर्पत्वाला पावला. हें तुला माहीत नाहीं काय ? १४७९. म्हणून अर्जुना, तूं पुष्कळ पुण्य केलेंस त्यामुळें आज गीतारूपी श्रेष्ठशास्त्र ऐकण्यास पात्र झाला आहेस. १४८०. तर याच शास्त्राचा संप्रदाय अंगीकारून या शास्त्रार्थाचें चांगल्या रीतीनें आचरण

अनुष्ठीं हो ॥ ८१ ॥ एऱ्हवीं अमृतमथना- । सारिखें होईल अर्जुना । जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥ ८२ ॥ गाय धड जोडे गोमटी । ते तैंचि पिवों ये किरीटी । जैं जाणिजे हातवटी । सांजवणीची ॥ ८३ ॥ तैसा गुरु प्रसन्नु होये । शिष्य विद्याही कीर लाहे । परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥ ८४ ॥ म्हणौनि शास्त्रीं जो इये । उचितु संप्रदायो आहे । तो ऐक आतां बहुवें । आदरेंसीं ॥ ८५ ॥

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन । न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

तरी तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना हो ॥ ८६ ॥ अथवा तापसुही जाला । परी गुरुभक्ती जो ढिला । तो वेदीं अंत्यजु वाळिला । तैसा वाळी ॥ ८७ ॥ नातरी पुरोडाशु जैसा । न घापे वृद्ध तरी वायसा । गीता नेदी तैसी तापसा । गुरुभक्तिहीना ॥ ८८ ॥ का तपही जोडे देहीं । भजे गुरुदेवांचां ठायीं । परी आकर्णनीं नाहीं । चाड जरी ॥ ८९ ॥ तरी तो मागील दोहीं आंगीं । उत्तम होय कीर जगीं । परी या श्रवणालागीं । योग्यु नोहे ॥ १४९० ॥ मुक्ताफळ भलतैसें । हो परी मुख नसे । तंव गुण प्रवेशे । तेथ कायी ॥ ९१ ॥ सागरु गंभीरु होये । हें कोण ना म्हणत आहे । परी वृष्टि वाया जाये । जाली तेथ ॥ ९२ ॥ धालिया दिव्यान्न सुवावें । मग जे वांया धाडावें । तें आर्तीं कां न करावें । उदारपण ॥ ९३ ॥ म्हणौनि योग्य भलतैसें । होतु परी चाड नसे । तरी झणें वानिवसें । देसी हें तयां ॥ ९४ ॥ रूपाचा सुजाणु डोळा । वोडवूं ये कायि परिमळा । जेथ जें माने तें फळा । तेथचि ये गा ॥ ९५ ॥ म्हणौनि तपी भक्ति । पाहावे ते सुभद्रापति । परी शास्त्रश्रवणीं अनासक्ति । वाळावेचि ते ॥ ९६ ॥ नातरी तपभक्ति । होऊनि श्रवणीं आर्ति । आथी ऐसीही आयती । देखसी जरी ॥ ९७ ॥ तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळलोकशास्ता । तया मातें सामान्यता । बोलेल जो ॥ ९८ ॥ माझां सज्जनेंसिं मातें । पैशून्याचेनि आव्हातें । येक आहाती तयांतें । योग्य न म्हण ॥ ९९ ॥ तयांची येर आघवी । सामग्री ऐसी जाणावी । दीपेंवीण ठाणदिवी । रात्रीची जैसी ॥ १५०० ॥ अंग गोरें आणि तरुणें । वरि लेइलें आहे लेणें । परी येकलेनि प्राणें । सांडिलें जेवीं ॥ १ ॥ सोनयाचें सुंदर । निर्वाळिलें होय घर । परी सर्पांगना द्वार । रुंधलें आहे ॥ २ ॥ निपजे दिव्यान्न चोखट । परी माजीं असे काळकूट । हें असो मैत्री कपट- । गर्भिणी जैसी ॥ ३ ॥ तैसी तपभक्तिमेधा । तयाची जाण प्रबुद्धा । जो माझयांची का निंदा । माझीचि करी ॥ ४ ॥ याकारणें धनंजया । तो भक्तु मेधावी तपिया । तरी नको बापा इया । शास्त्रा आतळों देवों ॥ ५ ॥ काय बहु बोलों निंदका । योग्य स्रष्टयाही- सारिखा । गीता हे कवतिका- । लागींही नेदी ॥ ६ ॥ म्हणौनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गाडोरा । वरी गुरुभक्तीचा पुरा । प्रासादु जो जाला ॥ ७ ॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंठा सदा उघडा । वरी कळसु चोखडा । अनिंदारत्नांचा ॥ ८ ॥

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

कर हो. १४८१. नाहीं तर अर्जुना संप्रदायाशिवाय जर तूं या शास्त्रार्थाचें अनुष्ठान करावयास लागशील, तर अमृतमंथनासारखी स्थिति होईल. १४८२. गाय चांगली धड प्राप्त झाली असतां तिचें दूध तेव्हांच पितां येईल कीं, जेव्हां धार काढण्याची हातवटी कळेल. १४८३. त्याप्रमाणें गुरु प्रसन्न होतील व शिष्याला खरोखर विद्याही प्राप्त होईल. परंतु त्या विद्येचें संप्रदायाप्रमाणें अनुष्ठान केलें, तरच ती फलद्रूप होईल १४८४. म्हणून या गीताशास्त्रांत जो योग्य संप्रदाय आहे, तो आतां चांगला आदरपूर्वक ऐक. १४८५.

तपोहीन, गुरुदेवाविषयीं भक्तींत ढिला, जो (हें) ऐकण्याची इच्छा करीत नाहीं व जो माझी निंदा करतो, त्याला हें (ज्ञान) कधींही सांगूं नये. ६७.

तर अर्जुना, हें जें गीताशास्त्र तुला आस्थेनें प्राप्त झालें आहे, तें तपोहीन मनुष्याला मुळींच सांगूं नको हो. १४८६. अथवा एकादा मनुष्य तपी असेल, परंतु जर गुरुभक्तीमध्यें तो ढिला असेल, तर वेदानें जसा अंत्यजाचा त्याग केला आहे, तसा त्याचा त्याग कर. १४८७. अथवा ज्याप्रमाणें कावळा जरी वृद्ध असला, तरी त्याला यज्ञाचा अवशेष प्रसाद घालीत नाहींत, त्याप्रमाणें जो गुरुभक्तिहीन असेल, तो मग किती मोठा तपी असेना, त्या मनुष्याला हें गीताशास्त्र सांगूं नकोस. १४८८. अथवा एकाद्यानें शरीरानें तपही केलें आहे व तो गुरु व देव यांच्या ठिकाणीं भजतोही आहे, पण त्याला ऐकण्याची इच्छा नसेल, १४८९. तर तो मागल्या दोन गुणांत या जगांत खरोखर उत्तम असेल; परंतु तो या गीताश्रवणाला योग्य नाहीं. १४९०. मोतीं वाटेल तसें उत्तम असेल परंतु त्याला जर वेज्ञ नसेल, तर त्याच्यांत सूत (सोन्याची तार) प्रवेश करील काय? १४९१. समुद्र गंभीर आहे हें कोण नाहीं म्हणतो? परंतु त्या सागरावर पाऊस पडला तर तो व्यर्थ जातो. १४९२. तृप्त झालेल्या मनुष्याला दिव्यान्न वाढून मग तें व्यर्थ घालवावें, (त्याऐवजीं) तें (अन्न) भुकेलेल्या मनुष्याला उदारपणानें कां देऊं नये? १४९३. म्हणून (इतर बाबतींत) वाटेल तसा योग्य असो, परंतु त्याच्या ठिकाणीं जर गीताश्रवणाची चाड नसेल, तर त्याला चुकून सहज देखील गीता सांगूं नकोस हो! १४९४. रूपविषयाला चांगला जाणणारा डोळा आहे खरा, पण तो सुवास घेण्याकडे पुढें करून काय उपयोग? म्हणून जेथें जें योग्य असेल, तें तेथेंच फळाला येतें. १४९५. म्हणून अर्जुना, ज्यांना गीता सांगावयाची, ते तपस्वी व गुरुभक्त आहेत हें तर पहावेंच; परंतु त्यांच्या ठिकाणीं जर गीताशास्त्रश्रवणाविषयीं अनावड असेल, तर त्यांचा त्याग करावाच. १४९६. अथवा तप व गुरुभक्ति असून गीताश्रवणाच्या ठिकाणीं उत्कट इच्छा आहे, अशी सामुग्री जरी तूं पाहिलीस, १४९७. तरी पण गीताशास्त्र निर्माण करणारा व सर्व लोकांचें नियमन करणारा जो मी, त्या मला जो यःकश्चित् म्हणून समजेल; १४९८. माझ्या भक्तांना व मला दुष्टपणानें बोलणारे असे जे कोणी आहेत, त्यांना तूं गीताशास्त्र देण्यास योग्य असें समजूं नकोस. १४९९. (माझ्याविषयीं व माझ्या भक्तांविषयीं त्यांची पूज्यबुद्धी नसेल तर) त्यांची असलेली इतर सर्व सामुग्री म्हणजे दिव्यावांचून रात्रीची जशी ठाणवई असते तशी समजावी. १५००. शरीर गोरें व तरणें असून शिवाय त्या शरीरावर दागिनेही घातलेले आहेत, परंतु जसें तें शरीर एका प्राणानें रहित असावें; १५०१. सोन्याचें सुंदर घर निर्माण केलें आहे, परंतु त्याचें दार नागिणीनें अडविलेलें (जसें) असावें. १५०२. सुंदर दिव्यान्न तयार केलेलें आहे, परंतु त्यामध्यें कालकूट विष मिसळलेलें असावें; हें राहूं दे. अथवा जशी आंतून कपटानें भरलेली मैत्री असावी. १५०३. हे प्रबुद्धा अर्जुना, जो माझ्या भक्तांची अथवा माझी निंदा करतो, त्याचें तप, गुरुभक्ति व धारणाशक्ति तशा आहेत असें समज. १५०४. अर्जुना, या कारणास्तव तो जरी भक्त बुद्धिमान् व तपी असला तरी या गीताशास्त्राला त्याचा स्पर्श होऊं देऊं नकोस. १५०५. फार काय सांगूं! निंदक जरी ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा असला, तरी त्याला कौतुकाकरितांही हें गीताशास्त्र देऊं नकोस. १५०६. म्हणून अर्जुना, खालीं तपरूपी गुंड्यांचा पाया बळकट घालून, त्यावर गुरुभक्तीचें जें पूर्ण मंदीर तयार झालें; १५०७. आणि ज्या मंदिराचा श्रवणेच्छेचा दरवाजा सदा पुढें उघडा आहे व ज्या मंदिरावर निंदा न करणेंरूपी रत्नांचा शुद्ध कळस ठेवला गेला आहे, १५०८.

हें परम गुह्य (ज्ञान) माझ्या ठिकाणीं पराकाष्ठेची भक्ति करून (माझा लोभ धरून) जो माझ्या भक्तांना सांगेल, तो निःसंशय मजप्रतच येईल. ६८.

ऐसा भक्तालयीं चोखटीं । गीतारत्नेश्वरु हा प्रतिष्ठीं । मग माझिया संवसाटी । तुकसी जगीं ॥ ९ ॥ का जे एकाक्षरपणेंसीं । त्रिमात्रकेचिये कुशीं । प्रणवु होतां गर्भवासीं । सांकडला ॥१५१०॥ तो गीतेचिया वाहळीं । वेदबीज गेलें पाहाळीं । कीं गायत्री फुली फळीं । श्लोकांचां आली ॥ ११ ॥ ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्तां । अनन्यजीवना माता । बाळका जैसी ॥ १२ ॥ तैसी भक्तां गीतेसीं । भेटी करी जो आदरेंसीं । तो देहापाठीं मजसीं । येकचि होय ॥ १३ ॥ आणि देहाचेंही लेणें । लेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवेंप्राणें । तोचि पढिये ॥ १४ ॥ ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां– । माजीं तो एकु गा जैसा । पढिये मज ॥ १५ ॥

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः । भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

तैसा भूतळीं आघवा । आन न देखें पांडवा । जो गीता सांगे मेळावा । भक्तजनांचा ॥१६॥ मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें । जो मंडन होय सभे । संतांचिये ॥ १७ ॥ नवपल्लवीं रोमांचितु । मंदानिळें कांपवितु । आमोदजळें वोलवितु । फुलांचे डोळे ॥ १८ ॥ कोकिळाकलरवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें । वसंत का प्रवेशे । मद्भक्तआरामीं ॥ १९ ॥ का जन्माचें फळ चकोरां । होतु चंद्र ये अंबरा । नाना नवघन मयूरां । वो देत पावे ॥१५२०॥ तैसा सज्जनांचां मेळापीं । गीतापद्यरत्नीं उमपीं । वर्षे जो माझां रूपीं । हेतु ठेऊनि ॥ २१ ॥ मग तयाचेनि पाडें । पढियंतें मज फुडें । नाहींचि गा मागेंपुढें । न्याहाळितां ॥ २२ ॥ अर्जुना हा ठायवरी । मी तयातें स्वयें जिव्हारीं । जो गीतार्थाचें करी । परगुणें संतां ॥ २३ ॥ पैं माझिया तुझिया मिळणीं । वाढीनली जे हे कहाणी । मोक्षधर्म का जिणीं । आलासे जेथें ॥२४॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः । ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

तो हा सकळार्थप्रदु । आम्हां दोघांचा संवादु । न करितां पदभेदु । पाठेंचि जो पढे ॥ २५ ॥ तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया आहुती । तोषविला होय सुमती । परमात्मा मी ॥ २६ ॥ घेऊनि गीतार्थ उगाणा । ज्ञानिये जें विचक्षणा । ठाकिती तें गाणावाणा । गीतेचा तो लाहे ॥ २७ ॥ गीतापाठकासि असे । फळ अर्थज्ञाचि सरिसें । गीतामाउलिये कीं नसे । जाणेंतान्हें ॥ २८ ॥

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः । सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

अशा भक्तरूपी शुद्ध मंदिरांत गीता हाच कोणी रत्नांचा ईश्वर, त्याची प्राणप्रतिष्ठा कर. ( अशा योग्य अधिकाऱ्यास गीता सांग. ) मग तूं जगांत माझ्या योग्यतेला येशील. १५०९. कारण कीं, ओंकार हा, ॐ या एक अक्षराच्या रूपानें, अ उ म या त्रिमात्रकेच्या पोटांत गर्भवासामध्यें अडकला होता. १५१०. तो वेदाचें बीज जो ॐकार, तो गीतेच्या विस्तारानें विस्ताराला गेला अथवा ही गीता म्हणजे जणूंकाय गायत्रीच श्लोकरूपी फळांनीं व फुलांनीं प्रफुल्लित झाली. १५११. आईशिवाय ज्या बालकाला दुसरें जीवन नाहीं, त्या बालकाची व आईची जशी गांठ घालून द्यावी, त्याप्रमाणें जो माझ्या भक्तांची व त्या ह्या गायत्रीमंत्राचें रहस्य सांगणाऱ्या गीतेची ओळख करून देईल. १५१२ वरील आई व बालक ह्या दृष्टांताप्रमाणें भक्तांची गीतेशीं जो प्रेमानें भेट करील, तो देहपातानंतर मद्रूपच होईल. १५१३. आणि शरीररूपी अलंकार घालून तो ( गीता सांगणारा ) माझ्याहून ( शरीरदृष्टया ) वेगळेपणानें जेव्हां असतो, तेव्हांही जीवाप्राणानें मला तोच आवडतो. १५१४. ज्ञानी, कर्मठ व तापसी, हीं जीं माझी अंतरंग माणसें आहेत, त्यांमध्यें तो ( गीता सांगणारा ) एकच मला जसा आवडतो. १५१५.

मनुष्यांमध्यें त्याच्यापेक्षां मला कोणीही अतिशय प्रिय नाहीं व पुढेंही जगतांत त्या पेक्षां मला कोणीही अधिक प्रिय होणार नाहीं. ६९.

अर्जुना, जो भक्तजनांच्या समुदायामध्यें गीता सांगतो, तसा या सर्व पृथ्वीतलावर मला दुसरा कोणी ( आवडता ) दिसत नाहीं. १५१६. मी गीता सांगणारा आहे, असा अभिमान न ठेवतां, केवळ मी जो ईश्वर, त्या माझ्या लोभानें जो ही गीता सांगत असतांना संतांच्या सभेला भूषण होतो. १५१७. झाडास फुटणाऱ्या कोंवळ्या पानांप्रमाणें अंगावर रोमांच उभे करीत, व हळू हळू वाहणाऱ्या वाऱ्यानें हालणाऱ्या झाडाप्रमाणें आनंदानें ( शरीर ) डोलवीत, आणि मकरंदाच्या रसानें फुलें जशी डबडबतात, त्याप्रमाणें डोळे आनंदाश्रूंनीं भरून आणीत, १५१८, कोकीळ पक्ष्याच्या पंचमस्वराप्रमाणें कंठ दाटून धन्यतेचे उद्गार बोलावयास लावीत, जणूंकाय माझ्या भक्तरूपी बगिच्यांत हा गीताव्याख्यानरूपी वसंतच प्रवेश करतो. १५१९. अथवा आपल्या जन्माचें फळ मिळालें असें चकोराला वाटवीत चंद्र जसा आकाशांत उगवतो, अथवा नवा मेघ मोरांना ओ देत जसा प्राप्त होतो. १५२०. त्याप्रमाणें सज्जनांच्या समुदायामध्यें, जो माझ्या स्वरूपाची प्राप्ति व्हावी; या हेतूनें गीताश्लोकरूपी पुष्कळ रत्नांचा वर्षाव करतो; ( म्हणजे गीतेच्या श्लोकांचें जो व्याख्यान करतो. ) १५२१. अर्जुना, मग, मागें होऊन गेलेले अथवा पुढें होणारे भक्त, यांचा विचार करतां, त्यामध्यें तो गीता सांगणारा जितका मला आवडतो, तितका निश्चयानें दुसरा कोणी आवडत नाहीं. १५२२. अर्जुना, जो संतांना गीतेच्या अर्थाची मेजवानी करतो, तो मला इतका आवडतो कीं, मी त्याला माझ्या अंतःकरणांत ठेवतों. १५२३. माझ्या व तुझ्या भेटींत जी ही गीतारूपी कथा वाढली व ज्या गीतेत मोक्ष प्राप्त करून देणारे उपाय जगण्याकरितां आले. १५२४.

या आपल्या ( मोक्ष ) धर्मासंबंधीच्या संवादाचें ( गीतेचें ) जो अध्ययन करील, त्यानें माझें ज्ञानरूपी यज्ञानें यजन केलें असें मी समजतों. ७०.

तो हा सकळार्थ देणारा आम्हां दोघांचा संवाद, पदांचा अर्थ न करितां, जो आवर्तनच करतो, ( नुसती गीता पाठ म्हणतो ) १५२५ हे सुमति अर्जुना, त्यानें प्रदीप्त ज्ञानाग्नीमध्यें मूळ अविद्येची आहुति देऊन, मी जो परमात्मा, त्या मला संतुष्ट केलें आहे. १५२६, हे चतुरा अर्जुना, गीतेच्या अर्थाचा आढावा घेऊन, ज्ञानी पुरुष जेथें प्राप्त होतात., तें ठिकाण ( ब्रह्मस्वरूप ), त्याला ( मागल्या ओंवींत सांगितलेला गीतेचा केवळ पाठ करणाराला ) गीतेच्या गाण्यानें ( पाठानें ) व वर्णनानें प्राप्त होतें. १५२७. याप्रमाणें, गीतापाठ करणाराला गीतेचा अर्थ जाणण्या-सारखेंच फळ मिळतें. गीता ही आई आहे, म्हणून तिला जाणतें मूल व लहान मूल असा भेद नाहीं. १५२८

श्रद्धायुक्त व ( मजविषयीं ) मत्सरहीन, असा मनुष्य हें श्रवण करील, तर तो देखील ( सर्व पापांतून ) मुक्त होईल व ( मला मिळण्यापूर्वी पहिला मुक्काम म्हणून ) पुण्यकर्म करणारांचे ( करणारांना प्राप्त होणारे ) शुभ लोक ( स्वर्गादि ) पावेल. ७१.

आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनिया आस्था पैं शुद्धा । गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ २९ ॥ तयाचां श्रवणपुटीं । गीतेचीं अक्षरें जंव पैठीं । होतीना तंव उठाउठीं । पळेचि पाप ॥ १५३० ॥ अटवियेमाजीं जैसा । वन्हि रिघतां सहसा । लंघिती का दिशा । वनौकें तियें ॥ ३१ ॥ का उदयाचळकुळीं । झळकतां अंशुमाळी । तिमिरें अंतराळीं । हारपती ॥ ३२ ॥ तैसा कानाचां महाद्वारीं । गीता गजर जेथ करी । तेथ सृष्टीचिये आदीवरी । जायचि पाप ॥ ३३ ॥ ऐसी जन्मवेली धुवट । होय पुण्यरूप चोखट । याहीवरी अचाट । लाहे फळ ॥ ३४ ॥ जे इये गीतेचीं अक्षरें । जेतुलीं का कर्णद्वारें । रिघती तेतुले होती पुरे । अश्वमेध कीं ॥ ३५ ॥ म्हणौनि श्रवणें पापें जाती । आणि धर्म धरी उन्नती । तेणें स्वर्गराज्यसंपत्ति । लाहेचि शेखीं ॥ ३६ ॥ तो पैं मज यावयालागीं । पहिलें पेणें करी स्वर्गीं । मग आवडे तंव भोगी । पाठीं मजाचि मिळे ॥ ३७ ॥ ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया । फळे महानंदें मियां । बहु काय बोलों ॥ ३८ ॥ याकारणें हें असो । परी जयालागीं शास्त्रातिसो । केला तें तंव तुज पुसों । काज तुझें ॥ ३९ ॥

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा । कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

तरी सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांतु आघवा । तुज एकचित्तें फावा । गेला आहे ॥ १५४० ॥ आम्हीं जैसें जया रीती । उगाणिलें कानांचां हातीं । येरीं तैसेंचि तुझां चित्तीं । पैठें केलें कीं ॥ ४१ ॥ अथवा माझारीं । गेलें सांडिविखुरी । किंवा उपेक्षेवरी । वाळूनि सांडिलें ॥ ४२ ॥ जैसें आम्हीं सांगितलें । तैसेंचि हृदयीं पावलें । तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥ ४३ ॥ हां गा स्वाज्ञानजनितें । मागिलें मोहें तूतें । भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ॥ ४४ ॥ हें बहु पुसों काई । सांगें तूं आपलां ठाइं । कर्माकर्म कांहीं । देखतासी ॥ ४५ ॥ पार्थु स्वानंदैकरसें । विरेल ऐसा भेददशे । आणिला येणें मिषें । प्रश्नाचेनि ॥ ४६ ॥ पूर्णब्रह्म जाला पार्थु । तरी पुढील साधावया कार्यार्थु । मर्यादा श्रीकृष्णनाथु । उल्लंघों नेदी ॥ ४७ ॥ एऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणे । परी केलें पुसणें । याचिलागीं ॥ ४८ ॥ एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणूनियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ॥ ४९ ॥ मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजुमंडितु । निवडे जैसा न निवडितु । पूर्णचंद्र ॥ १५५० ॥ तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे । हेंही सांडी तरी विरे । ब्रह्मपणही ॥ ५१ ॥ ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥५२॥ मग कापतां करतळीं । दडपूनि रोमावळी । पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां ॥ ५३ ॥ प्राणक्षोभें डोलतया । आंगा आंगाचि टेंकया । स्तुनि स्तंभु चाळया । भुलौनियां ॥ ५४ ॥ नेत्रयुगुळाचेनि वोतें । आनंदामृताचें भरितें । वोसंडत तें मागुतें । काढूनियां ॥ ५५ ॥

आणि परमार्थाच्या सर्व मार्गांची निंदा करणें टाकून गीतेच्या श्रवणाच्या ठिकाणीं शुद्ध आस्थेनें जो श्रद्धा ठेवून राहातो. १५२९. त्याच्या कानांत गीतेचीं अक्षरें प्रविष्ट होतात न होतात तोंच पाप तत्काळ पळून जातें. १५३०. जसा अरण्यामध्यें अग्नि एकदम शिरला असतां, त्या अरण्यांत राहणारे प्राणी जिकडे वाट सापडेल तिकडे पळतात. १५३१. अथवा उदयपर्वताच्या रांगांवर सूर्य झळकण्याबरोबर अंधार आकाशाच्या पोकळींत नाहींसा होतो. १५३२. त्याप्रमाणें जेथें गीतेचा गजर कानरूपी महाद्वारांत होतो, तेथें सृष्टीच्या आरंभापासूनचें (ऐकणाराचें) पाप जातें. १५३३. याप्रमाणें पुढील जन्मपरंपरा स्वच्छ, शुद्ध व पुण्यरूप होते. याहीपेक्षां आणखीं अलोट फळ प्राप्त होतें. १५३४ कारण कीं, या गीतेची जितकीं अक्षरें कानाच्या वाटेनें ( अंतःकरणांत ) आंत शिरतील, तितके पूर्ण अश्वमेध होतात. १५३५. म्हणून गीताश्रवणानें पापें जातात आणि धर्माचा उत्कर्ष होतो. त्या योगानें शेवटीं स्वर्गाच्या राज्याचें ऐश्वर्य प्राप्त होतेंच. १५३६. तो मजकडे येण्याकरितां पहिला मुक्काम स्वर्गांत करतो. मग जेथपर्यंत त्याला वाटेल तेथपर्यंत ( स्वर्गभोग ) भोगतो आणि नंतर मलाच येऊन मिळतो. १५३७. अर्जुना, ऐकणाराला व वाचणाराला, याप्रमाणें, गीता ही, मी जो ब्रह्मानंद, त्या रूपानें फलद्रूप होते. ( यावर ) फार काय सांगूं ! १५३८. ऐवढ्याकरितां हें राहूं दे. परंतु ज्या कारणाकरितां गीताशास्त्र तुला सांगण्याची खटपट केली, तें तर तुझें काम तुला विचारूं. १५३९.

हे पार्था, तूं एकाग्र चित्तानें हें ( सर्व ) श्रवण केलेंस ना ? हे धनंजया, तुझा अज्ञानापासून उत्पन्न झालेला मोह नष्ट झाला ना ? ७२.

तर अर्जुना, हा सर्व शास्त्रसिद्धांत तूं एकाग्रचित्तानें श्रवण केल्यावर, तो तुझ्या मनांत ठसला किंवा नाहीं, सांग बरें ? १५४०. आम्हीं जसा ज्या रीतीनें या गीताशास्त्राचा कानाला हिशेब दिला, तसाच तो तुझ्या कानांनीं तुझ्या चित्तांत आणून दिला कीं नाहीं ? १५४१. अथवा मध्येंच त्याची सांडलवंड झाली किंवा अनादरानें तें टाकून दिलें ? १५४२. जसें आम्हीं तुला सांगितलें, तसेंच जर तुझ्या अंतःकरणापर्यंत पोहोंचलें असेल, तर मी जें विचारीन तें लवकर सांग. १५४३. अरे अर्जुना, स्वस्वरूपाच्या अज्ञानापासूनच उत्पन्न झालेल्या मोहानें तुला मागें भ्रमांत पाडलें होतें, ( कर्तव्यपराङ्मुख केलें होतें. ) तो मोह अजून आहे कीं नाहीं ? १५४४. हें फार काय विचारूं ? सांग. अमुक एक कर्म मी करीन अथवा अमुक एक कर्म मी करणार नाहीं, हें केवळ आपल्या हातीं ( तुझ्या हातीं ) आहे, असें तुला अद्याप वाटतें काय ? १५४५. अर्जुन हा आत्म्याच्या पूर्ण आनंदरूपी रसानें विरघळून जाईल, म्हणून या प्रश्नाच्या निमित्तानें अर्जुनाला भेदाच्या स्थितींत आणला. १५४६. अर्जुन, पूर्ण ब्रह्म झाला, तरी पण पुढील कार्यार्थ साधण्याकरितां ( देहस्मृतीची ) मर्यादा श्रीकृष्णनाथ उल्लंघूं देईनात. १५४७. एऱ्हवीं तो सर्वज्ञ श्रीकृष्णनाथ आपल्या उपदेशाचा परिणाम जाणत नव्हता काय ? परंतु वर सांगितलेल्या कारणां-करितांच देवांनीं प्रश्न विचारला. १५४८. याप्रमाणें प्रश्न करून नसतेंच अर्जुनपण ( नाहींसा झालेला अर्जुनाचा देहाहंकार ) आणून, देवानें आपण अर्जुनाला प्राप्त झालेली पूर्णस्थिति स्वतः अर्जुनाला बोलावयास लावली. १५४९. मग क्षीरसागरांतून बाहेर निघून आपल्या किरणांच्या समुदायानें अलंकृत असा पूर्ण चंद्र, क्षीरसागरा-पासून स्वरूपानें वेगळा न होतां, जसा आकाशांत वेगळा झालेला दिसतो. १५५०. त्याप्रमाणें (प्रथम) ' मी ब्रह्म आहें ' अशा समजुतीवर असतो, त्या वेळीं जगाचें भान नाहींसें होतें. मग जगच ब्रह्मत्वानें भरून गेलेलें आहे असें वाटतें. नंतर ही समजूत देखील तो सोडून देतो. तरी ब्रह्मपणसुद्धां आपोआप जिरून जातें ( म्हणजे कधीं मी ब्रह्म अशा स्फुरणावर राहून तर कधीं त्याही स्फुरणाला टाकून सहज स्थितिवर असा, ) १५५१. याप्रमाणें केव्हां मी ब्रह्म हें स्फुरण टाकीत व केव्हां मी ब्रह्म हें स्फुरण घेत, तो देहाच्या हद्दीवर ' मी अर्जुन ' या नांवानें मोठ्या दुःखानें उभा राहिला. १५५२. मग थरथर कांपणाऱ्या तळहातांनीं रोमांच उभे राहिलेले दाबून सर्व अंगावर आलेल्या घामाचे बिंदू जिरवून, १५५३. प्राणक्षोभानें ( श्वासोच्छ्वास अव्यवस्थित होत होत ) डोलणाऱ्या अंगाला अंगाचाच आधार देऊन ( आपणच आपल्या ठिकाणीं जरा तकवा धरून ) चलनवलनाला ( हालचालीला ) विसरून स्तब्ध राहिला. १५५४. दोन डोळ्यांच्या कडांतून आनंदाश्रुरूप अमृताचे लोट वाहात होते, त्यांना आंवरून, १५५५.

विविधा औत्सुक्यांची दाटी । चीप आतती होती कंठीं । ते करूनियां पैठी । हृदयामाजीं ॥ ५६ ॥ वाचेचें वितुळणें । सांवरुनि प्राणें । अक्रमाचें श्वसणें । ठेऊनि ठायीं ॥ ५७ ॥

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत । स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो । तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपला ॥ ५८ ॥ पासीं येऊनि दिनकरें । डोळयातें आंधारें । पुसिजे हें कायि सरे । कोणे गांवीं ॥ ५९ ॥ तैसा तूं श्रीकृष्णराया । आम्हुचिया डोळयां । गोचर हेंचि कायिसया । न पुरे तंव ॥ १५६० ॥ वरी लोभें मायेपासूनी । तें सांगसी तोंड भरूनी । जें कायिसेनिही करूनी । जाणूं नये ॥ ६१ ॥ आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें ॥ ६२ ॥ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त जालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ ६३ ॥ मी तुझेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें । मोहाचें तया कांदे । नेदीच उरों ॥ ६४ ॥ आतां करणें का न करणें । हें जेणें उठी दुजेपणें । तें तूं वांचूनि नेणें । सर्वत्र गा ॥ ६५ ॥ येविषयीं माझां ठायीं । संदेहाचें नुरेचि कांहीं । त्रिशुद्धी कर्म जेथ नाहीं । तें मी जालों ॥ ६६ ॥ तुझेनि मज मी पावोनी । कर्तव्य गेलें निपटूनी । परी आज्ञा तुझी वांचोनी । आन नाहीं प्रभो ॥ ६७ ॥ का जें दृश्य दृश्यातें नाशी । जें दुजें द्वैतातें ग्रासी । जें एक परी सर्वदेशीं । वसवी सदा ॥ ६८ ॥ जयाचेनि संबंधें बंधु फिटे । जयाचिया आशा आस तुटे । जें भेटलया सर्व भेटे । आपणपांचि ॥ ६९ ॥ तें तूं गुरुलिंग जी माझें । जें येकलेपणाचें विरजें । जयालागीं बोलांडिजे । अद्वैतबोधु ॥ १५७० ॥ आपणाचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्यांचें काम । मग कीजे का निःसीम । सेवा जयाची ॥ ७१ ॥ गंगा सिंधु सेवूं गेली । पावतांचि समुद्र जाली । तेवीं भक्तां सेल दिधली । निजपदाची ॥ ७२ ॥ तो तूं माझा जी निरुपचारु । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरु । मा ब्रह्मतेचा उपकारु । हाचि कां मानी ॥ ७३ ॥ जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ ७४ ॥ तरी आतां तुझी आज्ञा । सकळदेवाधिदेवराज्ञा । करीन देईं अनुज्ञा । भलतियेविषीं ॥ ७५ ॥ यया अर्जुनाचिया बोला । देवो नाचे सुखें भुलला । म्हणे विश्वफळा जाला । सफळा फळ हा मज ॥ ७६ ॥ उणेनि उमचला सुधाकरु । देखुनी आपला कुमरु । मर्यादा क्षीरसागरु । विसरोचि ना ॥ ७७ ॥ ऐसें संवादाचां बहुलां । लग्न दोघांचिया आंतुला । लागलें देखोनि जाला । निर्भरु संजयो ॥ ७८ ॥

नाना प्रकारच्या उत्कंठेच्या गर्दीनें गळ्यांत बांध बसला होता, ( कंठ दाटला होता ), त्या उत्कंठांची गर्दी हृदयांत दाबून, १५५६. वाचा विस्कळीत झाली होती ती प्राणानें सांवरुन, क्रमरहित श्वासोच्छ्वास जागच्या जागीं व्यवस्थित करुन, १५५७.

अर्जुन म्हणाला, ( माझा ) मोह नष्ट झाला, (मला माझ्या खऱ्या स्वरूपाचें) स्मरण प्राप्त झालें. हे अच्युता, तुझ्या कृपेमुळें मी संशयरहित झालों आहें; आतां तुझी जी आज्ञा असेल ती मी करीन. ७३.

मग अर्जुन म्हणाला, ' तुझ्या ठिकाणीं मोह आहे, असें तुला वाटतें काय?' असें देवा तुम्ही मला विचारता काय ! ( तर महाराज, ) तो मोह आपलें ठिकाण ( अज्ञान ) घेऊन परिवारासह गेला. १५५८. सूर्यानें डोळ्याच्या जवळ येऊन अंधार भासतो काय, असें डोळ्याला विचारावें; हें त्याचें वेड्यासारखें विचारणें कोणत्या तरी गांवांत सरतें होईल काय? १५५९. त्याप्रमाणें श्रीकृष्णराजा, तुम्हीं आमच्या डोळ्यांना प्रत्यक्ष दिसत आहांत, ही एकच गोष्ट, कोणची गोष्ट करण्याला पुरणार नाहीं ? ( म्हणजे केवळ तुमचें दर्शनच, वाटेल ती गोष्ट करण्यास समर्थ आहे. ) १५६०. शिवाय जें कोणत्याही उपायांनीं जाणतां येणार नाहीं, तें, आईपेक्षां अधिक प्रेमानें तूं तोंड भरुन सांगतोस. १५६१. आतां महाराज, माझ्या ठिकाणीं मोह आहे कीं नाहीं, असें आपण काय विचारतां ? मी तुझ्या स्वरूपाच्या प्राप्तीनें कृतकृत्य झालों, पहा. १५६२. ' मी अर्जुन आहें ' अशा देहतादात्म्यानें अडकलों होतों, तों तुझ्याशीं ऐक्य पावून मुक्त झालों. आतां तूं पुसणें व मी सांगणें, या दोन्हीं गोष्टी उरल्या नाहींत. १५६३. तुमच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या आत्मबोधानें, त्या मोहाचें मूळ ( अज्ञान ), मी आपल्या ठिकाणीं शिलक राहूं देणार नाहीं. १५६४. आतां, हे देवा, अमुक एक करावयाचें अथवा अमुक एक करावयाचें नाहीं, हें ज्या द्वैतापासून उत्पन्न होतें, त्या द्वैतांत सर्व ठिकाणीं तुझ्याशिवाय मला कांहीं दिसत नाहीं. १५६५. याविषयीं माझ्या ठिकाणीं संशयाचें कांहींच उरलें नाहीं; तर निश्चयैकरुन जेथें कर्मांचा संबंध नाहीं, तें ( ब्रह्मस्वरूप ) मी झालों. १५६६. तुझ्या कृपेनें माझें आत्मस्वरूप मला प्राप्त होऊन, माझें कर्तव्य निःशेष गेलेंच, परंतु आतां प्रभो, तुमच्या आज्ञेवांचून मला दुसरें कांहीं कर्तव्य राहिलें नाहीं. १५६७. कारण कीं, जें दृश्य ( कृष्णस्वरूप ) असें आहे कीं, तें इतर दृश्याचा नाश करतें, जें ( कृष्णस्वरूप ) दुसरें असून द्वैताचा नाश करतें; जें ( कृष्णस्वरूप ) एकच आहे, पण सर्व देशांत सर्वकाळ वास्तव्य करतें, १५६८. ज्याच्यासंबंधानें संसारबंध नाहींसा होतो, ज्याची आशा केली असतां इतर सर्व आशा नाहींशा होतात व जें भेटलें असतां आपल्या ठिकाणीं सर्व भेटतें; १५६९ ज्याच्या प्रेमाकरितां अद्वैतबोधाचें उल्लंघन करावें लागतें व जी एकाकीपणाला मदत करतें, अशी माझी गुरुमूर्ति तूं आहेस. १५७० आपणच स्वतः ब्रह्म होऊन, कृत्य व अकृत्य यांचें प्रयोजनच नाहींसें करुन आणि मग ज्याची अमर्याद सेवा करावी; १५७१. गंगा समुद्राचा उपभोग घेण्यास गेली आणि समुद्राजवळ जातांच समुद्र झाली ( समुद्रानें जसें तिला आपलें पद दिलें ) त्याप्रमाणें ज्यानें आपल्या भक्तांना आपल्या पदाचा उत्तम वांटा दिला, १५७२. तो तूं माझा निर्निमित्त ( कोणाच्याही अपेक्षेनें गुरुपद पावलेला नव्हे असा ) व सेवा करण्यास योग्य असा गुरु आहेस. ( व आपल्या शिष्याला ब्रह्मरूपता देणें, हा तुमचा स्वभावच आहे, त्याप्रमाणें तुम्हीं मला ब्रह्मरूपता दिली, ) तर मग हाच तुमचा मला ब्रह्मता देण्याचा उपकार, मी कां मानतों म्हणून म्हणाल तर, १५७३. ( याचें कारण असें आहे कीं, ) माझ्या व तुमच्यामध्यें जो भेदाचा प्रतिबंध (पडदा) होता, तो दूर करुन तुम्हीं सेवासुख गोड केलेंत. १५७४, हे सर्व देवांतील श्रेष्ठ देवराया, तर आतां तूं वाटेल त्याविषयीं मला आज्ञा दे. मी तुझ्या आज्ञेप्रमाणें करीन. १५७५. अर्जुनाच्या या बोलण्यानें देव सुखानें भुलून नाचूं लागले ( व म्हणाले कीं, सदा सफळ असणारा, विश्वाचें फळ व साध्य ) जो मी, त्या मला हा अर्जुन फळ झाला. १५७६. आपला मुलगा जो चंद्र, त्यानें उणेपणा टाकलेला आहे, ( तो पूर्ण झाला आहे ), असें पाहून क्षीरसमुद्र आपली मर्यादा विसरतच नाहीं काय ?१५७७. याप्रमाणें संवादाच्या बहुल्यावर कृष्ण व अर्जुन या दोघांमध्यें लग्न लागलेलें ( ते दोघे स्वरूपैक्यतेला पावलेले ) पाहून संजय आनंदानें उचंबळला. १५७८.

संजय उवाचः—इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः । संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥७४॥

तेणें उचंबळलेपणें । संजय धृतराष्ट्रातें म्हणे । जी कैसें बादरायणें । राखिलों दोघे ॥ ७९ ॥ आजि तुमतें अवधारा । नाहीं चर्मचक्षूही संसारा । कीं ज्ञानदृष्टिव्यवहारा । आणिलेती ॥१५८०॥ आणि रथींचिये राहाटी । घेईजो घोडेयासाठीं । तया आम्हां या गोष्टी । गोचरा होती ॥८१॥ वरी झुंझाचें निर्वाण । मांडलें असे दारुण । दोहीं हारीं आपण । हारपिजे जैसें ॥ ८२ ॥ येवढा जिये सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥८३॥ ऐसें संजय बोलिला । परी न द्रवे येरु उगला । चंद्रकिरणीं शिवतला । पाषाणु जैसा ॥८४॥ हे देखोनि तयाची दशा । मग करीचि ना सरिसा । परी सुखें जाला पिसा । बोलतसे ॥ ८५ ॥ भुलविला हर्षवेगें । म्हणौनि धृतराष्ट्रा सांगें । एऱ्हवीं नव्हे तयाजोगें । हें कीर जाणे ॥ ८६ ॥ मग म्हणे पैं कुरुराजा । ऐसा भ्रातृपुत्र तो तुझा । बोलिला तें अधोक्षजा । गोड जालें ॥ ८७ ॥ अगा पूर्वापर सागर । या नामासीचि सिनार । येर आघवें तें नीर । एक जैसें ॥ ८८ ॥ तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगाचिपासीं दिसे । मग संवादीं जी नसे । कांहींचि भेदु ॥८९॥ पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होती सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें ॥१५९०॥ तैसा देवेंसीं पंडुसुतु । आपणपें देवीं देखतु । पांडवेंसीं देखे अनंतु । आपणपें पार्थीं ॥ ९१ ॥ देवो देवभक्तालागीं । जिये विवरु देखे आंगीं । येरुही तियेची भागीं । दोन्ही देखे ॥ ९२ ॥ आणिक कांहींच नाहीं । म्हणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांदताती ॥ ९३ ॥ आतां भेदु जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर का घडे । ना भेदुचि तरी जोडे । संवादसुख कां ॥ ९४ ॥ ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैत गिळणें । तें ऐकिलें बोलणें । दोघांचें मियां ॥ ९५ ॥ उटूनि दोन्ही आरसे । वोडविलीया सरिसे । कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ॥ ९६ ॥ का दीपासन्मुखु । ठेविलया दीपकु । कोण कोणा अधिकु । कोण जाणे ॥ ९७ ॥ नाना अर्कापुढें अर्कु । उदयलिया आणिकु । कोण म्हणे प्रकाशकु । प्रकाश्य कवण ॥ ९८ ॥ हें निर्धारूं जातां फुडें । निर्धारासि ठक पडे । ते दोघे जाले येवढे । संवादें सरिसे ॥ ९९ ॥ जी मिळतां दोन्ही उदकें । माजीं लवण वारूं ठाके । कीं तयासींही निमिखें । तेंचि होय ॥ १६०० ॥ तैसे श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं । धरितां मजही वानी । तेचि होतसे ॥ १ ॥ ऐसें म्हणे ना मोटकें । तंव हिरोनि सात्त्विकें । आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥ २ ॥ रोमांच जंव फरके । तंव तंव आंग सुरके । स्तंभ स्वेदातें जिंके । एकला कंपु ॥ ३ ॥ अद्वयानंदपरिसें । दिठी रसमय जाली असे । ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वाचि ॥ ४ ॥ नेणों काय न माय पोटीं । काय नेणों गुंफे कंठीं । वागर्था पडत मिठी । उससांचिया ॥ ५ ॥ किंबहुना सात्त्विकां आठां ।

संजय म्हणाला, महात्मा अर्जुन व वासुदेव यांचा हा अद्भुत व रोमहर्षण ( म्हणजे शरीरावर रोमांच उभे रहातील इतका हर्ष देणारा ) संवाद मीं ऐकला.७४.

त्या आनंदाच्या भरतीनें मग संजय धृतराष्ट्राला म्हणाला, महाराज, आपण दोघे व्यासांकडून कसे रक्षिले गेलों ! १५७९. ऐका, आज जगांतील पदार्थ पहाण्याची जी चर्मदृष्टि, तीही ज्या तुम्हांस नाहीं, त्या तुम्हांला अतींद्रिय पदार्थ दाखविणाऱ्या ज्ञानदृष्टीच्या व्यवहारांत आणलें. १५८०. आणि रथ चालविण्यास जे घोडे लागतात, त्या घोड्यांसाठीं ( घोड्यांची परीक्षा करून ते घेण्यासाठीं ) तुम्हीं ज्या आम्हांला ठेविलें, त्या आम्हांला या गोष्टी ( कृष्णार्जुनाचा संवाद ) व्यासकृपेनें ऐकण्यास मिळत आहेत. १५८१. शिवाय आणखी युद्धाचा अनर्थ असा भयंकर आरंभला आहे कीं, या युद्धामध्यें उभयपक्षापैकीं कोणीही पराभूत झाले, तरी आपलाच पराभव होईल. ( कारण दोन्ही सैन्यें एकाच कुळांतील आहेत. ) १५८२. व्यासाचा कसा बलवत्तर अनुग्रह कीं, युद्धासारख्या एवढ्या संकटांत पण निरावरण ब्रह्मानंद ( आपल्याकडून ) भोगवीत आहेत ! १५८३. असें संजय बोलला; परंतु धृतराष्ट्रावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तो चंद्रकिरणानें स्पर्श केलेल्या सामान्य दगडाप्रमाणें, ( पाझर न फुटतां ) निर्विकारपणानें स्वस्थच राहिला. १५८४. ही त्या धृतराष्ट्राची अवस्था पाहून, मग कृष्णार्जुनाच्या संवादासंबंधानें तो पुढें बोलणें करीचना. परंतु सुखानें वेडा झाला असल्याकारणानें, तो तसाच बोलत राहिला. १५८५. आनंदाच्या वेगानें बेहोष झाल्यामुळें तो धृतराष्ट्राला सांगत होता. एऱ्हवीं हें धृतराष्ट्राजोगें नाहीं, हें तो निश्चयानें जाणतच होता. १५८६. मग संजय धृतराष्ट्राला म्हणाला, कीं याप्रमाणें तुझ्या भावाचा मुलगा ( अर्जुन ) बोलला, तें श्रीकृष्णाला गोड वाटलें. १५८७. अहो महाराज, पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र या नांवांनाच काय तो वेगळेपणा आहे. बाकी सर्व पाणी जसें एकच आहे. १५८८. त्याप्रमाणें श्रीकृष्ण आणि अर्जुन, हें ( असा भेद ) त्यांच्या देहासंबंधानेंच दिसतें. मग महाराज, संवादाच्या ठिकाणीं त्यांच्यांत कांहींच भेद रहात नाहीं. १५८९. आरशापेक्षां स्वच्छ असे दोन पदार्थ जर एकमेकांसमोर झाले, तर तेथें एकमेक जसे एकमेकांत आपण आपल्याला पाहातात. १५९०. त्याप्रमाणें देवासह अर्जुन आपल्याला देवाच्या ठिकाणीं पहात होता आणि श्रीकृष्ण आपल्याला अर्जुनासह अर्जुनाच्या ठिकाणीं पहात होता. १५९१. श्रीकृष्ण ज्या ( ब्रह्म ) स्वरूपांत देव व भक्तांकरितां अवकाश पहात होते, अर्जुनही त्याच ( ब्रह्म ) स्वरूपांत आपल्याला व देवाला अशा दोघांना अवकाश पहात होता. १५९२. आणखी ( त्या दोघांशिवाय ) कांहींच नाहीं म्हणून काय करतील ? दोघे एकपणानें नांदत आहेत. पहा. १५९३. आतां भेद नाहींसा झाला, तर प्रश्नोत्तर कसें घडेल अथवा भेदच जर राहिला, तर संवादसुख कसें प्राप्त होईल ? १५९४. असें द्वैतपणानें बोलत असतां संवादानें द्वैताचा ग्रास करणारें असें जें दोघांचें बोलणें तें मी ऐकिलें ( असें संजय म्हणाला. ) १५९५. दोन आरसे स्वच्छ करून एकमेकांपुढें ठेविले असतां, कोणता आरसा कोणत्या आरशाला पहातो, म्हणून कल्पना करावी ? १५९६. अथवा एका दिव्यासमोर दुसरा दिवा ठेवला असतां, कोणाला कोणाचा उपयोग आहे, हें कोणीं जाणावें? १५९७. अथवा एका सूर्यापुढें दुसरा सूर्य उगवला, तर प्रकाशक कोण व प्रकाश्य कोण, हें काय सांगावें ? १५९८ याचा पक्का निश्चय करावयास गेलें तर, निश्चय कुंठित होतो. ते दोघे ( कृष्णार्जुन ) संवादानें इतके सारखे झाले. १५९९. ( संजय म्हणतो ) महाराज, पाण्याचे दोन ओघ मिळत असतांना, त्या दोन ओघांना मिळण्याचें थांबविण्याकरितां, जर मध्यें मीठ उभें राहिलें तर मधल्या मिठाचें एका निमिषांत पाणीच होईल. १६००. त्याप्रमाणें श्रीकृष्ण व अर्जुन, हे दोघे जें बोलले त्यांच्या त्या बोलण्याचा मी मनांत विचार करीत असतां माझाही प्रकार तोच झाला आहे. १६०१. असें संजय थोडेंसें म्हणतो न म्हणतो तोंच अष्टसात्त्विक-भावांनीं त्याचा संजयपणाचा आठव ( मी संजय— अशी देहस्मृति ) हरण करून कोठें नेला तें कळेना. १६०२. जसजसे अंगावर रोमांच उभे राहात होते, तसतसें शरीर संकोचित होत होतें व एकटा कंप, स्तंभ व स्वेद यांना जिंकीत होता. १६०३. अद्वयानंदाच्या स्पर्शानें दृष्टि जलमय झाली, ( डोळे डबडबून पाण्यानें भरले ), ते अश्रु नव्हेत, तर जसे डोळ्यांना ( प्रेम- ) पाझरच फुटले होते ! १६०४. पोटांत काय मावत नव्हतें कोणास माहीत ? गळ्यांत काय अडकत होतें, हें माहीत नाहीं; ( पण ) उसाशांमुळें ( हुंदक्यामुळें ) वाचा उमटण्याचें बंद पडलें होतें. १६०५ फार काय सांगावें ! अष्टसात्त्विक भावांच्या योगानें अतिशय बोबडी वळली

चाचरु मांडतां उमेठा । संजयो जालासे चोहटा । संवादसुखाचा ॥ ६ ॥ तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती । मग पुढती देहस्मृती । लाघली तेणें ॥ ७ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् । योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

तेव्हां बैसतेनि आनंदें । म्हणें जी जें उपनिषदें । नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ॥ ८ ॥ ऐकतांचि ते गोठी । ब्रह्मत्वाची पडिली मिठी । मीतूंपणेंसीं दिठी । विरोनि गेली ॥ ९ ॥ हे आघवेचि का योग । जया ठाया येती मार्ग । तयाचें वाक्य सवंग । केलें मज व्यासें ॥ १६१० ॥ अहो अर्जुनाचेनि मिषें । आपणपेंचि दुजें ऐसें । नटोनि आपणया उद्देशें । बोलिले जें देव ॥ ११ ॥ तेथ कीं माझें श्रोत्र । पाटाचें जाले जी पात्र । काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य गुरूचें ॥ १२ ॥

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् । केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

हें बोलतां विस्मित होये । तेणेंचि मोडावला ठाये । रत्नीं कीं रत्नकिळा ये । झांकोळित जैसी ॥ १३ ॥ हिमवंतींचीं सरोवरें । चंद्रोदयीं होती काश्मीरें । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये ॥ १४ ॥ तैसा शरीराचिया स्मृती । तो संवादु संजय चित्तीं । धरी आणि पुढती । तेंचि होय ॥ १५ ॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः । विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥

मग उठोनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहासी ॥ १६ ॥ न देखणेनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । विसरें आठवे तें कैसें । चुकवूं आतां ॥ १७ ॥ देखोनि चमत्कारु । कीजे तो नाहीं पैसारु । मजहीसकट महापुरु । नेत आहे ॥ १८ ॥ ऐसा श्रीकृष्णार्जुन– । संवादसंगमीं स्नान । करूनि देतसे तिळदान । अहंतेचें ॥१९॥ तेथ असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं स्फुंदे । श्रीकृष्ण म्हणे सद्गदें । वेळोवेळां ॥ १६२० ॥ या अवस्थांची कांहीं । कौरवातें परी नाहीं । म्हणौनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव ॥२१॥ तंव जाला सुखलाभु । आपणपां करूनि स्वयंभु । बुझाविला अवष्टंभु । संजयें तेणें ॥ २२ ॥ तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी । रावो म्हणे संजया परी । कैशी तुझी गा ॥ २३ ॥ तेणें तूंतें येथें व्यासें । बैसविलें कासया उद्देशें । अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ॥ २४ ॥ रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया । कां रात्री होय पाहलया । निशाचरां ॥ २५ ॥ जो जेथिंचें गौरव नेणे । तयासि तें भिंगुळवाणें । म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥ २६ ॥ म्हणे सांगें प्रस्तुत । उदयलेंसे जें उत्कळित । तें कोणासि वा रे जैत । देईल शेखीं ॥ २७ ॥ एऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानासिक । जे दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ॥ २८ ॥ आणि येरांचेनि पाडें । दळही यांचें देव्हडें । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें ॥ २९ ॥ आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें जोतीष कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ १६३० ॥

असतां, संजय हा कृष्णार्जुनाच्या संवादसुखाचा चव्हाटा झाला. १६०६. त्या सुखाची जात अशी आहे कीं, तें आपण होऊनच शांति धरतें ( म्हणजे त्याचा वेग आपोआप कमी होतो ). मग पुनः त्या योगानें त्या संजयाला देहस्मृति मिळाली. १६०७.

प्रत्यक्ष योगेश्वर श्रीकृष्ण स्वतः सांगत असतांना व्यासांच्या कृपेनें हें अत्यंत योगरूप गुह्य मी श्रवण केलें. ७५.

तेव्हां स्थिरावत असलेल्या आनंदानें संजय म्हणतो, महाराज, जें उपनिषदांना माहीत नाहीं, तें व्यासांच्या कृपेनें मीं ऐकिलें. १६०८. ती कथा ऐकतांच माझें ब्रह्मभावाशीं ऐक्य झालें व मीतूंपणासह अज्ञानदृष्टि नाहींशी झाली. १६०९. हे सर्वच योग ज्या ठिकाणाला येणारे मार्ग आहेत, त्या श्रीकृष्णाचें वाक्य व्यासांनीं मला सुलभ केलें आहे. १६१०. अहो महाराज, अर्जुनाच्या निमित्तानें आपणच दुसरें ( अर्जुन ) असे बनून आपल्याचकरितां जें देव बोलले. १६११. महाराज, येथें माझे कान अधिकाराला पात्र झाले. गुरूंच्या स्वतंत्र सामर्थ्याचें मी काय वर्णन करूं ! १६१२.

हे राजा ( धृतराष्ट्रा ), या श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या अद्भुत व पुण्यकारक संवादाचें वारंवार स्मरण होऊन मी पुनः पुनः हर्ष पावत आहें ७६.

( राजाशीं ) हें बोलत असतां संजय आश्चर्यचकित झाला व त्यायोगानें त्याची देहस्मृति गेली. तें कसें तर, ज्याप्रमाणें रत्नाचे ठिकाणीं जसें रत्नाचें तेज रत्नाच्या मूळ स्वरूपाला झांकीत येतें. १६१३. हिमालय पर्वतावरील सरोवरें चंद्रोदय झाला असतां स्फटिकासारखीं घट्ट होतात; नंतर मग सूर्योदय झाल्यावर त्यांस पुनः पाझर फुटतात, १६१४. त्याप्रमाणें देहस्मृतीवर आल्यावर संजय तो संवाद चित्तांत आणी. पुनः त्याची तीच ( देहविस्मृतीची ) अवस्था होत होती. १६१५.

हरीच्या त्या अतिशय अद्भुत रूपाचें पुनः पुनः स्मरण होऊन, हे राजा, मला अत्यंत आश्चर्य वाटत आहे व पुनः पुनः मी हर्ष पावत आहें ७७.

मग हर्षाच्या वेगांत उभा राहून संजय म्हणाला, राजा, श्रीहरीच्या विश्वरूपाला पाहिलें असतांना तूं उगा कसा राहूं शकलास ? १६१६. न पाहण्यानें जें दिसतें, नाहींपणानें जें आहे, विसरण्यानें ( विसरूं म्हटलें तरीही ) जें आठवतें, तें आतां कसें चुकवूं ? १६१७. श्रीहरीचें विश्वरूप पाहून, त्याचा तो नुसता चमत्कार मानण्यासुद्धां त्या ठिकाणीं अवकाश नाहीं. हा विश्वरूपरूपी महापूर माझ्याही सकट वाहून नेत आहे. १६१८. याप्रमाणें श्रीकृष्णार्जुन संवादरूपी संगमांत स्नान करून, संजय अहंकाराला तिळांजळी देत आहे. १६१९. तेव्हां न सांवरणाऱ्या आनंदानें त्याला कांहीं अलौकिकही गहिंवर येऊन, सद्गदित कंठानें ' श्रीकृष्ण ' ' श्रीकृष्ण ' असें वेळोवेळां म्हणत होता. १६२०. या अष्टसात्त्विक भावांचा प्रकार ( अवस्था ) धृतराष्ट्राला केव्हांच ( माहीत ) नव्हता. म्हणून ( संजयाची अशी अवस्था कां झाली ? ) त्याची जी काहीं कल्पना धृतराष्ट्रानें करावी. १६२१. इतक्यांत त्या संजयानें आपणास झालेला सुखलाभ आपल्याच ठिकाणीं स्थिर करून, अष्टसात्त्विक भावाचा फुंज जिरविला. १६२२. तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला, संजया, लढाईत कोणत्या वेळेला कसा प्रसंग येईल, तें सांगून माझा वेळ घालवण्याकरतां, व्यासांनीं तुला माझ्याजवळ ठेवला; तें बाजूला सारून, तूं हा काय प्रकार मांडला आहेस ? १६२३. त्या व्यासांनीं तुला येथें कशाकरितां बसविलें ? प्रसंग नसतां, मध्येंच असें काय बोलतोस ? १६२४. रानांत राहणारा मनुष्य राजमंदिरांत नेला असतां त्याला दाही दिशा उदास वाटतात. अथवा उजाडलें असतां, पिशाचांना रात्र होते. १६२५. ज्याला जेथचें महत्त्व माहीत नाहीं, तें त्याला विपरीतच वाटतें. म्हणून ( त्या महत्त्व माहीत नसलेल्या गोष्टीच्या वर्णनास ) तो अप्रसंग आहे, असें म्हणणारच. ( यांत काय नवल ? ) १६२६. ( मग ) धृतराष्ट्र म्हणाला, अरे बापा संजया, सांप्रत जें युद्ध सुरू झालें आहे, तें शेवटीं कोणाला जय देईल ? १६२७. सहज विचार करून पाहिलें तर, विशेषें करून बहुतेक आमची अशी कल्पना आहे कीं, दुर्योधनाचा पराक्रम नेहमीं विशेष असतो. १६२८. आणि प्रतिपक्षी पांडवांच्या मानानें या दुर्योधनाचें सैन्यही दीडपट आहे. म्हणून तें सैन्य निश्चयेंकरून जय मिळवील ना ? १६२९. आम्हांला तर असें वाटतें. मग तुझें भविष्य कसें आहे, तें आम्हांस कळत नाहीं. तर संजया तुझें भविष्य जसें असेल तसें सांग. १६३०.

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें मी नेणें । परी आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ ३१ ॥ चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ ३२ ॥ रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोइरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ ३३ ॥ दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ ३४ ॥ वसंत तेथें वनें । वन तेथ सुमनें । सुमनीं पालिंगनें । सारंगांचीं ॥ ३५ ॥ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥ ३६ ॥ भाग्य तेथ विलासु । सुख तेथें उल्लासु । हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥ ३७ ॥ तैसें सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी का सनाथ । तो श्रीकृष्ण रावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ ३८ ॥ आणि आपलेनि कांतेंसीं । ते जगदंबा जयापासीं । अणिमादिकी काय दासी । नव्हती तयातें ॥ ३९ ॥ कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तें जयो लागवेगें । तेथेंचि आहे ॥ १६४० ॥ विजयी नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । श्रियेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ॥ ४१ ॥ तयाचिये देशींचां झाडीं । कल्पतरूतें होडी । न जिणावें कां येवढी । मायबापु असतां ॥ ४२ ॥ ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें कां नोहावे । तिये भूमिके कां न यावें । चैतन्यत्व ॥ ४३ ॥ तयाचिया गांवींचिया । नदी अमृतें वाहाविया । नवल कायि राया । विचारीं पां ॥४४॥ तयाचे विसाट शब्द । सुखें म्हणों येती वेद । सदेह सच्चिदानंद । कां नोहावा तो ॥४५॥ पैं स्वर्गापवर्ग दोन्ही । इयें पदें तया अधीनीं । जे श्रीकृष्ण बाप जननी । कमळा जया ॥ ४६ ॥ म्हणौनि जिया बाहीं उभा । तो लक्ष्मियेचा वल्लभा । तेथ सर्वसिद्धी स्वयंभा । येर नेणों ॥ ४७ ॥ आणि समुद्राचा मेघु । उपेगें तयाहूनि चांगु । तैसा पार्थी आजि लागु । आहे तये ॥ ४८ ॥ कनकत्वदीक्षागुरू । लोहा परिसु होय किरू । परी जगा पोसिता व्यवहारू । तेंचि जाणें ॥ ४९ ॥ येथ गुरूत्वा होतसे उणें । ऐसें झणें कोण्ही म्हणे । वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपला ॥ १६५० ॥ तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि बहुती । परी माने इये स्तुती । गौरव असे ॥ ५१ ॥ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिराणी । तरी ते शार्ङ्गपाणी । फळा आली ॥ ५२ ॥ किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा । तो जयाकडे साक्षेपा । रीति आहे ॥ ५३ ॥ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो । तेथ न ये तरी वावो । विजयोचि होय ॥ ५४ ॥ म्हणौनि जेथ श्री श्रीमंतु । जेथ तो पांडुचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ ५५ ॥ जरी व्यासाचेनि साचें । थिरे मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवचि माना ॥ ५६ ॥ जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगळाचा ॥५७॥ या बोला आन होये । तरी व्यासाचा अंकु न वाहें । ऐसें गाजोनि बाहें । उभिली तेणें ॥ ५८ ॥ एवं भारताचा आवांका । आणूनि श्लोका येका । संजयें कुरुनायका । दिधला हातीं ॥ ५९ ॥

जिकडे योगेश्वर कृष्ण आणि धनुर्धर पार्थ असतील, तेथें श्री, विजय, ऐश्वर्य आणि नीति हीं अढळ आहेतच, अशी माझी समजूत आहे. ७८.

या धृतराष्ट्राच्या बोलण्यावर संजय म्हणाला, महाराज, त्यांचें एकमेकांचें काय होईल, हें मी जाणत नाहीं; परंतु जेथें आयुष्य आहे, तेथें जगणें आहे. १६३१. महाराज, चंद्र तेथें चांदणें असावयाचें, शिव तेथें शक्ति असावयाचीच व संत तेथें सुविचार असायचाच. १६३२. राजा तेथें सैन्य, प्रेम तेथें संबंध व जेथें अग्नि तेथें जाळण्याची शक्ति असावयाचीच. १६३३. दया तेथें धर्म, धर्म तेथें सुखप्राप्ति आणि सुखाच्या ठिकाणीं जसा पुरुषोत्तम असतो. १६३४. जेथें वसंत तेथें ( झाडांना ) नवी पालवी असावयाची; व नवी पालवी तेथें फुलें व फुलें तेथें भ्रमरांचे समुदाय असावयाचेच. १६३५. जेथें गुरु तेथें ज्ञान, जेथें ज्ञान तेथें आत्मदर्शन व जेथें ( आत्मदर्शन ) तेथें जसें समाधान असतें. १६३६. जेथें भाग्य तेथें सुखभोग व जेथें सुखभोग तेथें प्रसन्नता; असो हें राहूं दे. जेथें सूर्य तेथें प्रकाश असावयाचाच. १६३७. त्याप्रमाणें ज्या स्वामीच्या योगानें सर्व पुरुषार्थ ( धर्म, अर्थ, काम व मोक्ष ) सनाथ झाले आहेत, तो श्रीकृष्ण राजा जेथें आहे, तेथें लक्ष्मी असावयाचीच. १६३८. आणि ज्याच्याजवळ आपल्या पतीसह ती जगन्माता लक्ष्मी आहे, अणिमादिक सिद्धि देखील त्याच्या दासी होत नाहींत काय ? १६३९. कृष्ण आपल्या अंगानें विजयाचें स्वरूप आहे; तो ज्या पक्षाला राहिलेला आहे, अर्थात् जय त्या बाजूला त्वरेनें मिळावयाचाच. १६४०. 'विजय' नांवानें अर्जुन प्रसिद्ध आहे व श्रीकृष्णनाथही विजयाची मूर्ति आहे. लक्ष्मीसुद्धां सर्व विजय निश्चितपणानें तेथेंच आहे असें समज. १६४१. त्याला ( अर्जुनाला ) एवढे ( श्रीकृष्ण व लक्ष्मी यांच्यासारखे ) मायबाप असतां, त्याच्या देशाच्या झाडांनीं कल्पतरूला पैजेनें कां जिंकूं नये ? १६४२. त्या देशाचे सर्वही दगड चिंतामणि कां होऊं नयेत ? आणि त्या देशाच्या भूमीला चैतन्यत्व कां येऊं नये ? १६४३. त्याच्या गांवच्या नद्या अमृतानें ( भरून ) कां वाहूं नयेत ? राजा, विचार कर. यांत कांहीं आश्चर्य आहे काय ? १६४४. त्याच्या स्वैर उच्चारिलेल्या शब्दांना खुशाल वेद म्हणतां येईल ! ( मग ) तो देहासह सच्चिदानंदरूप कां होऊं नये ? १६४५. ज्याला श्रीकृष्ण बाप आहे व आई लक्ष्मी आहे, त्याच्या आधीन स्वर्ग व मोक्ष हीं दोन्हीं पदें आहेत. १६४६. म्हणून ज्या पक्षाला तो लक्ष्मीचा पति उभा आहे, तेथें सर्व सिद्धि मूर्तिमंत आहेत, याशिवाय मी दुसरें कांहीं जाणत नाहीं. १६४७. आणि मेघ हा समुद्राच्या पाण्याचा बनलेला असून, उपयोगानें त्याच्यापेक्षां अधिक चांगला आहे; त्याप्रमाणें ( विशेष उपयोगाचा ) संबंध आज त्या अर्जुनाच्या ठिकाणींच आहे. ( देवापेक्षां अर्जुनाचा जास्त उपयोग आहे. ) १६४८. लोखंडाला सोनेंपणाची दीक्षा ( रूप ) देणारा परीस हा लोखंडाचा गुरु आहे खरा; परंतु जगाला पोसणारा व्यवहार तेंच ( सोनेंच ) जाणतें. १६४९. या उदाहरणांत गुरुपणाला कमीपणा होतो, असें कोणी कदाचित म्हणेल, ( पण तसें नाहीं. तर असें आहे कीं, ) अग्नि हा दिव्याच्या रूपानें आपलाच प्रकाश प्रकाशित करतो. १६५०. त्याप्रमाणें देवाच्या सामर्थ्यानेंच अर्जुन बलवान झाला आहे. परंतु अर्जुन देवापेक्षांही सामर्थ्यवान् आहे, अशी वर केलेली अर्जुनाची स्तुतीच देवाला पुष्कळ प्रकारें आवडते, असें या स्तुतीचें गौरव आहे. १६५१. आणि मुलाकडून मी सर्व गुणांत जिंकला जावा, ही बापाला आवड असते, ती श्रीकृष्णाच्या ठिकाणीं फळाला आली. ( आपल्यापेक्षां आपला शिष्य अर्जुन अधिक वढावा, ही जी देवाची इच्छा होती, ती सफळ झाली. ) १६५२. फार काय सांगावें ? धृतराष्ट्र राजा, अर्जुन हा कृष्णकृपेनें असा ( कृतकृत्य ) झाला. तो ( अर्जुन ) ज्या पक्षाकडे जाणूनबुजून आहे, १६५३. हे राजा, तोच पक्ष विजयाची जागा आहे, यांत तुला काय संशय ( वाटत ) आहे ? त्या पक्षाकडे जर जय न येईल, तर तो जयच खोटा होईल. १६५४. म्हणून जेथें लक्ष्मी व श्रीकृष्ण व जेथें तो पंडूचा मुलगा ( अर्जुन ), हे तीन आहेत, तेथें विजय आहे व सर्व गोष्टींची भरभराट तेथेंच आहे. १६५५. व्यासाच्या बोलण्यावर जर तुमचा खराखरा विश्वास असेल, तर हें माझें भविष्य अढळ माना. १६५६. जेथें तो लक्ष्मीसहित श्रीकृष्ण आहे व जेथें भक्तांचा समुदाय आहे, तेथें (अनायासें) सुखाची व कल्याणाची प्राप्ति आहे. १६५७. या बोलण्यांत जर अन्यथा होईल, तर व्यासाचा शिष्य म्हणून मी म्हणविणार नाहीं, अशी गर्जना करून त्यानें हात वर केला. १६५८. याप्रमाणें भारताचें तात्पर्य एका श्लोकांत आणून, संजयानें धृतराष्ट्राच्या हातांत दिलें. १६५९

जैसा नेणों केवढा वन्ही। परी गुणाग्रीं ठेउनी। आणिजे सूर्याची हानी। निस्तरावया ॥१६६०॥ तैसें शब्दब्रह्म अनंत। जाले सवालक्ष भारत। भारताचें शतें सात। सर्वस्व गीता ॥ ६१ ॥ तयाही सातां शतांचा। इत्यर्थु हा श्लोक शेषींचा। व्यासशिष्य संजयाचा। पूर्णोद्गारु जो ॥ ६२ ॥ येणें येकेंचि श्लोकें। राहे तेणें असकें। विद्याजाताचें निकें। जिंतिलें होय ॥ ६३ ॥ ऐसेयां श्लोका शतें सात। गीतेचीं पदें आंगें वाहत। पद्यें म्हणों कीं परमामृत। गीताकाशींचें ॥६४॥ कीं आत्मराजाचिये सभे। गीते वोडवले खांबे। मज श्लोक प्रतिभे। ऐसे येत ॥ ६५ ॥ कीं गीता हे सप्तशती। मंत्रप्रतिपाद्य भगवती। मोहमहिषा मुक्ती। आनंदलीसे ॥६६॥ म्हणौनि मनें कायें वाचा। जो सेवक होईल इयेचा। तो स्वानंदसाम्राज्याचा। चक्रवर्ती करी ॥ ६७ ॥ कीं अविद्यातिमिररोखें। श्लोक सूर्यातें पैजा जिंके। ऐसे प्रकाशिले गीतामिखें। रायें श्रीकृष्णें ॥६८॥ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता। मांडव जाली आहे गीता। संसारपथश्रांता। विसंवावया ॥ ६९ ॥ कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं। केले" ते श्लोक कल्हारीं। श्रीकृष्णाख्यसरोवरीं। सासन्नली हे ॥१६७०॥ कीं श्लोक नव्हती आन। गमे गीतेचें महिमान। वाखाणिते बंदिजन। उदंड जैसे ॥ ७१ ॥ कीं श्लोकाचिया आवारा। सात शतें करूनि सुंदरा। सर्वागम गीतापुरा। वसों आले ॥ ७२ ॥ कीं निजकांता आत्मया। आवडी गीता मिळावया। श्लोक नव्हती बाह्या-। पसरु का जो ॥ ७३ ॥ कीं गीताकमळींचे भृंग। हे गीतासागरतरंग। कीं हरीचे तुरंग। गीतारथींचे ॥ ७४ ॥ कीं श्लोक सर्वतीर्थसंघातु। आला श्रीगीतेगंगेआंतु। जे अर्जुन सिंहस्थु। जाला म्हणौनि ॥ ७५ ॥ कीं नोहे हे श्लोकश्रेणी। अचिंत्यचित्तचिंतामणी। कीं निर्विकल्पां लावणी। कल्पतरूंची ॥ ७६ ॥ ऐसिया शतें सात श्लोकां। परी आगळा येकयेका। आतां कोण वेगाळिका। वानावा पां ॥ ७७ ॥ दीपा आगिलु मागिलु। सूर्यु धाकटा वडीलु। अमृतसिंधु खोलु। उथलु कायसा ॥ ७८ ॥ तान्ही आणि पारठी। इया कामधेनूतें दिठी। सूनि जैसिया गोठी। कीजतीना ॥ ७९ ॥ तैसे पहिले सरते। श्लोक न म्हणावे गीते। जुनीं नवीं पारिजातें। आहाती काई ॥ १६८० ॥ आणि श्लोका पाडु नाहीं। हें कीर समर्थु काई। येथ वाच्य वाचकही। भागु न धरी ॥ ८१ ॥ जे इये शास्त्रीं येकु। श्रीकृष्णचि वाच्य वाचकु। हें प्रसिद्ध जाणे लोकु। भलताही ॥ ८२ ॥ येथें जें अर्थे तेंचि पाठें। जोडे येवढेनि धटें। वाच्यवाचकें येकवटें। साधित शास्त्र ॥ ८३ ॥ म्हणौनि मज कांहीं। समर्थनीं आतां विषो नाहीं। गीता जाणा हे वाङ्मयी। श्रीमूर्ति प्रभूची ॥ ८४ ॥ शास्त्र वाच्यें अर्थे फळे। मग आपण मावळे। तैसें नव्हे हें सगळें। परब्रह्मचि ॥ ८५ ॥ कैसा विश्वाचिया कृपा। करूनि महानंद सोपा। अर्जुनव्याजें रूपा। आणिला देवें ॥ ८६ ॥ चकोराचेनि निमित्तें। तिन्ही भुवनें संतप्तें। निववीलीं कळावंतें। चंद्रें जेवीं ॥ ८७ ॥ कां गौतमाचेनि

जसा अग्नि केवढा तरी मोठा आहे, हें काय सांगावें ! परंतु तो वातीच्या टोंकावर ठेवून सूर्याची गैरहजेरी भरून काढण्यासाठीं आणावा. १६६०. त्याप्रमाणें अनंत वेद, सव्वा लक्ष भारत झालें व भारताचें सार सातशें श्लोकांत गीता झाली. १६६१, व्यासांचा शिष्य जो संजय, त्याचा जो पूर्णोद्वार, तो हा गीतेचा शेवटला श्लोक, या सातशें श्लोकांचेंही तात्पर्य आहे. १६६२. या एकाच श्लोकावर जो विश्वास ठेवून राहील, त्यानें संपूर्ण विद्यामात्राचें खरें स्वरूप हस्तगत केलें, असें होईल. १६६३. याप्रमाणें या सातशें श्लोकांना गीतेचीं पदें आपल्या अंगीं धारण करितात. या श्लोकांना श्लोक म्हणावें का गीतारूपी आकाशांतील परमामृत म्हणावें ! १६६४. अथवा आत्मराजाची सभा जी गीता, त्या गीतारूपी सभेला हे सातशें श्लोकरूपी खांबच लावले आहेत. हे श्लोक माझ्या अनुभवाला असे येतात, १६६५. अथवा गीता ही सप्तशतीच्या मंत्रांनीं ( सातशें श्लोकरूपी मंत्रांनीं ) प्रतिपादन करण्यास योग्य अशी देवी आहे व ती मोहरूपी महिषासुराच्या नाशानें आनंद पावली आहे. १६६६. म्हणूण जो मनानें, शरीरानें अथवा वाचेनें गीतारूपी देवीचा सेवक होईल, त्याला ही गीता स्वानंदरूपी साम्राज्याचा सार्वभौम राजा करील. १६६७. अथवा अविद्यारूपी अंधारावर चाल करून, गीतेचा एकेक श्लोकच सूर्याला पैजेनें जिंकतो. असे सातशें श्लोक श्रीकृष्णराजानें प्रगट केले आहेत. १६६८. अथवा संसाररूपी रस्त्यावर चालतांना श्रमलेल्यांना विश्रांति घेण्याकरितां, श्लोकांच्या अक्षररूपी द्राक्षांच्या वेलीला, गीता ही मांडव झाली आहे. १६६९. अथवा भाग्यवान संतरूपी भ्रमरांनीं सेवन करून ज्या श्लोकांना कमळरूपता आणली, अशा श्लोककमळांनीं युक्त असें जें श्रीकृष्ण नांवाचें सरोवर त्यांमध्ये ही गीतारूप वेली, भरास आली आहे. १६७०. किंवा हे श्लोक नव्हेत. मला तर यासंबंधानें दुसरीच कल्पना येते. हे श्लोक म्हणजे जणूंकाय गीतेचा महिमा वर्णन करणारे पुष्कळसे भाटच आहेत ! १६७१. अथवा सातशें श्लोकांचा सुंदर कोट करून, सर्व शास्त्रें गीतारूपी शहरांत रहावयास आलीं आहेत. १६७२. अथवा हे श्लोक म्हणजे, गीता ही आपला पति जो आत्मा, त्यास आवडीनें भेटण्याकरितां आली असतां, तिनें पसरलेले बाहूच नव्हेत काय ? १६७३. अथवा हे श्लोक गीतारूपी कमळावरील भुंगे आहेत, अथवा गीतारूपी समुद्रावरील हे श्लोक लाटा आहेत. अथवा श्रीहरीच्या गीतारूपी रथाचे हे श्लोक म्हणजे घोडेच आहेत. १६७४. अथवा अर्जुना हा सिंहस्थ झाला, म्हणून हा श्लोकरूपी सर्व तीर्थांचा समुदाय श्रीगीतारूपी गंगेत आला. १६७५. अथवा ही श्लोकांची पंक्ति नव्हे, तर अचिंत्य जें ब्रह्म, तें चित्ताला देणारा चिंतामणि आहे. अथवा निर्विकल्प ब्रह्माला देणारीं श्लोक हीं कल्पतरूंचीं झाडें लावलेलीं आहेत. १६७६. असे सातशें श्लोक आहेत. परंतु एकापेक्षां एक वरचढ आहेत. आतां कोणाची निवड करून वेगळें वर्णन करावें ? १६७७. दिव्याला आधींचा व मागचा भेद कसला ? सूर्याला धाकटा व वडील हा भेद कसला ? अमृताच्या समुद्राला खोल व उथळ हा भेद कसला ? १६७८. ती तान्ही आहे अथवा पारठी (वयस्कर) आहे, या गोष्टी कामधेनूच्या दृष्टीनें पाहिलें तर जशा करतां येत नाहींत; १६७९. त्याप्रमाणें गीतेच्या श्लोकांत हें पहिलें ( उत्तम ) हें शेवटलें ( कमी योग्यतेचें ) असे प्रकार आहेत असें म्हणूं नये. पारिजातकाच्या फुलांत जुनीं नवीं ( हे भेद ) आहेत काय ? १६८०. आणि श्लोकांमध्ये कमी योग्यतेचा व अधिक योग्यतेचा असा भेद नाहीं असें खरोखर काय समर्थन करूं ? या गीतेंत वाच्य व वाचक हीही निवड होत नाहीं. १६८१. कारण कीं या गीताशास्त्रांत एक श्रीकृष्णच वाच्य व वाचक आहेत, हें प्रसिद्ध आहे व वाटेल त्या मनुष्यालाही हें माहीत आहे. १६८२. गीतेच्या अर्थापासून जें फळ प्राप्त होतें, तेंच गीतेच्या पाठानेंही मिळतें. जसें गीतेचें अर्थज्ञान व पठण हे फलदृष्टीनें ताजव्यांत सारखेच आहेत, तसेंच, गीताशास्त्र हें, वाच्य व वाचक यांचें ऐक्य साधणारें आहे. ( म्हणजे या गीताशास्त्रांत वाच्य व वाचक एक श्रीकृष्ण परमात्माच आहे, असें दाखविलें आहे. ) १६८३. म्हणून मला आतां समर्थन करण्यास कांहीं विषय ( राहिला ) नाहीं. गीता ही प्रभूची शब्दमय सुशोभित मूर्ति आहे असें समजा. १६८४. इतर शास्त्र, आपल्या विषयांचें अर्थज्ञानरूपी फल देऊन आपण नाहींसें होतें, तसें हें गीताशास्त्र नाहीं. तर हें सगळें परब्रह्मच आहे. १६८५. देवांनीं विश्वाच्या करुणेनें, ब्रह्मानंद सोपा करून अर्जुनाच्या निमित्तानें कसा प्रगट केला आहे ! १६८६. ज्याप्रमाणें चकोराच्या निमित्तानें, कलांनीं युक्त असलेल्या चंद्रानें तापलेले तिन्ही लोक शांत केले. १६८७. अथवा कलिकाळरूपी तापानें तप्त झालेल्यांची पीडा नाहींशी करण्याच्या हेतूनें, शंकरांनीं गौतमाच्या निमित्तानें गंगेचा

मिषें । कळिकाळज्वरितादोषें । पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ॥ ८८ ॥ तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्णगाय ॥ ८९ ॥ येथें जीवें जरी नाहाल । तरी हेंचि कीर होआल । नातरी पाठमिषें तिंबाल । जीभचि जरी ॥ १६९० ॥ तरी लोह एके अंशें । झगटलिया परिसें । येरीकडे आपैसें । सुवर्ण होय ॥ ९१ ॥ तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव वोठीं । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल आंगा ॥ ९२ ॥ ना येणेसीं तोंड वांकडें । करूनि ठाकाल कानवडें । तरी कानींही घेतां पडे । तेचि लेख ॥ ९३ ॥ जे हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआरौतें । जैसा समर्थ दाता कोणातें । नास्ति न म्हणे ॥ ९४ ॥ म्हणौनि जाणातया सवा । गीताचि येकी सेवा । काय कराल आघवां । शास्त्रीं येरीं ॥ ९५ ॥ आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चावळिली जे निराळीं । ते श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ॥ ९६ ॥ बाळकातें वोरसें । माय जैं जेवऊं बैसे । तैं तया ठाकती तैसे । घांस करी ॥ ९७ ॥ कां अफाटा समीरणा । आपैतेपण शाहाणा । केलें जैसें विंजणा । निर्मूनियां ॥ ९८ ॥ तैसें शब्दें जें न लभे । तें घडुनियां अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविलें ॥ ९९ ॥ स्वातीचेनि पाणियें । न होती जरी मोतियें । तरी अंगीं सुंदराचिये । का शोभते तें ॥ १७०० ॥ नादु वाद्या न येतां । तरी कां गोचरु होता । फुलें न होतां घेपता । आमोदु केवीं ॥ १ ॥ गोडी न होतीं पक्वान्नें । तरी कां फावती रसनें । दर्पणावीण नयनें । नयनु का दिसे ॥ २ ॥ द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं । तरी काह्या उपास्ती । आकळता तो ॥ ३ ॥ तैसें वस्तु जें असंख्यात । तया संख्या शतें सात । न होती तरी कोणा येथ । फावों शकतें ॥ ४ ॥ मेघ सिंधूचें पाणी वाहे । तरी जग तयातेंचि पाहे । कां उमप तें नोहे । ठाकतें कोण्हा ॥ ५ ॥ आणि वाचा जें न पवे । तें हे श्लोक न होते बरवे । तरी कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ॥ ६ ॥ म्हणौनि व्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु । श्रीकृष्णउक्ती आकारु । ग्रंथाचा केला ॥ ७ ॥ आणि तोचि हा मी आतां । व्यासाचीं पदें पाहतां पाहतां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ ८ ॥ व्यासादिकांचे उन्मेख । राहाटती जेथ साशंक । तेथ मीही रंक येक । वाचाळी करीं ॥ ९ ॥ परी गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा । तरी माझीया दूर्वांदळा । ना न म्हणे कीं ॥१७१०॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा । तेथ काय मुरकुटा । वारिजतसे ॥ ११ ॥ पांख फुटे पाखिरूं । नुडे तरी नभींच थिरू । गगन क्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ ॥१२॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शाहाणें । आणिकें काय कोणें । चालावेंचिना ॥ १३ ॥ जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ॥ १४ ॥ दिवियेचां आंगीं थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ॥ १५ ॥ जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लराऐसें । बिंबेचि पैं ॥ १६ ॥ तेवीं व्यासादिक महामती । वावरों येती इये ग्रंथीं । मा आम्ही ठाकों हे युक्ती ।

ओघ खालीं सोडून दिला. १६८८. त्याप्रमाणें अर्जुनाला वांसरूं बनवून श्रीकृष्णरूपी गायीनें हें गीतेचें दुभतें जगाला पुरेल, एवढें दिलें आहे. १६८९. या गीतारूपी गंगेंत जर तुम्हीं जीवानें ( अंतःकरणानें ) स्नान कराल, ( म्हणजे या गीतेच्या अर्थाचा जर तुम्ही मनानें चांगला विचार कराल ) तर हेंच ( गीतारूपी ब्रह्मच ) तुम्ही व्हाल. अथवा पाठाच्या रूपानें जर नुसती जीभच ओली कराल; १६९०. तरी परिसानें लोखंडाच्या एका भागाला स्पर्श केला असतां त्या लोखंडाच्या इतर सर्व भागाचें जसें आपोआप सोनें होतें, १६९१. त्याप्रमाणें पाठरूपी वाटीनें गीतेचे श्लोक मुखाला लावतां न लावतां तोंच, ब्रह्मतेची पुष्टी अंगाला येईल. १६९२. अथवा गीतेकडे ( कंटाळ्यानें ) तोंड वांकडें करून एका अंगाला पडून रहाल, तरी कानानें गीता घेतली ( ऐकली ) असतां तोच हिशेब होतो. ( तीच फलप्राप्ति होते. ) १६९३ कारण कीं, ज्याप्रमाणें समर्थ दाता कोणाला ' नाहीं ' असें म्हणत नाहीं; त्याप्रमाणें गीताही आपल्या ऐकण्यानें, पठणानें अथवा अर्थज्ञानानें मोक्षापेक्षां कमी कांहीं देत नाहीं. १६९४. म्हणून शहाण्या मनुष्याच्या समागमानें एक गीतेचेंच सेवन करावें. इतर सर्व शास्त्रें घेऊन काय करावयाचें आहे? १६९५. आणि श्रीकृष्णार्जुन हे थागा न लागेल ( इतकी कठीण ) अशी जी मोकळी कथा बोलले, ती व्यासांनीं वाटेल त्याला तळहातावर घेतां येईल इतकी सोपी केली. १६९६. जेव्हां आई मुलाला प्रेमानें जेऊं घालावयास बसते, तेव्हां त्या मुलाला घेतां येतील असे जसे घास करते. १६९७. अथवा ज्याप्रमाणें शहाण्या माणसांनीं पंखा बनवून अफाट वाऱ्याला ( वाटेल तेव्हां घेतां यावा असा ) आपल्या स्वाधीन केला. १६९८. तसें शब्दांनीं जें प्राप्त होत नाहीं, तें अनुष्टुप छंदांत बसवून स्त्रीशूद्रादिकांच्या समजुतीला उतरेल असें ( श्रीव्यासांनीं ) केलें. १६९९. स्वाति नक्षत्राचे पाण्याचे थेंब जर मोतीं झाले नसते, तर तीं सुंदर स्त्रियांच्या शरीरावर कोठून शोभलीं असतीं ? १७००. नाद जर वाद्याच्या रूपाला न येता, तर तो कानाला गोचर कसा झाला असता ? व फुलें जर सुवास झाला नसता, तर तो सुगंध ( नाकानें ) कसा घेतला जाता ? १७०१. गोडी जर पक्वान्नें झाली नसती, तर ती जिभेला कशी घेतां आली असती ? आरशाशिवाय डोळ्याला डोळा दिसेल काय ? १७०२ द्रष्टा जो श्रीगुरुमूर्ति, तो जर दृश्याच्या मार्गांत पडला नसता ( निर्गुण जो श्रीगुरु, तो जर सगुण झाला नसता ) तर तो उपासनेनें कसा स्वाधीन झाला असता ? १७०३ त्याप्रमाणें जें अपार ब्रह्म, तें जर सातशें श्लोकांच्या मर्यादेंत आलें नसतें, तर तें ब्रह्म या जगांत कोणाला प्राप्त होऊं शकलें असतें ? १७०४ मेघ हा जरी समुद्राचें पाणी धारण करतो, तरी जग समुद्राकडे न पाहतां मेघाकडेच पहातें. कां तर जें अमर्याद आहे तें कोणाला प्राप्त करून घेता येत नाहीं. १७०५ आणि वाचेला जें प्राप्त होत नाहीं, असें जें ( ब्रह्म ), तें ( ब्रह्म ) जर हे सातशें सुंदर श्लोक होते ना, तर तें ब्रह्म कानानें, मुखानें भोगता येईल असें कां झालें असतें ? १७०६ म्हणून जगावर व्यासांचा हा मोठा उपकार झाला कीं, त्यांनीं श्रीकृष्णाच्या बोलण्याला ग्रंथाचा आकार दिला. १७०७. आणि तोच हा ग्रंथ व्यासांचीं पदें पहातां पहातां, मी आतां मराठी भाषेच्या योगानें ऐकण्याच्या मार्गाला आणला. १७०८ व्यासादिकांचीं ज्ञानें ज्या गीतेंत संशययुक्तच वावरतात, त्या गीतेच्या बाबतींत एक गरीब मनुष्य बडबड करीत आहे; १७०९ परंतु गीता हा भोळा शंकर आहे. तो व्यासवचनरूपी फुलांची माळ धारण करतो. तरी माझ्या दुर्वादळांना ( माझ्या मराठी ओंव्यांना ) खास ' नाहीं ' म्हणणार नाहीं. १७१०. आणि क्षीरसमुद्राच्या किनाऱ्याला पाणी प्यावयास हत्तींचे समुदाय येतात, तेथें चिलटांना क्षीरसमुद्र ' येऊं नकोस ' म्हणतो काय ? १७११. नुकतेच पंख फुटलेलें पांखरूं जरी फार उडलें नाहीं, तरी आकाशांतच उडतें व त्वरेनें उंच आकाशाचें आक्रमण करणारा गरुडही ( आकाशांतच ) उडत रहातो. १७१२. राजहंसाचें चालणें जगांत उत्तम ठरलें, तर आणखी कोणी पृथ्वीवर चालूंच नये कीं काय ? १७१३. महाराज, आपल्या पोकळीप्रमाणें घागरीला पुष्कळ पाणी घेतां येतें; म्हणून चुळींत चुळीच्या लहान पोकळीइतकें पाणी भरून निघत नाहीं काय ? १७१४. मशालीचा आकार मोठा असतो, म्हणून ती पुष्कळ उजेडाला धारण करते आणि वात ( लहान असली तरी ) आपल्या मानानें प्रकाश धारण करते कीं नाहीं ? १७१५. महाराज, समुद्रांत समुद्राच्या विस्ताराच्या मानानें आकाशाचें प्रतिबिंब पडतें व डबक्यांत डबक्याएवढें आकाशाचें प्रतिबिंब पडतेंच. १७१६. त्याप्रमाणें व्यासादिकांसारखे विशालबुद्धि, या ग्रंथाचें ( गीताग्रंथाचें ) विवरण करण्यास येतात; मग आम्ही ( आपल्या अल्पबुद्धीनें ) या गीताग्रंथाचें विवरण

न मिळे कीर ॥ १७ ॥ जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखों शफरें येरें । पोहों लाहती ॥ १८ ॥ अरुण आंगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । भुंगी काई ॥ १९ ॥ यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधें गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ॥ १७२० ॥ आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलाची सोये । बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ॥२१॥ तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट पुसतु । अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ॥ २२ ॥ आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुबगे स्थावरजंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ २३ ॥ जयाचें आंगिक अंशिकें । तेज लाहोनि अर्कें । आंधाराचें सावाइकें । लोटिजत आहे ॥ २४ ॥ समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ॥२५॥ पवना जयाचें बळ । आकाश जेणें पघळ । ज्ञान जेणें उजाळ । चक्रवर्ती ॥२६॥ वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास । हें असो रूपस । विश्व जेणें ॥ २७ ॥ तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजहीआंतु । रिघोनियां ॥२८॥ आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगीं । येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥ २९ ॥ श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ॥१७३०॥ चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें । वसिष्ठें मांडली कीं भांडे । भानूसीं काठी ॥ ३१ ॥ मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला । जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ॥ ३२ ॥ आर्धीचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी । तैं न दिसे ऐसी गोठी । कैंही आहे ॥ ३३ ॥ म्हणोनि माझे नीच नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे । गुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३४ ॥ याकारणें मियां । गीतार्थ मऱ्हाठिया । केला लोकां यया । दिठीचा विषो ॥ ३५ ॥ परी मऱ्हाठे बोल रंगें । कवळितां पैं गीतांगें । तैं गातयाचेनि पांगें । येकाढता नोहे ॥ ३६ ॥ म्हणौनि गीता गावों म्हणे । तैं गाणिवें होती लेणें । ना मोकळे तरी उणें । गीताही आणित ॥ ३७ ॥ सुंदर आंगीं लेणें न सूये । तैं तो मोकळा श्रृंगारु होये । ना लेइलें तरी आहे । तैसें कें उचित ॥ ३८ ॥ कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मानवती । अंगेंचि सडीं ॥ ३९ ॥ नाना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होती परिमळीं । वसंतागर्भीचीं वाटोळीं । मोगरीं जैसीं ॥१७४०॥ तैसा गाणिवेनें मिरवी । गीतेवीणही रंगु दावी । तो लाभाचा बंधु ओंवीं । केला मियां ॥ ४१ ॥ तेणें आबालसुबोधें । वोवीयेचेनि बंधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ ४२ ॥ आतां चंदनाचां तरुवरीं । परिमळालागीं फूलवरी ।

करावें, हें खरोखर युक्तीला जुळणार नाहीं कीं काय? १७१७ ज्या समुद्रामध्यें मंदार पर्वताच्या आकाराचे प्राणी संचार करतात, त्या समुद्रांत शफर नांवाच्या लहान माशांना पोहतां येतें असें दिसतें. १७१८. अरुण हा सूर्याच्या शरीराजवळ असतो म्हणून तो सूर्यास पहातो. मग त्या सूर्याला पृथ्वीवरची मुंगी पहात नाहीं काय? १७१९. म्हणून आम्हांसारख्या सामान्य लोकांना देशी भाषेंत (मराठी भाषेंत) गीता आणतां येते, हें म्हणणें अयोग्य आहे, असें म्हणण्याला कारण नाहीं. १७२० आणि बाप पुढें जात असतां त्याच्या पाउलाच्या अनुरोधानें जर मूल आलें, तर त्या मुलाला (बाप ज्या ठिकाणीं गेला त्या ठिकाणीं) पोहोंचतां येणार नाहीं काय? १७२१. त्याप्रमाणें व्यासांचा माग घेत घेत व भाष्यकारांना वाट पुसत पुसत, मी अयोग्य मनुष्यही तेथें (गीतार्थाच्या ठिकाणीं) प्राप्त न होता कोठें जाईन? १७२२. आणि ज्याच्या क्षमेनें पृथ्वी स्थावरजंगम प्राण्यांना कंटाळत नाहीं व ज्याच्या अमृतानें चंद्र जगाला शांत करतो. १७२३. ज्याच्या अंगचे अंशभर तेज घेऊन सूर्य अंधाराचे संकट दूर करतो. १७२४. समुद्राला ज्याचें पाणी आहे, पाण्याला ज्याचें माधुर्य आहे व माधुर्याला सुंदरपणा ज्याच्या योगानें आहे. १७२५. वाऱ्यांतील सामर्थ्य ज्याचें आहे, ज्याच्या योगानें आकाश ऐसपैस आहे व ज्याच्या योगानें ज्ञान हें प्रकाशमान सार्वभौम राजा बनलेलें आहे. १७२६. ज्याच्या योगानें वेद चांगले बोलणारा आहे, ज्याच्या योगानें सुख भरभराटींत आहे. हें राहूं द्या. ज्याच्या योगानें विश्व रूपवान् झालें आहे. १७२७. तो सर्वांवर उपकार करणारा समर्थ श्रीगुरु निवृत्तिनाथ माझ्यामध्येंही प्रवेश करून वागत आहे. १७२८. ज्या गीतेचें ज्ञान मला सद्गुरुपासून आयतें (मी श्रम न करतां) मिळालें आहे, ती गीता मी जगांत आतां मराठी भाषेच्या द्वारां सांगतों, यांत आश्चर्याला जागा कोठें आहे? १७२९. डोंगरावर मातीचा पुतळा करून, त्यास श्रीगुरु (द्रोणाचार्य) असें नांव ठेवून, त्याच्यापासून जो धनुर्वेद शिकला, त्या (एकलव्य) कोळ्यानें आपल्या धनुर्विद्येच्या सामर्थ्याविषयीं त्रैलोक्याची एकवाक्यता केली. १७३०. चंदनानें (चंदनाच्या परिमळानें) व्यापलेलीं झाडें चंदनाच्या जोडीचीं झालीं; वसिष्ठानें सूर्याच्या ऐवजीं, सूर्याचे जागीं ठेवलेली जी आपली काठी, ती काठी सूर्याशीं स्पर्धा करावयास लागली. (तिनें सूर्यासारखा प्रकाश पाडला.) १७३१. (थोरांनीं निर्जिवाचाही अंगीकार केला असतां अशी एवढी योग्यता येते.) मग मी तर चित्तानें संपन्न आहें आणि जो आपल्या कृपादृष्टीनें आपल्या पदावर बसवितो, त्या श्रीगुरुसारखा मालक माझे शिरावर आहे. १७३२. मूळची दृष्टि स्वच्छ असून शिवाय तिला जर सूर्याचें सहाय्य मिळालें, तर त्या दृष्टीला दिसणार नाहीं, अशी गोष्ट कोठें झाली आहे काय? १७३३. म्हणून माझे नेहमीं वाहणारे नवे नवे श्वासोच्छ्वासही काव्यग्रंथ होतात. गुरुकृपेनें काय एक होणार नाहीं! असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. १७३४. या कारणास्तव, मी गीतेचा अर्थ ह्या लोकांना डोळ्यांनीं दिसेल, असा स्पष्ट मराठी भाषेंत सांगितला. १७३५. परंतु माझ्या मराठी शब्दांच्या रंगानें जेव्हां कोणी गीतेचीं पदें समजून घेईल, तेव्हां संस्कृत गीता सांगणारा नसला, तरी माझ्या मराठी शब्दांत एकदेशित्व येणार नाहीं. १७३६. म्हणून संस्कृत गीतेचा अर्थ सांगून माझी मराठी टीका जर सांगितली, तर संस्कृत गीतेवरून अर्थ सांगण्याला माझी मराठी टीका दागिना होईल. (संस्कृतांतील अर्थ खुलवील.) अथवा माझी नुसती मराठी टीका जर सांगितली, तर ती संस्कृत गीतेवरून अर्थ सांगण्यालाही मागें सारील. १७३७. सुंदर अंगावर दागिना घातला नाहीं, तर तो (दागिना) मोकळा (नुसता) शोभतो; अथवा तो अलंकार, सुंदर अंगावर घातला तर तशी योग्य गोष्ट आणीक कोठें आहे? १७३८. अथवा मोत्यांचा असा स्वाभाविक गुण असा आहे कीं, तीं सोन्यालाही शोभा देतात अथवा तीं मोतीं मोकळीं असलीं तरी आपल्या स्वरूपानें शोभिवंत असतात. १७३९. अथवा वसंताच्या आरंभींचीं मोगरीचीं वाटोळीं फुलें, गुंफलेलीं असोत किंवा मोकळीं असोत; वासाच्या दृष्टीनें त्यांत कमीजास्तपणा नसतो. १७४०. त्याप्रमाणें संस्कृत गीतेसह माझी मराठी टीका सांगण्यांत आली, तरी शोभा आणील. (अथवा) संस्कृत गीता न सांगता केवळ माझी मराठीच टीका सांगितली तरी शोभा दाखविणारच. असा दोन्हीं प्रकारानें लाभ देणारा ओंवीबद्ध काव्यग्रंथ मी केला आहे. १७४१. मुलापासून तों जाणत्या मनुष्यापर्यंत सहज कळणाऱ्या त्या ओंवीच्या वृत्तांत, ब्रह्मरसानें रुचिकर झालेलीं अक्षरें, मीं गुंफलीं आहेत. १७४२. आतां ज्याप्रमाणें चंदनाच्या झाडांना सुवासाकरितां फुलें

पारुखणें जियापरी । लागेना कीं ॥ ४३ ॥ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ॥ ४४ ॥ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषजे । तें अमृतातें नेणिजे । फावलिया ॥ ४५ ॥ तैसेनि आइतेपणें । कवित्व जालें हें उपेणें । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥ ४६ ॥ हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवलि । श्रवणाकरवीं ॥ ४७ ॥ चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शहाणे । परी फावे जैसें चांदिणें । भलेतया ॥ ४८ ॥ तैसें अध्यात्मशास्त्रीं इयें । अंतरंगचि अधिकारिये । परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ ४९ ॥ तैसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तये ॥ १७५० ॥ क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तीचां कर्णकुहरीं । नेणों कें श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ॥५१॥ तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं गुप्तु । होता तयाचा हातु । पैठें जालें ॥ ५२ ॥ तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावयवा चौरंगीं । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥ ५३ ॥ मग समाधि अव्यत्यया । भोगावी वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ॥ ५४ ॥ तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तिये पदीं का सर्वेश्वरु । अभिषेकिले ॥ ५५ ॥ मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभव । श्रीगहिनीनाथा ॥ ५६ ॥ तेणें कळि कळितु भूतां । आला देखोनि निरुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥५७॥ ना आदिगुरू शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसारा । जाला जो आम्रुतें ॥ ५८ ॥ तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवां । सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ॥ ५९ ॥ आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरु-आज्ञेचा बोलू । जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ॥ १७६० ॥ मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥ ६१ ॥ तेथ पुढा मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६२ ॥ एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बांधोनि दिधलें । गोसावी मज ॥ ६३ ॥ वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची । ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ॥ ६४ ॥ परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ ६५ ॥ तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोलिलों पुरें उणें । तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो ॥ ६६ ॥ शब्द कैसा घाडिजे । प्रमेयीं कैसें पां चढिजे । अळंकारु म्हाणिजे । काय तें नेणें ॥ ६७ ॥ सायिखडेयाचें बाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चाले । तैसा मातें दावीत बोलें । स्वामी तो माझा ॥ ६८ ॥ यालागीं मी गुणदोष- । विषीं क्षमाविना विशेष । जे मी संजात ग्रंथलों देख । आचार्यें कीं ॥६९॥ आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणिवेंसी ठाके उभें । तें पूर्ण नोहे तैं लाभे । तुम्हांसीचि कोपों ॥ १७७० ॥ सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे । न मूकिजे आयसें । तैं कोणा बोलु ॥ ७१ ॥ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगाचि नव्हे । तैं तो काइ करी ॥ ७२ ॥ म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचे मी पाये । पातलों आतां

येईतोंपर्यंत रहावें (थांबावें) लागत नाहीं; १७४३. त्याप्रमाणें ही माझी ओंवीबद्ध टीका कानांवर येतां क्षणींच श्रोत्याला समाधि आणते व माझ्या ओंवीबद्ध टीकेचें व्याख्यान ऐकलें असतां, तें व्याख्यान ऐकण्याचा नाद लावणार नाहीं काय? १७४४. माझी टीका वाचण्यास लागलें कीं, त्या निमित्तानें पांडित्याचा प्रकाश पडतो आणि त्या वेळीं त्या व्याख्यानांतील गोडीचा अनुभव आला कीं, मग अमृताची देखील आठवण होत नाहीं. १७४५. त्याप्रमाणें सहज प्राप्त झालेलें हें कवित्व ( सर्वांना ) विश्रांतिस्थान झालें आहे. त्यामुळें आतां याच्या श्रवणानें, मनन व निदिध्यास यांस जिंकलें आहे. १७४६. ही माझी टीका वाटेल त्याला आत्मानंदभोगाचा शेलका भाग देईल व श्रवणेंद्रियांकडून सर्व इंद्रियांचें पोषण करील. १७४७. आपल्या स्वाभाविक सामर्थ्यानें चंद्राला ( चंद्राच्या अमृताला ) भोगून चकोरपक्षी चतुर ठरला आहेच. परंतु चंद्राचें चांदणें मात्र वाटेल त्याला जसें भोगावयास सांपडतें. १७४८. त्याप्रमाणें या अध्यात्मशास्त्रांत अंतर्मुखवृत्ति झालेलेच अधिकारी आहेत. परंतु शब्दचातुर्यानें सर्व लोक सुखी होतील. १७४९. त्याप्रमाणें महाराज, श्रीनिवृत्तिनाथांचा खरोखर मोठेपणा आहे. हा ग्रंथ नव्हे, तर हें त्या ( निवृत्तिनाथांच्या ) कृपेचें वैभवच आहे. १७५०. क्षीरसमुद्राच्या सन्निधभागीं पार्वतीच्या कर्णरूपी गुहेंत जें शंकरांनीं केव्हां सांगितलें, तें माहीत नाहीं. १७५१. तें क्षीरसागराच्या लाटांमध्यें माशाच्या पोटांत जो ( भगवान् विष्णु ) गुप्त होता, त्याच्या हातांत सांपडलें. १७५२. तो मत्स्येंद्र सप्तशृंगी पर्वतावर हातपाय तुटलेल्या चौरंगीनाथाला भेटला, कीं तो चौरंगीनाथ सर्वांगांनीं संपूर्ण झाला. १७५३. मग समाधि न उतरतां ( एकसारखी ) भोगावी, या वासनेनें (इच्छेनें) तें वर्म मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षरायाला दिलें. १७५४. त्या सर्वेश्वर मत्स्येंद्रनाथांनीं योगरूपी कमळांचें सरोवर व विषयांचा नाश करण्यांत शूर, असे जे गोरक्षनाथ, त्यास त्या समाधिपदाचे ठिकाणीं अभिषेक केला. १७५५. मग त्या गोरक्षनाथांनीं तें शंकरापासून परंपरेनें प्राप्त झालेलें अद्वैत आनंदाचें ऐश्वर्य, सामर्थ्यासह, श्रीगैनीनाथांस दिलें. १७५६. कलीं हा प्राण्यांना खरोखर ग्रासित आला आहे असें पाहून, त्या गैनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना आज्ञा दिली ती अशी, १७५७. कीं आद्य गुरु जो शंकर, त्यापासून शिष्यपरंपरेनें हा जो बोधाचा लाभ आमच्यापर्यंत आला, १७५८. तो हा सर्व घेऊन, तूं कलीकडून गिळल्या जाणाऱ्या जीवांना सर्व प्रकारें संकटांत सत्वर मदत कर. १७५९. मेघांना वर्षाकाळाची जोड मिळाली म्हणजे ते जशी जोराची वृष्टि करितात, त्याप्रमाणें ( स्वभावतः ) कृपाळू असलेल्या श्रीनिवृत्तिनाथांना त्यावर गुरुआज्ञेचा निरोप मिळाला. १७६०. मग पीडित प्राण्यांच्या ( दयेनें, गीतेचा अर्थ ) जुळून सांगण्याच्या निमित्तानें, निवृत्तिनाथांकडून जी ही शांतरसाची वृष्टि झाली तीच हा माझा गीतेवरील टीकारूप ग्रंथ होय. १७६१. तेव्हां मी चातकपक्षी आपल्या उत्कट इच्छेनेंच पुढें येऊन उभा राहिलों. या कारणामुळें मी एवढ्या यशाला आणला गेलों. १७६२. याप्रमाणें गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें आपलें समाधिरूपी धन, तें ग्रंथाच्या रूपानें रचून माझ्या स्वामीनें (निवृत्तिनाथानें) मला दिलें. १७६३. नाहीं तर मी शिकलों नाहीं व मला वाचण्याचा अभ्यास नाहीं व मी गुरूची सेवाही जाणत नाहीं. असा जो मी, त्या मला ग्रंथ रचण्याची योग्यता कोठून असणार? १७६४. परंतु खरोखरच गुरुनाथांनीं मला निमित्त करून, ग्रंथरचनेच्या निमित्तानें जगाचें रक्षण केलें, समजा. १७६५, तरी गुरूंचा पुरोहित म्हणून, मी कांहीं कमीजास्त बोललों असेन, तें तुम्हीं (श्रोत्यांनीं) माऊलीप्रमाणें सहन करावें. १७६६. शब्द कसा बनवावा, चढत्या प्रमेयानें व्याख्यान कसें करावें व ( साहित्यशास्त्रांतील ) अलंकार म्हणजे काय, तें मी जाणत नाहीं. १७६७. कळसूत्राचें बाहुलें त्याला चालविणाऱ्या सूत्रानें चालतें, त्याप्रमाणें मला दाखवीत ( पुढें करून ) ते माझे गुरु बोलत आहेत. १७६८. या कारणास्तव गुणदोषांविषयीं मी विशेष क्षमा मागत नाहीं, कारण कीं माझ्या गुरूंनीं उत्पन्न केलेल्या ग्रंथाची मी रचना केली. १७६९. आणि तुम्हां संतांच्या सभेंत जर उणीव कायमच राहील आणि ती जर पुरी होणार नाहीं, तर तुमच्यावरच प्रेमानें रागावतां येईल. १७७०. परिसाचा स्पर्श झाला असतांही, लोखंडपणाच्या हीनदशेला जर लोखंड मुकलें नाहीं, तर तो दोष कोणाला? १७७१. ओहोळानें हें करावें कीं, गंगेच्या प्रवाहाला ( जाऊन ) मिळावें; मग देखील तो गंगाच झाला नाहीं तर त्यानें काय करावें? १७७२. म्हणून बहुत भाग्ययोगानें मी तुम्हां संतांच्या पायांजवळ प्राप्त झालों असतां, मला

कें लाहे । उणें जगीं ॥ ७३ ॥ अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडुनि तुम्हीं । दिधलेति ते सर्वकामीं । परिपूर्ण जालों ॥ ७४ ॥ पाहा पां मातें तुम्हांसांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें हें आळियाडें । सिद्धी गेलें ॥ ७५ ॥ जी कनकाचें निखळ । वोतूं येईल भूमंडळ । चिंतारत्नीं कुळाचळ । निर्मूं येती ॥ ७६ ॥ सातांही हो सागरातें । सोपें भरितां अमृतें । दुवाड नोहे तारांतें । चंद्र करितां ॥ ७७ ॥ कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं विषम । परी गीतार्थाचें वर्म । निवडूं न ये ॥ ७८ ॥ तो मी येकु सर्वमुका । बोलोनि मऱ्हाठिया भाखा । करीं डोळेवरी लोकां । घेवों ये ऐसें जें ॥ ७९ ॥ हा ग्रंथसागरु येव्हढा । उतरोनि पैलीकडा । कीर्तिविजयाचा धेंडा । नाचे जो का ॥ १७८० ॥ गीतार्थाचा आवारु । कळशेंसीं महामेरु । रचूनि माजीं श्रीगुरु- । लिंग जें पूजी ॥ ८१ ॥ गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय । ते मायपूता भेटी होय । हा धर्म तुमचा ॥ ८२ ॥ तुम्हां सज्जनांचें केलें । आकळुनी जी मी बोलें । ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें तें नव्हे ॥ ८३ ॥ काय बहु बोलों सकळां । मेळविलों जन्मफळा । ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥ ८४ ॥ मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥ ८५ ॥ मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं । तें पाहोनि हांसों आम्ही । विश्वामित्रातेंही ॥ ८६ ॥ जे असोनि त्रिशंकुदोषें । घातयाही आणावें वोसें । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मावें नाहीं ॥ ८७ ॥ शंभू उपमन्यूचेनि मोहें । क्षीरसागरुही केला आहे । येथ तोही उपमे नोहे । जे विषगर्भ कीं ॥ ८८ ॥ अंधकारु निशाचरां । गिळितां सूर्यें चराचरां । धांवा केला तरी खरा । ताउनी कीं तो ॥ ८९ ॥ तातलिया जगाकारणें । चंद्रें वेंचिलें चांदणें । तया सदोखा केवीं म्हणे । सारखें हें ॥ १७९० ॥ म्हणौनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं । उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ॥ ९१ ॥ किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपण ॥ ९२ ॥ आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ ९३ ॥ जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ९४ ॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९५ ॥ वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळीं । भेटतु भूतां ॥ ९६ ॥ चलां कल्पतरूंचे आरव । चेतनाचिंतामणीचे गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥ ९७ ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ९८ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥ ९९ ॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ १८०० ॥ येथ म्हणे विश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ १ ॥ ऐसें युगीं परी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीचां कूलीं । दक्षिणिली ॥ २ ॥ त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोशक्षेत्र । जेथ जगाचें जीवसूत्र ।

जगांमध्ये उणें कोठें आहे ? १७७३. अहो महाराज, माझ्या स्वामींनीं मला तुम्ही संत प्राप्त करून दिलेत. त्या योगानें मी सर्व बाबतींत परिपूर्ण झालों. १७७४. पहा कीं, मला तुम्हांसारखे माहेर आहे, त्या योगानें हा माझा ग्रंथाचा हट्ट सुखानें सिद्धीस गेला. १७७५. महाराज, सर्व पृथ्वी शुद्ध सोन्याची ओततां येईल अथवा ( सात ) मोठमोठ्या महेंद्रादि पर्वतांप्रमाणें चिंतामणिरत्नाचे डोंगर निर्माण करतां येतील. १७७६. साताही समुद्रांना अमृतानें भरणें सोपें आहे; तान्यांचे चंद्र करणें कठीण नाहीं. १७७७. कल्पतरूंचे बगीचे लावणें कठीण नाहीं. परंतु गीतेच्या अर्थाचें मर्म स्पष्ट सांगतां येणार नाहीं. १७७८. तो गीतार्थ, मी एक सर्व प्रकारानें मुका, मराठी भाषेंत सांगून, लोकांना डोळ्यांनीं घेतां येईल असा जो करतों, १७७९. हा एवढा अफाट ग्रंथरूपी सागर उतरून पलीकडे गेल्याचा कीर्तिविजयाचा धेंडा जो नाचतो, १७८०. गीतार्थाच्या आवारांत अठरावा अध्यायरूपी कळसासह महामेरू पर्वत तयार करून त्या ठिकाणीं श्रीगुरुमूर्तीची ( शिवपिंडीची ) मीं पूजा करीत आहें. १७८१. गीतारूपी निष्कपट आईला चुकून, जें मी लेकरूं संसाररूपी रानांत व्यर्थ हिंडत होतें, त्या मायलेकांची भेट होते, ही तुमची पुण्याई आहे. १७८२. महाराज, तुम्ही सज्जनांनीं केलेलें समजून मी बोलत आहें, हें कांहीं लहानसहान आहे असें म्हणता येत नाहीं, असें ज्ञानदेव म्हणतात, १७८३. फार काय सांगूं ! जो हा तुम्हीं ग्रंथसमाप्तीचा आनंददायक प्रसंग दाखविला, त्या योगानें माझ्या संपूर्ण जन्माचें फळ मला प्राप्त करून दिलेत, १७८४. महाराज, मीं जसजशा आशेनें तुमच्याविषयीं खात्री बाळगली, ती सर्व पुरी करून आपण मला सुखी केलेंत, १७८५. महाराज, माझ्याकरितां तुम्ही जी ग्रंथाची दुसरी सृष्टि केलीत, तिच्याकडे पाहून आम्ही विश्वामित्राला देखील हसूं. १७८६. कारण कीं, मूळची सृष्टि असून, ब्रह्मदेवाला, उणें आणण्याकरितां व त्रिशंकु राजाच्या हेतूनें केलेली ती सृष्टि नाश पावणारी होती, ही ग्रंथरूपी सृष्टि अशी नाश पावणारी तुम्हीं केली नाहीं, १७८७. शंकरानें उपमन्यूच्या लोभानें क्षीरसागरदेखील केला, पण तोही येथें उपमा देण्यास योग्य होत नाहीं, कारण कीं, त्याच्या पोटांत विष आहे, १७८८. अंधकाररूपी निशाचर (चराचराला) गिळीत असतां, सूर्यानें चराचराला त्या संकटांतून सुटण्याला मदत केली खरी; परंतु ती जगाला ताप देऊन. १७८९. संतप्त झालेल्या जगाकरितां चंद्रानें आपल्या चांदण्याचा देखील उपयोग करून दिला. त्या कलंकयुक्त चंद्रासारखें हें आहे, असें कसें म्हणतां येईल ? १७९०. महाराज, म्हणून तुम्हीं संतानीं माझ्यावर जो हा ग्रंथरूपी उपकार केला, तो पुनः पुनः विचार केला असतां, त्रैलोक्यांत निरुपम आहे असें दिसतें. १७९१. महाराज, फार काय सांगावें ! तुम्हीं केलेलें हें धर्माचें व्याख्यान तुमच्याच हातून शेवटाला गेलें. या ठिकाणीं माझा काय तो फक्त सेवकपणाच उरला. १७९२. आतां विश्वरूपी देवानें या वाग्यज्ञानें संतुष्ट व्हावें व संतुष्ट होऊन मला हें ( पुढील ) प्रसाददान द्यावें. १७९३. कीं खलांचा कुटिलपणा नाहींसा व्हावा आणि त्या खलांची सत्कर्माच्या ठिकाणीं आवड वाढावी व प्राण्यांची एकमेकांशीं जीवाभावापासून मैत्री व्हावी. १७९४. पापाचा अंधार जावा व विश्वांत स्वधर्मरूपी सूर्याचा उदय व्हावा. प्राणिमात्रांत जो जें इच्छील, तें त्याला प्राप्त होवो. १७९५. ईश्वरनिष्ठांचा समुदाय संपूर्ण कल्याणाचा वर्षाव करीत, या भूतलावर निरंतर सर्व प्राण्यांना भेटो. १७९६. चालणाऱ्या कल्पतरूंचे बगीचे, सजीव चिंतामणींचें गांव व अमृताचे जे बोलणारे सागर आहेत; १७९७. जे कलंकरहित चंद्र आहेत व जे उष्णतारहित सूर्य आहेत, ते सज्जन सर्वांना नेहमीं आवडते व्हावेत. १७९८. फार काय सांगावें ! तिन्ही लोकांनीं ( स्वर्ग, मृत्यु, पाताळ यांनीं ) सर्वसुखानें पूर्ण होऊन आदिपुरुषाच्या ठिकाणीं अखंडित भजावें. १७९९. आणि महाराज, या लोकांत विशेषेंकरून हा ग्रंथच ज्यांचें जीवन ( अत्यंत प्रिय ) होऊन राहिला असेल, त्यांनीं इहलोकींच्या व परलोकच्या भोगावर विजयी व्हावें. १८००. तेव्हां विश्वाचे प्रभुराय श्रीनिवृत्तिनाथ म्हणाले कीं, हा दानप्रसाद होईल. या वरानें ज्ञानदेव अंतःकरणांत सुखी झाला. १८०१. याप्रमाणें युगापैकीं कलियुगांत आणि महाराष्ट्रदेशांत श्रीगोदावरीच्या दक्षिणतीरावर—१८०२. त्रैलोक्यामध्यें जें एक पवित्र पांचकोसांचें अनादि क्षेत्र आहे व जेथें ( ज्या नेवाशांत ) जगांतील सर्व जीवांची चालक

श्रीमहालया असे ॥ ३ ॥ तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥ ४ ॥ तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥ ५ ॥ एवं श्रीभारताचां गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ॥६॥ जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥ ७ ॥ तये गीतेचा कलशु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥ ८ ॥ पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होईजो ॥ ९ ॥ शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ॥ १८१० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सर्वगीतार्थसंग्रहो नाम अष्टादशोऽध्यायः

[ श्लोक ७८. ओंव्या १८१०. ]

श्रीएकनाथमहाराजांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथ संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या.

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरीप्रति शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥ ३ ॥ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाहली ॥ ४ ॥

श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु.



श्रीमहाल्या ( श्रीमोहिनीराज ) आहे. १८०३. तेथें यदुवंशाची शोभा व सर्व कलांचें राहाण्याचें ठिकाण, जो पृथ्वीपति श्रीरामचंद्र, तो न्यायानें राज्य करीत होता. १८०४. तेथें ( त्या नेवाशामध्यें ) आदिनाथ शंकर यांच्या परंपरेंत उत्पन्न झालेला श्रीनिवृत्तिनाथसुत (शिष्य) जो ज्ञानदेव, त्यानें गीतेवर देशी भाषेचा ( मराठी टीकेचा ) अलंकार चढविला. १८०५. याप्रमाणें श्री-भारतरूपी गांवांत, भीष्मनाम प्रसिद्ध पर्वांत, श्रीकृष्णार्जुनांनीं जो चांगला संवाद केला, १८०६. जो ( कृष्णार्जुनांचा संवाद ) उपनिषदांचें तात्पर्य आहे व सर्व शास्त्रांचें मोकळेपणानें रहाण्याचें जन्मस्थान आहे व परमहंसरूपी राजहंसांनीं सेवन करण्याचें मानससरोवर आहे, १८०७. त्या गीतेचा अठरावा अध्याय कळस आहे व तो येथें संपूर्ण झाला आहे, असें श्रीनिवृत्तिनाथांचे दास ज्ञानदेव म्हणतात. १८०८. या ग्रंथाच्या पुण्यरूपी संपत्तीनें सर्व भूतांनीं, सर्व सुखांनीं उत्तरोत्तर संपूर्ण व्हावें. १८०९. शके १२१२ चालू होतें तेव्हां ज्ञानेश्वर महाराजांनीं टीका केली व सच्चिदानंद बाबा या टीकेचा पूज्यबुद्धीनें लेखक झाला. १८१०.

**अष्टादश अध्याय समाप्त.**

## श्रीज्ञानेश्वरी संशोधन केल्यावर श्रीएकनाथ महाराजांनीं ज्ञानेश्वरीसंबंधानें लिहिलेल्या ऑव्यांचा अर्थ.

शके १५०६ सालीं तारणनाम संवत्सरांत एका जनार्दनानें ( जनार्दनस्वामीचे शिष्य एकनाथ महाराजांनीं ) गीतेवरील टीका जी ज्ञानेश्वरी, तिची प्रत अत्यंत पूज्यबुद्धीनें शुद्ध केली. १. हा ज्ञानेश्वरी ग्रंथ मूळचाच अतिशुद्ध आहे. परंतु लोकांच्या पाठभेदामुळें हा शुद्ध ग्रंथ कोठें कोठें अबद्ध ( अशुद्ध ) झाला होता. तो शोधून याप्रमाणें ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार केली. २. ज्यांची गीतेची टीका वाचली असतां अतिभाविक व गीतेचा अर्थ जाणण्याची इच्छा करणारे जे लोक, त्या लोकांना गीतार्थाचें ज्ञान होतें, त्या निष्कलंक ज्ञानेश्वरांस माझा नमस्कार असो. ३. भाद्रपद महिन्यांत बहुत काळानें येणारी चांगली कपिलाषष्ठीची पर्वणी होती. त्या दिवशीं गोदेच्या किनाऱ्यावर पैठण गांवीं हें शुद्ध प्रत लिहिण्याचें काम सगळें संपलें. ४.

॥ पुंडलीकवरदा हरिविठ्ठल ॥ श्रीज्ञानेदेव तुकाराम ॥



# ज्ञानेश्वर-स्तुति-सुमनें

ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणें निगमवल्ली प्रगट केली ॥ १ ॥
गीताअलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्मविद्येचें दाविलेंसें रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ ३ ॥
छप्पन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारीली ॥ ४ ॥
श्रवणाचे मिषें बैसावें येउनी । सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओंवी अनुभवावी ॥ ६ ॥

---

कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतळा । चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ॥ १ ॥
साधकाचा मायबाप । दरुशनें हरी ताप । सर्वांभूतीं सुखरुप । ज्ञानोबा माझा ॥ ध्रु० ॥
ज्ञानियांचा शिरोमणी । वंद्य जो का पूज्यस्थानीं । चिंतकाचा चिंतामणी । ज्ञानोबा माझा ॥ २ ॥
चालविली जड भिंती । हरली चांगयाची भ्रांति । मोक्षमार्गीचा सांगातीं । ज्ञानोबा माझा ॥ ३ ॥
रेडयामुखीं वेद बोलविला । गर्व द्विजांचा हरविला । शांतिरूप प्रगटला । ज्ञानोबा माझा ॥ ४ ॥
ब्रह्मसाम्राज्यदीपिका । वर्णियेली गीतेची टीका । विठोबाचा प्राणसखा । ज्ञानोबा माझा ॥ ५ ॥
गुरुसेवेलागी जाण । शरण एका जनार्दन । त्रैलोक्याचें जीवन । ज्ञानोबा माझा ॥ ६ ॥

---

ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करीं तूं सर्वज्ञा । ज्ञाना ज्ञानविरहित ब्रह्म प्राप्तीची संज्ञा ।
ज्ञाता ज्ञेय जागे होय ऐसी प्रतिज्ञा । ज्ञानाग्नीनें पापें जळती हे ज्याची आज्ञा ॥ १ ॥
ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञान देव देतो । वासुदेव होतो अखंड वदनीं वदे तो ॥ ध्रु० ॥
नररूपें विष्णु अवतरला हा भगवान । नदीनद वापीकूप पहातां उदक नव्हे भिन्न ।
नवल हेचि पशु हैसा करितो वेदाध्ययन । नमन करूनि सद्भावें जपतां होय विज्ञान ॥ २ ॥
देवाधीश देव भक्तांप्रति वर दे । देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्मआनंद कोंदे ।
देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे । देशभाषा ज्ञानदेवी गीतार्थ वदे ॥ ३ ॥
वक्ता श्रोता श्रवणें पठणें पावती समभाव । वर्णूं जातां अघटित महिमा होतो जिव शिव
वंदुनी अनन्य एका जनार्दनीं धरीं दृढभाव । वर्षती निर्जर ज्ञानदेवनामें पुष्पांचा वर्षाव ॥ ४ ॥

---

## श्रीज्ञानेश्वर महाराजांची आरती

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा । सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ ध्रु० ॥
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नांव ठेवियले ज्ञानी ॥ १ ॥
प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामयाजनार्दनी । पायीं टकचि ठेलें ॥ २ ॥

# कांहीं भिन्नपाठ व त्यांची थोडी चर्चा

मूळांतील पाठ श्रीएकनाथांच्या घरीं बसून उतरविलेल्या पोथीवरून उतरलेली जी पोथी तिच्यांतील आहेत. त्या पाठाहून भिन्न आढळणारे कांहीं पाठ या विभागांत दिले आहेत व त्यावाबत अगदीं थोडी चर्चा केली आहे. सर्व भिन्न पाठांची चर्चा करून उत्तम पाठांच्या ज्ञानेश्वरीची प्रत तयार करणें हें उत्तम पण फार अवघड काम आहे. त्यास एका दृष्टीनें बोलावयाचें तर श्रीएकनाथच हवेत! एकतर श्रीज्ञानदेवकालीन पोथ्या मिळावयास हव्यात; तदनंतर यादवकालीन महाराष्ट्रीचा व तदनंतर निर्माण झालेल्या भाषाभेदांचाहि चांगला अभ्यास हवा. शिवाय त्यास श्रीज्ञानदेवांच्या मनांत शिरण्याइतकी सिद्धिहि प्राप्त झालेली हवी! नाहींतर आपणांस जें असावें असें वाटतें, तेंच त्यांतून काढण्याचा आपण प्रयत्न करणार!

पोथ्यांतून सूक्ष्म पद्धतीनें फरक कसा पडत जातो व त्यामुळें ज्ञानेश्वरीची मूळ प्रत ठरविणें किती कठीण होतें याची कल्पना येण्याकरितां नुसती अ. १८ तील कांहीं स्थळें खालीं देतो; कीं ज्या योगानें मूळ ज्ञानदेवी प्रत ठरविणें किती कठीण आहे याची वाचकांना कल्पना येईल. वाचकांच्या लक्षांत येईल कीं खालील यादींत देशी शब्दांकरितां संस्कृत शब्द घातले गेले आहेत.

| मूळ पोथी | छापील पोथी | मू. पो. | छा. पो. | मू. पो. | छा. पो. | मू. पो. | छा. पो. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| साच | सत्य | आरिसा | दर्पण | वेढला | वेष्टला | चाक | चक्र |
| कुंभार | कुलाल | नांव | नाम | तण | तृण | पाणी | उदक |
| सोनें | सुवर्ण | दिठी | दृष्टि | बांधु | बंध | बाहिरि | बाह्य |
| तहान | तृषा | नीच | नित्य | धुंवा | धूम | भंवर | भ्रमर |

हे पाठ कसे तयार होत असतील ती कथा एक उदाहरण देऊन थोडिशी सांगतां येण्यासारखी आहे. उदाहरणार्थ. कांहीं छापिल अनुभवामृताच्या पोथींत पुढील ओंवी आढळून येते.

> वातदशाही ते निमालिया। येणें जें उबाया।
> तें केवळ नाशावया। दीपाचे परी    प्र. ४–७

'दिवा जातांना मोठा होतो तो विझण्याकरितां' अशा अर्थाची ही ओंवी आहे. यांत अडचण आली ती 'वातदशा' या शब्दाचा अर्थ करण्याची. या शब्दाचा अर्थ लागेना. पुढें एका पोथींत पाठ 'दशाहि निमालिया' आढळला. कोडें सुटलें. 'दशाहि निमालिया' हा पाठ असलेल्या पोथीवरून कोणी अनुभवामृताचा अभ्यास करीत असावा. त्यानें 'दशा' या शब्दाचा अर्थ 'वात' असा पोथीच्या कडेला लिहून ठेवला असावा. उतरणाऱ्यास उतरवतांना ज्यानें 'दशा' या शब्दाचा अर्थ 'वात' लिहिला तो कांहीं तोंडानें सांगत नसावा. उतरणाऱ्या समोर पोथी व स्वतःचें डोकें. त्याला वाटलें मूळांतील हा शब्द लिहिण्याचा राहिला म्हणून हा बाहेर लिहिला. उतरवतांना त्या लेखकानें त्याला मूळपाठांत जागा दिली व 'वातदशा' हा पाठ तयार झाला!

माडगांवकरांनीं आपल्या प्रतींत भिन्न पाठ देण्याचें काम चांगलें केलें आहे. आमच्या या पोथींत असे अनेक भिन्नपाठ दिलेले नाहींत. बहुतेक वारकऱ्यांच्या वाचनांत 'कुंटे,' 'साखरे,' व 'बंकटस्वामी' यांच्या प्रती असल्यानें त्यांच्या माहितीकरतां जेथें त्या पोथ्यांशीं ठळक फरक दिसतात असेच पाठ या सदरांत दिले आहेत; व त्यांची अगदीं अल्प अशी चर्चा केली आहे. या प्रतींच्या जोडीस राजवाडे प्रतींतील पाठहि चर्चेकरतां घेतले

आहेत. राजवाडे प्रत व नाथप्रत यांच्या सर्व भिन्न पाठांची नोंद करून चर्चा करणें हें आवश्यक; पण फार मोठें काम आहे. प्रस्तुत लेखकाचें तर असें मत आहे कीं या दोन वेगवेगळ्या परंपरेच्या पोथ्या आहेत. व त्यामुळें यांत अनेक भिन्न पाठ आहेत.

प्रथम आमच्या छापील पोथीप्रमाणें ओंवी दिली आहे. नंतर भिन्न पाठ दिले आहेत.

ज्या पोथ्या पाठचर्चेकरतां घेतल्या त्यांचीं नांवें खालील प्रमाणें चर्चेत दिली आहेतः—

एकनाथांच्या घरीं असलेली प्रत......ए.   वंकटस्वामी प्रत......वं.   राजवाडे......रा.
साखरे........................सा.   माडगांवकर........मा.   कुंटे.........कुं.

चर्चेकरतां आगाशे यांनीं केलेले ओंव्यांचे अर्थहि मधून मधून घेतले आहेत. पण आगाशे यांच्या प्रतीला वेगळे नांव दिलें नाहीं. कारण त्यांनीं राजवाडे पाठच सर्वत्र घेतला आहे.

मूळ पाठांत प्रत्येक अध्यायांत कांहीं ओंव्यांतील पाठभेद दाखवण्याकरतां आंकडे घातले आहेत. तेच आंकडे या ठिकाणीं प्रथम देऊन नंतर ओंव्या दिल्या आहेत.

---

## अध्याय पहिला

१ ओ. २. देवा तूंचि गणेशु ।
सकलमतिप्रकाशु ।
म्हणे निवृत्तिदासु ।
अवधारिजो जी ॥

'सकलमतिप्रकाशु' या करतां

मा. } 'सकलार्थ प्रकाशु'
रा. }

वं. व सा. सकलार्थमतिप्रकाशु

वं. व सा. या प्रतींत 'सकलार्थमतिप्रकाशु' हा पाठ आहे पण तो व्याकरणदृष्ट्या बरोबर नाहीं. याचा सा. कृत अर्थ 'सकल जगाच्या बुद्धीला ज्ञानाचा प्रकाश देणारा' असा दिला आहे.

वं. प्रतींत पाठ एक व अर्थ एक असें झालें आहे. पाठ 'सकलार्थमतिप्रकाशु' व अर्थ 'सर्वांच्या बुद्धीचा प्रकाशक' असा अर्थ दिला आहे.

रा. मा. प्रतींत 'सकलार्थप्रकाश' असा पाठ आहे. 'सकलार्थप्रकाश' याचा आगाशे पुढीलप्रमाणें अर्थ देतातः—'गणेशु हे सर्व विद्यांचे अधिपति असल्या-मुळें त्यांस सकलार्थांवर पडलेला प्रकाश–सकलार्थप्रकाशु असें जें दुसऱ्या ओंवींत म्हटलें तें सार्थच आहे' व याचें स्पष्टीकरण म्हणून पुढें ते म्हणतात. 'अंधःकार असला म्हणजे एक पदार्थ दुसऱ्या पदार्थांपासून निराळा असा व्यक्त दिसत नाहीं; पण सूर्यप्रकाश पडला म्हणजे सर्व पदार्थ निरनिराळे व्यक्त स्वरूपांत दिसूं लागतात. तसेंच गणेशाचेंही सामर्थ्य आहे. गणेशाचा प्रसाद झाला म्हणजे अज्ञानांधःकार नष्ट होऊन प्रत्येक अर्थ निरनिराळा स्पष्टपणें प्रत्ययास येतो.'

ज्ञानेश्वर महाराज गीतेवर टीका लिहून मराठींत गीतार्थ स्पष्ट करण्याकरतां उद्युक्त झाले आहेत व त्या कार्यांत यश यावें म्हणून गणपतीचें वंदन करीत आहेत. ही गोष्ट लक्षांत ठेवून 'सकलार्थप्रकाश' याचा अर्थ करणें अवश्य आहे. हा प्रसंग जर लक्षांत घेतला तर 'सगळ्या अर्थांवर पडलेला प्रकाश' यापेक्षां 'सगळ्या अर्थांवर प्रकाश पाडणारा' 'सर्व अर्थ दाखविणारा' असा अर्थ करणें अधिक श्रेयस्कर होईल व इतरांनीं तसा अर्थ केलाही आहे.

श्री. केतकर यांनीं आपल्या 'केतकी-शब्दार्थ जान्हवी' टीकेसह ज्ञानेश्वरी अध्याय पहिला प्रसिद्ध केला आहे. त्यांत या पदाचा दिलेला अर्थ बघण्यासारखा आहे. ते म्हणतातः—

"सकलार्थ प्रकाशु —

(१) आत्मरूपपक्षीं–सकल सदर्थ दाखवणारा.

(२) गणेशपक्षीं–कुसरीचे अर्थ प्रकट करणारा.

(१) चें स्पष्टीकरण–चर्मचक्षूंना गोचर होणारे सर्व (अर्थ) पदार्थ म्हणजे विषय अंतीं अनर्थकारकच आहेत,

म्हणून ( ' अर्थमनर्थं भावयनित्यं '. शंक. ) हे सारे अर्थ अनर्थच होत. तरीहि आत्मज्ञानानें हें दृश्य अनर्थ अदृश्य होऊन त्यांचें अधिष्ठान जें ( सदर्थ ) सद्रूप तें प्रकाशित होतें. ( २ ) ज्ञानवाङ्मय सारें शब्दघटित असून शब्दांचें रहस्य अर्थात असतें. बुद्धिदाता गणेश या अर्थाचे सूक्ष्म पडदे उकलून दाखवितो. ज्ञानेश्वरांना गीतेचा गूढार्थ उकलून दाखवावयाचा आहे, म्हणून गणेशस्तवन उचित आहे. "

या ठिकाणीं 'सदर्थ' असा जो केतकरांनीं ' सकलार्थ ' याचा आत्मरूपपक्षीं अर्थ केला तो बरोबर दिसत नाहीं. एकतर येथें आत्मरूपपक्षाला महत्त्व नाहीं. ते म्हणतात त्याप्रमाणें गीतेचा अर्थ स्पष्ट करण्याचें कार्य हातीं घेतलेलें असल्यानें ' सकल शब्दार्थाचें प्रकाशन करणारा ' येवढा अर्थ हवा आहे. आत्मरूपपक्षीं लावणें झाल्यास सकलार्थ म्हणजे सदर्थ घेण्याचें कारण नाहीं. कारण येथें आत्मज्ञान झाल्यावर काय होतें हें सांगण्याचा प्रसंग नाहीं.

येथें एवढें सांगणें अवश्य आहे कीं ' सकलार्थ प्रकाश ' या पाठापेक्षा ' सकलमतिप्रकाश ' हा पाठ चांगला. कारण ज्ञानदेवांना ज्या बुद्धीच्या द्वारां गीतेवर टीका करावयाची होती ती समर्थ व्हावी असें वाटणें स्वाभाविक आहे. असें तार्किक अनुमान कशाला ? पुढें चौदाव्या अध्यायांत आपल्या गुरूंच्याजवळ त्यांनीं पुढील प्रमाणें मागणीच केली आहे.—

आतां कृपाभांडवल सोडीं । भरी मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्यजोडी । थोरा मातें ॥ मग मी संसरेन तेणें । करीन संतांसी कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकांची ॥ जी गीतार्थनिधान । काढूं माझें मन । सुयीं स्नेहांजन । आपलें तूं ॥ हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुद्धीचें डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ । तो वसंतु होय स्नेहाळ—। शिरोमणी ॥ प्रमेय महापूरें । हे मतीगंगा ये थोरें । तैसा वरिष उदारें । दिठीवेनी ॥ १७–२२.

या सर्व ओंव्या देण्याचा हेतु एवढाच आहे कीं, लेखक हा बुद्धीचें सामर्थ्य वाढून तिला कळूं लागावें अशी प्रार्थना करतो. परमात्मवस्तु ही मनबुद्धीची प्रकाशक म्हणून प्रसिद्ध आहे. केनोपनिषदांत खालील ऋचा आढळतेः——

' यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतं तदेव ब्रह्म त्वं विद्धि । ' ज्ञानेश्वरींतच ब्रह्माचें ' बुद्धीची जें बुद्धी ' असें अ. १३ ओं. ९२८ मध्यें वर्णन आहे. तेव्हां आत्मा जर गणपती तर त्याचें ' सकलमतिप्रकाश ' ' सर्वांच्या बुद्धीचा प्रकाश म्हणजे प्रकाशक ' असें वर्णन करून गर्भित अर्थानें आपल्या बुद्धीला प्रकाशाचें दान मागणेंच योग्य आहे. म्हणून ' सकलमतिप्रकाश ' हा पाठ बरा.

२ ओं. ४. स्मृति तेचि अवयव ।
देखा अंगीक भाव ।
तेथ लावण्याची ठेव ।
अर्थ शोभा ॥

' देखा अंगीक भाव ' या करितां

रा. ' रेखा अंगीक भाव '

मा. } ' देखा अंगीक भाव '
सा. }

मा. यांत ' देखा ' आहे येवढेच नव्हे तर ' मा ' पोथींत खालीं वेगवेगळे पाठ दिले आहेत त्यांत ' रेखा ' हा पाठच दिला नाहीं !

' रेखा ' हा पाठ घेऊन आगाशे यांनीं पुढील अर्थ दिला आहे.

' गणेशाचें शरीर स्मृतिरूप अवयवांनीं मंडित आहे. एक स्मृति दुसरीहून भिन्न आहे; पण ती भिन्नता योग्य प्रमाणांत असल्यानें वेदब्रह्मानें बनलेल्या गणेश स्वरूपाचा–सुरेखपणाचा–तिनें परिपोषच झाला आहे. '

···पण स्मृतींची भिन्नता दाखवणाऱ्या रेखा कोणच्या अशी एक शंका रहाते. तिचें उत्तर ' अंगिकभाव ' ह्या पदानें दिलें आहे; अंगिकभाव म्हणजे इतर स्मृतीहून आपलें मत भिन्न आहे असें दाखणारा त्या स्मृतींत प्रतिपादिलेला, त्या त्या स्मृतिकाराचा विशिष्ट हेतु···अशा रीतीनें व्यक्त झालेला जो भिन्न हेतु तीच त्या स्मृतीची मर्यादा दाखविणारी रेषा असें समजावयाचें व त्याच आशयानें ग्रंथकार ज्ञानेश्वर काव्यमय अशा आपल्या वाणीनें म्हणतात ' रेखा अंगिकभाव '

हा अर्थ करीत असतां ' अंगिक भाव ' या शब्दाचा अर्थ ठरवीत असतांना कितीतरी गृहित धरावें लागतें हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. रूपक करीत असतांना मूळच असें संदिग्ध ठेवणें हें कांहीं चांगलें नव्हे.

'रेखा' पाठ हा 'देखा' पाठापेक्षां एका दृष्टीनें बरा. पण 'रे' चा 'दे' झाला कां 'दे' चा 'रे' झाला हें सांगणें कठीण आहे. येथें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, साखरे यांचा अर्थ चूक असला तरी 'देखा' पाठ घेऊन अर्थ लागतच नाहीं असें नव्हे. 'अंगीकभाव देखा, स्मृति तेचि अवयव' असा अन्वय करून जर अर्थ केला तर अर्थ होऊं शकतो व तो चूकही नव्हे.

चित्रकार हा जसा प्रथम आराखडा काढतो व मागून त्यांत रंग भरतो तशाप्रकारें ज्ञानदेव हें गणपतीचें वर्णन करीत आहेत. हें लक्षांत ठेऊन या ओंवीपासून वर्णन करण्याच्या पद्धतीचें स्वरूप पाहूं लागलों व या ओंवीपुढील दोनचार ओंव्यापर्यंत पहात राहिलों तर आपणांस असें आढळून येईल कीं गणपतीच्या मूर्तीच्या एकेक भागावर शब्दब्रह्मांतील एकेक वस्तूची कल्पना करून त्यांच्यातील एकेक वैशिष्ट्यच पुढें सांगितलें आहे.

ओ. ४ शब्द ही सुवेषमूर्ति आणि तिच्या ठिकाणीं निर्दोष वर्णरूपीं सौंदर्य खुलून राहिलें आहे.

ओ. ५ अठरा पुराणें हेंच रत्नखचित अलंकार. तेथें पदपद्धति खेवणें प्रमेयरत्नांची.

त्याचप्रमाणें ओ. ४ चा अर्थ केला. 'आतां शरीराची ठेवण पहा. स्मृति हेच त्याचे अवयव होत व त्यांतील अर्थसौंदर्य हेच त्यांचें लावण्य.'

३. ओ. ६. पदबंध नागर ।
तोंचि रंगाथिलें अंबर ।
जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥

'पदबंध नागर' याकरितां

रा. पद्यबंध.

मा. } पदबंध.
ए. }

माडगांवकर आपल्या पोथींत वाला दुसरा पाठच देत नाहींत. ए. पोथींत पदबंध असाच पाठ आहे.

आगाशे यांनीं 'पद्यबंध' याचा अर्थच दिला नाहीं. राजवाडेहि कोशांत देत नाहींत. भावेकोश अर्थ–पद्यांत बांधलेली रचना, कमलबंध, छत्रबंध इत्यादि पदबंधाचे प्रकार साहित्य शास्त्रांत प्रसिद्ध आहेत. पद्यबंध या पाठापेक्षां पदबंध हा पाठ बरा कां याबाबत 'केतकी-शब्दार्थ जान्हवी सहित' टीकेत श्री. केतकर यांनीं सविस्तर चर्चा केली आहे.

४. ओ. १३. मग सहजें सत्कारवादु ।
तो पद्मकर वरदु ।
धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु ।
अभयहस्तु ॥

'मग सहजें सत्कारवादु' करतां

रा. मग साहाजें सत्तर्कवादु

याचा आगाशेकृत अर्थः — तर्क पद्धतीस अनुसरून 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' 'अशा दृष्टीनें केलेला वाद'.

केतकी अर्थ—निर्मल तर्क प्रतिष्ठित आस्तिक्यवाद. परशूनें तासून सुसमंजस केलेला तर्क तो सत्तर्कवाद.

'सत्तर्कवाद' हा जो रा. पाठ आहे त्यापेक्षां 'सत्कारवादु' हा पाठ बरा. कारण, ज्यांना दार्शनिक तत्त्वज्ञानाची कल्पना आहे त्यांना 'स्वभावतः' खंडित यानें ओंवी १२ मध्यें ज्ञानदेव बौद्धांच्या शून्यवादाचा उल्लेख करतात हें सहज कळण्यासारखे आहे. ज्ञानदेवांनींच अनुभवामृतांत म्हटलें आहे.

'शून्यसिद्धान्त बोधु । कवणीं सत्ता होय सिध्दु ।'

तात्पर्य 'असतः असत् जायते' हें कां बाधित ठरलें कीं 'सतः सत् जायते' हा 'सत्कारवाद' सहज शिल्लक राहतो. ज्ञा. १३ ओंवीमध्यें ज्ञानदेव याचाच उल्लेख करतात. येथें 'सत्तर्काचा प्रश्न नाहीं.' 'असत्वाद' अथवा 'सद्वाद' असा विकल्प आहे. कुतर्क अथवा 'सत्तर्क' असा विकल्प नाहीं. म्हणून सत्कारवाद हा पाठ बरा.

५. ओ. १४. देखा विवेकवंतु सुविमळु ।
तोचि शुंडादंडु सरळु ।
जेथ परमानंदु केवळु ।
महासुखाचा ॥

'देखा विवेकवंतु सुविमळु' या करितां

रा. }
ए. } वरील प्रमाणें
सा. }

मा. } 'विवेक तंव सुविमळु'
कुं. }

विवेकवंतुपेक्षां ' विवेक तंव, ' हा पाठ बरा. कारण ' विवेकवंतु ' हा पाठ घेतला तर त्या वाक्यांत सोंड ज्याला म्हणतां येईल अशा वस्तूचा निर्देश करणारे नाम रहातच नाहीं. कारण ' विवेकवंतु ' हें विशेषण असल्यानें त्या पदाचा शुंडादंडु या पदाकडे संबंध जोडून अर्थ करावा लागतो. शुंडादंडु खेरीज दुसरें एकच नाम रहातें व तें म्हणजे महासुख. पण त्याला विवेकवंतु हें विशेषण जुळत नाहीं. महासुखाची योजना, निवड करणाऱ्या सोंडेच्या स्थानीं करण्यांत स्वारस्य नाहीं. यापेक्षां ' जेथ महासुखाचा केवळ परमानंद असा जो विवेक तोचि सरळ शुंडादंडु ' असा अन्वय करून विवेक हाच सोंड असा अर्थ चांगला जमतो. केतकरांनीं राजवाडे पाठ सोडून येथें ' देखा विवेक, तंव विमळु ' हाच पाठ घेतला आहे हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

६. ओ. २०. कीं परमधाम प्रकट ।
सर्व विद्यांचें मूळपीठ ।
शास्त्र जातां वसिष्ठ । अशेषांचे ॥

' शास्त्र जातां वसिष्ठ ' या करितां

[ चुकून छापील पाठांत ' वरिष्ठ ' पडलें आहे. ]

रा. } ए. } शास्त्र जातां वसैट

सा. विशिष्ठ

मा. } कुं. } वसौट

बं— वरिष्ठ,

कोणचाहि पाठ घेतला तरी अर्थ जवळ जवळ सारखाच आहे. पण या ओंवींत आलेले ' मूळपीठ ' या शब्दांच्या दृष्टीनें वसौट अथवा वसैट पाठ बरा.

रा. वसैट अर्थ वसतिस्थान
सा. विशिष्ठ अर्थ आधार
मा. } कुं. } वसौट अर्थ आश्रयस्थान
बं. वरिष्ठ अर्थ श्रेष्ठ

७ ओ. ९५ जो का तुम्हीं शिक्षापिला ।
विद्या देऊनि कुरुठा केला ।
तेणें हा सैन्यसिंहु पाखरिला ।
देखदेख ॥

' तेणें हा सैन्यसिंहु पाखरिला ' या करितां

रा. } मा. } कु. } सा. } सैन्यसिंधु

बं.—सैन्यसिंहु

सैन्यरूपी समुद्र तयार केला या पेक्षां सैन्यरूपी ' सिंह ' तयार केला हें म्हणणें अधिक बरें.

केतकरांनीं राजवाडे 'सैन्यसिंधु' पाठ सोडून ' सैन्य-सिंहु 'च पाठ घेतला आहे.

## अध्याय दुसरा

१ ओ. १७ हो कां सांप्रत ऐसें जहालें ।
जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिलें ।
आणि नाशु पावे नाशिलें ।
तुझेनि कायी ॥

' जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिलें ' या करितां

कु. } मा. } वरीलप्रमाणें पाठ

रा. जें हें जन्मे तुवां सृजिलें ।
आणि नाशु यावें नाशिलें । विचारी पां ॥

रा. पाठ चांगला कारण उत्तरार्धांत ' नाशु यावे नाशिलें । ' असें आहे. त्याच्याशीं ' पूर्वी जें जन्माला आलें तें तूं घातलेंस कां ? ' असा प्रश्न सुसंगत दिसतो. जन्ममृत्यु तूं कां निर्माण केलेस, हें तितकें सुसंगत दिसत नाहीं.

२ ओं. २१३ ऐसा महिमा घनवट ।
गंगा तैसी चोखट ।
जया देखी जगीं सुभट ।
बांठ जाहली ॥

' बांठ जाहली ' या करितां

बं. वरील प्रमाणें.
मा. बांठ जाले.
रा. जाणते जाले.

' बांठ 'चा अर्थ ' तटस्थ ' ' चकित ' असा आहे. अर्जुनापासून थोडे ' शिकले ' अथवा ' शहाणे झाले '

या अर्थापेक्षां 'जे आयकलिया दचकती। कृतांतादिक॥ 'तें पौरुष तुझें अद्‌भुत। आइकोनिया हे समस्त। जाले आथि विरक्त। जीवितेंसी॥' हें जें अर्जुनाचें वर्णन आहे त्याच्याशीं सुसंगत 'जी ऐकून जगांतील थोडे स्तिमित झाले' हेंच म्हणणें योग्य. म्हणून 'वांठ' हा पाठ बरा.

मा. चा 'वांठ जालें' हा पाठ 'वांठ जाहली' पेक्षां बरा.

३ ऒं. २३५ तियापरी जे सुबुद्धि।
आपुलाल्या निरवधि।
हा असतांचि उपाधि।
आकळूं न सके॥

'आपुलाल्या निरवधि' करितां.

बं.
रा.
मा. } 'आपु जालिया निरवधि'

'आपु जालिया' अथवा 'जालेया निरवधि' हा पाठ बरा. कारण, 'आपुलाल्या' या पाठांत क्रियापद अध्याहृत घ्यावें लागतें.

४ ऒं. २४४ म्हणोनि तया पार्था।
स्वर्ग संसार नरकावस्था।
आत्मसुख सर्वथा। दृष्ट नाहीं॥

'स्वर्ग संसार नरकावस्था' याकरितां

रा. 'स्वर्गं संसारीं आस्था'

दोन्हीं पाठ वेगवेगळ्या दृष्टींनीं बरें. पुढच्या श्लोकांत कामनिक कर्म करणाऱ्या याज्ञिकांचा विचार असल्यानें त्यांची आवड स्वर्गसंसारापलीकडे जात नाहीं, असें सांगण्याचा प्रसंग आहे. 'स्वर्गं संसारीं आस्था' हा रा. पाठ अधिक बरा. दुसऱ्या पाठांत त्या याज्ञिकांच्या आवडीचा परिणाम सांगितल्यासारखें होतें.

## अध्याय तिसरा

१ ऒं. ५ तरी हेंचि विचारी हृषिकेशा।
तूं मानु देसी कर्मलेशा।
आणि येसणी हे हिंसा।
करवीत अहासी॥

'तूं मानु देसी कर्मलेशा' याकरितां.

सा.
मा. } वरीलप्रमाणेंच

बं.
रा. } 'तूं मानु नेदसी कर्मलेशा'

वरील ओवींत जें सांगितलें आहे कीं 'तूं जर सर्व कर्मांचा निषेध करतोस तर माझ्याकडून असें हिंसक कर्म कां करवितोस?' याशीं सुसंगत 'मानु नेदसी' हा पाठ आहे. म्हणून तोच पाठ बरा.

२ ऒं. ७० तो कर्मेंद्रियें कर्मीं।
राहटतां तरी न नियमी।
परी तेथींचेनि ऊर्मीं।
झांकोळेना॥

'राहटतां तरी न नियमी' या करितां

सा.
बं.
कुं.
मा. } वरील प्रमाणें

रा. 'राहटतां तरी नियमी'

ज्या श्लोकावर ही ओवी आहे त्या श्लोकाचा अभिप्राय असा आहे कीं, 'तो कर्मयोगी श्रेष्ठ कीं जो मन आवरतो. नुसत्या बाह्य इंद्रियाचें नियमन करून तो मिथ्याचार करीत नाहीं.' या श्लोकार्थाशीं व ज्ञानेश्वर महाराजही 'तो इंद्रियां आज्ञा न करी।' असें मागच्याच ओवींत लिहितात त्याच्याशीं विरुद्ध असा राजवाडे पाठ आहे. म्हणून तो पाठ बरा नव्हे. आणि शिवाय 'नियमी' असा पाठ घेऊन अर्थ केला तर 'परंतु तेथल्या उर्मीत तो झांकला जात नाहीं' याला स्वारस्यच राहात नाहीं.

३ ऒं ९४. देखा स्वधर्मातें भजाल।
तरी कामधेनु हा होईल।
मग प्रजा हो न संडील।
तुमतें सदा॥

'मग प्रजाहो न संडील। तुमतें सदा' या करितां

मा.
कुं.
सा. } वरील प्रमाणें

रा. यऱ्हवीं प्रजा हाचि नाडिल। तुमतें सदा ॥

स्वधर्म हा 'इष्टकामधुक्' असा आहे. याचें व्याख्यान या दृष्टीनें 'मग प्रजाहो न संडील। तुमतें सदा ॥' हा पाठ चांगला. राजवाडे पाठ या श्लोकार्थांशीं न जुळणारा आहे.येथें धर्म पोषक कसा याचें व्याख्यान हवें. 'नाडील' याचें नको. म्हणून रा. पाठापेक्षां दुसरा पाठच योग्य.

४ ओ. १०५. अग्निमुखीं हवन।
न करील देवतापूजन।
प्राप्तवेळे भोजन।
ब्राह्मणाचें ॥

'प्राप्तवेळे भोजन' या करितां

सा. } कुं. } वरील प्रमाणें.
मा. } रा. } 'प्राप्तवेळे भजन'

दोन्हीं पाठ वेगवेगळ्या दृष्टीनें बरें. पण राजवाड्यांचा पाठ, ज्ञानेश्वर महाराजांनीं १२० व्या ओवींत 'अवसरें भजे द्विजीं' असें जें म्हटलें, त्याच्याशीं सुसंगत असा आहे. म्हणून तो पाठ अधीक बरा.

५ ओ. १४५. परिस पां सव्यसाची।
मूर्ति लाहोनी देहाची।
खंती करिती कर्मांची।
ते गांवढे गा ॥

रा. पाठांत ही ओवीच नाहीं.

६ ओ. १५१. जे स्वकर्में निष्कामता।
अनुसरले पार्था।
ते कैवल्य पर तत्त्वता।
पातले जगीं ॥

'ते कैवल्य पर तत्त्वतां। पातलें जगीं' या करितां

मा. } सा. } वरील प्रमाणें.
रा. 'ते कैवल्य परम तत्वता'
कुं. 'ते कैवल्यपद तत्वतां। पावले जगीं ॥'

वर दिलेले दोन्हींही पाठ आपापल्या परीनें बरे आहेत. 'पर' अथवा 'परम' असा पाठ घेतला तर त्याचा 'श्रेष्ठ' असा अर्थ करून तें कैवल्याचें विशेषण करावें.

७ ओ. १५७. हा गा ऐसें जरी न कीजे।
तरी अज्ञाना काय बोजे।
तिहीं कवणें परी जाणिजे।
मार्गातें या ॥

'तरी अज्ञाना काय बोजे।' या करितां

रा. 'तरी अज्ञाना काय बोजे।'
सा. } कुं. } 'तरी अज्ञाना काय जाणिजे।'
बं. मा. 'तरी अज्ञाना काय उमजे।'

दोन्हीं पाठांतील शब्दांच्या अर्थांत विशेष फरक नाहीं. 'उमजणें म्हणजे कळणें' आणि बोजे म्हणजे (बोज=रीत) रीत लागणे, कळणें. पण पुढें त्याच ओंवीत 'जाणिजे' हा शब्द आहे. या दृष्टीनीं, 'रीत लागेल' असा अर्थ अधिक चांगला म्हणून 'बोजे' हा पाठ बरा.

## अध्याय चौथा

१ ओ. २१. अव्हांटलिया आस्थाबुद्धि।
विषय सुखचि परमावधि।
जीवु तैसा उपाधि। आवडे लोकां ॥

'अव्हांटलिया आस्थाबुद्धि' याकरितां

कुं. } सा. } वरीलप्रमाणें
रा. 'अविट नाथिली आस्थाबुद्धि'
मा. 'अव्हांटली आत्याबुद्धि'

आगाशे, राजवाडे पाठाचा अर्थ देतात तो असा 'आत्म्याविषयींची आस्थाबुद्धि, म्हणजे आत्मा म्हणून कांहीं चीज आहे ही बुद्धि अजिबात नष्ट होऊन गेली,' 'अव्हांटलिया आस्थाबुद्धि' हा पाठ बरा. कारण 'अव्हांटा' हा शब्द ज्ञानदेवांनीं 'आडवाट'या अर्थानें अनेक ठिकाणीं वापरला आहे.

२. ओ. १९३. ऐकें जया प्राणियाच्या ठायीं।
इया ज्ञानाची आवडी नाहीं।
तयाचें जियालें म्हणों काई।
वरी मरण चांग ॥

'इया ज्ञानाची आवडी नाहीं' या करितां.

रा. 'यया ज्ञानाचें पाहिलें नाहीं.'

'ज्ञान आपले जवळ नसेल; पण जर त्याची एक आवड असेल तर प्राप्तीची कांहीं तरी आशा आहे.' हें जें एकशें पंचाण्णव ओवींत म्हटलें आहे त्या दृष्टीनें राजवाडे पाठ चांगला.

३. ओं. २०७. योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंच्छिन्न संशयम् ।
आत्मवन्तं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४–४१

राजवाडेमध्यें पुढील ओंव्या आहेत—

म्हणोनि हा त्यजावा । हाचि येकु जिणावा ।
जो ज्ञानाचिया अभावा– । माजि असे ॥ २०२.
जै अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवसु मनीं वाढे ।
म्हणोनी सर्वथा मार्गु मोडे । विश्वासाचा ॥ २०३.

हें संशयाचें वर्णन आहे. वरील श्लोकार्थाशीं त्या फारशा जुळत्या नाहींत हें चाणाक्ष वाचक सहज जाणूं शकतील.

मा.—सा.— व बं.—

म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक पाप नाहीं घोर ।
हा विनाशाची वागुर । प्राणियांसी ॥
येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एक जिणावा ।
जो ज्ञानचिया अभावा–। माजि असे ॥
जैं अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवस मनीं वाढे ।
म्हणौनि सर्वथा मागु मोडे । विश्वासाचा ॥
हृदयीं हाचि न समावे । बुद्धीतें गवसूनि ठाये ।
तेथें संशयात्मक होये । लोकत्रय ॥

एका. शक १७४१ मधील पोथींत पुढील ओंव्या आहेत :—

ऐसा जरी हा थोरावे । तऱ्हीं उपायें योगे अंगवे ।
जरी हाति होय बरवें । ज्ञानखड्ग ॥ २३३
तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळ हा निवटे । मग हा सकळ फिटे । मानसाचा ॥ ३४
पुर्ण येगिं ( योगी ) जे ही । कर्मांचा त्यागु केला पाही । तया संशयो कही असेंचिना ॥ ३५
जे आत्मतत्त्व पावले । ते कर्माकर्मापासुनी सुटले ।
ते बंधमोक्षीं सांडिले । धनुर्धरा ॥ ३६

अशा अर्थाच्या ओव्या कांहीं तरी असाव्यात असें वाटतें.

## अध्याय पांचवा

१ ओं. १५७ तैसें मनपण मुदल जाय ।
मग अहंभावादिक कें आहे ।
म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये ।
अनुभवी तो ॥

'म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये ।' याकरितां

रा. 'म्हणोनि शरीरेंचि गगन होये'

हा पाठ १४४ ओवींतील 'गगन' या शब्दास अनुसरून आहे. पण या चर्चेस आरंभ ओं. १५० मध्यें 'ते ऐसे कैसेनि जाहाले । जे देहींच ब्रह्मत्वा आले' यानें झाला आहे. त्या दृष्टीनें 'म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये' हा पाठ चांगला.

## अध्याय सहावा

१. ओं. २. सहजें ब्रह्मरसाचें पारणें ।
केलें अर्जुनालागीं नारायणें ।
कीं तेचि अवसरीं पाहुणे ।
पातलों आम्हीं ॥

'सहजें ब्रह्म रसाचें पारणे' या करितां,

सा. वरील प्रमाणें.

मा. } रा. } 'सहजें ब्रह्मरसाचें परगुणें'

'परगुणें' म्हणजे मेजवानी. हा पाठ चांगला. कारण 'ब्रह्मरसाचें पारणें' या पाठानें अर्थ करतांना अध्याहृत घ्यावें लागतें.

२ ओं. ११२. म्हणोनि असो हें वानणें ।
सांगो नेणों कवणाची लक्षणें ।
दावावीं मिषें येणें ।
कां बोलिलों तें ॥

'कां बोलिलों तें' या करितां.

मा. } सा. } कुं. } वरील प्रमाणें.

रा. } बं } 'कां बोलिला तें'

वरील ओंवीचा अन्वयः—' म्हणोनि असो हें वानणें. येणें मिषें कवणाचीं लक्षणें व कां बोलिला तें सांगो नेणों ' या दृष्टीनें ' बोलिलों'च्या ऐवजीं ' बोलिला ' हा पाठ बरा. हा पाठ घेतला तर अर्थ लागतो. ' बोलिलों ' यानें अर्थ लागत नाहीं.

३. ओ. १५९. निगिजे पूर्वीलिया मोहरा।
कीं येईजे पश्चिमेचिया घरा।
निश्चळपणें धनुर्धरा।
चालणें येथिंचें ॥

' निगिजे पूर्वीलिया मोहरा। कीं येईजे पश्चिमेचिया घरा ' याचा अर्थ करतांना साखरे व आगाशे यांनीं या ओंवींतील पूर्व व पश्चिम यांचे अर्थ प्रवृत्ति व निवृत्ति असे केले आहेत; त्या पेक्षां या शब्दांनीं पूर्व पश्चिम असे योगांतील दोन मार्ग अभिप्रेत आहेत असा अर्थ करणें बरें. हे दोन मार्ग असे आहेत कीं कोणच्याहि मार्गानें गेला तरी साधक शेवटीं एकाच मुक्कामाला म्हणजे सहस्रारापर्यंत येऊन पोंचतो. म्हणून दिसायला विरोधात्मक असें पूर्वेकडे तोंड करून निघाला 'तरी येईजे पश्चिमेच्या घरा' असें वर्णन केलें आहे.

मनाला जशीजशी स्थिरता प्राप्त होईल तशीतशी योगमार्गांत अधिक अधिक प्रगति होते म्हणून ' निश्चळपणें धनुर्धरा। चालणें येथींचें ' असें पुढें वर्णन केलें आहे.

ओ. ३४८. म्हणोनि अतिशयें विषयसेवा।
तैसा विरोध न व्हावा।
कां सर्वथा निरोधु करावा।
हेंहि नको ॥

मा. वरील प्रमाणे.

रा. म्हणोनि अतिशयें विषयसेवा। तैसा बोलु न व्हावा। कां सर्व निरोधु करावा। तें ही नको ॥

बं. म्हणोनि अतिशयें विषयसेवा। तैसा बोधु न व्हावा। का सर्वथा निरोधावा। हेंहि नको ॥

बं. पाठ ' बोधु ' हा बरा.

५ ओ. ४३६ ऐसा वोलांतरला काजीं।
जो श्रद्धेचांचि समाजीं।
बुडला तया हो जी।
कवणगति ॥

[ मूळ पाठांत चुकून ' वोलांतरा ' असें छापलें गेलें आहे. ]

रा. ऐसा ओलांतरला काजीं। जो श्रद्धेचांचि समाजीं। बुडाला तेआ हो जी। कवण गति ॥

मा. ऐसा वेळा अंतरला कां जी।
सा. ऐसा दोंळा अंतरला कां जी।
बं. ऐसा बेला अंतरला का जीं।
कु. ऐसा दोहोंला अंतरला का जीं।

भावे यांनीं ' ओलांतरणें ' म्हणजे उशीरामुळें फसणें असा अर्थ दिला आहे. तो घेऊन अर्थ केला आहे.

कुंटेपाठ 'दोहोंला अंतरला ' हा बरा. ' कारण तैसी दोन्हीं दुरावली ' ही जी अगोदरची ओंवी आहे तिच्याशीं तो जुळतो.

## अध्याय सातवा

१. ओ. ४०. पैं आदिचेनि अवसरें।
विरूढे गगनाचेनि अंकुरें।
जें अंतीं गिळी अक्षरें।
प्रणवपटींचीं ॥

' प्रणवपटींचीं ' या करतां.

रा. वरीलप्रमाणें.

सा., बं., मा. } ' प्रणवपीठींचीं '

दोन्ही पाठ सारखेच.

२. ओ. ५६. मग तया काष्ठाचां ठायीं।
सांग पां बीजपण असें काई।
तैसा मी विकारी नाहीं।
जरी विकारला दिसें ॥

' तैसा मी विकारी नाहीं।
जरी विकारला दिसें ' ॥ या करतां

मा., सा. } वरीलप्रमाणें

रा. ' म्हणौनि विशनीं मी नाहीं। जरी हें माझें ' वर ५२ व्या ओंवीमध्यें ' भजपासूनि जाणावें। विकारलें असे ॥ ' असें आहे. तेव्हां, ' मी विकाराला

पावलों असा दिसतो. ' हा जो आवश्यक अर्थ तो राजवाडे पाठांत स्पष्ट होत नाहीं; म्हणून तो पाठ बरा नाहीं.

३ ओं. ६५. पैं पृथ्वीयेचा घट्ट कीजे ।
सर्वेचि पृथ्वीसि मिळे जरी मेळविजे ।
एऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे ।
तरी वेगळा होय ॥

' तरी वेगळा होय ' या करितां

रा. ' तरी मांगल होय '

' मांगल ' म्हणजे मंगलकार्यांत उपयोगी पडणारा घट. येथें मांगलिकाचा प्रश्न नाहीं. तो निवडून वेगळा पडतो, हें दाखविणें आहे. या दृष्टीनें ' वेगळा ' पाठ चांगला.

४ ओं. ६८. आतां महदादि हे माझी माया ।
उतरोनियां धनंजया ।
मी होइजे हें आया ।
कैसेनि ये ॥

' आतां महदादि हे माझी माया ' या करितां

मा. } वरीलप्रमाणें
सा. }

रा. ' आतां महानदी हे माया '

एका दृष्टीनें ' महदादि ' हा पाठ बरा. तो मायेचे अवयव सांगतो; पण ' महानदी ' हा पाठ अधिक बरा. कारण नदीचें रूपक आहे व ही ओंवी सोडून ७९ ओंवीपर्यंत नदी शब्द येतच नाहीं.

५ ओं. ७२. जे द्वेषांचां आवर्तीं दाटत ।
मत्सराचे वळसे पडत ।
माजी प्रमदादि तळपत । महामीन ॥

' माजी प्रमदादि तळपत ' या करितां

रा. } माझि प्रमादादि तळपु अंत ।
मा. }

' प्रमादादि ' पाठ चांगला. कारण द्वेष, मत्सर हे दुष्ट गुण सांगतांना प्रमादादि सांगणें योग्य. म्हणून राजवाडे पाठ बरा.

६. अध्यायाचा शेवटचा संकल्प.

त्यांत ' विज्ञानयोग ' या करितां

रा. ' परमहंस योग '

सर्व अध्यायावरून अर्थातच ' विज्ञानयोग ' हा पाठ बरा हें सांगण्याचें कारण नाहीं.

## अध्याय आठवा

१ ओ. ८ किरीटी कामधेनूचा पाडा ।
वरी कल्पतरूचा आहे मांदोडा ।
म्हणोनि मनोरथ सिद्धीचिया चाडा ।
तो नवल नोहे ॥

' चाडा ' करतां

रा. पडा ( अर्थ खडा )
मूळ पोथींतील पाठ बरा.

२. ओ. १५. मग म्हणितलें सर्वेश्वरें ।
जें आकारीं इये खोकरें ।
कोंदलें असत न खिरे ।
कवणे काळीं ॥

' कोंदलें असत न खिरे ' या करितां

मा. हाच पाठ.
रा. कोंदलें असति न सिरे ।
कव्हणी काळीं ॥

' न खिरे ' हा पाठ बरा. कारण खोकऱ्या म्हणजे फुटक्या आकारांत भरलें तरी क्षरत नाहीं—गळत नाहीं असें सांगावयाचें आहे.

श्लोकांतील ' अक्षर ' यापदाशीं ' न सिरें ' पाठ सुसंगत दिसत नाहीं.

३. ओ. ४७. तो हा सकळ जीवांचा विसांवा ।
नैष्कर्म्यसुखाचा ठेवा ।
परि उघड करूनि पांडवा ।
दाविजत असे ॥

' तो हा सकळ जीवांचा विसावा ' या करितां

रा. ' तो हा क्रियाजातांचा विसावा '

ही द्विरुक्ति आहे. पुढें नैष्कर्म्य सुखाचा ठेवा आहेच. म्हणून रा. पाठ बरा नव्हे.

४. ओ. ५५. देखा बालकाचिया धणी धाइजे ।
कां शिष्याचेनि जाहलेपणें होईजे ।
हें सद्‌गुरुचि एकलेनि जाणिजे ।
कां प्रसवतिया ॥

'देखा बालकाचिया धणी धाइजे' या करितां

रा· 'देखा बोलाचिया धणी धाइजे'

'बालकाचिया' पाठ निर्विवाद चांगला. कारण याच ओवीच्या पुढच्या भागांत शिष्य आहे. त्याच्याशीं 'बालकाचिया' हा पाठ योग्य जुळत आहे.

५. ओ. ८३. जें नानागती पावतें ।
तें चित्त वरील आत्मयातें ।
मग कवण आठवी देहातें ।
गेलें कीं आहे ।

'जें नानागती पावते' या करितां

रा. वर प्रमाणें.
बं. } जें नानागतीतें पावविते
सा. }

दोन्ही पाठ वेगवेगळ्या दृष्टीनें बरें. अनेक प्रकारच्या गती मनालाच मिळतात म्हणून पहिला पाठ बरा व दुसऱ्या पाठाप्रमाणें मन जीवाला अनेक गती मिळवून देतें असा अर्थ म्हणून बरा. दुसऱ्यांत अध्याहृत घ्यावें लागतें. या दृष्टीनें पहिला पाठ बरा.

६ ओं. ८९ देखें वोळंबा इंगळु न चरे ।
तेजीं तिमिर जेथ नसरे ।
जें देहाचें आंधारें ।
चर्मचक्षूसी ॥

'तेजीं तिमिर जेथ नसरे' या करितां

बं. }
मा. } 'तेजीं तिमिर न शिरे'
रा. }

बं. मा. रा. पाठ चांगला

## अध्याय नववा

१ ओ १ तरी अवधान एकवेळें दीजे ।
मग सर्वसुखासि पात्र होईजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ॥

'तरी अवधान एकवेळें दीजे ।' या करितां

बं. }
मा. } वरील प्रमाणें.
सा. }

रा. 'तरि अवधान एकलें दीजे ।'

दोन्ही पाठ बरे. पण 'अहो अळुमाळ अवधान देयावें' ओ. ५३४ नें जो शेवट केला आहे त्या दृष्टीनें 'एकवेळें' पाठ अधिक बरा.

२ ओ. १४ प्रभू तुम्हीं महेशाचिया मूर्ति ।
आणि मी दुबळा अर्चितसें भक्ती ।
म्हणोनि बेल जऱ्ही गंगावती ।
तऱ्ही स्वीकाराल कीं ॥

'म्हणोनि बेल जऱ्ही गंगावती' या करतां

मा. }
रा. } 'म्हणोनि बोल जऱ्ही गंगावती'
बं. }
सा. }

'बोल' पाठ बरा.

'बेल' या पाठांत ' 'गंगावती' कोणची याची स्पष्टता होत नाहीं.

३ ओ. ५७ पाहें पां दूध पवित्र आणि गोड ।
पासीं त्वचेचिया पदराआड ।
परि तें अव्हेरूनि गोचिड ।
अशुद्ध काय नेघती ॥

'परि तें अव्हेरूनि गोचिड' या करतां

रा. 'परि ते अव्हेरूनि ते मूढ'

गोचिड पाठ योग्य; कारण 'मूढ' या पदानें कोण 'मूढ' ही स्पष्टता होत नाहीं. व हा दृष्टान्त आहे तेव्हां स्पष्टता होणें अधिक बरें.

४ ओं. ६० तैसा हृदयामध्यें मी रामु ।
असतां सर्व सुखाचा आरामु ।
कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥

'तैसा हृदयामध्यें मी रामु ।' या करतां

मा. वरील प्रमाणें.
रा. 'तैसा हृदयीं आंतु मी धर्मु.'

'रामु', हा पाठ 'धर्मु' पेक्षा बरा. कारण 'धर्मु' या पाठानें श्लोकांतील 'धर्मु' या शब्दाची स्पष्टता होत नाहीं व व्याख्यानांत ती होणें अवश्य; यामुळें रा. पाठ 'धर्म' बरा नाहीं.

५ ओ. ६३. एऱ्हवीं मी तरी कैसा ।
मुखाप्रति भानु कां जैसा ।
कहीं नसे न दिसे ऐसा ।
वाणीचा नव्हे ॥

'कहीं नसे नदिसे ऐसा' या करतां

मा. वरील प्रमाणें.
रा. 'कहिं न दिसे नसे ऐसा'
बं. 'कहीं दिसे न दिसे ऐसा'

बं पाठ बरा. 'नदिसे' याच्या विरुद्ध 'दिसे' बरें. 'नसे' या पाठांत ओढून तसा अर्थ आणावा लागतो.

६ ओ. २१५. तेव्हां प्रत्याहारें ख्याति केली ।
विकारांची संपिली बोहली ।
इंद्रियें बांधोनि आणिलीं ।
हृदयाआंतु ॥

'विकारांची संपिली बोहली' करतां

मा. 'विकारांची संपिली बोहिली'
रा. 'विकारांची सपिलें बोहिली'
सा. }
बं. } 'विकारांची सपिली बोहली'

'सपिली' या पाठांत बोहली (क्रियापद) चा अर्थ 'ठार केली.' पण यांत 'विकारांची' हें पद अधांतरींच रहातें.

'संपिली' या पाठांत 'बोहली (नाम) चा अर्थ भाषा' असा आहे. कोशांत दोन्ही अर्थ सांपडतात. 'संपिली बोहली' हा पाठ बरा.

७ ओ. २९४. इयें नामरूपें लोटती ।
वर्णव्यक्ती आटती ।
जातीचे भेद फिटती ।
जैं आकाश नाहीं ॥

'जैं आकाश नाहीं'—करतां

रा. वरील प्रमाणें.
मा. 'जैं आकार नाहीं.'
बं. }
सा. } 'जैं आकारु नाहीं'

'आकारु' पाठ बरा. कारण नामरूप, वर्णव्यक्ति ई सर्व आकाराला असतें असें ज्ञानेश्वर महाराज सांगतात. तेव्हां नामरूप वगैरे नाहींसें होतें या व्याख्यानाचा शेवट जेथें आकारच नसतो यानें होणें योग्य आहे.

'आकाश' नाहीं या पाठांत सृष्टींतील पहिलें महाभूत आकाश (त्यालाहि आकार नाहीं) तेंहि नाहींसें होतें. असा अर्थ होतो. एकंदर 'आकार ज्या वेळेस नाहींसा होतो' असें सांगावयाचें असल्यानें स्पष्ट 'आकार' पाठ बरा.

८ ओ. ३२५ पैं बृहस्पति आपण ।
ऐसे स्वर्त्तीश्रियेचे ब्राह्मण ।
तार्टियेचे सुरगण ।
विकार जेथें !

'विकार जेथें' करतां

रा. 'विकार जेथ'
मा. 'पांतिकर जेथ'
बं. }
सा. } 'बहुवस जेथे'

विकार म्हणजे समुदाय व विकर म्हणजे (भावेकोश) सटरफटर काम करणारा. आगाशे विकर म्हणजे निकर, समुदाय. बहुबस पाठ बरा.

९ ओ. ३३३. अर्जुना वेदु जऱ्हीं जाहला ।
तरी मातें नेणतां वायां गेला ।
कणु सांडुनि उपणिला ।
कोंडा जैसा ।

[ मूळ पाठांत चुकुन वेदुद झालें आहे. ]

'अर्जुना वेदु जऱ्हीं जाहला' करतां

रा. }
मा. } वरील प्रमाणें
बं. }
सा. } 'अर्जुना वेदविद जऱ्ही जाहला,

'वेदविद' पाठ योग्य. कारण वरच्या ओंवींतून वेदज्ञांचें वर्णन आहे.

१० ओं. ४४०. तैसे भक्तिहीनाचें जिणें ।
जो स्वप्नींहि परि सुकृत नेणे ।
तेणें संसारदुःखासि आवंतणें ।
बोगरिलें गा ।

'तेणें संसारदुःखासि आवंतणें' या करितां

रा. 'तैं संबसारदुःखासि आवंतणें'

मा. } तेणें संसारदुःखासि भाणें
बं. }

'भाणें' पाठ बरा. 'भाणें' म्हणजे वाढलेलें ताट; 'आवंतण' म्हणजे आमंत्रण. दुःखाला आमंत्रण दिलें यापेक्षां, दुःखाचें ताटच वाढून ठेविलें; हें म्हणणें अधिक जोरदार आहे.

११. ओं. ४७१. म्हणोनि पार्था पाहीं ।
प्रवेशावया माझां ठायीं ।
उपायांची नाहीं । केणि एथ ॥

'केणि एथ' या करितां.

मा. } वरीलप्रमाणें
रा. }

बं. 'वाणी एथ'

दोन्ही पाठ बरे. 'वाणी' म्हणजे तूट आणि 'केणि' म्हणजे बंधन. वाणीपेक्षां केणि म्हणजे बंधन हा पाठ अधिक बरा.

## अध्याय दहावा

१. ओ. ४. नमो चतुरचित्तचकोरचंद्रा ।
आत्मानुभवनरेंद्रा ॥
श्रुतिगुणसमुद्रा । मन्मथमन्मथा ॥

'श्रुतिगुणसमुद्रा' करतां.

मा. वरीलप्रमाणें

रा. 'श्रुतिसागरसमुद्रा'

बं. } 'श्रुतिसारसमुद्रा'
सा. }

रा. पाठ बरा नव्हे. त्यांत सागर व समुद्र अशी एकाच पदांत द्विरुक्ति आहे. आगाशे अर्थ—श्रुतिच्या-सागरांत शोभण्यासारख्या अपारसमुद्रा. त्या खेरीज दोन्ही इतर पाठ बरे. 'गुण' पाठ अधिक बरा. गुणांचा समुद्र हें 'साराच्या समुद्रापेक्षां' चांगलें.

ज्ञा.···१०६

२. ओ. १५. कां साडेपंधरया रजतवणी ।
तैशी स्तुतीचीं बोलणीं ।
उगियाचि माथा ठेविजे चरणीं ।
हेंचि भलें ॥

'कां साडेपंधरया रजतवणी' करतां.

मा. }
बं. } वरीलप्रमाणें
सा. }

रा. 'साडेपंधरेया आणि कसवटणी.'

'साडेपंधरया रजतवणी' हा पाठ बरा. कारण, ओवींत मी स्तुति करणें म्हणजे जें चांगलें आहेत तें विघडवण्यासारखें होईल असें सांगावयाचें आहे. 'उत्तम सोनें आणि कस कशाला?' या म्हणण्यांत वरील भाव व्यक्त होत नाहीं. म्हणून 'साडेपंधरया रजतवणी' हा पाठ बरा. शिवाय तो १४ व्या ओंवींतील वर्णनाशीं सुसंगत आहे.

३. ओ. ३३. अहो गूळासाखरे मालेयाचे ।
हे बांधे तरी एकाचि रसाचे ।
परि स्वाद गोडियेचे ।
आन आन जैसे ॥

'आन आन जैसे' करतां.

मा. वरीलप्रमाणें

रा. 'परि पाहतां गोडियेचे । विशेष नाहीं ॥'

रा. पाठांत स्वाद वेगवेगळे असतात हें स्पष्ट होत नाहीं. म्हणून 'आन आन जैसे' हा पाठ बरा.

४. ओ. ३६. कां एकाचि काठि तपिन्नली ।
एकीं सृष्टीवरी सृष्टी केली ।
एकीं पाषाण बाऊनि उतरली ।
समुद्रीं कटकें ॥

'कां एकाची काठि तपिन्नली' या करितां

मा. 'शाठी'

रा. 'षाठी'

बं. 'शाटी'

'शाटी' पाठ बरा. कथानकांत छाटी असें आहे. बहुधा शाटी, षाटी, खाटी, काठी असें झालें असावें.

५. ओ. ५७. तैसें एथ पार्था ।
तुज आभार नाहीं सर्वथा ।
आम्ही आपुलियाचि स्वार्था ।
बोलोनि आम्ही ॥

आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलौनि–या करितां,

मा. ' आपुलियाचि स्वार्था । बोलौनि आम्ही '
रा. 'आम्ही आपुलेयाचि स्वार्था । बोलौनु पुढुती'
बं ' आम्ही आपुल्याचि स्वार्था । बोलों पुढती'

रा. व बं. पाठ चांगला. श्लोकांतील ' भूयः ' पदाशीं सुसंबद्ध असा आहे.

६ ओं. ६३ तरी किरीटी तूं मातें ।
नेणसी ना निरुतें ।
तरि गा जो मी येथें । तें विश्वचि हें ॥
' तरि गा जो मी येथें ।
तें विश्वचि हें ' ॥ या करितां

मा. }
बं. } वरील प्रमाणें

रा. ' तरी तोचि मी जेथें । विश्व हें स्वप्न ॥ '

रा. पाठा पेक्षां मा. बं. पाठ बरा. कारण या अध्यायांत पुढें, विश्वांत विखुरलेल्या विभूति सांगून शेवटीं ' माझ्या स्वरूपांत सामान्य विशेषाची गोष्ट नाहीं; सर्व मीच व्यापलों आहें.' असें सांगावयाचे आहे. त्याचा आरंभ ' हें विश्व खोटें ' असें सांगून होणें योग्य नव्हे. म्हणून रा. पाठापेक्षां दुसरा पाठ बरा.

७ ओं. ८५. आतां भय आणि निर्भयता ।
अहिंसा आणि समता ।
हें मम रूपचि पांडुसुता ।
ओळख तूं ॥

' हें मम रूपचि पांडुसुता । ' या करितां

रा. }
मा. } ' पैं भय आणि निर्भयता । अहिंसा ज्ञान समता । तुष्टी तप पांडुसुता ।
बं. } दान जें गा ॥ '

रा. मा. बं. पाठ योग्य आहे. कारण त्यांत श्लोकांतील ' तुष्टि तप ' यांचें व्याख्यान येतें.

८. ओं. ८९. आणि माझें जें जाणणें नेणणें ।
तें तंव भूतांचिया दैवाचें करणें ।
म्हणोनि भूतीं भावांचें होणें ।
विषम पडे ॥

'ते तव भूतांचिया दैवांचे करणें ।' याकरितां

मा. }
रा. } वरील प्रमाणें

बं. ' तें तंव भूतांचिया भावांचें करणें ' ।

भूतांच्या ठिकाणीं उत्पन्न होणारे भाव माझ्या ज्ञानांत व अज्ञानांत होतात असें मागच्या ओंवींत सांगतात; आणि लगेच, माझें जाणणें व नेणणें हें भूतांच्या ठिकाणच्या भावांचें करणें म्हणणें हें विसंगत दिसतें. म्हणून बं. पाठ बरा नाहीं. त्या पेक्षां ' भूतांचिया दैवाचें ' हा पाठ बरा.

९ ओं. १०६. ऐसें जाणो जो साचें ।
तया चेइरें जाहालें ज्ञानाचें ।
म्हणोनि उत्तम मध्यम भेदाचें ।
दुःस्वप्न तया ॥

'उत्तम मध्यम भेदाचें । दुःस्वप्न तया॥' याकरितां

मा. ' उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न तया ॥ '

रा. }
बं. } 'म्हणौनि उत्तमाधम भेदाचे । स्वप्नही न देखे'

रा. बं. पाठ चांगला; कारण दुसऱ्या पाठांत प्रश्नार्थक वाक्य करून अर्थ करावा लागतो.

१० ओं. १३७. पैं गा भक्तासि माझें कोड ।
मज तयाचे अनन्य गतीची चाड ।
कां जें प्रेमळांचें सांकड ।
आमतें घरीं ॥

' पैं गा भक्तासि माझें कोड ' या करतां

मा. }
बं. } वरीलप्रमाणें

रा. ' अगा या विश्वासि मी माझें कोड '

हें प्रकरण भक्तांच्या वर्णनाचें असल्यानें हें विश्व ' मी माझें ' या स्वार्थीवृत्तीनें भरलें आहे, हें सांगण्याचा प्रसंग नाहीं. शिवाय पुढें ' मज तयाचे अनन्य गतीची चाड ' असा भक्तांचा उल्लेख आहे. म्हणून रा. पाठ बरा नव्हे.

११ ओ. १६५. अहो नारदादिकां संतां ।
त्याचिया युक्तिरूप सरिता ।
मी महोदधि जालां अनंता ।
संवादसुखाचा ॥

'त्याचिया युक्तिरूप सरिता' या करितां

मा. } 'त्याचिया उक्तिरूप सरिता'
बं. }
रा. 'तेयांचिया जुती स्वरूप सरिता'

'संवादसुखासमुद्र जालों' या दृष्टीनें 'उक्तिरूप' पाठ चांगला. शिवाय मागें १६२ व्या ओवींत 'तैशीं व्यासादिकांचीं बोलणी,' असें स्पष्ट आहेच.

## अध्याय अकरावा

१. ओ. २६९. जी सहस्रशीर्षयाचें देखिले ।
कोडीवरी होताति एकिवेळें ।
कीं परब्रह्माचि वदनफळें ।
मोडोनि आलें ॥

'जी सहस्रशीर्षयाचें देखिलें' या करतां

मा. पाठ वरील प्रमाणें.
रा. 'जी सहस्रशीर्षयाचे डाखले ।'
बं 'जी सहस्रशीर्षयाचे दाखले ।'

'डाखले' (भावे कोश) डाखल म्हणजे वर्णन करणें. याचाच आगाशे हे 'शीर्षामध्यें असणारे दांत' (डाखले म्हणजे डंख करणारे) असा अर्थ करतात. 'देखिलें' हा पाठ बरा.

२. ओ. ३१५. कां जे भूर्लोक पाताळ ।
पृथिवी हन अंतराळ ।
अथवा दशदिशा समाकुळ ।
दिशाचक्र ॥

'कां जे भूर्लोक पाताळ' या करितां

मा. 'कां जे भुवर्लोक पाताळ'

बं. }
रा. } 'कां जे द्यौर्लोक आणि पाताळ'
सा. }

बं. रा. सा. यांचा पाठ बरा. कारण 'भू' चा अर्थ 'द्यौ' होत नाहीं.

३. ओ. ३३३. अवधारा अग्नि हन गंधर्व ।
पैल यक्षरक्षोगण सर्व ।
जी महेंद्र मुख्य देव ।
कां सिद्धादिक ॥

'अवधारा अग्नि हन गंधर्व' या करितां.

रा. वरील प्रमाणें.

बं. }
सा. } 'अवधारा पितर हन गंधर्व'
मा. }

'अवधारा पितर हन गंधर्व' हा पाठ बरा. कारण 'वसु' हा शब्द पूर्वी एकदां आल्यानें पुनः अग्नि म्हणण्यांत द्विरुक्ति होते. शिवाय पितरांचा उल्लेख होत नाहींच.

४. ओ. ४३४. ऐसी अपारें वदनें ।
आत्तां येतुलीं कैंचीं त्रिभुवनें ।
कां आहारु न मिळतां येणें मानें ।
वाढविलीं असह्या ॥

'वाढविलीं असह्या' या करितां.

बं. } 'वाढविलीं कास्या'
मा. }
सा. 'वाढविलीं सैंघ'
रा. 'का आहारु न मेळवितां येणे माने ।
वाढविलीं असती ॥'

'वाढविलीं असह्या' अथवा रा. पाठ बरा. बं. व मा. या पाठांत 'कां' व 'कास्या' या दोन शब्दांनीं द्विरुक्ति होते.

५. ओ. ५५४. मज एकासनीं बैसणें ।
कां तुझा बोलु न मानणें ।
हें वोळखीचेनि दाटपणें ।
बहुत घडलें ॥

'हें वोळखीचेनि दाटपणें' या करितां.

बं. वरील प्रमाणें.

मा. } 'वोतटीचेनि दाटपणें । बहुत घडलें ॥'
ए. }
रा. 'हे प्रीतीचेनि दाटपणें । बहुत घडलें ॥'

'वोतटी' म्हणजे 'फार संघट्टण'. त्यामुळें दोन्ही पाठांच्या अर्थांत फारसा फरक नाहीं, पण ए. पाठ अधिक चांगला.

६. ओ. ६९० तैसें मज लागुनी मुंगीवरी ।
किंबहुना चराचरीं ।
भजनासि कां दुसरी ।
भ्रांति नाहीं ॥

'भजनासि कां दुसरी । भ्रांति नाहीं ॥' या करितां.

प. }
रा. } वरील प्रमाणें.
मा. }
बं. } 'भजनासि कां दुसरा । परीचि नाहीं ॥'
सा. }

'भ्रांति' म्हणजे शंका आणि 'परि' म्हणजे प्रकार. 'परीचि नाहीं' हा पाठ बरा.

## अध्याय बारावा

१ ओ. १. जय जय शुद्धे ।
उदारे प्रसिद्धे ।
अनव्रत आनंदे । वर्षतिये ॥

'जय जय शुद्धे,' या करितां

मा. }
बं. } 'जय जय वो शुद्धे'
सा. }
रा. 'जयजय सिद्धे'

आगाशे अर्थ 'सिद्धे म्हणजे सिद्धावस्थेंत असणारी.' 'शुद्धे' पाठ बरा; कारण, पुढें जें शिष्याचें कार्य करावयाचें आहे त्या दृष्टीनें गुरूच्या शुद्धत्वाचा निर्देश चांगला. विषयव्याळानें दंश केल्यानें मूढ झालेला, तापत्रयानें पोळलेला शोच्य जो जीव त्यास शुद्ध करण्याचें सामर्थ्य तुझ्यांत आहे असें दाखवणारा 'शुद्ध' हा शब्द चांगला.

२ ओ. १.
'अनव्रत आनंदे' या करितां
रा. वरील प्रमाणें
बं. } अनवरत
मा. }
अर्थात फरक नाहीं.

३ ओ. ५०. वज्राग्नीचां ज्वाळीं ।
करूनि अपान धातूंची होळी ।
व्याधींचां सिसाळीं ।
पूजिलीं यंत्रें ॥

'करूनि अपानधातूंची होळी' या करतां
मा. वरील प्रमाणें.
रा. 'करूनु अपारां धातूंची होळी ।'
बं. 'करूनि सप्तधातूंची होळी ।'

बं. पाठ बरा; कारण 'अपानाची होळी' असा उल्लेख मागें आला आहे; पण त्याला 'धातु' म्हणणें युक्त नव्हे. म्हणून 'सप्तधातु' पाठ बरा.

## अध्याय तेरावा

१. ओ. १. आत्मरूप गणेशु स्मरण ।
सकळ विद्यांचे अधिकरण ।
तेचि वंदूं श्रीचरण । श्रीगुरूचे ॥

'आत्मरूप गणेशु स्मरण' करतां
मा. 'केल्या स्मरण'
रा. 'केलेया स्मरण'
सा. } 'आत्मरूप गणेशु केलिया स्मरण'
बं. }

'आत्मरूप गणेशु स्मरण' पेक्षां इतर पाठ बरे.

२. श्लो. १. राजवाडे पोथींत या प्रथम श्लोकापूर्वी पुढील श्लोक आहे व त्यावर खालील ओंवी आहे:—

अर्जुन उवाचः—
प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेवच ।
एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानंज्ञेयंच केशव ॥ १ ॥
तेथ अर्जुनु म्हणे प्रकृति पुरुष ।
क्षेत्रज्ञु आणि क्षेत्रविशेष ।
हें तुजपासाव अशेष । इच्छितु असें जाणों ॥

वरील श्लोक प्रायः काश्मीरपाठांत आढळतो. गौडपाठांत आणखी एक अधिक श्लोक आढळतो तो:—

श्रीभगवानुवाच :—
प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेवच ।
एतत्ते कथयिष्यामि ज्ञानं ज्ञेयंच भारत ॥

[ वरील माहिती ( आनंदवर्धनविरचित ज्ञानकर्मसमुच्चयाख्या टीकेसह ) डॉ. एस. के. बेलवलकर यांनीं

संपादिलेली श्रीमद्भगवद्गीता पान २०८ वर आहे. याची अधिक चर्चा राजवाडे प्रत या प्रकरणांत केली आहे. ]

३. ओ. १७३. 'जयाचेनि उन्नाळें'

या ओंवीच्या वर साखरे व कुंटे प्रतींत पुढील ओवी आढळते.

जयाचेनि जालेपणें । पांगुळा होइजे प्राणें ।
जयाचेनि विंदाणें । जग हें चेष्टे ॥

४. ओ. २७०. उरोधु वादुवलु । प्राणुपापढालु ।
उपहासु चालु । वर्मस्पर्शु ॥

'प्राणुपापढाळु' करतां.

मा. वरीलप्रमाणें
सा. प्राणिपापढाळु
रा. प्राणुपापता ढाळु
बं. } कुं. } प्राणितापढाळु

भावे 'प्राणुपापता' शब्दच कोशांत देत नाहींत. आगाशे मात्र अर्थ करतात. प्राणुपापता—प्राणास जाऊन भिडणारी, प्राणास भेदणारी. राजवाडे कोश-पापता-पापत्व. राजवाडे पोथींत हस्तदोष दिसतो. एक शब्द असता तर चांगलें झालें असतें.

५. ओ. ४२६. तयां श्रवणाचां आंगणीं ।
होईन शब्दांचिया आक्षोणि ।
परिसु होईन घसणी ।
आंगाचिया ॥

'परिसु होईन घसणी, करतां'

बं. } मा. } रा. } सा. } 'स्पर्श होईन घसणी'

परिस याचा अर्थ स्पर्श असाच आहे. अर्थांत फरक नाहीं.

६. ओ. ७५६. पुष्टि लागे विघरों ।
कांति पाहे निसरों ।
माथा आदरीं शिरों ।
बागीवळ ॥

'बागीवळ' करतां

ए. } रा. } मा. } पाठ वरप्रमाणेंच
बं. 'शिरो-। भागीं कंप'

बागीवळचा अर्थ कंप, कापरें. अर्थांत फरक नाहीं.

७. ओ. ९२३. अगा सृष्टीवेळे प्रियोत्तमा ।
जया नांव म्हणती ब्रह्मा ।
व्याप्ति जें विष्णुनामा ।
पात्र जाहलें ॥

'व्याप्ति' च्याकरतां

ए. } मा. } सा. } पाठ वर प्रमाणें
बं. } कुं. } 'स्थिती' असा पाठ आहे
रा. 'व्याप्ति जे नामा । पात्र जाहले'

राजवाडेपेक्षां इतर पाठ बरे. कारण सृष्टि, स्थिती व प्रलय, याकाळीं ब्रह्मा, विष्णु, रुद्र हीं नांवें त्या अखंड वस्तूस प्राप्त होतात हें सांगणें आहे. रा. पाठांत 'विष्णु' गाळलेलेंच आहे.

राहिलेले व्याप्ति व स्थिति—सारखेच.

८ ओ. १०६९. हे उघड पांचवेळली ।
हे पंचधा आंगीं लागली ।
जीवपंचाननां सांपडली ।
हरिणकुटी हे ॥

'हे पंचधा आंगीं लागली' करतां

मा. } रा. } पाठ वर प्रमाणें
बं. } सा. } पंचधा आगी लागली
'आंगीं' पाठ बरा.

९ ओ. ११६३. म्हणोनि अक्षरीं सुभेदीं ।
उपमा श्लोक कोंदाकोंदीं ।
झाडा देईन प्रतिपदीं ।
ग्रंथार्थासी ॥

' उपमा श्लोक कोंदाकोंदीं ' करतां

मा. } पाठ वरप्रमाणें
सा. }

रा. ' उपमा श्लेष कोंदाकोंदीं '

भावे कोश—श्लेष म्हणजे उपमा. हा अर्थ घेतला तर रा. पाठांत द्विरुक्ति होते. पण डॉ. तुळपुळे यांनीं ' पांच संतकवी ' पान १२५ वर म्हटल्याप्रमाणें श्लेष याचा अर्थ ' रूपक ' असा अर्थ केला तर रा. पाठ अधिक बरा.

## अध्याय चवदावा

१. ओ. २८. सहजें दुर्वेचा हिरु ।
आंगेंचि तव अमरु ।
वरी आला पुरु । पीयुषाचा ॥

' सहजे दुर्वेचा हिरु ' याकरतां

रा. } पाठ वरप्रमाणें
मा. }

बं. ' सहजें दुर्वेचा डिरु '. अर्थांत फरक नाहीं.

२ ऒं. ७८. ना राती ना तेज ।
ते सांधि जेवीं सांज ।
तेवीं विरुद्ध ना निज ।
अज्ञान आथी ॥

' अज्ञान आथी ' करतां

बं. } ' ज्ञान आथी '
मा. }

रा. ' ज्ञाना आथि '

दोन्ही पाठ घेऊन अर्थ लागतो. फक्त अन्वय वेगवेगळा करावा लागेल.

ज्ञान पाठ घेतला तर ' तेवी विरुद्ध ज्ञान आथी ना. ' अथवा 'निजज्ञान आथी ना.' अज्ञान पाठ घेतला तर आहे तसाच अन्वय. पण ज्ञान शब्द विरुद्ध व निज या प्रत्येका-पुढें अध्याहृत घ्यावा.

३. ऒं. ११५. आतां असो हें बहुबोली ।
ऐसें विश्व माया व्याली ।
तेथ जांघु जाली । माझी सत्ता ॥

' तेथ जांघु जाली । माझी सत्ता ' या करतां

मा. वरप्रमाणें

रा. ' तेथ चांग जाली । माझी सत्ता ॥ '

बं. } ' तेथ साह्य जाली। माझी सत्ता '
सा. }

'जांघ' व 'साहाय्य' या पाठांत अर्थांत फरक नाहीं; कारण ' जांघ ' ह्याचा अर्थ सहाय्य असा आहे. ' जांघ ' अथवा ' साह्य ' पाठ बरा. चांग याचे अर्थ ( भावे कोश ) उत्तम, चांगलें, शूर असे आहेत. त्यांत ' उपयोग ' असा नाहीं. तसा अर्थ फक्त आगाशे देतात. चांग जाली म्हणजे उपयोगी पडली.

४ ऒं. २६६. आणि तैसेंचि हें जाण ।
लोभासि रज कारण ।
आपलें विस्मरण । अद्वैता जेवीं ॥

' आपलें विस्मरण । अद्वैता जेवीं ' करतां

बं. }
मा. } पाठ वर प्रमाणेंच
सा. }

रा. ' आपलें विस्मरण । द्वैता जेवि '

रा. पाठ बरा.

५ ऒं. २९९. ऐसेनि विवेकें जया ।
उदो होय धनंजया ।
ये गुणातीतत्व तया ।
अर्धपंथें ॥

' अर्धपंथें ' करतां

ए. } वरप्रमाणें
मा. }

रा. ' ऊर्धपंथें '

बं. ' अर्धपंथें '

सा. ' उर्ध्वपंथें '

अर्ध या शब्दाचा उपनिषदांत ' उच्चस्थान ' असा अर्थ आहे; ' अर्धपंथें ' पेक्षां उर्ध्व व अर्ध पाठ बरे.

६ ऒं. ३३०. कां वाढिनलेनि तमें ।
न गिळिजेचि मोहभ्रमें ।
तैं अज्ञानत्वें न श्रमे ।
घेणेंही नाहीं ॥

' न गिळिजेचि मोहभ्रमें ' या करता

मा. वरप्रमाणें

बं. }
रा. } ' गिळिजेचि मोहभ्रमें '

पुढील वर्णनाच्या दृष्टीनें ' गिळिजेचि मोहभ्रमें ' हाच पाठ बरा.

## अध्याय पंधरावा

१ ओ. ५८. पैं बल्वचेचि महामारी ।
पिंपळ्या कां वडाचिया परी ।
जे पारंबियां माझारी ।
उहाळिया असती ॥

' पैं बल्वचेचि महामारी ' करतां

ए. }
सा. } पाठ वर प्रमाणें

रा. ' पैं बल्वचेन महामारी '

मा. }
बं. } ' प्रबळला चौमेरी '

दोन्ही पाठ बरे, पण ' प्रबळला चौमेरी ' अधिक बरा.

२ ओ. ९२. मग आधिलीं सदेहांतरें ।
उठती जियें अपारें ।
तें चौपासि घेऊनि आगारें ।
खोलावती ॥

' मग आधिलीं सदेहांतरें ' करतां

बं. ' मग आधिलीं देहांतरें '

मा. ' मग आधिलीं संदेहांतरें '

रा. ' मग अधमूळासि देहांतरें '

रा. व बं. पाठ बरे.

३ ओ. १३०. तेंवींचि हा अनादी ।
ऐसी आथी शाब्दी ।
तो आलु नोहे नुरोधी ।
बोल तया ॥

' तो आलु नोहे नुरोधी । बोल तया ॥ ' करतां

बं. }
मा. } ' तो आलु नोहे अनुरोधी । बोल तया ' ॥

रा. ' ते आलुकी नोहे नुरोधि । बोल ते एया ' ॥

अर्थात कांहीं फरक नाहीं. नुरोधि व अनुरोधि अर्थ एकच.

४ ओ. २५४. म्हणोनि स्वप्नीचेया भया ।
ओखद चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया ।
ज्ञानचि खड्ग ॥

' भया ' करतां

मा. }
ए. } वर प्रमाणें

रा. ' घाया.'

' भय ' पाठ बरा.

५ ओ. ४९१. पाठीं तिये निद्रेचेनि भरें ।
मी सुखी दुःखी म्हणत घोरें ।
अहंसमाधीचेनि थोरें ।
बोसणाये सादें ॥

' अहंसमाधीचेनि थोरें ' करतां

ए. वरप्रमाणें

मा. }
रा. } ' अहंममाधीचेनि थोरें '

बं. }
सा. } ' अहंममतेचेनि थोरें । '

पुढील ओवीच्या दृष्टीनें ' अहंममतेचेनि ' हा पाठ अधिक बरा.

६ ओ. ५०८ अ.

पुढचे सगळे आंकडे बदलून, कोशांतीलहि आंकडे बदलावे लागतील म्हणून ५०८ अ असा आंकडा या ओंवीस दिला. येव्हवी ही ओंवी मूळ पाठांत आहे. नाथांच्या खऱ्या पोथींतहि आहे. माडगांवकरांनीं मूळांत घेतली नाहीं. पण पाठांत दिली आहे.

७. ओ. ५५२. हें असो जलतरंगा ।
नाहीं सिनानेपण जेवीं गा ।
तेवीं दिसता प्रकाशु जगा ।
आपणचि जो ॥

' तेवीं दिसता प्रकाशु जगा ' या करतां

बं. }
मा. }
सा. } ' तेवीं सत्ताप्रकाशु जगा '

' दिसता प्रकाशु ' चा अर्थ नुसत्या ' प्रकाश ' यानेंहि येतो. ' बिभर्ति ' चें व्याख्यान ' विश्व जो धरी ' असें केलें

आहे. त्या दृष्टीनें 'सत्ताप्रकाश' हा पाठ अधिक चांगला.

## अध्याय सोळावा

१ ओ. ७२. पाणी बुडऊं ये मिठातें।
तंव मिठचि पाणी आते।
तेवीं आपण जालेनि अद्वैतें। नाशे भय॥

'तेवीं आपण जालेनि अद्वैतें' या करितां

सा., बं. — वरप्रमाणे

मा., रा., ए. — 'तेवीं आपण जालेनि द्वैतें'

यापैकीं 'आपण जालेनि द्वैतें' हा पाठ बरा. तो दृष्टान्तार्शी अधिक जुळता आहे. पाण्यापासून मिठाला भीति. पण तेंच मीठ पाणी झालें कीं भय गेलें. तसें द्वैतापासून भय. तेंव आपण जालों कीं भय गेलें. दुसऱ्या पाठांत अशी स्पष्टता होत नाहीं.

२. ओ. ९१. आंतुला चित्ताचे अंगवरी।
सांडोनि प्रवृत्ति पळे परबाहेरी।
आगी सुयिजे दाहींही द्वारीं।
वैराग्याची॥

'सांडोनि प्रवृत्ति पळे परबाहेरी' या करितां.

मा., ए. — वरप्रमाणे

रा. 'प्रवृत्ति पळौनि माघारी'

बं. 'प्रवृत्ति पेलोनि माघारी'

सा. 'प्रवृत्ति पळे पर बाहेरी'

बं. पाठ बरा.

३. ओ. ३२९ ऐसेनि गा आटोपें।
थोरियें आणती पापें।
धर्मधेनु खुरपें।
सुटलें जैसे॥

मा., रा. — वरीलप्रमाणें

धर्मधेनु याचा अर्थ कांहीं कोशांत हरळी असा दिला आहे. अर्थदृष्ट्या दोन्ही सारखेंच.

४. ओ. ३८१ वरी धनाचिया मदिरा।
माजूनि धनुर्धरा।
कृत्याकृत्यविसरा। सवतें केलें॥

'कृत्याकृत्यविसरा' या करितां

रा., मा. — वरप्रमाणे

बं., सा. — 'कृत्याकृत्यविचारा'

बं. पाठ बरा. विसरा या पाठांत अध्याहृत फार घ्यावें लागतें.

५ ओ. ४६५. आणि धर्मानुज हें ऐसें।
बोधेंचि आलें आपैसें।
म्हणौनि अनारिसें। करूं नये॥

'बोधेंचि आलें आपैसें' या करितां.

ए., मा. — वरप्रमाणें

रा. 'हें बोधेंचि आलें पैसें'

बं., सा. — 'ओघेंचि आलें आपैसें।'

दोन्ही पाठ वेगवेगळ्या दृष्टीनें बरें; पण 'ओघें' पाठ अधिक बरा.

## अध्याय सतरावा

१. ओं. १. विश्वविकासित मुद्रा।
जया सोडी तुझी योगनिद्रा।
तया नमो जीवगणेंद्रा।
सद्‌गुरु तुज॥

'तया नमो जीव गणेंद्रा' या करतां

ए. वरप्रमाणें

मा. 'जी तया नमो जीव गणेंद्रा'

रा., सा., बं. — 'तया नमो जी गणेंद्रा।'

जीवगणेंद्रा हा पाठ बरा. त्यांत 'गणांची' स्पष्टता होते.

२. ओं. २. त्रिगुणत्रिपुरीं वेढिला ।
जीवत्वदुर्गीं आडिला ।
तो आत्मा शंभूनें सोडविला ।
तुझिया स्मृती ॥

'तो आत्मा शंभूनें सोडविला' या करतां
सा. वरप्रमाणें
मा. 'तो आत्मशंभू नि सोडविला'
रा. 'तो आत्मा शंभु सोडिला । तुझिया स्मृति ।'

पाठ बरा कोणाचा, हें कथानकाच्या स्वरूपावर अवलंबून राहील. प्रचलित गोष्टीप्रमाणें या ठिकाणीं त्रयींची अपेक्षा आहे. त्रिपुरांनीं वेढलेला असुर (त्रिगुणांत अडकलेला जीव), शंकर (शुद्धमायोपाधिक शिव), व गणपती (निर्गुण सद्गुरु), या त्रयींची गरज आहे, व ही त्रयी 'आत्मा शंभूनें सोडविला । तुझिया स्मृति ॥ या पाठांत मिळते. दुसऱ्या पाठांत ही त्रयी सांपडत नाहीं, म्हणून ते बरे नव्हेत.

३. ओं. ३. म्हणौनि शिवेसीं कांटाळा ।
गुरुत्वें तूंचि आगळा ।
तऱ्ही हलु मायाजळा ।
मार्जी तारूनि ॥

'तऱ्ही हलु मायाजळा । मार्जी तारूनि,' करतां
मा. } वरप्रमाणें
बं. }
रा. 'तऱ्ही हलु मायाजाळा । माजी तारिता ॥'

तारून नेण्याचा प्रसंग असल्यानें 'मायाजळ' हा पाठ रा. 'मायाजाळा' पेक्षां बरा हें उघड आहे.

४. ओं. ११४. कां जो साविया अन्नरसु सेवी ।
तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं ।
काय ज्वरु जालिया निववी ।
पयादिक ॥

'काय ज्वरु जालिया निववी । पयादिक' करतां
मा. वर प्रमाणें
रा. 'दाहक जाली निववी । पथ्यादिक'
बं. 'काय ज्वरु जालिया निववी । पयादिक'

सगळे पाठ सारखेच. चांगला अर्थ कोणच्यानेंच लागत नाहीं.

५. ओं. ११२. नाहीं विधींची तेथ चाड ।
नये मंत्रादिक तयाकड ।
अन्नजातां न सुये तोंड ।
मासिये जेवी ॥

'अन्न जातां नसुये तोंड । मासिये जेवी' करतां
मा. 'अन्न जातां नतुटे तोंड । मासिये जेवी ॥'
रा. 'अन्न तें न सुटे तोंडा । मासियेच्या ॥'

रा. पाठ बरा, कारण ह्या योगें श्लोकांतील 'अहृष्टान्नम्' या पदाचें व्याख्यान होतें.

६. ओं. ३२० हे कीर आवडतां विखीं ।
रीति सत्त्वीं आथी निकी ।
परी मोक्षेसी एकी ।
मिसळणें जें ॥

'रीति सत्त्वीं आथी निकी' करतां
मा. } पाठ वर प्रमाणें
रा. }
बं. 'शक्ति सत्त्वीं आथी निकी'

रीतीपेक्षां शक्ति पाठ बरा. फळ प्राप्त करून देण्याच्या रीतीपेक्षां 'फळ प्राप्त करून देण्याची शक्ति कर्मांत आहे,' हें म्हणणें बरें.

७. ओं. ३३२. ब्रह्माचा अबोला फिटावा ।
अद्वैतत्वें तो भेटावा ।
ऐसा मंत्रु देखिला कणवा ।
वेदें बापें ॥

'अद्वैतत्वें तो भेटावा' करतां
बं. } वर प्रमाणें
मा. }
रा. 'अद्वैतु द्वैतत्वें तो भेटावा'

या पुढच्या ओंवींत 'मागां असत ठाके । पुढां उभें' या दृष्टीनें रा. पाठ अधिक बरा.

## अध्याय अठरावा

१. ओं. ६५. मग कोता खेंव देणें ।
बार्तेवरील धांवणें ।
संडीं पडे खेळणें । नागिणीचें तें ॥

'संडीं पडे खेळणें' या करतां

मा. वरप्रमाणें
बं. ' सांडीं पडे खेळणें । '
रा. ' संडीं फडे खेळवणें । नागिणी एची ॥ '

'संडीं'–(भावे कोश) मोठी, लांबलचक. दोन्ही पाठ बरे.

२. ओ. ९४. तरी आपैसीं दांगीं डोंगर ।
झाडालि विति असार ।
तैसें लांबे राजागर । नुठिती ते ॥

' झाडालि विति असार ' याकरतां

मा. ' झाडाळी विती असार '
रा. ' झाडलीं वीति असार '
बं. ' झाडें लागती असार '
सा. ' झाडें डाळती अपार '

रा. मा. बं. पाठाच्या अर्थांत फारसा फरक नाहीं.

३. ओ. १३४. चुकलिया त्यागाचें वेझें ।
केला सर्व त्यागुही होय बोझें ।
नेदखति सर्वत्र जुंझे ।
बीतराग ते ॥

' नेदखति सर्वत्र जुंझे । बीतराग ते ' करतां

ए. वरप्रमाणें
मा. ' नेदखति सर्वत्र जुझे । वीतराग ते ॥ '
रा. ' निषिद्धेसि सर्वत्र जूझे । वीतरागां ॥ '
बं. ' निषिद्धें त्या सर्वत्र जुंझे । वीतराग ते ॥ '

रा. व बं. पाठ बरा. ए. मा. मध्यें अध्याहृत घ्यावें लागतें.

४. ओ. १७०. तैसें कर्तृत्व अहंकारें ।
नेघोनि यथा अवसरें ।
कृत्यजाताचीं निरहरें । सारीजती ॥

' निरहरें ' या करतां

ए. } वरप्रमाणें
मा. }
बं. ' मोहरें '
रा. ' मोहिरें '

निरहर म्हणजे बुद्धिबळांतील मोहरें; म्हणून अर्थांत फरक नाहीं.

५. ओ. २४६. रेचकुचि योगवशें ।
होय स्तंभावया दोषें ।
सत्यासत्य समरसें ।
असत्य जिणिजे ॥

' असत्य जिणिजे ' करतां

मा. } वरप्रमाणें
रा. }
बं. } ' सत्यासत्यचि जिणिजे ।'
सा. }

या ओंव्यांतून दोहींनाहि जिंकून तिसरेंच निर्माण होतें असें सांगावयाचें आहे. या दृष्टीनें बं. सा. पाठ बरा.

६. ओ. ३२५. जया विचाराचां देशीं ।
प्रसिद्धि गा जीवु ऐसी ।
जेणें भाष केली देहेंसी ।
आघवाविषयीं ॥

' जया विचाराचां देशीं ' करतां

मा. } वरप्रमाणें
रा. }
बं. ' जया विसराच्या देशीं '
' विसर ' पाठ बरा.

७. ओ. ४१२. तैसा कर्माकारा दुजेया ।
तो कर्तेपणाचा आत्मया ।
अबलाहो ये तें गेलया ।
कांहीं बाहीं जें उरे ॥

' अबलाहो ये तें गेलया ' करतां

मा. } वरप्रमाणें
रा. }
बं. ' आलु आला तो गेलिया '
अवलाहो म्हणजे आळ. अर्थांत फरक नाहीं.

८. ओ. ४४९. तव अंधारुचि देखावा तजें ।
मा तें फेडी हें कें बोलिजे ।
तैसे ज्ञानिया नाहीं दुजें ।
करील कायी ॥
' करील कायी ' करतां

मा. } वरप्रमाणें
रा. }
बं. ' मारील कायी '

'घात करणें' असा विषय असल्यानें 'मारील कायी' हा पाठ बरा.

९. ओ. ५४५. तैसी जया ज्ञाना ।
जाणोनि भूतव्यक्ति भिन्ना ।
ऐक्यबोधाची वासना । निमोनि गेली ॥

'वासना' करतां

मा. } वरप्रमाणें
सा. }
बं. 'भावना'

भावना म्हणजे जाणीव, कल्पना. हा पाठ बरा.

१०. ओ. ५६८. म्हणे पश्चिलेनि शरीरें ।
केलेनिसीं आत्मा विसरे ।
मा भोगावया उरे । कोण वेचें ॥

'केलेनिसीं आत्मा विसरे'—करतां

मा. }
रा. } 'केलेनसी आत्मा चि सरे'
बं. }

मा. रा. बं. पाठ बरा.

११ ओ. ६१३. कां कांजी घुसळलिया ।
कां सारखरु फुंकलिया ।
कांहीं न दिसे गाळिलिया ।
वाळु घाणां ॥

'कां सारखरु फुंकलिया'—करतां

मा. } 'कां राखोंडी फुंकलिया'
बं. }
रा. 'सारकतु फुंकलिया'

अर्थांत फार फरक नाहीं. सारखरु म्हणजे विझलेला कोळसा.

१२ ओ. ९१२. पैं जीवाचां कसीं उतरली ।
ते दासी कीं गोसांवीण जाली ।
सिसे वेंची तया मविली ।
वही जेवीं ॥

'सिसे वेंची तया मविली । वही जेवी'—करतां

बं. वरच्या प्रमाणें
मा. 'तैसी सेवेची तया मवली । वही जेवी ॥'
रा. 'तैसी सेवेची तेयां माउली । विहित जेवी ॥'

बं. पाठानें अर्थ थोडा स्पष्ट होतो; पण संतोषकारक अर्थ कोणच्याच पाठानें लागत नाहीं.

१३ ओ. ९४४. अकुळखी दांड्याचे घाये ।
परघर रिगालीहि जरी आहे ।
तरी स्वपतीतें वायें ।
सांडिलें कीं ॥

'अकुळखी' करतां

बं. वरप्रमाणें
मा. 'अगा कुळखी दांड्यांचे घाये'
रा. 'कुलखी दांडेयाचे घाए'

मा. रा. पाठ बरा.

१४ ओ. ११२८. तैसा मीचि ज्ञानद्वारें ।
दिसें परी हस्तांतरें ।
मग द्रष्टृत्वीं तें सरे ।
मियांचि मी लाभें ॥

'तैसा मीचि ज्ञानद्वारें' करतां

मा. } वरच्या प्रमाणें
ए. }
बं. } 'तैसा मीचि अज्ञानद्वारें'
रा. }

बं. रा. 'तैसा मीचि अज्ञानद्वारें' हा पाठ बरा. कारण अज्ञानाचा अंगीकार करून व्यवहार करणाऱ्या भक्तीचा विषय चालू असल्यानें अज्ञान पाठ बरा. ज्ञान पाठ घेतला तरी त्याचा अर्थ 'अन्यथाज्ञान'च करावा लागतो.

१५ ओ. १५७६. यया अर्जुनाचिया बोला ।
देवो नाचे सुखें भुलला ।
म्हणे विश्वफळा जाला ।
सफळा फळ हा मज ॥

'सफळा फळ हा मज' करतां

मा. वर प्रमाणें
रा. 'लाभु हा मज'
बं. } 'फळ हा मज'
सा. }

बं. सा. पाठ चांगला. देव म्हणतात मी विश्वफळ, तर हा माझा शिष्य माझ्यासारखा झाला म्हणजे फळाला फळ आलें.

मा. व मूळ पोथींत 'सफळा' अधिक वाटतें. रा. पाठापेक्षां बं. सा. पाठ अधिक बरें.

१६ ओं. १६४३. ते पाषाणही आघवे ।
चिंतारत्नें कां नोहावें
तिये भूमिके का न यावें ।
चैतन्यत्व ॥

'चैतन्यत्व' करतां

मा. } वरप्रमाणें
ए. }

बं. }
रा. } 'सुवर्णत्व'
सा. }

दोन्ही पाठानें अर्थ लागतो; पण 'चैतन्यत्व' ह्यामागें चिंतारत्नें हा शब्द आहे त्या दृष्टीनें तो पाठ बरा.

१७. ओं. १६७०. कीं सभाग्य संतीं भ्रमरीं ।
केलें ते श्लोक कल्हारीं ।
श्रीकृष्णाख्यसरोवरीं ।
सासन्नली हे ॥

( मुळांत चुकून 'केलें श्लोक कल्हारी' छापलें आहे. )

'केलें ते श्लोक कल्हारी' करतां

मा. } वरप्रमाणें
रा. }

बं. 'सेविलीं श्लोककल्हारीं'

दोन्ही पाठ सारखेच.

१८. ओं. १७२२. तैसा व्यासाचा मागोवा घेतु ।
भाष्यकारातें वाट पुसतु ।
अयोग्यही मी न पवतु ।
कें जाईन ॥

'भाष्यकारांतें' या करतां

बं. } वरप्रमाणें
रा. }

मा. } 'भाष्यकारातें'
ए. }

मा. ए. पाठांत 'भाष्यकारातें' या शब्दांत 'रा' वर अनुस्वार नाहीं.

१९. ओं. १८०२. ऐसें युगीं परी कळीं ।
आणि महाराष्ट्रमंडळीं ।
श्रीगोदावरीचां कूलीं ।
दक्षिणिली ॥

'दक्षिणिली' याकरितां

मा. } 'दक्षिणिलीं'
रा. }

बं. } 'दक्षिणलिंगीं'
सा. }

'दक्षिणिलीं' पाठ बरा.

'दक्षिणलिंगीं 'चाहि अर्थ दक्षिण तीरावर करतात. पण 'कूलीं' असा मागें शब्द आहेच.

२० श्रीएकनाथांच्या या चार ओंव्या झाल्यावर बहुतेक छापील पोथ्यांतून खालील ओंवी आढळते.

'ज्ञानेश्वरी पाठी । जो ओंवी करील मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ।'

ही ओंवी आम्ही मूळ घेतलेल्या पोथींत नाहीं. तसेंच श्रीएकनाथांच्ही आज जी पोथी आहे तींतहि मूळांत ती नाहीं. तींत मागाहून कोणीतरी ती लिहिली आहे.

मा. यांनीं क, ग, च, छ, ढ या पोथ्यांतील चार ओंव्या अधिक दिल्या आहेत. त्या आम्हीं छापलेल्या पोथीप्रमाणेंच आहेत. त्यांतहि ही ओंवी नाही.

बं. व सा. या पोथ्यांतून आहे.



# कांहीं पौराणिक कथानकें

अ. १-२७.

## जनमेजयाचे अवलीळा दोष हरले ।

जनमेजय राजानें, आपला पिता परीक्षिती हा सर्पदंशानें मरण पावला म्हणून, त्याचा सूड उगविण्याकरितां सर्पसत्र आरंभिलें व त्या यज्ञांत सर्पांच्या आहुत्या पडूं लागल्या; पण मुख्य तक्षकाची आहुति पडेना. कारण त्याला इंद्राचें सहाय्य मिळालें होतें. इंद्रानें ब्राह्मणवेष धारण करून जनमेजयाकडे याचना केली व तक्षकाला जीवदान मिळविलें.

इंद्रानें अशा रीतीनें आपणांस फसविलें म्हणून त्याचे मनांत सर्व ब्राह्मणवर्गाविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन त्यानें त्यांना आपल्या राज्यांतून हाकलून दिलें. ही हकीकत व्यासांना कळतांच त्यांना अत्यंत वाईट वाटलें. जनमेजयाच्या घराण्याचा व्यासांना फार अभिमान होता व त्या घराण्याचा उत्कर्ष व जयजयकार व्हावा अशी त्यांना फार इच्छा होती; म्हणून त्यांनीं आपल्या दोन शिष्यांना जनमेजयाच्या पूर्वजांचा इतिहास ज्याच्यांत आहे असे भारत त्यास वाचून दाखविण्यासाठीं पाठविलें; परंतु जनमेजयानें उन्मत्तपणानें त्या शिष्यांचा अपमान करून आपल्या पूर्वजांचीच निंदा केली. शिष्यांना याचा राग येऊन 'या तुझ्या निंदेमुळें तूं कुष्ट रोगानें ग्रस्त होशील.' असा त्यास शाप दिला. पुढें खुद्द व्यासांनीं त्यास 'तूं एका विशिष्ट दिशेला जाऊं नकोस, तेथें स्त्री भेटेल तिच्याशी लग्न करूं नकोस, तिच्या सल्ल्याप्रमाणें वागूं नकोस;' वगैरे उपदेश केला; परंतु त्या उपदेशाविरुद्ध वागून जनमेजयानें विवाह केला व त्या राणीच्या सल्ल्यानुसार वागूं लागला. राणीनें सांगितल्यावरून पिपीलिका पर्वतावर त्यानें नरयाग आरंभिला व त्या यज्ञांत खुद्द इंद्राचीही आहुति पडण्याची पाळी आली, तेव्हां इंद्र भगवंताला शरण गेला.

भगवंतांनीं यज्ञ करणाऱ्या अठरा ब्राह्मणावर मोहिनी घातली, व त्यामुळें यज्ञकार्य बंद पडून यज्ञकुंडें विझून गेलीं. हा प्रकार राजाराणीस समजतांच तीं दोघे यज्ञमंडपांत आलीं व पहातात तों ब्राह्मण निद्रिस्त आहेत असे दिसलें. राणीच्या सल्ल्यानुसार त्यानें ब्राह्मणाच्या अंगावर थंड पाण्यानें सिंचन केलें; परंतु त्या जलकणांची भयंकर शस्त्रें होऊन त्यांनीं ते अठरा ब्राह्मण शतखंड झाले व तो कुष्ठ रोगानें व्यापला गेला. तो प्रकार पाहून जनमेजय भयभीत होऊन दुःख करूं लागला व त्यानें व्यासांचा धांवा केला. 'तूं आपल्या पूर्वजांची निंदा केलीस आणि भारत ऐकलें नाहीस म्हणून ही आपत्ति तुझ्यावर आली आहे; तर तूं आता भगवंताला प्रसन्न करून घे, असें व्यासांनीं त्यास सांगितल्यावरून त्यानें भगवंताचे ध्यान करून त्यास प्रसन्न करून घेतलें.

भगवंतांनीं 'तूं जनमेजयास भारत वाचून दाखव म्हणजे तो ब्रह्महत्येच्या व कुष्ठरोगाच्या आपत्तींतून मुक्त होईल' असे व्यासास सांगितलें. मग व्यासांनीं ती अठरा प्रेतें मंडपांत आणून अठरा हात कृष्णवर्णाचें वस्त्र मध्यें धरून पलीकडे जनमेजयाला बसविलें व वैशंपायन ऋषींकडून त्यास भारत ऐकविलें. प्रत्येक पर्वाबरोबर एकेक ब्राह्मण जिवंत होऊन एकेक हात कृष्णवस्त्र पांढरें होत गेलें. अशा रीतीनें संपूर्ण अठरापर्वें भारत ऐकल्यावर ते अठराही ब्राह्मण जिवंत झाले, ते सर्व वस्त्र पांढरें झालें व राजाचा कुष्ठ रोग संपूर्ण नाहींसा झाला.

---

अ. १-६८.

## कीं टिटिभू चांचुवरी । माप सूये सागरीं ।

एकदां एका टिटवी पक्षिणीनें आपली अंडीं समुद्राच्या कडेला कपारींत नीट ठेविलीं होतीं. तीं एका वेडकीनें गिळून समुद्रांत जाऊन बसली. तेव्हां टिटवा व टिटवी दुःखीत होऊन ती समुद्राला आपली अंडी परत मागूं लागली, परंतु तो तीं देईना; तेव्हां त्यांनीं समुद्र कोरडा करून आपली अंडी मिळविण्यासाठीं चंग बांधला. आपल्या चोंचींतून समुद्राचें पाणी ती उपसूं लागली. असे कित्येक दिवस त्यांचें हें काम चालूं होतें. ज्ञानेश्वर महाराजांनीं आपला गीतार्थाचा प्रयत्न, या टिटवीनें समुद्र उपसण्यासारखा आहे असें विनयानें म्हटलें आहे.

---

अ. १–१४१.

## ध्वज स्तंभांवरी वानरु ।

कुरुक्षेत्रावरील लढाईचे कांहीं दिवस आधीं श्रीकृष्ण व अर्जुन हे यमुनेच्या कांठीं फिरावयास गेले असतां अर्जुनानें आपल्या धनुर्विद्येच्या गर्वानें फुगून जाऊन श्रीकृष्णाला म्हटलें 'कृष्णा, रामाला पूर्वी लंकेत जाण्यासाठीं सेतू बांधण्याची एवढी कां जरूरी पडली ? त्याला बाणाचा पूल उभारता कां आला नाहीं. यावरून राम धनुर्विद्येंत इतका निष्णात नसावा.' अर्जुनाचा गर्व हरण करण्याची बरी संधि चालून आली आहे हें पाहून भगवान म्हणाले. 'अरे अर्जुना, रामाचें सैन्य शरीरानें फार धिप्पाड होतें. बाणाचा पूल त्याच्या वजनापुढें टिकला नसता.'

यावर अर्जुनानें 'मी कसल्याही परिस्थितींत टिकणारा पूल बाणांनीं तयार करतों. रामाचें सामर्थ्य नसेल पण माझें आहे, श्रीकृष्ण म्हणाले 'फार कशाला, रामाच्या सैन्यापैकीं एक हनुमान अद्यापि आहे. तूं बाणांचा पूल तयार कर व हनुमानाला पलीकडे घेऊन जा.' असें म्हणून हनुमंताला बोलावून आणलें. अर्जुनानें बाणांचा पूल यमुनेवर तयार केला. हनुमान त्यावरून जाण्यास धजेना, तेव्हां भगवान मुद्दाम म्हणतात 'अर्जुना तुझा पूल भरभक्कम आहे ना ! हनुमान जाण्यास धजत नाहीं.' मग श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून हनुमान पुलावरून जाण्यासाठीं एक पाय ठेवतात न ठेवतात तोंच तो पूल एकदम खालीं आला. अर्जुनानें लज्जित होऊन धनुष्य बाण टाकले व भगवंताला शरण आला.

मारुतीरायाला आपल्या सामर्थ्याचा गर्व होऊं नये म्हणून भगवंतानीं अर्जुनाला पुनः बाणांचा पूल तयार करावयास सांगून त्या खालीं आपलें सुदर्शन चक्र घातलें. या वेळीं हनुमान कितीहि उड्या मारीत गेले तरी पुलाला कांहीं झालें नाहीं. मारुतिराय हरले व त्यांनीं, अर्जुन जेव्हां बोलावील तेव्हां त्याचे मदतीला येण्याचें आश्वासन दिलें. तेव्हां भारतीय युद्धाचें वेळीं 'माझे रथावर आपण येऊन बसा' असें अर्जुनानें सांगितल्यावरून मारुतिराय ध्वजस्तंभावर येऊन बसले.

---

अ. १–२००.

## जेणें संग्रामीं हरु जिंतिला ।

वनवासांत असतांना अर्जुनानें पाशुपतअस्त्राच्या प्राप्तीसाठीं तप आरंभिलें व शंकरांची आराधना केली. शंकरांनीं त्याची परीक्षा पाहण्यासाठीं आपल्या गणांतील एकाला वराह करून आपण किरात ( भिल्ल ) झाले व त्या वराहाच्या शिकारीमागें लागले. वराहानें मुद्दाम अर्जुनाला धुसंडी मारून त्यालाहि शिकारीस उद्युक्त केलें. अर्जुनाच्या व शंकरांच्या बाणांनीं वराह मृत होऊन पडल्यावर किरात आणि अर्जुन यांच्यामध्यें वराह कोणाचा याबद्दल भांडण जुंपलें व प्रकरण हातघाईवर आलें. या लढाईत अर्जुनाचा पराक्रम चांगला दिसून आला. तेव्हां शंकर प्रसन्न होऊन त्यांनीं अर्जुनाला पाशुपतास्त्र दिलें.

---

अ. १–२००

## निवातकवचांचा ठावो फेडिला ।

प्रल्हादाचा भाऊ संन्हाद याला निवात आणि कवच असे दोन महापराक्रमी मुलगे होते. हे समुद्रतीरीं राहात असून इंद्रालाहि अजिंक्य झाले होते. तेव्हां इंद्रानें यांना मारण्यासाठीं अर्जुनाची मदत मागितली व त्याला सर्व युद्धसाहित्य पुरविलें. हे राक्षस मायावी होते तरी अर्जुनानें मोठ्या हुषारीनें यांना ठार केलें, व इंद्राकडून वाहवा मिळविली.

---

अ. २–१०.

## पवाडा तुवां केला । गंधर्वांसी ॥

अर्जुनानें अनेक गंधर्वांचा पराभव केला आहे. एकदां अंगापर्ण नांवाचा गंधर्व आपल्या स्त्रियांसह रात्रीं विलास करीत असतां त्या बाजूनें पांडव द्रौपदीस्वयंवरासाठीं गुप्तपणें चालले होते. तेव्हां अंगारपर्णानें 'रात्रीं कोठें चालला ?' म्हणून त्यांना दटावलें व आडवून धरलें. पांडवांनीं त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न केला. पण तो त्या गंधर्वाला पटला नाहीं; तेव्हां अर्जुनानें त्याला युद्धास पाचारलें व त्यांत त्याचा पराभव केला. तेव्हां त्या गंधर्वानें अर्जुनाला सूक्ष्मपदार्थदर्शक चाक्षुषीविद्या देऊन त्याच्याशीं स्नेह केला.

उत्तरदिशा दिग्विजयाच्या मोहिमेंत अर्जुनानें गंधर्वांनीं रक्षित असा देश जिंकल्याचें वर्णन सभापर्वांत आहे. चित्रसेन गंधर्वापासून अर्जुनानें गीतनृत्यकला संपादन केली. ती त्याला विराटगृहीं असतांना उपयोगी पडली.

---

अ. २-३८.

**तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ॥**

शंकराच्या भस्मापासून एक राक्षस उत्पन्न झाला; म्हणून त्याचें नांव भस्मासुर असें पडलें. त्यानें शंकराची आराधना करून असा वर मिळवला कीं, मी ज्याच्या डोक्यावर हात ठेवीन तो भस्म व्हावा. या वरामुळें उन्मत्त होऊन भस्मासुर सर्व प्राणिमात्रांस फार त्रास देऊं लागला. एकदां नारदांच्यावरच हा प्रयोग करण्यास प्रवृत्त झाला असतां नारदानें त्याचा नाश करण्याची युक्ति योजिली व त्यास सुचविलें कीं, 'आम्हां गरिबांना मारून काय मिळवतोस ? शंकरांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांना भस्म कर व सौंदर्यशाली पार्वतीचा लाभ करून घे.'

हें ऐकतांच भस्मासुर लोभानें ग्रस्त होऊन शंकराचे मागें लागला. पुढें विष्णूनें मोहिनीचें रूप धरून त्याचा नाश केला.

या कथेस अनुसरून अर्जुन म्हणतो कीं 'देवा, ज्या गुरुजनांनीं माझ्यावर उपकार केले आहेत त्यांच्यावरच उलटण्यानें मी भस्मासुरासारखा पाप करूं काय ?'

---

अ. ३-१५२.

**देख पां जनकादिक । कर्मजात अशेख ।**
**न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥**

जनकराजा मिथिला नगरींत राहून राज्य करीत असे. त्याचे सर्व व्यवहार लौकिकाप्रमाणें चालून देखील आत्मज्ञानसंपन्न असल्यामुळें तो त्यांत आसक्त नव्हता, त्यामुळें कर्म करूनही तो मुक्तअवस्था भोगीत होता.

---

अ. ३-१६३.

**मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवां पवाडा देखिला ।**

कृष्ण-बलराम अवंती नगरींत रहात असलेल्या संदीपनि नामक आचार्यांजवळ धनुर्वेद शिकण्यासाठीं राहिले. त्यांच्यापासून त्यांनीं सर्व वेदवेदांगांचेंहि पूर्ण अध्ययन केलें. परत घरीं जातांना, "आपणास कोणती गुरुदक्षिणा द्यावी ?" असें संदीपनींना कृष्णानें विचारलें. गुरुचा दत्त नांवाचा एकुलता एक मुलगा समुद्रांत बुडून मेला होता तो परत मिळण्याविषयीं त्यानें इच्छा व्यक्त करतांच कृष्ण-बलराम गुरुपुत्राच्या शोधार्थ यमलोकीं गेले आणि यमधर्माचा पराभव केला व पुत्र परत आणून गुरूंच्याकडे पोंचता केला. हा कृष्णाचा पराक्रम अद्भुत व अलौकिक होता.

---

अ. ५-११.

**पाहे पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्युचिया आर्ता । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचि ना ॥**

उपमन्यु हा वसिष्ठकुलांतील व्याघ्रपादाचा वडील मुलगा; धाकट्याचें नांव धौम्य. घरची अत्यंत गरिबी; तेव्हां साहजिकच आई या दोघांना पाण्यांत पीठ कालवून देत असे. एकदां दुसऱ्याच्या घरीं दोघे खेळावयास गेले असतां तेथील मुलांबरोबर यांनाहि ताजें काढलेलें दूध देण्यांत आलें. हा वेळपावेतों उपमन्यूनें खऱ्या दुधाची चव घेतलीच नव्हती. तेव्हां घरीं आल्यावर हा दुधासाठीं हट्ट धरून बसला. नेहमीचें पीठपाणी तो घेईना. आईनें वैतागून म्हटलें कीं, खरें दूध मिळण्याजोगें तुमचें पूर्वजन्मीचें ईश्वराराधन नाहीं; तेव्हां कोठून मिळणार ! हें ऐकून उपमन्यूनें कडक तपाचरण सुरू केलें व शंकराला प्रसन्न करून घेतलें. शंकरानें दुधाची याला सदैव प्राप्ति व्हावी म्हणून क्षीरसमुद्र (दुधाचा सागरच) त्याला बहाल केला.

---

अ. ९-३९२.

**गरुडासारिखीं वाहनें ।**

विष्णूचें वाहन, अत्यंत गतिमान् असा गरुड होय. हा गरुड कश्यप ऋषींना विनतेच्या पोटीं झालेला दुसरा मुलगा. यानें स्वर्गलोकींहून अमृत आणून दिलें व आपल्या आईला सवतीच्या दास्यांतून मुक्त केलें. अमृत वाहून नेत असतां यानें त्यांतील एक बिंदूहि चाखला नाहीं, हें पाहून विष्णू प्रसन्न होऊन त्यांनीं अमृतावेरीज अमरत्व त्याला दिलें. त्यानें विष्णूची सेवा करण्याची तीव्र मनीषा

दाखविली असतां, " तूं माझें वाहन व्हावेंस. " असें सांगितलें.

---

अ. ९–३९४.

**मी सुदामयाचिया सोडीं गांठी । पव्हयां लागीं ॥**

सुदामा नांवाचा एक अत्यंत दरिद्री ब्राह्मण कृष्णाचा बालपणाचा मित्र होता. कृष्ण द्वारकेंत वैभवाच्या शिखरीं पोंचले तरी हा दारिद्यांत दिवस काढीत होता. पण कृष्णाजवळ कांहीं याचना करावी असें त्याच्या मनांत मुद्दां येईना. बायकोनें अनेकवार आग्रह केल्यावर हा कृष्णाकडे जाण्यास तयार झाला. बरोबर कांहीं भेट घेणें अवश्य पण जवळ तर कांहीं नाहीं; तेव्हां काय न्यावें हा विचार पडला. तेव्हां बायकोनें थोडे पोहे उसनें आणून त्याच्या फाटक्या धोतरांत बांधले. द्वारकेला पोंचल्यावर कृष्णानें याचें चांगलें आतिथ्य केलें व वहिनीनें मला काय दिलें आहे तें दाखवा पाहूं, म्हणून सुदाम्याच्या धोतराची गांठ सोडून त्यांतील पोहे आवडीनें खाले. नंतर सुदामा कांहीं न मागतां परतला व घराजवळ येतो तों त्याला सोन्याची सुदामनगरी दिसली. कृष्णानें पोह्याच्या मोबदला ती त्याला नकळत दिली होती.

---

अ. ९–४४२.

**पाहें पां सावजें हातिरू धरिलें ।**

एकदां इंद्रद्युम्न राजाला, 'तूं गजयोनि पावशील' असा अगस्तिऋषीनें शाप दिला होता. तसाच शाप देवऋषीनें हूहू गंधर्वास दिल्या कारणानें तो नक्र झाला होता. या दोघां पशूंची पुष्कर तीर्थांवर अचानक गांठ पडली तेव्हां नक्रानें गजाला धरलें. आतां आपण वांचत नाहीं हें पाहून गजेंद्रानें विष्णूचा धांवा मांडला व त्याला अर्पण करण्याकरतां अखेरचें म्हणून एक कमलपुष्प सोंडेनें तोडून वाहिलें. तेव्हां विष्णु प्रसन्न होऊन त्याला सोडविण्यासाठीं गरुडावर बसून आले व नक्राला मारून भगवंतानें गजेंद्राला मुक्त केलें व त्या बरोबरच नक्रहि विष्णुस्पर्शानें शापमुक्त झाला.

---

अ. ९–४५०.

**माझें नृसिंहत्व लेणें । जयाचिये महिमे ॥**

महान् पराक्रमी हिरण्यकशिपूदैत्याला कयाधू राणीपासून प्रल्हाद मुलगा झाला. हा गर्भामध्यें असल्यापासूनच भगवद्भक्त होता. हा जन्मल्यानंतर त्याला हरिनामाखेरीज कांहींच प्रिय नव्हतें. त्यानें विष्णुभक्ति सोडावी म्हणून बापानें त्याला छळलें, विष दिलें, कड्यावरून खालीं लोटलें, अशा नानाप्रकारांनीं त्याला त्रास दिला, परंतु प्रल्हाद भक्ति करण्याचें सोडीना. त्याच्या बापानें त्याला विष दिलें पण तें त्यास बाधा करू शकलें नाहीं; कारण भगवानच विष होत राहिले. शेवटीं, 'तुझा देव कोठें आहे तो दाखीव म्हणजे त्याला ठार करतों' असें बापानें विचारतां, 'देव जगांत सर्वत्र भरला आहे' असें प्रल्हादानें उत्तर केलें. 'सर्वत्र भरला आहे तर या खांबांत आहे कां?' असें म्हणून खांबावर लाथ मारतांच त्यांतून विष्णूचा नरसिंहावतार प्रगट झाला.

या हिरण्यकशिपूनें ब्रह्मदेवापासून असा वर मिळविला होता कीं, घराच्या आंत-बाहेर, दिवसां रात्रीं, नर आणि पशु, शस्त्र आणि अस्त्र, सजीव आणि निर्जीव पदार्थ इत्यादिकांपासून मला मृत्यु नसावा. या वरामुळें आपण मृत्यु पासून निर्भय आहों असें तो समजत होता. संध्याकाळीं उंबऱ्यावर बसून, नखांनीं नरसिंहरूपी विष्णूनें त्याला ठार मारलें व प्रल्हादाचें रक्षण केलें. प्रल्हादचरित्र इतकें पावन आहे कीं तें वर्णिल्यानें ईश्वरभक्तीपासून मिळणारें फल मिळतें.

---

अ. ९–४६६.

**नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचे काय कंसें? ।**

'कोणत्याहि बुद्धीनें माझी भक्ति केली असतां मी पावतों' असें सांगतांना भगवान अनेक भक्तांचीं उदाहरणें देत आहेत. यदुकुलांतील उग्रसेन राजाचा पुत्र कंस याला देववाणीनें बजावलें होतें कीं 'तुझी (चुलत) बहीण देवकी हिचा आठवा मुलगा तुला मारील.' तेव्हां कंसानें देवकीला बंदींत ठेवून तिचीं सात मुलें मारलीं, पण आठव्याच्या वेळीं देवकीचा पति वसुदेव यानें मुलगा जन्मतःच तो गोकुळांत पोंचविला पुढें कंसाला हें कळून

त्यानें गोकुळांत वाढणाऱ्या कृष्णाला मारण्यासाठीं अनेक राक्षस पाठविले. शेवटीं अक्रुराला पाठवून कृष्णाला मथुरेंत आणलें व त्याच्या अंगावर बलवान् मल्ल सोडले. कृष्णानें त्यांना मारून कंसाचाहि शिरच्छेद केला. या कंसाला जळीं-स्थळीं-पाषाणीं आपला वैरी कृष्ण दिसत असे. त्याची ही विरोधी भक्ति होती व तो कृष्णभक्तीनेंच शेवटीं मुक्त झाला.

---

अ. ९-४६६.

### कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ॥

चेदि देशाचा राजा दमघोष याचा मुलगा शिशुपाल (चैद्य) हा कृष्णाचा आतेभाऊ. शिशुपाल जन्माला आला तेव्हां त्याला तीन डोळे व चार हात होते. हें विचित्र मूल टाकून देण्यास आईबाप सिद्ध झाले असतां, आकाशवाणी झाली कीं, हा फार पराक्रमी होईल. याच्या शत्रूच्या मांडीवर ठेवलें असतां याचे दोन हात व तिसरा डोळा नाहींसा होईल. पुढें कृष्ण आत्याबाईकडे मुलगा पाहण्यास आला असतां, त्यानें शिशुपालाला मांडीवर घेतल्याबरोबर शिशुपालाचे हात व डोळा गळून पडले. तेव्हां उघडच कृष्ण हा मृत्युवैरी ठरला. हें पाहून आत्याबाईनें कृष्णापासून वचन घेतलें कीं शंभर अपराध भरेपर्यंत याला मारूं नये. पुढें यानें कृष्णाचे अपराध केले. रुक्मिणीशीं विवाह करण्यास हा उद्युक्त झाला होता. धर्माच्या राजसूय यज्ञांत कृष्णास अग्रपूजेचा मान मिळाल्याचें पाहून याचें पित्त खवळलें व हा त्याला भलभलत्या शिव्या देऊं लागला. तेव्हां कृष्णानें याचे शंभर अपराध भरले असे बजावून सुदर्शनानें याचा शिरच्छेद केला व मुक्ति दिली.

---

अ. ९-४६८.

### अक्रूराः—

अक्रूर हा सात्वतवंशांतील श्वफल्क राजाचा मुलगा. कृष्ण आणि बलराम यांना गोकुळांतून मथुरेस आणण्यास कंसानें यालाच पाठविलें होतें. हा मोठा भगवद्भक्त होता.

---

अ. ९-४७९

### जयांचेनि गा बोलें । अग्नीसि आयुष्य जाहलें ।

एकदां श्वेतकीराजानें एका यज्ञांत बारा वर्षें अग्नीमध्यें अखंड घृतधारा धरल्या. त्यामुळें अग्नीला जाड्य झालें असतां 'अनेक औषधींनीं युक्त अशा खांडववनाचें भक्षण केल्यास तें जाईल' असें ब्रह्मदेवानें त्यास सांगितल्यावरून हा कृष्णार्जुनाकडे खांडववन मागण्यास गेला. तो मुद्दाम ब्राह्मणवेषानें गेल्यामुळें त्यांनीं तें देण्याचें आश्वासन देऊन त्यासाठीं इंद्राशींहि युद्ध केलें. हें वन भक्षण करून अग्नि जाड्यमुक्त झाला.

---

अ. ९-४७९.

### म्हणोनि समुद्रें पाणी आपुलें ।
### दिधलें याचिया प्रीतीं ।

समुद्राच्या पोटांतील वडवाग्नि हा समुद्रांत राहून त्याचें जल शोषण करीत असतो व समुद्र त्याला नवीन जल देत असतो.

---

अ. ९-४८०.

### आझुनि पाउलाची मुद्रा ।
### मी हृदयीं वाहे गा सुभद्रा ।

भृगुऋषि हे ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकीं एक असून भृगुकुल फार उच्च आहे. ब्रह्मा-विष्णु-महेश यांमध्यें श्रेष्ठ कोण हें ठरविण्यासाठीं त्यांनीं सर्वांची प्रचिति पाहिली. ब्रह्मा आणि शंकर या दोघांना त्यांच्या उद्धटपणाचा फार राग आला. पण विष्णूला लाथ मारली असतांनाहि ते मुळींच रागावले नाहींत; तर उलट भृगुऋषींच्या पायाला लागलें असेल म्हणून पाय चुरीत राहिले व छातीवर झालेली जखम भूषण म्हणून अद्यापि मिरवीत असतात.

---

अ. ९-४८६.

### जेथ निववील ऐशिया आशा ।
### हरें चंद्रमा आधा ऐसा ।

समुद्र मंथनांतून चौदा रत्नें निघालीं त्यांतच हालाहल असें हें अत्यंत दाहक विष निघालें. तें जग जाळीत सुटलें असतां, शंकरावांचून तें कोणी स्वीकारणार नाहीं; असें

जाणून देव शंकराकडे गेले. शंकरानें जगाच्या कल्याणासाठीं तें प्राशन केलें; पण त्याचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. अंगाची सारखी आग होऊं लागली, कंठ निळा पडला, तेव्हां शीतलतेचा एक उपाय म्हणून मस्तकावर चंद्राची कोर शंकरानें धारण केली.

---

अ. ९–५०२.

## जिये लोकींचा चंदु क्षयरोगी ।

सोम ( चंद्र ) हा अत्रिऋषीचा पुत्र. यानें रोहिणीसह प्राचेतस दक्षाच्या साठ कन्यांशीं लग्न केलें होतें. पण त्याला रोहिणीच सर्वांत अधिक आवडे, व तिला बुध नांवाचा पुत्रहि झाला. तेव्हां इतर पत्न्यांनीं आपला पिता जो दक्ष त्याच्याकडे चंद्राच्या सापत्न्यभावाविषयी तक्रार नेली. तेव्हां दक्षानें जांवयाला शाप दिला कीं, तूं क्षयी होशील. तेव्हांपासून चंद्राच्या कला कमी अधिक होत असतात.

गुरुपत्नी तारा हिचें हरण केल्यामुळें बृहस्पतीनें याला क्षयाचा शाप दिला अशीहि कथा आहे.

---

अ. १०–१८.

## ' उत्तानचरणाचिया बाळा । काय ध्रुवपदींचाड ' ॥

उत्तानपाद राजाला सुनीति व सुरुचि अशा दोन स्त्रिया होत्या. सुरुचि,राजाची धाकटी पण आवडती राणी होती. वडील राणीचा पुत्र ध्रुव व धाकट्या राणीचा पुत्र उत्तम हा होता. एकदां राजा, उत्तमाला मांडीवर घेऊन सिंहासनावर बसला असतां ध्रुव बाळ तेथें आला व तो बापाच्या दुसऱ्या मांडीवर बसला. तें पाहून सुरुचीला राग आला. तेव्हां तिचा राग घालविण्यासाठीं ध्रुवाला राजानें मांडीवरून खालीं ढकलून दिलें. तो रडत रडत आपल्या आईकडे ( सुनीतिकडे ) गेला. तेव्हां तिच्या सांगण्यावरून वडिलांच्या मांडीवर बसावयास मिळावें म्हणून ध्रुवबाळ वनांत जाऊन परमेश्वराची प्रार्थना करूं लागला. कांहीं काळानें नारदमुनींनीं तेथें येऊन त्याच्यावर अनुग्रह केला व द्वादशाक्षरी मंत्राचा उपदेश केला. त्याप्रमाणें अनुष्ठान केल्यावर त्यास भगवंतानीं बापाची मांडीच काय पण कायमचें अढळपद दिलें. तें पद अद्यापि नक्षत्ररूपानें आकाशांत अढळ आहे.

---

अ. १०–३६.

## अहो एकाची काठी तपिन्नली ।

वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्यांतील स्पर्धा सुप्रसिद्ध आहे. विश्वामित्र ब्रह्मर्षि आहे कीं नाहीं हें ठरविण्यासाठीं सूर्य, समुद्र आणि मेरुपर्वत यांना साक्षीस घेऊन येण्याविषयीं ब्रह्मदेवानें विश्वामित्रास सांगितलें पण तो त्यांना आणूं शकला नांहीं. तेव्हां वसिष्ठानेंच या तिघांची प्रतीकें निर्माण केलीं. आपली छाटी त्यांनीं हांथरली असतां सूर्यप्रकाश तींतून येऊं लागला; कमंडलूंतून समुद्राप्रमाणें पाणी वाहूं लागलें; व दंड हा पृथ्वीचा भार वाहण्यास मेरूसारखा समर्थ झाला. असें हें वसिष्ठाचें अचाट सामर्थ्य होतें.

---

अ. १०–३६.

## एकीं सृष्टीवरी सृष्टी केली ।

त्रिशंकु राजास सदेह स्वर्गास जावयाचें होतें; पण त्याला वसिष्ठांचा ' चांडाल होशील ' म्हणून कांहीं कारणानें शाप होता; तेव्हां विश्वामित्रानें त्याच्यासाठीं विशिष्ट यज्ञ केला असतांहि त्याला स्वर्गांत घेण्यास इंद्र कबूल होईना व खालून विश्वामित्रानें वर चढविलें होतें. अशा रीतीनें त्रिशंकु अधांतरी लोंबकळत राहिला. त्याची ही दुःस्थिति पाहून विश्वामित्रानें दुसरीच सृष्टी निर्माण करण्यास सुरवात केली. शेवटीं इंद्रानें विश्वामित्राची समजूत घालून ती सृष्टी बंद करविली.

---

अ. १०–३६.

## एकीं पाषाणीं बाउनि उतरलीं । समुद्रीं कटकें ॥

रावणाशीं युद्ध करण्यासाठीं लंकेस जाण्याचें रामानें योजून नलास समुद्रावर सेतु बांधण्यास आज्ञा केली. समुद्रांत दगड बुडूं लागले व सेतु तयार होईना; पण रामाचें नांव घेऊन जेव्हां दगड समुद्रांत टाकावा तेव्हां तो तरंगूं लागावा, असें पाहून वानरांनीं लाखों दगड

रामनामानें समुद्रांत टाकले व पूल तयार केला. या तरंगणाऱ्या पुलावरून ससैन्य राम-लक्ष्मण लंकेंत सुवेलाचलीं गेले.

---

अ. १०–३७.

### एकीं आकाशीं सूर्यातें धरिलें ।

अंजनीच्या पोटीं मारुतीचा जन्म झाला तेव्हां आकाशांत लाल सूर्यबिंब तळपत होतें. तें फळ आहे अशा समजुतीनें बालमारुति तीनशें योजनें आकाशांत उडाला व सूर्यमंडलाकडे चालला. हा सूर्याला ग्रासणार हें पाहून इंद्रानें याच्यावर वज्रप्रहार केला; तेव्हां मारुति मूर्च्छित होऊन खालीं पडला. पण मारुतीचा पिता मारुत ( वायु ) याच्या कोपाला भिऊन इंद्रादि देवांनीं मारुतीची स्तुति करून त्यास सावध केलें व वज्रापासून कांहीं पीडा होणार नाहीं असा वर दिला. इंद्राचें वज्र हनवटीला लागून ती तुटली म्हणून याला हनुमान् नांव पडलें.

---

अ. १०–३७.

### एकीं चुळींचि सागरातें भरिलें ।

इंद्रानें वृत्रासुराला मारल्यानंतर त्याचे अनुयायी राक्षस समुद्रांत लपले. ते रात्री बाहेर निघून ऋषींना खाऊन टाकीत. त्यांच्या भीतीनें ऋषिजन घरांत लपून बसूं लागले. त्यांचीं यज्ञादिक कर्में होईनातशीं झालीं. तेव्हां ब्रह्मदेवानें त्यांना अगस्त्य ऋषीकडे जाण्यास सांगितलें. अगस्त्यानें त्यांच्यावरील मोठें संकट लक्ष्यांत घेऊन तपोबलानें संपूर्ण समुद्र एका आचमनांत खलास केला. त्यामुळें आंतले राक्षस नाश पावले. पुढें अगस्त्यानें प्राशन केलेलें पाणी समुद्रांत सोडून दिलें.

---

अ. १०–२२९.

**त्रिभुवनींचिया सेनापतीं ।**
**आंत स्कंदु तो मी महामती ।**
**जो हरवीर्यें अग्निसंगती ।**
**कृत्तिकाआंतु जाहला ॥**

हिमालयावरील शिवपार्वतींचें क्रीडावन शरवण नांवाचें आहे. या वनांत शिवाचें रेत एकदां स्खलन ( पतन ) पावलें असतां तें पुढें कांहीं कालपर्यंत गंगेनें, नंतर अग्नीनें व शेवटीं सहा कृत्तिकांनीं धारण केलें व शिवपुत्राला जन्म दिला. यामुळें त्याला अनुक्रमें स्कंद, गांगेय, अग्निभू व कार्तिकेय अशी नांवें पडलीं. प्रत्येक कृत्तिकेपासून याला एक मुख व दोन हात लाभल्यामुळें हा षण्मुख व द्वादशहस्त झाला. हा शिवपुत्र कार्तिकेय, देवांचा सेनानी होता.

---

अ. १०–२५६.

**पै समस्तांही वोघां– ।**
**मध्यें जे भगीरथें आणितां गंगा ।**
**जन्हूनें गिळिली मग जंघा ।**
**फाडुनि दिधली ॥**

इक्ष्वाकुवंशांतील महापराक्रमी सगर राजानें अनेक अश्वमेध यज्ञ केले होते. एका यज्ञांत त्याचा श्यामकर्ण घोडा इंद्रानें हरण करून कपिलाश्रमांत नेऊन ठेवला. सगराचे साठसहस्र पुत्र त्याच्या शोधार्थ निघाले असतां त्यांना कपिलमुनीसन्निध वारू दिसला. तेव्हां याच गोसावड्यानें हा चोरून आणला असें समजून त्यांनीं कपिलमुनीस बरेंच मारलें. तेव्हां समाधीचा भंग होतांच मुनीनें नेत्र उघडून त्यांची रक्षा केली. पुढें सगराचा नातू अंशुमान यानें मुनीची स्तुति करून घोडा परत आणला. परंतु गंगोदकाच्या स्पर्शाशिवाय साठ सहस्र सगरपुत्रांचा उद्धार होणें नाहीं असें समजल्यावर अंशुमान व त्याचा पुत्र दिलीप यांनीं गंगेस खालीं आणण्यासाठीं मोठें तपाचरण केलें, पण त्यांत यश आलें नाहीं.

नंतर दिलीपाचा पुत्र भगीरथ यानें हिमालयावर गोकर्णक्षेत्रीं सहस्र वर्षे तप केलें. तेव्हां गंगा प्रसन्न होऊन स्वर्गांतून खालीं येण्याचें तिनें मान्य केलें. तिला खालीं झेलण्यास भगीरथाच्या प्रार्थनेवरून शंकर तयार झाले. पुढें भगीरथ व मागें गंगा अशा रीतीनें ते येत असता मध्येंच महापराक्रमी जन्हूचा यज्ञमंडप लागला. तो गंगेच्या प्रवाहानें बुडल्यामुळें जन्हूनें रागावून तिला प्राशन करून टाकलें. पुढें गंगेला कन्या या नात्यानें

स्वीकारण्याविषयीं प्रार्थना केल्यावर जन्हूनें मांडींतून तिला सोडून दिली. या कारणानें गंगेला जान्हवी असें नांव पडलें. नंतर भगीरथानें तिला पाताळांत नेऊन आपल्या साठसहस्र पूर्वजांचा उद्धार केला.

---

अ. १०–२८८.

**जो देवकी-वसुदेवास्तव जाहला।**
**कुमारीसाठीं गोकुळीं गेला।**

कंस आपल्या मुलांना जन्मल्याबरोबर ठार मारतो, तेव्हां आठवा पुत्र जन्मल्याबरोबर त्याला बाहेर नेऊन ठेवावा; या विचारानें देवकी बंदीशाळेंत प्रसूत झाल्याबरोबर वसुदेवानें रातोरात यमुना ओलांडून त्यास गोकुळांत नेलें. दैवीसामर्थ्यानें अडचणींतून तो पार पडला. गोकुळांत त्याच वेळीं नंदपत्नी यशोदा ही प्रसूत होऊन तिला कन्या झाली होती. ती वसुदेवानें उचलून तिच्या जागीं आपल्या मुलाला–कृष्णाला–ठेवलें व त्या मुलीला बंदीशाळेंत नेलें.

---

अ. १०–२८८.

**तो मी प्राणासकट पियाला। पूतनेतें ॥**

गोकुळांत नंदयशोदेचा पुत्र म्हणून कृष्ण वाढत असतां कंसानें त्याला मारण्यासाठीं अनेक उपाय केले. पूतना नांवाची एक राक्षसी गोकुळांतील सर्व सुंदर मुलांना मारण्यासाठीं कंसानें पाठविली होती. ती लहान तरुणीचें रूप घेऊन यशोदेकडे आली व लडिवाळपणा दाखवून कृष्णाला पाजण्यास घेतलें. तिनें आपल्या स्तनांत मुद्दाम विष भरलें होतें. कृष्णानें हें जाणून त्यानें तिचें इतकें जोरानें स्तनपान केलें कीं तिची आंतडी बाहेर येऊन ती मृत होऊन पडली.

---

अ. १०–२८९.

**करीं गिरि धरूनि उमाणिली। महेंद्र महिमा ॥**

लहान वयांतच कृष्णानें दैत्य मारले, इतकेंच नव्हे तर इंद्राचाही गर्व हरण केला. प्रतिवर्षी गोकुळांतील गोपजन नवें धान्य आलें असतां इंद्राचे प्रीत्यर्थ अन्नकोट करीत असत. ही रीत कृष्णानें बंद पाडून गोकुळाचा संरक्षक गिरीगोवर्धन याचा याग आरंभला. हें पाहून इंद्रानें रागानें गोकुळावर जोराची पर्जन्यवृष्टि करून जलप्रलयाची वेळ आणली; पण कृष्णानें आपल्या हातावर गोवर्धन उचलून त्याच्या छत्राखालीं लोकांना आश्रय दिला व कांहीं नाश होऊं दिला नाहीं.

---

अ. १०–२९०.

**कालिंदिचें हृदयशल्य फेडिलें।**

काद्रवेयकुलोत्पन्न कालिया नांवाचा एक नाग गरुडाच्या भयानें यमुनेच्या डोहांत येऊन राहिला होता. त्याच्या विषानें पाणीच नव्हे तर सर्व आसमंत भाग विषमय झाला होता. एकदां कृष्णाचे मित्र गोपाळ, गायींसह तेथें चुकून गेले असतां एकदम मरण पावले. हें ऐकून कृष्णानें डोहांत उडी मारून कालियाला जर्जर केलें व त्याला मारणार पण त्याच्या स्त्रियांच्या प्रार्थनेवरून त्याला जीवदान दिलें. पण तेथून हांकलून त्याच्या मूळच्या जागीं ( रमणक द्वीपास ) पाठविलें व गायी–गोपाळ जिवंत केले.

---

अ. १०–२९०.

**वासरुंवासाठीं लाविलें। विरंचीस पिसे ॥**

ब्रह्मदेवानें एकदां कृष्णाच्या सामर्थ्याची परीक्षा पाहण्यासाठीं गायी–गोपाळ यांना अदृश्य केलें असतां कृष्णानें त्यांची नवीन उत्पत्ति केली व वर्षभर कांहीं समजूं दिलें नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवालाच लाज वाटून त्यानें गायी–गोपाळ परत केले.

---

अ. १०–२९४.

**संन्यासी तुवां होऊनि जनीं।**
**चोरुनि नेली माझी भगिनी।**

कृष्ण-बलरामाची बहीण सुभद्रा ही उपवर झाली असतां बलरामानें तिला आपला शिष्य दुर्योधन याला देण्याचें योजलें. कृष्णाच्या मनांत तिचें अर्जुनाशीं लग्न व्हावें असें होतें. अर्जुन तीर्थयात्रेहून द्वारकेस आला तेव्हां कृष्णानें त्याला संन्यासी होऊन बलरामाची मर्जी

संपादण्यास सांगितलें. हा संन्याशी फार तपोनिष्ठ व विरक्त आहे असें पाहून बलरामानें त्यास घरीं आणून ठेवलें व सुभद्रेस त्याची सेवा करण्यास सांगितलें. एकदां रैवतक पर्वतावर सर्वांनीं जावयाचें असें ठरून अर्जुन संन्याशी व सुभद्रा यांना एका रथांत बसविण्यांत आलें. कृष्णानें सुचवितांच अर्जुनानें रथ इंद्रप्रस्थाकडे चालविला व पाठलाग करणाऱ्यांना पराभूत केलें. पुढें संन्याशी हा अर्जुन आहे असें कळल्यावर सर्वांना आनंद झाला.

---

अ. ११-३५.

## एकाचे गर्भवासही साहिले।

अंबरीष राजा दानशूर, पराक्रमी व भगवद्भक्त होता. एकदां द्वादशीस उपवास सोडण्याच्या वेळीं दुर्वासऋषि अतिथि म्हणून घरीं आले. आपण नदीवर जाऊन आन्हिक उरकून भोजनास या असें राजानें, त्यांचा प्राथमिक सत्कार करून सांगितलें. दुर्वास त्याप्रमाणें नदीवर गेले पण लवकर परत येईनात. इकडे द्वादशी अतिक्रांत होत चालली. तेव्हां व्रतभंग होऊं नये म्हणून राजानें देवास नैवेद्य समर्पण करून आपण फक्त तीर्थ प्राशन करून पारणें सोडलें. दुर्वासांना हें कळल्यावर त्यांना मोठा राग येऊन त्यांनीं आपल्या जटेतून एक कृत्या निर्माण करून राजावर सोडली व शापहि दिला कीं, 'तूं अनेक योनींत जन्म घेशील' राजाचा नाश होणार हें जाणून भगवंतांनी सुदर्शनचक्र कृत्येवर टाकलें. कृत्येचा नाश केल्यावर चक्र दुर्वासांच्या मागें लागलें. त्यांना कोणी देव संरक्षण देईना. भगवंतांनीही सांगितलें कीं तुम्ही राजाकडे जाऊन त्याची क्षमा मागा, तो तुमच्यासाठीं उपवासी राहिला आहे. तेव्हां एक वर्षानें दुर्वास परत राजाकडे गेले तों तो उपाशीं राहून अतिथीची वाट पाहातच होता. राजानें सांगतांच दुर्वासांच्या पाठीचें सुदर्शन चक्र सुटलें व राजानें दुर्वासांना पंक्तीला घेऊन आनंदानें भोजन केलें. अनेक योनींत जन्म हा दुर्वासांचा शाप अंबरीषाला बाधूं नये म्हणून भगवंतांनीं मत्स्यादि अवतार त्याच्यासाठीं आपणच घेतले.

---

अ. ११-६०.

## मार्गा जळत काढिलें जोहरीं।

धृतराष्ट्रपुत्र आणि पंडुपुत्र हे मोठे झाले तेव्हां त्यांचे एकमेकांशीं पटेना. युधिष्ठिराला युवराजपद दिलेलें दुर्योधनाला सहन झालें नाहीं. तेव्हां धृतराष्ट्रानें दूरवर विचार करून पांडवांना आपल्या मुलांपासून दूर ठेवण्याचें योजून वारणावत नगरास जाऊन राहण्याची आज्ञा केली. वारणावतास पांडव राहात होते, तें घर दुर्योधनानें मोठ्या कपटविद्येनें एकदम जळेल असें लाखेचें करविलें होतें. ही गोष्ट विदुरास कळली असल्यानें त्यानीं बर्बर भाषेत युधिष्ठिरास तेथें जाण्याच्या वेळीं ती कळविली व बाहेर सुखरूप पडण्याचा विवरमार्ग जो विदुरानें घर बांधत असतांनाच गुप्तपणें तयार करवून घेतला होता तोहि धर्मराजाला कळावा अशी व्यवस्था केली होती.

पांडव लाक्षागृहांत असतांना मोठा दानधर्म चाले. जो येईल त्याला भोजन मिळे. एकदां सायंकाळीं भिल्लीण आपल्या पांच मुलांसह तेथें येऊन राहिली होती. त्याच रात्रीं विवरद्वारें लाक्षागृह सोडून बाहेर येण्याची युधिष्ठिरास विदुराची सूचना आल्यावरून आपणच लाक्षागृहास आग लावून पांडव बाहेर पडले. आगींत भिल्लीण तिच्या मुलांसह दग्ध झाल्यानें पुढें लोकांना व कौरवांनाहि वाटलें कीं, कुंतीसह पांडवच जळून मेले. याप्रमाणें परमेश्वरानेंच पांडवांचें लाक्षागृहांत जळून मरण्याच्या संकटापासून रक्षण केलें.

---

अ. ११-६१.

## दुराग्रहें हिरण्याक्षें।

एकदां सनत्कुमार वैकुंठास गेले असतां तेथील जय व विजय या द्वारपाळांनीं त्यांस राजमंदिरांत जाण्यास अडथळा केला तेव्हां ते रागावून त्यांनीं त्या दोघांस शाप दिला कीं, तुम्हांला मृत्युलोकांत जन्म घ्यावे लागतील. तेव्हां त्यांनीं सनत्कुमारांची प्रार्थना करून उःशाप मागून घेतला कीं 'विरोधी भक्तीनें तरी आम्हांला देवाचें स्मरण घडावें.' त्याप्रमाणें त्यांना हिरण्याक्ष-हिरण्यकशिपु, रावण-कुंभकर्ण व शिशुपाळ-दंतवक्र असे तीन जन्म प्राप्त झाले.

---

अ. ११-१०४.

**पुत्रा आळविता अजामिळा। आपणपें देसी॥**

अजामिळ नांवाचा कान्यकुब्ज देशांत एक ब्राह्मण राहात असे; त्यानें मातापितरें व स्त्री यांचा त्याग केला व तो एका गणिकेला बेऊन राहूं लागला. तिच्यापासून त्याला मुलेंहि झालीं. सर्वांत धाकट्या मुलाचें नांव नारायण होतें. त्याचा त्याला लळा होता, मरणसमयींहि त्याला तो हांका मारीत असतांना विष्णुदुतांनीं यमदूतांना याच्यावर मृत्युपाश टाकूं दिला नाहीं. अजामिळानें त्यांचा संवाद ऐकून व परमेश्वरस्मरणाचें पुण्य जाणून तो पुढें विरक्त व भगवद्भक्त बनला. मरणोत्तर त्याला उत्तम गति मिळाली.

---

अ. ११-१०५.

**अझुनी वैरियांचिया कलेवरा। विसंवसीना॥**

कृष्णानें संदीपनी गुरूचा मृतपुत्र परत आणून देतांना (ज्ञा. ३-१६३- मृत गुरुपुत्र आणिला।) शंखरूप धारण केलेल्या पंचजन दैत्याला मारल व त्याच्या अस्थींचा शंख करून तो जवळ हातांत नेहमीं बाळगला. पंचजनाच्या अस्थींचा केलेला म्हणून या शंखाला पांचजन्य असें नांव पडल आहे.

---

अ. ११-१०६.

**दे दान म्हणौनि दारवंटेकरु।**
**जाहलासी बळीचा॥**

प्रल्हादाचा नातु बळी हा महाबलिष्ट, तसाच उदार आणि धार्मिक होता. त्याचें देवाशीं वारंवार युद्ध होई व तो संजीवनिमुळें जिवंत राही. यानें इंद्र होण्यासाठीं शंभर यज्ञाचा संकल्प करून नव्याण्णव यज्ञ केले व शेवटचा यज्ञ करीत असतां देवांना धाक पडून त्यांनीं विष्णूस वामनावतार घेण्यास विनविलें. वामनानें यज्ञांत बळीजवळ त्रिपादभूमि मागितली; व शुक्राचार्य नको म्हणत असतां ती दिली म्हणून उदक सोडिलें. वामनानें विश्वरूप धारण करून एक पावलांत पृथ्वी व दुसऱ्या पावलांत आकाश आक्रमिलें व तिसरें पाऊल कोठें ठेवूं म्हणून विचारलें असतां बलिराजानें आपलें मस्तक पुढें केलें. तेव्हां तिसऱ्यापावलानें त्याला पाताळांत दडपलें; पण प्रसन्न होऊन वर दिला कीं, 'तूं वैवस्वत मन्वंतर असेपर्यंत उपेंद्र व नंतर इंद्र होशील. तूं पाताळांत सुतलांत सुखानें राज्य कर. मी अक्षयीं द्वारपाळ होऊन सुदर्शनचक्रानें तुझें संरक्षण करीन.'

कृतयुगापूर्वीं कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बळीनें वामनास दान दिलें; तो दिवस अद्यापि बलिप्रतिपदा म्हणून ओळखला जाऊन या दिवशीं बळींचें पूजन होतें. याप्रमाणें बळीकडे दान मागावयास जाऊन भगवान् उलट त्याचा द्वारपाळ होऊन राहिला.

---

अ. ११-१८२.

**मागां बाळपणीं येणें श्रीपती।**
**जें एकवेळ खादली होती माती।**
**तें कोपोनियां हातीं।**
**यशोदां धरिला॥**
**मग भेणें भेणें जैसें।**
**मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें।**
**चवदाही भुवनें सावकाशें।**
**दाविलीं तियें॥**

कृष्णानें माती खाल्ली हें पाहून यशोदा त्याला फार रागें भरली; तेव्हां मी माती खाल्ली नाहीं, असें कृष्णानें अट्टाहासानें सांगतांच यशोदेनें त्याला तोंड उघडण्यास सांगितलें. त्यानें तें उघडून दाखवितांच त्यांत तिला चतुर्दश भुवनें दाखविलीं.

---

अ. ११-१८४.

**नातरी मधुवनीं ध्रुवासि केलें।**
**जैसे कपोल शंखें शिवतलें।**
**आणि वेदाचियेही मतीं ठेलें।**
**तें लागला बोलों॥**

ध्रुवाची परमेश्वराराधनाची घोर प्रतिज्ञा ऐकून नारदानें त्याला यमुनेच्या तीरीं जाऊन 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र जपण्यास सांगितलें. ध्रुवाची अत्यंत

कडक तपश्चर्या पाहून भगवंतांनीं त्याला मधुवनांत येऊन दर्शन दिलें. तेव्हां परमेश्वराचें गुणवर्णन करावें अशी ध्रुवास इच्छा झाली; पण अज्ञानामुळें त्याला तें प्रत्यक्ष करतां येईना. तेव्हां भगवंतांनीं त्याच्या गालास शंखाचा स्पर्श केला. त्याबरोबर वेदांप्रमाणें तो खडाखड स्तोत्रें गाऊं लागला.

---

अ. ११–१८७.

**जैसा आब्रह्म पूर्णोदकीं। पव्हे मार्कंडेय एकाकी।**

मार्कंडेय हे महान् ब्रह्मर्षि असून, त्यांनीं परमेश्वराजवळ त्याची माया पाहण्याची इच्छा दर्शविली. भगवंतानें तथास्तु म्हटलें. पुढें एकदां हे आश्रमांत बसले असतां, जोराचा वारा सुटून पृथ्वी जलमय झाल्याचें त्यांना दिसलें. हे त्या जलप्रलयांत एकाकी पोहत असतां त्यांस एका वटपत्रावर एक सुंदर बालक निजलेलें दिसलें. या बालकाच्या श्वासानें ते त्याच्या पोटांत ओढले गेले व तेथें बाहेरच्या सृष्टीप्रमाणेंच सर्व सृष्टि पुनः त्यांना दिसली. बालकाच्या श्वासाबरोबर ते बाहेर पडले तेव्हां आपण आपल्या आश्रमांतच आहों असें त्यांना दिसलें. पाहिलें तें सर्व खोटें, मायारूप असें त्यांनीं ओळखलें. त्यांच्या आश्चर्ययुक्त मनःस्थितींत भगवंतांनीं त्यांना पुनः दर्शन दिलें व इच्छा पुरी केली असें पटवून दिलें.

---

अ. ११–४६९.

**तुवां गोग्रहणाचेनि अवसरें।**
**घातलें मोहनास्त्र एकसरें।**
**मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें।**
**आसडूनि नागविले॥**

कीचकवधावरून पांडव बहुतेक विराटनगरींतच असावेत असा दुर्योधनाला संशय येऊन त्यानें, अज्ञातवासांत असतांनाच पांडवांना ओळखून काढावें व पुनः वनवास करवावा, या हेतूनें विराटाचीं गोधनें हरण्यासाठीं मोठी मोहीम काढली. गोधनें हरण करून नेत असतां गोपांनीं विराटाचा पुत्र उत्तर यास त्यांच्या संरक्षणार्थ पाचारलें. (कारण विराट बाहेर होता). यावेळीं राजपुत्र उत्तर हा आपली बहीण उत्तरा हिच्या महालांत होता. उत्तरेला नृत्यकला शिकविणारी बृहन्नडा (वेषधारी अर्जुन) तेथेंच होती. मला सारथी असता तर मी यावेळीं शत्रूला नामोहरम केलें असतें; अशी वढाई त्यानें जेव्हां मारली तेव्हा बृहन्नडा सारथ्य करण्यास तयार झाली असतां नाइलाजानें उत्तराला लढाईला जावें लागलें. पण प्रत्यक्ष शत्रूचें मोठें सैन्यबळ पाहून तो घाबरला व मागें पळूं लागला. तेव्हां अर्जुनानें त्याला परतवून आपणच शत्रूशीं सामना दिला व शत्रुसैन्यावर मोहनास्त्र टाकून वस्त्रहरण करविलें व उत्तराला फुकटचा विजय आणि कर्तृत्व मिळवून दिलें.

---

अ. १३–२५.

**ऐसिया पैजा महेशा।**
**पांघुरणें दाही दिशा।**
**लांचकरु म्हणोनि कोळसा।**
**कामु केला॥**

कैलासाचें राज्य सोडून शंकरांनीं स्मशानांत वास केला तेव्हां तपश्चर्येत विघ्न उत्पन्न करणारा व योग्याचें मन विचलित करणारा जो मदन (काम) त्याचें आपल्या तृतीय नेत्रानें भस्म केलें. ब्रह्मदेवाच्या हृदयापासून कामाची उत्पत्ति असून याच्या स्त्रीचें नांव रति आहे.

---

अ. १३–९५८.

**जया मार्गातें जगीं।**
**सांख्य म्हणती योगी।**
**जयाचिये भाटिवेलागीं।**
**मी कपिल जाहलों॥**

कर्दमऋषि हा एक प्रजापति होता. याची बायको, मनु राजाची कन्या, देवहूति–यांच्या पोटीं विष्णूनें अवतार घेतला–तो म्हणजे कपिल महामुनीचा. या कपिलांचा जन्म सिद्धपूरला झाला. तेथें बिंदुसरोवरावर त्यांचा आश्रम अद्यापि दाखविला जातो. कपिलांनीं मातेस ब्रह्मज्ञान शिकवून आपण पाताळांत जाऊन राहिले.

---

अ. १५-१३५.

**वायसा एकें बुबुळें दोहींकडे ।**
**डोळे चाळितां अपाडें ।**

एकदां राम, सीता आणि लक्ष्मण वनवासांत एका आश्रमांत राहात असतांना, सीता अंगणांत वाळत घातलेल्या खाद्य पदार्थांना राखण करीत बसली होती. तेव्हां एक कावळा तेथें येऊन सीतेला फार त्रास देऊं लागला. हांकलला असतांहि जाईना. तेव्हां रामाला राग येऊन त्यानें एका काडीला ऐषिकास्त्रानें अभिमंत्रण करून ती कावळ्यावर सोडून दिली. दुर्वासाच्या मागें सुदर्शन चक्र जसें लागलें होतें तसें हें अस्त्र त्या कावळ्याच्या मागें लागलें. शेवटीं हताश होऊन कावळा प्राणदानाची रामाजवळ याचना करूं लागला. रामाला दया आली पण अस्त्र फुकट जाणार नाहीं म्हणून कावळ्याचा एक डोळा फोडण्यास अस्त्राला रामानें आज्ञा दिली. तेव्हां पासून कावळा एकाक्ष झाला. पण एका बुबुळाची दोन्ही डोळ्यांत हालचाल होत असते.

---

अ. १५-५२६.

**तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया ।**
**ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया ।**

देवालयांत गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर एक सिंहासारखें अक्राळ विक्राळ तोंड काढलेलें असतें त्याला कीर्तिमुख म्हणतात. या विषयीं स्कंद पुराणांत ( शिवकाण्ड १७ वा अध्याय ) अशी कथा आहे कीं:—

शंकरांनीं जालंदराला मारण्यासाठीं क्रोधावस्थेंत सिंहाच्या मुखाची आकृती असलेला एक पुरुष निर्माण केला होता. जालंदरादिकांना मारूनही त्याची भूक शमेना. तेव्हां शंकरांनी त्याला त्याचेंच शरीर खाण्यास सांगितलें व उरलेल्या तोंडाच्या आकृतीला 'कीर्तिमुख' असें नांव दिलें. आणि प्रत्येक शिवालयांत तें काढण्याविषयीं आज्ञा केली. ( कीर्तिमुखाचें दर्शन घेऊन मग शिवाचें दर्शन घेण्याची पद्धत आहे. )

कीर्तिमुखानें इतर राक्षसांना खाऊन शेवटीं आपलें शरीरही खाल्लें, त्याप्रमाणें ज्ञान अज्ञानाला नाहींसें करून स्वतःही नाहींसें होतें, असें या ओंवींत दाखविलें आहे.

---

अ. १६-५७९.

**मज चैतन्यशंभूचा माथा ।**
**जो निक्षेपु होता पार्था ।**
**तया गौतमु जालासि आस्था—।**
**निधी तूं गा ॥**

नाशिक प्रांतांत ब्रह्मगिरीजवळ गौतम ऋषींचा आश्रम होता. अनेक ऋषिगण येऊन राहात. गौतमाचे यांत अनेक शिष्यहि होते. त्यांमध्यें एकदां गणपति शिरला. कारण, पार्वतीला गंगेबद्दल सवतीमत्सर वाटूं लागल्यानें तिला कांहीं करून बाहेर काढण्यास तिनें गणपतीला सांगितलें. गणपतीनें जया, या स्वर्गीय स्त्रीस गायीचें रूप घेऊन आश्रमाच्या शेतांत चरावयास पाठविलें. कोणी गाय ऋषींचें अन्न जे भात तें खात आहे असें पाहून गौतमानें एक दर्भ तिच्याकडे फेकला. त्या एवढ्याशा लागण्यानें गाय मृत होऊन पडली. फट् म्हणतां ब्रह्महत्या झाली ! तिचें क्षालन कसें होईल या विचारांत गौतम असतां, गणपतीनें त्यास सल्ला दिला कीं, शंकरापासून गंगा मागून घ्या. ती खालीं येऊन वाहूं लागली म्हणजे तींत स्नान करा; म्हणजे ही गोहत्या जाईल.

गौतमांनीं शंकराची त्याप्रमाणें दीर्घकाळपर्यंत ब्रह्मगिरीवर आराधना केली. तेव्हां शंकर प्रसन्न होऊन जटेंतील गंगा त्यांनीं खालीं टाकली. ती गंगाद्वारांतून वाहात येऊन कुशावर्तांत पडत असलेली आजहि दिसते.

---

अ. १६-१२७.

**नाना रंभेचेनि रूपें । शुकीं त्रुटिजेचि कंदर्पें ॥**

घृताची अप्सरेपासून झालेले शुक (व्यासपुत्र) हे जन्मतःच परम ज्ञानी होते. व्यासांनी त्यास भागवत पढविलें व तेंच त्यांनीं पुढें परीक्षित राजास सांगितलें. त्यांच्या तपाचरणांत व्यत्यय आणसाठीं इंद्रानें रंभेला त्यांच्याकडे पाठविलें पण ते मुळींच मोहित झाले नाहींत.

---

अ. १७-२.

**त्रिगुण त्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला ।**
**तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ॥**

मयासुरानें ब्रह्मदेवाकडून तीन अभेद्य पुरें मागून घेतलीं व लोखंड, रुपें आणि सोनें यांचीं एकावर एक अशीं तीन नगरें रचलीं. मयासुरानंतर त्याच्या अनुयायांनीं देवादिकांना फार त्रास देण्यास सुरवात केली; तेव्हां ते सर्व महादेवाकडे जाऊन त्यांनीं असुरनिर्दालनार्थ महादेवाची प्रार्थना केली. सर्व देवांनीं या युद्धांत शंकराला साहाय्य दिलें होतें. पण गणपतीची प्रारंभीं आराधना केली नसल्यानें देवांना यश लाभेना. ती केल्यावरच शंकरांना त्रिपुरांचा नाश करतां आला.

---

अ. १८–७८९.

### पहिलिया वैराग्यगरळा। धैर्यशंभु वोडवी गळा।

समुद्रमंथनाच्या वेळीं प्रथम जग जाळणारें हलाहल विष बाहेर पडलें. तेव्हां तें कोणी उचलावें याची देवांना विवंचना पडली. शंकर जगत्कल्याणासाठीं पुढें झाले व त्यांनीं विष प्राशन केलें. म्हणून तर पुढें अमृताची प्राप्ति झाली.

---

अ. १८–८३७

### सटवीचिये रातीं। न विसंबिजे जेवीं वाती।

प्रसूतीनंतर सहाव्या दिवशीं सटवीची पूजा करतात. " विघ्नेशस्य जन्मदानां जीवन्त्यपरनाम्न्यः षष्ठी देव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्चपूजनं करिष्ये। " असा पूजेचा संकल्प असतो. पाटावर तांदुळ व त्यावर चार सुपाऱ्या ठेवून जीवन्ती, षष्ठी, आणि शस्त्रगर्भा भगवती या तीन देवींचें आवाहन करतात. एक कोयता शेवळ्याच्या फडक्यांत गुंडाळून सुपलींत ठेवतात. " गौरीपुत्रो यथा स्कंदः शिशुत्वे रक्षितः पुरा। तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नमः ॥ " अशी शेवटीं प्रार्थना करतात. म्हणजे स्कंद (कार्तिकेय) याचें रक्षण सटवीनेंच केलें अशी कथा दिसते. रात्रीं काळोखांत येऊन सटवीनें मुलाला अपाय करूं नये म्हणून त्या रात्रीं समई सारखी तेवत ठेवतात.

---

अ. १८–१४७८.

### तेथ अमरत्वा वोगरिलें।
### ते मरणाचिलागीं जालें।

समुद्रमंथनांतून जेव्हां अमृत निघालें तेव्हां तें देव आणि दानव या दोघांच्या हक्काचें झालें पण दानवांना अमृत देऊन अमर करणें हें हानिकर म्हणून विष्णूनें मोहिनीचें रूप घेऊन अमृतकलश पळविला. नंतर देव व दानव यांच्या पंक्ति समोरासमोर बसवून देवांच्या पंक्तीत मात्र विष्णू मोहिनीरूपानें अमृत वाढूं लागले; त्यावेळीं राहू देवांच्या पंक्तींत नकळत येऊन बसला व त्यानें अमृतपान इतरांबरोबर केलें. अमृत त्याच्या गळ्याखालीं उतरण्यापूर्वीच चंद्रसूर्यांनी त्याला दैत्य म्हणून ओळखलें. तेव्हां विष्णूनें त्याचा शिरच्छेद केला.

---

अ. १८–१४७९.

### नहुषु स्वर्गाधिपति जाहला।
### परी राहाटी भांबावला।
### तो भुजंगत्व पावला।
### नेणसी कायी ॥

पुरूरव्याचा नातू नहुषराजा हा फार पराक्रमी व सद्गुणी असल्यानें, इंद्राला ब्रह्महत्येमुळें इंद्रपदाला मुकावें लागलें असतांना देवऋषींनीं मिळून नहुषाला इंद्र केलें व त्या स्थानीं तो ऐषआरामांत राहूं लागला. तो विषयलंपट होऊन इंद्रपदाप्रमाणेंच इंद्राणीची प्राप्ति व्हावी अशी इच्छा धरून त्यानें इंद्राणीला उपभोगार्थ पाचारलें. तिनें संकट टाळावें म्हणून एक अट घातली. ती म्हणजे 'नहुषानें अपूर्व वाहनांतून तिच्याकडे यावें' तेव्हां नहुषानें सप्तर्षींना रथाला जोडलें व त्या रथांतून तिच्याकडे जाऊं लागला. त्याला घाई झाली असल्यानें त्यानें ऋषींना लाथेनें 'लवकर चला!' 'चला!' (सर्प, सर्प) असा हुकूम केला. याचा अगस्तीला राग येऊन त्यानें, तूं सर्पयोनींत पतन पावशील असा शाप दिला. तेव्हां नहुष इंद्रपदावरून च्युत होऊन सर्प झाला.

---

अ. १८-१६६६.

कीं गीता हे सप्तशती ।
मंत्र प्रतिपाद्य भगवती ॥
मोहमहिषा मुक्ती ।
आनंदली असे ॥

रंभासुरास महिषीपासून झालेला महिषासुर. यानें घोर पुरश्चरण करून ब्रह्मदेवापासून, पुरुषव्यक्तीपासून मला मरण नसावें, असा वर मिळविला. नंतर यानें देवादिकांना अत्यंत त्रास दिला; सर्व प्राणिमात्रांस पीडा देऊं लागला. तेव्हां आदिशक्ति, अष्टभुजा स्त्रीरूप धारण करून, त्याच्याशीं युद्धाला प्रवृत्त झाली. यानें तिच्या रूपावर मोहित होऊन तिला वश करण्याचा प्रयत्न केला; पण अष्टभुजेनें त्याचा वध केला.

---

अ. १८-१७३०.

श्रीगुरुचेनि नांवें माती ।
डोंगरी जयापासीं होती ।
तेणें कोळिये त्रिजगतीं ।
येकवद केली ॥

हिरण्यधेनुक नांवाच्या निषादपतीला एकलव्य नांवाचा फार हुषार मुलगा होता. त्यानें पांडवांप्रमाणें द्रोणाचार्यांपासून अस्त्रविद्या प्राप्त व्हावी म्हणून आचार्यांना विनविलें, पण त्यांनीं हा निषाद जातीचा म्हणून शिष्य करून घेण्याचें नाकारलें. पण यानें त्यांच्या पादुका मागून घेऊन द्रोणाचार्यांची मातीची मूर्ति केली व पुढें पादुका ठेवून आपणच धनुर्विद्या शिकूं लागला. या विद्येंत तो पांडवापेक्षांहि जास्त तरबेज झाला हें पाहून यानें अर्जुनापेक्षां भारी होऊं नये म्हणून आचार्यांनीं त्याजवळ गुरुदक्षिणा मागितली. ती कोणती तर त्यानें आंगठा तोडून द्यावा. एकलव्यानें हें मान्य केलें. त्या वेळेपासून कोळी-किरात हे आंगठयाचा स्पर्श न करतां बाण मारतात.

---



# श्रीगीताश्लोकवर्णानुक्रमणिका.

द



ध



न



प



ब

---

# श्रीज्ञानेश्वरींतील ओंव्यांची वर्णानुक्रमणिका

इ

उ



ऋ



ए

## ऐ

### औ



### क

## थ



## द

फ



ब

र

## क्ष



## ज्ञ

# श्रीज्ञानेश्वरींतील कठीण शब्दांचा कोश

अ.

अउमकारेंसीं—अकार, उकार व मकार या ओंकाराच्या तीन मात्रांसह ९–२७६.

अंक–मांडी १२–५; शिक्का, चिन्ह १८–५२४.

अकरण–कर्म न करणें; १८–५९२. नित्यकर्म १४–१९२.

अकरणीय–निषिद्ध, त्याज्य. १८–७२२.

अकर्ता–कांहींच कर्तव्य न उरलेला, सिद्ध १३–२८०.

अकर्म–निषिद्ध कर्म ४–८५, १५-१६८.

अकल्पन–कल्पनारहित १८–१०

अकल्पनाख्यकल्पतरु–कल्पना-रहित अशी ज्याची प्रसिद्धी आहे अशा परमात्मस्वरूपास देणारा कल्पवृक्ष १८–१०.

अंकसळा ( आंकसळा )–धातूला कसोटी लावून तिची परीक्षा करणारा १८–४१२.

अकारण–निरर्थक, व्यर्थ ९–३३४.

अकार्य–अकरणीय १८–७१०.

अकाळ–अयोग्य वेळ ३–१४१

अंकित–चिन्हित, खुण केलेले १८–११०.

अंकिला–स्वाधीन झालेला६–३४५.

अंकुश–हत्तीला ताब्यांत ठेवण्याचें आयुध, गणपतीच्या हातांतील आयुध. १–११

अकृत्य–निषिद्ध कर्म १६–४६६.

अकृत्रिम–स्वाभाविक१८–११५०

अक्रम–क्रमरहित १८–१५५७.

अक्रिय–क्रियारहित ९–१५६.

अखंड–भेदरहित ९–८१; निरंतर १५–४४८.

अखंडित–खंडरहित,अखंड९–७२, निरंतर ४–१७०.

अखरें–खोटें १७–३९५.

अखाडा–तालीम ११–५४८.

अखाद्य–खाण्याचे निषिद्ध पदार्थ १८–८०६.

अखिल–संपूर्ण १८–४.

अंग–शरीर ९–२६९; भाग, अवयव १७–३८८.

अगण्य–अमर्याद ६–३२०.

अंगतुक–शरीराचा आकार व वजन १७–२१६.

अंगना–स्त्री १–४२.

अगरू–चंदनविशेष ९–३९१.

अगर्वता–अभिमानशून्यतेनें ४–१६७.

अंगलग–आश्रय ११–२५७.

अंगलीन–अंगांत गुप्त असलेलें १६–४२.

अंगवसा-दगळा, शेंडा११–४१४ १५–९९.

अगस्तीगवसणी–अगस्ति ऋषीस आवरण असलेला कुंभ ९–१८३.

अंगहीन–वेश्या १७–२४६. अव-यवरहित १७–३८९.

अगाध–मिळण्याला कठीण१–२६३ गहन, खोल १–७३; गूढ; न कळणारें ११–१२६.

अगाधपण–महत्त्व २–२१७.

अंगानिळ–अंगावरून येणारा वारा ९–४८४.

अंगार–अग्नि, विस्तव १३–१०६२

अंगीकभाव–शरीराची ठेवण १–४.

अंगीं वाजणें–अंगावर आदळणें १–२४१

अगुणी–गुणातीत–१८–१९

अंगुष्ठ–आंगठा १७–४१५.

अंगुळी } अंगूळ } –बोट ६–१९५.

अंगोष्टी-शरीर १७–२०४.

अगोचर–निर्विषय, इंद्रियांस न कळणारें १५–१६.

अग्निदाह–अग्नीचें जाळणें. २–१४६.

अग्निक–अग्निहोत्री ४–१२४.

अग्निस्थान–योगशास्त्रांत सांगितलेलें भ्रुकुटीमधील द्विदल चक्र ८–९४.

अग्निहोत्र–शास्त्रोक्त अग्नि ठेवून होम करणें ९–२४३.

अग्र–टोंक १–२५६.

अग्रवन–अंकुर १५–१५८.

अग्रहार–ब्राह्मणांना निर्वाहाकरितां दिलेली इनाम जमीन ९–४७५.

अघ–पाप ३–१२३.

अघडती–न घडणारी, अशक्य १–२३५.

अघोर–भयंकर १६–२१५.

अंघ्रि–पाय, चरण ११–७०८.

अचर्चे–जो चर्चेचा विषय होऊं शकत नाहीं असा ४–६९.

अचल–स्थिर २–१४७.; पर्वत ४-५६; पडदा ५–१३२.
अचळ–पर्वत २–७९.
अचक्षु–ज्याला डोळे नाहींत असा १३–८७७.
अचाट–विलक्षण १–१४७.
अचिंत–चिंता न करणारा, चिंतारहित ८–१९५.
अचिंत्य–कल्पनेपलीकडील ८–८८.
अचुक–बिनचुक, दोषरहित १८–१६६; नेमकें १४–३००.
अचुंबित–अस्पृष्ट २–२३२, निर्मळ ४–१८९; अचुक ५–७.
अचेत–प्राण ८–९५.
अच्युत–आपल्या स्थानापासून भ्रष्ट न होणारा, नाशरहित १८–११९४.
अज–जन्मरहित ४–४४.
अजंगम–झाड १३–२२७.
अजगर– एक जातीचा प्रचंड साप १३–५१५.
अजड–चेतनायुक्त ८–९७.
अंजन–काजळ ११–१३४; जें पायाळूचे डोळ्यांत घातलें असतां भूमिगत ठेवा दाखवितें तें काजळ. १–२३.
अंजनाचल–काजळाचा पर्वत ११–१३४.
अजर–वृद्धपणारहित १८–११९३.
अजा–शेळी ३–१४२.
अजातपक्ष–पंख न फुटलेला ९–३३९.
अजातशत्रु–ज्याला कोणींच शत्रु नाहीं असा १३–२२८.
अजाति–जातिरहित १७–३२९.
अंजुळी–ओंजळ १५–२.
अटक–अडचण ६-११५ अटकाव, प्रतिबंध १३–११६६; अगम्य १८–१४२०.
अटवी–अरण्य ७–१७३.
अडुवे–संकोचित ६–७७.
अडणें–अडकला जाणें, वेढला जाणें, ६–४०१.
अडदर–धाक, भीति. १–१०७.
अडपणें–अडचणींत पडणें, दगदगींत पडणें २–२९४.
अडव–अरण्य १३–७६३, अडचण, दोष १८–१८७.
अडवी–अरण्य १३–६७७.
अढंच–थोर १७–३४१.
अढळ–खरा ११–४९१; खात्रीपूर्वक १८–११२६; दृढ १८–१२३८; स्थिरता६–३६२.
अणगट–अंकुर १५–१९१.
अणिमादिक–अणिमा, महिमा; लघिमा, गरिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व, वशित्व या आठ सिद्धि ६–२९७.
अणी–अग्र, टोंक १५–९३.
अणु–लहान कण १६–३३१.
अणुआर–चाराचुरा १८–३६.
अंतक–काळ १–१५०
अंतर–अंतःकरण २–११२; काळ, वेळ ६–३००; आंतला भाग १३–११५; भेद, भिन्नता ९–४११; सामासिक शब्दाच्या शेवटी 'अन्य' 'दुसरा' या अर्थी ६–५२.
अंतरणें–दूर होणें, वियोग पावणें २–२७.
अंतरंग–अंतर्मुख १८–१७४९; जिवलग, जवळचा ११–३२; आंतील, गुह्य १७–३८५.
अंतराय–वियोग, ताटातूट१-२३४; अडथळा ६–४४३.
अंतराळ–आकाश ११–२७१.
अंतरिक्ष–पोकळी १३–५४.
अंतर्ज्योति–प्रत्यगात्मा ६-२५४.
अंतवंत–नाशवंत २–१५२.
अतिकरणें–अतिक्रांत होणें, ओलांडणें १७–१५५.
अतिकार्श्य–अतिशय रोडपणा १३–५१७.
अतिकृतकंदर्पसर्पदर्प–मदनरूपी सापाच्या घमेंडीचा धुव्वा उडविणारा १८–८.
अतिक्रम–उल्लंघन १३–२५९.
अतिक्रमणें–उल्लंघन करणें १४–३७०.
अतिथि–भोजनसमयीं आलेला आगंतुक ३–१०६; पाहुणा १५–३६५.
अतिदास–अतिशय दाहक ११–३०३.
अतिप्रसंग–विषयांतर ५–६६; अप्रासंगिक भाषण, पाल्हाळ ४–६.
अतिवृद्ध–अतिकृपण, चिक्कु ११–१२६.
अतिमात्र–फार १३–६३५.
अतिरस–अतिशयपणा ५–२; उन्हाळा, उष्णता ९–१०१.
अतिशय–अतिप्रसंग १७–४३१.
अतिशयो–अतिरेक ६–१२२.
अतिशो–फाजिल कळवळा २–२४.
अतिसो–पाल्हाळ ४–६; विस्तार ७-२७;खटपट१८-१५३९; आग्रह १७–४९.
अतीत–पलीकडे गेलेला, २–१३५; मागील, होऊन गेलेला १३–५३७.
अतीतलीं–होऊन गेलेलीं ७–१६१.
अतींद्रिय–इंद्रियांना अगम्य ६–३३.
अंतुरी–स्त्री १–१२०.
अतुर्बळ–बिनजोड १६–३५६.
अंतौरी–स्त्री ९–३२३.
अंत्य–अंत्यज १३–७२४.

अंत्यज–चांडाळादि योनी ९–४६०.
अत्यागी–फलेच्छा न टाकणारा १८–२५६.
अत्यादर–विशेष प्रेम १–२२.
अथर्वण–चौथा वेद, अथर्ववेद १३–८२९.
अथाव–खोल, अथाक ८–६५; अथांग पाणी १८–७११.
अदंभित्व–ढोंगीपणाचा अभाव १३–२०२.
अदळपण–असमर्थता १३–९४९.
अदानव–दैत्यरहित १०–२८९.
अदृष्ट–प्रारब्ध, दैव १५–२२.
अद्‌भुत–नवरसांपैकीं एक रस ११–४; विलक्षण १–१२६.
अद्रि–पर्वत १७–२४२.
अद्वय–द्वितीयसंबंधशून्य ५–९६.
अद्वयाब्जिनिविकाश–अद्वैतास्थितिरूपी कमळाचा विकास करणारा १६–१.
अद्वितीय-बिनजोड,निरुपम १–४९.
अध–अपानवायु ६–२३७; गुद १८–१०३७.
अंध–अंधार २–३२५; आंधळा ३–१५६.
अंधकूप–अंधारानें भरलेला आड १–२३९.
अधपणें–होरपळणें १२–४६.
अधम–वाईट, नीच २–२९७. अधर्म, पूर्वजन्मकृत दुष्कर्म १६–३०६.
अधाडा–तुटलेला कडा ६–५६.
अधिकरण–आश्रयस्थान १३–१.
अधिकरणें–आश्रय करून असणें ८–३२.
अधिकार–योग्यता १६–९४.
अधिकारिया–सरकारी अधिकारी १८–७९५.
अधिभूताधिदैवा–आधिभौतिक (प्राण्यांकडून होणारें) व आधिदैविक (देवतांकडून होणारें) दुःख १६–१९५.
अधिराज–सार्वभौम राजा १२–२०
अधिवास–वास्तव्य ३–१३७.
अधिष्ठणें–स्वीकारणें, आरंभ करणें ६–१५१; आश्रय करणें ३–४३.
अधिष्ठाता–मुख्य १०–२४२.
अधिष्ठात्री–मुख्य ६–१२७; मुख्य आश्रयस्थान १०–१५२.
अधिष्ठान–आश्रय ३–५३;आचरण ३–८३; ब्रह्म ६–१७१.
अधिष्ठी–अंगिकार करतो ९–१०६.
अधीं–खालीं १५–५९.
अधीन–स्वाधीन १८–८२०.
अधृती–अधैर्य २–३६०
अधोगति–निकृष्ट जन्म ७–१०४.
अधोदेश–पाताळ १४–१०५.
अधोद्वार–उपस्थ १३–१००.
अधोमुख–खालीं मान घातलेला २–१२.
अधोरंध्र–अपानद्वार १८–३३८.
अधोर्ध्व–खालीं-वरतीं ११–१८९; खालचे वरचे १३–१५१.
अधोशाख–खालीं फांद्या असलेला १५–५१९.
अधोक्षज–कृष्ण १८–१५८७.
अध्यक्ष–स्वामी ८–३४.
अध्यात्म–ब्रह्माची सहजस्थिति ७–१७७; अध्यात्मिक दुःख १६–१९५; आत्म्यासंबंधीं १०–१५७.
अध्यात्मिक–ईश्वरविषयक, आत्मविषयक १६–१९०.
अध्वर–यज्ञ ३–१३८.
अनकळित–संपूर्ण, निर्वैर १–२२६; अडचणींत न पडतां, प्रयासरहित ७–१०१.
अनंग–मदन ११-२२५; अंगहीन, निराकार १३–९८०.
अनघड्ड–आपआपलीं कामें करण्यास असमर्थ अशी स्थिति, संकोचितता ८–१२१; गुप्त ९–१०२; बहिरेपणा १३-५६८;
अनणु–स्थूळ १८–११९७.
अनंत–देशकालपरिच्छेदशून्य १४-५३; नागांचा मुख्य १०-२४२; श्रीकृष्णाचें नांव ५–३.
अनधिकारी–अयोग्य १५–५९०.
अनन्य–एकनिष्ठपणानें ९–२८८; एकरूप १८–१३९७.
अनन्यगति–एकनिष्ठ १८–१३४९.
अनन्यगतिक–एकनिष्ठ ९–३३७.
अनपायिनी–अखंड १८–१३३.
अनर्घ्य–अमोलिक ६–९३.
अनर्थ–संकट, दुःख ८–१४९.
अनवछिन्न–अखंड २–२९८.
अनवरत–अखंड १२–१.
अनवसर–अवेळ ३–२९ अनाधिकारित्व १८–१४५८.
अनस्यूत–अखंड १३–९१६.
अनळ–अग्नि १–२३०.
अनाकार–आकाररहित १५-५०६.
अनाक्रोश–सहज,आक्रोशरहित १३-३५३.
अनाचारी–आचाररहित, पाप करणारा ९–४१८.
अनात्मवर्ग–असद् पदार्थांचा समुदाय १५–२९६.
अनाथ–दीन ८–१९५.
अनादि–आरंभरहित १७–५६.
अनादित्व–आरंभरहित स्वरूप १७–२२०.
अनादिसिद्ध–मूळचेंच, स्वयंभू, १५–३२३.
अनाम–ज्याला नाम नाहीं असा ४–६९.
अनार्त–निरिच्छ, दुःखरहित ३–१०२.

अनारिसें–वेगळें, भलतें. २–७०.
अनावर–अफाट, असाध्य १–६७ न आवरणारें ११–१२५.
अनावरण–वस्त्रांत गुंडाळता न येण्यासारखा ९–१६२.
अनावृत–प्रगट निरावरण १४–४०६.
अनासक्त–उदासीन ९–१२९.
अनाहत–आघाताशिवाय उत्पन्न होणारा, योगाच्या कांहीं भूमिका गेल्यानंतर शरीरांत ऐकूं येणारा–आवाज, अनुहत ध्वनि ६–२७४.
अनिंदक–निंदा न करणारा ९–४०
अनियत–नियमानें न वागणारा ६–३४४.
अनियम–अमर्याद १६–३३२
अनिरूप–ज्याचें वर्णन करतां येत नाहीं असा १३–१७६.
अनिरुप्य–निरूपण करण्यास अशक्य १३–१७६.
अनिर्वाच्य–शब्दातीत ६–३२५.
अनिवार–अनिवार्य २–१६०;एकसारखा १–१६६.
अनिष्ट–अकल्याण १६–२१९; अशुभ १८–२४०.
अनिळ–ळ–वारा, वायु ४–२२०.
अनुकरणें–सारखें होणें, सदृश होणें, १५–४९५; उत्पन्न करणें १८–४३२.
अनुकार–प्रतिबिंब ५–१३८; अनुकरण ६–४५; आकार ६–३००.
अनुक्रम–आरंभ २–२३३; वर्णाश्रम धर्म ३–८०.
अनुगृहीत–कृपेतील १–८२.
अनुग्रह–कृपा, प्रसाद १०–६.
अनुघडी–एकसारखी, न उघडतां १३–६४०.
अनुचित–अयोग्य २–८.
अनुच्छिष्ट–न सेवन केलेलें ७-१९७.
अनुज–पाठीमागून येणारा, धाकटा भाऊ १६–४६५.
अनुजायिनी–अनुकूल असणारी १०–२७९.
अनुताप–पश्चात्ताप ९–४२०.
अनुपरोध–यथार्थ निर्विकार ३–१९२.
अनुभूति–अनुभव १८–१२१७.
अनुमान–तर्क ९–१३७.
अनुमानणें–अजमावणें ८–२६६.
अनुराग–प्रेम १–६०.
अनुलेप–उटी ११–२२५.
अनुवाद–वर्णन करणें २–१७३.
अनुवादणें–बोलणें १–७२.
अनुवृत्ति–मालिका, क्रम १४–११३ सुषुम्ना नाडी ८–११४.
अनुष्ठणें–आचरण करणें १७–२२.
अनुष्ठान–आचरण १७–४०.
अनुष्टुभ्–ज्यांत गणाचा नियम नाहीं, ज्यांत चार चरण असतात व ज्यांत प्रत्येक चरणांत आठ अक्षरें असतात असा छंदाचा एक प्रकार १८–१६९९.
अनुष्ठेय–करणीय १८–११९.
अनुसंग–निकट संबंध ४–३०.
अनुसंधान–वेध, ध्यान ९–५१८.
अनुसार ( अनुसारा )–मार्ग. ५–१६५.
अनुस्यूत-अखंड २–१५४.
अनुस्यूति–अखंड स्थिति. १३–१११५.
अनुहत–अनाहत ध्वनि, १२–७
अनुज्ञा–आज्ञा १८–१५७५.
अनेग–अनेक ४–१५६.
अनोळखपण–अज्ञान १०–१६३.
अन्न–भक्ष्य, खाद्य १८–५६३.
अन्य–वेगळा, दुसरा १८–२७७.
अन्यकारणक–ज्याचें कारण वेगळें आहे असा १८–२७७.
अन्यथा–भिन्न रीतीनें ३–१२६.
अन्यथात्व–अन्य प्रकार १८–१११४.
अन्यथादृष्टि–विपरीत ज्ञान १८–१३००.
अन्यथाबोध–विपरीत ज्ञान १८–९६४.
अन्यथामति–विपरीत ज्ञान १६–११.
अन्यथाज्ञान–विपरीत ज्ञान १५–५२५.
अन्वय–कुल ६–४५, प्रवेश १५–५६७.
अपकार–अन्याय १६–२६.
अपकारी–त्रास देणारा ११–१०६.
अपत्य–मूल १–६४.
अपथ्यशील–पथ्य न करणारा ७–९३.
अपभ्रंश–नाश, नाश करणारा २–२०; अधोगतीला नेणारा-२–११८; भ्रम उत्पन्न करणारें भाषण ३–७.
अपर–दुसरा १–१०१; पश्चिमेकडून वाहणारी ३–३९.
अपरवडी–अन्याय १८–९४२; गैररीत १७–३४७.
अपराजित–अजिंक्य १–१५२.
अपरिग्रही–संग्रहित, परिवारशून्य ६–१०६.
अपरितोख–असंतोष २–२६९.
अपरिमित– अफाट १०–२.
अपरिहर–टाळण्याला अशक्य, अनिवार्य २–१५८.
अपवर्ग– मोक्ष ६–१५८.
अपवाड–असामर्थ्य १३–५६८.
अपवाद–निंदा १३–७९१.
अपह–नाश करणारा १८–८.

अपाड–योग्यतेबाहेरचें, अशक्य १–६९; फार ६–२६३; अंतर, असाहस्य १३–११०१.

अपाडें–असाधारण १–४३; सत्वर, वेगानें १५–१३५.

अपाणि–हस्तरहित ९–१५८.

अपात्र–अयोग्य ११–९८.

अपान–गुदद्वारस्थ वायु ४–१४५.

अपानरंध्रद्वय–गुद व शिश्न १८–१०३६.

अपांपति–समुद्र १३–१०७४.

अपाययंत्र–अपायकारक युक्ति. १६–३४४.

अपार–पाररहित, अमर्याद १–७४.

अपारांअपार–अमर्याद, वस्तूपेक्षां अमर्याद ११–६१४.

अपारांतर–अमर्याद अंतरावर असलेलें ११–६२०.

अपावृत–प्रगट ४–१२८.

अपावो–अपाय, हानि २–१८७.

अपुरा–अपूर्ण ६–१४०.

अपूर्ण–अतूल १६–३३९.

अपूर्व–लोकोत्तर १४–२६१.

अपेय–शास्त्रानें पिऊं नये म्हणून सांगितलेलें १८–५८०.

अपेश–अपयश, अपकीर्ति २–२०१.

अपेक्षणीय–इच्छा करण्यास योग्य १८–१११८.

अपेक्षणें–इच्छा करणें, १–५३.

अपेक्षा–आकांक्षा, इच्छा १८–१४४१.

अपेक्षित–इच्छित ४–१६८.

अपैशून्य–दोष टाकून गुण घेण्याची दृष्टि १६–१५३.

अपैसें–सहजच, आपल्या आपण २–२८१.

अप्रकाशी–अंधार १३–११०८.

अप्रतिमल्ल–बिनजोड पहिलवान, ज्यास कोणी प्रतिस्पर्धी नाहीं असा १–११०.

अप्रमाण–ज्याला कांहीं किंमत नाहीं असें ९–४५२.

अप्रमाद–चूक न करतां १८–१४३८

अप्रमेय–अगम्य, प्रमाणांनीं सिद्ध करतां येत नाहीं असें ११–५६०.

अप्रवृत्ति–शास्त्रनिषिद्ध कर्म ७–४८.

अप्रसंग–अप्रस्तुत भाषण, अवेळ १८–१६२६.

अप्रांत–अमर्याद ११–१२४.

अप्राप्त–ज्यास (सद्बुद्धि) प्राप्त झाली नाहीं असा, अयुक्त २–२५३

अप्राप्य–मिळण्यास कठीण १–७९.

अप्रौढ–लहान १३–७८.

अफाट–अमर्याद १५–२१३; फारच फार १५–५३०.

अबंध–बंधरहीत ८–२५७.

अंबर–वस्त्र १–६; आकाश १–९०

अबळ–अशक्त १६–३०२.

अंबा–आई १२–१०.

अंबिका–आई १३–५०२; पार्वती १८–१६३२.

अंबु–पाणी १५–२८४.

अंबुज–कमल १४–२८६.

अंबुद–ढग १८–५.

अबोट–अनामिका १५–३.

अबोध–अज्ञान १५–८८.

अबोला–मौन १७–२३२.

अब्जिनी–कमलिनी १६–१.

अब्धि–समुद्र १–५१.

अंभ–पाणी १५–२७०.

अभंग–न भंगणारी, अखंड १३–९९२.

अभंगीं–अयोग्य रीतीनें १८–२८०.

अभयहस्त–अभय देण्याकरितां वर केलेला हात, १–१३.

अभिचार–जारणमारण १५–१६७.

अभिचारक–जारणमारण करणारा १६–४००

अभिचारिक–जारणमारण कर्मांसंबंधीं ९–३५७.

अभिधान–नांव १३–११६; व्याख्यान १६–२१३.

अभिनव–अपूर्व १–२१

अभिनवणें–अपूर्वतेनें प्रगट होणें ४–२१४.

अभिन्न–व्यापकपणानें असणारा, भेदरहित १३–१०६६.

अभिप्राव–भावार्थ १५-३४६.

अभिप्रेत–आवडता, प्रिय ८–१०५

अभिभवणें–घेरणें, जिंकणें २-२००.

अभिभूत–व्याप्त होऊन, पराभूत २–२४८.

अभिलषित–इच्छिलेला १–२७.

अभिलाष–इच्छा २–२९१.

अभिलाषणें–इच्छा करणें १५–३००.

अभिलाषिया–इच्छा करणारा १८–६०५.

अभिवंदणें–नमस्कार करणें १–२७.

अभिव्यक्ति–स्पष्टता, प्रगटभाव १४–९२.

अभिशाप–निंदा, शाप २–१९८.

अभिशाप देणें–नांवें ठेवणें, शाप देणें २--१९८-

अभिज्ञ–माहितगार, जाणता १६–९९-

अभेद– ऐक्य १७–४०३.

अभोळ–दुर्बळ, अशक्त ५–१६६.

अभ्यंतर–आंतील बाजू १३–३८४.

अभ्यर्चणें–पूजा करणें १३–६६०.

अभ्र–ढग २–३.

अभ्यासणें–अभ्यास करणें ८–८०.

अभ्युदय–भरभराट १८–१६५५.

अमंगळ–अशुभ १८–२.

अमंद–महान्, जोराचा १८–४.

अमनमन–मन ह्या उपाधीनें रहित मन, ९–२७२.

अमनस्क–मनरहित १३–१००२.

अमर–देव ६–४५६; नाशरहित १४–२८.
अमरपण–मृत्युरहित स्थिति, चिरंजीवपण १५–५८३.
अमरावती–देवांची राजधानी ९–३२०.
अमंत्रि–प्रधानरहित १३–५५६.
अमर्त्यभाव–अविनाशी स्थिति, अमरस्थिति ४–१५३.
अमर्ष–क्रोध १२–१६८.
अमानित्व–सन्मानाच्या इच्छेचा अभाव १३–२०१.
अमानुष–मनुष्यदेहधर्मरहित ९–१४२.
अमान्य–तुच्छ, अप्रमाण १६–४४६.
अमार्ग–योग्य मार्गाचा अभाव, कुमार्ग १८–६२५.
अमित–अमर्याद ११–५३३.
अमूर्त–अव्यक्त, निराकार २-१६४.
अमृत–दूध २–२२४; स्वर्गातील अमर करणारें पेय १६–३३५.
अमृतमंथन–अमृताकरितां केलेलें क्षीरसमुद्राचें मंथन १८–१४८२.
अमेध्य–अपवित्र १६–३१७.
अमेय–मोजतां न येण्याइतकें मोठें ९–१५९.
अमोघ–निष्फल न होणारें ६-४४२.
अमोडी–न मोडलेले, साग्र ६–१८२.
अयुक्तपण–युक्तपणाचा अभाव, चंचलता; २–३४७.
अरडीदरडी–भिंती, नदीचा कांठ वगैरे ९–८१.
अरणी–घासून अग्नि उत्पन्न करण्याचें यज्ञांतील लाकूड ४–१३१.
अरव–बगीचा १८–१७९७.
अरविंद–कमल १०–१.
अरसिक–मर्म न जाणणारा १५–५९४.
अरि–शत्रु ९–१६६.
अरुता, अरुतें –कमी प्रतीचा, अलिकडचा २–२७४.
अरुवार–सुंदर, मृदु १८–१४२,
अरोचक–अरुचि, शिसारी १२–१०६.
अरौतें–अलिकडील १३–१५८.
अर्क–सूर्य १३–३८७.
अर्कमंडळ–सूर्यमंडळ १५–५३०.
अर्घ्य–देवास अथवा पूज्य व्यक्तीस गंध, फूल घालून पाणी देतात तें १५–२.
अर्चणें–पूजा करणें २–३२.
अर्चन–पूजा १२–२३६.
अर्चि–दिव्याची ज्योत १३-११२३.
अर्चिरामार्ग–प्रकाशमय मार्ग, ज्योतिमार्ग ८–२२५.
अर्जणें–मिळविणें २–२५३.
अर्णव–समुद्र ११–६१.
अर्थ–इंद्रियांचा विषय १५–३७४; पुरुषार्थ १–४०; समासाच्या शेवटीं 'कारणें', 'जोरावर'. जसें–बळार्थें–'बळाच्या जोरावर' १६–४६४; द्रव्य १६–३४२; कारण, हेतु, काम ३–१५३;वस्तु ३-९५; निरूपण करण्याचा विषय १४–३७.
अर्थना–अर्थप्राप्तीची इच्छा १८–११२०.
अर्थवाद–पुष्पित वाणी, अतिशयोक्ति ३–१९५.
अर्थाभिधान–अर्थ हें नांव १८–११२०.
अर्थार्थी–धनाची इच्छा करणारा ७–१०९.
अर्थास्तव–निमित्ताने ७–४६.
अर्थिक–उपयोगी १८–१५९७-
अर्थी–याचना १८-११२०; याचना करणारा ७–१०९.
अर्ध–स्थान, उच्चस्थान १४–२९९.
अर्धघणी–अर्धतृप्त, अर्धपोटीं १६-३०.
अर्धनारीनटेश्वर–आपल्या अर्ध्या अंगावर पार्वतीस दाखविणारी शंकराची मूर्ति ९-२७०.
अर्धबिंब–ओंकाराची अर्धमात्रा ८-११५.
अर्धवेरी–ओंकाराच्या अर्ध मात्रेपर्यंत ६-३०४
अर्धार्ध–निम्याचे निम्मे, एक चतुर्थांश ११–८५१.
अर्धोदकीनिमणें–उपोषण करून अर्धे शरीर बुडेपर्यंत गंगेच्या पाण्यांत राहून प्राणत्याग करणें १८–१९४.
अर्धोन्मिलित–अर्धी उघडी ६-२०३.
अर्पे–अर्पिलें जातें १८–२२८.
अर्यमा–पितरांतील मुख्य १०–२४४.
अर्वाचिन–अलिकडचा १३–४०.
अलक–केस १०–२१५.
अलग–दूर ६–४३५.
अलक्षपण–लक्षांत न येण्याजोगी स्थिति १३–११११
अलांछन–कलंकरहित १८–१७९८.
अलि–भ्रमर १–१६.
अलिडलें–भ्रमरांचे समुदाय ११–२४९.
अलोकिक–अलौकिक ११–२६५.
अलोट–दृढ १८–३८२.
अलोलुपत्व–अनासक्ति १६-१६७.
अलौकिक–लोकबाह्य, ३–१७१. जगविरहित, लोकोत्तर ६–४४२.

**अल्पक**–दरिद्री पुरुष १६–२२७.
**अवकण**–धान्य ९–४५.
**अवकाश**–पोकळी ५–३०; अंतर ६–४०.
**अवकळा**–फजिती २–२१८ निस्तेजता ९–१९८.
**अवकाळ**–अकाळीं आलेला १७–२५१.
**अवखळा**–न्यूनता १५–३०३.
**अवगणी**–सोंग ११–८४.
**अवगणें**–दिसणें १४–२८१.
**अवगमणें**–वाटणें १–१६, विचार करणें ३–१६.
**अवगळणें**–त्याज्य म्हणून टाकणें १३–६७७; चुकून राहणें १६–४०१.
**अवगाहन**–स्नान १–२६.
**अवगाळ**–गाळ ७–७८.
**अवगुण**–वाईट गुण १३–२७१.
**अवघड**–भिन्न भिन्न आकाराचे, वेडेवाकडे १३–१०६१; त्रासदायक १८–७८०; संकटांत पडलेला १८–६४६.
**अवघडणें**–कोंडमारा होणें, कुचंबणें २–३२७.
**अवघा**–सर्व ९–४७.
**अवंचक**–न फसविणारा, पक्का १८–३३३,
**अवचटें**–अकस्मात् २–१९५; कदाचित्, चुकून १३–७६५.
**अवचित**, **अवचिता**, **अवचितीं**–एकदम, १–१५४, आकस्मिक ६–१६८; ८–७०. सहजगत्या ९–२२७.
**अवचिता**–अकस्मात आलेला मनुष्य, परका, १०–५२.
**अवचिती**–आकस्मिकपणा १८–१५
**अवच्छेद**–पृथक्‌पणा, भेद १८–५४
**अवंतणें**–आमंत्रण करणें ११–३४६
**अवतरण**–अवतार २–१९०; मूर्ति ११–४२; संचार ६–३४७
**अवतरणें**–प्रकट होणें, उत्पन्न होणें ११–१४३; सरसावणें १३–११४९; संचारानें ६–३४७; आवेशानें १४–४१४.
**अवतरविणें**–प्रगट करणें १५–५७६.
**अवदसा**–दुर्दशा १६–३४; हीन स्थिति १८–१७६९.
**अवधान**–लक्ष १–६२.
**अवधानीं**–लक्ष दे १७–३०८.
**अवधारणें**–ऐकणें १–२.
**अवधि**–शेवट १–२४१, ६–४५७ हद्द, मर्यादा ४–५२; सामासिक पदाचें शेवटीं कालदर्शक 'पर्यंत' असा अर्थ ८–१६३.
**अवनी**–पृथ्वी ११–६६०.
**अवबोध**–जागृति ३–५७.
**अवभृथ**–यज्ञसमाप्तिचें शेवटचें स्नान ४–१३८.
**अवयविया**–शरीरी १४–१२५.
**अवर**–अलिकडील १५–५३८.
**अवर्षण**–दुष्काळ ११–३८१.
**अवलाहो**–आळ १८–४१२.
**अवलीळा**–सहज १–३७.
**अवलोक**–दर्शन १५–४२४; प्रकाश १८–३२८; नजर १६–१४७.
**अवलोकणें**–पाहणें १–१८४.
**अवशिष्ट**–शिल्लक राहिलेले ४–१५२.
**अवष्टंभ**–अष्टसात्त्विक भावांचा पुंज १८–१६२२; अहंकार–९–४१४.
**अवस**–संध्याकाळ १३–२९.
**अंवस**–अमावास्या ११–५
**अवसर**–वेळ १–८७; संधी १३–११६९.
**अवसरी**–अभाव, उणीव १३–२९७ अडचण १८–१०४४.
**अवसरोचित**–यथाकाल ३–१८८.
**अवसांत**–अकस्मात् ६–६९.
**अवसान**–शेवट, अंत ७–२८.
**अवस्था**–वेध, उत्कंठा ६–१३१. जागृतादि अवस्था १८–१००४.
**अवस्थात्रय**–जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्था १८–१३००; बालत्व, तारुण्य व वृद्धत्व या तीन अवस्था १८–३२०.
**अवज्ञा**–अनादर ३–१९५.
**अवाच्य**–ज्याचा उच्चार करूं नये असे १४–२०९.
**अवांतर**–इतर ७–१०३.
**अविकार**–विकाररहित, निर्दोष १६–१२४.
**अविकृत**–न विकार पावणारा, न बदलणारा २–१५०.
**अविक्रिय**–ज्याच्यांत विकार अथवा बदल होत नाहीं असा १५–३३७.
**अविचारणीय**–विचाराच्या आवाक्याबाहेरचें ६–४६७.
**अविचारित**–अविचारकाळांतील १४–११०.
**अविट**–निर्विकार २–१७०.
**अविद्या**–माया १६–२; अज्ञान १५–४४०.
**अविधि**–स्वैराचार १८–२४
**अविनाश**–नाशरहित ९–१५२.
**अविनाशभाव**–नित्यताबुद्धि ४–१२०.
**अविरजी**–न विरजलेलें १८–१४७६.
**अविरल**–एकसारखा, निरंतर १८–६.

अविवेक–मूर्ख १–७६; अज्ञान ४–१२२.
अविवेकी–मूर्ख २–२५६.
अविसाळ–घटें ११–२५८.
अवृष्टी–अवर्षण १३–२२१.
अवेव–अवयव २–३०१.
अव्यक्त–निराकार १८–११९४.
अव्यंग–दोषरहित, निर्दोष १८–६९.
अव्यंगवाणें–व्यंगरहीत, दोषरहीत ८–९१.
अव्यत्यय–एकसारखें १८–१७५४.
अव्यभिचार–अनन्यता,एकनिष्ठपणा १५–५.
अव्यय–नाशरहित १८–१२७५.
अव्यवहार्–निष्कर्म १८–७३३.
अव्यवहारी–ज्याच्या संबंधानें कोणचाही व्यवहार होऊं शकत नाहीं अशी १८–८१.
अव्याहत–निर्विवाद १८–६८८.
अव्हां–भलतें, विरुद्ध १८–७१९.
अव्हांटणें–आडमार्गाला जाणें ४–२१.
अव्हाटा–आड मार्ग, ९–३१५.
अव्हांसव्हां–हवें तसें, बेंवाईट न पहातां १३–७७०.
अव्हेर–त्याग ८–१३६.
अव्हेरणें–धिःकारणें, न मोजणें १–९२.
अंश–भाग १५–४६४.
अशन–खाणें,भोजन १८–१०२६.
अंशिक–अंशाएवढें १८–१७२४.
अशुचि–अपवित्र १३–६७८.
अशुद्ध–रक्त ९–५७.
अंशुमाळी–सूर्य १५–२९७.
अशेख, अशेष } संपूर्ण ११–७७
अशोक–अशोकवृक्ष ११–४१४; शोकरहित १८–११९८.

अशौच्य–अशुद्ध ९–१७७.
अश्व–घोडा १–१४०.
अश्वत्थ–पिंपळ १०–२३५; उद्यापर्यंत न टिकणारा, पिंपळ १५–११०.
अश्ववाहक–सारथी, घोडे हांकणारा १–१४०.
अश्विनौदेव–अश्विनीकुमार, देवांचे वैद्य ११–१४४.
अष्ट–आठ ७–१७.
अष्टधा–आठ प्रकारची ७–१७.
अष्टांग–यम,नियम,आसन,प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि ही योगाचीं आठ अंगें ९–४२२.
अष्टादश–अठरा १–५.
असकें–पूर्ण, सर्व १०–३२२.
असंख्याक–अगणित १०–३०.
असंगडें–अशक्य ४–१७८; असामान्य १३–९७८.
असत्–विनाशी पदार्थ १७–३८०; मिथ्या १५–८१.
असतपण–मिथ्यात्व १७–३८२.
असंत–अस्थिर १५–१३३; असत्कर्म १७–३९०. अशाश्वत ११–५१३.
असंतपण–असत्कर्मपणा १७–३९०.
असंतुष्टि–असमाधान ७–१६९.
असतें–असणारें, असलेलें ६–७३
असतेपण–अस्तित्व ८–३१.
असंबद्ध–विसंगत १५–३२३.
असंभाड–असंभाव्य, बेसुमार १३–३१.
असंभाव्य–अशक्य १८–८०९.
असमसहास–असंख्यात ८–२४.
असमाई–न मावणारी ६–११८.
असलग–सोपें, सुगम ११–१२६.
असलगपणा–सुलभता ७–१९४.
असलळें–उसळलें, १३–२६८.

असंवरें–न सांवरणाऱ्या १८–१६२०.
असांगडें–निरुपम १५–३०४.
असाधारण–असामान्य १–९६.
असाधु–असत्, वाईट १७–३९९.
असार–खोटा, मिथ्या १६–३३१.
असारणें–पसरणें १५–१०७.
असि–तरवार १६–३७३.
असिका–असिकें–संपूर्ण १७–१८७.
असिपत्रतरुवर–तरवारीच्या पानांचीं झाडें १६–३७३.
असिलेपण–अस्तित्व १५–१४०.
असिवार–स्वार ९–१७३.
असुर–राक्षस १८–१४७६.
असुरवाड–क्लेश,दुःख १८–१८९.
असोस–पुष्कळ १३–८३५; अमर्याद १४–१०; पूर्णपणें १४–२४६.
असौरभ्य–सुवास न येतां येण्यासारखा १५–७४.
अस्करणें–धिःकारून बोलणें ११–५४८.
अस्तगिरी–पश्चिमेकडील पर्वत, ज्याच्या पाठीमागें सूर्य संध्याकाळीं विश्रांति घेण्यास जातो अशी कल्पना आहे १२–३५.
अस्तमान–सूर्य मावळण्याची वेळ, २–३२४.
अस्तवणें–मावळणें १५–५४१.
अस्ताव्यस्त–अव्यवस्थित ११–३८१.
अस्थि–हाड ६–२१८.
अस्त्र–फेकून मारण्याचें हत्यार १–९६.
अहं–मी १८–४०८
अहंकृतिभावो–अहंकार १८–४२२.
अहंकृति–अभिमान २–९८.
अहंभाव–अहंकार ४–१०८.

अहंममता–मी व माझें असा समज १८–४०८.
अहंमान–अहंता १८–३८१.
अहर्निशीं–रात्रंदिवस ४–१२३.
अहाकटा–अरेरे ! ९–५१५.
अहाळबहाळ–अत्यंत, फार ११–३५१.
अहाळलेली–पोळलेली १३–५२५.
अहित–अकल्याण १६–१२३.
अहेतुक–हेतु न धरतां, निष्काम ३–९२.
अहेव–सौभाग्यवती, सुवासिनी १३–८२१.
अहोरात्र–रात्रंदिवस १८–७१८.
अहोरात्रविद्–दिवसरात्र जाणणारें ८–१५९.
अळंकार–दागिना १४-१२४;भाषेतील अलंकार १८–१७६७.
अळंकारणें–अलंकृत करणें १–४५, नटवणें, सुशोभित करणें १–८२.
अळंकृत–सुशोभित १८–८७३.
अळुमाळ–किंचित्,थोडेसें६-१७५.
अक्षत–लग्न समारंभांत नवरानवरीचे मस्तकावर टाकतात ते तांदूळ १८–७२३.
अक्षम–आंधळा १३–२७९, असमर्थ १६–१८५.
अक्षय्यत्व-अविनाशित्व१८–९४६
अक्षर–ब्रह्म ३–१३६; न क्षरणारा, नाशरहित १८–११९३.
अक्षोभता–शांतता, अक्षुब्धता २–३५७.
अक्षोभें–चित्ताची गडबड होऊं न देतां १८–१५१७.
अक्षौहिणी–२१८७० हत्ती, तितकेच रथ, ६५६१० घोडे व १०९३५० पायदळ मिळून होणारें सैन्य १–१२२.

अज्ञान–मूर्खपणा ३–५३; अज्ञानी, ६–३०. प्रपंचाच्या ठिकाणीं खरेपणाची बुद्धि ७–६; स्वरूपाचा विसर १४–७ ज्ञानगुणांच्या विरुद्ध गुण १३–६५२;

## आ

आइती (आयती) –तयारी, सामुग्री १३–५९१; –अनायासें, श्रम न करितां १८–१७२९
आइसी–आई, लक्ष्मी ११–३२.
आउट–साडेतीन १३–१२.
आउत–शेतकींतील एक हत्यार १८–४५४.
आकंठें–गळ्यापर्यंत असणारें १७–२५८.
आकडा–टोंक ११–३६३.
आकर–खाण १०–२८३.
आकर्णणें–ऐकणें १–५३.
आकर्णन–ऐकणें १८–१४८९.
आकर्षणें–संकोच पावणें, घट्ट होणें; १४–३७६; आकर्षण करणें, ओढवणें १८–७१.
आकळणें–व्यापला जाणें १–१९०; जाणणें ६–१११.
आकळियां–प्रहार ७–७.
आकांत–कल्होळ, गोंधळ १–१३८
आकार–वैखरी ९–२७५; आकारास येणें १३–९३१.
आकारजात–आकाराला आलेलें, सर्व, संपूर्ण विश्वाकार १५–८३.
आकाश–निर्गुणस्वरूप १२–७४.
आकांक्षणें–इच्छा करणें १२–१९३.
आकांक्षा–आशा १५–१०१.
आकुंचणें–संकोचित करणें, आकर्षण करणें १८–१०३७; –संकोचित होणें ६–२३७.

आकुल–व्याप्त झालेला २–१.
आकुळ–समुदाय ८–२३१.
आक्रमणें–व्यापणें २–३५०.
आक्रोश–चरफड १३–३३९; आवेश १४–१८९.
आंख ( अंक )–रकम १३–९३७.
आखणें–योजना करणें ७–२६.
आखर–अक्षर ६–३१६; गुरें बसण्याची जागा १३–५५८.
आखेंलेखें–आंकडे मांडून, लिहून १३–८४६.
आख्य–नांवाचा १–५०.
आख्यान–कथा १–४६.
आंग झाडणें–सर्व मालकी टाकून देणें १७–३७२.
आंगदट–बळकट १६–४५.
आंगभर–अंगाचा जोर १३–३१८
आगम–मंत्रशास्त्र १३–८३०;अथर्ववेद १५–१६७;प्राप्ति१८-३४५; आगमन १८–३०८; शास्त्र १८–२, १६–९५.
आगर–उत्पत्तिस्थान२–३७४;मळा १५–४०४; शेत १८–२३५.
आगरडे–टोंक ११–४१६.
आंगवठा–शरीर, मूर्ति, ८–१४४.
आंगवण–पराक्रम १६-४३६.
आंगवणें–स्वाधीन होणें ३–२६७; स्वाधीन करून घेणें १२-४५.
आंगवत–सामर्थ्य ११–४०५.
आंगवसा–ढगळा १५–१०३.
आंगवळा–मिळवलेला ८–१३७.
आगळा–अधीक १–३७.
आगळिक–अधिकपणा, वाढ १–३८.
आंगाघडणें–ऐक्य पावणें ६–३०५
आगारा–अंकुर १५–९२.
आगारी–अंकूर; दोंडा १५–१७२
आंगी–आंगडें, पोषाख ९–५०२. ११–२८३.

आंगिक–अवयव ५–१४०; अंगांतील, स्वाभाविक ६–११०.
आगिटा–ठा–विस्तव १३–१०३६
आगिठी–अग्नि १८–६८४.
आगियाळें–अग्निकुंड १४–१६२.
आगी–विस्तव, निखारा ३–२५४.
आंगें–बाजूनें १७–२८२.
आंगोळी–बोट (हाताचें)१४–१०९ बोट (पायाचें) १५–५.
आग्रहो–हट्ट, आग्रह ३–६३.
आघवें–संपूर्ण १–६९; सर्व १–१७१.
आघाट–हद्द १३–४५.
आचरता–आचरण करणारा ३–२२०.
आचार्य–गुरु ९–४७.
आचार्योपास्ती–गुरुसेवा १३-३७०
आच्छादणें–झांकणें १४–१२५.
आजन्म–जन्मापासून १४- १४६.
आज्य–(हवन करण्याचें) तूप ९–२६७.
आटणी–नाश ६–२९०.
आटणें–आकुंचित होणें. ६–२२५ नाश करणें १६–३१९; नाहींसें होणें, लय होणें, ९–१०२.
आटले–आंतले, व्यापलेले ८–१२६
आटी–श्रम १–१६९; मिठी १३-७८५.
आटी काढणें–मेहनत करणें, श्रम करणें, १३–२९.
आटीव–ओतीव १६–३७९.
आटु–लय, आटणी, नाश ६-३१४; ९-५२७; हट्ट १३-२७१.
आटोप–अभिमान १७–९५; व्याप्ति, आवेश ११–११५.
आटोपणें–व्यापून टाकणें १४–१९६.
आटोपें–स्वाधीन होऊन ३-१८४.
आंठी–आलिंगन ५–१३२.
आठुळणें–बांधणें १५–८८.
आठोळी–कोय १८–२०४.
आठौ–आठव १४–३१७.
आड–पडदा ६–११४; आडवें संकोचित, उंबरा, उंबरठा १३–६९९.
आडऊ–डबर १८–३६.
आडकंठ–अवघड कडा ६–५५.
आडकडा–कडा ६–४७६.
आडकाठी-अडथळा, प्रतिबंध १७-३२५.
आडखिळा–निशाण, लगोऱ्याची रचना ११–४७८.
आड घालणें–उडी घालणें ८–२४०.
आडजाणें–जवळून जाणें ६-१६७.
आडणी ( अडणी )–सुपाच्या विणकरीच्या चोहींकडून असणारी वेळूची पट्टी ११–६०३.
आडणें–मावणें ९–११.
आडनांव–कुळावरून येणारें नांव, दूरसंबंधानें येणारे नांव, अमुख्य नांव ८–९०.
आडपडणें–समोर येणें, प्राप्त होणें १८–५५८; मार्गांत आडवें होणें, नमस्कार घालणें १३–३७५.
आडफुटणें–मध्येंच फुटणें १५-१५०; आडवा फुटणें १५-१५६.
आडमुठी–मिळण्याचा संभव नसतां, अनायासें ६–४.
आडमोडणें–मध्येंच मोडणें १३-२२७.
आडलेपणें–अडल्यामुळें ८-१२८.
आडव–अडचणीचें ठिकाण १८–७२४; अरण्य १६-३४; अडचण, संकट १८–७७९.
आडवंकी–आडसर १२–५२.
आडवंगी–आडथळा, आडकाठी १६–२०३.
आडवस्त्र–पडदा १८-१३०३.
आडवारा–अडथळा,-प्रतिबंध १५-४६.
आडवोहळ–आडरानांतील ओढा १३–७५५.
आडस–खोळंबा, अडथळा १३–६३३.
आडसो–अडचण, अडथळा १७-४९.
आडळ–अडथळा १८–८९२; विकल्प १३–३५८.
आडळणें–आडखळणें १- २४७; सांपडणें ४–१३.
आडिला –अडकलेला १७–२.
आडी–बंद करते १३-१६९. अडथळा, प्रतिबंध ६–४६५.
आडें–उंबरा १३–६९९.
आढ्य–श्रीमंत १३-२०५.
आढ्यता–श्रीमंती १३-२०५.
आण–शपथ ११-९६.
आणिकचि–विलक्षण ६-३७१.
आणियाळें–तीक्ष्ण, अणकुचीदार १५-३८२.
आणी–आणतो १५-२९७.
आणोजें–अंकुर १४-३२७.
आतणें–व्यापणें १८–५३९; होणें १६–७२.
आतप–ऊन ५–११४.
आतला–दडपलेला ६–१४५.
आतळणें–स्पर्श करणें, शिवणें २–२७८.
आतुडणें–सांपडणें ३–२५५; स्वाधीन होणें ५–६७.
आतुडविणें–स्वाधीन करणें १६–२६०.
आतुर–उतावळे १–१७२.
आंतुल–आंतील ११–३८८.

आंतुबट–अंतरंग ८–२०३; बळकट १६–२१३.
आते–बनतें, होतें १६–७२.
आंतौटेपण–आंत असणें ३–२५९.
आंतौतीं–मधील ६–१९५; पर्यंत १३–१५८.
आत्मचोर–आत्मघातकी १६-४४५
आत्मछाया–आपली छाया १८–५३०.
आत्मज–मुलगा ५–९३.
आत्मजा–मुलगी १२–१३२.
आत्मतुष्टि–आत्मज्ञानानें प्राप्त झालेली तृप्तता अथवा कृतकृत्यता ३–१४८.
आत्मनिवेदन–' श्रवणं कीर्तनं ' या श्लोकांत सांगितलेल्या भक्तीपैकीं नववी भक्ति ६–१२७.
आत्मनिवेदनातळींची–आत्मनिवेदन या भक्तीच्या पूर्वीची, आठवी सख्य भक्ति ६–१२७
आत्मबिंब–प्रतिबिंब १८–१३०६.
आत्मरूप–सर्वव्यापी, आत्म्याचें स्वरूप १–१.
आत्मलिंग–आत्मस्वरूप १८––१३६९.
आत्मविद्–आत्मज्ञानी ५–१४९.
आत्मविदविलास–आत्मज्ञानाच्या ठिकाणीं विलास करणारे १५–६५.
आत्माराम–ब्रह्मनिष्ठ ५–१३६.
आत्मिक–नातलग १८–१२८२.
आत्यंतिक–पक्का १८–१२८१.
आथर्वणविधि–अथर्व वेदांत सांगितलेले जारणमारणादि विधि १३–८२९.
आथि–असतो, आहे १–६४.
आथिला–संपन्न १–६१; असलेला ४–२२५;ऐश्वर्यसंपन्न १५–३६२.
आथिलेपण–संपन्नपणा, संपन्नता ३–१०७.
आदरणें–आरंभ करणें २–८४.
आदळणें–येऊन ठेपणें, आपटणें ८–६९.
आदि–उगम, आरंभ, मूळ १–२९; उत्पत्ति २–१५३, ७–४०.
आदित्य–सूर्य ११–१४१.
आदिपुरुष–परमात्मा १–१५९.
आदिप्रकृति–मूलप्रकृति ६–१२.
आदिबीज–मूळकारण, ओंकार १–२०.
आदिवंत–मिरासदार ६–४४९.
आदिवंद्य–पहिल्यानें वंद्यअसे १–५४
आदिशून्य–माया ७–२४, १०–१७८.
आदिसंकल्प–परमात्म्याच्या ठिकाणीं उत्पन्न होणारा ' एकोऽहं बहुस्याम् ' हा संकल्प ८–२२.
आदील–पूर्वीचा, मूळचा; पहिला १–४३, ९–४२८.
आंदोळणें–हेलकावे खाणें १–१५५; आदळणें ११–२४९.
आद्य–सर्वांच्या आरंभींचा, मूळचा, पहिला १–१.
आधलें–उत्सुक ११–६०६.
आधा–अर्धा ९–४८६.
आधाडा–अर्धा तुटलेला कडा ७–६९.
आधातुरें–अतृप्त, अर्धमुकेलें ६–२८०.
आधाधिला–म्यालेला १३–२३.
आधार–योगशास्त्रांतील षट्चक्रापैकीं गुद व शिस्न यांच्यामधील मूलाधारचक्र १२–५१.
आधारद्रुम–आधारचक्ररूपी वृक्ष ६–१९३.
आधारमुद्रा–योगशास्त्रांतील दहा मुद्रापैकीं एक मुद्रा ८–४९.
आधारशक्ति–मूलाधारचक्र १२-५.
आंधारें–आंधार ८–८९.
आधि–खालच्या ६–२०५;काळजी, चिंता १६–१४१; उत्कंठा १७–३२६.
आधिली–पूर्वीची ६–२६७.
आधियेदिठीचें–अर्ध्या दृष्टीचें ६–२०५.
आधीच–मुळांतच, मूळचाच १–११७.
आधीन–स्वाधीन २–११९.
आधील–खालचा १५–९२.
आधेय–आश्रित १८–११९५.
आंध्य–काळोख, अंधार. १६–२००.
आध्यात्मिक–मानसिक ताप ६–४९०.
आन–दुसरें १–२४८; भिन्न १३–११६.
आनान–भिन्नभिन्न, निरनिराळे ५–२७.
आनौती–दुसरी २२–७९.
आप–स्वाधीन २–६५, पाणी ६–२२०.
आपंगणें–आश्रय करणें १५–३६८.
आपजणें–वाटणें २–१३९; उत्पन्न होणें १५–३३२.
आपणपें–स्वतः १–१९५; आपणाला ४–९६.
आपत्य–आपत्ति, दुर्दशा १३–५६६.
आपद्–संकट १–१८३.
आपदा–संकट, विपत्ति ७–८७.
आपपर–आपला व परका ९–४०७.
आपसया–आपोआप १०–८०.
आपाद–मस्तकापासून पायापर्यंत ११–२४६.
आपादकंचुकित–पायापासून मस्तकापर्यंत अंगरखा घातल्यासारखें ९–५२७.

आपादणें–स्वीकार करणें ३–५१; प्रयत्न करून मिळविणें १८–९६.
आपादन–संपादन १७–३८.
आपान–गुदद्वार १६–२९१.
आपांपती–समुद्र ९–१३.
आपांपरी–दुर्दशा ११–६६५.
आपु–आपलें, आपलेंसें ७–१३५. स्वाधीन, प्राप्त २–१४९.
आपुलियापरी–इवातसा १–४०.
आपैंआप–स्वभावतः, सहज १४–६.
आपैतें–स्वाधीन २–३०२; अनुकूल १५–२२.
आपैसी–सहज, आपोआप १–१८५.
आपैसें–सहज २–१४२.
आप्त–सोयरें १३–८०२.
आप्लाविणें–बुडविणें १–२५६.
आफळणें–हापटणें १७–२८०.
आफावणें–आपलेंसें होणें १३–८३०.
आबालसुबोध–मुलापासून तों जाणत्यापर्यंत सहज कळणारा १८–१७४२.
आंबुखणें–पेटवणें ११–३४२; शिंपडणें १४–१६२.
आंबुखा–चिंतोडा १८–७०९.
आंबुथणें–वाढणें १३–७२२, उजळणें, पेटवणें १८–१००८.
आंबुली–वायको १३–९७९.
आब्रह्म–ब्रह्मदेवापर्यंत १–२५६; ब्रह्मलोकापर्यंत ११–१८७.
आभरण–दागिना, अलंकार १७–२८१.
आभार–ओझें ११–७९; भीड १८–१३३५.
आभास–भास ६–४०; प्रतिबिंब १५–३७८.
आभासणें–भासणें १८–३२४.
आभारैला–(उपकाराच्या) ओझ्यानें दडपलेला २–३७.

आभाळ–ढग ६–२५१.
आभिजात्य–कुलीन, उत्तम जातीचें किंवा अस्सल, ९–४२१.
आमतें–आमच्या १०–१३७.
आमिष–माशास पकडण्याकरितां गळास लाविलेली उंडी ३–२१३; खाद्य ३–२४६.
आमुतें–आमच्या १–११४, आम्हांला ९–३०.
आमुला–नवरा १३–९७८.
आमोद–सुवास, साजुकपणा १–५२.
आम्नाय–वेद १८–२४३.
आम्ल–आंबट १७–१३९.
आय–स्वाधीन १–२०३. आकार १३–८९७, १५–६१.
आयणी–चातुर्य २–१२९, ७–५; बुद्धि ४–२१३.
आयत–विस्तृत, मोठें ११–६९.
आयतन–घर ११–३०८.
आयती–विस्तार, थाट २–७८; सामुग्री ७–१३०; सहजच ८–४४; तयारी १२–२९५.
आयस–लोखंड १८–१७७१.
आयास–श्रम १८–९३६.
आया–साध्य, स्वाधीन ७–६८; ताब्यांत, स्वाधीन ९–३५१.
आयु–आयुष्य ११–३८९.
आयुध–शस्त्र १–१०.
आयुर्वेद–वैद्यशास्त्र १३–२२४.
आर–अजगर १३–७२४; अंकुर १५–७९.
आरण–युद्धभूमि १–१२२.
आरंबळणें–पोळणें ११–३२५.
आरभ्य–आरंभ करून १५–५७०.
आरब–बाग, अरण्य ११–३३७.
आरबसा–अंकुर १५–१०९.
आराइणें–अर्पिलेले असणें, अनुकूल असणें १–११०.
आराणुक–समाधान २–८०.

आराधणें–सेवा करणें ११–९९.
आराधन–उपासना ३–९०.
आराध्यालिंग–पूजा करण्यास योग्य असे देव. १०–३.
आराम–बगीचा ९–६०.
आरायिणें–तृप्त होणें १२–२०९.
आरिसा–आरसा १६–१०२.
आरूढ–चढलेले ४–३०.
आरूढणें–चढणें, बसणें. ३–६०.
आरोगण–खाणें, भक्षण ११–४२७.
आरोगणें–सेवन करणें, खाणें ४–१०७.
आरोचक–अरुचि, वीट ४–१९७.
आरोप–आळ १८–५४४.
आरोपणें–ठेवणें १–२२०; मारणें १–२४५; राहणें १८–९७९; आरोप करणें २–१४३; पेरणें १३–३२.
आरोहण–वर चढणें, वर बसणें १३–४२४.
आरौतें–पूर्वी, अगोदर ४–२४.
आर्जव–सरळता, ऋजुता १६–११३.
आर्त–त्रस्त, दुःखानें पीडित १३–२८७; इच्छा ५–११.
आर्तबंधु–पीडितांना संकटांतून सोडविणारा १४–३.
आर्ति–इच्छा २–१७०; पीडा, दुःख ७–११०
आल्हां–अलिकडे १५–७५.
आलय–घर, मंदिर १–८६.
आलस्य–आळशीपणा १४–१७९.
आलाप–बोलणें ७–४२; कथा, गोष्टी ९–४४५.
आलोक–भास १४–७६.
आलोच–विचार ६–२६९.
आलोट–अपार १८–९९९.
आलोडणें–अध्ययन करणें, घुसळणें १०–१७२.
आवगे–घेतों ६–१३१.

आवडणें–भासणें, दिसणें ४–१००, ५–३५.
आवडतयाही–भलत्यासही ६–३३७.
आवडता–हवा तो, वाटेल तो. ६–३३७.
आवडताविखीं–हवें त्याविषयीं, वाटेल त्याविषयीं १७–३२०
आवडतें–हवा तसा १–४५.
आवडेतेसणा–हवा तेवढा ९–९.
आवडेतैसें–हवे तितके २–६६.
आवंतणें–आमंत्रण ९–४४०.
आवरण–आच्छादन ९–१६२.
आवरणें–हुकमतींत ठेवणें १–१२३; व्यापून असणें १३–८८२.
आवर्त–भोंवरा ७–७२.
आवर्तणें–घोकणें १६–१०४.
आवर्तवणें–पुनः पुनः म्हणणे १७–२२१
आवळी–पंक्ति ९–११९.
आवांकणें–गोळा करणें १८–१३३७.
आवांका–विचार, शंका १३–३६०; १३–४०३; आकार १४–९५; अभिप्राय १८–१२४२.
आवार–गांवकूस ९–१७३.
आवारी–देखरेख करणारा १३-२८.
आवाहन–आमंत्रण, बोलावणें १८–७१.
आवाळुं, (आवाळें)–ओंठाचे कांठ, ओष्ठप्रांत ९–१८२.
आविष्करणें–प्रगट होणें, स्फुरणें १–३२; दिसणें, प्रतिबिंबित होणें ९–७८; गर्व मिरवणें १८–१६९.
आविष्कारणें–गर्व मिरविणें १३–७१४.
आंविस–आमिष ७–७७.
आवृत–व्याप्त २–२५६.

आवृत्ति–वारंवार चिंतन १८–११३५.
आवो–डौल १–३३; दबदबा २–९; प्राप्ति १८–६२२; प्रतिष्ठा १५–५१२; आकार १८–४०.
आव्हाट–आडरस्ता, आडमार्ग ३–९
आव्हाटणें–भलत्या मार्गाला जाणें, मार्ग चुकणें. ६–१५८.
आशय–सांठा १७–४१६.
आश्रय-स्थिति १ ब्रह्मचर्य, २ गार्हस्थ्य, ३ वानप्रस्थ, ४ संन्यास हे चार आश्रम आहेत ४–९०; रहाण्याचें ठिकाण १८–७५८.
आश्रयणें–आश्रय करणें १८–१२५०.
आश्रो–आश्रय १६–२६८.
आश्वासणें–आश्वासन देणें, धीर देणें ११–६५४.
आस–इच्छा २–२६६; आशा १८–९२५.
आसकड–अडचणीची जागा १६-५.
आसका–संपूर्ण १८–६०७.
आसक्ति–लोभ २–२४५.
आसडणें–हिसकणें ११–४६९.
आसतुटी–निरास ११–४५३.
आसन–योगशास्त्रांत सांगितलेली बसण्याची एक पद्धत, हीं आसनें ८४ आहेत. १०–२६; बसावयाचें वस्त्र १३–४२०; अशन, खाणें १८–१०२६.
आसलग–सोपें १६–४२९.
आंसु–अश्रु, डोळ्यांतील पाणी, १३–५६०.
आसुडणें–हिसका बसणें १–१५६; हिसका देणें १४–१४७.
आसुरी–असुरासंबंधीं १६–६०.
आस्तिक–श्रद्धावान् ८–१९३.

आस्तिक्य–श्रद्धा, शास्त्रांनीं सांगितलेल्या मार्गांचा आदरयुक्त स्वीकार १८–८४८.
आस्तिक्यबुद्धि–'नित्य आहे' असा निश्चय २–१३२.
आस्था–उत्कट इच्छा ६–१६७; आसक्ति, प्रेम १३–५९४. कळकळ ४–१९६.
आस्थान–ठिकाण; सभा ४–२३.
आस्थाबुद्धि-आस्था बाळगणारी बुद्धि ४–२१; तीव्र इच्छा ९-३६.
आस्पद-स्थान, ठिकाण १६–२३१.
आस्फारणें–वाजविणें १–१३०.
आस्फुरणें–फुंकणें, वाजविणें १-१२७
आस्वाद–लालसा १८–२०५.
आस्वादन–सेवन १–२६.
आहत–ताडन केलेली २–२२३.
आहवनीयादि–गार्हपत्य, आहवनीय व दक्षिण हे तीन अग्नि १७–३६१.
आहाच–वरवरचा, उथळ २–३९; खोटें ८–३१.
आहाचवाणें–वर वर ८–९५.
आहाचवाहाच–वरवरचें ६–९९.
आहार–अन्न ६–३४९.
आहाणा–दृष्टांत २–१९६.
आहाती–आहेत १–१०८.
आहाळणी–ताप १३–२३४.
आव्हाळणें–भाजणें २–६६.
आहाळी–बांधलेली १७–७.
आव्हाते–बोलणारे; हांक मारणारे, १८–१४९९.
आव्हानणें–आवाहन करणें, बोलावणें ९–१६३.
आळ–आरोप १५–२३०.
आळमाळ–जराशा, थोड्याशा १३–४४१.
आळवणें–समजूत घालणें; विनवणी करणें २–८२; बोलणें, म्हणणें ८–३६.

आळविणे–हांक मारणें, बोलावणें ५–५८.
आळियाडे–हट्ट १८–१७७५.
आळी–हट्ट ११–५७९.
आलुकी–आग्रह ३–२२७; तीव्र इच्छा ९–७.
आलुकैले–भुकेलेलें ५–११०.
आक्षेप–हट्ट १३–५४२; संशय १५–३२९; कष्ट, त्रास १७–२४९; दक्षता १८–१५३.
आक्षेपणें–अपेक्षणें, आशा करणें १७–४२१.
आक्षोणि–पृथ्वी १३–४२६.
आज्ञा–योगशास्त्रांत सांगितलेलें एक भ्रुकुटिस्थ चक्र १८-१०३८; हुकुम ३–९९.
आज्ञापक–आज्ञा करणारा ३–९९.
आज्ञापणें–आज्ञा करणें १२–१०.
आज्ञासिद्ध–ज्याची आज्ञा सर्वत्र पाळली जाते असा १६–३५५.

इ

इ–हा, ही, हें १–२१७, ११–७०.
इंगळ–विस्तव ८–८९; निखारा९–५०१.
इटाळ–दगड, धोंडा १६–४०१.
इडा–डाव्या नाकपुडींतून वारा वाहणारी नाडी ६–२४४.
इतुका–एवढा १–१७४
इत्यर्थ–तात्पर्य १८–१४६.
इदंता–हेंपणा १५–२६७.
इंदीवर–कमळ १३–३६१.
इंद्रधनुष्य–सूर्याचे किरण मेघावर पडल्यामुळें आकाशांत चित्र-विचित्र रंगांची जी धनुष्याची आकृति दिसते ती १५–२४०.
इंद्रनीळ–एक प्रकारचें रत्न ११–१३४.
इंद्रावणी–कडूवृंदावन १४–२६२.
इंद्रियपणें–इंद्रियद्वारां १८-३२९.
इंद्रियार्थ–विषय २–१२४.
इंधन–लांकूड २–१४.
इप्सणें ( ईप्सणें )–इच्छा करणें १–२१५.
इभ–हत्ती १–१७.
इये–ह्या १–२३३.
इये तव–हिला तर १३–९८६.
इष्ट–आवडता १–१८१; अग्निद्वारां होणारें कर्म ४–१२०; कल्याण, हित, १६–६१; शुभ १८–२४०.
इष्टदा–इच्छित वस्तु देणारी १६–२१९.
इष्टानिष्ट–आवडतें नावडतें १३–६००.
इष्टापूर्त–इष्ट, यज्ञादि व पूर्त म्हणजे कूप, तलाव वगैरे १३–५२४.
इष्टि–यज्ञ १३–२२२.
इसाळ–ब्रह्मराक्षस अथवा अस्सल सर्प १३–५०१, स्पर्धा १३–५५९.
इहभोग–मृत्युलोकींचा भोग १५–१५८.
इक्षुदंड–ऊंस १२–२००.
इक्षुरस–उसाचा रस १८–५०९.

ई

ईप्सित–इच्छिलेले ३–९५.
ईश–नियामक १५–५४५.
ईशान–शंकर १३–२४.
ईशितव्य–नियमित केलें जाणारें, नियम्य १५–५४५.
ईश्य–नियम्य १८–११९५.
ईश्वर–नियामक १८–११९५, सामासिक पदाचे शेवटीं 'श्रेष्ठ' या अर्थी ६–४७, ६–८७.
ईषत्–किंचित् २–३५८.
ईक्षण–डोळा १–१५.

उ

उकल–उघड, फोड करून ३–५२, उलगडा ६–३८७.
उकलणें–विकास पावणें, विकासित होणें १५–१८५.
उकळिया–उकळ्या ७–७५.
उक्त–बोललेलें ३–३४.
उक्ति–बोलणीं, वचनें १०–१६५.
उक्ती–भाषण, बोलणें १–४१.
उखर–जेथें लागवड होत नाहीं अशी माळ अथवा बरड जमीन १३–१०५२, १६–९.
उखरवा–गुंताडा १४–३२५.
उखा–उषःकाल ५–१४२.
उखि–मिथ्याभास, अनित्य १५–१४३.
उखिता–आगंतुक, वाटसरू १३–३४, उपरी १३–५९३.
उखितें–उक्तें, जसेंच्या तसें, एकंदर ९–३३५, सर्वस्वीं ११–५७७.
उखिविखी–चर्चा, वादविवाद १३–६६.
उखी–हकालपट्टी १३–५३०.
उगंडु–सुटका १–२६१.
उगला–निवांत ३–१६३.
उगळणें–बाहेर पडणें १६–२११, बाहेर टाकणें १६–२९४.
उगाणणें–अर्पण करणें, ९–४०४, झाडून हिशोब देणें, सांगणें १६–४१.
उगाणा–हिशोब, झाडा ७–१२९.
उगाळु–पान खाऊन थुंकलेला थुंका १३–४१९.

उगे–शांत, निवान्त १७–६३.
उगेले–निवान्त ९–२२४.
उग्रपण–प्रखरता ११–३१८.
उघड–प्रत्यक्ष ६–१२०; स्पष्ट ११–४४२.
उचंबळणें–आनंदीत होणें ७–११७, उसळणें, भरून सांडणें १–१२९.
उचलणें–निघणें १२–१०१, उठाव करणें १–८८.
उंचावणें–वाढणें, थोर होणें १८–११४.
उचित–चांगला, योग्य १–८.
उंचीनी–उंचावरुन १६–३४१.
उच्चैःश्रवा–क्षीरसमुद्रांतून निघालेला घोडा १०–२३७.
उच्छ्रंखल–स्वैर,उद्दाम १८–६६९.
उच्छ्रंखळ–उतावीळ ६–१६२.
उजगरा–जागृति, जागरण ५–५४.
उजरा–मार्ग १६–२७१.
उजरी–आश्रय १६–३७७; उत्कर्ष १६–३९०; प्रकाश ६-९७; सरळ वाट ९–२४५; व्यवस्थितपणा १३–७६७; स्पष्ट, उघड १८–४३; स्पष्टता १८–५५.
उजवण–सफलता १०–१४७.
उजवणें–विवाहित होणें १४–६४.
उजळणें–स्वच्छ होणें, प्रकाशित होणें १–३९; लावणें १५–३६९.
उजाळ–चकचकित १–६; प्रकाशितपणा ११–२१२; शुद्धता १६–३५८.
उजितें–तेज ८–११३; ११–३१२.
उजियेड–प्रकाश ६–३२.
उजिवड–प्रकाश ९–२१४.
उजिवडणें–प्रकाशणें,उजाडणें १३–१०८२.
उजु–सरळ ६–२२८.
उजुकार–सरळ मार्ग ६–१५५; सरळपणा १८–८४३.
उजू–सरळ १–२४७; अनुकूल १७–३८.
उज्जीवन–उत्तेजन २–६८; प्रगटता ४–१३३.
उटकणें–उच्चाटण होणें १४–३६६.
उटणें–घांसणें १०–१०; ११-१५७; चोपडणें, चर्चणें ११–२२२
उटी–तेज ९–३२८.
उठणें–उत्पन्न होणें ८–२०; तयार होणें १८–१२८८.
उठाउठी–लवकर ६–३०३.
उठावणें–उठाव करणें ११–१९९.
उठावा–विस्तार, उत्पत्ति १५–२०२.
उडवा–ढीग १८–७२५.
उंडी–गोळा ११–४५७; बळी १७-९७; आमिष १३–७३९.
उड्डाण–उडी १०–२५०.
उणखुण–मनोगत, हेतु, १३–८००.
उणी–कमी; हीन १६–२५६.
उणीव-न्यूनता, कमीपणा ११-२८०.
उणें–कमीपणा, न्यूनता ९–४५०. दोष १३–५३७.
उतटणें–उकलणें ६–२६६.
उतणें–मस्त होणें १६–२२९, उतूं जाणें, बाहेर सांडणें १८–१९३.
उतत–उन्मत्त ११–४८०.
उततणें–उसळणें–१६–३७३.
उतरंड–भांड्यांची एकावर एक रचना १३–११४.
उतरणें–खालीं येणें १०–६९; पार पडणें ९–४२३.
उतराई–कर्जमुक्त १५–५८५.
उताणा–छाती काढून १३–७१५.
उतान्ही–इच्छा १३–१६६.
उतार–पाण्यांतून येण्याजाण्याचा सोपा मार्ग ५–१६५.
उतारपेठ–माल उतरण्याची जागा १७–२७४.
उत्कट–आधिक्य १४–१०१.
उत्कंठा–उत्कट इच्छा, आशा १४–२६.
उत्कलित–कलह, युद्ध १८–१६२७.
उत्क्रांतमति–बुद्धीची अफाट स्फूर्ति १३–४५१.
उत्तमांग–मस्तक ११–४१८.
उत्तराभिमुख–उत्तरेकडे ज्यानें तोंड केलें आहे असा ८–९२.
उत्तरायण–मकरसंक्रांतीपासून कर्क–संक्रांतीपर्यंतचा काळ ८–२२०.
उत्तरोत्तर–अधिकाधिक ४–१९२.
उत्तानचरण–ध्रुवाचा बाप ११–१०२.
उत्तीर्ण–पलीकडे गेलेला, उतरून पार गेलेला १०–२४०; उतराई १६–३३.
उत्तीर्णत्व–उतराई, कर्जाची फेड ८–१३१.
उत्तीर्ण(प्राणें)होणें–मरणें १–२०२.
उत्पल–कमळ १७–६.
उत्पाटी–उपटील १४–२१०.
उत्प्रेक्षा–कल्पना, तर्क १०–२६८.
उत्लवन–उडी ३–४१.
उत्संग–मांडी ९–४७६.
उत्सर्ग–त्याग १३–२१९.
उदंड–पुष्कळ १३–६९१; अनेक १–१३१.
उदधि–समुद्र २–२४१.
उदयणें–उत्पन्न होणें ६–२९५.
उदयाचलकुल–उदयपर्वताच्या रांगा १८–१५३२.
उदर–पोट १–१९.
उदान–कंठस्थित वायु १८–३३७.
उदावादा–भांडवल १३–३०५; पूर्णत्व १५–५३२.

उदास–तटस्थ १३–५९३; निष्काळजी, दुर्लक्ष १८–४९६.
उदासीन–निष्काळजी १८–१५२.
उदाळणें–उसळणें, आंदोळणें १५–४९८.
उदित–तयार १–१८४; उगारलेले ११–२१७; उगवलेला १७–१७८.
उदेला–उगवलेला १५–४७३.
उदेजणें } उगवणें, उदय पावणें
उदेणे } १६–३११.
उदैला–उगवलेला १–१४४.
उदो–उदय २–१६०; भूतपिशाचांचें ओरडणें १०–२५३.
उदोअस्त–सूर्याचा उदय व अस्त ४–९९.
उद्दीपणें–प्रकाशित होणें १८–११०४.
उद्देश–अभिप्राय ५–१६१; बोलणें १०–७; हेतु, मतलब ३–३४.
उद्देशें–संक्षेपानें, थोडक्यांत१-१०४.
उद्धत–मस्त; उन्मत्त, १–१९४; उपमर्द ११–५७४.
उद्धरणें–उद्धार पावणें. ११–६८.
उद्‌बोध–जागृति ९–९६.
उद्भट-उत्कर्षास आलेला १८–८५७. श्रेष्ठ १४–११८.
उद्भव–उत्पत्ति १८–५.
उद्भिज–वृक्षादिक ६–४४.
उद्यत–तयार १–२१९.
उद्यम-व्यापार, उद्योगधंदा ६-३५४.
उद्यान–बाग, बगीचा १–२८.
उद्रस–रिकामें, ओस १४–२४६.
उद्वेग–खिन्नता २–२९४.
उद्वेगणें–खिन्न होणें १–२६९.
उधवणी–धुराडें १६–२९४.
उधवणें–वर करणें १४–४९; उसळणें ९-९०; वाढणें ३-२०४; वर उडवून देणें, पसरणें ४–१७६, उद्धवणें ६–२६४.
उधाइणें–प्रगट होणें ११–४५२.
उन्नति–उत्कर्ष, वाढ ४–२१२; उत्साह १८–६००.
उन्नाहो–भरती, वाढ १८–४१३.
उन्निद्रा–जागृति १२–६४.
उन्निद्रित–जागें ११–१२८.
उन्मनि–जाग्रतादि चार अवस्थेपलिकडील मनरहित अवस्था ६–३२०.
उन्मादती–बुडबुडे येतात १३–५६२.
उन्मीलन–(दृष्टि) उघडणें ११–१४१; प्रगट करणें, दाखवणें १८–६.
उन्मूळणें–मुळासकट उपटून टाकणें १३–१७२.
उन्मेख–बुद्धि १६–८.
उन्मेष–ज्ञान १–१५; ९–७९; प्रफुल्लितपणा २–२८६.
उन्मेषलता–ज्ञानरूपवल्ली १५–५८२.
उन्मेषसूक्ष्मेक्षण–ज्ञानरूप बारीक डोळे असलेला १–१५.
उपकंठ–समीप भाग, जवळचा भाग १२–३५.
उपकरण–सामुग्री, साधन ३–१२८.
उपकरणें ( उपकारणें )– उपकार करणें १८–१३५९, उपयोगास येणें, उपयोगी पडणें ३–१५३; पूजेचीं भांडीं १३–४०६.
उपकरती–उपयोगी पडणारी १३–४०६.
उपक्रम–आरंभ १०–२८.
उपक्रमणें–आरंभ करणें१४–२३४.
उपखणें–व्यर्थ होणें ११–९५; खर्चणें १८–६५३; क्षय पावणें, नाश पावणें १६–१५६.
उपखा–श्रम ९–११५.
उपचार–साधन, सामुग्री ४–७१; आदर १६–२६; पूजेची सामुग्री १७–२०३.
उपचारभरण–साहित्य, सामुग्री ९–२४०
उपजणें–उत्पन्न होणें ६–६९.
उपजीवी–निर्वाहाचें साधन १६–६७; जीवन, जिव्हाळा १८––१८००.
उपडणें–उन्मळून पडणें, मुळांसकट उपटून पडणें १–२५०; आपटून मरणें १८–७९८; पडणें, आपटणें ७–८७; मुळांसकट उपटणें १८–१०९.
उपणणें–उफणणें, वाऱ्यावर धरणें २-१३०.
उपद्रव–दुःख १३–३४३.
उपनणें–उत्पन्न होणें; उपजणें १–६७.
उपनिषत्–वेदाचा शेवटचा भाग, अरण्यक १३–८२६.
उपपत्ति–युक्तिवाद २–४९; युक्ति ११–७०४; हेतु, कारण १८–६२७.
उपपत्ति येणें–मान्य होणें, पटणें २–४९.
उपमणें–उपमा देणें ४–१८३.
उपमर्दणें–नाश पावणें १८–१२७२.
उपमा–उपमा अलंकार १३–११६३, दृष्टान्त ४–१८१.
उपरतणें–उलतवणें १८–८३.
उपरता–वरच्या १५–२०५.
उपरति–वैराग्य, विषयनिवृत्ति २–१७३.
उपरतें–उलट ११–३८४.
उपरम–अंतर्मुखता १८–८३४.

उपरि–वर, वरती १–१८; अधिक, जास्त ९–४५२.
उपरोध–जुलूम १३–२८८; भीड ११–७९; वर्मी लागेल असें भाषण ११–५४३.
उपलभणें–प्राप्त होणें १५–३७३.
उपलवणी–विस्तार १३–८५२.
उपलवणें–उलगडून मांडणें ६–२९२; उकलणें, उघडणें ११–२२३; विस्तारपूर्वक सांगणें १५–४४.
उपलवला–प्रसन्न झालेला ६–४८८.
उपलक्षण–उपमा ६–३५८.
उपलाणा–खोगीर पाठीवर नसलेला; उघड्या पाठीचा १८–४६४.
उपवढ–जागृति १५–२६४.
उपवढणें–जागें होणें १५–२९४.
उपशम–निग्रह ३–२५२.
उपशमणें–नाहींसें करणें ८–३७.
उपशाखा–दुय्यम फांदी ९–१०९.
उपशांत–पूर्णशांत ६–८१.
उपसर्ग–विघ्न, उपद्रव ९–३१३.
उपसंहरणें–शांत होणें, लोपणें १–१६१; उपसंहार होणें, नाश होणें ७–३०.
उपसाहणें–सहन करणें; क्षमा करणें १–६५.
उपहत–निस्तेज १–२७.
उपहति–अनादर, मानहानि २–१९९.
उपहार–फराळाचें सामान १३–४२१.
उपहास–थट्टा १३–२७०.
उपहित–उपाधीच्या संबंधानें असणारें (चैतन्य) १५–४६७; अंबोण १७–१५४.
उपाइणें ( उपायिणें )– मिळविणें १०–१३२.
उपाइलें–विस्तार पावलें १८–६९५.
उपाइलें (उपायिलें)–उत्कृष्ट ५–१०८; प्राप्त झालेला, पुढें आलेला १०–४०; उपायांनीं मिळणारें १०–१३८.
उपांग–उपसाधन १८–१०९३.
उपादान–प्राप्ति, संपादन १८–१२४३; ज्याकारणाचा कार्यांत प्रवेश असतो तें, समवायिकारण १८–३०६.
उपाधि–देहादि प्रपंच ४–२१; संग १७–३६२.
उपार्जिणें–मिळविणें ८–३३
उपायिणें–'उपाइणें' शब्द पहा.
उपासणें–आराधन करणें, उपासना करणें ३–८८.
उपासन–उपासना ४–१२२.
उपास्ति–आचरण ३–४०; उपासना ८–१२७.
उपेग–उपयोग २–६७.
उपेणें–विश्रांतिस्थान १८–१७४६.
उपेय–साध्य, उपायांनीं प्राप्त करून घेण्याची गोष्ट १८–१२४५.
उपेक्षणें–अव्हेरणें १०–१६१.
उपेक्षा–चालढकल १८–१५४२.
उफगणें–रिकामा पडणें, संकोच पावणें १३–६६४.
उफराटें–उलट, विरुद्ध ९–५१५.
उबग–कंटाळा १३–१९२.
उबगणें ( उभगणें )— कंटाळणें, त्रासणें ११–४५२.
उबजणें ( उभजणें )— कंटाळणें १३–६७२.
उबडा ( उघडा )— उघड्यावर १३–६९९.
उबडें–पालथें १३–३०१; प्रकाशलेलें १३–९२७.
उबा–उष्णता १८–२२०.
उबारा–उष्णता, उकाडा ६–२२१.
उभजणें–खेद पावणें १४–३२९. कंटाळणें १८–१८४.
उभड–उसळी ७–६९; लोट १६–१३८.
उभणें–उभारणें १४–१८५; उभे रहाणें १५–३७३.
उभयाचि–उभ्याउभ्या १–१३५.
उभलें–उंबरा १३–७००.
उभवणें–मांडव घालणें, उभारणें १०–१२.
उभळी–खोकल्याची ढास १३–५७४.
उभा–जिवंत १३–११००, ८–६३.
उभारणें–रचणें ५–७८.
उभारा–मांडणी, उत्पत्ति १८–३०४.
उभिला–उभा केलेला १३–६५८.
उभीं–उभ्याउभ्या १८–७३७.
उभेपण–जिवंतपणा ८–६३.
उभे–अधांतरी टांगलेलें १८–१४०७, उत्पत्ति, मांडणी १८–२४७.
उमचणें–परत मिळवणें, फेडणें १३–५४१.
उमज–समजूत ५–३.
उमजणें–समजूत पटणें २–८५; जागें होणें १४–११२; समजणें १४–१५६.
उमटणें–पडणें, उठणें ५–१५६; प्रगट होणें ११–२१७.
उमप–अमर्याद ७–१५६.
उमरडणें–उलंघन करून जाणें ९–२०७.
उमलणें–विकसित होणें १५–६.
उमसणें–सांगणें १३–२०२.
उमळणें–उन्मळून पडणें १३–५६४.
उमाणणें–जाणलें जाणें ८–१०२; मोजणें १०–२८९.

उमाणा–माप १८–५२२; बरोबरी १३–११५७.
उमाणितें–मोजणारें ६–४६३.
उमाणें–माप १८–५००.
उमाळा–लोट ११–४६४.
उमेठा–अतिशय, पुष्कळ १८–१६०६.
उर–छाति १३–५६०.
उरग–सर्प १३–१९९.
उराउरी–झटपट ११–५४९; तात्काळ, छातीला छाति लावून १८–४७; एकदम ११–३६
उरी–बाकी, अवशेष १८–४२६.
उरोध–उपरोधिक बोलणें १३–२७०.
उर्मी–लहर २–६९; विकार ३–७०; जोर ४–११७; लाट ७-७५; वृत्ति ( अहंकार ) गर्व १८–१६९.
उर्वी–पृथ्वी ८–४९.
उलंडणें–उन्मळून पडणें १५–१० पालथें करणें ६–२१८; उलथून पडणें, तुटून पडणें ६–२२६.
उल्लसणें–प्रगट होणें, भासणें १५–३४४.
उल्लास–प्रसन्नता १८–१६३७.
उल्लाळ–उसळी ७–७५.
उल्व–गर्भावरील वेष्टण ३–२६०.
उल्हाटशक्ति–कुंडलिनी ९–२१४.
उल्हास–आनंद ४–१०६.
उल्हासणें–शोभणें १८–१३०२.
उल्हासतें–आनंद पावणारें, आनंदभरित १४–१०५.
उवाइणें–स्पष्ट करणें १८–५१९; प्रसन्न होणें २–३५२.
उवाइला (उवायिला)–प्रशस्त ८–१३१; प्रसन्न झाला २–३५२; इशारा ५–१४२.
उवाय–सुख ९–५०९; उत्कर्ष १३–७७१.
उवायिणें–प्रसन्न होणें २–३०१; बसवणें, चढवणें १८–३३.
उवावो–प्रसर, उसळी ६–४१६; सामर्थ्य १८–६२२; विस्तार १६–६२.
उवेढा–उलगडा, उठवण्याची क्रिया, पराभव ११–३८७.
उशनाचार्य–शुक्राचार्य १०–२९५.
उशिटणें–उष्टें होणें १८–२२.
उशिटें–उष्टें ८–१४४.
उसणा–उसना २–१९०.
उसणाघायीं– घांवाला घांव, माऱ्याला मारा, समोरासमोर २–१९०.
उसंत–विश्रांति १४–२४१.
उसंतणें–दूर करणें १७–३११
उससणें–उसासा टाकणें, श्वास टाकणें ११–२५३; उत्पन्न होणें १५–१०९; वाढणें १७–१३२.
उससा–हुंदका, श्वासोश्वास १८–१६०५.
उसासा–विसावा १६–४१५.
उळिग–भौंवरा १७–२०२; व्यवसाय १८–८१७; सेवा १३–४१९

## ऊ.

ऊरु–मांडी ६–१९२.
ऊर्ध्व–वरती ६–२२८.
ऊहापोही–चर्चा, वाटाघाट ६–८९

## ऋ.

ऋक्–ऋग्वेद ९–२७७.
ऋचा–वेदांतील मंत्र १५–१६६.
ऋणवैपण–कर्जदारपणा, ऋणीपण ८–१३१.
ऋणिया–सावकार, धनको १८–२५२; कर्जदार १८–३०१.
ऋतुपति–वसंत ३–१००.
ऋतुत्रय–उन्हाळा, पावसाळा व हिवाळा हे तीन हंगाम १४–२९१.
ऋद्धि–ऐश्वर्य १–१८८.

## ए.

एकतुके–एक किंमतीचें, ७–२५.
एकंदरें–एकवट ५–१५१.
एकदेशी–मर्यादित ( समजणारा ) ३–१७९.
एकनिष्ठ–निश्चयात्मक ३–१८.
एकनिष्ठता–एकरूपता, एकस्थिति २–११३.
एकरूप–अविकारी १८–८.
एकलाधी–ऐक्य, एकमत १३–४९.
एकलें–एकटें ५–५३.
एकलौती–एकट्याचीच, एका पुत्राचीच, एक पोर असलेली १३–४०९; एकुलता १३–५०२.
एकवंक–निश्चय, एकवाक्यता १३–१६.
एकवंकी ( एकवंकें )–एकरूपता, तादात्म्यता ४–१२.
एकवट–एकजीवाचा १८–३७.
एकवटणें–एकत्र होणें, मिळणें १–२०.
एकवटत–एकत्र राहिलीं १–१७.
एकवद–एकवाक्यता १५–७३. ऐक्यता ११–३७.
एकवळा–ऐक्य, एकोपा ११–५.
एकवाक्यता–ऐकमत्य ६–५२.
एकवाट–एकदम १–८९; एकत्र ६–२२०; समरस १५–३२०.
एकसर–एकसारखा १३–८१३.

एकसरणें–एकनिष्ठेनें अनुसरणें १३–६०६.
एकसरा–एकदम ५–१४४; एकसारखा ( व्यापून असणारा ) १८–२३.
एकसरी–एकसारखी १०–२१.
एकसरें–एकदम, नीट, एकसारखें ६–१५५.
एकसार–एकच तत्त्व ५–४.
एकाकी–एकटा १४–८५.
एकांत–निश्चयाचें ठिकाण ६–३२१; शांत, सोबतीरहित ६–१८०.
एकांतर–एकदिवसाआड भोजन करण्याचें व्रत १७–३६४.
एकात्मता–एकरूपता १८–११७१.
एकादश–अकरावा ११–१.
एकायतन–एकच ठिकाण, एकच घर ४–६२.
एकार्णव–प्रळयकाळीं सर्वत्र पाणीच पाणी होऊन झालेला महासमुद्र १०–२७१.
एकावळी–एक पदरी माळ १३–५३०.
एकाहार–ऐक्य, एकपंक्ति १८–२९१.
एकिहेळा–एकदम ४–३९; एकवेळच, एकदांच ९–२९९.
एकोत्तरा–शेंकडा १ रु. व्याज ९–५४.
एतुला–एवढा ६–६५.
एरी मोहरें–उलट बाजूला ६–७६.
एवं–याप्रमाणें ९–३३०.
एवंविध–अशा प्रकारचा ११–३१२.
एहीं–ह्यांनीं १३–११८.

ऐ.

ऐकनखेवो–ऐकण्याबरोबर १०–११७.
ऐक्यभाव–अद्वैतपणाची समजूत १६–७१.
ऐरावत–क्षीरसागरांतून निघालेला इंद्राचा हत्ती १०–२३८.
ऐल–अलिकडचा १८–२५५.
ऐलाडी–अलिकडच्या कांठावर ६–१९१.
ऐश्वर्य–वैभव ६–३७;प्रभुपणा ११–५६९;ईश्वरसंबंधी ९–८७.
ऐसा–असा ५–५५.
ऐसियाहीं–असें असूनही ३–६३.
ऐसैसें–असें असें १६–१३.
ऐहिक–इहलोकांतील २–२१३.

ओ.

ओइचले–अल्प, थोडे, इवलेसे १–११९.
ओखद–औषध ४–२१९, विरुद्ध १७–६२.
ओघ–क्रम ४–४९.
ओत–आडवे तंतु १०–२६४.
ओतप्रोत–उभे आडवे दोरे, संपूर्ण १०–२६४.
ओम्–ब्रह्माचें एकाक्षर नांव १–१.
ओषधी–वनस्पति १६–१०६.
ओसंडणें–टाकणें ३–१९४.

औ

औट–साडेतीन ६–२२३.
औटवळणी–साडेतीन वळणाची ६–२२३.
औटावीमात्रा–ओंकाराच्या साडेतीन मात्रांपैकीं शेवटची अर्ध मात्रा ११–३०७.
औत्सुक्य–उत्कंठा १८–१५५६.
औदार्य–दातृत्व ११–९८.
औद्धत्य–उद्धटपणा १६–३९१.
औपाधिक–उपाधिसंबंधीं १५–४७०.

क

कंकण–कडे १८–१४१८.
ककारांत–सुषुम्ना नाडी ६–३०२.
कंचुकित–आंगरख्यानें आच्छादित ९–५२७.
कटक–सैन्य १०–३६.
कटकटा–हायहाय ११–४५२.
कटा–दुःखाचा उद्गार, हाय, हाय १३–५३९.
कटार–कट्यार ४–२२३.
कटाह–कढई १–१४७.
कंटाळा–भय १५–५६०; त्रास, चिळस १६–४१९.
कटाक्ष–डोळ्याच्या कोनांतून पहाणें १४–१७०.
कंठनाळ–गळ्याची नळी ६–२०७.
कड–कडे १७–१९२.
कडवसा–पडछाया ४–१७४; आंधार ७–११२, ११–३६४.
कडसणी–मंथन, घुसळणें २–१२९; विचार २–३४२; निवड ४–७९, ९–३७२.
कडसणें–कढवणें १–५२; कसास उतरणें ४–६५; निवड करणें ६–२७.
कडा–कांठ ७–८७; डोंगराचा सुळका १३–९४७.
कडाड–जाणता ११–९७; कडा १८–६४६.
कडियाळी–जाळीदार अंगरखा ९–५२९; वेढा, वेष्टन ११–३१७.
कडे–बाजू, धांव, प्रवृत्ति १८–६६.
कडेलग–कडेलोट, अगदीं, शेवटीं ६–५६.
कण–दाणा १८–९३९.
कणव–दया, कळकळ ६–४११.
कणिका–लहान कणि ७–५५.

कणी–कण ६–२६४.
कथणें–सांगणें १०–१२८.
कथन करणें–सांगणें १–८७.
कथिलयादारभ्य–सांगावयास आरंभ केल्यापासून १५–५७०.
कंद–कांदा, गड्डा ५–११५; नाभिस्थानाखालील मणिपूर चक्र ७–२२७; नाभिस्कंद १५–४०७.
कदंब–समुदाय १८–१६५७.
कंदर–गुहा १–१३०.
कदर्थणें–कासावीस होणें १३–२३५.
कदर्थविणें–नाहींसा करणें १६–१४१; कष्टी करणें १६–१७५.
कंदर्प–काम ७–५१.
कंदुक–चेंडू १७–२८०.
कदा–कधीं २–१३५.
कनक–सोनें १–७७; धोत्रा १८–६५८.
कनकचंपक–सोनचांफा ६–२५७.
कंप–कांपरें १३–७५६; थरकांप, धाक १८–१०५७.
कपाट–दरी, गुहा १३–६११.
कपाळीं पिटणें–माथीं मारणें, आरोप करणें १५–३७९; ११–४०२.
कपिध्वज–ज्याच्या ध्वजेवर हनुमान आहेत तो, अर्जुन १८–९५२.
कपिल–सांख्यशास्त्रांचा कर्ता १३–९५७.
कपिलवर्ण–पिंगट रंग ११–१३२.
कपोल–गाल ९–१९०.
कमलजन्मा–ब्रह्मदेव ३–८७.
कमलायतडोळस–कमलासारखे लांबट डोळे असलेला ११–६९.
कमळा–लक्ष्मी ११–२१९.
कर–किरण ११–२४८; हात १३–१००.
करंडी–संबळी ६–२७३.
करण–इंद्रिय १३–१७८; ९–२४५; साधन १८–५०६.
करणीय–करण्यास योग्य १८–११५.
करणता–साधनपणा १८–४९४.
करणीयेचा–कृत्रीम १८–१२६१.
करतळ–तळहात १५–२५८.
करपल्लव–हाताचा पंजा ११–२१५.
करवाड–कडचा, धान्याचें ताट १४–२४०.
करवीं–कडून ४–२२१.
करसंपुट–द्रोणाकार झालेली हस्तांजली ६–२०१.
करांडणें–कुरतडणें, कुरतडून तोडणें ७–९५.
करिती–करण्याची १७–३२५.
करी–हत्ती १३–१५२.
कर्कश–खडतर, कठीण १८–७८१.
कर्ण–कान १७–७; दुर्योधनाकडील प्रमुख योद्धा १–१०५.
कर्णजप–कानांत सांगितलेला मंत्र १७–२९७.
कर्णताळ–कानाचें चलन १७–७.
कर्णभूषण–कानांतील दागिना १४–१८.
कर्दम–चिखल २–४.
कर्दळी–केळी ६–२९५.
कर्पूर–कापूर २–२५१.
कर्पूरकेळी–कापूरकेळी ११–२५०.
कर्मकांड–वेदांतील तीन भागापैकीं कर्मांचा विचार करणारा भाग १३–८२८.
कर्मकेरसुणी–कर्मरूपी केर सरसकट झाडणारी केरसुणी १७–६४.
कर्मज–कर्मांपासून उत्पन्न झालेलें ८–४६.
कर्मजड–कर्मठ १४–२४२.
कर्मठ–कर्म करणारा, कर्मांवर भिस्त ठेवणारा १८–६८.
कर्मसंचय–कर्मसंग्रह १८–५१२.
कर्मसबळ–कर्मांवर भर १८–१३९.
कर्माभिमानिया–मी कर्म करतो असा अहंकार बाळगणारा १८–६२८.
कर्माकार–कर्म १८–४३१.
कर्मेंद्रियें–कर्म करणारीं, हात, पाय, जिव्हा, गुद, शिस्न हीं पांच इंद्रियें ३–६४.
कऱ्हा–ऊंट ११–४१४.
कलंक–डाग १८–२७३.
कल–मंजुळ ११–३३६.
कलत्र–कुटुंब, स्त्री १२–८६.
कलन–ग्रास करणें ७–७०.
कलश–घागर १३–११४४. कळस १८–१५०८.
कलातीत–अंशादि विभागापलीकडला १८–३.
कलाप–समुदाय ४–९५.
कलाली–कपटी १८–६७२.
कलितकाळकौतुहल–कालाच्या करामतीस ज्यानें अंकित करून ठेवलें आहे असा १८–३.
कलुष–पातक १३–५३५.
कलुषकरिकेसरी–पातकरूपी हत्तीचा नाश करणारा सिंह १७–४२३.
कलेवर–शरीर ११–१०५.
कल्प–ब्रह्मदेवाचा दिवस १४–११२.
कल्पणें–कल्पना करणें १३–१९५.
कल्पतरु–इच्छिलेल्या प्रमाणें देणारा स्वर्गातील वृक्ष १८–१०.
कल्पद्रुम–कल्पवृक्ष १०–२३५.
कल्पलता–कल्पवृक्ष १०–२०.
कल्पवृक्ष–कल्पतरू ४–२१६.

कल्पिते–कल्पना करणारें ६–२७७.
कल्मष–पाप १–२४२.
कल्लोळ–लाट ५–१००.
कल्हातणें–कलंडून पडणें १४–१८८.
कल्हार–कमळ २–७१.
कव–मिठी १३–६१.
कवच–पांघरूण ७–३६; कात (सर्पाची) ८–६६; शरीर शस्त्रप्रहारापासून रक्षण करण्याकरतां अंगावर घालतात तें २–२३२.
कवडा–पैसा ९–३२९.
कवण–कोण १–८९; कोणता ९–९२.
कवणीकडे–कोठेंही ११–१९४.
कवतिक–नवल, आश्चर्य २–३०३
कवतिकें–चुकून, लीलेनें ५–९०.
कवळ–घास ५–११८; काविळ ९–१४१.
कवळणें–व्यापणें, कवटाळणें १–२०; आकलन करणें १–६६; मिटणें ६–२६७.
कवळी–आलिंगन १५–१९०.
कवाड–दरवाजा ६–२०२.
कवि–काव्यकर्ता, पारदर्शी १०–२९५.
कवीठ–कवठ ११–४२३.
कव्हाळ–खिंड ११–३५९.
कश्मळ–सदोष, घाणेरडा १८–६२०; घाण १८–६५०.
कस–सोनें रूप इत्यादि धातूंची परीक्षा ४–१८०; सामर्थ्य, शक्ति ३–२४२.
कसमस–रग, चांचल्य ६–१८८.
कसवटी–कस पहाण्याची शिळा ६–९६.
कहाणी–गोष्ट ९–५०१.
कहीं–केंव्हांही, कधीं २–११३.
कळ–युद्धकौशल्य १–११३; युद्ध १–१८४.
कळंक–कालिमा ६–११५.
कळणें–समजणें ७–९३.
कळंभा–भांडण, तंटा ६–१६.
कळा–किरण १-५६; तेज ६–२५० फुलाचा कळा ६–२५७; चंद्राची कला १५–३०३.
कळांतर–व्याज १७–२८७.
कळाविदपण–कुशलता १–३७.
कळास–कौशल्य १७–८.
कळासणें–बांधला जाणें ५–७२; लावणें, बंद करणें८–११२; निग्रह करणें १३–५०५.
कळि–कलियुग १८–१८०२; युद्ध १–१८४.
कळिका–(कलिका) फुलाची कळी १-२०१; ज्योत २–२३८.
कळित–ग्रास करीत १८–१७५७.
कळिता–ग्रास करणारा १०–२४८.
कळिशणें–आकलन करणें, जाणणें ६–१११.
कक्षा–बगल, बाजू १३–६१२.
का–शिवाय, आणखीं १७–२६०
कां–काय म्हणून १–२०७.
काइ–काय ४–११३.
काइसा–कशाचा, कशाकरितां २–७
काउळ–कावळा ९–४३८.
काक–कावळा ८–१४०.
कांकण–कंकण, मनगटावरचा अलंकार १४–३७८.
काकुळती–दीनपणा २–३२६; करुणा ६–११९; काळजी, कींव ११–३६७.
काख–बगल १०–२६०.
कांचन–सोनें ११–१३५.
काचरी–वाळलेल्या भाजीचे तुकडे १३–५५५.
काचा–घाबरा; अधीर, अपक्व १–१३४.
काचें–अधीर ११–६३०.
काज–कार्य १–११२; कारण ६–७९; विशेष प्रसंग १३–८१५; परिणाम १३–११०५.
काजळी–दिव्याच्या ज्योतीवर येणारा काळा पदार्थ १५–४३९.
कांजी–भाताची पेज २–३६४.
काटणें–भरणें, डाग पडणें, मळणें ११–३४५, १३–४७७.
कांटस–काट्यांचा, कांटेरी १८–६१७.
कांटाळा–रोमांच १–१९७.
कांटाळें–वजन १४–५१, कस ४–१८१; उपमा १२–१६१ तुलना–१७–३.
काटिवडें–कांटे १३–६७७.
कांटी–कुंपण ९– २१३.
काठिण्य–कठिणपणा १८–७५४.
कांड–बाण १६–४०४; भाग १३–२३६. पेर१५-१२८.
कांडत्रय–वेदाचे कर्म, उपासना व ज्ञान हे तीन भाग १८–१४३१.
काढणें–दूर करणें १३–८६६; कमी होणे १५–११९, शोध काढणें ३–१०१.
काणी–खिन्नता, क्लेश १८–७६.
कांत–नवरा, प्रिय ११–५७७.
कातणें–जुंपणें १–१३८.
कांता–स्त्री १७–२७५.
कांति–तेज ६–२५३.
काती–एक प्रकारचें शस्त्र, कोयता १७–९३.
कान झाडणें–कानावर गोष्ट येऊं न देणें १३–६१७.
कानडें–अवघड, कळण्यास कठीण ६–१२०.
कानवडा–एका अंगावर पडणारा १८–१६९३.

कानवडोनि–एका अंगानें ६–२४७
कानवेरी–कानापर्यंत ९–१८२.
कानी–काढणी, दोर १४–१५८.
कापडी–यात्रेकरू ६–१५३.
काबाड–ओझें, कष्ट १८–५४०.
कांबी–चिमटा ६–४२३; काठी १८–१०७०.
काम–इच्छा २–२५०; भोगेच्छा १६–३१०; कार्य ७–१७७.
कामऊनिया–एकत्र करून ११–६१२.
कामठ–टांकसाळ १५–४८०; व्यापार १८–३५८.
कामणें–इच्छा करणें ४–१२४.
कामधेनु–इच्छिलेलें देणारी स्वर्गांतील गाय १–७९.
कामना–भोगाची इच्छा १८–२०२
कामविणें–कमवणें १८–७५२; निर्माण करणें १८–४३१.
कामाकारें–काम काढून, नाहींसें करून १६–६०.
कामारें–दास १६–३५३.
कामिक–काम्य १८–९६.
कामिता–इच्छा करणारा ४–२१६.
कामिनी–स्त्री १४–१७०.
कामुक–विषयी, स्त्रीलंपट १–१८७. फलासक्त ३–१६९.
काम्य–इष्टापूर्त वगैरे कामनिक कर्म १८–१०३.
काय–शरीर १८–६५६.
कायसया–कशाला, कशाचें ८–२.
कायसेनि–कशानें १०–११.
कारण–साध्य ५–१४९; हेतु १५–४३८; इच्छित वस्तु १३–९६८.
कारुण्य–दया १३–२४८.
कार्श्य–कृशता, रोडपणा १३–५१७.
कार्य–परिणाम १५–७८; कर्म १३–९६९.
कालकूट–समुद्रमंथनांतून निघालेलें विष १–८९.
कालवणें–मिसळणें, एकत्र करणें १०–१२१.
कालाभुला–कासावीस १६–१४२.
कालिंदी–यमुना नदी १०–२९०.
कावडी–कावड १६–७७.
कावरू–गुद व शिस्न या दोन द्वारांतील शिवण १८–१०३६
कावरूखें–आश्चर्यकारक १५–५२.
कांवरुमूळ–गुदशिस्नामधील शिवणीचें मूळ १८–१०३६.
कावरें–भ्रमात्मक, आश्चर्यकारक १५–१०९.
काश्मिरी–सरस्वती १३–३१९.
काश्मीर–स्फटीक, ६–२५३.
काष्ठ–लाकूड ७–५६.
कास–आश्रय १८–५३८. कंबर, आधार १६–४४८.
कासणें–कांस बळकट करणें १३–५४५.
काहणी–गोष्ट ६–१४२.
काहाळा–मोठी झांज १–१३२.
कांहींबाहीं–कांहींतरी, कांहीं एक १८–४१२..
काह्या–कशाकरितां १८–९४७.
काह्याचें–कशाचें ६–९५.
काळकूट–समुद्रांतून उत्पन्न झालेलें महाविष १८–६६४.
काळज्वर–विषमज्वर ४–२००.
काळ्याणा–कृष्णसर्प १८–७१२.
काळरात्र–प्रळयकाळची रात्र ११–१९९.
काळवखे–आंधार १२–४९.
काळवंडणें–काळें होणें १६–४१६.
काळवशें–कालांतरानें, कालवशात् २–४१.
काळवसें–अंधःकार, काळोख १४–२१०.
काळशुद्धि–योग्य वेळ, पवित्र काळ १३–३८८,
काळिक–काळसरपणा ४–६४.
काळिमा–काळोख, आंधार ५–८६ काळेपणा १६–३८५.
काळुगा–काळनांवाचा १३–३९.
किड–हिणकस धातु ६–८२.
किडाळ–निंद्य १–२३३; हिणकस धातू २–१२८; अनुचित ४–१७५; दोष ९–२०४.
किंधर्म–काय धर्माचा १४–१३७.
किन्नर–अश्वमुख असलेला देवयोनीपैकीं एक प्रकार ११–५०६.
किरडूं–साप ११–५४.
किरीटी–अर्जुन २–१४८.
किंलक्षण–कोणत्या लक्षणाचा १५–६३.
किळा–तेज १४–१२३.
किळावो–किळा, तेज १४–३७२.
कीं–अथवा १६–१८४; तर १८–१८३; एऱ्हवी, उलट ( तूं सोडून ) १८–१८०.
कीजणें–केलें जाणें १–२१६.
कीजत–केलें जातें १–८७.
कीट–हिणकस धातु १३–१०३६; किडा १८–२४२.
कीटक–किडा १३–२५५.
कीड–वाईट १७–३१२; हिणकस १५–४६४.
कीर–खरोखर १–११९.
कीर्तणें–वर्णन करणें, स्तवन करणें ९–२११.
कीर्तिमुख–देवालयाच्या दरवाज्याच्या उंबऱ्यावर जें राक्षसाचें शिर कोरलेलें असतें, त्यास कीर्तिमुख म्हणतात. १५–५२६.

कीर्तिमुखत्व करणें–कीर्तिमुख (उंबरा)ओलांडून जाणें, नाहींसें होणें;मागें रहाणें १५–५२६.
कु–वाईट २–२६६.
कुंकुम–केशर ६–२२२,
कुच–स्तन १३–५३९.
कुचंबणें–चुरगळणें, चुरडणें १३–२४७.
कुंचा–मोचेंल १३–६५८.
कुंजर–हत्ती १३–२३२.
कुंजरी–हत्तीण १५–३१८.
कुटका–तुकडा १६–३६८.
कुटा–पेंढा, चुरा ३–२५०.
कुटिल–काळा १०–२१५.
कुटिलालकमस्तक–मस्तकावर कुरळे केस असणारा १०–२१५.
कुटी–निंदेचें भाषण २–२१८; वसतिस्थान १६–२४३.
कुटीचेंबोट–निंदेचा डाग १६–१७८.
कुंठणें–थांबणें ३–४९.
कुंठवणें–थांबवणें १८–७३३.
कुंडलिनी–योगशास्त्रांत सांगितलेली मणिपूरचक्राचे ठिकाणीं सर्पाच्या आकृतीनें राहाणारी प्राणरूप शक्ति ६–२२१.
कुंडली–कुंडलिनी ६–२७४.
कुड्मळ–उमलणारी कळी १५–२.
कुडें–वाईट२–२५०;खोटें४–८६.
कुणबट–अडाणी शेतकरी, कुणबी १३–८११.
कुंथणें–कुंथणें १३–७१४; गुरगुरणें ११–४५९.
कुंथाकुंथी–श्रम, खटपट १५–२४७.
कुद्रव्य–निषिद्ध पदार्थ १७–१६२.
कुंप–कुंपण १३–२१८.
कुपिका–कुपि ७–१८५.
कुबोल– अपशब्द १६–४०४.
कुब्ज–कुबडा १३–७६०; कुबड असलेली १८–९२७.
कुंभ–घडा २–२५२; गंडस्थळ १०–५.
कुमर } मुलगा १–९४
कुमार }
कुमारत्व–बालपण ४–१२२.
कुमारी–अविवाहित मुलगी ९–१७७.
कुमुद–चंद्रविकासनी कमल५–१०५
कुमुदिनी–चंद्रविकासिनी कमल १–६०.
कुमुदी–चंद्रविकासिनी कमल ६–१३४.
कुरवंडी–ओवाळून टाकण्याचा पदार्थ, उतारा ९–३८१.
कुरुठा–शहाणा १–९५; घर ३–२६८; ४–१६६.
कुरूपणें–खवळणें, क्षोभणें १६–३९४.
कुरोंडी–ओवाळून टाकलेला बळी ४–१०८; उतारा ६–२८.
कुर्हें–वांकडें १८–९२७.
कुलक्रम–परंपरा ९–२७७.
कुलाल–कुंभार ९–७४.
कुवाडें–कठीण ४–१४३.
कुंवासा–आश्रय ६–१२५.
कुश–दर्भ ६–१८२.
कुशलाकुशल–शुभाशुभ १८–२१२.
कुशी–कूस, पोट १४–४०.
कुष्ठ–कोड १६–१७८.
कुष्ठी–कोड असलेला, रक्तपिती असलेला १८–१३६.
कुसरी–चातुर्य १–८.
कुसळ–गवतावर येणार अणीदार तुरा १३–५६६.
कुसुम–फूल १–१८.
कुसुमाकर–पुष्पाची खाण, वसंत ऋतु १०–२८३.
कुहणें–कुजणें, १३–५२१.
कुहर–गुहा ७–१२५;कोठार १३–११५.
कुहा–आड, कूप ८–७०.
कुहिजणें–कुजणें १७–१५४.
कुहिलें–कुजलेलें १३–५२१.
कुहीदुळी–कुजकी घाण ६–२१६.
कुळ–समुदाय ११–२४९; वंश ८–२७०.
कुळकणी–कुशलता, चातुर्य १–११३.
कुळदिवा–कुलदीपक ८–२७०.
कुळवधू–कुलवान् स्त्री १८–१०२७
कुळवाडी–देवघेव ३–२४६; व्यापार ६–४४८; शेतकीचा धंदा १३–५६५.
कुळवाडीकर–शेतकी करणारा १३–२८.
कुळाचळ–मोठे पर्वत, हे सात आहेतः–महेंद्र,मलय, शुक्तिमान, गंधमादन, विंध्य, पारियात्र, १८–१७७६.
कूजणें–शब्द करणें ६–४५०.
कूटस्थ–मायेच्या संगानें असणारें (चैतन्य) १६–४३.
कूप–कुंपण ११–५३९;आड १८–९९.
कूर्म–कांसव २–३०२; शिंकेच्या वेळेच्या वायूच्या विशिष्ट स्थितीचें नांव १८–३४०; विष्णूचा एक अवतार ११–८४.
कूर्मी–कांसवी १३–१४०.
कूल–तीर १८–१८०२.
कृकर–ढेंकरेच्या वेळच्या वायूच्या स्थितीचें नांव १८–३४०.
कृच्छ्र–पहिले दिवशीं एकवार भोजन, दुसरें दिवशीं नक्त (सायंकाळीं भोजन), तिसरें दिवशीं न मागतां आपोआप प्राप्त

होईल तें खाणें व चौथे दिवशीं उपोषण; याप्रमाणें क्रमानें बारा दिवस करण्याचें व्रत १७–३६४.
कृतकार्य–कृतकृत्य १–२५.
कृतांत–काळ १–८८.
कृपण–कद्रु, कंजुष मनुष्य १३–२०९.
कृमि–किडा १८–५२५.
कृमिदोष–जंताचा रोग ३–२२६.
कृश–रोडका ११–१२४.
कृषि–शेतकी १८–८८१.
कृषीवल–शेतकरी १३–२०६.
कृष्णपक्ष–वद्यपक्ष; महिन्यांतला दुसरा पंधरवडा ८–२३३.
कृष्णाचिया–कृष्णाचे (अनन्य भक्त) ८–१०.
कें–कोठें १–२२९.
केउता–कशाला, कोठला १०–११.
केउतें–कोणीकडे, कोठें १–१४५; कोठला १६–४५३; कोठलें १३–२८३.
केंकाण–समुदाय १८–४६४.
केणि (केणी) बंधन, धरबंद ९–४७१.
केणी–माल ६–३४१.
केणें–वस्त्राच्या घडीवर बांधलेला दोरा ६–२९२; माल ९–४९६.
केतु–धूमकेतु, शेंडेनक्षत्र १६–३१९.
केतुकें–कसलें १३–१२; कांहीं ३–४२.
केतुलें–केवढें ५–११७.
केधवा–केव्हां १४–१९०.
केयूर–एक प्रकारचें बाहूभूषण १३–१०६५.
केर फिटणें–कचऱ्याप्रमाणें उडून जाणें ११३४.
केर फेडणे–कचऱ्याप्रमाणें उडवून देणें ११–३९९.
केलि–क्रीडा १८–६.
केलें–कृत्य, केलेलें कर्म १८–३९४.
केवी–कसें १–७४.
केवेळीं–केव्हांही ४–६०.
केशिहंता–केशिदैत्यास मारणारा, कृष्ण १६–८०.
केसर–फुलांतील बारीक तंतु १३–२४७.
केसरी–सिंह १७–४२३.
कैंहीं–कोठेंही ३–८९.
केळवली–लग्नाचा निश्चय होऊन गडगनेर जिचा झाला आहे अशी नवरी मुलगी १३-५५१
कै–केव्हां १८–६८.
कैकट–धर्मकृत्यास अयोग्य असा कीकट देश १७–२९४.
कैंचें–कोठचें, कसें ८–१०१.
कैपखें–कोणाची बाजू अथवा पक्ष घेऊन १७–३५,
कैपक्ष–कैवार ९–१६६.
कैवल्य–मोक्ष ३–१५१.
कैवार–कड, बाजू ४–५१.
कोक–कामशास्त्र १३–८३०.
कोठा–गोठा १३–२३३.
कोठार–वखार १६–३९५.
कोंड–गांवकुस ३–२४२.
कोड–इच्छा ४–२१९; कौतुक ८–१७९.
कोडीसवाणी–गोजिरी, सुंदर ११–२९१.
कोडी–कोटी ६–४६५.
कोडें–कौतुकानें १–२०१.
कोढी–कोड असलेला १३–७०४.
कोंत–भाल्याचें लोखंडी अग्रफळ शस्त्राचें पातें. १३–५३९.
कोदंड–धनुष्य ३–१८९.
कोंदणें–गच्च भरणें १५–४७६.
कोंदाकोंदी–दाटी, खेंचाखेंच १५–१५६.
कोंदाट–विपुलता, पूर्णता ११–२५०.
कोंदाटणें–गच्च भरणें १–१३९.
कोप–राग २–८८.
कोपट (कोपटी)–झोपडी १३–७८५.
कोंबारा–कोंभ, अंकुर १५–१८४.
कोंभ–अंकुर ६–३५३.
कोंभणें–उत्पन्न होणें ११–२६६.
कोंभेला–अंकुर दशेला आलेला ९–२५.
कोंभेली–आकाराला आलेली ६–३२४.
कोमैजणें–अकुंचित होणें १५–९७
कोमाइणें–कोमेजणें ९–४.
कोर–हद्द, मर्यादा १३–८५३.
कोरडा–व्यर्थ, फुकट १३–६८९.
कोरान्न–कोरडी भिक्षा १२–८५.
कोराळें–डोंगरांतला कडा १६–११७.
कोलकाठी–दांडपट्टा ११–५४८.
कोलित–जळणारें लांकूड १८–७९०.
कोल्हाटी–डोंबारी १८–६०६.
कोल्हाळ–गलबला, आरडाओरडा १–१३२.
कोलेंरी / कोल्हेरी–मातीचे कुंभारी चित्र ९–१७३; ११–४६६.
कोवळिक–मृदुता १–३४.
कोश–कमळ ६–२०९; शपथ, प्रतिज्ञा १३–६०४; अंतरभाग, १४–३१३.
कोशपिणें–शपथ वाहणें १३–६०४.
कोशकिटक–(कोशकीट) कोसला, घर करून आपणच आपल्याला कोंडून घेणारा किडा ६–७२-

कोहं–मी कोण १५–३४२.
कोळ–तिळ झाडून घेतलेली तिळाची झाडें ५–८५.
कौमारत्व–बालपण २–१०९.
कौस्तुभ–श्रीविष्णूनें कंठावर धारण केलेल्या रत्नाचें नांव ९–३८९.
क्रतु–यज्ञ ३–१३९.
क्रमणें–चालणें ६–५८.
क्रमयोगी–क्रमाक्रमानें ब्रह्मप्राप्ति करूण घेणारा १८–११३४
क्रांत–व्याप्त, व्याकूळ १५–४१२.
क्रांतदर्शी–दीर्घदर्शी ४–८८.
क्रीडामृग–करमणूकीकरितां पाळलेला पशु, हरिण वगैरे ११–१७०.
क्रुद्ध–रागावलेला ११–१२६.
क्रोश–कोस १८–१८०३.
क्लेश–दुःख ८–१४०.
क्लेशकार–क्लेशकारक १८–१४२.

## ख.

ख–आकाश १६–३९.
खग–पक्षी १३–५८३.
खंग–खंड १०–११०.
खचणें–जडवणें ११–१३३.
खंड–भाग ६–२३२; पाकळी १४–२०५.
खंडणें–तुटणें २–१५४.
खडग–खडक ११–५३९.
खडळूं–खडा १३–१३५.
खडाडता–खळबळ ७–१८२.
खडाण–अल्पदुधी लाथरी गाय १३–२०४.
खंडित–तुटलेला, भग्न १–१२.
खडु–गढूळ १६–८९.
खडुळ–गढूळपणा ७–७८. गढूळ पाणी ११–५५७.
खड्ग–तरवार ४–२०७.


खणुवाळ–खणु असलेला, खरबडीत १५–१६५; कठीण १८–१८६.
खत–जखम, क्षत ९–५००.
खता–मळ, संशय ४–२०८.
खंती–कंटाळा १३–६१३; तिरस्कार १६–३१४; खिन्नता १८–८०.
खतेलें–भरलेलें १६–२७.
खदिरांगार–खैराचा निखारा ९–१५०.
खद्योत–काजवा १–६७.
खपुष्प–आकाशाचें फूल १५-२१५.
खर–गाढव १३–७०५.
खरपुस–बोचणारा, तीक्ष्ण १३–२८९; कडक, कठीण १६–९१.
खरपें–डिखळ ६–४९०.
खरमरा–रखरखित, प्रचंड १६–३९५.
खरा–खडा १४–१२८.
खरांटा–झाडू, पूर्ण अभाव, दुष्काळ ५–११२.
खरी–गाढवी १३–७०५.
खवणा–दिगंबर ४–२१.
खवलें–खपली ८–६२.
खवळणें–क्षुब्ध होणें १–१४८.
खसासित–खसखशीत १६–२४४
खळ–खल, दुष्ट १८–१७९४.
खळाळ–खळबळ ७–७८; खळखळ वहाणारें पाणी १५–३८६.
खळें–शेतावरील धान्य मळण्याचें ठिकाण १३–३९.
खाइर–खाणारा १८–५५४.
खाई–नाश ११–४४०.
खांकरणें–आरंभ करणें १७–९४.
खांकरेजणें–तयार होणें, फुटणें १५–१५९.
खाखात–खा खा करित उठलेला कर्कश १–१३१.

खागें–ठिकाण ९–४७०.
खांचणें–खचणें, कमी होणें ६–२३७; कमी करणें १३–७९४; खंडण करणें १३–१०४९.
खांचणें–श्रमणें, दमणें ९–२२६.
खाजें–खाद्य ६–२९.
खांड–दुधारी तरवार १५–२४८,
खांडणें–तोडणें ३–२५३; वेगळे करणें ९–४४; खपणें १८–३५.
खांडी–दांतांतील छिद्र १३–५६७.
खाणी–उत्पत्तिस्थान १८–३५२.
खातवड–दुर्गंधियुक्त उकिरडा १३–५६२.
खांद–आधार, आश्रय १८–७३१.
खादणें–खाणें ११–१८२.
खांदी–फांदी १०–९९.
खाद्य–खाण्यास योग्य १८–५६०.
खापर–भैरवाचें भिक्षापात्र १८–१०४०; मडक्याचा तुकडा ९–४३९.
खाल–साल ३–२५२; भोत, मेलेल्या जनावराच्या आंतील भाग काढून टाकून गवत वगैरे भरून तयार केलेला आकार ११–४६५.
खालवणें ( खालावणें )–नम्रपणानें लवणें ९–२२५.
खालां–खालीं १८–७१६.
खालार–उतार १८–४८१.
खांबे–सोट १५–१५९.
खिच–खिचडी ८–१४४.
खिचटें–खिचडी १४–२७३.
खिरडणें–मागें हटणें, जिंकला जाणें ११–२१६; मागें सरणें १६–४२१.
खिरणें–गळणें ८–१५.
खिल्लार–कळप ९–३२१.

खिळणें—जखडून टाकणें ११–४६१.
खिळिलें—जखडलेलें १६–१४५.
खीचपुरी—खिचडी १८–१०४६.
खुजट—ठेंगणा—११–२७७.
खुजें—ठेंगणें १५–१३.
खुंटणें—थांबणें ३–५६.
खुडकणें—आडकणें १४–१४८.
खुडणें—तोडणें २–३०५.
खुणेचें—मर्माचें, अंतरंग १८–११७८.
खुतला—तटस्थ बसला, निश्चय करून बसला. १८–६५४.
खुपणें—टोंचणें, बोचणें १६–१२०.
खुरखोडी—लाथा झाडतो १४–१४९.
खुरतोडी—लाथरी गाय १३–६३७.
खुरपें—खुरपण्याचें हत्यार १६–३२९.
खुला—थोटा १३–४५६.
खुळें—थोटें १८–९५८.
खूण—मर्म, तत्त्व ५–१६६; वर्म, लक्षण ९–१३४.
खूण पाळणें—मनोगताप्रमाणें वागणें, आज्ञा पाळणें १८–९१४.
खेचर—पिशाच५–९९; गगनविहारी ६–२९६; यक्ष १७–७८.
खेद—कंटाळा ४–१०३.
खेंव—आलिंगन ६–५९.
खेंवण—कोंदण १–५
खेवणें—भूषण १३–१९४.
खेवों—तत्क्षणींच १७–३२६.
खेवों—लगेच, तत्क्षणीं ६–१७०.
खेळवणें—हालवणें १८–१३०३.
खेंवंग—बळ १३–१०७.
खोकरें—फुटकें ८–१५.
खोकरपण—फुटकेपणा १५–५००.
खोंचणें—रुपणें ९–१२६.
खोचरा—भाला १६–३४५.
खोट—लगड १–२१६.
खोटी—लगड ८–१७३; गोळा१५–३३६.
खोडा—गुन्हेगाराचे हातपाय अडकविण्याकरितां केलेल्या लांकडाची चौकट १८–८९८.
खोंप—घर, खोपटी ९–१०३.
खोमणें—न्यूनता १३–९१६; कमीपणा येणें १४–२८५.
खोलणी—पुढें चालणें ९–३२६.
खोलणें—चालणें १२–७१; पुढें चालणें १६–३४०.
खोलता—पुढें चालणारा वाटाड्या १३–४१७.
खोलबिणें—लावणें १७–२५५.
खोलावणें—खोल जाणें १५–९३.
खोविलें—पेरिलें १३–२९६.
खोळ—गवसणी ३–२६०; पदर ७–१८७.
खोळी—कात १४–३१२.
ख्याति—पराक्रम ९–२१५; प्रसिद्धि १८–१०९५.

## ग.

गगन—आकाश १–७४.
गगनौळ—आकाशाचें फूल, खपुष्प १६–३६३.
गंगावती—निरगुडी ९–१४.
गचिया—गचांडी, मान ६–२३६.
गज—हत्ती १–९२.
गजपति—ऐरावत १६–२२५.
गजबज—खळबळ १–१८५.
गजबजणें—गडबडून जाणें, गोंधळून जाणें १–१५०; दाटणें, भरलेलें असणें १५–२४०.
गंड—गर्वानें ताठलेला १३–७१७.
गंडकी—शालिग्रामासारखा कसोटीचा दगड १३–३१९.
गडद—गाढ आंधार ४–२०५.
गडबडणें—कोसळणें, कोसळून पडणें ७–८०.
गण—समुदाय ३–९६.
गणणें—मोजणें १–९३; लेखणें १६–६९. १६–१८६.
गणिका—एका वेश्येचें नांव ११–१०७.
गणेश—गणपति १–२.
गत—गेलेलें १२–१९२.
गतायु—आयुष्य संपलेला १६–१२९.
गतायुषी—आयुष्य संपलेला ३–१०९.
गति—आधार १५–११६; व्यापार, चलनवलन ३–५६; वागण्याची रीत २–२०३; स्थान ८–१८१; अर्थ १५–११६
गती ( गति )—मार्ग, आधार २७–२९; वेग १७–३८९.
गदळ—घाण १३–३२३.
गद्गद—सद्गदित ११–५६८.
गंध—वास ७–३३; चंदनादिकांची कपाळावर उटी लावतात ती १७–३०४.
गंधर्व—स्वर्गांतील गाणारा ९–३२३; अदृश्य पुरुष ९–५०४.
गंधर्वदुर्ग—ढगाच्या आकृतींत भासणारा किल्ला १५–२१५.
गंधर्वनगर—आकाशांत ढगाच्या आकृतीवर दिसणारा शहराचा भास ९–१७३.
गंधर्वभुवन—गंधर्वनगर १८-४२९.
गंधानिळ-सुगंधयुक्त वारा १७–६.
गंधि-कलंक, काळकविण्याचा गुण ४-६४; घाण १८–७५७.
गंधिकाळिक—गंज व काळेपणा १८-२०९.
गभस्ति—सूर्य २–२६१.
गमणें—भासणें ७–११६; वाटणें८–४२; चालणें १७–१७८; प्राप्त होणें ५–२९
गमावा—चालावयाचा १७–१७८.
गमिजे—जाणावें ४–१४२.

गम्य–प्राप्य ११–७३.
गरल–विष ६–२४१.
गरिमा–मोठेपणा १३–१८७.
गरुवा–मोठा, म्हातारा १३–५६८.
गरुवी–श्रेष्ठ ९–२२८.
गर्जित–गर्जना करणारा ११-१२७.
गर्ता–खळगा ९–१८५.
गर्भ–पोट ११–६५०. आकार, भाव ९–७४.
गर्भगोळ–गर्भातील गोळा, गर्भांतील मूल ९–३३५.
गर्भपत्र–आंतून निघणारें कोमल पान १५–९९.
गर्भपुट–गाभ्याचा पडदा अथवा सोपट ११–२५०.
गर्भि (गर्भिणी)–फळ देण्याच्या बेतांत आलेली वनस्पती १३–२२७.
गर्वतुष्टिगुंड–गर्वानें संतुष्ट होऊन ताठ झालेला १३–७१७.
गवखा–दरी ११–४२५.
गवसणी–(आच्छादणारी) खोळ ९–१९३.
गवसणें–आच्छादन करणें, आश्रयाखालीं आणणें १-११६; सांपडणें ६–१०१; व्यापणें, कवटाळणें ६–४०२.
गवादी–अन्नछत्र १३–२३०.
गवार–मूर्ख १५–२६८.
गवाक्ष–खिडकी, झरोका ७–२००; द्वार ११–६१.
गव्हर–गुहा १३–८५५.
गव्हरणें–गूढपणानें सांगणें १०-२५.
गव्हार–मूर्ख १३–७४१.
गव्हाळा–गव्हासारख्या ठिपक्यांचा ७–१६३.
गहन–खोल, गंभीर विचारानें भरलेली १–२८; दुर्बोध ४–९२; संकट ८–६३.
गंहिरु–गंभीर १–१४४.

गहिंवर–मनोविकाराचा उमाळा १–२६९.
गहिंस–अज्ञानी, मूर्ख ११–९७.
गहींसपण–मूर्खपणा ९–५१३.
गळ–मासे पकडण्याचें साधन ३–२१४. नवस फेडण्याकरिता पाठींत आंकडा घालून घेतात तो १७–२५६.
गळाळा–घोट ८–१४७.
गा–अरे १८–१२९७.
गांग–गंगेचें पाणी १४–३५३.
गाजणें–दुमदुमणें १–१२६; वाजणें ६–२७७; डौल मिरविणें ९–४३२; गर्जणें १–१६३.
गाजावज्य–गडबड; गोंधळ ४–३१
गांठा–पिंजरा १३–२३३.
गांठी–गांठ १४–१२८.
गांडीव–अर्जुनाच्या धनुष्याचें नांव १–१९७.
गांडोरा (गाडोरा)–पाया ११–५३९, १८–१५०७.
गाढ–दृढ १८–१००२; अतिशय भरलेले १७–१२८.
गाढणें–कसणें, घट्ट करणें ११–२२१.
गाढा–बळकट १८–१०६२.
गाढिका–बळकटपणा, दृढता ६–३६४.
गाण (न)–गायन, गाणें ९–३२३.
गाणावाणा–गाण्यानें व वर्णन करण्यानें १८–१५२७.
गाणीव–गाणें ११–१५७; संस्कृत टीका १८–१७४१.
गात्र–अवयव ६–२१९.
गादणें–पीडित होणें १३–२२१; लिप्त होणें १३–१११९.
गाभा–अंतर्भाग, मतलब ७–२०७.
गाभागोभा–अडथळा १८-१३६५.
गाभार–अंतर्गृह, माजघर ४–१०७.
गाभिणी– गरोदर स्त्री १८–९७१.
गाभिणें–फदफदलेलें १७–१५९.

गाभेवन–सूक्ष्म अंकुर, गर्भांतील पान १०–७०.
गायत्री–चोवीस अक्षरांचें वैदिक वृत्त १०–२८९.
गार–गारवा ६–१३४; गारगोटी ९–१४८.
गारुडी–इंद्रजाल विद्या १३–८३२; सर्पादिक बाळगून त्यावर पोट भरणारा व त्यांचे विष उतरवणारा २–७२.
गांवढा–अडाणी, खेडवळ ३-१४५.
गांवधन–गोधन, गांवातील गाई १८–१७४.
गांवरस–गांवातील घाण पाणी १६–२५.
गांवाई–गुंतागुंत, घोटाळा ३–११.
गिध–गिधाड २–२००.
गिरबडणें–चिकट करणें, राड करणें १३–५६१.
गिरि–पर्वत १०–२३४.
गिरिदुर्ग–डोंगरी किल्ला १–९४.
गिरिवर–मोठा पर्वत २–७६.
गिरीश–शंकर १८–१६८८.
गिवसणें–कवटाळणें, व्यापणें १–६९; शोधणें २–४८; सांपडलें जाणें १०–७०.
गीत–गाणें १७–२९७.
गीताख्य–गीता या नांवाचा १–५०.
गीतांग–गीतेचीं पदें १८–१७३६.
गीता गाणें–संस्कृत गीतेचा अर्थ सांगणें १८–१७३७.
गुगुळ–एक प्रकारचा सुगंधी पदार्थ १७–२९८.
गुज–गुप्त ४–२८.
गुंडणें–गुंडाळणें १४–७९.
गुंडा–दगड १३–४७.
गुढ–मर्यादा, आवरण १८–७३९.
गुढणें–व्याप्त होणें ११–२८६;
गुढी–ध्वजा ४–५२; बातमी १४–४१०.

गुण–पाश २–३४२; वात १३–७१९; दोरा १३–११०२; सत्त्व, रज, तम १८–८१७; धर्म १७–१३१.
गुणागुणी–गुणी व गुणातीत १८–१९.
गुणिया–गारोडी ११–८४.
गुणी–गारुडी, मांत्रिक १३–७२५.
गुणें–मुळें १३–५६९; म्हणून १८–१७६६.
गुणेंद्र–गुणांचा राजा, श्रेष्ठ गुण १८–८६७.
गुतकुली–गुदगुली ७–११०.
गुंतणें–अडकणें १८–१३०६.
गुंतलें– गुंतागुंत १८–३११.
गुंती–अडथळा १३–२४; अडचण १४–३३७.
गुंथले–गुंफलेले १३–११०२.
गुद–अपानद्वार ६–१९५.
गुंफणें–गुंतणें, घोटाळ्यांत पडणें ४–८५.
गुंफिरें–गुंताडा, बंधन, जाळें १४–२८४.
गुरुगम्य–गुरूकडून कळणारे ६–४५९.
गुरुतल्पग-गुरुनिंदक, गुरुपत्नीगमन-करणारा १३–६७५.
गुरुत्व-मोठेपणा, गुरुपणा १६-२६; श्रेष्ठपणा, जडपणा १७–३.
गुरुवती–मोठेपणा, विस्तार १-३३.
गुरूपदिष्टा-गुरूनें उपदेशिलेली १६–२११.
गुर्विणी–गरोदर १४–८९.
गुल्फ–घोटा ६–१९७.
गुळळा–गुळणी, चूळ १३–४१८.
गूढ–गुप्त ३–१७९; गढलेला ३-६८; गुप्तगोष्ट १८–१३५२.
गूढणें–झांकणें १५–१९६.
गूढला–व्यापला १६–३९६.
गृह–घर ५–२२.
गृहिणी–विवाहित स्त्री, घरधनीण १४–८७.
गो–गाय २–१८४.
गोखा–मध्येंच ११–३८९.
गोग्रहण–गाई हरण करणें ११–४६९.
गोचर–दिसणारा, प्रत्यक्ष दिसण्याचा विषय २–१४८.
गोठी–गोष्ट ३–२७२.
गोडिरें–गोड १८–८०४.
गोडसा–मधुर १७–१२६.
गोतांबील–एका ताटांत सर्वांनी जेवणें १७–१६०.
गोत्र–कुळ १–१८४.
गोत्रज–नातेवाईक १–२०७.
गोंदळी–पिशाच १३–१००९.
गोधन–गाईंचा कळप ९–३१२.
गोंधळुक–सांजवेळ, मावळती वेळ १८–१०८५.
गोप्य–गुप्तगोष्ट ९–४०; गुप्त १८–१३५१.
गोफणें–गोफण १३–२८४.
गोमटें–चांगलें २–२११.
गोरी–पारधी ८–१४८; पारध्याचें गाणें १३–७३९.
गोरूं–गुरूं १३–५९६.
गोंवणें–गुंतवणें, अडकवणें १८–६५५.
गोंवारी–गुराखी १८–१७४.
गोंवी(गोंवी)–गुंताडा १८–७१८.
गोसावी–मालक, स्वामी ५–१३.
गोसावीण–धनीण, मालकीण १८–९१२.
गोसाविणी–मालकीण ९–१२०
गोसावीपण–प्रभुत्व ११–२२.
गोसी (गोंसी)–अंतर्भाव १४–९३.
गोळक–गोल ८–२२.
गोक्षीर–गाईचें दूध २–१८४.
गौण–अमुख्य, दुय्यम प्रतीचे ६–३११.
गौतम–एका ऋषींचें नांव १५-५७८.
गौप्य–गुप्त गोष्ट ११–६१३.
गौर–गोरा १५–४९२.
गौरव–मोठेपणा ९–४३५; शोभा ६–४६२.
गौल्य–गोडी ३–२२६.
ग्रंथणें–ग्रंथरचना करणें १८–१७६९.
ग्रथन–ग्रंथरचना १३–३२८.
ग्रंथी–गांठ १८–१४०४.
ग्रंथोद्यम–ग्रंथाचा उद्योग १४–१६.
ग्रंथोपजीवी–ग्रंथ ज्यांचा जीवन आहे असे १८–१८००.
ग्रह–पिशाच २–८५; सूर्यमालेंतील फिरणारे बुध, गुरु वगैरे गोल ११–२५८.
ग्रहण–सूर्य किंवा चंद्र यांचें राहुकेतु-कडून आच्छादिलें जाणें १८–११०.
ग्राम–समुदाय ५–१०५; गांव ६–४३२.
ग्रामकुल–कुत्रे १३–६८०.
ग्रामद्वार–गांवची वेस १२–६९९.
ग्रास–नाश १५–५४९; घांस १८–१००.
ग्रासणें–नाश करणें ११–४९१.
ग्राहकी (ग्राहिकें)–गिऱ्हाइकी ९–४९७; ११–६५२.
ग्राहिकी–खरेदी ९–४९७.
ग्राहीक–गिऱ्हाईक ६–२९२.
ग्रीवाघंटा–गळ्यावरील डेरा १८–४०.
ग्रीष्म–उन्हाळा २–३५९.
ग्रीष्मशेष–ग्रीष्म ऋतूचा शेवट १५–२४६.
ग्लानि–खंती ९–५११; दुःख, संकट, लाचारपणाची विनंति ८–१२८.

### घ

घट–मातीची घागर १३–८७२; (लाक्षणिक) शरीर १५–४०७.

घटघटा–घटाघट ११–३९४.

घटणें–घडणें २–२०५.

घटभंग–घटाचा नाश १४–५४.

घटा–समुदाय १–९२, १–१६२.

घटिका–पाण्यानें भरलेल्या घंगाळांत वेळ मोजण्याकरतां जें पात्र ठेवतात तें ६–४७१.

घंटिका–पायांतील घागरी १–७; कंठमणी, गळ्याची घाटी ६–२०८.

घटिकायंत्र–रहाटगाडगें २–१५९.

घड–घोस १८–९६८.

घडघडणें–गडगड आवाज करणें १–१२९.

घडणें–भेटणें, स्पर्शणें १–४३, १८–१०८१; उत्पन्न होणें ३–२५५; तयार करणें १८–१७६८.

घडतें–घडणारें, बनणारें १५–५९५; अनुकुलता १७–२९.

घडला–बनलेला, तयार झालेला ६–४६४.

घडवणें–उत्पन्न करणें १३–९६८.

घडा–घागर, हंडा १८–५४३.

घडी–क्षण १०–२५०; घटका १७–२५१; दुमड ७–१९५

घडेंयागाडगेयांचें– घागरी व मडकीं यांचे ९–७४.

घणावणें–दृढ होणें १४–१४२.

घणावली–घट्ट अथवा दृढ झालेली १५–५.

घन–दग २–७५; लगड ८–१७३. गाढ, दाट १४–७४.

घनवट–जड २–१३०; भरीव १०–१७६, दाट १३–२१३.

घनाकार–गोळा, लगडीचा आकार ८–१७३.

घनावळी–मेघपंक्ति ९–११९.

घनीभूत–लगडीच्या रूपानें असलेलें १–४४.

घरकुल–भातुकुलीच्या खेळांत मुलींनीं केलेलें घर ९–३७४.

घरटा–ठिकाण, आश्रय १८–६५१.

घरटी–पहारा, गस्त २–३११.

घरडहुळी–घरांतला शोध ६–२१६.

घरडोळी–घराचा झाडा ११–५८६.

घराचार–प्रपंच १८–१३९२.

घराणें–ठिकाण, समुदाय, कुळ (समुदाय या अर्थी.) ८–२३४.

घलणें–उडी मारणें १६–६९, उडी १८–७११.

घसणीं–संघट्टण, संसर्ग ७–१३९.

घाई–घाव २–१९०.

घाउस–घास, लचका ६–२३१.

घांघुसणें–घासाघीस करणें ५–६७.

घाट–धरण, नदीचा घाट ९–१२४.

घाटणें–ताडन करणें, घाव देणें ७–१२.

घाण–सुवास १८–४८१.

घाणा–तेल काढण्याचें तेल्याचें यंत्र १७–४१९.

घाणी–दुर्गंध १७–१५८.

घात–नाश ६–७०.

घातुक–घात करणारा ३–२१७.

घातेचिये–माराच्या, मारण्याच्या. ३–२१६.

घापणें–घालणें २–३४६; घातलें जाणें १८–२३.

घापें–घालावी १८–१२६६.

घामेजणें–श्रमी होणें १३–३४८.

घाय–घाव ७–१०७; जखम १३–५३८.

घारणें–व्यापणें ३–१९६.

घालणें–उडी टाकणें ६–४७४; स्वाधीन करणें, अर्पण करणें १८–१०२७.

घुणाक्षर–लांकडे कोरणाऱ्या घुणानामक किड्यापासून कोरलें जाणारें अक्षर १७–३०१.

घुमघुमणें–घुमघुम् आवाज करणें १५–१८८.

घुमणें–शब्द करणें ६–२७८.

घुमरी–भर १७–२१३.

घुरें–एक घाण येणारें लाकूड १८–१२५३.

घूर्णित–धुंद, बेसावध ११–१२६.

घृत–तूप ९–२४०.

घृष्टि–घर्ष, घांसणें १८–११५९; संसर्ग, संघट्टण १७–५१.

घेणी–स्वीकार १६–१६४.

घेणीदेणी–घेवदेव १६–१९.

घेणें–ताब्यांत घेणें, स्वाधीन करून घेणें ९–१७.

घेते–घेणारें ५–२९.

घेपणें–लिप्त होणें ३–७१. वेढणें १५–२९५.

घेपें–घ्यावें २–२६०.

घोंकरी–घो घो आवाज करीत ९–५३१.

घोंघें–घो घो करीत ८–८४.

घोटणें–गिळणें ७–९४.

घोटीव–चकचकीत वेढें ६–२२४.

घोर–भयंकर ४–२०३; १५–१६३ झोंपेंतील घोरणें १–७२.

घोष–आवाज १–१४४; परा वाणी ६–२७६; गजर ११–३३६

घोषध्वनिनादाकार–परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी ९–२७५.

घोंसाळिया–घोंस असलेल्या १९–१९०.

घ्राण–नाक २–११७.

च

चकै–चुकभूल, भ्रम, भ्रमिष्टपणा १८–५२९.
चकोर–चंद्रकिरणांतील अमृत खाऊन राहणारा एक पक्षी १–५६.
चक्र–योगमार्गांत कल्पिलेलें चक्र, तीं चक्रें ६ आहेत; मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, सहस्रार ६–२३७; कुंभाराचें चाक १८–३१०; विष्णूचें एक आयुध ११–६०४.
चंक्रमण–पायानें चालणें १३–११९
चक्रवर्ती–सार्वभौम राजा ६–२७२.
चक्रवाक–ज्याचा स्त्रीशीं दिवसास योग होतो व रात्रीस वियोग होतो असा एक पक्षी १६–६.
चडकण–चापट, चपराक १७-४१८.
चडफणें–चरफडणें १४–१४९.
चंडवात–सोसाट्याचा वारा २–२२३.
चंडांशु–सूर्य ११–२११.
चंडिका–देवी १८–४४४.
चढावा–वाढ, वृद्धी १२–१७२. वरचढपणा ११–३८८.
चतुरंग–सैन्याची चार अंगें–हत्ती, घोडे, रथ व पायदळ ११–३९७.
चतुरानन–ब्रह्मदेव ३–११६.
चतुराश्रम–'आश्रम' शब्द पहा १८–६२९.
चतुर्थी–चौथी १४–२७०.
चतुर्दिक्षु–चारी दिशाकडील १३–४११.
चतुर्धा–चार प्रकारचा १८–६२९.
चतुर्भुज–चार हातांचें ११–८३.
चतुर्विध–चार प्रकारचा ७–२३.
चतुर्व्याजें–चार प्रकारच्या निमित्तानें १३–९५०.
चतुष्टय–चार वस्तूंचा समाहार १५–९७.
चतुष्पथ, चतुष्पद –चौक, चार रस्ते मिळण्याचें ठिकाण, चव्हाटा १०–१२४.
चतुष्पद–चार पायांचें जनावर १२–९३.
चंद्र–चंद्रामृत ६–२५९.
चंद्रकळा–चंद्राचा किरण १–५६.
चंद्रकांत–ज्यावर चंद्राचे किरण पडले असतां द्रव सुटतो असा मणी ९–२९.
चंद्रमा–चंद्र ९–४८६.
चंद्ररेखा–चंद्राची कोर १५–४७०.
चंद्रसूर्य–इडा व पिंगला या दोन नाड्या १२–५४.
चंद्रसूर्यसंपुट–इडा व पिंगळा यांचे संगमस्थान १३–५०८.
चंद्रामृत–सतरावी कला, योगीक मतें मस्तकांत असणाऱ्या तळ्यांतील अमृत ६–२४७.
चंद्रिका–चांदणें ९–१२३.
चंपक–चाफा ६–२५७.
चरणतळ–तळपाय ६–१९३.
चरणयुगुल–दोन पाय १–१९.
चरणसंवाहन–पाय चेपणें १३–४२१.
चरणें–लागणें, शिरणें ८–८९; सेवन करणें १५–२९६.
चराचर–स्थावर जंगम पदार्थ १–१२९.
चर्चणें–उटी लावणें १०–१२; चर्चा करणें १३–१११३.
चर्चा–वादविवाद १३–२११.
चर्मचक्षु–चामड्याचा डोळा, स्थूल दृष्टि ८–८९.
चलां–चालतें १८–१७९७.
चलितचित्तपानतुंदिल–चंचल चित्तास पिऊन ज्याचें पोट मोठें झालें आहे असा १८–६.
चवक–दचका ११–३३९.
चवडा–पंजा १३–६४.
चवरधर–चवरी धरणारा १३–४१७.
चवरें–शिखर ६–५८; ८–१५४;
चहू–चार २–२०४.
चळणें–हलणें, चालणें ३–६१; क्षुब्ध होणें १८–६६६.
चळवळणें–हालचाल करणें १४–९.
चळिया–धारा ७–७५.
चाक्षु–डोळा ९–१६०.
चाकळा–चघळ ९–१८१.
चाकाटणें–विस्मित होणें, चकीत होणें ९–५२७.
चांग–धैर्यवान १–१३५; चांगला १६–२१४.
चांगावें–चांगुलपणा १८–१२३०.
चांचर–बोबडी १८–१६०६.
चांचुवडें–चोंच १३–३२५.
चांचू–चोंच १–६८.
चांचूवरी–चोंचीनें १–६८.
चाड–इच्छा १–२६६; बुद्धि ४–८४.
चांडाळ–मांग, महार १६–१७६.
चाडें–बीं पेरण्याकरितां पाभरीवर जें लांकडाचें पात्र असतें तें ६–४९२.
चातक–मेघोदकानेंच वांचणारा पक्षी १५–२०.
चातुर्यार्थकलाकामिनी–चातुर्य, वागर्थ व कला यांची देवता १–२०.
चांथी–बडबड १६–३१४.

चांद्रायण–पौर्णिमेस पंधरा घांस खाणें व नंतर वद्य पक्षांत रोज एकेक घांस कमी कमी करून शुक्ल पक्षांत एकेक घांस वाढविणें अशा प्रकारचें व्रत १७–३६४.
चापेगोरी–चाफ्याप्रमाणें गोरी असलेली ११–१३५.
चांपोळ–चाफ्याचें फूल १८–८५३.
चाम–कातडें ९–४५३.
चामर–चंवरी ९–४७५.
चामुंडा–देवीचें नांव १२–५३.
चारणें–चरविणें, विषय सेवन करविणें १३–७७०.
चारी–सेवन करवितो १८–१३०१.
चारु–सुंदर ६–७२.
चावटी–बडबड ९–१६.
चावडी–न्यायाची जागा १६–२९५.
चावदशी–चतुर्दशी १३–८१८.
चावळणें–बोलणें ६–११८, बडबडणें १६–३६४.
चासेंचास–पाभरीच्या प्रत्येक तासांत ११–५८२.
चाळ–हालचाल १८–१५५४.
चाळढाळ–हालचाल १३–९८५.
चाळणें–करणें ३–२४६; हलवणें १२–१४६; फिरविणें १५–१३५; बोलणें १३–१५, १२–६४.
चाळा–उठाठेव ११–३४.
चाळिता–हलवणारा, प्रवर्तक ९–२८३.
चाळू–टाकून बालणें १३–२७०.
चिकाटी–पक्षी धरण्याकरितां चिकटा लावलेली काठी १६–३४५.
चिकित्सा–औषधाची योजना १३–२२५.
चिंतवणी–काळजी ९–३३८.
चिंतामणी–चिंतिलेला अर्थ देणारें रत्न १–२४.
चितारणें–रंगवणें १४–२६२.
चिंतारत्न–चिंतामणि नांवाचें चिंतिलेलें देणारें रत्न १८-१६४३.
चितारिणी–चित्र काढणारी १८–४६०.
चित्कळा–जीवनकळा ४–२९.
चित्कळिका–ज्ञानरूप ज्योती ११–१७८.
चित्तचतुष्टय–मन, बुद्धि, चित्त व अहंकार १५–९७.
चित्ताथिला–चित्तसंपन्न १८–१७३२.
चित्ररथ–एका गंधर्वाचें नांव १०–२३६.
चित्रींव–चित्रांतील, कृत्रिम १३–४७०.
चिदंबर, चिदाकाश, चिद्गगन–चैतन्यस्वरूप आकाश ७–१५४;९–७५; १६–६.
चिद्भ्रमर–जीवचैतन्यरूपी भ्रमर १८–१३०१.
चिद्वृत्ति–माया १५–९४.
चिमुटणें–दाब बसला जाणें ६–२२५.
चिरंजीव–चिरकाल टिकणारा ८–१५७.
चिरणें–खुलें करणें ७–१७०; कायम करणें १३–४६.
चिरंतन–चिरंजीव २–९८.
चिरस्थाई–कायम टिकणारें ८–१५४.
चिरा पडणें किंवा घालणें–बंद पडणें किंवा पाडणें १२–१३६.
चिरीव–चिरलेली १८–३२७.
चिळसणें–विटणें, कंटाळणें १७–१५३.
चिळसी (चिळस)–किळस १३–५७३.
चीप–बांध, गळ्यांत कांहीं अडकतें तें १८–१५५६.
चुकणें–अंतरणें, मुकणें ८–२५३.
चुकी ठेवणें–मागें सारणें १३–११५६.
चुंबणें–सेवन करणें ५–१३१.
चुबुकळणें–बुडविणें ७–१८८; गटांगळ्या खाणें ८–१०७.
चुरमुरे–झणझणीत १७–१४६.
चुळुक–चमकणारें ११–१३३.
चुळोदक–चूळभर पाणी ९–१३.
चूडारत्न–अग्रभागीं असणारें रत्न १४–४००.
चूत–आंब्याचें झाड १८–१२४.
चूतफळ–आम्रवृक्षाचे फळ, आंबा १८–४७३.
चेइणें (चेणें)–जागें होणें २–१३९.
चेइरें–जागृति ११–२४६.
चेइलेंपण–जागृतअवस्था १५–२१८.
चेडा–भूतविशेष १७–९७.
चेत–जागा ६–६५.
चेतणें–जागें होणें ५–१४८.
चेतविणें–चैतन्ययुक्त करणें ७–२०.
चेतना–ज्ञानकला ८–२१४; सजीव १८–१७९७.
चेतनावर्ग–इंद्रियसमुदाय ८-२१०.
चेपणी–आटी ९–२०.
चेपणें–जोरानें दाबणें, हात लावणें ९–३२९.
चेयिरें–जागृति १०-१०६.
चेवविणें–जागें करणें ६–२०.
चेवो–जागृति ६–६३.
चेष्टणें–हालणें, व्यापार करणें १–८१.
चेष्टविणें–हालविणें १८–४२८.
चेष्टा–कर्म ३–५३.
चेष्टित–कर्म, केलेला व्यापार ५–५७.

चैतन्य–प्राण ३-१०९, आत्मा १–११५; चित्त १६–४७०.
चैत्य–चिंतन करण्याचा विषय १८–१२६७.
चैद्य–शिशुपाल ९–४६६.
चोख–शुद्ध, चांगलें १५–४३६; स्वच्छ, साफ १८–१४१.
चोखटीव-शुद्धपणा, स्वच्छपणा १५-५७९.
चोखटें–शुद्ध २–२१३.
चोखडें–शुद्ध, उत्तम १–११२.
चोखविषीं–चांगल्या रीतीनें १८–७२३.
चोखाळ–निर्मळ १७–३१८.
चोखाळणें–शुद्ध करणें ४–६५.
चोखाळपणा–निर्दोषपणा, शुद्धपणा १–९.
चोखी–शुद्धपणा, निर्मळपणा १७–२३०.
चोखौळ–शुद्ध पुष्प १८–१२४७.
चोज–प्रेम ६–१२३, कौतुक९–६; नवल, आश्चर्य ११–२२९.
चोजवणें–समजणें ६–५.
चोंढा–खळगा ७–७६.
चोंढी–खोल पाणी,डोह१३-५४९.
चोरळी–चोरवेळ १६–७.
चोह्टा–चव्हाटा १–२५१.
चौकडी–चार, चार युगें ८–१५६.
चौखुरणें–ताणून बांधणें १४–१७७.
चौगुणी–चौपट १८–७४७.
चौचक–कवाड १२–५२.
चौपासि–चहूंकडे १५–९२.
चौपाहारी–चारप्रहर ८–१६२.
चौफळ–चौकोनी १३–८९७.
चौफळणें–चौरंग करणें १५–१.
चौवार–चव्हाटा १६–२२३.
चौमेरी–चोहीं बाजूंनीं २–२००.
चौरंगी–चौरंगीनाथ १८–१७५३.
च्युत–पडलेलें १८–८८६.

छ

छत्र–छत्री ९–४७५.
छत्रचामर–छत्री व चंवरी हीं मानाचीं चिन्हें. श्रेष्ठ या अर्थी ९–४७५.
छंद–नाद, आग्रह ६–७४; अनुष्टुभादिवृत्त १०–२८२; अनुरोध १८–११५२.
छाया–सावली १६–१०.
छायाचित्र–पडद्यावर पाडलेली चित्राची छाया १८-१३०३.
छेद–घात २–१४५.
छेदणें–तोडणें १५–२६६.
छेदभेद–तोडमोड १७–२१२.

ज

जगजेठी–जगांत मोठा १–११५.
जगडंबर–प्रचंड विश्व,विश्वविस्तार १५–४७.
जगणें–चिकटून देणें ६–१३३.
जगदंबा–जगाची आई ६–२७२.
जगदंबुदगर्भनभ–जगद्रूपीढगाचा गर्भ ज्यांत संभवतो, असें आकाश १८–५.
जगदादिकंद–जगाचें मूळ कारण १२–२३९.
जगदादिविश्रामधाम–जगताचें उत्पत्ति व विश्रांतिस्थान १७–३२८.
जगदुन्मीलनाविरलकेलिप्रिय—जगत् प्रकट करण्याचा एकसारखा खेळ खेळण्याची आवड असणारा १८–६.
जंगम–हालचाल करणारा, सचेतन प्राणी १३–२२९.
जघन–पोटरी ६–१९२.
जंघा–मांडी १०–२५६.
जचणें, जाचणें–कष्ट करणें, मेहनत करणें १८–८४४.
जठर–पोट २–३३९.
जड–अचेतन ९–११६;मंद बुद्धीचा ३–१८.
जतन–रक्षण २–३१०.
जतना–तत्परता ९–२१२; सांभाळ २–३१०.
जंत्र ( यंत्र )–तोफा, बंदुका वगैरे ११–३९५.
जन–उत्पत्ति ११–१३०; लोक ५–९९.
जनक–बाप १५–४९२.
जनणें–जन्म देणें ६–४४.
जननी–आई १८–१६४६.
जनपद–लोक किंवा गांव ३–२३५.
जनलीलाविलास–उत्पन्न करण्याच्या लीलेंत क्रीडा करणारा ११–१३०.
जनी–जन्म देते ६–४४.
जन्मजराजलदजालप्रभंजन–जन्म व म्हातारपणरूपी मेघांच्या फळीची धूळधाण करणारा वायु. १८–१.
जन्मपत्रिका–जन्मकुंडली १५–२३४.
जन्मौनि–जन्मापासून ४–३४.
जन्यजनक–उत्पन्न होणारा व उत्पन्न करणारा १८–७५.
जन्मलेसाते–जन्माला आल्यापासून ४–१५४.
जन्मवृत्ती–जन्मभर पक्के वतनदार १६–३२७.
जन्मव्रती–जन्मभर आचरण करण्याचें व्रत घेतलें आहे असा १४–२७०.
जन्मक्षय–जन्म व मरण १४–५९.
जन्मांतर–दुसरा जन्म ३–२५.
जय जय–जयजयकार असो १–१.
जरंगा–जाळें ७–८६.

**जरा**—म्हातारपण १३–५५४.
**जर्जर**—पछाडलेला १–२७२; खिळखिळी झालेली ९–४९०.
**जलचर**—पाण्यांत राहणारे मत्स्यादिक ३–११७.
**जलद्**—मेघ ११–१३५.
**जलधर**—मेघ १–१४९.
**जलसेनु**—क्षीरसमुद्रस्थित महाविष्णु १३–३९२.
**जलाशय**—तलाव १३–६१२.
**जल्पणें**—बडबडणें ५-११५; वर्णन करणें ५–१७३.
**जल्पवाद**—बडबड ७–१०६.
**जंव**—जेव्हां १–१६३; जो पर्यंत १–१७०.
**जंव जंव**—जसजसें ९–५११.
**जवट**—जुळें १३–९६१.
**जवनीक**—पडदा ६–३०६.
**जवळिका**—सांनिध्य १०–१२१.
**जवळीका**—सांनिध्य ९–१०९.
**जळकेली**—जळक्रीडा ११–५९२.
**जळतभीत**—रवरलीत निखारा १७–२५६.
**जळदच्युत**—ढगांतून पडणारे १८-८८६.
**जळपारधी**—धीवर १४–१४७.
**जळंबट**—खांकरा, लाळ, कफ १३-५६४.
**जळराशी**—समुद्र १०–२३०.
**जळशयन**—क्षीरसमुद्रस्थित महाविष्णु १०–२१.
**जळार्णव**—पाण्याचा समुद्र १४–३३३.
**जळाशय**—पाण्याचा सांठा १४–२३३.
**जाकळणें**—व्यापणें ६–२६७; आकलन करणें १४–६२.
**जागरु**—जागृति १४–७४.
**जागेश्वरु**—जागती देवता ६–४४६.

**जागोवा**—जागरण १६–३४०.
**जाचणे**— खटपट करणें, श्रम करणें १५–२५३.
**जाड**—काल, कंवर ७–८५.
**जाडय**—जडपणा १४–१७९.
**जाण** / **जाणू**—जाणता ५–१६.
**जाणता**—शहाणा, ज्ञानी १–२५.
**जाणतां**—जाणून बुजून ११–१५८.
**जाणती**—बुद्धि १८–७२०.
**जाणांनेणां**—ज्ञानी व अज्ञानी यांना ५–१६.
**जाणावें**—ज्ञेय विषय १८–५३३.
**जाणीव**—बुद्धी २-१३९; शहाणपणा ९–३६८.
**जाणेंतान्हें**—जाणतेनेणतें १८–१५२८.
**जात**—समासाचें अंतीं ‘ समुदाय ’ या अर्थी १–३०; सामासिक शब्दाचे शेवटीं ‘ जात असतांना ’ या अर्थी ९–५१३.
**जातखेवों**—जातांच, जाताक्षणींच ९–७३.
**जात्यंध**—जन्मांध २–९३.
**जानु**—गुडघा ११–६०१.
**जान्हवी**—भागीरथी १५–५७२.
**जापाणणें**-आवरून घेणें ११-३८१.
**जायाचें**—जाण्याचें, दोन दिवस उसनें मागून आणलेलें, परत करण्याचें ९–४१२.
**जारज**-गर्भाशयापासून झालेली सृष्टि (मनुष्यादिक) १५–१४८.
**जालंधर**—योगशास्त्रोक्त बंधत्रयांतील कंठस्थानचा बंध ६–३०२.
**जालिया**—प्राप्त झाली असतांना ३–१०३.
**जालें**—उत्पत्ति १७–४१२.
**जावळिया**—जोडीचा १–१३८.
**जावळी**-भावंड, सोबती ११-३९६; शेजारचा १७–२१७.

**जाहलेपणा**—पूर्णपणा ८–५५.
**जाळ**—जाळें १६–३२३; समुदाय १६–१३२; ज्वाळ, आग १६–४१०.
**जिणणें**—जिंकणें ४–२०४.
**जिणता**—जय पावणारा, जिंकणारा १४–३३८.
**जिणी**—जन्माची सफलता १३–११६०.
**जिणें**—जिंकणें १–११३; जगणें ८–८८.
**जित**—जिवंत, जागृत, १८–६३८; जिंकलेला १८–९.
**जिंतणें**—जिंकणें १८–२६.
**जितया**—जिवंत ३–२५२.
**जितवणी**—जीवन, जिव्हाळा १८–५१४.
**जितार्णे**—जिवंतपणा ११–६६६; मीठ मोहऱ्या घेऊन काढलेली दृष्ट १३–३३६.
**जिती**—जगतात ९–४२९; जिवंत, जागती १८–६३८.
**जितेंद्रिय**—ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकलीं आहेत असा ४–१४३.
**जितेनिअवसरें**—जिवंत असतां ८–७४.
**जिरणें**—नाहींसें होणें १२–१३३; पचणें ३–२०३.
**जियालें**—जगणें २–३६.
**जियावें**- जगावें २–२०२.
**जिव्हा**—जीभ १८–१३६.
**जिव्हादंश**—तोंडी लावणें १७-१४४.
**जिव्हार**—जिव्हाळा १–३१; जीव १–२२०; मर्मस्थान २–४८; जीवन ५–१२२; आधार २–६८; अंतःकरण १२–३०; जीवाची गुप्त गोष्ट ११-११८.

जिव्हाळा–ओलावा २–३४५; जीवन ११–२१२; लाभ १३–१०८९.
जिज्ञासा–ज्ञानाची इच्छा १८–१११९.
जिज्ञासु–ज्ञानाची इच्छा करणारा ७–१०९.
जिज्ञास्य–ज्ञानाचा विषय १८–१११९.
जी–महाराज १–१, जगणें १–२६५.
जीजे–जगणें १३–१२२.
जीत–जिवंत ९–२८९.
जीर्णे–जुनें २–१४४.
जीव–अंतःकरण १०–३२९.
जीवकण–अल्प जीवदशा १८–१२७२.
जीवत्व–जीवदशा १७–२.
जीवन–आहार ७–३७; पाणी १३–७२०, वेतन ९–३९९; साधन १७–२८८.
जीवनसूत्र–जीवांचे चालक १८–१८०३.
जीवनोपाय–निर्वाहाचें साधन १८–६०६.
जीवविणें–चैतन्ययुक्त करणें ९–२४.
जीवसरें-जिवासरखी (प्रीय) १३-३२९.
जीविका–उदरनिर्वाह १७–२३९.
जीवित–आयुष्य १–७७.
जीवितांत–मृत्युसमय १५–५८९.
जुंझ–युद्ध १–८६.
जुंझणें-लढणें, तोंड देणें १८-१३४.
जुंझार–लढवय्या, लढणारा १८–१२८३.
जुंतणें–जुंपणें ८–२४४.
जुंपणें–उत्पत्ति, रचना १४–५७.
जुंबाड–समूह ११–२६३.
जुंवार–द्यूतकर्म, जुगार १८–६७३.
जुंवारी–जुगार खेळणारा १३-५४१.
जूं–जुगार–१–२८४.
जें–कारण कीं १–७५; कीं २-९७.
जेउती -निकडे ४–१९१.
जेतुलालें–जेवढें म्हणून २–२७१.
जेधवां–जेव्हां ९–२५४.
जेविं–त्याप्रमाणें ६–२९.
जेवी–खाईल ३–१७२.
जैं (जै)–जेव्हां ४–४१.
जैत–जय २–३३२; ९–२१७.
जोगावणुक–निर्वाह १३–७९८.
जोगावणें–तृप्त असणें १३–३६३; पोसणें, संभाळणें १३-६६९.
जोगाविणें–हेळसांड करणें १३–७९५; उपासना करणें १३–८२०.
जोगा } जोगें } –योग्य १५–६७.
जोजार–त्रास, कष्ट ४–३४.
जोडणें–मिळवणें १–२१७.
जोडभाता–भात्याची जोडी १५–४०८.
जोडी–प्राप्ति १८–६५३.
जोडें–रणजोडवे १५–५.
जोहर–अग्निकुंड १० १४५; लाक्षागृह ११–६०; ११–४३७.
जोहारणें–नमस्कार करणें ११–४९०.
जोहरबाहर–अग्नींची पीडा ११–६०.
ज्योत्स्ना- चंद्राचा प्रकाश १५-३९९.
ज्वर–ताप १६–३६४.
ज्वरित–तप्त झालेले १८–१६८८.

## झ.

झकवणें–फसवणें १–३३२.
झकविणें (झांकविणें)–फसवणें २–३१६; फसविलें जाणें ७–१९४.
झगटणें–धक्के देणें, चिकटणें ६–६३.
झगडें–मिश्रण १४–२०७.
झगमग–चकाकी, लखलखाट १३–७४०.
झटे–दुखणीं ९–१८; ऐक्य ६–३०६.
झडकरी–लौकर १–१६९.
झडझडाट–वाहाण्याचा वेग, सोसाटा १५–१५४; गर्जना १५–१९२.
झडझडौनि–झाडून, झिडकारून, लवकर ९–५१६.
झडणें–गळणें, नाहींसें होणें १८–१५६.
झडती–झपाट्यानें १५–१३७.
झणी } झणे } 'नको' या अर्थी क्रियापदाबरोबर २–१७, ३–९०.
झणें–कदाचित १–१५९.
झरि–झरा ६–२८६.
झळ–उन्हाची झळई १८–१६१.
झळकणें–चकाकणें, शोभणें १–९; चमकणें २–७८.
झळंबणें–विरघळणें, स्पर्शणें २–३; आदळणें ७–८०; भरून टाकणें १८–१०७२.
झळाळ–कांती ११–२१२; चकाकी १३–४७०.
झाक–उडी ११–४२५.
झांकरी–तावडतोब, लवकर ७–१९२.
झांकोळणें–आच्छादित होणें, लिप्त होणें ३–७०; झांकणें ७–६०.
झाडा–हिशोब, झडति ११–१९, १५–२७९.
झाडालि–भिकार झाडें (झुडपें) १८–९४.
झाडी–शुद्धि १७–२०९.
झाडी करणें–नाहींसें करणें १६–४४४.
झांवळें–अस्पष्ट ९–७२; ८–२२९.

झांसुरणें–आळसांत स्वस्थ पडणें १४–१८४; झुरणें १७–२९२.
झील–हलके १३–२१३.
झुंज–लढाई १–१७२.
झुंजता–लढणारा १–१७०.
झुंजती–लढण्याची १–११३.
झेपावणें–वळणें ७–१००.
झोती–धक्का, विक्षेप १३–२५६.
झोंबणें–आकलन करणें १–५८; युद्ध करणें, झोंबी करणें २–१६; तुटून पडणें १३–५८१.
झोंबीलोंबी–कुस्ती ११–५४८.
झोळ–खोटा, मिथ्या, असत्य ८–६०.

## ट.

टक–एकाग्रता ११–१९२.
टकणें–टेंकणें, लागणें ११–२०२.
टकळी–ध्यास, हांव १८–१७४.
टका–चौंस १५–१५१; अग्रभाग १५–१६६.
टवंच (टंवच)–दुःख, त्रास, टोंचणी १२–१८२.
टवटवा–टवटवीत ८–२१०.
टवटवी–प्रफुल्लितपणा १३–१३६.
टवाळ–खोटें १३–८१०; नकल, टवाळी १६–३८३.
टांक–नाणें ७–२५.
टांकसाळ–नाणीं पाडण्याचा कारखाना ७–२२.
टांकोंटांकी–लगेच, लागलीच ६–४८.
टांचें–कमी ६–१११; अपुरें १०–५०; अल्प १५–४७१.
टाळिये–हाताच्या टाळींत, टाळी वाजवीत असतां १७–३०१.
टिक–टिकली, रवा १४–३८३.
टिकलग–जडावाचा अलंकार १८–८५४.
टिकु–बोट घालणें १५–२४४.
टिट–पायाचा चवडा ६–७७.
टिटांतु–चवड्यांत; 'टी, टा टु,' असें ओरडत ६–७७.
टिटिभ / टीटिभू – टिटवी, एक प्रकारचा पक्षी १–६८.
टिटेघर–तिवठ्यावरील घर, १८–६७३.
टिळक–मुख्य, प्रमुख, भूषण १३–९१७.
टीक–ठिकाण १४–३००; जडावाचा दागिना १७–३४८.
टेकणें–विश्वास ठेवणें १३–८१२; स्पर्शीकरणें १३–५५४.
टेका–आश्रय, आधार १८–१४५४.
टेंभा–पलिता, काकडा, मशाल १२–५१.
टेहणी–पहारा, टेहळणी १३–५०५.

## ठ.

ठक–भूल १८–१५९९.
ठकणें–आश्चर्यचकित होणें ७–२००; राहाणें १०–१६६; फसणें १६–२९८; थांबणें, बंद पडणें १–२४९; प्राप्त होणें ६–१३९; पडणें, होणें ६–३३५.
ठसा–आकृति, छाप ७–२३.
ठसेठोंबसें / ठसें ठोमसें – ओबडधोबड १५–५९३.
ठाउकी–प्रसिद्ध, सर्वांस माहित असलेली १६–१६७.
ठाउनि–ठिकाणाहून ५–६२.
ठाउवें–ठाऊक ३–२१४.
ठाकणें–प्राप्त होणें २–३४९; राहाणें ६–३१७; ११–४५, बनणें, जमणें, मर्जी असणें ११–३८.
ठाकतें–साध्य, हातून घडण्यासारखें १४–१९०.
ठाकावें–प्राप्त करून घ्यावें १८–१४५१.
ठाकी–योग्यता ११–९१; १६–८१.
ठाण–आकृति ११–२७४.
ठाणदिवी–ठाणवी, एके ठिकाणींच नेहमीं असणारा स्थानदीप ६–२३.
ठाणांतर–पाहाऱ्याची जागा १३–५०७.
ठाणांतरी–पहारा करणारा शिपाई १६–३४०.
ठाणें–आकार १४–८८; राहणें ९–५२०; स्वरूप ६–१२.
ठाणोरी–युद्धांत मेलेला १८–१०६१; वीरश्री अंगांत संचरलेला योद्धा १८–४३९.
ठाय–ठिकाण, मुक्काम ६–१६०.
ठायठिकें–स्थिर १०–७४.
ठायवरी (हा)–येथपर्यंत १८–६८.
ठायीठावो–नेमकीं ६–२०४.
ठायेंठाय / ठायें ठावो – पूर्ण ८–१५६; ठिकच्या ठिकाणीं १०–३४; जसा हवा तसा १४–९४.
ठाव फेडणें–ठावठिकाणा नाहीसा करणें १–२००.
ठावो–ठिकाण १–३३; थांग, पत्ता १५–१५.
ठांसी–रहाशील ९–५२०.
ठिकरी–बारीक तुकडा १८–५३९.
ठी–मुक्काम ७–३०, निश्चय १०–३००; नांव २–३६४.
ठेणें–राहणें, थांबणें २–७.
ठेव–खाण १–४.
ठेवा–सांठा, ठेव ८–४७.
ठेवाठेवी–उठाठेव ९–३१.
ठोठावलें (थोटावलें)–पंगू, थोटें २–३१४.

### ड

**डगर ( डगरु )**–प्रसिद्धि, आळ १५–११८.
**डगळ**–मोठें, बेढब १७–१२७.
**डंडळणें**–डळमळणें १–१५५.
**डंबर**–अवडंबर, विस्तार १५–४७; १७–७२.
**डवरणें**–माखणें, लिप्त करणें ११–१३२.
**डहुळणें**–ढवळणें, गडबडणें ३–१४; इकडून तिकडे धक्के खात बसणें ९–६२.
**डळमळीत**–खळखळ करीत वाहात १४–३९९.
**डांक**–सांधा जोडण्याकरतां पत्रा वगैरेस दिलेला डाग ८–४३.
**डांकुली**–चुटकी १७–९४.
**डांग**–लांब काठी १५–२५१.
**डांगुरटी**–प्रसिद्धि १८-२८१.
**डांगोरा**–प्रसिद्धि १६–२१७; दवंडी १३–६५९.
**डाय**–डाव १३–५४१.
**डाव**–विशिष्ट खेळांत 'दाना' करतां टाकतात तो ११–५८१, १३–१२६.
**डाव पडणें**–फांशानें डाव खेळणें ११–५८१; स्थिति घडून येणें १३–१२६.
**डावलणें**–टाकणें ८–२६०, ७–१२८.
**डाहारणें**–प्रसिद्ध असणें १५–२६७; बाहेर काढणें, अंगाला लावणें १७–१४३.
**डाहाळिका**–फांद्या १५–९७.
**डाहाळी**–फांदी १३–५०.
**डाळ**–टोपली १३–३८७.
**डाळी**–डहाळी, फांदी १५–९६.
**डाळुका**–लहान फांद्या १५–१६४.
**डिखळ**–ढेंकूळ ६–९२.
**डिंडिमा**–डंका, नगारा, (लाक्षणिक) गडबड १६–४४३.
**डिंडी**–पसारा १५–३१५.
**डिंभ**–लेंकरूं १८–२१.
**डिरी** } –अंकुर १५–९५;
**डिरु** } १५–१०४.
**डुडुळ**–दुबड १८–६८२.
**डोई**–डोकें १८–९३२.
**डोणी**–नाव १५–२५२.
**डोंबा**- काळा ( एक सापाची जात ) ७–१६३.
**डोल**–हालणें १८–४२३.
**डोहळे**–इच्छा ६–७३.
**डोळस**–स्वच्छ, प्रत्यक्ष १८–५८१; डोळ्यानीं युक्त, ज्ञाता १४–१०, १३–१०६७.
**डोळा**–(कोणत्याहि कामांतील) नजर ४–८६.
**डौर**–उपहास १३–८२५.

### ढ

**ढळणें**–हालणें ७–४; क्रम बदलणें ११–४९७; पुढें सरणें १६-१५८; ढाळ येणें ६–२०३; सुटणें ९–२८; बदलणें ११–४९७.
**ढाळ**–फांदी ३–४२; हापका १८–७७५; वागण्याची रीत १३–३५८; ढेप १५–४५७.
**ढाळणें**–घालणें, वर ओतणें, अभिषेक करणें १३–३८६.
**ढाळें**–हलकें हलकें, हळूहळू ६–२४७, १३–२५३.
**ढाळेंढाळें**–एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर ३–४२.
**ढिमा**–मुलामा १३–४७०.
**ढिला**–आळशी, नियमरहित १३–६७७; मृदु, नरम १७–१२८.
**ढिलेपणा**–नामर्दपणा, मवाळपणा २–२८.
**ढिसाळ**–समर्थ, मोठें ४–१७५.
**ढीवर**–पारधी, कोळी १६–३१८.
**ढेंढें**–धेंडें-अवडंबर ९–१०२.
**ढेंपुळी**–ढेंकूळ १५–४०१.
**ढेस**–खडक १६–३४१.
**ढोंढी**–आकार ८–२२.
**ढोर**–गुरूं १३–७८३.

### त

**तगणें**–टिकाव १५–३६.
**तट**–किनारा ७–७०.
**तडवा**–छत १३–५५.
**तडातोडी**–विस्कळीतपणा १४–३३६.
**तणार**–गवताची झोंपडी ३–२२३.
**तंतु**–सूत १६–१३१.
**तत्**–ब्रह्मवाचक शब्द १७–३६८.
**तत्पद**–सर्वज्ञ, सर्वशक्तिमान असा वाच्य ईश्वर व त्याचें लक्ष्य ब्रह्म मिळून ११–६४८.
**तत्त्व**–ब्रह्मवस्तु २–१३१; भूत (पृथ्वीआदिक) १३–१४३. सिद्धान्त ३–१६.
**तत्त्वता**–वास्तविक, वस्तुतः, खरोखर २–१३१.
**तत्त्वनिष्ठ**–ब्रह्मनिष्ठ ३–१२४.
**तत्त्वार्थ**–ब्रह्मरूप धन १२–१७९.
**तनु**–शरीर ३–१२.
**तनुमनप्राणें**–शरीर, मन व प्राण यांनीं ७–१२१.
**तन्निष्ठ**–त्याच्या ठिकाणीं (श्रीगुरूंच्या ठिकाणीं ) अनन्य असलेली १५–३.
**तन्मय**–स्वरूपैक्य ९–२१७.
**तन्मात्रा**–ओंकाराच्या मात्रा ६–२०४; सूक्ष्म विषय १५–९९.

तपणें–प्रकाशणें ९–२९६; तप करणें १७–४१५.
तपन–सूर्य १५–३६६; उष्णता १७–२२८.
तपोनाथ–तपस्व्यांत श्रेष्ठ ६–४७९.
तप्त–तापलेलें १५–३१९.
तम–अंधकार १०–२; तमोगुण १७–६९; राग, कोप ११–३११.
तमारी–सूर्य १८–९६७.
तमालश्याम–तमालवृक्षाप्रमाणें श्यामवर्ण असलेला १७-३४.
तरंग–लाट २–१०६.
तरंगणें–पोहणें १४–२२२.
तरणि–सूर्य १०–१६२.
तरणें–पोहणें १३–१८६; पलिकडे जाणें १२–७१.
तरणोपावो–तरून जाण्याचा उपाय ७–८२.
तरळणें–चमकणें, चंचळपणानें भासणें १३–१०४.
तरांडें–ताफा ७–९८.
तरी–नाव, नौका ११–३४८. खाडी १३–३०६.
तरु–झाड १–२८.
तरुणी–तरुण स्त्री १४–९२.
तरुवर–मोठा वृक्ष १६–३७३.
तर्क–प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, उपनय व निगमन अशा पांच अवयवांचें बनलेलें अनुमान १–१०.
तर्कणें–अटकळ बांधणें १५–१२१.
तलग–लहान पिलूं १–१६.
तंव–तर १३–११०२. तेव्हां १–१६३.
तवक–जोर १२–४६.
तवकणें–जोर बांधणें ११–३४२.
तंवतंव–तसतसें ९–५११.
तह्याना फुटणें–तहानेनें तरफडत रहाणें ३–२४.
तळ–पृष्ठभाग १–१५६; खालचा भाग १३-४१७; हातापायाचा तळवा १४–१०३.
तळउपर–खालींवर १३–४१७.
तळपणें–चमकणें ७–७२; हालणें, चलनवलन करणें १३–६०९.
तळबुड–तळचें मूळ १५–१६८.
तळवट–पायथा ४–७५; नम्रता १२–२२०.
तळवा–तळपाय ६–२३२.
तळींचीं–खालचीं ६–१२७.
तळील–खालचा, शेवटचा १८–४८.
तळींवरी–खालीं वर ६–२३०.
तळौटेपण–नम्रता १३–१९४.
तक्षक–एका सापाचें नांव ११–३७७.
ताउनि–तपासून ७–९९.
तागा–नांव ढकलण्याचा वेळू ६–३१५. आश्रय १६–४०६.
ताटस्थ्य–स्तब्धता ११–१९२.
ताटियेचे–पंक्तीला जेवणारे ९–३२५.
ताटी–कुंपण २–३११.
ताठणें–मूर्च्छा येणें १२–२.
ताठा–गर्व १३–७२३.
तांडव–(शिव) नृत्य, पुरुषनृत्य १७–८.
तांडी–समुदाय १५–३६४.
ताणा–हात मागावर पसरलेलें उभें सूत १८–३६०.
तातणें–तप्त होणें, तापणें ६–२४९.
तांतु–तंतू १८–८१२; दोरा १८–८२२.
तांथु–तंतू १८–२१९.
तान्हें–लहान मूल १५–१९.
ताप–दुःख १६–१५७; दाह १२-३.
तापत्रय–आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक असें तीन प्रकारचें दुःख ३–२५४.
तापस–तपस्वी ९–३७२.
तापापह–तापांचा नायनाट करणारा १८–८.
तांबूल–विडा १३–५६३.
तामसी–तमोगुणात्मक १५–१७७.
ताम्र–तांबें ११–१३६.
तार–टपोर, लखलखींत ६–१३४.
तारणें–पलिकडे नेणें १–२२.
तारा–पायउतार ७–१००; तारका ११–६६०.
तारागण–ताऱ्यांचा समुदाय ११–१९०.
तारिता–तारणारा १६–२२२.
तारु–तारणारा, नावाडी ७–९८; जहाज १३–१०८६.
तार्किक–तर्क करणारा ९–५३.
तावणें–तप्त करणें १८–१७८९.
ताळ–हालचाल १७–७.
ताळासी येणें-ताळ्यावर येणें किंवा जागेवर येणें १३–२१.
तिकडी–तीन कड्यांची १६–४३८.
तिकुटी–त्रिपुटी १८–८१७.
तिख–पोलाद १६–२४४; तीक्ष्ण १५–१८५.
तिखट–तीक्ष्ण ४–२०८.
तिगुणी–सत्त्वरजतम या तीन गुणांची १८–९१५.
तिघावन्ही–प्रलयाग्नि, विद्युताग्नि आणि वडवाग्नि १६–२५४.
तिजा–तिसरा १८–१३६४.
तिडपिडणें–तडतड करणें १३–७२०.
तिन्हीबंध–मूळ, जालंधर व ओढियाणा असे तीन बंध १८–१०३७.
तिंबणें–भिजवणें, ओली करणें १८–१६९०.
तिमणें–भिजणें ९–१३७.

**तिमिर**–डोळ्यांतला सारा २–५६; अंधकार १७–४२३.
**तिमिरेजणें**–मंद होणें ९–७२.
**तिहीं**–तिघांनीं १३–६०३.
**तिवनें**–तिन पानी १५–९५.
**तिळदान देणें**–संबंध सोडणें १८–१६११.
**तिळांजळी देणें**–संबंध पूर्णपणें सोडणें ८–१२४.
**तिळोदक देणें**–संबंध तोडणें ११–१०.
**तीख**–तिखट १३–६६२.
**तीव्र**–कडक ११–१२५.
**तुक**–वजन ९–४४९.
**तुकणें**–बरोबरीला येणें ४–१; तुलना करणें ९–४४९; डोलवणें ९–५२३; डोलणें९–३०८; वजन करणें १८–३१४.
**तुंग**–उंच ७–७०.
**तुटी**–कमीपणा ९–४४९.
**तुंड**–तोंड १७–४.
**तुंदिल**–पुष्ट, मोठ्या पोटाचा १८–६.
**तुंबिनी**–भोपळीचा वेल १३–३०६०.
**तुरंग**–घोडा १०–२३७.
**तुरंवणी**–हुंगणें १६–३९.
**तुरंबणें**–वास घेणें ९–२१.
**तुर्या**–जाग्रतिस्वप्नसुषुप्ति या पलीकडील ज्ञानरूप चौथी अवस्था ६–३२०.
**तुलगा**–प्रतिध्वनि १–१२७.
**तुलि**–गादी १३–३९२.
**तुष**–कोंडा ५–११०.
**तुषार**–शितळ बिंदू १८–२५९.
**तुष्टणें**–संतुष्ट होणें ३–९७.
**तुष्टि**–संतोष १०–८५.
**तुळणें**–तोलणें १५–२६०.
**तुळा**–ताजवा १६–२८.
**तुळी**–गादी १३–४२.
**तूक**–वजन १४–१४१.
**तूं करणें**–एकेरी मार्फत बोलणें, अरे तुरे करणें १७–३०५.
**तूर**–वाद्य १–१३६.
**तूरबंबाळ**–वाद्यांचा मोठा आवाज १–१३६.
**तृण**–गवत ७–३८.
**तृणकुट**–पेंढा ३–२५०.
**तृतीय**–तिसरा ११–३०४.
**तृषा**–तहान ५–१११.
**तृषार्त**–तान्हेला १८–१६१.
**तृष्णा**–इच्छा, वासना, लालसा १४–१६४.
**तेडता** / **तेडती** / **तेडतें** – तेथें–४–१९१.
**तेज**–उष्णता १८–३०८.
**तेजतत्त्व**–ज्ञान १३–८८.
**तेजस**–प्रकाश तेज ११–६९.
**तेजाकार**–सूर्य ११–६९३.
**तेतुला**–तेवढा ४–१११.
**तेवीं ( वि )**–त्याप्रमाणें ९–१५०.
**तेसणें**–तेवढें ९–९.
**तैं**–त्या वेळेला १५–२२९.
**तोडणें**–कमी करणें ६–३४६; छाटणें ६–३७०.
**तोंडागळा**–अधिक तोंडाचा ९–३७०.
**तोय**–पाणी ३–७२.
**तोरण**–दारावर बांधलेलें मंगल चिन्ह १३–४६९.
**तोष**–सुख २–११७.
**तोषणें**–संतुष्ट करणें १६–१४८.
**त्यजणें**–टाकतां येणें, टाकलें जाणें १८–१३१.
**त्याज्य**–टाकावयाला योग्य २-१८२.
**त्रय**–तीन २–२५९.
**त्रयी**–तीनपणा १८–८१७
**त्रयीधर्म**–तीन ऋत्विजांकडून होणारी ज्योतिष्टोमादि यज्ञ कर्मे, तीन वेदांत सांगितलेला धर्म ९–३३४.
**त्रयोदश**–तेरावा १४–३२.
**त्राण**–रक्षण १७–१३१; चिलखत कवच १८–१०७७.
**त्राय**–बळ, आश्रय ३–२५२; किंमत १८–६६७.
**त्रास**–शिसारी, किळस १–२६२; भीती १३–२८२; त्रासणें कंटाळणें १८–२२१.
**त्राहाटणें**–थोपटणें १–१३३.
**त्रि**–तीन १७–२.
**त्रिकुटी**–तिघांचा समुदाय ६–१२१; चोरी, चहाडी व शिंदळकी १६–४३९.
**त्रिगुण**–सत्त्व, रज व तम हे तीन गुण १७–२.
**त्रिजगतीं**–त्रैलोक्यांत १७–२९३.
**त्रिताप**–'तापत्रय' पहा १७–४२३.
**त्रिदाह**–आध्यात्मिक वगैरे त्रिविध ताप १६–४३९.
**त्रिदोष**–कफ, वात व पित्त यांचा अतिरेक १६–४३९.
**त्रिधा**–तीन प्रकारांनीं १७–१२२.
**त्रिधातुक**–कफवातपित्त या तीन धातूंचें बनलेलें शरीर ११–६९९.
**त्रिपुटी**–तिघांचा समाहार ६–१२१.
**त्रिपुर**–त्रिपुरासुराची लोह, रजत व सुवर्ण यांची केलेलीं जीं तीन पुरें अथवा शहरें १७–२.
**त्रिपुरारि**–शंकर, आदिनाथ १८–१७५१.
**त्रिभुवन**–त्रैलोक्य १–२६.
**त्रिभुवनदीप**–तीन लोकांचें प्रकाशन करणारा ८–११०.
**त्रिमात्रका**–अ, उ, म या ओंकाराच्या तीन मात्रा १८–१५१०.

त्रिमाळिक–तीन मजल्यांची ५–११४.
त्रिरूप–धर्म, अर्थ व काम या तीन प्रकारचें १७–१९७; धर्म, अर्थ व काम या तिहींचा समूह १८–७४५; स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तिहींचा समुदाय १५–२५६.
त्रिविध–तीन प्रकारचें १५–५८१.
त्रिवेणी–गंगा, यमुना व सरस्वती या तीन नद्यांचा प्रयागास झालेला संगम ११–७.
त्रिशंकु–तीन खिळे मारलेला १६–४३०; त्रिशंकु नांवाचा राजा १८–१७८७.
त्रिशुद्धि–त्रिवार खरे, निश्चयपूर्वक, खरोखर ६–३१६.
त्रेता–चार युगांपैकीं दुसरें युग १०–२५२.
त्रैविध्य–त्रिविधता १८–५२४.
त्र्यंबक–शंकर १०–१९५.
त्वचा–कातडी ९–५७; सापाची कात १६–१२६; स्पर्शेंद्रिय १८–४९९.
त्वंपद–अल्पज्ञ, अल्पशक्तिमान् असा वाच्य जीव व त्याचें लक्ष्य कूटस्थ मिळून ११–६४८.

थ

थडथांद-कूटस्थपणानें, अलिप्तपणानें १८–११३७.
थडी–तीर २–३४९.
थर–जाति ७–२३.
थरविथर–बरेंवाईट १८–५५४.
थरा–प्रकार, योनी ७–२४.
थर्ळीव–दागीना १७–३४५.
थाउ–स्थिति १३–२७२.
थाटी–समुदाय ११–३९४.
थातंबणें–थोपवणें १३–३१८.
थान–स्तन ९–३८.
थानापति–मिरासदार १३–३७६.
थापटणें–थापटून जागें करणें १८–४०४.
थारणें-स्थिर होणें १२–२२१.
थारा–आश्रय ३–११०.
थांव–बळ १६–३७१; ठाव (पाण्याचा) १०–७.
थावणें–जोरावणें, बळावणें ६–२१६.
थावलें–बळावलें, ६–२५६.
थिगळ (थिगळी)–डाग १३–४६५.
थिजणें–घट्ट होणें, संकुचित होणें ९–६६.
थितें–स्थिर ३–१४; जवळ असलेलें ९–३३०.
थिर–स्थिर १८–१७१२.
थिल्लर–डबकें ७–१५२.
थेंकुटें–लहान २–२३८.
थेकुलें–लहान, थोडें १–११५.
थेंबुटा–थेंब १०–१८३.
थोकडें–लहान, कमी किंमतीचें १–११२.
थोकणें–थांबणें १–१५८; गुप्त असणें २–८८; लहान होणें, खपाटीला जाणें ६–२०९.
थोकलें–गुप्त २–८८.
थोकी–गुप्तपणांत १३–७८.
थोंब–बंड १६–४२५.
थोरवन–मोठें पान १५–१४७.
थोराड–मोठें १५–१६८.
थोरावणें–वाढणें ४–२०७.
थोरी–वाढ १४–६८, मोठेपणा, थोरवी १–२४२.
थोरीव–उंचपणा ६–२०१.

द

दग्धलीं–भाजलेलीं ४–८३.
दचकणें–धास्ति वाटणें २–२१२.
दटणें–भारावणें, दडपणें ६–३६९.
दंड–व्यूह, सैन्याची रचना १–१६५; शासन १०–२९६; हिंसा १३–३१०; तडाका १३-४९४; पाठीचा कणा६–२०२; दांडकें १८–३१०.
दडगी–तलज्वाला १७–२५५.
दडणें–लपणें ९–३७१.
दंडणें–शिक्षा करणें ३–११२.
दंडवत–काठीसारखा साष्टांग नमस्कार १८–१०२८.
दत्तचित्त–सावधान, ज्यानें आपलें चित्त अथवा लक्ष दिलें आहे असा १८–६३०.
दंत–दात १–१२.
दंदिया–योद्धा १३–५०१.
दधि–दही २–१२९.
दम–बाह्येंद्रियांचा निग्रह १८–८३६.
दमन–निग्रह २–३४७.
दमिता–नियमन करणारा १०–२९६.
दयार्णव–दयेचा समुद्र १८–७.
दरकुट (दरकुटा)–दरी १२–१४.
दरिद्र–दैन्य ३–६५.
दरिद्रालिये (कर्म)–दारिद्र्य आलें असतां, अपूर्ण झालें असतां १४–३२८.
दरी–गुहा ११–३६२.
दर्दुर बेडूक २–१५.
दर्प–गर्व, मस्ति १६–२२९.
दर्पण–आरसा ३–२६१.
दर्वी–पळी १६–२४८.
दर्शन–शास्त्र १३–१५; दृष्टि १५–३६६; भेट १८–४२६.
दर्शी–पहाणारा ४–८८.
दवडणें–मालवणें, नाहींसें करणें १–२४७.
दवडा–धांव १३–४४०.
दश–दहा १–१८.
दंश–वर्म १०–३६; ६–१९१.
दशक–दहांचा समुदाय ११–२२९.

दशन–दांत १–१५.
दशा–अवस्था ६–४५३.
दशी–सुताची वात १७–१९.
दशोपनिषदें–ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडुक्य, ऐतेरेय, तैत्तिरीय, छांदोग्य व बृहदारण्यक हीं दहा उपनिषदें १–१८.
दंष्ट्रा–दाढ ११–४१६.
दहन–पाचन–जाळणें व शिजविणें १५–४००.
दहणें–जाळणें ९–२८१.
दळ–सैन्य १–९१; पाकळी १–२०२.
दळभार–सैन्याचा समुदाय १–९३.
दळवाडें–समुदाय ५–७८; चिरा १८–३७; अंग, स्वरूप १३–२१२.
दळवैपण–सेनापतित्व १–११५.
दळें–म्यान १५–२५८.
दक्ष–तत्पर ६–३६०.
दक्षिण–उजवा ५–१५३.
दक्षिणायन–कर्कसंक्रांतीपासून मकर संक्रांतीपर्यंतचा काळ ८–२३३.
दक्षिणिली–दक्षिण दिशेकडील १८–१८–१८०२.
दाखला–अनुभव ११–२६९.
दांग–अरण्य ११–२१७.
दांगाण–अरण्य १७–२९४.
दाट–गर्दीनें ६–१७६.
दाटणी–रेलचेल, गर्दी १६–१२.
दाटणें–भारानें दबपून जाणें ३–१७७; गच्च भरणें, गुरफटणें ७–८७; भिणें ७–९४; गर्दी करणें ९–२१६; भार वाटणें, अडकणें १७–३६६; खुपसणें १६–४४५.
दाटपणा–अतिपरिचय ११–५५४.
दाटी–गर्दी ११–३७६.
दादुगा–दांडगा १३–५०१.

दाटुन–कडकडून ६–११७.
दांडि–काठी १८–१०६३.
दांडेवरि–दांडक्यानें ७–१७१.
दाता–दान देणारा १८–१६९४.
दातार–मालक ९–५२४; महाराज १७–४२.
दातेपण–दातृत्व १८–१६९.
दाथर–थर ९–३३१.
दादर–जिना ६–२७१.
दादुला–मर्द, वीरवान् १–१३५; समर्थ ५–८१.
दानव–दैत्य, राक्षस १०–१७४.
दानशीळ–उदार १५–१२२.
दायक–देणारें १८–७०१.
दायाद–भाऊबंद ११–४८०.
दारवंटेकर–द्वारपाल ११–१०६.
दारवंठा–उंबरठा ४–१६६.
दारा–स्त्री १३–५९९.
दारुण–भयंकर १–१९९.
दारुयंत्र–लाकडाची बाहुली १–८१.
दार्ढ्य–दृढपणा १४–१७९.
दावणें–दाखवणें ६–२२०.
दासट–दाहक ११–४६३; पीडाकारक १८–७७९.
दासिरूं–वटिक १८–१४०३.
दास्य–सेवा, चाकरी ४–१६७.
दाह–ताप, जळणें २–१४६.
दिक–दिवस ११–१६८.
दिगंतीचें–देशोदेशींचें १–२१८.
दिगंत–दूर देश १८–१२९३.
दिग्विभाग–दिशांचें विभाग १६–३३६.
दिघडा–उंच ११–२७७.
दिठिवा–कृपादृष्टि ९–४.
दिठी–दृष्टि १–१६७.
दिठें–दिसलेलें, दृष्ट ५–११२.
दिन–दिवस ( सूर्य ) १–१५८.
दिनकर–सूर्य १–१४४.
दिनमान–दिवस १३–९२२.

दिपला–पेटलेला, प्रदीप्त झालेला १६–११.
दिया–दिवस, ( एकवचन दी ) ६–४२८.
दिवटा–मशालजी ७–४८, १०–१४२; मशाल १८–३५८.
दिवटी–मशाल १८–१७१५.
दिवसनाथ–सूर्य १६–२७.
दिवाकर–सूर्य १७–१७८.
दिवि–स्वर्गात ६–४४३.
दिवी-मशाल १०-१४२. दिवा १८–११४३.
दिवो–दिवस ८–१५५.
दिवोरजनी-दिवस रात्र १८-५२१.
दिव्य-शपथ १८–१३२९; लोकोत्तर १७–३९३.
दिव्यचक्षू-ज्ञानदृष्टिवान् ११-२९२.
दिव्यतेज–सूर्य १६–२३.
दिशाचक्र–क्षितिज ११–३१५.
दिसता–पाहाणारा १५–७५.
दिसोंदिसें–दिवसेंदिवस १२-१०८.
दिह–दिवस १–१५८.
दी–दिवस ६–४२८.
दीप–दिवा ३–२०१.
दीपक–दिवा १३–८९२.
दीपकलिका–दिव्याची ज्योत १४–२५७.
दीपन-प्रखरता ११–४२७; चेतविणारें, प्रकाश देणारें १३–९२६; भुकेची प्रखरता १५–४०६.
दीपमाळ–उत्सव प्रसंगीं दिवे लावण्यासाठीं मंदिरासमोर एक स्तंभ बांधलेला असतो तो ९–३९१.
दीपमूळक–दिव्याची मूळज्योत १४–५५.
दीपशिखा–दिव्याची ज्योत १४–५५.

दीपिका—प्रकाशित करणाऱ्या ११—१७८; मशाल, लहान ज्योत १५—८२.
दीप्ति—तेज ६—२५१; अग्नि १९—४०७.
दीर्घकंठ—उंच मानेचे ११—१३९.
दीक्षागुरु—( धर्मपंथांतील ) उपदेश देणारा गुरु १८—१६४९.
दीक्षित—ज्यानें यज्ञ केला आहे असा १७—१८७; यज्ञ करणारा ४—१३७.
दुकाळ—दुष्काल १५—२९२.
दुखंड—दोन तुकडे झालेला १३—३४५.
दुगळी—दुर्बळ, पोकळ १५—२१८.
दुश्चित—क्षुब्ध ६—२३८.
दुजें—द्वैत १५—४३८; दुसरें १५—५५६.
दुणवटणें—दुप्पट होणें ९—१८.
दुणवटौनी—दुप्पट जोरानें १—१६५.
दुणा } दुणें } —दुप्पट १२—१६०.
दुणावणें—दुप्पट होणें १—३४; ६—४८७.
दुणी—दुपटी १६—२५५.
दुणीव—दुपटी ६—१६४.
दुणें—दुप्पट १३—१२९.
दुथडी—दोन थड्या (कांठ) असलेली नदी ९—६२.
दुधिया—दुधभोपळा १३—४६८.
दुपाउलीं—दोन्ही पायांसह ८—७०.
दुपाहार—दोन प्रहर, दुपार १७—१५५.
दुपुरुषी—दोन पुरुषांची १५—४७१.
दुबळवाडी—दारिद्र्य ७—१७९.
दुबाहीं—दोन्ही बाजूंनीं ६—२६३.
दुभणें—विणें, दूध देणें ६—४५४.
दुभतीं—दूध देणाऱ्या गाई १३—११३०.
दुभतें—दूध दहीं वगैरे १८—१४६७.
दुभिन्नणें—दूध देणें १८—१६८९.
दुमदुमित—कोंदून ९—२००.
दुमेळावा ( दुर्मेळावा )—वाईट योग, कुयोग १८—६६.
दुराराध्य—कष्टानें संतुष्ट होणारा, मिळविण्यास फार कठीण ११—९९.
दुरावणें—दूर रहाणें ६—४३५.
दुराशा—खोटी आशा ३—२१३.
दुरित—पातक १८—१३९०.
दुर्ग—किल्ला १—९४.
दुर्गम—मिळण्यास कठीण १८—१२७०.
दुर्दिन—उदासीन दिवस १३—१००९.
दुर्धर—न आटोपणारें १—९१.
दुर्नाम—वाईट नांव १७—३९६.
दुर्बळ—गरीब ३—२२१; असमर्थ १८—१३७.
दुर्भगत्व—दुर्भाग्य, हीन नशीब १८—१३९०.
दुर्भर—दुर्घट, मिळण्याला कठीण २—४६; भरण्याला अथवा तुप्त होण्यास कठीण १६—३२३.
दुर्भरत्व—भरण्याचा अथवा तृप्तीचा अवघडपणा १४—२३५.
दुर्भेद—बुद्धीचा प्रवेश होण्यास कठीण ६—४५९.
दुर्मति—वाईट बुद्धि २—२४३.
दुर्मद—मदोन्मत्त ११—४८०.
दुर्मेळावा—कुयोग १८—६६.
दुर्वाक्यशेल—शेलके अपशब्द १३—४९६.
दुर्वात—प्रतिकूल वारा ११—३४८.
दुर्वाद—वाईट शब्द ११—१०१.
दुर्व्यवहार—वाईट कर्म १८—६८१.
दुऱ्हा—दूर १३—६९६.
दुवाड—कठीण ३—२२५.
दुवाडपण—दुस्तरत्व १—११७.
दुवाळी—क्लेश १३—२६६.
दुष्कर—कठीण १२—११३.
दुष्कृत—वाईट कर्म ९—४१६.
दुष्कृति—वाईट कर्म १४—२५०.
दुष्काळ पहाणें—दुष्काळ संपून सुकाळ होणें ११—४२८.
दुस—वस्त्र १५—८३.
दुसरा—दोन पदरी हार ९—१४८.
दुसरें—द्वैत, भेद १७—३७४.
दुःस्वभाव—दुष्ट बुद्धीचे १—१७२.
दुहणें—दूध काढणें १७—२४८.
दुहिता—मुलगी १८—२३४.
दूणे—दुप्पट १५—२००.
दूषण—दोष ११—६४२.
दृढ—निश्चळ ३—६८.
दृढिवा—दृढ, दृढनिश्चय ६—३४७.
दृति—सुवास १४—२०५.
दृश्य—पहाण्याचा विषय १८—११२१.
दृष्ट—पाहिलेलें ११—५८८.
दृष्टादृष्ट—इहपर लोक ९—५०८.
दृष्टि चोरणें—नजरबंद करणें १४-९
दृष्टिबंध—नजरबंदी १४—५.
दृष्टीसी फांटा फुटणें—दृष्टि फांटणें, दृष्टीचें सामर्थ्य वाढणें १—२२.
देख—प्रकाश ११—२३५; पहा ३—१५२.
देखणें—दृश्य १४—८४; पाहणें १—१२४.
देखणेपण—ज्ञानदृष्टि १३—९८.
देखणा—डोळस ३—१५६.
देखतखेंवो—पाहण्याबरोबर ६—१७०.
देखता—पाहणारा, द्रष्टा १६—५०.
देखतां—पाहतां पाहतां १६—५०.
देखा—पहा १—७.

देखी–किस्सा; वळण ३–१५४; दिसणें ११–५८८.
देवढें–दिडपट १८–५९९.
देवतांतर–अन्य देवता ७–१४३.
देवतालय–देवाचें मंदीर १७–२०२.
देवत्रयी–ब्रह्मदेव, विष्णु आणि शंकर ११–१४७.
देवर्षि–नारद १०–१५७.
देवलबसी–देवर्षि, मंत्रतंत्र जाणणारा १३–७१५; पुजारी १८–४४५.
देवांगण–शपथ १८–१२८३; देवाल्यांतील मोकळी जागा १७–२०३.
देवो–दिवस ६–३१४.
देव्हडें–वांकडें ६–११३; अधिक, पुष्कळ १५–१००; मोठी १५–१२९.
देशरहित–देशपरिच्छेदशून्य, देशानें मर्यादित नाहीं असा १२–३२.
देशधडी–हद्दपार ११–३७०.
देशी–मराठी भाषा, देशांतील भाषा १०–४२.
देशीकार–मराठी भाषेच्या आकाराचें १८–१८०५.
देह–शरीर २–१४४; दिवस ७–१५८,८–८९.
देहखंड–साडेतीन हातांचें शरीर १८–५६७.
देहप्रयाण–मरण ८–५.
देहभाव–देहाभिमान, देहतादात्म्य २–१७०.
देहसंग–देहाचा अहंकार १८–१७६.
देहसंभूत–देहाला कारणीभूत असणारा १४–१०७.
देहास्तमान–मरणाची वेळ ८–३४.
देही–देहांत राहणारा जीवात्मा १४–१७३.
दैत्य–असुर ९–४५०.
दैन्य–दारिद्र्य ५–९०.
दैन्यकरणें–भीक मागणें९–३११.
दैवगुणें–दैवयोगानें २–२४०.
दैवणें–दैववान् होणें, उत्कर्षास पावणें १६–३१.
दैवगत्या–दैववशात् ८–६५.
दैवसमुद्र–षड्गुणऐश्वर्यरूपी भाग्यसमुद्र ९–४८१.
दैवागळा–थोर नशीबाचा १०–३३२.
दैविक–देवाच्या ९–२३०.
दैवी–दैवी प्रकृति १६–६७.
दोख–दोष १–२६३.
दोखीं–संबंधानें, उद्देशानें १८–७९८.
दोघे–दोन १७–६२.
दोंद पेलणें–दोंद सुटणें ९–२६.
दोंदिल–मोठ्या पोटाचा, स्थूल७–१६८.
दोर्दंड–बळकट भुजा ११–२०४.
दोष–उद्देश १३–३५४; व्याधि, रोग १६–४२.
द्युति–तेज २–७८.
द्योतक–तेज १५–९८; प्रकाशक १८–१२०२.
द्यौलोक–स्वर्ग ११–३१५.
द्रव–पातळ १०–१९६.
द्रवणें–पातळ होणें, पाझरणें ९–२९.
द्रवभाव–ओलेपणा १७–१२८.
द्रवीभूत होणें–विरघळणें, २–१८३.
द्रव्य–पदार्थ ४–१२७.
द्रष्टा–पाहणारा १८–११२१.
द्रष्टु–पाहाणारा १६–५०.
द्राव–पाझर ११–२४८.
द्राक्षी–द्राक्षवेल १८–५९६.
द्रात–सुगंध १३–३०४.
द्रुपदकुमार–द्रुपदाचा मुलगा, धृष्टद्युम्न १–९४.
द्रुम–वृक्ष १८–२.
द्वंद्व–एक समासविशेष १०–२७०; वादविवाद, तंटा १३–१५; जोडी ( शीतोष्णादिक उलट अर्थांची ) १८–१०१३;
द्वय–दोन १८–१०३६.
द्वादश–बारा ११–२३७.
द्वार–दरवाजा ८–११२; सामासिक पदाच्या अंतीं 'मार्ग' या अर्थी जसे ७–५५.
द्विज –, द्विजन्मा– } ब्राह्मण ३–१२०; क्षत्रिय, वैश्य, ब्राह्मण १७–५१.
द्विजोत्तम–उत्तम ब्राह्मण १७–२८९.
द्विधा–दोन प्रकारचा १५–५५४.
द्विभुज–दोन हातांचें ११–८३.
द्विरद–हत्ती १८–७.
द्विरेफ–भ्रमर १३–२८६.
द्विविध–दोन प्रकारचा ९–११८.
द्वीप–बेट १४–८४३.
द्वेषिया–द्वेष करणारा ६–९५.
द्व्यर्थ–दुटप्पी, दोन अर्थाचें ५–४.
द्वैत–भेद १८–२१६.

### ध.

धगी–उष्णता १६–३९४.
धट–तानवा, तराजु ६–५३.
धड–दूध देणारी १६–१४२.
धडफडणें–आपटून आवाज उत्पन्न करणें १३–२५६.
धडफुडा–प्रज्वलित ९–२४१.
धडाडीत–रसरशीत तापलेलें १३–५१५.
धडौतें–धड, न फुटकें १०–४९; सवस्त्र ११–७१.
धणी–तृप्ति ३–२१.

धनंजय–अर्जुन ७–६८.
धनुर्धर–धनुष्यानें लढणारा १–१६६; अर्जुन १–१८२.
धनुर्वेद–धनुर्विद्या, १०–२१५.
धरणें–तगादा १८–९३१ टिकणें ८–१५५.
धरवणी–सांठवलेलें १८–९६५.
धरा–पृथ्वी ११–६८६.
धरीं मोकलीं–मी करीन अथवा मी टाकीन अशी समजूत ३–५९.
धरु–निग्रह, विरोध ६–२८९.
धर्ता–धारण करणारा ९–८३.
धर्म–पूर्वजन्मकृत सुकृत१६–३०६.
धर्मकीर्तन–धर्माचें व्याख्यान १८–१७९२.
धर्मदिवी–धर्मार्थ लावलेला दिवा १६–६५.
धर्मधेनु–धर्मार्थ सोडलेली गाय १६–३२९.
धर्मनिधान-धर्माचा खजिना ११-९.
धर्मपत्नी-विवाहित स्त्री १८–९४२.
धर्मप्रतिष्ठा-धर्माची स्थापना १–१३.
धर्मानुज–धर्माचा धाकटा भाऊ १६–४६५.
धर्मालय–धर्माचें घर १–८६.
धर्म्यें–धर्माला धरून ९–५५; धर्मानें मिळवलेलें १७–३६०.
धवळणें–प्रकाशित करणें १–३९.
धवळार–चुनेगच्ची घर ३–२२३.
धसाळ–दांडगा, अविचारी १०–३२०, सढळ ११–१०४.
धसाळ जाणें–अविचाराची कृति होणें, विसरून जाणें ११–१६१.
धाइणें–तृप्त होणें १८–५९९.
धाक–भीति २–२१५.
धाकड–धैर्यवान्, मी मी म्हणणारा १–१३१.
धाकुला–धाकटा १–१८३.

धांगडी–व्यभिचारिणी,स्वैरस्त्री १८–९४२.
धाटी–फांस, पाश १२–४७.
धाडणें–घालवणें, गमावणें २-१९७; वजा करणें १८–१२१२.
धाडसा–समजूतदार १०–३२९.
धाडा–हल्ला, परचक्र ११–३८७.
धाडी–हल्ला १३–९९२; घालवतो १४–१४९.
धाणें–तृप्त होणें ४–१५३.
धाता–ब्रह्मदेव १–१०८.
धातु–शरीरांतील चर्बी, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व रेत ह्या सप्त धातु ६–२१८.
धातुराशि–शरीरांतील रक्त, मांस वगैरे धातूंचा समुदाय १७–३६४, लोखंड वगैरे खनिज पदार्थ १८–२०९.
धातुवाद–किमया ६–३४.
धातुसाम्य–कफवातादि सर्व धातूंची समता ६–३५१.
धात्रा–ब्रह्मदेव ११–९.
धात्री–आधार१०–१५१;जन्मभूमि १२–१४८.
धांदा–व्यवहार १५–३४६.
धानी–शहर १४–१५४.
धापकांप–अस्वस्थता १७–२३१.
धाम–घर ३–२८.
धायपण–दाईपणा ३–२४३.
धाया–दाई १८–१७२.
धारण–समजूत ६–३३६;स्थिति ६–३७६; खांबाचें लाकूड १३–७२४.
धारणा–योगाच्या आठ अंगापैकी सहावें अंग ९–२१६.
धारसा–प्रवाह ६–४७४.
धाराधर–मेघ १३–१०५३.
धाराधरकाळ–पाऊसकाळ १४–२११.

धारें ( धार )–कमी, कनिष्ठ १४–१३९.
धाला–तृप्त, संतुष्ट १८–१४९३.
धालेपण–तृप्ति ६–९.
धांव–मोहर १२–७९; गति ३–२६९.
धांवणें–जासूद ९–३२४; रक्षण करणारा शिपाई १६–७३; धांव १८–८८४.
धांवया–हांकेला २–७२.
धांवा–संकटांत मदत १८–१७५९.
धिकारणें–तुच्छ मानणें १६–३२८.
धिग–धिकारदर्शक ९–१७५.
धिटीव–धैर्य ९–२३.
धिंवसा–धैर्य १–६७; इच्छा ३–७; ६–४९१.
धिंवसेकर–इच्छा करणारा ७–१०.
धीट–दालगज १३–५०५.
धीर–धैर्य १५–१९१.
धुंधुरु–काजवा ९–९.
धुंधुवणें–फूं फूं करणें १८–७१२.
धुपणें–नाहींसें होणें १८–१३९३.
धुमाड–धुमाकुळ १५–३६३.
धुर–श्रेष्ठपणा १२–१३४; श्रेष्ठ १६–६८.
धुरधरणें–अग्रभागीं रहाणें १५–१७२.
धुरा–सारथी बसण्याची जागा ११–६६३.
धुरी–जूं १८–५०५.
धुरु–ध्रुव, स्थिर १३–३८५.
धुरें–पुढें, प्रामुख्यानें ५–६१; अग्रगण्य ८–१५४.
धुवट–शुद्धिकारक, पवित्र करणारी १८–१०१७;
धुवारी–धूमाची आकुलता, वाफेची आकुलता १७–१४६.
धूं–धूर १८–७८०.
धूप–सुगंधि धूर सोडणारा पदार्थ १६–१०७.

धूम–वाफ १८–३०८; धूर १८–५१३.
धूमाकुळ–धुराचा समुदाय ८–२३१.
धूम्र–धूर ८–२४४.
धूर्जटी–शंकर १०–१७.
धृती–धैर्य ६–३७७.
धेंड–प्रस्थ १८–२८९.
धेंडा–ज्या दिवशीं वर वधूच्या घरीं जातो त्या दिवशीं वधूवरांस कुलदेवतांचा आशिर्वाद मागण्यासाठीं वधुवरांस खांद्यावर घेऊन नाचणारा मनुष्य १८–११८७.
धेंडें–समुदाय १८–८३५.
धेनु–गाय ५–९४.
धैर्य–धैर्यवान् ९–९७.
धोकटी–न्हाव्याची धोकटी १३–१०६८.
धोंड–मोठा दगड ३–२४२.
धोपटणें–चांगला मार देणें १८–१०५०.
धोरण–मार्ग ६–१५४.
धौत–पवित्र १३–६११.
ध्याता–ध्यान करणारा १८–१०३३.
ध्येय–ध्यानाचा विषय १८–१०३४.
ध्रुव–आकाशांतील ध्रुवतारा १८–४२१.
ध्रुवपद–ध्रुवाला दिलेलें अचल ठिकाण १०–१८.
ध्वज–पताका १८–४१.
ध्वनि–आवाज १–७; अभिप्राय ५–१७५; ७–१७; शंका ८–१२३.
ध्वनित–गूढ अर्थानें, संक्षेपानें ३–१६; उद्देशानें ६–२९२.

न.

नई–नदी १७–३२४.
नखी–गति, प्रवेश १२–४१; टेंकण्यास आधार, आश्रय १७–३९.
नखी लागणें–आश्रय लागणें, प्रवेश होणें १२–४१.
नग्न–नागवें १८–१३५.
न घेपिजणें–न घेतलें जाणें १५–२९५.
न चलवितेनि–चालवल्यावांचून ८–१८७.
नट–वेष ४–४८; सोंगाड्या १४–२९०.
नटणें–नाचवणें १८–१३०३; नटासारखें नटणें ४–४८; डौल मिरवणें ३–६५; बनणें १८–१६११.
नटनाच } –उत्कर्ष ९–१९७;
नडनाच } १३–११५.
न ठकेचि–यांबतच नाहीं ३–५८.
नद–मोठी नदी १५–५३२.
नंदन–मुलगा १–१०४; आनंद देणारा १–१०१.
न धरत–आवरलें अथवा धरलें न जातां १–१९८.
न धाति–( ती ) तृप्त होत नाहींत ३–२३५.
नभ–आकाश ६–२९५.
नमणें–नमस्कार करणें १–२०.
न मम–माझें नाहीं १७–३७२.
नमवेनम–वारंवार नमस्कार कर १८–१३६१.
नमस्कारणें–नमस्कार करणें १–२१.
नमस्ते–तुला नमस्कार असो ११–५२६.
न मिळणें–न प्राप्त होणें १७–३६. न पटणें, न जुळणें ११–४९२.
नमो–नमस्कार असो १–१.
नयन–डोळा १३–९८.
नयीच–नदीच १८–१६२.
नरत्व–पौरुषत्व ७–३५.
नरेंद्र–राजा १५–४५.
न लगे–जरूरी नाहीं १–८३.
नवचंडी–नवरात्रांतील देवी १३–८१९.
न वंचणें–प्रतारणा न करतां देणें १६–८५.
नवज्वर–विषमज्वर १३–७२२.
नवद्वार–डोळ्यांचीं २, कानांचीं २, नाकांचीं २, तोंडाचें १, गुद व शिश्न यांचीं दोन मिळून नऊ द्वारें ५–७५.
नवनिशत–नवीन धार लावलेलें २–४८.
नवनीत–लोणी १–५१.
नवम–नववा १०–३१.
नवरस–शृंगार, हास्य, करुणा, रौद्र वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत हे नऊ रस आहेत १०–७.
नवल–आश्चर्य ८–८; आश्चर्यकारक अद्भुत १४–५.
नवलपण–अनोळखपण ७–१७७.
नवलावो–आश्चर्य ११–२३७.
नवसी–नवस करणारा १३–५७१.
नवसीय–नवस केलेली देवता १७–९७.
नवाई–नवल, आश्चर्य ३–११.
नव्हाळी–बहर, भर १–४२.
नव्हेल–न होईल, होणार नाहीं ६–३३१.
नशणें ( नसणें )–नाश पावणें, नाहींसें होणें १७–५९.
नळिका–नळी ६–७६.
नळे–नळ्या ६–२३४.
ना–नाहीं २–७१; अथवा २–३०१; कीं ८–१२०.
नाइकिजता–न ऐकला जाणारा, कानाला विषय न होणारा १५–७४.

नाकळणें–न आवरणें, न आटोपणें ६–४२१.
नाग–जांभईच्या वेळेची वायूची विशिष्ट स्थिति १८–३४१.
नागर–उत्तम, सुंदर १–६; शहरांतील, चाणाक्ष १–४१.
नागरपण–सुंदरपणा १०–४२; ऐश्वर्य, मोठेपणा २–३६३.
नागलतिका–विड्याच्या पानाचा वेल १८–६३२.
नागवण–घात ३–२०९.
नागवणें–स्वाधीन न होणें, न आटोपणें, न आवाक्यांत येणें २–१२४; लुटणें ३–२५१; वस्त्रहीन करणें ११–४६९; फसवणें १६–२९८; लूट १८–४६४.
नांगवणें–नागवणें १४–३०७.
नागवा–दिगंबर वगैरे जैन श्रमणक १३–२१.
नागवे–असाध्य १४–१९०.
नागा–देवी १३–८००.
नागारी–गारुडी १७–२९६.
नागोबा–लूट १३–८५.
नाचणी–नृत्य करणारी स्त्री ९–३२३.
नाचणें–वाटेल तसें करणें १४–१७५.
नाचरणें–न करणें १–२२६.
नाट–ठिकाण, छंद १०–१०९.
नाटणें–न आटणारें ८–१७८.
नाटोपणें–न मिळणें १६–४११.
नाडर–पाण्याचें डबकें १५–३८७.
नाडळणें–न दिसणें १८–५३१; न सांपडणें १५–२०५; न आडखळणें २–१८७; न खुपणें १६–११७.
नाडी–रक्तवाहिनी ६–२१९.
नाणी–न आणी, न नेई १४–२६९.
ना तरी–अथवा १–२६.

नातळणें–न स्पर्शणें १३–४७९.
नातुडणें–न स्वाधीन होणें, न सांपडणें ३–२५५.
नातुडविणें–न गुंतवणें, न घालणें १६–१५०.
नाथ–श्रेष्ठ १–४८; प्रभु, स्वामी ९–२८५
नाथसंकेतीचा दंश–नाथ संप्रदायाच्या अंतरंग खुणेचें मर्म ६–२९१.
नाथिलें–नसलेलें, खोटें, मिथ्या २–१९६, ५–१२६; वाईट १३–४७६.
नाथी–नाहीं १३–८७१.
नाद–आवाज १–१२८; मध्यमा ६–२७६; नादब्रह्म ९–१०.
नांदणूक–वागणूक ९–५०७, वसती ९–५८.
नांदणें–मिरवणें १७–१४; राहणें ६–३७७,
नादरणें–न आरंभ करणें १४-३३१.
नांदविणें–रूढवणें, प्रचारांत आणणें १५–२८०.
नाना–अनेक १–८; अथवा १–२९.
नानाविध–नाना प्रकारच्या ७–३७.
नापादणें–न संपादणें १८–११६.
नाप्नुवणें–न बुडणें ८–२५८.
नाभि–बेंबी ६–२०९
नाभिकार–अभय, 'भिऊं नकोस' असें वचन १०–७.
नाभिभवणें–वरती पगडा बसला न जाणें, पराभव न केला जाणें २–२९९.
नाभ्यासणें–अभ्यास अथवा परिश्रम न करणें ६–२५३.
नायक–मुख्य १–१०३.
नायका–महत्त्वयुक्त स्त्री, मालकीण ९–३७६.
नायके–न ऐके ५–९१
नाराच–बाण १३–५२०.

नाराणूक–असमाधान १६–९२.
नारी–स्त्री १०–२८०.
नालोचणें–विचार न करणें, मागें पुढें न पाहणें १३–३६०.
नाव–नौका ५–१६; क्षण १–३८.
नावभरी–क्षणभर ६–३३२.
नावाणिगा–नावाजलेले ११-४७३.
नांवानांवा (नावानावा)–वारंवार ४–२११.
नावेक–एक क्षण, क्षणभर १–३८.
नांवें नांवें–वेळोवेळीं १३-११२६.
नाशणें–नाश पावणें, नष्ट होणें २–१५९.
नाशिवंत–अनित्य ९–१५२.
नासा–नाक २–५५.
नासापुट–नाकपुडी ६–२३६.
नास्ति–नाहीं १८–१६९४.
नास्तिक–पाषांडी १३–१९.
नास्तिकवाद–'नास्तिक' अशी कीर्ति अथवा नांव १६–४५१.
नाह–हो–पति, नवरा ३–२७३, १५–४६९.
नाहं–मी नाहीं (अहंकाराचा अभाव) १५–७.
नाहणें–स्नान करणें ११–१०.
नाळक–नळी ६–२४८.
नाळवणें–न विनंति करणें २–८२.
निकण–दाणे येण्यापूर्वीचे कणीस १३–९६०.
निकर–हातघाई; आवेश ११-५४८, समूह १५–१७०.
निकरें–निक्षून १३–७२६.
निकवडा–द्रव्यहीन, दरिद्री १३–९८०.
निकसी–घासाघीस, निकीर ११–६४६.
निकाम–निष्काम १२–१३२.
निकी–चांगली १३–५१२.

निकुंज–दाट झाडींचें अरण्य १८–१०२१.
निकुंभ–गंडस्थळ १–१७.
निकुर–निश्चय १३–६२०.
निकृष्ट–अत्यंत हीन १५–१६१.
निकें–चांगलें १-२६६; हित२-२८; चांगलें स्वरूप १८–२८३.
निखरपणा–प्रखरपणा ११–२१६.
निखळ-शुद्ध २–३३७; संपूर्ण ४–२०८; केवळ ९–२१०.
निखिळ–केवळ, सर्व १८–४५९.
निगड–हत्तीच्या पायांत आडकवण्याची बेडी ८–१३४.
निगणें–चालणें, शिरणें ४–१५१.
निगदणें–म्हणणें, बोलणें १५–५७.
निगम–वेद १८–२.
निगमागमद्रुमफळ–वेदशास्त्ररूपी वृक्षांचें फळ १८–२.
निगळ–( डोळ्यांचें ) चिपड १३–७५८.
निगा–धांव १७–१७२.
निगावा–सुटण्याचा प्रकार १६–४६९.
निगुती–बरोबर, नेमकें ६–१९५; युक्ति १७–१८४.
निगूढ–न दिसणारें, गुप्त ६–१७९.
निग्रहो–संयमन ६–४२४.
निघंट–शब्दांचा कोश १३–८३२.
निच–नित्य १०–२७६.
निचाड–निरिच्छ २–२८१.
निचेष्ट–क्रियारहित, हालचाल न करतां ३–६१.
निज–अंतःकरण, चित्त ९–४६५; आपल्या११–३२७.मूळरूप १७–२३३.
निजजनजित–आपल्या दासांकडून जिंकलेला १८–९.
निजजनाखिलमंगल–आपल्या भक्तांचें संपूर्ण कल्याण करणारा १८–१.
निजधाम–आपलें स्थान; आत्मस्वरूप १६–१४.
निजवृत्ती–स्वधर्म ३–१११.
निजसार–तात्पर्य ६–१४०.
निडळ–कपाळ ९–४८४.
निडार–पक्वदशा ६–३६६.
निडाराचेनी–परिपूर्ण दशेला आल्यामुळें ६–३६६.
निढाळ–केवळ १३–१०८.
नितंब–कटिभाग, कमरेच्या खालचा भाग ११–२२१.
नित्य–शास्त्रानें दररोज करण्याविषयीं ज्याचें विधान केलें आहे असें कर्म १८–९७; अविनाशी २–१३३.
नित्यता–निरंतर,कायमचें२–१०४.
नित्यनिरस्ताखिलमळ–ज्यानें संपूर्ण दोष कायमचेच नाहींसे केले आहेत असा १८–४.
निद्–झोंप १८–४०३.
निदणें–निजणें १५–८६.
निदसुरें–अज्ञान ५–९८; अज्ञानात्मक ६–१५५; निजलेला ८–३५.
निदाघ–उष्णता ११–२२४.
निदान–मरण, शेवट ८–१२३; मूळ कारण ११–९०.
निदानीची–निर्वाणीची, शेवटची २–८६.
निदारपण–दरिद्रिपण १३–७९५.
निदिध्यास–निजध्यास, चिंतन, मननाच्या पुढची पायरी१५-२६१.
निदेलें ( निंदेलें )–निजलेलें५–५३.
निदैव–दुर्दैवी ३–१०९.
निद्रा–झोंप ६–२१३.
निधडा–निःशंक ४–१६९.
निधन–मरण ९–१६६.
निधान–ठेवा २–१९१;(ठेवण्याचें) ठिकाण ९–२९५.
निधि–ठेवा, खजिना १–२३;भ्रमण १५–१३६.
निनाद्–आवाज १–१४६.
निपजणें–उत्पन्न होणें २–३०५.
निपट–समूळ, पूर्ण १७–१५६.
निपटारा–निस्तेज, तेजोहीन ११–४७०.
निपटून सांडणें–निःशेष त्याग करणें १८–९२.
निपुणपणा–चारकाई, चतुराई १–८.
निफजणें–उत्पन्न होणें ३–१७८.
निंब–कडूलिंब ४–२२३.
निबर–प्रखर, तीव्र १६–९.
निबरपणा–कठीणपणा १८–१८४.
निंबलोण–उतारा १५–८.
निबिड–घनदाट १६–१३८.
निंबोळी–निंबाच्या झाडांचें फळ ९–४३८.
निभ्रांत–निःसंशय २–१६५.
निभ्रांति–निःसंशय १८–९११.
निमटणें–नाहींसें होणें ६–२८५.
निमणें–मरणें २–१०७.
निमता–मरणारा १८–१६२.
निमथा–शिखर ५–३२.
निमालेपण–मरण १५–४६८.
निमाळ–माळ, वरड १६–४४१.
निमित्त–कारण १६–१२८.
निमिष–पापण्या मिटण्यास लागणारा वेळ,क्षण १३–३७८.
निमिषोन्मिमिष–पापण्यांची उघडझांप ५–४५.
निमीलन–मिटणें ११–२४१.
निमुटणें–मिटणें ११–२३४.
निमोलें–मोफत, बिनखर्चानें ९–३८८.
निम्न–लहान१६–१५८; खोल१६-३३१.
नियत–नेहमीं, निरंतर ३–१५०; नियही ६–३४२.

नियंता–नियमन करणारा १६–२९५.
नियम–निग्रह १६–१८५; अष्टांग योगांतील दुसरें अंग ६–५५.
नियमणें–निग्रह करणें ३–७६.
नियमिता–नियमन करणारा ११–५२०.
नियामिलासांता–नियमन केल्यामुळे ९–२८४.
नियामक–नियमन करणारा, सत्ता चालवणारा १८–५७०.
नियोगी–अधिकारी १८–८२८.
नियोजना–कारण १४–२९३.
नियोजिली–ठरावीक १३–२१.
निरंजन–अरण्य १३–२३.
निरत–तत्पर ३–१०२.
निरपणें–निरपून घेणें, खरवडून काढणें ६–२३४.
निरपेक्ष–इच्छारहित १६–२०९.
निरभिलाष–षी–निरिच्छ, निष्काम १२–१३२.
निरय–नरक १–२६०.
निरवडी–कुशलता ४–१३०, कोठडी १८–७४२.
निरवधि–अमर्याद १–५१.
निरसणें–निरास करणें, मिथ्या ठरवणें २–१३१.
निरस्त–नाहींसें केलेल्या १८–४.
निरहर–बुद्धिबळांतील मोहरें १८–१७०.
निराकरणें–त्याज्य ठरवणें, निषेध करणें २–३७२.
निरामय–आनंद, कल्याण, रोगरहित स्थिति २–२७९.
निरार्तता–निरिच्छता ३–४९.
निरालंब–निराश्रय १२–६०; निराकार परब्रह्म १३–४४.
निराशता–निरिच्छता ४–९३.
निरास–निरिच्छ, आशारहित ४–१०६.
निराळ–चढण्यास आधार मिळत नाहीं असें ठिकाण ६–५७; मूर्ध्न्याकाश ८–११६; आकाश ११–६७९.
निरिंधन–सर्पणरहित १२–१८३.
निरीक्षण–पाहाणें, नजर ठेवणें २–२३४.
निरुज–बरा, निरोगी १३–१७५.
निरुता–खरोखर, नेमका १५-४७०.
निरु ताऊनी–पाणी तपासून ७-९९.
निरुती–प्राप्ति ८–२२१; निर्णय १०–६७; निश्चय १३–६१४.
निरुतें–खरोखर ३–१६; निश्चित १३–११३२.
निरुंधणें–निरोध करणें ४–१४६.
निरुपचार–बाह्य कारणाशिवाय १२–१५१; निर्निमित्त १८–१३४६.
निरुपम–उपमारहित, अद्वितीय १–५०.
निरुपहित–उपाधिरहित १५–४४२.
निरुपाधिक–उपाधिरहित १५–५५७.
निरूपणें–सांगणें १–२७४.
निरूपीत–निरोप्या १–८२.
निरूप्य–सांगण्याचा विषय १३–९६४.
निरोध–निग्रह ६–३६४.
निरोधणें–निग्रह करणें ३–६४.
निरोप–आज्ञा १६–४५५.
निरोविणें–सोडणें १८–५५२.
निरोविलें–हुकूम, निरोपिलेलें ९–५३०.
निरोळले–तयार झाले ६–४९०.
निर्गमागम–बाहेर जाणें व आंत येणें १३–४१५.
निर्गुण–गुणरहित १४–३००; गुणातीत पुरुष ८–१९४.
निर्घात–आघात, धक्का १–१५४.
निर्जिव–निःसत्व, व्यर्थ १३–१०९७; जड ९–४८४.
निर्झर–झरा ६–१७४; पाझर १८–१४.
निर्णो–निर्णय १८–१३७.
निर्दळणें–नाश करणें १–२१५.
निर्देश–न दाखवतां येण्याजोगा १२–३२.
निर्दोष–दोषरहित १–३.
निर्द्वंद्व–दुजेपणा सोडून ११–५७३.
निर्धार–निश्चय १३–२४०.
निर्धारणें–विचार करणें १–७.
निर्धूम–धूररहित ८–५१.
निर्वुज–गोंधळलेलें, थक्क ११–२९८.
निर्वुजणें–गोंधळणें, घाबरणें १५–५३४.
निर्भर–तल्लीन १८-१५७८; युक्त, पूर्णभरलेला ११–६८०.
निर्भिन्न–तादात्म्य पावलेला, तल्लीन २–३३३.
निर्मणें–निर्माण करणें, उत्पन्न करणें १२–१७.
निर्लेप–शुद्ध ५–१६०; ब्रह्म ११-२२५.
निर्वच–निर्णय १३–२४०.
निर्वचणें–शब्दानें सांगणें, उघड करणें ६–४८४; निश्चय करणें १०–२६८.
निर्वाण–अनर्थ १८–१५८२; अंत ७–१५०; शेवट २–१२९; मोक्ष ५–१४९; शेवटचा, अत्यंत उच्चदर्जाचा ६–३३९; परमगति ३–३७.
निर्वात–वायुरहित जागा ६–३५८.

निर्वाह्–धोरण १८–५९.
निर्वाह्–टिकणें ८–२११; रक्षण ९–३४२; स्थिति १०–११२; प्रकार १८–७७१.
निर्वाहणें–जोपासना करणें १७-८४.
निर्वाहतें–टिकणारें १७–२५२.
निर्वाळणें–उत्पन्न होणें १३–९७५; शुद्ध करणें १५–४.
निर्वाळलें–शुद्ध ६–२५४.
निर्वाळा–शुद्ध ५–७; परिपक्वदशा १४–१२६.
निर्विकल्प–कल्पनारहित ३–५६.
निर्विण्ण–विरक्त, निरिच्छ १६–२०८.
निर्विवाद–शंकारहित १३–३२६.
निर्विशिष्ट–निर्धर्म १७–४०२.
निर्विशेष–भेदरहित १८–११.
निर्वेच–अभिप्राय १६–११२; निर्णय १३–२४०.
निर्व्याज–निर्दोष १८–१५७.
निर्हेतुक–निष्काम ३–११९.
निलाग–निराश्रय, ब्रह्म १३–४८; निःसंग १३–६८१; निराधार ६–४७६.
निवटणें–मरणें, नाहींसें होणें ३–२७०; ठार मारणें ९-२१६.
निवटलें–मेलेलें १४–३५९.
निवडणें–वेगळे होणें–करणें ६–३०७; निष्णात होणें १७–७७; स्पष्ट भाखणें १५–३८४; ठरवणें १६–२९५.
निवणें–शांत होणें ९–५.
निवर्तणें–नाहींसें होणें ४–१३४.
निवर्तविणें–सोडून देणें १७–२७५.
निवविणें–शांत करणें ९–२३३. स्थिर करणें ६–४९६.
निववितें–शांत करणारें ९–२४.
निवाड–फरक ३–२३४; निर्णय १३–६९६; निष्पत्ति १०–५५; उत्तम निवड ९-५३३.
निवाडु दावणें–निवडून अथवा निराळेंच दाखवणें १–४४.
निवांत–मुका, स्तब्ध, शांत १५–२२७.
निवातकवच–दानवविशेष प्रल्हाद-बंधु संन्हादाचे पुत्र, हे समुद्रतीरीं रहात; यांस अर्जुनानें मारलें १–२००.
निवांता–मुकाट्यानें, मौनपूर्वक १४–१५.
निवारणें–दूर करणें ९–२८८. निवारण करणें ९–१२८.
निवास–रहाण्याचें ठिकाण ९–२८७.
निवृत्ति–ज्ञानेश्वर महाराजांचे वडील बंधु व गुरु १–२४; मोक्ष ८-२३७; उत्पत्तीच्या विरुद्ध, लय १७–७, माघार १६–२८१; विहितकर्मापासून माघार, विहितकर्माचा त्याग १८–५६६.
निवृत्तिदास-श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव १–२.
निवृत्तिनाथसुत–श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव १८–१८०५.
निवेदणें–सांगणें ११–५५९.
निःशंकपणें–निःसंशयपणानें ९–२०५.
निशा–रात्र.
निशाचर–राक्षस ११–५०९.
निशाचरी–राक्षसी ९–१७९.
निशाण–डंका १–१३२, ९-२१७.
निशित–धार लावलेलें, तीक्ष्ण २–४८.
निशी–रात्र २–३२४.
निःशेष ( निःशेख )–संपूर्ण १५–४३६; निरास, नाश १४–२९८.
निश्चल–स्थिर १८–६.
निश्चिंत–चितारहित, स्वस्थ ९–४९०.
निश्चिती–निश्चय १८–१५२.
निःश्वास-श्वासोच्छ्वास १८-१४२८.
निषिद्ध–शास्त्रानें करूं नये म्हणून सांगितलेलें कर्म ४–९१.
निषेध–शास्त्रानें करूं नये म्हणून सांगितलेला आचार १२–७७; शास्त्राची मनाई १६–१८८.
निष्कंप–अचल ४–१४; निश्चल २–२३६.
निष्कर्ष–निश्चय ६–२२५; शेवट १३–८८४; सार २–१३२.
निष्कल–अखंड १२–१९५; पूर्ण १२–२४०.
निष्कलंक–शुद्ध २–२८१.
निष्कळ–शुद्ध ९–३९६, निरुपाधिक १८–४.
निष्काम–निरिच्छ ५–१४६.
निष्कामता–निष्कामतेनें, निष्काम बुद्धीनें ३–१५१.
निष्कृति–नैष्कर्म्यस्थिति १८–२३२.
निष्क्रिय–क्रियारहित १८–९७७.
निष्टंक–अखंड १२–९७; निश्चय १८–१२८१.
निष्टंकणें–निश्चय करणें १८–७३१.
निष्टंकीं–निश्चितपणानें १७–२१.
निष्ठा–मार्ग ३–३५; आस्था, श्रद्धा १८–१५८.
निष्पत्ति–सिद्धि १७–१५७.
निष्पन्न–प्राप्तपुरुष ६–१०७.
निष्प्रपंच–निष्कपट १३–३६५; भेदशून्य १८–१३७०.
निःसंग–विरक्त, ज्यानें संग टाकला आहे असा २–२२१.
निसंतान–निर्वंश १६–३०२.
निसरडा–घसरण्याजोगा ६–५६.
निसरणें–कमी होणें १३–७५६.

निसळें–शुद्ध १३–२१०.
निसि–त्रास ११–६४६.
निसिलें–पाजळलेलें १५–२५१.
निःसीम–अनंत, अमर्याद२–१४८.
निसुग–निर्लज्ज ११–५५१.
निस्तरणें–पार पडणें ३–१६६.
निस्तरविणें–दूर करणें, नाहींसें करणें ११–४०४.
निस्तेज–अपमान १३–४९४.
निस्तेजणें–पाणउतारा करणें, मानहानि करणें ११–१०१.
निस्तेजा–तेजोहीन १६–१७५.
निहटणें–बळकट धरणें ४–१३२.
निहाळणें–पाहणें २–१७२.
निळयाचा–नीळमण्याचा ९-१४८.
निक्षेप–ठेव ९–२९३; त्याग १७–३६१.
निक्षेपणें–पुरून टाकणें ९–४२४.
नीच–नित्य १२–३६; हलकें १६–३८०; सखल ६–१८४; खालचा १४–११९.
नीतिभेद–न्यायशास्त्रांत सांगितलेले सोळा प्रकार १–११.
नीद–निद्रा, झोंप १८–४०५.
नीर–पाणी ७–९९.
नीरांजन–आरती ओंवाळणें १६–२१०.
नीलोत्पल–निळ्या रंगाचें कमल११–६००.
नीळ–नीळमणि ९–१४८.
नीळिमा–निळा रंग १३–१०५.
नुजळणें–प्रकाशित न होणें १५–५०८.
नुठणें–न हलणें ३–२७२; शुद्धीवर न येणें १२–२; न उठणें १६–१२९.
नुधवणें–वर न करणें १५–२२६.
नुपकरणें–समर्थ न होणें १८–९६५; कामास न येणें२-२३.



नुबगणें–न कंटाळणें १०–५५.
नुमचणें–न फेडणें, परत न करणें १७–२७८.
नुमसणें–उघड बोलणें, सांगणें १३–२०२.
नुरणें–न उरणें, शिल्लक न राहणें ४–११३.
नुरविणें–कांहीं शिल्लक न ठेवणें१८–६२६.
नुरोधि–विरुद्ध नसणारा, अनुकूल १५–२३०.
नुसधा–एकटा १३–९८०.
नूतन–नवीन २–१४४.
नूपुर–घागऱ्यांचा वाळा १५–४.
नृप–राजा १–४८.
नेघ–न घे, घेऊं नकोस ११–६२३.
नेघसी–न घेसी, घेणार नाहींस, विचार करणार नाहींस १८–१२७७.
नेटका–चांगला १८–६०२.
नेण–अज्ञानी १०–२९८; समजूं नकोस १०–३०९.
नेणणें–अज्ञानी १८–१११४; न जाणणें २–२४.
नेणतसातें–न समजतां ३–१३८
नेणता–अज्ञानी, अल्पज्ञ १–६८.
नेणीव–अज्ञान २–९२.
नेति–असा नाहीं ९–३७१.
नेत्र–डोळा २–११६.
नेदवे–देववत नसेल १२–१२५.
नेदावें–देऊं नकोस ११–६३७.
नेदी–देत नाहीं ९–५३०.
नेदील–न देईल ३–१०६.
नेपाळा–चूळ १३–४१८.
नेम–निग्रह २–२१०.
नेमाचें–अवश्य २–३४.
नेवाणें–पराभव ११–२३.
नेहटणें ( निहटणें )–दाबणें ६–१९६; आदळणें १६–३४१;

मिळणें १५–२७०; निश्चय करणें १४–३११.
नैमित्तिक–शास्त्रानें प्रसंगविशेषीं ज्याचें विधान केलें आहे असें कर्म १८–९७.
नैमिष–सौतीनें महाभारत ज्या ऋषींस सांगितलें त्या ऋषींचें राहाण्याचें पवित्र अरण्य१३-६७.
नैराश्य–निष्काम पुरुष ३–६७, आशारहित १२–१८१.
नैष्कर्म्य–कर्मरहित स्थितीस प्राप्त झालेला पुरुष ३–६४; कर्मशून्यता, कर्मरहित स्थिति १८–९७८.
नैसर्ग–नैसर्गिक, स्वाभाविक १४–८१.
नैसर्गिक–स्वभावतःच ७–३४.
नोकणें–पराभव करणें ६–३२४.
नोडवणें–पुढें न येणें, प्राप्त न होणें ७–१८५.
नोलांडणें–न उल्लंघणें ९–२८२.
नोसंतणें–दूर न करणें १७–३११.
नोहिजणें–न होणें १३–८९८.
नोह्योटणें–माघारी न फिरणें १३–४९६.
न्यसणें–ठेवणें १३–२५४.
न्यायागत–न्यायानें मिळवलेला १७–२८४.
न्यासणें–ठेवणें ३–१८६.
न्याहाळणें–पाहणें १–४४.
न्यून–कमी, उणें १–८०.
न्हाणें–स्नान करणें ९–४२०.

प.

पंक–चिखल ३–१९६.
पंगु–पांगळा ८–८१.
पघळ–विस्तार, विस्तृत १६–३१३.
पघळणें–विस्ताराला पावणें १५–१४५.

पंचक–पांचाचा समुदाय ११–२६०.
पचणें–जिरवणें १५–४०९; शिजणें, उकडणें ९–३३१.
पंचत्व–मरण ३–२०८.
पंचदश–पंधरावा १५–४०.
पंचधा–पांच प्रकारांनीं १३–१०६९.
पंचम–सप्तसुरांतील पांचवा ( कोकिळेचा ) सूर १८–८४१.
पंचमालाप–सप्तसुरांतील पंचमस्वर ४–२.
पंचविध–पांच प्रकारचा १३-११७.
पंचविसावा–सांख्यमताप्रमाणें मूलप्रकृत्यादि जीं चौवीस तत्त्वें आहेत, त्या पलिकडील पंचविसावा ( आत्मा ) १०–१५०.
पंचात्मक–पंचमहाभूतांचें बनलेलें शरीर ६–४०१.
पंचानन–सिंह १–९२.
पंचायतन–शरीर ( पंचमहाभूतांचें स्थान ) ८–३६.
पंचाक्षरी–मांत्रिक २–८५.
पट–वस्त्र ४–१५; ठिकाण ९–४६; पदर १२–८४.
पटळ–(ढगांची वगैरे) फळी, पडदा, आच्छादन ८–२०.
पटांतरीं–परोक्षरीतीनें १६–४२८.
पट्टाभिषेक–राज्याभिषेक ९–२१८.
पडघाणी–कळसाच्या बैठकीचा ओटा १८–४०; थप्पड देणें, दावणें १३–५१.
पडणें–पटणें १३–१९९, होणें १८–१७९४.
पडताळा–अनुवाद ५–१६७; अनुभव ७–२०२.
पडप–प्रतिष्ठा १०–४६.
पडपणें–शृंगार करणें १७–२४६.
पडसाद–प्रतिध्वनि ४–७५.
पडळ–पडदा ७–६२.
पडिकर–डोलस १७–४२; १७–१०२.
पडिघा–तस्त, पिकदाणी १३–४१८.
पडिघाणें–प्राप्त होणें, अंगावर आदळणें १३–५८७; धरणें १४-१८५; दावणें १३–५१.
पंडित–शिक्षक १३–३०७.
पडिपाड–पराक्रम, थोरी १०–१५९.
पडिभर–अतिशयपणा, अधिकता २-१९३; जोर ११–९१.
पडिभासणें–भासणें १५–२३९.
पडिलेंसातें–पडल्यामुळें १३–१५९.
पडिसाई–सांवली ११–६२७.
पडिसाद–प्रतिध्वनि १–१६१.
पढणें–घोकणें, वर्णन करणें १८–५२३; शिकणें ११–१७; अभ्यास करणें १७–७७.
पढाविणें–शिकविणें ११–१७.
पढिन्नले–शिकले ९–१७६.
पढियणें, पढियेणें –आवडणें ४–२८.
पढियंता–आवडता ३–२४४.
पढियावो–प्रेम ९–७; आवड १२–१७०.
पढियासणें–भासणें २–१६७'
पढियें–अत्यंत आवडतें १२–१८९.
पण्यांगणा–वेश्या ८–१४६.
पतंग–दिव्यावर झडप घालणारा एक क्षुद्रप्राणी ३–२०१.
पतन–अधोगति १–२६१.
पतिकर–अनुभव २–१९३; प्रिय, आवडता १०–२०५; ११–२९.
पतित–पडलेलें १८–५६५; अधोगतीला गेलेलें १–२५३.
पतिव्रता–पति हेंच दैवत मानणारी साध्वी स्त्री १–१११.
पत्र–पान १५–१०२; दाखला, परवाना १५–२७९.
पत्रावलंबन–ग्रंथाचा आश्रय १३–६७.
पंथ–मार्ग १३–१०८८; ५–३२.
पंथराज–मार्गांतील श्रेष्ठमार्ग ६–१५२.
पथ्य–हितकारक अन्न १६–६९.
पद–शब्द १–५; ठिकाण ३–५०; स्थिति ६–२९६; परमात्मा ३–२७२; श्लोकाचा चरण १८–५४; पाऊल १८–३६९.
पदच्युत–अधिकारापासून दूर झालेला १–२७०.
पदपद्धति–छंदोबद्ध शब्दरचना १–५.
पदपिंडाची–परमात्मा व जीव यांची ३–२७२.
पदबंध–शब्दाची विशिष्ट प्रकारची रचना, जसें कमलबंध, छत्रबंध वगैरे १–६.
पदर–पडदा ४–६३.
पदवी–अधिकार १०–१३५.
पदांतर–अन्यस्थान १५–१५८.
पदाति–पायदळ, पायानें चालणारे ११–३९५.
पदें–पद्यें, वेंचे १– ८.
पद्धति–रचना १–५.
पद्म–कमळ १०–९.
पद्मकर–कमलासारखा हात १–१३.
पद्मपत्र–कमळाचें पान ३–७१.
पद्मखंड–कमळाची पाकळी १४–२०५.
पद्माकर–कमलाचा समुदाय १८–८६८.
पद्मासन–योगांत सांगितलेलें एक आसन ८–९२.

पद्मिनी–सूर्यविकासिनी कमळ १८–१६.
पद्य–काव्य १४–१७; श्लोक १६–४०.
पंधरें–पंधरा रुपये दराचें म्हणजे उत्तम सोनें, शंभर नंबरी सोनें ६–८२.
पंधरेपण–सोन्याचा उत्तमपणा ८–३९.
पन्नग–नाग, सर्प ११–२६३.
पन्नासणें–शृंगारणें १–११६; तयार करणें ९–२१३.
पय–दूध २–१२७; पाणी १३–२६८.
पयोराशि–क्षीरसमुद्र १०–२१८.
पर–वस्तु ( ब्रह्मवस्तु ) २–१२५; श्रेष्ठ ३–१५१; पलीकडला १५–५३८; दुसरा, परका १६–१४१.
परगुणें–मेजवानी १५–५६५.
परचक्र–शत्रूची स्वारी १३–१३८.
परचित्तलक्षणाचारावो–मनकवड्यांचा राजा ५–१६३.
परजणें–फिरविणें, धारण करणें १५–२५५.
परतणें–पालटणें १५–२२; वळून पहाणें १८–८९८; मार्गे वळणें ६–३६६; उलटणें १८–८०१.
परतंत्र–शरीर ३–८४.
परतत्त्व–परब्रह्म ११–७६.
परतें–दूर, पलीकडे, बाजूला ४–५०.
परत्र–परलोक १६–३०६.
परत्व–दुसरेपणा १७–३७७.
परदारा–दुसऱ्याची बायको १४–२२९.
परद्वार–व्यभिचार १६–३०५.
परंपरा–क्रम, मालिका ४–१८; विस्तार ११–८२.
परब्रह्मण्य–ब्रह्मनिष्ठ ६–४४९.
परम–श्रेष्ठ १–३०; परम गति १२–२९; शेवटची मर्यादा १८–९८१.
परमधाम–मोक्ष १–३०.
परमपर–सर्वांत पलिकडला ८–१९१.
परमाणु–बारिक कण ९–२५६.
परमार–परपीडा करणारे १५–१६७; दुसऱ्यांचा नाश १६–३६०.
परमार्थ–ब्रह्मज्ञान १–४८.
परवडी–प्रकार ६–१८९; परवां १८–६२९; आवृत्ति १४–१८०.
परस्व–दुसऱ्याचें द्रव्य १८–८०७.
परस्वापहर–दुसऱ्याचें द्रव्य हरण करणें १८–८०७.
परा–चौथी वाणी १०–१.
पराग–पुष्परेणु, सुगंध १५–१७.
पराधीन–परतंत्र ३–२०५.
परापर–दूर व जवळ असणारें ३–१३६; आपला व दुसरा ४–६०.
परापेक्ष–दुसऱ्याच्या इच्छेनें किंवा कल्पनेनें २–१६७.
पराप्रमेयप्रमदाविलासिया–परावाणीचा विषय जी स्वरूपस्थिति हीच कोणी तरुण स्त्री तिशीं विलास करणारा १०–१.
पराव–दुसऱ्याचा ३–२२०.
परि–परंतु ४–११५.
परिकर–तयार १–९१.
परिग्रह–परिवार, संग १३–९४४.
परिग्रही–कुटुंबवत्सल १२–९१.
परिचर्या–सेवा ८–१३१.
परिजिणें–फिरवणें ११–२९५.
परिणत–परिपक्व १८–९.
परिणतोपरमैकप्रिय–परिपक्व झालेल्या वैराग्यवानाचेंच प्रेम असलेला १८–९.
परिणमणें–परिणामाला पावणें १८–७९३.
परिणाम–पूर्णावस्था ६–४९६; शेवट ५–७; ब्रह्म १२–१७१.
परितुष्ट–सर्व बाजूंनीं संतुष्ट ११–१२८.
परितोख–संतोष ३–९५.
परितोषणें–संतोष होणें १०–३१४.
परिधान–पांघरावयाचें किंवा नेसावयाचें वस्त्र १३–४२०.
परिपाक–परिपक्व अवस्था १८–१०५८.
परिपाठ–अनुक्रम १४–२०१.
परिपूर्ति–पूर्ण भर ८–४८.
परिभाषा–विवेचन १८–११.
परिमळ–वास २–११७; गंधविषय.
परिमाण–लांबीरुंदी ११–६५२.
परिमार्जणें–पुसणे ९–३२.
परियवसणें–अनुभवास येणें १७–३७७.
परियसणें (परियेसणें)–ऐकणें १–८४.
परिया–शीका १२–५.
परिवडणें–प्रकार करणें १७–१४६.
परिवर–घर ६–२८१.
परिवसणें–मंडळीसह राहणें १३–७११; स्पर्श करणें १५–३९४.
परिवार–लवाजमा १३–११८; मर्यादित केलेली जागा १३–३६१.
परिवारणें–वेढणें १८–८७६.
परिव्राज–संन्यासी १५–३५३.
परिष्वंग–आलिंगन १८–५८६.
परिस–लोखंडाचें सोनें करणारा दगड १–७७; पेक्षां ११–१०३; स्पर्श विषय १३–४२६; स्पर्श १८–१६०४.

परिसणा–ऐकणारा ८–५८.
परिसणें–ऐकणें १–६२.
परिसर–सान्निध्य, जवळीक १३–६१२.
परिसवणें–ऐकवणें ८–५.
परिहरणें–टळणें २–१६१; टाळणें ५–४३; दूर करणें १४–१९६.
परिहार–उत्तर, निराकरण १४–३२२.
परी–प्रकार १–८; परंतु १–६६; प्रमाणें १३–१४१.
परेश–परमात्मा १३–१०६२.
परोपताप–परपीडा १६–३२७.
परौतें–पलिकडे १८–९७६.
पर्जन्य–पाऊस ९–१२६.
पर्यालोच–विचार १६–९७.
पर्यावो–पर्याय शब्द, दुसरें नांव १३–९२.
पर्व–पुण्यकाळ १७–३०१; महाभारतांतील अठरा पर्वांतील एक पर्व १–५४.
पऱ्हा–पलीकडे, दूर ९–३७८; खांच, खळगा १३–५६२.
पलक–पाळणा १२–५.
पल्लव–पदर १२–१७; पानें १–२५; वस्त्राचा पदर १–९.
पल्लवसडका–पदराच्या दशा १–९.
पवणें–पावणें, मिळणें १६–३३८.
पवन–वारा २–१४; प्राण १२–६.
पवाड–अवकाश ७–१३७; विस्तार ११–२४२; महत्त्व १६–३५२; इच्छा ८–२६४, वर्णन १६–५९.
पवाडणें–सामर्थ्य असणें १३-५४८.
पवाडा–पराक्रम २–१०.
पव्हणें–पोहणें ११–१८७.
पव्हे–पोहे ९–३९४; पोहत होता ११–१८७.
पश्यंती–चार वाणीतील एक वाणी ६–३०३.
पसर–विस्तार १५–१५८.
पसाय–प्रसाद १५–२८.
पसारा–विस्तार १६–२२३; दुकान १३–६५९.
पसावो–प्रसाद ११–५७१.
पहाड–पर्वत ८–८१.
पहार–प्रहर ८–१५५.
पहिलें–आरंभीं, पहिल्यानें १८–१८६.
पहुडणें–निजणें, स्वस्थ पडणें ६–६२.
पहुरणी–एका किल्याचें नांव, धामण, ओटी केलेल्या गाईची विण्यापूर्वीची स्थिति १७–२४८.
पळणी–धांवाधांव २–३२६.
पळिपणें–पेटणें १६–३९४; ४–१२९.
पक्ष–बाजू १८–१०३५; पक्षी ९–३३९; पंख ९–३३९; सिद्धांताचा प्रकार १३-८७७.
पक्षिणी–पक्षीण १३–४००.
पां–चरें ८–४.
पाइका–चाकरी ९–३२२.
पाइकी (पायिकी)–सेवा, चाकरी १३–३८३.
पाईक–सेवक १–१४३.
पाउटी–पायरी ६–२७१; दर्जा ९–३२८.
पाउड–पैसा १८–४६.
पाउवा–खडावा, पादुका १३-४१६.
पाक–पक्वान्न ३–१२९; निष्पन्नता १५–५९१.
पाख–पंख १–१३९.
पाखडणें–(पंख) फडकावणें; फडफड करणें १३–११०३.
पाखंड–नास्तिकमत १६–३१५.
पाखर–छाया ६–२११.
पाखरणें–उभारणें, तयार करणें १–९५.
पाखांड–नास्तिकवाद १२–१४; नास्तिकवादी १३–१९.
पाखांडी–नास्तिक ६–१६७.
पाखाळ–शुद्धता १३–४६३.
पाखाळणें–शुद्ध करणें ११–१७२.
पाखाळी–प्रक्षालित, स्वच्छ ६–२६५.
पाखाळीं कीड–निर्णयांतीं वाईट ठरलेलें १६–१२१.
पांखिरूं–पक्षी ११–१७०.
पांग–दारिद्र्य, पंगिस्तपणा ४–१६४; उणीव ६–३३३; आशा, तृष्णा १४–१६५.
पांगणें–पसरणें ९–१३८.
पागुंतणें–व्याप्त होणें ११–२४६; व्यापणें १३–२४८.
पांगुळ–नंदीबैल फिरवून भिक्षा मागणारा १४–१५८; लंगडा, लुळा ४–३४.
पांगुळणें–पांगळें होणें, गति खुंटणें १०–६४.
पांगोरा–टोंक, बारीक मूळ, मुख्य मुळावरील दुय्यम बारीक मुळांचा समुदाय १५–४७८.
पांचजन्य–विष्णुच्या हातांतील शंख १–१४३.
पांचापिसें–वेड १८–१८.
पांचभौतिक–पांच भूतांचें, शरीर ५–५३.
पांचवटा–पांचांचा समुदाय १३–४६.
पांचवनी–पंचाग्नि (प्रळयानळ, विद्युदनल, वडवानल, शिवनेत्रानल व द्वादशादित्यानल हे पांच अग्नि) ११–३०५.
पांचवेळी–पांच नांग्यांचीं इंगळी १३–१०६९.

**पारखी**–परीक्षक १८–७१६; ओळख, परीक्षा १४–४४.
**पारंगत**–पार गेलेला, निष्णात १-५३.
**पारठें**–वयस्कर १८–१६७९.
**पारणें**–तृप्ति ४–२२२; उपवास सोडणें ६–२.
**पारत्रिक**–परलोकासंबंधींचें २–२०.
**पारद्**–पारा ११–२२२.
**पारंबी**–वडासारख्या झाडांची खालीं लोंबणारीं मुळें १५–५८.
**पारसेपण**–पारोसेपणा १०–२०२.
**पारावार**–अलिकडील व पलीकडील १५–५३७.
**पारिजातक**–स्वर्गातील एक वृक्ष १०–२३५.
**पारु**–पलीकडे सर १३–३.
**पारुखणें**–बंद करणें ५–१५२; स्थिर राहाणें १०–९; वाट पहाणें, थांबणें १८–१७४३; खिन्न होणें १२–२१०.
**पारुषणें**–बंद पडणें १–२४६.
**पारुषविणें**–खुंटविणें १८–९६८.
**पारुष्य**–कठिणपणा १६–२४५.
**पार्थिव**–पृथ्वीसंबंधीं ६–२३९; जड ११–३६७.
**पार्वण**–पर्वासंबंधानें येणारें (नैमित्तिक) श्राद्ध १८–११०.
**पार्ष्णि**–टांच ६–१९८.
**पालक**–पालन करणारा १०–९१.
**पालट**–फरक, बदल २–२९८.
**पालटणें**–बदलणें १८–४९५.
**पालन**–पाळण करणारा १०–३; रक्षण करणें ११–१३०.
**पालव**–पदर ८–१६; पालवी १५–१५७.
**पालवणें**–मोकळें करणें ६–४८९; पदरानें दिवा मालवणें १२–१००; प्रगट करणें १६–१५.
**पालाणणें**–खोगीर ठेवणें किंवा घालणें १८–१०६३.
**पालिंगन**–( पालेगन ) समुदाय ११–२०३.
**पालिवणें**–पालांनीं केलेलें खोपटें २–२६३.
**पालेखाइर**–पाले खाणारा ११–२३.
**पाल्हाळ**–निष्फळ पसारा ९–४३२; विस्तार ९–४७८.
**पाल्हाळणें**–पसरणें, विस्ताराला पावणें १८–११३.
**पाल्हेजणें**–उत्पन्न होणें १५–१२७; विस्ताराला पावणें १५–१५२.
**पाल्हेलें**–टवटवीत झालेलें ६-२५८.
**पावक**–अग्नि २–१४.
**पावणें**–मिळणें, प्राप्त होणें ४–१०९.
**पावो**–पाय १६–१६०.
**पावोनि**–पासून ९–१२३; ११–४८.
**पाश**–जाळें, फांसा ३–७४.
**पाशक** – } फांस १४–६४; १६–३४५.
**पाशिक** – }
**पासिक** – }
**पाषाण**–दगड १०–७६.
**पासवणा**–माघार, पाठमोरेपणा १३–४९६.
**पासवणें**–माघार, पाठमोरेपणा ७–१७२.
**पासिं**–जवळ ५–८०.
**पासिक**–फांसा, जाळें ३–२५९.
**पांसु**–धूळ १५–४०१.
**पांसुता**–मातीपणा १५–५०५.
**पासोनी**–'पासून' पेक्षां पंचमीचा प्रत्यय १–४३.
**पाहणें**–उजाडणें २–३५५; बघणें ११–२३०.
**पाहलें**–उजाडलें १८–१९६.
**पाहाटी**–पांहाट १३–२९.
**पाहाती**–उजाडती ७–१३०.
**पाहार**–प्रहर ११–१६७.
**पाहालया रजनी**–रात्र उजाडल्यावर १३–९३.
**पाहावणें**–उजाडवणें ९–२०१.
**पाहाळ**–विस्तार १२–१०२.
**पाहिजे**–पाहावें १५–२६७.
**पाहुणेर**–पाहुणचार १०–११.
**पाहे**–पुढें ७–१२; उद्यां १३–५४७; ९–४०५.
**पाळ**–समुदाय १३–८४.
**पाळणें**–बाळगणें, रक्षण करणें १६–३७२; पुरवणें ११–५९३.
**पाळती**–क्षेम, रक्षण १०–१३६.
**पिक**–फळ ४–९.
**पिकणें**–फलद्रूप होणें ६–३५५.
**पिंगळ**–पिंगट ११–२०४.
**पिंगळा**–उजव्या नाकपुडींतून वाहाणारी नाडी ६–२४४; पिंगट अशा ११–२०४.
**पिचडी**–थुंकींची पिचकारी १३–५६१.
**पिंजरी**–छत ९–१२५; उटी ११–२२३.
**पिटणें**–ठोकणें, बडवणें १३-१०१५; हाणणें, मारणें १५–३७९.
**पिंड**–शरीर ६–१५०; मातीचा गोळा १८–३१०; जीव ३–२७२.
**पिंडजन**–देहधारी लोक ६–२९६.
**पिंडी**–शिवाचें लिंग ६–२७३.
**पितर**–पूर्वपुरुष १–२५५.
**पिता**–बाप ९–२६९.
**पितामह**–आजोबा १–१८०; ब्रह्मदेव १०–२०६.
**पितृ**–चुलता, बापासारखा पूज्य १–१८०; पितर १५–१९५.
**पितृपक्ष**–वद्यपक्ष १६–१०७.

पित्त–यकृताचे योगानें रक्तांतून निघणारा आणि अन्नपचनास साह्य करणारा एक पिवळा रस १३–२२९.
पिनाकपाणि–शंकर ११–२०७.
पिंपरूं–पिंपळाचें फळ १८–१७३.
पिपीलिका–मुंगी १०–१०५.
पिशाच–वेडा मनुष्य ५–५७.
पिशित–मांस १३–५२१.
पिसें–वेड२–९३;वेडा१६–३८२
पीठ–ठिकाण, स्थान ६–२०४.
पीठिका–भूमिका ६–१२७.
पीडणें–दावणें ६–१९४; त्रास देणें ३–८९.
पीतांबर–नेसावयाचें उंची रेशमी वस्त्र ११–१२१.
पीन–पुष्ट, लठ्ठ ११–१३९.
पीयूख–ष–अमृत २–१९५; पाणी १६–१९७.
पींस–पीस, लहान पंख १३–१०६८.
पुच्छ–शेंपूट १०–२५५.
पुंज–समुदाय १६–९.
पुंजमंडित–किरणांच्या समुदायानें अलंकृत १८–१५५०.
पुंजा–ढीग, राशि १३–११०५.
पुंजाळणें–पसरणें ६–२०३.
पुट–क्षाराचे थर १३–२२७; मूस १७–५४; संकोचित जागा ६–२२५.
पुट देणें–लेप देऊन सोनें रुपें वगैरे धातु शुद्ध करणें १०–५६.
पुटीं वळला–पेऱ्यांत वांकलेला, मागें वळलेला १८–८४२.
पुढतपुढती–पुनः पुनः १–२७.
पुढती–पुनः ५–२.
पुढां–पुढे १–१४१.
पुढां पुढां–पुढें पुढें ९–३४२.
पुढारणें–बोलण्यास सुरवात करणें १८–२९१.
पुढारी–पुढें येणारी १–२७५; मुख्य १५–१७२.
पुढील–पुढचें १६–२८३; जवळचा ३–१७७.
पुण्यगिरी–आज्ञाचक्ररूपी पर्वत १८–१०४०.
पुण्यजन–राक्षस, पुण्यवान मनुष्य १८–७५०.
पुण्यपुंज–पुण्याचा राशि१०-२३४.
पुत्र–मुलगा १–२२३.
पुनरपि–पुन्हां १–१२१.
पुनरावृत्ति–पुनर्जन्म, पुनः मागें येणें ७–८०.
पुनीव–पौर्णिमा १८–४९६.
पुर–शहर १५–४८६.
पुरणें–संपणें २–६७; पुरें पडणें १३–५९; पूर्ण होणें ९–३.
पुरता–पूर्ण १–४६; व्यंग नसलेला १५–४९२.
पुरतें–पूर्णपणा ७–४९.
पुरंदर–इंद्र १०–१९२.
पुरवणी–जोड २–८९; पुरवठा १३–५१२.
पुरविता–पूर्ण करणारा ७–१४३.
पुरस्करणें–शाबासकी देणें९–२३८.
पुराण–जुनें १८–११९७; अठरा पुराणें १–५; इतिहास, कथा ९–५०५.
पुरातन–जुना, पूर्वीचा १–५१४.
पुरी–नगर १५–४८९; पूर्णपणानें ७–१४३.
पुरुख–पुरुष १४–७६.
पुरुष–मनुष्य २–३४८; जीव-वाचक ८–३३; नर ९–२७०; सांख्योक्त पुरुष १०–१५०.
पुरुषार्थ–पुरुषाच्या इच्छेचा विषय; हे धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार आहेत १२-२१९.
पुरुषार्थराज–मोक्ष १८–९४९.
पुरुषोत्तम–उत्तम पुरुष १८–११९८.
पुरें–पूर्णपणा १८–४२; पूर्ण ७–१४३.
पुरोडाश–हवनद्रव्यशेष ४–१३९.
पुरोहित–उपाध्याय अथवा प्रतिनिधि १८–१७६६.
पुलकांचल–रोमांच ११–२४६.
पुलिका–कण ११–२५०; बिंदु १८–१५५३.
पुष्ठगंड–मोठा ताठा १६–२३६.
पुष्टि–लठ्ठपणा ५–११९.
पुसणें- पार नाहींसें होणें ९–४०४; विचारणें २–२८६.
पुंसा–पक्षी, राघू ११–१७.
पुसी–प्रश्न १८–१२३४.
पुळिका–आकार ६–२४६.
पूजा–द्रव्यरूप सत्कार, पैसा १७–२८७.
पूजाबंध–बांधलेल्या पूजा ११–२२०.
पूत–मुलगा १८–१७८२.
पूय–पू ५–१२१; १३–५२०.
पूर्ण–पूर्ण अवस्थेला पोहोंचलेला २–३५४; संपूर्ण ८–११७.
पूर्णाहुती–यज्ञाच्या शेवटीं देवतांना दिलेली आहुती ४–१३८.
पूर्वे–पूर्वेकडून वाहणारी ३–३९; पूर्वीचा, आर्षीचा २–२३३.
पूर्वपुरुष–पूर्वीचे वंशज १–२५३.
पूर्वमीमांसा- कर्मकांड १३–२२०.
पूर्वापर–मागील पुढील ४–२११.
पूर्विलिया–पूर्वेकडील ६–१५९.
पूंस–शेंपूट १३–७२९.
पृथक–वेगवेगळे ११–२८३;वेगळा १८–३३०.
पृथिवीपति–राजा १–१७५.
पृथुतर–अधिक विस्तृत ११–१२४.
पृथ्वी–माती १८–५४३.

पृष्ठांत–पाठीचा खालचा भाग ६–१९७.
पेटणें–प्रदीप्त होणें, उद्युक्त होणें ११–३५८.
पेटा–बाजार ८–१८४.
पेटी–समुदाय १३–२९; लाकडाची पेटी, सांगड १२–९२.
पेंठ–बाजार ६–१०९.
पेंडवळा-मेंडोळा ११-४६४;मर्यादा १३–६९५.
पेंडी–जुडी, गोळा १८–७३९.
पेणा–मुक्काम १३–५४७.
पेंदळी–त्वचा, कातडी १६–४१०.
पेंधा–पांगळा १३–९८०.
पेर–कांडें, उसाचा तुकडा, हाताचे वगैरे दोन गांठीमधील भाग १४–१०७.
पेलणें–हांकणें १–१६९;तोलून धरणें ६–१९६;तोलणें ८–२५९; तयार होणें १५–१६०.
पेली–पहिली १५–१२९.
पेलोवेली–वाद १५–१०२.
पेंव–दाणे सांठवण्याचें कोठार १७–२८५.
पैं–पण १८–१३३७; पादपूरणार्थ अक्षर १५–२९१.
पैक–समुदाय १७–६१.
पैंज–प्रतिज्ञा ७–११४;
पैंठे–स्थिर, स्थापित ६–३०२.
पैल–पलीकडे १–१०७.
पैलाडी–पलीकडचा ६–२६९.
पैशुन्य–दोषदृष्टि १६–४०१.
पैस–मार्ग, प्रवृत्ति ६–९०; विस्तार, फैलाव ७–४७.
पैसणें–प्रवेश करणें ९–७०.
पैसार–प्रशस्त रस्ता ६–५८;विस्तार ७–१५५.
पोखणें–पुष्ट होणें १–३५;पुष्ट करणें, वाढविणें ५–२.

पोटाळणें–मिठी मारून असणें ११–८५; कवटाळणें १३-३८२.
पोतडी–पिशवी १४–१७.
पोतास–कापूर १०–१४२.
पोती–थैले १६–३४५.
पोफळ घालणें–पैजेचा विडा मांडणें १३–२०.
पोरी–धान्यावर पडणारी कीड ९–५०३.
पोवळी–आवार १३–३८६.
पोळ–मोकळा सोडलेला बैल १३–३९.
पोळणें–भाजलें जाणें ११–४३८.
पौढणें–निजणें १४–८९.
पौत्र–नातु १–१८२.
पौरुष–पराक्रम १–९७.
पौळी–कोट ९–२११; आवार १८–५४१.
प्रकट–स्पष्ट, प्रत्यक्ष १–३०.
प्रकाश्य–प्रकाशलें जाणारें १५–५४५.
प्रकृति–शरीर ३–५३; माया४–४४;मूळस्थिति ११–६६६.
प्रकृतिगत–प्रकृतीच्या स्वाधीन झालेला १४–३४.
प्रकृतिदोष–जन्ममृत्यु आदिकरून असणारे शरीराचे दोष १०–७९.
प्रकृतिपरिहार–प्रकृतीसंबंधींचा सर्व विचार १०–२८.
प्रकृतिमंत–शरीरवान ३–१९४.
प्रगटणें–प्रगट होणें १–३२.
प्रचंड–विशाल ११–३४४.
प्रचार–व्यापार, गति १६–१८४.
प्रजा–संतति, मुलेंबाळें १३–५९६; रयत १०–२३९.
प्रजापति–ब्रह्मदेव १७–३३५.
प्रजासाधन–प्रजोत्पत्ति १६-३०३.
प्रज्वळणें–प्रदीप्त होणें १–२५८.
प्रणत–शरण आलेले १२–२४२.

प्रणति–वंदन, नमस्कार १७–२०.
प्रणव- ओंकार ६–१०९.
प्रणीति–यज्ञांतील एक पात्र १७–९६.
प्रताप–पराक्रम २–१९२.
प्रतारण–फसवेगिरी १३–२७१.
प्रति–गणिक ५–२७; लागी ८–२०७.
प्रतिकारा माजिवडा–प्रतिकार करणाऱ्या वस्तूंमधील ११–४०४.
प्रतिग्रहिता / प्रतिग्रहीता –दान घेणारा १८–२३४.
प्रतिपत्ति–मेजवानी ६–२२;विधि, विधान १६–३०४.
प्रतिपथ–रूपांतर १२–२४६.
प्रतिपदीं–पावलोपावलीं १८–१०६९.
प्रतिपादणें–सांगणें ४–२.
प्रतिपाद्य–प्रतिपादन करण्यास योग्य १–१; प्रतिपादनाचा विषय १६–१०३.
प्रतिपाळ–संरक्षण १७–१८३.
प्रतिपाळणें–रक्षण करणें ९–१२१.
प्रतिफळणें–फलद्रूप होणें ११–२०५; (अनुरूपपणानें) फळणें ४–७६.
प्रतिबिंबणें–(छाया) पडणें; प्रतिबिंबित होणें ७–१५; भासणें ४–४५.
प्रतिभा–प्रतिबिंब ५–१५६; अनुभव १८–१६६५.
प्रतिभासणें–भासणें ११–२२९.
प्रतिभित–समोरील भिंत १५–४४४.
प्रतिमंडळ–प्रतिबिंब १३–९०८.
प्रतिमल्ल–जोडीचा पहिलवान १८–४९०.
प्रतिमा–मूर्ति १७–२०४.

प्रतिमुख–प्रतिबिंबांतील मुख १४–३०४.
प्रतिवदन–प्रतिबिंब १३–१०७.
प्रतिविभूति–गौण विभूति, सामान्य विभूति १०–४१.
प्रतिशब्द–प्रतिध्वनि १७–२७९.
प्रतिष्ठणें–स्थापणें २–२४५; स्थिर होणें ४–१९०.
प्रतिष्ठा–मोठेपणा १–४६; स्थिरता, स्थापना ६–३७८.
प्रतिज्ञा–पैज ९–१.
प्रतीति–अनुभव ५–४६; प्रसिद्धि १५–९०.
प्रत्यंग–प्रत्येक अंग ६–२३२.
प्रत्यगावृत्ति–आत्माकारवृत्ति; अंतर्मुखता १८–१०१७.
प्रत्यग्ज्योति–आत्मप्रकाश १२–६.
प्रत्यग्बुद्धि–अंतर्मुख झालेली बुद्धि १५–२५८.
प्रत्यय येणें–पटणें, अनुभवास येणें; १–२०८.
प्रत्यवाय–दोष १८–१२२.
प्रत्याहार–आपल्या विषयांचा संसर्ग न करतां इंद्रियांचें चित्ताच्या स्वरूपास अनुसरून रहाणें यांस प्रत्याहार असें म्हणतात. स्वविषयासंयोगे चित्तस्वरूपानुकार इवेंद्रियाणां प्रत्याहारः॥ पातंजलसूत्र पा. २ सू. ५४. ६–५६.
प्रत्युत्तर–उलट उत्तर १८–७४.
प्रत्युपकार–उलट उपकार, मोबदला १७–२८१.
प्रथम–पहिला १०–८३.
प्रथमदशा–आरंभ ११–२४७.
प्रथमवयसाकाळीं–तारुण्यामध्यें १–४२.
प्रथा–अनुभव १८–५७४.
प्रद–देणारा १८–२.

प्रदीप्त–चांगले पेटलेले ८–४८.
प्रदेश–भाग ११–१५०.
प्रधान–मुख्य १०–२११.
प्रपंच–संसार २–१३१.
प्रबंध–छंद ६–४९७; कथन ९–२१०; वादविवाद १०–८; कथा १२–१९; काव्यग्रंथ १८–१७३४.
प्रबळ–अतिशय सामर्थ्यवान् १८–२.
प्रबुद्ध–शहाणा १०–९२; तरबेज १३–९८८; जागृत १८–४०३.
प्रबोध–विकसित करणारा १०–१; जागृती १५–२२५.
प्रबोधणें–जागृत होणें १५–३१५.
प्रभंजन–धूळधाण करणारा किंवा तुफान वारा १८–१.
प्रभव–उत्पत्ति ९–१३१.
प्रभवणें–प्रभाव चालणें ९–१४६.
प्रभा–प्रकाश ३–२६०; तेज १५–५४२.
प्रभात–प्रातःकाळ १४–१.
प्रभाव–पराक्रम, सामर्थ्य १७–५६.
प्रभाहीन–निस्तेज १–२७०.
प्रभु–स्वामी १–६३.
प्रभृति–आदिकरून १३–८४९.
प्रभेद–वेगवेगळे १३–४६.
प्रभेदली–वेगवेगळी झालेली १३–११३५.
प्रमत्त–उन्मत्त ३–१०७.
प्रमदा–तरुण स्त्री ७–७२.
प्रमा–बुद्धि, समजूत १८–५६७; निश्चय, निश्चितज्ञान १८–९०१.
प्रमाण–दाखला, पुरावा ४–९९.
प्रमाद–चूक २–३१.
प्रमादी–चुकी करणारा १४–२००.
प्रमेय–प्रतिपादिलेलें तत्त्व किंवा विषय १–५; विषय १०–१.
प्रयाग–संगम ६–३५७.

प्रयागमाधव–प्रयाग क्षेत्रांतील वेणीमाधव दैवत ११–१०.
प्रयागवट–गंगा-यमुनांच्या संगमावर असणारा अक्षय्यवटवृक्ष १०–१६.
प्रयाण–सोडून जाणें 'मरण' या अर्थी ८–५.
प्रयोग–वापर, उपयोग १७-३०५.
प्रयोजन–कारण, फळ १३–१०६०.
प्ररुद्ध–पूर्णपणें, झांकलेलें, आच्छादलेलें ३–२६३.
प्ररोह–वाढ ३–१३४; ६–१२.
प्ररोहण–वाढणें १८–१०.
प्रलोभ–अतिशय लोभ १५–१०४.
प्रवर्त–मार्ग ७–२६.
प्रवर्तणें–तयार होणें, उद्युक्त होणें १–६८; १६–४०५; चालू होणें १७–३६७.
प्रवाद–संज्ञा ५–११६; उल्लेख १८–९७८.
प्रवाल–पोंवळें १–१७.
प्रवाहणें–नाव १८–७०५.
प्रवृत्ति–बहिर्मुख प्रवृत्ति १६–९१; शुद्ध कर्माकडे प्रवृत्ति १८–५६६; प्रेरणा १८–४५७; प्रेरक, प्रेरणा, हेतु १८-४८५.
प्रवेशणें–प्रवेश करणें, शिरणें १–२५१.
प्रशंसणें–स्तुति करणें १–५५.
प्रशस्त–श्रेष्ठ १७–३७८.
प्रशान्ति–समाधान ६–१०२; प्रसन्नता १८–१०९५.
प्रसंग–लाभ, प्राप्ति १८–३५५; कथा, गोष्ट १६–२९३.
प्रसंगता–ओघानें, प्रसंगानुसार १५–४४६.
प्रसर–विस्तार १६–१०८.
प्रसवणें–उत्पन्न करणें ९–२९२.
प्रसवती–आई ८–५५; प्रसविणारी ८–२६.

प्रसीद-प्रसन्न हो १८-५६८.
प्रस्ताव,प्रस्तावो-प्रसंग १८-६२२; आरंभ १८-७७१.
प्रस्तावणें-उपक्रम करणें १८-१२२९.
प्रस्तुत-तूर्त, आतां ५-६; व्याख्यानाचा विषय १८-१२४१.
प्रहारणें-मारणें १२-५३.
प्रळयांबु-प्रळयकाळचें पाणी १६-१३८.
प्रज्ञा-बुद्धि २-३००;बुद्धीनें १८-८६३; ज्ञान १८-२८९.
प्राकार-कोट, आवार १८-३६.
प्राकृत-सामान्य २-२६५; प्रकृतिपासून उत्पन्न झालेलें ९-१०४; देहधारी १०-७९.
प्राक्तन-नशिब, दैव १६-१२२.
प्रागल्भ्य-पाणीदारपणा १८-८६०.
प्राची-पूर्व दिशा १५-१२.
प्राचीन-प्रारब्ध १६-१९२.
प्रांजळ-सरळ५-७;प्रामाणिक११-१२५; स्वाधीन, सीधा ९-१११.
प्राण-हृदयांतील वायु १६-१८३.
प्राणनाथ-पति १८-९२०.
प्राणायाम-प्राणाचा निरोध, अष्टांग योगांतील चवथें अंग६-५५.
प्राणायामी-प्राणायाम करणारा ४-१४६.
प्राणिपापडाळु-प्राण्यास त्रास देण्यासारखें शौकाचें बोलणें १३-२७०.
प्राणिया-प्राणी १७-३५.
प्राणें उत्तीर्ण होणें-मरणें १-१०२.
प्राणेश्वर-पति १६-१८६.
प्रांत-भाग ११-५२५; शेवट ६-३२१;मर्यादा,शीव ३-२११.
प्रांतहीन-अमर्याद २-३७४.
प्रादुर्भाव-अवतार १८-६७४.
प्राप्त-पूर्ण अवस्थेला पोहोंचलेला२-३५०.
प्राप्तकर्म-अधिकारानुरूप भागास आलेलें कर्म ३-४६.
प्राप्तार्थ-कृतार्थ ३-१५५.
प्राप्ति-लाभ ६-४१०.
प्राप्य-फळ, साध्य ४-१४०.
प्रायश्चित्त-पापक्षालनार्थ केलेलें कर्म ८-१०४.
प्रार्थणें-विनंति करणें १-६५.
प्रावरण-वस्त्र ९-१६२.
प्रासंगिक-नैमित्तिक ६-४८.
प्रासाद-मंदिर, राजवाडा १४-२३२.
प्राज्ञ-बुद्धिमान् ८-५३.
प्रिय-नवरा १८-५८६.
प्रिया-प्रिय अशी धर्मपत्नी १३-३७२.
प्रियोत्तम-पति १७-३३.
प्रीतित्रास-आवडनावड २-११८.
प्रेमजन-प्रेमळजन १८-२४३.
प्रेमटांगा-ज्याचें प्रेम गुंतलें आहे असा १३-५५७.
प्रोत-उभे तंतु १०-२६४.
प्रौढ-वाढलेला, उत्कृष्ट २-२९१. समर्थ १८-५१८.
प्रौढि-मोठेपणा १-९७; महत्त्व ६-१९२; आढ्यता, अभिमान ९-२; सामर्थ्य १८-३४८.
प्लव-नाव, नौका २-२२३.

फ.

फणी-साप२-१५; फडा (सापाची) ५-११७.
फरकणें-उभारणें १८-१६०३.
फरशु-परशु १-११.
फरसाळे-भिन्नरुचीचे १८-२४५.
फरारी-भाल १३-१०५; भरभराट १३-७३६.
फलकट-फोल, असार २-१३०.
फलप्रद-फळ देणारा १८-२.
फलाढ्य-फळें आलेला १५-१९८.
फलितार्थ-गर्भित अर्थ १३-१०४९.
फळ-सफळ ८-११.
फळणें-फळास येणें ९-३५८; सफळ होणें १४-१६.
फळपाकांत-फळ पिकल्यावर १५-५१०.
फळभाव-फळाची स्थिति १५-८९.
फळाभिलाषी-फळाची इच्छा करणारा १८-६०५.
फांक-विस्तार ५-१७३.
फांकणें-विस्तार पावणें १३-६३८; फुलणें १८-२५७.
फांटणें-वाढणें १५-१०६.
फांटा-फांदी १५-१६९.
फांटा फुटणें-फांकणें १-२३.
फाडोवाड-स्पष्टता, वेगळेपणा ९-४३.
फार-जास्त, विस्तृ १५-३१०.
फाल्गुन-अर्जुनाचें नांव २-७५.
फाव-अनुभव १७-३१६.
फावणें-प्राप्त होणें ५-६८; अनुभवास येणें ९-४९.
फावा जाणें-ठसणें, समजून जाणें १८-१५४०.
फांसा करणें-माळा घालणें ७-१२०.
फाळणें-फाडणें १८-६५५.
फिटणें-निःशेष जाणें ३-२७०; उघडणें ६-२७९; सोंपलेलें असणें ११-१५९.
फुंक-फुंकर १३-६६४.
फुका-फुकट १३-४५७.
फुगु-फुगवटा ६-२१४.
फुंज-गर्व १३-७६०.
फुंजणें-गर्व धारण करणें १८-५९२; फुगणें १३-७१५.

कुडिया-खरोखर ७-१९५.
कुडें-निष्णात १७-३६१.
कुडें-खरोखर ३-६५.
कुडेंपण-निश्चय १३-१०३.
फुणगा-ठिणगी १६-८.
फुलणें-फुलांचा बार येणें ९-४३४.
फुलसर-फुलांचे हार १८-५७.
फुली-अवस्था, दशा १०-२८९; संयोग १५-१२०.
फुलौरा-फुलोरा, फुलांचा बहर ९-२७.
फेडणें-दूर करणें, नाहींसें करणें २-७२; सोडून ठेवणें ६-२८४.
फेण-न-फेस ७-७४.
फोक-लहान डहाळी १५-९८.
फोकारणें-प्रसिद्ध करणें १६-२२२.
फोडसें-फुरसें १३-७२५.

ब.

बक-बगळा ११-१५६.
बगा-प्रकार ११-४०४; आकार ११-४६८; मार्ग १८-७६९; रीत १३-२४३; संबंध १३-१०३९.
बटिकरी-दासी १८-५५०.
बडंबा-व्यर्थ गलबला १५-२७६.
बडि-कवड्या ( सापाची एक जात ) ७-१६३.
बंदिमोक्ष-बंधनातून सुटका १६-४.
बंदीजन-भाट १८-१६७१.
बंदीशाळा-तुरुंग १८-३९२.
बद्ध-घट्ट १०-१९६.
बद्धक-कृपण, लोभी पुरुष १३-५०१.
बद्धता-बंधन १८-१६३.
बंध-योगांतील विशिष्ट मुद्रा ६-२०८; रचना, जसें पुजाबंध ११-२२०; बंधन, पाश १७-३६५; प्रबंध १८-१७४१.
बंधक-बांधणारें, बंधनकारक १८-१३५.
बधणें-बाधा होणें २-२३४.
बंधणें-बांधलें जाणें १४-१३५.
बंधत्रय-मुलबंध ( गुदस्थानीं ) ओडियाणा ( नाभिस्थानीं ) जालंदर (कंठस्थानीं) हे योगांत सांगितलेले तीन बंध १३-५०८.
बधिर-बहिरे १-१२८.
बधिरीभुत-बहिरे झालेले १-१२८.
बंधु-भाऊ २-५९.
बन-बाग १८-४२९.
बनकर-माळी १०-१६९.
बंबाळ-मोठा आवाज, गर्जना १-१३६; मोठा प्रकाश १५-३०८.
बरड-माळ रान ५-१११; ओसाड १३-१२.
बरवट-चिखल ७-८८.
बरव-शोभा ६-१३२; चांगला ३-२२०.
बरवंट-उत्तम ६-१७१.
बरवें-चांगलें १-२६५.
बरवेपण-सौंदर्य १-४४.
बरळ-असंबद्ध १-२०६. भलता मार्ग ३-१६५.
बरळ जाणें-चाचरणें, मंत्र म्हणत असतां चुकणें १-१९०.
बरळूं देणें-भलत्या मार्गाला जाऊं देणें ३-११६.
बलौता-बलुतेदार, उत्पन्नाचा हिस्सा घेणारा १३-३४.
बल्वच-लव्हाळा १५-५८.
बहकणें-दरवळणें, फांकणें ७-१८०.
बहकातें-दरवळत ७-१८०.
बहळ-फार, विपुल १५-६.
बहुडणें-मागें फिरणें ६-२६०.
बहुडा-वर्षाव ११-६७०; १६-४७२.
बहुतकरूनि-फार करून १-१७२.
बहुधाकार-अनेक प्रकारचे आकार ९-२५८.
बहुलें-लग्नाचें बोहलें १८-१५७८.
बहुवस-फार ४-२०५.
बहुवसपण-सर्वज्ञता ६-१०७.
बहुवा आगळिका-मोठ्या अधिक्यानें १६-१९४.
बहुवें-फार १७-१२; मोठें ११-२९४.
बहुसाल-फार मोठमोठ्या २-९२.
बळार्थ-पराक्रमाचें काम ६-२६१.
बळिबंधन-ज्यानें बळीला बंधन केलें किंवा जो बळीच्या बंधनांत राहिला तो १२-२४१.
बळिया-बळकट ६-४६०.
बळियावणें-बळकावणें ९-२१४.
बळी-बळकट ७-१२०; देवता वगैरेस अर्पण केलेला गुलालयुक्त भात वगैरे १७-८०.
बळीकरण-बळकट करणें १६-१४१.
बळीयेपणा-बळकटपणा, सामर्थ्य १६-३९१.
बा-बावा, ( संबोधन ) १०-२०७; बाप १३-७०९.
बाइणी-बायदा १८-२५२.
बागडे-सोंग १३-५७०; चेष्टा १४-३१०.
बागीबळ-कंप १३-७५६.
बागुल-बाऊ ६-३६१.
बाज-खाट ९-२२.
बाणणें ( बनणें )-आंगांत घालणें ६-४७५; अनुभवाला येणें ७-६१; घट्ट करणें, घालणें १२-५२; स्वीकारणें १२-१८६.

बादरायण–व्यास १८–१५७९.
बांदोडी–बंधन,बंदीखाना६–३४६.
बाध–दोष २–३१.
बाधक–बाधा उत्पन्न करणारा २–३१२.
बाधणें–बाधा करणें, दूषित करणें ४–११२.
बांधणें–अडकवणें १४–३६.
बांधा–आकार ८–२१.
बाधित–बाधक १६–३०२.
बाधी–बाधा १६–१८८.
बाप–बाबा (संबोधनार्थक) ३–१०२; शाबास, वाहवा ४–२२१;धन्य धन्य ११–२६; दुःखोद्गार–बापरे बाप! ९–४९६.
बापिक–कुळांतील १२–६७.
बापिया–चातक पक्षी १०–१८३.
बापुडा–दीन ८–१०६.
बांवळ (बावळ)–वृद्धि, आधिक्य १५–१०१.
बावळेजणें (बांवळेजणें)–विस्तार पावणें १५–१८५.
बाबुळी–गोंडाळ, शेवाळ ७–६०.
बारी–छत्र १३–४१६;पाळी १३–६५४.
बारीपण–छत्र धरण्याचें काम १३–४१६.
बारोत्तर–अधिक बारा १८–१८१०.
बावन–उत्तम जातीचा बावन चंदन १८–१२५३.
बावन्न–उत्तम प्रकारचें चंदन १८–६३१.
बासट–काळकूट १६–२१६.
बासटणें–चोपडणें १६–४०४.
बाहु–हात ११–६५८.
बाहळ–विस्तार १८–१५११.
बाहाळ–विस्तार १३–१७९.
बाहिर–बाहेर १८–३०४.
बाहिरबाहिरा–बाहेरच्या बाहेर १८–३०४.
बाही–बाजू ६–२६३.
बाहुटी–खांदा, बाहुटा १३-१२३.
बाहुला–बुजगावणें १८–४३८.
बाहू–बाहु, आधार १७–४१४.
बाहेरसवडी–बाह्यदृष्टि १०–३२६.
बाहेरा–बाहेर ६–३८०.
बाह्य–बाहेरचा २–३१८.
बाळदशा–बाल्य ६–२३०.
बाळसें–बाळपणची पुष्टि १४–१०६.
बाळा–नवरी, नवीन लग्न झालेली लहान मुलगी १५–४६८; बाळकाला १५–५९५.
बिक–बळ १–३८.
बिढार–जागा, घर १२–२११.
बिदी–रस्ता ७–१०६; रस्त्यावरून वाहणारें पाणी १८–१२५२.
बिंदुलें–शून्य ९–४६१.
बिंब–सूर्यबिंब ४–२१५; मूर्ति १०–७७; प्रतिबिंब २–१४१; ओंकाराची अर्धमात्रा ८–११६; मंडळ ९–१२५.
बिंबणें–भासणें, उत्पन्न होणें २–१६८.
बिरडे–गांठ १३–३७८.
बिरुद–मी मी म्हणणारे, बाणेदार १–१३५; ब्रीद १८–१३७२.
बिवड–खत घालून उत्तम पीक देणारी झालेली जमीन ९–५३३.
बिसाट–स्वैर उच्चारलेलें १८–१६४५; यदृच्छेनें होणारें १८–३७५.
बिसाटणें–फैलावणें १८–६२४.
बिहणें–भिणें २–१४.
बीक–अधिकार १३–७००.
बीज–वर्म ९–३४; धान्याचें बी ९–३९.
बीजकणिका–लहान बीज ९–४१०.
बीजभाव–बीजरूप अव्यक्त १५–५१२.
बीजमुद्रा–बीजाचा आकार १३–९५.
बीजांकुरभाव–बीजाची अंकुरावस्था १५–८९.
बीजिका–बीज १५–८२.
बीजें–आगमन १३–३७५.
बुजवणें–बुजगावणें,जनावरांनीं भ्यावें म्हणून शेतांत उभें केलेलें बाहुलें १३–५६९.
बुजाला–भरून आला ११–४८८.
बुजणें / बुझणें — बंद होणें ३–५५; समजणें ४–९१; समजाविणें १३–५०६.
बुझावणी–समजूत, एकवाक्यता ९–२७४.
बुझावणें–समाधान करणें ६–२०; मिटणें १३–१५.
बुड–खालचा भाग, तळ ६–१९१.
बुडकुळी–बुडी १८–७०४.
बुडणें–गढून जाणें १५–४२६; नाहींसें होणें १५–४४०.
बुडसल–शुष्क काष्ठ १५–१६०.
बुडुखा–झाडाचा बुंधा, बूड १३–२१८.
बुंथी–आवरण, खोळ ६–२५१.
बुद्धि–शहाणपण ११–५४९; मति १६–१८;समजूत ९-१४८; अष्टधा प्रकृतीपैकीं एक ७–१८.
बुद्धियोगु–निष्काम कर्मयोग २–२३०.

बुद्धि सांगणें–शहाणपणाच्या गोष्टी सांगणें, उपदेश करणें ११–५४९.
बुभुत्सु–जिज्ञासु १८–९६८.
बुरी–वाईट १३–५५८.
बुरु–कृतघ्न मनुष्य १७–२८१.
बेगें–खिडकी, द्वार ६–२७९.
बेंच–पानांत फुटलेलें पान १५–१०३.
बेंचळ–झुंबाडा, झुबका १५–९३.
बेधु–दांडगा, आडदांड १–१२०.
बैबळ–निर्जीव, ढिला १–१९७.
बेळें–दुबेळकें १४–५१.
बैठा–बसलेला ११–२७७.
बैसका–आसन, बैठक ९–२८२.
बैसणा–बसणारा १६–६८.
बैसणीं केलीं–बैठक केली, बसण्यास जागा मिळविली ९–४८४.
बैसणें–बैठक, आसन ९–४८४; बसणें ६–२५८.
बोचरा–दांतरहित १२–७०.
बोंड–बीजकोश, फल १३–५८५.
बोट–डाग १६–१७८.
बोध–समजूत ६–३४८; ज्ञान १४–६; जागृत अवस्था १५–५२९.
बोधणें–उपदेश करणें १–१३; बोध होणें, ज्ञान होणें ४–९४.
बोधलेपणं–ज्ञानसंपन्नता १४–३१८.
बोध्य–ज्ञेय, ज्ञानाचा विषय १८–११०६.
बोनें–पक्वान्न ९–३९३; जेवण ११-५५१.
बोंबणें–भरणें, लिप्त होणें ७–८८.
बोवाणें ( बोभाणें )–बडबड करणें १३–१४; गाजावाजा करणें १३–३०४.
बोभाट–गर्जना १८–७३४.
बोरांटी–खाटी बोर १८–६५५.
बोलती–बोलण्याची ६–१८.
बोली–शब्द, भाषण ६–२७४.
बोहणी–आरंभ १८–७८४.
बोहरी–वणवा १८–५५५.
बोहली–बोली, भाषा ९–२१५.
बोळविणें–घालविणें, घालवून देणें १८–५५०.
बोळावा–मुकामापर्यंत पोंचविणारा सोबती १६–६५.
बौद्धमतसंकेत–बौद्धमताला दाखविणारा १–१९.
ब्रह्म–ब्रह्मदेव ११–५२१; मूळ तत्त्व ८–२; वेद १७–२२२; ब्रह्मांड ११–१४९.
ब्रह्मकटाह–ब्रह्मांडरूपी कढई, ब्रह्मांड १–१४७.
ब्रह्मगिरी–ज्या पर्वतांतून गोदावरीचा उगम झाला तो नीळकूट पर्वत १५–२३८.
ब्रह्मगोळक–ब्रह्मांड ८–२२.
ब्रह्मचर्य–अविवाहित राहून, इंद्रियें दमन करून ब्रह्मविचार करण्याकरितां असलेला पहिला आश्रम २–१७१.
ब्रह्मजन–ब्राह्मण १७–३३९.
ब्रह्मदत्त–ब्रह्मदेवानें दिलेलें १७–३४०.
ब्रह्मनिष्ठ–ब्रह्माच्या ठिकाणीं स्थित असलेला ४–१५९.
ब्रह्मभुवन–सत्यलोक ८–१५४.
ब्रह्मभाव–ब्रह्मस्थिति ८–२१०.
ब्रह्मरंध्र–जेथून प्राण योगसामर्थ्यानें नेतां येतो असें मस्तकांतील गुप्त छिद्र ८–९४.
ब्रह्मविद–ब्रह्म जाणणारे १७–३५५.
ब्रह्मशाला–वेदशाळा १७–२२२.
ब्रह्मसभा–ब्रह्मदेवाची सत्यलोकांतील सभा १६–२२४.
ब्रह्मसूत्र–व्यासांनीं केलेलीं वेदांतसूत्रें १७–८५.
ब्रह्मस्थान–सहस्रदळ कमळ ६–२७९.
ब्रह्मा–ब्रह्मदेव १–२०१.
ब्रह्माचळ–ब्रह्मरूपी पर्वत ७–६९.
ब्रह्मांड–विश्व ८–२१.
ब्रह्माहमस्मिबोध–मी ब्रह्म आहें, असा बोध १५–२५९.
ब्रह्मेश–ब्रह्मदेव व शंकर १–५५.
ब्रह्मेशांत–ब्रह्मदेव व शंकर यांपर्यंत १५–१९९.
ब्रह्मेशान–ब्रह्मदेव व शंकर १५–२०३.

## भ.

भक्तभावभुवनदीप-भक्ताच्या प्रेमरूपी घरांतील दिवा १८–८.
भक्तालय–भक्तरूपी मंदिर १८–१५०९.
भंग–नाश ११–५०४.
भंगणें–मोडणें २–१४२
भंगता–भेद, भिन्नता ४–११९.
भंगलिये वाटे–वाट फुटली असतां १३–६१८.
भगवंतपण–ईश्वरत्व (पालन करण्याचा स्वभाव) ११–४४३.
भगवती–देवी १८–१६६६.
भंगी–रीत १०–३२६; स्थिति ९–११४.
भग्नावयव–हातपाय तुटलेला १८-१७५३.
भजणें–सेवा करणें १५–३५४; मान देणें १८–८४९; अनुष्ठान करणें १८–६२८; अवलंबणें आश्रयणें २–१७६; आराधन करणें ७–१०८.
भजता-भक्त, भजन करणारा ६–४८३.
भजती–भजनाचा मार्ग ९–३४५.
भंजन–नाश करणारा १०–५.

भजनीय–भजण्यास योग्य १८–९.
भजावें–भज्य ६–४८३.
भज्य–भजन करण्यास योग्य ६–४७७.
भट–योद्धा १–९८.
भडसें–उदय, उत्कर्ष ६–३५४; थोरपणा ८–१५२.
भडाड–भडभडाट, भडका ११–३०४.
भणंग–भिकारी ११–४२८.
भद्रजाति–हत्ती १–१३३.
भयभीरु–भयभीत ११–३२८.
भयानक–भयंकर वस्तु ११–३१६.
भयासुर–भयंकर, भीतिदायक १–९१.
भर–आधिक्य १–१८७; जोर, मनाच्या कलाचें आधिक्य १८–८९४.
भरण–आयुष्य ११–४९९; पोषणें ३-२०९; सामुग्री ९–२४०.
भरणें–भरती येणें १३–१३८; समुदाय १५–३६०; (पाणी) घालणें १३–५६.
भरती–वाढ १८–१०९६; भरण्याचा १८–१०९३.
भरतें–भरती ९–११५.
भरंवसेनि–निश्चयानें २–८२.
भरा–एकशें साठ पायल्यांचें माल्वण तालुक्यांतील माप ९–४९६.
भराडा–गोसावी १३–३८९.
भरित–पूर्ण २–२९२.
भरितें–पूर ११–३१९.
भरी–पर्यंत १५–११२; भरून १५–२१७.
भरोवरी–सामुग्री १८–८५५; सायास १३–११३३.
भर्ता–नवरा, पति ९-२८०.
भलतयापरी–मनाला वाटेल तसे १–८२.
भलतें (भलेतें)–हवें तें, कोणतेंही १–२२५.
भलतेउतें–भलतीकडे १८-११७१.
भलतेणें–वाटेल त्यानें ९–२५७.
भलतेतुकें–पाहिजे तितकें १८–८६२.
भलतेथ–हवें तेथें ९–२५७.
भलतेवढी–पाहिजे तेंवढी १५-४९.
भलतेव्हां–पाहिजे तेव्हां ८–२५७.
भलतेसणी–हवी तेवढी १६–७९.
भला–चांगला, उत्तम १–८; चांगल्या रीतीनें ४–११५.
भव–संसार ९–१४०. उत्पन्न होणारे १७–२२३
भवंडणें–फिरविणें १८–३१०.
भवंडी–भोवंड, भोंवळ ९–८१.
भंवणें–फिरणें १३–११०२.
भंवत–फिरत ८–२४४.
भंवतें–भोंवतालीं, सभोंवार १–१४५.
भवध्वंस–संसाराचा फडशा पाडणारा १८–५.
भंवरु–भुंगा १८–९०२.
भवादृश–आपल्यासारखे ९–८.
भवानी–पार्वती १–७०.
भविन्नणें–होणें ६–३१४.
भविष्यमाण–होणारें ७–१६२.
भंवे–भ्रमण, फेरे २–३२६; होईल १३–७६०.
भवेभकुंभभंजन–संसाररूपी हत्तीच्या गंडस्थळाचा नाश करणारा १०–५.
भस्मासुर–एका दैत्याचें नांव २–३८.
भाक–शपथ ८–७९.
भाकड–दूध न देणारी १६–१४२.
भाख–भाषा १३–३५७.
भाखा–शब्द १८–३१८.
भाग–निवड, भेद १८–१६८१; प्रकार १०–७७; वांटा १६ ३०९.
भागा फिटणें–वांट्याला येणें ५–१४७.
भांगार–सोनें ६–९८.
भागीन–भागीदार १६–३७५.
भाग्य–दैव १४–१५१.
भांजणें–नाहींसें होणें, उतरणें, २–७१.
भाजन–भजन करण्यास योग्य १०-५; पात्र १७–२७०.
भाट–स्तुतिपाठक २–२१२; पडित किंवा बरड जमीन १३–४५.
भाटिव–स्तुति १३–९५७.
भांड–भांडें १७-५२; मातीचा डेरा १३–८७२.
भांडकें–भांडखोर १८–१३५.
भांडार–खजिना १–२२०.
भांडारी–खजिनदार १०–५२.
भांडावणें–बंद पडणें १७–३८९.
भाणें–ताट, पात्र ८–१४३.
भाता–बाण ठेवण्याची पिशवी ११–२०७; लोहाराचा भाता १३–६६४.
भातार–नवरा २–१९९.
भांती–प्रकार १४–८६.
भातुकें–खाऊ ३–२४८.
भातें–खाऊ ६–३५२.
भादी–चांगली १३–६३७.
भानु–सूर्य १–१०५; पिंगळा नाडींतून वाहाणारा वारा ६-२४५.
भांव–शोभा ६–२५३; मास १०–७७.
भांबावणें–चुकणें, गोंधळणें १८–१४७९.
भार–समुदाय ११–३९५; भर, आधिक्य ११–२०; वजन १७–२६०.

भारणी–भुरळ पाडणारा मंत्र १२–१५८.
भारती–सरस्वती १–३२; वाचा १–७८.
भारी–कठीण १५–५८९.
भारैले–भारावलेलें, भारलें गेलेले १४–९१.
भाल–टोंक ७–१७३.
भाव–स्थिति ४–१५३; अस्तित्व ९–७१; श्रद्धा, कल्पना ९–३५३; अभिप्राय १३–४; वस्तु, पदार्थ ७–५३; प्रकार १६–५७; अष्टसात्त्विकभाव ८–५६; भाववाचकनामाचा प्रत्यय जसें 'ब्रह्मभाव' ६–१०२.
भावणें–भावना किंवा कल्पना करणें ५–८७; चिंतन करणें ८–७६; इच्छिणें ७–१४६; पुटें देणें १८–७७६.
भावना–कल्पना ९–७९; संस्कार १८–७७४.
भावशुद्धि–अंतःकरणशुद्धि ७-१७०.
भावज्ञ–अभिप्राय जाणणारा, गुणज्ञ ६–२१.
भावाभाव–होणें न होणें १०–८४; अस्तित्वनास्तित्व १८–११८६.
भाविक–संतुष्ट होणारा ३–१०४.
भाव्य–भावना करण्यास आश्रय ९–८४.
भाष–नांव ६–३०१; शपथ, वचन १६–४४९.
भासळणें–मिळणें ६–३१४.
भास्वत–सूर्य १४–१३.
भाळणें–भुलणें १८–३८९.
भिंग–अभ्रक १४–३०८.
भिंग देणें–अभ्रकाचें पुट देणें १०–१४.
भिंगार–कंदील, भिंगाचें घर, तावदान १३–१८२.
भिंगुळवाणें–भयानक ११–२४६; विपरीत १८–१६२६.
भिंगोरी–भिंगरी १५–१३६.
भिडणें–तोंड देणें १–११९.
भिंती–भिंत १३–८२७.
भिन्न–फुटलेलीं ८–४४; वेगळा १५–३२२.
भिन्नता–भेदभाव ४–११९.
भीतर–आंत ७–१३४.
भीतरलें–आंतील १३–२७४.
भीरु–भिणारा ११–३२८.
भुकाळ–हपापलेला १६–३२३.
भुकेला–भूक लागलेला ९–३८६.
भुज–हात १–१०.
भुजंग–सर्प १८–१४७९.
भुंजणें–अनुभव घेणें, भोगणें२-२८८.
भुजा–दंड १–१३३.
भुंजौनि–भोग देऊन १८–१०६२.
भुतणें–घेरणें, व्यापणें ५–४७.
भुररें–भुरळ १३–७५५.
भुलणें–मोहित होणें १–२३६; विसरणें १८–८०८.
भुलवणें–भूल घालणें २–३१२; चुकवणें १८–१०५६.
भुली–भ्रम १८–२६.
भुवन–घर २–३६३; जागा ९–३२०; लोक ८–१६०.
भुवनोद्भवारंभस्तंभ–स्वर्गादि लोकांच्या उत्पत्तीचे आधारभूत खांब १८–५.
भूगोल–पृथ्वीचागोल १०–२६०.
भूत–प्राणी, जीव ७–४६; तत्त्व; हीं तत्त्वें, पृथ्वी आप, तेज, वायु व आकाश अशीं पांच आहेत ६–२४०; गतकालचें ११–५१५; पिशाच २–२३४.
भूतखिचा–भूतांच्या खिचडीकरतां, नाशाकरतां ११–३४३.
भूतपति–जगन्नाथ १०–१९०.
भूतभविष्य–झालेलें व होणारें ११–५१५.
भूतभारसहिष्णु–भूतांचे ओझें सहन करणारा १३–४६०.
भूतभाव–प्राणी ८–१७७.
भूतभावन–भूतांच्या अथवा जगाच्या कल्पनेचा आश्रय९-८६.
भूतल–पृथ्वी १४–३८५.
भूतला–स्वाधीन झाला, भुलला १–८४.
भूतलें–घडलेलें ११–५७६; मागील १३–१२२.
भूतसंचार–पिशाचबाधा ७–१०३.
भूतसमुद्र–प्राणीरूपी समुद्र ९–१२०.
भूतळ–पृथ्वी ११–२४३.
भूताभास–जगाचा आभास९–८०.
भूतें–प्राणी ५१–१२४.
भूतोंडी–भूताला टाकलेला बळी ९–१८४.
भूपति–राजा १–१५१.
भूपाल–राजा १–२१८.
भूमि–मूळ १०–४३; पृथ्वी १८–४२४; मजला १८–३९; स्थान १४–१३८.
भूमिका–अवस्था १८–१०४३; वेळ १८–४२५; जमीन१५–२३४; आधार, आश्रय१३–६०९.
भूषण–दागिना ९–१६२.
भूषावयालागीं–भूषण मिरवण्याकरितां ९–३६२.
भूस–फोल, कोंडा २–१३०.
भृंग–भ्रमर १७–६.
भृत्य–सेवक १८–८५.
भेडरें–भय १३–१०४०.
भेटी–संयोग, दर्शन ११–१.
भेंड–एक प्रकारचा वृक्ष १८-५७५.
भेड–भित्रा १–१३४.

भेडका–भित्रा ११–३८६.
भेडसावणें–भिवविणें ६–२१९.
भेण–भीति ११–१८३.
भेणभेण–भीतभीत ११–४९०.
भेद–प्रकार २–२६०; भिन्नता ८–२१.
भेदणें–भेदन करणें, खोंचून जाणें १–१६२; कोरणें, छेदणें १–२०१; फुटणें ८–४२; विभागणें १७–१९९.
भेदली–फुटलेली ८–४२.
भेरी–मोठा नगारा १–१३२.
भेसक–मिश्रित १८–८२९.
भैरव–शिवाचें एकरूप, ह्याचे आठ प्रकार आहेत (असितांग, रुद्र, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति, कपाली, भीषण) १३·८१९.
भोकसा–मेलेल्या जनावराचा आंतील मालमसाला ३–२५०.
भोक्ता–जेवणारा ७–१२५.
भोग–विषय १३–७१८; सुखदुःखानुभव १–२११; उपभोग १६–१६६.
भोगक्षम–भोगांना योग्य, भोगण्यास योग्य १४–२१८; शरीर १४-२७४.
भोगक्षीण–ज्याचें प्रारब्ध संपलें आहे असें १५–३७५.
भोंगळ–कर्णा १–१३२.
भोगायतन–अंतःपूर ११–५५२.
भोग्य–सेव्य ३–१२२; भोगावयाचें आहे तें ११–४०२.
भोग्यजात–विषयमात्र, भोगावयाचें सर्व ९–४९५.
भोज–करामत ३–२४९; चित्र, मूर्ति ६–१२३; प्रेम ९–२०६; वृद्धि १४–२००; आवड १३–३९०; कौतुक ११–३६५; उल्हास, आनंद १०–१२०.
भोज्य–अन्न, आहार १७–१३१.
भोय-भूमिका, भूमि १८–९५५.
भोवंडणें–फिरविणें १८–४२७.
भोंवणें–भ्रमण करणें १८–५५१.
भोंवत–फिरत ९–८१.
भोंवरी–बुगडी १३–९०२.
भोविन्नणें–फिरणें ६–७६.
भौतिक–पंचमहाभूतांचें बनलेलें शरीर १३–१५६.
भौम–पृथ्वीचा पुत्र मंगळ, एक पापग्रह ५–११६.
भ्यासुर–भयंकर, भयासुर २–११६.
भ्रमणचक्र–गति असणाऱ्या ग्रहांचें चक्र १३–४८८.
भ्रमणें–भुलणें १–२७१; फिरणें ११–१४९.
भ्रमता–भटकणारा ६–१६९.
भ्रमर–भुंगा १–५९.
भ्रमलेपण–भ्रांति, मोहावस्था २–९८.
भ्रमहत–भ्रमलेलें, भ्रमिष्ट ५–५७.
भ्रंशणें–भ्रष्ट होणें १–१८८; नष्ट होणें २–५६; ८–३३.
भ्रांत–भ्रमलेला, मोहग्रस्त ६–१०२.
भ्रांति–मिथ्या, खोटें २–१०२. शंका ११–६९०.
भ्रामक–लोहचुंबक ९–११६.
भ्रातृ–भाऊ १८–१५८७.
भ्रुकुटी–भुंवई १३–२७२.
भ्रूभंग–चढविलेली भुंवई ११–२०४.
भ्रूपल्लव–भुंवई ५–१५२.
भ्रूलता–भुंवई ८–९७.

म.

मकर–मगर, एक प्रकारचा मासा १८–१७५२.
मकरतुंड–मगराचें तोंडासारखा केलेला रथाचा अग्रभाग ११-२९३.
मकरंद–मध १–१८; सुवास १०-१२७.
मकरध्वज–मदन ११–६०१.
मकार–आज्ञाचक्र, ओंकाराची तिसरी मात्रा १२–५६.
मख–यज्ञ ३-९३.
मगणें–घेणें, शोधणें १६–७५.
मंगळ–शुभ ९–५०३; मंगळ नांवाचा ग्रह ५–११६.
मज–मला १–१६.
मज्जा–शरीरांतील धातुविशेष ६–२१८.
मंडण–भूषण, अलंकार १८–५८७.
मंडप–मांडव १६–३८४.
मंडळ–चंद्राचें प्रतिबिंब १४–४०५.
मंडित–अलंकृत १८–१५५०.
मढ–कलिका, कळी ११–३०४; कोठडी १८–७४२.
मढणें–मढविणें ११–२२१.
मणिज–अंड्यापासून झालेलें (पक्षी वगैरे) १५–१४८.
मणिपूर–नाभिस्थानाजवळील एक चक्र ६–२१५.
मणिभूषण–रत्नाचा अलंकार १–५.
मतपत्रिका–साक्षीभूत अथवा आधार असा लेख १३–६६.
मतमुक्त–मतरूपी मोतीं १३–५१.
मतवाद–मतांचा दुराग्रह १३–१०४९.
मति–बुद्धि १–९.
मतिभ्रम–बुद्धिभ्रंश ३–१७८.
मतिमंद–अल्पबुद्धीचा १–७३.
मतिवंत–बुद्धिमान १३–४०.
मत्त–माजलेला ३–१३९.
मंत्र–क्लृप्ति, युक्ति १३-६३५; ज्यांची कांहीं विशेष शक्ति असते असें जें ऋषि इत्यादिकृत वाक्य तें १–१०९.
मंत्रविद्या–वेदविद्या ९–४७५.

मंत्राचीं बीजाक्षरें–शेलक्या शिव्यांचीं अक्षरें १६–१२८.
मंत्रज्ञ–मंत्र जाणणारा १–१९०.
मथणें (मथिजे)–मंथन करणें, घुसळणें १–५१; घांसणें १–२४३.
मंथा–मंथन करण्याचा दंड, घांसून अग्नि उत्पन्न करण्याचें लांकूड ४–१३१.
मथित–लोणी १५–५७१.
मद–गर्व, फुंज ९-३८१; माजलेल्या हत्तीच्या गंडस्थळांतून निघणारा स्राव १७–६.
मदत्रय–विद्यामद, धनमद, व कुलमद, असे तीन मद ७–७४.
मदन–काम ९–३२४.
मदनारी–मदनाचा शत्रु शंकर १०–२२५.
मदमुख–मदोन्मत्त हत्ती २–२१५.
मंदर–एका पर्वताचें नांव ११-२५७.
मदवी–कोरें वस्त्र १८–६९०.
मंदावणें–कमी होणें १६–१२.
मदिरा–दारु ३–१९६.
मद्भाव–मद्रूपता ४–६३.
मद्य–दारु १६–२८६.
मद्यप–दारुपिणारा १३–५३२.
मद्याजी–माझें भजन करणारा ९–३६६.
मधु–मध १३–५०२.
मधुकरी–भ्रमरी १३–७८६.
मधुमक्षिका–मधमाशी १३-५०२.
मधुर–गोड ३–१९.
मधुरता–गोडी १८–७९६.
मधुरस–पुष्पांतलि मध १३-७८६.
मधुवन–मधु नांवाचें अरण्य ११–१८४.
मध्य–मधला १५–७३.
मध्यमा–सुषुम्ना नाडी ६–२४६; चार वाणींतील कंठस्थानस्थित तिसरी वाणी १६–२०.
मध्यस्थ–मध्यमार्गी राहणारा १५–५०२.
मनणें–पठणें २–२०३; मानणें १७–१०८.
मनु–स्वायंभु, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्णिक, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि, इंद्रसावर्णि हे चवदा मनु आहेत १०–९३.
मनोगत–मनांतील इच्छा, हेतु ४–१८५.
मनोजय–मनाचा जय, आत्मनिग्रह १६–१८४.
मनोधर्म–मनाचा संकल्प ४–८७; मनाची चंचलता ६–२११; मनोगताप्रमाणें वागणारा १७–३३.
मनोरथ–इच्छा १–२४.
मनोरुचि–मनाची आवड १–२७.
मनोहर–सुंदर २–२४६.
मनोहारी–मनाचे आनंदानुरूप १६-८७.
मनौनि–मनापासून, मनास आरंभ करून १६–८७.
मनौरा–दगड, चुना इत्यादिकांचा जो पोकळ स्तंभ करतात तो, डोलारा, मनोरा ९–३.
मन्मथ–काम, मदन ७–८५.
मन्वंतर–एका मनूचा काळ १५–१२८.
मापितला–मोजका ६–३५०.
मम–माझें १८–२३४.
ममत्व–माझेपण १४–१४६; ममता ९–४६७.
मयूर–मोर ६–१७८.
मरगज–पाच (एक प्रकारचें रत्न) ११–६०१.
मरतें–मरणारें ९–२९७.
मरुदेश–मारवाड प्रांत, निर्जल प्रदेश १८–१६१.
मरुद्गण–देव विशेष १०–२२२.
मर्कट–माकड ३–९.
मऱ्हाटा( मऱ्हाटे )–मराठी ४–२१४;प्राकृत, सुगम ३–१७.
मऱ्हाठी–मराठी भाषा १२–१६.
मलय–एका पर्वताचें नांव ४–२२०.
मवणी–मोज, माप १७–४२५; घोकणी १६–३३२.
मवणें–मोजणें, लिहून ठेवणें, दाखल करणें १८–९१२; मोजणें १०–१७८.
मवाळ–मऊ, मृदु १३–२६९; हळुवार, हलके १–५६.
मशक–चिलट १–७४.
मसी–शाई १७–७०; काजळ १३–७१९.
मसैरें–आंधार, काळोख ५–८३.
मस्तक–डोकें १–१७.
महत्–महत्तत्व १४–२२३; मोठें ६–२८०.
महंत–मोठा २–४४;साधु १७–३४७.
महंतपण–थोरपणा १६–३७८.
महदादि-महत्तत्वादिक ६–४२६.
महदादि देहांत–महत्तत्वापासून स्थूल देहापर्यंत ९–६७.
महद्ब्रह्म–माया ११–५११.
महा–मोठा १–२३.
महाकल्प–महाप्रळय १३–६१.
महातेज–सूर्य १–७४.
महाद्वीप–मोठें बेट १६–३२.
महानुभाव–महात्मा, प्रशस्त अनुभवाचा ९–१९४.
महापद–ब्रह्मपद १३–३७१.

महापुरुष–ब्रह्मनिष्ठ १३–७८९.
महाबाहू–अर्जुन १०–५४.
महाभूतें–पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही पांच महाभूतें आहेत १०–१४९.
महामंडल–मोठें वाटोळें १–१९.
महामारी–महामारीप्रमाणें वाटणारें १५–५८.
महायाग–महायज्ञ; हे ब्रह्मयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ असे पांच आहेत १८–१६६.
महारथी–शस्त्रास्त्रांत प्रवीण असून दहा हजार योद्ध्यांशीं एकटा लढणारा १–९८.
महार्घ–महाग १८–८८१.
महावाक्य–वेदांतील जीवब्रह्माचें ऐक्य दाखवणारें वाक्य. हीं चार वेदांचीं चार आहेत. १८–४०४.
महाशून्य–परब्रह्म ६–३१५.
महासिद्धांत–'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' हा मुख्य सिद्धांत १५–४३४.
महासिद्धि–अणिमा गरिमा वगैरे मोठ्या सिद्धि; या आठ आहेत ९–३२१.
महासुख–ब्रह्मसुख १–१४.
माहिख–महिषासुर १८–४४४.
महिमा–मोठेपणा ६–४८०.
महिमान–मोठेपणा ९–४५०.
महिष–रेडा, महिषासुर १२–५३.
मही–पृथ्वी २–२६२.
महुर–मधुर, गाड ५–११५;(ज्ञानांना येणारा) मोहोर ६–१४९.
महेंद्र–मोठा इंद्र २–६५.
महेश–शंकर ६–१५३.
महेश्वर–मुख्य ईश्वर १०–७५.
महोदधि–महासमुद्र १५–३१७.
मळ–विष्ठा १८–६७७; कमीपणा १८–६२; दोष ४–१७५.
मळकटा–मळ १८–१०११.
मळा–बाग १८–४९२.
मळी–अमंगलता प्राप्त करून देते १७–१९६; मळणी करते १३–३९.
मक्षिका–माशी १३–७३०.
मा–ना (प्रश्नार्थक) ११–१५६; मग ११–४०१; १३–९८६.
माउली–आई १२–८.
माखणें–चोपडणें १७–२४६.
माग–मार्ग ४–२०५; पत्ता १५–४४१; शोध १८–१५०.
मांगळी–मुंजींत बांधली जाणारी मोळाची दोरी १३–६५८.
मागा–मागें, पूर्वी ५–२.
मागावा–किचा १७–४१.
मागुतें–परत ४–१५०.
मागोवा–माग १८–१७२२.
माघुत–मागेंच १४–२८५.
माघौतें–मागें ६–१९१.
माच–माळा, मांडव ११–३०२.
माज–खळबळ १२–१६५; कैफ १८–६५८; जोर १३–२२; वृद्धि १४–१९९.
माजणें–मस्त होणें, बेपर्वा होणें ४–१९८.
माजवण–कैफ आणणारा अथवा उत्तेजक पदार्थ ३–९.
माजविणें–उन्मत्त करविणें १८–१८२.
माजि–मध्यें ४–१८९.
माजिठें–वस्त्र ६–१०९.
माजिरा–मादक १६-३६२;उन्मत्त, बेहोष १७–११३.
माजिवटा–गुंगी ८–२०८; मध्य १२–१४३; मर १८–११८७.
माजिवडें–मध्यें ७–३१.
माझारीं–मध्यें १–८.
मांदुळणें–खुंटणें १८–१०८२.
मांडणें–आरंभ होणें १–१५८; घडणें ३–४९; व्यापणें ११-२८६. आरंभ करणें १४–३६८.
मांडवी–लहान मांडव १३–९११.
मांडी बांधणें–निश्चय करणें १८–१५५.
माणिकुलें–माणिक ६–२६४.
माणें–मावणें १६–३४१.
मात–वृत्तांत, हकिकत, गोष्ट १–८५.
मातंग–मांग १८–५४८.
मातणें–माजणें १३–७५५.
मातली–माजलेली, भयप्रद ९–१८२.
मातलेपण–सुस्तपणा ११–३३९.
मातापितरें–आईबाप २–३२.
माती–मातीचा पुतळा १८-१७३०.
मातुल–मामा १–१८०.
मातृका–देवता ६–१२७; आई १३-७३२.
मात्र–केवळ, संपूर्ण १८–९७०.
मात्रा–प्रमाण १८–७७४.
माथा–डोकें १६–१०; वरचा भाग ६–१९८.
माथुला–रवी (घुसळण्याची) ९–२१.
मांदळ–ढोल १–१३२.
मांदियाळी–समुदाय १८–१७९६.
मांदी–समुदाय ७–१०६.
मादुरी (मांदुरी)–तबेला ठेवणारा १६–२२५.
मांदुस–पेटी १५–८३.
मांदोडा–कांबांचा जुंबाडा; मंडप ८–८.
माधवी–वसंत काळ १–४३.
माधुरी–गोडी १४–३१.
माधुर्य–गोडी १६–११८.

मान–मर्यादा, मोजमाप ९–१५९; आदर ४–१८७; गर्व अभिमान १५–२८५; प्रमाण १–९२; मोजमाप २–४०; गळा ३–२५२.

मानणें–जाणणें १–६१; मान्य करणें, स्वीकारणें २–१६२; नांव देणें ६–१२९. पटणें ५–८४.

मानवणें–अनुभवास येणें ९–२४७; समजणें ८–४०.

मानस–मन १२–९७; चित्तांतील ५–१६३.

मानिया–मानी पुरुष १६–१७५.

मानुष–मानवी १५–१७९.

मापक–माप मोजणारें १८–७१६.

माय–आई १–७९.

मायपूत–आई व मुलगा १८–१७८२.

मायपोट–मुख्य आधार, बरें वाईट जेथें सर्व सांठविलें जातें तें ८–१९५.

माया–भास, खोटें २–१४०; मृगजळ १३–१०३०; मोह घालणारी ईश्वराची शक्ति १–२०३; अविद्या, अज्ञान १८–४०५.

मायाकारित–मायेनें करविलेलें २–१६८.

मायागम्य–मायेला आकलन न होणारा १८–९.

मार–निग्रह ६–२८९; मारा करणारे लोक १३–३९५; प्राण हरण करणें १७–१३९.

मारक–मारणारें १७–६८.

मारिता–मारणारा १५–२२.

मारुत–वायु २–१४६; ज्यावेळीं प्राणवायु आंतून निघून गगनाला मिळतो त्या स्थितींतील कुंडलिनीचें नांव ६–३०१.

मार्गामार्ग–सरळ व आडमार्ग ८–२३९.

मार्तंड–सूर्य १८–५२१.

मार्दव–मृदुपणा १३–१८०.

मालें–राव, कांब्वी १०–३३; कर्जफेडीची भिक्षा १४–३१.

मालें मागणें–गळ्यांत नांगर बांधून कर्जफेडीची भिक्षा मागणें १४–३१.

माल्हातणें–आश्रय करणें १४–१७९.

माव–माया १–२३२; भ्रांति १३–७५१.

मावळणें–लय पावणें ६–२८७.

मास–महिना १०–२८३.

मांसळ–मांस असलेली ११–१३९.

मासोळी–लहान मासा १४–३५१.

महारी–माहारीण १३–४७९.

माहेर–जन्मस्थान १–३१; मायबाप ९–३.

माहेवणी–गरोदर स्त्री १८–८६६.

माळादंड–फुलांचे हार ११–२२०.

माळिक–मजल्याचें ५–११४.

माळिया–आडव्या फांद्या १५–१५०.

माळी–पठार १८–३५; बागवान १२–१२०.

माळोंवाळीं–चोहोंकडून, शास्त्रोपशाखीं १५–१९८.

मिख–निमित्त १६–२३७.

मिठांश–गोडी १०–१९३.

मिठी–लय १५–५१४; आलिंगन १४–३९६.

मिठी देणें–गिळणें ११–३९४.

मिठी पडणें–संपणें ९–५०.

मिडगण–स्तुति १३–३१९.

मिणधी–ओशाळी, कपटी १३–३६४.

मित–थोडकें, मोजकें १८–१०२५.

मितलें–मोजकें, माफक, नियमित ६–३५१.

मिति–संख्या, गणती १–१०२.

मित्र–सूर्य १५–५५८.

मिथुन–जोडपें १६–६.

मिथ्या–असार, खोटें १८–५४१.

मिथ्यादृष्टि–अन्यथाज्ञान १४–११३.

मिनणें–एकत्र होणें, जमणें १–१०२; प्राप्त होणें १३–५९४.

मियां–म्यां १०–२८९.

मिरवणी–अलंकार ११–८४; सुशोभित करणें १७–२०३; सोंग ११–८४.

मिरवणें–शोभणें, खुलून राहणें १–३; प्रतिष्ठा मिरवणें २–३६.

मिष–निमित्त २–३१३.

मिषांतर–निमित्त १८–१३७७.

मिष्टान्न–पक्वान्न २–२५१.

मिस–निमित्त ६–३५४.

मिसक–निमित्त १८–२२६.

मिसकट–निमित्त १८–१४६२.

मिळणी–संयोग १६–८९.

मिळणें–भेटणें, मिलाफ होणें ६–२३८.

मी–तूं–द्वैतभाव १५–२८०.

मीन–मासा ३–२१३; मत्स्येंद्रनाथ १८–१७५४.

मिनणें–मिळणें ७–१२५.

मीमांसा–पूर्व व उत्तर मीमांसा १–१६.

मीलनोन्मीलन–मिटणें व उघडणें, उघडझांप १७–५.

मुकणें–अंतरणें १५–५८२.

मुकुलित–थोडक्यांत २–२३०.

मुकुळ–कमळकळी १५–६.

मुकुळणें–आवरून घेणें ५–१४२.

मुक्त–मोती ७–४९; मोक्षास प्राप्त झालेलें. १८–३९७

मैळणें—मळणें ८–३९.
मोकलणें—घालवणें, मोकळें सोडणें ६–३८१.
मोकळवादी—मोकळिक, निराश्रस्थिति १–१५७.
मोकळा—मुक्त १३–१११०.
मोकळी—स्वच्छंदता, मतभेद १७–२६; अखंड १८–३२७.
मोकाट—मोकळा १३–६९७.
मोगर—पायदळ ११–३९५.
मोघ—व्यर्थ ९–१७३.
मोचक—सोडविणारें, मुक्त करणारें ३–७९.
मोट—दाट ७–१२७; गांठोडें १७-३४८.
मोटकें—नेमकें ६–२२३; अल्प ६-४५२.
मोट वळणें—वांकणें, लवणें ११–४८७.
मोड—आकार ६–२७६.
मोडणें—उकरणें १५–२६९.; बंद पडणें ६–२४३; नाश पावणें १५–१३८.
मोडामोडी—आळोखे पिळोखे १४–१८०.
मोडावणें—देहस्मृति नाहींशी होणें १८–१६११.
मोडून घेणें—पाडून टाकणें १८–१०५२.
मोडोनि येणें—दाट येणें ९–४३८.
मोदळा—चिखलाचा गोळा १८–८१४.
मोल—किंमत २–२५४; मजुरीचे पैसे, मजुरी १८–१६७.
मोह—भ्रम ७–२०.
मोहणें—मोह पावणें ४–८८.
मोहन—भुरळ १३–९९५.
मोहर—मार्ग, रस्ता ३–१७१; बाजू ६–१५९; प्रकार १७–१२०.
मोहरणें—वळणें, फिरणें ६–१९२; मार्गाला लावणें १३–६१९.
मोहरा—बाजूला, समोर १८-१७१.
मोहित—वेडा झालेला १–८५.
मोक्ष—चार पुरुषार्थांपैकीं अखेरचा; हा प्राप्त झाला असतां संसारांतून कायमची सुटका होते; दुःखाची अत्यंत निवृत्ति व परमानंदाची प्राप्ति. ४–१४८.
मोक्षकाम—मोक्षाची इच्छा असलेला ४–१४८.
मौढ्य—मूर्खपणा १४–१७९.
मौन—स्तब्धता, न बोलणें १७–१५.
मौळ—शिखर १३–५६७.
मौळा—कांटा १८–६५८.
म्लेंछ—यवन १८–५५०.
म्हण म्हणौनि—म्हणून १४–४१.
म्हणावेया—म्हणणार ८–१०९.
म्हणिपणें—म्हटलें जाणें १–१०.
म्हणियागत—चाकर, आज्ञेप्रमाणें वागणारा ९–२८४.
म्हणियारा—म्हटलेलें करणारा ९–३२४.
म्हणियें—आज्ञा ३–९९; म्हणतात ८–१६८.
म्हैसा—रेडा ९–५२२.

य.

यजणें—यज्ञ करणें ४–१२०; १६–९५; पूजणें ९–३४९.
यजन—यज्ञ ४–१४०.
यजिजे—भजावें १६–९५.
यजितसांते—यज्ञ करीत होत्सातें ९–२६३.
यजिता—यज्ञ करणारा ४–१५०.
यजुस्—यजुर्वेद १५–१६६.
यज्वा—यज्ञ करणारा ९–२४२.
यंत्र—तोफ ९–२११; साधन ३–९०.
यथाकाल—योग्य काळीं ११-४९९.
यथागम—शास्त्रानुसार १८–८१०.
यथारूप—जसा आहे तसा ११–२९२.
यथार्थ—खरें १६–१२०.
यथावृत—जसें आहे तसें १५–४३५.
यथासंपन्न—असलेलें, अनुकूल १६-८५.
यदुराज—श्रीकृष्ण १३–८३.
यमणें—नियमन करणें ९–१९९.
यमनियम—इंद्रिय व मन यांचा निग्रह १–२४९; पातंजलीच्या योगसूत्रांत पांच प्रकारचे यम व पांच प्रकारचे नियम सांगितले आहेत तेः—
तत्राहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ पाद. २ सू. ३०॥
शौचसंतोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः॥ पाद २ सू. ३२॥
हठयोगप्रदीपिकेंत १० यम व १० नियम दिले आहेत. ६–५५.
यक्ष—देवयोनिविशेष १०–२२६.
यज्ञपुरुष—यज्ञाचा भोक्ता, परमात्मा ९–२५०.
यज्ञभाविक—यज्ञानें संतुष्ट होणारा ३–१०४.
यज्ञसूकर—वराह अवतार १३–३४७.
यज्ञांग—श्रीकृष्ण, ज्याचे सर्व अवयव यज्ञरूप आहेत असा १६-१३५.
यज्ञभास—यज्ञाचा नुसता देखावा १७–१९५.
यज्ञेश—यज्ञपुरुष ३–१२१.
यज्ञोपहार—यज्ञांतील सामुग्री ९–३५१.
याग—यज्ञ ४–१५६.

याचक–मागणारा ११–११७.
याचणें–याचना करणें, मागणें ९–३१८.
याज्य–यज्ञाचा विषय ६–४७७.
यातायात–शीण, त्रास ८–८५.
यातायाति–येरझारा, जन्ममृत्यु २–२७८.
यादव–यदुकुलोत्पन्न पुरुष१–४६७.
यादवेश्वरु–श्रीकृष्ण १०–४८.
यादस्–जलचर, पाण्यांत रहाणारे प्राणी १०–२४३.
यापरौतें–यापेक्षां २–५२.
यावा–ओघ ९–४६२; प्राप्ति१५–१७१; येणें १४–३४०.
यावाजावा–येणें जाणें १४–३४०.
याज्ञिक–यज्ञ करणारे पूर्वमीमांसक १३–२२३; यज्ञ करणारा १६–४०२.
युक्ति–निष्काम कर्म करण्याची हतवटी ५–३२; नियम ६–३४९; नियमितपणा ६–३५७.
युक्तिघोष–बंधत्रयरूपी मंत्रघोष ८–५०.
युक्तित्रय–मूल, जालंदर, उड्डियाना असे तीन बंद (योगांतील पारिभाषिक शब्द) ४–१२७; ८–५०.
युग–कालाचें एक मान, हीं चार आहेत ८–१६४; जग ११–५७.
युग बुडणें–संपूर्ण नष्ट होणें ८–२३१.
युगांत–प्रलयकाळ २–२१५.
युगानुवृत्ति–युगाची मालिका १४–११३.
युगुल–जोडी ११–७०८.
युग्म–जोडपें १६–३१०.
यूप–यज्ञांतील खांब ९–२३९.
येडतें–येवढेंसें ९–३७५; येवढें (येवढ्या योग्यतेचें)१०–५०.
येकवढें–एकत्र १८–६२५.
येकवळा–सांगड, एकत्रता १८–६३७.
येकाढता–एकदेशीपणा १८–१७३६.
येकाहारी–एका पंक्तीला१७-२३४.
येकोपजीवी–एकच आश्रय १६–६७.
येतुला–इतका १–८७.
येतुलावरी (येतुलेवरी)–इतकेंच, एथपर्यंत २–३०.
येर–हा, जवळचा १–१४६; इतर ३–१५८.
येरझारा–येणें जाणें, खेपा ६–६२.
येरयेर–एकमेक १–८७.
येरीमोहर–शेंडा खालीं व बुड वर असें १५–४१.
येसणें–येवढें १–२६१.
योग–सांगड, संबंध, गांठ ८–८१; अप्राप्ताची प्राप्ति ९–३४३; अष्टांगयोग ६–३६३.
योगच्युत–योगभ्रष्ट ६–४४८.
योगनिद्रा–सहजस्वरूपस्थिति ५–७८; योगमाया १७–१.
योगनिष्ठा–योगपरायणता २-३१६.
योगपट–नवीनच संन्यास घेतलेल्या मनुष्यास संन्यासाबरोबर आलेले नियम १६–३३२.
योगक्षेम–योग म्हणजे अप्राप्त वस्तूची प्राप्ती; क्षेम म्हणजे मिळालेल्याचें पाळण ३–९६.
योगाब्जिनीसरोवर–योगरूपी कमळ उगवण्याचें सरोवर १८–१७५५.
योगारूढ–योगनिष्णात ६–६५.
योगी–निष्काम कर्मयोगी ६–३९.
योजणें–आश्रय करणें २–२७७.
योनि–प्राण्यांच्या जाती ५–१२३.
यौवन–तारुण्य १८–११२.

## र.

रंक–दरिद्री पुरुष ५–११०; दीन, लाचार ८–१२८.
रंकपण–दारिद्य १८–३२३.
रगडणें–चेंगरणें, दाबणें ७–१७३.
रगडा–चुराडा १७–२६०.
रंगण–मंडळ,वर्तुळाकार स्थान११–६०३.
रंगाथिलें–रंगविलेलें १–६.
रचणें–तयार करणें १–९४; तन्मय होणें ५–१४१; उभारणें ८–९२.
रचलेपण–स्थिरपणा, सुखरूपता १३–२५६.
रज–धूळ ८–१३५; रजोगुण१४–१५९; धुळीचा कण ९–१२५.
रंजणें–रंगणें, रंगून जाणें ४–१९८; मनोरंजन करणें १३–२०७.
रजतवणी–चांदीचा मुलामा १०–१५.
रजनी–रात्र १८–५२१.
रंजे–खूष होतो २–३६३.
रज्जु–दोरी १८–९१५.
रण–युद्ध १–१३२.
रणतुर–रणवाद्य १–१३०.
रत–निमग्न २–२५५.
रति–आसक्ति ३–८२; आवड१८-१७९४; संभोग ७–७४.
रत्नाकर–समुद्र १८–८५२.
रथांग–रथाचे भाग–चाक जूं वगैरे १३–१५१.
रथौनियां–रथांतून १–२६९.
रथ्योदक–रस्त्यावर वहाणारें (गटारांतील) पाणी ५–१५४.
रंधन (रंधण)–शिजवणें १८-९३९.
रंध्र–भोंक १३–५९०.

रंभा–केळीं ६–४६२; एका अप्सरेचें नांव १६–१२७.
रमणें–रममाण होणें २–२४३.
रमा–लक्ष्मी १०–२८१.
रमानायक–लक्ष्मीकांत, विष्णु ११–१९७.
रम्य–गोड, आनंद देणारें२–१२०.
रव–शब्द ११–३३६.
रवा–लगड ११–६४४; खडा १४–३९३.
रवि–सूर्य ६–११०.
रविचंद्रराहुमेळु–सूर्यचंद्रग्रहण १७-२७२.
रश्मि–किरण ३–२३३.
रश्मिकर–किरण १५–४०४.
रश्मिराज–सूर्य १४–४६.
रस–आर्द्रता ७–१५९; रसायन, औषध १७–२८७; पाणी १७–१८; अन्नाच्या रुचीचे प्रकार९–४३९; अंतःकरणांत उत्पन्न होणाऱ्या वृत्तीचे भाव १०–७, ११–२; पातळ पदार्थ १०–१९३; साहित्य-शास्त्रांतील रस ११–३; पारा १८–१०७९; पंचविषयांपैकीं एक १५–३५८.
रसन–जिव्हा १३–९८.
रसना–जिव्हा २–३०४.
रसभावना–पुटें देण्याची रीत १८-७७४.
रसमय–जलमय १८–१६०४.
रसरसणें–संतापणें १४–४११.
रसरीति–रासायनिक पद्धत १८–१६३.
रसवृत्ति–शृंगारादिक रसभाव १०–४१.
रससोय–पक्वान्न २–२५४.
रसायन–धातु जाळून तयार केलेलें औषध वगैरे १०–१७०.
रसाळ–रसयुक्त, मधुर १३–२१२.
रसिक–रसभरित ६–१४.
रसिकत्व–रसिकता १८–३४७.
रसौषध–रासायनिक औषध १८–१०७९.
रहंवर–उत्तम रथ १–१३९.
रहाटी–मार्ग ३–१६०.
रहित–शिवाय, खेरीज ७–१५९.
रहिवास–वस्ति १३–५२३.
रळी–विनोद ११–४४४.
रक्षसू–राक्षस १०–२२६.
रक्षिता–रक्षण करणारा २–५९.
राई–मोहरी १४–२५६.
राऊत–घोडेस्वार ९–३२६.
राऊळ–देव ५–५; घर ५–८६.
राखणें–रक्षण करणें १६–१४३.
राग–रंग १५–१९४; प्रीति, आवड २–३३१; गायनशास्त्रांतील राग १०–१५७; क्रोध १३–५४२.
रांग–पंगत, बरोबरी ९–३२६.
रागी–इच्छा करणारा, फलाच्या ठिकाणीं आसक्त ६–४३; शोक असलेला १८–४९०.
रांजण–मातीचा मोठा घडा १३–६९०.
राजन्यत्व–राजेपणा १८–११४४.
राजबिदी–राजमार्ग १८–१०६९.
राजयोग–हट्टानें प्राण निरोध न करतां परमात्मस्वरूपी अंतःकरण लावण्याचा उपाय १८–१०४७.
राजवाटा–राजाचा वाटा, मुख्य वाटा ८–१८४.
राजस–रजोगुणात्मक १३–७४२.
राजसूय–सार्वभौम राजानें करण्याचा यज्ञ–११–१०१.
राजागर–राजाचा बगीचा१८–९४.
राजावळ–राजमुद्रा १७–३२२.
राजीव–सूर्यविकासिनी कमळ १६–१६३.
राणा–राजा १–१४०.
राणीव–राज्य ६–३५६.
राणेपण–मोठेपण १०–३२३.
राती–रात्र १०–६४.
रातोत्पल–लाल कमळ ६–२६५.
रांधणें–शिजविणें १०–१२.
रांधवणी–स्वयंपाक करणारी सुगरण स्त्री २–२५४; स्वयंपाक करण्याची (चूल) १३–५६२.
रांधिती–स्वयंपाक १८–१४२.
राब–श्रम १३–३०; धुमाकूळ १४-२३०; जमीन भाजणें १८–९५.
राबणी–पहारा, चाकरी १४–२०६.
राबता–मेहनत करणारा १३–२८.
राभस्य–अविचारानें भाषण १०–३१९; अविचाराचें १८–१०२८.
राय–राजे १–१००.
रायपण–राजेपण १५–३४०.
रांवणें–रंग देणें ११–६००; १३–५६३.
रावो–राजा १४–१५४.
राशिनांव–मुलाची जी राशि असेल त्यावरून ठेवलेलें नांव १७–१५.
राशिवा–रास ९–४५.
राशी–ढीग, रास ४–६९.
राहटी–व्यापार, व्यवहार ९–४२४; वागणूक १८–१४७९.
राहणें–थांबणें १–८३; उरणें, असणें ९–२५५.
राहवलेपण–गाण्याच्या रंगाचा परिणाम १८–४२४.
राहाटणें–वावरणें १–२४७.
राहटवणें–व्यापार करवणें १३–९७०; उपयोगांत आणणें १७–२३२.

राहावणें–छपवणें, राखून ठेवणें ११–११८.
राहुमेळ–राहूचा संयोग, ग्रहण १७–२७२.
राहें–यांव ९–२३७.
राज्ञ–राजा १८–१५७५.
रिक्त–रिकामा, मोकळा १७–२५.
रिगणें–प्रवेश करणें २–२५८; येणें १३–३६०.
रिगवणें–प्रवेश १३–१७८.
रिगावा–प्रवेश १५–४९.
रिगिनिगी–ये-जा १३–१०२.
रिचविणें–ओतणें, रिकामें करणें १३–११४४; वृष्टी करणें १५–२०.
रिझणें–संतुष्ट होणें ५–९.
रिझवणें–संतुष्ट करणें, समाधान देणें ६–४९७.
रिण–कर्ज १७–३७७.
रिणाईत–सावकार १७–३०५.
रिता–रिकामा १३–११०९.
रिति ( सोपें )-रिकामें,पोकळ, रिकाम्या पोकळ सोपटाप्रमाणें ११–४७६.
रितें–रिकामें ९–४४६.
रिपु–शत्रु १–१०४.
रुख–वृक्ष, झाड ४–९७.
रुचणें–आवडणें १४–१९२.
रुचि–गोडी १–३५.
रुच्य–रुचकर ३–१९.
रुणझुणणें–रुणझुण असा आवाज करणें १–७.
रुतणें–पुरणें ९–५९.
रुदणें–रडणें २–१६९.
रुदन–रडणें २–१.
रुद्र–देवताविशेष, हे अकरा आहेत १०–२२५.
रुंधणें–वेढणें १३–१८६; अडवणें, व्यापणें १५–५३.
रुधिर–रक्त २–४८.
रुपडें–मूर्ति ६–१२०.
रुपणें–रुतणें, अडकणें २–४; खुपणें ६–८७; पुरणें, रोवणें १४–२४९.
रुसणें–रागावणें, त्याग करणें, टाकणें ६–३८७; दूर करणें १३–५८१; नाहींसें करणें १८–१६५.
रुळणें–मळणें ८–६४; शोभणें, झुलणें ११–२२०.
रूढ–प्रसिद्ध १–१०३; व्यवहार करणारा ३–६८; प्रवृत्त १५–३५२.
रूढणें–तयार होणें ६–४६४; प्रचारांत येणें १५–१६२.
रूढपण–प्रचारांत येणें, प्रतिष्ठा १–३६.
रूढविणें–वाढविणें ३–१९०.
रूढि–प्रकार, रीत १८–१०३३; प्रचार, प्रसिद्धि १७–३९२.
रूप–शरीर १३–९६०; पंचविषयांपैकीं एक १३–११७;स्वरूप ६–३६.
रूपक–एक प्रकारचा अर्थालंकार १६–४२.
रूप करणें–वर्णन करणें १०–१४.
रूपस–सुंदर, रूपवान १६–१७८.
रेखली–रेखलेली ६–२७६.
रेखा–मर्यादा ४–२१८; ओळ, लोट १६–१९४; कोर१५-४७०.
रेचक–नाकपुडींतून वारा बाहेर सोडणें १८–२४३.
रेचणें–सोडणें १३–६६४.
रेंव–गाळ ७–८८.
रेंवणें–फसणें, रोंवणें ७–७८.
रोकडा–प्रत्यक्ष १२–१७६.
रोख–चाल, मोहोर, अनुरोध १८–१६६८; रोष, राग १८–१७८.
रोगिया–रोगी १८–१३६.
रोड–रोडावलेली, कृश १३–२१०.
रोप–रोपटें ६–२५६.
रोम–केस ६–२३४.
रोमबीज–केसांचें मूळ ६–२३४.
रोमशुचि–केसरहितपणा १७–२३५.
रोमांच–अतिशय आनंदामुळें अंगावर उभा राहणारा कांटा ९–५२७.
रोमांचित–अष्टसात्त्विक भावांत होणारी रोमांचयुक्त अशी अवस्था १३–९५५.
रोमावळी–केसांची पंक्ति १३–२८५.
रोवणें–रोवून स्थिर करणें ५–३४; खुपसणें १०–१७८.
रोष–राग, संताप ९–१८.
रोहिणी–मृगजळ ५–११६.
रोहिणीजळ–मृगजळ २–१२१.
रोहो–आरंभ १८–६५२; दृढता, वृद्धि १६–३७०.
रौद्र–तामसी ११–१२९.
रौरव–एका नरकाचें नांव १६–२२६.

## ल.

लंकेश्वर–लंकाधिपति रावण ११–२३.
लखलखणें–चमकणें ६–२८५.
लग–संबंधानें असणारे ६–१७७; ओघांत पडलेला १३–३१४.
लगणें–पेटणें १७–३११; लागणें, गणना होणें १८–११३; लाभ होणें, मिळणें १८–६८७; लागणें, आधारानें घडणें १८–३७५; नादी लागणें १३–५३; 'न' नें युक्त नलगे-नको ६–२७.

लिगटणें–चिकटणें ८–१२६;
लिंगदेह–वासनात्मक सतरा अथवा एकोणिस तत्वांचें बनलेलें सूक्ष्म शरीर १६–४.
लिंगभेद–पूज्यांचा उच्छेद २–३१.
लिंपणें–लिप्त होणें, माखणें ३–१८४.
लिपि–भाषा ३–२५४.
लिप्त–माखलेलें २–४९.
लिहीलीं–सनदा ४–५२.
लीन–गुप्त १६–४२.
लीला–सहज १–१६२; सहज घडणारी क्रिया, क्रीडा ९–१९२.
लुगडें–वस्त्र १८–७४०.
लुंचणें–उपटणें ३–२५४.
लुंटणें–लोटांगण घालणें ९–२२२; लोळणें १८–११४८.
लुती–कोड, कुष्ट, लूत १३–७३१.
लुब्ध–मोहित, लोलुप ३–१०३.
लुब्धक–पारधी १४–६४.
लुळ्लुळीत–लुसलुशीत १५–९९.
ले–धारण करतो १४–१७१.
लेइणें–धारण करणें, घालणें २–२३२.
लेंक–मुलगी १८–२०६; मुलगा १५–२३४.
लेख–मोजदाद, गणती ७–२५; हिशोब १३–९३७; आकार १३–९८५; वळण १८–१२८६.
लेखणें–समजणें, गणणें ३–१९५; विचार करणें ९–३८४, अनुमानणें १३–२५८.
लेखणीय–खिजगणतींतील २-३६५.
लेंडी–ओहोळ १३–६९३.
लेंडोरें–लेंडी १८–६८५.
लेणें–धारण करणें, धारणें ७–१९९; दागिना ९–३८९.
लेता–धारण करणारा ९–७७.
लेप–विटाळ, दोष २–२३६; रंग ६–२५६; चित्र १३-५३२; औषधांचा वगैरे शरीरावर लावतात तो ६–४९.
लेवविणें–अलंकार घालणें, धारण करविणें १०–५८.
लेवा–लेप १६–३९०.
लेश–बिंदु २–२४०.
लेसां–तयारीनें ७–२०९; जपून १३–२४६.
लोक–जग १०–७५; प्राणी ८–१८७; स्वर्गादिक लोक, भुवन १०–९५.
लोकपाळ–अष्टदिक्पाळ; इंद्र, अग्नि, यम, वरुण, नैर्ऋति, वायु, कुबेर, ईशान हे आठ लोकपाल आहेत १०–१०२.
लोकसंग्रह–लोकसंस्थेचें संरक्षण, समाजव्यवस्थेचें रक्षण ३–१७५.
लोकसंपादणी–लोकांकरितां बतावणी ३–१७६.
लोकाचळ–स्वर्गादि लोकरूपी पर्वतांचें शिखर ८–१५४.
लोकोत्तर-असाधारणता, अलौकिकता १७–४७.
लोचन–डोळा ११–१९५.
लोटणें–पालटणें, बदलणें २-४१; ढकलणें ५–१०३; मरणें ८–१५७; मोजून टाकणें ९–४९६; तोडून टाकणें १८–१२८; दूर करणें, नाहींसें करणें १८–५३६.
लोढणें–परिशीलन करणें १७–८५.
लोंढा–लोट १३–५६४.
लोण–उतारा, ओंवाळणी ९–३८१.
लोण करणें–ओंवाळून टाकणें १३–४४१.
लोथ–मोट, गांठोडें १०–२५९.
लोप–नाश २–१४३.
लोपणें–नाहींसें होणें, दिसेनासा होणें १४–१३२.
लोभिया–लोभी १३–२०२.
लोलुप्य–आसक्ति ७–१४१.
लोंव–लोंकर १८–८१४.
लोष्ट–मातीचें ढेंकुळ १५–१७३.
लोह–लोखंड १–७७; लोखंडाचें केलेलें शस्त्र ७–१२; तरवार १६–११८.
लोहित्व–तांबडेपणा १३–१०१७.
लोहिवा (लोहिवी)–तांबडी १५–१९४.
लोह्या–मोहरा ९–५९.
लौकिक–लोकांचा आचार १-२५७; लोकसंबंधी ५–९८; लोकासारखा ३–३८.

## व.

वक्ता–बोलणारा ९–२९.
वक्तृत्वता–व्याख्यानाची शैली १४–६३.
वक्त्र–मुख ११–१९८.
वक्र–वांकडें १३–१०६०.
वक्रतुंड–मुख एकीकडे फिरवलेला असा १७–४.
वंग–कलंक १०–३११; मळ १३–४७३.
वंचणें–फसवणें ४–३०; त्याग करणें १७–३५६.
वंचन–फसवणूक १८–१३३६.
वचणें–टाकून जाणें १–२४०; पोंचणें २–२६१; फिरणें १५–१२३; जाणें १८–८९७; दिवा जाणें १३–५८१.
वज्र–इंद्राच्या हातांतील न फुटणारें अस्त्र १–१९९.
वज्रकवच–वज्राचें केलेलें अथवा वज्रासारखें अभेद्य चिलखत २–२३२.

वज्रगांठ–पक्की, न सुटणारी गांठ १८–३९२.
वज्रमिठी–घट्ट मिठी ७–१५२.
वज्रमिठी पाडणें–कायमचे बंद करणें ७–१५२.
वज्रयोग–वज्रासन, मूलबंध ४–१४७.
वज्रांगी–चिलखत, वज्रकवच ६–४७५.
वज्राग्नि–विजेचा अग्नि ११–३७७; मूलबंधापासून उत्पन्न होणारी उष्णता १२–५०.
वज्राचेया–वज्रासारखें १–२१६.
वज्रासन–मूळबंध ८–४९.
वट–वड ९–४१०.
वडप–वृष्टी ६–४९०.
वडवानळ–समुद्राच्या पोटांतील जळत असणारा अग्नि १–९०.
वडवाळी–घांस ६–२३०.
वडील–वाडवडील १–२६४; श्रेष्ठ ३–१५८, ७–१४; थोर, मोठा १४–१६५.
वणवणें–वणव्यानें व्याप्त होणें २–७६.
वणवा–अरण्यांतील वाऱ्याच्या जोरामुळें झाडांच्या फांद्यांचें घर्षण होऊन पेटलेला अग्नि १४–१९१.
वणिज–व्यापार ६–११०; सामान्य व्यवहार ११–५४२.
वत्स–वांसरूं ७–१२०.
वत्सल–वत्साप्रमाणें प्रेम करणारा १२–२४२.
वदंती–बोलवा ९–१०५; उच्चार, उपदेश१०–१२६९;प्रवाद, वचन १४–६९.
वदन–मुख, तोंड ११–१९७.
वंद्य–नमस्कार करण्यास योग्य १–५४.
वध–नाश, संहार १–२२८.
वधणें–मारणें,नाश करणें १–२०६.
वधिता–मारणारा २–१३८.
वधू–नवरी १४–३.
वध्य–मारण्याचा विषय २–१३८.
वन–अरण्य १८–१०२२; सामासिक पदांत 'पान' या अर्थी १५–१४७, १५–१५८.
वनवासी–अरण्यांत राहणारा ३–२३५; दुःखी ११–१०४.
वनश्री–वनशोभा ३–१००.
वनिता–स्त्री १–१८७.
वनौकें–वनांत राहणारे पशुपक्षी वगैरे १८–१५३१.
वन्य–वनांतील वस्तु १८–१०६५.
वह्नि–अग्नि १–२५८.
वपु–त्वचा–२–११५;शरीर १–३.
वमणें–ओकणें ६–२४१.
वयसा–वय १–४१; तारुण्य ७–८५.
वर–या पेक्षां २–३६; श्रेष्ठ ६–१२८; तर, परंतु १६–३५२; नवरा मुलगा ११–३; तथापि २–३९.
वरकल–कसवटी १७–४०७.
वरगण–वाटणी १–१२२.
वरचिल–बाह्य ७–१९१; पाठीमागून येणारें ९–४०४.
वरणें–माळ घालणें, लग्न करणें ६–४५३; पसंत करणें ९–३१०.
वरद–वर देणारा १–१३.
वरपडा (वरिपडा)–पात्र, योग्य २–२०१; स्वाधीन २–३४९; प्राप्त ६–१६८.
वरयितु–नवरा १३–१०२४.
वरंडा–बांध १३–६९३.
वराडिक–लग्न ७–१६६.
वराडी–लग्नांकरतां जमलेली मंडळी ११–३.
वराह–डुक्कर, वराहअवतार ११–६२.
वरि–तृतीयेचा प्रत्यय १–१६६; पर्यंत ७–१३;वर (खालींच्या उलट) ११–२७५;आणखीं १–११५; एखादे वेळीं २–४१.
वरिपडणें–प्राप्त होणें, ८–२०९; उडी घालणें १४–३५८.
वरिष्ठ–श्रेष्ठ १७–९८.
वरिवरि–वरवर २–९०.
वरिष्ट–श्रेष्ट १–३०.
वरी–नें (तृतीयेचा प्रत्यय) ४–११३; शिवाय १६–२८५.
वरीता–वर, अधीक १०–५१.
वरीष–पाऊस ३–१३४.
वरैत–वरणारा १८–१०४९.
वरो–पोटगी १८–२५८.
वरौता–वर ४–२०९.
वर्ग–समुदाय १६–७८.
वर्जणें–टाकणें १०–८०.
वर्ण–जात, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण आहेत. ४–९०; रंग ६–९७;अक्षर १७–३५३.
वर्णनीय–वर्णन करण्यास योग्य ११–५७०.
वर्णवपु–वर्णरूपी शरीर १–३.
वर्णाश्रम–ब्राह्मणादि वर्ण व ब्रह्मचर्यादि आश्रम १३–४४४.
वर्तणें–घडणें, होणें १–१३७; वागणें, करीत असणें ४–९३; ऋणी असणें २–३४.
वर्तन–धंदा १७–३३९; आचरण १३–३५६.
वर्म–तत्त्व, मर्म ५–९६.
वर्मस्पर्शी–वर्माला झोंबणारे शब्द बोलणें १३–२७०.

वर्य–श्रेष्ठ १४–१.
वर्षे–पाऊस ५–११४.
वर्षणें–वर्षाव करणें १–१६६.
वर्षा–पावसाळा १५–२८५.
वर्षाकाळ–पावसाळा ६–१७४.
वऱ्हाडिक–बोलावून आणण्याचें काम करणारा ९–२३८.
वल्गणें–व्यर्थ बडबड करणें ११–४५८.
वल्लभ–अत्यंत आवडता, नवरा १२–१७१.
वल्लभा–प्रिय स्त्री १२–१५६.
वल्ली–वेल ६–१२.
वश–आधीन ७–६१.
वंशज धर्म–कुलधर्म १–२४५.
वशें–योगानें ७–६१; १४–९९.
वश्य–स्वाधीन १३–१०१२.
वसणें–राहणें १–२५५.
वसतें–वस्ती असलेलें, राहिलेलें ६–१७२.
वसु–देवताविशेष. हे आठ आहेत ते असेः–आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास १०–२२७.
वसुंधरा–पृथ्वी ११–६१.
वसुधा–पृथ्वी १२–१४५.
वसो–पोळ १३–६९७.
वसौट (वसौटा)–आश्रयस्थान १–२२८.
वस्ती–वास, रहाणें १४–३२७.
वस्तीकर–वाटसरूं १३–३४.
वस्तु–ब्रह्म, आपलें स्वरूप ६–७१; पदार्थ २–५६.
वहाणधर–जोडे उचलणारा १३–११३२.
वहाविणें–लागवड करणें १३–४९.
वहाळवोहळ–नालेओढे ९–४५८.
वहिलें–लवकर ५–३२.
वहिलेपण–वाहण्याचा वेग ७–८१.

वही–व्यवहार १३–९३८; दसर १८–९१२.
वहीवटी–वहिवाट ११–४२६.
वह्याळी–क्रीडा, खेळ १८–५४१.
वळ–मुद्रा, शिक्का १७–३२२.
वळघणें–वसणें, चढणें ६–२७०; आश्रय करणें ११–६६४; आरूढ होणें १३–११३१. वळणें १४–१९२; खटपट करणें १४–१६४.
वळणें–वनवणें ७–१८८; वांकणें ११–४८७.
वळसा–वळण ७–७२; फेरा ८–१५२; भोंवरा १३–१८६.
वळित धरणें–परत फिरणें १३–५८३.
वळी–दुमड ६–२१६.
वक्षस्थळ–छाती ९–४८०.
वाइणें (वाणें)–धारण करणें, वाहणें ११–६८२; दाखवणें १७–९४; पेरणें ६–४९२.
वाई–व्यर्थ ४–१५५.
वाउगें–मिथ्या १५–२३८; व्यर्थ ९–४३१.
वाउधाण, वाउधान, बावधण, वावधाण } वावटळ, वादळ १३–६८८.
वाउनि–घालून ८–१२४.
वाऊनि–धारण करून ११–३६५.
वाऊर–अनुचित ११–५३८; वाईट १६–४२२.
वाक्–वाणी ४–१४२.
वांकडाविचुका–वेडेंवांकडें ९–६.
वांकडी–झडीचा पाऊस १३–५६५.
वांकुडा–वाकलेला, डगमगलेला १३–३४३.
वाकुलिया–वेडावणें १७–९४.
वांकुलिया वाये–वेडावून दाखवितो १८–६५१.

वाक्पथ–संभाषण १३–११५५.
वाक्यपूजा–शब्दरूपी पूजा १५–५९८.
वाखती–छातीचा खळगा ९–४८०.
वाखाणणें–निरूपण करणें १४–२९.
वाखार (वाखारी)–वखार ७–१३५.
वाग्–बोलणें १३–६४८.
वागुर–जाळें ४–२०३.
वागेश्वरी–सरस्वती १०–८.
वागोरा–लगाम ११–२९६.
वाग्जाळ–शब्दपांडित्य १३–२०.
वाग्देवता–वाणीची देवता, सरस्वती १८–३६४.
वाग्ध्वज–वाणीरूप पताका १३–२०७.
वाग्ध्वजीं बांधणें–तोंडानें उच्चार करणें, दवंडी देणें १३–२०७.
वाग्ब्रह्म–वेद १२–११२.
वाग्भव–वाचेपासून होणारे १७–२२३.
वाङ्मय–ग्रंथरचना १३–९९२; शब्दमय १८–१६८४; वाचिक १७–२१५.
वाग्वाद अव्हाटे–वितंडवादरूपी आडवाटा १२–१४.
वाग्विलासिनी–वाणीच्या ठिकाणीं क्रीडा करणारी १–२१.
वाग्वृद्धि–व्याख्यानाचा विस्तार १८–२७.
वाग्व्यापार–वाणीचा व्यवहार, बोलणें १८–१०३०.
वाचक–वक्ता १८–१६८२.
वाचस्पति–बृहस्पति १०–८
वाचासिद्धी–बोलल्याप्रमाणें खरे होण्याची योग्यता ३–९९.
वाचाळी–बडबड १८–१७०९.

वाच्य–शब्दांतील ( बोलण्याजोगें ) ११-४४;व्याख्यानाचा विषय १८–१६८२.
वांचूनि–शिवाय ३–४४.
वांछणें–इच्छा करणें १७–२९१.
वांछा–इच्छा ३–२३.
वांछित–इच्छिलेलें १६–३३८.
वाजट ( वांजट )–व्यर्थ १३-५९.
वाजणें–आदळणें १–२४१;जोरानें वाहाणें ९–१२५; गर्जना करणें १८–१०५५; तडाखे बसणें, भोगावें लागणें १३–१०१४.
वांझ–निष्फळ, संतानरहित १२–१३५.
वांझोटी–वांझ स्त्री ६–१२१.
वांझोळ–वांझ फूल १०–३३२.
वाटणें–काढून ठेवणें ५–१४७.
वाटबंधा–वाटमाऱ्याचा १३-५४७.
वाटवधा–वाटमारा ७–१७४.
वाटवधें–वाटमाऱ्याचा धंदा १२–६१.
वाट वाहती करणें–वाट मोकळी करणें,घालवून देणें १६–५७.
वाटावो–उणीव १३–७५२.
वांटीव–पुरुषार्थ, पराक्रम १–१७२.
वांठ–चकित २–२१३.
वाड–मोठें ७–७९.
वाडपण–विस्तार १०–१७६; मोठेपणा १६–११७.
वाडी–बाग ८–१४०.
वाडेंकोडें–मोठ्या कौतुकानें १५–४४८.
वाढणें–राहाणें १८–१२१२.
वाढती–वाढ दिवस ९–५१२; वाढणारी स्त्री १३–६४३.
वाढिन्नला–वाढला ९–४३८.
वाढी–वाढ १८–५९९.
वाढी पेलणें–विस्तार होणें, वृद्धि होणें १५–१६०.

वाण–पोत, वस्त्राचें तंतू १–६; प्रकार १८–६०३; वायन १७–२८६.
वाणसी–वेश्या १३–७००.
वाणिज्य–व्यापार १८–९१३.
वाणिया–वाणी १७-४२५;तोट्याचे ७–१५१.
वाणी–उणीव, कमतरता ९–४७१; वाचा ९–१८६.
वाणीचा–उणीवेचा, कमीपणाचा ९–६३.
वाणें–प्रकार ६–१३३; वाहणें १८–१३६९.
वाणेपण–कमतरता १८–५९४.
वात–वारा २–३;कापूस ६-२४५; शरीरगत धातुविशेष ८–२२६.
वांत–ओकलेलें १८–५५६.
वात चढणें–वायु होणें ११–३५७.
वाति–दिव्याची वात,दिवा९-३०१.
वांति–उलटी १८–६२०.
वाती–दाववितात ७–१९०.
वातोर्मि–वाऱ्याची लाट १४–४५.
वाद–संज्ञा, नांव १४–७९; शाब्दिक चर्चा १०–२६९.
वादवळू–तंट्यास उत्तेजन देणें १३–२७०.
वाधावणें–वर्धावा १३–८३७.
वाधावा–वर्धावा,आधी आगमनाची सूचना १८–९०३.
वानणें–स्तुती करणें ५–१४०.
वानवसें–मानवर १७–१०२.
वानिवसें ( वानवसें )–अकस्मात् १–२५८.
वानी–कमीपणा, उणीव ३–२२; वार्ता ५–९१; प्रकार,मासला ६–९६; वर्णन करील ११-२२५; कस १२–२५; सारखे १८–१२५; १४–१५८.

वापी–विहीर, पुष्करणी १८–९९.
वाफ–संधि १३–३०;शुद्ध भूमिका १७–२३१; वाफसा १७–२६७.
वाफविणें–उत्पन्न करणें १३–३०.
वाफसा–धान्य पेरण्यास योग्य अशी पहिला पाऊस पडून जमिनींतील उष्णता बाहेर येते ती ६–४९१.
वाम–डावा ५–१५३.
वामांगी–पत्नी १७–८.
वायकांड–निष्फळ बाण ११-२०७.
वायणें–वाहणें १३–१२८.
वायबुद्धि–व्यर्थ समजूत १५-३२७.
वायस–कावळा ३–१९८.
वायां–व्यर्थ २–१४०.
वांयाचि–उगाच, व्यर्थ १–६७.
वायाणें–खोटें, आभासात्मक ४–९८; पोकळ ७–१७२.
वारणें–सांगणें ३–८; मागें आणणें ६–३६२; निवारण करणें १२–२२.
वारती–शिडी १८–४८२.
वारा–संचार १७–२५४; वायु १५–३७६.
वारिकें–वाहन ६–२७०; शिंगरूं ११–५३८.
वारी–येरझारा ६–३७७; जाणें, यात्रा १८–६८; निवारते १३–७५७.
वारु–घोडा ९–२१६.
वारूं–थांबविण्याकरितां १८–१६००.
वारेलग–वाऱ्याच्या वेगांत सांपडलेलें १३–३१४.
वार्ता–हकीगत ४–१६; दोरी १८–६५.
वार्तिक–सूत्रावरील व्याख्यान १-१२.

वार्धक्य–म्हातारपण ६–२६०.
वार्षिया–वर्षाऋतु ९–१७२.
वार्षी–वर्षाऋतु ९–१०२.
वाल–दोन गुंजा मिळून होणारें वजन १२–२५.
वालभ–प्रेम ६–१२३.
वालभेला–प्रिय असलेला १८–६४३.
वालीफ ( वालीप )–गवसणी, आच्छादन ६–२५.
वाल्हीदुल्ही–नवानवसांची, लाडकी ३–२४७; नवीन, लुसलुशीत १५–९४.
वाव–हात ७–१०१.
वावटणें–विश्रांति घेणें ११–२१९.
वावदळ–वावटळ १७–१४३.
वावरणें–प्रहार करणें २–४८. वागणें, व्यवहार करणें ७–११८.
वावें घालणें–विस्तारणें १५-१८६.
वावो–व्यर्थ ६–६९; मिथ्या १५–२२३.
वावो होणें–निष्फळ होणें, मिथ्या ठरणें १८–१६५४.
वास–वाट, मार्ग ३–१६७; वस्ति ३–१०९; सुवास १३–३२०.
वास पाहणें–( सुगावा लागेल तेथें ) वाट पहाणें १–२३.
वासिप–भय ११–३८७.
वासिपणें–भिणें ११–३५१.
वासी–राहणारा ११–१०४.
वाह–गति १८–३१८.
वाहक–हांकणारा १–१४०.
वाहटुळ ( वाहटुळी )–वावटळ ४–१७७.
वाहणधर–जोडे उचलणारा १३–११३२.
वाहणी ( वाह्यणी )–पद्धत ६–१८; प्रकार ६–८५; मार्ग १३–२५७; ओघ १४–२७९.
वाहणें–धारण करणें ४–१९५; चालणें ५–१२४; जमिनीची मशागत करणें ११–१६२; नेणें १८–१८५; प्रवृत्त होणें १८–४८९; अर्पण करणें १६–३८७; घडून येणें १८–६४६.
वाहतवणा–रानांतून चालणारा, प्रवासी ७–१२९.
वाहतें–चालू असणारें ९–२१३.
वाहर–पीडा ११–४६०; रस्ता, मार्ग १७–४२९.
वाहवट–मार्ग १८–४७६.
वाहाळ–ओढा १७–९१.
वाहिला–निराळा, वेगळा ९–५१६.
वाहिवा–शेताची वहिवाट, लागवड १३–३६.
वाहो–मशागत १०–५५; धार १५–२६४.
वाळणें–चुकवणें ९–४३७; टाकणें ११–६४२; संबंध नसणें १५–२४२; सुकणें १३–३००.
विकट–हिडीस स्वरूपाचें ११–१३९.
विकडी–अलंकारिक भाषण १०–६०.
विकणुवातें–कणही जवळ नसलेल्या शेतकऱ्याला १८–५०४.
विकरणें–विकार पावणें २–२४३.
विकरवणें–विकार उत्पन्न करण्याचा प्रयत्न करणें २–४१.
विकरा–विक्री १३–३२०.
विकल्प–संशय १३–४७६; कुकल्पना १५–३८८.
विकळ–अमेळ, संबंधशून्य ५–५७.
विकळता–शिथिलता १–१९६.
विकार–कामक्रोधादि अंतःकरणांतील वृत्ति, मनोविकार ४–१२९; परिणाम, विकृति १७–५९; (विकर) समुदाय ९–३२५.
विकारणें–आकाराला येणें ७–५२.
विकास–विस्तार १५–५४९; प्रफुल्लितपणा १८–२६७.
विकासणें–विकास पावणें १४–२९६.
विकृति–त्रास, दुःख ४–२२२; आकाळविकाळ ११–६३२; विकार १३–४७६.
विकोप–क्षोभ १५–२५३.
विक्रम–पराक्रम ११–५३३.
विक्रांत–पराक्रमी १–९९.
विक्राळ–भयंकर ११–१३९.
विख–विष ९–१४२.
विखार–साप ९–१४८.
विखीं–विषयीं १७–३२०.
विखुरणें–पसरणें ७–१७०.
विखो–विषय९–९९.
विख्यात–प्रसिद्ध १८–१३२३.
विगतविषयवत्सल–विषयवासना दवडलेल्यांचा कैवार घेणारा १८–३.
विगुंतणें–गुंतणें, मग्न असणें २–३६२.
विघड–विघाड ८–२५७.
विघडणें–भंगणें ९–१७०.
विघडविणें–शिथिल करणें ६–२१९.
विघरणें–कमी होणें १३–७५६.
विचंबणें–कष्टांत पडणें, कुचंबणें ६–४९; श्रम करणें १८–६०९.
विचंबवणें–कुचंबत ठेवणें १८–१०५१.
विचरणें–फिरणें २–३६७.
विचळणें–मोडणें १३–१६.
विचक्षण–चिकित्सक, विचारी ४–८५.

विचारणें–विचार करणें १–२४६.
विचित्रता–वैचित्र्य, भिन्नता १८–५३९.
विचुका–अडखळणारें ९–६.
विंजणा–पंखा १३–४३४.
विंजणें–वारा घालणें ९–१०.
विजन–एकांत १३–१९८.
विजावळी–वेगळीक, वेगळेपणा १८–२६९.
विजिला–वारा लागलेला १३-७२०.
विजू–वीज ११–२०४.
विटंक–घनदाट १५–६२.
विटणें–विघडणें, नासणें २–४१.
विटंब–फजीती १३–८३७.
विटवणें–कंटाळा आणणें १५–२५७.
विटावणें–वेडावणें १३–७६०.
विटाळ–दोष ११–२९२.
विटाळणें–विघडणें ९–१४२; अपवित्र होणें १८–९९४.
विडापाउड–विडा पैसा १८–४६.
विडी–वाटोळी कडी ६–२२४.
विणावणी–विणकर ९–१०७.
विणें–उत्पन्न करणें ८–८८.
वितंड–विशाळ ११–३७५; खोटा वादविवाद, मिथ्या कोटिक्रम १३–२१.
वितान–विस्तार १५–१८९.
विताळ–मोठ्या टाळूची ११–१३९.
विति–उत्पन्न होतात १८–९४.
वितुटणी–ताटातूट १६–८९.
वितुळणें–विस्कळित होणें १८–१५५७.
वितृष्ण–निरिच्छ १७–३१.
वित्त–द्रव्य १३–६८३.
वित्पत्तित्व–व्युत्पन्नत्व; विद्वत्ता १३–८४०.
विद्–ज्ञान १८–७; जाणणारा ६–१५६.

विदग्ध–करपलेलें १५–४०९; चातुर्यपूर्वक, चातुर्ययुक्त १४–२९; चतुर १०–१.
विदळ–द्विणकस धातु १३–१००८.
विदळितामंगळकुळ–अशुभांच्या समुदायांचा ज्यानें नायनाट केला आहे असा १८–२.
विंदाण–निग्रह, वेध ६–३६५; कौशल्य ७–२१; कारस्थान १०–२८४; कपट १३–२७१.
विंदाणी–कारागीर १८–४४.
विदारणें–फांकाफांक करणें १-१६२; फाडणें २–२००.
विदुदयोद्यानद्विरद–ज्ञानोदयरूपी अरण्यांतील हत्ती १८–७.
विदेह–देहरहित ९–१५६.
विद्रद–चतुर १०–१.
विद्यमान–सांप्रतचें, हल्लींचें ६–४७३.
विद्युत्–वीज ५–११३.
विद्युल्लता–वीज २–७८.
विद्वांस–विद्वान १३–८२५.
विध–प्रकार ११–३१२.
विंधणें–टोंचणें १६–१५०; नेम मारणें ११–४७८.
विधान–क्रिया ४–१५०; आज्ञा १५–१७८.
विधि–शास्त्रानें करण्यास सांगितलेला आचार, शास्त्राची आज्ञा १२–७७; शास्त्र १७–१७९; कर्म करण्याची रीत अथवा प्रयोग २–२४९.
विधिनिषेध–कर्तव्याकर्तव्य १–२४६.
विधिविवर्जित–शास्त्र मर्यादेचें बंधन नसलेला ९–१५७.
विधीविधान–वेदांनी सांगितलेलें ४–११८.

विधुळणें–विस्कळित होणें, उधळणें, नाश पावणें १७–७.
विध्वंसणें-दाणादाण करणें १–१६१.
विनट–लेळगडी १४–११४.
विनटणें–शोभणें १२–१८१.
विनति–स्तुति १४–२५.
विनतिव्याज–प्रार्थनेचें निमित्त १४–२५.
विनवणी–विनंति ३–२३०.
विनवणें–विनंति करणें १–६३.
विनवूं लाहे–विनवणी करण्याचें धैर्य करीत आहे १–६६.
विनियोगणें–खर्च करणें ३–१२५, देणें ६–२८१.
विनोद–चर्चा ४–३; करमणूक ९–३२२.
विनोदवनवाटिका-करमणूकीकरितां केलेला बाग ९–३२२.
विनोदें–कवतुकानें, सहज ५–१७६.
विन्यास–खुलासा, विस्तार १५–६६; रचना १५–५९३.
विपरीत–अन्यथा १५–५२१; उफराटें १–२१९.
विइपाले–घोडे ७–१०२.
विपायिला–एखादा ७–१०.
विपायें–कदाचित् २–२०५.
विपाव–कचितच घडून येणारा मेळ, योग १७–२८.
विफलता–फलशून्यता, व्यर्थता १८–६३३.
विफलत्व–व्यर्थता ११–२०७.
विफळणें–व्यर्थ करणें १६–३७६.
विबुध–ज्ञानी १०–३१८.
विबुधवनवसंत–ज्ञानीपुरुषरूपी वनाचा वसंत १०–३१८.
विभव–ऐश्वर्य ६–११.
विभाग–भेद १३–९५६; वांटा १८–१८३.

विभांडणें–युद्धांत जिंकणें १–२१६; झोंबणें, भेद करणें १६–१२१.
विभूति–ईश्वरांश १०–४१.
विभ्रम–गोंधळ ७–७७.
विमळ–दोषरहित, शुद्ध १–१४.
विमुख–पाठमोरे, पराङ्मुख ११–५३१.
विरक्त–वैराग्ययुक्त २–१७०; उदासीन ३–२१४.
विरक्ति–वैराग्य १५–३६.
विरणें–नाहींसा होणें ६–४६८; विरघळणें १३–४९५; लीन होणें १५–५४७.
विरंगुळा ( विरंगोळा )–हरकत १५–४६६.
विरंचि–ब्रह्मदेव ११–६२२.
विरजा ( विरिजा ) विरजे –मदत १–११७.
विरमणें–द्रवणें २–३; शांत होणें ६–२१२;नाहींसें होणें १५–४२३.
विरह–वियोग १६–७९.
विरहिणी–नवऱ्याचा वियोग झालेली स्त्री १३–३७४.
विरळा–एखादा ७–१०.
विराग–वैराग्य ९–४७०.
विरागी–वैराग्यशील १८–७८७.
विराजणें–शोभणें १२–१५३.
विराम–लय, नाश १८–१३६७.
विरु ( वीरु )–वांकडेपणा २–५३; विरुद्ध १३–६६९; प्रतिकूल १६–४६०.
विरुद्ध–अकल्याण १–२१४.
विरुळें–झिरझिरित ८–१७.
विरूढणें–अंकुर फुटणें, रुजणें २–६६.
विरूढी–वाढ, वृद्धि ६–२३४; अंकुर २–७९.
विरोधणें–विरोध करणें ९–४७२.
विऱ्हया–दुःखी ७–१८१.
विलग–उपद्रव १२–६२.
विलंब–उशीर,अवकाश १८-४८६.
विलया–व्यर्थ ११–१६२.
विलसणें–वागणें, वर्तणें २–२८९; शोभणें १८–८७७.
विलासिनी–विलासवती स्त्री ९–३२३.
विलासिया–विलास करणारा १०-१.
विवंचणें–भेद करणें ४–७०; फोड करून सांगणें १३–९१.
विवंचना–विचार ४–८४; निवड ५–१५५;विवेचन ७–१७.
विवर–अवकाश १८–१५९२;गुहा १३–५१४.
विवरणें–विचार करणें १–७०; स्पष्ट करणें १५–४६८.
विवशी ( विवसी )–हडळ २–३१२; चिळस, कंटाळा ३–२३७; भय १६–४१७.
विवस्वत–सूर्य ४- १६.
विवळ–स्पष्ट ५–१६४.
विवळणें–उगवणें, उदयास येणें ४–१२८.
विवक्षा–बोलण्याची सोय ११–२७१.
विविध–नानाप्रकारचे १–९४.
विवेक–फरक, वेगळेपणा १८–२७३; विचार ३–१७.
विवेकवंतु–( बरे वाईटाची ) निवड करण्यास समर्थ १–१४.
विवेकिया–विचारी ४–५७.
विव्हळ–यातना १७–१०१.
विशद–स्पष्ट ९–२१०; साफ ११–४८०.
विशाल–ळ–मोठें १–१९.
विशिष्ट–श्रेष्ठ १५–१९१.
विशुद्ध–अत्यंत शुद्ध १८–७.
विशेख–विशेष १८–१२१२.
विशेष–अधिक ५–६९.
विशेषणें–विशेष वर्णन करणें ३–७५.
विशेषलिंग–विशेष विभूति १०–३०१.
विशेषें–फार करून ६–४१७.
विश्रांति–मोक्ष १४–५०;१६-५९.
विश्राम–विश्रांतिस्थान १४–६७.
विश्रामणें–विसांवा घेणें १५-४२३.
विश्रामधाम–विश्रांति ( लय ) स्थान १७–३२८.
विश्रामशालिका-विश्रांतिस्थान १४–६७.
विश्व–जग १–३९.
विश्वतश्चक्षु–ज्याचे सर्वत्र डोळे आहेत असा १३–८७७.
विश्वतोमुख–सर्व बाजूंनीं ज्यास मुखें आहेत असा ११–२३३
विश्वबाहु–ज्याचे हात सर्वत्र आहेत असा १३–८७४.
विश्वबीज–विश्वाचें बीज अथवा कारण ७–४२.
विश्वमूर्धा–ज्याचीं सर्वत्र डोकीं आहेत असा १३–८७८.
विश्वमोहिनी–जगाला मोहून टाकणारी १–२१.
विश्वरचना–विश्वव्यवस्था २-९५.
विश्वांघ्रि–ज्याचे सर्वत्र पाय आहेत असा १३–८७४.
विश्वात्मक–विश्वस्वरूपी १५–५९८.
विश्वानुसार–सृष्टींतील पदार्थांप्रमाणें १६–१७३.
विश्वासला–ज्यानें विश्वास ठेविला आहे असा १६–२६०.
विश्वेदेव–देवता विशेष, हे दहा आहेत ११–३३२.
विश्वेश–विश्वाचा स्वामी १५–४०.
विश्वेशराव–विश्वाचे प्रभु १८–१८०१.

विषम–भेदभाव ५–९५;संकट ९–२४३;भिन्न ९–२४९; एक प्रकारचा ज्वर १०–११२; वांकडा ९–३४५; कठीण १८–९२३.
विषमवात–त्रिदोष ८–२११.
विषमज्ञान–भेदज्ञान १४–११२.
विषयमता–विषयासक्त १८-२४१.
विषयाचरण -विषयभोग ३–२०१.
विषयी–विषयासक्त पुरुष ५–१२५.
विषाद–दुःख २–११७;खेद १०–२४.
विषी–विषयीं १२–१३२; १८–६८७.
विषो–कारण २–१६३; प्रतिपाद्य विषय १४–३७.
विष्वक्सेन–ज्याच्या समोर दैत्यसेना वाट फुटेल तिकडे जीव घेऊन पळते तो श्रीकृष्ण १०–२४१.
विसकुसणें–कासावीस होणें, गोंधळणें ८–६७.
विसंचणें–विघडणें ८–१८१.
विसणेले–चिडून, आवेशयुक्त होऊन १–१३३
विसंवणें ( विसंभणें )–विसरणें, सोडणें २–२५९.
विसरा–विचाराला १६–३८१.
विसरोनी–चुकून २–३४५.
विसर्जणें–पुसून टाकणें, टाकणें ९–५३२; देवतादिकांचे विसर्जन करणें ९–१६३.
विसवणें–विश्रांतिस्थान १५–१०; स्थिर होणें १८–९८८.
विसवता–विश्रांति घेण्याचें १०–१९.
विसंवता ठावो–विश्रांति घेण्याचें ठिकाण १०–१९.
विसंवाद–विरोध, अमेळ, भिन्नमत



१–२०; विसंगतता४–२८; भेद १८–२९५.
विसुरा–आश्चर्य ५–१७४; विचार १७–१५२; समुदाय ६–९८.
विस्तार–फैलाव ९–६५.
विस्फुलिंग–ठिणगी २–३२९.
विस्मरण–विसर १४–२६६.
विस्मित–आश्चर्यचकित १–१५९.
विस्मो–विस्मय १–१७७; १३–६३२.
विस्मृति–विसर १५–३५४.
विहंग–पक्षी १२–१८१.
विहंगम–पक्षी ३–४३.
विहार–अग्निकुंड ४–१२८; रहाण्याचें ठिकाण ५–१३८.
विहिणें–सांगणें ३–८८.
विहित–शास्त्रानें सांगितलेला ३–४४.
विहितत्व–कर्तव्यता १८–१८९.
विहिरा–विहिर १५–२६१.
विहीन–रहित, शिवाय २–३३४.
विळ–एक दिवस ८–१५६.
विळोनि–एका दिवसांत ८–१५६.
विक्षेप–चंचलता ६–४७१.
विज्ञान–प्रपंचज्ञान ७–२; प्रपंच ८–१७; ईश्वराच्या ठिकाणीं प्रवेश करणारी निश्चयात्मक बुद्धि,ब्राह्मण कर्मांतील आठवा गुण १८–८४७.
विज्ञानात्मक–अनुभवाला येणारें ६–८८; आत्मज्ञान १८–८४८.
वीचि–लाट १४–३०५.
वीट–खेद १४–३२८.
वीण–शिवाय १३–२२.
वीतराग–विरक्त ४–६१.
वीतरागता–वैराग्य १८–१०४३.
वीर–शूर पुरुष १–१०२.

वीरविलास–वीरांना ज्यापासून विलास ( आनंद ) होतो असा १५–५८६.
वीरवृत्ति–शौर्य, वीरांचा स्वभाव १–१९७.
वीर्यविलास–पराक्रम हाच ज्याचा खेळ आहे असा११–६६३.
वृत्ति–इच्छा १–२१०; स्वभाव ९–२५२; वतन १३–३५; जीवन, चरितार्थाचें साधन १८–८२०; मनाची स्थिति १३–५२९.
वृत्तिक–वतनदार १२–९७.
वृत्तिपंथ–व्यापारमार्ग १८–३४३.
वृथा–व्यर्थ १६–२९७.
वृंद–समुदाय २–३३.
वृद्ध–श्रेष्ठ १०–९२; म्हातारा ९–१६४.
वृद्धाप्य–म्हातारपण ७–८६.
वृद्धि–वाढ १५–१२८.
वृश्चिक–विंचू १६–४०८.
वृष–बैल १४–३६२.
वेडली–इंगळी १३–१०६९.
वेख–वेष ४–१०५.
वेलासें–विरुद्ध ७–४७.
वेखें–दिसण्यांत १५–४१२.
वेग–आवेश १३–२७१; झपाटा २–१७.
वेंगडी–तिढा, पायांत पाय अडकणें १३–५७०.
वेगळवाणें–वेगळें असें ६-११४.
वेगळवेंटाळी–वेगवेगळ्या गोष्टी एकत्र किंवा गोळा करणें १६–३००.
वेगातिशय–वेगाचें आधिक्य १५–१३६.
वेगळीक–भिन्नता १३–११२३.
वेगावणें–अधिक वेग होणें १८–१५४.
वेगीं–त्वरित, लौकर २–१७.

वेगें–तत्क्षणीं १–२५६.
वेंघणें–वर चढणें, स्वार होणें १५–४९२.
वेच ( वेंच )–खर्च ३–२२९.
वेचकपणा–खर्चिकपणा १५–१२२.
वेंचणें–खर्च करणें १–२१२; नाश होणें १३–११२; उचलून घेणें, निवडणें १–५६; खर्ची पडणें १८–३१०.
वेझ ( वेझें )–छिद्र १८–८६३; वर्म १८–१३४.
वेझ देणें–भोंक पाडणें १८–८६३.
वेंटाळणें–गोळा करणें, लुबाडणें १४–२३०; कवटाळणें, व्यापणें १३–१७२; आवरणें ११–४०५ जमीन सारखी करणें १३–४५.
वेठणें–मूर्त होणें, आकाराला येणें १८–१४५९; गुंडाळणें १८–४२७.
वेडावणें–मति कुंठित होणें १–७३.
वेढणें–नेसणें २–१४४; व्यापणें ६–१०९; पांघरणें ११-२२१.
वेढा रिघणें–फिरूं लागणें १८–१३११.
वेढा–वेटोळें ६–२२७.
वेडिवा–वेडेपणा १३–१९०.
वेताळ–भूतांचा राजा १७–२९८.
वेदकु–जाणणारा १८–१२०३.
वेदत्रय–ऋग् यजुः साम हे तीन वेद ७–८४.
वेदप्रतिपाद्य–वेदांच्या प्रतिपादनाचा विषय १–१.
वेदवती–पृथ्वी ११–२२४.
वेदवादरत–वेदांतील अर्थवादांमध्यें मग्न असलेला २–२५५.
वेदविद–वेद जाणणारा ८–१०३.
वेदांत–औपनिषदिक ब्रह्मज्ञान १–११.
वेदिका ( वेदी )–ओटा (यज्ञांतील) ८–४९.
वेद्य–जाणण्यास योग्य ६–४७९.
वेध–चित्ताकर्षकपणा ६-१५; ध्यास, छंद १३–४१०.
वेधणें–व्यापणें ९–१४१.
वेरी–पर्यंत १–१५५.
वेन्ही–पर्यंत ६–२८६.
वेलरी–वेलींचें जाळें १६–३६७.
वेलांडी–विस्तार १५–२८१.
वेल्हावणी–विस्तार १८–८२७.
वेल्हावणें–प्रशस्तपणें भोगणें १२–६४.
वेल्हाळ–प्रिय १०–२३१; विस्तृत १३–३११; सुंदर १३–११५६.
वेल्हाळपणा–विस्तार १५–१९०.
वेव्हारा–सावकार १४–१६.
वेष–रूप ९–२९६.
वेसजें (वेषजें)–प्रकाश ६–११०; १८–१७४५.
वेळा–मर्यादा १६–३१३.
वेळाउळ–मंदीर १३–३११; घर १३-९९४.
वैकल्य–व्याकुळता ८–१३२.
वैकुंठ–विष्णूचा लोक ९–३८९; श्रीकृष्ण ११–१८१.
वैकुंठनाथ – } वैकुंठस्थानचा
वैकुंठपीठनायक– } मुख्य, श्रीकृष्ण १–२७४; १०–१८.
वैखरी–चार वाणींतील स्वपरवेद्य वाणी ६–३१२.
वैजयंती–श्रीविष्णूच्या गळ्यांतील माळ; ( हींत पांच तत्वांची दर्शक पांच रत्नें असतात तीं, १ हिरा-आकाश, २ माणिक-अग्नि, ३ पुष्कराज–वायु; ४ मोतीं–जल, ५ नीळ–पृथ्वी ) ११–६०३.
वैधव्य–विधवेची अवस्था १६–१७७.
वैभव–ऐश्वर्य १८–२४८.
वैरण–वस्त्र विणतांना घातलेला आडवा दोरा १८–३६०.
वैराग्य–विषयांचा मनापासून कंटाळा ५–१५१.
वैरी–शत्रु १६–८५.
वैश्य–चार वर्णांतील तिसरावर्ण, वाणी ९–४६०.
वैश्वानर–जठराग्नि १५–४३९.
वैषम्य–वांकडेपणा १२–१९७; दुःख १३–८०६.
वैष्णव–विष्णुसंबंधीं १८–४९.
वोइरणें–ठेवणें, पुढें करणें १८–५४०.
वोखटें–वाईट १–२०९; १६–१९५.
वोखती–चिंता १३–८०६.
वोखद–औषध १८–९९८; विरुद्ध १७–६२.
वोगर–पक्वान्नाची वाढ, वाढलेलें अन्न ४–१०७.
वोगरणें–वाढणें ६–२२.
वोघ–ओघ २–३५८.
वोघें–सहज १४–१८८.
वोज–रीत, व्यवस्था, मार्ग ६–१८३; शुद्धता, तेज ११–६००; योग्यता १५–३६.
वोजावणें–सजवणें, तेज आणणें १३–११५६.
वोटंगणें–अवलंबून राहाणें ३–११; आश्रय करणें १२–७५.
वोडण–ढाल ९–४९१; आडपडदा ११–३४९.
वोडंबरी–गारुडी विद्या ९–१७३.
वोडव–योग्यता ६–३३९; आदर-सत्कार १३–६३६.
वोढवणें ( वोडवणें )–प्राप्त होणें १–१३६; पुढें करणें ९-१५.

वोढावारा—घरबंध १३–६९२.
वोढाळ—ओढाळ अथवा उनाड गुरूं ११–५४०.
वोढाळणें—वोढाळपणा करणें १३–७२९.
वोढियाणा—योगशास्त्रांत सांगितलेला शिश्नाचे वरचे भागास व बेंबीच्या खालच्या भागांस पडणारा बंध ६–२१०.
वोढी—त्रास १८–९४२; टंचाई १७–२६८; ओढ १७–७७; तडतातड, आपण होऊन, सहज १७–३४७.
वोत—पुराचें पाणी नदीच्या पात्रांत न मावून बाहेर पसरून होणारा ओघ १५–३३७; कडा १८–१५५५.
वोतणें—घडणें ५–१७२.
वोतपली—कोवळें ऊन ७–१३१.
वोतीव—मूर्ती ६–३२७; पुतळा १६–१८०.
वोथंबा—वोळंबा १३–५३६; आश्रय देण्याचा खांब १३–१०२१.
वोथिजणें—पातळ करणें ९–२१.
वोपणें—वाढणें, देणें ६–३५३; विकणें ९–३३५; अर्पण करणें १३–३७३.
वोपसरा ( वोपसिरा )—संबंध १५–७६.
वोभाण—पूर, वेग ७–७३.
वोमथणें—लोंबणें १३–५६०.
वोरप—ओरखडा १७–२३१.
वोरपणें—ओरपणें ६–२३४; ओढणें १६–३६७.
वोरबारा—व्यवहार, खटपट ८–३५.
वोरस—पान्हा १४–६२; प्रेम १८–१३२८.
वोल—तारण, जामीन १३–३३०, १३–१०९१; ओलावा ९–४७८.
वोलट—ओल्सर १८–९९९.
वोलावा—आश्रय १–२३२.
वोलांश—ओलेपणाचा अंश १८–४४६.
वोलिंवठा—वाहती वाट ८–१४४.
वोली—प्रेमयुक्त १८–६७१; चूल १३–५६५.
वोल्हांटणें—हांकलणें ११–५४०.
वोल्हावणें—शांत होणें ११–२९०.
वोल्हावा—आधार ९–२८६.
वोवरां—खोलींत ६–६१.
वोवरी—खोली १०–२१.
वोवसा—व्रत १३–८१६.
वोवसी ( वोवसिया )—वोवसा घेतलेला १७–२८६.
वोवांडणें—उडण्याचा प्रयत्न करणें १८-४८४; उपेक्षा करणें १३-२६५; फिरून परत येणें, खालीं येणें १–२५३; पार पडणें १३–१६४.
वोंविळा—ओंवळा १०–२०२.
वोवी—ओवी १०–१९.
वोस—रिकामा, गंधरहित ९–४१३; वस्ती नसलेलें, ओसाड ९–४३३.
वोसंडणें—टाकणें १–२४०; भरून सांडणें १५–५८८.
वोसणणें—वरळणें ८–६.
वोसणता—बरळणारा १५–३९४.
वोसंतणें—आचरण करणें १६–९२; चालणें, आक्रमण करणें १७-४२९.
वोसरणें—वितळून जाणें, कमी होणें ९–२०५; नाहींसें होणें ४–१५०.
वोसरा—कमताई, न्यूनता १५–१६३.
वोसाण—पूराड ७-७३.
वोसावणें—न्यून असणें १५–३०२.
वोसाळ—वांझ, शून्य १८–५७८.
वोसें—न्यूनता १४–२९१.
वोहू—कास १८–७८५.
वोहट—उतार, कमीपणा ११–१५४.
वोहटणें—संकोचित होणें ६–२००, कमी होणें १४–२१३.
वोहटा वाहिला—माघार घेतली ११–६८२.
वोहर—नवरानवरी, वधुवर १३–८३७.
वोहळ—ओढा ९–४५८.
वोहळणें—पाणी वाहून जाणें ११–२४७.
वोळख—परिचय, ज्ञान १७–३५६.
वोळखण—ओळखण्याची खूण १३–८९.
वोळखी—लक्षण १३–२०१; परिचय १३–३३८.
वोळग—सेवा १३–४२४.
वोळगणा—सेवा करणारा १३–३.
वोळगणें—सेवा करणें ३–१००.
वोळगी—चाकरी, सेवा १३–४३०.
वोळघणें—चढणें १८–११६७.
वोळणें—वळणें २–७७; भागणें, तुस होणें १८–५५९.
वोळंबा—वाळवी ८–८९.
व्यंकटी—कुटिलपणा १८–१७९४.
व्यक्त—साकार १३–३०७; १८–११९४; उघड, स्पष्ट १६–१३६.
व्यक्ति—आकार २–१५०; स्पष्टता १०–१७६; प्राणी १०–१०७.
व्यंजक—व्यक्त करून दाखविणारें १७–४०२.
व्यथा—पीडा १२–१८१; दुःख १६–१५९.
व्यभिचरणें—विरुद्ध जाणें, अनुकूल नसणें २–६३; बदलणें १७–६२; भ्रष्ट होणें ३–१३३.

व्यभिचार–कृतघ्नपणा २–३८; परपुरुषगमन १–२४९; वेगळेपणा, फरक ४–७८.
व्यय–नाश १५–१२२.
व्यवधान–आडपडदा १३–६२१.
व्यवसाय–उद्योग, व्यापार १३–५५६; काम, खटाटोप ९–१९७.
व्यवस्थणें–ठरवणें ११–१५९.
व्यवस्था–मत ११–६३१; गणती, मोजदाद १०–३०१; प्रकार, रचना १३–८८०.
व्यवस्थित–नेमकें १७–७२७; योग्य ६–३४२.
व्यवहार–भांडवल १३–७२८; व्यापार ७–२६; संज्ञा १६–१३१.
व्यष्टणें–व्यापणें १०–१०७.
व्यसन–चट, छंद १३–४४३; अडचण ३–४७.
व्याकुळ–विव्हळ, दीन १–१३६.
व्याघ्र–वाघ ८–१४६.
व्याज–निमित्त १–८६.
व्याध–पारधी १३–७३९.
व्याधि–रोग ६–२२०.
व्यान–सर्व शरीरस्थ वायु १८–२३८.
व्यापार–कर्म ३–८८.
व्यापारणें–क्रिया करणें ३–६२.
व्याप्ति–व्यापकता, विस्तार २–११४; पालन स्थिति १३–९२३.
व्यामोह–भ्रांति २–११०.
व्यामोहता–भ्रम, भ्रांति १५–१०२.
व्यास–महाभारताचे कर्ते ऋषि यांचें नांव १–९.
व्याळ–साप १–२५६.
व्युत्पत्ति–शास्त्रीयज्ञान, शास्त्राध्ययनाचा फुंज १–३७८; विद्वत्ता १३–७२३.
व्युत्पन्नत्व–विद्वत्ता १३–८४०.
व्यूह–सैन्याची एक प्रकारची रचना १–९१.
व्योम–आकाश ५–१५३.
व्योमकुसुम–आकाशाचें फूल १५–२३५.
व्योमगामी–आकाशाकडे जाणारे ५–१५३.
व्रजांगना–गोकुळांतील गोपी ९–४६५.

## श.

शंका–कल्पना, सूक्ष्मसंस्कार २–३२०; कल्पना, संशय ९–७३; आठवण ९–४०१.
शक्ति–कुंडलिनी ६–२२७; सामर्थ्य १७–३३५; पार्वती १८–१७८१.
शंख–एक प्रकारचें वाद्य १–१३२.
शत–शंभर १८–१६६१.
शतकूट–शेंकडों तुकडे १–१४७.
शतजर्जर–शेंकडों ठिकाणीं खिळखिळी झालेली ९–४९०.
शतधा–शेंकडों प्रकारांनीं ११–१०१.
शतमख–शंभर यज्ञ करणारा ६–४४१; शंभर यज्ञ ८–२६५.
शतमखोत्तीर्ण–शंभर यज्ञ पूर्ण झाल्यामुळें ज्याला इंद्रपद प्राप्त झालें आहे असा इंद्र १०–२४०.
शतवृद्ध–शतायु, शंभर वर्षांचा १३–५८४.
शफर–एक प्रकारची माशाची जात १८–१७१८.
शब्द–आवाज १–१४७; पांच विषयांपैकीं एक १५–१००.
शब्दब्रह्म–वेद १–३३.
शब्दश्री–शब्दाची शोभा १–३४.
शंभु–शंकर ९–३८०.
शम–मनोनिग्रह १८–८३४.
शमदमदनमदभेद–शमदमेंकरून कामाच्या भराचा नाश करणारा १८–७.
शर–बाण २–४८.
शरण–आश्रय, आधार ९–४८९.
शरणागत–शरण आलेला ९–२८८.
शरण्य–शरण येण्यास योग्य ९–२८८.
शरद–शरदृतु १५–२६३.
शराव–परळ १३–८७२.
शरीरपर–देहासक्त ३–१८८.
शरीरभाव–शरीराचे विकार, शरीरधर्म २–३०९.
शरीरांतर–अन्य शरीर २–११०.
शरीरी–देहधारी ५–९१.
शल्य–सलणारा कांटा, बाणाग्र १३–५५३.
शव–प्रेत २–२००.
शशविषाण–सशाचें शिंग १५–२१५.
शशांक–चंद्र १६–११५.
शशि–चंद्र ७–३३.
शशी–चंद्र, (येथें) इडा या नाडींतून वहाणारा वारा ६–२२५.
शस्त्र–हातांत धरून मारण्याचें हत्यार १–९६.
शाक–भाजी ६–२८२.
शाखा–फांदी १५–५०.
शाखी–वृक्ष १८–८६८.
शाटी–छाटी १०–३६.
शाड्वळ–हिरवा १५–५६.
शांत–नवरसांपैकीं एक रस १०–४२; दैवी संपत्तीतील एक गुण १६ १४०.
शांति–ब्रह्म ४–१८९; शांत रस ४–२१८.
शाब्द–वाचिक १७–२००.
शाब्दी–म्हणणें १५–२३०.
शांभव–शंकरापासून परंपरेनें प्राप्त झालेलें १८–१७५६.

शारदा-सरस्वती १-२१.
शारदी-शरत्काल १-५६.
शारीर-शरीरासंबंधीं १७-२१५.
शार्ङ्ग-विष्णूचें धनुष्य ११-५४६.
शार्ङ्गधर-श्रीकृष्ण २-५.
शार्ङ्गपाणी-श्रीकृष्ण ११-५४६.
शार्ङ्गी-श्रीकृष्ण ११-७०४.
शार्दुल-सिंह १०-२४८.
शालक-मेहुणा १-२२३
शासन-नियमन करणारा १३-१०२३; भर १५-१४७; आचरणाची पद्धत शिकविणारा १७-३३९.
शिखराथिला-पर्वत १०-२२७.
शिखा-शेंडी १-२५६; ज्योत १४-५५.
शिणणें-श्रम करणें ३-२०७.
शिनसाळ-जुनी साल १३-५६०.
शिबिर-छावणी १७-२९४.
शियारी-शहारे ११-३६९.
शिरयाणी (शिराणी)-महत्त्व ६-१४२.
शिरयाळें-डोकें १४-१८५.
शिराणी-आवड १८-१६५२.
शिल्प-कलाकौशल्याचें काम १३-८२९.
शिव-मर्यादा, हद्द १८-४७०; शंकर ६-१७९.
शिवणी-सांधा ६-२६६.
शिवतणें-स्पर्श करणें ११-२४८.
शिष्ट-सभ्य १६-१४४.
शिष्टाई-तडजोड ११-५४२.
शिष्टागमविधान-शिष्टाचार व वेदोक्त आचरण१५-१८९.
शिसार-अर्धशिशी १८-१७९.
शिळा-दगड १८-१३८; आदल्या दिवशींचा जुना १०-२०२.
शिळाराशी-पर्वत १६-३७९.
शिक्षापिणें-शिकविणें १-९५.
शीग-मापाचें शीग, टोंक ८-१६६.
शीत-थंड २-११९. थंडी १४-१९७.
शीतळ-थंड ५-११७.
शीतांशु-चंद्र १८-४९६.
शीर्ष-मस्तक ११-२६९.
शीस-मस्तक ९-५००.
शीळ-वागणूक १३-२११.
शुक-पोपट ६-७६; व्यासपुत्र ११-१७३.
शुक्ति-शिंप १३-११३८.
शुक्तिका-शिंपी ९-६१.
शुक्तिपल्लव-शिंपेचीं दोन शकलें ६-२६६.
शुक्र-वीर्य १३-१०६.
शुक्लपक्ष-पहिला पंधरवडा ८-२२३.
शुचा-चिंता, काळजी १८-६८७.
शुचि-पवित्र १२-१७५.
शुचित्व-पवित्रता १२-१०४.
शुंडादंड-लांब सोंड १-१४.
शुद्धि-खबर ५-७९; वियोग १२-७०; शुद्धता १८-६३६
शुभाशुभ-बरें वाईट, पापपुण्यात्मक ३-१७८.
शुभ्र-पांढरा १-१५.
शुश्रूषण-सेवा १८-८८३.
शुष्क-वाळलेलें ३-६१.
शून्य-निराकार ब्रह्म १२-५८; ओसाड ४-१९४; आकाश १५-५४७; निर्धन १३-९२४; पूज्य, कांहीं नाहीं १३-८८७.
शून्यलिंग-निराकार परमात्म्याचें चिन्ह ६-२७३.
शूलपाणी-शंकर ९-३७२.
शृंग-शिखर १७-२४२.
शृंगार-नवरसांपैकीं एक रस १०-४२; शोभा १०-५८; भूषण १७-३२.
शृंगारणें-शोभा आणणें, सुशोभित करणें १८-११२.
शृंगारपण-शोभा १७-२३०.
शृंगारी-विलासी ६-१७०.
शेखीं-शेवटीं ३-२०८.
शेज भरणें-सांगड घालणें ४-५३.
शेजार (सेजार)-शय्यागृह ९-३९०.
शेजिया-जवळच्या ९-५२३.
शेल-शेलके अपशब्द १३-४९६.
शेष-(ख)-बाकी, शिल्लक १८-१२११; विष्णूचें शयनस्थान १३-३९२.
शेषींचें-शेवटचें ११-४५.
शैल-पर्वत ११-२४७.
शोचणें-शोक करणें २-१७८.
शोच्य-शोकग्रस्त १३-३६९.
शोच्यता-खेद, शोक २-२१.
शोणित-रक्त १३-१०६.
शोधक-शुद्ध करणारें १८-१३८.
शोधणें-शोध करणें ६-२३२; शुद्ध करणें ८-४९; भेद करणें १६-१४१; नीट पहाणें ८-२४५.
शोधारणें-शुद्ध करणें १८-१०१८.
शोषणें-आटून जाणें ९-२९६.
श्यातुक-शंभर भार १२-२५.
श्यामळ-काळेसांवळें ११-१३५.
श्यामिका-निळिमा १५-२४२.
श्रद्धा-आस्तिक्य बुद्धि ७-१४५.
श्रवण-कान १-१६.
श्रांत-श्रमलेला ४-३३.
श्राव्यत्व-ऐकण्याची चव १६-११८.
श्रियेचें राउळ-लक्ष्मीचें निवासस्थान, कमळ १६-२००.
श्री-लक्ष्मीची एक दासी ९-३७३, लक्ष्मी ११-१६५.
श्रीकांत-लक्ष्मीचा नवरा १७-३४१.
श्रीनाथ-लक्ष्मीचा पति विष्णु १६-३५७.

श्रीनिवास–श्रीकृष्ण १६–१३०.
श्रीपति–श्रीकृष्ण ११–१८२.
श्रीमंत–ऐश्वर्यवान् १०–२८७.
श्रीमहालया–श्रीमोहनीराज १८–१८०३.
श्रीमाठ–अहंकार, अभिमान १४–३२८.
श्रीमुख–भगवंताचें मुख ११–२७७.
श्रीरंग–श्रीकृष्ण १–५०.
श्रीराज–लक्ष्मीचा पति १८–१४७०
श्रुत–ऐकलेलें ११–५८८.
श्रुताधीत–शास्त्र ऐकलेला व पढलेला ९–४४९.
श्रुति–वेद ९–३१०.
श्रेणी–पंगत १६–३७४.
श्रेय–पुण्य ११–५४.
श्रोणवी–युद्धभूमि १४–३३८.
श्रोता–ऐकणारा ९–२९.
श्रोत्र–श्रवणेंद्रिय, कान २–३०४.
श्रोत्री–वेदसंपन्न ६–४१९.
श्रौतसमो–श्रुतीचा संकेत १४–२६०.
श्रौतादिक–श्रुति–स्मृति–पुराणोक्त १६–४०३.
श्लाघणें–स्तुति करणें ६–१४२; आनंद मानणें ९–४३१; धन्य मानणें ११–६२३.
श्लाघ्य–प्रशंसनीय ११–२०३.
श्लाघ्यता–मोठेपणा १८–१६७.
श्लेष–द्व्यर्थी उपमा १६–२८.
श्लेष्मा–कफ ८–२१३.
श्वः–उद्यां १५–२११.
श्वपच–चांडाळ ५–९३.
श्वसणें–श्वास घेणें ११–२९९.
श्वान–कुत्रें ५–१४.
श्वापद–पशु ६–१७६.
श्वेत–पांढरें, स्वच्छ ११–१३६.

## ष.

षट्–सहा ६–४७४.
षट्कर्में–यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह हीं (ब्राह्मणाचीं) सहा कर्में आहेत ६–४७४.
षट्पद–भ्रमर ६–१७६.
षड्गुण–यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य हे भगवंताचे सहा गुण १४–३२२.
षड्गुणाधिकरण–ऐश्वर्यादि सहा गुणांचें आश्रयस्थान २–२५०.
षड्दर्शनें–पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, मीमांसा, वेदांत हीं सहा शास्त्रें १–१०.
षड्रस–सहा रस (मधुर, अम्ल लवण, कटु, कषाय, तिक्त), ९–४३९.
षष्ठ–सहावा १०–२६.
षोडश–सोळावा १८–१४५२.

## स.

सकणव–करुणावान्, सदय १८–१२३७.
सकणवपणा–कृपाळूपणा १६–१५५.
सकणें–समर्थ असणें ४–८७.
सकरुण–दयावान, सदय १७–२०८.
सकर्दम–चिखलानें भरलेला १–२३१.
सकलमतिप्रकाश–सर्वांच्या बुद्धीला प्रकाश देणारा १–२.
सकलवी–एकत्र, सरसकट १८–७१८.
संकल्प–मानसिक कर्मप्रवृत्ति ४–१०४.
संकल्पौनि–संकल्पापासून ५–३६.
सकळ–पूर्ण १८–३; सर्व १–२६; भागसहित १३–११०७.
सकळकामपूर्णता–सर्व इच्छांची पूर्णता २–१८८.
सकळात्मक–सर्वरूप; सर्वव्यापी २–१५१.
सकळिक–सर्व १२–२०४.
सकळे–कालवाकालव १३–३२२.
सकाम–इच्छायुक्त ६–४५५; विषयी पुरुष ७–९६.
सकारण–कारणासहित १८–१२६५.
सकाळें–अतिशय काळें ११–१३४.
सकृप–कृपाळू ४–२१०.
सके–शकतो १–२४०.
संकेत–खूण ११–४९९.
संकोच–आकुंचन १५–५५३.
संकोचणें–लहान होणें १६–२०५.
सकोमळ–लुसलुशीत, कोमळ ६–१८३.
सकौतुका–कौतुकानें १–७.
सक्लेश–दुःखानें भरलेलें १८–६१०.
सखा–बरोबरीचा स्नेही ११–५७४.
सखेद–खेदयुक्त, दुःखानें १–१९२.
सखोल–गंभीर १–६३.
सख्य–आठवी भक्ति ६–१२७; मैत्री ११–६३६.
संख्या–गणना, मोजदाद ७–१६३.
संग–आसक्ति, प्रीति ४–१६२; संबंध, संगति ३–६३.
सगडी–शेगडी ८–१४०.
संगत–अनुरोध, प्रसंग १–५४.
संगती–संसर्ग १–२५९; पूर्वापार संबंध ५–६६.
संगदोष–संसर्गदोष १–२५७.
संगम–ऐक्य, संयोग ६–४८०.
सगुण–सकल १–२७०.
संगे–सांगतो ४–८.
संगोपणें–पालन करणें, पोसणें १३–८.

संगोपन–ओपासना १३–७८६.
संग्रह–कल्याण ३–१७५.
संग्राम–युद्ध १–१७३.
संघ–समुदाय १८–८७.
संघट–समुदाय ११–३९४.
संघाट–समुदाय ७–७४.
संघात–समुदाय १३–५११.
संचक–पैसा सांठवणारा, चिकू ११–४१२.
संचणें–सर्वत्र भरणें, एकत्र गोळा होणें ६–८४.
सचंद्र–चंद्रासह १५–३१४.
संचय–सांठा, संग्रह १८–५१२.
संचरणें–शिरणें १–२५०; प्रवेश करणें, वसणें ६–१९३.
संचरवणें–घालणें २–२५१.
संचलें–बनलेलें ५–५३; जोडलेलें ११–४७९.
सचाड ( फळाची )–इच्छा करणारा १३–५२४.
संचार–भूतबाधा १–१९०; प्रवेश ३–८१.
संचु–आकार, बांधा ६–१९८.
सचेतन–हालचालयुक्त १३–१२९; चित्त १३–५०६.
सचैल–कपडे वगैरेसह ( स्नान ) १३–७०३.
सच्छास्त्रिक–निर्दोषपणानें शास्त्रीय १–३४.
सजणें–तयार करणें १२–९०; शोभणें १५–१३.
सजनपण–मित्रत्वाचें नातें ११–५४७.
सजल–पाण्यानें युक्त २–७७; ८–२२९.
संजात–उत्पन्न केलेला १८-१७६९.
संजीवनी–मृतास उठविणारा वेल १३–८३६.
संजोडा–( घोडे ) जोडलेला ११–३९७.
सज्ज–तयार १३–१११७.
सटवी–सटवाई, प्रसूतीच्या पांचव्या दिवशीं पूजतात ती दुर्गादेवी १८–८३७.
सडका–( पदराच्या ) दशा १–९.
संडणें–टाकणें २–९२.
सडा–एकटा १२–९१.
सडी–मोकळी १८–१७३९.
सडी आयती–संगरहितपणा ७–१३०.
संडी पडणें–हार खाणें १८–६५.
सणाणा–तीक्ष्ण ७–१७२.
सत् ( संत )–सत्कर्म १७–३९०; ब्रह्मवाचक शब्द १७–३७७.
संत–सदाचरणी ११–१२७; स्थिर १५–१३३; शाश्वत ११–५१३.
सतत–नित्य ८–१३९.
सदतिसावें–गीतेंत तेराव्या अध्यायांत दिलेल्या छत्तिस तत्त्वांपलीकडील ब्रह्म १४–२२४.
संतती–परंपरा १६–३३८; प्रजा १५–८०.
संतप्त–ऊष्ण १४–१९६.
सतरावी ( सत्रावी )–व्योम चक्रांतील चंद्रामृतरूपी जीवनकला १२–७.
संतान–मूल, मुलें १५–२२०.
संताप–यातना १–१९७; उष्णता ५–९२.
सतासत–अविनाशी व विनाशी ९–२९९
संतासंत–सांग आणि असांग २–२७२; बरें वाईट १३–९७५.
सती–पतिव्रता १६–४०२; मृतपती बरोबर सहगमन करणारी स्त्री १३–४८६.
संतुष्टी–तृप्ती ( आत्मतृप्ती ) ३-४९.
सत्कार–सत् हा शब्द १७–३४२.
सत्कारवाद–कार्याच्या अभिव्यक्ति पूर्वी म्हणजे कार्य प्रगट होण्याच्या पूर्वी त्याचें कारणांत अस्तित्व मानणारें निरीश्वर सांख्यांचें मत १–१३.
सत्क्रिया–सदाचार २–२६६.
सत्ता–सद्त्व १३–९६४; सामान्य चैतन्य १४–८१; अस्तित्व १३–१३४; मालकी १३–६५.
सत्ताप्रकाश–सद्त्व व चिद्त्व १५–५५२.
सत्यधूत–सत्यानें पवित्र झालेलें ६–४४५.
सत्यलोक–ब्रह्मलोक ७–८०.
सत्यलोकनायक–ब्रह्मदेव ३–९३.
सत्यसेतु–ज्याच्याकडे जाण्यास सत्य हाच पूल आहे १२–२४३.
सत्र–अन्नछत्र १३–७००.
सत्राण–घोर, भयंकर जोरानें १५–१८३.
सत्त्व–सत्त्वगुण १०–२८७; सारभूत ७–३५; अंतःकरण १६–७४; सार, कस ६–२३३; सामर्थ्य १७–३९२.
सत्त्वाधिला–सत्त्वगुणसंपन्न १०–२८७.
सत्त्वानिळ–सत्त्वगुणरूप वारा १५–१९२.
सत्त्वशुद्धि–सत्त्वगुणाचें निर्मलत्व १४–२२२; अंतःकरणशुद्धि १६–७४.
सत्शास्त्रिक–निर्दोषपणें शास्त्रीय १–३४.
सदट–दाट ८–२२९; बळकट १६–४०४.
सदन–घर ९–४७४.
सदन्न–चांगलें पक्व अन्न १७-१५८.

सदभ्यास–चांगला अभ्यास ८–८२.
सदयता–दयाळुपणा १–२०५.
सदाफळती–नित्यफळ देणारीं ६–१७३.
सदामद–सदा मदोन्मत्त ११-१२७.
संदेह–संशय १६–११८.
सदैव–भाग्यवान् ५–१०.
सदोष ( सदोख )–दोषयुक्त १७–३१०.
सद्गद–सद्गदित, कंठ दाटून ११–५६८.
सद्भाव–अस्तित्व ६–६९; श्रद्धा ११–६३७; चांगल्या मनोवृत्ती १३–४७५; खरोखरीचा अनुभव ११–५३६.
सद्य–त्वरित ३–४३.
सद्वैद्य–चांगला वैद्य १६–४२.
सधर–बलवान् , धैर्यासह १–७५; श्रेष्ठ २–४६; गंभीर, भक्कम २–२७६.
संधी–मधील जागा १३–८८; पेंच, अडचण २–३१४; शरीरांतील सांधा ६–२३२; वेळ १४–७८.
सधीर–गंभीर २–३.
संध्याराग–संध्याकाळचा आकाशांतील रंग ६–२५४.
सनकादिक–ब्रह्मदेवाचे चार मानस पुत्र; हे निवृत्तिमार्गांतील प्रमुख संत आहेत १–५५.
सनागर–अतिशय चांगलें ५–१४१.
सनाथ–मोठा, ज्याला आश्रय आहे असा, समर्थ १६–४७३.
सनोळख–ओळखीचें १३–३५७.
सन्निधान–संगति, सामिप्य १८–८०६.
सान्निधी–जवळीक १८–२५.
सन्निपात–वात, कफ, पित्त या तिन्ही दोषांचा एकदम प्रकोप होऊन येणारा ज्वर ९–८३.
सन्मुख–समोर ११–५३१; १–१७५.
सन्मुखपण–समोरपणा ११–३३९.
सन्यसिणें–टाकणें १३–२७१.
सन्यायी–न्यायी, न्यायानें वागणारा १६–२९६.
संन्यास–त्याग १८–१२६०.
संन्यासणें–अर्पण करणें १२–७८.
संपता–शेवटीं १८–६०.
संपत्तिजात–नातलग वगैरे १३–८०२.
संपदा–संपत्ति १६–२५६.
संपन्न–श्रीमंत १६–३०१; मिळविलेलें १६–८५.
संपर्क–संसर्ग १–५२.
सपल्लव–पानांचे झुबके असलेले १५–१५७.
सपाई ( सपाईं )–सर्वथैव १३–१०९७.
सपाखर–कृपाळु ९–२०५.
सपाट–स्थिर २–१०७.
सपातळ–पातळ, झिरझिरित ६–११४.
संपुट–शिंपल्यांचा जोड ६–२६६; पुडा, जोड ११–३३६.
सपूर–बारीक १–६.
सपोष–पुष्ट १३–४४२.
सप्तऋषि–कश्यप, अत्रि, भारद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि वसिष्ठ हे सात ऋषि होत १०–९२.
सप्तदश–सतरावा १८–५०.
सप्तधातु–अस्थि, नाडी, मज्जा, मांस, त्वचा, रक्त, नख आणि केश इ. सात धातु ६–२३५.
सप्तम–सातवा १०–२९.
सप्तशती–सातशें श्लोकांचा ग्रंथ, चंडीपाठ १८–१६६६.
संप्रदाय–परंपरागत मार्ग १३–४४४.
सप्रभव–सामर्थ्यासह १८-१७५६.
सफळ–यशस्वी १०–१६८.
सफोल–व्यर्थ, निष्फळ १६–३१३.
संबंधी–नातेवाईक १३–१९३.
सबळ–समर्थ ११–४९५; अन्नसामुग्री १८–५९१; पहार, भाला १३–६६२.
सबाध–दोषयुक्त १८–६९८.
सबाह्य–आंत बाहेर ७–१३३.
सबाह्याभ्यंतरीं–आंत बाहेर ७–३०.
सबुडबुडी–सगळा १३–७३०.
संबोखणें–बोळवणें, हांक मारणें १४–३१९.
सबोंब–सुशोभित १५–१८७.
संभव–उत्पत्ति १३–९६७.
संभवणें–उत्पन्न होणें १३–४७२; शक्य होणें ३–७७.
संभवी–उत्पन्न करणारी १६–६७.
सभा–चौकशी करणारी सभा, पंच ७–१४; सभागृह, मंदीर; १८–१६६५.
संभार–समुदाय ११–६८८; साहित्य १७–१७९.
संभावना–योग्यता ११–९३; प्रतिष्ठा १३–६५६.
संभावित–प्रतिष्ठित १६–१७८.
सभासद–सभामंडळ ११–५४४.
संभूति–उत्पत्ति ८–१६२.
संभोग–उपभोग ४–१८८.
सभ्रम–वेडा ९–३६३.
संभ्रम–गोंधळ १–१५९; उत्सुकता १–१६७; मोह १–२७१; समारंभ ८–५१; भ्रांतिकारक ८–२४२; आदरातिथ्य १३–१८१, पसारा १८–९९, हट्ट, प्रयत्न ४–१४७; घोटाळा ४–७०.

सभ्य–सज्जन प्रेक्षक १४–३४३.
सम–सारखें ११–५३२; ऐक्यता १८–१२१७; शांत १८–१०९४; साम्य ४–१२१.
समता-समबुद्धि १०–८५.
समतादृष्टि–अभेद बुद्धि ५–८८.
समग्र–संपूर्ण ७–२.
समत्व–समता २–२७३.
समयोग–चांगला जुळून आलेला योग ८–२२१.
समर–युद्ध १–२६८.
समरस–ऐक्यता ४–१३८.
समरांगण–युद्धभूमी ६–४७५.
समर्घ–स्वस्त १८–८८१.
समर्थणें–सिद्ध करणें ९–४८३.
समर्पणे–अर्पण करणें १७–३७३.
समवाय–नित्यसंबंध ९–१०६; समष्टिरूप ९–३४४; समुदाय १८–१२९०.
समवावो–समुदाय ८–२११.
समविषम–एकसारखें एक व एकाहून एक भिन्न ८–१७०; बरेंवाईट १८–४०१.
समसमित–सरमरीत ११–४२९.
समस्त–संपूर्ण १–१७६.
समस्या–मर्यादा, अंदाज ११-९२.
समाकुळ–समस्त, सर्व ११–३१५.
समाज–गर्दी ११–१८६; दाटी, उत्कर्ष ६–४३६.
समात–मावणारा १–१३६.
समाधि–योगांतील आठ अंगापैकीं शेवटचें अंग ६–६०; गाढ झोंप १५–४९१.
समान–नाभिस्थ असून, अन्नरसाचा सर्व शरीरांत सारखा प्रसार करणारा व सर्व सांध्यांत राहणारा वायु १८–३४०; सारखें १२–२०२.
समायिणें–मावणें, व्यापणें ४–२०६.
समारंभ–आवेश १५–४८७; खटाटोप १७–४१८.
संमार्जन–सडा, शिंपण ११–५३८.
समास–दोन किंवा अधिक शब्दाचा संयोग होऊन झालेला शब्द १०–२७०.
समिधा–यज्ञांत होमाकरतां लागणारीं पवित्र काष्टें ४–१३६.
समीननिमीन–समविषम १८–८९८.
समीप–जवळ १४–८८.
समीर–प्राणवायु ८–११६.
समीरण–वारा १८–१६९८.
समुच्चय–समुदाय १३–८६०.
समुद्धर्ता–चांगला उद्धार करणारा १२–९४.
समृद्ध–संपन्न; वाढलेल्या४–१३६.
समूह–समुदाय ११–१४२.
समूळ–मुळासकट १–२५०; संपूर्ण १३–२७.
समृद्धि–विपुलता २–६८; ऐश्वर्य ६–३५४.
समो–समय, वेळ ८–१६८.
संमोह–अविवेक ७–७७.
सम्यक्–उत्तम, चांगलें ४–७३; यथार्थ १६–५१.
संयति–संयम ४–१२८-
संयम–(योगांतील पारिभाषिक शब्द) धारणाध्यानसमाधि रूप संयम ४–१२७; ८–५०; 'त्रय मेकत्रसंयमः;' पातंजल सूत्र पाद ३ सू. ४; निग्रह ४–१४७.
सरकटणें–सरसकट ग्रास करणें ११–३९३;गिरवळून जाणें १३–५६१.
सरकटित–रगडित १८–६२६.
सरड–सरडा १३–५६१.
सरणें–कार्यभाग होणें ५–११४; चालणें ५–१२०; पुरें पडणें, चालणे ९–३८०; संपणें १५–५८६; सोडून देणें, गाळणे १–८०; उरणें, राहणें १८–१२५३; किंमत असणें १८–५६२.
सरतें–मान्य १–८०; संपणारे ६–३६२; शेवटचें १८–१११३.
सरस्वती–एका नदीचें नांव११-७. विद्येची देवता १–७८.
सरळी–मोकळीक १२–११६.
सराव–अभ्यास १५–३९६.
सरिता–नदी २–६०.
सरिसे–तयार, सारखें १–१२१; बरोबर ३–१५६; पुढें बोलणें १८–१५८५; समोर १८–१५९६.
सरिसेपण–समतोलपणा २–२७२.
सरिसेंपणें–तुल्य बळानें १–१७.
सरी–योग्यता ४–१५९; एक प्रकारचा दागिना ६–२८६;बरोबरी १६–३५९.
सरोगु–रोगी ११–९०.
सरोभरी–भर १२–१८५; जोर १६–३८; सारखाच, बरोबर १६–९६; तुलना १८-१९.
सरोष–रागानें २–८८.
सर्वगत–सर्वव्यापी २–१३६.
सर्वतीर्थ–समुद्र १८–९०९.
सर्वथा–मुळींच, सर्वप्रकारें १–१९५.
सर्वभावें–कायावाचामनानें १३–७९०.

सर्वरूप–सर्वव्यापी, सर्व ( विश्व ) ज्याचें रूप आहे असा २–१५०.
सर्वस्व–सर्व धन १–१११.
सर्वज्ञ–सर्व जाणणारा ९–२.
सर्वांतर–सर्वांच्या अंतःकरणांत असणारा ९–१६६.
सर्वातीत–सर्वांच्या पलीकडचा १८–११९६.
सर्वेश्वर–परमेश्वर ३–१०४.
सर्वोपरी–सर्वांत उंच १०–२२७.
सल–शल्य, दुःख १६–१४६.
सलगी–विशेष परिचय, मैत्री ६–१३९; लडिवाळपणा १–६३.
संलग्न–मिळून, चिकटून १३–८८१.
सलंच–लाचीरवाणे १८–६४२.
सलणें–बोचणें, टोंचणें १३–७३१.
सलिल–पाणी २–१२७.
सलें–शल्यें १६–१४६.
सलेप–सदोष ११–२९१.
सवंग ( सवंघ )–स्वस्त १८–१६१०.
संवगण ( संवगणी )–काढणी १३–३८.
संवचोर–सभ्य दिसणारा चोर ३–२११.
सवडी–शेवट १०–६०; फट ११ ४१६.
सवती–प्रतिस्पर्धी १६–२३५.
संवतुकी–सारख्या वजनाचें १४–५१.
सवतें–वेगळें, दूर १३–५८२.
सवदणी ( सौंदणी )–परटाचें कपडे धुण्याचें भांडें १८–१४१.
सवर्म–मर्मयुक्त २–७१.
संवसरिसी–बरोबर चालणारी १३–९५९.
सवळें–पहाटे, प्रातःकाळीं १६–३ तात्काळ, लवकर १३–७६९ बरोबर ६–५०
सवा–बाजू ११–२५४; इच्छा ११–६४४; तात्काळ, लवकर १३–७६९; सव्वा १८–१६६१; बरोबर ६–५०.
संवादणें–बोलणें, सांगणें, १–५०.
संवादिया–संवाद करणारा १२–१६१.
संवादी–संवाद करणारा १५–४५१.
संवाहन–साह्य, सहाय्य १७–३८.
सविकार–परिणाम किंवा विकार यासह १३–१६१.
सविता–सूर्य १३–६३२.
सविवळें–विस्तारपूर्वक, खुलाशासह १५–२०९.
सविवेकमतिपाटव–आत्मानात्मविचार करण्याची बुद्धीची कुशलता ९–२४२.
सविस्तर–विस्तारा सह ९–४१०.
सवें–तात्काळ २–७२; संवय ६–३८२; १२–२२; बरोबर १–१२७.
सवेसा–स्वइच्छा ३–२६.
सव्य–उजवा ६–१९४.
सव्यसाची–अर्जुन ३–१४५.
संसरणें–सांवरणें ७–१३५; सरसावणें ११–२९६.
संसरा ( संसारा )–व्यवहार १५–७५; स्थिति १४–२८४; लाभ १८–१७५८.
संसर्ग–संबंध २–१५.
संसाटी–बरोबरी, योग्यता १८–१५०९.
संसार–विस्तार ५–५४.
संसारा–एकत्र १७–३५१; विस्तार ५–५४
संसारिक–विषय ११–३२१.
संसारिया–संसारी, प्रापंचिक १४–३३.
सांसिद्धि–वैराग्य १८–९५४.
संसृति–संसार १४–४९.
संस्था–भेद, व्यवस्था ५–२६; रचना ३–८५.
सस्य–धान्य १५–४८५.
सस्यांत–धान्य कापण्याची वेळ १४–३५२.
सहचर–सोबती १७–३३.
सहज–नित्य असणारा, स्वतःसिद्ध ९–१६३.
सहनसिद्धि–क्षमा करण्याचा स्वभाव १०–८३.
संहरणें–नाश पावणें २–१६१.
सहसा–एकदम ११–३१.
सहस्र–हजार ६–२०
सहस्रकर–सूर्य ६–२०.
सहस्रकिरण–सूर्य ९–३७९.
सहस्रधा–हजारों प्रकारांनीं २–३०४.
सहस्रशीर्ष–हजारों मस्तकें ज्याला आहेत असा ११–२६९.
सहा–सहा शास्त्रें ११–६८२.
सहाता–सहन करणारा ११–६४३.
संहारखेचरें–नाश करणारीं पिशाचें ११–३४५.
संहारणें–नाश करणें ५–८२; सांवरणें, आंवरणें ११-४६९
संहारतेज–प्रळयकाळचें तेज ११–३०२.
संहारत्रिपुरारी–संहार करणारा श्रीशंकर ११–३४३.
संहाररुद्र–प्रळयकाळचा रुद्र ११–३५१.
संहारवाहर–संसाररूपी संकट ११-४५४.
सहिष्णु–सहन करणारा १३–४६०.

सहोदर–सख्खे भावंड १०–१९२.
सळ–भंग ५–७८; छळणारा ७–१६८; द्वेष १८–६१८; उसळी १५–३०२; आग्रह, हट्ट ३–५४.
सळणें–भीति वाटणें १६–४१८; छळणें ६–४१४.
संक्षेपें–थोडक्यांत ३–१३८.
संज्ञा–खूण ( मूर्ति ) ९-३६; चिन्ह १३–७६१; नांव १८–७७२.
साइखडें–बाहुली ( लाकडांची ) ९–३०.
साइलिया–निजलेल्या १३–५७४.
साउमा–समोर १४–२८५; प्रत्यक्ष १६–६२.
साउळ–पांढरेपणा १३–७५७.
सांकड ( सांकडें )–संकट ३–२३; थोडी, संकोचित १४–१६३; कठिण १८–९२६.
सांकडणें–अडचणींत अथवा कचाटींत सांपडणें ११–३२९; संकोच पावणें ६–२१४.
सांकडी–संकट ८–१०६.
साकांक्ष–कामनायुक्त ३–९०; संशययुक्त १७–३४.
साकें–डाकलग, हिणकस ८–३८.
सांखळ–बंधन १८–६३७; सांखळा, बेडी १४–१७२.
सांख्य–ज्ञानी लोक ३–३६; विचार, ज्ञान ७–४३; षड्दर्शनापैकीं एक शास्त्र १८–२७९.
सांख्यस्थिति–ज्ञानमार्ग २–२३०.
सांग–यथास्थित, समग्र ६–४४२.
सांगड–भोपळे एकत्र बांधून नदींतून पोहून जाण्याकरतां तयार केलेलें साधन ७–८४.
सांगडें–सारखें ५–८.
सागर–समुद्र १–७२.
सागळा–झारी धरणारा शागीर्द १३–४१८.
सांगाती–स्नेही ११–५४०; वाटाड्या १६–९९.
सांगातें–सारखें १८–८७.
सांगोपांग–अंग व उपांग यांसहित, पूर्ण १७–१८२.
साग्निक–अग्निहोत्री ४–१२४.
सांघात–मिलाफ १–११८.
साच ( साचें )–खरा, समर्थ १–१२४; खरा २–१६; ब्रम्ह ५–१६०.
साचणें–प्रज्वलित होणें १५–८२.
सांचल–आवाज १३–२४५.
सांचा–ठसा ११–२०८.
साचार–खरा १४–३१; खरोखर १४–३६९.
साचारीव–खरेपणा १६–११९.
साचोकार–खरेपणा ४–९७.
साचोकारेपण–यथार्थस्वरूप ९–१३६.
सांज–संध्याकाळ ९–७३; रास १३–३९.
साजणें–मैत्री, सख्य, मित्राबरोबर बोलणें १२–६४; शोभणें १३–६०८.
सांजवणी–कांस १३–६३७; धार काढणें १८–१४८३; धार काढण्याची वेळ १८–४८१.
साजा–प्रसन्न १३–४३८; पूर्ण, भरलेला १४–३३३.
साजिरें–सुशोभित १८–८३९.
साजूक–ताजें ९–३८५.
साजेपण–टवटवीतपणा १३-१७८.
साट–वेग १८–७३४.
सांटणें–मावणें, चैन पडणें १७–१४९.
साटी–बरोबरी १३–१८९; मोबदला १०–१६९.
साटोप–अहंकारयुक्त ६–४६; उद्युक्त १८–६२३.
साटोपा–कोठार ८–१६६.
साटोवाटीं–मोबदला ६–४९४.
सांठी–तुलना ८–२६२.
साठीं–बरोबर १२–१८; कारणानें ९–४६.
सांड–कोपरा १४–२३५.
सांडणें–ओंवाळून टाकलेला बळी ८–२६०; टाकणें ४–१२९; कारणें, आक्रमणें ५–८; दुरावणें ६–४३५.
सांडस–चिमटा ९–४४.
सांडीपडणें–कोंपऱ्यांत पडणें, हार खाणें १४–२३५.
सांडी मांडी–मी टाकीन अथवा मी करीन ३–५३.
सांडीविखुरीं–सांडण्यांत लवंडण्यांत ९–३९.
सांडेपंधरें–उत्तम शंभर नंबरी सोनें १०–१५.
सांडोवा–उतारा ९–३८१.
सात–बाजार १३–३२०.
सात पांच–पंचाहत्तर १०–३०२.
सातरें ( सातरी )–सात दिवस १७–९८.
सातवांकडी–पावसाची एकसारखी सात दिवस झड १३–६४०.
सातवेडळीं–सात नोंम्यांची इंगळी १६–२५९.
साता ( साती, सातें )–बरोबर, लगेच ४–११७; पासून ४–१५४; असतां ७–४.
सात्त्विक–अष्टसात्विकभाव ९–५२३; सत्वगुणयुक्त २–२५६.
सात्विक भाव–हे आठ आहेत. ते खालील श्लोकांत दिले आहेतः स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वर भंगोऽथ वेपथुः । वैवर्ण्यमश्रु

प्रलय इत्यष्टौ सात्विकाः स्मृताः ८–५६.
साद–ध्वनि, इच्छा १०–१११; हांक १७–६२.
सांदणी–सांधणी १४–१०७.
सांदणें–सांधणें ७–१७९; जोडणें ८–४३.
सादुकणें–भडकणें १–९०.
सादुकपणा–साह्य, पेटवण ४–१३६.
साद्यंत–संपूर्ण २–३१८.
साधक–मुमुक्षु २–३०३.
साधणें–मारणें ३–२१६; ३–२५८; हस्तगत करणें ४–१६०.
सांधा–मिलाफ १३–१०६.
साधिभूत–अधिभूतासह ७–१८०.
साधु–चांगलें १७–३९६; सज्जन ३–२५१.
साध्य–तयार करावयाचें ३–३८; देवांचा एक प्रकार. हे देव १२ आहेत. ११–३३२.
साध्वस–भीति ११–३८.
साध्वी–पतिव्रता ३–२५१.
सान–लहान ७–६९; कमी प्रतीची १८–६४.
सानिव–लहान १५–३४४.
सानीव–लहानपणा १–४६.
सानुकूल–अनुकूल १–७५.
सानुराग–प्रेम १३–४५७.
सानुला–लहान १३–२४८.
सानें–लहान थोर ६–९१.
सानेजणें–लहान होणें ६–२६३.
सांपेचा–सांप्रतचा ४–३८.
सांप्रत–हल्लीं २–९७.
साबरी–कांडे निवडुंग ९–१७४.
सांबरें–( शंबर–पाणी ) सडा-संमार्जन ९–३२४.
साबळ ( संबळ )–पहार १७–१४३.
साभिलाष–आशाखोर ११-१२८.
साम–वेदांतील ऋचा १०–२८१; सामवेद १५–१६६.
सामरस्य–ऐक्यता ५–१३७.
सामाणें–समावेश होणें, मावणें १७–५९.
सामान्य–साधारण मनुष्य १३–७००; कमी योग्यतेचें, साधारण ३–१३२.
सामान्य स्त्री–वेश्या १७–२९६.
सामान्या–वेश्या १८–३५०.
सामावणें–मावेल असें करणें १८–१६९९.
सामास–सहा महिने ८–२२०.
सामीप्य–समीपता १८–१०८०
सामुग्री–ऐश्वर्य ३–१६२.
सामुद्रिक–हात पाय वगैरे अवयवांवरील रेषा व चिन्हें १३–११६७.
सामोरिया–पुढें १६–१५८.
साम्य–ऐक्यता १३–१७०; बरोबरी १३–१८४.
साम्राज्य–निष्कंटक राज्य, सार्वभौमत्व ६–३६७.
सायं–संध्याकाळ १४–३३२.
सायास–कष्ट २–२०९.
सायुज्य–चवथा मोक्ष ८–२०७.
सार–चांगलें १–२४६; गाभा १–१३८; सत्व २–१३२०.
सारखरु–विझलेला कोळसा १८–६१३.
सारंग–भुंगा १८–१६३५.
सारणें–संपवणें १५–४२; पुरें करणें १६–४६७.
सारथी–रथ हांकणारा १–१४१.
सारस–चक्रवाकपक्षी ६–१७७.
सारस्वत–विद्या ६–४५४; सरस्वतीचा मुलगा ९–८.
सारी-सोंगटी, सोंगट्याचा खेळ ११–५४८.
सारोख ( सरोख )–जोरानें १५–९८.
सार्थक–सफलता २–३५१.
सार्थकपण–सफलत्व १०–१७१.
सार्ध–निम्मा, दिड ६–१९५.
साल–सालडें, सालपट १५–१२९.
सावकाश–विस्तारासह ११–१८३.
सावज–श्वापद, मगर ९–४४१.
सावध–जागृत ६–२२५.
सावयव–मूर्तिमंत १३–२९५.
सांवरणें–आटोपणें ३–२५६;जमणें १३–११५१.
सांवरी–एक प्रकारचा वृक्ष ज्याची फळें निरुपयोगी असतात तो ९–१५५.
सावाइकें–अडचण १८–१७२४.
सावाय–सहाय्य १८–८५७; बरोबरी १८–१५९.
सावायिणें–मदत करणें १८–५८८.
सावात्रो–मदत ३–२६५.
सावियाची–सहजच, स्वभावतः४–१९७.
सावेव–मूर्तिमंत ६–२५५; सर्व १३–१०३५.
सासनणें, सासिनणें–भरास येणें १५–१४.
सासिकवच–तलवारी व चिलखतासह ११–४१०.
साहंकार–अहंकारयुक्त, अभिमानी १८–६०५.
साहणें–सहन करणें १–१८६.
साहता–सहन करणारा १६–१९१.
साहस्र–सहस्रांचा समूह १७–४१५.
साहाकार–साह्य १८–२५१.
साहान–सामुग्री १०–३०९.
साहित्य–अलंकार (भांडेतील)१–६.
साळी–भात १३–२२२.
साक्षात्कार–प्रत्यक्ष दर्शन ११–६९४.
साक्षी–द्रष्टा, पहाणारा ५–१३५.

**साक्षीभूत**–साक्षी असलेला, उदासीन ९–२८५.

**साक्षेप**–कष्ट करून १७–२४९.

**साक्षेपें**–जाणूनबुजून १८–१६५३.

**सिग**–टोंक, अग्रभाग १७–१४२.

**सिंचन**–शिंपणें १–२५.

**सिजणें**–भाजणें ७–६५.

**सिण**–शीण, श्रम १७–४२२.

**सिंतरणें**–भ्रमांत पाडणें, फसवणें १४–३४२.

**सिदणें**–दुःख पावणें १८–६४३.

**सिद्ध**–तयार असलेले ३–३८; पूर्णावस्था प्राप्त झालेला, निष्कर्म ३–४५; आयता, कृतीनें न केलेला १७–१४; उपदेवांतील एक प्रकार ११–५०६; प्रत्यक्ष १–७८.

**सिद्धप्रज्ञा**–पूर्व जन्मांत तयार झालेली या जन्मांत मिळणारी बुद्धि ६–४५४.

**सिद्धरस**–अमृत ६–२५५.

**सिद्धि**–अणिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, महिमा, ईशिता, वशित्व व कामावसायिता या आठ महा सिद्धि होत २–३१३; पूर्णता १३–१३३; प्राप्ति ३–१३३.

**सिंधु**–समुद्र ८–८४.

**सिनानपण**–वेगळेपणा, भिन्नता १५–५५२.

**सिनानें**–भिन्न, वेगळें ६–३९.

**सिनार**–वेगळेपण १८–१५८८.

**सिनें**–वेगळें १७–७०; १५–४५८.

**सिंपणें**–लिप्त होणें ४–१५१; पाणी घालणें १६–१०१.

**सियारी**–डाकीण १३–५०४.

**सिरयाणी, सिरीयाणी, सिराणी**–आवड १६–३९.

**सिरें**–शिरोभाग ८–१५४.

**सिवणी**–गुद व शिस्न यांना जोडणारी शिवण ६–१९४.

**सिसाळ ( सिसाळी )**–मस्तक १०–२५३.

**सिंहनाद**–सिंहासारखी गर्जना १–१२५.

**सिंहस्थ**–पुण्यकाळ १८–१६७५.

**सिंहाडा**–सिंह ( उग्र सिंह ) ११–३४४.

**स्निग्ध**–तुपट १५–४०९.

**सींगेचीं**–टोंकाचीं, पूर्ण आचरलेलीं ११–६११.

**सीनसाळ**–जीर्ण सालीचा १५–१४०.

**सीमा**–मर्यादा १८–३८२.

**सीस**–मस्तक, डोकें ११–४९.

**सुआरु**–स्वयंपाक करणारा १३–४२१; १७–९०.

**सुईन**–घालीन १३–४१८.

**सुकाळ**–विपुलता १५–४०५.

**सुकुलीन**–चांगल्या कुळांतला १३–१८०.

**सुकृत**–पुण्य १५–१७७.

**सुखसंभवी**–सुखाला उत्पन्न करणारी १६–६७.

**सुखागम**–सुखाची प्राप्ती १८–१६३४.

**सुखानुभूति**–सुखाचा अनुभव १६–१२.

**सुखावणें**–सुखी होणें १६–१६०.

**सुखासन**–पालखी १०–४५.

**सुखिया**–सुखी १४–१५१.

**सुखोदय**–सुखाचा उदय करणारा १४–१.

**सुगम**–सोपें १८–१०१०.

**सुगरणी**–उत्तम स्वयंपाक करणारी १३–११४९.

**सुगरवा**–थाटमाट १३–८१२.

**सुघट**–उत्तम बनलेली ७–५५.

**सुघटितें**–सुस्थिर ६–१९३.

**सुजणें ( सुज्ञणें )**–कळणें, समजणें १३–८७; १८–६३.

**सुजाण**–चांगला जाणणारा १८–१४९५.

**सुटणें**–पडणें ६–८७; मुक्त होणें; ४–८१; स्थूल होणें १३–७४६.

**सुटिका**–वर्षाव, वृष्टि ११–६८६; मोकळीक १७–२३.

**सुटी**–वृष्टी–१६–२४३.

**सुडावणी**–मुक्तता १२–५४.

**सुणा**–व्यर्थ १७–४१८.

**सुणें, सूणें**–कुत्रें ९–४३९; घालणें ३–३; १३–१२४; देणें १८–४७०; चेतवणें १३–१११; सोडणें १७–२९०.

**सुत**–मुलगा १–१५२; शिष्य १८–१८०५.

**सुतणें**–निजणें ५–४७.

**सुति**–टाकतात, मारतात १६–४०४.

**सुती**–घालतात, खुपसतात १३–१२४.

**सुतेजपणा**–पाणिदारपणा १–१८६.

**सुदणें ( सूदणें )** घालणें १–२६४; देणें २–१८४.

**सुदर्शन**–विष्णूच्या हातांतील चक्र २–७८.

**सुदंश**–मर्मज्ञ ५–१६१.

**सुदिन**–निरभ्र दिवस १३-१००९.

**सुद्रव्य**–पक्वान्न १८–६७७.

**सुधा**–अमृत–१–२९.

**सुधाकर**–चंद्र ११–२५२.

**सुधाब्धि**–अमृताचा समुद्र १–२९.

**सुधासिंधु**–अमृताचा समुद्र १५–१०.

**सुनयन**–चांगले आहेत डोळे ज्याचे असा १३–१०६७.

**सुना**–उदास, शून्य १८–१६२५.

**सुनाटें**–व्यर्थ १८–३६९.

**सुनीळ**–अत्यंत सांवळा २–७७.

